# वेदान्तप्रस्थानत्रय.

## गीताभाष्यार्थ

हा ग्रंथ शांतपणें समग्र अवलोकन केल्यावर
यांत थोडा तरी ग्राह्यांश आहे
व
त्याच्या परिशीलनानें अंशतः तरी परमार्थ साधेल
असें वाटल्यास प्रत्येक ग्राहकानें आपल्या मित्रमंडळीस
सदर ग्रंथ संग्रहीं ठेवण्याची अवश्य शिफारस करावी,
आणि पुढें प्रसिद्ध होणाऱ्या

## ब्रह्मसूत्र-शारीरभाष्यार्थ

या ग्रंथासाठीं ग्राहकांत आपलें नांव नोंदवावें,
तसेंच
छापून तयार असलेला

## दशोपनिषद्भाष्यार्थ

हा ४०७५ पृष्ठांचा पांच पुस्तकांत मजबूत बांधलेला ग्रंथ
टपाल खर्चासह वीस रुपयांस मागवून
वेदान्तप्रस्थानत्रयसंग्रह करावा.

ॐ तत्सत्

# श्रीमद्भगवद्गीताभाष्यार्थ

मूळ श्लोक, अन्वयार्थ, शांकरभाष्य, शब्दशः भाष्यार्थ

आणि

गीतारहस्यपरीक्षणात्मक विस्तृत टीपा, कोश यांसह.

लेखक

आचार्यभक्त–विष्णु वामन बापटशास्त्री.

न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते ।
तत्स्वयं योगसंसिद्धः कालेनात्मनि विन्दति ॥

गीता, ४.

पुणें शके १८४३ सन १९२१.

किंमत साडेसात रुपये.



सर विठ्ठलदास दामोदर ठाकरसी, Kt.

ॐ तत्सत्

दैवी संपद्विमोक्षाय निबन्धायासुरी मता ॥ १६-५ ॥

महात्मानस्तु मां पार्थ दैवीं प्रकृतिमाश्रिताः ।

भजन्त्यनन्यमनसो ज्ञात्वा भूतादिमव्ययम् ॥ ९-१३ ॥

मत्कर्मकृन्मत्परमो मद्भक्तः सङ्गवर्जितः ।
निर्वैरः सर्वभूतेषु यः स मामेति पाण्डव ॥ ११-५५ ॥

**श्रीमान् सर विठ्ठलदास दामोदर ठाकरसी,**

यांच्या अंगी असलेल्या स्वाभाविक दैवी संपत्तीला अनुरूप अशी

त्यांची

व

त्यांच्या धर्मपत्नी

**सकलसौभाग्यसम्पन्न प्रेमलीलाबाई ठाकरसी,**

---

यांची

श्रीमद्भगवद्गीतेवरील श्रद्धा व भक्ति प्रत्यहीं वाढत असल्यामुळे

**त्यांना**

हा ग्रंथ नित्यपठनासाठीं, अनेक शुभाशीर्वादपूर्वक

सप्रेम व सादर अर्पण करीत आहे.

ग्रंथकर्ता.

# प्रस्तावना.



**श्रीमच्छंकरभगवत्पूज्यपादांच्या** कृपालेशानें आज " **श्रीमद्भगवद्गीताभाष्यार्थ** " हा विस्तृत ग्रंथ महाराष्ट्रिय **भगवद्भक्त** वाचकांस समर्पण करण्याचा सुयोग आम्हांस प्राप्त झाला आहे. गेल्या म्ह० शके १८४२ च्या विजयादशमीला हा एवढा मोठा ग्रंथ पुढील म्ह० शके १८४३ च्या विजयादशमीला आपण प्रसिद्ध करूं, याची नुस्ती कल्पनाहि नव्हती. परंतु आचार्यांच्या अनुग्रहानें अकल्पित योग व अनुकूलता प्राप्त होऊन तो आमच्या हातून निर्विघ्नपणें पार पडला, ही खरोखर अन्तर्यामीचीच इच्छा! गीतारहस्य प्रसिद्ध झाल्यापासून असा ग्रंथ लिहिण्याचा आमचा मानस होता. पण अनुकूलतेच्या अभावीं तो ' दरिद्राणां मनोरथ 'च ठरतो कीं काय अशीहि भीति वाटत होती. तथापि केवल ' सत्यसंकल्पाचा दाता भगवान् ' याच न्यायानें तो सफल झाला, याबद्दल आम्हांला मोठी धन्यता वाटते, व ' पंगुं लंघयते गिरिं ' हा नुस्ता अर्थवाद नसून भूतार्थवाद आहे, अशीहि खात्री पटते.

दशोपनिषद्भाष्यार्थ प्रसिद्ध केल्यावर अनेक प्रतिकूल परिस्थितीमुळे आम्ही बहुतेक निरुत्साहच झालों होतों; व गीता आणि ब्रह्मसूत्र यांवरील शांकरभाष्याचा भाष्यार्थ करावा असे आमच्या मनांतहि येत नव्हते. शिवाय कै० भाऊशास्त्री लेले यानी, गीता व शारीरभाष्य यांचें भाषांतर केले होते. महामहोपाध्याय वासुदेवशास्त्री अभ्यंकर, यांनीं केलेले व बडोदासरकारनें प्रसिद्ध केलेलें ब्रह्मसूत्रभाष्याचे सुंदर व सुबोध भाषांतरहि वाचकवर्गाला उपलब्ध होतें. प्रो. चि. गं. भानु, यांनींहि गीतेवरील शांकरभाष्याचें भाषांतर प्रसिद्ध केलें होतें. अर्थात् या दोन्हीं ग्रंथाचीं दोन दोन भाषांतरें अगोदरच झालेलीं असल्यामुळें आपण आणखी त्यांचे तिसरे भाषांतर करावे, असें आमच्या मनांतहि नव्हतें. आजवर दशोपनिषद्भाष्याचें भाषांतर कोणाकडून पूर्ण झालें नव्हते, तें आमच्या हातून झाले, एवढया आचार्यसेवेंतच आम्ही आपल्याला कृतार्थ समजत होतों, व छान्दोग्यभाष्यार्थाच्या प्रस्तावनेंत आरंभींच आम्हीं या गोष्टीचा थोडक्यात उल्लेखहि केला आहे. पण आमच्या हातून ही सेवा पुरी करून घेण्याचा त्या सर्वैश्वर्यसंपन्न आचार्यांचीच इच्छा दिसते. त्यांच्याच अचिंत्य योजनेनें सर **विठ्ठलदास ठाकरसी** या सुप्रसिद्ध गृहस्थांचा व आमचा शके १८४० च्या ज्येष्ठ कृष्णपक्षांत म्ह० छान्दोग्यभाष्यार्थ प्रसिद्ध झाल्यावर दोन-चार दिवसांनींच अनपेक्षित परिचय श्रीमद्भगवद्गीतेमुळेंच झाला व तो सुमारें तीन महिने श्रीमद्गीतेच्या अध्ययन-अध्यापनानें दृढ झाला. आज प्रस्तुत ग्रंथ सुमारें दहा हजार रुपये खर्च करून इतक्या उत्तम रीतीनें प्रसिद्ध करितां आला हें त्या परिचयाचेच फल आहे. इतकेंच नव्हे तर याच पद्धतीनें [ म्हणजे प्रथम भाष्य निराळें देऊन पुनः भाष्यार्थात प्रत्येक वाक्य घेऊन त्याचा सरळ व सुबोध अर्थ करणे व प्रत्येक प्याऱ्याचे शेवटीं त्याचा अगदी सरळ व सुबोध भावार्थ सांगणें, या

पद्धतीनें ] समग्र ब्रह्मसूत्रशारीरभाष्यार्थहि दोन वर्षांच्या आंत प्रसिद्ध करण्याचा आमचा मानस आहे. सर **विठ्ठलदास ठाकरसी**, हे पुणे (एरवडा) मुक्कामीं बन्डगार्डनच्या समोर –जी उंच टेकडी आहे तिच्यावर एक सुंदर ' पर्णकुटी ' बांधीत आहेत. त्या एकान्त व शांत स्थानीं बसून सर्व जगांतील सर्वोत्तम ज्ञानाचा साठा, असें जें ब्रह्मसूत्रशारीरभाष्य त्याचा भाष्यार्थ वर सांगितल्याप्रमाणे आम्ही लिहिणार आहों. दशोपनिषदे, श्रीगीता व ब्रह्मसूत्र या प्रस्थानत्रयावर एकट्या श्रीशंकराचार्यांचेंच भाष्य आहे. त्यावर एकट्या आनन्दज्ञानांचीच ( आनन्दगिरीचीच ) टीका आहे. त्याचप्रमाणें तात्त्विक महाराष्ट्र-वाङ्मयांत आमच्या प्रस्थानत्रयभाष्यार्थाची भर पडल्यास मराठींत आम्हीं आनन्दज्ञानाचेंच कार्य केलें आहे, असें निःपक्षपात तज्ज्ञ तरी खचित मानतील. शिवाय असले ग्रंथ लिहीत असताना मनाला जे सुसंस्कार होत असतात व ज्या एकाग्रतेचा व तज्जन्य शान्तीचा अनुभव येतो तो तर अवर्णनीयच होय. असो;

मराठींत गीतेवरील शांकरभाष्याची दोन भाषांतरें प्रसिद्ध झालेली आहेत, हें आम्हीं वर सांगितलेच आहे. ती पुष्कळ वाचकानीं संग्रही ठेविलीं असतील व वाचलीहि असतील. तथापि आमच्या या भाष्यार्थांत त्या दोन्हीहून निराळीच अपूर्वता आहे. अगोदर तीं भाषांतरें गीतारहस्याच्या पूर्वी प्रसिद्ध झालेलीं आहेत, त्यामुळे गीतारहस्यांतील सूक्तासूक्ताचा विचार करून, त्यांत रहस्यकारानीं संन्यासमार्गीय टीकाकारांचे नाव पुढे करून आचार्यभाष्यावर जे दोष दिले आहेत त्याचे निरसन व भाष्याचे समर्थन करण्याचें सौभाग्य त्या भाषांतरकाराना लाधले नव्हते. आम्हाला या भाष्यार्थांत रहस्याचें सविस्तर परीक्षण करून त्यांतील उक्तानुक्तदुरुक्ताचा विचार करून आचार्यभाष्याचे समर्थन करण्याचा सुयोग आला आहे. त्या दोन्ही भाषातरांत अगदी अल्पसंस्कृतज्ञाला भाष्य सहज समजेल, अशी योजना केलेली नाहीं. पण आम्हीं गीतेसारख्या अप्रतिम ग्रंथाचा यथार्थ अर्थ वाचकाना भाष्यार्थावरून सहज कळावा, अशी योजना केली आहे. त्यामुळे मूळ श्लोक व भाष्य या दोहोंचीहि द्विरुक्ति झाली असून ग्रंथाचीं सुमारें ३०० पाने वाढली, व त्या मानाने जवळ जवळ दोन हजार रुपये खर्चहि अधिक झाला. तथापि लोकोपयोगाच्या दृष्टीनें आम्हांला त्याबद्दल मुळीच चिंता वाटत नाही. विद्यार्थ्यानें घर बसल्या गीताभाष्याचा अभ्यास करावा, अशी आमची इच्छा असून ती या ग्रंथानें पूर्ण होईल, त्याबद्दल आम्हांला मुळीच शंका वाटत नाहीं.

शिवाय गीतारहस्यकारांनी सर्वसांप्रदायिकाना दोष देऊन गीतेला कर्मयोगशास्त्र बनविण्याचा जो अपूर्व प्रयत्न केलेला आहे, त्यात ग्राह्यांश किती आहे व त्याज्य अंश किती आहे, याचा विचार अवश्य व्हावयास पाहिजे होता. गीतारहस्य प्रसिद्ध होऊन ( शके १८३७ ) सहा वर्षे झालीं. त्यावर आजपर्यंत पुष्कळानी विरुद्ध टीका केली आहे. आम्हींहि केली आहे. तथापि त्या टीकाकारांतील अग्रपूजेचा मान आम्हांला आहे. गीतारहस्य प्रसिद्ध होण्यापूर्वीच शके १८३६ साली रहस्यकारांनीं येथील गायकवाडवाड्यांतील गणपतीपुढे जीं चार प्रवचनें केलीं तीं ऐकूनच आम्ही पांचव्या दिवशीं जाहीर

व्याख्यानांत त्याच जागीं व त्यांच्याच अध्यक्षतेखालीं गीतारहस्यावर आक्षेप घेतले, हें प्रसिद्ध आहे. आम्हा आमच्या व्याख्यानाचा सारांश आचार्यांतून त्याचवेळीं प्रसिद्ध केला असून 'शांकरभाष्यानुसार गीतारहस्य ' या नांवानें तोच लेख पुढे पुस्तकरूपानेंहि प्रसिद्ध केला, हे सर्वांना माहितच आहे. पुढें १८३७ सालीं रहस्य प्रसिद्ध झालें. त्यावरहि आम्ही 'गीता अथवा सांख्य योगशास्त्र ' या नांवाखाली अनेक लेख लिहिले आहेत. पण पुढे येथील भयंकर प्लेग, त्यामुळे आम्हांवर ओढवलेलीं संकटे, आचार्य बंद पडणे, इत्यादि विविध कारणानीं तो प्रयत्न तसाच अपूर्ण राहून गेला सुमारें दोन वर्षांपूर्वी आम्ही पुनः गीतेचें व्याख्यान लिहिण्यास सुरवात केली, त्यांत मूळ श्लोक, अन्वय, अर्थ, सारांश, व त्या सारांशांत भाष्यसमर्थन करण्यास आरंभ केला होता. पण तें पुस्तक येथील मे. गणेश विष्णु चिपळुणकर आणि मंडळीचे मालक रा. बा. पां. ठकार यांनी धार संस्थानचे अधिपति सर **उदाजीराव पवार** यांना अर्पण करण्यासाठी घेतलें; अर्थात्च तें त्यांच्यासाठीं ल्याहावयाचे असल्यामुळें त्यांतहि आम्हांला रहस्याचे साक्षात् परीक्षण करितां आलें नाही. शिवाय रहस्यकारांचें म्हणणें आम्हीं आमच्या शब्दांनीं खोडून काढण्यापेक्षां आचार्यांच्या शब्दांनीच ते खोडून काढणें, अधिक परिणामकारक होईल, कारण **आचार्य** काय म्हणतात, तेंच पुष्कळांना माहीत नसतें. यास्तव आचार्यांचें भाष्यच शब्दशः जनतेपुढें ठेवून मग रहस्यकार त्याविषयीं काय म्हणतात व तें अनुपपन्न कसे व कां आहे, हें दाखविणे अधिक सोयीचे होईल, असे वाटल्यामुळे आम्हीं गेल्या मार्गशीर्षांत म्ह० चिपळुणकर मंडळींच्या प्रेरणेनें धार संस्थानाधिपतीसाठीं ' बालबोधिनी ' गीता लिहून झाल्यावर लागलेंच हे काम हातीं घेतलें. पण **आचार्यपाक्षिक** सुरू असतांनाच तें जोराने चालवितां येणें शक्य नाही, असे दिसतांच, आम्ही पाक्षिक बंद ठेवलें. शंभर फार्मांत म्ह० ८०० पानांत हे काम आवरेल, असे आम्हांला प्रथम वाटलें होते व त्याप्रमाणें ते आषाढात पूर्ण होईल असे आम्हीं प्रसिद्ध केले. पण पुढे तें १२५,१५० व आतां जवळ जवळ १७० फार्मांपर्यंत वाढलें आहे. त्यामुळे अर्थात्च अंदाजापेक्षां काल व खर्च हीं दोन्हीं वाढली. इतके वाढलेले पुस्तक प्रसिद्ध होण्यास तीन-चार महिने अधिक लागणे अपरिहार्यच होते, हे कोणाच्याहि लक्षांत येईल. खर्च जरी जवळ जवळ दुप्पट वाढला आहे तरी आम्हीं किमत पूर्वीच्या अंदाजापेक्षा फक्त दीडपटच वाढविली असून आचार्यांचे ग्राहक व आगाऊ नांवें नोंदविणारे यांस ट. ख. सह फक्त सहाच रुपयास पुस्तक देत आहों. यावरून हें पुस्तक आम्हीं अगदीं मूळ किमतीला देत आहों हें कोणाच्याहि लक्षांत येईल. पुस्तकाचे सुमारे फार्म १७० आहेत. प्रत्येक फार्मला छपाई व कागद मिळून ४५ रु. प्रमाणें ७६५० रु. खर्च आला. १५०० रु. बाइंडिंग.=९१५०. ४ चित्रांचा व इतर किरकोळ खर्च त्यांत मिळविल्यास एकंदर बरोबर १०००० खर्च होऊन ग्लेज पण पातळ ३६ रतली कागदाच्या प्रती १५०० व उत्तम जाड ४८ रतली कागदाच्या ५००, मिळून दोन हजार प्रती तयार झाल्या. म्हणजे ५ रुपयाला आम्हांला

घरांत प्रत पडली. यांत आमची मेहनत वगैरे कांही नाहीं. ट. ख. प्रत्येक प्रतीला १-१। रु. लागणार. अर्थात् पातळ प्रतीची किमत ट. खर्चासह ७॥ व जाड प्रतीची किमत ट. ख. सह १० ठेवून यांत आम्ही केवढा स्वार्थत्याग केला आहे तें सुज्ञाच्या सहज लक्षांत येईल आगाऊ प्रसिद्ध करून गेल्यामुळे आगाऊ वर्गणीदाराना व आचार्य ग्राहकांना आम्ही ६ व ८ रु.सच प्रत जी देत आहों ती प्रत्यक्ष नुकसान करून देत आहो, हेंहि लक्षात येईल. आम्हीं निःस्वार्थबुद्धीनें-केवल आचार्यांची अहैतुकी सेवा याच भावनेने हे काम केले आहे, यांतहि देणगीच्या रूपाने वगैरे जो थोडा फार फायदा होईल त्याचाहि पण ब्रह्म- सूत्रशारीरभाष्याकडे विनियोग करणार आहो. ब्रह्मसूत्रशांकरभाष्यहि तीन भागात छापून अशाच अल्प म्ह० मूळ किमतीस देण्याचा आमचा विचार आहे. आम्ही हे काम गेल्या दहा महिन्यात दुसऱ्या कोणाचेंहि साह्य न घेता केले आहे. नाही म्हण- ण्यास आमच्या एक सुशिक्षित भगिनी श्री. लक्ष्मीबाई प्रधान, या विदुषीने निःस्वार्थ- बुद्धीने लेखी प्रत लिहिणे, शेवटपर्यंत ग्रंथशुद्धि करणे, कोश तयार करणे, इत्यादि बाबतींत आमच्या बरोबरीने आठ आठ दहादहा तास सारखे बसून नेटाने काम केले, या एका व्यक्तीवांचून संपादनाच्या कामी या ग्रंथाला दुसऱ्या कोणाचाहि हात लागलेला नाही, यावरूनच आम्ही हें मोठे कार्य किती अनन्य चित्ताने, निग्रहाने व एकनिष्ठने केले असेल याची कल्पना कोणालाहि येईल. पण **जगत् गुणग्राही नाहीं**, ते **पक्षपाती** आहे; यांत केवल रहस्याचे परीक्षण केले आहे, याच एका अपराधाबद्दल बरीचशी जनता याच्याकडे दोषदृष्टीनें पाहील. पुष्कळ **विद्वान्हि** याची **असूयाच** करतील, हे आह्मी जाणून आहो. कारण रहस्याच्या अनुकूल बोलणे सोपे आहे व ते दृष्टफल देणारेंहि आहे. पण त्याच्या उलट बोलणे तितके सोपेंहि नाही व दृष्ट अनुकूल फल देणारेहि नाही. किंबहुना तसे करणे ह्मणजे जनतेच्या अनादरास व निंदेस पात्र होणेच आहे. तथापि आह्मी **आचार्यांच्या** अबाधित सिद्धान्ताकरिता रहस्यकाराविरुद्ध लेखणी उचलली आहे व ' सत्यमेव जयति नानृतं सत्येन पन्था विततो देवयानः ' ( मुं. भा. पृ. ९९ ) या श्रुतिवचनावर आमचा पूर्ण विश्वास आहे. त्यासाठी किंवा अबाधित अद्वैत सिद्धान्तासाठी आह्मी लौकिक दृष्टफल, लोकाचा अनादर किंवा निंदा यांची फारशी चिंताच करीत नाही. सामान्य लोकांनीं किंवा पक्षपाती जनतेने आमच्या या कृतीचें कौतुक करावें, अशी आमची अपेक्षा नाही. **आचार्यांवर** आमची पूर्ण- निष्ठा आहे व **सर्वज्ञ** ईश्वराच्या गुणग्राहकतेविषयीं आमच्या मनात मुळींच संशय नाहीं. वर्तमानकालच्या जनतेनें आमच्या कृतीचा जरी कदाचित् तिरस्कार केला तरी त्या कृतींत जर तसाच कांहीं स्थिरांश असेल तर भावी जनता तिचा आदर करील ! तिच्यामध्यें कांहीं सत्य-स्थिरांश नसेल तर ती आज आमच्या समक्ष जगांतून नाहींशी झाली तरी त्याबद्दल आम्हांला मुळीच खेद वाटणार नाहीं. शिवाय या वर्तमानसमयींहि सर्वच जनता पक्षपाती आहे, असे नाही. या वेळींहि कांही **सत्यप्रेमी** जन हयात आहे- तच. याविषयीं आमच्याच अवस्थेंतील एका प्राचीन कवीचे उद्गार येथे मुद्दाम नमूद करून ठेवण्यासारखे आहेत. कविश्रेष्ठ भवभूति म्हणतो-" ये नाम केचिदिह नः प्रथय-

न्त्यवज्ञां जानन्ति ते किमपि तान्प्रति नैष यत्नः । उत्पत्स्यतेऽस्ति मम कोऽपि समानधर्मा कालो ह्ययं निरवधिः विपुला च पृथ्वी ॥ " म्ह० " जे कांहीं लोक केवल पक्षपाताने आमची अवज्ञा करितात–आमचा तिरस्कार करितात ते कांहीं तरी जाणतात. [ ते अनिर्वचनीय ब्रह्माला जाणतात म्हणून त्यांना आमच्या या कृतीचें कौतुक वाटत नाहीं किंवा त्यांचे ज्ञानच तितकें, अगदीं अल्प. ] अर्थात् त्यांच्यासाठीं माझा हा यत्न नाही. माझ्याच स्वभावाचा कोणी एखादा तरी मानव या जगांत यावेळीं हयात असेल ! कदाचित् या वेळी तो नसला तर पुढे उत्पन्न होईल, व तो माझ्या या कृतीचें कौतुक करील ! ! कारण हा काल अमर्याद आहे व पृथ्वीहि विस्तीर्ण आहे ! " आम्हीहि आमच्या या कृतीबद्दल अक्षरशः तेच म्हणतों.

सामान्य जनता पक्षपाती असेल तर त्यांत कांही आश्चर्य नाहीं. कारण जगत् प्रायः ' परप्रत्ययनेयबुद्धि ' असते. म्हणूनच भगवानांनीं पुढें ' अन्ये त्वेवमजानन्तः श्रुत्वान्येभ्य उपासते । तेऽपि चातितरन्त्येव मृत्युं श्रुतिपरायणाः ' अ. १३ श्लो. २५ पृ. ९६५ असे म्हटले आहे. पण बहुतेक नेते–लोकनायकहि पक्षपाती आहेत. केवल पक्षपातीच नव्हेत तर पक्षाभिमानानें अन्यायहि करणारे आहेत. याविषयीं येथें एकच ताजे उदाहरण देतों—कै. लोकमान्य टिळकांच्या प्रथम श्राद्धतिथीच्या प्रसंगाने, या वेळी महाराष्ट्रांतील जनतेच्या अत्यंत आदरास व विश्वासास पात्र झालेल्या ' केसरी ' नांवाच्या वर्तमानपत्रांत ' कर्मयोग कीं कर्मसंन्यास ' या नांवाची एक लेखमाला सुरू केली. त्यांत रहस्याचे कसे तरी समर्थन व आचार्यांच्या भाष्यांतील दोष दाखविण्याचा अवास्तव प्रयत्न करण्यास आरंभ केला. आम्ही पहिलाच लेख पाहून केसरीच्या संपादकास पत्र लिहून "या विषयाची दुसरी बाजू म्हणून माझा लेख आपण केसरींत घेतां का ? " असा प्रश्न केला त्याला त्यांनी " आम्ही आपला लेख प्रसिद्ध करात नाहीं " असे साफ लखी उत्तर पाठविलें. अशा अत्यंत पक्षपाती व अन्यायी आधुनिक विद्वानांकडून आम्ही आमच्या कृतीच्या, मेहनतीच्या, किंवा गुणाच्या गौरवाची काय अपेक्षा करावयाची आहे ? व अशा मर्त्यांच्या गौरवानें आम्हाला पारमार्थिक लाभ तरी काय होणार ! तात्पर्य आम्ही हा जो एवढा यत्न केला आहे व पुढेहि करणार आहों तो केवल ईशसेवा, केवल आचार्यसेवा, केवल स्वाध्याय, व गीतेतच सांगितल्याप्रमाणें ( अ. १८ श्लो. ६९ पृ. ७० ) केवल ज्ञानयज्ञ व केवल संप्रदायप्रवृत्ति यांसाठी आहे. याचें आम्हांला ऐहिक फल कांहीं नको.

रहस्यकार म्ह० कै० **लोकमान्य टिळक** हे व्यावहारिक दृष्ट्या फार मोठे पुरुष होऊन गेले, याबद्दल कोणाचाच वाद नाही. त्यांचें भाग्य थोर व पुण्यप्रभावहि अवर्णनीय ! लोकांच्या इतक्या आदराला व विश्वासाला पात्र झालेला पुरुष कित्येक शतकांत निपजला नाही ! राजकारणाला ऊर्फ मुत्सद्देगिरीला अवश्य असलेले सर्व गुण त्यांच्यामध्यें होते. अगदीं लहानपणापासून आम्हांलाहि त्यांच्याविषयीं अतिशय आदर वाटत असे. केसरीचे संपादक या दृष्टीनें आम्हांला ते अत्यंत पूज्य झाले होते व गीतारहस्य हा

ग्रंथ लिहून, त्यांत सर्व सांप्रदायिकांना व विशेषतः अद्वैतवादी शंकराचार्यादि संन्यासमार्गीयांना वृथा दोष देऊन कर्मयोगाचे कसें तरी समर्थन करण्याचा त्यांनीं जो अयोग्य प्रयत्न केला आहे, तो जर केला नसता तर इतरांप्रमाणें आमचाहि त्यांविषयींचा आदर कायम राहिला असता. पण त्यांनीं आपला जो 'जन्मसिद्ध' विषय नव्हे त्यांत प्रवेश करून, ज्याचें समर्थन करितां येणे शक्य नाहीं, असा अगदी निराधार सिद्धान्त प्रतिपादन करण्याचा वृथा यत्न केल्यामुळें ते आम्हांप्रमाणे दुसऱ्याहि पुष्कळांच्या अप्रीतीला पात्र झाले, ही मोठी खेदाची गोष्ट आहे. लोकमान्यांचें आधिकारिक-स्वभावजन्य कार्य-राजकारण होतें. म्ह० त्यांचा जन्म त्यासाठीं झाला होता. गीतेसारख्या पारमार्थिक ग्रंथाचें आलोडन करून त्याला 'कर्मयोगशास्त्र' बनविण्यासाठी त्यांचा जन्म नव्हता. 'गीतेंतील प्रतिपाद्य विषय प्रवृत्तिपर आहे, हें मत कायम होऊन व तें लिहून काढण्याचें ठरूनहि बरींच वर्षें झालीं' असें जरी त्यांनीं प्रस्तावनेत ( ६ ) म्हटलें आहे तरी त्यांना सहा वर्षें मंडाल्यास स्वस्थ बसण्याचा प्रसंग जर आला नसता तर कदाचित् 'गीतारहस्य' हा ग्रंथ लिहिण्यास त्यांना अवकाश मिळता की नाही, याची शंका आहे ! म्हणूनच आम्ही म्हणतों की कांहीं काम नाहीं म्हणून फावल्या वेळीं केलेले हें त्यांचें कार्य आहे. **आचार्यां**ची गोष्ट याहून अगदीं निराळी आहे. त्यांचा जन्मच वैदिक संप्रदाय व अद्वैत मार्ग यांची प्रस्थापना करण्यासाठीं होता. त्यांनी आपल्या आयुष्यांत दुसरें काही केलेंच नाही. ब्रह्ममीमांसा, दशोपनिषदें व गीता यांवर भाष्य लिहून, तें शिष्यांना पढवून व वाद्यांना वादांत जिकून वैदिक संप्रदायी बनविण्यासाठी त्याचें शरीरग्रहण होतें. रहस्यकारांच्या म्हणण्याप्रमाणेच त्यांना आज जवळ जवळ १३०० वर्षे होऊन गेलीं. तथापि त्यांनीं स्थापिलेला अद्वैत संप्रदाय अविच्छिन्न चालू आहे. त्याच्या मागून अद्वैतविरोधी विशिष्टाद्वैतादि कांहीं मते रामानुजादिकांनीं प्रचलित केली, पण त्यामुळें अद्वैत संप्रदाय लुप्त झाला नाहीं. किंबहुना त्याचा उत्तरोत्तर अधिक सूक्ष्म विचारच होत गेला. श्रीशंकराचार्यांच्या प्रस्थानत्रयभाष्याचा मात्र प्राचीन शास्त्रीय वाङ्मयावर असा परिणाम झाला कीं ते लुप्तच झालें! आचार्यांच्या भाष्यानें इतर सर्व शास्त्रें वेदान्तादि शास्त्रावरील इतर विस्तृत ग्रंथांसह, गतार्थ झाल्यामुळें त्यांचें अध्ययनच कोणी करीनासे झाले; त्यामुळें ते ग्रंथ व तीं शास्त्रें जेथल्या तेथें जीर्ण होऊन गेलीं. फक्त पद, वाक्य व प्रमाण यांचें प्रतिपादन करणारीं व्याकरण, मीमांसा व न्याय हींच वेदान्तोपकारक शास्त्रें आचार्यांच्या मागें टिकलीं व बाकीचीं सर्व लुप्त झालीं. सांख्य व योग हीं दर्शनें सुद्धां जवळ जवळ लुप्तप्राय झालीं. हल्लीं सांख्य व योग या दर्शनावरील अगदींच मोजके ग्रंथ उपलब्ध होतात व तेहि अद्वैत संप्रदायी लोकांच्या कृपेमुळेंच होत. कारण सांख्यकारिकांवर भामतीकार वाचस्पतिमिश्रांनीं तत्त्वकौमुदी टीका लिहिली व गौडपादांनीं भाष्य लिहिलें आणि त्याला जिवंत ठेवलें; योगदर्शनावर व्यास, भोज, वाचस्पतिमिश्र यांनीं भाष्य-टीका वगैरे लिहून त्याचें रक्षण केलें, हें प्रसिद्ध आहे. हें सर्व येथें सांगण्याचें कारण इतकेंच कीं, आचार्यांचा जन्म वेदान्त शास्त्राला ऊर्फ औपनिषद दर्शनाला पूर्णावस्थेस पोचवून त्याचा आबालवृद्ध स्त्रीपुरुषांत प्रचार करण्यासाठी असून

त्यांनीं तेंच एक आपलें जन्मकार्य उत्तम प्रकारें बजावलें व त्यांच्या शिष्यांनीहि पुढें तेंच केलें. अलीकडे महाराष्ट्रांत श्रीज्ञानेश्वरमहाराजांपासून जो एक भागवतसंप्रदाय सुरू झाला असून संतांच्या अपूर्व व समर्थवाणीनें सर्व बालगोपालांना तल्लीन करून सोडीत आहे तोहि आचार्यांच्या अद्वैतसंप्रदायाला सोडून नाहीं. ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकोबाराय यांच्या वाणीकडे पाहिले असतां वैदिक संप्रदायान्तर्गत गीतेंत कर्म, संन्यास, ध्यान, उपासना इत्यादि जे अनेक उपाय सांगितले आहेत त्यांतील प्रेमलक्षणाभक्तीला अतिशय प्राधान्य देऊनच हा अद्वैती वैष्णव भागवत संप्रदाय त्यांनीं सर्व पामरांवर अनुग्रह करण्यासाठीं निर्माण केला आहे, याबद्दल कोणाचीहि खात्री होईल. **आचार्य** भक्तिमार्गाच्या विरुद्ध आहेत, ज्ञानमार्ग निराळा व भक्तिमार्ग निराळा, इत्यादि ज्या कांहीं लोकांच्या समजुती आहेत व रहस्यकारांनींहि ज्यांचा पुरस्कार केला आहे त्या खोट्या आहेत, हें आचार्यांच्या भाष्यावरून दाखविता येण्यासारखे आहे. त्याचप्रमाणें स्मार्त व वैष्णव हा भेद आचार्यांच्या मनात नव्हता, उलट ते वारंवार ‘ विष्णु व वैष्णव ’ या नांवांचाच आपल्या ग्रन्थांत उल्लेख करीत असतात, हेहि दाखवितां येण्यासारखें आहे. वाचकाना गीताभाष्य वाचतांना या गोष्टीचा प्रत्यय येईल. असो; तात्पर्य, आचार्यांचें भाष्य वैदिकसंप्रदायाला यत्किंचित्‌हि सोडून नाहीं. श्रुति, स्मृति व न्याय यांना सोडून नाही. स्मार्त-वैष्णव इत्यादि राग द्वेषप्रधान भावनांनीं लिहिलेलें नाहीं. वेदान्ताला भक्तीचें वावडें नाहीं. स्वतः आचार्य परमभक्त होते. त्यांनीं कर्म, उपासना, ज्ञान यांतील कशाचाहि द्वेष केलेला नाहीं, किंवा त्यांतील कोणाचेंहि फाजिल स्तोम माजविलेलें नाहीं. औपनिषददर्शनाचें समर्थन करून संसारी जीवांना मोक्षमार्ग दाखविण्याचे सर्वोपकारक कार्य त्यानीं केले व त्यासाठींच वेदबाह्य सांख्य-वैशेषिक-बौद्ध-जैनादिकांचें सविस्तर खंडन केलें आहे. या सर्व गुणांमुळेच आचार्यांच्या पूर्वीचे सर्व ग्रन्थ लुप्त झाले. रहस्यकारांनाहि आचार्यांच्या कृतीचें हें लोकोत्तरत्व कबूल आहे. ( गी. र. पृ. ११ पहा. ) तथापि ते आचार्यांवरहि सांप्रदायिक आग्रह, ओढाताण वगैरे दोषांचा आरोप करण्यास तयारच आहेत, हें आश्चर्य होय. असो;

तथापि रहस्यकारानीं फावल्या वेळीं ‘ गीतारहस्य ’ हा ग्रन्थ लिहिला, त्यांत गीता हे ज्ञानमूलक भक्तिप्रधान कर्मयोगशास्त्र आहे, असें पूर्वीच त्यांच्या ठाम झालेल्या समजुतीप्रमाणें ठरविलें. ते ठरवितांना आचार्यांपासून ज्ञानेश्वरांपर्यंत सर्वसांप्रदायिकांची दृष्टि सदोष ठरवून त्यांच्या छापेंतून आपली ‘सुटका’ करून घेऊन त्यांच्या ‘मतांतील अपुरेपणा सकारण ’ दाखविण्याचें महत्कार्य त्यांनीं केलें. तथापि “ अद्यापहि हा ग्रंथ ( गीतारहस्य ) सर्वांशीं पूर्ण झाला आहे ” ( प्रस्ता. पृ. ६-७ ) असें त्यांना म्हणतां येत नाहीं. पण स्वतःचा “वृद्धापकाल झाल्यामुळें आपले विचार लोकांस कळवून ठेवावे, म्हणजे कोणी तरी ‘ समानधर्मा ’ सध्यां अगर पुढें निघून ते पुरे करील, ” या आशेनें त्यांनीं हा ग्रन्थ प्रसिद्ध केला आहे. अर्थात् गीतारहस्यकार सांप्रदायिकांच्या मतांतील अपुरेपणा दाखविण्यास जरी प्रवृत्त झाले आहेत, तरी त्यांचे विचार पूर्णावस्थेस पोंचलेले नाहींत, असें त्यांचें त्यांनाच वाटतें, हें त्यांतल्या त्यांत लक्षांत ठेव-

ण्यासारखें आहे. कोणाचेहि स्वतंत्र विचार असेच अपुरे राहणार हें निर्विवाद आहे. कारण कितीहि झालें तरी, ते तर्कच ! तर्क केव्हांहि अप्रतिष्ठितच–अस्थिर–डळमळितच राहणार, हें उघड आहे. पण आचार्यांना स्वतःचें असें कांहीच सांगावयाचे नसल्यामुळें त्यांना अशी प्रस्तावना करण्याचें कांहीं कारणच पडले नाहीं. श्रुति स्मृति-न्याय व शेवटीं स्वानुभव या खंबीर पायावर श्रुत्यर्थाचे समर्थन करून अश्रुत्यर्थाचे निरसन करण्याचेंच तेवढे काम आचार्यांनीं केल्यामुळें त्यांची बाजू अशी डळमळित राहिलेली नाही. म्हणूनच आचार्यांचे प्रस्तानत्रयभाष्य हे वेदान्तशास्त्र बनले. अद्वैत वेदान्तशास्त्रावरील सर्वप्रकरणग्रन्थाना आचार्यांचें भाष्य हा आधार होऊन बसला आहे, भाष्याचे हे लोकोत्तरत्वहि लक्षांत ठेवण्यासारखे आहे. या सर्व विस्ताराचा साराश एवढाच कीं, रहस्यकार जो आपला प्रधान विषय नव्हे त्यांत विनाकारण पडले व आचार्यांनी ज्यासाठी जन्म घेतला तेंच नियत कार्य केले. त्यामुळें रहस्य आक्षेपास योग्य व भाष्य समर्थनास पात्र झाले आहे.

आम्ही भाष्याचे समर्थन व गीतारहस्याचे परीक्षण करण्यास जरी याप्रमाणें प्रवृत्त झालो आहों, तरी रहस्यकाराची लौकिक विषयात बरोबरी करण्याची आमची इच्छा नाही. रहस्यकारांकडे एक ‘ लोकमान्य ’ व्यक्ति या दृष्टीनें आम्ही या वेळी पहात नाहीं, तर ‘ गीतारहस्यकार ’ या दृष्टीने पहात आहों व तें ‘ एक शास्त्र ’ या दृष्टीनें त्याचें आम्हीं परीक्षण केले आहे, ‘ लोकमान्यांचा ग्रंथ ’ म्हणून त्याच्याशी विरोध केलेला नाहीं. त्यानीं गीतारहस्यात आचार्यादिकांवर सांप्रदायिक आग्रही वगैरे दोष देऊन त्यांच्या अर्थातील दोष दाखविण्याचा वृथा यत्न केला नसता, तर आम्हाला भाष्याचे समर्थन करून रहस्याचे परीक्षण करण्याचेंहि कारण नव्हते. त्यानी भाष्याला धक्का देऊन माझेच म्हणणे खरे व संन्यासमार्गी टीकाकारांचें खोटे, असे स्पष्ट म्हणण्याचे धाष्टर्य केल्यामुळेच त्यांचे गीतारहस्य अद्वैतसंप्रदायी लोकांच्या परीक्षणास पात्र झालें आहे. आजपर्यंतचा इतिहास असाच आहे. आचार्यांचें म्हणणें खोडून काढण्याचा प्रयत्न जेव्हा जेव्हा झाला तेव्हां तेव्हां त्याचें परीक्षण अद्वैत सांप्रदायिकांकडून झालेले आहे, व त्याच दृष्टीनें आमचे कर्तव्य म्हणून आम्ही हा ग्रंथ लिहिला आहे. लोकमान्यांसारख्या लोकप्रसिद्ध पुरुषानें **आचार्यांवर** लेखणी चालविल्यामुळें तिला अतिशय महत्त्व आले व नुस्त्या विद्वत्तेच्या दृष्टीनें जरी पाहिले तरी ज्यांची योग्यता सूर्यापुढे काजवा, इतकीच ठरणार, अशा लोकांनाहि आचार्यांविरुद्ध लेखणी चालविण्यास व जीभ उचलण्यास सवड मिळाली. लो. **टिळक** या एका व्यक्तीवांचून दुसऱ्या कोणीहि जरी **गीतारहस्य** हा ग्रंथ लिहिला असता तरी जनतेकडून त्याची उपेक्षाच केली गेली असती. किंबहुना स्वतः केसरीकारहि त्यावर तुटून पडले असते. पण तो ग्रंथ लोकमान्यांचा असल्यामुळे केसरीतहि आचार्यांविरुद्ध लेख येतात व आचार्यांच्या कृपेनेंच–त्यांच्या ज्ञानलेशावर आपलें दुरोदर भरणारे हरदास व पुराणिकहि रहस्याची ‘ री ’ ओढून ‘ ज्ञानापेक्षां कर्मच श्रेष्ठ ’ असें निःशंकपणें कीर्तनांत व पुराणांत बोलतात. कांहीं जाडे शास्त्रीहि गीता-

रहस्याला बेधडक ' ग्रंथराज ' म्हणूं लागले आहेत. हा केवल कालमहिमा आहे. हीच स्थिति कायम राहील असें मुळींच नाहीं. सत्य असेल तेच टिकेल, व असत्य निश्चयानें लय पावेल, अशी आमच्या मनाची पक्की खात्री आहे व त्यासाठींच आम्ही गीतारहस्यपरीक्षण करण्यास तयार झालो आहों.

इतिहासाची पुनरावृत्ति होत असते. लो. टिळक हो गौतमबुद्धाचीच अल्पप्रमाणात पुनरावृत्ति आहे, असें एकंदर परिस्थितीकडे पाहून आम्हांला वारंवार वाटते. गौतमबुद्धाचें तत्त्वज्ञान किती योग्यतेचे होते तें आतां आमच्या वाचकांना अवगत झालेच आहे. पण त्याच्या लोकमान्यतेमुळे अनेक विद्वान् ब्राह्मण पंडितहि त्याचे अनुयायी झाले व अलौकिक भाग्यामुळे दशावतारात त्याची गणना होऊं लागली आणि हाडें, दात, केस इत्यादिकांवर देवळें बांधली गेलीं ! ! त्याच न्यायानें आमचे लोकमान्यहि अवतार बनून पुराणात प्रविष्ट झाले, किंवा त्यांची देवळें बांधली गेलीं, अथवा ते आचार्य ठरले, व त्याच्या जयंत्या होऊन कीर्तनांतून आख्याने गायलीं जाऊं लागली, तर त्यांत अनिष्ट किंवा अशक्य असे काहीच नसून आम्हा महाराष्ट्रियाना तर ते एक भूषणच आहे. कारण हा विभूतिमत्तेचा व भाग्याचा विलास आहे. पण शारीरकमीमांसेत सुगत बुद्धाच्या मताचें परीक्षण केल्यावर शेवटीं आचार्यांनी "यथा यथा अयं वैनाशिकसमयः उपपत्तिमत्त्वाय परीक्ष्यते तथा तथा सिकताकूपवद्विदीर्यत एव " असें ' सर्वथानुपपत्तेश्च " अ. २ पा. २ सू. ३२ या सूत्रावरील भाष्यात जसें म्हटले आहे तसेंच गीतारहस्याचे परीक्षण केल्यावर मोठ्या कष्टाने म्हणण्याचा प्रसंग येतो. गीतारहस्यांत शास्त्रदृष्ट्या व तात्त्विक विचाराच्या दृष्टीनेंहि किती स्खलन झाले आहे तें आम्हीं पुढे परीक्षणात पदोपदी दाखविलेच आहे, त्यावरून निःपक्षपात वाचकांची याविषयीं खात्री होईल.

याप्रमाणे रहस्यकार लौकिकदृष्ट्या कितीहि जरी मोठे असले तरी त्यांनीं गीतारहस्यात अद्वैतवेदान्तशास्त्रावर संन्यासमार्गाचे नाव पुढे करून दिलेले दोष व आचार्यांच्या भाष्याशी केलेला विरोध उपेक्षा करण्यास योग्य नव्हते, म्हणूनच आम्ही लौकिकदृष्ट्या त्यांची बरोबरी करण्यास केव्हाहि तयार नसलो तरी सत्य व वेदान्तशास्त्र यांच्या बलावर त्याच्या रहस्याचे परीक्षण केले आहे. गीतेचा अर्थ विशद होण्यास व आचार्यांच्या भाष्याची खरी योग्यता कळण्यास या परीक्षणाचा फार उपयोग होईल. आमच्या कृतींतहि कांही दोष नसतीलच असे आमचें म्हणणे नाही; व कोणी निःपक्षपातबुद्धीनें ते आम्हांला दाखविल्यास व आमची खात्री करून दिल्यास ते आम्ही परतहि घेऊं. पण केवल आम्ही गीतारहस्याच्या विरुद्ध लिहीत आहों एवढ्याचसाठीं राग-द्वेषानें ज्यांना

---

१ या बौद्धाच्या सिद्धान्तात थोडीबहुत तरी उपपत्ति असेल म्हणून त्याचें जों जों अधिक परीक्षण करूं लागावे तों तो तो सिद्धान्त वाळूच्या विहिरीप्रमाणें अधिक-अधिकच ढासळत जातो.

आम्हांवर तुटून पडावयाचें असेल त्यांच्याकडे आम्ही लक्षहि देणार नाहीं. पण शास्त्रार्थाच्या शुद्धीसाठीं ज्यांना चर्चा करावयाची असेल, त्यांच्याशीं मोकळया मनानें ती करावयास आम्ही केव्हांहि तयार आहों. वस्तुतः आमचें हें परीक्षण रहस्यकार जिवंत असतांना प्रसिद्ध व्हावयास पाहिजे होतें, असे आम्हांलाहि वाटतें, व त्यांचें आयुष्य कमी झालें याबद्दल आम्हांला फार वाईट वाटतें; पण त्यासाठीं आम्हीं आपलें कर्तव्यहि करूं नये, असे होत नाहीं. गीतारहस्यासारखा शास्त्रीय विषय केव्हांहि शिळा होत नाहीं. त्याचा व्यक्तीशीं कांहीं संबंध नसतो. व्यक्तीचें आयुष्य जरी अल्प असलें तरी चांगल्या ग्रंथांचें आयुष्य ग्रंथकारापेक्षा अधिक असतें. म्हणूनच रहस्यकाराना तरी **आचार्यांच्या** अद्वैतसंप्रदायावर व भाष्यावर सुमारे दीड हजार वर्षांनीं तुटून पडता आलें. 'शंकराचार्य हयात असतांना तुम्ही त्यांच्यावर हे दोष द्यावयास पाहिजे होते, आतां त्याच्या भाष्याविरुद्ध बोलून काय उपयोग?' असें जर कोणी म्हटले तर तें जितकें सयुक्तिक होईल तितकेंच 'रहस्यकार हयात असतांना तुम्ही हें परीक्षण केले असतेंत तर त्याचा उपयोग झाला असता, आता त्यांच्या पश्चात् त्यांच्या ग्रंथावर टीका करण्यांत काय अर्थ आहे?' असें कोणी आम्हाला म्हटल्यास तेंहि सयुक्तिक ठरेल! आम्ही त्यांचे समकालीन असल्यामुळे त्यांच्या रहस्याशी भाष्यकारांच्या वतीनें पहिल्या दिवसापासूनच विरोध करीत आहों. पण कदाचित् आम्हीं जरी विरोध केला नसता व रहस्य शें-दोनशें वर्षे वेदान्त शास्त्रीय वाङ्मयांत टिकले असतें तर भविष्यत्कालींहि कोणीं आचार्यभक्तानें त्याचे परीक्षण केले नसतें असें थोडेंच आहे. अर्थात् 'लोकमान्यांच्यामागें त्यांच्या रहस्याचें परीक्षण करण्यांत काय पुरुषार्थ आहे?' असा जो कांहीं अदूरदृष्टि लोकांचा आक्षेप ऐकूं येतो तो व्यर्थ आहे. आचार्यांचें भाष्य भाष्यार्थासह जनतेपुढें ठेवून गीतारहस्यासारख्या फार मोठ्या ग्रंथाचें पांक्त परीक्षण सूर्य-जयद्रथन्यायानें करावयाचें, हें कांहीं सोपें काम नाहीं आणि एखाद्यानें तें कठिण कामहि जरी केलें तरी पुनः हजारो रुपये खर्चून तें छापून प्रसिद्ध करावयाचें कोणी? कै. लेलेशास्त्री व प्रो. भानु यांनीं जेव्हां गीतेचें भाषांतर प्रसिद्ध केलें तेव्हां कागदासह ज्या फार्मला १२ रुपये पडत होते त्यालाच आज आम्हांला ४५ रुपये पडले! म्हणूनच आम्ही पुनः म्हणतों की, हें कार्य आम्हीं केलें नसून आचार्यांनीं आम्हाकडून करविलें आहे व रहस्याच्या मागून सहाच वर्षांनीं व खुद्द रहस्यकारांच्या पश्चात् एकाच वर्षानें तें प्रसिद्ध व्हावें, ही सुद्धां सामान्य गोष्ट नव्हे. असो;

गीतेसारखा अलौकिक ग्रंथ नाहीं. त्याचा खरा अर्थ समजून घेऊन त्याप्रमाणें आपापल्या अधिकाराप्रमाणें नित्य-नैमित्तिक कर्म, ध्यान, उपासना, ज्ञान, इत्यादिकांचा अवलंब करणें, यासारखें मनुष्याचें श्रेष्ठ कर्तव्य नाहीं व तें कर्तव्य बजाविल्यास कोणाचेंहि ऐहिक व पारमार्थिक कल्याण झाल्यावांचून राहणार नाहीं, अशी आमची दृढ समजूत असल्यामुळें आम्हीं हा सर्वोपकारक ग्रंथ, आमच्या अनुकूलतेप्रमाणें, सर्वांगसुंदर करण्याची शिकस्त केली आहे, हें ग्रंथाचें अन्तरंग-बहिरंग पाहिल्यावर कोणाचीहि खात्री

झाल्यावांचून राहणार नाहीं. तो सर्व वाचकांना अल्प मोबदल्यांत मिळावा, म्हणून आम्हीं त्याची किंमतहि अगदीं अल्प ठेवली आहे. त्यांत आह्मांला फायदा तर नाहींच, पण स्वतःच्या अविश्रांत श्रमाचाहि मोबदला आकारलेला नाहीं. कारण ही आमची निष्काम आचार्यसेवा आहे. यांत चार सुंदर चित्रें योग्य स्थानी घातलीं आहेत. त्यांत अगदीं आरंभीं आमचे आश्रयदाते—**सर विठ्ठलदास ठाकरसी**—यांचा फोटो आहे. हा ग्रंथ केवल या सद्गृहस्थांच्या व त्यांना सर्वथा अनुरूप अशा, त्यांच्या पत्नींच्या प्रोत्साहनानेंच आम्हांला प्रसिद्ध करितां आला. गीतारहस्यपरीक्षणाशीं त्यांचा कांहीं संबंध नाहीं. कारण त्यांना त्याचें फारसें महत्त्वहि वाटत नाहीं. पण गीताग्रंथावर त्यांची अतिशय श्रद्धा असून ती उत्तरोत्तर वाढत आहे. अशा स्थितींत त्यांना गीताभ्यासाला या ग्रंथाचें साह्य व्हावे म्हणून आम्हीं हा त्यांनाच अर्पण केला आहे. उपोद्घात भाष्याच्या आरंभीं येथील सुप्रसिद्ध चित्रकार **रा. सदाशिवराव पिंपळखरे** यांनी आचार्योत्सवासाठीं तयार करून दिलेल्या चित्राचा फोटो घातला आहे. भगवानाच्या उपदेशाला जेथें आरंभ झाला तेथें शरीररथाचें चित्र घातलें आहे. हें रथाचें चित्र काठकोपनिषदांतील 'आत्मानं रथिनं विद्धि शरीरं रथं एव तु॰' या मंत्राच्या आधारानें काढविलेले आहे. गीता हें अध्यात्मशास्त्र शोकमोहमहासागरांत निमग्न झालेल्या अर्जुनरूपी जीवाच्या उद्धारासाठीं अन्तर्यामी ईश्वरानें उपदेशिले आहे, हें या चित्रावरून वाचकांच्या ध्यानांत येईल. या चित्राची कल्पना बरोबर मनात आणतांच गीतेचें प्रतिपाद्य काय आहे, हें वाचकाच्या लक्षांत येईल. शरीर हा रथ, भोक्ता जीव हा रथी, पाच ज्ञानेंद्रियें हे त्या शरीररथाला जोडलेले पांच घोडे, त्यांची शब्दादि विषयाकडे गति, मन हा त्यांचा लगाम व बुद्धि हा सारथि, अशी या रथाची मूळ मंत्रात कल्पना आहे, त्यांत आम्हीं अर्जुनाचा सारथि व गीताशास्त्रोपदेशक या दोन्ही दृष्टींनी श्रीकृष्णाची कल्पना यावी म्हणून बुद्धीच्या जागीं बुद्धिसाक्षी असा प्रसंगाला अनुसरून फरक केला आहे. या रथाच्या रूपकावरूनच गीता 'अर्जुन' या एका व्यक्तीकरितां सांगितलेली नाहीं, ती त्यानें केवल युद्धाला प्रवृत्त व्हावें, म्हणून सांगितलेली नाही, ते लौकिक नीतिशास्त्र नव्हे व तें कर्मयोगशास्त्रहि नव्हे, हें कोणाच्याहि सहज लक्षांत येईल. भाष्यकारांनी भाष्याच्या आरंभीं 'नारायणः परोऽव्यक्तात्' या श्लोकानें मंगलाचरण केले आहे व पुढे उपोद्घात लिहिला आहे. त्यावरूनहि हीच कल्पना सिद्ध होते. नर म्ह॰ चराचर शरीरें, नारा म्ह॰ त्यांतील जीव व नारा+अयन = नारायण म्ह॰ जीवांचा नियामक, असा नारायणशब्दाचा तात्त्विक अर्थ आहे. [ गी. भा. पृ. १ पहा. ] नारायण अन्तर्यामी ईश्वर असल्यामुळेंच—'माझे व तुझे अनेक जन्म होऊन गेले आहेत; पण ते सर्व मी जाणतों व तूं जाणत नाहींस. (गी. भा. ४.५ ३६८पृ.) मी सर्वांची उत्पत्ति व प्रलय आहें, माझ्यापासून सर्व प्रवृत्त होते–' इत्यादि पुढील सर्व वर्णन सुसंबद्ध होते. चवथें चित्र चतुर्भुज श्रीकृष्णाचे असून तें ११ व्या अध्यायांतील अर्जुनाच्या प्रार्थनेवरून श्रीकृष्णांनीं दाखविलेलें चतुर्भुज सौम्य रूप आहे. हीं शेवटचीं दोन्ही चित्रें दक्षिण हैदराबाद येथील रा. रा. **पुरुषोत्तम श्रीपाद**

काळे, या चित्रकारांकडून आम्हीं मुद्दाम काढविली आहेत. आमच्या सूचनेप्रमाणें त्यांनीं हें चित्रांचें काम फारच थोड्या अवधींत पण उत्तम प्रकारें करून दिल्याबद्दल आम्ही त्यांचें आभारी आहों. या दोन्ही चित्रांवरून त्यांचें आपल्या कलेंतील कौशल्य तज्ज्ञांच्या सहज लक्षांत येण्यासारखें आहे.

इंदिरा छापखान्याचे मालक व आमचे चिरपरिचित मित्र रा. त्र्यंबक हरि आवटे यांनीं पांच प्रकारचा नवीन टाईप आणवून, आमच्या कामाकडे स्वतंत्र चागलीं काम करणारीं माणसें कायम करून व करेक्शन वगैरे इतर बाबतीतहि शक्य तितकी काळजी घेऊन गीताभाष्यार्थाचें काम आपल्या कारखान्यांत व्हावें याच एका धार्मिक बुद्धीनें फायद्याकडे फारसें लक्ष न देतां फारच जलदीनें काढून दिले, याबद्दल त्यांचे आम्हीं मनापासून आभार मानितों. पुण्यातील दुसऱ्या कोणत्याहि छापखान्यांत इतक्या स्वातंत्र्यानें आम्हांला काम काढतां आलें नसतें.

या ग्रंथाच्या शुद्धीसाठीं आम्ही अतिशय काळजी घेतली असल्यामुळे त्यांत फारसे दोष राहिलेले नाहींत; तथापि आमच्या अनवधानामुळें किंवा प्रिंटरच्या प्रमादामुळे व छापतां छापता मशीनवर होणाऱ्या कांहीं घोंटाळयामुळें काना–मात्रा–अनुस्वार वगैरेच्या कांहीं चुका झाल्या असतील, पण त्या वाचतांना सहज लक्षात येण्याजोग्या असल्यामुळें आम्हीं स्वतंत्र शुद्धिपत्र जोडलेले नाहीं. तथापि फारच महत्त्वाच्या चुकांची यादी पुढें जोडली आहे. तीवरून ग्रंथ शुद्ध करून वाचावा, गीतेंतील कांहीं शब्द वादग्रस्त असून ज्या एकाच शब्दाचे प्रसंगोपात्त भिन्न भिन्न अर्थ होतात त्याचा एक कोश या ग्रंथाला जोडला आहे. भाष्यकारांनीं कोणत्या श्लोकांत कोणत्या शब्दाचा काय अर्थ केला आहे, हें एकदम समजण्यास त्याचा पुष्कळ उपयोग होईल. आम्हीं या ग्रंथांत रहस्यकारांनी मूळ गीतेचा जो अर्थ केला आहे व त्यावर टीपा दिल्या आहेत, त्याचेंच मुख्यतः परीक्षण केलें आहे. कारण आम्हांला त्याच्या पूर्वीच्या पाल्हाळिक रहस्यापेक्षां शब्दार्थ व त्याचें समर्थन यांचेंच अधिक महत्त्व वाटतें तथापि आम्हीं रहस्याकडेहि अगदींच दुर्लक्ष केलेलें नाहीं, हें आमच्या टीपा वाचूनें कोणाच्याहि लक्षात येईल. आम्हीं त्यांच्या म्हणण्याचा विपर्यास केला आहे, असें कोणाला म्हणता येऊं नये म्हणून आम्हीं त्यांच्या ग्रंथांतील जसेच्या तसेच उतारे घेतले आहेत.

रहस्यकारांनी रहस्यांत ज्या ज्या संस्कृत प्रमाण ग्रंथांचा उल्लेख केला आहे ते सर्व मूळ ग्रंथ पाहूनच आह्मीं हें परीक्षण लिहिलें आहे. त्यांनी प्रस्तावनेंत आपला गीतेशीं त्रेचाळीस वर्षांचा परिचय असल्याचें सांगितलें आहे. आह्मांला कोणत्याहि बाबतींत त्यांची बरोबरी करावयाची नाही, हें आह्मीं वर सांगितलेंच आहे. तथापि आमचेहि या ग्रंथावर थोडे-फार परिश्रम झाले आहेत. आमच्या वयाच्या तेविसाव्या वर्षापासून ( आज आह्मांला ५१ वें वर्ष आहे ) प्रथम ज्ञानेश्वरीवरून व पुढें भाष्यावरून आह्मीं गीताभ्यास केला. कै. भाऊशास्त्री लेल्यांच्या गीताभाष्याच्या पहिल्या भाषांतराचीं बरीचशीं प्रुफें आह्मीं तपासलीं आहेत. वीस वर्षांपूर्वी मुंबईचे पुरंदरे आणि कंपनी

यांना सार्थ गीता लिहून दिली. पुढे हैदराबाद सिंध येथे दहा वर्षांत जवळ जवळ ५०० विद्यार्थ्यांना गीता शिकविली. त्यांत पुष्कळसे अल्पवयस्क विद्यार्थीच जरी असले तरी कांहीं डॉक्टर, बी. ए, एम्. ए. थिऑसफिस्ट व नानकपंथी साधु-उदासी वगैरे प्रौढ विद्यार्थीहि होते. मिस् लिलियन् एडगर या थिऑसफीस्ट बाईशीं तर डॉक्टर ' बूलचंद परशराम ' या नांवाच्या एका गृहस्थांमार्फत ' मनुष्याचा आत्मा पशु-पक्षी-स्थावर वगैरे होत नाही. शंकराचार्यसुद्धां आत्मा प्रत्यक्ष पशुपक्षी वगैरे होत नाही, तर त्यांच्या शरीरांत त्याचा आत्मा कोटेनन्ट ह्म० त्या जीवाबरोबर राहणारा आहे, असें ह्मणतात' या मुद्यावर चर्चा होऊन बाईना शंकराचार्य तसें ह्मणत नाहीत, ही गोष्ट कबूल करावयास लाविल्याचें हैदराबाद येथील पुष्कळ वृद्धांना माहित आहे. हा वाद गीतेंतील 'तानहं द्विषतः क्रूरान्०' या श्लोकावरून उत्पन्न झाला होता. मि. दयाराम गिडुमल हे जेव्हां जेव्हां सुटींत हैदराबादेस येत त्या त्या वेळीं रोज सायंकाळी त्यांच्याशीं आमची गीता व उपनिषदे या विषयांवर नेहमी चर्चा होत असे. इकडे आल्यावरहि प्रवचनादिकांच्या द्वारा आमचा गीताभ्यास चालूच आहे. श्रीमन्महाराज-सर **उदाजीराव पवार** यांसाठीं लिहिलेल्या बालबोधिनीचा उल्लेख वर आलाच आहे व यापुढेंहि अखेरपर्यंत असाच गीताभ्यास चालावयाचा आहे. हे सर्व सविस्तर सांगण्याचें कारण इतकेंच कीं आमचाहि गीतेशी थोडा-फार परिचय आहे.

आमच्या प्राचीन पद्धतीप्रमाणें शास्त्रीय ग्रंथ लिहूनच ग्रंथकाराचें काम पुरें होत नाही, तर तो ग्रंथ शिष्यांना पढवून त्याचा संप्रदायहि चालू करावा लागतो. ज्या वेळीं हल्लींच्यासारखीं वर्तमानपत्रे वगैरे नव्हती त्या वेळीं ग्रंथाच्या प्रसाराचा तोच एक मार्ग असे. त्यामुळे पूर्वीं ग्रंथ लिहिणें व त्याचा प्रसार करणे हीं दोन्ही मोठ्या दगदगीचीं कामे असत किंबहुना ग्रंथ लिहिण्यापेक्षां त्याचा प्रसार करणेंच अतिशय कठिण होतें. शिवाय भाष्यासारखे मोठमोठे ग्रंथ हातानें लिहून काढावे लागत असत प्रत्येक विद्यार्थ्यानें ग्रंथ लिहून काढावयाचा ह्मणजे ती तर एक मोठीच तपश्चर्या घडत असे. पण त्यामुळे एक मोठा फायदा होता. जो शास्त्रदृष्ट्या निर्दोष व लोकोपयोगी ग्रंथ असेल तोच लोकादरास पात्र होऊन, टिकत असे व गबाळग्रंथ सर्वभक्षक कालाच्या उदरांत केव्हांच गडप होऊन जात. अर्थात् चांगले ग्रंथ तेवढेच अध्ययन अध्यापनाच्या द्वारा शेकडों वर्षे टिकत! वेद, स्मृति, व्याकरणादि शास्त्रें, आचार्यादिकांचीं भाष्यें वगैरे आज शेकडों वर्षे जीं टिकली आहेत तीं त्यांच्या अंगच्या गुणामुळें टिकली आहेत; पण अशा लोकोत्तर गुणाच्या अभावीं कित्येक ग्रंथ विलय पावले असतील! आचार्यांच्या प्रस्थानत्रय भाष्यामुळे प्राचीन भाष्ये, वृत्त्या, टीका, व विवरणें यांचा अभाव झाल्याचें आम्हीं वर दाखविलेंच आहे. या एका दृष्टीनें जरी पाहिले तरी आचार्यांच्या भाष्याची योग्यता कोणाच्याहि लक्षांत येईल हल्लीं मुद्रणकलेमुळें ग्रंथलेखन, प्रकाशन व त्यांचा प्रसार हीं तिन्हीं कामें अगदीं सोपीं झालीं आहेत. तथापि सोपेपणामुळें ग्रंथांचें महत्त्व मात्र अगदी कमी झाले. हवा तो लेखक बनतो, हवें तें लिहितो, व वर्तमानपत्रांतील जाहि-

रातीवरून त्याचा प्रसारहि होतो. पण असल्या झटपट सृष्टीचें आयुष्यहि तितकेंच असतें. तथापि त्यामुळें अगदीं हलक्या प्रतीच्या वाङ्मयाचा मात्र बेसुमार प्रसार होऊन सात्विक ग्रंथांना कोणी विचारीत नाहींत आणि एकप्रकारें तेंहि बरोबरच आहे. कारण विचारपूर्वक तत्त्वाभ्यास करणे हें सामान्य बहिर्मुख लोकांचें कामच नव्हे. असो; ही इतकी प्रस्तावना करण्याचें कारण असे कीं, केवल असले ग्रंथ लिहून ते प्रसिद्ध केल्यानेंच आमचें त्याविषयींचें कर्तव्य संपलें, असें आम्ही समजत नाहीं, तर त्यांचें अध्यापन करून अध्ययनपरंपरा चालू करणें हेंहि आमचें त्याहिपेक्षां अधिक महत्त्वाचें कर्तव्य आहे, व त्यासाठीं ठिकठिकाणीं हिंडून भाष्यार्थप्रवचन-अध्यापनाच्या द्वारा त्याचा प्रचार करण्याचाहि आमचा उद्देश आहे, कारण प्राचीन आचार्यांनीं हेच केलें आहे व ज्ञानयज्ञाइतके पवित्र कर्तव्य दुसरें कोणतेंच नाहीं, इतकेच नव्हे तर महाराष्ट्रांतील एखाद्या पवित्र स्थळीं आचार्यांच्या प्रस्थानत्रय भाष्याच्या अध्ययनाची कायमची सोय करावी असाहि आमचा संकल्प आहे; पण तो सफल करणे सर्वस्वी आचार्यांच्या कृपेवर अवलंबून असून आम्ही केवल निमित्तमात्र आहों. असो; याप्रमाणे प्रस्तुत ग्रंथ यथामति लिहून आम्ही जनतेपुढें ठेवीत आहोंत. त्याचा उपयोग प्रत्येकाने आपापल्या अधिकाराप्रमाणें करावा.

आम्ही गीतारहस्याचें जें परीक्षण केले आहे तें शास्त्रीय दृष्टया शास्त्रशुद्धीसाठीं केलें आहे, हें वर सांगितलेंच आहे. तथापि गीतारहस्यकारांचे जनतेवर जे उपकार झाले आहेत ते केव्हांहि नाकबूल करितां येणार नाहीत. आधुनिक सुशिक्षित प्रजा प्रायः गीतेसारख्या ग्रंथांपासून पराङ्गमुख झालेली होती. त्यांतील बऱ्याचशा लोकांचे लक्ष थिऑसफीने गीतेकडे लाविले, तथापि थिऑसफीचें कार्य सात्त्विक कोटींतलेंच असल्यामुळें तितकें परिणामकारक झालें नाहीं. पण रहस्यकारांचे सर्वच कार्य झणझणित असल्यामुळें त्यांच्या गीतारहस्यानें सर्वांचेच डोळे गीतेकडे लाविले, फार काय पण आमच्यासारख्या गीतारहस्याचा सिद्धान्त चुकला आहे, असें प्रामाणिकपणें समजणारानांहि गीतारहस्यासाठीं शांकरभाष्याचें सूक्ष्म व सूक्ष्मतर निरीक्षण करावे लागले, त्यामुळें भाष्याची अनेक परायणें करूनहि त्याचें जे महत्त्व यापूर्वी आम्हाला कळलें नव्हतें ते या **गीतारहस्याच्या कृपेनें कळलें**, हें प्रांजलपणे कबूल करण्यास आम्हांला कोणत्याहि प्रकारचा कमीपणा वाटत नाहीं. तसेंच, अगदीच विपरीत दृष्टीनें गीतेकडे पाहिल्यामुळे ठिकठिकाणी रहस्यकारांचा अर्थ व विवेचन जरी सदोष झालें आहे, व अशीं बहुतेक स्थळें आम्हीं पुढें दाखविलींच आहेत, तरी त्यांचा बहुश्रुतपणा, अनेक ग्रंथांचें आलोडन, व आपल्या पक्षाचें समर्थन करण्याची शैली विलक्षण असून त्यांचा प्रत्येक मुद्दा खोडून काढतांना विचारच करावा लागतो. त्यांची कडक-झोंबणारी भाषा वाचून मनांत संताप तर येतो, पण त्याला तितकेंच जोरदार उत्तर कसें द्यावें, हें मात्र एकदम सुचत नाहीं. आम्हीं आपल्या परीक्षणांत होतां होईतों कडक भाषा वापरलेली नाहीं व शक्य तितक्या सयुक्तिकपणेच त्यांचें म्हणणे खोडून काढण्याचा यत्न केला आहे. हें पुढील परीक्षण वाचून कोणच्याहि ध्यानांत येईल, तथापि कांहीं ठिकाणीं आमचीहि वृत्ति

क्षुब्ध झालेली आढळून येईल, नाही असें नाहीं; पण त्याचेंहि कारण रहस्यकारांनीं संन्यासमार्गीयांच्या विरुद्ध वापरलेली कडक भाषा व आमचे भाष्यावरील उत्कट प्रेम यांवाचून दुसरें कांहीं नाहीं. क्वचित् रहस्यकारांच्या विरुद्ध लिहिलेला मजकूर वाचून ज्यांचीं मनें दुखवतील त्या रहस्यभक्तांनीं रहस्यांतील संन्यासमार्गी टीकाकारांवरील वृथा हल्ले वाचून आचार्यभक्तांची मनें कशीं दुखवली गेलीं असतील, याचें अनुमान करावें !

आमच्या मते सर्व सांप्रदायिकांच्या विरुद्ध रहस्यकारांनीं–१गीता हें स्वतंत्र कर्मयोग-शास्त्र आहे,२ केवल अर्जुनाकडून युद्ध करविण्यासाठी तिची प्रवृत्ति झाली आहे,३ आत्म-ज्ञानानंतर प्रत्येक ज्ञानी पुरुषानें जगांतील व्यवहार कसा करावा, या प्रश्नाचा निर्णय करण्यासाठीं गीता आहे, ४ गीतेंतील निष्काम कर्मयोग ही प्रवृत्ति आहे, ५ कर्मयोग हे ज्ञान-निष्ठेचे साधन नसून स्वतंत्र मोक्षमार्ग आहे, ६ कर्म म्ह० खाणें, पिणें वगैरे सर्व हालचाल, योग म्ह० कर्मयोग, ७ ज्ञान व कर्म यांचा समुच्चय, ८ धर्म म्ह० पतकरलेला धंदा, ९ कर्मयोगाच्या सिद्धीसाठीं ज्ञान व भक्ति, १० गीतेत सांख्य व वेदान्त यांची जोड घातली आहे, पण योग मात्र गीतेंत नाहीं—इत्यादि सर्वथा असमर्थनीय पक्ष जर स्वी-कारले नसते, तर त्यांचें रहस्य निर्दोष व त्यामुळेच बहुतेक सर्वांच्या आदरास पात्र झाले असते. 'तूं कर्मच कर' 'स्वधर्म सोडूं नको' असे अर्जुनाला सांगितले नाहीं, असें कोणीच सांप्रदायिक म्हणत नाहींत. अर्जुनाला 'तूं कर्मत्यागरूप संन्यास कर' असें संन्यासमार्गी भाष्य-टीकाकारहि म्हणत नाहींत ( गी. भा. अ. २ श्लोक ४७. पृ. १७१ अ. ४ श्लोक १५ पृ. ३८५ पहा. ) तूं चित्तशुद्धीसाठीं अगोदर आपलीं विहित नित्य-नैमित्तिक कर्में ईश्वरार्पणबुद्धीनें कर, असेंच आचार्यादि सर्व टीकाकार म्हणतात. ( गी. भा. पृ. ९, २६३–२६५; ३०७–३०८; ३८५; ४९६. ५७२, वगैरे ) ते वैदिक संप्र-दायाला अगदीं धरून आहे. म्हणून त्या बाबतींत इतर सांप्रदायिकांचाहि मतभेद नाहीं. ( पृ. २६६ पहा. ) एकटे रहस्यकार मात्र संप्रदायाला सोडल्यामुळें त्या सर्वांच्या विरुद्ध कर्मयोग ज्ञानयोगाचें साधन नव्हे, तो स्वतंत्र मोक्षमार्ग आहे, असें समजतात. त्यामुळें त्यांचें रहस्य अग्राह्य झालें आहे. त्यांनीं सर्व टीकाकारांच्या व विशेषतः श्री-शंकराचार्यांच्या विरुद्ध जाण्याचें धार्ष्ट्य न करितां आचार्यांच्या भाष्याला अनुसरून–गीता हें शास्त्र अर्जुनाच्या मिषानें इतर संसारी जीवांचा शोक-मोह-सागरांतून उद्धार करण्यासाठीं सांगितलें आहे, त्यांत प्रवृत्तिलक्षण व निवृत्तिलक्षण असा दोन्ही प्रकारचा धर्म दोन प्रकारच्या अधिकाऱ्यांसाठीं सांगितला आहे, त्यांतील अर्जुन किंवा इतर अज्ञ जीव कर्माधिकारी असल्यामुळें त्यांना चित्तशुद्धीसाठीं योगस्थ होऊन, फलाशा सोडून –ईश्वरार्पण बुद्धीनें, कर्तृत्वाभिमान टाकून स्वधर्मरूप कर्में करण्याचा उपदेश केला आहे, फलाशात्याग, कर्में ईश्वरार्पण करणें, अहंकारत्याग हे सर्व गौण त्याग-संन्यासच होत, अर्थात् अर्जुनाला सांगितलेलें निष्काम कर्म हाहि गौण संन्यास–निवृत्तिमार्गच आहे, प्रवृत्तिमार्ग नव्हे, प्रवृत्तिमार्ग संसाराला कारण होतो, निवृत्तिमार्ग संसाराची निवृत्ति करतो, अर्जुनाला निष्काम कर्मानुष्ठान परंपरेनें मोक्षासाठीं सांगितलें आहे, त्यानें किंवा

दुसऱ्या कोणीं संसारांत पडावें म्हणून नव्हे, त्यामुळें गीतेंतील कर्मयोग हा प्रत्यक्ष प्रवृत्ति धर्म नव्हे, गीतेंतील कर्म व योग त्या शब्दांचा अर्थ प्रकरणानुसार निरनिराळा केला पाहिजे, कर्म म्ह० खाणे, पिणें, वगैरे सर्व हालचाल व योग म्ह० कर्मयोग असाच अर्थ सर्वत्र करितां येत नाही, गीता हे स्वतंत्र शास्त्र नसून उपनिषदानुसारी वेदान्त शास्त्र आहे, वगैरे वैदिक संप्रदायानुसार रहस्यकारांनीहि जर विचार केला असता तर गीतारहस्य सर्वांच्या आदरास खचित पात्र झाले असतें. पण त्यांनी भलत्याच दृष्टीने गीतेकडे पाहिल्यामुळे गीतारहस्य आक्षेपार्ह झाले आहे. तथापि त्यांच्या कृतीचा पूर्ण फायदा घेऊन पुढील मार्गाचे आक्रमण करणे, हे आमचें आतां प्राप्तकालकर्तव्य आहे, त्यांनीं आपल्या ग्रंथाने महाराष्ट्र जनतेचे लक्ष गीतेकडे आकर्षण करून घेतलें आहे. आतां प्रत्येक गीताभक्ताला त्यांतील उक्तानुक्तदुरुक्ताची चर्चा करावयास लावून गीतेचा यथार्थ बोध होईल, असे करणें हे पुढील लोकांचे व पुढील पिढीचें कार्य आहे. आम्ही गीतारहस्याचे जे परीक्षण केले आहे, ते याच दृष्टीने केले आहे. त्यावरून भाष्याचे निर्दोषत्व व सर्वथा ग्राह्यत्व वाचकांच्या लक्षांत येईल, व तेवढे कार्य घडून मतमतान्तराच्या भानगडीत न पडतां जनता भाष्यानुसार गीताभ्यास करूं लागली म्हणजे आम्ही कृतकार्य होऊं.

रहस्यकारांनीं रहस्याचे दोन मोठे विभाग केले आहेत. त्यांतील पहिल्या विभागाला ‘ गीतारहस्य ’ म्हणून दुसऱ्याला ‘ रहस्यसंजीवन ’ असे म्हटले आहे. आमचा मुख्य कटाक्ष गीतेच्या अर्थावर आहे. कारण आह्मांला गीतेच्या यथार्थ अर्थाचे जितके महत्त्व वाटतें तितके इतर ‘ चिकित्सेचे ’ केव्हांच वाटत नाही. म्हणून आम्हीं गीतारहस्यापेक्षां गीतार्थाचेंच–रहस्यसंजीवनाचेच विशेष परीक्षण केले आहे. त्यांत रहस्यांतील बहुतेक विषय येऊन गेलेच आहेत. गीताभाष्यार्थाची सविस्तर विषयानुक्रमणिका पुढें दिली आहे. तीवरून आम्ही कोठें कोणत्या मुद्याचा विचार केला आहे, ते वाचकांस सहज कळेल. तथापि पहिल्या भागांतील प्रत्येक प्रकरणाचे आम्ही सविस्तर परीक्षण करावें, अशी पुष्कळांची इच्छा आहे. पण ग्रंथविस्तार अगोदरच फार झाला आहे. त्यांत आणखी अधिक भर घालण्यास कालाचें आनुकूल्य नाही. शिवाय मूळ गीतार्थ समजण्यास त्याचा फारसा उपयोगहि नाहीं. आम्हीं रहस्यकारांच्या अर्थावर व त्यांच्या उपपादनावर जे दोष दिले आहेत, त्यांचे निरसन कोण कोण कसें कसे करितात तें पाहून मग आवश्यकता भासल्यास आम्ही पुनः सविस्तर लिहूं. ईश्वराच्या इच्छेनें ‘ ब्रह्मसूत्र-शारीरभाष्यार्थ ’ हा फार मोठा व महत्त्वाचा ग्रंथ आमच्या हातून झाल्यावर आम्ही प्रस्थानत्रयभाष्याचा उपसंहार लिहिणार आहों, त्यांतहि याबद्दल अधिक विचार करतां येईल. तथापि ‘ गीतारहस्य ’ या प्रकरणांतील मुद्देहि कसे खंडनार्ह आहेत, त्याचें केवल दिग्दर्शन करण्यासाठीं थोडासा विचार करून ही प्रस्तावना संपवितों.

“ भगवद्गीता भगवानांनीं सांगितलेली म्हणून तो भागवत धर्म होय. श्रीकृष्णास भगवान् हें नांव भागवत धर्मातच देत असतात. गीतेच्या चवथ्या अध्यायांतील पर-

परा व नारायणीय किंवा भागवत धर्माची हल्लींच्या कल्पाच्या त्रेतायुगांतलि परंपरा एकच आहे. म्हणून गीताधर्म व भागवत धर्म एकच असले पाहिजेत. निष्काम कर्म हाच भागवत धर्म व महाभारतकारांच्या मतें गीतेचें हेच तात्पर्य " असें रहस्यकार ( गी. र. पृ.९–११ ) म्हणतात. पण भगवान् हा शब्द एकट्या श्रीकृष्णालाच लावीत नाहींत. कोणत्याहि पूज्य उपास्याला भगवान् म्हणतात. शैव शिवाला भगवान् म्हणतात. शिवगीता अध्याय ६ ' भगवन्नत्र मे चित्रं ' ( १ ) ' श्रीभगवानुवाच ' ( ४ ) ' आर्योऽह भगवान् ईशः ' ( १६ ) अ. ७ ' भगवन्यन्मया पृष्टं ' ( १ ) ' देहे भगवतस्तव ' ( २ ) ' श्रीभगवानुवाच ' ( ५ ) इत्यादि अनेक ठिकाणीं शंकराला भगवान् म्हटलें आहे. गणेशगीतेत गणेशाला भगवान् म्हणतात. ' भगवन् कृपया तन्मे ' ( अ. ४ श्लो. २० ) ' भगवन्नारदो मह्यं० ' ( अ. ८ श्लो. १ ) देवीगीतेंत देवीला ' इत्युक्त्वा सा भगवती ' ( अ. ९-३८ ) असें म्हटलें आहे. कपिलगीतेंत ' श्रीभगवान् उवाच ' ( अ. १ श्लो. १३ ) वगैरे अनेक ठिकाणीं कपिलाला भगवान् म्हटलें आहे. यमगीतेंत ' भगवान् प्रब्रवीतु मे' (अ. १ श्लो. १) असें, व ब्रह्मगीतेत 'भगवांस्तन्नो वक्तुमिहार्हसि,' अ. १ श्लो. ३ असे वचन आहे. अर्थात् भगवानांनीं सांगितलेली गीता म्हणून ती भागवत धर्म ही कल्पना चुकीची आहे.गीता व नारायणीय यांच्या परंपरेबद्दलचा विचार आम्हीं पुढे केला आहे (पृ.३५५-५७)निष्काम कर्म हा भागवत धर्म नव्हे. निष्कामभक्ति–अहैतुकी भक्ति हा भागवत धर्म आहे, महाभारतकारांचें मत एका उपाख्यानावरून बादरायणसंबंधाने ठरविण्यापेक्षा तें शांतिपर्वादि इतर प्रधान-प्रकरणावरून ठरविणेंच सयुक्तिक होय.शांतिपर्वात स्वतः व्यासच म्हणतात–"द्वाविमावथ पन्थानौ यत्र वेदाः प्रतिष्ठिताः । प्रवृत्तिलक्षणो धर्मो निवृत्तौ च व्यवस्थितः ॥६॥ कर्मणा बध्यते जन्तुर्विद्यया च विमुच्यते। तस्मात् कर्म न कुर्वन्ति यतयः पारदर्शिनः॥७॥कर्मणा जायते प्रेत्य मूर्तिमान् षोडशात्मकः । विद्यया जायते नित्यं अव्ययो ह्यक्षरात्मकः ॥ ८ ॥ कर्म त्वेके प्रशंसन्ति स्वल्पबुद्धितया नराः । तेन ते देहजालानि रमयन्त उपासते ॥९॥ ये स्म बुद्धिं परां प्राप्ता धर्मनैपुण्यदर्शिनः । न ते कर्म प्रशंसन्ति कूपं नद्यां पिबान्निव॥१०॥ कर्मणः फलमाप्नोति सुखदुःखे भवाभवौ । विद्यया तदवाप्नोति यत्र गत्वा न शोचति॥११॥ यत्र गत्वा न म्रियते यत्र गत्वा न जायते । न जीर्यते यत्र गत्वा यत्र गत्वा न वर्धते॥१२॥ यत्र तद्ब्रह्म परममव्यक्तमचलं ध्रुवम्। अव्याहतमनायासममृतं चावियोगि च॥१३॥द्वन्द्वैर्न यत्र बाध्यन्ते मानसेन च कर्मणा । समाः सर्वत्र मैत्राश्च सर्वभूतहिते रताः॥१४॥" याचा भावार्थ–"ज्यांत वेद प्रतिष्ठित आहेत असे हे दोन मार्ग आहेत. एक प्रवृत्तिलक्षण व दुसरा निवृत्तिरूप. कर्मानें प्राणी बद्ध होतो व विद्येनें मुक्त होतो. म्हणून तत्त्वदर्शी यती कर्म करीत नाहींत. प्राणी मेल्यावर कर्मानें एकादश इंद्रियें व पंचप्राण एतद्रूप सशरीर होतो, व विद्येच्या योगानें नित्य अव्यक्त अक्षरात्मक होतो. अल्पबुद्धित्वामुळें लोक कर्माची नेहमीं प्रशंसा करितात. त्यामुळें ते अनेक देह धारण करून त्यांतच रममाण होत्साते त्यांचीच उपासना करितात. जे परा बुद्धीला प्राप्त झालेले धर्मनैपुण्यदर्शी ते नदीचें जल

पिणारा विहिरीची जशी प्रशंसा करीत नाहीं त्याप्रमाणें कर्माची प्रशंसा करीत नाहींत. कर्माचें सुख-दुःख व उत्पत्ति-नाश हें फल प्राप्त होतें. पण जेथें प्राप्त होऊन जीव शोक करीत नाही तें स्थान विद्येने मिळते. जेथे जाऊन मरत नाहीं, उत्पन्न होत नाहीं, जरा-युक्त होत नाहीं व वाढत नाहीं, जेथे ते परम, अव्यक्त, अचल, ध्रुव, अव्याहत, अना-यास, अमृत व अवियोगी-नित्य ब्रह्म आहे, जेथें द्वंद्वांची पीडा होत नाहीं. मनाच्या चिंताप्रभृति कर्माने त्रास होत नाहीं, तर सर्वत्र सम, सर्वांचे मित्र व सर्वभूतांच्या हितामध्ये रत असे ते विद्वान् होतात" इत्यादि ( महा. भा. मद्रास प्रत अ.१४७ पहा.) व्यासांचें म्ह० महाभारतकारांचें हें मत आहे. पुनः आश्रमाविषयींहि व्यासच म्हण-तात.—" चतुष्पदी हि निःश्रेणी ब्रह्मण्येषा प्रतिष्ठिता । एतां आश्रित्य निःश्रेणीं ब्रह्मलोके महीयते ॥" (अ. २४८. श्लो. १५ )—चार पायऱ्यांची ही शिडी ब्रह्मामध्ये प्रतिष्ठित आहे. या शिडीचा आश्रय करून द्विज ब्रह्मलोकीं पूज्य होतो. याप्रमाणे चार आश्रम याच चार पायऱ्या कल्पून व क्रमाने तीन आश्रमाचें वर्णन करून शेवटच्या यति-आ-श्रमाचे २५१ व्या अध्यायांत सविस्तर वर्णन आहे. ते गीतेतील स्थितप्रज्ञ, भगवद्भक्त, गुणातीत यांच्या वर्णनाहून भिन्न प्रकारचे नाही. शांतिपर्वातील असे शेकडो उतारे देऊन महाभारतकार व्यासांचें मत रहस्यकार समजतात तसें नाहीं, हे सिद्ध करितां येण्यासारखें आहे. व्यास ज्ञानकर्मसमुच्चयवादी नसून निष्काम कर्मानें चित्तशुद्धि होऊन ( महा. भा. शांति. अ. १८८ पहा. ) ज्ञानानेंच मोक्ष मिळतो असें स्पष्ट म्हणणारे आ-हेत. 'कषायपक्तिः कर्माणि ज्ञानं तु परमा गतिः ' अर्थात् या संबंधाने रहस्यकारांनी जो विस्तार केला आहे तो सर्व फुकट आहे.

शिवाय गीता ही स्मृति आहे. कारण ब्रह्ममीमांसेंत तिचा स्मृति म्हणून प्रमाणत्वानें उल्लेख केलेला आहे. स्मृति नेहमीं श्रुतीच्या अर्थाला अनुसरते, श्रुत्यर्थाला अनुसरणाऱ्या स्मृतीलाच वैदिक शिष्ट प्रमाण मानतात. श्रुतिविरुद्ध अर्थाचें प्रतिपादन करणारी स्मृति अनपेक्ष—अप्रमाण होय, असे मीमांसेत स्पष्ट म्हटलें आहे, ( विरोधे त्वनपेक्ष्यं स्यादसति हि अनुमानं अ. १, पा. ३ सू. ३ ) त्यामुळेंच श्रुत्यर्थाच्या विरुद्ध प्रतिपादन करणाऱ्या कपिल, कणाद इत्यादिकाच्या स्मृति अप्रमाण आहेत. त्या स्मृतींतूनहि जो अविरुद्ध अर्थ आहे तेवढ्या पुरते त्याना प्रामाण्य आहे. श्रीगीता ही प्रमाण स्मृति असल्यामुळेंच तिला मूळ श्रुतीचा आधार असला पाहिजे, हे उघड ठरतें. पण श्रुति म्ह० मंत्र-ब्राह्मण. त्यातील संसार हेच फल देणाऱ्या सकाम कर्मकांडाला गीता अनु-सरत नाहीं. तर संसाराची निवृत्ति करणाऱ्या उपासना-ज्ञानकांडात्मक मंत्र-ब्राह्मणाला ती अनुसरते. तिच्यांतील सर्व विषय प्रायः उपनिषद्रूप श्रुतीच्या आधारानें प्रतिपादिलेले आहेत.जसें—'यामिमां पुष्पितां वाचं०' (अ. २.४२-४४);'त्रैगुण्यविषया वेदाः (२.४५); 'त्रैविद्या मां सोमपाः०' (९.२०.२१); ' न वेदयज्ञाध्ययनैः० ' (११.४८); ' नाहं वेदैर्न तपसा०' (११-५३); इत्यादि वचनें मुंडकोपनिषद् १.२.७-१०;काठक.१.२.५-६; मुंडक. ३.२.३. नारायण अ. १२ यांच्या आधाराने लिहिलेलीं आहेत. ' य एनं वेत्ति हंतारं०' २.१९ ' न जायते म्रियते वा०' २.२०; ' आश्चर्यवत्पश्यति ' हीं काठक. १.२.१८-१९

व १.२.७. यांच्या आधारें आहेत. तिसऱ्या अध्यायांतील नित्य पंचमहायज्ञ ऋग्वेद १०.११७.६ तैत्तिरीय, मनु. ३.११८ इत्यादिकांच्या आधारें सांगितले आहेत. ' आत्मरतिः आत्मतृप्तः आत्मनि संतुष्टः' ३.१७ हें मुंडक. ३.१.४; छान्दोग्य अ. ७. ५. यांच्या आधारें आहे. ' इंद्रियाणि पराण्याहुः ' हे 'इन्द्रियेभ्यः पर मनः ' या काठक १.३.१० श्रुतीच्या आधारें; ' ये यथा मां प्रपद्यन्ते ' ४.११ हें ' तं यथा यथोपासते तदेव भवति ' (बृ. अ. १ ब्रा. ५) ' यथा क्रतुरस्मिल्लँलोके पुरुषो भवति तथेतः प्रेत्य भवति ' ( छां. भा. ३.१४,पृ.२११ ) यांच्या आधारें आहे. ' ज्ञानाग्निदग्धकर्माणं ' ४.१९ व ' ज्ञानाग्निः सर्वकर्माणि भस्मसात् कुरुते ' ४.३७ हें ' क्षीयन्ते चास्य कर्माणि तस्मिन्दृष्टे परावरे०' या (मुंड. भा.२.२.८. पृ.७९) श्रुतीला धरून आहे.' यावानर्थ उदपाने० ' २.४५. व ' सर्वं कर्म ज्ञाने परिसमाप्यते ' ४.३३ हीं वचनें 'यथा कृताय विजिताय अधरेया संयन्ति०' या छान्दोग्य ( अ. ४.१.४. पृ. २५० ) श्रुतीच्या आधारानें आहेत. ' नवद्वारे पुरे०' ५.१३ हें ' यदिदमस्मिन्ब्रह्मपुरे ' या ( छां.भा. अ. ८.१ पृ. ५७५) श्रुतीच्या व नवद्वारे पुरे देही० ' या (श्वेताश्व.४.१८) श्रुतीच्या आधारें आहे. अध्याय ६–' शुचौ देशे' ११, 'समं कायशिरोग्रीवं' १३ इत्यादि वचनें 'त्रिरुन्नतं स्थाप्य समं शरीरं' 'समे शुचौ०' इत्यादि श्वेताश्वतरोपनिषदाच्या आधारें आहेत. अशींच आणखीहि हवीं तितकीं वचनें प्रत्येक अध्यायात दाखवितां येतील. 'यदक्षरं वेदविदो वदन्ति' ८.११ 'ओमित्येकाक्षरं ब्रह्म'८.१३यांना श्रौत आधार आहे.'शुक्लकृष्णे गती' ८.२४–२७ या गती छांदोग्य, बृहदारण्यक, कौषीतकी इत्यादि उपनिषदांतील देवयान व पितृयाण मार्गाच्या आधारानें सागितल्या आहेत.दहाव्या अध्यायांतील विभूतिवर्णन–'यो देवो अग्नौ योऽप्सु यो विश्वं भुवनं आविवेश ।य ओषधिषु० ' इत्यादि श्वेताश्वतराच्या आधारें आहे. 'अहं आदिर्हि देवानां महर्षीणां च सर्वशः' २ हे वचन 'यो देवानां प्रभवश्चोद्भवश्च' याच्या आधारे आहे. अकराव्या अध्यायांतील ' अनेकबाहूदरवक्त्रनेत्रं ' १६ इत्यादि वचनें श्वेताश्व. ' विश्वतश्चक्षुरुतविश्वतो मुखो०' इत्यादि श्रुतीच्या आधारें आहे. अध्याय १३ –' सर्वतःपाणिपादं ' हा सर्व श्लोक व ' सर्वेन्द्रियगुणाभासं ' हा श्लोकार्ध श्वेताश्वतरांतून अक्षरशः घेतला आहे. प्रकृति, पुरुष, माया, गुण, क्षर, अक्षर इत्यादि शब्दहि श्वेताश्वतरादिकांतील आहेत, सांख्यदर्शनातील नव्हेत. अध्याय १५–' ऊर्ध्वमूलमधः शाखं ' हें संसारवृक्षाचें वर्णन ' ऊर्ध्वमूलोऽवाक्शाख एषोऽश्वत्थः सनातनः ' २. ३. १ या काठक श्रुतीच्या आधारें आहे. ' ततः पदं तत्परिमार्गितव्यं० ' ४ हें ' तद्विष्णोः परमं पदं सदा पश्यन्ति सूरयः ' या श्रुत्याधारें आहे. ' न तद्भासयते सूर्यो० ' ६ व ' यदादित्यगतं तेजः'१२ हीं वचनें ' न तत्र सूर्यो भाति०' ६-१४ या श्वेताश्वतराच्या वगैरे आधारें आहेत. अध्याय १६–' द्वौ भूतसर्गौ लोकेऽस्मिन् ' हें वचन ' द्वया ह प्राजापत्या दैवाश्चासुराश्च ' बृ. १. ३. १. या श्रुत्याधारें आहे. सूक्ष्म अवलोकन केल्यास आणखीं अनेक गीतावचनांचा श्रुतीशीं साक्षात् किंवा परंपरेनें संबंध दाखवितां येईल.पण विस्तारभयास्तव तसें करीत नाहीं. यावरून गीतेचा संबंध उपनिषदाशीं आहे. म्हणू-

नच तिला उपनिषद् व पुनः ब्रह्मविद्या म्हटलें आहे; तिचा संबंध नारायणीय उपाख्यानाशीं असता, तर निदान त्यांतील एखादें तरी वचन किंवा विचार यांत यावयास पाहिजे होता, पण तो नाहीं. अर्थात् ' सर्वोपनिषदो गावो दोग्धा गोपालनंदनः' व 'दुग्धं गीतामृतं महत् ' हें म्हणणेंच निर्दोष व प्रमाणसिद्ध असून रहस्यकारांचें म्हणणें सदोष व प्रमाणरहित आहे. याविषयीं सविस्तर विचार ४ थ्या अध्यायाच्या आरंभीं टीपेंत केला आहे. तो पहा.

रहस्यकारांच्या पृ. १४ वरील वर्णनावरून असें दिसतें कीं त्यांना आचार्यांचें अद्वैत तत्त्वज्ञान मान्य आहे. पण आचरणदृष्ट्या त्यांच्या मतानें अवश्य असलेली संन्यासनिष्ठा मात्र मान्य नाहीं. पण वस्तुतः अद्वैत तत्त्वज्ञानहि आचार्यांच्या पदरचे नाहीं व संन्यासनिष्ठा किंवा निवृत्तिमार्गहि त्यांच्या घरचा नाहीं. तीं दोन्ही वैदिक आहेत व वैदिक शिष्टांना संमत आहेत. गीतेंतहि सर्वकर्मसंन्यासावांचून मोक्ष मिळत नाहीं, असेंच प्रतिपादन केलें आहे. कामत्याग, संकल्पत्याग, कर्तृत्वाभिमानत्याग हेंच त्यांचें स्वरूप आहे. ( पुढें पृ. १११७ पहा. ) संन्यास स्मार्त आहे व कर्मयोग भागवत आहे. ही रहस्यकारांची कल्पनाच चुकलेली आहे. कर्मयोगहि वैदिक व संन्यासहि वैदिक.प्रवृत्तिमार्गहि वैदिक व निवृत्तिमार्गहि वैदिक.वैदिक जनतेंत केवल स्मार्त किंवा केवल भागवत मताला केव्हांहि मान्यता मिळणें शक्य नाहीं.ही गोष्ट आम्हीं पुढें सविस्तर सिद्ध केली आहे.

रहस्यकार म्हणतात—( पृ. १८ ) " ब्रह्मात्मैक्यरूप मोक्ष प्राप्त होण्यास जीं अनेक साधनें आहेत त्यांपैकीं भक्तिमार्ग हे साधन अत्यंत सुलभ होय " अगदीं खरें आहे. पण भक्तिहि ज्ञानद्वारा मोक्षाचे कारण होते, हें विसरतां कामा नये आणि भक्तीनें प्राप्त होणारें जें ज्ञान–ब्रह्मात्मैक्यानुभव तोच मोक्ष–तीच जीवन्मुक्ति होय. ' भक्त्या मां अभिजानाति यावान् यश्चास्मि तत्त्वतः ' इत्यादि गीतावचनांचाच याला आधार आहे. रहस्यकारांचे उपक्रमोपसंहार कसे चुकले आहेत तें आम्हीं पुढें सविस्तर सांगितलें आहे ( पृ.३७–४१ पहा ) रहस्यकार पुढें म्हणतात ( पृ. २४ ) " ( दोन्ही सैन्याचें युद्ध सुरू होणार ) इतक्यांत एकाएकीं ब्रह्मज्ञानाच्या गोष्टी सांगून ' विमनस्क ' व संन्यास घेण्यास तयार झालेल्या अर्जुनास आपल्या क्षात्र कर्मास प्रवृत्त करण्यासाठीं भगवंतांनीं गीता उपदेशिली आहे " ही दृष्टि साफ चुकीची आहे. अर्जुनाला ' हे सर्व माझे ' असा मोह झाला व त्यांचा मूर्तिमंत मृत्यु त्याच्या डोळ्यापुढें उभा राहिला. त्यामुळें त्याला शोक झाला. शोक व मोह यांनीं व्याकुळ झालेला तो स्वधर्माला अधर्म व परधर्माला धर्म समजूं लागला. म्हणजे त्यावेळीं त्याची बुद्धि तामसी झाली व तो तामस त्याग करावयास तयार झाला होता. ( गी. अ. २. ७ पृ. ३२; १८.७ पृ. ११३८. १८.३२ पृ. ११८० ) पण तामस व राजस बुद्धि व त्याग यांचें फल नरक आहे.( पृ. ११३८–३९ पहा. ) तसल्या त्यागानें अर्जुनाचें किंवा दुसऱ्या कोणाचेंच कल्याण होणें शक्य नाहीं. म्हणून भगवानांनीं त्याला सात्त्विक त्याग करावयास लावून मोक्षमार्गांत प्रवृत्त केलें, हें खरें गीतारहस्य आहे. गीता केवल युद्धास प्रवृत्त करण्यासाठींच जर भगवानांनीं सांगितलीं असती तर तिच्या मध्यें ' अमृतत्वाय कल्पते ' २-१५ पृ. ७४ ' कर्मबन्धं प्रहास्यसि ' ( २.३९ पृ. ११४, ) 'त्रायते महतो भयात् ' ( २.४० पृ. १५२, ) 'जन्म-

बन्धविनिर्मुक्ताः पदं गच्छन्त्यनामयं ' २.५१ पृ. १८४ 'स शान्तिमधिगच्छति' व ' एषा ब्राह्मी स्थितिः... ब्रह्मनिर्वाणमृच्छति ' २.७१-७२ पृ. २२८.२३० ' मे दिव्यं जन्म कर्म यः वेत्ति सः देहं त्यक्त्वा पुनर्जन्म न एति मां एति' ( ४.९.पृ.३७४) 'ज्ञान-तपसा पूता मद्भावमागताः' ४.१० 'यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात्' ४.१६ ज्ञानं लब्ध्वा शान्ति अधिगच्छाति ' ४-३९ 'संन्यासः कर्मयोगः निःश्रेयसकरौ ' ५.२ 'सुखं बंधात्प्रमुच्यते' ५.३. ' ज्ञाननिर्धूतकल्मषाः अपुनरावृत्तिं गच्छान्ति ' ५.१७ ' अभितो ब्रह्मनिर्वाणं वर्तते ' ५-२६. ' ज्ञात्वा मां शांतिमृच्छति ' ५.२९ ' निर्वाणपरमां मत्संस्थां शान्तिमधिगच्छति ' ६.१५ ' परां गतिं याति ' ६-४५ ' स मद्भावं याति ना-स्त्यत्र संशयः ' ८.५ ' मामेवैष्यसि० ' ८.७ 'परमं दिव्यं पुरुषं याति ' ८.८ ' स याति परमां गतिं' ८.१३ 'मामुपेत्य दुःखालयं अशाश्वतं पुनर्जन्म नाप्नुवन्ति ' ८.१५ 'मामुपेत्य पुनर्जन्म न विद्यते ' ८.१६ 'यं प्राप्य न निवर्तन्ते ' ८.२१ 'योगी परं स्थान-मुपैति चाद्यं ' ८.२८ अध्याय ९.-'यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात् ' १ ' मृत्युसंसारवर्त्मनि निवर्तन्ते' ३ 'मद्याजिनः मां यान्ति ' २५ 'विमुक्तो मामुपैष्यसि ' २८ 'तेऽपि परां गतिं यान्ति ' ३२ 'मामेव एष्यसि ' ३४ अध्याय १०-'मां अनादिं लोकमहेश्वरं वेत्ति सः सर्वपापैः प्रमुच्यते ' ३, 'ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयान्ति ते ' १० अध्याय ११-'स मामेति ' ५५ अध्याय १२-'ते मामेव प्राप्नुवन्तिं ' ४ 'मय्येव निवसिष्यसि' ८ 'त्यागात् शान्तिरनन्तरं' १२ अध्याय १३-'न स भूयोऽभिजायते' २३ 'तेऽपि मृत्युं अतितरन्ति एव' २५ 'न हिनस्त्यात्मनात्मानं ततो याति परां गतिं' २८ 'तदा ब्रह्म संपद्यते' ३० 'ये ब्रह्म विदुः ते परं यान्ति ' ३४ अध्याय १४-'परां सिद्धिं इतो गताः' 'मम साधर्म्यमागताः सर्गेऽपि नोपजायन्ते प्रलये न व्यथन्ति' २ 'मद्भावं सोऽधिगच्छन्ति' १८ 'जन्ममृत्युजरादुःखैः विमुक्तोऽमृतमश्नुते ' २० 'स गुणान्समतीत्यैतान्ब्रह्मभूयाय कल्पते ' २६ अध्याय १५-'अमूढाः अव्ययं पदं गच्छान्ति ' ५ 'बुद्धिमान् कृतकृत्यश्च स्यात्' २० अध्याय १६-'दैवी संपद्विमोक्षाय ' ५ 'आचरत्यात्मनः श्रेयस्ततो याति परां गतिं ' १२ अध्याय १८-'त्रिविधं फलं अत्यागिनां भवति संन्यासिनां न' १२ 'स्व-कर्मनिरतः सिद्धिं विन्दति ' ४५ 'स्वकर्मणा तं अभ्यर्च्य सिद्धिं विन्दति' ४६ 'परमां नैष्कर्म्यसिद्धिं संन्यासेन अधिगच्छति ' ४९ 'सिद्धिं प्राप्तो यथा ब्रह्म माप्नोति...ज्ञानस्य या परा निष्ठा ' ५० 'बुद्ध्या विशुद्धया युक्तः... .. ब्रह्मभूयाय कल्पते ' ५१-५३ 'मां तत्त्वतः ज्ञात्वा विशते ' ५५ 'शाश्वतं अव्ययं पदं अवाप्नोति ' ५६ 'परां शान्तिं शाश्वतं स्थानं प्राप्स्यसि ' ६२ 'मामेव एष्यति सत्यं प्रतिजाने ' ६५ 'अहं त्वा सर्वपापेभ्यः मोक्षयि-ष्यामि ' ६६ या वचनांवरून गीता मोक्षासाठीं सांगितली, केवल युद्धप्रवृत्तीसाठीं नाहीं, हें कोणाच्याहि लक्षांत येईल. कारण प्रत्येक अध्यायांत पुनः पुनः त्याचाच अभ्यास केला आहे. म्हणूनच आचार्यांनी 'तस्यास्य गीताशास्त्रस्य संक्षेपतः प्रयोजनं परं निःश्रेयसं०' इत्यादि उपोद्घातभाष्यांतच ( पृ. ७ ) स्पष्ट सांगितलें आहे.

सबंध गीतेंत युद्धाच्या विधानाचा ज्यांत आभास आहे, अशीं ४ वचनें आहेत. १ 'तस्माद्युद्ध्यस्व भारत' २.१८; २ 'युद्ध्यस्व विगतज्वरः' ३.३०; ३ 'युद्ध्यस्व जेतासि रणे

सपत्नान्'११ ३४;'युध्य च' ८.४. पण तेवढ्यावरून 'समग्र गीता युद्धाला तयार करण्यासाठीं भगवानांनीं अर्जुनाला उपदेशिली' हें म्हणणें अयोग्य आहे. बरें, युद्धाचे फल मोक्ष आहे, म्हणून म्हणावें तर तसेंहि म्हणतां येत नाहीं. कारण स्वतः भगवानांनींच युद्धाचें फल 'हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं जित्वा वा भोक्ष्यसे महीं' अ. २ श्लोक ३७ असें सांगितलें आहे. पण गीतेंत तर मोक्ष, परमेश्वरप्राप्ति, त्यांचे कर्मफलत्यागादि अनेक उपाय, यांचेंच प्राधान्यानें वर्णन आहे. यास्तव गीतेचा युद्ध हा प्रधान प्रतिपाद्य विषय नसून प्रासंगिक विषय आहे, हें कोणीहि विचारी मनुष्य कबूल करील आणि ते युद्धहि 'स्वधर्माख्य' कर्म या रूपानेंच करावयास सांगितलें आहे. म्हणजे गीतेंत युद्धापेक्षां स्वधर्म–कर्म करण्याचा विशेष आग्रह केला आहे व तो सुद्धां निःश्रेयस्कर या रूपानें केला आहे.अर्थात् कर्मानुष्ठानहि मोक्षासाठीं लौकिकासाठीं नव्हे. युद्ध हें सांख्याचेच–आत्मज्ञानाचेंच अंग आहे, असें कित्येक रहस्याकारांचे भक्त म्हणतात, पण तें बरोबर नाही. कारण दुसऱ्या अध्यायाच्या ११ व्या श्लोकांत ज्या आत्मज्ञानाला आरंभ केला आहे,त्याचा उपसंहार 'तस्मात् सर्वाणि भूतानि न त्वं शोचितुमर्हसि' ( २.३० ) येथे करून 'स्वधर्मं अपि चावेक्ष्य' येथून पुढील आठ श्लोकांत केवल प्रासंगिक लौकिक न्याय सांगितला आहे. हें 'स्वधर्म अपि च' या शब्दांवरूनच उघड होतें 'व स्वधर्माकडेहि पाहून' येथील 'हि' शब्दच मागील आत्मज्ञानाशीं पुढील प्रतिपादनाचा संबंध नाहीं, हें सुचवितो. प्रत्यक्ष त्या श्लोकांचा अर्थ जरी पाहिला तरी ते सांख्य–आत्मज्ञान नव्हे, हें उघड होते.

आचार्यांनीं आपल्या भाष्यांत हा विषयविभाग उपक्रमोपसंहारपूर्वक स्पष्टपणे दाखविला आहे. गीता हा सूत्ररूप ग्रंथ आहे. त्यामुळें त्याची संगति श्लोकांतील शब्दार्थावरून लाविली पाहिजे. वरचा श्लोक कर्मपर आहे, म्हणून त्याच्या खालचाहि कर्मपरच लावूं लागल्यास अर्थविघात झाल्यावाचून रहात नाहीं. रहस्यकारादि सर्व आधुनिक गीतार्थाच्या वेळीं हीच चूक करितात. उदाहरणार्थ—चवथ्या अध्यायाच्या शेवटीं 'आत्मज्ञानानें संशय घालीव' असें म्हटलें आहे व पांचव्या अध्यायांत 'कर्मसंन्यासापेक्षां कर्मयोग श्रेष्ठ आहे,' असें सांगितलें आहे. तेव्हां हा कर्मयोग ज्ञानानंतरचा आहे, असे आधुनिक म्हणणार ! पण आचार्यादिक 'निःश्रेयसकरौ उभौ' या साक्षात् पदांकडे पाहून 'ज्ञानरहित पुरुषाच्या संन्यासापेक्षां ज्ञानरहित पुरुषाचा कर्मयोग श्रेष्ठ,' असें म्हणणार. तसेंच 'कर्मयोगो विशिष्यते' हा पांचव्या अध्यायाचा आरंभ पाहून सर्व अध्यायांत कर्मयोगच प्रतिपादिला आहे, किंबहुना सर्व गीताशास्त्राचा तो सिद्धान्त आहे, असें आधुनिक समजणार. सहाव्या अध्यायाच्या आरंभीं 'कर्मफलाची इच्छा न करितां जो नियत कर्म करितो तो संन्यासी व योगी' असें म्हटलेलें पाहून सहाव्या अध्यायांत निष्काम कर्मयोगच सांगितला आहे व तोच खरा संन्यास, इत्यादि ठरविणार ! मग त्या त्या अध्यायांत त्याच्या विरोधी किती कां वचनें असेनात! उदाहरणार्थ अ.५.१३–२९श्लोकांपर्यंतचा भाग कर्मयोगपर संभवत नाहीं. सहाव्या अध्यायांतील श्लो. १०–३२ पर्यंतचा विषय कर्मयोगपर असणें शक्य नाहीं.यास्तव विचाराची ही आधुनिक पद्धति गतिसारख्या

सूत्ररूप शास्त्राला तरी लागू होत नाहीं. असले ग्रंथ 'यत्परः शब्दः सः शब्दार्थः' या मीमांसे-च्या पद्धतीनेंच लाविले पाहिजेत. म्हणूनच आचार्यांनीं दुसऱ्या अध्यायाच्या ३९ व्या श्लोकाला अवतरण देतांना ' इह हि दर्शिते पुनः शास्त्रविषयविभागे उपरिष्टात् निष्ठाद्वय-विषयं शास्त्रं सुखं प्रवर्तिष्यते श्रोतारश्च विषयविभागेन सुखं ग्रहीष्यन्ति ' गी. भा. पृ. १४२, पहा असें म्हटले आहे. तात्पर्य प्रत्येक अध्यायांत प्रायः ज्ञाननिष्ठा व कर्मनिष्ठा आणि ज्ञान व ज्ञानोपाय यांचें वर्णन अधिकारिभेदानें न्यूनाधिक प्रमाणांत आहे. त्यामुळें प्रत्यक्ष शब्दांकडे पाहून श्लोकार्थ केला पाहिजे. प्रत्येक अध्यायांत किंवा समग्र गीतेंत अथपासून इतिपर्यंत एकच कर्मयोग प्रतिपाद्य आहे, असें म्हटल्यास ज्ञाननिष्ठापर वचनांचा अर्थघात करावा लागतो. या दृष्टीनें आचार्यांची गीतार्थयोजनाच निर्दोष आहे, हें समग्र गीताभाष्य वाचल्यावर कोणाच्याहि लक्षांत येईल. असो;

गीतेचें परम प्रयोजन निःश्रेयस आहे, हे याप्रमाणें गीतेतील वचनांनींच सिद्ध झालें असतां त्याचा उपाय कोणता ते जाणण्याची इच्छा ओघानेंच होते. आचार्यांनीं त्या निःश्रेयसाचें स्वरूप ' कारणासह जन्म-मरण-सुखदुःखसंप्राप्तिरूप संसाराचा अत्यंत उपरम ' असे सांगून ' सर्वकर्मसंन्यासपूर्वक आत्मज्ञाननिष्ठा' हें त्याचें साधन सांगितले आहे. रहस्यकार व इतर आधुनिक यांचा आचार्यांविषयीं याच वाक्यावरून गैरसमज झाला आहे. पण आचार्य सर्वकर्मसंन्यास व कर्मसंन्यास हे दोन पृथक मानतात, हे त्यांच्या लक्षांत येत नाहीं. सर्व कामत्याग, देहाभिमानत्याग, कर्तृत्वाभिमानत्याग हाच सर्वकर्मसंन्यास असून केवल अग्निहोत्रादिकर्मांचा त्याग हा नुस्ता कर्मसंन्यास आहे, असें त्यांनीं स्पष्ट प्रतिप्रादन केलें आहे. ( पृ. ४७८-८०, ११४७ पहा. ) कर्मसंन्यास म्ह० रहस्यकार ज्याला संन्यासमार्ग म्हणतात त्याला आचार्य मोक्षाचें साक्षात् साधन समजत नाहींत आणि सर्वकामत्याग, कर्तृत्वाभिमानत्याग, देहाभिमानत्याग गीतेंत सांगितलेला नाहीं, असें कोणालाहि म्हणतां येणें शक्य नाहीं; तीच ज्ञाननिष्ठा किंवा नैष्कर्म्यसिद्धि आहे. काम्यकर्मत्याग, सर्वकर्मफलत्याग, कर्म ईश्वरार्पण–ब्रह्मार्पण करणें, हे सर्व गौण त्याग असून ते सर्व अहंकारत्यागरूप मुख्य संन्यासासाठीं आहेत. पुढें या सिद्धान्ताचें पुष्कळच विवेचन झालें आहे. ( पृ. १११७–१८ वगैरे पहा. )

अर्जुनाला भगवानांनीं कर्मच करावयास सांगितलें आहे, याबद्दल कोणाचाच वाद नाहीं. पण ते कर्म म्ह० स्वधर्मरूप श्रौत-स्मार्त कर्म होय. लौकिक कर्म नव्हे. कारण परंपरेनें मोक्षाचें साधन होणाऱ्या कर्मांचेंच तें विधान आहे. स्वर्गादि फल देणाऱ्या वैदिक सकाम कर्मांचीहि निंदा करणारी गीता केवल लौकिक स्वाभाविक कर्म निष्काम करा, असे सांगेल तरी कशी? अर्थात् रहस्यकारांचा कर्मशब्दाचा व्यापक अर्थ स्वधर्म किंवा धर्म या शब्दांच्या अर्थाप्रमाणेंच चुकला आहे. याविषयींहि आम्ही पुढें पुष्कळ लिहिलें आहे. वैदिक संप्रदायांत अधिकाराप्रमाणें साधन सांगितलें जातें. कर्माचे अधिकारी निराळे, ज्ञानाचे निराळे. जगांतील सर्वच मनुष्यें व्यवहारांतहि समान योग्यतेचीं नसतात, हें कोणीहि कबूल करील, मग केवल अलौकिक परमार्थांत तीं समान योग्यतेचीं कोठून असणार! म्हणूनच वैदिक धर्मांत चार वर्ण व चार आश्रम, असे भाग केले आहेत. प्रवृत्तिमार्ग व निवृत्ति-

मार्ग किंवा कर्मयोग व ज्ञानयोग हा भेदहि अधिकारपरत्वेंच आहे. अज्ञच कर्मयोगाचे अधिकारी, जिज्ञासु निष्काम कर्मयोगादि उपासनेचे अधिकारी व आत्मसाक्षात्कारवान्च ज्ञानयोगाचे अधिकारी आहेत. जिज्ञासु अधिकारी पुरुषाला क्रमानें अन्तरंग-बहिरंग ज्ञानसाधनें सांगून ज्ञाननिष्ठेंत प्रवृत्त करण्यासाठी गीतेचा आरंभ आहे. म्हणून तिनें स्वर्गादि संसार हेंच फल देणाऱ्या कर्मयोगाची निंदा करून फलेच्छारहित नित्य कर्मांच्या विधानास आरंभ केला आहे. तोच सात्त्विक त्याग होय. ( अ. १८.९ पृ. ११३९ पहा ) म्हणजे एक प्रकारच्या संन्यासापासूनच गीतेच्या उपदेशास आरंभ झाला आहे. पण या गोष्टीचा कांहींच विचार न करितां गीता हे कर्मयोगशास्त्र आहे, गीता प्रवृत्तिपर आहे, वगैरे म्हणणें, म्हणजे गीतेच्या खऱ्या अर्थाचा घात करणें आहे. गीता हें जर कर्मयोगशास्त्र असतें तर त्यानेंच अर्जुन किंवा दुसरा कोणीहि कृतकृत्य झाला असता! पण गीतेंत कर्मयोगानें परमात्मप्राप्ति, शान्ति, कर्मबंधमुक्ति होते, असें सांगणारें एकहि वचन नाहीं. उलट ज्ञानलक्षण भक्तीनेच मोक्षप्राप्ति होते, असा घोष केला आहे. कर्मानें सिद्धि किंवा संसिद्धि मिळते असे सांगितले आहे. पण ती सिद्धि किंवा संसिद्धि म्ह० मोक्ष–ब्रह्मप्राप्ति–ईश्वरनिष्ठता नव्हे. तर चित्तशुद्धि व ज्ञाननिष्ठायोग्यताच होय. अर्थात् कर्मानेंच मोक्ष मिळतो,हे म्हणणें केवल श्रुति-न्यायविरुद्धच नव्हे, तर गीतेलाहि असंमत आहे. फलेच्छारहित कर्मयोग हें चित्तशुद्धीच्या द्वारा ज्ञानाचें व ज्ञाननिष्ठेचें साधन आहे, हा श्रौत सिद्धान्त गीतेंतील वचनांनीहि सिद्ध करितां येतो, व पुढे भाष्यार्थांत तो सिद्ध केलेला आहे.

गीतेचें प्रधान प्रयोजन निःश्रेयस असल्यामुळें तिचें प्रधान प्रतिपाद्य ज्ञाननिष्ठाच आहे. पण ज्ञाननिष्ठेचे अधिकारी–ज्ञानी फार थोडे व अज्ञ कर्माधिकारीच फार, म्हणून जिज्ञासूंसाठीं फलेच्छारहित कर्मानुष्ठानापासून ज्ञाननिष्ठेपर्यंत सर्व साधनें गीतेंत सांगितलीं आहेत. ज्ञाननिष्ठेची संन्यास-आश्रम ही इतिकर्तव्यता आहे. कारण आश्रमान्तर केल्यावांचून कर्मत्याग केल्यास दोष लागतो. कदाचित् तो ज्ञानी असल्यास त्यामुळें त्याच्या मोक्षाला बाध येणार नाहीं, पण लोकनिंदा होईल व तो श्रेष्ठ असल्यास त्याचे भक्त त्याच्याप्रमाणें ज्ञान नसतांना कर्मत्याग करतील, त्यांचा संग्रह करण्यासाठी म्ह० लोकसंग्रहासाठीं ज्ञानी कर्माधिकाऱ्याने म्ह० ज्याला संन्यासाश्रमाचा अधिकार किंवा उपपत्ति नाही त्यानें कर्तृत्वाभिमान सोडून केवल चेष्टामात्र कर्मे करावींत, एवढीच गीतेंत अनुज्ञा दिली आहे.सबंध गीतेंत 'लोकसंग्रह' हा शब्द फक्त दोनदा आला आहे, व तोहि तिसऱ्या कर्मयोग-अध्यायांतच व प्रसंगानें आला आहे, प्राधान्यानें नव्हे. ही गोष्ट ' लोकसंग्रहं एवापि ' येथील अपिशब्दानेंच सिद्ध होते. पण रहस्यकारांनीं त्याला नसतें महत्त्व देऊन, त्याचा भलताच अर्थ करून, रहस्यांत त्याचा पांचशें वेळां उल्लेख केला आहे, व त्यावरून 'गीतेची दृष्टि उपनिषदांहून व्यापक आहे, गीता व उपनिषदें यांत हाच भेद आहे,' वगैरे नसतीं अनुमानें काढली आहेत. असो; पण अशा ज्ञानी पुरुषानें केलेल्या चेष्टामात्र कर्मांना शास्त्रदृष्ट्या कर्मच म्हणतां येत नाहीं. कारण त्याच्या ठिकाणीं कर्माची मुख्य सामग्री जो कर्तृत्वाभिनिवेश तो नसतो. अर्थात् ज्ञानकर्मसमुच्चय असिद्ध

आहे. रहस्यकारांच्या ज्ञानकर्मसमुच्चयाला ' शास्त्रीय ज्ञानकर्मसमुच्चय ' हें नांवच देतां येत नाहीं. यासंबंधानेंहि आम्हीं पुढें पुष्कळ लिहिलें आहे. ( पृ. २४८-४९ पहा. ).

गीतेत योगशब्दाचा मुख्य अर्थ ज्ञानप्राप्तीचा उपाय-साधन हा आहे. योगशब्दाचा कर्मयोग हा मुख्य अर्थ केव्हांच संभवत नाहीं. पण साधन या मुख्य अर्थांत कर्मयोगापासून समाधियोगापर्यंत सर्वांचा अन्तर्भाव होतो व तीं सर्व आत्मसाक्षात्कार -ब्राह्मी स्थिति-ब्रह्मस्थिति-जीवन्मुक्ति यांचीं न्यूनाधिक योग्यतेचीं साधनें आहेत. लोकसंग्रहशब्दाप्रमाणेंच कर्मयोग हा शब्दहि सबंध गीतेंत पांच वेळां आला आहे व त्याचा अर्थ कर्म-कर्मानुष्ठान असा आहे. ' योग ' या शब्दाचाहि ' योगार्थत्वात् योगः ' या व्युत्पत्तीनें कांहीं ठिकाणीं कर्मयोग असा अर्थ प्रकरणानुरोधानें करावा लागतो. आचार्यांनीं तसा केला आहे. पण तेवढ्यावरून सर्वत्र ' योग म्ह० कर्मयोग' असा अर्थ करणें अयोग्य आहे. याविषयींहि आम्हीं पुढें बरेंच लिहिलें आहे. ( १४५-५० ).

सांप्रदायिक आग्रह, ओढाताण, वगैरे संबंधानें जर विचार केला तर श्रीशंकराचार्यांच्या भाष्यांतच त्या सर्वांचें प्रमाण सर्वांहून कमी असून रहस्यकारांची ओढाताण व आग्रह कित्येक ' सांप्रदायिकांना'हि खालीं मान घालावयास लावील अशा तऱ्हेची आहे. आम्हीं त्याचीं उदाहरणें पुढें दिलीं आहेत. ' कर्मणि एव अधिकारः ' येथील ' एव ' शब्दानें कोणता अर्थ ध्वनित होतो, तें आचार्यांनीं ' न ज्ञाननिष्ठायां ' या शब्दांनीं सांगितलें आहे. यालाच ओढाताण म्हणणें म्हणजे आचार्यांच्या भाष्याची शैलीच आपल्याला कळली नाहीं, हें कबूल करणें आहे. कारण आचार्य असे विशेष अर्थबोधक शब्द जेथें जेथें येतात, तेथें तेथें तो तो अर्थ अगदीं विशद करून दाखवीत असतात. उदाहरणार्थ-४-१५, पृ. ३८५. ५. २८, पृ.५३१. १३-२९, पृ. ९७६ वगैरे पहा.

असो; एखाद्या वाक्याला स्तुत्यर्थवाद म्हणणें म्हणजे त्याला पोकळ मानून उडवून देणें, अशी रहस्यकारांनीं आपली भलतीच समजूत करून घेतली आहे. पण मीमांसेंत अर्थवादाला पोकळ मानलेलें नाहीं. तर विहिताची स्तुति करून त्याविषयीं साधकाच्या मनांत रुचि उत्पन्न करणें व निषिद्धाची निंदा करून त्याविषयीं अरुचि उत्पन्न करणें हें अर्थवादाचें प्रयोजन आहे. आम्हीं पुढें त्याचा पुष्कळ विचार केला आहे. तथापि आचार्यांनीं गीताभाष्यांत वारंवार त्याचें कसें स्पष्टीकरण केलें आहे तें पहा—अ. २ श्लो. ३९-४० यांतील ' बुद्ध्या युक्तो यया० ' इत्यादि भागानें योगबुद्धीची स्तुति केली आहे, असें आचार्य म्हणतात, ( पृ. १४८ पहा ) व त्यांतील अक्षरार्थाकडे पाहिलें असतां ती स्तुति नव्हे, असें कोणालाच म्हणतां येणार नाहीं. तसेंच ' स्तुति-पोकळ अर्थवाद म्हणून त्याला उडवून दिलें ' असेंहि म्हणतां येणें शक्य नाहीं. अशींच आणखीं १४ स्थळें दाखवितों—गीताभाष्यार्थ पृ. २३० " सा एषा ज्ञाननिष्ठा स्तूयते " असें ' एषा ब्राह्मी स्थितिः ' या श्लोकाला बहुतेक सर्व प्राचीन टीकाकारांनीं अवतरण दिलें आहे. पण त्यावरून ' ज्ञाननिष्ठा पोकळ अर्थवाद म्हणून उडवून दिली ' असा त्याचा अर्थ होत नाहीं. अक्षरार्थाकडे पाहिलें तरी ही ज्ञाननिष्ठेची स्तुति आहे, हेंच ठरतें. गी. भा. पृ. ३९१ कर्मामध्यें अकर्म व अकर्मामध्यें कर्म पाहणाराची ' स बुद्धि-

मान्मनुष्येषु स युक्तः कृत्स्नकर्मकृत्' अशी स्तुति केली आहे. तो 'कर्मामध्यें अकर्मादि दृष्टि करावी' या विधीचा रोचक अर्थवाद आहे. पोकळ नव्हे. गी. भा. पृ. ४१०. 'तदेतत्कर्मण्यकर्मदर्शनं स्तूयते०' ही स्तुतिहि पोकळ नाहीं. गी. भा. पृ. ४३४. "ज्ञानयज्ञस्तुत्यर्थं प्रकरणं" "श्रेयान्द्रव्यमयाद्यज्ञाज्ज्ञानयज्ञः" "इति ज्ञानं स्तौति" यावरून ज्ञानाला उडवून दिलें,असें होत नाहीं.अशीं गीताभाष्यांतच आणखीं शेकडों उदाहरणें दाखवितां येतील. तसेंच गी. भा. पृ. ४८४ यावरील "इति कर्मयोगं स्तौति" असें म्हटल्यानें 'कर्मयोग श्रेष्ठ' हा पोकळ अर्थवाद मानून त्याला उडवून दिलें,असें म्हणणें सर्वथा अन्याय्य होय. कारण विधींच्या स्तुत्यर्थत्वाने अर्थवाद प्रमाणच आहे, असें मीमांसाशास्त्रांत 'विधिना त्वेकवाक्यत्वात्स्तुत्यर्थेन विधीनां स्युः' ( १-२-७ ) या सूत्रानें सांगितलें आहे.

आतां आणखी एकच अत्यंत महत्त्वाचा सिद्धान्त सांगतों. अद्वैत वेदान्त शास्त्राला सद्योमुक्ति किंवा जीवन्मुक्ति संमत आहे. स्वर्गाप्रमाणे मरणोत्तर प्राप्त होणारे विदेहकैवल्य किंवा क्रममुक्ति, असमंत जरी नसली तरी विवक्षित नाहीं. ज्ञाननिष्ठ सांख्य हा जीवन्मुक्त होय. त्यालाच गीतेंत स्थितप्रज्ञ, गुणातीत, भगवद्भक्त म्हटलें आहे. सर्व कामत्याग, देहादिसंघातावरील आत्माभिमानाचा सर्वथा त्याग, सर्वसंकल्पत्याग हें त्याचें लक्षण आहे. त्यालाच गीतेंत आत्मरति, आत्मतृप्त, आत्मसंतुष्ट म्हटलें आहे, वैराग्य व ज्ञान हेच त्या अवस्थेचें लक्षण आहे. त्या अवस्थेंत शास्त्रीय नित्य-नैमित्तिकादि कोणत्याच कर्मांचा संभव नाहीं. फक्त शरीरस्थितीला अत्यंत अवश्य, तेवढींच कर्मे तो करील व तीहि 'यदृच्छालाभसंतुष्टः द्वंद्वातीतः विमत्सरः' इत्यादि होऊन करील. तीं कर्मेंहि माझी आहेत, अशा भावनेनें तो करणार नाहीं. आचार्य या संन्यासालाच सर्वकर्मसंन्यास–ज्ञाननिष्ठा–नैष्कर्म्य म्हणतात. हा संन्यास व जीवन्मुक्ति यांत कांहीं फरक नाहीं. ते पर्याय शब्द आहेत. या अवस्थेंत मनोनाश व वासनाक्षय पराकाष्ठेस पोंचलेले असतात. म्हणूनच आचार्यांनीं आपल्या भाष्यांत वारंवार 'भोजनाप्रमाणें ज्ञान दृष्ट फल देणारें आहे,' असें म्हटलें आहे. अशा मनुष्याला ब्रह्मविद्हि म्हटलेलें वेदान्तशास्त्राला खपत नाहीं, तर तो साक्षात् ब्रह्मच होय. अशा अवस्थेत कर्मांचा मुळींच संभव नाहीं. ज्ञानी पुरुषानें लोकसंग्रहार्थ कर्म करणें वगैरे हे सर्व पक्ष या जीवन्मुक्तीच्या अपेक्षेनें कमी योग्यतेचे आहेत. कारण जेथें कर्म तेथें विक्षेप अपरिहार्य असल्यामुळें कोणत्याहि कर्मानुष्ठानावस्थेंत निरतिशय शांतीचा भंग झाल्यावांचून रहात नाहीं. असो; गीतेला व वेदान्तशास्त्राला वरील जीवन्मुक्ति किंवा 'ज्ञानस्य परा निष्ठा' अंतिम साध्य म्हणून विवक्षित आहे. अर्थात् बाकीचे सर्व उपाय–योग हीं त्या श्रेष्ठ स्थितीचीं साधनें आहेत.

आधुनिक सुशिक्षितांतील पुष्कळ लोक गीतेला प्रमाण मानतात. पण तिचीं सर्व प्रमेयें त्यांना संमत नसतात. उदाहरणार्थ–त्यांना जगत् प्रत्यक्ष दिसतें.त्यांतील सर्व व्यवहार अबाधितपणें चाललेले दिसतात.त्यामुळें जगत् मिथ्या–अनित्य आहे,हें म्हणणें त्यांस पटत नाहीं. तसेंच मोक्ष म्ह० जन्ममरणसुखदुःखसंप्राप्तिरूप किंवा शरीरग्रहणरूप

संसाराचा अत्यंत उच्छेद ही कल्पना त्यांच्या चित्तावर आरूढ होत नाहीं. पण ते गीतें-तीलच ‘ आगमापायिनः अनित्याः ’ २-१४ ‘ असतः भावः न ’ २-१६ ‘ अन्तवन्तः देहाः ’ २-१८ ‘ जातस्य ध्रुवः मृत्युः ’ २-२७ ‘ व्यक्तमध्यानि ’ २-२८ ‘ भोगाःदुःख योनयः आद्यन्तवन्तः ’ ५-२२ ‘ अनित्यं असुखं इमं लोकं ’ ९-३३ इत्यादि वचनांकडे पहात नाहींत. त्याचप्रमाणे ‘ मामुपेत्य पुनर्जन्म दुःखालयं अशाश्वतं नाप्नुवन्ति ’ ८-१५ ‘ मामुपेत्य पुनर्जन्म न विद्यते ’ ८-२६ ‘ जन्मबन्धविनिर्मुक्ताः अनामयं पदं गच्छन्ति ’ २-५१ ‘ जन्ममृत्युजरादुःखैः विमुक्तः मां उपैष्यसि ’ १४-२० ‘ जरामरणमोक्षाय ’ ७-२९ इत्यादि वचनांवरून गीतेला कोणता मोक्ष विवक्षित आहे, तें उघड होतें. आतां ज्यांना हीं वचनेंच मानावयाचींच नसतील किंवा ज्यांना त्यांच्या श्रुतार्थाहून निराळ्याच अश्रुत अर्थाची कल्पना करावयाची असेल त्यांच्याविषयीं आम्हांला कांहींच बोलावयाचें नाहीं.

रहस्यकार ‘ प्रस्थानत्रयी ’ या संबंधानें म्हणतात–“ उपनिषदांतील ज्ञान प्रायः वैराग्यपर म्ह० निवृत्तिपर असून वेदान्तसूत्रें उपनिषदांची एकवाक्यता करण्यासाठींच रचलेलीं असल्यामुळे त्यांतहि वैदिक प्रवृत्तिमार्गाचें कोठेंच सविस्तर तात्त्विक प्रतिपादन केलेलें नाही. म्हणून वर सांगितल्याप्रमाणें प्रवृत्तिमार्गप्रतिपादक भगवद्गीतेनें वैदिकधर्म-तत्त्वज्ञानांतील ही उणीव जेव्हां प्रथम भरून काढली, तेव्हां उपनिषदे व वेदान्तसूत्रें यांतील धार्मिकतत्त्वज्ञानाची पूर्तता करणारा ग्रंथ या नात्यानें भगवद्गीता ही त्यांच्या इतकीच सर्वमान्य व प्रमाणभूत झाली; आणि अखेर उपनिषदें, वेदान्तसूत्रें व भगवद्गीता यांस ‘ प्रस्थानत्रयी ’ हे नांव प्राप्त झालें. ‘ प्रस्थानत्रयी ’ म्ह० प्रवृत्ति व निवृत्ति मिळून दोन्ही मार्गांचें पद्धतशीर व तात्त्विक विवेचन करणारे वैदिक धर्माचे तीन मुख्य आधारभूत ग्रंथ किंवा खांब होत. ” (गी. र. पृ. १२.) पण हें म्हणणें निराधार आहे. ‘प्रस्थानत्रयी’ या शब्दाची अशी व्याख्या कोणींच कोठे केलेली नाहीं. वैदिकप्रवृत्तिमार्गाचें सविस्तर प्रतिपादन कोठेंच केलेले नाही, हें म्हणणे अतिशय धाष्टर्याचें आहे. सर्व कर्मकांड, सबंध पूर्व मीमांसा, कल्पसूत्रें, मनु-याज्ञवल्क्यादि स्मृति यांपेक्षां आणखीं वैदिक प्रवृत्तिमार्गाच्या प्रतिपादनाचा विस्तार कितीसा हवा ? आतां ‘ तात्त्विक प्रतिपादन ’ असा एक शब्द त्यांत त्यांनीं घातला आहे. पण तात्त्विक प्रतिपादन उपनिषदांतहि आहे, ब्रह्मसूत्रांतहि आहे व त्याला अनुसरूनच गीतेंतहि आहे. वैदिक सकाम प्रवृत्ति संसार देणारी आहे, निष्काम प्रवृत्ति चित्तशुद्धीच्याद्वारा ज्ञाननिष्ठायोग्यता देणारी आहे. आत्मा वस्तुतः निष्क्रिय, अभोक्ता व असंग आहे, त्यामुळें सर्व प्रवृत्ति शरीरेंद्रियांची आहे, इत्यादि गीतेंतील विचार उपनिषदांना सोडून नाहींत. अर्थात् गीतेनें वैदिकधर्मतत्त्वज्ञानांतील उणीव भरून काढली किंवा उपनिषदे व वेदान्तसूत्रे यांतील धार्मिकतत्त्वज्ञानाची पूर्तता केली, हे म्हणणे सर्वथा अनुपपन्न आहे. श्रुति व स्मृति यांचा संबंध आम्हीं वर दाखविला आहे व ब्रह्मसूत्रांत गीतेचा स्मृति म्हणून उल्लेख केल्याचेंहि सांगितलें आहे. त्यामुळें रहस्यकार म्हणतात तशी कल्पना करण्यास अवकाशच नाही. वैदिक प्रवृत्ति धर्माचा विचार कर्मकांड, कल्पसूत्रें व स्मृति आणि पूर्वमीमांसा यांत जसा केला आहे तसाच

निवृत्ति धर्माचा विचार उपनिषदें, गीता व ब्रह्ममीमांसा यांत केला आहे. प्रस्थानत्रय याच शब्दानें बोलावयाचें झाल्यास श्रुति, स्मृति व सूत्र हें जसें प्रवृत्तिलक्षण धर्माचें प्रस्थानत्रय तसेंच उपनिषद्, गीता व ब्रह्मसूत्र हें वेदान्ताचें प्रस्थानत्रय आहे. तात्पर्य रहस्यकारादि सर्व आधुनिकांना आमचें इतकेंच सांगणें आहे कीं, ‘ तर्क्यतां मा कुतर्क्यतां ’ तुम्ही हवे तसे व हवे तितके तर्क करा, पण कुतर्क करूं नका, व ‘ अमार्गेण विचार्याथ...वक्त्यन्यथान्यथा ’ या दोषास पात्र होऊं नका !

तात्पर्य आचार्यांचे गीताभाष्य वैदिक संप्रदाय, वेदान्त व मीमांसाशास्त्र यांना धरून लिहिलेले आहे, ही गोष्ट विचारपूर्वक भाष्य वाचणारांच्या लक्षांत येईल. खरा गीतार्थ शांकरभाष्यावरूनच कळणे शक्य आहे. दुसऱ्या कोणत्याहि टीकेवरून नाहीं. गीतारहस्यावरून गीतेचा खरा अर्थ कळणें तर अगदींच अशक्य आहे, हें आम्ही पुढें ठिकठिकाणी दाखविलें आहे. रहस्यकारांनीं आपल्या अर्थाच्या समर्थनार्थ ज्या विस्तृत टीपा लिहिल्या आहेत त्यांचे परीक्षण आम्ही यांत केलेंच आहे. आतां त्यांनीं आरंभीं जी पंधरा-सोळा प्रकरणें लिहिलीं आहेत, त्यांचेंहि संक्षिप्त परीक्षण अप्रत्यक्षपणें टीपांच्या परीक्षणांतच होऊन गेलें आहे, तथापि प्रत्येक प्रकरणाचें सविस्तर परीक्षण व्हावयास पाहिजे होते, पण प्रस्तुत ग्रंथ फारच वाढल्यामुळें आतां त्यासंबंधीं एक अक्षरहि लिहिण्यास सवड नाहीं. क्षराक्षरविचार, कर्मविपाक, अध्यात्म, सुखदुःखविवेक, कर्मयोग व संन्यास इत्यादि बहुतेक प्रकरणांचें सविस्तर व सोपपत्तिक परीक्षण करावयास पाहिजे व पुढे मागें प्रसंग आल्यास आम्ही तें करूंहि, पण तूर्त प्रत्यक्ष गीताशास्त्रार्थाला त्याचा विशेष उपयोग नसल्यामुळें व महत्त्वाच्या भागांचे परीक्षण होऊन गेल्यामुळें आम्ही त्याची उपेक्षा करितों. आमचा धर्म व तत्त्वज्ञान परमार्थप्रधान व मोक्षप्रधान असल्यामुळें आणि आमचे वर्ण व आश्रम शास्त्रोक्त असल्यामुळे त्यांची व इतर धर्म व तत्त्वज्ञान यांची तुलना करणेंच अयोग्य आहे. पुनर्जन्म व जन्ममरणपरंपरेंतून मुक्त होणें, ह्याची ज्यांना कल्पनाच नाहीं, त्यांच्या लौकिक तत्त्वज्ञानाशीं केवल जीवाच्या मोक्षासाठींच प्रवृत्त झालेल्या वेदान्तशास्त्राची बरोबरी होणार कशी ? असो; तात्पर्य आमचीं शास्त्रें आमच्या परंपरेनेंच पाहिलीं पाहिजेत. तीं श्रुतिप्राधान्यानेच लाविलीं पाहिजेत. अंशतः श्रुतिविरुद्ध प्रतिपादन करणाऱ्या सांख्य-वैशेषिकांचीहि उपेक्षा करणारे वैदिक केवल इहलोकवादी पाश्चात्त्यांच्या तत्त्वज्ञानाला मोक्षमार्गात कितीसा मान देतील, याचे नुस्ते अनुमानच करणें बरें ! रहस्यकारांनीं सम्प्रदाय सोडून व पाश्चात्त्यांचा चष्मा लावून गीतेकडे पाहिल्यामुळें त्यांचें गीतारहस्य पदोपदीं आक्षेपार्ह झाले आहे. म्हणून वैदिक जनतेनें वैदिक संप्रदायाला यत्किंचित्‌हि न सोडता लिहिलेल्या व सर्वथा सोपपत्तिक, अशा शांकरभाष्याधारेंच गीतेचा खरा अर्थ समजून घेऊन मोक्षमार्गाला लागावे, अशी शुभ इच्छा व्यक्त करून व त्या सर्वांना सर्वान्तर्यामी तशी सद्‌बुद्धि देवो, अशी प्रार्थना करून ही प्रस्तावना आचार्यचरणीं अर्पण करितों.

मिति कार्तिक शु. १ शके १८४३
पुणे सदाशिव पेठ घर नं. २७०

आचार्यभक्त
**विष्णु वामन बापटशास्त्री.**

# गीताभाष्यार्थांची विषयानुक्रमणिका.

## विषय.

**हें कर्मच नव्हे**, लोकसंग्रहार्थ कर्म, रहस्यकारांची मोक्षसाधनाविषयीं धरसोड, भगवान् व जनकादिक यांच्या कर्माविषयी विचार, चित्तशुद्धीसाठीं कर्म, त्याविषयीं प्रमाण, तस्मात् केवल ज्ञानानेंच मोक्ष, म्हणून शोकसागरांतून अर्जुनाचा उद्धार करण्यासाठीं आत्मज्ञानोपदेश, [ ५१–६० ]; रहस्यकारांच्या ' अशोच्यान्० ' या श्लोकाच्या अवतरणाचा विचार [ ६१–६४ ]; ' अशोच्यान्०' याचे व्याख्यान व रहस्यकारांच्या अर्थाचें परीक्षण [ ६५–६६ ]; आत्मा नित्य म्हणून अशोच्य, नित्यत्वाविषयीं दृष्टान्त [ ६७–७० ]; 'मात्रास्पर्शाः०' यानें तितिक्षेचें विधान, र. का.च्या अर्थाचें परीक्षण, तितिक्षेचे फल [ ७१–७५ ]; 'नासतो विद्यते०' याचें सविस्तर व्याख्यान, रहस्यकारांच्या अर्थाचें परीक्षण [ ७६–८४ ]; सत् काय ? असत् काय ? [ ८५–८८ ]; 'अनाशिनः०' व 'नित्यस्य' या वरील पुनरुक्तीचें निरसन [ ८८ ]; आत्म्याचें अप्रमेयत्व [ ८९–९१ ]; 'युध्यस्व' हा विधि नव्हे, अनुवाद, याविषयीं रहस्यकाराचे म्हणणें व त्यावर दोष [ ९१–९२ ]; गीताशास्त्र संसारकारणनिवर्तक आहे प्रवर्तक नव्हे, याविषयीं श्रुतिप्रमाण, त्यावरून आत्मा निर्विकार आहे, हा सिद्धान्त [ ९३–९९ ]; आत्म्याला जो निर्विकार समजतो तो क्रिया कशी करणार ? [ १००–१०२ ]; अविद्वानासाठींच कर्मविधि, विद्वानासाठीं नाहीं, याचें सोपपत्तिक विवेचन, त्याविषयीं व्यासवचन, आत्मज्ञानाच्या असंभवाविषयीं आक्षेप-समाधान, ' सर्वकर्माणि मनसा० ' याचे विवेचन, ज्ञान्याचा संन्यासातच अधिकार [ १०३–११५ ]; आत्म्याच्या अविनाशित्वाचेच दृष्टान्तपूर्वक उपपादन व त्यामुळेच अशोच्यत्व, [११६-१२१]; आत्मा अनित्य आहे, असे मानले तरी त्याचें अशोच्यत्व [१२२–२३]; देहेंद्रियादि संघाताविषयींहि शोक करणे योग्य नव्हे, अव्यक्तशब्दावरून रहस्यकार सांख्यदर्शनाशीं गीतेचा संबंध जोडतात त्याचे निरसन, ' अदर्शनात् ' या शब्दाच्या अर्थाचे निरसन [ १२४–२६ ]; आत्मा दुर्ज्ञेय याविषयी श्रुतीचा अनुवाद, रहस्याचें परीक्षण [ १२७–२८ ]; प्रकरणार्थाचा उपसंहार, त्याविषयींच्या रहस्याचे परीक्षण [१२९–३०]; प्रासंगिक उपदेश व त्यासंबधीं रहस्याचे परीक्षण [ १३१–३८ ]; ' सुखदुःखे०' याचे व्याख्यान व त्यासंबधीं रहस्याचे परीक्षण [ १३९–४० ]; शास्त्रविषयविभाग, त्यासबधी रहस्यपरीक्षण [ १४१–४३ ]; ' एषा तेऽभिहिता०' याचे व्याख्यान, त्याविषयींच्या व योगशब्दाच्या अर्थाविषयींच्या रहस्याचे परीक्षण [१४४–५१]; 'नेहाभिक्रमनाशोऽस्ति०' याचें व्याख्यान व परीक्षण [ १५२–५४ ]; 'व्यवसायात्मिका बुद्धिः०' याचें व्याख्यान व परीक्षण [ १५५–५७ ]; 'यामिमां०' इत्यादि श्लोकांचे व्याख्यान, व तत्संबंधी रहस्याचें परीक्षण [ १५८–६३ ]; ' त्रैगुण्यविषयाः०' याचे व्याख्यान व परीक्षण [ १६४–६८ ]; 'यावानर्थ उदपाने० ' याचें व्याख्यान व परीक्षण [ १६९–७१]; 'कर्मण्येवाधिकारस्ते०' याचें व्याख्यान व परीक्षण [ १७२–७४ ]; ' योगस्थः कुरु कर्माणि०' याचें व्याख्यान व परीक्षण [१७५–७७]; 'दूरेण ह्यवरं कर्म०' याचें व्याख्यान व परीक्षण [ १७८–७९ ]; ' बुद्धियुक्तो जहातीह० ' याचे व्याख्यान व परीक्षण [१८०–८३]; ' कर्मजं बुद्धियुक्ताः ' व्याख्यान व परीक्षण [१८४–८६];'यदा ते मोहकलिलं०' व्याख्यान-परीक्षण [१८७–८८]; ' श्रुतिविप्रतिपन्ना० ' व्याख्यान-परीक्षण [ १८९–९१ ]; स्थितप्रज्ञाच्या लक्षणाविषयीं प्रश्न-प्रतिवचन, व ठिकाठिकाणीं रहस्यपरीक्षण [ १९२–२२७ ]; ' विहाय कामान्०' याचें व्याख्यान व रहस्यपरीक्षण [ २२८–२९ ]; ' एषा ब्राह्मी स्थितिः०' याचें व्या-

ख्यान व परीक्षण [ २३०–३२ ]; 'योग'शब्दाच्या अर्थाविषयीं चर्चा [ २३३–३४ ].


**अध्याय ३ रा**—[ २३५–३४७ ] अर्जुनाच्या प्रश्नाविषयीं विचार, ज्ञानकर्म-समुच्चयाचें पुनः खंडन [ २३५–४८ ]; त्यासंबधी रहस्याचें परीक्षण [ २४९–५० ]; 'ज्यायसी चेत्० ' इत्यादि प्रश्नाचें व्याख्यान व तत्संबधीं रहस्यपरीक्षण, [ २५१–५४ ]; ' लोकेऽस्मिन् द्विविधा०' याचें व्याख्यान व तत्संबधीं रहस्यपरीक्षण, [ २५५–२६० ]; ' न कर्मणामनारभात्०' याचें अवतरणासह व्याख्यान व रहस्यपरीक्षण, [ २६१–६७ ]; ' कर्मयोग नैष्कर्म्याचे साधन ' या सिद्धान्ताच्या सिद्ध्यर्थ रहस्यपरीक्षण [ २६७–७० ]; ' न हि कश्चित् क्षणमपि०' याचे व्याख्यान न तत्संबंधी रहस्यपरीक्षण [ २७१–७२ ]; 'कर्मेन्द्रियाणि सयम्य०' इत्यादि दोन श्लोकाचे व्याख्यान व परीक्षण [ २७३–७७ ]; ' नियत कुरु कर्म त्वं०' याचें व्याख्यान व परीक्षण [ २७८ ]; ' यज्ञार्थात्कर्मणोऽन्यत्र ' याचें व्याख्यान व सविस्तर परीक्षण [ २७९–८२ ]; ' सहयज्ञाः प्रजाः सृष्ट्वा ' इत्यादि तीन कर्मयोगपर श्लोकाचे व्याख्यान व तत्संबधीं रहस्यपरीक्षण [ २८३–८७ ]; १४ ते १६ श्लोकांतील जगच्चक्र व तत्संबधीं रहस्यपरीक्षण [ २८८–९४ ]; या कर्मयोगाच्या अपवादभूत ' यस्त्वात्मरतिरेव० ' इत्यादि दोन लोकाचे अवतरणासह व्याख्यान व तत्संबंधी रहस्यकाराच्या म्हणण्याचें परीक्षण [ २९५–३०० ]; ' तस्मादसक्तः सततं कार्य कर्म समाचार ' याचे व्याख्यान व तत्संबधीं रहस्यपरीक्षण [ ३०१–३०७ ]; ' कर्मणैव हि ससिद्धि० ' या श्लोकांचें व्याख्यान, लोकसग्रहशब्दार्थ, तत्संबधी रहस्यपरीक्षण [ ३०७–३१२ ]; श्रेष्ठाचें अनुकरण इतर जन करितात [ ३१३ ]; याविषयी स्वतः भगवानांचें उदाहरण, तत्संबधी रहस्यपरीक्षण [ ३१४–३१७ ]; भगवान् मी आपलें नियत कर्म न केल्यास काय होईल ते सांगतात [ ३१८ ]; लोकसंग्रहचिकीर्षूनें कर्म कसें करावें, तें २५–२६ श्लोकांत सांगून तत्संबधी रहस्यपरीक्षण [ ३१९–२३ ]; अज्ञ कर्मांत आसक्त कसा होतो, आत्मज्ञ कसा होत नाहीं तें सांगुन अज्ञांचा बुद्धिभेद करूं नये, याचा उपसंहार व तत्संबधी रहस्यपरीक्षण [ ३२४–२७ ]; अर्जुनाला सर्व कर्मे ब्रह्मार्पण करण्याचा उपदेश [३२८]; या उपदेशाचे अनुवर्तन करणारे व न करणारे यास भिन्न भिन्न फल, सर्वच लोक त्याचें का अनुवर्तन करीत नाहीत? पुरुषार्थाला अवकाश कोठें? इत्यादि व तत्संबधीं रहस्यपरीक्षण [ ३२९–३३६ ]; ' श्रेयान् स्वधर्मः ' याचें व्याख्यान व रहस्यकारांच्या स्वधर्मशब्दाच्या अर्थाचे परीक्षण [ ३३७–३८ ]; सर्व अनर्थांचें मूळ काय? 'काम'च सर्व पापांचें कारण, असे या प्रश्नाचें उत्तर, व इंद्रियनिग्रह–मनोनिरोध या उपायांनी त्याचा त्याग करण्याविषयी उपदेश व परीक्षण [३३९–४७].... २३५–३४७.

**अध्याय ४ था**.—[ ३४८–४६८ ] या योगाचा सप्रदाय, त्याविषयीं रहस्यकारांच्या म्हणण्याचें सविस्तर परीक्षण, नारायणीयधर्माचें संक्षिप्त स्वरूप, कर्मयोगाचें स्वरूप, नृसिंहपुराण, हारितस्मृति, योगवासिष्ठ यांतील वचनांची व्यवस्था, संप्रदाय सदोष नाही, [ ३४८–६६ ]; ' योगो नष्टः ' याचा भावार्थ, तोच प्राचीन योग तुला सांगितला, त्याविषयीं अर्जुनाची शका व भगवानांचें समाधान, अज असूनहि जन्माचा प्रकार, प्रकृतिशब्दाने सांख्यप्रकृति घेतां येत नाहीं, ईश्वराच्या मायिक जन्माचे निमित्त, त्याचें प्रयो-

जन, रहस्यकारांच्या येथील धर्मशब्दाच्या अर्थाचें परीक्षण [ ३६६–३७३ ]; ईश्वराचें दिव्य जन्मकर्म, त्याच्या ज्ञानानें मुक्ति, त्यासंबंधीं रहस्यपरीक्षण, हा ज्ञानमार्ग अनादि आहे [ ३७४–७६ ]; ‘ ये यथा मां० ’ याचें व्याख्यान, रहस्यपरीक्षण, ‘कर्मजा सिद्धि’ सत्वर होते, चातुर्वर्ण्य, मी अकर्ता व अव्यय, तत्संबंधीं रहस्यपरीक्षण, मला जो तत्त्वतः जाणतो तो बद्ध होत नाही, तत्संबंधीं रहस्यपरीक्षण [ ३७६–८४ ]; पूर्वमुमुक्षूंनी कर्म केलें, म्हणून तूंहि कर्म कर, मुमुक्षुशब्दाच्या अर्थाविषयीं रहस्यपरीक्षण, श्रीशंकराचार्यादि संन्यासमार्गीयांवरील रहस्यकारांचे आक्षेप व त्यांचें समाधान [३८५–८९]; कर्माकर्माचा सविस्तर विचार, तत्संबंधी रहस्यपरीक्षण [ ३९०–४०९]; कर्मामध्यें अकर्मादि दर्शनाची स्तुति, लोकसंग्रहेच्छु ज्ञानी पुरुषाचें कर्म हे कर्म नव्हे, यासंबंधी आचार्यांचें महत्त्वाचें भाष्य, रहस्यपरीक्षण [ ४१०–१४ ]; सर्वथा निवृत्त झालेल्या ज्ञानी पुरुषाच्या केवल शारीर कर्मांमुळें त्याला पाप लागत नाहीं, शारीरशब्दाचा अर्थ, रहस्यपरीक्षण, अन्नादि-प्राप्तीचा उपाय, त्या वेळची वृत्ति, ज्ञानी कर्माधिकाऱ्याचे कर्म लीन होतें, तत्संबधी रहस्य-परीक्षण [ ४१५–२६ ]; ‘ ब्रह्मार्पणं० ’ याचे सविस्तर भाष्य व तत्संबंधी रहस्यपरीक्षण, ज्ञानयज्ञाच्या स्तुत्यर्थ इतर मुख्य व गौण यज्ञांचा निर्देश, त्यांत ठिकठिकाणी रहस्यपरी-क्षण, ज्ञानयज्ञ सर्वांत श्रेष्ठ [ ४२७–५२ ]; ज्ञानप्राप्तीचे बहिरंग उपाय, ज्ञानाचें फल, ज्ञानाग्नि कर्मांना दग्ध करितो, ज्ञानासारखे पावन करणारे कांहीं नाही, ते ज्ञान दीर्घकाल कर्मादिकांच्या अनुष्ठानानें प्राप्त होते,यासंबंधी रहस्याचे परीक्षण [४५३–६०]; ज्ञानप्राप्तीचीं श्रद्धादि नियत अन्तरंग साधनें, ‘ संशयात्मा विनश्यति ’ ‘योगसन्यस्तकर्माणं०’ ‘योगं आतिष्ठ ’ यांचें भाष्य व रहस्यपरीक्षण [ ४६१–६८ ]. ... ... ...३४८–४६८.

**अध्याय ५ वा.**—[४६९–५३४] चवथ्या अध्यायांतील संन्यासपर व कर्मपर वचनें, पण परस्पर विरुद्ध असलेल्या त्यांतील कोणतें तरी एकच करण्याचा प्रसंग आला असतां त्यांतल्या त्यांत प्रशस्ततर कोणतें, असा प्रश्न, त्याविषयीं सविस्तर विचार, येथील संन्यास व कर्मयोग अनात्मकृतच घेतले पाहिजेत, आश्रमसंन्यासाहून सर्वकर्मसंन्यास अगदीं निराळा, याविषयीं रहस्यकारांचें म्हणणे व त्याचें परीक्षण [ ४६९–८१ ]; अर्जुनाचा प्रश्न, भग-वानांचें ‘ कर्मयोगो विशिष्यते ’ असें उत्तर, तत्संबंधी रहस्यपरीक्षण [४८२–८९ ]; राग-द्वेषरहित पुरुष नित्यसंन्यासी, सांख्य व योग फलतः पृथक् नाहींत, परमार्थसंन्यास कर्मयो-गानुष्ठानावांचून प्राप्त होणें कठिण, योगयुक्ताला संन्यास सत्वर प्राप्त होतो, तत्संबंधीं रहस्यपरीक्षण [४९०–९७]; ज्ञानी लोकसंग्रहार्थ कर्म करीत असूनहि लिप्त होत नाहींत, तत्त्ववेत्त्यानें सर्व स्वाभाविक कर्में करीत असतांना कशी भावना ठेवावी, तत्संबंधीं रहस्य-परीक्षण, अतत्त्वविद् कर्में ब्रह्मार्पण करून व फलासक्ति सोडून दोषानें लिप्त होत नाही, चित्तशुद्धीसाठीं कर्में करितात,कर्मफलत्यागानें नैष्ठिकी शान्ति,फलेच्छेनें बंध [४९८–५०३]; परमार्थदर्शी सर्वकर्मसंन्यास करून शरीरनगरांत राहतो, तत्संबंधीं रहस्यपरीक्षण, प्रभु —आत्मा कांहीं करीत नाहीं, करवीत नाही, कोणाचें पापपुण्य घेत नाही, पण अज्ञानानें ज्ञान आवृत्त होऊन तसा भ्रम होतो, रहस्यकार येथें पुनः सांख्यदर्शन आणतात, त्याचें संक्षिप्त निरसन, ज्ञानानें अज्ञाननाश व परमार्थतत्त्वाचा प्रकाश, तत्संबंधीं रहस्यपरीक्षण, [ ५०४–११ ]; ब्रह्मनिष्ठ ज्ञानी मुक्त होतात, ज्ञानी समदर्शी असतात, रहस्यपरीक्षण,

साम्यांत स्थित झालेले ब्रह्मस्थित होत, तत्संबंधी रहस्यपरीक्षण [ ५१२-१८ ]; ब्रह्मस्थितानें कसें असावें, विषयोपभोग दुःखाचीच कारणें, कामक्रोधोद्भव वेग सहन करितो तो सुखी, ब्रह्मनिर्वाण कोणाला मिळतें, काम-क्रोधरहित यतींना ब्रह्मनिर्वाण उभयतः असतें, ठिकठिकाणीं रहस्यपरीक्षण [ ५१९-५२९ ]; पुढील ध्यानयोगाचे सूत्रस्थानीय श्लोक, ईश्वराला जाणूनच शांति, रहस्यपरीक्षण [५२९-३४ ]. ... ... ४६९-५३४.

**अध्याय ६ वा**—[५३५-६११] ध्यानयोग ज्ञानाचें अन्तरंग साधन, कर्म ध्यानाचें बहिरंग, ध्यानयोगारोहणसामर्थ्य येईपर्यंत अधिकारी गृहस्थानें कर्मच करावें, नंतर शम—सन्यास, याविषयीं सविस्तर विचार, भगवान् श्रुति-स्मृत्यादि प्रमाणसिद्ध आश्रमसंन्यासाचा निषेध करतील, हें शक्य नाही, याविषयींच्या रहस्याचें परीक्षण [ ५३५-५४३ ]; 'अनाश्रितः०' या श्लोकाचें व्याख्यान व तत्संबधीं रहस्यपरीक्षण, कर्मफलत्यागाची संन्यास व योग या रूपाने स्तुति, यांतील संकल्पत्याग हें सादृश्य, 'आरुरुक्षोः०' या श्लोकाचें व्याख्यान व तत्संबंधी रहस्याचें सविस्तर परीक्षण [ ५४४-५५ ]; योगारूढाचें लक्षण, रहस्यपरीक्षण, आपला उद्धार करावा, आपणच आपला शत्रु व मित्र, त्याचें स्पष्टीकरण, युक्त योग्याचे लक्षण, तत्संबधी रहस्यपरीक्षण, उत्तम योगारूढाचें लक्षण [ ५५५-६५ ]; 'योगी युञ्जीत सततं०' याचे व्याख्यान, तत्संबंधी रहस्यपरीक्षण, योगाभ्यासास देश, आसन, आहार-विहारादिनियम, प्राप्तयोगलक्षण, त्याचें फल वगैरे तत्संबंधी रहस्याचें ठिकठिकाणी परीक्षण [ ५६६-५८४ ]; योगाभ्यासाचा प्रकार, योगी ब्रह्मभूत होतो, त्याला अक्षय्य सुख होतें, योग्याला सर्वत्र समदर्शन प्राप्त होतें, योगी व ईश्वर एकमेकाला परोक्ष रहात नाहींत, अद्वैती भक्त ईश्वरामध्येंच राहतो, आपल्या उपमेनें सर्वत्र सुखदुःखांस सम पाहणारा परम योगी, तत्सबंधीं रहस्यपरीक्षण [५८५-५९२]; या योगाच्या अशक्यतेविषयीं अर्जुनाचा प्रश्न, मनाच्या निग्रहाचे दुष्करत्व, तत्संबंधीं रहस्यपरीक्षण, मनाचे चांचल्य कबूल करून त्याच्या निग्रहाचे उपाय, तत्संबंधी रहस्यपरीक्षण, योग शक्य कोणाला व अशक्य कोणाला ? [ ५९३-५९९ ]; योगभ्रष्टाविषयीं अर्जुनाचा प्रश्न व 'त्याचा नाश होत नाही,' इत्यादि श्रीकृष्णाचे उत्तर, रहस्यपरीक्षण [६००-६०८ ]; सर्वांहून योगी श्रेष्ठ व तू योगी हो, सर्व योग्यांमध्ये भक्त श्रेष्ठ, अशी पुढील उपासनाकांडाची प्रस्तावना, रहस्याचे परीक्षण [ ६०८-६११ ]. ... ... ५३५-६११.

**अध्याय ७ वा**—[ ६१२-६४४ ] ध्यान करीत असतांना मला कसा जाणशील तें ऐक, शास्त्रज्ञानासह स्वानुभव ज्ञान सागतों, तत्संबंधीं रहस्यपरीक्षण, ज्ञानाची दुर्लभता अपरा व परा प्रकृति, त्या दोन प्रकृतिच सर्व जगाचें कारण, मला सोडून कांहीं नाहीं, माझ्यामध्यें सर्व ओतप्रोत, रहस्यपरीक्षण, जलादि पदार्थ रसादिरूप अशा माझ्या ठिकाणीं ओतप्रोत, मी सर्वभूतांचें बीज, सात्त्विकादि सर्व पदार्थ मजपासून, सत्त्वादि गुणांनी मोहित झालेलें जगत् मला जाणत नाही, माझी दैवी माया दुरत्यय आहे, माझे भक्तच तिला तरतात, पापी मूढ मला शरण येत नाहीत, चार प्रकारचे भक्त, त्यांतील ज्ञानी श्रेष्ठ, सर्व भक्त उत्तम पण ज्ञानी माझा आत्मा, अनेक जन्मांनीं ज्ञानी झालेला मला पोंचतो, जे भिन्न भिन्न देवतांची उपासना करितात, त्यांची तीच ती श्रद्धा मी दृढ करितों, त्यांना अंतवत् फल मिळतें, अज्ञ मी पूर्वी अव्यक्त होतों व आतां व्यक्त झालों असें समजतात, मी सर्वांनाच

प्रकट होत नाहीं. इच्छा-द्वेषजन्य द्वंद्वांनी भूतें जन्माच्या वेळींच मोह पावतात; पुण्यवान्‌च मला भजतात, त्यांनाच ब्रह्मज्ञान होतें. ... ... ... ... ...६१२–४४.

**अध्याय ८ वा**—[ ६४५–६७९ ] ब्रह्मादिकांविषयीं प्रश्न, त्यांचीं क्रमानें उत्तरें, अन्तकालीं माझें स्मरण करीत जो शरीर सोडतो तो मला प्राप्त होतो, रहस्यपरीक्षण, त्याविषयीं सामान्य नियम, सर्वकालीं माझें स्मरण कर व युद्ध कर, तत्संबंधीं रहस्यपरीक्षण [ ६४५–६५२ ]; अनन्य मनानें परम पुरुषाचें चिंतन करणारा त्यालाच प्राप्त होतो, पुरुषाचें वर्णन, ओंकारोपासना, तत्संबंधीं रहस्यपरीक्षण [ ६५३–६१ ]; माझें सतत स्मरण करणाराला मी सुलभ, मला प्राप्त झाल्यावर पुनर्जन्म नाहीं, ब्रह्मलोकापर्यंत सर्व लोक पुनः उत्पन्न होणारे, कारण ते सर्व लोक कालपरिच्छिन्न, कल्पाच्या आरंभीं तोच तो भूत-समुदाय उत्पन्न होऊन कल्पान्तीं नाश पावतो, परमात्मा त्या अव्यक्ताहून अगदीं विलक्षण अव्यक्त, सनातन वगैरे आहे, तो पुरुष अनन्य भक्तीनेच लभ्य आहे [ ६६२–७० ]; शुक्लकृष्णगती, तत्संबंधीं रहस्यपरीक्षण, जगाच्या या नित्य गतीच्या ज्ञानाचें फल [ ६७०–७९ ]. ... ... ... ... ... . ... ...६४५–६७९.

**अध्याय ९ वा**—[ ६८०–७२६ ] पूर्वोत्तराध्यायसंगति, तत्संबंधीं रहस्यपरीक्षण, विज्ञानासह ज्ञान सांगण्याची प्रतिज्ञा, राजविद्या-राजगुह्य अशी त्या ज्ञानाची प्रशंसा, रहस्यपरीक्षण, या धर्मावर श्रद्धा न ठेवणारे संसारांत पडतात; मीं हें सर्व व्यापिलें आहे, मी सर्वाधार, माझा ऐश्वर योग पहा, तत्संबंधीं रहस्यपरीक्षण [ ६८०–८८ ]; आकाशांत जसा वायु, तशीं माझ्यामध्यें सर्वभूतें, रहस्यपरीक्षण, कल्पान्तीं सर्वभूतें माझ्या प्रकृतीला प्राप्त होतात, प्रकृतीला स्वाधीन ठेवून मीं भूतांना पुनः पुनः उत्पन्न करितो, तीं कर्में मला बद्ध करीत नाहींत,रहस्यपरीक्षण,माझ्या अध्यक्षपणामुळे प्रकृति चराचर प्रसवते,रहस्यपरीक्षण [ ६८८–९६ ]; मूढ माझी अवज्ञा करितात, त्यांच्या आशा वगैरे सर्व व्यर्थ होतात, दैवीप्रकृतीचे महात्मे माझें अनन्य मनानें भजन करितात; त्यांच्या भजनाचा प्रकार, मीच क्रतु वगैरे सर्व [ ६९७–७०४ ]; वैदिक कर्मठ स्वर्गाला प्राप्त होऊन तेथून पुण्यक्षय होतांच परत या लोकीं येतात,भक्तांचा योगक्षेम मी वाहतो,तत्संबंधीं सविस्तर रहस्यपरीक्षण, अन्यदेवताभक्तहि अज्ञानानें माझेंच यजन करितात, तत्संबंधीं रहस्यपरीक्षण, मीच यज्ञभोक्ता व फलदाता, देवादिकांचे पूजक देवादिकांस प्राप्त होतात, भक्ताच्या पत्र-पुष्पादिकांचाहि मी स्वीकार करितों, 'यत्करोषि यदश्नासि०' याचें व्याख्यान, तत्संबंधीं रहस्यपरीक्षण [ ७०५-१५ ] ; 'शुभाशुभफलैः०' याचें व्याख्यान व तत्संबंधीं रहस्यपरीक्षण, मी सर्वभूतांमध्यें सम, अत्यंत दुराचारी भक्तहि साधुच, कारण तो सत्वर सद्वृत्त होतो, स्त्रिया, वैश्य, शूद्रहि जर माझ्या भक्तीनें परम गतीला प्राप्त होतात तर मग पुण्यवान् ब्राह्मण व भक्त राजर्षि यांविषयीं काय सांगावें ? 'पापयोनयः' या शब्दासंबंधीं रहस्याचें सविस्तर परीक्षण,'मन्मना भव' इत्यादि श्लोकाचें व्याख्यान व तत्संबंधीं रहस्यपरीक्षण. [७१६-२६] ... ... ... ... ... ... ... ... ...६८०–७२६.

**अध्याय १०वा**—[७२७–७६४]माझें परम वचन ऐक, रहस्यपरीक्षण, मला देवादिक जाणत नाहींत, मी त्यांचें कारण, मला जो असें जाणतो तो सर्व पापांपासून मुक्त होतो, तत्संबंधीं रहस्यपरीक्षण, बुद्ध्यादि सर्व भाव मजपासून, रहस्यपरीक्षण, महर्षी वगैरे सर्व माझे

मानसें भाव, तत्संबंधीं रहस्यपरीक्षण,या विभूतीला व योगाला जो जाणतो तो निश्चल योग-युक्त होतो [७२८-३७]; भजनाचे प्रकार, भक्तांना मी बुद्धियोग देतो, तत्संबंधी रहस्यपरी-क्षण, भक्ताचे अज्ञान मी ज्ञानदीपानें घालवितों, रहस्यपरीक्षण [७३७-४२]; अर्जुनाचा दिव्य विभूतींविषयी प्रश्न, रहस्यपरीक्षण, सविस्तर विभूतिकथन, मध्ये मध्ये रहस्यपरीक्षण [७४२-६४]. ... ... ... ... ... ... ... ... ...७२.७-६४.

**अध्याय ११ वा**—[ ७६५-८१८ ] अर्जुनाची विश्वरूप दाखविण्याविषयी प्रार्थना, तत्संबंधी रहस्यपरीक्षण [ ७६५-७० ]; भगवान् विश्वरूप पहा, दिव्यदृष्टि देतो, असें बोलून ते दाखवितात,त्याचे संजयकृत वर्णन, अर्जुनानें केलेले त्याचें सविस्तर वर्णन व शेवटी ' असा हा उग्र तूं कोण ? ' असा प्रश्न [७७१-९०]; ' मी काल आहे ' इत्यादि भगवानांचें उत्तर, 'मीच या सर्वांना मारले तूं केवल निमित्तमात्र हो,' तत्संबधी रहस्यपरीक्षण, [ ७९१-९५ ] अर्जुनानें केलेली भगवत्स्तुति, मध्ये मध्यें रहस्यपरीक्षण, [ ७९६-८०६ ]; 'प्रियः प्रियायार्हसि' याविषयींच्या रहस्याचे परीक्षण, चतुर्भुजरूपदर्शनाविषयीं प्रार्थना, हे रूप अतिशय दुर्दर्श आहे, असे सागून सौम्यरूपदर्शनाने अर्जुनाचे सांत्वन, भक्तीनेंच माझ्या प्राप्तीचा सभव, 'मत्कर्मकृत०' याचें व्याख्यान, तत्सबंधी रहस्यपरीक्षण [८०७-१८].

**अध्याय १२ वा**—[ ८१९-८५९ ], पूर्वोत्तरसगति, तत्संबंधी रहस्यपरीक्षण, अक्षर ब्रह्मोपासक व सगुण ब्रह्मोपासक यातील योगवित्तम कोण ? सगुणोपासक श्रेष्ठ, अक्ष-रोपासक साक्षात् मलाच प्राप्त होतात,पण त्याना क्लेश फार, जे माझी भक्ति करितात त्यांचा मी संसारसागरांतून उद्धार करितो [ ८१९-२८ ]; माझ्याच ठिकाणी मन व बुद्धि ठेव, म्हणजे मजमध्येच राहशील, २-८ श्लोकांवरील रहस्यकारांच्या टीपेचे परीक्षण, चित्तसमा-धानाचे उत्तरोत्तर सुलभ उपाय, कर्मफलत्यागाची स्तुति, तत्सबधी रहस्यकारांच्या विस्तृत टीपेचे सविस्तर परीक्षण [ ८२९-४४ ]; अक्षरोपासकाचे ' अद्वेष्टा० ' इत्यादि धर्म, मध्यें मध्ये रहस्यपरीक्षण, ' अनिकेत ' इत्यादि शब्दाच्या अर्थाचे परीक्षण, ' ये तु० ' या श्लोकाचें व्याख्यान, रहस्यपरीक्षण [ ८४५-८५९ ].... ... ... ८१९-८५९.

**अध्याय १३ वा**—[ ८६०-९८४ ]; व्यवहित व अव्यवहित पूर्वोत्तरसंगति, तत्संबंधी रहस्यपरीक्षण,'इदं शरीरं०' या श्लोकाचे व्याख्यान, रहस्यपरीक्षण 'क्षेत्रज्ञ चापि०' याचे भाष्य व रहस्यपरीक्षण [८६०-६७]; क्षेत्रज्ञ-ईश्वर-एकत्वाविषयी सविस्तर विवेचन [ ८६७-९०२]; ' तत्क्षेत्र० ' व ' ऋषिभिःबहुधा गीत० ' यांचे व्याख्यान, त्याचे रहस्यपरीक्षण, क्षेत्राचे वर्णन [९०३-१३]; 'अमानित्वादि०' ज्ञानसाधने,ठिकठिकाणी रहस्यपरीक्षण [९१४-२२]; ज्ञेयाचें वर्णन,सत्-असत् शब्दांच्या अर्थाचा विचार, तत्सबधी रहस्यपरीक्षण, ज्ञेयाचेच सोपाधिक वर्णन व क्षेत्रादिवर्णनाचा उपसहार [ ९२२-४२ ]; प्रकृति व पुरुष दोन्ही अनादि, विकार व गुण प्रकृतिजन्य, तत्संबंधी रहस्यपरीक्षण, शरीरेंद्रियांचे कर्तृत्व प्रकृतीला व सुखदुःख-भोक्तृत्व पुरुषाला, पुरुष प्रकृतिस्थ होऊन गुणभोग घेतो, गुणसंग त्याच्या बऱ्या-वाईट योनींतील जन्माचे कारण, ठिकठिकाणीं रहस्यपरीक्षण, पुरुषाचाच साक्षात् निर्देश [ ९४३-५७ ]; पुरुष व गुणांसह प्रकृति यांना जाणणारा पुनः जन्म घेत नाहीं, याविषयीं सविस्तर विचार, व रहस्यपरीक्षण, [ ९५८-६३ ]; आत्मज्ञानाचे ध्यानादि उपाय तत्संबंधी रहस्यपरीक्षण [९६४-६७]; सर्व चराचर प्राणी क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगापासून उद्भवतात, जो सर्व भूतांत सम ब्रह्म पाहतो तो ज्ञानी, सर्वत्र स्थित असलेल्या ईश्वराला पाहणारा आप-

लीच आपण हिंसा करीत नाहीं, परम गतीला जातो, सर्व कर्में प्रकृति करते, आत्मा अकर्ता, असें जो पाहतो तो तत्त्वज्ञ, सर्वभूतभाव एकामध्यें स्थित असून त्यापासूनच सर्व विस्तार जेव्हां पाहतो तेव्हां ब्रह्म बनतो, आत्मा शरीरस्थ असूनहि अनादि, निर्गुण, अव्यय असल्यामुळें कांहीं करीत नाही व लिप्त होत नाही, याविषयीं आकाशाचा दृष्टान्त, सर्वक्षेत्राच्या प्रकाशनाविषयीं सूर्याचा दृष्टान्त, ज्ञानदृष्टीनें क्षेत्रक्षेत्रज्ञांचें अन्तर जे पाहतात ते परमपदास पोंचतात, तत्संबंधीं रहस्यपरीक्षण [ ९६८-९८४ ].... ... ... ... ८६०–९८४.

**अध्याय १४ वा**—[९८५-१०१७] पूर्वोत्तरसंगति, तत्संबंधीं रहस्यपरीक्षण, उत्तम ज्ञान सांगतों, अशी प्रतिज्ञा, त्या ज्ञानाची स्तुति [९८५-९०]; प्रकृति ही माझी योनि, तिच्यामध्यें गर्भाधान करितों, तत्संबंधीं रहस्यपरीक्षण, सर्व साकार पदार्थांची माझी प्रकृति योनि व मी त्यांचा बीजप्रद पिता, सत्त्व, रज, तम हे तीन गुण, ते आत्म्याला देहांत बद्ध करितात, त्यांचेंच सविस्तर लक्षण, कार्य, फल इत्यादिकांच्या योगानें वर्णन [९९१-१००४]; गुणच कर्ते, आत्मा नव्हे, तो गुणांहून अगदी भिन्न–विलक्षण असे जाणणाराच ईश्वरभावास प्राप्त होतो, त्रिगुणातीताला मोक्ष मिळतो, गुणातीताची चिन्हे, आचार व गुणातीत होण्याचे उपाय अर्जुन विचारतो, भगवान् गुणातीताचें लक्षण व आचार सांगतात. तत्संबंधी रहस्यपरीक्षण, अव्यभिचारी भक्तियोग हे गुणातीत होण्याचें साधन व मीच ब्रह्माची प्रतिष्ठा, तत्संबंधीं रहस्यपरीक्षण [१००५-१७]. ... . . ... ... ... ९८५–१०१७.

**अध्याय १५ वा**[१०१८-१०५१]. पूर्वोत्तरसंगति-तत्संबंधीं रहस्यपरीक्षण, संसारवृक्षाचें वर्णन, तत्संबंधीं रहस्यपरीक्षण [१०१८-२४]; संसारवृक्षाच्या अवयवांची निराळया प्रकारें कल्पना, रहस्यपरीक्षण, त्या संसारवृक्षाचें रूप तसें येथे उपलब्ध होत नाहीं, असंगशस्त्रानें त्याला तोडावें, नंतर मोक्षरूप पदाला जाणावे, मोक्षाधिकाऱ्याचे गुण, त्या पदाला सूर्यादि ज्योति प्रकाशित करीत नाहींत, जीव हा माझाच सनातन अंश तो शरीर सोडून जातांना मनासह श्रोत्रादिकांना आकर्षण करून घेऊन जातो [१०२५-३५]; सर्व व्यवहार करणाऱ्या त्याला अज्ञ पहात नाहींत, ज्ञानदृष्टि लोक पहातात, सुसंस्कृत बुद्धीचे यत्नशील त्याला पहातात, आदित्यादि सर्व ज्योतींतील तेज मीच, मीच पृथ्वींत प्रवेश करून भूतांना धारण करितों, चंद्र होऊन ओषधींचें पोषण करितों, प्राण्यांच्या जठरांतील वैश्वानर होऊन अन्न पचवितों, मी सर्वांच्या हृदयांत स्थित असून माझ्यापासूनच ज्ञान, स्मृति, त्यांचा अभाव होतो, सर्व वेदांनी वेद्य मी, वेदान्तकर्ता व वेदवेत्ता मी [१०३६-४४]; क्षर व अक्षर असे दोन पुरुष, सर्व भूतें हा क्षर व त्यांचें बीज प्रकृति हा अक्षर, तत्संबंधीं रहस्यपरीक्षण, परमात्मा या नांवाचा उत्तम पुरुष निराळा, तो त्रैलोक्याला व्यापून धारण करितो, क्षराक्षराहून विलक्षण, म्हणून मी पुरुषोत्तम, जो मला असें जाणतो तो सर्वज्ञ मला भजतो, हें गुह्यशास्त्र, हें जाणून मनुष्य कृतकृत्य होतो [१०४५-५१]. ... ... १०१८–१०५१.

**अध्याय १६ वा**—[ १०५२–१०८० ] पूर्वोत्तरसंगति, रहस्यपरीक्षण, दैवीसंपत्तीचे गुण, तत्संबंधीं रहस्यपरीक्षण, आसुरी प्रकृति, दैवीसंपत्ति मोक्षासाठीं व आसुरी बंधासाठीं [ १०५२–५९ ]; दोन भूतसर्ग, त्यांतील आसुरीचें सविस्तर वर्णन, तत्संबंधीं रहस्य परीक्षण, त्यांना मिळणारें फल [ १०५९–७४ ]; त्रिविध नरकद्वार, कामादिरहित पुरुष श्रेयःसाधनाचें आचरण करितो, शास्त्रविधि सोडून मनसोक्त आचरण करणाराला सिद्धि नाहीं, शास्त्रच तुला कर्तव्याकर्तव्याचा निर्णय करण्यास प्रमाण आहे. शास्त्रविधि जाणून त्याप्रमाणें तुला कर्म करणें उचित, तत्संबंधीं रहस्यपरीक्षण [१०७५–८०]. १०५२–१०८०.

**अध्याय १७ वा**—[ १०८१–११०८ ] शास्त्रविधि न जाणतां श्रद्धेनें जे पूजनादि करितात त्यांची निष्ठा कोणती ? याचें उत्तर भगवान् त्रिविध श्रद्धेच्या द्वारा देतात. तत्संबधीं रहस्यपरीक्षण, सात्त्विकादिकांची लक्षणे [ १०८१–९० ]; आहार, यज्ञ, दान व तप, यांचे प्रत्येकीं सात्त्विक, राजस व तामस प्रकार, तपाविषयीं रहस्यपरीक्षण, शारीरादि तप, कर्मसाद्गुण्यार्थ ' ॐतत्सत् ' असा त्रिविध ब्रह्मनिर्देश, रहस्यपरीक्षण, त्याचा विनियोग व वर्णन,तत्संबंधीं रहस्यपरीक्षण [ १०९१–११०८ ]; ... ... ...१०८१–११०८.

**अध्याय १८ वा**—[ ११०९–१२८७ ] त्याग व संन्यास यांच्या स्वरूपाविषयीं प्रश्न, रहस्यकारांच्या सिंहावलोकनाचें सविस्तर व महत्त्वाचे परीक्षण [ ११०९–१८ ]; 'काम्यानां कर्मणां न्यासं' याचें व्याख्यान व तत्संबंधी रहस्यपरीक्षण [१११८–२४ ]; त्याग व संन्यास यांविषयीं आणखी दोन विकल्प, तत्संबंधीं भगवानांचा निश्चय यज्ञ-दान-तपः-कर्म त्याज्य नाही, तें पावन करणारें आहे, पण हीं कर्मेंहि फल व सग सोडून करावीं, तत्संबंधी रहस्यपरीक्षण [ ११२४–३८ ]; नित्यकर्मांचा मोहानें त्याग करणें हा तामस त्याग, दुःख म्हणून क्लेशाच्या भीतीने कर्म टाकणें, हा राजस त्याग व नित्य कर्म संग व फल सोडून करणें हा सात्त्विक त्याग होय, तत्संबंधी रहस्यपरीक्षण [ ११३९–४२ ]; कर्मयोगाचें ज्ञाननिष्ठा हें प्रयोजन,अज्ञाचा कर्मामध्येच अधिकार, कर्माचें इष्टानिष्टमिश्र असें त्रिविध फल असंन्याश्याला प्राप्त होतें, संन्याश्याला नाहीं, रहस्यपरीक्षण [ ११४३–४९ ]; सर्वकर्मांच्या सिद्धीसाठी वेदान्तशास्त्रोक्त पांच कारणें, तत्संबधी रहस्यपरीक्षण, शारीरादि सर्व विहित-निषिद्ध कर्मांचीं ही कारणे, रहस्यपरीक्षण, असें असून केवल आत्म्याला जो कर्ता पहातो तो मूढ, रहस्यपरीक्षण [११५०–५८]; ज्याला अहंभाव नाहीं, व ज्याची बुद्धि लिप्त होत नाही तो या लोकांना मारूनहि दोषी होत नाही, कर्मचोदना व कर्मसंग्रह, रहस्यपरीक्षण [११५८–६७]; ज्ञान, कर्म, कर्ता, बुद्धि, धृति, व सुख,यांचे सात्त्विकादि भेद तत्संबंधी रहस्यपरीक्षण [ ११६८–८६ ]; ब्राह्मणादिकांची स्वभावजन्य कर्में [ ११८७–९४ ]; आपापल्या कर्मांत निमग्न असलेला संसिद्धीला प्राप्त होतो, स्वकर्मानें ईश्वरपूजन केल्यानें सिद्धि मिळते, रहस्यपरीक्षण, विगुण स्वधर्महि गुणसंपन्न परधर्माहून श्रेष्ठ, त्याचें आचरण करणाराला पाप लागत नाहीं, जन्मसिद्ध कर्म सदोष असलें तरी त्याचा त्याग करूं नये, सर्व कर्में सदोष, तत्संबंधी सविस्तर भाष्य [ ११९५–१२०९ ]; विरक्ताला संन्यासानें नैष्कर्म्यसिद्धि प्राप्त होते, रहस्यपरीक्षण, सिद्धीला प्राप्त झालेला ब्रह्माला कसा प्राप्त होतो तें ऐक, तीच परा ज्ञाननिष्ठा, ही ज्ञाननिष्ठा कशी संपादन करावी ? तो क्रम, तत्संबंधी रहस्यपरीक्षण [ १२१०–३३ ]; भक्तियोगाची उपसंहारार्थ स्तुति, सतत मच्चित्त हो, म्हणजे तरून जाशील, हे न ऐकशील तर नाश पावशील, प्रकृति तुझ्या इच्छेविरुद्ध तुजकडून युद्ध करवील, तूं स्वभावनिबद्ध आहेस, म्हणून इच्छेवांचूनहि युद्ध करशील, ईश्वर सर्वांच्या हृदयांत वास करून त्यांच्याकडून पूर्वकर्मानुसार कार्य करवितो, त्यालाच शरण जा, त्याच्या प्रसादानें पराशान्ति व शाश्वत स्थान प्राप्त होईल [ १२३३–३९ ]; ' इति ते ज्ञानं आख्यातं ' असा गीताशास्त्राचा उपसंहार, तत्संबंधी रहस्यपरीक्षण, सर्वगुह्यतम असें 'मन्मना भव मद्भक्तः' हें वचन, ' सर्व धर्माधर्मांचा त्याग करून मलाच केवल शरण ये, हा परम उपसंहार [ १२४०–४४ ]; उपसंहारभाष्य, मोक्षसाधनाविषयीं सविस्तर विचार [ १२४५–७६ ]; संप्रदायविधि, फल, अर्जुनाची कृतार्थता, संजयाचा उपसंहार [ १२७७–८७ ]. ... ... ... ... ... ... ...

## संक्षिप्त चिह्नांचा खुलासा.

गी.—भगवद्गीता.
गी. र.—गीतारहस्य.
र. का.—रहस्यकार.
गी. भा.—गीताभाष्यार्थ.
छां. भा.—छान्दोग्यभाष्यार्थ.
का. भा.—काठकभाष्यार्थ.
मुं. भा.—मुंडकभाष्यार्थ.
बृ. भा.—बृहदारण्यकभाष्यार्थ.
ऐ. भा.—ऐतरेयोपनिषद्भाष्यार्थ.
तै. भा.—तैत्तिरीयोपनिषद्भाष्यार्थ.
ना. भा.—सार्थ नारायणोपनिषद्.
व. सं. टी.—वल्लभ संप्रदायी टीका.
रामा.—रामानुजाचार्य.

महा. भा.—महाभारत.
शां.—शांतिपर्व.
( यांतील सर्व पृष्ठें पहिल्या आवृत्तींतील आहेत. )
[ ]-पूर्वीच्याच अर्थाचें स्पष्टीकरण.
( )-अवतरणादिक.
—भाष्याचा आरंभ व शेवट सुचविणारा लांब ड्याश.
-' म्हणजे ' या अर्थी एकाच शब्दाचा किंवा वाक्याचा पर्याय-अर्थदर्शक ड्याश.
- समासांतील व संधींतील पदच्छेद-दर्शक हायफन.

---

### ठळक चुकांचें शुद्धिपत्र.

'**अर्जुन उवाच**—कृपया परयाऽऽविष्टो विषीदन्निदमब्रवीत् ' हा श्लोकार्ध, पृ. २० वर श्लो. २७ च्या पुढें वाचावा.

पृ. ३६८ ' बहूनि मे० ' या श्लोकापूर्वी ' **श्रीभगवानुवाच**—श्रीकृष्ण म्हणाले ' असें वाचावें.

पृ. ४०८ शेवटची ओळ—" ठेवणे ' हे कर्म आहे, असे सांगितले व कर्म, किंवा कर्माभाव हा .... " अशी वाचावी.

पृ. ४६८ ' इति भगवान्...समाप्त झाला. ' हे वाक्य टीपेच्या वर ४२ वा श्लोक संपतांच वाचावें.

पृ. १०२५ भाष्यार्थ ओळ ५–'सत्यलोकापर्यंत' याच्यापुढे म्ह० चतुर्मुख, मरीच्यादिक व साक्षात् धर्म येथपर्यंत ( मनु. १२.५० ) असा याचा भावार्थ, असे वाचावें.

याशिवाय अक्षरें-काना-मात्रा-ऱ्हस्व-दीर्घ यांच्या चुका सहज कळण्यासारख्या असल्यामुळें त्या वाचकांनींच दुरुस्त करून घ्याव्या.

# गीतेंतील वादग्रस्त व अनेकार्थी शब्दांचा कोश.

**अकर्म**—विहित कर्म आळसानें वगैरे न करणें २.४७,३.५-८,४.१६-१७,मुकाट्यानें बसणें,कर्माभाव ४.१८; **अकुशलं**—अशोभन-काम्य १८.१०; **अकार्य**—अकर्तव्य-निषिद्ध कर्म १६.२४, १८.३०-३१; **अकृतात्मा, अकृतबुद्धि**—ज्याच्या अन्तःकरणाला शास्त्रादिसंस्कार झालेला नाहीं तो, १५.११, १८.१६; **अकृत**—कर्म न करणें ३.१८; **अकृत्स्नविद्**—अब्रह्मज्ञ-कर्मफलमात्रदर्शी ३.२९; **अक्रियः**—तपोदानादिक अग्निसाध्य नसलेल्याहि क्रिया ज्याच्या विद्यमान नाहींत, त्या क्रियाहि ज्याने सोडल्या तो ६.१; **अक्षर**—अविनाशी ब्रह्म, परमात्मा ८.३-११-२१, ११.१८-३७, १२.१-३, ओंकार ८.१३, १०.२५, अकारादि वर्ण १०.३३, संसारवृक्षाचें बीज-मायाशक्ति १५.१६-१८; **अखिलं**—अप्रतिबद्ध ४.३३, समस्त ७.२९, १५.१२; **अचेतसः**—अविवेकी ३.३२, १५.११, १७.६; **अज्ञ**—अविवेकी, अनात्मज्ञ ३.२६, ४.४०; **अज्ञान**—अविवेक ४.४२, ५.१५-१६, १०.११, १४.८-१६-१७, १८.७२, मानित्व-दंभित्वादि १३.११, अविवेकज्ञान-मिथ्याप्रत्यय १६.४-१८; **अतीन्द्रियं**—इंद्रियांना विषय नसलेलें, अविषयजन्य ६.२१; **अत्यागी**—अज्ञ, कर्मी, अपरमार्थ संन्यासी १८.१२; **अधर्म**—शास्त्रप्रतिषिद्ध १८.३१-३२; **अधिकः**—विशिष्ट-श्रेष्ठ ६.४६; **अधिष्ठानं**—आश्रय ३.४०, शरीर १८.१४; **अधियज्ञः**—सर्व यज्ञाभिमानी विष्णुसंज्ञक देवता ८.४; **अधिष्ठाय**—वश करून ४.६, अधिष्ठाता होऊन, आश्रय करून १५.९; **अध्यात्मचेतसा**—विवेकबुद्धीनें ३.३०; **अध्यात्मज्ञाननित्यत्वं**—आत्मा-अनात्मा यांचा विवेक, त्यांतच निष्ठा ठेवणें १३.११; **अध्यात्मनित्याः**—परमात्म्याच्या स्वरूपाचे आलोचन करण्यांत-श्रवण-मननांत तत्पर १५.५; **अध्यात्मविद्या**—आत्म्याविषयींचे ज्ञान १०.३२; **अध्यात्मसंज्ञितं**—आत्मानात्मविवेकविषयक ११.१; **अध्यात्मं**—देहापासून प्रत्यगात्मरूपाने प्रवृत्त झालेलें व परमात्म्यात पर्यवसान पावणारे तत्त्व-जीवभाव ७.२९, ८.१-३; **अनन्यचेताः**—८.१४, **अनन्यमनाः**—९.१३ ज्याचे चित्त ईश्वरावांचून दुसऱ्या विषयांमध्ये नाहीं तो योगी; **अनन्यभाक्**—९.३०;ज्याची भक्ति मजवांचून दुसऱ्या कशावर नाही तो भक्त, **अनन्याभक्तिः**—८.२२; आत्मविषयक ज्ञानलक्षणाभक्ति; **अनन्येन**—विश्वरूप आत्म्याला सोडून ज्याचे दुसरे आलंबन-ध्यानाचा विषय नाहीं, अशा अनन्य योगाने-समाधीने १२.६; **अनन्ययोगेन**—अपृथक्समाधीनें-वासुदेवाहून श्रेष्ठ कांहीं नाहीं, तोच आमची परा गति, अशा निश्चितबुद्धीनें १३.१०; **अनन्याः**—नारायणाला आत्मा मानणारे, तद्रूप झालेले ९.२२; **अनपेक्षः**—देहेंद्रियादि अपेक्षाविषयांमध्येंहि अपेक्षा न ठेवणारा, निःस्पृह १२.१६; **अनभिष्वंगः**—पुत्रादिकांमध्यें 'हाच मी' अशा स्वरूपाची अत्यन्त आसक्ति नसणें १३.९; **अनभिस्नेहः**—देहजीवितादिकांमध्येंहि अ-

त्यन्त स्नेहशून्य २.५७; **अनहंकारः**—अहंकार नसणें १३.८; **अनहंवादी**—'अहं' असें म्हणण्याचें ज्याचें शीलच नाहीं तो १८.२६; **अनात्मनः**—अजितात्म्याचें, ज्यानें शरीरेंद्रियसमूह जिकला नाहीं त्याचें ६.६; **अनादि**—ज्याला आदि–आरंभ–कारण नाहीं तें अनादि, उत्पन्न न झालेलें १३.१२-१९-३१, ११.१९, १०.३; **अनामयं**—सर्वोपद्रवरहित २.५१, उपद्रवरहित १४.६; **अनारम्भात्**—आरंभ न केल्यास–आरंभ केल्यावांचून ३.४; **अनावृत्ति**—अपुनर्जन्म ८.२३; **अनिकेतः**—ज्याचें निश्चित निवासस्थान नाहीं तो १२.१९; **अनिष्टं**—नरक–तिर्यक् योनिप्राप्तिरूप १८.१२; **अन्तगतं**—समाप्तप्राय, क्षीण झालें ७.२८; **अन्तरं**—अन्तर–अवकाश ११.२०, परस्पर विलक्षणता १३.३४; **अन्तरात्मना**—अन्तःकरणानें ६.४७; **अन्तः**—निर्णय २.१६, शेवट–सीमा १०.१९–४०, १५.३; प्रलय (आदि व मध्य यांच्या साहचर्यामुळें) १०.२०–३२; **अन्ते**—प्राणवियोगाचे वेळीं ८.६; **अन्तकाले**—अखेरच्या वयांत २.७२, मरणसमयीं ८.५; **अन्यत्र**—अन्य–दुसऱ्या कर्मानें ३.९; **अन्यः**—कोणी २.१९, विशिष्ट साधनसाध्य दुसरा लोक ४.३१, दुसरा ११.४३, १६.१५, १८.६९, विलक्षण ८.२०, १५.१७; **अन्येभ्यः**—आचार्यांपासून १३.२५; **अन्विच्छ**—इच्छा कर, परमार्थज्ञानाचा आश्रयकर २.४९; **अपरस्परसंभूतं**—कामुक स्त्रीपुरुषांपासून झालेलें १६.८; **अपरं**—अर्वाचीन ४.४, दुसरा ६.२२; **अपरा**—निकृष्ट–संसारबन्धनात्मिका, अशुद्ध–अनर्थकरी ७.५; **अपरिग्रह**—( त्यक्तसर्वपरिग्रहः ४.२१ ) सर्वपरिग्रहशून्य ६.१०; **अपुनरावृत्ति**—पुनर्जन्मराहित्य, मुक्ति ५.१७; **अप्रतिष्ठः**—निराश्रय ६.३८; **अप्रतिष्ठं**—याला धर्म व अधर्म ही प्रतिष्ठा नाहीं १६.८; **अभावयतः**—आत्मज्ञानाभिनिवेश न करणाऱ्या २.६६; **अभावः**—अविद्यमानता २.१६; **अभिक्रमनाशः**—उपक्रमाचा नाश २.४०; **अभिजातः**—अनुलक्षून उत्पन्न झालेला १६.३-४-५; **अभितः**–उभयतः–जिवंतपणीं व मरणोत्तर ५.२६; **अभ्यासः**—कोणत्या तरी चित्तभूमींत चित्ताच्या समान प्रत्ययाची सतत आवृत्ति ६.३५, ८.८, १२.९, १२.१२, १८.३६ ( परिचय ); **अमृतत्वं**—मोक्ष २.१५, १३.१२, १४.२०; **अमृतं**—देवाचे अमृत ९.१९, वाक्यामृत १०.१८; **अमृतोद्भव**—अमृतासाठीं केलेल्या समुद्रमथनापासून उद्भवलेल्या १०.२७; **अयुक्तः**—अशान्तचित्त २.६६, ५.१२, १८.२८; **अयोगतः**—वैदिककर्मयोगावांचून ५.६; **अर्थः**—फल, प्रयोजन २.४६, ३.१८; **अर्थव्यपाश्रयः**—प्रयोजनाच्या निमित्तभूत क्रियेनें साध्य असा विशेष आश्रय ३.१८; **अर्पणं**—हवि अर्पण करण्याचें साधन स्रुक्-स्रुवा वगैरे ४.२४; **अविधिपूर्वकं**—अज्ञानपूर्वक ( कारण त्यांचें पूजन विधिपूर्वक असतें, पण ते हें पूजन भगवानांचें आहे, हें जाणत नाहींत.)९.२३, विहित अंग–इतिकर्तव्यतादि यांनीं रहित १६.१७; **अव्यक्त**—अदर्शन २.२८, अप्रकाश ७.२४, इंद्रियांचा विषय न होणारें २.२५, १२.१-३-५, ८.२०–२१, ९.४, अव्याकृत–ईश्वराची शक्ति, माया १३.५, प्रजापतीची सुषुप्ति-अवस्था ८.१८–२०; **अव्यय**—अविनाशी–वृद्धिक्षय न पावणारा २.१७–२१ (अपक्षयरहित) १३.३१, १५.१–५–१७, १४.२७, ४.६, ७.१३ ( जन्मादि विकाररहित )–२४.२५, ९.१३, ११.४

करावेंच १८.५ शास्त्रविहित कर्तव्य–३१, अवश्य कर्तव्य–१८.९; **कार्याकार्यव्यवस्थितौ**—कर्तव्य व अकर्तव्य यांची व्यवस्था–निर्णय करण्यास १६.२४; **कार्याकार्ये**—विहित–निषिद्ध कर्तव्याकर्तव्य १८.३०; **कार्ये**—देह किंवा बाह्य प्रतिमादि यांमध्ये १८.२२; **किल्बिष**–धर्माधर्मादि पाप ४.२१, पाप १८.४७; **कुशले**—शुभ–नित्य कर्मांमध्ये १८.१०; **कूटस्थ**—निर्विकार, मायेचा अध्यक्ष १२.३; न डळमळणारा ६.८, अनेक मायादि प्रकारांनी स्थित असलेला १५.१६; **कृतान्ते**—ज्यांत कर्माची परिसमाप्ति–अन्तर्भाव होतो तें कृतान्त, त्यात १८.१३; **क्षर**—सर्व विनाशी भूतभाव ८.४ १५.१६–१८; **गतिं**—प्राप्तव्य फलाला ६.३७–४५, ७.१८, ८.१३–२१,९.३२, १३.२८, १६.२०–२२–२४; **गतिः**—तत्त्व ४.१७,कर्मफल ९.१८, प्राप्ति–फल १२.५; **गती**—मरणोत्तर गमनमार्ग ८.२६; **गुणकर्मविभागयोः**—गुणविभाग व कर्मविभाग यांचे ३.२८; **गुणकर्मविभागशः**—गुणविभागशः व कर्मविभागशः ४.१३; **गुणकर्मसु**—शरीरेंद्रियगुणांच्या कर्मामध्यें ३.२९; **गुणतः**—सत्त्वादि गुणांमुळे १८.२९; **गुणप्रवृद्धाः**—सत्त्वादि गुणांनी स्थूल केलेल्या ( शाखा ) १५.२; **गुणभेदतः**—सत्त्वादि गुणभेदानें १८.१९, **गुणभोक्तृ**—शब्दादिकांच्या द्वारा सुख-दुःख-मोहाकारानें परिणाम पावलेल्या सत्त्वादि गुणाचा अनुभव घेणारे १३.१४; **गुणमयी**—सत्त्वादि गुणप्रचुर ७.१४; **गुणमयैः**—राग-द्वेष-मोह इत्यादि गुणविकाररूप ७.१३; **गुणसंगः**—सुख-दुःख-मोहरूप गुणामध्ये जो संग–मीच सुखी, दुःखी, मूढ असा आत्मभाव तो गुणसंग १३.२१; **गुणसंमूढः**—सत्त्वादि गुणांनी संमूढ ३.२९; **गुणसंख्याने**—सांख्य दर्शनांत १८.१९; **गुणातीतः**—सत्त्वादि गुणाचे उल्लंघन केलेला–जीवन्मुक्त १४.२५;**गुणान्**—सुख-दुःख-मोहाकार परिणत झालेल्या गुणांस१३.१९–२१,सत्त्वादि तीन गुणांस १४.२०–२१–२६; **गुणान्वितं**—सुख-दुःख-मोहरूप गुणानी युक्त १५.१०; **गुणाः**—इंद्रियरूप गुण ३.२८, पारिभाषिक सत्त्वादि गुण १४.५, ( शरीरेंद्रिय विषयकार गुण ) १४.२३; **गुणेषु**—विषयात्मक गुणांत ३.२८; **गुणेभ्यः**—सत्त्वादि गुणांहून १४.१९; **गुणैः**—सत्त्वादि गुणांकडून ३.५–२७, १४.२३, १८.४०–४१, आपल्या विकारासह १३.२३.

**चेतना**—शरीरेंद्रियांत नित्य अभिव्यक्त झालेली बुद्धिवृत्ति १०.२२, १३.६; **छन्दसां**—गायत्र्यादि छंदोविशिष्ट ऋचांतील १०.३५; **छन्दांसि-छन्दोभिः**—वेद–वेदांनीं १५.२, १३.४; **छिन्नद्वैधाः**—ज्यांचे सर्व संशय तुटले आहेत ५.२५; **छिन्नसंशयः**—ज्याचा संशय तुटला आहे १८.१०; **जनसंसदि**—प्राकृत जनांच्या समुदायांत १३.१०; **जिज्ञासुः**—ध्यानयोगाचे स्वरूप जाणण्याची इच्छा करणारा ६.४४, भगवत्तत्त्व जाणण्याची इच्छा करणारा ७.१६; **जितात्मा**—ज्याने शरीरेंद्रियसंघात जिंकला आहे तो ६.७; ज्यानें अन्तःकरणाला जिंकलें आहे तो १८.४९; **जीवभूतः**—कर्ता–भोक्ता म्हणून प्रसिद्ध असलेला १५.७; **जीवभूतां**—क्षेत्रज्ञरूप म्ह० कर्ता-भोक्ताच ७.५; **ज्ञानगम्यं**—ज्ञात झालेले ज्ञेयच ज्ञानफल

रादि, इंद्रियादिसंयमपूर्वक शरीरपीडन,-हाच अर्थ विवक्षित आहे; **तमसः**—अज्ञानलक्षण मोहान्धकाराहून ८.९, १३.१७, तामस कर्मांचें १४.१६, तमोगुणांपासून १७; **तमसा**—तमोगुणानें १८.३२; **तमसि**—तमोगुण वाढला असतां १४.१३–१५; **तमः**—मोहान्धकार १०.११, चवदाव्या अध्यायांतील सर्व तमःशब्द तमोगुण या अर्थी आहे, १७.१; **तमोद्वारैः**—दुःखमोहात्मक नरकाच्या द्वारांनी १६.२२; **तु**—हा शब्द नेहमी विषयान्तर दाखवितो. जसें–२.१७–३९–६४,३–७–१७ वगैरे पद्य. **तेजः**—दीप्ति ७.९, १५.१२, प्रागल्भ्य–धीटपणा ७.१०, १०.३६, १६.३, १८.४३; अकराव्या अध्यायांतील 'तेजोभिः, तेजोमयं, तेजोराशिं,' या तेजःशब्दांचा अर्थ 'प्रकाश' असा आहे. **तेजोंशसंभवं**—मज ईश्वराच्या तेजाचा एकदेश हाच ज्याचा संभव आहे असें १०.४१; **त्याग**—कर्मफलत्याग १२.१२, सन्यास १६.२, त्याग–सोडणें १८.१–४; सर्वकर्मफलत्याग १८.२–४; सग व फल यांचा त्याग १८.९–१०–११, ( राजस तामस त्याग म्ह० कर्माधिकाऱ्यानें कर्म टाकणें १८.७–८ ) **त्रयीधर्म–त्रैधर्म्य**—वैदिक कर्म ९.२१; **त्रैगुण्यविषयाः**—त्रैगुण्य–ससार हा ज्यांचा विषय आहे ते वेद त्रैगुण्यविषय होत २.४५; **त्रैविद्याः**—वेदत्रयवेत्ते ९.२०; **दिव्यं**—अलौकिक ( अप्राकृत–ईश्वराचे ४.९ ) ९.२०, १०.१२, १६.४०, ११.५–८–१५, सूर्यमंडलांतील ८.८, प्रकाशरूप ७.१०; **दूरेण**—अत्यन्त–फारच अन्तरानें २.४९; **देहभृता**—देहच आत्मा असें मानणाऱ्याकडून १८.११; **देहभृतां**—देह धारण करणाऱ्यांतील ८.४; **देहभृत्**—देही–आत्मा १४.१४; **देहवद्भिः**—देहाभिमानवानाकडून १२.५; **दैवं**—ज्यांत देवतांचें यजन केलें जातें तो दैवयज्ञ त्यास ४.२५; इंद्रियांवर अनुग्रह करणारे आदित्यादि १८ १४, दैवी प्रकृतीचा भूतसर्ग १६.६; **दैवी**—देवतांची संपत् १६.५, देवाची–ईश्वराची माया ७.१४, दैवी प्रकृति ९.१३, १६.३–५ **दोषवत्**—दोषानें युक्त किंवा दोषाप्रमाणें १८. ३; **द्रव्यमय**—द्रव्यसाधनसाध्य ४.३३; **द्रव्ययज्ञाः**—सत्पात्री द्रव्याचा विनियोग करणें हाच यज्ञ मानणारे ४.२८; **द्वंद्वमोह**—सुखदुःखादि द्वंद्वांच्या निमित्तानें होणारा मोह ७.२७-२८,(द्वद्वशब्दाचा अर्थ द्वद्व समास असा फक्त १०.३३. येथें करून बाकी सर्व ठिकाणीं द्वंद्व म्ह० शीतोष्णसुखदुःखादि परस्पर प्रतिपक्षी भावांची जोडी घ्यावी. ); **धर्मसंमूढचेताः**—शास्त्रोक्त श्रौत-स्मार्त धर्माविषयीं ज्यांचें चित्त मूढ झालें आहे. २.७; **धर्मसंस्थापनार्थाय**—सनातन श्रौत-स्मार्त वैदिक वर्णाश्रमरूप धर्माची प्रस्थापना करण्यासाठीं (कारण अवताराची कल्पना वैदिक धर्माची आहे.) ४.८; **धर्मस्य**—या योगधर्माचें ( कारण प्रकृत योग आहे. ) २.४०, वर्णाश्रमादिलक्षण धर्माची ४.७,१४.२७, ब्रह्मज्ञानरूप धर्माविषयीं अश्रद्धावान् ९.३; **धर्मं**—शास्त्रविहित धर्माला १८.३१.३२; **धर्म्यं**—श्रौत-स्मार्त धर्माला सोडून नसलेल्या २.३१–३३, ९.२, १२.२०, १८.७०; **धर्मे**—कुलधर्म १.४०, (धर्मात्मा ९.३१ धर्माविरुद्ध ७.११ स्वधर्म २.३१–३३, ३.३५,१८.४७,परधर्म ३.३५,१८.४७, इत्यादि सर्वत्र वर्णाश्रमाविहित धर्म विवक्षित आहे;) **धाता**—प्राण्यांना कर्मफल विभागून देणारा १८.९,९.१७,१०.३३; **धाम**—स्थान-पद ८.२१, ११.३८, १५.६, तेज १०.१२; **धीर**—बुद्धिमान्-ज्ञानी–विवेकी २.१३–१५–

१४.२४; **धृतिः**—( या शब्दाचा सामान्य अर्थ धैर्य आहे, ) धृतिदेवता १०.३४, थकलेल्या देहेंद्रियांदिकांना उत्साह देणारी एक अन्तःकरणाची वृत्ति १३.६, १६.३; **ध्यानयोगपरः**—आत्मस्वरूपाचें चिंतन करणें हे ध्यान व आत्म्यांतच चित्त एकाग्र करणें हा योग, त्यांतच तत्पर झालेला १८.५२; **ध्यान**—एकाच विषयाचें सतत चिंतन करणें ( हाच अर्थ सर्वत्र विवक्षित आहे ) १२.१२.

**नित्यजातं**—देहाबरोबर उत्पन्न झालेला २.२६; **नित्ययुक्त**—सदा समाहित-शांत-चित्त ७.१७, ८.१४, ९.१४, १२.२; **नित्यसत्त्वस्थः**—सदा सत्त्वगुणाश्रित ( १४. १६-१७-१८ अध्यायांत सांगितलेल्या सर्व सात्त्विक वृत्तीचाच आश्रय करणारा ) २.४५; **नित्यसंन्यासी**—सदा संन्यासी ५.३; **निरग्निः**—कर्मांगभूत अग्नि ज्यानें सोडले आहेत तो ६.१; **निरहंकारः**—मी विद्वान् वगैरे आहें. अशा आत्मसंभावनेनें रहित २.७१, अहंप्रत्ययशून्य १२.१३; **निराशीः**—ज्यानें सर्व आशा सोडल्या आहेत तो ३.३०, ४.२१, ६.१०; **निराश्रयः**—ज्याच्या आश्रयाने पुरुषार्थ साधण्याची इच्छा करतो तो आश्रय, तसा आश्रय ज्याला नाहीं तो निराश्रय ४.२०; **निराहारस्य**—कष्ट तपस्याचें-विषयाचें निग्रहानें ग्रहण न करणाराचें २.५९; **निरुद्धं**—सर्वबाजूंनी ज्याच्या प्रचाराला निरोध केला आहे, तें ६.२०; **निरुध्य**—निरोध करून-हृदयांत अडवून ठेवून ८.१२; **निर्गुणं**—सत्वादि गुणत्रयरहित १३.१४-३१; **निर्देश**—नांवाचा निर्देश १७.२३; **निर्योगक्षेम**—अप्राप्त वस्तुची प्राप्ति-योग प्राप्तवस्तूचें रक्षण-क्षेम, यांपासून निवृत्त झालेला २.४५, ९.२२; **निर्वाणपरमां**—मोक्ष ही जिची परा निष्ठा-पराकाष्ठा आहे अशा शांतीस ६.१५; **निवृत्ति**—कोणत्या अनर्थाच्या साधनापासून निवृत्त व्हावें ते ( कारण हें प्रकरण आसुरी प्रकृतीचें आहे ) १६.७, मोक्षहेतु सन्यासमार्ग ( हे प्रकरण सात्त्विकबुद्धीचें आहे ) १८ ३०; **निष्ठा**-पराकाष्ठा-सीमा १८.५०, अवस्थिति १७.१, स्थिति-अनुष्ठेयतत्परता ३.३; **निस्त्रैगुण्यं**—निष्काम २.४५; **निःश्रेयसकरौ**—मोक्ष करणारे, मोक्षसाधनभूत ५.२; **नीतिः**—जयाचा उपाय असा न्याय १०.३८, १८.७८; **नैष्कर्म्यसिद्धिं**—निष्क्रिय आत्मस्वरूपानें अवस्थान, हीच सिद्धि, कर्माभावस्थिति, ज्ञानयोगनिष्ठा १८.४९, ३.४; **न्याय्यं**—धर्म्य-शास्त्रीय; **नैष्ठिकीं**—निष्ठासंबंधी-सत्त्वशुद्धि, ज्ञानप्राप्ति, सर्वकर्मसंन्यास ज्ञाननिष्ठा या क्रमानें प्राप्त होणारी ५.१२.

**पण्डित**—आत्मसंबंधी बुद्धि ज्यांना आहे ते पंडित-आत्मज्ञ २.११, ४.२१, ज्ञानी ५.४ ( ब्रह्मदर्शी ) १८; **परधर्मः**—दुसऱ्या वर्णाचा व आश्रमाचा धर्म ३.३५, १८.४७; **पदं**—विष्णूचें परम-मोक्षाख्य स्थान २.५१, १५.४-५, १८-५६, तें अक्षरसंज्ञक पद-गमनीय-स्थान ८.११; **परमं-परम-परा-परमा**—निरतिशय-श्रेष्ठ असाच अर्थ सर्वत्र विवक्षित आहे; **परंपराप्राप्तं**—क्षत्रिय-पितापुत्रसंप्रदायानें प्राप्त ४.२; ( **परिग्रहं**—स्त्री-पुत्र-वित्त-गृह इत्यादिकांचा संग्रह; ) **परिपंथिनौ**—चोर-मोक्ष मार्गाला विघ्न करणारे ३.३४; **परिमार्गितव्यं**—शोध करावा, जाणावे १५.४; **परिसमाप्यते**—अन्तर्भूत होतें ४.३३; **पवित्रं**—पावन-शुद्धिकर ४.३८, ९.२-१७, १०.१२; **पावनानि**—विशुद्धि करणारीं

१८.५; **पुण्यकर्मणां**—अग्निहोत्रादि कर्मे करणारांचे १८.७१, ज्याचें चित्तशुद्धीला कारण होणारें पुण्य-नित्यादि कर्म आहे त्यांच्या ७.२८; **पुण्यकृतां**—अश्वमेधादि यज्ञ करणारांच्या ६.४१; **पुण्यं**—पुण्याचें फल ( कारण हें इंद्राच्या लोकाचें विशेषण आहे ) ८.२०, श्रवणानेंहि पापाचें हरण करणारें १८.७६; **पुण्यः**—चांगला-घ्राणाला तृप्त करणारा ७.९; **पुण्याः**—पुण्य योनि ( कारण वर पापयोनिशब्द असून त्याचा हा प्रतियोगी आहे ) ९.३३; **पुरा**—पूर्वी-सृष्टीच्या आरंभी ३.३-१०: १७.२३; **पुराण पुरातन-पुराणी**—या सर्वांचा 'सनातन चिरतन' असा अर्थ विवक्षित आहे; **पुष्पितां**—फुललेल्या वृक्षाप्रमाणें शोभणाऱ्या २.४२; **पौर्वदेहिकं**—पूर्व देहांतील ६.४३; **प्रकृतिज-प्रकृतिसंभव**—ईश्वराच्या मायाशक्तीपासून झालेले ३.५, १३.२१, १४.५ १८.४०; **प्रकृतिस्थः**—शरीरेंद्रियाकाराने परिणाम पावलेल्या अविद्यारूप प्रकृतीत स्थित झालेला १३.२१; **प्रकृतिस्थानि**—स्वस्थानीं स्थित असलेल्या १५.७: **प्रकृतिः**—स्वभाव-या जन्मी व्यक्त झालेला पूर्व जन्मीचा धर्माधर्मादि संस्कार ३.३३,७.२०, (प्रकृतेः) ९.८-१२-१३, ११.५१, १८.५९, त्रिगुणात्मिका वैष्णवी माया ३.२७-२९,४.६, ७.४-५, ९.७-८, १३.१९-२०-२३, (शरीरेंद्रियाकार परिणत झालेल्या)-२९; **प्रत्यक्षावगमं**—सुखादिकांप्रमाणें प्रत्यक्ष प्रमाणानें ज्ञात होण्यास योग्य असें ( ज्ञान आहे ) ९.२; **प्रत्यवायः**—दोष २.४०; **प्रशान्तमनसं-प्रशान्तात्मा-प्रशान्तस्य**—ज्याचें अन्तःकरण अत्यत शांत आहे, ६.७-१४-२७; **प्रसन्नचेतसः-प्रसन्नात्मा**—ज्यांचें चित्त प्रसन्न-स्वस्थ-आहे २.६४,१८.५४; **प्रसाद**—प्रसन्नता-स्वास्थ्य २.६४-६५; **पश्यतः**—परमार्थ तत्त्व पहाणाऱ्या २.६९.

**फलं**—इष्ट-अनिष्ट देहप्राप्ति २.५१, निःश्रेयस फल ५.४, विषयरूप ७.२३, नारळ, सुपारी वगैरे फळ ९.२६, सुख, दुःख व मोह असें त्रिविध फल १४.१६, ऐहिक किवा पारलौकिक फल १७.१२-२१-२५; १८.९ ( जन्मरूप फल )-१२ ( इतर सर्व ठिकाणीं फल म्ह० पारलौकिक फलच विवक्षित आहे ).

**बाह्यस्पर्शेषु**—बाह्य शब्दादि विषयांमध्यें ५.२१; **बाह्यान्**—बाहेरच्या ५.२७; **बुद्धयः**—चित्तवृत्ति २.२१; **बुद्धिग्राह्यं**—अतीन्द्रिय-निर्विषय ६.२१; **बुद्धिनाशः**—अन्तःकरणाच्या विवेकशक्तीचा नाश २.६३; **बुद्धिभेदं**—माझे हे कर्तव्य आहे इत्यादि निश्चयरूप बुद्धीचे चालन ३.२६; **बुद्धिमान्**—ज्ञानी २.१८, १५.२०; **बुद्धियुक्तः**—ज्ञानी २.५०-५१; **बुद्धियोगः**—ज्ञानयोग २.४९, १०.१०, ईश्वराचे ठिकाणीं समाहित चित्त करणें हा बुद्धियोग १८.५७; **बुद्धिः**—ज्ञान २.३९, ३.१, चित्तवृत्ति किंवा ज्ञानच २.४१-४४-६६, अन्तःकरणवृत्ति२.५१-५३-६५, ३.४०-४२-४३, १८.२९-३२; महत्तत्त्व ७.४, १३.५, विवेकशक्ति ७.१०, १०.४, अन्तःकरण १८.१७; **बुद्धौ**—योगविषयक किंवा सांख्यविषयक ज्ञानांत २.४९; **बुद्ध्या**—ज्ञानानें २.३९, बुद्धीनें ५.११, ६.२५, १८.५१; **ब्रह्म**—वेद ३.१५, परमात्मा ४.२४-३१, ५.१९-२१, ७.२९, ८.१-३-२४, १०.१२, १३.१२-३०, १८.५०; परमार्थसंन्यास ( कारण आरंभ संन्यासानें आहे ) ५.६, ब्रह्मार्चे नांव ८.१३, मायाशक्ति १४.३-४;

**ब्रह्मकर्म**—ब्राह्मणजातीचें कर्म १८.४२; **ब्रह्मकर्मसमाधिना**—ब्रह्म हेंच कर्म त्यांत ज्याचें चित्तसमाधान आहे तो ब्रह्मकर्मसमाधि त्याच्याकडून ( या श्लोकांतील सर्व 'ब्रह्म'शब्द परमात्मा या अर्थी आहेत. ) ४.२४; **ब्रह्मणः**—वेदाच्या ४.३२, परमात्म्याच्या ( प्राप्तिमार्गांत ) ६.३८, प्रजापतीच्या–विराटाच्या ८.१७, हिरण्यगर्भाच्या ११.३७, परमात्म्यांची १४.२७, परमात्म्याचा १७.२३; **ब्रह्मणि**—ईश्वरामध्यें ५.१०–१९–२०; **ब्रह्मनिर्वाणं**—मोक्षास २.७२, ५.२४–२५–२६; **ब्रह्मभूत**—ब्रह्मरूप ५.२४, १८.५४, जीवन्मुक्त ६.२७; **ब्रह्मभूयाय**—मोक्षास–ब्रह्म होण्यास १४.२६, १८.५३; **ब्रह्मयोगयुक्तात्मा**—ब्रह्मामध्ये जो योग–समाधि, त्यांत ज्याचें मन गढून गेलें आहे तो ५.२१; **ब्रह्मवादिनां**—वेदवाद्यांच्या १७.२४; **ब्रह्मवित्**—ब्रह्मज्ञ ५.२०; **ब्रह्मविदः**—ब्रह्मोपासक लोक ८.२४; **ब्रह्मसंस्पर्शं**—ब्रह्माशीं ज्याचा संस्पर्श आहे तें ६.२८; **ब्रह्मसूत्रपदैः**—ब्रह्मसूचक वाक्यरूप पदांनीं १३.४; **ब्रह्मोद्भवं**—वेद ज्याचें कारण आहे ते कर्म, ब्रह्मापासून ज्ञात झालेलें कर्म ३.१५; **भक्तियोगेन**—भजन हाच योग, त्यानें १४.२६; **भावना**—आत्मज्ञानाभिनिवेश २.६६; **भावसमन्विताः**—भाव–परमार्थतत्त्वाभिनिवेश, त्याने युक्त १०.८; **भावसंशुद्धिः**—निष्कपटपणा १७.१६; **भावं**—स्वभावाला ७.१५, आत्मस्वरूप–२४.९.११ ( आत्मवस्तु१८.२० )विशेष देवतेस ८.६;**भावः**—अस्तित्व२.१६,वस्तु ८.४, अक्षरसंज्ञक परब्रह्म ८.२०, भावना १८.१७; **भावाः**—पदार्थ ७.१२, बुद्ध्यादिक १०.५; **भावैः**—पदार्थ ७.१३; **भावेषु**—वस्तूंमध्ये १०.१७.

**मद्भावं**—ईश्वरभावास–मोक्षास ४.१०; वैष्णव तत्त्वास ८.५, १४.१९; **मद्भावाय**—परमात्मभावास १३.१८; **मद्भावाः**—माझ्यामध्यें ज्यांची भावना आहे–वैष्णव सामर्थ्यानें युक्त १०.६; **महद्ब्रह्म**—सर्व कार्याहून मोठें म्हणून महत् व स्वविकारांच्या भरणामुळें ब्रह्म, अशी माझी प्रकृति माया १४.३–४; **महायोगेश्वरः**—योग्यांचा महान् ईश्वर ११.९; **मात्रास्पर्शाः**—मात्रा–श्रोत्रादि इंद्रियें, त्यांचे स्पर्श–शब्दादिकांशी सयोग किंवा मात्रा–श्रोत्रादि इंद्रियें व स्पर्श–शब्दादिविषय २.१४; **माया**—त्रिगुणात्मिका वैष्णवी प्रकृति ७.१४–१५; **मायया**—छद्माने–मिषानें-गूढ शक्तीनें १८.६१, ( आत्ममायया ४.६); **मुक्तस्य**—ज्याचें धर्माधर्मादि बंधन निवृत्त झालें आहे त्याचें ४.२३; **मुक्तः**—संसारांतून मुक्त झालेलाच आहे ५.२८, हर्षादिकांपासून मुक्त–हर्षादिरहित झालेला १२.१५, पापापासून मुक्त झालेला १८.७१; **मौनं**—मूकत्व–वाणीचें संयमन १०.३८, १२.१९, मनःसंयम १७.१६; **यज्ञ**—विष्णु ३.९ ( बाकी सर्व ठिकाणीं याग; चवथ्या अध्यायांत ज्ञानसाधनांनाहि यज्ञ म्हटलें आहे. )

**युज्यस्व**—तयार हो–सज्ज हो २.३८–५०; **युञ्जतः**—योगानुष्ठान करणाऱ्या ६.१९; **युञ्जन्**—मनः समाधान करणारा ६.१५–२८, ७.१; **युञ्जीत**—समाधान करावें ६.१०; **युञ्ज्यात्**—मनःसमाधानाचा अभ्यास करावा ६.१२; **योगमायासमावृतः**—योग म्ह० गुणांची घटना–रचना–साम्यावस्था तीच माया, तिनें आच्छा-

दित झालेल्या ७.२५; **योगयज्ञाः**—प्राणायाम-प्रत्याहारादिरूप योग हाच ज्यांचा यज्ञ आहे ते योगयज्ञ ४.२८; **योगयुक्तः**—वैदिक-ईश्वर समर्पितरूप फलनिरपेक्ष योगानें युक्त ५.६–७, समाहित ८.२७; **योगयुक्तात्मा**—ज्याचें अन्तःकरण समाहित आहे तो ६.२९; **योगवित्तमाः**—अतिशय योगज्ञ १२.१; **योगसंन्यस्तकर्माणं**—परमार्थ दर्शनरूप योगानें ज्यानें कर्मांचा संन्यास केला आहे त्याला ४.४१; **योगसंसिद्धः**—कर्मयोग व समाधियोग यानें संसिद्ध–संस्कृत झालेला–योग्यतेस प्राप्त झालेला ४.३८; **योगसंसिद्धिं**—योगफलास ६.३७; **योगसेवया**—योगानुष्ठानाने ६.२०; **योगस्थः**—सिद्धि व असिद्धि यांना सम मानणे या समत्वयोगांत स्थित होऊन २.४८; **योगस्य**—ध्यानयोगाचें ( स्वरूप जाणण्याची इच्छा करणारा ) ६.४४; **योगं**—विवेकप्रज्ञेला–समाधीला २.५३, दोन अध्यायांनीं सांगितलेल्या, कर्मयोग हा ज्याचा उपाय आहे, त्या ज्ञाननिष्ठालक्षण योगाला (कारण पूर्वोक्त २.३९ ते ३.४३ पर्यंत सांगितलेल्या विषयाला उद्देशून हा योगशब्द आहे ) ४.१, सम्यग्दर्शनाचा उपाय अशा कर्मानुष्ठानाला ४.४२, कर्मानुष्ठानास ५.१, वैदिक कर्मयोगाला ५.५, कर्मानुष्ठानरूप योगास ६.२, ध्यानयोगास ६.३, चित्तसमाधान ६.१२–१९, ७.१, आत्म्याचें याथात्म्य ९.५, ( किंवा योगजन्य योगैश्वर्य-सामर्थ्य–योगशक्तीचें आधिक्य ) १०.७–१८, ११.८, योगासाठीं असल्यामुळे हा संवाद-योगच होय, त्यास १८.७५; **योगः**—सिद्धि-असिद्धींचें समत्व हाच योग २.४८–५०, कर्मं ज्याचा उपाय आहे असा ज्ञाननिष्ठारूप योग ४.२–३, चित्तसमाधानरूप योग ६.१६–१७–२३–३३–३६; **योगात्**—ध्यानयोगापासून–चित्तसमाधानापासून ६.३७; **योगाय**—समत्वबुद्धि योगासाठीं, ज्ञानयोगासाठीं २.५०; **योगारूढस्य**—ध्यानयोगारूढ झालेल्याला ६.३; **योगारूढः**—ज्याला योग प्राप्त झाला आहे तो ६.४; **योगिनं**—या ध्यानयोग्याला ६.२७; **योगिनः**—कर्म करणारे ( कारण प्रकरण दैवयज्ञाचें आहे ) ४.२५, कर्म ईश्वरार्पण करून व फलाची इच्छा टाकून कर्मानुष्ठान करणारे ५.११, ध्यानयोग्याचें ६.१९, १८.१४, ध्यानयोगी व कर्मठ ( कारण पुढें दोघांच्या दोन गती सांगितल्या आहेत ) ८.२३, समाहितचित्त योगी १५.११; **योगिनां**—कर्माधिकाऱ्यांची ३.३, दरिद्र्यांच्या ( कारण वर ' श्रीमतां ' असा शब्द आहे ) ६.४२, रुद्र-आदित्यादिकाचे ध्यान करणाऱ्या योग्यांतील ६.४७; **योगी**—योगी–ध्यायी–समाधिमान् ५.२४, चित्त-समाधानवान् ६.१–२–८, १२.१४, ध्यानाभ्यासी ६.१०–१५–( योगविघ्नरहित )–२८, सम्यग्दर्शी योगी ६.३१–३२–४५, ध्यायी–ध्यानाभ्यासी ६.४६, कर्मी ८.२५, ध्यायी किंवा कर्मी ८.२७–२८; **योगे**—सांख्यज्ञानाच्या प्राप्तीचा उपाय असा ईश्वराराधनार्थ कर्मयोग व समाधियोग याविषयीं २.३९; **योगेन**—सम्यग्दर्शनस्थैर्यरूप १०.७, समाधीनें १२.६, १८.३३, आत्म्याचें यथार्थ स्वरूपाचिंतन हाच योग त्यानें १३.२४; **योगेश्वर**—योग्यांच्या ईश्वरा ११.४, ( रः ) १८.७८ ( योगेश्वरात् ) १८.७५; **योगैः**—ज्ञानप्राप्तीच्या उपायत्वानें कर्मं ईश्वरार्पण करून फलाची इच्छा सोडून त्यांचें अनुष्ठान करणारे, त्यांच्याकडून ५.५; **योनिः**—उत्पत्तिस्थान १४.३, व्याघ्रादियोनि १६.१९–२०.

४.१२, क्रमानें मोक्षसिद्धीला १२.१०, मोक्षाला १४.१, पुरुषार्थयोग्यतेला १६.२३, ज्ञाननिष्ठायोग्यतेला १८.४५–४६–५०, फलनिष्पत्ति ४.१२; **सिद्धि-असिद्धि**—इष्ट लाभ होणें किंवा न होणें ४.२२, २.४८, १८.२६; **स्मृतिभ्रंशः**—शास्त्राचार्योपदेशजनित संस्कारापासून होणाऱ्या स्मृतीचा भ्रंश २.६३; **स्वकर्म-स्वधर्म**—आपापल्या वर्णाश्रमाला उचित असें कर्म. **स्वभाव**—अविद्यालक्षण प्रकृति ५.१४, जीवभाव ८.३, इतर सर्वत्र स्वभाव म्ह० या जन्मीं व्यक्त झालेला पूर्वजन्मार्जित धर्माधर्मसंस्कार. ( १८.४१ येथे स्वभाव म्ह० ईश्वराची त्रिगुणात्मिका प्रकृति–माया असाहि दुसरा अर्थ संभवतो. ) **हेतु**—निमित्त ९.१०, १३.२०, कारण १८.१५; **हेतुमद्भिः**—युक्तियुक्त १३.४. ( **नियतं**—निश्चित–अवश्य १.४४, नित्यकर्म ३.८, १८.९–१३; **नियतस्य**—नित्यकर्माचा १८.७; **प्रजापतिः**—प्रजाचा स्रष्टा–उत्पादक ३.१०, कश्यपादि ११.३९. )

---

॥ ॐ ॥

**पार्थाय प्रतिबोधितां भगवता नारायणेन स्वयं**
**व्यासेन ग्रथितां पुराणमुनिना मध्येमहाभारतम् ।**
**अद्वैतामृतवर्षिणीं भगवतीमष्टादशाध्यायिनी-**
**मम्ब त्वामनुसंदधामि भगवद्गीते भवद्वेषिणीम् ॥ १ ॥**

**अन्वयार्थ—अंब भगवद्गीते**—हे माते भगवद्गीते !—**भगवता नारायणेन स्वयं**—भगवान् नारायणानीं स्वतः—**पार्थाय प्रतिबोधितां**—अर्जुनाला उपदेशिलेली—**पुराणमुनिना व्यासेन**—प्राचीन मुनी व्यासांनीं—**मध्येमहाभारतं ग्रथितां**—महाभारतामध्यें ग्रथित केलेली—**अद्वैतामृतवर्षिणीं**—अद्वैतरूप अमृताचा वर्षाव करणारी—**भवद्वेषिणीं**—संसाराचा द्वेष–उच्छेद करणारी—**अष्टादश-अध्यायिनीं भगवतीं**—जिचे अठरा अध्याय आहेत, अशी जी पूज्य गीता—**त्वाम् अनुसंदधामि**—त्या तुज गीतेचें मी चिंतन–स्मरण करितों. १.

**नमोऽस्तु ते व्यास विशालबुद्धे फुल्लारविन्दायतपत्रनेत्र ।**
**येन त्वया भारततैलपूर्णः प्रज्वालितो ज्ञानमयः प्रदीपः ॥ २ ॥**

**अन्वयार्थ—फुल्लारविंद-आयतपत्रनेत्र विशालबुद्धे व्यास**—फुललेल्या कमलपत्रासारखे ज्यांचे आकर्ण नेत्र आहेत, ज्यांची बुद्धि विशाल आहे, अशा हे व्यासमुने! —**येन त्वया भारततैलपूर्णः ज्ञानमयः प्रदीपः प्रज्वालितः**—ज्या तुम्ही भारतरूपी तेलानें भरलेला ज्ञानप्रचुर दीप प्रदीप्त केलात,—**ते नमः अस्तु**—त्या तुम्हांला नमस्कार असो. २

**प्रपन्नपारिजाताय तोत्रवेत्रैकपाणये ।**
**ज्ञानमुद्राय कृष्णाय गीतामृतदुहे नमः ॥ ३ ॥**

**अन्वयार्थ—प्रपन्नपारिजाताय**—शरणागतास कल्पवृक्षाप्रमाणें असलेल्या—**तोत्रवेत्रैकपाणये**—ज्याच्या एका हातांत चाबकाची काठी आहे—**ज्ञानमुद्राय**[1]—ज्यानें ज्ञानाची मुद्रा धारण केली आहे अशा—**गीतामृतदुहे**—गीतामृताचें दोहन करणाऱ्या—**कृष्णाय**—श्रीकृष्णाला—**नमः**—नमस्कार असो. ३.

**सर्वोपनिषदो गावो दोग्धा गोपालनन्दनः ।**
**पार्थो वत्सः सुधीर्भोक्ता दुग्धं गीतामृतं महत् ॥ ४ ॥**

**अन्वयार्थ—सर्वोपनिषदः गावः**—सर्व उपनिषदें याच गायी—**गोपालनंदनः दोग्धा**—नंद गोपालाचा पुत्र हा दोहन करणारा-गवळी—**भोक्ता सुधीः पार्थः वत्सः**—गीतामृताचें प्राशन करणारा भोक्ता-जीव बुद्धिमान् पार्थ हेंच वासरूं असून त्याच्यासाठीं—**महत् गीतामृतं दुग्धं**—मोक्षासारखें श्रेष्ठ फल देणाऱ्या गीतामृताचें दोहन केलें. [ उपनिषद्रूपी गायींपासून पार्थरूपी जीवासाठीं अंतर्यामी नारायणानें गीतामृताचें दोहन केलें. ] ४

**वसुदेवसुतं देवं कंसचाणूरमर्दनम् ।**
**देवकीपरमानन्दं कृष्णं वन्दे जगद्गुरुम् ॥ ५ ॥**

**अन्वयार्थ—वसुदेवसुतं**—वसुदेवाचा पुत्र—**कंसचाणूरमर्दनं देवं**—कंस व चाणूर यांना मारणारा देव—**देवकीपरमानंदं**—देवकीचा परम आनंद अशा—**जगद्गुरुं कृष्णं**—सर्व जगताच्या धर्मोपदेशक श्रीकृष्णाला—**वन्दे**—मी वंदन करितों. ५

**भीष्मद्रोणतटा जयद्रथजला गांधारनीलोत्पला**
**शल्यग्राहवती कृपेण वहनी कर्णेन वेलाकुला ।**
**अश्वत्थामविकर्णघोरमकरा दुर्योधनावर्तिनी**
**सोत्तीर्णा खलु पाण्डवै रणनदी कैवर्तकः केशवः ॥ ६ ॥**

**अन्वयार्थ—भीष्मद्रोणतटा**—भीष्म व द्रोण हे ज्या रणनदीचे दोन तीर आहेत, —**जयद्रथजला**—जयद्रथ हें जिच्यांतील जल आहे,—**गांधारनीलोत्पला**—शकुनि हेंच नील कमल आहे,—**शल्यग्राहवती**—जी शल्य या सुसरानें युक्त आहे, —**कृपेण वहनी**—कृपाचार्य याच प्रवाहानें जी वहात आहे,—**कर्णेन वेलाकुला**—कर्णाच्या योगानें जी दोन्ही तीरांवर क्षुब्ध झाली आहे,—**अश्वत्थामविकर्णघोरमकरा**—अश्वत्थामा व विकर्ण हेच जिच्यांतील भयंकर नक्र आहेत,—**दुर्योधनावर्तिनी**—दुर्योधन हा जिच्यांतील मोठा भोंवरा आहे अशी—**सा रणनदी**—ती रणरूपी नदी—**पांडवैः खलु उत्तीर्णा**—पांडवांनीं खरोखर उल्लंघिली, कारण **कैवर्तकः केशवः**—त्यांचा नावाडी-त्यांना त्या रणनदींतून पार करणारा साक्षात् भगवान् केशव होता. ६

---

१. श्रीमच्छंकराचार्यांच्या फोटोंत उजव्या हाताची जी आकृति आहे, तीच ज्ञानमुद्रा होय.

**पाराशर्यवचःसरोजममलं गीतार्थगन्धोत्कटं**
**नानाख्यानककेसरं हरिकथासद्वासनावासितम् ।**
**लोके सज्जनषट्पदैरहरहः पेपीयमानं मुदा**
**भूयाद्भारतपङ्कजं कलिमलप्रध्वंसि नः श्रेयसे ॥ ७ ॥**

**अन्वयार्थ—पाराशर्यवचःसरोजं**—पराशरपुत्र भगवान् व्यास यांच्या वचन-रूपी सरोवरांत उत्पन्न झालेलें—**अमलं**—निर्मल-शुद्ध-धर्म्य—**गीतार्थगन्धोत्कटं**—गीतार्थ हाच ज्याचा उत्कृष्ट सुवास आहे,—**नानाख्यानककेसरं**—नाना प्रकारचीं आख्यानें हेंच ज्यांतील केसर आहे,—**हरिकथासंबोधनाबोधितं**—हरिकथेच्या वर्णनानें जें प्रफुल्लित झाले आहे—**लोके सज्जनषट्पदैः अहरहः मुदा पेपीयमानं**—या लोकीं धार्मिक संतजन याच भ्रमराकडून जे प्रत्यहीं मोठ्या आनंदानें वारंवार सेवन केलें जाणारें—**कलिमलप्रध्वंसि**—असे कलीचा मल घालविणारें-पातकाचा नाश करणारें—**भारतपंकजं**—भारतरूपी कमल—**नः श्रेयसे भूयात्**—आमच्या कल्याणास कारण होवो-आमचे कल्याण करणारे होवो. ७.

**मूकं करोति वाचालं पङ्गुं लङ्घयते गिरिम् ।**
**यत्कृपा तमहं वन्दे परमानन्दमाधवम् ॥ ८ ॥**

**अन्वयार्थ—यत्कृपा**—ज्याची कृपा—**मूकं वाचालं करोति**—मुक्याला वाचाळ करते—**पंगुं गिरिं लंघयते**—पांगळ्याकडून पर्वताचे उल्लंघन करविते—**तं परमानंदमाधवं**—त्या परमानंदरूप माधवाला—**अहं वन्दे**—मी वंदन करितो. ८

**यं ब्रह्मा वरुणेन्द्ररुद्रमरुतः स्तुन्वन्ति दिव्यैः स्तवै-**
**र्वेदैः साङ्गपदक्रमोपनिषदैर्गायन्ति यं सामगाः ।**
**ध्यानावस्थिततद्गतेन मनसा पश्यन्ति यं योगिनो**
**यस्यान्तं न विदुः सुरासुरगणा देवाय तस्मै नमः ॥ ९ ॥**

**अन्वयार्थ—ब्रह्मा वरुणेन्द्ररुद्रमरुतः यं दिव्यैः स्तवैः स्तुवन्ति**—ब्रह्मदेव, वरुण, इंद्र रुद्र व मरुद्गण ज्याला दिव्य स्तुतींनी स्तवितात,—**सामगाः यं सांगपदक्रमोपनिषदैः वेदैः गायन्ति**—साम गायन करणारे वैदिक व्याकरणादि अंगें, पदे, क्रम व उपनिषदें यासह वेदांनीं ज्याचें गान-वर्णन करितात,—**योगिनः यं ध्यानावस्थिततद्गतेन मनसा पश्यन्ति**—योगी ज्याला ध्यानानें स्थिर केलेल्या आत्मनिष्ठ मनानें पहातात,—**सुरासुरगणाः यस्य अन्तं न विदुः**—देव व दानव यांचे समूह ज्याचा अंत जाणत नाहींत-देवादिकांनाहि ज्याचा अंत लागत नाहीं,—**तस्मै देवाय नमः**—त्या स्वयंप्रकाश देवाला नमस्कार असो. ९.

( इति ध्यानम् )

---





शास्त्रं शारीरमीमांसा देवस्तु भगवान् स्वयम् ।
आचार्याः शंकराचार्याः सन्तु जन्मनि जन्मनि ॥

Lakshmi Art, Bombay, 8

# श्रीमद्भगवद्गीताभाष्यार्थ

## उपोद्घात.

ॐ नारायणः परोऽव्यक्तादण्डमव्यक्तसंभवम् ।
अण्डस्यान्तस्त्विमे लोकाः सप्तद्वीपा च मेदिनी ॥ १ ॥

**अर्थ—नारायणः अव्यक्तात् परः**—नारा म्ह० जलतत्त्व, तें ज्याचें अयन-अधिष्ठान आहे तो नारायण-शेषशायी भगवान् अव्यक्ताहून-मायेहून पर-अगदीं विलक्षण आहे. मायेच्या लक्षणाहून-स्वरूपाहून त्याचें लक्षण अगदीं निराळें आहे. माया जड, परतंत्र, व अनादि सान्त आहे. नारायण चेतन, स्वतंत्र व नित्य-अनादि-अनन्त आहे. तत्त्वदृष्ट्या—नर म्ह० चराचर शरीरें, त्यांत सतत राहणारे जे चिदाभास-जीव त्यांस नारा म्हणतात. त्यांचा जो अयन-आश्रय-नियामक-अंतर्यामी तो नारायण, अव्यक्त किंवा अव्याकृत या नांवाच्या मायेहून अगदीं निराळा आहे. माया व तिचे गुण यांचा त्याला स्पर्शहि झालेला नाहीं. तो निर्लेप, असंग, उदासीन, सत्-चित्-आनंदरूप आहे, असा याचा अर्थ होतो —**अण्डं**—अपंचीकृत पंचमहाभूतात्मक जें तत्त्व त्याला अंड म्हणतात.तें —**अव्यक्तसंभवं**—अव्यक्तापासून झालेलें आहे.—**तु अण्डस्य अन्तः**—त्या ब्रह्मांडांत—**इमे लोकाः**—हे भूः,भुवः, सुवः, महः, जनः, तपः व सत्य असे सप्त लोक आहेत —**च**—व—**सप्तद्वीपा मेदिनी**—त्यांत ही सप्तद्वीपांनीं युक्त अशी पृथिवी आहे. १

---

१ बृहदारण्यकभाष्यार्थ अ. ३. पृ. १७७–१८८ पहा. २ प्रकृतीपासून-मायेपासून अगोदर आकाश, वायु, तेज, जल व पृथिवी हीं पांच सूक्ष्म भूतें होतात. त्यांचें परस्पर मिश्रण झालेलें नसतें. त्याना अपंचीकृत पंचभूतें किंवा तन्मात्रे म्हणतात. हीं सूक्ष्म भूतें हेंच हिरण्यगर्भाचें तत्त्व-शरीर आहे. त्यालाच ब्रह्मांड म्हणतात. ३ हे सात लोक हेंच विराडात्म्याचें शरीर आहे. अन्तर्यामी नारायण नित्य आहे. त्याच्या आश्रयानें अव्यक्त नांवाची मायाशक्ति राहते. ती कार्योन्मुख-जगद्रूप-सृष्टिरूप कार्य करण्यास तयार झाली म्हणजे आकाशादि सूक्ष्म भूते होतात. त्या भूतांनी युक्त असलेले जे नारायण तत्त्व तोच हिरण्यगर्भ, तेंच ब्रह्मांड. नंतर सूक्ष्म भूतांचें परस्पर मिश्रण होतें. त्यालाच पंचीकरण म्हणतात. त्यामुळें भूतें स्थूल होतात. तीं स्थूल भूते हाच मी असा त्यांवर अभिमान ठेवणारा नारायण हाच विराट् पुरुष, त्या पंच महा भूतांतच या सप्तद्वीपवती पृथ्वीचा अन्तर्भाव होतो. या विराट्-पुरुषाच्या मुखादिकांपासूनच वेद-शास्त्रें, ब्राह्मणादि वर्ण वगैरे सृष्टि झाली. असो. भाष्यकारांनीं या श्लोकानें नारायणतत्त्वानुस्मरणरूप मंगलाचरण केलें आहे. त्यांत गीताशास्त्राचें-विषय, प्रयोजन, अधिकारी व संबंध-हें अनुबंधचतुष्टयहि सुचविलें आहे. ‘ ब्रह्म व आत्मा यांचे ऐक्य ’ हा या शास्त्राचा विषय, मोक्ष-संसारनिवृत्ति हे फल, मोक्षाची इच्छा करणारा मुमुक्षु हा अधिकारी, ब्रह्म हा विषय व गीताशास्त्र त्याचें प्रतिपादक विषयी, यास्तव ब्रह्म व गीताशास्त्र यांचा विषय-विषयी, प्रतिपाद्य-प्रतिपादक हा संबंध आहे.

**स भगवान्सृष्ट्वेदं जगत्तस्य च स्थितिं चिकीर्षुर्मरीच्यादीनग्रे सृष्ट्वा प्रजापतीन्प्रवृत्तिलक्षणं धर्मं ग्राहयामास वेदोक्तम् । ततोऽन्यांश्च सनकसनन्दनादीनुत्पाद्य निवृत्तिलक्षणं धर्मं ज्ञानवैराग्यलक्षणं ग्राहयामास ॥**

**भाष्यार्थ—सः भगवान् इदं जगत् सृष्ट्वा**—तो भगवान्–नारायण हें जगत् उत्पन्न करून—**च तस्य स्थितिं चिकीर्षुः**—व त्याची स्थिति करण्याची इच्छा करणारा तो—**अग्रे मरीच्यादीन् प्रजापतीन्**—प्रथम मरीची, अत्रि, अंगिरस इत्यादि[1] प्रजापतींना—**सृष्ट्वा**—उत्पन्न करून—**वेदोक्तं प्रवृत्तिलक्षणं धर्मं**—वेदानें सांगितलेल्या प्रवृत्तिरूप[2] धर्मास—**ग्राहयामास**—ग्रहण करविता झाला. [जगाला उत्पन्न करून त्याच्या स्थितीची इच्छा करणाऱ्या नारायणानें अगोदर मरीचिप्रभृति प्रजापतींना उत्पन्न करून त्यांच्याकडून वेदोक्त प्रवृत्तिधर्माचें ग्रहण करविलें. ]—**च ततः अन्यान् सनक-सनन्दनादीन्**—आणि त्यांहून निराळ्या सनक, सनन्दन, सनात्, सनातन यास—**उत्पाद्य**—उत्पन्न करून—**ज्ञानवैराग्यलक्षणं निवृत्तिलक्षणं धर्मं**—ज्ञान व वैराग्य हें ज्याचें स्वरूप आहे अशा शम-दमादिरूप निवृत्तिधर्मास—**ग्राहयामास**—त्यांच्याकडून ग्रहण करविलें. [शम-दम-उपरम-तितिक्षा-श्रद्धा-समाधान हें निवृत्तिलक्षण धर्माचें स्वरूप असून ज्ञान व वैराग्य हे त्या शमादिकांचेंहि कारण आहे. भगवानांनी सनकादिकांस उत्पन्न करून त्यांना तो धर्म शिकविला. ]

**द्विविधो हि वेदोक्तो धर्मः । प्रवृत्तिलक्षणो निवृत्तिलक्षणश्च । जगतः स्थितिकारणं प्राणिनां साक्षादभ्युदयनिःश्रेयसहेतुर्यः स धर्मो ब्राह्मणाद्यैर्वर्णिभिराश्रमिभिश्च श्रेयोर्थिभिरनुष्ठीयमानः ॥**

**भाष्यार्थ—वेदोक्तः धर्मः द्विविधः हि**—वेदोक्त धर्म दोन प्रकारचा आहे—**प्रवृत्तिलक्षणः च निवृत्तिलक्षणः**—एक प्रवृत्तिलक्षण–याग-दानरूप व दुसरा निवृत्तिलक्षण–ज्ञानवैराग्यरूप, (धर्माचें लक्षण–)—**यः जगतः स्थितिकारणं**—जो जगाच्या स्थितीचें कारण—**प्राणिनां साक्षात् अभ्युदय-निःश्रेयसहेतुः**—प्राण्याच्या साक्षात् अभ्युदयाचें[3]–उत्कर्षाचें व मोक्षाचें कारण—**सः धर्मः**—तो धर्म होय. ( धर्माचें जर एवढेंच लक्षण असेल तर तो वाटेल त्याला साध्य आहे, असें कोणी म्हणेल म्हणून पुनः आचार्य

---

१ मरीचि, अत्रि, अंगिरस, पुलस्त्य, पुलह, क्रतु व दक्ष किंवा प्रचेतस आणि वसिष्ठ, भृगु व नारद या दहा (मनुस्मृ. अ. १ श्लो. ३५.) प्रजापतींस उत्पन्न करून त्यांना वेदोक्त प्रवृत्तिधर्म सांगितला. २ याग, दान, तप हा प्रवृत्तिधर्म आहे. मरीच्यादि गृहस्थाश्रमी त्याचे अधिकारी होत. म्हणून भगवानांनीं त्यांजकडून त्याचें ग्रहण करविलें. ३ आपला उत्कर्ष व्हावा. या लोकीं मोठेपणा मिळावा व परलोकीं उत्तम लोकाची प्राप्ति व्हावी, अशी इच्छा करून प्रवृत्तिलक्षण याग-दानादि धर्म जे गृहस्थ करितात त्यांच्या साक्षात् उत्कर्षाला तो धर्म कारण होतो व आपल्याला मोक्ष मिळावा, अशा इच्छेने प्रवृत्ति-धर्माचें अनुष्ठान जे करितात, त्यांना चित्तशुद्धि, ज्ञानप्राप्ति व ज्ञानानें मोक्ष अशा परंपरेनें तो निःश्रेयसहेतु–मोक्षाचें कारण होतो, पण ज्ञान-वैराग्यरूप निवृत्तिधर्म साक्षात् निःश्रेयसहेतु आहे.

म्हणतात-)—**श्रेयोर्थिभिः ब्राह्मणाद्यैः वर्णिभिः च आश्रमिभिः अनुष्ठीय-मानः**—पुरुषार्थाची इच्छा करणाऱ्या ब्राह्मणादि वर्णांकडून व ब्रह्मचारी-गृहस्थ इत्यादि आश्रमांकडून अनुष्ठान केला जाणारा जो, तो धर्म होय. [ श्रुति-स्मृतींमध्ये सांगितलेल्या नियमाप्रमाणें जो ब्राह्मणादि वर्ण व आश्रम यांच्याकडून आचरिला जातो, जो जगाच्या स्थितीचें व प्राण्यांच्या साक्षात् उत्कर्षाचें व मोक्षाचें कारण आहे तो धर्म होय. ]

**दीर्घेण कालेनानुष्ठातॄणां कामोद्भवाद्धीयमानविवेकविज्ञानहेतुकेनाधर्मेणाभिभूयमाने धर्मे प्रवर्धमाने चाधर्मे जगतः स्थितिं परिपिपालयिषुः स आदिकर्ता नारायणाख्यो विष्णुर्भौमस्य ब्रह्मणो ब्राह्मणत्वस्य रक्षणार्थं देवक्यां वसुदेवादंशेन किल संबभूव। ब्राह्मणत्वस्य हि रक्षणेन रक्षितः स्याद्वैदिको धर्मस्तदधीनत्वाद्वर्णाश्रमभेदानाम् ॥**

**भाष्यार्थ—दीर्घेण कालेन**—दीर्घकालानें-कृत, त्रेता व जवळ जवळ द्वापर, एवढा मोठा काल मध्यें निघून गेल्यावर—**अनुष्ठातॄणां कामोद्भवात्**—त्या धर्माचें अनुष्ठान करणाऱ्या ब्राह्मणादिकांमध्यें कामाचा-विषयतृष्णेचा उद्भव झाल्यामुळें—**हीयमानविवेकविज्ञानहेतुकेन अधर्मेण**—कमी होत जाणारा विवेक व विज्ञान यांना कारण होणाऱ्या अधर्मांकडून—**धर्मे अभिभूयमाने**—धर्माचा पराभव-क्षय केला जाऊं लागला असतां—**च अधर्मे प्रवर्धमाने**—व अधर्माची अतिशय वृद्धि होऊं लागली असतां—**जगतः स्थितिं परिपिपालयिषुः**—जगाच्या स्थितीचें परिपालन करण्याची इच्छा करणारा—**सः आदिकर्ता नारायणाख्यः विष्णुः**—तो आदिकर्ता-पहिला स्रष्टा—नारायणनांवाचा विष्णु—व्यापक परमात्मा—**भौमस्य ब्रह्मणः- ब्राह्मणत्वस्य**—भूलोकच्या ब्रह्माचे[१] म्ह० ब्राह्मणत्वाचे—**रक्षणार्थं**—रक्षण करण्यासाठी—**देवक्यां वसुदेवात् अंशेन संबभूव किल**—देवकीच्या ठिकाणी वसुदेवापासून अंशानें उत्पन्न झाला, हे पुराणांतून प्रसिद्ध आहे.—**हि**—ब्राह्मण्याच्याच रक्षणाचें कारण असें की,—**ब्राह्मणत्वस्य रक्षणेन**—ब्राह्मणत्वाचे रक्षण केल्यानें—**वैदिकः धर्मः रक्षितःस्यात्**—वैदिक धर्म सुरक्षित राहील.—**वर्णाश्रमभेदानां तदधीनत्वात्**—कारण वर्णभेद व आश्रमभेद ब्राह्मणाच्या अधीन आहेत. [ ब्राह्मण जिवंत राहिले तर वर्ण व आश्रम जगांत राहणार. कारण वर्णाश्रमांची व्यवस्था त्यांच्या अस्तित्वावर अवलंबून असते. ]

**स च भगवाञ्ज्ञानैश्वर्यशक्तिबलवीर्यतेजोभिः सदा संपन्नस्त्रिगुणात्मिकां वैष्णवीं स्वां मायां मूलप्रकृतिं वशीकृत्याजोऽव्ययो भूतानामीश्वरो नित्यशुद्धबुद्धमुक्तस्वभावोऽपि सन्स्वमायया देहवानिव जात इव च लोकानुग्रहं कुर्वन्निव लक्ष्यते ॥**

---

१ ' भौमस्य ब्रह्मणो गुप्त्यै वसुदेवादजीजनत् ।' या वचनाला अनुसरून भाष्यकारांचें हे म्हणणें आहे. २ म्हणून वर्णाश्रमविभाग नाहींसा करूं पाहणाऱ्या दानवांकडून प्रथम ब्राह्मणाचा नाश करण्याचाच यत्न केला जात असे. हल्लींच्या धर्मविध्वंसकांचे प्रयत्नही याच दिशेनें होत असतात, हें प्रसिद्ध आहे.

**भाष्यार्थ—च ज्ञान-ऐश्वर्य-शक्ति-बल-वीर्य-तेजोभिः सदा संपन्नः सः भगवान्**—आणि ज्ञान, ऐश्वर्य, शक्ति, बल, वीर्य व तेज यांनीं संपन्न असलेला तो भगवान्-नारायण—**स्वां त्रिगुणात्मिकां वैष्णवीं मायां मूलप्रकृतिं**—आपल्या ईशपरतंत्र असलेल्या त्रिगुणात्मक वैष्णवी-व्यापक मायेला-मूलप्रकृतीला—**वशीकृत्य**—वश करून-तिला आपल्या स्वाधीन ठेवून तो स्वतः—**अजः अव्ययः भूतानां ईश्वरः नित्य-शुद्ध-बुद्ध-मुक्तस्वभावः अपि सन्**—अज-न जन्मणारा, अव्यय-निर्विकार, सर्व प्राण्यांचा नियामक, नित्यस्वभाव, शुद्धस्वभाव, ज्ञानस्वभाव व मुक्तस्वभावही असून—**स्वमायया**—आपल्या मायेच्या योगानें—**देहवान् इव जातः इव**—देहवान् असल्यासारखा, उत्पन्न झाल्यासारखा—**च लोकानुग्रहं कुर्वन् इव**—व लोकांवर अनुग्रह करीत असल्यासारखा—**लक्ष्यते**—दिसतो. [अ. ४ श्लो. ६, यांत सांगितल्याप्रमाणें तो भगवान् ज्ञानादि षड्गुणांनी संपन्न असूनही त्याच्या अधीन असलेल्या सर्व प्रपंचाचें कारण अशा आपल्या मायेला-सत्त्व-रज-तम या त्रिगुणयुक्त मायेला-जगाच्या मूल प्रकृतीला-आपल्या स्वाधीन ठेवितो व स्वतः अज, अव्यय, वगैरे असतांही आपल्या विचित्र शक्तीमुळे शरीराने युक्त झाल्यासारखा दिसतो. त्यामुळें त्याचा जन्म झाला आहे, तो सर्व लोकांवर जणुं काय अनुग्रह करीत आहे, असें भासतें.]

**स्वप्रयोजनाभावेऽपि भूतानुजिघृक्षया वैदिकं हि धर्मद्वयमर्जुनाय शोकमोहमहोदधौ निमग्नायोपदिदेश गुणाधिकैर्हि गृहीतोऽनुष्ठीयमानश्च धर्मः प्रचयं गमिष्यतीति। तं धर्मं भगवता यथोपदिष्टं वेदव्यासः सर्वज्ञो भगवान्गीताख्यैः सप्तभिः श्लोकशतैरुपनिबबन्ध॥**

**भाष्यार्थ—स्वप्रयोजन-अभावे अपि**—(त्या कृतकृत्य व नित्यतृप्त ईश्वराला) स्वतःच्या प्रयोजनाचा जरी अभाव असला (अ. ३ श्लो. २२ पहा.) म्ह. त्याला जरी

---

१ ज्ञान—विषयाला जाणण्याचे सामर्थ्य, ऐश्वर्य—स्वातंत्र्य, शक्ति—स्वातंत्र्यानें नियमन करण्याचे सामर्थ्य, बल—सहाय करणारांची संपत्ति, वीर्य—पराक्रम व तेज प्रगल्भता—विजयशक्तित्व या सहा गुणांनीं तो नारायण सदा युक्त असतो 'स्वा' म्ह० ईश्वराच्या अधीन असलेल्या वैष्णवी—व्यापक, 'त्रिगुणात्मिकां-' सत्त्व, रज व तम हे तीन गुण हेंच जिचें स्वरूप आहे अशा, सत्त्वादि गुणांची साम्यावस्था हेंच मायेचें स्वरूप आहे, 'मायां' अशा आपल्या अचिन्त्य शक्तीला तो स्वाधीन ठेवतो. जीवाप्रमाणे ईश्वर प्रकृतिपरतंत्र होत नाहीं. जीवानेंही या मायेला—आपल्या प्रकृतीला योगाभ्यासाने स्वाधीन ठेवल्यास तोही ईश्वर म्ह० स्वतंत्रच आहे. नित्यत्व, शुद्धत्व, बुद्धत्व व मुक्तत्व हा त्याचा स्वभाव आहे. स्वभाव केव्हांही बदलत नाहीं, त्यामुळे त्याचे हे नित्यत्वादि स्वभाव संसारावस्थेंत संभवत नाहीत मोक्षावस्थेंतच संभवतात, असे म्हणतां येत नाहीं. ईश्वराच्या देहग्रहणामध्यें मायेला प्राधान्य असते. म्ह० त्याचें शरीरग्रहण मायिक आहे वास्तविक नव्हे, हें भाष्यांतील 'स्वमायया' या पदानें सुचविले आहे. पूर्वोक्त दोन्हा धर्मांचा उपदेश करून लोकांना अभ्युदय व निःश्रेयस यांमध्ये तत्पर करणे, हाच लोकानुग्रह आहे. पण त्या अज-अव्यय-निष्क्रिय नारायणाचा जन्म, शरीर व लोकानुग्रह वगैरे सर्व आभासमात्र आहे. वास्तविक नव्हे. कारण ते सर्व वास्तविक मानल्यास त्याच्या अजत्वादि व नित्यत्वादि स्वभावाला बाध येईल.

कोणतेंही फळ संपादन करावयाचें नसलें तरी—**भूतानुजिघृक्षया**—भूतांवर अनुग्रह करण्याच्या इच्छेनें—**वैदिकं हि धर्मद्वयं**—दोन प्रकारचा-प्रवृत्तिलक्षण व निवृत्तिलक्षण धर्म—**शोकमोहमहादधौ निमग्नाय अर्जुनाय**—शोक व मोह यांच्या महासागरांत निमग्न झालेल्या-बुडालेल्या अर्जुनाला—**उपदिदेश**—उपदेशिला. ( भगवानांनीं लोकांवर अनुग्रह करण्यासाठीं-त्यांना यथाधिकार धर्मामध्यें प्रवृत्त करण्यासाठीं-दोन प्रकारचा वैदिकधर्म अर्जुनाला सांगितला. कारण इतर जीवांप्रमाणे तोही त्यावेळीं शोक-मोहसागरांत निमग्न झाला होता. अर्जुनालाच उपदेश करण्याचे कारण-)—**हि गुणाधिकैः गृहीतः च अनुष्ठीयमानः धर्मः**—कारण गुणांनीं अधिक-श्रेष्ठ असलेल्या लोकांकडून स्वीकारलेला व अनुष्ठान केला जाणारा धर्म—**प्रचयं गमिष्यति**—वृद्धि पावेल,—**इति**—म्हणून तो अर्जुनालाच उपदेशिला.—**भगवता यथा-उपदिष्टं तं धर्मं**—भगवानांनीं जसा त्याचा उपदेश केला होता तशाच त्या धर्माला—**सर्वज्ञः भगवान् वेदव्यासः**—सर्वज्ञ पूज्य वेदव्यास—**गीताख्यैः सप्तभिः श्लोकशतैः**—गीता या नांवाच्या सातशें श्लोकांनीं—**उपनिबबन्ध**—ग्रथित करता झाला. [ भगवानांनीं अर्जुनाला सांगितलेला तोच दोन प्रकारचा धर्म सर्वज्ञ वेदव्यासींनीं गीता या नांवाच्या सातशें श्लोकांनीं ग्रथित केला. ]

---

१ अर्जुन त्या वेळच्या लोकांत मोठा मान्य झाला होता. शूर, धार्मिक, विद्वान् इत्यादि गुणांनीं तो प्रसिद्ध होता. त्यामुळे तो श्रेष्ठ होता. म्हणून श्रीकृष्णांनीं त्याला धर्माचा उपदेश केला. सामान्य लोक श्रेष्ठाचे अनुकरण करितात, हे प्रसिद्ध आहे. पुष्कळ लोक धर्माचे अनुकरण करूं लागले कीं त्याची वृद्धि होते. धर्मानुष्ठान वाढावे, म्हणून भगवानांनीं अर्जुनामारख्या गुणांनीं श्रेष्ठ असलेल्या पुरुषाला धर्मोपदेश केला.

२ भगवानांनीं अर्जुनाला सांगितलेला धर्म सुगतबुद्धाच्या धर्माप्रमाणे शिष्टांना असमत नव्हता. तर व्यासांसारख्या शिष्टांना संमत होता. म्हणूनच भगवान् व्यासांनीं त्याला सातशे श्लोकांनीं ग्रथित केलें. व्यास म्ह० वेदव्यास, ज्यांनीं वेदाचा विभाग केला ते. त्यांनीं ग्रथित केलेल्या उपदेशांत श्रुति-स्मृतिविरुद्ध कांहीं असण्याचा संभवच नाहीं. म्हणूनच भाष्यकारांनीं त्यांना सर्वज्ञ म्हटले आहे. ‘ कृष्णद्वैपायन विद्धि व्यास नारायणं प्रभुं-’ अशी त्यांची प्रशंसा केलेली आढळते. सज्जनावर उपकार करण्यासाठीच त्यांनीं हा भगवदुपदेश सातशे श्लोकांत ग्रथित केला आहे.

३ श्रीकृष्णांनीं शोकमोहसागरात बुडत असलेल्या अर्जुनाचा त्यातून उद्धार करण्यासाठीं दोन प्रकारचा वैदिक धर्म त्यास सांगितला. श्रीव्यासांनीं सातशे श्लोकात तोच उपदेश ग्रथित केला. व्यासांनीं भारतग्रंथ इतिहासाच्या द्वारा लोकांना धर्मोपदेश करण्यासाठी रचिला. अर्थात् सनत्सुजातीय, भगवद्गीता, मोक्षधर्म, अनुगीता इत्यादि त्यांतील प्रसंगोपात्त प्रकरणे सामान्य लोकांवर अनुग्रह करण्यासाठीं रचलीं आहेत. तीं स्वतःकरिता, श्रीकृष्णांकरितां किंवा अर्जुन, धर्म इत्यादि तत्कालीन पुरुषाकरितांहीं नाहींत. त्यावरूनच त्यांतील धर्मोपदेश पुढील धर्मजिज्ञासूंसाठी आहे, हे उघड होते. त्या उपदेशावरून आम्हीं कोणता धर्म आचरावा, हें कळते. त्यासाठीच भाष्यकारांनीं वर ‘ सर्व भूतांवर अनुग्रह

**तदिदं गीताशास्त्रं समस्तवेदार्थसारसंग्रहभूतं दुर्विज्ञेयार्थम् । तदर्थाविष्करणायानेकैर्विवृतपदपदार्थवाक्यार्थन्यायमप्यत्यन्तविरुद्धानेकार्थत्वेन लौकिकैर्गृह्यमाणमुपलभ्याहं विवेकतोऽर्थनिर्धारणार्थं संक्षेपतो विवरणं करिष्यामि ॥**

---

करण्याच्या इच्छेने ' असें म्हटलें आहे. अर्थात् भगवानांनीही अर्जुनाला जो उपदेश केला तो सर्व लोकांवर उपकार करण्यासाठीं केला. व्यासांनीं त्याचें जें श्लोकरूपानें ग्रथन केलें तेंही लोकांसाठीं केलें. ' तर मग अर्जुनाला त्याची मुळीच गरज नव्हती कीं काय ? ' नाहीं, गरज नव्हती असें नाहीं. तो त्यावेळीं शोक व मोह यांनीं व्याकुळ झाला होता. त्यामुळे त्यालाही धर्मोपदेशाची आवश्यकता होती. म्हणून त्याला निमित्त करून सर्वांवर अनुग्रह करण्यासाठीं श्रीकृष्णांनीं त्याला धर्मोपदेश केला. किंवा अर्जुन कृतार्थच होता. लोकांवर अनुग्रह करण्याच्या इच्छेनें त्याला व्यासांनीं शोकमोहसागरांत निमग्न होणाऱ्या सामान्य मनुष्याची भूमिका दिली, अशीही कल्पना संभवते. असो; आपण ज्या धर्माचा उपदेश करीत आहो त्याची लोकांत प्रसिद्धि व्हावी, लोकांनीं त्याचे अनुष्ठान करावें, म्हणून अर्जुनासारख्या सर्व सद्गुणांनीं श्रेष्ठ असलेल्या अधिकाऱ्यासच त्याचा उपदेश केला,व भगवान् व्यासांनींही त्याचसाठीं त्याला श्लोकरूपानें ग्रथित केलें. ज्यांना धर्माचें ज्ञान नाहीं त्यांना ते व्हावें, हा श्रीकृष्ण व व्यास या दोघांचाही उद्देश त्यांत स्पष्ट दिसतो.

तथापि कित्येक आधुनिक असे समजतात कीं युद्ध टाकून स्वस्थ बसलेल्या ज्ञानी अर्जुनाला युद्धोन्मुख करण्यासाठीं—त्यानें युद्ध करावें म्हणून, ज्ञानानंतर ज्ञानी—जीवन्मुक्तानें कर्म करावें म्हणून, भगवानांनीं गीताशास्त्र सांगितलें व गीता हें कर्मयोगशास्त्र आहे; गीतेच्या अठराही अध्यायांत भगवानांनीं कर्मयोगाचें विधान केलें आहे. मधून मधून भक्ति, ज्ञान, ध्यानयोग वगैरेही आहे, पण तें मुख्य नव्हे; कर्मयोग मुख्य. गीतारहस्य—' ज्ञानप्राप्तीनंतर कर्में करावीं का न करावीं हा गीतेंतला मुख्य मुद्दा आहे. म्हणून कर्म करणें व कर्म सोडणें असे जीवन्मुक्त पुरुषांच्या आयुष्यक्रमणाचे जगांत आढळून येणारे जे दोन मार्ग तेथपासूनच गीतेला सुरवात केली असून ' पृ. ४५२ ' गीतारहस्य अथवा कर्मयोगशास्त्र ' मुख पृष्ठ. " कर्में करीत असतांच अध्यात्म विचारानें किंवा भक्तीनें सर्वात्मैक्यरूप साम्यबुद्धि पूर्णपणें संपादन करणें व ती प्राप्त झाल्यावरही संन्यास घेण्याच्या भरीस न पडतां संसारांत शाश्वत: प्राप्त आलेलीं सर्व कर्में केवळ कर्तव्य म्हणून नेहमीं करीत राहणें, हाच या जगांत मनुष्याचा परम पुरुषार्थ किंवा आयुष्यक्रमाचा उत्तम मार्ग होय, असें भगवद्गीतेंत म्ह० भगवानांनीं गायिलेल्या उपनिषदांत प्रतिपादन केलें आहे. " पृ. ४४०. " सर्व गीतेंत ब्रह्मविद्यान्तर्गत कर्मयोगशास्त्र हा एकच विषय जरी प्रतिपाद्य असला तरी प्रत्येक अध्यायांत जो विषय मुख्यत्वेकरून वर्णिलेला असतो तो या कर्मयोगशास्त्राचा भाग समजून दरएक अध्यायास त्यांतील विषयाप्रमाणें अमुक योग तमुक योग अशीं निरनिराळीं नांवें दिलेलीं आहेत आणि हे सर्व योग एकत्र झाले म्हणजे ब्रह्मविद्येंतील कर्मयोगशास्त्र होतें. " पृ. ४४३.

पण हें म्हणणें सर्वथा अयोग्य आहे. अर्जुन ज्ञानी नव्हता. तो जर ज्ञानी असता तर त्याला शोक व मोह झाला नसता. अर्जुनाला युद्धोन्मुख करण्यासाठींच जर गीता सांगितली असती तर त्यांत वैदिक द्विविध धर्मांचें प्रतिपादन करण्याचें कारण नव्हतें. गीतेंत

**भाष्यार्थ—तत् इदं गीताशास्त्रं समस्तवेदार्थसारसंग्रहभूतं**—तें हें अशा प्रकारचें गीताशास्त्र सर्व वेदार्थांच्या साराचा ज्यांत संग्रह केला आहे असें आहे. ( यांत वेदाच्या सर्व अर्थांचा सारांश संगृहीत केला आहे. वेदार्थांचा सर्व अर्थ थोडक्यात ग्रथित केला आहे. तथापि )—**दुर्विज्ञेयार्थं**—त्याचा अर्थ कळण्यास फार कठिण आहे. ( नुसत्या अक्षरार्थावरून त्याचा गूढार्थ लक्षांत येत नाहीं. म्हणून )—**तदर्थाविष्करणाय**—त्याचा अर्थ अगदीं स्पष्ट करण्यासाठीं—**अनेकैः**—अनेक विद्वान् व्याख्याकारांनीं—**विवृतपदपदार्थवाक्यार्थन्यायं अपि**—पदच्छेद, पदाचा अर्थ, सर्व वाक्याचा अर्थ, त्यावरील आपेक्ष घेऊन त्यांचें समाधान करणें हा न्याय, इत्यादि क्रमानें त्याचें व्याख्यान-विवरण जरी केलें आहे तरी—**लौकिकैः अत्यन्तविरुद्ध-अनेक-अर्थत्वेन गृह्यमाणं**—शास्त्राचा परिचय नसलेले साधारण लोक त्याचा अत्यंत विरुद्ध अर्थ समजतात, अनेक लोक मूळ अर्थाच्या अगदी विपरीत अर्थ समजतात व एकाच वाक्याचे अनेक अर्थ करितात, असें—**उपलभ्य**—पाहून—**अहं**—मी—**विवेकतः अर्थनिर्धारणार्थं**—विवेकपूर्वक अर्थाचा निश्चय करण्यासाठीं—**संक्षेपतः विवरणं करिष्यामि**—संक्षेपाने विवरण करीन. [ पूर्वाचार्यांनीं गीताशास्त्राचा अर्थ सर्वांना सुलभतेनें कळावा म्हणून प्रत्येक पद तोडून त्याचा अर्थ सांगितला आहे. समासांचा विग्रह करून त्यांचा अर्थ सांगितला आहे. सर्व वाक्यांचा अर्थ सांगितला आहे. त्यांवर येणाऱ्या आक्षेपांचें समाधान केलें आहे, म्हणजे तसाच अर्थ करण्यास अनुकूल उपपत्ति दाखविली आहे. पण इतकें उत्तम विवरण केलें असूनहि शास्त्रपरिचयशून्य लोक त्याचा अर्थ भलताच समजतात, असें अलीकडे दिसूं लागलें, म्हणून मीं आतां विवेकपूर्वक त्याचा अर्थ निश्चित करण्यासाठीं हे संक्षिप्त विवरण लिहितों. प्राचीन आचार्यांच्या व्याख्यानांतील विषय मिश्र झाल्यासारखे वाटतात. पण शंकराचार्य म्हणतात "मी या आपल्या संक्षिप्त व्याख्यानांत प्रत्येक विषय अगदीं पृथक् करून न्यायपूर्वक त्याचें विवरण करतों" ]

**तस्यास्य गीताशास्त्रस्य संक्षेपतः प्रयोजनं परं निःश्रेयसं सहेतुकस्य संसारस्यात्यन्तोपरमलक्षणम् । तच्च सर्वकर्मसंन्यासपूर्वकादात्मज्ञाननिष्ठारूपाद्धर्माद्भवति । तथेममेव गीतार्थधर्ममुद्दिश्य भगवतैवोक्तम्—"स हि धर्मः सुपर्याप्तो ब्रह्मणः पदवेदने" इत्यनुगीतासु । तत्रैव चोक्तम्—"नैव धर्मी न चाधर्मी न चैव हि शुभाशुभी । यः स्यादेकासने लीनस्तूष्णीं किंचिदचिन्तयन्" 'ज्ञानं संन्यासलक्षणम्' इति च । इहापि चान्त उक्तमर्जुनाय—'सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज' इति ॥**

---

प्रवृत्ति व निवृत्ति या दोन्ही धर्मांचे प्रतिपादन केलेलें आहे व प्रवृत्ति धर्म निवृत्ति धर्माचें साधन आहे, हेंहि आम्ही पुढे ठिकठिकाणीं दाखवू. जीवन्मुक्तानें कर्म करावें की न करावें, हें सांगण्यासाठीं गीताशास्त्र नसून निष्काम कर्मयोगाने चित्तशुद्धि करून घेऊन ज्ञानाने मोक्ष मिळवावा, हें सांगण्यासाठीं गीताशास्त्र आहे. गीता हें योगशास्त्र आहे. कर्मयोगशास्त्र नव्हे. कर्मयोग हें मुख्य योगाचें एक साधन आहे. ज्ञाननिष्ठा हाच मुख्य योग व तोच गीतेचा प्रतिपाद्य विषय आहे, हें आम्ही पुढें सप्रमाण दाखवूं.

**भाष्यार्थ—तस्य अस्य गीताशास्त्रस्य**—( भगवानांनीं अर्जुनाला सांगितलेल्या व व्यासांनीं ग्रथित केलेल्या ) त्या या गीताशास्त्राचें—**संक्षेपतः**—अगदीं थोडक्यांत व एकरूप असें सांगावयाचें झाल्यास—**निःश्रेयसं**—निश्चित श्रेय-कैवल्य-मोक्ष हें—**परं प्रयोजनं**—परम प्रयोजन आहे. ( त्याचें स्वरूप सांगतात- )—**सहेतुकस्य संसारस्य अत्यन्त-उपरमलक्षणम्**—कारणासह संसाराचा अत्यंत उपरम-शांति होणें, हें त्याचें लक्षण-स्वरूप आहे. [आत्म्याचें अज्ञान हें मी सुखी-दुःखी-कर्ता-भोक्ता आहे, या संसाराचें कारण आहे. त्यासह संसाराचा अत्यंत नाश म्ह०पुनः उद्भवच न होणें,हें गीताशास्त्राचें परम प्रयोजन आहे; आणि तें आत्मज्ञाननिष्ठेनेंच प्राप्त होतें, असें सांगतात-]—**च तत्**—आणि तें परम प्रयोजन—**सर्वकर्मसंन्यासपूर्वकात् आत्मज्ञाननिष्ठारूपात् धर्मात्**—सर्वकर्मसंन्यासपूर्वक आत्मज्ञाननिष्ठारूप धर्मापासून-अशा धर्मामुळें—**भवति**—सिद्ध होतें. [ अर्थात् कर्मासहित ज्ञाननिष्ठारूप धर्मापासून किंवा नुसत्या कर्मानें तें सिद्ध होत नाहीं. गीतेंत कर्मनिष्ठा जी सांगितली आहे ती ज्ञाननिष्ठेचें अंग-साधन-उपाय या रूपानें सांगितली आहे. मोक्षाचें स्वतंत्र किंवा ज्ञानसमुच्चित-ज्ञानासह साधन आहे, अशा रूपानें सांगितलेली नाहीं. गीतेंत प्राधान्यानें-मुख्यत्वेंकरून आत्मज्ञाननिष्ठाच प्रतिपादिली आहे.त्याविषयीं प्रमाणें-]—**इमं एव गीतार्थधर्मं उद्दिश्य**—याच गीतार्थधर्माला उद्देशून—**तथा**—तसें—**भगवता एव अनुगीतासु उक्तं**—भगवानांनींच अनुगीतेंत सांगितलें आहे—**ब्रह्मणः पदवेदने**—ब्रह्माचें पद म्ह० निःश्रेयस-निश्चित श्रेय-मोक्ष त्याच्या प्राप्तीविषयीं-तें ब्रह्मपद-निःश्रेयस प्राप्त करून देण्यास—**सः हि धर्मः सुपर्याप्तः**—तोच ज्ञाननिष्ठारूप गीतोक्त धर्म अतिशय समर्थ आहे,—**इति**—असें अनुगीतेंत भगवानांनींच सांगितलें आहे. [ सर्वकर्मसंन्यासपूर्वक आत्मज्ञाननिष्ठाधर्मच मोक्षाचें साधन आहे, हा गीतार्थधर्म आहे, व त्यालाच उद्देशून भगवानांनीं अनुगीतेंत 'मोक्षप्राप्तीला तोच धर्म अगदीं पुरेसा आहे, मोक्ष देण्यास तोच धर्म समर्थ आहे,'असें म्हटलें आहे. पण तो धर्म म्हणजे ज्ञाननिष्ठाधर्मच कशावरून? कर्मयोग किंवा ज्ञानकर्मसमुच्चय नव्हे कशावरून? अशी शंका राहूं नये, म्हणून तेथलींच ज्ञाननिष्ठाप्रतिपादक आणखीं दोन वचनें देतात-]—**किंच**—आणखीं—**तत्र एव**—त्या अनुगीतेंतच—**उक्तं**—असें म्हटलें आहे—**न एव धर्मी**—तो धर्मवान् नव्हे—**न च अधर्मी**—व अधर्मीहि नव्हे.—**न च एव हि शुभाशुभी**—पुण्यवान्हि नव्हे व पापीहि नव्हे. ( तो कोण? तर )—**यः**—जो—**तूष्णीं**—वाणी, हात-पाय यांचे व्यापार सोडून—**किंचित् अचिन्तयन्**—व मनांत कांहीं चिंतन न करतां—**एकासने**—एका ब्रह्मामध्यें जें अवस्थान त्यांत-केवल -ब्रह्मरूपांत—**लीनः**—लीन-तन्मय-तद्रूप—**स्यात्**—होतो [ तो धर्मी, अधर्मी किंवा शुभाशुभी नाहीं. जो केवळ स्व-रूपांत स्थिर झालेला असतो-' मी ' ही भावना विसरून आत्ममय बनतो म्ह० जो असंप्रज्ञातसमाधिनिष्ठ झालेला असतो त्याला हा धार्मिक

१ मोक्ष हें गीताशास्त्राचें मुख्य फल आहे, व मनोनिग्रहादिक हें अवान्तर फल आहे, मुख्य फल मिळावयाच्या पूर्वीं जें फल मिळतें तें अवान्तर फल होय, व तें गीतेंतच ठिकठिकाणीं सांगितलेलें आहे.

आहे, किंवा अधार्मिक आहे, पुण्यवान् आहे किंवा पापी आहे इत्यादि कांहींच म्हणतां येत नाहीं, असा याचा भावार्थ.तसेंच ]—**संन्यासलक्षणं ज्ञानं**--सर्व कर्मांच्या त्यागाला कारण होणारें जें ज्ञान तेच मोक्षाचें साधन आहे, [मी असंसारी आत्मा आहे, हें ज्ञान सर्व कर्मांच्या त्यागाचें कारण होतें. म्हणून त्याला 'संन्यासलक्षण' म्हटलें आहे. ]—**इति च**—असेंही अनुगीतेंत भगवद्वचन आहे. ( केवल अनुगीतेंतच असें वचन आहे, असें नाहीं तर )—**इह अपि च**—या भगवद्गीतेंतही—**अन्ते**—अगदीं शेवटीं—**अर्जुनाय**—अर्जुनाला—**सर्वधर्मान् परित्यज्य**--सर्व धर्मांना व अधर्मांना सोडून—**एकं मां**—केवल मलाच—**शरणं व्रज**—शरण जा—**इति**—असें—**उक्तं**—सांगितलें आहे. [ त्यावरूनही सर्वकर्मसंन्यासपूर्वक आत्मज्ञाननिष्ठाच मोक्षाचें साधन आहे, ही गोष्ट सिद्ध होते. ]

**अभ्युदयार्थोऽपि यः प्रवृत्तिलक्षणो धर्मो वर्णाश्रमांश्चोद्दिश्य विहितः स देवादिस्थानप्राप्तिहेतुरपि सन्नीश्वरार्पणबुद्ध्याऽनुष्ठीयमानः सत्त्वशुद्धये भवति फलाभिसंधिवर्जितः। शुद्धसत्त्वस्य च ज्ञाननिष्ठायोग्यताप्राप्तिद्वारेण ज्ञानोत्पत्तिहेतुत्वेन च निःश्रेयसहेतुत्वमपि प्रतिपद्यते। तथा चेममेवार्थमभिसंधाय वक्ष्यति—'ब्रह्मण्याधाय कर्माणि' 'योगिनः कर्म कुर्वन्ति सङ्गं त्यक्त्वाऽऽत्मशुद्धये' इति ॥**

**भाष्यार्थ**—( अहो पण गीतेंत 'कुरु कर्मैव तस्मात्त्वं' इत्यादि अनेक वचनांनीं प्रवृत्तिलक्षण धर्मही सांगितलेला आहे, केवल निवृत्तधर्मच सांगितलेला नाहीं, व ही गोष्ट तुम्हांलाही मान्य आहे. मग निवृत्तिलक्षण धर्मच जर मोक्षाचें साधन आहे तर प्रवृत्तिलक्षण धर्माचा मोक्षाच्या दृष्टीनें उपयोग काय ? या प्रश्नाचें उत्तर-)—**अभ्युदयार्थः अपि यः प्रवृत्तिलक्षणः धर्मः**--अभ्युदय हा ज्याचा अर्थ म्ह० प्रयोजन आहे, असाही असलेला जो प्रवृत्तिलक्षण धर्म—**वर्णाश्रमान् च उद्दिश्य विहितः**—कीं जो वर्ण व आश्रम यांना उद्देशून विहित आहे,—**सः**—तो—**देवादिस्थानप्राप्तिहेतुः अपि सन्**—देवादिकांच्या स्थानाची प्राप्ति होण्यास कारण असूनही-तो मुख्यतः स्वर्गादिकांच्या प्राप्तीचें साधन जरी असला तरी—**ईश्वरार्पणबुद्ध्या अनुष्ठीयमानः**—ईश्वराला समर्पण करण्याच्या बुद्धीनें अनुष्ठान केला गेला असतां—**फलाभिसंधिवर्जितः**—फलाच्या इच्छेने विरहित असलेला तो—**सत्त्वशुद्धये भवति**--चित्तशुद्धीला कारण होतो. [ अभ्युदयासाठींच असलेला जो वर्ण व आश्रम यांस उद्देशून वेदशास्त्रानें सांगितलेला दुसरा प्रवृत्तिलक्षणधर्म त्याचें मुख्य फल देवादिस्थानांची प्राप्ति होणें, हें आहे. पण ईश्वरार्पणबुद्धीनें फलाची इच्छा न करितां त्याचें अनुष्ठान केलें असतां तो चित्त-शुद्धीला कारण होतो. त्याच्यायोगानें चित्ताची शुद्धि होते. ]—**च शुद्धसत्त्वस्य**—आणि ज्याचें सत्त्व-चित्त शुद्ध झालें आहे त्याच्या—**ज्ञाननिष्ठायोग्यताप्राप्तिद्वारेण**—ज्ञाननिष्ठेची योग्यता प्राप्त होणें, याच्या द्वारा—**च ज्ञानोपत्तिहेतुत्वेन**—व ज्ञानाच्या उत्पत्तीला कारण होण्यानें—**निःश्रेयसहेतुत्वं अपि**—मोक्षाच्या कारणत्वालाही तो धर्म—**प्रतिपद्यते**—प्राप्त होतो. [ प्रवृत्तिलक्षण

धर्म देवादिस्थानांची प्राप्ति व्हावी, ही इच्छा सोडून अनुष्ठिला असतां चित्तशुद्धि करतो. ज्याची चित्तशुद्धि झाली आहे त्याला ज्ञाननिष्ठेची योग्यता देतो व ज्ञानोत्पत्तीला कारण होतो आणि अशा परंपरेनें तोच धर्म मोक्षाचें परंपरासाधनही बनतो, साक्षात् मोक्षाचें साधन होत नाही.]—**इमं एव अर्थं अभिसंधाय**—हाच अर्थ मनांत धरून—**तथा वक्ष्यति**—तसे भगवान् पुढे सांगणार आहेत—**कर्माणि ब्रह्मणि आधाय**—कर्मे ब्रह्मार्पण करून—**योगिनः संगं त्यक्त्वा आत्मशुद्धये कर्म कुर्वन्ति**—योगी आसक्ति टाकून चित्तशुद्धीसाठीं कर्म करितात—**इति**—असें पुढें सांगतील. [कर्माधिकारी योगी कर्मे ईश्वरार्पण करून, आसक्ति सोडून, चित्तशुद्धीसाठीं तीं करितात, असें भगवान् पुढें पांचव्या अध्यायात याच आशयानें सांगणार आहेत. अर्थात् प्रवृत्ति-रूपधर्म मुख्यतः देवादिकांच्या स्थानांची म्हणजे स्वर्गादि लोकांची प्राप्ति व्हावी यासाठींच जरी आहे व त्यामुळे तो मोक्षमार्गाच्या अगदीं विरुद्ध आहे तरी ईश्वरार्पणबुद्धीनें—स्वर्गादि लोक मिळावे, ही इच्छा सोडून त्याचें अनुष्ठान केल्यास तो मोक्षोपयोगी होतो. मोक्षाचें बहिरंग साधन—परंपरेचा उपाय होतो, हे भगवानांच्या वचनांनीच सिद्ध होतें.]

---

१ पण गीतारहस्यकार म्हणतात—आवृत्ति १ ली पृ. ३०६ "ज्ञानानें मोक्ष मिळतो, किंवा ज्ञान व कर्म यांच्या समुच्चयाने मोक्ष मिळतो, असा प्रश्न या ठिकाणीं उपस्थित करून, केवळ ज्ञानानेच सर्व कर्मे दग्ध होऊन मोक्षप्राप्ति होते, मोक्षप्राप्तीस कर्माची जरूर नाहीं, असा गीतार्थ श्रीशंकराचार्यांनीं आपल्या भाष्यांत दिला आहे, आणि त्यावरून पुढें असे अनुमान काढले आहे कीं, ज्याअर्थी गीतेच्या दृष्टीनेही मोक्षाला कर्माची जरूरी नाहीं, त्याअर्थी चित्तशुद्ध झाले म्हणजे कर्मे निरर्थक होतात, आणि तीं स्वभावतःच बंधक म्ह० ज्ञानाला विरुद्ध असल्याने ज्ञानोत्तर ज्ञानी पुरुषानें सोडून दिली पाहिजेत, हेंच मत भगवंतासही गीतेत ग्राह्य आहे, असे म्हणावे लागतें. ज्ञानोत्तर ज्ञानी पुरुषानेही कर्मे केलीं पाहिजेत, या पक्षास ज्ञानकर्मसमुच्चयपक्ष असे नांव असून श्रीशंकराचार्यांचा वरील युक्तिवाद हाच काय तो तद्विरुद्ध मुख्य आक्षेप होय."

आचार्यांनी 'सर्वधर्मान् परित्यज्य०' अ. १८. ६६ या श्लोकाच्या व्याख्यानानंतर म्ह. गीताशास्त्राच्या शेवटच्या श्लोकाचे भाष्य संपल्यावर हा प्रश्न उपस्थित केला आहे. वाचकांना तो पुढे सविस्तर वाचावयास सांपडेलच. पण येथे थोडक्यांत एवढेच सांगतो कीं, ज्ञानोत्तर ज्ञानी पुरुषानेही सांसारिक कर्मे केलीं पाहिजेत, असें ज्ञानकर्मसमुच्चयवाद्यांचे म्हणणे नाहीं. तें रहस्यकाराचें म्हणणे आहे. ज्ञानकर्मसमुच्चयवाद्यांचें म्हणणे "अग्निहोत्रादि श्रौत-स्मार्त कर्मे व आत्मज्ञान यांचें एकाच वेळीं अनुष्ठान करणें हें मोक्षाचे साधन आहे. केवळ आत्मज्ञान मोक्षाचे साधन नाहीं," असें आहे व आचार्यांनीं त्या मताचे खंडन सविस्तर केले आहे. मोक्षाचे साक्षात् साधन आत्मज्ञाननिष्ठा हेंच आहे. कारण कर्मनिष्ठा व ज्ञाननिष्ठा एकमेकींच्या विरुद्ध आहेत, असें आचार्यांचें म्हणणे आहे, व ते गीतेंतील 'ज्ञानयोगेन सांख्यानां कर्मयोगेन योगिनां' ३.३. 'तदेकं वद निश्चित्य येन श्रेयोऽहमाप्नुयाम्' ३.२. या वचनांवरून ज्ञान व कर्म यांचा समुच्चय—एकाच वेळीं अनुष्ठान संभवत नाहीं, हे सिद्ध होतें. व 'यज्ज्ञात्वाऽमृतमश्नुते' १३.१२ 'मां तत्त्वतो ज्ञात्वा विशते' १८.५५ 'ज्ञात्वा मां शांतिमृच्छति' ५.२९ यांवरून ज्ञानच मोक्षाचें साधन आहे, हें असें

**इमं द्विप्रकारं धर्मं निःश्रेयसप्रयोजनं परमार्थतत्त्वं च वासुदेवाख्यं परं ब्रह्माभिधेयभूतं विशेषतोऽभिव्यञ्जयद्विशिष्टप्रयोजनसंबन्धाभिधेयवद्गीताशास्त्रम्। यतस्तदर्थे विज्ञाते समस्तपुरुषार्थसिद्धिरित्यतस्तद्विवरणे यत्नः क्रियते मया ॥**

**भाष्यार्थ**—( आतां गीताशास्त्राच्या प्रयोजनाचा साधनासह अनुवाद करून त्याचा विषय दाखवितात व त्याच्या व्याख्यानाची प्रतिज्ञा करितात- )—**निःश्रेयसप्रयोजनं इमं द्विप्रकारं धर्मं** - मोक्ष हें ज्याचें प्रयोजन-फळ आहे असा हा दोन प्रकारचा धर्म—**च अभिधेयभूतं परमार्थतत्त्वं वासुदेवाख्यं परं ब्रह्म**—आणि या शास्त्राचें विषयभूत वासुदेव या नांवाचें परब्रह्म परमार्थ तत्त्व यांना—**विशेषतः अभिव्यञ्जयत्**—विशेषेंकरून अभिव्यक्त करणारें—**गीताशास्त्रं** हें गीताशास्त्र **विशिष्टप्रयोजन-संबंध-अभिधेयवत् अस्ति**—विशिष्ट-असामान्य फळ, संबंध व विषय यांनीं युक्त आहे. [ याचे मोक्ष हें प्रयोजन सामान्य नाहीं, विशिष्ट आहे. संबंधही तसाच विशिष्ट आहे. शास्त्राचा त्या मोक्षफलाशीं द्विविध निष्ठेच्या द्वारा साध्यसाधनभाव संबंध आहे. परब्रह्म या विषयाशीं विषयविषयीभाव संबंध आहे. दोन प्रकारचा धर्म व वासुदेवसंज्ञक परमार्थतत्त्व हा विषयही सामान्य नाहीं विशिष्ट आहे. ] **यतः**—ज्याअर्थीं—**तदर्थे विज्ञाते**—त्याचा अर्थ उत्तम प्रकारें कळला असतां **समस्तपुरुषार्थसिद्धिः**—समस्त पुरुषार्थांची सिद्धि होते—**इति** - हें निश्चित आहे - **अतः**—त्याअर्थीं—**मया तद्विवरणे यत्नः क्रियते**—मजकडून त्याच्या विवरणासाठीं यत्न केला जातो. ( गीताशास्त्राचा विषय, संबंध व प्रयोजन हीं तिन्ही विशिष्ट आहेत, इतर शास्त्रसाधारण, अशी नाहीत. त्याचा यथार्थ अर्थ कळला असतां समग्र पुरुषार्थांची सिद्धि होते. म्हणून त्याचें विवरण मी करितों, अशी प्रतिज्ञा आचार्य करीत आहत. )

---

१ आचार्यांच्या उपोद्घातभाष्यांत काय म्हटले आहे, ते वाचकांच्या पुढे आहेच. आतां गीतारहस्यकार गीतेसंबंधाने काय म्हणतात ते पहा- " परंतु स्वकीयांबरोबर युद्ध करणें हें मोठें कुकर्म म्हणून खिन्न झालेल्या अर्जुनास त्याच युद्धास प्रवृत्त करण्यासाठीं सांगितलेल्या गीतेंत ब्रह्मज्ञानाने किंवा भक्तीनें मोक्ष कसा मिळवावा याचे, म्ह० नुसत्या मोक्षमार्गाचें विवेचन कशाला, ही शंका मनांत येऊन तीच उत्तरोत्तर बळावत चालली, ... म्हणून सर्व टीका व भाष्यें बाजूला ठेवून नुसत्या गीतेचीच स्वतंत्र विचारपूर्वक आम्हा अनेक पारायणे केलीं. तेव्हा टीकाकारांच्या छापेंतून सुटका होऊन मूळ गीता निवृत्तिपर नसून कर्मयोगपर आहे, ... असा बोध झाला.... गीतेंतील प्रतिपाद्य विषय प्रवृत्तिपर आहे हे मत कायम झाले.... सांसारिक कर्में गौण किंवा त्याज्य ठरवून ब्रह्मज्ञान, भक्ति वगैरे नुसत्या निवृत्तिपर मोक्षमार्गांचेच गीतेत निरूपण केलेलें आहे, हें मत जरी आम्हांस मान्य नाहीं तरी मोक्षप्राप्तीच्या मार्गाचें भगवद्गीतेंत मुदलाच विवेचन नाहीं, असेंही आमचे म्हणणें नाहीं.... किंबहुना प्रत्येक मनुष्यानें शुद्ध परमेश्वर स्वरूपाचे ज्ञान संपादन करून तद्द्वारा आपली बुद्धि पवित्र व निर्मल करणें, हें गीताशास्त्राप्रमाणें त्याचें जगांतील पहिलें कर्तव्य होय, असें आम्हीही यांत स्पष्ट दाखविलें आहे, पण हा गीतेंतील मुख्य मुद्दा नव्हे. क्षत्रियाचा धर्म जें युद्ध तें मोक्षप्राप्तिरूप आत्मकल्याणाचा नाश करणार. तें करावें का करूं नये,

अशा कर्तव्यमोहांत अर्जुन पडला. म्हणून तो मोह घालविण्यासाठीं शुद्ध वेदांतशास्त्राधारें कर्माकर्माचें व त्याबरोबरच मोक्षोपायाचेंहि पूर्ण विवेचन करून आणि कर्में कधींही सुटत नाहींत व सोडूंही नयेत, असें ठरवून ज्या युक्तीनें कर्में केलीं म्हणजे कोणतेंच पाप न लागतां अखेर त्यानेंच मोक्षही मिळतो त्या युक्तीचें म्हणजे ज्ञानमूलक व भक्तिप्रधान कर्मयोगाचेंच गीतेंत प्रतिपादन आहे."... ..." कोणतें कर्म चांगलें व कोणतें वाईट हें ठरविण्यापूर्वी कर्म करावें किंवा नाहीं हा सामान्य प्रश्नच ज्या काळीं महत्त्वाचा समजत असत, तेव्हां गीता सांगितलेली असल्यामुळे त्यांतील बराच भाग आतां कित्येकांस अनावश्यक वाटतो आणि त्यावरच आणखी निवृत्ति मार्गीय टिकाकारांचे सारवण पडल्यामुळें गीतेंतील कर्मयोगाचें विवेचन सध्यांच्या काळीं पुष्कळांस दुर्बोध झालें आहे. " ... ...
" ज्ञान व कर्म यांमध्ये संन्यास मार्गीयांच्या मतें असणारा विरोधही खरा नव्हे."... ...
" सांख्यादि शास्त्रे शक्य तेवढया पूर्णावस्थेस आल्यावर वैदिक धर्मास ज्ञानमूलक भक्तिप्रधान व कर्मयोगपर असे अखेर स्वरूप आले."... ... "गीतेवर पहिल्या टीका कर्मयोगपर असाव्या असें गीतेवरील शांकरभाष्याच्या तिसरे अध्यायाचे आरंभीं या टीकाकारांच्या अभिप्रायाचा जो उल्लेख आहे, त्यावरून दिसून येते. त्या टीका आतां उपलब्ध नाहीत म्हणून गीतेचें कर्मयोगपर व तुलनात्मक हें पहिलेंच विवेचन आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं."... ..."मला दोन चार मार्ग सांगून घोटाळ्यांत न पाडतां त्यांपैकीं जो श्रेयस्कर असेल तो एकच निश्चयें करून सांगा. गीता ३–२,–५–१, असा अर्जुनाचा भगवंतास स्पष्ट प्रश्न असल्यामुळें गीतेंत कांहीं तरी एकच विशिष्ट मत प्रतिपाद्य असलें पाहिजे हें उघड आहे व तें कोणते हे मूळ संस्कृत गीतेचा अर्थ करून निराग्रहबुद्धीनें आम्हांस पहावयाचें आहे. प्रथम कांही तरी मत कायम करून त्याला गीता जुळत नाहीं, म्हणून गीतार्थाची ओढाताण करावयाची नाहीं."

रहस्यकारांच्या प्रस्तावनेंतील हें महत्त्वाचे उतारे आहेत. ' मूळ गीता निवृत्तिपर नसून प्रवृत्तिपर–कर्मयोगपर आहे. ' असा बोध त्यांना कसा झाला याचा इतिहास त्यांनी त्यांत दिला आहे, तो पाहिला म्हणजे त्यांना असा विपरीत बोध कां झाला, तेंही ध्यानांत येतें. त्यांनी दुसऱ्या कोणाला न विचारतां व कोणाचें म्हणणें न ऐकतां आपल्याच मनाला जें वाटलें तें गीतारहस्य काढलें, हे यावरून स्पष्ट होतें. गीतेंत ब्रह्मज्ञान, भक्ति वगैरे नाहीं असें नाहीं, पण तो मुख्य मुद्दा नव्हे, असे त्यांना वाटलें. पण तें वाटणें, कितपत सयुक्तिक आहे तें आतां पुढे सूर्य-जयद्रथन्यायाने प्रत्यक्ष दाखवावयाचें असल्यामुळे आम्ही येथें कांहींच विचार करीत नाहीं. फक्त गीतेच्या प्रवृत्तीचें निमित्त आचार्य काय सांगतात व रहस्यकार काय सांगतात तेवढेंच वाचकांना कळावें, म्हणून येथें हे उतारे दिले आहेत.



# श्रीमद्भगवद्गीताभाष्यार्थ.

## ( मूळ श्लोक, अन्वयार्थ, शांकरभाष्य, शब्दशः भाष्यार्थ आणि गीतारहस्यपरीक्षणात्मक विस्तृत टीपा यांसह. )

### अध्याय पहिला.

#### अर्जुनविषादयोग.

**—अत्र च धृतराष्ट्र उवाच धर्मक्षेत्र इत्यादि**—गीताशास्त्राचा पहिला सर्व अध्याय व दुसऱ्या अध्यायाचे १–१० श्लोक कथेचा संबंध दाखविणारे आहेत. यास्तव तो दाखविण्यासाठीं धृतराष्ट्र ' धर्मक्षेत्रे० ' इत्यादि म्हणाला.

**धृतराष्ट्र उवाच—धृतराष्ट्रः**-दुर्योधनाचा पिता धृतराष्ट्र**—उवाच**—आपल्या संजयनांवाच्या सारथ्यास विचारूं लागला—

**धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे समवेता युयुत्सवः ॥**
**मामकाः पांडवाश्चैव किमकुर्वत संजय ॥ १ ॥**

**अन्वयार्थ—संजय**—अरे संजया !**—धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे**—धर्मोत्पत्तीचें स्थान-धर्म उत्पन्न होण्याची जागा अशा कुरुक्षेत्रांत**—समवेता युयुत्सवः मामकाः च एव पाण्डवाः**—जमलेले युद्धाची इच्छा करणारे माझे पुत्र आणि पंडूचे पुत्र**—किं अकुर्वत**—काय करते झाले ? ( '**कुरुक्षेत्र**' ही पुण्यभूमि आहे. चांगल्या शेतांत पेरलेलें धान्य जसें चांगलें उगवतें व त्यांत उत्पन्नही चांगलें होतें, त्याप्रमाणें कुरुक्षेत्रांत केलेलें धर्माचरण अधिक फळ देतें. अशा त्या धर्मक्षेत्रांत युद्ध करण्याच्या इच्छेनें जमलेले कौरव व पांडव, यांनीं तेथें पुढें काय केलें ? ) १.

**संजय उवाच—संजयः**—धृतराष्ट्राचा सारथि संजय **उवाच**—म्हणाला—

**दृष्ट्वा तु पांडवानीकं व्यूढं दुर्योधनस्तदा ।**
**आचार्यमुपसंगम्य राजा वचनमब्रवीत् ॥ २ ॥**

**अन्वयार्थ—तु**—पण**—तदा**—त्यावेळीं**—राजा दुर्योधनः**—राजा दुर्योधन**—पांडवानीकं व्यूढं दृष्ट्वा**—पांडवांचें सैन्य व्यूहरचना करून उभें आहे असें पाहून

**—आचार्यं उपसंगम्य**—द्रोणाचार्यांपाशीं जाऊन—**इदं वचनं**—असें वचन—**अब्रवीत्**—बोलला. २. ( दोन्ही पक्षांचे लोक कुरुक्षेत्रांत आपापल्या सैन्यासह जमले व त्यांचा आतां संग्राम सुरू व्हावयाचा, हे खरें; पण दुर्योधनानें पांडवांचें सैन्य व्यूहरचना करून तयार आहे असें जेव्हां पाहिलें, तेव्हां तो गुरु द्रोणाचार्यांजवळ जाऊन त्यांस असें म्हणाला—)

पश्यैतां पांडुपुत्राणामाचार्य महतीं चमूम् ।
व्यूढां द्रुपदपुत्रेण तव शिष्येण धीमता ॥ ३ ॥

**अन्वयार्थ**—अहो द्रोणाचार्य !—**तव**—तुमच्या—**धीमता शिष्येण**—बुद्धिमान् शिष्यानें म्हणजे—**द्रुपदपुत्रेण**—द्रुपदाच्या[1] पुत्रानें-धृष्टद्युम्नानें—**व्यूढां एतां पाण्डुपुत्राणां महतीं चमूं**—रचलेल्या-व्यूहाच्या आकारानें उभ्या केलेल्या या पांडवांच्या मोठ्या सेनेस—**पश्य**—पहा. ३.

अत्र शूरा महेष्वासा भीमार्जुनसमा युधि ।
युयुधानो विराटश्च द्रुपदश्च महारथः ॥ ४ ॥
धृष्टकेतुश्चेकितानः काशिराजश्च वीर्यवान् ।
पुरुजित्कुंतिभोजश्च शैब्यश्च नरपुंगवः ॥ ५ ॥
युधामन्युश्च विक्रांत उत्तमौजाश्च वीर्यवान् ।
सौभद्रो द्रौपदेयाश्च सर्व एव महारथाः ॥ ६ ॥

**अन्वयार्थ—अत्र**—या सैन्यांत—**शूराः**—शूर,—**महेष्वासाः**—ज्यांचीं इष्वास म्ह० धनुष्यें मोठमोठीं आहेत असे,—**युधि भीमार्जुनसमाः**—युद्धांत भीम व अर्जुन यांच्या तोडीचे, ( असे लोक आहेत. त्यांतील कित्येकांचीं नांवेंही दुर्योधन सांगतो —) —**युयुधानः**—सात्यकि[2]—**विराटः च**—व विराट[3] राजा—**महारथः द्रुपदः**—महारथी[4] द्रुपद ४,—**वीर्यवान् धृष्टकेतुः चेकितानः काशिराजः**—वीर्यवान्

---

१ द्रुपदानें द्रोणाचार्याला मारण्यासाठींच यज्ञ करून हा पुत्र संपादन केला होता. पण अशा शत्रूलाही तुम्ही धनुर्विद्या शिकविलीत, असा टोमणा मारण्यासाठीं दुर्योधनानें मुद्दाम हे शब्द उच्चारले आहेत, असें दिसते.

२ हा यादववीर अर्जुनाचा पट्टशिष्य व श्रीकृष्णाला अतिशय प्रिय होता.

३ हा अभिमन्यूचा सासरा, उत्तरेचा बाप, व पांडवांच्या अज्ञातवासांतील आश्रयदाता आहे.

४ जो एकटा दहा हजार धनुर्धरांशीं लढतो व शस्त्र आणि शास्त्र यांत प्रवीण असतो तो महारथ होय. द्रुपद हा द्रौपदीचा बाप, पांडवांचा सासरा होय.

-पराक्रमी धृष्टकेतु, चेकितान व काशीराजा,—**नरपुंगवः पुरुजित् च कुन्तिभोजः च शैब्यः**—नरश्रेष्ठ पुरुजित्, कुंतिभोज, व शैब्य, ५—**विक्रान्तः युधामन्युः**—पराक्रमी युधामन्यु,—**च वीर्यवान् उत्तमौजाः**—व वीर्यवान् उत्तमौजा,--**सौभद्रः**—सुभद्रेचा पुत्र अभिमन्यु—**च द्रौपदेयाः**—आणि द्रौपदीचे पांच पांडवांपासून झालेले पांच पुत्र—**सर्वे एव महारथाः**—हे सर्वच महारथी आहेत. ६. ( याप्रमाणें वरील अडीच श्लोकांत पांडवांकडील मुख्य योद्धे सांगून आता दुर्योधन आपल्या बाजूचे मुख्य योद्धे सांगण्यासाठी म्हणतो— )

**अस्माकं तु विशिष्टा ये तान्निबोध द्विजोत्तम ।**
**नायका मम सैन्यस्य संज्ञार्थं तान्ब्रवीमि ते ॥ ७ ॥**

**अन्वयार्थ**—**तु**—पण—**अस्माकं**—आम्हांमध्ये—**ये विशिष्टाः**—जे श्रेष्ठ आहेत—**च**—व--**ये**—जे—**मम सैन्यस्य नायकाः**—माझ्या सैन्याचे नेते आहेत—**तान्**—त्यांना—**निबोध**—तूं ऐक.—**द्विजोत्तम**—अहो श्रेष्ठ द्विज !—**ते संज्ञार्थं**--तुम्हांला कळण्यासाठी-आपल्याकडे कसे कसे श्रेष्ठ लोक आहेत हें आपल्या ध्यानांत यावे म्हणून—**तान्**—त्यांचीं ( कांहीं ) नांवे—**ब्रवीमि**—मी सांगतों. ७ ( पांडवांकडे असे मोठमोठे महारथी आहेत हे जरी खरें, तरी पण आमच्या पक्षांत कोण कोण श्रेष्ठ वीर आहेत व माझ्या सैन्याचे अधिपती किती योग्यतेचे आहेत हेंही आपल्या ध्यानांत यावें, म्हणून मी त्यांतील कांहीं मुख्यांचीं तेवढीं नावे सांगतों, तीं आपण ऐका. आपल्याला ते माहीत नाहीत म्हणून मी सांगतो असे नाही, तर या वेळीं आपल्या बाजूला केवढाले वीर आहेत, याचें आपल्याला स्मरण व्हावें, म्हणून सांगतों. )

**भवान्भीष्मश्च कर्णश्च कृपश्च समितिंजयः ।**
**अश्वत्थामा विकर्णश्च सौमदत्तिस्तथैव च ॥ ८ ॥**
**अन्ये च बहवः शूरा मदर्थे त्यक्तजीविताः ।**
**नानाशस्त्रप्रहरणाः सर्वे युद्धविशारदाः ॥ ९ ॥**

**अन्वयार्थ**—**भवान्**—आपण स्वतः (आह्मां सर्वांचे गुरु)—**च भीष्मः**—व भीष्म (आह्मां कौरव-पांडवांचे पितामह)—**च कर्णः**—व (माझा मित्र) कर्ण,—**समितिंजयः कृपः**—युद्धास जिंकणारा-विजयी कृपाचार्य (आमचे प्राचीन गुरु व तुमचे श्यालक),—**अश्वत्थामा**—तुमचा पुत्र अश्वत्थामा—**च विकर्णः**—व माझा भाऊ विकर्ण,—**तथा एव च सौमदत्तिः**—व तसाच सौमदत्ति-भूरिश्रवा,—**च अन्ये**--आणि तसेच दुसरे—**बहवः शूराः**—पुष्कळ शूर—**मदर्थे त्यक्तजीविताः**—माझ्यासाठीं ज्यांनीं आपले जीवित सोडण्याचा-मरण्याचा निश्चय केला आहे असे,—**नानाशस्त्रप्रहरणाः**—अनेक प्रकारचीं शस्त्रें हींच ज्यांचीं शत्रूवर प्रहार करण्याचीं साधनें आहेत असे व—**सर्वे युद्धविशारदाः**—ते सर्व युद्धामध्यें कुशल, असे आहेत. ८-९ त्यामुळें—

**अपर्याप्तं तदस्माकं बलं भीष्माभिरक्षितम् ।**
**पर्याप्तं त्विदमेतेषां बलं भीमाभिरक्षितम् ॥ १० ॥**

**अन्वयार्थ—तत्**—अशा प्रकारचें—**अस्माकं**—आमचें—**भीष्माभिरक्षितं बलं**—भीष्मांनीं ज्याचें सर्व प्रकारें रक्षण केलें आहे, असें सैन्य—**अपर्याप्तं**—अपरिमित –फार मोठें आहे.—**तु**—परंतु—**एतेषां**—या पांडवांचें—**भीमाभिरक्षितं**—भीमानें ज्याचे सर्वतः रक्षण केलें आहे असें—**इदं**—**बलं**—हें सैन्य—**पर्याप्तं**—परिमित –थोडे आहे. १० (आह्मांकडे तुमच्यासारखे मोठमोठे वीर आहेत व आमचे सैन्य अकरा अक्षौहिणी[1] आहे. अशा प्रकारच्या या सैन्याचे भीष्मासारख्या अनुभवी–विचारी–पोक्त वीरानें रक्षण केलें आहे. म्हणून आमचें सैन्य संख्येनें, पराक्रमानें, कसलेल्या सेनापतीच्या योगानें अजिंक्य आहे. पण पांडवांचे सैन्य सात अक्षौहिणीच आहे. त्यांच्याकडे सात्यकीसारखे वीर जरी असले, तरी ते सर्व तरुण व अननुभवी आहेत. त्यांना मोठमोठ्या संग्रामांचा अनुभव नाहीं. त्यांच्या सैन्याचा रक्षकही भीमासारखा आडदांड मनुष्य आहे. त्यामुळें सर्वच बाजूंनीं त्यांचें सैन्य थोडें व सहज जिंकतां येण्यासारखें आहे.) यास्तव–

**अयनेषु च सर्वेषु यथाभागमवस्थिताः ।**
**भीष्ममेवाभिरक्षन्तु भवन्तः सर्व एव हि ॥ ११ ॥**

**अन्वयार्थ—भवन्तः सर्वे एव हि**—आपण सर्वही—**सर्वेषु अयनेषु**[2]—आपापल्या नियत स्थानांत—**यथाभागं**—आपला भाग न सोडतां—**अवस्थिताः**—राहून–स्थित होऊन—**भीष्मं एव**—केवळ भीष्माचेच—**अभिरक्षन्तु**—सर्व बाजूंनीं रक्षण करा. ११. (तुम्हीं सर्वांनीं आपापल्या नेमलेल्या जागींच राहून तेथून मुख्य सेनापतीचें दक्षतेने रक्षण करावे.) त्यानंतर—

**तस्य संजनयन्हर्षं कुरुवृद्धः पितामहः ।**
**सिंहनादं विनद्योच्चैः शंखं दध्मौ प्रतापवान् ॥ १२ ॥**

**अन्वयार्थ—तस्य**—त्या दुर्योधनाचा—**हर्षं**—हर्ष—**संजनयन् प्रतापवान् कुरुवृद्धः पितामहः**—उत्पन्न करणारा प्रतापी कुरुवंशांतील वृद्ध पितामह–भीष्म—**उच्चैः सिंहनादं विनद्य**—मोठ्या जोरानें आरोळी ठोकून–सिंहाच्या गर्जनेसारखी मोठी गर्जना करून—**शंखं**—शंखाला—**दध्मौ**—वाजविता झाला. १२ (याप्रमाणें दुर्यो-

---

१ एका अक्षौहिणींत २१,८७० रथ, २१,८७० हत्ती, ६५,६१० घोडे, व १,०९,३५० पायदळ, इतके सैन्य असते.

२ 'अयन' ह्म० युद्धभूमींत–पूर्वदिशेंत अमक्यानें रहावें, दक्षिणेंत अमक्याने रहावें, इत्यादि संकेताप्रमाणें मुख्य योद्ध्याने रहाण्याचें स्थान; त्यांत आपापल्या भागांतच राहून तेथूनच सैन्याच्या मध्यभागीं असलेल्या भीष्माचें योद्ध्यांकडून रक्षण करा.

नानें द्रोणाचार्यास सांगितलें असतां भीष्माचार्यांनीं दुर्योधनाचा उत्साह वाढविण्यासाठीं, त्याला खुष करण्याकरितां तोंडानें मोठा ध्वनि करून शंख वाजविला. )

**ततः शंखाश्च भेर्यश्च पणवानकगोमुखाः ।**
**सहसैवाभ्यहन्यन्त स शब्दस्तुमुलोऽभवत् ॥ १३ ॥**

**अन्वयार्थ—ततः**—भीष्मांनीं शंख वाजवितांच—**शंखाः**—शंख,—**भेर्यः**—नगारे,—**पणवानकगोमुखाः**—ढोल, खंजिऱ्या, मृदंग,—**सहसा एव**—एकाएकींच—**अभ्यहन्यन्त**—वाजविले गेले.—**सः शब्दः**—तो शब्द—**तुमुलः**—फार मोठा—**अभवत्**—झाला. १३. ( भीष्माचार्यांनीं योद्धयाना प्रोत्साहन देण्यासाठीं सिंहनाद करून आपला शंख वाजविला असतां कौरवांच्या सैन्यांत जिकडे तिकडे सर्व रणवाद्यें वाजूं लागलीं. त्यांचा तो ध्वनि फार भयंकर होता. पण त्याच्या योगाने पाडवांचीं हृदयें भीतीनें कांपलीं नाहींत. उलट—)

**ततः श्वेतैर्हयैर्युक्ते महति स्यन्दने स्थितौ ।**
**माधवः पांडवश्चैव दिव्यौ शंखौ प्रदध्मतुः ॥ १४ ॥**

**अन्वयार्थ—ततः**—त्यानंतर—**श्वेतैः हयैः युक्ते**—पांढऱ्या घोड्यांनीं युक्त असलेल्या—**महति स्यंदने**—मोठ्या रथावर—**स्थितौ**—बसलेले—**माधवः च एव पांडवः**—श्रीकृष्ण व अर्जुन—**दिव्यौ शंखौ**—दिव्य-देवलोकांतील शंख—**प्रदध्मतुः**—मोठ्याने वाजविते झाले १४ ( कौरवांच्या सैन्यांत असा मोठा वाद्याचा गजर झाला असतां, त्यानंतर चार पांढरे घोडे जोडलेल्या मोठ्या रथांत बसलेले श्रीकृष्ण व अर्जुन यांनीं आपापले शंख वाजविले. )

**पाञ्चजन्यं हृषीकेशो देवदत्तं धनंजयः ।**
**पौण्ड्रं दध्मौ महाशंखं भीमकर्मा वृकोदरः ॥ १५ ॥**
**अनंतविजयं राजा कुंतीपुत्रो युधिष्ठिरः ।**
**नकुलः सहदेवश्च सुघोषमणिपुष्पकौ ॥ १६ ॥**

**अन्वयार्थ—हृषीकेशः**—श्रीकृष्ण—**पांचजन्यं**—पांचजन्यनांवाच्या शंखास—**धनंजयः देवदत्तं**—अर्जुन देवदत्तनांवाच्या शंखास,—**भीमकर्मा वृकोदरः**—ज्याचीं कर्में भयंकर आहेत, असा भीम—**पौंड्रं महाशंखं**—पौंड्रनांवाच्या मोठ्या शंखास—**दध्मौ**—वाजविता झाला.—**कुंतीपुत्रः राजा युधिष्ठिरः**—कुंतीचा पुत्र राजा युधिष्ठिर—**अनन्तविजयं**—अनन्तविजय या नांवाच्या शंखाला वाजवूं लागला.—**नकुलः**—नकुल—**च**—व—**सहदेवः**—सहदेव हे दोघे माद्रीचे पुत्र—**सुघोषमणिपुष्पकौ**—सुघोष व मणिपुष्पक या नांवांचे शंख क्रमानें वाजविते झाले. १५-१६

**काश्यश्च परमेष्वासः शिखंडी च महारथः ।**
**धृष्टद्युम्नो विराटश्च सात्यकिश्चापराजितः ॥ १७ ॥**
**द्रुपदो द्रौपदेयाश्च सर्वशः पृथिवीपते ।**
**सौभद्रश्च महाबाहुः शंखान्दध्मुः पृथक् पृथक् ॥१८॥**

**अन्वयार्थ—हे पृथिवीपते**—अहो धृतराष्ट्र महाराज !—**च परमेष्वासः काश्यः**—आणि ज्याचे इष्वास-धनुष्य मोठे आहे असा महाधनुर्धर काशिराजा—**च महारथः शिखंडी**—व महारथी शिखंडी, धृष्टद्युम्न, विराट,—**अपराजितः**—पराभव न पावणारा सात्यकि, द्रुपद, द्रौपदीचे पांच पुत्र,—**महाबाहुः सौभद्रः**—ज्याचे बाहू मोठे-पराक्रमी आहेत असा सुभद्रापुत्र-अभिमन्यु—**सर्वशः**—या सर्वांनी—**पृथक् पृथक्**—निरनिराळे शंख वाजविले. १७, १८. ( श्रीकृष्ण व अर्जुन यांनी आपापले शंख वाजवितांच इतर पांडव व त्यांच्या पक्षांतील प्रसिद्ध योद्धे यांनी एकदम चोहोंकडून आपले शंख फुंकले आणि आम्ही युद्धाला तयार आहो, असे कौरवांना कळविले. तेव्हां हे महाराज ! काय सांगूं ? )

**स घोषो धार्तराष्ट्राणां हृदयानि व्यदारयत् ।**
**नभश्च पृथिवीं चैव तुमुलो व्यनुनादयन् ॥ १९ ॥**

**अन्वयार्थ—नभः**—अंतरिक्ष—**च**—व—**पृथिवीं**—पृथिवी यांना—**व्यनुनादयन्**—भरून सोडणारा-त्यांना दुमदुमून टाकणारा—**सः तुमुलः घोषः**—तो भयंकर नाद—**धार्तराष्ट्राणां**—धृतराष्ट्रपुत्रांची-कौरवांची—**हृदयानि**—हृदयें—**व्यदारयत्**—फाडून टाकता झाला. १९ ( आकाश व पृथ्वी यांना दुमदुमून सोडणाऱ्या त्या भयंकर शंखध्वनीने दुर्योधनादिकाच्या मनांत भय उत्पन्न केले. तो तुमुल नाद ऐकून त्यांची छाती फाटली. )

**अथ व्यवस्थितान्दृष्ट्वा धार्तराष्ट्रान्कपिध्वजः ।**
**प्रवृत्ते शस्त्रसंपाते धनुरुद्यम्य पांडवः ॥ २० ॥**
**हृषीकेशं तदा वाक्यमिदमाह महीपते ।**

**अन्वयार्थ—अथ**—नंतर अहो महाराज !—**कपिध्वजः**—ज्याच्या ध्वजावर वानराचे चिह्न आहे असा—**पांडवः**—पंडूचा पुत्र अर्जुन—**धार्तराष्ट्रान् व्यव-**

---

१ ' शिखंडं श्मश्रुशून्यता-' असा कोश आहे. अर्थात् ज्याला दाढीमिशा नाहात तो शिखंडी. हाही द्रुपदाचा पुत्र होय.

२ अन्वयांतील अगदी स्पष्ट अर्थांचे शब्द पुनः येथें घातले नाहींत.

**स्थितान् दृष्ट्वा**—धृतराष्ट्रपुत्र-दुर्योधनादिक युद्ध करण्यासाठीं सज्ज होऊन उभे आहेत असें पाहून—**तदा**—त्यावेळीं—**शस्त्रसंपाते प्रवृत्ते सति**—शस्त्रें चालू होण्याचा प्रसंग प्राप्त झाला असतां—**धनुः उद्यम्य**—आपले गांडीव धनुष्य वर उचलून—**हृषीकेशं**—श्रीकृष्णाला—**इदं वाक्यं**—हे वाक्य—**आह**—बोलला. २० (याप्रमाणे पांडवांच्या सैन्यांतील वीरांनी केलेला शंखध्वनि ऐकून कौरवांच्या मनांत भय उत्पन्न झालें, तथापि दुर्योधनादिक भय सोडून युद्धास तयार झाले आहेत व आतां साक्षात् लढाई-लाच सुरुवात होणार, असें पाहून अर्जुन आपले प्रख्यात गांडीव धनुष्य उचलून भग-वानास असें म्हणाला— )

**अर्जुन उवाच**—अर्जुन बोलला—

**सेनयोरुभयोर्मध्ये रथं स्थापय मेऽच्युत ॥ २१ ॥**
**यावदेतान्निरीक्षेऽहं योद्धुकामानवस्थितान् ।**
**कैर्मया सह योद्धव्यमस्मिन् रणसमुद्यमे ॥ २२ ॥**

**अन्वयार्थ**—हे निर्विकार श्रीकृष्णा !—**यावत्**—जोंवर[1]—**अहं**—मी—**योद्धुका-मान् अवस्थितान् एतान्**—युद्धाची इच्छा असलेल्या व सन्मुख उभ्या राहिलेल्या यांस—**निरीक्षे**—पाहीन—**तावत्**—तोवर—**मे रथं**—माझ्या रथाला—**उभयोः सेनयोः मध्ये**—दोन्ही सैन्यांच्या मध्यभागीं—**स्थापय**—उभा कर.—**अस्मिन् रणसमुद्यमे**—या रणाच्या उद्योगांत-या युद्धांत—**मया**—मी—**कैः सह**—कोणा-बरोबर—**योद्धव्यं**—युद्ध करावें-मला कोणाशीं लढावयाचे आहे, हे पाहण्याची प्रबल इच्छा झाली आहे. २१-२२ ( आम्हांशी संधि न करितां युद्धाची इच्छा करणाऱ्या व आमच्या शंखांचा प्रचंड ध्वनि ऐकून हृदये विदीर्ण झाली असतांनाही आमच्यासमोर उभ्या राहिलेल्या या सर्वांना मी पाहतो. तोवर हे कृष्णा ! माझा रथ दोन्ही सैन्यांच्या मध्यभागीं उभा कर. आम्हां बंधूबंधूंमध्ये परस्परांशी होणाऱ्या या लढाईत मला कोणाको-णांशीं झुंजावें लागणार आहे, ते मी अगोदर पाहतों. )

**योत्स्यमानानवेक्षेऽहं य एतेऽत्र समागताः ।**
**धार्तराष्ट्रस्य दुर्बुद्धेर्युद्धे प्रियचिकीर्षवः ॥ २३ ॥**

**अन्वयार्थ**—**दुर्बुद्धेः धार्तराष्ट्रस्य**—ज्याची बुद्धि अधर्मनिष्ठ आहे,त्यामुळे ज्याला आपले हित कळत नाहीं, अशा दुष्ट दुर्योधनाचे—**युद्धे**—युद्धांत-युद्धाने-युद्ध करून—**प्रियचिकीर्षवः**—प्रिय करण्याची इच्छा करणारे—**ये एते**—जे हे—**अत्र**—येथे—**समागताः**—आलेले आहेत—**तान् योत्स्यमानान्**—त्या युद्ध करणाऱ्या सर्वांस—

---

१ 'यावत्०' याचा अर्थ 'जेथून मला प्रतियोध्यांना पाहतां येईल अशा जागीं दोन्हीं सैन्यांमध्यें माझा रथ उभा कर' असाही होतो.

**अहं**—मी—**अवेक्षे**—पहातों. २३. (दुर्योधनाची बुद्धि दुष्ट आहे. त्यामुळें त्याचा कल नेहमीं अधर्माकडे असतो व त्याला आपलें हित कसें करून घ्यावें तें कळत नाहीं. अशा दुष्टाचें युद्ध करून-युद्धाच्या योगानें प्रिय करण्यासाठीं जे कोणी येथें जमले आहेत त्यांना मी पाहतों. कारण दुर्योधनाला सदुपदेश करून युद्धापासून परतविण्याची ते खटपट करीत नाहींत, तर युद्धांत पांडवांना जिंकून दुर्योधनाचें हित करण्याची इच्छा करीत आहेत, यास्तव मला त्यांना एकदा पाहिलें पाहिजे. )

**संजय उवाच**—संजय धृतराष्ट्रास म्हणाला—

**एवमुक्तो हृषीकेशो गुडाकेशेन भारत ।**
**सेनयोरुभयोर्मध्ये स्थापयित्वा रथोत्तमम् ॥ २४ ॥**
**भीष्मद्रोणप्रमुखतः सर्वेषां च महीक्षिताम् ।**
**उवाच पार्थ पश्यैतान्समवेतान्कुरूनिति ॥ २५ ॥**

**अन्वयार्थ**—**हे भारत**—हे महाराज धृतराष्ट्रा!—**गुडाकेशेन**—अर्जुनाकडून—**एवं उक्तः हृषीकेशः**—असें बोलला गेलेला श्रीकृष्ण—**उभयोः सेनयोः मध्ये**—दोन्ही सैन्यांच्या मध्यभागीं—**भीष्मद्रोणप्रमुखतः**—भीष्म व द्रोण यांच्यासमोर—**च सर्वेषां महीक्षितां प्रमुखतः**—व इतर सर्व राजांच्या समोर—**रथोत्तमं**—उत्तम रथ—**स्थापयित्वा**—उभा करून—**हे पार्थ**—अर्जुना!—**एतान् समवेतान् कुरून्**—या जमलेल्या सर्व कौरवांना—**पश्य**—पहा,—**इति**—असें—**उवाच**—बोलला. २४-२५. ( अर्जुनानें भगवानाला असें सांगितलें असतां श्रीकृष्णानें त्याप्रमाणे त्याचा रथ दोन्हीं सैन्यांच्या मध्यभागीं भीष्म, द्रोण व इतर राजे यांच्यासमोर उभा करून ‘ अर्जुना ! युद्धासाठीं जमलेल्या आपल्या या सर्व शत्रूंना तूं पाहून घे ’ असें म्हटलें. )

**तत्रापश्यत्स्थितान्पार्थः पितॄनथ पितामहान् ।**
**आचार्यान्मातुलान्भ्रातॄन्पुत्रान्पौत्रान्सखींस्तथा ॥२६॥**
**श्वशुरान्सुहृदश्चैव सेनयोरुभयोरपि ।**
**तान्समीक्ष्य स कौंतेयः सर्वान्बंधूनवस्थितान् ॥ २७ ॥**

**अन्वयार्थ**—**तत्र**—याप्रमाणे श्रीकृष्णाने सांगितलें असतां—**पार्थः**—अर्जुन—**उभयोः अपि सेनयोः**—दोन्ही सैन्यांमध्ये—**स्थितान्**—असलेल्या—**पितॄन्**—भूरिश्रवाप्रमृति चुलत्यांस,—**अथ**—व—**पितामहान्**—भीष्मादि पितामहांस—**आचार्यान्**—द्रोणाचार्यादि आचार्यांस,—**मातुलान्**—शल्यादि मामांस—**भ्रातॄन्**—भीम-दुर्योधनादि भावांस—**पुत्रान्**—अभिमन्यु-लक्ष्मणादि पुत्रांस,—**पौत्रान्**—

**लक्ष्मणादि-पुत्रांच्या** पुत्रांस—**तथा**—त्याचप्रमाणें—**सखीन्**—अश्वत्थामाप्रभृति मित्रांस—**श्वशुरान्**—द्रुपदादि सासऱ्यांस—**च सुहृदः**—आणि कृतवर्मा-भगदत्त व इतर निरपेक्ष उपकार करणारे स्नेही यांस पाहता झाला.—**तान् सर्वान् अवस्थितान् बन्धून्**—त्या सर्व सन्मुख उभ्या असलेल्या बंधूंस–आप्तांस—**समीक्ष्य**—पाहून—**परया कृपया आविष्टः**—परम कृपेनें प्रवेश केलेला–ज्याच्या चित्तांत परम कृपा आपोआप उत्पन्न झाली आहे असा—**सः कौन्तेयः**—तो कुंतीचा पुत्र अर्जुन—**विषीदन्**—विषाद –खेद करीत होत्साता—**इदं**—हें असें—**अब्रवीत्**—बोलला ( तेव्हां अर्जुनानें कौरवांच्या व आपल्या सैन्यांत असलेल्या आपल्याच आप्तांस पाहिले. त्यांत कांही अत्यंत मान्य होते, कांहीं अत्यंत प्रिय होते, कांही अतिशय स्नेही होते व कांही निकटसंबंधी होते. युद्ध करून, त्यांत स्वतः मरण्यासाठी किंवा दुसऱ्याला मारण्यासाठी आलेल्या व आपापल्या जागीं सज्ज होऊन राहिलेल्या त्यांस पाहून अर्जुनाच्या मनांत मोठी कृपा उत्पन्न झाली व त्यामुळें तो खेद करीत भगवानाला असें बोलला— )

**अर्जुन उवाच**—अर्जुन म्हणाला—

**कृपया परयाऽऽविष्टो विषीदन्निदमब्रवीत् ।**
**दृष्ट्वेमं स्वजनं कृष्ण युयुत्सुं समुपस्थितम् ॥ २८ ॥**
**सीदन्ति मम गात्राणि मुखं च परिशुष्यति ।**
**वेपथुश्च शरीरे मे रोमहर्षश्च जायते ॥ २९ ॥**

**अन्वयार्थ**—हे कृष्णा!—**युयुत्सुं**—युद्धाची इच्छा करणाऱ्या व—**समुपस्थितं**—रणभूमीत प्राप्त झालेल्या—**इमं स्वजनं**—या बंधुवर्गास—**दृष्ट्वा**—पाहून—**मम गात्राणि**—माझीं गात्रे-अवयव—**सीदन्ति**—व्यथा पावतात—**च मुखं**—व तोंड—**परिशुष्यति**—सर्व बाजूंनी कोरडे पडतें—**मे शरीरे**—माझ्या शरीरांत—**वेपथुः**—कंप (सुटतो)—**च**—आणि—**रोमहर्षः**—अंगावर रोमांच—**जायते**—उभा राहतो.

**गांडीवं स्रंसते हस्तात् त्वक्चैव परिदह्यते ।**
**न च शक्नोम्यवस्थातुं भ्रमतीव च मे मनः ॥ ३० ॥**

**अन्वयार्थ—हस्तात्**—माझ्या हातांतून—**गाण्डीवं**—गाण्डीव धनुष्य—**स्रंसते**—गळतें—**च**—आणि—**त्वक्**—त्वचा—**परिदह्यते**—सभोवार जाळली जाते–सर्व शरीरांत दाह उत्पन्न झाला आहे—**अहं**—मी—**अवस्थातुं**—स्थिर उभा राहण्यास—**न शक्नोमि**—समर्थ नाही.—**मे मनः**—माझें मन—**भ्रमति इव**—जणूं काय भ्रमण करीत आहे. ३०.

**निमित्तानि च पश्यामि विपरीतानि केशव ।**
**न च श्रेयोऽनुपश्यामि हत्वा स्वजनमाहवे ॥ ३१ ॥**

**अन्वयार्थ**—हे केशवा—**विपरीतानि निमित्तानि**—अशुभ निमित्तें-अरिष्ट-सूचक चिह्नें—**पश्यामि**—मी पाहत आहे.—**च** -आणि—**आहवे**—लढाईत—**स्वजनं**—स्वजनांना—**हत्वा**—मारून—**श्रेयः**—परम हित—**न अनुपश्यामि**—मी मागून पहात नाहीं. स्वजनांना मारल्यावर परिणामीं हित होईल असे मला वाटत नाहीं. ३१. (वरील साडेतीन श्लोकांत अर्जुनानें खेदामुळें आपल्या शरीराची व मनाची काय स्थिति झाली आहे, याचे वर्णन केले आहे. युद्धासाठीं आलेल्या या स्वजनांस पाहून माझ्या गात्रांना पीडा होऊं लागली आहे. तोंड कोरडे पडले आहे. शरीर कांपूं लागलें आहे, व अंगावर शहारा आला आहे. माझ्या हातांतील हें प्रिय धनुष्य खालीं पडत आहे. सर्व शरीराचा दाह होत आहे. मी रथांत उभा राहण्यासही समर्थ नाहीं. माझें मन भ्रमण करीत आहे. मला अशुभ चिह्नें दिसूं लागली आहेत व स्वजनांना मारल्यानें परिणामी माझें कांहीं हित होईल, असेंही मला वाटत नाहीं. )

**न कांक्षे विजयं कृष्ण न च राज्यं सुखानि च ।**
**किं नो राज्येन गोविंद किं भोगैर्जीवितेन वा ॥ ३२ ॥**

**अन्वयार्थ**—हे कृष्णा !—**अहं**—मी—**विजयं**—विजय—**न काङ्क्षे**—इच्छीत नाहीं.—**राज्यं च न काङ्क्षे**—राज्याला मी इच्छीत नाहीं.—**सुखानि च न काङ्क्षे**—व सुखांना इच्छीत नाहीं.—**हे गोविंद**—हे गोविंदा !—**नः राज्येन किं**—आम्हांला राज्याने काय करावयाचे आहे ? आमचें राज्याने काय होणार ?—**भोगैः किं**—भोगांनीं काय होणार ? भोगांचा तरी आम्हांला काय उपयोग ?—**जीवितेन वा किं**—अथवा जीविताला तरी घेऊन काय करावयाचें आहे ? ३२.

**येषामर्थे कांक्षितं नो राज्यं भोगाः सुखानि च ।**
**त इमेऽवस्थिता युद्धे प्राणांस्त्यक्त्वा धनानि च ॥ ३३ ॥**
**आचार्याः पितरः पुत्रास्तथैव च पितामहाः ।**
**मातुलाः श्वशुराः पौत्राः श्यालाः संबंधिनस्तथा ॥ ३४ ॥**

**अन्वयार्थ**—**येषां अर्थे**—ज्यांच्यासाठीं—**नः**—आम्हांला—**राज्यं**—राज्य—**काङ्क्षितं**—इष्ट आहे,—**भोगाः काङ्क्षिताः**—भोग इष्ट आहेत—**च सुखानि काङ्क्षितानि**—आणि सुखे इष्ट आहेत—**ते इमे**—ते हे आमचे—**आचार्याः पितरः०**—आचार्य, चुलते, पुत्र, तसेच आजे, मामा, सासरे, नातू, मेव्हणे तसेच संबंधी—**प्राणान्**—प्राण म्ह० प्राणांची आशा—**च धनानि**—व धन म्ह० धनाची आशा यांस—**त्यक्त्वा**—सोडून—**युद्धे**—युद्धाकरितां—**अवस्थिताः**—येथें उभे राहिले आहेत. ३३-३४.

**एतान्न हंतुमिच्छामि घ्नतोऽपि मधुसूदन ।**
**अपि त्रैलोक्यराज्यस्य हेतोः किं नु महीकृते ॥ ३५ ॥**

**अन्वयार्थ—हे मधुसूदन**—हे मधुसूदना !—**त्रैलोक्यराज्यस्य हेतोः अपि**—त्रैलोक्याच्या राज्यासाठीही—**घ्नतः अपि एतान्**—मला मारणाऱ्याही-मजवर शस्त्रांचे प्रहार करणाऱ्याही या दुर्योधनादिकांस—**अहं**—मी—**हन्तुं न इच्छामि**—मारण्याची इच्छा करीत नाही.—**महीकृते किं नु**—तेव्हा मी नुसत्या पृथ्वीच्या राज्यासाठी त्यांचा प्राण कसा घेईन ? ३५. कारण—

**निहत्य धार्तराष्ट्रान्नः का प्रीतिः स्याज्जनार्दन ।**
**पापमेवाऽऽश्रयेदस्मान्हत्वैतानाततायिनः ॥ ३६ ॥**

**अन्वयार्थ—हे जनार्दन**—हे वासुदेवा !—**धार्तराष्ट्रान्**—धृतराष्ट्राच्या पुत्राना—**निहत्य**—मारून—**नः**—आमची—**का प्रीतिः**—कोणती प्रीति होणार ?—**एतान् आततायिनः**—या पाप्यांना[1]—**हत्वा**—मारून—**अस्मान्**—आम्हांला—**पापं एव**—पापच—**आश्रयेत्**—लागेल. ३६.

**तस्मान्नार्हा वयं हंतुं धार्तराष्ट्रान्स्वबांधवान् ।**
**स्वजनं हि कथं हत्वा सुखिनः स्याम माधव ॥ ३७ ॥**

**अन्वयार्थ—तस्मात्**—म्हणून—**वयं**—आम्ही-पांडव—**स्वबांधवान् धार्तराष्ट्रान्**—आपले बांधव जे धृतराष्ट्राचे पुत्र त्यांस—**हन्तुं**—मारण्यास—**न अर्हाः**—योग्य नाही. ( त्यांना मारणे आम्हांला उचित नाही )—**हि**—कारण—**हे माधव**—हे माधवा !—**स्वजनं हत्वा**—स्वजनाना मारून—**सुखिनः**—आम्ही सुखी—**कथं**—कसे—**स्याम**—होऊं ? ३७. ( शरीर व मन यांची काय दशा झाली आहे ते सांगून, त्यावरून आपला काय विचार ठरला आहे, तेही अर्जुन सांगतो—हे कृष्णा ! मला विजय, राज्य व सुख यांची इच्छा नाही. कारण राज्य, विषयोपभोग व हे जीवित तरी आम्हांस घेऊन काय करावयाचें आहे ? ज्यांच्यासाठी आम्हांला राज्य, विषय व सुख पाहिजे तेच हे आचार्यादिक तेथें मरावयास तयार होऊन उभे आहेत. यास्तव मधुसूदना ! मी यांना मारण्याची इच्छा करीत नाहीं. यांनी मजवर जरी शस्त्रे चालविलीं तरी त्यांचा प्रतिकार करण्यासाठी मी यांच्यावर उलट प्रहार करणार नाहीं. यांना मारून मला त्रैलोक्याचें राज्य जरी मिळत असले तरी मी असले पाप करणार नाही. मग या एकट्या भूलोकच्या राज्यासाठीं कसे करीन ? कौरवांना मारून आमचे काय हित होणार ?

१ आग लावणारा, विष घालणारा, हातांत शस्त्र घेऊन मारावयास धांवून येणारा, धनाचा अपहार करणारा, क्षेत्र-शेत व स्त्री यांचा अपहार करणारा असे सहा प्रकारचे लोक आततायी आहेत. दुर्योधनानें पांडवांचे हे सहाही अपराध केले होते.

या पाप्यांना मारल्यास आमचें हित होण्याच्या ऐवजीं आम्हांस पातक मात्र लागेल, म्हणून या आपल्या बांधवांना म्ह० दुर्योधनादिकांना मारणे योग्य नाहीं. स्वजनांना मारून आम्ही सुखी कसे होणार? ते शक्यच नाहीं. पण ही गोष्ट त्यांना कळायला नको का, म्हणून म्हणशील तर सांगतों--

यद्यप्येते न पश्यन्ति लोभोपहतचेतसः ।
कुलक्षयकृतं दोषं मित्रद्रोहे च पातकं ॥ ३८ ॥
कथं न ज्ञेयमस्माभिः पापादस्मान्निवर्तितुम् ।
कुलक्षयकृतं दोषं प्रपश्यद्भिर्जनार्दन ॥ ३९ ॥

**अन्वयार्थ—यद्यपि**—जरी—**लोभोपहतचेतसः एते**—ज्यांचें चित्त लोभानें विवेकशून्य झालें आहे असे हे दुर्योधनादिक—**कुलक्षयकृतं दोषं**—कुलाचा क्षय झाल्यामुळें होणारा दोष—**च मित्रद्रोहे पातकं**—व मित्रांचा द्रोह केल्यामुळें लागणारें पाप यांस—**न पश्यन्ति**—जाणत नसले-त्यांची त्याकडे दृष्टि जात नसली—**तथापि**—तरी हे जनार्दना!—**कुलक्षयकृतं दोषं प्रपश्यद्भिः अस्माभिः**—कुलक्षयामुळें होणाऱ्या दोषाला-कुलक्षयामुळे होणाऱ्या परिणामाला पाहणाऱ्या-जाणणाऱ्या आम्ही—**अस्मात् पापात् निवर्तितुं**—या पापापासून निवृत्त होण्यास—**कथं न ज्ञेयं**—कसे न जाणावें? ३८,३९. ( दुर्योधनादिकांना आमच्या राज्याचा लोभ सुटला आहे, त्यामुळें त्यांचें चित्त विचार करण्यास समर्थ नाहीं. त्यामुळेंच युद्धांत आपल्या कुलाचा क्षय होऊन त्याचा अनिष्ट परिणाम होईल व आम्हीं मित्रांचा द्रोह केल्यामुळें पाप लागेल, हें त्यांना कळत नाहीं. पण आम्हांला तसा कांहीं लोभ नाहीं. त्यामुळे कुलक्षयाच्या योगानें घडणारा परिणाम आम्हांस स्पष्ट दिसत आहे. तेव्हां तो पहात असतांनाही आपण या पापापासून परत फिरावें, हे आम्हांला सुद्धां कळूं नये की काय? कुलाचा क्षय झाला तर काय होईल ते सांगतो—)

कुलक्षये प्रणश्यन्ति कुलधर्माः सनातनाः ।
धर्मे नष्टे कुलं कृत्स्नमधर्मोऽभिभवत्युत ॥ ४० ॥
अधर्माभिभवात्कृष्ण प्रदुष्यन्ति कुलस्त्रियः ।
स्त्रीषु दुष्टासु वार्ष्णेय जायते वर्णसंकरः ॥ ४१ ॥

---

१ गीतारहस्यकारांची या श्लोकांवरील टीप विचार करण्यासारखी आहे. पण तिचा विचार आचार्यांच्या संबंधभाष्याचे समर्थन करतांनाच करणं उचित दिसते.

**संकरो नरकायैव कुलघ्नानां कुलस्य च ।**
**पतन्ति पितरो ह्येषां लुप्तपिंडोदकक्रियाः ॥ ४२ ॥**

**अन्वयार्थ—कुलक्षये**—कुलाचा क्षय झाला असतां—**सनातनाः कुलधर्माः**—वंशपरंपरेनें चालत आलेले कुलधर्म—**प्रणश्यन्ति**—सर्वथा नाश पावतात.—**धर्मे नष्टे**—धर्म नाश पावला असतां—**अधर्मः**—अधर्म—**कृत्स्नं उत कुलं**—सर्वही कुलाला—**अभिभवति**—व्यापतो.—**हे कृष्ण**—हे कृष्णा !—**अधर्माभिभवात्**—अधर्म सर्व कुलांत पसरल्यामुळे—**कुलस्त्रियः**—कुलीन स्त्रिया—**प्रदुष्यन्ति**—अतिशय दूषित होतात, दुराचरणी होतात.—**हे वार्ष्णेय**—हे वृष्णिकुलोत्पन्ना !—**स्त्रीषु दुष्टासु**—साध्वी स्त्रिया दूषित झाल्या असतां—**वर्णसंकरः**—ब्राह्मणादि वर्णाचा परस्पर संकर—**जायते**—होतो.—**च संकरः**—आणि वर्णसंकर—**कुलघ्नानां च कुलस्य**—कुलाचा घात करणारे लोक व तें कुल या दोघांच्याही—**नरकाय एव**—नरकालाच कारण होतो.—**हि**—कारण—**एषां**—या कुलघ्नांचे व कुलाचे—**पितरः**—पितर—**लुप्तपिंडोदकक्रियाः सन्तः**—ज्यांची पिंडक्रिया व उदकक्रिया लुप्त झाली आहे असे होत्साते ह्म० श्राद्ध व तर्पण करणारे पुत्रादिकच नाहीसे झाल्यामुळे ज्यांचीं श्राद्धें व तर्पण होत नाहींत असे ते पितर—**पतन्ति**—नरकांत पडतात. ४०-४२( कुलाचाच क्षय झाला कीं वंशपरंपराप्राप्त धर्म नाश पावतात. सनातन धर्माचा नाश झाला कीं अधर्म सर्व कुलाला ग्रासतो. म्हणजे कुलांतील कर्ते पुरुष नाश पावले कीं लहान मुलें व स्त्रियाच अवशिष्ट राहतात. त्यांचें नियमन करणारा कोणी नसल्यामुळे त्या कुलांत अधर्म वाढतो. त्यामुळें कुलीन साध्वी स्त्रियाही दुराचरणानें दूषित होतात. स्त्रिया दुराचरणी झाल्या असता वर्णसंकर होतो. वर्णसंकर, कुलाचा घात करणारे व तें कुल या दोघांनाही नरक देतो. श्राद्ध-तर्पणादि क्रिया लुप्त झाल्यामुळें कुलाचा घात करणाऱ्या दुष्टांचे पितर नरकांत पडतात, आणि—)

**दोषैरेतैः कुलघ्नानां वर्णसंकरकारकैः ।**
**उत्साद्यन्ते जातिधर्माः कुलधर्माश्च शाश्वताः ॥ ४३ ॥**

**अन्वयार्थ—कुलघ्नानां**—कुलाचा घात करणाऱ्या दुष्टाच्या—**एतैः वर्णसंकरकारकैः**—या वर्णसंकरकारक—**दोषैः**—दोषांनीं—**शाश्वताः**—परंपराप्राप्त—**जातिधर्माः**—क्षत्रियत्वादिकांमुळें प्राप्त होणारे धर्म—**च कुलधर्माः**—व कुलधर्म—**उत्साद्यन्ते**—विनाश पावतात. ४३.

**उत्सन्नकुलधर्माणां मनुष्याणां जनार्दन ।**
**नरके नियतं वासो भवतीत्यनुशुश्रुम ॥ ४४ ॥**

**अन्वयार्थ**—हे कृष्णा!—**उत्सन्नकुलधर्माणां मनुष्याणां**—ज्यांचे कुलधर्म नाश पावले आहेत, अशा मनुष्यांचा—**नरके**—नरकांत—**नियतं**—निश्चयाने—**वासः**—वास—**भवति**—होतो;—**इति**—असे—**अनुशुश्रुम**—महर्षींच्या वचनां-वरून-आचार्यांच्या तोंडून ऐकिले आहे. ४४. (कुलाचा घात करणाऱ्या लोकांच्या या वर्णसंकर करविणाऱ्या दोषांनी नित्य कुलधर्म व जातिधर्म नाश पावतात आणि ज्यांचे जातिधर्म व कुलधर्म नाश पावले आहेत, अशा लोकांना निःसंशय नरकवास भोगावा लागतो, असेंही आम्ही शास्त्रें व महात्मे यांच्या तोंडून ऐकलें आहे.)

**अहो बत महत्पापं कर्तुं व्यवसिता वयम्।**
**यद्राज्यसुखलोभेन हंतुं स्वजनमुद्यताः॥ ४५॥**

**अन्वयार्थ**—**अहो**—काय चमत्कार आहे!—**बत**—अरेरे—**वयं**—आम्ही—**यत्**—जें—**राज्यसुखलोभेन**—राज्यसुखाच्या लोभाने—**स्वजनं**—स्वजनांना—**हन्तुं**—मारण्यास—**उद्यताः**—तयार झालो—**तत्**—ते—**एतत्**—हे—**महत् पापं**—मोठें पाप—**कर्तुं**—करण्यास—**व्यवसिताः**—सज्ज झालों आहो. ४५ (अरेरे आम्ही राज्यसुखाच्या लोभाने स्वजनांस मारण्यास तयार झालो, हे मोठे आश्चर्य आहे! असें स्वजनवधास तयार होणे म्हणजे घोर पापच करावयास तयार होणें आहे.)

यास्तव—

**यदि मामप्रतीकारमशस्त्रं शस्त्रपाणयः।**
**धार्तराष्ट्रा रणे हन्युस्तन्मे क्षेमतरं भवेत्॥ ४६॥**

**अन्वयार्थ**—**यदि**—जर—**अप्रतीकारं अशस्त्रं मां**—शत्रूंचा प्रतीकार न करणाऱ्या व शस्त्र सोडून बसलेल्या मला—**शस्त्रपाणयः धार्तराष्ट्राः**—ज्यांच्या हातांत शस्त्रे आहेत असे दुर्योधनादि धृतराष्ट्रपुत्र—**रणे**—रणांगणांत—**हन्युः**—मारतील तर—**तत्**—ते—**मे**—मला—**क्षेमतरं**—अतिशय क्षेम-कल्याणकर—**भवेत्**—होईल. ४६. (हातांत शस्त्रे घेतलेले दुर्योधनादिक शस्त्रही टाकून बसलेल्या व प्रहार करणाऱ्यांचाही प्रतीकार न करणाऱ्या मला जरी रणांगणांत मारतील तरी तें मला सुखकर होईल.)

**संजय उवाच**—संजय म्हणाला—

**एवमुक्त्वाऽर्जुनः संख्ये रथोपस्थ उपाविशत्।**
**विसृज्य सशरं चापं शोकसंविग्नमानसः॥ ४७॥**

**इति श्रीमद्भगवद्गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे अर्जुनविषादयोगो नाम प्रथमोऽध्यायः॥ १॥**

**अन्वयार्थ—अर्जुनः**—अर्जुन—**एवं उक्त्वा**—असें बोलून—**संख्ये**—संग्रामांत—रणमैदानांत—**सशरं चापं**—बाणांसह धनुष्य—**विसृज्य**—टाकून—**शोकसंविग्नमानसः**—शोकानें ज्याचें मन अतिशय उद्विग्न झालें आहे असा होत्साता—**रथोपस्थे**—रथाच्या आंत-रथाच्या एका विशिष्ट भागीं—**उपाविशत्**—बसला. ४७. ( **हे महाराज धृतराष्ट्र ! अर्जुन कृष्णाला असें बोलला. त्यानें संग्रामांत धनुष्य व बाण यांचा त्याग केला आणि शोकामुळें खिन्न होऊन तो रथांत मागें जाऊन बसला.**)

इति भगवान् श्रीकृष्णांनीं गायलेल्या-सांगितलेल्या उपनिषदांतील-रहस्यविद्यांतील ब्रह्मविद्येपैकीं योगशास्त्रांतील अर्जुनविषादयोगनांवाचा पहिला अध्याय विष्णुशर्मकृत सान्वयार्थ-सटीप-भाष्य-भाष्यार्थासह समाप्त झाला.

---

१ भगवंतांनीं सांगितलेल्या ज्या गुप्तविद्या त्यांपैकीं ब्रह्मविद्या म्ह० ब्रह्मज्ञान येथे सांगितले आहे. ब्रह्मविद्येंतील हे योगशास्त्र आहे. योग म्ह० उपाय-साधन. त्या साधनशास्त्रांतील अर्जुनविषादयोगनांवाचा हा पहिला अध्याय आहे. पण रहस्यकार या अध्यायसमाप्तिसूचक वाक्याला 'संकल्प' असे नाव देऊन व त्याला नसते महत्त्व देऊन त्यावरून निरनिराळी अनुमाने व अर्थ काढतात. प्रथम ते ' भगवद्गीतासु उपनिषत्सु ' हे बहुवचन आदरार्थी आहे, असे म्हणतात; पण तें बरोबर नाहीं. कारण उपनिषद म्ह० रहस्यविद्या. भगवानांनीं अनेक रहस्यविद्या—गुप्तविद्या सांगितल्या आहेत व त्यांना उद्देशूनच हे बहुवचन आहे. तसे जर न मानले तर पुढील ' ब्रह्मविद्यायां ' म्ह० ब्रह्मविद्येंतील हे एकवचनी पद व्यर्थ होते. कारण 'उपनिषद्' या शब्दाचे मुख्य अर्थ—रहस्य-वेदरहस्य—उपासना व ब्रह्मविद्या असे तीन आहेत. पण या ' सकल्पांत ' ' ब्रह्मविद्यायां ' असे पुढे स्पष्ट पद असल्यामुळे ' उपनिषत्सु ' याचा अर्थ वेदरहस्यांतील असाच केला पाहिजे. भगवानानीं निरनिराळ्या अवतारात व निरनिराळ्या प्रसंगीं सांगितलेलीं वेदरहस्ये अनेक आहेत. त्यातील 'ब्रह्मविद्या' हेही एक रहस्य आहे. त्यांतील प्रस्तुत ग्रंथ हे योगशास्त्र आहे. ब्रह्मविद्या साध्यरूप व साधनरूप अशी दोन प्रकारची आहे. गीतेत कर्म, भक्ति, योग, ध्यान, ज्ञान, सन्यास, विवेक इत्यादि साधनें सांगितलीं आहेत. एकेक अध्याय हे एकेक साधन—एकेक योगच आहे. म्हणून हे ब्रह्मविद्येंतील योगशास्त्र होय. याला 'योग' हे नांव खुद्द संजयानेच दिले आहे अ. १८ श्लो. ७५ पहा. गीतेत साध्यरूप ब्रह्मविद्या म्ह० आत्मज्ञान फार थोडक्यांत (अ. २ श्लोक २१—३०, अ १३,' ५ वगैरे) सांगून बाकी सर्वत्र योग म्ह० साधनेच सांगितलीं आहेत. कारण मुमुक्षूला जो यत्न करावयाचा असतो तो साध्यासाठीं नसून साधनासाठींच असतो. यास्तव ब्रह्मविद्येतील योगशास्त्रे म्ह० कर्मयोगशास्त्रे असा अर्थ करणे सर्वथा अनुचित होय. कारण त्याचा समन्वय कोणत्याच अध्यायाच्या ' सकल्पा'शीं योग्य रीतीने होत नाहीं. ब्रह्मविद्येतील कर्मयोगांतील विषादयोग या नांवाचा प्रथम अध्याय, ०कर्मयोगातील सांख्ययोगनांवाचा दुसरा अध्याय, ०कर्मयोगांतील कर्मयोगनांवाचा तिसरा अध्याय, ०कर्मयोगांतील ज्ञानकर्मसंन्यासनांवाचा चवथा अध्याय वगैरे वाक्यांचा वस्तुतः कांहीं अर्थच संभवत नाहीं. पण योगशास्त्रांतील—साधनशास्त्रांतील विषादयोग, सांख्ययोग, कर्मयोग, ज्ञानकर्मसंन्यासयोग, संन्यासयोग, ध्यानयोग, ज्ञानविज्ञानयोग, अक्षरब्रह्मयोग, राजविद्याराजगुह्ययोग, विभूतियोग,

भक्तियोग, क्षेत्रक्षेत्रज्ञयोग, गुणत्रयविभागयोग, पुरुषोत्तमयोग, दैवासुरसंपद्योग, श्रद्धात्रय-विभागयोग व मोक्षसंन्यासयोग, असा अर्थ सर्वप्रकारें उपपन्न होतो. कारण तीं सर्व ब्रह्मज्ञानाची साक्षात् किंवा परंपरेनें साधनें आहेत. यास्तव गीतेंतील 'योग' हा शब्द सर्वत्र 'कर्मयोग' याच अर्थी योजला आहे, हें म्हणणे सर्वथा अयोग्य आहे. तो कांहीं ठिकाणीं कर्मयोग या अर्थी योजला आहे, पण तो गौणवृत्तीने होय, मुख्यवृत्तीने नव्हे, हे आम्ही पुढें जेथल्या तेथें सकारण दाखवू. यावरून गी. र. पृ. ३, ६०, ३४९ वगैरे ठिकाणीं जे लिहिले आहे ते सर्व अयोग्य आहे, हे निःपक्षपात वाचकांच्या लक्षांत येईल.

रहस्यकार म्हणतात–'हा संकल्प गीतेवर संन्यासमार्गाच्या टीका होण्यापूर्वीचा असला पाहिजे. कारण कोणीही संन्यासमार्गी पंडित असा संकल्प देणार नाहीं.' पृ. ६१२ हें म्हणणें अगदीं अयोग्य आहे. अध्यायसमाप्तिसूचक वाक्य श्रीशंकराचार्यांच्या पूर्वी असेल, असें संशयित कशाला म्हणतां? आम्ही म्हणतों तें त्यांच्या पूर्वींचेंच आहे. इतकेंच नव्हे तर गीतेवर त्यांच्यापूर्वी अनेक अद्वैती व्याख्यानेंही होतीं, हे त्यांच्या उपोद्घातावरूनच सिद्ध होत आहे. 'पण कोणीही संन्यासमार्गी पंडित असा संकल्प देणार नाहीं,' असें जें रहस्यकार म्हणतात ते मात्र साफ चुकीचे आहे. कारण त्यांत संन्यासमार्गी (?) टीकाकारांना बाधक असे काय आहे? योग म्ह० कर्मयोग असा जो विपरीत ग्रह रहस्यकारांनीं करून घेतला आहे त्यामुळें त्यांना झालेला हा भ्रम आहे. गीताशास्त्राला 'योग' असे प्रत्यक्ष गीतेंत म्हटलेले असतांना (अ. १८-७५) संकल्पांतील 'योगशास्त्रे' हा शब्द संन्यासमार्गी पंडितांना सहन न होण्याचें कांहीं कारण दिसत नाहीं! गीतारहस्यकारांना मात्र त्यांतील 'योगशास्त्र' हा शब्द सहन न झाल्यामुळें त्याचे शुद्ध स्वरूप घालवून त्याला आपल्या समजुतीप्रमाणे 'कर्मयोग' असें विकृत स्वरूप दिले आहे, मुख्य योग म्ह० चित्तसमाधान वेदान्तशास्त्राचें अन्तरंग साधन आहे. त्याचे वेदान्ताला वावडें नाहीं. योग ज्ञानासाठींही पाहिजे व ज्ञानानंतर जीवन्मुक्तीसाठींही पाहिजे. कर्मयोग मात्र चित्तशुद्धीपुरताच व चित्तशुद्धि होईपर्यंतच पाहिजे, त्यानंतर नको. संन्यासमार्गी टीकाकार म्ह० शंकराचार्यादि यांच्या ग्रंथांचा परिणाम प्रस्तुत शास्त्रीय वाङ्मयावर इतका विलक्षण झाला कीं, त्यांच्या पूर्वीची एकही टीका किंवा ग्रंथ उरला नाहीं. मग या संकल्पांतील 'योगशास्त्र' हा शब्द संन्यासमार्गाला जर रहस्यकार समजतात तितका घातक असता तर तो संकल्पांत राहूं तरी शकला असता काय? तो शब्द संन्यासमार्गाला–वेदान्तशास्त्राला जर प्रतिकूल वाटला असता तर आचार्यांनीं त्याबद्दल कांहींच लिहिले नसते काय? तात्पर्य गीतारहस्यांत रहस्यकारांनीं अशीं अनेक भ्रामक मतें प्रतिपादिलीं आहेत. त्यांचें आम्ही ठिकठिकाणीं आविष्करण करूं.

# अध्याय दुसरा.

## सांख्ययोग.

**संजय उवाच**—संजय म्हणाला—

**तं तथा कृपयाऽऽविष्टमश्रुपूर्णाकुलेक्षणम् ।**
**विषीदन्तमिदं वाक्यमुवाच मधुसूदनः ॥ १ ॥**

**अन्वयार्थ—मधुसूदनः**—श्रीकृष्ण—**तथा**—वर वर्णन केल्याप्रमाणें—**कृपया आविष्टं**—कृपेनें युक्त झालेल्या—**अश्रुपूर्णाकुलेक्षणं**—ज्याचे नेत्र अश्रूंनी भरले आहेत व त्यामुळें आकुल झाले आहेत अशा—**विषीदन्तं**—खेद करणाऱ्या—**तं**—त्या अर्जुनाला—**इदं वाक्यं**—हें वाक्य—**उवाच**—बोलला. १. ( महाराज ! आपले हे सर्व बांधव या युद्धांत मरणार, असें समजून अर्जुनाच्या मनांत कृपा उत्पन्न झाली; त्याचे नेत्र अश्रूंनी भरून आले व त्यामुळे त्याची दृष्टि आकुल झाली. तेव्हां अतिशय खेद करीत असलेल्या त्याला श्रीकृष्ण असें बोलले. )

**श्रीभगवान् उवाच**—श्रीकृष्ण म्हणाले-

**कुतस्त्वा कश्मलमिदं विषमे समुपस्थितम् ।**
**अनार्यजुष्टमस्वर्ग्यमकीर्तिकरमर्जुन ॥ २ ॥**
**क्लैब्यं मा स्म गमः पार्थ नैतत्त्वय्युपपद्यते ।**
**क्षुद्रं हृदयदौर्बल्यं त्यक्त्वोत्तिष्ठ परंतप ॥ ३ ॥**

**अन्वयार्थ—अर्जुन**—हे अर्जुना !—**इदं अनार्यजुष्टं अस्वर्ग्यं अकीर्तिकरं कश्मलं**—हे श्रेष्ठांनी न अंगीकारलेलें, स्वर्ग न देणारें व अकीर्ति करणारें पाप—**त्वा**—तुला—**विषमे**—या कठीण प्रसंगीं—**कुतः**—कोठून—**समुपस्थितम्**—प्राप्त झालें ? —**हे पार्थ**—हे पार्था !—**क्लैब्यं**—अशा दुर्बलपणास—**मा स्म गमः**—प्राप्त होऊं नकोस.—**एतत्**—हें मानसिक दौर्बल्य—**त्वयि**—तुझ्या ठिकाणीं—**न उपपद्यते**—उचित दिसत नाहीं.—**हे परंतप**—शत्रूंना संताप देणाऱ्या हे अर्जुना !—**क्षुद्रं हृदयदौर्बल्यं**—हें क्षुद्र हृदयाचें दुर्बलपण—**त्यक्त्वा**—टाकून—**उत्तिष्ठ**—ऊठ. २,३. (क्षत्रियश्रेष्ठ अर्जुनाची ही दशा पाहून श्रीकृष्णांना मोठें आश्चर्य वाटलें. स्वधर्माला विसरून एखाद्या प्राकृत मनुष्याप्रमाणें त्यानें असें दीन बनणें, वर्णाश्रमधर्माच्या दृष्टीनें अतिशय वाईट

---

१ रहस्यकार ' कश्मल ' म्ह० काळेबेरें असा अर्थ करितात व पृ. ४४४ वर त्यालाच ' अवदसा ' म्हणतात.

आहे. साक्षात् शंकराशीं झुंझणाऱ्या या वीराची आयत्यावेळीं अशी तारंबळ उडावी हें केव्हांही इष्ट नव्हतें. 'हे सर्व माझे व मी यांचा ' या मोहामुळेंच याची ही अशी दशा झाली आहे, असे जाणून भगवान् मोठ्या खेदानें त्याला म्हणतात—"हे अर्जुना ! हें खूळ तुला याच वेळी कोठून आठवलें? श्रेष्ठ क्षत्रिय अशा मोहांत पडत नाहींत. रणांत येऊन पुनः अशा रीतीनें परत फिरणें फार वाईट. त्यामुळें स्वर्ग प्राप्त होत नाहीं व या लोकीं अपकीर्तिही होते. तूं असा मनानें दुर्बल होऊं नकोस. तुला हे शोभत नाहीं. यास्तव आपल्या मनाची ही दुर्बलता टाकून तूं युद्ध करावयास ऊठ." )

**अर्जुन उवाच**—अर्जुन म्हणाला—

**कथं भीष्ममहं संख्ये द्रोणं च मधुसूदन ।**
**इषुभिः प्रतियोत्स्यामि पूजार्हावरिसूदन ॥ ४ ॥**

**अन्वयार्थ**—हे मधुसूदना!—**अहं**—मी—**संख्ये**—संग्रामांत-लढाईत—**भीष्मं च द्रोणं**—भीष्म व द्रोण यांच्याशीं—**इषुभिः**—बाणांनी—**कथं**—कसा बरें—**प्रतियोत्स्यामि**—लढाई करूं? कारण—**हे अरिसूदन**—हे शत्रुनाशका! **तौ**—ते दोघेही—**पूजार्हौ**—पूजा करण्यास योग्य आहेत. ४.

**गुरूनहत्वा हि महानुभावाञ्छ्रेयो भोक्तुं भैक्ष्यमपीह लोके ।**
**हत्वाऽर्थकामांस्तु गुरूनिहैव भुञ्जीय भोगान्रुधिरप्रदिग्धान् ५**

**अन्वयार्थ**—**महानुभावान्**—अति प्रभावशाली—**गुरून्**—गुरुंना—**अहत्वा**—न मारून—**हि इह लोके**—या इह लोकीं—**भैक्ष्यं अपि**—भिक्षान्नही—**भोक्तुं**—खाणें—**श्रेयः**—श्रेयस्कर आहे.—**तु**—पण तेच—**गुरून्**—या गुरूंस—**हत्वा**—मारून—**इह एव**—या लोकींच—**रुधिरप्रदिग्धान्**—रक्तानें माखलेल्याप्रमाणें निंद्य असलेल्या—**भोगान् अर्थकामान्**—अर्थ व काम याच भोगांस—**भुञ्जीय**—मी भोगीन. ५. शिवाय—

**न चैतद्विद्मः कतरन्नो गरीयो यद्वा जयेम यदि वा नो जयेयुः**
**यानेव हत्वा न जिजीविषामस्तेऽवस्थिताः प्रमुखे धार्तराष्ट्राः**

**अन्वयार्थ**—**नः**—आम्हां पांडवांना युद्ध करणें व भिक्षान्न खाणें या दोहोंतील—**कतरत्**—कोणतें एक—**गरीयः**—अधिक चांगलें आहे—**एतत्**—हे—**न विद्मः**

---

१ क्लैब्यं म्ह० हृदयदौर्बल्य, असे भगवान् स्वतःच म्हणत आहेत. पण अगदीं सरळ अर्थ करणाऱ्या रहस्यकारांनीं त्याचा 'नामर्द' व 'हिजडेपणा' (गी. र. पृ. ४४४ पहा.) असा सरळ अर्थ केला आहे. पण रहस्यकारांच्या मतें आत्मज्ञानी असलेल्या अर्जुनाला असें म्हणणे उचित दिसत नाहीं ! पृ. ४४४ वर पुनः ' भागुबाईप्रमाणे ' असें म्हटलें आहे.

—आम्ही जाणत नाही.—**यत् वा**—किंवा—**जयेम**—आम्ही यांना जिंकूं—**यदि वा**—अथवा—**नः**—आम्हांला—**जयेयुः**—हे कौरव जिंकतील—**एतत् न विद्मः**—हें जाणत नाही—**यान् एव**—ज्या दुर्योधनादि बंधूंनाच—**हत्वा**—मारून—**न जिजीविषामः**—आम्ही जिवंत राहण्याची इच्छा करणार नाही—**ते धार्तराष्ट्राः**—ते धृतराष्ट्राचे पुत्र—**प्रमुखे**—आमच्या सन्मुख—**अवस्थिताः**—उभे राहिले आहेत. ६

---

१ याचा अर्थ रहस्यकारांनी " आम्ही जय मिळवावा किंवा आम्हास (त्यांनी) जिंकावे, या दोहोंपैकी आम्हांस श्रेयस्कर कोणते हेही कळत नाही. " असा केला आहे, पण आम्ही युद्ध करून या श्रेष्ठांना मारावे की सन्यास करून भिक्षान्न खाऊन निर्वाह करावा, असे दोन पक्ष वरील ( ५ व्या ) श्लोकांत प्रकृत आहेत. यास्तव त्यांतील 'गरीयः' अधिक गुरु-श्रेष्ठ-चांगले-श्रेयस्कर कोणते ते आम्हांला कळत नाही. तसेच, युद्ध केले तरी यश आम्हालाच मिळेल, अशीही खात्री नाही. बरे, जरी आम्हालाच जय मिळाला तरी दुर्योधनादिकांना मारल्यावाचून तो मिळणे शक्य नाही. पण ज्याना मारून आम्ही जिवत राहण्याची इच्छाच करीत नाही, इतके जे आम्हाला प्रिय असलेले आप्त-संबंधी-प्रत्यक्ष आमचे बधु तेच हे आमच्या समोर लढण्यास उभे आहेत. असा त्याचा अर्थ आम्ही आनंदज्ञानादि अद्वैती टीकाकारांच्या टीकांप्रमाणे करतो. यांतील सयुक्तिक कोणता ते वाचकांनीच ठरवावे. ' आम्ही जय मिळवावा की त्यांनी आम्हास जिंकावे, ' हेही न कळण्याइतका मूर्ख अर्जुन होता, असे आम्हाला वाटत नाही. साधारण मनुष्यालाही जय आपलाच व्हावा, शत्रूचा होऊ नये हे जर कळते, तर ते अर्जुनासारख्याला कसे कळणार नाही ? युद्ध करून गुरूना मारावे की निवृत्तिमार्गी होऊन भिक्षान्न खावे, यांतील श्रेयस्कर कोणते, ते मात्र त्याला न समजणे शक्य होते. तसेच ' अनित्यो विजयो युद्धे ' या न्यायाने युद्धात आपला जय होईल की त्याचा, हेही कळण्यास मार्ग नसतो, म्हणून ' आम्ही जय मिळवावा की त्यांनी, हेही कळत नाही, ' असा अर्थ न करता आम्ही वर केला आहे तसाच तो करणे उचित होय.

आपल्या त्या अर्थाचे समर्थन करण्यासाठी रहस्यकारांनी त्यावर अशी टीप दिली आहे—' या श्लोकांत पुष्कळांचे पुष्कळ सुख यासारखी कर्माकर्माचे लाघव-गौरव ठरविण्याची कसोटी उद्दिष्ट असून कोणाचा जय होणे बरे, हे त्याप्रमाणे ठरविता येत नाही, असा एकंदर आशय आहे. ' पण पाश्चात्त्य तत्त्ववेत्त्यांच्या नीतिशास्त्रांतील ' पुष्कळांचे पुष्कळ सुख ' हे तत्त्व गीतेच्या माथी मारण्याची ही खटपट वृथा आहे. 'सर्वभूतहिते रताः' 'साम्यबुद्धि' इत्यादि गीतेच्या वचनांवर इतका भार टाकणे, अयोग्य आहे. आमचे सर्वभूतहितेरतत्व, साम्य किंवा परोपकार निराळा व पाश्चात्त्यांचे ' पुष्कळांचे पुष्कळ सुख ' निराळे, आमचे पारमार्थिक तर त्यांचे लौकिक, आमचे सात्त्विक तर त्यांचे राजस किंवा तामस, आमचे सर्वभूतांचे म्ह० सर्व प्राण्यांचे तर त्यांचे आपल्या देशापुरते किंवा आपल्याच जातीपुरते. त्यामुळे अध्यात्मपर गीतेला पाश्चात्त्य नीतिशास्त्राचे स्वरूप देण्याचा प्रयत्न करणे सर्वथा अयोग्य आहे. यासंबंधी आमचे मित्र रा. यशवंतराव कोल्हटकर यांनी आपल्या 'गीताधर्म अथवा रहस्यखंडन ' या ग्रंथांत पृ. ८१–९२ सविस्तर विचार केला आहे. जिज्ञासूंनी तो अवश्य वाचावा. विस्तारभयास्तव येथे त्यासंबंधाने अधिक कांहीं लिहीत नाही.

**कार्पण्यदोषोपहतस्वभावः पृच्छामि त्वां धर्मसंमूढचेताः ।**
**यच्छ्रेयःस्यान्निश्चितं ब्रूहि तन्मे शिष्यस्तेऽहं शाधि मां त्वां प्रपन्नम्**

**अन्वयार्थ— कार्पण्य-दोष-उपहत-स्वभावः**—कार्पण्य म्हणजे कृपणता, दैन्य, आत्म्याचें स्वरूप न जाणणें, या दोषामुळें ज्याचा स्वभाव-क्षात्रधर्म उपहत-तिरस्कृत-नष्ट झाला आहे व त्यामुळेंच—**धर्मसंमूढचेताः**—धर्माविषयीं-परमात्म्याविषयीं ज्याचें चित्त मूढ झालें आहे, असा—**अहं**—मी—**त्वां**—तुला—**पृच्छामि**—विचारतों.—**यत् निश्चितं श्रेयः स्यात्**—जें निश्चित श्रेय असेल, ज्याच्यापासून परमपुरुषार्थरूप अव्यभिचारी फल प्राप्त होईल—**तत्**—ते—**मे**—मला—**ब्रूहि**—सांग.—

१ रहस्यकार म्हणतात ( पृ. ६१४ ) " धर्माचा म्ह० कर्तव्याचा " पण नुसत्या कर्तव्याचा मोह घालविण्यासाठीं आत्मज्ञानाचा उपदेश करावयास आरंभ करणें अनुचित होय. भगवानांनीं ' अशोच्यान्० ' येथून आत्मज्ञान व त्याचीं साधनें यांच्या उपदेशास आरंभ केला आहे. यास्तव धर्म म्ह० केवल कर्तव्य नव्हे. तर धर्म म्ह० जगाचें धारण करणारा परमात्मा व धर्म म्ह० त्याच्या प्राप्तीचा उपाय, असा व्यापक अर्थच घेतला पाहिजे. त्यावांचून पुढील ग्रंथाची उपपत्ति लागत नाहीं. तसेंच, अर्जुन जर नुसता कर्तव्याविषयींच संमूढ झाला असता तर ' जें निश्चित श्रेय असेल तें सांग, मी तुझा शिष्य आहे. तुला शरण आलेल्या मला उपदेश कर ' असें म्हणावयाचें कारण नव्हतें. अर्जुन येथें निश्चित श्रेय म्ह० मोक्षसाधनच विचारीत आहे, हे भगवानांच्या उपदेशावरून स्पष्ट होत आहे. ' मी तुझा शिष्य आहें ' व ' उपदेश कर ' यांवरूनही येथील प्रश्न मोक्षसाधनांविषयीं आहे, हें स्पष्ट होतें.

याच श्लोकावरील टीपेंत ( पृ. ६१४ ) रहस्यकार पुनः म्हणतात—" ब्रह्माचें ज्ञान करून घेऊन ते या जगांत कसे वागतात येथपासूनच गीतेतील उपदेशास सुरवात आहे. " "भगवान् म्हणतात कीं, जगाच्या रहाटीकडे पाहिलें तर आत्मज्ञानी पुरुषाच्या आयुष्यक्रमणाचे अनादि कालापासून दोन मार्ग चालत आले आहेत, असें दिसून येतें ( गी. ३. ३. ) आत्मज्ञान संपादन केल्यावर शुकासारखे पुरुष संसार सोडून आनंदानें भिक्षा मागतात तर जनकासारखे दुसरे आत्मज्ञानी ज्ञानोत्तरही स्वधर्माप्रमाणे लोकसंग्रहार्थ जगाच्या शेंकडो उलाढालींत आपला वेळ घालवीत असतात. " वगैरे. पण हें सर्व म्हणणें अयोग्य आहे. अर्जुन आत्मज्ञानी असूनही ' धर्मसंमूढचेताः ' झाला, हे म्हणणे अयोग्य आहे. ज्ञानी पुरुषाचें चित्त धर्माविषयीं संमूढ होणें अयोग्य आहे. ज्ञानी कृतकार्य झालेला असतो. त्याचे सर्व संशय नाहींसे झालेले असतात. ( मुंडकभाष्यार्थ पृ. ७९ ) त्यामुळें ' मला निश्चित श्रेय सांग, मी तुला शरण आहे, मी तुझा शिष्य आहें ' असें तो कधींही म्हणत नाहीं. तसेंच, आत्मज्ञानी पुरुषाला ' अशोच्यानन्वशोचस्त्वं ' अ. २ श्लो. ११ व 'एषा तेऽभिहिता सांख्ये बुद्धिर्योगेत्विमां शृणु ' अ. २ श्लो. ३९ असा उपदेश करण्याचें कारणच नसतें. अर्थात् ज्ञानी पुरुषानें जगांत कसें वागावें, येथून गीतेतील उपदेशाला सुरवात आहे, हें म्हणणें भ्रामक आहे. तिसऱ्या अध्यायाच्या तिसऱ्या श्लोकाच्या अर्थाविषयीं व जनकशुकाचार्यांविषयीं खरा प्रकार काय आहे तें पुढें योग्य स्थळीं दाखवूं.

**अहं**—मी—**ते**—तुझा—**शिष्यः**—शिष्य आहे.—**त्वां प्रपन्नं मां**—तुला शरण आलेल्या मला—**शाधि**—तूं उपदेश कर.७.

**न हि प्रपश्यामि ममापनुद्याद्यच्छोकमुच्छोषणमिंद्रियाणां ।**
**अवाप्य भूमावसपत्नमृद्धं राज्यं सुराणामपि चाधिपत्यम् ॥८**

**अन्वयार्थ**—**भूमौ**—या भूलोकीं—**असपत्नं**—शत्रुरहित—**ऋद्धं**—समृद्ध—**राज्यं**—राज्य—**च**—व—**सुराणां अपि**—देवांचेही—**आधिपत्यं**—राज्य—**अवाप्य**—प्राप्त करून—**यत्**—जे—**मम इंद्रियाणां उच्छोषणं शोकं**—माझ्या इंद्रियांना सुकविणाऱ्या शोकाला—**अपनुद्यात्**—घालवील—**तत्**—ते साधन-तो उपाय—**न हि प्रपश्यामि**—मला दिसतच नाहीं. ८. (अर्जुनाने पहिल्या अध्यायाच्या शेवटीं युद्ध न करण्याचा निश्चय केला व तो धनुष्य-बाण टाकून रथांत जाऊन खिन्न मनाने बसला, त्यानंतर भगवानांनी त्याला, 'तुझ्यासारख्या क्षत्रियाला हे शोभत नाहीं, हातात शस्त्र घेऊन मारण्यासाठीं अंगावर धावून आलेल्या प्रत्यक्ष बापाचाही प्रतीकार केला पाहिजे, त्याच्यापासून पराङ्मुख होतां कामा नये, असा तुझा क्षत्रियधर्म आहे,' इत्यादि सुचाविले, पण ते अर्जुनाला पटले नाहीं. तो म्हणाला–"देवा ! पूजेलाच योग्य असलेल्या भीष्मांशी व द्रोणाचार्यांशीं मी बाणांनी कसा लढूं ? ते मोठे पुण्यवान् प्रतापी आहेत. अशा त्या श्रेष्ठाना मारण्यापेक्षा या लोकीं संन्यास घेऊन, भिक्षा मागून, निर्वाह करणेही अधिक चांगले. हे गुरु द्रव्याच्या लोभाने दुर्योधनाच्या पक्षास मिळाले आहेत हे खरे; पण अशा त्या लोभ्याना मारूनही आम्हांला रक्ताने माखलेले–निंद्य अर्थ व काम हेच भोग भोगावे लागतील आणि ते भोगही याच लोकीं मिळतील. परलोकीं या पापाचे, दुःख हेच फल भोगावे लागेल; पण यांना न मारतां यति-आश्रम स्वीकारून भिक्षान्न खाल्यास, येथे सुख होईल व परलोकींही पुण्याचें फल मिळेल. शिवाय युद्ध करणे चांगले कीं त्यापासून निवृत्त होऊन भिक्षान्न खाणे चांगले, यांतील अधिक चांगले काम कोणतें तेही आम्हांला समजत नाहीं. बरें, जरी युद्ध केलें, तरी त्यांत आम्ही त्यांना जिंकूं की, ते आम्हांला जिंकतील, याचाही निश्चय नाहीं. युद्धांत जरी आमचा विजय झाला, तरी ज्यांना मारून आम्हांला या जगांत जिवंत राहण्याची इच्छा करणेंही उचित नाहीं, तेच धृतराष्ट्राचे–आमच्या चुलत्याचे–पुत्र आमच्या सन्मुख येऊन उभे राहिले आहेत." ज्याला धनाचा थोडामुद्धां खर्च करवत नाहीं त्याला कृपण म्हणतात. देहादिकांना आत्मा–मी असें समजणारा, हाही त्या प्रसिद्ध

---

१ पहिल्या अध्यायातील विषाद व येथील हे वचन यावरून अर्जुनाचा शोक व मोह स्पष्ट होतो. शोकनिवृत्तीसाठी आत्मज्ञानाचा उपदेश केला जातो व आत्मज्ञानानतर शोक होत नाहीं, हे उपनिषदांत स्पष्ट सांगितलेले आहे. छान्दोग्यांत 'नारदाचा शोक घालविण्यासाठीं सनत्कुमारांनी ब्रह्मोपदेश केला आहे.' ईशावास्यात व बृहदारण्यकांत सर्व भूतांतील आत्मा एक आहे असे ज्ञान झाल्यावर शोक व मोह होत नाहींत' असे वर्णन आहे. छान्दो.भाष्यार्थ पृ. ५१७. ईशोप.भाष्यार्थ पृ. २२. बृहदा. भाष्यार्थ अ.४, पृ.१७०-१७९-३६२ पहा. काठकभाष्यार्थ पृ. ६५.

कृपणाप्रमाणें देहादि अनात्म्याची थोडीसुद्धां हानि सहन करीत नाहीं. म्हणून येथें आत्म्याला न जाणणें, हेंच कार्पण्य आहे. अर्जुन म्हणतो-"आत्म्याचें ज्ञान नसणें या दोषामुळें माझा शौर्य-तेज इत्यादि क्षात्र स्वभाव पराभूत झाला आहे. किंवा दैन्यानें माझा स्वभाव-चित्त दूषित झालें आहे. त्यामुळेंच मी धर्म व अधर्म यांचा विचार करण्यास समर्थ नाही. किंवा धर्म म्ह. परमात्मा ( काठकभाष्यार्थ पृ. २७-२८ पहा ) त्याविषयीं माझें चित्त अगदीं मूढ-विवेकहीन झालें आहे. म्हणून हे कृष्णा! मी तुला विचारितों, ज्याच्यायोगानें माझें निश्चित श्रेय होईल-नित्य कल्याण होईल तें मला सांगा" निश्चित म्ह. साधनाच्या अनुष्ठानानंतर अवश्य प्राप्त होणारें व कधी नाश न पावणारें, असें श्रेय म्ह. एक मोक्षच आहे. त्याला 'निःश्रेयस' असे म्हणतात. "मला या लोकचे राज्य नको, त्रैलोक्याचें राज्य नको, तर निःश्रेयस-मोक्ष पाहिजे आहे. तो कशानें मिळेल तें सांग." ( पण निःश्रेयसाचें साधन पुत्र किंवा शिष्य यांवांचून कोणाला सांगूं नये असे उपनिषदांत सांगितलें आहे. तेव्हां तें मी तुला कसें सांगूं? म्हणून म्हणशील तर ) "मी तुझा शिष्य आहे. तुला शरण आलों आहें. यास्तव मला मोक्षाच्या साधनाचा उपदेश कर. कारण मला या लोकचें निष्कंटक-शत्रुरहित राज्य मिळालें किंवा देवांचें इंद्रत्व जरी मिळालें, तरी त्यानें माझा हा शोक कमी होणार नाहीं. ज्याच्यामुळे तो जाईल असे मला कांहीं दिसत नाही. यास्तव माझ्या या शोकाचा नाश होण्यासाठीं मला निःश्रेयसाचें-मोक्षाचें साधन सांग." )

**संजय उवाच**—संजय म्हणाला—

**एवमुक्त्वा हृषीकेशं गुडाकेशः परंतप ।**
**न योत्स्य इति गोविंदमुक्त्वा तूष्णीं बभूव ह ॥९॥**

**अन्वयार्थ—परंतप**—हे राजन्!—**गुडाकेशः**—अर्जुन—**हृषीकेशं**—कृष्णाला—**एवं उक्त्वा**—असें बोलून—**च**—व पुनः—**न योत्स्ये**—मी युद्ध करणार नाही,—**इति**—असें—**गोविंदं**—त्या गोविंदाला—**उक्त्वा**—सांगून—**तूष्णीं**—गप्प—**बभूव ह**—बसला-मुकाट्यानें बसला. ९. ( अर्जुन श्रीकृष्णाला असें बोलून 'मला निश्चित श्रेय साग-मी तुझा शिष्य आहें, मला उपदेश कर' अशी प्रार्थना करून व पुनरपि 'मी कांहीं झालें तरी युद्ध करणार नाहीं' असा आपला निश्चय व्यक्त करून रथांत मुकाट्यानें बसला. तेव्हां—)

**तमुवाच हृषिकेशः प्रहसन्निव भारत ।**
**सेनयोरुभयोर्मध्ये विषीदन्तमिदं वचः ॥ १० ॥**

**अन्वयार्थ—हे भारत**—हे धृतराष्ट्रमहाराजा!—**हृषीकेशः**—श्रीकृष्ण—**उभयोः सेनयोः मध्ये**—दोन्ही सैन्यांच्या मध्यें—**विषीदन्तं तं**—खेद करणाऱ्या त्या अर्जुनाला—**प्रहसन् इव**—जणुं काय हंसतच—**इदं वचः**—हें वचन—**उवाच**—बोलला.

**'दृष्ट्वा तु पाण्डवानीकम्' इत्यारभ्य 'न योत्स्य इति गोविन्दमुक्त्वा तूष्णीं बभूव ह' इत्येतदन्तः प्राणिनां शोकमोहादिसंसारबीजदोषोद्भवकारणप्रदर्शनार्थत्वेन व्याख्येयो ग्रन्थः ॥**

**भाष्यार्थ—दृष्ट्वा तु पाण्डवानीकं**—(अ. १ श्लो. २) पांडवांचें सैन्य पाहून **—इति आरभ्य**—येथून आरंभ करून**—न योत्स्ये इति गोविन्दं उक्त्वा**—मी युद्ध करणार नाहीं, असें गोविंदाला सांगून**—तूष्णीं बभूव ह**—अर्जुन मुकाट्यानें बसला, (अ. २ श्लो. ९)**—इति एतत्-अन्तः ग्रन्थः**—येथपर्यंतचा ग्रंथ [गीताग्रंथाचा भाग]**—प्राणिनां**—प्राण्यांच्या**—शोकमोहादिसंसारबीजभूतदोष-उद्भवकारणप्रदर्शनार्थत्वेन व्याख्येयः**—शोक-मोह-इत्यादि जो संसाराचा बीजभूत दोष त्याच्या उत्पत्तीचे कारण-अहं-ममाभिमान व अज्ञान यांचे प्रदर्शन करण्यासाठीं आहे, असें त्याचें व्याख्यान करावें. [पहिल्या अध्यायाच्या दुसऱ्या श्लोकापासून दुसऱ्या अध्यायाच्या नवव्या श्लोकाच्या अखेरपर्यंत जो गीताग्रंथाचा भाग आहे तो प्राण्यांच्या दुःखरूप संसाराचे कारण कसें उद्भवतें तें दाखविण्यासाठीं आहे. शोक, मोह, लोभ इत्यादि दोष हेंच संसाराचे बीज आहे. ते दोष आत्म्याच्या स्वरूपाचे अज्ञान, व त्यामुळें 'देहच मी' हा अहंकार व देहसंबंधी स्त्री-पुत्र-मित्र-वित्त इत्यादि हे माझे, असें वाटणें हें ममत्व यांमुळें उद्भवतात. शोक म्हणजे मनाचा संताप व मोह म्हणजे अविवेक. त्यामुळे दुःख देणारा संसार उत्पन्न होतो. पण त्या शोक-मोहाचे कारण 'मी व माझें' आहे, असें दाखविण्यासाठीं हा वरील गीताभाग आहे, असें त्याचें व्याख्यान करावें. वरील ग्रंथ हा गीतेचा मुख्य उपदेश नव्हे, तो फक्त गीताशास्त्राच्या प्रवृत्तीचें कारण सांगणारा आहे. अर्जुनाला अहं-ममाभिमानामुळे शोक व मोह झाला, म्हणून भगवानांना त्याला शोक-मोह घालविणारें आत्मज्ञान योगासह-साधनासह सांगावें लागलें, असें यांत सांगितले आहे. अर्थात् हा भाग विशेष महत्त्वाचा नसल्यामुळें आचार्यांनीं त्यावर शब्दशः विवरण-भाष्य केले नाहीं. फक्त त्याचा संबंध दाखविला आहे. आनंदज्ञानादि टीकाकारांनीं त्यावर टीका लिहिली आहे.]

---

१ पण रहस्यकार म्हणतात—"गीतेच्या पुढील अध्यायातून जें विवेचन आहे ते पहिल्या अध्यायांत अर्जुनास आलेल्या शंकांची निवृत्ति करण्यासाठीं आहे, हे लक्षात ठेवले म्हणजे गीतेचे तात्पर्य काय याबद्दल शंका रहात नाहीं. भारती युद्धांत एकाच राष्ट्रांतील व धर्मांतील लोकांमध्ये दुफळी होऊन ते परस्पर वधार्थ उद्युक्त झालेले असल्यामुळें या शंका उद्भवल्या आहेत." ६१०. पण हें म्हणणें बरोबर नाहीं. कारण पहिल्या अध्यायात अर्जुनानें भगवानांस एकहि शंका विचारलेली नाहीं. फक्त या युद्धाचे किती अनिष्ट परिणाम होतील हें दाखविलें आहे. 'या युद्धानें आमचा कुलक्षय होईल, कुलक्षय झाला असतां म्ह० कुलांतील वीर पुरुष मेले असतां अधर्म वाढेल, कुलस्त्रिया दूषित होतील, स्त्रिया दुष्ट झाल्या असतां वर्णसंकर होईल व संकर नरकाला कारण होतो' असें म्हटले आहे. अर्जुनाच्या या म्हणण्याला 'शंका' हें नांव दिल्यास भगवानांचें त्यांवर लागलेच समाधान पाहिजे होतें. पण तें सबंद गीतेंत कोठेंहि नाहीं, शिवाय अर्जुनाचे इतर प्रश्न किंवा शंका गीतेंत अगदीं स्पष्ट

**तथा ह्यर्जुनेन राज्यगुरुपुत्रमित्रसुहृत्स्वजनसंबन्धिबान्धवेष्वहमेषां ममैत इत्येवंप्रत्ययनिमित्तस्नेहविच्छेदादिनिमित्तावात्मनः शोकमोहौ प्रदर्शितौ 'कथं भीष्ममहं संख्ये' इत्यादिना ॥ शोकमोहाभ्यां ह्यभिभूतविवेकविज्ञानः स्वत एव क्षात्रधर्मे युद्धे प्रवृत्तोऽपि तस्माद्युद्धादुपरराम । परधर्मं च भिक्षाजीवनादिकं कर्तुं प्रववृते ॥**

**भाष्यार्थ—तथा हि**—तो कसा तें पहा—**अर्जुनेन**—अर्जुनानें—**कथं भीष्ममहं संख्ये इत्यादीना**—'कथं भीष्मं०'२-४इत्यादि श्लोकाने—**राज्य-गुरु-पुत्र-मित्र-सुहृद्-स्वजन-संबंधि-बान्धवेषु**—राज्य, गुरु, पुत्र, मित्र, सुहृद्, स्वजन, संबंधी व बांधव यांच्याविषयीं—**अहं एषां मम एते**—मी यांचा व हे माझे—**इति एवं प्रत्ययनिमित्तस्नेहविच्छेदादिनिमित्तौ**—अशा प्रकारचा जो प्रत्यय-समजूत-भावना तिच्यामुळे त्यांजवरील स्नेह, त्यांच्याशीं होणारा वियोग इत्यादि कारणांनी होणारे जे—**आत्मनः शोकमोहौ**—आपले शोक-मोह ते—**प्रदर्शितौ**—प्रदर्शित केले. [ अर्जुनाने आपला शोक व मोह 'कथं भीष्मं अहं०' अ. २ श्लो. ४ या वचनानें प्रदर्शित केला. तो त्याचा शोक व मोह राज्य-गुरु वगैरे हे सर्व माझे व मी त्यांचा, या समजुतीमुळें उत्पन्न झालेला होता. कारण हा मी व हे माझे या भावनेमुळे त्यांच्यावर प्रेम जडलें होते.त्यांचा वियोग होईल ही कल्पना प्रेमामुळे त्याला असह्य झाली. म्हणून शोक व मोह झाला. शोक व मोह हेच दुःखरूप संसाराचे निमित्त-कारण आहे.राज्य म्हणजे राजाचें प्रजारक्षणादि कर्म, गुरु म्हणजे आदराला योग्य असलेले भीष्मादिक, पुत्र म्हणजे अभिमन्यु, प्रतिविध्यादिक, दुर्योधनपुत्र लक्ष्मण वगैरे,गुरुपुत्र-अश्वत्थामा वगैरे मित्र,श्रीकृष्णासारखे सुहृद् ,दुर्योधनादिक स्वजन,द्रुपद,विराट,शल्य वगैरेसंबंधी व दूरदूरचे आप्त-बांधव.] —**शोकमोहाभ्यां हि अभिभूतविवेकविज्ञानः**—आणि शोक-मोहांच्या योगानें ज्याचे विवेकविज्ञान अभिभूत म्ह. पराभूत झाले आहे, असा तो अर्जुन—**स्वतः एव क्षात्रधर्मे युद्धे प्रवृत्तः अपि**—स्वतःच आपल्या-स्वाभाविक इच्छेने-कोणाच्या उप-

---

दाखविल्या आहेत. जसे-'यच्छ्रेयः स्यात् ... तद्ब्रूहि' २-७ 'तदेक वद' अ.३,२ 'अथ केन प्रयुक्तः पापं चरति ?' ३,३६ 'अपरं भवतो जन्म ... ...कथ एतद्विजानीयाम्' ४,४ 'कच्चिन्नोभयविभ्रष्टः' ६,३८ 'एतन्मे संशय कृष्ण०' ६,३९ 'किं तद्ब्रह्म०-'८,१.इत्यादि भगवानांची उत्तरे किंवा समाधानंही लागलीच त्या त्या प्रश्नाच्या मागोमाग आहेत. पहिल्या अध्यायांत तशा प्रकारचे प्रश्न किंवा शंका तर नाहींतच पण त्यांची उत्तरेंही पुढे दिलेली नाहींत. उलट 'तूं पंडितांच्या गोष्टी मात्र सांगतोस' असें म्हणून त्याचे म्हणणे प्रवृत्तिशास्त्राला सोडून मुळीच नाहीं, असें भगवानांनीच कबूल केले आहे. पहिल्या अध्यायांत अर्जुनाच्या शंकाच जर असत्या तर भगवानांनी त्यांचें समाधान केलें असतें. 'तू एकीकडे अशोच्यांविषयीं शोक करतोस व दुसरीकडे तत्त्ववेत्त्यांच्या गोष्टी सांगतोस.पण तत्त्ववेत्ते जिवत किंवा मृत आप्तांविषयीं शोक करीत नाहींत; तूं शोक करीत आहेस, म्हणून तू तत्त्वज्ञांच्या गोष्टी जरी बोलत असलास तरी खरोखर तत्त्वज्ञ नाहींस,' २,११ असे म्हटलें नसते. अर्थात् अर्जुन तत्त्वज्ञ जरी नसला तरी त्यानें जे पूर्वी म्हटलें आहे, तें खोटें नव्हे. तें पंडितांचेंच म्हणणें आहे, हें उघड होते.

देशावांचून-क्षत्रियांचा धर्म असे जें युद्ध त्यांत जरी प्रवृत्त झाला होता तरी—**तस्मात् युद्धात् उपरराम**—त्या युद्धापासून निवृत्त झाला—**च परधर्मे भिक्षाजीवनादिकं कर्तुं प्रववृते**—आणि परधर्म जें भिक्षाजीवन वगैरे तें करावयास प्रवृत्त झाला. [ शोक व मोह, यांच्या योगानें अर्जुनाचें विवेकविज्ञान नष्ट झालें. त्यामुळे तो कोणाच्या सांगण्यावांचूनच स्वयं प्रेरणेनेंच स्वधर्मांत म्ह० युद्धांत जरी प्रवृत्त झाला होता—युद्ध हा क्षात्रधर्म आचरण्यास जरी तयार झाला होता तरी त्या स्वधर्मभूत युद्धापासून परतला. धनुष्य टाकून व ' मी लढणार नाहीं ' असे म्हणून, ते सोडून स्वस्थ बसला व परधर्म म्ह० ब्राह्मणांचा धर्म असें जें भिक्षान्न खाऊन शरीराचें रक्षण करणें, सर्वकर्मसंन्यासरूप पारिव्राज्य, आत्म्याचें ध्यान, ते करण्यास तयार झाला. यावरून भिक्षान्न सेवन करणें, सर्व कर्मांचा संन्यास करणें, आत्मध्यानरूप योगाभ्यास करणें हा ब्राह्मणांचा धर्म आहे, क्षत्रियांचा नव्हे, पण अर्जुन शोकमोहांनीं व्याकुळ होऊन स्वधर्म टाकून परधर्म स्वीकारण्यास तयार झाला होता, हे सिद्ध झाले. ]

---

१ पण रहस्यकार—" जो पहावा तो गीतेचा उपक्रम म्हणजे पहिला अध्याय आणि शेवटचा उपसंहार व फल यांकडे दुर्लक्ष करून " ( २७ ) इत्यादि म्हणतात. तसेच, त्यांनी पहिल्या ' विषयप्रवेश ' या प्रकरणात [ पृष्ठ २१–२७ ] व चवदाव्या ' गीताध्यायसंगति ' या प्रकरणांत ( पृ. ४४१–४७ ) पहिल्या अध्यायाचे महत्त्व सविस्तर वर्णिले आहे. त्यांच्या मतें पहिला अध्याय हा उपक्रम आहे व अठरावा अध्याय हा उपसंहार आहे. अर्जुनाने युद्ध केले हे फळ आहे. ( २६ ) " भयंकर कुलक्षय होणार हे डोळ्यापुढे दिसत असतांनाही युद्ध करावे का न करावे आणि करावें म्हटल्यास पाप न लागता कसे करावे, हाच त्याचा मुख्य प्रश्न होता आणि कितीही लटपट केली तरी " निष्कामबुद्धीने युद्ध कर " किंवा ' कर्म कर ' असे या प्रश्नाचे म्हणजे मुख्य मुद्याचेच जे उत्तर ते ' अर्थवाद ' म्हणून कधीही उडवून टाकतां येत नाहीं. " इत्यादि.

पण हें म्हणणें मुळींच सयुक्तिक नाहीं; व ते यथार्थही नाहीं. कारण रहस्यकारांनी सर्व प्राचीन टीकाकारांना तुच्छ करून व जणुं काय त्याना मीमांसा म्हणजे काय हें माहीत नसून आपल्यालाच ते शास्त्र यथावत् अवगत आहे, असे मानून उपक्रमोपसंहार दाखविण्याचा जरी प्रयत्न केला आहे तरी तो प्रामादिक आहे, असे आम्ही समजतो. गीतारहस्य ग्रंथांतील शास्त्रीय दोषच जर दाखवूं लागले तर ते इतके असंख्य आहेत की, त्या सर्वांचें आविष्करण करून ते खरोखरीच दोष आहेत, असें सप्रमाण सिद्ध करावयाचे झाल्यास गीतारहस्या एवढाच दुसरा ग्रंथ होईल. पण तेवढा उपद्व्याप करण्याचें कांहीं कारणही नाहीं व त्याचा कांहीं उपयोगही नाहीं. तथापि ज्या अर्थी रहस्यकारांनी केवळ स्वतःच्या दोषदृष्टीमुळें संन्यासमार्गीयांवर वारंवार दोषारोप करण्याचा यत्न बुद्धिपुरःसर केला आहे त्याअर्थी त्यांचे कांहीं प्रमाद तरी व्यक्त करणें भाग आहे.

रहस्यकार [ पृष्ठ २१ ] उपक्रम व उपसंहार ही दोन तात्पर्यनिर्णयलिंगें मानून एकंदर लिंगांची संख्या सात समजतात. पण मीमांसक उपक्रम व उपसंहार मिळून एकच लिंग मानतात. म्हणजे त्यांनी तात्पर्यलिंगें सहाच मानलेली आहेत व तें सयुक्तिकही आहे.

कारण ग्रंथाचे किंवा प्रकरणाचें तात्पर्य नुस्त्या उपक्रमावरून ठरवितां येत नाही व नुसता उपक्रम हें तात्पर्यलिंगही होऊं शकत नाहीं. तर उपक्रम व उपसंहार यांचें ऐक्य हें एक तात्पर्यलिंग आहे. पण रहस्यकारांना याची कल्पनाच नाहीं, असें मोठ्या खेदानें म्हणावें लागतें. कारण ते [ पृष्ठ २१ ] उपक्रम व उपसंहार म्हणजे ग्रंथाचा आरंभ व शेवट एवढेंच समजतात व त्यांचें त्यांनीं असें स्पष्टीकरण केलें आहे. " कोणीही झाला तरी तो मनामध्यें कांहीं विशिष्ट हेतु धरून ग्रंथ लिहिण्यास सुरवात करतो आणि सदर विशिष्ट उद्देश सिद्ध झाल्यावर ग्रंथ समाप्त करतो. म्हणून ग्रंथाचा उपक्रम व उपसंहार ग्रंथतात्पर्यनिर्णयाचे कामी प्रथम लक्षात घेतले पाहिजेत," अर्थात् उपक्रम म्हणजे आरंभ असें जरी अगोदर म्हटलं आहे तरी पुढे त्याचा अर्थ–विशिष्ट हेतु धरून ग्रथाला सुरवात करणे व तो हेतु सिद्ध झाल्यावर तो समाप्त करणे–असा व्यक्त केला आहे.

परंतु उपक्रम व उपसंहार याचे हेच अर्थ घेतल्यास ते तात्पर्यलिंग कसे होतात ? कारण ज्या प्रतिपाद्य विषयानें आरंभ त्याच विषयाचा उपसंहार केला, तरच या प्रकरणाचें हेंच प्रतिपाद्य आहे, कारण त्याचा आरंभ या अमुक विषयानें केला आहे व उपसंहारही त्याचाच केला आहे, असें दाखवून जिज्ञासूंची खात्री करून देतां येते. आपण जेव्हां एखादा लेख लिहूं लागतो किंवा व्याख्यान द्यावयास उभे राहतो, तेव्हांहि आपल्या प्रतिपाद्य विषयाचाच आरंभीं उल्लेख करतो व तो लेख किंवा व्याख्यान संपवितांना त्याचाच उपसंहार करतों आणि असे केलें तरच तो लेख किंवा ते व्याख्यान सुसंगत झालें, असें श्रोते समजतात. पण गीतारहस्यकारांनीं वर गीतेचा जो उपक्रम दाखविला आहे त्याहून उपसंहार अगदीं भिन्न आहे. गीतेचा पहिला अध्याय हा गीताशास्त्राचा उपक्रम आहे, असें म्हटल्यास ' अर्जुनाची युद्धपराङ्मुखता ' अथवा ' अर्जुनविषाद ' हा उपक्रम ठरतो व त्याने ' नष्टोः मोहः स्मृतिर्लब्धा ... करिष्ये वचनं तव ' असे म्हणून भगवान् सांगतील ते करावयास तयार होणे अथवा अर्जुनाच्या विषादाचा नाश, हा उपसंहार ठरतो. परंतु हे दोन्ही एक नाहीत. तर एकमेकांच्या अगदीं विरुद्ध आहेत. शिवाय पहिला अध्याय हा कांहीं गीता सांगणाऱ्या श्रीकृष्णांचा ग्रंथ नव्हे, तर महाभारतकारांचा आहे. महाभारतकार गीतोपदेशक नव्हेत ही गोष्ट प्रत्येकाला कबूल केलीच पाहिजे. पहिल्या अध्यायांत गीतोपदेशाचें कारण दाखविले आहे. पण कारणाला उपक्रम ह्मणणें सर्वथा अयुक्त आहे. 'ग्रंथकार विशिष्ट उद्देश धरून ग्रंथ लिहिण्यास आरंभ करतो,' हें रहस्यकारांचें ह्मणणें प्रमाण समजून जर विचार केला तर महाभारतकारांनी–अर्जुनाला 'मी व माझा' या अहं-ममाभिमानामुळें प्रसंगी स्वधर्मत्यागाचीही कशी इच्छा झाली, ते दाखविण्यासाठीं गीताप्रकरण आरंभिलें, व शेवटीं भगवानांच्या उपदेशानें त्याच्या अहं-ममाभिमानाची निवृत्ति होऊन तो स्वधर्माचरण करण्यास प्रवृत्त होतांच ते प्रकरण संपविलें, असें होतें,–पण त्यामुळें तो महाभारतकारांचा उपक्रम व उपसंहार झाला. भगवदुक्त गीताशास्त्राचे ते उपक्रमोपसंहार होऊं शकत नाहीत. निदान मीमांसक अशा तऱ्हेचे–बादरायणसंबंधाचे–उपक्रमोपसंहार मानीत नाहीत.

उपक्रमोपसंहारादि सहा तात्पर्यनिर्णयाची लिंगें एकट्या पूर्वमीमांसकांनीच मानलेलीं नाहींत. तर पूर्व व उत्तर या दोन्ही मीमांसकांना तीं एकसारखीच मान्य असून उत्तर मीमांसकांनी म्हणजे वेदान्त्यांनी–संन्यासमार्गीयांनीच–त्यांचा अधिक उपयोग केलेला आढळतो. उत्तरमीमांसा–शारीरक–भाष्य, उपनिषद्भाष्य, शांकरदर्शन, वेदान्तसार, वेदान्त-

परिभाषा इत्यादि सर्व आकर व प्रकरण ग्रंथांत त्यांचा विशेषेंकरून उपयोग केलेला आढळतो. अर्थात् ' संप्रदायप्रवर्तक आचार्यांना हे मीमांसकांचे नियम माहीत असले ... ...तरी दृष्टि एकदा सांप्रदायिक बनली म्हणजे ... ...मीमांसाशास्त्राच्या कांहीं नियमांस बाध आला तरी ... ...त्याचें या टीकाकारांस कांहींच महत्त्व वाटत नाहीं ' [ गीतार. पृ. २३,२४ ] हें म्हणणें वस्तुस्थितीला अगदीं सोडून आहे. निदान श्रीशंकराचार्यांची व त्यांच्या अनुयायांची तरी या तात्पर्यलिंगांवर मोठीच श्रद्धा आहे,असें त्यांच्या ग्रंथांवरून स्पष्ट दिसतें.जसे— वैयासिकन्यायमालाविस्तार पृ. ८ व सर्वदर्शनसंग्रह [ शांकरदर्शन पृष्ठ १५० आनंदाश्रम प्रत ] यांत " लिंगषट्कं च पूर्वाचार्यैर्दर्शितम्— ' उपक्रमोपसंहारावभ्यासोऽपूर्वता फलम् । अर्थवादोपपत्ती च लिङ्गं तात्पर्यनिर्णये ॥' इति । तत्र सदेव सोम्येदमग्र आसीत्—इत्युपक्रमः । ऐतदात्म्यमिदं सर्वं तत्सत्यं स आत्मा तत्त्वमसि श्वेतकेतो इत्युपसंहारः । तयोर्ब्रह्मविषयत्वेनैक्यरूपमेकं लिङ्गं । असकृत्तत्त्वमसीत्युक्तिरभ्यासः । मानान्तरागम्यत्वमपूर्वत्वम् । एकविज्ञानेन सर्वविज्ञानं फलम् । सृष्टि-स्थिति-प्रलय-प्रवेश-नियमनानि पञ्च अर्थवादाः । मृदादिदृष्टान्ता उपपत्तयः । तस्मादेतैर्लिङ्गैर्वेदान्तानां ब्रह्मपरत्वं निश्चेयम् ॥ " असे म्हटले आहे. त्याचा अर्थ—तीं सहा लिंगे पूर्व आचार्यांनीं अशीं दाखविलीं आहेत—१ उपक्रमोपसंहार, २ अभ्यास, ३ अपूर्वता, ४ फल, ५ अर्थवाद व ६ उपपत्ति हे तात्पर्यानिर्णयाचे लिंग आहे. त्यांतील छान्दोग्याच्या सहाव्या अध्यायांतील १ ' सदेव सोम्येदमग्र आसीत्-' म्ह० हे प्रिय शिष्या, हे सर्व जगत् उत्पत्तीच्या पूर्वी 'सत् 'च होतें; हा उपक्रम आहे व 'ऐतदात्म्यमिदं सर्वं०-' हे सर्व एतद्रूप,सद्रूप आहे, ते सत्य आहे, तो आत्मा आहे. हे श्वेतकेतो, ते तूं आहेस, हा उपसंहार आहे. ते–उपक्रम व उपसंहार सद्रूप ब्रह्मविषयक असल्यामुळे त्या दोहोंचे ऐक्यरूप हे एक लिंग आहे. २ वारंवार ' ते तूं आहेस, ' हे सांगणे हा अभ्यास आहे ३ ते सद्रूप ब्रह्म उपनिषद्रूप प्रमाणावाचून दुसऱ्या कोणत्याही प्रमाणाचा विषय होत नाहीं, हेंच त्याचे अपूर्वत्व आहे. ४ एका सद्रूप ब्रह्माच्या विज्ञानानें सर्वविज्ञान हें फळ आहे;५ त्या सत्-ने ईक्षणपूर्वक–विचारपूर्वक सृष्टि करणे, स्थितीचे कारण होणें, प्रलयाचा आश्रय होणे, उत्पन्न केलेल्या कार्यांत–शरीरांत प्रवेश करणे, व नियमन करणें, हे पांच अर्थवाद आहेत व ६ एका मृत्तिकेला जाणले असतां सर्व मृद्विकार जसा ज्ञात होतो त्याप्रमाणें एका सद्रूप ब्रह्माला जाणले असतां सर्व ज्ञात होतें, इत्यादि प्रकारे मृत्तिका, लोखंड, इत्यादिकांचे दृष्टान्त ही उपपत्ति आहे. यास्तव या सहा तात्पर्यलिंगांवरून छान्दोग्याचा सहावा अध्याय सद्रूप ब्रह्मपर आहे, असा निश्चय होतो. छान्दोग्याच्या या–सहाव्या अध्यायाच्या आरंभींही, भगवद्गीतेंतील उपदेशाचें कारण दाखविणाऱ्या ग्रंथाप्रमाणे असा कारणदर्शक ग्रंथ आहे—

पूर्वी एक अरुणपुत्र श्वेतकेतु होता. त्याला त्याचा पिता म्हणाला, " बा श्वेतकेतो, आपल्या कुलगुरूकडे जाऊन ब्रह्मचर्य पाळ–अध्ययन कर. आमच्या कुलांत झालेला पुत्र अध्ययन न करून ब्रह्मबंधूसारखा–अधम ब्राह्मणासारखा–होत नाहीं."तें ऐकून तो त्यावेळी बारा वर्षांचा असलेला श्वेतकेतु गुरुगृहीं गेला व बारा वर्षें तेथे राहून त्यानें वेदाध्ययन केलें. त्यामुळें तो गंभीरमनाचा, विद्वन्मन्य, उद्धट–अनम्रस्वभावाचा होऊन घरी परत आला. तेव्हां त्याची वृत्ति पाहून त्याचा पिता त्याला सद्धर्मविचारांत प्रवृत्त करण्याच्या इच्छेनें म्हणाला, " श्वेतकेतो, तूं असा गंभीरमनाचा, विद्वन्मन्य व अनम्र आहेस खरा, पण तूं

आपल्या आचार्याला तो आदेश–उपदेशगम्य पदार्थ विचारलास का, की ज्याच्या योगानें सर्व अश्रुत–न ऐकलेलें श्रुत होते; अमत न तर्क केलेले, मत होते; सर्व अनिश्चित निश्चित होतें ? " त्यावर श्वेतकेतु ह्मणतो–" भगवन्, तो आदेश कसा आहे ? " पुत्राचा हा प्रश्न ऐकून उद्दालक म्हणाला " ज्याप्रमाणे एका मातीच्या गोळ्याच्या ज्ञानानें सर्व मृन्मय ज्ञात होतें; कारण विकार वाङ्मात्र असून मृत्तिकाच सत्य असते; त्याप्रमाणे तो आदेश आहे. " हें ऐकून श्वेतकेतु म्हणाला " आमच्या गुरूंना तो आदेश माहीतच नव्हता. ते त्याला जाणत नव्हते. जर जाणत असते तर त्यांनी मला त्याचा उपदेश केला असता. बरे, आतां तुम्हीच मला सांगा. " त्यावर बरे आहे, असे म्हणून उद्दालकानें ' सदेव सोम्येदमग्र आसीत्' येथून 'तत्सत्यं स आत्मा तत्त्वमसि श्वेतकेतो ' येथवर पुढील पंधरा खडांत उपदेश केला आहे. (छान्दोग्यभाष्यार्थ अ. ६ पृ. ४१० पहा.) पण येथे पूर्वीच्या कथाभागाला उपक्रम म्हटलेले नाही. तर ' सदेव सोम्य ' या वाक्याला उपक्रम म्हटले आहे. त्याच न्यायानें गीतेच्या पहिल्या अध्यायालाही उपक्रम म्हणणे सर्वथा अशास्त्रीय आहे.

शिवाय उपक्रम नेहमी वाक्याने दाखविला जातो. तो अध्यायाने, अनेक वाक्यांनी किंवा स्वतंत्र प्रकरणाने अथवा कथासदर्भानेहि कधीच दाखविला जात नाही.

रहस्यकारांनी ' अपूर्वता ' म्हणजे नवेपणा असा अर्थ ( पृष्ठ २२ ) सांगितला आहे. पण त्यापेक्षां ' असाधारणत्व-' विशेष–हा अर्थ अधिक शास्त्रीय आहे ह्मणूनच वरील उदाहरणांत ' मानान्तरागम्यत्व '–दुसऱ्या प्रमाणाचा विषय न होणे हे सद्रूप ब्रह्माचे अपूर्वत्व सांगितलें आहे. रहस्यकारांनीही मध्येच एकदा अपूर्वता म्ह० वैशिष्ट्य असे ह्मटले आहे व तें नवेपणा या अर्थापेक्षां चागले आहे.

गीतारहस्याच्या २२--२३ पानांवरील विवेचनांत रहस्यकारांनी अर्थवादाविषयीही असेच अनेक घोटाळे केले आहेत. अर्थवाद व भूतार्थवाद यांची लक्षणे बरोबर सांगितलेली नाहीत, इतकेच नव्हे तर अर्थवाद हे तात्पर्यनिर्णयाचे एक लिंग आहे, असे एकदा म्हणून पुढे ( पृष्ठ २३ ओ. ३ ) " हीं अर्थवादात्मक विधाने सोडून देऊन मग ग्रंथाचे तात्पर्य ठरवीत असतात " असें म्हटले आहे. अगोदर ' अर्थवादात्मक विधाने' हे शब्दच अशास्त्रीय आहेत. ' अर्थवादवाक्ये ' असे म्हणणे उचित होय. कारण अर्थवाद विधाने केव्हांच नमतात. तर ते विहिताची स्तुति व निषिद्धाची निन्दा करणारे असतात, त्यामुळेंच त्यांना 'पोकळ' म्हणणेंही अयुक्त आहे.

सारांश रहस्यकारांनी सदोष सांप्रदायिक दृष्टि सोडून मीमांसकांच्या तात्पर्यनिर्णयालिंगाच्या आधारानें गीतेचें प्रतिपाद्य ठरविण्याचा जरी आग्रह घातला आहे तरी मीमांसकांच्या तात्पर्यलिंगांचा उपयोग बरोबर न करतां आल्यामुळे त्यांचे उपक्रमादिक चुकले आहेत.

पण तेंच आचार्यांच्या भाष्याकडे पहा. त्यांनी वरील भाष्यार्थांत म्हटल्याप्रमाणें छान्दोग्यांतील सहाव्या अध्यायाच्या पहिल्या खंडाप्रमाणेंच गीतेचा पहिला अध्याय व दुसऱ्या अध्यायाचे दहा श्लोक यांना साक्षात् गीताशास्त्र न म्हणतां गीतेच्या उपदेशाचे व शोकमोहादि दोषोद्भवाचे कारण दाखविणारा ग्रंथ म्हणून म्हटलें आहे. अर्थात् आचार्यांच्या मतें पहिला अध्याय उपक्रम नव्हे. दुसऱ्या अध्यायाचा ' न योत्स्य इति गोविन्दमुक्त्वा तूष्णीं बभूव ह ' येथपर्यंतचा भागही उपक्रम नव्हे तर ' अशोच्यानन्वशोचस्त्वं ' हा उपक्रम

**तथा च सर्वप्राणिनां शोकमोहादिदोषाविष्टचेतसां स्वभावत एव स्वधर्मपरित्यागः प्रतिषिद्धसेवा च स्यात् । स्वधर्मे प्रवृत्तानामपि तेषां वाङ्मनःकायादीनां प्रवृत्तिः फलाभिसंधिपूर्विकैव साहंकारा च भवति ॥**

**भाष्यार्थ—तथा च**—आणि अर्जुनाप्रमाणेंच—**शोकमोहादिदोषाविष्टचेतसां सर्वप्राणिनां**—शोक, मोह, मिथ्याभिमान, स्नेह इत्यादि दोष ज्यांच्या चित्तात उद्भवले आहेत अशा सर्व प्राण्यांचा—**स्वभावतः एव**—स्वभावतःच—**स्वधर्मपरित्यागः च प्रतिषिद्धसेवा स्यात्**—स्वधर्माचा त्याग व निषिद्ध असलेल्या आचरणाचें सेवन, हीं होतात.—**स्वधर्मे प्रवृत्तानां अपि तेषां**—आणि ते स्वधर्मामध्येंच जरी प्रवृत्त झालेले असले म्ह० स्वधर्म न सोडतां त्याचेंच आचरण जरी ते करीत असले तरी त्यांच्या—**वाङ्मनः-कायादीनां**—वाणी, मन, शरीर इत्यादिकांची—**प्रवृत्तिः**—प्रवृत्ति—**फलाभिसंधिपूर्विका एव च साहंकारा भवति**—फलाच्या इच्छेनेच व अहंकारयुक्तच होते. [ अर्जुनाप्रमाणेच ज्या दुसऱ्याही लोकांच्या चित्तांत शोक, मोह, देहच मी हा मिथ्याभिमान, हे माझे असा पुत्रादिकांवर स्नेह इत्यादि दोषांचा आविर्भाव होतो ते स्वाभाविकपणेच स्वधर्माचा त्याग करितात व निषिद्ध परधर्माचा स्वीकार करितात. पण शोकादि दोषांनीं युक्त असलेले कित्येक स्वधर्म सोडीत नाहीत. तर त्याचें अनुष्ठान करीत असतात. पण त्या स्वधर्मांत त्यांच्या शरीराची, मनाची व वागादि इंद्रियांची जी प्रवृत्ति होते ती फलाच्या इच्छेनें व ‘ मी या धर्माचा कर्ता आहें ’ अशा अभिमानानें होते. ]

**तत्रैवं सति धर्माधर्मोपचयादिष्टानिष्टजन्मसुखदुःखसंप्राप्तिलक्षणः संसारोऽनुपरतो भवति, इत्यतः संसारबीजभूतौ शोकमोहौ ॥ तयोश्च सर्वकर्मसंन्यासपूर्वकादात्मज्ञानान्नान्यतो निवृत्तिरिति तदुपदिदिक्षुः सर्वलोकानुग्रहार्थमर्जुनं निमित्तीकृत्याह भगवान्वासुदेवः—अशोच्यानित्यादि ॥**

---

आहे व ‘इति ते ज्ञानमाख्यातं’ १८-५६ हा उपसंहार आहे. शांकरभाष्यानुसार गीतारहस्य पृ. ४-५ पहा.

म्हणजे गीताशास्त्राचा उपक्रम ज्ञानानें आहे, आत्मज्ञानाने आहे, सांख्यनिष्ठेनें आहे व उपसंहारही आत्मज्ञानानें व सांख्यनिष्ठेने आहे. कर्मयोगाने उपक्रम नाहीं. यास्तव गीतेचे तात्पर्य आत्मज्ञानांत आहे. गीताशास्त्र निवृत्तिपर आहे; प्रवृत्तिपर नव्हे. अर्जुनाला गीताशास्त्रांत ज्ञानाची अनेक साधनें सांगितली आहेत. त्यातलेंच निष्काम कर्मयोग हें एक आहे; व तें त्याच्या वर्णाला व आश्रमाला उचित असल्यामुळें–त्याच्या अवस्थेला–गीतेंत दाखविलेल्या अवस्थेलाही योग्य असल्यामुळें ‘ तूं कर्मच कर; तूं प्राप्त युद्धच कर; ’ असा उपदेश केला आहे. निष्काम कर्मही गौण संन्यासच आहे; म्हणजे आश्रम संन्यासाने होणारें जें चित्तशुद्धिरूप कार्य तें निष्काम कर्मानुष्ठानहि करूं शकते व साक्षात् कर्माचा जरी नाही तरी कर्मफलाचा, आसक्तीचा व कर्तृत्वाभिमानाचा त्याग त्यातही असतोच. यास्तव अर्जुनालाही गीतेंत निवृत्तीचाच उपदेश केलेला आहे. निष्काम कर्मानुष्ठान हे प्रवृत्त कर्म नव्हे तर निवृत्त कर्म आहे, हें रहस्यकारांनाही संमत आहे. गी. र. पृ. ३५४ पहा.

**भाष्यार्थ—तत्र एवं सति**—आणि त्यांची स्वधर्मप्रवृत्ति फलासाठीं व अभिमानपूर्वक होऊं लागली असतां—**धर्माधर्मोपचयात्**—धर्म व अधर्म यांची वृद्धि झाल्यामुळें—**इष्टानिष्टजन्मसुखदुःखसंप्राप्तिलक्षणः**—इष्ट व अनिष्ट जन्म, सुखदुःखांची प्राप्ति इत्यादि रूप—**संसारः**—संसार—**अनुपरतः भवति**—अविच्छिन्न असतो. संसाराचा विच्छेद-शांति होत नाहीं.—**इति अतः**—म्हणून—**शोकमोहौ संसारबीजभूतौ**—शोक व मोह हे संसाराचे बीजभूत दोष आहेत. [ आणि शोक-मोहांनीं व्याकुळ झाल्यामुळे प्राण्यांचें स्वधर्माचरण फलासाठीं व 'मी यांचा कर्ता' अशा कर्तृत्वाभिमानानें होऊं लागलें असतां धर्म व अधर्म किंवा पुण्य व पाप यांचा संचय होतो. त्यामुळें धर्माचें इष्टजन्म-देवादिकांची उत्तम योनीं प्राप्त होणें-हें फळ मिळतें, व अधर्माचें पशुपक्ष्यादिकांची अनिष्ट योनि प्राप्त होणे, हे फळ मिळतें. इष्ट जन्मांत सुख होतें, अनिष्ट जन्मांत दुःख होते, याप्रमाणे इष्ट-अनिष्ट जन्म प्राप्त होऊन त्यांत सुखदुःखांची प्राप्ति होणें, ( अ. १८ श्लो. १२ ) हाच संसार आहे. अशा प्रकारचा संसार धर्माधर्मांच्या संचयामुळें अनुपरत होतो. तो अविच्छिन्न रहातो. त्याचा प्रवाह सतत चालूच असतो. तो विच्छिन्न होत नाहीं. यासाठीं शोक व मोह हेच संसाराचें बीज-कारण आहे. ] —**च तयोः**—व त्या शोकमोहांचीं—**सर्वकर्मसंन्यासपूर्वकात् आत्मज्ञानात् अन्यतः**—सर्वकर्मसंन्यास करून आत्मज्ञाननिष्ठ झाल्यावांचून दुसऱ्या कोणत्याही उपायानें—**निवृत्तिः न**—निवृत्ति होत नाहीं,—**इति**—म्हणून—**तत् उपदिदिक्षुः**—ते आत्मज्ञान उपदेशिण्याची इच्छा करणारा—**भगवान् वासुदेवः**—भगवान् वासुदेव—**सर्वलोकानुग्रहार्थं**—सर्व लोकांवर अनुग्रह करण्यासाठीं—**अर्जुनं निमित्तीकृत्य**—अर्जुनाला निमित्त करून—**'अशोच्यान्०' इत्यादि आह**—' तूं शोक करण्यास योग्य नसलेल्या भीष्मादिकांविषयीं शोक केलास, ' इत्यादि म्हणतो. [ संसाराचे बीज असे जे शोक व मोह हे दोष त्यांची निवृत्ति सर्वकर्मसंन्यासपूर्वक आत्मज्ञानावांचून दुसऱ्या कोणत्याही उपायानें होत नाहीं. म्हणून त्या संन्यासपूर्वक ज्ञानाचाच उपदेश करण्याच्या इच्छेने भगवान् वासुदेवानें शोकमोहांनी व्याकुळ झालेल्या सर्व लोकावर अनुग्रह करण्यासाठीं अर्जुनाला केवळ निमित्त करून 'अशोच्यान्०' इत्यादि ज्ञानोपदेश करण्यास आरंभ[1] केला आहे. त्या अर्जुनाची या वेळीं जी अवस्था होती तीतच त्याला ज्ञानोपदेश

---

१ छांदोग्याच्या सातव्या अध्यायात छा.भाष्यार्थ पृ. ५१७, नारद सनत्कुमारांस शरण जाऊन म्हणतो–" हे भगवन्, तो मी मन्त्रवेत्ताच म्ह० ऋग्वेदादि सर्व विद्या जाणणाराच आहे. आत्मवेत्ता नाहीं. आपल्या सारख्यांच्या तोंडून मी ऐकलेच आहे कीं, आत्मवेत्ता शोकास उल्लंघितो. हे भगवन्! तो मी अनात्मविद्–आत्म्याला न जाणणारा शोक करतो. तो भगवान् मला शोकाच्या पार नेवो–या शोकसागराच्या पार करो" त्यानंतर सर्व अध्यायांत आत्मज्ञान सांगून शेवटी असे म्हटले आहे–"आहारशुद्धौ सत्त्वशुद्धिः" म्ह० विषयानुभवरूप विज्ञानाची शुद्धि झाली असतां सत्त्वाची–अन्तःकरणाची शुद्धि होते. सत्त्वशुद्धि झाली असतां आत्म्याची ध्रुवा स्मृति–अविस्मरण होतें. तशी अविच्छिन्न स्मृति झाली असतां सर्व हृदयग्रंथींचा सर्वथा प्रमोक्ष होतो. त्या राग-द्वेषादिदोषरहित नारदास भगवान् सनत्कुमार अविद्या-तमा-

करणें इष्ट नव्हतें. तर स्वधर्मानुष्ठानानें चित्तशुद्धि झाल्यावरच तो करणें उचित होतें, म्हणून 'अर्जुनाला निमित्त करून' असें म्हटले आहे. ]

**तत्र केचिदाहुः, सर्वकर्मसंन्यासपूर्वकादात्मज्ञाननिष्ठामात्रादेव केवलात्कैवल्यं न प्राप्यत एव किं तर्ह्यग्निहोत्रादिश्रौतस्मार्तकर्मसहिताज्ज्ञानात्कैवल्यप्राप्तिरिति सर्वासु गीतासु निश्चितोऽर्थ इति ॥ ज्ञापकं चाऽऽहुरस्यार्थस्य—'अथ चेत्त्वमिमं धर्म्यं सङ्ग्रामं न करिष्यसि ' ' कर्मण्येवाधिकारस्ते ' ' कुरु कर्मैव तस्मात्त्वम् ' इत्यादि ॥**

**भाष्यार्थ—तत्र**—पण या गीताशास्त्राचा अर्थ असा निश्चित झालेला असतां—**केचित् आहुः**—कोणी ( ज्ञानकर्मसमुच्चयवादी ) म्हणतात—**सर्वकर्मसंन्यासपूर्वकात् केवलात् आत्मज्ञाननिष्ठामात्रात् एव**—सर्वकर्मसंन्यासपूर्वक केवल आत्मज्ञाननिष्ठेनेच—**कैवल्यं**—केवल आत्मभाव-मोक्ष—**न प्राप्यते एव**—प्राप्त होत नाहीच—**किं तर्हि**—तरमग काय ?—**अग्निहोत्रादिश्रौतस्मार्तकर्मसहितात् ज्ञानात्**—अग्निहोत्रादि श्रौत व स्मार्त कर्मांसहवर्तमान असलेल्या ज्ञानानें—**कैवल्यप्राप्तिः**—मोक्षप्राप्ति होते—**इति**—असा—**सर्वासु गीतासु**—सर्व गीतांमध्यें—**निश्चितः अर्थः**—निश्चित अर्थ आहे—**इति**—असे ते म्हणतात. [ सर्वकर्मसंन्यासपूर्वक केवल आत्मज्ञाननिष्ठारूप धर्माने मोक्षप्राप्ति होत नाही तर अग्निहोत्रादि श्रौतस्मार्त कर्मे व ज्ञान यांचे एकाचवेळीं अनुष्ठान केल्याने मोक्ष मिळतो, असा अर्थ सर्व गीतेंत निश्चित केला आहे. केवल आत्मज्ञानानेंच मोक्ष प्राप्त होतो असें आचार्यांचे मत आणि कर्म व ज्ञान या दोन साधनांनीं मोक्ष मिळतो, नुसत्या ज्ञानानें नाहीं, असें ज्ञानकर्मसमुच्चयवाद्यांचें मत आहे. ] **अस्य अर्थस्य ज्ञापकं च आहुः**—या आपल्या अर्थाला ते—

---

च्या पार असलेले आत्मतत्त्व दाखविता झाला. " ( छां. भाष्यार्थ पृ. ५७२ ) यावरून शोकाची निवृत्ति आत्मज्ञानानें होते, त्यावांचून होत नाही, हे उपनिषत्प्रमाणाने सिद्ध झालें. अर्जुनानेंही ' धर्मसंमूढचेताः ' ' कार्पण्यदोषोपहतस्वभावः ' ' निश्चितं श्रेयः ब्रूहि-' ' अहं ते शिष्यः ' ' प्रपन्नं मा शाधि ' ' इंद्रियाणां उच्छोषण शोक यत् अपनुद्यात् तत् न हि पश्यामि ' इंद्रियाना शुष्क करून सोडणाऱ्या माझ्या शोकाचें निरसन करील असे मला दुसरे कांहीं दिसत नाही. त्रिभुवनाचे राज्य जरी मिळाले तरी माझा शोक जाणार नाही असे म्हटले आहे. अर्जुनाच्या या भाषणात व वरील नारदाच्या भाषणात किती साम्य आहे,ते वाचकांनी अवश्य पहावें व गीतेचा पहिला अध्याय आणि दुसऱ्या अध्यायाचे ९ श्लोक याचा पुढील उपदेशाशी आचार्य सांगतात तसाच संबंध लागतो, की रहस्यकार सांगतात तसा त्याचा संबंध आहे, याचा विचार करावा. ' चित्तशुद्धि झाली असतां आत्म्याची अविच्छिन्न स्मृति होते ' हें छान्दोग्याचें वचन पुढील ' नष्टो मोहः स्मृतिः लब्धा ' अ. १८ श्लो. ७३ या अर्जुनाच्या वचनाशी कसें जुळतें तेंहि वाचकांनी पहावे. शोकनिवृत्तीसाठीं आत्मज्ञान व आत्मज्ञानानें शोकमोहांची निवृत्ति हा सिद्धान्त इतर उपनिषदांवरूनही सिद्ध होतो, पण विस्तारभयास्तव त्यांतील उतारे येथें देत नाही.

१ गीतारहस्यकारांचा पंथ याहून अगदीच भिन्न आहे. ते ज्ञानानेंच मोक्ष मिळतो, असेंही सांगतात, सन्यास व कर्मयोग हे स्वतंत्र मोक्षमार्ग आहेत, असेंही म्हणतात व ज्ञान-

ज्ञानकर्मसमुच्चयवादी गीतेंतीलच प्रमाण सांगतात—**'अथ चेत् त्वं इमं धर्म्यं संग्रामं न करिष्यसि'**—पण जर तूं हा धर्म्य संग्राम न करशील तर स्वधर्म व कीर्ति या दोहींला मुकून पापी होशील,—**'ते अधिकारः कर्मणि एव'**—तुझा अधिकार कर्मा-मध्येंच आहे.—**'तस्मात् त्वं कर्म एव कुरु'**—यास्तव तूं कर्मच कर.—**इत्यादि**—ही व अशींच दुसरी वचनेही ते प्रमाण म्हणून देतात.

**हिंसादियुक्तत्वाद्वैदिकं कर्माधर्मायेतीयमप्याशङ्का न कार्या, कथं क्षात्रं कर्म युद्ध-लक्षणं गुरुभ्रातृपुत्रादिहिंसालक्षणमत्यन्तक्रूरमपि स्वधर्म इति कृत्वा नाधर्माय, तद-करणे च ' ततः स्वधर्मं कीर्तिं च हित्वा पापमवाप्स्यसि ' इति ब्रुवता यावज्जीवादि-श्रुतिचोदितानां पश्वादिहिंसालक्षणानां च कर्मणां प्रागेव नाधर्मत्वमिति सुनिश्चित-मुक्तं भवतीति ॥**

**भाष्यार्थ—हिंसादियुक्तत्वात् वैदिकं कर्म अधर्माय**—हिंसादि दोषांनीं युक्त असल्यामुळे वैदिक कर्म अधर्माला कारण होतें—**इयं अपि आशंका**—ही सुद्धां आशंका—**न कार्या**—करूं नये.—**कथं**—ती कां करूं नये ?—**गुरु-भ्रातृ-पुत्रादि-हिंसालक्षणं**—वडील माणसे, भ्राते, पुत्र इत्यादिकांची हिंसा करणें, या स्वरूपाचें—**युद्धलक्षणं क्षात्रं कर्म**—क्षत्रियाचे युद्धरूप कर्म—**अत्यन्तक्रूरं अपि**—अतिशय क्रूर जरी असले तरी—**स्वधर्मः इति कृत्वा**—स्वधर्म असल्यामुळे—**न अधर्माय**—अधर्माला कारण होत नाहीं.—**तदकरणे च**—उलट ते न केल्यास—**'ततः स्वधर्मं कीर्तिं च हित्वा पापं अवाप्स्यसि'**—त्यामुळें स्वधर्म व कीर्ति या दोहींना मुकून तुला पाप लागेल,—**इति ब्रुवता**—असे सांगणाऱ्या भगवानानें—**यावज्जीवादि-श्रुतिचोदितानां**—यावज्जीव अग्निहोत्र करावे, इत्यादि अर्थाच्या श्रुतींनीं सांगितलेल्या **च पश्वादिहिंसालक्षणानां कर्मणां**—व पशु-आदिकांच्या हिंसारूप कर्मांना—**प्राक् एव**—अगोदरच—**अधर्मत्वं न**—अधर्मत्व नाहीं—**इति सुनिश्चितं उक्तं भवति**—असें अगदीं स्पष्ट व निश्चित सांगितलें आहे, असें होतें—**इति**—असे ते म्हणतात. [ वेदोक्त यज्ञकर्म हिंसा, उच्छिष्ट भक्षण इत्यादिकांनीं युक्त असल्यामुळें ते अधर्माला कारण होतें, अशांही शंका घेऊं नये. कारण गुरु-भ्राते-पुत्र इत्यादिकांची हिंसा करणें एत-द्रूप युद्ध, हे क्षत्रियकर्म अत्यंत क्रूर जरी असलें तरी क्षत्रियांचा तो स्वधर्म आहे. त्या-मुळे तें युद्ध अधर्माला कारण होत नाहीं. इतकेच नव्हे तर उलट तें न केल्यास तूं स्व-

---

कर्मसमुच्चयही मानतात. त्यांचा ज्ञानकर्मसमुच्चय म्हणजे ज्ञानोत्तर लोकसंग्रहार्थ निष्काम कर्में करीत राहणें. पण कर्में कोणती ? अग्निहोत्रादि श्रौतस्मार्त कर्में नव्हेत, तर पत्करलेला धंदा (गी. र. पृ. ६६१ पहा) अर्थात् आचार्यांनीं वृत्तिकारांच्या ज्ञानकर्मसमुच्चयाचें जें खण्डन केले आहे, त्याबद्दल रहस्यकारांस वस्तुतः इतका राग येण्याचें कांहीं कारण नव्हतें. कारण त्यांचा ज्या कर्माविषयीं एवढा आग्रह आहे ती अग्निहोत्रादिक नव्हेत. तर जगाचे व्यवहार होत. ज्ञानी पुरुषाने जगाचे व्यवहार, सांसारिक कर्में आमरणान्त करीत रहावें, हाच आशय गीतेंतून काढण्यासाठीं त्यांनीं हा सर्व खटाटोप केला आहे. (गी. र. पृ. ३०३-४ पहा.)

धर्म व कीर्ति यांना मुकून तुला पाप लागेल, असें सांगणाऱ्या भगवानांनीं 'यावज्जीव अग्नि-होत्र करावें' इत्यादि श्रुतींनीं ज्यांचें विधान केलें आहे, अशा पश्वादिकांच्या हिंसादिरूप कर्मांना मुळीच अधर्मत्व नाहीं, असें अगदीं निश्चितच सांगितलें आहे, असें होतें. ]

**तदसत्,ज्ञानकर्मनिष्ठयोर्विभागवचनाद्बुद्धिद्वयाश्रययोः। अशोच्यानित्यादिना भगवता यावत् 'स्वधर्ममपि चावेक्ष्य' इत्येतदन्तेन ग्रन्थेन यत्परमार्थात्मतत्त्वनिरूपणं कृतं तत्सांख्यं तद्विषया बुद्धिरात्मनो जन्मादिषड्विक्रियाभावादकर्ताऽऽत्मेति प्रकरणार्थनिरूपणाद्या जायते सा सांख्यबुद्धिः सा येषां ज्ञानिनामुचिता भवति ते सांख्याः ॥**

**भाष्यार्थ**—( वृत्तिकारांच्या वरील ज्ञानकर्मसमुच्चयाचें खंडन-)—**तत् असत्**—तें त्यांचें म्हणणें खोटे आहे.कारण—**बुद्धिद्वयाश्रययोः ज्ञानकर्मनिष्ठयोः विभागवचनात्**—दोन बुद्धींचा आश्रय करून असलेल्या ज्ञाननिष्ठा व कर्मनिष्ठा यांचा विभाग सांगितलेला आहे—**भगवता**—भगवानांनीं—**अशोच्यान्० इत्यादिना**—'अशोच्यान्०' अ.२-११येथपासून—**यावत्'स्वधर्मं अपि च अवेक्ष्य'**—२-३१.**इति एतदन्तेन ग्रन्थेन**—'स्वधर्म अपि च अवेक्ष्य'—येथपर्यंतच्या ग्रंथानें—**यत् परमार्थात्मतत्त्व-निरूपणं कृतं**—जें परमार्थ-आत्मतत्त्वाचे निरूपण केले—**तत् सांख्यं**—तें सांख्य,—**प्रकरणार्थनिरूपणात्**—त्या प्रकरणाच्या अर्थाचे निरूपण केल्यामुळे—**आत्मनः**—आत्म्याला—**जन्मादिषड्विक्रियाभावात्**—जन्मादि सहा विक्रियांचा अभाव असल्यामुळें—**आत्मा अकर्ता इति**—आत्मा अकर्ता आहे, अशी—**या तद्विषया बुद्धिः जायते**—जी त्याविषयीं बुद्धि उत्पन्न होते—**सा सांख्यबुद्धिः**—ती सांख्यबुद्धि—**येषां ज्ञानिनां**—ज्या ज्ञानी पुरुषांना—**सा उचिता भवति**—ती बुद्धि उचित असते -जे तत्पर झालेले असतात—**ते सांख्या**—ते सांख्य. [ ब्रह्मज्ञान कर्मासहवर्तमानच आपलें फळ देऊं शकते; एकटेंच ज्ञान मोक्ष देऊं शकत नाहीं. कारण तीं दोन्ही मिळून मोक्षाचे कारण आहेत. असे जें वृत्तिकारांचे अनुमान आहे, तें असत्-बाधित होणारे आहे. कारण,शिंप,दोरी इत्यादि अधिष्ठानाचें ज्ञान झाले म्हणजे भासलेले रुपें,सर्प इत्यादिकांची निवृत्ति होण्यास दुसऱ्या कशाचीही गरज नसते,हें प्रसिद्ध आहे. त्याचप्रमाणें आत्मज्ञान झालें म्ह० भ्रामक संसाराच्या निवृत्तीला दुसऱ्या कशाचीही गरज नाहीं. तसेंच गीताशास्त्रांत ज्ञानकर्मसमुच्चयाचेंच प्रतिपादन आहे, असें जें त्यांचें म्हणणें आहे तेंही सांख्यबुद्धि व योगबुद्धि यांचा आश्रय करून असलेल्या ज्ञाननिष्ठा व कर्मनिष्ठा या दोन निष्ठांचा विभाग सांगितलेला असल्यामुळें योग्य नाहीं. दुसऱ्या अध्यायाच्या ११ व्या श्लोकापासून ३१ व्या श्लोकांपर्यंत भगवानांनीं जें परमार्थ आत्मतत्त्वाचे निरूपण केलें आहे तें सांख्य होय. त्या प्रकरणाच्या अर्थाचा विचार केला असतां त्याविषयीं जी बुद्धि उत्पन्न होते ती सांख्यबुद्धि. जन्म, अस्तित्व, वृद्धि, परिणाम, क्षय व नाश हे सहा विकार प्रत्येक पदार्थाला होतात, पण ते आत्म्याला होत नाहींत, त्यामुळें आत्मा अकर्ता आहे, अशी बुद्धि प्रकरणार्थाचे निरूपण केल्यानें होते. ही सांख्यबुद्धि ज्ञानी पुरुषांनाच योग्य असते. त्यामुळें तेच तत्परायण होतात. म्हणून जे सांख्यबुद्धिनिष्ठ झालेले असतात ते सांख्य होत. ]

**एतस्या बुद्धेर्जन्मनः प्रागात्मनो देहादिव्यतिरिक्तत्वकर्तृत्वभोक्तृत्वाद्यपेक्षो धर्माधर्मविवेकपूर्वको मोक्षसाधनानुष्ठाननिरूपणलक्षणो योगः, तद्विषया बुद्धिर्योगबुद्धिः । सा येषां कर्मिणामुचिता भवति ते योगिनः ॥**

**भाष्यार्थ**—(आतां योग, योगबुद्धि व योगी म्हणजे काय तें सांगतात–) **एतस्याः बुद्धेः**—या सांख्यबुद्धीच्या—**जन्मनः प्राक्**—जन्माच्या पूर्वी—**आत्मनः देहादिव्यतिरिक्तत्व-कर्तृत्व-भोक्तृत्वादि-अपेक्षः**—आत्म्याचें देहादिकांहून भिन्नत्व, कर्तृत्व, भोक्तृत्व इत्यादिकांची ज्याला अपेक्षा आहे असा—**धर्माधर्मविवेकपूर्वकः**—धर्म व अधर्म यांच्या विवेकपूर्वक,—**मोक्षसाधनानुष्ठाननिरूपणलक्षणः योगः**—मोक्षसिद्धीसाठीं परंपरेनें साधन होणारें जें धर्मानुष्ठान त्याचें निरूपण करणें, हेंच ज्याचें स्वरूप आहे तोच योग होय.—**तद्विषया बुद्धिः योगबुद्धिः**—त्याविषयींची जी बुद्धि–निष्ठा ती योगबुद्धि.—**सा येषां कर्मिणां उचिता भवति**—ती कर्मनिष्ठा ज्या कर्माधिकारी लोकांना उचित असते—**ते योगिनः**—ते योगी होत. [ वर सांगितलेली सांख्यबुद्धि उत्पन्न होण्यापूर्वी मोक्षसिद्धीचें परंपरेने साधन होणारें जे धर्मानुष्ठान तोच योग होय. त्या धर्मानुष्ठानरूप योगाला पुण्य व पाप यांचें फळ परलोकीं भोगणारा आत्मा देहाहून निराळा आहे, तो कर्माचा कर्ता आहे, त्या कर्माचें फळ भोगणारा आहे. तो ब्राह्मण, क्षत्रिय वगैरे आहे अशा प्रकारच्या ज्ञानाची अपेक्षा असते. तसेच त्या धर्मानुष्ठानरूप योगाच्या पूर्वी हा धर्म आहे व हा अधर्म आहे, असा विवेकही असावा लागतो. अर्थात् ही धर्मानुष्ठानाची सामग्री वरील सांख्यबुद्धि उत्पन्न होण्यापूर्वींच संभवते. आत्मा निर्विकार, अकर्ता, अभोक्ता, नित्यशुद्ध-बुद्ध-मुक्तस्वभाव आहे, अशा ज्ञानाच्या उत्पत्तीनंतर त्याचा संभवच नाहीं. अशा योगाविषयींची जी बुद्धि म्ह० निष्ठा–तत्परता ती योगबुद्धि व ती ज्या कर्माधिकारी म्ह० अर्थात् अनात्मज्ञ मुमुक्षूंना उचित असते ते योगी. ]

**तथा च भगवता विभक्ते द्वे बुद्धी निर्दिष्टे—' एषा तेऽभिहिता सांख्ये बुद्धिर्योगे त्विमां शृणु ' इति । तयोश्च सांख्यबुद्ध्याश्रयां ज्ञानयोगेन निष्ठां सांख्यानां विभक्तां वक्ष्यति—'पुरा वेदात्मना मया प्रोक्ता' इति । तथा च योगबुद्ध्याश्रयां कर्मयोगेण निष्ठां विभक्तां वक्ष्यति—'कर्मयोगेण योगिनाम्' इति ॥**

**भाष्यार्थ**—( या दोन बुद्धींविषयीं भगवानांची अनुमति दाखवितात–)—**भगवता एव**—भगवानानेंच—**तथा च**—तशाच—**द्वे बुद्धी विभक्ते निर्दिष्टे**—दोन बुद्धि अगदीं भिन्न भिन्न सांगितल्या आहेत.—**एषा ते सांख्येबुद्धिः अभिहिता**—ही तुला मी सांख्यबुद्धि सांगितली—**तु योगे इमां शृणु**—व आतां ही योगबुद्धि ऐक.—**इति**—अशा प्रकारें दोन बुद्धि स्वतः भगवानानेंच अगदीं पृथक् सांगितल्या आहेत.—**तयोः**—त्या दोन बुद्धींतील—**सांख्यबुद्ध्याश्रयां सांख्यानां ज्ञानयोगेन निष्ठां**—सांख्यबुद्धीचा आश्रय करून असलेली जी संन्याश्यांची ज्ञानयोगानें निष्ठा तिला—**पुरा वेदात्मना मया प्रोक्ता**—सृष्टीच्या आरंभीं वेदरूप अशा मीं ज्ञानयोगानें

सांख्यांची निष्ठा सांगितली,—**इति**—अशी ( अ. ३ श्लो. ३ )—**विभक्तां वक्ष्यति** अगदीं पृथक्–कर्मनिष्ठेहून अगदी भिन्न सांगेल.—**तथा च**—आणि त्याचप्रमाणे—**योगबुद्ध्याश्रयां**—योगबुद्धीचा आश्रय करून असलेली जी—**कर्मयोगेण निष्ठां**—कर्मयोगानें निष्ठा तिला—**कर्मयोगेन योगिनां**—कर्मयोगाने योग्यांची—**इति**—अशी—**विभक्तां वक्ष्यति**—प्रथक् सांगेल [ ' मी ही तुला सांख्यबुद्धि सांगितली,आतां योग-बुद्धि ऐक' अशा रीतीनें भगवानांनीच अगदी पृथक दोन बुद्धि सांगितल्या आहेत. त्यांतील सांख्यबुद्धीचा आश्रय करून राहणारी जी संन्याशांची ज्ञानयोगनिष्ठा ती सृष्टीच्या आरंभी मी वेदरूपानें पृथक् सांगितली आहे, असे भगवान् सांगतील. त्याचप्रमाणें कर्मयोग्यांची कर्मयोगाने निष्ठा सांगतील. ज्ञान हाच योग आहे. कारण त्याच्या योगाने पुरुष आत्म-तादात्म्य पावतो–युक्त होतो, म्हणून तो योग; त्या ज्ञानयोगाने संन्याश्यांची निष्ठा–म्हणजे निश्चयानें स्थिति–तत्परता, तिला कर्मनिष्ठेहून अगदी पृथक् सांगितली आहे. तसेंच कर्म हाच योग. कारण कर्माच्या योगानें पुरुष चित्तशुद्धीच्या द्वारा मोक्षाला कारण हो-णारें जें ज्ञान त्याला योग्य होतो. म्हणून कर्म हा योग. ती कर्मयोगनिष्ठा कर्माधिकारी पुरुषांना उद्देशून भगवानांनीं सांगितली आहे. कर्मयोगनिष्ठा ज्ञानयोगनिष्ठेहून अगदीं विलक्षण आहे. त्यांचें स्वरूप परस्परविरुद्ध आहे. ]

**एवं सांख्यबुद्धिं योगबुद्धिं चाश्रित्य द्वे निष्ठे विभक्ते भगवतैवोक्ते ज्ञानकर्मणोः कर्तृत्वाकर्तृत्वैकत्वानेकत्वबुद्ध्याश्रययोरेकपुरुषाश्रयत्वासंभवं पश्यता ॥**

**भाष्यार्थ**—**एवं**—याप्रमाणें—**सांख्यबुद्धिं योगबुद्धिं च आश्रित्य**—सांख्यबुद्धीचा व योगबुद्धीचा आश्रय करून—**भगवता एव**—भगवानानेंच—**विभक्ते द्वे निष्ठे उक्ते**—अगदी पृथक् अशा या दोन निष्ठा सांगितल्या आहेत. ( पण त्यांचे कारण काय ते सांगतात–)—**कर्तृत्व-अकर्तृत्व-एकत्व-अनेकत्व-बुद्ध्याश्रययोः ज्ञानकर्मणोः**—कर्तृत्व-अकर्तृत्व-एकत्व-अनेकत्व या बुद्धीचा आश्रय करून असलेलें ज्ञान व कर्म यांचे—**एकपुरुषाश्रयत्वासंभवं पश्यता**—एका पुरुषाच्या आश्रयानें असणें, संभवत नाही, असे पाहणाऱ्या भगवानानें दोन निष्ठा भिन्न सांगितल्या. [ मी कर्ता आहें, प्रत्येक शरीरांत जीव निरनिराळा आहे, या बुद्धीचा आश्रय करून कर्म प्रवृत्त होतें व ज्ञान 'मी अकर्ता आहे, सर्व भूतांमध्यें एक आहें,' या बुद्धीच्या आश्रयाने असतें, त्यामुळे ती दोन्ही म्ह० ज्ञान व कर्म एकाच वेळी एकाच पुरुषामध्ये राहणे, शक्य नाही. असें जाणणाऱ्या भगवान् श्रीकृष्णांनीं वर वर्णन केल्याप्रमाणें सांख्यबुद्धि व योगबुद्धि यांचा आश्रय करून–त्या दोन बुद्धींना उद्देशून दोन अगदी भिन्न भिन्न निष्ठा सांगि-तल्या आहेत. ]

---

१ पण रहस्यकारांनीं सांख्य व योग या शब्दांचा अर्थ अगदीच. विपरीत केला आहे. ' चित्तशुद्धीसाठी स्वधर्माप्रमाणे वर्णाश्रमविहित कर्मे करून ज्ञानप्राप्ति झाल्यावर मोक्षा-साठी शेवटी सर्व कर्मे सोडून सन्यास घेणे यास सांख्य आणि कर्मे कधीही न सोडतां शेवटपर्यंत तीच निष्काम बुद्धीने करीत राहणे, यास योग किंवा कर्मयोग असे म्हणतात. "

**यथैतद्विभागवचनं तथैव दर्शितं शातपथीये ब्राह्मणे–" एतमेव प्रव्राजिनो लोकमिच्छन्तो ब्राह्मणाः प्रव्रजन्ति " इति सर्वकर्मसंन्यासं विधाय तच्छेषेण–"किं प्रजया करिष्यामो येषां नोऽयमात्मायं लोकः " इति ॥**

**भाष्यार्थ**—( भगवानांनीं सांगितलेल्या या विभागवचनाला श्रुतीचें प्रमाण दाखवितात–)—**यथा एतत् विभागवचनं**—जसें हें भगवानांचें विभागवचन आहे—**तथा एव शातपथीये ब्राह्मणे**—तसेंच शतपथ शाखेच्या ब्राह्मणांत–**दर्शितं**—दाखविलें आहे.—**एतं एव प्रव्राजिनः लोकं इच्छन्तः ब्राह्मणाः**—याच संन्याशांच्या लोकास म्ह० प्रकृत आत्म्यास इच्छिणारे ब्राह्मण—**प्रव्रजन्ति**—संन्यास करितात.—**इति सर्वकर्मसंन्यासं विधाय**—याप्रमाणें सर्वकर्मसंन्यासाचें विधान करून—**तच्छेषेण**—त्या विधीच्या शेषाने म्ह० अर्थवादानें—**येषां नः**—ज्या आमचा—**अयं आत्मा**—हा आत्मा—**अयं लोक**—हाच लोक आहे ते आम्ही—**प्रजया किं करिष्यामः**—प्रजेने काय करणार (प्रजेला घेऊन काय करावयाचें आहे ?)—**इति**—असें शतपथब्राह्मणांत दाखविलें आहे. [ भगवानांनीं या दोन निष्ठा जशा अगदी पृथक् करून दाखविल्या आहेत त्याचप्रमाणें शुक्लयजुर्वेदाच्या शतपथ ब्राह्मणांतही दाखविल्या आहेत. अर्थात् भगवानांच्या या विभागवचनाचे तें मूळ आहे. " नित्य विज्ञानस्वरूप आत्म्याला जाणण्याची इच्छा करणारे ब्राह्मण सर्व कर्मफलाविषयीं अत्यंत विरक्त होऊन सर्व कर्मांचा त्याग करून ज्ञाननिष्ठ होतात. " याप्रमाणे सर्वकर्मसंन्यासाचे विधान करून त्याचें प्राशस्त्य दाखविणाऱ्या पुढील अर्थवादाने ' आम्हांला हा आत्मा हाच संपादन करण्यास योग्य असा लोक–फळ आहे. तेव्हां या मनुष्य-लोकाचें साधन अशी जी

---

पृ.४४४ सांख्य–कर्मे सोडणे,योग–कर्मे करणे ४४७.योग म्ह. पाप न लागता कर्मे करण्याची युक्ति ७,४४६ सांख्य–सन्यास, सांख्य म्ह. सांख्यनिष्ठा, वगैरे अनेक जागीं अनेक अर्थ केले आहेत. एक निश्चित अर्थ नाहीं. एके ठिकाणीं तर " धर्म पहिल्याने चित्तशुद्धीकरितां तर पुढें चित्तशुद्धी झाल्यावर स्वतःकरितां जरी विषयोपभोगरूपी व्यवहार तुच्छ झाले तरी लोकसंग्रहार्थ तेच व्यवहार केवळ स्वधर्म किंवा कर्तव्य म्हणून निष्काम बुद्धीनें करणे जरूर आहे."पृ.४६४असें ह्मटलें आहे. यांत ते 'ज्ञानी पुरुषानें विषयोपभोगरूपी व्यवहार लोकसंग्रहार्थ स्वधर्म म्हणून निष्काम बुद्धीने केले पाहिजेत,' असे म्हणतात ! हा केवढा अपसिद्धान्त आहे, हें सामान्य वाचकांच्याही लक्षांत येईल. गीताही या गोष्टीला अनुकूल नाहीं. ती मुमुक्षूच्या विषयोपभोगरूप व्यवहाराचाही जर तीव्र निषेध करते तर ज्ञानी पुरुषाच्या विषयोपभोगरूप व्यवहाराला संमति कशी देईल ? असे अपसिद्धान्त गीतारहस्यांत पदोपदीं आढळतात. जसें–वरील पहिल्या उताऱ्यांत ' ज्ञानप्राप्ति झाल्यावर मोक्षासाठीं शेवटी सर्व कर्मे सोडून संन्यास घेणें, यांस सांख्य म्हणतात ' असें म्हटलें आहे. ज्ञान झाल्यावर मोक्षासाठी कांहीं कर्तव्य राहतें, हें म्हणणें वेदान्तशास्त्राच्याच नव्हे तर गीतेच्या ' ज्ञानं लब्धा परां शांतिं अचिरेण अधिगच्छति '. ' ज्ञात्वा मां शांतिं ऋच्छति ' इत्यादि अनेक वचनांच्याही विरुद्ध आहे.

१ या वाक्याचा अर्थ रहस्यकार 'लोक हाच आमचा आत्मा' पृ. ३५६ असा करितात, पण तो चुकीचा आहे.

प्रजा तिला घेऊन आम्हांला काय करावयाचें आहे,' कारण प्रजेनें प्राप्त होणारा जो मनुष्यलोक तो या आत्मलोकाहून भिन्न नाही. आत्म्यांत सर्व फलांचा अन्तर्भाव होतो. (अ. ४-३३) असें म्हणून मोक्ष हें ज्याचे फल आहे, असे ज्ञान दाखविले आहे.]

**तत्रैव च–"प्राग्दारपरिग्रहात्पुरुष आत्मा प्राकृतो धर्मजिज्ञासोत्तरकालं लोकत्रयसाधनं पुत्रं द्विप्रकारं च वित्तं मानुषं दैवं च, तत्र मानुषं वित्तं कर्मरूपं पितृलोकप्राप्तिसाधनं विद्यां च दैवं वित्तं देवलोकप्राप्तिसाधनं सोऽकामयत" इति ॥**

**भाष्यार्थ**—(आतां त्याच ब्राह्मणांतील कर्मनिष्ठेविषयींचें वाक्य दाखवितात–)—**च तत्र एव**—आणि तेथेंच म्ह० शतपथ ब्राह्मणांतच—**दारपरिग्रहात् प्राक्**—पत्नीचे पाणिग्रहण करण्याच्यापूर्वी—**प्राकृतः पुरुषः आत्मा**—तत्त्वदर्शन झालेले नसल्यामुळे प्राकृत म्ह० अज्ञ पुरुष म्ह० तोही आत्माच—**धर्मजिज्ञासोत्तरकालं**—गुरुसमीप वेदाध्ययन करून त्याच्या अर्थज्ञानासाठीं धर्मजिज्ञासा केल्यावर-पूर्वमीमांसेचे अध्ययन केल्यावर—**लोकत्रयप्राप्तिसाधनं**—मनुष्य, पितृ व देव या तीन लोकांच्या प्राप्तीचें साधन—**सः अकामयत**—तो इच्छिता झाला. एक—**पुत्रं**—पुत्र, हे मनुष्यलोकाच्या प्राप्तीचे साधन,—**च द्विप्रकारं वित्तं**—व दोन प्रकारचें वित्त—**मानुषं च दैवं**—मानुष वित्त व दैववित्त.—**तत्र मानुषं वित्तं कर्मरूपं**—त्यांतील मानुष वित्त कर्मरूप असतें ते—**पितृलोकप्राप्तिसाधनं**—पितृलोकाच्या प्राप्तीचे साधन आहे—**च विद्यां**—व विद्या-उपासना हे—**दैवं वित्तं**—दैव वित्त आहे. ते—**देवलोकप्राप्तिसाधनं**—देवलोकाच्या प्राप्तीचे साधन आहे.—**इति**—असे सांगितले आहे [आणि स्त्रीपरिग्रह करण्याच्यापूर्वी अज्ञ पुरुष ब्रह्मचारी होऊन गुरुगृही वेदाध्ययन करून त्याच्या अर्थज्ञानासाठीं धर्मजिज्ञासा करून म्ह०पूर्वमीमांसेचे अध्ययन केल्यावर मनुष्यलोकादि तीन लोकांच्या प्राप्तीचें साधन जे पुत्रादिक त्याची 'तो मला पत्नी असावी अशी कामना करता झाला' इत्यादि वाक्यात सांगितल्याप्रमाणे इच्छा करतो. पुत्र-प्रजा हे मनुष्यलोकाच्या प्राप्तीचे साधन आहे. कर्माला मानुष वित्त म्हणतात. ते पितृलोकाच्या प्राप्तीचें साधन आहे व उपासना हे दैववित्त असून ते देवलोकाच्या प्राप्तीचें साधन आहे. असें शतपथ ब्राह्मणांत सांगितलें आहे.]

**अविद्याकामवत एव सर्वाणि कर्माणि श्रौतादीनि दर्शितानि। "तेभ्यो व्युत्थाय प्रव्रजन्ति" इति व्युत्थानमात्मानमेव लोकमिच्छतोऽकामस्य विहितम्। तदेतद्विभागवचनमनुपपन्नं स्याद्यदि श्रौतकर्मज्ञानयोः समुच्चयोऽभिप्रेतः स्याद्भगवतः ॥**

**भाष्यार्थ**—(कर्मनिष्ठा व ज्ञाननिष्ठा सांगणाऱ्या वरील दोन्ही श्रुतिवाक्यांचें तात्पर्य–)—**अविद्याकामवतः एव**—अविद्या व काम यांनी विशिष्ट असलेल्या अज्ञालाच—**सर्वाणि श्रौतादीनि कर्माणि**—सर्व श्रौत-स्मार्त कर्मे—'**सः अकामयत जाया मे स्यात्**'—तो मला पत्नी असावी, अशी कामना करता झाला, इत्यादि वाक्यानें—**दर्शितानि**—दाखविली आहेत.—**तेभ्यः व्युत्थाय प्रव्रजन्ति**—त्या कर्मांपासून निवृत्त होऊन-कर्मे सोडून संन्यास करितात,—**इति**—या वाक्यानें—**आत्मानं एव**

**लोकं इच्छतः**—आत्मा याच लोकाची इच्छा करणाऱ्या—**अकामस्य**—निष्काम पुरुषाला—**व्युत्थानं**—व्युत्थान-संन्यास—**विहितं**—सांगितला आहे,—**यदि भगवतः श्रौतकर्म-ज्ञानयोः समुच्चयः अभिप्रेतः स्यात्**—जर भगवानाला श्रौत कर्म व ज्ञान यांचा समुच्चय-सह अनुष्ठान इष्ट असेल—**तत्**—तर—**एतत् विभागवचनं अनुपपन्नं स्यात्**—हें विभागवचन अयोग्य होईल. [ कामनेनें युक्त असलेला जो अज्ञ त्याच्याच साठीं सर्व श्रौत-स्मार्त कर्में आहेत, असें वरील 'सोऽकामयत॰' या श्रुतीनें दाखविलें आहे. तसेंच आत्मलोकाचीच इच्छा करणाऱ्या व कर्माविषयीं विरक्त झालेल्या निष्काम मुमुक्षूला 'तेभ्यो व्युत्थाय प्रव्रजन्ति' या वाक्यानें संन्यासपूर्वक ज्ञाननिष्ठा सांगितली आहे. अर्थात् भगवानांना ज्ञान व कर्म यांचा समुच्चय इष्ट आहे, असें जर मानलें तर सकाम पुरुषाला कर्में व निष्काम पुरुषाला संन्यास, हें श्रुतीचें विभागवचन अयोग्य ठरेल. पण तसें होणें वैदिक संप्रदायाला सोडून आहे. भगवानही श्रुतिविरुद्ध जर कांहीं सांगतील तर तेंही वैदिक संप्रदायांत केव्हांच ग्राह्य मानलें जाणार नाहीं. सुगत-बुद्धाचा उपदेश वैदिकांना याच कारणानें अग्राह्य झाला. शिवाय वैदिकसंप्रदायाचे आधारस्तंभ जे व्यास ते भगवानांचा असा अवैदिक उपदेश श्लोकरूपानें केव्हांच ग्रंथित करणार[1] नाहीत. ]

**न चार्जुनस्य प्रश्न उपपन्नो भवति 'ज्यायसी चेत्कर्मणस्ते' इत्यादिः । एकपुरुषानुष्ठेयत्वासंभवं बुद्धिकर्मणोर्भगवता पूर्वमनुक्तं कथमर्जुनोऽश्रुतं बुद्धेश्च कर्मणो ज्यायस्त्वं भगवत्यध्यारोपयेन्मृषैव ज्यायसी चेत्कर्मणस्ते मता बुद्धिरिति ॥**

**भाष्यार्थ**—( भगवानांना ज्ञानकर्मसमुच्चयच इष्ट आहे असें जर मानलें तर अर्जुनाचा प्रश्नही अनुपपन्न होतो, असा दुसरा दोष दाखवितात—)—**च 'ज्यायसी चेत् कर्मणः ते॰'—इत्यादिः अर्जुनस्य प्रश्नः उपपन्नः न भवति**—आणि 'कर्मापेक्षां ज्ञान अधिक श्रेष्ठ आहे, असें जर तुझें मत आहे तर मला घोर कर्मांत कां नियुक्त करतोस' हा अर्जुनाचा प्रश्न उपपन्न होत नाहीं.—**भगवता पूर्वं बुद्धिकर्मणोः एकपुरुषानुष्ठेयत्वासंभवं अनुक्तं**—भगवानांनीं पूर्वीं ज्ञान व कर्म यांचें एका

१ अर्थात् रहस्यकारांनी मूळ प्रमाण जी श्रुति व स्मृति त्यांना सोडून नारायणीय किंवा भागवत धर्माच्या पायावर कर्मयोगशास्त्राची 'उभारणी' करण्याचा जो प्रयत्न केला आहे तो वेदविरुद्ध जर असेल तर अप्रमाण ठरेल.वैदिक दोन धर्मांचा उपाय-उपेयभाव आचार्यांनी वर स्पष्टपणें सांगितला आहे. गीता किंवा नारायणीय–भागवत-धर्म 'प्रवृत्ति व निवृत्ति हे दोन मार्ग स्वतंत्र आहेत' असे खरोखरीच जर सांगत असतील तर ते वैदिक संप्रदायाला सोडून असल्यामुळे वैदिकांना अग्राह्य ठरतील. अशा वेदबाह्य मताचा पुरस्कार भगवान् श्रीकृष्णांनी केला असें जरी क्षणभर मानलें तरी वेदव्यास त्याचें श्लोकरूपानें ग्रथन केव्हांही करणार नाहींत आणि वैदिक संप्रदाय तर 'धर्मेण पापं अपनुदन्ति' नाराय. पृ. ७८ असें समस्वरानें सांगत आहे. अर्थात् नारायणीय धर्म हा एक अपूर्व प्रमाण ग्रंथ आहे, असे मानून व त्यांत प्रवृत्तिधर्मच मोक्षाचें साक्षात् साधन आहे, किंवा ज्ञानानंतर प्रत्येक ज्ञानी पुरुषानें मरेपर्यंत कर्म करीतच राहिलें पाहिजे असेंच प्रतिपादन केलें आहे, असें मानणें, सर्वथा अनुचित होय.

पुरुषाकडून एकाच वेळीं अनुष्ठान होणें अशक्य आहे असें न सांगितलेलें—**च**—व—**अश्रुतं**—न ऐकलेलें—**कर्मणः बुद्धेः ज्यायस्त्वं**—कर्माहून ज्ञानाचें श्रेष्ठत्व—**अर्जुनः**—अर्जुन—**'ज्यायसी चेत् कर्मणः ते मता बुद्धिः' इति**—कर्माहून ज्ञान जर श्रेष्ठ आहे, असें—**भगवति**—भगवानावर—**मृषा एव**—खोटेंच—**कथं**—कसें—**अध्यारोपयेत्**—लादील ? [ भगवानाला ज्ञान व कर्म यांचा समुच्चय-सह अनुष्ठानच इष्ट आहे, असें जर मानलें तर अर्जुनाचा ' कर्मापेक्षां ज्ञान जर श्रेष्ठ आहे तर मला घोर कर्म करावयास कां सांगतोस ? ' असा हा प्रश्न योग्य ठरत नाहीं. कारण समुच्चय म्हटला कीं तो एका पुरुषाला एकाच वेळीं प्राप्त होतो. ज्ञान व कर्म यांचे एकाच पुरुषाला एकाच वेळीं अनुष्ठान करतां येणे शक्य नाहीं, असें पूर्वी भगवानांनी सांगितलेलें नसतांना व अर्जुनानें कर्मापेक्षां ज्ञान श्रेष्ठ आहे असें ऐकलेलेंही नसतांना, अर्जुन कर्माहून बुद्धि श्रेष्ठ आहे, असें भगवानावर—**'ज्यायसी चेत्'**—या वाक्यानें खोटेंच कसें लादील ? भगवानांनीं तसें सांगितलेलें असल्यावांचून अर्जुन त्यांच्यावर तसा मिथ्या आरोप करणारें नाहीं. पण ज्याअर्थी अर्जुन तसें स्पष्ट विचारीत आहे, त्याअर्थी भगवानांनींच तसें सांगितलें असलें पाहिजे हें उघड होतें. ]

**किं च यदि बुद्धिकर्मणोः सर्वेषां समुच्चय उक्तः स्यादर्जुनस्यापि स उक्त एवेति—'यच्छ्रेय एतयोरेकं तन्मे ब्रूहि सुनिश्चितम्' इति कथमुभयोरुपदेशे सति अन्यतरविषय एव प्रश्नः स्यात् । न हि पित्तप्रशमनार्थिनो वैद्येन मधुरं शीतं च भोक्तव्यमित्युपदिष्टे तयोरन्यतरत्पित्तप्रशमनकारणं ब्रूहीति प्रश्नो भवति ॥**

**भाष्यार्थ**—( ज्ञानकर्मसमुच्चय हा गीतेचा प्रतिपाद्य विषय नव्हे याविषयीं आणखी एक उपपत्ति- )—**किं च**—आणि शिवाय—**यदि सर्वेषां बुद्धिकर्मणोः समुच्चयः उक्तः स्यात्**—जर सर्व मुमुक्षूंना ज्ञान व कर्म यांचा समुच्चय सांगितलेला असेल तर—**सः अर्जुनस्य अपि उक्तः एव**—तो अर्जुनालाही सांगितलाच असला पाहिजे.—**इति**—तेव्हां—**एतयोः यत् श्रेयः तत् एकं सुनिश्चितं ब्रूहि**—संन्यास व कर्म या दोहोंतील जें श्रेयस्कर तें एक अगदीं निश्चयानें सांग. ( अ. ५ श्लो. १ ).—**इति**—असा—**उभयोः उपदेशे सति**—दोहींचा उपदेश केलेला असतांना—**अन्यतरविषयः एव प्रश्नः**—त्यांतील एकाविषयींच प्रश्न—**कथं स्यात्**—कसा होईल ?—**पित्तप्रशमनार्थिनः**—आपल्या पित्ताची शांति व्हावी, अशी इच्छा करणाऱ्या रोग्याला—**वैद्येन**—वैद्यानें—**मधुरं शीतं च भोक्तव्यं**—मधुर व शीत पदार्थ खावा—**इति उपदिष्टे**—असा उपदेश केला असतां—**तयोः**—मधुर व शीत या दोहोंतील—**अन्यतरत्**—कांहीं तरी एक—**पित्तप्रशमनकारणं ब्रूहि**—पित्ताच्या शांतीचें कारण-उपाय सांग—**इति प्रश्नः न भवति हि**—असा प्रश्न उपपन्न होत

१ अर्थात् ज्ञानाहून कर्म निकृष्ट आहे, हें अर्जुनाचें म्हणणें खोटें नव्हे. त्याला भगवानांच्या वचनाचाच आधार आहे ( अ. २-४९ पद्य ) व जर ज्ञान श्रेष्ठ व स्वतंत्र मोक्षसाधन, तर समुच्चय संभवतच नाहीं.

नाहीं, हें प्रसिद्ध आहे. [ तसेंच, इतर सर्व साधकांना ज्ञान व कर्म यांचा समुच्चय जर सांगितलेला असेल तर तो अर्जुनालाही सांगितलेला असणारच. कारण मोक्षाचें साधन अर्जुनासाठी निराळें व इतर साधकांसाठी निराळे, असें होणें शक्य नाही. मग त्या दोन्ही साधनांचा समुच्चयाने उपदेश केलेला असतांना ' त्या दोन्हींतील जें एक श्रेयः-साधन असेल तेच मला सांग, ' असा दोन्हीतील एकाविषयींच प्रश्न करणें उपपन्न होत नाही. एखाद्याला पित्ताचा विकार झाला असतां व त्याच्या शांतीसाठीं त्यानें वैद्याला औषध विचारलें असतां ' मधुर व शीत पदार्थ खावे, म्हणजे पित्तोपशम होतो ' असें वैद्यानें सांगितल्यास त्यांतील एकच कोणतें तरी पित्तशांतीचें औषध सांग, असें तो रोगी विचारीत नाहीं, हें प्रसिद्धच आहे. ]

**अथार्जुनस्य भगवदुक्तवचनार्थविवेकानवधारणनिमित्तः प्रश्नः कल्प्येत, तथापि भगवता प्रश्नानुरूपं प्रतिवचनं देयं, मया बुद्धिकर्मणोः समुच्चय उक्तः किमर्थमित्थं त्वं भ्रान्तोऽसीति । न तु पुनः प्रतिवचनमननुरूपं, पृष्टादन्यदेव द्वे निष्ठे मया पुरा प्रोक्ते इति वक्तुं युक्तम् ॥**

**भाष्यार्थ**—( भगवानांनी समुच्चयच सांगितला, पण अर्जुनाला त्याचा बोध न झाल्यामुळें त्याने असा प्रश्न केला, अशी शंका घेऊन तिचें समाधान- )—**अथ**—बरे,—**भगवदुक्तवचनार्थ-विवेक-अनवधारणनिमित्तः**—भगवानांनीं सांगितलेल्या वचनाच्या अर्थाचा विवेक करतां न आल्यामुळें—**अर्जुनस्य प्रश्नः**—अर्जुनाचा हा प्रश्न आहे, अशी—**कल्प्येत**—जरी कल्पना केली—**तथापि**—तरी—**भगवता**—भगवानानें—**प्रश्नानुरूपं प्रतिवचनं देयं**—प्रश्नानुरूप प्रतिवचन-उत्तर द्यावयास पाहिजे होतें. म्हणजे—**मया बुद्धिकर्मणोः समुच्चयः उक्तः**—मी ज्ञान व कर्म यांचा समुच्चय सांगितला आहे, मग—**त्वं इत्थं भ्रान्तः किमर्थं असि**—तूं असा भ्रान्त कशासाठीं झाला आहेस,—**इति**—असें भगवानांनी उत्तर द्यावयास पाहिजे होतें. **तुं**—**पुनः**—पण—**मया पुरा द्वे निष्ठे प्रोक्ते**—मीं पूर्वी दोन निष्ठा सांगितल्या आहेत—**इति**—असें—**पृष्टात् अन्यत् एव**—विचारलेल्या प्रश्नाहून निराळेंच—**अननुरूपं प्रतिवचनं**—अयोग्य उत्तर—**वक्तुं न युक्तं**—सांगणे उचित नव्हे. [ भगवानांचा आशय अर्जुनाला न कळल्यामुळें त्यानें असा प्रश्न विचारला, असें जरी क्षणभर मानिलें म्ह० अर्जुनाला भगवद्वचनाच्या अर्थाविषयीं भ्रम झाला असें जरी एक क्षणभर समजलें तरी भगवानांना आपल्याच आशयाविषयीं भ्रम होणें शक्य नाहीं. यास्तव त्यांनीं तरी अर्जुनाच्या प्रश्नाला अनुसरून योग्य तेच उत्तर द्यावयास हवें होतें. म्हणजे ' अरे अर्जुना ! मी तुला ज्ञान व कर्म यांचा समुच्चय-त्यांचें सह अनुष्ठान करावयास सांगितलें असतांना तूं असा भ्रांत कां होतोस ? मला यांतील एकच साधन सांग असें कां म्हणतोस ? ' असें भगवानांनी म्हणणें उचित होतें. पण तसें कांही न म्हणतां-'मीं पूर्वी दोन निष्ठा सांगितल्या आहेत, ' असें प्रश्नाच्या अगदी विपरीत उत्तर भगवानांनीं दिले आहे. त्यावरून ज्ञानकर्मसमुच्चय भगवानांना इष्ट आहे असें सिद्ध होत नाहीं.]

**नापि स्मार्तेनैव कर्मणा बुद्धेः समुच्चयेऽभिप्रेते विभागवचनादि सर्वमुपपन्नम् । किं च क्षत्रियस्य युद्धं स्मार्तं कर्म स्वधर्म इति जानतस्तत्किं कर्मणि घोरे मां नियोजयसीत्युपालम्भोऽनुपपन्नः । तस्माद्गीताशास्त्रे ईषन्मात्रेणापि श्रौतेन स्मार्तेन वा कर्मणात्मज्ञानस्य समुच्चयो न केनचिद्दर्शयितुं शक्यः ॥**

**भाष्यार्थ**—( याप्रमाणें श्रौत कर्म व ज्ञान यांचा समुच्चयच संभवत नाहीं, असें सांगून स्मार्त कर्म व ज्ञान यांचा समुच्चयही संभवत नाहीं, असें सांगतात-)—**स्मार्तेन एव कर्मणा**—स्मार्त कर्माशींच—**बुद्धेः समुच्चये अभिप्रेते अपि**—बुद्धीचा समुच्चय भगवानांना इष्ट आहे, असें जरी मानलें तरी—**विभागवचनादि सर्वं**—विभागाचें कथन वगैरे सर्व—**उपपन्नं न**—उपपन्न होत नाहीं. [ श्रुति व स्मृति यांतील ज्ञान व कर्म यांचें विभागवचन, कर्माहून ज्ञानाचे श्रेष्ठत्व, पांचव्या अध्यायांतील एकाच साधनाविषयी अर्जुनाचा प्रश्न, भगवानांचे त्यावरील उत्तर, हें सर्वच स्मार्त कर्माशींच ज्ञानाचा समुच्चय भगवानांना इष्ट आहे, असे मानल्यास उपपन्न होत नाहीं. ] ( स्मार्त कर्म व ज्ञान यांचा समुच्चय न संभवण्याचे आणखी एक कारण-)—**किं च**—आणि शिवाय—**युद्धं स्मार्तं कर्म**—युद्ध हे स्मृतीने सांगितलेलें कर्म—**क्षत्रियस्य स्वधर्मः**—क्षत्रियाचा स्वधर्म आहे,—**इति जानतः**—असे जाणणाऱ्या अर्जुनाचा—**'तत् घोरे कर्मणि मां किं नियोजसि'**—तर मग घोर कर्मात मला कां नियुक्त करतोस ?—**इति उपालंभः**—असा उपालंभ-निंदा-असा टोमणा—**अनुपपन्नः**—अयोग्य आहे. [ मनु ( अ. ७.८८-९५ ) याज्ञवल्क्य ( अ. १ श्लो. ३२३-३२६. ) इत्यादि धर्मशास्त्रकारांनी क्षत्रियाला उद्देशून युद्धाचे विधान केलें आहे. त्यामुळें तो त्यांचा स्वधर्म आहे. अर्जुनाला युद्ध हा आपला धर्म आहे, हे ठाऊक होते, असें असतांना ' कर्माहून ज्ञान जर श्रेष्ठ आहे तर मला तूं हे घोर कर्म-युद्ध करावयास कां सांगतोस ? ' असा अर्जुनाने भगवानास जो टोमणा मारला आहे तो अयोग्य आहे. स्मार्त कर्म व ज्ञान यांचा समुच्चय जर इष्ट असता तर हा अर्जुनानें केलेला भगवानांचा उपालंभ योग्य झाला नसता. याप्रमाणें समुच्चयपक्षीं प्रश्न-प्रतिवचनांची उपपत्ति लागत नसल्यामुळे गीताशास्त्र समुच्चयपर नाहीं, असे सांगून समुच्चयपक्षाच्या खंडनाचा उपसंहार करितात-]—**तस्मात्**—म्हणून—**गीताशास्त्रे**—गीताशास्त्रांत—**ईषन्मात्रेण अपि श्रौतेन स्मार्तेन वा कर्मणा**—यत्किंचित्‌ही श्रौत किंवा स्मार्त कर्माशी—**आत्मज्ञानस्य समुच्चयः**—आत्मज्ञानाचा समुच्चय-सहभाव—**केनचित्**—कोणाकडूनही-कोणालाही—**दर्शयितुं न शक्यः**—दाखवितां येणे शक्य नाहीं. [ अशी वस्तुस्थिति असल्यामुळें गीताशास्त्रांत अतिशय अल्प अशाही श्रौत किंवा स्मार्त कर्माशी आत्मज्ञानाचा समुच्चय सांगितलेला आहे, असें कोणालाही[१] दाखवितां येणें शक्य नाहीं.]

---

१ पण रहस्यकार तर ज्ञानकर्मसमुच्चयपक्षच गीतेला समत आहे, असे म्हणतात. आचार्यांनी ज्ञानकर्मसमुच्चयपक्षाचे जें वर खंडन केलें आहे ते लक्षपूर्वक वाचल्यावर ज्ञान व कर्म म्ह० काय, त्यांचा विरोध कसा, व त्यामुळेंच त्यांचा समुच्चय अशक्य कसा, ते कोणा-

च्याही लक्षांत येईल. पण रहस्यकार प्राचीन वृत्तिकारांचा पक्ष घेऊन म्हणतात "श्रीशंकराचार्यांचें गीतेवरील भाष्य हा सध्यां अति प्राचीन ग्रंथ समजतात. यापूर्वीं गीतेवर बरींच भाष्यें किंवा टीका झालेल्या होत्या यांत संशय नाही. परंतु या टीका सध्यां उपलब्ध नसल्यामुळें महाभारतानंतर व शंकराचार्यांचा उदय होण्यापूर्वीं दरम्यानच्या काळांत गीतेचा अर्थ कसा लावीत असत हें समजण्यास आतां पुरीं साधनें उरलीं नाहीत. तथापि शांकरभाष्यांतच या प्राचीन टीकाकारांच्या मतांचा जो उल्लेख आहे, त्यावरून आचार्यांच्या पूर्वींच्या टीकाकारांनी गीतेचा अर्थ महाभारतकारांप्रमाणें ज्ञानकर्मसमुच्चयात्मक म्ह. ज्ञानाबरोबरच ज्ञानी मनुष्यानें आमरणान्त स्वधर्मोक्त कर्म केलें पाहिजे, असा प्रवृत्तिपर लाविलेला होता असें उघड दिसून येतें." पृ. ११.

पण हें म्हणणें किती योग्य आहे तें शांकरभाष्य आतां वाचकांपुढें प्रत्यक्षच असल्यामुळें निराळें सांगावयास नको. केवल ज्ञानाने मोक्ष नाही. तर ज्ञान व अग्निहोत्रादि कर्म यांचें एकाच वेळीं अनुष्ठान केल्यानें मोक्ष मिळतो, असें वृत्तिकारांचें मत होतें. पण आत्मसाक्षात्कार झाल्यावर मी अकर्ता, अभोक्ता, इत्यादि आहें, असें निश्चित ज्ञान होतें, सर्वत्र एक आत्मतत्त्व आहे, असाही अनुभव येतो. त्यामुळें 'मी कर्ता भोक्ता आहें, आत्मा सर्व शरीरांत एक नसून अनेक आहे,' इत्यादि समजुतीनेंच होणारें कर्म संभवत नाहीं असें सांगून आचार्यांनीं वर त्या मताचें खंडन कसें केलें आहे, तें वाचकांनी पहावें. म्हणजे 'ज्ञानाबरोबरच ज्ञानी पुरुषानें आमरणान्त स्वधर्मोक्त कर्म केलें पाहिजे' हें रहस्यकारांचें म्हणणें बरोबर नाही, हें लक्षांत येईल. ज्ञान व श्रौत-स्मार्त कर्म यांचा समुच्चय मोक्षाचे साधन आहे, असें वृत्तिकार म्हणतात. पण रहस्यकार 'मोक्ष जरी ज्ञानानेंच मिळत असला तरी ज्ञानी पुरुषानें स्वतः-साठी जरी नाहीं तरी, लोकसंग्रहार्थ मरेपर्यंत सांसारिक कर्में करीत राहिलें पाहिजे' असें म्हणतात. रहस्यकार आणखी एके ठिकाणीं म्हणतात की, आचार्यांच्या पूर्वीं संन्यासमार्गी टीका होत्या कीं काय तें कळण्यास मार्ग नाहीं. पण ज्या वृत्तिकारांच्या वृत्तीवरून आचार्यांच्या पूर्वीं ज्ञानकर्मसमुच्चयपक्ष होता, असें ठरतें त्याच वृत्तीवरून त्यांच्याही पूर्वीं 'सर्वकर्मसंन्यासपूर्वकात् केवलात् ज्ञानात् कैवल्यप्राप्तिः' असें प्रतिपादन करणारे टीकाकार होते हें सिद्ध होतें. कारण तसे मत जर प्रचलित नसतें तर वृत्तिकारांचा पूर्वपक्षच उद्भवला नसता. महाभारतकारांचें मतही ज्ञानकर्मसमुच्चयाला अनुकूल असेंच होतें, ही समजूत चुकीची आहे. कारण ज्ञानकर्मसमुच्चयपक्ष कर्मकांडी मीमांसकांचा आहे व 'ज्ञानात् एव कैवल्य' हा औपनिषद सिद्धान्त आहे. शिवाय रहस्यकार ज्याला ज्ञान समजतात तें ज्ञान मोक्षाच्या मुळींच उपयोगी नाहीं. ज्ञान म्ह० आत्मसाक्षात्कार असें ते समजत नाहीत. गी. र. प्रस्तावना पृ. ७ पहा.

"ज्ञानानें मोक्ष मिळतो किंवा ज्ञान व कर्म यांच्या समुच्चयानें मोक्ष मिळतो, असा प्रश्न या ठिकाणीं उपस्थित करून केवळ ज्ञानानेंच सर्व कर्में दग्ध होऊन मोक्ष प्राप्ति होते, मोक्ष प्राप्तीस कर्मांची जरूरी नाही, असा गीतार्थ श्रीशंकराचार्यांनीं आपल्या भाष्यांत प्रथम दिला आहे. आणि त्यावरून पुढें असें अनुमान काढिलें आहे कीं ज्याअर्थीं गीतेच्या दृष्टीनेंही मोक्षाला कर्मांची जरूरी नाही, त्याअर्थीं चित्त शुद्ध झालें म्हणजे कर्में निरर्थक होतात. आणि तीं स्वभावतःच बंधक म्ह० ज्ञानाला विरुद्ध असल्यामुळें ज्ञानोत्तर ज्ञानी पुरुषानें

**यस्य त्वज्ञानाद्रागादिदोषतो वा कर्मणि प्रवृत्तस्य यज्ञेन दानेन तपसा वा विशुद्धसत्त्वस्य ज्ञानमुत्पन्नं परमार्थतत्त्वविषयमेकमेवेदं सर्वं ब्रह्माकर्तृ चेति, तस्य कर्मणि कर्मप्रयोजने च निवृत्तेऽपि लोकसंग्रहार्थं यत्नपूर्वं यथा प्रवृत्तस्तथैव कर्मणि प्रवृत्तस्य यत्प्रवृत्तिरूपं दृश्यते न तत्कर्म येन बुद्धेः समुच्चयः स्यात् ॥**

**भाष्यार्थ**—( अहो पण ' लोकसंग्रह करण्याची इच्छा असलेल्या विद्वानानें कर्मामध्यें आसक्त न होतां तीं अज्ञाप्रमाणेंच करावीं ' अ. ३ श्लो. २५. असें गीतेंतच सांगितलेलें आहे. तेव्हां गीताशास्त्रांत समुच्चय नाहीं, असें कसें म्हणतां ? ' अशी शंका कोणी घेईल म्हणून आचार्य सांगतात-)—**तु**—परंतु—**अज्ञानात् रागादिदोषतः वा**—अज्ञानामुळें किंवा राग-द्वेषादि दोषांमुळें—**कर्मणि प्रवृत्तस्य**-श्रौत-स्मार्त कर्मामध्यें प्रवृत्त झालेल्या—**यज्ञेन दानेन तपसा वा**—यज्ञ, दान व तप यांनीं—**विशुद्धसत्त्वस्य**—ज्याचें चित्त शुद्ध झालें आहे अशा—**यस्य**—ज्याला—**परमार्थतत्त्वविषयकं**—परमार्थ तत्त्वाविषयीचें—**इदं सर्वं एकं एव ब्रह्म च अकर्तृ इति ज्ञानं**—हें सर्व एकच ब्रह्म आहे व तें अकर्तृ आहे असें ज्ञान—**उत्पन्नं**—उत्पन्न झालें—**तस्य**—

सोडून दिली पाहिजेत हेंच मत भगवंतासही गीतेंत ग्राह्य आहे, असे म्हणावें लागते. ज्ञानोत्तर ज्ञानी पुरुषानेंही कर्मे केली पाहिजेत या पक्षास ज्ञानकर्मसमुच्चयपक्ष असें नांव असून श्रीशंकराचार्यांचा वरील युक्तिवाद हाच काय तो तद्विरुद्ध मुख्य आक्षेप होय. ” ३०६

पण वरील भाष्यांत आचार्यांनी तसें अनुमान काढलेले नाही. प्रत्यक्ष श्रुति-स्मृतिवचनांनीं व युक्तीनें तसें सिद्ध केलें आहे. मी अकर्ता आहें. नित्य शुद्धबुद्धमुक्तस्वभाव आहें असें ज्ञान झाल्यावर कर्मांचा संभवच नाही. त्यामुळे त्यांचा त्यागच प्राप्त आहे. तथापि कांहीं कारणानें त्यांचा स्वरूपतः त्याग अशक्य झाल्यास त्याच्या हातून होणारी जी कर्मरूप चेष्टा ते वस्तुतः कर्मच नव्हे. त्यामुळें ज्ञानाशी त्याचा समुच्चय मानतां येत नाही. असे स्पष्ट म्हटलें आहे. शिवाय प्राचीन समुच्चयवादी ज्ञाननिष्ठा व कर्मनिष्ठा याना मोक्षाचे दोन स्वतंत्र मार्ग म्हणत नाहीत. रहस्यकार त्यांना स्वतंत्र मोक्षमार्ग म्हणतात. तुल्यबल समजतात. किंबहुना कर्मयोगाच्या मातब्बरी ज्ञानयोगाहून अधिक आहे, असेंही प्रतिपादन करितात. अर्थात् रहस्यकारांचा ज्ञानकर्मसमुच्चय वृत्तिकारांच्या ज्ञानकर्मसमुच्चयाहून अगदीं विपरीत आहे. त्यामुळें आचार्यांच्या पूर्वी गीतेवर समुच्चयपर टीका जरी असल्या तरी त्यांचा रहस्यकारांच्या पक्षास कांही उपयोग नाहीं; शिवाय आचार्यांनी ज्ञान-कर्मसमुच्चय पक्षाचें जें खंडन केलें आहे त्याचें प्रतिखंडन रहस्यकारांनी किंवा दुसऱ्या कोणीही केलेले नाही. नुसते 'शंकराचार्यांचा युक्तिवाद समाधानकारक किंवा निरुत्तरही नाहीं.' ३०६,७ असे म्हणून काम भागत नाही. रहस्यकारांनी ३०७ पृष्ठावर जी दोन कारणें सांगितली आहेत ती सर्वथा अयोग्य कशी आहेत तें आम्ही पुढें तिसऱ्या अध्यायाच्या आरंभी दाखवूं; येथें विस्तार करीत नाही. आचार्यांनी भगवानांना गीतेंत ज्ञानकर्मसमुच्चय विवक्षित नाही असें दाखविण्यासाठी जी अनेक कारणें सांगितली आहेत त्यांचें निराकरण केल्यावांचून ' आचार्यांचा युक्तिवाद कायतो एवढाच व तो समाधानकारक किंवा निरुत्तर नाहीं.' या म्हणण्यावर आमचा विश्वास बसणें शक्य नाहीं.

त्याचें—**कर्माणि च कर्मप्रयोजने निवृत्ते अपि**—कर्म व कर्माचें प्रयोजन हीं दोन्हीं जरी निवृत्त झालेलीं असलीं तरी—**लोकसंग्रहार्थं**—लोकसंग्रहार्थ-लोकांनीं उन्मार्गी होऊं नये म्हणून—**यत्नपूर्वं**—मोठ्या यत्नानें—**यथा प्रवृत्तः**—ज्ञान होईपर्यंत तो जसा कर्मांत प्रवृत्त झाला होता—**तथा एव**—तसाच—**कर्मणि प्रवृतस्य**—कर्मामध्यें प्रवृत्त झालेल्या त्याचें—**यत् प्रवृत्तिरूपं दृश्यते**—जें प्रवृत्ति करीत असल्यासारखें दिसतें—**तत् कर्म न**—तें कर्मच नव्हे. कीं—**येन बुद्धेः समुच्चयः स्यात्**—ज्याच्याशीं ज्ञानाचा समुच्चय होईल. [ पण एखादा पुरुष आत्म्याच्या अज्ञानामुळें व राग-द्वेषादि दोषांमुळें श्रौत-स्मार्त कर्मांमध्यें प्रवृत्त झाला, म्हणजे त्याने वेदाचें अध्ययन संपवून धर्मजिज्ञासा करून, गुरुकुलांतून परत येऊन स्त्रीपरिग्रह करून अग्निहोत्रादि कर्में आरंभिलीं, पण यज्ञ, दान व तप यांच्या योगानें त्याचे चित्त पूर्वपुण्यामुळे लवकरच शुद्ध झालें, म्हणजे त्यांतील राग-द्वेषादि दोष गेले, व परमार्थ आत्मतत्त्वाविषयीं-'हे आत्मतत्त्व सर्व एकच आहे, ब्रह्म आहे व अकर्तृ आहे' अशा प्रकारचे ज्ञान त्याला झालें म्ह. आत्म्याच्या स्वरूपाविषयींचें अज्ञानही गेलें, मग त्याला कर्माचें कांहीं कारणच उरत नाहीं. आत्म्याचे अज्ञान व राग-द्वेष हीं कर्माचीं निमित्तें आहेत. पण तीं यज्ञादि कर्मानुष्ठान व आत्मविचार यांच्या योगानें गेलीं त्यामुळे कर्मही निवृत्त झाले व कर्माचें प्रयोजन-फळही निवृत्त झाले. तथापि तो श्रेष्ठ आहे. हजारों लोक त्याचे अनुयायी आहेत, त्यानें श्रौत-स्मार्त कर्म टाकल्यास लोकही तें टाकतील, अशी स्थिति आहे. म्हणून लोकांनीं ज्ञानापूर्वी कर्माचा त्याग करून उन्मार्गी होऊं नये म्हणून तो पूर्वीप्रमाणेंच-ज्ञानापूर्वी जसा कर्म करीत होता तसाच कर्म करीत राहिला, तर त्याचें जें आभासरूप कर्म दिसतें तें वस्तुतः कर्म नव्हे. त्यामुळें त्या तसल्या आभासरूप कर्माशीं ज्ञानाचा समुच्चय मानतां येत नाहीं. कारण तत्त्ववेत्ता वर्णाश्रमाभिमानशून्य झालेला असतो. त्याला मी ब्राह्मण, मी गृहस्थ इत्यादि प्रकारचा अभिमान नसतो. त्यामुळे त्याचें कर्म ही नुस्ती शरीरेंद्रियांची चेष्टा आहे. तें विधिप्राप्त अनुष्ठान नव्हे. ]

---

१ अर्थात् लोकसंग्रहासाठीं केलें जाणारें जें कर्म तें वस्तुतः कर्मच नव्हे. त्याचा आत्मज्ञानाशीं मोक्षासाठीं समुच्चय करतां येत नाहीं. समुच्चयवादी वैदिक मोक्षासाठीं ज्ञान व कर्म यांचें एकाच वेळीं अनुष्ठान केलें पाहिजे असें म्हणतात. केवळ ज्ञान मोक्षाचें साधन आहे, हें त्यांना कबूलच नाहीं. पण रहस्यकारांना ज्ञानानेंच मोक्ष मिळतो, एवढें कबूल आहे. पण तोही निश्चय नाहीं, धरसोड फार; क्वचित् त्यांनीं ' कर्मच स्वतंत्र मोक्षसाधन आहे, ' असें म्हटलें आहे. ३०३ क्वचित् चित्तशुद्धीसाठीं वर्णाश्रमधर्म जरी प्रथम हवे असले तरी ज्ञानोत्तर ते लोकसंग्रहार्थ केले पाहिजेत. ज्ञानोत्तर केलेलीं कर्में मोक्षाला प्रतिबंधक होत नाहीत. गीतेंतील कर्ममार्ग संन्यासमार्गाचें म्ह० ज्ञानयोगाचें पूर्वांग-साधन नव्हे. कर्मानेंच सिद्धि मिळतें. रहस्यकार 'ज्ञान' शब्दाच्या अर्थाचाही फार घोटाळा करितात. ज्ञान म्ह० संन्यास, ३०५. आपल्या आत्म्याचे कल्याण कशात आहे हें कळणे ३०३, साम्यबुद्धि हेच ज्ञान, २०८, सर्वभूते आपल्या ठायीं किंवा भगवंताचे ठायीं आहेत, असें जें ज्ञान, ४४९, इत्यादि धरसोडीचीं अशीं आणखीं शेकडों उदाहरणें देतां येतील.

**यथा भगवतो वासुदेवस्य क्षात्रकर्मचेष्टितं न ज्ञानेन समुच्चीयते पुरुषार्थसिद्धये तद्व-त्तत्फलाभिसंध्यहंकाराभावस्य तुल्यत्वाद्विदुषः । तत्त्ववित्तु नाहं करोमीति मन्यते न च तत्फलमभिसंधत्ते । यथा च स्वर्गादिकामार्थिनोऽग्निहोत्रादिकामसाधनानुष्ठानायाऽऽहिताग्नेः काम्य एवाग्निहोत्रादौ प्रवृत्तस्य सामिकृते विनष्टेऽपि कामे तदेवाग्निहोत्राद्यनुतिष्ठतोऽपि न तत्काम्यमग्निहोत्रादि भवति ॥**

**भाष्यार्थ**—( तसेंच ज्ञानी पुरुषाची जी यज्ञयागादि प्रवृत्ति ती फलेच्छा व कर्तृत्वाभिमान यांनी रहित असल्यामुळें भगवानांच्या प्रवृत्तीप्रमाणे ज्ञान किंवा त्याचे फल याच्याशी समुच्चय पावत नाही, असें सांगतात-)—**यथा**—जसे—**भगवतः वासुदेवस्य**—भगवान् वासुदेवाचें—**क्षात्रकर्मचेष्टितं**—क्षत्रिय जातीच्या कर्माचे अनुष्ठान—**पुरुषार्थसिद्धये**—पुरुषार्थसिद्धीसाठीं—**ज्ञानेन न समुच्चीयते**—ज्ञानाशी समुच्चित केलें जात नाही—**तद्वत्**—त्याप्रमाणे—**विदुष**—आत्मज्ञानी पुरुषाचे कर्म त्याच्या ज्ञानाशीं समुच्चित केलें जात नाही. कारण—**तत्फलाभिसंधि-अहंकाराभावस्य तुल्यत्वात्**—त्याच्या फलाची इच्छा व कर्तृत्वाभिमान यांचा अभाव विद्वानामध्ये तुल्यच असतो. [ भगवानांचे युद्धादि क्षात्रकर्म पुरुषार्थसिद्धीसाठी त्यांच्या ज्ञानाशी जसे समुच्चय पावत नाही त्याचप्रमाणे विद्वानाचेंही कर्म त्याच्या ज्ञानाशी पुरुषार्थसिद्धीसाठी समुच्चय पावत नाही. कारण भगवानांच्या ठिकाणी त्या कर्माच्या फलाची इच्छा व त्याचा 'कर्ता मी' असा कर्तृत्वाभिमान यांचा अभाव जसा असतो तसाच तो आत्मज्ञानी विद्वानाच्या ठायी असतो. ]—**तु**—कारण—**तत्त्ववित्**—'कूटस्थ ब्रह्मच मी' असे मानणारा विद्वान्—**अहं करोमि इति न मन्यते**—मी करतो, असे मानीत नाही. —**च**—व—**तत्फलं न अभिसंधत्ते**—त्याच्या फलाची इच्छा करीत नाही. [ब्रह्मच मी असें जाणणारा प्रवृत्ति व तिचे फळ ही दोन्हीं आपल्या ठिकाणी आहेत, असे पहात नाहीं. तर ती शरीर व इंद्रियें यांच्यामध्ये आहेत, असे पाहतो. त्यामुळे व्याख्यान, भिक्षाटन इत्यादि करीत असतांना त्याच्या ठिकाणी अहंकार, संतोष, तृप्ति इत्यादि वृत्ति जरी प्रतीत झाल्या तरी त्या आभासरूप असतात. म्हणजे त्या आत्म्यामध्ये आहेत, ते माझे धर्म आहेत, असे तो पहात नाही, त्यामुळे तसल्या प्रवृत्तीचा ज्ञानाशी समुच्चय होत नाही. ] ( 'अहो पण ज्ञान होण्याच्या पूर्वावस्थेत जशी, तशीच ज्ञानोत्तरकालीही मनुष्याची नियत प्रवृत्ति दिसते, त्यामुळें ती आभासरूप आहे, असे म्हणता येत नाही' असें कोणी म्हणेल म्हणून आचार्य सांगतात-)—**यथा च**—आणि ज्याप्रमाणे—**स्वर्गादिकामार्थिनः**—स्वर्गादि कामांची इच्छा करणाऱ्या—**अग्निहोत्रादिकामसाधनानुष्ठानाय आहिताग्नेः**—त्या कामांच्या अग्निहोत्रादि साधनांचें अनुष्ठान करण्यासाठीं ज्यानें अग्निहोत्र घेतले आहे अशा—**काम्ये एव अग्निहोत्रादौ**—काम्य च अग्निहोत्रादिकांमध्ये—**प्रवृत्तस्य**—प्रवृत्त झालेल्या पुरुषाचा—**सामिकृते**—अर्धे अनुष्ठान झाल्यावर—**कामे विनष्टे अपि**—तो काम जरी निवृत्त झाला व—**तत् एव अग्निहोत्रादि अनुष्ठितः अपि**—तेंच अग्निहोत्रादि कर्म तो तसेंच करीतही राहिल तरी—**तत् काम्यं अग्निहोत्रादि न भवति**—ते काम्य अग्निहोत्रादिक होत नाही.

[ याविषयीं आपण एक उदाहरण घेऊं—स्वर्गादि विषयांची इच्छा करणाऱ्या एखाद्या पुरुषानें त्याच्या साधनांचें अनुष्ठान करण्यासाठीं अग्निहोत्र घेतलें व त्या काम्य अग्निहोत्रादिकांत तो प्रवृत्त झाला. पण पुढें कांहीं कारणानें त्याचा तो काम—स्वर्गादिकांच्या प्राप्तीची इच्छा—निवृत्त झाली. तथापि तो तें अग्निहोत्रादि-अनुष्ठान तसेंच करीत राहिला, तर तें त्याचें अग्निहोत्र काम्य होईल का ? नाहीं. कारण नित्य अग्निहोत्र व काम्य अग्निहोत्र हा भेद कामामुळें—स्वर्गादि फलाच्या इच्छेमुळें—झाला आहे. स्वर्गादि फलाची इच्छा नसली तर त्याला काम्य म्हणतां येत नाही. कामाच्या अभावी तेंच नित्य होतें. त्याच न्यायानें आत्मज्ञान झाल्यावर पूर्वीप्रमाणेच कर्म जरी करीत राहिला तरी तें वस्तुतः कर्म नव्हे. कर्माभास आहे. कारण ' मी कर्ता ' ही कर्मविधीची सामग्री त्याच्याजवळ नसते. ]

**तथा च दर्शयति भगवान् ' कुर्वन्नपि ' ' न करोति न लिप्यते ' इति तत्र तत्र ॥ यच्च ' पूर्वैः पूर्वतरं कृतम् ' ' कर्मणैव हि संसिद्धिमास्थिता जनकादयः ' इति तत्तु प्रविभज्य विज्ञेयम् । तत्कथम्, यदि तावत्पूर्वे जनकादयस्तत्त्वविदोऽपि प्रवृत्तकर्माणः स्युस्ते लोकसंग्रहार्थं 'गुणा गुणेषु वर्तन्त' इति ज्ञानेनैव संसिद्धिमास्थिताः, कर्मसंन्यासे प्राप्तेऽपि कर्मणा सहैव संसिद्धिमास्थिता न कर्मसंन्यासं कृतवन्त इत्येषोऽर्थः ॥**

**भाष्यार्थ**—( आत्मतत्त्वज्ञानी पुरुषाची कर्मप्रवृत्ति खरी नसून केवळ आभासरूप आहे, याविषयीं भगवानांची अनुमति दाखवितात-)—**तथा च**—तसेंच—**भगवान्**—स्वतः श्रीकृष्ण—**'कुर्वन् अपि न लिप्यते'**—५-७ ब्रह्मात्मैक्यदर्शी ज्ञानी लोकसंग्रहार्थ कर्म करीत असला तरी त्याने लिप्त होत नाहीं.—**'न करोति न लिप्यते'**—१३-३१ हा आत्मा शरीरांत जरी स्थित असला तरी करीत नाहीं व लिप्त होत नाहीं.—**इति तत्र तत्र दर्शयति**—असें ठिकठिकाणीं दाखवीत आहे. [ ज्ञानी कर्म करीत असला तरी त्याने लिप्त होत नाहीं, तो करीत नाहीं व लिप्त होत नाहीं, असे म्हणून भगवानांनी पुढे ठिकठिकाणीं आत्मज्ञ पुरुषाची प्रवृत्ति हा कर्माभास आहे, असें सांगितलें आहे. ] ( अहो पण ज्ञानी पुरुषाच्या हालचालीलाही—व्यापारालाही—पुढे कर्म म्हटलें आहे. तेव्हां त्याला कर्माभास कसे म्हणतां ? उत्तर-)—**च**—आणि—**यत्**—जे—**'पूर्वैः पूर्वतरं कृतम्'**—पूर्वींच्या लोकांनीं त्यांच्याही पूर्वींचें कर्म केलें,—**'कर्मणा एव हि जनकादयः संसिद्धिं आस्थिताः'**—कर्मानेंच जनकादिक संसिद्धीला प्राप्त झाले,—**इति**—असें म्हटले आहे—**तत् तु**—तें तर—**प्रविभज्य ज्ञेयं**—विभागपूर्वक जाणावें.—**तत् कथं**—तें कसे ?—**यदि तावत् पूर्वे जनकादयः**—जर पूर्वींचे जनकादिक—**तत्त्वविदः अपि**—तत्त्ववेत्ते असूनही—**प्रवृत्तकर्माणः**—कर्मात प्रवृत्त झालेले—**स्युः**—असतील तर ते—**लोकसंग्रहार्थं**—लोकसंग्रहासाठीं—**' गुणाः गुणेषु वर्तन्ते'**—शरीरेंद्रियादि गुण शब्दादि विषयांमध्यें प्रवृत्त होतात ( मी नाहीं )—**इति ज्ञानेन एव**—अशा ज्ञानानेंच—**संसिद्धिं आस्थिताः'**—संसिद्धीला—मोक्षाला प्राप्त होण्यास सज्ज झाले. म्ह०—**कर्मसंन्यासे प्राप्ते अपि**—कर्मांचा त्याग करण्याची

प्राप्ति जरी होती तरी—**कर्मणा सह एव**—कर्मांसहवर्तमानच—**संसिद्धिं आस्थिताः**—मोक्षाला प्राप्त व्हावयास तयार झाले.—**कर्मसंन्यासं न कृतवन्तः इति एषः अर्थः**—त्यांनीं कर्मसंन्यास केला नाहीं, असा हा अर्थ आहे. [ 'पूर्वीच्या जनकादिकांनीं त्यांच्याही पूर्वीच्या लोकांनीं केलेलेंच कर्म केलें,' 'जनकादिक कर्मांनेंच सांसिद्धीला प्राप्त झाले' असें जें गीतेंतच म्हटलें आहे त्याचा अर्थ ज्ञानी व अज्ञानी असा विभागपूर्वक जाणावा. तो कसा म्हणून विचाराल तर सांगतों–जनकादिक तत्त्ववेत्ते असूनही कर्मे करीत होते, असें जर मानावयाचें असेल तर ते लोकसंग्रहासाठीं 'हीं कर्मे शरीरेंद्रियांचीं आहेत माझीं नव्हेत,' असें समजूनच तीं करीत होते. अर्थात् ते ज्ञानानेंच मोक्षाला प्राप्त झाले, म्ह० कर्मसंन्यास प्राप्त झाला असतांही त्यांनीं तो केला नाहीं. आभासरूप कर्मे करीत असतांनाच मुक्त झाले, असा त्याचा अर्थ करावा. त्यांचीं कर्मे मोक्षासाठीं नव्हतीं, लोकसंग्रहासाठीं होतीं. तीं मोक्षसाधनरूप नसल्यामुळे ज्ञानाशीं त्यांचा समुच्चय मानतां येत नाहीं. ]

**अथ न ते तत्त्वविद ईश्वरसमर्पितेन कर्मणा साधनभूतेन संसिद्धिं सत्त्वशुद्धिं ज्ञानोत्पत्तिलक्षणां वा संसिद्धिमास्थिता जनकादय इति व्याख्येयम् ॥ एतमेवार्थं वक्ष्यति भगवान्सत्त्वशुद्धये कर्म कुर्वन्तीति । 'स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विन्दति मानवः' इत्युक्त्वा सिद्धिं प्राप्तस्य च पुनर्ज्ञाननिष्ठां वक्ष्यति 'सिद्धिं प्राप्तो यथा ब्रह्म' इत्यादिना ॥**

**भाष्यार्थ**—( आतां ते तत्त्वज्ञ नव्हते, या पक्षीं त्यावरील वचनांची व्यवस्था कशी लावावी, तें सांगतात- )—**अथ**—बरे,—**न ते जनकादयः तत्त्वविदः**—ते जनकादिक तत्त्ववेत्ते नव्हते, असा पक्ष घेतला तर—**साधनभूतेन ईश्वरार्पितेन कर्मणा**—साधनरूप अशा ईश्वरसमर्पण केलेल्या कर्मांनें—**संसिद्धिं**—सांसिद्धीला म्ह० —**सत्त्वशुद्धिं ज्ञानोत्पत्तिलक्षणां वा संसिद्धिं**—चित्तशुद्धि किंवा ज्ञानोत्पत्तिरूप सांसिद्धीला—**आस्थिताः**—प्राप्त झाले.—**इति व्याख्येयम्**—असे व्याख्यान करावें. [ जनकादिक तत्त्ववेत्ते नव्हते, असें मानलें तर ते ईश्वराला समर्पण केलेल्या साधनरूप कर्मांनें चित्तशुद्धिरूप किंवा ज्ञानोत्पत्तिरूप सांसिद्धीला प्राप्त झाले, असें त्या वचनांचें व्याख्यान करावें. ] ( याविषयीं प्रमाण म्हणून भगवानांच्या दोन-तीन वाक्यांचा उल्लेख करितात- )—**भगवान्**—श्रीकृष्ण—**एतं एव अर्थं**—हाच अर्थ—**'योगिनः कर्म कुर्वन्ति संगं त्यक्त्वा आत्मशुद्धये'**—अ. ५-११ कर्माधिकारी अतत्त्वज्ञ आसक्ति सोडून चित्तशुद्धीसाठीं कर्मे करितात—**इति**—या वाक्यानें—**वक्ष्यति**—पुढें सांगेल. तसेंच—'**स्वकर्मणा तं अभ्यर्च्य**'—अ. १८-४६ आपल्या विहित कर्मांने ईश्वरास पूजून—**मानवः सिद्धिं विन्दति**—मानव सिद्धीला प्राप्त होतो,—**इति उक्त्वा**—असें सांगून—**'सिद्धिं प्राप्तः यथा ब्रह्म०'**—अ. १८-५० सिद्धीला प्राप्त झालेला तो ब्रह्माला कसा पोचतो तें ऐक,—**इत्यादिना**—इत्यादि वचनानें—**सिद्धिं प्राप्तस्य च**—आणि सिद्धीला प्राप्त झालेल्या साधकाची—**पुनः ज्ञाननिष्ठां वक्ष्यति**—पुनः ज्ञाननिष्ठा सांगेल. [ भगवान् हाच अर्थ 'कर्माधिकारी अज्ञ चित्तशुद्धीसाठीं आसक्ति

सोडून कर्म करितात' या वचनानें पुढें पांचव्या अध्यायांत सांगतील.त्याचप्रमाणें पुढें अठराव्या अध्यायांतही 'स्वकर्मानें ईश्वराची पूजा करून मनुष्य सिद्धीला प्राप्त होतो,' असें म्हणून 'ज्याला सिद्धि प्राप्त झाली आहे तो ब्रह्माला कसा पोंचतो तें ऐक' या वचनाने चित्तशुद्धि किंवा ज्ञानोत्पत्तिरूप सिद्धीला प्राप्त झालेल्या त्याला ज्ञाननिष्ठा सांगतील. त्यावरून 'संसिद्धि' म्हणजे केवळ मोक्षच नव्हे. तर कर्मानें प्राप्त होणारी संसिद्धि म्ह० चित्तशुद्धि किंवा ज्ञानोत्पत्ति व ज्ञानानें प्राप्त होणारी संसिद्धि म्ह० मोक्ष, असा साधनाच्या अनुरोधानें त्या शब्दाचा अर्थ केला पाहिजे. नाहीं तर काम्य अग्निहोत्रापासून होणारी संसिद्धि म्हणजे सुद्धां मोक्षच होईल. ]

**तस्माद्गीतासु केवलादेव तत्त्वज्ञानान्मोक्षप्राप्तिः, न कर्मसमुच्चितादिति निश्चितोऽर्थः। यथा चायमर्थस्तथा प्रकरणशो विभज्य तत्र तत्र दर्शयिष्यामः॥ तत्रैवं धर्मसंमूढचेतसो महति शोकसागरे निमग्नस्यार्जुनस्यान्यत्राऽऽत्मज्ञानादुद्धरणमपश्यन्भगवान्वासुदेवस्ततोऽर्जुनमुद्दिधारयिषुरात्मज्ञानायावतारयन्नाह—अशोच्यानित्यादि॥**

**भाष्यार्थ**—( याप्रमाणें तत्त्वज्ञानानंतर मोक्षाच्या उपयोगी पडणारें असें कर्मच संभवत नसल्यामुळें ज्ञानकर्मसमुच्चयाच्या या सर्व मीमांसेवरून काय निष्पन्न होतें, तें सांगून—**अशोच्यान्०**—या श्लोकाच्या व्याख्यानास आरंभ करितात-)—**तस्मात्**—यास्तव—**गीतासु**—गीता या नांवाच्या सातशें श्लोकात्मक ग्रंथांत—**केवलात् एव तत्त्वज्ञानात्**—केवल म्ह० कर्मनिरपेक्ष-कर्मरहित नुस्त्या तत्त्वज्ञानामुळेंच—**मोक्षप्राप्तिः**—मोक्षप्राप्ति होते.—**कर्मसमुच्चितात् न**—कर्मसमुच्चित-कर्मयुक्त तत्त्वज्ञानामुळें होत नाही,—**इति**—असा—**निश्चितः अर्थः**—निश्चित अर्थ आहे, हा गीतेचा सिद्धान्त आहे.—**च यथा**—आणि ज्याप्रमाणे—**अयं एव अर्थः**—गीतेचा प्रतिपाद्य विषय हाच आहे,—**तथा**—त्या प्रकारें—**प्रकरणशः विभज्य**—प्रकरणशः विभाग करून—**तत्र तत्र**—ठिकठिकाणीं—**दर्शयिष्यामः**—आम्ही पुढे दाखवूं. [ तस्मात् गीता या नांवाच्या सातशे श्लोकांत केवळ तत्त्वज्ञानानेंच मोक्ष प्राप्त होतो, कर्मसहित तत्त्वज्ञानाने होत नाहीं: हा अर्थ-हाच सिद्धान्त निश्चित केला आहे आणि हाच सिद्धान्त गीतेत कसा सांगितला आहे ते आम्ही पुढे ठिकठिकाणीं प्रत्येक प्रकरणाचा विभाग करून दाखवूं. )—**तत्र**—याप्रमाणे गीताशास्त्राचा अर्थ निश्चित झाला असतां—**एवं**—येथवरच्या ग्रंथांत वर्णन केल्याप्रमाणे—**धर्मसंमूढचेतसः**—धर्माविषयीं-परमात्म्याविषयीं ज्याचें चित्त मूढ झालें आहे अशा, त्यामुळे—**महति शोकसागरे निमग्नस्य**—मोठया शोकसागरांत बुडून गेलेल्या—**अर्जुनस्य**—अर्जुनाचा—**आत्मज्ञानात् अन्यत्र**—आत्मज्ञानावांचून दुसऱ्या कशानेंही—**उद्धरणं अपश्यन्**—उद्धार न पाहणारा-त्याला शोकसागरांतून बाहेर काढण्याचें दुसरें साधनच नाहीं, असें जाणणारा व—**ततः**—त्या शोकसागरांतून—**अर्जुनं**—अर्जुनास—**उद्दिधारयिषुः**—वर काढण्याची इच्छा करणारा—**भगवान् वासुदेवः**—भगवान् वासुदेव—**आत्मज्ञानाय अवतारयन्**—आत्मज्ञानासाठीं प्रवृत्त करीत—**अशोच्यान् इत्यादि आह**—

'अशोच्यान्०' इत्यादि म्हणतो [याप्रमाणें गीताशास्त्र निवृत्तिपर आहे, असें ठरलें असतां धर्माविषयीं ज्याचें चित्त मूढ झालें आहे व जो मोठया शोकसागरांत निमग्न झाला आहे अशा अर्जुनाचा आत्मज्ञानाच्या उपदेशावांचून त्यांतून उद्धार होणें शक्य नाहीं, असें जाणून त्याचा त्यांतून उद्धार करण्यासाठीं आत्मज्ञानामध्यें त्याला प्रवृत्त करीत होत्साते भगवान् श्रीकृष्ण—'**अशोच्यान्०**-' इत्यादि म्हणतात. ]

---

१ पण रहस्यकार 'अशोच्यान्०' या श्लोकाला असें अवतरण देतात-"एके बाजूस क्षत्रियांचा स्वधर्म व दुसरीकडे गुरुहत्या व कुलक्षय या पातकांची भीति, याप्रमाणें ओढीत असतां 'मरावें का मारावें' या मोहांत पडून लढाई सोडून भिक्षा मागण्यास तयार झालेल्या अर्जुनास त्याचें या जगांत खरें कर्तव्य काय आहे, याचा भगवान् आतां उपदेश करीत आहेत" ६१४. अर्जुन धर्म व अधर्म यांच्या कचाटींत सांपडला होता, हें अंशतः खरें आहे. पण त्याचें कारण 'मरावें की मारावें' हा मोह नव्हे; 'मरावें की मारावें' हा मोह कशाचा? अर्जुनाला 'मी आतां काय करूं? शत्रूंना मारूं की स्वतःच मरून जाऊं' असा का येथें मोह पडला आहे? मुळींच नाहीं. तो प्रश्नच येथें नाहीं. फक्त ज्याचे परिणाम अतिशय भयंकर होणार आहेत असें युद्धासारखें घोर कर्म केल्यानें मी संसारांतून—कर्मबंधांतून मुक्त होईन की असलें घोर पण स्वधर्मरूप कर्म न केल्यानें मोक्षाधिकारी होईन, असा प्रश्न त्याच्यापुढें होता. 'मरावें की मारावें' हा प्रश्न अर्जुनासारख्याला मुळींच शोभत नाहीं आणि अर्जुन खरोखरच तशा मोहांत पडला असता तर भगवानांनी त्याला काय सांगितलें असतें, हें सांगावयास व्यास नको होते. 'तुझ्या अंगांत सामर्थ्य असले तर मार, नाहीं तर खुशाल मर' हेंच त्याचें उत्तर आहे. त्यासाठीं आत्मोपदेश व आत्मज्ञानाचे कर्मयोगादि उपाय सांगत बसण्याचें कारण नव्हतें. तो स्वतःच आपल्याला धर्मसंमूढचित्त म्हणत आहे, व मला निश्चित श्रेय सांग अशी प्रार्थना करीत आहे. मी तुझा शिष्य आहे. तुला शरण आलो आहें, मला उपदेश कर, असे म्हणत आहे. मला शोक—विषाद झाला आहे. तो भूलोकचें किंवा स्वर्गाचें निष्कंटक राज्य मिळाल्यानेंही जाणार नाहीं, असे सांगत आहे. असें असतांना त्याच्या शब्दांचा विचार न करितां बळेच त्याच्या गळ्यांत 'मारावें की मरावे' याविषयींचा आपल्याच पदरचा मोह बांधणे, अनुचित होय. "लढाईसारख्या घोर कर्मानें आत्म्याचें कल्याण होणार नाहीं, अशी अर्जुनाची शंका होती." आत्म्याचें कल्याण होणें म्ह० काय? आत्मा नित्य कल्याणरूपच आहे. त्याचें कल्याण, किंवा अकल्याण संभवतच नाहीं. त्यापेक्षां 'माझें कल्याण होणार नाहीं' असें म्हटलें असतें तर ते किती चांगले झालें असतें? पण गीतारहस्यासारख्या शास्त्रीय ग्रंथांतही शब्दयोजना अगदीं अयोग्य व मनसोक्त केली आहे. असो; अर्जुनाची तशी शंका होती का? मग ती श्रीकृष्णांनी कशी घालविली? युद्धासारख्या घोर कर्मानें आत्म्याचे कल्याण होईल, असे सांगून ती घालविली? रहस्यकार म्हणतात-" ज्या थोर पुरुषांनी परब्रह्माचें ज्ञान करून घेऊन आपल्या आत्म्याचें पूर्ण कल्याण करून घेतलें ते या जगांत कसे वागतात, येथपासून गीतेंतील उपदेशास सुरवात आहे." अर्जुनाची शंका काय व भगवानांच्या उपदेशास सुरवात कोठून होते, याचा कांहींच मेळ नाहीं. ज्या थोर पुरुषांनीं परब्रह्माचें ज्ञान संपादन केलेलें असतें त्यांनींही ज्ञानासाठीं कांहीं साधनांचें अनुष्ठान केलेलें असतेंच. साधनानुष्ठानावांचून साध्य

–ज्ञान होणें शक्य नाहीं. पण रहस्यकारांचा आशय असा आहे कीं ज्ञानाच्या साधनांची येथें चर्चा केलेली नाहीं, तें सहज होतें, त्यासाठी कांही खटपट करावयास नको. येथें जो मोठा थोरला प्रश्न सोडवावयाचा आहे तो 'परब्रह्माचें ज्ञान करून घेऊन आपल्या आत्म्याचें पूर्ण कल्याण करून घेतलेले थोर लोक जगांत कसे वागतात?' हा आहे. अर्जुनाला 'माझें खरें कल्याण म्ह० बंधापासून मोक्ष कोणत्या मार्गानें होईल? युद्धासारखा हिंसाप्रधान स्वधर्म केल्यानें की अहिंसाप्रधान निवृत्त धर्म स्वीकारल्यानें,' याची कांहीं जिज्ञासा नव्हती तर 'मी ज्ञानी आहें,मला ज्ञान झालें आहे, माझ्या आत्म्याचें पूर्ण कल्याण झालें आहे,आतां पुढें मी जगांत कसा वागूं?' ते जाणण्याची इच्छा होती;म्हणून भगवानांनीं त्याच उपदेशास आरंभ केला आहे! कोणही असत् कल्पना! आपल्या उपदेशावर पुढें अशा असंबद्ध कल्पना उभारल्या जातील, हें भगवान् श्रीकृष्ण व व्यास यांच्या कधी स्वप्नांतही आलें नसेल!!

"भगवान् म्हणतात कीं जगाच्या रहाटीकडे पाहिलें तर आत्मज्ञानी पुरुषांच्या आयुष्यक्रमणाचे अनादि कालापासून दोन मार्ग चालत आले आहेत, असें दिसून येतें." (गी.३-३) पण भगवान् तिसऱ्या अध्यायाच्या तिसऱ्या श्लोकांत आत्मज्ञानी पुरुषांच्या आयुष्यक्रमणाचे अनादि कालापासून दोन मार्ग चालत आले आहेत, असे कोठें म्हणत आहेत? गीतेचा सरळ अर्थ करण्याची प्रतिज्ञा करून सांप्रदायिक टीकाकारांना दोष देणाऱ्या रहस्यकारांनीं हें भगवानांचें म्हणणें आणलें कोठून? 'या लोकीं मीं पूर्वी दोन प्रकारची निष्ठा सांगितली आहे. सांख्यांची ज्ञानयोगानें व योग्यांची कर्मयोगानें' असा तिसऱ्या अध्यायाच्या तिसऱ्या श्लोकाचा सरळ अर्थ आहे. त्यांत आत्मज्ञानी पुरुषांच्या आयुष्यक्रमणाचा कांही संबंध नाही. जगांत ज्ञानी व अज्ञानी किंवा निवृत्तिमार्गी व प्रवृत्तिमार्गी असे दोन प्रकारचे लोक जगाच्या आरंभापासूनच संभवत असल्यामुळें त्या दोघांसाठीं दोन प्रकारची निष्ठा–अनुष्ठानतात्पर्य सांगणेंच अवश्य होते. जगाच्या आरंभीं किंवा आतां सर्वच मानव ब्रह्मज्ञानी असण्याचा संभव नाही. तर नेहमीच कांही थोडे–फार विरळा ज्ञानी व बाकीचे सर्व अज्ञानी असण्याचाच संभव आहे. (अ. २ श्लो. २९ अ. ७ श्लो. ३). यासाठीं ज्ञानी पुरुषांकरितां ज्ञानयोग व अज्ञांकरितां कर्मयोग, सृष्टीच्या आरंभीच भगवानांनीं सांगितला, हीच व्यवस्था जास्त सयुक्तिक आहे. ज्ञानी पुरुषांच्या आयुष्यक्रमणाचेच दोन मार्ग सांगण्यासाठीं जर गीतेचा आरंभ असेल तर ती आम्हां अज्ञांकरितां नाही, ज्ञानी पुरुषाकरितांच आहे, असें म्हणावें लागेल; आणि आजवर लक्षावधि लोक तिचा पाठ, अभ्यास, विचार वगैरे जो करीत आले आहेत तो सर्व व्यर्थ होईल.

रहस्यकार आणखी पुढें म्हणतात–"आत्मज्ञान संपादन केल्यावर शुकासारखे पुरुष संसार सोडून आनंदानें भिक्षा मागत हिंडतात तर जनकासारखे दुसरे आत्मज्ञानी ज्ञानोत्तरही स्वधर्माप्रमाणे लोककल्याणार्थ जगाच्या शेकडों उलाढालीत आपला वेळ घालवीत असतात. पहिल्या मार्गास सांख्य किंवा सांख्यनिष्ठा असें म्हणतात आणि दुसऱ्यास कर्मयोग किंवा योग असें नांव आहे. (श्लो. ३९ पहा)" ६१५.

बहुतेक ज्ञानी ज्ञानोत्तर विद्वत्संन्यास करितात व कांहीं थोडेसे संन्यास न करितां 'गुणा गुणेषु वर्तन्ते' अ. ३-२८ या न्यायानें लोकसंग्रहार्थ कर्म करीत राहतात, हें खरें; पण त्यांचें कर्म हा कर्मयोग नव्हे. कारण तो 'साधन' या रूपानें आचरिला जात नाहीं.

पण गीतेंत योग्यांची दुसरी निष्ठा म्हणून सांगितलेला जो कर्मयोग तो ज्ञानाची योग्यता प्राप्त करून देणारें साधन आहे. ६-३. तथापि रहस्यकारांच्या म्हणण्याला मान देण्यासाठी त्या दोन्ही निष्ठा ज्ञानी पुरुषांच्याच आहेत असें जरी मानलें तरी शुकासारखे व जनकासारखे ज्ञानी लोक जगांत किती आहेत? अगदीं थोडे! अशा थोड्याशा ज्ञानी लोकांनी ज्ञानोत्तर काय करावें, हें सांगण्याची व्यासांना इतकी काय मोठी गरज भासली कोण जाणे! शिवाय ज्ञानी पुरुषाच्या आयुष्यक्रमणाच्या या दोन निष्ठा किंवा मार्ग आहेत असे म्हटलें की अर्जुन ज्ञानी होता, असें मानावें लागतें. पण ज्ञानी 'धर्मसंमूढचेता:' होत नाही. सारांश रहस्यकारांची 'गीतेचा आरंभ ज्ञानी पुरुषांनी आपलें आयुष्य कसें कंठावें, हे सांगण्यासाठी झाला आहे,' असें समजणे ही एक फार मोठी चूक झाल्यामुळे पुढील सर्व अर्थ व उपपादन अग्राह्य व असंबद्ध झालें आहे. भाषेत तर पदोपदीं स्खलन आढळतें. उदाहरणार्थ यावरील उताऱ्यांतच पहा—' शुकासारखे ससार सोडून आनंदाने भिक्षा मागत हिंडतात.' जणु काय भिक्षा मागत हिंडणे, हेंच त्यांचे प्रधान कार्य असतें. 'संसाराचा परित्याग करितात,' 'संन्यास करितात' अशा दोन किंवा तीन शब्दांत जो आशय सहज सांगतां आला असता व सुबोधही झाला असता तोच अधिक शब्द योजून दुर्बोध व सदोष केला आहे. तसेंच, 'जनकासारखे दुसरे आत्मज्ञानी ज्ञानोत्तरही स्वधर्माप्रमाणे लोककल्याणार्थ जगाच्या शेकडों उलाढालीत आपला वेळ घालवितात.' जगाच्या शेकडो उलाढालीत वेळ घालवितात, याला प्रमाण काय? जनक राज्य करीत होता, हे खरें; पण तेवढ्यावरून त्यानें शेकडो उलाढाली केल्या, हे कसें सिद्ध होतें? त्यानें दिग्विजय केला, शेकडों अश्वमेध केले, अनेक लढाया जिंकल्या, असे कोठें वर्णन आहे काय? वंशपरंपराप्राप्त राज्य चालविणें, याला 'शेकडो उलाढाली' हें नांव कसें देतां येतें, तें रहस्यकारांसच माहीत. शिवाय तसें जरी क्षणभर मानलें तरी सर्वच ज्ञानी जनकासारखे दृढज्ञानी असतात, असें म्हणतां येत नाही. पंचदशींत 'जनकादे: कथ राज्यं इति चेत् दृढबोधत: । तथा तथापि चेत् तर्कं पठ यद्वा कृषि कुरु ॥' म्ह० आत्मज्ञ पुरुषाने आत्मचिंतनावांचून कांही करूं नये, हाच जर सिद्धान्त आहे तर जनकादिकांनी राज्य कसें केलें म्हणून म्हणशील तर सांगतो. त्यांचा बोध—ज्ञान अतिशय दृढ असल्यामुळें त्यांनी राज्य केलें. तुझाही बोध जर तसाच दृढ असेल तर तूंही तर्कशास्त्राचा अभ्यास कर किंवा शेती कर, असें म्हटलें आहे. अर्थात् एक पाय अग्नींत जळत आहे व दुसऱ्या पायाला सुंदर स्त्रिया कोमल हातांनी सुवासिक तेल लावीत आहेत. तरी सुख व दु:ख कांही नाही, अशी ज्याची वृत्ति झाली असेल त्यानें जनकाप्रमाणें राज्य खुशाल करावे. पण असे लोक रहस्यवाचकांत कितीसे आहेत? जर एकही नाही तर जनकाचें उदाहरण त्यांच्या काय कामाचें? शिवाय जे आत्मज्ञानी कृतकार्य झालेले असतात त्यांनीं काय करावें? हें युद्धाच्या ऐन प्रसंगीं सांगत बसण्याचें भगवानांस काय कारण झालें, कोण जाणें!

"पण या दोन्ही निष्ठा जरी प्रचारांत असल्या तरी त्यांतले त्यांत कर्मयोग अधिक श्रेष्ठ असा गीतेचा सिद्धान्त आहे, (५-२) हे पुढें सांगण्यांत येईल" या गीतेच्या सिद्धान्ताविषयीं आम्हीही पुढेंच विचार करूं.

"या दोन निष्ठांपैकी अर्जुनाच्या मनाचा कल आतां संन्यास निष्ठेकडे वळला होता. म्हणून त्याच मार्गातील तत्त्वज्ञानानें अर्जुनाची चूक प्रथम त्याच्या नजरेस आणून देऊन

पुढें एकूणचाळीसाव्या श्लोकापासून कर्मयोगाच्या प्रतिपादनास भगवंतांनी सुरवात केली. " तर मग एकूण अर्जुनाला या ज्ञानोत्तर दोन निष्ठा माहीत होत्या. त्यांतील संन्यासनिष्ठे-कडे त्याचा कल असल्यामुळें त्याच मार्गांतील तत्त्वज्ञानानें भगवंतांनीं त्याची चूक उपदे-शाच्या आरंभी दाखविली आहे ! आणि ती चूक दाखविणें, याचेच नांव सांख्य !! एकं-दरीत गीतारहस्याचें प्रतिपादन अपूर्व खरें !!!

" सांख्य मार्गांतील पुरुष ज्ञानोत्तर कर्में करीत नसले तरी त्यांचें ब्रह्मज्ञान व कर्मयोगां-तील ब्रह्मज्ञान कांही निराळें नसतें. तेव्हां सांख्यनिष्ठेप्रमाणे पाहिलें तरीही आत्मा जर अविनाशी व नित्य आहे, तर मग ' मी अमक्याला कसे मारूं ' ही तुझी बडबड व्यर्थ होय, असें किंचित् उपहासपूर्वक अर्जुनास भगवंतांचें प्रथम सांगणें आहे " ६१५ दोन्ही निष्ठेतील ब्रह्मज्ञान जर निराळे नव्हे तर मग ' त्याच म्ह. संन्यासमार्गांतील तत्त्वज्ञानाने अर्जुनाची चूक प्रथम त्याच्या नजरेस आणतात, ' याचा काय अर्थ ? आत्मा अविनाशी व नित्य जरी असला तरी ' मी अमक्याला कसें मारूं ? ' हे अर्जुनाचे म्हणणें बडबड कशी ठरते ? आणि ती जर बडबड तर तिलाच भगवानांनीं ' प्रज्ञावाद ' कमे म्हटले आहे ? गीतेला ' कर्मयोगशास्त्र ' असें नांव देऊन त्यांत संन्यासमार्गी टीकाकारांवर वृथा गहजब जरी केला आहे तरी त्यांतील प्रतिपादन शास्त्रीय ग्रंथाला न शोभण्यासारखें कसें आहे, तें एवढ्यावरूनच सुज्ञ वाचकांच्या लक्षांत येईल. रहस्यकारांच्या या विस्तृत अवतरणावरून काय निष्पन्न होतें तें पहा—'अर्जुन मरावें का मारावें या मोहांत पडून युद्ध सोडून भिक्षा मागण्यास तयार झाला. म्हणून त्याचें खरे कर्तव्य काय ते भगवान् सांगत आहेत. पर-ब्रह्मज्ञानानें पूर्ण कृतार्थ झालेले थोर पुरुष जगांत कसे वागतात येथपासून गीतेचा आरंभ झाला आहे. आत्मज्ञांच्या आयुष्यक्रमणाचे दोन मार्ग. एक प्रवृत्ति—कर्मयोग—योग व दुसरा निवृत्ति—सांख्यनिष्ठा. त्यांतील प्रवृत्ति श्रेष्ठ. दोन्ही मार्गांतील ज्ञान एकच. आत्मा जर नित्य तर मी भीष्मादिकांना कसें मारूं ? ही बडबड व्यर्थ आहे, असें भगवान् प्रथम सांगतात. '

आचार्य म्हणतात—" शोक व मोह हे संसाराचे बीजभूत दोष आहेत. 'अहं' व 'मम' म्ह० हा मी व हें माझें, या भावनेमुळें ते उद्भवतात. शोक-मोहांनीं व्याकुळ झालेला म-नुष्य स्वधर्म टाकून परधर्म स्वीकारण्यास तयार होतो. परधर्म न स्वीकारतां तो स्वधर्मानुष्ठानच जरी करीत राहिला तरी त्याची ती धर्मप्रवृत्ति फलेच्छेनें व साहंकारच होते. त्यामुळें जन्ममरण-सुखदुःख-प्राप्तिरूप संसार अविच्छिन्न चालतो. अर्जुन शोक म्ह० विषाद ( अ. १ ) व मोह म्ह० आत्मा व अनात्मा यांचा अविवेक ( अ. २ श्लो. ७ ) यांनीं व्याकुळ होऊन युद्धरूप स्वधर्म सोडण्यास व संन्यासरूप परधर्म—ब्राह्मणधर्म स्वीकारण्यास तयार झाला होता, ( अ. २ श्लो. ५ ) आत्मज्ञानावांचून त्याच्या शोकमोहाची निवृत्ति होणें अशक्य होतें. म्हणून त्या शोकमोहसागरांतून त्याचा उद्धार करण्यासाठी आत्मज्ञानाचा साधनांसह उपदेश करण्यास भगवान् प्रवृत्त झाले आहेत. " या दोन अवतरणांतील गीता-शास्त्राला शोभणारें व वेदान्तशास्त्राला धरून कोणतें अवतरण आहे, याचा विचार वाच-कांनींच करावा.






आत्मानं रथिनं विद्धि शरीरं रथमेव तु। बुद्धिं तु सारथिं विद्धि मनः प्रग्रहमेव च ॥३॥
इन्द्रियाणि हयानाहुर्विषयांस्तेषु गोचरान्। आत्मेन्द्रियमनोयुक्तं भोक्तेत्याहुर्मनीषिणः ॥४॥ काठक २. ३

**अशोच्यानन्वशोचस्त्वं प्रज्ञावादांश्च भाषसे ।**
**गतासूनगतासूंश्च नानुशोचंति पंडिताः ॥ ११ ॥**

**अन्वयार्थ—त्वं**—तूं—**अशोच्यान्**—शोक करण्यास योग्य नसलेल्या भीष्मादिकांना उद्देशून-त्यांच्यासाठीं—**अन्वशोचः**—शोक केला आहेस.—**च**—आणि—**प्रज्ञावादान्**—बुद्धिमानांच्या गोष्टी तर—**भाषसे**—सांगतोस. पण—**पण्डिताः**—पंडित-आत्मज्ञानी—**गतासून्**—मेलेल्यांविषयीं—**च अगतासून्**—व जिवंत असलेल्यांविषयीं—**न अनुशोचन्ति**—असा शोक करीत नाहींत. ११.

**न शोच्या अशोच्या भीष्मद्रोणादयः सद्वृत्तत्वात्परमार्थरूपेण च नित्यत्वात्, तानशोच्यानन्वशोचोऽनुशोचितवानसि ते म्रियन्ते मन्निमित्तमहं तैर्विनाभूतः किं करिष्यामि राज्यसुखादिनेति । त्वं प्रज्ञावतां बुद्धिमतां वादांश्च वचनानि च भाषसे । तदेतन्मौढ्यं पाण्डित्यं च विरुद्धमात्मनि दर्शयस्युन्मत्त इवेत्यभिप्रायः ॥**

**भाष्यार्थ—न शोच्याः अशोच्याः**—जे शोक करण्यास योग्य नाहींत ते अशोच्य—**भीष्मद्रोणादयः**—भीष्मद्रोणादिक (ते कां ? तर)—**सद्वृत्तत्वात्**—सद्वृत्तत्वामुळे-सदाचरणामुळे—**च परमार्थरूपेण नित्यत्वात्**—व परमार्थरूपानें नित्यत्वामुळे [ भीष्मादिक सदाचरणसंपन्न-सद्वर्तनशील व परमार्थ आत्मरूपानें नित्य असल्यामुळें अशोच्य आहेत. ]—**तान् अशोच्यान्**—त्या अशोच्य असलेल्या भीष्मादिकांस उद्देशून—**अन्वशोचः-अनुशोचितवान् असि**—तूं शोक केला आहेस (तो कसा ?) —**ते मन्निमित्तं म्रियन्ते**—ते भीष्मादिक माझ्यामुळे मरत आहेत.—**तैः विनाभूतः अहं राज्यसुखादिना किं करिष्यामि इति**—त्यांनी विरहित झालेला मी राज्य,सुख,इत्यादिकांना घेऊन काय करूं,इत्यादि भाषणानें तूं शोक केलास—**च**—आणि —**त्वं**—तूं—**प्रज्ञावतां-बुद्धिमतां**— बुद्धिमानांची —**वादान्-वचनानि**—वचनें—**भाषसे**—बोलतोस—**तत् एतत् मौढ्यं च पांडित्यं च उन्मत्तः इव आत्मनि विरुद्धं दर्शयसि**—तें हें मूढत्व व पांडित्य-तत्त्वज्ञत्व उन्मत्ताप्रमाणें -वेड्याप्रमाणे आपल्यामध्ये विरुद्ध दाखवितोस,—**इति अभिप्रायः**—असा याचा आशय. [ भीष्मादिक सद्वर्तनशील आहेत, त्यामुळे त्यांचा मरणोत्तर उत्कर्षच होणार हें निर्विवाद आहे. ज्यांचा उत्कर्ष होतो,ते केव्हांही शोच्य नसतात. शिवाय ते परमार्थ आत्मरूपानें नित्य आहेत. त्यामुळे त्यांचा नाशच संभवत नाहीं. म्हणून त्या दृष्टीनेंही ते अशोच्य आहेत. पण अशा अशोच्य असलेल्या भीष्मादिकांविषयींही तूं शोक केला आहेस, 'माझ्यामुळे हे सर्व मरत आहेत; पण त्यांचा वियोग झाल्यावर मी राज्यसुखादिकांला घेऊन काय करणार?' (अ.१.श्लो.३२,३३) असा त्यांच्याविषयीं शोक केलास व इकडे तर मोठ्या तत्त्ववेत्त्याच्या गोष्टी (अ. १श्लो. ४०-४५) सांगत आहेस.म्हणजे एखाद्या वेड्याप्रमाणें तूं आपल्या ठिकाणीं मूढपणा व आत्मज्ञानीपणा, असे परस्पर विरुद्ध भाव दाखवीत आहेस.]

**यस्माद्गतासून्गतप्राणान्मृतानगतासूनगतप्राणाञ्जीवतश्च नानुशोचन्ति पण्डिता आत्मज्ञाः। पण्डाऽऽत्मविषया बुद्धिर्येषां ते हि पण्डिताः। "पाण्डित्यं निर्विद्य" इति श्रुतेः। परमार्थतस्तु नित्यानशोच्याननुशोचस्यतो मूढोऽसीत्यभिप्रायः ॥ ११ ॥**

**भाष्यार्थ—यस्मात्**—कारण— **पंडिताः-आत्मज्ञाः**—पंडित-आत्मज्ञ—**गतासून्-गतप्राणान्-मृतान्**—ज्यांचे प्राण गेले आहेत-जे मेले आहेत त्यांस उद्देशून-त्यांच्यासाठीं व—**अगतासून्-अगतप्राणान्-जीवतः**—ज्यांचे प्राण गेले नाहींत-जे जिवंत आहेत त्यांस-त्यांच्यासाठीं—**न अनुशोचन्ति**—शोक करीत नाहींत.—**पण्डा आत्मविषया बुद्धिः येषां ते हि पंडिताः**—पंडा म्ह० आत्म्याविषयींची बुद्धि ज्यांना आहे ते पंडित.—**'पांडित्यं निर्विद्य'**—आत्मज्ञान निश्चयानें संपादन करून,—**इति श्रुतेः**—अशी बृहदारण्यक श्रुति याविषयीं प्रमाण आहे.(बृह. भाष्यार्थ अ.३ पृ.१५५)—**तु**—पण तूं—**परमार्थतः नित्यान् अशोच्यान् अनुशोचसि**—परमार्थदृष्टया नित्य असलेल्या व त्यामुळेंच अशोच्य अशा भीष्मादिकांविषयीं शोक करीत आहेस—**अतः मूढः असि**—म्हणून तूं मूढ-अविवेकी आहेस,—**इति अभिप्रायः**—असा याचा अभिप्राय. [आत्मज्ञानी पंडित मेलेल्या व जिवंत असलेल्या लोकांविषयीं शोक करीत नाहीत. मूर्ख, अज्ञ, दुराचारी इत्यादि आप्त जिवंत असतांनाहीं शोच्य होतात, हें प्रसिद्ध आहे. पण्डा म्ह० आत्मविषयकबुद्धि-आत्मज्ञान ते ज्यांना असते ते पंडित.कारण बृहदारण्यकोपनिषदांत 'पांडित्य म्ह०आत्मज्ञान निश्चयानें संपादन करून' असें म्हटले आहे. सारांश ज्याअर्थी तूं नित्य, व नित्य असल्यामुळेंच अशोच्य असलेल्या भीष्मादिकांविषयीं शोक करीत आहेस त्याअर्थीं अपंडित-अनात्मज्ञ आहेस. तुझ्या या शोकावरूनच तुझें अज्ञान-अविवेक-मोह व्यक्त होत आहे.] ११.

---

१ रहस्यकार 'अशोच्यान्०' इत्यादि श्लोकांतील काही शब्दांचा अर्थ असा करितात—"......आणि ज्ञानाच्या बाता सांगतोस. कोणाचे प्राण गेले (काय) आणि राहिले (काय) ज्ञानी पुरुष त्याचा शोक करीत नाहीं." प्रज्ञा + वादान् = ज्ञानाच्या + बाता, हा अर्थ फारच सरळ आहे ! प्रज्ञा म्ह० बुद्धि, बुद्धि म्ह० ज्ञान आणि वाद म्ह० बाता. श्लोकांतील 'गतासून्' व 'अगतासून' हे सामासिक शब्द आहेत. आचार्य व इतर सर्व टीकाकार त्यांचा बहुव्रीहि समास करितात व "ज्यांचे प्राण गेले आहेत व ज्यांचे गेले नाहींत म्ह० जे मेले आहेत व जे जिवंत आहेत अशा दोन्ही प्रकारच्या आप्तेष्टांविषयीं आत्मज्ञानी शोक करीत नाहीत" असा अर्थ करितात. तूं भीष्मादिकांविषयीं शोकही करीत आहेस व विद्वानांच्या गोष्टीही सांगत आहेस. म्ह० वेड्याप्रमाणें तूं आपल्यामध्ये परस्पर विरुद्ध धर्म दाखवीत आहेस. त्यावरून तू तत्त्वज्ञ नाहींस हे उघड होते, असा भाष्यकारांचा आशय आहे. पण रहस्यकार समास कोणता, काय, वगैरे कांहींच पत्ता लागूं न देतां 'प्राण गेले काय व राहिले काय त्याचा ज्ञानी शोक करीत नाहीं' असे म्हणतात. पण प्राणासाठीं शोक कोणीच करीत नाहीं, मेलेल्या किंवा जिवंत असून मृततुल्य झालेल्या मनुष्यांसाठींच कोणी झाला तरी शोक करीत असतो. ज्ञानी तशा मनुष्यांविषयींही शोक-विषाद-करीत नाहीं,असे भगवानांना येथे सांगावयाचें आहे. पण रहस्यकार या श्लोकावरील टीपेंत म्हणतात—" या

**न त्वेवाहं जातु नाऽऽसं न त्वं नेमे जनाधिपाः ।**
**न चैव न भविष्यामः सर्वे वयमतः परम् ॥ १२ ॥**

**अन्वयार्थ**—**अहं**—मी—**जातु**—केव्हांही—**न आसं**—नव्हतो—**इति तु न एव**—असें तर नाहींच.—**त्वं जातु न आसीः**—तूं केव्हां नव्हतास—**इति न एव**—असेंही नाहीं.—**इमे जनाधिपाः**—हे राजे—**न आसन् इति न एव**—कधीं नव्हते असें नाहींच—**च**—आणि—**वयं सर्वे**—आम्ही सर्व—**अतः परं**—या शरीराचा नाश झाल्यावर—**न भविष्यामः**—नसूं-नाहींसे होऊं—**इति न एव**—असेंही नाहींच. १२.

**कुतस्तेऽशोच्या यतो नित्याः । कथम्—न त्वेव जातु कदाचिदहं नाऽऽसं किं त्वासमेवातीतेषु देहोत्पत्तिविनाशेषु नित्य एवाहमासमित्यभिप्रायः । तथा न त्वं नाऽऽसीः किं त्वासीरेव । तथा नेमे जनाधिपा नाऽऽसन्किं त्वासन्नेव । तथा न चैव न भविष्यामः, किं तु भविष्याम एव सर्वे वयमतोऽस्माद्देहविनाशात्परमुत्तरकालेऽपि त्रिष्वपि कालेषु नित्या आत्मस्वरूपेणेत्यर्थः । देहभेदानुवृत्त्या बहुवचनं नाऽऽत्मभेदाभिप्रायेण १२**

**भाष्यार्थ**—**ते अशोच्याः कुतः**—ते भीष्मादिक अशोच्य कोणत्या कारणामुळें?—**यतः नित्याः**—ज्यास्तव ते नित्य आहेत, त्यास्तव अशोच्य—**कथं**—नित्य कसे?—**अहं**—मी—**जातु-कदाचित्**—केव्हांही—**न आसं इति तु न एव**—न होतों, असें तर नाहींच—**किंतु**—परंतु—**अतीतेषु देहोत्पत्तिविनाशेषु**—मागें होऊन

---

श्लोकांत प्राण गेल्याचा किंवा राहिल्याचाही शोक करीत नाहीत, असें विधान आहे." येथील 'विधान' हा शब्द अगदीं अस्थानीं योजला आहे. मीमांसा, वेदान्त किंवा धर्मशास्त्र यांत विधान हा शब्द 'विधि' या अर्थी योजतात आणि विधीचें उल्लंघन कोणालाच करतां येत नाहीं. गीतारहस्यांत असे अनुचित शब्दप्रयोग पुष्कळ आहेत. 'असें विधान आहे' याबद्दल 'असें सांगितलें आहे' असें जर म्हटलें असतें, तर हेंच वाक्य अगदीं निर्दोष व सुबोध झालें असतें. पण अनेक आधुनिक पदवीधरांच्या व एक-दोन शास्त्र्यांच्याही मदतीनें व सल्ल्यानें प्रसिद्ध केल्या गेलेल्या रहस्यांत असे दोष रहावे हें मोठेंच आश्चर्य होय. 'गेल्याचा किंवा राहिल्याचा' हा अर्थ मूळाला धरून नाहीं. रहस्यकार टीकाकारांप्रमाणे 'प्राण राहिल्याचा शोक कसा व कां करावयाचा' याबद्दल कीस काढीत न बसतां 'शोक करणें म्ह० बरें-वाईट वाटणें किंवा परवा करणें असा व्यापक अर्थ करावा' असें म्हणतात. पण प्रकरणावरून तसा व्यापक अर्थ करतां येत नाहीं. प्रकरण आहे प्रत्यक्ष शोकाचें-विषादाचें. अर्जुन शोक करीत आहे, विषाद करीत आहे. भगवान् म्हणतात-तूं शोक करीत आहेस पण तत्त्ववेत्ते मृत किंवा जिवंत असून मृततुल्य झालेल्या लोकांविषयीं तुझ्यासारखा शोक करीत नाहींत. अर्थात् तूं आत्मज्ञ नाहींस. त्यामुळेंच ज्ञाननिष्ठेचा अधिकारी नाहींस. स्वधर्मरूप कर्मयोगाचाच अधिकारी आहेस. 'ज्ञानी पुरुषास कोणाचे प्राण गेले किंवा राहिले, तरी सारखेच' हें सांगण्यांत काय स्वारस्य आहे, तें रहस्यकारांनाच ठाऊक!

गेलेल्या देहाच्या उत्पत्तीच्या व नाशाच्या वेळीं—**आसं एव**—होतोंच.—**अहं नित्यः एव आसं इति अभिप्रायः**—मी नित्यच होतों,असा याचा आशय.—**तथा**—त्याच-प्रमाणे—**त्वं न आसीः इति न**—तूं नव्हतास असें नाहीं—**किं तु आसीःएव**—तर होतासच—**तथा इमे जनाधिपाः**—तसेच हे राजे—**न आसन्**—न होते—**इति न**—असें नाहीं,—**किं तु आसन् एव**—तर होतेच.—**तथा न च एव न भविष्यामः**—तसेच, आम्ही न होऊं असे नाहीं.—**किं तु**—तर—**सर्वे वयं**—आम्ही सर्व—**अतः-देहविनाशात्**—या देहविनाशाच्या—**परं-उत्तरकाले अपि**—नंतर-उत्तरकाळींही-मेल्यावरसुद्धा—**भविष्यामः एव**—असणारच—**त्रिषु अपि कालेषु आत्मस्वरूपेण नित्याः इत्यर्थः**—म्हणजे तिन्हीं काळीं आत्मस्वरूपानें नित्य आहोत, असा त्याचा भावार्थ. येथें 'आम्ही सर्व' असें जे—**बहुवचनं देहभेदानुवृत्त्या**—बहुवचन योजलें आहे ते देहांच्या भेदाच्या अनुवृत्तीने आहे.—**आत्मभेदाभिप्रायेण न**—आत्मा प्रत्येक शरीरांत भिन्न भिन्न आहे, या आशयानें ते योजलेलें नाहीं. [ मी, तूं व हे सर्व राजे या जन्माच्या पूर्वी नव्हतों असें नाहीं व मेल्यावर नसूं असेही नाहीं. आम्ही आत्मरूपाने तिन्ही काळीं नित्य आहों. पण 'आत्मा जर एक आहे तर हे राजे, आम्ही, असें बहुवचन कसें योजले आहे ? त्यावरूनच भगवानांना आत्म्याचे एकत्व कबूल नाहीं, असे होतें, ' असे कोणी म्हणेल, तर ते बरोबर नाहीं. कारण ज्याच्याशीं बोलावयाचे असते त्याच्या भाषेत बोलावे लागते, त्यावांचून त्याला ते कळतच नाहीं. अर्जुन, मी-तूं-हे इत्यादि शब्दव्यवहार करणारा होता. कारण तो त्या देहांच्या भिन्नत्वाला उद्देशून तसे समजत होता. म्हणून भगवानांनीं त्याच्याच भाषेंत तसें म्हटलें आहे. आत्मा प्रतिशरीरांत निरनिराळा आहे, या अभिप्रायाने ते बहुवचन योजलेले नाहीं. कारण आत्म्याचा भेद मानूनच जर तें बहुवचन योजलेलें असते तर पुढें ' सर्वभूतेषु एकं भावं ' 'विभक्तेषु अविभक्तं ' अ. १८ श्लो. २०. ' सर्वभूतेषु समं तिष्ठन्तं ' ' विनश्यत्सु अविनश्यन्तं ' अ. १३ श्लो. २७ असे म्हणतां आलें नसते. यास्तव 'आम्ही व हे सर्व ' हे बहुवचन देहोपाधींना उद्देशून आहे. या संबंधाने रहस्यकारांचें जें म्हणणें आहे ते सर्वथा ग्राह्य आहे. ] १२.

( आत्मा नित्य कसा, त्याविषयीं दृष्टान्त— )

**देहिनोऽस्मिन्यथा देहे कौमारं यौवनं जरा ।**
**तथा देहान्तरप्राप्तिर्धीरस्तत्र न मुह्यति ॥ १३ ॥**

**अन्वयार्थ—यथा**—ज्याप्रमाणे—**अस्मिन् देहे**—या देहांत-शरीरांत—**देहिनः**—देहवान् आत्म्याला—**कौमारं**—बाल्यावस्था-लहानपण,—**यौवनं**—मध्यमावस्था--तरुणपण,—**जरा**—जीर्णावस्था-म्हातारपण, अशा तीन अवस्था देहाच्या अवस्थांमुळे प्राप्त होतात—**तथा**—तशीच—**देहान्तरप्राप्तिः**—दुसऱ्या देहाची प्राप्ति होते.—**तत्र**—त्याविषयीं—**धीरः**—विद्वान्-तत्त्ववेत्ता-पंडित—**न मुह्यति**—मोहित होत नाहीं.

**तत्र कथमिव नित्य आत्मेति दृष्टान्तमाह–देहिन इति । देहोऽस्यास्तीति देही तस्य देहिनो देहवदात्मनोऽस्मिन्वर्तमाने देहे यथा येन प्रकारेण कौमारं कुमारभावो बाल्यावस्था, यौवनं यूनो भावो मध्यमावस्था, जरा वयोहानिर्जीर्णावस्थेत्येतास्तिस्रोऽवस्था अन्योन्यविलक्षणास्तासां प्रथमावस्थानाशे न नाशो द्वितीयावस्थोपजनने नोपजननमात्मनः किं तर्ह्यविक्रियस्यैव द्वितीयतृतीयावस्थाप्राप्तिरात्मनो दृष्टा यथा तथा तद्वदेव देहादन्यो देहान्तरं तस्य प्राप्तिर्देहान्तरप्राप्तिरविक्रियस्यैवाऽऽत्मन इत्यर्थः । धीरो धीमांस्तत्रैवं सति न मुह्यति न मोहमापद्यते ॥ १३ ॥**

**भाष्यार्थ—तत्र**—आत्मा नित्य आहे, म्हणून अशोच्य आहे, असें सिद्ध झालें असतां—**कथं इव**—कसा बरें-कोणाप्रमाणें बरें—**आत्मा नित्यः**—आत्मा नित्य आहे?—**इति**—अशी शंका आली असतां भगवान्—**'देहिनः०-' इति दृष्टान्तं आह**—'देहिनः०' या श्लोकानें दृष्टान्त सांगतात—**अस्य देहः अस्ति इति देही**—याला देह आहे, म्हणून देही—**तस्य देहिनः-देहवत्-आत्मनः**–त्या देहयुक्त आत्म्याच्या—**अस्मिन्-वर्तमाने देहे**—या वर्तमान देहांत—**यथा-येन प्रकारेण**—ज्याप्रकारें—**कौमारं-कुमारभावःबाल्यावस्था**—कौमार- कुमारभाव-बाल्यावस्था—**यौवनं-यूनः भावः-मध्यमावस्था**—तारुण्य-तरुणपणा-मध्यमावस्था—**जरा-वयोहानिः-जीर्णावस्था**—म्हातारपण-वयाची हानि-जीर्णावस्था,—**इति एताः तिस्रः अवस्थाः**—अशा या तीन अवस्था—**अन्योन्यविलक्षणाः**—एकमेकींच्या अगदीं विरुद्ध-विलक्षण-अगदीं भिन्न स्वरूपाच्या होतात.—**तासां प्रथमावस्थानाशे आत्मनः न नाशः**—त्या तीन अवस्थांतील पहिल्या अवस्थेचा नाश झाला असतां आत्म्याचा नाश होत नाहीं,—**द्वितीयावस्था-उपजनने आत्मनः न उपजननं**—दुसऱ्या अवस्थेचा उद्भव झाला असतां आत्म्याचा जन्म होत नाहीं—**किं तर्हि**—तर मग काय?—**अविक्रियस्य एव आत्मनः**—विक्रियारहित-निर्विकार असलेल्या आत्म्यालाच—**द्वितिय-तृतीय-अवस्थाप्राप्तिः**—दुसऱ्या, तिसऱ्या अवस्थेची प्राप्ति—**यथा दृष्टा**—झालेली जशी आपण पाहिली आहे—**तथा-तद्वत् एव**—त्याप्रमाणेच—**देहात् अन्यः-देहान्तरं**—या देहाहून जो अन्य देह त्याला देहान्तर म्हणतात,—**तस्य प्राप्तिः-देहान्तरप्राप्तिः**—त्याची जी प्राप्ति ती देहान्तरप्राप्ति—**अविक्रियस्य एव आत्मनः इत्यर्थः**—विकाररहित असलेल्याच आत्म्याला देहान्तर प्राप्ति होते, असा याचा भावार्थ,—**धीरः-धीमान्**—धीर म्ह० बुद्धिमान्—**तत्र एवं सति**—आत्मा निर्विकार व त्यामुळेच नित्य आहे, असें कळलें असतां—**न मुह्यति-न मोहं आपद्यते**—मोहित होत नाहीं.—मोहास प्राप्त होत नाहीं. [ देहाला 'हा मी किंवा हा माझा' असें जो समजतो तो देही. त्या देहाभिमानी आत्म्याला याच देहांत बाल्यावस्था, तारुण्य व वृद्धावस्था अशा तीन-एकमेकींच्या अगदीं उलट असलेल्या-अवस्था जशा प्राप्त होतात, त्यांतील एका अवस्थेचा नाश झाला असतां आत्म्याचा नाश किंवा दुसऱ्या अवस्थेचा आरंभ झाला असतां आत्म्याचा आरंभ-जन्म

असा होत नाहीं, तर निर्विकार असलेल्या–स्वतःच्या सत्-चित्सुखरूपानें अवस्थित असलेल्या आत्म्यालाच जशी दुसरी, तिसरी अवस्था प्राप्त होते, तशीच त्याला म्ह० निर्विकार असलेल्या आत्म्याला दुसऱ्या देहाची प्राप्ति होते. मनुष्य लहानाचा मोठा व मोठ्याचा म्हातारा जरी झाला तरी त्याच्या आत्मस्वरूपांत कांहींच फरक पडत नाहीं, हें प्रसिद्ध आहे, त्याचप्रमाणें पूर्व देह सोडून दुसरा देह घेतांना त्याच्या स्वरूपांत यत्किंचितही फरक पडत नाहीं. याप्रमाणें आत्मा निर्विकार व नित्य असल्यामुळें आत्मज्ञानी मनुष्य 'शरीराबरोबर आत्माही मरतो,' असें समजून मोहित होत नाहीं[1]. अर्जुन भीष्मादिक मरणार, असें समजून मोहवश झाला, हें वर दाखविलेंच आहे. अर्थात् तो धीर म्ह० आत्मज्ञानी नव्हता, हें उघड होतें आणि त्याला शोक व मोह झाला म्हणूनच त्यांच्या निवृत्तीसाठीं भगवानांनी गीताशास्त्राचा उपदेश करण्यास आरंभ केला, हेही सिद्ध होतें. कौमारादि अवस्थांप्रमाणेंच आत्म्याला दुसऱ्या देहाची प्राप्ति होते, यावरून पुनर्जन्माची सिद्धि होते. शुभाशुभ कर्माप्रमाणें उत्तम, अधम, मध्यम जन्म प्राप्त होतो, हा वैदिक धर्माचा परम सिद्धान्त आहे. ] १३

**यद्यप्यात्मविनाशनिमित्तो मोहो न संभवति नित्य आत्मेति विजानतस्तथाऽपि शीतोष्णसुखदुःखप्राप्तिनिमित्तो मोहो लौकिको दृश्यते । सुखवियोगनिमित्तो दुःखसंयोगनिमित्तश्च शोक इत्येतदर्जुनस्य वचनमाशङ्क्याऽऽह–मात्रास्पर्शा इति ॥**

**भाष्यार्थ—नित्यः आत्मा इति विजानतः**—आत्मा नित्य आहे असें जाणणाऱ्या पुरुषाचा—**आत्मविनाशनिमित्तः मोहः**—आत्म्याचा नाश होतो, या कारणाने होणारा मोह—**यद्यपि न संभवति**—जरी संभवत नाहीं—**तथापि**—तरी—**शीतोष्णसुखदुःखप्राप्तिनिमित्तः लौकिकः मोहः दृश्यते**—शीत व उष्ण यांच्या प्राप्तीमुळे होणारें जें सुख व दुःख त्यांच्यामुळें होणारा लौकिक–प्रत्यक्षसिद्ध–मोह दिसतो.—**च सुखवियोगनिमित्तः च दुःखसंयोगनिमित्तः शोकः दृश्यते**—तसाच सुखाचा वियोग झाल्यामुळें व दुःखाचा संयोग झाल्यामुळें शोक होतो, असेंही प्रत्यक्ष दिसतें,—**इति एतत् अर्जुनस्य वचनं आशंक्य 'मात्रास्पर्शाः०' इति आह**—असें हें अर्जुनाचे वचन–अर्जुनाची आशंका यावर येईल, असें समजून भगवान्—' मात्रास्पर्शास्तु कौन्तेय० ' इत्यादि सांगतात—[ देहाभिमानी आत्म्याला दुसऱ्या अवस्थेची जशी प्राप्ति होते तशीच दुसऱ्या देहाची प्राप्ति होते. अर्थात् आत्मा नित्य आहे, असें जाणणाऱ्या विद्वानाला आत्म्याच्या विनाशामुळें होणारा मोह म्ह० मीच मरतों, किंवा हे भीष्मादि मरतात हा मोह जरी संभवत नसला तरी शीत व उष्ण यांमुळें होणारें सुख व शीतोष्णामुळेंच होणारें दुःख या निमित्ताने लौकिक मोह संभवतो. हिंवाळ्यांत मला थंडी लागते, पण शेगडीजवळ बसल्यावर बरें वाटतें, उन्हाळ्यांत मला

---

१ रहस्यकार वर एकदा ' मरावें का मारावें' याला मोह म्हणतात. पण येथें–' मी अमक्याला कसें मारूं ' हीच काय ती अर्जुनाच्या मनांतील मोठी भीति अगर मोह होता–असें म्हणतात. हा पूर्वोत्तरविरोध लक्षांत ठेवण्यासारखा आहे.

फार उकडतें, पण पाणी शिपडलेल्या वाळ्याच्या पंख्याचा वारा फार सुख देतो, त्यामुळें मी सुखी व दुःखी होतों इत्यादि प्रकारचा मोह व्यवहारांत प्रत्यक्ष अनुभवास येतो. तसाच सुखाचा वियोग झाला किंवा दुःखाचा संयोग झाला की शोक होतो, हेंही प्रसिद्ध आहे. अर्थात् आत्मा नित्य आहे, असे जरी कळलें तरी शीतोष्णादिकांमुळें होणारा लौकिक मोह व शोक यांचें निवारण होत नाही, अशी शंका अर्जुन यावर घेईल असें जाणून भगवान् 'मात्रास्पर्शास्तु०' इत्यादि सांगत आहेत.]

**मात्रास्पर्शास्तु कौंतेय शीतोष्णसुखदुःखदाः ।**
**आगमापायिनोऽनित्यास्तांस्तितिक्षस्व भारत ॥ १४ ॥**

**अन्वयार्थ—कौन्तेय**—हे कुंतिपुत्रा!—**तु**—परंतु—**मात्रास्पर्शाः**—मात्रा म्ह० इंद्रियें, त्यांचे विषयांशीं संयोग,—**शीत-उष्ण-सुख-दुःखदाः**—शीत व उष्ण देऊन-थंडी व उष्णता यांचा अनुभव देऊन त्यांच्या द्वारा-शीतोष्णांच्या योगानें सुख व दुःख देणारे आहेत, तसेच ते—**आगम-अपायिनः**—उत्पत्ति व विनाश यांनी युक्त आहेत. म्ह० त्यांना आदि व अंत आहे. म्हणूनच ते—**अनित्याः**—अनित्य-कांहीं काल राहणारे आहेत.—**अतः**—यास्तव—**तान्**—त्या मात्रास्पर्शांना-इंद्रियविषय-संबंधांना—**तितिक्षस्व**—सहन कर. १४.

**मात्रा आभिर्मीयन्ते शब्दादय इति श्रोत्रादीनीन्द्रियाणि, मात्राणां स्पर्शाः शब्दादिभिः संयोगास्ते शीतोष्णसुखदुःखदाः शीतमुष्णं सुखं दुःखं च प्रयच्छन्तीति । अथवा स्पृश्यन्त इति स्पर्शा विषयाः शब्दादयः, मात्राश्च स्पर्शाश्च शीतोष्णसुखदुःखदाः शीतं कदाचित्सुखं कदाचिद् दुःखं तथोष्णमप्यनियतरूपं सुखदुःखे पुनर्नियतरूपे यतो न व्यभिचरतोऽतस्ताभ्यां पृथक्शीतोष्णयोर्ग्रहणम् ॥ यस्मात्ते मात्रास्पर्शादय आगमापायिन आगमापायशीलास्तस्मादनित्या अतस्ताञ्शीतोष्णादींस्तितिक्षस्व प्रसहस्व। तेषु हर्षं विषादं च मा कार्षीरित्यर्थः ॥**

**भाष्यार्थ—मात्राः-आभिः मीयन्ते शब्दादयः इति श्रोत्रादीनि इन्द्रियाणि**—मात्रा म्ह० श्रोत्र, चक्षु इत्यादि इंद्रियें, त्याच्यायोगानें शब्दादिक विषय मापले जातात म्हणून मात्रा—**मात्राणां स्पर्शाः शब्दादिभिः संयोगाः**—मात्रांचे-इंद्रियांचे स्पर्श-म्ह० शब्दादि विषयांशी संयोग,—**ते शीतं उष्णं सुखं दुःखं च प्रयच्छन्ति इति शीतोष्णसुखदुःखदाः**—ते-इंद्रियांचे विषयांशीं संयोग शीत, उष्ण, सुख, दुःख देतात, म्हणून शीतोष्णसुखदुःखद आहेत. ( याप्रमाणें 'मात्रास्पर्शाः' हा षष्ठीतत्पुरुष समास मानून इंद्रियांचे विषयांशीं संबंध, असा अर्थ केला. आतां तोच द्वंद्वसमास मानून अर्थ करितात-)—**अथवा**—किंवा—**स्पृश्यन्ते इति स्पर्शाः**—जे स्पर्श करितात ते स्पर्श—**विषयाः**—विषय—**शब्दादयः**—शब्दादिक.—**मात्राः च स्पर्शाः च**—मात्रा-इंद्रियें व स्पर्श-शब्दादि विषय

**—शीतोष्णसुखदुःखदाः**—शीत-उष्ण-सुख-दुःख देणारे आहेत. ( पहिल्या विग्रहानें ‘ इंद्रियांचे विषयांशीं होणारे जे संयोग ते शीतोष्ण-सुखदुःख देणारे आहेत ’ असा अर्थ निष्पन्न होतो व या दुसऱ्या विग्रहानें ‘ इंद्रियें व विषय ही दोन्ही शीतोष्ण-सुखदुःखादि देणारीं आहेत ’ असें होतें. इंद्रियांच्या द्वारा विषय सुखदुःख देतात, हे प्रसिद्ध आहे. इंद्रियें नसली तरी सुखदुःख होणार नाहीं व विषय नसले तरी सुखदुःख होणार नाहीं. अर्थात् तीं दोन्ही सुखदुःख देणारी आहेत. आतां शीत व उष्ण यांचें निराळें ग्रहण कां केलें तें सांगतात-- )**—शीतं कदाचित् सुखं कदाचित् दुःखं**—शीत केव्हां सुख व केव्हां दुःख देते**—तथा उष्णं अपि अनियतरूपं**—त्याचप्रमाणे उष्णही अनिश्चित स्वरूपाचें आहे.**—सुखदुःखे पुनः नियतरूपे**—पण सुख व दुःख ही नियत–निश्चित स्वरूपाचीं आहेत.**—यतः न व्यभिचरतः**—कारण त्यांचा व्यभिचार होत नाहीं.—**अतः ताभ्यां शीतोष्णयोः पृथक् ग्रहणं**—म्हणून सुखदुःखांहून शीत व उष्ण यांचें पृथक् ग्रहण केलें आहे. [ इंद्रियें व विषय शीत व उष्ण देतात, इतकें सांगितले म्हणजे मग सुख-दुःख देतात हे निराळे सांगावयास नको, किंवा सुख-दुःख देतात असे म्हटल्यावर शीत-उष्ण देतात, असे म्हणावयास नको; पण असें असतांना शीतोष्ण व सुख-दुःख या दोन्हींचें ग्रहण कां केले ? म्हणून म्हणाल तर सांगतो–शीत म्ह० थंडी. थंडीच्या दिवसांत थंडी दुःख देते, पण उन्हाळ्यांत सुखावह होते. तसेच उष्ण उन्हाळ्यांत दुःख देतें व हिवाळ्यांत सुख देते. म्हणजे त्यांचे स्वरूप एक नाहीं. अनियत–व्यभिचारी आहे. पण सुख व दुःख ही तशीं अनियत–व्यभिचारी नाहींत. तीं एकरूप आहेत. सुख हे त्रिकाली सुखच व दुःख हे त्रिकाली दुःखच असतें. म्हणून सुख-दुःखांहून शीत व उष्ण यांचें पृथक् ग्रहण केलें आहे. शीत व उष्ण यांचाही विषयात अन्तर्भाव होतो. म्ह० शीत व उष्ण हे सुद्धां त्वक्-इंद्रियांचे विषय आहेत. त्यामुळेही त्यांचें सुखदुःखाहून पृथक् ग्रहण करण्याचें कारण दिसत नाहीं, असे कोणी म्हणेल म्हणून आचार्य म्हणतात–शीत व उष्ण हे सुख व दुःख यांचे कारण आहे. शीतोष्णामुळें सुख-दुःख होते. म्हणून त्यांचें निराळें ग्रहण करून, त्यांवरून आनुकूल्य व प्रातिकूल्य हे सुखदुःखांचे खरे कारण सुचविलें आहे. कारण विषय प्राण्याच्या मनांत शीत किंवा उष्ण व अनुकूलता किंवा प्रतिकूलता उत्पन्न करून सुख-दुःख देत असतात. शीत थंडीच्या दिवसांत प्रतिकूल वाटतें म्हणून त्यापासून दुःख होते, पण तेंच उन्हाळ्यांत अनुकूल भासते, त्यामुळे सुख होतें. अर्थात् कोणताही विषय स्वतः सुखरूप किंवा दुःखरूप नाहीं. जो अनुकूल भासतो तो सुख देतो व जो प्रतिकूल भासतो तो दुःख देतो. यास्तव इंद्रियें व विषय शीतोष्ण किंवा अनुकूलता व प्रतिकूलता यांच्या द्वारा सुख-दुःख देतात, हें सुचविण्यासाठी शीत व उष्ण हे शब्द उदाहरणार्थ पृथक् घेतले आहेत. यावर कोणी असे म्हणेल कीं, इंद्रिय व विषय यांचा संयोग आत्म्यामध्यें नित्य असतो. त्यामुळें शीतोष्णही आत्म्यामध्यें नित्यच आहेत, असें म्हणावें लागतें, आणि शीतोष्ण आत्म्यामध्यें नित्य आहेत असे झाले म्हणजे त्यामुळें हर्ष व विषादही नित्यच ठरतात. या शंकेचें उत्तर श्लोकाच्या उत्तरार्धानें देतात–]—**यस्मात्**—ज्या कारणास्तव**—ते मात्रास्पर्शादयः**—ते-इंद्रियें, विषय, शीत, उष्ण,

वगैरे—**आगमापायिनः**—उत्पत्ति-विनाशशील आहेत-उत्पन्न होऊन विनाश पावणारे आहेत—**तस्मात्**—त्या कारणास्तव ते— **अनित्याः**—अनित्य आहेत.—**अतः तान् शीतोष्णादीन् तितिक्षस्व-प्रसहस्व**—म्हणून त्या शीतोष्णादिकांस सहन कर.—**तेषु हर्षं विषादं वा मा कार्षीः इत्यर्थः**—त्यांविषयीं हर्ष किंवा विषाद-खेद करूं नको, असा याचा भावार्थ. [ सुख व दुःख हे अन्तःकरणाचे धर्म आहेत. आत्म्याचे नव्हेत. ( अ. १३.६ ) ते उत्पन्न होऊन विनाश पावणारे असल्यामुळें अनित्य आहेत. उत्पन्न होऊन विनाश पावणें, हेंच अनित्यत्वाचे लक्षण आहे. सुख-दुःख हे क्षेत्र-धर्म असल्यामुळे व अनित्य असल्यामुळे त्यांस तूं सहन कर. त्यांची जरी प्राप्ति झाली तरी तूं हर्ष किंवा विषाद मानूं नकोस. ] १४.

---

१ रहस्यकारांचा अर्थ—"शीतोष्ण किंवा सुखदुःख देणारे जे हे मात्राचे म्ह० बाह्य सृष्टींतील पदार्थांचे ( इंद्रियांशीं ) संयोग त्यांना उद्भव व नाश आहेत. म्हणून ते अनित्य म्ह० विनाशी होत. हे भारता, शोक न करिता ते तूं सहन कर." त्यावरील टीपेंत असें उपपादन आहे, "मात्रा म्ह० इंद्रिये असा शांकर भाष्यांत अर्थ केला आहे .... पण मात्रा म्ह० इंद्रियांनीं मोजले जाणारे शब्दरूपादि बाह्य पदार्थ व त्याचा इंद्रियांशीं जो स्पर्श म्ह. संयोग तो मात्रास्पर्श होय. ... ... कारण या श्लोकांतीलच विचार गीतेंत पुढे ज्या ठिकाणीं आले आहेत तेथें 'बाह्यस्पर्श' असा शब्द असून 'मात्रास्पर्श' शब्दाचा आम्हीं दिल्याप्रमाणे अर्थ केला म्ह० हे दोन्ही शब्द एकमेकांशीं जुळते होतात. .. मात्रास्पर्श हा शब्द पुरातन दिसतो. कारण मनुस्मृतींत (६-५७) याच अर्थी 'मात्रासंग' हा शब्द आला असून बृहदारण्यकोपनिषदांत ज्ञानी-पुरुषाच्या आत्म्याचा मेल्यावर मात्रांशीं असंसर्ग होतो. म्ह० तो मुक्त होऊन त्याला मेल्यावर संज्ञा रहात नाहीं, असें वर्णन आहे." पण मधुसूदनसरस्वती, शंकरानंद, ज्ञानेश्वरमहा-राज इत्यादि सर्व मात्रा म्ह० इंद्रिये, असाच अर्थ करितात व तो अगदीं बरोबर आहे. कारण इंद्रियें व विषय हे दोन्ही शीतोष्ण-सुखदुःखद आहेत, हे वर दाखविलेंच आहे. मात्रास्पर्श म्ह० इंद्रियांचा विषयाशीं संयोग, हा अर्थही योग्य आहे. कारण त्यापासूनही सुखदुःख होतें. पण 'पदार्थांचे इंद्रियांशीं संयोग' हा अर्थ बरोबर नाहीं. कारण इंद्रियाच्या द्वारा अंतःकरणवृत्ति विषयांना व्यापते व विषयाकार बनते. नंतर तो विषय अनुकूल असला तर अन्तःकर-णांत सुख होतें व प्रतिकूल असला तर दुःख होतें, अशी प्रक्रिया आहे. त्यामुळे 'शीतोष्ण-सुखदुःखदाः' हें 'मात्रास्पर्शाः' या शब्दाचें विशेषण न करितां 'मात्रास्पर्शाः' हे उद्देश्य व 'शीतोष्णसुखदुःखदाः आगमापायिनः अनित्याः' हे त्याचे विधेय मानणेंच उचित होय. त्यामुळे 'शीतोष्ण किंवा सुखदुःख देणारे मात्रास्पर्श' असें न म्हणतां 'मात्रास्पर्श शीतोष्णसुख-दुःख देणारे, आगमापायी व अनित्य आहेत,' असेंच म्हणणे सयुक्तिक होय. गीतेंत पांचव्या अध्यायांत 'बाह्यस्पर्शेषु' ५-२१ व 'बाह्यान् स्पर्शान्' ५-२७ असे शब्द आहेत व त्यांतील 'बाह्य' म्ह० बाहेरील व स्पर्श म्ह० विषय असाच अर्थ होतो. बाह्य म्ह० पदार्थ व स्पर्श म्ह० त्यांचा इंद्रियांशीं संयोग असा अर्थ संभवत नाहीं. कारण बाह्य हें विशेषण आहे, नाम नाहीं. प्रायः विशेषणाचा षष्ठी तत्पुरुष समास होत नाहीं. नामाचाच होतो. 'बाह्यान् स्पर्शान्' ५.२७ या पदावरूनच 'बाह्यस्पर्शेषु' हा समास षष्ठी तत्पुरुष नसून कर्मधारय आहे, हें उघड होतें. आपल्या या चुकीच्या अर्थाचें समर्थन करतांना पुढें पांचव्या अध्या-

**यं हि न व्यथयंत्येते पुरुषं पुरुषर्षभ।**
**समदुःखसुखं धीरं सोऽमृतत्वाय कल्पते ॥ १५ ॥**

**अन्वयार्थ—पुरुषर्षभ**—हे पुरुषश्रेष्ठा!—**यं हि समदुःखसुखं धीरं पुरुषं**—ज्याला सुख व दुःख हीं दोन्हीं समान आहेत अशा धीर-बुद्धिमान् पुरुषाला—**एते**—हे शीतोष्णादिक—**न व्यथयन्ति**—व्यथा उत्पन्न करूं शकत नाहींत-नित्य आत्मदर्शनापासून-ढळवून 'हें सुख व दुःख मलाच होत आहे,' असा भ्रम उत्पन्न करीत नाहीत—**सः**—तो—**अमृतत्वाय**—मोक्षाला—**कल्पते**—समर्थ होतो. १५.

**शीतोष्णादीन्सहतः किं स्यादिति शृणु—यं हीति। यं हि पुरुषं समदुःखसुखं समे दुःखसुखे यस्य तं समदुःखसुखं सुखदुःखप्राप्तौ हर्षविषादरहितं धीरं धीमन्तं न व्यथयन्ति न चालयन्ति नित्यात्मदर्शनादेते यथोक्ताः शीतोष्णादयः स नित्यात्मदर्शननिष्ठो द्वंद्वसहिष्णुरमृतत्वायामृतभावाय मोक्षाय इत्यर्थः कल्पते समर्थो भवति ॥ १५ ॥**

**भाष्यार्थ**—( वरील श्लोकात तितिक्षा सांगितली आहे. तितिक्षा म्ह० सहनशीलता. अधिकाऱ्याच्या शमादि साधनांत तितिक्षेचा अन्तर्भाव होतो. पण तिला विवेक व वैराग्य यांचें साह्य पाहिजे. म्हणजे ती तितिक्षा ज्ञानाच्या द्वारा मोक्षाला कारण होते असें आतां या श्लोकांत सांगतात- )—**शीतोष्णादीन् सहतः किं स्यात् इति**—शीत-उष्ण इत्यादिकांना सहन करणाऱ्या मुमुक्षूला कोणता लाभ होतो असें म्हणशील तर—**यं हि इति शृणु**—'यं हि०' या श्लोकाने उत्तर ऐक.—**यं हि पुरुषं**—ज्या पुरुषाला—**समदुःखसुखं समे दुःखसुखे यस्य तं समदुःखसुखं**—ज्याला दुःख व सुख समान आहेत त्या समदुःखसुख पुरुषाला—**सुखदुःखप्राप्तौ हर्षविषादरहितं**—सुख व

---

यांत किती 'ओढाताण व लटपट' करावी लागली आहे, ते आम्ही तेथेच दाखवू. तूर्त 'मात्रास्पर्श व बाह्यस्पर्श' हे शब्द एका अर्थी नाहींत, एवढेच वाचकानी लक्षात ठेवावें. मात्रा म्ह० बाह्य नव्हे व बाह्य म्ह० पदार्थही नव्हे; तर मात्रा म्ह० इंद्रिये व स्पर्श म्ह० विषय किंवा विषयसंयोग हाच अर्थ योग्य होय. मनुस्मृतीत 'मात्रासंग' हा शब्द यतिधर्मप्रकरणांत असून त्याचा अर्थ 'मात्रासंगात्' दंड-कमंडलु इत्यादि विहित विषयांमध्येंही आसक्ति ठेवूं नये, त्या आसक्तीपासूनही निवृत्त व्हावें, असा आहे. बृहदारण्यकातील 'मात्राऽसंसर्गस्त्वस्य भवति' या वचनाचा अर्थ-आत्म्याचा भूत-इंद्रिये इत्यादिकांशी संसर्ग रहात नाहीं व इंद्रियादिकांशी संबंध नसल्यामुळे मेल्यावर त्याला हा मी, हा माझा बाप, आई इत्यादि विशेष विज्ञान होत नाहीं-असा आहे. यास्तव ही दोन्ही प्रमाणे 'मात्रा' म्ह० बाह्य पदार्थ या अर्थाच्या उपयोगी नाहींत. 'शीतोष्णादि देणारे मात्रास्पर्श अनित्य आहेत म्हणून त्यांना सहन कर' हा अर्थ बरोबर नसून 'मात्रास्पर्श शीतोष्णादि देणारे व अनित्य आहेत, म्हणून तूं त्यांपासून होणाऱ्या शीतोष्णादिकास सहन कर,' हा भाष्यकारांचा अर्थच सयुक्तिक आहे. कारण 'इंद्रियविषयसंयोगाला सहन कर' असा उपदेश करण्याचें कारणच नसून शीतोष्णसुखदुःखादिकांना सहन कर असा मात्र उपदेश करण्याची अत्यंत आवश्यकता आहे.

दुःख यांची प्राप्ति झाली असतां हर्ष व विषाद न करणाऱ्या—**धीरं-धीमन्तं**—नित्यानित्यविवेक करणाऱ्या बुद्धिमानास—**न व्यथयन्ति-नित्यात्मदर्शनात् न चालयन्ति**—व्यथा करीत नाहीत-नित्य आत्मदर्शनापासून ढळवीत नाहींत. ( कोण ? उत्तर- )—**एते यथोक्ताः शीतोष्णादयः**—हे वर सांगितलेले शीतोष्णादिक ढळवीत नाहींत.—**सः नित्यात्मदर्शननिष्ठः द्वंद्वसहिष्णुः**—तो नित्य आत्म्याचें स्वरूप पाहण्यामध्ये ज्याची निष्ठा आहे असा शीतोष्णादि द्वंद्वांना सहन करणारा—**अमृतत्वाय-अमृतभावाय मोक्षाय इत्यर्थः**—अमृतत्वाला म्हणजे अमृतभावास म्हणजे मोक्षाला, असा याचा अर्थ,—**कल्पते-समर्थः भवति**—समर्थ होतो. [ अर्जुना, शीतोष्णादिकांना सहन केल्यास कोणता लाभ होतो, म्हणून विचारशील तर सांगतों—सुख व दुःख यांना समान लेखणाऱ्या म्हणजे सुख प्राप्त झालें असतां हर्ष न मानणाऱ्या व दुःख प्राप्त झाले असतां विषाद न मानणाऱ्या ज्या नित्यानित्यविवेकी व विरक्त बुद्धिसाक्षिरूप पुरुषाला हे शीतोष्णादिक किंवा शीतोष्णादिक देणारे मात्रास्पर्श पीडा देत नाहीत, त्याला नित्यात्मानुभवापासून ढळवीत नाहीत, तो मोक्षाला समर्थ होतो, तो मोक्षाचा अधिकारी होय. वरील श्लोकांत तितिक्षा करावयास सांगून येथें मोक्षाचा अधिकारी होणें, हे त्या तितिक्षेचें फळ सांगितलें आहे. त्यावरून अर्जुनानें आरंभीं ' निश्चित श्रेय ' २.७. जें विचारलें तें कोणते, याचा निर्णय होतो. मोक्ष हेंच निश्चित श्रेय. निश्चित श्रेय म्हणजेच निःश्रेयस. शम-दम-उपरति-तितिक्षा-श्रद्धा-समाधान, विवेक, वैराग्य यांसह आत्मज्ञान हेंच अमृतत्वाचे साधन आहे. अर्जुनाचा प्रश्न जर मोक्ष व मोक्षसाधन यांसाठी नसता तर येथे 'तो मोक्षाला समर्थ होतो' हें म्हणणें अप्रासंगिक झालें असते. पुढेही ठिकठिकाणी अर्जुनाला मोक्ष व त्याची साधने यांचाच उपदेश केलेला आहे, आम्ही ती सर्व स्थळें वाचकाच्या नजरेस आणूं. शीतोष्णादि हे अंतःकरणादि अनात्म्याचे धर्म आहेत, आत्म्याचे नव्हेत, म्हणून त्यांना सहन करावें, त्यामुळें शोक करूं नये व मोहित होऊं नये, अशा दृष्टीने त्यांस जो सहन करतो तो मोक्षाला योग्य होतो. ] १५.

**नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सतः ।**
**उभयोरपि दृष्टोऽन्तस्त्वनयोस्तत्त्वदर्शिभिः ॥ १६ ॥**

**अन्वयार्थ—असतः**—असत्-अविद्यमान पदार्थाचा—**भावः**—भाव म्ह० अस्तित्व—**न विद्यते**—नसते.—**सतः**—विद्यमान पदार्थाचा—**अभावः**—अभाव—**न विद्यते**—नसतो.—**अनयोः उभयोः अपि**—या दोघांचाही—**अन्तः**—निर्णय—**तत्त्वदर्शिभिः**—तत्त्ववेत्त्यांनीं—**दृष्टः**—पाहिलेला आहे, अनुभविलेला आहे. १६.

**इतश्च शोकमोहावकृत्वा शीतोष्णादिसहनं युक्तं यस्मात्—नासत इति । नासतोऽविद्यमानस्य शीतोष्णादेः सकारणस्य न विद्यते नास्ति भावो भवनमस्तिता । न हि शीतोष्णादि सकारणं प्रमाणैर्निरूप्यमाणं वस्तु संभवति । विकारो हि सः । विकारश्च**

**व्यभिचरति, यथा घटादिसंस्थानं चक्षुषा निरूप्यमाणं मृद्व्यतिरेकेणानुपलब्धेरसत्तथा सर्वो विकारः कारणव्यतिरेकेणानुपलब्धेरसन् । जन्मप्रध्वंसाभ्यां प्रागूर्ध्वं चानुपलब्धेः कार्यस्य घटादेः ॥**

**भाष्यार्थ—इतः च**—आणि याही कारणाने—**शोकमोहौ अकृत्वा**—शोक व मोह न करितां—**शीतोष्णादिसहनं युक्तं**—शीतोष्णादिकांस सहन करणें योग्य आहे.—**यस्मात्**—कारण—**न असतः इति**—'न असतः०' इत्यादि श्लोकानें तेंच कारण सांगितलें आहे.—**न असतः-अविद्यमानस्य सकारणस्य शीतोष्णादेः**—असत् म्हणजे अविद्यमान अशा कारणासह शीतोष्णादिकाचा—**न[1] विद्यते-नास्ति**—नाही ( काय नाही ? उत्तर-)—**भावः-भवनं-अस्तिता**—भाव-होणें-अस्तित्व. ( कारण शीतोष्णादिक आपल्या कारणासह असत् आहेत. कारण तीं सर्व अनात्मरूप आहेत, त्यामुळें त्यांचें अस्तित्व संभवत नाहीं.)—**हि**—कारण—**सकारणं शीतोष्णादि प्रमाणैः निरूप्यमाणं**—कारणासह शीतोष्णादिकांचे प्रमाणांनी निरूपण करूं लागलें असतां—**वस्तु न संभवति**— ती सत्य आहेत, परमार्थरूप आहेत, असें ठरत नाहीं. ( शीत, उष्ण, सुख, दुःख इत्यादि हें सर्व कार्य आहे. पण कार्य जरी असत् -अविद्यमान असले तरी त्याचें कारण विद्यमान-सत् असेल, म्हणून म्हणशील तर प्रमाणांनीं विचार करूं लागलें असतां शीतोष्णादि कार्य जसें असत्-मिथ्या ठरतें, तसेंच त्याचें कारणही मिथ्या ठरतें. कार्य व कारण सत्-सत्य-परमार्थ वस्तुभूत आहे, असें ठरत नाहीं. कारण तें अनिर्वाच्य आहे. द्वैत मिथ्या आहे, याविषयीं ' घटादि विकार नाममात्र असतो. मृत्तिका मात्र खरी असते' या अर्थाची छान्दोग्यश्रुति प्रमाण आहे,(छां. भाष्यार्थ पृ. ४१३ )—**हि सः विकारः**—कारण तो विकार आहे,—**च विकारः व्यभिचरति**—व विकार व्यभिचार पावतो.तो नित्य टिकत नाहीं. (कार्य कारणाहून भिन्न आहे, असें म्हणतां येत नाही, हे सोदाहरण दाखवितात-)—**यथा घटादि संस्थानं**—जसें, घटादिकांची रचना-आकार—**चक्षुषा निरूप्यमाणं**—नेत्रांनी प्रत्यक्ष पाहिला जाणारा घटादि आकार—**मृद्व्यतिरेकेण अनुपलब्धेः**—मृत्तिकेहून भिन्नत्वानें-भिन्न पदार्थ या रूपानें किंवा कारणावांचून उपलब्ध होत नसल्यामुळें—**असत्**—मिथ्या—**तथा सर्वः विकारः**—तसा सर्व विकार—**कारणव्यतिरेकेण अनुपलब्धेः असन्**—आपल्या कारणांहून भिन्नत्वानें-किंवा कारणावांचून उपलब्ध होत नसल्यामुळें असत्-मिथ्या आहे. [ आपण घटाचा आकार नेत्रांनीं पाहतों. पण घट ही काय वस्तु आहे, म्हणून विचारपूर्वक आंतून व बाहेरून जर त्याच्याकडे पाहूं लागलों तर त्याचें कारण जी माती, तिच्यावांचून घट म्हणून कांहीं निराळी वस्तु दिसत नाहीं. म्हणून घटाकार जरी दिसत असला तरी तो मिथ्या, केवळ आभास, किंवा माया. कारण '**न निरूपयितुं शक्या विस्पष्टं भासते च या सा माया**'... पंचदशी ६-१४१ 'जिचें प्रमाणपूर्वक निरूपण करतां येत नाहीं, पण जी अगदीं स्पष्टपणें भासते ती माया

---

१ ' न असतः ' येथील 'न'च ' न विद्यते ' येथें अन्वय दाखविण्यासाठीं पुनः घेतला आहे.

होय, ' असें मायेचें लक्षण केलें आहे. याच न्यायानें सर्व विकार आपापल्या उपादान कारणावांचून व त्याहून भिन्नत्वानें उपलब्ध होत नसल्यामुळें असत्-मिथ्या होत. जें जें कार्य तें तें आपल्या उपादान कारणाहून तत्त्वतः भिन्न नसतें, हा नियम अबाधित आहे. '**आदौ अन्ते च यन्नास्ति वर्तमानेऽपि तत्तथा**' जें उत्पत्तीच्या पूर्वावस्थेंत नसतें व नाशानंतरही नसते ते वर्तमानसमयींही नाहीं. ( मांडूक्यभाष्यार्थ पृ. १०० पहा ) या न्यायानेंही कार्य कारणाहून भिन्न नाहीं, असे आतां भाष्यकार म्हणतात-] **—कार्यस्य घटादेः जन्मप्रध्वंसाभ्यां प्राक् च ऊर्ध्वं अनुपलब्धेः**—घटादि कार्यांचा उत्पत्ति व ध्वंस-यांच्यापूर्वी व नंतर प्रत्यय-अनुभव येत नसल्यामुळें कार्य कारणाहून पृथक् वस्तु नाहीं. [ घटादि कार्य उत्पन्न होण्यापूर्वी व तें नाश पावल्यावर त्याचा प्रत्यय येत नाहीं, म्हणून तें असत् आहे. ]

**मृदादिकारणस्य तत्कारणस्य च तत्कारणव्यतिरेकेणानुपलब्धेरसत्त्वम् । तदसत्त्वे च सर्वाभावप्रसङ्ग इति चेत् । न, सर्वत्र बुद्धिद्वयोपलब्धेः सद्बुद्धिरसद्बुद्धिरिति । यद्विषया बुद्धिर्न व्यभिचरति तत्सत्, यद्विषया बुद्धिर्व्यभिचरति तदसदिति सदसद्विभागे बुद्धितन्त्रे स्थिते सर्वत्र द्वे बुद्धी सर्वैरुपलभ्येते समानाधिकरणे ॥**

**भाष्यार्थ**—( अर्थात् कार्य-कारणविभागरहित आत्मवस्तूमध्यें दिसणारी कार्य-कारणपरंपरा भ्रमरूप आहे अशा आशयाने हाच न्याय सर्व कार्यकारणांना लागू करितात- )**—मृदादिकारणस्य तत्कारणस्य च**—घटादिकांच्या मृत्तिकादि कारणाचा, व त्या मृत्तिकादिकांच्याही धूळ वगैरे कारणाची**—तत्कारणव्यतिरेकेण अनुपलब्धेः असत्त्वं**—त्यांच्या कारणांहून भिन्नत्वानें उपलब्धि होत नसल्यामुळें त्यांनाही असत्त्व आहे. [ घटादि कार्यांचें मृत्तिकादि कारण, व त्या मृत्तिकादिकांचें धूलिकणादि कारण, पुढें त्याचेंही परमाणु वगैरे कारण इत्यादि सर्व आपापल्या कारणाहून भिन्नत्वानें उपलब्ध होत नाहीं. प्रत्येक कार्य आपल्या कारणरूपानेंच दिसते. पुढें ते कारणही आपल्या कारणाचें कार्य असल्यामुळे तेंही कारणरूपानेच दिसतें. त्याहून पृथक् उपलब्ध होत नाहीं. यास्तव प्रत्येक कार्य-विकार असत् आहे; आणि व्यवहारांतील प्रत्येक कारण हें आपल्या कारणाचें कार्य आहे. त्यामुळें व्यावहारिक कार्यकारणभाव अनिर्वाच्य आहे. त्यामुळेंच भ्रामक आहे. खरा नव्हे-वास्तविक नव्हे. यावर शंका-]**—तदसत्त्वे सर्वाभावप्रसंगः इति चेत्**—अहो पण कार्यही असत् व त्याचें कारणही असत् असें मानल्यास सर्वांचाच अभाव होण्याचा प्रसंग येतो. [ कारण या जगांत कार्य-कारणविभागशून्य वस्तुच नाहीं; व तुम्ही तर तिला असत् म्हणणार, असें म्हणाल तर ]—**न**—तसें नाहीं. **—सद्बुद्धिः असद्बुद्धिः इति सर्वत्र बुद्धिद्वयोपलब्धेः**—सत्-बुद्धि व असत्-बुद्धि अशी सर्व ठिकाणी दोन प्रकारची बुद्धि उपलब्ध होते. [ एक बुद्धि सर्व वस्तूमध्यें अनुवृत्त असते व दुसरी प्रत्येक वस्तूपासून व्यावृत्त होते. जसा-माळेंतील दोरा सर्व मण्यांत किंवा पुष्पांत अनुवृत्त असतो व प्रत्येक मणी किंवा पुष्प एकमेकांपासून व्यावृत्त होतें. अनुवृत्तबुद्धीमध्यें व्यावृत्त होणारी बुद्धि कल्पित असते. त्यामुळें अकल्पित-सर्व-

भेदकल्पनांचें अधिष्ठान-कार्यकारणभावशून्य अशी वस्तु सिद्ध होते. आतां सद्बुद्धिच परमार्थ वस्तु आहे, याविषयीं अनुमान प्रमाण दाखवितात-]—**यद्विषया बुद्धिः न व्यभिचरति तत् सत्**—ज्याविषयींची बुद्धि व्यभिचरित होत नाहीं तें सत् व—**यद्विषया बुद्धिः व्यभिचरति तत् असत्**—ज्याविषयींची बुद्धि व्यभिचार पावते तें असत् —**इति**—याप्रमाणें—**सदसद्विभागे बुद्धितन्त्रे स्थिते**—सत् व असत् हा विभाग-बुद्धितंत्र बुद्धीच्या अधीन-आहे असें सिद्ध झालें असतां—**सर्वत्र**—व्यवहारांत सर्व ठिकाणी—**सर्वैः**—सर्वांकडून—**समानाधिकरणे**—एकाच पदार्थाविषयीं—**द्वे बुद्धी** —दोन बुद्धी—**उपलभ्येते**—अनुभविल्या जातात. [ जें व्यावृत्त होतें, व्यभिचरित होतें, तें मिथ्या, जसा रज्जूवर झालेला सर्प, पाण्याची धार, काठी इत्यादिकांचा भ्रम. परस्पर व्यावृत्त होणाऱ्या पदार्थांमध्यें जें अनुवृत्त होतें तें सत्-सत्य. अंधकारांतील दोरीला पाहून कोणी हा सर्प आहे, असें समजतो. कोणी ही पाण्याची धार आहे, असें मानतो, कोणी तिला काठी समजतो. पण सर्प, पाण्याची धार, काठी हे सर्व परस्पर व्यावृत्त होणारे पदार्थ आहेत, म्ह० सर्प ही धार किंवा काठी नव्हे. धारही सर्प किंवा काठी नव्हे, काठीसुद्धां सर्प किंवा धार नव्हे. पण त्या तिन्हीमध्यें दोरी अनुवृत्त आहे. कारण त्या तिन्ही प्रकारच्या भ्रमाचें ते अधिष्ठान आहे. म्हणून दोरीवर भासणारे सर्पादिक मिथ्या व दोरी खरी, अशीं याविषयीं दोन अनुमानें संभवतात. अर्थात् ज्या पदार्थांविषयींची बुद्धि व्यभिचार पावत नाहीं तो पदार्थ सत्-अकल्पित व ज्याविषयींची बुद्धि व्यभिचार पावते तो असत्-कल्पित-मिथ्या असें ठरतें. पण समस्त द्वैत मिथ्या आहे असें म्हणणाऱ्या अद्वैतवेदान्त्याला वरील दोन अनुमाने तरी कशीं करितां येतील असें कोणी म्हणेल म्हणून आचार्य म्हणतात—वरील सत् व असत् हा विभाग दोन प्रकारच्या बुद्धीच्या अधीन आहे, त्यामुळें अनुमानादि व्यवहार संभवतो. बुद्धिविभागही जरी कल्पित असला तरी त्यामुळें द्वैतविभागाचा भ्रामक अनुभव येऊं शकतो. म्हणूनच व्यवहारांत एकाच पदार्थाला अनुलक्षून दोन प्रकारच्या बुद्धीचा अनुभव प्रत्येकास येतो. 'घटः सन्' येथें घट व सन् या दोन्ही पदांची प्रथमा विभक्ति आहे. व ते दोन्ही शब्द एकाच पदार्थाला उद्देशून आहेत. त्यामुळें त्यांना समानाधिकरण म्हणतात. अशा समानाधिकरण शब्दांमध्यें सामानाधिकरण्य हा संबंध असतो, पदांचें सामानाधिकरण्य बुद्धीवर गौणवृत्तीने लादून बुद्धीलाही सद्बुद्धि व असद्बुद्धि असें म्हणतां येतें. ]

**न नीलोत्पलवत्सन्घटः सन्पटः सन्हस्तीति । एवं सर्वत्र । तयोर्बुद्ध्योर्घटादिबुद्धिर्व्यभिचरति । तथा च दर्शितम् । न तु सद्बुद्धिः । तस्माद्घटादिबुद्धिविषयोऽसन्व्यभिचारात्, न तु सद्बुद्धिविषयोऽव्यभिचारात् ॥**

**भाष्यार्थ**—( 'तो हा' हें सामानाधिकरण्य-दोन शब्दांचें एकविभक्तित्व असें एकाच पदार्थाला उद्देशून असतें तसेंच 'सन् घट' हें सामानाधिकरण्यही एक वस्तुनिष्ठ आहे. कारण सन् व घट हे जर दोन पदार्थ असते तर घट व पट यांचें सामानाधिकरण्य जसें संभवत नाहीं, तसें त्यांचेंही ( सन् व घट यांचेंही ) संभवलें नसतें. पण

'नीलं कमलं' यांचें सामानाधिकरण्य आहे आणि नील हा धर्म–गुण व कमल हा त्याचा धर्मी आहे. धर्म व धर्मी हे दोन पदार्थ आहेत.त्यामुळें सामानाधिकरण्य एक वस्तुविषयच असतें, असा नियम नाही, म्हणून म्हणाल तर तें खरे आहे, पण हें सामानाधिकरण्य–) **—नीलोत्पलवत् न**—नील कमल यांच्या सामानाधिकरण्याप्रमाणें नाही. तर**—सन् घटः सन् पटः सन् हस्ती इति**—घट सत्, पट सत्, हत्ती सत् अशा प्रकारचें आहे. [ म्ह० 'नील कमल' याप्रमाणें हें सामानाधिकरण्य गौण नाहीं. तर व्यावृत्त होणारे पदार्थ अनुवृत्त होणाऱ्या पदार्थामध्यें कल्पित आहेत, अशा प्रकारचें एक वस्तुनिष्ठ आहे आणि सामान्य व विशेष यांना लागू असलेला हाच न्याय गुण व गुणी–धर्म व धर्मी यांनाही लागू आहे असे सांगतात–]**—एवं सर्वत्र**—सर्व सामानाधिकरण्य असेंच एक-निष्ठ असते. असो.**—तयोः बुद्ध्योः घटादिबुद्धिः व्यभिचरति**—त्या दोन बुद्धींतलि घटादि विषयांविषयींची बुद्धि व्यभिचार पावते.**—तथा च दर्शितं**—ती कशी व्यभिचार पावते तें वर ('विकारो हि सः') येथें दाखविलेंच आहे.**—तु न सद्-बुद्धिः**—पण सद्बुद्धि व्यभिचार पावत नाही, ( आणि ज्याअर्थी घट, पट इत्यादि विशेष पदार्थांविषयींची बुद्धि व्यभिचार पावते पण 'सत्' ही सामान्य बुद्धि अनुवृत्त असते. )**—तस्मात् घटादिबुद्धिविषयः असन्**—त्याअर्थी घटादि बुद्धीचा विषय –घट असत् आहे. कारण**—व्यभिचारात्**—त्याचा व्यभिचार होतो.**—तु सद्-बुद्धिविषयः न**—पण सद्बुद्धीचा विषय तसा असत् नाहीं. कारण**—अव्यभि-चारात्**—त्याचा व्यभिचार होत नाहीं. [ 'हा घट' अशी जी बुद्धि ती घट-बुद्धि, घट हाच तिचा विषय, बुद्धीनें दुसऱ्या विषयाचें ग्रहण केलें कीं घट हा तिचा पूर्व विषय व्यभिचार पावतो. बुद्धीतून निघून जातो. म्हणून तो असत्–मिथ्या. तसेंच 'घटः सन्–' घट विद्यमान आहे, अशी जी घटाविषयींची सद्बुद्धि तिचा विषय–' सत् सन्–आहे ' हा आहे. तो घटाप्रमाणे मिथ्या नाहीं. कारण त्याचा व्यभिचार होत नाहीं. म्हणून सद्बुद्धीचा विषय सत् आहे. ] ( यावर शंका पण– )

**घटे विनष्टे घटबुद्धौ व्यभिचरन्त्यां सद्बुद्धिरपि व्यभिचरतीति चेत्। न, पटादावपि सद्बुद्धिदर्शनात् । विशेषणविषयैव सा सद्बुद्धिः । सद्बुद्धिवद्घटबुद्धिरपि घटान्तरे दृश्यत इति चेत् । न पटादावदर्शनात् ॥**

**भाष्यार्थ—घटे विनष्टे**—घटाचा विनाश झाला असतां**—घटबुद्धौ व्यभि-चरन्त्यां**—घटबुद्धीचाही व्यभिचार होतो, त्यामुळें**—सद्बुद्धिः अपि व्यभिच-रति**—सद्बुद्धीचाही व्यभिचार होतो,**—इति चेत्**—असें जर म्हणाल [ घट हा विषय नाहींसा झाला म्हणजे 'हा घट आहे' ही सद्बुद्धिही उरत नाहीं. तीही नाहीं-शी होते. तिचाही व्यभिचार–बाध होतो म्हणून जर म्हणाल तर ]**—न**—तसें नाहीं**—पटादौ अपि सद्बुद्धिदर्शनात्**—कारण पटादिकांविषयींही सद्बुद्धीचा प्रत्यय येतो [ सद्बुद्धीचा अत्यंत अभाव होत नाहीं. घटविषयकबुद्धि जरी नष्ट झाली तरी पटादि इतर पदार्थांविषयींची सद्बुद्धि विद्यमान असते. त्यामुळें तिचा व्यभिचार होतो, असें

म्हणतां येत नाहीं. कारण ]—**सा सद्बुद्धिः विशेषणविषया एव**—ती सद्बुद्धि विशेषणविषयकच असते. [ म्ह० विशेषण हाच तिचा विषय असतो. ती निर्विषय केव्हांच नसते. त्यामुळे तिचें ' सन् घटः ' यांतील ' सन् ' हें विशेषण जरी गेलें तरी दुसरीं अनंत विशेषणें असतात व त्यांच्या आश्रयानें तिचा प्रत्यय येतच असतो. त्यामुळें तिचा बाध होत नाहीं. सत् अकल्पित–सत्य–नित्य आहे, म्हणून त्याचा व्यभिचार होत नाहीं, पण घटादि पदार्थ कल्पित आहेत, म्हणून त्यांचा व्यभिचार होतो. ]

**सद्बुद्धिरपि नष्टे घटे न दृश्यत इति चेत् । न, विशेष्याभावात् । सद्बुद्धिर्विशेषणविषया सती विशेष्याभावे विशेषणानुपपत्तौ किंविषया स्यात्, न तु पुनः सद्बुद्धेर्विषयाभावात् । एकाधिकरणत्वं घटादिविशेष्याभावे न युक्तमिति चेत् न इदमुदकमिति मरीच्यादावन्यतराभावेऽपि सामानाधिकरण्यदर्शनात् । तस्माद्देहादेर्द्वंद्वस्य च सकारणस्यासतो न विद्यते भाव इति ॥**

**भाष्यार्थ**—(यावर पुनः शंका-)—**घटे नष्टे**—पण घट नष्ट झाला असतां—**सद्बुद्धिः अपि न दृश्यते**—सद्बुद्धिही दिसत नाहीं,—**इति चेत्**—म्हणून म्हणाल [ घट नाहीसा झाला म्हणजे ' हा घट आहे ' ही बुद्धिही उरत नाहीं, म्हणून म्हणाल ] तर—**न**—तसे नाहीं.—**विशेष्याभावात्**—विशेष्याच्या अभावामुळें ती सद्बुद्धि प्रत्ययाला येत नाहीं. (तथापि घटाचा येथे अभाव आहे, अशा रूपानें ती प्रतीत होतेच.) —**सद्बुद्धिः विशेषणविषया सती**—सद्बुद्धि विशेषणविषयक आहे म्ह० विशेषण हा तिचा विषय आहे आणि—**विशेष्याभावे विशेषणानुपपत्तौ**—विशेष्याच्या अभावीं विशेषणाची अनुपपत्ति होत असल्यामुळें, ती—**किंविषया स्यात्**—कोणाला विषय करून राहील–तिचा विषय काय असेल, कांहींच नाहीं. ती निर्विषयच होणार हें उघड आहे.—**तु पुनः सद्बुद्धेः विषयाभावात् न**—परंतु सद्बुद्धीला मुळीं विषयच रहात नाहीं म्हणून घटबुद्धि प्रतीत होत नाहीं, असे नाहीं [ ' सन् घटः ' यांतील ' सन् ' हे विशेषण आहे. सद्बुद्धि त्यालाच विषय करते.त्यामुळें 'सन् घटः' यांतील घट या विशेष्याच्या अभावीं ' सन् ' या विशेषणाचीही अनुपपत्ति होते. मग त्या सद्बुद्धीनें कोणत्या विषयाला व्यक्त करावें ' सन् ' या विशेषणाच्या अभावीं तिला व्यक्त होण्याला विषयच उरत नाहीं. गोत्व–गाईपणा, मनुष्यत्व–मनुष्यपणा इत्यादि जाति आहे. ती असंख्य व्यक्तींमध्येंच व्यक्त होते. त्यांतील एखादी गाय किंवा मनुष्य ही व्यक्ति नष्ट झाली तर ती जाति तेथें व्यक्त होणार नाहीं, हें उघड आहे. पण त्यामुळें गोत्व, मनुष्यत्व ही जातिच नाहीं असें म्हणतां येणार नाहीं. त्याच न्यायानें घटादि व्यक्ति जरी नष्ट झाली तरी त्यामुळे सर्व सद्बुद्धिच नष्ट झाली असें म्हणतां येत नाहीं. अहो पण दोन सत्–विद्यमान पदार्थांमध्येंच विशेषणविशेष्यभाव संभवतो. त्यामुळें ' सन् घटः ' यांतील विशेषण सन् व विशेष्य घट हे दोन्ही सत्पदार्थच आहेत, असें सिद्ध होतें. अर्थात् घटादि द्वैत कल्पित आहे, हें वरील अनुमान सामानाधिकरण्यबुद्धीनें बाधित होतें, अशी शंका घेऊन तिचें निरसन करितात- ]—

**घटादिविशेष्याभावे एकाधिकरणत्वं न युक्तं इति चेत्**—घटादि विशेष्याच्या अभावी—**सन् घटः**—असें ' सन् ' व 'घट' यांचें सामानाधिकरण्य उपपन्न होत नाहीं, असें म्हणाल तर—**न**—तें बरोबर नाहीं. कारण—**मरीच्यादौ अन्यतराभावे अपि इदं उदकं इति सामानाधिकरण्यदर्शनात्**—भ्रमानें भासणाऱ्या मृगजलादि पदार्थांमध्यें अधिष्ठान व आरोपित यांतील एकाचा म्ह. आरोपिताचा अभाव असला तरी ' हें जल ' असें सामानाधिकरण्य अनुभवास येतें. [ घटादि विशेष्य जर मिथ्या आहे तर ' सन् घटः ' असें विशेषण व विशेष्य यांचे सामानाधिकरण्य संभवत नाहीं, हें म्हणणें बरोबर नाहीं. कारण ते अनुभवाच्या विरुद्ध आहे. मृगजलादिकांचा जेव्हां भ्रम होतो तेव्हां मृगजल, रज्जुसर्प, शुक्तिकारजत इत्यादि आरोपित पदार्थांचा वस्तुतः अभाव असतांना म्ह० ते मिथ्या असतांनाही हें जल, हा सर्प, हे रुपें, असें आरोपित व अधिष्ठान यांचें एकाधिकरणत्व नेहमीं अनुभवास येतें. याप्रमाणे घटादि द्वैत सद्वस्तूमध्यें कल्पित आहे, असें जे वर अनुमान केले होतें, त्यावर कोणत्याही प्रकारचा दोष येत नाही, असा उपसंहार करितात- )—**तस्मात्**—यास्तव—**सकारणस्य देहादेः च द्वंद्वस्य असतः भावः न विद्यते**—कारणासह देहादि व शीतोष्णादि 'द्वंद्वे' या असताचा-मिथ्या पदार्थांचा भाव-अस्तित्व नाहीं.—**इति**—हा शब्द ' नासतो विद्यते भावः ' या श्लोकाच्या पहिल्या पादाचे व्याख्यान संपलें, असे सुचविण्यासाठीं आहे. [ सारांश देहादि व शीतोष्णादि असत् द्वंद्वांचे त्यांच्या कारणासह अस्तित्त्व संभवत नाहीं. द्वैतप्रपंचाला पारमार्थिक सत्यत्त्व नाही, पारमार्थिक सत्य एक आत्मतत्त्वच आहे. म्हणून द्वैत मिथ्या व अद्वैतच सत्य, असे येथे भाष्यकारांनीं प्रतिपादन केलें आहे. ]

**तथा सतश्चाऽऽत्मनोऽभावोऽविद्यमानता न विद्यते सर्वत्राव्यभिचारादित्यवोचाम। एवमात्मानात्मनोः सदसतोरुभयोरपि दृष्ट उपलब्धोऽन्तो निर्णयः सत्सदेवासदसदेवेति त्वनयोर्यथोक्तयोस्तत्त्वदर्शिभिः। तदिति सर्वनाम सर्वं च ब्रह्म तस्य नाम तदिति तद्भावस्तत्त्वं ब्रह्मणो याथात्म्यं तद्द्रष्टुं शीलं येषां ते तत्त्वदर्शिनस्तैस्तत्त्वदर्शिभिः॥**

**भाष्यार्थ**—( प्रस्तुत श्लोकाच्या राहिलेल्या तीन पादांचे व्याख्यान- )—**तथा**—त्याचप्रमाणें—**सतः आत्मनः अभावः-अविद्यमानता**—सत्-आत्म्याचा अभाव -अविद्यमानता-नास्तिभाव-**न विद्यते**—नाहीं—**सर्वत्र अव्यभिचारात्**—कारण त्याचा कोठेंही व्यभिचार-बाध होत नाहीं,—**इति अवोचाम**—असें आम्ही वर सांगितलेंच आहे. [ ज्याप्रमाणें असत्चे अस्तित्व संभवत नाहीं, त्याचप्रमाणे सत्चे नास्तित्व संभवत नाहीं. कारण असत्-द्वैताचा व्यभिचार होतो. परस्परव्यावृत्ति होते पण सर्वव्यापी आत्म्याची-सत्ची व्यावृत्ति-व्यभिचार कोठेच होत नाहीं, हे आम्ही वर सविस्तर सांगितलेंच आहे.अहोपण उत्पत्तीच्या पूर्वी असत् असलेला घटादि पदार्थ उत्पत्तीनंतर सत्-विद्यमान होतो, तसाच स्थितिकालीं ' सत् ' असलेला पदार्थ नाशानंतर असत् बनतो. त्यावरून सत् त्रिकालीं सत्च असतें व असत त्रिकालीं असतच असतें

असें ह्मणतां येत नाही, त्यामुळें दोघांचीही योग्यता सारखीच. अर्थात् त्यांतील एक ग्राह्य व दुसरें त्याज्य असें ठरत नाहीं. एकतर दोघांनाही त्याज्य मानलें पाहिजे किंवा दोघांनाही ग्राह्य मानलें पाहिजे, अशी शंका घेऊन तिचें समाधान करितात-)—**एवं**—याप्रमाणें—**आत्मानात्मनोः सदसतोः उभयोः अपि**—आत्मा व अनात्मा म्ह० सत् व असत् या दोघांचाही—**अन्तः-निर्णयः**—अन्त-निर्णय—**दृष्टः-उपलब्धः**—साक्षात् अनुभविलेला आहे. (कोणी? )—**तत्त्वदर्शिभिः**—तत्त्वदर्शी पंडितांनीं अनुभविला आहे.—**सत् सत् एव, असत् असत् एव इति तु अनयोः यथोक्तयोः अन्तः दृष्टः**—जें सत् तें त्रिकालीं सत्च व असत् तें असत्च असाच या दोहोंचा निश्चय तत्त्वदर्शी विद्वानांनी केला आहे. [ पूर्वी सर्वथा अविद्यमान असलेल्या घटाला उत्पत्तीनंतर सत्त्वप्राप्ति होते, हें म्हणणें युक्तिशून्य आहे. स्थितिकाळीं सत् असलेल्या घटाला नाशाने सर्वथा असत्त्वप्राप्ति होते, हे म्हणणेंही अयोग्य आहे. तर मग तसा अनुभव कां येतो? याचें उत्तर 'तत्त्वदर्शिभिः' या पदानें भगवनांनीच दिले आहे. तत्त्वदृष्टीच्या अभावीं तसा भ्रम होणें साहजिक आहे. 'तत्त्वदर्शिभिः' या पदाचें विशेष व्याख्यान करितात-]—**तत् इति सर्वनाम**—तत् हे सर्वनाम आहे.—**च सर्वं ब्रह्म**—व सर्व ब्रह्म आहे.—**तस्य नाम तत् इति**—त्या ब्रह्माचें नांव तत् असें आहे.—**तद्भावः तत्त्वं**—त्याचा जो भाव ते तत्त्व—**ब्रह्मणः याथात्म्यं**—म्हणजे ब्रह्माचे यथार्थस्वरूप—**तत् द्रष्टुं शीलं येषां ते तत्त्वदर्शिनः**—ते ब्रह्माचे तत्त्व पाहण्याचें ज्याचे शील आहे, ते तत्त्वदर्शी,—**तैः तत्त्वदर्शिभिः**—त्या तत्त्वदर्शी लोकांकडून सत् व असत् यांचा निश्चय केला गेला आहे. [ 'तत्' हे व्याकरणांत सर्वनाम आहे. सर्वनाम म्ह० सर्व पदार्थांना लागू होणारे नांव. ब्रह्म सर्व आहे. म्हणून त्याचे 'तत्' हे नांव आहे. 'तत्' या सर्वनामाला 'भाव' या अर्थी 'त्व' हा प्रत्यय लागून 'तत्त्व' असा शब्द बनला आहे. त्याचा अर्थ ब्रह्माचें यथार्थ स्वरूप असा आहे. ते ब्रह्माचे तत्त्व-याथात्म्य पाहण्याचें ज्यांचें शील आहे ते तत्त्वदर्शी. त्यांनी पूर्वोक्त सत् व असत् म्ह० आत्मा व अनात्मा यांचा निर्णय स्वानुभवाने ठरविला आहे. असो; याप्रमाणे श्लोकांचे व्याख्यान करून अर्जुनाने काय करावे हे सांगतात- ]

**त्वमपि तत्त्वदर्शिनां दृष्टिमाश्रित्य शोकं मोहं च हित्वा शीतोष्णादीनि नियतानियतरूपाणि द्वंद्वानि विकारोऽयमसन्नेव मरीचिजलवन्मिथ्याऽवभासत इति मनसि निश्चित्य तितिक्षस्वेत्यभिप्रायः ॥ १६ ॥**

**भाष्यार्थ**—**तत्**—म्हणून—**त्वं अपि**—तूं सुद्धां—**तत्त्वदर्शिनां दृष्टिं आश्रित्य**—तत्त्वदर्शी लोकांच्या दृष्टीचा आश्रय करून—**शोकं मोहं च हित्वा**—शोक व मोह टाकून—**नियतानियतरूपाणि शीतोष्णादीनि द्वंद्वानि**—नियत व अनियतरूप अशा या शीतोष्णादि द्वंद्वांना—**विकारः अयं असन् एव**—हा विकार असत्च आहे—**मरीचिजलवत् मिथ्या अवभासते**—मृगजळाप्रमाणें मिथ्या भासत आहे—**इति मनसि निश्चित्य**—असा मनामध्यें निश्चय करून—**तितिक्षस्व**—

सहन कर,—**इति अभिप्रायः**—असा याचा अभिप्राय आहे. [यास्तव हे अर्जुना! तूंही तत्त्वज्ञांच्या दृष्टीचा आश्रय करून शोक व मोह यांचा त्याग कर. शीत-उष्ण इत्यादि द्वंद्वें नियत व अनियत रूप आहेत. तो खोटा विकार आहे, मृगजळाप्रमाणें मिथ्या भासत आहे, असा मनामध्यें पक्का निश्चय करून तूं द्वंद्वांना सहन कर, असा या सर्व विवेचनाचा आशय आहे. ] १६

---

१या श्लोकाला रहस्यकारांनी असें अवतरण दिलें आहे—'हाच अर्थ आतां अध्यात्मशास्त्रदृष्ट्या व्यक्त करून दाखवितात–' तर मग वर ( श्लो. १४ ) ' शीतोष्णादिकांना सहन कर ' म्हणून जे भगवानांनी सांगितले व 'त्यांना जो सहन करतो तो मोक्षाला समर्थ होतो,' असें ( श्लोक १५ ) जें म्हटले आहे तें अध्यात्मशास्त्रदृष्ट्या नव्हे म्हणावयाचे ? पण तें जर त्या शास्त्राच्या दृष्टीने नव्हे, तर कोणत्या शास्त्राच्या दृष्टीने आहे ? लौकिकदृष्टीनें की काय ? की कर्मयोगाच्या दृष्टीने? त्यापेक्षां आचार्यांनी 'आणखी कोणत्या कारणाने शीतोष्णादिकांना सहन करणें युक्त आहे तें या श्लोकांत सांगतात– ' असे म्हणून 'शीतोष्णादि असत् आहेत, कारण ते विकार आहेत, विकार नित्य नसतात, म्हणून त्यांना सहन करणें सर्वथा युक्त आहे, हें सांगण्यासाठी एक अबाधित नियम या श्लोकांत सांगितला आहे,' अशी जी कल्पना केली आहे ती किती सयुक्तिक आहे ?

रहस्यकार म्हणतात—" सत् म्ह. ब्रह्म आणि असत् म्ह० नामरूपात्मक जग असे अर्थ या श्लोकांत विवक्षित आहेत" व याला आधार काय? तर वेदांतील, उपनिषदांतील व गीतेंतील ' सत्'शब्द. जसे—' एक सत् विप्रा बहुधा वदन्ति ' ' सत् एव सोम्य इदं अग्र आसीत् ' ' असत् एव० ' ' कथं असतः सत् जायेत ' ' ॐ तत् सत् इति निर्देशो ' इत्यादि ' सत् 'शब्द. ( गीतार. पृ. २२१, २४१–२४३ पहा ) पण हे म्हणणे बरोबर नाही. कारण येथें प्रकृत विषय कोणता आहे ? तितिक्षेचा. तितिक्षा केल्याने मुमुक्षु मोक्षाला समर्थ होतो म्हणून ती करावी, हे एक कारण १५ व्या श्लोकांत सांगितले व विषय खोटे असल्यामुळेही त्यांची तितिक्षा करणे–त्याना सहन करणे योग्य आहे, असे दुसरे कारण यांत विवक्षित आहे. यास्तव विषय मिथ्या असून विषयी आत्मा नित्य आहे हेच येथे सांगणें उचित आहे. ' सत् ' म्ह० आत्मा–विद्यमान वस्तु, तिचा अभाव त्रिकालीं होत नाहीं. ' असत् ' म्ह० अविद्यमान वस्तु, तिचा भाव म्ह० अस्तित्वही संभवत नाहीं. शीतोष्णादि असत् आहे. त्यामुळे त्याचे वास्तविक अस्तित्व संभवत नाहीं. ते जरी कांहीं काळ भासले तरी फार वेळ टिकत नाहीं म्हणून ते मिथ्या आहे. ते जर मिथ्या–असत नसते तर त्याचा अभाव झाला नसता. ज्याचा अभाव होतो ते सत् नव्हे आणि जे सत्–नित्य असते त्याचा अभाव केव्हांच होत नाहीं. शीतोष्णादिकांचा अभाव होतो, म्हणून ते जरी भासले तरी असत्–मिथ्या ! यास्तव तू त्यांस सहन कर. अतत्त्वज्ञांना प्रत्यक्ष अनुभवास येणारे शीतोष्णादिक मिथ्या आहेत, व आत्माच नित्य आहे, असें वाटत नाहीं. पण या सत्-असतांचा निर्णय तत्त्वज्ञांनी प्रत्यक्ष अनुभविला आहे, असाच येथें अर्थ करणे सयुक्तिक आहे. अर्थात सत् म्ह० त्रिकाली विद्यमान असणारी वस्तु, अर्थात् आत्मा–ब्रह्म. पण असत् म्ह. नामरूपात्मक दृश्य जगत् नव्हे. तर केव्हांच विद्यमान नसलेली वस्तु. पण रहस्यकार याचा अर्थ काय करितात तो पहा–'जें नाहीं तें आहेसें होत नाही व जें आहे तें नाहींसें होत नाहीं.'

**अविनाशि तु तद्विद्धि येन सर्वमिदं ततम् ।**
**विनाशमव्ययस्यास्य न कश्चित्कर्तुमर्हति ॥ १७॥**

**अन्वयार्थ—तु**—पण—**येन**—ज्यानें—**इदं सर्वं**—हें सर्व दृश्य जगत्—**ततं**—व्यापिलें आहे—**तत्**—तें आत्मतत्त्व-ब्रह्म—**अविनाशि**—नाश न पावणारें, नित्य आहे असें—**विद्धि**—तूं जाण—**अस्य अव्ययस्य**—या अव्ययाचा—**विनाशं**—विनाश—**कर्तुं**—करण्यास—**कश्चित्**—कोणी—**न अर्हति**—योग्य-समर्थ नाहीं. १७.

**किं पुनस्तद्यत्सदेव सर्वदैवास्तीति, उच्यते—अविनाशीति । अविनाशि न विनष्टुं शीलमस्येति । तुशब्दोऽसतो विशेषणार्थः तद्विद्धि विजानीहि । किं, येन सर्वमिदं जगत्ततं व्याप्तं सदाख्येन ब्रह्मणा साकाशमाकाशेनेव घटादयः ॥ विनाशमदर्शनमभावमव्ययस्य न व्येति उपचयापचयौ न यातीत्यव्ययं तस्याव्ययस्य । नैतत्सदाख्यं ब्रह्म स्वेन रूपेण व्येति व्यभिचरति निरवयवत्वाद्देहादिवत् । नाप्यात्मीयेनाऽऽत्मीयाभावा-**

---

पण घट उत्पत्तीच्या पूर्वी नसतो, तो पुढे होतो. पुत्र पूर्वी नाही, तो जन्मानतर आहे, तसेंच झाड आतां आहे, ते तोडल्यावर नाहींसे होते. तेव्हां रहस्यकारांचा हा अर्थ कितपत ग्राह्य आहे, ते आतां वाचकांनीच ठरवावे. ‘एकं सत् विप्रा बहुधा वदन्ति-’ यातील ‘सत्-’ शब्दाचा ब्रह्म असा अर्थ होऊच शकत नाही. कारण परमात्मतत्त्व एक असतांना ब्राह्मण त्याला अनेक प्रकारे सांगतात, असा त्या वाक्याचा अर्थ आहे. ‘सन् एव सोम्य’ या छान्दोग्यांतील ‘सत्-’ शब्दाचा अर्थही हे जगत् उत्पत्तीच्या पूर्वी विद्यमानच होते, अविद्यमान नव्हते, असाच आहे. ‘असद्वा इद’ यांतील असत् म्ह० अव्यक्त. गीतेतही ‘ॐ,’ ‘तत’ व ‘सत्’ असा ब्रह्माचा त्रिविध नामनिर्देश केला आहे. अर्थात् रहस्यकारांचा मत म्ह० ब्रह्म हा अर्थ त्यांनीं दाखविलेल्या आधाराला धरूनही नाही. रहस्यकार पुन: म्हणतात—“सत् म्ह० जे आहे त्याचें अस्तित्व ( भाव ) आणि असत् म्ह० जे नाही, त्याचा अभाव ही दोन्ही नित्य म्ह० कायम टिकणारी आहेत, एवढेंच सागणे आहे.” ६१८ पण हे म्हणणेही बरोबर नाही. कारण भावाचा भाव व अभावाचा अभाव हे दोन्ही नित्य आहेत, हे सागण्यांत मोठेंसें स्वारस्य नाही. त्यापेक्षां आचार्य म्हणतात त्याप्रमाणे “विकार भासला, आहे असा वाटला तरी तो खरा नव्हे. त्याचे अस्तित्व म्ह० भाव वस्तुत: नाहीच. कारण तो टिकत नाहीं.केवळ भासमान आहे. तो बाधित होतो.पण प्रत्येक विकारांत जें सत् असते,ज्याच्यामुळें हें सर्व ‘आहे आहे’ असें वाटतें ते, विकार जरी नाश पावला तरी त्रिकाळीं नाहींसें होत नाही. अर्थात् जें सत् तें त्रिकाळीं सत्च. हजारो विकार झाले व गेले तरी त्याचा अभाव होत नाही व जें असत्—मिथ्या ते मध्यें—उत्पत्तीपासून नाशापर्यंत जरी स्पष्ट भासलें, त्यांच्यापासून सुखदु:ख झालें तरी असत्च सत् नव्हे.” असें मानणेच अधिक सयुक्तिक आहे. शिवाय सत् व असत् यांचा निर्णय इतका सूक्ष्म असल्यामुळेंच तत्त्वदर्शी लोकांनीं तो पाहिला आहे, असें या श्लोकाच्या उत्तरार्धांत म्हटलें आहे. नुस्ता भावाचा भाव व अभावाचा अभाव नित्य आहे, हे ठरविण्यास तत्त्वदर्शींचीच कांही गरज नाहीं.

**यथा देवदत्तो धनहान्या व्येति न त्वेवं ब्रह्म व्येत्यतोऽव्ययस्यास्य ब्रह्मणो विनाशं न कश्चित्कर्तुमर्हति न कश्चिदात्मानं विनाशयितुं शक्नोतीश्वरोऽपि । आत्मा हि ब्रह्म स्वात्मनि च क्रियाविरोधात् ॥ १७ ॥**

**भाष्यार्थ—यत् सर्वदा सत् एव अस्ति तत् सत् किं पुनः**— जें सर्वकाली सत्च आहे तें सत् काय बरें आहे ?—**इति अविनाशि इति उच्यते**—असें कोणी विचारील म्हणून ‘ अविनाशी तु० ’ या श्लोकानें सांगितलें जातें.—**न विनष्टुं शीलं अस्य इति अविनाशि**—विनाश न पावण्याचें याचें शीलच आहे, म्हणून अविनाशी, —**तुशब्दः असतः विशेषणार्थः**—‘तु’ हा शब्द असत्हून सत्‌ला अगदीं विशिष्टपणानें पृथक् करण्यासाठीं आहे. [ देहादि द्वैताला ‘ असत् ’ म्हटलें जातें. त्याहून सत्चें विशिष्टत्व तें कोणतें ? तर स्वतः विनाशराहित्य हेंच होय. तें त्याचें विशेषण दाखविण्यासाठींच ‘ तु ’ हा शब्द आहे. ]—**तत् विद्धि-विजानीहि**—तें तूं जाण.—**किं** —तें कोणतें ?—**येन-सदाख्येन ब्रह्मणा इदं सर्वं साकाशं जगत् आकाशेन घटादयः इव ततं-व्याप्तं**—ज्या सत्-संज्ञक ब्रह्मानें हें सर्व आकाशासह जगत् आकाशानें घटादिक जसे, त्याप्रमाणें व्यापलेलें आहे. [ अर्जुना, ज्या ‘सत्’ या नांवाच्या ब्रह्मानें हें सर्व जगत् व्यापिलें आहे तें सत् ब्रह्म अविनाशी आहे, विनाश न पावणें हा त्याचा स्वभावच आहे, असें तूं समज. ‘आकाश घटादि पदार्थांना ज्याप्रमाणें व्यापतें त्याप्रमाणें ब्रह्मानें आकाशासह सर्व जगाला व्यापलें आहे ’ हा त्याच्या व्याप्तीविषयीं दृष्टान्त असून, असें जें सर्वव्यापक सत् तेंच एक अविनाशी आहे. त्याचा अभाव कधींही होत नाहीं. अर्थात् वरील सत् म्हणजे सामान्य-विशेषभावशून्य अखंड-एकरस सर्व विक्रियारहित ब्रह्मच होय. सर्वजगद्व्यापित्व हेंच त्या सद्रूप आत्म्याच्या अविनाशित्वाचें कारण आहे.] (दुसऱ्या श्लोकार्धाचें व्याख्यान-)—**विनाशं-अदर्शनं-अभावं**— विनाश म्ह० अदर्शन-अभाव—**अव्ययस्य-न व्येति-उपचयापचयौ न याति इति अव्ययं तस्य अव्ययस्य**—व्यय पावत नाहीं, वृद्धि व क्षय यांस प्राप्त होत नाहीं, म्हणून अव्यय, त्या अव्ययाचा—**एतत् सदाख्यं ब्रह्म स्वेन रूपेण न व्येति-व्यभिचरति**—हें ‘सत्’ या नांवाचें ब्रह्म स्वतःच्या रूपानें-स्वरूपानें व्यय-व्यभिचार पावत नाहीं,—**निरवयवत्वात्**—कारण तें निरवयव आहे, त्यामुळें (कोणाप्रमाणें)—**देहादिवत्**—देहादिकांप्रमाणें—**आत्मीयेन अपि न व्येति**—आत्मसंबंधी पदार्थांच्या व्ययानेंही व्यय पावत नाहीं(तें कां?)—**आत्मीयाभावात्**—कारण त्याला आत्मसंबंधीच कोणी नसतें-( याविषयीं दृष्टान्त-)—**यथा देवदत्तः धनहान्या व्येति**—ज्याप्रमाणें देवदत्त त्याच्या धनाची हानि झाली असता व्यय-क्षय पावतो—**एवं तु ब्रह्म न व्येति** —त्याप्रमाणेंच ब्रह्म क्षय पावत नाहीं.—**अतः अस्य अव्ययस्य ब्रह्मणः विनाशं कश्चित् कर्तुं न अर्हति**—यास्तव कोणीही या अव्यय ब्रह्माचा विनाश करण्यास समर्थ नाहीं—**कश्चित् ईश्वरः अपि आत्मानं विनाशयितुं न शक्नोति**—कोणी ईश्वरही-सार्वभौम राजा किंवा महेश्वरसुद्धां आत्म्याचा विनाश करण्यास समर्थ होत नाहीं.

**—हि—**कारण**—आत्मा ब्रह्म**—आत्मा ब्रह्म आहे**—च स्वात्मनि क्रियाविरोधात्** **—**व स्वतःच्या स्वरूपामध्येंच क्रियेचा विरोध आहे. [आत्म्याचा विनाश होत नाहीं,या विषयीं प्रस्तुत श्लोकांत युक्ति सांगितली आहे. आत्म्याचा विनाश स्वतःही संभवत नाहीं व परतःही संभवत नाहीं.स्वतः कसा संभवत नाहीं तें पूर्वार्धांत सांगितले. परतः कसा संभवत नाहीं तें या उत्तरार्धांत सांगत आहेत. या सद्रूप आत्म्याचा विनाश करण्यास कोणी समर्थ होत नाही. विनाश दोन प्रकारें संभवतो. एक सावशेष व दुसरा निरवशेष. मातीचा घट फुटला तरी त्याच्या खापऱ्या राहतात. हा सावशेष विनाश होय. पण रज्जूवर भासलेला सर्प रज्जुज्ञानानें विनाश पावला म्हणजे त्याचा कांहींच अवशेष उरत नाहीं, म्हणून हा निरवशेष विनाश होय. पण ब्रह्म–आत्मा निरवयव असल्यामुळें त्याचा सावशेष विनाश संभवत नाहीं व तो कल्पित नसल्यामुळें निरवशेष विनाशही संभवत नाहीं, असें येथें सांगितलें आहे. विनाश म्ह० अदर्शन, अभाव. ज्याचा व्यय होत नाहीं, तें अव्यय. वृद्धि होणें व क्षय पावणें, यांच्या योगानें वस्तूचा व्यय होत असतो, तिच्या स्वरूपांत विकार होत असतो. पण ब्रह्माचे वृद्धि-क्षय होत नाहींत, म्हणून तें अव्यय आहे. व्यवहारांत व्यय दोन प्रकारें संभवतो. १ स्वरूपाच्या–अवयवांच्या वृद्धिक्षयांमुळें व २ तत्संबंधी पदार्थांच्या वृद्धिक्षयांमुळें. देह सावयव असल्यामुळें अवयवांच्या वृद्धीमुळें त्याची वृद्धि व अवयवांच्या क्षयामुळें त्याचा क्षय संभवतो. पण ब्रह्म निरवयव आहे. त्यामुळें त्याचा पहिल्या प्रकारचा व्यय संभवत नाहीं. त्याचप्रमाणें एखाद्या पुरुषाच्या धनादि पदार्थांची वृद्धि झाली असतां त्याची वृद्धि व धनादिकांचा नाश झाला असतां त्याचा नाश होतो. पण ब्रह्म–आत्मा असंग असल्यामुळें तत्संबंधी पदार्थच नसतो.त्यामुळें त्याच्या व्ययानेंही ब्रह्माचा व्यय होत नाहीं. यास्तव याप्रमाणें स्वतः किंवा परतःही नाश न पावणाऱ्या या अव्यय सत्–आत्मतत्त्वाचा सावशेष किंवा निरवशेष अभाव कोणी एखादा अति समर्थ पुरुषही करूं शकत नाहीं. कारण आत्माच ब्रह्म आहेः 'हा आत्माच ब्रह्म आहे,' असें मांडूक्य श्रुति सांगते. त्यामुळें ब्रह्मच आत्म्याचा विनाश करील, हेंही संभवत नाहीं. कारण आपली क्रिया आपल्यावरच होऊं शकत नाहीं. अग्नि स्वतःलाच जाळीत नाहीं. डोळा आपल्यालाच पहात नाहीं. मनुष्य आपल्याच खांद्यावर बसूं शकत नाहीं, हें प्रसिद्ध आहे. ] १७

---

१ रहस्यकार या सतराव्या श्लोकाच्या अर्थात–'येन सर्व इदं तत' याचा 'ज्याने हे सर्व जग विस्तारलें आहे' असा एक अर्थ करितात. पण तो ठीक नाहीं. कारण 'तन्' म्ह० विस्तार करणें, असा जरी एक अर्थ असला तरी ज्याने हे सर्व विस्तारिलें आहे, असें म्हटल्यास आत्मा त्याहून निराळा, त्याच्या बाहेर राहतो. पण अद्वैतसिद्धान्ताला ते इष्ट नाहीं. ह्मणून ज्यानें हें व्यापिले आहे, हाच अर्थ सयुक्तिक होय; व तो रहस्यकारांनाही संमत आहे. रहस्यकार ह्मणतात—"१७ व १८ या दोन श्लोकांत सत् व असत् यांच्या अर्थांची फोड केली आहे" पण खरा प्रकार असा आहे की, १७ व्या श्लोकांत सत् काय ते सांगितलें व अठराव्यांत असत् काय तें सांगितले आहे. आत्माच सत् आहे व त्याची शरीरें –देह नाशवंत आहेत, असें त्या दोन्ही श्लोकांचें तात्पर्य आहे.

**अन्तवन्त इमे देहा नित्यस्योक्ताः शरीरिणः ।**
**अनाशिनोऽप्रमेयस्य तस्माद् युध्यस्व भारत ॥१८॥**

**अन्वयार्थ—नित्यस्य**—नित्य,—**अनाशिनः**—अविनाशी व—**अप्रमेयस्य**—अप्रमेय अशा या—**शरीरिणः**—शरीरी-आत्म्याचे—**इमे देहाः**—हे सर्व देह—**अन्तवन्तः**—अन्तवान्-अन्त-नाश पावणारे आहेत.—**तस्मात्**—म्हणून—**भारत**—हे अर्जुना !—**युध्यस्व**—तूं युद्ध कर. १८.

**किं पुनस्तदसद्यत्स्वात्मसत्तां व्यभिचरतीति उच्यते-अन्तवन्त इति ॥ अन्तवन्तोऽन्तो विनाशो विद्यते येषां तेऽन्तवन्तो यथा मृगतृष्णिकादौ सद्बुद्धिरनुवृत्ता प्रमाणनिरूपणान्ते विच्छिद्यते सा तस्या अन्तस्तथेमे देहाः। स्वप्नमायादेहादिवच्चान्तवन्तो नित्यस्य शरीरिणःशरीरवतोऽनाशिनोऽप्रमेयस्याऽऽत्मनोऽन्तवन्त इत्युक्ता विवेकिभिरित्यर्थः।**

**भाष्यार्थ**—( १६ व्या श्लोकात सांगितलेल्या-सत् व असत्-यांपैकी 'सत्'चा निश्चय केला. आता या श्लोकांत असत्-चा निश्चय करितात-)—**यत् स्वात्मसत्तां व्यभिचरति तत् असत् किं पुनः**—जे स्वरूपसत्तेला सोडते तें असत् काय बरें आहे ?—**इति अन्तवन्तः इति उच्यते**—ते 'अन्तवन्तः०' या श्लोकाने सांगतात—**अन्तवन्तः-अन्तः-विनाशः विद्यते येषां ते अन्तवन्तः**—अन्त म्ह० विनाश ज्यांना असतो ते अन्तवन्त—**यथा मृगतृष्णिकादौ अनुवृत्ता सद्बुद्धिः प्रमाणनिरूपणान्ते विच्छिद्यते**—ज्याप्रमाणे मृगजळादि भ्रामक पदार्थामध्ये अनुवृत्त झालेली सद्बुद्धि प्रमाणपूर्वक निरूपण करूं लागले असतां शेवटी विच्छिन्न होते,—**सः तस्याःअन्तः**—तो त्या बुद्धीचा अन्त होय,—**तथा इमे देहाः**—तसेच हे देह अन्तवन्त आहेत.—**स्वप्नमायादेहादिवत् च**—व स्वप्नातील देहाप्रमाणें किंवा मायेनें उत्पन्न केलेल्या देहाप्रमाणें—**अन्तवन्तः**—अन्तवंत-नाशवंत (कोणाचे देह?)—**नित्यस्य शरीरिणः-शरीरवतः**—नित्य शरीराचे-शरीरवानाचे—**अनाशिनः अप्रमेयस्य आत्मनः**—नाशरहित व प्रमाणाचा विषय न होणाऱ्या आत्म्याचे (देह)—**अन्तवन्तः इति उक्ताः**—नाशवंत म्हणून सांगितलेले आहेत. (कोणी?)—**विवेकिभिः इत्यर्थः**—विवेकी लोकाकडून सांगितले गेले आहेत, असा याचा भावार्थ. [असत् म्ह० शून्य नव्हे, तर काय? जे कांहीं काल भासून पुढें भासेनासें होते, तें असत् होय. ज्याची सत्ता त्रिकाली नसते तर नाशानंतर बाधित होते, व्यभिचरित होते ते असत्. देहादि सर्व अनात्मवर्ग असत् आहे. कारण हे देह अन्तवन्त आहेत. अन्तवन्त म्ह० नाशवंत आहेत. सर्व नाशवंत पदार्थ असत् होत. पण ते देह स्वतंत्र नाहींत, तर नित्य आत्म्याच्या सत्तेनेच सत्तावान् होणारे आहेत. असो. देह अन्तवन्त कसे ? कारण त्यामध्यें सद्बुद्धीची अनुवृत्ति होते. देह आहेत अशी प्रतीति येते, व त्या सद्बुद्धीचा विच्छेदही होत नाहीं, म्हणून म्हणशील तर सांगतो-भ्रमाने भासणाऱ्या मृगजळादिकांमध्येंही सद्बुद्धि अनुवृत्त होते, म्ह० 'हें जळ आहे,' अशी याविषयीं अस्तित्वबुद्धि

होते. पण प्रत्यक्ष प्रमाणाचा आश्रय करून निरूपण करूं लागलें कीं लागलीच ती सद्‌बुद्धि नाहींशी होते. हें खरें जल नसून जलाचा आभास आहे, अशी खात्री होते. तोच या सद्‌बुद्धीचा अन्त-विच्छेद होय. त्याच न्यायानें हे सर्व देह आहेत, असें जरी वाटत असलें-ते सद्‌बुद्धीचे विषय जरी होत असले-तरी प्रत्यक्षादि प्रमाणांच्या योगानें त्यांचें निरूपण करूं लागलें असतां शेवटी त्या बुद्धीचा विच्छेद होतो. त्यामुळें ते अन्तवन्त आहेत. स्वप्न, भ्रम, मनोरथ इत्यादि अवस्थांतील देह व गारुड्यानें मायेनें उत्पन्न केलेले देह जरी त्या त्या दशेत सद्‌बुद्धियुक्त असले तरी ते दुसऱ्या अवस्थेत जातांच त्यांविषयीच्या सद्‌बुद्धीचा विच्छेद झाल्यामुळे जसे अन्तवन्त ठरतात त्याप्रमाणें हे जाग्रदवस्थेंतील देहही अन्तवन्त आहेत. 'अहो पण देह जरी अन्तवन्त असले तरी आत्म्याचा असंख्य देहांशी प्रवाहरूपानें सतत संबंध होत असल्यामुळे आत्मा व देह यांचा संबंध अनंत आहे,' म्हणून म्हणाल तर सांगतो-नित्य जो शरीरी--शरीरवान्, नाश न पावणारा व प्रत्यक्षादि प्रमाणाचा विषय न होणारा आत्मा त्याचे हे देह अन्तवन्त आहेत. कोणत्याही पदार्थाचा प्रवाह प्रवाही पदार्थाहून पृथक् दिसत नाही जल प्रवाही असून त्याचा प्रवाह जलरूपानेंच दिसतो देहाचा प्रवाह मानावयाचा झाल्यास तो देहरूपानें दिसला पाहिजे. पण तशा प्रकारे तो दिसत नाही, त्यामुळे देहादिकांच्या अभावी त्यांचा आत्म्याशी प्रवाहरूपानें संबंधही सिद्ध होत नाही. म्हणून नित्य आत्म्याचे हे देह अन्तवन्तच आहेत.]

**नित्यस्यानाशिन इति न पुनरुक्तं नित्यत्वस्य द्विविधत्वाल्लोके नाशस्य च। यथा देहो भस्मीभूतोऽदर्शनं गतो नष्ट उच्यते विद्यमानोऽप्यन्यथापरिणतो व्याध्यादियुक्तो जातो नष्ट उच्यते। तत्रानाशिनो नित्यस्येति द्विविधेनापि नाशेनासंबन्धोऽस्येत्यर्थः। अन्यथा पृथिव्यादिवदपि नित्यत्वं स्यादात्मनस्तन्मा भूदिति नित्यस्यानाशिन इत्याह॥**

**भाष्यार्थ**—('नित्यस्य' व 'अनाशिनः' या पदाचा अर्थ एकच असल्यामुळे त्यावर पुनरुक्ति दोष येतो, असे कोणाला वाटेल म्हणून आचार्य म्हणतात)—**नित्यस्य अनाशिनः इति न पुनरुक्तं**—नित्य व अनाशी—नाश न पावणाऱ्या, हे पुनरुक्त नव्हे, यावर पुनरुक्त दोष येत नाही.—**लोके नित्यत्वस्य च नाशस्य द्विविधत्वात्**—कारण व्यवहारांत नित्यत्व व नाश यांना द्विविधत्व आहे. [व्यवहारांत नाश व नित्यत्व हीं दोन्हीं दोन प्रकारची दिसतात. त्यामुळे नित्य व अनाशी, या म्हणण्यावर पुनरुक्त दोष येत नाहीं.]—**यथा भस्मीभूतः अदर्शनं गतः देहः नष्टः उच्यते**—ज्याप्रमाणें भस्मीभूत झालेला-अभावास प्राप्त झालेला देह नष्ट झाला, असे म्हटले जाते.—**विद्यमानः अपि अन्यथापरिणतः व्याध्यादियुक्तः जातः नष्टः उच्यते**—त्याचप्रमाणें विद्यमान असूनही विपरीत परिणाम पावलेला,- रोगादिकांनी युक्त झालेला देह नष्ट झाला असें म्हटलें जातें.—**तत्र**—असे असल्यामुळे—**अनाशिनः नित्यस्य इति**—अनाशी व नित्य या दोन पदांनी—**द्विविधेन अपि नाशेन अस्य असंबंधः इत्यर्थः**—दोन्ही प्रकारच्या नाशाशी याचा संबंध नाही, असा आशय व्यक्त केला

आहे.—**अन्यथा**—नाहीं तर—**पृथिव्यादिवत् अपि आत्मनः नित्यत्वं स्यात्**—पृथिवी, आकाश इत्यादिकांप्रमाणेंही आत्म्याचें नित्यत्व सिद्ध होईल,—**तत् मा भूत् इति नित्यस्य अनाशिनः इति आह**—तें तसें न व्हावें, म्हणून भगवान् 'नित्यस्य' व 'अनाशिनः' असें म्हणत आहेत. [ शरीर जळून भस्म झालें, तें अदृश्य झालें तरी त्याचा नाश झाला असें म्हणतात व तें जिवंत असतांनाच रोगादिकांच्या योगानें त्याच्यामध्यें कांही विपरीत परिणाम झाला तरी त्याचा नाश झाला असें म्हणतात. अर्धांगवायूनें अर्धे अंग लुलें पडलें, तर त्याचें उजवें किंवा डावें अंग गेलें, असें म्हणतात. डोळे फुटले, तर दृष्टि गेली, नष्ट झाली, असे म्हणतात, हे प्रसिद्ध आहे. पण अशा या दोन्हीं प्रकारच्या नाशाचा आत्म्यामध्यें संभव नाहीं, तो निर्विकार नित्य आहे, हें सांगण्यासाठीं नित्य व अनाशी हीं दोन विशेषणें दिलीं आहेत. त्यांतील कोणतें तरी एकच विशेषण असतें तर पृथिवीमध्यें प्रतिक्षणीं परिणाम होत असूनही 'तीच ही' अशी नित्यत्वाची प्रतीति जशी येते त्याप्रमाणे आत्माही परिणामी नित्य आहे, असे वाटण्याचा संभव होता. पण तशी कोणाची विपरीत भावना होऊं नये, म्हणून दोन विशेषणे मुद्दाम दिलीं आहेत. ]

**अप्रमेयस्य न प्रमेयस्य प्रत्यक्षादिप्रमाणैरपरिच्छेद्यस्येत्यर्थः । नन्वागमेनाऽऽत्मा परिच्छिद्यते प्रत्यक्षादिना च पूर्वम् । न । आत्मनः स्वतःसिद्धत्वात् । सिद्धे ह्यात्मनि प्रमातरि प्रमित्सोः प्रमाणान्वेषणा भवति । न हि पूर्वमित्थमहमित्यात्मानमप्रमाय पश्चात्प्रमेयपरिच्छेदाय प्रवर्तते । न ह्यात्मा नाम कस्यचिदप्रसिद्धो भवति ॥**

**भाष्यार्थ—अप्रमेयस्य-न प्रमेयस्य-प्रत्यक्षादिप्रमाणैः अपरिच्छेद्यस्य इत्यर्थः**—अप्रमेय म्ह० प्रमेय नसलेल्या–प्रत्यक्षादि प्रमाणांनी परिच्छिन्न न होणाऱ्या –प्रत्यक्षादिकांनी ज्ञात न होणाऱ्या–प्रमाणांचा विषय न होणाऱ्या, असा याचा भावार्थ. [ आत्मा केवल उपनिषद् या प्रमाणानेंच परोक्ष ज्ञात होतो. उपनिषदांवरूनही त्याचा अपरोक्ष साक्षात्कार होत नाहीं. म्हणून तो अप्रमेय–प्रत्यक्षादि लौकिक प्रमाणांचा विषय न होणारा आहे, अशा त्या अप्रमेय आत्म्याचे हे देह अन्तवन्त आहेत, याविषयींच शंका घेऊन समाधान–]—**ननु**—अहो पण—**आगमेन आत्मा परिच्छिद्यते**—उपनिषद्रूप आगमावरून आत्म्याचें ज्ञान होतें, [ त्यामुळें त्याला अप्रमेय म्हणतां येत नाहीं. ]—**प्रत्यक्षादिना च पूर्वं**—व आगमाची प्रवृत्ति होण्यापूर्वी प्रत्यक्षादि प्रमाणांच्या योगानेच तो ज्ञात होतो. [ त्यामुळेंही त्याला अप्रमेय म्हणतां येत नाहीं. कारण मी कोण याविषयींच अज्ञान संभवतें व जे अज्ञात असेल त्याचे ज्ञान करून देणे, हेंच प्रमाणाचे लक्षण आहे आणि मी अमुक–मनुष्य, कर्ता, भोक्ता आहे इत्यादि ज्ञान झाल्यावरच आगमाची प्रवृत्ति होते. या शंकेचे 'एतदप्रमेयं' या श्रुतीच्या आधारानें समाधान–]—**न**—असें नाहीं,—**आत्मनः स्वतःसिद्धत्वात्**—कारण आत्म्याला स्वतःसिद्धत्व आहे. [त्याच्या सिद्धीला दुसऱ्या प्रमाणाची अपेक्षा नाहीं. ती कशी ? म्हणून म्हणाल तर सांगतों–]—**हि प्रमातरि-आत्मनि सिद्धे**—कारण प्रमाता–प्रमेयाला

जाणणारा आत्मा जेव्हां सिद्ध असतो तेव्हांच—**प्रमित्सोः**—प्रमेयाला जाणण्याची इच्छा करणाऱ्या त्याला—**प्रमाणान्वेषणा भवति**—प्रमाणाची अपेक्षा वाटते—**हि पूर्वं अहं इत्थं इति आत्मानं अप्रमाय पश्चात्प्रमेयपरिच्छेदाय न प्रवर्तते**—कारण अगोदर हा मी अशा प्रकारचा आहें, जसें स्वतःला न जाणतां कोणीही नंतर प्रमेयाला -विषयाला जाणावयास प्रवृत्त होत नाहीं.—**आत्मा नाम कस्यचित् अप्रसिद्धः न भवति हि**—आत्मा कोणालाही अप्रसिद्ध केव्हांच नसतो, हें प्रसिद्ध आहे. [ प्रमाता -मी असे म्हणणारा कर्ता-जीव, तो सर्व प्रवृत्तींच्या पूर्वींच सिद्ध असतो. 'मी' ची सिद्धि सर्व प्रवृत्तींच्या पूर्वीं त्यामुळें प्रमाता-म्ह० प्रमाणांच्या योगानें प्रमेयाला जाणणारा. हेंच सोप्या शब्दांत सांगावयाचें झाल्यास प्रमाता म्ह० विषयांना जाणणारा,प्रमाण म्ह० इंद्रियें-ज्ञानाचीं साधनें व प्रमेय म्ह० विषय. अर्थात् इंद्रियांची विषयग्रहणासाठीं जी प्रवृत्ति व्हावयाची ती प्रमाता पूर्वीं सिद्ध असेल तरच होईल त्यावांचून होणार नाहीं. एखादा धनी असला तरच भृत्यांची गरज, त्याच्या प्रेरणेनेंच त्याचे भृत्य-नोकर त्याच्यासाठीं आपापल्या कार्यांत प्रवृत्त होतात. प्रमाता प्रमेयाला जाणण्याची जेव्हां इच्छा करतो तेव्हां त्याला प्रमाणांची गरज भासते. मी हा अशा प्रकारचा आहें, असें अगोदर प्रमाता जेव्हां स्वतःला जाणतो, तेव्हांच तो प्रमेयाला प्रमाणांच्या योगानें जाणण्यास सिद्ध होतो. आत्मा सर्वलोकप्रसिद्ध आहे. 'मी' हे कोणाला शिकवावयास नको. आत्मप्रतीति पशु-पक्ष्यांनाही स्वभावतःच असते. अर्थात् आत्म्याच्या सामान्य ज्ञानाला कोणत्याही प्रमाणाची अपेक्षा नसते. इतकेंच नव्हे तर कोणतेंच प्रमाण त्याला विषय करण्यास समर्थ नाहीं. सर्व प्रमाणे जड आहेत. त्यामुळें चेतन आत्म्याला जाणण्याची योग्यता त्यांच्यामध्यें नाहीं. ( अ. १० श्लो. १४,१५. ) ह्मणून सत्-आत्मा अप्रमेय आहे. शिवाय प्रत्यक्ष, अनुमान, शब्द हीं प्रमाणें अनात्म्याला विषय करितात. व्यवहारावस्थेंत अनात्म्याचेंच अज्ञान संभवतें. अज्ञात पदार्थाचें ज्ञान करून देणें, हेंच प्रमाणांचें लक्षण आहे. अर्थात् प्रत्यक्षादि प्रमाणांना व्यवहारांतच प्रामाण्य आहे. व्यवहारांत अहंकारविशिष्ट आत्म्याचाच 'अहं'-मी असा अनुभव येत असतो. केवळ आत्मा अनुभवाचा विषयच होत नाहीं. ह्मणून तो सर्वथा अप्रमेय आहे. ]

**शास्त्रं त्वन्त्यं प्रमाणमतद्धर्माध्यारोपणमात्रनिवर्तकत्वेन प्रमाणत्वमात्मनि प्रतिपद्यते न त्वज्ञातार्थज्ञापकत्वेन । तथा च श्रुतिः— " यत्साक्षादपरोक्षाद्ब्रह्म य आत्मा सर्वान्तरः" इति ॥**

**भाष्यार्थ**—( प्रत्यक्षादि प्रमाणें आत्म्याला जरी विषय करीत नसलीं तरी श्रुतीनें आत्म्याला 'औपनिषद पुरुष' म्हटलें आहे. म्ह० आत्मा केवळ उपनिषद् या प्रमाणानेंच ज्ञात होतो, असें तिचें म्हणणें आहे. त्यामुळें आत्म्याचे ठिकाणीं शास्त्राची प्रवृत्ति अवश्य होणारच, अशी कोणी शंका घेईल, म्हणून आचार्य सांगतात-)—**शास्त्रं तु अन्त्यं प्रमाणं**—शास्त्र तर शेवटचें प्रमाण आहे.—**अतद्धर्माध्यारोपणमात्रनिवर्तकत्वेन आत्मनि प्रमाणत्वं प्रतिपद्यते**—आत्म्यावर जितक्या अनात्मधर्मांचा

आरोप झालेला आहे त्या सर्वांचें निवर्तन करणें, या कार्यामुळें शास्त्र आत्म्याविषयीं प्रमाण आहे—**तु अज्ञातार्थज्ञापकत्वेन आत्मनि प्रमाणत्वं न ( प्रतिपद्यते )** —पण अज्ञात अर्थाचें ज्ञापन करणें, या रूपानें ते आत्म्याविषयी प्रमाण होऊं शकत नाहीं.—**तथा च-यत्साक्षात्-अपरोक्षात् ब्रह्म, य आत्मा सर्वान्तरः इति श्रुतिः**—तसाच सिद्धान्त सांगणारी ' जें साक्षात्-अपरोक्ष ब्रह्म, जो सर्वान्तर आत्मा ' अशी श्रुति आहे. [ शास्त्रानें प्रत्यगात्मरूप ब्रह्माचें प्रतिपादन केलें असतां प्रमाता-प्रमाण-प्रमेय इत्यादि सर्व विभाग निवृत्त होतो. त्यामुळें शास्त्राला अन्त्य-शेवटचें म्हणणें उचित आहे व तें अपौरुषेय असल्यामुळे निर्दोष आहे. त्यामुळे त्याच्या प्रामाण्याविषयींही शंका रहात नाहीं. ' तद्धर्म ' म्ह० आत्मधर्म, अतद्धर्म म्ह० अनात्म्याचे-अन्तःकरण, इंद्रियें, देह, विषय यांचे-धर्म. आत्म्याच्या अनादि अविद्येमुळें त्याच्यावर ' मी सुखी-दुःखी ' इत्यादि अंतःकरणाचे धर्म, आंधळा, बहिरा, इत्यादि इन्द्रियधर्म, उंच, स्थूल, गोरा, इत्यादि शरीरधर्म, धनी, कुटुंबी इत्यादि विषयधर्म प्रत्येक अज्ञ जीव लादतो. त्याच्यावर त्यांचा आरोप करतो. शास्त्र त्या सर्व आरोपित धर्मांची निवृत्ति करते व तेवढया कार्यानेच ते आत्म्याविषयीं प्रमाण होऊं शकते. आत्मा स्वयंप्रकाश व अनुभवरूप-नित्य ज्ञात असल्यामुळे अज्ञात असलेला पदार्थ ज्ञात करून देणें, या रूपानें तें आत्म्याचे प्रमाण होऊं शकत नाहीं: अनात्मधर्मांची निवृत्ति केल्यावर त्याचा कांहींच उपयोग नसतो, म्हणून तें अन्त्य प्रमाण होय. ' साक्षात् म्ह० दुसऱ्या कशाचीही अपेक्षा न करणारें व अपरोक्ष-स्वयं ज्ञानरूप असे जें ब्रह्म तोच सर्वान्तर्यामी राहणारा आत्मा आहे. तेंच सर्व वस्तूंतील सार आहे, ते मला सांग. ' अशा अर्थाची बृहदारण्यक श्रुति आहे. ( बृहदा. भाष्यार्थ अ. ३ पृ. १०७ ) तीही ब्रह्मात्मा अन्य प्रमाणाची अपेक्षा न करितां स्वतः स्फुरतो, याविषयीं प्रमाण आहे. असो; याप्रमाणें आत्मा-सत्-ब्रह्म अप्रमेय असल्यामुळें अविनाशी आहे, असें प्रतिपादन करून त्यापासून निष्पन्न झालेल्या गोष्टीचें निगमन[1] करितात. ]

**यस्मादेवं नित्योऽविक्रियश्चाऽऽत्मा तस्माद्युध्यस्व युद्धादुपरमं मा कार्षीरित्यर्थः । न ह्यत्र युद्धकर्तव्यता विधीयते । युद्धे प्रवृत्त एव ह्यसौ शोकमोहप्रतिबद्धस्तूष्णीमास्ते तस्य कर्तव्यप्रतिबन्धापनयनमात्रं भगवता क्रियते । तस्माद्युध्यस्वेत्यनुवादमात्रं न विधिः ॥ १८ ॥**

**भाष्यार्थ—यस्मात् एवं नित्यः च अविक्रियः आत्मा**—ज्याअर्थी याप्रमाणें नित्य व अविक्रिय-निर्विकार आत्मा आहे—**तस्मात् युद्ध्यस्व-युद्धात् उपरमं मा कार्षीः इत्यर्थः**—त्याअर्थी युद्ध कर म्ह० युद्धापासून उपरम पावूं नकोस -युद्ध सोडून निवृत्त होऊं नकोस, असा याचा भावार्थ.—**अत्र युद्धकर्तव्यता न हि विधीयते**—या वाक्यांत ' युद्ध करावें ' असें युद्ध कर्तव्यतेचें विधान केलें

१ ' म्हणून पक्षावर साध्य अबाधितपणे राहतें ' असें प्रतिपादन करणारें जें वाक्य तें निगमन होय. तर्कसंग्रहसार पृ. ५५ पहा.

जात नाहीं—**हि असौ युद्धे प्रवृत्तः एव**—कारण तो अर्जुन युद्धांत प्रवृत्त झालेलाच होता. त्याला या वाक्यानें नवीन प्रवृत्त करावयाचें नव्हतें. पण—**शोकमोहप्रतिबद्धः तूष्णीं आस्ते**—शोक व मोह यांच्या योगानें प्रतिबद्ध होऊन–तूष्णी–मुकाट्यानें ( अ. २ श्लो. ९ ) बसला आहे.—( **अतः** ) **भगवता तस्य कर्तव्यप्रतिबन्धापनयनमात्रं क्रियते**—म्हणून भगवानाकडून केवल त्याच्या कर्तव्यप्रतिबंधाचें निवारण केलें जात आहे.—**तस्मात्**—यास्तव—**युद्ध्यस्व इति अनुवादमात्रं न विधिः**—'युद्ध कर' हा नुस्ता अनुवाद आहे. विधि नव्हे. [ वर वर्णन केल्याप्रमाणें आत्मा नित्य व निर्विकार आहे. म्हणून तूं युद्धापासून परत फिरूं नको. युद्ध हा स्वधर्म सोडूं नको. ' अहो पण आत्म्याच्या नित्यत्वादि स्वरूपाचें उपपादन करून युद्ध करावें असें विधान भगवानांनीं केलेले असल्यामुळें येथे ज्ञान व कर्म यांचा समुच्चय भगवानांना इष्ट असावा, असें दिसतें, ' असें समुच्चयवादी म्हणतील म्हणून आचार्य म्हणतात—" ' तस्माद्युध्यस्व भारत ' या वाक्यानें भगवान् युद्धाच्या कर्तव्याचें विधान करीत नाहींत. स्वधर्मरूप युद्धांत तो पूर्वीच प्रवृत्त झालेला आहे. क्षत्रियानें युद्ध करावें, असें धर्मशास्त्राचेंच विधान असल्यामुळे तो स्मार्त धर्म अर्जुनाला जन्मतःच प्राप्त आहे, व यापूर्वीही त्यानें अनेक वेळां शंकर, निवातकवच, इंद्र, गंधर्व, उत्तरगोग्रहणप्रसंगीं कौरव यांच्याशीं युद्ध केलें आहे. पण या प्रसंगीं शोक व मोह यांनीं त्याच्या त्या धर्मप्रवृत्तीला प्रतिबंध केल्यामुळें तो स्वधर्मरूप युद्ध सोडून मुकाट्यानें बसला आहे. म्हणून भगवान् आत्मज्ञानानें त्याचा शोक-मोह घालवून त्याच्या स्वधर्मप्रवृत्तीच्या प्रतिबंधाचें निवारण करीत आहेत. अर्थात् 'युध्यस्व' हा विधि[1] नसून तो स्मार्त विधीचा अनुवाद आहे. त्यामुळें येथें समुच्चयाचा गंधही नाहीं." ] १८

---

१ रहस्यकार ' तस्मात् युद्ध्यस्व भारत ' हा विधि आहे, असें मानतात, पण त्यांनीं आचार्यांचें वरील म्हणणें सबंध गीतारहस्यांत कोठेंही खोडून काढलेलें नाहीं. याला विधि कां मानतां येत नाहीं, ते आचार्यांनीं वर स्पष्ट सांगितलें आहे. पण त्याचा कांहींच विचार न करितां रहस्यकार म्हणतात—

" यावर कित्येकांचें असें म्हणणें आहे कीं, अर्जुनास भगवंतांनीं जो उपदेश केला तो निवृत्तिपर ज्ञानाचा, योगाचा किंवा भक्तीचाच असून तोच मुख्य प्रतिपाद्य विषय होय. पण युद्धाला प्रारंभ झाला होता म्हणून कर्माची मध्यें मध्यें थोडीशी प्रशंसा करून भगवंतांनीं अर्जुनाला तें युद्ध पुरे करूं दिले आहे. अर्थात् युद्ध पुरें करणें ही गोष्ट मुख्य न धरतां आनुषंगिक किंवा अर्थवादात्मकच मानली पाहिजे. पण अशा लटपटित कोटिक्रमानें गीतेच्या उपक्रमोपसंहारांची किंवा फलाची नीट उपपत्ति लागत नाहीं. स्वधर्माप्रमाणें प्राप्त झालेलें कर्तव्य कांहीं झालें तरी आमरणान्त करीत राहण्याचें महत्त्व व अवश्यकता या ठिकाणीं दाखवावयाची होती व ती सिद्ध करण्यास वरच्यासारखें पोकळ कारण गीतेंत कोठेंही सांगितलें नाहीं आणि सांगितलें असतें तरी अर्जुनासारख्या बुद्धिमान् व चौकस पुरुषास तें पटलेंही नसतें. भयंकर कुलक्षय होणार हें डोळ्यापुढें दिसत असतांही युद्ध करावें का न करावें, आणि करावें म्हटल्यास पाप न लागतां कसें करावें, हाच त्याचा मुख्य प्रश्न होता आणि कितीही

**शोकमोहादिसंसारकारणनिवृत्त्यर्थं गीताशास्त्रं न प्रवर्तकमित्येतस्यार्थस्य साक्षिभूते ऋचावानिनाय भगवान्। यत्तु मन्यसे युद्धे भीष्मादयो मया हन्यन्तेऽहमेव तेषां हन्तेत्येषा बुद्धिर्मृषैव ते। कथम्—य एनमिति।**

**भाष्यार्थ**—( गीताशास्त्र ही केवल भगवन्ताची कल्पना आहे. त्याला मूळ प्रमाण कांहीं नाहीं, असें कोणी म्हणेल म्हणून भगवान् दोन मंत्रांचा येथें उल्लेख करितात, असें सांगून आचार्य त्यांची संगति दाखवितात–)—**गीताशास्त्रं शोकमोहादिसंसार-कारणनिवृत्त्यर्थं**—गीताशास्त्र शोकमोहादि संसारकारणांच्या निवृत्तीसाठी आहे, **—न प्रवर्तकं**—ते शोकमोहादि संसारकारणांत प्रवृत्त करणारें नाही,**—इति एतस्य अर्थस्य साक्षिभूते ऋचौ भगवान् आनिनाय**—अशा या अर्थाच्या साक्षिभूत दोन ऋचा भगवान् येथे आणीत आहेत. [ गीताशास्त्र संसारकारणाची प्रवृत्ति करविणारें नाहीं, त्याची निवृत्ति करणारे आहे, या सिद्धान्ताला प्रमाणभूत–आधारभूत अशा दोन ऋचा भगवानांनी येथे घेतल्या आहेत. त्यांतील पहिल्या मंत्राची संगति आचार्य सांगतात–]—**तु युद्धे भीष्मादयः मया हन्यन्ते**—पण युद्धांत भीष्मादिक मजकडून मारले जातात—**अहं एव तेषां हन्ता**—मीच त्यांचे हनन करणारा आहें.**—इति यत् मन्यसे**—असे जे तूं मानीत आहेस—**एषा ते बुद्धिः मृषा एव**—ही तुझी बुद्धि–भावना मिथ्याच आहे.**—कथं**—ती कशी - म्हणून विचारशील तर—**यः**

---

लटपट केली तरी " निष्काम युद्ध कर " किंवा " कर्म कर " असे या प्रश्नाचे म्हणजे मुख्य मुद्यानेंच जे उत्तर ते ' अर्थवाद ' म्हणून कधींही उडवून टाकता येत नाहीं." गी. र. पृ.५६.

गीतारहस्यकारांनी वर ' कित्येकांचे ' म्हणून जें म्हणणे माटले आहे, ते ' अमक्याचें ' ह्मणून जर ह्मटले असते तर बरे झाले असते. पण तसे स्पष्ट न ह्मटल्यामुळे आह्माला त्याचें भ्रामकत्व निःशंकपणे दाखविता येत नाहीं. तथापि त्यात 'निवृत्तिपर ज्ञानाचा' हे शब्द श्रीमच्छंकराचार्यांना किंवा त्यांच्या संप्रदायांतील आचार्यांना उद्देशून आहेत असे वाटतें. म्हणून त्याविषयीं दोन शब्द लिहिणे अयोग्य होणार नाहीं. रहस्यकारांनी ज्याला 'लटपटीत कोटिक्रम' म्हणून ह्मटले आहे तो अद्वैती करीत नाहीत व असा लटपटीत कोटिक्रम कोणते टीकाकार करतात तेही आह्माला माहीत नाहीं. कदाचित् रहस्यकारांनी त्याला आपल्या शब्दांनींही लटपटीत केले असेल ? म्हणजे त्यांचें म्हणणें अशा लटपटीत रूपाने मांडलें असेल ! पण ते कसेंही जरी असले तरी ' युद्धाला प्रारंभ झाला होता, म्हणून कर्माची मध्यें मध्ये थोडीशी प्रशंसा करून भगवंतांनी अर्जुनाला ते युद्ध पुरे करूं दिलें आहे. अर्थात् युद्ध पुरे करणे ही गोष्ट मुख्य न धरता आनुषंगिक किंवा अर्थवादात्मकच मानली पाहिजे' हा कोटिक्रम लटपटीत आहे, असें आम्हीही म्हणतों; व त्यानें गीतेच्या उपक्रमोपसंहाराची किंवा फलाची उपपत्ति लावण्याची आमची इच्छाही नाही. तथापि वरील कोटिक्रम अद्वैत वेदान्त्यांचाच आहे, असें जर रहस्यकाराचें ह्मणणे असेल तर ' त्या संप्रदायांतील अमुक भाष्यकार किंवा टीकाकार अमुक ठिकाणीं हें असें म्हणतात पहा,' असे त्यांनीं दाखवावयास पाहिजे होतें. पण तसे कोठेही दाखविलेले नाहीं. अर्थात् वरील म्हणण्यानें भाष्यकारांचें भाष्य बाधित होऊं शकत नाहीं.

**एनं इति**—'य एनं०' या श्लोकानें भगवान् सांगतात—[ या युद्धांत भीष्मादिक माझ्या हातून मारले जाणार, मी त्यांचा हिंसक होणार, असें जें तुला वाटत आहे तें उगीच भ्रमाने वाटत आहे, तें खरें नव्हे; 'अहो पण प्रत्यक्ष प्रमाणाने सिद्ध असलेली ती गोष्ट खोटी कशी असेल' म्हणून म्हणशील तर त्याचे उत्तर भगवान् सांगत आहेत— ]

**य एनं वेत्ति हन्तारं यश्चैनं मन्यते हतम् ।**
**उभौ तौ न विजानीतो नायं हन्ति न हन्यते ॥१९॥**

**अन्वयार्थ**—**यः**—जो कोणी—**एनं**—या आत्म्याला—**हन्तारं**—हन्ता-मारणारा—**वेत्ति**—समजतो—**च**—व—**यः**—जो—**एनं**—या आत्म्याला—**हतं**—मेलेला—**मन्यते**—समजतो—**तौ उभौ**—ते दोघे—**न विजानीतः**—आत्म्याला जाणत नाहीत. त्याचे स्वरूप त्यांस माहीत नाही. कारण—**अयं**—हा आत्मा—**न हन्ति**—मारीत नाही,—**न हन्यते**—व मारला जात नाही. १९.

**य एनं प्रकृतं देहिनं वेत्ति जानाति हन्तारं हननक्रियायाः कर्तारं, यश्चैनमन्यो मन्यते हतं देहहनने हतोऽहमिति हननक्रियायाः कर्मभूतं, तावुभौ न विजानीतो न ज्ञातवन्तावविवेकेनाऽऽत्मानमहंप्रत्ययविषयं, हन्ताऽहं हतोऽस्म्यहमिति देहहननेनाऽऽत्मानमहंप्रत्ययविषयं यौ विजानीतस्तावात्मस्वरूपानभिज्ञावित्यर्थः। यस्मान्नायमात्मा हन्ति न हननक्रियायाः कर्ता भवति, न हन्यते न च कर्म भवतीत्यर्थः,अविक्रियत्वात् ॥**

**भाष्यार्थ**—( मी मारणारा व भीष्मादिक मारले जाणारे ही भावना अज्ञानमूलक असल्यामुळें ती भ्रामक आहे, असे वरील प्रश्नाचें उत्तर या श्लोकांत दिले आहे. काठकोपनिषदांत ' हन्ता चेन्मन्यते हन्तुं ' अशी जी ऋचा आहे ( का. भाष्यार्थ पृ. ६१ पहा ) तिचाच येथे अर्थतः उल्लेख केला आहे- )—**यः एनं-प्रकृतं देहिनंहन्तारं -हननक्रियायाः कर्तारं वेत्ति-जानाति**—जो या प्रकृत देहवान् आत्म्याला हन्ता--हननक्रियेचा कर्ता समजतो-जाणतो—**च यः अन्यः एनं हतं मन्यते**—व जो दुसरा याला मारला गेलेला मानतो—**देहहनने हतः अहं इति हननक्रियायाः कर्मभूतं**—म्ह० देहाला मारलें असतां मीच मारला गेलो आहे, असे आत्म्याला ' हनन ' या क्रियेचा कर्मभूत मानतो—**तौ उभौ**—ते दोघेही—**अविवेकेन**—अविवेकाने—**अहंप्रत्ययविषयं आत्मानं**—अहं-मी या प्रत्ययाचा विषय जो आत्मा त्याला—**न विजानीतः-न ज्ञातवन्तौ**—जाणत नाहीत, त्यांना आत्मा कळला नाहीं. —**देहहननेन**—देहाची हिंसा केल्यानें—**अहं हन्ता अहं हतः अस्मि**—मी हनन-हिंसा करणारा आहें, मी दुसऱ्याकडून हिंसा केला गेलों आहें,—**इति**—असें—**अहंप्रत्ययविषयं आत्मानं**—अहंप्रत्ययाचा विषय होणाऱ्या आत्म्याला—**यौ विजानीतः तौ आत्मस्वरूपानभिज्ञौ इत्यर्थः**—जे समजतात ते दोघेही आत्म्याच्या स्वरूपाला न जाणणारे आहेत, असा याचा आशय आहे. [ जो अज्ञ या प्रस्तुत आत्म्याला 'हनन' ही क्रिया करणारा समजतो तो व जो कोणी दुसरा आत्मा मारला जातो,

हननक्रियेचे कर्म होतो, असें समजतो तो, असे ते दोघेही अज्ञानामुळे—**अहं**—मी या अनुभवाचा विषय होणाऱ्या आत्म्याला जाणत नाहीत. देहानें दुसऱ्याला मारलें, म्हणजे मी याला मारलें व दुसऱ्यानें याच्या देहाला मारलें म्ह० मी मारला गेलों, असें जे समजतात ते दोघेही आत्म्याच्या स्वरूपाविषयीं अनभिज्ञ आहेत.]—**यस्मात्**—ज्या अर्थी—**अयं आत्मा न हन्ति-हननक्रियायाः कर्ता न भवति**—हा आत्मा मारीत नाहीं, म्ह० हनन या क्रियेचा कर्ता होत नाहीं.—**च न हन्यते-कर्म न भवति इत्यर्थः**—व तो मारला जात नाहीं, म्ह० हननक्रियेचें कर्म होत नाहीं, असा भावार्थ, (तो कां ?)—**अविक्रियत्वात्**—कारण त्याला अविक्रियत्व आहे [ ज्या अर्थी तो निर्विकार आहे, त्या अर्थी 'मी हन्ता आहे' इत्यादि ज्ञान हे अज्ञान आहे. आत्मा निर्विकार असल्यामुळेच हननक्रियेचा कर्ता नाहीं व कर्महीं नाहीं. ] १९

न जायते म्रियते वा कदाचित्
नायं भूत्वाऽभविता वा न भूयः ।
अजो नित्यः शाश्वतोऽयं पुराणो
न हन्यते हन्यमाने शरीरे ॥ २० ॥

**अन्वयार्थ—अयं**—हा आत्मा—**कदाचित्**—केव्हांहीं—**न जायते**—उत्पन्न होत नाहीं.—**वा**—किंवा—**कदाचित्**—केव्हांहीं—**न म्रियते**—मरत नाहीं.—**अयं**—हा—**भूत्वा**—होऊन—**भूयः**—पुनरपि—**अभविता**—न होणारा—**न**—नाहीं. (म्हणून केव्हांहीं मरत नाहीं.)—**अयं**—हा—**अजः**—न जन्मणारा,—**नित्यः**—त्रिकालीं असणारा—**शाश्वतः**—निर्विकार-अक्षय—**पुराणः**—नित्य एकरूप आहे—**शरीरे हन्यमाने अपि**—शरीरांत जरी विपरिणाम-बदल-विकार होत असला, तरी—**न हन्यते**—याच्यामध्यें कोणताही विपरिणाम होत नाहीं, ( किंवा शरीराला जरी मारलें, तरी आत्मा मारला जात नाहीं, असा अर्थ केला तरी चालेल. ) २०

**कथमविक्रिय आत्मेति द्वितीयो मन्त्रः—न जायते नोत्पद्यते जनिलक्षणा वस्तुविक्रिया नाऽऽत्मनो विद्यत इत्यर्थः । न म्रियते वा । वाशब्दश्चार्थे । न म्रियते चेत्यन्त्या विनाशलक्षणा विक्रिया प्रतिषिध्यते । कदाचिच्छब्दः सर्वविक्रियाप्रतिषेधैः संबध्यते न कदाचिज्जायते न कदाचिन्म्रियत इत्येवम् । यस्मादयमात्मा भूत्वा भवनक्रियामनुभूय पश्चादभविताऽभावं गन्ता न भूयः पुनस्तस्मान्न म्रियते । यो हि भूत्वा न भविता स म्रियत इत्युच्यते लोके । वाशब्दान्नशब्दाच्चायमात्माऽभूत्वा भविता वा देहवन्न भूयः पुनस्तस्मान्न जायते । यो ह्यभूत्वा भविता स जायत इत्युच्यते नैवमात्माऽतो न जायते ॥**

**भाष्यार्थ**—( आत्मा अविक्रिय असल्यामुळें हननक्रियेचा कर्ता किंवा कर्म होत नाहीं, हें सांगितलें. तेंच आतां प्रश्नपूर्वक दुसऱ्या मंत्रानें सिद्ध करितात-)—**आत्मा**

**अविक्रियः कथं इति द्वितीयः मंत्रः**—आत्मा अविक्रिय कसा, ते सांगण्यासाठीं हा दुसरा मंत्र आहे—**न जायते-न उत्पद्यते-जनिलक्षणा वस्तुविक्रिया आत्मनः न विद्यते**—आत्मा उत्पन्न होत नाहीं. जन्म-प्रादुर्भाव या रूपाचा प्रत्येक सृष्टपदार्थाला अवश्य होणारा विकार आत्म्याला नाहीं.—**न म्रियते वा वाशब्दः चार्थे**—येथील 'वा' शब्द 'च' म्ह० आणि-व-या अर्थी आहे.—**न म्रियते च इति अन्त्या विनाशलक्षणा विक्रिया प्रतिषिध्यते**—आणि तो मरत नाहीं, या वाक्याने शेवटच्या विनाशरूप विक्रियेचा प्रतिषेध केला जातो.—**कदाचित् शब्दः सर्वविक्रियाप्रतिषेधैः संबध्यते**—कदाचित् हा शब्द सर्व विकारांच्या निषेधांशीं संबद्ध होतो. ( तो कसा ? )—**न कदाचित् जायते न कदाचित् म्रियते इति एवम्**—तो केव्हांही उत्पन्न होत नाहीं, केव्हांही मरत नाहीं, याप्रमाणे सर्व विक्रियांशीं त्याचा संबंध लावावा.—**यस्मात् अयं-आत्मा भूत्वा-भवनक्रियां अनुभूय पश्चात् भूयः-पुनः अभविता-अभावं गन्ता न, तस्मात् न म्रियते**—ज्याअर्थी हा आत्मा होऊन-अगोदर होणे या क्रियेचा अनुभव घेऊन मागाहून पुनरपि न होणारा-अभावास प्राप्त होणारा नाहीं त्या अर्थी तो मरत नाहीं.—**हि**—कारण—**यः भूत्वा न भविता**—जो होऊन पुनः न होणारा-अभावास प्राप्त होणारा—**सः म्रियते इति लोके उच्यते**—तो मरतो असें लौकिकांत म्हटले जाते.—**वाशब्दात् च नशब्दात्**—दुसऱ्या चरणांत 'वा' असा शब्द व 'न' असा शब्द असल्यामुळें—**वा अयं आत्मा देहवत् अभूत्वा भूयः पुनः भविता न**—किंवा हा आत्मा देहाप्रमाणे पूर्वी नसून पुनरपि होणारा नाहीं.—**तस्मात् न जायते**—त्यामुळे तो उत्पन्न होत नाहीं.—**हि**—कारण—**यः अभूत्वा भविता सः जायते इति उच्यते**—जो पूर्वी नसून होणारा तो उत्पन्न होतो, असें म्हटले जाते.—**आत्मा एवं न**—आत्मा असा नसून होणारा नाहीं—**अतः न जायते**—म्हणून उत्पन्न होत नाहीं. [ या श्लोकांत आत्मा अविक्रिय कसा ते सांगितलें आहे. आत्मा उत्पन्न होत नाहीं व मरत नाहीं. म्ह० त्याला जन्म ही पहिली व मरण हीं शेवटची विक्रिया नाहीं. 'कदाचित्' ह्या शब्दाचा सर्व विक्रियांच्या निषेधांशीं संबंध लावावा म्ह० आत्मा कधीच उत्पन्न होत नाहीं, कधीच परिणाम पावत नाहीं, कधीच क्षीण होत नाहीं; कधीच मरत नाहीं, असा अर्थ निष्पन्न होईल. 'नायं भूत्वा भविता वा न भूयः' या दुसऱ्या चरणांतील 'न' व 'वा' या शब्दांचे स्वारस्य व्यक्त करण्यासाठीं आचार्यांनी दोन प्रकारें अन्वय लावून 'न म्रियते' व 'न जायते' यांच्याशी या चरणाचा कारणत्वानें संबंध दाखविला आहे. 'अयं आत्मा भूत्वा अभविता न' हा आत्मा होऊन न होणारा नाहीं, म्हणून मरत नाहीं, जो होऊन नाहींसा होतो, तो मेला असें म्हणतात, असा एक अन्वय व दुसरा 'वा नभूत्वा भूयः भविता न' किंवा नसून पुनः होणारा नाहीं, त्यामुळें उत्पन्नही होत नाहीं. जो पूर्वी नसून होतो, तो उत्पन्न झाला असें म्हणतात. या दोन्ही विषयीं देहाचा दृष्टान्त दिला आहे. देह नसून होतो व असून नाहींसा होतो. तसा आत्मा नाहीं. असल्या विषम दृष्टान्ताला न्यायशास्त्रांत व्यतिरेकी दृष्टान्त म्हणतात. आकाश निरवयव अस-

ल्यामुळें जसें निर्विकार तसा आत्मा निरवयव असल्यामुळें निर्विकार, असल्या सम दृष्टान्ताला अन्वयी दृष्टान्त व देह सावयव असल्यामुळें जसा क्षयी तसा आत्मा नाहीं कारण तो निरवयव आहे, अशा विषम दृष्टान्ताला व्यतिरेकी म्हणतात. असो; आतां अजो नित्यः० ' इत्यादि तिसऱ्या चरणाचें व्याख्यान करितात-]

**यस्मादेवं तस्मादजो यस्मान्न म्रियते तस्मान्नित्यश्च । यद्यप्याद्यन्तयोर्विक्रिययोः प्रतिषेधे सर्वा विक्रियाः प्रतिषिद्धा भवन्ति तथाऽपि मध्यभाविनीनां विक्रियाणां स्वशब्दैरेव तदर्थैः प्रतिषेधः कर्तव्य इत्यनुक्तानामपि यौवनादिसमस्तविक्रियाणां प्रतिषेधो यथा स्यादित्याह शाश्वत इत्यादिना ॥**

**भाष्यार्थ**—( या मंत्रांत जन्म व मरण याच विक्रियांचा निषेध केलेला नाहीं, तर सर्वच विकारांचा निषेध केला आहे, असें सांगतात-)—**यस्मात् एवं**—ज्या अर्थी हा आत्मा उत्पन्न होत नाहीं—**तस्मात् अजः**—त्या अर्थी अज आहे—**च यस्मात् न म्रियते तस्मात् नित्यः**—आणि ज्या अर्थी मरत नाहीं त्या अर्थी नित्य आहे. ( आत्मा जन्मत नाही म्हणून अज व मरत नाहीं म्हणून नित्य. )—**यद्यपि आद्यन्तयोः विक्रिययोः प्रतिषेधे सर्वाः विक्रियाः प्रतिषिद्धाः भवन्ति**—जरी पहिली व शेवटची अशा दोन विक्रियांचा प्रतिषेध केला असतां सर्व विक्रिया प्रतिषिद्ध होतात-त्यांचा त्यामुळेंच निषेध होतो,—**तथापि मध्यभाविनीनां विक्रियाणां तदर्थैः स्वशब्दैः एव प्रतिषेधः कर्तव्यः इति**—तरी जन्म व नाश यांच्यामध्ये होणाऱ्या विक्रियांचा नी ती विक्रिया हा ज्यांचा अर्थ आहे अशा त्या त्या विक्रियांच्या वाचक शब्दांनीच प्रतिषेध करावा म्हणून—**यथा अनुक्तानां अपि यौवनादि-समस्तविक्रियाणां प्रतिषेधः स्यात् इति शाश्वतः इत्यादिना आह**—ज्या प्रकारें न सांगितलेल्या अशाही तारुण्यादि सर्व विक्रियांचा प्रतिषेध होईल त्या प्रकारें ' शाश्वतः ' इत्यादि शब्दांनीं भगवान् (किंवा प्रस्तुत मंत्र) सांगतात- [ जन्म व नाश हे दोन विकार आत्म्याला नाहींत असे सांगितलें म्हणजे त्या पहिल्या व शेवटच्या विकारांमधील कोणताच विकार त्याला नाहीं, हे अर्थातच सिद्ध होते, हें खरें; तथापि त्यांचा प्रत्यक्ष शब्दांनीच निषेध करण्यासाठीं ' शाश्वतः पुराणः ' इत्यादि भाग आहे. त्या योगानें षड्भावविकारांत[1] ज्यांचा उल्लेख केलेला नाहीं, अशा तारुण्यादि सर्व विक्रियांचा निषेध होतो. ]

**शाश्वत इत्यपक्षयलक्षणा विक्रिया प्रतिषिध्यते शश्वद्भवः शाश्वतः । नापक्षीयते स्वरूपेण निरवयवत्वान्निर्गुणत्वाच्च नापि गुणक्षयेणापक्षयः ॥ अपक्षयविपरीताऽपि वृद्धिलक्षणा विक्रिया प्रतिषिध्यते पुराण इति । यो ह्यवयवागमेनोपचीयते स वर्धतेऽभि-**

---

१ ' जायते '--उत्पन्न होतो, ' अस्ति ' आहे, जिवंत आहे, ' वर्धते ' वृद्धि पावतो, ' विपरिणमते-' परिणाम पावतो, ' अपक्षीयते ' अपक्षय पावतो, ' नश्यति ' नाश पावतो ह्या सहा भावविक्रिया आहेत. भावविक्रिया म्ह० प्रत्येक सृष्ट पदार्थाला होणारे विकार.

**नव इति चोच्यते । अयं त्वात्मा निरवयवत्वात्पुराऽपि नव एवेति पुराणो न वर्धत इत्यर्थः ॥**

**भाष्यार्थ—शाश्वतः इति अपक्षयलक्षणा विक्रिया प्रतिषिध्यते**—'शाश्वतः' या पदानें 'अपक्षय' म्ह० शक्तीचा क्षय होणें या स्वरूपाची जी भावविकारांतील पांचवी विक्रिया तिचा निषेध केला जात आहे.—**शश्वत् भवः शाश्वतः**—जो नित्य–सर्वदा असतो तो शाश्वत—**निरवयवत्वात् स्वरूपेण न अपक्षीयते**—आत्मा निरवयव असल्यामुळें स्वरूपानें अपक्षय पावत नाहीं.—**च निर्गुणत्वात् गुणक्षयेण अपि अपक्षयः न**—आणि आत्मा निर्गुण असल्यामुळें गुणक्षयानेंही अपक्षय होत नाहीं. [शाश्वतशब्दानें 'अपक्षय' या विक्रियेचा निषेध केला आहे. त्यामुळें एकदा नित्य म्हटल्यावर पुनः शाश्वत म्हणण्याचें कारण काय? ही शंका येत नाहीं. जो सतत असतो तो शाश्वत. स्वरूप क्षीण झाल्यानें किंवा गुण कमी झाल्यानें अपक्षय संभवतो. पण आत्मा निरवयव व निर्गुण असल्यामुळे त्याच्या ठिकाणी दोन्ही प्रकारें अपक्षय संभवत नाहीं.]—**पुराणः इति अपक्षयविपरीता वृद्धिलक्षणा विक्रिया अपि प्रतिषिध्यते**—पुराण या पदानें अपक्षयाच्या उलट असलेली वृद्धिरूप विक्रियाही निषेधिली जाते.—**हि**—कारण—**यः अवयवागमेन उपचीयते सः वर्धते च अभिनवः इति उच्यते**—जो अवयवांच्या आगमामुळें–उत्पत्तीमुळें पुष्ट होतो तो वाढतो–वृद्धि पावतो–नूतन आहे असे म्हटले जातें.—**तु**—पण—**अयं आत्मा निरवयवत्वात् पुरा अपि नवः एव इति पुराणः**—हा आत्मा निरवयव असल्यामुळें पूर्वीही नवाच असतो, म्हणून पुराण—**न वर्धते इत्यर्थः**—तो वृद्धि पावत नाहीं, असा याचा भावार्थ. ['पुराणः' या शब्दानें अपक्षयाच्या उलट असलेल्या 'वृद्धि' या नांवाच्या विक्रियेचा निषेध केला जातो. आत्मा जसा क्षय पावत नाहीं, तसाच तो वृद्धि पावत नाहीं. कारण नवीन अवयवांची उत्पत्ति होऊन ज्याची वाढ होते त्याला 'वर्धते–वाढतो' असें म्हणतात. झाडाच्या नव्या रोपट्याला नवीन नवीन शाखा फुटूनच तो उत्तरोत्तर कसा वाढत जातो ते प्रसिद्ध आहे. सतत नवीन असलेल्या या आत्म्याला 'पुराणः' म्हणतात. निरवयव असल्यामुळें तो फार प्राचीनकाळींही आजच्या सारखाच नवा असतो. त्याच्या स्वरूपांत दीर्घ काल लोटला तरी वाढ होत नाहीं, असा याचा भावार्थ.]

**तथा न हन्यते न विपरिणम्यते हन्यमाने विपरिणम्यमानेऽपि शरीरे । हन्तिरत्र विपरिणामार्थो द्रष्टव्योऽपुनरुक्ततायै न विपरिणम्यत इत्यर्थः ॥ अस्मिन्मन्त्रे षड्भावविकारा लौकिकवस्तुविक्रिया आत्मनि प्रतिषिध्यन्ते । सर्वप्रकारविक्रियारहित आत्मेति वाक्यार्थः । यस्मादेवं तस्मादुभौ तौ न विजानीत इति पूर्वेण मन्त्रेणास्य संबन्धः २०**

**भाष्यार्थ**—(पहिल्या चरणांत 'न म्रियते-' तो मरत नाहीं, असें सांगितलें व चवथ्या चरणांत पुनः 'न हन्यते-' असें म्हटले आहे. त्यामुळे पुनरुक्ति दोष येतो, असे कोणी म्हणेल, म्हणून आचार्य त्याची व्यवस्था लावितात-)—**तथा**—त्याचप्रमाणें—

**न हन्यते न विपरिणम्यते**—तो आत्मा विपरिणामास प्राप्त केला जात नाहीं.—**शरीरे हन्यमाने विपरिणम्यमाने अपि**—शरीर जरी विपरिणामास प्राप्त केलें जात असलें तरी आत्मा विपरिणत केला जात नाहीं. ( अहो पण 'हन्-' हा धातु हिंसा करणें या अर्थी आहे. मग त्याचा विपरिणाम असा अर्थ कसा करितां येईल ? उत्तर-)—**अत्र हन्तिः विपरिणामार्थः द्रष्टव्यः**—येथें 'हन्' हा धातु विपरिणाम या अर्थी आहे असें समजावें ( तें कां ? )—**अपुनरुक्ततायै**—पुनरुक्तता हा दोष येऊं नये म्हणून.—**न विपरिणम्यते इत्यर्थः**—त्याचा विपरिणाम केला जात नाहीं, असा याचा भावार्थ. [ 'न म्रियते' व 'हन्यते-' यांचा अर्थ जवळ जवळ एकच असल्यामुळें त्यावर पुनरुक्ति दोष येतो, तो न यावा म्हणून 'हन्' या धातूचा येथें विपरिणाम पावणें, असा अर्थ करावा. म्हणजे तो दोष येणार नाहीं. पूर्व अवस्था जाऊन दुसरी अवस्था प्राप्त होणें, याला विपरिणाम म्हणतात. आत्म्याचें असें अवस्थान्तर होत नाहीं, वैयाकरणांनी धातूंचे अनेक अर्थ मानलेले असल्यामुळें तसा अर्थ करण्यास कांहीं हरकत नाहीं. ] ( या मंत्रार्थाचा उपसंहार करितात-)—**अस्मिन् मन्त्रे**—'न जायते' या मंत्रांत—**षड्भावविकाराः-लौकिकवस्तुविक्रियाः**—सहा भावविकार म्ह० लौकिक वस्तूला होणारे विकार—**आत्मनि प्रतिषिध्यन्ते**—आत्म्यामध्यें निषेधिले जातात. ( त्यामुळें )—**आत्मा सर्वप्रकारविक्रियारहितः इति वाक्यार्थः**—आत्मा सर्व प्रकारच्या विक्रियांनी रहित आहे, असा या वाक्याचा अर्थ आहे.—**यस्मात् एवं**—आणि ज्या अर्थी आत्मा सर्व विकारशून्य आहे—**तस्मात्**—त्या अर्थी—**उभौ तौ न विजानीतः**—ते दोघेही आत्मस्वरूपाला जाणत नाहींत—**इति पूर्वेण मन्त्रेण अस्य संबन्धः**—या पूर्व मंत्रांशीं याचा संबंध. [ प्रत्येक लौकिक वस्तूला अवश्य होणारे हे सहा विकार आत्म्याला होत नाहीत, तो निर्विकार आहे, असें येथें सांगितले आहे. आत्मा सर्व विकारशून्य आहे, हा या सर्व वाक्याचा अर्थ आहे. ज्याअर्थी आत्मा सर्व विकाररहित आहे त्याअर्थी तो हननक्रियेचा कर्ता व कर्म आहे, असें जे समजतात ते दोघेही आत्मस्वरूपाला जाणत नाहींत, असा पूर्व मंत्रार्थाशीं याचा संबंध आहे. ] २०

**य एनं वेत्ति हन्तारमित्यनेन मन्त्रेण हननक्रियायाः कर्ता कर्म च न भवतीति प्रतिज्ञाय 'न जायते' इत्यनेनाविक्रियत्वे हेतुमुक्त्वा प्रतिज्ञातार्थमुपसंहरति—वेदाविनाशिनमिति ॥**

**भाष्यार्थ**—( 'अहो पण पूर्वमंत्राचाच अर्थ दुसऱ्या मंत्रांत आहे. त्यामुळे पुनरुक्ति दोष आल्यासारखा वाटतो, असें कोणी म्हणेल म्हणून त्याच्या अर्थाचा अनुवाद करून पुढील श्लोकाला अवतरण देतात-)—'**य एनं वेत्ति हन्तारं' इति अनेन मन्त्रेण**—'य एनं वेत्ति०-' या मंत्रानें—**हननक्रियायाः कर्ता कर्म च न भवति इति प्रतिज्ञाय**—आत्मा हननक्रियेचा कर्ता व कर्म होत नाहीं, अशी प्रतिज्ञा[1] करून

१ येथील प्रतिज्ञाशब्द अनुमानांतील पारिभाषिक अर्थी आहे, लौकिक नव्हे. तर्कसंग्रहसार पृ. ५४ पहा.

**—'न जायते०' इति अनेन अविक्रियत्वे हेतुं उक्त्वा 'वेदाविनाशिनं०' इति प्रतिज्ञातार्थं उपसंहरति**—'न जायते०' या मन्त्रानें आत्म्याच्या अविक्रियत्वाविषयीं हेतु सांगून 'वेदाविनाशिनं०' या श्लोकानें त्या प्रतिज्ञात अर्थाचा उपसंहार करितात-[ पहिल्या मंत्राने आत्मा कोणत्याही क्रियेचा कर्ता व कर्म होत नाही, अशी प्रतिज्ञा करून दुसऱ्या मंत्रांत आत्मा निर्विकार आहे, याविषयी हेतु सांगून भगवान् आतां येथें आत्मा कर्ता वगैरे नाही, या प्रतिज्ञात अर्थाचाच उपसंहार करीत आहेत—]

वेदाविनाशिनं नित्यं य एनमजमव्ययम् ।
कथं स पुरुषः पार्थ कं घातयति हन्ति कम् ॥ २१ ॥

**अन्वयार्थ—पार्थ**—हे अर्जुना !—**यः**—जो—**एनं**—या आत्म्याला—**अविनाशिनं नित्यं अजं अव्ययं वेद**—अविनाशी, नित्य, अज व अव्यय समजतो,—**सः पुरुषः**—तो पुरुष—**कं**—कोणाला—**कथं**—कसा—**हन्ति**—मारणार ? व—**कं**—कोणाला—**कथं**—कसा—**घातयति**—मारविणार ? २१.

**वेद विजानात्यविनाशिनमन्त्यभावविकाररहितं नित्यं विपरिणामरहितं यो वेदेति संबन्धः । एनं पूर्वेण मन्त्रेणोक्तलक्षणमजं जन्मरहितमव्ययमपक्षयरहितं कथं केन प्रकारेण स विद्वान्पुरुषोऽधिकृतो हन्ति हननक्रियां करोति कथं वा घातयति हन्तारं प्रयोजयति । न कथंचित्कंचिद्धन्ति न कथंचित्कंचिद्घातयतीत्युभयत्राऽऽक्षेप एवार्थः प्रश्नार्थासंभवात् । हेत्वर्थस्य तुल्यत्वाद्विदुषः सर्वकर्मप्रतिषेध एव प्रकरणार्थोऽभिप्रेतो भगवतः । हन्तेस्त्वाक्षेप उदाहरणार्थत्वेन ॥**

**भाष्यार्थ—वेद-विजानाति**—जाणतो.—**अविनाशिनं-अन्त्यभावविकाररहितं**—अविनाशी म्ह० अन्त्यभावविकाररहित—**नित्यं-विपरिणामरहितं**—नित्य म्ह० विपरिणामरहित—**यः**—जो—**वेद इति संबन्धः**—याचा 'वेद' या क्रियापदाशीं संबंध.—**एनं-पूर्वेण मन्त्रेण उक्तलक्षणं**—याला-पूर्व मंत्रानें ज्याचें लक्षण सांगितलें आहे, त्याला—**अजं-जन्मरहितं**—अज म्ह० जन्मरहित—**अव्ययं-अपक्षयरहितं**—अव्यय म्ह० अपक्षयरहित ( जो जाणतो तो )—**कथं केन प्रकारेण**—कसा-कोणत्या प्रकारें—**सः विद्वान् अधिकृतः पुरुषः**—तो विद्वान्-ज्ञानाचा अधिकारी असलेला पुरुष—**हन्ति-हननक्रियां करोति**—मारतो-हनन ही क्रिया करतो ?—**वा कथं घातयति-हन्तारं प्रयोजयति**—किंवा कसा घात करवितो-हनन करणारास प्रेरणा करतो?—**कथंचित् कंचित् न हन्ति कथंचित् कंचित् न घातयति इति उभयत्र आक्षेपः एव अर्थः**—कोणत्याच प्रकारें कोणाला मारीत नाहीं व कोणत्याच प्रकारें कोणाचा घात करवीत नाहीं,असा दोन्ही वाक्यांत आक्षेप हाच अर्थ आहे. कारण—**प्रश्नार्थासंभवात्**—येथें प्रश्नार्थाचा असंभव आहे. [ज्याला आत्म्याचा साक्षात्कार झाला आहे त्याला मी कर्ता असा अभिमान नसतो व आत्मा एक निर्विकार आहे, असा त्याचा निश्चय झालेला असतो. त्यामुळें त्याचा संन्यास-श्रौत-स्मार्त-कर्मांचा

त्याग-प्राप्त असतो. विद्येचा परिपाक होण्यासाठीं-म्ह० आत्मज्ञान दृढ होण्यासाठीं त्या आर्थिक संन्यासाला भगवान् येथें अनुमोदन देत आहेत. जो या मरणरहित, विपरिणामरहित, अज, अव्यय आत्म्याला जाणतो तो आत्मज्ञानी पुरुष स्वतः कोणाला कसा मारणार व दुसऱ्याकडून तरी कोणाला कसा मारविणार ? छेः, तो कधींच कोणाला मारीत नाहीं, किंवा मारवीत नाहीं. ' कथं हन्ति ' व ' कथं घातयति ' हे दोन्ही आक्षेप आहेत, प्रश्न नव्हेत. येथें प्रश्नांचा असंभव आहे. कारण भगवान् या प्रश्नांचीं उत्तरें अर्जुनाकडून मिळावीं, अशी अपेक्षा करीत नाहींत व पुढें अर्जुनानें उत्तर दिल्याचेंही दिसत नाहीं. या गीताशास्त्रांतही पुढें जेथें जेथें प्रश्न आहे तेथें तेथें लागलेंच पुढें उत्तर दिलेलें आहे. म्हणून आक्षेप हाच या वाक्यांचा अर्थ आहे. आक्षेपांत दुसऱ्याकडून उत्तराची अपेक्षा नसते. तें त्या वाक्यांतच अन्तर्भूत झालेले असतें. जसें-' तो कसा मारणार ? ' छेः त्याला मारणे शक्यच नाहीं, ' तो कसा मारविणार ? ' त्याला दुसऱ्याकडून मारवितां येणेंही शक्य नाहीं. कूटस्थ म्ह० निर्विकार आत्म्याचे ठिकाणी त्यांचा असंभव आहे.]

( आतां या प्रकरणार्थाचा उपसंहार करितात- )—**हेत्वर्थस्य विदुषः तुल्यत्वात्** —आणि अविक्रियत्व हा जो हेत्वर्थ तो विद्वानालाही आत्म्याप्रमाणेंच लागू असल्यामुळें—**भगवतः सर्वकर्मप्रतिषेधः एव प्रकरणार्थः अभिप्रेतः**—भगवानाला सर्व नित्य-नैमित्तिकादि कर्मांचा निषेध, हाच या प्रकरणाचा अर्थ विवक्षित आहे. [आत्मा निष्क्रिय आहे, याविषयीं वर अविक्रियत्व हा हेतु ( कारण ) सांगितला आहे. तो विद्वानाच्या सर्वकर्मत्यागालाही तसाच लागू आहे. विद्वान्‌ही सर्व विक्रियाशून्य आहे, म्हणून तो सर्वकर्मत्याग करतो. अर्थात् ' सर्वकर्मांचा संन्यास ' हाच या प्रकरणाचा अर्थ भगवानाला इष्ट आहे. त्यांना या प्रकरणांत तोच अर्थ सांगावयाचा आहे. ]

( 'विद्वानानें सर्वकर्मसंन्यास करावा, असेंच जर भगवानाला इष्ट आहे तर येथें नुस्त्या हिंसेविषयींच आक्षेप कां ? ' या प्रश्नाचे उत्तर- )—**तु हन्तेः आक्षेपः उदाहरणार्थत्वेन**—पण हननक्रियेविषयींच जेथें जो आक्षेप आहे तो उदाहरण देण्यासाठीं म्हणून आहे. [ विद्वान् केवल हननक्रिया मात्र स्वतः किंवा दुसऱ्याकडून करूं किंवा करवूं शकत नाहीं; पण इतर क्रिया करूं शकतो, असें म्हणतां येत नाहीं. कारण अविक्रियत्व हा हेतु सर्वच कर्मांना एकसारखाच लागू आहे. पण येथें हिंसेचें प्रकरण असल्यामुळें हननक्रियेचाच तेवढा निषेध केला आहे. १८ व्या श्लोकांत 'म्हणून तूं युद्ध कर' असें सांगून लागलेंच पुढें १९ व २० श्लोकांत काठकोपनिषदाच्या वचनांच्या आधारानें आत्मा निर्विकार आहे, असें सांगितले व त्याला जो निर्विकार जाणतो, तो विद्वान्, स्वतः किंवा दुसऱ्याकडून हिंसा कशी करणार असा आक्षेप केला आहे. यावरून 'युद्ध कर' असें सांगण्याच्या प्रसंगानें हिंसेचा निषेध करणेंच उचित होय. पण तो निषेध उदाहरणार्थ आहे, असें जाणून सर्व क्रियांचा निषेध येथें अभिप्रेत आहे, असेंच समजलें पाहिजे. नुस्त्या हिंसेच्या निषेधानें भगवानांना कोणताच विशेष उद्देश साधावयाचा नाहीं, हें कोणीही कबूल करील. ]

**विदुषः कं कर्मासंभवे हेतुविशेषं पश्यन्कर्माण्याक्षिपति भगवान्कथं स पुरुष इति। ननूक्त एवाऽऽत्मनोऽविक्रियत्वं सर्वकर्मासंभवकारणविशेषः, सत्यमुक्तो न तु स कारणविशेषोऽन्यत्वाद्विदुषोऽविक्रियादात्मन इति। न ह्यविक्रियं स्थाणुं विदितवतः कर्म न संभवतीति चेत् ॥**

**भाष्यार्थ**—( वरील हेतूवर आक्षेप घेण्यासाठी वादी विचारतो- )—**विदुषः कर्मासंभवे कं हेतुविशेषं पश्यन् भगवान् 'कथं स पुरुषः' इति कर्माणि आक्षिपति**—विद्वानाला कर्मांचा असंभव आहे, याविषयीं कोणता विशेष हेतु पाहणारा भगवान् ' कथं स पुरुषः ' या वाक्यानें कर्मांचा आक्षेप-निषेध करीत आहे ? ( यावर आचार्यपक्षाचें म्हणणें- )—**ननु आत्मनः अविक्रियत्वं सर्वकर्मासंभवकारणविशेषः उक्तः एव**—अहो पण आत्म्याचें अविक्रियत्व हा सर्व कर्मांच्या असंभवाचा कारणविशेष वर सांगितलाच आहे. ( पण तो बरोबर नाहीं, असें वादी म्हणतो-)—**सत्यं उक्तः**—तुम्ही तो कारणविशेष सांगितला आहे, हें खरें;—**तु सः कारणविशेषः न**—पण तो कारणविशेष नव्हे.—**अविक्रियात् आत्मनः विदुषः अन्यत्वात्**—कारण अविक्रिय आत्म्याहून विद्वानाला अन्यत्व आहे.—**इति**—म्हणून तो कारणविशेष नव्हे.—**अविक्रियं स्थाणुं विदितवतः कर्म न संभवति इति न, इति चेत्**—अविक्रिय स्थाणूला-खांबाला जाणणाऱ्या पुरुषाचे कर्म संभवत नाहीं, असें नाहीं, म्हणून म्हणाल-[ वादी म्हणतो-पण विद्वानाचें कर्म संभवतच नाहीं, याविषयीं कोणतें विशेष कारण पाहून भगवान् येथें ' कथं स० ' या वाक्यानें कर्मांचा निषेध करीत आहेत ? यावर मध्यस्थ वेदान्त्याच्या बाजूनें म्हणतो-आत्मा अविक्रिय आहे,हेंच विद्वानाच्या सर्व कर्मांच्या असंभवाचें विशेष कारण आहे,हें वर सांगितलेंच आहे.पण वादी पुनः त्यावर आक्षेप घेतो-होय,तुम्ही तें कारण सांगितलेत खरें; पण ते विशेष कारणच नव्हे. कारण अविक्रिय आत्मा निराळा व त्याला जाणणारा पुरुष निराळा. हा समोरचा खांब निर्विकार आहे, हालत वगैरे नाहीं, असें जाणणाऱ्या पुरुषाचें कर्म संभवत नाहीं, असें नाहीं, तर निर्विकार खांबाला जाणणाऱ्याही त्याचें जाणें-येणें-बोलणें वगैरे कर्म संभवतेंच. त्याचप्रमाणें आत्मा निर्विकार आहे, असें जाणणाऱ्या विद्वानाचेंही श्रौत-स्मार्त-लौकिक कर्म संभवतें, म्हणून वादी म्हणेल तर-]

**न। विदुष आत्मत्वात्। न देहादिसंघातस्य विद्वत्ता। अतः पारिशेष्यादसंहत आत्मा विद्वानविक्रिय इति तस्य विदुषः कर्मासंभवादाक्षेपो युक्तः कथं स पुरुष इति॥ यथा बुद्ध्याद्याहृतस्य शब्दाद्यर्थस्याविक्रिय एव सन्बुद्धिवृत्त्यविवेकविज्ञानेनाविद्ययोपलब्धात्मा कल्प्यते, एवमेवाऽऽत्मानात्मविवेकज्ञानेन बुद्धिवृत्त्या विद्ययाऽसत्यरूपयैव परमार्थतोऽविक्रिय एवाऽऽत्मा विद्वानुच्यते॥ विदुषः कर्मासंभववचनाद्यानि कर्माणि शास्त्रेण विधीयन्ते तान्यविदुषो विहितानीति भगवतो निश्चयोऽवगम्यते॥**

**भाष्यार्थ**—( ' अयं आत्मा ब्रह्म ' या महा वाक्याच्या आधारानें प्रस्तुत आक्षेपाचें निरसन-)—**न**—असें नाहीं—**विदुषः आत्मत्वात्**—कारण विद्वानाला आत्मत्व

आहे.—**देहादिसंघातस्य विद्वत्ता न**—देह, इंद्रियें इत्यादिकांच्या संघाताला विद्वत्ता नाहीं.—**अतः पारिशेष्यात् असंहतः आत्मा विद्वान् अविक्रियः**—म्हणून देहादि संघाताहून परिशिष्ट–अगदीं निराळा, त्याहून सर्वथा विलक्षण असलेला, असंहत –त्याच्याशीं संघात न पावलेला आत्माच विद्वान् अविक्रिय आहे.—**इति तस्य विदुषः कर्मासंभवात् 'कथं स पुरुषः०' इति आक्षेपः युक्तः**—म्हणून त्या विद्वानाच्या कर्मांचा असंभव असल्यामुळें 'कथं स पुरुषः०' हा आक्षेप योग्यच आहे. [ तुमचें म्हणणें बरोबर नाहीं. कारण विद्वान् आत्माच आहे. देहादि नव्हे विद्वत्ता देहादि विशिष्ट आत्म्याला आहे कीं केवल निरुपाधिक आत्म्याला आहे? विद्वत्ता हा धर्म देहादि विशिष्ट आत्म्याचा आहे, असें मानलें तर विशेषणाचाही तो आहे, असें होणार. शालजोडी पांघरलेला ब्राह्मण जात आहे, असें म्हटल्यास विशिष्ट ब्राह्मणाबरोबर विशेषणभूत शालही जाते. देहादिसंघात हे विशेषण आहे. पण ते जड आहे. जडाला विद्वत्ता संभवत नाहीं. कारण तो चेतनाचा धर्म आहे. जडाचा नव्हे. यास्तव विद्वत्ता हा केवल चिदात्म्याचा धर्म आहे, असेंच मानणें भाग आहे. पण केवल आत्माच विद्वान् आहे, असें म्हटल्यावर जीव ब्रह्म हा विभाग उरत नाहीं. कारण तो भेद बिंब-प्रतिबिंबन्यायानें प्रातिभासिक आहे. प्रामाणिक नाहीं. म्हणून असंहत–केवल–निरुपाधिक आत्माच विद्वान् आहे. अर्थात् असा जो केवल आत्मा–विद्वान् त्याचीं कर्में संभवत नाहींत म्हणून या श्लोकांतील 'कथं सः' हा आक्षेप योग्य आहे. पण यावर अशी शंका येते कीं, मग विद्वानाला विद्वत्ता तरी कशी? विद्वान् जर अविक्रिय आत्माच आहे व तोच परब्रह्म असल्यामुळें त्याच्या सर्व कर्मांचा असंभव आहे तर त्याच्या ठिकाणीं विद्वत्ताही संभवत नाहीं. कारण ती सुद्धां एक विक्रियाच आहे, या शंकेचें समाधान. ]—**यथा बुद्ध्यादि-आहृतस्य शब्दादि-अर्थस्य**—ज्याप्रमाणें बुद्धि-इंद्रियें इत्यादिकांनीं अन्तःकरणांत आणलेल्या शब्द-स्पर्शादि विषयांचा—**उपलब्धा आत्मा कल्प्यते**—ज्ञाता–अनुभव घेणारा आत्मा कल्पिला जातो ( पण तो कसा? )—**अविक्रियः एव सन्**—स्वतः अविक्रियच असतांना–कोणत्याही प्रकारचा विकार त्याला होत नसतांनाच तो विषयांचा ज्ञाता कल्पिला जातो, ( कशामुळें? )—**बुद्धिवृत्ति-अविवेकविज्ञानेन-अविद्यया**—आत्मा निराळा व बुद्धिवृत्ति निराळी असा विवेक न होणें, याच अविवेकविज्ञानानें–अविद्येमुळें ( आत्मा विषयभोक्ता कल्पिला जातो )—**एवं एव आत्मानात्मविवेकज्ञानेन विद्यया असत्यरूपया बुद्धिवृत्त्या एव परमार्थतः अविक्रियः एव आत्मा विद्वान् उच्यते**—त्याचप्रमाणें आत्मा व अनात्मा यांच्या विवेकज्ञानानें म्ह० विद्या या नांवाच्या असत्यरूप अशाच बुद्धिवृत्तीनें परमार्थतः अविक्रियच असलेला आत्मा विद्वान् म्हटला जातो. [ दैव, इंद्रियें इत्यादिकांसह अन्तःकरण प्रदीपाच्या प्रभेप्रमाणें विषयापर्यंत परिणत होतें. दीपप्रभा जशी घरभर पसरते त्याप्रमाणें अन्तःकरण इंद्रियांच्या द्वारा देहांत व बाहेर सभोंवार पसरतें. अन्तःकरणाच्या त्या परिणामाला वृत्ति असें म्हणतात. त्यांत प्रतिबिंबित झालेलें जें चैतन्य त्यालाच विषयज्ञान असें म्हणतात.

कारण त्याला व्यक्त करणारी अन्तःकरणवृत्ति व तें व्यक्त होणारें चैतन्य ही भिन्न भिन्न आहेत, असा विवेक होत नाही. त्यामुळे त्या चैतन्याला विषयज्ञान ह्मणतात व त्यामुळेंच आत्मा विषयांचा अनुभव घेणारा असें मानतात. पण तसें मानणें–तशी कल्पना करणें, याचें कारण अविद्याप्रयुक्त मिथ्या संबंध हेंच आहे. यामुळें आत्म्याला विषयांचा उपलब्धा-भोक्ता मानणें, हे खरें नव्हे. कारण त्यावेळींही तो स्वतः–स्वरूपानें –नित्य चैतन्यानें अविक्रियच असतो. त्याचप्रमाणें ब्रह्म व आत्मा यांचें ऐक्य सांगणारीं जीं ‘ तत्त्वमसि, अहं ब्रह्मास्मि ’ इत्यादि वाक्यें त्यांपासून उत्पन्न झालेल्या बुद्धिवृत्तीच्या द्वारा आत्म्याला विद्वान् म्हटलें जाते. पण त्यावेळची बुद्धिवृत्ति विवेकसंपन्न असते. तिला आत्मा व अनात्मा यांचा भेद कळतो, म्हणून तिला विद्या म्हणतात. पण तीसुद्धां सत्यरूप नव्हे. तर आरोपित असल्यामुळे मिथ्या आहे. ती विद्यावृत्ति शरीरेंद्रियादि उपाधि असेपर्यंत असते, पुढें नाही. असो; पण त्या प्रसंगीही आत्मा अविक्रियच असतो. कारण मिथ्यासंबंधानें पारमार्थिक अविक्रियत्व नष्ट होत नाही. तर मग शास्त्रानें कर्माचें विधान जें केलें आहे तें कोणाकरितां ? उत्तर–]—**विदुषः कर्म-असंभववचनात्**— अर्थात् विद्वानाच्या कर्मांचा असंभव सांगितलेला असल्यामुळे—**शास्त्रेण यानि कर्माणि विधीयन्ते**—शास्त्राकडून ज्या कर्मांचे विधान केलें जातें—**तानि अविदुषः विहितानि**—तीं कर्में अविद्वानासाठी–अनात्मज्ञासाठी विहित आहेत,—**इति भगवतः निश्चयः अवगम्यते**—असा भगवानांचा निश्चय ज्ञात होतो. [ ‘ कथं सः पुरुषः ’ या वचनानें भगवानांनींच विद्वानाच्या कर्मांचा असंभव सांगितलेला आहे. त्यावरून शास्त्रानें अग्निहोत्रादि ज्या कर्मांचें विधान केलें आहे तीं सर्व अनात्मज्ञासाठीं आहेत, असाच भगवानांचा निश्चय व्यक्त होतो. ]

**ननु विद्याऽप्यविदुष एव विधीयते विदितविद्यस्य पिष्टपेषणवद्विद्याविधानानर्थक्यात् । तत्राविदुषः कर्माणि विधीयन्ते न विदुष इति विशेषो नोपपद्यते ॥**

**भाष्यार्थ**—(यावर शंका–)—**ननु**—अहो पण,—**विद्या अपि अविदुषः एव विधीयते**—विद्याही अविद्वानासाठीच विहित आहे.—**विदितविद्यस्य पिष्टपेषणवत् विद्याविधान-आनर्थक्यात्**—कारण ज्याला आत्मविद्या प्राप्त झाली आहे त्याला पीठच पुनः दळीत बसण्याप्रमाणे विद्येचें पुनः विधान करणें व्यर्थ आहे.—**तत्र**—अर्थात् अविद्वानासाठीं कर्मविधि व विद्वानासाठीं ज्ञानाचा विधि असा विभागच करतां येत नसल्यामुळें—**अविदुषः कर्माणि विधीयन्ते न विदुषः इति विशेषः न उपपद्यते**—अविद्वानाला उद्देशून कर्मांचें विधान केलें जातें विद्वानाला उद्देशून नाही, हा विशेष उपपन्न होत नाहीं. [ आत्मज्ञानाचें विधान सुद्धां शास्त्रानें अविद्वानासाठींच केलें आहे, विद्वानासाठीं नाही. कारण जो विद्वान् म्ह० आत्मज्ञानी झाला त्याला विद्येचें विधान करणें म्ह० पीठ दळण्यास सांगण्याप्रमाणेंच व्यर्थ आहे. म्हणून अविद्वानास कर्में सांगितलीं आहेत विद्वानाला नाहींत, असा विभाग करतां येत नाहीं. ]

**न, अनुष्ठेयस्य भावाभावविशेषोपपत्तेः । अग्निहोत्रादिविध्यर्थज्ञानोत्तरकालमग्निहोत्रादिकर्मानेकसाधनोपसंहारपूर्वकमनुष्ठेयं कर्ताऽहं मम कर्तव्यमित्येवंप्रकारविज्ञानवतोऽविदुषो यथाऽनुष्ठेयं भवति न तु तथा ' न जायते ' इत्याद्यात्मस्वरूपविध्यर्थज्ञानोत्तरकालभावि किंचिदनुष्ठेयं भवति । किंतु नाहं कर्ता न भोक्तेत्याद्यात्मैकत्वाकर्तृत्वादिविषयज्ञानादन्यन्नोत्पद्यत इत्येष विशेष उपपद्यते ॥**

**भाष्यार्थ**—( वरील शंकेचें समाधान- )—**न**—असें नाहीं.—**अनुष्ठेयस्य भाव-अभावविशेषोपपत्तेः**—कारण अनुष्ठेयाचा भाव व अभाव हा विशेष संभवतो. [ वेदाध्ययनानंतर धर्ममीमांसेचे अध्ययन करून धर्मज्ञान संपादन केल्यावर अनुष्ठेय-अनुष्ठान करण्यास योग्य-आचरणीय असे कर्म करावयाचें असते. कर्मानुष्ठानावांचून केवल धर्मज्ञानाने स्वर्गादि फल मिळत नाहीं. पण ब्रह्मज्ञानानंतर तसे कांहीं अनुष्ठेय नसते. यास्तव ब्रह्मज्ञान नसलेल्या पुरुषाला उद्देशूनच कर्मविधि आहे, असे या समाधानाचें तात्पर्य आहे. आतां याच सूत्ररूप वाक्याचे व्याख्यान करितात- ]—**अग्निहोत्रादि-विध्यर्थज्ञानोत्तरकालं अनेकसाधनोपसंहारपूर्वकं अग्निहोत्रादि कर्म अनुष्ठेयं**—अग्निहोत्रादि विधींचें अर्थज्ञान झाल्यावर मग पुढे अनेक साधने जमवून अग्निहोत्रादि कर्म करावयाचे असते. ( पण आत्मा देहादिकांहून निराळा आहे, असे ज्ञान असल्यावांचून पारलौकिक कर्मामध्ये पुरुषाची प्रवृत्तिच संभवत नाहीं. यास्तव आत्मा शरीरादिकांहून भिन्न आहे, असे जाणणाऱ्या पुरुषाला कर्मानुष्ठान केलेच पाहिजे, म्हणून वादी म्हणेल तर सांगतात- )—**कर्ता अहं मम कर्तव्यं इति-एवंप्रकारविज्ञानवतः अविदुषः यथा अनुष्ठेयं भवति**—' मी कर्ता, माझे हें कर्तव्य ' इत्यादि प्रकारचें विज्ञान असलेल्या अविद्वानाला ते अग्निहोत्रादि कर्म जसे अनुष्ठेय असते—**तथा**—तसे —**'न जायते' इत्यादि आत्मस्वरूपविध्यर्थज्ञानोत्तरकालभावि किंचित् न अनुष्ठेयं भवति**—आत्मा उत्पन्न होत नाहीं, ( काठकभाष्यार्थ पृ. ५८ गी. अ. २ श्लो. २० ) इत्यादि आत्मस्वरूपविधीचा अर्थ समजल्यानंतर-आत्मस्वरूपाचा साक्षात्कार झाल्यावर अनुष्ठान करावयास योग्य असे कांहीं नसते. [ ' अग्निहोत्रं जुहुयात् ' इत्यादि जे विधि त्याचा अर्थ धर्ममीमांसेच्या अध्ययनाने कळतो, पण तो कळल्यानंतर स्त्रीपरिग्रह करणें, द्रव्यादि संपादन करणे, होमाचें साहित्य जमविणें, ऋत्विगादिक करणें, इत्यादि सर्व साधनें जमवावीं लागतात. त्यानंतर अग्निहोत्रादि अवश्य अनुष्ठेय कर्म करावयाचे असते. ' मी कर्ता आहें, माझें हे कर्तव्य आहे, ' इत्यादि समजणाऱ्या अविद्वानालाच त्याचा अधिकार आहे. आत्मा शरीरादिकांहून निराळा आहे असे समजूनच पुरुष पारलौकिक कर्मानुष्ठानांत जरी प्रवृत्त होत असला तरी त्याला मी कर्ता, भोक्ता आहें, असें वाटतच असते. म्ह०ब्रह्मज्ञान नसतें त्यामुळें त्याला अग्निहोत्रादिक अनुष्ठेय असतें. पण वर २० व्या श्लोकांत वर्णन केल्याप्रमाणे आत्मा उत्पन्न होत नाहीं, इत्यादि आत्मस्वरूपाचें

१ आचार्यांचे हे पुढील म्हणणें अक्षरशः खोडून काढल्यावाचून ज्ञानोत्तर कर्मयोगाची सिद्धि होणें शक्य नाहीं, हें कर्मयोगाभिमान्यांनीं पक्कें लक्षात ठेवावें.

साक्षात् ज्ञान झाल्यावर–मी अकर्ता नित्य निर्विकार आहें,–असें अनुभवानें कळल्यावर मग कांहीं एक कर्तव्य–कोणतेंही अनुष्ठेय कर्म रहात नाहीं. कारण आत्मा नित्यतृप्त आहे. त्यामुळें आत्मरूप झालेला ज्ञानी कृतकृत्य असतो. आत्मा देहादिकांहून भिन्न पण कर्ता, भोक्ता, इत्यादि ज्ञान कर्मानुष्ठानाला प्रतिबंध करीत नाहीं, उलट तें कर्मानुष्ठानोपयोगीच आहे. पण तो अविक्रिय आहे, हे ज्ञान त्याला प्रतिबंध करतें. "अहो पण ब्रह्म व आत्मा एक आहे, असें ज्ञान झाल्यावरही 'मी कर्ता आहें' इत्यादि ज्ञान उत्पन्न होईल व त्यामुळें कर्मविधि त्याच्याही उपयोगी पडेल," म्हणून म्हणाल तर सांगतों–]—**किंतु**—पण—**अहं कर्ता न भोक्ता, न, इत्यादि आत्मैकत्व-अकर्तृत्वादिविषयज्ञानात् अन्यत् न उत्पद्यते**—मी कर्ता नाहीं, भोक्ता नाहीं, इत्यादि आत्म्याचें एकत्व–अकर्तृत्व इत्यादिक विषयांच्या ज्ञानाहून निराळें–कर्तृत्वादि ज्ञान उत्पन्न होत नाहीं. —**इति एषः विशेषः उपपद्यते**—अशा प्रकारचा हा विशेष संभवतो. [ मी कर्ता, भोक्ता वगैरे नाहीं, इत्यादि आत्म्याच्या स्वरूपज्ञानाहून विपरीत ज्ञान–मी कर्ता वगैरे आहें, अशा प्रकारचें मिथ्या ज्ञान संभवत नाहीं. कारण ते उत्पन्न होण्यास काही कारणच उरत नाही. त्यामुळे अविद्वानाला कर्मानुष्ठान, व विद्वानाला तें नाहीं, हा विशेष उपपन्न होतो. ]

**यः पुनः कर्ताऽहमिति वेत्त्यात्मानं तस्य ममेदं कर्तव्यमित्यवश्यंभाविनी बुद्धिः स्यात्तदपेक्षया सोऽधिक्रियत इति तं प्रति कर्माणि संभवन्ति । स चाविद्वान्—' उभौ तौ न विजानीतः' इति वचनात् । विशेषितस्य च विदुषः कर्माक्षेपवचनात् 'कथं स पुरुष' इति । तस्माद्विशेषितस्याविक्रियात्मदर्शिनो विदुषो मुमुक्षोश्च सर्वकर्मसंन्यास एवाधिकारः ॥ अत एव भगवान्नारायणः सांख्यान्विदुषोऽविदुषश्च कर्मिणः प्रविभज्य द्वे निष्ठे ग्राहयति—'ज्ञानयोगेन सांख्यानां कर्मयोगेण योगिनाम्' इति ॥**

**भाष्यार्थ**—( 'अहो पण आत्मवेत्त्याला जर कांहींच अनुष्ठेय नाहीं तर 'विद्वान् यजेत' इत्यादि शास्त्रवचनें त्याला कर्मे करावयास कशी सांगतात?' या प्रश्नाचें उत्तर–) —**पुनः यः आत्मानं अहं कर्ता इति वेत्ति**—पण जो आत्म्याला 'मी कर्ता आहें' अशा प्रकारें जाणतो—**तस्य मम इदं कर्तव्यं इति अवश्यंभाविनी बुद्धिः स्यात्**—त्याला माझें हें कर्तव्य आहे, अशी अवश्य होणारी बुद्धि होईल.—**तदपेक्षया सः अधिक्रियते**—त्या बुद्धीच्या अपेक्षेनें तो कर्माधिकारी होतो.—**इति तं प्रति कर्माणि संभवन्ति**—म्हणून त्याप्रत कर्मे संभवतात. [ आतां जो कोणी आत्म्याला कर्ता-भोक्ता वगैरे मानतो त्यालाच 'मी कर्माधिकारी आहें, हें माझें कर्तव्य आहे, मला अवश्य केलें पाहिजे, न केल्यास मी प्रत्यवायी होईन,' असें वाटत असतें. अशा कर्माधिकारी पुरुषाला उद्देशूनच कर्माचें विधान केलेलें असतें–]—**च**—आणि—**उभौ तौ न विजानीतः इति वचनात् सः अविद्वान्**—ते दोघेही आत्मस्वरूपाचे अनभिज्ञ आहेत असें भगवद्वचन असल्यामुळें तो अविद्वान् आहे.—**च**—तसेंच—**विशेषितस्य विदुषः कथं स पुरुषः इति कर्माक्षेपवचनात्**—आत्मा अविनाशी,

नित्य, अज, अव्यय आहे असें जो जाणतो त्या विशिष्ट विद्वानाच्या कर्मांचा 'कथं सः०' या वचनानें आक्षेप केला आहे. [ आणि स्वतःला कर्माधिकारी समजणारा पुरुष अविद्वान् आहे. कारण खुद्द भगवानांनीच ' जो आत्म्याला क्रियेचा कर्ता समजतो व जो कर्म समजतो ते दोघेही कांहीं जाणत नाहीत,' अ. २ श्लो. १९ असें सांगितलें आहे. त्याचप्रमाणें आत्म्याला जो नित्य, निर्विकार वगैरे जाणतो तो विशिष्ट विद्वान् कोणतीही क्रिया कशी करणार व दुसऱ्याकडून कशी करविणार ( अ. २ श्लो. २१ ) असें म्हणून भगवानांनीच आत्मज्ञानी पुरुषाच्या कर्मांचा असंभव दाखविला आहे. ' अहो पण विद्वानाला कर्म जरी नसले तरी विविदिषूला-जिज्ञासूला तें केलेंच पाहिजे ' अशी शंका घेऊन सांगतात-)—**तस्मात् विशेषितस्य अविक्रिय-आत्मदर्शिनः विदुषः च मुमुक्षोः सर्वकर्मसंन्यासे एव अधिकारः**—म्हणून ज्याचा विशेष सांगितला आहे अशा अविक्रिय आत्मदर्शी विद्वानाचा व मुमुक्षूचा सर्व कर्मसंन्यासांतच अधिकार आहे. [ आत्म्याला अविक्रिय समजणारा जो आत्मसाक्षात्कारवान् त्याला व तशा आत्म्याला जाणण्याची इच्छा करणारा जो मुमुक्षु त्यालाही सर्व कर्मांच्या संन्यासाचाच अधिकार आहे, कर्मानुष्ठानाचा नाहीं. आतां मुमुक्षूलाही आश्रमकर्मांची अपेक्षा असते, पण विद्या-आत्मज्ञान व त्याचें फल यांशीं विरुद्ध नसलेलींच कर्में त्याला विहित आहेत. कारण आत्मज्ञानाच्या विरुद्ध असलेला काम-इच्छा, कर्तृत्वाभिमान यांना कारण होणारीं कर्में करीत राहिल्यास ज्ञानाचा असंभवच होतो. म्हणून विविदिषा संन्यास शास्त्रानें सांगितला आहे, अशा आशयानें भाष्यकार म्हणतात-]—**अतः एव भगवान् नारायणः सांख्यान् विदुषः च कर्मिणः अविदुषः प्रविभज्य द्वे निष्ठे ग्राहयति**—विद्वान् व विविदिषु-जिज्ञासु यांचा संन्यासामध्ये व अज्ञांचा कर्मामध्यें अधिकार आहे, हा विभाग इष्ट असल्यामुळे भगवान् नारायण विद्वान् सांख्य-म्ह० ज्ञानी संन्यासी व अविद्वान् कर्मी यांचा विभाग करून दोन निष्ठांचें ग्रहण करवितात. (कोणत्या वाक्यानें ? )—'**ज्ञानयोगेन सांख्यानां कर्मयोगेण योगिनां**' **इति**—'ज्ञानयोगानें सांख्यांची-ज्ञानी संन्यासांची निष्ठा व कर्मयोगानें योग्यांची-कर्मठ गृहस्थांची निष्ठा ' या तिसऱ्या अध्यायांतील तिसऱ्या श्लोकानें दोन निष्ठांचें ग्रहण करविलें आहे. [ भगवानांना वरील विभाग संमत असल्यामुळें त्यांनीं ज्ञानी-संन्यासी व अविद्वान् कर्मठ असा अधिकारी पुरुषांचा विभाग करून ' ज्ञानयोगेन सांख्यानां० ' या वचनानें त्यांच्याकडून दोन निष्ठांचें ग्रहण करविलें आहे. त्यांच्यासाठीं दोन पृथक् निष्ठा सांगितल्या आहेत. अधिकारिभेदानें अशा दोन निष्ठा भगवान् व्यासांनींही सांगितल्या आहेत, असें सांगतात- ]

**तथा च पुत्रायाऽऽह भगवान्व्यासः—' द्वाविमावथ पन्थानौ ' इत्यादि । तथा च क्रियापथश्चैव पुरस्तात्पश्चात्संन्यासश्चेति । एतमेव विभागं पुनः पुनर्दर्शयिष्यति भगवान् । अतत्त्वविदहंकारविमूढात्मा कर्ताऽहमिति मन्यते, तत्त्ववित्तु नाहं करोमीति । तथा च सर्वकर्माणि मनसा संन्यस्याऽऽस्त इत्यादि ॥**

**भाष्यार्थ—तथा च**—आणि तसेंच—'**द्वाविमावथ पन्थानौ यत्र वेदाः प्रतिष्ठिताः' इत्यादि भगवान् व्यासः पुत्राय आह**—ज्यांत वेद प्रतिष्ठित आहेत,

असे हे दोन मार्ग आहेत इत्यादि भगवान् व्यासांनीं पुत्राला सांगितलें आहे. [ वेद मुख्यत्वेंकरून ज्यांचें प्रतिपादन करितात असे दोन मार्ग आहेत. एक प्रवृत्तिलक्षण मार्ग व दुसरा निवृत्तमार्ग. असे दोन मार्ग भगवान् व्यासांनीं आपल्या पुत्राला सांगितले आहेत. 'स्वाध्यायोऽध्येतव्यः' या अध्ययनविधीनें त्रैवर्णिक वेदाध्ययनांत प्रवृत्त झाला असतां त्यांत अधिकारिभेदानें कर्ममार्ग व ज्ञानमार्ग असे दोन मार्ग सांगितलेले त्याच्या प्रत्ययास येतात, पण हे दोन मार्ग तुल्यबल-एकसारखेच आहेत, त्यामुळें वाटेल त्यानें वाटेल तो मार्ग, वाटेल तेव्हां स्वीकारावा, असे कोणी समजेल म्हणून आचार्य नारायणोपनिषदाच्या आधारें-सार्थ ना. उ. पृ. ७५ पहा. त्यांचा क्रम सांगतात-)—**तथा च**—आणि तसेंच—**क्रियापथः च एव पुरस्तात् च पश्चात् संन्यासः इति**—क्रियामार्ग पूर्वी व नंतर संन्यास असेंही सांगितलें आहे. [ अगोदर कर्ममार्ग व नंतर संन्यास असा त्यांचा क्रमही सांगितलेला असल्यामुळे दोन्ही मार्ग तुल्यबल नाहींत. चित्तशुद्धीपर्यंत कर्ममार्ग, चित्तशुद्धि होऊन कर्म व त्याचे फल यांविषयीं विरक्ति येईपर्यंत कर्ममार्ग, व विरक्ति येऊन आत्मजिज्ञासा उत्पन्न झाली असतां संन्यासमार्ग-ज्ञानमार्ग असा त्यांचा पूर्वोत्तरभाव आहे. कर्ममार्ग साधन व ज्ञानपूर्वक संन्यास साध्य, म्हणूनही कर्ममार्ग पूर्वी व ज्ञानमार्ग मागून. या दोन मार्गांतील ज्ञानपूर्वक संन्यासमार्ग श्रेष्ठ आहे, असेंही नारायणोपनिषदांतच सांगितलें आहे. आतां याविषयीं गीतेंतीलच अनुकूल वाक्यांचा निर्देश करितात-]—**भगवान् एतं एव विभागं पुनः पुनः दर्शयति**—भगवान हाच विभाग पुनः पुनः पुढें दाखवितात—'**अहंकारविमूढात्मा-अतत्त्वविद् अहं कर्ता इति मन्यते**—( अ. ३ श्लो. २७ ) ज्याचें चित्त अहंकारानें विवेकहीन झालें आहे असा म्ह० अतत्त्ववेत्ता-अज्ञ मी कर्मांचा कर्ता आहें, असें मानतो,—**तत्त्वविद् तु अहं न करोमि इति**—( अ. ३ श्लो. २८ ) पण तत्त्ववेत्ता मी करीत नाही, असें मानतो. [ अज्ञ मी कर्मकर्ता आहें, असें समजतो, पण तत्त्ववेत्ता मी कांहीं करीत नाहीं, असे मानतो, इत्यादि वचनांनीं भगवान् हाच विभाग गीतेंत सर्वत्र पुनः पुनः सांगत आहेत. विरक्ताला उद्देशून आणखी एक वचन आचार्य घेतात-]—**तथा च सर्वकर्माणि मनसा संन्यस्य आस्ते इत्यादि**—( अ. ५ श्लो. १३ ) 'आणि तसेंच सर्व कर्मांचा मनानें संन्यास करून राहतो' इत्यादि म्हटले आहे. [ देहवान् आत्मा नऊ द्वारांनीं युक्त असलेल्या शरीरांत सर्व कर्मांचा मनानें त्याग करून कांहीं न करितां व न करवितां सुखानें राहतो असें म्हटलें आहे. त्यावरूनही विरक्ताला सर्वकर्मसंन्यास करण्याचा अधिकार आहे. ]

**तत्र केचित्पण्डितंमन्या वदन्ति जन्मादिषड्भावविक्रियारहितोऽविक्रियोऽकर्तैकोऽहमात्मेति न कस्यचिज्ज्ञानमुत्पद्यते यस्मिन्सति सर्वकर्मसंन्यास उपदिश्यते ॥**

**भाष्यार्थ**—( याप्रमाणें अविक्रिय आत्मज्ञानामुळें सर्व कर्मांचा संन्यास प्रदर्शित केला असतां त्याविषयीं मीमांसकांचें मत उपस्थित करितात-)—**तत्र केचित् पंडितंमन्याः वदन्ति**—त्याविषयीं कांहीं पण्डितंमन्य असें म्हणतात—**अहं जन्मादिषड्-**

**भावविक्रियारहितः अविक्रियः अकर्ता एकः आत्मा (अस्मि) इति ज्ञानं न कस्यचित् उत्पद्यते**—मी जन्मादि सहा भावविकारांनीं रहित, अविक्रिय, अकर्ता, एक आत्मा आहें, असें ज्ञान कोणालाच होत नाहीं, कीं—**यस्मिन् सति सर्वकर्मसंन्यासः उपदिश्यते**—जे ज्ञान झालें असतां सर्व कर्मांचा संन्यास उपदेशिला जातो. [ आत्मा ज्ञानशक्ति व क्रियाशक्ति यांचा आधार आहे. त्यामुळें त्याला अविक्रिय, अकर्ता, एक म्हणतां येत नाहीं. अर्थात् संन्यासाला कारण होणारें अविक्रिय आत्मज्ञान संभवतच नाहीं, आणि तसें ज्ञानच जर संभवत नाहीं तर संन्यासोपदेश कसा संभवणार ? असें कित्येक पंडितंमन्य म्हणतात. पण तें त्यांचें म्हणणें अयोग्य आहे, असें दाखवितात–]

**न । न जायत इत्यादिशास्त्रोपदेशानर्थक्यात् । यथा च शास्त्रोपदेशसामर्थ्याद्धर्मास्तित्वविज्ञानं कर्तुश्च देहान्तरसंबन्धिज्ञानं चोत्पद्यते, तथा शास्त्रात्तस्यैवाऽऽत्मनोऽविक्रियत्वाकर्तृत्वैकत्वादिविज्ञानं कस्मान्नोत्पद्यत इति प्रष्टव्यास्ते । करणागोचरत्वादिति चेन्न, मनसैवानुद्रष्टव्यमिति श्रुतेः । शास्त्राचार्योपदेशशमदमादिसंस्कृतं मन आत्मदर्शने करणम् । तथा च तदधिगमायानुमान आगमे च सति ज्ञानं नोत्पद्यत इति साहसमेतत् । ज्ञानं चोत्पद्यमानं तद्विपरीतमज्ञानमवश्यं बाधत इत्यभ्युपगन्तव्यम् । तच्चाज्ञानं दर्शितं हन्ताऽहं हतोऽस्मीत्युभौ तौ न विजानीत इति । अत्र चाऽऽत्मनो हननक्रियायाः कर्तृत्वं कर्मत्वं हेतुकर्तृत्वं चाज्ञानकृतं दर्शितम् ॥**

**भाष्यार्थ—न**—हे म्हणणे बरोबर नाहीं. कारण तसें म्हटल्यास—**'न जायते-' इत्यादि शास्त्रोपदेशानर्थक्यात्**—' न जायते- ' अ. २.१९ इत्यादि शास्त्रोपदेशाला आनर्थक्य येते. [ अविक्रिय आत्माच नाहीं, तो विक्रियावान्च आहे, हे म्हणणें अयोग्य आहे. कारण ' न जायते म्रियते वा० ' इत्यादि हें आप्तवचन असल्यामुळें तेंच आत्म्याच्या अविक्रियत्वाविषयीं प्रमाण आहे. तेव्हां कांहीं कारणावांचून ते वचन व्यर्थ होणें योग्य नव्हे. पण अविक्रिय आत्म्याचें ज्ञान होत नाहीं, असे म्हटल्यास ते आप्तवचन व्यर्थ होते. अर्थात् अविक्रिय आत्मा हा विषयच नसल्यामुळें त्याचें ज्ञान होत नाहीं, असें म्हणता येत नाहीं. बरे, त्याविषयीं कांहीं प्रमाणच नाहीं, म्हणून म्हणावें तर तसेंही नाहीं. त्याविषयीं शास्त्र हें प्रमाण आहे, असें दाखवितात–]—**यथा च शास्त्रोपदेशसामर्थ्यात् धर्मास्तित्वविज्ञानं च कर्तुः देहान्तरसंबंधिज्ञानं च उत्पद्यते**—आणि ज्याप्रमाणे शास्त्रोपदेशाच्या सामर्थ्यामुळें धर्माच्या अस्तित्वाविषयींचें विज्ञान व कर्त्याचा दुसऱ्या देहाशीं संबंध आहे, असेंही ज्ञान उत्पन्न होतें—**तथा**—त्याप्रमाणे—**शास्त्रात्**—शास्त्रावरून—**तस्य एव आत्मनः अविक्रियत्व-अकर्तृत्व-एकत्व-आदिविज्ञानं**—त्याच आत्म्याचें अविक्रियत्व, अकर्तृत्व, एकत्व इत्यादि विज्ञान—**कस्मात् न उत्पद्यते इति ते पृष्टव्याः**—कां उत्पन्न होणार नाहीं, असें त्या मीमांसकांना अवश्य विचारावें. [शास्त्रानें सांगितलें आहे, याच कारणामुळें धर्म आहे, असें ज्ञान होतें. शास्त्रानें पारलौकिक कर्मांचें विधान केलें आहे, याच

कारणामुळें कर्मकर्त्याचा दुसऱ्या देहाशीं संबंध आहे, असें ज्ञान होतें. हें जर खरें आहे तर शास्त्रानें सांगितल्यामुळेंच आत्मा अविक्रिय, अकर्ता, एक आहे इत्यादि आत्मज्ञान कां होणार नाहीं, तें त्या पण्डितंमन्य मीमांसकांना विचारावें. शास्त्रावरून धर्माचें अस्तित्व, आत्म्याचा परलोकसंबंध इत्यादि गोष्टी जशा कळतात त्याचप्रमाणें शास्त्रावरून आत्मा निर्विकार, अकर्ता, एक आहे, असें ज्ञान न होण्यास कांहीं कारण नाहीं. पण जे तसें ज्ञान होत नाहीं, म्हणून म्हणतात त्यांना त्याचें कारण विचारावें. कर्मकांडावरून अज्ञात धर्मादिकांचें ज्ञान जसें होतें त्याचप्रमाणें ज्ञानकांडावरून अज्ञात ब्रह्मात्म्याचें ज्ञान होतें. ]—**करणागोचरत्वात् इति चेत्**—कोणतेंही ज्ञान, मन व विषय यांच्या संयोगापासून होतें. आत्मा मनाचा विषयच होत नाहीं, असें श्रुतीनें सांगितलें आहे. यास्तव आत्मा करणाचा म्ह० साधनाचा विषयच होत नसल्यामुळें त्याचें ज्ञान होऊं शकत नाहीं, म्हणून म्हणाल तर—**न**—तें बरोबर नाहीं. कारण—**मनसा एव अनुद्रष्टव्यं इति श्रुतेः**—( काठकभाष्यार्थ पृ. १०९ ) मनानेंच तें आत्मतत्त्व शास्त्राचार्यांच्या उपदेशानुसार पहावें, अशी श्रुति आहे. त्यामुळें—**शास्त्राचार्योपदेशशमदमादिसंस्कृतं मनः आत्मदर्शने करणम्**—शास्त्र व आचार्य यांचा उपदेश, शम, दम इत्यादिकांच्या योगानें संस्कारसंपन्न झालेलें मन आत्मसाक्षात्काराचें साधन आहे. [ आत्मा निर्विषय आहे. तो मन व वाणी यांचा विषय होत नाहीं. त्यामुळें त्याच्या ज्ञानाला योग्य साधनच नसल्यामुळें तें होऊं शकत नाहीं, असें म्हणाल तर तें तसें नाहीं. कारण श्रुति मनानेंच आत्म्याला पहावें, असें सांगतें. यास्तव शास्त्र व आचार्य यांचा उपदेश, शम, दम इत्यादिकांच्या योगानें अतिशय शुद्ध व एकाग्र झालेलें मन आत्मसाक्षात्काराचें साधन आहे. आत्मा स्वयंप्रकाशस्वरूप आहे. त्यामुळें वस्तुतः मनाच्या प्रकाशाचा–अन्तःकरणांतील चिदाभासाचा–त्यावर कांहीं परिणाम होत नाहीं. तथापि 'तत्त्वमसि, अहं ब्रह्मास्मि-' इत्यादि वाक्यें व आचार्यांनीं सांगितलेला त्यांचा अर्थ ऐकून उत्पन्न झालेल्या बुद्धिवृत्तीत ती आत्मवस्तु अभिव्यक्त होते; व या सर्व सविकल्प व्यवहाराचा आश्रय होते. म्हणून आत्मा मनाचा विषय होतो असें उपचारानें म्हणतात. अर्थात् तो इन्द्रियांचा विषयच होत नाहीं, हें म्हणणें बरोबर नाहीं. कारण सुसंस्कृत, शुद्ध, एकाग्र मन आत्मज्ञानाचें साधन आहे. 'अहो पण ही श्रुति तसें सांगत असली तरी त्याला पुष्टि देणारें दुसरें प्रमाण नाहीं' म्हणून म्हणाल तर सांगतात–]—**तथा च**—आणि अशा प्रकारें—**तत्-अधिगमाय**—त्या आत्म्याच्या ज्ञानासाठीं—**अनुमाने आगमे च सति**—अनुमान व आगम असतांना—**ज्ञानं न उत्पद्यते इति एतत् साहसं**—ज्ञान उत्पन्न होत नाहीं, असें म्हणणें हें केवळ साहस आहे. [ आत्मा अविक्रिय आहे, हें सांगणारें श्रुति-स्मृतिरूप आगम प्रमाण तर आहेच, तसेंच, 'कर्तृत्वादिक हा आत्मधर्म नव्हे. कारण त्याला विकारत्व आहे. दोघांनाहीं संमत असलेल्या विकाराप्रमाणेंच' असें त्याविषयीं अनुमानप्रमाणही आहे. कोणताही विकार हा वस्तुधर्म नव्हे. कारण तो वस्तूमध्यें नित्य–हमेष नसतो. केव्हां केव्हां असतो. हें सर्व वाद्यांना संमत आहे. कर्तृत्वादिकही आत्म्यामध्यें नित्य नसल्यामुळें तो

आत्मधर्म नव्हे, विकार आहे. याप्रमाणें आत्मज्ञान होण्यास आगम व त्यालाच पुष्टि देणारें अनुमान हीं प्रमाणें असतांना आत्मज्ञान होत नाहीं, असें म्हणणें हे मोठें धाडस आहे. 'अहो पण तसें ज्ञान जरी झालें तरी तें कशाचेंही ग्रहण किंवा त्याग यांच्या उपयोगाचे नसल्यामुळें निष्फळ आहे,' म्हणून म्हणाल तर सांगतों-]—**च उत्पद्यमानं ज्ञानं तद्विपरीतं अज्ञानं अवश्यं बाधते इति अभ्युपगन्तव्यं**—आणि उत्पन्न होणारें ज्ञान त्याच्या विपरीत असलेल्या अज्ञानाला अवश्य घालवितें,असें मानणें भाग आहे.—**च तत् अज्ञानं "हन्ता अहं हतः अस्मि इति उभौ तौ न विजानतः" इति दर्शितं**—आणि ते अज्ञान "मी हननकर्ता आहे व हननक्रियेचें कर्म आहें, असें जे समजतात ते दोघेही आत्मस्वरूपाला जाणत नाहींत," या वचनानें दाखविलें आहे.—**अत्र च आत्मनः हननक्रियायाः कर्तृत्वं कर्मत्वं हेतुकर्तृत्वं च अज्ञानकृतं दर्शितं**—या वचनांत आत्म्याला हननक्रियेचे कर्तृत्व, कर्मत्व व हेतुकर्तृत्व अज्ञानकृत आहे, असे दाखविले आहे. [ प्रकाश प्रवृत्त झाला कीं अंधकाराला घालविल्यावांचून जसा रहातच नाहीं त्याप्रमाणें ज्ञान उत्पन्न होऊं लागलें कीं ते तत्क्षणीं अज्ञाननिवृत्ति करतेंच. अज्ञानाला घालविल्यावांचून ज्ञान उत्पन्नच होत नाहीं. यावर कोणी म्हणेल कीं ज्ञानाचा प्रागभाव-ज्ञानाच्या उत्पत्तीची पूर्वावस्था-हेंच अज्ञान आहे. त्यामुळे अज्ञानाची निवृत्ति हेंच ज्ञान आहे. ज्ञान अज्ञानाला निवृत्त करणारें नव्हे. पण तें बरोबर नाहीं. ज्ञानानें ज्या अज्ञानाची निवृत्ति होते त्याचें स्वरूप १९ व्या श्लोकांत सांगितले आहे. 'पण भगवानांनी तरी ज्ञानाच्या अभावाहून निराळें अज्ञान कोठें दाखविलें आहे, ते दोघेही आत्मस्वरूपाला जाणत नाहींत, एवढेंच म्हटलें आहे,' असें कोणी म्हणेल, म्हणून आचार्य सांगतात—या वचनांत मी हननक्रियेचा कर्ता आहें, मी त्या क्रियेचे कर्म होतो, व मी ती क्रिया करण्याविषयीं दुसऱ्यास प्रेरणा करणारा-प्रयोजक आहे, असें वाटणें, हें अज्ञानाचें कार्य आहे, अज्ञानामुळें तसें वाटते, असें भगवानांनीं स्पष्टपणें म्हटलें आहे. त्यावरून येथील अज्ञान म्ह० ज्ञानाचा प्रागभाव नव्हे. तर मिथ्या ज्ञान होय,हें ठरतें. कारण मी कर्ता,कर्म,प्रयोजक इत्यादि आहें,असें त्यामुळें वाटत असतें. भगवानांना विवक्षित असलेलें अज्ञान जर ज्ञानाभावरूप असतें, तर अभावापासून कोणतेंच कार्य होत नसल्यामुळें पूर्वोक्त विपरीत भावनाही झाल्या नसत्या. असो. ]

**तच्च सर्वक्रियास्वपि समानं कर्तृत्वादेरविद्याकृतत्वमविक्रियत्वादात्मनः। विक्रियावान्हि कर्ताऽऽत्मनः कर्मभूतमन्यं प्रयोजयति कुर्विति। तदेतदविशेषेण विदुषः सर्वक्रियासु कर्तृत्वं हेतुकर्तृत्वं च प्रतिषेधति भगवान्विदुषः कर्माधिकाराभावप्रदर्शनार्थं 'वेदाविनाशिनं कथं स पुरुष' इत्यादिना। क्व पुनर्विदुषोऽधिकार इत्येतदुक्तं पूर्वमेव ज्ञानयोगेन सांख्यानामिति। तथा च सर्वकर्मसंन्यासं वक्ष्यति सर्वकर्माणि मनसेत्यादिना॥**

**भाष्यार्थ**—( हिंसा शास्त्रविरुद्ध आहे. त्यामुळें तिचें कर्तृत्व जरी अज्ञानमूलक असलें तरी विहित कर्मांचें कर्तृत्व तसें नाहीं, असें कोणी म्हणेल, म्हणून आचार्य

सांगतात-)—**च**—आणि—**तत् कर्तृत्वादेः अविद्याकर्तृत्वं**—तें कर्तृत्वादिकांचें अज्ञानमूलकत्व—**सर्वक्रियासु अपि समानं**—सर्व क्रियांमध्येंही एकसारखे आहे. —**आत्मनः अविक्रियत्वात्**—कारण आत्म्याला अविक्रियत्व आहे. आत्मा अविकारी आहे.—**विक्रियावान् हि कर्ता आत्मनः कर्मभूतं अन्यं कुरु इति प्रयोजयति**—विक्रियावान् कर्ताच आपल्या कर्मभूत अशा दुसऱ्याला 'हें कर' असें म्हणून प्रेरणा करतो. [ मी या निषिद्ध किंवा विहित कर्माचा कर्ता आहें, असे जें वाटतें तें आत्म्याच्या स्वरूपाचें यथार्थ ज्ञान नसल्यामुळें होय. अर्थात् ते सर्व क्रियांना एकसारखेंच लागू आहे. कारण आत्म्याचे कर्तृत्व नित्य नाहीं, ते जर नित्य असतें तर मुक्तीचाच असंभव झाला असता. अर्थात् ते अनित्यच होय. पण आत्म्याचे कर्तृत्व अनित्य जरी असले तरी ते उपादान कारणावांचून नाहीं. कारण कोणत्याही भावकार्याला उपादान कारण अवश्य असावेच लागते. पण अनात्मा हें त्याचे उपादान कारण होऊं शकत नाहीं. कारण कर्तृत्व आत्म्यामध्ये भासते. 'मी कर्ता' असे त्याचें भान आत्मधर्मत्वाने होतें. अर्थात् आत्माच त्याचे उपादान कारण असले पाहिजे. पण केवल आत्मा कूटस्थ-निर्विकार आहे. म्हणून अविद्यायुक्त आत्माच त्याचे उपादान होय. अज्ञानावांचून निर्विकार आत्म्यानें क्रियाचा कर्ता होणे, शक्य नाहीं. अर्थात् अज्ञानामुळे विक्रियेनें युक्त होणारा कर्ताच 'हे कर' असे म्हणून दुसऱ्यास प्रेरणा करीत असतो, त्यामुळें आत्म्याला प्रत्यक्ष कर्तृत्व जरी नसले तरी हेतुकर्तृत्व-प्रेरकत्व तरी असेल, असेही म्हणतां येत नाहीं. आत्म्याच्या ठिकाणीं कर्तृत्वादिकांचा जो भास होतो त्याचे उपादान कारण अनादि व अनिर्वाच्य अज्ञान आहे व त्याची निवृत्ति तत्त्वज्ञानाने होते, हें सांगितले. आतां कर्तृत्व व प्रेरकत्व याना अविद्याकर्तृत्व आहे, याविषयीं भगवानाची अनुमति दाखवितात- )—**तत् एतत्**—तेंच हे—**भगवान्**—श्रीकृष्ण—'**वेदाविनाशिनं' 'कथं सः' इत्यादिना**—जो आत्म्याला अविनाशी वगैरे जाणतो तो पुरुष कोणाला कसा मारणार व मारविणार ? इत्यादि वचनांनीं—**विदुषः कर्माधिकाराभावप्रदर्शनार्थं**—आत्मज्ञानी पुरुषाला कर्माचा अधिकार नाहीं, हे प्रदर्शित करण्यासाठीं—**विदुषः सर्वक्रियासु कर्तृत्वं हेतुकर्तृत्वं च अविशेषेण प्रतिषेधति**—विद्वानांच्या सर्व क्रियांतील कर्तृत्वाचा व हेतुकर्तृत्वाचा सर्वसाधारणपणेच प्रतिषेध करीत आहे. [ भगवान् आत्मज्ञाला कर्माचा अधिकार नाहीं, हे दाखविण्यासाठीं 'वेदाविनाशिनं०' इत्यादि वचनानें विद्वानांचें कर्तृत्व व प्रयोजकत्व या दोन्हींचाही एकसारखाच-त्यांत कांहीं फरक न ठेवतां-निषेध करीत आहे. विद्वानाला विहित किंवा निषिद्ध कोणतीच क्रिया नाहीं, तो त्यांतील कोणत्याच क्रियेचा कर्ता किंवा करविता नाहीं, असें भगवान् स्पष्ट सांगत आहेत. 'अहो पण भगवानांच्या मतानें विद्वानाला जर कर्माचा अधिकारच नाहीं तर जिवंत असलेल्या त्याचा कशांत अधिकार आहे ?' असा प्रश्न व त्याचें भगवानांच्या वचनानेंच उत्तर-]—**क्व पुनः विदुषः अधिकारः**—तर मग विद्वानाचा अधिकार कशांत आहे ?—**इति**—म्हणून म्हणाल तर

—"**ज्ञानयोगेन सांख्यानां**"३-३ **इति एतत् पूर्वं एव उक्तं**—ज्ञानयोगानें ज्ञानी संन्याशांची निष्ठा मीं सांगितली आहे, या वाक्यानें हे पूर्वीच सांगितलें आहे. [ आचार्य ह्मणतात—" ज्ञानी पुरुषाचा अधिकार ज्ञाननिष्ठेमध्ये आहे, " हें आम्ही पूर्वी (पृ. ४६) भगवद्वचनाचा उल्लेख करून सांगितलेंच आहे. ]—**तथा च**—आणि त्याचप्रमाणें—**'सर्वकर्माणि मनसा' इत्यादिना सर्वकर्मसंन्यासं वक्ष्यति**—' सर्वकर्मांचा मनाने संन्यास करून ' या वचनानें सर्वकर्मसंन्यास भगवान् पुढें सांगतील [ आणि त्या ज्ञाननिष्ठेच्या अंगत्वानें आत्मज्ञानी पुरुषानें सर्वकर्मांचा संन्यास करावा, असे भगवान् पुढें पांचव्या अध्यायांत ' सर्वकर्माणि मनसा ' या वचनाने सांगणार आहेत. त्यामुळें आत्मज्ञानी पुरुषाचा संन्यासपूर्वक आत्मज्ञाननिष्ठेतच अधिकार आहे, हा भगवानांचा अभिप्राय सिद्ध झाला. ]

**ननु मनसेति वचनान्न वाचिकानां कायिकानां च संन्यास इति चेन्न, सर्वकर्माणीति विशेषितत्वात् । मानसानामेव सर्वकर्मणामिति चेन्न, मनोव्यापारपूर्वकत्वाद्वाक्कायव्यापाराणां मनोव्यापाराभावे तदनुपपत्तेः । शास्त्रीयाणां वाक्कायकर्मणां कारणानि मानसानि वर्जयित्वाऽन्यानि सर्वकर्माणि मनसा संन्यसेदिति चेन्न, नैव कुर्वन्न कारयन्निति विशेषणात् ॥**

**भाष्यार्थ**—( अहो पण त्या वाक्यांत सर्वकर्मसंन्यास विवक्षित नाहीं, तर केवल मानस कर्मांचाच त्याग विवक्षित आहे अशी शंका-)—**ननु**—पण—**मनसा इति वचनात् न वाचिकानां कायिकानां च संन्यासः**—मनानें असे त्यांत म्हटलेले असल्यामुळें वाचिक व कायिक कर्मांचा संन्यास विवक्षित नाहीं,—**इति चेत्**—असें म्हणाल तर—**न**—तसे नाहीं.—**सर्व कर्माणि इति विशेषितत्वात्**—कारण सर्व कर्में मनानें सोडून असें कर्मांना ' सर्व ' हे विशेषण जोडले आहे. ( वादी-)—**मानसानां एव सर्वकर्मणां**—मानस सर्वकर्मांचाच संन्यास विवक्षित आहे,—**इति चेत्**—असे म्हणाल तर—**न**—तसेंही नाहीं. कारण—**वाक्कायव्यापाराणां मनोव्यापारपूर्वकत्वात्**—वाक् व शरीर यांचे व्यापार मनोव्यापारपूर्वकच होत असतात. —**मनोव्यापाराभावे तद्-अनुपपत्तेः**—मनाच्या व्यापाराच्या अभावीं वाक् व शरीर यांच्या व्यापारांचा असंभवच असतो. [ मनानें सर्व कर्मांचा त्याग करावा, असें म्हटलेलें असल्यामुळे व मनाच्या व्यापारावांचून शरीर व वाणी यांचा व्यापार संभवतच नसल्यामुळें फक्त मानस सर्व कर्मेंच टाकावीं शारीर व वाचिक कर्में करावीं, असे म्हणणे सर्वथा अयोग्य आहे. मनाचीं सर्व कर्में टाकल्यावर शरीर व वाणी यांचें अल्प-स्वल्प-कर्मही होऊं शकत नाहीं, ही प्रत्येकाच्या अनुभवाची गोष्ट असल्यामुळे ' सर्व कर्मांचा मनानें ( साक्षात् नव्हे ) संन्यास करून ' गी. र. पृ. ६८८ असा जे अर्थ करितात ते अनुभवाच्या विरुद्ध अर्थ करितात, असें मानण्यास काहीं हरकत नाहीं. असो; पुनः कर्म शब्दाच्या अर्थाचा संकोच करण्याविषयीं शंका-]—**शास्त्रीयाणां वाक्कायकर्मणां कारणानि मानसानि वर्जयित्वा**—शास्त्रीय कायिक व वाचिक कर्मांना कारण हो•

णाऱ्या मानस कर्मांना वर्ज्य करून—**अन्यानि सर्वकर्माणि मनसा संन्यसेत्**—बाकीचीं सर्व कर्में मनानें टाकावीं.—**इति चेत्**—असें म्हणाल तर—**न**—तें बरोबर नाहीं. कारण—**न एव कुर्वन् न कारयन् इति विशेषणात्**—न करणारा व न करविणारा, असें विशेषण दिलेलें असल्यामुळें [ तसा संकोच करतां येत नाहीं. शास्त्रीय म्ह० विहित कायिक कर्में व शास्त्रीय वाचिक कर्में यांना कारण होणारीं जीं मानस कर्मे म्ह० संकल्प वगैरे त्यांना सोडून बाकीचीं सर्व म्ह० अशास्त्रीय शारीर व वाचिक कर्मांना कारण होणारीं जीं अशास्त्रीय मानस कर्में त्यांचा करावा, असाही त्याचा अर्थ करतां येत नाहीं. कारण 'तो स्वतः कांहीं न करितां व न करवितां,' असा विशेष सांगितला आहे. त्यामुळें विवेकबुद्धीनें सर्व अशास्त्रीय कर्मांचा त्याग करून राहतो, हें म्हणणें योग्य नव्हे. आतां भगवानांना इष्ट असलेल्या सर्वकर्मसंन्यासाचा विशिष्ट अवस्थेमध्यें संकोच करावा, अशी शंका—]

**सर्वकर्मसंन्यासोऽयं भगवतोक्तो मरिष्यतो न जीवत इति चेन्न, नवद्वारे पुरे देह्यास्त इतिविशेषणानुपपत्तेः। न हि सर्वकर्मसंन्यासेन मृतस्य तद्देहे आसनं संभवति अकुर्वतोऽकारयतश्च देहे संन्यस्येति संबन्धो न देह आस्त इति चेन्न, सर्वत्राऽऽत्मनोऽविक्रियत्वावधारणात्। आसनक्रियायाश्चाधिकरणापेक्षत्वात्तदनपेक्षत्वाच्च संन्यासस्य। संपूर्वस्तु न्यासशब्दस्त्यागार्थो न निक्षेपार्थः। तस्माद्गीताशास्त्र आत्मज्ञानवतः संन्यास एवाधिकारो न कर्मणीति तत्र तत्रोपरिष्टादात्मज्ञानप्रकरणे दर्शयिष्यामः॥ २१॥**

**भाष्यार्थ—भगवता उक्तः अयं सर्वकर्मसंन्यासः**—भगवानांनीं सांगितलेला हा सर्वकर्मसंन्यास—**मरिष्यतः न जीवतः**—मरावयास टेंकलेल्या मनुष्याला उद्देशून आहे. जिवंत असलेल्या पुरुषाला उद्देशून नाहीं,—**इति चेत् न**—असें म्हणाल तर ते बरोबर नाहीं. कारण—**नवद्वारे पुरे देही आस्ते इति विशेषणानुपपत्तेः**—नऊ द्वारांनीं युक्त असलेल्या शरीर-पुरांत देही-आत्मा राहतो, या विशेषणाची अनुपपत्ति होते—**हि सर्वकर्मसंन्यासेन मृतस्य तद्देहे अकुर्वतः च अकारयतः आसनं न संभवति**—कारण सर्व कर्मांचा त्याग करून मृत झालेल्या जीवाचें त्या देहांत कर्म न करतां व न करवितां असणें-राहणें संभवत नाहीं.—**देहे संन्यस्य इति संबन्धः देहे आस्ते इति न**—देहांत कर्मांचा त्याग करून असा संबंध लावावा, देहांत राहतो, असा लावूं नये,—**इति चेत् न**—असें म्हणाल तर तें बरोबर नाहीं. कारण—**सर्वत्र आत्मनः अविक्रियत्व-अवधारणात्**—श्रुति, स्मृति इत्यादि सर्व प्रमाण ग्रंथांत आत्म्याच्या अविक्रियत्वाचा निश्चय केला आहे.—**च**—शिवाय—**आसनक्रियायाः अधिकरणापेक्षत्वात्**—आसन-राहणें, या क्रियेला अधिकरणाची अपेक्षा असते, त्यामुळें—**च**—आणि—**संन्यासस्य तदनपेक्षत्वात्**—संन्यासाला त्याची अपेक्षा नसते, त्यामुळें—**देहे संन्यस्य**—असा अन्वय न करितां—**देहे आस्ते**—असाच करणें योग्य आहे.—**संपूर्वः तु न्यासशब्दः त्यागार्थः न निक्षेपार्थः**—आणि 'सं' या उपसर्गासह असलेला जो 'न्यास' शब्द त्याचा 'त्याग' हा

अर्थ आहे, ' निक्षेप' हा अर्थ नाहीं. [भगवानांनीं 'सर्व कर्माणि मनसा०' या वचनानें सांगितलेला संन्यास जिवंत मनुष्यासाठीं नाहीं, मुमुर्षूसाठीं आहे, असेंही म्हणतां येत नाहीं. कारण त्याच वचनांत ' नवद्वारे पुरे आस्ते ' मनाने सर्व कर्मे सोडून नऊ द्वारांनीं युक्त असलेल्या शरीरांत तो राहतो, असें म्हटले आहे. सर्व कर्मे सोडून मेलेल्या जीवाचें कर्म न करितां व न करवितां त्या देहांत राहणें, संभवत नाहीं. यास्तव भगवानांनी सांगितलेला हा संन्यास जिवंत मनुष्यासाठींच आहे, म्रियमाणासाठीं नाहीं, हे सिद्ध होतें. विवेकवशात् सर्वही कर्मे पूर्वोक्त देहांत ठेवून विद्वान् कांहीं न करितां व न करवितां सुखाने राहतो, असा अन्वय लावावा. म्ह० ' देहे संन्यस्य ' असा अन्वय लावावा. कारण जिवंतपणीं सर्व कर्मांचा संन्यास संभवत नाहीं. म्हणून कर्मांचा त्याग करून देहांत राहतो, असा अन्वय लावूं नये, असें कित्येक म्हणतात; पण ते बरोबर नाहीं. कारण श्रुति-स्मृत्यादि प्रमाणग्रंथांत आत्मा निर्विकार आहे, असे प्रतिपादन केले आहे. त्यामुळें देहसंबंधावांचून त्याला कर्तृत्व किंवा कारयितृत्व संभवत नाहीं. मेल्यावर म्ह० देहसंबंध सुटल्यावर ' न करितां व न करवितां राहतो ' असे म्हणतांच येत नाहीं. यास्तव जिवंत विद्वानासाठींच हा संन्यास आहे, मृतासाठीं नव्हे. शिवाय 'देहे आस्ते' असाच अन्वय लावण्यास आणखीही एक विशेष कारण आहे. आसन म्ह० राहणे, या क्रियेला अधिकरणाची-आधाराची जशी अपेक्षा असते तशी त्यागाला नसते. म्हणून देहांत कर्मांचा त्याग करतो असे म्हणण्यापेक्षां देहांत राहतो, हे म्हणणे, अधिक सयुक्तिक होय. तसेच, ' संन्यास ' या शब्दाचा निक्षेप-ठेवणे, असा अर्थ केल्यास ' ठेवणें ' या क्रियेला आधाराची अपेक्षा असल्यामुळें ' देहे संन्यस्य ' असा अन्वय संभवतो हे खरे; पण ' न्यास ' या शब्दाला ' सं-' हा उपसर्ग जोडला असतां त्याचा ' त्याग ' हाच अर्थ होतो, ' निक्षेप ' असा अर्थ होत नाहीं. त्यामुळे तसा अन्वय संभवत नाहीं. सारांश विवेकविज्ञानानें सर्व कर्मांचा त्याग करून विद्वान् देहांत राहतो, असाच 'सर्वकर्माणि मनसा०' या वचनाचा अन्वय व अर्थ लावणे, सयुक्तिक होय, असें मानून आचार्य उपसंहार करितात-]—**तस्मात्**—म्हणून—**गीताशास्त्रे आत्मज्ञानवतः संन्यासे एव अधिकारः न कर्मणि इति उपरिष्टात् तत्र तत्र आत्मज्ञानप्रकरणे दर्शयिष्यामः**—गीताशास्त्रांत आत्मज्ञानवानाचा संन्यासामध्येंच अधिकार आहे, कर्मामध्यें नाहीं, असें पुढें ठिकठिकाणीं आत्मज्ञानप्रकरणांत आम्ही दाखवूं. [ सर्व कर्मे सोडणे, हेंच संन्यासाचें स्वरूप आहे व आत्मज्ञानाशीं त्याचा विरोधही नाहीं. यास्तव ज्याला परोक्ष ज्ञान झालें आहे त्यानें विधिप्राप्त-विविदिषा संन्यास करावा व ज्याला यथार्थ आत्मसाक्षात्कार झालेला आहे त्याचा स्वाभाविक-फलभूत संन्यासामध्यें अधिकार आहे, असा संन्यासाचा विभाग पुढें या गीताशास्त्रांतच आम्ही ठिकठिकाणीं दाखवूं.]२१.

**वासांसि जीर्णानि यथा विहाय नवानि गृह्णाति नरोऽपराणि ।**
**तथा शरीराणि विहाय जीर्णान्यन्यानि संयाति नवानि देही२२**

**अन्वयार्थ—यथा**—ज्याप्रमाणें—**नरः**—पुरुष—**जीर्णानि वासांसि**—जुनीं वस्त्रें—**विहाय**—टाकून—**अपराणि**—दुसरीं—**नवानि**—नवीं वस्त्रें—**गृह्णाति**—घेतो—**तथा**—त्याप्रमाणें—**देही**—देहवान्-आत्मा—**जीर्णानि शरीराणि**—जीर्ण-निर्बल झालेलीं शरीरें—**विहाय**—सोडून—**अन्यानि नवानि**—दुसरीं नवीं शरीरें—**संयाति**—घेतो. नव्या शरीरांत जातो. २२.

**प्रकृतं तु वक्ष्यामः, तत्राऽऽत्मनोऽविनाशित्वं प्रतिज्ञातं तत्किमिवेत्युच्यते—वासांसीति । वासांसि वस्त्राणि जीर्णानि दुर्बलतां गतानि यथा लोके विहाय परित्यज्य नवान्यभिनवानि गृह्णात्युपादत्ते नरः पुरुषोऽपराण्यन्यानि तथा तद्वदेव शरीराणि विहाय जीर्णान्यन्यानि संयाति संगच्छति नवानि देह्यात्मा पुरुषवदविक्रिय एवेत्यर्थः ॥ २२ ॥**

**भाष्यार्थ**—( असो, )—**तु प्रकृतं वक्ष्यामः**—पण आतां प्रकृत विषयच पुढें सांगूं या.—**तत्र आत्मनः अविनाशित्वं प्रतिज्ञातं**—वर आत्म्याचें अविनाशित्व, अविक्रियत्व वगैरे सांगितलें, त्याविषयीं प्रतिज्ञा केली—**तत् किं इव इति "वासांसि०" इति उच्यते**—पण तें कोणाप्रमाणें आहे. हें ' वासांसि० ' इत्यादि श्लोकानें सांगतात. [ आत्मा अविनाशी, निर्विकार वगैरे कसा आहे तें दृष्टान्तानें स्पष्ट करितात-]—**वासांसि-वस्त्राणि**—वासांसि म्हणजे वस्त्रें—**जीर्णानि-दुर्बलतां गतानि**—जीर्ण झालेलीं-दुर्बलतेस प्राप्त झालेलीं—**यथा लोके**—ज्याप्रमाणें व्यवहारांत—**विहाय-परित्यज्य**—सोडून—**नवानि-अभिनवानि**—सर्वप्रकारें नवीं—**गृह्णाति-उपादत्ते**—स्वीकारतो—**नरः-पुरुषः**—मनुष्य—**अपराणि-अन्यानि**—दुसरीं [ ज्याप्रमाणें व्यवहारांत पुरुष जुनीं झालेलीं वस्त्रें टाकून दुसरीं नवीं-कोरीं वापरूं लागतो ]—**तथा-तद्वत् एव**—त्याप्रमाणेंच—**जीर्णानि शरीराणि विहाय** जीर्ण झालेलीं शरीरें टाकून—**देही-आत्मा अन्यानि-नवानि संयाति-संगच्छति**—देहवान् आत्मा दुसऱ्या नव्या शरीरास प्राप्त होतो-दुसरीं शरीरें धारण करतो—**पुरुषवत् अविक्रियः एव इत्यर्थः**—आत्मा जीर्ण वस्त्रें टाकून नवीं नेसणाऱ्या पुरुषाप्रमाणें अविक्रियच आहे, असा याचा भावार्थ. [ आत्मा स्वतः जरी अविक्रिय असला तरी पूर्वशरीराचा त्याग करून दुसरें नवीन शरीर घेतांना त्याच्यामध्यें विकार होणें अपरिहार्य आहे, असें कोणी म्हणेल म्हणून येथें दृष्टान्त देऊन त्याचें अविक्रियत्व सिद्ध केलें आहे. जुनीं फाटलेलीं वस्त्रें टाकून दुसरीं नवीं वस्त्रें घेणाऱ्या लौकिक पुरुषामध्यें कोणत्याही प्रकारचा विकार-बदल झालेला दिसत नाहीं. त्याच न्यायानें जराजर्जर झालेलें शरीर टाकून दुसरें नवें शरीर धारण करणाऱ्या आत्म्यामध्येंही कांहीं विकार होत नाहीं. तो सर्वदा एकरूपच असतो. ]. २२.

**नैनं छिन्दन्ति शस्त्राणि नैनं दहति पावकः ।**
**न चैनं क्लेदयन्त्यापो न शोषयति मारुतः ॥२३॥**

**अन्वयार्थ—एनं**—या आत्म्याला—**शस्त्राणि**—शस्त्रें—**न छिन्दन्ति**—तोडीत नाहीत.—**एनं पावकः न दहति**—याला अग्नि जाळीत नाहीं.—**एनं आपः न**

**क्लेदयन्ति**—याला पाणी कुजवीत नाहीं.—**च मारुतः न शोषयति**—व याला वायु सुकवीत नाहीं. २३.

**कस्माद्विक्रिय एवेति । आह—नैनं छिन्दन्तीति । एनं प्रकृतं देहिनं न छिन्दन्ति शस्त्राणि निरवयवत्वान्नावयवविभागं कुर्वन्ति शस्त्राण्यस्यादीनि । तथा नैनं दहति पावकोऽग्निरपि न भस्मी करोति । तथा नैनं क्लेदयन्त्यापः । अपां हि सावयवस्य वस्तुन आर्द्रभावकरणेनावयवविश्लेषापादने सामर्थ्यं तन्न निरवयव आत्मनि संभवति। तथा स्नेहवद्द्रव्यं स्नेहशोषणेन नाशयति वायुरेनं स्वात्मानं न शोषयति मारुतोऽपि२३**

**भाष्यार्थ**—( अहो पण पृथिवी, आप, तेज व वायु या चार भूतांमुळें त्याच्यामध्यें विकार होण्याचा संभव आहे, अशी शंका घेऊन पुढील श्लोकानें तिचें निरसन-) —**अविक्रियः एव कस्मात्**—आत्मा अविक्रियच कशावरून आहे.—**इति " नैनं छिन्दति०" इति आह**—हे ' नैनं छिन्दन्ति०' या श्लोकाने भगवान् सांगतात—**शस्त्राणि एनं-प्रकृतं देहिनं न छिन्दन्ति**—शस्त्रें या प्रकृत आत्म्याला तोडीत नाहींत.—**निरवयवत्वात् अस्यादीनि शस्त्राणि अवयवविभागं न कुर्वन्ति**—आत्मा निरवयव असल्यामुळे तरवार, बाण वगैरे शस्त्रे याच्या अवयवांचा विभाग करीत नाहींत—**तथा**—त्याचप्रमाणे—**पावकः-अग्निः अपि एनं न दहति-न भस्मी करोति**—पावक म्ह० अग्नीमुद्धां या आत्म्याला जाळीत नाहीं-त्याचे भस्म करीत नाहीं.—**तथा आपः एनं न क्लेदयन्ति**—त्याचप्रमाणे जल याला कुजवीत नाहीं,—**हि**—कारण—**सावयवस्य वस्तुनः आर्द्रीभावकरणेन अवयवविश्लेषापादाने अपां सामर्थ्यं**—सावयव वस्तूला आर्द्रपणा-ओलेपणा देऊन-तिला ओली करून तिच्या अवयवांना पृथक् पृथक् करण्याचे जलांना सामर्थ्य आहे. पण—**निरवयवे आत्मनि तत् न संभवति**—निरवयव आत्म्यामध्ये तें संभवत नाहीं. [ सावयव व साकार वस्तूला ओली करून तिला फुगवून तिचे अवयव भिन्न भिन्न करण्याचे सामर्थ्य पाण्यांत आहे. पण आत्मा निरवयव असल्यामुळे पाणी त्याच्यामध्ये तसा विकार उत्पन्न करूं शकत नाहीं. ]—**तथा वायुः स्नेहशोषणेन स्नेहवत् द्रव्यं नाशयति**—त्याचप्रमाणे वायु स्नेह शोषून घेऊन स्नेहयुक्त द्रव्याचा नाश करतो. पण—**मारुतः अपि एनं स्वात्मानं न शोषयति**—वायुही या स्वात्म्याला-वायूच्याही आत्म्याला सुकवीत नाहीं. [ शस्त्रे आत्म्याला तोडीत नाहींत, म्ह० पृथ्वीचा त्यावर परिणाम होत नाहीं, त्याचप्रमाणे आप, तेज व वायुही त्याच्यावर कांहीं परिणाम करूं शकत नाहींत. कारण भूतें त्याला आपला विषयच करूं शकत नाहींत. त्यामुळे आत्मा आकाशाप्रमाणें अविक्रिय आहे, असा भावार्थ ] २३.

अच्छेद्योऽयमदाह्योऽयमक्लेद्योऽशोष्य एव च ।
नित्यः सर्वगतः स्थाणुरचलोऽयं सनातनः ॥२४॥

**अन्वयार्थ—अयं अच्छेद्यः**—हा आत्मा अच्छेद्य-शस्त्रांना तोडतां न येण्यासारखा आहे.—**अयं अदाह्यः**—हा अग्नीला न जाळतां येण्यासारखा आहे.—**अयं अक्लेद्यः**—हा पाण्याला न कुजवितां येण्यासारखा आहे.—**च अशोष्यः एव**—व हा वाऱ्याला न सुकवितां येण्यासारखा आहे, म्हणून—**अयं**—हा—**नित्यः**—नित्य आहे.—**सर्वगतः**—त्यामुळें सर्वव्यापक आहे.—**स्थाणुः**—सर्वगत असल्यामुळेंच झाडाच्या खोडाप्रमाणें स्थिर आहे.—**अचलः**—स्थिर असल्यामुळेंच अचल आहे. म्हणूनच तो—**सनातनः**—चिरकालीन आहे. एखाद्या कारणापासून नवीन उत्पन्न झालेला नाहीं. २४. तसाच—

**यत एवं तस्मात्—अच्छेद्योऽयमिति । यस्मादन्योन्यनाशहेतूनि भूतान्येनमात्मानं नाशयितुं नोत्सहन्ते तस्मान्नित्यो नित्यत्वात्सर्वगतः सर्वगतत्वात्स्थाणुः स्थाणुरिव स्थिर इत्येतत् । स्थिरत्वादचलोऽयमात्माऽतः सनातनश्चिरंतनो न कारणात्कुतश्चिन्निष्पन्नोऽभिनव इत्यर्थः । नैतेषां श्लोकानां पौनरुक्त्यं चोदनीयम् । यत एकेनैव श्लोकेनाऽऽत्मनो नित्यत्वमविक्रियत्वं चोक्तं 'न जायते म्रियते वा' इत्यादिना । तत्र यदेवाऽऽत्मविषयं किंचिदुच्यते तदेतस्माच्छ्लोकार्थान्नातिरिच्यते किंचिच्छब्दतः पुनरुक्तं किंचिदर्थत इति । दुर्बोधत्वादात्मवस्तुनः पुनः पुनः प्रसङ्गमापाद्य शब्दान्तरेण तदेव वस्तु निरूपयति भगवान्वासुदेवः कथं नु नाम संसारिणामव्यक्तं तत्त्वं बुद्धिगोचरतामापन्नं सत्संसारनिवृत्तये स्यादिति ॥ २४ ॥**

**भाष्यार्थ**—(आत्म्यावर पृथिव्यादि भूतांचा परिणाम न होण्याचें कारण त्याच्यामध्यें विकाराची योग्यता नसणे, हेंच आहे, असे सांगतात-)—**यतः एवं**—ज्याअर्थी याप्रमाणें आत्म्यामध्यें विकार पावण्याची योग्यताच नाहीं,—**तस्मात्**—त्याअर्थी—**अच्छेद्योऽयमिति**—'अच्छेद्योऽयं' इत्यादि भगवान् सांगतात—**यस्मात्**—ज्याअर्थी—**अन्योन्यनाशहेतूनि भूतानि एनं आत्मानं नाशयितुं न उत्सहन्ते**—एकमेकांच्या नाशाला कारण होणारीं भूते या प्रकृत आत्म्याचा नाश करण्यास समर्थ होत नाहींत—**तस्मात् नित्यः**—त्याअर्थी हा आत्मा नित्य आहे.—**नित्यत्वात् सर्वगतः**—नित्य असल्यामुळे सर्वगत आहे—**सर्वगतत्वात् स्थाणुः-स्थाणुः इव स्थिरः इति एतत्**—सर्वगतत्वामुळें स्थाणु. स्थाणु-स्तंभ, त्याप्रमाणे स्थिर असा याचा भावार्थ.—**स्थिरत्वात् अयं आत्मा अचलः**—स्थिर असल्यामुळे हा आत्मा अचल आहे—**अतः सनातनः-चिरंतनः कुतश्चित् कारणात् न निष्पन्नः-अभिनवः इत्यर्थः**—म्हणूनच सनातन-चिरंतन कोणत्याही कारणापासून उत्पन्न न झालेला-नूतन असा याचा भावार्थ. [ निरवयव आत्म्याचा छेद, दाह, क्लेद, व शोष संभवत नाहीं. म्हणून त्याला येथें अच्छेद्य, अदाह्य, अक्लेद्य व अशोष्य म्हटले आहे. त्यामुळेंच तो नित्य आहे. तार्किक परमाणूंना नित्य मानतात, पण आत्म्याचें नित्यत्व त्याहून भिन्न प्रकारचें आहे. कारण आत्मा सर्वगत आहे. सर्वगत असला तरी त्याच्यामध्यें विक्रिया न होण्यास कोणतें कारण आहे? म्हणून कोणी म्हणेल तर तें बरोबर नाहीं. कारण आकाश विभु आहे व त्यांत कोणतीही विक्रिया होत नाहीं, हें प्रसिद्ध

आहे. त्याचप्रमाणें आत्म्यामध्यें विक्रियाशक्ति जर असती तर त्याला स्थाणु–स्थिर म्हणतां आलें नसतें. कारण मृत्तिकादि विक्रियाशक्तियुक्त पदार्थ स्थिर नसतात. आत्मा स्थिर असल्यामुळेंच अचल व चिरंतन आहे. तो कोणत्याही कारणापासून उत्पन्न झालेला नाही. त्यामुळे आत्मा स्वतः जरी नित्य असला तरी त्याच्या कारणाचा नाश झाल्यानें त्याचा नाश होईल, अशीही तार्किकांची शंका येथें संभवत नाहीं. अहो पण 'न जायते०' २–२० इत्यादि श्लोकांत आत्म्याचें अविक्रियत्व सिद्ध केलें आहे. पुनः तेच तें सांगण्यांत त्यावर पुनरुक्ति दोष नाहीं का येत? असे कोणी ह्मणेल ह्मणून सांगतात–]—**एतेषां श्लोकानां पौनरुक्त्यं न चोदनीयं**—या श्लोकांवर पुनरुक्तीचा दोष येतो, अशी शंका घेऊं नये—**यतः**—कारण—**'न जायते म्रियते वा' इत्यादिना एकेन एव श्लोकेन**—'न जायते०' इत्यादि एकाच श्लोकाने—**आत्मनः नित्यत्वं च अविक्रियत्वं उक्तं**—आत्म्याचे नित्यत्व व अविक्रियत्व सांगितले आहे, (त्यामुळें 'वेदाविनाशिनं' इत्यादि श्लोकावर पुनरुक्ति दोष येतो, कारण)—**तत्र आत्मविषयं यत् एव किंचित् उच्यते**—'वेदाविनाशिनं०' या श्लोकांत आत्म्याविषयीं जें कांहीं सांगितलें आहे—**तत् एतस्मात् श्लोकार्थात् न अतिरिच्यते**—ते 'न जायते०' या श्लोकाच्या अर्थाहून अधिक मुळींच नाही. कारण—**किंचित् शब्दतः पुनरुक्तं किंचित् अर्थतः इति**—त्यांत कांहीं शब्दांनीं पुनरुक्त आहे व कांहीं अर्थानें पुनरुक्त आहे, त्यामुळें तसा दोष येतो हे खरें तथापि—**आत्मवस्तुनः दुर्बोधत्वात्**—आत्मवस्तु अतिशय दुर्बोध असल्यामुळे—**भगवान् वासुदेवः**—भगवान् वासुदेव—**अव्यक्तं तत्त्वं संसारिणां बुद्धिगोचरतां आपन्नं सत् संसारनिवृत्तये कथं नु नाम स्यात् इति**—ते अव्यक्त आत्मतत्त्व संसारी जीवांच्या बुद्धिविषयत्वास प्राप्त होत्सातें त्यांच्या संसारनिवृत्तीला कसे बरें कारण होईल, अशा आशयाने—**पुनः पुनः प्रसंगं आपाद्य शब्दान्तरेण तत् एव वस्तु निरूपयति**—पुनः पुनः प्रसंग आणून दुसऱ्या शब्दाने तेच तत्त्व निरूपीत आहेत. दुसऱ्या दुसऱ्या शब्दांनी त्याच वस्तूचें पुनः पुनः निरूपण करीत आहेत. ['न जायते०' या श्लोकांत आत्मा सर्व विक्रियाशून्य व नित्य आहे, असे सांगितले 'वेदाविनाशिनं नित्यं०' यांतही पुनः तेंच सांगितलें आहे. कोठें निराळ्या शब्दानें तर कोठे निराळ्या अर्थाने तीच एक गोष्ट सांगितली आहे. त्यामुळें त्यावर पुनरुक्ति दोष येतो. पण त्या दोषाची आशंका घेऊं नये. कारण आत्मवस्तु अतिशय दुर्बोध आहे. एकदा सांगूनच तिचे ज्ञान होत नाही. म्हणून तें अव्यक्त आत्मतत्त्व संसारी जीवांच्या बुद्धीचा विषय होऊन त्यांच्या संसाराच्या निवृत्तीला कसें बरें कारण होईल? असा विचार करून भगवान् श्रीकृष्ण पुनः पुनः प्रसंग आणून निरनिराळ्या शब्दांनीं त्याच आत्मवस्तूचें निरूपण करीत आहेत. म्हणून त्यावर पुनरुक्ति दोष येत नाहीं. ह्म० पुनरुक्ति मुद्दाम केली आहे. त्यामुळें ती[1] दोषावह नाहीं, असा भावार्थ.] २४

---

१ 'न जायते०' या श्लोकांत जन्ममरणाचा अभाव सांगितला आहे व 'वेदाविनाशिनं०' येथें अपक्षयादिकांचा अभाव उक्त आहे. यास्तव थोडासा अर्थभेदही आहे, सर्वथा अर्थसाम्य नाहीं.

**अव्यक्तोऽयमचिन्त्योऽयमविकार्योऽयमुच्यते ।**
**तस्मादेवं विदित्वैनं नानुशोचितुमर्हसि ॥ २५ ॥**

**अन्वयार्थ—अयं अव्यक्तः**—हा आत्मा अव्यक्त आहे,—**अयं अचिन्त्यः**—हा अचिन्त्य आहे,—**अयं अविकार्यः उच्यते**—हा अविकार्य म्हटला जातो.—**तस्मात्**—यास्तव—**एनं**—या आत्म्याला—**एवं**—असें—**विदित्वा**—जाणून—**अनुशोचितुं**—भीष्मादिकांविषयीं शोक करण्यास—**न अर्हसि**—तूं योग्य नाहीस. २५

**किंच—अव्यक्तोऽयमिति । अव्यक्तः सर्वकरणाविषयत्वान्न व्यज्यत इत्यव्यक्तोऽयमात्मा । अत एवाचिन्त्योऽयम् । यद्धीन्द्रियगोचरं वस्तु तच्चिन्ताविषयत्वमापद्यतेऽयं त्वात्माऽनिन्द्रियगोचरत्वादचिन्त्यः । अविकार्योऽयम् । यथा क्षीरं दध्यातञ्चनादिना विकारी न तथाऽयमात्मा । निरवयवत्वाच्चाविक्रियः । न हि निरवयवं किंचिद्विक्रियात्मकं दृष्टम् । अविक्रियत्वादविकार्योऽयमात्मोच्यते । तस्मादेवं यथोक्तप्रकारेणैनमात्मानं विदित्वा त्वं नानुशोचितुमर्हसि हन्ताऽहमेषां मयेमे हन्यन्त इति ॥ २५ ॥**

**भाष्यार्थ**—( हें प्रकरण त्वंपदार्थ जो जीव त्याच्या शोधनाचें म्ह० त्याला उपाधीपासून अगदीं पृथक् करण्याचें आहे. यास्तव त्याविषयींच )—**किंच अव्यक्तः अयं इति**—'अव्यक्तोऽयं०' या श्लोकानें आणखी हेतु सांगतात.—**अव्यक्तः-सर्वकरणाविषयत्वात् न व्यज्यते इति अयं-आत्मा अव्यक्तः**—सर्व इंद्रियांचा अविषय असल्यामुळें व्यक्त होत नाहीं-प्रत्यक्ष दिसत नाहीं म्हणून हा-आत्मा अव्यक्त आहे.—**अतः एव अयं अचिन्त्यः**—म्हणूनच हा अचिन्त्य आहे.—**हि यत् इन्द्रियगोचरं वस्तु तत् चिन्ताविषयत्वं आपद्यते**—कारण जे इंद्रियांचा विषय होणारें तत्त्व-वस्तु असते तें चिन्ताविषयत्वास प्राप्त होतें-इंद्रियांचा विषय होणाऱ्या वस्तूविषयींच चिंतन करतां येतें.—**तु अयं आत्मा अनिन्द्रियगोचरत्वात् अचिन्त्यः**—पण हा आत्मा इंद्रियगोचर होणारा नसल्यामुळे अचिन्त्य आहे.—**अयं अविकार्यः**—हा विकार न पावणारा आहे.—**यथा क्षीरं दध्यातञ्चनादिना विकारि न तथा अयं आत्मा**—जसें दूध दह्याचें विरजण वगैरे लावलें असतां विकार पावतें तसा हा आत्मा विकार पावत नाहीं.—**च निरवयवत्वात अविक्रियः**—आणि त्याचप्रमाणें आत्मा निरवयव असल्यामुळेंही अविकार्य आहे.—**हि किंचित् निरवयवं विक्रियात्मकं न दृष्टं**—कारण कांहीही निरवयव असलेलें तत्त्व विक्रियात्मक आहे असा अनुभव येत नाहीं.—**अविक्रियत्वात् अयं आत्मा अविकार्यः उच्यते**—अविक्रिय असल्यामुळे हा आत्मा अविकार्य म्हटला जातो. [ मग नित्य, निर्विकार असलेल्या आत्म्याचा तसाच अनुभव कां येत नाहीं ? उत्तर-कारण तो अव्यक्त आहे. कोणत्याही इंद्रियानें त्याचें प्रत्यक्ष ज्ञान होत नाहीं. तथापि त्याचें अनुमान होण्यास काय हरकत आहे ? उत्तर-अव्यक्त असल्यामुळेंच तो अचिंत्य आहे. त्याच्याविषयीं चिंतन-अनुमान-कल्पना वगैरे कांहीं करतां येत नाहीं. जी वस्तु इंद्रियांचा

विषय होते तिच्याविषयींच चिंतनादि संभवतात. आत्मा इंद्रियगोचर नाहीं, अतींद्रिय आहे. म्हणून अचिन्त्य आहे. पण तो अतींद्रिय जरी असला तरी अनुमानांतील सामान्यतोदृष्ट[1] म्हणून जो एक प्रकार आहे त्याचा तो विषय कां होणार नाही? उत्तर—आत्मा कूटस्थ आहे. त्यामुळें व्याप्तिलिंगच नाहीं. याविषयीं व्यतिरेकीदृष्टान्त—दुधाला विरजण घातले असतां त्याचें दहीं होतें. कारण दूध विकारी पदार्थ आहे. पण आत्मा तसा विकारी नाही. शिवाय हा आत्मा निरवयव असल्यामुळें घटादिसावयव द्रव्याप्रमाणें विकार पावत नाही. तो निरवयव जरी असला तरी त्याच्यामध्यें विक्रिया होण्यास कोणती हरकत आहे? उत्तर—निरवयव वस्तु विक्रिया पावते असा अनुभव येत नाहीं, व तिच्यामध्येंही जर विक्रिया होऊं लागली तर तिचें निरवयवत्व टिकणार नाहीं. दुधासारखे सावयव व सक्रिय पदार्थच विकार पावतात. आत्मा निरवयव आहे, असें श्रुति-स्मृति सांगतात. त्यामुळें तो अविकार्य आहे. असो, ‘ अशोच्यान् अन्वशोचः० ’ २-११ येथून आरंभिलेल्या आत्म्याच्या उपदेशाचा उपसंहार करितात-]—**तस्मात्**—म्हणून—**एनं-आत्मानं एवं-यथोक्तप्रकारेण विदित्वा**—या प्रकृत आत्म्याला वर सांगितलेल्या प्रकारानें जाणून—**त्वं**—तूं—**अहं एषां हन्ता मया इमे हन्यन्ते इति**—मी यांचा हननकर्ता आहे, मजकडून हे मारले जात आहेत, अशा रीतीनें—**अनुशोचितुं न अर्हसि**—भीष्मादिकांविषयी शोक करण्यास योग्य नाहीस. [ आत्मा अव्यक्त, अचिन्त्य, अविकार्य, नित्य, व सर्वगत वगैरे असल्यामुळें त्याला तसेंच जाणणे उचित होय. आत्म्याला तसे साक्षात् जाणल्यास शोक-मोहादिसंसारबीजांची निवृत्ति होते. म्हणजे तें आत्म्याचें सम्यक् ज्ञान मोक्षरूप फळ देणारें आहे. यास्तव ‘ मी यांचा हन्ता आहे व हे माझ्या हातून मरत आहेत ’ असे समजून त्यांच्यासाठीं शोक करणें तुला उचित नाहीं. तूं आत्म्याला साक्षात् जाणून शोक करूं नकोस. अर्जुनाचा शोक घालविण्यासाठीं भगवानांनीं आत्मोपदेश करून त्याचाच येथे उपसंहार केला आहे. ‘ अशोच्यांविषयी शोक केलास ’ व ‘ आत्म्याला असें जाणून शोक करणे तुला योग्य नाहीं ’ या उपक्रमोपसंहारावरून आत्मज्ञानाने शोकमोहात्मक संसारबीजांची निवृत्ति करणे, हाच सर्व गीतेचा व या प्रकरणाचा प्रतिपाद्य विषय ठरतो. ]. २५.

**अथ चैनं नित्यजातं नित्यं वा मन्यसे मृतम् ।**
**तथापि त्वं महाबाहो नैनं शोचितुमर्हसि ॥ २६ ॥**

**अन्वयार्थ—अथ च**—आतां जरी—**त्वं**—तूं—**एनं**—या आत्म्याला—**नित्यजातं**—नित्य उत्पन्न झालेला—**वा**—किंवा—**नित्यं मृतं**—नित्य मेलेला—**मन्यसे**

---

१ ज्या अनुमितिज्ञानातील हेतु प्रत्यक्ष नसतो ते सामान्यतोदृष्ट अनुमान होय. जसें आपल्याला रूपाचें ज्ञान झाले म्हणजे ती क्रिया असल्यामुळें तिच्या साधनाचे म्हणजे चक्षुरिंद्रियांचें आपण अनुमान करतों. जसे-रूपज्ञान ही क्रिया आहे. कोणत्याही क्रियेला साधन हवें असतें, म्हणून रूपज्ञानक्रियेचेंही चक्षु हें करण आहे, असें अनुमान आपण करतों.

—मानीत असशील—**तथापि**—तरी—**महाबाहो**—हे पराक्रमी अर्जुना !—**एवं** —अशा रीतीनें—**शोचितुं**—शोक करण्यास—**न अर्हसि**—तूं योग्य नाहीस. २६.

**आत्मनोऽनित्यत्वमभ्युपगम्येदमुच्यते—अथ चैनमिति । अथ चेत्यभ्युपगमार्थः । एनं प्रकृतमात्मानं नित्यजातं लोकप्रसिद्ध्या प्रत्यनेकशरीरोपात्ति जातो जात इति मन्यसे । तथा प्रतितद्विनाशं नित्यं वा मन्यसे मृतं मृतो मृत इति । तथाऽपि तथा-भाविन्यप्यात्मनि त्वं महाबाहो नैवं शोचितुमर्हसि जन्मवतो जन्म नाशवतो नाशश्चे-त्येताववश्यंभाविनाविति ॥ २६ ॥**

**भाष्यार्थ—आत्मनः अनित्यत्वं अभ्युपगम्य ‘अथ चैनं०’ इति इदं उच्यते**—आत्म्याच्या अनित्यत्वाचा स्वीकार करून ‘अथ चैनं०’ या श्लोकानें असें म्हटलें जातें.—**अथ च इति अभ्युपगमार्थः**—‘अथ च’ हे दोन निपात अर्जुनाचा अभ्युपगम व्यक्त करण्यासाठी आहे. [आत्म्याचें यथार्थ स्वरूप ऐकूनही त्याविषयीं पूर्ण निश्चय झालेला नसल्यामुळे चार्वाक किंवा बौद्ध यांच्या मताचा अंगीकार अर्जुनानें केला असावा, अशी शंका येणे साहजिक आहे. ती व्यक्त करण्यासाठी हे दोन निपात -अव्ययें आहेत. तूं जरी क्षणभर असे मानीत असलास, असे म्हणजे कसे ?]—**एनं प्रकृतं आत्मानं नित्यजातं**—या प्रकृत आत्म्याला नित्यजात म्ह०—**लोकप्र-सिद्ध्या प्रति-अनेकशरीरोत्पत्ति जातः जातः इति मन्यसे**—लोकांच्या प्र-सिद्धीप्रमाणें प्रत्येक अनेक शरीरांच्या उत्पत्तीचे वेळीं उत्पन्न झाला, प्रत्येक देहोत्पत्ती-बरोबर आत्मा झाला असे मानीत असलास—**तथा प्रतितद्विनाशं नित्यं वा मृतं मृतः मृतः इति मन्यसे**—त्याचप्रमाणे प्रत्येक शरीराच्या विनाशाबरोबर त्याला नित्य मृत-तो मेला मेला असे मानीत असलास—**तथापि-तथाभाविनि अपि आत्मनि** —तरी सुद्धां-तसा जरी आत्मा असला तरी—**त्वं**—तूं—**हे महाबाहो**—हे आजानुबाहु अर्जुना !—**एवं शोचितुं न अर्हसि**—अशा प्रकारें शोक करण्यास योग्य नाहीस.—**जन्मवतः नाशः च नाशवतः जन्म इति एतौ अवश्यं भाविनौ इति**—कारण जन्मवानाचा नाश व नाशवानाचा जन्म असे हे दोन भाव अवश्य हो-णारे आहेत; म्हणून तूं शोक करण्यास योग्य नाहीस. [प्रत्येक देह उत्पन्न झाला कीं हा अमुक जन्मास आला व प्रत्येक देह मेला की अमुक मेला असें व्यवहारांत म्हणतात. त्या लोकप्रसिद्धीला अनुसरून आत्माच प्रत्येक देहाबरोबर उत्पन्न होतो व प्रत्येक देह-नाशाबरोबर मरतो, असे जरी तूं मानलेंस व तसे मानूनच ‘अहो बत महत्पापं कर्तुं-व्यवसिता वयं’ अ. १ श्लो. ४५ असें म्हटलेंस तरी उत्पन्न होणाऱ्या प्रत्येकाला नाश व नाश पावणाऱ्या प्रत्येकाला पुनः जन्म हे विकार अवश्य होणारे असल्यामुळें तुला असा शोक करणे शोभत नाही.] २६

**जातस्य हि ध्रुवो मृत्युर्ध्रुवं जन्म मृतस्य च ।**
**तस्मादपरिहार्येऽर्थे न त्वं शोचितुमर्हसि ॥ २७ ॥**

**अन्वयार्थ—हि**—कारण—**जातस्य**—उत्पन्न झालेल्या आत्म्याचा—**मृत्युः**—मृत्यु—**ध्रुवः**—निश्चित आहे—**च**—आणि—**मृतस्य**—मेलेल्या आत्म्याचा—**जन्म**—जन्म—**ध्रुवं भवति**—निश्चित आहे—**तस्मात्**—यास्तव—**अपरिहार्ये अर्थे**—या अपरिहार्य टाळतां न येणाऱ्या गोष्टीविषयीं—**त्वं**—तूं—**शोचितुं**—शोक करण्यास—**न अर्हसि**—योग्य नाहींस. २७

**तथा च सति—जातस्येति । जातस्य हि लब्धजन्मनो ध्रुवोऽव्यभिचारी मृत्युर्मरणं ध्रुवं जन्म मृतस्य च तस्मादपरिहार्योऽयं जन्ममरणलक्षणोऽर्थस्तस्मिन्नपरिहार्येऽर्थे न त्वं शोचितुमर्हसि ॥ २७ ॥**

**भाष्यार्थ—तथा च सति 'जातस्य०' इति**—आणि तसें असल्यामुळें 'जातस्य०' या श्लोकानें शोक न करण्याचें दुसरें कारण सांगतात—**जातस्य हि-लब्धजन्मनः**—ज्यानें जन्म घेतला आहे त्याचा—**ध्रुवः-अव्यभिचारी**—ध्रुव म्ह० अगदीं निश्चित-टाळता न येण्यासारखा—**मृत्यु-मरणं**—मृत्यु-मरण आहे.—**च मृतस्य ध्रुवं जन्म**—आणि मृताचें जन्म निश्चित आहे.—**तस्मात् अयं जन्ममरणलक्षणः अर्थः अपरिहार्यः**—म्हणून हा जन्ममरणरूप अर्थ अपरिहार्य आहे, त्याचा परिहार करतां येणें शक्य नाहीं.—**तस्मिन् अपरिहार्ये अर्थे त्वं शोचितुं न अर्हसि**—त्या अपरिहार्य गोष्टीविषयीं तूं शोक करण्यास योग्य नाहींस. [जो जन्माला आला त्याला मरणावांचून गत्यंतर नाहीं. तो कांहीं घटिकांनीं, दिवसांनीं, महिन्यांनीं, वर्षांनीं, युगांनीं, किंवा कल्पांनीं अवश्य नाश पावतोच. त्याचप्रमाणे जो मेला आहे तो आपलें बीज मागें ठेवूनच मेलेला असतो. त्याचा स्थूल आकार जरी नष्ट झाला तरी सूक्ष्म जीवनशक्ति नष्ट होत नाहीं. त्यामुळें त्या बीजापासून योग्य वेळीं पुनः त्याचा जन्म होतो. त्यामुळें जन्मलेल्याचें मरण व मेलेल्याचा पुनः जन्म कोणालाही टाळतां येत नाहीं, यास्तव अशा या अपरिहार्य-न टाळतां येणाऱ्या गोष्टीविषयीं तूं शोक करूं नको. ज्याला आपला कांहीं इलाज नाहीं त्याविषयीं शोक करणे केव्हांही योग्य नव्हे.] २७

## अव्यक्तादीनि भूतानि व्यक्तमध्यानि भारत ।
## अव्यक्तनिधनान्येव तत्र का परिदेवना ॥ २८ ॥

**अन्वयार्थ—हे भारत**—हे अर्जुना!—**भूतानि अव्यक्तादीनि**—भूतें उत्पत्तीच्या पूर्वी अव्यक्त असतात. तीं शरीरेंद्रियरूपानें दिसत नाहींत.—**व्यक्तमध्यानि**—

---

१ रहस्यकार म्हणतात—"गीतेचा खरा सिद्धान्त आत्मा सत्, नित्य, अज, अविकार्य आणि अचिंत्य किंवा निर्गुण आहे, असे प्रथमच सांगितले आहे." ६२२. पण आत्मा नित्य, शुद्ध, बुद्ध, मुक्त, अव्यक्त, अज, अव्यय, अविकार्य आहे, हा गीतेचा सिद्धान्त नसून उपनिषदाचा आहे व गीतेनें त्याचाच अनुवाद केला आहे. गीता ही स्मृति असल्यामुळें तिचा निराळा स्वतंत्र सिद्धान्त संभवतच नाहीं.

उत्पत्तीनंतर मरणापर्यंत जी मध्यावस्था त्यांत शरीरेंद्रियरूपानें तीं व्यक्त असतात.—**अव्यक्तनिधनानि एव**—निधनानंतर–मरणानंतर तीं पुनः अव्यक्त होतात–दिसत नाहींत.—**तत्र**—मग त्याविषयीं—**का परिदेवना**—शोक काय करावयाचा आहे ? २८.

**कार्यकरणसंघातात्मकान्यपि भूतान्युद्दिश्य शोको न युक्तः कर्तुं यतः—अव्यक्तादीनीति । अव्यक्तादीन्यव्यक्तमदर्शनमनुपलब्धिरादिर्येषां भूतानां पुत्रमित्रादिकार्यकरणसंघातात्मकानां तान्यव्यक्तादीनि भूतानि प्रागुत्पत्तेः । उत्पन्नानि च प्राङ्मरणाद्व्यक्तमध्यानि अव्यक्तनिधनान्येव पुनरव्यक्तमदर्शनं निधनं मरणं येषां तान्यव्यक्तनिधनानि । मरणादूर्ध्वमप्यव्यक्ततामेव प्रतिपद्यन्त इत्यर्थः । तथा चोक्तम्— "अदर्शनादापतितः पुनश्चादर्शनं गतः । नासौ तव न तस्य त्वं वृथा का परिदेवना" इति । तत्र का परिदेवना को वा प्रलापोऽदृष्टदृष्टप्रनष्टभ्रान्तिभूतेषु भूतेष्वित्यर्थः ॥ २८ ॥**

**भाष्यार्थ**—( आत्म्याला उद्देशून शोक करणें जसें युक्त नव्हे त्याचप्रमाणें– )—**कार्यकरणसंघातात्मकानि भूतानि उद्दिश्य अपि शोकः कर्तुं न युक्तः**—शरीरइंद्रियसंघातरूप भूतांना उद्देशूनही शोक करणे युक्त नव्हे.—**यतः अव्यक्तादीनि इति**—तें कोणत्या कारणानें हे 'अव्यक्तादीनि०' या श्लोकांत सांगितलें आहे.—**अव्यक्तादीनि**

१ पण गीतारहस्यकार " देह अनित्य म्हणून शोक करणे युक्त नाहीं, याचीच दुसरी म्ह० सांख्यशास्त्राप्रमाणे उपपत्ति सांगतात"—असे या श्लोकास अवतरण देतात; पण ते सर्वथा अयोग्य आहे. कारण वर ' देह अनित्य आहे, म्हणून शोक करणें युक्त नाहीं, ' असा प्रकृत विषयच नाहीं. तर ' आत्मा अव्यक्त, अचिंत्य, अविकार्य वगैरे आहे, म्हणून त्याच्याविषयीं शोक करणे योग्य नव्हे, ' असे प्रकरण चालू आहे. त्याच्याच अनुरोधाने ' आत्मा नित्य नसून अनित्य आहे, असे जरी मानले तरी त्याच्याविषयीं शोक करणे उचित नव्हे. कारण तो उत्पन्न होतो असे मानल्यास त्याचा विनाश अपरिहार्य आहे ' असे म्हणून २६ व २७ या श्लोकांतही आत्म्याविषयीं शोक करणे अयोग्य आहे, हेच सांगितले आहे. अर्थात् ' देह अनित्य म्हणून शोक करणे युक्त नव्हे ' हा प्रस्तुत विषयच नव्हे. त्यामुळे ' त्याचीच दुसरी उपपत्ति सांगतात' हे म्हणणे बरोबर नाहीं. तसेच 'दुसरी म्ह० सांख्यशास्त्राप्रमाणें उपपत्ति सांगतात ' हे म्हणणे अगदींच अयोग्य आहे. कारण भगवान् सांख्य, योग, मीमांसा, वैशेषिक वगैरे दर्शनकारांची मतें सांगावयास प्रवृत्त झाले आहेत की वैदिक सिद्धान्त सांगावयास सज्ज झाले आहेत ? भगवानांना वेद व उपनिषदें प्रमाण की कापिलदर्शन प्रमाण ? भूतें उत्पत्तीपूर्वी अव्यक्त, मध्ये मात्र व्यक्त, मरणानंतरही अव्यक्त, हा सांख्यांचाच सिद्धान्त आहे व वेदान्ताचा नाहीं, याला काय प्रमाण ? रहस्यकारांना 'अव्यक्त'शब्दाने अशा या घोटाळ्यांत घातले असावे. कारण त्यांना ' अव्यक्त ' हा शब्द सांख्यांचा आहे. त्यामुळे गीतेत ( किंवा उपनिषदांतहीं ) ' अव्यक्त ' असा शब्द जेथे जेथे येईल तेथे तेथे तो सांख्यशास्त्रांतून –कापिलदर्शनांतून घेतला, असे आधुनिक आपल्या चिकित्सापद्धतीला अनुसरून समजतात. ही त्यांची चिकित्सा म्ह. प्रायः ' मर्कटचिकित्सा'च असते तो भाग निराळा; गीतेच्या आठव्या अध्यायांत ' अव्यक्तात् व्यक्तयः सर्वाः प्रभवन्ति ' व ' प्रलीयन्ते तत्रैवाव्यक्तसंज्ञके ' असा जो ' अव्यक्त ' शब्द आला आहे तोही सांख्यांचाच आहे, आणि ' एका अव्यक्त

**-अव्यक्तं-अदर्शनं-अनुपलब्धिः आदिः येषां भूतानां-पुत्र-मित्रादि-कार्य-करणसंघातात्मकानां तानि अव्यक्तादीनि भूतानि**—अव्यक्त म्ह० न दिसणें, कोणत्याही इंद्रियानें अनुभव न येणें, याच स्वरूपाचा आदि म्ह० पूर्वावस्था ज्या पुत्र-मित्रादिशरीरेंद्रियसंघातात्मक भूतांची आहे, तीं भूतें अव्यक्तादीनि होत. केव्हां ?—**उत्पत्तेः प्राक्**—उत्पत्तीच्या पूर्वी—**उत्पन्नानि च प्राक् मरणात् व्यक्तमध्यानि**—आणि उत्पन्न झालेली तीं शरीरेंद्रियरूप भूते मरणाच्यापूर्वी-मरेपर्यंत व्यक्तमध्य असतात. त्यांची ती मध्यावस्था व्यक्त-दर्शनास-अनुभवास योग्य असते.—**अव्यक्तनिधनानि एव-पुनः अव्यक्तं-अदर्शनं निधनं-मरणं येषां तानि अव्यक्तनिधनानि**

---

द्रव्यापासूनच पुढे क्रमाक्रमाने सर्व व्यक्त सृष्टि निर्माण होऊन शेवटी म्ह. प्रलयकाली सर्व व्यक्त सृष्टीचा पुन: अव्यक्तांतच लय होतो' गी.र.पृ. ६२२ हा सांख्यांचाच सिद्धान्त आहे, असेंही रहस्यकार म्हणतात, पण तो निव्वळ भ्रम आहे. वेदाने एखादी कल्पना दर्शनकारापासून घेतली ही समजूत वैदिक संप्रदायाला सोडून आहे. भगवान् म्हणतात 'मी हा योग सृष्टीच्या आरंभी सूर्याला सांगितला. व तोच आज तुला सांगत आहें.' ४.१-२ मग त्या वेळीही सांख्य होते का काय ? वेद सृष्टीच्याही पूर्वी ब्रह्मदेवाला स्फुरले, त्या वेळीं सांख्य कोठचे ? कदाचित् उपनिषदें दर्शनानंतर झालीं, असे आधुनिक म्हणतील. पण त्यालाही विशेष प्रमाण नाहीं. शिवाय क्षणभर तसे जरी मानले तरी 'अव्यक्त' हा शब्द सांख्यदर्शनांत प्राधान्याने योजीत नाहीत. रहस्यकार 'सांख्यकारिका' हा सांख्यदर्शनाचा आज उपलब्ध होणारा सर्वांत जुना ग्रंथ म्हणून म्हणतात. पण त्यात तर 'प्रकृति' असा शब्द आहे. (कारिका ३ पहा) अव्यक्त असा शब्द नाहीं. काठकोपनिषदांत मात्र 'महतः परं अव्यक्त, अव्यक्तात् पुरुषः परः' (काठकभाष्यार्थ पृ. ८१ पहा) असा 'अव्यक्त' शब्द आहे. तोच शब्द येथे, आठव्या अध्यायांत व तेराव्या अध्यायांत योजला आहे. अर्थात् तो सांख्यांचा नसून उपनिषदातील आहे. गीतेचा संबंध उपनिषदांशी न जोडतां दर्शनांशी जोडणे हा मोठा प्रमाद आहे. 'सर्वोपनिषदो गावो...दुग्धं गीतामृतं महत्' म्ह० सर्व उपनिषदे या गायी आहेत व त्यांपासून गीतारूपी फार श्रेष्ठ अमृत हेच दूध, श्रीकृष्णरूपी दोहन करणाऱ्या गवळ्यानें काढलें आहे, हे गीतेचे महत्त्व विसरणें म्ह० गीतेच्या खऱ्या अर्थालाच आंचवणे होय. रहस्यकार व इतर आधुनिक चिकित्सक यांची गीतार्थाचा विचार करतांना अशीच शोचनीय अवस्था झाली आहे. असो; दुर्दैव त्यांचें व आमचें ! वैदिक तत्त्वज्ञान पहावयास अवैदिक उपनेत्र लावले म्ह० असेंच अन्यथा दर्शन व्हावयाचें. भाष्यवाचकांनी ही असत्-दृष्टि सोडून अव्यक्त म्ह० अव्याकृतावस्था असेच समजावें. वेदान्ताला सांख्यांची प्रक्रिया घेण्याचें कांहींच कारण नाहीं. उलट सर्व दर्शने वेदान्ताच्या एकेका विशिष्ट भागावरच आपली उपजीविका करीत असतात. वेदान्त म्ह० उपनिषदें. गीता, भागवत इत्यादिकांत 'सांख्य' हा शब्द ज्ञान या अर्थी योजिलेला आहे. सांख्यदर्शनानें 'ज्ञान' या अर्थी उपनिषदांतून योजलेला सांख्यशब्दच आपल्या दर्शनाला लाविला. लोकांना अतिशय आवडणारेच नाव घेऊन नवीन पंथ सुरू करण्याची ही युक्ति नवी नसून जुनीच आहे. पण विचारी लोकांनी नुस्त्या नामसादृश्यावरून आपली विपरीत भावना करून घेऊं नये.

—तीं अव्यक्तनिधनच असतात. म्ह० पुनः ज्यांचें निधन-मरण अव्यक्त-अनुभवास न येणारें असतें तीं अव्यक्तनिधन होत.—**मरणात् ऊर्ध्वं अपि अव्यक्ततां एव प्रतिपद्यन्ते इत्यर्थः**—मरणानंतरही अव्यक्ततेलाच प्राप्त होतात, असा याचा भावार्थ. —**तथा च उक्तं**—आणि तसेंच महाभारतांत स्त्रीपर्वात सांगितलें आहे.—**अदर्शनात् आपतितः**—अव्यक्तापासून आला,—**च पुनः अदर्शनं गतः**—आणि पुनः अदर्शनाला प्राप्त झाला—**असौ तव न त्वं तस्य न**—हा तुझा नव्हे व तूं त्याचा नव्हेस.—**वृथा परिदेवना का**—मग व्यर्थ शोक काय करावा ?—**इति**—असें सांगितलें आहे.—**तत्र परिदेवना का अदृष्ट-दृष्ट-प्रनष्टभ्रान्तिभूतेषु भूतेषु कः वा प्रलापः इत्यर्थः**—त्याविषयीं शोक काय करावा ? पूर्वी अदृष्ट, मध्यें दृष्ट व पुनः अत्यंत नष्ट अशा भ्रांतिभूत भूतांविषयीं प्रलाप काय करावयाचा आहे, असा याचा भावार्थ. [ भूतें म्ह० शरीरेंद्रियांचा समुदाय-प्रत्यक्ष दिसणारीं प्राणिशरीरें. तीं उत्पत्तीच्या पूर्वी उपलब्ध होत नाहीत. म्हणून उत्पत्तीच्या पूर्वीची त्यांची अवस्था अव्यक्त असते. उत्पत्तीपासून मरणापर्यंत जी अवस्था तिला मध्य म्हणतात. ती व्यक्त असते. म्ह० त्यांना व्यावहारिक अस्तित्व असतें. मरणानंतरही जन्माच्या पूर्वी जी अवस्था असते तिलाच ती प्राप्त होतात. तेव्हां पूर्वी अदृष्ट, मध्यें दृष्ट व शेवटीं पुनः सर्वथा नष्ट, याप्रमाणें भ्रांतीचा विषय होणाऱ्या पुत्र-मित्रादि भूतांविषयीं विलाप करण्यांत काय अर्थ आहे ? ] २८

**आश्चर्यवत्पश्यति कश्चिदेनमाश्चर्यवद्वदति तथैव चान्यः ।**
**आश्चर्यवच्चैनमन्यः शृणोति श्रुत्वाप्येनं वेद न चैव कश्चित् २९**

---

१ रहस्यकारांनीही हाच श्लोक टीपेत दिला आहे. पण ते ' अदर्शन ' शब्दाचा अर्थ अभाव समजतात, तो बरोबर नाहीं. अदर्शन ह्म० अभाव नव्हे, अभावापासून भावाची उत्पत्ति होणें शक्य नाही. यास्तव अदर्शन म्ह० अव्यक्तच होय. अदर्शन म्ह० अभाव असें ह्मणण्यापेक्षां अदर्शन म्ह० ' दृष्टी आड होणें ' असें जें त्यांनीच म्हटलें आहे ते कांहीं बरें आहे. कारण या श्लोकांतील अदर्शन म्ह० नुसते दृष्टिआड होणेंही नव्हे, तर अव्यक्तावस्थाच आहे. भूतें अव्यक्तावस्थेंतून आलीं व पुनः अव्यक्तावस्थेंत गेलीं म्ह० ' अव्यक्तादीनि ' व 'अव्यक्तनिधनानि ' च होत. हा वेदान्ताचा उपदेश आहे, सांख्यदर्शनाचा नव्हे, आणि त्यांत ' असल्या या केवल मध्यावस्थेंत दिसणाऱ्या शरीरेंद्रियांविषयीं शोक करणें अनुचित आहे ' असे ह्मटले आहे. म्ह० ही मध्यावस्था मिथ्या आहे. सांख्य मध्यावस्थेला मिथ्या मानीत नाहींत, ते द्वैताला सत्य मानितात. रामानुजाचार्य ' अव्यक्तादीनि ' ह्म० ' अनुपलब्धपूर्वावस्थानि ' व ' अव्यक्तनिधनानि ' ह्म० ' अनुपलब्धउत्तरावस्थानि ' असाच अर्थ करितात. ज्ञानेश्वर महाराजही " जियें समस्तें इयें भूतें । जन्माआदि अमूर्तें । मग पातलीं व्यक्तीतें । जन्मलिया ॥१७४॥ तियें क्षयासि जेथ जाती । तेथ निभ्रांत आने नव्हती । देखें पूर्वस्थितिच येती । आपुलिये ॥ १७५ ॥ " असें म्हणतात. अर्थात् अव्यक्त म्ह० अमूर्त असा अर्थ करितात.

**अन्वयार्थ—कश्चित्**—कोणी एखादा—**आश्चर्यवत्**—आश्चर्याप्रमाणें—**एनं**—या आत्म्याला—**पश्यति**—पाहतो.—**तथा एव च**—तसाच—**अन्यः**—दुसरा कोणी—**आश्चर्यवत्**—आश्चर्यासारखेंच—**वदति**—आत्म्याविषयीं बोलतो.—**अन्यः**—कोणी—**एनं आश्चर्यवत्**—याला आश्चर्याप्रमाणेंच—**शृणोति**—ऐकतो—**कश्चित्**—कोणी तर—**एनं**—याचें—**श्रुत्वा अपि**—श्रवण करूनही—**न वेद एव**—जाणत नाहींच. २९.

**दुर्विज्ञेयोऽयं प्रकृत आत्मा किं त्वामेवैकमुपालभे साधारणे भ्रान्तिनिमित्ते । कथं दुर्विज्ञेयोऽयमात्मेति । आह—आश्चर्यवदिति । आश्चर्यवदाश्चर्यमदृष्टपूर्वमद्भुतमकस्माद् दृश्यमानं तेन तुल्यमाश्चर्यवदाश्चर्यमिवैनमात्मानं पश्यति कश्चित् । आश्चर्यवदेनं वदति तथैव चान्यः । आश्चर्यवच्चैनमन्यः शृणोति । श्रुत्वा दृष्ट्वोक्त्वाऽप्येनं वेद न चैव कश्चित् । अथ वा योऽयमात्मानं पश्यति स आश्चर्यतुल्यो यो वदति यश्च शृणोति सोऽनेकसहस्रेषु कश्चिदेव भवति । अतो दुर्बोध आत्मेत्यभिप्रायः ॥ २९ ॥**

**भाष्यार्थ—**( प्रथम अदृष्ट, मध्ये दृष्ट व शेवटीं पुनः अदृष्ट, अशा स्वरूपाच्या भ्रांतिरूप भूतांविषयीं शोक काय करावयाचा आहे ? असे म्हणून अर्जुनाचा थोडासा उपालंभ-निंदा केल्यासारखे दाखवून आत्मा दुर्विज्ञेय असल्यामुळे एकट्या अर्जुनालाच दोष देण्यांत काय अर्थ आहे, अशा आशयाने भाष्यकार पुढील श्लोकास अवतरण देतात-)—**अयं प्रकृतः आत्मा दुर्विज्ञेयः**—हा प्रकृत आत्मा अतिशय दुर्विज्ञेय आहे. त्याचे ज्ञान होणे फारच कठिण आहे. तेव्हां—**साधारणे भ्रांतिनिमित्ते त्वां एव एकं किं उपालभे**—सर्वसाधारण अशा या भ्रांतीच्या निमित्ताविषयी मी तुझाच एकट्याचा उपालंभ कशाला करूं—तुलाच एकट्याला दोष कशाला देऊं ? अहो पण आत्मा-' अहं-'प्रत्ययाचा विषय होतो, प्रत्येकाला ' मी मी ' असें वाटते. तेव्हां—**अयं आत्मा दुर्विज्ञेयः कथं इति ' आश्चर्यवत्० ' इति आह**—हा आत्मा दुर्विज्ञेय कसा ? तें ' आश्चर्यवत्० ' या श्लोकानें सांगतात. [ अहंप्रत्ययाविशिष्ट आत्मा जरी दृष्ट-प्रत्यक्ष असला तरी केवल आत्मा दुर्विज्ञेय आहे. अशा आशयानें श्रीकृष्ण म्हणतात-]—**आश्चर्यवत् आश्चर्यं-अदृष्टपूर्वं-अद्भुतं-अकस्मात् दृश्यमानं**

---

१ रहस्यकार " सांख्य व वेदान्त या दोन्हीं शास्त्राप्रमाणें शोक करणे जर व्यर्थ ठरतें... तर लोक मृत्यूबद्दल शोक कां करितात ? आत्मस्वरूपाबद्दलचे अज्ञान, हेंच याचें उत्तर होय कारण—" असे या श्लोकास अवतरण देतात. येथें वेदान्ताबरोबर सांख्यांचे घोडें उगीच दामटले आहे. सांख्यशास्त्रांत आत्म्याबद्दल शोक करणें व्यर्थ आहे की सार्थ आहे, याचा विचारच केलेला नाहीं. ते शास्त्र गुणसंख्यान करणारें म्ह० सत्त्वादि गुणांचा व त्यांच्या कार्यांचा विचार करणारे आहे. त्यांत वेदान्तशास्त्राप्रमाणे आत्मानात्मविचारच प्राधान्याने केलेला नसतो. असो; ' रहस्यकार म्हणतात मृत्यूबद्दल शोक करण्याचे कारण आत्म्याचे अज्ञान आहे, हे या श्लोकांत सांगतात ' व आचार्य ह्मणतात-" आत्म्याचे ज्ञान होणें किती कठीण आहे, तें या श्लोकांत सांगितलें आहे. " श्लोकाच्या अर्थाकडे लक्ष देऊन यांतील

**तेन तुल्यं-आश्चर्यवत्-आश्चर्यं इव**—आश्चर्य म्ह० जें पूर्वी न पाहिलेलें-अद्भुत -अकस्मात् पाहिलें जाणारें, त्याच्यासारखें तें आश्चर्यवत् म्ह० आश्चर्याप्रमाणें—**कश्चित् एनं आत्मानं पश्यति**—कोणी या आत्म्याला पाहतो.—**च तथा एव अन्यः एनं आश्चर्यवत् वदति**—आणि तसाच दुसरा या आत्म्याला आश्चर्याप्रमाणें बोलतो.—**च अन्यः एनं आश्चर्यवत् शृणोति**—आणि कोणी याला आश्चर्याप्रमाणें श्रवण करतो.—**च कश्चित् एनं श्रुत्वा दृष्ट्वा उक्त्वा अपि न वेद एव**—आणि कोणी याला श्रवण करून, पाहून व बोलूनही जाणत नाहींच. [ याप्रमाणें आत्म्याचें दर्शन, उपदेश व श्रवण दुर्लभ आहे, त्यामुळे तो दुर्बोध झाला आहे, असे सांगून आत्म्याचा द्रष्टा, श्रोता व वक्ताही दुर्लभ असल्यामुळे तो दुर्लभ झाला आहे, असें सांगतात-]—**अथ वा यः अयं आत्मानं पश्यति सः आश्चर्यतुल्यः**—किंवा जो हा पुरुष आत्म्याला पाहतो तो आश्चर्यासारखा आहे.—**यः वदति च यः शृणोति सः अनेकसहस्रेषु कश्चित् एव भवति**—जो बोलतो व जो ऐकतो तो अनेक सहस्रांमध्यें एखादाच असतो. [ या दोन्ही अर्थांनीं फलितार्थ काय निष्पन्न होतो, तें सांगतात-]—**अतः आत्मा दुर्बोधः इति अभिप्रायः**—यास्तव आत्मा दुर्बोध आहे, असा याचा अभिप्राय आहे. [ या श्लोकाच्या पहिल्या पादांत आत्म्याचें दर्शन दुर्लभ आहे, असें सांगून द्रष्टयाचेंही दुर्लभत्व सांगितलें. दुसऱ्या चरणांत त्याच्याविषयीं बोलणेंही फार कठिण असल्यामुळे त्याचा उपदेशकर्ता दुर्लभ आहे, असें सुचविलें. तिसऱ्या चरणानें त्याचें श्रवण दुर्लभ असल्यामुळे श्रोत्याची दुर्लभता सांगितली आणि चवथ्या चरणानें दर्शन,भाषण, श्रवण जरी संभवलें तरी त्याचा साक्षात्कार अत्यंत आयासानेंच होतो हे सुचविलें आहे. काठक-भाष्यार्थ पृ. ४५ पहा. ] २९

**देही नित्यमवध्योऽयं देहे सर्वस्य भारत ।**
**तस्मात्सर्वाणि भूतानि न त्वं शोचितुमर्हसि ॥३०॥**

**अन्वयार्थ—हे भारत**—हे अर्जुना!—**अयं देही**—हा देहवान् आत्मा—**सर्वस्य देहे**—सर्व प्राण्यांच्या देहांत—**नित्यं अवध्यः**—सर्वदा अवध्य[1] आहे.—**तस्मात्**—म्हणून—**त्वं**—तूं—**सर्वाणि भूतानि**—भीष्मादि कोणत्याच भूताला उद्देशून—**शोचितुं**—शोक करण्यास—**न अर्हसि**—योग्य नाहींस. ३०.

**अथेदानीं प्रकरणार्थमुपसंहरन्ब्रूते—देहीति । देही शरीरी नित्यं सर्वदा सर्वावस्थास्ववध्यो निरवयवत्वान्नित्यत्वाच्च तत्रावध्योऽयं देहे शरीरे सर्वस्य सर्वगतत्वात्स्थाव-**

---

सयुक्तिक अवतरण कोणतें ते वाचकांनींच ठरवावें. या श्लोकाचा मूलभूत मंत्र काठकांत आहे. तोही आत्म्याचें दुर्विज्ञेयत्वच सांगतो. त्यामुळे हा श्लोकही त्याच अर्थी योजणें सयुक्तिक होय.

१ अवध्य म्ह० मारतां न येण्याजोगा, मारण्यास अयोग्य आहे. तो अमर आहे.

**रादिषु स्थितोऽपि सर्वस्य प्राणिजातस्य देहे वध्यमानेऽप्ययं देही न वध्यो यस्मात्तस्मा-द्भीष्मादीनि सर्वाणि भूतान्युद्दिश्य न त्वं शोचितुमर्हसि ३०**

**भाष्यार्थ—अथ**—आत्मा अतिशय दुर्ज्ञेय आहे, असें प्रदर्शित केल्यानंतर—**इदानीं प्रकरणार्थं उपसंहरन् 'देही' इति ब्रूते**—आतां प्रकरणार्थाचा उपसंहार

---

१ आचार्यांच्या भाष्याप्रमाणें आत्मानात्मविवेकरूप प्रकरणाचा येथे उपसंहार केला जात आहे. पण रहस्यकारांच्या मताप्रमाणे आत्मानात्मविवेक अजून पुढे चाललाच आहे. ह्मणून ते या श्लोकाला कांहीच अवतरण देत नाहीत. पण त्यावरील टीपेंत ह्मणतात—" सांख्य किंवा सन्यासमार्गातील तत्त्वज्ञानाप्रमाणे आत्मा हा अमर म्हणून व देह हा स्वभावतःच अनित्य असल्यामुळें कोणी मरो वा मारो त्यांत शोक करण्याचे कारण नाहीं, असे आतां-पर्यंत सिद्ध केले" ६२३ वस्तुतः सांख्य ह्म० ज्ञान. पण रहस्यकारांनी सांख्य ह्म० संन्यास-मार्गातील तत्त्वज्ञान अशी आपली खोटीच समजूत करून घेतली आहे. त्यामुळे त्यांना वारवार धरसोड करावी लागत आहे. सांख्यमार्गातील तत्त्वज्ञानाप्रमाणे मात्र आत्मा अमर आणि योगमार्गातील तत्त्वज्ञानाप्रमाणे तो अमर नव्हे की काय ? दोन्ही मार्गातील तत्त्वज्ञान जर एकच आहे तर ' सांख्यमार्गातील ' हे विशेषण क-शाला? तसेंच 'आत्मा अमर व देह स्वभावतःच अनित्य ह्मणून कोणी मरो वा मारो त्यात शोक करण्याचे कारण नाहीं, असे येथवर सिद्ध केले,' हे रहस्यकाराचे ह्मणणे खरे आहे का ? आह्माला तर आचार्यांच्या भाष्यावरून वरील भगवदुपदेशाचा आशय असा दिसतो—आत्मा नित्य, निर्विकार, अकर्ता व अभोक्ता आहे. यास्तव तो मरतो व मी त्याला मारतो, या समजुतीने शोक करणे उचित नव्हे. तो कोणाला मारीत नाहीं, मार-वीत नाहीं, व स्वतः मरतही नाहीं. आत्म्याहून भिन्न असलेला अनात्मा ह्म० देहादि सर्व जडवर्ग तर मिथ्या आहे. यास्तव विवेकदृष्ट्या आत्मा व अनात्मा यांतील कोणासाठीच शोक करावयास नको. वाचकांनी ' कोणी मरो वा मारो ' इत्यादि वाक्यार्शी या आश-याची तुलना करून त्यांतील ग्राह्य अर्थ कोणता ते ठरवावे. रहस्यकार पुढे म्हणतात " पण एवढ्यावरून कोणी कोणाला मारले तर त्यांत 'पाप' नाही, असे जर कोणी अनुमान करील तर ती भयकर चूक होय " ती का बरे ? रहस्यकार याचे असे उत्तर देतात—" देह जरी अनित्य असला तरी आत्म्यानें कायमचे कल्याण किंवा मोक्ष संपादन करण्यास देह हेंच काय ते एक साधन असल्यामुळें आत्महत्या करणे किंवा योग्य कारणाखेरीज दुसऱ्यास मारणे ही दोन्ही शास्त्राप्रमाणे घोर पातकेंच होत. " पण आत्मा जर मरत नाहीं व देह विनाश पावणाराच आहे तर कोणी कोणाला मारले म्हणून काय झालें ? फार तर जो देह ' आत्म्याचे कायमचे कल्याण किंवा मोक्ष संपादन ' करणार असेल त्याला तेवढे मारू नये. पण लक्षावधि देहांतील एखादा देहच तसा असतो. तेव्हां इतर देहांना मारण्यांत घोर पातक का लागावे ? तथापि ते लागतेच असे समजून रहस्यकार म्हणतात " म्हणून मेल्या-च्या शोक करणे, जरी योग्य नाही तरी एकानें दुसऱ्याला का मारावें, याचे दुसरें कांहीं तरी सबळ कारण सांगणें जरूर आहे. यालाच धर्माधर्मविवेक हे नाव असून गीतेंतील खरा प्रतिपाद्यविषयही तोच आहे." गी. र. पृ. ६२३, एकूण' एकाने दुसऱ्याला कां मारावें याचे दुसरे ( म्ह० आत्मा अमर आहे व देह अनित्य आहे, या एका कारणाहून दुसरें ) कारण'

करणारे भगवान् 'देही नित्यं०' या श्लोकांत म्हणतात.—**देही-शरीरी**—देही-शरीरवान् आत्मा—**नित्यं-सर्वावस्थासु**—नित्य म्ह० सर्व अवस्थांमध्ये—**अवध्यः**—वध न पावणारा-वधाला अयोग्य आहे.—**निरवयवत्वात् च नित्यत्वात्**—कारण तो निरवयव आहे व नित्य आहे.—**अयं तत्र सर्वस्य देहे-शरीरे-स्थावरादिषु स्थितः अपि अवध्यः**—हा त्या सर्वांच्या देहांत-शरीरांत-स्थावरादिकांमध्यें स्थित असूनही अवध्य आहे.—**यस्मात् सर्वस्य प्राणिजातस्य देहे वध्यमाने अपि**—ज्याअर्थी सर्व प्राणिवर्गाचे शरीर जरी मारले गेले तरी—**अयं देही वध्यः न**—हा देही-आत्मा वध्य-मारण्यास योग्य नाहीं—**तस्मात् भीष्मादीनि सर्वाणि भूतानि उद्दिश्य त्वं शोचितुं न अर्हसि**—त्याअर्थी भीष्मादि सर्व भूतांस उद्देशून तूं शोक करण्यास योग्य नाहीस. [ आत्मा नित्य व निरवयव असल्यामुळे कोणत्याही अवस्थेत अवध्यच आहे. तो सर्वव्यापी असल्यामुळे स्थावरादि सर्व प्राण्यांच्या शरीरांत जरी असला तरी अवध्य आहे. सर्व प्राण्यांचीं शरीरें जरी मारलीं जात असलीं तरी हा आत्मा त्यांबरोबर वधास पात्र होत नाहीं. यास्तव भीष्मादि कोणत्याच प्राण्याला उद्देशून शोक करणे तुला योग्य नाही. ११ व्या श्लोकापासून या श्लोकापर्यंत जे आत्मज्ञान सांगितलें आहे त्याला सांख्य म्हणतात. ते ज्याना साक्षात् झालेले असते त्यांना सांख्य-ज्ञानी संन्यासी म्हणतात. ते ज्ञानयोगाचे अधिकारी होत. ] ३०

**स्वधर्ममपि चावेक्ष्य न विकंपितुमर्हसि ।**
**धर्म्याद्धि युद्धाच्छ्रेयोऽन्यत्क्षत्रियस्य न विद्यते ॥३१॥**

---

सांगण्यासाठीं गीता आहे, 'एकाने दुसऱ्याला का मारावे, ते सांगणे हाच धर्माधर्मविवेक, गीतेतील खरा प्रतिपाद्य विषय हाच.' अन्यत्रही प्रस्तावना पृ. ६, ७ पृ. २७ इत्यादि ठिकाणीं 'गीतेचा प्रतिपाद्य विषय प्रवृत्तिपर आहे. गीतेचा मुख्य विषय कर्मयोग असून बाकी सर्व तत्सिद्धयर्थ आहे.' असा वारवार उल्लेख केला आहे. आचार्य म्हणतात "शोक, मोह व त्याचे कारण 'अहं-मम-' भाव घालवून सर्व संसारबंधातून मुक्त करण्यासाठीं गीताशास्त्र आहे. संसारांत प्रवृत्त करण्यासाठीं नाहीं. आत्मज्ञान व त्याचे उपाय म्ह० सांख्य व योग हे याचें प्रतिपाद्य आहे." यांतील युक्तायुक्ततेचा विचार वाचकांनीच करावा.

१ 'तस्मात्' हा शब्द प्रकृत विषयाचा उपसंहार करण्यासाठीं योजलेला असतो. गीतेनेच या शब्दाने प्रकरणार्थाचा उपसंहार अनेक ठिकाणीं केला आहे व आचार्यांनी तो स्पष्ट दाखविला आहे. अ. २ श्लो. २५ येथें पहिला उपसंहार व येथे दुसरा उपसंहार केला आहे. 'तस्मात्-' शब्दाने पुढेही असेच विषयोपसंहार केलेले आहेत. ते आम्ही तेथल्या तेथें दाखवूच, तूर्त ही दोन उदाहरणे वाचकांनी लक्षांत ठेवावीं; रहस्यकारांनी पृष्ठ २१ वर आचार्यांची सांप्रदायिकवृष्टि त्याज्य ठरवून आचार्यांना जणु काय उपक्रमोपसंहारादि षड्विध तात्पर्यबोधक लिंगांची माहितीच नाही, असें आपल्या वाचकांना भासविण्यासाठीं जे उपक्रमोपसंहारादिकांचें चुकीचें वर्णन केलें आहे तें भ्रामक आहे. गी. भा. पृ. ३७-४१ पहा.

**अन्वयार्थ—च**—शिवाय—**स्वधर्मं**—आपल्या धर्माला—**अवेक्ष्य अपि**—पाहूनही-स्वधर्माकडे दृष्टि देऊनही—**विकम्पितुं**—त्यापासून ढळण्यास—**न अर्हसि**—तूं योग्य नाहींस. स्वधर्मापासून च्युत होणे तुला उचित नाहीं.—**हि**—कारण—**क्षत्रियस्य**—क्षत्रियाला—**धर्म्यात्**—धर्माला सोडून नसलेल्या-धर्मरूप—**युद्धात्**—युद्धाहून—**अन्यत्**—दुसरें कांहीं—**श्रेयः**—श्रेयस्कर—**न विद्यते**—नाहीं. ३१.

**इह परमार्थतत्त्वापेक्षायां शोको मोहो वा न संभवतीत्युक्तं, न केवलं परमार्थतत्त्वापेक्षायामेव किंतु—स्वधर्ममिति । स्वधर्ममपि स्वो धर्मः क्षत्रियस्य युद्धं तमप्यवेक्ष्य त्वं न विकम्पितुं प्रचलितुं नार्हसि स्वाभाविकाद्धर्मादात्मस्वाभाव्यादित्यभिप्रायः। तच्च युद्धं पृथिवीजयद्वारेण धर्मार्थं प्रजारक्षणार्थं चेति धर्मादनपेतं परं धर्म्यं तस्माद्धर्म्याद्युद्धाच्छ्रेयोऽन्यत्क्षत्रियस्य न विद्यते हि यस्मात् ॥ ३१ ॥**

**भाष्यार्थ—इह परमार्थतत्त्वापेक्षायां शोकः मोहः वा न संभवति इति उक्तं**—पूर्वश्लोकांत परमार्थतत्त्वाची अपेक्षा केली असतां-परमार्थतत्त्वाकडे दृष्टि दिली असतां शोक किंवा मोह संभवत नाहीं, असें सांगितलें, पण—**परमार्थतत्त्वापेक्षायां एव केवलं न किंतु ' स्वधर्मं० ' इति**—परमार्थतत्त्वाची अपेक्षा केली असतांच केवल नव्हे तर स्वधर्माकडे पाहूनही शोक-मोह संभवत नाहींत, असें 'स्वधर्मं०' या श्लोकांत सांगतात—**स्वधर्मं-क्षत्रियस्य स्वः धर्मः-युद्धं**—स्वधर्माला-क्षत्रियाचा स्वकीय धर्म-युद्ध—**तं अपि अवेक्ष्य**—त्या स्वकीय धर्मालाही पाहून—**त्वं न**

---

१ आचार्य पुढील श्लोकास हें असें अवतरण देतात. पण रहस्यकारांची सांख्यमार्गाप्रमाणे दुसऱ्याना मारण्याची उपपत्ति अद्यापि संपलेली नसल्यामुळे (गी. र. पृ ६६ पहा) ते असें अवतरण देतात. "सांख्यमार्गासहा संमत असलेल्या चातुर्वर्ण्यव्यवस्थेप्रमाणे लढाई करणें हें क्षत्रियाचें कर्तव्य असल्यामुळे मेल्याचा किंवा मारल्याचा तूं शोक करूं नको, इतकेंच नव्हे तर लढाईंत मरणें किंवा मारणे या दोन्ही गोष्टी क्षात्रधर्माप्रमाणे तुला प्राप्तच आहेत असें भगवान् सांगतात–" यांतील 'सांख्यमार्गासही संमत असलेल्या०' इत्यादि हें सर्व कशासाठीं म्हटलें आहे, तें कांहीं कळत नाहीं. कदाचित् 'अर्जुनाच्या मनाचा कल सन्यासमार्गाकडे वळला होता म्हणून त्याच मार्गांतील तत्त्वज्ञानानें अर्जुनाची चूक ' दाखविण्यासाठीं हें असेल. पण सांख्यमार्गास चातुर्वर्ण्य मिथ्या वाटतें. 'न वर्णा न वर्णाश्रमाचारधर्माः' असा त्याचा सिद्धान्त आहे.सांख्य 'आत्मवत्सर्वभूते' पाहतात.'सर्वभूतहिते रत' असतात. सर्व भूतांस अभय देतात. त्यामुळे चातुर्वर्ण्यव्यवस्थेप्रमाणे युद्ध हा जरी क्षात्रधर्म असला तरी ज्ञाननिष्ठाना तो संमत आहे, हें म्हणणें चिन्त्य आहे. वास्तव या पुढील ८ श्लोकांत 'सांख्यमार्गाप्रमाणे युद्धाची उपपत्ति सांगितली आहे,' अशी कल्पना न करितां आचार्य म्हणतात त्याचप्रमाणें 'स्वधर्माच्या दृष्टीनेंही शोक करणें उचित नाहीं, तर शोक न करितां युद्ध करणेंच उचित आहे' हे दाखविण्यासाठींच पुढील श्लोक आहेत, असें मानणे अधिक सयुक्तिक होय.

**विकंपितुं-प्रचलितुं न अर्हसि**—तूं विकंपित[1] होण्यास-त्यापासून ढळण्यास योग्य नाहींस ( कोठून ? )—**स्वाभाविकात् धर्मात्**—स्वाभाविक धर्मापासून ढळण्यास योग्य नाहींस. ( पण स्वाभाविक म्ह० अशास्त्रीय असाच मुख्य अर्थ आहे. तेव्हां अशास्त्रीय धर्मापासून, असा त्याचा अर्थ कोणी मानील म्हणून म्हणतात- )—**आत्मस्वाभाव्यात् इति अभिप्रायः**—आपल्या म्ह० स्वतःच्या-येथें अर्जुनाच्या-स्वाभाव्यात् म्ह० क्षत्रियस्वभावप्रयुक्त वर्णाश्रमोचित कर्मापासून असा प्रचलित होण्यास तूं योग्य नाहींस. वर्णाश्रमोचित कर्म सोडणें, तुला योग्य नाहीं, असा याचा अभिप्राय. ( धर्मासाठीं किंवा प्रजेचें परिपालन करण्यासाठीं ते युद्ध सोडण्यास कोणती हरकत आहे ? उत्तर- )—**च तत् युद्धं पृथिवीजयद्वारेण धर्मार्थं प्रजारक्षणार्थं च**—आणि तें युद्ध पृथिवीला जिंकणें, या कर्माच्या द्वारा धर्मासाठीं व प्रजारक्षणासाठीं आहे. —**इति धर्मात् अनपेतं-परं धर्म्यं**—त्यामुळें तें धर्माहून दूर असलेलें नाहीं.धर्माला सोडून नाहीं.तर परम धर्म्य आहे—**तस्मात् धर्म्यात् युद्धात् अन्यत् श्रेयः क्षत्रियस्य यस्मात् न विद्यते**—त्या धर्माला धरून असलेल्या युद्धाहून दुसरें कांहींही श्रेयःसाधन क्षत्रियाला ज्याअर्थी नाहीं त्याअर्थी युद्ध सोडणें सर्वथा अनुचित आहे. [ क्षत्रियाला युद्धाहून अधिक श्रेयस्कर असें दुसरें कांहीं नाहीं. गीतेंत स्वधर्मशब्दानें वर्णाश्रमोचित कर्मच भगवानांना इष्ट आहे, हें ' क्षत्रियाला युद्धच श्रेयस्कर आहे ' यावरून ठरत आहे. यास्तव अ. ३ श्लो. ३५ व अ. १८ श्लो. ४७ येथील 'स्वधर्म-' शब्दाचा अर्थ जे आपल्या मनाप्रमाणें ' पत्करलेलें कर्म-धंदा' वगैरे करितात, ते शास्त्रार्थ न समजतां कसा तरी अर्थ करितात, असें म्हणणें भाग आहे. पोटासाठीं-व्यवहारासाठीं पत्करलेला धंदा किंवा कर्म हा धर्म केव्हाही होऊं शकत नाहीं. तर शास्त्रविहित वर्णाश्रमोचित कर्मच स्वधर्म होय. येथून पुढील आठ श्लोकांत भगवानांनी शोकमोह न करण्याचें दुसरें प्रासंगिक कारण सांगितलें आहे. त्याचा वरील सांख्याशी कांही संबंध नाहीं, हें ' स्वधर्माकडे पाहूनही ' यांतील ' ही-अपि-' शब्दावरूनच स्पष्ट होत आहे. एखादा विषय चालू असतां त्या प्रसंगानें जें कांहीं दुसरें आठवतें त्याला प्रासंगिक म्हणतात. आत्मा नित्य अवध्य आहे, म्हणून तुला शोक करावयास नको, हें सांगत

---

१ 'न विकंपितुं अर्हसि' याचा अर्थ रहस्यकार 'कचरणें तुला योग्य नाहीं' असा करितात. तो जरी सरळ असला तरी प्रकरणाला धरून नाहीं.कारण अर्जुन कचरला नव्हता.परावृत्त झाला होता. २ 'धर्म्यात्' याचा अर्थ त्यांनीं एकदा 'धर्मोचित' (श्लोक ३१) व दुसऱ्या वेळीं 'धर्माला अनुकूल ' (श्लो. ३३) असा केला आहे.पण त्यापेक्षां 'धर्मात् अनपेतं धर्म्यं' या व्युत्पत्तीप्रमाणें ' धर्माला सोडून नसलेलें युद्ध ' हा अर्थ अधिक चांगला. कारण अर्जुनाला ' युद्ध तुझ्या धर्माला उचित किंवा अनुकूल आहे, ' असे सांगण्यापेक्षां 'तें धर्माला सोडून नाहीं' असेंच यावेळीं त्याला सांगण्याची अधिक आवश्यकता होती. कारण तो युद्धाला घोरकर्म समजत होता. त्यापासून आपल्याला पाप लागेल, अशी त्याची समजूत झाली होती. त्यामुळें क्षत्रियांचें युद्ध धर्म्य आहे, धर्माला सोडून नाहीं, असेंच त्याला सांगणें अवश्य होतें.

असतांना भगवानांस स्वधर्माकडे दृष्टि देऊनही शोक-मोह करणें व स्वधर्मरूप युद्ध सोडणें अनुचित वाटलें; म्हणून सांख्यबुद्धि सांगून होतांच योगबुद्धीला आरंभ करण्यापूर्वी त्यांनीं हा लौकिक न्याय सांगण्यास आरंभ केला आहे, हेंच वाचकांनीं येथें ध्यानांत ठेवावें. अर्थात् हे ३१-३८ श्लोकही सांख्यबुद्धीचेंच प्रतिपादन करीत आहेत, असें जे समजतात, त्यांना गीतार्थ बरोबर कळला नाही, असें कष्टानें म्हणावें लागतें. ] ३२.

---

१ रहस्यकार ३१ व्या श्लोकावरील टीपेंत म्हणतात—" स्वधर्माची ही उपपत्ति पुढेंही दोनदा ३.३५; १८.४७ आली आहे." पण ही स्वधर्माची उपपत्ति कशी ? त्यापेक्षां स्वधर्म-शब्दाचा उल्लेख पुढेंही दोनदा आला आहे, असें म्हणणें अधिक सयुक्तिक झालें असतें. 'स्वधर्माच्या दृष्टीनेंही युद्ध सोडणें तुला उचित नाहीं.' ही युद्ध न सोडण्याविषयीं उपपत्ति होऊं शकेल. पण 'त्याहीपेक्षां त्याविषयी आणखी एक कारण सांगतात,' असे म्हणणें अधिक सयुक्तिक होय. तिसऱ्या व अठराव्या अध्यायातही परधर्माहून स्वधर्म अधिक श्रेयस्कर आहे, असे सांगितले आहे; व परधर्माहून स्वधर्म अधिक हितकर कसा याविषयीं उपपत्ति सांगितली आहे. पण संन्यासमार्गी म्ह० वस्तुतः अद्वैती टीकाकारांवर वेळीं अवेळीं घसरणारे रहस्यकार इतकी सूक्ष्मदृष्टि ठेवतात कशाला ? असो. त्याच टीपेंत ते पुनः म्हणतात—" संन्यास किंवा सांख्य मार्गाप्रमाणे कर्मसन्यासरूपी चतुर्थाश्रम ही जरी शेवटची पायरी असली तरी तत्पूर्वी ब्राह्मणानें ब्राह्मणधर्म व क्षत्रियानें क्षत्रियधर्म चातुर्वर्ण्यव्यवस्थेप्रमाणे पाळून गृहस्थाश्रम पुरा केला पाहिजे,असे मन्वादि सर्व स्मृतिकारांचे सांगणे असल्यामुळे गृहस्थाश्रमी अर्जुनास युद्ध करणे भाग आहे, असे या पुढील श्लोकाचे तात्पर्य आहे." ६२४ रहस्यकार 'संन्यास किंवा सांख्य' व 'सांख्य किंवा सन्यासमार्ग' असे वारवार म्हणत असतात,हें वाचकांनीं अवश्य लक्षात ठेवावें. ते सन्यास किंवा सांख्य हा मार्ग योगाइतकाच प्राचीन म्हणतात. पण पुनः शंकराचार्यांच्या पूर्वी गीतेवर सन्यासमार्गी टीका होती की नाहीं, याबद्दल शंका प्रदर्शित करितात. ( पृ. १४ ) आचार्यांच्या भाष्यावरून आचार्यांपूर्वी गीतेवर ज्ञानकर्मसमुच्चयपर टीका होती, एवढे मात्र रहस्यकाराना कळते पण त्याच भाष्यातील समुच्चयवाद्याच्या पूर्वपक्षावरून गीतेवर एखादी तरी सन्यासपर टीका होती की नाहीं, याचा निश्चय करवत नाहीं, हें केवढें आश्चर्य आहे ! आचार्य आपल्या भाष्यांत ' अनेकैः विवृतपदपदार्थ० ' इत्यादि (पृ. ६ पहा) स्पष्ट म्हणत असले तरी रहस्यकार आचार्यांपूर्वी 'संन्यासपर टीका असल्यास ती सध्यां उपलब्ध नाही, म्हणून गीतेचें प्रवृत्तिपर रूप काढून टाकून तिला निवृत्तिपर सांप्रदायिक रूप देण्यास शांकरभाष्यापासून आरंभ झाला असे म्हटलें पाहिजे, ' ( पृ. १४ ) असें म्हणतात. पण सांख्य किंवा सन्यासमार्ग सृष्टीच्या आरंभापासून सुरू झाला व हल्लीची गीताही शंकरभाष्याच्या पांचशें वर्षांपूर्वी झाली. तरी हजार-पंधराशें वर्षांत तिला सांप्रदायिक रूप देणारे दुसरे कोणी भेटले नाहीत. हजार वर्षांनंतर शंकराचार्य भेटले. तोंवर ती बिचारी संप्रदायरहित होती ! कोण ही विचित्र 'चिकित्सा' ! असो; वरील उताऱ्यांतील कल्पना अगदीं अयोग्य आहे. कर्मसंन्यासरूपी चतुर्थाश्रम हा सांख्यमार्गाप्रमाणेंच शेवटची पायरी नसून वैदिकसंप्रदायाप्रमाणें ही शेवटची पायरी आहे. ' न्यास एवात्यरेचयत् ' ' न्यासं एषां तपसां अतिरिक्तं आहुः' (तै. आ. प्र. १० सार्थ नारायण पृ. ११९ पहा.) वर्ण व आश्रम अवैदिक नाहीत. त्यांना केवल स्मार्त म्हणणें हा अन्याय आहे. स्मृतींना स्वतंत्र प्रामाण्य

**यदृच्छया चोपपन्नं स्वर्गद्वारमपावृतम् ।**
**सुखिनः क्षत्रियाः पार्थ लभन्ते युद्धमीदृशम् ॥३२॥**

**अन्वयार्थ—च हे पार्थ**—आणि हे अर्जुना !—**यदृच्छया**—न मागतां—**उपपन्नं**—प्राप्त झालेलें—**अपावृतं**—उघडलेलें—**स्वर्गद्वारं**—स्वर्गाचें द्वारच—**ईदृशं**—अशा प्रकारचें हें—**युद्धं**—युद्ध—**सुखिनः क्षत्रियाः लभन्ते**—मोठ्या भाग्यशाली क्षत्रियांना प्राप्त होतें. ३२.

**कुतश्च तद्युद्धं कर्तव्यमिति । उच्यते—यदृच्छयेति । यदृच्छया चाप्रार्थितयोपपन्नमागतं स्वर्गद्वारमपावृतमुद्घाटितं ये तदीदृशं युद्धं लभन्ते क्षत्रियाः हे पार्थ किं न सुखिनस्ते ॥ ३२ ॥**

**भाष्यार्थ**—( युद्धांत गुरु-आप्त इत्यादि अनेक प्राण्यांची हिंसा होणार व हिंसा अहिंसाशास्त्राच्या विरुद्ध आहे, म्हणून ती करणें उचित नव्हे, अशी शंका घेऊन सांगतात—)—**'यदृच्छया०' इति तत् युद्धं कुतः च कर्तव्यं इति उच्यते**—'यदृच्छया०' या श्लोकानें तें युद्ध आणखी कोणत्या कारणानें करावें तें सांगतात—**यदृच्छया-अप्रार्थितया उपपन्नं-आगतं**—यदृच्छेनें-प्रार्थना केल्यावांचून प्राप्त झालेलें—**स्वर्गद्वारं**—स्वर्गाचें दार (तें कसें ?)—**अपावृतं-उद्घाटितं**—उघडलेलें स्वर्गद्वारच—**तत् ईदृशं युद्धं ये क्षत्रियाः लभन्ते**—तें अशाप्रकारचें युद्ध ज्या क्षत्रियांना न मागतां प्राप्त होतें—**हे पार्थ**—हे पार्था,—**ते सुखिनः न किं**—ते सुखी-मोठे भाग्यवान् नव्हेत का? [युद्धांत हिंसा जरी अपरिहार्य असली तरी ती अग्नीषोमीय हिंसेप्रमाणें-यज्ञांतील पशुवधाप्रमाणें

नाहीं. श्रुतींत आश्रमांचा समुच्चय व विकल्पही सांगितला आहे. त्यामुळें प्रत्येक मनुष्यानें गृहस्थ झालेच पाहिजे, असे म्हणतां येत नाहीं. 'ज्या दिवशीं पूर्ण विरक्ति बाणेल त्याच दिवशीं संन्यास करावा, ब्रह्मचर्यापासूनच प्रव्रजन करावें, किंवा गृहस्थाश्रमांतून व वानप्रस्थाश्रमांतून संन्यस्त व्हावें,' असें श्रुतिविधान आहे. जाबालोप० ख. ४ बृहदारण्यकभाष्यार्थ अ. ४ पृ. ३३८ पहा. त्या विरुद्ध स्मृतींचे विधान असणें केव्हांही शक्य नाहीं. 'गृहस्थाश्रमी अर्जुनास युद्ध करणें भाग आहे.' एवढें जर रहस्यकारांस मान्य आहे तर त्याच न्यायानें गृहस्थाला विहित असलेला कर्मयोगच करण्याविषयीं त्याला भगवान सांगत आहेत, हे कां मान्य नसावें ? " कर्मयोग ज्ञानोत्तरच विहित आहे, अर्जुन ज्ञानी होता, 'तूं कर्मच कर' इत्यादि वचनें पोकळ अर्थवाद मानून सोडून देतां येत नाहींत," वगैरे वारंवार जें म्हटलें आहे, ते कां ? अर्जुन गृहस्थाश्रमी व क्षत्रिय असल्यामुळें भैक्ष्याचा अधिकारी नव्हता, त्याची चित्तशुद्धि व्हावयाची होती, म्हणून त्याला कर्मयोगच करण्याविषयीं सांगितलें आहे, असें जर रहस्यकारांनीं म्हटलें असतें तर कांहींच वाद उरला नसता व वेदान्तशास्त्राशींही विरोध आला नसता. अद्वैत वेदान्तशास्त्र व संन्यासमार्ग हे तत्त्वतः दोन भेदच नाहींत. पण रहस्यकारांनीं सांख्य किंवा संन्यासमार्ग व वेदान्तशास्त्र यांचा वृथा भेद मानून गीतारहस्याची टोलेजंग इमारत पायावांचून उभारली आहे.

शास्त्रविहित आहे; व सामान्यशास्त्राहून विशेषशास्त्र प्रबळ असतें, असा नियम आहे. शिवाय या यज्ञयागादिकांचें अनुष्ठान करणाऱ्या यजमानांना दीर्घकालानें स्वर्गादि सुख मिळतें. पण युद्ध करणाऱ्या क्षत्रियांना एकदम स्वर्गसुख प्राप्त होतें. यास्तव क्षत्रियानें युद्ध अवश्य करावेंच. ज्यांना या लोकीं व परलोकीं पुढे सुख व्हावयाचें असतें त्यांनाच असल्या स्वधर्मभूत युद्धाची यदृच्छेनें प्राप्ति होते. असले युद्ध म्हणजे उघडलेलें स्वर्गद्वारच होय. यास्तव शोकमोह सोडून तूं तें अवश्य कर.] ३२

**अथ चेत्त्वमिमं धर्म्यं संग्रामं न करिष्यसि ।**
**ततः स्वधर्मं कीर्तिं च हित्वा पापमवाप्स्यसि ॥३३॥**

**अन्वयार्थ**—**अथ**—आतां—**त्वं**—तूं—**इमं धर्म्यं संग्रामं**—या धर्मरूप-विहित संग्रामास—**न करिष्यसि चेत्**—जर न करशील, हे शास्त्रविहित युद्धही जर न करशील,—**ततः**—तर—**स्वधर्मं च कीर्तिं**—स्वधर्म व कीर्ति या दोघानाही,—**हित्वा**—सोडून-या दोघांनाही मुकून—**पापं**—पापाला—**अवाप्स्यसि**—जोडशील -तुला पाप लागेल. ३३.

एवं कर्तव्यताप्राप्तमपि—अथ चेत्त्वमिमं धर्म्यं धर्मादनपेतं सङ्ग्रामं युद्धं न करिष्यसि चेत्ततस्तदकरणात्स्वधर्मं कीर्तिं च महादेवादिसमागमनिमित्तां हित्वा केवलं पापमवाप्स्यसि ॥ ३३ ॥

**भाष्यार्थ**—( स्वधर्मरूप युद्ध श्रद्धेने केल्यास स्वर्गादि महत्फलाची प्राप्ति होते, असे सांगून ' अथ चेत्० ' या श्लोकांतील अथ शब्दाचा अर्थ सांगतात-)—**अथ चेत् एवं कर्तव्यताप्राप्तं अपि**—याप्रमाणें कर्तव्यता या रूपाने प्राप्त झालेल्याही[१]—**इमं धर्म्यं संग्रामं-धर्मात् अनपेतं युद्धं न करिष्यसि चेत्**—या धर्म्य-धर्माला सोडून नसलेल्या संग्रामास-युद्धास जर न करशील—**ततः-तदकरणात्**—तर मग तें न केल्यामुळे—**स्वधर्मं च महादेवादिसमागमनिमित्तां कीर्तिं हित्वा**—स्वधर्म व महादेव-इंद्र इत्यादिकांशी केलेल्या सामन्यामुळे झालेली कीर्ति, यांस-सोडून-या दोन्ही गोष्टींना मुकून—**केवलं पापं अवाप्स्यसि**—तूं केवल पापाला प्राप्त होशील. [प्राप्त युद्ध न करितां तूं जर समरांगणांतून परत फिरशील तर स्वधर्माला मुकशील, मोठा धनुर्धर, शूर म्हणून झालेली तुझी कीर्ति नाहींशी होईल व तुला पाप लागेल] ३३.

**अकीर्तिं चापि भूतानि कथयिष्यन्ति तेऽव्ययाम् ।**
**संभावितस्य चाकीर्तिर्मरणादतिरिच्यते ॥ ३४ ॥**

---

१ युद्ध शास्त्रविहित आहे, त्याचें मोठें फल मिळतें, याप्रकारें कर्तव्य म्हणून प्राप्त झालेलें युद्ध.

**अन्वयार्थ—भूतानि**—सर्व लोक—**ते**—तुझी—**अव्ययां अकीर्तिं च अपि**—अक्षय अपकीर्तिही—**कथयिष्यन्ति**—सांगतील,—**च**—आणि—**संभावितस्य**—एखाद्या संभावित-मान्य-पुरुषाची—**अकीर्तिः**—अपकीर्ति—**मरणात्**—मरणाहून—**अतिरिच्यते**—अधिक आहे. ३४.

**न केवलं स्वधर्मकीर्तिपरित्यागः— अकीर्तिं चापि भूतानि कथयिष्यन्ति ते तवाव्ययां दीर्घकालाम् । धर्मात्मा शूर इत्येवमादिभिर्गुणैः संभावितस्य चाकीर्तिर्मरणादतिरिच्यते । संभावितस्य चाकीर्तेर्वरं मरणमित्यर्थः ॥ ३४ ॥**

**भाष्यार्थ**—('अकीर्तिं०'इत्यादि श्लोकाचे व्याख्यान-)—**न केवलं स्वधर्मकीर्तिपरित्यागः**—केवल स्वधर्म व कीर्ति यांचाच परित्याग होणार नाहीं-यांचाच नाश होऊन थांबणार नाही, ( क्षत्रिय असूनही युद्ध सोडल्यास तुला पारलौकिक प्रत्यवाय लागून शिवाय शिष्टनिंदारूप ऐहिक प्रत्यवायही लागेल, असे सांगतात-)—**भूतानि ते-तव अव्ययां-दीर्घकालां अकीर्तिं च अपि कथयिष्यति**—तर प्राणी तुझी अव्यय-दीर्घकाल राहणारी अकीर्तिही सांगतील.( 'अहो पण युद्धामध्यें मरण्याचा संभव असतो व मेलें की गेले. तेव्हां मृत्यूला टाळण्यासाठीं व आत्मसंरक्षणासाठीं अकीर्ति झाली तरी ती सहन करणेंच शहाणपणाचे आहे,' म्हणून म्हणशील तर-)—**धर्मात्मा शूरः इति-एवं-आदिभिः गुणैः संभावितस्य च अकीर्तिः मरणात् अतिरिच्यते**—धर्मात्मा, शूर इत्यादि गुणांनीं लोकांत ज्याची मोठी संभावना झालेली असते त्याची अपकीर्ति मरणाहून अधिक आहे.—**संभावितस्य च अकीर्तेः मरणं वरं इत्यर्थः**—संभावित म्ह० मान्य झालेल्या मनुष्याच्या अकीर्तीपेक्षा मरण बरें; अशा पुरुषाची अकीर्ति त्याला मरणाहूनही अधिक दुःसह होते, असा याचा तात्पर्यार्थ आहे. ३४

( आणखीही एका कारणानें तुला युद्ध केलें पाहिजे. असें पुढच्या श्लोकांत सांगतात-)

## भयाद्रणादुपरतं मंस्यन्ते त्वां महारथाः ।
## येषां च त्वं बहुमतो भूत्वा यास्यसि लाघवम् ॥३५॥

**अन्वयार्थ—महारथाः**—दुर्योधनादिक वीर—**त्वां**—तुला—**रणात्**—रणापासून—**भयात्**—भयानें—**उपरतं**—परतला असें—**मंस्यन्ते**—समजतील—**च**—आणि—**येषां**—ज्यांना—**त्वं**—तूं पूर्वी—**बहुमतः** ( अभूः तेषां एव तादृशः ) **भूत्वा**—बहुमत-मोठा शूर-योद्धा खरा-क्षत्रिय म्हणून अतिशय मान्य झाला होतास त्याच भीष्मादिकांस तसा मान्य होऊन—**लाघवं यास्यसि**—लघुभावास-हलकेपणास-साक्षात् तिरस्कारास पात्र होशील. ३५.

**किंच— भयादिति । भयात्कर्णादिभ्यो रणाद्युद्धादुपरतं निवृत्तं मंस्यन्ते चिन्तयिष्यन्ति न कृपयेति त्वां महारथा दुर्योधनप्रभृतयः येषां च त्वं दुर्योधनादीनां बहुमतो बहुभिर्गुणैर्युक्त इत्येवं बहुमतो भूत्वा पुनर्यास्यसि लाघवं लघुभावम् ॥ ३५ ॥**

**भाष्यार्थ—किं च 'भयात्०' इति**—शिवाय—'भयात्०' या श्लोकानें आणखी कारण सांगतात—**कर्णादिभ्यः भयात्**—कर्णादिकांच्या भीतीनें—**रणात्-युद्धात्**—रणापासून-युद्धापासून—**त्वां उपरतं-निवृत्तं**—तूं उपरत-निवृत्त झाला आहेस—**मंस्यन्ते-चिन्तयिष्यन्ति**—असें मानतील-असें चिन्तन करतील—**न कृपया इति**—कृपेनें निवृत्त झालास असें कोणी समजणार नाहीं. ( कोण ? )—**महारथाः दुर्योधनप्रभृतयः**—दुर्योधनादिक महारथ असें मनांत समजतील. (लोक नेहमीं दोषदृष्टि असतात. गुणदृष्टि नसतात. एखाद्याच्या कृतींतील गुणही त्यांना दोष वाटतात. किंबहुना गुणापेक्षां दोषाची कल्पना त्यांच्या मनांत प्रथम येते आणि सामान्य लोकांचीही जर प्रायः स्वभावतःच अशी वृत्ति असते तर दुर्योधनादि शत्रूंची तशी समजूत झाल्यास त्यांत कांहींच आश्चर्य नाहीं. )—**च येषां-दुर्योधनादीनां त्वं बहुमतः-बहुभिः गुणैः युक्तः इत्येवं बहुमतः भूत्वा**—आणि ज्या दुर्योधनादिकांना तूं बहुमत म्ह० हा अनेक गुणांनीं युक्त आहे अशारीतीनें बहुमत होऊन-सन्मान्य होऊन—**पुनः लाघवं-लघुभावं यास्यसि**—पुनरपि लाघवाला-लघुत्वाला-हलकेपणाला प्राप्त होशील. [ तूं प्राण्याची हिंसा होऊं नये, म्हणून दयेने जरी युद्धापासून निवृत्त झालास तरी तुझे दुर्योधनादिक शत्रु ' अरे हा कर्णादिकांना भ्याला ' असे समजून तुझा उपहास करतील. तुला ते तुच्छ लेखितील. यास्तव शत्रूंचा उपहास टाळण्यासाठीं तुला संग्राम अवश्य केला पाहिजे. ] ३५ आणखी एका कारणास्तव तूं युद्धापासून निवृत्त होऊं नकोस असे सांगतात—

अवाच्यवादांश्च बहून्वदिष्यन्ति तवाहिताः ।
निंदन्तस्तव सामर्थ्यं ततो दुःखतरं नु किम् ॥३६॥

**अन्वयार्थ—च**—व—**तव**—तुझ्या—**सामर्थ्यं**—सामर्थ्यास—**निन्दन्तः**—निंदणारे—**तव**—तुझे—**अहिताः**—शत्रु—**बहून् अवाच्यवादान्**—अनेक अवाच्य शब्द—**वदिष्यन्ति**—बोलतील.—**ततः**—त्याहून—**दुःखतरं**—अधिक दुःखकर—**किं नु**—काय बरें ? ३६.

**किंच— अवाच्यवादानिति । अवाच्यवादानवक्तव्यवादांश्च बहूननेकप्रकारान्वदिष्यन्ति तवाहिताः शत्रवो निन्दन्तः कुत्सयन्तस्तव त्वदीयं सामर्थ्यं निवातकवचादियुद्धनिमित्तम् । तस्मात्ततो निन्दाप्राप्तेर्दुःखाद्दुःखतरं नु किम् । ततः कष्टतरं दुःखं नास्तीत्यर्थः ॥ ३६ ॥**

**भाष्यार्थ—किंच 'अवाच्यवादान्०' इति**—' अवाच्यवादान्० ' या श्लोकानें युद्धच करण्याविषयीं आणखी एक कारण सांगतात—**बहून्-अनेकप्रकारान् अवाच्यवादान्-अवक्तव्यवादान्**—अनेक प्रकारचे अवाच्यवाद-बोलूं नयेत तसले शब्द—**तव अहिताः**—तुझे शत्रु—**वदिष्यन्ति**—बोलतील. (काय करीत होत्साते बोलतील ?)—**निवातकवचादियुद्धनिमित्तं तव-त्वदीयं सामर्थ्यं निन्दन्तः**

**—कुत्सयन्तः**—निवातकवचादि असुरांशी युद्ध केल्यामुळें प्रकट झालेल्या तुझ्या सामर्थ्याची निंदा करणारे, असे होत्साते अवाच्य शब्द बोलतील. ( भीष्मद्रोणादिकांना मारल्यामुळे मला होणारें दुःख खरोखरच असह्य होईल, ते माझ्यानें सहन करवणार नाही. त्यापेक्षां माझ्या सामर्थ्याची निंदा मी आनंदानें सहन करूं शकेन, असें म्हणशील तर सांगतों-)—**तस्मात् ततः निन्दाप्राप्तेः दुःखात् दुःखतरं किं नु**—त्या निंदाप्राप्तीमुळें होणाऱ्या दुःखाहून अधिक दुःखकर काय बरें आहे ?—**ततः कष्टतरं दुःखं न अस्ति इत्यर्थः**—त्याहून अधिक कष्टकर असे दुःख नाहीं, असा भावार्थ. ३६ ( अहो पण युद्धांत गुरूंची हिंसा केल्यास मध्यस्थ लोक निंदा करणार, व युद्धापासून निवृत्त झाल्यास शत्रु निंदा करणार, तेव्हां कांहीं केले तरी निंदा होणारच म्हणून म्हणशील तर त्याचें उत्तर पुढील श्लोकांत ऐक— )

**हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं जित्वा वा भोक्ष्यसे महीं ।**
**तस्मादुत्तिष्ठ कौन्तेय युद्धाय कृतनिश्चयः ॥ ३७ ॥**

**अन्वयार्थ—हतः वा**—युद्धांत शत्रूंकडून मारला गेलास तर—**स्वर्गं**—स्वर्गाला—**प्राप्स्यसि**—प्राप्त होशील—**जित्वा वा**—किंवा शत्रूंना तूं जर जिंकलेस, तर—**महीं भोक्ष्यसे**—पृथ्वीचा उपभोग घेशील.—**तस्मात्**—यास्तव—**हे कौन्तेय**—हे कुंतीपुत्रा !—**कृतनिश्चयः**—मी शत्रूंना मारीन किंवा मरेन, असा निश्चय करून—**युद्धाय**—युद्ध करावयास—**उत्तिष्ठ**—ऊठ. ३७.

**युद्धे पुनः क्रियमाणे कर्णादिभिः—हतो वेति । हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं हतः सन्स्वर्गं प्राप्स्यसि जित्वा वा कर्णादीञ्शूरान्भोक्ष्यसे महीम् । उभयथाऽपि तव लाभ एवेत्यभिप्रायः । यत एवं तस्मादुत्तिष्ठ कौन्तेय युद्धाय कृतनिश्चयो जेष्यामि शत्रून्मरिष्यामि वेति निश्चयं कृत्वेत्यर्थः ॥ ३७ ॥**

**भाष्यार्थ—पुनः कर्णादिभिः युद्धे क्रियमाणे ' हतो वा० ' इति**—पण याच्या उलट कर्णादिकांशी युद्ध जर केलेस तर काय होईल ते ' हतो वा० ' या श्लोकानें सांगतात—**हतः वा स्वर्गं प्राप्स्यसि-हतः सन् स्वर्गं प्राप्स्यसि**—मारला गेलास तर स्वर्गाला प्राप्त होशील—**कर्णादीन् शूरान् जित्वा वा महीं भोक्ष्यसे**—व कर्णादि शूरांना जिंकून पृथ्वीचा भोग घेशील—**उभयथा अपि तव लाभः एव इति अभिप्रायः**—जय किंवा पराजय यांतील कांहीं जरी झालें तरी तुझा लाभच आहे. असा आशय म्ह० जयाविषयीं जरी निश्चय नसला तरी लाभाविषयीं संशय नाहीं.—**यतः एवं तस्मात्**—आणि ज्याअर्थी असें आहे त्याअर्थी—**कौन्तेय युद्धाय कृतनिश्चयः उत्तिष्ठ**—हे अर्जुना, युद्धासाठीं कृतनिश्चय करून ऊठ.—**शत्रून् जेष्यामि मरिष्यामि वा इति निश्चयं कृत्वा इत्यर्थः**—शत्रूंना जिंकीन किंवा मरेन असा निश्चय करून ऊठ, असा याचा भावार्थ. ३७ ( अहो पण पाप लागेल या भीतीनें मला युद्धाचा निश्चय करवत नाहीं, म्हणून म्हणशील तर त्याचें उत्तर ऐक— )

**सुखदुःखे समे कृत्वा लाभालाभौ जयाजयौ ।**
**ततो युद्धाय युज्यस्व नैवं पापमवाप्स्यसि ॥ ३८ ॥**

**अन्वयार्थ—सुखदुःखे**—सुख व दुःख यांना—**समे**—तुल्य-एकसारखें—**कृत्वा**—करून-मानून म्ह० सुखाविषयीं आसक्ति-राग व दुःखाविषयीं द्वेष न करतां,—**लाभालाभौ च जयाजयौ समे कृत्वा**—त्याचप्रमाणें लाभ व अलाभ, जय व पराजय यांनाही तुल्य समजून—**ततः**—मग—**युद्धाय**—युद्ध करावयास—**युज्यस्व**—तयार हो.—**एवं**—अशा भावनेनें युद्ध करूं लागलास म्हणजे—**पापं न अवाप्स्यासि**—तुला पाप लागणार नाही. ३८.

**तत्र युद्धं स्वधर्म इत्येवं युध्यमानस्योपदेशमिमं शृणु—सुखदुःखे इति। सुखदुःखे समे तुल्ये कृत्वा रागद्वेषावकृत्वेत्येतत् । तथा लाभालाभौ जयाजयौ च समौ कृत्वा ततो युद्धाय युज्यस्व घटस्व । नैवं युद्धं कुर्वन्पापमवाप्स्यसीत्येष उपदेशः प्रासङ्गिकः ३८**

**भाष्यार्थ—तत्र**—युद्ध हा स्वधर्म असल्यामुळे तें अवश्य केले पाहिजे, इतके ठरलें असतां—**स्वधर्मः इति एवं युद्ध्यमानस्य इमं उपदेशं**—हा स्वधर्म आहे, असें समजून युद्ध करणाऱ्या तुला हा उपदेश आहे तो—**सुखदुःखे० इति शृणु**—'सुखदुःखे०' या श्लोकाने ऐक—**सुखदुःखे समे-तुल्ये कृत्वा**—सुख व दुःख

---

१ पण रहस्यकारांच्या समजुतीप्रमाणे हा ३१-३८ श्लोकापर्यंतचा भागही सांख्यज्ञानच आहे. म्हणून ते या श्लोकास असे अवतरण देतात--"सांख्य ज्ञानाप्रमाणे मारिल्याचा किंवा मेल्याचा शोक करू नये इतकेच नव्हे, तर स्वधर्माप्रमाणे युद्ध करणे हे कर्तव्य होय असें जरी वरील विवेचनाने सिद्ध झाले तरी लढाईत जी हत्या होणार तिचे 'पाप' कर्त्यास लागते की नाही या शकेचे आतां उत्तर सांगतात." पण त्या उत्तरावरून पाप लागते कीं नाही, याचा कांहीच उलगडा होत नाही. युद्ध जर धर्म्य आहे तर त्यापासून पाप लागणारच कसे? धर्म्य कर्मापासून पाप लागणें कधीच शक्य नाही व जर ते लागतें असे म्हटले तर त्याला 'धर्म्य' हे विशेषण देतां येणार नाही. अर्थात् 'लढाईतील हत्येचे पाप कर्त्याला लागतें की नाही,' ही शंकाच येथें अप्रस्तुत आहे. हा स्वधर्म आहे व त्याचे आचरण केलेंच पाहिजे, असे एकदा ठरले म्हणजे मग त्यापासून पाप लागेल ही शंकाच संभवत नाही. यास्तव 'स्वधर्माचरण करीत असतांनाही तुला त्यामुळें बंध कसा प्राप्त होणार नाही, तो बंधक न होता तुझ्या चित्तशुद्धीलाच कसा कारण होईल, तें ऐक' असेंच येथे म्हटले पाहिजे. युद्ध हा स्वधर्म आहे. त्यामुळे त्यापासून आपल्याला पाप लागणार नाही, हे अर्जुनालाही ठाऊक होतें. पण अनिष्ट फल देणारे पाप जरी न लागले तरी इष्ट फल देणारे पुण्य लागेल. त्याचें फल भोगण्यासाठी पुनः जन्म घ्यावा लागेल, अर्थात् असल्या प्रवृत्तिपर धर्मामुळेही आपण संसारबंधांतून मुक्त होणार नाही, आपल्याला निश्चित श्रेय प्राप्त होणार नाही, असें समजून अर्जुन धर्मसमूढचित्त झाला होता. यास्तव स्वधर्माचरणापासून इष्ट फल देणाऱ्या पुण्या-

यांना सम म्ह० तुल्य करून—**रागद्वेषौ अकृत्वा इति एतत्**—राग व द्वेष न करितां, असा याचा भावार्थ.—**तथा लाभालाभौ च जयाजयौ समौ कृत्वा**— त्याचप्रमाणें शत्रूच्या कोशादिकांची प्राप्ति हा लाभ व ती न होणें, हा अलाभ, युद्धानें स्वतः पराभूत न होतां दुसऱ्याला पराभूत करणें हा जय व त्याच्या उलट स्थिति होणें, हा अजय यांना सम करून म्ह० त्याविषयीं राग-द्वेष न करून—**ततः**—मग— **युद्धाय युज्यस्व-घटस्व**—युद्ध करण्यास सज्ज हो.—**एवं युद्धं कुर्वन् पापं न अवाप्स्यसि**—अशा प्रकारें युद्ध करणारा तूं पापाला प्राप्त होणार नाहीस. ( अहो पण या परमार्थदर्शनाच्या प्रकरणांत युद्ध करावयास सांगितलेलें असल्यामुळें हें शास्त्र ज्ञान-कर्मसमुच्चयपर आहे, असें सिद्ध होतें, असें वादी म्हणेल म्हणून आचार्य सांगतात—) —**एषः उपदेशः प्रासंगिकः**—हा उपदेश प्रासंगिक आहे. (क्षत्रिय असलेल्या तुला युद्धच विहित आहे. यास्तव तेच केलें पाहिजे, असा विधीचा अनुवाद करण्याच्या प्रसं-

---

चा संचय न होतां तें धर्माचरण चित्तशुद्धीलाच कसे कारण होईल ते भगवान् अर्जुनाला येथे सांगत आहेत, अशी कल्पना करणेच युक्त आहे. वेदान्तशास्त्रांत पुण्यालाही पाप म्हटलें आहे. कारण पाप जसे अनिष्ट जन्माला कारण होते तसेंच पुण्य इष्ट जन्माला कारण होते. म्हणजे तेही बंधकच. मोक्षाच्या दृष्टीने त्यांची योग्यता सारखीच. याविषयीं 'सर्वे पाप्मानोऽतो निवर्तन्ते ' छां. भाष्यार्थ अ. ८ पृष्ठ ६०० ' इतरस्याप्येवं असंश्लेषः पाते तु ' ब्र. सू. अ. ४ पा. १ सूत्र १४. इत्यादि श्रुति-सूत्र प्रमाण आहे.

१ आचार्य ' हा सर्व उपदेश प्रासंगिक आहे, ' असे म्हणतात. पण रहस्यकारांचें सांख्यज्ञान 'एषा तेऽभिहिता सांख्ये बुद्धिः' येथपर्यंत चालावयाचे असल्यामुळें त्यांना या श्लोकाची व्यवस्था लावतांना बरीच ' लटपट ' करावी लागली आहे. (' लटपट ' हा रहस्यकारांचाच शब्द आम्ही येथें घेतला आहे.) ते म्हणतात ' वस्तुतः पाहतां या उत्तरातील युक्तिवाद कर्मयोगमार्गातला असून त्या मार्गाची येथेंच प्रस्तावना झाली आहे '' गी. र. पृ. ६२५ पण सांख्यज्ञानात कर्मयोगाची प्रस्तावना कां ? व प्रस्तावनेला आरंभ करितांच ' एषा तेऽभिहिता सांख्ये ' हा सांख्यज्ञानाचा उपसंहार कां ? यापेक्षां 'स्वधर्म अपि चावेक्ष्य०' येथून आठ श्लोकांत प्रासगिक उपदेश केला आहे असे मानणे किती सयुक्तिक आहे ? ' अपि ' शब्दावरूनही शोकमोह सोडून स्वधर्मरूप युद्ध करण्याचें दुसरें कारण भगवान् सांगत आहेत, हे उघड होते. या आठ श्लोकांतील अक्षरार्थाकडे जरी पाहिले तरी या श्लोकाचा वरील आत्मानात्मविचाराशीं कांहीं संबध नसून तो लौकिक न्यायाला अनुसरून केलेला उपदेश आहे, हें लक्षांत येतें. 'तूं भिऊन पळालास अशी तुझी अकीर्ति होईल, तुझी निंदा करतील' इत्यादि उपदेश सांख्यज्ञानांतीलही नव्हे व प्रवृत्तिमार्गांतीलही नव्हे. तो केवळ लौकिकदृष्ट्या आहे. ३८ व्या श्लोकांत प्रवृत्ति मार्गाची प्रस्तावना करून ३९ व्या श्लोकांतच सांख्यज्ञानाचा उपसंहार केला आहे, अशी कल्पना करण्यापेक्षां आचार्यांनी म्हटल्याप्रमाणे ' स्वधर्माचरण करीत असतांनाही सुखदुःखादिकांना सम मानून ते केल्याने मोक्षाला प्रतिबध करणारें धर्माधर्मरूप पाप तुला लागणार नाहीं, ' हाही प्रासंगिकच उपदेश मानणे उचित होय. कारण ३१–३८ हें सांख्यप्रकरणही नाहीं व योगप्रकरणही नाही.

गानें हा उपदेश येथें आलेला आहे. गीताशास्त्र युद्धाच्या कर्तव्यतेचें विधान करीत नाहीं, हें वर पृष्ठ ९२ सांगितलेंच आहे. अर्थात् तेवढयावरून समुच्चयसिद्धि होते, असें म्हणतां येत नाही. ) ३८.

**शोकमोहापनयनाय लौकिको न्यायः स्वधर्ममपि चावेक्ष्येत्याद्यैः श्लोकैरुक्तो न तु तात्पर्येण । परमार्थदर्शनं त्विह प्रकृतं तच्चोक्तमुपसंहियत एषा तेऽभिहितेति शास्त्रविषयविभागप्रदर्शनाय । इह हि दर्शिते पुनः शास्त्रविषयविभाग उपरिष्टाज्ज्ञानयोगेन सांख्यानां कर्मयोगेन योगिनामिति निष्ठाद्वयविषयं शास्त्रं सुखं प्रवर्तिष्यते श्रोतारश्च विषयविभागेन सुखं ग्रहीष्यन्तीत्यत आह—एषा त इति ॥**

**भाष्यार्थ—**( 'एषा ते०' या श्लोकाच्या पहिल्या चरणांत सम्यग्दर्शनाचा उपसंहार केला आहे, पण तो तसा कां केला ? 'स्वधर्ममपि०' येथून सांगितलेल्या लौकिक न्यायाचा उपसंहार कां केला नाहीं ? अशी शंका घेऊन आचार्य म्हणतात-)—**स्वधर्मं अपि च अवेक्ष्य इत्याद्यैः श्लोकैः शोकमोहापनयनाय लौकिकः न्यायः उक्तः**—'स्वधर्मं०' इत्यादि श्लोकांनीं शोक व मोह घालविण्यासाठी लौकिक न्याय सांगितला. —**तु तात्पर्येण न**—परंतु तो तात्पर्यानें सांगितलेला नाहीं. [ ज्ञान व कर्म यांच्या समुच्चयामध्यें त्याचे तात्पर्य नाहीं. आपले स्वजन मरतील, भीष्मादिकांचा आपल्या हातून वध होईल, अशा समजुतीमुळे झालेल्या शोक-मोहांना घालविणे भाग होते. कारण शोक व मोह आत्म्याच्या सम्यग्ज्ञानाला प्रतिबंध करीत असतात. यास्तव त्या शोक-मोहांना घालविण्यासाठीं भगवानांनी येथे 'स्वधर्मं०' इत्यादि आठ श्लोकांत लौकिक-न्याय सांगितला आहे. आपला वर्ण व आश्रम यांस विहित असलेल्या धर्माचें अनुष्ठान करणाऱ्या पुरुषाला स्वर्गादि फलाची प्राप्ति होते, व अनुष्ठान न करणाऱ्याला होत नाहीं, हा लौकिकन्याय होय. याला अन्वय-व्यतिरेक न्याय म्हणतात.[1] अनुष्ठान केलें तर फल मिळते, हा अन्वय व ते न केले तर फळही मिळत नाहीं, हा व्यतिरेक. पण हा लोकप्रसिद्ध न्याय जरी सांगितला असला तरी तो तात्पर्यानें येथे सांगितलेला नाहीं. कारण हे चालू प्रकरण त्या लोकप्रसिद्ध न्यायाचे नाहीं. तर मग चालू प्रकरण कोणते आहे ? उत्तर-)—**इह तु परमार्थदर्शनं प्रकृतं**—येथे तर परमार्थदर्शन प्रकृत आहे.—**च तत् उक्तं एषा तेऽभिहिता इति उपसंह्रियते**—आणि प्रतिपादिलेल्या त्या आत्मदर्शनाचा—'एषा ते०'—या श्लोकानें उपसंहार करितात.(कशासाठीं-)—**शास्त्रविषयविभागप्रदर्शनाय**—शास्त्राच्या विषयांचा विभाग प्रदर्शित करण्यासाठीं. ['न त्वेवाहं०' श्लो. १२ येथून परमपुरुषार्थरूप जो आत्मा त्याचें प्रकरण चालू आहे. 'न जायते० ' श्लो. २० इत्यादि श्लोकांनीं त्याचेच उपपादन केले आहे. 'देही नित्यं० ' ३० या श्लोकांत प्रकरणार्थाचा उपसंहार केला व मध्येच लौकिकन्याय सांगितल्यावर आतां पुनः या ३९ व्या श्लोकांत परमार्थदर्शनाचा म्ह० सांख्याचा उपसंहार या गीताशास्त्राच्या विषयाचा विभाग स्पष्टपणे दाखविण्यासाठीं पुनः केला जात आहे. सांख्य-

---

१ तर्कसंग्रहसार पृ. ५६ पहा.

निष्ठा व योगनिष्ठा हा त्याचा विभाग आहे. पण तो पुढील प्रतिपादनावरून आपोआप कळण्यासारखा आहे. तो निराळा येथे दाखवावयाचें काय कारण आहे ? उत्तर-]—**हि**—कारण—**इह पुनः शास्त्रविषयविभागे दर्शिते**—येथेंही शास्त्रविषयाचा विभाग दाखविला असतां—**उपरिष्टात्-' ज्ञानयोगेन सांख्यानां कर्मयोगेन योगिनां-' इति निष्ठाद्वयविषयं शास्त्रं सुखं प्रवर्तिष्यते**—पुढें 'ज्ञानयोगेन०' ३-३. इत्यादि दोन निष्ठांविषयींचें शास्त्र अनायासानें प्रवृत्त होईल.—**च श्रोतारः विषयविभागेन सुखं ग्रहीष्यन्ति**—व श्रोते विषयविभागानें अनायासानें शास्त्राचें ग्रहण करतील. [ पुढें जरी प्रत्यक्ष दोन निष्ठांचें प्रतिपादन केलेलें आहे तरी येथेंच एकदा शास्त्राचा विषयविभाग स्पष्टपणें प्रदर्शित केलेला असला म्हणजे पुढे तिसऱ्या अध्यायाच्या तिसऱ्या श्लोकांत सांगितलेले दोन निष्ठांविषयींचे शास्त्र अनायासानें-सुलभपणें प्रवृत्त होईल व श्रोतेही त्याचें सहज विषयविभागपूर्वक ग्रहण करतील. आरंभींच एकदा विषयविभाग सुचवून ठेवलेला असला म्हणजे मग शास्त्राचें प्रतिपादन करणारांस व तें समजून घेणारांस फार त्रास पडणार नाहीं.]—**इति अतः 'एषा ते०' इति आह**—या अभिप्रायानें भगवान् श्रीकृष्ण ' एषा ते० ' इत्यादि सांगतात.

---

१ पण रहस्यकार असे म्हणतात-"जगात आयुष्यक्रमणाचे मार्ग दोन;एक सांख्य व दुसरा योग. पैकी ज्या सांख्य किंवा संन्यास मार्गाचा आचार लक्षात आणून अर्जुन लढाई सोडून भिक्षा मागण्यास तयार झाला होता, त्या संन्यास मार्गांतील तत्त्वज्ञानाप्रमाणेंच आत्म्याचा किंवा देहाचा शोक करणे उचित नाहीं. सुखदुःखें समबुद्धीनें सोसली पाहिजेत, आणि स्वधर्माकडे लक्ष देऊन क्षत्रियाने युद्ध करणेंच योग्य व हे युद्ध समबुद्धीनें केलें असतां कोणतेंही पाप लागत नाहीं, असे भगवंतांनीं अर्जुनास सिद्ध करून दाखविलें." जगांत म्ह० कोणत्या जगांत ? सर्व त्रिभुवनांत कीं भूलोकीं ? कीं आचार्य म्हणतात त्याप्रमाणें शास्त्रार्थाचा अधिकार असलेल्या त्रैवर्णिकांत ? कर्माधिकार फक्त मनुष्यालाच आहे. त्यामुळें येथे जगांत म्ह० त्रिभुवनांत किंवा भूलोकांतही नव्हे. फार काय पण सर्व मनुष्यांच्या आयुःक्रमणाचे हे दोन मार्ग आहेत, असेंही म्हणतां येत नाहीं. कारण वेदोक्त कर्माचा अधिकार फक्त त्रैवर्णिकांनाच आहे. ज्ञानाचा अधिकार सर्व मनुष्य व देवादि यांना जरी असला तरी ज्ञाननिष्ठायोग्यता प्राप्त होण्यासाठीं कर्मानुष्ठान पूर्वी केलेंच पाहिजे. त्यामुळे शास्त्रार्थानुष्ठानाचे अधिकारी त्रैवर्णिक म्ह० ब्राह्मण-क्षत्रिय-वैश्यच होत. अर्थात् सांख्य व योग या दोन निष्ठा त्रैवर्णिकांच्या आहेत. पण सांख्य म्ह० केवळ सन्यास नव्हे. तर सांख्य म्ह० ज्ञानयोग किंवा निवृत्तिमार्ग व योग म्ह० कर्मयोग किंवा प्रवृत्तिमार्ग. त्यांतील योग किंवा प्रवृत्तिमार्ग हा उपाय व ज्ञानयोग हें उपेय-साध्य आहे. जे ज्ञानी किंवा विरक्त जिज्ञासूही नसतील त्यांनीं स्वर्गादि उत्कर्षासाठीं किंवा चित्तशुद्धीसाठीं प्रवृत्तिमार्गाचाच स्वीकार केला पाहिजे. अर्थात् ज्ञानयोग व कर्मयोग या दोन निष्ठा त्रैवर्णिकांसाठीं असून त्यांतील ज्ञानी किंवा विरक्त जिज्ञासूंनीच सांख्य किंवा ज्ञानयोगी व्हावें व इतर द्विजांनीं कर्मयोगी व्हावें, असा वेदान्तसिद्धान्त आहे. पण रहस्यकार या दोन निष्ठा ज्ञानोत्तर मानतात. रहस्यकारांची जी मुख्य दिशाभूल झाली आहे ती येथेच. भगवानांनीं सृष्टीच्या आरंभीं ज्या दोन

निष्ठा सांगितल्या त्या आत्मज्ञानी पुरुषानें ज्ञानानंतर आपलें आयुष्य कसें घालवावें, हें सांगण्यासाठी सांगितल्या अशी कल्पना करणे अगदी अयोग्य आहे, कारण सृष्टीच्या आरंभी सर्व ज्ञानीच होते अशी कल्पना करतां येत नाहीं. जगांत नेहमीच ज्ञानी व अज्ञानी, विरक्त व रागी, मुमुक्षु व बुभुक्षु, असे दोन प्रकारचे लोक असतात. त्यांच्यासाठी धर्माच्या दोन निष्ठा अवश्यच आहेत व त्याच भगवानांनी सृष्टीच्या आरंभी सांगितल्या, असे मानणेंच अधिक सयुक्तिक आहे. अर्थात वरील उताऱ्यात रहस्यकारांनी ...' असे अर्जुनास सिद्ध करून दाखविले,' म्हणून जे म्हटले आहे, त्याला काही प्रमाण नाही. भगवानांनी अर्जुनाला नुस्ता आत्मानात्मविवेक सांगून स्वधर्माच्या दृष्टीनेही युद्ध सोडणें उचित नाहीं, असा प्रासंगिक उपदेश केला आहे. उपदेश करणे म्हणजे 'सिद्ध करून दाखविणे' नव्हे.

रहस्यकार पुन. म्हणतात—"तथापि केव्हाहि झाले तरी संसार सोडून संन्यास घेणे हेच प्रत्येकाचे या जगात परम कर्तव्य असे या मार्गाचे मत असल्यामुळे इष्ट वाटल्यास आतांच युद्ध सोडून संन्यास का घेऊ नये, किंवा स्वधर्म तरी का पाळावा, इत्यादि शंकाचे सांख्यज्ञानाने निवारण होत नाही, व त्यामुळे अर्जुनाचा मूळ आक्षेप कायम राहतो, असें म्हटले तरी चालेल, म्हणून भगवान् आता असे सांगतात—" ६२६ पण 'प्रत्येकाने संसार सोडून संन्यास घ्यावा' असे वेदान्त कोठे म्हणत आहे? आणि तो जरी म्हणाला तरी त्याचे ऐकणार कोण? फक्त ज्याला पूर्ण वैराग्य प्राप्त झाले असेल, ज्याला आत्मज्ञानच हवे असेल त्यांने सर्व एषणांचा त्याग करावा, असे वेदान्त म्हणतो. अनधिकाऱ्यानेहि संन्यास करावा असे अद्वैत वेदान्तशास्त्राचें मत नाही. संन्यास किंवा ज्ञाननिष्ठा याची योग्यता प्राप्त होईपर्यंत प्रत्येक कर्माधिकाऱ्यानें कर्मानुष्ठानच केले पाहिजे असा वेदान्तसिद्धान्त आहे. पण रहस्यकार त्याचा कधी विचारच करीत नाहीत. ते 'संन्यासमार्ग' म्हणून अद्वैत वेदान्तशास्त्राहून निराळाच पथ कल्पून त्याच्याविषयी वाटेल ते लिहीत सुटतात. पण आमच्या वाचकांनी—न्याय, सांख्य, योग, मिमांसा यांप्रमाणे अद्वैत वेदान्तशास्त्र म्हणून एक शास्त्र आहे, त्यालाच रहस्यकार संन्यासमार्ग म्हणतात. संन्यासमार्ग म्हणून निराळा एखादा पथ अस्तित्वात नाही, हे लक्षांत ठेवावे. अर्थात् संन्यासमार्गावर म्हणून त्यांनी जे आक्षेप घेतलेले आहेत ते वस्तुत. वेदान्तशास्त्रावर आहेत; पण अद्वैत वेदान्तशास्त्रावर उघड उघड आक्षेप घेण्याचे धैर्य न झाल्यामुळे रहस्यांत 'संन्यासमार्ग' म्हणून एका निराळ्याच मार्गाची कल्पना करून त्या मार्गाचे तत्त्वज्ञान म्हणून काहीं निराळेच तत्त्वज्ञान मानून त्यावर आक्षेप घेतले आहेत. आम्ही ही गोष्ट वाचकांच्या चागलीच लक्षात आणून देणार आहो. अथात् 'आताच युद्ध सोडून संन्यास कां घेऊ नये किंवा स्वधर्म तरी का पाळावा इत्यादि शंकाचे सांख्यज्ञानाने निवारण होत नाही' हें म्हणणे अगदी अयोग्य आहे. 'तूं पूर्ण विरक्त, खरा जिज्ञासु किंवा ज्ञाननिष्ठेचा अधिकारी अजून झालेला दिसत नाहींस, शिवाय तूं क्षत्रिय आहेस, क्षत्रियाला भैक्ष्याचा म्ह० परमहंस होण्याचा अधिकार नाही, म्हणून तुला संन्यास घेतां येत नाही. आणि संन्यासाचा अधिकार नसल्यामुळेच तो या किंवा उत्तर जन्मी प्राप्त होण्यासाठी तुला स्वधर्मानुष्ठानच केलें पाहिजे, असे वरील शंकाचे योग्य समाधान आहे. पण **रहस्यकारांचें मन संन्यासमार्गासंबंधानें कलुषित झालेलें असल्यामुळें त्यांना तें आठवलें नाहीं; नाइलाज आहे,**

**एषा तेऽभिहिता सांख्ये बुद्धिर्योगे त्विमां शृणु ।**
**बुद्ध्या युक्तो यया पार्थ कर्मबन्धं प्रहास्यसि ॥३९॥**

**अन्वयार्थ—एषा**—ही—**ते**—तुला—**सांख्ये**—परामार्थ वस्तूच्या विवेकाविषयीं—**बुद्धिः**—ज्ञान—**अभिहिता**—सांगितले.—**तु**—पण आतां—**योगे**—उपायाविषयींची—**इमां**—ही बुद्धि—**शृणु**—ऐक.—**पार्थ**—हे अर्जुना !—**यया बुद्ध्या युक्तः** (त्वं)—ज्या योगबुद्धीनें-उपायबुद्धीनें युक्त झालेला तूं—**कर्मबन्धं**—कर्मरूप बंधाला—**प्रहास्यसि**—टाकशील. ३९.

**एषा ते तुभ्यमभिहितोक्ता सांख्ये परमार्थवस्तुविवेकविषये बुद्धिर्ज्ञानं साक्षाच्छोकमोहादिसंसारहेतुदोषनिवृत्तिकारणम् । योगे तु तत्प्राप्त्युपाये निःसङ्गतया द्वन्द्वप्रहाणपूर्वकमीश्वराराधनार्थे कर्मयोगे कर्मानुष्ठाने समाधियोगे चेमामनन्तरमेवोच्यमानां बुद्धिं शृणु। तां बुद्धिं स्तौति प्ररोचनार्थं-बुद्ध्या यया योगविषयया युक्तो हे पार्थ कर्मबन्धं कर्मैव धर्माधर्माख्यो बन्धः कर्मबन्धस्तं प्रहास्यसीश्वरप्रसादनिमित्तज्ञानप्राप्तेरित्यभिप्रायः ॥ ३९ ॥**

**भाष्यार्थ—एषा**—ही—**ते-तुभ्यं**—तुला—**सांख्ये-परमार्थवस्तुविवेकविषये**—सांख्याविषयीं म्ह० परमार्थवस्तु जो आत्मा त्याच्या विवेकाविषयीं—**बुद्धिः-ज्ञानं**—बुद्धि म्ह० ज्ञान—**अभिहिता-उक्ता**—सांगितली. [ येथे बुद्धि म्ह० ज्ञान, अंतःकरणाची निश्चयात्मिका वृत्ति नव्हे. भाष्यकार तिचे विशिष्ट फळ दाखवितात-]—**साक्षात् शोकमोहादिसंसारहेतुदोषनिवृत्तिकारणं**—शोक-मोह, राग-द्वेष, कर्तृत्व-भोक्तृत्व इत्यादि अनर्थ हाच संसार त्याचा हेतुभूत दोष-आत्म्याचें अज्ञान त्या अज्ञानाच्या निवृत्तीचें निरपेक्ष-दुसऱ्या कोणत्याही साधनाच्या साह्याची अपेक्षा न करणारें-साक्षात् साधन, हें आत्मज्ञान आहे. [ अशा प्रकारचे आत्म्याविषयींचे ज्ञान मी तुला सांगितलें. ज्ञान अज्ञान निवृत्तीचे साक्षात् साधन आहे, ही गोष्ट वरील लोकप्रसिद्ध -अन्वय-व्यतिरेकन्यायानेच सिद्ध आहे.]—**तु**—पण आतां—**योगे-तत्प्राप्त्युपाये**

२ पण रहस्यकार ' एषा ते अभिहिता सांख्ये बुद्धिः ' याचा अर्थ कसा करितात तो पहा-' सांख्ये-' सांख्य म्हणजे सांख्यनिष्ठेप्रमाणें ' ते-' तुला ' एषा बुद्धि.-' ही बुद्धि म्ह० ज्ञान किंवा उपपत्ति ' अभिहिता-' सांगितली. यांतील ' सांख्ये म्ह० सांख्य निष्ठेप्रमाणे व बुद्धि म्ह० उपपत्ति ' हे अर्थ बरोबर नाहींत. ' सांख्ये ' ही विषयसप्तमी आहे. म्हणूनच आचार्यांनीं त्याचा अर्थ-परमार्थवस्तुविवेकाविषयीं-असा केला आहे व तोच बरोबर आहे. कारण वरील ११-३० श्लोकांत सांख्य किंवा संन्यासनिष्ठेप्रमाणे ज्ञान सांगितलेलें नसून परमार्थवस्तु जो आत्मा, त्याच्या विवेकाविषयींच सर्व ज्ञान आहे. आत्मा मरत नाहीं. तो नित्य, अव्यक्त, अविकार्य, अकर्ता, वगैरे आहे. देहादि सर्व द्वैत असत्-मिथ्या आहे, अनित्य आहे, इत्यादि आत्मानात्मविवेक त्यांत आहे. तसेंच बुद्धि म्ह० ज्ञान, उपपत्ति नव्हे. कारण त्यांत उपपत्ति म्ह० युक्ति सांगितलेली नाहीं. विवेकज्ञानच सांगितलें आहे.

—योगाविषयीं म्ह० आत्मज्ञानप्राप्तीच्या उपायाविषयींची [ बुद्धि ऐक. येथें योग म्ह० चित्तवृत्तिनिरोधरूप योग हा अर्थ विवक्षित नाहीं, तर योग म्हणजे मुक्तीच्या उपयोगी असलेल्या त्या ज्ञानाच्या प्राप्तीचा उपाय हा अर्थ विवक्षित आहे. पण तो उपाय तरी कोणता तें स्पष्ट करितात-]—**निःसंगतया द्वंद्वप्रहाणपूर्वकं ईश्वराराधनार्थे कर्मयोगे-कर्मानुष्ठाने च समाधियोगे**—फलाची आसक्ति न ठेवतां सुख-दुःखादि द्वंद्वत्यागपूर्वक ईश्वराच्या आराधनेसाठीं केलेला जो कर्मयोग म्हणजे कर्मानुष्ठान व समाधियोग, या योगाविषयींची—**इमां अनन्तरं एव उच्यमानां बुद्धि**

---

१ 'योगे तु इमा शृणु-' याचा अर्थ रहस्यकार असा करितात-"आतां ही ( कर्म-) योगांतील बुद्धि म्ह० ज्ञान ( तुला सांगतो ) ऐक" येथे 'योगे' म्ह० कर्मयोगांतील, असा अधिकरणसप्तमी मानून अर्थ केला आहे. पण तीमुळां विषयसप्तमीच आहे. 'आतां योगाविषयींचे ज्ञान ऐक.' असाच त्याचा खरा अर्थ आहे. कारण 'कर्मयोगांतील ज्ञान ऐक' याचा काहींच अर्थ होत नाहीं. पण मुळात 'योग' असा सामान्य शब्द असतांना त्याचा 'कर्मयोग' असा विशेष अर्थ करण्यास काय आधार आहे? रहस्यकारांनी योगशब्दाच्या अर्थाविषयीं ( गी. र. पृ. ५६-५९) बराच विचार केला आहे. विस्तारभयास्तव त्या सर्वांचा प्रतिविचार येथे करतां येत नाहीं. तथापि त्याचा थोडक्यात परामर्श घेणें भाग आहे. रहस्यकार म्हणतात-"युज म्ह० जोडणे या धातूपासून योगशब्द झाला आहे." पण'युजिर् योगे, युज समाधौ' असा पाणिनिधातुपाठ आहे. त्यापासून 'योग' हा शब्द झाला आहे. म्हणून त्याचा जोडणें, हा एकच अर्थ नाहीं. तर अमरकोशात सांगितलेल्या-संहनन ( चिलखत ), उपाय, ध्यान, संगति व युक्ति, असे त्याचे पाच अर्थ आहेत. त्यात योग म्ह० कर्मयोग असा अर्थ नाहीं. तथापि रहस्यकार म्हणतात-'...पुढे तशी स्थिति म्ह० जोड, जुळणी, मिळवणी, संगति, एकत्रावस्थिति प्राप्त होण्याचा 'उपाय साधन, युक्ति किंवा इलाज म्ह० कर्म असाही अर्थ झाला....' पण उपाय० वगैरे म्ह० कर्म हा अर्थ किती सरळ आहे त्याचा विचार वाचकांनीच करावा व ते कर्म तरी कोणते, तर पृ. ५५-५६ यांत सांगितलेलें 'खाणे, पिणे, खेळणें,' येथून 'जगणे व मरणे' येथपर्यंत सर्व शरीरेंद्रियाचें कर्म; व या कर्मयोगानेंच जनकादिकाना ससिद्धि मिळाली. भगवान्‌ही 'मला कांही कर्तव्य नाहीं, तरी मी हाच खाण्या-पिण्याचा कर्मयोग लोकसंग्रहासाठीं करतो व तूंही तेच कर्म कर' असा अर्जुनाला उपदेश करीत आहेत! कोण ही शास्त्रार्थाची विटंबना!! हर हर भगवति गीते, खरोखर तू या शतकात अनुकंपनीय झाली आहेस!!! तूं स्वतः दुसऱ्यांच्या शोक-मोहाची निवृत्ति करावयास जरी प्रवृत्त झालेली असलीस तरी हल्ली गीतारहस्यांतील व्यापक, सरळ, तुलनात्मक, असांप्रदायिक वगैरे अर्थामुळे तूं स्वतः मात्र शोच्य बनली आहेस! असो; पण 'योग'शब्दाचा 'कर्म' हा अर्थ रूढही नाहीं व यौगिकही नाहीं. तर तो लाक्षणिक आहे, एवढेंच तूर्त वाचकांनी लक्षांत ठेवावे. पुढें रहस्यकार म्हणतात—"गीतेत फार झालें तर चारपांच ( अ. ६-१२ व २३ ) स्थलाखेरीज पातंजलयोग हा अर्थ कोठेंही अभिप्रेत नाहीं. 'युक्ति, कौशल्य, साधन, उपाय, जोड,' हेच अर्थ थोड्या फार भेदानें सर्वत्र आढळून येत असून गीताशास्त्रांतल्या व्यापक शब्दांपैकीं हा एक शब्द आहे." शब्द व्यापक असतो कीं अर्थ? असो, पण इतकी सूक्ष्म दृष्टि नको; कारण गीतारह-

स्यांत इतकी सूक्ष्म दृष्टि सहन करण्याचे सामर्थ्य नाहीं. पण हेच अर्थ जर सर्वत्र आढळतात तर योगशास्त्र म्ह० कर्मयोगशास्त्र, योग म्ह० कर्मयोग वगैरे अर्थ कोठून आले ? पण हा प्रश्न येऊं नये ह्मणून पुनः ते ह्मणतात—"योगशब्दाने कोणच्या विशिष्ट प्रकारचें कौशल्य, साधन, युक्ति, अगर उपाय गीतेंत मुख्यत्वेकरून विवक्षित आहे हे सांगण्यासाठीं 'योगः कर्मसु कौशलं-' २-५० योग म्ह० कर्मे करण्याची काहीं विशेष प्रकारची कुशलता, युक्ति, चतुराई, अगर शैली अशी या शब्दाची व्याख्या गीतेतच स्पष्टपणे केली आणि यावरील शांकरभाष्यांतही 'कर्मसु कौशल' या पदाचा कर्माचे ठायीं स्वभावतः असणारें जे बंधकत्व ते नाहींसे करण्याची युक्ति असाच अर्थ केलेला आहे. सामान्यतः पाहिले तर एकच कर्म करण्याचे अनेक योग किंवा उपाय असतात. परंतु त्यापैकीं उत्तम साधनास योग हा शब्द विशेषेकरून लावण्यांत येत असतो, " गी. र. पृ. ५७ पण 'योगः कर्मसु कौशलं' याचा अर्थ काय ? कर्मे करण्याची युक्ति, चतुराई वगैरे हा का त्याचा अर्थ ? आणि शंकराचार्यही तसेच म्हणतात ? धन्य आहे ! वाचकहो, आचार्य काय म्हणतात ते यावेळीं जरूर पहा. तुह्मांपुढे भाष्य आहे व त्याचा शब्दशः अर्थही आहे. याच अध्यायाचा पन्नासावा श्लोक व त्यावरील 'योगो हि कर्मसु कौशलं०' येथून पुढील भाष्य वाचा. म्हणजे भाष्यकार काय ह्मणतात व रहस्यकार काय समजतात, ते स्पष्टच होईल. रहस्यकाराचा 'योगः कर्मसु कौशल' या चरणाचा अर्थ कसा चुकला आहे, ते आम्ही त्याच श्लोकावरील टीपेंत दाखवूं. 'उत्तम साधनास योग हा शब्द विशेषे करून लावतात' हे जर खरें; तर मग योग म्ह० उत्तम साधन, योगशास्त्र म्ह० उत्तम साधनशास्त्र, योगविषयक बुद्धि ऐक म्ह० आत्मज्ञानाच्या उत्तम साधनाविषयींचे ज्ञान ऐक, असा अर्थ करावयाचा सोडून कर्मयोग कोठून आणतां ? रहस्यकार म्हणतात—" भगवान् स्वतः आपल्या उपदेशास योग हे नाव देतात. (४.१-३) सहाव्या अध्यायात अर्जुन (६.३३) व गीतेच्या अखेरच्या उपसंहारात (अ.१८-७५) संजयही गीतेतील उपदेशास 'योग' हेच नाव देतात. प्रत्येक अध्यायाच्या शेवटीं जो समाप्तिसूचक संकल्प असतो त्यांतही 'योगशास्त्र' हाच गीतेतील प्रतिपाद्य विषय होय, असे स्वच्छ म्हटले आहे. पण या संकल्पातील शब्दाच्या अर्थाकडे प्रस्तुतच्या टीकाकारापैकीं कोणीच लक्ष दिलेले दिसत नाहीं. " यावर आम्ही ह्मणतों कीं हे सर्व खरें आहे. पण त्यावरूनसुद्धा गीतेचा प्रतिपाद्य विषय 'योग' आहे, असेच ठरते. 'कर्मयोग' आहे, असें ठरत नाहीं. योग म्ह० कर्मयोग नव्हे. योग म्ह० तुमच्याच म्हणण्याप्रमाणे उपाय, इलाज युक्ति. पण तो उपाय ह्मणजे नुस्तेच कर्म असा योगशब्दाच्या अर्थाचा संकोच करणे सर्वथा अयोग्य आहे. त्याला कांहीं प्रमाण नाहीं, इतकेच नव्हे तर ते गीतेतील प्रतिपादनाच्याही विरुद्ध आहे. गीतेत फक्त तिसऱ्या अध्यायात कर्मयोग आहे. बाकीच्या अध्यायात सांख्य, कर्मसंन्यास, ध्यान, अभ्यास, भक्ति इत्यादि इतर योग आहेत. गी.भा.पृ. २७ पहा. त्यांना कर्मयोगाचें अंग म्हणणे वैदिकसंप्रदायाच्या विरुद्ध आहे. रहस्यकार आह्मांला वारंवार ज्या नारायणीय किंवा भागवत धर्माचें बुजगावणे दाखवितात तो धर्मही वैदिक संप्रदायाच्या विरुद्ध जर कांहीं सांगूं लागेल तर त्यालाहि वैदिकधर्म म्हणतां येणार नाही. फार काय पण भगवान् कृष्णही जर त्याविरुद्ध जर काहीं सांगूं लागतील तर त्यांचीही सुगतबुद्धाच्या दर्शनाप्रमाणेंच अवस्था होईल, हे विसरता कामा नये. भग-

वानांनीं अर्जुनाला केलेला उपदेश वैदिक सिद्धान्ताला जर सोडून असता तर वेदाचार्य व्यासांनीं त्याला ‘ गीता ’ या नांवाच्या श्लोकरूपांनीं रचलेंच नसतें. तात्पर्य गीता हें योगशास्त्र आहे, याबद्दल कोणाचाच वाद नाहीं. तें कर्मयोगशास्त्र आहे, हे म्हणणें मात्र आम्हाला कबूल नाहीं. कारण ‘ योग ’ या शब्दाचा उपाय किंवा साधन हाच अर्थ येथे विवक्षित असून तो कर्मापासून ज्ञानापर्यंत सर्व मोक्षसाधनांना लागू होतो. गीतेंत केवळ कर्मयोगच सांगितलेला नाहीं. अनेक योग सांगितले आहेत. असे असतांना स्वतः असत्-कल्पना करून भाष्यकारादिक तशी असत्कल्पना करीत नाहींत, म्हणून त्यांच्यावर मन-सोक्त आक्षेप करणें, याला काय म्हणावें ? रहस्यकार म्हणतात ‘ संकल्पांतील शब्दांच्या अर्थाकडे कोणत्याही टीकाकारानें लक्ष दिलें नाहीं ’ पण आम्ही त्यास असें विचारतो की ग्रंथाच्या समाप्तिसूचक वाक्याकडे आजवर कधीं कोणी तरी टीकाकारानें लक्ष दिलें आहे काय ? मूळ ग्रंथावरून ग्रंथाचा प्रतिपाद्य विषय ठरवावयाचा कीं ग्रंथाच्या विषयानुक्रमणिके-वरून ? प्राचीन ग्रंथांत विषयानुक्रमणिकेबद्दल असा संकल्प घालीत असत. त्यावरून त्या अध्यायांत, ग्रंथात वगैरे कोणता विषय आहे, हे कळत असे. यापेक्षां त्याचा विशेष उपयोग नसे. टीकाकार मूळ ग्रंथावर टीका करितात. ‘श्रीगणेशाय नमः ’ किंवा ‘इति श्रीवाल्मीकीये रामायणे आदिकाव्ये अमुकः सर्गः’ असल्या वाक्याचा अर्थ सांगत बसत नाहींत. पण रहस्य-कारांना त्या विषयसूचक वाक्याचेंही महत्त्व वाटलें व त्यांनीं त्याचाही कीस काढला. तेव्हां शंकराचार्यादिकांनी त्याच्याकडे ढुंकूनही पाहिलें नाहीं, हा त्यांचा अपराध नव्हे का ? पण रहस्यकारांच्या म्हणण्याप्रमाणें संकल्पाला जरी महत्त्व दिलें तरी त्यापासून कांहींच इष्ट साधत नाहीं. त्यांतही ‘ योगशास्त्रे ’ असेंच आहे ‘ कर्मयोगशास्त्रे ’ असें नाहीं. यास्तव ‘ योग ’ या शब्दाचा सर्व ठिकाणीं कर्मयोग असा अर्थ करणें अयोग्य आहे. त्यापेक्षा आ-चार्यांनीं ‘ हा आत्मानात्मविवेक मीं तुला सांगितला, आतां त्याच्या प्राप्तीचा उपाय सां-गतो, तो ऐक, ’ असा जो अर्थ केला आहे तोच सरळ आहे. पण रहस्यकारांना तो कोठला पटावयाला ? ते म्हणतात “ युद्ध का केलें पाहिजे याची सांख्यमार्गाप्रमाणे उपपत्ति सांगि-तल्यावर आतां तुला योगाप्रमाणें उपपत्ति सांगतो, असा भगवतांनीं आरंभ केला आहे ” म्हणजे भगवानांनीं या अध्यायाच्या ११-३० ( किंवा रहस्यकाराच्या समजुतीप्रमाणे ११-३८ ) श्लोकांत जें कांहीं सांगितलें आहे ते युद्ध कां केलें पाहिजे याची सांख्य—संन्या-समार्गाप्रमाणें उपपत्ति सांगितली आहे ! अर्जुनानें युद्ध कां केलें पाहिजे हें सांगण्यासाठीं एवढें मोठें गीताशास्त्र भगवानांनीं सांगितलें ! अर्थात् आमच्यासारख्या इतर असंख्य लो-कांना त्याचा कांहीं उपयोग नाहीं. कारण आम्हांला युद्धाची प्राप्तिच नाहीं. अर्थात् आम्ही आज हजारो वर्षे गीता संसारबंधांतून सोडविणारी आहे, या भावनेनें तिचा जो पाठ करीत आलों ती आमची चूक झाली. एखादा मनुष्य मरणोन्मुख झाला असतां त्याच्याजवळ बसून गीतेचा पाठ करण्याचा जो परिपाठ आहे, तो सर्व फुकट झाला म्हणावयाचा ! का-रण ज्याचे प्राण आतां एका क्षणांत निघून जाणार आहेत त्याच्यापाशीं ‘ युद्ध कां केलें पाहिजे ’ याविषयीं उपपत्ति सांगणारी गीता वाचून काय करावयाचें आहे ? पण अर्जुनानें ‘ युद्ध कां केलें पाहिजे ’ याविषयींची उपपत्ति भगवानाला विचारली आहे कोठें ? ‘ मला निश्चित श्रेय सांग, मी तुझा शिष्य आहे, तुला शरण आलो आहें, मला उपदेश कर’ असें तो

शृणु—ही यानंतरच सांगितली जाणारी बुद्धि ऐक.—**तां च बुद्धिं प्ररोचनार्थं स्तौति**—आतां त्या बुद्धीची श्रोत्याच्या मनांत तिच्याविषयीं रुचि-श्रद्धा उत्पन्न व्हावी म्हणून भगवान् स्तुति करितात.—**यया योगविषयया बुद्ध्या युक्तः**—ज्या योग-

---

विनवीत आहे. यास्तव ११-३० श्लोकांत भगवानांनी आत्मज्ञान सांगून आतां येथून त्याच्या प्राप्तीचे उपाय सांगण्यास आरंभ केला आहे, असा यांचा साध्यसाधनभावसंबंध लावणेंच योग्य आहे. आचार्यांनी ' योग ' म्ह० ' तत्प्राप्त्युपाय ' असा सामान्य अर्थ सांगून नंतर त्याचेंच ' ईश्वराराधनार्थ कर्मानुष्ठान व समाधियोग ' असे पुढील प्रकरणाला अनुसरून स्पष्टीकरण केलें आहे; व तेंच अतिशय सयुक्तिक आहे. आपल्या सर्व शास्त्रांची शैली प्रायः अशीच दिसते. अगोदर साध्य काय तें सांगून नंतर त्याची साधनें सांगितलेलीं असतात. उपनिषदें व दर्शनें यांत हीच पद्धत स्वीकारली आहे. दिग्दर्शनार्थ कांहीं उदाहरणें देतों— ' ब्रह्मविद् परब्रह्माला प्राप्त होतो ' असें सांगून व पुढें ब्रह्माचें स्वरूपलक्षण व तटस्थ लक्षण सांगून नंतर ' तपसा ब्रह्म विजिज्ञासस्व ' असे त्याचें विचाररूप साधन सांगितले आहे. ऐतरेय, छान्दोग्य इत्यादिकांतही अगोदर अध्यारोप-अपवादन्यायानें आत्मतत्त्वनिरूपण करून नंतर आत्मविचार हें साधन सांगितलें आहे. योगदर्शनांत प्रथम समाधिपाद व नंतर साधनपाद आहे. सांख्यदर्शनांत प्रथम ' त्रिविधदुःखात्यंताभाव ' हा परम पुरुषार्थ सांगून मग त्यांचीं साधनें सांगितलीं आहेत. सांख्य व योग या शब्दांचा अर्थ मध्वाचार्य "सांख्यं ज्ञानं । ' शुद्धात्मतत्त्वविज्ञानं सांख्यमित्यभिधीयते ' इति भगवद्वचनाद्व्यासस्मृतौ । योगः उपायः । " असें म्हणतात. त्यांत सांख्य म्ह० ज्ञान व योग म्ह० उपाय असा स्पष्ट अर्थ केला आहे. रामानुजाचार्य— ... " आत्मतत्त्वं सांख्य । मोक्षसाधनभूतकर्मानुष्ठाने यः बुद्धियोगः वक्तव्यः स इह योगशब्देन उच्यते ॥ " असें म्हणतात. बुद्धीनें निश्चय करण्यास योग्य असलेलें जे आत्मतत्त्व तें सांख्य; व मोक्षसाधनभूत कर्मानुष्ठानांतील बुद्धियोग जो सांगावयाचा आहे तोच येथें योगशब्दानें सांगितला जातो, असा याचा भावार्थ. अर्थात् येथें योग म्ह० बुद्धियोग म्हटले आहे. वल्लभस. टीका ' सांख्यं—आत्मज्ञानात्मक ' व ' तज्ज्ञानार्थं एव कर्मयोगं शृणु ' ज्ञानेश्वरमहाराज—" आतां बुद्धियोग निश्चिता । अवधारीं पा । " असें म्हणून योग म्ह० बुद्धियोग म्हणतात.

१ या श्लोकाच्या उत्तरार्धांत भगवान् आत्मज्ञानोपायाची स्तुति प्ररोचनासाठीं—त्या उपायाविषयीं श्रोत्यांच्या मनांत रुचि उत्पन्न करण्यासाठीं करीत आहेत असें आचार्य सांगतात. पण रहस्यकार तसें कांहीं सांगत नाहींत. तर ' ज्या बुद्धीनें युक्त झालास म्हणजे ( कर्मे न सोडतांही ) हे पार्था ! तूं कर्मबंध सोडशील अशी ही ( कर्म ) योगांतील बुद्धि ... ऐक ' असा अर्थ करितात. यांत ' कर्में न सोडतांही ' हें रहस्यकारांच्या पदरचें आहे. शिवाय हें मोक्षाचे म्ह० कर्मबंधत्यागाचें स्वतंत्र साधन आहे, असें दाखवावयाचें असल्यामुळें त्यांना असाच अर्थ करणें सोयीचें आहे. शिवाय योगबुद्धीची स्तुति करीत आहेत असें म्हटलें कीं तो अर्थवाद झाला आणि अर्थवाद म्ह० ' पोकळ ' व ' उडवून देणें ' तेव्हां अशा महत्त्वाच्या वाक्याला रहस्यकार स्तुति किंवा अर्थवाद कसें म्हणतील ? अर्थवादाविषयीं त्यांची खोटीच समजूत कशी झाली आहे ती पहा—'...तीं विधानें प्रमाणभूत म्हणजे त्यांतील निरनिराळ्या विषयांसंबंधानें ग्रंथकाराचा सिद्धान्तपक्ष दाखविणारीं न मानतां ती नुसती प्रशंसा-

पर म्हणजे पोकळ, आगंतुक अगर स्तुत्यर्थ समजून मीमांसक त्यांस 'अर्थवाद' असें नांव देतात आणि हीं अर्थवादात्मक विधानें (?) सोडून देऊन मग ग्रंथाचें तात्पर्य ठरवीत असतात." पृ.२३ रहस्यकारांचें हें म्हणणें खरें आहे, असें उपक्रमोपसंहारादि लिंगांची माहिती असलेला कोणीही म्हणणार नाहीं. उपक्रमोपसंहारादि सहाही लिंगें प्रतिपाद्य ठरविण्याच्या कामीं अत्यंत उपयोगी असतात हें आम्हीं वर (गी.भा. पृ.३७-४१ पहा.) दाखविलेंच आहे. अर्थवाद विहिताची स्तुति करून श्रोत्यांच्या मनांत त्याविषयीं रुचि उत्पन्न करीत असतात. ज्याची स्तुति केलेली असते तेंच त्या प्रकरणाचें प्रतिपाद्य असतें; मीमांसेच्या 'विधिना त्वेकवाक्यत्वात् स्तुत्यर्थेन विधीनां स्युः' अ. १ पा. २ सू.७ इत्यादि सूत्रांत अर्थवादाचें महत्त्व स्पष्टपणें वर्णिलेलें आहे. असें असतांना त्यांना पोकळ वगैरे म्हणणें, म्हणजे उपक्रमादिकांची आपल्याला माहिती नाहीं, असेंच तज्ज्ञ वाचकांस सुचविणें आहे. अर्थवाद सोडून देऊन मग जर ग्रंथाचें तात्पर्य ठरवावयाचें तर अर्थवाद तात्पर्यलिंग कसें? पण इतके सूक्ष्म पाहतें आहे कोण? आपल्याला एखाद्या विषयाची माहिती असो वा नसो, सुचतील त्या कल्पना लिहीत सुटावयाचें, हीच हल्लींची विद्वत्ता व हेच पांडित्य ! असो. अर्थवाद किंवा स्तुति 'पोकळ' नसते; ती नेहमीं खरीच असते. ज्याची स्तुति केलेली असते ते विहित असतें, त्याचें अनुष्ठान करावें, असा शास्त्राचा आशय असतो. 'यद्धि स्तूयते तद्विधीयते' शास्त्र ज्याची स्तुति करते त्याचें ते विधान करते, तें अवश्य करावें, असें मागते, असा मीमांसेचाच सिद्धान्त आहे.

या ३९ व्या श्लोकावरील टीपेंत रहस्यकार म्हणतात—"सांख्यशब्दानें कापिलसांख्य किंवा नुसता वेदान्त व योगशब्दानें पातंजलयोग हे अर्थ या ठिकाणीं उद्दिष्ट नसून सांख्य म्ह० संन्यासमार्ग आणि योग म्ह० कर्ममार्ग हेच अर्थ या ठिकाणीं घेतले पाहिजेत असें गी. ३.३ या श्लोकावरून उघड होतें." गी. र.पृ. ६२६. पण हा भ्रम आहे. कारण सांख्यशब्दाचा खरा अर्थ आत्मानात्मविवेक आहे. आत्मानात्मविवेक व वेदान्त यांत कांहीच फरक नाहीं. येथील सांख्यशब्दानें सांख्यदर्शन व योगशब्दानें योगदर्शन विवक्षित नाहीं, हें आम्हांलाही संमत आहे. कारण रहस्यकारांनीं आचार्यांच्याच म्हणण्याचा हा अनुवाद केला आहे. पण 'सांख्य म्ह० संन्यासमार्ग व योग म्ह० कर्मयोग' हें म्हणणें आम्हांस संमत नाहीं. कारण तिसऱ्या अध्यायाच्या तिसऱ्या श्लोकांत 'ज्ञानयोगेन सांख्यानां' व 'कर्मयोगेण योगिनां' असें म्हटलें आहे. त्यांत कर्मयोगाचा प्रतियोगी ज्ञानयोग आहे, संन्यास नाहीं व योग्यांचा प्रतियोगी सांख्य आहे. अर्थात् योगी म्ह० अनात्मज्ञ कर्माधिकारी गृहस्थ व सांख्य म्ह० ज्ञानी संन्यासी. त्यामुळें येथील सांख्य म्ह० ज्ञानयोग व योग म्ह० कर्मयोग असेंच ३.३ या श्लोकावरूनही ठरतें. पण येथील सांख्य-योगशब्दांचा अर्थ ठरवावयास तिसऱ्या अध्यायाकडे धांव घेणेंच अयोग्य आहे. 'ही मी सांख्यबुद्धि सांगितली' असें भगवानांनीं म्हटलें आहे. त्यामुळें 'ही' म्हणजे पूर्वी सांगितलेली. पूर्वी आत्मानात्मविवेक सांगितला आहे. संन्यासमार्गाप्रमाणें कांहीं सांगितलेलें नाहीं. ११–३० श्लोकांत वर जें सांगितलें आहे तें आत्मज्ञान होय. दुसरें कांहीं नाहीं. आत्म्याचें यथार्थ स्वरूप त्यांत व्यक्त केलें आहे. त्यांत संन्यासमार्गाचा कांहीं संबंधही नाहीं. (गी.भा. पृ. ४५पहा.) तसेंच येथील योगशब्दाचा अर्थ ठरवावयासही लांब जावयास नको.

पुढील प्रकरणावरूनच तो ठरवितां येतो. आचार्यांनी योगशब्दाचा वर जो अर्थ केला आहे तोच बरोबर आहे, आणि तोच बरोबर कसा ते आम्ही पुढे दाखवूं. येथे अधिक विस्तार नको. रहस्यकार म्हणतात—" हे दोन्ही मार्ग स्वतंत्र असून त्याच्या अनुयायांसही अनुक्रमें सांख्य = सन्यासमार्गी आणि योग = कर्मयोगमार्गी असे म्हणतात. (गी. ५.५) " पण हे दोन्ही मार्ग स्वतंत्र नाहीत.साख्य–ज्ञान-निष्ठेच्या अधिकाऱ्यांना साख्य म्हणतात हे खरें. ( गी. भाष्यार्थ पृ. ४६ पहा. ) कर्मयोग्याना योगी किंवा ' योग ' म्हणतात, हेही खरे.

पण त्यातील सांख्य हे मोक्षाचे अंतरग साधन असून योग हे बहिरग साधन आहे किंबहुना योग सांख्याचेही साधन आहे. त्यामुळे योगाला चित्तशुद्धि व ज्ञान यांच्या द्वारा मोक्ष मिळतो. तो स्वतत्रपणे मुक्त होत नाही तर मग पाचव्या अध्यायांत 'यत्सांख्यैः प्राप्यते स्थानं तद्योगैरपि गम्यते ' श्लो. ५ असे कसे म्हटले आहे ? याचा अधिक विचार पुढे त्याच श्लोकाच्या भाष्यार्थात करू. तूर्त इतकेच सागणे अवश्य आहे की, पुण्याहून व नाशकाहून निघालेले मनुष्यही मुंबईला पोचतात व कल्याणाहून निघालेलेही पोचतात, पुण्याहून व नाशकाहून निघालेल्याना कल्याणच्या द्वाराच मुबईस यावे लागते, त्याला सोडून मुंबईस जाता येत नाही. त्याप्रमाणे विविदिषा सन्यासी व कर्मयोगी, भक्त, इत्यादि सर्वांना मोक्ष या स्थानाला ज्ञानाच्या द्वाराच जावे लागते. अर्थात् ज्ञान हे सर्व मार्गांचे जंक्शन आहे. ज्ञानापर्यंत जाऊन पोचल्यावर मग मोक्षाचा एकच मार्ग ज्ञानानतर त्याला निरनिराळे फाटे नाहीत. पण हा अद्वैतसिद्धान्त न कळल्यामुळे गीतेचा अर्थ लावताना रहस्यकाराची फार धादल उडाली आहे; व त्याना वारवार धरमोड करावा लागली आहे. वैदिक सप्रदाय सोडून स्वतःचीच कल्पना चालविल्याचा हा परिणाम आहे. असो.

पुनः रहस्यकार म्हणतात—" साख्यनिष्ठेतील लोक केव्हाना केव्हा तरी अखेर कर्मे अजिबात सोडून देणेंच श्रेष्ठ मानीत असल्यामुळे . . " पण हे म्हणणे बरोबर नाही. कारण साख्यनिष्ठा म्हणजेच ज्ञानयोग. ज्ञानयोगी कर्मांचा त्याग करूनच साख्य बनत असतात व सांख्यनिष्ठा भगवानानीच सृष्टीच्या आरंभी सागितला आहे. तेव्हा त्या निष्ठेतील लोक अमुक मानितात, असा त्यांच्यावर आरोप करण्यात काय अर्थ आहे ?

ते पुनः म्हणतात—" म्हणून सन्यास न घेता ज्ञानप्राप्तीनतरही निष्काम बुद्धीने सदैव कर्मे करीत राहणे, हाच प्रत्येकाचा खरा पुरुषार्थ असे ज्या कर्मयोगनिष्ठेचे मत आहे त्या कर्मयोगांतील किंवा संक्षेपाने योगमार्गांतील ज्ञान सागण्यास आतां सुरवात करून गीतेतील शेवटच्या अध्यायापर्यंत अनेक कारणे दाखवून व अनेक शकांचे निवारण करून या मार्गाचेंच पुष्टीकरण केले आहे. . भगवानाना केलेली फोड लक्षात ठेवली म्हणजे गीतेंत कर्मयोगच प्रतिपाद्य आहे, त्याबद्दल शका रहात नाही. " गी. र. पृ. ६२६. पण ' ज्ञानप्राप्तीनंतर निष्काम बुद्धीने कर्म करीत राहणे ' याचा अर्थ काय ? ज्ञानानतर ज्ञानी पुरुषामध्ये स्वर्ग, पुत्र, धन इत्यादिकाविषयी काम राहतात का काय ? जर राहण्याचा सभव असेल तरच ' निष्काम बुद्धीने कर्म सदैव करीत राहणे ' या शब्दांना कांही तरी अर्थ आहे असें म्हणतां येईल, पण श्रुति 'ज्ञानी अकाम, निष्काम, आप्तकाम, अकामहत असतो' असें म्हणते. येथेही ' मनांतील सर्व काम सोडून आत्म्यामध्ये आत्म्यानेंच सतुष्ट असणें, ' हें स्थितप्रज्ञाचें लक्षण सांगितलें आहे. तेव्हां ' ज्ञानी पुरुषानें निष्काम बुद्धीने कर्मे करावी '

विषयक बुद्धीनें-ज्ञानप्राप्तीच्या उपायाच्या ज्ञानानें युक्त झालेला तूं—**हे पार्थ**—हे अर्जुना, —**कर्मबन्धं-कर्म एव धर्माधर्माख्यः बंधः-कर्मबन्धः तं प्रहास्यसि**—कर्मबन्धाला-कर्म हाच धर्म व अधर्म या नांवाचा बंध आहे, त्या कर्मबंधाला सर्वथा टाकशील. ( अहो पण कर्मानुष्ठानविषयाच्या ज्ञानानें कर्मबंधाची निवृत्ति कशी होईल ? कारण तत्त्वज्ञानावांचून कर्मांचा समूल त्याग करितां येणें शक्य नाहीं, या शंकेचें समाधान-)—**ईश्वरप्रसादनिमित्तज्ञानप्राप्तेः इति अभिप्रायः**—ईश्वराच्या आराधनेसाठीं कर्म केलें असतां त्याचा प्रसाद होतो, त्या निमित्तानें तत्त्वज्ञान प्राप्त होतें आणि तत्त्वज्ञानानें कर्मबंधाची निवृत्ति होते, असा याचा आशय आहे. [ येथील 'योग, या शब्दाचा अर्थ-पातंजलयोगशास्त्रांत सांगितल्याप्रमाणें ' चित्तवृत्तीचा निरोध ' असा करावयाचा नाहीं. कारण गीताशास्त्रांत तेवढा एकच उपाय सांगितलेला नाहीं. अनेक उपाय सांगितलेले आहेत व योगशब्दाचे अनेक अर्थ रूढ आहेत. त्यांतील उपाय हा सामान्य अर्थ येथें घेणें उचित होय, असें समजून आचार्यांनीं भाष्यांत ' आत्मज्ञानाच्या प्राप्तीचा उपाय ' असा त्याचा अर्थ केला आहे. नंतर ' कर्मयोग व समाधियोग ' असें त्या उपायाचेंच स्पष्टीकरण केलें आहे. कर्मयोग म्हणजे कर्मांचें अनुष्ठान. पण तें कर्मानुष्ठान जर सकाम-फलाच्या इच्छेनें केलेलें असेल तर त्याच्या योगानें ज्ञानप्राप्ति होत नाहीं म्हणून त्या कर्मानुष्ठानाला ' फलासक्तीपासून सुख-दुःखादि द्वंद्वांना सोडून ईश्वराच्या आराधनार्थ केलेलें ' असें विशेषण दिलें आहे कारण पुढें ४७ व्या श्लोकांत अर्जुनाला असलेंच कर्म करावयास सांगितलें आहे. त्याचप्रमाणें ५३ व्या श्लोकांत समाधियोग सांगितला आहे अर्थात् पुढील उपदेशाकडे पूर्ण लक्ष देऊनच आचार्यांनीं योगशब्दाचा ' योग चित्तवृत्तिनिरोधः ' हा योगदर्शनोक्त अर्थ सोडला, व गीतेंतील सर्व साधनांना लागू पडेल असा ' उपाय ' हा अर्थ स्वीकारला, आणि त्यांतील पहिली पायरी ईश्वरार्थ कर्मयोग व शेवटची पायरी समाधियोग, असें स्पष्टीकरण दिलें आहे. योगशब्दाचा 'कर्मयोग' असा अर्थ कोशांत मिळत नाहीं. त्यामुळें त्याचा तो 'प्रसिद्ध अर्थ' आहे, असें केव्हांही म्हणतां येत नाहीं. पण योगशब्दाचा 'उपाय' हा अर्थ कोशांत दिलेला आहे 'योग संहननोपायध्यानसंगतियुक्तिषु' असा अमरकोश आहे.

---

हे म्हणणें 'मन्यासयानें ब्रह्मचर्य पाळावें,' या म्हणण्यासारखेंच आहे. 'कर्म सदैव करीत राहणें हाच प्रत्येकाचा खरा पुरुषार्थ असें कर्मयोगनिष्ठेचें मत आहे ' या म्हणण्याला आधार काय? मीमांसक मुख्य कर्मवादी आहेत. पण तेही कर्मानुष्ठानाला खरा पुरुषार्थ न म्हणतां स्वर्गालाच पुरुषार्थ म्हणतात. ' गीतेंतील शेवटच्या अध्यायापर्यंत कर्मयोगांतील ज्ञानाचेंच पुष्टीकरण केलें आहे ' हे म्हणणें साक्षात् गीतेंतील उपदेशाच्याच विरुद्ध आहे. कसें तें आम्ही पुढें ठिकठिकाणीं दाखवूं. भगवानांनीं येथें ' सांख्यविषयीं ज्ञान सांगितलें, आतां योगाविषयीं ऐक. ' एवढेंच म्हणून फक्त विषयविभाग दाखविला आहे. पण तेवढ्यावरून गीतेचा प्रतिपाद्य विषय कर्मयोगच आहे, हे कसें निश्चित होतें ? कारण गीतेंत ज्ञान, भक्ति, ध्यान इत्यादि अनेक विषय आहेत, एक कर्मयोगच नाहीं. याविषयींहि अधिक विचार पुढेंच करूं.

योग म्ह० संहनन–चिलखत, उपाय, ध्यान, संबंध व युक्ति असे पांच अर्थ आहेत. त्यांतील उपाय हाच अर्थ येथें संभवतो, ज्ञानोपायांमध्यें कर्मानुष्ठानाचा अंतर्भाव होतो. म्हणून त्याला योग असें गौणवृत्तीनें म्हणतां येतें. तेराव्या अध्यायांत 'अमानित्वमदम्भित्वम्०' श्लो. ७. इत्यादि ज्ञानाच्या साधनांना 'ज्ञान' म्हटलें आहे. त्याचप्रमाणें कर्मानुष्ठान मुख्य समाधियोगाचें साधन आहे म्हणून त्याला 'योग' म्हटलें आहे. अर्थात् योग म्ह० केवल कर्मयोगच असा मुख्यवृत्तीनें जे अर्थ करितात त्यांना हे रहस्य ठाऊक नसतें. असो; पुढील उपायज्ञानाविषयीं श्रोत्याच्या मनांत आवड उत्पन्न व्हावी, म्हणून 'या कर्मानुष्ठानज्ञानानें तूं युक्त झालास म्ह० तुला ईश्वरप्रासादामुळें तत्त्वज्ञान होईल व त्यामुळे तुझा धर्माधर्मसंज्ञक बंध निवृत्त होईल' अशी भगवान् स्तुति करीत आहेत. ] ३९

नेहाभिक्रमनाशोऽस्ति प्रत्यवायो न विद्यते ।
स्वल्पमप्यस्य धर्मस्य त्रायते महतो भयात् ॥४०॥

**अन्वयार्थ—इह**—या मोक्षमार्गरूप कर्मयोगांत—**अभिक्रमनाशः**—आरंभिलेल्या कर्माचा नाश—**न अस्ति**—होत नाहीं. त्यांत—**प्रत्यवायः न विद्यते**—दोष नाहीं.—**अस्य धर्मस्य**—या योगरूप धर्माचे—**स्वल्पं अपि**—थोडेसेंही अनुष्ठान—**महतः भयात्**—संसाररूप मोठ्या भयापासून—**त्रायते**—रक्षितें. ४०

किंचान्यत् नेहाभीति । **नेह मोक्षमार्गे कर्मयोगेऽभिक्रमनाशोऽभिक्रमणमभिक्रमः प्रारम्भस्तस्य नाशो नास्ति** । यथा कृष्यादेर्योगविषये प्रारम्भस्य नानैकान्तिकफलत्वमित्यर्थः । किंच नापि चिकित्सावत्प्रत्यवायो विद्यते । किं तु भवति । **स्वल्पमप्यस्य योगधर्मस्यानुष्ठितं त्रायते रक्षति महतः संसारभयाज्जन्ममरणादिलक्षणात्** ॥ ४० ॥

**भाष्यार्थ**—( अहो पण कर्मानुष्ठानाचें फळ तरी नियमानें मिळतेच, अशी खात्री कोठें आहे ? शिवाय त्यांत दोषही संभवतात. तेव्हां या योगबुद्धीवर तरी श्रद्धा कशी ठेवावी ? उत्तर-)—**किं च 'नेहाभि०' इति अन्यत् (उच्यते)**—शिवाय 'नेहाभि०' या श्लोकानें कर्माचें अनुष्ठान अवश्य केलें पाहिजे याविषयीं आणखी कांहीं कारण सांगितलें जातें.—**इह मोक्षमार्गे-कर्मयोगे**—या मोक्षमार्गांत–कर्मयोगांत—**अभिक्रम-**

---

१ रहस्यकार–" कर्मयोगाच्या मुख्य मुख्य सिद्धान्तांचा प्रथम निर्देश करितात–" असें या श्लोकाला अवतरण देतात व पुढे श्लोकाचा अर्थ असा करितात–" येथे म्ह० या कर्मयोगमार्गांत ( एकदा ) आरंभिलेल्या कर्माचा नाश होत नाहीं व ( पुढें ) विघ्नही येत नाहीं. या धर्माचे थोडेही ( आचरण ) मोठ्या भयापासून संरक्षण करितें." आचार्यांनीं 'इह' या शब्दाचा 'या मोक्षमार्गांत–कर्मयोगांत' असा अर्थ केला आहे व निष्काम व ईश्वरार्पणबुद्धीनें केलेलें कर्म हें मोक्षाचें साधन असल्यामुळें त्याला मोक्षमार्ग म्हणणेंच उचित आहे. रहस्यकारांनी 'प्रत्यवाय' शब्दाचा अर्थ 'विघ्न' असा केला आहे. तो चिन्त्य आहे. कारण कर्मकांडांत प्रत्यवायशब्दाचा अर्थ 'दोष' असाच केला जातो. रहस्यकार 'महतः भयात्' याचा अर्थ 'मोठ्या भयापासून' असा अगदीं सरळ करितात, पण मोठें भय

**नाशः अभिक्रमणं-अभिक्रमः-प्रारंभः तस्य नाशः न अस्ति**—अभिक्रमण करणें, हाच अभिक्रम आहे. अभिक्रम म्ह० प्रारंभ. त्याचा नाश नाहीं. [ मोक्षमार्गभूत कर्मानुष्ठानांत म्ह० निष्काम ईश्वराराधनार्थ केलेल्या कर्मानुष्ठानांत प्रारंभिलेल्या कर्माचा नाश होत नाहीं. ]—**यथा कृष्यादेः**—ज्याप्रमाणें शेती, व्यापार इत्यादि कर्मांचा

---

कोणतें, तें कांहीं सांगत नाहींत. आचार्य-'या योगधर्माचें थोडेसेंही अनुष्ठान जन्ममरणादिरूप संसारभयापासून रक्षितें' असा त्याचा अर्थ करितात. वस्तुतः योगधर्माचा हा रोचक अर्थवाद आहे. पण रहस्यकार त्यालाच मुख्य सिद्धान्त म्हणतात. जणुं काय अर्थवाद व सिद्धान्त यात कांहींच फरक नाही ! पण श्लोकांतील अक्षरार्थावरूनही ही योगधर्माची स्तुति-प्रशंसा आहे, हें उघड होते. रहस्यकार या श्लोकावरील टीपेत म्हणतात-"कर्मयोगमार्गांत एका जन्मात सिद्धि मिळाली नाहीं, तरी केलेलें कर्म फुकट न जातां पुढील जन्मांत तें उपयोगीं पडतें आणि जन्मोजन्मी अशी भर पडत जाऊन अखेर केव्हाना केव्हां तरी खरी सद्गति मिळते, असा याचा अर्थ आहे." मग असें जर आहे तर 'ज्ञानोत्तर ज्ञानी पुरुषानें काय करावें, तें सांगण्यासाठीं गीता प्रवृत्त झाली आहे,' इत्यादि म्हणण्याची वाट काय ? ज्ञानानंतरही सिद्धि मिळविण्यासाठीं जर अनेक जन्म कर्मयोग आचरावा लागत असला तर त्या बिचाऱ्या ज्ञानाची कीव करावयास पाहिजे ! रहस्यकार ! ज्ञानोत्तर ज्ञानी पुरुषानें कर्मयोगमार्गानेंच जावें, असा भगवानांचा उपदेश ना ? आणि त्याच ज्ञानोत्तर कर्मयोगाचें जन्मोजन्म आचरण केल्याने त्यांत भर पडत जाऊन अखेर केव्हाना केव्हां तरी खरी सद्गति मिळते, हेंच गीतेचें रहस्य ? खरोखर आपला हा सिद्धान्त अपूर्व आहे ! बिचाऱ्या सांप्रदायिक अद्वैतमार्गियांना किंवा दुसऱ्या कोणाही सांप्रदायिकाला असला ज्ञानोत्तरही अनेक जन्म खितपत ठेवणारा कर्मयोगमार्ग गीतेंत दिसला नाहीं. पण सांप्रदायिक टीकाकारांच्या छापेंतून सुटल्यामुळें आपणास तो दिसला ! ! बिचारे रहस्याचे श्रद्धाळु वाचक स्वतःला ज्ञानी समजून अनेक जन्म ज्ञानोत्तर कर्मयोग करीत राहोत ! ! त्याना अखेर केव्हांना केव्हा तरी सद्गति मिळेल. आम्हां आचार्यभक्तांना किंवा अद्वैतवेदान्तसांप्रदायिकांना ज्ञानसमकालच मुक्ति पाहिजे आहे. ज्ञानापूर्वी चित्तशुद्धीसाठीं आम्ही अनेक जन्म कर्म, उपासना, ध्यान इत्यादि करूं. ज्ञान झाल्यावर एक क्षणभरही पुनर्जन्म घेणार नाहीं. असो; शास्त्रार्थाची यथार्थ प्रतिपत्ति न झाल्याचें हें स्पष्ट चिह्न आहे. शिवाय असें कीं, एकाच जन्मांत सिद्धि जरी न मिळाली तरी केलेलें पुण्याचरण फुकट जात नाहीं, हा नियम एका कर्मयोगालाच का तेवढा लागू आहे ? आणि भक्ति, उपासना, ध्यान यांनाही तोच नियम कां लागू नाहीं ? शिवाय हा नियम कोणत्या कर्माला लागू आहे बरे ? गी. र. च्या ५५-५६ पृष्ठावर सांगितलेल्या खाणें, पिणें, खेळणे, बसणें इत्यादि कर्मांनाच तो लागू आहे ना ? यापेक्षां आचार्य म्हणतात त्याप्रमाणें 'इह' म्ह० त्या मोक्षमार्गांत आरंभिलेलें साधन फुकट जात नाहीं, असें म्हणणेंच अधिक सयुक्तिक होय; आणि आत्मज्ञान हेंच मोक्षाचें साक्षात् साधन असल्यामुळें कर्मयोगादि सर्व साधनें चित्तशुद्धीच्या द्वारा ज्ञानप्राप्तीसाठीं आहेत. चित्तशुद्धि होईपर्यंत त्यांचें अनेक जन्म अनुष्ठान करावें लागतें ज्ञानोत्तर साधनांची मुळींच गरज नाहीं व ज्ञानोत्तर एकाही जन्माचा संभव नाहीं, मग अनेक जन्म तर दूरच राहिले, हा वेदान्तसिद्धान्त होय.

आरंभ जरी केला तरी त्याचें इष्ट फळ मिळेलच असा निश्चय नसतो, ( कारण शेती-व्यापार वगैरे केल्यास फायदा होण्याचा संभव आहे, एवढ्या आशेवरच मनुष्य त्यांचा आरंभ करतो ) तशी या कर्मानुष्ठानांत प्रारंभाच्या नाशाची भीति नसते.—**योगविषये प्रारंभस्य अनैकान्तिकफलत्वं न इत्यर्थः**—या योगविषयांतील प्रारंभाला व्यभिचारि फलत्व नाहीं. म्ह० वैदिक कर्माचें नियत फळ मिळत नाही, असें कधीं होत नाहीं. तें अवश्य मिळतेंच. केलेलें शास्त्रीय अनुष्ठान व्यर्थ जात नाही, असा याचा भावार्थ.—**किंच**—शिवाय दुसरे असे की,—**चिकित्सावत् प्रत्यवायः अपि न विद्यते**—एखादा वैद्यराज एखाद्या रोग्याच्या रोगावर औषधोपचार करींत असतांना रोग वाढण्याचा किंवा मरण येण्याचाही संभव असतो. म्ह० चिकित्सेंत प्रत्यवायही संभवतो. पण चिकित्सेप्रमाणें-औषधोपचाराप्रमाणें या वैदिक कर्मानुष्ठानांत प्रत्यवायही नाहीं. ( कारण ते वेदविहित आहे. )—**किं तु भवति**—तर मग त्या कर्मानुष्ठानाचें कोणतें फळ मिळते ? —**अस्य योगधर्मस्य स्वल्पं अपि अनुष्ठितं महतः-जन्ममरणादि-लक्षणात् संसारभयात् त्रायते-रक्षति**—या योगधर्माचें थोडेसेंही अनुष्ठान फार मोठ्या जन्म-मरणादिरूप संसारभयापासून रक्षण करतें. [ सम्यग्ज्ञान उत्पन्न करून त्याच्या द्वारा ते अनुष्ठान संसारभयांतून सोडविते. कारण ' सर्वपापप्रसक्तोऽपि ध्यायन्निमिषमच्युतम् । यतिस्तपस्वी भवति पंक्तिपावनपावनः ॥ ' सर्व पापांमध्ये आसक्त असलेलाही जो कोणी क्षणभर अच्युताचें ध्यान करतो तो यति, तपस्वी व पंक्तिपावन ब्राह्मणालाही पावन करणारा होतो, असें म्हटले आहे. ही अच्युताच्या ध्यानाची स्तुति आहे. त्यावरून दिवसभर सर्व पापे करावीं व क्षणभर अच्युताचें ध्यान करावें, म्हणजे यति, तपस्वी व पंक्तिपावन होतां येतें, असें न समजतां पापी पुरुषसुद्धां क्षणभरच अच्युत-ध्यान करून जर पावन होतो तर मुळीच पाप न करिता अहर्निश ध्यान करणारा मनुष्य साक्षात् ईश्वरमय होईल, यांत आश्चर्य कसलें ? यास्तव आपणास साक्षात् परमात्मरूप होण्यासाठीं पुण्याचरणपूर्वक अच्युताचें सतत ध्यान केलें पाहिजे, असा त्यावरून निश्चय करावा. कारण स्तुतीचा उपयोग त्या त्या साधनाविषयीं साधकाच्या मनांत आवड उत्पन्न करण्यापुरताच असतो. या श्लोकांत व अ. ६ श्लो. ४० येथेंही या मार्गाची अशीच स्तुति केली आहे. असल्या स्तुतीला व निंदेलाही अर्थवाद म्हणतात. ] ४०

**व्यवसायात्मिका बुद्धिरेकेह कुरुनन्दन ।**
**बहुशाखा ह्यनन्ताश्च बुद्धयोऽव्यवसायिनाम् ॥४१॥**

**अन्वयार्थ—हे कुरुनंदन**—हे कुरुवंशजा अर्जुना !—**इह**—या मोक्षमार्गांत—**व्यवसायात्मिका बुद्धिः**—ही निश्चयस्वभावाची बुद्धि—**एका**—एकच आहे.—**अव्यवसायिनां**—अनिश्चयी पुरुषांच्या—**बुद्धयः**—बुद्धि—**बहुशाखाः**—अनेक प्रकारच्या—**च**—व—**अनन्ताः हि**—अनन्त आहेत, हें प्रसिद्ध आहे. ४१.

**येयं सांख्ये बुद्धिरुक्ता योगे च वक्ष्यमाणलक्षणा सा व्यवसायेति । व्यवसायात्मिका निश्चयस्वभावैकैव बुद्धिरितरविपरीतबुद्धिशाखाभेदस्य बाधिका सम्यक्प्रमाणजनितत्वादिह श्रेयोमार्गे हे कुरुनन्दन। याः पुनरितरा बुद्धयो यासां शाखाभेदप्रचारवशादनन्तोऽपारोऽनुपरतः संसारो नित्यप्रततो विस्तीर्णो भवति, प्रमाणजनितविवेकबुद्धिनिमित्तवशाच्चोपरतास्वनन्तभेदबुद्धिषु संसारोऽप्युपरमते । ता बुद्धयो बहुशाखा बह्व्यः शाखा यासां ता बहुशाखा बहुभेदा इत्येतत्। प्रतिशाखाभेदेन ह्यनन्ताश्च बुद्धयः केषामव्यवसायिनां प्रमाणजनितविवेकबुद्धिरहितानामित्यर्थः ॥ ४१ ॥**

**भाष्यार्थ**—( येथें सांख्यज्ञान व योगज्ञान असें बुद्धिद्वयच सांगितलें आहे. पण वैशेषिक, न्याय, सांख्य, योग, पूर्वमीमांसा, चार्वादिकांची नास्तिक शास्त्रें इत्यादिकांनीं उपदेशिलेलीं दुसरीं ज्ञानेंही आहेत. भगवानांनी त्या सर्वांकडे दुर्लक्ष करून हे बुद्धिद्वयच कां सांगितलें ? उत्तर- )—**या इयं सांख्ये बुद्धिः उक्ता**—जी ही सांख्यबुद्धि वर सांगितली—**च योगे वक्ष्यमाणलक्षणा**—आणि पुढें योगबुद्धि सांगावयाची आहे—**सा 'व्यवसाया०' इति**—तीच एक प्रमाणभूत बुद्धि आहे, असें आतां भगवान् 'व्यवसायात्मिका०' या श्लोकानें सांगतात.—**हे कुरुनंदन**—अर्जुना—**इह श्रेयोमार्गे**—या

१ 'कर्मयोगांतील महत्त्वाचा दुसरा सिद्धान्त आता सांगतात-' असे या श्लोकाला अवतरण देऊन रहस्यकार त्याचा अर्थ असा करितात—"व्यवसाय म्ह० कार्याकार्याचा निश्चय करणारी ( इन्द्रियरूपी ) बुद्धि या मार्गात एक म्ह० एकाग्र असावी लागते. कारण ज्यांच्या बुद्धीचा ( अशा प्रकारे ) एक निश्चय होत नाहीं त्याच्या बुद्धि म्ह० वासना अनेक फांटे फुटलेल्या व अनंत ( प्रकारच्या ) असतात." पण या श्लोकात कर्मयोगांतील सिद्धान्त मुळींच सांगितलेला नाहीं. मोक्षमार्गांत निश्चित एकच बुद्धि असते व प्रवृत्तिमार्गांत अनिश्चित अनेक बुद्धि असतात, असे सांगून या श्लोकातही मोक्षमार्गभूत योगाची प्रशंसाच विवक्षित आहे. कारण 'योगबुद्धि ऐक' असें जरी भगवानांनी ३९ व्या श्लोकांत म्हटलें आहे, तरी पुढच्याच श्लोकांत कांहीं ती सांगण्यास आरंभ केलेला नाहीं. तर प्रथम २॥ श्लोकात त्या बुद्धीची प्रशंसा व ४२-४४ श्लोकांत इतर सकाम बुद्धीची निंदा करून ४५ व्या श्लोकांत 'अर्जुनाला तूं निष्काम हो,' असें सांगून ४६ श्लोकात ज्ञानाच्या फलांत सर्वकर्मफलांचा अंतर्भाव होतो असें म्हणून ४७ व्या श्लोकात पण तुला कर्माचाच अधिकार आहे, येथून योगाच्या उपदेशास आरंभ केला आहे. यास्तव स्तुतिरूप किंवा निंदारूप अर्थवादाला कर्मयोगमार्गांतील सिद्धान्त म्हणतां येत नाहीं. या श्रेयोमार्गांत व्यवसायात्मिका म्ह० निश्चयस्वभावाबुद्धि म्ह० ज्ञान एकच आहे. वर सांगितलेली सांख्यबुद्धि व पुढे सांगावयाची योगबुद्धि ही एकच प्रमाणभूत बुद्धि आहे. कारण ती निर्दोष वेदरूप प्रमाणापासून झालेली आहे. बाकीच्या दर्शनकारांच्या बुद्धि सम्यक्प्रमाणजनित नसतात, असे आचार्य म्हणतात. पण रहस्यकार व्यवसायात्मिका बुद्धि म्ह० कार्याकार्याचा निश्चय करणारें बुद्धींद्रिय असें म्हणून 'एका' म्ह० एकाग्र असावें लागतें, असें सांगतात. पण एका म्ह० एकाग्र हा सरळ अर्थाचाच प्रकार की काय ? बरें, एका म्ह० एकाग्र असे जरी मानलें तरी पुढें त्यालाच स्थिर म्हटलें आहे. याचा सरळ अर्थ असा होतो की कार्याकार्याचा निश्चय करणारें

बुद्धींद्रिय स्थिर असावें लागतें. पण स्थिर म्हणजे काय, तर ते पुढें म्हणतात–" ज्यांच्या बुद्धीचा अशा प्रकारें एक निश्चय होत नाही त्यांच्या बुद्धि म्ह० वासना अनेक फांटे फुटलेल्या व अनंत प्रकारच्या असतात" म्हणजे कशास कांहीं मेळच नाहीं. पूर्वार्धात बुद्धि म्ह० बुद्धींद्रिय व उत्तरार्धात बुद्धि म्हणजे वासना. पूर्वार्धात व्यवसायात्मिका म्ह० कार्याकार्याचा निश्चय करणारी व एका म्ह० एकाग्र पण उत्तरार्धात अव्यवसायिनां म्हणजे ज्यांच्या बुद्धीचा अशा प्रकारे ( म्ह० कशा प्रकारें ? ) एक निश्चय नाही त्यांच्या; या अर्थाला सरळ म्हणावयाचें की सुसंगत म्हणावयाचें कीं म्हणावयाचें तरी काय ? पण रहस्यकारांना याच अर्थाचें मोठे कौतुक वाटतें. ते म्हणतात–"या श्लोकाच्या दुसऱ्या चरणांत बुद्धि असा नुस्ताच शब्द आहे. मागें व्यवसायात्मक हे विशेषण नाही. म्हणून 'बुद्धयः' या अनेकवचनानें " वासना, कल्पनातरंग " असा अर्थ होऊन " ज्यांची व्यवसायात्मक बुद्धि म्ह० निश्चय करणारें बुद्धींद्रिय स्थिर नाही त्यांच्या मनांत क्षणोक्षणी नेव तरंग किंवा वासना उत्पन्न होत असतात," "असा एकंदर श्लोकाचा अर्थ होतो. बुद्धि या शब्दाचे 'निश्चय करणारे इंद्रिय' व 'वासना' हे दोन्ही अर्थ लक्षांत ठेवल्याखेरीज कर्मयोगांतील बुद्धीच्या विवेचनाचें मर्म नीट समजावयाचें नाही." ६२७. पण बुद्धि म्ह० वासना हा अर्थ कोणत्या कोशांत आहे ! 'सकल्पविकल्पात्मक मनः निश्चयात्मिका बुद्धिः' अशीं क्रमानें मन व बुद्धि यांची लक्षणें वेदान्तग्रंथात करीत असतात. पण येथें बुद्धीचें लक्षण सांगावयाचे नाही. मग 'व्यवसायात्मिका' हे बुद्धीला विशेषण देण्याचे कारण काय? रहस्यकार ह्मणतात 'त्या विशेषणामुळें येथें बुद्धि म्ह० बुद्धींद्रिय हा अर्थ घ्यावा असें कळतें व उत्तरार्धात ते नसल्यामुळें व बहुवचनामुळे बुद्धि म्ह० वासना, कल्पनातरग असा अर्थ होतो.' पण असा अर्थ करण्याचें कारण काय ? जेथे जेथे 'व्यवसायात्मिका' हे विशेषण नसतें तेथें तेथें असाच अर्थ करूं लागल्याम 'सांख्ये बुद्धिः' 'योगे बुद्धिः' इत्यादि ठिकाणींही तसाच करावा लागेल. पण तो केव्हाही सयुक्तिक होणार नाही. शिवाय 'एका' या विशेषणाचा अर्थ अगोदर एकाग्र व नतर स्थिर, असा लांबवावा लागतो. पण त्यापेक्षां या मोक्षमार्गांत प्रमाणजनित निश्चयस्वरूप अशी ही सांख्य-योगबुद्धि एकच आहे. तिच्या अनेक शाखा नाहीत. पण अशा प्रमाणजनितबुद्धीनें हीन असलेल्या लोकांच्या बुद्धि अनंत व अनेक शाखांनी युक्त असतात, असें म्हणणें अधिक सयुक्तिक, सरळ व प्रकृत विषयाला धरून नाहीं का ? मोक्षमार्गातील ही प्रस्तुत बुद्धि एक व इतर मार्गांतील बुद्धि अनेक असा अर्थ करण्यांत 'एका' व 'अनंताः' या शब्दांचें स्वारस्य किती चांगल्या रीतीनें व्यक्त होतें ? वरील उताऱ्यांत 'ज्यांची ... व त्यांच्या मनांत' इत्यादि जो अर्थ सांगितला आहे तो तर मुळाला अगदींच सोडून आहे. कारण मूळ श्लोकांत 'ज्यांची' व 'त्यांच्या' असा संबंध दाखविणारे शब्द नाहीत. या श्लोकाचा रहस्यकारासारखा अर्थ रामानुज, माध्व, वल्लभ, ज्ञानेश्वरमहाराज इत्यादि दुसरे कोणी करीत नाहीत. सर्व टीकाकार प्रायः आचार्यासारखाच अर्थ करितात व तसाच संबंध लावितात. सांख्ययोगबुद्धीच्या प्रशंसापरच हे श्लोक आहेत, असें त्या सर्वांचें म्हणणें आहे, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. मध्वाचार्य 'व्यवसायात्मिका बुद्धिः' म्ह० सम्यक्–युक्तिनिर्णीत मत, असा अर्थ करितात. रामानुजाचार्य म्हणतात—'मुमुक्षुणा अनुष्ठेये कर्मणि बुद्धिः व्यवसायात्मिका बुद्धिः व्यवसायः निश्चयः' म्ह०

मोक्षमार्गांत—**व्यवसायात्मिका-निश्चयस्वभावा एका एव बुद्धिः**—व्यवसायात्मिका म्ह० निश्चयस्वभावाची एकच बुद्धि आहे. (श्रेयोमार्गांत प्रवृत्त झालेल्या या व्यवसायात्मिका बुद्धीचें फळ सांगतात-)—**इतरविपरीतबुद्धिशाखाभेदस्य बाधिका**—या प्रकृतबुद्धिद्वयाच्या अपेक्षेनें इतर-त्याच्या उलट-अप्रमाणजनित-स्वकपोलकल्पित अशा ज्या बुद्धि त्यांचा संसाराला कारण होणारा जो शाखाभेद त्याला बाधित करणारी आहे.—**सम्यक्प्रमाणजनितत्वात्**—कारण ही बुद्धि निर्दोष वेदवाक्यरूप प्रमाणापासून उत्पन्न झालेली असल्यामुळें इतर काल्पनिक ज्ञानाच्या प्रकारांचा बाध करणारी आहे. [त्यामुळे येथें सांगितलेलें बुद्धिद्वय म्ह० उपायरूप योगबुद्धि व उपेयरूप सांख्यबुद्धि अनुक्रमे परंपरेने व साक्षात् संसारहेतुभूत अज्ञानाचा बाध करणारी आहे. उत्तरार्धाचें व्याख्यान-]—**याः पुनः इतराः बुद्धयः**—आणि ज्या प्रस्तुत बुद्धिद्वयाहून इतर बुद्धि आहेत,—**यासां शाखाभेदप्रचारवशात् अनन्तः अपारः अनुपरतः संसारः नित्यप्रततः विस्तीर्णः भवति**—ज्या अप्रामाणिक बुद्धींचा प्रसंगोपात्त आणखी अत्यंत वाढलेला विस्तार प्रवृत्त झाल्यामुळे संसार अनंत, अपार, अनुपरत म्ह० नित्य प्रतत-अत्यंत विस्तीर्ण होतो—**च**—आणि—**प्रमाणजनितविवेकबुद्धिनिमित्तवशात् अनन्तभेदबुद्धिषु उपरतासु संसारः अपि उपरमते**—शुद्ध अनुमान व आगम या प्रमाणांनीं उत्पन्न झालेल्या विवेकबुद्धिरूप निमित्तामुळे त्या अनंतबुद्धि निवृत्त झाल्या असतां संसारही निवृत्त होतो—**ताः बुद्धयः बहुशाखाः**—त्या बुद्धि बहुशाखा आहेत.—**बह्व्यः शाखाः यासां ताः बहुशाखाः बहुभेदाः इति-एतत्**—ज्यांच्या शाखा-भेद पुष्कळ आहेत त्या बहुशाखा-बहुभेदयुक्त असा याचा भावार्थ—**प्रतिशाखाभेदेन अनन्ताः बुद्धयः हि**—प्रत्येक शाखेच्या भेदामुळे अनन्त बुद्धि होतात,—**केषां**—कोणाच्या ?—**अव्यवसायिनां प्रमाणजनितविवेकबुद्धिरहितानां इत्यर्थः**—अव्यवसायींच्या-वेदरूप स्वतःप्रमाणापासून उत्पन्न झालेल्या विवेकबुद्धिरहित लोकांच्या बुद्धि अनंत असतात असा भावार्थ. [वर सांगितलेली जी व्यवसायात्मिका बुद्धि तिच्याहून अगदी निराळ्या असलेल्या बुद्धि बहुशाखांनीं युक्त व अनन्त असतात. त्या काल्पनिक-अप्रामाणिक बुद्धीविषयींच्या आनुषंगिक अभिनिवेशामुळें तिच्यामध्यें आणखी अनेक प्रकार उद्भवतात. तेच त्यांचे शाखाभेद होत. त्यांच्या प्रवृत्तीमुळें संसार अनंत बनतो. सम्यग्ज्ञानावांचून संसाराची निवृत्ति न होणें, हेंच त्याचें अनन्तत्व आहे. संसार स्वतः कार्य आहे. पण त्याचें वस्तुभूत-सत्य-अबाधित कारण नाहीं. म्हणून अपार-पाररहित म्हटलें आहे. तो प्रवाहरूपानें नित्य प्रवृत्त आहे. केव्हांही निवृत्त होत नाहीं. म्हणून त्याला अनुपरत-नित्यप्रतत म्हटलें आहे. तात्पर्य इतर अनंत भेदयुक्त बुद्धींच्या प्रवृत्तीमुळें

---

मुमुक्षूनें अनुष्ठान करावयास योग्य असलेलें जें मोक्षसाधनभूत कर्म त्याविषयींची बुद्धि ही व्यवसायात्मिका बुद्धि होय. व्यवसाय म्ह० निश्चय. इतर टीकाकारही व्यवसायात्मिका म्ह० निश्चयात्मिका व एका म्ह० एक असाच अर्थ करितात.

संसार असा अनन्त, अपार व नित्य प्रवृत्त होऊन विस्तारला आहे. पण वेदोक्त प्रमाणापासून उत्पन्न झालेल्या विवेक-बुद्धीमुळें सम्यग्ज्ञान होऊन अप्रामाणिक बुद्धीचे अनंत भेद निवृत्त होतात. त्या असंख्य विपरीत बुद्धि निवृत्त झाल्या असतां संसारही निवृत्त होतो. पण जे विवेकबुद्धिहीन असतात त्यांचीं ज्ञानें बहुशाखांनीं युक्त व अनन्त असतात. इतर बुद्धींतील एकेका बुद्धीचे अवान्तर भेद अनेक असल्यामुळें ते सर्व मिळून अनंत भेद झाले आहेत. ] ४१

यामिमां पुष्पितां वाचं प्रवदन्त्यविपश्चितः ।
वेदवादरताः पार्थ नान्यदस्तीति वादिनः ॥४२॥
कामात्मानः स्वर्गपरा जन्मकर्मफलप्रदाम् ।
क्रियाविशेषबहुलां भोगैश्वर्यगतिं प्रति ॥ ४३ ॥
भोगैश्वर्यप्रसक्तानां तयापहृतचेतसाम् ।
व्यवसायात्मिका बुद्धिः समाधौ न विधीयते ॥४४॥

**अन्वयार्थ—हे पार्थ**—हे अर्जुना !—**वेदवादरताः**—वेदांचे जे रमणीय अर्थवाद त्यांतच आसक्त झालेले—**अन्यत् न अस्ति इति वादिनः**—स्वर्गादि फल देणाऱ्या कर्मांहून दुसरें कांही चांगलें साधन नाहीं, असे बोलणारे—**कामात्मानः**—कामस्वभाव-नाना प्रकारच्या विषयासक्तीनें विषयमय झालेले,—**स्वर्गपराः**—स्वर्गालाच श्रेष्ठ पुरुषार्थ समजणारे, असे—**अविपश्चितः**—अविद्वान्-अविवेकी लोक—**यां इमां पुष्पितां**—ज्या या फुललेल्या वृक्षाप्रमाणे रमणीय वाटणाऱ्या—**जन्मकर्मफलप्रदां**—जन्म हेंच कर्माचें फल देणाऱ्या,—**भोगैश्वर्यगतिं प्रति क्रियाविशेषबहुलां**—भोग व ऐश्वर्य यांच्या प्राप्तीसाठीं जिच्यामध्यें अनेक प्रकारचीं कर्में सांगितलीं आहेत, अशा—**वाचं**—वाणीला—**प्रवदन्ति**—बोलतात,—**तया**—त्या वाणीनें—**अपहृतचेतसां**—ज्यांचें चित्त हरण केलें आहे अशा—**भोगैश्वर्यप्रसक्तानां**—भोग व ऐश्वर्य यांत अत्यंत आसक्त झालेल्या—**तेषां**—त्या अविवेक्यांची—**व्यवसायात्मिका बुद्धिः**—निश्चयस्वभाव-सांख्ययोगबुद्धि—**समाधौ**—अंतःकरणांत—**न विधियते**—होत नाहीं. ४२—४४.

**येषां व्यवसायात्मिका बुद्धिर्नास्ति ते यामिति । यामिमां वक्ष्यमाणां पुष्पितां पुष्पितवृक्ष इव शोभमानां श्रूयमाणरमणीयां वाचं वाक्यलक्षणां प्रवदन्ति । केऽविपश्चितोऽल्पमेधसोऽविवेकिन इत्यर्थः । वेदवादरता बह्वर्थवादफलसाधनप्रकाशकेषु वेदवाक्येषु रता हे पार्थ नान्यत्स्वर्गप्राप्त्यादिफलसाधनेभ्यः कर्मभ्योऽस्तीत्येवंवादिनो वदनशीलाः ॥ ४२ ॥**

**भाष्यार्थ**—( सांख्य-योगरूप एकच जर प्रमाणभूत बुद्धि आहे तर सर्वांच्या चित्तांत तीच एक स्थिर कां होत नाहीं ? उत्तर-)—**येषां व्यवसायात्मिका बुद्धिः नास्ति**—ज्यांची अशी निश्चयात्मक बुद्धि-ज्ञान नसतें.—**ते 'यां०' इति**—ते ही अर्थवादरूप वाणी बोलतात. ती त्यांचें चित्त आकर्षण करून घेते. त्यामुळें प्रायः त्यांना निश्चयात्मक ज्ञान होत नाही, असें 'यां०'इत्यादि श्लोकांनी सांगतात—**यां इमां पुष्पितां-पुष्पित-**

---

१ पण रहस्यकार ह्मणतात—" व्यवसायात्मिका बुद्धि स्थिर किंवा एकाग्र नसली म्ह० दररोज निरनिराळ्या वासनांनी मन व्यग्र होऊन आज पुत्रप्राप्तीसाठी अमुक कर्म कर तर उद्या स्वर्गप्राप्तीसाठी अमुक कर्म कर, अशा नादात मनुष्य कसा पडतो याचें आता वर्णन करितात. " ६२७ व्यवसायात्मिका म्ह० निश्चयरूप बुद्धि, ती स्थिर व एकाग्र नाही, असें कसें ह्मणतां येईल ? स्थिर किंवा एकाग्र नसलेली बुद्धि निश्चयात्मिका कशी? शिवाय 'बुद्धींद्रिय' याचा रूढ अर्थ 'ज्ञानेंद्रिय' असा आहे. तथापि रहस्यकारांनी अन्तःकरणालाच बुद्धींद्रिय म्हटले आहे, असे आपण समजू. पण सर्व अन्तःकरणाला व्यवसायात्मक हें विशेषण लागत नाही. अन्तःकरणाच्या चार वृत्ति मानतात. चित्त, अहंकार, बुद्धि व मन. निदान बुद्धि व मन अशा दोन तरी मानतात. त्यांतील मन चंचल, अनिश्चित, संकल्प-विकल्पात्मक व बुद्धि निश्चयात्मिका असते. त्यामुळे 'निश्चयात्मिका बुद्धि स्थिर किंवा एकाग्र नसली' हा शब्दप्रयोगच संभवत नाही. मन स्थिर किंवा एकाग्र नसते. बुद्धि तशी नसते. रहस्यकारांनी येथे 'वासना' हा शब्द 'इच्छा' या अर्थी योजलेला दिसतो. पण शास्त्रात किंवा संस्कृत भाषेतही वासनाशब्दाचा इच्छा हा अर्थ रूढ नाही. तर वासना म्ह० अनुभवाचे सूक्ष्म रूप, संस्कार, असा अर्थ रूढ आहे. वासना म्ह० इच्छा, हा प्राकृत अर्थ आहे. पण गीताशास्त्रांत प्राकृत अर्थी रूढ असलेला वासनाशब्द योजला असेल, असें म्हणतां येत नाही. तसेच पुढील तीन श्लोकातल्या अर्थाकडे पाहिले म्हणजे रहस्यकार सांगतात तसे वर्णन त्यात नसून आचार्य ह्मणतात त्याप्रमाणे 'ज्याना सम्यक् प्रमाणजनित निश्चित ज्ञान झालेलें नसते, ते कर्मकांडात्मक वेदांतील अर्थवादातच आसक्त होतात व त्यामुळेंच त्यांच्या चित्तांत हें प्रमाणजनित ज्ञान उत्पन्नच होत नाही, ' असे वर्णन आहे. मध्वाचार्य ह्मणतात-अवैदिक मतेच अव्यवसायात्मक असतात. वैदिक मत तसे नसते. हें खरें, तथापि कांहीं वैदिकच सर्व वैदिक कर्मे स्वर्गफलासाठी आहेत असे म्हणतात, त्याचें मत खरें वैदिक नसून वैदिकाभास आहे, असे दाखविण्यासाठी तीन श्लोकात त्याच्या मताची निंदा केली आहे. रामानुजाचार्यही 'भगवान् काम्यकर्माधिकाऱ्यांची निंदा करितात' असे याला अवतरण देतात. वल्लभाचार्यादि इतरांचेही म्हणणें असेच आहे. चित्तशुद्धीसाठी निष्काम व ईश्वरार्पणबुद्धीने केलेल्या कर्मांची स्तुति करण्यासाठी काम्यकर्माची ही निंदा-हा निंदार्थवाद आहे, व तो मीमांसेच्या पद्धतीला धरून आहे. सांप्रदायिक टीकाकारांना दोष देऊन व त्यांचा अर्थ ओढाताणीचा असतो असे म्हणून स्वतः सरळ अर्थ करणारे रहस्यकार या तीन श्लोकाचा अर्थ कसा करितात तो पहा—'हे पार्था! 'वेदवादरताः-' ( कर्मकांडात्मक ) वेदांतील ( फलश्रुतीच्या ) वाक्यांना भुललेले व 'नान्यत् अस्ति इति वादिनः-' त्याखेरीज दुसरे कांही नाही, असे म्हणणारे 'अविपश्चितः' मूढ ( जे ) लोक 'पुष्पितां वाचं प्रवदन्ति-' फुलवून असे भाषण करितात कीं-४२ "-'क्रियाविशेष-

वृक्ष इव शोभमानां—ज्या या पुष्पित म्ह० फुललेल्या पळसाच्या वृक्षाप्रमाणें शो-

बहुलां' अनेक प्रकारच्या (यज्ञयागादि) कर्मांनीच 'जन्मकर्मफलप्रदां-' (पुनः) जन्म होणें हें फळ मिळून (जन्मोजन्मीं) 'भोगैश्वर्यगतिं प्रति' भोग व ऐश्वर्य प्राप्त होतें," 'स्वर्गपराः कामात्मानः-' ते स्वर्गाच्या पाठीस लागलेले काम्यबुद्धीचे लोक 'तथा अपहृत-चेतसां' वरील भाषणाकडेच त्यांचें मन ओढलें जाऊन 'भोगैश्वर्यप्रसक्तानां' भोग व ऐश्वर्य यांत गढून जातात व त्यामुळें त्यांची 'व्यवसायात्मिका बुद्धिः' व्यवसायात्मक म्ह० कार्याकार्याचा निश्चय करणारी बुद्धि (कधींच) 'समाधौ-' समाधिस्थ म्ह० एका ठिकाणीं 'न विधीयते' स्थिर होऊं शकत नाहीं." ४४ पृ. ६२८. यात मूळ श्लोकांतील शब्द अवतरणचिह्नांत आम्ही मुद्दाम दिले आहेत. 'रता' म्ह० भुललेले हा अर्थ बरोबर नाहीं. कारण रत ह्म० आसक्त झालेले, भुललेले नव्हे. कारण भुलणे निराळें व रत होणें निराळें. 'पुष्पितां वाचं प्रवदन्ति-' याचा 'फुलवून असें भाषण करितात,' हा अर्थ बरोबर नाहीं. कारण 'पुष्पित' हे वाणीचे विशेषण आहे व त्याचा अर्थ 'आपातरमणीय' असा आहे. फुललेल्या वृक्षाप्रमाणे शोभणारी, ऐकायला मोठी गोड अशी वाणी बोलतात. 'वाचं' याचा भाषण व 'पुष्पिता' याचा फुलवून हा अर्थ व 'वाच प्रवदन्ति' याचा 'असे भाषण करितात' हा अर्थ बरोबर नाहीं. कारण जी वाणी बोलतात तिनें ज्यांचें चित्त हरण केलें आहे असा पुढे संबंध असून 'जन्मकर्मफलप्रदां' व 'भोगैश्वर्यगति प्रति क्रियाविशेषणबहुलां' हीं विशेषणे आहेत. त्यामळे ती वाणी ह्म० वेदवाणी, नुसतें भाषण नव्हे. बरें, त्यांनीं त्यांचे भाषण ह्मणून जें दिले आहे त्यात तरी या वाणीच्या दोन विशेषणाचाच अर्थ केला आहे. पण तो कितपत बरोबर आहे याचा विचार वाचकांनीच करावा. 'क्रिया-विशेषबहुलां' ह्म० अनेक प्रकारच्या यज्ञयागादि कर्मांनीच, 'जन्मकर्मफलप्रदा' पुनः जन्म होणे, हें फळ मिळून (जन्मोजन्मी) 'भोगैश्वर्यगति प्रति-' भोग व ऐश्वर्य प्राप्त होतें. हा अर्थ मुळाला अगदीं धरून नाहीं. वास्तव भोग व ऐश्वर्य याच्या प्राप्तीसाठी ज्या वाणीमध्यें कर्मांचे अनेक प्रकार सांगितले आहेत व जी जन्मरूप कर्मफळ देणारी आहे अशी पुष्पित वाणी अज्ञ कर्मठ बोलतात. असा अन्वय व अर्थ करणेंच अतिशय सयुक्तिक आहे. बहुतेक सर्व टीकाकार असाच अर्थ करितात. 'तया अपहृतचेतसां' वरील भाषणाकडेच त्याचें मन ओढून जाऊन, हा अर्थही मुळाला धरून नाहीं, 'तया' ही तृतीया विभक्ति असल्यामुळें तिच्याकडून ज्याचे चित्त अपहृत झाले आहे, त्या वाणीनें ज्यांचें चित्त आकर्षण करून घेतलें आहे व जे भोगैश्वर्यांत आसक्त झाले आहेत त्यांच्या मनांत सांख्य व योग यांविषयींचें ज्ञान होत नाहीं, उद्भवत नाहीं, हाच अर्थ अधिक सयुक्तिक आहे. कार्याकार्याचा निश्चय करणारी बुद्धि कधीच 'समाधौ-' समाधिस्थ म्ह० एका ठिकाणीं 'न विधीयते-' स्थिर होऊं शकत नाहीं, हा अर्थ अयोग्य आहे. कारण तो मूळाला धरून नाहीं. 'समाधौ' म्ह० समाधिस्थ—एका ठिकाणी व 'न विधीयते' स्थिर होऊं शकत नाहीं हा अर्थ त्या त्या शब्दापासून कसा निष्पन्न होतो, तें एक रहस्यकारांसच माहीत!

१ पळसाचें झाड फुललें म्ह० फार सुशोभित दिसतें. पण प्राण्यांच्या उपयोगी पडतील—त्यांना खावयास सांपडतील अशीं फळें त्यावर येत नाहीत. त्याप्रमाणें कर्मकांडात्मक वाणी ऐकायला मोठी गोडी वाटते. कारण त्यांत अनेक साधनें व साध्य यांचें रसभरित वर्णन केलेलें असतें. पण ती निरतिशय फल मात्र देत नाहीं. म्हणून हा दृष्टान्त दिला आहे.

भणाऱ्या—**श्रूयमाणरमणीयां**—श्रवण करीत असतांना अत्यंत रमणीय वाटणाऱ्या **—वाचं-वाक्यलक्षणां**—वाक्यरूप वाणीला—**प्रवदन्ति**—बोलतात. —**के**—कोण बोलतात ?—**अविपश्चितः-अल्पमेधसः-अविवेकिनः इत्यर्थः**—अविद्वान् -अल्पबुद्धिमान्-अविवेकी असा याचा भावार्थ.—**वेदवादरताः-बहु-अर्थवाद-फल-साधनप्रकाशकेषु वेदवाक्येषु रताः**—अनेक अर्थवाद, फल व साधनें यांचें प्रकाशन करणाऱ्या वेदवाक्यांमध्यें रत झालेले,—**हे पार्थ**—अर्जुना,—**स्वर्गप्राप्त्यादिफलसाधनेभ्यः कर्मभ्यः अन्यत् न अस्ति इति एवं वादिनः वदनशीलाः**—स्वर्गाची प्राप्ति होणें, इत्यादि फलांची साधनें, अशा कर्माहून दुसरें-ईश्वर किंवा मोक्ष नाहीं, असें बोलण्याचें ज्यांचे शीलच बनले आहे, असे ते कर्मनिष्ठ अविवेकी सम्यग्ज्ञानवान् होत नाहींत. [ वेदवाद म्ह० वेदवाक्यें, तीं पुष्कळ अर्थवाद, फलें व साधनें यांचें प्रकाशन करितात. वेदांत जे विधि असतात त्याचे शेष म्हणून विधींची स्तुति, फल व साधन यांचेंही सविस्तर वर्णन असतें. तीं विधिशेषवाक्यें ऐकून पूर्वोक्त वेदाध्यायी अविवेकी ब्राह्मण त्यांतच आसक्त होतात. कर्मकांडनिष्ठ होतात. त्यामुळे कर्मकांडरूपी पुष्पित वाणीचे प्रवचन करणारे ते कर्मनिष्ठ कर्मांवांचून दुसरें कांहीं नाहीं, ईश्वर किंवा मोक्षही नाहीं, असें म्हणून नास्तिक बनतात. अविवेकामुळे त्यांना वेदवाक्याचें तात्पर्य कशांत आहे, हे कळत नाहीं. त्यामुळे त्यांना सम्यग्ज्ञान होत नाहीं. भलताच सिद्धान्त ठरवितात व त्याचाच मग दुरभिमान धरितात. अशा लोकांची प्रायः व्यवसायात्मिका बुद्धि स्थिर होत नाहीं. ] ४२

**ते च-कामात्मान इति । कामात्मानः कामस्वभावाः कामपरा इत्यर्थः । स्वर्गपराः स्वर्गः परः पुरुषार्थो येषां ते स्वर्गपराः स्वर्गप्रधाना जन्मकर्मफलप्रदां कर्मणः फलं कर्मफलं जन्मैव कर्मफलं जन्मकर्मफलं तत्प्रददातीति जन्मकर्मफलप्रदा तां वाचं प्रवदन्तीत्यनुषज्यते । क्रियाविशेषबहुलां क्रियाणां विशेषाः क्रियाविशेषास्ते बहुला यस्यां वाचि तां स्वर्गपशुपुत्राद्यर्था यया वाचा बाहुल्येन प्रकाश्यन्ते । भोगैश्वर्यगतिं प्रति भोगश्चैश्वर्यं च भोगैश्वर्ये तयोर्गतिः प्राप्तिर्भोगैश्वर्यगतिस्तां प्रति साधनभूता ये क्रियाविशेषास्तद्बहुलां तां वाचं प्रवदन्तो मूढाः संसारे परिवर्तन्त इत्यभिप्रायः॥४३॥**

**भाष्यार्थ**—( प्रकृत अविवेकी प्रवचनकर्त्यांना व्यवसायात्मिका बुद्धीची प्राप्ति न होण्याचें कारण दुसऱ्या विशेषणांनीं सुचवितात-)—**ते च 'कामात्मानः०' इति** -ते आणखी कसे असतात ते 'कामात्मानः०' या श्लोकांत सांगतात—**कामात्मानः -कामस्वभावाः-कामपराः इत्यर्थः**—कामामध्येच ज्यांचे चित्त असतें ते का-

---

१ गीतार्थाचा विचार करणाऱ्या आधुनिकांचीही हीच अवस्था झाली आहे. त्यामुळें त्यांना खरा गीतार्थ कळत नाहीं, विधिवाक्य कोणतें व अर्थवादवाक्य कोणते, याचा निश्चय न करितां ते फक्त अक्षरार्थाला चिकटून बसतात, आम्ही सरळ अर्थ करतों, म्हणून वृथा अभिमान धरितात, पण शेवटी तोही टिकत नाही. कारण असल्या ग्रंथाचा अर्थ तात्पर्यानुसारच करावा लागतो.

मात्मे म्ह० कामस्वभाव-कामपरायण असा याचा भावार्थ. [ निरनिराळ्या फलांच्या इच्छेनें तत्साधनभूत कर्मांमध्यें प्रवृत्त झाल्यामुळे कर्मसंन्यासपूर्वक ज्ञाननिष्ठेविषयीं बहिर्मुख होणे, हेंच कामपरायणत्व होय. ]—**स्वर्गपराः—स्वर्गः परः पुरुषार्थः येषां ते स्वर्गपराः स्वर्गप्रधानाः**—स्वर्ग हाच ज्यांचा परम पुरुषार्थ आहे ते स्वर्गपर म्ह० स्वर्गप्रधान [ कर्मनिष्ठ लोक कर्मांमध्येंच आसक्त असतात. त्यांना स्वर्ग या फलाची इच्छा असते. स्वर्ग हाच परम पुरुषार्थ आहे, असा त्यांचा निश्चय असतो, त्यामुळें मोक्ष व त्याचा उपाय ज्ञान यांकडे त्यांच्या मनाचा मुळीं कलच नसतो. ]—**जन्मकर्मफलप्रदां-कर्मणः फलं कर्मफलं जन्म एव कर्मफलं जन्मकर्मफलं तत् प्रददाति इति जन्मकर्मफलप्रदा तां वाचं प्रवदन्ति इति अनुषज्यते** —कर्माचें जें फल तें कर्मफल, जन्म हेंच कर्मफल-जन्मकर्मफल, ते उत्तम प्रकारें देते म्हणून जन्मकर्मफलप्रदा, त्या वाणीला बोलतात-उच्चारितात, असा मागील श्लोकांतील 'वाचं'शब्दाशीं या शब्दाचा अन्वय लागतो. [ येथील ' जन्म ' या शब्दानें उच्च, नीच व मध्यम देह व त्यांचे असंख्य अवांतर भेद यांचें ग्रहण करावे. पण ती वाणी असें अनेक देहरूप फळ कशी देणार ? या प्रश्नाचे उत्तर-]—**क्रियाविशेषबहुलां-क्रियाणां विशेषाः क्रियाविशेषाः ते बहुलाः यस्यां वाचि तां**—क्रिया म्ह० याग, दान इत्यादि अनुष्ठाने, त्यांचे विशेष म्ह० देश, काल, अधिकारी, यांमुळें होणारे सप्ताह, अनेकाह इत्यादि प्रकार ते ज्या वाणीमध्यें पुष्कळ प्रतीत होतात, ती क्रियाविशेषबहुला वाणी होय. (त्या वाणीमध्यें ते विशेष बाहुल्याने कसे राहतात, ते सांगतात-) **—स्वर्ग-पशु-पुत्र-आदि-अर्थाः यया वाचा बाहुल्येन प्रकाश्यन्ते**—स्वर्ग, पशु, पुत्र इत्यादि अर्थ-विषय ज्या वाणीकडून मोठ्या प्रमाणावर प्रकाशित केले जातात, ( अशा त्या वाणीला बोलतात. तथापि कर्मनिष्ठांचा कल मोक्षाकडे होण्यास काय हरकत आहे, या प्रश्नाचें उत्तर-)—**भोगैश्वर्यगतिं प्रति भोगश्च ऐश्वर्यं च भोगैश्वर्ये तयोः गतिः-प्राप्तिः भोगैश्वर्यगतिः तां प्रति साधनभूताः ये क्रियाविशेषाः तद्बहुलां**—भोग व ऐश्वर्य-भोगैश्वर्य, त्यांची जी गति म्ह० प्राप्ति-ती भोगैश्वर्यगति त्या प्राप्तिप्रत-भोगैश्वर्यप्राप्तीचे साधनभूत असे जे क्रियांचे प्रकार, ते जींत बहुल म्ह० पुष्कळ आहेत,—**तां वाचं प्रवदन्तः मूढाः संसारे परिवर्तन्ते इति अभिप्रायः**—त्या तसल्या कर्मकांडरूप वाणीला बोलणारे मूढ संसारांत परिभ्रमण करीत राहतात, असा याचा आशय आहे. [ ते अविवेकी कर्मनिष्ठ लोक फलांच्या इच्छेनें अनेक कर्मे करितात. स्वर्ग हाच त्यांचा मुख्य पुरुषार्थ असतो. स्वर्गाच्या पलीकडे मोक्ष म्हणून कांहीं आहे, ईश्वर म्हणून कोणी कर्मे व कर्मफल यांचा नियन्ता व दाता आहे, ज्ञान हें मोक्षाचें साधन आहे, असें ते जाणतच नाहीं. वेदोक्त कर्मे करून स्वर्ग मिळविला कीं पुरुषार्थ संपला, असा त्यांचा दृढ निश्चय झालेला असतो. ज्या वाणींत विषयभोग व ऐश्वर्य यांच्या प्राप्तीसाठीं, त्यांची प्राप्ति व्हावी म्हणून अनुष्ठेय कर्मांचे अनेक प्रकार सांगितलेले आहेत व जी विविध शरीरें हेंच फळ देते, अशा पुष्पित वाणीचा ते पाठ करीत

बसतात; व त्यामुळें संसारांतच भ्रमण करितात. अहो पण त्या कर्मानुष्ठान करणाऱ्या -कर्मकांडनिष्ठ कर्मठांचीही बुद्धि शुद्ध होऊन त्यांना मोक्ष व त्याचें साधन ज्ञान यांविषयीं इच्छा उत्पन्न होईल व कालान्तरानें त्यांनाही मोक्ष मिळेल, म्हणून म्हणाल तर त्याचें उत्तर ' भोगै० ' या पुढील श्लोकानें देतात–]

**तेषां च—भोगेति । भोगैश्वर्यप्रसक्तानां भोगः कर्तव्यमैश्वर्यं चेति भोगैश्वर्ययोरेव प्रणयवतां तदात्मभूतानां तया क्रियाविशेषबहुलया वाचाऽपहृतचेतसामाच्छादितविवेकप्रज्ञानां व्यवसायात्मिका सांख्ये योगे वा बुद्धिः समाधौ समाधीयतेऽस्मिन्पुरुषोपभोगाय सर्वमिति समाधिरन्तःकरणं बुद्धिस्तस्मिन्समाधौ न विधीयते न भवतीत्यर्थः ॥**

**भाष्यार्थ—च भोगैश्वर्यप्रसक्तानां तेषां**—आणि भोग व ऐश्वर्य यांमध्यें आसक्त झालेल्या त्यांची ( व्यवसायात्मिका बुद्धि होत नाही, असा पुढें संबंध )—**भोगः कर्तव्यं ऐश्वर्यं च इति भोगैश्वर्ययोः एव प्रणयवतां तदात्मभूतानां**—भोग–कर्तव्य व ऐश्वर्य, त्या भोगैश्वर्यामध्येंच ज्यांचा प्रणय आहे, जे तदात्मभूत झाले आहेत, भोग व ऐश्वर्य हेंच आपलें या जगातील कर्तव्य आहे, अशा अभिनिवेशानें युक्त असलेल्या चित्ताशीं ज्यांचा तादात्म्य-अध्यास झाला आहे म्ह०जे बहिर्मुख आहेत—**तया -क्रियाविशेषबहुलया वाचा**—त्या क्रियाविशेषप्रचुर वाणीने—**अपहृतचेतसां**—ज्यांची विवेकप्रज्ञा आच्छादित केली आहे अशा लोकांच्या—**समाधौ समाधीयते अस्मिन् पुरुषोपभोगाय सर्वं इति समाधिः-अन्तःकरणं-बुद्धिः तस्मिन्**—समाधींत म्ह० अन्तःकरणांत–ज्यांत पुरुषाच्या उपभोगासाठीं सर्व उत्तम प्रकारें स्थापिलें जातें ती समाधि म्ह० अन्तःकरण–बुद्धि त्यांत—**व्यवसायात्मिका सांख्ये योगे वा बुद्धिः**—सांख्य किंवा योग यांविषयींची जी व्यवसायात्मिका बुद्धि ती—**न विधीयते -न भवति इत्यर्थः**—स्थित होत नाहीं. त्यांच्या अन्तःकरणांत तसली बुद्धिच उत्पन्न होत नाहीं, असा याचा भावार्थ. [ अमृतपान, अप्सरांबरोबर विहार, पारिजातादि पुष्पांचा सुगंध, नंदनविहार इत्यादिकांचा उपभोग–अनुभव व त्याला कारण होणारें ऐश्वर्य –देवादिकांचे स्वामित्व वगैरे यांमध्ये अत्यंत आसक्त झालेल्या म्ह०आम्हांला यांचीच प्राप्ति करून घ्यावयाची आहे,अशा अभिनिविष्ट चित्ताशीं ज्यांनीं आपलें तादात्म्य करून घेतलें आहे अशा म्ह० आत्मोन्मुखता सोडून बहिर्मुख झालेल्या लोकांच्या अन्तःकरणांत व्यवसायात्मिका बुद्धि स्थिर होत नाहीं. कारण पूर्वोक्त क्रियाविशेषप्रचुर कर्मकांडात्मक वाणीनें त्यांच्या विवेकशक्तीला आच्छादित करून सोडलेलें असतें. त्यामुळे त्यांच्या समाधींत म्ह० अन्तःकरणांत सांख्य किंवा योग यांविषयींची निश्चयरूप बुद्धि उत्पन्नच होत नाहीं. पुरुषाच्या भोगासाठीं ज्यांत सर्व विषयजात ( 'समाधीयते' ) स्थापिलें जातें ती समाधि म्ह० अन्तःकरण. इंद्रियांच्या द्वारा सर्व विषय अन्तःकरणांत येतात. म्हणजे अन्तःकरणाची वृत्ति विषयाकार बनते. अन्तःकरण तदाकार झालें, म्ह० अन्तःकरणाचा साक्षी त्याला पाहतो. अन्तःकरण ज्याचें ग्रहण करीत नाहीं त्याला आत्मा पहात नाहीं; व ते ज्याचें ग्रहण करतें तो पदार्थ वस्तुतः बाहेर जरी नसला तरी आत्मा त्याला पाहतो.

म्हणून पुरुषोपभोगासाठीं अन्तःकरणांत सर्व ठेविलें जातें, असें म्हटलें आहे. येथें समाधि म्ह० संप्रज्ञात किंवा असंप्रज्ञात समाधि असा अर्थ करितां येत नाही. कारण समाधींत वृत्तींचा अभावच असतो. त्यामुळें व्यवसायात्मिका बुद्धिवृत्ति त्यांत संभवत नाही. ती अन्तःकरणांतच संभवते. ] ४४.

**त्रैगुण्यविषया वेदा निस्त्रैगुण्यो भवार्जुन ।**
**निर्द्वंद्वो नित्यसत्त्वस्थो निर्योगक्षेम आत्मवान् ॥४५॥**

**अन्वयार्थ—हे अर्जुन**—हे अर्जुना !—**वेदाः त्रैगुण्यविषयाः**—वेदांचा विषय त्रैगुण्य म्ह० संसार आहे.—**त्वं**—तूं—**निस्त्रैगुण्यः**—निष्काम,—**निर्द्वंद्वः**—शीतोष्ण-सुख-दुःख-लाभालाभ इत्यादि द्वंद्वांनीं रहित,—**नित्यसत्त्वस्थः**—नेहमीं सत्त्वगुणी—**निर्योगक्षेमः**—योगक्षेमाची चिंता न करणारा व—**आत्मवान्**—आत्मस्वरूपाविषयीं सावधान—**भव**—हो.

**य एवं विवेकबुद्धिरहितास्तेषां कामात्मनां यत्फलं तदाह त्रैगुण्येति । त्रैगुण्यविषयास्त्रैगुण्यं संसारो विषयः प्रकाशयितव्यो येषां ते वेदास्त्रैगुण्यविषयास्त्वं तु निस्त्रैगुण्यो भवार्जुन निष्कामो भवेत्यर्थः । निर्द्वंद्वः सुखदुःखहेतू सप्रतिपक्षौ पदार्थौ द्वंद्वशब्दवाच्यौ ततो निर्गतो निर्द्वंद्वो भव । त्वं नित्यसत्त्वस्थः सदासत्त्वगुणाश्रितो भव । तथा निर्योगक्षेमोऽनुपात्तस्योपादानं योगः, उपात्तस्य रक्षणं क्षेमः, योगक्षेमप्रधानस्य श्रेयसि प्रवृत्तिर्दुष्करेत्यतो निर्योगक्षेमो भव । आत्मवानप्रमत्तश्च भव । एष तवोपदेशः स्वधर्ममनुतिष्ठतः ॥ ४५ ॥**

**भाष्यार्थ**— ( अहोपण वेदाभ्यास करणाऱ्या अविवेक्यांच्याही मनात विवेकबुद्धि उत्पन्न होईल, म्हणून कोणी म्हणेल तर आचार्य सांगतात- )—**ये एवं विवेकबुद्धिरहिताः तेषां कामात्मनां**—जे अशा रीतीनें विवेकबुद्धिरहित आहेत त्या कामात्म्यांना-सकाम पुरुषांना—**यत्फलं तत् 'त्रैगुण्य०' इति आह**—जे फळ मिळतें तें भगवान् 'त्रैगुण्य०' या चरणाने सांगतात—**त्रैगुण्यविषयाः-त्रैगुण्यं-संसारः विषयः प्रकाशयितव्यः येषां ते वेदाः त्रैगुण्यविषयाः**—त्रैगुण्य म्ह० संसार. ज्यांचा तो संसार विषय आहे म्ह० ज्यांना संसाराचें प्रकाशन-प्रतिपादन करावयाचें आहे ते वेद त्रैगुण्यविषय होत. ( सत्त्वादि तीन गुणांचा जो समाहार त्याला त्रैगुण्य म्हणतात. पुण्य-पाप व मिश्र कर्म आणि त्याचें फल यांचा संबंधरूप समाहार म्हणजेच त्रैगुण्य. संसार म्हणजे तरी काय? हे त्रिविधकर्म व त्याचा फलसंबंध हाच संसार आहे. कर्मकांडरूप वेदाचा प्रतिपाद्य विषय त्रैगुण्य म्ह० संसार आहे. येथील वेदशब्दाने कर्मकांडच घेणें उचित आहे. त्याचा अभ्यास करणाऱ्या लोकांना त्यांत सांगितलेल्या कर्मांच्या अनुष्ठानद्वारा निश्चयानें संसारच प्राप्त होतो. तेव्हां कर्तव्य व फल यांच्या चक्रांत सांपडलेल्या संसारी जीवांना विवेक करण्यास अवसरच कोठून मिळणार? तर मग संसाराचें परिमार्जन करण्यासाठीं विवेक सिद्ध व्हावा, म्हणून मी काय करावें ? असें

विचारशील तर सांगतों ]—**अर्जुन, त्वं तु निस्त्रैगुण्यः भव-निष्कामः भव इत्यर्थः**—हे अर्जुन,पण तूं निस्त्रैगुण्य हो-निष्काम हो, असा याचा भावार्थ. [ अहो पण याच श्लोकांत पुढे जर नित्यसत्त्वस्थ हो, असें स्पष्ट ह्मटलें आहे तर निस्त्रैगुण्य हो, असें कसें भगवान् सांगत आहेत, अशी शंका कोणाला येऊं नये, ह्मणूनच भाष्यांत 'निष्काम हो ' असा त्याचा अर्थ केला आहे ]—**निर्द्वंद्वः-सुखदुःखहेतू सप्रतिपक्षौ पदार्थौ द्वंद्वशब्दवाच्यौ ततः निर्गतः निर्द्वंद्वः भव**—सुख व दुःख यांना कारण होणारे व परस्पर विरोधी असणारे जे दोन पदार्थ त्यांना द्वंद्व ह्मणतात. [ शीत-उष्ण, लाभ-अलाभ, जय-पराजय इत्यादि, असले परस्पर विरुद्ध दोन पदार्थ हा द्वंद्व या शब्दाचा वाच्य-अर्थ आहे ]—त्या द्वंद्वापासून निघालेला-दूर झालेला असा तूं हो म्ह० निर्द्वंद्व हो. [ द्वंद्वराहित्य ह्म० शीतोष्णादिकांना सहन करणे, हे निष्काम होण्याचें साधन आहे, असे सांगून सदा सत्त्वगुणाचा आश्रय करणे, हा निर्द्वंद्व होण्याचा उपाय आहे असें सांगतात-]—**त्वं नित्यसत्त्वस्थः-सदा सत्त्वगुणाश्रितः भव**—तूं नित्यसत्त्वस्थ ह्म० सदा सत्त्वगुणाचा आश्रय केलेला असा हो. [अहोपण योगक्षेमाकडे ज्याचें लक्ष आहे त्याला रजोगुण व तमोगुण यांना सोडून केवल सत्त्वगुणाचा आश्रय करतां येणार नाही, अशी शंका घेऊन सांगतात-]—**तथा निर्योगक्षेमः-अनुपात्तस्य उपादानं योगः उपात्तस्य रक्षणं क्षेमः**—त्याचप्रमाणे तूं योगक्षेमरहित हो. ज्याचा संग्रह केलेला नाही अशा अवश्य पदार्थांचा संग्रह-संपादन करणे हा योग व ज्याचा संग्रह-संचय केला आहे त्याचे रक्षण करणे हे क्षेम. ( अहो पण जिवंत रहावयास अवश्य लागणाऱ्या अन्न-वस्त्रादिकांचा संग्रह व रक्षण करणे, यांत कांहीच दोष नाही. कारण योगक्षेम हे मुद्दां जीवनाच्या द्वारा पुरुषार्थाच्या उपयोगी आहे, तेव्हां 'निर्योगक्षेम हो' असें कसे म्हणता ? उत्तर )—**योगक्षेमप्रधानस्य श्रेयसि प्रवृत्तिः दुष्करा, इत्यतः निर्योगक्षेमः भव**—योग व क्षेम यांना प्रधान मानून त्यात तत्पर झालेल्या पुरुषाची श्रेयोमार्गांत-मोक्षमार्गांत प्रवृत्ति होणे फार कठिण आहे. ह्मणून तूं निर्योगक्षेम हो. ( अहो पण योगक्षेमामध्यें सर्वांची स्वभावतःच प्रवृत्ति होत असते. त्यामुळे त्यापासून निवृत्त होणे अशक्य आहे, असें कोणी म्हणेल म्हणून सांगतात-)—**आत्मवान्-अप्रमत्तः च भव**—आणि आत्मवान् म्ह० अप्रमत्त हो (मनाने विषयाधीन न होणे,हाच अप्रमाद आहे.करितां तूं आपल्या मनाला विषयपरवश होऊं देऊं नको.अहो पण मुमुक्षूला असा उपदेश केला जातो. प्रवृत्तिमार्गी पुरुषाला असा उपदेश करतां येत नाही, यावरून अर्जुन मुमुक्षु होता, असे ठरले, म्हणून कोणी म्हणेल तर सांगतात-)—**एषः तव उपदेशः**—हा तुला उपदेश आहे. [ स्वधर्माचें अनुष्ठान करीत असतांना त्यामुळेच चित्तशुद्धि होऊन मुमुक्षुत्वहि बाणावें, म्हणून तुला हा उपदेश केला आहे. त्याप्रमाणें तूं स्वधर्माचरण केलेंस म्हणजे चित्तशुद्धि, मुमुक्षुत्व इत्यादि ज्ञानाधिकारी पुरुषाला अवश्य असलेले गुण तुझ्यांमध्यें येतील. ] ४५

---

१ रहस्यकार ह्मणतात 'वेद त्रैगुण्याच्या गोष्टींनी भरलेला आहे' पण त्यापेक्षां 'कर्मकांडात्मक वेदाचा विषय सत्त्वादि त्रिगुणाचा परिणाम असा संसार आहे. कर्मकाड संसारांत पडण्याचेच

उपाय ह्म० अग्निहोत्रादि सकाम कर्में सांगतो. त्यांतून सुटण्याचे उपाय सांगत नाही,' असें ह्मणणें अधिक सयुक्तिक होय. कारण वेद कर्मांच्या योगानें स्वर्गादि सांसारिक फळेच मिळविण्याचा उपदेश करतो. ह्मणून त्याचा प्रतिपाद्य विषय संसार आहे, पण तूं निस्त्रैगुण्य हो ह्म० त्या संसाराविषयींची कामना सोड. निष्काम हो. पण रहस्यकार 'निस्त्रैगुण्य ह्म० त्रिगुणातीत हो' असें ह्मणतात. पण 'त्रिगुणातीत हो' असा अर्थ केल्यावर 'नित्य सत्त्वस्थ हो' याची उपपत्ति कशी लागणार? यास्तव ' निस्त्रैगुण्य ह्म० निष्काम हो, नित्य सत्त्वगुणाश्रित हो' इत्यादि अर्थच सयुक्तिक होय. रहस्यकार ह्मणतात– ' नित्यसत्त्वस्थ या पदाचाच अर्थ त्रिगुणातीत असा होतो ' पण मग ' निस्त्रैगुण्य' ह्म० त्रिगुणातीत हो व 'नित्यसत्त्वस्थ' ह्म० त्रिगुणातीत हो. असा अर्थ केल्यास पुनरुक्ति हा दोष नाही का येत? रहस्यकार ह्मणतात–" ...मायिक संसारांतील सुखें प्राप्त होण्यासाठीं मीमांसामार्गांतील लोक श्रौत यज्ञयागादि करीत असतात." पण मीमांसामार्गांतील लोक ह्मणून कोणी निराळेच आहेत की काय? नाही. सर्व वैदिक कर्माधिकारी हे मीमांसामार्गीच आहेत. कोणताही वेदानुयायी द्विज हा प्रथम कर्माधिकारीच असतो. पण रहस्यकारांनीं मीमांसामार्गी व संन्यासमार्गी हे आपल्याच पदरचे शब्द योजून जणु काय बौद्ध, जैन, किंवा सांख्य, योग, इत्यादिकाप्रमाणें तेही निराळेच मार्ग किंवा दर्शनें आहेत असें भासविण्याचा यत्न केला आहे. पण वस्तुस्थिति तशी नाही. वेदाचे प्रवृत्ति व निवृत्ति असे जे दोन मुख्य प्रकार आहेत त्यांचेंच प्रतिपादन करणारी तीं दोन–मीमांसा व वेदान्त हीं–शास्त्रें आहेत. मीमांसा कर्मकांडात्मक वेदाचा विचार करते व वेदान्त वेदाच्या उपासना व ज्ञान या कांडांचा विचार करतो. ह्मणनच त्या दोन शास्त्रांना पूर्वमीमांसा व उत्तरमीमासा असें क्रमानें म्हणतात. पूर्वमीमांसेंत भट्ट, प्रभाकर, मुरारीमिश्र इत्यादि जसे मतभेद झाले, तसेच उत्तरमीमांसेंत अद्वैत, द्वैत, विशिष्टाद्वैत, शुद्धाद्वैत इत्यादि संप्रदाय झाले. यास्तव ' मीमांसामार्गांतील लोक अमुक ह्मणतात व सन्यासमार्गी तमुक ह्मणतात व आमचें कर्मयोगशास्त्र मात्र असें ह्मणतें,' असें ह्मणून गीतेला अगदीं पृथक् शास्त्र मानणें, हा अन्याय आहे. ' मीमांसामार्ग म्ह० वेदोक्त कर्मकांडच होय, व संन्यासमार्ग ह्म० अद्वैत वेदान्त. कर्मकांडांत सर्वच काम्य कर्में सांगितली आहेत, असें नाहीं. त्यांत नित्य, नैमित्तिक, काम्य, प्रायश्चित्त व निषिद्ध अशी पांच प्रकारची कर्में सांगितलीं आहेत. सर्वप्राणिसाधारण अशा स्वाभाविक कर्मांचें अधोगति हें फळ आहे. यास्तव वेदानें प्रथम त्या स्वाभाविक कर्मांनाच प्रतिबंध करून कर्माधिकारी मनुष्याच्या स्वर्गादिक उत्कर्षासाठीं नित्य-नैमित्तिकादि कर्में सांगितलीं आहेत. त्यालाच प्रवृत्तिमार्ग ह्मणतात. कारण तीं कर्में मनुष्याच्या अधोगतीला जरी निरोध करीत असलीं तरी स्वर्गादि संसारसुखांतच प्रवृत्त करितात. शिवाय अधिकारी मनुष्यही सात्त्विक, राजस व तामस अशा तीन प्रकृतीचे असल्यामुळें त्यांच्या प्रकृतीप्रमाणें वेदांत सात्त्विक, राजस व तामस अशी त्रिविध कर्में विहित आहेत. त्यांतील कांहीं ऐहिक उत्कर्षासाठीं व बाकीचीं सर्व पारलौकिक उत्कर्षासाठीं आहेत. त्यांपैकी नित्य व नैमित्तिक कर्में सर्व वैदिक धर्मी द्विजांना केलीच पाहिजेत, व तीं सर्व पारलौकिक उत्कर्षासाठींच आहेत. काम्य कर्मेंच ऐहिक व पारलौकिक फलांसाठीं विहित असतात. प्रायश्चित्त कर्में घडलेल्या निषिद्धाचरणाच्या परिहारासाठीं व निषिद्ध कर्में सर्वथा त्याज्य ह्मणून सांगितलेलीं आहेत. पूर्वमीमांसा हें एक शास्त्र आहे व त्यांत या पूर्वोक्त वैदिक कर्मकांडाचाच विचार केला आहे. स्वतः मी-

मांसा कोणत्याच कर्माचे विधान करीत नाहीं. फक्त ती कर्मकांडोक्त सर्व वाक्यांचा विचार करून इतिकर्तव्यता सांगते. पण रहस्यकार काय म्हणतात तें पहा–" कोणी पुत्रप्राप्ति व्हावी म्हणून अमुक याग करितो तर कोणी पाऊस पडावा ह्मणून दुसरी इष्टि करतो. हीं सर्व कर्मे इहलोकीं संसार चालण्यासाठीं म्हणजे योगक्षेम चालण्यासाठी आहेत. म्हणून ज्याला मोक्ष मिळवावयाचा आहे त्यानें वैदिक कर्मकांडांतील हीं त्रिगुणात्मक व फक्त योगक्षेम संपादन करणारीं कर्मे सोडून देऊन आपलें चित्त परब्रह्माकडे लाविलें पाहिजे ... वैदिक कर्मकांडांतील हीं काम्य कर्मे सोडली तर योगक्षेम कसा चालेल ? " पण 'कर्मकांडोक्त कर्मे संसार चालण्यासाठीं म्ह० योगक्षेम चालण्यासाठीं, फक्त योगक्षेम संपादन करणारीं, ती सोडलीं तर योगक्षेम कसा चालेल ' ही भीति अस्थानीं आहे. वैदिक काम्य कर्मे ऐहिक योगक्षेमासाठीं आहेत, ही कल्पनाच खोटी आहे. यज्ञयागादि कर्मे मुख्यतः स्वर्गासाठीं आहेत. 'स्वर्गकामो यजेत' इत्यादि विधिवाक्ये या विषयीं प्रमाण आहेत. योगक्षेम लौकिक कर्मांनीच होतो. त्याला कर्मकांडोक्त कर्मेच नकोच. कर्मकांड केवल धर्मासाठीं आहे. पुत्रकामेष्टि, कारिरी इष्टि इत्यादि कांहीं इष्टि ऐहिक फलासाठींही कर्मकांडात सांगितल्या आहेत. पण कर्मकांडाचा मुख्य विषय त्या इष्टि नव्हेत. परलोकप्राप्तीसाठीं नित्य-नैमित्तिकादि कर्मे सांगणे हा त्याचा मुख्य विषय आहे. 'तू निर्योगक्षेम हो' याचा अर्थ–निष्काम व नित्य सत्त्वस्थ झाल्यावर माझा योगक्षेम कसा चालेल, ही चिंताही तू बाळगू नकोस. कारण माझ्या भक्ताचा योगक्षेम मी चालवितो. (९.२२)–असा आहे. त्याचा काम्य कर्मांशीं कांहीं संबंध नाहीं व काम्य कर्मे योगक्षेमासाठीं नाहींत. असो; या श्लोकात ' तू निष्काम, नित्यसत्त्वस्थ निर्द्वंद्व, योगक्षेमाच्या चिंतेने रहित व आत्मवान् हो ' असे सांगितल्यामुळे कर्मांचा त्याग करण्याचा प्रसंग आला, असे समजून रहस्यकार म्हणतात–"पण याचा अर्थ सर्व कर्मे स्वरूपतः अजीबात सोडून दे असाही समजावयाचा नाहीं.. वरील श्लोकांत वैदिक काम्य कर्मांची जी निंदा केली आहे किंवा कमीपणा दाखविला आहे तो कर्मांचा नव्हे तर त्यांतील काम्य बुद्धीचा आहे. काम्यबुद्धि मनात नसेल तर नुस्ते यज्ञ-याग कोणत्याही प्रकारें मोक्षास प्रतिबंधक होत नाहींत." पण येथे कर्मत्यागाची प्राप्तिच नाही. कारण वर ४२-४४ श्लोकांत सकाम बुद्धीनें युक्त असलेल्या कर्मठाची निंदा करून या श्लोकांत, वेद संसाराचेंच प्रतिपादन करितात. पण तू निष्काम हो, इत्यादि सांगितलें आहे. कारण कर्मकांडाच्या पुढची पायरी ह्मणजे उपासना. कर्मफलाची इच्छा सोडून कर्मे करणें, येथून तिला आरंभ होतो. ईश्वरार्पणबुद्धीनें कर्मे करणे म्ह० उपासनेलाच सुरवात करणें आहे. उपासनेनें चित्तैकाग्र्य होते, चित्तशुद्धि होते, ज्ञान होतें, मी कर्ता इत्यादि भावना नष्ट होते, ज्ञाननिष्ठायोग्यता प्राप्त होते, त्यानंतर वैदिक कर्मकांडाचा सहज त्याग होतो. त्यानंतर निष्काम यज्ञयागाचाही असंभव होतो. त्याविषयीं अधिक विचार मूळ भाष्यांतच होणार आहे. ह्मणून येथें विस्तार करीत नाहीं.

रहस्यकार म्हणतात—" मीमांसकांचीं हीच यज्ञयागादि कर्मे फलाशा व संग सोडून चित्तशुद्ध्यर्थ व लोकसंग्रहार्थ अवश्य केलीं पाहिजेत." पण गीता ज्ञानोत्तर ज्ञानी पुरुषानें काय करावें हें सांगण्यासाठीं आहे ना ? मग ज्ञानोत्तर चित्तशुद्धीची काय आवश्यकता ? कीं रहस्यकारांच्या मतें ज्ञानानंतरही चित्तशुद्धि व्हावयाची शिल्लकच राहते ? पुनः म्हण-

**यावानर्थ उदपाने सर्वतःसंप्लुतोदके ।**
**तावान्सर्वेषु वेदेषु ब्राह्मणस्य विजानतः ॥ ४६ ॥**

**अन्वयार्थ**—**उदपाने**—विहीर, आड, तळें, इत्यादि अनेक लहान लहान जलाशयांत—**यावान्**—जेवढा—**अर्थः**—कार्यभाग होतो—**(सः सर्वः**—तो सर्व)—**सर्वतः संप्लुतोदके**—चोहोंबाजूंनी पाण्यानें भरलेल्या समुद्रादिकांत—**तावान् (एव)**—

---

तात–" मीमांसकांच्या कर्मकांडाचा कमीपणा जो दाखविला आहे तो त्यांतील काम्य बुद्धीला उद्देशून आहे नुस्त्या क्रियेला नव्हे. " मग ' दूरेण ह्यवरं कर्म०' ४९ ' सर्व कर्माणि मनसा संन्यस्य ' इत्यादि वाक्यांचा अर्थ काय ? " हाच अभिप्राय मनांत आणून भागवतांतही ' वेदोक्तमेव कुर्वाणो निःसगोऽर्पितमीश्वरे । नैष्कर्म्यां लभते सिद्धिं रोचनार्था फलश्रुतिः ' वेदोक्त कर्मांची वेदात जी फलश्रुति सांगितली आहे ती रोचनार्थ म्ह० सदर कर्मे कर्त्यास गोड वाटावीं एवढ्याचकरिता आहे. म्हणून ही कर्मे त्या फलासाठी करीत न बसतां निःसंगबुद्धीने म्ह० फलाशा सोडून ईश्वरार्पणबुद्धीनें करणाऱ्या पुरुषास नैष्कर्म्यानें मिळणारी सिद्धि प्राप्त होते ' असे म्हटले आहे. " पण हा अर्थ अगदी असंबद्ध आहे. आम्ही याच वचनाचा अर्थ असा करतों–'मी कर्ता' इत्यादि आसक्ति सोडून ईश्वराचे ठिकाणी समर्पण केलेले वेदोक्त कर्मच करणारा पुरुष नैष्कर्म्यसिद्धीला म्ह० ज्ञाननिष्ठेला प्राप्त होतो. ' मग वेदात कर्माची फलश्रुति जी आहे ती कशासाठी ? ' उत्तर–कर्मांच्या फलाचे जे वर्णन आहे ते कर्त्याच्या मनांत त्या कर्माविषयी रुचि उत्पन्न व्हावी म्हणून आहे. आता या दोन अर्थांतील सरळ, सुबोध व शास्त्रार्थाला धरून कोणता अर्थ आहे त्याचा विचार वाचकांनीच करावा. ' नैष्कर्म्यां सिद्धिं ' म्ह० नैष्कर्म्याने मिळणारी सिद्धि, हा रहस्यकारांचा अर्थ मूळ शब्दांना धरून नाही, हे कोणीही कबूल करील. पण रहस्यकारांना कर्मयोग हें मोक्षाचे स्वतंत्र साधन आहे, असे सांगावयाचे आहे. त्यासाठी हा सर्व द्राविडी प्राणायाम आहे. तथापि शेवटी इष्ट हेतु साध्य होत नाही तो नाहीच. शेवटी पुनः रहस्यकार ह्मणतात—" वेदांत अमुक अमुक कारणासाठी यज्ञ करावे असे जरी सांगितलें तरी त्याला न भुलतां केवळ यष्टव्य ह्म० यज्ञ आपल्याला कर्तव्य आहे ह्मणून हे यज्ञ करावे, काम्यबुद्धि सोडावी, यज्ञ सोडूं नये ( १७.११ ) व त्याचप्रमाणे इतर कर्मेंही करावीं हें गीतोपदेशाचे सार"...६३० पण यज्ञ कर्तव्य ह्मणून करावयाचे, काम्यबुद्धि सोडावयाची व यज्ञ सोडावयाचे नाहीत, यालाही कांही मर्यादा आहे की नाही ? जर नसेल–मरेपर्यंत जर यज्ञच करावयाचे असतील तर निवृत्तिमार्ग, किंवा ज्ञाननिष्ठा, याला अवकाश कोठे राहिला ? आणि त्याला जर अवकाशच नाही तर भगवानांनी दोन प्रकारची निष्ठा कां सांगितली ? एकाच प्रकारची कां सांगितली नाही? वास्तव प्रत्येकानें मरेपर्यंत यज्ञच करीत रहावें असा आग्रह न धरितां ज्ञाननिष्ठायोग्यता प्राप्त होईपर्यंत चित्तशुद्धीसाठीं ते करावे, हाच अबाधित सिद्धान्त होय. तसेंच ' इतर कर्मेंही करावीं ' पण तीं कोणती ? खाणें, पिणें, वगैरे की काय ? तींच जर असतील तर ' ती करावी ' असें सांगावयास गीता कशाला पाहिजे ? ती स्वभावप्राप्तच आहेत. सारांश रहस्यकारांची गतिकडे पाहण्याची दृष्टि सपशेल चुकली आहे, असें आमचें स्पष्ट मत आहे.

तेवढाच होतो. त्याच न्यायानें—**सर्वेषु वेदेषु**—सर्व कर्मकांडरूप वेदांत—(**यः अर्थः** जो अर्थ-जें फळ मिळतें—**सः सर्वः**—तो सर्व अर्थ-ती सर्व फलनिष्पत्ति)—**विजानतः ब्राह्मणस्य (फले)**—विद्वान् ब्राह्मणाच्या (फलांत)—(**तावान् एव**)—अंतर्भूत होते.

**सर्वेषु वेदोक्तेषु कर्मसु यान्यनन्तानि फलानि तानि नापेक्ष्यन्ते चेत्किमर्थं तानीश्वरायेत्यनुष्ठीयन्त इति,उच्यते शृणु—यावानिति । यथा लोके कूपतडागाद्यनेकस्मिन्नुदपाने परिच्छिन्नोदके यावान्यावत्परिमाणः स्नानपानादिरर्थः फलं प्रयोजनं स सर्वोऽर्थः सर्वतः संप्लुतोदके तावानेव संपद्यते तत्रान्तर्भवतीत्यर्थः । एवं तावांस्तावत्परिमाण एव संपद्यते सर्वेषु वेदेषु वेदोक्तेषु कर्मसु योऽर्थो यत्कर्मफलम् । सोऽर्थो ब्राह्मणस्य संन्यासिनः परमार्थतत्त्वं विजानतो योऽर्थो विज्ञानफलं सर्वतः संप्लुतोदकस्थानीयं तस्मिंस्तावानेव संपद्यते तत्रैवान्तर्भवतीत्यर्थः । 'सर्वं तदभिसमेति यत्किंच प्रजाः साधु कुर्वन्ति यस्तद्वेद यत्स वेद' इति श्रुतेः । 'सर्वं कर्माखिलम् ' इति च वक्ष्यति । तस्मात्प्राग्ज्ञाननिष्ठाधिकारप्राप्तेः कर्मण्यधिकृतेन कूपतडागाद्यर्थस्थानीयमपि कर्म कर्तव्यम् ॥ ४६ ॥**

**भाष्यार्थ—सर्वेषु वेदोक्तेषु कर्मसु**—सर्व वेदोक्त कर्मांमध्ये—**यानि अनन्तानि फलानि**—जीं अनन्त फळे उक्त आहेत—**तानि नापेक्ष्यन्ते चेत्**—तीं जर अपेक्षिलीं जात नाहींत, त्यांची जर अपेक्षा केली जात नाहीं तर—**तानि ईश्वराय किमर्थं अनुष्ठीयन्ते इति**—तीं ईश्वरासाठीं कशाकरितां अनुष्ठिलीं जातात म्हणून विचारशील तर—**उच्यते यावानिति शृणु**—कर्ममार्गाचा उपयोग 'यावान्०' या श्लोकाने सांगितला जातो तो ऐक. ( कर्मांचें अनुष्ठान करूनही फलाची इच्छा न केल्यामुळें हा कर्मयोग व्यर्थच ठरतो, अशी शंका घेऊन कर्मयोग व्यर्थ नाहीं, त्याचा उपयोग आहे असें सांगतात- )—**यथा लोके कूप-तडागादि-अनेकस्मिन् उदपाने-परिच्छिन्न-उदके**—ज्याप्रमाणे व्यवहारांत विहीर, तळे इत्यादि अनेक प्रकारच्या उदपानांत-मर्यादित उदकांत—**यावान्-यावत्परिमाणः-स्नानपानादिः अर्थः-फलं-प्रयोजनं**—जेवढा-जितक्या परिमाणाचा स्नान-पानादि अर्थ म्ह० फल-प्रयोजन-कार्य होते—**सः सर्वः अर्थः सर्वतःसंप्लुतोदके तावान् एव संपद्यते-तत्र अन्तर्भवति इत्यर्थः**—तो सर्व अर्थ-सर्व बाजूंनी उदकपूर्ण अशा जलाशयांत तेवढाच होतो. म्ह० त्यांत त्याचा अन्तर्भाव होतो, असा भावार्थ. [ घटाकाशाचा महाकाशांत जसा अन्तर्भाव होतो त्याप्रमाणे मर्यादित उदकांतील कार्याचा अमर्याद जलांत अन्तर्भाव होतो. ते कार्य त्यात होते. ]—**एवं**—या दृष्टान्ताप्रमाणे—**सर्वेषु वेदेषु-वेदोक्तेषु कर्मसु यः अर्थः यत् कर्मफलं**—सर्व वेदामध्ये म्ह० वेदोक्त कर्मांमध्यें जो अर्थ-जे कर्मफळ—**सः अर्थः**—तो अर्थ-ते कर्मफळ—**ब्राह्मणस्य-संन्यासिनः परमार्थतत्त्वं विजानतः**—परमार्थ तत्त्वाला जाणणाऱ्या ब्राह्मणाचा-संन्याशाचा—**यः अर्थः-विज्ञानफलं-सर्वतःसंप्लुतोदकस्थानीयं**—जो अर्थ म्ह० जें सर्वतः जलपूर्ण समुद्राच्या स्थानीं असलेलें विज्ञानफळ—**तस्मिन् तावान् एव संपद्यते-तत्र एव अन्तर्भवति इत्यर्थः**—त्यात तेवढाच अर्थ होतो.

त्यांतच अन्तर्भाव होतो, असा भावार्थ. (सर्व कर्मफल ज्ञानाच्या फलांत अन्तर्भूत होतें, याविषयीं श्रुतीचें प्रमाण–)—**सः यत् वेद तत् यः वेद सः तत् सर्वं अभिसमेति**—तो रैक जें जाणतो तें जो जाणतो तो त्या सर्वाला प्राप्त होतो. ( तें सर्व म्हणजे काय ? उत्तर–)—**प्रजाः यत् किंच साधु कुर्वन्ति**—प्रजा जें कांही शुभ कर्म करितात त्या सर्वाला तो पुरुष प्राप्त होतो—**इति श्रुतेः**—अशी छान्दोग्य श्रुति आहे. ( छान्दोग्यभाष्यार्थ अ. ४.१.४. पृ. २५१ पहा. कर्मफलाचा सगुण ब्रह्मज्ञानाच्या फलामध्यें अन्तर्भाव कसा संभवतो ? उत्तर–)—**सर्वं अखिलं कर्म ज्ञाने परिसमाप्यते** (अ. ४ श्लो. ३३) **इति च वक्ष्यति**—सर्व अप्रतिबद्धकर्म ज्ञानांत अन्तर्भूत होतें असें येथें पुढें भगवान् सांगतील. ( तर मग ज्ञाननिष्ठाच करावी. कारण तिच्या योगानें जर कर्मफलही मिळतें तर कर्मानुष्ठानाची काय अपेक्षा आहे ? उत्तर–)—**तस्मात्**—योगमार्ग निष्फळ नसल्यामुळें—**ज्ञाननिष्ठाधिकारप्राप्तेः प्राक्**—ज्ञाननिष्ठेचा अधिकार प्राप्त होण्यापूर्वी—**कर्मणि अधिकृतेन**—कर्मामध्यें अधिकार असलेल्या पुरुषानें—**कूपतडागादि-अर्थस्थानीयं अपि कर्म कर्तव्यम्**—विहीर, तळे इत्यादिकांच्या प्रयोजनाच्या जागीं असलेलेंही कर्म करावें. [ विहीरी, तळीं, इत्यादि मर्यादित जलानें युक्त असलेल्या अनेक जलाशयांत मिळून लोकांचा जेवढा कार्यभाग होतो, तेवढा तो सर्व, पाण्यानें सर्व बाजूंनी तुडुंब भरलेल्या मोठया सागरांत होतो. लहान लहान अशा अनेक जलाशयांचें प्रयोजन एका फार मोठया जलाशयांत अन्तर्भूत होते, हें प्रसिद्ध आहे. त्याचप्रमाणें वेदोक्त सर्व कर्मांचें जें फल आहे ते सर्व तत्त्वज्ञानी संन्यासी ब्राह्मणांच्या ज्ञानफलांत अन्तर्भूत होतें. कारण ज्ञानाचे फळ जलानें तुडुंब भरलेल्या मोठया जलाशयासारखें असते आणि फार मोठें फल मिळालें असतां क्षुद्र फलांची अपेक्षा रहात नाहीं, हे प्रसिद्ध आहे. याविषयीं छान्दोग्य श्रुतीचेंही प्रमाण आहे व या गीतेंतच पुढें भगवानांनींही तसेंच सांगितलें आहे. तथापि योगमार्ग व्यर्थ–निरुपयोगी नाहीं. तो ज्ञानाचा अधिकार देणारा आहे. यास्तव ज्ञाननिष्ठेचा अधिकार प्राप्त होईपर्यंत कर्माधिकारी पुरुषानें कर्मच करावें. ते विहीर, तळें इत्यादि मर्यादित जलासारखें अल्प फळ देणारे जरी असले तरीं ज्ञानाधिकार प्राप्त होईतों ते सोडूं नये. ] ४६.

---

रहस्यकार या श्लोकाचा अर्थ असा करितात—“ चोहोंकडे पाण्याचा पूरच पूर झाला असतां विहिरीचा जितका अर्थ किंवा प्रयोजन राहतें ( अर्थात् कांहीच काम राहत नाहीं) तितकेंच, ज्ञान प्राप्त झालेल्या ब्राह्मणाला सर्व ( कर्मकांडात्मक ) वेदाचें प्रयोजन राहतें. ( नुस्त्या काम्यकर्मरूपी वैदिक कर्मकांडाची त्याला अपेक्षा रहात नाहीं. )” आणि आपलाच अर्थ सरळ व सुबोध आहे, असे समजून “ यांतील शब्दांची टीकाकारांनी फुकट ओढाताण केली आहे, ” असा आचार्यादि टीकाकारांस दोष देतात. कारण ‘सर्वतः संप्लुतोदके सति उदपाने यावान् अर्थः तावान् विजानतः ब्राह्मणस्य सर्वेषु वेदेषु अर्थः ’ असा आपण सरळ अन्वय लावतों व टीकाकारांना ‘ ज्ञान्यानें कर्मे करण्याची जरूर नाहीं ’ या सांप्रदायिक सिद्धान्ताकडे दृष्टि देऊन ‘ यावान् ’ व ‘ तावान् ’ या पदांचा अध्याहार करावा लागतो,

**कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन ।**
**मा कर्मफलहेतुर्भूर्मा ते सङ्गोऽस्त्वकर्मणि ॥४७॥**

---

इत्यादि दोष देतात. पण स्वत:च्या अन्वयावर त्याहून दुसरे किती अक्षम्य दोष येतात, याची त्यांना कल्पनाच नाही ! अगोदर ' सम्प्लुतोदके सति ' ही सति सप्तमी मानणें व्याकरणदृष्ट्या चिन्त्य आहे ' उदके सर्वत: संप्लुते ' (सति) असे जर असतें तर सति सप्तमी मानतां आली असती. दुसरे, ' यावान् अर्थ: ' जेवढा अर्थ, याचा भावार्थ 'कांहीच काम रहात नाही, ' असा काढावा लागतो. तेव्हा एखाद्या शब्दाचा अध्याहार करणें बरें की विधिबोधक वाक्यापासून निषेधबोधक वाक्यार्थ काढणे बरें, याचा विचार वाचकांनीच करावा. तिसरें, ज्ञानोत्तरही कर्म केलें पाहिजे असा रहस्यकारांचा सिद्धान्त असतांना त्याविरुद्ध ' ज्ञान प्राप्त झालेल्या ब्राह्मणाला सर्व कर्मकाडात्मक वेदाचे तितकेंच प्रयोजन असतें, म्ह० वैदिककर्माचा कांहींच उपयोग नसतो ' असें सिद्ध होतें. चवथें, मुळांत 'सर्वेषु वेदेषु' अशीं पदें असतांना 'नुस्त्या काम्यकर्मरूपी वैदिक कर्मकाडाची त्याला अपेक्षा रहात नाही' असा अर्थाचा संकोच करावा लागतो. त्यापेक्षां ' अनेक लहान लहान जलाशयात मनुष्यांचा जेवढा कार्यभाग होतो तेवढा तो सर्व पाण्याने तुडुब भरलेल्या मोठ्या समुद्रादिकांत होतो, त्याच न्यायाने वेदोक्त सर्व कर्मामध्ये जेवढा अर्थ म्ह० फल मिळतें तेवढें सर्व ज्ञानी ब्राह्मणाला प्राप्त होते. सर्व कर्मांच्या फलाचा ज्ञानाच्या फलात अन्तर्भाव होतो ' हाच अर्थ अधिक सयुक्तिक व भाष्यात दाखविलेल्या श्रुति-स्मृतींना धरून आहे. रहस्यकारांनी आपल्या अर्थाला पुष्टि देणारी म्हणून जी सनत्सुजात, शुकानुशासन, यांतील वचनें दिली आहेत तीही आचार्यांच्या भाष्यार्थालाच अधिक अनुकूल आहेत. असो; रहस्यकारांच्याच अर्थावरून ज्ञानी पुरुषाला कर्मकांडाची अपेक्षा नाही असे जरी सिद्ध होत असले तरी कर्मरुचि रहस्यकार पुन: म्हणतात—" परतु ज्ञानी पुरुषास यज्ञयागादि कर्मांची अपेक्षा नसते, असें म्हटल्यानें ज्ञानी पुरुषानेंही कर्मे करूं नयेत, अजीबात सोडून द्यावीत, असें यावरून कित्येक लोक जें अनुमान काढीत असतात ते मात्र गीतेस समत नाही.... इत्यादि" पुन: आपल्या मूळ पदावर आलेच आहेत. पण वेदाच्या विरुद्ध गीतेच्या समतीला विचारतो कोण ? गीतेला स्वतंत्र प्रामाण्य नाही, हे रहस्यकार विसरले आहेत. वेद जर कर्मकांड व ज्ञानकांड अशी दोन कांडें सांगत आहे, व कर्माधिकारी निराळे व ज्ञानाधिकारी निराळे, असें म्हणत आहे तर त्याविरुद्ध बोलण्याचा गीतेला किंवा भगवानांनाही अधिकार नाही. शिवाय गीतेतही दोन निष्ठा सांगितल्या आहेत. त्यामुळें कर्मे अजीबात सोडणें गीतेस संमत नाही, हें म्हणणें अयोग्य आहे. ' ज्ञानी पुरुषास कर्मांची अपेक्षा नसते ' असें म्हणण्यापेक्षां त्यास त्यांची आवश्यकता नसते, असें म्हणणें अधिक सयुक्तिक झाले असतें. ' ज्ञानी पुरुषानें कर्मे अजीबात करूं नयेत असे कित्येक लोक जे अनुमान काढितात ' हें रहस्यकारांचें म्हणणें बरोबर नाही. कर्मत्याग-संन्यास-प्रव्रजन याला उपनिषदें, धर्मशास्त्र व खुद्द गीतेंतही शब्दप्रमाण आहे. कर्मत्याग अनुमानानें सिद्ध करावा लागत नाही. तो शास्त्रविहित आहे.

**अन्वयार्थ—ते—**तुझा**—अधिकारः—**अधिकार**—कर्मणि एव—**कर्मातच आहे ( ज्ञानामध्यें नाहीं ). कर्म करीत असतांनाही**—फलेषु—**फलांविषयीं**—कदाचन —**केव्हांही**—मा—**तुझा अधिकार-तुझी तृष्णा नसो. त्याचप्रमाणें तूं**—कर्मफलहेतुः मा भूः—**कर्मफलाची इच्छा करून त्या फलाचें कारण-निमित्त होऊं नकोस.**—ते संगः —**तुझी प्रीति**—अकर्मणि—**कर्मच न करणें, या गोष्टींत**—मा अस्तु—**न होवो.

**तव च कर्मणीति । कर्मण्येवाधिकारो न ज्ञाननिष्ठायां ते तव । तत्र च कर्म कुर्वतो मा फलेष्वधिकारोऽस्तु कर्मफलतृष्णा मा भूत्कदाचन कस्यांचिदप्यवस्थायामित्यर्थः । यदा कर्मफले तृष्णा ते स्यात्तदा कर्मफलप्राप्तेर्हेतुः स्याः, एवं मा कर्मफलहेतुर्भूः । यदा हि कर्मफलतृष्णाप्रयुक्तः कर्मणि प्रवर्तते तदा कर्मफलस्यैव जन्मनो हेतुर्भवेत् । यदि कर्मफलं नेष्यते किं कर्मणा दुःखरूपेणेति मा ते तव सङ्गोऽस्त्वकर्मण्यकरणे प्रीतिर्मा भूत्॥**

**भाष्यार्थ—**(पण कर्ममार्ग हें पुरुषार्थाचें साक्षात् साधन नाहीं, परंपरेचें साधन आहे. म्हणून मी कर्म, हें परंपरेचें साधन सोडून आत्मज्ञान हे साक्षात् साधन संपादन करतो. मला तेंच आवडतें, यास्तव तूंही मला त्याचाच उपदेश कर असें अर्जुन म्हणेल, म्हणून भगवान्-)**—तव च 'कर्मणि०' इति—**पण तुझा तर कर्मातच अधिकार आहे, असें 'कर्मणि०' या श्लोकानें सांगतात**—ते-तव कर्मणि एव अधिकारः—**तुझा कर्मातच अधिकार आहे**—न ज्ञाननिष्ठायां[१]—**ज्ञाननिष्ठेमध्यें तुझा अधिकार नाहीं. ( अहो पण कर्म करूं लागल्यास त्याच्या फलाचा अभिलाषही होईल. उत्तर-)**—तत्र च—**आणि कर्माधिकार असल्यामुळें**—कर्म कुर्वतः तव—**कर्म करीत असलेल्या तुझा**—फलेषु अधिकारः मा अस्तु—**फलांमध्यें अधिकार नसो.**—कदाचन-कस्यांचित् अपि अवस्थायां कर्मफलतृष्णा मा भूत् इत्यर्थः—**केव्हांही-कोणत्याही अवस्थेमध्ये-( कर्मानुष्ठानाच्या पूर्वी, कर्मानुष्ठान करीत असतांना व ते केल्यावरही ) कर्माच्या फलाविषयींची इच्छा तुला न होवो, असा याचा भावार्थ.**— यदा ते कर्मफले तृष्णा स्यात् तदा (त्वं) कर्मफलप्राप्तेः हेतुः स्याः—**जेव्हां तुझी कर्माच्या फलाविषयीं तृष्णा होईल तेव्हां तूं कर्मफलाच्या प्राप्तीचा हेतु-निमित्त होशील. [ कर्मफलाची तृष्णा धरलीस की तूं त्या तृष्णेच्या योगानें फलाचा अधिकारी झालास. मग ते कर्म आपलें फळ भोगविल्यावांचून तुला सोडणार नाहीं. हीच गोष्ट भाष्यकार अधिक स्पष्ट करितात] **—हि यदा कर्मफलतृष्णाप्रयुक्तः कर्मणि प्रवर्तते तदा कर्मफलस्य एव जन्मनः हेतुः भवेत्—**कारण जेव्हां कर्मफलाविषयींच्या तृष्णेनें प्रेरित होऊन मनुष्य

---

१ या ' एव-'कारावरूनच ज्ञाननिष्ठेचा अधिकार नाहीं, ही गोष्ट अर्थात् सिद्ध होते. कारण वर ज्ञानाचें महत्त्व वर्णिलें आहे व पुढे लागलेंच तुझा कर्मातच अधिकार आहे, असें म्हटलें आहे. अर्थात् ज्ञानाचा नाहीं, म्हणून भाष्यकारांनी हा अर्थ आपल्या पदरचा आणला आहे, हे म्हणणे अयोग्य आहे. जो ब्राह्मण नाहीं व ब्राह्मण असूनही ज्याचे रागद्वेषादि दोष क्षीण झालेले नाहींत, त्याला ज्ञाननिष्ठेचा मुख्य अधिकार नाहीं.

**कर्मामध्यें प्रवृत्त** होतो तेव्हां तो जन्मरूप कर्मफलाचा हेतु-कारण-निमित्त होतो. (तर मग उगीच कर्म तरी काय म्हणून करावयाचें? अशी शंका घेऊन तिचें समाधान-) **कर्म-फलं यदि न इष्यते ( तर्हि ) दुःखरूपेण कर्मणा किं इति**—कर्माचें फल जर इच्छावयाचें नाहीं तर दुःखरूप-क्लेशकर कर्म करून तरी काय करावयाचें आहे? असें मानून—**ते तव संगः अकर्मणि मा अस्तु-अकरणे प्रीतिः मा भूत्**—तुझी आसक्ति अकर्मामध्यें न होवो—कर्म न करण्याविषयीं तुझी प्रीति न होवो. [ ज्ञान जरी श्रेष्ठ असलें तरी तुझा अधिकार कर्मामध्येंच आहे. ज्ञानांत नाहीं. तूं कर्माधिकारी आहेस, ज्ञानाधिकारी नाहींस. पण कर्म करीत असलेल्याही तुझा फलामध्यें अधिकार नाहीं. कर्म करतांना, त्यापूर्वी व तें केल्यावरही तुला कर्मफलाचा अधिकार नाहीं. कर्म-फलाविषयीं अभिलाष धरून तूं त्याचा हेतु होऊं नकोस व कर्माच्या फलाची इच्छा जर करावयाची नाहीं तर क्लेशकर कर्म तरी कां करावें? असे म्हणून तें न करण्याविषयींही तूं आसक्ति ठेवूं नकोस. कारण निष्काम कर्म चित्तशुद्धीच्या द्वारा ज्ञाननिष्ठेचा अधिकार प्राप्त करून देत असते. म्हणून तूं फलाभिलाष न धरतां कर्म कर. ] ४७

---

१ पण रहस्यकार या श्लोकाचा अर्थ असा करितात—"कर्म करण्यापुरताच तुझा अधिकार आहे. फल (मिळणे किंवा न मिळणे हे) केव्हांही तुझ्या अधिकारांतले म्ह० ताब्यांतले नाहीं. ( म्हणून माझ्या कर्माचे ) अमुक फल मिळावें असा ( हावरेपणाचा ) हेतु ( मनात ) ठेवून काम करणारा होऊं नको; आणि कर्म न करण्याचाही तूं आग्रह धरूं नको." 'कर्मणि एव' याचा 'कर्मापुरताच' हा अर्थ बरोबर नाहीं. कर्मांतच ( फार तर कर्माचाच ) तुला अधिकार आहे. ज्ञानाचा नाहीं. येथील अधिकार या शब्दाचा अर्थ 'योग्यता' असा आहे. या वेळीं तुझ्यामध्ये कर्म करण्याचीच योग्यता आहे. ज्ञाननिष्ठेची योग्यता अद्यापि तुला आलेली नाहीं, असें येथे विवक्षित आहे. कारण ज्ञान व कर्म यांतील अर्जुनाला काय विहित आहे, ते सांगण्याचे हे प्रकरण आहे. यास्तव 'एव'शब्दाने ज्ञानाचा व्यवच्छेद केला आहे. पण आपल्या अधिकाराप्रमाणे कर्मे करीत असतांनाही त्यांच्या फलामध्ये—त्यांच्या फलाची इच्छा करण्याचा तुला अधिकार नाहीं. तूं फलाची इच्छा करूं नयेस. पण रहस्यकार याचाच अर्थ—'फल मिळणे किंवा न मिळणे हे केव्हाही तुझ्या ताब्यांतले नाहीं,' असा करितात. तोही बरोबर नाहीं. कारण फळ मिळणे किंवा न मिळणें, हे जरी कदाचित् कर्त्याच्या ताब्यांतले नसलें तरी त्याविषयींची इच्छा करणे त्याच्या ताब्यांतले असते, आणि त्याने इच्छा केली तरच कर्माचे फल मिळते व न केली तर मिळत नाहीं. यास्तव 'मा फलेषु' याचा अर्थ फलाची तृष्णा करू नको, असा असून तसा उपदेश करणेंच येथे उचित आहे, 'फळ मिळणें किंवा न मिळणे, हें तुझ्या ताब्यांतलें नाहीं.' हा अर्थ मूळाला अगदीं सोडून आहे. प्राचीन भाष्यकार व टीकाकार यांतील कोणीही असा विपरीत अर्थ करीत नाहींत. कारण 'फळ मिळणे किंवा न मिळणे हे तुझ्या ताब्यांतलें नाहीं' हें सांगण्यांत विशेष स्वारस्यही नाहीं व तो शास्त्राचा सिद्धान्तही पण नव्हे. हा अर्थ पहिल्या चरणाच्या अर्थाला अनुसरूनही नाहीं. पहिल्या चरणात 'तुझा कर्मामध्यें अधिकार आहे,' असें सांगितल्यावर 'मा फलेषु' म्ह० फलामध्यें अधिकार नाहीं, असे सांगणेंच

उचित दिसतें व तें मूळाला धरूनही आहे. रहस्यकारांनी मूळ श्लोकाचा सरळ व ओढाताण केल्यावांचून म्हणून जो हा अर्थ दिला आहे त्यापेक्षां याच श्लोकार्थावरील टीपेंत जो सारांश म्हणून दिला आहे तोच बरा आहे, असें म्हणावें लागते. ' या श्लोकाचे चार चरण म्हणजे कर्मयोगाची चतुःसूत्रीच होय, ' असें म्हणून ' कर्में करण्याचाच फक्त तुझा अधिकार आहे ' असा पहिल्या चरणाचा अर्थ दिला आहे. ' फलाचे ठायीं तुझा अधिकार नाहीं ' हा दुसऱ्या चरणाचा अर्थ आहे. तो वरच्यापेक्षां फारच चांगला आहे. 'कर्माच्या फलाचा हेतु–निमित्त होऊं नको ' अशा अर्थाचा ' मा कर्मफलहेतुः भूः' असा जो तिसरा चरण आहे त्याचा अर्थ–' माझ्या कर्माचे अमुक फळ मिळावे, असा हावरेपणाचा हेतु मनांत ठेवून काम करणारा होऊं नको ' असा करितात. पण टीपेंत ' फलाशा मनांत ठेवून कर्म करणारा होऊं नको ' असा ' सिद्धान्त ' (?) मानतात. कदाचित् एवढ्यावरून अर्थबोध होणार नाहीं म्हणून 'कर्मफलहेतुः' याचा ' कर्मफले हेतुः यस्य सः कर्मफलहेतुः' असा बहुव्रीहि समास होतो असे सांगतात. पण त्यांतील एकाचा एकाला पत्ता नाहीं, असें होऊन मूळ अर्थ एकीकडेच राहतो. तथापि 'हेतु' या शब्दाचा अर्थ 'आशा' असा ते समजतात. पण संस्कृतांत त्याचा तसा अर्थ नाहीं. हेतु म्हणजे कारण, निमित्त असा अर्थ आहे. पण रहस्यकारांनी वर 'वासना' हा संस्कृत शब्द 'इच्छा' या प्राकृत अर्थी जसा योजला आहे तसाच कारण, निमित्त, या अर्थी असलेला संस्कृत 'हेतु'शब्द येथें प्राकृत अर्थी घेतला आहे. पण कांहीं संस्कृत शब्द प्राकृतात अगदीं विपरीत अर्थी रूढ झालेले असतात. जसें–'परोक्ष' हा शब्द अपरोक्ष या अर्थी रूढ झाला आहे.त्याचप्रमाणे रहस्यकारांनी 'वासना' 'हेतु' हे शब्द मूळ अर्थ सोडून प्राकृत अर्थी मानले आहेत. ते म्हणतात, 'हा बहुव्रीहि समास आहे. ' पण तो षष्ठी तत्पुरुष आहे. बहुव्रीहि नाहीं, ' कर्मफलस्य हेतुः ' असा त्याचा विग्रह असून तूं कर्मफलाचें निमित्त, कारण होऊं नकोस, असा त्याचा अर्थ आहे. फलाच्या इच्छेने कर्म करणारा कर्मफलाच्या उत्पत्तीचें कारण, निमित्त होतो, तसा तूं होऊं नकोस. म्ह० फलकामना करूं नकोस. किंवा बहुव्रीहिच समास करावयाचा झाल्यास 'कर्मफलं हेतुः यस्य-' कर्माचे फळच ज्याच्या कर्मप्रवृत्तीचें निमित्त आहे,असा तू होऊं नकोस, असा समानाधिकरण बहुव्रीहि करावा. व्यधिकरण बहुव्रीहि करणें,हा अनिर्वाहपक्ष आहे. या श्लोकाच्या चार चरणांत जो उपदेश केला आहे, तो महत्त्वाचा आहे, हें निर्विवाद आहे. पण तो ज्ञानी पुरुषानें आत्मसाक्षात्कार झाल्यावर काय करावें, त्याचा हा उपदेश आहे, हें म्हणणें अयोग्य आहे. मुमुक्षूनें चित्तशुद्धीच्या द्वारा ज्ञानप्राप्तीसाठीं व ज्ञाननिष्ठायोग्यता प्राप्त होण्यासाठीं काय करावें, ते यांत व या पुढील दोन श्लोकांत सांगितलें आहे. रहस्यकारांनी 'मा फलेषु कदाचन' याचा जो वर चमत्कारिक अर्थ केला आहे त्याच्या पुष्टिकरणार्थ ते—"फल मिळणें ही गोष्ट आपल्या ताब्यांत नसून दुसऱ्या पुष्कळ गोष्टींची त्यास अनुकूलता लागते असें दाखवून अठराव्या अध्यायांत श्लो. १४–१६ पुनः हाच अर्थ दृढ केला आहे," असे म्हणतात. गीतारहस्याच्या ११४ पृष्ठावर कर्मफलाचे ठायीं केव्हांच ( कदाचन ) तुझा अधिकार नाहीं, या अर्थाचें कारण असें सांगितलें आहे:– " कारण कर्माचें फळ मिळणें अगर न मिळणे ही तुझ्या ताब्यांतली गोष्ट नसून नेहमी परमेश्वराधीन किंवा एकंदर सृष्टीतील कर्मविपाकावर अवलंबून आहे असें भगवंतांनी पुनः

**योगस्थः कुरु कर्माणि सङ्गं त्यक्त्वा धनंजय ।**
**सिद्ध्यसिद्ध्योः समो भूत्वा समत्वं योग उच्यते ॥ ४८ ॥**

**अन्वयार्थ—हे धनंजय,**—हे धनंजया !—**योगस्थः**—तूं योगांत स्थित होऊन—**सङ्गं त्यक्त्वा**—कर्मफलाविषयींची आसक्ति सोडून—**सिद्ध्यसिद्ध्योः समः भूत्वा**—सिद्धि व असिद्धि यांविषयीं सम होऊन—**कर्माणि**—विहित कर्मे—**कुरु**—कर.—**समत्वं**—सिद्धि व असिद्धि यांना समान मानणे, हाच—**योगः उच्यते**—योग म्हटला जातो. ४८.

**यदि कर्मफलप्रयुक्तेन न कर्तव्यं कर्म कथं तर्हि कर्तव्यमित्युच्यते–योगस्थ इति । योगस्थः सन्कुरु कर्माणि केवलमीश्वरार्थं तत्रापीश्वरो मे तुष्यत्विति सङ्गं त्यक्त्वा धनंजय । फलतृष्णाशून्येन क्रियमाणे कर्मणि सत्त्वशुद्धिजा ज्ञानप्राप्तिलक्षणा सिद्धिस्तद्विपर्ययजाऽसिद्धिस्तयोः सिद्ध्यसिद्ध्योरपि समस्तुल्यो भूत्वा कुरु कर्माणि । कोऽसौ योगो यत्रस्थः कुर्वित्युक्तमिदमेव तत्सिद्ध्यसिद्ध्योः समत्वं योग उच्यते ॥ ४८ ॥**

**भाष्यार्थ—यदि कर्मफलप्रयुक्तेन कर्म न कर्तव्यं तर्हि कथं कर्तव्यं इति 'योगस्थः' इति उच्यते**—जर कर्मफलाकडून प्रेरित होऊन कर्म करूं नये तर तें कसें करावें, हें 'योगस्थ०' या श्लोकाने सांगतात—**योगस्थः सन् कर्माणि कुरु—**

---

स्पष्ट शब्दांनी सांगितले आहे." इत्यादि. पण 'मा फलेषु कदाचन' याचा खरा अर्थ काय होतो व रहस्यकाराचा हा अर्थ असंबद्ध कसा आहे, तें वर सांगितलेच आहे. भगवान्, रहस्यकार म्हणतात तसें स्पष्ट सांगत नाहींत. अठराव्या अध्यायाच्या १४–१६ श्लोकांत प्रत्येक कर्माचे पांच हेतु सांगितले आहेत.'फल मनुष्याच्या ताब्यांत नाहीं, त्याला दुसऱ्या पुष्कळ गोष्टींची अनूकूलता लागते,' हे सांगितलेले नाहीं. त्या श्लोकांचा अर्थ व भाष्यार्थ पाहिला असतां त्याविषयीं वाचकांची खात्री आपोआपच होईल.

१ पण रहस्यकार याला असें अवतरण देतात– "आतां यासच योग किंवा कर्मयोग म्हणतात असें कर्मयोगाचें स्पष्ट लक्षण सांगतात." पण ते बरोबर नाहीं. कारण यांत योगाचें लक्षण सांगितलें आहे, कर्मयोगाचें नाहीं. उलट 'योगस्थ होऊन कर्मे कर' असें येथें सांगितलें आहे. त्यामुळे कर्मे करणे हा कर्मयोग निराळा, व ज्यांत स्थित होऊन तीं कर्मे करावयाचीं तो योग निराळा. या श्लोकांत योगशब्दाचा अर्थ सांगितला आहे, हें अगदीं खरें, पण योग म्ह० कर्मयोग नव्हे, हेंही यावरूनच सिद्ध होत आहे. ३९ व्या श्लोकांत आतां 'योगविषयक ज्ञान ऐक' असें म्हटलें व त्याविषयीं श्रोत्याच्या मनांत आवड उत्पन्न व्हावी म्हणून 'बुद्ध्या युक्तो यया०' येथून...'बुद्धिः एका इह कुरुनंदन' येथवर त्याच योगाची स्तुति केली. पुढे 'बहुशाखा०' येथून 'समाधौ न विधीयते' येथवर सकाम कर्मे करणाऱ्या अज्ञांची निंदा केली. नंतर ४५ व्या श्लोकांत ती योगबुद्धि सांगण्यास आरंभ केला. त्यांत 'वेदांचा विषय त्रिगुणात्मक संसार आहे. तूं निष्काम, निर्द्वंद्व, नित्यसत्त्वस्थ, निर्योगक्षेम व आत्मवान् हो असें सांगितलें. पण कोणत्याही साधकाला

एकदम निष्काम, निर्द्वंद्व, वगैरे होतां येणे शक्य नाही. म्हणून ४६ व्या श्लोकांत ज्ञान सर्व कर्मांहून श्रेष्ठ आहे. सर्व कर्मांचें फळ ज्ञानाच्या फळांत अन्तर्भूत होते, यास्तव प्रत्येकाला ज्ञानच संपादन केलें पाहिजे, प्रत्येकाने ज्ञानयोगीच झाले पाहिजे, तोच मुख्य योग आहे, हें सुचविले, पण अर्जुन किंवा कोणताही साधक प्रथमच ज्ञानयोगाचा अधिकारी असू शकत नाही. म्हणून ४७ व्या श्लोकांत 'तुझा कर्मांतच अधिकार आहे, ज्ञानांत नाही. कर्में करीत असतांनाही त्यांच्या फलाची इच्छा करण्याचा तुला अधिकार नाही. कर्मफलाची इच्छा करून तूं त्याचें निमित्त होऊं नको व फलाची इच्छा जर करावयाची नाही तर कर्में करून तरी काय करावयाचे आहे, असे म्हणून ती न करण्याविषयीही तुझी आसक्ति न वाढो' असे सांगितले. म्हणजे निष्काम कर्म करण्याचे विधान भगवानांनी ४७ व्या श्लोकांतच केले आहे, व आतां या श्लोकांत ते फलेच्छारहित कर्मही कसे करावे ते सांगत आहेत. वैदिक धर्म दोन प्रकारचा. एक प्रवृत्तिरूप व दुसरा निवृत्तिरूप. प्रवृत्तिरूप धर्म पुण्याच्या द्वारा स्वर्गादि उत्कर्षासाठी व निवृत्ति धर्म मोक्षासाठी आहे. उपनिषदें व गीता यांत उत्कर्षाला कारण होणाऱ्या प्रवृत्ति धर्माची निंदा केली आहे (मुंडक भाष्यार्थ पृ.३९-४०काठको.भाष्यार्थ पृ. ४२गी अ. २.४२–४४ अ. ९ श्लो२०–२१ पहा)प्रवृत्ति धर्म हाच वैदिक कर्मयोग होय. पण उपनिषदांतच त्याला उपासनेचे स्वरूप दिले आहे. (छा. भाष्यार्थ पृ.७-८ बृ भाष्यार्थ १.१०० तैत्तिरीभाष्यार्थ पृ.१.७४ पहा) त्याच्याच अनुरोधानें गीतेतही प्रवृत्तिलक्षण कर्मयोगाची निंदा करून चित्तशुद्धीसाठी निष्काम कर्माचरण करण्याचा उपदेश केला आहे. मी कर्ता हा अभिमान सोडून ईश्वरार्थ कर्म कर ३. ९ असा येथे उपदेश केला असल्यामुळे येथेही उपनिषदांच्या अनुसार कर्मांगावबद्ध उपासनाच विहित आहे. असले निष्काम व ईश्वराराधनार्थ कर्म हे प्रवृत्त कर्म नव्हे, निवृत्त कर्म आहे.मनुस्मृतीत १२ व्या अध्यायात अशी वचने आहेत–

"सुखाभ्युदयिक चैव नैःश्रेयसिकमेव च। प्रवृत्तं च निवृत्तं च द्विविध कर्म वैदिकम्॥
इह चामुत्र वा काम्य प्रवृत्तं कर्म कीर्त्यते। निष्काम ज्ञानपूर्वं तु निवृत्तमुपदिश्यते "॥

या लोकीं निष्काम पुरुषाची कोणतीही क्रिया कधीच दिसत नाही. तर पुरुष जें जें काही करतो ते ते कामाचे चेष्टित–कामाचे कार्य आहे. यास्तव वरील श्लोकांचा अर्थ– ज्या संन्यासमार्गी टीकाकारांवर रहस्यकारांनी गीतारहस्यांत ठिकठिकाणी कोरडे ओढले आहेत व ज्यांना जवळ जवळ मूर्ख ठरविले आहे त्याना–अनुकूल असाच आहे. कसा तो पहा–वैदिक कर्म दोन प्रकारचे आहे. एक सुखाभ्युदयिक व दुसरें नैःश्रेयसिक. त्यातील पहिलें स्वर्गादिसुख देणाऱ्या संसाराचे प्रवर्तक असल्यामुळे 'प्रवृत्त' या नावाचे आहे व दुसरें संसाराची निवृत्ति करणारें असल्यामुळे 'निवृत्त' या नावाचें आहे. ८८ (त्यातील ज्योतिष्टोमादि हे प्रवृत्त व प्रतीकोपासनादि हें निवृत्त कर्म आहे. कारण पहिले स्वर्गसुख देतें म्हणजे सुखाभ्युदयिक आहे व दुसरें चित्तशुद्धीला–चित्तसमाधानाला कारण होतें) ८९ व्या श्लोकांत मनूंनी हेंच सांगितले आहे.–ऐहिक किंवा पारलौकिक फलाच्या इच्छेने केलेलें जें कर्म ते प्रवृत्त (कारण तें संसारप्रवृत्तीचें निमित्त होतें) व जे दृष्ट किंवा अदृष्ट फलाच्या इच्छेने न केलेले ज्ञानाभ्यासपूर्वक कर्म ते निवृत्त [कारण ते संसाराच्या निवृत्तीला कारण होतें.] अर्थात् संध्यावंदनादि नित्य कर्मे, जातेष्टयादि नैमित्तिक कर्मे, निषिद्धाचा त्याग, इत्यादिक हीं निवृत्त कर्मेंच आहेत. फार काय पण वर म्हटल्याप्रमाणे स्वर्गेच्छेचा त्याग

योगनिष्ठ होऊन कर्मे कर. [ कर्मे क्लेश देणारीं जरी असलीं तरी शास्त्रानें सांगितलीं आहेत, तीं शास्त्रविहित आहेत, म्हणून त्यांचे अनुष्ठान अवश्य केले पाहिजे. येथील कर्मे म्ह० शास्त्रानें ज्यांचे विधान केले आहे अशीं नित्य व नैमित्तिक कर्मेच होत. लौकिक —व्यावहारिक व स्वाभाविक कर्मे नव्हेत. कारण तीं न करण्याविषयीं कधीं कोणाला इच्छाच होत नाहीं. प्रत्येक प्राणी तीं स्वभावतःच करीत असतो. असो; पण हें कर्मानुष्ठान कोणत्या उद्देशाने करावे, ते सांगतात-]—**केवलं ईश्वरार्थं**—केवल ईश्वरासाठीं ( दुसऱ्या कोणत्याही फलाची अपेक्षा न करितां केवल ईश्वराला प्रसन्न करण्यासाठीं अनुष्ठान करावे. तर मग ईश्वराच्या प्रसन्नतेचा अभिलाष धरावयास कांहीं हरकत नाहीं ? उत्तर-)—**तत्र अपि**—ईश्वराच्या प्रसन्नतेसाठीं कर्मानुष्ठान करावे, असे जरी सिद्ध झालें तरी—**ईश्वरः मे तुष्यतु इति संगं त्यक्त्वा धनंजय**—ईश्वर मजवर प्रसन्न होवो, अशी आसक्ति सोडून हे अर्जुना, तूं कर्म कर.—**फलतृष्णाशून्येन क्रियमाणे कर्मणि**—फलविषयींची तृष्णा सर्वथा सोडून कर्माचे अनुष्ठान करूं लागले असतां-फलाभिलाषरहित पुरुषाकडून कर्मानुष्ठान होत असतां—**सत्त्वशुद्धिजा ज्ञानप्राप्तिलक्षणा सिद्धिः**—चित्तशुद्धीपासून झालेली ज्ञानप्राप्तिरूप सिद्धि—**तद्विपर्ययजा असिद्धिः**—व चित्ताच्या अशुद्धीपासून झालेली ज्ञानाची अप्राप्तिरूप असिद्धि—**तयोः सिद्ध्यसिद्ध्योः अपि समः-तुल्यः भूत्वा कर्माणि कुरु**—त्या सिद्धि-असिद्धीविषयींही सम म्ह० तुल्य होऊन कर्मे कर.—**यत्रस्थः कुरु इति उक्तं असौ योगः कः**—पण ज्यामध्ये स्थित होऊन कर्मे कर म्हणून सांगितलेस तो योग कोणता ?—**इदं एव तत् सिद्ध्यसिद्ध्योः समत्वं योगः उच्यते**—हेच ते सिद्धि-असिद्धीचे समत्व 'योग' म्हटले जाते. (सिद्धि व असिद्धि याना तुल्य मानणे,हा तो योग

---

करून केलेलें अग्निहोत्रादिकर्मही निवृत्तच आहे, प्रवृत्त नव्हे-कारण तीं सर्व चित्तशुद्धीच्या द्वारा संसारनिवृत्तीला कारण होतात, असे म्हटलें आहे व रहस्यकारानीही त्याचा ३४६ पृष्ठावर उल्लेख केला आहे. जन्ममरणसुखदुःखप्राप्तिरूप संसारामध्ये प्रवृत्त करणारें जे विहित-निषिद्ध कर्म ते प्रवृत्त कर्म किंवा प्रवृत्तिमार्ग व परंपरेने ज्ञानाला व ज्ञानाच्या द्वारा मोक्षाला कारण होणारें जे निष्काम कर्म ते निवृत्त कर्म होय. गीता त्यांतील निवृत्त कर्म सांगते, प्रवृत्त कर्मांचा उपदेश करीत नाहीं, यास्तव गीताशास्त्र हे निवृत्तिमार्गाचें शास्त्र आहे. प्रवृत्तिमार्गाचे नाहीं. असो; येथील योग म्ह० नुसता कर्मयोग नव्हे.

१ 'समत्व' हे योगाचे लक्षण आहे. सिद्धि-असिद्धि इत्यादि द्वंद्वाना समान लेखणे म्ह० हर्ष-विषाद न मानणे हेंच समत्व व तोच योग होय, अर्थात् योग म्हणजे चित्ताचे साम्य, चित्तसमाधान. 'योगामध्ये स्थित होऊन कर्म कर' असे भगवान् म्हणत आहेत व 'समत्वालाच योग म्हणतात' असें स्पष्ट सांगत आहेत. यास्तव कर्मानुष्ठान हा योग नव्हे तर समत्व हा योग आहे, हें वाचकानी लक्षांत ठेवावें. रहस्यकार म्हणतात "कर्म सिद्ध होणे किंवा निष्फळ होणे, यांचे ठिकाणी असलेल्या सारखेपणाच्या मनोवृत्तीसच कर्मयोग म्हणतात." हा अर्थ कितीसा सुबोध आहे याचा विचार वाचकांनीच करावा.

होय. या योगामध्यें स्थित होऊन-या योगामध्यें निष्ठा ठेवून म्ह० इष्टानिष्टाला तुल्य लेखून तूं कर्म कर. ] ४८.

दूरेण ह्यवरं कर्म बुद्धियोगाद्धनंजय ।
बुद्धौ शरणमन्विच्छ कृपणाः फलहेतवः ॥४९॥

**अन्वयार्थ**—**हे धनंजय**—हे धनंजया !—**बुद्धियोगात्**—या समत्वबुद्धियुक्त कर्माहून-किंवा ज्ञानयोगाहून—**कर्म**—फलाच्या इच्छेनें केलेलें कर्म—**दूरेण हि**—फारच—**अवरं**—निकृष्ट आहे.—**अतः**—यास्तव—**बुद्धौ**—बुद्धींत-ज्ञानांत—**शरणं अन्विच्छ**—आश्रय मिळविण्याची इच्छा कर. परमार्थज्ञानशरण हो. कारण—**फलहेतवः**—फलाच्या तृष्णेनें कर्मफलाचे हेतु होणारे कर्मठ—**कृपणाः**—कृपण अज्ञ आहेत. ४९.

यत्पुनः समत्वबुद्धियुक्तमीश्वराराधनार्थं कर्मैतस्मात्कर्मणः—दूरेणेति । दूरेणातिविप्रकर्षेण ह्यवरं निकृष्टं कर्म फलार्थिना क्रियमाणं बुद्धियोगात्समत्वबुद्धियुक्तात्कर्मणो जन्ममरणादिहेतुत्वाद्धनंजय । यत एवं योगविषयायां बुद्धौ तत्परिपाकजायां वा सांख्यबुद्धौ शरणमाश्रयमभयप्राप्तिकारणमन्विच्छ प्रार्थयस्व परमार्थज्ञानशरणो भवेत्यर्थः । यतोऽवरं कर्म कुर्वाणाः कृपणा दीनाः फलहेतवः फलतृष्णाप्रयुक्ताः सन्तः " यो वा एतदक्षरं गार्ग्यविदित्वाऽस्माल्लोकात्प्रैति स कृपणः " इति श्रुतेः ॥ ४९ ॥

**भाष्यार्थ**—( तत्त्वज्ञानाच्या उद्देशानें योगस्थ होऊनच कर्म करण्याचे कारण काय ? फलाभिलाष धरूनही त्याचें अनुष्ठान सहज होऊं शकतें, अशी आशंका घेऊन योगस्थ होऊन केलेल्या कर्माची स्तुति करीत पुढील श्लोक उत्थापित करितात-)—**पुनः यत् समत्वबुद्धियुक्तं ईश्वराराधनार्थं कर्म**—पण जें वरील समत्वबुद्धीनें युक्त असलेलें ईश्वराच्या आराधनेसाठीं केलेलें कर्म—**एतस्मात् कर्मणः**—या कर्माहून सकाम कर्म फार निकृष्ट आहे असें—**दूरेण० इति**—'दूरेण०' या श्लोकानें सांगतात—**दूरेण-अतिविप्रकर्षेण**—फार मोठ्या अन्तरानें—**हि अवरं-निकृष्टं कर्म**—कर्म अवर-निकृष्ट -हीन आहे. (पण तें कर्म कोणतें ? )—**फलार्थिना क्रियमाणं**—फलाची इच्छा करणाऱ्या पुरुषाकडून केलें जाणारें कर्म फारच-अतिशय निकृष्ट आहे. ( कोणापेक्षां निकृष्ट आहे ? )—**बुद्धियोगात्-समत्वबुद्धियुक्तात् कर्मणः**—समत्वबुद्धीनें युक्त असलेल्या कर्माहून [ सकाम कर्म निकृष्ट आहे. त्याचें कारण काय ? ]—**जन्ममरणादिहेतुत्वात्**—कारण सकाम कर्म जन्म-मरणादिकांना कारण होतें म्हणून तें समत्वबुद्धियुक्त कर्माहून अत्यंत निकृष्ट आहे.—**धनंजय**—अर्जुना ( ईश्वराच्या आराधनेसाठीं

---

१ आचार्य कोणत्या कर्माच्या विरुद्ध आहेत व ते का आहेत, हे येथें स्पष्ट सांगितलं आहे. हा त्यांचा परम सिद्धान्त वाचकानी लक्षांत ठेवावा. तो आचार्यांचें मत व इतर मतें यांतील भेद ओळखण्यास अत्यंत उपयोगी आहे.

केलेल्या समत्वबुद्धियुक्त कर्माहून फलाच्या इच्छेनें केलेलें कर्म फार निकृष्ट आहे. त्या दोन प्रकारच्या कर्मांत फारच अन्तर आहे. कारण सकाम कर्म जन्ममरणादिसंसाराला कारण होतें व योगस्थ होऊन केलेलें कर्म चित्तशुद्धि, ज्ञानप्राप्ति यांच्या द्वारा मोक्षाला कारण होतें. )—**यतः एवं**—आणि ज्याअर्थी असें आहे त्याअर्थी—**योगविषयायां बुद्धौ**—योगविषयक बुद्धीमध्यें म्ह० समत्वबुद्धीमध्यें—**वा तत्परिपाकजायां सांख्यबुद्धयौ**—किंवा समत्वबुद्धियुक्त कर्माच्या अनुष्ठानाचा चित्तशुद्धि हा परिपाक होऊन त्यापासून झालेल्या सांख्यबुद्धींत—**शरणं-आश्रयं-अभयप्राप्तिकारणं**—शरण म्ह० आश्रय म्ह० अभयप्राप्तीचें कारण—**अन्विच्छ-प्रार्थयस्व**—संपादन करण्याची इच्छा कर.—**परमार्थज्ञानशरणः भव इति-अर्थः**—(बुद्धीमध्यें अभयकारणाची इच्छा कर, याचा अर्थ-) परमार्थ ज्ञानाचा आश्रय कर,अभयप्राप्तीचें कारण असें जें परमार्थज्ञान त्याची इच्छा कर.—**यतः अवरं कर्म कुर्वाणाः कृपणाः दीनाः फलतृष्णाप्रयुक्ताः सन्तः फलहेतवः**—कारण निकृष्ट कर्म करणारे लोक कृपण-दीन असतात.ते फलाच्या तृष्णेकडून कर्माची प्रेरणा केले गेलेले असे होत्साते फलाचे हेतु होतात. फलाचे अधिकारी बनतात.—**हे गार्गि यः वै एतत् अक्षरं अविदित्वा अस्मात् लोकात् प्रैति सः कृपणः इति श्रुतेः**—हे गार्गि, जो या अस्थूल-अनणु इत्यादि प्रकारच्या अक्षर ब्रह्माला न जाणतां या लोकातून मरून जातो तो कृपण आहे. अशी बृहदारण्यक श्रुति त्याच्या कृपणत्वाविषयीं प्रमाण आहे. ( बृह. भाष्यार्थ अ. पृ. २०९ ) [समत्वबुद्धियुक्त कर्माहून बुद्धिरहित कर्म अत्यंत हीन असल्यामुळें समत्वबुद्धिरूप योगाचा आश्रय कर. पण समत्वबुद्धि किंवा योगबुद्धि हें साधन आहे, साध्य नव्हे. सांख्यबुद्धि हें साध्य आहे. यास्तव त्याचाच आश्रय कर, असें सांगणे उचित होय. म्हणून आचार्य 'बुद्धौ शरणं अन्विच्छ' याचा दुसरा अर्थ सांगतात-' बुद्धौ ' म्ह० सांख्यबुद्धीमध्यें शरण म्ह० अभयप्राप्तीचें कारण संपादन करण्याची इच्छा कर. परमार्थज्ञानाचा आश्रय कर. कारण ज्ञानाचा आश्रय न करितां फलाभिलाषाकडून प्रेरित होत्साते जे फलाचे हेतु-फलाचे अधिकारी बनतात ते कृपण-दीन होत. कारण ' अक्षर ब्रह्माला न जाणतां जे या मनुष्यशरीराला सोडून जातात-मरतात ते कृपण होत ' असें श्रुतीनें सांगितलें आहे. अर्थात् अज्ञ लोक कृपण होत व फलाची इच्छा हें अज्ञतेचें-आत्म्याच्या अज्ञानाचें चिह्न आहे. अर्जुना, तूं तसा अज्ञ राहूं नकोस. परमार्थज्ञानाचा आश्रय कर. त्या ज्ञानाच्या योगानें स्वतः अभय होण्याची इच्छा कर. ] ४९

---

१ रहस्यकार ' कारण बुद्धीच्या सारखेपणाच्या योगापेक्षां बाह्य कर्म फारच कनिष्ठ होय. ' असा ' दूरेण ह्यवरं कर्म बुद्धियोगात् ' या वाक्याचा अर्थ करितात. ' बुद्धियोगात् ' याचा ' बुद्धीच्या सारखेपणाच्या योगापेक्षां ' हा अर्थ सरळ व सुबोध आहे असें कोण म्हणेल ? तसेंच कर्माला बाह्य हें विशेषण कशाला पाहिजे ? ' अवरं ' म्ह० कनिष्ठ असें न म्हणतां निकृष्ट म्हणणेंच अधिक योग्य नव्हे का ? कारण ज्येष्ठ व कनिष्ठ हे शब्द प्रायः वयोमानाला उद्देशून योजितात.

बुद्धियुक्तो जहातीह उभे सुकृतदुष्कृते ।
तस्माद्योगाय युज्यस्व योगः कर्मसु कौशलम् ॥५०॥

**अन्वयार्थ—बुद्धियुक्तः**—ज्ञानयुक्त पुरुष-ज्ञानी—**इह**—या लोकीं—**सुकृतदुष्कृते उभे**—पुण्य व पाप हीं दोन्ही—**जहाति**—सोडतो.—**तस्मात्**—म्हणून—**योगाय**—समत्वरूप योगाला—**युज्यस्व**—तयार हो. समत्वरूप योगामध्यें स्थित होऊन ज्ञानप्राप्तीसाठीं कर्मे कर, कारण—**योगः**—सिद्धि व असिद्धि यांना सम मानणें, हा योग—**कर्मसु**—कर्मांतील—**कौशलं**—कुशलता आहे. ५०.

**समत्वबुद्धियुक्तः सन्स्वधर्ममनुतिष्ठन्यत्फलं प्राप्नोति तच्छृणु—बुद्धीति । बुद्धियुक्तः समत्वविषयया बुद्ध्या युक्तो बुद्धियुक्तो जहाति परित्यजतीहास्मिँल्लोक उभे सुकृतदुष्कृते पुण्यपापे सत्त्वशुद्धिज्ञानप्राप्तिद्वारेण यतस्तस्मात्समत्वबुद्धियोगाय युज्यस्व घटस्व। योगो हि कर्मसु कौशलं स्वधर्माख्येषु कर्मसु वर्तमानस्य या सिद्ध्यसिद्ध्योः समत्वबुद्धिरीश्वरार्पितचेतस्तया तत्कौशलं कुशलभावः । तद्धि कौशलं यद्बन्धस्वभावान्यपि कर्माणि समत्वबुद्ध्या स्वभावान्निवर्तन्ते । तस्मात्समत्वबुद्धियुक्तो भव त्वम् ॥ ५० ॥**

**भाष्यार्थ—समत्वबुद्धियुक्तः सन् स्वधर्मं अनुतिष्ठन् यत् फलं प्राप्नोति तत् 'बुद्धि०' इति शृणु**—समत्वबुद्धीनें युक्त होऊन स्वधर्माचे अनुष्ठान करणारा ज्या फलास प्राप्त होतो तें फल 'बुद्धियुक्तो०' इत्यादि श्लोकाने ऐक—**बुद्धियुक्तः-समत्वविषयया बुद्ध्या युक्तः बुद्धियुक्तः**—समत्वविषयक बुद्धीने युक्त असलेल्या पुरुषाला बुद्धियुक्त म्हणतात. असा बुद्धियुक्त पुरुष—**इह अस्मिन् लोके**—याच लोकीं-याच जन्मांत—**उभे सुकृतदुष्कृते-पुण्यपापे**—सुकृत व दुष्कृत म्ह० पुण्य व पाप ही दोन्ही—**जहाति-परित्यजति**—टाकतो, त्यांचा परित्याग करतो. (अहो पण नुस्त्या समत्वबुद्धीनें पुण्यपापांची निवृत्ति होणें योग्य नव्हे, कारण ज्याला परमार्थदर्शन झालें आहे त्याच्याच पुण्यपापांची निवृत्ति होते अशी प्रसिद्धि आहे! या शकेचे उत्तर-)—**सत्त्वशुद्धि-ज्ञानप्राप्तिद्वारेण**—चित्तशुद्धि, ज्ञानप्राप्ति यांच्या द्वारा (समत्वबुद्धियुक्त पुरुष पुण्यपापांचा त्याग करतो.)—**यतः**—ज्याअर्थी असें आहे—**तस्मात्**—त्या अर्थी—**समत्वबुद्धियोगाय युज्यस्व-घटस्व**—तूं स्वधर्माचे अनुष्ठान करीत असतांना समत्वबुद्धियोगासाठीं मन लाव-यत्न कर. तूं समत्वबुद्धियोगामध्यें आपलें मन स्थिर कर.—**हि योगः कर्मसु कौशलं**—कारण योग हीच कर्मांतील कुशलता आहे. (तर मग प्रस्तुत योगाच्या सामर्थ्यानेंच फलसिद्धि होणें शक्य आहे. अर्थात् स्वधर्मानुष्ठानाविषयीं अनास्था केली तरी चालेल! उत्तर-)—**ईश्वरार्पितचेतस्तया स्वधर्माख्येषु कर्मसु वर्तमानस्य या सिद्ध्यसिद्ध्योः समत्वबुद्धिः तत् कौशलं-कुशलभावः**—चित्त ईश्वरार्पण केलेले असल्यामुळें स्वधर्मसंज्ञक कर्माचे अनुष्ठान करीत असलेल्या पुरुषाची सिद्धि व असिद्धि याविषयीं

जी समत्वबुद्धि तेंच त्यांतील कौशल म्ह० कुशलपणा आहे. ( अहो पण बंध उत्पन्न करणें हा कर्मांचा स्वभावच आहे. त्यामुळें कर्मानुष्ठान केल्यास बंध अवश्य होणारच ! उत्तर-)—**बन्धस्वभावानि अपि कर्माणि समत्वबुद्ध्या स्वभावात् निवर्तन्ते इति यत् तत् हि कौशलं**—बंधन उत्पन्न करणें हाच ज्यांचा स्वभाव आहे अशींही कर्मे समत्वबुद्धीनें त्या स्वभावापासून निवृत्त होतात हें जें कांहीं आहे तेंच कौशल होय.—**तस्मात्**—समत्वबुद्धीचें असें विशिष्ट फळ असल्यामुळें—**त्वं समत्वबुद्धियुक्तः भव**—तूं समत्वबुद्धियुक्त हो. [ समत्वबुद्धीने युक्त असलेला पुरुष चित्तशुद्धि, ज्ञानप्राप्ति या परंपरेने कर्मापासून होणारें पुण्य व पाप ही दोन्ही येथल्या येथेच टाकतो, त्याला त्यांचा लेप लागत नाहीं. समत्वबुद्धीने चित्तशुद्धि होते, चित्तशुद्धीनंतर ज्ञानप्राप्ति होते. मी अकर्ता, अभोक्ता, नित्य, निर्विकार आहें, असें आत्मज्ञान होतें. तें झाल्यामुळे पुण्यपापांचा क्षय होतो. नुस्त्या समत्वबुद्धीने पुण्यपापक्षय संभवत नाहीं. यास्तव तूं समत्वबुद्धियोगासाठींच यत्न कर. त्यांत आपलें मन स्थिर कर. कारण कर्त्याला पुण्यपापांनीं बद्ध करणे–हा कर्मांचा जरी स्वभावच असला तरी समत्वबुद्धियोग[1] हेंच त्या कर्मांतलि कुशलत्व आहे. कारण त्यामुळें कर्मांचा स्वभाव बदलतो आणि असा स्वभाव बदलून सोडणें हेच कर्मातील कौशल आहे. म्हणून तूं समत्वबुद्धियुक्त हो. ] ५०

---

१ पण रहस्यकार ‘ तस्मात् योगाय युज्यस्व योगः कर्मसु कौशलं ’ याचा अर्थ–‘म्हणून योगाचा आश्रय कर. ( पुण्यपाप न लागता ) कर्मे करण्याची जी चतुराई ( कौशल किंवा युक्ति ) तिलाच कर्मयोग असे म्हणतात’ असा करितात. पण हा अर्थ बरोबर नाहीं. योग ह्म० समत्व हे कर्मातील कौशल आहे.कौशल म्ह० कुशलता, पण त्यालाच रहस्यकार युक्ति म्हणतात. कौशल ह्म० युक्ति हा अर्थ अपूर्व आहे. चित्ताला सम ठेवून कर्मे करणें हेच कौशल आहे. कारण तसे केल्याने कर्मापासून पुण्यपापादि बंध उत्पन्न होत नाहीं. रहस्यकार कौशल ह्म० युक्ति हे योगाचे लक्षण आहे, असे समजतात. पण समत्व हे एक लक्षण सांगितल्यावर पुनः कौशल–युक्ति हे दुसरे लक्षण सांगण्याचे प्रयोजन काय आहे ? शिवाय योग ह्म० युक्ति असा एक अर्थ प्रसिद्ध आहे. तेव्हा कर्मातील कौशल म्ह० युक्ति असा कौशलशब्दाचा अप्रसिद्ध अर्थ मानून पुनः त्या योगाचे हे दुसरें लक्षण आहे असे समजण्याचें कांहीं कारण दिसत नाहीं. त्यापेक्षां योग हेच कर्मातील कौशल आहे, हाच सरळ अर्थ आहे, रहस्यकार सांप्रदायिक टीकाकाराना मात्र ‘ ओढाताणीनें अर्थ करणारे ’ म्हणून म्हणतात. पण स्वतः शब्दाच्या अर्थाला इतके दूर ओढीत नेतात की त्या बिचाऱ्याचा मूळ अर्थ काय आहे, हेंही वाचकाच्या ध्यानात रहात नाहीं. जसे—४९ व्या श्लोकांत ‘ कर्मापेक्षा बुद्धि श्रेष्ठ,’ असे सांगितलेले कबूल करितात. पण त्या बुद्धीच्या अर्थाला फार दूर खेंचून नेतात. “ तिच्या मागे ‘ व्यवसायात्मिका ’ हे विशेषण नसल्यामुळे तिचा अर्थ ‘ समजूत, इच्छा, वासना, हेतु ’ असा आहे, ” असें म्हणतात. पण यावर आम्ही त्यांना उलट असा प्रश्न करतो की ३९ व्या श्लोकांत ‘ सांख्ये बुद्धिः ’ ‘ योगे बुद्धिः ’ असे शब्द आहेत. त्यांना ‘ व्यवसायात्मिका ’ हे विशेषण लावलेले नाहीं. तेव्हां त्या बुद्धिशब्दाचा अर्थही ‘ समजूत, इच्छा ’ वगैरे करावयाचा का काय ? पण

तुम्ही तर त्याचा 'ज्ञान' असा अर्थ केला आहे. शिवाय ४९ व्या श्लोकांत नुस्ता 'बुद्धि' शब्द नाहीं. 'बुद्धियोग' असा शब्द आहे. तेव्हां त्यांतील बुद्धि म्ह० जर समजूत, वासना तर मग त्याला योगशब्द जोडून 'समजूतयोग,' 'वासनायोग,' वगैरे म्हणावयाचें की काय ? असो; आचार्यांनी बुद्धियोग म्ह० समत्वबुद्धियोग असा एक पूर्व सांप्रदायिक टीकाना अनुसरून अर्थ दिल्यावर पुनः बुद्धियोग म्ह० ज्ञानयोग असा अर्थ केला आहे; व तसा केल्यासच अर्जुनाचा तिसऱ्या अध्यायाच्या आरंभीचा 'कर्माहून ज्ञान जर श्रेष्ठ तर मला तूं घोर कर्मांत कां नियुक्त करतोस ?' हा प्रश्न उपपन्न होतो. कारण भगवानांनी कर्म बुद्धियोगाहून अतिशयच निकृष्ट आहे, हे येथेंच सांगितले आहे, दुसऱ्या कोठेही नाहीं; व त्यालाच उद्देशून अर्जुनाचा प्रश्न आहे. बुद्धियोगाला उद्देशून प्रश्न नाही. कारण भगवान् योगस्थ होऊन कर्म कर म्ह० बुद्धियोगयुक्त होऊन कर्म कर असें सांगतच आहेत. तेव्हा तिसऱ्या अध्यायांत अर्जुनाने जो प्रश्न केला आहे त्यांतील बुद्धीचा साम्य बुद्धि असा अर्थ करणें सर्वथा अनुचित होय. यास्तव आचार्यांना अगोदर 'बुद्धियोगात्-' 'समत्वबुद्धियोगाहून' असा पूर्वसंप्रदायाला अनुसरून अर्थ करून तो अर्जुनाच्या पुढील प्रश्नाला अनुकूल नसल्यामुळे 'बुद्धियोग' याचा 'ज्ञानयोग' असा अर्थ केला आहे व त्याहूनच कर्म अत्यंत निकृष्ट आहे; आणि या वचनाला अनुलक्षूनच 'कर्माहून ज्ञान अतिशय श्रेष्ठ आहे, असे जर तुझें मत आहे तर मला घोर कर्म का करावयास सांगतोस ?' असा पुढे अर्जुनाने प्रश्न केला आहे. भगवानांनी त्याचें उत्तरही 'ज्ञान व कर्म या दोन निष्ठा असून त्याचे अधिकारी सांख्य व योगी आहेत,' असे दिले आहे. पण या सर्व गोष्टींचा विचार न करितां 'बुद्धि म्ह० ज्ञान' असा अर्थ करणाऱ्या आचार्यादिकांना रहस्यकार जो दोष देतात (गी. र. पृ. ६३४) तो अस्थानीं आहे. 'कर्माचा बरेवाईटपणा कर्मावर अवलंबून नसून कर्म एकच असले तरी कर्माच्या बऱ्यावाईट बुद्धीप्रमाणे ते शुभ अगर अशुभ होत असते, म्हणून कर्मापेक्षां बुद्धि श्रेष्ठ होय,' इत्यादि रहस्यकारांनी जे ठिकठिकाणी म्हटलें आहे त्याचाही येथील बुद्धीशीं व कर्माशीं काहीं संबंध नाहीं. कारण येथील कर्म म्हणजे लौकिक कर्म नव्हे, तर शास्त्रविहित कर्म आहे. त्यातील शुभ कोणते व अशुभ कोणते, हें कर्त्याच्या बुद्धीवरून ठरवावयाचें नसून शास्त्रावरून ठरवावयाचे असते. कार्याकार्याचा निश्चय करणारे प्रमाण शास्त्र आहे; बुद्धि नाही. अ. १६ श्लो. २४ पहा. निष्काम कर्म याचाही अर्थ नित्य कर्म असाच आहे. अग्निहोत्र नित्यही आहे व काम्यही आहे. यास्तव गीतेंत ज्या दोन निष्ठा सांगितल्या आहेत त्या दोन्ही वैदिक आहेत. तसेच, येथील बुद्धिशब्दाचा अर्थही वासना, समजूत वगैरे नाही. तर ज्ञान असाच त्याचा अर्थ आहे. दुसरा अर्थ संभवत नाही. अर्थात् रहस्यकारांनी 'कर्मे करतांना बुद्धि स्थिर, सम, पवित्र, व शुद्ध ठेवणे हीच एक युक्ति किंवा कौशल असून यासच योग म्हणतात,' असें जें म्हटले आहे ते सर्वथा अप्रासंगिक व मूळाला सोडून आहे. तथापि ते टीकाकारांना दोष देण्यास तयारच ! "–'योगः कर्मसु कौशलं' या पदाचा याप्रमाण सरळ अर्थ लागत असतां कित्येकांनी 'कर्मसु योगः कौशलं' 'कर्माचे ठायीं जो योग त्याला कौशल म्हणतात,' असा ओढाताणीनें अर्थ लावण्याचा प्रयत्न केलेला आहे. पण 'कौशल'शब्दाची व्याख्या देण्याचें येथें कांहीं कारण नसून योगशब्दाचें लक्षण सांगणेंच प्रस्तुत असल्यामुळे हा अर्थ मानतां येत नाहीं. शिवाय 'कर्मसु कौशलं'

असा सरळ अन्वय लागत असतां ' कर्मसु योग: ' अशी उलटापालट करणेंही योग्य नव्हे." गी. र. ६३४. पण रहस्यकारांचा अर्थ सरळ नाहीं, हे आम्ही वर दाखविलेच आहे. आचार्यांनी त्याचा अर्थ कसा केला आहे तेंही वर स्पष्टपणें दाखविलें आहे. रहस्यकार त्यालाच येथें ओढाताणीचा अर्थ म्हणत आहेत. पण ' कौशलं'शब्दाचा 'युक्ति' हा अर्थ कोठून आला? एकदा योग म्ह० युक्ति म्हणतां व दुसऱ्यांदा कौशल म्ह० युक्ति म्हणतां ? याचा अर्थ काय ? ' कर्मसु वर्तमानस्य या सिद्धिसिद्ध्योः समत्वबुद्धिः तत् कौशलं-' कर्में करीत असलेल्या पुरुषाची जी सिद्धि-असिद्धीविषयाची समत्वबुद्धि तेंच कौशल होय, असें आचार्य म्हणतात व रहस्यकार ' कर्में करतांना बुद्धि स्थिर, पवित्र, सम वगैरे ठेवणे हीच ती युक्ति किंवा कौशल असून यासच योग ह्मणतात. ' ' कर्मसु-' कर्में करतांना ' योग: ' बुद्धि स्थिर, सम वगैरे ठेवणे ' कौशल ' हीच युक्ति किंवा कौशल, या रहस्यकारांच्या अर्थांत व अन्वयांत आणि आचार्यांच्या अन्वयार्थांत काय फरक आहे? त्यांत ' यासच योग म्हणतात ' हे मात्र रहस्यकारांच्या पदरचे आहे व ते मुळाला सोडून आहे. दोघांचाही अन्वय सारखाच. पण रहस्यकार ' कर्मसु कौशल ' असा सरळ अन्वय लागत असता ' कर्मसु योग: ' अशी उलटापालट करणेंही योग्य नव्हे असें म्हणतात. परंतु स्वत: ' कर्में करतांना बुद्धि स्थिर ठेवणे हीच युक्ति–कौशल' म्हणतात. म्ह० स्वत:ही तसाच अन्वय लावितात, याला काय म्हणावे ? कौशल ह्म० युक्ति नव्हे, हे आम्ही वर सांगितलेच आहे. यास्तव रहस्यकारही ' योग. कर्मसु कौशल ' याचा अन्वय ' कर्मसु योग: कौशल' असाच म्ह० आचार्यांप्रमाणेच लावितात. पण त्यांतील कौशलशब्दाचा अर्थ निराळा करितात व तो बरोबर नाहीं. आचार्यांचाच अर्थ अधिक सरस, सुबोध व प्रकरणाला धरून आहे. आचार्यांचा अर्थ खरा न मानण्याचे कारण ते असे सांगतात की–कौशलशब्दाची व्याख्या देण्याचे येथें काहीं कारण नाहीं. योगशब्दाचें लक्षण सांगणेंच प्रस्तुत आहे. पण त्यावर आम्ही असे विचारतो की, कौशलशब्दाची व्याख्या कोण देते आहे ? कर्में करीत असताना समत्वबुद्धि ठेवणे, हेच कर्मकर्त्याचे चातुर्य आहे, असे म्हटल्याने ती चातुर्याची व्याख्या कशी होते ? ' कागदावर चित्र काढलेले असतांनाही, ते खऱ्या मनुष्यासारखें दिसणे, यांत चित्रकाराचे कौशल आहे,' असे कोणी म्हटल्यास ती कौशलाची व्याख्या दिली आहे, असे का म्हणणार ? तसेंच, योगशब्दाचें लक्षण तरी प्रस्तुत कोठें आहे ? योगाचे लक्षण तर ' समत्व योग उच्यते ' असें वर स्पष्ट सांगितलेंच आहे. मग पुन: लक्षण सांगण्याचे काय कारण ? रहस्यकार म्हणतात "योगशब्दाची द्विवार व्याख्या केली आहे" आम्ही म्हणतों ती का ? ' योगस्थ होऊन कर्में कर ' असे सांगतांच योग म्ह० काय ते सांगणे जरूर होतें. यास्तव तेथेच ' समत्व हा योग आहे ' असें जें सांगितले आहे तेच बरोबर आहे व समत्व हेच योगाचें लक्षण संभवतें. समत्वामध्यें स्थित होऊन कर्में कर, हे म्हणणे सयुक्तिक आहे. पण ' कौशल ' हें योगाचे लक्षण मानून ' कौशलांत किंवा युक्तींत स्थित होऊन कर्म कर ' असा अर्थ करूं लागतांच तो दुर्बोध होतो. यास्तव ' योग: कर्मसु कौशल ' ही योगाची व्याख्या होऊ शकत नाहीं. येथें योगाचें लक्षण प्रस्तुतही नाहीं. कारण ४८ व्या श्लोकांत ' समत्व ' हे योगाचे लक्षण सांगून ' दूरेण ... ' येथून ' ... सुकृतदुष्कृते ' येथवर म्ह०संबंध ४९ श्लोक व ५० व्या श्लोकाचा पूर्वार्ध

**कर्मजं बुद्धियुक्ता हि फलं त्यक्त्वा मनीषिणः ।**
**जन्मबन्धविनिर्मुक्ताः पदं गच्छन्त्यनामयम् ॥ ५१ ॥**

**अन्वयार्थ—हि**—कारण—**बुद्धियुक्ताः मनीषिणः**—ज्ञानानें युक्त असलेले विद्वान्—**कर्मजं फलं त्यक्त्वा**—कर्मापासून उत्पन्न होणारे सुख-दुःखरूप फल टाकून—**जन्मबन्धविनिर्मुक्ताः (सन्तः)**—जन्मरूप बंधापासून सर्वथा मुक्त होत्साते—**अनामयं पदं**—सर्व उपद्रवरहित पदाला-विष्णूच्या परम पदाला—**गच्छन्ति**—प्राप्त होतात. ५१.

**यस्मात्—कर्मजमिति । कर्मजं फलं त्यक्त्वेति व्यवहितेन संबन्धः । इष्टानिष्टदेहप्राप्तिः कर्मजं फलं कर्मभ्यो जातं बुद्धियुक्ताः समत्वबुद्धियुक्ता हि यस्मात्फलं त्यक्त्वा परित्यज्य मनीषिणो ज्ञानिनो भूत्वा जन्मबन्धविनिर्मुक्ता जन्मैव बन्धो जन्मबन्धस्तेन विनिर्मुक्ता जीवन्त एव जन्मबन्धविनिर्मुक्ताः सन्तः पदं परमं विष्णोर्मोक्षाख्यं गच्छन्त्यनामयं सर्वोपद्रवरहितमित्यर्थः । अथ वा बुद्धियोगाद्धनंजयेत्यारभ्य परमार्थदर्शनलक्षणैव सर्वतःसंप्लुतोदकस्थानीया कर्मयोगजसत्त्वशुद्धिजनिता बुद्धिर्दर्शिता साक्षात्सुकृतदुष्कृतप्रहाणादिहेतुत्वश्रवणात् ॥ ५१ ॥**

**भाष्यार्थ**—(अहो पण समत्वबुद्धियुक्त पुरुषाच्या पुण्य-पापांचा व त्यांच्या फलाचा त्याग जरी होत असला तरी तेवढ्यानेंच मोक्ष कसा मिळेल ? उत्तर-)—**यस्मात् कर्मजमिति**

---

यांत नुसत्या कर्माची निंदा व बुद्धियोगाची प्रशंसा केली व ५० व्या श्लोकाच्या उत्तरार्धांत ‘ योगस्थ होऊन कर्मे कर ’ या विधानाचाच, ‘ म्हणून तू समत्वरूप योगाला आरंभ कर; कारण योग–समत्व हेंच कर्मांतील कौशल आहे, ’ असा उपसंहार केला आहे. ‘ योगच कर्मांतील कौशल आहे ’ ही योगाची पुनः प्रशंसा आहे. ती योगाची व्याख्या नव्हे. योगाच्या एक ‘समत्व’ व दुसरी ‘कौशल’ अशा दोन परस्परविरुद्ध व्याख्या मानण्याचें काहीं कारणही नाहीं व कौशल ही योगाची व्याख्याही संभवत नाहीं. ४९ व्या श्लोकांतील बुद्धियोग या शब्दाचा अर्थ मध्वाचार्य ‘ ज्ञानलक्षणात् उपायात ’ असाच करितात. कांहीं टीकाकार समत्वबुद्धियोग व ज्ञानयोग, असा करितात व कांहीं केवल बुद्धियोग असाच करितात व ते दोन्ही अर्थ आचार्यांना मान्य आहेत. त्यांतल्या त्यांत ‘ ज्ञानयोग’ हा अर्थ पुढील प्रकरणाला अधिक अनुकूल आहे, हे आम्ही वर सांगितलेंच आहे. ‘ योगः कर्मसु कौशलं ’ याचा अर्थ सर्व टीकाकार एकसारखाच करितात. ‘ अतः योगाय युज्यस्व ज्ञानोपायाय, तद्धि कर्मसु कौशलं । ’ असे मध्वाचार्य म्हणतात. ‘ योगः कर्मसु कौशलं–कर्मसु क्रियमाणेषु अयं बुद्धियोगः कौशलं–अतिसामर्थ्यसाध्यं ’ असें रामानुजाचार्य म्हणतात. ‘ मदाज्ञया कर्मकरणं योगः । एतदेव कर्मसु चातुर्यं । ’ असें वल्लभसंप्रदायी टीकाकार म्हणतात. शंकरानंद, मधुसूदनसरस्वती इत्यादि अद्वैत संप्रदायी तर आचार्यांनाच अनुसरले आहेत, हें निराळे सांगावयास नकोच. रहस्यकार या सर्व आचार्यादिकांच्या विरुद्ध अर्थ करावयास गेले आहेत खरे; पण शेवटी न कळत त्यांनाच कसे अनुसरले आहेत, हेंही वर दाखविलेंच आहे.

—समत्वबुद्धीनें युक्त होऊन केलेलें कर्म ज्या अर्थी पापाचा क्षय करतें त्या अर्थी हा योग परंपरेनें मोक्षाचें साधन आहे,असें 'कर्मजं०' या श्लोकानें सांगतात—**कर्मजं फलं त्यक्त्वा इति व्यवहितेन संबंधः**—'कर्मजं' या शब्दाचा 'फलं त्यक्त्वा' या पुढील पदांशीं संबंध आहे.—**इष्ट-अनिष्ट-देहप्राप्तिः कर्मजं फलं-कर्मभ्यः जातं**—इष्ट व अनिष्ट देहाची प्राप्ति हें कर्मज फल होय. कर्मज म्ह० कर्मापासून उत्पन्न झालेलें—**बुद्धियुक्ताः-समत्वबुद्धियुक्ताः**—बुद्धियुक्त म्ह०समत्वबुद्धियुक्त पुरुष—**हि यस्मात् फलं त्यक्त्वा-परित्यज्य**—ज्याअर्थी फल टाकून-त्याचा परित्याग करून—**मनीषिणः-ज्ञानिनः भूत्वा**—मनीषी ज्ञानी होऊन—**जन्मबन्धविनिर्मुक्ताः -जन्म एव बन्धः-जन्मबन्धः तेन विनिर्मुक्ताः जीवन्तः एव जन्मबन्धविनिर्मुक्ताः सन्तः**—जन्म हाच बंध त्या जन्मरूप बंधानें विशेषेकरून मुक्त केले गेलेले-सर्वथा मुक्त झालेले, जिवंत असतांनाच जन्मरूप बंधनांतून पूर्णपणं मुक्त होत्साते —**पदं-परमं विष्णोः मोक्षाख्यं गच्छन्ति**—व्यापक परमात्म्याच्या 'मोक्ष' या नांवाच्या परम पदास जातात. ( ते पद कसे आहे ? उत्तर-)—**अनामयं-सर्वोपद्रवरहितं इत्यर्थः**—अनामय म्ह० सर्वोपद्रवशून्य पदाला जातात असा याचा भावार्थ. [ देवादिकांचा देह हा इष्ट देह व पश्वादिकांचा देह हा अनिष्ट देह, त्याची प्राप्ति होणें हेंच कर्मापासून मिळणारे फळ आहे.पण पूर्वोक्त समत्वबुद्धियुक्त पुरुष चित्तशुद्धीच्या द्वारा ज्ञानी होऊन ज्ञानाच्या बलानेंच त्याचा परित्याग करितात. याप्रमाणें बंधांतून आपल्याला सोडवून जीवन्मुक्त झालेले ते प्रारब्ध कर्माचा क्षय होताच विदेहमोक्षाला पात्र होतात. ४९,५० व ५१ या तिन्ही श्लोकात बुद्धि असा जो शब्द आला आहे त्याचा पूर्वपरंपरेला धरून समत्वबुद्धि असा अर्थ केला. पण केवल समत्वबुद्धि पुण्यपापाच्या त्यागाचे साक्षात् निमित्त होऊं शकत नाहीं. म्हणून पूर्वपरंपरेला धरून बुद्धिशब्दाचा दुसरा योग्य अर्थ सांगतात-]—**अथवा बुद्धियोगात् धनंजय इति-आरभ्य**—किंवा 'बुद्धियोगात् धनंजय'-४९ येथून पुढे—**संप्लुतोदकस्थानीया कर्मयोगजसत्त्वशुद्धिजनिता परमार्थदर्शनलक्षणा एव बुद्धिः दर्शिता**—सर्व बाजूंनीं तुडुंब भरलेल्या फार मोठ्या जलाशयाच्या स्थानीं असलेली कर्मानुष्ठानापासून उत्पन्न झालेली जी चित्तशुद्धि, तिच्यापासून उद्भवलेली परमार्थ ज्ञानरूपच बुद्धि दाखविली आहे. ( बुद्धिशब्दाचा असा अर्थ करण्याचे कारण )—**साक्षात् सुकृतदुष्कृतप्रहाणादिहेतुत्वश्रवणात्**—कारण पुण्य-पापांचा त्याग व जन्मबंधापासून मोक्ष यांचें प्रत्यक्ष हेतुत्व त्या बुद्धीला सांगितलेलें आहे. [ म्हणून या बुद्धिशब्दाचा अर्थ परमार्थ ज्ञान असाच करणे सर्वथा उचित होय. शिवाय अर्जुनानें तिसऱ्या अध्यायाच्या आरंभीं 'कर्माहून बुद्धि श्रेष्ठ आहे असें जर तुला संमत आहे तर तूं मला या घोर कर्मात कां नियुक्त करतोस !' असा जो प्रश्न केला आहे, तो 'दूरेण ह्यवरं कर्म बुद्धियोगात्०' ४९ या वचनाला अनुलक्षूनच केला असावा, असे उघड दिसतें व त्यांतील बुद्धिशब्दाचा अर्थ ज्ञानच आहे, बुद्धियोग नव्हे, हेंही 'ज्ञानयोगेन सांख्यानां०' या भग-

वद्गगनावरून निश्चित होतें. यास्तव ' बुद्धियोगात् बुद्धौ ४९, बुद्धियुक्तः ५०, बुद्धियुक्ताः ५१' यांतील बुद्धिशब्दाचा अर्थ ज्ञान-परमार्थज्ञान असाच करणें उचित होय. तसा अर्थ केल्यास त्या तिन्ही श्लोकांचा अर्थ असा होतो-ज्या कर्मांचें अनुष्ठान करितांना परमार्थदर्शनरूप बुद्धीचा उद्देश मनांत असतो म्ह० ज्ञानाला उद्देशून कर्मानुष्ठान केले जातें तसल्या कर्मांहून तशा उद्देशानें न केलेलें कर्म अतिशय निकृष्ट आहे. म्हणून परमार्थज्ञानाचा उद्देश मनांत धरून कर्मांचें अनुष्ठान करावें. म्ह० ज्ञानासाठीं कर्म करावें. ज्ञानावांचून दुसऱ्या कोणत्याही क्षुद्र फळाच्या अपेक्षेनें कर्म केल्यास कार्पण्य दोष येतो. शिवाय परमार्थबुद्धीचा उद्देश मनांत धरून कर्मानुष्ठान करणाऱ्या पुरुषाचें चित्त शुद्ध होतें. त्यामुळें परमार्थज्ञान सिद्ध होते. नंतर देह जिवंत असतांनाच पुरुष जन्माला कारण होणाऱ्या पुण्यपापाचा त्याग करून मुक्त होतो. म्हणून परमार्थदर्शनरूप योगासाठी म्ह० ज्ञानयोगासाठीं मन स्थिर करावें. योगसंज्ञक परमार्थ दर्शनाच्या उद्देशानें कर्मानुष्ठान करणें हेंच कर्मांतील कौशल आहे. यास्तव परमार्थदर्शनाला उद्देशून बुद्धियुक्त होत्साते जे कर्मांचें अनुष्ठान करितात त्यांची चित्तशुद्धि होते. ते अपरोक्ष आत्मसाक्षात्कारवान् होतात, कर्मजन्यफलाचा त्याग करितात व मुक्तीला पात्र होतात. अर्थात् भगवानांनीं अर्जुनाला जो समत्वबुद्धियुक्त कर्मयोग उपदेशिला आहे, योगस्थ होऊन स्वधर्मसंज्ञक कर्म करण्याविषयीं आग्रह केला आहे तो जन्मबंधापासून मुक्त होऊन परमात्मपदी पोंचण्याचा उपाय म्हणून सांगितला आहे. ज्ञानी पुरुषानें ज्ञानानंतर काय करावें, तें सांगण्यासाठीं हा समत्वबुद्धियुक्त कर्मानुष्ठानाचा उपदेश नाहीं, हें निःपक्षपात वाचकांच्या ध्यानांत येईल. तसेंच अर्जुनाला गीताशास्त्राचा जो उपदेश केला आहे तो जन्मबंधांतून मुक्त होऊन सर्व संसारक्लेशशून्य पदीं पोंचण्यासाठी मुख्यतः केला आहे. त्याने युद्ध करावें, याच प्रधान उद्देशानें तो केलेला नाही, हें वाचकांच्या ध्यानांत येईल. ] ५१.

---

१ रहस्यकार या श्लोकाला असे अवतरण देतात—" अशा रीतीनें साम्यबुद्धीने सर्व कामे केली म्ह० व्यवहाराचा लोप न होतां पूर्णसिद्धि किंवा मोक्ष प्राप्त झाल्याखेरीज रहात नाहीं, असे आतां सांगतात-" सर्व कामे ती कोणती ? खाणे, पिणे, वगैरे जर असतील तर त्याचा मोक्षाशीं काय संबंध ? शिवाय ' बुद्धियुक्त लोक कर्मजन्य फलाला सोडून, ' असे म्हटलें आहे. कर्मै म्ह० कामे--व्यावहारिक कामे हा अर्थ संभवत नाहीं. कारण हें सर्व प्रकरण शास्त्रीयकर्मांचे आहे. अर्थात् ' व्यवहाराचा लोप न होतां ' हे म्हणणे अप्रासंगिक आहे. वैदिककर्मांचें फल व्यवहार नव्हे. समत्वबुद्धीने कामें केल्यानें पूर्णसिद्धि कशी मिळणार ? सिद्धीचें साधन ज्ञान आहे, कर्म नव्हे. तसेच 'समत्वबुद्धीनें कामें केल्यानें पूर्णसिद्धि किंवा मोक्ष मिळाल्यावांचून रहात नाहीं,' या सांगण्यांत काय स्वारस्य आहे ? या असल्या वाक्यरचनेवरूनच ओढाताण कोण करतें, हें उघड दिसत आहे. असो; या अवतरणाप्रमाणेंच या श्लोकाचा अर्थ किती सरळ व सुबोध आहे तो पहा—'बुद्धियुक्ताः मनीषिणः-' समत्वबुद्धीने ज्ञानी पुरुष मुक्त झाले म्हणजे ' कर्मजं फलं त्यक्त्वा-' कर्मफलाचा त्याग केल्यानें ( ते ) ' जन्मबंधविनिर्मुक्ताः-' जन्माच्या बंधापासून मुक्त होत्साते ' अनामयं पदं गच्छन्ति-' ( परमेश्वराच्या ) दुःखविरहित पदाला जाऊन पोंचतात. यांत

**यदा ते मोहकलिलं बुद्धिर्व्यतितरिष्यति ।**
**तदा गन्तासि निर्वेदं श्रोतव्यस्य श्रुतस्य च ॥५२॥**

**अन्वयार्थ—यदा**—ज्यावेळीं—**ते बुद्धिः**—तुझी बुद्धि—**मोहकलिलं**—मोहरूपी मलास—**व्यतितरिष्यति**—उल्लंघन करील—**तदा**—त्या वेळीं—**श्रोतव्यस्य च श्रुतस्य**—श्रवण करण्यास योग्य व श्रवण केलेलें शास्त्रादिक यांच्या—**निर्वेदं**—वैराग्यास—**गन्तासि**—प्राप्त होशील. ५२.

**योगानुष्ठानजनितसत्त्वशुद्धिजा बुद्धिः कदा प्राप्यत इत्युच्यते—यदेति । यदा यस्मिन्काले ते तव मोहकलिलं मोहात्मकमविवेकरूपं कालुष्यं येनाऽऽत्मानात्मविवेकबोधं कलुषीकृत्य विषयं प्रत्यन्तःकरणं प्रवर्तते तत्तव बुद्धिर्व्यतितरिष्यति व्यतिक्रमिष्यति शुद्धिभावमापत्स्यत इत्यर्थः । तदा तस्मिन्काले गन्तासि प्राप्स्यसि निर्वेदं वैराग्यं श्रोतव्यस्य श्रुतस्य च तदा श्रोतव्यं श्रुतं च निष्फलं प्रतिपद्यत इत्यभिप्रायः॥५२**

**भाष्यार्थ—योगानुष्ठानजनितसत्त्वशुद्धिजा बुद्धिः कदा प्राप्यते इति 'यदा०'इति उच्यते**—योगानुष्ठानामुळें झालेली जी चित्तशुद्धि तिच्यापासून प्राप्त होणारी बुद्धि-ज्ञान केव्हां प्राप्त होईल तें 'यदा०' इत्यादि श्लोकानें सांगितलें जातें—**यदा**

---

'मुक्त झाले म्हणजे' हा अर्थ कशाला ? 'त्यक्त्वा' म्ह० त्याग केल्यानें की त्याग करून? जन्माचा बध की जन्मरूप बंध ? पण यात पूर्णसिद्धि किंवा मोक्ष मिळाल्यावांचून रहात नाहीं, असें कोठेंच सांगितलेले नाहीं. यापेक्षां "समत्वबुद्धियुक्त पुरुष कर्मापासून झालेलें इष्टानिष्टदेहप्राप्तिरूप फल टाकून, ज्ञानी होऊन जन्मरूपबधाकडून मुक्त केले गेलेले असे होत्साते सर्व दुःखशून्य पदाला प्राप्त होतात." हा अर्थ किती सरळ आहे ? इतर भाष्यकार व टीकाकारही याचा प्रायः असाच अर्थ करितात.

१ आचार्य याला असें अवतरण देतात. मध्वाचार्यही 'कियत्पर्यन्तं अवश्यं कर्तव्यानि मुमुक्षुणा एव कर्माणि इत्याह-' मुमुक्षूने कोठपर्यंत अशीच कर्मे अवश्य करावी, ते भगवान् सांगतात. रामानुजाचार्यही 'उक्तप्रकारे कर्मे करीत असलेल्या व त्या वृत्तीने निष्पाप झालेल्या तुझी बुद्धि जेव्हा मोहरूप कलुष उल्लघन जाईल०' इत्यादि म्हणतात. 'त्या भक्तिरूप पदार्थाची प्राप्ति केव्हा होईल ते सांगतात.' इत्यादि वल्लभसप्रदायी टीकाकार म्हणतात. इतर अद्वैतमार्गी टीकाकारही या श्लोकाची अशीच योजना करितात. ज्ञानेश्वरमहाराजही 'तू ऐसा तै होसी । जै मोहाते मया सांडिसी । आणि वैराग्य मानसीं सचरेल॥' २८० असे म्हणतात. रहस्यकार याला अवतरण कांही देत नाहींत, अर्थ मात्र असा करितात—"जेव्हां तुझी बुद्धि मोहाच्या गढुळ आवरणांतून पार पडेल तेव्हां जें ऐकले असेल तें, आणि काय ऐकावयाचें असेल ते, या दोहोंचाही तुला कंटाळा येईल."'मोहकलिलं' याचा मोहाच्या गढुळ आवरणांतून हा अर्थ मूळाला धरून नाहीं. 'जें ऐकले असेल' व 'जें काय ऐकावयाचें असेल' याचा कर्ता कोण ? कोणी ऐकलें असेल व कोणाला ऐकावयाचे असेल ? अर्जुन कर्ता असेल तर 'तूं जे ऐकले असशील' असा मध्यम किंवा द्वितीय पुरुषी प्रयोग पाहिजे होता.

**–यस्मिन् काले**–जेव्हां-ज्यावेळीं–**ते-तव**–तुझें–**मोहकलिलं-मोहात्मकं अविवेकरूपं कालुष्यं**–मोहरूप-अविवेकरूप मालिन्य-( अविवेक हाच दोष, तो दोष कसा ते स्पष्ट करून दाखवितात- )–**येन आत्मानात्मविवेकबोधं कलुषीकृत्य विषयं प्रति अन्तःकरणं प्रवर्तते**–ज्या मोहाच्या योगानें-मोहामुळें आत्मा व अनात्मा यांचें विवेकज्ञान कलुषित होऊन अन्तःकरण विषयाकडे प्रवृत्त होतें–**तत् तव** –तें तुझें मोहरूप मालिन्य–**बुद्धिः व्यतितरिष्यति-व्यतिक्रमिष्यति-शुद्धिभावं आपत्स्यते इत्यर्थः**–बुद्धि विशेषेंकरून अगदी तरून जाईल-व्यतिक्रम-उल्लंघन करील म्ह० शुद्धिभावाला प्राप्त होईल, असा याचा भावार्थ–**तदा-तस्मिन् काले**–त्यावेळीं–**निर्वेदं-वैराग्यं गन्तासि-प्राप्स्यसि**–निर्वेदास-वैराग्यास प्राप्त होशील. ( कशाच्या वैराग्यास ? उत्तर- )–**श्रोतव्यस्य च श्रुतस्य**–अध्यात्मशास्त्रातिरिक्त शास्त्रादिकांचें श्रोतव्य व श्रुत यांच्या वैराग्यास प्राप्त होशील–**तदा श्रोतव्यं श्रुतं च निष्फलं प्रतिपद्यते इत्यभिप्रायः**–त्यावेळी श्रोतव्य व श्रुत हीं दोन्हीं निष्फळ होतात असा याचा भावार्थ. [ मी अमुक श्रवण केलें आहे, व मला अद्यापि अमुक-अमुक श्रवण करावयाचें आहे. मी अमुक पाहिलें आहे व अमुक पहावयाचें आहे, आणि त्या सर्वांचें फळ संपादन करावयाचें आहे: इत्यादि सर्वमनुष्यसाधारण अशा ज्या भावना असतात, त्या सर्व विवेक परिपक्व झाला असतां निवृत्त होतात. अर्थात् विवेक परिपक्व झाला असता तुझी बुद्धि अविवेकरूपी मलाचें उल्लंघन करून जाईल. या अविवेकरूप मलामुळेंच आत्मानात्मविवेक कलुषित होऊन अन्तःकरण विषयांकडे प्रवृत्त होत असतें. यास्तव तुझी बुद्धि जेव्हां त्या मलाचें अतिक्रमण करील म्ह० शुद्ध होईल तेव्हां तूं श्रोतव्य व श्रुत या दोन्हीविषयीं विरक्त होशील. अध्यात्मशास्त्राला सोडून तूं जें जें कांही ऐकलें आहेस किंवा जें तुला ऐकावें असें वाटत आहे, तें सर्व व्यर्थ आहे-निष्फळ आहे अशी तुझी खात्री होईल. या अनात्मविषयक शास्त्रज्ञानाविषयीं मी आजवर वृथा श्रम केले, असें वाटेल व आतां यापुढें मला कोणतेंही अनात्मविषयज्ञान संपादन करावयाचें नाहीं, कारण तें फुकट आहे, ते निरतिशय परमात्म्याची प्राप्ति करून

---

असो; " निर्वेद म्ह० सामान्यतः कंटाळा. हा कंटाळा किंवा नकोसें होणें, विशेषेंकरून मागें सांगितलेल्या त्रैगुण्यविषयक श्रौतकर्मांबद्दलचा आहे, असें पुढील श्लोकावरून दिसून येईल " असें म्हणतात. अर्थात् त्रैगुण्यविषयक श्रौतकर्मांबद्दल मात्र कंटाळा येतो, तीं नकोशीं होतात. सांसारिक कर्मांचा कांहीं कंटाळा येत नाहीं, व तो आला तरी सांसारिक कर्में मरेपर्यंत त्यानें केलींच पाहिजेत. श्रौतकर्में मात्र नकोशीं झालीं म्हणजे सोडावींत असा यांत रहस्यकारांचा आशय दिसतो. पण मूळ श्लोकांत तर ' तदा गतासि निर्वेदं श्रोतव्यस्य श्रुतस्य च-' म्ह० त्यावेळीं तूं श्रोतव्य म्ह० ऐकावयाचें व श्रुत-ऐकलेलें यांविषयींच्या वैराग्यास प्राप्त होशील, असें आहे. म्ह० अर्जुनाला कंटाळा कशाचा येईल व नकोसें काय होईल, ते भगवानांनीं स्पष्ट सांगितलें आहे. तेव्हां त्याचा त्रैगुण्यविषयक कर्मांशीं बादरायण संबंध जोडण्याचें कारण दिसत नाहीं. पण तें ' पुढील श्लोकावरून दिसून येईल ' असें म्हणतात. यास्तव आतां तेंच आपण पाहूं.

देत नाहीं, इतकेंच नव्हे तर उलट दुरभिमानादिकांच्या योगानें त्याला प्रतिबंधच करतें, असें वाटून त्या श्रोतव्याविषयींही तूं पूर्ण विरक्त होशील. पण मोहरूपी मल अन्तःकरणांतून साफ निघून जाईपर्यंत तुला त्याविषयीं विरक्ति येणार नाहीं. म्हणून तूं मोहरूपी मल घालविण्यासाठीं योगस्थ होऊन कर्म कर. ] ५२.

**श्रुतिविप्रतिपन्ना ते यदा स्थास्यति निश्चला ।**
**समाधावचला बुद्धिस्तदा योगमवाप्स्यसि ॥ ५३ ॥**

**अन्वयार्थ—श्रुतिविप्रतिपन्ना**—अनेक साध्य-साधनसंबंध दाखविणाऱ्या श्रवणांनीं विक्षिप्त झालेली—**ते बुद्धिः**—तुझी बुद्धि—**यदा निश्चला सती**—जेव्हां विक्षेपरहित होऊन व—**अचला**— त्यांतूनही विकल्पशून्य होऊन—**समाधौ**—आत्म्यामध्यें—**स्थास्यति**—स्थिर होईल—**तदा**—त्यावेळीं—**योगं**—खरा-मुख्य योग—**अवाप्स्यसि**—प्राप्त होईल. ५३

**मोहकलिलात्ययद्वारेण लब्धात्मविवेकजप्रज्ञः कदा कर्मयोगजं फलं परमार्थयोगमवाप्स्यामीति चेत्तच्छृणु—श्रुतिविप्रतिपन्नेति । श्रुतिविप्रतिपन्नाऽनेकसाध्यसाधनसंबन्धप्रकाशनश्रुतिभिः श्रवणैर्विप्रतिपन्ना नानाप्रतिपन्ना श्रुतिविप्रतिपन्ना विक्षिप्ता सती ते तव बुद्धिर्यदा यस्मिन्काले स्थास्यति स्थिरीभूता भविष्यति निश्चला विक्षेपचलनवर्जिता सती समाधौ समाधीयते चित्तमस्मिन्निति समाधिरात्मा तस्मिन्नात्मनीत्येतत् । अचला तत्रापि विकल्पवर्जितेत्येतत् । बुद्धिरन्तःकरणं तदा तस्मिन्काले योगमवाप्स्यसि विवेकप्रज्ञां समाधिं प्राप्स्यसि ॥ ५३ ॥**

**भाष्यार्थ**—( समत्वबुद्धियुक्त होऊन परमार्थज्ञानाच्या उद्देशानें कर्मानुष्ठान केल्यानें क्रमानें चित्तशुद्धि, विवेक व वैराग्य यांची प्राप्ति जरी झाली तरी ज्ञानप्राप्ति केव्हां होते, तें अजून कळलें नाहीं, अशी शंका घेऊन पुढील श्लोकांत ज्ञानप्राप्तीचा काल सांगतात–) **—मोहकलिलात्ययद्वारेण लब्धात्मविवेकजप्रज्ञः कर्मयोगजं फलं परमार्थयोगं कदा अवाप्स्यामि**—मोहरूपी मलाचें उल्लंघन करून त्याच्या द्वारा आत्मविवेक करण्यास योग्य अशी प्रज्ञा-बुद्धि ज्याला प्राप्त झाली आहे, असा मी योगस्थ होऊन केलेल्या कर्मानुष्ठानाच्या फलाला म्ह० परमार्थयोगाला केव्हां प्राप्त होईन–तो परमार्थयोग मला केव्हां प्राप्त होईल—**इति चेत् 'श्रुतिविप्रतिपन्ना०' इति तत् शृणु**—असें म्हणशील तर 'श्रुतिविप्रतिपन्ना०' या श्लोकानें त्याचें उत्तर ऐक—**श्रुतिविप्रतिपन्ना-अनेकसाध्यसाधनसंबन्धप्रकाशनश्रुतिभिः-श्रवणैः विप्रतिपन्ना -नानाप्रतिपन्ना-श्रुतिविप्रतिपन्ना-विक्षिप्ता सती**—अनेक प्रकारचें साध्य व त्यांचीं अनेक साधनें, त्यांच्या संबंधाचें जें प्रकाशन-प्रतिपादन त्याच्या श्रुतींनीं म्ह० श्रवणांनीं विप्रतिपन्न-नाना प्रकारें भलभलती समजूत झालेली म्ह० विक्षिप्त होत्साती—**ते-तव बुद्धिः यदा-यस्मिन् काले स्थास्यति-स्थिरीभूता भविष्यति**—तुझी बुद्धि

ज्यावेळीं-वैराग्य परिपक्क झालें असतां स्थित होईल-स्थिर होईल—**निश्चला विक्षेपचलनवर्जिता सती**—निश्चल-विक्षेपरूप चलनानें रहित होत्साती जेव्हां स्थिररूप होईल (कोठें स्थिर होईल? उत्तर-)—**समाधौ-समाधीयते चित्तं अस्मिन् इति समाधिः आत्मा तस्मिन् आत्मनि इति एतत्**—समाधींत[1] म्ह० ज्यांत चित्त समाहित केलें जातें तो समाधि म्ह० आत्मा, त्या आत्म्यांत, असा याचा भावार्थ—**अचला-तत्रापि विकल्पवर्जिता इति एतत्**—आणि त्यांतही अचल म्ह० सर्व विकल्परहित होऊन स्थिर स्थित होईल—**बुद्धिः-अन्तःकरणं**—बुद्धि म्ह० अन्तःकरण—**तदा-तस्मिन् काले**-त्यावेळीं-**योगं अवाप्स्यसि-विवेकप्रज्ञां समाधिं प्राप्स्यसि**—योगाला प्राप्त होशील म्ह० विवेकाच्या द्वारा उत्पन्न झालेली जी प्रज्ञा पूर्वोक्त बुद्धि-परमार्थदर्शनरूप ज्ञान हीच समाधि, तिला प्राप्त होशील. [मोहरूपी चित्तमल नाहींसा होऊन पूर्वोक्त विवेकादिकांनीं युक्त झालेली बुद्धि आत्म्यामध्यें जेव्हां स्थिर होईल तेव्हां ती ज्ञानरूप बुद्धि सिद्ध होईल,हें अर्जुनाच्या प्रश्नाचें उत्तर आहे. अनेक साध्यें व त्यांचीं अनेक साधनें यांचा संबंध प्रतिपादन करणारीं कर्मकांडात्मक वाक्यें ऐकून नाना उपाय कळल्यामुळें चंचल झालेली तुझी बुद्धि-हें करूं की तें करूं असें जिला झालें आहे ती तुझी विक्षिप्त बुद्धि-तुझें अस्थिर चित्त जेव्हां म्ह० वैराग्याचा पूर्ण परिपाक झाला असतां सर्व विक्षेपशून्य व सर्व संशयरहित होऊन आत्म्यामध्यें स्थिर स्थित होईल, तेव्हां तूं त्या योगाला प्राप्त होशील, तेव्हां तूं ज्ञाननिष्ठ होशील. हाच मुख्य योग आहे; व तो मिळविण्यासाठींच प्रत्येक मनुष्यानें यत्न करणें उचित होय. भगवानांनीं समत्वबुद्धीनें कर्मयोगाचें अनुष्ठान करण्याविषयीं जें कर्माधिकारी अर्जुनाला सांगितलें आहे तें याच योगासाठीं. हाच समाधियोग-आत्मयोग. म्हणूनच आचार्यांनीं ३९व्या श्लोकांतील योगशब्दाचा सामान्य अर्थ सांख्यबुद्धीच्या प्राप्तीचा उपाय असा करून फलेच्छारहित ईश्वराराधनार्थ कर्मानुष्ठान व समाधियोग असा विशेष अर्थ सांगितला आहे. कर्मयोग हें सांख्यबुद्धीचें परंपरा साधन असून समाधियोग हें साक्षात् साधन आहे. जेव्हां तुझें चित्त शुद्ध होईल, तुला वैराग्य व विवेक प्राप्त होईल व तुझें अन्तःकरण आत्म्यामध्यें सर्व संशय-विपर्ययशून्य होऊन स्थिर स्थित होईल तेव्हां तुला परमार्थयोग प्राप्त होईल, असें भगवानांनीं स्पष्ट सांगितलें आहे. त्यावरून अर्जुन ज्ञानी नसून अज्ञानी आहे, तो ज्ञानाधिकारी नसून कर्माधिकारी आहे, व त्याचें चित्त शुद्ध व्हावें, म्हणून त्याला समत्वबुद्धियुक्त कर्मानुष्ठान सांगितलें आहे, असाच याचा भावार्थ सिद्ध होतो. हाच गीताशास्त्रार्थ[2] आहे.] ५३.

---

१ संस्कृत भाषेंत "समाधि" हा शब्द पुल्लिंगी आहे.

२ पण रहस्यकार पुढील श्लोकाचा अर्थ असा करितात—'श्रुतिविप्रतिपन्ना-'नाना प्रकारच्या वेदवाक्यांनीं गांगरून गेलेली 'ते' तुझी 'बुद्धः' बुद्धि 'यदा' जेव्हां 'समाधौ' समाधिवृत्तीत 'निश्चला अचला स्थास्यति-' स्थिर व निश्चल होईल 'तदा-' तेव्हां 'योगं' हा साम्यबुद्धिरूप योग तुला 'अवाप्स्यसि-' प्राप्त होईल." यातील विप्रतिपन्ना म्हणजे

गांगरून गेलेली हा अर्थ बरोबर नाही. अनेक प्रकारची वेदवाक्यें ऐकून बुद्धि विक्षिप्त—अस्थिर होण्याचा संभव आहे. अनेक साधनें ऐकल्यावर आपण हें करावे, ते करावे, असें करावें, तसे करावें, इत्यादि वाटणें साहजिक आहे. म्हणून अनेक साध्य व साधनें ऐकून अस्थिर व अनिश्चित झालेली तुझी बुद्धि जेव्हां आत्म्यामध्ये स्थिर—विक्षेपशून्य होईल, तेव्हां तुला खरा मुख्य ज्ञानयोग प्राप्त होईल, असे जें आचार्य म्हणतात तेंच योग्य आहे. रहस्यकार या व वरील श्लोकांतील 'बुद्धि 'शब्दाचा अर्थ—बुद्धि म्ह० अंतःकरण असाच करितात. पण त्याच्यामागे व्यवसायात्मिका हें विशेषण नाही. तेव्हां त्यांच्याच परिभाषेप्रमाणे त्याचा अर्थ 'वासना किंवा समजूत' असा करावयास नको होता का ? पण असो. 'समाधौ-' याचा अर्थ 'समाधिवृत्तांत' 'हा अर्थ अगदी चुकीचा नसला तरी चांगलाही नाहीं. कारण स्थिर व निश्चल बुद्धि—अन्तःकरण हीच समाधिवृत्ति होय. 'योग' याचा अर्थ तर अगदींच विपरीत आहे. " अनेक उपदेश ऐकण्याचे काम सोडून चित्ताची निश्चल समाधि कर, म्हणजे साम्यबुद्धिरूप कर्मयोग तुला प्राप्त होऊन जास्त उपदेशाचीही जरूर न पडतां कर्मे करून त्याचे पाप तुला लागणार नाही. " ६३५ ' चित्ताची निश्चल समाधि कर म्हणजे साम्यबुद्धिरूप कर्मयोग प्राप्त होईल ' हे, समाधीचा अर्थ मनात आणून म्हटलेलें नाही. समाधीत सिद्धि व असिद्धि या दोन्हींविपर्याची साम्यबुद्धिही जर बुडून जाते तर बिचारा कर्मयोग निराळा कोठून राहणार ? तसेच, कर्मयोग साम्यबुद्धिरूप कसा ? कारण ' योगस्थ होऊन कर्मे कर ' असे म्हटले आहे व ' समत्व हाच योग आहे ' असें सांगितलें आहे. तेव्हा साम्यबुद्धिरूप योगात स्थित होऊन कर्मे करण्याविषयी जर भगवान् सांगत आहेत तर साम्यबुद्धि हाच कर्मयोग कसा ? पण रहस्यकारांना योग म्ह० कर्मयोग हा एकच अर्थ ठाऊक आहे. गीतेत दुसरा योगच त्याना दिसत नाही. सहाव्या अध्यायातही कांही चार—पाच ठिकाणीच योग म्ह० पातजलयोग त्यांना दिसतो. (गी. र. पृ. ५६ ) पण ' योगस्थ ' ( ४८ ) शब्दांतील योग म्हणजे समत्व व येथील योग म्हणजे आत्म्यामध्यें चित्ताची स्थिरता. तथापि हा अर्थभेद रहस्यकाराच्या लक्षांत न आल्यामुळें किंवा त्यांना सर्वत्र कर्मयोगच दिसत असल्यामुळे ते येथेही योग म्ह० कर्मयोग व तोही साम्यबुद्धिरूप कर्मयोग असे कांहीतरी म्हणत आहेत. पण हा योग श्रौत-स्मार्त कर्मे व त्यांची फल याच्या विरक्तीनतर, चित्ताला आत्म्यामध्ये स्थिर करण्याचा दीर्घकाल अभ्यास केल्यावर, चित्त आत्म्यामध्ये निश्चल व विक्षेपशून्य होऊन राहिले असतां भविष्यत्काली प्राप्त होणार आहे. तो योग म्ह० स्थितप्रज्ञस्थितिच होय. हाच आत्मसाक्षात्काराचा मुख्य उपाय आहे, व योगस्थ होऊन कर्मानुष्ठान करणे हा त्याचाही उपाय आहे. म्हणूनच आचार्यादिकांनी ' बुद्धिर्योगेत्विमां शृणु ' (३९) येथील योगशब्दाचा आत्मप्राप्तीचा उपाय असा सामान्यअर्थ करून ईश्वराराधनार्थ कर्मयोग व समाधियोग असा दोन प्रकारचा विशेष अर्थ सांगितला आहे. वैदिक कर्मयोग या मुख्य ज्ञानयोगासाठी असल्यामुळेच त्याला ' योग ' असे म्हणतां येते. मध्वाचार्य म्हणतात—" येथील योगशब्द फलभूत आहे. जेव्हां बुद्धि समाधीत निश्चल होते तेव्हां मुमुक्षु ब्रह्माच्या प्रत्यक्ष दर्शनाने परमानंदात निमग्न होतो. उपायाने त्याला फल मिळते. " रामानुजाचार्य म्हणतात—" तदा योगं आत्मावलोकनं अवाप्स्यसि.' त्या वेळी तुला योग म्ह० आत्म्याचें दर्शन प्राप्त होईल. वल्लभ-

**स्थितप्रज्ञस्य का भाषा समाधिस्थस्य केशव ।**
**स्थितधीः किं प्रभाषेत किमासीत व्रजेत किम् ॥५४॥**

**अन्वयार्थ—हे केशव**—हे केशवा !—**समाधिस्थस्य स्थितप्रज्ञस्य**—समाधिस्थ–आत्मनिष्ठ स्थितप्रज्ञाचें—**भाषा**—लक्षण—**का**—काय आहे ?—**स्थितधिः**—स्थितप्रज्ञ—**किं प्रभाषेत**—काय बोलतो,—**किं आसीत**—तो कसा राहतो ?—**किं व्रजेत**—व व्यवहार कसा करतो ? ५४.

**प्रश्नबीजं प्रतिलभ्यार्जुन उवाच लब्धसमाधिप्रज्ञस्य लक्षणबुभुत्सया—स्थितप्रज्ञस्येति । स्थिता प्रतिष्ठिताऽहमस्मि परं ब्रह्मेति प्रज्ञा यस्य स स्थितप्रज्ञस्तस्य का भाषा किं भाषणं वचनं कथमसौ परैर्भाष्यते समाधिस्थस्य समाधौ स्थितस्य केशव । स्थितधीः स्थितप्रज्ञः स्वयं वा किं प्रभाषेत । किमासीत व्रजेत किम् । आसनं व्रजनं वा तस्य कथमित्यर्थः । स्थितप्रज्ञस्य लक्षणमनेन श्लोकेन पृच्छति ॥ ५४ ॥**

**भाष्यार्थ—प्रश्नबीजं प्रतिलभ्य**—संन्याश्याची ज्ञाननिष्ठा व तिच्या प्राप्तीचें कथन हें प्रश्नाचें बीज मिळालें असतां—**अर्जुनः लब्धसमाधिप्रज्ञस्य लक्षणबुभुत्सया 'स्थितप्रज्ञस्य०'इति उवाच**—अर्जुन ज्याला समाधिप्रज्ञा[१] प्राप्त झाली आहे अशा पुरुषाचें लक्षण जाणण्याच्या इच्छेनें 'स्थितप्रज्ञस्य०'इ० म्हणाला—**स्थिता प्रतिष्ठिता अहं अस्मि परं ब्रह्म इति प्रज्ञा यस्य सः स्थितप्रज्ञः तस्य**— मी परब्रह्म आहे अशी ज्याची बुद्धि स्थित झाली आहे तो स्थितप्रज्ञ होय. त्या स्थितप्रज्ञाची-**का भाषा-किं भाषणं वचनं**—भाषा म्ह० भाषण-वचन काय आहे ? ( अहो त्याच्या कार्याप्रमाणें त्याची भाषा असणार, त्यांत प्रश्न करण्यासारखें काय आहे ? उत्तर-)—**असौ परैः कथं भाष्यते**—हा इतरांकडून कसा बोलला जातो ?—**समाधिस्थस्य -समाधौ स्थितस्य केशव**—समाधींत स्थित असलेल्या स्थितप्रज्ञाची काय भाषा

---

संप्रदायी टीकाकार म्हणतात-'मत्सांनिध्यरूपं योगं अवाप्स्यसि' माझें सांनिध्य याच स्वरूपाच्या योगास प्राप्त होशील. अद्वैतसंप्रदायी सर्व टीकाकार योग म्ह० विवेकप्रज्ञा-आत्मसाक्षात्काररूप सर्व योगाचें फल असें म्हणतात. ज्ञानेश्वरमहाराजही " इंद्रियांचिया संगती । जिये पसर होतसे मती । ते स्थिर होईल मागुती । आत्मस्वरूपीं ॥८२॥ समाधिसुखीं केवळ । जैं बुद्धि होईल निश्चळ । तैं पावसी तूं सकळ । योगस्थिति ॥ ८४ ॥ " असें म्हणतात. सकळ योगस्थिति म्ह० स्थितप्रज्ञता. अर्थात् बुद्धि आत्मस्वरूपीं स्थिर झाल्यावर तुला परम योग-मोक्षरूप अंतिम फल प्राप्त होईल, असेंच सर्व भाष्यकार व टीकाकार म्हणत असून एकटे रहस्यकारच ' बुद्धि समाधिवृत्तीत स्थिर झाल्यावर साम्यबुद्धिरूप कर्मयोगास प्राप्त होशील,' असें म्हणत आहेत, हे वाचकांनी लक्षांत ठेवावें.

१ ज्याने समाधीविषयी म्ह० आत्म्याविषयीं प्रज्ञा-परमार्थज्ञान संपादन केलें आहे किंवा समाधानानें प्रज्ञा संपादिली आहे, असा याचा अर्थ.

आहे, हे केशवा ! [ या श्लोकांत समाधिस्थ स्थितप्रज्ञाचें लक्षण विचारलें आहे. समाधि-म्ह० स्वाभाविक चित्तसमाधान. मधुसूदनसरस्वतींच्या म्हणण्याप्रमाणें योगांगभूत समाधि नव्हे. कारण येथें ज्ञाननिष्ठाचे प्रकरण चालू आहे. यास्तव समाधिस्थ म्हणजे आत्मसाक्षात्कार झाल्यामुळे स्वाभाविक चित्तसमाधानवान् अशा स्थितप्रज्ञाचे, म्हणजे मीच परब्रह्म आहे अशी ज्याची प्रज्ञा स्थिर झाली आहे, त्याचे-ज्ञाननिष्ठाचे लक्षण काय आहे ? लोक त्याच्याविषयीं काय बोलतात ? असा अर्जुनाच्या पहिल्या प्रश्नाचा मथितार्थ आहे ? समाधि-चित्तसमाधान हें स्थितप्रज्ञतेचे साधन आहे, हे सुचविण्यासाठी 'समाधिस्थ स्थितप्रज्ञाचें' असे म्हटलें आहे. ]—**स्थितधीः-स्थितप्रज्ञः स्वयं वा किं प्रभाषेत**—किंवा स्थितप्रज्ञ स्वतः काय बोलतो ?—**किं आसीत व्रजेत किं**—कसा असतो व व्यवहारांत कसा वागतो ?—**तस्य आसनं व्रजनं वा कथं इत्यर्थः**—त्याचे आसन-अवस्थान किंवा गमन-व्यवहार कसा होतो, असा याचा भावार्थ—**अनेन श्लोकेन स्थितप्रज्ञस्य लक्षणं पृच्छति**—या श्लोकानें स्थितप्रज्ञाचें लक्षण अर्जुन विचारीत आहे. ५४.

**यो ह्यादित एव संन्यस्य कर्माणि ज्ञानयोगनिष्ठायां प्रवृत्तो यश्च कर्मयोगेन तयोः स्थितप्रज्ञस्य प्रजहातीत्यारभ्याध्यायपरिसमाप्तिपर्यन्तं स्थितप्रज्ञलक्षणं साधनं चोपदिश्यते । सर्वत्रैव ह्यध्यात्मशास्त्रे कृतार्थलक्षणानि यानि तान्येव साधनान्युपदिश्यन्ते यत्नसाध्यत्वात् ॥**

**भाष्यार्थ**—( अर्जुनाच्या प्रश्नाला भगवानांनी जे प्रतिवचन दिले आहे त्याचे व्याख्यान करण्यासाठीं अगोदर भूमिका तयार करितात-)—**यः हि आदितः एव कर्माणि संन्यस्य ज्ञानयोगनिष्ठायां प्रवृत्तः**—जो कर्मसंन्यासाला कारण होणाऱ्या वैराग्याने संपन्न असलेला साधक ब्रह्मचर्यावस्थेंतच कर्मांचा संन्यास करून ज्ञानरूप योगांत-म्ह० ज्ञान याच ब्रह्मात्मभाव प्राप्त करून देणाऱ्या साधनांत अगदीं तन्निष्ठ होऊन प्रवृत्त झालेला असतो—**च यः कर्मयोगेन**—आणि जो कर्मरूप योगाने म्ह० उपायाने त्याच निष्ठेत प्रवृत्त झालेला असतो,—**तयोः स्थितप्रज्ञस्य**—त्या दोघांतील स्थितप्रज्ञाचे ( लक्षण व साधन सांगितले जाते. )—**प्रजहाति इति आरभ्य अध्याय परिसमाप्तिपर्यन्तं स्थितप्रज्ञलक्षणं च साधनं उपदिश्यते**—'प्रजहाति' येथून या अध्यायाच्या समाप्तीपर्यंत स्थितप्रज्ञाचें लक्षण व साधन सांगितलें जातें. (अहो पण एकाच वाक्यानें लक्षण व साधन अशीं दोन्ही कशीं सांगितलीं जातील ? उत्तर-)—**हि सर्वत्र एव अध्यात्मशास्त्रे यानि कृतार्थलक्षणानि तानि एव साधनानि उपदिश्यन्ते**—कारण सर्वच ठिकाणीं अध्यात्मशास्त्रांत जीं कृतार्थ पुरुषाची लक्षणें तींच साधनें उपदेशिलीं जातात.—**यत्नसाध्यत्वात्**—कारण तीं यत्नसाध्य असतात. [ कृतार्थ झालेल्या ज्ञानी पुरुषाचे ज्ञानलक्षण जरी साधन होऊं शकत नाहीं ( कारण ते लक्षण या रूपाने फलच बनलेले असते) तरी जिज्ञासूला तेंच म्ह० ज्ञानी पुरुषाचें फलरूप लक्षणच साधन होतें. कारण तें त्याला प्रयत्नानें साधावयाचें असतें. ज्ञानी पुरु-

याचा जो धर्म स्वभावभूत असतो तोच जिज्ञासूला दीर्घ काल अभ्यासानें संपादन करावा लागतो. त्यामुळें ज्ञानसामर्थ्यानें ज्ञानी पुरुषामध्यें स्वाभाविकपणेंच दिसणाऱ्या लक्षणांचा येथें नुसता अनुवाद केला आहे, तो विधि केव्हांच होऊं शकत नाहीं. पण तोच साधकासाठीं विधि होऊं शकतो. अप्राप्ताचाच[1] विधि संभवतो. जें पूर्वीच प्राप्त असतें, त्याचा विधि संभवत नाहीं. यास्तव एकाच वाक्यानें लक्षण व साधन या दोघांचेंही विधान कसें केलें आहे, अशी शंका घेतां येत नाहीं.[2] ] ५४.

**प्रजहाति यदा कामान्सर्वान्पार्थ मनोगतान् ।**
**आत्मन्येवाऽऽत्मना तुष्टः स्थितप्रज्ञस्तदोच्यते ॥ ५५ ॥**

**अन्वयार्थ—हे पार्थ**—हे पार्था !—**यदा**—जेव्हां—**मनोगतान् सर्वान् कामान्**—मनांतील सर्व कामांस—**प्रजहाति**—सर्वथा सोडतो, आणि—**आत्मनि एव**—आत्म्यामध्येंच—**आत्मना तुष्टः**—आत्मस्वरूपानेंच संतुष्ट झालेला असतो—**तदा**—त्यावेळी—**स्थितप्रज्ञः**—स्थितप्रज्ञ—**उच्यते**—म्हटला जातो. ५५.

**यानि यत्नसाध्यानि साधनानि लक्षणानि च भवन्ति तानि–श्रीभगवानुवाच प्रजहातीति । प्रजहाति प्रकर्षेण जहाति परित्यजति यदा यस्मिन्काले सर्वान्समस्तान्कामानिच्छाभेदान्हे पार्थ मनोगतान्मनसि प्रविष्टान्हृदि प्रविष्टान् । सर्वकामपरित्यागे**

---

१ याच न्यायानें ‘ तस्माद्युध्यस्व भारत ’ २–१७ हा अनुवाद आहे, विधि नव्हे, असें आचार्यांनीं वर पृ. ९२ म्हटलें आहे.

२ पण रहस्यकार या श्लोकाला असें अवतरण देतात—“अशा रीतीनें ज्या कर्मयोग्याची बुद्धि किंवा प्रज्ञा स्थिर झाली त्याला स्थितप्रज्ञ असें म्हणतात व त्याचें वर्तन कसें असतें असा आतां अर्जुनाचा प्रश्न आहे.” पण कर्मयोग्याची बुद्धि स्थिर कशानें होणार ? कर्मयोगानेंच की काय ? कर्मयोग हेंच जर ती स्थिर होण्याचा उपाय असेल तर सहाव्या अध्यायांतील ‘ मन फार चचल आहे, त्याचा निग्रह वायूच्या निग्रहाप्रमाणें फार कठिण आहे ’ इत्यादि अर्जुनाचें म्हणणें व त्यावरील ‘ पण, अभ्यास व वैराग्य यांच्यायोगानें त्याचाही निग्रह करितां येतो,’ हें उत्तर व्यर्थ होतें. कारण कर्मयोगानेंच जर प्रज्ञा स्थिर झाली तर चित्तनिग्रहाचे कष्ट कोण करणार ? यास्तव कर्मयोगी स्थितप्रज्ञ होऊं शकत नाहीं. समाधियोगीच स्थितप्रज्ञ होऊं शकतो. कर्मयोग हा त्याचा आरंभींचा उपाय आहे. आत्म्यामध्यें अन्तःकरण निश्चल होणें हीच स्थितप्रज्ञता. ती प्राप्त झाल्यावर कर्मयोग संभवत नाही. ही गोष्ट पुढील लक्षणांवरूनही सिद्ध होते. रहस्यकार म्हणतात, ‘ ज्या कर्मयोग्याची बुद्धि किंवा प्रज्ञा स्थिर झाली त्याला स्थितप्रज्ञ म्हणतात.’ अर्थात् ते प्रज्ञा म्ह० केवल बुद्धि–अन्तःकरण असा अर्थ करितात. पण मध्वाचार्य ‘स्थिता प्रज्ञा ज्ञानं यस्य स स्थितप्रज्ञः ’ असें म्हणतात. म्हणजे प्रज्ञाशब्दाचा अर्थ ‘ज्ञान’ असा करितात. रामानुजाचार्यही स्थितप्रज्ञता म्ह० ‘ज्ञाननिष्ठा’ म्हणतात व ती कर्मयोगसाध्य आहे, असेंही सांगतात. ज्ञानेश्वरमहाराजांनीं ‘ जो समाधिसुख भुंजे । अखंडित । ’ असें स्थितप्रज्ञाविषयीं म्हटलें आहे. इतर अद्वैतवादी आचार्यांनाच अनुसरले आहेत, हें निराळें सांगावयास नकोच.

तुष्टिकारणाभावाच्छरीरधारणनिमित्तशेषे च सत्युन्मत्तप्रमत्तस्येव प्रवृत्तिः प्राप्तेत्यत उच्यते—आत्मन्येव प्रत्यगात्मस्वरूप एवाऽऽत्मना स्वेनैव बाह्यलाभनिरपेक्षस्तुष्टः परमार्थदर्शनामृतरसलाभेनान्यस्मादलंप्रत्ययवान्स्थितप्रज्ञः स्थिता प्रतिष्ठिताऽऽत्मानात्मविवेकजा प्रज्ञा यस्य स स्थितप्रज्ञो विद्वांस्तदोच्यते । त्यक्तपुत्रवित्तलोकैषणः संन्यास्यात्माराम आत्मक्रीडः स्थितप्रज्ञ इत्यर्थः ॥ ५५ ॥

**भाष्यार्थ—यानि यत्नसाध्यानि साधनानि लक्षणानि च भवन्ति तानि 'प्रजहाति०' इति श्रीभगवान् उवाच**—जीं यत्नसाध्य साधनें व स्वभावसिद्ध लक्षणें आहेत तीं 'प्रजहाति०' इत्यादि श्लोकांनीं श्रीभगवानांनीं सांगितलीं आहेत. ( पूर्वपुण्यामुळें ब्रह्मचर्यावस्थेंतच असतांना संन्यासाचें कारण जें वैराग्य—पुत्र-वित्त-लोक इत्यादिकांविषयींची विरक्ति त्याची प्राप्ति झाल्यामुळें कर्मत्याग करून जो ज्ञाननिष्ठेमध्यें प्रवृत्त होतो व जो अविरक्त गृहस्थाश्रमी होऊन कर्मानुष्ठानानें परंपरेनें ज्ञाननिष्ठेमध्यें प्रवृत्त होतो त्या दोघांनाही ज्ञानप्राप्तीच्या द्वारा स्थितप्रज्ञ होतां येतें. यास्तव त्यांतील कोणत्याही मार्गानें जो स्थितप्रज्ञ झाला आहे त्याचें लक्षण व ज्याला स्थितप्रज्ञ व्हावयाचें आहे त्याचें साधन येथून सांगावयाचें आहे.)—**हे पार्थ यदा—यस्मिन् काले सर्वान्—समस्तान् मनोगतान्—मनसि प्रविष्टान् हृदि प्रविष्टान् कामान्—इच्छाभेदान् प्रजहाति—प्रकर्षेण जहाति—परित्यजति**—हे पार्था ज्यावेळीं समस्त मनोगत—मनांत प्रविष्ट झालेल्या—हृदयांत शिरलेल्या कामांना—भिन्न भिन्न इच्छांना पूर्णपणें सोडतो—त्यांचा परित्याग करतो. [ अन्तःकरणाचे धर्म, आत्म्याचे नव्हेत, अशा विविध इच्छांना पुरुष जेव्हां वासनांसह सोडतो, तेव्हां स्थितप्रज्ञ होतो. 'तर मग विद्वान् स्थितप्रज्ञाची कोणतीच प्रवृत्ति होणें शक्य नाहीं,' असें कोणी म्हणेल म्हणून आचार्य म्हणतात—]—**सर्वकामत्यागे तुष्टिकारणाभावात् च शरीरधारणनिमित्तशेषे सति उन्मत्त-प्रमत्तस्य इव प्रवृत्तिःप्राप्ता इति अतःउच्यते**—सर्व कामांचा त्याग केला असतां संतोषाच्या कारणांचाच अभाव होतो व शरीराचें धारण, एवढेंच निमित्त अवशिष्ट राहतें. तसे झालें असतां बुद्धिभ्रम झालेल्या व अत्यंत मदोन्मत्त झालेल्या मनुष्याप्रमाणें स्थितप्रज्ञाची प्रवृत्ति होण्याचा प्रसंग येतो. पण तिचें निवारण करण्यासाठीं भगवान् सांगतात—**आत्मनि एव—प्रत्यगात्मस्वरूपे एव आत्मना—स्वेन एव—बाह्यलाभनिरपेक्षः तुष्टः**—आत्म्यामध्येंच—प्रत्यगात्मस्वरूपांतच—आपल्या स्वरूपानेंच, बाह्य वस्तूंच्या लाभाविषयीं निरपेक्ष होत्साता संतुष्ट होतो—म्ह०—**परमार्थदर्शन-अमृतरसलाभेन अन्यस्मात् अलंप्रत्ययवान्**—परमार्थदर्शन—आत्मज्ञानरूप—अमृतरसाच्या लाभानें दुसऱ्या सर्व अनात्म पदार्थांविषयीं जो विरक्त झाला आहे, दुसरे अनात्म पदार्थ नकोत—पुरे झाले, असें ज्याला वाटूं लागलें आहे तो—**स्थितप्रज्ञः—स्थिता—प्रतिष्ठिता आत्मानात्मविवेकजा प्रज्ञा यस्य सः स्थितप्रज्ञः—विद्वान् तदा उच्यते**—स्थितप्रज्ञ—ज्याची आत्मा व अनात्मा यांच्या विवेकामुळें उत्पन्न झालेली प्रज्ञा स्थित—प्रतिष्ठित झाली आहे तो स्थितप्रज्ञ—विद्वान् तेव्हां

म्हटला जातो. म्ह०—**त्यक्तपुत्रवित्तलोकैषणः संन्यासी आत्मारामः आत्मक्रीडः स्थितप्रज्ञः इत्यर्थः**—ज्यानें पुत्र, वित्त व लोक यांविषयींची एषणा–इच्छा टाकिली आहे, असा संन्यासी–आत्माराम–आत्म्यामध्येच आराम पावणारा–आत्मक्रीड–आत्म्यामध्येंच ज्याची क्रीडा चालते, बाह्यविषयामध्ये नाहीं, तो स्थितप्रज्ञ असा

---

१ रहस्यकार या श्लोकावरील टीपेत "स्थितप्रज्ञाचें वर्तन म्हणजे कर्मयोगशास्त्राचा पाया आहे," असे म्हणतात व त्यासाठी बाराव्या प्रकरणाचा हवाला देतात. पण स्थितप्रज्ञता कर्मयोगानेच जर साध्य होणारी आहे, तर स्थितप्रज्ञाचे वर्तन हा कर्मयोगाचा पाया कसा असणार? तथापि ते बाराव्या प्रकरणांत काय म्हणतात ते पाहिले पाहिजें. पण येथेंच त्याचा विचार केल्यास फार विस्तार होईल, म्हणून आम्ही त्याचा विचार अन्यत्र करण्याचें अभिवचन देऊन प्रकृत विषयाकडे वळतो. रामानुजाचार्य—'सर्व मनांतील काम जेव्हां टाकतो तेव्हां हा स्थितप्रज्ञ म्हटला जातो. ही ज्ञाननिष्ठेची पराकाष्ठा आहे.' असें म्हणतात. ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—'जो अभिलाष निजसुखालाही विघ्न करतो व ज्याच्यामुळे नित्यतृप्त आत्मज्ञ पुरुषही विषयामध्ये पडतो–तो काम सर्वथा जाये। जयाचें आत्मसंतोषीं मन राहे। तोचि स्थितप्रज्ञ होये। पुरुष जाणे॥' २९३. रहस्यकार 'काम म्हणजे वासना' असा अर्थ करितात, पण तो बरोबर नाहीं. कारण वासना म्हणजे इच्छा हा प्राकृत वासनाशब्दाचा अर्थ आहे. संस्कृतांत वासनाशब्दाचा अर्थ प्रायः इच्छा असा नाहीं. वासना म्हणजे सूक्ष्मसंस्कार असा अर्थ आहे. वास्तव शास्त्रीय ग्रथांत शास्त्रीय अर्थी रूढ असलेल्या शब्दांचाच उपयोग केला पाहिजे. वेदान्तशास्त्रात वासना हा शब्द इच्छा,काम, याअर्थी केव्हांही योजीत नाहींत. आचार्यांनी 'कामान् म्ह० इच्छाभेदान्' असा अर्थ केला आहे. इतरांनीही तोच अर्थ गृहीत धरला आहे. ज्ञानेश्वरमहाराज काम म्ह० विषयाभिलाष म्हणतात. उपनिषदांतील 'एषणा'शब्दाबद्दल येथे 'काम'शब्द योजला आहे, व तोच अर्थ सयुक्तिक आहे. रहस्यकार 'प्रजहाति' याचा 'सोडतो' एवढाच अर्थ करितात. आचार्यादि सर्व 'प्रकर्षेण जहाति–परित्यजति-' सर्वथा–पूर्णपणें टाकतो असा अर्थ करितात. ज्ञानेश्वरमहाराजही 'काम सर्वथा जाये' असे म्हणतात. पण 'काम सर्वथा टाकतो' असे म्हटल्यावर ते कर्मयोग्याचे लक्षण होऊ शकणार नाहीं, म्हणून 'प्र' या उपसर्गाकडे दुर्लक्ष करून 'जहाति' म्ह० सोडतो, असाच साधा व 'सरळ' अर्थ रहस्यकारांनीं केला आहे. 'आत्मनि एव आत्मना तुष्टः' याचा 'आपण आपल्या ठायींच संतुष्ट होऊन राहतो' असा ते अर्थ करितात. पण 'आत्मना' या तृतीयान्त पदाचा अर्थ 'आपण' असा करणे उचित नाहीं. तर 'आत्म्यानेंच' आपल्या स्वरूपानेच संतुष्ट होतो, संतोषासाठी बाह्य विषयांची अपेक्षा करीत नाहीं, असाच करणे उचित आहे. आचार्यादि अद्वैतसंप्रदायी टीकाकारांनी तसाच केला आहे. मध्वाचार्य "आत्मना–परमात्मना" असा, रामानुजाचार्य "आत्मना–मनसा–आत्मैकावलम्बनेन"असा,वल्लभ सं.टीकाकार 'आत्माना स्वस्यैव जीवात्मस्वरूपेण' असा अर्थ करितात. म्ह० सर्व 'आत्मना' याचा तृतीयान्तच अर्थ करितात, व संतोषासाठी बाह्य साधनांची त्याला अपेक्षा नसते, असें सुचवितात. 'स्थितप्रज्ञः तदोच्यते' असें येथें व पुढेही म्हटलेलें असल्यामुळें हे स्थितप्रज्ञाचें लक्षण आहे, हें उघड होत. तसेंच 'समत्वं योग उच्यते' हेंही योगाचे लक्षण आहे. पण 'योगः कर्मसु कौशलं' हे लक्षण नव्हे. कारण त्यांत 'उच्यते' या सारखा लक्षणबोधक शब्द नाहीं.

**याचा भावार्थ.** [ मनांतील सर्व इच्छांचा त्यांच्या वासनांसह त्याग करून आपल्या अन्तर्यामीच्या स्वरूपांत दुसऱ्या कोणत्याही अनात्म पदार्थाच्या लाभाची अपेक्षा न करितां त्या आत्मस्वरूपानेंच जो संतुष्ट असतो, तो स्थितप्रज्ञ होय. स्थितप्रज्ञाचें हें मुख्य लक्षण आहे. या लक्षणाने युक्त असलेला पुरुष कर्मनिष्ठ असणे शक्य नाही. अर्थात् तो ज्ञाननिष्ठ संन्यासीच होय. आत्म्याला जाणण्याची इच्छा करणारा वैराग्याच्या द्वारा सर्व-एषणात्यागरूप संन्यास करून, श्रवण-मननादिकांच्या आवृत्तीने आत्मज्ञान संपादन करून, त्यांतच आसक्त होऊन, विषयांपासून विमुख होऊन, ज्ञानाचें फळ अशी जी तृप्ति–परम संतोष त्याचा त्याच अवस्थेंत अनुभव घेणारा हा स्थितप्रज्ञ कर्म-विधींचा विषय होत नाही. अर्थात् समत्वबुद्धियुक्त कर्मयोगही आत्मजिज्ञासा उत्पन्न होण्यासाठी आहे. निष्काम कर्मानुष्ठानाने पापाची निवृत्ति होऊन आत्मजिज्ञासा म्ह० विविदिषा उत्पन्न होते, असा श्रुति-स्मृति-पुराणांचा घोष चालू आहे. असे असतांना गीतेत ज्ञानी पुरुषाने ज्ञानोत्तर निष्काम कर्म आचरावें, स्वतःसाठी जरी नको असलें तरी दुसऱ्यासाठी ते करावे, असे जे कित्येकांचे म्हणणे आहे ते भ्रामक होय. ] ५५.

**दुःखेष्वनुद्विग्नमनाः सुखेषु विगतस्पृहः ।**
**वीतरागभयक्रोधः स्थितधीर्मुनिरुच्यते ॥ ५६ ॥**

**अन्वयार्थ—दुःखेषु अनुद्विग्नमनाः**—आध्यात्मिकादि दुःखें प्राप्त झालीं असतां ज्याचें मन उद्विग्न होत नाही,—**सुखेषु**—नाना प्रकारचीं सुखें प्राप्त झालीं असतां—**विगतस्पृहः**—त्यांविषयींची ज्याची इच्छा गेलेली आहे म्ह० त्यांविषयीं जो निरिच्छ असतो,—**वीतरागभयक्रोधः**—ज्याचे राग-प्रीति, भय व क्रोध निवृत्त झालेले असतात तो—**स्थितधीः**—स्थितप्रज्ञ—**मुनिः**—मुनि—**उच्यते**—म्हटला जातो. ५६.

**किं च—दुःखेष्विति । दुःखेष्वाध्यात्मिकादिषु प्राप्तेषु नोद्विग्नं न प्रक्षुभितं दुःखप्राप्तौ मनो यस्य सोऽयमनुद्विग्नमनाः । तथा सुखेषु प्राप्तेषु विगता स्पृहा तृष्णा यस्य नाग्निरिवेन्धनाद्याधाने सुखान्यनु विवर्धते स विगतस्पृहः । वीतरागभयक्रोधो रागश्च भयं च क्रोधश्च वीता विगता यस्मात्स वीतरागभयक्रोधः स्थितधीः स्थितप्रज्ञो मुनिः संन्यासी तदोच्यते ॥ ५६ ॥**

**भाष्यार्थ—किं च 'दुःखेषु०' इति**—तसेंच 'दुःखेषु०' या श्लोकानें विविदिषूचेंच दुसरें कर्तव्य व विद्वानाचें दुसरें लक्षण सांगतात—**दुःखेषु-आध्यात्मिकादिषु प्राप्तेषु**—आध्यात्मिकादिक[१] दुःखे प्राप्त झाली असतां—**न उद्विग्नं-न प्रक्षु-**

---

१ ज्वर, मस्तकशूल इत्यादि शरीरांतील रोगांमुळे होणारें जे दुःख तें आध्यात्मिक, व्याघ्र, सर्प इत्यादि पृथ्वींतील इतर पदार्थांपासून होणारें जे दुःख ते आधिभौतिक व अतिवात, अतिवृष्टि, अनावृष्टि इत्यादिकांमुळें होणारीं जीं दुःखें तीं आधिदैविक दुःखें होत.

**भितं दुःखप्राप्तौ मनः यस्य सः अयं अनुद्विग्नमनाः**—दुःखप्राप्ति झाली असतां ज्याचें मन उद्विग्न–प्रक्षुभित होत नाहीं तो हा ' अनुद्विग्नमनाः ' होय.—**तथा सुखेषु प्राप्तेषु विगता स्पृहा–तृष्णा यस्य इन्धनादि–आधाने अग्निः इव न सुखानि अनु विवर्धते स विगतस्पृहः**—त्याचप्रमाणें सुखांची प्राप्ति झाली असतां ज्याची स्पृहा–तृष्णा नाहींशी झाली आहे म्ह० काष्ठें वगैरे घातली असतां अग्नि जसा वाढतो त्याप्रमाणें सुखें मिळूं लागलीं असतां त्यांच्यामागून ज्याची तृष्णा वाढत जात नाहीं तो ' विगतस्पृहः ' होय. [ आध्यात्मिकादि दुःखें प्राप्त झालीं असतां त्यांचा परिहार करण्यास असमर्थ झालेल्या पुरुषाला तें दुःख अनुभवीत असतांना जो खेद होतो त्यास उद्वेग म्हणतात. पण दुःख प्राप्त झालें असतांही ज्याच्या मनाला तसा उद्वेग होत नाहीं तो स्थितप्रज्ञ होय. यास्तव ज्याला स्थितप्रज्ञ व्हावयाचें आहे त्यानें दुःखें प्राप्त झालीं असतांही मन उद्विग्न न होईल, असा अभ्यास करावा. दुःखांप्रमाणें सुखेंही आध्यात्मिकादि तीन प्रकारचीं आहेत असे भाष्यांतील ' तथा ' या पदानें सुचविलें आहे. अज्ञाला जशीं जशीं सुखें होऊं लागतात तशी तशी त्यांविषयींची त्याची तृष्णा वाढूं लागते. अग्नीत जशीं जशीं लांकडें, गवत वगैरे घालावीं तसा तसा तो वाढतच जातो. पण विद्वान्–आत्मज्ञानी पुरुषाची तृष्णा तशी सुखांबरोबर वाढत नाहीं. अग्नीवर दगड किंवा माती घातल्यास तो त्यांना जाळूं शकत नाहीं, किंवा त्याबरोबर वाढतही नाहीं, हें प्रसिद्ध आहे. त्याचप्रमाणें आत्मज्ञाची तृष्णा सुखांबरोबर वाढत जात नाहीं. यास्तव जिज्ञासूनेंही सुख किंवा दुःख झालें असतां तृष्णा व उद्वेग करूं नये. त्याचप्रमाणें ]—**वीतरागभयक्रोधः–रागः च भयं च क्रोधः च ( राग-भय-क्रोधाः ) यस्मात् वीताः–विगताः सः वीतरागभयक्रोधः**—आसक्ति, भय व क्रोध ज्याच्यापासून निघून गेले आहेत तो वीतरागभयक्रोध होय.—**स्थितधीः -स्थितप्रज्ञः मुनिः–संन्यासी तदा उच्यते**—स्थितधी म्ह० स्थितप्रज्ञ मुनि म्ह० संन्यासी म्हटला जातो. [ दुःखांनी उद्विग्न न होणारा, सुखाविषयींची तृष्णा वाढूं न देणारा, आसक्ति, भय व क्रोध यांनी रहित असा जो असतो तो स्थितधी–स्थितप्रज्ञ मुनि होय. मुनि म्हणजे आत्मवेत्ता–संन्यासी. वरील अवस्था जेव्हां प्राप्त होते तेव्हां त्याला स्थितप्रज्ञ म्हणतात. ] ५६.

**यः सर्वत्रानभिस्नेहस्तत्तत्प्राप्य शुभाशुभम् ।**
**नाभिनन्दति न द्वेष्टि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ५७ ॥**

**अन्वयार्थ—यः**—जो—**सर्वत्र**—देह-जीवितादिकांविषयींही—**अनभिस्नेहः**—प्रीति नसलेला,—**तत् तत् शुभाशुभं प्राप्य**—तें तें शुभ व अशुभ यांस प्राप्त

---

आत्मा म्ह० शरीर, त्यापासून आध्यात्मिक, भूत म्ह० या लोकांतील शरीरभिन्न पदार्थ, त्यापासून आधिभौतिक व देव म्ह० वायु, इंद्र, सूर्य इत्यादिकांपासून आधिदैव, असे हे शब्द बनले आहेत.

होऊन—**न अभिनन्दति न द्वेष्टि**— अभिनंदन करीत नाहीं व द्वेष करीत नाहीं—**तस्य प्रज्ञा**—त्याची प्रज्ञा-त्याची बुद्धि—**प्रतिष्ठिता**—प्रतिष्ठित आहे. ५७.

**किं च—यः सर्वत्रेति । यो मुनिः सर्वत्र देहजीवितादिष्वप्यनभिस्नेहोऽभिस्नेहवर्जितस्तत्तत्प्राप्य शुभाशुभं तत्तच्छुभमशुभं वा लब्ध्वा नाभिनन्दति न द्वेष्टि शुभं प्राप्य न तुष्यति न हृष्यत्यशुभं च प्राप्य न द्वेष्टीत्यर्थः । तस्यैवं हर्षविषादवर्जितस्य विवेकजा प्रज्ञा प्रतिष्ठिता भवति ॥ ५७ ॥**

**भाष्यार्थ—किंच 'यः सर्वत्र०' इति**—'यः सर्वत्र०' या श्लोकानें आणखी एका लक्षणाचा अनुवाद करून विविदिषूचें आणखी कर्तव्य सांगतात-( अहो पण देहाच्या जीवनाविषयीं तृष्णा, शुभाशुभ प्राप्त झालें असतां हर्ष-विषाद या गोष्टी विद्वान् व विविदिषु यांतील कोणालाच वर्ज न करितां येण्यासारख्या आहेत. तेव्हां प्रज्ञा स्थिर कशी होणार ? अशी शंका घेऊन सांगतात-)—**यः-मुनिः सर्वत्र-देहजीवितादिषु अपि अनभिस्नेहः-अभिस्नेहवर्जितः**—जो मुनि-आत्मवेत्ता-संन्यासी सर्वाविषयीं म्ह० देह, जीवित इत्यादिकांविषयींही अभिस्नेहरहित असतो, त्यांविषयींही ज्याला अतिशय स्नेह नसतो—**तत्तत्प्राप्य शुभाशुभं-तत् तत् शुभं अशुभं वा लब्ध्वा न अभिनन्दति न द्वेष्टि**—त्या त्या शुभाला किंवा अशुभाला प्राप्त होऊन अभिनन्दन करीत नाहीं व द्वेष करीत नाहीं. म्हणजे—**शुभं प्राप्य न तुष्यति-न हृष्यति च अशुभं प्राप्य न द्वेष्टि इत्यर्थः**—शुभाला प्राप्त होऊन संतुष्ट होत नाहीं, हृष्ट होत नाहीं व अशुभाला प्राप्त होऊन त्याचा द्वेष करीत नाहीं, (अर्थात् विषयांविषयीं आसक्ति न ठेवणें व शुभाशुभप्राप्ति झाली असतां हर्ष-विषाद न मानणें हें प्रज्ञास्थैर्याचें कारण आहे, असें सांगतात-)—**एवं हर्षविषादवर्जितस्य तस्य विवेकजा प्रज्ञा प्रतिष्ठिता भवति**—याप्रमाणें हर्ष-विषादरहित असलेल्या त्याची विवेकापासून उत्पन्न झालेली प्रज्ञा प्रतिष्ठित होते. ५७.

## यदा संहरते चायं कूर्मोऽङ्गानीव सर्वशः ।
## इन्द्रियाणीन्द्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ५८ ॥

**अन्वयार्थ—कूर्मः**—कांसव—**अंगानि इव**—आपले अवयव जसे एकदम आवरून घेतो, तसा—**अयं**—हा पुरुष—**यदा**—जेव्हां—**इन्द्रियार्थेभ्यः**—विषयांपासूनें—**इन्द्रियाणि**—इंद्रियें—**सर्वशः**—सर्व प्रकारें—**संहरते**—परतवून घेतो—**तदा**-तेव्हां—**तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता**—त्याची प्रज्ञा प्रतिष्ठित झाली आहे. ५८.

**किं च—यदा संहरत इति । यदा संहरते सम्यगुपसंहरते चायं ज्ञाननिष्ठायां प्रवृत्तो यतिः कूर्मोऽङ्गानीव सर्वशो यथा कूर्मो भयात्स्वान्यङ्गान्युपसंहरति सर्वत एवं ज्ञाननिष्ठ इन्द्रियाणीन्द्रियार्थेभ्यः सर्वविषयेभ्य उपसंहरते । तस्य प्रज्ञा प्रतिष्ठितेत्युक्तार्थं वाक्यम् ॥ ५८ ॥**

**भाष्यार्थ—किंच-'यदासंहरते०'-इति**—'यदा०'या श्लोकानें जिज्ञासूचेंच आणखी कर्तव्य सांगतात—**च यदा अयं-ज्ञाननिष्ठायां प्रवृत्तः यतिः संहरते-सम्यक् उपसंहरते**—आणि जेव्हां हा ज्ञाननिष्ठेमध्यें प्रवृत्त झालेला यति ( म्ह० स्थितप्रज्ञ नव्हे तर त्यासाठीं यत्न करणारा) उपसंहार करतो–उत्तम प्रकारें–पूर्णपणे आपल्या अधीन ठेवतो–( येथील इंद्रियांचा उपसंहार म्हणजे लय नव्हे, संकोच आहे, हें दृष्टान्तानें दाखवितात–)—**कूर्मः अंगानि इव सर्वशः**—कांसव अंगें जशीं सर्व बाजूंनीं म्हणजे —**यथा कूर्मः भयात् स्वानि अंगानि सर्वतः उपसंहरति**—ज्याप्रमाणें कांसव भयानें आपलीं अंगें सर्व बाजूंनीं आत ओढून घेतो–त्यांना आपल्या पाठीवरील कवचांत संकुचित करतो—**एवं**—त्याप्रमाणें—**ज्ञाननिष्ठः इंद्रियाणि इंद्रियार्थेभ्यः -सर्वविषयेभ्यः उपसंहरते**—ज्ञाननिष्ठ आपलीं इद्रियें सर्व विषयांपासून परतवितो व त्यांना आपल्या अधीन ठेवतो—**तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता इति उक्तार्थं वाक्यम्**—त्याची प्रज्ञा प्रतिष्ठित आहे, ह्या वाक्याचा अर्थ वर सांगितलाच आहे. ( अर्थात् इंद्रियांना विषयांपासून विमुख करणे हे प्रज्ञास्थैर्याचे निमित्त आहे.) ५८

विषया विनिवर्तन्ते निराहारस्य देहिनः ।
रसवर्जं रसोऽप्यस्य परं दृष्ट्वा निवर्तते ॥ ५९ ॥

**अन्वयार्थ—निराहारस्य**—जो विषयांचे हरण करूं शकत नाहीं, अनुभव घेऊं शकत नाहीं, अशा उपाशी किंवा अशक्त—**देहिनः**—प्राण्यापासूनही—**विषयाः**—शब्द-स्पर्शादि विषय—**रसवर्जं**—प्रीतीवांचून—**विनिवर्तन्ते**—निवृत्त होतात. (विषयासक्तीसह निवृत्त होत नाहींत. )—**अस्य**—या स्थितप्रज्ञाचा—**रसः अपि**—तो विषयासक्तिरूप रसही—**परं दृष्ट्वा**—परमार्थतत्त्वाचा अनुभव घेऊन—**निवर्तते**—निवृत्त होतो. ५९.

**तत्र विषयाननाहरत आतुरस्यापीन्द्रियाणि निवर्तन्ते कूर्माऽङ्गानीव संह्रियन्ते न तु तद्विषयो रागः स कथं संह्रियत इति उच्यते विषया इति । यद्यपि विषयोपलक्षितानि विषयशब्दवाच्यानीन्द्रियाण्यथ वा विषया एव निराहारस्यानाह्रियमाणविषयस्य कष्टे तपसि स्थितस्य मूर्खस्यापि विनिवर्तन्ते देहिनो देहवतो रसवर्जं रसो रागो विषयेषु यस्तं वर्जयित्वा । रसशब्दो रागे प्रसिद्धः स्वरसेन प्रवृत्तो रसिको रसज्ञ इत्यादिदर्शनात् । सोऽपि रसो रञ्जनरूपः सूक्ष्मोऽस्य यतेः परं परमार्थतत्त्वं ब्रह्म दृष्ट्वोपलभ्याहमेव तदिति वर्तमानस्य निवर्तते निर्बीजं विषयविज्ञानं संपद्यत इत्यर्थः । नासति सम्यग्दर्शने रसस्योच्छेदः । तस्मात्सम्यग्दर्शनात्मिकायाः प्रज्ञायाः स्थैर्यं कर्तव्यमित्यभिप्रायः ॥ ५९ ॥**

**भाष्यार्थ**—( अहो पण इंद्रियांना जरी विषयांपासून परतविले तरी त्याविषयींची आसक्ति जोंवर मनांत आहे तोंवर ज्ञानाचा लाभ कसा होणार ? अशी शंका–)—**तत्र**

**विषयान् अनाहरतः आतुरस्य अपि इंद्रियाणि निवर्तन्ते**—व्यवहारांत विषयोपभोगापासून विमुख झालेल्या रोग्याचींही इंद्रिये निवृत्त होतात—**कूर्मः अंगानि इव संव्हियन्ते**—कांसव जशी आपली अंगे ओढून घेतो त्याप्रमाणें रोगीही आपल्या इंद्रियांना संकुचित करतो—**तु तद्विषयः रागः न**—पण त्या विषयांचा राग-प्रीति कांहीं संकुचित केली जात नाही. ( आणि मनांत विषयप्रीति असेपर्यंत प्रज्ञालाभही संभवत नाही. कारण विषयासक्ति हा ज्ञानाचा मोठा प्रतिबंध आहे तेव्हां )—**सः कथं उपसंव्हियते इति ' विषया:० ' इति उच्यते**—रागाचा-विषयप्रीतीचा उपसंहार कसा केला जातो ते 'विषया:०-' या श्लोकाने सांगितले जाते.—**यद्यपि विषयोपलक्षितानि-विषयशब्दवाच्यानि इंद्रियाणि अथवा विषयाः एव**—जरी या श्लोकांतील ' विषयाः ' या शब्दावरून उपलक्षित होणारीं-' विषय ' या शब्दाने वाच्य असलेलीं-सांगितलेलीं इंद्रिये किंवा स्वतः विषयच—**निराहारस्य-अनाव्हियमाणविषयस्य कष्टे तपसि स्थितस्य मूर्खस्य अपि देहिनः-देहवतः निवर्तन्ते**—निराहार म्ह० जो विषयांचे आहरण-उपभोग घेत नाही-जो कष्टकर तपामध्ये स्थित आहे अशा मूर्ख देहवानाचेही निवृत्त होतात. ( विषयेच्छा कितीही जरी प्रबल असली तरी विषयांचे सेवन करावयाचें नाही, असा निश्चय करून जो अत्यंत क्लेशकर तप करीत राहतो त्या अविद्वानाचेही विषय निवृत्त होतात. म्ह० त्याचीं इंद्रिये विषयांपासून जरी पराङ्मुख होतात तरी—**रसवर्जं-विषयेषु यः रसः-रागः तं वर्जयित्वा**—रसवर्ज म्ह० विषयांविषयींचा जो रस-राग-आसक्ति-प्रीति त्या रसाला सोडून निवृत्त होतात. [ विषयाचे सेवन करावयाचेच नाही, अशा हठाने जे इंद्रियाना विषयापासून परतावितात किंवा इंद्रियांचा हठाने निरोध केल्यामुळें विषय त्यांच्यापासून निवृत्त होतात ते विषय किंवा इन्द्रियें विषयप्रीतीसह निवृत्त होत नाहीत, तर विषयवासना मनांत जशीच्या तशी ठेवूनच निवृत्त होतात. विषयवासनेसह निवृत्त होत नाहीत. ] —**रसशब्दः रागे प्रसिद्धः**—रस हा शब्द राग-आसक्ति-प्रीति-इच्छा या अर्थी प्रसिद्ध आहे. ( अर्थात् रस म्हणजे जिव्हेचा माधुर्यादि विषय, एवढा एकच रसशब्दाचा अर्थ नाही. पण वृद्धांच्या प्रयोगावांचून रसशब्दाचा राग-इच्छा असा अर्थ कसा करतां येईल, म्हणून कोणी म्हणेल, यास्तव आचार्य सांगतात-)—**स्वरसेन प्रवृत्तः रसिकः रसज्ञः इत्यादि दर्शनात्**—स्वरसाने म्ह० स्वेच्छेने प्रवृत्त झाला. हा मोठा रसिक-स्वेच्छावशवर्ती-रागी-रसज्ञ-विवक्षित व अपेक्षित जाणणारा-मर्मज्ञ आहे, इत्यादि

---

१ विषयोपभोगापासून पराङ्मुख झालेल्या पुरुषाच्या विषयाची निवृत्ति कशी होणार ? वस्तुतः पुरुष विषयांपासून निवृत्त होतो. विषय कांही पुरुषापासून निवृत्त होत नाहीत, म्हणून श्लोकांतील ' विषयाः विनिवर्तन्ते-' विषय निवृत्त होतात. यातील विषयशब्दाचा अर्थ लक्षणेने ' इंद्रिये ' असा करावा, असे अगोदर सांगून पुनः ' किंवा इंद्रिये निवृत्त झाली असतां जणु काय विषयच निवृत्त झाल्यासारखे होतात, ' अशा आशयाने विषयशब्दाचा 'विषय' असाच अर्थ करावा, असें सांगत आहेत.

रसशब्दाचे राग-इच्छा या अर्थी प्रयोग होतात.—**अस्य यतेः सः अपि रसः-रञ्जनरूपः सूक्ष्मः**—या यतीचा तो रसही-सूक्ष्म रंजनरूप राग-आसक्ति—**परं -परमार्थतत्त्वं ब्रह्म दृष्ट्वा-उपलभ्य-अहमेव तत् इति वर्तमानस्य निवर्तते**—परमार्थ तत्त्व जें ब्रह्म त्याला पाहून-त्याचा साक्षात् अनुभव घेऊन 'मीच तें' असें मानून-तद्रूप होऊन राहणारा जो यति त्याचा तो सूक्ष्म रसही निवृत्त होतो.—**विषयविज्ञानं निर्बीजं संपद्यते इत्यर्थः**—याचें विषयविज्ञान निर्बीज होतें, असा याचा भावार्थ.—**सम्यग्दर्शने असति रसस्य उच्छेदः न भवति**—सम्यग्दर्शन म्ह. यथार्थ आत्मसाक्षात्कार झालेला नसतांना म्ह. सम्यग्ज्ञान झाल्यावांचून रसाचा-रागाचा -प्रीतीचा उच्छेद होत नाहीं.—**तस्मात् सम्यग्दर्शनात्मिकायाः प्रज्ञायाः स्थैर्यं कर्तव्यं इति अभिप्रायः**—म्हणून समग्दर्शनरूप प्रज्ञेचें स्थैर्य करावें-आत्मज्ञानरूप प्रज्ञा दृढ करावी, असा याचा अभिप्राय आहे. [ रस म्ह० विषयप्रीति, पर ब्रह्माला साक्षात् जाणल्यानें-मीच तें आहें, असा अनुभव घेऊन त्यांतच स्थिर झाल्याने ती विषयप्रीतिही निवृत्त होते. अहो पण अशा आत्मसाक्षात्कारावांचून विषयासक्ति जर निवृत्त होत नाही, व विषयासक्ति सोडल्यावांचून आत्मज्ञान होत नाहीं तर अन्योन्याश्रय दोष येत नाहीं का ? असे कोणी येथे विचारील; पण साधकावस्थेंत विवेकाच्या योगानें इंद्रियांची विषयोन्मुखता घालवून त्यांना अन्तर्मुख केले असतां विषयाविषयींचा स्थूल राग निवृत्त होतो. नंतर सम्यग्ज्ञान झाल्यामुळें सूक्ष्म रागही पूर्णपणें निवृत्त होतो, अशी वस्तुस्थिति असल्यामुळें वरील दोष येत नाहीं. याप्रमाणें प्रज्ञास्थैर्य फार मोठें फल देणारें असल्यामुळें साधकानें दीर्घ प्रयत्नानें ते संपादन करावें, असा याचा आशय आहे.]५९

## यततो ह्यपि कौन्तेय पुरुषस्य विपश्चितः ।
## इन्द्रियाणि प्रमाथीनि हरन्ति प्रसभं मनः ॥ ६० ॥

**अन्वयार्थ—हि**—कारण—**हे कौन्तेय**—हे कुंतिपुत्रा !—**यततः अपि**—यत्न करणाऱ्याही—**विपश्चितः पुरुषस्य**—बुद्धिमान् पुरुषाचीं—**प्रमाथीनि इन्द्रियाणि**—व्याकुल करणारीं इंद्रियें—**मनः**—त्याच्या मनाला—**प्रसभं**—बलात्कारानें—**हरन्ति**—हरण करितात. ६०.

**सम्यग्दर्शनलक्षणप्रज्ञास्थैर्यं चिकीर्षताऽऽदाविन्द्रियाणि स्ववशे स्थापयितव्यानि यस्मात्तदनवस्थापने दोषमाह—यतत इति । यततः प्रयत्नं कुर्वतोऽपि हि यस्मात्कौन्तेय पुरुषस्य विपश्चितो मेधाविनोऽपीति व्यवहितेन संबन्धः । इन्द्रियाणि प्रमाथीनि प्रमथनशीलानि विषयाभिमुखं हि पुरुषं विक्षोभयन्त्याकुली कुर्वन्ति । आकुलीकृत्य च हरन्ति प्रसभं प्रसह्य प्रकाशमेव पश्यतो विवेकविज्ञानयुक्तं मनो यतस्तस्मात्॥६०॥**

**भाष्यार्थ—सम्यग्दर्शनलक्षणप्रज्ञास्थैर्यं चिकीर्षता आदौ इंद्रियाणि स्ववशे स्थापयितव्यानि**—सम्यग्दर्शनरूप प्रज्ञास्थैर्य करण्याची इच्छा करणारानें प्रथम इंद्रियांना आपल्या अधीन ठेवावें, तीं स्ववश करावीं ( अहोपण मनाला स्वाधीन ठेव-

त्यानेंच जर प्रज्ञास्थैर्य संभवतें तर इंद्रियांना स्वाधीन ठेवण्याची खटाटोप कशाला हवी? उत्तर-)—**यस्मात् तदनवस्थापने 'यततः०' इति दोषं आह**—कारण त्यांना स्वाधीन न ठेवल्यास कोणता दोष घडतो तें 'यततः०' या श्लोकानें सांगतात—**हि-यस्मात्**—ज्याअर्थी—**कौन्तेय**—अर्जुना—**यततः-प्रयत्नं कुर्वतः अपि विपश्चितः-मेधाविनः अपि पुरुषस्य**—प्रयत्न करणाऱ्या बुद्धिमान् -विद्वान् पुरुषाचीही—**इति व्यवहितेन संबंधः**—असा 'अपि' शब्दाचा 'विपश्चितः' या दूरच्या शब्दाशी संबंध लावावा.—**प्रमाथीनि-प्रमथनशीलानि इंद्रियाणि**—प्रमथन करणें-आकुल करणें हेंच ज्यांचें शील आहे अशीं इंद्रियें—**हि पुरुषं विषयाभिमुखं विक्षोभयन्ति-आकुलीकुर्वन्ति**—कारण तीं पुरुषाला विषयाभिमुख-विषयाकडे प्रक्षुब्ध करितात-विषयासाठीं आकुल करितात.—**च यतः आकुलीकृत्य प्रकाशं एव पश्यतः विवेकविज्ञानयुक्तं मनः प्रसभं -प्रसह्य हरन्ति**—आणि ज्याअर्थी तीं इंद्रियें पुरुषाला विषयांसाठीं आकुल-क्षुब्ध करून ज्ञानरूप प्रकाशच पहात असलेल्या विद्वान् पुरुषाचें विवेकविज्ञानयुक्त मन बलात्कारानें हरण करितात त्याअर्थी-[त्या सर्वांचें नियमन करून, असा पुढील श्लोकाशी याचा संबंध. प्रज्ञास्थैर्याची म्हणजेच सम्यग्ज्ञानाची इच्छा असलेल्या पुरुषानें अगोदर आपल्या इंद्रियांना स्वाधीन ठेवावें. कारण त्यांना जर स्वाधीन न ठेवले तर पुनः पुनः विषयांतील दोषांचें चिंतन करणाऱ्या व विद्वान् अशाही पुरुषाचीं, त्याला विषयांसाठीं व्याकुल करून सोडणारी इंद्रियें त्याच्या विवेकविज्ञानयुक्त मनालाही बलात्कारानें हरण करितात. आणि ज्याअर्थी असें आहे त्याअर्थी-] ६०.

तानि सर्वाणि संयम्य युक्त आसीत मत्परः।
वशे हि यस्येन्द्रियाणि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ६१ ॥

**अन्वयार्थ—तानि सर्वाणि**—त्या सर्व इंद्रियांचें—**संयम्य**—संयमन करून-त्यांना आपल्या वश ठेवून—**युक्तः**—शांतचित्त व—**मत्परः**—मीच ज्याला श्रेष्ठ आहें, दुसरा कोणी श्रेष्ठ नाहीं, असें होऊन—**आसीत**—रहावे.—**हि**—कारण—**इन्द्रियाणि**—इंद्रियें—**यस्य**—ज्याच्या—**वशे**—अधीन असतात—**यस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता**—त्याची प्रज्ञा प्रतिष्ठित असते. ६१.

तानीति। तानि सर्वाणि संयम्य संयमनं वशीकरणं कृत्वा युक्तः समाहितः सन्नासीत। मत्परोऽहं वासुदेवः सर्वप्रत्यगात्मा परो यस्य स मत्परो नान्योऽहं तस्मादित्यासीतेत्यर्थः। एवमासीनस्य यतेर्वशे हि यस्येन्द्रियाणि वर्तन्तेऽभ्यासबलात्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ६१ ॥

**भाष्यार्थ—तानि इति**—'तानि०' या श्लोकानें काय करावें तें सांगतात—**तानि सर्वाणि-संयम्य-संयमनं-वशीकरणं कृत्वा युक्तः-समाहितः सन् आसीत**—त्या सर्वांना संयमित करून म्ह० त्यांचें संयमन-वशीकरण करून युक्त म्ह०

समाहित-विक्षेपशून्य होऊन रहावें. ( तें कसें ? उत्तर- )—**मत्परः-अहं वासुदेवः-सर्वप्रत्यगात्मा परः यस्य सः मत्परः**—मी वासुदेव-सर्वांचा प्रत्यगात्मा-अन्तर्यामी ज्याला पर-आहे तो मत्पर, ( तर मग पर व अपर अशी भेददृष्टि ठेवावयास कांहीं हरकत नाहीं ! उत्तर-)—**अहं तस्मात् अन्यः न इति आसीत इत्यर्थः**—मी त्याहून अन्य नाहीं, असा निश्चय करून स्थिर रहावें, असा याचा भावार्थ.—**एवं आसीनस्य यस्य यतेः इंद्रियाणि वशे हि-अभ्यासबलात् तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता**—याप्रमाणें दृढ निश्चय करून राहणाऱ्या ज्या यतीचीं इंद्रियें त्याच्या अधीन अभ्यासबलात् असतात त्याची प्रज्ञा स्थिर झालेली आहे. [ म्हणून सर्व इंद्रियांचें वशीकरण-संयमन करून सर्व विक्षेपशून्य-शांत होऊन मी सर्वान्तर्यामी जो वासुदेव तत्पर होऊन तोच मी, त्याहून निराळा नव्हे, असा निश्चय करून रहावें. परमात्म्याहून मी अन्य नाही, असें दीर्घकाल निरंतर अनुसंधान ठेवल्यामुळें किंवा विषयांतील दोषांचें चिंतन करण्याचा अभ्यास केल्यामुळें ज्याचीं इंद्रियें वश झालेलीं असतात त्याची प्रज्ञा प्रतिष्ठित आहे, असें जाणावें. ] ६१

---

१ ५८-६१ या चार श्लोकांत-ज्याची इंद्रियें अधीन त्याची प्रज्ञा प्रतिष्ठित असते. म्ह० इंद्रियें स्वाधीन असणें हें स्थितप्रज्ञाचें लक्षण आहे, असे सांगितलें आहे. पण रहस्यकार त्यांतील ५९ व्या श्लोकांतून असा भावार्थ काढितात. 'ब्रह्माचा अनुभव घडल्यावर मन आणि त्याबरोबरच इंद्रियेंही आपोआप ताब्यात राहतात, इंद्रियें ताब्यांत राहण्याकरितां निराहारादि उपाय नकोत.' पण निराहारशब्दाचा उपोषण असा अर्थ जरी केला तरी 'इंद्रियें ताब्यांत राहण्याकरितां निराहारादि उपाय नकोत' हें त्यावरून कसें सिद्ध होतें. कारण 'तपो नानशनात् परं' अनशनाहून म्ह० उपोषणाहून श्रेष्ठ तप नाहीं, 'म्हणून तप हेच श्रेष्ठ साधन आहे,' इत्यादि श्रुतिवचनें असून कृच्छ्रचांद्रायणादि तपें प्रायः उपवासरूपच आहेत. गीतेंतही यज्ञ, दान, तप ही कर्में पावन करणारीं म्हणून सांगितली आहेत. त्यामुळें इंद्रियनिग्रहासाठीं धर्मशास्त्रादि सर्व शास्त्रांवरून सिद्ध होणारे उपवासादि उपाय नकोत असे म्हणणें योग्य नव्हे. 'ब्रह्माचा अनुभव आल्यावर मनासह इंद्रियें आपोआप ताब्यांत येतात' हें जरी खरें मानले तरी उपवासाइतका ब्रह्मानुभव सोपा नाहीं, तो लक्षावधि लोकांतील एखाद्यालाच येतो. तेव्हां बाकीच्या लोकांनीं काय करावे, त्यांनी इंद्रियांचा जय कसा करावा ? शिवाय ब्रह्मानुभव आला म्हणजे मन व इंद्रियें-ताब्यांत राहतातच असाही अबाधित नियम नाहीं. तसे जर असते तर मनूंनी 'बलवान् इंद्रियग्रामो विद्वांसमपि कर्षति' इंद्रियसमुदाय मोठा बलाढ्य आहे, तो विद्वानालाही विषयपरवश करतो, असे म्हटले नसतें. वास्तव निराहारशब्दाचा अर्थ 'उपवास' असा करून त्यावरून 'उपवासादि उपायच नकोत' असें म्हणणें अनुचित आहे. त्याचप्रमाणें योगाभ्यासासाठीं आहार-विहार-झोप-जागणे, इत्यादि सर्व परिमित पाहिजे, असें जें सहाव्या अध्यायांत सांगितलें आहे, त्याचाही येथील स्थितप्रज्ञलक्षणाशीं कांहीं संबंध नाहीं. येथें इंद्रियें स्वाधीन असणे हें स्थितप्रज्ञाचें लक्षण सांगण्याच्या प्रसंगानें 'निराहार मनुष्याचेही विषय निवृत्त होतात, पण ते विषयप्रीतीसह निवृत्त होत नाहींत. या स्थितप्र-

ज्ञाचे विषय प्रीतीसह–विषयासक्तीसह निवृत्त होतात,' असा अज्ञ व तज्ज्ञ यांच्यामधील विषयनिवृत्तींतील फरक दाखविला आहे. त्यावरून अस्थितप्रज्ञालाही चित्तशुद्धीकरितां उपवासादि उपाय नकोत, असें होत नाहीं. 'निराहार' या शब्दाचा अर्थ 'विषयांचें सेवन न करणारा' असा आचार्यांनीं केला आहे. रामानुजांनीं 'विषयेभ्यः प्रत्याहृत-इंद्रियस्य' विषयांपासून ज्यानें आपलीं इंद्रियें परतविलीं आहेत, असा केला आहे. मध्वाचार्य व वल्लभ स० टीकाकार यांनीं मात्र निराहार म्ह० उपवास–अन्नाचा अभाव असा अर्थ केला आहे. सर्व अद्वैती टीकाकार आचार्यांप्रमाणेंच अर्थ करितात. ज्ञानेश्वरमहाराजांनी 'जे श्रोत्रादि इतर इंद्रियांचा निग्रह करितात पण रसनेंद्रियाचा निग्रह करीत नाहींत त्यांना हजारों विषय कवटाळतात. एखाद्या वृक्षाची वरवर पालवी येईल तेवढी खुडावी पण त्याच्या मुळाशीं पाणी घालीत रहावें, अशानें त्याचा नाश कसा होणार? मुळाशीं घातलेल्या पाण्याच्या जोरावर तो वृक्ष आडव्या अंगानें जसा फोंफावतो त्याप्रमाणें विषय रसनेच्याद्वारा मनांत पोसतो. इतर इंद्रियांचें विषय सुटतील, पण रस हा विषय सोडतां येत नाहीं. कारण रसावांचून जिवंतच राहतां येत नाहीं. पण अर्जुना! जेव्हां हा साधक अनुभवाने ब्रह्मच होऊन जातो तेव्हां स्वभावतःच या रसाचेंही नियमन होतें. सोहंभाव प्रतीति प्रकट होतांच 'मी' शरीर हा भाव सुटतो व इंद्रियें विषयांना विसरतात,' असा अर्थ केला आहे. तो जवळ जवळ मध्वाचार्यांच्या भाष्यासारखा आहे. त्यांच्या भाष्याचा सारांश असा आहे. "आहार सोडल्यानें इंद्रियांतील विषयोपभोगाचें सामर्थ्य नाहींसें होतें, एवढेंच. किंवा आहार सोडल्यानें इतर विषयाविषयींची आकांक्षा नाहींशी होते. पण रस या विषयाविषयींची आकांक्षा व रसनेंद्रियांतील रस सेवन करण्याची शक्ति निवृत्त होत नाहीं. पण ती रसविषयक आकांक्षा व शक्तिहि अपरोक्ष ज्ञानानेंच निवृत्त होते,' इत्यादि. अर्थात् बाह्य इंद्रियाची शक्ति क्षीण होण्यासाठीं निराहार झाले पाहिजे व मनांतील राग–आसक्ति क्षीण होण्यासाठीं ब्रह्मसाक्षात्कारही झाला पाहिजे, असा अर्थ करितात. तथापि सर्व भाष्य व टीकाकारांचा आशय एकच आहे तो हा की, अज्ञ पुरुषांचे विषय जरी निवृत्त झाले तरी ते विषयवासनेसह निवृत्त होत नाहीत, ज्ञानी पुरुषाचे वासनेसह निवृत्त होतात. पण त्यावरून 'इंद्रियांना जिंकण्यासाठीं उपवासादि उपाय नकोत,' असें रहस्यकारांवांचून कोणीच ठरवीत नाहीत. रहस्यकार रस म्ह० गोडी असें म्हणतात. पण तें बरोबर नाहीं. कारण अज्ञ मनुष्याच्या मनांत अनाहारदशेमध्यें विषयाचा रस म्ह० सूक्ष्म प्रीति–वासनाच संभवते. प्रत्यक्ष इच्छा संभवत नाहीं. कारण रहस्यकारांच्या म्हणण्याप्रमाणे ज्यानें आहार टाकला आहे त्याच्या मनांत त्या वेळा विषयोपभोगाची इच्छा संभवत नाहीं. सूक्ष्म संस्कार–वासना संभवते व तीच पुढें आहार वगैरे केल्यावर विषयाभिलाषरूपानें प्रकट होते. म्हणूनच आचार्यांनी 'रसः रागः...रंजनरूपः सूक्ष्मः' असें म्हटलें आहे. रस म्ह० राग–आसक्ति, प्रीति–सूक्ष्म वासना असाच अर्थ मध्वाचार्यादि सर्व भाष्य व टीकाकार करितात. तस्मात् 'शरीर कृश करणारीं निराहारादि साधनें एकांगी अतएव त्याज्य ठरवून माफक आहार-विहार व ब्रह्मज्ञान हेंच इंद्रियनिग्रहाचें उत्तम साधन होय, असा गीतेचा सिद्धांत आहे,' इत्यादि गीतारहस्यकारांचें जें म्हणणें आहे तें मूळाला व प्रकरणालाही सोडून आहे. उपवासादि तप गीतेला जर संमत नसतें, तें जर त्याज्य असते तर गीतेनेंच 'द्रव्ययज्ञाः तपोयज्ञाः' अ.

४ श्लो. २८ इत्यादि म्हटलें नसतें. तसेंच ब्रह्मज्ञान हेंच जर इंद्रियनिग्रहाचें उत्तम साधन आहे, तर गीतेनेंच ‘ तस्मात्त्वं इंद्रियाण्यादौ नियम्य भरतर्षभ, पाप्मानं प्रजहिह्येनं ज्ञान-विज्ञाननाशनं ’ ३.४१ या श्लोकांत अगोदर इंद्रियांचें नियमन करून ज्ञान व विज्ञान यांचा नाश करणाऱ्या पापी कामाला सोड, असें अर्जुनाला सांगितलें नसतें. इंद्रियांचा निग्रह अब्रह्मज्ञ ब्रह्मचारी व यति, यांनाही विहित आहे. ब्रह्मज्ञानाच्या साधनांत त्याची गणना केली आहे. त्यामुळें ‘ ब्रह्मज्ञान हेंच त्याचें उत्तम साधन ’ होऊं शकत नाही. गीता असा वेडगळ सिद्धान्त कधी करणार नाहीं. पण रहस्यकारांनीं असे अनेक सिद्धान्त त्या बिचारीच्या गळ्यांत बांधले आहेत.

रहस्यांत पूर्वोत्तरविरोधाची तर गणनाच करवत नाहीं. एका पानांतही पूर्वोत्तर-विरोध आढळतो. उदाहरणार्थ–६३७ पानांत एकदा ‘ ब्रह्माचा अनुभव घडल्यावर मन व इंद्रियें आपोआप ताब्यांत राहतात, त्यासाठीं निराहारादि उपाय नकोत. ’...‘निराहारादि साधनें...ब्रह्मज्ञान हेंच इंद्रियनिग्रहाचें उत्तम साधन’...‘ ब्रह्मसाक्षात्काराखेरीज पुरा इंद्रिय-निग्रह होणें शक्य नाही,’ असें म्हणतात. पण पुनः त्याच पानांत ‘ माफक आहारानें इंद्रियनिग्रह करून त्याबरोबरच ब्रह्मज्ञानप्राप्तीसाठीं मत्परायण म्ह० ईश्वराच्या ठिकाणीं चित्त ठेवून रहावें ’ असें म्हणतात. ब्रह्मज्ञान हाच इंद्रियनिग्रहाचा जर उत्तम उपाय तर इंद्रियनिग्रह करून मग ब्रह्मज्ञानप्राप्तीसाठीं मत्परायण कसे व्हावयाचें ? पण ही अशी भरसोड होण्याचें कारण एवढेंच कीं, ५९ व्या श्लोकाचा अर्थ त्यांनीं बरोबर केला नाहीं. तो मूळाला धरून म्ह० ‘ विषयग्रहण न करणाऱ्या अज्ञाचे विषय निवृत्त होतात, पण ते विषयवासनेसह निवृत्त होत नाहीत. आणि परब्रह्माच्या साक्षात्काराने या स्थितप्रज्ञाची विषयवासनाही निवृत्त होते ’ असा सरळ केला असता तर इतकी भानगड करावयास नको होती.

६१ व्या श्लोकावरील टीपेंत ‘ माफक आहारानें, आहारविहार माफक ठेवून ’ इत्यादि जें म्हटलें आहे त्याला मुळांत कांहीं आधार नाही. “ मत्परायण या पदानें भक्तिमार्गाचेंही यांत ‘ सूत उवाच ’ झालें आहे. ” पण मुळांत ‘ मत्परः ’ असा शब्द आहे. ‘मत्परायण’ असा शब्द नाही. पण रहस्यकारांनी ‘ मत्परः ’ याचा ‘ मत्परायण ’ असा अर्थ केला आहे व त्याचें नवव्या अध्यायांतील ‘ मत्परायणः ’ श्लोक ३४ या शब्दाशीं सादृश्य आहे, असें पाहतांच यांत भक्तिमार्गाचें ‘ सूत उवाच ’ आहे असे निःशंकपणें म्हटलें आहे. पण ‘ मत्परः ’ याचा अर्थ मत्परायण असा होत नाहीं. आचार्य ‘ अहं वासुदेवः परः यस्य स मत्परः न अन्यः अहं तस्मात् ’ असा याचा अर्थ करितात. मध्वाचार्य ‘ अहं एव परः सर्वस्मात् उत्कृष्टः यस्य स मत्परः ’ असा करितात. इतर सर्व अद्वैती टीकाकारही असाच करितात. ज्ञानेश्वरमहाराज–‘ जो आत्मबोध युक्त । होऊनी असे सतत । जो मातें हृदया आंत । विसंबेना ॥ ’ असें ‘ युक्त आसीत मत्परः ’ याचें व्याख्यान करितात. म्हणजे ‘ मत्परः ’ याचा मत्परायण असा कोणीच अर्थ करीत नाहींत. पण आम्ही असें म्हणतों कीं ‘ मत्परः ’ याचा ‘ मत्परायण ’ असा अर्थ जरी केला तरी त्यांत असें काय मोठें गूढ तत्त्व आहे कीं त्यावरून हा भक्तिमार्गाचाच आरंभ मानणें भाग आहे. भक्तिमार्गाखेरीज ईश्वरपरायणता संभवतच नाहीं कीं काय ! शिवाय भक्तिमार्ग हा कांहीं पूर्वोक्त द्विविध

**ध्यायतो विषयान्पुंसः सङ्गस्तेषूपजायते ।**
**सङ्गात्संजायते कामः कामात्क्रोधोऽभिजायते ॥ ६२ ॥**
**क्रोधाद्भवति संमोहः संमोहात्स्मृतिविभ्रमः ।**
**स्मृतिभ्रंशाद्बुद्धिनाशो बुद्धिनाशात्प्रणश्यति ॥ ६३ ॥**

**अन्वयार्थ—विषयान् ध्यायतः पुंसः**—विषयांचें ध्यान-चिंतन करणाऱ्या पुरुषाचा—**तेषु**—त्या विषयांचे ठिकाणीं—**सङ्गः**—प्रीति-आसक्ति—**उपजायते**—उत्पन्न होते.—**सङ्गात्**—आसक्तीमुळें—**कामः**—विषयाविषयींची इच्छा—**सञ्जायते**—उत्पन्न होते.—**कामात्**—विषयेच्छेपासून—**क्रोधः**—क्रोध—**अभिजायते**—उत्पन्न होतो—**क्रोधात्**—क्रोधापासून—**सम्मोहः**—अविवेक—**भवति**—होतो—**सम्मोहात्**—कार्य व अकार्य यांच्या अविवेकापासून—**स्मृतिविभ्रमः**—स्मृतिभ्रंश

---

वैदिक धर्माला सोडून अगदीं विलक्षण मार्ग नाहीं. त्यातील निवृत्तिमार्गाचेंच उपासना हें अंग आहे. यास्तव संन्यासमार्ग, कर्मयोगमार्ग व कर्मयोगशास्त्र, भक्तिमार्ग इत्यादि मार्गांची वैदिकसंप्रदायाला सोडून पृथक्पणे गणना करणें, हा अन्याय आहे. हे सर्व एकाच वैदिक धर्माचे अधिकारपरत्वे भाग आहेत.

६१ व्याच श्लोकांत ‘ युक्तः ’ असा जो शब्द आहे, त्याचा अर्थ रहस्यकार ‘ योगानें तयार झालेला किंवा बनलेला ’ असा करितात. व अ. ६ श्लो. १७ येथील “ युक्त-शब्दाचा अर्थ ‘ माफक ’ असा जरी असला तरी गीतेतील या शब्दाचा नेहमींचा अर्थ— “ साम्यबुद्धीचा जो योग गीतेत सांगितला आहे त्याचा उपयोग करून त्याप्रमाणें सर्व सुखदुःखें शांतपणे सोसून वागण्यास तरबेज झालेला गृहस्थ ” असा आहे ( गी. ५. २३ ) अशा तरबेज गृहस्थासच ‘ स्थितप्रज्ञ ’ हे नाव असून त्याची जी अवस्था तीच सिद्धावस्था होय. ” पृ. ६३८. पण ‘ युक्तः ’ या शब्दाचा हा अर्थ बरोबर नाहीं. कारण ‘ युक्तः ’ म्ह० समाहित-शांतचित्त हा सरळ, साधा, व सुबोध अर्थ सोडून पाचव्या अध्यायांतील तेविसाव्या श्लोकांतील युक्तशब्दापर्यंत जाण्याची कांहीं गरज नाहीं. कारण तेथील किंवा इतर अनेक ठिकाणी आलेल्या युक्तशब्दाचा ‘ समाहित ’ हाच अर्थ आहे. कारण आचार्यांप्रमाणेंच इतर भाष्यकार व टीकाकारही ‘ मयि मनोयोगयुक्तः ’ ( मध्वा. ) ‘ मयि मनोऽवस्थाप्य समाहितः ’ ( रामा. ) ‘ मयि युक्तः ’ ( व. सं. टी. ) ‘ युक्तः समाहितः निगृहीतमनाः ’ ( मधुसू. ) इत्यादि म्हणतात. यास्तव ‘ साम्यबुद्धीच्या योगाचा आश्रय करून. ’ इत्यादि जो अप्रासंगिक अर्थ विनाकारण केला आहे किंवा ‘ योगानें तयार झालेला, बनलेला ’ असा जो कांहीं तरी अर्थ केला आहे तो व्यर्थ आहे. युक्ताचें लक्षण पांचव्या अध्यायाच्या तेविसाव्या श्लोकांतच सांगितलें आहे, असें नाहीं. तर सहाव्या अध्यायाच्या आठव्या श्लोकात, अठराव्या श्लोकांत; वगैरेही युक्ताचें लक्षण सांगितलें आहे. पण लक्षण हा केव्हांही अर्थ होऊं शकत नाहीं. नाहींतर स्थितप्रज्ञाचीं लक्षणें हा सुद्धां स्थितप्रज्ञशब्दाचा अर्थच होऊं लागेल !

होतो. शास्त्रादिकांच्या उपदेशाची आठवण नाहींशी होते.—**स्मृतिभ्रंशात्**—आठवणच नाहींशी झाल्यामुळे—**बुद्धिनाशः**—बुद्धीचा नाश होतो व—**बुद्धिनाशात्**—बुद्धीचा नाश झाल्यामुळें—**प्रणश्यति**—पुरुष नाश पावतो. तो पुरुषार्थाला योग्य होत नाही.

**अथेदानीं पराभविष्यतः सर्वानर्थमूलमिदमुच्यते—ध्यायत इति । ध्यायतश्चिन्तयतो विषयाञ्शब्दादिविषयविशेषानालोचयतः पुंसः पुरुषस्य सङ्ग आसक्तिः प्रीतिस्तेषु विषयेषूपजायते। सङ्गात्प्रीतेः संजायते समुत्पद्यते कामस्तृष्णा। कामात्कुतश्चित्प्रतिहता-त्क्रोधोऽभिजायते ॥ ६२ ॥**

**भाष्यार्थ—अथ**—पुरुषार्थांच्या उपायाचा उपदेश केल्यावर—**इदानीं**—तन्निष्ठ न झालेल्या अवस्थेंत—**पराभविष्यतः**—विवेकविज्ञानहीन असल्यामुळें मोठ्या अनर्थास प्राप्त होणाऱ्या पुरुषाच्या—**इदं सर्वानर्थमूलं**—सर्व अनर्थांचें हे मूळ—**'ध्यायतः' इति उच्यते**—'ध्यायतः०'या श्लोकानें सांगितलें जातें,—**ध्यायतः-चिन्तयतः विषयान् शब्दादिविषयविशेषान् आलोचयतः पुंसः-पुरुषस्य**—ध्यान-चिन्तन करणाऱ्या-विषयांचें-शब्दादिविषयांच्या प्रकारांचें-हा चांगला आहे,हा फार.सुंदर आहे असें आलोचन करणाऱ्या पुरुषाचा—**तेषु विषयेषु संगः-आसक्तिः-प्रीतिः उपजायते**—त्या विषयाविषयी संग-आसक्ति-साधारण प्रीति उत्पन्न होते.—**संगात्-प्रीतेः कामः-तृष्णा संजायते-समुत्पद्यते**—संगापासून म्ह० सामान्य प्रीतीपासून काम-तृष्णा उत्पन्न होते.—**कामात्-कुतश्चित् प्रतिहतात् क्रोधः अभिजायते**—प्रतिबंधानें किंवा नाशानें प्रतिहत झालेल्या कामापासून क्रोध उद्भवतो. ६२.

**क्रोधाद्भवति संमोहोऽविवेकः कार्याकार्यविषयः। क्रुद्धो हि संमूढः सन्गुरुमप्याक्रोशति। संमोहात्स्मृतिविभ्रमः शास्त्राचार्योपदेशाहितसंस्कारजनितायाः स्मृतेः स्याद्विभ्रमो भ्रंशः स्मृत्युत्पत्तिनिमित्तप्राप्तावनुत्पत्तिः। ततः स्मृतिभ्रंशाद्बुद्धेर्नाशः। कार्याकार्यविषयविवेकायोग्यताऽन्तःकरणस्य बुद्धेर्नाशः उच्यते। बुद्धिनाशात्प्रणश्यति। तावदेव हि पुरुषो यावदन्तःकरणं तदीयं कार्याकार्यविषयविवेकयोग्यं तदयोग्यत्वे नष्ट एव पुरुषो भवत्यतस्तस्यान्तःकरणस्य बुद्धेर्नाशात्प्रणश्यति पुरुषार्थायोग्यो भवतीत्यर्थः ॥**

**भाष्यार्थ—क्रोधात् संमोहः-कार्याकार्यविषयः अविवेकः भवति**—क्रोधापासून संमोह म्हणजे कार्य व अकार्य यांविषयींचा अविवेक होतो. (हीच गोष्ट अनुभवानें दृढ करितात-)—**क्रुद्धः हि संमूढः सन् गुरुं अपि आक्रोशति**—रागावलेला पुरुष संमूढ म्ह० विवेकशून्य होऊन पूज्य गुरूचाही अधिक्षेप-धिक्कार करतो. **संमोहात् स्मृतिविभ्रमः-शास्त्राचार्योपदेशाहितसंस्कारजनितायाः स्मृतेः विभ्रमः-भ्रंशः स्यात्**—संमोहापासून स्मृतिविभ्रम होतो.शास्त्र व आचार्य यांच्या उपदेशापासून अन्तःकरणावर झालेले जे संस्कार त्यांपासून झालेल्या स्मृतीचा विभ्रम म्ह० भ्रंश होतो. (अहो पण स्मृति स्वभावतः क्षणिक असल्यामुळें तिचा नाश आपोआपच होईल, त्याला संमोहच कशाला पाहिजे? उत्तर-)—**स्मृत्युत्पत्तिनिमित्त-**

**प्राप्तौ अनुत्पत्तिः**—स्मृतीच्या उत्पत्तीचें-स्मरण होण्याचें निमित्त प्राप्त झालें असतां ती उत्पन्न न होणें, हाच स्मृतिभ्रंश आहे. ( वस्तुतः ज्यावेळीं शास्त्र, आचार्य यांच्या उपदेशाचें स्मरण व्हावयास पाहिजे त्यावेळी तें होत नाही, असा याचा भावार्थ. )—**ततः स्मृतिभ्रंशात् बुद्धिनाशः**—त्या स्मृतिभ्रंशापासून बुद्धीचा नाश होतो. (अहो पण स्मृतिभ्रंश जरी झाला तरी त्यामुळे बुद्धीचा स्वरूपतःच नाश कसा होईल? उत्तर–) —**अन्तःकरणस्य कार्याकार्यविषयविवेक-अयोग्यता बुद्धेर्नाशः उच्यते** —अन्तःकरणाची कार्य व अकार्य यांविषयींच्या विवेकाची अयोग्यता म्ह० हे कार्य आहे व हे अकार्य आहे, असा विवेक करण्याची पात्रता अन्तःकरणामध्ये न राहणे हाच बुद्धीचा नाश असे म्हटले जाते. ( संमोहामुळे अशा प्रकारचा नाश होऊं शकतो.)—**बुद्धिनाशात् प्रणश्यति**—आणि बुद्धिनाशामुळे अज्ञानी मनुष्य अत्यंत नाश पावतो. ( अहो पण बुद्धीचा तसा नाश जरी झाला तरी नित्य सिद्ध पुरुषाचा नाश कसा होईल? उत्तर–)—**यावत् तदीयं अन्तःकरणं कार्याकार्यविवेकयोग्यं**—जोवर त्याचें अन्तःकरण कार्य व अकार्य याचा विवेक करण्यास योग्य असते—**तावद् एव हि पुरुषः**—तोवरच पुरुष आहे.—**तदयोग्यत्वे पुरुषः नष्टः एव भवति**—अन्तःकरण विवेक करण्यास असमर्थ झाले असता पुरुष जणुंकाय नष्टच होतो.—**अतः तस्य अन्तःकरणस्य-बुद्धेः नाशात् प्रणश्यति-पुरुषार्थायोग्यो भवति इत्यर्थः** —यास्तव त्याच्या अन्तःकरणाचा–बुद्धीचा नाश झाल्यामुळे तो नाश पावतो. म्हणजे तो पुरुषार्थाला अयोग्य होतो, असा याचा भावार्थ. ६३

**रागद्वेषवियुक्तैस्तु विषयानिन्द्रियैश्चरन् ।**
**आत्मवश्यैर्विधेयात्मा प्रसादमधिगच्छति ॥६४॥**

**अन्वयार्थ—तु**—परंतु—**रागद्वेषवियुक्तैः**—राग-द्वेषरहित—**आत्मवश्यैः**—व आपल्या वश असलेल्या—**इन्द्रियैः**—इंद्रियांनी—**विषयान्**—विषयाचा—**चरन्** —अनुभव घेणारा—**विधेयात्मा**—ज्याच्या इच्छेप्रमाणे चालणारे अन्तःकरण असते असा—**प्रसादं**—चित्ताच्या स्वास्थ्यास—**अधिगच्छति**—प्राप्त होतो. ६४.

**सर्वानर्थस्य मूलमुक्तं विषयाभिध्यानमथेदानीं मोक्षकारणमिदमुच्यते रागद्वेषेति । रागद्वेषवियुक्तैः रागश्च द्वेषश्च रागद्वेषौ । तत्पुरःसरा हीन्द्रियाणां प्रवृत्तिः स्वाभाविकी ।**

---

१ रहस्यकार ६२ व्या श्लोकातील ‘ सग ’ शब्दाचा अर्थ ‘ सलगी ’ व ‘ उपजायते ’ याचा ‘ वाढत जाते ’ असा करितात. तो बरोबर नाही. कारण सग म्ह. आसक्ति, प्रीति, व उपजायते म्ह० उत्पन्न होते. ‘सांप्रदायिक भाष्यकार व टीकाकार सरळ अर्थ करीत नाहीत, अर्थाची ओढाताण करितात, सांप्रदायिक आग्रहानें करितात’ असा, शंकराचार्यांपर्यंत सर्वांना एका मापाने मोजून रहस्यकार वारवार दोष देण्याचा प्रयत्न करितात म्हणून त्यांचा अर्थ किती सरळ आहे तें वाचकाना कळावें, यासाठी आम्हीं असली उदाहरणे देत आहों.

**तत्र यो मुमुक्षुर्भवति स ताभ्यां वियुक्तैः श्रोत्रादिभिरिन्द्रियैर्विषयानवर्जनीयांश्चरन्नुपलभमान आत्मवश्यैरात्मनो वश्यानि वशीभूतानि तैरात्मवश्यैर्विधेयात्मेच्छातो विधेय आत्माऽन्तःकरणं यस्य सोऽयं प्रसादमधिगच्छति । प्रसादः प्रसन्नता स्वास्थ्यम् ॥ ६४ ॥**

**भाष्यार्थ**—( अहो पण विषयांचें स्मरणही जर अनर्थाचें कारण आहे तर त्यांचा भोग अनर्थाचें कारण अवश्य असणारच ! मग जीवनासाठीं विषयांचा भोग घेणारा अनर्थाला कसा प्राप्त होत नाहीं ? उत्तर-)—**विषयाभिध्यानं सर्वानर्थस्य मूलं उक्तं**—विषयांचें चिन्तन सर्व अनर्थाचें मूळ आहे, असे सांगितलें.—**अथ इदानीं**—तें सांगितल्यावर आतां—**'रागद्वेष०-' इति मोक्षकारणं इदं उच्यते**—'रागद्वेष०' या श्लोकानें मोक्षाचें कारण हे असें सांगितलें जातें—**रागद्वेषवियुक्तैः-रागः च द्वेषः च रागद्वेषौ**—राग व द्वेष, त्यांनीं रहित ( अशा इंद्रियांनीं )—**तत्पुरःसरा हि इंद्रियाणां प्रवृत्तिः स्वाभाविकी**—रागद्वेषपूर्वकच इंद्रियांची प्रवृत्ति स्वाभाविक होते. [ इन्द्रियें स्वभावतःच राग-द्वेषामुळें प्रवृत्त होतात, हे प्रसिद्ध आहे. ]—**तत्र यः मुमुक्षुः भवति**—अधिकारी मनुष्यांत जो मुमुक्षु असतो—**सः ताभ्यां वियुक्तैः श्रोत्रादिभिः इन्द्रियैः**—तो रागद्वेषांनीं रहित अशा श्रोत्रादि इंद्रियांनीं—**अवर्जनीयान् विषयान् चरन्-उपलभमानः**—ज्यांना वर्ज करितां येत नाहीं, अशा विषयांचा ( देहाच्या स्थितीला कारण होणाऱ्या अन्न-पानादिकांचा ) अनुभव घेणारा ( इंद्रियांचेंच आणखी एक विशेषण )—**आत्मवश्यैः आत्मनः वश्यानि-वशीभूतानि तैः आत्मवश्यैः**—जीं आपल्या वश्य-अधीन असलेलीं तीं आत्मवश्य-तशा स्वाधीन इंद्रियांनीं अवश्य तेवढ्याच विषयांचा उपभोग घेणारा—**विधेयात्मा-इच्छातः विधेयः आत्मा-अन्तःकरणं यस्य सः अयं**—इच्छेप्रमाणें ज्याचे अन्तःकरण वागत असतें तो विधेयात्मा, तो हा मुमुक्षु—**प्रसादं अधिगच्छति**—प्रसन्नतेला प्राप्त होतो.—**प्रसादः-प्रसन्नता-स्वास्थ्यम्**—प्रसाद म्हणजे प्रसन्नता, चित्ताचा स्वस्थपणा, चित्तस्वास्थ्य [ कर्म व ज्ञान यांचे जे अधिकारी असतात त्यांतील मुमुक्षु, रागद्वेषरहित व स्वाधीन ठेवलेल्या इंद्रियांनीं, अन्तःकरणालाहि आपल्या इच्छेच्या अधीन ठेवून —अन्तःकरणासहि आपल्या इच्छेच्या विरुद्ध वागूं न देतां, शरीर जिवंत राहण्यास अगदीं अवश्य एवढ्याच विषयांचा उपभोग घेतो. त्यामुळें त्याच्या चित्ताला स्वास्थ्य मिळतें. इंद्रियें व अन्तःकरण या दोघांनाहि आपल्या स्वाधीन ठेवल्यामुळें त्यांची प्रवृत्ति अनियमानें होऊं शकत नाही, तर ती नियमानेच होते. त्यामुळें त्याचें चित्त अत्यंत निर्मळ, स्वस्थ, प्रसन्न होतें. ] ६४

---

१ रहस्यकार ' विषयान् चरन्- ' ' विषयांमध्ये वागूनही, ' ' प्रसाद अधिगच्छति- ' 'चित्तानें प्रसन्न असतो,' असा अर्थ करितात. पण तो मूळ अक्षरांना सोडून आहे व अनुभवाच्याही विरुद्ध आहे. कारण ' ज्यांना वर्ज करितां येतच नाहीं अशा अन्नपानादि विषयाचा उपभोग घेणारा प्रसन्नतेला-चित्ताच्या स्वास्थ्याला प्राप्त होतो ' हा त्या शब्दाचा सरळ व सुबोध अर्थ आहे. त्याचप्रमाणे 'सर्व विषयांत वागणारा चित्ताने प्रसन्न असतो' असा

**प्रसादे सर्वदुःखानां हानिरस्योपजायते ।**
**प्रसन्नचेतसो ह्याशु बुद्धिः पर्यवतिष्ठते ॥ ६५ ॥**

**अन्वयार्थ—प्रसादे**—चित्तप्रसाद झाला असतां-चित्त स्वस्थ झालें असतां,—**अस्य**—याच्या—**सर्वदुःखानां**—सर्व-आध्यात्मिकादि त्रिविध दुःखांची—**हानिः**—हानि-नाश—**उपजायते**—होतो व—**हि**—ज्या अर्थी—**प्रसन्नचेतसः**—ज्याचें चित्त प्रसन्न झालें आहे त्याची—**बुद्धिः**—चित्त-मन—**आशु**—सत्वर—**पर्यवतिष्ठते**—सर्व बाजूंनी स्थिर होते त्याअर्थी रागद्वेषरहित इंद्रियांनी अनिषिद्ध व अगदी अवश्य तितक्याच विषयांचा अनुभव घ्यावा. ६५.

**प्रसादे सति किं स्यादित्युच्यते— प्रसाद इति । प्रसादे सर्वदुःखानामाध्यात्मिकादीनां हानिर्विनाशोऽस्य यतेरुपजायते । किंच प्रसन्नचेतसः स्वस्थान्तःकरणस्य हि यस्मादाशु शीघ्रं बुद्धिः पर्यवतिष्ठत आकाशमिव परि-समन्तादवतिष्ठत आत्मस्वरूपेणैव निश्चली भवतीत्यर्थः । एवं प्रसन्नचेतसोऽवस्थितबुद्धेः कृतकृत्यता यतस्तस्माद्रागद्वेषवियुक्तैरिन्द्रियैः शास्त्राविरुद्धेष्ववर्जनीयेषु युक्तः समाचरेदिति वाक्यार्थः ॥ ६५ ॥**

**भाष्यार्थ—प्रसादे सति किं स्यात् इति 'प्रसादे०' इति उच्यते**—आणि चित्तस्वास्थ्य प्राप्त झालें असतां काय होते, ते 'प्रसादे०' या श्लोकानें सांगतात—**प्रसादे अस्य-यतेः सर्वदुःखानां-आध्यात्मिकादीनां हानिः-विनाशः उपजायते**—चित्ताला स्वास्थ्य प्राप्त झाले असतां या यतीच्या आध्यात्मिकादि सर्वदुःखांची हानि-विनाश होतो. [ अर्थात् अनेक प्रकारच्या दुःखांनी व्याकुळ होणाऱ्या चित्ताला स्वस्थता जरी प्राप्त झाली तरी ती टिकणें शक्य नाहीं, ही शंका उरत नाही. कारण चित्तप्रसादानें सर्व दुःखांचा नाश होतो व चित्ताचें स्वास्थ्य कायम राहतें. 'अहो पण सर्व दुःखांची हानि झाल्यामुळें चित्त जरी स्वस्थ झालें तरी प्रज्ञास्थैर्य कसे होणार?' अशी शंका कोणी घेईल, म्हणून या श्लोकाच्या उत्तरार्धांत बुद्धिप्रसादाचेंच दुसरे फळ सांगून तिचें समाधान केलें आहे- ]—**किं च**—आणि तसेंच,—**प्रसन्नचेतसः-स्वस्थान्तःकरणस्य बुद्धिः हि-यस्मात् आशु-शीघ्रं पर्यवतिष्ठते-आकाशं-**

---

कोणाचाही अनुभव नाही. चित्ताचा प्रसाद-स्वास्थ्य व वर्जनीय-टाळता येण्याजोग्याही विषयांत वागणें परस्पर विरुद्ध आहे. शिवाय जो स्थितप्रज्ञ झाला तो अनावश्यक विषयांमध्यें वागेल ही नुस्ती कल्पना आहे. सर्व कामत्याग करून आत्म्यामध्यें आत्म्याच्या योगानें संतुष्ट राहणारा बाह्य विषयांत वागेल, त्यांचा अनुभव घेईल हें शक्य नाही. तशी कल्पना करणें म्हणजे स्थितप्रज्ञ किंवा स्थितप्रज्ञ होण्याची इच्छा करणारा मुमुक्षु यांची मनःस्थिति न ओळखणेंच होय. त्यापेक्षां ' चित्ताला आपल्या इच्छेप्रमाणें वागावयास लावणारा स्थितप्रज्ञ किंवा मुमुक्षु स्वाधीन ठेविलेल्या व रागद्वेषरहित इंद्रियांनी अवश्य तितक्याच विषयांचा उपभोग घेणारा असा होतसाता चित्तस्वास्थ्यास प्राप्त होतो.' हें म्हणणें सर्वथा संभवनीय व युक्त आहे.

**इव परि-समन्तात् अवतिष्ठते**—ज्याचें चित्त प्रसन्न आहे-अन्तःकरण स्वस्थ आहे त्याची बुद्धि ज्याअर्थी अगदी शीघ्र आकाशाप्रमाणें सर्व बाजूंनीं अवस्थित होते. म्ह०—**आत्मरूपेण एव निश्चली भवति इत्यर्थः**—आत्मरूपानेंच ती निश्चल होते, असा याचा भावार्थ. ( त्याअर्थी बुद्धिप्रसादासाठी प्रयत्न करावा. याप्रमाणें दोन श्लोकांचा अक्षरार्थ सांगून आचार्य तात्पर्यार्थाचा उपसंहार करितात-)—**यतः एवं प्रसन्नचेतसः अवस्थितबुद्धेः कृतकृत्यता**—ज्याअर्थी याप्रमाणें प्रसन्नचित्त व स्थिरबुद्धि मुमुक्षूला कृतकृत्यता प्राप्त होत असते—**तस्मात् रागद्वेषवियुक्तैः इन्द्रियैः शास्त्राविरुद्धेषु अवर्जनीयेषु युक्तः समाचरेत् इति वाक्यार्थः**—त्याअर्थी राग-द्वेषशून्य इंद्रियांनी शास्त्राच्या विरुद्ध नसलेल्या व अत्यंत अवश्य-वर्ज करितां न येण्याजोग्या विषयांचे समाहित मनानें म्ह० मनाला विषयपरतंत्र न होऊं देतां सेवन करावें, असा या वाक्याचा तात्पर्यार्थ आहे. [ चित्त प्रसन्न झाले कीं लागलीच बुद्धि स्थिर होते. ती आत्मरूपानें निश्चल बनते. त्यामुळे प्रसन्नचित्त व स्थिरबुद्धि मुमुक्षु कृतकृत्य होतो. म्हणून मनाला विषयांमध्ये आसक्त न करितां रागद्वेषरहित इंद्रियांनी विहित व अवश्य तेवढ्याच विषयांचे सेवन करावे. निषिद्ध व अनावश्यक विषयांचें सेवन कधींही करूं नये, असा या दोन श्लोकांचा सारांश आहे. ] ६५.

---

१ रहस्यकार या श्लोकाच्या दुसऱ्या अर्धाचा अर्थ–'कारण ज्याचे चित्त प्रसन्न त्याची बुद्धिही तत्काल स्थिर होते.' असा करितात. पण त्यांत बुद्धि स्थिर कोठे होते, ते सांगत नाहीत. कारण ती कोणत्या तरी आलंबनातच स्थिर होते. तिला स्थिर होण्यास कांहीं तरी आधार पाहिजे. म्हणूनच आचार्यांनी व इतर अद्वैती टीकाकारांनी ती आत्मरूप होते, असे म्हणून आत्मा हे तिचे आलंबन सांगितले आहे. मध्वा०–बुद्धि ब्रह्मानुभवानें उत्तमप्रकारें स्थित होते' रामा०–व०सं० टी०–'बुद्धि माझ्या ठिकाणी स्थिर होते' असे म्हणतात. ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात" तैसें हृदय प्रसन्न होये, तरी दुःख कैंचे के आहे। तेथ आपैसी बुद्धि राहे। परमात्मस्वरूपी ॥ ३४० ॥" असो रहस्यकार टीपेत म्हणतात—" या दोन श्लोकांत विषय अगर कर्में न सोडतां फक्त त्यामधला संग सोडून स्थितप्रज्ञ विषयांतच निःसंगबुद्धीने वागत असतो, व त्याला जी शांति मिळते ती कर्मत्यागामुळे नसून फलाशेच्या त्यागाने प्राप्त होते, असे स्पष्ट वर्णन आहे." पण येथे 'कर्मे' किंवा 'कर्मांचा संग' हे शब्द नाहीत. 'कर्मत्याग करू नये, फलाशेचा त्याग करावा' असेही येथें म्हटलेले नाहीं. तथापि तसे 'स्पष्ट वर्णन आहे' असें रहस्यकार म्हणतातच आहेत. परंतु हे आपले व्याख्यान ५९ व्या श्लोकावरील व्याख्यानाच्या विरुद्ध आहे, हे त्याच्या ध्यानीं-मनींही नाहीं. कारण ५९ श्लोकाच्या व्याख्यानांत रहस्यकार म्हणतात—'परब्रह्माचा अनुभव आल्यावर सर्व विषय व त्यांतील गोडीसुद्धा म्ह० विषय व त्यातील गोडी ही दोन्ही सुटतात.' व येथें 'विषय अगर कर्में न सोडतां त्यांतला संग सोडून स्थितप्रज्ञ विषयांतच निःसंगबुद्धीनें वागतो' असे म्हणतात. तेव्हा त्यांतील खरें काय? असो; रहस्यकार पुनः म्हणतात-'हा स्थितप्रज्ञ व संन्यासमार्गांतील स्थितप्रज्ञ यांत कांहीं भेद नाहीं. इंद्रियसंयमन, निरिच्छपणा व शांति हे गुण दोघांसही पाहिजेत, पण गीतेंतील स्थितप्रज्ञ कर्मांचा संन्यास न करितां लो-

कसंग्रहार्थ सर्व कर्मे निष्कामबुद्धीनें करीत असतो आणि दुसरा करीत नाहीं, हा या दो-होंत महत्त्वाचा भेद आहे. (गी. ३-२५ पहा )' ३३९. पण गीतेतील स्थितप्रज्ञ निराळा व संन्यासमार्गातील स्थितप्रज्ञ निराळा, याला प्रमाण काय ? रहस्यकारांच्या केवळ कल्पने-वांचून त्याला दुसरा कांहीं आधार नाहीं. 'स्थितप्रज्ञ' हें नांवच गीतेवांचून दुसऱ्या कोठें आढळत नाहीं.सन्यासमार्ग अद्वैतवेदान्ताहून भिन्न आहे,यालाही कांहीं आधार नाहीं. गीता, उपनिषदें व ब्रह्मसूत्रे हेच अद्वैतवेदान्तसप्रदायाचे मुख्य आधार ग्रंथ आहेत. बाकीचीं सर्व त्यांचीं प्रकरणें आहेत. पण रहस्यकार अद्वैतवेदान्ताहून सन्यासमार्ग निराळा समजतात, हा मोठाच प्रमाद आहे. अद्वैतवेदान्ताला तर सोडवत नाहीं, संन्यासमार्ग तर कबूल करवत नाहीं, असा पेच पडल्यामुळें रहस्यांत वारवार धरसोड, पूर्वोत्तरविरोध, संन्यासमार्गाचा द्वेष, अर्थाची ओढाताण व असंबद्धता हे दोष बाहुल्याने आढळतात. पण रहस्यकार संन्यासमार्ग म्हणून ज्याला म्हणतात तो अद्वैतसंप्रदायाहून भिन्न नाहीं, कर्म-योग ज्याला म्हणतात तो वैदिक कर्ममार्गाहून भिन्न नाहीं, व निष्काम कर्मयोग, भक्ति-मार्ग, ध्यानयोग इत्यादि उपासनाकांडाहून पृथक् नाहीं, ही गोष्ट वाचकांनी पूर्णपणें लक्षांत ठेवावी. म्हणजे गीतार्थांत कांहीं घोटाळा होणार नाहीं. गीतेतील स्थितप्रज्ञ जर वेगळा तर संन्यासमार्गातील स्थितप्रज्ञाचें लक्षण वगैरे दुसऱ्या कोठें सांगितले आहे तें दाखविले पाहिजे. किंवा 'कर्मयोगी स्थितप्रज्ञ निराळा व संन्यासमार्गी स्थितप्रज्ञ निराळा' हें म्हणणे काल्पनिक आहे, हें कबूल केलें पाहिजे. रहस्यकार म्हणतात—" इंद्रियजय, नि-ष्कामता, शांति हे गुण दोघांसही पाहिजेत. पण गीतेतील स्थितप्रज्ञ सर्व कर्मे निष्कामबुद्धीनें करतो" सर्व कर्मे कोणती ? खाणे, पिणें वगैरे गी. र. च्या ५५ पृष्ठावर सांगितलेली सांसारिक कीं अग्निहोत्रादिक शास्त्रीय ? व 'दुसरा म्ह० गीतेच्या बाहेरचा स्थितप्रज्ञ करीत नाहीं ' तीं कोणतीं ? खाणे, पिणे, वगैरे शरीरस्थितीला अवश्य असलेलीं कर्मे सन्याशीही सोडीत नाहीं. गृहस्थाचीं अग्निहोत्रादिक कर्मे मात्र सन्याशी सोडतो. पण गीतेतील स्थितप्रज्ञानें अग्निहोत्र, संध्यावंदन, पंचयज्ञ इत्यादि कर्मे केलीच पाहिजेत, असा रहस्यकारांचाही आग्रह नाहीं. मग सर्व कर्मे कोणती ? अर्थात् पोटासाठीं किंवा देशसेवा, राष्ट्रसेवा, वगैरे नांवाखाली येणारे उपद्व्याप ! पण गीतेतील स्थितप्रज्ञाने तरी तीं करावीं याला काय प्रमाण आहे देव जाणे ! आपल्या म्हणण्याला रहस्यकार ३-२५ श्लोकाचा आधार दाखवितात. पण त्यांतही 'अविद्वान् कर्मांत आसक्त होऊन तीं जशीं करितात त्याप्रमाणे लोकसंग्रहाची इच्छा करणाऱ्या विद्वानानें त्यांत आसक्त न होता करावीं ' एवढेच सांगितले आहे. तेथें गीतेतील स्थितप्रज्ञ अमुक करतो व गीतेच्या बाहेरचा अमुक करीत नाहीं, असें कांहींएक सांगितलेलें नाहीं व तेथील कर्मेही नित्य-नैमित्तिक शास्त्रीय कर्मे आहेत. खाणे, पिणें, वगैरे नव्हेत. अर्थात् गीतेतील स्थितप्रज्ञ व दुसरा स्थितप्रज्ञ हा काल्पनिक आहे. पण तो काल्पनिक असला तरी फार महत्त्वाचा आहे, असें समजून रहस्यकार आचार्यांवर कसे घसरले आहेत तें पहा—" पण हा भेद गौण समजून गीतेवरील सन्यासमार्गाचे टीकाकार स्थितप्रज्ञाचें वरील वर्णन संन्यासमार्गाचेंच आहे असें संप्रदायाच्या आग्रहानें प्रतिपादन करीत असतात. " स्थितप्रज्ञाच्या सर्व लक्षणांचा पूर्ण विचार केल्यावर तीं ज्ञानी संन्याश्या-मध्यें मुख्यत्वानें संभवतात कीं कर्मयोग्यामध्ये, याचा निर्णय येथपर्यंतचें सर्व विवेचन वाचून

**नास्ति बुद्धिरयुक्तस्य न चायुक्तस्य भावना ।**
**न चाभावयतः शान्तिरशान्तस्य कुतः सुखम् ॥ ६६ ॥**

**अन्वयार्थ—अयुक्तस्य**—ज्याचें चित्त स्थिर झालेलें नसतें त्याला—**बुद्धिः**—आत्म्याविषयींची बुद्धि—**न अस्ति**—नसते,—**च**—व—**अयुक्तस्य**—ज्याचें चित्त स्थिर नसतें त्याला—**भावना**—आत्मज्ञानाविषयींचा अभिमान नसतो. सतत आत्मानुसंधान, 'मीच ब्रह्म' ही बुद्धि नसते.—**च**—आणि—**अभावयतः**—तशी भावना न करणाराला—**शान्तिः**—शांति-चित्ताची स्वस्थता—**नास्ति**—नसते.—**अशान्तस्य**—आणि ज्याचें चित्त शांत-स्वस्थ झालेलें नाहीं, त्याला—**सुखं**—सुख—**कुत**—कोठचें ? ६६.

**सेयं प्रसन्नता स्तूयते— नास्तीति । नास्ति न विद्यते न भवतीत्यर्थः । बुद्धिरात्मस्वरूपविषयाऽयुक्तस्यासमाहितान्तःकरणस्य । न चास्त्ययुक्तस्य भावनाऽऽत्मज्ञानाभिनिवेशः । तथा न चास्त्यभावयत आत्मज्ञानाभिनिवेशमकुर्वतः शान्तिरुपशमः । अशान्तस्य कुतः सुखम्, इन्द्रियाणां हि विषयसेवातृष्णातो निवृत्तिर्या तत्सुखं न विषयविषया तृष्णा, दुःखमेव हि सा, न तृष्णायां सत्यां सुखस्य गन्धमात्रमप्युपपद्यत इत्यर्थः ॥ ६६ ॥**

**भाष्यार्थ—'नास्ति०' इति सा इयं प्रसन्नता स्तूयते**—भगवान् 'नास्ति०' या श्लोकानें चित्तप्रसादाची स्तुति करितात.—**न अस्ति-न विद्यते-न भवति**

---

कोणालाही सहज करतां येण्यासारखा आहे. ह्मणून आम्ही अधिक विस्तार करीत नाहीं. स्थितप्रज्ञता ही एक काल्पनिक अवस्था नसून ज्ञानी पुरुषाच्या आचरणांत आलेली अवस्था आहे,हें ध्यानांत न ठेवल्यामुळें 'कर्मयोगी स्थितप्रज्ञ, गीतेतील स्थितप्रज्ञ' इत्यादि शब्दप्रयोग निःशंकपणें करतां आले आहेत. पण आचार्यांपासून ज्ञानेश्वरांपर्यंत सर्व भाष्यकार व टीकाकार स्थितप्रज्ञ हा ज्ञानयोगी आहे, तो प्रवृत्तमार्गी नसून निवृत्तमार्गी आहे, असेंच समजतात. त्या सर्वांना अप्रमाण व आग्रही समजून रहस्यकारांनाच तेवढें प्रमाण व अनाग्रही ज्यांना समजावयाचे असेल त्यांनीं तसें खुशाल मानावे.

१ पण रहस्यकार या श्लोकाला कसे अवतरण देतात तें पहा—"ज्याचे चित्त याप्रमाणें प्रसन्न नाहीं त्याचें वर्णन करून स्थितप्रज्ञाचे स्वरूप आतां अधिक व्यक्त करितात." पण मध्वाचार्य-'प्रसादाभावे दोषं आह द्वाभ्यां' म्ह० 'चित्ताच्या प्रसंन्नतेच्या अभावीं कोणता दोष संभवतो, तें दोन श्लोकांनीं सांगतात.' असें अवतरण देतात. रामानुजादि इतर भाष्यकारादिकही मनःप्रसादाच्या अभावी काय होतें, तेंच सांगण्यासाठीं हे श्लोक मानितात. अर्थात् स्थितप्रज्ञाचे स्वरूप अधिक व्यक्त करण्यासाठीं ते नाहीत. रहस्यकार ६६ श्लोकाच्या अर्थात "जो पुरुष म्ह० वरील प्रकारें योगयुक्त झालेला नाहीं त्याला स्थिरबुद्धि आणि भावना म्ह० दृढबुद्धिरूप निष्ठाही नसते." असे म्हणतात. पण येथील 'बुद्धि' शब्दाचा 'अर्थ 'स्थिर बुद्धि' असा का करावयाचा ? त्याचा अर्थ त्यांच्याच परिभाषेप्रमाणें वासना असा करावयास

**इत्यर्थः**—नाहीं, विद्यमान नाहीं, होत नाहीं, असा याचा भावार्थ. ( काय ? उत्तर-) —**बुद्धिः आत्मस्वरूपविषया**—आत्मस्वरूपाविषयींची बुद्धि (कोणाची ?)—**अयुक्तस्य-असमाहित-अन्तःकरणस्य**—ज्याचें अन्तःकरण असमाहित-अशांत विक्षिप्त असतें (त्याला आत्म्याच्या स्वरूपाविषयीं बुद्धि होत नाहीं.)—**न च अस्ति अयुक्तस्य भावना-आत्मज्ञानाभिनिवेशः**—आणि अशांतचित्त पुरुषाला भावना-आत्मज्ञानाचा अभिनिवेश नसतो. (शब्दांवरून आत्म्याचें परोक्ष ज्ञान झालें असतां त्याचाच साक्षात्कार होण्यासाठीं सतत अनुचिंतन करणें, ही भावना होय. ज्याचें चित्त अशान्त म्ह० विक्षिप्त असतें त्याला आत्म्याचें निदिध्यासन करतां येत नाहीं. )—**तथा अभावयतः-आत्मज्ञानाभिनिवेशं अकुर्वतः शांतिः-उपशमः न अस्ति**—अयुक्त पुरुषाला जशी भावना नसते त्याचप्रमाणें आत्मज्ञानासाठीं सतत आत्मानुसंधान न करणाराला शांति-उपशम-सुखदुःखादि अनर्थांची निवृत्ति प्राप्त होत नाहीं.—**अशान्तस्य सुखं कुतः**—आणि जो अशान्त आहे त्याला सुख कोठचें ? [ज्याच्या अनर्थांची निवृत्ति झाली नाहीं, जो परमानंदसागरापासून दूर झाला आहे, व संसारसागरांत निमग्न झाला आहे, त्याच्या चित्तांत सुखाचा आविर्भाव होणें शक्य नाहीं. 'अहो पण संसारी जीवाला सुद्धां दृष्ट विषयांच्या उपभोगापासून सुख होऊं शकतें-' उत्तर-]—**इन्द्रियाणां विषयसेवातृष्णातः या निवृत्तिः तत् सुखं विषयविषया तृष्णा न सुखं हि**—इंद्रियांची विषयोपभोगाविषयींच्या तृष्णेपासून जी निवृत्ति तें सुख, विषयाविषयींची तृष्णा हे सुख नव्हे, ही गोष्ट शास्त्र व लौकिक अनुभव या दोन्ही प्रमाणांनीं सिद्ध आहे.

---

पाहिजे. कारण येथे ' व्यवसायात्मिका ' हे तिला विशेषण नाहीं व ' स्थिर ' हा ज्याचा अर्थ आहे असा ' एका ' हा शब्दही नाहीं. गी. र. पृ. ६२७ पहा. पण अर्थात जरी 'बुद्धि म्ह० स्थिरबुद्धि ' असें म्हटलें असले तरी टीपेंत वासनात्मकबुद्धि म्हटले आहे. तसेच 'स्थिरबुद्धि ' व भावना म्ह० दृढबुद्धिरूप निष्ठा यांत फरक काय ? स्थिर व दृढ या विशेषणांत बुद्धि व भावना या शब्दांच्या अर्थाचा अन्तर्भाव कसा होतो ? पण टीपेत भावना म्ह० दृढ उद्योग, असा अर्थ केला आहे. तो तर फारच विचित्र आहे. आचार्य बुद्धि म्ह० आत्मस्वरूपाविषयीं बुद्धि, व भावना म्ह० आत्मस्वरूपाचें सतत अनुचिंतन-निदिध्यासन असा स्पष्ट अर्थभेद सांगतात. मध्वाचार्य ' भावना म्ह० सम्यक ज्ञान,' रामानु० ' भावना म्ह० आत्म्याविषयींची भावना-चिंतन ' असा बुद्धीहून निराळा अर्थ सांगतात. असो; यावरून या श्लोकांत अप्रसन्नचित्त पुरुषाचें 'वर्णन' नसून चित्त प्रसन्न नसल्यास आत्मज्ञान, आत्मचिंतन, व शांति याचा अभाव कसा होतो त्याचे वर्णन आहे.

१ पण रहस्यकाराना ही गोष्ट मान्य नाहीं. त्यांनीं रहस्याच्या पांचव्या प्रकरणांत यासंबंधाने पुष्कळ लिहिले आहे. पण ते सर्व अनुपपन्न असल्यामुळें त्यांचा सविस्तर विचार येथें करीत नाहीं. एक दोन वाक्येच नमुन्यासाठीं घेऊन त्यांचा विचार करतों-" दुःखनिवारणापलीकडे सुख म्हणून कांहीं निराळा पदार्थ नाहीं. " ९७. " सर्व सुख तृष्णादि दुःखाच्या निवारणापासूनच उत्पन्न होतें, हे संन्यासमार्गीयाचें म्हणणेंच आधीं सर्वस्वी खरें मानतां येत नाहीं. " ९९. " सुख हा वास्तविक पदार्थ नसल्यामुळें तृष्णात्मक सर्व

कर्में सोडल्याखेरीज शांति नाही, हें म्हणणें तुम्हांस जरी मान्य नसलें तरी तुमच्याच म्हणण्याप्रमाणें असंतोष व असंतोषापासून पुढे जर दुःख होते तर निदान हा असंतोष दूर करण्यासाठीं तरी मनुष्यानें तृष्णा व तृष्णेबरोबर सर्व सांसारिक कर्मांचा–मग तीं परोपकारासाठीं असोत वा स्वार्थाप्रीत्यर्थ असोत,–त्याग करून सदैव संतुष्ट रहावे, असे ह्मणण्यास हरकत काय ?...'' गी. र. १०७. केवळ नमुन्यासाठीं हे उतारे दिले आहेत. यांवरून संन्यासमार्गीयांचें (वेदान्त्यांचें?) म्हणणे रहस्यकारांना बरोबर कळले नाहीं, असें उघड दिसते. आचार्यांनी वर भाष्यांत 'इंद्रियांची विषयोपभोगाविषयींच्या तृष्णेपासून जी निवृत्ति तेंच सुख आहे. विषयांविषयींची तृष्णा हें सुख नव्हे, तृष्णा हे दुःखच आहे. तृष्णा विद्यमान असतांना सुखाचा नुस्ता गंधही उपलब्ध होत नाहीं.' असे म्हटले आहे, व तें अनुभवसिद्ध आहे. पण 'विषयतृष्णानिवृत्ति हेच सुख आहे, तृष्णा हे सुख नव्हे, ते दुःख आहे.' अशा प्रकारची वेदान्त वाक्यें ऐकून रहस्यकार संन्यासमार्गीयाच्या गळ्यात 'सुखदुःखाभावरूप आहे' हा सिद्धान्त बांधू पाहतात. पण वेदान्तशास्त्र सुखाला दुःखाभावरूप मानीत नाहीं. 'यो वै भूमा तत्सुखं नाल्पे सुखमस्ति.' जे सर्वव्यापक ब्रह्म तेच सुख आहे, अव्यापक त्रिपुटींत सुख नाहीं, असा वेदान्ताचा सिद्धान्त आहे. 'आत्मा चिद्वित्सुखात्मा' ह्म० आत्मा सत्, चित्, आनंद रूप आहे, असे आचार्य ह्मणतात. 'आनन्दो ब्रह्म'–ब्रह्म आनंद आहे. 'को ह्येवान्यात्कः प्राण्यात् यदेष आकाश आनन्दो न स्यात्-' हा आकाश आनन्द जर नसता तर प्राण व अपान यांच्या क्रिया कोण करता? 'आनन्दाद्ध्येव खल्विमानि भूतानि जायन्ते' आनंदापासूनच हीं सर्व भूतें उत्पन्न होतात. इत्यादि शेकडों श्रुति आनंद–सुख हे आत्म्याचें स्वरूप आहे व आत्मा नित्य आहे, असें जर सांगत आहेत तर 'दुःखनिवारणापलीकडे सुख म्हणून कांहीं पदार्थ नाहीं,' असा भलताच सिद्धान्त संन्यासमार्गीयावर लादण्यात कोणता पुरुषार्थ आहे ? पण संन्यासमार्गी असेंच मानतात, असे खोटेंच समजून त्यावर टीकास्त्र घेऊन उठणें, म्हणजे चांगल्या कुत्र्याला वेडे ठरवून त्याला गोळी घालण्यास तयार होण्यासारखेंच आहे. तर मग भर्तृहरि 'प्रतीकारो व्याधेः सुखमिति विपर्यस्यति जनः' ह्म० "दुःखाचा जो प्रतीकार–निवारण त्यालाच भ्रमानें लोक सुख असें म्हणतात. गी. र. पृ. ९७" असे कसे म्हणतो, म्हणून म्हणाल तर भर्तृहरि वस्तुतः जे खरे सुख नव्हे त्याला लोक सुख समजतात, असे सांगत आहे. 'दुःखनिवारणापलीकडे सुख म्हणून काहीं निराळा पदार्थ नाहीं' असे सांगत नाहीं. तसेंच आचार्यही 'विषयतृष्णा हेच दुःख आहे, इंद्रियांना विषयतृष्णेपासून निवृत्त करणे हेंच सुख आहे' असे जें म्हणत आहेत तेही तृष्णाभाव हेंच सुखाचें साधन व तृष्णा हेच दुःखाचें निमित्त आहे, अशा आशयानें सांगत आहेत. कारण तृष्णा हेच साक्षात् दुःख व तृष्णाभाव हेंच साक्षात् सुख, हाच जर त्यांचा आशय असता तर 'तृष्णा विद्यमान असतांना सुखाचा लेशही अनुभवास येत नाहीं,' असें लागलेंच पुढें म्हटले नसतें. 'अशान्तस्य कुतः सुखं' याचाही आशय हाच आहे. ज्याच्या चित्तांत शान्ति नाहीं त्याला सुख कोठचें? 'तृष्णात्मक सर्व कर्में' इत्यादि असंबद्ध शब्दप्रयोग रहस्यकाराचे-च आहेत, तसले प्रयोग वेदान्त शास्त्रांत कोठेही सांपडावयाचे नाहीत. सांसारिक कर्में विक्षेप उत्पन्न करणारीं अहंकार व ममता वाढविणारीं असल्यामुळें तीं मुमुक्षूला सोडलीच पाहिजेत, असा वेदान्ताचा सिद्धान्तच आहे व सांसारिक कर्में करण्याविषयीं गीताही सांगत नाहीं,

**—सा दुःखं एव हि**—ती-विषयतृष्णा हें दुःखच आहे, हेंही त्याच प्रमाणांनी सिद्ध आहे. ( कारण विषयोपभोगाच्या द्वारा क्षणिक सुखानुभव जरी येत असला तरी त्या-पूर्वी व नंतर दुःखच आहे. )—**तृष्णायां सत्यां सुखस्य गन्धमात्रं अपि न उपपद्यते इत्यर्थः**—तृष्णा विद्यमान असतांना सुखाचा नुस्ता गंधही संभवत नाहीं, असा याचा भावार्थ. [ ज्याचें चित्त विक्षिप्त—अस्थिर असते, संकल्प-विकल्प-संशय-विपरीत भावना इत्यादि दोषांनीं युक्त असतें त्याला आत्म्याविषयीं बुद्धिच होत नाहीं. तसल्या विक्षिप्तचित्त पुरुषांकडून आत्मानुसंधान—आत्म्याचे निदिध्यासन—सतत चिंतनही होत नाही. दीर्घकाल—वर्षेच्या वर्षे आत्म्याचें सतत स्मरण न करणाराला शांति प्राप्त होत नाही. त्याच्या अनर्थांची निवृत्ति होत नाही आणि ती न झाल्यामुळे संसा-रसागरांतच निमग्न झालेल्या अशान्त पुरुषाला सुख कोठून होणार? कारण इंद्रियांना विषयेच्छारहित करणे हेंच सुख आहे. चित्ताला तृष्णारहित—कामनाशून्य करणें हेंच सुख आहे. विषयतृष्णा वाढविणे किंवा तिला चित्तांत राहूं देणे हे सुख नव्हे; कारण तृष्णा असेपर्यंत सुखाचा लेशही अनुभवास येत नाही, असा अनुभव पदोपदी येतो, व शास्त्रही तसेंच सांगतें. ] ६६.

## इन्द्रियाणां हि चरतां यन्मनोऽनुविधीयते ।
## तदस्य हरति प्रज्ञां वायुर्नावमिवाम्भसि ॥ ६७ ॥

**अन्वयार्थ—हि**—कारण—**चरतां इन्द्रियाणां**—आपापल्या विषयामध्यें प्रवृत्त होणाऱ्या इंद्रियांच्या—**अनु**—मागोमाग—**यत् मनः**—जे मन—**विधीयते**—जातें—**तत्**—ते मन—**अस्य**—या साधकाच्या—**प्रज्ञां**—प्रज्ञेला—आत्मा व अनात्मा यांच्या विवेकापासून उत्पन्न झालेल्या बुद्धीला—**अम्भसि**—पाण्यात—**वायुः**—वारा—**नावं इव**—नावेला जसा अमार्गाने नेतो, त्याप्रमाणे—**हरति**—हरण करते. ६७

**अयुक्तस्य कस्माद्बुद्धिर्नास्तीत्युच्यते— इन्द्रियाणामिति । इन्द्रियाणां हि यस्माच्च-रतां स्वस्वविषयेषु प्रवर्तमानानां यन्मनोऽनुविधीयतेऽनुप्रवर्तते तदिन्द्रियविषयवि-कल्पनेन प्रवृत्तं मनोऽस्य यतेर्हरति प्रज्ञामात्मानात्मविवेकजां नाशयति । कथं, वायुर्ना-वमिवाम्भस्युदके जिगमिषतां मार्गादुद्धृत्योन्मार्गे यथा वायुर्नावं प्रवर्तयत्येवमात्मवि-षयां प्रज्ञां हृत्वा मनो विषयविषयां करोति ॥ ६७ ॥**

---

'गीता सांगते' असें जे सांगणे आहे तें खोटें आहे. 'परोपकाराची कर्मेही सोडा' असें वेदान्त सांगत नाहीं. पण खोटा सांसारिक परोपकार हा उपकार नसून अपकार आहे, असे त्याचें स्पष्ट म्हणणें आहे. मनुष्याचे परम हित करण्यास वेदान्ती किंवा सन्यासमार्गी नेहमी तयार असतात. मोक्षमार्गाचा उपदेश करून मनुष्याला त्यांत प्रवृत्त करणे हाच खरा परोपकार आहे असे ते समजतात. अर्थात् रहस्यकारानीं खोट्या कल्पनेने संन्यासमार्गावर केलेली सर्व टीका अस्थानीं आहे.

**भाष्यार्थ—अयुक्तस्य बुद्धिः कस्मात् न अस्ति इति 'इन्द्रियाणां०' इति उच्यते**—असमाहित पुरुषाला आत्म्याविषयींची बुद्धि कां होत नाहीं, तें 'इन्द्रियाणां०' या श्लोकानें सांगितले जातें.—**यत् मनः**—जें मन—**हि-यस्मात् चरतां स्वस्वविषयेषु प्रवर्तमानानां इन्द्रियाणां**—कारण आपापल्या विषयामध्ये प्रवृत होणाऱ्या इंद्रियांच्या—**अनुविधीयते-अनुप्रवर्तते**—मागून प्रवृत्त होतें—**तत्-इंद्रियविषयविकल्पनेन प्रवृत्तं मनः**—तें श्रोत्रादि इंद्रियांच्या शब्दादि विषयांचें पृथक्त्वानें ग्रहण करून प्रवृत्त झालेलें मन—**अस्य-यतेः प्रज्ञां-आत्मनात्मविवेकजां हरति-नाशयति**—या यतीच्या आत्मानात्मविवेकापासून उत्पन्न झालेल्या प्रज्ञेला हरण करतें-नष्ट करते.—**कथं**—तें कसे?-**वायुः जिगमिषतां नावं इव अम्भसि-उदके वायुः मार्गात् उद्धृत्य उन्मार्गे यथा नावं प्रवर्तयति**—वायु जलांतून जाण्याची इच्छा करणाऱ्या लोकांच्या नावेला तिच्या मार्गांतून काढून भलत्याच मार्गांत जसा प्रवृत्त करतो—**एवं मनः आत्मविषयां प्रज्ञां हृत्वा विषयविषयां ( प्रज्ञां ) करोति**—त्याप्रमाणें मन आत्म्याविषयींच्या प्रज्ञेचे हरण करून विषयाविषयींची प्रज्ञा करतें [ त्यामुळे अयुक्ताला आत्मसाक्षात्काररूप बुद्धि होत नाही. इंद्रियें विषयाचा उपभोग घेत असतांना जे मन त्या इंद्रियांच्या विषयाविषयीं संकल्प-विकल्पादि करीत त्यांच्या मागोमाग जातें तें, पाण्यांतील नावेला वायु जसा भलत्याच मार्गानें नेतो त्याप्रमाणे, या यत्न करणाऱ्या मुमुक्षूच्या आत्मानात्मविवेक करणाऱ्या प्रज्ञेला नाहींसे करते. ] ६७

**तस्माद्यस्य महाबाहो निगृहीतानि सर्वशः ।**
**इन्द्रियाणीन्द्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ६८ ॥**

**अन्वयार्थ—तस्मात्**—म्हणून—**हे महाबाहो**—हे महापराक्रमी अर्जुना !—**यस्य**—ज्याचीं—**इन्द्रियाणि**—इंद्रियें—**इन्द्रियार्थेभ्यः**— विषयांपासून — **सर्वशः**—सर्व प्रकारें—**निगृहीतानि**—निग्रह करून ठेविलेली-आंवरून धरलेलीं असतात—**तस्य**—त्याची—**प्रज्ञा**—आत्मानात्मविवेकापासून उत्पन्न झालेली बुद्धि—**प्रतिष्ठिता**—प्रतिष्ठित झालेली असते. ६८.

**यततो ह्यपीत्युपन्यस्तस्यार्थस्यानेकधोपपत्तिमुक्त्वा तं चार्थमुपपाद्योपसंहरति तस्मादिति । इन्द्रियाणां प्रवृत्तौ दोष उपपादितो यस्मात् तस्माद्यस्य यतेर्हे महाबाहो निगृहीतानि सर्वशः सर्वप्रकारैर्मानसादिभेदैरिन्द्रियाणीन्द्रियार्थेभ्यः शब्दादिभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ६८ ॥**

**भाष्यार्थ—'यततो ह्यपि०' इति उपन्यस्तस्य अर्थस्य अनेकधा उपपत्तिं उक्त्वा** 'यततो ह्यपि० ' ६० या श्लोकांत ज्या विषयाचा आरंभ केला होता त्याची अनेक प्रकारें उपपत्ति सांगून—**च तं अर्थं उपपाद्य 'तस्मात्०' इति उपसंहरति**—आणि त्या विषयाचें उपपादन करून ' तस्मात्०' या श्लोकानें त्याचा उपसंहार

करितात.—**यस्मात् इन्द्रियाणां प्रवृत्तौ दोषः उपपादितः तस्मात्**—ज्या-अर्थीं इंद्रियांच्या प्रवृत्तीमध्यें दोष सांगितलेला आहे त्याअर्थीं—**हे महाबाहो**—हे पराक्रमी अर्जुना—**यस्य यतेः इंद्रियाणि इंद्रियार्थेभ्यः-शब्दादिभ्यः सर्वशः-सर्वप्रकारैः-मानसादिभेदैः निगृहीतानि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता**—ज्या यतीचीं इंद्रियें शब्दादि विषयांपासून सर्व प्रकारांनीं मानसादि-सर्व भेदांनीं निगृहीत असतात, त्याची प्रज्ञा प्रतिष्ठित असते. ( ६० व्या श्लोकांत इंद्रियें मनाला विषयासक्त करून पुरुषाचा कसा घात करितात तें सांगण्यास आरंभ करून ' ध्यायतः० ' ६२ इत्यादि श्लोकांनीं त्याविषयीं उपपत्ति सांगून या श्लोकांत त्याच विषयाचा उपसंहार केला आहे. त्यामुळें यावर पुनरुक्ति दोष येत नाहीं. ज्यांचीं इंद्रियें सर्व प्रकारच्या मानसादि विषयांपासून उत्तम प्रकारें नियमित केलेलीं असतात तोच स्थितप्रज्ञ होय. ) ६८.

---

१ आचार्य नेहमीं विषयाचा उपक्रम व उपसंहार ठिकठिकाणीं स्पष्टपणे दाखवीत असतात, याचें हे एक उदाहरण आहे. पण रहस्यकार गीतेच्या उपक्रमोपसंहारादि गोष्टी त्यांना शिकवावयास तयारच आहेत. ' मीमांसकाचे हे उपक्रमोपसंहारादि संप्रदायप्रवर्तक आचार्यांस माहीत नव्हते कीं काय ? ' असें कोणी म्हटल्यास " दृष्टि एकदा सांप्रदायिक बनली म्हणजे आपलाच संप्रदाय प्रमाणभूत झालेल्या ग्रंथांत वर्णिलेला आहे, असें ज्या रीतीनें दाखवितां येईल तीच रीति सांप्रदायिक टीकाकार स्वीकारीत असतो. " असें उत्तर देऊन रहस्यकार त्याची वाट लावतात. जणु काय संप्रदायाला धरून टीका करणे म्हणजे मोठा गुन्हाच करणे होय ! पण अद्वैत संप्रदायी आचार्यांनाही असे तुच्छ मानून गीतेचे उपक्रमोपसंहारादि सांगावयास तयार झालेल्या रहस्यकारांनी ते किती सुशुद्ध व मीमांसेला धरून सांगितले आहेत त्याचे दिग्दर्शन वर केलेंच आहे.

२ रहस्यकारांनी ६६–६८ श्लोकांस ' स्थितप्रज्ञाचें स्वरूप आतां अधिक व्यक्त करितात' असें जें अवतरण दिलें आहे, ते यावरून खोटें ठरते. कारण ६६ श्लोकांत अशान्तचित्त पुरुषाला आत्मविषयक बुद्धि वगैरे नसते असें सांगून व ६७ व्या श्लोकांत ती कां नसते, ते सांगून ६८ व्या श्लोकात ६० व्या श्लोकांत आरंभिलेल्या विषयाचा उपसंहार केला आहे. कारण विषयांपासून सर्व इंद्रियांचा निग्रह केलेला असणे, हें अधिक वर्णन नसून ५८ व्या श्लोकातील लक्षणाचेंच ते उपपादन आहे. ज्ञानेश्वरमहाराजही ६८ व्या श्लोकांत इंद्रियनिग्रहरूप लक्षणाचा उपसंहार केला आहे असेंच कूर्माच्या दृष्टान्ताचा अनुवाद करून सुचवितात–देखे कूर्म जियापरी । उवाइला अवयव पसरी । नातरी इच्छावशें आवरी । आपणपेंचि ॥३५२॥ तैसीं इंद्रियें अपैतीं होती । जयाचें म्हणितलें करिती । तयाची प्रज्ञा जाण स्थिति । पातली असे ॥ असो; रहस्यकार या श्लोकांवरील टीपेंत पुढे ह्मणतात–" तथापि इंद्रियनिग्रह म्ह० इंद्रिये अजिबात मारून सर्व कर्मे अजिबात सोडणें, असा अर्थ नसून ६४ व्या श्लोकांत वर्णिल्याप्रमाणें निष्काम बुद्धीने कर्म करावीं, असा गीतेचा अभिप्राय आहे. " ६४०. पण हा गीतेचा अभिप्राय नसून स्वतः रहस्यकारांचा आहे. कारण ६४ व्या श्लोकांतही ' निष्काम कर्म करावीं ' असें वर्णन केलेलें नाहीं. त्यांत रागद्वेषरहित व स्वाधीन असलेल्या इंद्रियांनी अवश्य तेवढ्याच विषयांचा उपभोग घेणारा मुमुक्षु चित्त-

**या निशा सर्वभूतानां तस्यां जागर्ति संयमी ।**
**यस्यां जाग्रति भूतानि सा निशा पश्यतो मुनेः ॥ ६९ ॥**

**अन्वयार्थ—सर्वभूतानां**—सर्वभूतांची—**या**—जी—**निशा**—रात्र म्ह० परमार्थदर्शन—**तस्यां**—तिच्यामध्यें—**संयमी**—संयमवान्–जितेंद्रिय योगी–स्थितप्रज्ञ —**जागर्ति**—जागतो.—**यस्यां**—व जिच्यामध्यें म्ह० ज्या व्यवहारावस्थेंत—**भूतानि**—भूतें—**जाग्रति**—जागतात—**सा**—ती—**पश्यतः मुनेः**—ज्ञानी मुनीची —**निशा**—रात्र आहे. ६९.

**योऽयं लौकिको वैदिकश्च व्यवहारः स उत्पन्नविवेकज्ञानस्य स्थितप्रज्ञस्याविद्याकार्यत्वादविद्यानिवृत्तौ निवर्तते। अविद्यायाश्च विद्याविरोधान्निवृत्तिरित्येतमर्थं स्फुटीकुर्वन्नाह— या निशेति । या निशा रात्रिः सर्वपदार्थानामविवेककरी तमःस्वभावत्वात्सर्वेषां भूतानां सर्वभूतानाम् । किं तत्परमार्थतत्त्वं स्थितप्रज्ञस्य विषयः । यथा नक्तंचराणामहरेव सदन्येषां निशा भवति तद्वन्नक्तंचरस्थानीयानामज्ञानां सर्वभूतानां निशेव निशा परमार्थतत्त्वमगोचरत्वादतद्बुद्धीनाम् । तस्यां परमार्थतत्त्वलक्षणायामज्ञाननिद्रायाः प्रबुद्धो जागर्ति संयमी संयमवाञ्जितेन्द्रियो योगीत्यर्थः ॥**

**भाष्यार्थ**—('आत्मज्ञ स्थितप्रज्ञाचा सर्व कर्मसंन्यासामध्येच अधिकार असून अनात्मज्ञाचा कर्मामध्येच आहे' याअर्थी पुढील श्लोक आहे हे दाखविण्यासाठी आचार्य या श्लोकाला अवतरण देत म्हणतात-)—**यः अयं लौकिकः च वैदिकः व्यवहारः सः अविद्याकार्यत्वात् उत्पन्नविवेकज्ञानस्य स्थितप्रज्ञस्य अविद्यानिवृत्तौ निवर्तते**—जो हा लौकिक व वैदिक व्यवहार तो अविद्येचें कार्य असल्यामुळें ज्याला विवेकज्ञान उत्पन्न झाले आहे अशा स्थितप्रज्ञाच्या अविद्येची निवृत्ति झाली असतां निवृत्त होतो—**च अविद्यायाः विद्याविरोधात् निवृत्तिः इति एतं अर्थं स्फुटीकुर्वन् 'या निशा०' इति आह**—आणि अविद्येचा विद्येशीं विरोध असल्यामुळें विद्येच्यायोगानें अविद्येची निवृत्ति होते, अशा या अर्थाला स्पष्ट करणारे भगवान् 'या निशा०' इत्यादि सांगतात.[बाह्य इंद्रियांची वृत्ति स्वभावतःच बाह्य विषयांकडे असते. त्याला पराग्दर्शन म्हणतात. ते पराग्दर्शन म्ह० बहिर्मुखता, हें आत्म्याला आच्छादित करणाऱ्या अविद्येचें कार्य आहे. आत्मदर्शनानेच त्याची निवृत्ति होते. यास्तव आत्मज्ञानासाठीं इंद्रियांचा विषयांपासून निग्रह करावा. त्यांना अन्तर्मुख करावें, असा याचा भावार्थ.]—**या निशा-रात्रिः सर्वपदार्थानां अविवेककरी तमःस्वभा-**

---

स्वास्थ्यास प्राप्त होतो असे म्हटले आहे. अर्थात् जो रागद्वेषशून्य व निगृहीत इंद्रियांनी विषय सेवन करीत नाहीं, त्याला चित्तप्रसाद प्राप्त होत नाहीं, यास्तव मुमुक्षुनें विषयांचा जो भोग घ्यावयाचा तो अशा इंद्रियांनीच घ्यावा, असेंच तेथें विवक्षित आहे. निष्काम कर्माचा तेथें कांहीं संबंध नाहीं.

**त्वात् सर्वेषां भूतानां-सर्वभूतानां**—जी निशा म्ह० रात्रि-सर्व पदार्थांचा अविवेक करणारी, सर्व प्राण्यांची निशा तमःस्वभावाची असल्यामुळें पदार्थांचा अविवेक करणारी आहे. ( सर्व प्राण्यांना साधारण असलेली रात्र अंधकारमय असते. त्यामुळें रात्री प्राण्यांना जगांतील पदार्थांचा बरोबर अनुभव येत नाहीं. त्यांचा विवेक होत नाही. याप्रमाणें निशाशब्दाचा रात्र हा प्रसिद्ध अर्थ सांगून आतां तोच अर्थ प्रस्तुत प्रकरणीं कसा लागू होतो तें सांगतात-)—**किं तत्**—तें काय—**परमार्थतत्त्वं स्थितप्रज्ञस्य विषयः**—परमार्थतत्त्व म्ह० स्थितप्रज्ञाचा विषय, ( हीच अज्ञ जनांची रात्र. ' अहोपण स्थितप्रज्ञाचा विषय असें जें परमार्थतत्त्व त्याचा ' प्रकाश ' हाच एक स्वभाव असल्यामुळें अनात्मज्ञांना रात्र कशी भासेल? उत्तर-)—**यथा अन्येषां अहः एव सत् नक्तंचराणां निशा भवति**—ज्याप्रमाणें इतर मनुष्यादिकांचा दिवसच असतांना निशाचर जे राक्षस, उलूक वगैरे त्यांना जशी ती रात्रच होते—**तद्वत् नक्तंचरस्थानीयानां अज्ञानां सर्वभूतानां परमार्थतत्त्वं निशा इव निशा**—त्याप्रमाणें रात्रिचरांच्या जागीं असलेल्या अनात्मज्ञ सर्व भूतांची परमार्थतत्त्व ही जणुं काय रात्रिच आहे. कारण—**अतद्बुद्धीनां अगोचरत्वात्**—ज्यांची बुद्धि परमार्थतत्त्वांत प्रवृत्त झालेली नसते तर परमार्थतत्त्वाहून अगदी विलक्षण अशा द्वैतप्रपंचांत प्रवृत्त झालेली असते त्यांना परमार्थतत्त्व कळत नाहीं. अशा लोकांचा परमार्थतत्त्व हा विषय नव्हे. म्हणून परमार्थतत्त्व त्यांना रात्रीसारखें आहे.—**तस्यां परमार्थतत्त्वलक्षणायां अज्ञाननिद्रायाः प्रबुद्धः संयमी-संयमवान् जितेन्द्रियः योगी इत्यर्थः जागर्ति**—त्या निशेसारख्या परमार्थतत्त्वरूप अवस्थेत अज्ञाननिद्रेपासून जागा झालेला संयमवान् म्ह० जितेंद्रिय योगी-ज्ञानी असा याचा भावार्थ, जागतो.

**यस्यां ग्राह्यग्राहकभेदलक्षणायामविद्यानिशायां प्रसुप्तान्येव भूतानि जाग्रतीत्युच्यते यस्यां निशायां प्रसुप्ता इव स्वप्नदृशः सा निशाऽविद्यारूपत्वात्परमार्थतत्त्वं पश्यतो मुनेः। अतः कर्माण्यविद्यावस्थायामेव चोद्यन्ते न विद्यावस्थायाम् । विद्यायां हि सत्यामुदिते सवितरि शार्वरमिव तमः प्रणाशमुपगच्छत्यविद्या । प्राग्विद्योत्पत्तेरविद्या प्रमाणबुद्ध्या गृह्यमाणा क्रियाकारकफलभेदरूपा सती सर्वकर्महेतुत्वं प्रतिपद्यते। नाप्रमाणबुद्ध्या गृह्यमाणायाः कर्महेतुत्वोपपत्तिः। प्रमाणभूतेन वेदेन मम चोदितं कर्तव्यं कर्मेति हि कर्मणि कर्ता प्रवर्तते नाविद्यामात्रमिदं सर्व निशेवेति। यस्य पुनर्निशेवाविद्यामात्रमिदं सर्वं भेदजातमिति ज्ञानं तस्याऽऽत्मज्ञस्य सर्वकर्मसंन्यास एवाधिकारो न प्रवृत्तौ। तथा च दर्शयिष्यति—' तद्बुद्धयस्तदात्मानः ' इत्यादिना ज्ञाननिष्ठायामेव तस्याधिकारम् ॥**

**भाष्यार्थ**—( या श्लोकाच्या द्वितीयार्धाचें व्याख्यान-)—**यस्यां ग्राह्यग्राहकभेदलक्षणायां अविद्यानिशायां प्रसुप्तानि एव भूतानि जाग्रति इति उच्यते**—ज्या ग्राह्यग्राहकभेदरूप अविद्यानिशेमध्यें गाढ निजलेलीं भूतें जागतात असें म्हटलें जातें—**यस्यां निशायां**—ज्या रात्रीं—**प्रसुप्ताः इव स्वप्नदृशः**—गाढ झोंपी गे-

लेल्या स्वप्नदृष्ट्यांप्रमाणें—**सा परमार्थतत्त्वं पश्यतः मुनेः निशा**—ती परमार्थ-तत्त्व पाहणाऱ्या मुनीची निशा-रात्र आहे—**अविद्यारूपत्वात्**—कारण तिला अ-विद्यारूपत्व आहे. [ विषयांचें इंद्रियांच्या योगानें ग्रहण केलें जातें. म्हणून व्यवहाराव-स्थेंत विषय ग्राह्य व इंद्रियें ग्राहक आहेत. अशा ग्राह्यग्राहकरूप अविद्यानिद्रेंत सर्व भूतें घोरत पडलेलींच असतात. तथापि त्या तसल्या रात्रीं तीं जागत आहेत असें म्हटलें जातें. कारण त्यांचा ग्राह्यग्राहकभेदव्यवहार चाललेला असतो. पण निजलेल्यांना 'जा-गत आहेत ' असें कसें म्हणतां येतें ? म्हणून म्हणाल तर सांगतों. ज्याप्रमाणें निजलेले लोक स्वप्न पहात असतात म्ह० झोपेंत सर्व ग्राह्यग्राहकरूप व्यवहार करीत असतात त्याप्रमाणें अविद्यानिद्रेंत गाढ निजलेले हे सर्व लोक जागतात, व्यवहारावस्थेंत फार दक्ष असतात. पण ती व्यवहारदशा अज्ञानरूप असल्यामुळे परमार्थतत्त्वदर्शी पुरुषांची रात्र आहे. परमार्थतत्त्वाचा अनुभव घेणाऱ्या व त्यामुळेच ज्याची अविद्या निवृत्त झाली आहे अशा संन्याश्याला द्वैतावस्था ही रात्र आहे, असा याचा भावार्थ. असो; याप्रमाणें अनात्मज्ञांना परमार्थावस्था रात्रीसारखी आहे व आत्मज्ञांना द्वैतावस्था रात्रीसारखी आहे, असें या श्लोकावरून ठरले असतां कोणता सिद्धान्त ठरतो ते सांगतात-]—**अतः अ-विद्यावस्थायां एव कर्माणि चोद्यन्ते न विद्यावस्थायां**—यास्तव अविद्या-वस्थेंतच कर्मांचें विधान केलें जाते, विद्यावस्थेंत नाहीं. [ कारण क्रिया, कारक, फल यांचा भेद अविद्यावस्थेंत प्रतीत होतो. ]—**हि सवितरि उदिते शार्वरं तमः इव विद्यायां सत्यां अविद्या प्रणाशं उपगच्छति**—कारण सूर्याचा उदय होतांच रात्री-चें तम-अंधकार जसा नाश पावतो त्याप्रमाणें विद्येचा उदय झाला असतां अविद्या अस्तं-गत होते. [ अविद्येची निवृत्ति झाल्यावर देह असेपर्यंत बाधितानुवृत्तीने[1] क्रिया-कारक-फलभेद जरी भासला तरी त्याविषयी ज्ञानी पुरुषामध्यें अभिनिवेश नसतो. त्यामुळें त्याला कर्मविधि नाहीं. कर्मविधि अविद्यावस्थेंत संभवतो, या म्हणण्याचेंच अधिक स्पष्टीकरण-]—**प्राग्विद्योत्पत्तेः प्रमाणबुद्ध्या गृह्यमाणा अविद्या क्रियाका-रकफलभेदरूपा सती सर्वकर्महेतुत्वं प्रतिपद्यते**—आत्मज्ञानाची उत्पत्ति होण्यापूर्वी प्रमाणबुद्धीने ग्रहण केली जाणारी अविद्या क्रिया-कारक-फलभेदरूप होऊन सर्व कर्मांच्या कारणत्वास प्राप्त होते. [ आत्मसाक्षात्कार होण्यापूर्वी अविद्येला बाधक

१ अंधकारांतील रज्जूवर सर्प भासला. पण दिवा आणून तो सर्प नसून दोरी आहे, असें कळतांच त्याचा बाध झाला. तथापि पुनः कांही वेळाने तीच दोरी पाहून सर्पाचा भ्रम होतो. परंतु पूर्वीच्या प्रमाणभूत ज्ञानानें त्याची लागलीच निवृत्तिही होते. याप्रमाणें एकदा बाधित झालेल्या भ्रमाची पुनः अनुवृत्ति होणें याला बाधितानुवृत्ति म्हणतात. त्याच न्यायानें देह असेपर्यंत ज्ञानानें बाधित झालेल्या क्रिया-कारक-फलभेदाची अनुवृत्ति होत असते. म्ह० देहच मी, हीं इंद्रियें व त्याच्या योगानें होणाऱ्या क्रिया माझ्या, त्यांच्यापासून होणारें सुखदुःख मलाच होत आहे, असा क्षणिक भ्रम होतो. पण देहादि मी नव्हे, या प्रमाणभूत ज्ञानानें तो लागलाच निवृत्तही होतो.

असें कांहींच नसतें. त्यामुळें ती अबाधित असलेली अविद्या कायिक-वाचिक-मानसिक क्रियारूप, कर्ता, कर्म, करण इत्यादि करणरूप, सुख-दुःखादि फलरूप बनून ही खरी आहे, प्रमाणभूत आहे, असें वाटतें व कर्मांचें निमित्त बनते. कारण क्रिया, कारक व फल या द्वैताचा अभिनिवेशच कर्मविधीचें निमित्त आहे. ]—**अप्रमाणबुद्ध्या गृह्यमाणायाः कर्महेतुत्वोपपत्तिः न**—पण आत्मज्ञानानें अविद्या अप्रमाण आहे, मिथ्या आहे, असे कळलें असतां–अप्रमाणबुद्धीनें ग्रहण केल्या जाणाऱ्या तिला कर्म-हेतुत्वाची उपपत्ति नाहीं. [ अप्रमाण–मिथ्या ठरलेली अविद्या कर्मांचें निमित्त होऊं शकत नाही. आत्मसाक्षात्कार होतांच आत्म्याविषयींचें मिथ्या अज्ञान निवृत्त होतें. नंतर क्रिया-कारक-फलभेदाचे ज्ञान मिथ्या–अप्रमाण आहे अशी बुद्धि उत्पन्न होते. तशा बुद्धीनें ग्रहण केली जाणारी क्रियादि भेदरूप अविद्याही कर्मांचे कारण होत नाहीं. कारण–]—**प्रमाणभूतेन वेदेन मम कर्तव्यं कर्म चोदितं इति हि कर्ता कर्मणि प्रवर्तते**—प्रमाणभूत वेदानें माझें कर्तव्य कर्म सांगितले आहे, असें समजूनच कर्ता कर्मामध्ये प्रवृत्त होतो, हें प्रसिद्ध आहे.—**इदं सर्वं अविद्यामात्रं निशा इव इति न**—हें सर्व द्वैत अविद्यामात्र आहे, रात्रीसारखें आहे असें समजून तो प्रवृत्त होत नाहीं. [ फलकामना, जीवन इत्यादिकांनीं युक्त असलेल्या, मला कर्म-कांडरूप वेदाने कर्म करण्याचा विधि सांगितला आहे. म्हणून मला ते केलेंच पाहिजे. असें मानणारा अज्ञ कर्माचा अधिकारी होतो. त्यालाच विशेष साधने सांगणारा वेद कर्मामध्ये प्रवत्त करीत असतो. पण हे सर्व द्वैत अविद्यमान-रात्रीसारखे आहे, असे समजणारा आत्मज्ञानी कर्मात प्रवृत्त होत नाहीं. व त्याला वेदही प्रवृत्त करीत नाही. तर मग विद्वानाचा अधिकार कशांत आहे ? ]—**पुनः यस्य निशा इव सर्वं इदं भेदजातं अविद्यामात्रं इति ज्ञानं तस्य आत्मज्ञस्य सर्वकर्मसंन्यासे एव अधिकारः न प्रवृत्तौ**—पण ज्याला रात्रीप्रमाणे हें सर्व द्वैत अविद्यामात्र आहे असें ज्ञान झालें आहे त्या आत्मज्ञाचा सर्वकर्मसंन्यासामध्येच अधिकार आहे, कर्मप्रवृत्तींत त्याचा अधिकार नाही. ( तसल्या आत्मज्ञाचा फलभूत संन्यासामध्येंच अधिकार आहे याविषयीं गीतेंतीलच पुढील वाक्य प्रमाण देतात–)—**तथा च 'तद्बुद्धयस्तदात्मानः०'** अ. ५ श्लो. १७ **इत्यादिना ज्ञाननिष्ठायां एव तस्य अधिकारं दर्शयिष्यति**—आणि तसेंच ' तद्बुद्धयः० ' इत्यादि वचनानें ज्ञाननिष्ठेंतच त्याचा अधिकार भगवान् दाखवितील. [ अर्थात् सर्व द्वैत अविद्यामात्र आहे, असे ज्ञान झालेल्या आत्मज्ञाचा सर्वकर्म-संन्यासपूर्वक आत्मज्ञाननिष्ठेंतच अधिकार आहे. कर्मांत नाहीं. ]

**तत्रापि प्रवर्तकप्रमाणाभावे प्रवृत्त्यनुपपत्तिरिति चेत्, न स्वात्मविषयत्वादात्मज्ञानस्य न ह्यात्मनः स्वात्मनि प्रवर्तकप्रमाणापेक्षताऽऽत्मत्वादेव तदन्तत्वाच्च सर्वप्रमाणानां प्रमाणत्वस्य । न ह्यात्मस्वरूपाधिगमे सति पुनः प्रमाणप्रमेयव्यवहारः संभवति । प्रमातृत्वं ह्यात्मनो निवर्तयत्यन्त्यं प्रमाणम् । निवर्तयदेव चाप्रमाणी भवति स्वप्नकालप्रमाणमिव**

**प्रबोधे । लोके च वस्त्वधिगमे प्रवृत्तिहेतुत्वादर्शनात्प्रमाणस्य । तस्मान्नाऽऽत्मविदः कर्मण्यधिकार इति सिद्धम् ॥ ६९ ॥**

**भाष्यार्थ**—( प्रवृत्त करणारें जें प्रमाणवचन त्याला विधि म्हणतात. पण त्याच्या अभावीं विद्वानाची कर्मामध्यें जशी प्रवृत्ति होत नाहीं, त्याप्रमाणेंच विधीच्या अभावीं ज्ञानामध्येंही त्याची प्रवृत्ति संभवत नाहीं, अशी शंका घेऊन तिचें समाधान-)—**प्रवर्तकप्रमाणाभावे तत्र अपि प्रवृत्ति-अनुपपत्तिः इति चेत्**—पण प्रवर्तक प्रमाणाच्या अभावीं म्ह० विधिवाक्याच्या अभावी ज्ञानी पुरुषाची ज्ञाननिष्ठेंतही प्रवृत्ति संभवत नाहीं, अशी शंका घ्याल तर—**न आत्मज्ञानस्य स्वात्मविषयत्वात्**—ती बरोबर नाहीं. कारण आत्मज्ञानाचा विषय स्वात्माच आहे. [ आत्मज्ञानाला विधीची अपेक्षा आहे, असें म्हणतां कीं स्वतः आत्म्यालाच विधीची अपेक्षा आहे ! आत्मज्ञानाला विधीची अपेक्षा नाहीं. कारण त्याचा विषय स्वतः आत्माच आहे. त्यामुळे विधीवांचूनच प्रमाणानुसार त्याचे ज्ञान आपोआपच होतें. बरें आत्म्याला विधीची अपेक्षा आहे, असें म्हणावे तर तसेही नाहीं. ]—**हि स्वात्मनि आत्मनः प्रवर्तकप्रमाणापेक्षता न**—कारण स्वरूपांतच आत्म्याला प्रवर्तक प्रमाणवचनाची अपेक्षताच संभवत नाही. [ प्रवर्तक प्रमाण म्ह० विधि. जी वस्तु साधनांनीं साध्य करून घ्यावयाची असते तिच्या विषयींच विधि संभवतो. आत्मा स्वतःसिद्ध आहे. त्यामुळें त्याला विधीची अपेक्षा नाही. ]—**आत्मत्वात् एव**—कारण आत्म्याला आत्मत्व असल्यामुळेंच विधीची अपेक्षा नाही. [ आत्म्यानें स्वात्म्याचीच प्राप्ति करून घ्यावी, असा विधि संभवत नाही. आपणच आपल्याला उत्पन्न करावें, असा विधि केवल अशक्य आहे. ' अहो पण आत्मा व त्याचें ज्ञान याविषयीं विधि जरी संभवत नसला तरी ज्ञानी पुरुषाच्या व्यवहाराविषयीं नियम करण्यासाठीं विधीची अपेक्षा आहे ' असें कोणी म्हणेल म्हणून आचार्य सांगतात-]—**च सर्वप्रमाणानां प्रमाणत्वस्य तदन्तत्वात्**—आणि सर्व प्रमाणांचें प्रमाणत्व आत्मज्ञान होईपर्यंत असतें. [ आत्मज्ञान झाल्यावर व्यवहाराला अवकाशच उरत नाही. त्यामुळें त्याचा नियम करण्यासाठीं विधीची अपेक्षाच नसते. ]—**हि आत्मस्वरूपाधिगमे सति पुनः प्रमाणप्रमेयव्यवहारः न संभवति**—कारण आत्मस्वरूपाचा साक्षात् अनुभव आला असतां पुनरपि प्रमाण-प्रमेयव्यवहार संभवत नाही. ( हें साधन, हें साध्य, मी या साधनानें हें साध्य मिळविणारा साधक इत्यादि व्यवहार अद्वैत आत्मज्ञान झाल्यावर संभवत नाहीं. ' अहो पण धर्माचें ज्ञान झाल्यावर धर्माचे अनुष्ठान जसे संभवतें त्याप्रमाणें आत्मज्ञान झाल्यावरही ते कां संभवणार नाहीं ? ' उत्तर-)—**हि अन्त्यं प्रमाणं आत्मनः प्रमातृत्वं निवर्तयति**—कारण शास्त्ररूप अन्त्य प्रमाण आत्म्याच्या प्रमातृत्वाचें निवर्तन करतें.—**निवर्तयत् एव स्वप्नकालप्रमाणं प्रबोधे इव अप्रामाणी, भवति**—आणि आत्म्याचें प्रमातृत्व निवृत्त करीत असतानाच स्वप्नकालचें प्रमाण जसें जागें होतांच अप्रमाण ठरतें त्याप्रमाणें तें अन्त्यप्रमाण अप्रमाण

होतें. [ अद्वैत आत्मज्ञान आत्म्याचें कर्तृत्व, भोक्तृत्व, सुखित्व इत्यादिकाचें निवर्तन करतें व तें करीत असतांनाच स्वतःचें प्रामाण्यही टाकते. याविषयीं स्वप्नाचा दृष्टान्त दिला आहे. जागें होतांच स्वप्नांतील सर्व अनर्थ व त्यांची प्रमाणें हीं सर्व एका क्षणांत जशीं मिथ्या ठरतात त्याप्रमाणें आत्मा अकर्ता वगैरे आहे असें ज्ञान होतांच ' तो तसा आहे ' असे सांगणारे वाक्यही अप्रमाण होतें. कारण आत्मज्ञानाचा प्रतिबंध घालविणें एवढेंच शास्त्राचें काम आहे. ते करतांच शास्त्र कृतकार्य होतें. आत्मज्ञानाला विधीची अपेक्षा नसते याविषयीं आणखी एक कारण-]—**च लोके वस्तु-अधिगमे प्रमाणस्य प्रवृत्तिहेतुत्वादर्शनात्**—आणि तसेंच व्यवहारात वस्तूचा निश्चय होणे, हे फल निष्पन्न झाले असता-वस्तूचे ज्ञान झाले असता त्यानंतर मग प्रमाणाला प्रवृत्ति हेतुत्व असल्याचे दिसत नाहीं. [ प्रमाण त्याच वस्तूच्या ज्ञानात प्रवृत्त करीत नाहीं. प्रमाणाचे कार्य झाल्यावर व्यवहारातही तें व्यर्थ ठरत असतें. इष्टस्थानीं जाऊन पोंचल्यावर वाहनाची गरज भासत नाहीं. रज्जूचे ज्ञान झाल्यावर प्रकाश व्यर्थ ठरतो. त्याचप्रमाणे शास्त्रप्रमाणाने अद्वैत आत्मज्ञान झाल्यावर मग तें ज्ञान शास्त्र या प्रमाणाची व विधीचीही अपेक्षा करीत नाहीं. अर्थात् आत्मज्ञानी पुरुषाची ज्ञाननिष्ठा विधीवाचून ज्ञानाच्या माहात्म्यानेच सिद्ध असल्यामुळे ज्ञानी पुरुषाचा कर्मसंन्यासांतच अधिकार आहे, कर्मामध्ये नाहीं, असा उपसंहार करितात.-)—**तस्मात् आत्मविदः कर्मणि अधिकारः न इति सिद्धम्**—म्हणून आत्मवेत्त्याचा कर्मामध्ये अधिकार नाहीं, ही गोष्ट सिद्ध झाली. ६९.

**आपूर्यमाणमचलप्रतिष्ठं समुद्रमापः प्रविशन्ति यद्वत् ।**
**तद्वत्कामा यं प्रविशन्ति सर्वे स शान्तिमाप्नोति न कामकामी ॥**

**अन्वयार्थ-यद्वत्**—ज्याप्रमाणे—**आपः**—पाणी—**आपूर्यमाणं**—पाण्याने चोहोबाजूंनी भरल्या जाणाऱ्या—**अचलप्रतिष्ठं**—तथापि ज्याची मर्यादा थोडीसुद्धां न्यूना-

---

१ या श्लोकाच्या टिपेंत रहस्यकार म्हणतात—" ज्ञानी पुरुष काम्य कर्मे तुच्छ मानतो तर त्यातच सामान्य लोक राबत असतात आणि ज्ञानी पुरुषाला जे निष्काम कर्म पाहिजे ते इतरास नको असते " पण ज्ञानी पुरुषाला निष्काम कर्म पाहिजेच असते याला प्रमाण काय ? शिवाय रात्र व दिवस यांत जितका विरोध आहे तितका तो सकाम कर्मे व निष्काम कर्मे यांत नाहीं. पण ज्ञान व अज्ञान यांत आहे. निष्काम कर्म मुमुक्षूलाच चित्तशुद्धीसाठी विहित आहे. ज्ञानी पुरुषाला तें विहित नाहीं. येथे तर ज्ञानी ज्या आत्मस्वरूपीं दक्ष असतो त्याविषयीं अज्ञ झोपलेला असतो, त्याला त्याचे भानही नसते व अज्ञ जीव ज्या व्यवहारदशेंत अतिशय दक्ष असतात तिचे ज्ञानी पुरुषाला भान नसतें, हाच विवक्षित अर्थ आहे. रहस्यकारांचा भावार्थ ज्ञानी पुरुषाच्या परिस्थितीला धरून नाहीं. ज्ञानामृताने तृप्त झालेल्या पुरुषाच्या हातून निष्काम कर्महि होणे शक्य नाहीं व त्याला त्याची कांहीं गरजही नाही. ज्ञानानें तृप्त झालेल्या पुरुषाच्या मनांत कामाचा जर मुळी संभवच नाहीं तर तो निष्काम कर्मे करील, ही तरी दुराशाच नव्हे का ?

धिक होत नाहीं, ज्याच्यामध्यें कांहीं फरक पडत नाहीं अशा—**समुद्रं**—समुद्रास समुद्रामध्यें—**प्रविशन्ति**—शिरते—**तद्वत्**—त्याप्रमाणें—**सर्वे कामाः**—सर्व इच्छा —**यं प्रविशन्ति**—ज्या पुरुषामध्ये त्याला विकारयुक्त न करितां प्रवेश करितात— **सः**—तो—**शान्तिं**—शांतीला—**आप्नोति**—प्राप्त होतो—**न कामकामी**—विषयांची इच्छा करणारा शांतीला प्राप्त होत नाहीं. ७०

**विदुषस्त्यक्तैषणस्य स्थितप्रज्ञस्य यतेरेव मोक्षप्राप्तिर्न त्वसंन्यासिनः कामकामिन इत्येतमर्थं दृष्टान्तेन प्रतिपादयिष्यन्नाह आपूर्यैति । आपूर्यमाणमद्भिरचलप्रतिष्ठमचलतया प्रतिष्ठाऽवस्थितिर्यस्य तमचलप्रतिष्ठं समुद्रमापः सर्वतोगताः प्रविशन्ति स्वात्मस्थमविक्रियमेव सन्तं यद्वत्तद्वत्कामा विषयसंनिधावपि सर्वत इच्छाविशेषा यं पुरुषं समुद्रमिवाऽऽपोऽविकुर्वन्तः प्रविशन्ति सर्वे आत्मन्येव प्रलीयन्ते न स्वात्मवशं कुर्वन्ति स शान्तिं मोक्षमाप्नोति नेतरः कामकामी काम्यन्त इति कामा विषयास्तान्कामयितुं शीलं यस्य स कामकामी नैव प्राप्नोतीत्यर्थः ॥ ७० ॥**

**भाष्यार्थ**—( अहोपण ज्यानें संन्यास केलेला नाहीं अशा विद्वान् पुरुषालाहीं विद्येचें फळ जो मोक्ष तो मिळणे शक्य आहे. मग विद्वानानें संन्यासच करावा, असा आग्रह कां ? उत्तर-)—**त्यक्त-एषणस्य-स्थितप्रज्ञस्य विदुषः यतेः एव मोक्षप्राप्तिः असंन्यासिनः कामकामिनः न**—ज्यानें सर्व एषणांचा त्याग केला आहे अशा स्थितप्रज्ञ विद्वान् यतीलाच मोक्षाची प्राप्ति होते, जो असंन्यासी-कामकामी —विषयेच्छु त्याला मोक्षप्राप्ति होत नाहीं—**इति एतं अर्थं दृष्टान्तेन प्रतिपादयिष्यन् ‘ आपूर्य० ’ इति आह**—अशा या अर्थाचें दृष्टान्तानें प्रतिपादन करणारे भगवान् ‘ आपूर्यमाणं० ’ या श्लोकानें सांगतात—[ ज्याला आत्म्याचें आपात ज्ञान —परोक्ष ज्ञान झालें आहे, जो विवेक-वैराग्यादिकांनीं युक्त आहे, पुत्र-वित्त-लोक यांविषयींच्या एषणा-इच्छा ज्यानें सोडल्या आहेत व श्रवण-मनन-निदिध्यासन यांच्या द्वारा ज्याला आत्मसाक्षात्कार झाला आहे अशा मुख्य संन्याशालाच मोक्ष मिळतो, विषयतृष्णेनें पराभूत होणाऱ्या पुरुषाला मोक्ष मिळत नाहीं, हा परम सिद्धान्त सांगण्याची इच्छा करणारे भगवान् ‘ रागद्वेषवियुक्तै० ’ श्लो. ६४ या श्लोकांत सांगितलेला अर्थच पुनः सांगतात-]—**अद्भिः आपूर्यमाणं**—पाण्यानें चोहोंकडून भरला जाणारा तथापि—**अचलप्रतिष्ठं-अचलतया प्रतिष्ठा-अवस्थितिः यस्य तं अचलप्रतिष्ठं समुद्रं**—ज्याची प्रतिष्ठा म्ह० अवस्थिति अचलतेनें असते-ज्याचें स्वरूप अगदीं अचल असतें, त्यांत वृद्धि किंवा क्षय हे विकार होत नाहात त्या अचलप्रतिष्ठ समुद्रास—**सर्वतः गताः आपः प्रविशन्ति**—सर्व बाजूंनीं गेलेलें नद्यांचें जल ( समुद्रांत ) प्रवेश करतें—**स्वात्मस्थं अविक्रियं एव सन्तं यद्वत्**—स्वरूपांत स्थित असलेल्या-अविक्रिय अशाच समुद्रास सर्व बाजूंनीं वाहत गेलेलें पाणी जसें मिळतें —**तद्वत्**—तसे—**कामाः सर्वतः इच्छाविशेषाः**—काम म्ह० सर्व विषयांविषयींच्या निरनिराळ्या इच्छा—**विषयसंनिधौ अपि**—विषय संनिध-समोर असले

तरी—**आपः समुद्रं इव यं पुरुषं अविकुर्वन्तः प्रविशन्ति**—जल समुद्राला जसें, त्याप्रमाणें ज्या पुरुषाला विकारयुक्त न करतां त्याच्यामध्यें प्रवेश करितात म्ह० —**सर्वे आत्मनि एव प्रलीयन्ते स्वात्मवशं न कुर्वन्ति**—सर्व काम आत्म्या-मध्येंच प्रलय पावतात त्याला ते आपल्या अधीन करीत नाहीत—**सः शान्तिं-मोक्षं आप्नोति**—तो शांतीला म्ह० मोक्षाला प्राप्त होतो.—**इतरः कामकामी न**—दुसरा -त्याहून निराळा कामकामी मोक्षाला प्राप्त होत नाही.—**काम्यन्ते इति कामाः -विषयाः तान् कामयितुं शीलं यस्य सः कामकामी**—ज्यांची कामना-इच्छा केली जाते ते काम म्ह० विषय. त्यांची इच्छा करण्याचें ज्याचें शील आहे तो काम-कामी—**न प्राप्नोति एव**—तो मोक्षास प्राप्त होतच नाही. [हजारो नद्यांचे पाणी चोहो-कडून प्रतिक्षणीं समुद्रास येऊन मिळत असतें. पण त्याच्या ठराविक उदकरूप स्वरूपांत थोडासुद्धां न्यूनाधिक भाव झालेला दिसत नाही, त्याची स्थिति एकरूपच असते. त्याच-प्रमाणे सर्व विषय विद्वानाच्या अगदीं समीप असले तरी त्यांविषयींच्या सर्व इच्छा त्याच्या अन्तःकरणांत लीन होतात. त्या त्यामध्ये कोणताही विकार उत्पन्न करीत नाहींत. अशा विषयांविषयीं अगदी विरक्त झालेल्या निष्काम ज्ञानी पुरुषालाच मोक्षरूप शांति प्राप्त होते. विषयासक्त सकाम पुरुषाला ती प्राप्त होत नाहीं.[1] ] ७०

विहाय कामान्यः सर्वान्पुमांश्चरति निःस्पृहः ।
निर्ममो निरहंकारः स शान्तिमधिगच्छति ॥ ७१ ॥

**अन्वयार्थ**—**यः**—जो—**पुमान्**—पुरुष—**सर्वान् कामान् विहाय**—सर्व कामांस टाकून, सर्व कामनांचा त्याग करून—**निःस्पृहः**—निरिच्छ—**निर्ममः**—मम-तारहित—**निरहंकारः**—अहंकाररहित होऊन—**चरति**—पर्यटन करतो,—**सः**—तो—**शान्तिं**—शांतीला—**अधिगच्छति**—प्राप्त होतो. ७१.

---

१ या श्लोकावरील टीपेत रहस्यकार पुनः म्हणतात–"शांति मिळविण्यासाठी कर्मे करूं नयेत असा या श्लोकाचा अर्थ नसून सामान्य लोकांचे मन फलाशेने गांगरून जाऊन कर्मांनी त्यांच्या मनाची शांति बिघडते, पण सिद्धावस्थेस पोंचलेल्याचें मन फलाशेने क्षुब्ध न होतां कितीही कर्में करावयाचीं असलीं तरी त्याच्या मनाची शांति न ढळतां समुद्रासारखा शांत राहून तो तीं करीत असतो .. " इत्यादि. पण काम म्ह० फलाशा हा अर्थ बरोबर नाही. श्लोकाचा अर्थ करतांना ते 'सर्वे कामाः' याचा 'सर्व विषय' व 'विषयांची इच्छा' असाच सरळ अर्थ करि-तात. पण टीपेंत 'कर्म व फलाशा' ही जोडी पदरचीच आणतात व 'सिद्धाला कितीही कर्में करावयाचीं असलीं' असें म्हणून त्याच्यावर काल्पनिक कर्मांचा उगीच बोजा लादतात. या श्लोकांत विषयेच्छारहित पुरुषाला शांति मिळते व विषयेच्छावानाला ती मिळत नाही, हेच सांगावयाचें आहे. येथे कर्म किंवा फलाशा यांचा काही संबंध नाही. त्यांचा मुळांत मुळीच उल्लेख केलेला नाही.

**यस्मादेवं तस्मात् विहायेति । विहाय परित्यज्य कामान्यः संन्यासी पुमान्सर्वानशेषतः कार्त्स्न्येन चरति जीवनमात्रचेष्टाशेषः पर्यटतीत्यर्थः, निस्पृहः शरीरजीवनमात्रेऽपि निर्गता स्पृहा यस्य स निस्पृहः सन्निर्ममः शरीरजीवनमात्राक्षिप्तपरिग्रहेऽपि ममेदमित्यभिनिवेशवर्जितः, निरहंकारो विद्यावत्त्वादिनिमित्तात्मसंभावनारहित इत्यर्थः स एवंभूतः स्थितप्रज्ञो ब्रह्मविच्छान्तिं सर्वसंसारदुःखोपरमलक्षणां निर्वाणाख्यामधिगच्छति प्राप्नोति ब्रह्मभूतो भवतीत्यर्थः ॥ ७१ ॥**

**भाष्यार्थ**—( सर्व अभिमान टाकून कूटस्थ ब्रह्मच मी आहे, अशी सतत भावना करणाऱ्या गृहस्थालाही जर ब्रह्मनिर्वाण प्राप्त होतें तर संन्यासच काय करावयाचा आहे? उत्तर-)—**यस्मात् एवं तस्मात् ' विहाय० ' इति आह**—ज्याअर्थी निष्काम पुरुषालाच मोक्ष मिळतो व विषयाभिलाष धरणाऱ्या सकाम पुरुषाला मिळत नाहीं, असा अबाधित नियमच आहे त्याअर्थी '**विहाय०**' इत्यादि सांगतात.—**यः-संन्यासी कामान् सर्वान्-अशेषतः-कार्त्स्न्येन विहाय-परित्यज्य**—जो संन्यासी सर्व कामांना, कोणताच काम बाकी न ठेवतां, पूर्णपणें टाकून—**चरति-जीवनमात्रचेष्टाशेषः पर्यटति इत्यर्थः**—संचार करतो-फक्त जीवनाला अवश्य तेवढीच शरीरचेष्टा –हालचाल ज्याची बाकी राहिली आहे असा होऊन पर्यटन करतो, असा याचा अर्थ, [ शरीर जिवंत राहण्यास अवश्य तेवढेंच कर्म करतो व एकाच जागीं राहिल्यास त्या स्थानादिकांवर आसक्ति जडेल म्हणून एकाच नियत स्थानीं न राहतां पर्यटन करीत राहतो; त्याचीच ' निस्पृह ' ' निर्मम ' व ' निरहंकारः ' हीं आणखी तीन विशेषणें आहेत- त्यांचे व्याख्यान-]—**निःस्पृहः-शरीरजीवनमात्रे अपि निर्गता स्पृहा यस्य सः निःस्पृहः सन्**—फक्त शरीराच्या जीवनाला अवश्य तेवढ्याच अन्नवस्त्रादि पदार्थांविषयींही ज्याची इच्छा अवशिष्ट राहिलेली नाहीं तो निःस्पृह, असा निस्पृह होऊन व—**निर्ममः-ममत्ववर्जितः-शरीरजीवनमात्र-आक्षिप्तपरिग्रहे अपि ' मम ' इति अभिनिवेशवर्जित**—निर्मम म्ह० ममत्वरहित–शरीराच्या केवल जीवनाला अत्यंत अवश्य असलेल्या परिग्रहाविषयींही ' हा माझा ' असा अभिनिवेश ज्याला नसतो तो निर्मम,—**निरहंकारः-विद्यावत्त्वादिनिमित्त-आत्मसंभावनारहितः इत्यर्थः**—अहंकारशून्य–मी मोठा विद्वान् आहे, अशा प्रकारच्या विद्यावत्त्वादिकांविषयींच्या आत्मसंभावनेनें रहित असलेला असा याचा भावार्थ. —**सः एवंभूतः स्थितप्रज्ञः ब्रह्मविद्-सर्वसंसारदुःखोपरमलक्षणां निर्वाणाख्यां शान्ति अधिगच्छति-प्राप्नोति-ब्रह्मभूतः भवति इत्यर्थः**—तो अशाप्रकारचा स्थितप्रज्ञ ब्रह्मवेत्ता सर्व संसारदुःखांचा क्षय हेच जिचें लक्षण–स्वरूप आहे व निर्वाण हे जिला नाव आहे अशा शांतीला प्राप्त होतो, ब्रह्मभूत होतो, असा याचा भावार्थ. [ मोक्षाची इच्छा करणाऱ्या संन्याश्याची सर्व कामत्याग, निःस्पृहता, निर्ममता, निरहंकार इत्यादि विशेषणें यत्नसाध्य असून कैवल्य हे त्यांचें फळ आहे. ] ७१.

---

१ रहस्यकार या श्लोकाचा अर्थ असा करितात—"सर्व काम म्ह० आसक्ति सोडून जो पुरुष निःस्पृह होऊन ( व्यवहारांत ) वागतो व ज्याला ममत्व व अहंकार नाहीं त्यालाच

शांति मिळते " पण यांतील काम म्ह० आसक्ति हा अर्थ बरोबर नाहीं. तो प्रसिद्ध अर्थाच्या विरुद्ध आहे इतकेच नव्हे तर वरच्या श्लोकांत कामशब्दाचा जो अर्थ केला आहे त्याच्याही विरुद्ध आहे. वरच्या श्लोकांत एकदा 'विषय' व दुसऱ्यांदा 'विषयाची इच्छा' असा केला आहे. व येथें 'आसक्ति' असा केला आहे, हा विरोध वाचकांनी लक्षांत ठेवावा. तसेंच 'चरति' म्ह० वागतो हा अर्थ विचित्र आहे. पण आपलाच अर्थ निर्दोष आहे असें मानून ते टीपेंत म्हणतात—" चरति–वागतो या पदाचा सन्यासमार्गातील टीकाकार 'भिक्षा मागत हिंडतो' असा अर्थ करितात, पण तो बरोबर नाही. मागें ६४ व ६७ व्या श्लोकांत 'चरन्' व ' चरतां ' यांचा जो अर्थ आहे तोच येथेंही घेतला पाहिजे. स्थितप्रज्ञानें भिक्षा मागावी असा गीतेत कोठेंही उपदेश नाहीं. उलट ६४ व्या श्लोकांत इंद्रियें ताब्यांत ठेवून 'विषयांमध्यें वागावें' असें स्पष्ट म्हटले आहे. म्हणून चरति म्ह० वागतो, जगाचे व्यवहार करतो, असाच अर्थ केला पाहिजे" ६४१.पण 'भिक्षा मागत हिंडतो' असा अर्थ कोणी अद्वैती टीकाकार करीत नाही. आचार्य 'चरति' म्ह० पर्यटन करतो, असा करितात.मधुसूदनसरस्वती व श्रीधरस्वामी'प्रारब्धकर्मवशेन भोगान् भुक्ते–यादृच्छिकतया यत्र क्वापि गच्छति इति वा' शंकरानन्द ' भूमौ सर्वत्र असंगोदासीनो भूत्वा पर्यटति' असा अर्थ करितात. ज्ञानेश्वरमहाराजही 'तो अहंकारातें दवडुनी । सकळ काम सांडुनी । विचरे विश्व होऊनी। विश्वामाजी ॥' असा करितात. अर्थात् 'स्थितप्रज्ञाने भिक्षा मागावी असा गीतेत कोठेंही उपदेश नाहीं' असें जें म्हणणे आहे ते वृथा होय. कारण आचार्यादि जर तसे म्हणतच नाहीत, तर 'गीतेत कोठेंही तसा उपदेश नाहीं, ' या म्हणण्यात काय स्वारस्य आहे ? रहस्यकार म्हणतात ' चरन् ' ६४ व 'चरतां-' ६७ याचा जो अर्थ आहे तोच ' चरति-' शब्दाचा अर्थ घेतला पाहिजे. पण तेथे 'विषयान् चरन्' व 'इंद्रियाणां चरतां' असे शब्द आहेत व येथे 'यः पुमान् सर्वान् कामान् विहाय चरति ' जो पुरुष सर्व विषयांच्या इच्छास सोडून पर्यटण करतो असे आहे. त्यामुळे तेथे विषयाचा अनुभव घेत व इंद्रिय विषयामध्ये प्रवृत्त होत असता, असा अर्थ करावा लागतो; व येथे 'जो जातो, पर्यटन करतो,' असा अर्थ होतो. 'विषयामध्ये वागतो' हा अर्थ दुर्बोध आहे व मूळ शब्दांना धरूनही नाहीं. कारण 'विषयान् चरन्-' यांतील 'विषयान' ही द्वितीया आहे,सप्तमी नव्हे व 'चरन्-'भोगणारा हे प्रथमान्त वर्तमानकालवाचक धातुसाधित विशेषण आहे. त्यामुळे 'विषयांमध्ये' व 'वागतो' हा त्याचा खरा अर्थच नव्हे. 'चर-गतौ' या धातूपासून झालेले 'चरति' हे क्रियापद चालणे, जाणे या अर्थीच मुख्य आहे. वागणे या अर्थी मुख्य नाहीं. ' विषयान् चरन् ' येथे ' चरन्'-चें विषय हे कर्म प्रत्यक्ष आहे. 'चरति' येथील प्रयोग अकर्मक आहे. वागणें हे मराठी क्रियापदही अकर्मक, आहे. म्हणून 'विषयान् चरन-' याचा अर्थ प्रत्यक्ष कर्माचा त्याग करून 'विषयांमध्ये वागतो,' असा करणें हा अन्याय आहे आणि वागतो म्ह० 'जगाचे व्यवहार करतो' हा तर अर्थ नसून अनर्थच आहे अद्वैत वेदान्ती भाष्य-टीकाकारांवर आक्षेप करताना रहस्यकारांनी याहून अधिक सूक्ष्म दृष्टि ठेवावयास पाहिजे होती. पण परमात्म्यानें त्यांना तशी बुद्धि दिली नाहीं. असो; सर्वकामांचा त्याग,निःस्पृहता, निर्ममत्व,निरहंकारत्व या विशेषणांवरून स्थितप्रज्ञ कर्मयोगी ठरतो की ज्ञानयोगी,हें आतां भाष्यार्थाच्या साह्यानें वाचकांनींच ठरवावे.

एषा ब्राह्मी स्थितिः पार्थ नैनां प्राप्य विमुह्यति ।
स्थित्वास्यामन्तकालेऽपि ब्रह्मनिर्वाणमृच्छति ॥ ७२ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे सांख्ययोगो नाम द्वितीयोऽध्यायः ॥

**अन्वयार्थ—हे पार्थ**—हे अर्जुना!—**एषा**—ही वर सांगितलेली—**ब्राह्मी**—ब्रह्मांतील-ब्रह्मासंबंधीं—**स्थितिः**—स्थिति आहे.—**एनां**—या स्थितीला—**प्राप्य**—प्राप्त होऊन—**न विमुह्यति**—मनुष्य मोहित होत नाही.—**अस्यां**—या स्थितींत—**अन्तकाले अपि स्थित्वा**—अन्त्य वयामध्येंही स्थित होऊन तो—**ब्रह्मनिर्वाणं**—मोक्षास—**ऋच्छति**—प्राप्त होतो. ७२.

**सैषा ज्ञाननिष्ठा स्तूयते एषा ब्राह्मीति । एषा यथोक्ता ब्राह्मी ब्रह्मणि भवेयं स्थितिः सर्वं कर्म संन्यस्य ब्रह्मरूपेणैवावस्थानमित्येतत् । हे पार्थ नैनां स्थितिं प्राप्य लब्ध्वा न विमुह्यति न मोहं प्राप्नोति । स्थित्वाऽस्यां स्थितौ ब्राह्म्यां यथोक्तायामन्तकालेऽप्यन्ते वयस्यपि ब्रह्मनिर्वाणं ब्रह्मनिर्वृतिं मोक्षमृच्छति गच्छति किमु वक्तव्यं ब्रह्मचर्यादेव संन्यस्य यावज्जीवं यो ब्रह्मण्येवावतिष्ठते स ब्रह्मनिर्वाणमृच्छतीति ॥ ७२ ॥**

इति श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यगोविन्दभगवत्पूज्यपादशिष्यश्रीमच्छंकरभगवतः कृतौ श्रीभगवद्गीताभाष्ये सांख्ययोगो नाम द्वितीयोऽध्यायः ॥ २ ॥

**भाष्यार्थ**—( याप्रमाणें या अध्यायांत ठिकठिकाणीं संक्षेपानें व विस्तारानें प्रदर्शित केलेल्या ज्ञाननिष्ठेमध्यें अधिकारी पुरुषाची प्रवृत्ति होण्यासाठीं भगवान् तिची स्तुति करितात, असें सांगून आचार्य या अध्यायाच्या शेवटच्या श्लोकाला अवतरण देतात–) **—सा एषा ज्ञाननिष्ठा 'एषा ब्राह्मी०' इति स्तूयते**—ती ही ज्ञाननिष्ठा 'एषा ब्राह्मी०' या श्लोकानें स्तविली जाते.—**एषा-यथोक्ता ब्राह्मी-ब्रह्मणि भवा**

---

१ सर्व अद्वैती टीकाकार या श्लोकांत ज्ञाननिष्ठेची स्तुति करितात, असेंच अवतरण देतात. कित्येक 'प्रकरणाचा उपसंहार करितात' असें अवतरण देतात. रहस्यकार याला अवतरणच देत नाहींत. अर्थात 'अंतकाळीं म्ह० मरणाच्या वेळीं सुद्धा या स्थितीमध्यें राहून त्याला ब्रह्मनिर्वाण म्ह० ब्रह्मांत मिळून जाण्याच्या स्वरूपाचा मोक्ष मिळतो' असें म्हणतात. टीपेंत "ब्राह्मी स्थिति ही कर्मयोगांतील शेवटची व अत्युत्तम स्थिति होय... एखाद्या मनुष्याला एखादे दिवशीं घटिकाभर ब्राह्मी स्थितीचा कदाचित् अनुभव येऊं शकला तरी त्यापासून कांहीं कायमचा फायदा होत नाहीं . मरते वेळीं जर ही स्थिति नसेल तर त्यावेळीं मनांतील वासनेप्रमाणें पुनर्जन्म टळत नाहीं." वगैरे ६४१. ब्राह्मी स्थिति ही जर कर्मयोगांतील शेवटची स्थिति तर मग ज्ञानयोगांतील शेवटची स्थिति कोणती ? कीं ज्ञानयोगांत शेवटची स्थितिच नाहीं ? पण 'ही कर्मयोगांतील शेवटची व अत्युत्तम स्थिति' आहे हें म्हणणें रहस्यकारांच्या पदरचें आहे. त्याला मुळांत कांहीं आधार नाहीं. रह-

स्यकारांनी गीतेतील स्थितप्रज्ञ कर्मयोगी आहे, अशी जी आपली भ्रामक समजूत एकदा करून घेतली आहे तिच्या पुष्टीसाठी हे वाक्य आहे. 'एखाद्याला एखादे दिवशी घटकाभर ब्राह्मी स्थितीचा कदाचित् अनुभव येऊ शकला ' इत्यादि वाक्यावरूनच रहस्यकारांना ब्राह्मीस्थितीची यथार्थ कल्पना नाही, हे उघट दिसते. त्यांना जर तिची बरोबर कल्पना असती तर ' एखादे दिवशी घटिकाभर अनुभव ' इत्यादि ब्राह्मीस्थितीला लागू नसलेले शब्द त्यांनी कधी लिहिले नसते. ब्राह्मी स्थिति म्ह० जीवन्मुक्ति, स्थितप्रज्ञता ती एखादे दिवशी, घटिकाभर कधीच प्राप्त होत नसते. सर्व विक्षेपरहित झालेले मन आत्म्यामध्ये जेव्हा निश्चल होते तेव्हांच ही स्थिति प्राप्त होते. जो एकदा या अवस्थेला प्राप्त झाला त्याची शांति कधीहि ढळत नाही. ' गुरुणापि दुःखेन न विचाल्यते '—फार मोठ्या दुःखानेही तो स्वरूपापासून ढळत नाही. ( अ. ६ श्लो. २२ ). असे गीतेतच सांगितले आहे. हीच ज्ञाननिष्ठा होय. कर्मनिष्ठा नव्हे. ' कर्मयोगी स्थितप्रज्ञ ' ही शुद्ध कल्पना आहे. कल्पनेला काही अशक्य नाही. कल्पना आकाशातही भव्य रत्नजडित प्रासाद उभा करूं शकेल. पण अनुभवाने लहानशी झोपडीही बांधता येणे शक्य नाही मूळ श्लोकार्थाकडे जरी अधिक काळजीपूर्वक पाहिले तरी ही स्थिति एखाद्या दिवशी घटिकाभरच अनुभवास येणे शक्य नाही, हे लक्षात येते. कारण ह्या स्थितीला प्राप्त होऊन पुरुष मोहित होत नाही, एकदा ही अवस्था प्राप्त झाली की पुन. ' हा मी व हे माझे, सुखी, दुःखी, कर्ता, भोक्ता ' इत्यादि मोह होत नाही, असे येथे स्पष्ट म्हटले आहे. त्यावरून ही स्थिति क्षणभर प्राप्त होऊन पुन. तिचा अस्त होतो, असे ठरत नाही ' गतायाः भ्रांतेः न पुनरागमः ' आत्मज्ञान होऊन तत्काल गेलेली भ्रांति पुन. होत नाही, ' ज्ञानसमकालमुक्तः ' ज्ञान होतांच मुक्त झालेला, इत्यादि अनेक वचने याविषयी प्रमाण आहेत. पण रहस्यकारांचा स्थितप्रज्ञ बिचारा कर्मयोगी पडला ! त्यामुळे त्याच्या मनात सुख-दुःखादि इतर अनेक क्षणिक वृत्तीप्रमाणे हा ब्राह्मी स्थितिही क्षणभर उदय पावत असल्यामुळे ती अंतकालीही असली तरच त्याला मोक्ष मिळेल, नाही तर तो ( कर्मयोगी स्थितप्रज्ञ ) पुनः जन्म घेईल, हे उघड आहे! म्हणून त्यांना क्षणिक ब्राह्मी स्थितीची येथे कल्पना करून अन्तकालीही त्या स्थितीची आवश्यकता टीपेत सद्दाम वर्णिली आहे. पण अद्वैत संप्रदाय म्हणजेच औपनिषद सिद्धान्त तसा नाही. 'परमात्म्याचा साक्षात्कार होताच सर्व अविवेक, संशय, व कर्म क्षीण होतात-' असा उपनिषदांचा सिद्धान्त आहे. 'आत्मवित् शोकं तरति-' आत्मवेत्ता सर्व शोकांचे उल्लंघन करितो. ब्रह्मविद् ब्रह्मच होतो, इत्यादि अनेक वचने ज्ञान होताच सर्व दुःखादिकाचा क्षय होतो, असे सांगतात आणि ज्ञानी पुरुषाची ज्ञानोत्तर जी स्थिति तीच ब्राह्मी स्थिति तिलाच जीवन्मुक्ति म्हणतात. ज्ञाननिष्ठांचीच ती स्थिति असल्यामुळे कर्मयोगाचा त्या दशेत संभवच नाही. अर्थात् ही स्थिति अगदी शेवटी शेवटी—मरता मरता जरी प्राप्त झाली तरी त्या मुमूर्षूलाही मोक्ष मिळतो. अर्थात् शेवटी शेवटी जरी ज्ञान झाले तरी 'ज्ञान होतांच मोक्ष' असा सिद्धान्त असल्यामुळे त्याच्या मोक्षाला काही प्रतिबंध होत नाही. अर्थात् पूर्व वयांतच ज्ञान होऊन जीवन्मुक्त दशेचा अनुभव ज्याने पुष्कळ वर्षे घेतला आहे, त्याच्या मोक्षाविषयी तर संशयच नको, असा याचा आशय आहे. 'अगदी शेवटी जरी ही ब्राह्मी स्थिति प्राप्त झाली तरी मोक्ष मिळतो' असा उत्तरार्धाचा अर्थ आहे, व त्यांतच अधिक

**इयं स्थितिः**—ही या अध्यायांत सांगितलेली ब्राह्मी-ब्रह्मामध्यें झालेली ही स्थिति म्ह०—**सर्वं कर्म संन्यस्य ब्रह्मरूपेण एव अवस्थानं इति एतत्**—सर्व कर्मांचा संन्यास करून ब्रह्मरूपानेंच अवस्थित होणें, असा 'ब्राह्मी स्थिति' या शब्दाचा अर्थ.—**हे पार्थ एनां स्थितिं प्राप्य-लब्ध्वा न विमुह्यति-न मोहं प्राप्नोति**—हे अर्जुना, या स्थितीला प्राप्त होऊन-संपादन करून मुमुक्षु विमूढ होत नाहीं-मोहास प्राप्त होत नाहीं.—**अस्यां यथोक्तायां ब्राह्म्यां स्थितौ अन्तकाले अपि-अन्ते वयसि अपि स्थित्वा**—या वर सांगितलेल्या प्रकारच्या सर्व कर्मसंन्यासपूर्वक ब्राह्मी स्थितींत अन्तकालींही-अगदीं अखेरच्या वयांतही स्थित होऊन—**ब्रह्मनिर्वाणं-ब्रह्मनिर्वृतिं-मोक्षं ऋच्छति-गच्छति**—ब्रह्मनिर्वाणास-ब्रह्मामध्ये शांतीस-मोक्षास प्राप्त होतो. [ अहोपण गृहस्थ व संन्यासी असे दोघेही जर मोक्षाला प्राप्त होतात तर अत्यंत कष्ट देणाऱ्या संन्यासाचीच इतकी काय मोठी आवश्यकता आहे ? असें कोणी म्हणेल ! पण गृहस्थांच्या ज्ञानप्राप्तीलो प्रतिबंध फार व त्यात विघ्नेही पुष्कळ येतात. म्हणून मुमुक्षूला संन्यासाचीच अत्यंत अपेक्षा असते, असे येथे 'ब्राह्मी' स्थिति या शब्दांनी सुचविले आहे. या ब्राह्मी स्थितीला प्राप्त झाल्यावर संन्याश्याला विमोह होण्याचा फारसा संभव जरी नसला तरी गृहस्थाला धनादिकांच्या हानीमुळे मोह होण्याचा फार संभव असतो. मोहामुळें त्याचे चित्त विक्षिप्त होते व तो परमार्थविवेकशून्य होतो. यास्तव सर्व कर्मसंन्यासपूर्वक या ब्रह्मनिष्ठेंत अगदी अखेरच्या वयात जरी एखादा मनुष्य स्थित झाला तरी त्याला मोक्ष मिळतो. ) मग—**यः ब्रह्मचर्यात् एव संन्यस्य यावज्जीवं ब्रह्मणि एव अवतिष्ठते सः ब्रह्मनिर्वाणं ऋच्छति इति किमु वक्तव्यम्**—जो ब्रह्मचर्याश्रमांतूनच संन्यास करून मरेपर्यंत ब्रह्मामध्येच अवस्थित होतो तो ब्रह्मनिर्वाणास प्राप्त होतो हें काय सांगावे ! ७२

[ याप्रमाणे या अध्यायांत '**तत्त्वमसि**' या महावाक्यांतील—'**तत्**-' पदाचा अर्थ परमात्मा,'**त्वं**-'पदाचा अर्थ जीवात्मा, त्यांचे ऐक्य 'हाच महावाक्याचा अर्थ' केवल आत्मज्ञानानेंच मुक्ति व तिचा उपाय, यांचें येथें प्राधान्याने वर्णन केलें आहे. त्यावरून या अध्यायांत उपाय-उपेयभूत म्ह० साध्यसाधनभूत दोन निष्ठा सांगितल्या आहेत, हें सिद्ध झालें, असें आनंदज्ञान म्हणतात. ज्ञाननिष्ठाच शोक-मोहांची साक्षात् निवृत्ति करते. यास्तव या अध्यायांत तिचेच मुख्यत्वाने वर्णन करून ज्ञाननिष्ठेचा उपाय अशी जी योग-

---

स्वारस्य आहे. ब्राह्मी स्थिति केव्हाही जरी प्राप्त झाली तरी मोक्ष मिळतो, हें भगवानांना विवक्षित आहे. ती स्वस्थावस्थेत जशी तशीच मरणाचे वेळींही प्राप्त झाली पाहिजे, तरच मोक्ष मिळतो, असें म्हटल्यास पूर्वोक्त वेदान्त सिद्धान्ताशी विरोध येतो, इतकेंच नव्हे तर 'या स्थितीला प्राप्त होऊन मनुष्य मोहित होत नाही' या दुसऱ्या चरणाशीही विरोध येतो. आचार्य व इतर अद्वैती टीकाकारच 'अंतकालेऽपि' याचा असा अर्थ करितात असे नाही, तर रामानुजाचार्येही 'अस्यां स्थित्यां अन्तिमेऽपि वयसि स्थित्वा' असा अर्थ करितात. वल्लभसं. टी. 'अन्तकाले क्षणं अपि अस्यां स्थित्वा' असें म्हणतात.

**निष्ठा ती गौणत्वानें सांगितली आहे. याप्रमाणे येथें उपाय-उपेयभूत दोन निष्ठा भगवानांनी प्रतिपादिल्या आहेत, असें भाष्योत्कर्षदीपिकाकार म्हणतात. ज्ञान, ज्ञानाचें साधन कर्म, चित्तशुद्धि हें कर्माचें फळ व ज्ञाननिष्ठा हे चित्तशुद्धीचें फळ या अध्यायांत सांगितलें आहे, असे मधुसूदनसरस्वती म्हणतात.]**

इति भगवान् श्रीकृष्णांनीं गायलेल्या—सांगितलेल्या उपनिषदांतील—रहस्यविद्येतील ब्रह्मविद्येपैकीं योग—उपाय—शास्त्रांतील सांख्ययोग—ज्ञानयोगनांवाचा दुसरा अध्याय विष्णुशर्मकृत सान्वयार्थ-सटीप-भाष्य-भाष्यार्थासह समाप्त झाला.

---

१ पण रहस्यकार समाप्तिसूचक संकल्पांत " योग म्ह० कर्मयोग शास्त्रावरील ... सांख्ययोगनांवाचा दुसरा अध्याय " असे म्हणतात व टीपेत " या अध्यायांत आरंभीं सांख्य किंवा संन्यासमार्गाचें विवेचन असल्यामुळें याला 'सांख्ययोग' हे नांव दिलें आहे. परंतु तेवढ्यावरून सबंध अध्यायांत तोच विषय आहे, असें समजूं नये. एकाच अध्यायांत प्रायः अनेक विषय असतात. त्यांतील प्रारंभींचा किंवा प्रमुख विषय घेऊन त्याप्रमाणें त्या अध्यायाला नांव दिलें जातें. " असें त्याचें उपपादन करितात ' पण कर्मयोगशास्त्रावरील सांख्ययोग ' हा शब्दप्रयोगच सदोष आहे. दुसऱ्या अध्यायाच्या ११–३० श्लोकांत संन्यासमार्गाचें विवेचन नाहीं. आत्मयाथात्म्य–आत्मस्वरूप सांगितलें आहे. पण तेंही सांख्य या नांवाचें आहे. त्याला योग हे नांव कसें प्राप्त झालें? भगवानांनीं तर ' सांख्ये बुद्धिः ' असें म्हटलें आहे. सांख्ययोग असें नांव कोठेंच नाहीं मग संकल्पांतच तें नांव कोठून आलें? तसेंच ' योगशास्त्रांतील म्ह० कर्मयोगशास्त्रावरील सांख्ययोग ' याचा अर्थ रहस्यकाराच्याच परिभाषेप्रमाणें 'कर्मयोगशास्त्रावरील संन्यासमार्गाच्या विवेचनाचा योग ' असा होतो पण येथील ' योग-' शब्दाचा अर्थ काय? कीं त्याचाही अर्थ कर्मयोगच? कीं साम्य? कीं कौशल? पण त्यांतील कोणताही अर्थ जरी घेतला तरी ' संन्यासमार्गाच्या विवेचनाशीं' तो जुळत नाहीं. शिवाय कर्मयोग व संन्यास हे जर पृथक आहेत, दोन स्वतंत्र मोक्षमार्ग आहेत तर कर्मयोगावरील श्रीकृष्णार्जुनाच्या संवादांत ' संन्यास मार्गाच्या विवेचनाचा योग ' कशाला आला? तसेंच, सांख्य दुसऱ्या अध्यायाच्या आरंभीं आहे म्हणून त्याला सांख्ययोग हें नांव दिलें कीं तो प्रमुख आहे म्हणून? पण आरंभीं आरंभीं अर्जुनाचा विषादच आहे, म्हणून यालाही ' अर्जुनविषाद ' च म्हणावयास पाहिजे होतें. ' प्रमुख ' म्हणावें तर ' सांख्य ' एवढेंच नांव दिलें पाहिजे. ' योग ' हा शब्द त्याच्याशीं जोडताच येत नाहीं. कारण ३९ व्या श्लोकांत ' ही तुला सांख्यविषयक बुद्धि सांगितली, योगविषयक ऐक ' असें म्हणून योग पुढेंच यावयाचा आहे व रहस्यकाराच्या अर्थाप्रमाणें ३९ ते ७२ श्लोकांत किंबहुना १८ व्या अध्यायाच्या अखेरपर्यंत कर्मयोगच प्रतिपादिलेला आहे. तेव्हां सांख्ययोग हे नांव या अध्यायाला कां दिलें? रहस्यकारांनीं दिलेलें कारण पटत नाहीं. यापेक्षां १ ज्या अध्यायांत जो विषय प्रामुख्यानें व आधिक्यानें सांगितलेला असतो त्याचें नांव त्या अध्यायास देतात, २ सांख्य म्ह० आत्म्याचें स्वरूप, ३ योग म्ह० त्याच्या प्राप्तीचा उपाय, ४ योगशास्त्र म्ह० उपायशास्त्र, उपाय–साधनशास्त्र, व ५ स्थितप्रज्ञता म्ह० ज्ञानयोग किंवा सांख्ययोग, असें मानल्यानें या अध्यायाचें 'सांख्ययोग' हे नांव

सर्वथा उपपन्न होते. कारण यात सांख्य म्ह० ज्ञानयोगाचेच सविस्तर व प्रमुखत्वानें वर्णन केलें आहे. श्लोक ४५, ४६ व ४९–७२ यांत ज्ञानाचे किंवा ज्ञानायोगाचे प्रतिपादन आहे. 'सांख्ययोग' 'कर्मयोग' इत्यादि गीतेंतील योगशब्दान्त सर्व शब्द कर्मधारय समास आहेत. त्यामुळे सांख्य हाच योग–उपाय–साधन, कर्म हाच योग–उपाय–साधन असाच त्यांचा विग्रह व अर्थ होतो. दुसऱ्या अध्यायाच्या ३९ व्या श्लोकापासून अठराव्या अध्यायाच्या समाप्तीपर्यंत योगाचेच प्रतिपादन केले आहे हे खरे; पण तो योग म्ह० केवल कर्मयोगच नव्हे तर ज्ञान, कर्म, संन्यास, ध्यान, भक्ति इत्यादि अनेक योग त्यात आहेत ( मागे पृ. २७ पहा ) अर्थात् 'योगशास्त्रांतील ज्ञानयोग' इत्यादि म्हणतां येत. कारण योगशास्त्रांत ज्ञानादि सर्व योगांचा अन्तर्भाव होतो. कर्मयोगांत होत नाही. अर्थात् रहस्यकारांची कल्पना सर्वथा अग्राह्य व अनुपपन्न आहे. शिवाय दुसऱ्या अध्यायात ज्ञानयोग सांगितला आहे,ज्ञानाचे श्रेष्ठत्व वर्णिले आहे,असे मानले तरच अर्जुनाचा पुढील प्रश्न उपपन्न होतो, त्यावांचून होत नाही. सर्व अद्वैतवादी टीकाकार असेंच समजतात. ज्ञानेश्वरमहाराजही–' ऐसे कृष्णवाक्य ऐकिले। तेथ अर्जुने मनीं म्हणितले। आता आमच्या काजा आले। उपपत्ती इया ॥ ३७ ॥ जें कर्मजात आघवे। ग्थ निराकारिले देवे। तरी पारुषलें म्यां झुझावे। म्हणूनियां ॥ ३३१ ॥' इत्यादि म्हणतात. असो; यावरून रहस्यकारांनी गीता र. प्रकरण ९, १४ इत्यादि स्थळी यासंबंधी जे जें लिहिले आहे ते ते सर्व अयोग्य आहे, हें तत्त्वार्थजिज्ञासु वाचकांच्या सहज लक्षांत येईल.

# अध्याय तिसरा.

## कर्मयोग.

**शास्त्रस्य प्रवृत्तिनिवृत्तिविषयभूते द्वे बुद्धी भगवता निर्दिष्टे सांख्ये बुद्धिर्योगे बुद्धिरिति च । तत्र प्रजहाति यदा कामानित्यारभ्याऽऽध्यायपरिसमाप्तेः सांख्यबुद्ध्याश्रितानां संन्यासं कर्तव्यमुक्त्वा तेषां तन्निष्ठतयैव च कृतार्थतोक्ता—एषा ब्राह्मी स्थितिरिति । अर्जुनाय च ' कर्मण्येवाधिकारस्ते ' ' मा ते सङ्गोऽस्त्वकर्मणि ' इति कर्मैव कर्तव्यमुक्तवान्योगबुद्धिमाश्रित्य, न तत एव श्रेयःप्राप्तिमुक्तवान् । तदेतदालक्ष्य पर्याकुलीभूतबुद्धिरर्जुन उवाच । कथं भक्ताय श्रेयोर्थिने यत्साक्षाच्छ्रेयःसाधनं सांख्यबुद्धिनिष्ठां श्रावयित्वा मां कर्मणि दृष्टानेकानर्थयुक्ते पारम्पर्येणाप्यनैकान्तिकश्रेयःप्राप्तिफले नियुञ्ज्यादिति युक्तः पर्याकुलीभावोऽर्जुनस्य । तदनुरूपश्च प्रश्नो ज्यायसी चेदित्यादिः प्रश्नापाकरणवाक्यं च भगवतोक्तं यथोक्तविभागविषये शास्त्रे ॥**

**भाष्यार्थ**—( पूर्वोत्तर अध्यायांचा संबंध सांगण्यासाठी दुसऱ्या अध्यायांत होऊन गेलेल्या विषयाचा संक्षेपतः अनुवाद करितात-)—**भगवता शास्त्रस्य प्रवृत्ति-निवृत्तिविषयभूते सांख्ये बुद्धिः योगे बुद्धिः इति च द्वे बुद्धी निर्दिष्टे**—भगवानांनी शास्त्राच्या प्रवृत्तिविषयभूत योगबुद्धि व निवृत्तिविषयभूत सांख्यबुद्धि अशा दोन बुद्धि निर्दिष्ट केल्या आहेत. ( गीताशास्त्राच्या प्रारंभाला अपेक्षित असलेल्या हेतु-फलभूत-साध्य-साधनभूत दोन बुद्धींचा भगवानांनी निर्देश केला.आतां प्रश्न करणारा जो अर्जुन त्याच्या आशयाचा निर्देश करण्यासाठी आणखी एका मागील विषयाचा अनुवाद करितात-)—**तत्र ' प्रजहाति यदा कामान् ' इति आरभ्य आ-अध्यायपरिसमाप्तेः सांख्यबुद्ध्याश्रितानां संन्यासं कर्तव्यं उक्त्वा**—त्या दोन बुद्धींच्या निर्देशांत ' प्रजहाति यदा० ' अ. २ श्लो. ५५ येथून आरंभ करून दुसरा अध्याय संपेपर्यंत सांख्यबुद्धीचा आश्रय केलेल्या ज्ञाननिष्ठांचें संन्यास हेच कर्तव्य सांगून—**तेषां तन्निष्ठतया एव ' एषा ब्राह्मी स्थितिः ' इति कृतार्थता उक्ता**—त्यांची तन्निष्ठत्वानेंच-' एषा ब्राह्मी० ' अ. २ श्लो. ७२ या श्लोकाने कृतार्थता सांगितली आहे. [ सांख्य म्ह० पारमार्थिक तत्त्व, त्याची बुद्धि म्ह० ज्ञान, त्यांतच निष्ठा असलेले जे सर्व कर्मत्यागी त्यांनी कामप्रयुक्त सर्वकर्माचा त्यागच करावा, असें भगवानांनी सांगितले आहे. ]—**च अर्जुनाय ' कर्मणि एव अधिकारस्ते ' ' मा ते संगोऽस्त्वकर्मणि ' इति योगबुद्धिं आश्रित्य कर्म एव कर्तव्यं उक्तवान्**—पण अर्जुनाला 'कर्मण्येव ' ' मा ते संगः ' २.४७ या वचनांनीं योगबुद्धीचा आश्रय करून कर्मच करावें, असें सांगितलें आहे.—**ततः एव श्रेयःप्राप्तिं न उक्तवान्**—त्या कर्माचरणामुळेंच मोक्षप्राप्ति होते असें सांगितलें नाहीं.—**तत् एतत् आलक्ष्य पर्या-**

**कुलीभूतबुद्धिः अर्जुनः उवाच**—दुसऱ्यांना साक्षात् श्रेयःसाधन ज्ञान सांगितलें व आपल्याला कर्म सांगितलें हें सर्व पाहून ज्याची बुद्धि अतिशय आकुल झाली आहे, असा अर्जुन म्हणाला—**यत् साक्षात् श्रेयःसाधनं-सांख्यबुद्धिनिष्ठां तत् श्रेयोऽर्थिने भक्ताय श्रावयित्वा**—जे साक्षात् मोक्षसाधन म्ह० परमार्थतत्त्वज्ञान-निष्ठा तें मोक्षाची इच्छा करणाऱ्या अन्य भक्ताला सांगून—**मां कर्मणि-दृष्टानेका-नर्थयुक्ते पारंपर्येण अपि अनैकान्तिकश्रेयःप्राप्तिफले**—मला कर्मामध्यें की जें कर्म साक्षात् अनेक अनर्थांनीं युक्त आहे, व परंपरासंबंधानेही नित्य श्रेयःप्राप्ति हें ज्याचें फल नाहीं अशा कर्मामध्यें—**कथं नियुञ्ज्यात् इति अर्जुनस्य पर्याकुलीभावः युक्तः**—भगवान् कसा नियुक्त करील, असा अर्जुनाचा पर्याकुलभाव युक्तच आहे.—**च 'ज्यायसी चेत्' इत्यादिः प्रश्नः तदनुरूपः**-आणि 'ज्यायसी चेत्०-' इत्यादि प्रश्नही त्या पर्याकुलभावाला अनुरूप असाच आहे.—**च भगवता यथोक्त-विभागविषये शास्त्रे प्रश्न-अपाकरणवाक्यं उक्तम्**—आणि भगवानांनीं ज्ञान-निष्ठांना कृतार्थता आहे, कर्मनिष्ठांना नाहीं, हा विभाग सांगणारेंच गीताशास्त्र आहे, अशा अर्थी 'लोकेऽस्मिन्०' हें प्रश्ननिरसनरूप वाक्य सांगितलें आहे. [ भगवानांनीं दुसऱ्या अध्यायांत गीताशास्त्राचें प्रतिपाद्य-अशा दोन बुद्धि सांगितल्या[1]. एक सांख्यबुद्धि व दुसरी योगबुद्धि. सांख्यबुद्धि हा निवृत्तीचा विषय आहे व योगबुद्धि हा प्रवृत्तिविषय आहे. योगबुद्धि साधन आहे व सांख्यबुद्धि साध्य आहे. त्यांत 'प्रजहाति०' येथून दुसरा अध्याय संपेपर्यंत ज्ञाननिष्ठेचा आश्रय केलेल्या ज्ञानी लोकांनी सर्व कर्मसंन्यास करावा असे सांगितलें; व त्या निष्ठेनेंच ते कृतार्थ होतात, असेंही शेवटीं म्हटलें आहे. पण अर्जुनाला 'तूं ज्ञाननिष्ठ हो,' असे न सांगता 'तुझा कर्मामध्येंच अधिकार आहे, कर्म न करण्याविषयी तूं आग्रह धरूं नकोस,' असे सांगितलें. पण त्या कर्मानेंच तूं कृतार्थ होशील, असें कांहीं सांगितलें नाहीं. उलट 'कर्म बुद्धियोगाहून अत्यंत निकृष्ट आहे,' असे सांगितलें आहे. त्यामुळें अर्जुनाचें अंतःकरण व्याकुळ झालें. भगवान् इतर मुमुक्षुभक्ताला ज्ञाननिष्ठा म्ह० साक्षात् मोक्षसाधन सांगतो व मला मात्र जणुं काय मी भक्त व श्रेयोर्थी-मुमुक्षु नाहींच, असें समजून 'तूं कर्मच कर,' असा आग्रह करतो; पण तें कर्म तरी कोणतें, तर युद्धासारखें घोर कर्म. ज्यांत गुरु-भ्राते इत्यादिकांची हिंसा प्रत्यक्ष आहे. असल्या कर्माच्यायोगानें चित्तशुद्धि होऊन याच जन्मीं ज्ञानरूप फल प्राप्त होईल, असाही नियम नाहीं. यास्तव भगवानांनीं मला अशी आज्ञा करणें योग्य नाहीं, असें वाटून अर्जुनाचें चित्त व्याकुळ होणें, साहजिक होतें व त्यानें जो प्रश्न केला आहे तोही या त्याच्या आकुलतेला साजेसाच आहे. पण भगवानांनीं त्याच्या प्रश्नाचें जें उत्तर दिलें आहे तें शास्त्राच्या पूर्वोक्त विभागाला धरूनच आहे, त्याला सोडून नाहीं. ]

---

१ गीताशास्त्राचें प्रतिपाद्य केवल कर्मयोग आहे, असें रहस्यकार म्हणतात, व आचार्य 'सांख्य व योग या दोन बुद्धि प्रतिपाद्य आहेत,' असें सांगतात. हा भेद लक्षांत ठेवण्या-सारखा आहे. रहस्यकार ठिकठिकाणीं 'संन्यासमार्गी लोक' 'सांप्रदायिक आग्रहानें

**केचित्त्वर्जुनस्य प्रश्नार्थमन्यथा कल्पयित्वा तत्प्रतिकूलं भगवतः प्रतिवचनं वर्णयन्ति, यथा चाऽऽत्मना संबन्धग्रन्थे गीतार्थो निरूपितस्तत्प्रतिकूलं चेह पुनः प्रश्नप्रतिवचनयोरर्थं निरूपयन्ति । कथं तत्र संबन्धग्रन्थे तावत्सर्वेषामाश्रमिणां ज्ञानकर्मणोः समुच्चयो गीताशास्त्रे निरूपितोऽर्थ इत्युक्तं पुनर्विशेषितं च यावज्जीवश्रुतिचोदितानि कर्माणि परित्यज्य केवलादेव ज्ञानान्मोक्षः प्राप्यत इत्येतदेकान्तेनैव प्रतिषिद्धमितीह त्वाश्रमविकल्पं दर्शयता यावज्जीवश्रुतिचोदितानामेव कर्मणां परित्याग उक्तः, तत्कथमीदृशं विरुद्धमर्थमर्जुनाय ब्रूयाद्भगवान्, श्रोता वा कथं विरुद्धमर्थमवधारयेत् ॥**

**भाष्यार्थ**—( भगवान् साक्षात् श्रेयःसाधन–ज्ञाननिष्ठा इतरांना सांगतो मला मात्र सांगत नाहीं, असें समजून अर्जुन प्रश्न करीत आहे, असा भाष्यकारांनी आपल्या अभिप्रायाप्रमाणे दुसऱ्या व तिसऱ्या अध्यायाचा संबंध सांगितला. आतां वृत्तिकारांच्या अभिप्रायावर दोष देतात–)—**तु केचित् अर्जुनस्य प्रश्नार्थं अन्यथा कल्पयित्वा भगवतः प्रतिवचनं तत्प्रतिकूलं वर्णयन्ति**—पण कित्येक अर्जुनाच्या प्रश्नाचा अर्थ अगदींच विपरीत कल्पून भगवानांचे प्रतिवचन त्याच्या प्रतिकूल वर्णितात. [ अर्जुनाचा प्रश्न ज्ञान व कर्म यांचा समुच्चय हेंच मोक्षाचें साधन आहे, हे भगवानांच्या तोंडून ऐकावें या उद्देशाने आहे. पण भगवान् समुच्चयाला मुळींच थारा न देतां दोन प्रकारच्या अधिकाऱ्यांसाठीं दोन भिन्न साधने उत्तरांत सांगत आहेत. अर्थात् प्रश्न एक व प्रत्युत्तर त्याच्या अगदीं विपरीत, असा वृत्तिकारांच्या व्याख्यानावर दोष येतो. केवल हाच एक दोष येऊन रहात नाहीं तर त्यांनी संबंधग्रंथांत जो शास्त्रार्थ वर्णिला आहे त्याच्याशींही येथील त्यांच्याच व्याख्यानाचा विरोध येतो, असें दाखवितात–]—**च आत्मना संबंधग्रन्थे यथा गीतार्थः निरूपितः तत्प्रतिकूलं च इह पुनः प्रश्नप्रतिवचनयोः अर्थं निरूपयन्ति**—आणि स्वतः वृत्तिकारानी संबंधग्रंथांत म्ह० गीताशास्त्राच्या आरंभीं लिहिलेल्या उपोद्घातांत जसा गीतार्थ निरूपिला आहे त्याच्या विरुद्ध येथें पुनः अर्जुनाचा प्रश्न व भगवानांचे प्रतिवचन यांच्या अर्थाचें निरूपण करितात—**कथं**—ते कसे ?—**तत्र संबन्धग्रन्थे तावत्**—त्याच्या वृत्तींतील उपोद्घातांत तर असा

---

कर्माला उडवून देतात ' इत्यादि जे म्हणतात ते बरोबर नाहीं, हे यावरून उघड होते. अर्जुनाला ' तूं कर्मच कर, तुझा कर्मांतच अधिकार आहे ' असा योगबुद्धीचा आश्रय करून सांगितलें आहे, ही गोष्ट आचार्यही स्पष्टपणें सांगत आहेत. पण आचार्य व इतर भाष्यटीकाकार वैदिक संप्रदायाला धरून कर्मयोग हा ज्ञानाचा–आत्मसाक्षात्काराचा उपाय मानतात; व संप्रदायाला सोडून गीतार्थाचा निश्चय करणारे रहस्यकार दुसऱ्या अध्यायांत ( ३९ श्लोकाच्यापुढे ) व पुढेहि सर्वत्र कर्मयोगच प्रतिपादिला आहे, कर्म ज्ञानाचा उपाय नव्हे, दोन्ही मार्ग स्वतंत्र पृ. ३०४ असे म्हणतात. ' मुमुक्षु कर्मयोगानें कृतार्थ होतो, असें दुसऱ्या अध्यायांत सांगितलेलें नाहीं. ज्ञाननिष्ठेनें मात्र कृतार्थता सांगितली आहे. ' असें आचार्य म्हणतात व रहस्यकार ' स्थितप्रज्ञालाही कर्मयोगी ' म्हणतात. भाष्य व रहस्य यांतील या भेदाकडे दुर्लक्ष करितां येत नाहीं.

अर्थ सांगितला आहे.—**गीताशास्त्रे सर्वेषां आश्रमिणां ज्ञानकर्मणोः समुच्चयः अर्थः निरूपितः इति उक्तं**—गीताशास्त्रांत सर्व आश्रमांतील लोकांना ज्ञान व कर्म यांचा समुच्चय हा अर्थ निरूपण केलेला आहे, असें सांगितलें ( इतकेंच नव्हे तर त्या-विषयीं पुनः हडसून-खडसून सर्व कर्मसंन्यासपूर्वक केवल ज्ञानानें मोक्षाची प्राप्ति होत नाहीं, असें बजाविलेंही आहे, )—**च पुनः विशेषितं**—आणि पुनः त्याविषयीं असा विशेष सांगितला आहे.—**यावज्जीवश्रुतिचोदितानि कर्माणि परित्यज्य केवलात् एव ज्ञानात् मोक्षः प्राप्यते इति एतत् एकान्तेन एव प्रतिषिद्धं इति**—यावजीव अग्निहोत्र हवन करावे, कर्मे करीतच शंभर वर्षे जिवंत रहावे, इत्यादि यावज्जीव श्रुतींनी सांगितलेली कर्मे टाकून[१]—त्यांचा परित्याग-संन्यास करून केवल ज्ञानानेंच मोक्ष प्राप्त होतो, या मताचा नियमानेच प्रतिषेध केला आहे, असे म्हणून आपल्या ज्ञानकर्मसमुच्चयाचेंच अधिक स्पष्टीकरण[२] केले आहे.—**तु इह आश्रमविकल्पं दर्शयता यावज्जीवश्रुतिचोदितानां एव कर्मणां परित्यागः उक्तः**—पण येथें म्ह० तिसऱ्या अध्यायाच्या व्याख्यानांत संन्याश्यांकरितां ज्ञाननिष्ठा व कर्माधिकारी गृहस्थांकरितां कर्मनिष्ठा असा आश्रमांचा विभाग दर्शविणाऱ्या वृत्तिकारांनी यावज्जीवादि श्रुतींनी ज्यांचें विधान केलें आहे अशा अग्निहोत्रादि कर्मांचाच संन्यास सांगितला आहे. ( त्यामुळे त्यांच्या व्याख्यानावर परस्परविरोध येतो. ' अहो पण स्वतः भगवानांनींच जर तसें प्रतिपादन केले असलें तर त्यांत वृत्तिकारांचा काय दोष आहे ? ' उत्तर-)—**तत् भगवान् ईदृशं विरुद्धं अर्थं अर्जुनाय कथं ब्रूयात्**—पण भगवान् अशा प्रकारचा विरुद्ध अर्थ अर्जुनाला कसे सागतील ? [ भगवान् सर्वज्ञ व परम आप्त असल्यामुळें असा विरुद्ध अर्थ कधीही सांगणार नाहीत. अर्थात् त्यांचा आशय न कळल्यामुळें वृत्तिकारच असा विरुद्ध अर्थ सांगत आहेत. बरें, भगवानांनीं विरुद्ध अर्थ सांगितला नाहीं. श्रोत्याला तो तसा कळला म्हणून वृत्तिकारांनी तसें व्याख्यान केले आहे, म्हणून म्हणावें तर तेंही जुळत नाहीं. ]—**वा श्रोता विरुद्धं अर्थं कथं**

---

१ कर्मे टाकणें निराळे व त्याचा परित्याग-संन्यास करणे निराळे. टाकणे म्ह० विहित-कर्मे आळसानें, अश्रद्धेमुळे वगैरे न करणे, व परित्याग-संन्यास म्ह० गृहस्थाच्या शास्त्र-विहित कर्मांचा यथाशास्त्र-विधानेच त्याग करणे, हा भेद वाचकांनी लक्षात ठेवावा.

२ अर्थात् केवल ज्ञानानेच मोक्ष मिळतो, हा पक्ष आचार्यांनीच नवीन उत्पन्न केलेला नसून तो वृत्तिकारांच्या पूर्वीपासूनच दृढमूल झालेला होता, हे उघड आहे. म्हणजे संन्यासमार्ग ज्ञानकर्मसमुच्चयानंतर अस्तित्वांत आला, हे म्हणणे अप्रामाणिक आहे. तसेच, ज्ञान-कर्मसमुच्चय म्ह० आत्मज्ञान व श्रौत-अग्निहोत्रादि कर्मे यांचे एकाचवेळी अनुष्ठान केल्याने मोक्ष प्राप्त होतो नुस्त्या ज्ञानाने मोक्ष प्राप्त होत नाहीं, हा पक्ष होय. रहस्यकारांचा ज्ञानकर्मसमुच्चयपक्ष याहून अगदींच विपरीत आहे. त्यांचें ज्ञान म्ह० आत्म्याचें कल्याण कशांत आहे तें जाणणें व कर्म म्ह० लौकिक कर्म. पत्करलेला धंदा, वगैरे-देशकार्य, राष्ट्रकार्य वगैरे हाही भेद वाचकांनी अवश्य लक्षांत ठेवावा.

**अवधारयेत्**—किंवा श्रोता-अर्जुन तरी असा विरुद्ध अर्थ कसा समजेल ? ( अर्जुन म्हणजे कांहीं सामान्य मनुष्य नव्हे, मोठा बुद्धिमान्, तेव्हां तो असा विरुद्ध अर्थ कसा समजेल ! हे संभवतच नाहीं. अर्थात् हा दोष वृत्तिकारांचाच आहे. वक्त्याचा किंवा श्रोत्याचाही नव्हे. )

**तत्रैतत्स्यात्गृहस्थानामेव श्रौतकर्मपरित्यागेन केवलादेव ज्ञानान्मोक्षः प्रतिषिध्यते न त्वाश्रमान्तराणामित्येतदपि पूर्वोत्तरविरुद्धमेव । कथं, सर्वाश्रमिणां ज्ञानकर्मणोः समुच्चयो गीताशास्त्रे निश्चितोऽर्थ इति प्रतिज्ञायेह कथं तद्विरुद्धं केवलादेव ज्ञानान्मोक्षं ब्रूयादाश्रमान्तराणाम् ॥**

**भाष्यार्थ**—( याप्रमाणें श्रीमच्छंकराचार्यांनीं वृत्तिकाराच्या वृत्तीवर पूर्वोत्तरविरोध हा दोष दिला असतां त्याचा परिहार करणाऱ्या तत्पक्षीयाच्या शंकेचा अनुवाद करितात-) —**तत्र एतत् स्यात्**—संबंधग्रंथांत वृत्तिकारांचा आशय असा आहे—**गृहस्थानां एव श्रौतकर्मपरित्यागेन केवलात् एव ज्ञानात् मोक्षः प्रतिषिध्यते**—गृहस्थांनाच श्रौतकर्मांचा त्याग करून केवल ज्ञानानेच मोक्ष मिळत नाहीं.—**तु आश्रमान्तराणां न**—पण गृहस्थेतर आश्रमांतील लोकाना केवल ज्ञानानेच मोक्ष मिळत नाहीं, असे नाहीं—**इति**—असे कोणी म्हणेल तर—[ संबंध ग्रंथांत वृत्तिकारांनीं अग्निहोत्रादि श्रौतस्मार्तकर्मासह आत्मज्ञानानेच मोक्ष मिळतो, केवल ज्ञानाने मिळत नाहीं, असे जें म्हटले आहे त्याचा आशय असा आहे—गृहस्थाश्रमींच असतांना आत्मज्ञान परिपक्व झाल्यावांचून यावज्जीवश्रुतींनीं सांगितलेलीं कर्मे सोडून नुसत्या परोक्ष आत्मज्ञानानेच आम्हांला मोक्ष मिळेल, असे जे समजतात त्याच्या मोक्षाचा यावज्जीवादि श्रुति निषेध करितात. स्वरूपतःच कर्मांचा त्याग म्ह० संन्यास आश्रम किंवा ज्ञानानेच मोक्ष मिळतो हा सिद्धान्त, याचा निषेध केला जात नाहीं व तिसऱ्या अध्यायात गृहस्थेतर कर्मत्यागी लोकांनाच म्ह० संन्याश्यानाच केवल ज्ञानाने मोक्ष मिळतो, असे त्यांचे म्हणणे आहे. त्यामुळे पूर्वोत्तरविरोध येत नाहीं, म्हणून म्हणाल तर-]—**एतत् अपि पूर्वोत्तरविरुद्धं एव**—हे समर्थनही पूर्वोत्तरविरुद्धच आहे.—**कथं**—ते कसें ?—**गीताशास्त्रे सर्वाश्रमिणां ज्ञानकर्मणोः समुच्चयः निश्चितः अर्थः इति प्रतिज्ञाय** —गीताशास्त्रात सर्व आश्रमांच्या लोकांना ज्ञानकर्मांचा समुच्चय हाच निश्चित अर्थ आहे, अशी प्रतिज्ञा करून—**इह तद्विरुद्धं आश्रमान्तराणां ज्ञानात् मोक्षं कथं ब्रूयात्**—येथे ( तृतीयाध्यायांत ) त्याच्या विरुद्ध गृहस्थेतर आश्रमांना ज्ञानानेंच मोक्ष मिळतो, असें वृत्तिकार कसें सांगतील ?

**अथ मतं श्रौतकर्मापेक्षयैतद्वचनं केवलादेव ज्ञानाच्छ्रौतकर्मरहिताद्गृहस्थानां मोक्षः प्रतिषिध्यत इति । तत्र गृहस्थानां विद्यमानमपि स्मार्तं कर्माविद्यमानवदुपेक्ष्य ज्ञाना-**

---

१ येथें ज्ञानकर्मसमुच्चयवादी वृत्तिकारांच्या वृत्तींतील पूर्वोत्तरविरोध हा दोष आचार्यांनीं स्पष्टपणें दाखविला आहे.

**देव केवलादित्युच्यत इति । एतदपि विरुद्धम् । कथं, गृहस्थस्यैव स्मार्तकर्मणा समुच्चिताज्ज्ञानान्मोक्षः प्रतिषिध्यते न त्वाश्रमान्तराणामिति कथं विवेकिभिः शक्यमवधारयितुम् ॥**

**भाष्यार्थ**—( श्रौत कर्म गृहस्थांना अवश्य केलेच पाहिजे, अशा आशयानें केवल ज्ञानानें त्यांना मोक्ष मिळत नाही, असें म्हटलें, पण गृहस्थांच्या मात्र केवल ज्ञानाधीन असलेल्या मोक्षाचा निषेध करून बाकीच्या आश्रम्यांचा मोक्ष केवल ज्ञानाधीन आहे, असें सांगण्याचा वृत्तिकारांचा हेतु नाही. कारण दुसऱ्या आश्रमाच्या लोकांनाही स्मार्त कर्म व ज्ञान यांचा समुच्चय विवक्षित आहेच, अशा अभिप्रायाने शंका-)—**अथ मतं**—आतां कदाचित् असें मानले कीं,—**श्रौतकर्मरहितात् केवलात् एव ज्ञानात् गृहस्थानां मोक्षः प्रतिषिध्यते इति एतत् श्रौतकर्मापेक्षया वचनं**—श्रौतकर्मरहित केवल ज्ञानानेंच गृहस्थांच्या मोक्षाचा निषेध केला जातो, असे हे श्रौतकर्माच्या अपेक्षेनें म्हणणें आहे. ( यावर मध्यस्थाची शंका-अहो पण गृहस्थ श्रौत कर्म जरी करीत नसले तरी स्मार्त कर्म करीत असतातच. तेव्हां स्मार्त कर्मासह असलेल्या ज्ञानाला केवल ज्ञान कसें म्हणतां येईल ? समुच्चयवाद्याचेंच उत्तर-)—**तत्र गृहस्थानां विद्यमानं अपि स्मार्तं कर्म अविद्यमानवत् उपेक्ष्य 'ज्ञानात् एव केवलात्' इति उच्यते इति**—त्या वचनांत गृहस्थाचे विद्यमान असलेलेंही स्मार्त कर्म विद्यमान नसल्याप्रमाणे त्याची उपेक्षा करून 'केवल ज्ञानाने गृहस्थांना मोक्ष मिळत नाही' असें म्हटले आहे, असें म्हणाल ( श्रौत कर्म मुख्य आहे. त्यामुळे ते सोडल्यावर करीत असलेलेंही स्मार्त कर्म करीत नसल्यासारखेच आहे, असे समजून त्यांना केवल ज्ञानानेंच मोक्ष मिळत नाही, तर अग्निहोत्रादि श्रौतस्मार्तकर्मासह ज्ञानाने मोक्ष मिळतो, असे म्हणाल तर-)—**एतत् अपि विरुद्धं**—गृहस्थांनाच श्रौतकर्म व ज्ञान यांचा समुच्चय विवक्षित आहे, इतरांना नाही, इतराना स्मार्तकर्म व ज्ञान यांचा समुच्चय भगवानांनी सांगितला आहे, असें म्हणणेंही विरुद्ध आहे ( असा पक्षपात करण्याचे कांही कारण दिसत नाही. )—**कथं**—ते कसे ?—**गृहस्थस्य एव स्मार्तकर्मणा समुच्चितात् ज्ञानात् मोक्षः प्रतिषिध्यते**—गृहस्थाच्याच स्मार्त कर्मासह ज्ञानाने मिळणाऱ्या मोक्षाचा निषेध केला जातो—**तु आश्रमान्तराणां न इति विवेकिभिः कथं अवधारयितुं शक्यम्**—पण गृहस्थेतर आश्रमांच्या स्मार्तकर्मसमुच्चित ज्ञानानें मोक्ष पक्षाचा निषेध केला जात नाही, हे विवेकी लोकांना कळणे कसें शक्य आहे ? [ श्रौतकर्मसमुच्चित ज्ञानच गृहस्थांच्या मोक्षाला कारण होते, असा तुमचा पक्ष असल्यामुळें केवल स्मार्तकर्मसमुच्चित ज्ञानानें गृहस्थांना मोक्ष मिळत नाहीं, हें म्हणणें कांहीं तरी संभवतें, पण ऊर्ध्वरेत्यांना म्ह० नैष्ठिक ब्रह्मचारी, संन्यासी इत्यादिकांना केवल स्मार्तकर्मसमुच्चित ज्ञानाने मोक्ष मिळतो, असा पंक्तिप्रपंच करण्याचें कांहीच कारण दिसत नाही. ]

**किंच यदि मोक्षसाधनत्वेन स्मार्तानि कर्माण्यूर्ध्वरेतसां समुच्चीयन्ते तथा गृहस्थस्यापीष्यतां स्मार्तैरेव समुच्चयो न श्रौतैः । अथ श्रौतैः स्मार्तैश्च गृहस्थस्यैव समुच्चयो मोक्षायोर्ध्वरेतसां तु स्मार्तकर्ममात्रसमुच्चिताज्ज्ञानान्मोक्ष इति । तत्रैवं सति गृहस्थस्याऽऽयासबाहुल्यं श्रौतं स्मार्तं च बहुदुःखरूपं कर्म शिरस्यारोपितं स्यात् ॥**

**भाष्यार्थ**—( याप्रमाणे पक्षपात करण्याचें कारण नाहीं, असें सांगून पक्षपात न करण्यास मात्र सबळ कारण आहे, असे सांगतात-)—**किंच यदि मोक्षसाधनत्वेन स्मार्तानि कर्माणि ऊर्ध्वरेतसां समुच्चीयन्ते**—शिवाय जर मोक्षाचे साधन या रूपाने स्मार्त कर्मे ऊर्ध्वरेत्यांच्या ब्रह्मज्ञानाशी समुच्चित केली जातात तर—**तथा गृहस्थस्य अपि स्मार्तैः एव समुच्चयः इष्यतां न श्रौतैः**—त्याचप्रमाणे गृहस्थाच्याही-स्मार्तकर्मांशीच ब्रह्मज्ञानाचा समुच्चय-हे मोक्षाचे साधन माना, श्रौतकर्मांशी ज्ञानाचा समुच्चय मानूं नका. [ स्मार्त कर्म व ब्रह्मज्ञान यांचा समुच्चय इतराच्या मोक्षाचे साधन जसे मानतां तसेच गृहस्थाच्या मोक्षाचेही तेच साधन मानणे उचित आहे. कारण ब्रह्मज्ञान सर्वत्र एकाच सहकारी कारणाची अपेक्षा करते, असे म्हणणे युक्त आहे. कांही लोकांच्या स्मार्त कर्मांचे साहाय्य ते मागते व कांही लोकांच्या श्रौतकर्मांची अपेक्षा करते, हे म्हणणें युक्त नाही. ' अहो पण स्मार्त कर्म व ज्ञान यांच्या समुच्चयानेंच गृहस्थाना मोक्ष मिळतो, असे म्हटल्यास यावज्जीव अग्निहोत्र करावें, ह्या श्रुतीशी विरोध येतो व स्मार्तकर्मसमुच्चित ज्ञान गृहस्थांच्या मोक्षाचें साधन आहे, असे म्हटल्यास सिद्ध असलेली गोष्टच मुद्दाम पुन: सिद्ध करीत बसल्याप्रमाणे होते, म्हणून आम्ही श्रौत कर्मे व ज्ञान यांच्या समुच्चयाने गृहस्थांना मोक्ष मिळतो असे म्हटले आहे,' अशा प्रकारचे वाद्याच्या म्हणण्याचा अनुवाद-]—**अथ गृहस्थस्य एव मोक्षाय श्रौतैः च स्मार्तैः समुच्चयः तु ऊर्ध्वरेतसां स्मार्तकर्ममात्रसमुच्चितात् ज्ञानात् मोक्षः इति**—बरे, गृहस्थाच्याच मोक्षासाठी श्रौत व स्मार्त कर्मांचा ज्ञानाशी समुच्चय विवक्षित आहे, पण ऊर्ध्वरेत्याचा केवल स्मार्तकर्मसमुच्चित ज्ञानाने मोक्ष होतो, असे म्हणाल,—**तत्र एवं सति गृहस्थस्य शिरसि आयासबाहुल्यं श्रौतं स्मार्तं च बहुदुःखरूपं कर्म आरोपितं स्यात्**—पण तसे जर मानले तर गृहस्थाच्या मस्तकावर ज्यांत आयास पुष्कळ आहेत असे श्रौत व स्मार्त बहुदुःखरूप कर्म लादल्यासारखे होईल. [ अर्थात् गृहस्थाश्रमात अगोदरच क्लेश फार असल्यामुळे त्यांत आणखी अतिशय दुःख देणाऱ्या श्रौत-स्मार्तकर्मांचा भर घातल्यास गृहस्थाश्रमांतील कर्मे कोणीच करणार नाहीं, असें मात्र होईल. कारण उगीच आपल्या शक्तीबाहेर भार कोण घेणार ? ]

**अथ गृहस्थस्यैवाऽऽयासबाहुल्यकारणान्मोक्षः स्यान्नाऽऽश्रमान्तराणां श्रौतनित्यकर्मरहितत्वादिति । तदप्यसत्, सर्वोपनिषत्स्वितिहासपुराणयोगशास्त्रेषु च ज्ञानाङ्गत्वेन मुमुक्षोः सर्वकर्मसंन्यासविधानादाश्रमविकल्पसमुच्चयविधानाच्च श्रुतिस्मृत्योः ॥**

**भाष्यार्थ**—( आतां ' साधनभूयस्त्वे फलभूयस्त्वं '- साधन पुष्कळ केलें असतां फल पुष्कळ मिळतें, या न्यायाच्या आश्रयानें शंका-)—**अथ गृहस्थस्य एव**

**आयासबाहुल्यकारणात् मोक्षः स्यात्**—बरें गृहस्थालाच पुष्कळ क्लेशांनी युक्त असलेले श्रौत व स्मार्त कर्म फार सांगितलें असल्यामुळें त्यालाच मात्र त्या बहुकर्मानुष्ठानानें मोक्ष मिळेल,—**आश्रमान्तराणां न श्रौतनित्यकर्मरहितत्वात् इति**—इतर आश्रमांतील लोकांना मिळणार नाही. कारण ते श्रौतनित्यकर्मांनी रहित असतात, असे म्हणाल तर—**तत् अपि असत्**—तेंहि बरोबर नाही. कारण—**सर्वोपनिषत्सु इतिहासपुराणयोगशास्त्रेषु च ज्ञानाङ्गत्वेन मुमुक्षोः सर्वकर्मसंन्यासविधानात्**—सर्व उपनिषदांत व इतिहास-पुराण-योगशास्त्रांत ज्ञानाच्या अंगत्वानें मुमुक्षूला उद्देशून सर्वकर्मसंन्यासाचे विधान केले आहे. [ ज्ञानाच्या अंगत्वानें संन्यासाचे विधान असल्यामुळे 'गृहस्थ हा एकच आश्रम आहे, तोच मुख्य आहे, कर्मसंन्यासाचें विधान अनधिकृत अंध-पंगु इत्यादिकांकरितां आहे' इत्यादि जें कित्येकांचे म्हणणे आहे, त्याला अवकाशच उरत नाही. कारण कर्माचा अधिकार नसलेले जे अंधादिक त्यांना संन्यासाचा तरी अधिकार कसा असणार? संन्यास श्रवण, मनन, ध्यान, निदिध्यासन वगैरे निर्विघ्नपणें करितां यावे म्हणून करावयाचा असतो, स्वस्थ झोंप घेण्यासाठी संन्यास घ्यावयाचा नसतो. त्यामुळे श्रवणादिकाच्या द्वारा संन्यास ज्ञानाचें अंग होतें. अंधादिकांनी संन्यास जरी केला तरी श्रवणादिकाचा अभ्यास करण्याचे त्यांच्यामध्ये सामर्थ्य नसते. शिवाय त्यांना संन्यास तरी कसा करतां येणार? प्राप्त कर्मांचाच त्याग संभवतो. अंधादिकाना कर्मे प्राप्तच नसतात. त्यामुळे गृहस्थाश्रमालाच प्राधान्य नाही. ]—**च श्रुति-स्मृत्योः आश्रमविकल्पसमुच्चयविधानात्**—आणि तसेच श्रुति व स्मृति यांमध्ये आश्रमांचा विकल्प व समुच्चय याचे विधान केलें आहे. [ 'ब्रह्मचर्य संपवून गृहस्थ व्हावे, गृहस्थाश्रमातून वानप्रस्थ व्हावे व शेवटी संन्यास करावा,' असा समुच्चय व 'किंवा ब्रह्मचर्यातूनच संन्यास करावा, किंवा गृहाश्रमांतून किंवा वनांतून करावा,' असा विकल्प श्रुतीने सांगितला आहे. स्मृतीनेही 'ज्या आश्रमांत राहण्याची इच्छा असेल त्यांत रहावे.' असें म्हटले आहे. त्यामुळे गृहस्थाश्रमालाच प्राधान्य नाही. ]

**सिद्धस्तर्हि सर्वाश्रमिणां ज्ञानकर्मणोः समुच्चयः । न मुमुक्षोः सर्वकर्मसंन्यासविधानात् । " व्युत्थायाथ भिक्षाचर्यं चरन्ति । तस्मात्संन्यासमेषां तपसामतिरिक्तमाहुः । न्यास एवात्यरेचयत् " इति । " न कर्मणा न प्रजया धनेन त्यागेनैकेऽमृतत्वमानशुः ।" इति च । " ब्रह्मचर्यादेव प्रव्रजेत् " इत्याद्याः । " त्यज धर्ममधर्मं च उभे सत्यानृते त्यज । उभे सत्यानृते त्यक्त्वा येन त्यजसि तत्त्यज " ॥ " संसारमेव निःसारं दृष्ट्वा सारदिदृक्षया । प्रव्रजन्त्यकृतोद्वाहाः परं वैराग्यमाश्रिताः " इति बृहस्पतिः । " कर्मणा बध्यते जन्तुर्विद्यया च विमुच्यते । तस्मात्कर्म न कुर्वन्ति यतयः पारदर्शिनः " इति शुकानुशासनम् । इहापि सर्वकर्माणि मनसा संन्यस्येत्यादि । मोक्षस्य चाकार्यत्वान्मुमुक्षोः कर्मानर्थक्यम् ॥**

**भाष्यार्थ**—( सर्वच आश्रम जर श्रुतिस्मृतिमूलक आहेत, तर त्या त्या आश्रमांतील कर्मांचा व ज्ञानाचा समुच्चय सिद्ध झालाच, अशी समुच्चयवाद्याची शंका–)—**तर्हि सर्वाश्रमिणां ज्ञानकर्मणोः समुच्चयः सिद्धः**—तर मग सर्वच आश्रमांतील लोकांच्या ज्ञान-कर्मांचा समुच्चय सिद्ध झाला. [ ज्ञान उत्पन्न होण्यास आश्रमकर्मांची आवश्यकता आहे. पण तें एकदा उत्पन्न झालें म्ह० फलासाठीं दुसऱ्या कशाचीही अपेक्षा करीत नाहीं, कारण ज्ञानाला कर्मांची अपेक्षा जर असती तर संन्यासाचा विधिच शास्त्राने केला नसता, अशा आशयाने आचार्य शंकेचे निरसन करितात–]—**न मुमुक्षोः सर्वकर्मसंन्यासविधानात्**—नाहीं, समुच्चय सिद्ध होत नाहीं. कारण मुमुक्षूच्या सर्वकर्मसंन्यासाचें विधान केले आहे.—"**व्युत्थाय अथ भिक्षाचर्यं चरन्ति**"—सर्व एषणांपासून निवृत्त होऊन भिक्षाचरण करितात (बृह. भाष्यार्थ अ.३ पृ. १३५)—'**तस्मात् संन्यासं एषां तपसां अतिरिक्तं आहुः**'—सत्यादिकांचे फल अल्प असल्यामुळे व संन्यास ज्ञानद्वारा मोक्ष देत असल्यामुळें संन्यासाला या तपांमध्यें श्रेष्ठ म्हणतात.(सान्व. नाराय०पृ.८२)—"**न्यास एवात्यरेचयत्**"—संन्यासालाच सर्वांत श्रेष्ठ ठरविलें आहे ( सान्व. नारा. पृ. ७५)—**इति**—असे संन्यासाचे विधान आहे.—"**न कर्मणा न प्रजया धनेन त्यागेन एके अमृतत्वं आनशुः** "—मनुष्य, पितृ व देव या तीन लोकांच्या प्राप्तीचे साधन, असें प्रजा, कर्म व दैव वित्त–उपासना यांच्या योगानें साधक मोक्षाला प्राप्त झाले नाहीत तर तीं साधनें टाकून–त्यांचा परित्याग करून संसारापासून विरक्त झालेले मुमुक्षु संन्यासपूर्वक आत्मज्ञानानेच मोक्षाला प्राप्त झाले, (सा. नारा.३५.)—**इति च**—असेही श्रुतिवचन आहे.(वैराग्य असल्यास कर्मांची अपेक्षा नाहीं. कारण सामग्री सिद्ध असल्यावर कार्याला अवधि लागणे उचित नाहीं, असे सांगतात– )—'**ब्रह्मचर्याद् एव प्रव्रजेत्**–'**इत्याद्याः (श्रुतयः)**—ब्रह्मचर्यापासूनच प्रव्रजन करावे. इत्यादि सर्वकर्मसंन्यासाचें विधान करणाऱ्या श्रुति आहेत.—'**धर्मं त्यज च अधर्मं त्यज । सत्यानृते उभे त्यज सत्यानृते उभे त्यक्त्वा येन त्यजसि तत् त्यज**'—धर्माचा त्याग कर, अधर्माचा त्याग कर.सत्य व मिथ्या या दोघांचा त्याग कर. कारण ते सर्व संसाराचा आरंभ करणारे आहेत. सत्य व अनृत यांचाही त्याग करून व ज्या अभिमानाने त्यांचा त्याग करशील त्या ' मी यांचा त्याग केला ' या अभिमानाचाही त्याग कर.—'**संसारं एव निःसारं दृष्ट्वा सारदिदृक्षया अकृतोद्वाहाः परं वैराग्यं आश्रिताः प्रव्रजन्ति** '—संसारच मुळीं निःसार–तत्त्वशून्य आहे असें पाहून त्यांतील सारभूत तत्त्व पाहण्याच्या इच्छेने मुमुक्षु विवाह न करितां तीव्र वैराग्याचा आश्रय करून संन्यासाश्रम घेतात असें बृहस्पतीने सांगितले आहे. [ यांत आपल्या स्वानुभवानेच कर्तृत्वादिरूप संसार दुःख हे फल देणारा आहे, असें ठरवून मोक्षाचें साधन जें सम्यग्ज्ञान त्याच्या सिद्धीसाठीं ब्रह्मचर्याश्रमांतून संन्यास करावा,असा संन्यासाचा उत्पत्तिविधि सांगितला आहे. वैराग्य ही संन्यासाची सामग्री आहे. यास्तव ब्रह्मचर्यापासूनच परमविरक्त होऊन सर्वकर्मत्याग करावा, असा याचा भावार्थ. आतां

ज्ञान व कर्म यांचा समुच्चय होऊं शकत नाहीं, हें दाखविण्यासाठीं त्यांच्या फलाचा विभाग दाखवितात-]—**जन्तुः कर्मणा बध्यते**—प्राणी कर्मानें बद्ध होतो—**च विद्यया विमुच्यते**—आणि विद्येने-आत्मज्ञानानें मुक्त होतो.—**तस्मात्**—कर्म व ज्ञान यांच्या फलामध्यें असें फार मोठें अंतर असल्यामुळे—**पारदर्शिनः यतयः कर्म न कुर्वन्ति**—ज्ञानाकडे दृष्टि देणारे साधक कर्म करीत नाहींत.—**इति शुकानुशासनं**—असा शुकाला व्यासांचा उपदेश आहे.—**इह अपि च 'सर्वकर्माणि मनसा संन्यस्य' इत्यादि**—या गीताशास्त्रांतही पुढें सर्व कर्मांचा मनानें संन्यास करून (मागें पृ.११३-१५पहा) इत्यादि म्हटलें आहे. [ज्ञानाची इच्छा करणाऱ्या मुमुक्षूला उद्देशून श्रुतिस्मृतींमध्यें संन्यासाचें जे विधान केले आहे त्याच्यायोगानें ज्ञानकर्मसमुच्चयविधि बाधित होतो, कारण ज्ञानकर्मसमुच्चय मोक्षसाधन मानल्यास संन्यासविधि अनुपपन्न ठरतो, हें तर एक झालेंच, पण त्याशिवाय मोक्षाचा नुस्ता स्वभाव जरी पाहिला तरी समुच्चयवचन अयोग्य ठरते, असें सांगतात-]—**च मोक्षस्य अकार्यत्वात् मुमुक्षोः कर्मानर्थक्यं**—आणि मोक्षाला कार्यत्व नसल्यामुळे मुमुक्षूला कर्माचे आनर्थक्य आहे. [म्ह० मोक्ष हें कोणत्याही कारणाचे कार्य नाहीं. त्यामुळे मोक्ष उत्पन्न होत नाहीं. तो नित्य आहे. त्यामुळे मुमुक्षूला मोक्षासाठी कर्म करावयास नको. त्याने कर्म जरी केलें तरी ते साक्षात् मोक्षोपयोगी नसल्यामुळे व्यर्थ आहे.]

**नित्यानि प्रत्यवायपरिहारार्थमनुष्ठेयानीति चेत्, न, असंन्यासिविषयत्वात्प्रत्यवायप्राप्तेः । न ह्यग्निकार्याद्यकरणात्संन्यासिनः प्रत्यवायः कल्पयितुं शक्यो यथा ब्रह्मचारिणामसंन्यासिनामपि कर्मिणाम् । न तावन्नित्यानां कर्मणामभावादेव भावरूपस्य प्रत्यवायस्योत्पत्तिः कल्पयितुं शक्या कथमसतः सज्जायेतेत्यसतः सज्जन्मासंभवश्रुतेः ॥**

**भाष्यार्थ—नित्यानि प्रत्यवायपरिहारार्थं अनुष्ठेयानि इति चेत्**—(विहित[1] कर्म न करणारा, निंदित कर्म करणारा व विषयांमध्ये आसक्त होणारा नर पतित होतो, असें स्मृतिवचन असल्यामुळे) मुमुक्षूनेंही नित्य कर्मे प्रत्यवायपरिहारार्थ अवश्य अनुष्ठावीं, असें म्हणाल तर—**न प्रत्यवायप्राप्तेः असंन्यासिविषयत्वात्**—तें बरोबर नाहीं. कारण प्रत्यवायप्राप्तीचा विषय संन्यासी नाहीं. असंन्यासी त्या प्रत्यवायप्राप्तीचा विषय आहे. [जो ज्या कर्मामध्यें अधिकारी असतो त्याने ते न केल्यास त्याला प्रत्यवाय लागतो. पण जो कर्माचा अधिकारीच नाहीं त्या संन्याश्याने तीं न केल्यास त्याला प्रत्यवाय लागण्याचे कांहीं कारणच नाहीं. हीच गोष्ट उदाहरणानें स्पष्ट करितात-]—**यथा असंन्यासिनां कर्मिणां अपि ब्रह्मचारिणां तथा संन्यासिनः अग्निकार्यादि-अकरणात् प्रत्यवायः कल्पयितुं शक्यः**—ज्याप्रमाणें संन्यासी नसलेल्या कर्मठाना व ब्रह्मचाऱ्यांनाही अग्निकार्य, समिद्धोम, स्वाध्याय,

---

१ 'अकुर्वन्विहितं कर्म निन्दितं च समाचरन् । प्रसज्जंश्चेन्द्रियार्थेषु नरः पतन ऋच्छति-' किंवा 'प्रसक्तश्चेन्द्रियार्थेषु प्रायश्चित्तीयते नरः' मनु. अ. ११ श्लो. ४४.

इत्यादि न केल्यानें प्रत्यवाय लागतो त्याप्रमाणें संन्याश्याला अग्निकार्यादि न केल्यानें प्रत्यवाय लागतो, अशी कल्पना करतां येणें शक्य नाहीं. [ विहित कर्म न केल्यानें प्रत्यवाय लागतो, असें गृहीत धरून हें सांगितलें. पण आतां निषिद्ध आचरण केल्यानेंच प्रत्यवाय लागूं शकेल, केवल अकरणानें म्ह० कर्मांच्या अभावापासून प्रत्यवायरूप भावाची उत्पत्ति होणें, शक्य नाहीं. कारण अभावापासून भाव होणें, हें लोक व वेद या दोन्ही प्रमाणांच्या विरुद्ध आहे,अशा आशयानें सांगतात-]—**नित्यानां कर्मणां अभावात् एव भावरूपस्य प्रत्यवायस्य उत्पत्तिः न तावत् कल्पयितुं शक्या**—नित्य कर्मांच्या अभावापासूनच भावरूप प्रत्यवायाची उत्पत्ति होते,अशी कल्पना करणेंच शक्य नाहीं.—**असतः सत् कथं जायेत इति असतः सज्जन्मासंभवश्रुतेः**—असत्पासून सत कसें उत्पन्न होईल ? अशा प्रकारें अभावापासून भावाची उत्पत्ति संभवत नाहीं, हे सांगणारी श्रुति आहे, त्यामुळे तशी कल्पना करतां येत नाहीं.

**यदि विहिताकरणादसंभाव्यमपि प्रत्यवायं ब्रूयाद्वेदस्तदाऽनर्थकरो वेदोऽप्रमाणमित्युक्तं स्यात् । विहितस्य करणाकरणयोर्दुःखमात्रफलत्वात् । तथा च कारकं शास्त्रं न ज्ञापकमित्यनुपपन्नार्थं कल्पितं स्यात् । न चैतदिष्टम् । तस्मान्न संन्यासिनां कर्माण्यतो ज्ञानकर्मणोः समुच्चयानुपपत्तिः ॥**

**भाष्यार्थ**—( ' अहोपण नित्य कर्माचे विधान करणाऱ्या वेदानेच ते न केल्यास प्रत्यवाय लागतो, असे सांगितले आहे. तेव्हां ' कथं असतः सत् जायेत ' या श्रुतीच्या आधाराने प्रत्यवाय लागत नाहीं, असे वेदविरुद्ध कसे म्हणतां ? ' उत्तर-)—**यदि वेदः विहिताकरणात् असंभाव्यं अपि प्रत्यवायं ब्रूयात्**—जर वेद विहित कर्मांच्या अननुष्ठानापासून असंभाव्य असाही प्रत्यवाय सांगूं लागेल—**तदा अनर्थकरः वेदः अप्रमाणं इति उक्तं स्यात्**—तर अनर्थकर वेद अप्रमाण आहे, असें म्हटल्यासारखे होईल. (अहोपण विहित कर्म न केले तर प्रत्यवाय लागतो,असे वचन असल्यामुळे नित्य कर्माचे विधान करणारा वेद अनर्थकर व अप्रमाण कसा होईल ? उत्तर-) —**विहितस्य करणाकरणयोः दुःखमात्रफलत्वात्**—कारण विहित कर्माचें अनुष्ठान केले तरी दुःख-कर्मानुष्ठानामुळे होणारे क्लेश व न केले तरी दुःख-प्रत्यवायप्राप्ति-मिळून वेदोक्त विहित कर्माचें तें केले तरी व न केले तरी दुःख हेच एक फल मिळतें, म्हणून वेद अनर्थकर, व त्यामुळेंच तो अप्रमाण. [ अहो पण वेद अभावामध्येही भावाला उत्पन्न करण्याचे सामर्थ्य उत्पन्न करील, आणि त्यामुळे विहित कर्माचे अनुष्ठान न करणे, या अभावापासून झालेल्या प्रत्यवायाचा परिहार विहित कर्माचें अनुष्ठान केल्यानें होईल ! उत्तर-)—**तथा च शास्त्रं कारकं, ज्ञापकं न इति अनुपपन्नार्थं कल्पितं स्यात्**—आणि तसेच शास्त्र हे कारक आहे-अपूर्वशक्ति उत्पन्न करणारें आहे, नुस्तें ज्ञापक नाहीं, असा त्याचा अयुक्त अर्थ कल्पिल्यासारखें होईल. [ पदार्थांच्या लोकप्रसिद्ध शक्तींच्या आश्रयानेंच शास्त्राची प्रवृत्ति होते, असे मानलेले असल्यामुळें व पदार्थांत अपूर्व शक्तींचें आधान करणे, अयोग्य असल्यामुळें शास्त्र ज्ञापकच आहे. पण तुम्ही

म्हणतां तसेंच जर शास्त्र असेल तर तें कारक ठरेल. म्ह० त्याचा असंभाव्य अर्थ काल्पिला असें होईल आणि शास्त्र कारक ठरल्यास त्याचें प्रामाण्य अबाधित राहणार नाहीं. ]—**न च एतत् इष्टं**—पण अपौरुषेय वेद अप्रमाण ठेवणें इष्ट नाहीं.—**तस्मात्**—अकरणापासून प्रत्यवायाची उत्पत्ति होणें शक्य नसल्यामुळे—**संन्यासिनां कर्माणि न**—संन्याश्यांना कर्में नाहींत. (ते ज्ञाननिष्ठ असल्यामुळेंच त्यांना कर्मसंन्यासित्व आहे. त्यामुळें त्यांना कर्माचा संभवच नाहीं. )—**अतः ज्ञानकर्मणोः समुच्चयानुपपत्तिः**—यास्तव ज्ञान व कर्म यांच्या समुच्चयाची अनुपपत्ति आहे.

**' ज्यायसी चेत्कर्मणस्ते मता बुद्धिः ' इत्यर्जुनस्य प्रश्नानुपपत्तेश्च । यदि हि भगवता द्वितीयेऽध्याये ज्ञानं कर्म च समुच्चयेन त्वयाऽनुष्ठेयमित्युक्तं स्यात्ततोर्जुनस्य प्रश्नोऽनुपपन्नो ज्यायसी चेत्कर्मणस्ते मता बुद्धिरिति । अर्जुनाय चेद्बुद्धिकर्मणी त्वयाऽनुष्ठेये इत्युक्ते या कर्मणो ज्यायसी बुद्धिः साऽप्युक्तैवेति ' तत्किं कर्मणि घोरे मां नियोजयसि केशव ' इति प्रश्नो न कथंचनोपपद्यते । न चार्जुनस्यैव ज्यायसी बुद्धिर्नानुष्ठेयेति भगवतोक्तं पूर्वमिति कल्पयितुं युक्तं येन ज्यायसी चेदिति प्रश्नः स्यात् ॥**

**भाष्यार्थ**—(ज्ञानकर्मसमुच्चयाच्या अनुपपत्तीचे आणखी एक कारण-)—**च 'ज्यायसी चेत् कर्मणः ते मता बुद्धिः' इति अर्जुनस्य प्रश्नानुपपत्तेः**—आणि ' कर्मांहून ज्ञान श्रेष्ठ आहे, असें जर तुला संमत आहे, ' असा अर्जुनाचा प्रश्नही उपपन्न होत नाहीं. ( ज्ञानकर्मसमुच्चयपक्षीं अर्जुनाचा हा प्रश्नही अयोग्य ठरतो. तो कसा तेच सविस्तर सांगतात-)—**यदि हि द्वितीये अध्याये भगवता ज्ञानं च कर्म समुच्चयेन त्वया अनुष्ठेयं इति उक्तं स्यात**—जर दुसऱ्या अध्यायांत भगवानांनी ज्ञान व कर्म यांचे तूं समुच्चयाने अनुष्ठान करावेस असे सांगितले असेल—**ततः 'ज्यायसी चेत्कर्मणस्ते मता बुद्धिः ' इति अर्जुनस्य प्रश्नः अनुपपन्नः**—तर ' ज्यायसी चेत्०' हा अर्जुनाचा प्रश्न अयोग्य ठरतो.—**अर्जुनाय चेत् त्वया बुद्धिकर्मणी अनुष्ठेये इति उक्ते कर्मणः ज्यायसी या बुद्धिः सा अपि उक्ता एव**—अर्जुनाला जर तूं ज्ञान व कर्म या दोन्हींचें अनुष्ठान करावेंस, असे सांगितले असेल तर कर्मांहून श्रेष्ठ असलेली जी बुद्धि-ज्ञान तीही सांगितलीच असेल.—**इति**—त्यामुळे—**' तत् हे केशव घोरे कर्मणि मां किं नियोजयसि ' इति प्रश्नः कथंचन न उपपद्यते**—तर मग हे केशवा, तूं घोर कर्मांत मला कां नियुक्त करतोस, हा प्रश्न कोणत्याच प्रकारें संभवत नाहीं. ( तुला कर्माचाच अधिकार आहे, अ. २ श्लो. ४७ असा अर्जुनाला उपदेश केलेला आहे. त्यामुळे त्याला श्रेष्ठ असलेली बुद्धि सांगितली नाहीं, हें उघड आहे. म्हणून अर्जुनाचा हा प्रश्न योग्यच आहे, असें कोणी म्हणेल तर सांगतात-)—**अर्जुनस्य एव ज्यायसी बुद्धिः न अनुष्ठेया इति भगवता पूर्वं उक्तं इति कल्पयितुं न युक्तं**—अर्जुनालाच तेवढी श्रेष्ठ असलेली बुद्धि अनुष्ठान करण्यास योग्य नाहीं, असे भगवानांनी पूर्वी सांगितलें, अशी कल्पना करणें युक्त नव्हे, कीं—**येन ' ज्यायसी चेत्०' इति प्रश्नः स्यात्**—ज्या कल्पनेनें

'ज्यायसी चेत्०' हा अर्जुनाचा प्रश्न संभवेल. [ भगवानानीं सर्वच अनात्मज्ञांना चित्त-शुद्धीसाठी कर्माधिकार सांगितला आहे, एकट्या अर्जुनाला उद्देशून नाहीं, तसेच 'ही मीं तुला सांख्यबुद्धि सांगितली, आतां योगबुद्धि ऐक,' असें म्हणून ज्ञाननिष्ठाही सांगितली आहे. त्यामुळे तशी कल्पना करतां येत नाहीं. ]

**यदि पुनरेकस्य पुरुषस्य ज्ञानकर्मणोर्विरोधाद्युगपदनुष्ठानं न संभवतीति भिन्नपुरुषानुष्ठेयत्वं भगवता पूर्वमुक्तं स्यात्ततोऽयं प्रश्न उपपन्नो ज्यायसी चेदित्यादिः । अविवेकतः प्रश्नकल्पनायामपि भिन्नपुरुषानुष्ठेयत्वेन भगवतः प्रतिवचनं नोपपद्यते । न चाज्ञाननिमित्तं भगवत्प्रतिवचनं कल्प्यम् । अस्माच्च भिन्नपुरुषानुष्ठेयत्वेन ज्ञानकर्मनिष्ठयोर्भगवतः प्रतिवचनदर्शनाज्ज्ञानकर्मणोः समुच्चयानुपपत्तिः । तस्मात्केवलादेव ज्ञानान्मोक्ष इत्येषोऽर्थो निश्चितो गीतासु सर्वोपनिषत्सु च । ज्ञानकर्मणोरेकं वद निश्चित्येति चैकविषयैव प्रार्थनाऽनुपपन्नोभयोः समुच्चयसंभवे । कुरु कर्मैव तस्मात्त्वमिति च ज्ञाननिष्ठासंभवमर्जुनस्यावधारणेन दर्शयिष्यति ।**

**भाष्यार्थ**—( तर मग अर्जुनाचा प्रश्न कोणत्या पक्षीं उपपन्न होतो ? उत्तर-)—**पुनः यदि**—पण याच्या उलट जर—**ज्ञानकर्मणोः विरोधात् एकस्य पुरुषस्य युगपत् अनुष्ठानं न संभवति**—ज्ञान व कर्म याचा विरोध असल्यामुळे एका पुरुषाचे एकाच वेळीं ज्ञान व कर्म याचे अनुष्ठान संभवत नाहीं,—**इति भगवता भिन्नपुरुषानुष्ठेयत्वं पूर्वं उक्तं स्यात्**—म्हणून भगवानांनीं ज्ञान व कर्म यांना भिन्न पुरुषानुष्ठेयत्व आहे, त्याचे अधिकारी भिन्न भिन्न आहेत, असे पूर्वी सांगितले असेल—**ततः**—तरच—'**ज्यायसी चेत्०' इत्यादिः अयं प्रश्नः उपपन्नः स्यात्**—'ज्यायसी चेत्०' इत्यादि हा प्रश्न उपपन्न होईल. [ ज्ञान व कर्म यांचा विरोध आहे. कर्माची सामग्री निराळी व ज्ञानाची निराळी.(गी.भा.पृ. ८७पहा) त्यामुळे एकाच पुरुषाला एकाच वेळीं त्या दोघांचे अनुष्ठान करतां येत नाहीं, म्हणून त्यांचे अधिकारी निरनिराळे आहेत, असे जर भगवानानीं दुसऱ्या अध्यायात सांगितले असेल तरच अर्जुनाचा 'ज्यायसी चेत०' इत्यादि प्रश्न योग्य होईल,त्यावाचून तो केव्हांच योग्य ठरणार नाहीं. कदाचित् यावर कोणी म्हणेल की, अर्जुनाला भगवानाच्या उपदेशाचा आशय कळला नाहीं, म्हणून त्यानें असा प्रश्न केला, तर तेही जुळत नाहीं-)—**अविवेकतः प्रश्नकल्पनायां अपि**—अविवेकामुळे अर्जुनानें असा प्रश्न केला, अशी जरी कल्पना केली तरी—**भगवतः भिन्नपुरुषानुष्ठेयत्वेन प्रतिवचनं न उपपद्यते**—भगवानांचें कर्म व ज्ञान यांचें अनुष्ठान भिन्न भिन्न पुरुषांनाच करतां येते, अशा प्रकारचे प्रतिवचन सयुक्तिक ठरत नाहीं. ( मी दोन निष्ठा सांगितल्या आहेत, ज्ञानयोगानें सांख्यांची व कर्मयोगानें योग्यांची, असे भगवानांनी जे उत्तर दिले आहे तें अर्जुनाचा प्रश्न अविवेककृत आहे, असे मानलें तरी सयुक्तिक ठरत नाही. 'अहो भगवानांचे प्रतिवचनही अज्ञाननिमित्तच आहे,' असे समजावे तर )—**भगवत्प्रतिवचनं अज्ञाननिमित्तं न कल्प्यं**—भगवानांचें उत्तरही अज्ञानामुळेंच आहे, अशी कल्पना करणें अगदीच अनुचित आहे.

( कारण भगवान् सर्वज्ञ आहेत, अशी त्यांची प्रसिद्धि आहे. अर्जुनाचा प्रश्नही अज्ञानकृत व भगवानांचें उत्तरही तसेंच असें म्हटल्यास त्यांच्या प्रसिद्धीशी विरोध येतो.)— **अस्मात् च**—यामुळेंही ज्ञानकर्मसमुच्चय हा शास्त्रार्थ नव्हे.—**ज्ञानकर्मनिष्ठयोः भिन्नपुरुषानुष्ठेयत्वेन भगवतः प्रतिवचनदर्शनात् ज्ञानकर्मणोः समुच्चयानुपपत्तिः**—आणि ज्ञाननिष्ठा व कर्मनिष्ठा यांचें अनुष्ठान करणारे अधिकारी भिन्न भिन्न आहेत असे भगवानांचें प्रतिवचन दिसत असल्यामुळे ज्ञान व कर्म यांच्या समुच्चयाचा असंभव आहे.—**तस्मात् केवलात् एव ज्ञानात् मोक्षः इति एषः अर्थः गीतासु च सर्वोपनिषत्सु निश्चितः**—यास्तव केवल ज्ञानानेच मोक्ष, असा हा अर्थ गीतेमध्ये व सर्व उपनिषदांमध्ये निश्चित आहे.—**च उभयोः समुच्चयसंभवे ज्ञानकर्मणोः एकं निश्चित्य वद इति एकविषया एव प्रार्थना अनुपपन्ना** —आणि त्या दोहोंचा समुच्चय जर संभवला असता तर ज्ञान व कर्म यांतील एकाचाच निश्चय करून मला सांग अशी त्यांतील एकाविषयीच प्रार्थना करणे अयोग्य झाले असतें. —**'कुरु कर्मैव तस्मात्त्वं'** ४.१५. **इति अर्जुनस्य ज्ञाननिष्ठासंभवं अवधारणेन दर्शयिष्यति**—म्हणून तूं कर्मच कर, असे म्हणून अर्जुनाच्या ज्ञाननिष्ठेचा असंभव ( कर्म एव–कर्मच या ) अवधारणेनें भगवान् पुढे दाखवितील. [ ' कर्म एव ' यांतील एवकार कर्माचाच निर्धार सांगत आहे, व 'कर्मच' असें म्हटल्याने ज्ञानाचे निरसन होते. तुला कर्माचाच अधिकार आहे, ज्ञानाचा नाही, असे त्यावरून निश्चित होते. ( अ. २ श्लो. ४७ ) दुसऱ्या अध्यायाच्या ११ व्या श्लोकाच्या आरंभी जे भाष्य आहे त्याला संबंधग्रंथ असे म्हणतात. त्यांत समस्त शास्त्रार्थाचा संग्रह केला आहे. तेथे या समुच्चयवादाचेंही खंडन केले आहे. पण ते संक्षिप्त असून हे येथील विवरणासारखें[१] आहे, त्यामुळे यावर पुनरुक्त दोष येत नाही. ]

---

१ आचार्यांनी या भाष्यांत ज्ञानकर्मसमुच्चयाचें खंडन सविस्तर केले आहे. ज्ञान व कर्म यांचा एकाच वेळी एका पुरुषाचे ठिकाणी संभवच नाही, असे ज्या कारणावरून दाखविले आहे, त्या सर्वांचे सयुक्तिकपणे खंडन केल्यावाचून कोणालाही गीतेत किंवा उपनिषदांत ज्ञानकर्मांचा समुच्चय विहित आहे, असे म्हणतां येणार नाही. आचार्यांनी गीताभाष्यांतच ज्ञानकर्मसमुच्चयाचे खंडन केले आहे, असे नाही. तर उपनिषद्भाष्यात व ब्रह्मसूत्रभाष्यांतही तें केले आहे. पण त्याचे तें खंडन श्रौत-स्मार्त कर्म व आत्मज्ञान यांच्या समुच्चयाला उद्देशून आहे; लौकिक कर्म व ज्ञान यांना उद्देशून नाही. प्राचीन ज्ञानकर्मसमुच्चयवाद्यांचें म्हणणे ' केवल आत्मज्ञान हे मोक्षाचे साधन नव्हे, तर ज्ञान व श्रौत-स्मार्त कर्मानुष्ठान ही दोन्ही मिळून मोक्षसाधन आहे.' ( मागे पृ. ४३ पहा ) असे आहे व रहस्यकार–आत्म्याचें कल्याण कशांत आहे हें ज्ञान, साम्यबुद्धीरूप ज्ञान, इत्यादि प्रकारचें ज्ञान झाल्यावर ( गीता र. पृ. २५, २९८, ४४९, वगैरे पहा ) मरेपर्यंत सांसारिक कर्मे करीत राहणें, पतकरलेला धंदा करणें, खाणे, पिणें, लढणें, वगैरे करणें याला ज्ञानकर्मसमुच्चय म्हणतात. या समुच्चयाला ते मोक्षाचें साधन म्हणत नाहीत! तर ज्ञानोत्तर सन्यास व कर्मयोग हे दोन स्वतंत्र मोक्षमार्ग समजतात!! ३०३ पण त्यांतल्या त्यांत संन्यासाहून कर्म श्रेष्ठ ३०५ असें प्रति-

पादितात. ह्याच गीतेचा सिद्धान्त म्हणतात व तो संन्यासमार्गीयांना कसा रुचणार ? असा अद्वैतवाद्यांवर आक्षेप घेतात. पण त्यांचा ज्ञानकर्मसमुच्चय नाममात्र आहे. त्याला कांहीं अर्थच नाहीं. आचार्यांनीं वर ज्या ज्ञानकर्मसमुच्चयाचें खंडन केलें आहे, त्याचें प्रतिखंडन या अर्थशून्य ज्ञानकर्मसमुच्चयानें होत नाहीं. रहस्यकारांचें कर्म हा कर्मयोगच नव्हे. तें सर्व-प्राणिसाधारण स्वाभाविक व लौकिक कर्म आहे. तें मोक्षाचें साधन कधींच होऊं शकत नाहीं. तें चित्तशुद्धीचेंही साधन होऊं शकत नाहीं. मग ज्ञानाचें साधन कसें होणार ? कांहीं ठिकाणीं 'आपल्या धर्माप्रमाणे सांसारिक कर्म' इत्यादि शब्द त्यांनीं योजले आहेत, पण गीतेंतील कर्मशब्दाचा अर्थ त्यांनीं ५६–५७ पानांत स्पष्टपणें ठरवून टाकला आहे. खाणें, पिणें, लढणें, खेळणें, जेवणें वगैरे हा त्याचा अर्थ आहे. कर्म म्ह० जगाचा व्यवहार, ३०२ धंदा स्वीकारला की तो धर्म. पृ. ६४७. अर्थात् हा ज्ञानकर्मसमुच्चय म्ह० एक अपूर्वच गोष्ट आहे. असल्या ज्ञानकर्मसमुच्चयानें आचार्यांनीं सविस्तर व सोपपत्तिक केलेल्या वृत्तिकाराच्या ज्ञानकर्मसमुच्चयाच्या खंडनाचें प्रतिखंडन होणें शक्य नाहीं. कारण असल्या लौकिक ज्ञान-कर्मसमुच्चयाचा मोक्षाशीं कांहींच संबंध नाहीं. आधुनिक सुशिक्षितांना 'तौलनिक चिकित्सा-पद्धतीचें ' जें एक वेड लागलेलें दिसतें त्याच्या भरांत पाश्चात्त्य निवृत्तिमार्गी व प्रवृत्तिमार्गी यांची आमच्याकडील संन्याशी व कर्मयोगी यांच्याशीं तुलना करण्याचाही रहस्यकारांनीं प्रयत्न केला आहे. पण ' पाश्चात्त्यांचा निवृत्तिमार्ग म्ह० तत्त्वविचारांत गढून राहणें व प्रवृत्तिमार्ग म्ह० राजकारणांत गढून राहणें ' हें जर खरें आहे तर त्यांच्या त्या दोन मार्गांची वैदिक ज्ञानमार्ग व कर्ममार्ग यांच्याशीं तुलना कशी संभवते तेंच समजत नाहीं. आमचे वैदिक मार्ग केवल धर्मप्रधान व त्यांचे केवल लौकिक. आमचे परमार्थसाधनभूत व त्यांचे ऐहिक उत्कर्षाचे उपायभूत. तेव्हां " अधिभौतिक जर्मन पंडित नित्शे यानें तिकडील राजकरणांत न पडणाऱ्या शोपेनहॉएरसारख्या तत्त्ववेत्त्यावर झोड उडवून त्यास ' मूर्खांतले मूर्ख ' जरी म्हटलें असलें " तरी रहस्यकारांनीं आमच्या वैदिक विरक्त स्थितप्रज्ञा-वर, बिचाऱ्या मुमुक्षूवर तशीच झोड उडवावयास नको होती. कारण निव्वळ राजकारण हा केवल लौकिक व राजस लोकांचा विषय असून मुमुक्षूचा सात्त्विक कर्मयोग किंवा संन्यास हा परमार्थी व सात्त्विक वैदिक धर्मीयांचा विषय आहे. अर्थात् त्यांची तुलनाच संभवत नाहीं. रहस्यकारांनीं ही गोष्ट ३०१ पृष्ठावरील टीपेंत कबूलही केली आहे. असो; सारांश रहस्यकारांचा ज्ञानकर्मसमुच्चय शुद्ध लौकिक आहे.शास्त्रीय नव्हे. 'ज्ञानी पुरुष जगाचे व्यवहार करतो किंवा न करतो एवढ्या एकाच गोष्टीवर नजर देऊन संन्यास व कर्मयोग या दोन मार्गांचा गीतेंत भेद केला आहे." ३०२ असें रहस्यकार म्हणतात, पण तें अगदीं अप्र-योजक आहे. कारण ज्ञानयोग व कर्मयोग हे दोन मार्ग किंवा भेद गीतेचे नसून सनातन वैदिक धर्माचे आहेत. अर्थात् ' ज्ञानी पुरुष जगाचे व्यवहार करतो किंवा न करतो, या गोष्टीकडे नजर देऊन' त्यांचा गीतेंत भेद केलेला नाहीं. तर कर्माधिकारित्व व ज्ञानाधि-कारित्व यांना उद्देशून उपनिषदांत केलेल्या भेदाला धरूनच गीतेंतील भेद आहे. तो निर्मूल नाहीं. ' कर्मयोग मोक्षाचें साक्षात् साधन नसून चित्तशुद्धि व ज्ञानप्राप्ति यांच्या द्वारा तें मोक्षसाधन आहे ' असें जें आचार्यादि अद्वैतवाद्यांचें म्हणणें आहे त्या संबंधानें रहस्यकार म्हणतात–" पण हा अर्थ स्वीकारल्यास सांख्य ( संन्यास ) व योग ( कर्मयोग )

**अर्जुन उवाच**—अर्जुन म्हणाला—

**ज्यायसी चेत्कर्मणस्ते मता बुद्धिर्जनार्दन ।**
**तत्किं कर्मणि घोरे मां नियोजयसि केशव ॥ १ ॥**

---

अशा या जगात द्विविध म्ह० दोन प्रकारच्या निष्ठा आहेत (गी. ३.३) असें जें भगवंतांनी म्हटले आहे त्यांतील द्विविध या पदाचें स्वारस्य बिलकूल रहात नाहीं. " ३०२-३. पण अगोदर सांख्य ह्म० संन्यास नव्हे, सांख्य ह्म० ज्ञान व योग ह्म० नुसता कर्मयोग नव्हे, तर योग ह्म० त्या ज्ञानाचा उपाय,व 'लोके' याचाही अर्थ 'जगांत' असा नसून 'त्रैवर्णिकांत' असा आहे. द्विविध निष्ठा हा एकवचनी शब्द आहे. दोन प्रकारची निष्ठा. कारण मूळांत 'द्विविधा निष्ठा प्रोक्ता' असे एकवचन आहे. त्यामुळे 'दोन प्रकारच्या निष्ठा आहेत' हें म्हणणे योग्य नाहीं, येथे जसे हे एकवचन आहे तसेच पुढे चवथ्या अध्यायाच्या पहिल्या श्लोकांत ' इमं योगं ' असे एकवचनच आहे व तो योगशब्द दुसऱ्या व तिसऱ्या अध्यायांतील उपदेशाला उद्देशून आहे. त्यामुळे द्विविध निष्ठा किंवा सांख्य-कर्मयोग हा एकच मोक्षोपाय असून त्यांत उपाय-उपेय—साध्यसाधनभाव आहे, हे उघड आहे. दोन प्रकारची म्ह० एक उपायरूप—साधनरूप व दुसरी उपेयरूप—साध्यरूप निष्ठा आहे. त्यामुळे ' द्विविध ' या पदाचे स्वारस्य रहात नाहीं, हे म्हणणे फुकट आहे. उलट ' द्विविधा निष्ठा ' दोन प्रकारची निष्ठा असा स्पष्ट एकवचनी शब्द असताना कर्म व ज्ञान हे दोन स्वतंत्र मार्ग आहेत असा आग्रह धरण्यांतच कांहीं स्वारस्य नाहीं. रहस्यकार पुन: म्हणतात— "ज्याला आत्म्याचें कल्याण कशात आहे हे कळते अशा ज्ञानी पुरुषाने युद्धादि स्वधर्मोक्त सांसारिक कर्मे आमरणान्त करावीं का करूं नये हाच गीतेतला मुख्य प्रश्न असून ज्ञानी पुरुषानेंही चातुर्वर्ण्याचीं हीं कर्मे निष्कामबुद्धीने केलीच पाहिजेत हा गीतेंतील कर्मयोग आहे; आणि तो संन्यासमार्गाचें पूर्वांग कधींच होऊं शकत नाहीं. " ३०३. रहस्यकारांचा ज्ञानी कोण ते येथे स्पष्ट कळतें. पण अशा ज्ञानी पुरुषाने संन्यास करावा, असें आचार्यादि कोणीच अद्वैतवादी म्हणत नाहींत. त्यामुळे त्याने युद्धादि सांसारिक कर्मे करावीं का करूं नये, हा प्रश्नच उपस्थित होत नाहीं. हा प्रश्न गीतेतला नसून रहस्यकाराच्या मनातला आहे. गीतेत ' ज्ञानी तु मे आत्मा एव–' ज्ञानी तर माझा आत्माच आहे, असें भगवानांनी ज्याच्याविषयीं म्हटले आहे तो ज्ञानी रहस्यकारांच्या ज्ञानी पुरुषाहून अगदीं भिन्न आहे. भगवानाचा आत्मा झालेला ज्ञानीच ज्ञाननिष्ठेचा मुख्य अधिकारी आहे. त्यामुळे रहस्यकारांच्या ज्ञानी पुरुषानें युद्धादि सांसारिक कर्मे मरेपर्यंत जरी केलीं तरी त्यांत अद्वैत सिद्धान्ताची कांहीं हानि नाहीं; व त्यांना इष्ट असलेले ज्ञान व कर्म याचा समुच्चय त्यांनीं जरी मानला तरी त्यांत शास्त्रार्थाचे कांहीं जात नाहीं. अशा ज्ञानाचा व सांसारिक स्वधर्मोक्त कर्मांचाच केवळ नव्हे तर तशा ज्ञानाचा व निषिद्ध कर्मांचाही समुच्चय मानण्यास आम्ही तयार आहों. मात्र जीवन्मुक्तीला साक्षात् कारण होणारें ज्ञान व शास्त्रोक्त नित्य-नैमित्तिक कर्म यांचा समुच्चय संभवत नाहीं. अर्थात् कर्मयोग हे साधन—पूर्वांग व ज्ञानयोग हें साध्य होय. भगवानानी अर्जुनाला त्याच्या अधिकाराप्रमाणे ज्ञानयोगाचें साधन म्हणून कर्मयोग उपदेशिला आहे; ज्ञानोत्तर नव्हे. आचार्यांनी भाष्यांत हेंच प्रतिपादन केलें आहे व आम्हीही त्याचाच अनुवाद करीत आहों.

**अन्वयार्थ—हे जनार्दन**—हे कृष्णा!—**कर्मणः**—कर्माहून—**बुद्धिः**—ज्ञान—**ते**—तुला—**ज्यायसी**—श्रेष्ठ—**चेत्**—जर—**मता**—संमत आहे—**तत्**—तर मग—**हे केशव**—हे केशवा—**घोरे कर्मणि**—घोर कर्मांत—**मां**—मला—**किं**—कां बरें—**नियोजयसि**—नियुक्त करतोस? १

ज्यायसी चेदिति। ज्यायसी श्रेयसी चेद्यदि कर्मणः सकाशात्ते तव मताऽभिप्रेता बुद्धिर्ज्ञानं हे जनार्दन। यदि बुद्धिकर्मणी समुचिते इष्टे तदैकं श्रेयःसाधनमिति कर्मणो ज्यायसी बुद्धिरिति कर्मणोऽतिरिक्तकरणं बुद्धेरनुपपन्नमर्जुनेन कृतं स्यान्न हि तदेव तस्मात्फलतोऽतिरिक्तं स्यात्। तथा कर्मणः श्रेयस्करी भगवतोक्ता बुद्धिरश्रेयस्करं च कर्म कुर्विति मां प्रतिपादयति तत्किं नु कारणमिति भगवत उपालम्भमिव कुर्वंस्तत्किं कस्मात्कर्मणि घोरे क्रूरे हिंसालक्षणे मां नियोजयसि केशवेति च यदाह तच्च नोपपद्यते अथ स्मार्तेनैव कर्मणा समुच्चयः सर्वेषां भगवतोक्तोऽर्जुनेन चावधारितश्चेत्तत्किं कर्मणि घोरे मां नियोजयसीत्यादि कथं युक्तं वचनम्॥ १॥

**भाष्यार्थ—'ज्यायसी चेत्०' इति अर्जुनः उवाच**—'ज्यायसी चेत्०' इत्यादि अर्जुन विचारूं लागला.—**हे जनार्दन, कर्मणः सकाशात् बुद्धिः-ज्ञानं ज्यायसी-श्रेयसी चेत्-यदि ते-तव मता-अभिप्रेता**—हे जनार्दना, कर्मापेक्षां बुद्धि म्ह० ज्ञान अधिक-श्रेष्ठ आहे, असे जर तुला अभिमत-अभिप्रेत असेल [-कर्माहून ज्ञान श्रेष्ठ आहे, असा जर तुझा निश्चयच असेल तर मग मला तूं घोर कर्मात कां नियुक्त करतोस, असा संबंध.]—**यदि बुद्धिकर्मणी समुच्चिते इष्टे**—जर ज्ञान व कर्म हीं समुच्चित इष्ट असतीं—त्यांचें एकाच वेळीं एकाच पुरुषानें अनुष्ठान करावे, असें जर भगवानांना संमत असतें—**तदा एकं श्रेयःसाधनं इति कर्मणः ज्यायसी बुद्धिः इति कर्मणः बुद्धेः अतिरिक्तकरणं अर्जुनेन अनुपपन्नं कृतं स्यात्**—तर 'एक श्रेयःसाधन मला सांग,' असे म्हणणे, 'कर्माहून बुद्धि श्रेष्ठ' असें म्हणून कर्माहून बुद्धीला पृथक् करणें, हें सर्व अर्जुनानें अयोग्य केलें, असें होईल. [कारण ज्ञान व कर्म याचा समुच्चय जर मोक्षाचे साधन आहे, तर त्यांतील एकच श्रेयःसाधन सांग असे कसें म्हणतां येईल? तसेंच समुच्चय हें जर एक मोक्षसाधन आहे तर त्यांतील एक कमी व दुसरें अधिक असे कसें म्हणतां येईल?]—**हि-तत् एव तस्मात् फलतः अतिरिक्तं न स्यात्**—कारण तेंच त्याहून फलतः अधिक होणें शक्य नाही. (समुच्चयपक्षीं त्यांतील प्रत्येकाला श्रेयःसाधनत्व नाहीं. तीं दोन्ही मिळून एक श्रेयःसाधन होते. त्यामुळें केवल कर्माहून केवल ज्ञानाला फलाच्या दृष्टीनें भिन्नता नाहीं. असो; याप्रमाणें या श्लोकाच्या पूर्वार्धावरून समुच्चयपक्ष जसा अनुपपन्न ठरतो तसाच तो उत्तरार्धावरूनही अनुपपन्न ठरतो, असें दाखवितात-)—**तथा भगवता कर्मणः बुद्धिः श्रेयस्करी उक्ता अश्रेयस्करं च कर्म कुरु इति मां प्रतिपादयति**—त्याचप्रमाणें भगवानांनीं कर्माहून बुद्धि अधिक श्रेयस्कर आहे, व कर्म बुद्धीहून अश्रेयस्कर आहे, असें सांगितलें (अ. २ श्लो. ४९) तथापि तें

अश्रेयस्कर कर्मच कर ( श्लो. ४७ ) असें मला-अतिशय प्रेमळ भक्ताला ते सांगतात— **तत् किं नु कारणं**—तें कां बरें, याचें कारण काय ?—**इति भगवतः उपालम्भं इव कुर्वन्**—असा भगवानांचा जणुंकाय उपालंभचसा करीत—**तत् हे केशव घोरे-क्रूरे-हिंसालक्षणे कर्मणि मां किं-कस्मात् नियोजयसि**—तर मग हे केशवा, घोर-क्रूर-हिंसारूप कर्मामध्यें मला कां-कोणत्या कारणामुळें नियुक्त करतोस ? ( मला युद्धासारख्या क्रूर कर्माची प्रेरणा कां करतोस ?)—**इति च यत् आह तत् च न उपपद्यते**—असें जें अर्जुन म्हणत आहे तेही समुच्चयपक्षीं उपपन्न होत नाहीं. [आतां श्रौत व स्मार्त कर्माशीं ज्ञानाचा समुच्चय, हे गृहस्थांचें श्रेयःसाधन आहे व स्मार्त कर्माशीं ज्ञानाचा समुच्चय, हे इतर आश्रमांतील लोकांच्या मोक्षाचें साधन आहे, असें भगवानांनीं सांगितलें व अर्जुनही तसेच समजला, असे जें वृत्तिकारांनी वर म्हटले आहे त्याचा अनुवाद करून पुनः त्यावर दोष देतात-]—**अथ सर्वेषां स्मार्तेन एव कर्मणा समुच्चयः भगवता उक्तः च अर्जुनेन अवधारितः चेत्**—बरें, सर्व आश्रमांतील लोकांच्या स्मार्तकर्माशींच ज्ञानाचा समुच्चय भगवानांनी सांगितला व अर्जुनानें जाणला असें म्हणावे तर—**'तत् किं कर्मणि घोरे मां वियोजयसि ' इत्यादि वचनं युक्तं कथं**—तर मग तूं मला घोर कर्मात कां नियुक्त करतोस ? हें अर्जुनाचे निदावचन युक्त कसें होतें ? ( ते मुळींच उपपन्न होत नाही. अर्थात् भगवानांना कोणत्याच कर्माशी ज्ञानाचा समुच्चय इष्ट नाहीं. ) १

## व्यामिश्रेणेव वाक्येन बुद्धिं मोहयसीव मे ।
## तदेकं वद निश्चित्य येन श्रेयोऽहमाप्नुयाम् ॥ २ ॥

**अन्वयार्थ—व्यामिश्रेण इव**—जणुं काय अत्यंत घोटाळ्याच्या—**वाक्येन**—वाक्यानें—**मे बुद्धिं**—माझ्या बुद्धीला—**मोहयसि इव**—तूं मोहच पाडीत आहेस. मला जणुं काय भ्रमांत पाडीत आहेस.—**तत्**—यास्तव—**येन**—ज्याच्या योगानें—**अहं**—मी—**श्रेयः**—कल्याणास—**प्राप्नुयाम्**—प्राप्त होईन—**तत्**—तें—**एकं**—एक—**निश्चित्य**—ठरवून—**वद**—मला सांग. २.

**किं च—व्यामिश्रेणेति । व्यामिश्रेणेव यद्यपि विविक्ताभिधायी भगवांस्तथाऽपि मम मन्दबुद्धेर्व्यामिश्रमिव भगवद्वाक्यं प्रतिभाति । तेन मम बुद्धिं मोहयसीव । मम बुद्धिव्यामोहापनयाय हि प्रवृत्तस्त्वं तु कथं मोहयस्यतो ब्रवीमि बुद्धिं मोहयसीव मे ममेति । त्वं तु भिन्नकर्तृकयोर्ज्ञानकर्मणोरेकपुरुषानुष्ठानासंभवं यदि मन्यसे तत्रैवं सति तत्तयोरेकं बुद्धिं कर्म वेदमेवार्जुनस्य योग्यं बुद्धिशक्त्यवस्थानुरूपमिति निश्चित्य वद ब्रूहि । येन ज्ञानेन कर्मणा वाऽन्यतरेण श्रेयोऽहमाप्नुयां प्राप्नुयाम् । यदि हि कर्मनिष्ठायां गुणभूतमपि ज्ञानं भगवतोक्तं स्यात्तत्कथं तयोरेकं वदेत्येकविषयैवार्जुनस्य शुश्रूषा स्यात् । न हि भगवतोक्तमन्यतरदेव ज्ञानकर्मणोर्वक्ष्यामि नैव द्वयमिति । येनोभयप्राप्त्यसंभवमात्मनो मन्यमान एकमेव प्रार्थयेत् ॥ २ ॥**

**भाष्यार्थ—किं च 'व्यामिश्रेण०' इति**—' व्यामिश्रेण०' या श्लोकानें आणखीही एका कारणानें अर्जुनाचा प्रश्न समुच्चयानुसारी नाही, असें सांगतात—**व्यामिश्रेण इव** —जणुं काय अत्यंत मिश्रितशा-घोटाळ्याच्याशा वाक्यानें—**यद्यपि भगवान् विविक्ताभिधायी तथापि मम मन्दबुद्धेः भगवद्वाक्यं व्यामिश्रं इव प्रतिभाति** —जरीं भगवान् अगदीं स्पष्ट कथन करणारा आहे, तरी मज मंदबुद्धीला भगवानाचें वाक्य अतिशय मिश्र-संकीर्ण असल्यासारखें भासतें.—**तेन मम बुद्धिं मोहयसि इव** —त्या तसल्या घोटाळ्याच्या वाक्यानें माझ्या बुद्धीला तूं जणुं काय मोह पाडीत आहेस ! —**त्वं तु मम बुद्धिव्यामोहापनयाय हि प्रवृत्तः कथं मोहयसि**— पण तूं माझ्या बुद्धीचा व्यामोह घालविण्यासाठींच प्रवृत्त झालेला असून मला मोह कसा पाडतोस—**अतः मे-मम बुद्धिं मोहयसि इव इति ब्रवीमि**—म्हणून माझ्या बुद्धीला जणुं काय तूं मोहित करीत आहेस, असें मी म्हणतों—**त्वं तु भिन्नकर्तृकयोः ज्ञानकर्मणोः एकपुरुषानुष्ठानासंभवं यदि मन्यसे**—परंतु तूं ज्यांचे कर्ते भिन्न आहेत अशा-ज्ञान व कर्म-यांचें एकाच पुरुषाला एकाच वेळीं अनुष्ठान करतां येणें शक्य नाही, असें जर मानीत असशील—**तत्र एवं सति**—तर तुझें मत असें असल्यास—**तत्-तयोः एकं बुद्धिं कर्म वा इदं एव अर्जुनस्य योग्यं बुद्धि-शक्ति-अवस्थानुरूपं इति निश्चित्य वद-ब्रूही**—त्या दोहोंतील एक म्ह० बुद्धि किंवा कर्म यांतील हेंच एक अर्जुनाला योग्य आहे, त्याची बुद्धि, शक्ति, अवस्था यांना हेंच अनुरूप आहे, असा निश्चय करून सांग. [ क्षत्रिय असलेल्या मज अर्जुनाच्या अन्तःकरणाला, त्याच्या शरीरसामर्थ्याला, व युद्धाचा आरंभ होण्याचा प्रसंग असल्यामुळे त्या अवस्थेला जे ज्ञान किंवा कर्म उचित असेल तेंच तूं आपल्या बुद्धीनें ठरवून सांग. ]—**येन ज्ञानेन कर्मणा वा अन्यतरेण अहं श्रेयः आप्नुयां-प्राप्नुयाम्**—कीं ज्या ज्ञानानें किंवा कर्मानें म्ह० त्या दोहोंतील एकानें मी श्रेयाला-मोक्षाला प्राप्त होईन. ( निश्चय करून त्यांतील एक सांगितल्यानें श्रोत्याला श्रेयःप्राप्ति हें फळ मिळेल. येथील श्रेय म्ह० मोक्ष आहे, नुस्तें आत्म्याचें कल्याण नव्हे. कारण सर्व उपनिषदांत व गीतादि ग्रंथांत मोक्षप्राप्तीचेच उपाय सांगितलेले आहेत. असो: याप्रमाणे 'तदेकं०' इत्यादि या वाक्याचा अक्षरार्थ सांगून त्यावरून समुच्चय हा शास्त्रार्थ नव्हे, हेंच तात्पर्य कसे निष्पन्न होते ते सांगतात-)—**यदि हि कर्मनिष्ठायां गुणभूतं अपि ज्ञानं भगवता उक्तं स्यात्**—जर कर्मनिष्ठेंत गौण रीतीनेंही ज्ञान भगवानांनीं सांगितलें असतें—**तत् ' तयोः एकं वद ' इति एकविषया एव अर्जुनस्य शुश्रूषा कथं स्यात्**—तर 'त्या दोहोंतील एक सांग ' अशी एका विषयींच अर्जुनाला ऐकण्याची इच्छा कशी झाली असती ?—**ज्ञानकर्मणोः अन्यतरत् एव वक्ष्यामि न एव द्वयं इति भगवता न हि उक्तं**—ज्ञान व कर्म यांतील कोणते तरी एकच मी तुला सांगेन, दोन सांगणारच नाही, असे कांहीं भगवानांनीं अर्जुनाला म्हटलेलें नाहीं, कीं—**येन आत्मनः उभयप्राप्त्यसंभवं मन्यमानः एकं एव प्रार्थयेत्**—ज्या

**कारणानें आपल्याला ज्ञान व कर्म या दोहोंच्या प्राप्तीचा असंभव आहे, असें समजणारा अर्जुन एकाचीच प्रार्थना करील !** [ कर्मनिष्ठेंत मुख्य किंवा गौण कोणत्याही प्रकारें ज्ञानाचा समावेश करण्यास भगवानांनी जर सांगितलें असतें तर अर्जुनानें त्यांतील एकाविषयींच प्रार्थना केली नसती. भगवानांनीं ' मी तुला यांतील एकच सांगेन दोन्ही केव्हांही सांगणार नाहीं, ' असें कांही अर्जुनाला म्हटलेले नव्हतें ! सारांश ज्ञानकर्मसमुच्चय भगवानांना संमत नाहीं, हें यावरून उघड होते. ] २.

---

१ पण रहस्यकार या दोन श्लोकांना असे अवतरण देतात–" कोणतेहि कर्म समबुद्धीनें केलें म्ह० त्याचे पाप लागत नाही, हें खरें; पण कर्मापेक्षा समबुद्धिच श्रेष्ठ जर निर्विवाद आहे तर स्थितप्रज्ञाप्रमाणें बुद्धि सम केली म्हणजे झाले, कर्मे केलीच पाहिजेत असें त्यावरून सिद्ध होत नाही " पुढे अर्थातही ' कर्मापेक्षां साम्यबुद्धिच श्रेष्ठ ' असे म्हटले आहे. म्ह० येथील बुद्धिशब्दाचा अर्थ ते साम्यबुद्धि असा करितात. पण तो बरोबर नाही, हें आम्ही वर ( पृ. १८२ ) दाखविलेंच आहे. येथे बुद्धि म्ह० ज्ञान हाच अर्थ युक्त आहे. कारण साम्य बुद्धीनें कर्म कर, योगस्थ होऊन कर्म कर, असे भगवानांनी वर सांगितलेंच आहे. तेव्हां कर्म व साम्यबुद्धि यांची तुलना केलेली नसून कर्म व बुद्धियोग यांची तुलना ४९ व्या श्लोकांत केली आहे आणि तिला उद्देशूनच अर्जुनाचा हा प्रश्न आहे. भगवानांचे उत्तरही ज्ञानयोग व कर्मयोग यांना उद्देशून आहे. कर्म व साम्यबुद्धि यांना उद्देशून नाही. त्यामुळें बुद्धि म्ह० साम्यबुद्धि हा अर्थ अयोग्य आहे. अद्वैतसंप्रदायी भाष्य-टीकाकारच येथील बुद्धि म्ह० ज्ञान असा अर्थ करितात असें नाही, तर मध्वाचार्य म्हणतात–"आत्मस्वरूप ज्ञानसाधनं चोक्तं पूर्वत्र । ज्ञानसाधनत्वेन अकर्म विनिंद्य कर्म विधीयते उत्तराध्याये । कर्मणः ज्ञानं अत्युत्तमं इति अभिहितं भगवता ' दूरेण ह्यवरं कर्म ' इत्यादौ० " पूर्वाध्यायांत भगवानांनी सांख्यनांवाचे आत्मस्वरूप व ज्ञानाचे साधन सांगितले. पुढील तिसऱ्या अध्यायांत ज्ञानाचें साधन या रूपानें अकर्माची निंदा करून कर्माचे विधान केले जाते. भगवानांनी ' दूरेण ह्यवरं कर्म० ' या श्लोकांत कर्माहून ज्ञान उत्तम आहे असे सांगितले आहे. रामानुजाचार्य म्हणतात–" यदि कर्मणः बुद्धिरेव ज्यायसी इति ते मता . . ... एतदुक्तं भवति–ज्ञाननिष्ठा एव आत्मावलोकनसाधनं कर्मनिष्ठा तु तस्या निष्पादिका । आत्मावलोकनसाधनभूता च ज्ञाननिष्ठा सकलेन्द्रियमनसा शब्दादिविषयव्यापारोपरतिनिष्पाद्या । इन्द्रियव्यापारोपरतिनिष्पाद्य आत्मावलोकनं चेत् सिषाधयिषितं सकलकर्मनिवृत्तिपूर्वकज्ञाननिष्ठायां एव अहं नियोजयितव्यः किमर्थं घोरे कर्मणि सर्वेंद्रियव्यापाररूपे आत्मावलोकनविरोधिनि कर्मणि मां नियोजयसि इति ॥' जर कर्माहून बुद्धिच श्रेष्ठ आहे असे तुला संमत असेल तर... याचा भावार्थ असा–ज्ञाननिष्ठाच आत्मदर्शनाचे साधन आहे. कर्मनिष्ठा तर ज्ञाननिष्ठेला निष्पन्न करणारी आहे आणि आत्मज्ञानाचें साधन अशी ज्ञाननिष्ठा सर्व इंद्रियें व मन यांच्या शब्दादि विषयांविषयींच्या व्यापाराचा त्याग केल्यानेंच निष्पन्न होणारी आहे. इंद्रियांचा व्यापार शांत केल्यानेंच प्राप्त होणारें आत्मदर्शन जर साध्य करावयाचें असेल तर सर्वकर्मनिवृत्तिपूर्वक ज्ञाननिष्ठेतच तू मला नियुक्त करावेंस, आत्मदर्शनाला विरोध करणाऱ्या सर्वेंद्रियव्यापाररूप घोर कर्मांत मला कां नियुक्त करतोस ? ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–" देवा तुम्ही जें वाक्य बोलिलें । ते म्यां निकें परिसिलें । कृपा

**लोकेऽस्मिन्द्विविधा निष्ठा पुरा प्रोक्ता मयाऽनघ ।**
**ज्ञानयोगेन सांख्यानां कर्मयोगेन योगिनाम् ॥३॥**

**अन्वयार्थ**—**हे अनघ**—हे निष्पाप अर्जुना !—**मया**—मीं—**अस्मिन् लोके**—या लोकीं—**द्विविधा निष्ठा**—दोन प्रकारची स्थिति—अनुष्ठानतत्परता—**पुरा**—पूर्वी-वैदिक संप्रदाय सुरू केला त्यावेळीं-सृष्टीच्या आरंभीं—**प्रोक्ता**—सांगितली.—**सांख्यानां**—स्थितप्रज्ञ संन्याश्यांचीं—**ज्ञानयोगेन**—ज्ञानयोगानें-सांख्ययोगानें व—**योगिनां**—अज्ञ कर्माधिकाऱ्यांची—**कर्मयोगेन**—कर्मयोगानें स्थिति सांगितली. ३

**प्रश्नानुरूपमेव प्रतिवचनम्-श्रीभगवानुवाच—लोकेऽस्मिन्निति । लोकेऽस्मिन्शास्त्रानुष्ठानाधिकृतानां त्रैवर्णिकानां द्विविधा द्विप्रकारा निष्ठा स्थितिरनुष्ठेयतात्पर्यं पुरा पूर्वं सर्गादौ प्रजाः सृष्ट्वा तासामभ्युदयनिःश्रेयसप्राप्तिसाधनं वेदार्थसंप्रदायमाविष्कुर्वता प्रोक्ता मया सर्वज्ञेनेश्वरेण हेऽनघापाप । तत्र का सा द्विविधा निष्ठेत्याह—तत्र ज्ञानयोगेन ज्ञानमेव योगस्तेन सांख्यानामात्मानात्मविषयाविवेकज्ञानवतां ब्रह्मचर्याश्रमादेव कृतसंन्यासानां वेदान्तविज्ञानसुनिश्चितार्थानां परमहंसपरिव्राजकानां ब्रह्मण्येवावस्थितानां निष्ठा प्रोक्ता, कर्मयोगेन कर्मैव योगः कर्मयोगस्तेन कर्मयोगेन योगिनां कर्मिणां निष्ठा प्रोक्तेत्यर्थः ॥**

**भाष्यार्थ**—( अर्जुनाचा प्रश्न समुच्चयाला अनुकूल नाहीं, तर प्रतिकूल आहे, असें व्याख्यान करून भगवानांचें प्रतिवचनही त्याला प्रतिकूल आहे, असे दाखविण्यासाठीं पुढील श्लोकाला अवतरण देतात-)—**प्रश्नानुरूपं एव श्रीभगवान् 'लोकेऽस्मिन्०' इति प्रतिवचनं उवाच**—अर्जुनाच्या प्रश्नानुरूपच श्रीभगवान् 'लोकेऽस्मिन्०' या श्लोकानें प्रतिवचन बोलले.—**अस्मिन् लोके**—या व्यवहारभूमीत-या मनुष्यलोकीं—**शास्त्रानुष्ठानाधिकृतानां त्रैवर्णिकानां**—शास्त्रीय ज्ञान किंवा कर्म यांचें अनुष्ठान करण्याचा ज्यांना अधिकार आहे अशा त्रैवर्णिकांची—ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य यांची—**द्विविधा-द्विप्रकारा निष्ठा-स्थितिः-अनुष्ठेयतात्पर्यं**—द्विविधा म्ह० दोन प्रकारची निष्ठा म्ह० स्थिति-अनुष्ठेयतत्परता—**पुरा-पूर्वं सर्गादौ**-पूर्वी-सृष्टीच्या आरंभीं—**प्रजाः सृष्ट्वा तासां अभ्युदय-निःश्रेयसप्राप्तिसाधनं वेदार्थसंप्रदायं आविष्कुर्वता मया सर्वज्ञेन ईश्वरेण प्रोक्ता**—सर्व प्रजांना उत्पन्न करून त्यांच्या अभ्युदयाच्या व निःश्रेयसाच्या म्ह० उत्कर्षाच्या व मोक्षाच्या प्राप्तीचें

---

निधि ॥१॥ तेथ कर्म आणि कर्ता । उरेचिना पाहता । ऐसें मत तुझें श्री अनंता । निश्चित जरी ॥२॥ तरी मातें केवीं श्रीहरि । म्हणसी पार्था संग्राम करीं ॥ " यावरून येथील बुद्धि-शब्दाचा अर्थ ज्ञाननिष्ठा असाच सर्व टीकाकार करितात व तोच भगवानांच्या उत्तराला, वैदिक द्विविध निष्ठेला, पूर्वाध्यायांतील प्रतिपादनाला व अर्जुनाच्या दुसऱ्या अध्यायांतील श्रेयःसाधनाविषयींच्या प्रश्नाला धरून आहे, हे सिद्ध होतें !

साधन वेदार्थसंप्रदायाला प्रकट करणाऱ्या मी सर्वज्ञ ईश्वराने सांगितली.—**हे अनघ –अपाप**—हे निष्पाप अर्जुना [ मी सृष्टीच्या आरंभी सर्व प्रजा उत्पन्न करून त्यांच्या ऐहिक व पारलौकिक उत्कर्षासाठीं व मोक्षासाठीं त्यांतील त्रैवर्णिकांना दोन प्रकारची निष्ठा सांगितली. ]—**तत्र का सा द्विविधा निष्ठा इति आह**—पण ती दोन प्रकारची निष्ठा कोणती, अशी शंका कोणाला राहू नये, म्हणून भगवान् सांगतात—

**तत्र ज्ञानयोगेन–ज्ञानं एव योगः तेन सांख्यानां–आत्मनात्मविषयविवेक–ज्ञानवतां ब्रह्मचर्याश्रमात् एव कृतसंन्यासानां वेदान्तविज्ञानसुनिश्चि—तार्थानां परमहंसपरिव्राजकानां ब्रह्मणि एव अवस्थितानां निष्ठा प्रोक्ता**

---

१ रहस्यकार पुरा म्ह० दुसऱ्या अध्यायात असा अर्थ करितात. नीलकंठ, मधुसूदन-सरस्वती, श्रीधर, हेही ‘ पुरा–पूर्वाध्याये ’ असाच अर्थ करितात. शंकरानंद, पुरा म्ह० पूर्वकाली, ज्ञानेश्वर महाराज–‘ये लोकीं या दोनी निष्ठा । मजचि पासुनी प्रगटा । अनादि सिद्धा । ’ असे म्हणतात. म्ह० यांच्या म्हणण्याचा आशयही आचार्यांच्या भाष्यानुसार आहे. पुरा म्ह० पूर्वाध्यायात हा अर्थ सयुक्तिक नाही. कारण पूर्वाध्यायातच जर भगवानांनी ही दोन प्रकारची निष्ठा सांगितली असती तर अर्जुनाला शंका येण्याचे कारणच नव्हते. शिवाय ‘ या लोकीं पूर्वी द्विविध निष्ठा सांगितली, ’ असे भगवान् म्हणत आहेत. ‘ या लोकीं पूर्वी ’ म्ह० पूर्वाध्यायात असा अर्थ संभवतच नाही. ‘ मी पूर्वी तुला दोन निष्ठा सांगितल्या ’ असे भगवानांनी म्हटले असते तर पूर्वी म्ह० दुसऱ्या अध्यायात असा अर्थ झाला असता. तसेच पुढे चवथ्या अध्यायाच्या आरंभी ‘ मी हा योग सूर्याला सांगितला ’ असें म्हटले आहे, त्याच्याकडे लक्ष ठेवूनही येथील ‘ पुरा ’ शब्दाचा अर्थ केला पाहिजे.

पण रहस्यकार म्हणतात– “ आमचा अर्थ सरळ आहे. कारण दुसऱ्या अध्यायात प्रथम सांख्यनिष्ठेप्रमाणे ज्ञान सांगून नंतर कर्मयोगनिष्ठेस सुरवात केली आहे ” पृ. ६४३. ‘ सांख्यनिष्ठेप्रमाणे ज्ञान ’ हा शब्दप्रयोग शास्त्रीय दृष्ट्या सदोष आहे. ‘ सांख्ये बुद्धिः–’ ह्म० आत्म्याविषयी ज्ञान, आत्म्याचे ज्ञान. सांख्यशब्द निराळा व सांख्यनिष्ठा निराळी. सांख्यशब्दाच्या अर्थाचें स्पष्टीकरण आचार्यांनी भाष्यांत केले आहे. (गी. भा. पृ. ४५ पहा) दुसऱ्या अध्यायांत कर्मयोगनिष्ठा सविस्तर सांगितलेली नाही, हें आम्ही पूर्वी दाखविलेंच आहे. अर्थात् पुरा ह्म० दुसऱ्या अध्यायांत हा अर्थ ‘ सरळ ’ जरी कदाचित् असला तरी सयुक्तिक नाही. रहस्यकार पुनः म्हणतात–“ पुरा ह्म० सृष्टीच्या मूळारंभी असाही अर्थ होऊं शकेल, कारण महाभारतांत नारायणीय किंवा भागवत धर्माचे निरूपण आहे तेथें सांख्य व योग ( निवृत्ति व प्रवृत्ति ) या दोन निष्ठा स्वतंत्रपणे भगवतांनी जगाच्या आरंभीच उत्पन्न केल्या आहेत, असें वर्णन आहे. ” पृ. ६४३. नारायणीय किंवा भागवत धर्माचे विवेचन आम्ही स्वतंत्रपणे पुढे परिशिष्टांत करणार आहो, त्यावरूनही या दोन निष्ठा स्वतंत्र नाहीत, याविषयी खात्री होईल.

रहस्यकार ह्मणतात–“निष्ठाशब्दाच्या मागे मोक्ष हा शब्द अध्याहृत आहे व ज्या मार्गानें गेलें असतां अखेर मोक्ष मिळतो तो मार्ग, असा त्याचा अर्थ आहे. ( अर्थात् निष्ठा म्ह० मोक्षमार्ग. ) गीतेप्रमाणे अशा निष्ठा दोनच आहेत. त्या दोन्ही स्वतंत्र आहेत. एक

—त्यांतील ज्ञानयोगानें म्ह० ज्ञान हाच योग, त्यानें सांख्यांची म्ह० आत्मा व अनात्मा यांविषयींचें विवेकविज्ञान ज्यांना आहे त्यांची म्ह० ब्रह्मचर्याश्रमांतून ज्यांनी संन्यास केला आहे, वेदान्तविज्ञानानें ज्यांचें प्रयोजन अत्यंत निश्चित झालें आहे, अशा ब्रह्मामध्येच अवस्थित झालेल्या परमहंसपरिव्राजकांची निष्ठा सांगितली.—**कर्मयोगेन-कर्म एव योगः कर्मयोगः तेन कर्मयोगेन योगिनां-कर्मिणां निष्ठा प्रोक्ता इत्यर्थः**—कर्मयोगानें वर्णाश्रमविहित धर्मसंज्ञक कर्म हाच योग[2] त्या कर्मयोगाने योग्यांची म्ह० कर्माधिकाऱ्यांची निष्ठा सांगितली असा याचा अर्थ [ ज्ञानयोगाने सांख्यांची निष्ठा व

---

दुसऱ्याचे अंग नव्हे. " पण हे दोन मार्ग जर स्वतंत्र तर ' ज्ञानानेंच मोक्ष ' हा सिद्धान्त गीतेला मान्य नाहीं, असे म्हणावे लागते. पण मग ' ज्ञानं लब्ध्वा परां शांतिं अचिरेण अधिगच्छति ' इत्यादि गीतावचनांची वाट काय ? एक दुसऱ्याचे जर अंग नव्हे तर ' योगिनः कर्म कुर्वन्ति संगं त्यक्त्वात्मशुद्धये ' ' यज्ञो दानं तपश्चैव पावनानि मनीषिणां ' इत्यादि वचनांचे काय करावयाचें ? 'संन्यास व कर्मयोग या प्रकरणाचें परीक्षण' या परिशिष्टात आम्ही पुढे यासंबंधी सविस्तर विचार करणार आहो, तो पहावा. पण रहस्यकार निष्ठा-शब्दाचा अर्थ सर्वत्र ठिकाणीं मोक्षमार्ग असा करीत नाहीत. कोठें निष्ठा म्ह० अनुष्ठान-तात्पर्य असेही म्हणतात. आचार्यांना तोच अर्थ संमत आहे. ' नि ' म्ह० निश्चयाने ' स्था ' म्ह० स्थिति. निश्चयाने स्थिति किंवा अनुष्ठानतात्पर्य म्ह० आपल्या अधिकारा-प्रमाणे जे साधन प्राप्त असेल त्यांत तत्पर होऊन राहणे, असा त्याचा अर्थ आहे. ज्ञाना-नंतर जर या दोन निष्ठा सांगितल्या आहेत तर त्या स्वतंत्र आहेत, त्यांतील एक दुसरीचे अंग नव्हे, हे सांगण्याचे कारणच काय आहे ? ज्ञान झाल्यावर कर्मयोग कोणाचे अंग होणार ? व ज्ञान झाल्यावर मोक्ष म्हणून जर कांहीं निराळे रहातच नाहीं, ' ज्ञानसम-कालमुक्तः ' ज्ञान होताच मोक्ष, अशी जर वस्तुस्थिति आहे तर ' ज्ञानोत्तर दोन स्वतंत्र मोक्षनिष्ठा ' तरी कशाला ? की रहस्यकाराच्या मते ज्ञानानंतरही मोक्षाच्या मार्गाची आवश्यकता आहे ! जर असेल तर त्याचे ज्ञान म्ह० आत्मज्ञान नव्हे, आचार्य म्हणतात तें ज्ञान नव्हे. आचार्य ज्याला ज्ञान म्हणतात ते आत्मसाक्षात्काररूप ज्ञान आहे. आत्म-साक्षात्कार झाला की तत्काल मुक्ति. मी कर्ता, भोक्ता, संसारी जीव नव्हे, मी अकर्ता, अभोक्ता, निर्विकार, वगैरे आहे, असा साक्षात्कार-अनुभव आल्यावर मोक्ष म्हणून कांहीं वस्तुच उरत नाहीं. मग त्याला रहस्यकाराच्या या मोक्षमार्गांची काय गरज असणार ? अर्थात् कर्मयोग व ज्ञानयोग ह्या स्वतंत्रनिष्ठा-स्वतंत्र दोन मोक्षमार्ग आहेत, असे हजार वेळा जरी कोणी म्हटले तरी ते म्हणणे अर्थरहित व वस्तुस्थितीला सोडून आहे. हा सर्व घोटाळा 'ज्ञानोत्तर ज्ञानी पुरुषाने काय करावे हे सांगण्यासाठीं गीतेचा आरंभ आहे,' अशी ( गी. र. पृ. ३०२) रहस्यकारांनी चुकीची समजूत करून घेतल्यामुळे झाला आहे.

१ परमार्थ वस्तुविषयक ज्ञान-आत्मसाक्षात्कार हा योग-युज्यते अनेन ब्रह्मणा-ज्याच्या योगानें ब्रह्माशीं युक्त होतो, तो योग, त्या ज्ञानयोगाने.

२ ' युज्यते अभ्युदयेन इति योगः ' ज्याच्या योगानें अभ्युदयाशी युक्त होतो तो योग. दोन्ही ठिकाणी साधन हाच योगशब्दाचा अर्थ आहे.

कर्मयोगानें कर्माधिकारी द्विजांची निष्ठा, अशी दोन प्रकारची निष्ठा सांगितली. ज्ञान म्ह० परमार्थवस्तूचा-आत्म्याचा साक्षात्कार, हाच परब्रह्माशी तादात्म्य पावण्याचा उपाय, त्यानें सांख्यांची निष्ठा. सांख्य म्ह० आत्मा व अनात्मा यांच्या विवेकज्ञानानें युक्त असलेले म्ह० ज्ञानवान् संन्यासी. पण संन्यासी सुद्धां साधे नव्हेत, तर ब्रह्मचर्याश्रमांतून ज्यांनीं संन्यास केला आहे, पुत्रादि तीन एषणांचा त्याग केला आहे व ज्यांनीं जपादि सर्व साधनें सोडून श्रवण-मनन-निदिध्यासनांच्या योगानें वेदान्तविज्ञानानें पुरुषार्थ पूर्णपणें निश्चित केला आहे, जे ब्रह्मनिष्ठ आहेत अशा परमहंसांची ज्ञानयोगानें निष्ठा सांगितली व ज्यांचें चित्त शुद्ध झालेलें नाहीं, अशा कर्माधिकाऱ्यांना 'वर्णाश्रमविहित धर्म' या नांवाचें कर्म हाच योग म्ह० ऐहिक व पारलौकिक उत्कर्षाचें साधन सांगितलें आहे. येथें आचार्यांना ज्ञान, सांख्य, कर्मयोग व योगी या शब्दांचा कोणता अर्थ विवक्षित आहे ते वाचकांनीं लक्षात ठेवावे. ]

**यदि चैकेन पुरुषेणैकस्मै पुरुषार्थाय ज्ञानं कर्म च समुच्चित्यानुष्ठेयं भगवतेष्टमुक्तं वक्ष्यमाणं वा गीतासु वेदेषु चोक्तं कथमिहार्जुनायोपसन्नाय प्रियाय विशिष्टभिन्नपुरुषकर्तृके एव ज्ञानकर्मनिष्ठे ब्रूयात् । यदि पुनरर्जुनो ज्ञानं कर्म च द्वयं श्रुत्वा स्वयमेवानुष्ठास्यत्यन्येषां तु भिन्नपुरुषानुष्ठेयतां वक्ष्यामीति मतं भगवतः कल्प्येत तदा रागद्वेषवानप्रमाणभूतो भगवान्कल्पितः स्यात् । तच्चायुक्तम् । तस्मात्कयाऽपि युक्त्या न समुच्चयो ज्ञानकर्मणोः । यदर्जुनेनोक्तं कर्मणो ज्यायस्त्वं बुद्धेस्तच्च स्थितमनिराकरणात् । तस्याश्च ज्ञाननिष्ठायाः संन्यासिनामेवानुष्ठेयत्वं भिन्नपुरुषानुष्ठेयत्ववचनाच्च भगवत एवमेवानुमतमिति गम्यते ॥ ३ ॥**

**भाष्यार्थ**—( याप्रमाणे भगवानांच्या प्रतिवचनाचे व्याख्यान करून त्याचाच तात्पर्यार्थ सांगतात-)—**यदि च एकेन पुरुषेण एकस्मै पुरुषार्थाय ज्ञानं कर्म च समुच्चित्य अनुष्ठेयं भगवता इष्टं**—जर एका पुरुषानें एका पुरुषार्थासाठीं ज्ञान व कर्म याचें समुच्चयानें-सह-एकाच वेळीं अनुष्ठान करावे, हे भगवानांना इष्ट असतें—**गीतासु उक्तं वा वक्ष्यमाणं वेदेषु च उक्तं**—गीतेत मागें सांगितलें असतें, किंवा यापुढें सांगावयाचें असते व वेदांत सांगितलेलें असतें तर—**इह उपसन्नाय प्रियाय अर्जुनाय विशिष्टभिन्नपुरुषकर्तृके एव ज्ञानकर्मनिष्ठे कथं ब्रूयात्**—येथे शरण आलेल्या प्रिय अर्जुनाला विशेष प्रकारचे भिन्नभिन्न पुरुष ज्यांचे कर्ते आहेत अशा ज्ञान व कर्म या दोन निष्ठा भगवान् कसे सांगतील ?—**यदि पुनः अर्जुनः ज्ञानं च कर्म द्वयं श्रुत्वा स्वयं एव अनुष्ठास्यति**—बरे, जर अर्जुन-विचारपूर्वक काम करणारा असल्यामुळे ज्ञान व कर्म हीं दोन्ही ऐकून स्वतःच त्या दोहोंचें अनुष्ठान करील—**तु अन्येषां भिन्नपुरुषानुष्ठेयतां वक्ष्यामि इति भगवतः मतं कल्प्येत**—पण इतरांना मी 'भिन्न पुरुषांनीं ज्ञानकर्मानुष्ठान करावे, एकाच पुरुषाने दोन्ही करूं नयेत,' असें सांगेन, असें भगवानांचें मत जर कल्पिलें—**तदा भगवान् रागद्वेषवान् अप्रमाणभूतः कल्पितः**

**स्यात्**—तर मग भगवान् रागद्वेषवान् व अप्रमाणभूत आहेत, असें कल्पिल्यासारखें होईल—**तत् च अयुक्तं**—पण तें अयोग्य आहे ( अर्जुन शहाणा आहे तो ज्ञान व कर्म हीं दोन्ही साधनें ऐकून त्यांचें समुच्चयानेंच अनुष्ठान करील व कृतार्थ होईल. इतरांनीं कृतार्थ व्हावे, अशी माझी इच्छा नसल्यामुळे मी त्यांना ज्ञान-कर्मसमुच्चय न सांगतां ज्ञानाधिकारी निराळे व कर्माधिकारी निराळे, असेंच सांगेन, असा भगवानांचा आशय मानल्यास त्यांना एक अर्जुन मात्र प्रिय आहे बाकी सर्व अप्रिय, असें म्हणावें लागेल. म्हणजे भगवान् आम्हांप्रमाणेंच राग-द्वेषांनी युक्त आहेत, असे ठरेल. त्यामुळें ते आप्त नव्हेत, अनाप्त आहेत, म्हणूनच त्यांचें म्हणणें अप्रमाण आहे, असेंही म्हणणें भाग पडेल. पण ते 'समं सर्वेषु भूतेषु तिष्ठन्तं परमेश्वरं-' १३-२७ या भगवद्वचनाच्याच विरुद्ध आहे. यास्तव समुच्चयाच्या लोभानें भगवानाला रागद्वेषवान्, अनाप्त, अप्रमाण ठरविणें सर्वथा अयोग्य आहे. आतां दोन प्रकारची निष्ठा दोन प्रकारच्या लोकांना अनुष्ठेय आहे, असा जो भगवानांनीं निर्देश केला आहे, त्याच्या फलाचा उपसंहार करितात-)—**तस्मात् कया अपि युक्त्या ज्ञानकर्मणोः समुच्चयः न**—म्हणून कोणत्याही युक्तीनें ज्ञान व कर्म यांचा समुच्चय सिद्ध होत नाहीं.—**अर्जुनेन बुद्धेः कर्मणः ज्यायस्त्वं यत् उक्तं तत् स्थितं**—यावरून अर्जुनानें ज्ञानाचे कर्माहून श्रेष्ठत्व जे सांगितले होते तें भगवानांनाही संमत आहे, असे ठरले.—**अनिराकरणात्**—कारण भगवानांनीं त्याचे निराकरण केलें नाहीं. [ जर भगवानांना ज्ञान कर्माहून श्रेष्ठ आहे, असें संमत नसतें तर त्यांनीं त्याचें निराकरण केले असते. ज्ञान व कर्म हीं दोन्ही तुल्यबल[1] मोक्षसाधनें आहेत, ज्ञान कर्माहून श्रेष्ठ नाही असे स्पष्ट म्हटले असते, पण ते कांहीं न म्हणतां मी दोन प्रकारची निष्ठा सांगितली आहे, ज्ञानयोगाने सांख्यांची व कर्मयोगाने योग्यांची असे म्हटले आहे. सांख्य-ज्ञानी ज्ञानयोगाचे अधिकारी व सांख्याहून भिन्न असलेले योगी -अर्थात् अनात्मज्ञ गृहस्थ कर्मयोगाचे अधिकारी. अर्थात्-]—**तस्याः च ज्ञाननिष्ठायाः संन्यासिनां एव अनुष्ठेयत्वं**—आणि ती कर्मयोगाहून श्रेष्ठ असलेली ज्ञाननिष्ठा संन्याश्यांनाच अनुष्ठेय आहे, असंन्यासी गृहस्थांना नाहीं.—**च भिन्नपुरुषानुष्ठेयत्ववचनात्**—आणि त्या दोन निष्ठा निरनिराळ्या पुरुषांकडूनच अनुष्ठान करितां येण्याजोग्या आहेत, एका पुरुषाला एकाच वेळीं अनुष्ठितां येण्यासारख्या

---

१ यावरून रहस्यकारानी ठिकठिकाणीं 'हे दोन्ही मार्ग स्वतत्र आहेत, तुल्यबल आहेत,' पृ. ३०३ असे जे वारंवार म्हटले आहे, हे कितपत यथार्थ आहे, याचा विचार वाचक करतीलच ! शिवाय ते मार्ग जर स्वतंत्र व तुल्यबल तर मग रहस्यकारांना समत असलेल्या ज्ञानकर्मसमुच्चयाची काय वाट ? समुच्चय म्ह० दोहोचें एकाच वेळीं अनुष्ठान, स्वतंत्र दोन मार्गांनी एका मनुष्याला एकाच वेळी जातां येणें जसे अशक्य तसे दोन मोक्ष-मार्गांचें एकाच वेळी अनुष्ठान करतां येणे शक्य नाही. दोन्ही मार्ग जर सारखेच समर्थ म्ह० तुल्यबल ( पृ. ३०२ ) तर गीतेनें त्यांतील कर्मयोगालाच अधिक चागला म्हटले आहे, कर्मयोगच प्रधान, बाकीचे सर्व त्याची अंगे, इत्यादि म्हणण्यांत काय अर्थ राहिला ?

नाहींत, असेंही सांगितल्यामुळें,—**भगवतः एवं एव अनुमतं इति गम्यते**—भग-वानाला हें असेंच संमत आहे, हें निश्चित होतें. ( अर्थात् भगवानांना ज्ञानकर्मसमुच्चय

---

१ सर्व अद्वैतवादी या श्लोकाचा असाच अर्थ करितात. मध्वाचार्य म्हणतात,"ज्ञान कर्मा-हून जरी श्रेष्ठ असले तरी तूं आधिकारीक आहेस. म्हणून तुझा कर्मांतच अधिकार आहे. दोन प्रकारचे लोक आहेत. एक गृहस्थादिकर्मत्यागाने ज्ञाननिष्ठ होणारे सनकादिक व दुसरे जनकादिकांप्रमाणे गृहस्थादि-आश्रमात राहूनच ज्ञानसाधनरूप युद्धादि गृहस्थधर्मांनी युक्त असलेले, ( यति-आश्रमांत कांही साधक असतात व काही सिद्ध असतात. जे साधक असतात ते यति-आश्रमाला विहित असलेलीं ज्ञानसाधनभूत कर्में करितात. तसेच गृह-स्थाश्रमांतही कांहीं सिद्ध असतात. तथापि ते लोकसंग्रहार्थ कर्म करितात. ) सांख्य म्ह० ज्ञानी सनकादिक व योगी म्ह० उपायी. जनकादि ज्ञानी जरी असले तरी ते अधिकारी असल्यामुळें कर्में करीत होते. म्हणून तेही योगी म्ह० उपायीच होत. अर्जुना, तूंही जन-कादिकांप्रमाणे कर्मासहच ज्ञानाला योग्य आहेस. सनकादिकांप्रमाणे कर्मत्यागानें ज्ञानाला योग्य नाहीस." मध्वाचार्यांचे हे म्हणणे फारच सयुक्तिक आहे. या श्लोकावरील रामानुजाचार्यांचें भाष्यही अत्यंत वाचनीय आहे. पण मूळ भाष्यासह अर्थ दिल्यास विस्तार होईल, म्हणून त्याचा सारांश येथे देतो. ज्याना संशय असेल त्यांनीं मूळ भाष्य पहावे. "पूर्वींही विचित्र अधिकारी जीवांनीं भरलेल्या या लोकांत ज्ञान व कर्म यांविषयींची दोन प्रकारची निष्ठा मीं सांगितली. ती ज्याच्या त्याच्या अधिकाराप्र-माणें अगदी पृथक् आहे. कारण ज्याला मोक्षाचा अभिलाष आहे असा प्रत्येक लौकिक पुरुष लागलाच काही ज्ञानयोगाचा अधिकारी होत नाहीं. तर फलेच्छारहित केवळ परम पुरुषा-राधनरूप कर्माच्या योगानें मनाचा मळ पार नाहीसा झाला व इंद्रियांची विषयव्याकुलता क्षीण झाली म्हणजे तो ज्ञाननिष्ठेचा अधिकारी होतो. ‘ यतः प्रवृत्तिर्भूतानां ’ गी. १८-४६ या वचनांत परम पुरुषाची आराधना हाच एक कर्माचा विषय पुढे सांगितला जाणार आहे. दुसऱ्या अध्यायांतही ‘ कर्मण्येवाधिकारस्ते० ’ इत्यादि वचनाने फलाची इच्छा न धरतां कर्मानुष्ठान कर असे सागून त्या कर्मानुष्ठानाने विषयव्याकुलतारूप मोहांतून ज्याची बुद्धि वर निघाली आहे, त्याला ‘ प्रजहाति यदा कामान्० ’ येथून पुढें ज्ञानयोग सागितला आहे. म्हणून साख्यांचीच ज्ञानयोगानें स्थिति सांगितली व योग्याची कर्मयोगाने. सख्या म्ह० बुद्धि—आत्मज्ञान, तिनें युक्त असलेले ते सांख्य;आत्मैकविषयबुद्धीनें युक्त असलेले सांख्य. जे त्या बुद्धीला पात्र नसलेले ते कर्मयोगाधिकारी. विषयाविषयीं व्याकुळ झालेल्या बुद्धीनें युक्त असलेले जे गृहस्थ त्यांना कर्मयोगाचा अधिकार व ज्याची बुद्धि तशी विषयव्याकुल नसते त्यांना ज्ञानयोगाधिकार सांगितला आहे. त्यामुळे माझ्या उपदेशांत परस्पर विरुद्ध असे कांही नाही व व्यामिश्रही कांहीं नाहीं." ज्ञानेश्वरमहाराज असें लिहितात—" ...ये लोकीं या दोनी निष्ठा । मजची पासुनी प्रकटा । अनादिसिद्धा ॥ ३५ ॥ एक ज्ञानयोग म्हणिजे । जो सांख्यीं अनुष्ठिजे । जेथ ओळखीसवे पाविजे । तद्रूपता ॥ ३६ ॥ एक कर्मयोग जाण । जेथ साधक जन निपुण । होऊनियां निर्वाण । पावती वेळे ॥ ३७ ॥ हे मार्ग तरी दोनी । परी एकवटती निदानीं । जैसी सिद्ध-साध्य-भोजनीं । तृप्ति एक ॥ ३८ ॥ का पूर्वापरसरिता । भिन्न दिसती वाहतां । मग सिंधू मिळणीं ऐक्यता ।

संमत नाहीं, संन्याश्यांनाच ज्ञाननिष्ठेचा अधिकार आहे, असें त्यांचें मत आहे, हें यावरून ठरतें. ) ३.

**मां च बन्धकारणे कर्मण्येव नियोजयसीति विषण्णमनसमर्जुनं कर्म नाऽऽरभ इत्येवं मन्वानमालक्ष्याऽऽह भगवान्-न कर्मणामनारम्भादिति। अथ वा ज्ञानकर्मनिष्ठयोः परस्परविरोधादेकेन पुरुषेण युगपदनुष्ठातुमशक्यत्वे सतीतरेतरानपेक्षयोरेव पुरुषार्थ-हेतुत्वे प्राप्ते कर्मनिष्ठाया ज्ञाननिष्ठाप्राप्तिहेतुत्वेन पुरुषार्थहेतुत्वं न स्वातन्त्र्येण, ज्ञाननिष्ठा तु कर्मनिष्ठोपायलब्धात्मिका सती स्वातन्त्र्येण पुरुषार्थहेतुरन्यानपेक्षेत्येतमर्थं प्रदर्शयिष्यन्नाह भगवान्—**

**भाष्यार्थ**—( तर मग अर्जुनही संन्यासपूर्वक ज्ञाननिष्ठेचाच अधिकारी होईल. कारण ज्ञान श्रेष्ठ आहे, म्हणून कोणी म्हणेल तर सांगतात-)—**मां च बन्धकारणे कर्मणि एव नियोजयसि इति विषण्णमनसं कर्म न आरभे इत्येवं मन्वानं अर्जुनं आलक्ष्य**—आणि ज्ञान श्रेष्ठ असूनही मला बंधाचे कारण जें कर्म त्यांतच तूं नियुक्त करीत आहेस, असें म्हणून खिन्नचित्त झालेल्या व मी कर्माचा आरंभ करणार नाही, असें मानणाऱ्या अर्जुनाला पाहून [ म्ह० ज्ञान जर कर्माहून श्रेष्ठ आहे व कर्म जर संसारबन्ध उत्पन्न करणारे आहे तर तेंच करण्याविषयी भगवान् मला कां आग्रह करीत आहे, असे मनांत म्हणून अर्जुन अतिशय खिन्न झाला आहे असें पाहून ] —**भगवान् 'न कर्मणामनारंभात्' इति आह**—श्रीकृष्ण 'न कर्मणां०' इत्यादि म्हणतात.—**अथ वा ज्ञानकर्मणोः परस्परविरोधात् एकेन पुरुषेण युगपत् अनुष्ठातुं अशक्यत्वे सति**—किंवा ज्ञान व कर्म यांचा परस्पर विरोध असल्यामुळें एकाच पुरुषाकडून एकाच वेळीं त्याचे अनुष्ठान होणें अशक्य झाले असता—**इतरेतर-अनपेक्षयोः एव पुरुषार्थहेतुत्वे प्राप्ते**—परस्परांची अपेक्षा न करणाऱ्या अशाच त्या दोन साधनांना पुरुषार्थाचें हेतुत्व आहे, असे प्राप्त झाले असतां [ ज्ञान व कर्म या दोन निष्ठा एकमेकींच्या विरुद्ध असल्यामुळें त्यांचे समुच्चयानें अनुष्ठान होणें जर अशक्य आहे तर त्या दोन्ही निष्ठा स्वतंत्रपणेच पुरुषार्थ देतील, म्हणजे ज्ञाननिष्ठाही कर्माची अपेक्षा न करिता मोक्ष देऊं शकेल व कर्मनिष्ठाही ज्ञानाची अपेक्षा न करितां मोक्ष

---

पावती शेखा ॥ ३९ ॥ तैसा दानीहा मते। सूचिती एका कारणातें। परी उपासित ते योग्यते। अधीन असे ॥ ४० ॥ देखे उत्प्लवनासरिसा। पक्षी फळासि झोंबे जैसा। सांगें नर केवीं तैसा। पावे वेगा ॥ ४१ ॥ तो हळू हळू ढाळे ढाळें। केतुलेनि एके वेळे। मार्गाचेनि बळें। निश्चित ठाकी ॥ ४२ ॥ तैसें देख पा विहंगममतें। अधिष्ठोनि ज्ञानातें। सांख्य सद्य मोक्षातें। आकळिती ॥ ४३ ॥ येर योगिये कर्माधारें। विहितेंचि निजाचारें। पूर्णता अवसरें। पावते होती ॥४४॥" यावरून वैदिक संप्रदायी भाष्यकार व टीकाकार यांचा द्वैत, अद्वैत, विशिष्टाद्वैत, शुद्धाद्वैत इत्यादि बाबतीत कितीही जरी मतभेद असला तरी ज्ञान व कर्म या निष्ठांच्या साध्य-साधनभावाविषयीं यत्किंचितही मतभेद नाही, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. रहस्यकार पडले असांप्रदायिक ! त्यामुळे त्यांचा मार्गच निराळा ! ! !

देईल, असें ओघानेंच प्राप्त होतें, पण तसें झालें असतां-]—**कर्मनिष्ठायाः ज्ञाननिष्ठाहेतुत्वेन पुरुषार्थहेतुत्वं न स्वातन्त्र्येण**—कर्मनिष्ठेला ज्ञाननिष्ठाहेतुत्वानें पुरुषार्थहेतुत्व आहे, स्वतंत्रपणें नाहीं, [ कर्मनिष्ठा ज्ञाननिष्ठेचें कारण आहे, कर्मनिष्ठेनें ज्ञाननिष्ठेचा अधिकार प्राप्त होतो, व ज्ञाननिष्ठेच्या द्वारा कर्मनिष्ठा मोक्षाचें साधन होते; साक्षात् स्वतःच मोक्षाचें साधन होत नाही, ]—**तु ज्ञाननिष्ठा कर्मनिष्ठोपायलब्धात्मिका सती स्वातन्त्र्येण पुरुषार्थहेतुः अन्यानपेक्षा**—पण ज्ञाननिष्ठा कर्मनिष्ठा या उपायानें सिद्धरूप होत्साती स्वतंत्रपणे मोक्षाचे कारण होते, ती मग कर्मनिष्ठेची अपेक्षा करीत नाहीं, [ पण ज्ञाननिष्ठा मात्र तशी नाही. कर्मनिष्ठा हा तिचा उपाय आहे. त्या उपायाने ज्ञाननिष्ठा सिद्ध होते व ती सिद्ध झाल्यावर कर्मनिष्ठेची अपेक्षा न करितां-कर्मनिष्ठेचें साह्य न घेतां स्वतंत्रपणेंच मोक्ष देते. ]—**इति एतं अर्थं प्रदर्शयिष्यन् भगवान् ' न कर्मणां० ' इति आह**-असा हा अर्थ प्रदर्शित करणारे भगवान् ' न.कर्मणां० ' या श्लोकांत सांगतात—

**न कर्मणामनारम्भान्नैष्कर्म्यं पुरुषोऽश्नुते ।**
**न च संन्यसनादेव सिद्धिं समधिगच्छति ॥ ४ ॥**

**अन्वयार्थ—पुरुषः**—अधिकारी पुरुष—**कर्मणां**—विहित कर्मांच्या—**अनारम्भात्**—आरंभावांचून-कर्मानुष्ठानाला आरंभ केल्यावांचून—**नैष्कर्म्यं**—ज्ञानयोगनिष्ठेला—**न अश्नुते**—प्राप्त होत नाही.—**संन्यसनात् एव**—केवळ ज्ञानरहित संन्यासानेंच—**सिद्धिं**—ज्ञानयोगनिष्ठेला—**न समधिगच्छति**—तो पुरुष प्राप्त होत नाहीं. ४.

**न कर्मणामनारम्भादप्रारम्भात्कर्मणां क्रियाणां यज्ञादीनामिह जन्मनि जन्मान्तरे वाऽनुष्ठितानामुपात्तदुरितक्षयहेतुत्वेन सत्त्वशुद्धिकारणानां तत्कारणत्वेन च ज्ञानोत्पत्तिद्वारेण ज्ञाननिष्ठाहेतूनां " ज्ञानमुत्पद्यते पुंसां क्षयात्पापस्य कर्मणः । यथाऽऽदर्शतलप्रख्ये पश्यत्यात्मानमात्मनि " इत्यादिस्मरणादनारम्भादननुष्ठानान्नैष्कर्म्यं निष्कर्मभावं कर्मशून्यतां ज्ञानयोगेन निष्ठां निष्क्रियात्मस्वरूपेणैवावस्थानमिति यावत्, पुरुषो नाश्नुते न प्राप्नोतीत्यर्थः । कर्मणामनारम्भान्नैष्कर्म्यं नाश्नुत इति वचनात्तद्विपर्ययात्तेषामारम्भान्नैष्कर्म्यमश्नुत इति गम्यते ॥**

---

१ भाष्यकारांनी या श्लोकाला दोन अवतरणे दिली आहेत-१ 'ज्ञान जर श्रेष्ठ तर मी त्यासाठीं श्रवणादिक करीन, कर्म करणार नाहीं,' या अर्जुनाच्या म्हणण्याचें निराकरण करण्यासाठी व २ 'तर मग ज्ञाननिष्ठा व कर्मनिष्ठा हीं दोन स्वतंत्र मोक्षसाधने आहेत,' या म्हणण्याचें निराकरण करण्यासाठी, पुढील श्लोक आहे. त्या श्लोकानें वरील दोन्ही शंकांचें निरसन केलें आहे.

**भाष्यार्थ—कर्मणां अनारम्भात्-अप्रारंभात्**—कर्मांच्या आरंभावांचून-त्यांचा प्रारंभ केल्याशिवाय—**इह जन्मनि जन्मान्तरे वा अनुष्ठितानां**—या जन्मीं किंवा पूर्वीच्या दुसऱ्या जन्मीं अनुष्ठिलेल्या—**उपात्तदुरितक्षयहेतुत्वेन सत्त्वशुद्धिकारणानां**—अनेक जन्मीं संचय करून ठेवलेल्या पापाच्या क्षयाला कारण होऊन, पापक्षयद्वारा चित्तशुद्धीला कारण होणाऱ्या—**च तत्कारणत्वेन ज्ञानोत्पत्तिद्वारेण ज्ञाननिष्ठाहेतूनां कर्मणां-यज्ञादीनां क्रियाणां**—आणि चित्तशुद्धीच्या कारणत्वानें ज्ञानोत्पत्तीच्या द्वारा ज्ञाननिष्ठेला कारण होणाऱ्या कर्मांचा—यज्ञादिक्रियांचा ( प्रारंभ केल्याशिवाय नैष्कर्म्य ह्म० ज्ञाननिष्ठा प्राप्त होत नाहीं. कर्मे चित्तशुद्धीच्या द्वारा ज्ञानाला कारण होतात, याविषयीं प्रमाण– ) **पुंसः पापस्य कर्मणः क्षयात् ज्ञानं उत्पद्यते**—पुरुषाच्या पापकर्मांचा क्षय झाल्यामुळें त्याला ज्ञान उत्पन्न होतें.—**यथा आदर्शतलप्रख्ये तथा आत्मनि आत्मानं पश्यति**—ज्याप्रमाणें आरशाच्या तळावरील स्वच्छतेत-निर्मल आरशांत,त्याप्रमाणें आपल्या स्वच्छ बुद्धींत पुरुष आत्म्याला पाहतो,—**इत्यादि स्मरणात्**—अशा प्रकारचे वचन असल्यामुळें पूर्वोक्त यज्ञादि नित्य-नैमित्तिक कर्मांचा-**अनारम्भात्-अननुष्ठानात्**—आरंभ न केल्यानें, त्यांचें अनुष्ठान न केल्यास—**नैष्कर्म्यं-निष्कर्मभावं-कर्मशून्यतां-ज्ञानयोगेन निष्ठां**—नैष्कर्म्यास-निष्कर्मत्वास-कर्मशून्यतेस ह्म० ज्ञानयोगानें जी निष्ठा सांगितली आहे तिला—**निष्क्रिय-आत्मस्वरूपेण अवस्थानं इति यावत्**—ह्म० निष्क्रिय आत्मस्वरूपानें जे अवस्थान-स्थिति त्या निष्क्रिय-आत्मस्वरूपावस्थेस असा याचा भावार्थ—**पुरुषः न अश्नुते-न प्राप्नोति इत्यर्थः**—पुरुष प्राप्त होत नाहीं, असा याचा भावार्थ. [ या जन्मीं किंवा जन्मांतरीं संचित केलेल्या पापाचा क्षय होण्यासाठीं केलेल्या नित्य-नैमित्तिक कर्मांच्या योगानें पापाचा क्षय होतो. ह्म० चित्त शुद्ध होतें, रागद्वेषरहित होतें व चित्तशुद्धीच्या द्वारा तीं कर्मे आत्मज्ञानाला कारण होतात. याविषयीं श्रुति-स्मृति-इतिहास-पुराणादि प्रमाभूत ग्रंथांत हवीं तितकीं प्रमाणें आहेत. यास्तव नित्य-नैमित्तिक कर्मांचे अनुष्ठान केल्यावांचून पुरुषाला नैष्कर्म्य प्राप्त होत नाहीं. नैष्कर्म्य ह्म० निष्कर्मभाव–ज्ञानयोगानें निष्ठा, निष्क्रिय आत्मस्वरूपानें अवस्थित होणें, ही परम अवस्था कर्मानुष्ठानानेंच क्रमानें प्राप्त होते. ]—'**कर्मणां अनारंभात् नैष्कर्म्यं न अश्नुते**' **इति वचनात्**—नित्य-नैमित्तिक कर्मांचा आरंभ केल्यावांचून नैष्कर्म्याची प्राप्ति होत नाहीं, असें वचन असल्यामुळें—**तद्विपर्ययात् तेषां आरंभात् नैष्कर्म्यं अश्नुते इति गम्यते**—त्याच्या उलट वागल्यानें ह्म० त्या कर्मांचा आरंभ केल्यानें नैष्कर्म्य प्राप्त होतें, असें ठरतें.

---

१ पण रहस्यकार या श्लोकाला अवतरण असें देतात– " मोक्षाच्या दोन निष्ठा कोणत्या तें सांगितलें, आतां तदंगभूत जी अवश्य नैष्कर्म्यसिद्धि तिचें स्वरूप स्पष्ट करून दाखवितात–" ६४३ म्ह० यांच्या मतीं 'नैष्कर्म्य' हें ज्ञाननिष्ठा व कर्मनिष्ठा यांचें अंग आहे. ते सर्व श्लोकाचा अर्थ असा करितात–" कर्मांना आरंभ केला नाहीं, म्हणजे पुरुषाला

**कस्मात्पुनः कारणात्कर्मणामनारम्भान्नैष्कर्म्यं नाश्नुत इति । उच्यते, कर्मारम्भस्यैव नैष्कर्म्योपायत्वात् । न ह्युपायमन्तरेणोपेयप्राप्तिरस्ति । कर्मयोगोपायत्वं च नैष्कर्म्यलक्षणस्य ज्ञानयोगस्य श्रुताविह च प्रतिपादनात् । श्रुतौ तावत्प्रकृतस्याऽऽत्मलोकस्य वेद्यस्य वेदनोपायत्वेन " तमेतं वेदानुवचनेन ब्राह्मणा विविदिषन्ति यज्ञेन " इत्यादिना कर्मयोगस्य ज्ञानयोगोपायत्वं प्रतिपादितम् । इहापि च—" संन्यासस्तु महाबाहो दुःखमाप्तुमयोगतः " "योगिनः कर्म कुर्वन्ति सङ्गं त्यक्त्वाऽऽत्मशुद्धये " "यज्ञो दानं तपश्चैव पावनानि मनीषिणाम् " इत्यादि प्रतिपादयिष्यति ॥**

**भाष्यार्थ—कस्मात् पुनः कारणात् कर्मणां अनारंभात् नैष्कर्म्यं न अश्नुते**—कोणत्या बरे कारणामुळें कर्माचा आरंभ केल्यावांचून नैष्कर्म्य प्राप्त होत नाही? —**इति उच्यते**—असें विचाराल तर सांगतों—**कर्मारम्भस्य एव नैष्कर्म्य-उपायत्वात्**—कर्मांचा आरंभच नैष्कर्म्याचा उपाय आहे, ह्मणून कर्मारंभावाचून नैष्कर्म्य प्राप्त होत नाहीं.—**उपायं अन्तरेण उपेयप्राप्तिः न अस्ति हि**—उपायावाचून उपेयाची प्राप्ति होत नाही, हे प्रसिद्ध आहे.—**च नैष्कर्म्यलक्षणस्य ज्ञानयोगस्य कर्मयोगोपायत्वं श्रुतौ इह च प्रतिपादनात्**—आणि नैष्कर्म्यरूप ज्ञानयोगाचे कर्मयोगोपायत्व श्रुतीत व येथें ह्म० श्रीगीतेत प्रतिपादिलेले आहे. [ नैष्कर्म्य ह्म० कर्मांचा अभाव, हेंच ज्ञानयोगाचें स्वरूप आहे. अशा ज्ञानयोगाचें कर्मयोग हे साधन आहे. कर्मयोग हा ज्ञानयोगाचा उपाय आहे, व ही गोष्ट श्रुति-स्मृतिप्रमाणांनी सिद्ध आहे. ती कशी तेंच प्रमाणपूर्वक दाखवितात–)—**श्रुतौ तावत् प्रकृतस्य वेद्यस्य आत्मलोकस्य वेदनोपायत्वेन**—श्रुतींत तर या प्रस्तुत वेद्य–जाणण्यास योग्य अशा आत्मलोकाला जाणण्याचा उपाय या रूपाने–-'**तं एतं ब्राह्मणाः वेदानुवचनेन यज्ञेन विविदिषन्ति**--' (बृ.भाष्यार्थ अ. ४ पृ. ३३७) त्या या प्रकृत आत्मलोकाला ब्राह्मण वेदानुवचनाने, यज्ञानें, दानानें, उपवासानें जाणण्याची इच्छा करितात—**इत्यादिना कर्मयोगस्य ज्ञानयोगोपायत्वं प्रतिपादितं**—इत्यादि वचनाने कर्म-

---

नैष्कर्म्य प्राप्त होतें, असें नाहीं. आणि कर्मांचा संन्यास केला म्ह० तेवढ्यानेंच सिद्धि मिळतें असें नाहीं. " या अर्थात नैष्कर्म्याचे स्वरूप कोठें सागितलेलें दिसत नाहीं. त्यांत श्लोकाच्या दोन्ही अर्धांचा अर्थ एकच आहे, असें वाटते. म्हणजे त्यावर पुनरुक्ति हा दोष येतो. दोन्ही निष्ठांचें नैष्कर्म्य अग आहे, असेंही त्या अर्थावरून सिद्ध होत नाहीं. कर्मांचा आरंभ न केल्याने नैष्कर्म्य मिळते असें नाहीं, व कर्मांचा सन्यास केल्यानेच सिद्धि मिळते असें नाहीं, या अर्थात विशेष काय आहे ? ' कर्मांचा आरभ न केल्यानें ' व ' संन्यास केल्याने ' यांत आम्हांला तर कांहींच भेद दिसत नाहीं. तसेंच, ' नैष्कर्म्य प्राप्त होतें असे नाहीं ' व ' सिद्धि मिळत्ये असें नाहीं ' यांतही कांही फरक दिसत नाहीं. तेव्हां भगवानांनी या श्लोकांत पहिल्या अर्धाने जें सागितले आहे तेंच दुसऱ्या अर्धानें सांगितलें, असे समजावयाचे की काय ? रहस्यकारांचा प्रस्तुत अर्थ सर्वथा अनुपपन्न आहे, हें यावरून कोणाच्याही लक्षांत येईल.

योगाला ज्ञानयोगाचें उपायत्व सांगितलें आहे.—**च इह अपि ' संन्यासस्तु महाबाहो दुःखमाप्तुमयोगतः ।' अ. ५ श्लो. ६ ' योगिनः कर्म कुर्वन्ति सङ्गं त्यक्त्वात्मशुद्धये '** अ. ५ श्लो. ११ **'यज्ञो दानं तपश्चैव पावनानि मनीषिणाम्'** अ. १८ श्लो. ५ **इत्यादि प्रतिपादयिष्यति**—आणि येथेंही ' हे अर्जुना परमार्थ संन्यास योगावांचून प्राप्त होणें फार कठिण आहे. ' ' कर्माधिकारी गृहस्थ आसक्ति सोडून चित्तशुद्धीसाठीं कर्म करितात. ' ' यज्ञ, दान व तप ही मनुष्यांच्या चित्ताला पावन करणारीं आहेत ' इत्यादि पुढें प्रतिपादन[1] करतील.

**ननु च—'अभयं सर्वभूतेभ्यो दत्त्वा नैष्कर्म्यमाचरेत् ' इत्यादौ कर्तव्यकर्मसंन्यासादपि नैष्कर्म्यप्राप्तिं दर्शयति लोके च कर्मणामनारम्भान्नैष्कर्म्यमिति प्रसिद्धतरमतश्च नैष्कर्म्यार्थिनः किं कर्मारम्भेणेति प्राप्तमत आह—न च संन्यसनादेवेति । नापि संन्यसनादेव केवलात्कर्मपरित्यागमात्रादेव ज्ञानरहितात्सिद्धिं नैष्कर्म्यलक्षणां ज्ञानयोगेन निष्ठां समधिगच्छति न प्राप्नोति ॥ ४ ॥**

**भाष्यार्थ**—( याप्रमाणे पहिल्या अर्धाचें व्याख्यान करून आतां उत्तरार्धाचें व्याख्यान अवतरणपूर्वक करितात-)—**ननु च ' अभयं सर्वभूतेभ्यो दत्त्वा नैष्कर्म्यमाचरेत्-' इत्यादौ कर्तव्यकर्मसंन्यासात् अपि नैष्कर्म्यप्राप्तिं दर्शयति**—अहो पण ' सर्व भूतांना अभय देऊन संन्यास करावा ' इत्यादि[2] वचनांत कर्तव्यकर्माच्या संन्यासानेही नैष्कर्म्याची प्राप्ति होते, असें स्मृतिवचन सांगतें,—**लोके च कर्मणां अनारंभात् नैष्कर्म्यं इति प्रसिद्धतरं**—आणि व्यवहारांत[3] कर्माचा आरंभ न केल्याने नैष्कर्म्य प्राप्त होतें, हे सुप्रसिद्ध आहे.—**अतः च नैष्कर्म्यार्थिनः कर्मारम्भेण किं इति प्राप्तं अतः 'न च संन्यसनात् एव इति ' आह**—ह्मणून नैष्कर्म्याची इच्छा करणाऱ्या मुमुक्षूच्या कर्मारंभाने काय होणार, त्याला त्याचा काय उपयोग ? अशी शंका प्राप्त होते. ह्मणून भगवान् 'न च संन्यासनात्०' या उत्तरार्धानें सांगतात—**संन्यसनात् एव केवलात्-ज्ञानरहितात् परित्यागमात्रात् एव सिद्धिं नैष्कर्म्यलक्षणां ज्ञानयोगेन निष्ठां न समधिगच्छति—न प्राप्नोति**—नुसत्या संन्यासानेच ह्म० केवल-ज्ञानरहित कर्मपरित्याग केल्यानेच

---

१ कर्मयोग ज्ञानयोगाचा किंवा नैष्कर्म्याचा उपाय आहे, ही गोष्ट आचार्य श्रुतिस्मृतिप्रमाणानी सिद्ध करीत आहेत, हे लक्षात ठेवण्यासारखे आहे. पण रहस्यकार ' कर्मयोग व ज्ञानयोग यांचा परस्पर कांही संबंध नाही, त्यांचा अंगागी भाव नाही,' हे आपले म्हणणे मात्र तसें श्रौत-स्मार्त प्रमाणानी सिद्ध करीत नाहीत, हेही ध्यानांत धरले पाहिजे. २ ' शान्तो दान्त उपरतस्तितिक्षुः० ' बृह. भा. अ. ४ पृ. ३६२ ' संन्यासयोगाद्यतयः शुद्धसत्त्वाः०' मुं. भा. पृ. ११३. इत्यादि दुसरी श्रुतिवचने आदिशब्दाने घ्यावी. ३ 'यतो यतो निवर्तते ततस्ततो विमुच्यते । निवर्तनाद्धि सर्वतो न वेत्ति दुःखमण्वपि ' ज्या ज्या विषयापासून निवृत्त होतो त्या त्यापासून मुक्त होतो, सर्व विषयांपासून निवृत्त झाल्यानेंच त्याला थोडेसें सुद्धां दुःख अनुभवावें लागत नाही. इत्यादि लौकिक वचने प्रसिद्धच आहेत.

**सिद्धीला म्ह० नैष्कर्म्यरूप ज्ञानयोगनिष्ठेला पुरुष प्राप्त होत नाही. [ अर्थात् ज्ञानासह संन्यासानें नैष्कर्म्यप्राप्ति होते. ज्ञानासाठी चित्तशुद्धि व्हावी लागते व चित्तशुद्धीला नित्य-नैमित्तिक कर्मांची अपेक्षा आहे. यास्तव कर्मांच्या अनुष्ठानाला आरंभ केल्यावांचून नैष्कर्म्य प्राप्त होत नाही. ज्ञानरहित केवल कर्मत्याग केल्यानेच कांहीं नैष्कर्म्यसिद्धि प्राप्त होते नाहीं. ] ४.**

---

१ या श्लोकाचा आचार्यांनी केलेला अर्थ वाचकापुढें आहेच. रहस्यकारांचाही आहे.त्यांतील सयुक्तिक अर्थ कोणता तें सुज्ञ वाचक ठरवितीलच,तथापि त्यांतील गुणदोषांचे विवेचन आम्ही दिग्दर्शनार्थ करतों. प्रथम येथे हे सांगणे उचित आहे की,कर्मयोगनिष्ठा हा उपाय व ज्ञानयोग-निष्ठा हें साध्य-उपेय आहे याबद्दल सस्कृत टीकाकाराचा मतभेद नाहीं.याविषयी मध्वाचार्य म्हणतात—'कर्मणां युद्धादीना अनारभेण नैष्कर्म्य निष्कर्मता न प्राप्यते...।' युद्धादि कर्मांचा आरंभ केल्यावांचून नैष्कर्म्य–निष्कर्मभाव–मोक्ष प्राप्त होत नाहीं. ( कर्मे न केल्यानेंच जर मुक्ति मिळणे शक्य असते तर ती वृक्षादि स्थावरानाही मिळाली असती. ) रामानुजाचार्य म्हणतात—"न शास्त्रीयाणा कर्मणां अनारभादेव पुरुषो नैष्कर्म्य ज्ञाननिष्ठां आप्नोति..." शास्त्रीय कर्माचा आरंभ केल्यावाचूनच पुरुषाला नैष्कर्म्य म्ह० ज्ञाननिष्ठा प्राप्त होत नाहीं. (आरंभिलेल्या शास्त्रीय कर्मांचा त्याग केल्यानेच कांहीं सिद्धि मिळत नाहीं. परम पुरुषाराधन हीच फलेच्छारहित कर्मांची सिद्धि आहे. अर्थात् निष्काम कर्मांच्या योगानें गोविंदाची आराधना न केल्यामुळें ज्याचा अनादि कालापासून प्रवृत्त झालेला अनन्त पापसंचय क्षीण झालेला नाहीं, अशा लोकांना इंद्रियोपशमपूर्वक आत्मनिष्ठा मिळणें फार कठिण आहे;वल्लभसंप्र. टीका—"कर्मणामनारंभात्–अकरणात् नैष्कर्म्य–कर्मादिरहितभावं भक्तिरूपं न प्राप्नोति।... सन्यमनादेव स्वरूपाज्ञानात् केवलत्यागेन सिद्धि त्यागफलं न सम्यक् प्राप्नोति॥" कर्मे न केल्याने नैष्कर्म्य–भक्तिरूप कर्मादिरहितभाव प्राप्त होत नाहीं. स्वरूपाच्या अज्ञानामुळे केवल कर्माचा त्याग केल्याने सिद्धि म्ह० त्यागाचें फळ प्राप्त होत नाहीं, इत्यादि.फार काय पण श्रीज्ञानेश्वरमहाराजही—"वाचोनि कर्मारभ उचित। न करितां सिद्धवत्। कर्महीना निश्चित। होईजेना॥ ४५ की प्राप्त कर्म सांडिजे। एतुलेनी नैष्कर्म्य होइजे। हे अर्जुना वायां बोलिजे। मूर्खपणे ॥ ४६ ॥ सागे पैल तीरा जावें। ऐसे व्यसना का जेथ पावे। तेथ नावेतें त्यजावें। घडे केवीं ॥ ४७ ॥" असे स्पष्ट म्हणत आहेत. हा अर्थ आचार्यांच्या भाष्याला अगदीं सोडून नाहीं, हे निराळे सांगावयास नकोच. पण या दोन निष्ठा एकमेकींच्या अंगभूत नव्हेत, असे मोठ्या आवेशाने व पुनः पुनः सांगून श्रीशंकराचार्यादिकांवर रहस्यकार असे घसरले आहेत–"...नैष्कर्म्य म्ह० ज्ञान असे मानून कर्मांना आरभ न केल्याने ज्ञान होत नाहीं म्ह० कर्मांनीच ज्ञान होतें. कारण कर्म हे ज्ञानाचें साधन आहे, असा संन्यासमार्गीय टीकाकारांनी या श्लोकाचा अर्थ आपल्या संप्रदायास अनुकूल करून घेतला आहे. पण हा अर्थ सरळ किंवा बरोबरही नाहीं." रहस्यकारांचा अर्थ किती बरोबर आहे, ते आम्ही वर दाखविलेच आहे. 'नैष्कर्म्य म्ह० ज्ञान' असा अर्थ फक्त एका श्रीधरांनी केला आहे. मध्वाचार्यादि आचार्य, नीलकंठ, मधुसूदनसरस्वती, शंकरानंद, भाष्योत्कर्षदीपिकाकार व ज्ञानेश्वरमहाराजही नैष्कर्म्य म्ह० ज्ञानयोगनिष्ठा असाच अर्थ करितात. "म्हणोनि आइकें पार्था। जया नैष्कर्म्यपदीं आस्था। तया

उचित कर्म सर्वथा । त्याज्य नोहे ॥ ५० ॥" नैष्कर्म्य म्ह० ज्ञानयुक्त संन्यास हा अर्थ आचार्य व त्यांचे अनुयायी यांस समत आहे. नित्य व नैमित्तिक यज्ञ, दान, तप इत्यादि कर्मांच्या योगानें चित्तशुद्धि होते, ज्ञानाची योग्यता प्राप्त होते. आत्म्याला जाणण्याची इच्छा–जिज्ञासा उत्पन्न होते. नतर श्रवण, मनन व निदिध्यासन, यांनी आत्मज्ञान होतें. त्या ज्ञानानेच नैष्कर्म्यावस्था म्ह० ज्ञानयुक्त सन्यास ही अवस्था प्राप्त होते, असा वेदान्त-सिद्धान्त आहे व त्याला अनुसरूनच वेदान्ती टीकाकारांनी कर्मांवाचून चित्तशुद्धीच्या द्वारा नैष्कर्म्य प्राप्त होत नाहीं, असे म्हटले आहे.पण 'कर्मांनीच ज्ञान होते' हा अर्थ रहस्यकारांनी त्यांच्यावर कां लादला आहे कोण जाणे ! 'सन्यासमार्गीय टीकाकारांनी या श्लोकाचा अर्थ आपल्या सांप्रदायास अनुकूल करून घेतला आहे' हे म्हणणेच बरोबर नाहीं. कारण त्यांचा सप्रदाय म्हणजे औपनिषद सप्रदाय. उपनिषदांत व तदनुसारी स्मृतींत कर्मे ज्ञानाची परंपरासाधने आहेत असे स्पष्ट म्हटले आहे. वर भाष्यांत त्यांतील वचनाचा उल्लेख आलाच आहे. तेव्हा त्यानी मूळाला मोडून अर्थ केला आहे, असे म्हणणे सर्वथा अयोग्य आहे. रहस्य-कारानी मात्र नैष्कर्म्यशब्दाचा स्पष्ट अर्थ कोठेच केला नाहीं व जेथे त्याचे दिग्दर्शन केले आहे तेथेही त्याला मूळ प्रमाण काहीं दिले नाही. नैष्कर्म्यशब्दाचा अर्थ 'नैष्कर्म्य' असाच करून टीपेत त्याचे स्पष्टीकरण असे केले आहे–" कर्म म्हटले की ते बधक असावयाचे हे सांगा-वयास नको. म्हणून पाऱ्याचा उपयोग करण्यापूर्वी तो मारून ज्याप्रमाणे वैद्य शुद्ध करून घेतात तद्वत् कर्म करण्यापूर्वी त्याचे बधकत्व किंवा दोष जेणे करून नाहींसा होईल, असा उपाय करावा लागतो व अशा युक्तीने कर्मे करण्याची जी स्थिति तिला नैष्कर्म्य असे म्हणतात. याप्रमाणे नांगी मोडलेले कर्म मोक्षाला प्रतिबधक होत नसल्यामुळे ही स्थिति कशी सपादन करावी, हा मोक्षशास्त्रातील एक महत्त्वाचा प्रश्न आहे. " पृ. ६६४. पण रहस्यकाराच्या या स्पष्टीकरणाला आधार काय ? नैष्कर्म्य म्ह० कर्मांतील बधकत्व नाहींसे होईल अशा युक्तीने ते करणे, हा रहस्यकाराचा अर्थ सस्कृत वाङ्मयात आजपर्यंत कधी कोणी कोठे तरी केला आहे का ? जर केलेला नसेल तर तो त्याचा स्वकपोलकल्पित अर्थ आहे, असे म्हणण्यास काय हरकत आहे ? ते म्हणतात " नैष्कर्म्य म्ह० कर्मशून्यता नव्हे." ( ६४५ ). आम्ही उलट विचारतो की ती का नव्हे ? निष्कर्म म्ह० कर्मांतून सुटणे. त्याचा भाव–निष्कर्मपणा म्ह० नैष्कर्म्य. तेव्हा नैष्कर्म्य म्ह० कर्मशून्यता कशी नव्हे ? हा झाला नैष्कर्म्यशब्दाचा यौगिक अर्थ. त्याचा रूढ अर्थ सन्यासपूर्वक ज्ञाननिष्ठा हाच आहे. पुढें अठराव्या अध्यायात श्लो. ४९ 'सन्यासाने परम नैष्कर्म्यसिद्धि प्राप्त होते' असे स्पष्ट म्हटले आहे. पण रहस्यकार त्यातील सन्यासशब्दाचा अर्थ आपल्या संप्रदायाला जुळेल असा करून घेतात. 'सन्यासेन' म्ह० कर्मफलाच्या सन्यासाने असा करितात. तो बरो-बर नाहीं, हे आम्ही पुढे योग्यस्थानी दाखवू. रहस्यकार म्हणतात–' कर्म सोडूं म्हटलें तरी तें कोणाला सुटत नाहीं ' ६४२ हा जर निरपवाद सिद्धान्त मानला तर मग सांख्यांच्या ज्ञानयोगाला अवकाशच रहात नाहीं ! तेव्हां भगवानांनी असल्या असभाव्य निष्ठेचा उल्लेख तरी कशाला केला ? मी या लोकी दोन प्रकारची निष्ठा सांगितली, असें वृथा कशाला म्हटलें ? कर्मे जर कधीच व कोणाचीच सुटत नाहींत तर सर्व कर्मयोगीच, ज्ञानयोगी कोणीच नाहीं, तेव्हां निष्ठा एकच राहिली व ती कर्मयोगनिष्ठाच होय. हे आम्ही अनु-

मान काढीत नाही. तर त्याला रहस्यकारांच्याच हातच्या अक्षरांचें प्रमाण देतों तें पहा— “ नैष्कर्म्यसिद्धि प्राप्त होण्यास कर्में न सोडतां ज्ञानानें आसक्तीचा क्षय करून कर्में सदैव करीत राहणें, हाच काय तो एक मार्ग शिल्लक राहतो. कारण ज्ञान हेंच जरी मोक्षाचें साधन असलें तरी कर्मशून्य राहणें कधीच शक्य नसल्यामुळें त्याचें बंधकत्व नाहींसें होण्यास आसक्ति सोडून तीं करणें जरूर पडतें, यासच कर्मयोग म्हणतात व हाच ज्ञानकर्मसमुच्चयात्मक मार्ग विशेष योग्यतेचा म्ह० श्रेष्ठ आहे.” पण या उताऱ्यांत केवळ अपसिद्धान्तच नव्हे तर पूर्वोत्तरविरोधही आहे. कसा तो पहा—हाच एक मार्ग शिल्लक राहतो व ज्ञान हेंच मोक्षाचें साधन, हें जर खरे तर ‘ ज्ञानोत्तर हे दोन्ही मार्ग मोक्षदृष्ट्या स्वतंत्र म्ह० तुल्यबल आहेत ’ ( पृ. ३०३ ) या म्हणण्याची संगति कशी काय लावावयाची ? तसेंच ते जर स्वतंत्र तर ज्ञानकर्मसमुच्चय कसा ? असो; रहस्यकारांनी केलेला नैष्कर्म्यशब्दाचा अर्थ अयोग्य व प्रमाणशून्य आहे, हें दाखविल्यावर आतां आचार्यांनी केलेला अर्थच सयुक्तिक कसा आहे ते दाखविणें भाग आहे. भगवानांनी तिसऱ्या श्लोकांत ज्ञानयोगानें सांख्यांची व कर्मयोगाने योग्यांची अशी दोन प्रकारची निष्ठा सांगितली. म्ह० या मनुष्य लोकांतील त्रैवर्णिकांमध्यें दोन प्रकारचे लोक दिसतात. एक ज्ञानी—स्थितप्रज्ञ—निष्काम सन्यासी व दुसरे अज्ञ—अस्थितप्रज्ञ—सकाम गृहस्थ. ज्ञानी स्थितप्रज्ञ फार विरळा आढळतात ही गोष्ट खरी. पण प्रत्येकानें ज्ञानी व स्थितप्रज्ञ व्हावें, अशीच वैदिक धर्माची आकांक्षा असल्यामुळें स्थितप्रज्ञाची निष्ठाही त्याला सांगणें भाग होते व त्यानें दोन प्रकारचा धर्म सांगितला आहे, हे उपोद्धात भाष्यांतच आचार्यांनी सांगितले आहे. भगवानांनी गीता हें शास्त्र अर्जुनाला केवळ युद्धाला सज्ज करण्यासाठींच सांगितले, अशी आचार्यांची समजूत नाही. तर अर्जुनाच्या निमित्ताने सर्व लोकांवर अनुग्रह करण्यासाठी तोच दोन प्रकारचा वैदिक धर्म त्यांनी गीतेंत सांगितला आहे, असें ते समजतात. येथील दोन निष्ठा हाच तो दोन प्रकारचा धर्म आहे. सकाम कर्में हाच प्रवृत्ति धर्म व निष्काम कर्में, एषणात्यागरूप संन्यास, ध्यान, समाधि, ज्ञान हा निवृत्ति धर्म. शुभाशुभ देहाची प्राप्ति—जन्म-मरण-सुख-दुःखभोग इत्यादिरूप संसारांत प्रवृत्त करणारा जो धर्म तो प्रवृत्ति धर्म. सकाम कर्में देवादिस्थानांच्या प्राप्तीला जरी कारण होत असली तरी तीं संसाराची निवृत्ति करीत नाहींत, त्यांत प्रवृत्तच करितात. म्हणून तो प्रवृत्ति धर्म होय. तोच फलाची इच्छा न धरतां केला असतां चित्तशुद्ध्यादि क्रमानें संसारनिवृत्तीला कारण होतो. गीतेंत प्रवृत्तिमार्गाचा उपदेश जरी केला आहे तरी सकाम प्रवृत्तीचा नाहीं, निष्काम प्रवृत्तीचा आहे. त्यामुळें उपनिषदांप्रमाणेंच गीतेंतही संसाराची निवृत्ति करणाऱ्या प्रवृत्तीचाच उपदेश आहे. वेदोक्त कर्मकांडांत सकाम कर्मेंच सांगितली आहेत. पण तीं ज्ञानमार्गाच्या उपयोगीं नाहींत. उलट विरोधी आहेत म्हणून ज्ञानकांडांत त्यांची निंदा केलेली आढळते, गीतेंतही त्यांची तशीच निंदा केलेली दिसते अ. २ श्लो. ४२-४४ अ. ९ श्लो. २०–२१ पहा. पण तीं सकाम कर्मेंही मनुष्याच्या स्वाभाविक कर्मांना—यथेष्ट प्रवृत्तीला प्रतिबंध करीत असल्यामुळें प्रथम त्यांची आवश्यकता आहेच. पण पुढें स्वाभाविक प्रवृत्तीला पूर्णपणे प्रतिबंध होऊन पुरुष शास्त्राप्रमाणेंच आचरण करूं लागला म्हणजे त्याला उपासनेमध्यें प्रवृत्त करण्यासाठी वेद प्रथम निष्काम कर्मांमध्यें प्रवृत्त करतो. फलाची इच्छा न धरितां कर्में करणें, मी यांचा कर्ता

आहे, अशी आसक्ति न ठेवितां कर्मे करणें, ईश्वरार्पण बुद्धीनें कर्मे करणें, येथूनच उपासनेला आरंभ होतो. अर्थात् निष्काम कर्मे करणें किंवा आसक्ति सोडून वगैरे कर्मे करणें, ही लौकिक स्थूल दृष्टीनें जरी प्रवृत्ति भासली तरी पारमार्थिक सूक्ष्मदृष्ट्या ती निवृत्तीच आहे. गीता स्वधर्मरूप कर्मेच करावयास सांगते, पण ती सकाम नव्हे, निष्काम, व तींही अखेरपर्यंत म्ह० ज्ञान झाल्यावरही मरेपर्यंत करावीं, असें सांगत नाहीं. (अ. ६ श्लो. ३ पहा.) ज्ञानाची योग्यता प्राप्त व्हावी, चित्ताची शुद्धि व्हावी म्हणून निष्काम कर्मे आहेत. ज्ञान प्राप्त झाल्यावर निष्काम कर्मे कर, असें सांगण्याची गरजच रहात नाहीं. कारण चित्त सर्वथा निष्काम झाल्यावांचून आत्मज्ञानच संभवत नाही. तेव्हां अगोदरच निष्काम झालेल्या ज्ञानी स्थितप्रज्ञाला तूं आसक्ति सोडून निष्काम कर्मे कर असे सांगणें म्ह० भोजन करून तृप्त झालेल्या मनुष्याला तूं आपल्या क्षुधाशांतीसाठी स्वयपाक कर, असें सांगण्यासारखेंच आहे. जगांत चार प्रकारचे लोक असतात १ पामर, २ शास्त्रदृष्टि, उत्कर्षेच्छु, ३ जिज्ञासु, मुमुक्षु, साधक व ४ सिद्ध, ज्ञानी. पामरांसाठी शास्त्र कांही सांगत नाही. ऐहिक व पारलौकिक अभ्युदय इच्छिणाऱ्या लोकांसाठीं काम्य कर्मांचें विधान करतें. जिज्ञासु वगैरे लोकांसाठी निष्काम कर्म, उपासना वगैरे सांगतें. पण ज्ञानी सिद्धासाठीं कोणतेंही साधन सांगत नाहीं. कारण ज्ञानी होणें याचा अर्थ त्याने कृतकृत्य होणें होय. पुरुषाला ज्ञानी व सिद्ध करण्यासाठींच वेदशास्त्रांची सकाम कर्मांपासून प्रवृत्ति झाली आहे. त्यामुळें पुरुष सिद्ध झाला की वेद कृतकार्य होतो. ज्ञानानंतर त्याला जिज्ञासाही जर रहात नाहीं तर इतर लौकिक इच्छा कोठून राहणार? अर्थात् या अध्यायाच्या तिसऱ्या श्लोकांत सांगितलेली ज्ञाननिष्ठा हे अशा सिद्धाचें लक्षण आहे, साधन नव्हे, कारण ती निष्ठा त्याला प्रयत्नानें टिकवावी लागत नाहीं. ती निष्ठा हा त्याचा स्वभावच बनलेला असतो. पण नित्यकर्मे, उपासना यांच्या योगानें ज्यांची चित्तशुद्धि झालेली असते व ज्ञानासाठीं जे श्रवणादि करीत असतात त्यांना ही ज्ञाननिष्ठा प्रयत्नानें संपादन करावी लागते. अशा लोकांना जिज्ञासु किंवा साधक म्हणतात. अर्थात् अशा साधकासाठींच ज्ञाननिष्ठेचें विधान केलेलें असतें. आचार्यांनीं ही गोष्ट पूर्वीं पृ. १९३ स्पष्टपणें सांगितली आहे. वैदिक साधनांचा क्रम हा अशा तऱ्हेचा आहे. त्यामुळें कर्मयोग हे ज्ञानयोगाचे साधनच आहे. म्हणून कर्मानुष्ठानावांचून नैष्कर्म्य प्राप्त होत नाहीं, हे आचार्यादिकाचें म्हणणे सर्वथा निर्दोष आहे. प्रकरण ज्ञानयोग व कर्मयोग या विद्विध निष्ठेचे आहे. त्यामुळे 'कर्मणां' शब्दानें कर्मयोगाचें व 'नैष्कर्म्य-' शब्दाने ज्ञानयोगाचेच ग्रहण करणें उचित आहे. रहस्यकार म्हणतात— "कर्मांच्या ठिकाणीं असलेली आपली आसक्ति सोडणें हीच ती युक्ति होय." पृ. ६४५ पण ज्ञानोत्तर ही युक्ति कशाला? ज्ञान झाल्यावरही कर्मामध्यें आसक्ति राहते, असें रहस्यकार समजतात की काय? जर रहात असेल तर तें ज्ञान काय कामाचें? तसलें ज्ञान मोक्ष काय देणार? जर रहात नसेल तर ज्ञानोत्तर आसक्ति सोडून कर्मे करावीं, हे म्हणणें व्यर्थच नव्हे का? पुनः ते म्हणतात—"संन्यासमार्गी लोक सर्व कर्मांचा संन्यास करून ज्याअर्थीं मोक्ष मिळवितात त्याअर्थीं मोक्षप्राप्ति सिद्ध होण्यास कर्म सोडणें जरूर आहे. पण या कोटिक्रमास गीतेचें असें उत्तर आहे की, संन्यासमार्गीयांस मोक्ष मिळतो खरा, पण तो त्यांनी कर्मे सोडल्यामुळें मिळत नसून मोक्षसिद्धि हें त्यांच्या ज्ञानाचें फळ होय. कर्मे

**न हि कश्चित्क्षणमपि जातु तिष्ठत्यकर्मकृत् ।**
**कार्यते ह्यवशः कर्म सर्वः प्रकृतिजैर्गुणैः ॥ ५ ॥**

**अन्वयार्थ—हि**—कारण—**कश्चित्**—कोणीही—**क्षणं अपि**—एक क्षणभर-सुद्धां—**अकर्मकृत्**—कर्म न करणारा असा,कर्म सोडून—**जातु**—केव्हांही—**न तिष्ठति**—रहात नाही.—**हि**—कारण—**अवशः एव सर्वः**—कर्माच्या अधीन असलेलाच प्रत्येक प्राणी–प्रकृतिपराधीन असलेला हरएक जीव—**प्रकृतिजैः गुणैः**—ईश्वराच्या अचिन्त्य शक्तीपासून झालेल्या सत्त्व-रजस्तमोगुणांकडून—**कर्म**—कर्म—**कार्यते**—करविला जातो. गुण प्रत्येक अज्ञ जीवाकडून कर्म करवितात. ५.

**कस्मात्पुनः कारणात्कर्मसंन्यासमात्रादेव ज्ञानरहितात्सिद्धिं नैष्कर्म्यलक्षणां पुरुषो नाधिगच्छतीति हेत्वाकाङ्क्षायामाह—न हीति । न हि यस्मात्क्षणमपि कालं जातु कदाचित्कश्चित्तिष्ठत्यकर्मकृत्सन् । कस्मात्कार्यते हि यस्मादवश एव कर्म सर्वः प्राणी प्रकृतिजैः प्रकृतितो जातैः सत्त्वरजस्तमोभिर्गुणैः । अज्ञ इति वाक्यशेषो यतो वक्ष्यति—' गुणैर्यो न विचाल्यते ' इति । सांख्यानां पृथक्करणादज्ञानामेव हि कर्म-**

---

सोडून देण्यानेच जर सिद्धि मिळेल तर दगडालाही मुक्ति मिळाली पाहिजे." ६४५. पण हें गीतेचे उत्तर गीतेंत कोठेंसें आहे, ते सांगितलेले नाही. गीतारहस्यात गीतेच्या, कर्मयोगशास्त्राच्या, श्रीकृष्णांच्या व व्यासाच्या नावावर अशी पुष्कळ मते ठोकून दिलेली आहेत. पण त्याला आधार कोठेच दाखविलेला नाही व जेथे दाखविला आहे, तेथे त्याचा विपर्यास करून दाखविला आहे. उदाहरणार्थ याच पृष्ठावरील १८-४८ व ४९ श्लोकांचा आधार पहा. मोक्ष ज्ञानानेच मिळतो ना ? कर्मत्यागाने मिळत नाही, हे खरे ना ? मग आचार्य तरी काय सांगतात ? ज्ञाननिष्ठारूप धर्मानेच मोक्ष मिळतो, हेच म्हणतात. पृ. ७ पण ज्ञाननिष्ठा व कर्मनिष्ठा या दोन्ही निष्ठा एकत्र सभवतात का ? जर सभवत असतील तर हे दोन स्वतंत्र मोक्षमार्ग आहेत, या म्हणण्यात काय स्वारस्य आहे ? कीं मी आत्मा अकर्ता, अभोक्ता, निर्विकार, निष्क्रिय आहे असे ज्ञान व मी कर्ता आहें, सक्रिय आहे, असें ज्ञान व त्या ज्ञानानेच होणारे कर्म ही दोन्ही एकत्र सभवतात, असे रहस्यकाराचे मत आहे ! आचार्य म्हणतात तशा ज्ञानाबरोबर कर्म संभवत नाही. अर्थात् ज्ञानाने मोक्षसिद्धि होते इतकें कबूल केले, की ज्ञानाबरोबर कर्मत्याग आलाच. कर्मांचा त्याग करविणें, हा ज्ञानाचा स्वभाव आहे. केवल [ ह्म० ज्ञानावाचून ] कर्म सोडल्यानेच मोक्ष मिळतो, असें आचार्यांचे किंवा दुसऱ्या कोणाचेंच म्हणणे नाही. त्यामुळे 'दगडालाही मुक्ति मिळेल' हें म्हणणें सर्वथा अप्रासंगिक आहे. आपले मत 'येन केन प्रकारेण' गीतेच्या माथी मारण्यासाठीं रहस्यकारांनीं आपल्या ग्रंथात संन्यासमार्गीयाचा असा वारवार निष्कारण द्रोह व उपहास केला आहे. त्याचे दिग्दर्शन आम्ही पूर्वी केले आहे व पुढेंही करूं. उपहास किंवा शब्दछल आह्मांलाही करतां येईल. कारण ' कर्मयोगानेच जर मोक्ष मिळेल तर तो मरेपर्यंत कर्में करणाऱ्या पशु-पक्षी-कीटादिकांनाही मिळाला पाहिजे ' असें उलट म्हणतां येण्यासारखें आहे !

**योगो न ज्ञानिनाम् । ज्ञानिनां तु गुणैरचाल्यमानानां स्वतश्चलनाभावात्कर्मयोगो नोपपद्यते । तथा च व्याख्यातं वेदाविनाशिनमित्यत्र ॥ ५ ॥**

**भाष्यार्थ—कस्मात् पुनः कारणात् कर्मसंन्यासमात्रात् एव ज्ञानरहितात् नैष्कर्म्यलक्षणां सिद्धिं पुरुषः न अधिगच्छति**—कोणत्या बरें कारणामुळें नुसत्या ज्ञानरहित कर्मसंन्यासानेंच नैष्कर्म्यरूप सिद्धीस पुरुष प्राप्त होत नाही ? **—इति हेत्वाकांक्षायां ' न हि० ' इति आह**—ते कारण जाणण्याची अकांक्षा झाली असतां भगवान् ' न हि० ' या श्लोकानें सांगतात—**हि-यस्मात् कश्चित् क्षणं अपि कालं जातु-कदाचित् अकर्मकृत् सन् न तिष्ठति**—कारण कोणीही एक क्षणभरसुद्धा केव्हांच न कर्म करणारा असा होत्साता रहात नाही.—**कस्मात्**—कां बरे ?—**हि-यस्मात् सर्वः प्राणी प्रकृतिजैः-प्रकृतितः जातैः सत्त्वरजस्तमोभिः गुणैः अवशः एव कर्म कार्यते**—कारण सर्व-प्रत्येक प्राणी प्रकृतिजन्य ह्म० प्रकृतीपासून उत्पन्न झालेल्या सत्त्व-रज-तम या गुणांकडून पराधीनच होत्साता कर्म करविला जातो. ( अहोपण सर्वच म्ह० ज्ञानीसुद्धां जर गुणपरवश होऊन कर्म करविला जाऊं लागला तर मग संन्यासवचनाला अवकाशच राहत नाही, अशी शंका घेऊन आचार्य ह्मणतात-)—**अज्ञः इति वाक्यशेषः**—'सर्व' या शब्दापुढे ' अज्ञः ' असा वाक्यशेष जोडावा. ( पण असा शेष लावण्यास प्रमाण काय ? उत्तर-)—**यतः वक्ष्यति 'गुणैः यो न विचाल्यते'**—अ. १४ श्लो. २३—**इति**—कारण भगवान् पुढें गुणातीताच्या लक्षणांत ' जो सत्त्वादि गुणांकडून स्वरूपदर्शनावस्थेपासून ढळविला जात नाही ' असे सांगणार आहेत. [ आत्मज्ञानी गुणांकडून चंचल करविला जात नाही, म्हणूनच तो गुणातीत होय, असे म्हटलेले असल्यामुळे सत्त्वादि गुण इच्छा, लोभ, मोह इत्यादिकाच्या योगाने अज्ञ, व गुणातीत न झालेल्या मनुष्याच्या शरीरेंद्रियसंघातालाच कर्मामध्ये प्रवृत्त करूं शकतात. तसेच ]—**सांख्यानां पृथक्करणात्**—ज्ञानयोगाने सांख्यांची निष्ठा, असे म्हणून योग्यांपेक्षा सांख्यांना पृथक् केलेलें असल्यामुळे—**अज्ञानां एव हि कर्मयोगः न ज्ञानिनां**—अज्ञजनासाठीच कर्मयोग आहे, ज्ञानी लोकांसाठी कर्मयोग नाही,—**तु ज्ञानिनां गुणैः अचाल्यमानानां स्वतः चलनाभावात् कर्मयोगः न उपपद्यते**—आणि गुणांकडून चंचल न केल्या जाणाऱ्या ज्ञानी पुरुषाचे स्वतः म्ह० स्वाभाविक चलन संभवतच नसल्यामुळे त्यांचा कर्मयोग संभवत नाही. (आत्म्याच्या ठिकाणी स्वाभाविक चलनाचा अभाव कसा आहे तें-)—**तथा च 'वेदाविनाशिनं' इत्यत्र व्याख्यातं**—' वेदाविनाशिनं ' अ.२ श्लो.२१. या श्लोकाच्या व्याख्यानाचे वेळी सविस्तर सांगितलें आहे. [ अर्थात् अनात्मज्ञ पुरुष सत्त्वादि गुणांच्या अधीन असल्यामुळें गुणांकडून कर्मामध्यें प्रेरित केला जातो. पण गुणातीत ज्ञानी आत्मरूप झाल्यामुळे गुणांकडून कर्म करविला जात नाहीं. आत्मा स्वभावतः

तर निष्क्रियच आहे. त्यामुळें येथील सर्व हा शब्द केवल कर्माधिकारी अज्ञानाच उद्देशून आहे. ज्ञाननिष्ठाधिकारी सांख्यांना उद्देशून नाहीं. ] ५.

**कर्मेन्द्रियाणि संयम्य य आस्ते मनसा स्मरन् ।**
**इन्द्रियार्थान्विमूढात्मा मिथ्याचारः स उच्यते ॥६॥**

**अन्वयार्थ—यः विमूढात्मा**—जो अत्यंत मूढबुद्धि पुरुष—**कर्मेन्द्रियाणि**—कर्मेन्द्रियांचें—**संयम्य**—संयमन करून—**इन्द्रियार्थान्**—विषयांचें—**मनसा**—मनानें—**स्मरन्**—स्मरण करीत—**आस्ते**—राहतो—**सः**—तो—**मिथ्याचारः**—ढोंगी—**उच्यते**—म्हटला जातो. ६.

---

१ रहस्यकार 'सर्व'शब्दाचा अर्थ ज्ञानी व अज्ञानी असे सर्व देहधारी मानव असा करितात. पण मग त्यांबरोबर पशु-पक्ष्यादि इतर देहधारी जीवांचीही गणना कां करूं नये? कारण ते म्हणतात-" कर्म सोडण्याचें मनात आणले तरीही देह आहे तोपर्यंत निजणें, बसणें, इ. कर्में कधीच बंद होत नसल्यामुळे ( गी. ५.९,१८.११, ). कोणीही मनुष्य कधीच कर्मशून्य होऊं शकत नाही. म्हणून कर्मशून्यरूपी नैष्कर्म्यही अशक्य होय. " ६४४ पण पश्वादिकांचींही निजणे, बसणें इत्यादि कर्में कधीच बंद होत नाहीत. मग एकट्या ' मनुष्याचींच होत नाहीत, ' असा संकोच कां केला आहे? तेव्हां ' कर्मशून्यरूपी नैष्कर्म्य अशक्य होय ' असे ठरवितांना सर्वशब्दाचा अर्थ-कोणीही प्राणी-असाच करणे उचित होतें, पशुही गुणांकडून परतत्र केले जातात व गुणाधीन होऊन कर्म करितात. म्हणूनच आचार्यांनीं ' सर्वः प्राणी ' असे भाष्यांत म्हटलें आहे व तेच बरोबर आहे. पण रहस्यकारांच्या म्हणण्याप्रमाणे 'सर्व' या शब्दाच्या अर्थाचा ' सर्व मनुष्य ' असा संकोच जरी केला तरी सर्वच मनुष्य जर कर्मावांचून क्षणभरही राहूं शकत नाही तर भगवानांनी कर्मयोगाच्या अगदी विरुद्ध ज्ञानयोगनिष्ठा जी सांगितली आहे ती कोणाकरितां? याचें उत्तर गीतारहस्यकार संबंध ९०० पानांच्या पुस्तकात कोठेंही देत नाहींत, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. आचार्य मात्र ज्ञानयोगनिष्ठेचे अधिकारी स्थितप्रज्ञ, गुणातीत सांख्य आहेत, असें सांगून अस्थितप्रज्ञ, अगुणातीत योगीच कर्मावांचून क्षणभरही राहूं शकत नाहींत, अशी अगदीं उत्तम प्रकारें व्यवस्था लावितात. मधुसूदनसरस्वतीप्रभृति इतर टकाकारही " सर्व गुणाधीन प्राणी लौकिक व वैदिक कर्मावांचून एक क्षणभरही राहू शकत नाहीत, पण गुणातीत सांख्य ज्ञाननिष्ठ होऊन राहतात, " असाच आपला आशय प्रकट करितात. ज्ञानेश्वरमहाराजही-" जव प्रकृतीचे अधिष्ठान । तव सांडी मांडी हें अज्ञान । जे चेष्टा ते गुणाधीन । आपैसी असे ॥ ५३ ॥ म्हणउनि जंव सग प्रकृतीचा । तंव त्याग न घडे कर्माचा। ऐसियाही करूं म्हणती तयांचा । आग्रहची उरे ॥ ६३ ॥ " असें म्हणतात. सारांश या सर्व टीकाकारांच्या मतें-' न कर्मणामनारंभात्० ' येथून 'मोघं पार्थ स जीवति ' । ३-१६ येथपर्यंत जो उपदेश केला आहे तो योग्यांना म्ह० कर्माधिकारी अनात्मज्ञांना ज्ञानाधिकार प्राप्त होण्यासाठीं कर्मानुष्ठान करणेंच अत्यंत अवश्य आहे असे श्रोत्यांच्या मनांत ठसविण्यासाठींच आहे.

**यस्त्वनात्मज्ञश्चोदितं कर्म नाऽऽरभत इति तदसदेवेत्याह— कर्मेन्द्रियाणीति । कर्मेन्द्रियाणि हस्तादीनि संयम्य संहृत्य य आस्ते तिष्ठति मनसा स्मरंश्चिन्तयन्निन्द्रियार्थान्विषयान्विमूढात्मा विमूढान्तःकरणो मिथ्याचारो मृषाचारः पापाचारः स उच्यते ६**

**भाष्यार्थ—**( तर मग आत्मज्ञाप्रमाणें अनात्मज्ञानेंही जर कर्मत्याग केला तर त्यांत काय दोष आहे ? कारण शरीर व इंद्रियें यांच्या समुदायाचे नियमन करण्यास असमर्थ असलेल्या मूर्खालाही कर्मांचा संन्यास करितां येणें शक्य आहे, अशी आशंका घेऊन आचार्य म्हणतात—)**तु यः अनात्मज्ञः चोदितं कर्म न आरभते इति तत् असत् एव इति 'कर्मेन्द्रियाणि०' इति आह**—पणे जो अनात्मज्ञ शास्त्रविहित कर्म आरंभीत नाहीं, त्याचें ते कर्म न करणें-त्याच्या कर्मांचा अनारंभ अयोग्य

---

१ जो अनात्मज्ञ प्रकृतीच्या गुणाच्या अधीन असूनही विहित कर्म आरंभीत नाही, तो मोठा प्रत्यवार्या होय, असे या सहाव्या श्लोकात सांगितले आहे, असे आचार्य म्हणतात. पण रहस्यकार पुढील दोन ६-७ श्लोकांना निराळेच अवतरण देतात-" यासच कर्मयोग म्हणतात, व हाच ज्ञानकर्मसमुच्चयात्मक मार्ग विशेष योग्यतेचा म्हणजे श्रेष्ठ, असें आता सांगतात "- प्रकृतीच्या गुणाच्या अधीन असलेल्या प्रत्येक प्राण्याकडून गुण कर्म करवितात. सत्त्व, रज व तम याच्या अधीन राहून सात्त्विक, राजस व तामस कर्मे करणे हाच कर्मयोग होय, हाच ज्ञानकर्मसमुच्चय आहे आणि हा असला कर्मयोग किंवा ज्ञानकर्मसमुच्चयच श्रेष्ठ ( संन्यासाहूनही श्रेष्ठ ) आहे, असे भगवान् पुढील दोन श्लोकांत सांगत आहेत, असा रहस्यकारांच्या अवतरणाचा स्पष्ट अर्थ होतो. पण हा अर्थ इतका अनुचित आहे की त्याच्या योगाने कर्मयोगाचे महत्त्व किंवा श्रेष्ठत्व ठरत नसून अत्यंत हीनत्व मात्र सिद्ध होत आहे. प्रकृतीच्या तीन गुणातील सत्त्व गुणाकडून करविली जाणारी कर्मे जरी चांगली —सात्त्विक असली व त्यामुळे पुण्योत्पत्ति अ. १४ श्लो. १६–१८ होत असली व त्याना यथाकथंचित् कर्मयोगही म्हणता आलें, तरी दुःख व अज्ञान हेंच ज्याचे फळ आहे अशा राजस व तामस कर्मांनाही कर्मयोग म्हणणे सर्वथा अनुपपन्न आहे. तसेच, जो गुणाच्या अधीन होऊन कोणत्याही कार्यात प्रवृत्त होतो, जो गुणाना आपल्या अधीन ठेवू शकत नाही तो आत्मज्ञानी कशाचा ? त्याला आत्मज्ञ न म्हणतां अनात्मज्ञ म्हणणेच उचित आहे. बरें, गुणाना आपल्या स्वाधीन कोणीच ठेवू शकत नाही, म्हणून म्हणावें तर भगवानानी, 'तूं निस्त्रैगुण्य हो, नित्यसत्त्वस्थ हो, निर्योगक्षेम हो, रागद्वेष सोड, काम, क्रोध लोभ टाक,' असा उपदेश केला आहे. गुणातीताची लक्षणे व गुणातीत होण्याचा उपाय सांगितला आहे. ( अ. १४ ) तेव्हां गुणांना कोणीच जिंकूं शकत नाही, असेंही म्हणतां येत नाही. तस्मात् प्रकृतीच्या अधीन असणारा प्रत्येक प्राणी जे 'कांहीना कांही' करतो तोच कर्मयोग होय, असें पुढील दोन श्लोकांत सांगतात वगैरे जी कल्पना केली आहे ती बरोबर नाही. त्यापेक्षां आचार्यांचें अवतरण कितीतरी सयुक्तिक आहे ! अनात्मज्ञ एकक्षणभरही कर्म केल्यावांचून राहूं शकत नाही, कारण प्रकृतीचे गुण त्याची इच्छा नसली तरी त्याच्याकडून कर्मे करवितात. पण असें असतांनाही जो कर्माधिकारी वर्णाश्रमविहित कर्म करीत नाही, तो ढोंगी आहे. कारण तो इतर लौकिक किंवा स्वाभाविक कर्मांचा त्याग करूं शकत नाहीं, पण शास्त्रोक्त

-मिथ्याच आहे, असें 'कर्मेंद्रियाणि०' या श्लोकानें सांगतात—**यः कर्मेन्द्रियाणि -हस्तादीनि संयम्य-संहृत्य मनसा इन्द्रियार्थान्-विषयान् स्मरन्-चिन्तयन् आस्ते-तिष्ठति**—जो हस्त-पादादिक कर्मेंद्रियांचें संयमन-उपसंहार करून मनानें इंद्रियार्थांचें ह्म० विषयांचें स्मरण-चिंतन करीत असतो-विषयानुसंधान करीत राहतो—**सः विमूढात्मा-विमूढान्तःकरणः मिथ्याचारः-मृषाचारः-पापाचारः उच्यते**—तो विमूढात्मा म्ह० ज्याचें अन्तःकरण अत्यंत मूढ झाले आहे तो मिथ्याचार-मृषाचार-पापाचरण करणारा-ढोंगी म्हटला जातो. ६.

**यस्त्विन्द्रियाणि मनसा नियम्यारभतेऽर्जुन ।**
**कर्मेन्द्रियैः कर्मयोगमसक्तः स विशिष्यते ॥ ७ ॥**

**अन्वयार्थ—हे अर्जुन**—हे अर्जुना !—**तु**—पण—**यः**—जो—**इन्द्रियाणि**—ज्ञानेंद्रियांचा—**मनसा**—मनानें—**नियम्य**—निग्रह करून—**असक्तः सन्**—कर्मफलामध्ये आसक्त न होतां—**कर्मेन्द्रियैः**—कर्मेंद्रियांनीं—**कर्मयोगं**—कर्मयोगाचा **आरभते**—आरंभ करतो—**सः**—तो—**विशिष्यते**—चांगला श्रेष्ठ होय. ७.

**यस्त्विति । यस्तु पुनः कर्मण्यधिकृतोऽज्ञो बुद्धीन्द्रियाणि मनसा नियम्याऽऽरभतेऽर्जुन कर्मेन्द्रियैर्वाक्पाण्यादिभिः । किमारभत इत्याह— कर्मयोगमसक्तः सन्स विशिष्यत इतरस्मान्मिथ्याचारात् ॥ ७ ॥**

**भाष्यार्थ—'यः तु०' इति**—'यस्तु०' इत्यादि श्लोकाचे व्याख्यान—**तु पुनः अर्जुन**—पण याच्या उलट हे पार्था—**यः कर्मणि अधिकृतः अज्ञः बुद्धीन्द्रियाणि मनसा नियम्य**—जो कर्माचा अधिकारी अज्ञ पुरुष ज्ञानेंद्रियांचे मनाने नियमन करून—**वाक्-पाण्यादिभिः कर्मेन्द्रियैः आरभते**—वाक्, हस्त, इत्यादि कर्मेंद्रियांनीं आरंभितो—**किं आरभते इति आह**—काय आरंभितो तें सांगतात—**कर्मयोगं असक्तः सन् सः इतरस्मात् मिथ्याचारात् विशिष्यते**—कर्मयोगाला-कर्मानुष्ठानाला त्यात आसक्त न होतां आरंभ करतो तो इतर मिथ्याचाराहून ह्म० पूर्वोक्त ढोंग्याहून अधिक चांगला होय. ७.

---

कर्मांचा मात्र त्याग करतो, व मनाने विषयांचे चिंतन करतो. ज्याला आपलीं इंद्रियें व मन आपल्या स्वाधीन ठेवतां येत नाहींत त्यानें शास्त्रीय कर्मांचा त्याग करणें, हें पाप आहे, असा आचार्यांचा आशय आहे. आचार्य कर्मयोग म्ह० विहित कर्मानुष्ठान, वेदोक्त प्रवृत्ति धर्म, असे समजतात व रहस्यकार कर्मयोग म्ह० प्रकृतीच्या गुणाधीन झालेल्या मनुष्यांची कर्मे, असे निदान येथे तरी मानतात. हा कर्मयोगशब्दाच्या अर्थांतील फरक वाचकांनी लक्षात ठेवावा.

१. श्लोक ६ व ७ या वरील टीपेंत रहस्यकार पुनः म्हणतात-"कर्मयोगात कर्मापेक्षां बुद्धि श्रेष्ठ (गी. २.४९) असें जे मागच्या अध्यायांत सांगितलें त्याचेंच या दोन श्लोकांत स्पष्टीकरण

केलेलें आहे." ६४५. पण २ दुसऱ्या अध्यायाच्या ४९ श्लोकांत 'बुद्धियोगाहून कर्म फारच निकृष्ट आहे.' एवढेच म्हटले आहे व आमच्या मते त्यांचा या दोन श्लोकांशी कांहीं संबंध नाहीं. कारण त्यांत कर्म निकृष्ट आहे, असे म्हटलें आहे व येथे 'कर्मेंद्रियांचे संयमन करून जो मनानें विषयचिंतन करीत राहतो तो ढोंगी होय व त्याच्यापेक्षां ज्ञानेंद्रियांचे मनाने नियमन करून कर्मेंद्रियांनी आसक्ति सोडून कर्माचरण करणारा अधिक चांगला' असे सांगितले आहे. म्हणजे दुसऱ्या अध्यायांत कर्म व बुद्धियोग यांची तुलना केली आहे व येथे ढोंगी व ढोंग न करिता कर्म करणारा यांची तुलना केली आहे. तेव्हा त्याचे स्पष्टीकरण यात केले आहे, या म्हणण्यात काय अर्थ आहे? ढोंगी किंवा दांभिक मनुष्य खरा सदाचरणी नव्हे, हें कोणीहि कबूलच करील व सहाव्या श्लोकांत सांगितलेल्या दांभिकाहून भिन्न लोकांचेंच वर्णन सातव्या श्लोकांत केलें आहे, हे 'यः तु' येथील 'तु' शब्दावरूनच स्पष्ट होत आहे. पुढे पुनः रहस्यकार म्हणतात—"कलौ कर्ता च लिप्यते कलियुगात दोष बुद्धींत नसून कर्मात असतो, या वचनाचा आधार दाखवून बुद्धि कशीहि असो कर्म वाईट नसले म्हणजे झाले, असे जे प्रतिपादन करितात त्यांनी वरील श्लोकांत वर्णिलेले गीतेचे तत्त्व विशेषतः लक्षात ठेवले पाहिजे" ६४६ पण असें कोण ह्मणतात? अद्वैतमार्गी वेदान्ती असे केव्हाही ह्मणणार नाहींत. 'कलौ कर्ता च लिप्यते' याचा अर्थ 'कलियुगांत फक्त पापकर्म करणाराच दोषी ठरतो,' असा आहे. रहस्यकार वर सांगतात तसा त्याचा अर्थच होत नाहीं. वरील सर्व श्लोकाचा अर्थ असा आहे—"कृतयुगांत ज्या देशांत पाप कर्म घडते तो देश, त्रेतायुगात ज्या ग्रामामध्ये पाप घडते तो ग्राम, द्वापरयुगात ज्या कुलात पाप घडते ते कुल व कलियुगात फक्त पाप कर्म करणाराच त्या पापाने दोषी होतो," यावरून रहस्यकारांची अर्थ करण्याची शैली किती अपूर्व आहे ते वाचकांच्या लक्षांत येईल! "निष्काम बुद्धीनें कर्म करण्याच्या योगासच कर्मयोग हे नाव गीतेत दिले आहे, हे सातव्या श्लोकावरून उघड होते." ६४६ हे रहस्यकारांचे म्हणणे बरोबर नाहीं. त्या श्लोकाचा सरळ अर्थ 'मनाने ज्ञानेंद्रियांचे संयमन करून कर्मेंद्रियांनी असक्त होऊन कर्मयोगाचा जो आरंभ करतो तो अधिक चांगला' असा आहे. त्यात कर्मेंद्रियांनी कर्मयोगाचा आरंभ करणे, व तोही त्यात आसक्त न होतां करणे ढोंगीपणापेक्षां चांगले, एवढेच सांगितले आहे. निष्कामबुद्धीने कर्म करण्याच्या योगासच कर्मयोग हे नाव जर गीतेत दिले असते तर असक्त राहून कर्मयोगाचा आरंभ कर असे ह्मणण्याचे काहीच कारण नव्हते. कारण निष्काम कर्म करणे, आसक्ति न ठेवतां कर्म करणे हाच कर्मयोग. तेव्हा 'कर्मेंद्रियांनी कर्मयोग करणे' इतके ह्मटल्याने काम भागले असते. 'असक्त होऊन' असे आणखी निराळे सांगावयास नको होतें. पण असक्त होऊन कर्मयोग कर असे ज्यापक्षीं ह्मटले आहे, त्यापक्षीं कर्मयोग ह्म० निष्काम बुद्धीनें कर्म करण्याचा योग नव्हे, हे उघड होते. 'कर्मयोग आरंभितो' ह्म० कर्मानुष्ठान—कर्माचरण आरंभितो व तेही फलामध्ये आसक्त न होतां आरंभितो, तो ढोंग्यापेक्षां फार चांगला, असाच अर्थ करणें सयुक्तिक होय, व आचार्यांनी तो तसाच केला आहे. पण रहस्यकारांना तो पटत नसल्यामुळें ते ह्मणतात—"हा कर्मयोग सहाव्या श्लोकांत वर्णिलेल्या दांभिक मार्गापेक्षां श्रेष्ठ असला तरी संन्यासमार्गापेक्षां श्रेष्ठ नाहीं. असा या श्लोकाचा कित्येक संन्यासमार्गीय टीकाकार अर्थ करितात. पण ही कोटी सांप्र-

दायिक आग्रहाची आहे. कारण संन्यासमार्गापेक्षांही कर्मयोग अधिक योग्यतेचा किंवा श्रेष्ठ आहे, असें या श्लोकांतच नव्हे तर पुनः पांचव्या अध्यायाच्या आरंभीं व इतरत्रही स्पष्ट सांगितलें आहे. " ६४६.

पण रहस्यकारांचें हें म्हणणें बरोबर नाहीं. कारण येथे संन्यास प्रकृत नसून कर्मेंद्रियांचा मात्र संयम करून मनानें विषयांचें स्मरण करीत राहणें, हें प्रकृत आहे. तसें करणाराला वरील–म्हणजे तिसऱ्या अध्यायाच्या सहाव्या–श्लोकांत मिथ्याचार–ढोंगी म्हटलें आहे व या सातव्या श्लोकांत 'ज्ञानेंद्रियांचा मनानें संयम करून कर्मेंद्रियांनीं जो. कर्मयोग आरंभितो तो श्रेष्ठ आहे,' असें म्हटलें आहे. अर्थात् येथील तुलना संन्यास व कर्मयोग यांची नसून मिथ्याचार व कर्मयोग यांची आहे, हें उघड आहे. पण रहस्यकारांना ही कोटी वाटते; व ती सांप्रदायिक आग्रहाची आहे, असा ते शेरा मारतात. परंतु तिसऱ्या अध्यायाचा सहावा व सातवा श्लोक विचारपूर्वक वाचल्यावर रहस्यकारांचें संन्यासमार्गीयांना दोष देऊन केलेलें व्याख्यान बरोबर आहे की, प्रकृतविषयाला अनुसरून संन्यासमार्गीयांनीं केलेले व्याख्यान बरोबर आहे, हें निःपक्षपात वाचकांच्या सहज ध्यानात येण्यासारखें असल्यामुळें आम्ही त्याविषयीं अधिक कांहीं लिहूं इच्छीत नाहीं. स्वतः रहस्यकारांनींही ६४६ पृष्ठावर 'अकर्मणः' या पदाचा अर्थ 'कर्म न करण्यापेक्षां' असाच केला आहे. संन्यासापेक्षां असा केला नाहीं. पण ६७१ पृष्ठावर "या श्लोकात अकर्मशब्दानें संन्यासमार्गीय लोक ज्याला 'कर्माचा स्वरूपतः त्याग' असें म्हणतात तो कर्मत्याग विशेषें करून उद्दिष्ट आहे." असें रहस्यकारच म्हणतात. म्हणजे त्यांना अकर्मशब्दानें संन्यास विवक्षित आहे. पण संन्यासमार्गी अकर्म म्हणजे संन्यास असे म्हणत नाहीत. श्रीगीतेंत 'अकर्म' हा शब्द आठ वेळां आला आहे.

( १ ) दुसऱ्या अध्यायाच्या ४७ व्या श्लोकांत 'मा ते संगोऽस्तु अकर्मणि' असे म्हटलें आहे व भाष्यकारांनीं त्याचा अर्थ–'अकर्मणि–अकरणे' असा केला आहे. अर्थात् तुझी प्रीति कर्म न करण्यामध्येही नसो, असें म्हटले आहे. 'अकर्मणि' याचा अर्थ 'संन्यास' असा जर त्यांना विवक्षित असता तर त्यांनीं 'संन्यासे' असें स्पष्ट म्हटले असतें. श्रीशंकरानन्द, मधुसूदन इत्यादि इतर संन्यासमार्गीयांनींही 'अकर्म म्हणजे सन्यास' असा अर्थ केलेला नाही. उलट शंकरानन्दानीं तर 'अकरणे प्रत्यवायः। तेन नरको दुर्योनिश्च स्यात्' ह्म० नियत कर्म न केल्यास प्रत्यवाय लागेल व त्या प्रत्यवायामुळें तुला नरक व दुर्योनि प्राप्त होईल, असें म्हटलें आहे. येथें अकर्म म्हणजे संन्यासच जर विवक्षित असता तर प्रत्यवाय लागण्याचें कांहीं प्रयोजनच नव्हतें. रहस्यकारही 'मा ते संगोऽस्त्वकर्मणि' याचा–कर्म न करण्याचा म्हणजे सोडण्याचा आग्रह धरूं नको,–असा अर्थ करितात. त्यांत 'आग्रह' हा शब्द बरोबर नाही.

( २ ) तिसऱ्या अध्यायाच्या पांचव्या श्लोकांत 'न हि कश्चित्क्षणमपि जातु तिष्ठति अकर्मकृत्–' ह्म० कोणीही कधीं एक क्षणभरसुद्धां कर्म न करतां रहात नाहीं, असें म्हटलें आहे. येथेंही अकर्मशब्दाचा संन्यास असा अर्थ कोणी करीत नाहींत; व तसा कोणी केल्यास तो उपपन्नही होणार नाहीं. कारण 'संन्यास करणारा कोणी कधीं क्षणभरही रहात नाही,'

**नियतं कुरु कर्म त्वं कर्म ज्यायो ह्यकर्मणः ।**
**शरीरयात्रापि च ते न प्रसिद्ध्येदकर्मणः ॥ ८ ॥**

**अन्वयार्थ—त्वं**—तूं—**नियतं कर्म**—नित्य कर्म—**कुरु**—कर—**हि**—कारण—**अकर्मणः**—कर्म मुळींच न करण्यापेक्षां—**कर्म**—कर्म—**ज्यायः**—श्रेष्ठ आहे.—**च**—व—**ते**—तुझी—**शरीरयात्रा अपि**—शरीरस्थितिही—**अकर्मणः**—कर्म न करण्यानें—**न प्रसिद्ध्येत्**—उत्तम प्रकारें-शास्त्रविहित मार्गानें सिद्ध होणार नाही ८

**यत एवमतः नियतमिति । नियतं नित्यं यो यस्मिन्कर्मण्यधिकृतः फलाय चाश्रुतं तन्नियतं कर्म तत्कुरु त्वं हेऽर्जुन । यतः कर्म ज्यायोऽधिकतरं फलतो हि यस्मादकर्मणोऽकरणादनारम्भात् । कथं शरीरयात्रा शरीरस्थितिरपि च ते तव न प्रसिध्येत्प्रसिद्धिं न गच्छेदकर्मणोऽकरणात् । अतो दृष्टः कर्माकर्मणोर्विशेषो लोके ॥ ८ ॥**

**भाष्यार्थ—यतः एवं अतः 'नियतं०' इति**—आणि ज्याअर्थी पापाचरणी मनुष्यापेक्षां कर्मानुष्ठान करणारा पुरुष अधिक चांगला आहे त्याअर्थी कर्माधिकारी पुरुषानें नित्य कर्म अवश्य करावे, अशा आशयानें भगवान् 'नियतं०' या श्लोकांत सांगतात—**नियतं-नित्यं**—नियत म्ह० नित्य—**यः यस्मिन् कर्मणि अधिकृतः फलाय च अश्रुतं तत् तस्य नियतं**—जो ज्या कर्मामध्यें अधिकृत असतो-( ज्याला ज्या

---

असा अनुभव येत नाहीं. रहस्यकारही ' कोणी झाला तरी कांहीना काही कर्म केल्यावाचून क्षणभर देखील केव्हांही राहू शकत नाहीं ' असाच अर्थ करितात.

( ३-४ ) तिसऱ्या अध्यायाच्या आठव्या श्लोकात ' कर्म ज्यायो ह्यकर्मणः ' व ' शरीरयात्रापि च ते न प्रसिद्ध्येदकर्मणः ' असा हा शब्द दोनदा आला आहे. येथेंही आचार्यांनीं ' अकर्मणः-अकरणात्- ' कर्में न करण्यापेक्षां व ' अकर्मणः-अकरणात्- ' कर्में न केल्यामुळें तुझी शरीरस्थितिही होणार नाहीं, असें व्याख्यान केलें आहे. रहस्यकारही ' कर्में न करण्यापेक्षां कर्म करणें, हें अधिक चांगले होय. खेरीज कर्म न केलेंस तर ( खायला न मिळतां ) तुझा शरीरनिर्वाहसुद्धां चालावयाचा नाही. ' पृ. ६४६ असेंच म्हणतात. पण आचार्यांच्या मतें अकर्म म्हणजे अकरण व रहस्यकाराच्या मतें अकर्म म्ह० संन्यास. रहस्यकारांचा हा अकर्म शब्दाचा अर्थ बरोबर नाहीं. कारण संन्यास-आश्रमामुळे ' खायला न मिळतां शरीरनिर्वाहही चालत नाहीं,' असे होत नाहीं. यास्तव अकर्म म्ह०अकरण-मुकाट्यानें बसणें, हाच अर्थ बरोबर आहे. कारण कांही न करितां मुकाट्याने बसल्यासच खायला मिळत नाहीं व शरीरयात्रा चालत नाही, असा अनुभव आहे.

( ५-८ ) चवथ्या अध्यायांत ' किं कर्म किं अकर्म-इति ' १६; ' अकर्मणः च बोद्धव्यं ' १७; ' कर्मणि अकर्म यः पश्येत्- ' १८; ' अकर्माणि च कर्म यः-' १८. असा चार वेळ अकर्मशब्द आला आहे व त्याचा अर्थ भाष्यकारांच्या मताने ' तूष्णीभाव- ' मुकाट्यानें बसणें असाच सर्वत्र आहे. पण रहस्यकारांनीं अकर्मशब्दाच्या अर्थाचा येथें घोटाळा केला आहे. त्याचा विचार तेथेंच करूं.

कर्मांचा अधिकार असतो, ) व फलासाठीं जें अश्रुत [ स्वर्गादि फलासाठीं ज्या कर्मांचें विधान केलेलें नसतें ] तें त्याचें नियत कर्म होय.—**हे अर्जुन तत् कर्म त्वं कुरु** —हे अर्जुना,ते अशा प्रकारचें नित्य कर्म तूं कर.—**यतः कर्म फलतः ज्यायः-अधिकतरं**—कारण कर्म करणें हें फलाच्या दृष्टीनें अधिक चांगलें आहे.—**हि-यस्मात्** —ज्याअर्थी—**अकर्मणः-अकरणात्-अनारंभात्**—अकर्मापेक्षां म्ह० कर्म न करण्यापेक्षां-कर्मांना आरंभ न करण्यापेक्षां कर्म करणें अधिक चांगलें आहे.—**कथं**—तें कसें ?—**ते-तव शरीरयात्रा-शरीरस्थितिः अपि च अकर्मणः-अकरणात् न प्रसिद्ध्येत्-प्रसिद्धिं न गच्छेत्**—तुझी शरीरयात्रा-शरीराची स्थिति सुद्धां कर्म न केल्यानें उत्तम प्रकारें सिद्ध होणार नाहीं. (कर्म करीत असले तरच शरीराच्या विहित व्यापारानें शरीर राहूं शकतें.तो शरीराचा व्यापार टाकल्यास शरीराचे प्रतिष्ठित जीवनही अशक्य होईल.)—**अतः लोके कर्माकर्मणोः विशेषः दृष्टः**—यास्तव व्यवहारांत कर्म व अकर्म यांतील फरक प्रत्यक्ष पाहिलेला आहे. [ कर्म करणें व न करणें, यांचा परिणाम प्रत्यक्ष प्रमाणानेंच अनुभवास येतो. यास्तव कर्माधिकारी असतांना नियत कर्म सोडणें, हा मोठा दोष आहे. त्यामुळें मोठा प्रत्यवाय लागतो. ] ८.

---

१ रहस्यकार म्हणतात " खेरीज व सुद्धां ( अपि च ) या पदांनीं शरीरयात्रा हा किमानपक्षीचा हेतु सांगितला " ६४६ पण ते बरोबर नाहीं. 'विहित कर्म टाकल्यास तुझी शरीरस्थितिही सिद्ध होणार नाहीं, ' असे म्हणून कर्माधिकारी पुरुषाने विहित कर्में सोडल्यास त्यामुळें स्वधर्माचरणानेंच होणारी चित्तशुद्धि दुर्लभ होईल हे तर खरेच,पण 'कर्माधिकारी पुरुषानें विहित कर्म सोडल्यास त्याचें शरीररक्षणही शास्त्रीय मार्गानें होणार नाहीं,' असें दुसरेंही एक नुकसान सांगत आहेत. कारण ब्राह्मणादि वर्णांना धर्मशास्त्रानें कांहीं कर्में धर्मासाठीं व कांहीं जीविकेसाठीं सांगितलीं आहेत. जसें ब्राह्मणाला-अध्ययन, यजन व दान हीं तीन कर्में धर्मासाठीं व अध्यापन, याजन व परिग्रह हीं तीन जीविकेसाठीं सांगितलीं आहेत. क्षत्रियाला अध्ययनादि तीन कर्में धर्मासाठीं व प्रजारक्षण, शस्त्रास्त्रधारण, युद्ध हीं जीविकेसाठीं, वैश्याला अध्ययनादि तीन कर्में धर्मासाठीं व व्यापार, पशुपालन, शेती हीं जीविकेसाठीं; शूद्राला द्विजसेवा हेंच एक कर्म धर्म व जीवन यासाठीं विहित आहे. ( मनुस्मृ. अ. १० श्लो. ७५-८० पहा. ) त्यांतल्या त्यांत ब्राह्मणाला अध्यापन, क्षत्रियाला प्रजारक्षण व वैश्याला व्यापार हे श्रेष्ठ जीवनोपाय सांगितलेले आहेत. यास्तव तूं जर स्वधर्मरूप कर्मांचा त्याग करून भिक्षावृत्तीनें निर्वाह करूं लागलास किंवा कांहींच न केलेंस तर तुझी शरीरस्थितीही प्रतिष्ठितपणे व शास्त्रविहित मार्गानें होणार नाहीं. यास्तव कर्माधिकारी पुरुषाने नित्य कर्में सोडण्यापेक्षा तीं करणें हे चित्तशुद्धिरूप पारमार्थिक फलप्राप्तीच्या दृष्टीनेंच उत्तम, असे नाहीं तर विहित मार्गानें शरीरस्थिति होणें, या दृष्टीनेंही उत्तम आहे, असा त्याचा आशय आहे. कर्माधिकारी पुरुषानें विहित कर्में न करण्यापेक्षां तीं करणें यांत ऐहिक व पारमार्थिक असे दोन्ही लाभ आहेत, असें भगवान् येथें सांगत आहेत. अर्थात् ' अपि च ' हे शब्द किमान पक्षीं हेतु सांगण्यासाठीं नसून विहित कर्मानुष्ठानाच्या पारमार्थिक फलाबरोबर लौकिक फलाचाही समुच्चय करण्यासाठीं आहेत.

**यज्ञार्थात्कर्मणोऽन्यत्र लोकोऽयं कर्मबन्धनः।**
**तदर्थं कर्म कौन्तेय मुक्तसङ्गः समाचर ॥ ९ ॥**

**अन्वयार्थ—अयं लोकः**—हा अधिकारी कर्मठ मनुष्य—**यज्ञार्थात् कर्मणः**—ईश्वरार्थ केलेल्या कर्माहून—**अन्यत्र**—अन्य कर्मानें—**कर्मबन्धनः**—कर्मबद्ध होतो. ईश्वरासाठीं केलेल्या कर्माहून बाकीचे सर्व कर्म त्याला बंधनकारक होते. म्हणून—**कौन्तेय**—हे अर्जुना!—**मुक्तसङ्गः**—कर्मफलाविषयींची आसक्ति सोडून—**तदर्थं**—ईश्वरासाठीं—**कर्म**—कर्म—**समाचर**—कर. ९.

**यच्च मन्यसे बन्धार्थत्वात्कर्म न कर्तव्यमिति तदप्यसत्, कथम्—यज्ञार्थादिति। यज्ञो वै विष्णुः इति श्रुतेर्यज्ञ ईश्वरस्तदर्थं यत्क्रियते तद्यज्ञार्थं कर्म, तस्मात्कर्मणोऽन्यत्रान्येन कर्मणा लोकोऽयमधिकृतः कर्मकृत्कर्मबन्धनः कर्म बन्धनं यस्य सोऽयं कर्मबन्धनो लोको न तु यज्ञार्थादतस्तदर्थं यज्ञार्थं कर्म कौन्तेय मुक्तसङ्गः कर्मफलसङ्गवर्जितः सन्समाचर निर्वर्तय ॥ ९ ॥**

**भाष्यार्थ—च कर्म बन्धार्थत्वात् न कर्तव्यं इति यत् मन्यसे तद् अपि असत्**—आणि कर्म बंधालाच कारण होणारें असल्यामुळे करूं नये असे जे तूं समजत आहेस तेंही खोटें आहे.—**कथं**—ते कसें? तेच—'**यज्ञार्थात्०' इति**—'यज्ञार्थात्०' या श्लोकांत सागतात—[ 'कर्मणा बध्यते जन्तुः विद्यया च विमुच्यते०' म्ह० प्राणी कर्मानें बद्ध होतो व विद्येनें मुक्त होतो, असें स्मृतिवचन असल्यामुळे कर्म संसाररूप बंध उत्पन्न करणारें आहे. यास्तव ते मुमुक्षूनें करूं नये, म्हणून म्हणशील तर तें बरोबर नाहीं, असे भगवान् पुढील श्लोकांत सांगत आहेत. कर्माधिकारी पुरुषानें कर्म न करणें सर्वथा अयुक्त आहे. कर्म स्वभावतःच बंधक जरी असले तरी फलाची इच्छा न करितां ईश्वरार्थ कर्म करणाऱ्या पुरुषाला ते बंध उत्पन्न करीत नाहीं, म्हणून ईश्वरार्थ ते करावें, असे सांगतात-]—'**यज्ञः वै विष्णुः इति' श्रुतेः यज्ञः ईश्वरः तदर्थं यत् कर्म क्रियते तत् यज्ञार्थं कर्म**—यज्ञ हा विष्णु आहे, असें श्रुतिवचन असल्यामुळें यज्ञ म्ह० ईश्वर, त्याच्यासाठी जे कर्म केले जातें ते यज्ञार्थ कर्म होय.—**तस्मात् कर्मणः अन्यत्र-अन्येन कर्मणा अयं अधिकृतः कर्मकृत् लोकः कर्मबन्धनः**—त्या ईश्वरार्थ कर्माहून दुसऱ्या कर्मानें हा कर्माधिकारी कर्मकर्ता लोक कर्मबन्धन आहे.—**कर्म बन्धनं यस्य सः अयं कर्मबन्धनः**—कर्म ज्याचें बंधन आहे तो हा कर्मबन्धन लोक आहे.—**न तु यज्ञार्थात्**—पण ईश्वरार्थ कर्मानें लोक कर्मबंधन होत नाहीं. [ हा सर्व कर्माधिकारी मानववर्ग ईश्वराच्या आराधनेसाठीं केलेलें जें कर्म त्यानें बद्ध होत नाहीं, ईश्वरार्थ न केलेल्या कर्मानें बद्ध होतो. ]—**अतः हे कौन्तेय तदर्थं-यज्ञार्थं मुक्तसंगः-कर्मफलसंगवर्जितः सन् कर्म समाचर-निर्वर्तय**

—म्हणून हे अर्जुना, तूं त्याच्यासाठीं म्ह० ईश्वरासाठीं मुक्तसंग म्ह० कर्मफलाविषयींची आसक्ति सोडून कर्माचें आचरण कर-कर्मानुष्ठान कर. ९.

---

१ ' यज्ञार्थात् कर्मणः ' याचा सरळ अर्थ यज्ञासाठीं जें कर्म त्या कर्माहून, असा होतो. पण यज्ञ हेंच स्वतः कर्म आहे. त्यामुळें यज्ञासाठीं कर्म याचा अर्थ कर्मासाठीं कर्म असा होतो. पण कर्मासाठीं जें कर्म त्याला सोडून बाकीच्या कर्मानें मनुष्य बद्ध होतो, याचा अर्थ काय ? यज्ञ म्ह० श्रौत यज्ञ किंवा स्मार्त यज्ञ, एवढाच जरी अर्थ घेतला किंवा यज्ञ म्ह० ब्रह्मदेवानें प्रजेस चातुर्वर्ण्यविहित जीं कर्में लावून दिलीं आहेत तीं कर्में ( गी. र. ६४६ ) असें मानलें तरी तीं साहंकारच होतात. ' मी कर्ता आहे. मला हीं अवश्य केलीं पाहिजेत' असें समजणाऱ्या पुरुषांकडून तीं घडतात. त्यामुळें तीं बधाला म्ह० पुनर्जन्माला कारण होतातच. अर्थात् त्या यज्ञासाठीं जें कर्म त्यानें लोक बद्ध होत नाहींत, या म्हणण्यांत कांहीं समंजसपणा नाहीं. यास्तव यज्ञ म्ह० भगवान् विष्णु ईश्वर, त्याच्या प्रीत्यर्थ, त्याच्या आराधनेसाठीं केलेलीं जीं कर्में तीं मनुष्याला बद्ध करीत नाहींत, असाच अर्थ करणें येथें सयुक्तिक होय. म्ह० यज्ञशब्दाचा अर्थ विष्णु, ईश्वर असा केला असता ' तदर्थं कर्म कौन्तेय मुक्तसंगः समाचर '—यांतील ' तदर्थ ' या शब्दाचा अर्थही ईश्वरार्थ कर्म कर, असा अगदीं सरळ होतो. आचार्यांनीं ' यज्ञ—' शब्दाचा प्रसिद्ध यज्ञ हा अर्थ केल्यास, अशी अनुपपत्ति येते, हें जाणून ' यज्ञो वै विष्णुः ' या श्रुतीच्या आधारानें यज्ञ म्ह० विष्णु—ईश्वर असा अर्थ केला आहे. मधुसूदनसरस्वती, शंकरानंद, नीलकंठ, श्रीधर इत्यादि सर्व अद्वैतमार्गी टीकाकारांनीं आचार्यांचेंच अनुकरण केलें आहे. मध्वाचार्यही तसाच अर्थ करितात. पण रहस्यकार यज्ञशब्दाचा अर्थ निराळाच करितात."सृष्टि निर्माण करून,किंवा तिचा क्रम सुरळीत चालण्यासाठीं म्ह० लोकसंग्रहार्थ, सर्व प्रजेस ब्रह्मदेवानें चातुर्वर्ण्यविहित जीं जीं कर्में लावून दिलीं आहेत त्या सर्वांचा यज्ञ या शब्दांत समावेश होतो आणि हींच कर्में धर्मशास्त्रांत सांगितलीं आहेत. " ६४६. अर्थात् अशा ' कर्मासाठीं जें कर्म करितात त्याखेरीज इतर कर्मानें हा लोक बांधलेला आहे. ' पृ. ६४७ पण मग त्या कर्माहून इतर कर्म कोणतें ? वेद किंवा धर्मशास्त्र यांत सांगितलेलीं सर्व कर्में हाच यज्ञ, व त्यासाठीं केलेलें कर्म बंध उत्पन्न करीत नाहीं, हा जर सिद्धान्त आहे, ज्ञानोत्तरही तीं केलीं पाहिजेत, असा जर भगवानांचा आग्रह आहे तर मग बंधक कर्मच उरत नाहीं. कारण ब्राह्मणादि चार वर्णांना शास्त्रीय कर्मच अनुष्ठेय असतें. शास्त्रानें न सांगितलेलें कोणतेंही कर्म अनुष्ठेय नसतें. अर्थात् 'कर्मानें मनुष्य बद्ध होतो' हें म्हणणें खोटें झालें. इतकेंच नव्हे, तर शास्त्रीय कर्माहून इतर कर्मानें मनुष्य बद्ध होतो, या म्हणण्यांतही कांहीं स्वारस्य रहात नाहीं. कारण यज्ञ म्ह० सर्व शास्त्रीय कर्म असें मानल्यावर इतर कर्म म्ह० अशास्त्रीय कर्मच होय. अशास्त्रीय कर्मालाच पाप म्हणतात. अर्थात् यज्ञार्थ कर्माहून इतर कर्मानें मनुष्य बद्ध होतो, असें म्हणणें म्ह० पापानें तो बद्ध होतो असें म्हणणेंच आहे; पण मनुष्य पापानें मात्र बद्ध होतो व पुण्यानें बद्ध होत नाहीं, असें मुळींच नाहीं. शिवाय तो पापानें—अशास्त्रीय कर्मानें बद्ध होतो, हें निराळें सांगण्याची गरजच नाहीं. यास्तव यज्ञ म्ह० सर्व शास्त्रोक्त कर्म व त्यासाठीं केलेलें कर्म बंध उत्पन्न करीत नाहीं, हें म्हणणें अयोग्य आहे. शिवाय शास्त्रोक्त कर्मासाठीं आणखी निराळें कर्म तें कोणतें ? यज्ञासाठीं चालणें, बोलणें, सामग्री गोळा

करणें, हें की काय ? पण स्वत: कर्मच जर बध उत्पन्न करणारे आहे तर त्यासाठीं केलेलें इतर कर्म मात्र बंध उत्पन्न करीत नाहीं, हे सांगण्यांत असा कोणता मोठा हेतु आहे ? सारांश या श्लोकांतील यज्ञशब्दाचा–सर्व चातुर्वर्ण्यविहित कर्मे–असा अर्थ करणे सर्वथा अयोग्य असून यज्ञ म्ह० विष्णु, व त्याच्यासाठीं केलेलें कर्मच बधक होत नाहीं. ईश्वरार्थ न केलेले सर्व कर्म मग ते शास्त्रीय असो, लौकिक असो का स्वाभाविक असो, बंध करणारें आहे. कारण तें साहंकार असतें आणि 'मी याचा कर्ता' अशा अभिनिवेशाने केलेले कोणतेही कर्म पुण्य-पापांच्या द्वारा पुनर्जन्मरूप बंध अवश्य उत्पन्न करते. रहस्यकारांच्या यज्ञशब्दाच्या अर्थाहून आचार्यांचा अर्थ किती सयुक्तिक आहे, याचा विचार आतां वाचकांनीच करावा.

रहस्यकारांनी या श्लोकाचा अर्थही मोठासा रमणीय केलेला नाहीं। "यज्ञासाठीं जें कर्म करितात त्याखेरीज इतर कर्मांनें हा लोक बांधलेला आहे." (बांधलेला आहे म्हणजे काय? 'बाधलेला' असा भूतकाल कशाला? त्यापेक्षा 'ईश्वराच्या आराधनेसाठी केलेल्या कर्माहून बाकीच्या कर्माने मनुष्य बद्ध होतो,' असे म्हणणे किती सयुक्तिक व सुबोध आहे?) "तदर्थ ह्म० यज्ञार्थ (करावयाचे) कर्म (देखील) तूं आसक्ति किवा फलाशा सोडून करीत जा." येथें 'देखील' हा शब्द रहस्यकारांनी आपल्या पदरचा घातला आहे. पण यज्ञार्थ करावयाचे कर्म जर मुळी बंधकच नाही तर मग त्याची आसक्ति सोडून कर, हे म्हणण्यात काय अर्थ आहे. त्यापेक्षा ईश्वरासाठी 'मी कर्ता आहे,' हा संग सोडून 'तू आपलें सर्व विहित कर्म कर?' हे म्हणणे किती सयुक्तिक आहे ? असो; रहस्यकारांनी या श्लोकावरील टीपेत तर फारच मौज केली आहे. ते म्हणतात–"या श्लोकाच्या पहिल्या चरणांत मीमांसकाचा व दुसऱ्यांत गीतेचा सिद्धान्त सांगितला आहे." (तेथे 'चरणात' याबद्दल 'अर्धांत' असें पाहिजे होते. पण दोन-चार B. A. व LL. B. लोकाच्या साह्याने शुद्ध केलेल्या ग्रथात अशा ढोबळ चुका रहाव्या, याचें आश्चर्य वाटते. असो!) पण पहिल्या ओळींत मीमांसकांचा सिद्धान्त दिला आहे व दुसरींत गीतेचा सिद्धान्त आहे, असें म्हणण्यास आधार काय आहे ? की रहस्यकाराचे वचन हाच त्याला आधार ? पृ. ५३-५६ पर्यंत त्यांनी कर्मशब्दाबद्दल पुष्कळसें लिहिलें आहे. पण ते सर्व केवल तर्कमय आहे. त्याला शास्त्रप्रमाण कांहीं दिलेले नाही. त्यात विशेष अशी जर कांहीं गोष्ट सांगितली असेल तर ती ही–"गीताप्रतिपादनात कर्मशब्दाचा अर्थ केवळ श्रौत अथवा स्मार्त कर्मे एवढाच संकुचित न समजतां त्याहून जास्त व्यापक घेतला पाहिजे. साराश मनुष्य जें जें कांहीं करतो–त्याचें खाणें, पिणें, खेळणे, बसणे,... किबहुना जिवत राहणे व मरणें या सर्वांचा कर्म या शब्दांत भगवद्गीतेंत समावेश झाला आहे." याला आधार काय, तर पांचव्या अध्यायाचे ८ व ९ हे दोन श्लोक. कर्मशब्दाच्या या व्यापक अर्थाविषयी आम्ही पांचव्या अध्यायांत अधिक विचार करूं. तूर्त–गीतेत कर्मशब्द इतक्या व्यापक अर्थी सर्वच ठिकाणी मानला आहे, असें मानणें सर्वथा अयोग्य आहे. मोक्षाचें परंपरेनें साधन होणारें जें कर्म ते श्रौत-स्मार्त कर्मच होय. खाणें, पिणें, निजणें, उठणे, इत्यादि कर्मे हें मोक्षाचे साधन नव्हे. सृष्टीच्या आरंभी सांगितलेली जी कर्मनिष्ठा तीही शास्त्रीय कर्मनिष्ठाच होय. वरील खाणे, पिणें, वगैरे नव्हे,–एवढेंच सांगून ठेवतों. असो; या श्लोकाच्या पूर्वार्धात मीमांसकांचा सिद्धान्त सांगितला आहे व उत्तरार्धात गीतेचा सिद्धान्त आहे, असा विभाग करणें व्यर्थ

**सहयज्ञाः प्रजाः सृष्ट्वा पुरोवाच प्रजापतिः ।**
**अनेन प्रसविष्यध्वमेष वोऽस्त्विष्टकामधुक् ॥ १० ॥**

**अन्वयार्थ—प्रजापतिः**—स्रष्टा ब्रह्मदेव—**पुरा**—सृष्टीच्या आरंभी—**सहयज्ञाः**—यज्ञासहवर्तमान—**प्रजाः**—तीन वर्णांना—**सृष्ट्वा**—उत्पन्न करून—**अनेन**—या यज्ञाने—**प्रसविष्यध्वं**—प्रसव–वृद्धि करा, आपली वाढ करून घ्या.—**एषः**—हा यज्ञ—**वः**—तुम्हांस—**इष्टकामधुक्**—इष्ट भोग–फल देणारा—**अस्तु**—होवो.—**इति**—असे—**उवाच**—म्हणाला. १०.

**इतश्चाधिकृतेन कर्म कर्तव्यम्—सहेति । सहयज्ञा यज्ञसहिताः प्रजास्त्रयो वर्णास्ताः सृष्ट्वोत्पाद्य पुरा सर्गादावुवाचोक्तवान्प्रजापतिः प्रजानां स्रष्टा, अनेन यज्ञेन प्रसविष्यध्वं प्रसवो वृद्धिरुत्पत्तिस्तां कुरुध्वम् । एष यज्ञो वो युष्माकमस्तु भवत्विष्टकामधुगिष्टान-भिप्रेतान्कामान्फलविशेषान्दोग्धीतीष्टकामधुक् ॥ १० ॥**

**भाष्यार्थ—अधिकृतेन इतः च कर्म कर्तव्यं इति 'सह०' इति आह—** कर्माधिकारी पुरुषाने याही आणखी एका कारणास्तव नैमित्तिक कर्मासह नित्य कर्म करावे,

---

असून आम्ही वर केलेल्या अर्थाप्रमाणे हा सर्व श्लोक वेदान्तसिद्धान्तच सांगत आहे.'ईश्वरार्थ कर्म कर' हे येथे मुख्यतः सांगावयाचे आहे. आधुनिक सुशिक्षितांची कल्पनाशक्ति कशा भराऱ्या मारीत सुटते याचे हे एक येथें उदाहरण आहे. ' यज्ञार्थ ' हा शब्द पाहतांच रहस्यकारांनी यज्ञ म्ह० क्रतु व यज्ञार्थ म्ह० क्रत्वर्थ असा संबंध जोडून मीमांसक क्रत्वर्थ व पुरुषार्थ, असे जे कर्मांचे भाग करीत असतात तेथपर्यंत या श्लोकाला नेऊन भिडविले आहे व पुरुषार्थ या शब्दाचा अर्थ केवळ स्वतःच्या पोटासाठी मनुष्य जे करतो ते कर्म असा केला आहे,व स्वतः-च्या फायद्यासाठी केलेल्या अशा कर्मांनी पुरुष बद्ध होतो,असे मीमांसकाचे मत सांगितलें आहे. पण तें बरोबर नाही. कारण मीमांसक पुरुषाच्या संस्कारार्थ जे कर्म केले जाते त्याला पुरुषार्थ कर्म व अदृष्टासाठी जें कर्म केले जाते त्याला क्रत्वर्थ कर्म म्हणतात. असो; " यज्ञशब्दाचा विष्णु असा अर्थ श्रुतीला धरून केलेला असला तरी तो ' ओढाताणीचा व क्लिष्ट ' आहे असें रहस्यकार म्हणतात व आपला अर्थ सरळ व सुबोध मानतात. वाचकांपुढे दोन्ही अर्थ आहेत. त्यांतील सयुक्तिक कोणता व अयुक्त कोणता त्याचा निर्णय त्यांनीच करावा. " यज्ञार्थ कर्मे करावी कारण ती बंधक होत नाहीत. या मीमांसकांच्या सिद्धान्तांतच–यज्ञार्थ जी कर्मे करावयाची ती फलाशा सोडून करावी–अशी भगवद्गीतेने जास्त भर घालून दुरुस्ती केली आहे. " ६४८ हे म्हणणें मात्र सयुक्तिक नाही, असे आम्ही पुनः सांगून ठेवतों. कारण गीतेनें त्यांत कोणतीच दुरुस्ती केलेली नसून वैदिक सप्रदायाला धरूनच ' नित्य-नैमित्तिक कर्मे ईश्वरार्थ संग सोडून करावी. ' असें सांगितले आहे व कर्माधिकारी गृहस्थानें ज्ञानाची योग्यता प्राप्त होईपर्यंत नित्य-नैमित्तिक कर्माचा त्याग करूं नये, असेही वैदिक सप्रदायाचें म्हणणें असल्यामुळे ' कर्माच्या दगदगांतून सुटून मोक्षासाठी संन्यास घेणे बरें ' ६४८ असें **कोणीच अद्वैतसंप्रदायी केव्हांही म्हणणार नाही, हे वाचकांनीं लक्षांत ठेवावें.**

असें भगवान् ' सहयज्ञाः०' या श्लोकानें सांगतात—**प्रजापतिः-प्रजानां स्रष्टा सहयज्ञाः-यज्ञसहिताः प्रजाः-त्रयः वर्णाः ताः सृष्ट्वा-उत्पाद्य पुरा-सर्गादौ उवाच-उक्तवान्**—प्रजापति म्ह० प्रजांचा स्रष्टा-उत्पादक यज्ञांसह प्रजा म्ह० तीन वर्ण उत्पन्न करून पूर्वी म्ह० सृष्टीच्या आरंभीं त्यांस बोलला.—**अनेन यज्ञेन प्रसविष्यध्वं-प्रसवः वृद्धिः उत्पत्तिः तां कुरुध्वं**—या यज्ञानें प्रसव म्हणजे वृद्धि, उत्पत्ति, त्या वृद्धीला करा. [ या यज्ञानें तुम्ही आपली वृद्धि करा. ती कशी करतां येईल ? उत्तर-]—**एषः यज्ञः वः-युष्माकं इष्टकामधुक्-अस्तु-भवतु-इष्टान्-अभिप्रेतान् कामान् फलविशेषान् दोग्धि इति इष्टकामधुक्**—हा यज्ञ तुमचे इष्ट काम देणारा होवो. इष्ट-आवडणारे काम म्ह० फलविशेष-नानाप्रकारची फलें देतो तो इष्टकामधुक्, हा तुम्हांला इष्ट फल देणारा होवो. १०.

## देवान्भावयतानेन ते देवा भावयन्तु वः ।
## परस्परं भावयन्तः श्रेयः परमवाप्स्यथ ॥ ११ ॥

**अन्वयार्थ—अनेन**—या यज्ञाच्या योगानें—**देवान्**—इंद्रादि देवांची—**भावयत**—तुम्ही वृद्धि करा.—**ते देवाः**—ते देव—**वः**—तुमची—**भावयन्तु**—वृद्धि करोत. याप्रमाणें—**परस्परं भावयन्तः**—एकमेकांची वृद्धि करणारे असे होत्साते तुम्ही दोघेही—**परं श्रेयः**—स्वर्गरूप परम श्रेयास—**अवाप्स्यथ**—प्राप्त व्हाल.११

**कथम्—देवानिति । देवानिन्द्रादीन्भावयत वर्धयतानेन यज्ञेन ते देवा भावयन्त्वाप्याययन्तु वृष्ट्यादिना वो युष्मानेवं परस्परमन्योन्यं भावयन्तः श्रेयः परमपि ज्ञानप्राप्तिक्रमेणावाप्स्यथ स्वर्गं वा परं श्रेयोऽवाप्स्यथ ॥ ११ ॥**

**भाष्यार्थ—कथं ' देवान्० ' इति**—हा यज्ञ इष्ट काम कसा देणार ? ( कारण देवतांच्या प्रसादावांचून स्वर्गादि अभ्युदय होत नाहीं व सम्यग्दर्शनावांचून निःश्रेयस सिद्ध होत नाहीं ) या शकेचें समाधान ' देवान्० ' इत्यादि श्लोकानें करितात—**अनेन यज्ञेन देवान्-इंद्रादीन् भावयत-वर्धयत**—या यज्ञाच्या योगानें इंद्रादि देवांस तुम्ही वाढवा.—**ते देवाः वः युष्मान् वृष्ट्यादिना भावयन्तु-आप्याययन्तु**—ते देव तुम्हांस वृष्ट्यादिकांच्या योगानें परिपुष्ट करोत.—**एवं परस्परं-अन्योन्यं भावयन्तः श्रेयः परं अपि ज्ञानप्राप्तिक्रमेण अवाप्स्यथ**—याप्रमाणें परस्परांस-एकमेकांस संतुष्ट करणारे तुम्ही ज्ञानप्राप्तीच्या द्वारा परम श्रेयालाही प्राप्त व्हाल.—**स्वर्गं वा परं श्रेयः वा अवाप्स्यथ**—स्वर्गाला किंवा मोक्षाला प्राप्त व्हाल. [ तुम्ही हे यज्ञादि करून हविर्भागांनी देवतांना प्रसन्न करा व देव वृष्टि, अन्न इत्यादिकांच्या योगानें तुमचें परिपोषण करतील. याप्रमाणें एकमेकांच्या उपयोगीं पडून तुम्ही स्वर्गाची इच्छा असल्यास देवतांच्या प्रसादानें स्वर्गाला प्राप्त व्हाल, व तुम्हांस स्वर्गाची इच्छा नसून तुम्ही जर मुमुक्षु असाल तर चित्तशुद्धि, ज्ञानप्राप्ति या क्रमानें मोक्षाला प्राप्त व्हाल. ] ११.

**इष्टान्भोगान्हि वो देवा दास्यन्ते यज्ञभाविताः ।**
**तैर्दत्तानप्रदायैभ्यो यो भुङ्क्ते स्तेन एव सः ॥१२॥**

**अन्वयार्थ—यज्ञभाविताः देवाः**—यज्ञानें संतुष्ट केले गेलेले देव—**वः**—तुम्हांस—**इष्टान् भोगान् हि**—इष्ट असलेले भोगच—**दास्यन्ते**—देतील.—**तैः**, त्या देवांनी—**दत्तान्**—दिलेले भोग—**एभ्यः**—त्या देवांस—**अप्रदाय**—न देतां—**यः**—जो—**भुङ्क्ते**—भोगतो—**सः**—तो—**स्तेनः एव**—चोरच होय. १२.

**किंच—इष्टान्भोगानिति । इष्टानभिप्रेतान्भोगान्हि वो युष्मभ्यं देवा दास्यन्ते वितरिष्यन्ति स्त्रीपशुपुत्रादीन्यज्ञभाविता यज्ञैर्वर्धितास्तोषिता इत्यर्थः । तैर्देवैर्दत्तान्भोगानप्रदायादत्त्वाऽऽनृण्यमकृत्वेत्यर्थः, एभ्यो देवेभ्यो यो भुङ्क्ते स्वदेहेन्द्रियाण्येव तर्पयति स्तेन एव तस्कर एव स देवादिस्वापहारी ॥ १२ ॥**

**भाष्यार्थ—किं च इष्टान् भोगान् इति**—कर्माधिकारी पुरुषानें कर्मच करावें याविषयीं ‘ इष्टान् भोगान्० ’ या श्लोकानें आणखी एक कारण सांगतात—**देवाः इष्टान्-अभिप्रेतान् भोगान् हि वः युष्मभ्यं दास्यन्ते-वितरिष्यन्ति**—देव इष्ट म्ह० अत्यंत प्रिय असलेले भोग तुम्हांला देतील. ( कोणते भोग ? )—**स्त्री-पशु-पुत्रादीन्**—स्त्री, पशु, पुत्र इत्यादि प्रिय पदार्थ, (देव कसे ?)—**यज्ञभाविताः -यज्ञैः वर्धिताः-तोषिताः इत्यर्थः**—यज्ञांनी वाढविलेले म्ह० यज्ञांनी संतुष्ट केलेले देव तुम्हांला स्त्री-पशु-पुत्रादि भोग देतील, असा याचा भावार्थ.—**तैः देवैः दत्तान् भोगान् एभ्यः-देवेभ्यः अप्रदाय-अदत्त्वा-आनृण्यं अकृत्वा इत्यर्थः**—त्या देवांनी दिलेल्या भोगांस त्या देवांना परत न देतां, आनृण्य न करितां, असा याचा भावार्थ.—**यः भुङ्क्ते स्वदेहेन्द्रियाणि एव तर्पयति सः देवादिस्वापहारी स्तेनः एव-तस्करः एव**—जो त्यांचा भोग घेतो, आपला देह व इन्द्रियेंच तृप्त करतो तो देवादिकांच्या स्वचा-धनाचा अपहार करणारा चोरच होय. [ तुम्हांकडून यज्ञांनीं संतुष्ट केले गेलेले देव तुम्हांला इष्ट भोग देतील. पण आनृण्य न करितां म्ह० यज्ञांच्या योगानें देवांच्या, ब्रह्मचर्यानें ऋषींच्या व प्रजेच्या योगाने पितरांच्या ऋणांतून मुक्त न होतां–त्यांना त्या त्या साधनांनीं तृप्त केल्यावांचूनच जो त्यांचा उपभोग घेतो, आपलाच देह व इंद्रियें यांस तृप्त करतो तो देव, ऋषि व पितर यांचे धन हरण करणारा चोरच होय. ] १२.

**यज्ञशिष्टाशिनः सन्तो मुच्यन्ते सर्वकिल्बिषैः ।**
**भुञ्जते ते त्वघं पापा ये पचन्त्यात्मकारणात् ॥ १३**

**अन्वयार्थ—यज्ञशिष्टाशिनः**—देवयज्ञादिक करून अवशिष्ट राहिलेलें अन्न खाणारे—**सन्तः**—शिष्ट—**सर्वकिल्बिषैः**—सर्व पापांकडून—**मुच्यन्ते**—मुक्त केले

जातात.—**तु**—परंतु—**ये**—जे—**आत्मकारणात्**—आपलेंच पोट भरण्यासाठीं—**पचन्ति**—अन्न शिजवितात—**ते पापाः**—ते पापी लोक—**अघं**—पाप—**भुञ्जते**—खातात. १३.

**ये पुनः यज्ञेति । देवयज्ञादीन्निर्वर्त्य तच्छिष्टमशनममृताख्यमशितुं शीलं येषां ते यज्ञशिष्टाशिनः सन्तो मुच्यन्ते सर्वकिल्बिषैः सर्वपापैश्चुल्ल्यादिपञ्चसूनाकृतैः प्रमादकृतहिंसादिजनितैश्चान्यैः । ये त्वात्मंभरयो भुञ्जते ते त्वघं पापं स्वयमपि पापा ये पचन्ति पाकं निर्वर्तयन्त्यात्मकारणादात्महेतोः ॥ १३ ॥**

**भाष्यार्थ—ये पुनः ' यज्ञ० ' इति**—प्राप्त झालेल्या भोग्य पदार्थांचा देवादिकांना विभाग न देतां स्वतःच त्यांचा उपभोग घेणाऱ्या लोकांना प्रत्यवाय प्राप्त होतो असें दाखवून इतरांना कोणताच दोष लागत नाहीं, असे ' यज्ञ० ' इत्यादि श्लोकानें सांगतात. पण जे—**देवयज्ञादीन् निर्वर्त्य तच्छिष्टं अशनं अमृताख्यं अशितुं शीलं येषां ते यज्ञशिष्टाशिनः**—देवयज्ञ, पितृयज्ञ, इत्यादि[1] यज्ञ करून त्यांतून अवशिष्ट राहिलेलें अमृत या नांवाचें अन्न खाण्याचें ज्यांचें शीलच आहे ते यज्ञशिष्टाशी होत, असे—**सन्तः सर्वकिल्बिषैः चुल्ल्यादिपंचसूनाकृतैः प्रमादकृतहिंसादिजनितैः च अन्यैः सर्वपापैः मुच्यन्ते**—सदाचरणसंपन्न गृहस्थ सर्व किल्बिषांकडून म्ह० चुल्ली, पेषणी इत्यादि[2] पंचसूनाकृत पापांकडून व प्रमादानें[3] घडलेल्या हिंसादिजनित दुसऱ्या पापांकडून मुक्त केले जातात.—**ये तु आत्मंभरयः ते तु अघं-पापं भुञ्जते**—पण जे आपलेंच पोट भरणारे असतात ते तर अघ म्ह० पाप खातात. —**स्वयं अपि पापाः**—व ते स्वतःही पापीच होत. ( त्यांचा आपलपोटेपणाच भगवान् व्यक्त करितात-)—**ये पचन्ति-पाकं निर्वर्तयन्ति आत्मकारणात्-आत्महेतोः**—जें आपल्यासाठींच-आपलें पोट भरण्यासाठींच स्वयंपाक करितात-अन्न शिजवितात ते आपल्या देहेंद्रियांच्या पोषणासाठींच अन्न शिजविणारे व देवयज्ञादिकांपासून पराङ्मुख असणारे आत्मंभरी स्वतः पापी असून आपलें पापच खातात[4]. १३.

---

१ देवयज्ञ, पितृयज्ञ, मनुष्ययज्ञ, भूतयज्ञ व ब्रह्मयज्ञ, असे पंचमहायज्ञ गृहस्थाला अवश्य अनुष्ठेय आहेत. २ चूल, पाटा-वरवंटा किंवा जातें, उखळ-मुसळ, केरसुणी व पाण्याची भांडी, या पांच ठिकाणीं गृहस्थाच्या येथें नित्य हिंसा होते. म्हणून या पांच पदार्थांना सूनास्थानें ह्म० हिंसास्थानें म्हणतात. त्यामुळे होणाऱ्या बुद्धिपूर्वकृत पापांपासून पूर्वोक्त पंच महायज्ञांच्या योगानें पुरुष मुक्त होतो. ३ दुर्लक्ष करून चालल्यानें न कळत पायांखालीं जीव मरणें इत्यादि हिंसाही घडतात, तीं प्रमादकृत ह्म० अबुद्धिपूर्वक घडलेलीं पापें होत. पंच महायज्ञ करणारा गृहस्थ तसल्या पापापासूनही मुक्त होतो. वास्तव गृहस्थानें पंचमहायज्ञ प्रत्यहीं अवश्य करावे, असें पंचमहायज्ञांच्या स्तुतीसाठीं येथें सांगितलें आहे. ४ या अध्यायाच्या ५–९ श्लोकांत " अज्ञ प्राणी गुणांच्या अधीन असतो, त्यामुळें त्याला आपल्या गुणाप्रमाणें कर्म केल्यावांचून क्षणभरही राहवत नाहीं. विहित कर्म सोडून मनानें विषयचिंतन करीत राहणें, हें फार वाईट; त्यापेक्षां कर्माधिकारी पुरुषानें ज्ञानेंद्रियांचें संय-

मन करून कर्मेंद्रियांनीं विहित कर्मानुष्ठान आसक्ति सोडून करणें फार चांगलें, यास्तव अर्जुना, तूं विहित कर्म कर, कर्म केले तर मी बद्ध होईन व जन्ममरणपरंपरेंतून मुक्त होणार नाही, म्हणून म्हणशील तर सर्वच कर्में बंध उत्पन्न करीत नाहीत. ईश्वराच्या आराधने-साठीच जी कर्में केलेली नाहीत, तीं मनुष्याला बद्ध करितात. ईश्वरासाठी केलेली कर्में केव्हांच बद्ध करीत नाहींत. म्हणून मी कर्ता ही आसक्ति सोडून तूं ईश्वरार्थ कर्म कर " असें एक कारण सांगितलें व १०–१३ श्लोकांत–कर्माधिकारी पुरुषाने पंचमहायज्ञरूप कर्म अवश्य केलें पाहिजे, याविषयी दुसरें कारण सांगितले आहे. ब्रह्मदेवानें पूर्वी यज्ञासह ब्राह्मणादि त्रैवर्णिकांना उत्पन्न करून या यज्ञाने तुम्ही आपली वृद्धि करून घ्या,हा यज्ञच तुम्हाला इष्ट विषय देईल. या यज्ञानें तुम्ही देवांना संतुष्ट करा. ते देव वेळच्यावेळीं पाऊस पाडून व अन्न उत्पन्न करून तुमचें पोषण करतील, याप्रमाणे परस्परांवर उपकार करून तुम्ही आपल्या अधिकाराप्रमाणे स्वर्ग किंवा मोक्ष यांस प्राप्त व्हाल. तुमच्या यज्ञाने तृप्त झालेले देव तुम्हाला पशुपुत्रादि इष्ट भोग देतील. पण त्यांनीं दिलेले भोग त्यांना परत अर्पण न करितां जो स्वतः भोगतो तो चोरच होय. पण जे सदाचरणसंपन्न गृहस्थ पंचमहायज्ञ करून मग अवशिष्ट रा-हिलेलें अन्न खातात ते पंचसूना दोषापासून व प्रमादानें घडलेल्या इतर पापांपासून मुक्त होतात. जे आपल्याच शरीरेंद्रियांच्या तृप्तीकरितां अन्न शिजवितात ते स्वतः पापी असून आपलें पापच खातात. अर्थात् या दोषांपासून मुक्त होण्यासाठींही कर्माधिकारी गृहस्थाने पंचमहायज्ञ केले पाहिजेत.गृहस्थाश्रम सोडून संन्यासी झालेल्या चतुर्थाश्रमी पुरुषाला या पंचसूनास्थानांचीही प्राप्ति नाहीं व तो अन्नही शिजवीत नाहीं.सर्वभूतांना अभय देऊनच संन्यास घ्यावयाचा अस-ल्यामुळें त्याच्या हातून प्रमादाने हिंसा होण्याचाही फारसा संभव नाहीं. यास्तव संन्यासी पंचमहायज्ञांचा अधिकारी नाहीं. अर्थात् तो ते न केल्याने पापी वगैरे होत नाहीं. पण रहस्यकार म्हणतात " या यज्ञचक्राशिवाय जगाचे व्यवहार चालावयाचे नाहींत. किंबहुना जगाच्या धारण-पोषणार्थ हे चक्र ब्रह्मदेवाने प्रथम उत्पन्न केले आहे आणि जगाची सुस्थिति किंवा संग्रहच ज्याअर्थी भगवतास इष्ट आहे त्या अर्थी हें यज्ञचक्र कोणासही सोडतां येत नाहीं आणि आतां हाच अर्थ पुढील श्लोकांतून वर्णिला आहे. यज्ञशब्द केवळ श्रौत यज्ञापुरताच या ठिकाणीं वापरला नसून त्यांत स्मार्त यज्ञाचा आणि चातुर्वर्ण्यादि यथाधिकार सर्व व्यावहारिक कर्मांचा समावेश होतो. " पृ. ६४८ पण हे चक्र अर्जुन पुढे श्लोक १४–१५ यावयाचेंच आहे. १०–१३ श्लोकांत पंचमहायज्ञांचा उल्लेख आहे. चक्राचा नाहीं किंवा सर्व व्यावहारिक कर्मांचाही नाही. स्वतः रहस्यकारांनीच पृ. ६५० वरील टीपेत ' नार्य-मणं पुष्यति नो सखायं० ' या ऋग्वेदस्थ मंत्राचा व ' अघं स केवलं भुक्ते० ' या मनुवच-नाचा उल्लेख केला आहे. पण तो मंत्र व तें स्मृतिवचन पंचमहायज्ञप्रकरणांतीलच आहे. श्रौत-स्मार्त यज्ञ किंवा सर्व व्यावहारिक कर्में यांचें ते प्रकरण नव्हे. शिवाय सर्व पापांपासून मुक्त होणें, हे या पंचमहायज्ञांचें फल स्पष्ट सांगितले आहे. त्यामुळे जगाची सुस्थिति, व्यव-हार वगैरे काल्पनिक फल कल्पिण्याचें कांहीं कारणच नाहीं. फल प्रत्यक्ष शब्दांनीं सांगि-तलेलें असतांना त्याची कल्पना करणे, हा अन्याय आहे. हें यज्ञचक्र जगाच्या धारणपोष-णार्थच जर असेल व त्यासाठीं तें कोणासही सोडतां येत नाही, हाच जर निरपवाद सिद्धान्त असेल तर ज्ञाननिष्ठा भगवानांनी सांगितली तरी कशाला ? शिवाय पाश्चात्त्य

**अन्नाद्भवन्ति भूतानि पर्जन्यादन्नसम्भवः ।**
**यज्ञाद्भवति पर्जन्यो यज्ञः कर्मसमुद्भवः ॥ १४ ॥**

**अन्वयार्थ—अन्नात्**—खाल्लेल्या अन्नापासून—**भूतानि**—प्राण्यांची शरीरें—**भवन्ति**—होतात.—**पर्जन्यात्**—पर्जन्यापासून—**अन्नसम्भवः**—तांदूळ,गहूं इत्यादि अन्नाची उत्पत्ति होते.—**यज्ञात्**—यज्ञापासून—**पर्जन्यः**—पाऊस—**भवति**—होतो. —**यज्ञः**—तो धर्म-अपूर्वनांवाचा यज्ञ—**कर्मसमुद्भवः**—यजमान, ऋत्विक् इत्यादिकांच्या कर्मापासून, त्यांच्या हालचालींनें होणारा आहे. १४

---

राष्ट्रांना ब्रह्मदेवाच्या या यज्ञचक्राची व भगवताच्या इष्ट सुस्थितीची किंवा संग्रहाची वार्ताही ठाऊक नाही. मग त्यांचे जग त्यावांचून कसे निरपवाद चालले आहे ? त्यांच्या जगाचे धारणपोषण आमच्या पेक्षांही उत्तमप्रकारे कसे होत आहे ? अर्थात् रहस्यकारांनी यज्ञशब्दाच्या अर्थाची भयंकर ओढाताण करून त्याला उगीच व्यापक स्वरूप दिले आहे; व केवल पापनिवृत्तीसाठींच विहित असलेल्या पंच-महायज्ञावर फलाचा फार मोठा बोजा वृथा लादला आहे, हे कोणाही निःपक्षपात वाचकाच्या ध्यानात येईल.

भागवत धर्माचे प्रवृत्तिपर तत्त्वच गीतेंत प्रतिपाद्य आहे, असे रहस्यकार पुनः ( महाभा. शां. ३४०. ३२ ते ६२ पहा ) येथे आपल्या संप्रदायाला अनुसरून सांगत आहेत. पण भागवतधर्म प्रवृत्तिपर नाही, हे आम्ही परिशिष्टांत सविस्तर सांगणार असल्यामुळे येथे विस्तार करीत नाही. तथापि रहस्यकार वेद, उपनिषदे, मन्वादि स्मृति इत्यादि प्रमाण ग्रंथांना सोडून पुनःपुनः नारायणीय धर्माकडे वळतात यावरूनच त्यांना वेदादिकांत अनुकूल आधार आढळले नाहीत, हे उघड होते. पण गीता जर मूळ श्रौत-स्मार्त प्रमाणांना सोडून असती तर तिला वैदिकामध्ये एवढे महत्त्वच आले नसते; त्यांतून रहस्यकार जसें समजतात त्याप्रमाणे नारायणीय धर्म जर खरोखरच प्रवृत्तिपर असता तर त्याच्या आधाराने रचलेल्या गीतेला मुळींच महत्त्व आले नसते. असो; " यज्ञचक्र हे लोकसंग्रहाचेंच एक स्वरूप आहे. ह्मणून देवलोक व मनुष्यलोक या दोहोंच्याही संग्रहार्थ भगवतानींच प्रथम निर्माण केलेलें हे लोकसंग्रहकारक कर्म मनुष्याने पुढे चालू ठेवणे जरूर आहे " ६४९ इत्यादि, या सर्व प्रमाणशून्य कल्पना आहेत. रहस्यकार अशा अप्रामाणिक कल्पना करूनच थांबत नाहीत तर कर्मविधीच्या मूळ उद्देशाचा विपर्यासही करितात. कसा तो पहा—"यज्ञादि कर्में केवळ तिळ-तांदूळ अग्नींत जाळण्यासाठी किंवा नुसत्या स्वर्गप्राप्तीसाठींही नसून जगाचे धारण-पोषण होण्यास त्याची आवश्यकता कशी लागते किंवा यज्ञावर सर्व जग कर्में अवलंबून आहे याचा आता याहीपेक्षा अधिक खुलासा करितात " असें पुढील श्लोकांस रहस्यकारांनी अवतरण दिले आहे. यज्ञादि कर्मे तिळ-तांदूळ जाळण्यासाठी आहेत, असे कोणत्या शास्त्रात सांगितलें आहे ? जर सांगितलेलें नाहीं तर तो पक्ष आपल्या पदरचाच पुढें आणण्यांत काय पुरुषार्थ आहे ? 'नुसत्या स्वर्गासाठीही नाहींत,' हें म्हणणेंही फारसें रमणीय नाही. यज्ञ मुख्यतः पुण्योत्पत्तीच्या द्वारा स्वर्गासाठींच आहेत. याविषयी सर्व कर्मकांड प्रमाण आहे. स्वतः गीताही 'यज्ञैः इष्ट्वा स्वर्गतिं प्रार्थयन्ते' अ. ९ श्लो. २०,२१ असें सांगते.

**इतश्चाधिकृतेन कर्म कर्तव्यम् । जगच्चक्रप्रवृत्तिहेतुर्हि कर्म । कथमिति उच्यते— अन्नाद्भवन्तीति । अन्नाद्भुक्ताल्लोहितरेतःपरिणतात्प्रत्यक्षं भवन्ति जायन्ते भूतानि, पर्जन्याद्वृष्टेरन्नस्य संभवोऽन्नसंभवः, यज्ञाद्भवति पर्जन्यः—'अग्नौ प्रास्ताऽऽहुतिः सम्यगादित्यमुपतिष्ठते । आदित्याज्जायते वृष्टिर्वृष्टेरन्नं ततः प्रजाः' इति स्मृतेः । यज्ञोऽपूर्वं स च यज्ञः कर्मसमुद्भव ऋत्विग्यजमानयोश्च व्यापारः कर्म ततः समुद्भवो यस्य यज्ञस्यापूर्वस्य स यज्ञः कर्मसमुद्भवः ॥ १४ ॥**

**भाष्यार्थ—इतः च अधिकृतेन कर्म कर्तव्यं हि कर्म जगच्चक्रप्रवृत्तिहेतुः**—याही आणखी एका कारणास्तव कर्माधिकारी पुरुषानें पूर्वोक्त देवयज्ञादि कर्म करावें. कारण कर्म जगच्चक्राच्या प्रवृत्तीचें निमित्त आहे.—**'कथं अन्नात् भवन्ति॰' इति उच्यते**—ते कसे, तेच आतां 'अन्नात् भवन्ति॰' या श्लोकानें सांगितलें जातें. **—भुक्तात् अन्नात् लोहितरेतःपरिणतात् भूतानि प्रत्यक्षं भवन्ति-जायन्ते**—खाल्लेल्या व रस, रक्त, रेत इत्यादि रूपाने परिणाम पावलेल्या अन्नापासून भूतें प्रत्यक्ष उत्पन्न होतात.—**पर्जन्यात्-वृष्टेः अन्नस्य संभवः अन्नसंभवः**—पर्जन्यापासून म्ह॰ वृष्टीपासून अन्नाची उत्पत्ति होते.—**यज्ञात् पर्जन्यः भवति**—यज्ञापासून पर्जन्य होतो. ( याविषयी दुसऱ्या स्मृतीचे प्रमाण-)—**अग्नौ प्रास्ता आहुतिः आदित्यं सम्यक् उपतिष्ठते**—देवतेचे ध्यान करून तिला उद्देशून अग्नीत टाकलेली आहुति एक प्रकारच्या अपूर्वत्वाला प्राप्त होऊन किरणांच्या द्वारा आदित्यास प्राप्त होते. **—आदित्यात् वृष्टिः जायते**—आदित्यापासून वृष्टि होते.—**वृष्टेः अन्नं ततः प्रजाः**—वृष्टीपासून अन्न होते, अन्नापासून प्रजा उत्पन्न होते,—**इति स्मृतेः**— अशी स्मृति आहे.—**यज्ञः-अपूर्वं च सः यज्ञः कर्मसमुद्भवः**—येथें यज्ञ म्ह॰ अपूर्व-एक प्रकारचें पुण्य आणि तो अपूर्वरूप यज्ञ कर्मापासून उत्पन्न होणारा आहे.— **ऋत्विक्-यजमानयोः व्यापारः कर्म ततः समुद्भवः यस्य यज्ञस्य-अपूर्वस्य सः कर्मसमुद्भवः**—ऋत्विक् व यजमान या दोघांचा जो व्यापार-शरीरेंद्रियांची हालचाल तें कर्म, त्यापासून ज्या यज्ञाची म्ह॰ अपूर्वाची उत्तमप्रकारे उत्पत्ति होते तो यज्ञ कर्मसमुद्भव होय. १४.

---

१ याच श्लोकाचा अर्थ रहस्यकार असा करितात-"प्राणिमात्र अन्नापासून होतात. अन्न पर्जन्यापासून उद्भवतें; पर्जन्य यज्ञापासून होतो व यज्ञाचा उद्भव कर्मापासून होतो." ६५० हा अर्थ सर्वथा उपपन्न नाही. प्राणिमात्र अन्नापासून होत नाहीत. शुक्र-शोणित-संयोगापासून होणारीं जीं भूतें म्हणजे प्राण्यांचे देह-शरीरें तींच तेवढी अन्नापासून होतात. हीच गोष्ट व्यक्त करण्यासाठीं आचार्यांनीं 'अन्नापासून' म्हणजे रस-रक्त-रेत इत्यादि सप्त धातूंच्या रूपानें परिणाम पावलेल्या अन्नापासून भूतें होतात' असें म्हटले आहे. प्राणी म्ह॰ जीव, तो चिदंशरूप आहे, तो अन्नापासून कसा उत्पन्न होणार ? पण वेदान्तग्रंथाचें भाषांतर करितांना किंवा त्याविषयी कांहीं लिहितांना किती सूक्ष्म दृष्टि ठेवावी लागते, हें पाहतो कोण ? असो; खाल्लेल्या अन्नाचा रस, रक्त, मांस, मेद, मज्जा, अस्थि, स्नायु, शुक्र

किंवा स्त्री-शरीरांत शोणित अशा क्रमानें परिणाम होतो व त्या शुक्र-शोणितापासून भूलोकांतील प्राण्यांची शरीरे होतात, हें प्रसिद्ध आहे. पुढे यज्ञापासून पर्जन्य होतो, असे रहस्यकार म्हणतात, पण तें बरोबर नाहीं. 'यज्ञ म्ह० चातुर्वर्ण्याची सर्व कर्में' असे रहस्यकार वारंवार बजावीत असल्यामुळे त्या कर्मापासून तरी पर्जन्य कसा होतो, हें कळत नाही. कर्में प्रत्यक्ष दिसतात, तीं क्षणिक असतात. तीं एकदा होऊन गेलीं कीं मग त्याचा कांहीं अवशेष रहात नाहीं. अशा कर्मापासून वृष्टि कशी होणार? शिवाय यज्ञ म्ह० चातुर्वर्ण्याची सर्व कर्में असे जर म्हटले तर हल्लीं चातुर्वर्ण्याचीं कर्में जवळ जवळ लुप्तच झालीं आहेत. मग अद्यापि वृष्टि कशी होते? तसेच जेथे चातुर्वर्ण्य मुळीं नाहींच अशा पाश्चात्यादि देशांत जी वृष्टि होते ती कशी? रहस्यकार म्हणतात हल्लीं "श्रौतस्मार्त कर्में लुप्त झालीं असलीं तरी कर्में म्ह० हल्लींचीं लौकिक कर्में असे समजण्यास कांहीं हरकत नाहीं." पण हल्लींच्या लौकिक कर्मापासून तरी पर्जन्य कसा संभवेल? लौकिक कर्मांचा व पर्जन्याचा काय संबंध? तस्मात् 'यज्ञापासून पर्जन्य होतो' हे म्हणणे युक्तिशून्य व प्रत्यक्षविरोधी आहे. पण हे सर्व दोष टाळण्यासाठी आचार्य यज्ञशब्दाचा अर्थ काय करितात तो पहा. 'यज्ञः—अपूर्व-'यज्ञ म्ह० शास्त्रविहित कर्म केल्यावर त्यापासून जी एक शक्ति, धर्म–अदृष्ट–पुण्य उत्पन्न होते, ते येथे 'यज्ञ-'शब्दाने विवक्षित आहे. कारण यज्ञ किंवा कोणतेंही पुण्यकर्म पर्जन्याचें साक्षात् निमित्त झालेले दिसत नाहीं. वर भाष्यात 'अग्नौ प्रास्ताहुतिः०' हा मनूचा श्लोक जो आधारासाठी म्हणून दिलेला आहे तो तरी यासाठींच. अर्थात देवतेला उद्देशून दिलेली आहुति सुहुत होऊन म्ह० उत्तम प्रकारे तिचा दाह होऊन ती अपूर्वतेला प्राप्त होते आणि अपूर्वरूपाने सूर्यकिरणाच्या द्वारा सूर्यमंडळावर आरोहण करते. अपूर्वानुसार आदित्यापासून वृष्टीच्या रूपाने पृथ्वीवर येते. तीच अपूर्वरूप झालेली आहुति व्रीहि-यवादि अन्नभावास प्राप्त होऊन पुरुषाने भक्षण केलेल्या तिच्यापासूनच प्रजा म्ह० प्राणिशरीरे होतात, असा मनुवचनाचा अर्थ आहे. अर्थात् प्रत्यक्ष यज्ञापासून वृष्टि होत नाहीं. अपूर्वाच्या द्वारा ती होते; आणि अपूर्व कोणत्याही पुण्य कर्मापासून होऊ शकते. हल्लींही श्रौत-स्मार्त कर्मांचा प्रायः लोपच जरी झाला असला तरी अंशतः ती चालू आहेत. शिवाय इतर पुण्यकर्मेंही अगदीं नष्ट झालेलीं नाहीत. त्या मानाने थोडी-फार वृष्टि होतेच आहे. जेथे चातुर्वर्ण्य नाहीं त्या देशात त्याच्या धर्माप्रमाणे धर्मकार्य होतातच. त्यामुळे त्यांपासून निष्पन्न झालेल्या अपूर्वापासून तेथेही थोडी-फार वृष्टि होते. रहस्यकारांनी हा मनुस्मृतीत व महाभारतात हा श्लोक आहे, असे उपेत म्हटले आहे. पण आचार्यांप्रमाणे यज्ञशब्दाच्या अर्थाची फोड केलेली नाहीं. मधुसूदनसरस्वतीप्रभृति इतर सर्व अद्वैतमार्गी टीकाकारांनीही यज्ञ म्ह० नुसता यज्ञच न मानता अपूर्वनावाचा धर्म असे स्पष्ट म्हटले आहे. तसेंच, 'यज्ञाचा उद्भव कर्मापासून होतो' हे जरी 'यज्ञः कर्मसमुद्भवः' या चवथ्या चरणाचें सरळ भाषांतर असलें तरी त्यावरून त्याचे स्वारस्य मुळीच ध्यानांत येत नाहीं. कारण यज्ञ म्ह० चातुर्वर्ण्याची सर्व कर्में. त्यांचा उद्भव कर्मापासून होतो, याचा अर्थ काय? कर्मांचा उद्भव कर्मापासून होतो, असें कांही तरी म्हटल्यासारखेच ते होतें. म्हणून आचार्यांनी यज्ञ म्ह० अपूर्व व ते अपूर्व ऋत्विक व यजमान, यांच्या कर्मापासून म्ह० हात, पाय, वाणी, मन इत्यादिकांच्या व्यापारापासून होते, असे म्हटले आहे, व तेंच सर्वथा सयुक्तिक होय.

**कर्म ब्रह्मोद्भवं विद्धि ब्रह्माक्षरसमुद्भवम् ।**
**तस्मात्सर्वगतं ब्रह्म नित्यं यज्ञे प्रतिष्ठितम् ॥ १५ ॥**

**अन्वयार्थ—कर्म**—यजमानादिकांचें तें कर्म—**ब्रह्मोद्भवं**—वेदापासून उद्भवलेलें आहे. वेद हे कर्मांचे कारण-प्रमाण आहे, असें—**विद्धि**—तूं जाण.—**ब्रह्म**—तो वेद—**अक्षरसमुद्भवं**—परमात्म्यापासून श्वासोच्छ्वासाप्रमाणें प्रकट झालेला आहे.—**तस्मात्**—परमात्म्यापासून प्रकट झालेला असल्यामुळें—**ब्रह्म**—वेद—**सर्वगतं**—सर्वप्रकाशक असूनही—**नित्यं**—सर्वदा—**यज्ञे**—यज्ञात—**प्रतिष्ठितं**—प्रतिष्ठित आहे.

**तच्च कर्मेति । कर्म ब्रह्मोद्भवं ब्रह्म वेदः स उद्भवः कारणं यस्य तत्कर्म ब्रह्मोद्भवं विद्धि जानीहि, ब्रह्म पुनर्वेदाख्यमक्षरसमुद्भवम्, अक्षरं ब्रह्म परमात्मा समुद्भवो यस्य तदक्षरसमुद्भवं ब्रह्म वेद इत्यर्थः । यस्मात्साक्षात्परमात्माख्यादक्षरात्पुरुषनिःश्वासवत्समुद्भूतं ब्रह्म तस्मात्सर्वार्थप्रकाशकत्वात्सर्वगतम् । सर्वगतमपि सन्नित्यं सदा यज्ञविधिप्रधानत्वाद्यज्ञे प्रतिष्ठितम् ॥ १५ ॥**

**भाष्यार्थ—तत् च कर्म**—आणि ते कर्म कोठून होतें, तें 'कर्म०' इत्यादि श्लोकानें सांगतात.—**कर्म ब्रह्मोद्भवं-ब्रह्म-वेदः सः उद्भवः-कारणं यस्य तत् कर्म ब्रह्मोद्भवं विद्धि-जानीहि**—ते कर्म म्ह० ऋत्विक्, यजमान वगैरे कर्त्यांचा व्यापार ब्रह्मोद्भव आहे. (अहो सर्वच ब्रह्मापासून झालें आहे मग कर्मालाच तेवढें ब्रह्मोद्भव म्हणण्याचें काय कारण ? ) ब्रह्म म्ह० वेद, तो वेदच ज्याचा उद्भव म्ह० कारण आहे असें तें कर्म ब्रह्मोद्भव आहे, असें तूं जाण.—**पुनः वेदाख्यं ब्रह्म अक्षरसमुद्भवं-अक्षरं-ब्रह्म-परमात्मा समुद्भवः यस्य तत् अक्षरसमुद्भवं ब्रह्म वेदः इत्यर्थः**—आणि वेद या नांवाचें ब्रह्म अक्षरापासून उत्पन्न झालें आहे. ( म्ह० तें अनादि-निधन-आदि-अंतरहित नाही. पण अक्षररूप वेद अक्षरापासून कसा होईल ? उत्तर-) येथे अक्षर म्ह० ब्रह्म-परमात्मा, ते अक्षर ज्याचें कारण आहे ते ब्रह्म-वेद अक्षरसमुद्भव होय, असा याचा भावार्थ.—**यस्मात् साक्षात् परमात्माख्यात अक्षरात् पुरुषनिःश्वासवत् ब्रह्म समुद्भूतं तस्मात्-सर्वार्थप्रकाशकत्वात् सर्वगतं**—ज्याअर्थी साक्षात् परमात्मा या नांवाच्या अक्षरापासून पुरुषाच्या म्ह० प्राण्याच्या श्वासोच्छ्वासाप्रमाणें वेदसंज्ञक ब्रह्म उत्पन्न झालेलें आहे त्याअर्थी म्ह० वेद सर्व विषयांना प्रकाशित करणारा असल्यामुळे सर्वगत आहे.—**सर्वगतं अपि सत् नित्यं सदा यज्ञविधिप्रधानत्वात् यज्ञे प्रतिष्ठितं**—सर्वगत असूनही ते नित्य-सर्वदा यज्ञविधीच्या प्राधान्यामुळें यज्ञांत प्रतिष्ठित आहे. [ वेद सर्व विषयांचें प्रकाशन करणारा जरी असला तरी यज्ञाचें विधान करणें, हे त्याचे प्रधान कर्तव्य आहे. सर्व कर्मकांड यज्ञप्रधान आहे. म्हणून ते वेदसंज्ञक ब्रह्म सतत यज्ञांत स्थिर स्थित आहे. ] १५.

---

१ रहस्यकार या श्लोकाला असें अवतरण देतात—"तैत्तिरीयोपनिषदात ( २-१ ) ही पूर्वपरंपरा याच्याही मागे नेऊन " परमात्म्यापासून प्रथम आकाश व पुढें क्रमानें वायु, अग्नि,

पाणी, व पृथ्वी उत्पन्न होऊन पृथ्वीपासून ओषधि, ओषधींपासून अन्न व अन्नापासून पुरुष झाला " असा क्रम दिला आहे. यासाठीं त्याला अनुसरून प्राणिमात्राची कर्मापर्यंत सांगितलेली पूर्वपरंपरा त्याच्यामागें प्रकृति व प्रकृतीच्या मागें अखेर थेट अक्षर ब्रह्मापर्यंत नेऊन आतां पुरी करितात–" पण अन्नापासून भूतें होतात, अन्न पर्जन्यापासून, पर्जन्य अपूर्वाख्य यज्ञापासून होतो व अपूर्व पुरुषाच्या शरीरेंद्रियव्यापारापासून होतें, ही परंपरा व वरील परंपरा यांचा काय संबंध ? परमात्म्यापासून सर्व भूतें झालीं, त्यापासून शरीरें झालीं, स्थूल शरीर हाच अन्नमय कोश आहे, त्याच्या आंत प्राणमय कोश आहे, त्याच्या आंत मनोमय कोश आहे, मनोमयाच्या आंत विज्ञानमय व विज्ञानमयाच्या आंत आनंदमय कोश आहे, त्याचा आधार ब्रह्म आहे, इत्यादि ब्रह्मोपदेशप्रकरणाचा व येथील कर्मप्रकरणाचा वस्तुतः कांहीं संबंध नाहीं. पण तेथील 'ओषधीभ्योऽन्न अन्नात्पुरुषः' ( तैत्तिरीयोपनिषद्भाष्यार्थ पृ. ९८ पहा ) हें वाक्य व येथील 'अन्नाद्भवन्ति भूतानि' हें वाक्य हीं दोन्हीं एकसारखींच आहेत, एवढें पाहतांच रहस्यकार त्यांची सांगड घालण्यास तयार झाले. बादरायणसंबंध म्हणून जो म्हणतात तो हाच होय. आधुनिकांच्या चिकित्सेचा किंवा तुलनात्मक पद्धतीचा हा एक मासला आहे. पण येथील परंपरेला आकाशादि भूतें व पंचकोश यांच्या परंपरेशीं भिडविण्याचें कांहींच कारण नाहीं. तर आतां पूर्व परंपरेला धरून कर्म कोठून आलें ? तें सांगणें प्राप्त आहे. वेदविहित कर्मच अपूर्वोत्पादक आहे, असेंच भगवानांना येथें विवक्षित असणार, यांत शंका नाहीं. कारण वेदच धर्मविषयीं प्रमाण आहे, इतर पाखंडशास्त्रें धर्मविषयामध्यें प्रमाण नाहींत, हेंच वैदिक धर्माचा उपदेश करणाऱ्या भगवानांना इष्ट असणें साहजिक आहे. यास्तव अपूर्व उत्पन्न करणारें कर्म तरी कोठून आलें? तर तें वेदापासून प्राप्त झालें, असें सांगावयास पाहिजे व भगवानांनींही तेंच या श्लोकांत सांगितलें आहे. पण रहस्यकार म्हणतात–" कर्माची उत्पत्ति ब्रह्मापासून म्ह० प्रकृतीपासून आहे, असें जाण; आणि हें ब्रह्म अक्षरापासून म्ह० परमेश्वरापासून निघालें आहे. म्हणून सर्वगत ब्रह्मच नेहमीं यज्ञांत अधिष्ठित असतें ( असें समज ) " हा श्लोकार्थ कोणाला कळत असेल तो कळो ! आम्हाला तर त्यापासून कांहींच बोध होत नाहीं. कारण ब्रह्मशब्दाचा प्रकृति असा अर्थ विनाकारण करून पुनः त्या प्रकृतीपासून म्हणजे शरीरेंद्रियांपासून अशी जरी लक्षणा केली व प्रकृतीपासून कर्माची उत्पत्ति आहे असें क्षणभर मानलें तरी 'आणि हें ब्रह्म म्ह० प्रकृति अक्षरापासून म्ह० परमेश्वरापासून निघालें आहे. ' याचा अर्थ काय ? व प्रकृति परमेश्वरापासून निघाली म्ह० काय झालें ? व मग तिला सादि म्हणावयाचें कीं काय ? परमेश्वरापासून निघालेली प्रकृति सादि आहे, असें जर म्हटलें तर 'प्रकृतिं पुरुषं चैव विद्ध्यनादी उभावपि-' १३-१९ म्ह० प्रकृति व पुरुष हीं दोन्हीं अनादी जाण, या वचनाची वाट काय ? तसेंच ' तस्मात्- ' म्हणून ' सर्वगत- ' सर्वगत ' ब्रह्म- ' ब्रह्मच ' नित्यं- ' नेहमीं ' यज्ञे- ' यज्ञांत ' प्रतिष्ठितं- ' अधिष्ठित असतें हा जरी सरळ अर्थ असला तरी त्याचा भावार्थ काय ? ' म्हणून ' हा शब्द कोणत्या कोणत्या पूर्वप्रकृत अर्थाचा उपसंहार करतें ? 'म्हणून सर्वगत' पण म्हणून म्हणजे काय ? कांहीं कळत नाहीं. तसेंच सर्वगत ब्रह्म म्ह० प्रकृति–नेहमीं यज्ञांत अधिष्ठित कशी असते ? प्रकृति यज्ञांत कशी अधिष्ठित असणार ? त्यापेक्षां 'कर्म वेदविहित आहे. वेद अक्षर परमात्म्यापासून

# एवं प्रवर्तितं चक्रं नानुवर्तयतीह यः। अघायुरिन्द्रियारामो मोघं पार्थ स जीवति ॥ १६ ॥

झाला आहे. तो साक्षात् परमेश्वरापासून झालेला असल्यामुळें सर्वविषयप्रकाशक आहे व सर्वविषयप्रकाशक असल्यामुळे वेद सर्वगत जरी असला तरी यज्ञाचे प्राधान्यानें विधान करतो,' हा अर्थ किती सुबोध व सयुक्तिक आहे. पण रहस्यकारांना तो आवडत नाहीं. ते म्हणतात "कोणी ब्रह्मशब्दाचा प्रकृति असा अर्थ न करतां वेद असा करितात... पण सर्वगत ब्रह्म यज्ञात आहे, याचा अर्थ त्यानें नीट लागत नाहीं. म्हणून 'ममयोनिर्महत् ब्रह्म' १४-३ येथील ब्रह्मशब्दाप्रमाणे येथेंही ब्रह्मशब्दाने जगाची मूलभूत प्रकृति विवक्षित आहे." पण चवदाव्या अध्यायांत 'मम योनिः महद्ब्रह्म' असे प्रकृत आहे. तेथें सर्व भूतांचें उत्पत्तिस्थान सांगण्याचा प्रसग आहे. म्हणून तेथें ब्रह्मशब्दाचा प्रकृति हाच अर्थ करणें, योग्य आहे. पण येथें कर्म म्ह० कर्त्याचा व्यापार कसा होतो, तर वेदविधाने होतो, व वेद कोठून आला? तर साक्षात् परब्रह्मापासून झाला, असे कर्माचे निमित्त सांगावयाचें आहे. त्यामुळें येथे तसा अर्थ करता येत नाही. ब्रह्म म्ह० प्रकृति असा अर्थ केल्यास व तिला परमेश्वरापासून निघालेली म्हटल्यास तिचें अनादित्व नष्ट होतें. शिवाय ती यज्ञांत अधिष्ठित कशी? मूळ प्रकृतीपासून अपूर्वोत्पादक कर्म कसे होते, व ती सर्वगत कशी? याचाही उलगडा होत नाहीं. रहस्यकार—"महाभारताच्या शांतिपर्वांतील यज्ञप्रकरणांतील 'अनुयज्ञं जगत्सर्वं यज्ञश्चानुजगत्सदा' या वचनाचीही ब्रह्म म्ह० प्रकृति असा अर्थ केल्यानें प्रस्तुत श्लोकाशीं एकवाक्यता होते," ६५१ असें म्हणतात. पण 'यज्ञामागून जग व जगाच्या मागोमाग यज्ञ' असाच त्या वचनाचा अर्थ जरी केला तरी त्यात या श्लोकांतील ब्रह्मशब्दाचा प्रकृति असाच अर्थ केला पाहिजे, असे कोणतें गमक-सूचक पद आहे. यज्ञ म्ह० अपूर्व असा अर्थ केल्यानेंही अपूर्वरूप यज्ञ व जगत् यांचा परस्पर कार्यकारणभाव उत्तमप्रकारें सिद्ध होतो. त्यात ब्रह्म किंवा प्रकृति यांचा कांहींच संबध दिसत नाहीं. शेवटीं रहस्यकार म्हणतात—"परमेश्वरापासन प्रकृति व त्रिगुणात्मक प्रकृतीपासून जगातील सर्व कर्म कसें निष्पन्न होते हे रहस्याच्या सातव्या व आठव्या प्रकरणांत सविस्तर सांगितले आहे." पण 'परमेश्वरापासून प्रकृति होते' या म्हणण्यास वेदान्त व सांख्य यांतील कोणत्याच दर्शनांत आधार नाहीं. प्रकृतीला उपनिषदांतही 'अजा' म्हटलें आहे व सांख्य दर्शनातही 'अजा-मूलप्रकृतिः अविकृतिः' असें म्हटलें आहे. त्यामुळें 'परमेश्वरापासून प्रकृति निष्पन्न होते,' हे म्हणणें वरोबर नाहीं. सातव्या व आठव्या प्रकरणांत रहस्यकारांनीं प्रकृतिपुरुषादिकांविषयीं बराच विचार केला आहे. पण त्यांतही पृ. १७६ "प्रकृति व पुरुष दोन्ही स्वयंभू व अनादि" असेंच म्हटलें आहे. अगदी शेवटी रहस्यकार म्हणतात—'तसेंच देवांनी प्रथम यज्ञ करूनच सृष्टि निर्माण केली असें पुरुषसूक्तांतही वर्णन आहे' पण त्याचा व येथील ब्रह्मशब्दाच्या प्रकृति या अर्थाचा काय संबंध आहे? शिवाय सृष्टि देवांनीं केली असें त्यांत म्हटलें आहे का? आम्हाला तर आजवर सृष्टिकर्ता एक विराट् प्रजापति ब्रह्माच ठाऊक आहे! देवांनीं सृष्टि केली हा आम्हांला तरी नवीनच शोध आहे.

**अन्वयार्थ—हे पार्थ**—हे अर्जुना !—**एवं**—वर वर्णन केल्याप्रमाणें ईश्वरानें **प्रवर्तितं**—प्रवृत्त केलेलें—**चक्रं**—जगच्चक्र—**इह**—या लोकीं—**यः**—जो कर्माधिकारी—**न अनुवर्तयति**—तसेंच पुढें चालवीत नाहीं—**सः**—तो—**अघायुः**—पापी आहे. त्याचें जिणें पापरूप आहे.—**इन्द्रियारामः**—त्याची सर्व क्रीडा इन्द्रियांच्या योगानें विषयांमध्यें होते. तो—**मोघं**—वृथा-फुकट—**जीवति**—जिवंत राहतो. १६.

**एवमिति । एवमित्थमीश्वरेण वेदयज्ञपूर्वकं जगच्चक्रं प्रवर्तितं नानुवर्तयतीह लोके यः कर्मण्यधिकृतः सन्नघायुरघं पापमायुर्जीवनं यस्य सोऽघायुः पापजीवन इति यावत् इन्द्रियाराम इन्द्रियैराराम आरमणमाक्रीडा विषयेषु यस्य स इन्द्रियारामो मोघं वृथा हे पार्थ स जीवति । तस्मादज्ञेनाधिकृतेन कर्तव्यमेव कर्मेति प्रकरणार्थः ॥**

**भाष्यार्थ**—अधिकारी पुरुषानें अध्ययनादिकांच्या द्वारा जगच्चक्राचे अनुवर्तन करावें नाहीं तर ईश्वराच्या आज्ञेचें उल्लंघन करणाऱ्या त्याला प्रत्यवाय लागतो असें—**एवं इति**—'एवं०' इत्यादि श्लोकानें भगवान् सांगतात.—**एवं-इत्थं ईश्वरेण वेदयज्ञपूर्वकं जगच्चक्रं प्रवर्तितं**—याप्रमाणे ईश्वरानें वेद-यज्ञ इत्यादिकांच्या द्वारा जगच्चक्र प्रवृत्त केले आहे.—**इह लोके यः कर्मणि अधिकृतः सन् न अनुवर्तयति**—या लोकीं जो कर्मामध्ये अधिकृत असून-कर्माधिकारी असून त्या जगच्चक्राला तसेंच पुढें चालवीत नाहीं, त्याचे अनुवर्तन करीत नाहीं तो—**अघायुः अघं-पापं आयुः-जीवनं यस्य सः अघायुः पापजीवनः इति यावत्**—अघायु आहे. अघ म्ह० पाप व आयुः म्ह० जीवन. ज्याचे जीवन पाप आहे तो आघायु म्ह० पापजीवन असा याचा भावार्थ.—**इन्द्रियारामः-इन्द्रियैः विषयेषु आरामः आरमणं-आक्रीडा यस्य सः इन्द्रियारामः**—इंद्रियांच्या योगानें विषयांमध्ये ज्याचा आराम-आरमण-क्रीडा चालते तो इंद्रियाराम होय.—**हे पार्थ सः मोघं-वृथा जीवति**—हे अर्जुना तो व्यर्थ जिवंत राहतो. ('न कर्मणामनारंभात्०' श्लो. ४ येथून प्रस्तुत श्लोकापर्यंत सांगितलेल्या विषयाचा आचार्य उपसंहार करितात-)—**तस्मात् अज्ञेन अधिकृतेन कर्म कर्तव्यं एव इति प्रकरणार्थः**—म्हणून अज्ञ अधिकृत पुरुषानें कर्म करावेंच हा या प्रकरणाचा अर्थ आहे.

**प्रागात्मज्ञाननिष्ठायोग्यताप्राप्तेस्तादर्थ्येन कर्मयोगानुष्ठानमधिकृतेनानात्मज्ञेन कर्तव्यमेवेत्येतत् 'न कर्मणामनारम्भात्' इत्यत आरभ्य 'शरीरयात्राऽपि च ते न प्रसिद्ध्येदकर्मणः' इत्येवमन्तेन प्रतिपाद्य 'यज्ञार्थात्कर्मणोऽन्यत्र' इत्यादिना 'मोघं पार्थ स जीवति' इत्येवमन्तेनापि ग्रन्थेन प्रासङ्गिकमधिकृतस्यानात्मविदः कर्मानुष्ठाने बहुकारणमुक्तं तदकरणे च दोषसंकीर्तनं कृतम् ॥ १६ ॥**

**भाष्यार्थ**—('अहो पण शास्त्रानें अधिकार दिलेल्या प्रत्येकाला कर्म करणें जर अवश्यच आहे तर 'अज्ञेन अधिकृतेन' असें म्हणून 'अज्ञ' हें आणखी विशेषण कशाला

लावतां ? ज्ञाननिष्ठालाही तें केलेंच पाहिजे. कारण तोही अधिकृतच आहे.' अशी आशंका घेऊन पूर्वी सांगितलेल्या कारणाचाच अनुवाद करितात-)—**आत्मज्ञाननिष्ठायोग्यताप्राप्तेः प्राक् अधिकृतेन अनात्मज्ञेन तादर्थ्येन कर्मयोगानुष्ठानं कर्तव्यं एव इति एतत्**—आत्मज्ञाननिष्ठेची योग्यता प्राप्त होण्यापूर्वी शास्त्रानें अधिकार दिलेल्या अनात्मज्ञानें आत्मज्ञाननिष्ठायोग्यता प्राप्त होण्यासाठीं कर्मयोगाचें अनुष्ठान करावेंच, असें—**'न कर्मणां अनारम्भात्०' इत्यतः आरभ्य 'शरीरयात्राऽपि च ते न प्रसिद्ध्येदकर्मणः' इति एवं-अन्तेन प्रतिपाद्य**—'कर्माच्या आरंभावांचून पुरुषाला नैष्कर्म्याची प्राप्ति होत नाहीं' (श्लो.४) येथून 'तुझी शरीरयात्राही कर्मावांचून चांगल्या प्रकारें सिद्ध होणार नाहीं' ( श्लो. ८ ) येथपर्यंतच्या ग्रंथानें प्रतिपादन करून [ ज्ञान व कर्म यांचा विरोध असल्यामुळें ज्ञाननिष्ठ पुरुषाला कर्म करणें शक्य नाहीं. ( पृ. ४७ पहा ) यास्तव ज्याला आत्म्याचा साक्षात् अनुभव आलेला नाहीं, अशा पुरुषानेंच चित्तशुद्धि, ज्ञानप्राप्ति इत्यादि परंपरेनें साक्षात्कारासाठीं कर्माचें अनुष्ठान करावें, असें प्रतिपादन केलें आहे. तर मग 'यज्ञार्थात्कर्मणोऽन्यत्र०' श्लो. ९ इत्यादि कशासाठीं सांगितलें आहे ? त्यांत कांहीं ज्ञाननिष्ठा सांगितलेली नाहीं. कर्मनिष्ठा तर त्या पूर्वीच ( ४-८ श्लोकांत ) सांगितली आहे, तेव्हां पुनः तीच सांगण्याचें कांहीं कारण नाहीं अशी शंका घेऊन आचार्य सांगतात-]—**'यज्ञार्थात्कर्मणोऽन्यत्र०' इत्यादिना 'मोघं पार्थ स जीवति' इत्येवमन्तेन अपि ग्रन्थेन अधिकृतस्य अनात्मविदः कर्मानुष्ठाने प्रासंगिकं बहुकारणं उक्तं**—'ईश्वराच्या आराधनेसाठीं केलेल्या कर्मावांचून बाकीचें कर्म जीवाला बद्ध करतें' (९) येथून 'हे पार्था ! तो व्यर्थ जिवंत राहतो' ( १६ ) येथपर्यंतच्या ग्रंथानेंही कर्माधिकृत अनात्मज्ञाच्या कर्मानुष्ठानाविषयीं-अज्ञाला कर्म अवश्य केलेंच पाहिजे, हें सांगण्याच्या प्रसंगानें ईश्वराचा प्रसाद, देवतांची प्रीति इत्यादि अनेक कारणें सांगितलीं.—**च तद्-अकरणे दोषसंकीर्तनं कृतम्**—आणि तें न करण्यांत कोणता दोष लागतो, ते('तैर्दत्तानप्रदायैभ्यः०' 'मोघं पार्थ स जीवति-' इत्यादि वाक्यांनीं ) सांगितलें. १६.

---

१ पण रहस्यकार याला यज्ञाचें चक्र किंवा कर्माचें चक्र म्हणतात. आचार्य जगच्चक्र म्हणतात. प्रजापतीनें जगाला उत्पन्न केलें व त्याच्या स्थितीसाठीं त्याला कर्म लावून दिलें. वेद परमेश्वरापासून झाला. त्या वेदावरून कर्माचें ज्ञान होतें, कर्मानें अपूर्व उत्पन्न होतें, त्या अपूर्वापासून पर्जन्य, पर्जन्यापासून अन्न, अन्नापासून प्राणिशरीरें, प्राणिशरीरें हेंच जगत्, त्यापासून पुनः कर्म, कर्मापासून अपूर्व, अपूर्वापासून पर्जन्य, पर्जन्यापासून अन्न व अन्नापासून पुनः प्रजा, असें हें चक्र आहे. त्याला कर्मापासून किंवा यज्ञापासून आरंभ होत नाहीं. जगद्रूप शरीरांपासून आरंभ होतो, म्हणून या चक्राला जगच्चक्र म्हणणेंच अधिक सयुक्तिक होय. यास्तव जो कर्माधिकारी कर्मानुष्ठानानें त्याचें अनुवर्तन करीत नाहीं तो पापी होय. रहस्यकार या श्लोकावरील टीपेंत 'यज्ञमय कर्म म्ह० चातुर्वर्ण्याची वृत्ति' असा अर्थ करितात. पण तो बरोबर नाहीं. कर्म म्ह० चातुर्वर्ण्याचा धर्म होय, वृत्ति नव्हे. धर्मांतच ब्राह्मणादिकांच्या वृत्तीचाही अन्तर्भाव होतो. पण वृत्तींत धर्माचा अन्तर्भाव कधींच होत

**एवं स्थिते किमेवं प्रवर्तितं चक्रं सर्वेणानुवर्तनीयमाहोस्वित्पूर्वोक्तकर्मयोगानुष्ठानोपायप्राप्यामनात्मविदा ज्ञानयोगेनैव निष्ठामात्मविद्भिः सांख्यैरनुष्ठेयामप्राप्तैनैवेत्येवमर्थमर्जुनस्य प्रश्नमाशङ्क्य स्वयमेव वा शास्त्रार्थस्य विवेकप्रतिपत्त्यर्थमेतं वै तमात्मानं विदित्वा निवृत्तमिथ्याज्ञानाः सन्तो ब्राह्मणा मिथ्याज्ञानवद्भिरवश्यं कर्तव्येभ्यः पुत्रैषणादिभ्यो व्युत्थायाथ भिक्षाचर्यं शरीरस्थितिमात्रप्रयुक्तं चरन्ति, न तेषामात्मज्ञाननिष्ठाव्यतिरेकेणान्यत्कार्यमस्तीत्येवं श्रुत्यर्थमिह गीताशास्त्रे प्रतिपिपादयिषितमाविष्कुर्वन्नाह भगवान्—यस्त्विति ॥**

**भाष्यार्थ—' एवं स्थिते '**—याप्रमाणे कर्माधिकारी पुरुषानें नियत कर्म केलेंच पाहिजे, असें सिद्ध झाले असतां—**किं एवं प्रवर्तितं चक्रं सर्वेण अनुवर्तनीयं**—काय, हे याप्रमाणे ईश्वरानें प्रवृत्त केलेले चक्र प्रत्येकाने चालविले पाहिजे,—**आहोस्वित् पूर्वोक्तकर्मयोगानुष्ठान-उपायप्राप्यां आत्मविद्भिः सांख्यैः अनुष्ठेयां ज्ञानयोगेन एव निष्ठां अप्राप्तेन अनात्मविदा एव**—की पूर्वोक्त कर्मयोगानुष्ठान याच उपायाने प्राप्त होणारी व आत्मवेत्त्या सांख्यांनी अनुष्ठान करण्यास योग्य असलेली अशी जी ज्ञानयोगानेच निष्ठा तिला प्राप्त न झालेल्या अनात्मज्ञानेच फक्त त्या चक्राचे अनुवर्तन करणे उचित आहे ?—**इत्येवं अर्थं अर्जुनस्य प्रश्नं आशंक्य**—अशा प्रकारचा अर्थ ज्यांत आहे अशा अर्जुनाच्या प्रश्नाची आशंका घेऊन [ म्ह० अशा आशयाचा प्रश्न अर्जुन करील, असे जाणून भगवान् ' यस्तु० ' इत्यादि सांगत आहेत ' किंवा अनात्मज्ञाने कर्म अवश्य केलेच पाहिजे, असे पुष्कळ कारणांसह सांगितल्यामुळें अर्जुन अशी शंका घेणार नाही, असे समजून आचार्य या श्लोकाला दुसरे अवतरण देतात-]—**वा शास्त्रार्थस्य विशेषप्रतिपत्त्यर्थं**—किंवा शास्त्रार्थाचा विशेष उत्तमप्रकारे ध्यानात यावा म्हणून—**स्वयं एव भगवान्**—स्वतःच भगवान् श्रीकृष्ण—**एतं वै तं आत्मानं विदित्वा निवृत्तमिथ्याज्ञानाः सन्तः ब्राह्मणाः**—याच प्रकृत आत्म्याला साक्षात् जाणून ज्यांचे मिथ्या ज्ञान निवृत्त झाले आहे, असे होत्साते ब्राह्मण

---

नाही, असो. " मीमांसकाचे किंवा त्रयी धर्मातले कर्मकांड ( यज्ञचक्र ) गीताधर्मात अनासक्तबुद्धीच्या युक्तीनें कसे कायम ठेवले आहे, ते सांगितले" ६५१ असे रहस्यकार म्हणतात. पण तें बरोबर नाही. त्रयी धर्मातलें कर्मकांडच जर गीताधर्मांत कायम ठेवले असते तर 'एवं त्रयीधर्म अनुप्रपन्ना गतागत कामकामा लभन्ते' अ. ९ श्लो. २१ असे म्हटले नसते. उपनिषदाप्रमाणेच गीतेत त्यातील फक्त नित्य (नियत) कर्मच अनासक्त बुद्धीनें करावयास सांगितले आहे. सर्वच त्रयी धर्म करावयास सांगितलेला नाही. कारण त्रयी धर्म स्वर्गप्राप्त्यर्थ आहे व उपनिषद्धर्म किंवा गीताधर्म परंपरेने मोक्षप्राप्तीसाठी आहे.

१ संन्यासासह आत्मज्ञान हेच मुक्तीचें साधन आहे, हाच गीताशास्त्राचा प्रतिपाद्य विषय आहे, दुसरा कोणताही। म्ह० ज्ञानकर्मसमुच्चयाने मुक्ति, हा गीताशास्त्राचा विषय नाही, किंवा केवळ कर्माने मुक्ति हाही त्याचा विषय नाही, असा निश्चयपूर्वक विवेक करण्यासाठी येथें भगवान् श्रुत्यर्थ सांगत आहेत. २ श्रुतीत ' ब्राह्मणाः ' असे पद आहे. ब्राह्मणांनाच संन्यासाचा मुख्य अधिकार आहे, असे सुचवावें हाच त्याचा आशय आहे.

**—मिथ्याज्ञानवद्भिः अवश्यं कर्तव्येभ्यः पुत्रैषणादिभ्यः व्युत्थाय**—मिथ्या ज्ञानानें युक्त असलेल्या अनात्मज्ञांकडून अवश्य कर्तव्य अशा पुत्रैषणादि एषणांपासून व्युत्थान करून म्ह० त्यांचा त्याग करून—**अथ शरीरस्थितिमात्रप्रयुक्तं भिक्षाचर्यं चरन्ति**—नंतर केवल शरीराच्या स्थितीलाच अवश्य असलेलें भिक्षाचर्य–भिक्षाटन करितात.—**तेषां आत्मज्ञाननिष्ठाव्यतिरेकेण अन्यत् कार्यं न अस्ति**—त्यांचें आत्मज्ञाननिष्ठेवांचून दुसरें कांही कर्तव्य नसतें—**इत्येवं इह गीताशास्त्रे प्रतिपिपादयिषितं श्रुत्यर्थं आविष्कुर्वन् 'यस्तु०' इति आह**—अशा प्रकारचा हा या गीताशास्त्रांत प्रतिपादन करण्यास इष्ट असलेला श्रुतीचा अर्थ प्रकट करीत होत्साते 'यस्तु० इत्यादि सांगतात. [म्हणजे अर्जुनाने वर सांगितलेल्या प्रकारची शंका घेतली नसतांनाच स्वतः भगवान् आपण होऊनच या गीताशास्त्रांत विवक्षित असलेला श्रुत्यर्थ स्पष्ट करण्यासाठीं 'यस्तु०' इत्यादि सांगत आहेत. बृहदरण्यकांत असे सांगितलें आहे–"या प्रस्तुत आत्म्याला साक्षात् जाणून ज्यांचें मी देह आहें, कर्ता, सुखी, दुःखी आहे इत्यादि विपरीत ज्ञान निवृत्त झाले आहे, असे ब्राह्मण मिथ्याज्ञानानें युक्त असलेल्या अज्ञांस अवश्य कर्तव्य असलेलीं जी कर्में–पुत्रादिकांच्या प्राप्तीचीं साधनें–ती सर्व सोडून शरीर जिवंत रहावे, म्हणून अत्यंत अवश्य तेवढेच अन्न मिळविण्यासाठीं भिक्षाटन करितात. अशा ज्ञानी ब्राह्मणांना आत्मज्ञाननिष्ठेवांचून दुसरें कांही एक कर्तव्य नसते." बृ. भाष्यार्थ अ. ३ पृ. १३५ हाच श्रुत्यर्थ भगवानांना गीतेंतही प्रतिपादन करावयाचा आहे. म्हणून तोच स्पष्ट करण्यासाठीं असें म्हणतात–]

**यस्त्वात्मरतिरेव स्यादात्मतृप्तश्च मानवः ।**
**आत्मन्येव च संतुष्टस्तस्य कार्यं न विद्यते॥ १७ ॥**

---

१ पुत्रादिकांविषयींच्या एषणा म्ह० इच्छा क्लेश देणाऱ्या जरी असल्या तरी 'शरीरच मी, माझा हा संसार, तो सत्य आहे, मी कर्ता–भोक्ता आहे, असे मिथ्या अज्ञान ज्याच्या ठिकाणी असतें त्यांना त्या अवश्य होतात, ते पुत्रादिकांच्या इच्छा करितात. पण ज्यांचें हें मिथ्या अज्ञान आत्मज्ञानाने निवृत्त झालेलें असतें ते ज्ञानी त्या एषणांपासून निवृत्त होतात.'मग ते भिक्षाटन तरी कां करितात ?' म्हणून म्हणाल तर शरीरस्थितीला ते अत्यंत अवश्य आहे, म्हणून करितात. पण त्याविषयींही 'यदृच्छालाभसंतुष्टः' इत्यादि नियम आहेतच. 'शरीरस्थितीसाठीं जसें भिक्षाटण करितात, तसेंच त्यांना अग्निहोत्रादिकही केलेंच पाहिजे,' म्हणून म्हणाल तर श्रुतीने त्यांना ज्ञाननिष्ठेवाचून दुसरें कांहीं कर्तव्य सांगितलेले नाही. गीताशास्त्राचा पूर्वापार संबंध कसा आहे, याचा विचार केला म्हणजे त्यांतही भगवानांना हाच श्रुत्यर्थ इष्ट आहे व तोच येथे विशद करावयाचा आहे, अशी खात्री होते. अर्थात् 'वरील गीताग्रंथात वर्णन केल्याप्रमाणें जिवंत मनुष्याला कर्म अवश्य केलेंच पाहिजे, असा जर नियम आहे तर तुम्हीच वर ज्ञानयोगाने सांख्यांची निष्ठा (श्लो. ३) कशी सांगितली आहे ?' या शंकेचा परिहार वरील श्रुत्यर्थाला प्रकट करून, त्याच्या द्वाराच पुढील दोन श्लोकांत करीत आहेत.

**अन्वयार्थ—तु**—पण याच्या उलट—**यः मानवः**—जो मनुष्य, अर्थात् सांख्य -आत्मज्ञाननिष्ठ—**आत्मरतिः एव**—आत्मरतिच असतो म्ह० त्याची रति आत्म्यामध्येंच असते,—**च**—व—**आत्मतृप्तः**—आत्मस्वरूपांतच तृप्त असतो—**च**—आणि —**आत्मनि एव संतुष्टः**—आत्म्यामध्येच संतुष्ट असतो—**तस्य**—त्याला—**कार्यं** कांहीं शास्त्रविहित कर्तव्य—**न विद्यते**—नसतें. १७.

**यस्तु सांख्य आत्मज्ञाननिष्ठ आत्मरतिरात्मन्येव रतिर्न विषयेषु यस्य स आत्मरतिरेव स्याद्भवेदात्मतृप्तश्चाऽऽत्मनैव तृप्तो नान्नरसादिना मानवो मनुष्यः संन्यास्यात्मन्येव च संतुष्टः। संतोषो हि बाह्यार्थलाभे सर्वस्य भवति तमनपेक्ष्याऽऽत्मन्येव च संतुष्टः सर्वतो वीततृष्ण इत्येतत्। य ईदृश आत्मवित्तस्य कार्यं करणीयं न विद्यते नास्तीत्यर्थः ॥ १७ ॥**

**भाष्यार्थ**—( आत्मनिष्ठ पुरुषाच्या ठिकाणीं विषयासक्ति नसते, यास्तव जो जिज्ञासु असेल त्यानेंही विषयासक्ति सोडावी, असें सांगून भगवान् म्हणतात-)—**तु**—पण याच्या उलट—**यः सांख्यः आत्मज्ञाननिष्ठः**—जो सांख्य म्ह० आत्मज्ञाननिष्ठ—**आत्मरतिः-यस्य आत्मनि एव रतिः न विषयेषु सः आत्मरतिः एव स्यात्-भवेत्**—आत्मरति म्ह० ज्याची आत्म्यामध्येच रति म्ह० प्रीति असते विषयांमध्यें नसते तो आत्मरति. जो सांख्य असा आत्मरतिच असतो ( आत्मज्ञ ज्ञानानेंच म्ह० आत्मस्वरूपानेंच तृप्त असतो, त्याला अन्न-पानादिकांनीं होणारी तृप्ति इष्ट नसते म्हणून विद्यार्थी संन्याश्यालाही अन्नरसादिकामध्यें आसक्ति ठेवणें उचित नाहीं, असें सांगतात-)—**च आत्मतृप्तः-आत्मना एव तृप्तः अन्नरसादिना न**—आणि जो आत्मतृप्त म्ह० आत्म्याच्या योगानें-ज्ञानानेंच तृप्त आहे, अन्नरसादिकानें नव्हे-**मानवः-मनुष्यः-संन्यासी**—असा मानव म्ह० मनुष्य, पण वाटेल तो मनुष्य नव्हे तर संन्यासी. ( आत्मज्ञाच्या ठिकाणीं सर्व अनात्म पदार्थांविषयीं वैराग्य दिसतें, यास्तव ज्ञानेच्छूनेंही विरक्त व्हावें.-)—**आत्मनि एव च संतुष्टः**—आणि आत्म्यामध्येच जो संतुष्ट असतो—**बाह्यार्थलाभे सर्वस्य संतोषः भवति हि**—बाह्य विषयाच्या लाभानें सर्व प्राण्यांना संतोष होतो, हे प्रसिद्ध आहे,—**तं अनपेक्ष्य आत्मनि एव च संतुष्टः**—त्या बाह्य विषयजन्य संतोषाची अपेक्षा न करितां आत्म्यामध्येंच जो संतुष्ट असतो—**सर्वतः वीततृष्णः इति एतत्**—म्ह. सर्व विषयांविषयीं तृष्णारहित ज्ञा-

---

१ इष्ट विषयाचें दर्शन झालें असतां जो आनंद होतो तो मोद, त्याचा लाभ झाला असतां जो आनंद होतो तो प्रमोद व त्याचा भोग घेतला असतां जो आनंद होतो तो आनंद, असे एकाच आनंदाचे तीन प्रकार तैत्तिरीयोपनिषदांत सांगितले आहेत. (तैत्तिरीयभाष्यार्थ अ. २ अनु. ५ पृ. १२२ पहा ) तसेंच, येथे रति, तृप्ति व संतोष हे संतोषाचे अवांतर भेद आहेत. किंवा रति म्ह० विषयासक्ति, तृप्ति म्ह० विशेषप्रकारच्या विषयाच्या संसर्गानें होणारें सुख व संतोष म्ह० कोणताही इष्ट विषय प्राप्त झाल्यानें होणारे सामान्य सुख, असा त्यांचा भेद जाणावा.

लेला असा याचा भावार्थ. ( अहोपण जो आत्मरति, आत्मतृप्त व आत्म्यामध्येंच संतुष्ट असतो त्यालाही मुक्तीसाठीं कांही कर्तव्य असेल कीं नाहीं ? उत्तर-)—**यः ईदृशः आत्मविद् तस्य कार्यं-करणीयं न विद्यते-नास्ति इत्यर्थः**—जो अशा प्रकारचा आत्मवेत्ता त्याला कार्य म्ह० कर्तव्य नसतें, तो सर्वकर्तव्यशून्य असतो, असा भावार्थ. १७.

**नैव तस्य कृतेनार्थो नाकृतेनेह कश्चन ।**
**न चास्य सर्वभूतेषु कश्चिदर्थव्यपाश्रयः ॥ १८ ॥**

**अन्वयार्थ—इह**—या लोकीं—**तस्य**—त्याच्या—**कृतेन**—केलेल्या कर्मानें—**अर्थः**—कांही फल—**न अस्ति**—नाहीं. त्याचप्रमाणें त्याच्या—**अकृतेन**—न केलेल्या कर्मानें—**कश्चन**—कोणत्याही प्रकारचा—**अर्थः**—प्रत्यवाय—**न**—नाहीं.—**च**—आणि—**अस्य**—या सांख्याचा—**सर्वभूतेषु**—ब्रह्मादिस्तंबपर्यंत सर्वभूतांतील—**कश्चित्**—कोणीही—**अर्थव्यपाश्रयः**—प्रयोजनाचा आश्रय—**न अस्ति**—नाही. ( त्याला स्वतःकरितां जरी नाही तरी या सृष्टीतील दुसऱ्या कोणाकरितां तरी काही फळ कर्माने साधावयाचे असतें, असेंही नाही. ) १८.

**किंच—नैवेति । नैव तस्य परमात्मरतेः कृतेन कर्मणाऽर्थः प्रयोजनमस्ति । अस्तु तर्ह्यकृतेनाकरणेन प्रत्यवायाख्योऽनर्थो नाकृतेनेह लोके कश्चन कश्चिदपि प्रत्यवायप्राप्तिरूप आत्महानिलक्षणो वा नैवास्ति । न चास्य सर्वभूतेषु ब्रह्मादिस्थावरान्तेषु भूतेषु कश्चिदर्थव्यपाश्रयः प्रयोजननिमित्तक्रियासाध्यो व्यपाश्रयो व्यपाश्रयणम् । कंचिद्भूतविशेषमाश्रित्य न साध्यः कश्चिदर्थोऽस्ति । येन तदर्था क्रियाऽनुष्ठेया स्यात् । न त्वमेतस्मिन्सर्वतःसंप्लुतोदकस्थानीये सम्यग्दर्शने वर्तसे ॥ १८ ॥**

**भाष्यार्थ—किं च 'नैव०' इति**—याही आणखी एका कारणानें त्याला कर्तव्य नसतें, असें ' नैव० ' या श्लोकानें सांगतात.—**परमात्मरतेः तस्य कृतेन कर्मणा अर्थः-प्रयोजनं न एव अस्ति**—परम अर्थ असा जो आत्मा त्याच्यामध्यें रत झालेल्या त्या आत्मनिष्ठाला केलेल्या कर्मानें अर्थ म्ह० प्रयोजन नसतेंच. ( आत्मज्ञाला स्वर्गादि अभ्युदयाची इच्छा नसते व निःश्रेयस तर पूर्वीच प्राप्त झालेलें असतें, त्यामुळें त्यानें केलेलें कर्म कांहीं कामाचें नाहीं, तें व्यर्थ आहे, आणि कोणतेंही वृथा कर्म उन्मत्तावांचून दुसरा कोणी करीत नाहीं.—**तर्हि अकृतेन-अकरणेन प्रत्यवायाख्यः अनर्थः अस्तु**—तर मग जगच्चक्र चालू राहण्यासाठी प्रत्येकाला अवश्य कर्तव्य असलेलें कर्म न केल्यामुळें त्याला प्रत्यवायप्राप्ति होईल, म्हणून म्हणावें तर—**अकृतेन इह लोके कश्चन-कश्चित् अपि प्रत्यवायप्राप्तिरूपः आत्महानिलक्षणः वा अनर्थः न एव अस्ति**—त्याने कर्म न केल्यानें या लोकीं कोणताही प्रत्यवायप्राप्तिरूप किंवा आत्महानिरूप अनर्थ नाहींच होत. (त्यामुळें त्या अनर्थांच्या निवृत्तीसाठींही त्याला कर्म करावयास नको.)—**च सर्वभूतेषु-ब्रह्मादिस्थावरान्तेषु भूतेषु अस्य**

**कश्चित् अर्थव्यपाश्रयः-प्रयोजननिमित्तक्रियासाध्यः व्यपाश्रयः-व्यपाश्रयणं न**—आणि सर्वभूतांतील-ब्रह्मादि-स्थावरान्त भूतांतील कोणीही अर्थव्यपाश्रय म्ह० प्रयोजनाचें-फलाचें निमित्त अशी जो क्रिया, तिच्या योगानें साध्य असा व्यपाश्रय म्ह० व्यपाश्रयण-आलंबन-आधार नाहीं. म्हणजे—**कंचित् भूतविशेषं आश्रित्य कश्चित् अर्थः साध्यः न अस्ति**—कोणत्याही विशेष भूताचा आश्रय करून साधावयाचा असा कोणताही अर्थ नाहीं. (आब्रह्मस्तंबपर्यंत जीं असंख्य भूतें आहेत त्यांतील एखाद्यासाठीं या आत्मवेत्त्याला कांहीं प्रयोजन कर्मानें साधावयाचें आहे, असेंही नाहीं.) —**येन तदर्था क्रिया अनुष्ठेया स्यात्**—कीं ज्या कारणानें त्या प्रयोजनासाठीं त्याला कर्म अवश्य कर्तव्य आहे, असें म्हणतां येईल. (तर मग मी सुद्धां तसाच आत्मरति वगैरे होऊन कर्म टाकीन, म्हणून म्हणशील तर हे अर्जुना, )—**त्वं एतस्मिन् सर्वतःसंप्लुतोदकस्थानीये सम्यक्-दर्शने न वर्तसे**—तूं या सर्वतःसंप्लुतोदक समुद्राच्या स्थानीं असलेल्या सम्यग्दर्शनांत—आत्मज्ञाननिष्ठेंत अवस्थित झालेला नाहींस. १८

---

१ आचार्यांनीं ‘ यस्त्वात्मरतिः०’ ( १७ ) या श्लोकाला, कोणतीं दोन अवतरणें दिलीं आहेत तें वर सांगितलें आहे. पण रहस्यकार १७–१९ अशा तीन श्लोकांचें एकवाक्य मानून त्याला असें अवतरण देतात–“ परंतु आत्मज्ञानी पुरुषास येथेंच मोक्ष प्राप्त होत असून जें काय मिळवावयाचें ते सर्व त्याला मिळालें असल्यामुळे त्याला या जगात कोणतेंच कर्म करण्याची जरूर रहात नाहीं, व त्याने करूंही नये, अशी कित्येक सन्यासमार्गीय वेदान्ती यावर शंका काढीत असतात, यासाठीं तीवर गीतेचें उत्तर काय तें आता पुढील तीन श्लोकांत सांगतात. ” ६५२ तर मग एकूण सन्यासमार्गी वेदान्ती गीतेच्या पूर्वी होते, असे यावरून सिद्ध होते. अर्थात् सन्यासमार्ग शंकराचार्यांनी सुरू केला, हे म्हणणे आतां शिल्लक राहिलें नाहीं. सन्यासमार्गीयांचा सांप्रदायिक आग्रह किंवा कोटी ही आचार्यांची नसून, त्यांच्या पूर्वीपासूनची आहेत, असें यावरून उघड होतें. कारण गीता त्यांच्या शंकेचें उत्तर पुढील तीन श्लोकात सांगत आहे. पण रहस्यकारांचा खरा कटाक्ष मात्र त्या प्राचीन संन्यासमार्गीयांवर नसून शंकराचार्यादिकांवर आहे, हे रहस्यवाचकांच्या लक्षांत आल्यावांचून राहणार नाहीं. यास्तव हे तीन श्लोक शंकराचार्यादिकांच्या शंकेचा अनुवाद करून तिचें उत्तर भगवान् गीतेत देत आहेत, अशी रहस्यकार या श्लोकांची व्यवस्था लावितात. पण ती बरोबर नाहीं. कारण अद्वैत वेदान्ती ‘आत्मज्ञानी पुरुषाला केवल चित्तशुद्ध्यर्थ असलेल्या अग्निहोत्रादि नित्य-नैमित्तिक कर्मांची ज्ञानोत्तर गरज नाहीं, त्यानें ज्ञानानंतर ज्ञाननिष्ठच होऊन रहावें,’ असें म्हणतात. तीच स्थितप्रज्ञावस्था किंवा जीवन्मुक्ति होय. फार काय पण ज्यांना आत्मसाक्षात्कार झालेला नाहीं, तो व्हावा, अशी मात्र तीव्र इच्छा आहे, अशा जिज्ञासूनेंही श्रवणादि ज्ञानसाधनांचें निर्विघ्नपणें अनुष्ठान करतां यावें म्हणून यथाशास्त्र कर्मांचा त्याग करावा, असेंही त्यांचें म्हणणें आहे, व तें श्रुति-स्मृति-पुराणांना सोडून नाहीं. किंबहुना गीतेलाही सोडून नाहीं. आचार्यांचें समग्र भाष्य अर्थासह वाचल्यावर त्याविषयीं कोणालाही संशय वाटणार नाहीं. असो; अद्वैतसंप्रदायी टीकाकारांच्या शंकेचा असा अनुवाद करून रहस्यकार श्लोकांचा अर्थ

असा करितात.—" परंतु जो मनुष्य केवळ आत्म्यांतच रत, आत्म्यांतच तृप्त आणि आत्म्याचे ठायीं संतुष्ट झाला त्याला ( स्वतःचें म्हणून ) कांही कार्य ( शिल्लक ) रहात नसतें १७ तसेंच येथें म्ह० या जगांत एखादी गोष्ट केल्यानें त्याचा कांही नफा नसतो आणि न केल्यानेंही नसतो आणि सर्व भूतांचे ठायीं त्याचा स्वतःचा म्हणून कांहीं अर्थ गुंतून राहिलेला नसतो. १८ तस्मात् म्ह० ज्ञानी पुरुष याप्रमाणें कसलीच अपेक्षा ठेवीत नसल्यामुळें तूंही ( फलाचे ठायीं ) आसक्ति न ठेवितां ( आपलें ) कर्तव्य कर्म नेहमीं करीत जा. कारण आसक्ति सोडून कर्म करीत असणाऱ्या पुरुषाला परम गति मिळते. १९ " आचार्यांनीं या तीन श्लोकांचा अर्थ कसा केला आहे, तो आतां वाचकांपुढें आहेच. अगदी सरळ ओढाताण न करितां गीतेचा अर्थ करण्याची भीष्मप्रतिज्ञा करणाऱ्या रहस्यकारांनी येथे काय केलें आहे तें पहा—' तस्य कार्यं न विद्यते—' त्याचें कर्तव्य विद्यमान नसते. त्याला कांही कर्तव्य उरत नाहीं, हा सरळ अर्थ टाकून त्याला ' स्वतःचें म्हणून ' हे आपल्या पदरचें घातलें आहे. १८ व्या श्लोकाच्या पूर्वार्धात ' त्याच्या कृत कर्माने कांहीं अर्थ-प्रयोजन-फल-उपयोग नाहीं व न केलेल्या कर्मानेही कांही अनर्थ-प्रत्यवाय नाहीं ' असे म्हटलेलें असतांना ' कृतेन म्ह० एखादी गोष्ट केल्यानें ' व ' अर्थ म्ह० नफा ' असा अगदी लौकिक अर्थ करून प्रकृत कर्म व त्याचें प्रयोजन या दोहोंनाही सोडून दिलें आहे. ' स्वतःसाठीं नाहीं तर नाहीं, पण दुसऱ्यासाठीं तरी त्याला कांहीं कर्तव्य असेल,' असें कोणी म्हणेल म्हणून त्याचें उत्तर भगवानांनी १८ व्या श्लोकांच्या उत्तरार्धांत त्याला ' दुसऱ्यासाठीही कांहीं कर्तव्य नसतें,' असें स्पष्ट सांगितलेले असतांना त्याला कसें शिताफीने बदलून टाकलें आहे तें पहा—" च अस्य सर्वभूतेषु कश्चित् अर्थव्यपाश्रयः न अस्ति—आणि सर्व भूतांचे ठायीं त्याचा स्वतःचा म्हणून कांहीं अर्थ गुंतून राहिलेला नसतो. " ' सर्व भूतांचे ठायी त्याचा कांही अर्थ गुंतून राहिलेला नसतो ' म्हणजे काय ? वर अर्थ म्ह० नफा म्हटलें आहे. तेव्हां ' त्याचा स्वतःचा कांहीं नफा सर्व भूतांचे ठायीं गुतून राहिलेला नसतो,' असे जरी म्हटलें तरी त्याचा आशय लक्षांत येत नाहीं. त्यापेक्षा आब्रह्मस्तबपर्यंत भूतातील कोणी एकही भूत त्याच्या प्रयोजनाचा आधार नसतो, त्यांतील कोणासाठींही त्याला कांहीं कर्तव्य नसते, हे म्हणणे किती सुबोध आहे ? पण इतका सुबोध अर्थ केल्यास १७ व्या श्लोकाच्या अर्थांत ' ( स्वतःचे म्हणून ) ' असे जे म्हटले आहे ते व्यर्थ ठरणार ! कारण ते शब्द सहेतुक घातले आहेत. उगीच घातलेले नाहीत. त्यांवरून पुढे ' ज्ञानी पुरुषाला स्वतःचें म्हणून जरी कार्य नसलें तरी जगाच्या धारण-पोषणार्थ तें अवश्य आहे, ' असें म्हणावयाचे आहे. त्यासाठीं मूळ श्लोकांचा अर्थ शक्य तितका संदिग्ध करणेंच सोयीचें होतें. असो; पुढें ' तस्मात् ' ( श्लो. १९ ) या पदाचा अर्थ—ज्ञानी पुरुष याप्रमाणें कसलीच अपेक्षा करीत नसल्यामुळें, असा केला आहे. आचार्य—' तस्मात्—ज्याअर्थी तूं ज्ञाननिष्ठ नाहींस त्याअर्थीं ' असा करितात. या दोन अर्थांतील पूर्व श्लोकांशीं जुळणारा म्हणजे प्रकरणाला धरून कोणता अर्थ आहे, तें वाचकांनीच ठरवावें. ' ज्ञानी कसलीच अपेक्षा ठेवीत नाहीं,' हे पूर्व श्लोकांत प्रकृत नाही. आत्मरति, आत्मक्रीड, वगैरे पुरुषाला कर्तव्य नसतें. कारण त्यानें ते केले तरी व न केलें तरी त्याला त्याचा कांही उपयोग नाहीं. स्वतःसाठीं नव्हे तर या त्रिभुवनांतील कोणासाठींही त्याला कांही कर्तव्य नसतें. पण तूं तसा आत्मरति

**तस्मादसक्तः सततं कार्यं कर्म समाचर ।**
**असक्तो ह्याचरन्कर्म परमाप्नोति पूरुषः ॥ १९ ॥**

**अन्वयार्थ**—**तस्मात्**—त्याअर्थी—**असक्तः**—आसक्तिरहित होऊन—**सततं**—सर्वदा-नेहमीं—**कार्यं कर्म**—अवश्य कर्तव्य असलेलें जें वर्णाश्रमविहित नित्यकर्म तें—**समाचर**—तूं कर.—**हि**—कारण—**असक्तः**—फलामध्यें आसक्त न होतां—**कर्म**—कर्म—**आचरन्**—करणारा-ईश्वरार्पणबुद्धीनें कर्म करणारा—**पूरुषः**—पुरुष चित्तशुद्धीच्या द्वारा—**परं**—मोक्षास—**आप्नोति**—प्राप्त होतो. १९.

**यत एवम्—तस्मादिति । तस्मादसक्तः सङ्गवर्जितः सततं सर्वदा कार्यं कर्तव्यं नित्यं कर्म समाचर निर्वर्तय । असक्तो हि यस्मात्समाचरन्नीश्वरार्थं कर्म कुर्वन्परं मोक्षमाप्नोति पुरुषः सत्त्वशुद्धिद्वारेणेत्यर्थः ॥ १९ ॥**

**भाष्यार्थ**—( आणि सम्यग्ज्ञाननिष्ठेच्या अभावीं कर्माचें अनुष्ठान अवश्य केलें पाहिजे-)—**यतः एवं तस्मात् इति**—ज्याअर्थी असें आहे त्याअर्थी 'तूं कर्म कर' असें 'तस्मात्०' या श्लोकानें सांगतात—**तस्मात् असक्तः-सङ्गवर्जितः सततं-सर्वदा कार्यं-कर्तव्यं-नित्यं कर्म समाचर-निर्वर्तय**—तूं ज्ञाननिष्ठेचा अधिकारी नसल्यामुळे असक्त म्ह० संगरहित होऊन सतत-सर्वदा कार्य म्ह० अवश्य कर्तव्य असलेलें नित्य कर्म कर. त्याचें उत्तम प्रकारें अनुष्ठान कर.—**हि-यस्मात् असक्तः समाचरन्-ईश्वरार्थं कर्म कुर्वन् पुरुषः परं-मोक्षं आप्नोति**—कारण कर्मामध्ये 'मी कर्ता' इत्यादि प्रकारें आसक्त न होतां कर्मानुष्ठान करणारा म्ह० ईश्वरार्थ कर्म करणारा पुरुष पराला म्ह० मोक्षाला प्राप्त होतो. ( पण कर्मानें मोक्ष कसा मिळेल ? तो तर ज्ञानानेंच मिळूं शकतो. उत्तर-)—**सत्त्वशुद्धिद्वारेण इत्यर्थः**—चित्तशुद्धीच्या द्वारा ज्ञान होऊन परंपरेनें त्याला मोक्ष मिळतो, असा याचा भावार्थ. १९.

---

वगैरे नाहींस. म्हणून आसक्ति सोडून सतत कर्म कर. हा संबंध सरळ आहे कीं 'याप्रमाणे ज्ञानी कसलीच अपेक्षा ठेवीत नाहीं म्हणून तू फलाची आसक्ति न ठेवतां कर्तव्य कर्म कर' हा संबंध सरळ आहे, याचा विचार प्रत्येकानें आपल्या मनाशींच करावा. अगोदर ज्ञानी कसली अपेक्षा ठेवीत नाहीं, हें वर सांगितलेले नाहीं. शिवाय ज्ञानी जरी अपेक्षा करीत नसला तरी अर्जुनानें फलासक्ति सोडून कर्म करावें, हें त्यावरून प्राप्त कसें होते ? कदाचित् अर्जुन ज्ञानी असल्यामुळें त्यानें कसलीच अपेक्षा न करितां कर्म करावें, असें भगवान् म्हणत असतील ! पण योग्यासाठीं कर्मयोग आहे,असें सांगून 'नियतं कुरु कर्म त्वं' इत्यादि वर जो कर्मयोगाचा उपदेश केला आहे त्यावरून अर्जुन ज्ञानी ठरत नाहीं.'पूर्वींच्या मुमुक्षूंनींही कर्म केलें आहे, म्हणून तूंही तेंच प्राचीन कर्म कर.' असेंही पुढें (गी. अ. ४ श्लो. १५) भगवान् सांगणार आहेत. त्यावरूनही अर्जुन मुमुक्षु ठरत आहे.

१ रहस्यकार "टीकाकारांनी १७-१९ या तीन श्लोकांचा फारच विपर्यास केला असल्यामुळें त्यांचा सरळ भावार्थ काय तो प्रथम सांगतों", असें म्हणून पुढें म्हणतात-" तिन्ही

श्लोक मिळून हेत्वनुमानयुक्त एकच वाक्य आहे " ( हेत्वनुमान म्हणजे काय ? बरें, त्याचा अर्थ पुढें कळेल, या आशेनें पुढे जाऊं. ) " पैकी १७ व १८ व्या श्लोकांत ज्ञानी पुरुषानें कर्म न करण्याचीं जीं कारणें सामान्यतः दाखविण्यांत येतात त्यांचा प्रथम अनुवाद करून त्यावरून गीता जें अनुमान काढल्ये तें ' तस्मात् ' हा कारकबोधक शब्द प्रथम घालून १९ व्या श्लोकांत दिलें आहे. " पण ' ज्ञानी पुरुषानें कर्म न करण्याची कारणें सामान्यतः' कोण दाखवितें ? ज्ञाननिष्ठ सांख्य, कीं शंकराचार्य वगैरे संन्यासमार्गी ? भगवानांच्या वेळीं शंकराचार्य नव्हतेच ! तेव्हां राहिले सांख्य. पण त्यांच्यासाठीं ज्ञाननिष्ठा भगवानांनींच सांगितली आहे, तेव्हां त्यांच्या कर्म न करण्याच्या कारणांचा अनुवाद करून गीतेला अनुमान काढण्याचें काय कारण पडलें ? कीं गीता हें ज्ञानयोगाचें खंडन करून कर्मयोगाची प्रस्थापना करणारें शास्त्र आहे ? पण तसें मानल्यास 'यतीना चापि यो धर्मः स ते पूर्वं नरोत्तम । कथितो हरिगीतासु ' म्ह० यतींचा जो धर्म तोही मी तुला पूर्वीं भगवद्गीतेंत सांगितला आहे या अनुगीतेंतील वचनाची वाट काय ? शिवाय वरील दोन श्लोक हा जर कर्म सोडण्याच्या कारणांचा अनुवाद आहे तर त्यांतील ' तस्य कार्यं न विद्यते ' या वाक्याचा 'त्याला कर्तव्य नसतें' असा सरळ अर्थ न करितां 'त्याला स्वतःचे म्हणून कांहीं कार्य शिल्लक रहात नसतें ' असा अर्थ आपल्याला हवा तसा करण्याचें काय कारण ? दुसऱ्याच्या मताचा अनुवाद करतांना आपलें मत त्यांत कोणी घुसडीत नाहीं. तर मग एकूण गीता अनुमानें काढणारी आहे. ' अमुक कर ' असें विधान करणारें शास्त्र नव्हे ! रहस्यकार हें तुमचें म्हणणें अगदीं अप्रयोजक आहे बरें ! गीता हें शब्दप्रमाण आहे. त्यांत अनुमानाची कांही गरज नाहीं. गीता एकही अनुमान करीत नाहीं. तसेंच, निदान संस्कृत वाङ्मयांत तरी 'तस्मात्' हा शब्द निगमन—उपसंहार करण्यासाठीं योजितात. अनुमानाच्या आरंभी कारणबोधक म्हणून योजीत नाहीत. तसेच, ' म्हणून तू आसक्त न होतां सतत कर्तव्य कर्म कर ' हें अनुमान नव्हे, हा विधि आहे व याच श्लोकाच्या उत्तरार्धात ' कर्म व कर्मफल यांत आसक्त न होतां कर्म करणारा पुरुष परमात्म्यास प्राप्त होतो, ' असें त्याचें फळ सांगितलें आहे. कोणत्याही अनुमानांत प्रतिज्ञा, हेतु, उदाहरण, उपनय व निगमन असे पांच किंवा निदान पहिले तीन अवयव तरी अवश्य लागतात. पण येथें त्यांचा कांहींच संबंध नाहीं. येथें अनुमानाचें कारणच नाहीं. परम आप्त जे भगवान् त्यांचें वचनच प्रमाण आहे. त्यांनाही अनुमानाची गरज लागूं लागली तर 'आप्तवाक्य' या तिसऱ्या प्रमाणाला कांहीच महत्त्व उरणार नाहीं. अर्थात् रहस्यकारांची ही कल्पना साफ चुकीची आहे. ४—१६ श्लोकांपर्यंत कर्माधिकारी पुरुषानें कर्मयोगाचेंच अनुष्ठान कां केलें पाहिजे तें सविस्तर सांगून १७ व १८ या श्लोकांत कर्मयोग कोणाला करावयास नको, त्याचा निर्देश केला आहे. ज्ञानयोगाचे अधिकारी जे सांख्य त्यांना कर्मयोग नाहीं, असें त्यांत सांगून १९ व्या श्लोकांत ' म्हणून तूं सतत कर्मच कर ' असा प्रकरणाचा उपसंहार केला आहे. सर्व अद्वैती टीकाकार या श्लोकांचा असाच संबंध लावतात. मध्वाचार्य, रामानुजाचार्य वगैरे भाष्यकारही १७ व १८ हे श्लोक ' जो आत्मरति वगैरे आहे त्याला कर्मयोगाची आवश्यकता नाहीं,' हें सांगण्यासाठींच आहेत व १९ वा श्लोक 'तू तसा नाहींस म्हणून कर्तव्य कर्म कर' असें सांगत आहे, असेंच समजतात. ' यस्तु आत्मरतिरेव स्यात् ' यांतील ' तु ' या शब्दा-

वरूनही हे दोन श्लोक वरील नियमाला अपवाद सांगणारे आहेत हें सिद्ध होतें. गीतेंतच प्रकृत विषयाची विरुद्ध बाजू दाखवितांना असे ' तु- ' शब्द कितीदा तरी योजले आहेत ( अ. ३ श्लो. ७, २८, ३२, अ. ५ श्लो. ६ अ. ६ श्लो. ४५ अ. ७ श्लो. २८ अ. ८. २० अ. ९. १३. अ. ११. ५४. अ. १२.३. ६. अ. १३. २५. ) ज्ञानेश्वरमहाराजही या श्लोकांचें असें व्याख्यान करितात "-जे तो आत्मबोधें तोषला। तरी कृतकार्य देख जाहला। म्हणोनि सहज सांडवला। कर्मसंगा ॥ ४७ ॥ तृप्ति जालिया जैसीं। साधनें सरती आपैसी। देखें आत्मतुष्टीं तैसी। कर्में नाहीं ॥४८॥ जववरी अर्जुना। तो बोध भेटेना मना। तंवचि या साधनां। भजावें लागे॥ ४९ ॥ म्हणवूनि तूं नियत। सफळ कामनारहित। होऊनियां उचित। स्वधर्मे राहाटें ॥ ५० ॥" एकटे रहस्यकार मात्र याच्या अगदीं उलट स्वकपोलकल्पित अर्थ कल्पितात.

रहस्यकार पुढे म्हणतात—" निजणें, बसणे, उठणें, किंबहुना जिवंत राहणे इत्यादि कर्मे या जगांत सोडू म्हटल्याने सुटत नाहीत. म्हणून कर्मे सोडल्याने नैष्कर्म्य होत नसून सिद्धि मिळविण्याचाही तो उपाय नव्हे असे या अध्यायाच्या आरंभीं ४–५ श्लोकांत स्पष्ट म्हटलें आहे. " मदरहू दोन श्लोकाचा अर्थ रहस्यकारांनी जो केला आहे, त्यावर आम्ही टीका केलीच आहे. यास्तव आतां एवढेच सांगतों कीं, निजणे, बसणे, उठणें इत्यादि कर्मे हे देहधर्म आहेत. ती सर्वप्राणिसाधारण आहेत. त्यांना स्वाभाविक कर्मे म्हणतात. म्हणून ती सोडू म्हटल्याने सुटत नाहीत. पण ती सोडल्यानें नैष्कर्म्य होते, असें अद्वैती टीकाकारही म्हणत नाहींत. ती सोडणे हा नैष्कर्म्याचाही उपाय नव्हे व सिद्धीचाही उपाय नव्हे, तर तो मरणाचाच उपाय आहे. पण शास्त्रीय कर्मांचा आरंभ करणें हा मात्र नैष्कर्म्याचा म्ह० ज्ञाननिष्ठेचा उपाय आहे. याविषयीं सर्व सांप्रदायिकांचे एकमत आहे. पुनः रहस्यकार म्हणतात—" परंतु यावर संन्यासमार्गीयाची पुढे अशी कोटी आहे कीं, आम्हीं सिद्धि मिळविण्यासाठीं कर्मे सोडतों, असे नाहीं. कोणीही झाला तरी या जगांत जे कांहीं करितो, तें आपल्या किंवा दुसऱ्याच्या फायद्यासाठीं करितो. पण मनुष्याचें स्वतःचे परम साध्य जी सिद्धावस्था किंवा मोक्ष तो ज्ञानी पुरुषास त्याच्या ज्ञानानें प्राप्त झालेला असतो व त्यामुळे त्याला तदुत्तर दुसरे कांहीं मिळवावयाचें रहात नसून (श्लोक १७) कोणतीही गोष्ट केली काय आणि न केली काय दोन्ही त्याला सारखीच असतात. बरें लोकोपयोगार्थ त्यानें कर्मे केली पाहिजेत असें म्हणावें तर लोकांच्या ठायींही त्याचें कांहीं अडलें नसते ( श्लो. १८ ) मग त्यानें कर्म करावें कशाला? " गी. र. पृ. ६५२–५३. पण सन्यासमार्गीयांची ही कोटी रहस्यकारांना कोठे उपलब्ध झाली ? कोणत्या ग्रंथांत ? भाष्यकारांचे भाष्य तर आतां वाचकांपुढें आहेच व इतर अद्वैतीटीकाकारांतीलही कोणी ही कोटी लढविलेली नाहीं. मग रहस्यकारांनीं ती आणली कोठून ? अर्थात् स्वतःच्या कल्पनाशक्तीतून ती काढली असली पाहिजे ! रहस्यकार भाष्यकारादिकांच्या म्हणण्याचा विपर्यास कसा करितात तें या उताऱ्यावरून वाचकांच्या लक्षांत येईल. असो; याप्रमाणें संन्यासमार्गी (?) टीकाकारांचा आशय आपल्या भाषेत कसा तरी सांगून पुनः रहस्यकार म्हणतात—" गीतेचें याला असें उत्तर आहे कीं, कर्म केलें वा न केलें हीं दोन्ही जर तुला सारखींच तर मग कर्मे न करण्याचा तरी तुझा आग्रह कशाला ! जें जे शास्त्रतः प्राप्त

होईल ते आग्रहशून्य बुद्धीने करून मोकळा हो म्हणजे झाले. या जगांत कर्म कोणालाच सुटलें नाही. मग तो ज्ञानी असो वा अज्ञानी असो. ” ६५३ गीतेनें संन्यासमार्गीयांच्या वरील कोटीला उत्तर देत बसणे, थोडे अप्रयोजक वाटतें. तथापि गीताच संन्यासमार्गीयांशी वाद करीत आहे, असें जरी मानले तरी त्या गीतेलाच उलट असाही प्रश्न करतां येतो की, कर्म व अकर्म ही दोन्ही जर सारखीच तर तुझा कर्मे करण्याविषयी तरी एवढा आग्रह कां ? तूंच जर ज्ञान व कर्म या दोन निष्ठा सांगतेस तर त्यांतील ज्ञाननिष्ठेचा तिरस्कार करून कर्मालाच तेवढे महत्त्व का देतेस ? पण वस्तुतः बिचारी गीता कांहीच म्हणत नाही. रहस्यकारच तिच्या माथी हा अयोग्य उत्तराचा भार घालीत आहेत. ‘ शास्त्रतः प्राप्त होईल ते करून मोकळा हो ’ हे गीतेचे म्हणणे आहे, रहस्यकारांचे नव्हे असे जरी मानले तरी त्यांत वावगे कांहीच नाही. कारण यथाधिकार ज्ञानयोग व कर्मयोग शास्त्रतःच प्राप्त आहेत. पण ‘या जगात कर्म कोणालाच सुटले नाही, मग तो ज्ञानी असो वा अज्ञानी ’ हें म्हणणे मात्र गीतेचे आहे, असें मानण्यास आम्ही तयार नाहीं. कारण स्वाभाविक कर्म कोणाला सुटत नाही. देह असेपर्यंत देहधर्मभूत क्रिया होणारच. पण तेवढ्यावरून अग्निहोत्रादि शास्त्रीय कर्मही कोणालाच सुटत नाही, हे म्हणणे अनुभवाला सोडून आहे. बिचारे ज्ञानी सांख्य अग्निहोत्रादि कर्मांचा आम्हाला कांही उपयोग नाही, असे म्हणून तरी ती कर्मे टाकितात पण आधुनिक सुशिक्षितांतील शेकडा ९९ लोक नास्तिकतेने त्यांचा त्याग करितात ? तेव्हा श्रौत-स्मार्त कर्मे कोणालाच सुटत नाहीत, असें गीता कधी म्हणणार नाही. अ. ३ श्लो. ५ व अ. १८ श्लो. ११. यांचा खरा अर्थ काय आहे तो त्या त्या ठिकाणीच पहावा. म्हणजे गीता सदरहू श्लोकात तसे सांगत आहे, अशी शंका कोणालाही उरणार नाही. रहस्यकार पुनः ह्मणतात. “कर्म तर चुकत नाही आणि ज्ञान्याला तें स्वतःसाठी ( हा शब्द त्यांच्या पदरचा आहे ) नको. दिसण्यांत ही एक मोठीच अडचण वाटते (वेदान्त शास्त्राचें तत्त्व न कळणाराला अडचण वाटणारच !) पण गीतेला हें कोडें कठिण वाटत नसून गीता असे सांगत्ये की, कर्म ज्याअर्थी चुकत नाही त्याअर्थी तें केलेच पाहिजे. पण स्वार्थ बुद्धि उरली नाही ह्मणूनच आतां ते निःस्वार्थ ह्म० निष्काम बुद्धीनें कर म्हणजे झाले. ( ‘ स्वार्थबुद्धि उरली नाही व निःस्वार्थ ह्म० निष्काम बुद्धीनें’ हा अर्थ गीतेला संमत नाही. निष्काम कर्म म्ह० निःस्वार्थ कर्म हा अर्थ वैदिक संप्रदायाला धरून नाहीं. शास्त्रानें स्वर्ग, पशु इत्यादि फलासाठी सांगितलेलें कर्म त्या फलाची इच्छा न ठेवतां करणे, यास निष्काम कर्म म्हणतात. निष्काम म्ह० निःस्वार्थ व सकाम म्ह० स्वार्थ हा असांप्रदायिक अर्थ आहे. ) हाच उपदेश ‘ तस्मात् ’ हें पद घालून १९ व्या श्लोकांत अर्जुनास केला असून (‘तर मग हें अनुमान नव्हे, उपदेश आहे ! ) त्याच्या दृढीकरणार्थ सर्वांत श्रेष्ठ ज्ञानी जे भगवान् त्यांस कांही कर्तव्य राहिलें नसतांही ते कर्मच करितात हा दृष्टान्त पुढें (२२) दिला आहे. ( होय दिला आहे खरा, पण त्याचा विचार पुढें करूं. ) सारांश ज्ञानी पुरुषाची जी स्थिति संन्यासमार्गीय लोक वर्णितात तीच खरी धरून तीवरून कर्मसंन्यासपक्ष सिद्ध न होतां उलट सदैव निष्काम कर्मे करण्याच्या पक्षासच बळकटी येत्ये, असे गीतेचे म्हणणें आहे. ” ( ‘ ज्ञानयोगेन सांख्याना ’ असें सांगणाऱ्या गीतेचें असें म्हणणें कसें असेल ? संन्यासपक्षी लोक आपल्या पदरचें कांही वर्णीत नाहींत, वैदिक निवृत्तिलक्षण धर्मांची तत्त्वें सांगतात. रहस्यकार मात्र ते ( अद्वैती ) न

म्हणत असलेल्या गोष्टीही त्यांच्या माथी मारतात, व आपलेंच म्हणणें ' गीतेचें ' म्हणून पुढें करितात.) " परंतु कर्मयोगांतील हा युक्तिवाद व सिद्धान्त सन्यासमार्गीय टीकाकारांस मान्य नसल्यामुळें वरील कार्यकारणभावास, किंवा एकदर अर्थप्रवाहास अगर पुढें सांगितलेल्या भगवंताच्या दृष्टान्तासही ( श्लो. ७. ८. ९. २२. २५. ३० पहा ) न जुमानतां त्यांनी हे तीन श्लोक फोडून स्वतंत्र मानले आहेत; आणि त्यांपैकी पहिल्या दोन श्लोकांत ' ज्ञानी पुरुषाला स्वतःचें कांही कर्तव्य रहात नाही ' इत्यादि जो निर्देश आहे तोच गीतेचा अखेरचा सिद्धान्त कल्पून त्यावरून भगवान् ज्ञानी पुरुषास कर्म सोडण्यास सांगतात असे प्रतिपादन केले आहे."(पण कर्मयोग किंवा कर्मयोगशास्त्र ही रहस्यकार म्हणतात तशी कांही स्वतंत्र वस्तुच जगांत नसल्यामुळे त्याचा युक्तिवाद किंवा सिद्धान्त सन्यासमार्गीयांस मान्य असण्याचा किंवा नसण्याचा प्रश्नच उपस्थित होत नाही. वैदिक कर्मयोगाचा सिद्धान्त सर्व वैदिक सप्रदायी लोकाना समतच आहे व तो काय आहे हे आम्ही वर दाखविलेच आहे. रहस्यकाराचा कर्मयोग किंवा कर्मयोगशास्त्र वैदिक सप्रदायाला समतच नसल्यामुळे आजवर त्याची कोणी कधीच चर्चा केली नाही. तेव्हा 'रहस्यकाराच्या कर्मयोगाचा युक्तिवाद सन्यासमार्गीयांना मान्य नाही,' असे उलट बोलावयाचे की 'वैदिक सप्रदायी अद्वैतशास्त्राचे म्हणणे गीतेला कर्मयोगशास्त्र बनविणाऱ्या रहस्यकाराना मान्य नाही,' असें म्हणावयाचे, याचा विचार वाचकांनीच करावा. ' अद्वैती भाष्य-टीकाकारांनी कार्यकारणभावास व अर्थप्रवाहास न जुमानता हे तीन श्लोक फोडून स्वतंत्र मानले, ' हे म्हणणे वस्तुस्थितीला सोडून आहे. आचार्यांचे भाष्य व त्याचा अर्थ वाचकांपुढे प्रत्यक्ष असल्यामुळे रहस्यकारांच्या म्हणण्यावरच आता कोणाला विसबावयास नको. भाष्य, त्याचा अर्थ व त्यावरील रहस्यपरीक्षणात्मक टीपा वाचल्यावर 'तीन श्लोक फोडून स्वतंत्र मानले,' का काय केलें ते प्रत्यक्षच कळेल. म्हणून आम्ही अधिक विस्तार करीत नाही. ) " पण मग ' आसक्ति सोडून कर्म कर ' असा जो अर्जुनास लागलीच उपदेश केला आहे तो विलग पडून त्याची उपपत्ति लागत नाही. हा अडचण दूर होण्यासाठी अर्जुनाला कर्म कर म्हणून जो उपदेश केला तो अर्जुन अज्ञानी म्हणून केला, असे या टीकाकारांनी आपले समाधान करून घेतले आहे. पण इतके झाले तरी १९ व्या श्लोकांतील ' तस्मात् ' हे पद निरर्थक पडून याच अध्यायांतील पूर्वापर सदर्भास आणि गीतेत अनेक ठिकाणी 'ज्ञानी पुरुषानेंही आसक्ति सोडून कर्म करावें ' असे उल्लेख आहेत त्यास,अगर भगवानांनी पुढे दिलेल्या स्वतःच्या दृष्टान्तासही हा अर्थ विरुद्ध पडतो तो पडतोच " ( आसक्ति सोडून कर्म कर हा उपदेश विलग कसा पडत नाही, व त्याची उत्तम उपपत्ति कशी लागते, हे भाष्यार्थ व टीपा यांवरून कळण्यासारखे आहे. आत्मज्ञानासाठी कर्मयोग,त्याच्या योगाने कर्माधिकाऱ्याची चित्तशुद्धि होऊन आत्मजिज्ञासा उत्पन्न होते, हा वैदिक सिद्धान्तच असल्यामुळें ' संन्यासमार्गीयांनी ' अर्जुनाला अज्ञानी ठरविले नसून त्याची वर्णिलेली परिस्थिति व भगवानाचा उपदेश यांवरूनच तसे ठरत आहे. ' तस्मात् ' हें पद प्रकरणाचा उपसहार करण्यासाठी असल्यामुळें तें निरर्थक होत नाही. 'तस्मात्' हे पद अनुमानसूचक नसतें; वगैरे आम्ही वर सांगितलेच आहे. ज्ञानी पुरुषानेंही लोकसंग्रहार्थ कर्म करावे, असें गीतेत कांही ठिकाणीं म्हटलें आहे, पण तेवढ्यावरून सर्वच ज्ञानी पुरुषांनीं तें करावें, असें होत नाहीं. कारण मग

ज्ञानयोगाला अवकाशच रहात नाही. अर्जुनाला जरी कदाचित् ज्ञानी मानले तरी सर्वच कर्मयोगाचे अधिकारी ज्ञानी असतात, असेही ठरत नाही. यास्तव रहस्यकाराच्या या सर्व कल्पना वृथा आहेत.) "शिवाय कर्मे करूनही ज्यामुळे ती बधक होत नाहीत त्या कर्मयोगाचेच विवेचन या अध्यायांत चालू असतां मध्येच उपटसुळासारखें 'कर्मे सोडणे उत्तम' असे कोणीही समंजस मनुष्य सांगणार नाही. मग भगवानांची गोष्ट कशाला? ह्मणून निव्वळ सांप्रदायिक आग्रहाचे व ओढाताणीचे हे अर्थ ग्राह्य धरिता येत नाहीत." ६५४. (ज्ञानी पुरुषानें कर्मे करावीं, असे प्रकरण नाही. कर्मानुष्ठानाला आरभ केल्यावांचून ज्ञानयोगनिष्ठा प्राप्त होत नाही, असे येथें प्रकरण चालू आहे. त्या प्रसंगाने फक्त आत्मरति, आत्मतृप्त व आत्मसंतुष्ट (अ. २ श्लो. ५५) स्थितप्रज्ञाला मात्र हा कर्मयोग करावयास नको. कारण त्याच्या कर्मानुष्ठानाने व अननुष्ठानानेही काही लाभ-हानि नाही, असे सांगून तू तसा आत्मरति वगैरे नाहीस, म्हणून 'आसक्त न होता कर्म कर' असा आचार्यादि सर्व टीकाकारांनी त्याचा सबध लावला आहे. 'कर्मे सोडणे उत्तम' असे उपटसुळासारखे कोणीही म्हणत नाही. रहस्यकार आपल्या पदरचेच त्याच्या माथी ते लादीत आहेत. कर्मयोगाचे प्रतिपादन केल्यावर व 'जो त्याचे अनुष्ठान करीत नाही तो अघायु, इत्यादि आहे' वगैरे निंदा करून, कर्मयोगाचे अनुष्ठान न केलें तरी अघायु वगैरे न होणार ज्ञानी, हा वरील नियमास अपवाद सांगून,'म्हणून तू अघायु वगैरे न होण्यासाठी आसक्त न होतां कर्मयोगाचे अनुष्ठान कर.' हाच त्या श्लोकाचा योग्य सबध आहे. रहस्यकारांचा अर्थच पूर्वोत्तरविरुद्ध आहे. तो सरळही नाही आणि आग्रह व ओढाताण या दोषांनी युक्तही आहे. शिवाय एक विषय चालू असताना मध्ये दुसरा प्रासगिक विषय येत नाही, असेही नाही. दुसरा अध्याय हा साख्ययोग आहे. पण त्यात कर्मांचे विधान आहे. त्याला रहस्यकार 'उपटसुळासारखें' समजत नाहीत, असो; रहस्यकार पुढे योगवासिष्ठांतील दोन व गणेशगीतेतील एक, असे तीन श्लोक आपल्या अर्थाला पोषक ह्मणून देतात. त्याचा आतां विचार करूं. "यस्य नार्थः कर्मत्यागैः नार्थः कर्मसमाश्रयैः। तेन स्थित यथा यद्यत्तत्तथैव करोत्यसौ ॥" योग वा. ६ उ. १९९-४ ज्ञानी पुरुषाला कर्मत्यागांनीही काही अर्थ सपादन करावयाचा नसतो व कर्मांचा आश्रय करूनही कांही मिळवावयाचे नसते. म्हणून तो जें जें जसे सिद्ध असेल, जे जे जसे प्राप्त होईल ते ते तसेच करतो. कर्मत्यागच करीन किंवा कर्मेच करीन असा आग्रह धरीत नाही, प्रारब्धानुसार वर्तन करतो. (आचार्य तरी काय म्हणतात हेच.) "मम नास्ति कृतेनार्थो नाकृतेनेह कश्चन। यथाप्राप्तेन तिष्ठामि ह्यकर्मणि क आग्रहः" कर्म केल्यानेही मला काही लाभ नाही व न केल्यानेही कांही तोटा नाही. यास्तव मी जशी स्थिति प्राप्त होईल तसा राहतो. अकर्माविषयीच आग्रह काय करावयाचा आहे? इत्यादि. पण या व असल्याच दुसऱ्याही वाक्यांची अद्वैतवाद्यांना मुळीच भीति वाटत नाही. कारण ज्ञानी जीवन्मुक्त शास्त्राच्या कोणत्याही विधिनिषेधांनी बद्ध होत नाही, तो प्रारब्धप्राप्त अवस्थेत आनंदाने राहतो. मी अमुकच करीन किंवा अमुक करणार नाही, असा आग्रह न धरणे हाच खरा सन्यास आहे. चवथ्या अध्यायाच्या १८-२५ श्लोकांवरील भाष्य व भाष्यार्थ पहा. योगवासिष्ठ पूर्ण अद्वैती ग्रथ आहे. तो व आचार्यांचा सिद्धान्त यांत फरक असणे केव्हांच शक्य नाही. तो निवृत्तिमार्गी ग्रंथ आहे, याबद्दल हवीं तितकीं प्रमाणें देतां येतील, पण विस्तारभयास्तव तसें करतां येत नाहीं.

**कर्मणैव हि संसिद्धिमास्थिता जनकादयः।**
**लोकसंग्रहमेवापि संपश्यन्कर्तुमर्हसि ॥ २० ॥**

**अन्वयार्थ—हि**—कारण—**जनकादयः**—जनक-अश्वपति वगैरे विद्वान् क्षत्रिय—**कर्मणा एव**—कर्माचरणानेंच-कर्मानुष्ठान करूनच—**संसिद्धिं**—मोक्षास—**आस्थिताः**—प्राप्त होण्यास तयार झाले. कर्मानुष्ठानानेच मोक्ष मिळविण्याचा यत्न करूं लागले.—**लोकसंग्रहं एव अपि**—लोकांनी उन्मार्गी होऊं नये, याच गोष्टीकडेही—**संपश्यन्**—लक्ष्य ठेवणारा—( **त्वं** )—तूं—**कर्तुं अर्हसि**—कर्म करण्यासच योग्य आहेस. २०.

**यस्माच्च—कर्मणैवेति। कर्मणैव हि यस्मात् पूर्वे क्षत्रिया विद्वांसः संसिद्धिं मोक्षं गन्तुमास्थिताः प्रवृत्ता जनकादयो जनकाश्वपतिप्रभृतयः। यदि ते प्राप्तसम्यग्दर्शनास्ततो लोकसंग्रहार्थं प्रारब्धकर्मत्वात्कर्मणा सहैवासंन्यस्यैव कर्म संसिद्धिमास्थिता इत्यर्थः। अथाप्राप्तसम्यग्दर्शना जनकादयस्तदा कर्मणा सत्त्वशुद्धिसाधनभूतेन क्रमेण संसिद्धिमास्थिता इति व्याख्येयः श्लोकः॥**

**भाष्यार्थ—यस्मात् च**—आणि ज्याअर्थी ( विवेकी जितेंद्रियही श्रवणादिकांच्या योगाने सतत ब्रह्मनिष्ठ होऊं शकतो, तथापि तूं क्षत्रिय आहेस. त्यामुळें तुला चतुर्थाश्रमाचा अधिकार नाही. म्हणून तुला विहित कर्मांचा त्याग करतां येत नाही, अशा आशयाने ) शिष्टाचारही असाच आहे असे—'**कर्मणा एव०**' **इति**— 'कर्मणा एव०' या श्लोकाने सांगतात—**हि-यस्मात् जनकादयः-जनक-अश्वपतिप्रभृतयः पूर्वे विद्वांसः क्षत्रियाः कर्मणा एव संसिद्धिं-मोक्षं गन्तुं आस्थिताः-प्रवृत्ताः**—ज्याअर्थी जनकादिक-जनक-अश्वपति वगैरे पूर्वीचे विद्वान् क्षत्रिय कर्मांच्या योगानेच संसिद्धीला म्ह० मोक्षाला जाण्यास प्रवृत्त झाले (त्याअर्थी तुलाही कर्म करणेंच योग्य आहे. 'अहो पण जनकादिकांना कर्माने संसिद्धि प्राप्त झाली, असें कसें सांगतां ? कारण सर्वकर्मसंन्यासपूर्वक आत्मज्ञाननिष्ठानाच संसिद्धि प्राप्त होते हें प्रसिद्ध आहे.' म्हणून म्हणाल तर सांगतों-)—**यदि ते प्राप्तसम्यग्दर्शनाः ततः प्रारब्धकर्मत्वात् लोकसंग्रहार्थं कर्मणा सह एव-असंन्यस्य एव कर्म संसिद्धिं आस्थिताः इत्यर्थः**—जर ते प्राप्तसम्यग्दर्शन म्ह० ज्ञानी होते असे मानले तर त्यांनी कर्मांचा आरंभ केलेला असल्यामुळे लोकसंग्रहार्थ कर्मासहवर्तमानच म्ह० कर्मांचा संन्यास न करितांच ते संसिद्धीला प्राप्त झाले, असा भावार्थ. [जनकादिकांना आत्मज्ञान झालें होतें. पण प्रारब्धकर्मवशात् कर्मत्याग न करितांच लोकसंग्रहासाठी कर्मानुष्ठान करीत असलेल्या त्यांना ज्ञानमाहात्म्याने मुक्ति मिळाली. बरे ते ज्ञानी नव्हते, असे मानले तर पूर्वार्धाचा अर्थ कसा करावा ते सांगतात-]—**अथ अप्राप्तसम्यग्दर्शनाः जनकादयः**—बरे, जनकादिक अप्राप्तसम्यग्दर्शन होते, म्हणजे त्यांना आत्मसाक्षात्कार झाला नव्हता असें मानलें—**तदा सत्त्वशुद्धिसाधनभूतेन कर्मणा क्रमेण संसिद्धिं आस्थिताः इति व्याख्येयः**

श्लोकः—तर चित्तशुद्धीच्या साधनभूत कर्मानें क्रमानें संसिद्धीला प्राप्त होण्यास प्रवृत्त झाले, असें या श्लोकाचें व्याख्यान करावें. [ या अध्यायाच्या आरंभीं अधिकारी त्रैवर्णिकांची दोन प्रकारची निष्ठा सांगून १ ज्ञानी, संन्यासी व २ अनात्मज्ञ गृहस्थ हे तिचे दोन प्रकारचे अधिकारी सांगितले. कर्मानुष्ठानाला आरंभ केल्यावांचून ज्ञाननिष्ठा प्राप्त होत नाहीं, हेही सांगितलें. कर्माधिकारी पुरुषानें कर्म अवश्य केलें पाहिजे, याविषयीं कारणें सांगितली. शेवटीं फक्त ज्ञाननिष्ठांना मात्र हें कर्म करावयास नको, असें सांगून तूं कर्माधिकारी आहेस म्हणून तुला कर्मच केलें पाहिजे, असा कर्मकर्तव्यताप्रकरणाचा उपसंहार केला. पण ते करीत असतांना त्यामध्यें आसक्ति ठेवूं नको, असें सांगितलें व आसक्ति न ठेवतां कर्म करणाऱ्या पुरुषास चित्तशुद्धीच्या द्वारा मोक्ष मिळतो, असेंही सांगितलें. त्यावरूनच अर्जुन ज्ञानी नाहीं, हे उघड होतें. कारण ज्ञानी मुक्तच असतो. त्याला ' मोक्षासाठीं आसक्ति सोडून कर्म कर ' असा उपदेश करावा लागत नाहीं. या प्रमाणें ' ज्ञानच जर श्रेष्ठ तर मला घोर कर्मातच कां नियुक्त करतोस ? ' या अर्जुनाच्या प्रश्नाचे उत्तर सविस्तर देऊन आतां या श्लोकांत भगवान् याविषयीं शिष्टाचारही प्रमाण आहे असे सांगतात–जनकादि प्राचीन विद्वान् क्षत्रिय कर्मांचा त्याग न करितांच मोक्षाला प्रवृत्त झाले. ते ज्ञानी होते, असें मानले तरी प्रारब्ध कर्मानुसार प्राप्त झालेल्या क्षत्रियवर्णाप्रमाणे त्यांनीं कर्मसंन्यास केला नाहीं. कारण संन्यासाचा अधिकार फक्त ब्राह्मणांनाच आहे. क्षत्रियांना नाहीं. बृहदारण्यकांत ' ब्राह्मण पुत्र, वित्त व लोक या विषयांच्या एषणांपासून व्युत्थान पावून–तद्विषयक कामना सोडून–भिक्षाचर्य आचरितात, ' असें ब्राह्मणासाठीं संन्यासविधान आहे. ( बृहदा. भाष्यार्थ अ. ३ पृ. १३५) ' चत्वार आश्रमा ब्राह्मणस्य, त्रयो राजन्यस्य, द्वौ क्षत्रियस्य-' ब्राह्मणाला चार आश्रम, क्षत्रियाला संन्यास सोडून बाकीचे तीन, वैश्याला संन्यास व वानप्रस्थ सोडून बाकीचे दोन, असे स्मृतिवचन आहे व ' मुखजानां अयं धर्मो यद्विष्णोर्लिंगधारणं । बाहुजातोरुजातानां नायं धर्मः प्रशस्यते-' विष्णूचें लिंग–चिह्न धारण करणें हा ब्राह्मणांचा धर्म आहे. क्षत्रिय व वैश्य यांच्यासाठीं हा धर्म विहित नाहीं, असें पुराणांत म्हटलें आहे. त्यावरून क्षत्रियाला विविदिषा संन्यासाचा अधिकार नाहीं, हे उघड होते. जनकादि क्षत्रिय असल्यामुळें त्यांना आत्मसाक्षात्कार जरी झाला होता तरी त्यांनीं कर्मांचा त्याग केला नाही. तर लोकसंग्रहार्थ कर्म करीत असतांनाच ज्ञानमाहात्म्यानें ते मुक्त झाले. पण तेही ज्ञानी नव्हते, म्हणून म्हणशील तर चित्तशुद्धीचे साधन जें कर्म त्याच्यायोगानेंच ते क्रमानें मोक्ष मिळविण्यास तयार झाले, असें समज. यावरून क्षत्रिय ज्ञानी असले तरी व जिज्ञासु असले तरी संन्यास करीत नाहीत. ज्ञानी असल्यास लोकसंग्रहार्थ किंवा जिज्ञासु असल्यास चित्तशुद्ध्यर्थ कर्मच आसक्त न होतां करितात, हें उघड होतें. अर्जुन क्षत्रिय होता, यास्तव त्याला भैक्ष्य म्ह० संन्यास विहित नव्हता. त्याला तो परधर्म होता व युद्ध हा स्वधर्म होता. म्हणूनच भगवान् पुढें त्याला ' श्रेयान् स्वधर्मः-' श्लो. ३५ इत्यादि सांगणार आहेत. त्यांतील ' स्वधर्म ' व ' परधर्म ' या शब्दांवरूनही भगवा-

नांचा हाच आशय व्यक्त होतो. असो; याप्रमाणें प्रस्तुत श्लोकाच्या पूर्वार्धाचें व्याख्यान कसें करावें ते सांगून द्वितीयार्धानें ज्या शंकेचें निवारण करावयाचे आहे तिचाच अनुवाद करितात-]

**अथ मन्यसे पूर्वैरपि जनकादिभिरप्यजानद्भिरेव कर्तव्यं कर्म कृतं तावता नावश्यम-न्येन कर्तव्यं सम्यग्दर्शनवता कृतार्थेनेति तथाऽपि प्रारब्धकर्मायत्तस्त्वं लोकसंग्रहमेवापि लोकस्योन्मार्गप्रवृत्तिनिवारणं लोकसंग्रहस्तमेवापि प्रयोजनं संपश्यन्कर्तुमर्हसि २०**

**भाष्यार्थ—अथ मन्यसे**—आतां तूं जर असे समजत असशील की,—**पूर्वैः अपि अजानद्भिः एव जनकादिभिः अपि कर्तव्यं कर्म कृतं**—पूर्वींच्याही आत्म्याला न जाणणाऱ्या अशाच जनकादिकांनी सुद्धां कर्तव्य कर्म केलें—**तावता अन्येन सम्यग्दर्शनवता कृतार्थेन अवश्यं कर्तव्यं इति न**—पण तेवढयानें दुसऱ्या यथार्थ आत्मज्ञानी कृतार्थ पुरुषाने तें अवश्य केलें पाहिजे, असे म्हणतां येत नाहीं. ( समाधान-)—**तथापि त्वं प्रारब्धकर्मायत्तः**—तरी सुद्धां तूं प्रारब्धकर्माच्या अधीन आहेस. म्हणून—**लोकसंग्रहं एव अपि-लोकस्य उन्मार्गप्रवृत्तिनिवारणं लोकसंग्रहः तं एव अपि प्रयोजनं संपश्यन् कर्तुं अर्हसि**—लोकसंग्रहालाही-लोकांच्या उन्मार्गप्रवृत्तीचें निवारण करणें हा लोकसंग्रह आहे, त्याच्याकडेही-त्या प्रयोजनाकडेही पाहणारा तूं कर्म करण्यास योग्य आहेस. [ पूर्वींच्या अज्ञ असलेल्या, कृतार्थ न झालेल्या जनकादिकांनीं जरी कर्म केलें असलें तरी तेवढयावरून ज्ञानी व कृतार्थ झालेल्या माझ्यासारख्यानेही ते केलें पाहिजे असें म्हणतां येत नाहीं, असें म्हणशील तर तेंही मी कबूल करतों. पण तूं ज्ञानी आहेस, असें जरी मानलें तरी तूं आपल्या प्रारब्धकर्माधीन आहेस. त्या कर्मानेच तुला क्षत्रियकुलांत उत्पन्न केलें आहे. यास्तव लोकसंग्रहाकडे पाहणाऱ्याही तुला स्वधर्मरूप कर्मच करणें उचित आहे. लोकांच्या स्वाभाविक उन्मार्गप्रवृत्तीचें निवारण करणे, याला लोकसंग्रह म्हणतात. तेंच आपल्या धर्माचरणाचें फल आहे असें समजून तुला कर्मच केलें पाहिजे. ' सर्वे राजाश्रिता धर्मा राजा धर्मस्य धारकः-' म्ह० सर्व धर्म राजाच्या आश्रयाने राहणारे आहेत. राजा धर्माचे धारण करणारा आहे, असे स्मृतिवचन आहे. त्यावरून क्षत्रिय वर्णाश्रमधर्मप्रवर्तक आहे, हें सिद्ध होते. म्हणून तुला स्वधर्मरूप कर्म केलें पाहिजे ]. २०.

---

१ या श्लोकास रहस्यकार असे अवतरण देतात-"ज्ञानी पुरुषास स्वार्थ राहिलेला नसतो याचमुळें त्याने आपले कर्तव्य निष्काम बुद्धीनें केले पाहिजे, अशा प्रकारचे निष्काम कर्म मोक्षाच्या आड न येतां त्यानेंच सिद्धि मिळत्ये, असें जे वर सांगितलें त्याच्या पुष्टीकरणार्थ आतां दाखला देतात-" ६५५ पण हे इतके सर्व सांगितले आहे कोठें ? ज्ञानी पुरुषाने कर्म करावें याचा अद्यापि गीतेत उल्लेखही आलेला नाही. तो तर पुढेच (श्लो. २५,२६,२९यांत) आहे व तोसुद्धां लोकसंग्रहाच्या प्रसंगानें आहे.लोकसंग्रहाचे अधिकारी ज्ञानीच आहेत. जिज्ञासु नव्हेत. जिज्ञासु साधनभूत कर्मयोगाचे अधिकारी आहेत.'निष्काम कर्म मोक्षाच्या आड जरी येत नसलें तरी त्यानेंच सिद्धि मिळते,' हा अपसिद्धान्त आहे. निष्काम कर्मानें मोक्ष

मिळत नाहीं. चित्तशुद्धि होते. ज्ञानी पुरुषाने लोकसंग्रहार्थ करावयाचे जें कर्म तें वस्तुतः कर्मच नव्हे. ( पृ. ५५ पहा. ) कारण तें ' गुणा गुणेषु वर्तन्ते.'(३.२८) या समजुतीनें घडत असतें. असो; रहस्यकार " जनकादिकांनीही याप्रमाणे कर्मानेच सिद्धि मिळविली " असा पूर्वार्धाचा अर्थ करितात. त्यांतील ' याप्रमाणे ' हे पद त्यांच्या पदरचे आहे. त्याला मूळांत आधार नाही. पण अवतरणांत व टीपेत ' दाखला देतात ' असे जे म्हटलें आहे ते सार्थ होण्यासाठी तो शब्द अधिक घालणे भाग पडले. पण त्यापेक्षा ' ज्ञाननिष्ठाधिकारी असलेल्याही क्षत्रियानें स्वधर्मच करावा, याविषयी शिष्टाचाररूप प्रमाण दाखवितात,' हें म्हणणें अधिक सयुक्तिक आहे. या बाबतीत प्राचीन सर्व टीकाकारांचे प्रायः एकमत आहे. बुभुक्षु कर्माधिकारी पुरुषानें विषयप्राप्त्यर्थ सकाम कर्मयोग, मुमुक्षु कर्माधिकाऱ्याने चित्तशुद्ध्यर्थ निष्काम कर्मयोग व मुक्त कर्माधिकाऱ्याने लोकसंग्रहार्थ निरहंकार व समबुद्धीने कर्मयोग आचरावा; तसेंच, जिज्ञासु ज्ञानयोगाधिकाऱ्याने विविदिषा सन्यास करून ज्ञाननिष्ठ व्हावे, व ज्ञानी ज्ञानयोगाधिकाऱ्यानें विद्वत्संन्यास करून ज्ञाननिष्ठ व्हावे, असा वैदिकसंप्रदाय आहे व त्याविषयी द्वैती, अद्वैती वगैरे सर्व सांप्रदायिकांचे मतैक्यच आहे. ज्ञानेश्वरमहाराजही म्हणतात–" देखें पां जनकादिक । कर्मजात अशेख । न साडितां मोक्षसुख । पावते जाहले ॥ " १५२ " निष्काम कर्मांनी सिद्धि मिळत्ये याचा दाखला या श्लोकाच्या पहिल्या चरणांत सांगितला असून दुसऱ्या चरणापासून निराळ्या प्रकारच्या प्रतिपादनास सुरवात झाली आहे. " ६५५ असे रहस्यकार म्हणतात. पण येथे त्यांनी अर्धाला चरण म्हटले आहे; हा केवल दृष्टिदोष आहे असेही म्हणता येत नाही. कारण हा दोष येथे एकदाच नव्हे तर दुसऱ्याही अनेक ठिकाणी आढळतो. पृ. ६४७. ६४४. ६३२, वगैरे पहा. हा दोष अगदीच महत्त्वाचा नाहीं, असे नाहीं. पण त्याला विशेष महत्त्व देण्याचे आम्हांला कांही कारण नाहीं, हे खरें. तथापि दोन-चार बी. ए., एक-दोन शास्त्री यांच्या दृष्टीतून असले प्रमाद निसटून जावे, हे आश्चर्य आहे ! शिवाय प्रत्येक शब्द अतिशय विचारपूर्वक लिहिण्याचा ज्यांचा बाणा आहे त्यांच्या ग्रंथावर ' त्यांनी सरळ अर्थ केला नाहीं, ओढाताण केली वगैरे, सांप्रदायिक आग्रह, गीतार्थावर सारवण घातले,' वगैरे दोष देणारांनी आपल्या ग्रंथांत असले प्रमाद करणें, सर्वथा अयोग्य आहे. गीतारहस्यांत एके ठिकाणी तर आत्मा व मन यांचेही परमाणु मानले आहेत ! म्हणजे चार्वाक-बौद्धांसारखे नास्तिकही जें म्हणत नाहीत, तें म्हटलें आहे, याहून आणखी अधिक प्रमाद तो कोणता ? हे दोष वर्तमानपत्रासारख्या लौकिक भाषेत जरी क्षम्य असले तरी शास्त्रीय ग्रथांत सर्वथा अक्षम्य होत, असो.

रहस्यकार पुढे म्हणतात–" ज्ञानी पुरुषाचे लोकांचे ठायी कांही अडले नसते. तरीही ज्ञानी पुरुषास कर्म करणे चुकत नाही, म्हणून त्याने निष्काम कर्म करावे, असें सिद्ध केलें." ( पण असें सिद्ध केलें की सांगितले ? ज्ञानी पुरुषांचे लोकांचे ठायी कांही अडलें नसतें, हे म्हणणें बरोबर नाहीं. कारण ज्ञानी पुरुष लोकांवर अनुग्रह करीत असतात, स्वाध्याय-प्रवचन संन्याश्यालाही लोकानुग्रहार्थ विहित आहे. ज्ञानेश्वरमहाराज याविषयी अतिशय कळकळीनें याच श्लोकाच्या उत्तरार्धावरील टीकेंत असे उद्गार काढितात–" देखें प्राप्तार्थ जाहले । जे निष्कामता पावले । तयांही कर्तव्य असे उरले । लोकां लागीं ॥ १५५ ॥ मार्गीं अंधासरिसा । पुढें देखणाही चाले जैसा । अज्ञाना प्रकटावा धर्म तैसा । आचरोनी ॥१५६॥ हां गा

ऐसें जरी न कीजे। तरी अज्ञाना काय उमजे । तिहीं कवणेपरी जाणिजे। मार्गातें या ॥१५७॥" पण ' न चास्य सर्वभूतेषु० ' याचा अर्थ रहस्यकार तसाच समजतात ! ज्ञानी पुरुषास कोणते कर्म चुकत नाही ? शरीरधारणाला अवश्य तेवढे स्वाभाविक कर्म मात्र चुकत नाही. मागें पृ. ३०४ पहा. पण येथील कर्म तें नव्हे.त्यानें लोकसग्रहही होत नाही, मोक्षही मिळत नाही व ते निष्कामही घडत नाही. कारण अन्न निष्काम खा, पाणी फलाची इच्छा न धरतां पी. आसक्ति न ठेवता झोप घे,हे कसे शक्य आहे?) पण"कर्म करणे चुकत नाही म्हणून तें केले पाहिजे, हा युक्तिवाद कायदेशीर असला तरी सामान्य मनुष्याची तेवढ्याने व्हावी तितकी पूर्ण खात्री होत नाही. एकण अपरिहार्य म्हणूनच कर्म करावयाचे, त्यात दुसरें कांही साध्य नाही, अशी शका मनात येते. म्हणून आपल्या कर्माने लोकसग्रह करणे, हें ज्ञानी पुरुषाचे एक अत्यंत महत्त्वाचे असे या जगातील प्रत्यक्ष साध्य आहे, असे दाखविण्यास या श्लोकाच्या दुसऱ्या चरणापासून (उत्तरार्धापासून?) सुरुवात झाली आहे."( पण कर्म करणे चुकत नाही, वगैरे युक्तिवाद कोणत्या कायद्याला धरून आहे, ते कायदेपडितासच ठाऊक ! स्वाभाविक कर्मे चुकत नाहीत हे सृष्टीच्या कायद्यानेच सिद्ध आहे, तो युक्तिवाद नव्हे. प्रत्यक्ष सृष्टीचा अनुल्लघ्य कायदा आहे व तोही असा आहे की तो मोडण्यास सृष्टीतील एकही जीव समर्थ नाही. अर्थात् त्याबद्दल सामान्य मनुष्याचीच्याशी काय पण अतिशय सूक्ष्म कीटाचीही पक्की खातरी झालेली असते. जी कर्मे कोणालाच सुटत नाहीत तीच अपरिहार्य होत. पण शास्त्रीय कर्मे तशी अपरिहार्य नाहीत. ती परिहार्य आहेत. म्हणून तर ती लोकसंग्रहार्थ करण्याचे विधान सभवते. ती जर खरोखरच अपरिहार्य असती तर लोकसग्रह हे त्यांचे निराळे निमित्तच पुढे करावयास नको होते.'तुला स्वतःसाठी जेवण जरी नको असले तरी लोकसग्रहासाठी जेव' असे विधान सभवत नाही. अर्थात् 'लोकसग्रहार्थ कर्म कर' हे म्हणणे शास्त्रीय कर्मांना उद्देशून आहे. ज्ञानी पुरुषाला चित्तशुद्धि होऊन ज्ञानप्राप्ति झाल्यावर त्याच वर्णाश्रमविहित कर्माची काही आवश्यकता नसते. खाणे, पिणे, निजणे, इत्यादिकांची आवश्यकता नसते, असे मुळीच नाही, आणि त्या स्वाभाविक व म्हणूनच अपरिहार्य कर्मांनी लोकसग्रहही होत नाही. आपल्या कर्माने लोकसग्रह करणे हे ज्ञानी पुरुषाचे या जगांतील साध्य नव्हे. तो कृतार्थ झालेला असतो. त्याला कोणतेच साध्य संपादन करावयाचें नसते. अर्थात् 'लोकसग्रह प्रत्येक ज्ञानी पुरुषाने केलाच पाहिजे,' असे म्हणता येत नाही. ज्ञानानंतर ज्ञानी केवल प्रारब्धाधीन असतो. त्यावाचून तो दुसऱ्या कशाच्याही तंत्राने वागत नाही. त्यामुळेच ज्ञानी पुरुषाला तू ' लोकसग्रहार्थ कर्म कर' असेही कोणाला सांगतां येत नाही.)
" लोकसग्रहमेवापि, यातील 'एवापि' या पदाचें तात्पर्य हेच असून यावरून निराळ्या प्रकारच्या प्रतिपादनास आतां सुरुवात झाली आहे, असे स्पष्ट होतें." ('एवापि' याचे हेच तात्पर्य, म्हणजे कोणते? त्या निराळ्या प्रकारच्या प्रतिपादनाचे स्वरूप काय आहे ? सर्वच सदिग्ध ! वस्तुतः कर्माधिकारी अनात्मज्ञ पुरुषाला कर्मयोगाचे अनुष्ठान का केले पाहिजे हे वर सांगितले व आता ज्या कर्माधिकाऱ्याला आत्मज्ञान झाले आहे, पण तो ज्ञाननिष्ठेचा अधिकारी नाही त्याने कर्मानुष्ठान कशासाठी करावयाचे, तें तेथून पुढे सांगण्यास आरंभ केला आहे, असा विषयविभाग येथे केला पाहिजे. कर्म कां केले पाहिजे त्याचें एक कारण वर सांगितलेले असल्यामुळे लोकसंग्रह हे कर्मानुष्ठानाचें दुसरें कारण आहे, हेच'एवापि' यावरून स्पष्ट होतें.असो;

आतां रहस्यकार 'लोकसंग्रहशब्दाचा' अर्थ कसा करितात तो पहा)–"लोकसंग्रह या शब्दांत 'लोक' याचा अर्थ व्यापक असून केवळ मनुष्यज्ञातीसच नव्हे, तर सर्व जगाला सन्मार्ग लावून त्याचा नाश होऊं न देता संग्रह म्ह० चागल्या रीतीने धारण, पोषण, पालन किंवा बचाव करणे, या सर्व गोष्टींचा लोकसंग्रहशब्दांत समावेश होतो" पण हा अर्थ अतिशय ओढाताणीचा आहे. गीतारहस्य पृ. ३२६-३३४ येथे याच अर्थाचे सविस्तर समर्थन केले आहे, पण तेही सयुक्तिक नाही. कारण 'लोक'शब्दाचा 'सर्व जगत्' असा व्यापक अर्थ जरी केला तरी जगाला सन्मार्ग लावून त्याचा नाश होऊं न देतां संग्रह म्ह० त्याचें धारण, पोषण, पालन किंवा बचाव करणे, हा अधिकार आत्मज्ञानी पुरुषाला कसा प्राप्त होतो, ते कळत नाही. ज्ञानी पुरुष आपल्या पुत्राला किंवा कनिष्ठ बधुलाही जर सन्मार्ग लावू शकत नाही तर सर्व जगाला तो काय सन्मार्ग लावणार? स्वतः भगवान्ही जर पुढे 'प्रकृतिं यान्ति भूतानि निग्रहः किं करिष्यति' असे म्हणून प्रकृतीपुढे हात टेकीत आहेत तर इतरांची काय कथा? भगवान् षड्गुणैश्वर्यसंपन्न होते. पण त्यांनाही कंसादिक व दुर्योधनादिक यांना सन्मार्ग लावता आला नाही, तर त्याना ठार मारूनच टाकणे भाग पडले, हे प्रसिद्ध आहे. ज्याना आपण ईश्वराचा साक्षात् अवतार म्हणतो त्यांची जर ही दशा तर बिचाऱ्या इतर सात्त्विक–नित्यसत्त्वस्थ, निर्द्वंद्व, निर्योगक्षेम ज्ञानी पुरुषाना सर्व जगाला सन्मार्ग कसा लावतां येणार ? रहस्यकार कल्पना भराभर करीत सुटतात पण त्यांना अनुभवाचें पाठबळ मुळीच नसतें. रहस्यकार म्हणतात "सर्व सृष्टीचें पालन-पोषण करून लोकसंग्रह करण्याचा जो हा भगवताचा अधिकार तोच पुरुष ज्ञानी झाला म्हणजे त्याच्या ज्ञानामुळें त्याला प्राप्त होत असतो." पृ. ३२८. पण ही नुस्ती कल्पना आहे. 'ज्ञानी ब्रह्मरूप होतो' याचा अर्थ तो ईश्वराप्रमाणे निग्रहानुग्रह समर्थ होतो, असा नव्हे, तर तो आपला जीवभाव टाकून 'मी सच्चित्सुखरूप ब्रह्म आहे' असें साक्षात् जाणतो, एवढाच त्याचा अर्थ आहे. म्हणूनच वेदान्तमीमांसेत 'जगद्व्यापारवर्ज्यं प्रकरणादसंनिहितत्वाच्च' ४।४।१७ असें सूत्र आहे. जगाची उत्पत्ति, स्थिति, लय इत्यादि ईश्वराचे व्यापार सोडून बाकीचें ईश्वराचे व विद्वानाचे ऐश्वर्य सारखेंच. कारण सृष्टिवाक्यांत ईश्वरच प्रकृत आहे व विद्वानांचा तेथे उल्लेखही नाही. शिवाय ज्ञानी पुरुषही आपल्या प्रारब्धाचे अतिक्रमण करूं शकत नाही, हे जर वेदान्तशास्त्रावरूनच सिद्ध आहे तर तो आपल्या शक्तीच्या बाहेरचें काम जगाचें धारण, पोषण, बचाव वगैरे कसें करणार ? 'ज्ञानी इति कृत्वा न तस्य शृंगद्वयं भवति-' एखादा मनुष्य ज्ञानी झाला म्हणून त्याला दोन शिंगें आलीं आहेत, असें कधी होत नाही, असें म्हणून आचार्यांनी ज्ञानी व अज्ञानी यांच्या व्यावहारिक स्वरूपादिकांत कांही फरक पडत नाही, त्यांच्या अन्तःकरणांत मात्र विलक्षण फरक पडतो, असे सुचविलें आहे. अर्थात् ज्ञानी पुरुषानें लोकसंग्रह म्ह० जगाचे धारण-पोषण करावें, असें म्हणणें म्हणजे त्याच्या शक्तीच्या बाहेर त्याच्यावर भार लादणें आहे. त्यापेक्षां कल्पनेच्या अशा लांब लांब भराऱ्या न मारतां प्रकरणाला धरून लोकांनी उन्मार्गी होऊं नये म्हणून कर्माधिकारी ज्ञानी पुरुषानें आपल्या वर्णाला व आश्रमाला विहित असलेलें कर्म करीत असावें, असा अर्थ करणेंच सयुक्तिक होय. अधिकारी गृहस्थ किंवा ब्राह्मणेतर क्षत्रियादि यांना आत्मज्ञान जरी झाले तरी संन्यास घेऊन ज्ञाननिष्ठ होतां येत नाहीं. तथापि आपल्याला ज्ञान

**यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जनः ।**
**स यत्प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते ॥ २१ ॥**

**अन्वयार्थ—श्रेष्ठः**—प्रधान-मुख्य पुरुष—**यत् यत्**—जें जें—**आचरति**—करतो—**तत् तत् एव**—ते तेंच कर्म—**इतरः जनः**—इतर जन-त्याचा अनुयायिवर्ग करतो.—**सः**—तो श्रेष्ठ पुरुष—**यत्**—ज्या लौकिक किंवा वैदिक कर्माला वगैरे—**प्रमाणं**—प्रमाण—**कुरुते**—करतो—**लोकः**—लोक—**तत्**—त्यालाच—**अनुवर्तते**—अनुसरतो. २१.

**लोकसंग्रहं कः कर्तुमर्हति कथं चेत्युच्यते—यद्यदिति । यद्यत्कर्माऽऽचरति येषु येषु श्रेष्ठः प्रधानस्तत्तदेव कर्माऽऽचरतीतरोऽन्यो जनस्तदनुगतः । किंच स श्रेष्ठो यत्प्रमाणं कुरुते लौकिकं वैदिकं वा लोकस्तदनुवर्तते तदेव प्रमाणीकरोतीत्यर्थः ॥ २१ ॥**

**भाष्यार्थ**—( कृतार्थ झालेल्या ज्ञानी पुरुषानें लोकसंग्रहार्थही कर्म करूं नये, असें कोणी म्हणेल म्हणून आचार्य असें अवतरण देतात-)—**लोकसंग्रहं कर्तुं कः अर्हति**—लोकसंग्रह करण्यास कोण योग्य आहे ?—**च कथं इति ' यद्यत्० ' इति उच्यते**—व तो कसा करतो हे ' यद्यत्० ' या श्लोकानें सांगितले जातें—**येषु येषु श्रेष्ठः-प्रधानः**—ज्या ज्या लोकांतील श्रेष्ठ म्ह० प्रधान-मोठा सदाचरणसंपन्न, विद्वान् म्हणून सर्वांना मान्य झालेला पुरुष—**यत् यत् कर्म आचरति**—जे जे विहित किंवा निषिद्ध कर्म आचरितो—**तत् तत् एव कर्म**—तें तेच विहित-निषिद्ध कर्म—**इतरः-अन्यः तदनुगतः जनः आचरति**—इतर म्ह० दुसरा त्याचा अनुयायी जन आचरितो. [ श्रेष्ठ जे विहित किंवा निषिद्ध कर्म करतो तेंच इतर प्राकृत जनही आचरितो. यास्तव विद्वानानेंही लोकमर्यादा राखण्यासाठी विहित कर्म करावे. सामान्य लोक आचरणांत श्रेष्ठाचे अनुकरण करितात, असें सांगून एखादी गोष्ट प्रमाण किंवा अप्रमाण मानावयाची झाली तरी ते श्रेष्ठाचेंच अनुकरण करितात, असें सांगतात-]—**किंच**—तसेंच—**श्रेष्ठः यत् लौकिकं वैदिकं वा प्रमाणं कुरुते लोकः तत् अनुवर्तते-तत् एव प्रमाणीकरोति इत्यर्थः**—तो श्रेष्ठ-प्रधान पुरुष जें लौकिक किंवा वैदिक आचरण प्रमाण मानतो त्याचेंच इतर जन अनुवर्तन करतो, त्यालाच प्र-

---

झालें आहे, आतां ही वर्णाश्रमविहित कर्में काय करावयाचीं आहेत असें म्हणून त्याचा जर कोणी त्याग केला तर इतर गृहस्थ व ब्राह्मणेतरही ज्ञान झालेले नसतानाही तसेंच करतील, त्यामुळे ते सर्वच स्वधर्मापासून भ्रश पावून त्यांचा पारलौकिक नाश होईल, यास्तव ज्ञानी कर्माधिकारी पुरुषानें ज्ञानासाठी जरी नाही तरी लोकांनी आपलें अनुकरण करून धर्मभ्रष्ट होऊ नये, म्हणून कर्मच करणें युक्त आहे. हाच लोकसंग्रह होय. प्रारब्धाधीन असलेल्या ज्ञानी मनुष्याच्या हातून तोच होणे शक्य आहे. सर्व जगाला सन्मार्गे लावणें, वगैरे हें त्याच्या शक्तीच्या बाहेरचें काम आहे. या पुढील श्लोकांकडे जरी पाहिलें तरी लोकसंग्रहशब्दाचा हाच अर्थ निष्पन्न होतो.

माण समजतो, असा याचा भावार्थ. [ सामान्य जन नेहमींच श्रेष्ठाचें अनुकरण करणारे असतात. त्यांना स्वतःचे म्हणून कांहीं मतच नसते, असा याचा इत्यर्थ. ] . २१

**न मे पार्थास्ति कर्तव्यं त्रिषु लोकेषु किंचन ।**
**नानवाप्तमवाप्तव्यं वर्त एव च कर्मणि ॥ २२ ॥**

**अन्वयार्थ**—**हे पार्थ**—हे अर्जुना!—**मे**—मला—**त्रिषु लोकेषु**—या तीन लोकांत—**किंचन**—कांहींही—**कर्तव्यं**—कर्तव्य कर्म—**न अस्ति**—नाही. कारण —**अनवाप्तं**—मला न मिळालेले असें कांही नसून,—**अवाप्तव्यं**—मिळवावयास योग्य असें कांहीं—**न अस्ति**—नाही. तरी सुद्धां मी—**कर्मणि**—कर्मामध्यें—**वर्ते एव**—राहतोच म्ह० कर्म करतोच. २२.

**यद्यत्र ते लोकसंग्रहकर्तव्यतायां विप्रतिपत्तिस्तर्हि मां किं न पश्यसि—न म इति न मे मम पार्थ नास्ति न विद्यते कर्तव्यं त्रिष्वपि लोकेषु किंचन किंचिदपि । कस्मान्नानवाप्तमप्राप्तमवाप्तव्यं प्रापणीयं तथाऽपि वर्त एव च कर्मण्यहम् ॥ २२ ॥**

**भाष्यार्थ**—( सामान्य लोक असे श्रेष्ठानुकारी असल्यामुळें आत्मसाक्षात्काराने कृतार्थ झालेल्या श्रेष्ठ पुरुषाने लोकसंग्रहार्थ विहित कर्म करावे, असे सांगून आतां त्याविषयींच भगवानांचा उदाहरणरूपाने भाष्यकार उपन्यास करितात-)—**अत्र लोकसं-**

---

१ रहस्यकार "श्रेष्ठ म्ह० आत्मज्ञानी कर्मयोगी" असें म्हणतात पृ. ६५५. पण श्रेष्ठशब्दाचा हा सरळ अर्थ आहे असे कोण म्हणेल ? या श्लोकांत एक सर्वसाधारण लौकिक नियम सांगितला आहे. त्यात ज्ञानी, अज्ञानी, कर्मयोगी, किंवा सन्यासी असा कांहींच विशेष न ठेवता कोणत्याही काळीं, कोणत्याही प्रदेशीं किंवा कोणत्याही प्रकारच्या लोकात जो लोकांच्या आदरास पात्र झालेला असतो त्याचें अनुकरण सर्व त्याचे इतर अनुयायी करतात. तो धर्माचरण करूं लागला की, ते धर्माचरण करितात, तो दुराचरणी झाला, की ते दुराचरणी होतात. श्रेष्ठ आस्तिक असला तर ते आस्तिक होतात, तो नास्तिक असला की हे नास्तिक बनतात. 'यत् यत्' व 'तत् तत्' या शब्दांतून असाच अर्थ निघतो. रहस्यकार ग्रंथाचा बादरायण संबंध कसा लावितात त्याचे आणखी एक उदाहरण येथे आहे. "तैत्तिरीय-उपनिषदांतही प्रथम 'सत्यं वद धर्मं चर' इत्यादि उपदेश केल्यावर अखेर 'संसारांत एखाद्या प्रसंगीं कसें वागावें, याचा तुला संशय पडल्यास ज्ञानी युक्त व धर्मिष्ठ ब्राह्मण त्या बाबतीत जसे वागत असतील त्याप्रमाणें वागत जा' असे सांगितले आहे." गी.र.पृ.६५६ पण वस्तुतः येथील या सामान्य नियमाचा उपनिषदांतील समावर्तनसमयीं आचार्यांनी शिष्याला केलेल्या उपदेशाशीं कांही संबंध नाहीं. कारण येथें सामान्यलोकांचा स्वभाव सांगितला आहे व तेथें शिष्यानें गृहस्थाश्रमी झाल्यावर कसे वागावें ते सांगितले आहे. पण इतका सूक्ष्म भेद पाहतो कोण ? उपनिषदांतील हे उपदेशप्रकरण समग्र ज्यांना पहावयाचें असेल त्यांनी सार्थ तैत्तिरीयोपनिषद् आवृत्ति १ ली पृ. ३३-४४ आ. दुसरी पृ. २१-२५ तैत्तिरीयभाष्यार्थ पृ. ४८-५५ पहावें.

**ग्रहकर्तव्यतायां यदि ते विप्रतिपत्तिः तर्हि मां किं न पश्यसि**—या लोकसंग्रहकर्तव्यतेविषयीं जर तुझा कांहीं विरोध-मतभेद असला तर तूं मलाच कां पहात नाहीस ? असें—'**न मे०' इति**—'न मे०' या श्लोकानें भगवान् सांगतात—**पार्थ मे-मम त्रिषु अपि लोकेषु किंचन-किंचित् अपि कर्तव्यं नास्ति-न विद्यते**—हे अर्जुना, माझें तिन्ही लोकांत कांहीं सुद्धां कर्तव्य नाहीं. (मला त्रिभुवनांत कांहीं कर्तव्य नाहीं. )—**कस्मात्**—पण अप्राप्त वस्तूच्या प्राप्तीसाठीं तुलाही कांहीं कर्तव्य असेलच, मग असें असतांना 'मला कांहीं कर्तव्य नाहीं' असें कोणत्या कारणानें म्हणतोस ? —**अनवाप्तं-अप्राप्तं अवाप्तव्यं-प्रापणीयं न**—मला कांहीं अप्राप्त-प्राप्त न झालेले व त्यामुळे प्राप्तव्य-प्राप्त करून घेण्यास योग्य असें कांहीं नाहींच.—**तथापि**—त्यामुळें कर्मानुष्ठानानें मला कांहीं प्रयोजन संपादन करावयाचें जरी नसले तरी—**अहं कर्मणि वर्ते एव**—मी कर्मामध्ये प्रवृत्त होतोंच. [ लोकसंग्रहासाठीं माझ्या वर्णाला व आश्रमाला उचित असें कर्मानुष्ठान करतोंच. अर्थात् ज्ञानी प्रधान पुरुषाची लोकांनी धर्माचरण सोडून उन्मार्गी होऊं नये म्हणून कर्मप्रवृत्ति संभवते. ] २२.

---

१ रहस्यकार म्हणतात "आत्मज्ञानी पुरुषाची स्वार्थबुद्धि सुटली तरी लोककल्याणाची कर्में त्यास सुटत नाहात.हाच अर्थ स्वतःचें उदाहरण सांगून भगवान् आता अधिक दृढ करितात" ६५६. आत्मज्ञानी कृतकृत्य होतो ही गोष्ट खरी व तो ग्रंथ व प्रवचन याच्या द्वारा लोकोपदेशाचे काम करतो. तो ज्ञाननिष्ठेचा अधिकारी नसला तर लोकसंग्रहार्थ आपल्या वर्णाश्रमाला उचित असे कर्मानुष्ठानही करतो. पण तेवढ्यावरून 'लोककल्याणाची कर्में' त्यास सुटतच नाहीत हे म्हणणे वस्तुस्थितीला धरून नाहीं. कारण स्वधर्मरूप कर्मानुष्ठानाला 'लोककल्याणाची कर्में' असे म्हणताच येत नाहीं. आपले अनुकरण करून इतर अज्ञ कर्माधिकाऱ्यांनी स्वधर्मापासून च्युत होऊ नये म्हणूनच तो स्वप्रयोजनाच्या अभावीही कर्म करीत असतो. भगवान् स्वतःचें जे उदाहरण देत आहेत तेही याच आशयाने होय. प्रत्येक ज्ञानी पुरुषाने " जगाचे धारण, पोषण, पालन बचाव " करावा या आशयाने नव्हे.

रहस्यकार या श्लोकाच्या अर्थांत "माझे ( म्हणून ) त्रिभुवनांत ( मला ) कांहीही कर्तव्य उरलेले नाहीं ..तथापि मी कर्मेंच करीत आहें" असे म्हणतात. पण यांत 'मे' म्ह० माझें असा अर्थ केल्यावर 'मला' हा शब्द कोठून आणला ! तसेच 'मे' याचा अर्थ 'माझे म्हणून' असा करणे ही ओढाताण नव्हे तर काय ? तसेच 'वर्ते एव' असे मुळांत असताना 'कर्मेंच करीत आहें' असा अर्थ करण्यांत आपला सांप्रदायिक आग्रहच व्यक्त होत नाहीं काय ? 'कर्मेंच करीत आहे' व 'तथापि मी कर्मे करतोच' यांत निरनिराळे अर्थस्वारस्य आहे हें विचारी वाचकांना निराळें सांगावयास नकोच. 'कर्मेंच करीत आहे' या वाक्यांत कर्माविषयींचा आग्रह व्यक्त होतो, म्ह० कर्मावाचून दुसरे कांहींच करीत नाहीं, असें ध्वनित होतें. पण 'कर्मे करतोच, कर्मामध्ये प्रवृत्त होतोच' यावरून कर्मे सोडीत नाही तर त्यांचा मला उपयोग नसला तरी मी ती करीतच आहे, असा बोध होतो.

रहस्यकार याच श्लोकावरील टीपेंत पुनः म्हणतात "लोकसंग्रह म्हणजे उगाच कांही तरी थोतांड नव्हे ..."( पण लोकसंग्रहाला थोतांड म्हटले कोणी ? आचार्यादि अद्वैतवादी लोक-

संग्रहाला थोतांड म्हणत नाहीत, प्रत्येक ज्ञानी लोकसंग्रहाचा अधिकारी आहे हें मात्र त्यांना सम्मत नाही. श्रेष्ठच लोकसंग्रहाचा अधिकारी आहे. पण प्रत्येक ज्ञानी लौकिकांत श्रेष्ठ नसतो.)" तसेंच ज्ञान प्राप्त झाल्यावर ज्ञात्याचें जरी कांही कर्तव्य उरलें नसलें तरिहि सर्व कर्मे निष्कामबुद्धीनें त्यानें अवश्य केलें पाहिजे असा जो आम्ही १७ ते १९ श्लोकांचा वर अर्थ केला आहे तोहि भगवंताच्या स्वतःच्या या दृष्टान्तावरून पूर्णपणें सिद्ध होतो" ( पण १७ ते १९ श्लोकांचा वास्तविक अर्थ काय आहे हे आम्हीं वर दाखविलेंच आहे. १७ व १८ या श्लोकांत पूर्वोक्त कर्मयोग कोणाला करावयास नको तें सांगितलें असून तू तसा त्याचा अपवाद होत नाहीस, कर्मयोगाधिकारी आहेस; म्हणून आसक्त न होतां, सतत कर्तव्य कर्मे कर म्हणजे तुला मोक्षप्राप्ति होईल असें तेथें सांगितलें आहे. १९ व्या श्लोकाच्या उत्तरार्धावरून ज्ञानी पुरुषासाठीं निष्काम कर्माचें विधान नाहीं हें स्पष्ट होतें. कारण 'असक्त होऊन कर्मे करणारा पुरुष मोक्षाला प्राप्त होतो' असें सांगितल्यानें निष्काम कर्म मोक्षाचें साधन आहे हें उघड होतें व साधन केव्हांही सिद्धाकरितां नसतें. तेव्हां वरील विधान ज्ञानी पुरुषासाठीं नसून जिज्ञासूसाठीं आहे हें निर्विवाद होय. शिवाय 'लोकसंग्रहमेवापि' येथून चालू प्रकरण बदललेलें आहे ही गोष्ट रहस्यकारही कबूल करितात. त्यामुळें १७ ते १९ श्लोकाच्या अर्थाशीं भगवंताच्या या दृष्टान्ताचा कांहीं संबंध नाहीं. तथापि " एरवीं हा दृष्टान्तच विलग व निरर्थक होईल. " असें रहस्यकार म्हणतच आहेत. पण तें म्हणणें अगदीं अप्रयोजक आहे. कारण 'लोकसंग्रहमेवापि' येथून ज्ञानी कर्माधिकारी श्रेष्ठ पुरुषानें चित्तशुद्धि व ज्ञान यांसाठीं जरी नाहीं तरी लोकसंग्रहार्थ स्वधर्मानुरूप कर्मानुष्ठान करीत रहावें, असें सांगण्यास आरंभ केला आहे व त्याच प्रसंगानें भगवानांनीं आपला दृष्टान्त दिला आहे. त्याअर्थीं तो विलग किंवा निरर्थक होईल ही भीति व्यर्थ आहे.

" यज्ञचक्र बुडून जगाचें कांहीं होवो त्याची परवा न करितां सांख्यमार्गांतील ज्ञानी पुरुष सर्व कर्मे सोडून देतात, आणि कर्ममार्गांतील ज्ञानी पुरुष स्वतःसाठीं जरूर नसलें तरी लोकसंग्रह हें महत्त्वाचें व आवश्यक साध्य समजून त्यासाठीं स्वधर्माप्रमाणें आपलीं सर्व कामें चालू ठेवीत असतात, हा या दोन मार्गांत मोठा भेद आहे" ६५७, हें रहस्यकारांचें म्हणणें शास्त्रीय परिभाषेला धरून नाहीं. साधनचतुष्टयसंपन्न असलेल्या पुरुषालाच आत्मज्ञानाचा अधिकार प्राप्त होतो. विवेक, वैराग्य, शमदमादि व मुमुक्षुत्व हें साधनचतुष्टय होय. याच्या अभावीं कोणीही ज्ञानीच होऊं शकत नाहीं. ज्ञान झाल्यावर जगत् रहाणें, किंवा बुडून जाणें याचें सुखदुःख त्याला काहीच नाहीं. मग तो ज्ञानी आपल्या प्रारब्धानुसार ज्ञाननिष्ठ होवो कीं लोकसंग्रहार्थ कर्मेंच करीत राहो. मिथ्या ठरलेल्या जगाची त्याला परवा वाटणें केव्हांही शक्य नाहीं. मिथ्या जगांत आसक्त होऊन केवल अज्ञानानें विविध ताप भोगीत असलेल्या जीवांविषयीं म्हणजे स्वतःच्याच कल्पित अंशांविषयी त्याच्या मनांत दया उत्पन्न होणें साहजिक आहे. त्यामुळें जो ज्ञाननिष्ठ असेल तो ज्ञानोपदेशाच्या द्वारा व जो कर्मनिष्ठ असेल तो कर्मानुष्ठानाच्या द्वारा लोकसंग्रह करीत राहील यांतही कांहीं संशय नाहीं. पण त्या दोन्ही ज्ञान्यांची प्रवृत्ति जगच्चक्र अविच्छिन्न चालू रहावें यासाठीं नसून जीवांनी यथाधिकार साधनानुष्ठान करून या मिथ्या भवचक्रांतून मुक्त व्हावें या-

**यदि ह्यहं न वर्तेयं जातु कर्मण्यतन्द्रितः ।**
**मम वर्त्मानुवर्तन्ते मनुष्याः पार्थ सर्वशः ॥२३ ॥**

**अन्वयार्थ—हि**—कारण—**यदि**—जर—**अहं**—मी—**अतन्द्रितः सन्**—तन्द्रा सोडलेला असा होऊन, आळस सोडून—**कर्मणि**—कर्मामध्यें-सदाचरणांत—

---

साठीं आहे. भ्रामक जगच्चक्र अविच्छिन्न चालावें हें कोणत्याही ज्ञान्याला इष्टच नाहीं. शिवाय जगच्चक्र ईश्वराच्या नियतीनेंच चाललें आहे, तें चालवावयास वस्तुतः शास्त्रोपदेशाची गरज नाही. आपण असे समजूं कीं, जगांतून वैदिक कर्ममार्गच नामशेष झाला, तर मग काय जगच्चक्र त्यासाठीं थांबून राहील? जेथें वैदिक कर्ममार्ग नाहीं, अशा पाश्चात्त्यादि देशांत जगच्चक्र चाललेच आहे की नाही? तसेंच जगत् म्हटलें म्हणजे त्यांत केवल मनुष्यांचाच अंतर्भाव होत नाहीं. पशु-पक्षी व देवादि या सर्व संसारी जीवांचा त्यांत समावेश होतो. ते आपआपल्या कर्माप्रमाणें जन्म-मरण, सुख-दुःखादि भोगरूप संसार करीत असतात. तेव्हां मनुष्यांतील थोडेसे अल्पसंख्याक वैदिक जर उद्यां नाहीसे झाले तर त्यांच्या अभावीं सर्व जगत्च नाहीसें होईल ही भीति व्यर्थ आहे. अर्थात् वर जगच्चक्र चालविण्याविषयीं जें विधान आहे ते अतत्त्वज्ञाच्या चित्तशुद्धीसाठीं आहे. तत्त्ववेत्त्यासाठीं नाहीं, हें उघड होतें. अर्थात् संन्यासमार्गी व कर्मयोगी यांच्यांतील 'जग बुडेल याची परवा न करणें व ती करणें' हा जो भेद दाखविला आहे तो निव्वळ काल्पनिक आहे, तात्त्विक नव्हे. वर्णाश्रमादि-अभिमानी अज्ञ पुरुषासाठींच तें यज्ञादिकांचें विधान आहे; व त्यानेंच तें चालविलें पाहिजे, असा कर्मकांडाचा आग्रह आहे. अज्ञ कर्माधिकारी गृहस्थ सर्व लोकांचा उपभोग्य कसा होतो ते बृहदारण्यक अ. १ ब्रा. ४ कंडिका १६ यात सुंदर वर्णिलें आहे. विस्तारभयास्तव ते सर्व येथें देतां येत नाहीं. तथापि त्यांतील मुख्य भाग असा आहे—
"तो कर्माधिकारी गृहस्थ म्हणजे वर्णाश्रमादिकांचा अभिमानी अविद्वान् पुरुष जो होम व याग करतो त्यानें देवांचा भोग्य होतो, जो प्रत्यहीं स्वाध्याय करतो त्याच्यायोगाने तो ऋषींचा भोग्य होतो; जें पितरांना पिंडोदकादि देतो व जी प्रजेची इच्छा करतो, त्याच्यायोगाने पितरांचा भोग्य होतो. मनुष्यांना आपल्या घरीं ठेवून घेऊन त्यांना जें भोजन देतो त्याच्यायोगानें तो मनुष्यांचा भोग्य होतो. पशूंना जे गवत व पाणी देतो त्याच्यायोगानें पशूंचा भोग्य होतो.त्याच्या घरांत श्वापदें, पक्षी व कीडमुंगीपर्यंत इतर जीव तांदुळादिकांचे कण इत्यादिकांवर उपजीविका करितात त्यामुळे तो त्यांचा भोग्य होतो.याप्रमाणे देहाभिमानी अज्ञ गृहस्थ देवादि सर्व जीवांवर उपकार करीत असल्यामुळे एखाद्या ऋणी पुरुषाप्रमाणें 'मला या सर्वांचें ऋण फेडले पाहिजे' अशी आपणाविषयीं कल्पना करून अहर्निश देवादि पंचमहायज्ञांमध्यें निमग्न असतो. त्याच्या अविनाशाची इच्छा सर्व देवादि भूते करितात. एखादा कुटुंबी आपल्या पशूचें जसें रक्षण करतो तसें देवादि त्याचें रक्षण करितात. एखाद्या पशूला व्याघ्रादिकांनीं उचलून नेल्यास त्याच्या धन्याला फार दुःख होतें; तसेंच, एकेक गृहस्थ अनेक पशूंप्रमाणें देवांच्या उपयोगी असल्यामुळें त्याला आत्मज्ञान व्हावे हें देवतांना मुळींच प्रिय नाहीं. ते त्याच्या तत्त्वज्ञानाला विघ्न करीत असतात. इत्यादि" या प्रकरणाचा अधिक विस्तार पहावयाचा असल्यास बृहदा. भाष्यार्थ अ. १ पृ. ३३४-३६८. पहा.

**जातु**—कदाचित्—**न वर्तेय**—न वागलों तर—**पार्थ**—हे अर्जुना !—**मनुष्याः**—मनुष्य—**सर्वशः**—सर्व प्रकारें—**मम**—माझ्या—**वर्त्म**—मार्गास—**अनुवर्तन्ते**—अनुसरतील. २३.

**यदि पुनरहं न वर्तेय जातु कदाचित्कर्मण्यतन्द्रितोऽनलसः सन्मम श्रेष्ठस्य सतो वर्त्म मार्गमनुवर्तन्ते मनुष्या हे पार्थ सर्वशः सर्वप्रकारैः ॥ २३ ॥**

**भाष्यार्थ**—( लोकसंग्रहही व्यर्थ असल्यामुळें तुला तो करावयास नको, असें अर्जुन म्हणेल म्हणून भगवान् म्हणतात–)—**यदि पुनः अहं अतन्द्रितः-अनलसः सन् जातु-कदाचित् कर्मणि न वर्तेय**—पण जर मी आळस सोडून केव्हांही कर्मामध्यें प्रवृत्त न होईन तर—**हे पार्थ मनुष्याः श्रेष्ठस्य सतः मम वर्त्म-मार्गं सर्वशः-सर्वप्रकारैः अनुवर्तन्ते**—हे अर्जुना ! मानव श्रेष्ठ असलेल्या माझ्या मार्गाचें सर्वप्रकारें अनुवर्तन करतील. [ मी आळस सोडून स्वीकारलेल्या वर्णाश्रमाप्रमाणें धर्माचरण न केलें, तर इतर लोकही माझेंच सर्वप्रकारे अनुकरण करतील. कारण मी श्रेष्ठ आहें. यादवांमध्यें मी प्रधान पुरुष आहे. यास्तव मला धर्माचा कांहीं उपयोग जरी नसला तरी माझ्या अनुयायी जनांनीं धर्माचरण करावें, म्हणून मलाही तें करावें लागतें ] २३.

उत्सीदेयुरिमे लोका न कुर्यां कर्म चेदहम् ।
संकरस्य च कर्ता स्यामुपहन्यामिमाः प्रजाः ॥ २४ ॥

**अन्वयार्थ**—**अहं**—मी—**कर्म**—कर्म-सदाचरण—**न कुर्यां चेत्**—जर न करीन तर—**इमे लोकाः**—हे सर्व लोक—**उत्सीदेयुः**—नाश पावतील—**च**—व मी **संकरस्य**—वर्णसंकराचा—**कर्ता स्याम्**—कर्ता-वर्णसंकराचे निमित्त होईन व त्यामुळें **इमाः प्रजाः**—या सर्व लोकांना—**उपहन्याम्**—मी मारीन-त्यांचा जणुं काय घातच करीन. २४.

**तथा च को दोष इत्याह—उदिति । उत्सीदेयुर्विनश्येयुरिमे सर्वे लोका लोकस्थितिनिमित्तस्य कर्मणोऽभावात्, न कुर्यां कर्म चेदहम्, किंच संकरस्य च कर्ता स्याम् । तेन कारणेनोपहन्यामिमाः प्रजाः प्रजानामनुग्रहाय प्रवृत्त उपहतिमुपहननं कुर्यामित्यर्थः । ममेश्वरस्याननुरूपमापद्येत ॥ २४ ॥**

**भाष्यार्थ**—**तथा च कः दोषः इति 'उत्सीदेयुः०' इति आह**—आणि सर्व लोक माझ्या मार्गाचें अनुवर्तन करणारे असल्यामुळे कोणता दोष होईल, तें 'उत्सीदेयुः०' इत्यादि श्लोकानें सांगतात—**चेत् अहं कर्म न कुर्यां**—जर मी कर्म न करीन—**इमे सर्वे लोकाः उत्सीदेयुः-विनश्येयुः**—तर हे सर्व लोक विनाश पावतील. ( ते कां ? उत्तर-)—**लोकस्थितिनिमित्तस्य कर्मणः अभावात्**—लोकांच्या स्थितीला कारण होणारें जें कर्म त्याचा अभाव झाल्यामुळें [ सर्व लोक नाश पावतील. मी ईश्वर असून कर्मामध्यें जर प्रवृत्त न झालों तर माझें अनुकरण करणारे जे मन्वादिक तेही कर्म कर-

णार नाहीत आणि याप्रमाणें लोकस्थितीला कारण होणाऱ्या कर्मांचा लोप झाल्यामुळें सर्व लोकांचा नाश होईल. ]—**किं च संकरस्य कर्ता स्यां**—शिवाय मी कर्म न केल्यास वर्णसंकराचा कर्ता होईन—**तेन कारणेन इमाः प्रजाः उपहन्यां**—वर्णसंकर झाल्याकारणाने मी या सर्व प्रजेचा घात करीन ( मी प्रजेच्या नाशाचें कारण होईन. प्रजेचा घात झाला म्हणून काय झाले ? उत्तर-)—**प्रजानां अनुग्रहाय प्रवृत्तः उपहतिं-उपहननं कुर्यां इत्यर्थः**—प्रजांवर अनुग्रह करण्यास प्रवृत्त झालेला मी प्रजेची उपहति-उपहनन-घात करीन, असा त्याचा भावार्थ.—**मम ईश्वरस्य अननुरूपं आपद्येत**—मज ईश्वराला अनुरूप नसलेली गोष्ट घडून येईल, ( यास्तव मला कर्म केलेंच पाहिजे ). २४.

सक्ताः कर्मण्यविद्वांसो यथा कुर्वन्ति भारत ।
कुर्याद्विद्वांस्तथाऽसक्तश्चिकीर्षुर्लोकसंग्रहम् ॥ २५ ॥

**अन्वयार्थ—हे भारत**—हे अर्जुना !—**कर्मणि सक्ताः**—या कर्मांचा मी कर्ता आहे, मला याचे फल अवश्य मिळेल, अशा अभिमानाने कर्मांमध्यें आसक्त झालेले—**अविद्वांसः**—अविद्वान्-आत्मज्ञानशून्य लोक—**यथा**—जसे—**कुर्वन्ति**—कर्म करितात—**तथा**—त्याप्रमाणे—**लोकसंग्रहं**—लोकसंग्रह-लोकानुग्रह—**चिकीर्षुः**—करण्याची इच्छा करणाऱ्या—**विद्वान्**—विद्वानाने—**असक्तः सन्**—आसक्त न राहून-मी याचा कर्ता व भोक्ता असा अभिनिवेश न करितां कर्म—**कुर्यात्**—करावें.२५

**यदि पुनरहमिव त्वं कृतार्थबुद्धिरात्मविदन्यो वा तस्याप्यात्मनः कर्तव्याभावेऽपि परानुग्रह एव कर्तव्य इति—सक्ता इति । सक्ताः कर्मण्यस्य कर्मणः फलं मम भविष्यतीति केचिदविद्वांसो यथा कुर्वन्ति भारत, कुर्याद्विद्वानात्मवित्तथाऽसक्तः सन् । तद्वत्किमर्थं करोति तच्छृणु चिकीर्षुः कर्तुमिच्छुर्लोकसंग्रहम् ॥ २५ ॥**

**भाष्यार्थ**—( मी ईश्वर आहे. त्यामुळें कृतार्थ आहे. पण कृतार्थ असल्यामुळे माझें नियत कर्म जर मी न करीन तर माझे अनुवर्तन करणारे इतर अधिकारी जीवही आपापलें नियत कर्म करणार नाहीत. त्यामुळे जगाच्या स्थितीचे कारणच नाहींसें होऊन पृथिव्यादि भूतांचा विनाश होण्याचा प्रसंग येईल. वर्णाश्रमधर्मव्यवस्थाही राहणार नाही. अधिकारी जीवाचा पापामुळे नाश होण्याचा प्रसंग येईल. ही अनर्थपरंपरा टळावी म्हणून परानुग्रहार्थ मज ईश्वराची प्रवृत्ति होते, असें सांगितले. आतां लोकसंग्रहासाठीं कर्मे करणाऱ्या ज्ञानी पुरुषाच्या कर्तृत्वाभिमानामुळे त्याच्या ज्ञानामध्ये वैगुण्य येईल,अशी शंका आली असतां सांगतात-)—**यदि पुनः अहं इव त्वं कृतार्थबुद्धिः आत्मविद् अन्यः वा**—पण जर माझ्याप्रमाणें तूंही कृतार्थबुद्धि आत्मज्ञ असशील किंवा दुसराही कोणी आत्मज्ञ असेल [ म्ह० आत्म्याचा यथार्थ अनुभव आल्यामुळें तूं कर्तृत्वादि-अभिमानरहित असशील, किंवा दुसराही कोणी आत्मज्ञानी कर्तृत्वादि-अभिमानाच्या अभावी

कृतार्थबुद्धि झाला असेल]—**तस्य अपि आत्मनः कर्तव्याभावे अपि**—तर त्यालाही स्वतःच्या कर्तव्याचा अभाव जरी असला तरी—**परानुग्रहः एव कर्तव्यः इति 'सक्ताः०' इति आह**—परानुग्रहच करणें उचित आहे (आत्मवेत्त्यानेंही दुसऱ्यांवर अनुग्रह करण्यासाठीं कर्मानुष्ठान करावेंच,) असें भगवान् 'सक्ताः०' या श्लोकानें सांगतात—**हे भारत अस्य कर्मणः फलं मम भविष्यति इति कर्मणि सक्ताः केचित् अविद्वांसः यथा कुर्वन्ति**—हे अर्जुना, या कर्माचें फल मला प्राप्त होईल, अशा आशेने कर्मामध्ये आसक्त झालेले कित्येक अविद्वान् ज्याप्रमाणें कर्म करितात—**तथा विद्वान्-आत्मवित् असक्तः सन् कुर्यात्**—त्याप्रमाणें आत्मज्ञ विद्वानानें आसक्त न होतां कर्म करावे. (कर्मामध्यें आसक्त न होणें म्ह० काय? तर 'या कर्माचा मी कर्ता आहें' असा कर्तृत्वाभिमान किंवा 'याचे फळ मला मिळावें' अशी फलाशा न ठेवणे, म्हणजेच कर्मामध्यें आसक्त न होणे.) पण विद्वान्—**तद्वत् किमर्थं करोति तत् शृणु**—त्या अज्ञाप्रमाणें कर्म कशासाठीं करतो तें ऐक—**लोकसंग्रहं चिकीर्षुः**—लोकसंग्रह करण्याची इच्छा करणारा विद्वान् अज्ञाप्रमाणेच कर्म करतो. २५

**न बुद्धिभेदं जनयेदज्ञानां कर्मसंगिनाम् ।**
**जोषयेत्सर्वकर्माणि विद्वान्युक्तः समाचरन् ॥ २६ ॥**

**अन्वयार्थ—कर्मसंगिनां अज्ञानां**—कर्म व त्याचे फल यांत आसक्ति ठेवणाऱ्या अज्ञांचा-अविद्वानांचा-आत्मज्ञानशून्यांचा—**बुद्धिभेदं**—बुद्धिभेद—**न जनयेत्**—करूं नये. त्यांची कर्मावरील श्रद्धा ढळवूं नये. तर—**विद्वान्**—विद्वानाने-आत्मज्ञानी श्रेष्ठ पुरुषाने—**युक्तः**—समाहितचित्त राहून—**समाचरन्**—कर्मानुष्ठान करीत त्यांच्याकडून—**सर्वकर्माणि**—सर्व कर्मे—**जोषयेत्**—करवावीं. २६.

**एवं लोकसंग्रहं चिकीर्षोर्न ममाऽऽत्मविदः कर्तव्यमस्त्यन्यस्य वा लोकसंग्रहं मुक्त्वा ततस्तस्याऽऽत्मविद इदमुपदिश्यते—नेति। बुद्धेर्भेदो मयेदं कर्तव्यं भोक्तव्यं चास्य कर्मणः फलमितिनिश्चितरूपाया बुद्धेर्भेदनं चालनं बुद्धिभेदस्तं न जनयेन्नोत्पादयेदज्ञानामविवेकिनां कर्मसङ्गिनां कर्मण्यासक्तानामासङ्गवताम् । किं तु कुर्याज्जोषयेत्कारयेत्सर्वकर्माणि विद्वान्स्वयं तदेवाविदुषां कर्म युक्तोऽभियुक्तः समाचरन् ॥ २६ ॥**

**भाष्यार्थ—एवं लोकसंग्रहं चिकीर्षोः मम अन्यस्य वा आत्मविदः**—याप्रमाणें लोकसंग्रह करण्याची इच्छा करणाऱ्या मला किंवा दुसऱ्या कोणा आत्मवेत्त्याला—**लोकसंग्रहं मुक्त्वा कर्तव्यं न अस्ति**—लोकसंग्रह सोडून दुसरें कांहीं कर्तव्य नसतें.—**ततः तस्य आत्मविदः 'न०' इति इदं उपदिश्यते**—त्यामुळें त्या आत्मवेत्त्याला 'न०' इत्यादि श्लोकानें असा उपदेश केला जातो.—**कर्मसंगिनां-कर्मणि आसक्तानां-आसंगवतां अज्ञानां-अविवेकिनां**—कर्मसंगी म्ह० कर्मामध्यें आसक्त असलेल्या-कर्मासंगानें युक्त असलेल्या अज्ञ म्ह० अविवेकी लोकांच्या (बुद्धीचा

भेद करूं नये )—**बुद्धेः भेदः बुद्धिभेदः**—बुद्धीचा जो भेद त्याला बुद्धिभेद म्हणतात.—**मया इदं कर्तव्यं च अस्य कर्मणः फलं भोक्तव्यं इति निश्चितरूपायाः बुद्धेः भेदनं-चालनं बुद्धिभेदः**—मीं हे कर्म करावे व या कर्माचें फळ भोगावें, अशा निश्चितरूप बुद्धीचें भेदन म्ह० चालन करणे हाच बुद्धिभेद होय,—**तं न जनयेत्-न उत्पादयेत्**—त्याला उत्पन्न करूं नये.—**किं तु कुर्यात्**—तर मग काय करावे ?—**विद्वान् स्वयं तत् एव अविदुषां कर्म युक्तः-अभियुक्तः समाचरन्**—विद्वानाने स्वतः तेच अविद्वानांचे कर्म शांतचित्तानें करीत—**सर्वकर्माणि जोषयेत्-कारयेत्**—सर्व कर्मे त्यांच्याकडून करवावीं. [ सर्व कर्मांमध्ये प्रीति ठेवून व त्यांचेच कर्म स्वतः शांतचित्ताने आचरून त्याच्याकडून तीं करवावीं. ] २६.

---

१ या श्लोकास रहस्यकार असे अवतरण देतात—"आता यापुढे ज्ञानी व अज्ञानी याच्या कर्मातील भेद दाखवून अज्ञान्यास सुधारण्यासाठीं ज्ञात्याने काय करणे अवश्य आहे ते सागतात;" पण अज्ञान्यास सुधारण्यासाठीं ज्ञात्याने काय करावे हे पुढील श्लोकात सांगितलेलें नसून 'लोकसंग्रहाची इच्छा करणाऱ्या आत्मज्ञानी पुरुषाने अज्ञाप्रमाणेच कर्मे करून त्याचा बुद्धिभेद न होईल असे करावे' हे या दोन श्लोकात सांगितले आहे. यावरून लोकसंग्रह कोणी करावा व तो कसा करावा हेही उघड होते. ज्ञानी पुरुषच लोकसंग्रहाचा अधिकारी आहे, आत्मसाक्षात्कार झाल्यामुळे ज्ञानी पुरुषामध्ये कर्तृत्वाभिमान मुळींच रहात नाहीं,त्यामुळे तो कर्मामध्ये आसक्त न होताही अज्ञावर-अविवेकी जनावर अनुग्रह करू शकतो. कर्मामध्ये आसक्त असलेल्या लोकाची त्यावरील श्रद्धा न उडेल असें आपल्या आचरणाने व भाषणानें करणे हेच लोकसंग्रहाचें स्वरूप आहे. रहस्यकार म्हणतात त्याप्रमाणे जगाचे धारण, पोषण वगैरे करणे हा लोकसंग्रह नव्हे. आचार्यांनी लोकसंग्रहशब्दाचा अर्थ वर ( पृ. ३०९ ) जो केला आहे तोच यथार्थ होय. जगाचें धारण, पोषण वगैरे करण्याचा अधिकार ईश्वराचा आहे, ज्ञानी पुरुषाचा नव्हे. म्हणूनच भगवानाना ४ थ्या अध्यायांत आपल्या जन्माचें कारण सागून आपले जन्म व कर्म दिव्य आहे,असे स्पष्ट म्हटले आहे. (अ. ४ श्लो. ६ ते ९ पहा. )

रहस्यकार " हे अर्जुना ' ( म्हणून ) लोकसंग्रह करू इच्छिणाऱ्या ज्ञानी पुरुषाने (व्यावहारिक) कर्मात आसक्त झालेले अज्ञानी लोक ज्या प्रमाणे वागतात त्याप्रमाणेच पण आसक्ति सोडून वागले पाहिजे" असा २५ व्या श्लोकाचा अर्थ करतात. पण त्यात 'म्हणून' हा शब्द त्यांच्या पदरचा आहे. त्याला मुळात कांहीं आधार नाहीं. तसेच 'व्यावहारिक कर्मात ' हा 'कर्मणि' या शब्दाचा सरळ अर्थ नसून ओढाताणीचा आहे. शिवाय तो सयुक्तिकहि नाहीं. अज्ञलोक व्यावहारिक कर्मे जशीं करतात तशींच ज्ञानी पुरुषानेहि तीं करावीत हे म्हणणे अगदी अप्रयोजक आहे.येथील कर्मशब्दाचा अर्थ 'व्यावहारिक कर्म' असा नसून वर्णाश्रमविहित कर्मे हाच त्याचा अर्थ आहे. 'कुर्वन्ति' याचा वागतात व 'कुर्यात्' याचा वागले पाहिजे असा अर्थ करतात. दुसऱ्या अध्यायांतील "चरति चरन् चरताम्" या सर्वांचा वागतात असा अर्थ केला आहे, पण तो मूळ धात्वर्थाला धरून आहे कीं नाही याचा विचार वाचकांनीच करावा. २६ व्या श्लोकाचा अर्थ " कर्मांचे ठायीं आसक्त झालेल्या अज्ञानी लोकाच्या बुद्धीचा ज्ञानी पुरुषाने भेद करूं नये, आपण स्वतः युक्त म्हणजे योगयुक्त व सर्व कर्मे करणारा होऊन लोकाना तीं खुषीनें करावयास लावावें. " असा करतात, त्यांत ' अज्ञानाम्, ' याचा अर्थ 'अज्ञानी

लोकाच्या ' असा करतात, पण कर्मठ वैदिक अडाणी नसून अनात्मज्ञ असतात व हे प्रकरणही अडाणी व लौकिक ज्ञानी पुरुषांचे नसून अनात्मज्ञ कर्मनिष्ठ व आत्मज्ञानी कर्माधिकारी श्रेष्ठ यांचे आहे. युक्त म्हणजे योगयुक्त नव्हे, तर शांतचित्त ' जोषयेत् ' म्ह० 'खुशीने करावयास लावणे' हा अर्थ बरोबर नाही.'विद्वानाने शांत चित्ताने स्वतः कर्मे करून ती अज्ञाकडून करवावी,' हा अगदी सरळ व सुबोध अर्थ आहे.

रहस्यकार या श्लोकावरील टीपेत ' लोकसंग्रह ' याचा अर्थ ' लोकांना शहाणे करून सोडणे' असा करितात. पण तो बरोबरही नाही व त्यांच्याच पूर्वीच्या अर्थाच्या व समर्थनाच्याही विरुद्ध आहे. " पुढे नुसत्या चावटपणाच्या गोष्टी सांगू लागतात. " " ज्ञानी पुरुषाने कर्म अजिबात सोडली म्हणजे अज्ञानी लोकास निरुद्योगी होण्यास तो एक दाखलाच होतो. लोक अशा रीतीने चावट, तर्कटी व निरुद्योगी होणे यालाच बुद्धिभेद असें ह्मटले आहे. " पण बुद्धिभेदाचा खरा अर्थ हा नव्हे. ज्ञानी पुरुषही अग्नि-होत्रादि श्रौत-स्मार्त कर्मे व तीन एषणा मात्र सोडतो, स्वाभाविक कर्म सोडीत नाही, हे आम्ही वारवार सांगत आलोच आहोत. लोक निरुद्योगी होण्याचे ' सन्यासाश्रम' हे कारण नसून त्याचा स्वाभाविक आळस हेच कारण आहे. यास्तव लोकांच्या निरुद्योगीपणाचे खापर सन्यासाश्रमाच्या माथी फोडणे केव्हाहि योग्य होणार नाही. ज्ञानी पुरुषाने अग्निहोत्रादि कर्मे सोडल्यामुळे लोक तर्कटी, चावट वगैरे बनत नसून ते विपरीत ज्ञान, दुराग्रह, अश्रद्धा इत्यादि कारणाने तसे बनत असतात. म्हणून कर्मासक्त अज्ञाचा बुद्धिभेद न करणे, याचा अर्थ त्याची त्या कर्मावरील श्रद्धा उडेल असे स्वतः भाषण किंवा वर्तन न करणे असाच आहे. रहस्यकार पुढे म्हणतात " म्हणून जो पुरुष ज्ञानी झाला त्याने लोकसंग्रहार्थ म्ह० लोकाना शहाणे व सदाचरणी करण्यासाठी स्वतः संसारांत राहून लोकांस निष्काम कर्माचा म्ह० सदाचरणाचा प्रत्यक्ष धडा घालून देणे व त्याच्याकडून त्याप्रमाणे आचरण करविणे हे त्याचे या जगातील महत्त्वाचे काम आहे असा गीतेत सिद्धांत केलेला आहे. परंतु गीतेचा हा अभिप्राय मनात न घेता अडाणी लोकानी अडाणी राहूनच आपली कर्मे करावी म्हणून ज्ञानी पुरुषाने त्याच्याप्रमाणे कर्मे करण्याचे सोंग आणावे. असा टीकाकार या श्लोकाचा विपरीत अर्थ करीत असतात. जणु काय गीता दंभाचरण शिकविण्यासाठी किंवा लोकाना अडाणी ठेवून जनावराप्रमाणे त्यांच्याकडून कर्मे करून घेण्यासाठीच प्रवृत्त झाली आहे." गीतेचा सिद्धान्त काय आहे तो आम्ही वर सांगितलाच आहे.प्रत्येक ज्ञानी लोकसंग्रहाचा अधिकारी नाही, तर श्रेष्ठ कर्माधिकारी ज्ञानीच लोकसंग्रहाचा अधिकारी आहे. पण रहस्यकारांनी भगवानांनीच सांगितलेल्या ज्ञाननिष्ठेकडे दुर्लक्ष करून व ' चिकीर्षुः लोकसंग्रहम् ' या वाक्याचे स्वारस्य लक्षात न आणता 'प्रत्येक ज्ञानी पुरुषाने स्वतः संसारांत राहून लोकांस निष्काम कर्माचा धडा घालून दिला पाहिजे ' असा आपला स्वतःचा विपरीत ग्रह करून घेतला आहे व 'कित्येक टीकाकार अडाणी लोकांनी अडाणी राहूनच कर्मे करावी,' इत्यादि टीकाकारांवर मिथ्या आरोप केला आहे व "जणु काय गीता दंभाचरण शिकविण्यासाठी प्रवृत्त झाली आहे,"असा टीकाकारांचा ते उपहास करतात; इतकेंच नव्हे तर पुढे "ज्ञानी पुरुषाने कर्मे करूं नयेत असा ज्याच्या बुद्धीचा दृढनिश्चय आहे त्यांना ' लोकसंग्रह ' हे एक सोंग वाटणें स्वाभाविक आहे." असेंहि खुशाल म्हणतात. पण आम्ही असें विचारतों की, अडाणी

**प्रकृतेः क्रियमाणानि गुणैः कर्माणि सर्वशः ।**
**अहंकारविमूढात्मा कर्ताहमिति मन्यते ॥ २७ ॥**

**अन्वयार्थ—अहंकारविमूढात्मा**—ज्याचा आत्मा-चित्त अहंकारानें-शरीरालाच मी-असें मानल्याने विमूढ-नाना प्रकारें अत्यंत विवेकहीन झाले आहे असा अज्ञ—**प्रकृतेः**—प्रकृतीच्या—**गुणैः**—विकारांनी-शरीर-इंद्रियरूप परिणामांकडून—**सर्वशः**—सर्व प्रकारें—**क्रियमाणानि**—केली जाणारी—**कर्माणि**—कर्मे—**अहं कर्ता**—मीच करतो—**इति**—असे—**मन्यते**—मानतो. २७.

**अविद्वानज्ञः कथं कर्मसु सज्जत इत्याह—प्रकृतेरिति । प्रकृतेः प्रधानं सत्त्वरजस्तमसां गुणानां साम्यावस्था तस्याः प्रकृतेर्गुणैर्विकारैः कार्यकरणरूपैः क्रियमाणानि कर्माणि**

---

लोकांनी अज्ञानीच रहावे म्हणून कर्मे करण्याचे सोंग ज्ञानी पुरुषाने आणावे असा विपरीत अर्थ कोणते टीकाकार करतात? तसेच लोकसंग्रहाला तरी सोंग कोण म्हणते? रहस्यकारानी नामनिर्देशपूर्वक असा उपहास केला असता तर तो अधिक विचारणीय झाला असता. आचार्यांचे भाष्य वाचकापुढे आहेच. त्यामुळे त्यात या सोंगाची कोठे कल्पनाही नाहीं, हे निराळे सांगावयास नकोच. आम्ही दुसऱ्या सर्व संस्कृत टीकाही पाहिल्या. त्यातही असा अर्थ कोणी केलेला आढळला नाही. फक्त ज्ञानेश्वरमहाराजांनी २६ व्या श्लोकाचे व्याख्यान करून शेवटी अशी एक ओवी लिहिली आहे—" जैसी बहुरूपियाची रावो राणी । स्त्रीपुरुषभावो नाही मनी । परी लोकसपादणी । तैसीच करती ॥ १७६ ॥ " तिच्यावर कदाचित् वरील कटाक्ष असेल, असे वाटते. पण तोहि अन्यथा आहे. कारण तो केवळ दृष्टान्त आहे. नाटकांतील राजा व राणी यांच्या मनात पति-पत्नीभाव नसतो, पण ती लोकाची समजूत तशीच करितात. त्याचप्रमाणे लोकसंग्रहेच्छु ज्ञानी पुरुषाच्या मनात कर्मासक्ति नसते. पण अज्ञ कर्मठाना आपण कर्मासक्तीनेच कर्मे करीत आहो, असे दाखवून त्यानाही ती ( कर्मे ) करावयास लावावी, असा मूळ श्लोकाचाच अर्थ त्यांनी दृष्टान्ताने व्यक्त केला आहे. त्यात दंभादिकाचा काही संबंध नाही.

रहस्यकाराचा सन्यासमार्गीयावर असा एक मोठा आरोप आहे की, ते कर्मे अजिबात सोडून देतात. परोपकारहि करीत नाहीत. त्याना लोकसंग्रहाची पर्वा नसते. पण आचार्यांचे २५ व्या श्लोकावरील भाष्य पाहिल्यावर सदरहू आक्षेप किती निराधार आहे, हे वाचकांच्या सहज लक्षात येईल.कारण आचार्यांनी "विद्वान्" याला "आत्मवित्" असा पर्याय शब्द दिला आहे. त्यावरून कोणताच आत्मवेत्ता कर्म करीत नाही, असे आचार्यांचे मत आहे, असे कोणालाहि म्हणता येणार नाही. रहस्यकार व आचार्य यांच्या म्हणण्यात जर कांही फरक असेल तर तो हाच की, रहस्यकार प्रत्येक ज्ञान्याने लोकसंग्रह केला पाहिजे असा आग्रह धरितात व 'आचार्य चिकीर्षुः लोकसंग्रहम्' या महत्त्वाच्या विशेषणाकडे लक्ष देऊन प्रारब्धानुसार लोकसंग्रह करण्याची ज्याला इच्छा असेल त्याच आत्मज्ञानी पुरुषानें कर्तृत्वाभिमानादि सोडून कर्म करावे असे सांगतात. हा महत्त्वाचा भेद लक्षांत ठेवण्यासारखा आहे.

**लौकिकानि शास्त्रीयाणि च सर्वशः सर्वप्रकारैरहंकारविमूढात्मा कार्यकरणसंघातात्मप्रत्ययोऽहंकारस्तेन विविधं मूढ आत्माऽन्तःकरणं यस्य सोऽयं कार्यकरणधर्मा कार्यकरणाभिमान्यविद्यया कर्माण्यात्मनि मन्यमानस्तत्तत्कर्मणामहं कर्तेति मन्यते ॥ २७ ॥**

**भाष्यार्थ—अविद्वान् अज्ञः कर्मसु कथं सज्जते इति 'प्रकृतेः०' इति आह**—अनात्मज्ञ अज्ञ कर्मामध्यें कसा आसक्त होतो तें 'प्रकृतेः०' या श्लोकानें भगवान् सांगतात—**प्रकृतेः-(प्रकृतिः)-प्रधानं सत्त्वरजस्तमसां गुणानां साम्यावस्था तस्याः प्रकृतेः**—प्रकृतीच्या-प्रकृति म्ह० प्रधान मायाशक्ति सत्त्व, रज व तम या तीन गुणांची साम्यावस्था त्या प्रकृतीच्या—**गुणैः-विकारैः कार्यकरणरूपैः**—गुणांकडून म्ह० शरीर-इंद्रियरूप विकारांकडून—**सर्वशः-सर्वप्रकारैः**—सर्व प्रकारांनीं—**क्रियमाणानि लौकिकानि शास्त्रीयाणि च कर्माणि**—केलीं जाणारीं लौकिक व शास्त्रिय कर्मे—**अहंकारविमूढात्मा-कार्यकरणसंघातात्मप्रत्ययः अहंकारः तेन विविधं (नानाविधं) मूढः आत्मा-अन्तःकरणं यस्य सः अयं-कार्यकरणधर्मा-कार्यकरणाभिमानी**—अहंकाराने विमूढचित्त झालेला-कार्य म्ह० शरीर व करण म्ह० इंद्रियें त्यांचा संघात म्ह० एकरूप समूह, तोच आत्मा-मी आहे, असा प्रत्यय येणे, अशी मिथ्याभावना होणें हाच अहंकार, त्याच्या योगानें ज्याचा आत्मा म्ह० अन्तःकरण वि-मूढ म्ह० विविध-नानाप्रकारें मोहित झालें आहे तो हा शरीरेंद्रियधर्मा-' शरीरेंद्रियेंच मी ' असा अभिमान धरणारा—**अविद्यया कर्माणि आत्मनि मन्यमानः**—अज्ञानामुळे कर्मे आत्म्यामध्ये आहेत असे मानणारा-कर्मे हा आत्म्याचा धर्म आहे-कर्मे आत्माच करतो, असे समजणारा—**तत्तत्कर्मणां अहं कर्ता इति मन्यते**—त्या त्या शुभाशुभ लौकिक-वैदिक कर्माचा मी कर्ता आहें, असे मानतो. [ ' अविद्यया ' या भाष्यांतील पदाचा अन्वय मागे व पुढे असा दोन्हीकडे लावावा. म्ह० अविद्येने शरीरेंद्रियसमूहच मी आहे असे मानतो व अविद्येने कर्मे हा आत्म्याचा धर्म आहे, मी त्यांचा कर्ता आहे, असे मानतो. अर्थात् आत्मा कोणत्याही कर्माचा कर्ता नाहीं, हें यावरून सिद्ध होते. ] २७.

**तत्त्ववित्तु महाबाहो गुणकर्मविभागयोः ।**
**गुणा गुणेषु वर्तन्ते इति मत्वा न सज्जते ॥२८ ॥**

**अन्वयार्थ—तु**—पण याच्या उलट—**हे महाबाहो,**—हे महापराक्रमी अर्जुना ! —**गुणकर्मविभागयोः**—गुणविभाग व कर्मविभाग यांचे—**तत्त्ववित्**—तत्त्व जाणणारा—**गुणाः**—इंद्रियात्मक गुण—**गुणेषु**—विषयात्मक गुणांमध्यें—**वर्तन्ते**—प्रवृत्त होतात—**इति**—असें—**मत्वा**—मानून—**न सज्जते**—आसक्त होत नाहीं. २८

**यः पुनर्विद्वान्—तत्त्वविदिति । तत्त्ववित्तु महाबाहो कस्य तत्त्वविद्गुणकर्मविभागयोर्गुणविभागस्य कर्मविभागस्य च तत्त्वविदित्यर्थः गुणाः । करणात्मका गुणेषु विषयात्मकेषु वर्तन्ते नाऽऽत्मेति मत्वा न सज्जते सक्तिं न करोति ॥ २८ ॥**

**भाष्यार्थ—यः पुनः विद्वान् 'तत्त्ववित्०' इति**—पण जो विद्वान् असतो ( तो मी कर्मांचा कर्ता आहे, असें मानीत नाहीं, हे ) 'तत्त्ववित्तु०' या श्लोकानें सांगतात—**महाबाहो, तु तत्त्ववित्**—हे महापराक्रमी अर्जुना! पण जो तत्त्ववेत्ता असतो,—**कस्य तत्त्ववित् गुणकर्मविभागयोः-गुणविभागस्य कर्मविभागस्य च तत्त्ववित् इत्यर्थः**—कशाचे तत्त्व जाणणारा? गुण-कर्मविभागांचे म्ह० गुणविभागाचे व कर्मविभागाचें तत्त्व जाणणारा असा याचा भावार्थ. [ मी शरीरेंद्रियसंघातरूप नाहीं, हा गुणांहून आत्म्याचा विभाग आहे व कर्में माझी नव्हेत, हा कर्मांहून आत्म्याचा विभाग आहे. त्या दोन विभागांचे तत्त्व-यथार्थस्वरूप जाणणारा म्ह० गुण व कर्में यांहून आत्मा अगदीं निराळा आहे, असे साक्षात् जाणणारा. असा गुणकर्मविभागांचा तत्त्ववेत्ता अहंकारविमूढात्माही होत नाहीं व कर्मांमध्यें आसक्तही होत नाहीं. मग तो 'मी कर्ता' असे कसे मानील? असो: आतां उत्तरार्धाचें व्याख्यान करितात-]—**गुणाः-करणात्मकाः गुणेषु-विषयात्मकेषु वर्तन्ते आत्मा न**—इंद्रियरूप गुण विषयरूप गुणांमध्यें प्रवृत्त होतात. आत्मा प्रवृत्त होत नाहीं,—**इति मत्वा न सज्जते-सक्तिं न करोति**—असे मानून आसक्त होत नाहीं. विषयांमध्ये आसक्ति ठेवीत नाहीं. [ शरीरेंद्रियांचीच विषयांमध्यें प्रवृत्ति होते. आत्मा निर्विकार असल्यामुळें त्याची प्रवृत्ति होत नाहीं, असे जाणून तत्त्ववेत्ता कर्माविषयीं दृढतर कर्तव्याभिमान करीत नाहीं. ] २८

प्रकृतेर्गुणसंमूढाः सज्जन्ते गुणकर्मसु ।
तानकृत्स्नविदो मन्दान्कृत्स्नविन्न विचालयेत्॥ २९ ॥

**अन्वयार्थ—प्रकृतेः**—मायेच्या—**गुणसंमूढाः**—शरीरेंद्रियविकारांनीं अत्यंत मूढ झालेले अज्ञ—**गुणकर्मसु**—शरीरेंद्रियांच्या कर्मांमध्ये-हालचालीमध्यें—**सज्जन्ते**—आसक्त होतात. ती हालचाल-चेष्टा आम्हीच फलासाठीं करतों, असा अभिनिवेश धरितात.—**कृत्स्नवित्**—सर्वज्ञ-आत्मविद्-आत्मज्ञ ज्ञानी पुरुषानें—**तान्**—त्या—**अकृत्स्नविदः**—असर्वज्ञ-अनात्मज्ञ—**मंदान्**—मंद पुरुषांस—**न विचालयेत्**—श्रद्धेपासून ढळवूं नये. त्यांचा बुद्धिभेद करूं नये. २९

**ये पुनः-प्रकृतेरिति । प्रकृतेर्गुणैः सम्यङ्मूढाः संमोहिताः सन्तः सज्जन्ते गुणानां कर्मसु गुणकर्मसु वयं कर्म कुर्मः फलायेति, तान्कर्मसङ्गिनोऽकृत्स्नविदः कर्मफलमात्रदर्शिनो मन्दान्मन्दप्रज्ञान्कृत्स्नविदात्मवित्स्वयं न विचालयेद् बुद्धिभेदकरणमेव चालनं तन्न कुर्यादित्यर्थः ॥ २९ ॥**

**भाष्यार्थ**—( याप्रमाणें विद्वान् व अविद्वान् या दोघांचेंही प्रकृत स्वरूप सांगून विद्वानानें अविद्वानाच्या बुद्धीचा भेद करूं नये, असा—**'प्रकृतेः०' इति**—'प्रकृतेः०' या श्लोकानें उपसंहार करितात-)—**ये पुनः प्रकृतेः गुणैः सम्यङ्मूढाः-संमोहिताः सन्तः**—पण जे प्रकृतीच्या गुणांनीं अतिशय मूढ-संमोहित होत्साते—

**गुणानां कर्मसु गुणकर्मसु वयं कर्म कुर्मः फलाय इति सज्जन्ते**—शरीरेंद्रियांच्या कर्मांमध्ये म्ह० गुणकर्मांत आम्ही फलासाठीं कर्म करीत आहों, असे ह्मणून आसक्त होतात—**तान् कर्मसंगिनः अकृत्स्नविदः कर्मफलमात्रदर्शिनः मन्दान् मन्दप्रज्ञान्**—त्या कर्मांमध्यें आसक्त असलेल्या असर्वज्ञ–केवल कर्मफलाकडेच दृष्टि ठेवणाऱ्या मंदांना–म्ह० ज्यांची प्रज्ञा–बुद्धि मंद आहे अशा मतिमंदांना—**कृत्स्नवित्-आत्मवित् स्वयं न विचालयेत्**—सर्वज्ञानें म्ह० त्या आत्मवेत्त्यानें स्वतः चाळवूं नये. **बुद्धिभेदकरणं एव चालनं तत् न कुर्यात् इत्यर्थः**—त्यांच्या बुद्धीचा भेद करणें हेंच चाळविणे आहे. तें करूं नये, असा याचा भावार्थ. [ प्रकृतीच्या गुणांनीं म्ह० देहादि विकारांनीं संमूढ–देहादिकांनाच आत्मा समजणारे अज्ञ त्याच शरीरेंद्रियांच्या व्यापारांत आसक्त होतात म्ह० ते व्यापार माझेच आहेत, असे अगदी दृढ मानतात. आत्मज्ञानें त्या अनात्मज्ञांचा स्वतः बुद्धिभेद करूं नये. कारण तसा प्रयत्न केल्यास त्यांची कर्मावरील श्रद्धाच उडून ते नास्तिक बनतील व पुरुषार्थापासून भ्रंश पावतील. त्यापेक्षां ते श्रद्धेनें कर्मेंच करीत राहिल्यास काहीं दिवसांनी त्यानाच यातायातीचा कंटाळा येऊन ते आपोआप जिज्ञासू होतील. ] २९

---

१ या तीन श्लोकांस रहस्यकार असे अवतरण देतात " लोकसंग्रहार्थ आत्मज्ञानी पुरुष याप्रमाणे सांसारिक कर्मे करू लागला, तर तोही अज्ञानीच बनला अशी शंका येण्याला संभव आहे. म्हणून ज्ञानी व अज्ञानी दोघेही संसारी बनले तरी त्यांच्या वर्तनांत फरक कोणता व अडाण्याने त्यापासून काय शिकावयाचे ते आता स्पष्ट करून सांगतात. " लोकसंग्रहार्थ आत्मज्ञानी पुरुष सांसारिक कर्मे करतो व संसारी बनतो हा अपूर्व शोध आहे. कारण असंसारी आत्मा मी आहे असें समजणे हेंच आत्मज्ञान होय. मी संसारी आहे असें ज्याला वाटते तो आत्मज्ञानीच नव्हे. तेव्हा लोकसंग्रहार्थ कर्तृत्वाभिमान सोडून कर्मे करणारा संसारी बनतो या शंकेचा संभवच नाही. अर्थात् या तीन श्लोकात कर्मामध्ये अज्ञ आसक्त कसा होतो व तत्त्ववेत्ता आसक्त कसा होत नाही हे सांगून कर्मामध्ये आसक्त होणाऱ्या अनात्मज्ञाचा आत्मज्ञानी पुरुषाने बुद्धिभेद करू नये, हे सांगितले आहे. अर्थात् २५ व्या श्लोकापासून जो विषय आरंभिला होता त्याचा येथे उपसंहार केला आहे. येथें ' अडाण्यानें त्यापासून काय शिकावें ' वगैरे काही सांगितले नाही, हे भाष्यार्थावरून वाचकांच्या लक्षांत येईलच.

२७ व्या श्लोकाचा अर्थ रहस्यकार असा करतात—" प्रकृतीच्या ( सत्त्व, रज व तम या गुणांनी ) सर्व प्रकारें कर्मे होत असतां अहंकारानें वेडावलेला अज्ञानी पुरुष मी कर्ता असें म्हणतो. " पण सत्त्व, रज व तम हे गुणच कर्मे कशी करणार ? गुणांचे विकार अशी जी इंद्रिये व शरीर त्यांच्या योगाने कर्मे होत असतात. सर्व अद्वैती टीकाकार ' गुणैः ' या शब्दाचा असाच अर्थ करितात, फार काय पण मध्वाचार्य ' गुणैः इंद्रियादिभिः ' असेच म्हणतात. वल्लभसंप्रदायी टीकाकारही ' गुणैः ह्म० इंद्रियैः ' असाच पर्याय शब्द योजितात. पण रहस्यकार मात्र ' गुणैः ' म्ह० सत्त्वादि गुणानीं असें म्हणतात. कदाचित् रामानुजाचार्यांच्या या श्लोकावरील भाष्यांतील ' सत्त्वादिभिः ' या शब्दाकडे पाहून त्यांनी

असा अर्थ केला असेल, पण सत्त्वादि गुण साक्षात् कर्मे करीत नसल्यामुळे तोहि तितकाच अनुपपन्न आहे. 'अहंकाराने वेडावलेला अज्ञानी पुरुष' याचा अर्थ काय ? 'अहंकारविमूढात्मा' या शब्दापासून हा अर्थ कसा निघतो ? अहंकार म्ह० काय ? विमूढ म्ह० वेडावलेला व आत्मा म्ह० अज्ञानी पुरुष, हा अगदी सरळ अर्थ जरी असला तरी तो अतिशय दुर्बोध आहे. त्यापेक्षा 'शरीर व इंद्रिये यांच्या समूहावर 'मी' असा अभिमान ठेवणे हाच अहंकार, त्यामुळे ज्याचा आत्मा म्ह० अंतःकरण अनेक प्रकारें मोहित झाले आहे, तो शरीरेंद्रियांची कर्मे मीच करतो असे मानतो.' हा आचार्यांचा अर्थ किती सुबोध आहे ? २८ व्या श्लोकाच्या अर्थांत रहस्यकार म्हणतात " गुणाचा हा आपसांत खेळ चालला आहे, असें समजून ज्ञानी पुरुष त्यात आसक्त होत नाही." पण यापेक्षा 'ज्ञानी पुरुष इंद्रिये आपआपल्या विषयात प्रवृत्त होत आहेत, मी आत्मा नव्हे, असे समजून आसक्त होत नाही.' असा अर्थ करणे अधिक सयुक्तिक व सुबोध नव्हे का ? २९ व्या श्लोकाच्या अर्थांत अज्ञा असर्वज्ञ व मंद लोकास सर्वज्ञ पुरुषाने ( आपल्या कर्मत्यागाने भलत्या मार्गास लावून ) बिघडवू नये. " असें म्हटलें आहे. पण " न विचालयेत् " या दोन शब्दापासून हा अर्थ कसा निष्पन्न होतो ? वस्तुतः 'न विचालयेत्' म्हणजे त्याना श्रद्धेपासून ढळवू नये, व हाच अर्थ २६ व्या श्लोकांतील 'बुद्धिभेद न जनयेत्' या शब्दानी व्यक्त केला आहे. तेव्हा 'आपल्या कर्मत्यागानें भलत्या मार्गास लावून बिघडवू नये' हा अर्थ मुळाला धरून नाही हे कोणीही कबूल करील. याच श्लोकावरील टीपेत –" श्लोक २६ यातील अर्थाचाच अनुवाद येथें केला आहे " असे म्हणतात. पण येथे त्या अर्थाचा अनुवाद केलेला नसून 'अज्ञाचा बुद्धिभेद करू नये' या उपदेशाचा उपसंहार केला आहे. पुन. रहस्यकार म्हणतात—"प्रकृति निराळी आणि आत्मा निराळा. प्रकृति किंवा माया सर्व काही करते आत्मा काही करीत नाही. इत्यादि वरील श्लोकात दिलेले सिद्धान्त मूळ कापिल सांख्यशास्त्रातले आहेत. " पण हे म्हणणे बरोबर नाही. कारण सांख्यांची प्रकृति व उपनिषदांतील प्रकृति एक नाही. सांख्यांची प्रकृति स्वतंत्र व सत्य आहे, वेदान्त्यांची प्रकृति ईशपरतंत्र व मिथ्या आहे. गीतेतहि उपनिषदांतील प्रकृतीचाच उल्लेख केला आहे. उपनिषदात 'देवात्मशक्तिं स्वगुणैर्निगूढाम्' असें वर्णन आहे. गीतेत 'मे भिन्ना प्रकृतिः अष्टधा' अ. ७. ४ व 'प्रकृतिं विद्धि मे पराम्' ७. ५, 'दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया' ७. १४. असे स्पष्ट उल्लेख आहेत. त्यामुळे गीतेतील प्रकृति ही ईश्वराची शक्ति आहे, ईशाधीन आहे, माया आहे हे उघड होते, प्रकृतीला सांख्य माया असे कधीही म्हणत नाहीत. अर्थात् गीतेतील सिद्धान्त कापिल सांख्यशास्त्रांतील नसून ते उपनिषदांतील आहेत, हे निर्विवाद सिद्ध होते. गीताशास्त्र वैदिक संप्रदायाचे असल्यामुळे त्यात सांख्य, वैशेषिक, नैयायिक इत्यादिकांचे सिद्धान्त भगवान् सांगत बसणार नाहीत. कारण स्मृति नेहमी श्रुतीला अनुसरते. कापिलादि दुसऱ्या अवैदिक स्मृतीला ती कधीही अनुसरत नाही. रहस्यकार म्हणतात–"२८ व्या श्लोकांत गुण म्ह० इन्द्रियें, गुणांत म्ह० विषयांत वर्ततात असा अर्थ कित्येक घेतात. हा अर्थ कांहीं चुकीचा नाही. पण त्यापेक्षा प्रकृतीच्या एकंदर सर्व नोर्वाम गुणाना उद्देशून च 'गुणा गुणेषु वर्तन्ते' हा सिद्धान्त केला आहे. आम्ही त्याचे शब्दशः व व्यापकरीत्या भाषांतर दिले आहे." आचार्यांनी केलेला अर्थ चुकीचा नाही, पण आपण केलेला चांगला आहे, असे रहस्यकार म्हणतात. पण वस्तुतः आचा-

मयि सर्वाणि कर्माणि संन्यस्याध्यात्मचेतसा ।
निराशीर्निर्ममो भूत्वा युध्यस्व विगतज्वरः ॥ ३० ॥

**अन्वयार्थ—सर्वाणि कर्माणि**—लौकिक व वैदिक सर्व कर्में—**अध्यात्मचेतसा**—विवेकबुद्धीनें-मी कर्ता जीव अन्तर्यामीसाठीं चाकराप्रमाणें हीं करीत आहें-अशा भावनेनें—**मयि**—माझ्या ठिकाणीं-मज सर्वज्ञ परमेश्वराचे ठिकाणीं—**संन्यस्य**—टाकून-मला अर्पण करून त्याचप्रमाणें—**निराशीः**—फलाशारहित व—**निर्ममः**—देह-पुत्रादिकांविषयींच्या ममतेनें रहित—**भूत्वा**—होऊन-आशारहित व ममतारहित होऊन—**विगतज्वरः**—शोकरहित होऊन—**युध्यस्व**—युद्ध कर. ३०.

कथं पुनः कर्मण्यधिकृतेनाज्ञेन मुमुक्षुणा कर्म कर्तव्यमित्युच्यते—मयीति । मयि **वासुदेवे परमेश्वरे सर्वज्ञे** सर्वात्मनि सर्वाणि कर्माणि संन्यस्य निक्षिप्याध्यात्मचेतसा **विवेकबुद्ध्याऽहं कर्तेश्वराय** भृत्यवत्करोमीत्यनया बुद्ध्या । किंच निराशीस्त्यक्ताशीर्निर्ममो **ममभावश्च** निर्गतो यस्य तव स त्वं निर्ममो भूत्वा युध्यस्व विगतज्वरो विगतसंतापो **विगतशोकः सन्नित्यर्थः** ॥ ३० ॥

**भाष्यार्थ**—( जरी अज्ञ कर्मांचा अधिकारी असला तरी मोक्षाची इच्छा करणाऱ्या त्यानें कर्मांचा त्यागच करणे उचित होय. कारण मोक्ष कर्मानें साध्य होत नाहीं. शिवाय त्याला कर्म करतां येणें शक्यही नाहीं, कारण मोक्षाला ज्या शमादिकांची अपेक्षा असते त्यांचा व कर्मांचा विरोध आहे. अशी शंका घेतात- )—**पुनः कर्मणि अधिकृतेन अज्ञेन मुमुक्षुणा कथं कर्म कर्तव्यं**—पण कर्मामध्ये अधिकृत असलेल्या अज्ञ मुमुक्षूनें कर्म कसें करावें?—**इति ' मयि० ' इति उच्यते**—म्हणून विचाराल तर ' मयि० ' इत्यादि श्लोकानें उत्तर सांगितलें जातें—**मयि वासुदेवे परमेश्वरे सर्वज्ञे सर्वात्मनि**—मी जो वासुदेव परमेश्वर सर्वज्ञ सर्वात्मा त्या माझ्या ठिकाणीं—**सर्वाणि कर्माणि संन्यस्य-निक्षिप्य**—सर्व कर्मांचा संन्यास-निक्षेप करून—**अध्यात्मचे-**

---

यांचा अर्थच बरोबर असून रहस्यकाराचा चूक आहे. कारण येथे प्रकरण आहे कर्मांचे, तेव्हा कर्मांचे साधनभूत गुण येथें घेतले पाहिजेत. सांख्यांचे महत्तत्त्व, अहंकार, पंचतन्मात्रे इत्यादि सूक्ष्मतत्त्वांचा गुणकर्मांशीं काय संबंध आहे ? शिवाय येथील 'गुण'शब्दाचा अर्थ ठरविण्यासाठीं अवैदिक सांख्य शास्त्राकडे धाव मारण्यापेक्षां स्वतः गीतेतच याचा काय अर्थ केला आहे, हें पहाणे अधिक सयुक्तिक नव्हे का ? तत्त्ववेत्त्याने सर्व स्वाभाविक कर्मे करीत असतांनाही कशी दृष्टि ठेवावी हे सांगत असताना पांचव्या अध्यायात ' इन्द्रियाणि इन्द्रियार्थेषु वर्तन्ते इति धारयन् ' श्लो. ९ असे ' गुणा गुणेषु वर्तन्ते ' याचेच पर्याय शब्द देऊन सांगितले आहे. तेव्हां आतां रहस्यकाराचा ' शब्दशः व व्यापक ' अर्थ बरोबर आहे की आचार्यांनी गीतेंतीलच वचनाला धरून केलेला अर्थ बरोबर आहे, याचा निर्णय वाचकांनींच करावा. शिवाय स्वतः रहस्यकारच २७ व्या श्लोकाच्या अर्थात गुणशब्दाचा अर्थ सत्त्व, रज व तम असा करितात, हेंही ध्यानांत धरण्यासारखें आहे.

**तसा-विवेकबुद्ध्या अहं कर्ता ईश्वराय भृत्यवत् करोमि इति अनया बुद्ध्या**—अध्यात्मचित्तानें म्ह० विवेकबुद्धीनें म्ह० मी कर्ता ईश्वरासाठी भृत्याप्रमाणे म्ह० चाकराप्रमाणें हे कर्म करतों, अशा या बुद्धीनें [ सर्व कर्मे विवेकबुद्धीनें परमेश्वराला समर्पण करून, तसेंच मुमुक्षूचें आणखी दुसरे कर्तव्य सांगतात-]—**किंच निराशीः -त्यक्ताशीः**—तसेंच 'निराशीः' होऊन म्ह० फलाविषयींची इच्छा सोडून—**च निर्ममः-ममभावः निर्गतः यस्य तव**—आणि ज्या तुझा हे पुत्रादिक माझे असा ममत्वभाव निघून गेला आहे—**सः त्वं निर्ममः भूत्वा**—असा तूं निर्मम होऊन —**विगतज्वरः-विगतसंतापः विगतशोकः सन् इत्यर्थः**—विगतज्वर म्ह० संतापरहित, शोकरहित होऊन असा याचा भावार्थ,—**युध्यस्व**—युद्ध कर. [ सर्व कर्मे ईश्वरार्पण करून, कर्मफलाशा व पुत्रादिकांविषयींची ममता सोडून शोकाचा त्याग करून युद्ध कर, असा भगवान् मुमुक्षु अर्जुनाला साधनरूप कर्मयोगाचा म्ह० स्वधर्मानुष्ठानाचा उपदेश करीत आहेत. ] ३०.

**ये मे मतमिदं नित्यमनुतिष्ठन्ति मानवाः ।**
**श्रद्धावन्तोऽनसूयन्तो मुच्यन्ते तेऽपि कर्मभिः ॥ ३१ ॥**

**अन्वयार्थ—ये**—जे—**श्रद्धावन्तः**—श्रद्धाळू व—**अनसूयन्तः**—असूया न करणारे—**मानवा**—मनुष्य—**मे**—माझे—**इदं**—हे—**मतं**—मत—**नित्यं**—नित्य —**अनुतिष्ठन्ति**—अनुष्ठितात-माझ्या सांगण्याप्रमाणे आचरण करितात—**ते**—ते—**अपि**—सुद्धां—**कर्मभिः**—पुण्य-पापांकडून—**मुच्यन्ते**—मुक्त केले जातात. ३१

**यदेतन्मतं कर्म कर्तव्यमिति सप्रमाणमुक्तं तत्तथा—ये म इति । ये मे मदीयमिदं मतमनुतिष्ठन्त्यनुवर्तन्ते मानवा मनुष्याः श्रद्धावन्तः श्रद्दधाना अनसूयन्तोऽसूयां च मयि गुरौ वासुदेवेऽकुर्वन्तो मुच्यन्ते तेऽप्येवंभूताः कर्मभिर्धर्माधर्माख्यैः ॥ ३१ ॥**

**भाष्यार्थ—यत् एतत् कर्म कर्तव्यं इति मतं सप्रमाणं उक्तं तत् तथा** —हे जे 'कर्म करावे' अशा प्रकारचे माझे मत प्रमाणासह मी सांगितले ते अगदी बरोबर आहे असे समजून जे मुमुक्षु त्याचे अनुवर्तन करितात त्याना क्रममुक्ति हे फळ मिळते, असे-**'ये मे' इति**'-ये मे०' इत्यादि श्लोकाने सांगतात—**ये मानवाः-मनुष्याः श्रद्धावन्तः-श्रद्दधानाः च अनसूयन्तः-असूयां मयि गुरौ वासुदेवे अकुर्वन्तः** —जे मानव-मनुष्य श्रद्धावान्-शास्त्र व आचार्य यांनी उपदेशिलेल्या अदृष्टार्थावर-अप्र-

१ रहस्यकारानी 'अध्यात्मबुद्धीने' असे मोघम म्हटले आहे. त्याचे स्पष्टीकरण काहीच केलेलें नाही. त्यामुळे 'अध्यात्मबुद्धीने सर्व कर्मे ईश्वरार्पण कशी करावयाची' याचा कांहीच बोध होत नाही.

२ रहस्यकार 'विगतज्वरः' याचा अर्थ 'बिनादिक्कत' असा करितात. त्यापेक्षां आचार्यांचा 'शोकरहित होऊन' हा अर्थ किती सुबोध व प्रसंगाला धरून आहे बरे ?

त्यक्ष गोष्टीवर विश्वास ठेवणारे व मज वासुदेव गुरूविषयीं असूया न करणारे- **म्ह०** माझी असूया न करणारे-माझ्या गुणांमध्यें दोषदृष्टि न ठेवणारे असे होत्साते--**मदीयं इदं मतं अनुतिष्ठन्ति-अनुवर्तन्ते**—माझ्या या मताचें अनुवर्तन करितात-माझ्या सांगण्याप्रमाणें अनुष्ठान करितात—**ते अपि एवंभूताः धर्माधर्माख्यैः कर्मभिः मुच्यन्ते**—तेही अशाप्रकारचे-मानव धर्माधर्मनांवाच्या कर्माकडून मुक्त केले जातात. [ येथील ‘ अपि ’ या शब्दानें त्यांची मुक्ति मुख्य नव्हे, क्रममुक्ति आहे असे सुचविलें आहे. किंवा या माझ्या मताचें अनुवर्तन करणारे चित्तशुद्धि, ज्ञानप्राप्ति याच्या क्रमानें मुक्त होतात, असें समजावें. धर्माच्या सामर्थ्यानें मरणोत्तर ब्रह्मलोकीं जाणें, कल्प संपे-पर्यंत तेथेंच राहणें, व कल्पाच्या शेवटीं तेथील हिरण्यगर्भासह परमात्मस्वरूपीं मिळून जाणें, ही क्रममुक्ति व याच देहांत आत्मसाक्षात्काराने जीवन्मुक्त होऊन शरीर मरतांच परमात्मस्वरूप होणें ही सद्योमुक्ति होय. ] ३१.

**ये त्वेतदभ्यसूयन्तो नानुतिष्ठन्ति मे मतम् ।**
**सर्वज्ञानविमूढांस्तान्विद्धि नष्टानचेतसः ॥ ३२ ॥**

**अन्वयार्थ**—**तु**—पण याच्या उलट—**ये**—जे—**अभ्यसूयन्तः**—असूया करणारे—**एतत्**—हे—**मे मतं**—माझे मत—**न अनुतिष्ठन्ति**—आचरीत नाहींत -त्याप्रमाणें आचरण करीत नाहींत—**तान्**—त्यांना—**सर्वज्ञानविमूढान्**—सर्व ज्ञानाविषयीं अनेक प्रकारें मूढ—**अचेतसः**—अविवेकी व—**नष्टान्**—नष्ट झालेले—**विद्धि**—समज. ३२.

ये त्विति । ये तु तद्विपरीता एतन्मम मतमभ्यसूयन्तो नानुतिष्ठन्ति नानुवर्तन्ते मे मतं सर्वेषु ज्ञानेषु विविधं मूढास्ते, सर्वज्ञानविमूढांस्तान्विद्धि नष्टान्नाशं गतानचेतसोऽविवेकिनः ॥ ३२ ॥

**भाष्यार्थ**—‘ **ये तु०**’ **इति**—पण जे भगवन्ताचे अनुवर्तन करीत नाहींत त्यांना मोठा प्रत्यवाय लागतो असें ‘ये तु०’ या श्लोकाने सांगतात—**तु ये तद्विपरीताः**—पण जे वरील लोकांच्या उलट-विपरीत असलेले—**एतत् मम मतं अभ्यसूयन्तः**—हें माझें मत दोषदृष्टीनें पाहणारे-माझ्या या मताची असूया करणारे—**न अनुतिष्ठन्ति-न अनुवर्तन्ते मे मतं**—माझ्या मताचें अनुष्ठान करीत नाहींत-माझ्या मताचें अनुवर्तन करीत नाहींत—**ते सर्वेषु ज्ञानेषु विविधं मूढाः**—ते सर्व-सगुण-निर्गुण-विषयक ज्ञानामध्यें विविध म्ह० प्रमाण-प्रमेय-प्रयोजन इत्यादिकांविषयीं मूढ होतात—**सर्वज्ञानविमूढान् अचेतसः-अविवेकिनः तान् नष्टान्-नाशं गतान् विद्धि**—सर्व ज्ञानांमध्ये नानाप्रकारें मूढ झालेले ते अविवेकी नष्ट झालेले आहेत-नाशास प्राप्त झाले आहेत असे तूं जाण. ३२

---

१ या श्लोकांवरील टीपेत रहस्यकार म्हणतात,“निष्काम बुद्धीनें कर्मे करण्यास सांगणारा कर्मयोगच श्रेयस्कर याबद्दल वर अन्वय-व्यतिरेकानें जी फलश्रुति सांगितली तीवरून गीतेतील

**सदृशं चेष्टते स्वस्याः प्रकृतेर्ज्ञानवानपि ।**
**प्रकृतिं यान्ति भूतानि निग्रहः किं करिष्यति ॥३३॥**

**अन्वयार्थ—ज्ञानवान् अपि**—शहाणा मनुष्यही—**स्वस्याः**—आपल्या—**प्रकृतेः सदृशं**—प्रारब्ध कर्मांप्रमाणे-स्वभावाप्रमाणें—**चेष्टते**—व्यवहार करतो.—**भूतानि**—सर्व प्राणी—**प्रकृतिं**—आपल्या स्वभावावर—**यान्ति**—जातात.—**निग्रहः**—त्याला माझ्या किंवा दुसऱ्या कोणा राजादिकांचा निग्रह—**किं**—काय—**करिष्यति**—करणार? ३३.

**कस्मात्पुनः कारणात्त्वदीयं मतं नानुतिष्ठन्ति परधर्माननुतिष्ठन्ति स्वधर्मं च नानुवर्तन्ते, त्वत्प्रतिकूलाः कथं न बिभ्यति त्वच्छासनातिक्रमदोषात्, तत्राऽह—सदृशमिति । सदृशमनुरूपं चेष्टते कस्याः स्वस्याः स्वकीयायाः प्रकृतेः प्रकृतिर्नाम पूर्वकृतधर्माधर्मादिसंस्कारो वर्तमानजन्मादावभिव्यक्तः सा प्रकृतिस्तस्याः सदृशमेव सर्वो जन्तुर्ज्ञानवानपि किं पुनर्मूर्खः । तस्मात्प्रकृतिं यान्ति भूतानि निग्रहः किं करिष्यति मम वाऽन्यस्य वा ॥ ३३ ॥**

**भाष्यार्थ—कस्मात् पुनः कारणात्**—कोणत्या कारणानें बरें—**त्वदीयं मतं न अनुतिष्ठन्ति**—तुझ्या मताला अनुसरत नाहीत-तुझ्या या उपदेशाप्रमाणे अनुष्ठान करीत नाहींत—**परधर्मान् अनुतिष्ठन्ति**—परधर्मांचे अनुष्ठान करितात—**च स्वधर्मं न अनुवर्तन्ते**—आणि स्वधर्मांचे अनुवर्तन करीत नाहीत?—**त्वत्प्रतिकू-**

---

प्रतिपाद्य विषय काय ते पुरें व्यक्त होतें. " ३० व्या श्लोकांत अर्जुनाला 'सर्व शोक सोडून व सर्व कर्में विवेकबुद्धीनें परमेश्वराला समर्पण करून आणि फलाची आशा व ममता सोडून युद्ध कर,' असे सांगितले आहे. ३१ व्या श्लोकांत 'या माझ्या मताचे जे अनुवर्तन करतात, तेही कर्मांकडून मुक्त केले जातात व जे असे करीत नाहीत, ते नाश पावतात' असे सांगितलें आहे, पण येथें भगवानांचें मत तें कोणतें? याचा विचार केला पाहिजे. मुळांत 'युध्यस्व' म्हणजे युद्ध कर असे सांगितलें आहे. पण युद्ध करण्याचा अधिकार सर्वांनाच नसल्यामुळे येथें युद्धशब्दाचा 'स्वधर्म' हाच अर्थ घेतला पाहिजे आणि स्वधर्मरूप सर्व कर्में विवेकबुद्धीनें जे ईश्वरार्पण करतात ते कर्मांपासून मुक्त होतात हेंच भगवानांचें मत आहे, याबद्दल कोणाचाच वाद नाही. पण गीतेचें परम प्रतिपाद्य हेंच आहे की काय याबद्दल काय तो वाद आहे. तसेंच, हें मत "ज्ञानी पुरुषानें सर्व कर्में ईश्वरार्पण बुद्धीनें करावीं," असे आहे की काय? आचार्यांच्या मतें गीतेंतील कर्मयोग ज्ञाननिष्ठायोग्यताप्राप्तीचें साधन आहे व लोकसंग्रहार्थ कर्में करण्याविषयी जें सांगितलें आहे तेवढाच भाग श्रेष्ठ ज्ञानी पुरुषासाठीं आहे. अर्थात् गीतेचें मुख्य प्रतिपाद्य ज्ञानयोग असून कर्मयोग त्यासाठीं आहे व ही गोष्ट 'जे माझ्या या मताचें श्रद्धेनें अनुवर्तन करतात तेही कर्मबंधांतून मुक्त होतात' या भगवानांच्या सांगण्यावरूनच सिद्ध होते. कारण कर्मांकडून मुक्त केलें जाणें म्हणजेच ज्ञाननिष्ठ—जीवन्मुक्त होणें होय.

**लाः त्वच्छासनातिक्रमदोषात् कथं न बिभ्यति**—तुझ्या प्रतिकूल होणारे ते तुझ्या आज्ञेचा अतिक्रम करणें या दोषाला भीत कसे नाहींत ? ( तुझ्या आज्ञेचा भंग केल्यामुळे घडणारा जो मोठा दोष त्याची त्यांना भीति कशी वाटत नाहीं ? कारण राजाच्या आज्ञेचा भंग केल्यास काय परिणाम होतो ते प्रसिद्ध आहे. त्याचप्रमाणें भगवानांच्या आज्ञेचें उल्लंघन केल्यास आपल्यावर मोठा अनर्थ गुदरेल, अशी त्यांना भीति कशी वाटत नाहीं ? )—**तत्र 'सदृशं०' इति आह**—या सर्व शंकांचें उत्तर 'सदृशं०' या श्लोकानें देतात—**सदृशं-अनुरूपं चेष्टते**—सदृश म्ह० अनुरूप चेष्टा करतो-व्यवहार करतो.—**कस्याः स्वस्याः-स्वकीयायाः प्रकृतेः**—कोणाच्या सदृश ? आपल्या स्वतःच्या प्रकृतीच्या अनुसार व्यवहार करितो.—**प्रकृतिः नाम पूर्वकृत-धर्माधर्मादिसंस्कारः वर्तमानजन्मादौ अभिव्यक्तः सा प्रकृतिः**—प्रकृति म्ह० पूर्वी केलेल्या धर्माधर्मादिकांचा संस्कार की जो या प्रस्तुत जन्माच्या आरंभीं अभिव्यक्त होतो ती प्रकृति,—**तस्याः सदृशं एव सर्वः जन्तुः ज्ञानवान् अपि**—तिच्या अनुसारच सर्व प्राणी अनुवर्तन करतो. सर्व प्राणी म्ह० ज्ञानवान् सुद्धां आपल्या प्रकृतीप्रमाणें व्यवहार करतो.—**किं पुनः मूर्खः**—आणि ज्ञानवान्ही जर आपल्या प्रकृतीप्रमाणें अनुवर्तन करतो तर मूर्ख आपल्या प्रकृतीच्या अनुसार व्यवहार करतो हें काय सांगावे ? [ अर्थात् पूर्वजन्मीं आचरिलेला धर्म, अधर्म, संपादन केलेले ज्ञान, मनांत दृढ धरलेली इच्छा, यांचा संस्कार मरणानंतर पुनः शरीर घेईपर्यंत जरी अगदीं सूक्ष्म अवस्थेत रहात असला तरी तो या जन्माच्या अगदीं आरंभीं अभिव्यक्त होतो. तीच प्राण्याची प्रकृति होय. तिचें उल्लंघन ज्ञानी पुरुषालाही करतां येत नाहीं, मग अज्ञाला करतां येणार नाहीं, हे काय सांगावें ? ]—**तस्मात्**—ज्ञानी व अज्ञ असे सर्व प्रकृतीच्या अधीन असल्यामुळें—**भूतानि प्रकृतिं यान्ति**—सर्व प्राणी स्वभावावर जातात. त्यांची इच्छा जरी नसली तरी ते प्रकृतीप्रमाणे व्यवहार करतात.—**मम वा अन्यस्य वा निग्रहः किं करिष्यति**—तेव्हां माझा किंवा दुसऱ्या कोणा राजादिकांचा निग्रह-'असें करूं नका' असा निषेध काय करणार ? [ कोणी कितीही निग्रह केला तरी त्याचा कांहीं उपयोग होत नाहीं. ] ३३.

**इन्द्रियस्येन्द्रियस्यार्थे रागद्वेषौ व्यवस्थितौ ।**
**तयोर्न वशमागच्छेत्तौ ह्यस्य परिपन्थिनौ ॥ ३४ ॥**

**अन्वयार्थ—इन्द्रियस्य इन्द्रियस्य**—प्रत्येक इंद्रियाच्या—**अर्थे**—शब्दादि विषयांत—**रागद्वेषौ**—राग व द्वेष—**व्यवस्थितौ**—अवश्य होणारे आहेत.—**तयोः**—त्या राग-द्वेषांच्या—**वशं**—अधीन—**न आगच्छेत्**—होऊं नये, त्यांच्या ताब्यांत जाऊं नये.—**हि**—कारण—**तौ**—ते दोन राग-द्वेष—**अस्य**—या पुरुषाला—**परिपन्थिनौ**—विघ्न करणारे आहेत. ३४.

यदि सर्वो जन्तुरात्मनः प्रकृतिसदृशमेव चेष्टते न च प्रकृतिशून्यः कश्चिदस्ति ततः पुरुषकारस्य विषयानुपपत्तेः शास्त्रानर्थक्यप्राप्ताविदमुच्यते—इन्द्रियस्येति। इन्द्रियस्येन्द्रियस्यार्थे सर्वेन्द्रियाणामर्थे शब्दादिविषय इष्टे रागोऽनिष्टे द्वेष इत्येवं प्रतीन्द्रियार्थे रागद्वेषाववश्यंभाविनौ। तत्रायं पुरुषकारस्य शास्त्रार्थस्य च विषय उच्यते। शास्त्रार्थे प्रवृत्तः पूर्वमेव रागद्वेषयोर्वशं नाऽऽगच्छेत्। या हि पुरुषस्य प्रकृतिः सा रागद्वेषपुरःसरैव स्वकार्ये पुरुषं प्रवर्तयति। तदा स्वधर्मपरित्यागः परधर्मानुष्ठानं च भवति। यदा पुना रागद्वेषौ तत्प्रतिपक्षेण नियमयति तदा शास्त्रदृष्टिरेव पुरुषो भवति न प्रकृतिवशः। तस्मात्तयो रागद्वेषयोर्वशं न गच्छेत्। यतस्तौ ह्यस्य पुरुषस्य परिपन्थिनौ श्रेयोमार्गस्य विघ्नकर्तारौ तस्कराविवेत्यर्थः॥ ३४॥

**भाष्यार्थ—यदि सर्वः जन्तुः आत्मनः प्रकृतिसदृशं एव चेष्टते**—जर सर्वच प्राणी आपल्या प्रकृतिसदृश-प्रकृतीच्या अनुसारच चेष्टा करतो—**च कश्चित् प्रकृतिशून्यः न अस्ति**—व कोणीच प्रकृतिशून्य नाहीं,—**ततः पुरुषकारस्य विषयानुपपत्तेः शास्त्रानर्थक्यप्राप्तौ ' इन्द्रियस्य० ' इति इदं उच्यते**—तर मग पुरुषाच्या प्रयत्नाला विषयच उपपन्न होत नसल्यामुळे-प्रयत्नाला अवकाशच रहात नसल्यामुळें ' अमुक कर व अमुक करूं नको ' असे विधि-निषेध सांगणारें शास्त्र व्यर्थ होते. अशी प्राप्ति झाली असतां 'इन्द्रियस्य०' या श्लोकानें हें समाधान सांगितले जाते—**—इन्द्रियस्य इन्द्रियस्य अर्थे-सर्वेन्द्रियाणां अर्थे शब्दादिविषये**—प्रत्येक इन्द्रियाच्या शब्दादि विषयामध्यें—**इष्टे रागः अनिष्टे द्वेषः इति एवं प्रतीन्द्रियार्थे रागद्वेषौ अवश्यंभाविनौ**—इष्ट विषयाविषयीं राग-प्रीति व अनिष्ट विषयाविषयीं द्वेष,याप्रमाणे प्रत्येक इंद्रियाच्या विषयाविषयीं राग व द्वेष अवश्य होणारे आहेत. **तत्र पुरुषकारस्य शास्त्रार्थस्य च अयं विषयः उच्यते**—याप्रमाणे प्रत्येक विषयाविषयीं प्रीति किंवा द्वेष होणें अवश्य आहे असे ठरले असतां पुरुषाचा प्रयत्न व शास्त्रार्थ यांचा हा विषय सांगितला जातो.—**शास्त्रार्थे प्रवृत्तः पूर्वं एव रागद्वेषयोः वशं न आगच्छेत्**—शास्त्रार्थामध्ये प्रवृत्त झालेला आरंभीच राग व द्वेष यांच्या अधीन होत नाहीं.—**हि या पुरुषस्य प्रकृतिः सा रागद्वेषपुरःसरा एव स्वकार्ये पुरुषं प्रवर्तयति**—कारण जी पुरुषाची प्रकृति ती रागद्वेषपुरःसरच स्वकार्यामध्यें पुरुषाला प्रेरित करते—**तदा स्वधर्मपरित्यागः परधर्मानुष्ठानं च भवति** —तेव्हां स्वधर्माचा परित्याग व परधर्माचे अनुष्ठान होते. [ रागद्वेषांच्या द्वारा प्राणी प्रकृतीच्या अधीन झाला असतां त्याच्या हातून स्वधर्माचा त्याग वगैरे घडणें, साहजिकच आहे. त्याचें निवारण कोणालाच करतां येणे शक्य नाहीं, हें सांगितलें. आतां विवेकविज्ञानानें रागादिकांचें निवारण केलें असतां शास्त्रीयदृष्ट्या प्रकृतीच्या परतंत्रतेचें निवारण करितां येणें शक्य आहे,असें सांगतात-]—**यदा पुनः रागद्वेषौ तत्प्रतिपक्षेण नियमयति तदा पुरुषः शास्त्रदृष्टिः एव भवति**—पण जेव्हां राग व द्वेष यांचें त्यांच्या प्रतिपक्षाच्या योगानें म्ह० विवेकविज्ञानानें नियमन करतो तेव्हां

पुरुष शास्त्रदृष्टिच होतो. [ मिथ्या ज्ञानामुळें राग-द्वेष होतात. विवेकविज्ञान हें मिथ्या-ज्ञानाच्या विरोधी आहे. त्यामुळे तें रागद्वेषांचेंही प्रतिपक्षभूत आहे. विवेकविज्ञानानें मिथ्या ज्ञानाची निवृत्ति होऊन रागद्वेषांची निवृत्ति झाली असतां पुरुषाच्या शास्त्रीय-दृष्टीला होणारा प्रतिबंध क्षीण होतो.त्यामुळे तो शास्त्रदृष्टिच बनतो.]—**न प्रकृतिवशः** —प्रकृतिपरवश होत नाही —**तस्मात् तयोः रागद्वेषयोः वशं न गच्छेत्**— म्हणून त्या रागद्वेषांच्या अधीन होऊं नये.—**हि-यतः तौ अस्य पुरुषस्य परि-पन्थिनौ-श्रेयोमार्गस्य विघ्नकर्तारौ तस्करौ इव इत्यर्थः**—कारण ज्याअर्थी ते राग-द्वेष या पुरुषाचे मोठे प्रतिबंधक-मध्येच अडविणारे आहेत. मोक्षमार्गामध्यें विघ्न करणारे, चोरांसारखे सन्मार्गात विघ्न करणारे आहेत असा याचा भावार्थ. ( त्याअर्थी त्यांच्या अधीन होऊं नये, असा वरील वाक्यार्शी या वाक्याचा संबंध. ) ३४.

---

१पण या दोन श्लोकांना रहस्यकार कसे अवतरण देतात ते पहा—"याच कर्मयोगनिरूपणाच्या परिपूर्त्यर्थ भगवान् प्रकृतीच्या प्राबल्याचे व तन्निरोधार्थ इन्द्रियनिरोधाचे वर्णन करतात." नंतर मूळ श्लोकांचा अर्थ असा करितात " ज्ञानवान् पुरुष सुद्धा आपल्या प्रकृतिस्वभावानुरूप वागतो. सर्वच भूतें ( आपआपल्या ) प्रकृतीच्या वळणावर जातात. तेथें निग्रह म्ह० जबरी काय करणार ? ३३ इंद्रिय आणि त्याचे ( शब्दस्पर्शादि ) विषय यांच्या मधील प्रीति व द्वेष ( ही दोन्ही ) व्यवस्थित म्हणजे मुळचीच ठरलेली आहेत, या प्रीतिद्वेषांच्या ताब्यांत आपण जाऊं नये. कारण ते मनुष्याचे वाटमारे शत्रु होत ३४ पृ. ६६०" पण या दोन्ही श्लोकांत इंन्द्रियनिग्रहाचे नांवहि नाही, व त्याचा प्रसगहि नाही. 'अमुक करू नको,' असा निषेध हाच येथील निग्रहशब्दाचा अर्थ आहे. अर्थात् 'इद्रियनिग्रहाचे वर्णन करतात' असे जे रहस्यकारांनी अवतरणात म्हटले आहे, तें सर्वथा अयोग्य आहे. ३३ व्या श्लोकाच्या अर्थांत ' प्रकृति ' या शब्दाचा अर्थ स्पष्ट केलेला नाही, त्यामुळें ' ज्ञानवान् सुद्धा प्रकृति-स्वभावानुरूप वागतो ' म्हणजे काय, ते कळत नाही. तसेच 'सर्व भूते प्रकृतीच्या वळणावर जातात ' म्हणजे काय करतात? अवतरणांत 'प्रकृतीच्या निरोधासाठी इद्रियनिग्रहाचें वर्णन करतात ' असें म्हटले आहे व अर्थामध्यें 'निग्रह म्ह० जबरी काय करणार ?' असें त्याच्या उलट म्हटलें आहे. म्ह० कशास कांही मेळ नाही ! ३४ व्या श्लोकाचा अर्थ तर सपशेल चुकला आहे.अनेक पदवीधरांच्या दृष्टीतून गेलेला हा ग्रंथ अशा असंबद्ध अर्थानें युक्त असावा व त्याचें कांही शास्त्री म्हणविणाऱ्या लोकांनीहि कौतुक करावें, याचें मोठे आश्चर्य वाटतें ! मूळ श्लोकांत " इन्द्रियस्य इन्द्रियस्य अर्थे " असे शब्द आहेत. त्यांचा अर्थ रहस्यकारांनी "इन्द्रिय आणि त्याचे शब्दस्पर्शादि विषय यांच्यामधील" असा केला आहे. हा अर्थ बरोबर आहे, असे म्हणणाराहि एखादा तरी मनुष्य जगांत असेल का ? इतका सरळ ( ? ) अर्थ करणारांनी प्रत्येक शब्द विचारपूर्वक योजणाऱ्या भाष्यकारादिकांना 'आग्रही, सांप्रदायिक, अर्थाची ओढाताण करणारे' वगैरे म्हणावे हा केवळ प्रस्तुत काळाचा महिमा आहे. "इन्द्रि-यस्य इन्द्रियस्य " या द्विरुक्तीचा अर्थ प्रत्येक इन्द्रियाचा असा आहे. संस्कृत व मराठी भाषेत अशी हजारों उदाहरणें आहेत. जसें ' गृहे गृहे—घरोघर,' ' पिंडे पिंडे—प्रतिदेहांत,' ' दिने दिने-रोज रोज,' अशी अनेक उदाहरणें देता येतील. गीतेंतहि ' तस्य तस्य अचलां

श्रद्धाम्,' असें म्हटलें आहे, त्यामुळें येथें 'इन्द्रियस्य इन्द्रियस्य' याचा आचार्य व इतर टीकाकार यांनी 'प्रत्येक इन्द्रियाच्या अर्थामध्यें—विषयामध्यें' असाच अर्थ केला आहे. पण टीकाकार ओढाताणीचा अर्थ करणारे असें एकदा ठरल्यावर त्यांच्या सर्वथा निर्दोष असलेल्या अर्थाकडेहि पहाण्याची बुद्धि कशी होणार ? बरें, सर्व टीकाकार चुकले असें जरी मानले तरी रहस्यकाराचा अर्थ मुळाला धरून असावयास पाहिजे होता. पण तसेंहि नाही. 'इन्द्रियस्य इन्द्रियस्य अर्थे' यांतील पहिल्या शब्दाचा अर्थ 'इन्द्रिय' आणि दुसऱ्या 'इन्द्रियस्य अर्थे' या दोन शब्दाचा अर्थ 'त्याचे शब्दस्पर्शादि विषय' असा करून 'इन्द्रिय-' शब्दाची षष्ठी व 'अर्थ-'शब्दाची सप्तमी सार्थ होण्यासाठी 'त्याच्यामधील' असा अर्थ केला आहे, पण 'इन्द्रियस्य इन्द्रियस्य' हे शब्द दोन्ही जर षष्ठ्यंत आहेत, तर त्यांतील एकाचा अर्थ 'इन्द्रिय' व दुसऱ्याचा 'त्याचे विषय' हा कसा संभवतो ? 'इन्द्रियस्य' म्हणजे इन्द्रियाचा आणि 'इन्द्रियस्य अर्थे' म्ह० इन्द्रियाच्या विषयात असा तरी अर्थ करावयास पाहिजे होता ! म्हणजे तो व्याकरणशुद्ध तरी झाला असता. पण रहस्यकारांनी जसा अर्थ केला आहे, तसाच अर्थ करावयाचा झाल्यास 'इन्द्रियस्य इन्द्रियार्थस्य च मध्ये' असे शब्द मुळांत पाहिजे होते. परंतु ते तसे जरी घातले तरी पुढील शब्दांशी त्यांची संगति लागत नाही. 'इन्द्रिय व त्यांचे विषय यांच्यामधील प्रीति व द्वेष ही दोन्ही व्यवस्थित म्ह० मुळचीच ठरलेली आहेत,' हा अर्थ अगदी असंगत आहे. कारण प्रीति व द्वेष हे धर्म इन्द्रियें व विषय यांचे नसून अंतःकरणाचे आहेत, त्यामुळे रहस्यकारांचा अर्थ वस्तुस्थितीला धरून नाही. त्यासाठीच 'प्रत्येक इन्द्रियाच्या विषयाविषयी राग व द्वेष अवश्य होणारे आहेत,' असा जो भाष्यकारांनी अर्थ केला आहे, तोच अत्यंत सयुक्तिक व सुसंगत आहे. रहस्यकार म्हणतात—"इन्द्रिय व त्यांचे शब्दस्पर्शादि विषय ." पण एका इन्द्रियाचे शब्दस्पर्शादि अनेक विषय कसे संभवतील ? मुळांत तर 'इन्द्रियस्य इन्द्रियस्य अर्थे' हे तीनहि शब्द एकवचनी आहेत, त्यामुळे रहस्यकाराचा अर्थ कोणत्याच प्रकारें समर्थन करतां येण्यासारखा नाही.

याच श्लोकावरील टीपेंत रहस्यकार म्हणतात—"निग्रहशब्दाचा 'नुस्ते संयमन' असा अर्थ नसून 'जबरी' किंवा 'हट्ट' असा अर्थ आहे. इन्द्रियाचे योग्य संयमन गीतेस इष्ट आहे; पण हट्टाने किंवा जबरीनें इंद्रियाच्या स्वाभाविक वृत्तिही आजिबात मारून टाकणे शक्य नाही, असे येथे सांगणे आहे. उदाहरणार्थ, देह आहे तोपर्यंत भूक, तहान इत्यादि धर्म प्रकृतिसिद्ध असल्यामुळे मनुष्य कितीही ज्ञानी असला तरी भूक लागली म्हणजे भिक्षा मागावयास तरी तो बाहेर पडतो. म्हणून इद्रिये जबरीने अजीबात मारण्याचा वृथा हट्ट न धरिता योग्य संयमाने तीं आपल्या ताब्यांत ठेवून त्यांच्या स्वभावसिद्ध वृत्तींचा लोकसंग्रहार्थ उपयोग करून घेणे, हेच शहाण्या पुरुषाचे कर्तव्य होय, असा या श्लोकाचा भावार्थ आहे." पृ. ६६०. यावरून रहस्यकाराचा गीताशास्त्रार्थाविषयी कसा विपरीत ग्रह झाला आहे, ते स्पष्ट कळतें. प्रकृति व निग्रह या शब्दांचा वास्तविक अर्थ काय आहे, ते आम्ही वर सांगितलेच आहे. रहस्यकार ३४ व्या श्लोकांत 'इंद्रिय' शब्द आहे, असे पाहून ३३ व्या श्लोकांतील 'निग्रह-'शब्दाचा संबंध त्याच्याशी जोडून 'इंद्रियांच्या स्वाभाविक वृत्तींना हट्टाने किंवा जबरीनें अजीबात मारून टाकणे शक्य नाही,'

**श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् ।**
**स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः ॥ ३५ ॥**

**अन्वयार्थ—स्वनुष्ठितात्**—( सु-अनुष्ठितात् ) उत्तम प्रकारें अनुष्ठान केलेल्या -सर्वगुणसंपन्न—**परधर्मात्**—परधर्माहून—**विगुणः**—गुण-रहित-दोषयुक्त—**स्व-**

---

वगैरे म्हणूं लागले आहेत, व तें गीतेचे म्हणणे आहे, असें सांगून, स्वतः मोकळे होत आहेत. पण याच अध्यायांत पुढे ' तस्मात्त्वं इंद्रियाण्यादौ नियम्य–' म्ह० म्हणून तूं प्रथम इंद्रियांचे नियमन करून, असे म्हटले आहे. दुसऱ्या अध्यायांतही ( श्लो.५८–६८ ) इंद्रियांचा निग्रह सविस्तर वर्णिला आहे. त्याच्याशीं विरोध येऊ नये म्हणून ' इंद्रियाचे योग्य सयमन गीतेस इष्ट आहे ' असेही म्हणून ठेवले आहे. ' इद्रियाच्या स्वाभाविक वृत्तीना अजिबात मारून टाकणे शक्य नाही, ' असें म्हणून ' भूक, तहान इत्यादि धर्मांचे ' उदाहरण दिलें आहे. ' ज्ञानीही भूक लागली की भिक्षा मागावयास तरी निघतोच. ' असे म्हणून ' इंद्रिये जबरीनें अजीबात मारण्याचा वृथा हट्ट न धरितां योग्य सयमाने ती आपल्या ताब्यांत ठेवून त्यांच्या स्वभावसिद्ध वृत्तीचा लोकसग्रहार्थ उपयोग करून घेणे हेच शहाण्या-पुरुषाचे कर्तव्य होय ' असा या श्लोकाचा भावार्थ ते सागत आहेत. पण तो मूळ श्लोकातून निघत नाही. भूक, तहान वगैरे देहधर्म, या इद्रियाच्या वृत्तिच नव्हेत. पहाणें, ऐकणें, वगैरे ह्या इंद्रियवृत्ति आहेत. पण मूळातील प्रकृतिशब्दाचा अर्थ भलताच केल्यामुळे असा हा घोटाळा झाला आहे. 'प्रकृति म्ह० इद्रियाच्या स्वाभाविक वृत्ति' हा रहस्यकाराचा अर्थ चुकीचा आहे. प्रत्येक प्राण्याची प्रकृति म्ह० स्वभाव भिन्न भिन्न असतो, पण इद्रियाची स्वाभाविक वृत्ति सर्वांची सारखीच. चक्षु हें इद्रिय कोणत्याही प्राण्यामध्ये पाहण्याचीच क्रिया करतें. श्रोत्र सर्व शरीरात ऐकणे हेच काम करते. पण पूर्वसस्कारानुसार या जन्माच्या आरंभी अभिव्यक्त झालेला स्वभाव–प्रकृति प्रत्येक प्राण्यामध्यें भिन्न असते; सात्त्विक, राजस, तामस व त्या प्रत्येकात आणखी असंख्य भेद होतात. प्राणी त्या प्रकृतीच्या अनुसार वागतो, प्रत्येक जीव त्या तसल्या प्रकृतीवर जातो व त्याचें कोणी कितीही जरी निवारण केलें तरी त्याचा कांहीं उपयोग होत नाही, हा ३३ व्या श्लोकाचा यथार्थ अर्थ आहे. ३४ व्या श्लोकांत विवेकविज्ञानानें राग-द्वेषांना जिकावे म्हणजे त्याच एका उपायाने प्रकृतीमध्ये हळू हळू फरक पडत जातो, असे म्हटले आहे. अर्थात् रहस्यकारांनी वर तहान-भूक कोणालाच सुटत नाही, म्हणून ' इद्रियाना मारण्याचा हट्ट न धरिता त्यांच्या स्वभावसिद्ध वृत्तीचा लोकसंग्रहाकडे उपयोग करावा ' वगैरे जो भावार्थ काढला आहे तो अप्रासगिक आहे.

रहस्यकार त्याच टीपेंत पुढे म्हणतात–" तसेच सुख व दुःख हे दोन्ही विकार स्वतत्र आहेत. एक दुसऱ्याचा अभाव नाहीत, हेंही ३४ व्या श्लोकांतील 'व्यवस्थित' या पदावरून उघड होते, " तें कसें काय ? प्रीति व द्वेष आणि सुख व दुःख याचा काय सबंध ? शिवाय 'सुख व दुःख हे स्वतत्र विकार नाहीत, त्यांतील एक दुसऱ्याचा अभाव आहे' असे म्हणते कोण ? वेदान्तशास्त्राचे असें मत नाही, हे आम्ही अ. २ श्लो. ६६ वरील टीपेत स्पष्ट दाखविलें आहे. त्यामुळें रहस्यकारांचें हे म्हणणें फुकट आहे.

**धर्मः**—स्वधर्म—**श्रेयान्**—अधिक चांगला.—**स्वधर्मे**—स्वधर्मात राहिलेल्या पुरुषाला—**निधनं**—मरण जरी आले, तरी तें—**श्रेयः**—श्रेयस्कर आहे. कारण—**परधर्मः**—दुसऱ्या वर्णाचा किंवा आश्रमाचा धर्म—**भयावहः**—नरकादि भय देणारा आहे. ३५.

**तत्र रागद्वेषप्रयुक्तो मन्यते शास्त्रार्थमप्यन्यथा परधर्मोऽपि धर्मत्वादनुष्ठेय एवेति तदसत्—श्रेयानिति । श्रेयान्प्रशस्यतरः स्वो धर्मः स्वधर्मो विगुणोऽपि विगतगुणोऽप्यनुष्ठीयमानः परधर्मात्स्वनुष्ठितात्साद्‌गुण्येन संपादितादपि, स्वधर्मे स्थितस्य निधनं मरणमपि श्रेयः परधर्मे स्थितस्य जीवितात्, कस्मात्परधर्मो भयावहः नरकादिलक्षणं भयमावहति यतः ॥ ३५ ॥**

**भाष्यार्थ—तत्र रागद्वेषप्रयुक्तः शास्त्रार्थं अपि अन्यथा मन्यते**—व्यवहारांत राग व द्वेष यांनीं प्रेरित झालेला पुरुष शास्त्रार्थालाही विपरीत समजतो. म्हणजे तो—**परधर्मः अपि धर्मत्वाद् अनुष्ठेयः एव इति मन्यते**—परधर्महा धर्मच असल्यामुळें—त्यालाही स्वधर्माप्रमाणेच धर्मत्व असल्यामुळे तो आपल्याला अनुष्ठानास योग्यच आहे असे मानतो,—**तत् असत् इति ' श्रेयान्० ' इति**—पण तें समजणें असत् आहे, हे ' श्रेयान्० ' या श्लोकाने सांगतात.—**श्रेयान्-प्रशस्यतरः**—अधिक प्रशंसनीय आहे. ( कोण ? )—**स्वः धर्मः-स्वधर्मः विगुणः अपि अनुष्ठीयमानः**—आपला धर्म-स्ववर्णाश्रमाला विहित असलेला स्वधर्म. तो विगुण-गुणरहित जरी असला तरी तोच अनुष्ठान केला जाणारा स्वधर्म अधिक प्रशस्त आहे. ( कोणापेक्षां ? उत्तर-)—**स्वनुष्ठितात्-साद्‌गुण्येण संपादितात् अपि परधर्मात्**—सु-अनुष्ठित-उत्तम प्रकारे-साद्गुण्याने-सद्गुणत्वाने संपादन केलेल्याही परधर्माहून ( गुणरहित असलेलाही स्वधर्म आचरणें अधिक चांगले होय. )—**परधर्मे स्थितस्य जीवितात् स्वधर्मे स्थितस्य निधनं-मरणं अपि श्रेयः**—परधर्मात स्थित झालेल्या पुरुषाच्या जीविताहून स्वधर्मात स्थित असलेल्या पुरुषाचे निधन म्ह० मरणही श्रेयस्कर आहे.—**कस्मात्**—कोणत्या कारणास्तव—**यतः**—ज्याअर्थी—**परधर्मः भयावहः-नरकादिलक्षणं भयं आवहति**—परधर्म भयावह आहे. तो नरकादिरूप भय देतो, ह्मणून भयावह आहे. [ पर वर्णाचा व पर आश्रमाचा धर्म सर्व सद्गुणांनीं युक्त असा जरी आचरितां आला तरी त्याहून स्वतःच्या वर्णाला व आश्रमाला विहित असलेला धर्म, त्यांत हिंसा वगैरे कांहीं दोष जरी असले तरी, आचरणेंच अधिक चांगलें होय, स्वधर्माचरण करीत असतांना मरण आलेलेंही पतकरेल, पण दुसऱ्या वर्णाचा व आश्रमाचा धर्म केव्हांही भयावह आहे. स्वधर्माचा त्याग करून परधर्माचें अनुष्ठान करणाऱ्या पुरुषाला स्वधर्मत्यागाचा दोष अवश्य लागतो. ह्मणून स्वधर्माचा त्याग केव्हांही श्रेयस्कर नाहीं. ] ३५.

---

१ रहस्यकार येथें " स्वधर्म म्ह० स्मृतिकारांच्या चातुर्वर्ण्यव्यवस्थेने प्रत्येकाला शास्त्रानें लावून दिलेला धंदा असा अर्थ आहे. मोक्षधर्म असा अर्थ नव्हे," असें म्हणतात. पण तें

**अर्जुन उवाच**—अर्जुन म्हणाला—

**अथ केन प्रयुक्तोऽयं पापं चरति पूरुषः ।**
**अनिच्छन्नपि वार्ष्णेय बलादिव नियोजितः ॥ ३६ ॥**

**अन्वयार्थ—हे वार्ष्णेय**—हे कृष्णा !—**अथ**—आतां—**केन**—कोणाकडून—**प्रयुक्तः**—प्रेरणा केला गेलेला—**अयं पूरुषः**—हा पुरुष—**अनिच्छन् अपि**—पाप करण्याची इच्छा करीत नसतांनाही—**बलात्**—बलात्काराने—**नियोजितः इव**—करावयास लावल्याप्रमाणेच जणुं काय—**पापं**—पाप—**चरति**—करतो. ३६.

**यद्यप्यनर्थमूलं ध्यायतो विषयान्पुंसो रागद्वेषौ ह्यस्य परिपन्थिनाविति चोक्तं विक्षिप्तमनवधारितं च तदुक्तं तत्संक्षिप्तं निश्चितं चेदमेवेति ज्ञातुमिच्छन्नर्जुन उवाच ज्ञाते हि तस्मिंस्तदुच्छेदाय यत्नं कुर्यामिति—अथेति । अथ केन हेतुभूतेन प्रयुक्तः सन्राज्ञेव भृत्योऽयं पापं कर्म चरत्याचरति पूरुषः स्वयमनिच्छन्नपि हे वार्ष्णेय वृष्णिकुलप्रसूत बलादिव नियोजितो राज्ञेवेत्युक्तो दृष्टान्तः ॥ ३६ ॥**

**भाष्यार्थ—यद्यपि ' ध्यायतो विषयान् पुंसः ' ' रागद्वेषौ ह्यस्य परिपन्थिनौ ' इति च अनर्थमूलं उक्तं**—जरी मागें दुसऱ्या अध्यायांत ' ध्यायतो विषयान्०'(पृ.२०७पहा) व याच अध्यायांत नुकेंच वर 'तौ ह्यस्य परिपंथिनौ-' (पृ.३३२ पहा) या वचनांनी अनर्थाचें मूळ सांगितलें आहे. तरी—**तत् विक्षिप्तं अनवधारितं च उक्तं**—ते निरनिराळ्या प्रदेशी व अनिश्चित असें सांगितलें आहे. यास्तव—**तत् संक्षिप्तं निश्चितं च इदं एव इति ज्ञातुं इच्छन् अर्जुनः उवाच**—ते संक्षिप्त

---

अगदींच अयोग्य आहे. कारण तसें म्हटल्यास भगवानांनीं अर्जुनाला कर्म करण्याबद्दल जो उपदेश केला, तो मोक्षासाठीं नव्हे असें होतें. अर्थात् ' कर्मबंध प्रहास्यसि,' ' यज्ञदानतप:कर्म न त्याज्य ' ' आत्मशुद्धये कर्म कुर्वन्ति ' ' कर्मणा संसिद्धि आस्थिता जनकादयः ' ' स्वे स्वे कर्मणि अभिरतः संसिद्धिं लभते नरः ' इत्यादि गीतेंतीलच वचनें व्यर्थ ठरतात. येथील स्वधर्म म्ह० मोक्षधर्म जर नसेल तर स्वतः रहस्यकारांनींच कर्मयोग हा मोक्षाचा स्वतंत्र मार्ग जो मानला आहे त्याच्याशीं विरोध येतो. अर्थात् या संबंधानें गी. र. पृ. ३३२, ४९२, ६६१, इत्यादि ठिकाणीं जें लिहिलें आहे, तें व्यर्थ आहे. चातुर्वर्ण्यव्यवस्था ही स्मृतिकारांच्या घरची नाहीं. ती वेदोक्तच आहे. ' जेनु काम तेनाथी थाय बिजो करे तो गोथां खाय.' इत्यादि गुजराथी म्हण व स्वधर्म याचा अर्थ एकच आहे, असें समजून जो बराचसा विस्तार केला आहे तोहि व्यर्थ आहे. येथील ' स्वधर्म ' हा शब्द फार महत्त्वाचा आहे. तो केवळ पोट भरण्याचा धंदा नव्हे. भगवानांनीं अर्जुनाला युद्धच करण्याविषयीं जो एवढा आग्रह केला आहे तो स्वधर्माच्याच दृष्टीनें होय आणि अशा स्वधर्माचरणानें मनुष्याला चित्तशुद्धीच्या द्वारा मोक्षरूप सिद्धि मिळत असते. अर्थात् स्वधर्माला धंदा हे नांव देऊन स्वधर्मशब्दाच्या अर्थाची रहस्यकारांनीं फारच अयोग्य ओढाताण केली आहे.

व निश्चित-हेंच तें अनर्थाचें मूळ अशा रीतीनें जाणण्याची इच्छा करणारा अर्जुन ह्मणाला **—हि तास्मिन् ज्ञाते तदुच्छेदाय यत्नं कुर्यां इति 'अथ०' इति अर्जुनः उवाच**—कारण ते अनर्थाचें मूळ कळले म्हणजे त्याचा उच्छेद-नाश करण्यासाठीं मी यत्न करीन अशा आशयाने 'अथ०' इत्यादि श्लोकाने अर्जुन ह्मणाला—**अथ हेतुभूतेन केन प्रयुक्तः सन् राज्ञा भृत्यः इव अयं पूरुषः पापं कर्म चरति -आचरति**—पण हेतुभूत अशा कोणाकडून प्रेरित होत्साता ह्म० राजाकडून प्रेरित झालेला त्याचा भृत्य-चाकर जसा, त्याप्रमाणे कोणाकडून प्रेरणा केला गेलेला हा पुरुष पाप कर्म आचरितो.—**स्वयं अनिच्छन् अपि**—स्वतः इच्छा करीत नसूनही पापा चरण करतो—**हे वार्ष्णेय-वृष्णिकुलप्रसूत**—हे वार्ष्णेया ह्म वृष्णींच्या कुळांत उत्पन्न झालेल्या कृष्णा!—**बलात् नियोजितः इव**—जणुं काय बलात्कारानें तें करावयास लावला गेल्याप्रमाणे—**राज्ञा इव इति दृष्टान्तः उक्तः**—राजाकडून जसा चाकर त्याप्रमाणे, असा याविषयीं दृष्टान्त वर सांगितलाच आहे. ३६.

शृणु त्वं तं वैरिणं सर्वानर्थकरं यं त्वं पृच्छसि—"ऐश्वर्यस्य समग्रस्य धर्मस्य यशसः श्रियः। वैराग्यस्याथ मोक्षस्य षण्णां भग इतीङ्गना" ऐश्वर्यादिषट्कं यस्मिन्वासुदेवे नित्यमप्रतिबद्धत्वेन सामस्त्येन च वर्तते। "उत्पत्तिं प्रलयं चैव भूतानामागतिं गतिम्। वेत्ति विद्यामविद्यां च स वाच्यो भगवानिति"॥ उत्पत्त्यादिविषयं च विज्ञानं यस्य स वासुदेवो वाच्यो भगवानिति। काम इति॥

**भाष्यार्थ—त्वं यं पृच्छसि तं सर्वानर्थकरं वैरिणं त्वं शृणु**—तूं ज्याला विचारीत आहेस-ज्याच्या विषयीं प्रश्न करीत आहेस त्या सर्व अनर्थ करणाऱ्या वैऱ्याला तूं ऐक, असे भगवान् म्हणाले. ( भगवच्छब्दाचा अर्थ निश्चित करण्यासाठीं पुराणातील प्रमाण देतात-)—**समग्रस्य ऐश्वर्यस्य धर्मस्य यशसः श्रियः वैराग्यस्य अथ मोक्षस्य षण्णां 'भगः' इति इंगना**—समग्र ऐश्वर्य, धर्म, यश, श्री, वैराग्य व मोक्षाचा उपाय ज्ञान या सहा पदार्थांना 'भग' अशी संज्ञा आहे—**ऐश्वर्यादिषट्कं यास्मिन् वासुदेवे नित्यं अप्रतिबद्धत्वेन सामस्त्येन च वर्तते**—म्ह० हे ऐश्वर्यादि सहा गुण ज्या वासुदेवामध्यें सतत अप्रतिबद्धपणे व पूर्णपणे राहतात, तसेच—**उत्पत्तिं च एव प्रलयं भूतानां आगतिं गतिं विद्यां च अविद्यां यः वेत्ति सः भगवान् इति वाच्यः**—भूतांची उत्पत्ति व प्रलय म्ह० भूतांचे कारण, पुढील संपत्ति व विपत्ति, विद्या व अविद्या यांना जो जाणतो त्याला भगवान् असे म्हणावे असें श्रीभगवान् 'काम एषः०' या श्लोकानें अर्जुनाच्या प्रश्नाचें उत्तर सांगतात.—

**श्रीभगवान् उवाच**—श्रीकृष्ण म्हणाले—

**काम एष क्रोध एष रजोगुणसमुद्भवः।**
**महाशनो महापाप्मा विद्ध्येनमिह वैरिणम्॥ ३७॥**

**अन्वयार्थ—एषः कामः**—पुरुषाला पापांत प्रवृत्त करणारा हा काम आहे. **एषः क्रोधः**—हाच क्रोध आहे.—**रजोगुणसमुद्भवः**—तो काम रजोगुणापासून उत्पन्न होतो.—**महाशनः**—हा मोठा खादाड आहे. म्हणूनच तो—**महापाप्मा**—महापापी आहे.—**इह**—या संसारांत—**एनं**—या कामाला—**वैरिणं**—वैरी—**विद्धि**—समज. ३७.

**काम एष सर्वलोकशत्रुर्यन्निमित्ता सर्वानर्थप्राप्तिः प्राणिनां स एष कामः प्रतिहतः केनचित्क्रोधत्वेन परिणमते। अतः क्रोधोऽप्येष एव। रजोगुणसमुद्भवो रजश्च तद्गुणश्च स रजोगुणः स समुद्भवो यस्य स कामो रजोगुणसमुद्भवो रजोगुणस्य वा समुद्भवः। कामो ह्युद्भूतो रजः प्रवर्तयन्पुरुषं प्रवर्तयति। तृष्णया ह्यहं कारित इति दुःखितानां रजःकार्ये सेवादौ प्रवृत्तानां प्रलापः श्रूयते। महाशनो महदशनमस्येति महाशनोऽत एव महापाप्मा। कामेन हि प्रेरितो जन्तुः पापं करोति। अतो विद्ध्येनं काममिह संसारे वैरिणम् ॥ ३७ ॥**

**भाष्यार्थ—एषः कामः सर्वलोकशत्रुः**—हा काम सर्व लोकांचा शत्रु आहे.—**यन्निमित्ता प्राणिनां सर्वानर्थप्राप्तिः**—ज्या कामाच्या निमित्ताने प्राण्यांना सर्व अनर्थांची प्राप्ति होते, (म्हणून तो सर्व लोकांचा शत्रु होय-पण त्यालाच क्रोधत्व कसे? उत्तर-)—**सः एषः कामः केनचित् प्रतिहतः क्रोधत्वेन परिणमते**—तो हा काम कोणाकडून प्रतिबद्ध झाला असतां क्रोधत्वाने परिणत होतो. (कोणी प्रतिबंध केल्यास हा कामच क्रोध बनतो.)—**अतः क्रोधः अपि एषः एव**—म्हणून क्रोधही हाच आहे. (काम व क्रोध हे दोन्ही त्याज्य आहेत, असे सुचविण्यासाठी त्याचें कारण सांगतात-)—**रजोगुणसमुद्भवः-रजः च तत् गुणः च सः रजोगुणः सः समुद्भवः यस्य सः कामः रजोगुणसमुद्भवः**—तो रजोगुणसमुद्भव आहे. म्ह० 'रज' असा जो गुण तो रजोगुण, तोच रजःसंज्ञक गुण ज्या कामाचा समुद्भव म्ह० कारण-जनक आहे तो काम रजोगुणसमुद्भव होय. (याप्रमाणें कारणद्वारा कामक्रोधांचें त्याज्यत्व सांगून कार्यद्वाराही सांगतात-)—**वा रजोगुणस्य समुद्भवः**—किंवा तो रजोगुणाचा समुद्भव-कारण-जनक-उत्पादक आहे. (अहोपण काम पुरुषालाच तेवढा प्रवृत्त करतो रजोगुणाला उत्पन्न करीत नाहीं, म्हणून कोणी म्हणेल तर सांगतात-)—**हि उद्भूतः कामः रजः प्रवर्तयन् पुरुषं प्रवर्तयति**—कारण मनांत उत्पन्न झालेला काम रजोगुणाला प्रवृत्त करीतच पुरुषाला प्रवृत्त करितो. (याविषयीं अनुभवानुसार लोकप्रसिद्धिच दाखवितात-)—**रजःकार्ये सेवादौ प्रवृत्तानां दुःखितानां तृष्णया हि अहं कारितः इति प्रलापः श्रूयते**—रजोगुणाचे कार्य अशी जी सेवादिवृत्ति तिच्यामध्यें प्रवृत्त झालेल्या दुःखितांचा 'तृष्णेनेंच मजकडून हें करविलें, मला या संकटांत घातले' असा प्रलाप ऐकूं येतो. (त्यामुळें तृष्णा म्ह० काम सेवादि रजोवृत्तींत पाडणारा आहे, हें प्रसिद्ध आहे. तो योग्यायोग्यादि विचार केल्यावांचूनच अनेक विषयांचा उपभोग घेतो, असें सांगतात-)—**महाशनः-महत् अशनं अस्य इति**

**महाशनः अतः एव महापाप्मा**—हा महाशन आहे म्ह० याचें अशन-खाणें मोठें आहे, तो फार खातो म्हणून महाशन, आणि त्यामुळेच महा पापी आहे, (अहोपण मोठा खादाड-सर्व विषय भोगणारा जरी असला तरी महापापी कसा ? उत्तर-)—**हि कामेन प्रेरितः जन्तुः पापं करोति**—कारण कामाकडून प्रेरित झालेला प्राणी पाप करतो.—**अतः एनं कामं इह-संसारे वैरिणं विद्धि**—म्हणून या कामाला या संसारांत तूं वैरी जाण. ३७.

धूमेनाऽऽव्रियते वह्निर्यथाऽऽदर्शो मलेन च ।
यथोल्बेनाऽऽवृतो गर्भस्तथा तेनेदमावृतम् ॥ ३८ ॥

**अन्वयार्थ—यथा**—ज्याप्रमाणे—**धूमेन**—धुराकडून—**वह्निः**—अग्नि—**आव्रियते**—आच्छादित केला जातो—**च**—व—**मलेन**—मळानें—**आदर्शः**—आरसा (—**आव्रियते**—झांकला जातो)—**यथा**—ज्याप्रमाणें—**उल्बेन**—वारेनें—**गर्भः**—गर्भ—**आवृतः**—आच्छादित झालेला असतो—**तथा**—त्याप्रमाणें—**तेन**—त्या कामानें—**इदं**—हे—**आवृतं**—झांकलेले आहे. ३८.

कथं वैरीति दृष्टान्तैः प्रत्याययति—धूमेनेति । धूमेन सहजेनाऽऽव्रियते वह्निः प्रकाशात्मकोऽप्रकाशात्मकेन यथा वाऽऽदर्शो मलेन च यथोल्बेन गर्भवेष्टनेन जरायुणाऽऽवृत आच्छादितो गर्भस्तथा तेनेदमावृतम् ॥ ३८ ॥

**भाष्यार्थ—कथं वैरी इति 'धूमेन०' इति दृष्टान्तैः प्रत्याययति**—हा काम वैरी कसा ते 'धूमेन०' या श्लोकाने दृष्टान्तांनी अनुभवास आणून देतात—**सहजेन अप्रकाशात्मकेन धूमेन प्रकाशात्मकः वह्निः आव्रियते**—अग्नीच्या बरोबरच उत्पन्न झालेल्या अप्रकाशरूप धूमाकडून प्रकाशरूप अग्नि आच्छादित केला जातो—**वा यथा आदर्शः मलेन**—किंवा ज्याप्रमाणे आरसा मळानें झांकला जातो,—**यथा उल्बेन-गर्भवेष्टनेन-जरायुणा गर्भः आवृतः आच्छादितः**—किंवा जसा उल्बाने म्ह० गर्भाच्या वेष्टनानें-जरायूनें म्ह० वारेने गर्भ आवृत म्ह० आच्छादित झालेला असतो—**तथा**—त्याप्रमाणे—**तेन इदं आवृतं**—त्या कामानें हें आवृत-आच्छादित केले आहे, (हें म्हणजे काय तें पुढें सांगतील.) ३८.

आवृतं ज्ञानमेतेन ज्ञानिनो नित्यवैरिणा ।
कामरूपेण कौन्तेय दुष्पूरेणानलेन च ॥ ३९ ॥

**अन्वयार्थ—हे कौन्तेय**—हे अर्जुना !—**ज्ञानिनः**—ज्ञानी पुरुषाचा—**नित्यवैरिणा**—नित्यवैरी—**दुष्पूरेण**—ज्याची भरती कधींच होत नाही,—**च**—व—**अनलेन**—ज्याला 'पुरे' असें कधी वाटत नाहीं अशा—**एतेन कामरूपेण**—या इच्छारूप शत्रूनें—**ज्ञानं**—ज्ञान—**आवृतं**—आच्छादित केलें आहे. ३९.

किं पुनस्तदिदंशब्दवाच्यं यत्कामेनाऽऽवृतमित्युच्यते—आवृतमिति । आवृतमेतेन ज्ञानं ज्ञानिनो नित्यवैरिणा । ज्ञानी हि जानात्यनेनाहमनर्थे प्रयुक्तः पूर्वमेवेति । दुःखी च भवति नित्यमेव । अतोऽसौ ज्ञानिनो नित्यवैरी न तु मूर्खस्य । स हि कामं तृष्णाकाले मित्रमिव पश्यंस्तत्कार्ये दुःखे प्राप्ते जानाति तृष्णयाऽहं दुःखित्वमापादित इति न पूर्वमेवातो ज्ञानिन एव नित्यवैरी । किंरूपेण कामरूपेण काम इच्छैव रूपमस्येति कामरूपस्तेन दुष्पूरेण दुःखेन पूरणमस्येति दुष्पूरस्तेनानलेन नास्यालं पर्याप्तिर्विद्यत इत्यनलस्तेन ॥ ३९ ॥

**भाष्यार्थ—किं पुनः तत् इदंशब्दवाच्यं यत् कामेन आवृतं इति उच्यते 'आवृतं०' इति**—पण तें पूर्व श्लोकांतील ' इदं ' हें–या शब्दाचें वाच्य (म्ह० अर्थ ) काय बरें आहे की जें कामाने आच्छादित केलें आहे असें म्हटलें जातें. या प्रश्नाचें उत्तर ' आवृतं० ' या श्लोकानें दिलें जाते.—**एतेन ज्ञानिनः नित्यवैरिणा ज्ञानं आवृतं**—या ज्ञानी पुरुषाच्या नित्य वैऱ्याकडून ज्ञान आच्छादित केले गेले आहे. —**हि ज्ञानी अनेन अहं अनर्थे प्रयुक्तः इति पूर्वं एव जानाति**—कारण ज्ञानी या कामाकडून मी अनर्थात प्रेरणा केला गेलो आहे–या कामानं मला अनर्थांत पाडले आहे, असें पूर्वींच जाणतो—**च नित्यं एव दुःखी भवति**—आणि नेहमीच दुःखी होतो—**अतः असौ ज्ञानिनः नित्यवैरी तु मूर्खस्य न**—म्हणून हा काम ज्ञानी पुरुषाचा नित्य वैरी आहे, पण मूर्खाचा तो वैरी नाही.—**हि सः तृष्णाकाले कामं मित्रं इव पश्यन्**—कारण तो मूर्ख तृष्णेच्या वेळीं कामाला मित्रासारखा पाहतो, पण—**तत्कार्ये दुःखे प्राप्ते तृष्णया अहं दुःखित्वं आपादितः इति जानाति**—त्याचें कार्य–त्याचा परिणाम–जे दुःख ते प्राप्त झाले असतां तृष्णेने मी या दुःखित्वास प्राप्त केला गेलों आहे–या तृष्णेनें–कामाने मला दुःखी केलें आहे असे जाणतो—**न पूर्वं एव**—मूर्ख पूर्वींच त्याला शत्रु मानीत नाहीं, ( दुःख झालें म्ह० मग त्याला शत्रु मानतो. पण ज्ञानी कामाला प्रारंभीच म्ह० दुःखरूपी अनर्थ प्राप्त होण्यापूर्वींच, जेव्हां एखाद्या विषयाविषयीं तीव्र इच्छा होते त्याच वेळीं वैरी समजतो )—**अतः ज्ञानिनः एव नित्यवैरी**—म्हणून तो ज्ञानी पुरुषाचाच नित्य वैरी आहे. (नित्य म्ह० उत्पत्तीच्या व परिणामाच्या अशा दोन्ही प्रसंगीं)—**किंरूपेण**—कोणत्या स्वरूपाच्या या ज्ञान्याच्या नित्य वैऱ्यानें ज्ञानाला आच्छादित केले आहे ?—**कामरूपेण–कामः–इच्छा एव रूपं अस्य इति कामरूपः तेन**—कामरूप वैऱ्यानें–काम म्ह० इच्छा, हेंच याचे रूप आहे, म्हणून कामरूप. त्या कामरूप शत्रूने—**दुष्पूरेण –दुःखेन पूरणं अस्य इति दुष्पूरः तेन**—दुष्पूर म्ह० दुःखानें याचें पूरण–पूर्ति–भरति होते म्हणून दुष्पूर, अशा दुष्पूर कामानें—**अनलेन–अस्य अलं–पर्याप्तिः न विद्यते इति अनलः तेन**—त्याचप्रमाणें अनल म्ह० याचा अलंभाव–तृप्ति नाहीं, याला विषय केव्हांही पुरेसे होत नाहींत, म्हणून हा काम अनल आहे. ( त्या अनल, दुष्पूर कामरूप ज्ञान्याच्या नित्य वैऱ्यानें या ज्ञानाला आच्छादित केलें आहे. ) ३९.

**इन्द्रियाणि मनो बुद्धिरस्याधिष्ठानमुच्यते ।**
**एतैर्विमोहयत्येष ज्ञानमावृत्य देहिनम् ॥ ४० ॥**

**अन्वयार्थ—इन्द्रियाणि**—इंद्रियें,—**मनः**—मन—**बुद्धिः**—व बुद्धि हें—**अस्य**—या कामाचें—**अधिष्ठानं**—आश्रयस्थान—**उच्यते**—सांगितलें जातें.—**एषः**—हा काम—**एतैः**—या इंद्रियादिकांच्या योगानें—**ज्ञानं**—ज्ञानाला—**आवृत्य**—आच्छादित करून—**देहिनं**—देहवान्-देहाभिमानी आत्म्याला—**विमोहयति**—नानाप्रकारें मोहित करतो. ४०.

**किमधिष्ठानः पुनः कामो ज्ञानस्याऽऽवरणत्वेन वैरी सर्वस्येत्यपेक्षायामाह ज्ञाते हि शत्रोरधिष्ठाने सुखेन शत्रुनिबर्हणं कर्तुं शक्यत इति—इन्द्रियाणीति । इन्द्रियाणि मनो बुद्धिश्चास्य कामस्याधिष्ठानमाश्रय उच्यते । एतैरिन्द्रियादिभिराश्रयैर्विमोहयति विविधं मोहयत्येष कामो ज्ञानमावृत्याऽऽच्छाद्य देहिनं शरीरिणम् ॥ ४० ॥**

**भाष्यार्थ—पुनः किमधिष्ठानः कामः ज्ञानस्य आवरणत्वेन सर्वस्य वैरी**—पण कोणत्या अधिष्ठानाचा आश्रय केलेला हा काम ज्ञानाच्या आवरणत्वानें सर्वांचा वैरी होतो,—**इति अपेक्षायां**—अशी अपेक्षा झाली असतां—**हि शत्रोः अधिष्ठाने ज्ञाते सुखेन शत्रुनिबर्हणं कर्तुं शक्यते इति 'इन्द्रियाणि०' इति आह**—कारण शत्रूचें अधिष्ठान-आधार कळला असता अनायासानें शत्रूचा उच्छेद करता येतो, म्हणून 'इंद्रियाणि०' या श्लोकानें या कामरूपी शत्रूचें आश्रयस्थान सागतात—**इन्द्रियाणि मनः च बुद्धिः अस्य कामस्य अधिष्ठानं-आश्रयः उच्यते**—इंद्रियें, मन व बुद्धि हें या कामाचें अधिष्ठान म्ह० आश्रय आहे, असें सांगितलें जातें.—**एतैः इंद्रियादिभिः आश्रयैः एषः कामः ज्ञानं आवृत्य-आच्छाद्य देहिनं-शरीरिणं विमोहयति-विविधं मोहयति**—या इंद्रियादिकांच्या योगानें -या आश्रयांनीं हा काम ज्ञानाला आच्छादित करून देहवानाला, शरीराभिमानी आत्म्याला विमोहित करतो. नानाप्रकारें मोहित करतो. ४०.

**तस्मात्त्वमिन्द्रियाण्यादौ नियम्य भरतर्षभ ।**
**पाप्मानं प्रजहिह्येनं ज्ञानविज्ञाननाशनम् ॥ ४१ ॥**

**अन्वयार्थ—हे भरतर्षभ**—हे अर्जुना!—**तस्मात्**—म्हणून—**त्वं**—तूं—**आदौ**—अगोदर—**इन्द्रियाणि**—आपलीं इंद्रियें—**नियम्य**—नियमित करून-इंद्रियांचें नियमन करून—**एनं ज्ञानविज्ञाननाशनं**—या शास्त्रज्ञान व आत्मसाक्षात्काररूप ज्ञान यांचा नाश करणाऱ्या—**पाप्मानं**—पाप्याला—**प्रजहिहि**—सोड. त्याचा परित्याग कर. ४१.

**यत एवम्—तस्मादिति । तस्मात्त्वमिन्द्रियाण्यादौ पूर्वं नियम्य वशीकृत्य भरतर्षभ पाप्मानं पापाचारं कामं प्रजहिहि परित्यज, एनं प्रकृतं वैरिणं ज्ञानविज्ञाननाशनं**

ज्ञानं शास्त्रत आचार्यतश्चाऽऽत्मादीनामवबोधः, विज्ञानं विशेषतस्तदनुभवस्तयोर्ज्ञानविज्ञानयोः श्रेयःप्राप्तिहेत्वोर्नाशनं प्रजहिह्यात्मनः परित्यजेत्यर्थः ॥ ४१ ॥

**भाष्यार्थ—यतः एवं ' तस्मात्० ' इति**—ज्याअर्थी इन्द्रियादिक हें कामाचें अधिष्ठान आहे त्याअर्थी काय करावें तें 'तस्मात्०' या श्लोकाने सांगतात—**तस्मात्**—इन्द्रियादिक हा कामाचा आश्रय असल्यामुळें—**त्वं आदौ-पूर्वं इंद्रियाणि नियम्य-वशीकृत्य**—तूं आधीं-कामाचा निरोध करण्यापूर्वी इंद्रियांचें नियमन करून-त्यांना आपल्या वश करून घेऊन—**भरतर्षभ**—हे भरतकुलश्रेष्ठा !—**पाप्मानं-पापाचारं कामं**—पाप्याला-पापाचरण करणाऱ्या कामाला—**प्रजहिहि-परित्यज**—टाक, त्याचा परित्याग कर.—**एनं-प्रकृतं वैरिणं ज्ञानविज्ञाननाशनं**—या प्रस्तुत वैऱ्याचा ज्ञान व विज्ञान यांचा नाश करणाऱ्या या पाप्याचा परित्याग कर.—**ज्ञानं-शास्त्रतः आचार्यतः च आत्मादीनां अवबोधः**—ज्ञान म्ह० शास्त्रद्वारा व आचार्यांच्या मुखाने आत्मा, अनात्मा, विद्या, अविद्या इत्यादि पदार्थांचा अवबोध, अर्थज्ञान व—**विज्ञानं-विशेषतः तदनुभवः**—विज्ञान म्ह० विशेषतः त्याचा अनुभव.—**तयोः श्रेयःप्राप्तिहेत्वोः ज्ञानविज्ञानयोः नाशनं**—श्रेयःप्राप्तीचे-मोक्षप्राप्तीचे कारण-साधन अशा त्या दोन्ही ज्ञान-विज्ञानांचा नाश करणाऱ्या कामाला—**प्रजहिहि आत्मनः परित्यज इत्यर्थः**—टाक, त्याचा आपल्यापासून त्याग कर, असा याचा भावार्थ. ४१.

**इन्द्रियाणि पराण्याहुरिन्द्रियेभ्यः परं मनः ।**
**मनसस्तु परा बुद्धिर्यो बुद्धेः परतस्तु सः ॥ ४२ ॥**

**अन्वयार्थ—इन्द्रियाणि**—श्रोत्रादि पांच इन्द्रिये ( बाह्य स्थूल देहाच्या अपेक्षेने ) —**पराणि**—उत्कृष्ट आहेत, असे—**आहुः**—पंडित सांगतात.—**इन्द्रियेभ्यः**—इंद्रियांहून—**मनः**—मन—**परं**—श्रेष्ठ आहे—**तु**—व—**मनसः**—मनाहून—**बुद्धिः**—बुद्धि—**परा**—श्रेष्ठ आहे.—**यः**—जो—**बुद्धेः**—बुद्धीहून—**परतः**—पलीकडे असलेला साक्षी—**सः तु**—तोच—**सः**—प्रसिद्ध आत्मा आहे. ४२.

इन्द्रियाण्यादौ नियम्य कामं शत्रुं जहिहीत्युक्तं तत्र किमाश्रयः कामं जह्यादित्युच्यते—इन्द्रियाणीति । इन्द्रियाणि श्रोत्रादीनि पञ्च देहं स्थूलं बाह्यं परिच्छिन्नं चापेक्ष्य सौक्ष्म्यान्तरस्थत्वव्यापित्वाद्यपेक्ष्य पराणि प्रकृष्टान्याहुः पण्डिताः । तथेन्द्रियेभ्यः परं मनः संकल्पविकल्पात्मकम् । तथा मनसस्तु परा बुद्धिर्निश्चयात्मिका । तथा यः सर्वदृश्येभ्यो बुद्ध्यन्तेभ्योऽभ्यन्तरो यं देहिनमिन्द्रियादिभिराश्रयैर्युक्तः कामो ज्ञानावरणद्वारेण मोहयतीत्युक्तं स बुद्धेर्द्रष्टा परमात्मा ॥४२॥

**भाष्यार्थ—आदौ इंद्रियाणि नियम्य कामं शत्रुं जहिहि इति उक्तं**—अगोदर इंद्रियांचें नियमन करून कामरूपी शत्रूचा परित्याग कर असें सांगितलें. ( साध-

नासह कामत्याग हाच खरा संन्यास आहे.)—**तत्र किमाश्रयः कामं जह्यात् इति ' इंद्रियाणि० ' इति उच्यते**—पण कामत्याग करावा असें ठरलें असतां मुमुक्षूने कोणाचा आश्रय करून कामांचा त्याग करावा, असा प्रश्न उपस्थित होतो. म्हणून ('रसोप्यस्य परं दृष्ट्वा निवर्तते-' ( अ. २ श्लो. ५९ पृ. २०० ) या वचनाच्या आधारानें ) ' इन्द्रियाणि० ' या श्लोकाने उत्तर देतात—**श्रोत्रादीनि पंच इन्द्रियाणि**—श्रोत्रादिक पांच ज्ञानेंद्रिये ( व वागादिक कर्मेंद्रिये )—**स्थूलं बाह्यं परिच्छिन्नं च देहं अपेक्ष्य**—स्थूल, बाह्य व मर्यादित देहाच्या अपेक्षेने इन्द्रियांचें—**सौक्ष्म्य-अन्तरस्थत्व-व्यापित्वादि अपेक्ष्य**—सूक्ष्मत्व-आंत राहणें, अधिक व्यापी असणे, इत्यादि धर्मांच्या अपेक्षेने—**पराणि-प्रकृष्टानि पण्डिताः आहुः**—पर म्ह० अधिक श्रेष्ठ आहेत-उत्तम आहेत असे पंडित सांगतात. [ शरीर इंद्रियांहून स्थूल आहे, बाह्य आहे व मर्यादित आहे. त्याच्या अपेक्षेने श्रोत्रादिक इन्द्रियें सूक्ष्म आहेत, आंत आहेत व व्यापक आहेत. म्हणून शरीराहून इन्द्रियें योग्यतेनें श्रेष्ठ आहेत, असे विद्वान् लोक सांगतात. ]—**तथा इन्द्रियेभ्यः संकल्पविकल्पात्मकं मनः परं**—त्याचप्रमाणें श्रोत्रादि इंद्रियांहून संकल्पविकल्पात्मक मन पर आहे.—**तथा तु मनसः निश्चयात्मिका बुद्धिः परा**—आणि त्याचप्रमाणे मनाहून निश्चयस्वरूप बुद्धि परा-श्रेष्ठ आहे.—**तथा यः बुद्ध्यन्तेभ्यः सर्वदृश्येभ्यः अभ्यन्तरः**—त्याचप्रमाणे जो बुद्धीपर्यंत सर्व दृश्य पदार्थांहून अभ्यंतर आहे-[ शब्दादि बाह्य विविध विषयापासून शरीर, इन्द्रियें, मन व बुद्धि येथपर्यंत जे दृश्य-ज्ञानाचे विषय होणारे पदार्थ आहेत त्या सर्वांच्या अगदी आत असणारा तो परमात्मा]—**यं देहिनं इन्द्रियादिभिः आश्रयैः युक्तः कामः ज्ञानावरणद्वारेण मोहयति इति उक्तं**—ज्या देहाभिमानी आत्म्याला इंद्रियादि आश्रयांनी युक्त असलेला काम ज्ञानाला आच्छादित करणे या कार्याच्या द्वारा मोहित करतो असे सांगितले—**सः बुद्धेः द्रष्टा परमात्मा**—तो बुद्धीचा द्रष्टा परमात्मा आहे. [ जो बुद्धीपर्यंत सर्व दृश्यांच्या आंत-परतः आहे. ज्याला इंद्रियादि आश्रयांनी युक्त असलेला काम ज्ञानावरणाच्या द्वारा मोहित करतो असे वर ( श्लो. ३९ ) सांगितले तो बुद्धीचा साक्षी परमात्मा आहे. ] ४२.

एवं बुद्धेः परं बुद्ध्वा संस्तभ्यात्मानमात्मना ।
जहि शत्रुं महाबाहो कामरूपं दुरासदम् ॥ ४३ ॥

**इति श्रीमद्भगवद्गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे कर्मयोगो नाम तृतीयोऽध्यायः ॥**

**अन्वयार्थ—हे महाबाहो**—हे पराक्रमी अर्जुना ! **एवं**—याप्रमाणे—**बुद्धेः परं आत्मानं**—बुद्धीच्या पलीकडे असलेल्या आत्म्याला—**बुद्ध्वा**—जाणून—**आत्मना**—स्वतः सुसंकृत मनानेंच त्याचे—**संस्तभ्य**—उत्तमप्रकारें स्तंभन करून

**—दुरासदं**—जो हाती लागणें फार कठिण आहे, अशा—**कामरूपं शत्रुं**—या कामरूप शत्रूला—**जहि**—तूं टाक. ४३.

**एवमिति । एवं बुद्धेः परमात्मानं बुद्ध्वा ज्ञात्वा संस्तभ्य सम्यक्स्तम्भनं कृत्वा स्वेनैवाऽऽत्मना संस्कृतेन मनसा सम्यक्समाधायेत्यर्थः । जह्येनं शत्रुं हे महाबाहो कामरूपं दुरासदं** दुःखेनाऽऽसद **आसादनं प्राप्तिर्यस्य तं दुरासदं** दुर्विज्ञेयानेकविशेषमिति ४३

इति श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यगोविन्दभगवत्पूज्यपादशिष्यश्रीमच्छंकरभगवतः कृतौ श्रीभगवद्गीताभाष्ये कर्मप्रशंसायोगो नाम तृतीयोऽध्यायः ॥ ३ ॥

**भाष्यार्थ—'एवं०' इति**—इंद्रियादिकांच्या समाधानपूर्वक आत्मज्ञानानें कामाला जिंकतां येते, असे जें वर सांगितले त्याचा उपसंहार ' एवं० ' या श्लोकानें करितात.—**एवं बुद्धेः परं आत्मानं बुद्ध्वा-ज्ञात्वा**—याप्रमाणे बुद्धीहून श्रेष्ठ आत्म्याला जाणून ( संस्कृत मन हे मनःसमाधानाचे साधन आहे, असे सांगतात-)—**संस्तभ्य -सम्यक् स्तंभनं कृत्वा**—उत्तम प्रकारें स्तंभन करून—**स्वेन एव आत्मना-संस्कृतेन मनसा सम्यक् समाधाय इत्यर्थः**—स्वतःच आत्म्यानें म्ह० संस्कृत मनाने उत्तम प्रकारें समाधान करून-[सुसंस्कृत मनानेच अंतःकरणाला आत्म्यामध्ये शांत -समाहित करून ]—**हे महाबाहो**—हे पराक्रमी अर्जुना,—**एनं कामरूपं दुरासदं शत्रुं जहि**—या कामरूप दुरासद-शत्रूला टाक-त्याचा त्याग कर—**यस्य दुःखेन आसदः-आसादनं-प्राप्तिः तं दुरासदं**—ज्याची दुःखाने आसद म्ह० आसादन प्राप्ति होते तो दुरासद, त्या दुरासदाला [ म्ह० मोठया कष्टाने हातीं लागणाऱ्या कामाला ]—**दुर्विज्ञेय-अनेकविशेषं इति**—ज्याचे अनेक विशेष-प्रकार कळणें फार कठिण आहे, अशा कामाचा त्याग कर. [ त्याला जिंक. या तिसऱ्या अध्यायांत साधनभूत कर्मनिष्ठा प्राधान्यानें व तिनें साध्य असलेली ज्ञाननिष्ठा गौणत्वानें सांगितली आहे. ] ४३.

इति भगवान् श्रीकृष्णांनीं गायलेल्या-सागितलेल्या उपनिषदांतील-रहस्यविद्येतील ब्रह्मविद्येपैकीं योग-उपाय-शास्त्रांतील कर्मप्रशसायोगनावाचा तिसरा अध्याय विष्णुशर्मकृत सान्वयार्थ-सटीप-भाष्य-भाष्यार्थासह समाप्त झाला.

---

१रहस्यकारांनीं ३६-४३ श्लोकाची सगति व अर्थहि असाच कसा तरी लावला आहे. पण आतां यापुढें विस्तारभयास्तव महत्त्वाचे तेवढेच दोष दाखविण्याचा विचार आहे. कारण येथवर केलेल्या सविस्तर परीक्षणावरून गीतारहस्यांतील विवेचन शास्त्रीय परीभाषेच्या कसोटीला कितपत उतरेल, याबद्दल आतां बहुतेकांची खात्री झालीच असेल. असो या ४३ व्या श्लोकाच्या अर्थात रहस्यकार—' संस्तभ्य आत्मानं आत्मना ' याचा अर्थ ' आपणच आपल्याला आवरून धरून' असा करितात. पण आपणच आपल्याला आवरून कसें धरावें, वगैरे कांहीं सांगत नाहींत. त्यामुळें तो शब्दशः व सरळ अर्थही फारच दुर्बोध झाला आहे. आचार्यांनी त्याचेंच किती सुबोध स्पष्टीकरण केलें आहे, तें वाचकांनीं अवश्य पहावें. या

श्लोकावरील टीपेंत त्यांनी पुन: ‘ लोकसंग्रहार्थ सर्व कर्मे स्वधर्माप्रमाणें करण्याला इंद्रियें ताब्यांत पाहिजेत व तेवढाच इंद्रियनिग्रह येथें विवक्षित आहे.’ इत्यादि अप्रासंगिक उल्लेख केलाच आहे. पण लोकसंग्रहाचें प्रकरण २९ व्या श्लोकातच संपलें आहे. त्याचा येथें कांहीं संबंध नाहीं. येथे अर्जुनाच्या प्रश्नाचें उत्तर प्रकृत आहे.‘ सर्व अनर्थांचें मूळ काम आहे. तो इंद्रियादिकांच्या आश्रयानें प्राण्याला अविवेकी बनवितो, म्हणून तू प्रथम इंद्रियांचा निग्रह कर,’ असा स्पष्ट उपदेश आहे. त्यामुळें ‘ इंद्रियें स्वधर्माचरणापुरतींच ताब्यांत राहतील तेवढाच इंद्रियनिग्रह येथे विवक्षित आहे ’ हें म्हणणें मुळाला धरून नाहीं. “इंद्रियांचें काम बाह्य पदार्थांचे संस्कार ग्रहण करण्याचें असून मनानें त्यांची व्यवस्था लाविल्यावर बुद्धि त्याची निवडानिवड करते ” ६६३ हें रहस्यकारांचें म्हणणें वेदान्तपरिभाषेला धरून नाहीं. इंद्रियें बाह्य पदार्थांचे संस्कार ग्रहण करीत नाहींत, तीं साक्षात् शब्दादि विषयांचें ग्रहण करितात. मन त्यांची म्ह० कोणाची व्यवस्था लावते ? मन व्यवस्था लावणारें नाहीं, विषयांविषयीं हा चांगला आहे की वाईट, आपल्याला अनुकूल आहे की प्रतिकूल ? इत्यादि नुस्ते संकल्प व विकल्प करतें, व बुद्धि त्याच्या बऱ्या–वाईटपणाचा निश्चय करते. त्यामुळें वरील म्हणणें अप्रामाणिक आहे. आचार्यांनी या अध्यायाला ‘ कर्मप्रशंसायोग ’ असें नांव शेवटच्या समाप्तिसूचक वाक्यांत दिलें आहे.

# अध्याय चवथा.

## ज्ञान-कर्म-संन्यासयोग.

**श्रीभगवानुवाच**—श्रीभगवान् म्हणाले—

**इमं विवस्वते योगं प्रोक्तवानहमव्ययम् ।**
**विवस्वान् मनवे प्राह मनुरिक्ष्वाकवेऽब्रवीत् ॥ १ ॥**

**अन्वयार्थ**—**अहं**—मी—**इमं अव्ययं योगं**—हा अक्षय फल देणारा ज्ञानयोग—**विवस्वते**—आदित्याला—**प्रोक्तवान्**—सांगता झालो—**विवस्वान्**—आदित्य—**मनवे**—मनूला—**प्राह**—सांगता झाला.—**मनुः**—मनु—**इक्ष्वाकवे**—इक्ष्वाकुनांवाच्या आदिराजाला-आपल्या पुत्राला—**अब्रवीत्**—सांगता झाला. १.

**योऽयं योगोऽध्यायद्वयेनोक्तो ज्ञाननिष्ठालक्षणः ससंन्यासः कर्मयोगोपायो यस्मिन्वेदार्थः परिसमाप्तः प्रवृत्तिलक्षणो, निवृत्तिलक्षणश्च गीतासु च सर्वास्वयमेव योगो विवक्षितो भगवताऽतः परिसमाप्तं वेदार्थं मन्वानस्तं वंशकथनेन स्तौति श्रीभगवान्—इममध्यायद्वयेनोक्तं योगं विवस्वत आदित्याय सर्गादौ प्रोक्तवानहं जगत्परिपालयितॄणां क्षत्रियाणां बलाधानाय । तेन योगबलेन युक्ताः समर्था भवन्ति ब्रह्म परिरक्षितुम् । ब्रह्मक्षत्रे परिपालिते जगत्परिपालयितुमलम् । अव्ययमव्ययफलत्वात् । न ह्यस्य सम्यग्दर्शननिष्ठालक्षणस्य मोक्षाख्यं फलं व्येति । स च विवस्वान्मनवे प्राह मनुरिक्ष्वाकवे स्वपुत्रायाऽऽदिराजायाब्रवीत् ॥ १ ॥**

**भाष्यार्थ**—**कर्मयोगोपायः ससंन्यासः यः अयं ज्ञाननिष्ठालक्षणः योगः अध्यायद्वयेन उक्तः**—कर्मयोग हा ज्याचा उपाय आहे असा संन्यासासह जो हा ज्ञाननिष्ठारूप योग गेल्या दोन अध्यायांनी सांगितला—**यस्मिन् प्रवृत्तिलक्षणः च निवृत्तिलक्षणः वेदार्थः परिसमाप्तः**—ज्या निष्ठाद्वयात्मक योगांत प्रवृत्तिलक्षण व निवृत्तिलक्षण वेदार्थ सर्वप्रकारे अंतर्भूत झाला आहे (अहो पण मागील दोन अध्यायांत निष्ठाद्वय जरी सांगितलें असलें तरी पुढील अध्यायांत दुसरें कांहीं सांगावयाचें असेल, अशी शंका घेऊन म्हणतात)—**च सर्वासु गीतासु भगवता अयं एव योगः विवक्षितः**—आणि पुढील सर्व गीताध्यायांमध्यें भगवानांकडून हाच योग विवक्षित आहे-भगवानांना हाच योग सांगावयाचा आहे—**अतः वेदार्थं परिसमाप्तं मन्वानः श्रीभगवान् तं वंशकथनेन स्तौति**—म्हणून वेदार्थ पूर्णपणें समाप्त झाला आहे, यांत अन्तर्भूत झाला आहे, असें मानणारे श्रीभगवान् त्या योगाला संप्रदायाच्या कथनानें स्तवितात. [ 'वंशकथन' म्ह० संप्रदायाचा उपन्यास व संप्रदायाचा उपदेश करणें, त्यामुळें हा

योग कृत्रिम आहे, भगवानांनीं आपल्या पदरचाच सांगितला आहे, ही शंका जाऊन योगाच्या प्रशंसेमध्यें त्याचे पर्यवसान होते, आणि त्यामुळे त्याविषयींची श्रद्धा दृढ होते. म्हणून भगवान् या दोन अध्यायांनीं सांगितलेल्या ज्ञानयोगाचा संप्रदाय सांगतात. संप्रदाय म्ह० गुरुशिष्यपरंपरा. या ज्ञाननिष्ठारूप मुख्य योगाची इतिकर्तव्यता संन्यास आहे; व कर्मयोग हा त्याचा उपाय आहे. त्यामुळें या योगांत प्रवृत्तिलक्षण व निवृत्तिलक्षण असा दोन्ही प्रकारचा वेदार्थ संक्षेपतः अन्तर्भूत होतो, व भगवानांना या पुढील पंधरा अध्यायांतही हाच ज्ञानयोग सांगावयाचा आहे. ] —**इमं-अध्यायद्वयेन उक्तं योगं**—दोन अध्यायांनी सांगितलेल्या, कर्मयोग या उपायानें प्राप्य, अशा या ज्ञाननिष्ठारूप योगाला—**अहं सर्गादौ विवस्वते—आदित्याय प्रोक्तवान्**—मीं सृष्टीच्या आरंभीं विवस्वानाला म्ह० सूर्याला सांगितले ( कशासाठी ? उत्तर-)—**जगत्परिपालयितॄणां क्षत्रियाणां बलाधानाय**—जगाचे पालन करणारे जे क्षत्रिय यांच्या बलाचे आधान करण्यासाठीं ( त्यांच्यामध्ये बलाचें आधान करण्यासाठीं हा योग मीं सूर्याला सांगितला. पण या योगानें क्षत्रियांमध्ये बल कसे येते, ते सांगतात-)—**तेन योगबलेन युक्ताः ब्रह्म परिरक्षितुं समर्थाः भवन्ति**—त्या योगबलानें युक्त झालेले क्षत्रिय ब्राह्मण्याचें सर्वप्रकारें रक्षण करण्यास समर्थ होतात. याप्रमाणें—**ब्रह्म-क्षत्रे परिपालिते जगत् परिपालयितुं अलं**—ब्राह्मण व क्षत्रिय यांचें परिपालन झाले असतां त्या दोघांकडून कर्मफलभूत जगाचें अनुष्ठानाच्या द्वारा रक्षण

---

१ पण रहस्यकार म्हणतात—" कर्म कोणाला चुकत नाहीं " ( हें म्हणणे सर्वथा खरें नाहीं.मागे पृ.२६७ पहा।) "म्हणून बुद्धि निष्काम झाली तरी कर्म केलेंच पाहिजे" (कामच शरीरेंद्रियांचा प्रवर्तक असल्यामुळें बुद्धि सर्वथा निष्काम झाल्यावर कर्म संभवत नाहीं. 'अकामस्य क्रिया काचित् दृश्यते नेह कस्यचित्। यद्यद्धि कुरुते जन्तुस्तत्तत्कामस्य चेष्टितम्—मनु. अ.२ श्लो.४ म्ह० कोणाहि निष्काम पुरुषाची कोणतीच क्रिया या सृष्टीत दिसत नाहीं. प्राणी जे जे करतो ते तें कामाचें चेष्टित, कामाचा परिणाम आहे. यास्तव 'बुद्धि निष्काम झाली तरी कर्म केलेंच पाहिजे ' हा रहस्यकाराचा आग्रह रहस्यांतच राहणार, हें उघड आहे. लोकसंग्रहही लोकसंग्रहचिकीर्षुसाठीं विहित आहे.अ.३ श्लोक.२५पृ. ३१९पहा. "कर्म म्हणजेच यज्ञयागादिकर्म"( होय का ? मग मागच्या ६६१ पानावरच 'स्वधर्म म्ह० शास्त्रानें लावून दिलेला धंदा ' म्हणून जें म्हटले, त्याची वाट काय ? ) "पण मीमांसकाची ही कर्मे स्वर्गप्रद " ( मीमांसकांनी ती कोठून आणली ? कर्में वैदिक आहेत, मीमांसकांच्या पदरची नाहींत.) " ज्ञानानें स्वार्थबुद्धि सुटली तरी कर्म सुटत नाहीं." ( ज्ञानाने कर्तृत्वबुद्धि निवृत्त झाल्यावर कोठला स्वार्थ, कोठलीं निष्काम कर्मे व कोठला लोकसंग्रह ! साक्षात् आत्मज्ञान म्ह० काय हे बरोबर लक्षांत न आणल्यामुळें हा सर्व शब्दप्रपंच आहे. ) " कर्मयोगाचें आतांपर्यंत जें विवेचन केलें "( आतांपर्यंत म्ह० दुसऱ्या अध्यायाच्या ३९ श्लोकापासून तिसऱ्या अध्यायाच्या समाप्तीपर्यंत केवळ कर्मयोगाचेंच विवेचन केलेलें नाहीं. ज्ञानयोग व कर्मयोग या दोघांचेंही विवेचन केलें आहे. त्यांतल्या त्यांत ज्ञानयोगाचें प्राधान्यानें व कर्मयोगाचें त्याच्या अंगत्वानें विवेचन केलें आहे.)

करतां येणें शक्य आहे.—अव्ययं-अव्ययफलत्वात्—हा योग अव्यय आहे. का-

---

१ रहस्यकार म्हणतात-" अव्यय म्ह० कधीही क्षीण न होणारा किंवा त्रिकालाबाधित व नित्य असा हा कर्मयोग मार्ग ... " पण हा कर्मयोग जर असा नित्य आहे तर पुढच्याच श्लोकांत-" पण दीर्घ कालानें तोच योग या लोकीं नष्ट झाला " हे म्हणणे कसें संभवते? वास्तव ह्या योगालाच नित्य म्हणण्यापेक्षां आचार्यांनीं म्हटल्याप्रमाणें त्याचे मोक्षफल अव्यय असल्यामुळें त्याला अव्यय म्हणणेंच अधिक सयुक्तिक होय. शिवाय त्याला 'अव्यय' हें विशेषण दिलेलें असल्यामुळें तो साधनरूप कर्मयोग नसून साक्षात् मोक्ष हें फल देणारा ज्ञानयोगच आहे, हेंही सिद्ध होतें. रहस्यकार या श्लोकावरील टीपेंत म्हणतात- " या श्लोकांत ' योग ' या एकेरी शब्दानें " ..( तर मग ' कर्मयोग ' हा दुहेरी शब्द आहे वाटतें ! मराठींत ' अरे तुरे करणें ' याला एकेरी शब्द म्हणतात. रहस्यकारांना येथें ' एकवचनीं किंवा असमस्त ह्म० समासरहित पदानें ' असें म्हणावयाचें होतें असें वाटतें. पण तो आशय एकेरीशब्दानें व्यक्त होत नाहीं. ) पण " योग म्ह० कर्मयोग अर्थात् साम्य-बुद्धीनें कर्मे करण्याचा मार्ग" असा अर्थ होऊं शकत नाही. (मागे पृ.१७५ पहा.) योग म्ह० समत्व; व 'योगस्थ होऊन कर्मं कर' असा अर्जुनाला स्पष्ट उपदेश केला आहे. त्यामुळें योग ह्म० कर्मयोग असा वाच्य-मुख्य वृत्तीनें अर्थ होऊं शकत नाही. तेराव्या अध्यायांत अमा-नित्वादिक ज्ञानाचे उपाय असल्यामुळें त्यांना गौणवृत्तीनें ' ज्ञान ' म्हणून जसें म्हटलें आहे, त्याप्रमाणें कर्मयोग हे मुख्य योगाचें साधन असल्यामुळे त्याला ' योग ' असें गौणवृत्तीनें म्हटलें आहे. असें मानलें तरच ' समत्व ह्म० योग व योगस्थ होऊन कर्मं कर ' ( अ. २ श्लो. ४८ ) हा उपदेश उपपन्न होतो. अर्थात् यासंबंधानें गीतारहस्यांत ( पृ. ५६-६५ ) जें कांहीं लिहिलें आहे तें सर्व अयुक्त आहे. पुढें रहस्यकार " गीतेंतील या मार्गाची जी पर-परा वरील श्लोकांत सांगितली आहे तो या मार्गाचें मूळ समजण्यास अत्यत महत्त्वाची असतांही टीकाकारांनीं त्याची विशेष चर्चा केलेली दिसत नाहीं, " असा जातां जातां टीकाकारांवर दोषाचा सहज शिंतोडा उडवून स्वतः त्या परंपरेचें मूळ असे सांगतात-" महा-भारतान्तर्गत नारायणीयोपाख्यानांत भागवत धर्माचें जें निरूपण आहे त्यांत हा धर्म प्रथम श्वेतद्वीपांत भगवानापासूनच नारदास प्राप्त झाला असून, " तोच महान् धर्म हे राजा ! तुला पूर्वी हरिगीतेंत म्हणजे भगवद्गीतेंत समासविधिसहित सांगितला आहे. " असें वैशंपा-यन जनमेजयास सागत असून ( म. भा. शांतिपर्व ३४६. ९, १०.) पुढे "युद्धांत विमनस्क झालेल्या अर्जुनास हा धर्म सांगितला आहे. " असें पुनः म्हटले आहे. ( म. भा. शां. ३४८. ८ ) यावरून गीतेंतला योग म्हणजे कर्मयोग भागवत धर्मांतला आहे हें उघड होतें" ( गी. र. पृ. ९-११. ) पण वस्तुतः गीतेंतील प्रतिपादनाला वेदाचे मूळ न दाखवितां महाभारतांतील शांतिपर्वाच्या एका उपाख्यानाचा आधार दाखविणें, हें वैदिक संप्रदायाला सोडून आहे. भारतांत मागाहून पुष्कळ उपाख्यानें घालून त्याचें महाभारत केलें, हे जर खरें आहे, तर नारायणीयोपाख्यानही मागाहून घातलेलें नसेल म्हणून कशावरून ? व गीता सर्वमान्य झालेली पाहून नारायणीयाशीं तिचा सबंध बुद्धिपुरःसर जोडला गेला नसेल म्हणून तरी कशावरून ? अर्थात् गीतेचा सांख्यादि इतर दर्शनांशीं सबंध दाखविणें जितकें अयोग्य तितकाच तिचा पुराणांतील एका विशिष्ट पंथाच्या उपाख्यानाशीं संबंध दाखविणें अयोग्य आहे. ज्या अर्थी नारायणीयांत गीतेचा स्पष्ट उल्लेख आहे व गीतेंत नारा-

यणीयोपाख्यानाचा अस्पष्टही उल्लेख नाही, त्या अर्थी गीता स्वोपदेशाविषयी निरपेक्ष असून नारायणीयोपाख्यान मात्र आपलें नातें गीतेशीं लावण्याची अपेक्षा करतें असें दिसतें. त्यामुळें रहस्यकाराना प्रत्येक अध्यायाच्या शेवटी असलेल्या समाप्तिसूचक वाक्याचे जसे मोठें महत्त्व वाटले, त्याप्रमाणेच नारायणीयोपाख्यानाचेही महत्त्व जरी वाटलें असलें तरी टीकाकाराना ते वाटण्याचे फारसे कारण दिसत नाही. कारण ते भगवद्गीता पौराणिक आख्यानातील एखाद्या इतिहासाच्या आधाराने लिहिलेली आहे असे समजत नाहीत. तर ब्रह्मसूत्रादिकात तिचा 'स्मृति' म्हणून उल्लेख केलेला असल्यामुळे तिला मुख्य आधार उपनिषदांचा आहे, असे समजतात. कारण स्मृति म्हटली की ती श्रुत्यर्थालाच अनुसरली पाहिजे. पौराणिक कथाना ती अनुसरणार नाही. भागवतादि ग्रंथाना तर ती केव्हाच अनुसरणे शक्य नाही. श्रुति, स्मृति व मंत्रे यानाच भागवत, शैव, गाणपत इत्यादि पंथ अनुसरतात. यास्तव टीकाकारांनी नारायणीयोपाख्यानाशी गीतेचा संबंध लावला नाही, म्हणून रहस्यकारांनी त्याना दोष देण्याचा जो सहज यत्न केला आहे तो वृथा होय. आता प्रवृत्ति व निवृत्ति धर्म आणि मरीच्यादिक व सनकादिक हे त्याचे अधिकारी यांविषयी रहस्यकार ( गी. र. पृ. ३१२. १३ ) जे सागतात ते आचार्यादिकानाही संमतच आहे. ( मागे पृ. २ पहा ).

सृष्टीच्या आरंभापासून प्रवृत्ति व निवृत्ति असे दोन मार्ग चालू आहेत, याबद्दल आमचा वाद नाही. 'पण ते दोन्ही स्वतंत्र आहेत व मोक्षप्रद आहेत आणि ज्ञानी पुरुषाकरिता ज्ञानोत्तर अनुष्ठानासाठी आहेत.' हे म्हणणे आम्हाला म्हणजेच आचार्यांना समत नाही. कारण रहस्यकार ज्या नारायणीयाच्या आधाराने वरील उल्लेख करितात त्याच नारायणीयावरून व स्वतः रहस्यकाराच्या प्रतिपादनावरूनही प्रवृत्तिमार्ग संसारोपयोगी असून निवृत्तिमार्ग मोक्षोपयोगी आहे, असे ठरते. त्याविषयी नारायणीयात असे उल्लेख आहेत. मुंबईप्रत शांतिपर्व मोक्ष. अ. ३४०, मद्रासप्रत अ० ३४९. यात शौनकानें सौतीला 'भगवान् स्वतः निवृत्तधर्मामध्ये स्थित आहे. त्यानेच निवृत्ति धर्म केले आहेत; मग असे असतांना त्याने देवताना प्रवृत्तिधर्मांत भागीदार कसे केले व त्याच्या बुद्धि त्या धर्मापासून परतवून त्यांनाच निवृत्तिधर्मवान् कसें केले' असा प्रश्न केला. तेव्हा सौतीने वैशंपायन व जनमेजय यांच्यामध्ये याविषयीच झालेल्या संवादाचे पूर्ववृत्त सांगितलें. त्यांत जनमेजयानें असा प्रश्न केला आहे—"इमे सब्रह्मका लोकाः ससुरासुरमानवाः। क्रियास्वभ्युदयोक्तासु सक्ता दृश्यन्ति सर्वशः ॥ ७ ॥ मोक्षश्चोक्तस्त्वया ब्रह्मन्निर्वाणं परमं सुखम्। ये तु मुक्ता भवन्तीह पुण्यपापविवर्जिताः ॥ ते सहस्रार्चिषं देवं प्रविशन्तीह शुश्रुम ॥ ८ ॥ अयं हि दुरनुष्ठेयो मोक्षधर्मः सनातनः। यं हित्वा देवताः सर्वा हव्यकव्यभुजोऽभवन् ॥ ९ ॥ किं च ब्रह्मा च रुद्रश्च शक्रश्च बलभित्प्रभुः। सूर्यस्ताराधिपो वायुरग्निर्वरुण एव च ॥ १० ॥ आकाशं जगती चैव ये च शेषा दिवौकसः। प्रलयं न विजानन्ति आत्मनः परिनिर्मितम् ॥ ११ ॥ ततस्ते नास्थिता मार्गं ध्रुवमक्षरमव्ययम्।" अर्थ—ब्रह्मदेवासह हे सर्व देव, दानव, मानव अभ्युदयासाठीं सांगितलेल्या क्रियांमध्येंच सर्वप्रकारें आसक्त झालेले दिसतात; ७. हे ब्राह्मणा, तू मोक्ष सांगितलास व निर्वाण-मोक्ष हेच परम सुख आहे. जे पुण्य व अपुण्य यानीं रहित झालेले ज्ञानी येथें मुक्त होतात ते सूर्यमंडलवर्ती ज्योतिःस्वरूप पुरुषामध्यें प्रवेश

करितात, असें आम्ही ऐकतो. ८. हा सनातन मोक्षधर्म मोठ्या कष्टानें आचरतां येण्याजोगा आहे. त्याला सोडून सर्व देव हव्य-कव्यभक्षण करणारे झाले ९. ब्रह्मा, रुद्र, इंद्र, सूर्य, चंद्र, वायु, अग्नि, वरुण, आकाश, पृथ्वी तसेच बाकीचे सर्व देव आपणच निर्माण केलेल्या आपल्या कर्मबंधरूप मृत्यूला जाणत नाहीत. त्यामुळे ते त्या नित्य, अक्षर व अव्यय मार्गामध्ये स्थित झालेले नाहीत. (तर ते प्रवृत्तीमध्ये स्थित आहेत. त्याचप्रमाणें ते देव यज्ञामध्ये भाग हरण करणारे म्हणून कसे म्हटलें आहे ? यज्ञांत देवांचे यजन कां केलें जाते ? आमच्या यज्ञांत जे भाग घेतात ते स्वतः महायज्ञ करीत असतांना कोणाला भाग देतात ?) जनमेजयाने असे प्रश्न केले. निवृत्तिधर्मच जर श्रेष्ठ असता तर आमच्या अपेक्षेने जे जगत्तत्त्व अधिक जाणतात ते ब्रह्मा, रुद्र इत्यादि देव सृष्टि, संहार इत्यादि कार्यांमध्ये प्रवृत्त झाले नसते. पण ते तर नित्य प्रवृत्ति करितात. यास्तव निवृत्तिधर्म ही शुद्ध फसवणूक आहे. त्याचप्रमाणे देव जसे त्याच्याहून दुसरें श्रेष्ठ देव नसल्यामुळे इतराना भाग न देता स्वतःच सुख भोगतात त्याप्रमाणे आम्हीही यज्ञादि न करिता म्हणजे प्रवृत्तिमार्गाचे अनुष्ठान न करता सुखाने राहू. असा या प्रश्नाचा आशय आहे. त्यावर वैशंपायनाने "तुझा प्रश्न अतिशय गूढ आहे, वेदवेत्त्या, पुराणवेत्त्या व तपस्वी पुरुषावाचून दुसऱ्या कोणाला असा प्रश्न करता येणार नाही," अशी राजाची स्तुति करून आपल्या गुरूंच्या म्हणजे पराशरपुत्र व्यासाच्या तोंडून या प्रश्नांची उत्तरें जशी ऐकली होती तशी राजाला सांगितली. व्यास म्हणाले, "मी त्रिकालज्ञानाकरिता फार मोठें तप केलें; व नारायणाच्या प्रसादाने मला ते ज्ञान झाले. यास्तव मी तुमच्या संशयाचें निरसन करतो. कल्पाच्या आरंभी काय घडलें तें मी ज्ञानदृष्टीने पाहिले आहे. सांख्ययोगवेत्ते ज्याला 'परमात्मा' म्हणून म्हणतात त्याच्यापासून अव्यक्त झालें. अव्यक्तापासून महान् आत्मा या नांवाचे व्यक्त झाले. त्याच्यापासून पितामह झाला. सांख्यशास्त्रात यानाच क्रमाने महापुरुष, प्रधान, महत्तत्त्व, व अहंकार म्हणतात. तो अहंकाररूप ब्रह्मा सर्वतेजोरूप आहे. त्याच्यापासून आकाशादि पांच भूतें झाली. भूतापासून शब्दादि पाच गुण झाले. पंचभूतापासूनच मरीचि, अंगिरा, अत्रि, पुलस्त्य, पुलह, क्रतु, वसिष्ठ, स्वायंभुव मनु, हे ऋषी झाले. ते ऋषी, याच आठ प्रकृती असून त्यांच्यामध्ये सर्व लोक प्रतिष्ठित आहेत. ब्रह्मदेवानें लोकांच्या सिद्धीकरितां त्याना निर्माण केलें. या आठ प्रकृतीपासून हें सर्व जगत् झाले. रोषात्मक रुद्र झाला. त्याने दुसऱ्या दहा रुद्राना उत्पन्न केलें. त्यामुळे ते अकरा विकारपुरुष झाले. त्यानंतर लोकसिद्ध्यर्थ उत्पन्न केलेले ते सर्व रुद्र, प्रकृति व देवर्षि ब्रह्मदेवापाशी येऊन उभे राहिले; आणि "आम्हाला उत्पन्न करून आमच्यांतील कोणी कोणत्या अधिकारावर आरूढ व्हावें, तेंही सांगितलेंत; पण त्या अधिकाराचें परिपालन आम्ही कसे करावे, तें सांगा. आमचे बल कशात आहे, ते आम्हाला सांगितलेंत म्हणजे आपापला अधिकार चालविण्यास बरें पडेल." असें म्हणाले. तेव्हां ब्रह्मा त्यांना बरोबर घेऊन अव्यक्त महापुरुषाकडे गेला. तेथे त्या सर्वांनी उग्र तप केलें. तेव्हा प्रसन्न झालेला भगवान् म्हणाला, "अहो सर्व देवर्षींनो, मी तुमचें स्वागत करतों आणि स्वागतानेंच तुमचें पूजन करून जें उत्तम-वचन बोलतो, तें ऐका. तुमचे कार्य मला कळलें आहे व तें मोठें लोकहितही आहे. तुमच्या प्राणाचें प्रवृत्तियुक्त परिपोषण केलें पाहिजे, माझी आराधना कर-

ण्याच्या इच्छेनें तुम्ही मोठें तप केलेंत. यास्तव आतां त्याचें फल भोगा. हा पितामह व तुम्ही सर्व देव शांत चित्तानें मला उद्देशून यज्ञ करा. यज्ञांत सर्व भाग मला द्या. म्हणजे अहो ईश्वरांनो मी तुमच्या अधिकारांप्रमाणें तुमचें कल्याण करीन."

देवाधिदेवाचे हे भाषण ऐकून ते सर्व देव व ऋषी संतुष्ट झाले.त्यांनीं वेदोक्तपद्धतीने वैष्णव यज्ञ केला. त्या सत्रांत ब्रह्मदेवानें आपला भाग कल्पिला. देव व देवर्षी यांनीही आपापले भाग कल्पिले; आणि परात्पर देवाला ते निवेदन केले. तेव्हा तो वरद देवदेव त्या सर्व देवांस म्हणाला "तुमच्यापैकीं ज्यानें जो भाग कल्पिला तो मला पोचला. त्यामुळे मी प्रसन्न झालों आहे. आतां मी तुम्हांला त्याचें आवृत्तिलक्षण–पुनर्जन्मरूप फल सांगतो. अहो देवांनो, हे तुमचें लक्षण माझ्या प्रसादानें उद्भवलें आहे. तुम्ही प्रत्येक युगामध्ये प्रवृत्ति-फलाला पात्र व्हा आणि स्वतः यज्ञ करा. तुम्ही या यज्ञात भागाची जशी कल्पना केली आहे तशीच इतर करतील. त्यामुळे तुमची वृद्धि होईल. तुम्ही त्या यजमानाचें पोषण करा. मानवांनी यज्ञाच्या योगानें तुमचें पोषण केलें असता तुम्ही मला संतुष्ट करा. याप्रमाणें यज्ञभागानीं परिपुष्ट होऊन तुम्ही लोकाचे धारण करा.वेद व औषधींसह यज्ञ यासाठीच उत्पन्न केलेले आहेत. मी तुम्हांला प्रवृत्तिगुणयुक्त निर्माण केलें असून कल्पाच्या अन्तापर्यंत तुम्ही आपापल्या अधिकाराप्रमाणें लोकहित करीत रहा. मरीचि, अंगिरा, अत्रि, पुलस्त्य पुलह, क्रतु व वसिष्ठ हे सात मानसपुत्र मुख्य वेदवेत्ते व वेदाचार्य कल्पिलेले आहेत. हे प्रवृत्तिधर्माचे अनुष्ठान करणारे असून त्यांना प्राजापत्य अधिकारावर नेमलेले आहे. हा क्रियावानांचा मार्ग आहे. तो लोकाची सृष्टि करणारा आहे."

याप्रमाणें रजोगुणी लोकाचा प्रवृत्तिमार्ग सांगून सत्त्वप्रधान लोकाचा निवृत्तिमार्ग सांगतात—"सन, सनत्सुजात, सनक, सनंदन, सनत्कुमार, कपिल, व सनातन हे सात मानसपुत्र जन्मतःच ज्ञानी झाले. ते निवृत्तिधर्मामध्ये स्थित होते. तेच मुख्य योगवेत्ते, सांख्यज्ञानविशारद, धर्मशास्त्रांतील आचार्य, व मोक्षधर्मप्रवर्तक आहेत. हा निवृत्तिमार्ग क्रियावानांना–प्रवृत्तिमार्गामध्ये रत असलेल्या लोकाना दुर्लभ आहे, कारण अत्यंत सात्त्विक लोकांनाच तो मार्ग सुलभ असतो." इत्यादि.

याच अध्यायाच्या उपसंहारामध्ये—"एवमेष महाभाग पद्मनाभः सनातनः ॥ ९८ यज्ञेष्वग्रहरः प्रोक्तो यज्ञधारी च नित्यदा। निवृत्तिं चास्थितो धर्मं गतिमक्षय्यधर्मिणाम् ॥ प्रवृत्तिधर्मान्विदधे कृत्वा लोकस्य चित्रताम्"॥ ९९ ॥ असें म्हटले आहे. हे राजा, याप्रमाणे हा सनातन पद्मनाभ यज्ञांमध्ये नित्य अग्रहर–भागीदार व यज्ञकर्ता सांगितला आहे. तो निवृत्तिधर्मामध्यें स्थित आहे.निवृत्तिधर्म हा अक्षय्य धर्मी लोकाची–मुमुक्षूंची गति आहे. ह्यानेच लोकांची सात्त्विक, राजस व तामस अशी विचित्रता करून प्रवृत्ति धर्म केले आहेत, असा त्याचा भावार्थ आहे.

यावरून गीतारहस्यकार ज्या नारायणीयधर्माला प्रवृत्तिपर समजतात तो वस्तुतः कसा आहे तें वाचकांच्या ध्यानात येईल. त्याचप्रमाणें प्रवृत्तिमार्ग व निवृत्तिमार्ग असे दोन मार्ग सृष्टीच्या आरंभापासूनच जरी सुरू झालेले असले तरी त्यांचे अधिकारी क्रमाने राजस व सात्त्विक जीव आहेत. ब्रह्मादि देवांना कल्पाचे अधिकारी करून ईश्वरानें आधिकारिक

बनविलें आहे. म्हणजेच त्याना जगाच्या निर्वाहाकरितां नेमलें आहे. त्यामुळें त्यांना प्रवृत्ति करणे भाग आहे. पण त्यावरून प्रवृत्ति निवृत्तिमार्गाच्या बरोबरीची निष्ठा आहे, व ती प्रत्येक ज्ञानी पुरुषाने ज्ञानोत्तर करण्यास योग्य अशी निष्ठा आहे, हें म्हणणें सर्वथा अयुक्त होय.

निवृत्तिमार्गांतील निष्काम ज्ञानी पुरुषाच्या दृष्टीने लोकपितामह ब्रह्माही दुःखी आहे. कारण तोही आपल्या प्रारब्धानुसार प्रवृत्तीमध्ये नियंत्रित झालेला असतो. हें म्हणणें आमच्या पदरचे नाहीं. तर योगवासिष्ठांत श्रीवसिष्ठांनीच तसे म्हटले आहे. शिवाय उपनिषदांतही अग्नि, सूर्य,वायु, यम इत्यादि देवसुद्धा परमात्म्याच्या भीतीने आपापली नियत कार्यें करितात, असे वर्णन आहे. त्यावरून प्रवृत्ति, मग ती ब्रह्मदेवाची असो की एखाद्या क्षुद्र जीवाची असो, ती ईश्वराच्या नियतीमुळे होत असते; व ईश्वराच्या नियतीने नियत झालेला जीव साक्षात् चतुर्मुख जरी असला तरी तो बद्धच होय; मुक्त नव्हे. अशा बद्धाकरितां निवृत्तिमार्ग नाहीं. तर त्या सर्वांचा आत्मा होण्याची इच्छा करणाऱ्या मुमुक्षुकरितां निवृत्तिमार्ग आहे. त्यामुळे "ब्रह्मदेव कर्म करण्यास प्रवृत्त झाला तेव्हाच जरी सृष्टीची सुरवात झाली" (गीता र. ३१३) असली व ब्रह्मादिस्तंबपर्यंत प्रायः सर्व जीव तिचेच गुलाम असले तरी गीतेतच सांगितल्याप्रमाणे सहस्रावधि मनुष्यांतील जो एखादाच तिला कटाळला असेल, ज्याला सृष्टिचक्राच्या फेऱ्यांतून सुटून आवृत्तिरहित स्थानी जावयाचे असेल, म्हणजेच ज्याला संसारांतून मुक्त व्हावयाचे असेल त्याच्यासाठीं निवृत्ति हाच एक मार्ग आहे. प्रवृत्ति हा त्याच्यासाठीं ईश्वराने नियत केलेला मार्ग नव्हे. कारण शांतिपर्वांतच ( मद्रासप्रत अ. २१९ ) " प्रवृत्तिः पुनरावृत्तिर्निवृत्तिः परमा गतिः" असे स्पष्ट म्हटले आहे.

'प्रवृत्ति' या शब्दाचा अर्थच संसारप्रवर्तक चेष्टा असा आहे व 'निवृत्ति' म्ह० संसाराची निवृत्ति करणारा धर्म. मरीच्यादिकांनी ज्या धर्माचे अनुष्ठान केले तो प्रवृत्ति धर्म होय, व यज्ञ हे त्याचे स्वरूप असून त्याचे फल स्वर्ग आहे. स्वर्ग हे फल संसारांतर्गतच असल्यामुळे तो मोक्ष नव्हे. प्रवृत्तिहि विहित व निषिद्ध अशी दोन प्रकारची असून विहित प्रवृत्तीचें उत्कर्ष—अभ्युदय हे फल आहे व निषिद्ध प्रवृत्तीचें अधःपात—अधोगति हे फल आहे.अर्थात् विहितधर्मही पुनरावृत्तीला प्रतिबंध करू शकत नाहीं. म्हणून प्रवृत्तिहि एक प्रकारचा अधर्म ठरते. पण जी प्रवृत्ति ' मी हिचा कर्ता आहे' अशा भावनेनें होते तीच फलाचे निमित्त होते. म्हणजे साहंकार प्रवृत्तीमुळेच पुनरावृत्ति होते. ' मी कर्ता आहे ' या भावनेनें होणारें शुभ किंवा अशुभ कर्मच पुढचा उत्तम किंवा अधम जन्म देते. यास्तव मनुष्याने आपली प्रवृत्तिही जर निरभिमान केली तर ती प्रवृत्तिही निवृत्ति होते. कारण तसें—कर्तृत्वाभिमान सोडून केलेलें—शुभ शास्त्रीय कर्म पुनर्जन्माला कारण होत नाहीं. निरभिमान प्रवृत्ति हाच गीतेत सांगितलेला धर्म आहे; व तो पुनरावृत्तीला कारण होणारा नसल्यामुळेच निवृत्त धर्म आहे. या आमच्या म्हणण्याला मनूचें वचन प्रमाण आहे व त्याचा आम्ही वर [ पृष्ठ १७६] उल्लेखही केला आहे. नारायणीय धर्मही निष्काम प्रवृत्तिरूप आहे; कारण मद्रासप्रत अ. ३५० यांत—"चतुर्विधा मम जना भक्ता एव हि मे श्रुतम्॥ ३३ तेषामेकान्तिनः श्रेष्ठा ये चैवानन्यदेवताः । अहमेव गतिस्तेषां निराशीःकर्मकारिणाम् ॥ ३४ ॥ ये च शिष्टास्त्रयो भक्ताः फलकामा हि ते मताः । सर्वे च्यवनधर्माणः प्रतिबुद्धस्तु श्रेष्ठभाक् " ॥ ३५ ॥ असें म्हटलें आहे. त्याचा भावार्थ—माझे भक्तजन चार प्रकारचे आहेत. त्यांतील जे अनन्यदेवता

असतात म्हणजे ज्यांची देवता मी एकच आहें असे एकान्ती भक्त श्रेष्ठ होत. त्या निष्काम कर्में करणारांची मीच गति आहें. बाकी राहिलेले जे तीन भक्त ते फलाची इच्छा करणारे म्हणून मानलेले आहेत. त्या सर्वांचा च्युत होणें हा धर्म आहे. म्हणजे ते वारंवार जन्म घेतात व उत्तम फलापासून च्युत होतात पण त्यांतील चवथा ज्ञानी श्रेष्ठ फलाला पात्र होतो. श्रीमद्भगवद्गीतेंतही चार प्रकारचे भगवद्भक्त सांगून त्यातील अनन्यभक्त ज्ञानी श्रेष्ठ आहे व तो माझा आत्माच आहे, असें म्हटले आहे.

रहस्यकारानी भगवान् बादरायण व्यास व श्रीमच्छंकरभगवत्पूज्यपाद हेही प्रवृत्ति करणारे होते. कारण व्यासांनी ‘ परक्षेत्रामध्यें पुत्रोत्पत्ति केली व महाभारत लिहिले आणि आचार्यांनी अलौकिक ज्ञानानें व उद्योगाने धर्मसस्थापना केली ’ गी. र. ३१३ असे म्हटले आहे; दुसऱ्या एका प्रसगी ‘आचार्य व श्रीरामदासस्वामी याना कर्मयोगी म्हटले आहे.’ (पृ.३०१) पण आचार्यही जर कर्मयोगी तर सन्यासी कोण ? व त्याचे लक्षण काय ? सर्व प्रवृत्ति मोडणे, शरीर व इंद्रिये यांची चेष्टाच बद करणे, हे जर सन्याश्याचे लक्षण असेल तर आजपर्यंत एकही सन्यासी झाला नाही, सर्वच कर्मयोगी होते, असे मानणे भाग आहे. कारण व्यासापासून आचार्यापर्यंत जे अनेक निवृत्तधर्मी लोक झाले ते तर राहूच द्या ! पण आचार्यांनतर झालेल्या सन्याश्यानींही आपली शरीरे खाबामारखी निश्चेष्ट केली होती असे आम्हांला वाटत नाही. पद्मपाद, सुरेश्वराचार्य, शकरानन्द, विद्यारण्य, आनन्दज्ञान, मधुसूदनसरस्वती, चित्सुखाचार्य, इत्यादि सर्वांनी सन्यास आश्रम स्वीकारल्यानतरही यथाशक्ति ग्रथलेखन, उपदेश, भिक्षाचरण, सचार इत्यादि कार्ये केल्याचा पुरावा मिळतो. आधुनिक सन्यासाश्रमी लोकही यथाशक्ति ग्रंथलेखन, उपदेश इत्यादि करितात, असेच आढळते. कारण तसे जर नसते तर वेदान्तसंप्रदाय विच्छिन्न झाला असता. महाराष्ट्रात साप्रतकाळीही प्रस्थानत्रयाचे साप्रदायिक पद्धतीने अध्ययन केलेले जे दहा-पांच शास्त्री आढळतात तेही परमहस परिव्राजकांच्या कृपेचेच फळ आहे. भिक्षाचरण व संचार ही सुद्धां जर प्रवृत्तिच असेल तर सर्व सन्यासी कर्मयोगीच आहेत, असे म्हणणें भाग आहे. कारण सन्यासआश्रमाचे महत्त्व जाणून केवल पुरुषार्थासाठी त्याचा अगीकार करणारा प्रत्येक पूज्य सन्यासी यथाशक्ति व यथामति गृहस्थादिकांवर वेदान्ततत्त्वोपदेशाच्या द्वारा उपकार करीतच असतो, असा आमचा अनुभव आहे. यास्तव आचार्य व व्यास याच्यापर्यंत दूर न जाता थोड्याच वर्षापूर्वी समाधिस्थ झालेल्या वाईच्या परमपूज्य प्रज्ञानन्दस्वामींनाही कर्मयोगी म्हणावे लागेल ! पण स्वतः त्या स्वामींना आपण कर्मयोगी आहो, असें वाटत नव्हते. त्याचप्रमाणें आचार्यानाही जर कोणी कर्मयोगी म्हणू लागला तर ‘ हा आपल्यावर मिथ्या आरोप केला जात आहे,’ असे ते निःशयपणे म्हणतील !

पण कर्में करीत असतांनाही कर्मयोगी न म्हणून घेण्याचें कारण काय ? याचा विचार करणें भाग आहे. सन्यास या शब्दाचा अर्थ “ सर्व कर्मांचा त्याग करून, वनात झाडाखाली जाऊन बसणें व निंबाचा पाला खाणे,” असा नसून वर्णाश्रमविहित कर्में स्वर्गादि उत्तम लोक देणारी आहेत, पण त्या कर्मांमुळें मिळणारें प्रत्येक फल क्षयी असतें; यास्तव तसल्या अनित्य फलाची मला गरज नाही, मला नित्य सुखाची गरज आहे, असें ज्याला वाटते त्या विरक्त जिज्ञासूला चित्तशुद्धि व ज्ञान यांच्या ध्यानादि व श्रवणादि

साधनांचा अभ्यास निर्विघ्नपणे करतां यावा, म्हणून गृह, स्त्री व पुत्रादि परिग्रह, शिखा, यज्ञोपवित, अग्नि, ही कर्मसाधनें, अग्निसाध्य श्रौत-स्मार्त कर्में व इतर पूर्त व दत्त कर्में यांचा त्याग म्हणजेच गृहस्थाश्रमाच्या कर्मांचा, परिग्रहाचा व कर्मसाधनांचा त्याग करणें हा संन्यास आहे. अशा तऱ्हेचा संन्यास आचार्यांनीं केला होता. म्हणून ते कर्मयोगी नव्हेत. कारण गृहस्थच कर्मयोगी होऊं शकतात. पण निष्कामकर्मयोग्याला प्रवृत्तिमार्गी म्हणतां येत नाहीं. कारण तो स्वर्गादिकांकरितां यज्ञयागादि करीत नाहीं, तर चित्तशुद्धीकरितां परमात्मपरायण होऊन निरहंकारानें नित्य, नैमित्तिक, प्रायश्चित्त व उपासना कर्में करतो व काम्य आणि निषिद्ध कर्में सोडतो. नित्यनैमित्तिक कर्मांचेहि फल इच्छीत नाहीं. यास्तव 'काम्यानां कर्मणां न्यासं संन्यासं कवयो विदु:।' 'सर्वकर्मफलत्यागं प्राहुस्त्यागं विचक्षणाः।' 'एतान्यपि तु कर्माणि सगं त्यक्त्वा फलानि च। कर्तव्यानि०' (अ.१८.२ व ६.) इत्यादि वचनांत सांगितल्याप्रमाणें काम्य कर्मांचा त्याग, सर्व कर्मांच्या फलाचा त्याग व कर्मविषयींची आसक्ति—प्रेम व फल याचा त्याग कर्मयोगीही करतोच. त्यामुळे त्याचे ते कर्मानुष्ठान पुनर्जन्माला कारण होत नाहीं; तर चित्तशुद्धीला व चित्तशुद्धीच्या द्वारा ज्ञाननिष्ठेला कारण होतें; ज्ञाननिष्ठेच्या द्वारा ते मोक्षालाही कारण होतें. यास्तव निष्काम कर्मयोग ही प्रवृत्ति नव्हे, तर निवृत्ति आहे. भगवद्गीतेंत अर्जुनाला योगस्थ म्हणजे समत्वबुद्धियुक्त होऊन कर्में करावयास सांगितले आहे; व 'बुद्धियुक्तो जहातीह उभे सुकृतदुष्कृते' या वचनात तो क्रमानें मुक्त होतो, असें म्हटलें आहे. यास्तव भगवानांनी अर्जुनाला सांगितलेला योग संसारप्रवर्तक नसून ज्ञानाच्या द्वारा संसारनिवर्तक आहे, हे निर्विवाद आहे. भगवद्गीतेंत म्हणजेच हरिगीतेंत यतिधर्मही सांगितला आहे, असें नारायणीयातच म्हटले आहे. [ गीतार. पृ. १० ] त्यावरून गीताशास्त्र प्रवृत्तिपर आहे, हे म्हणणें अयोग्य ठरतें. तसेंच, 'गीतेतला योग म्ह० प्रवृत्त कर्मयोग भागवतधर्मांतला आहे,' हे म्हणणेंही तितकेंच अयोग्य आहे.

पुढें गीतेतील सूर्य, मनु व इक्ष्वाकु यांची परपरा नारायणीयांतील परपरेशीं जुळत नाहीं, त्यामुळेंहि नारायणीयांतील धर्म व गीतेंतील धर्म एक नाहीं, असें कोणी म्हणेल म्हणून रहस्यकार म्हणतात—"विस्तारभयास्तव गीतेंत त्याची सप्रदायपरपरा सृष्टीच्या मुळारंभापासून दिली नाहीं. विवस्वान्, मनु, इक्ष्वाकु या तिघाचाच उल्लेख केला आहे. पण याचा खरा अर्थ काय हें नारायणीय धर्माची सर्व परपरा पाहिली म्हणजे स्पष्ट दिसून येतें. ब्रह्मदेवाचे एकदर जन्म सात. त्यांपैकीं पहिल्या महा जन्मांतील नारायणीय धर्माच्या परंपरेचें वर्णन संपल्यावर ब्रह्मदेवाच्या सातव्या म्ह० प्रस्तुतच्या जन्मांतले कृतयुग समाप्त होऊन 'त्रेतायुगारभीं विवस्वानाने मनूस हा धर्म दिला. मनूनें इक्ष्वाकूस दिला. इक्ष्वाकूपासून पुढे सर्व लोकांत पसरला त्याबरोबरच सन्यास धर्मही तुला पूर्वी भगवद्गीतेंत सांगितला आहे,' असे नारायणीय धर्मांतच पुन: वैशपायनानें जनमेजयास सांगितलें आहे. यावरून ज्या द्वापरयुगाचे अखेरीस भारतीयुद्ध झालें, त्याच्या पूर्वीच्या त्रेतायुगापुरतीच भागवतधर्माची परंपरा गीतेंत वर्णिली आहे. विस्तारभयास्तव जास्त वर्णन केलेलें नाहीं, असें दिसून येतें." पण हे समर्थन मुळीच समाधानकारक नाहीं. कारण गीतेंत जी परंपरा सांगितली आहे, ती अपुरी किंवा त्रेतायुगाच्या आरंभाची आहे, अशी कल्पना करण्यास कांहीं आधार नाहीं. भगवान् "मी हा योग सूर्याला सांगितला, सूर्यानें वैव-

स्वत मनूला सांगितला, व मनूनें इक्ष्वाकूला सांगितला, अशा परंपरेनें राजर्षि या योगाला जाणत होते, पण सांप्रतकाळी दीर्घकालानें हा योग विच्छिन्नसंप्रदाय झाला, " इतकेंच सांगत आहेत. त्यावरून रहस्यकार म्हणतात तशी कांहींच कल्पना होत नाही. उलट "माझे व तुझे पुष्कळ जन्म होऊन गेले आहेत " ( श्लो. ५ ) यावरून ब्रह्मदेवाच्या सातव्या जन्मांतील त्रेतायुगाच्या आरंभींची परंपराच भगवानांनी येथें सांगितली आहे, असें म्हणणें अयोग्य दिसतें. कारण सांख्य व योग किंवा निवृत्ति व प्रवृत्ति हे मार्ग जगाच्या आरंभीं ईश्वरानेंच उत्पन्न केले आहेत, त्यामुळें रहस्यकारांचें म्हणणें ग्राह्य वाटत नाही.

रहस्यकारांनीं पुन: " हा भागवत धर्म म्हणजेच योग किंवा कर्मयोग होय आणि मनूला कर्मयोगाचा उपदेश केल्याची ही कथा गीतेंतच आली आहे, असें नाही; तर भागवत पुराणांत ( भाग. ८. २४. ५५ ) या कथेचा उल्लेख असून मत्स्यपुराणाच्या ५५ व्या अध्यायांत मनूस उपदेशिलेल्या कर्मयोगाचें महत्त्वहि वर्णिलें आहे, " असें म्हटलें आहे. यास्तव आपण भागवतांतील कर्मयोग कोणत्या स्वरूपाचा आहे तें पाहूं. वरील भागवतांतील अध्यायांत असे श्लोक आहेत—श्रीशुक उवाच–"इत्युक्तवन्तं नृपतिं भगवानादिपूरुषः। मत्स्यरूपी महाम्भोधौ विहरंस्तत्त्वमब्रवीत् ॥ ५४ ॥ पुराणसंहितां दिव्यां सांख्ययोगक्रियावतीम् । सत्यव्रतस्य राजर्षेरात्मगुह्यमशेषतः ॥५५॥ अश्रौषीदृषिभिः साकमात्मतत्त्वमसंशयम् । नाव्यासीनो भगवता प्रोक्तं ब्रह्म सनातनम् ॥५६॥ " अर्थ—असें बोलणाऱ्या राजाला महासागरांत विहार करणारा मत्स्यरूपी भगवान् आदिपुरुष तत्त्व सांगता झाला. ५४. तो सांख्ययोगक्रियायुक्त दिव्य पुराणसंहिता ( मत्स्यपुराण ) म्हणजे आत्मगुह्यच सत्यव्रत राजर्षीला अशेषत: सांगता झाला. ५५ तो नावेंत बसलेला सत्यव्रत राजा ऋषींसहवर्तमान निश्चित आत्मतत्त्व-भगवानाने सांगितलेलें सनातन ब्रह्म ऐकता झाला. ५६.

यावरूनही रहस्यकारांच्या म्हणण्यापेक्षां आमचे म्हणणेंच अधिक सिद्ध होत आहे. कारण येथे ' सांख्ययोगक्रियावती ' असें पद आहे: व आम्ही ' इमं विवस्वते योगं ' येथील योग म्हणजे दुसऱ्या व तिसऱ्या अध्यायांत सांगितलेला निष्ठाद्वययुक्त योग, केवल कर्मयोग नव्हे, असे म्हणतो. रहस्यकार ' योग ' म्हणजे नुस्ता ' कर्मयोग ' म्हणतात; व त्याला प्रमाण म्हणून वरील श्लोक देतात. पण त्यात तर मनूला मत्स्यरूपी आदिपुरुषाने सांख्ययोगक्रियावती संहिता सांगितली, असे म्हटले आहे व तिलाच पुढें तत्त्व, आत्मगुह्य, आत्मतत्त्व, सनातन ब्रह्म म्हटले आहे. त्यावरून नारायणीयांतील परंपराही केवल कर्मयोगाची नाही तर ज्ञान व कर्मयोग एतद्रूप आहे, हें निर्विवाद ठरतें.

आता मत्स्यपुराणाचा पन्नावन्नावा अध्याय पाहू या. येथील आनन्दाश्रमांत छापलेल्या मत्स्यपुराणाच्या प्रतींत बावन्नाव्या अध्यायांत योगमाहात्म्य वर्णिले आहे. रहस्यकार म्हणतात तो हाच अध्याय असला पाहिजे. पण त्यावरून रहस्यकारांच्या म्हणण्यापेक्षां आचार्यांच्या म्हणण्यासच अधिक पुष्टि मिळते. कारण त्यांत असे श्लोक आहेत—सूत उवाच–"एवमेकार्णवे तस्मिन्मत्स्यरूपी जनार्दनः । विस्तारमादिसर्गस्य प्रतिसर्गस्य चाखिलम् ॥ २ ॥ कथयामास विश्वात्मा मनवे सूर्यसूनवे । कर्मयोगं च सांख्यं च यथावद्विस्तरान्वितम् " ॥३॥ अर्थ—याप्रमाणें त्या एकसमुद्रांत मत्स्यरूपी विश्वात्मा जनार्दन सूर्यपुत्र मनूला म्हणजे वैव-

 स्वत मनूला आदिसर्गाचा व प्रतिसर्गाचा सर्व विस्तार व त्याचप्रमाणें सविस्तर कर्मयोग

आणि सांख्य यथावत् सांगता झाला २. ३. त्यानंतर ऋषींनीं " सूता, कर्मयोगाचें लक्षण ऐकण्याची आमची इच्छा आहे, " असें म्हटलें असतां पुन: सूत म्हणाला—" कर्मयोगं च वक्ष्यामि यथा विष्णुविभाषितम् । ज्ञानयोगसहस्राद्धि कर्मयोग: प्रशस्यते ॥ ५ ॥ कर्मयोगोद्भवं ज्ञानं तस्मात्तत्परमं पदम् । कर्मज्ञानोद्भवं ब्रह्म न च ज्ञानमकर्मण: ॥ ६ ॥ तस्मात्कर्मणि युक्तात्मा तत्त्वमाप्नोति शाश्वतम् ।" अर्थ—विष्णूनीं जसा सांगितला आहे तसा कर्मयोग मी तुम्हांला सांगतो. सहस्रावधि ज्ञानयोगांहूनही कर्मयोग प्रशंसा केला जातो. ५. कारण ज्ञान कर्मयोगामुळे होणारें आहे व त्या ज्ञानामुळें ते परमपद प्राप्त होतें. याप्रमाणे ब्रह्म कर्मजन्य ज्ञानापासून होणारे आहे. कर्मावांचून ज्ञान नाहीं. ६ यास्तव कर्मामध्ये युक्तचित्त असलेला शाश्वत तत्त्वाला प्राप्त होतो. इतके सांगून पुनरपि "त्या कर्मयोगांत आठ आत्मगुण प्राधान्येंकरून सस्थित आहेत. १ सर्व भूतांवर दया, २ क्षमा, ३ आतुराचे रक्षण, ४ त्याचप्रमाणे लोकाची असूया न करणे, ५ अतर्बाह्य शौच, ६ आयासरहित कार्यामध्ये शुभाचरण करणें, ७ उपार्जित द्रव्याविषयी अकृपणता, व ८ परद्रव्य आणि परस्त्री याविषयी सर्वदा अस्पृहा, हे पुराणवेत्त्यांनी आठ आत्मगुण सागितले आहेत. नतर या असल्या आत्मगुणयुक्त कर्मयोगाविषयी असे ह्मटले आहे.—"अयमेव क्रियायोगो ज्ञानयोगस्य साधक:॥११॥ कर्मयोगं विना ज्ञान कस्यचिन्नेह दृश्यते ।" अर्थ—हाच क्रियायोग ज्ञानयोगाचा साधक आहे. कर्मयोगावांचून ज्ञान येथे कोणालाही झालेले दिसत नाहीं. यावरून कर्मयोग स्वतत्र मोक्षमार्ग आहे; तें ज्ञानयोगाचे अग नव्हे, असे जे रहस्यकारांनी रहस्यात वारवार ह्मटले आहे, तें अप्रामाणिक आहे. असो; त्यानतर कर्मयोगाचे स्वरूप असे सांगितले आहे.—" श्रुतिस्मृतिप्रोक्त धर्माचे अनुष्ठान यत्नानें करावे. देवता, पितर, मनुष्य, भूतें व ऋषी यांचें प्रत्यही यज्ञांनी तर्पण करावे. स्वाध्यायाने ह्म० ब्रह्मयज्ञाने ऋषीचे तर्पण करावे; होमांच्या योगानें देवांचें तर्पण करावे, श्राद्धाच्या योगाने पितृतर्पण करावे, अन्नदानांनी मनुष्यांचे ह्मणजे अतिथींचे तर्पण करावे व बलिदानांनी इतर हीन प्राण्याचे तर्पण करावें. पांच प्रकारचे हिंसादोष घालविण्याकरितां हे पांच यज्ञ सांगितलेले आहेत. उखळ–मुसळ, पाटावरवटा, चूल, पाणी भरून ठेवण्याचे पात्र व केरसुणी ही गृहस्थाच्या घरांतील पांच हिंसास्थानें आहेत. त्यांच्यामुळे गृहस्थ स्वर्गास जात नाही. ह्मणून त्याच्या पापाचे परिमार्जन करण्यासाठी पांच यज्ञ सांगितलेले आहेत. गर्भाधानादि जे तास सस्कार सांगितलेले आहेत त्यांनी युक्त असलेलाही जो पुरुष वरील आठ आत्मगुणांनी रहित असतो तो मोक्षाला समर्थ नसतो. तस्मात् आत्मगुणांनी युक्त होऊन वेदोक्त कर्म करावे. स्वत:च्या धनाने गोब्राह्मणांचें सर्वदा हित करावें. दानें, पूजेचे उपचार, व्रतें, उपवास इत्यादिकांच्या योगानें यथाविधि सर्व देवमय शिवाचे पूजन करावें. कारण ब्रह्मा, विष्णु, रुद्र, सूर्य, वसु, इत्यादि या सर्व अतींद्रिय, शांत, सूक्ष्म, अव्यक्त, सनातन, जगन्मूर्ति वासुदेवाच्या विभूती आहेत. " इत्यादि प्रकारे कर्मयोगाचें स्वरूप सांगून शेवटी—" इति क्रियायोगपरायणस्य वेदान्तशास्त्रस्मृतिवत्सलस्य । विकर्मभीतस्य सदा न किंचित्प्राप्तव्यमस्तीह परे च लोके ॥ २६ ॥ " असा उपसंहार केला आहे.याप्रमाणें क्रियायोगामध्यें परायण असलेल्या, वेदान्तशास्त्राच्या स्मृतीविषयी प्रेम बाळगणाऱ्या व सदा निषिद्ध कर्माला भ्यालेल्या पुरुषाला या लोकीं किंवा परलोकीं कांहीं एक प्राप्तव्य नसतें. या

कर्मयोगाच्या प्रशंसेप्रमाणेंच पुढे ठिकठिकाणीं सांख्ययोगाचेंही वर्णन आहे. शिवाय १६७ व्या अध्यायात मार्कंडेयाला आपल्या संज्ञा सांगत असतांना "अहं सांख्यमहं योगोऽप्यहं तत्परम पदम् । अहमिज्या क्रिया चाहमहं विद्याधिपः स्मृतः ॥" ५६ असें म्हटलें आहे. त्यावरून भगवानांनीं सूर्याच्या आरंभीं सांगितलेला योग केवळ कर्मयोग नसून भागवताच्या आठव्या स्कंधात म्हटल्याप्रमाणे 'सांख्ययोगक्रियारूप.' आहे, हें निर्विवाद सिद्ध होतें. अर्थात् आचार्यांनीं या श्लोकाच्या व्याख्यानात 'अध्यायद्वयेनोक्त योगं' असे जें म्हटलें आहे तेंच अगदीं युक्त आहे.

पण यावर 'गीतेंत यतीचाही धर्म सांगितला आहे' असे 'यतीनां चापि यो धर्मः सः हरिगीतासु कथितः' यावरूनच सिद्ध होतें, असे कोणी म्हणेल म्हणून रहस्यकार म्हणतात—"परंतु सांख्य व योग या दोन निष्ठांची परंपरा जरी एक नसली तरी कर्मयोगाच्या म्हणजे भागवत धर्माच्या निरूपणातच सांख्य किंवा संन्यासनिष्ठेच्या निरूपणाचा पर्यायाने समावेश होत असल्यामुळे (गी. र. पृ. ४६५.) भगवद्गीतेत यतिधर्म म्ह० संन्यासधर्मही वर्णिला आहे, असे वैशंपायनाने म्हटले आहे." एकूण भागवतधर्मात पर्यायानेच का होइना पण सांख्य-संन्यास-निष्ठेचा समावेश होतो, एवढे तरी रहस्यकार येथे म्हणतात हे भाग्यच म्हणावयाचे ! तथापि 'यतीनां चापि०' या वाक्याची ही व्यवस्था समाधानकारक नाही. यतीचा धर्मही हरिगीतेत सांगितला आहे, असे वैशंपायन जनमेजयास नारायणीयधर्मातच सांगत असताना संन्यासधर्माचा कर्मयोगाच्या निरूपणांत पर्यायाने किंवा साहजिकरीत्या समावेश होऊन जातो हे म्हणणे किती 'लटपटीत' आहे याचा विचार वाचकानीच करावा. "सांख्य+निष्कामकर्म=कर्मयोग हे समीकरण" कागदावर जरी मांडता आले (गी. र. पृ. ४६५) तरी युक्तिसिद्ध नाही. कारण सांख्य म्ह० संन्यास व निष्काम कर्म याचे समीकरण आचरणात येणार कसे ? पण गीतारहस्य हे नुस्ते कल्पनाप्रधान असल्यामुळे त्यात शक्याशक्यतेची फारशी पर्वाच केलेली दिसत नाही ! "मनुस्मृतीत सहाव्या अध्यायात प्रथम यतीचा-संन्यासाश्रमाचा धर्म सांगितल्यावर त्याचा विकल्प या नात्याने 'वेदसंन्यासिकाचा कर्मयोग' या नावाने गीतेंतील किंवा भागवतधर्मांतील कर्मयोगाचे वर्णन असून 'निःस्पृहपणाने स्वकार्य करीत राहण्याने शेवटी परमसिद्धि मिळते' असे स्पष्ट म्हटले आहे व त्यावरून कर्मयोग मनूसहि ग्राह्य होता असे उघड दिसून येते. इतर स्मृतिकारासहि हा मान्य होता" पृष्ठ ६६६. रहस्यकार म्हणतात त्याप्रमाणे मनुस्मृतीत यतीचा व वेदसंन्यासिकाचा धर्म सांगितला आहे, ही गोष्ट खरी, पण वेदसंन्यासिकाचा धर्म हाच गीतेतील किंवा भागवत धर्मांतील कर्मयोग आहे, या म्हणण्यास मुळीच आधार नाही. मनुस्मृतीच्या सहाव्या अध्यायात 'एष धर्मोऽनुशिष्टो वो यतीनां नियतात्मनां । वेदसंन्यासिकानां तु कर्मयोगं निबोधत' ८६ म्ह० कुटीचक, बहूदक, हंस व परमहंस या चार प्रकारच्या यतीचा हा साधारण धर्म तुम्हांला सांगितला. आतां वेदसंन्यासिकांचा म्ह० कुटीचकनावाच्या विशेषयतीचा असाधारण कर्मयोग म्ह० कर्मसंबंध ऐका, असे म्हणून ८७ व्या श्लोकांत चारी आश्रम गृहस्थापासून झालेले आहेत, असे म्हटले आहे. या चारी आश्रमाचे यथाशास्त्र क्रमानें सेवन केले असता ते आश्रमच ब्राह्मणाला परम गतीला पोंचवितात ८८. गृहस्थाश्रम इतर आश्रमांचें पोषण करीत असल्या-

मुळें सर्वांत श्रेष्ठ ८९;जशा सर्व नद्या व नद समुद्रामध्यें स्थिर होतात त्याप्रमाणें सर्व आश्रम गृहस्थापाशीं अवस्थित होतात. ९०. या चारी आश्रमांच्या द्विजांनीं दशलक्षणक धर्माचें प्रयत्नानें सेवन करावें. ९१. संतोष, क्षमा, दम, अस्तेय, शौच, इंद्रियनिग्रह, शास्त्रज्ञान, आत्मज्ञान, सत्य व अक्रोध, हें दशक धर्मलक्षण आहे ९२ जे ब्राह्मण धर्माच्या या दहा लक्षणांचे अध्ययन करितात, व आत्मज्ञानाला उपकारक होण्यासाठीं त्याचे अनुष्ठान करितात, ते परम गतीला पोंचतात ९३. या दशलक्षणक धर्माचें शांत मनानें अनुष्ठान करणाऱ्या द्विजाने गृहस्थाश्रमांतच यथाविधि उपनिषदांचे गुरुमुखानें श्रवण करून देव, पितर व ऋषि यांच्या ऋणांतून मुक्त होऊन संन्यास करावा. ९४ असें वर्णन करून " संन्यस्य सर्वकर्माणि कर्मदोषानपानुदन् । नियतो वेदमभ्यस्य पुत्रैश्वर्ये सुखं वसेत्" ९५ असें विधान केले आहे. त्याचा अर्थ–गृहस्थाला . अनुष्ठान करण्यास योग्य असलेल्या अग्निहोत्रादि सर्व कर्मांचा परित्याग करून प्राणायामादिकाच्या योगानें अज्ञात पापांचा नाश करून, इंद्रियांचा निग्रह करून, उपनिषदाचा अभ्यास करीत पुत्राच्या गृहांत त्याने दिलेल्या अन्न-वस्त्रादिकांवर उपजीविका करीत सुखाने रहावें. हाच तो वेदसन्यासिक किंवा कुटीचक याचा असाधारण धर्म असून तोच सांगण्याची प्रतिज्ञा वर ८६ व्या श्लोकांत केली आहे. नतर–" एवं सन्यस्य कर्माणि स्वकर्मपरमोऽस्पृहः । संन्यासेनापहत्यैनः प्राप्नोति परमां गतिम् ॥ " ९६ याप्रमाणें अग्निहोत्रादि गृहस्थकर्मांचा त्याग करून आत्मसाक्षात्काररूप जें स्वकार्य त्यालाच प्रधान मानून स्वर्गादिकांविषयीं निःस्पृह होऊन सन्यासानें पापाचा नाश करून द्विज ब्रह्मसाक्षात्कारानें मोक्षरूप परमगतीला प्राप्त होतो. यावरून रहस्यकार आपल्या सिद्धान्ताला ज्याचा आधार दाखवितात तोच मूळ ग्रंथ त्याच्या विरुद्ध कसा असतो व आचार्यांच्या भाष्याला तोच किती अनुकूल असतो, हें वाचकांच्या सहज लक्षांत येईल. सांप्रदायिक दृष्टि सोडल्याचाच हा परिणाम आहे. ८६ व्या श्लोकातील 'कर्मयोग ' हा शब्द व ९६ व्या श्लोकांतील 'स्वकर्मपरमः ' हा शब्द पाहतांच रहस्यकार मनु आपल्यालाच अनुकूल आहे, असें समजलें. पण ' वेदसंन्यासिकानां ' ८६ ' संन्यस्य सर्वकर्माणि ' ९५ ' एवं संन्यस्य कर्माणि ' ९६ या शब्दाकडे त्यांनीं मुळींच पाहिलें नाहीं. एकंदरीत रहस्यकारांचा शास्त्रीय ग्रंथ लिहिण्याची पद्धति अपूर्व खरी !!

पुढें इतर स्मृतिकारांचाहि असाच आशय आहे, असे म्हणून त्यांनीं गीतारहस्याच्या ६० ते ६३ पृष्ठांचा जो हवाला दिला आहे तो पाहतां नृसिंहपुराण, हारीतस्मृति व योगवासिष्ठ यांतील "यथाश्वा रथहिनाश्च रथाश्चाश्वैर्विना यथा । एवं तपश्च विद्या च उभावपि तपस्विनः ॥ यथान्नं मधुसंयुक्तं मधु चान्नेन संयुतं । एवं तपश्च विद्या च संयुक्तं भेषजं महत् ॥ द्वाभ्यामेव हि पक्षाभ्यां यथा वै पक्षिणां गतिः । तथैव ज्ञानकर्मभ्यां प्राप्यते ब्रह्म शाश्वतम् ॥" हीं वचनें आढळतात. पण त्यांवरून रहस्यकार म्हणतात तसलाच कर्मयोग ऊर्फ ज्ञानकर्मसमुच्चय गीता, भागवत धर्म किंवा मनु इत्यादिकांसही मान्य आहे,हें कसें ठरतें ? आणि असलाच कर्मयोग त्या सर्वांस मान्य होता हें जर खरें आहे तर रहस्यकारांपूर्वीं आचार्यादि जे मोठमोठे असंख्य पंडित झाले त्यांना तो कसा दिसला नाहीं ? कीं तो दिसत असूनहि त्यांनीं–त्या सर्वांनींच–मुद्दाम विपर्यास केला. पण तसें करण्यांत त्यांना फायदा काय होता ? लोकांना खरा शास्त्रार्थ न सांगतां त्यांना उन्मार्गाला लावण्यासाठींच त्यांचा जन्म होता कीं काय?

पण ज्या अर्थी प्राचीन पंडितांपैकी कोणीच रहस्यकारांच्या कर्मयोगास अनुकूल नाहींत त्या अर्थी ' त्यजेदेकं कुलस्यार्थे ' या न्यायानें एकट्या रहस्यकाराचाच कर्मयोग काल्पनिक आहे, असें म्हणावें लागतें. वरील वचनांचा भावार्थ इतकाच कीं, रथाला घोड्यांची व घोड्यांना रथाची, अन्नाला मधाची व मधाला अन्नाची जशी गरज असते त्याप्रमाणें ज्ञानाला तपाची व तपाला ज्ञानाची गरज असते. पक्ष्याला एकाच पंखानें उडतां येत नाहीं, तर दोन्ही पंखांनीच तो आकाशांत उडून जातो त्याप्रमाणें नुसत्या ज्ञानानें किंवा नुसत्या कर्मानें ब्रह्म प्राप्त होत नाहीं, तर ज्ञान व कर्म यांच्या योगानेंच ब्रह्मप्राप्ति होते. पण यावरून रहस्यकार म्हणतात तसला म्ह० ज्ञानोत्तर ज्ञानी पुरुषानें आमरणान्त सांसारिक कर्में केलीं पाहिजेत, अशा स्वरूपाचा कर्मयोग कसा सिद्ध होतो? वरील श्लोकांत तप व ज्ञान आणि कर्म व ज्ञान या दोन्हींची आवश्यकता आहे, असें म्हटलें आहे व तें बरोबरही आहे. कारण कर्म, चित्तशुद्धि, विरक्ति वगैरे पूर्व तयारी होण्यासाठीं आहे व ज्ञान आत्म्याचें स्वरूप साक्षात् कळण्यासाठीं आहे. म्हणून ' तावत्कर्माणि कुर्वीत न निर्विद्येत यावता ' भा. महापुराण ११. २०-९ किंवा खुद्द गीतेंतच म्हटल्याप्रमाणें 'आरुरुक्षोर्मुनेर्योगं कर्म कारणमुच्यते ' ६-३. कर्म ज्ञानाची योग्यता प्राप्त करून देणारें आहे, याबद्दल कोणाचाच वाद नाहीं. पण रहस्यकार तेवढ्यानें संतुष्ट होत नाहींत. ते म्हणतात—"पण योगवासिष्ठावरील टीकाकार संन्यासमार्गीय पडल्यामुळें पक्ष्याच्या दोन पंखांची उपमा स्पष्ट असतांही ज्ञान व कर्म हीं दोन्ही युगपत् म्ह० एकाकालीं विहित नाहींत, असा त्यांनीं अखेर आपल्याच पदरचा शेरा दिला आहे. परंतु हा अर्थ ओढाताणीचा, क्लिष्ट व सांप्रदायिक आहे, हें टीकेवाचून मूळ ग्रंथ सरळ वाचणारास कोणाच्याही लक्षांत येईल." वरील श्लोकाचा सरळ अर्थ " दोन पंखांनीं पक्ष्याची जशी गति होते तशी ज्ञान व कर्म यांच्या योगानें शाश्वत ब्रह्म प्राप्त होतें." असा आहे. त्यांत ब्रह्मप्राप्तीला ज्ञान व कर्म या दोन्ही उपायांची गरज आहे एवढेंच विवक्षित आहे. त्याचें एकाच वेळीं अनुष्ठान करावें कीं क्रमानें याचा त्यावरून कांहीं बोध होत नाहीं. अशा वेळीं न्यायाचाच आश्रय करणें उचित होय. न्याय कसा आहे तें मागें आचार्यांनींच सांगितलें आहे. पृ. ४७ पहा. अर्थात् टीकाकारांनीं जो अर्थ केला आहे तो न्याय्य आहे. रहस्यकारांच्या अर्थाप्रमाणें न्यायाला सोडून नाहीं. मन्वादिकांना मान्य असलेला कर्मयोग ज्ञानसाधनभूत आहे. ज्ञानोत्तर नव्हे. अर्थात् रहस्यकारांनीं या संबंधानें सर्व गीतारहस्यांत वारंवार जें लिहिलें आहे तें सर्व वैदिक संप्रदायाला सोडून, अतएव अग्राह्य आहे.

संप्रदायावर रहस्यकाराचा मोठा रोष दिसतो. गीतारहस्यांत त्यांनीं संप्रदाय व सांप्रदायिक यांच्याविषयीं अतिशय अनादरानें व द्वेषानें लिहिलें आहे. पण या श्लोकांत स्वतः भगवानच योगाचा संप्रदाय सांगत आहेत, एवढें एक बरें आहे. नाहीं तर रहस्यकारांनीं संन्यासमार्गीयांवर याहीपेक्षां अधिक भडिमार केला असता. कारण स्वतःची भलतीच समजूत करून घेऊन संन्यासमार्गावर वेळीं अवेळीं घसरण्यास ज्यांनीं कमी केलें नाहीं ते संप्रदायाचें गीतेंत जर मुळीं नांवच नसतें तर बिचाऱ्या संन्यासमार्गावर किती घसरले असते याची कांहीं कल्पनाही होत नाहीं. कारण " जो निष्कामकर्मयोग संहिता, ब्राह्मणें, उपनिषदें, धर्मसूत्रें, मनु-याज्ञवल्क्यस्मृति, महाभारत, भगवद्गीता, योगवासिष्ठ व अखेर तत्त्वसारायण वगैरे ग्रंथांत प्रतिपादिला आहे तो श्रुतिस्मृतिप्रतिपादित नाहीं, आणि केवळ

संन्यासमार्गच कायतो श्रुतिस्मृतिप्रतिपादित होय, असे म्हणणेंही सर्वांशी निर्मूल होय ...” पृ. ३६३ असे रहस्यकार निःशंकपणे म्हणतात. पण त्यास आमचा येथें एवढाच प्रश्न आहे की, कर्मयोग श्रुतिस्मृतिप्रतिपादित नाहीं, व संन्यासमार्गच कायतो श्रुतिस्मृतिप्रतिपादित होय,असे म्हणतें कोण? तूर्त आपण संहिता, ब्राह्मणे वगैरे प्रमाणग्रथात निष्कामकर्मयोग (रहस्यकार समजतात तसला) आहे की काय हा प्रश्न बाजूला ठेवूं व गीतेपुरताच विचार करूं. या गीतेंत निष्कामकर्मयोग सागितलेला नाहीं, सन्यासच कायतो सांगितला आहे, असे शकराचार्य म्हणतात की काय ? भाष्य व त्याचा सरळ अर्थ वाचकाच्या पुढें आहे, त्यांत आचार्यांचे असे एक तरी वाक्य आहे की काय ते पहा व नाहीं अशी आपली पूर्ण खात्री करून घेऊन मग रहस्यकाराच्या सन्यासमार्गी टीकाकारावरील असल्या विपरीत मिथ्या आरोपांची योग्यता किती आहे ते आपल्याशीच ठरवा. ( मागे पृ. २ पहा. ) संहिताब्राह्मणात्मक सर्व वेद, सर्व स्मृतिग्रथ, सूत्रे, योगवासिष्ठ, इत्यादि सर्व प्रमाणग्रथात कर्मयोग व ज्ञान हीं दोन्हीं सांगितलीं असून कर्मयोग चित्तशुद्धीच्या द्वारा ज्ञानाचे साधन आहे, असाच घोष केला आहे. पण तो रहस्यकारांना ऐकू गेला नाहीं, हा आचार्यांचा अपराध नव्हे. असो; आतां सप्रदायाचेच प्रकरण चालू असल्यामुळे सप्रदाय म्ह० काय त्याचा थोडक्यांत विचार करतो—श्रीमच्छकराचार्यांनी केनोपनिषदाच्या पदभाष्यांत ‘ इति शुश्रुम पूर्वेषां ये नस्तद्व्याचचक्षिरे ’ ( खड १. क० ३ ) या वाक्याला ‘ इत्येव सर्वात्मनः सर्वविशेषरहितस्य चिन्मात्रज्योतिषो ब्रह्मत्वप्रतिपादकस्य वाक्यार्थस्य आचार्योपदेशपरम्परया प्राप्तत्वमाह इति शुश्रुमेत्यादि ’ असे अवतरण दिले आहे. त्याचा अर्थ—सर्वविशेषशून्य चिन्मात्रज्योति सर्वात्म्याचे ब्रह्मत्व प्रतिपादन करणारे जें पूर्व वाक्य त्याचा अर्थ याप्रमाणें आचार्यांच्या उपदेशाच्या परंपरेने प्राप्त झाला आहे, असे ‘ इति शुश्रुम० ’ इत्यादि वाक्य सांगते. अर्थात् आचार्यांच्या वाक्यार्थोपदेशाची परपरा हाच सप्रदाय होय. केनोपनिषदाच्या वाक्यभाष्यातही वरील श्रुतिवचनाचे व्याख्यान करतांना भाष्यकार म्हणतात— “ ये नस्तद्ब्रह्मोक्तवन्तस्ते नित्यमेवागम ब्रह्मप्रतिपादकं व्याख्यातवन्तः । न पुनः स्वबुद्धिप्रभवेण तर्केणोक्तवन्तः । इत्यागमपारम्पर्याविच्छेद दर्शयति विद्यास्तुतये । तर्कस्त्वनवस्थितो भ्रान्तोऽपि भवतीति ॥ ” म्ह० ‘ ज्यानीं आम्हांला तें ब्रह्म सांगितले त्यांनीं सुद्धां ब्रह्मप्रतिपादक नित्य आगमाचेंच व्याख्यान केलें. आपल्या बुद्धीने उत्पन्न केलेल्या तर्कानें कांहीं एक सांगितलें नाहीं, ’ असें सांगून हीं श्रुति आगमपरपरेचा अविच्छेद विद्येच्या स्तुतीकरिता दाखवीत आहे. कारण तर्क तर कदाचित् भ्रांतिजन्य व प्रायः अनवस्थित असतो. ( केनो० भाष्यार्थ पृष्ठ ३६, ३७ पहा. )

मुण्डकोपनिषद्भाष्याच्या अगदी आरभीच ‘अस्याश्च विद्यासंप्रदायकर्तृपारम्पर्यलक्षणसंबन्धमादावेवाह स्वयमेव स्तुत्यर्थम् ।’ म्ह० या उपनिषदाच्या स्तुतीकरिता विद्येचा सप्रदाय—आचार्योपदेशपरंपरा—चालविणाऱ्या पुरुषांचा परंपरासबध स्वतः श्रुतिच आरभीच सागत आहे, असें म्हणून ब्रह्मा, अथर्वा, अंगी, भारद्वाज सत्यवाह, अगिरस, शौनक अशी शिष्याचार्यपरंपरा सांगितली आहे.

बृहदारण्यकाच्या दुसऱ्या अध्यायाच्या शेवटी जो वंशब्राह्मण आहे त्यांतील ‘ वंश ’ या शब्दाचें व्याख्यान करतांना ‘ आचार्यपरंपराक्रमः ’ असें आचार्यांनीं म्हटलें आहे. तसेंच

त्या भाष्याच्या अगदीं आरंभीं त्याच वंशऋषींना 'ब्रह्मविद्यासंप्रदायकर्तृभ्यः' असें विशेषण दिलें आहे.

ज्या संप्रदायाला रहस्यकार सदोष व म्हणूनच टाकाऊ समजतात त्या संप्रदायाला सोडून शास्त्रार्थाचा निश्चय करणाराला उद्देशून आचार्यांनीं श्रीमद्भगवद्गीतेच्या तेराव्या अध्यायाच्या 'क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि' या दुसऱ्या श्लोकावरील भाष्यांत असे उद्गार काढले आहेत. 'आत्महा स्वयं मूढोऽन्यांश्च व्यामोहयति शास्त्रार्थसंप्रदायरहितत्वाच्छ्रुतहानिमश्रुतकल्पनां च कुर्वन्। तस्मादसंप्रदायवित्सर्वशास्त्रविदपि मूर्खवदेवोपेक्षणीयः॥' म्ह० आत्म्याविषयीं अन्यथा कल्पना करणारा आत्महा-आत्मघाती शास्त्रार्थसंप्रदायरहित असल्यामुळें श्रुतार्थाचा त्याग व अश्रुत अर्थाची कल्पना करीत होत्साता मोहित झालेलाच असतो व दुसऱ्यांनाही मोहित करतो. यास्तव सर्वशास्त्रवेत्ताही संप्रदायवेत्ता जर नसेल तर एखाद्या मूर्खाप्रमाणेंच त्याची उपेक्षा करावी. यावरून आचार्य संप्रदायाला किती महत्त्व देतात, तें व्यक्त होते. आतां आचार्यांचा संप्रदाय कोणता तें पाहूं. संप्रदाय या शब्दाचा अर्थ याप्रमाणे निश्चित झाल्यावर आचार्यांचा संप्रदाय कोणता, हा प्रश्न पुढें येतो. रहस्यकारांच्या मतीं निवृत्तिपर वैदिक संन्यासधर्म हा आचार्यांचा संप्रदाय आहे. (गी. र. पृष्ठ १३ ओळ १९ पहा). पण आम्ही त्याचा संप्रदाय—नारायण, ब्रह्मा, ब्रह्मपुत्र वसिष्ठ, वसिष्ठपुत्र शक्ति, शक्तीचा पुत्र पराशर, पराशराचा पुत्र व्यास, व्यासाचा पुत्र शुक, शुकाचार्यांचे शिष्य गौडपादाचार्य, त्यांचे शिष्य गोविंदपूज्यपाद व त्यांचे शिष्य शंकराचार्य—असा आहे, असे समजतों. वसिष्ठ हे निवृत्तिमार्गाचे उपदेशक असून त्यांनी आपल्या पुत्राला त्याचा उपदेश केला. त्यानंतर शुकाचार्यांपर्यंत पुत्राची परंपरा चालली व त्यानंतर शिष्यांची परंपरा चालली. अर्थात् आचार्यांना ज्या मार्गाचे ज्ञान संप्रदायाने प्राप्त झाले होतें तो मार्ग व्यासांना अभीष्ट होता. किंबहुना व्यास हे त्याचे प्रवर्तक होते. त्यामुळें आचार्यांचा व व्यासाचा संप्रदाय एकच असून व्यासांनीं 'द्वाविमावथ पन्थानौ यत्र वेदाः प्रतिष्ठिताः। प्रवृत्तिलक्षणो धर्मो निवृत्तश्च विभावितः'—ज्यामध्ये वेद प्रतिष्ठित आहेत असे हे दोन मार्ग आहेत. एक प्रवृत्तिलक्षण धर्म व दुसरा निवृत्त मार्ग, असें आपल्या पुत्राला अगदीं निश्चित सांगितले आहे. त्याला अनुसरूनच आचार्यांनीं प्रस्थानत्रयावर भाष्य लिहिले आहे आणि स्वसंप्रदायप्रवर्तक व्यासांना त्यांनीं आपल्या भाष्यात 'वेदाचार्य' असे वारंवार म्हटले आहे. तस्मात् आचार्यांचा वैदिक संप्रदाय असून स्वतः व्यासही त्याच संप्रदायाचे होते. त्यामुळे त्या दोघाच्या मतांत व सिद्धान्तांतही भेद असण्याचा संभव नाहीं.

पण यावर कोणी असे म्हणेल कीं मग त्याच न्यायाने रामानुजादिकांचेही संप्रदाय वैदिकच आहेत, असें म्हटले पाहिजे आणि तेही जर वैदिक तर आचार्यांच्या व त्याच्या सिद्धान्तात फरक का पडतो? संप्रदाय जर एक म्हणजे वैदिक तर सिद्धान्तही एकच असला पाहिजे; कोणी अद्वैती तर कोणी द्वैती, कोणी विशिष्टाद्वैती तर कोणी शुद्धाद्वैती असा सिद्धान्तभेद असणे योग्य नाहीं. तर त्याचे उत्तर थोडक्यांत असे—रहस्यकारांनीच २१ व्या पृष्ठावर म्हटल्याप्रमाणे त्याच्या सिद्धान्तात जो भेद आहे तो साध्याविषयी आहे. साधनांविषयीं नाहीं. ईश्वर, जीव व जगत याचा परस्पर संबंध, त्याचे स्वरूप व मोक्षावस्थेचें स्वरूप याविषयींच मुख्यतः मतभेद आहे. साधनांविषयी त्यांचा प्रायः एकवाक्यता

कशी असते तें गीतारहस्यावरूनच सिद्ध होतें. ‘कर्मनिष्ठा ही ज्ञाननिष्ठेची निष्पादक आहे, स्वतन्त्र नव्हे, असा रामानुजाचार्यांनीही निर्णय केला आहे.... चातुर्वर्ण्याची स्वधर्मोक्त सांसारिक कर्मे आमरणान्त करणे, हा पक्ष गौण ठरतो व त्यामुळें गीतेचें रामानुजीय तात्पर्यही एक प्रकारें कर्मसंन्यासपर आहे,’ इत्यादि. त्याचप्रमाणें पुढें द्वैती संप्रदायाचें मत असें सांगितलें आहे–‘निष्कामकर्माची महती गीतेंत जरी वर्णिली असली तरी निष्काम कर्म हे साधन असून भक्ति ही अखेरची निष्ठा होय. भक्ति सिद्ध झाल्यानंतर कर्म केलें काय आणि न केले काय त्यांत कांही विशेष नाही.’ पुढें वल्लभसंप्रदायाविषयीं असें म्हटलें आहे–‘भक्ति आणि त्यांतल्यात्यांतही घरदार सोडून देऊन केवळ निवृत्तिपर पुष्टिमार्गीय भक्ति हेंच सर्व गीतेचे तात्पर्य होय.’ (गी. र. पृ. १६-१७)

त्यानतर निंबार्क व ज्ञानेश्वर यांचाही निवृत्तीकडेच ओढा असल्याचें दाखवून (१७-१८) शेवटीं ‘सारांश गीतेंत उपदेशिलेला प्रवृत्तिपर कर्ममार्ग गौण म्हणजे केवळ ज्ञानाचें साधन ठरवून आपापल्या सप्रदायांत जे जे तत्त्वज्ञान आणि त्याबरोबरच मोक्षदृष्ट्या अखेरचे कर्तव्य म्हणून जे जे आचार वर्णिले आहेत ते तेच गीतेंत प्रतिपाद्य आहेत .असा गीतार्थाचा निश्चय केला आहे. भगवद्गीतेंत कर्मयोग प्रधान मानिला आहे, असें कोणीच म्हणत नाहीं,’ (गी. र. पृ. १९) असें म्हटलें आहे.

या सर्व उताऱ्यांवरून निवृत्तिच मोक्षाचें साधन आहे, याविषयीं शंकराचार्यांपासून तों ज्ञानेश्वरमहाराजांपर्यंत कोणाचाच वाद नाहीं. त्याचप्रमाणें ज्ञानानच मोक्ष होतो, ‘ज्ञानादेव तु कैवल्य’ याविषयींही त्यांचा वाद नाहीं, ही गोष्ट ठरते. अर्थात् आचार्यांच्या दोन मुख्य सिद्धान्ताविषयीं कोणाचाच वाद नाहीं. ज्ञानाचें मुख्य साधन कोणते याविषयीं मात्र वरील सांप्रदायिक लोकांनीं आपापल्या रुचीप्रमाणें निर्णय केला आहे. श्रीशंकराचार्य निष्काम कर्म, ध्यानयोग, आश्रमसन्यास, भक्ति, क्षराक्षरादि विचार इत्यादि सर्व किंवा यांतील प्रत्येक ज्ञानाचीं साधनें आहेत, असे म्हणतात; वैष्णव भक्तीलाच ज्ञानाचें साधन समजतात; व ज्ञानेश्वरमहाराज ध्यानयोगालाच ‘पंथराजु’ म्हणतात. आतां यांतील व्यापक दृष्टि कोणती व संकुचित दृष्टि कोणती याचा विचार आम्ही करीत नाहीं; तो वाचकांनीच करावा. पण ‘वैष्णव भक्त होते म्हणून त्यांनीं भक्तीला महत्त्व दिलें, ज्ञानेश्वरमहाराज योगी होते, म्हणून त्यांनीं योगाचेंच वर्णन केलें,’ हे जर खरें आहे तर गीतारहस्यकार स्वत: लौकिकप्रवृत्तिप्रधान होते, म्हणून त्यानी लौकिक प्रवृत्तीला प्रतिपाद्य ठरविलें, असे समजण्यास काय हरकत आहे ? कारण रामानुजादिक वैदिक संप्रदायाचेच असूनही त्यांनीं जसे वेद–उपनिषदें, ब्रह्मसूत्रे व गीता यांत आपापल्या रुचीप्रमाणे विशिष्टाद्वैत व भक्ति यांचेच वर्णन केलें आणि त्यांनाच महत्त्व दिलें त्याचप्रमाणें शुद्ध द्वैती, शुद्धाद्वैती इत्यादि इतर वैदिक सांप्रदायिकांनींही आपापल्या रुचीप्रमाणे शुद्ध द्वैत, शुद्धाद्वैत इत्यादि सिद्धान्त ठरविले आहेत. पण ते सर्व शास्त्रीय मार्गानेंच ठरविले आहेत. शास्त्रीय मार्गाला सोडून ठरविलेले नाहींत. म्हणून त्याच्याशीं आमचा विरोध नाहीं. तर मतभेद आहे. आचार्यांनीं मांडूक्योपनिषदावरील गौडपादीय कारिकांतील ‘स्वसिद्धान्तव्यवस्थासु द्वैतिनो निश्चिता दृढम्। परस्पर विरुध्यन्ते तैरयं न विरुध्यते’ ॥ ३–७ ॥ मांडू. भाष्यार्थ पृ. १७६. या कारिकेवरील भाष्यांत “तैरन्योन्यविरोधिभिरस्मदीयोऽयं वैदिकः

सर्वानन्यत्वादात्मैकत्वदर्शनपक्षो न विरुध्यते यथा स्वहस्तपादादिभिः " ' त्या परस्परांशीं विरोध करणाऱ्या द्वैती वाद्यांशीं आमचा हा वैदिक आत्मैकत्वदर्शनपक्ष, त्या सर्वांशीं अनन्य असल्यामुळें, विरोध करीत नाहीं. प्रत्येक पुरुष हस्त-पादादी अवयवांशी अनन्य असल्यामुळें जसा त्यांच्याशी विरोध करीत नाहीं त्याप्रमाणें;' असें सांगितलें आहे. साराश आचार्यांचा संप्रदाय वैदिक आहे. म्हणूनच त्यांनीं प्रवृत्तिमार्गांतील सर्व साधनांचा संग्रह करून त्या सर्वांचें साध्य निवृत्ति व ज्ञान हें व्यासादिकांच्या संप्रदायाला अनुसरून ठरविलें आहे. रामानुजादि सर्व सप्रदायप्रवर्तकाचा तत्त्वाच्या बाबतींत जरी शंकराचार्यांशीं मतभेद असला तरी निवृत्ति व ज्ञान या मोक्षसाधनाविषयीं मतभेद नाहीं, ही गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे; आणि त्यामुळेच तो निरपवाद वैदिक सिद्धान्त आहे, असें आम्ही समजतों.

संप्रदाय सदोष कीं निर्दोष ? संप्रदाय म्हणजे काय व आचार्यांचा संप्रदाय कोणता, या प्रश्नांचा विचार केल्यावर आतां सप्रदायाला धरून एखादा ग्रंथ लावणें, यांत कांहीं दोष आहे कीं काय याचा आपण विचार करूं. वैदिक संप्रदायाला धरूनच शास्त्रार्थविचार केला पाहिजे; असा सर्व वैदिकांचा आग्रह आहे. कारण ते तर्काला अप्रतिष्ठित समजतात. तर्क पुरुषाच्या कल्पनाशक्तीवर अवलबून असतात. ज्याची कल्पनाशक्ति जितकी तीव्र असेल तितका तो अधिक सूक्ष्म तर्क करूं शकतो. त्यामुळें एखाद्या पुरुषानें केलेला तर्क नेहमीच अबाधित राहू शकत नाहीं. तर त्याहून अधिक तीव्र कल्पनाशक्तीचा मनुष्य त्याच्या तर्काला तर्काभास करू शकतो. त्यामुळें कोणताही तर्क टिकत नाहीं. पण आगमपरंपरेने आलेला शास्त्रार्थ नेहमी एकरूप रहात असल्यामुळें तो तर्काप्रमाणे बाधित होत नाहीं. यास्तव अनेक आचार्यांच्या परपरेने प्राप्त झालेला शास्त्रार्थच निर्दोष असतो, असें वैदिकांचें त्याविषयी म्हणणें असते, व ते सयुक्तिकही आहे. कारण परपरेने प्राप्त झालेल्या ज्ञानामध्ये पुरुषाच्या बुद्धिदोषामुळें वैगुण्य येण्याचा सभव नसतो. कारण प्रत्येक आचार्य आपल्या शिष्यास आगमाचा जो उपदेश करतो तो त्याला त्याच्या आचार्यानें जसा केलेला असतो तसाच करतो. त्याच्या विपरीत करीत नाहीं. म्हणून सांप्रदायिक शास्त्रार्थज्ञान दीर्घकालपर्यंत एकरूप असतें. पण संप्रदायाला सोडून जे विचार करतात त्यांना आपल्या बुद्धीवर सर्व भार टाकून विचार करावा लागतो. त्यामुळें बुद्धिदोषामुळें तत्त्वार्थ न कळण्याचा पुष्कळ संभव असतो. म्हणून सप्रदायाला सोडून शास्त्रार्थाचा विचार करणाऱ्या पुरुषांचें प्रायः ऐक्यमत्य होत नाहीं. त्यांना नेहमी मतभेदाचा आश्रय करावा लागतो. संप्रदाय सोडून विचार करणाराला प्राचीन विचारी लोकांच्या अनुभवाचा मुळीच पाठिंबा नसतो. त्याला फार तर आपल्या सारख्याच दुसऱ्या कांहीं असांप्रदायिकांच्या मताचा आधार घ्यावा लागतो. गीतारहस्यकारांनीही मि. ब्रुक्स, मि. एम् राधाकृष्णम् इत्यादिकांच्या मताचा आपल्या मताला पाठिंबा असल्याचे प्रस्तावनेत पृ. १४ सांगितले आहे. पण ब्रुक्ससाहेबांचेंही गीतेविषयींचे मत असांप्रदायिक असल्यामुळें वैदिकांना प्रमाण वाटण्याचा संभव फारच थोडा आहे. गीतारहस्यकारांना भारतवर्षांतील एकाही प्राचीन तत्त्वज्ञाचा पाठिंबा नसावा व आपला हा कर्मयोग अपूर्व नाहीं, हें दाखविण्यासाठीं मि. ब्रुक्ससारख्या आधुनिक पाश्चात्त्यांच्या मताचा हवाला द्यावयास लागावा, यावरूनच तो (कर्मयोग) किती अपूर्व आहे, तें उघड होतें.

रण त्याचें फळ अव्यय आहे. ( अहोपण कर्मफलाप्रमाणें या योगाचें फलही साध्य आहे. त्यामुळें तें क्षयीच असण्याचा संभव आहे, असें कोणी म्हणेल म्हणून सांगतात-)—**अस्य सम्यग्दर्शननिष्ठालक्षणस्य मोक्षाख्यं फलं न हि व्येति**—या सम्यग्दर्शननिष्ठारूप म्ह० ज्ञाननिष्ठारूप योगाचें मोक्षसंज्ञक फल क्षीण होत नाहीं, हें प्रसिद्ध आहे.—**च सः विवस्वान् मनवे प्राह**—आणि तो सूर्य मनूला हा योग सांगता झाला.—**मनुः स्वपुत्राय आदिराजाय इक्ष्वाकवे अब्रवीत्**—मनु आपला पुत्र जो आदि राजा इक्ष्वाकु त्याला हा योग सांगता झाला [ सृष्टीच्या आरंभीं मीं सांगितलेला हा योग सूर्यानें मनूला व मनूनें आपल्या इक्ष्वाकुपुत्राला सांगितला. इक्ष्वाकु हा सूर्यवंशांतील पहिला राजा आहे. ] १.

एवं परंपराप्राप्तमिमं राजर्षयो विदुः ।
स कालेनेह महता योगो नष्टः परंतप ॥ २ ॥

**अन्वयार्थ**—**एवं**—याप्रमाणें—**परंपराप्राप्तं**—क्षत्रियांच्या परंपरेनें प्राप्त झालेल्या—**इमं**—या योगास—**राजर्षयः**—राजर्षी—**विदुः**—जाणते झाले. त्यांनीं या योगाचें अनुष्ठान केलें—**हे परंतप**—हे अर्जुना—**महता कालेन**—पण मध्यें पुष्कळ काल निघून गेल्यामुळे—**सः योगः**—तो योग—**इह**—यावेळीं—**नष्टः**—संप्रदायरहित झाला आहे. २.

**एवमिति । एवं क्षत्रियपरम्पराप्राप्तमिमं राजर्षयो राजानश्च त ऋषयश्च राजर्षयो विदुरिमं योगम् । स योगः कालेनेह महता दीर्घेण नष्टो विच्छिन्नसंप्रदायः संवृत्तो हे परंतप, आत्मनो विपक्षभूताः पर उच्यन्ते ताञ्शौर्यतेजोगभस्तिभिर्भानुरिव तापयतीति परंतपः शत्रुतापन इत्यर्थः ॥ २ ॥**

**भाष्यार्थ**—**एवं क्षत्रियपरंपराप्राप्तं इमं योगं**—याप्रमाणें क्षत्रियपरंपरेनें प्राप्त झालेल्या या योगाला—**राजर्षयः-राजानः च ते ऋषयः राजर्षयः विदुः**—राजर्षी म्ह० राजे व तेच ऋषि, म्हणून राजर्षि, जाणत असत ( याप्रमाणें क्षत्रियांच्या परंपरेनें अनादिकालापासून चालत आलेल्या या योगाला राजर्षी जाणत होते. ऐश्वर्यसंपन्न असून सूक्ष्म अर्थ जाणण्यास समर्थ असणें हे राजर्षित्व होय.)—**सः योगः**—तो योग—**इह महता दीर्घेण कालेन**—यावेळीं दीर्घ कालानें—**नष्टः-विच्छिन्नसंप्रदायः संवृत्तः**—नष्ट[१] झाला म्ह० ज्याची संप्रदाय-परंपरा तुटली आहे, असा

---

१ येथील 'योगः नष्टः' याचा अर्थ 'योग नष्ट झाला' असा रहस्यकारांना केला आहे. पण तो बरोबर नाहीं. कारण हा योग जर नष्ट झाला असता तर भीष्मासारखे ज्ञानी क्षत्रिय दिसले नसते. यास्तव 'नष्टः' याचा 'नष्ट' असा अगदींच सरळ अर्थ न करिता आचार्यांप्रमाणें 'विच्छिन्नसंप्रदाय झाला' असा करणेंच उचित होय. कारण तो योग स्वरूपतः नष्ट झाला नसून त्याचा पिता-पुत्रसंप्रदाय विच्छिन्न झाला होता. पण वस्तुस्थितीला धरून

झाला. [ सांप्रतकाळी मध्यें दीर्घकाल लोटल्यामुळें त्या योगाचा संप्रदाय अविच्छिन्न राहिला नाही. क्षत्रिय पित्याने आपल्या पुत्राला तो सांगावयाचा, त्यानें आपल्या पुत्राला, अशी जी या योगाची परंपरा चालली होती ती आतां राहिली नाहीं. ती परंपरा तुटली-]—**हे परंतप-आत्मनः विपक्षभूताः परे उच्यन्ते**—आपल्या प्रतिपक्ष्यांना 'परे' म्हटले जाते.—**तान् शौर्यतेजोगभस्तिभिः भानुः इव तापयति इति परंतपः-शत्रुतापनः इत्यर्थः**—त्या आपल्या विपक्षभूत शत्रूंना शौर्यरूपी तेजाच्या किरणांनीं सूर्याप्रमाणे ताप देतो, म्हणून परंतप म्ह० शत्रूंना ताप देणारा, असा याचा भावार्थ. २.

**स एवायं मया तेऽद्य योगः प्रोक्तः पुरातनः ।**
**भक्तोऽसि मे सखा चेति रहस्यं ह्येतदुत्तमम् ॥ ३ ॥**

**अन्वयार्थ—सः एव अयं**—तोच हा—**पुरातनः**—प्राचीन—**योगः**—योग—**मया**—मी—**ते**—तुला—**अद्य**—आज—**प्रोक्तः**—सांगितला, ( ते कां ? तर-) तूं—**मे**—माझा—**भक्तः**—भक्त—**असि**— आहेस—**च**—व—**सखा**—सखा—**असि**—आहेस,—**इति**—म्हणून सांगितला.—**हि**—कारण—**एतत्**—हे—**उत्तमं**—उत्तम—**रहस्यं**—ज्ञान आहे. ३.

**दुर्बलानजितेन्द्रियान्प्राप्य नष्टं योगमिममुपलभ्य लोकं चापुरुषार्थसंबन्धिनम्—स एवायमिति । स एवायं मया ते तुभ्यमद्येदानीं योगः प्रोक्तः पुरातनः, भक्तोऽसि मे सखा चासीति । रहस्यं हि यस्मादेतदुत्तमं योगो ज्ञानमित्यर्थः ॥ ३ ॥**

**भाष्यार्थ**—( पण वर्तमानसमयीं हा योग संप्रदायशून्य कां झाला ? तर त्याचे आधिकारी न राहिल्यामुळे, अशा आशयाने म्हणतात-)—**दुर्बलान्-अजितेंद्रियान् प्राप्य**—दुर्बल म्ह० अजितेंद्रिय अशा लोकांस प्राप्त होऊन [ म्ह० क्षत्रिय-प्रजा अजितेंद्रिय निपजल्यामुळे ]—**इमं योगं नष्टं च लोकं अपुरुषार्थसंबंधिनं उपलभ्य 'सः एव अयं' इति**—हा योग नष्ट झालेला व लोक पुरुषार्थरहित झालेले पाहून तोच हा योग मीं तुला सांगितला असे 'स एव०' या श्लोकाने सांगतात—**सः एव पुरातनः अयं योगः मया ते तुभ्यं**—तोच हा पुरातन-अनादिवेदमूलक योग मी तुला—**अद्य इदानीं प्रोक्तः**—आज-आता सांगितला.—**मे भक्तः असि च सखा असि इति**—माझा भक्त आहेस व सखा आहेस म्हणून सांगितला.—**हि यस्मात् एतत् उत्तमं रहस्यं**—कारण हे उत्तम रहस्य आहे ( पण योगाला 'एतत्-हे' असे कसे

---

पूर्वापर विचाराने व इतर शास्त्रांशी विरोध न येईल अशारीतीने केलेला हा अर्थ 'सरळ नाहीं, सांप्रदायिक आग्रहाने ओढाताणीनें केलेला आहे' असे रहस्यकार म्हणणार, यांत शंकाच नाहीं. तथापि वाचकांनी यांतील उचित अर्थ कोणता याचा आपल्या मनाशींच विचार करावा.

म्हटलें ? उत्तर-)—**योगं-ज्ञानं इत्यर्थः**—योग म्ह० हें ज्ञान उत्तम रहस्य आहे, असा भावार्थ. ३.

**अर्जुन उवाच**—अर्जुन म्हणाला—

**अपरं भवतो जन्म परं जन्म विवस्वतः ।**
**कथमेतद्विजानीयां त्वमादौ प्रोक्तवानिति ॥ ४ ॥**

**अन्वयार्थ—भवतः**—आपला—**जन्म**—जन्म—**अपरं**—अलीकडचा-कांहीं वर्षांपूर्वी झालेला—**विवस्वतः जन्म**—सूर्याचा जन्म—**परं**—सृष्टीच्या आरंभीं-फार प्राचीनकाळीं झालेला. तेव्हां—**त्वं**—तूं—**आदौ**—आरंभीं—**प्रोक्तवान्**—हा योग सूर्याला सांगितलास—**इति एतत्**—अशा प्रकारचें हे सांगणें—**कथं**—मी कसें—**विजानीयां**—खरे मानावें ? ४.

**भगवता विप्रतिषिद्धमुक्तमिति मा भूत्कस्यचिद्बुद्धिरिति परिहारार्थं चोद्यमिव कुर्वन्—अपरमिति । अपरमर्वाग्वसुदेवगृहे भवतो जन्म परं पूर्वं सर्गादौ जन्मोत्पत्तिर्विवस्वत आदित्यस्य तत्कथमेतद्विजानीयामविरुद्धार्थतया यस्त्वमेवाऽऽदौ प्रोक्तवानिमं योगं स एव त्वमिदानीं मह्यं प्रोक्तवानसीति ॥ ४ ॥**

**भाष्यार्थ—भगवता विप्रतिषिद्धं उक्तं इति कस्यचित् बुद्धिः मा भूत् इति परिहारार्थं चोद्यं इव कुर्वन् 'अपरं०' इति (अर्जुन उवाच)**—भगवानानें हें अगदींच विपरीत सांगितलें आहे अशी कोणाची बुद्धि-कल्पना न व्हावी म्हणून तिचा परिहार करण्यासाठीं जणु काय शंका-आक्षेप घेत असल्याप्रमाणे ' अपरं०' इत्यादि अर्जुन बोलला.—**अपरं-अर्वाक् वसुदेवगृहे भवतः जन्म**—अपर-अर्वाचीन-अलीकडे वसुदेवाच्या गृहीं तुझा जन्म झाला—**परं-पूर्वं सर्गादौ विवस्वतः आदित्यस्य जन्म-उत्पत्तिः**—व आदित्याची उत्पत्ति पर म्ह० सृष्टीच्या आरंभीं झाली. —**तत् एतत् अविरुद्धार्थतया कथं विजानीयां**—तेव्हां हें अविरुद्ध अर्थत्वानें मीं कसें जाणावें ? ( हें म्ह० काय ? उत्तर-)—**यः आदौ इमं योगं प्रोक्तवान् सः त्वं एव**—ज्यानें सृष्टीच्या आरंभीं हा योग सांगितला तो तूंच आहेस व—**सः एव त्वं इदानीं मह्यं प्रोक्तवान् असि इति**—तोच तूं आतां मला हा योग सांगत आहेस,हें. [त्या तूंच मला हा योग सांगितलास हें मीं कसें ओळखावें ? हा प्रश्न भगवानांच्या निजस्वरूपाला अनुलक्षून नाहीं. तर भगवानांनीं लीलेसाठीं जें मानुष शरीर धारण केलें आहे त्याला उद्देशून आहे. ] ४.

**बहूनि मे व्यतीतानि जन्मानि तव चार्जुन ।**
**तान्यहं वेद सर्वाणि न त्वं वेत्थ परंतप ॥ ५ ॥**

**अन्वयार्थ—हे अर्जुन,**—हे अर्जुना !—**मे च तव**—माझे व तुझे—**बहूनि जन्मानि**—अनेक जन्म—**व्यतीतानि**—होऊन गेले आहेत.—**अहं**—मी—**तानि**

**सर्वाणि**—त्या सर्व जन्मांस—**वेद**—जाणतों. मला त्यांचे स्मरण आहे.—**हे परंतप**—हे अर्जुना!—**त्वं**—तूं—**न वेत्थ**—जाणत नाहींस. तुला त्यांचे स्मरण नाही. ५.

**या वासुदेवेऽनीश्वरासर्वज्ञाशङ्का मूर्खाणां तां परिहरन्श्रीभगवानुवाच यदर्थो ह्यर्जुनस्य प्रश्नः— बहूनीति । बहूनि मे मम व्यतीतान्यतिक्रान्तानि जन्मानि तव च हेऽर्जुन तान्यहं वेद जाने सर्वाणि न त्वं वेत्थ जानीषे धर्माधर्मादिप्रतिबद्धज्ञानशक्तित्वात् । अहं पुनर्नित्यशुद्धबुद्धमुक्तस्वभावत्वादनावरणज्ञानशक्तिरिति वेदाहं हे परंतप ॥ ५ ॥**

**भाष्यार्थ—वासुदेवे मूर्खाणां या अनीश्वर-असर्वज्ञ-आशंका**—भगवान् वासुदेवाविषयी मूर्खांची जी 'हा ईश्वर नाहीं, सर्वज्ञ नाहीं' अशी आशंका—**तां परिहरन् श्रीभगवान् 'बहूनि०' इति उवाच**—तिचा परिहार करणारे श्रीभगवान् 'बहूनि०' इत्यादि बोलले;—**यदर्थः हि अर्जुनस्य प्रश्नः**—की ज्या विरोधाचा परिहार व्हावा म्हणूनच अर्जुनाने प्रश्न केला ( त्याचेच उत्तर सांगतात- )—**हे अर्जुन मे-मम च तव बहूनि जन्मानि व्यतीतानि-अतिक्रान्तानि**—हे अर्जुना, माझे व तुझे पुष्कळ जन्म मागे होऊन गेले आहेत.—**अहं तानि सर्वाणि वेद-जाने**—मी त्या सर्व जन्मांना जाणतों.—**त्वं न वेत्थ-जानीषे**—तूं जाणत नाहींस—**धर्माधर्मादिप्रतिबद्धज्ञानशक्तित्वात्**—कारण तुझी ज्ञानशक्ति धर्म, अधर्म, राग, लोभ इत्यादिकांमुळे प्रतिबद्ध झालेली आहे.—**पुनः अहं नित्यशुद्धबुद्धमुक्तस्वभावत्वात् अनावरणज्ञानशक्तिः**—पण मी नित्यशुद्धस्वभाव, ज्ञानस्वभाव व मुक्तस्वभाव असल्यामुळे माझी ज्ञानशक्ति आवरणरहित आहे.—**इति हे परंतप अहं वेद**—त्यामुळे हे शत्रुतापना! मी माझ्या मागील जन्मांना जाणतों. [ मला त्रिकालज्ञान आहे. पण तुझी ज्ञानशक्ति आवृत झालेली असल्यामुळे तूं जाणत नाहींस. ] ५.

## अजोऽपि सन्नव्ययात्मा भूतानामीश्वरोऽपि सन् ।
## प्रकृतिं स्वामधिष्ठाय संभवाम्यात्ममायया ॥ ६ ॥

**अन्वयार्थ—अहं**—मी-अन्तर्यामी-साक्षी—**अजः अपि सन्**—जन्मरहित असूनही—**अव्ययात्मा अपि सन्**—माझे ज्ञानशक्तिस्वरूप कधींही क्षीण न होणारे, असें असूनही—**भूतानां ईश्वरः अपि सन्**—आब्रह्मस्तंबपर्यंत भूतांचा ईश्वर-नियमन करणारा असूनही—**स्वां प्रकृतिं**—आपल्या त्रिगुणात्मक मायाख्य प्रकृतीला—**अधिष्ठाय**—वश करून घेऊन—**आत्ममायया**—आपल्या अचिन्त्य सामर्थ्याने—**संभवामि**—मी जन्म घेतो. मी जणुं काय देहवान् असल्यासारखा होतों. ६.

**कथं तर्हि तव नित्येश्वरस्य धर्माधर्माभावेऽपि जन्मेत्युच्यते—अजोऽपीति । अजोऽपि जन्मरहितोऽपि संस्तथाऽव्ययात्माऽक्षीणज्ञानशक्तिस्वभावोऽपि संस्तथा भूतानां ब्रह्मादिस्तम्बपर्यन्तानामीश्वर ईशनशीलोऽपि सन् प्रकृतिं स्वां मम वैष्णवीं मायां त्रिगुणात्मिकां, यस्या वशे सर्वं जगद्वर्तते यया मोहितं सत्स्वमात्मानं वासुदेवं न जानाति तां प्रकृतिं**

**स्वामधिष्ठाय वशीकृत्य संभवामि देहवानिव भवामि जात इवाऽऽत्ममाययाऽऽत्मनो मायया न परमार्थतो लोकवत् ॥ ६ ॥**

**भाष्यार्थ—तर्हि तव नित्येश्वरस्य धर्माधर्माभावे अपि कथं जन्म इति 'अजोऽपि०' इति उच्यते**—तर मग नित्य ईश्वर असा जो तूं त्या तुला धर्म व अधर्म यांच्या अभावींही जन्म कसा प्राप्त होतो, असें अर्जुन विचारील म्हणून भगवान् 'अजोऽपि०' या श्लोकानें उत्तर सांगतात—**अजः अपि-जन्मरहितः अपि सन्**—मी अजही म्ह० जन्मरहितही असून—**तथा अव्ययात्मा-अक्षीणज्ञानशक्तिस्वभावः अपि सन्**—तसाच अव्ययात्मा म्ह० ज्याचा ज्ञानशक्तिस्वभाव क्षीण न होणारा आहे असाही असून—**तथा भूतानां-ब्रह्मादिस्तंबपर्यन्तानां ईश्वरः ईशनशीलः अपि सन्**—त्याचप्रमाणें ब्रह्मादिस्तंबपर्यंत भूतांचा ईश्वर-सर्वांचें ईशन -नियमन करण्याचें ज्याचे शील आहे असाही असून—**स्वांप्रकृतिं-मम वैष्णवीं त्रिगुणात्मिकां मायां**—आपल्या प्रकृतीला म्ह० माझ्या वैष्णवी त्रिगुणात्मिका मायेला,—**यस्याः वशे सर्वं जगत् वर्तते**—ज्या मायेच्या अधीन सर्व जगत् राहते —**यया मोहितं सत् स्वं-आत्मानं वासुदेवं न जानाति**—जिच्याकडून मोहित होत्साते हे जगत् 'स्व'ला-आत्म्याला-वासुदेवाला जाणत नाहीं—**तां स्वां प्रकृतिं अधिष्ठाय-वशीकृत्य**—त्या आपल्या प्रकृतीला आपल्या अधीन ठेवून-तिचा अधिष्ठाता होऊन—**संभवामि-देहवान् इव भवामि**—मी उत्पन्न होतों. देहवान् असल्यासारखा-संसारी जीव असल्यासारखा होतों—**आत्ममायया-आत्मनः मायया**—आपल्या मायेच्या योगानें—**जातः इव**—जणुं काय उत्पन्न झालेलासा दिसतों—**लोकवत् परमार्थतः न**—इतर जीवाप्रमाणें खरोखरच कांहीं मी उत्पन्न होत नाहीं. [ मला संसारी जीवांप्रमाणें वास्तविक जन्म नाहीं, तथापि माझा मायिक जन्म होतो, आपल्या प्रकृतीला म्ह० त्रिगुणात्मक मायेला स्वाधीन ठेवून मी उत्पन्न झाल्यासारखा दाखवितों. ] ६.

---

१ या श्लोकांत 'प्रकृति' हा शब्द पाहतांच रहस्यकार टीपेंत म्हणतात-" या श्लोकांतील अध्यात्मज्ञानात कापिल-सांख्य व वेदान्त या मतांचीच जोड घातलेली आहे," हे म्हणणें खोटें आहे. कारण यांत अध्यात्मज्ञानच नाहीं. अध्यात्मज्ञान म्ह० शारीरज्ञान-शरीरांत राहणारा जो आत्मा-शरीरी त्याच्याविषयींचें ज्ञान. पण भगवान् येथें फक्त मी अज, अव्यय वगैरे असूनही जन्म कसा घेतों ते सांगत आहेत. तेव्हां अध्यात्मज्ञानाचा येथे प्रसंगच नाहीं. असो; निरीश्वरवादी कापिल सांख्यदर्शन व औपनिषद वेदान्त यांची जोड घालण्याचें भगवानांना काय बरें कारण पडलें ? भगवान् सर्व दर्शनकारांच्या मतांची एकवाक्यता करावयास प्रवृत्त झाले आहेत कीं अर्जुनाला परम पुरुषार्थाचें साधन सांगत आहेत ? व्यासांनीं गीता रचली; ब्रह्मसूत्रेंही त्यांचींच. निदान गीतेला हल्लींचें स्वरूप देणारे बादरायण व्यास व ब्रह्मसूत्रकार व्यास एकच असें रहस्यकारांनी अनुमान केलें आहे. (गी. र.पृ. ५३१). ब्रह्मसूत्रांत कापिल सांख्यदर्शनाचें खंडन प्राधान्यानें केलें आहे. तेच ब्रह्मसूत्रकार स्वतःच रचलेल्या गीतेंत सांख्यांच्या दर्शनाची व वेदान्ताची जोड घालतील, हें

**यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ।**
**अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ॥ ७ ॥**

**अन्वयार्थ—हे भारत**—हे अर्जुना !—**यदा यदा हि**—जेव्हां जेव्हां—**धर्मस्य**—धर्माची—**ग्लानिः**—हानि—**भवति**—होते—**च**—व—**अधर्मस्य**—अधर्माचा—**अभ्युत्थानं**—उद्भव होतो—**तदा**—त्यावेळी—**अहं**—मी-कूटस्थ आत्मा—**आत्मानं**—स्वतःला—**सृजामि**—उत्पन्न करितों. ७

**तच्च जन्म कदा किमर्थं चेत्युच्यते—यदेति। यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्हानिर्वर्णाश्रमादिलक्षणस्य प्राणिनामभ्युदयनिःश्रेयससाधनस्य भवति भारत, अभ्युत्थानमुद्भवोऽधर्मस्य तदाऽऽत्मानं सृजाम्यहं मायया ॥ ७ ॥**

**भाष्यार्थ—तत् च जन्म कदा किमर्थं च इति 'यदेति०' उच्यते**—आणि तो माझा मायिक जन्म केव्हां होतो व कशासाठी होतो ते 'यदा०' या श्लोकानें सांगितलें जातें—**यदा यदा हि**—ज्या ज्या वेळीं—**प्राणिनां-अभ्युदयनिःश्रेयससाधनस्य वर्णाश्रमादिलक्षणस्य धर्मस्य ग्लानिः हानिः भवति**—प्राण्यांच्या अभ्युदयाचें व निःश्रेयसाचे साधन अशा वर्णाश्रमादिलक्षण-म्ह० सर्व वर्ण, आश्रम, त्यांचे आचार यांवरून ज्ञात होणाऱ्या धर्माची ग्लानि म्ह० हानि होते,—**च हे भारत अधर्मस्य अभ्युत्थानं-उद्भवः भवति**—आणि हे अर्जुना ! अधर्माचें अभ्युत्थान म्ह० उद्भव होतो—**तदा अहं आत्मानं मायया सृजामि**—त्यावेळीं मी आपल्याला मायेने उत्पन्न करतों. [ वर्ण, आश्रम, त्यांचा आचार यांवरून ज्ञात होणाऱ्या धर्माची हानि झाली असतां लोक पुरुषार्थहीन होतात व त्याची प्रवृत्ति अधर्माकडे होते, अशा वेळीं मी मायेनें शरीरधारण करतो. ] ७.

---

सभवतें तरी कसें ? प्रकृति, अव्यक्त, पुरुष, महत्तत्त्व, विकार इत्यादि शब्द जेथें जेथे दिसतील तेथें तेथें रहस्यकारांस सांख्यदर्शनाची आठवण जरी होत असली तरी तेवढ्यावरून गीतेंत निरीश्वरवादी सांख्यदर्शनाचाच अनुवाद भगवान् श्रीकृष्ण किंवा व्यास यांनी केला, अशी कल्पना करणेंही उचित दिसत नाहीं. सांख्यदर्शनकारांनीच प्रकृति, अव्यक्त, पुरुष वगैरे शब्द उपनिषदातून घेऊन त्यांचाच स्वतःला अभिप्रेत असलेल्या अर्थी उपयोग केला आहे. गीता कोणत्याही एखाद्या दर्शनाला अनुसरते असे म्हणण्यापेक्षा ती उपनिषदाना अनुसरते असें म्हणणे अधिक सयुक्तिक होय. त्यामुळेंच तिला अधिक प्रामाण्य येतें. रहस्यकारांनीं गीता व उपनिषदे यांतील भेद परिशिष्ट भाग २ पृ. ५२१-२७ येथें दाखविण्याचा यत्न केला आहे. पण त्याचा विचार आम्ही पुढें करू. अर्थात् गीतेंत आलेले प्रकृति, अव्यक्त, माया, पुरुष, क्षेत्र, क्षेत्रज्ञ वगैरे शब्द मूळ उपनिषदातील असून गीता सर्वथा उपनिषदांस अनुसरते. ती कापिल सांख्यदर्शनास अनुसरत नाहीं. येथील 'प्रकृतिशब्द' सांख्यांच्या प्रकृतीचा वाचक नाहीं हे 'स्वां' या विशेषणावरूनच सिद्ध होतें. सांख्यांची प्रकृति स्वतंत्र आहे. ईशपरतंत्र नाहीं. पण येथें 'स्वां' म्ह० आपल्या-माझ्या अधीन असलेल्या प्रकृतीला असें भगवानच म्हणत आहेत. यास्तव रहस्यकारांची वरील कल्पना अयोग्य आहे.

**परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् ।**
**धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥ ८ ॥**

**अन्वयार्थ—साधूनां**—सन्मार्गस्थांचे—**परित्राणाय**—सर्व प्रकारें रक्षण करण्याकरितां—**च**—व—**दुष्कृतां**—पाप्यांचा—**विनाशाय**—विनाश करण्याकरितां आणि—**धर्मसंस्थापनार्थाय**—धर्माची उत्तम प्रकारे स्थापना करण्याकरितां मी—**युगे युगे**—दर युगांत—**संभवामि**—उत्पन्न होतों. ८.

**किमर्थं परित्राणायेति । परित्राणाय परिरक्षणाय साधूनां सन्मार्गस्थानां विनाशाय च दुष्कृतां पापकारिणाम् । किं च धर्मसंस्थापनार्थाय धर्मस्य सम्यक्स्थापनं तदर्थं संभवामि युगे युगे प्रतियुगम् ॥ ८ ॥**

**भाष्यार्थ—किमर्थं 'परित्राणाय०' इति**—कृतकृत्य असलेला तूं तो मायिक जन्म तरी कशासाठी घेतोस ? या प्रश्नाचे उत्तर 'परित्राणाय०' या श्लोकानें देतात.—**साधूनां-सन्मार्गस्थानां परित्राणाय-परिरक्षणाय**—साधूंच्या म्ह० सन्मार्गस्थांच्या परित्राणासाठी-सर्व प्रकारे रक्षण करण्यासाठी—**च दुष्कृतां पापकारिणां विनाशाय**—आणि दुष्कृत म्ह० पापाचरण करणाऱ्यांच्या विनाशासाठी—**अहं धर्मसंस्थापनार्थाय-धर्मस्य सम्यक् स्थापनं तदर्थं**—आणि धर्मस्थापनेसाठी धर्माचें जें सम्यक्-उत्तम प्रकारें स्थापन त्यासाठी—**युगे युगे-प्रतियुगं संभवामि**—मी प्रत्येक युगांत उत्पन्न होतो. [ धर्माची स्थापना केल्याने जगाचीच स्थापना के-

१ रहस्यकार ७-८ या श्लोकावरील टीपेत म्हणतात—" या दोन्ही श्लोकात 'धर्म-' शब्दाचा अर्थ केवळ पारलौकिक वैदिक धर्म असा नाही. चातुर्वर्ण्याचे धर्म, न्याय, नीति वगैरे गोष्टींचाच त्यांत मुख्यत्वेकरून समावेश होतो. जगात अन्याय, अनीति, दुष्टपणा, व बेबंदशाही माजून साधूंचा छल व दुष्टांचे वर्चस्व झाले म्हणजे आपण निर्माण केलेल्या जगाची सुस्थिति कायम राहून त्याचे कल्याण व्हावें म्हणून तेजस्वी व पराक्रमी पुरुषाच्या रूपानें ( गीता १०-४१ ) अवतार घेऊन भगवान् समाजाची विस्खलित झालेली घडी पुनः नीट बसवून देत असतात, असे या श्लोकाचे तात्पर्य आहे. " येथील धर्मशब्दाचा केवळ पारलौकिक वैदिक धर्म असा अर्थ नव्हे, हे म्हणणे अगदी अयोग्य आहे. कारण भगवानांचा अवतार वैदिकधर्माच्या संस्थापनेसाठी होतो, हे आबालवृद्धास माहित आहे. अवताराची पौराणिक कल्पना धर्मसंस्थापनेसाठी आहे. साधूंचे रक्षण व पाप्यांचा नाश ही दोन कार्यें धर्मसंस्थापनेच्या अनुषंगाने करावी लागतात. प्राधान्याने नव्हे वास्तव रहस्यकारांचे हे म्हणणें वैदिकसंप्रदायाला अगदी सोडून आहे. 'चातुर्वर्ण्याचे धर्म' व 'वैदिक पारलौकिक धर्म' यात काय फरक आहे. ? चातुर्वर्ण्याचे धर्म व न्याय, नीति वगैरे यांची बरोबरी कशी संभवते ? तिसऱ्या वाक्यात तर चातुर्वर्ण्याचे धर्मही जाऊन जगांत अन्याय, अनीति, दुष्टपणा, बेबंदशाही माजणे हेंच भगवानाच्या अवताराचें कारण ठरविलें आहे. भगवान् स्वतः शरीर ग्रहण न करितां 'तेजस्वी व पराक्रमी पुरुषाच्या रूपानें अवतार घेतात

त्यासारखें होतें. नाहीं तर धर्ममर्यादेने रहित असलेलें जगत् पुरुषार्थापासून च्युत होईल. ) ८.

**जन्म कर्म च मे दिव्यमेवं यो वेत्ति तत्त्वतः ।**
**त्यक्त्वा देहं पुनर्जन्म नैति मामेति सोऽर्जुन ॥ ९ ॥**

**अन्वयार्थ**—**यः**—जो—**मे**—माझा—**एवं**—वर सांगितलेल्या प्रकारचा—**दिव्यं**—अलौकिक—**जन्म च कर्म**—जन्म व कर्म—**तत्त्वतः**—अगदीं बरोबर—**वेत्ति**—जाणतो तो—**देहं**—देहाला—**त्यक्त्वा**—टाकून—**पुनर्जन्म**—पुनर्जन्मास—**न एति**—प्राप्त होत नाहीं, तर—**हे अर्जुन**—हे अर्जुना—**सः**—तो—**मां**—मला—**एति**—प्राप्त होतो. ९.

---

व समाजाची घडी नीट बसवितात,' वगैरे या सर्व कल्पना असांप्रदायिक तर आहेतच, पण अयोग्यही आहेत. कारण मग स्वतः श्रीकृष्ण हा अवतारही अशाच स्वरूपाचा ठरणार! अर्जुनाला गीता सांगणारे भगवान् ' वसुदेवपुत्र ' या एका तेजस्वी व पराक्रमी पुरुषाच्या रूपानें अवतीर्ण झाले आहेत, असें म्हणावें लागणार! दहाव्या अध्यायाच्या ४१ व्या श्लोकात सांगितल्याप्रमाणे जर अवताराचा निश्चय करावयाचा असेल तर वसुदेवाचा पुत्र मात्र अवतार व स्वतः अर्जुन, धर्म, कर्ण विकर्ण,भीष्म हे अवतार का नव्हेत ? तेजस्वी पराक्रमी पुरुष पुष्कळ असतात. पण त्यातील प्रत्येकाला अवतार म्हणू लागल्यास फारच अनवस्था होईल यास्तव अशा असत् कल्पना न करिता जेव्हा श्रुति-स्मृति-पुराणोक्त धर्माची हानि होऊन निषिद्ध आचरणाला ऊत येतो व त्यामुळे सन्मार्गवर्ती धार्मिकांचा छळ होतो तेव्हाच भगवान् स्वतः मनुष्यशरीर धारण करितात, अशी कल्पना करणे सर्वथा सयुक्तिक आहे. जगाची सुस्थिति कायम राहून त्याचे कल्याण होण्याचा उपाय ' सनातन वैदिक धर्माची संस्थापना ' हा एकच आहे त्यात दुसऱ्या सर्व चांगल्या गोष्टींचा अनायासानें अन्तर्भाव होतो. रहस्यकार पुनः म्हणतात—" अशा रीतीनें अवतार घेऊन भगवान् जे काम करितात त्याचेंच 'लोकसंग्रह' हे दुसरे नाव आहे व हेच काम आत्मज्ञानी पुरुषांनीही यथाशक्ति यथाधिकार केलें पाहिजे (गी. ३.२०)" अर्थात् ' लोकसंग्रह म्ह० भगवान् अवतार घेऊन जें करितात तें करणे व आत्मज्ञानी पुरुषांनीही ते केले पाहिजे !' बिचाऱ्या आत्मज्ञानी पुरुषांवर हा मोठाच जुलूम आहे. ते आत्मसाक्षात्काराने कृतकृत्य व नित्यतृप्त जरी झालेले असले तरी त्यांनी जगांतील अन्याय, अनीति, दुष्टपणा, बेबदशाही वगैरे घालविण्याचा प्रयत्न यथाशक्ति व यथाधिकार केलाच पाहिजे. फार उत्तम; रहस्यकारांच्या अशा जुलमांत सांपडणाऱ्या अभागी आत्मज्ञानी पुरुषांची खरोखरच कींव केली पाहिजे. पण वेदान्तशास्त्र किंवा प्रत्यक्ष गीताहि आत्मरति, आत्मतृप्त, व ' आत्मनि एव संतुष्ट ' झालेल्या पुरुषांवर असा कोणत्याही प्रकारचा भार लादीत नाहीं. लोकसंग्रह म्ह० काय व तो कोणी करावा याचा विचार तिसऱ्या अध्यायांत होऊन गेलाच आहे, म्हणून येथें त्याची पुनरुक्ति करीत नाहीं.

तत्—जन्मेति । जन्म मायारूपं, कर्म च साधुपरित्राणादि, मे मम दिव्यमप्राकृतमैश्वरमेवं यथोक्तं यो वेत्ति तत्त्वतस्तत्त्वेन यथावत्त्यक्त्वा देहमिमं पुनर्जन्म पुनरुत्पत्तिं नैति न प्राप्नोति मामेत्यागच्छति स मुच्यते हेऽर्जुन ॥ ९ ॥

**भाष्यार्थ—तत् ' जन्म० ' इति**—आणि तो माझा जन्म व कर्म जो जाणतो त्याला कोणतें फल प्राप्त होतें तें ' जन्म कर्म च० ' या श्लोकानें भगवान् सांगतात—**मे-मम तत् मायारूपं जन्म च साधुपरित्राणादि कर्म**—माझें तें मायारूप जन्म व साधुपरित्राणादिक कर्म ( ते कसें ? उत्तर-)—**दिव्यं-अप्राकृतं-ऐश्वरं**—दिव्य म्ह० अप्राकृत ईश्वराचें ( अलौकिक ) जन्म-कर्म—**एवं-यथोक्तं**—असें म्ह० वर वर्णन केल्याप्रमाणें मायामय-कल्पित आहे असे—**यः-तत्त्वतः-तत्त्वेन-यथावत् वेत्ति**—जो तत्त्वतः म्ह० तत्त्वानें जसे आहे तसे अगदीं बरोबर जाणतो—**सः इमं देहं त्यक्त्वा पुनर्जन्म-पुनरुत्पत्तिं न एति-न प्राप्नोति**—तो या देहाला सोडून पुनर्जन्माला म्ह० पुनरुत्पत्तीला प्राप्त होत नाहीं.—**हे अर्जुन मां एति-आगच्छति-मुच्यते**—हे अर्जुना ! तो मला प्राप्त होतो म्ह० मुक्त केला जातो. [ईश्वराचा जन्म मायामय आहे खरा नव्हे, जगत्परिपालन हे त्याचेच कर्म आहे, दुसऱ्या कोणाचें नव्हे, असे जाणणाऱ्याला श्रेयःप्राप्ति होते. पण याच्या उलट ईश्वराचा जन्म खराच आहे व जगत्परिपालनादि कर्म क्षत्रियाचे आहे, असे जो जाणतो त्याच्या जन्मादि संसाराची परंपरा तुटत नाहीं, असा भावार्थ. अर्थात् रहस्यकार-' लोकसंग्रह ' या शब्दाचा अर्थ जगाचें धारण, पोषण, पालन वगैरे करणे हे ज्ञानी पुरुषाचे कर्म आहे,-असे जे म्हणतात तें कसे अप्रामाणिक आहे ते यावरून उघड होते. ] ९.

---

१ या श्लोकावरील टीपेंत रहस्यकार म्हणतात-" भगवताचे दिव्य जन्म समजण्यास अव्यक्त परमेश्वर मायेनें सगुण कसा होतो, हे कळावे लागते व हे कळले म्हणजे अध्यात्मज्ञान होतें. " ( अध्यात्मज्ञानाची ही बरी सोपी युक्ति आहे ! ) " आणि दिव्य कर्म कळले ह्म० कर्म करूनही अलिप्त रहाण्याचे ह्म० निष्काम कर्माच्या तत्त्वाचे ज्ञान होतें, " ( पण दिव्य जन्म म्ह० अलौकिक मायिक जन्म, व दिव्य कर्म ह्म० साधूचें रक्षण, पाप्याचा नाश व धर्माची संस्थापना हे अलौकिक कर्म आहे. अर्थात ईश्वराचा जन्म व कर्म सामान्य जीवांच्या जन्म-कर्माप्रमाणे प्रारब्धाधीन नाहीं, हें येथें समजावयाचें आहे. पण तेवढे ज्ञान झाल्याने अध्यात्मज्ञान व निष्काम कर्माचे तत्त्व कसें कळणार ? साधुसरक्षणादि हें ईश्वराचें कर्म आहे, असें ज्ञान झाल्याने कर्म करूनही अलिप्त राहण्याचें तत्त्व कसें कळणार ? ) " सारांश परमेश्वराचे दिव्य जन्म व दिव्य कर्म पूर्ण कळलें म्हणजे अध्यात्मज्ञान व कर्मयोग या दोहोंचीही पूर्ण ओळख होते. " ( हा अपूर्व शोध आहे ! ) " व मोक्षप्राप्ति होण्यास हेंच लागत असल्यामुळे अशा मनुष्यास अखेर भगवत्प्राप्ति झाल्याखेरीज रहात नाहीं. " ( मोक्षप्राप्ति एवढ्यानेंच होणें शक्य नाहीं. आत्मसाक्षात्कारच झाला पाहिजे. ) " अर्थात् भगवंताचे दिव्य जन्म व दिव्य कर्म कळलें ह्म० त्यांत सर्व कांहीं आलें. अध्यात्मज्ञान किंवा निष्काम कर्मयोग या दोहोंचेंही निराळें अध्ययन करावयास नको." (हा शुद्ध भ्रम आहे. श्रवणादिकांवांचून अध्यात्मज्ञान होणें शक्य नाहीं

**वीतरागभयक्रोधा मन्मया मामुपाश्रिताः ।**
**बहवो ज्ञानतपसा पूता मद्भावमागताः ॥ १० ॥**

**अन्वयार्थ—वीतरागभयक्रोधाः**—विषयासक्ति, भय व क्रोध ज्यांच्यापासून निघून गेले आहेत असे—**मन्मया**—ईश्वरमय झालेले, ईश्वराहून मी भिन्न आहें, असें न समजणारे—**मां उपाश्रिताः**—माझाच पूर्ण आश्रय केलेले–केवळ ज्ञाननिष्ठ असे —**बहवः**—अनेक लोक आजवर—**ज्ञानतपसा**—ईश्वराचें ज्ञान याच तपानें—**पूताः**—पवित्र झालेले—**मद्भावं**—माझ्या भावास–माझ्या स्वरूपास–मोक्षास—**आगताः**—प्राप्त झाले आहेत. १०

**नैष मोक्षमार्ग इदानीं प्रवृत्तः किं तर्हि पूर्वमपि—वीतरागेति । वीतरागभयक्रोधा रागश्च भयं च क्रोधश्च वीता विगता येभ्यस्ते वीतरागभयक्रोधा मन्मया ब्रह्मविद ईश्वराभेददर्शिनो मामेव परमेश्वरमुपाश्रिताः केवलज्ञाननिष्ठा इत्यर्थः । बहवोऽनेके ज्ञानतपसा ज्ञानमेव च परमात्मविषयं तपस्तेन ज्ञानतपसा पूताः परां शुद्धिं गताः सन्तो मद्भावमीश्वरभावं मोक्षमागताः समनुप्राप्ताः । इतरतपोनिरपेक्षज्ञाननिष्ठा इत्यस्य लिङ्गं ज्ञानतपसेति विशेषणम् ॥ १० ॥**

**भाष्यार्थ—एषः मोक्षमार्गः न इदानीं प्रवृत्तः**—हा मोक्षमार्ग आतां नवीन प्रवृत्त झाला आहे, असें नाहीं.—**किं तर्हि पूर्वं अपि ( इति ) 'वीतराग०' इति** —तर काय पूर्वींही–फार दिवसापासून हा असाच प्रवृत्त झाला आहे,असें ' वीतराग०' या श्लोकानें सांगतात—**वीतरागभयक्रोधाः-रागः च भयं च क्रोधः च वीताः -विगताः येभ्यः ते वीतरागभयक्रोधाः**—राग-प्रीति, भय व क्रोध ज्यांच्या-पासून वीत म्ह० अगदीं निघून गेले आहेत ते वीतरागभयक्रोध होत.—**मन्मयाः -ब्रह्मविदः ईश्वराभेददर्शिनः**—मन्मय म्ह० ब्रह्मवेत्ते ईश्वर व जीवात्मा यांचा अ-भेद–ऐक्य पाहणारे—**मां-परमेश्वरं एव उपाश्रिताः केवल ज्ञाननिष्ठाः इत्य-र्थः**—मज परमेश्वराचाच पूर्णपणें आश्रय केलेले म्ह० केवल ज्ञाननिष्ठ असा याचा

व निष्काम कर्मयोगाचें अध्ययन केव्हांच करावयाचें नसून आचरण करावयाचें असतें ) " म्हणून भगवताच्या जन्माचा व कृत्याचा विचार करा व त्यातील तत्त्व ओळखून वागा म्ह० भगवत्प्राप्ति होण्यास दुसरें कांहीं साधन नको भगवताची खरी उपासना हीच होय." (भगवताचा दिव्य जन्म व कर्म यांना तत्त्वतः जाणणें ही उपासना नव्हे. यांतील खरें रहस्य असें आहे कीं भगवान् वासुदेव हाच माझा आत्मा आहे. त्यामुळे त्याचा म्ह० माझ्या आत्म्याचा जन्म मायिक आहे, खरा नव्हे व कर्महि माझें नव्हे, शरीरेंद्रियांचें आहे, असें जाणणें हें खरें आत्मज्ञान आहे व तें ज्ञान ज्याला होतें तो प्रस्तुत देह टाकल्यावर पुनः जन्म घेत नाहीं, हें योग्यच आहे. पण ' भगवत्प्राप्ति होण्यास दुसरें कांहीं साधन नको. फक्त भगवताचा जन्म व कर्म यांचा विचार करा व त्यांतील तत्त्व ओळखून वागा म्हणजे झालें, ' हें म्हणणें मात्र तसें सयुक्तिक नाहीं. )

भावार्थ.—**बहवः-अनेके**—असे पुष्कळ मुमुक्षु—**ज्ञानतपसा-ज्ञानं एव परमात्मविषयं तपः तेन ज्ञानतपसा पूताः परां शुद्धिं गताः सन्तः**—ज्ञानतपानें-परमात्मविषयक ज्ञान हेंच तप, त्या ज्ञानतपानें पावन झालेले-परम शुद्धीस प्राप्त झालेले असे होत्साते—**मद्भावं-ईश्वरभावं मोक्षं आगताः-समनुप्राप्ताः**—माझ्या भावास-ईश्वरभावास-मोक्षास आले-प्राप्त झाले आहेत. ( अहो पण केवल ज्ञाननिष्ठत्व सांगून ज्ञानतपाने पावन झालेले असें पुनः कां म्हटलें आहे ? )—**ज्ञानतपसा इति विशेषणं इतरतपोनिरपेक्षज्ञाननिष्ठाः इति अस्य लिंगम्**—' ज्ञानतपसा ' हें विशेषण इतर तपाची अपेक्षा न करितां ज्ञान याच तपामध्यें निष्ठा ठेवून राहणारे, असे सुचविण्यासाठीं आहे. १०.

**ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम् ।**
**मम वर्त्मानुवर्तन्ते मनुष्याः पार्थ सर्वशः ॥११॥**

**अन्वयार्थ—ये**—जे लोक—**मां**—मला—**यथा**—ज्याप्रकारें—**प्रपद्यन्ते**—भजतात—**तान्**—त्यांस—**तथा एव**—तसाच—**अहं**—मी—**भजामि**—भजतो. तसाच त्यांवर अनुग्रह करतो.—**(हे) पार्थ**—हे अर्जुना!—**मनुष्याः**—मानव—**सर्वशः**—सर्वप्रकारें—**मम**—माझ्या—**वर्त्म**—मार्गास—**अनुवर्तन्ते**—अनुसरतात.

**तव तर्हि रागद्वेषौ स्तः, येन केभ्यश्चिदेवाऽऽत्मभावं प्रयच्छसि न सर्वेभ्य इत्युच्यते—ये यथेति । ये यथा येन प्रकारेण येन प्रयोजनेन यत्फलार्थितया मां प्रपद्यन्ते तांस्तथैव तत्फलदानेन भजाम्यनुगृह्णाम्यहमित्येतत् । तेषां मोक्षं प्रत्यनर्थित्वात् । न ह्येकस्य मुमुक्षुत्वं फलार्थित्वं च युगपत्संभवति । अतो ये फलार्थिनस्तान्फलप्रदानेन । ये यथोक्तकारिणस्त्वफलार्थिनो मुमुक्षवश्च तान्ज्ञानप्रदानेन, ये ज्ञानिनः संन्यासिनो मुमुक्षवश्च तान्मोक्षप्रदानेन, तथाऽऽर्तानार्तिहरणेनेत्येवं यथा प्रपद्यन्ते ये तांस्तथैव भजामीत्यर्थः । न पुना रागद्वेषनिमित्तं मोहनिमित्तं वा कंचिद्भजामि । सर्वथाऽपि सर्वावस्थस्य ममेश्वरस्य वर्त्म मार्गमनुवर्तन्ते मनुष्याः । यत्फलार्थितया यस्मिन्कर्मण्यधिकृता ये प्रयतन्ते ते मनुष्या उच्यन्ते हे पार्थ सर्वशः सर्वप्रकारैः ॥ ११ ॥**

**भाष्यार्थ—तर्हि तव रागद्वेषौ स्तः**—तर मग तुला राग व द्वेष आहेत !—**येन केभ्यश्चित् एव आत्मभावं प्रयच्छसि न सर्वेभ्यः इति 'ये यथा०' इति उच्यते**—कारण तूं कांहीं लोकानाच आत्मभाव देतोस, सर्वास देत नाहींस, अशी शंका

---

१ हा श्लोक महत्त्वाचा असतांना रहस्यकारांनीं त्या सबधानें एक अक्षरही लिहिलें नाहीं. कारण त्यांत " ज्ञानतपानें परम शुद्ध होऊन पुष्कळ लोक मोक्षाला प्राप्त झाले आहेत " असें म्हटलें आहे. कर्माचें नांवही नाहीं, त्यामुळे लेखणी अडली !

कोणी घेईल, म्हणून ' ये यथा० ' या श्लोकानें सांगतात—**ये यथा-येन प्रकारेण येन प्रयोजनेन यत्फलार्थितया मां प्रपद्यन्ते**—जे जसे म्ह० ज्या प्रकारें, ज्या प्रयोजनानें व ज्या फलाच्या इच्छेनें मला भजतात—**अहं तान् तथा एव-तत्फलदानेन भजामि-अनुगृह्णामि इति एतत्**—मी त्यांना तसाच तें फल देऊन भजतों म्हणजे अनुग्रह करतों, असा याचा भावार्थ.—**तेषां मोक्षं प्रति अनर्थित्वात्**—कारण त्यांना मोक्षाविषयीं इच्छाच नसते [ कारण जे मुमुक्षु होऊन माझें भजन करितात त्यांना ज्ञानाच्या द्वारा मी मोक्ष देतों व जे इतर फलाची इच्छा धरून माझें भजन करतात त्यांना त्या त्या उपायाच्या अनुष्ठानाचें तें ते फल देतो. त्यामुळे माझ्यामध्ये रागद्वेषाचा संभवही नाहीं. जे इतर फलाची इच्छा करणारे असतात त्यांना मोक्षाची इच्छा नसते ]—**हि एकस्य मुमुक्षुत्वं फलार्थित्वं च युगपत् न संभवति**—कारण एकाच पुरुषाला मुमुक्षुत्व व फलार्थित्व हीं दोन्हीं एकाच वेळीं संभवत नाहींत.—**अतः ये फलार्थिनः तान् फलप्रदानेन**—म्हणून जे फलाची इच्छा करणारे आहेत त्यांना फलप्रदानाच्या योगानें—**तु ये यथोक्तकारिणः अफलार्थिनः मुमुक्षवः च तान् ज्ञानप्रदानेन**—पण जे नित्यनैमित्तिक कर्मानुष्ठान करणारे

---

१ पण रहस्यकार या श्लोकाला असे अवतरण देतात—"आता यापेक्षा खालच्या उपासनाचे फळ व उपयोग सांगतात—" वर उपासना प्रकृत नाहीं. ज्ञान प्रकृत आहे. ज्ञानाचे प्रकरण चालू आहे. 'माझे दिव्य जन्म-कर्म जो जाणतो तो पुनः जन्म घेत नाहीं. अशी ज्ञानरूपी तपाने पवित्र झालेले पुष्कळ मुमुक्षु मला प्राप्त झाले आहेत ' असा या पूर्वीच्या दोन श्लोकाचा सारांश आहे. पण रहस्यकारांनी मधल्या दहाव्या श्लोकाची पूर्णपणे उपेक्षा करून ९ व्या श्लोकातील भगवानाच्या दिव्य जन्मकर्मांचें तत्त्वतः ज्ञान ' हीच भगवताची खरी उपासना होय' असें जे म्हटले होतें त्याच्याशीं या श्लोकाचा संबंध जोडला आहे. पण तो सयुक्तिक नाहीं. कारण नवव्या श्लोकात जर उपासना मुळीच नाहीं तर त्यापेक्षा खालच्या उपासनांचे फल व उपयोग सांगण्याचा प्रसंगच कोठे आहे ? यास्तव आचार्यांनीं दिलेले अवतरणच सर्वथा योग्य आहे. असो. 'मम वर्त्म अनुवर्तन्ते' याचा अर्थ—माझ्याच मार्गाला येऊन मिळत असतात—असा करितात. पण 'अनुवर्तन्ते' याचा हा सरळ अर्थ नव्हे. याच श्लोकावरील टीपेंत रहस्यकार म्हणतात " मम वर्त्मानुवर्तन्ते हे उत्तरार्ध पूर्वी (३. २३.) थोड्या निराळ्या अर्थाने आले आहे व त्यावरून गीतेंत पूर्वापर संदर्भाप्रमाणे अर्थ कसा बदलतो हे लक्षांत येईल. " प्रकरण, सांनिध्य इत्यादिकांवरून शब्दांचे अर्थ बदलतात ही गोष्ट पूर्वोत्तर मीमांसामध्ये प्रसिद्धच आहे. त्यामुळे आम्हालाही ती कबूल आहे. पण रहस्यकार मात्र कर्म, योग, प्रकृति इत्यादि शब्दाचा अर्थ करताना ती विसरतात, ही मोठी खेदाची गोष्ट आहे. गीतेंत ' योग ' शब्द दिसला की, त्याचा ' कर्मयोग ' असा अर्थ रहस्यकारांनी केलाच ! ' कर्म ' शब्द आला की, खाणे, पिणें, बसणें, उठणें, धंदा, सांसारिक कर्मे वगैरे अर्थ त्यांनीं केलाच म्हणून समजावें. प्रकृति, अव्यक्त वगैरे शब्द दिसले की त्यांना कापिल सांख्य दर्शनाची आठवण झालीच ! अशा प्रसंगीं ते प्रकरणादिकांकडे मुळीच पहात नाहींत.

असून कर्मफलाची इच्छा न करणारे व मुमुक्षु असतात त्यांस ज्ञानप्रदानानें—**ये ज्ञानिनः संन्यासिनः मुमुक्षवः च तान् मोक्षप्रदानेन**—जे ज्ञानी सर्व कर्मांचा संन्यास करून केवल मोक्षाचीच अपेक्षा करणारे असतात त्याना मोक्षप्रदानानें—**तथा आर्तान् आर्तिहरणेन**—त्याचप्रमाणें जे रोग, भय, यांनी आर्त असतात त्यांची आर्ति -पीडा घालवून—**इति एवं ये यथा प्रपद्यन्ते तान् तथा एव भजामि इत्यर्थः**—ह्याप्रमाणे जे जसे शरण येतात त्यांच्यावर मी तसाच अनुग्रह करतो, असा याचा भावार्थ.—**पुनः रागद्वेषनिमित्तं मोहनिमित्तं वा कंचित् न भजामि**—पण राग-द्वेषामुळे किंवा मोहामुळे मी कोणावरही अनुग्रह करीत नाही.—**सर्वथा अपि सर्वावस्थस्य मम ईश्वरस्य वर्त्म-मार्गं मनुष्याः अनुवर्तन्ते**—मनुष्य मुमुक्षु असोत की फलेच्छु असोत ते कोणीही जरी असले तरी प्रत्येक अवस्थेमध्ये त्या त्या रूपानेंच अवस्थित होणाऱ्या मज ईश्वराच्या ज्ञान-कर्मरूप मार्गास ते अनुसरतात. ( पण येथें 'मनुष्य' असें म्हटल्याने देवादि इतर प्राणी ईश्वरमार्गानुवर्ती नाहीत, असें होते, अशी शंका घेऊन आचार्य सागतात-)—**यत्फलार्थितया यस्मिन् कर्मणि अधिकृताः ये प्रयतन्ते ते मनुष्याः उच्यन्ते**—ज्या फलाच्या अर्थित्वानें-इच्छेनें ज्या कर्मामध्ये अधिकृत असलेले जे प्रयत्न करितात ते मनुष्य म्हटले जातात;—**हे पार्थ सर्वशः सर्वप्रकारैः**—हे अर्जुना! 'सर्वश.' म्ह० सर्वप्रकारें मनुष्य माझ्या ज्ञानकर्मरूप मार्गाचे अनुवर्तन करितात. [जे जशा भावनेने माझी भक्ति करितात तसाच मी त्याच्यावर अनुग्रह करितो. अर्थात् मी राग, द्वेष व मोह याना वश होऊन काहीं करीत नाही. सर्व मनुष्य सर्व प्रकारें माझ्याच ज्ञानकर्ममार्गाचे अनुवर्तन करितात. ] ११.

काङ्क्षन्तः कर्मणां सिद्धिं यजन्त इह देवताः।
क्षिप्रं हि मानुषे लोके सिद्धिर्भवति कर्मजा ॥ १२ ॥

**अन्वयार्थ—कर्मणां**—कर्माच्या—**सिद्धिं**—सिद्धीची—**कांक्षन्तः**—आकांक्षा-इच्छा करणारे अधिकारी पुरुष—**इह**—या लोकीं—**देवताः**—इंद्र, अग्नि, इत्यादि देवतांची—**यजन्ते**—पूजा करितात—**हि**—कारण—**मानुषे लोके**—या मनुष्य लोकांत—**कर्मजा सिद्धिः**—कर्मापासून होणारी सिद्धि-कर्मफलें—**क्षिप्रं**—सत्वर—**भवति**—होते-कर्मफलें सत्वर मिळतात. १२.

**यदि तवेश्वरस्य रागादिदोषाभावात्सर्वप्राणिष्वनुजिघृक्षायां तुल्यायां सर्वफलप्रदानसमर्थे च त्वयि सति वासुदेवः सर्वमिति ज्ञानेनैव मुमुक्षवः सन्तः कस्मात्त्वामेव सर्वे न प्रतिपद्यन्त इति शृणु तत्र कारणम्—काङ्क्षन्त इति । काङ्क्षन्तोऽभीप्सन्तः कर्मणां सिद्धिं फलनिष्पत्तिं प्रार्थयन्तो यजन्त इहास्मिँल्लोके देवता इंद्राग्न्याद्याः " अथ योऽन्यां देवतामुपास्तेऽन्योऽसावन्योऽहमस्मीति न स वेद यथा पशुरेवं स देवानाम् "**

**इति श्रुतेः। तेषां हि भिन्नदेवतायाजिनां फलाकाङ्क्षिणां क्षिप्रं शीघ्रं हि यस्मान्मानुषे लोके, मनुष्यलोके हि शास्त्राधिकारः। क्षिप्रं हि मानुषे लोक इति विशेषणादन्येष्वपि कर्मफलसिद्धिं दर्शयति भगवान्। मानुषे लोके वर्णाश्रमादिकर्माणीति विशेषः तेषां वर्णाश्रमाद्यधिकारिकर्मणां फलसिद्धिः क्षिप्रं भवति कर्मजा कर्मणो जाता ॥ १२ ॥**

**भाष्यार्थ—यदि तव ईश्वरस्य रागादिदोषाभावात्**—जर तुज ईश्वराला राग-द्वेषादि दोष नाहीत, तुझ्या ठिकाणीं जर त्यांचा अभाव आहे—**सर्वप्राणिषु अनुजिघृक्षायां तुल्यायां**—त्यामुळें सर्व प्राण्यांवर अनुग्रह करण्याची इच्छाही एकसारखीच आहे—**च त्वयि सर्वफलप्रदानसमर्थे सति**—व तूं सर्व फल देण्यास म्ह० सर्वांना मोक्ष हे फल देण्यास समर्थ असतांना—**वासुदेवः सर्वं इति ज्ञानेन एव मुमुक्षवः सन्तः**—'वासुदेवच सर्व आहे' अशा ज्ञानानेच मुक्त होण्याची इच्छा करणारे होत्साते—**सर्वे त्वां एव कस्मात् न प्रतिपद्यन्ते**—सर्व तुलाच कां शरण येत नाहीत?—**इति तत्र कारणं 'कांक्षन्तः०' इति शृणु**—म्हणून म्हणशील तर त्याचे कारण 'कांक्षन्तः' या श्लोकाने ऐक.—**कांक्षन्तः-अभीप्सन्तः**—आकांक्षा करणारे—**कर्मणां सिद्धिं फल-निष्पत्तिं प्रार्थयन्तः**—कर्मांच्या सिद्धीची म्ह० फलनिष्पत्तीची इच्छा करणारे—**इह अस्मिन् लोके इन्द्राग्न्याद्याः देवताः यजन्ते**—या लोकीं इंद्र, अग्नि इत्यादि देवतांचे यजन करितात.—"**अथ यः अन्यां देवतां अन्यः असौ अन्यः अहं अस्मि इति उपास्ते**—आतां जो अन्य देवतेची उपासना 'हा निराळा व मी निराळा आहे' या भेददृष्टीने करतो—**सः न वेद**—जो जाणत नाहीं.—**यथा पशुः एवं सः देवानां**—जसा आम्हाला पशु तसा तो देवांना आहे.—**इति श्रुतेः**—अशी श्रुति आहे. [ बृह. भाष्यार्थ अ १ पृ. ३३४ पहा. या श्रुतींत मी यज्ञकर्ता, ही यष्टव्य देवता इत्यादि भेददर्शी व कर्मफलाची इच्छा करणाऱ्या लोकांना आत्मस्वरूपाचे ज्ञान नसते. आत्म्याविषयीं अज्ञान हेच त्यांच्या भेददृष्टीचें व फलेच्छेचें कारण आहे. बैल, गाई वगैरे पशु, नांगर, गाडा ओढणें, भार वाहणें, दूध देणें इत्यादिकामुळे मनुष्यांच्या जसे उपयोगी असतात तसा तो अज्ञ यज्ञादिकांच्या योगानें देवांच्या उपयोगीं पडतो. पण ते भेददर्शी व फलाची इच्छा करणारेच कां असतात? ज्ञानमार्गाची अपेक्षा कां करीत नाहीत? उत्तर-]—**हि यस्मात् भिन्नदेवतायाजिनां फलाकांक्षिणां तेषां**—कारण भिन्न देवतांचे यजन करणाऱ्या व फलाची इच्छा करणाऱ्या त्यांची—**मानुषे लोके हि मानुषे लोके शास्त्राधिकारः**—मनुष्यांच्या या लोकांमध्यें-कारण मानुषलोकांमध्येंच शास्त्राचा अधिकार आहे. म्हणून या मानुष लोकांत ( कर्मजा सिद्धि सत्वर होते, असा संबंध )—'**क्षिप्रं हि मानुषे लोके' इति विशेषणात्**—'क्षिप्रं हि मानुषे लोके' असें विशेषण दिलेले असल्यामुळें—**भगवान् अन्येषु अपि कर्मफलसिद्धिं दर्शयति**—भगवान् दुसऱ्या लोकांमध्येंही कर्मफलाची सिद्धि दाखवीत आहे.—**मानुषे लोके वर्णाश्रमादि कर्माणि इति विशेषः**—मानुष लोकांमध्यें वर्णाश्रमादि कर्में आहेत, हा इतर लो-

कांहून त्यांत विशेष आहे.—**तेषां वर्णाश्रमाद्यधिकारिकर्मणां**—त्या भेददर्शी व फलाकांक्षी लोकांच्या वर्णाश्रमादि अधिकारी कर्मांची—**कर्मजा-कर्मणः जाता फलसिद्धिः क्षिप्रं भवति**—कर्मापासून झालेली फलसिद्धि सत्त्वर होते. [ अर्थात् मनुष्यलोकांत कर्मफलाची सिद्धि शीघ्र होत असल्यामुळें त्या फलाच्या नादाला लागलेले लोक प्रायः ज्ञानमार्गापासून विमुख होतात. गीतेंत फलेच्छा सोडून ईश्वरार्पणबुद्धीनें कर्मे करण्याविषयीं जो उपदेश केला आहे तो मनुष्यानें ज्ञानमार्गाला लागावे म्हणून आहे म्हणूनच मागे अर्जुनाला 'बुद्धौ शरणं अन्विच्छ' ज्ञानमार्गाचा आश्रय कर. अ. २. श्लो. ४९ पृ. १७८ असे सागितले आहे. ] १२.

**चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागशः ।**
**तस्य कर्तारमपि मां विद्ध्यकर्तारमव्ययम् ॥ १३ ॥**

**अन्वयार्थ—मया**—मी—**गुण-कर्मविभागशः**—गुणांचा विभाग व कर्मांचा विभाग करून, त्याच्या अनुरोधाने—**चातुर्वर्ण्यं**—चार वर्ण—**सृष्टं**—उत्पन्न केले आहेत.—**तस्य कर्तारं अपि मां**—मायिक व्यवहारदृष्टया मी जरी त्यांचा कर्ता आहें, तरी—**अकर्तारं**—अकर्ता आहे व त्यामुळेंच—**अव्ययं**—असंसारी आहे, —**विद्धि**—असें जाण. १३.

**मानुष एव लोके वर्णाश्रमादिकर्माधिकारो नान्येषु लोकेष्विति नियमः किंनिमित्त इति, अथवा वर्णाश्रमादिप्रविभागोपेता मनुष्या मम वर्त्मानुवर्तन्ते सर्वश इत्युक्तं कस्मात्पुनः कारणान्नियमेन तवैव वर्त्मानुवर्तन्ते नान्यस्येत्युच्यते—चातुर्वर्ण्यमिति । चातुर्वर्ण्यं चत्वार एव वर्णाश्चातुर्वर्ण्यं मयेश्वरेण सृष्टमुत्पादितं "ब्राह्मणोऽस्य मुखमासीत्" इत्यादि श्रुतेः, गुणकर्मविभागशो गुणविभागशः कर्मविभागशश्च गुणाः सत्त्वरजस्तमांसि । तत्र सात्त्विकस्य सत्त्वप्रधानस्य ब्राह्मणस्य शमो दमस्तप इत्यादीनि कर्माणि । सत्त्वोपसर्जनरजःप्रधानस्य क्षत्रियस्य शौर्यतेजःप्रभृतीनि कर्माणि । तमउपसर्जनरजःप्रधानस्य वैश्यस्य कृष्यादीनि कर्माणि । रजउपसर्जनतमःप्रधानस्य शूद्रस्य शुश्रूषैव कर्मेत्येवं गुणकर्मविभागशश्चातुर्वर्ण्यं मया सृष्टमित्यर्थः । तच्चेदं चातुर्वर्ण्यं नान्येषु लोकेष्वतो मानुषे लोक इति विशेषणम् । हन्त तर्हि चातुर्वर्ण्यसर्गादेः कर्मणः कर्तृत्वात्तत्फलेन युज्यसेऽतो न त्वं नित्यमुक्तो नित्येश्वर इति । उच्यते । यद्यपि मायासंव्यवहारेण तस्य कर्मणः कर्तारमपि सन्तं मां परमार्थतो विद्ध्यकर्तारमत एवाव्ययमसंसारिणं च मां विद्धि ॥ १३ ॥**

**भाष्यार्थ—मानुषे एव लोके वर्णाश्रमादिकर्माधिकारः न अन्येषु लोकेषु इति नियमः किंनिमित्तः इति**—मानुष लोकांतच वर्णाश्रमादि कर्मांचा अधिकार आहे अन्य लोकांत नाहीं, असा नियम कोणत्या कारणानें केला आहे, तें —**अथवा वर्णाश्रमादिप्रविभागोपेताः मनुष्याः सर्वशः मम वर्त्म अनु-**

**वर्तन्ते इति उक्तं**—किंवा वर्ण-आश्रमादि ( अवस्था वगैरे ) विभागांनीं युक्त असलेले मनुष्य सर्व प्रकारें माझ्या मार्गाचें अनुवर्तन करितात, असें वर सांगितलें.—**पुनः कस्मात् कारणात् नियमेन तव एव वर्त्म अनुवर्तन्ते न अन्यस्य इति चातुर्वर्ण्यं इति उच्यते**—पण कोणत्या कारणानें मनुष्य नियमानें तुझ्याच मार्गाला अनुसरतात व दुसऱ्या कोणाच्या मार्गाला अनुसरत नाहींत, हें सांगण्यासाठीं 'चातुर्वर्ण्यं०' इत्यादि भगवान् म्हणतात—**चातुर्वर्ण्यं-चत्वारः एव वर्णाः चातुर्वर्ण्यं-**

---

१ पण रहस्यकार या श्लोकास असें अवतरण देतात—"धर्मसंस्थापना करण्यास परमेश्वर अवतार घेतो असे पूर्वी सांगितलें. आतां धर्मसंस्थापना करण्याला काय करावें लागते तें थोडक्यांत सांगतात." पण हें म्हणणें अयोग्य आहे. कारण पूर्वी 'धर्म म्ह० पारलौकिक वैदिक धर्म नव्हे,' (गी.र. ६६७) असे स्पष्ट म्हटलेलें असून,'जगांतील अन्याय,बेबंदशाही वगैरे मोडण्यासाठी ईश्वर तेजस्वी व पराक्रमी पुरुषाच्या रूपानें अवतार घेतो,' असें म्हटलें आहे व येथें 'धर्मसंस्थापनेसाठी परमेश्वर अवतार घेतो' असें म्हणतात वर 'परमेश्वर तेजस्वी व पराक्रमी पुरुषाच्या रूपानें अवतार घेऊन समाजाचा विस्खलित झालेला घडी पुनः नीट बसवून देतो' असें म्हटलें आहे व येथे 'धर्मसंस्थापना करण्यासाठी काय करावें लागतें तें पुढील श्लोकांत सांगतात' असे म्हणतात. तेव्हां हा पूर्वोत्तर ग्रंथ सुसंगत आहे की असंबद्ध? याचा विचार वाचकांनीच करावा.

पुढील श्लोकार्थाचा तर वरील अवतरणाशीं मुळींच मेळ नाहीं. कारण "(ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, व शूद्र या प्रकारे ) चार वर्णांची व्यवस्था गुण व कर्म याच्या भेदाप्रमाणे मीच निर्माण केली आहे. मी तिचा कर्ताहि आहें, आणि अकर्ता म्ह० ती न करणारा अव्यय ( मीच ) आहें, हें तू लक्षांत ठेव." असा त्या श्लोकाचा अर्थ करितात. यांत धर्मसंस्थापनेसाठी काय करावे लागतें त्याचा कोठें मागमूसही नाहीं त्यापेक्षा आचार्यांचें अवतरण किती सुसंबद्ध व प्रकरणाला धरून आहे तें पहा. बरें, मूळ श्लोकाचा जो अर्थ केला आहे तो तरी मूळाला धरून आहे का? नाहीं. 'गुणकर्मविभागशः चातुर्वर्ण्य-चार वर्ण मी उत्पन्न केले. मी जरी त्याचा कर्ता आहें तरी अकर्ता व अव्यय आहें, असें तू जाण!' हा अगदी सरळ अर्थ आहे. पण रहस्यकारांनी 'व्यवस्था' हा आपल्या पदरचा शब्द घातला आहे. 'गुणकर्मविभागशः' हें पद फार महत्त्वाचे असूनहि 'गुण व कर्म याच्या भेदाप्रमाणे' असा मोघम व अगदी संदिग्ध अर्थ लिहून ठेवला व त्यावर स्पष्टीकरणार्थ टीपही दिलेली नाहीं. वस्तुतः 'प्रत्येकाचे गुण व कर्म पाहून त्यावरून अमुक ब्राह्मण, अमुक क्षत्रिय इत्यादि जाती मी ठरविल्या आहेत' असें त्यांनी म्हणावयास पाहिजे होते. पण या वादग्रस्त शब्दाचा मुळींच विचार केला नाहीं. उत्तरार्धांतील 'तस्य कर्तारं अपि मां' या वाक्याचा मी तिचा कर्ताहि आहें, असा अर्थ केला आहे तो बरोबर नाहीं. तसेंच, 'विद्धि अकर्तार अव्ययं' याचा 'आणि अकर्ता म्ह० ती ( व्यवस्था ) न करणारा अव्यय मीच आहें, हे तूं लक्षांत ठेव' असा अगदी विपरीत अर्थ केला आहे.त्याला सरळ किंवा बरोबर कोण म्हणत असतील ते म्हणोत! त्यापेक्षां याच श्लोकावरील टीपेत "परमेश्वर कर्ता असला तरी पुढील श्लोकांत वर्णिल्याप्रमाणें तो नैष्कर्म्याच निःसंग असल्यामुळें अकर्ताच होय, असा अर्थ आहे" असें जें म्हटलें आहे तें पुष्कळ बरें आहे! 'हें विरोधाभासात्मक वर्णन आहे' असें ते म्हणतात.

चारच वर्ण हें चातुर्वर्ण्य—**मया ईश्वरेण सृष्टं-उत्पादितं**—मीं ईश्वरानें उत्पन्न केलें आहे—**'ब्राह्मणः अस्य मुखं आसीत्' इत्यादिश्रुतेः**—ब्राह्मण याचें मुख झाला–या विराट् पुरुषाच्या मुखापासून ब्राह्मण झाला, अशी ऋग्वेदश्रुति आहे. **—गुणकर्मविभागशः-गुणविभागशः कर्मविभागशः च**—गुणविभाग व कर्मविभाग करून, त्या विभागपूर्वक ब्राह्मणादि चातुर्वर्ण्य मीं उत्पन्न केलें.**—गुणाः सत्त्वरजस्तमांसि**—सत्त्व, रज व तम हे गुण आहेत.—**तत्र सात्त्विकस्य सत्त्व-प्रधानस्य ब्राह्मणस्य 'शमो दमस्तपः' इत्यादीनि कर्माणि**—त्यांतील सात्त्विक म्ह० सत्त्वगुणप्रधान असलेल्या ब्राह्मणाची शम, दम, तप इत्यादि कर्मे—**सत्त्वोपसर्जनरजःप्रधानस्य क्षत्रियस्य शौर्यतेजःप्रभृतीनि कर्माणि**—ज्याच्यामध्ये सत्त्वगुण गौण व रजोगुण प्रधान आहे अशा क्षत्रियाची शौर्य, तेज, इत्यादि कर्में—**तमउपसर्जनरजःप्रधानस्य वैश्यस्य कृष्यादीनि कर्माणि**—ज्याच्या-मध्यें तमोगुण गौण–अमुख्य व रजोगुण प्रधान–मुख्य आहे अशा वैश्याची शेती, गौरक्ष्य इत्यादि कर्मे,—**रजउपसर्जनतमःप्रधानस्य शूद्रस्य शुश्रूषा एव कर्म**—रजोगुण गौण व तमोगुण प्रधान अशा प्रकृतीच्या शूद्राचे शुश्रूषा हेंच कर्म—**इति एवं गुणकर्मविभागशः मया चातुर्वर्ण्यं सृष्टं इत्यर्थः**—अशा प्रकारे गुण-विभागपूर्वक कर्मविभाग करून मी चातुर्वर्ण्य उत्पन्न केले आहे, असा भावार्थ—**तत् च इदं चातुर्वर्ण्यं अन्येषु लोकेषु न अतः मानुषे लोके इति विशेषणं**—आणि तें हें चातुर्वर्ण्य अन्य लोकांमध्ये नाहीं म्हणून 'मानुष लोकांत' असे वरील श्लोकात विशेषण दिले आहे. [ मीं या मनुष्य लोकांत ब्राह्मणादि चार वर्ण व ब्रह्मचारी इत्यादि चार आश्रम उत्पन्न केले. त्यांच्या सत्त्वादि गुणांचा विभाग करून त्या गुणविभागा-नुसार त्याच्या कर्मांचाही विभाग केला आहे. त्यामुळे ब्राह्मणादि वर्णांना व आश्रमांना आपापल्या कर्मांचे अनुष्ठान केल्याने त्या कर्मांचे फल त्याना सत्वर मिळते. म्हणून वर 'मानुष लोकांत कर्मजा सिद्धि सत्वर होते' असे मुद्दाम म्हटले आहे. तसेच, ईश्व-रानेंच वर्णादि व त्यांची कर्मे उत्पन्न केलेली असल्यामुळे त्यांनी सर्व प्रकारे ईश्वराच्या मार्गानेंच अनुवर्तन करणे युक्तही आहे. ]—**हन्त तर्हि चातुर्वर्ण्यसर्गादेः कर्मणः कर्तृत्वात् तत्फलेन युज्यसे**—बरे तर मग चातुर्वर्ण्यसृष्टि, इत्यादि कर्मांचे कर्तृत्व तुला असल्यामुळे–तूं त्या कर्मांचा कर्ता असल्यामुळे त्या कर्मांच्या फलानें युक्त होतोस. **—अतः त्वं नित्यमुक्तः नित्येश्वरः न इति**—त्यामुळे तूं नित्यमुक्त व नित्य ईश्वर नाहींस, असे म्हणशील तर—**उच्यते**—सांगतो—**यद्यपि मायासंव्यव-हारेण तस्य कर्मणः कर्तारं अपि सन्तं मां**—जरी मायिक व्यवहारानें-मी त्या कर्मांचा कर्ता आहें तरी मला—**परमार्थतः अकर्तारं विद्धि**—परमार्थदृष्ट्या

---

पण येथें कोणताही अलंकार नसून तें परमेश्वराच्या वास्तविक स्वरूपाचें वर्णन आहे. 'ईश्वर मायिकदृष्ट्या जरी चातुर्वर्ण्याचा कर्ता असला तरी पारमार्थिकदृष्ट्या अकर्ता व त्या-मुळेंच असंसारी आहे, असें समज.' हाच त्याचा सरळ, सुबोध व वेदान्तशास्त्रानुसार अर्थ आहे.

अकर्ता जाण.—**अतः एव मां अव्ययं असंसारिणं च विद्धि**—म्हणूनच मला अव्यय व असंसारी समज. [ मला मायेमुळे कर्तृत्व आहे. वस्तुतः नाहीं. त्यामुळे मायिक दृष्टया मी चातुर्वर्ण्य, कर्म इत्यादिकांचा जरी कर्ता असलो तरी वस्तुतः मी अकर्ता व अभोक्ता आहे, असे समज. ] १३.

**न मां कर्माणि लिम्पन्ति न मे कर्मफले स्पृहा ।**
**इति मां योऽभिजानाति कर्मभिर्न स बद्ध्यते॥ १४ ॥**

**अन्वयार्थ—मां**—मला—**कर्माणि**—कर्मे—**न लिम्पति**—पुण्यपापाने लिप्त करीत नाहीत.—**कर्मफले**—कर्माच्या फलाविषयी—**मे**—माझी—**स्पृहा**—इच्छा—**न(अस्ति)**—नाही.—**इति**—याप्रमाणे—**मां**—मला-आत्म्याला—**यः**—जो—**अभिजानाति**—सर्वप्रकारे जाणतो—**सः**—तो—**कर्मभिः**—कर्मांनी—**न बद्ध्यते**—बद्ध केला जात नाही. १४.

येषां तु कर्मणां कर्तारं मां मन्यसे परमार्थतस्तेषामकर्तैवाहं यतः—नेति । न मां तानि कर्माणि लिम्पन्ति देहाद्यारम्भकत्वेनाहंकाराभावात् । न च तेषां कर्मणां फलेषु मे स्पृहा तृष्णा । येषां तु संसारिणामहं कर्तेत्यभिमानः कर्मसु स्पृहा तत्फलेषु च तान्कर्माणि लिम्पन्तीति युक्तं तदभावान्न मां कर्माणि लिम्पन्ति इत्येवं योऽन्योऽपि मामात्मत्वेनाभिजानाति नाहं कर्ता न मे कर्मफले स्पृहेति स कर्मभिर्न बध्यते । तस्यापि न देहाद्यारम्भकाणि कर्माणि भवन्तीत्यर्थः ॥ १४ ॥

**भाष्यार्थ—तु येषां कर्मणां मां कर्तारं मन्यसे**—पण तूं ज्या कर्मांचा मला कर्ता समजतोस—**तेषां परमार्थतः अहं अकर्ता एव**—त्यांचा वस्तुतः मी अकर्ताच आहे—**यतः 'न०' इति**—त्याचे कारण 'न मां०' या श्लोकाने सांगतात—**तानि कर्माणि मां देहाद्यारम्भकत्वेन न लिम्पन्ति**—तीं कर्मे मला देहादिकांच्या आरंभकत्वाने म्ह० देह, इंद्रियें इत्यादि फलाचा आरंभ करणे, त्यांचे कारण होणें, या रूपाने मला लिप्त करीत नाहीत. (ते का ? उत्तर-)—**अहंकाराभावात्**—माझ्यामध्ये 'ती कर्मे मी करतो ' अशा अहंकाराचा अभाव असल्यामुळे ( तीं मला पुढच्या जन्माचें कारण होऊन बद्ध करीत नाहीत.)—**च तेषां कर्मणां फलेषु मे स्पृहा-तृष्णा न**—आणि त्या कर्मांच्या फलाविषयीं मला स्पृहा म्ह० तृष्णाही नसते.—**येषां तु संसारिणां अहं कर्ता इति कर्मसु अभिमानः च तत्फलेषु स्पृहा**—पण ज्या संसारी मनुष्याचा ' मीं कर्ता ' असा कर्मामध्यें कर्तृत्वाभिमान व त्यांच्या फलाविषयीं तृष्णा असते—**तान् कर्माणि लिम्पन्ति इति युक्तं**—त्यांना कर्मे लिप्त करितात, बद्ध करितात, हे युक्त आहे.—**तदभावात् मां कर्माणि न लिंपन्ति**—माझ्या ठिकाणी कर्तृत्वाभिमान व फलतृष्णा यांचा अभाव असल्यामुळे मला कर्मे लिप्त करीत नाहीत. ( तीं केवल मलाच बद्ध करीत नाहींत, असे नाही तर )—**इति एवं यः अन्यः अपि मां आत्मत्वेन अभिजानाति**—अशाप्रकारें जो दुसराहि मला आत्मत्वानें जाणतो,

स्मरतो,ओळखतो [तें कसें ? उत्तर-]—**अहं कर्ता न, मे कर्मफले स्पृहा न इति**—मी कर्ता नव्हे व मला कर्मफलाची इच्छा नाही, असे जो मला स्मरतो—**सः कर्मभिः न बध्यते**—तो कर्मांकडून बद्ध केला जात नाहीं.—**तस्य अपि कर्माणि देहारंभकाणि न भवन्ति इत्यर्थः**—त्याचींही कर्में देहारंभक-उत्तर जन्माचें कारण होत नाहींत, असा भावार्थ. [ कर्तृत्वाभिमान व फलेच्छा यांच्या अभावीं कर्में कोणालाच बद्ध करीत नाहींत. कारण तोच कर्मत्याग किंवा संन्यास आहे. अर्थात् मोक्ष अशा कर्मसंन्यासावांचून प्राप्त होणें शक्य नाहीं. गीतेचें हेंच प्रतिपाद्य आहे व आचार्य तरी हेंच सांगत आहेत. (गी.भा.पृ. ८.५७ पहा) सर्वकर्मसंन्यास तो हाच होय. दगडासारखें बसणें याला आचार्यही संन्यास म्हणत नाहींत; व अद्वैतीही संन्यास म्हणत नाहीत. अर्थात् हें रहस्य न जाणतां ‘ सर्वकर्मसंन्यासपूर्वक आत्मज्ञाननिष्ठेनेंच मोक्ष मिळतो ’ असें जे आचार्यांचें म्हणणें आहे त्यावर वृथा दोषारोप करून गीता प्रवृत्तिपर आहे, हे म्हणणें सर्वथा अनुचित होय. ] १४.

---

१ रहस्यकार या श्लोकाचा अर्थ असा करितात–“ मला कर्मांचा लेप म्ह० बाधा लागत नाही. ( कारण ) माझी कर्माच्या फलाचे ठायीं इच्छा नाही. अशाप्रकारे जो मला जाणतो त्याला कर्मांची बाधा होत नाही. ” वस्तुत: ‘ कर्माणि ’ म्ह० कर्में ‘ मा-’ मला ‘ न लिंपन्ति-’ लिप्त करीत नाहीत, हा सरळ अर्थ आहे. पण रहस्यकारांनी ‘ कर्माणि ’ म्ह० कर्मांचा व ‘ न लिंपन्ति ’ म्ह० लेप–बाधा लागत नाही, असा अर्थ केला आहे. पण लेप किंवा बाधा लागत नाही म्ह० काय ? याचा खुलासा केलेला नाही. ‘ कर्में पुण्य व पाप यांनी मला लिप्त करीत नाहीत; व त्यामुळे पुढच्या जन्माची तीं निमित्तें होत नाहीत’ हा त्याचा सुबोध व शास्त्रीय अर्थ आहे. लेप म्ह० बाधा व बाधा म्ह० काय ? पीडा ? याच श्लोकाच्या ‘कर्मभिर्न स बध्यते’ या चवथ्या चरणाकडे लक्ष देऊन कर्में लिप्त करीत नाहीत म्ह० बद्ध करीत नाहीत, असें तरी म्हणावयाचे होतें ! पण तेथेंही ‘ न बध्यते- ’ याचा ‘बाधा होत नाही,’ असाच अर्थ केला आहे. पण तो मूळ धात्वर्थाला धरून नाही. असो; ‘ न मे कर्मफले स्पृहा ’ हा दुसरा चरण कर्मांचा लेप न लागण्याचें कारण सांगत आहे, असें रहस्यकार म्हणतात. पण तें बरोबर नाही. ‘ माझी कर्मफलाविषयीं इच्छा नाही, म्हणून मला कर्मांचा लेप लागत नाही, ’ हे म्हणणे योग्य नाही. कारण नुस्ती कर्मफलाची इच्छा नसली म्हणजे कर्में बद्ध करीत नाहीत, असें नाही. तर कर्मफलाची इच्छाहि नसली पाहिजे व कर्मांचा मी कर्ता, हा अभिमानहि नसला पाहिजे. म्हणूनच आचार्यांनी वर भाष्यांत ‘ अहंकाराभावात् ’ असें म्हणून कर्में बद्ध करीत नाहीत, याचें ‘अहंकाराभाव’ हें कारण सांगितलें आहे. प्रस्तुत श्लोकाच्या टीपेंत–९ व्या श्लोकांतील ‘जन्म व कर्म जाणतो तो मुक्त होतो ’ या अर्थाचा अनुवाद करून ‘त्यापैकीच कर्माच्या तत्त्वाचें या श्लोकांत स्पष्टीकरण केलें आहे. ’ असें रहस्यकार म्हणतात. पण असा दूरान्वय लावीत बसण्यापेक्षां वरच्या श्लोकांत ‘ मला अकर्ता समज ’ असें जें म्हटलें आहे त्याचेच कारण सांगण्यासाठीं पुढील श्लोक आहे, अशी संगति लावणेंच अधिक सयुक्तिक आहे.रहस्यकार पुनः म्हणतात—‘ जाणतो ’ या शब्दानें ‘ जाणून त्याप्रमाणें वागूं लागतो ’ एवढा अर्थ या

**एवं ज्ञात्वा कृतं कर्म पूर्वैरपि मुमुक्षुभिः ।**
**कुरु कर्मैव तस्मात्त्वं पूर्वैः पूर्वतरं कृतं ॥ १५ ॥**

**अन्वयार्थ—पूर्वैः अपि मुमुक्षुभिः**—पूर्वीच्याही मुमुक्षूंनी—**एवं**—असें—**ज्ञात्वा**—जाणून—**कर्म**—कर्म—**कृतं**— केलें —**तस्मात्**—म्हणून—**त्वं**—तूं—**पूर्वैः**—पूर्वीच्या मुमुक्षूंनी—**पूर्वतरं**—त्यांच्याही पूर्वीचें—**कृतं**—केलेलें—**कर्म एव**—कर्मच—**कुरु**—कर. १५.

**नाहं कर्ता न मे कर्मफले स्पृहेति—एवमिति । एवं ज्ञात्वा कृतं कर्म पूर्वैरप्यतिक्रान्तैर्मुमुक्षुभिः, कुरु तेन कर्मैव त्वं न तूर्ष्णामासनं नापि संन्यासः कर्तव्यस्तस्मात्त्वं पूर्वैरप्यनुष्ठितत्वाद्यद्यनात्मज्ञस्त्वं तदाऽऽत्मशुद्ध्यर्थं तत्त्वविच्चेल्लोकसंग्रहार्थं पूर्वैर्जनकादिभिः पूर्वतरं कृतं नाधुनातनं कृतं निर्वर्तितम् ॥ १५ ॥**

**भाष्यार्थ—अहं कर्ता न, मे कर्मफले स्पृहा न इति 'एवं०' इति**—मी कर्ता नाहीं व मला कर्मफलाविषयीं इच्छा नाहीं, असें जाणून पूर्वीच्या मुमुक्षूंनींही कर्म केलें आहे असें 'एवं ज्ञात्वा०' या श्लोकानें सांगतात—**एवं ज्ञात्वा पूर्वैः अतिक्रान्तैः मुमुक्षुभिः अपि कर्म कृतं**—मी कर्ता नाहीं, मला फलेच्छा नाहीं, असें जाणून पूर्वीच्या भूतकालीन मुमुक्षूंनींही कर्म केलें आहे,—**तेन**—पूर्वीच्या मुमुक्षूंनीं कर्मच केलें असल्यामुळें—**त्वं कर्म एव कुरु**-तूं कर्मच कर.—**तूर्ष्णीं आसनं न संन्यासः अपि न कर्तव्यः**

---

ठिकाणी विवक्षित आहे. पण 'अभिजानाति' या क्रियापदावरून असा अर्थ कां काढावयाचा? व त्याची आवश्यकता तरी काय? त्याप्रमाणे वागतो म्ह० काय? स्पष्ट कांहींच नाहीं. त्यापेक्षा 'मी अकर्ता व फलतृष्णाशून्य आहे असें आपल्या आत्मरूपानें जो कोणी मला जाणतो-स्मरतो, मीच त्याचा अकर्ता, अभोक्ता, निःस्पृह आत्मा आहे, असें ओळखतो त्याचीं कर्मेंहि त्याला बद्ध करीत नाहींत.' हें म्हणणें किती सयुक्तिक, शास्त्रीय व सुबोध आहे? नाहीं तर, परमेश्वराला कर्में लिप्त करीत नाहींत व त्याला कर्मफलाविषयीं तृष्णा नाहीं, एवढें जाणून मनुष्य मुक्त कसा होणार? नुसतें 'त्याप्रमाणे वागतो' एवढ्यावरून कांहीं बोध होत नाहीं.

१ रहस्यकारांनी या श्लोकाच्या अर्थांत 'मुमुक्षुभिः' या पदाचा अर्थ 'मुमुक्षु लोकांनीं' असाच केला आहे. पण 'पूर्वीच्या मुमुक्षूंनी कर्मच केलें म्हणून तूंही कर्मच कर' असें म्हटल्यास अर्जुन मुमुक्षु ठरतो. ज्ञानी—जीवन्मुक्त ठरत नाहीं, पण तें तर रहस्यसिद्धान्ताच्या विरुद्ध आहे. म्हणून रहस्यकारांनीं गी. र. पृ. ३१० वर "हें जाणून पूर्वीं जनकादि ज्ञानी पुरुषांनीं कर्म केलें" असें म्हटलें आहे. म्हणजे मुमुक्षुशब्दाचा ज्ञानी असा अर्थ केला आहे. तो सरळ आहे कीं काय तें वाचकांनींच ठरवावें.

—मुकाट्यानें बसणें हेंही करूं नये व संन्यासही करूं नये.—तस्मात्-पूर्वैः अपि

१ आचार्यांचे हें येथील सर्व भाष्य व मागील पृ. ४३–६४ पर्यंतचें भाष्य वाचकांनी पुनः लक्षपूर्वक वाचावे व मग गीतारहस्यातील खालील उतारे वाचावे–" पण वैदिक कर्मयोगाचा हा सिद्धान्त श्रीशंकराचार्यांस मान्य नसल्यामुळे तो खोडून काढून आचार्यांच्या मते गीतेचे तात्पर्य काय हे सांगण्याच्या हेतूनेच गीतेवर त्यांनी आपलें भाष्य मुद्दाम लिहिले " गी. र. पृ. ११. (आचार्यास वैदिक कर्मयोगाचा सिद्धान्त मान्य नाही हें म्हणणे धाडसाचें आहे. त्यांना रहस्यकारांचा काल्पनिक कर्मयोग मात्र मान्य होणें शक्य नाही. त्यांनी ' मोक्षाला ज्ञान व कर्म या दोन साधनांची एकाच वेळी अपेक्षा असते ' या वादाचें तेवढे खंडन केले आहे. आचार्यांनी आपल्या मते गीतेचे तात्पर्य सांगण्यासाठी भाष्य लिहिलें नसून औपनिषद सिद्धान्ताप्रमाणे गीतेचें तात्पर्य सांगण्यासाठी भाष्य लिहिले आहे ). "वेदान्तावरील हल्ली सामान्यतः वाचण्यात येणारे ग्रंथ सन्यासमार्गीयांच्या अनुयायांनीच लिहिलेले असल्यामुळे,आणि सन्यासमार्गीस तृष्णारूपी संसार सर्वच निःसार वाटत असल्यामुळें त्यांच्या ग्रंथात कर्मयोगाची उपपत्ति नीट दिलेली नाही हे खरें. किंबहुना या परसंप्रदायासहिष्णु ग्रंथकारांनी सन्यासमार्गातील कोटिक्रम कर्मयोगांत घुसडून देऊन संन्यास व कर्मयोग हे दोन स्वतंत्र मार्ग नसून सन्यास हाच काय तो एक शास्त्रोक्त मोक्षमार्ग असाही समज उत्पन्न करण्याचा प्रयत्न केला आहे " गी. र. पृ. १२१. (यात रहस्यकारांची राजसवृत्ति पूर्णपणे व्यक्त झाली आहे. वेदान्त ग्रंथ शंकराचार्यांसारख्या विरक्त संन्याश्यानीच लिहिले याबद्दल त्याना फार खेद होतो, पण त्याला कोणाचा काय उपाय ? विषयासक्त कर्मठांनी वेदान्तग्रंथ का लिहिले नाहीत ? त्यांचा सन्याससमार्गीयांना हात का धरला होता ? पण वस्तुस्थिति न जाणतांच जेथे मनसोक्त लिहिण्याची प्रवृत्ति आहे तेथे युक्तायुक्त विचार कोठचा ? अहो महाराज, विषयांविषयीं विरक्त असलेले लोकच वेदान्ताकडे पाहणार, इतरांना त्याकडे पाहण्याची नुसती इच्छाहि होणे शक्य नाही, हें तुम्ही विसरला की काय? असो; ' तृष्णारूप संसार ' हें रहस्यकारास कोणी सांगितलें? संसाराचें स्वरूप तृष्णा आहे, असे कोणीच म्हणत नाही, ' जन्ममरणसुखदुःखप्राप्ति ' याला संसार म्हणतात. वेदान्तग्रंथांत कर्मयोगाची उपपत्ति कशी येणार ? कारण वैदिक कर्मयोग हे प्रकरण निराळे व वेदान्त किंवा ज्ञानयोग हें प्रकरण निराळें. त्यामुळे वैदिक कर्मयोगांत वेदान्ताची उपपत्ति पाहूं लागणें हें जसें वेडेपण आहे तसेंच वेदान्तात कर्मयोगाची उपपत्ति पाहूं लागणें, हे वेडेपण आहे. पण रहस्यकार येथेच थांबत नाहीत, तर संन्यासमार्गीयांना ' परसंप्रदायासहिष्णु ' हा बहुमानाचा किताब देऊन 'कर्मयोगात सन्यासमार्गाचा कोटिक्रम घुसडून देऊन संन्यास व कर्मयोग हे दोन स्वतंत्र मार्ग नसून संन्यास हाच काय तो एक शास्त्रोक्त मोक्षमार्ग असाही समज उत्पन्न करण्याचा यत्न केला आहे, ' असा आरोपही संन्यासमार्गीयांवर करीत आहेत. पण ' नान्यः पन्था विद्यतेऽयनाय ' इत्यादि श्रुतिवचनें व ' ज्ञात्वा मां शांतिमृच्छति ' ५.२९. ' निष्ठा ज्ञानस्य या परा' १८.५० 'तत्त्वतो ज्ञात्वा विशते तदनन्तरं ' १८.५५. इत्यादि गीतावचनेंच तसें सांगत आहेत. कर्मयोग हा स्वतंत्र मोक्षमार्ग आहे, असें कोणीच कोठें सांगत नाही. उलट कर्माचें फल अनित्य आहे, असाच श्रुतिस्मृतींत सर्वत्र घोष केलेला आहे. अर्थात् रहस्यकारांच्या असल्या मिथ्या

आरोपानें वेदान्तशास्त्र किंवा संन्यासमार्ग ऊर्फ ज्ञाननिष्ठा यांची कांहींच हानि होत नसून आरोप करणारांच्या शास्त्रज्ञानाचा मात्र त्यावरून पूर्ण परिचय होत आहे.) "गीतेवरील सांप्रदायिक टीकाकारांनीं कर्मयोगमार्गास गौणत्व देण्याचा जो प्रयत्न केला आहे तो निव्वळ सांप्रदायिक आग्रहाचा परिणाम असून कर्मयोग हें ज्ञानप्राप्तीचें किंवा सन्यासाचें नुसतें साधन होय, असा जो या टीकांतून ठिकठिकाणीं शेरा दिलेला असतो, तो केवळ त्यांच्या पदरचा असतो. गीतेचा खरा भावार्थ तसा नाहीं, हेंही यावरून दिसून येईल. गीतेवरील सन्यासमार्गीय टीकांतला हाच आमच्या मतें दोष होय आणि टीकाकारांच्या या सांप्रदायिक आग्रहातून सुटका झाल्याखेरीज गीतेच्या खऱ्या रहस्याचा बोध होणें कधींच शक्य नाहीं." गी. र. पृ. ३०४. (कर्मयोग साधन असून चित्तशुद्धि, ज्ञानप्राप्ति, हें त्याचे साध्य–फल आहे, हें साम्प्रदायिक टीकाकारांचें म्हणणें नसून सनातन वैदिक धर्माचें म्हणणें आहे. उगीच भलभलतें कांहीं तरी बोलणें श्रेष्ठाला शोभत नाहीं. 'तं एत वेदानुवचनेन ब्राह्मणा विविदिषन्ति यज्ञेन, दानेन तपसानाशकेन, एतं एव विदित्वा मुनिः भवति। एत एव प्रव्राजिनो लोक इच्छन्तः प्रव्रजन्ति-' त्या या औपनिषद पुरुषाला ब्राह्मण नित्य स्वाध्यायरूप वेदानुवचनानें, तसेंच यज्ञ, दान व अनाशक तप यानें जाणण्याची इच्छा करितात. यालाच जाणून मुनि-योगी होतो. याच आत्मलोकाची इच्छा करणारे संन्यसनशील पुरुष सन्यास करितात. (बृहदा. भाष्यार्थ अ. ४ पृ. ३३८ पहा.) 'विशुद्धसत्त्वस्ततस्तु तं पश्यते निष्फल ध्यायमानः' कर्मानुष्ठानानें अन्तःकरण प्रसन्न होऊन शुद्धचित्त झालेला पुरुष एकाग्र मनानें निरवयव परमात्म्याचें ध्यान करूं लागला असता त्याला साक्षात् जाणतो (मुण्ड. भाष्यार्थ पृ. १०२.) 'धर्मेण पापमपनुदति' (सार्थ नारायण पृ ७८) 'ज्ञानं उत्पद्यते पुसां क्षयात्पापस्य कर्मणः' पापकर्माच्या क्षयानें पुरुषांना ज्ञान होतें. 'कषायपक्तिः कर्माणि ज्ञान तु परमा गतिः–" कर्मे काम-क्रोधादि दोष घालवितात व ज्ञान ही परमगति आहे. 'यज्ञो दानं तपश्चैव पावनानि मनीषिणा' यज्ञ, दान व तप हीं कर्मे पुरुषांच्या अन्तःकरणाला शुद्ध करणारीं आहेत. 'योगिनः कर्म कुर्वन्ति संगं त्यक्त्वात्मशुद्धये'–कर्माधिकारी अज्ञ कर्तृत्वाभिमान व फलाची इच्छा सोडून चित्तशुद्धीसाठीं कर्म करितात इत्यादि अनेक श्रुतिस्मृतिवचनें 'कर्मयोग चित्तशुद्धीचें साधन आहे, व चित्तशुद्धीच्या द्वारा तो ज्ञानोत्पादक आहे' असें सांगतात. द्वैती, विशिष्टाद्वैती, शुद्धाद्वैती इत्यादि सर्व आचार्यांचें या बाबतींत एकमत्य आहे. ज्ञानेश्वरमहाराजही कर्मयोगाला ज्ञाननिष्ठेचें साधन म्हणतात. त्यामुळे रहस्यकाराचें वरील म्हणणें फुकट आहे. शिवाय कर्मयोग ज्ञाननिष्ठायोग्यता प्राप्त करून देणारें साधन आहे असे जरी संन्यासमार्गीयांनीं म्हटलें तरी त्यांत रहस्यकाराचें काय बिघडतें, तें कळत नाहीं. कोणी एखादा तरी अद्वैती टीकाकार अर्जुनाला किंवा दुसऱ्या कोणाही कर्माधिकाऱ्याला 'तूं संन्यासच घे, स्वधर्मरूप कर्म करूं नको' असें का म्हणत आहे? मुळींच नाहीं. उलट तूं कर्मच कर. ज्ञानी असशील तर लोकसंग्रहासाठीं व अज्ञ असशील तर चित्तशुद्धीसाठीं स्वधर्मरूप कर्मानुष्ठानच कर, असाच त्यांचा आग्रह आहे व तोही वैदिक संप्रदायाला धरून आहे. पक्त त्यांचें जें मुख्य म्हणणें आहे तें एवढेंच की गीतेचें परम प्रयोजन सर्वसंसारोपरमरूप निःश्रेयस असून तें सर्वकर्मसंन्यासपूर्वक आत्मज्ञाननिष्ठेनेंच प्राप्त होतें. कर्म व ज्ञान यांच्या समुच्चयानें नाहीं; व ही गोष्ट उपनिषदें

**अनुष्ठितत्वात्**—म्हणून म्ह० पूर्वींच्या मुमुक्षूंनींही कर्मानुष्ठानच केलेलें असल्यामुळें—**यदि त्वं अनात्मज्ञः तदा आत्मशुद्ध्यर्थं तत्त्ववित् चेत् लोकसंग्रहार्थं**—जर तूं अनात्मज्ञ असशील–तुला आत्मसाक्षात्कार झाला नसेल तर चित्तशुद्धीसाठी व तत्त्ववेत्ता असशील तर लोकसंग्रहासाठी कर्मच कर. ( पूर्वींच्या मूढांनीं ते केलें असेल म्हणून म्हणशील तर तसेंही नाही. )—**पूर्वैः-जनकादिभिः**—पूर्वींच्या जनकादिकांनीं—**पूर्वतरं न अधुनातनं कृतं-निर्वर्तितं**—त्यांच्याही पूर्वींचे, अलीकडचें

---

तर राहूच द्या, पण गीतेतील वचनानींहिं सिद्ध होते. परंतु हे रहस्य न जाणता रहस्यकार संन्यासमार्गीयांवर विनाकारण वारंवार खवळलेले जे दिसतात तो शास्त्रार्थाच्या अन्यथाप्रतिपत्तीचा परिणाम आहे व त्याबद्दल आम्हीं त्याची कींव करतों.

आतां आणखी येथें दोनच उतारे देतो, म्हणजे त्यावरून रहस्यकारांनीं आचार्यांच्या भाष्याचा पूर्ण विचार न करिता त्यांच्यावर वारंवार वृथा आग कशी पाखडली आहे तें वाचकांच्या लक्षात येईल—" गार्हस्थ्यधर्मांतील कर्माकर्मविवेचनरूपी कुकवाच्या जास्त उठाठेवींत संन्यासमार्गांतील पंडित कधीं पडत नाहींत. कलियुगांतील संन्यासमार्गाचे पुरस्कर्ते श्रीशंकराचार्य यांच्या गीतेवरील भाष्यांत गीतेमधल्या कर्मपर वचनांची उपेक्षा करून अगर तीं केवळ प्रशंसापर ( अर्थवादपर ) आहेत असे कल्पून कर्मसंन्यासधर्मच सर्व गीतेंत प्रतिपाद्य होय, असा गीतेचा फलितार्थ अखेर काढला आहे. " (गी. र. पृ. ३६४) " गीतेंतील ज्या श्लोकांत कर्म श्रेयस्कर ठरवून करण्यास सांगितले आहे त्या श्लोकाकडे दुर्लक्ष केलें अथवा ते सर्व अर्थवादात्मक म्हणजे आनुषंगिक प्रशंसात्मक आहेत, असा आपल्या पदरचाच शेरा मारून किंवा दुसऱ्या काहीं लटपटीनें वरील सांख्य+निष्कामकर्म=कर्मयोग या समीकरणांतून एकदा निष्काम कर्म उडवून टाकले म्हणजे . गीतेंत सांख्यमार्गच प्रतिपाद्य आहे, असे म्हणण्यास सवड सापडते." पृ.४६५ (रहस्यकारांचें हें म्हणणें किती खोटें आहे तें गी.भा.पृ. ९-१० पाहिल्यानेंच वाचकाच्या लक्षांत येईल. वेदोक्तधर्म दोन प्रकारचा असून तो दोन्ही प्रकारचा धर्म गीतेंत सांगितला आहे,असे वारंवार (गी.भा.पृ.२,५,१४२,२३५,३४८ पहा.) म्हणणाऱ्या आचार्यांवर वरच्यासारखे वृथा आरोप करणें महत् पाप आहे असें आम्ही समजतों.) " शंकराचार्यांस स्मार्त किंवा संन्यास धर्मच मान्य असून इतर सर्व मार्ग ते अज्ञानमूलक मानीत होते, याबद्दल कोणासच शंका नाहीं. पण तेवढ्यामुळे गीतेचा भावार्थहि तोच असला पाहिजे असे म्हणतां येत नाहीं. गीतेचा सिद्धान्त तुम्हांस मान्य नसेल तर तो स्वीकारू नका. पण त्यामुळे " या जगांत आयुष्यक्रमणाचे दोन प्रकारचे स्वतंत्र मोक्षप्रद मार्ग किंवा निष्ठा आहेत " असें जे गीतेच्या आरंभीं म्हटलें आहे त्याचा अर्थ ' संन्यासनिष्ठा हा एकच खरा व श्रेष्ठ मार्ग होय ' असा करणे युक्त नाहीं." (गी. र. पृ. ३४१ ) " श्रीशंकराचार्य यांचा कटाक्ष सरळ अर्थापेक्षा संन्यास निष्ठापर एकवाक्यतेकडे विशेष होता, ." ( गी. र. ३६० ) ( दोन प्रकारचे स्वतंत्र मोक्षमार्ग जर गीतेंत सांगितले आहेत तर ज्ञानकर्मसमुच्चय कसा ? असल्या सर्व प्रमाणशून्य उल्लेखांचा हवा तितका सविस्तर परामर्श घेतां येण्यासारखा आहे. पण विस्तारभयास्तव तिकडे दुर्लक्ष करणें भाग आहे. शिवाय वाचकापुढे आचार्यांचे भाष्य प्रत्यक्ष असल्यामुळे विवेकी वाचकांना रहस्यकारांच्या असल्या आक्षेपांना किती महत्त्व द्यावयाचें तें सहज कळण्यासारखे आहे.

नव्हे, कर्म केलें. [ प्राचीन जनकादि राजांनीं त्यांच्या पूर्वीपासून चालत आलेलें कर्म केलें, त्यांनी तें नवीन उत्पन्न करून केलें असें नाहीं, त्यामुळें तूंही तेंच कर्म कर. अर्थात् गीतेंतील कर्मशब्दाचा अर्थ खाणें, पिणें वगैरे (गी. र.पृ. ५५,५६) हा नव्हे.] १५

**किं कर्म किमकर्मेति कवयोऽप्यत्र मोहिताः ।**
**तत्ते कर्म प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात् ॥१६॥**

**अन्वयार्थ—कर्म किं**—कर्म काय व—**अकर्म किं**—अकर्म काय—**इति अत्र**—याविषयीं—**कवयः अपि**—मोठे मोठे बुद्धिमान्‌ही—**मोहिताः**—मोहित झालेले आहेत.—**तत्**—म्हणून—**ते**—तुला—**कर्म**—कर्म-अकर्म वगैरे काय आहे,तें—**प्रवक्ष्यामि**—मी सांगतों.—**यत्**—जें कर्माकर्मादि—**ज्ञात्वा**—जाणून—**अशुभात्**—संसारापासून—**मोक्ष्यसे**—मुक्त केला जाशील-मुक्त होशील. १६.

**तत्र कर्म चेत्कर्तव्यं त्वद्वचनादेव करोम्यहं** किं विशेषितेन पूर्वैः पूर्वतरं कृतमित्युच्यते यस्मान्महद्वैषम्यं कर्मणि कथम्—किं कर्मेति। किं कर्म किं चाकर्मेति कवयो मेधाविनोऽप्यत्रास्मिन्कर्मादिविषये मोहिता मोहं गता अतस्ते तुभ्यमहं कर्माकर्म च प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वा विदित्वा कर्मादि मोक्ष्यसेऽशुभात्संसारात् ॥ १६ ॥

**भाष्यार्थ—तत्र कर्म चेत् कर्तव्यं त्वद्वचनात् एव अहं करोमि**—मनुष्यलोकीं कर्म जर करावयासच पाहिजे असेल तर ते तुझ्या सांगण्यावरूनच मी करीन. —**पूर्वैः पूर्वतरं कृतं इति विशेषितेन किं**—पूर्वीच्या जनकादिकांनी त्यांच्याही पूर्वीपासून चालत आलेले कर्म केले, असे त्याला विशेषण देऊन काय करावयाचें आहे ? **इति उच्यते**—असे विचारशील तर त्याचे उत्तर सांगतो.—**यस्मात् महत् वै-**

१ या श्लोकावरील टीपेत रहस्यकार म्हणतात-' मोक्ष व कर्म याचा याप्रमाणे विरोध नाहीं, म्हणून तू कर्म कर. ' पण प्रस्तुतच्या श्लोकात मोक्ष व कर्म याचा विरोध नाहीं, असें कोठें मागितलें आहे? प्राचीन मुमुक्षूंनीही कर्म केले आहे,असे त्यात म्हटले आहे.मुमुक्षु म्ह. मोक्ष नव्हे, मोक्ष म्ह० स्वरूपावस्थान,त्या अवस्थेत कर्माचा संभवच नाहीं. अर्थात् मोक्ष व कर्म याचा स्थिति व गति याच्या इतकाच विरोध आहे. प्राचीन मुमुक्षूंनी चित्तशुद्धीसाठी शास्त्रोक्त नित्य-नैमित्तिक कर्म केलें तसेच तूही कर,असे भगवान् येथे सांगत आहेत. 'पूर्वतर कर्म' म्ह० ' पतकरलेला धंदा' नव्हे, श्रौतस्मार्त नित्य कर्मे होत.

२ पण रहस्यकार या श्लोकाला असे अवतरण देतात-" परंतु मग 'कर्मे सोडण्याने म्ह० अकर्मानेच मोक्ष मिळतो ' असे जे संन्यासमार्गीयांचे मत त्यांतील बीज काय ? अशी शंका येते; म्हणून कर्म कोणतें व अकर्म कोणतें याच्या विवेचनास आतां सुरवात करून अकर्म म्ह० कर्मत्याग नव्हे, निष्काम कर्मालाच अकर्म म्हणावयाचे, असा अखेर तेविसाव्या श्लोकांत सिद्धान्त करितात. " पण अकर्म म्ह० अग्निहोत्रादि कर्मांचा यथाविधि त्याग नव्हे तर अकर्म म्ह० कांहींच न करणे, असा अर्थ आहे. (गी. भाष्यार्थ पृ. २७७ अ. ३. श्लो. ८ पहा. ) आतां अकर्म म्ह० निष्काम कर्म हा रहस्यकारांचा अर्थ ग्राह्य आहे की अग्राह्य हे आम्ही २३ व्या श्लोकांतच ठरवूं.

**षम्यं कर्मणि**—ज्याअर्थी कर्मामध्यें अतिशयच वैषम्य आहे, त्याअर्थी तसें विशे॰षण देणें भागच आहे.—**कथं 'किं कर्म॰' इति**—तें कसें तें 'किं कर्म॰' या श्लोकानें सांगतात.—**किं कर्म किं च अकर्म इति अत्र-अस्मिन् कर्मादिविषये कवयः-मेधाविनः अपि मोहिताः-मोहं गताः**—कर्म काय व अकर्म काय, असें म्हणून या कर्मादि विषयांमध्ये कवी म्ह॰ बुद्धिमान्हि मोहित झाले-मोहास प्राप्त झाले आहेत.—**अतः अहं ते-तुभ्यं कर्म अकर्म च प्रवक्ष्यामि**—म्हणून मी तुला कर्म व अकर्म सांगेन.—**यत् कर्मादि ज्ञात्वा-विदित्वा अशुभात्-संसारात् मोक्ष्यसे**—जे कर्मादि जाणून-कर्माकर्मांचे तत्त्व कळल्यानें अशुभापासून म्ह॰ संसारापासून तूं मुक्त केला जाशील. १६.

**कर्मणो ह्यपि बोद्धव्यं बोद्धव्यं च विकर्मणः ।**
**अकर्मणश्च बोद्धव्यं गहना कर्मणो गतिः ॥ १७ ॥**

**अन्वयार्थ—हि**—कारण—**कर्मणः अपि**—शास्त्रविहित कर्माचेंहि तत्त्व—**बोद्धव्यं (अस्ति)**—जाणणे उचित आहे.—**च**—व—**विकर्मणः**—प्रतिषिद्ध-शास्त्रनिषिद्ध कर्माचेंहा तत्त्व—**बोद्धव्यं (अस्ति)**—जाणण्यास योग्य आहे.—**च**—आणि **अकर्मणः**—सर्व कर्म टाकून मुकाट्याने बसणे, या अवस्थेचेंही तत्त्व—**बोद्धव्यं (अस्ति)**—समजून घेण्यासारखे आहे. कारण—**कर्मणः**—कर्माचें—**गतिः**—यथार्थस्वरूप—**गहना**—गहन आहे. १७.

**न चैतत्त्वया मन्तव्यं, कर्म नाम देहादिचेष्टा लोकप्रसिद्धमकर्म तदक्रिया तूष्णीमासनं किं तत्र बोद्धव्यमिति । कस्मादुच्यते—कर्मण इति । कर्मणः शास्त्रविहितस्य हि यस्मादप्यस्ति बोद्धव्यं, बोद्धव्यं चास्त्येव विकर्मणः प्रतिषिद्धस्य तथाऽकर्मणश्च तूष्णींभावस्य बोद्धव्यमस्तीति त्रिष्वप्यध्याहारः कर्तव्यो यस्माद्गहना विषमा दुर्ज्ञाना, कर्मण इत्युपलक्षणार्थं कर्मादीनां कर्माकर्मविकर्मणां गतिर्याथात्म्यं तत्त्वमित्यर्थः ॥ १७॥**

**भाष्यार्थ—त्वया एतत् च न मन्तव्यं**—तूं असेंही समजूं नकोस कीं,—**कर्म नाम देहादिचेष्टा लोकप्रसिद्धं**—कर्म म्ह॰ देह, इन्द्रियें इत्यादिकांची चेष्टा-हालचाल. अर्थात् कर्म सर्व लोकांत प्रसिद्ध आहे.—**अकर्म-तदक्रिया तूष्णीं आसनं**—व अकर्म म्ह॰ देहादिकांची अक्रिया-देहादिकांनी मुकाट्यानें राहणें, कांही हालचाल न करणें—**तत्र किं बोद्धव्यं इति**—त्यांत काय जाणावयाचे आहे, असें तूं समजूं नकोस.—**कस्मात् इति 'कर्मणः॰' इति उच्यते**—असे कां समजूं नको

---

१ यावरील टीपेत रहस्यकार म्हणतात– "या श्लोकांत अकर्मशब्दाने सन्यास मार्गीय लोक ज्याला 'कर्माचा स्वरूपतः त्याग' असें म्हणतात तो कर्मत्याग विशेषेकरून उद्दिष्ट आहे" पण पुनः लागलीच "अशा प्रकारचा कर्मत्याग खरें 'अकर्म' नसून" इत्यादि लिहितात. म्हणजे तेथल्या तेथेंच विरोध !

म्हणून म्हणशील तर त्याचें उत्तर 'कर्मणः०' या श्लोकानें सांगितलें जात आहे.—**हि-यस्मात् शास्त्रविहितस्य कर्मणः अपि बोद्धव्यं अस्ति**—कारण शास्त्रविहित कर्मांचेंही तत्त्व जाणण्यास योग्य आहे.—**च विकर्मणः-प्रतिषिद्धस्य बोद्धव्यं अस्ति एव**—आणि विकर्मांचे म्ह० प्रतिषिद्ध कर्मांचेंही तत्त्व जाणण्यास योग्य,असेंच आहे.—**तथा अकर्मणः-तूष्णींभावस्य च बोद्धव्यं अस्ति**—त्याचप्रमाणे अकर्मांचें म्ह० तूष्णींभावाचें-सर्व हाल-चाल सोडून स्वस्थ बसण्याचें तत्त्वही जाणण्यास योग्य असेंच आहे—**इति त्रिषु अपि अध्याहारः कर्तव्यः**—असा कर्म, अकर्म व विकर्म या तिन्हीमध्यें बोद्धव्य आहे असा 'अस्ति' या क्रियापदाचा अध्याहार करावा.—**यस्मात् कर्मणः गति गहना विषमा दुर्ज्ञाना**—कारण कर्मांची गति गहन म्ह० विषम-कळण्यास फारच कठिण आहे.—**कर्मणः इति कर्मादीनां कर्माकर्मविकर्मणां उपलक्षणार्थं**—'कर्मण' हें पद कर्मादिकांच्या म्ह० कर्म, अकर्म व विकर्म याच्या उपलक्षणार्थ आहे.—**गतिः-याथात्म्यं तत्त्वं इत्यर्थः**—गति म्ह० याथात्म्य तत्त्व असा भावार्थ. [कर्म, अकर्म, विकर्म यांचें तत्त्व अवश्य समजून घेतलें पाहिजे. कारण त्याचें तत्त्व कळणें फार कठिण आहे.] १७.

**कर्मण्यकर्म यः पश्येदकर्मणि च कर्म यः ।**
**स बुद्धिमान्मनुष्येषु स युक्तः कृत्स्नकर्मकृत् ॥१८॥**

**अन्वयार्थ—यः**—जो विवेकी मनुष्य—**कर्मणि**—शरीर-इंद्रियें-प्राण यांच्या प्रत्येक व्यापारामध्यें-यांच्या प्रत्येक हालचालींत—**अकर्म**—अकर्म-आत्म्याचें अकर्तृत्व—**पश्येत्**—पाहतो—**च**—व—**यः**—जो—**अकर्मणि**—अकर्मांत-मुकाट्यानें बसणें या अवस्थेंत—**कर्म**—कर्तृत्व—**पश्येत्**—पाहतो—**सः**—तो—**मनुष्येषु**—सर्व मनुष्यांमध्यें—**बुद्धिमान्**—मोठा बुद्धिमान-ज्ञानी—**सः**—तो—**युक्तः**—योगी—**सः**—तो—**कृत्स्नकर्मकृत्**—समस्त कर्म करणारा. १८.

किं पुनस्तत्त्वं कर्मादेर्यद्बोद्धव्यं वक्ष्यामीति प्रतिज्ञातमुच्यते—कर्मणीति। कर्मणि कर्म क्रियत इति व्यापारमात्रं तस्मिन्कर्मण्यकर्म कर्माभावं यः पश्येदकर्मणि च कर्माभावे कर्तृतन्त्रत्वात्प्रवृत्तिनिवृत्त्योर्वस्त्वप्राप्यैव हि सर्व एव क्रियाकारकादिव्यवहारोऽविद्याभूमावेव कर्म यः पश्येत्पश्यति स बुद्धिमान्मनुष्येषु स युक्तो योगी कृत्स्नकर्मकृत्समस्तकर्मकृच्च स इति स्तूयते कर्माकर्मणोरितरेतरदर्शी ॥

**भाष्यार्थ—पुनः कर्मादेः तत्त्वं किं यत् बोद्धव्यं वक्ष्यामि इति प्रतिज्ञातं**—पण कर्मादिकांचें तत्त्व काय आहे कीं जे अवश्य बोद्धव्य आहे व 'मी सांगेन'

---

१ रहस्यकारांनी या श्लोकाचा अर्थ "कर्माची गति गहन आहे म्हणून कर्म, विकर्म-विपरीत कर्म व अकर्म-कर्म न करणें म्हणजे काय ते कळले पाहिजे." असा केला आहे. त्यांत संदिग्धपणा फार आहे. असो.

अशी भगवानांनी प्रतिज्ञा केली आहे ?—**'कर्मणि०' इति उच्यते**—तें 'कर्मणि०' या श्लोकानें सांगितले जातें—**कर्मणि-क्रियते इति कर्म व्यापारमात्रं तस्मिन् कर्मणि**—कर्मामध्यें-जे केले जाते तें कर्म-शरीरेंद्रियांचा सर्व व्यापार त्या कर्मामध्यें—**अकर्म-कर्माभावं यः पश्येत्**—अकर्म म्ह० कर्माचा अभाव जो पाहतो—**च अकर्मणि-कर्माभावे कर्म यः पश्येत्**—व अकर्मामध्यें म्ह० कर्माच्या अभावामध्यें कर्म जो पाहतो; ( अहोपण प्रवृत्तीलाच कर्म म्हणतात व निवृत्ति प्रवृत्तीच्या अभावरूप असते, तेव्हां कर्माच्या अभावामध्ये कर्मदर्शन कसें ? अशी आशंका घेऊन प्रवृत्ति व निवृत्ति ही दोन्ही कर्ता, करण, इत्यादि कारकांच्या अधीन असल्यामुळे तत्त्वदृष्ट्या त्यांत कांहीच फरक नाही, असे सांगतात-)—**प्रवृत्तिनिवृत्त्योः कर्तृतंत्रत्वात्**—प्रवृत्ति व निवृत्ति या दोन्ही कर्त्याच्या अधीन असल्यामुळे प्रवृत्तीप्रमाणे निवृत्तीलाहि कर्म म्हणणे यांत कांहींच विरोध नाही. ( अहोपण निवृत्ति आत्मवस्तूच्या अधीन असते त्यामुळे तिचा कारकांशी कांही संबंध नसतो, म्हणून निवृत्तीमध्ये कर्मदृष्टि ठेवणे योग्य नाही, म्हणून कोणी म्हणेल तर सांगतात-)—**वस्तु अप्राप्य एव हि सर्वः एव क्रिया-कारकादिव्यवहारः अविद्याभूमौ एव**—आत्मवस्तूशी कांही संबंध न ठेवतांच क्रिया-कारक-फल इत्यादि सर्व व्यवहार अविद्यावस्थेतच प्रवृत्त होत असतो, त्यामुळे प्रवृत्तीप्रमाणेच निवृत्तीमध्येंही जो कर्मदृष्टि ठेवतो—**सः मनुष्येषु बुद्धिमान् सः युक्तः -योगी कृत्स्नकर्मकृत्-समस्तकर्मकृत् च सः इति कर्माकर्मणोः इतरेतर-दर्शी स्तूयते**—तो मनुष्यामध्ये बुद्धिमान्, तो युक्त म्ह० योगी व तो समस्त कर्म करणारा-अशा रीतीने कर्मामध्ये अकर्म व अकर्मामध्ये कर्म पाहणारा स्तुति केला जातो. ( अशी येथें कर्म व अकर्म यांमध्यें इतरेतरदृष्टि ठेवणाऱ्या पुरुषाची स्तुति केली जाते. )

**ननु किमिदं विरुद्धमुच्यते कर्मण्यकर्म यः पश्येदित्यकर्मणि च कर्मेति। न हि कर्माकर्म स्यादकर्म वा कर्म तत्र विरुद्धं कथं पश्येद्द्रष्टा ॥**

**भाष्यार्थ—ननु कर्मणि अकर्म यः पश्येत् इति अकर्मणि च कर्म पश्येत् इति किं इदं विरुद्धं उच्यते**—अहोपण कर्मामध्ये अकर्म जो पाहतो असे व अकर्मामध्ये कर्म जो पाहतो असे हे विरुद्ध का सांगितले जात आहे'—**हि कर्म अकर्म न स्यात् अकर्म वा कर्म, तत्र द्रष्टा विरुद्धं कथं पश्येत्**—कर्म कधींही अकर्म होत नाहीं किंवा अकर्म कर्म होत नाही. मग असे जर आहे तर द्रष्टा कर्मामध्यें अकर्म व अकर्मामध्यें कर्म असे विरुद्ध कसे पाहील ? [कारण एकमेकांच्या अगदी विरुद्ध असलेल्या कर्माकर्मांचा आधार-आधेयभाव संभवत नाही. आधार म्ह० ज्यावर आपण कांही ठेवतों किंवा आरोप करतों व आधेय म्ह० जें ठेवतो किंवा ज्याचा आरोप करतों. प्रस्तुत उदाहरणांत कर्मामध्यें अकर्म पहावयाचें झाल्यास कर्म आधार व अकर्म आधेय, आणि अकर्मामध्यें कर्म पहावयाचे झाल्यास अकर्म आधार व कर्म आधेय. पण प्रकाश व अंधकार यांचा अत्यंत विरोध असल्यामुळें परस्पर आधार-आधेयभाव जसा संभवत नाहीं त्याप्रमाणेंच कर्म व अकर्म यांचा, अत्यंत विरुद्ध स्वभावामुळेंच, आधार-आधेय-भाव शक्य नाही. ]

**नन्वकर्मैव परमार्थतः सत्कर्मवदवभासते मूढदृष्टेर्लोकस्य तथा कर्मैवाकर्मवत्तत्र यथाभूतदर्शनार्थमाह भगवान्कर्मण्यकर्म यः पश्येदित्यादि। अतो न विरुद्धम्। बुद्धिमत्त्वाद्युपपत्तेश्चबोद्धव्यमिति च यथाभूतदर्शनमुच्यते । न च विपरीतज्ञानादशुभान्मोक्षणं स्याद्यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभादिति चोक्तम्। तस्मात्कर्माकर्मणी विपर्ययेण गृहीते प्राणिभिस्तद्विपर्ययग्रहणनिवृत्त्यर्थं भगवतो वचनं 'कर्मण्यकर्म यः' इत्यादि। न चात्र कर्माधिकरणमकर्मास्ति कुण्डे बदराणीव नाप्यकर्माधिकरणं कर्मास्ति कर्माभावत्वादकर्मणः। अतो विपरीतगृहीते एव कर्माकर्मणी लौकिकैर्यथा मृगतृष्णिकायामुदकं शुक्तिकायां वा रजतम्॥**

**भाष्यार्थ**—('कर्मणि' व 'अकर्मणि' या अधिकरणसप्तमी नसून विषयसप्तमी आहेत, असे मानून सिद्धान्ती समाधान करितात-)—**ननु मूढदृष्टेः लोकस्य परमार्थतः अकर्म एव सत् कर्मवत् अवभासते**—अहो पण, ज्यांची दृष्टि मूढ झाली आहे अशा प्राकृत विवेकशून्य लोकाना परमार्थतः-वस्तुत ब्रह्म अकर्मच-निष्क्रियच असताना भ्रमाने सक्रियसे भासते—**तथा कर्म एव अकर्मवत्**—तसेच कर्मच म्ह० सक्रिय द्वैतच अकर्मासारखे म्ह० अक्रिय ब्रह्मामध्ये संबद्ध असल्यासारखे भासते. —**तत्र**—याप्रमाणे कर्म व अकर्म यांचा इतरेतराध्यास सिद्ध झाला असता—**यथाभूतदर्शनार्थं भगवान् 'कर्मण्यकर्म यः पश्येत्०' इत्यादि आह**—वस्तुस्थिति जशी आहे तसे पाहण्यासाठी-तत्त्वज्ञानासाठी भगवान 'कर्मण्यकर्म य पश्येत्०' इत्यादि सांगत आहेत. (जसे-' तं ज्याला रजत-रूप समजत आहेस तो हा शिंपीचा तुकडा आहे पहा,' असे म्हणतात. म्ह० भ्रामक रजतरूप विषयाचा अनुवाद करून त्याच्या अधिष्ठानाचा उपदेश करितात, त्याप्रमाणे भ्रमसिद्ध कर्मादिरूप विषयाचा अनुवाद करून त्याच्या अधिष्ठानाचा म्ह० कर्मादिरहित कूटस्थ ब्रह्माचा भगवान् उपदेश करितात)—**अतः न विरुद्धम्**—त्यामुळे भगवद्वचन विरुद्ध नाहीं.—**च बुद्धिमत्त्वादि-उपपत्तेः**—आणि तसेच बुद्धिमत्त्व, युक्तत्व व कृत्स्नकर्मकृत्त्व यांचीहि उपपत्ति लागत असल्यामुळे भगवद्वचन विरुद्ध नाही. [कूटस्थ ब्रह्माहून भिन्न असलेल्या दुसऱ्या सर्वाला मायामात्रत्व आहे. त्यामुळे त्याचे ज्ञान जरी झाले तरी बुद्धिमत्त्व, युक्तत्व वगैरे संभवत नाही. पण या श्लोकात तर कर्मामध्ये अकर्म व अकर्मामध्ये कर्म पाहणारा पुरुष 'बुद्धिमान्, युक्त व सर्व कर्म करणारा' असे म्हणून त्याची प्रशंसा केला आहे. यास्तव येथे मायिक प्रपंचाचे ज्ञान विवक्षित नसून ब्रह्मज्ञानच विवक्षित आहे.]—**बोद्धव्यं इति च यथाभूतदर्शनं उच्यते**—'बोद्धव्यं' असे म्हणून सम्यग्दर्शन येथे सांगितले आहे. ['बोध' हा शब्द 'सम्यग्ज्ञान' या अर्थी प्रसिद्ध आहे व 'कर्म, अकर्म, विकर्म यांचें स्वरूप जाणावे' असे सांगणाऱ्या भगवानांना सम्यग्ज्ञानाचा उपदेशच विवक्षित आहे. त्यामुळेंहि येथें कूटस्थ ब्रह्म सांगावयाचें आहे, असे सिद्ध होते. भगवानांनीं कर्मज्ञानाचें जें फल सांगितले आहे त्याच्याकडे दृष्टि दिली तरी सुद्धां कूटस्थ ब्रह्मच येथे विवक्षित आहे असें दिसतें-]—**च विपरीतज्ञानात् अशुभात् मोक्षणं न स्यात्**—तसेंच

विपरीत ज्ञानानें अशुभापासून मुक्त होणे शक्य नाहीं.—**च ' यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात् ' ( श्लो. १६ ) इति उक्तम्**—पण जें जाणून तूं अशुभापासून मुक्त होशील, असें भगवानांनीं सांगितलें आहे. ( याप्रमाणे भगवानाचे वचन अध्यारोपाचा म्ह० कर्माचा अपवाद करण्यासाठीं असल्यामुळे त्यांत विरुद्ध असे कांहींच नाहीं, असे जें येथवर उपपादन केलें त्याचा उपसंहार करितात-)—**तस्मात् प्राणिभिः कर्माकर्मणी विपर्ययेण गृहीते**—यास्तव प्राण्यांनीं कर्म व अकर्म यांचे विपरीत ग्रहण केले आहे, प्राणी कर्माला अकर्म व अकर्माला कर्म समजले आहेत.—**तद्विपर्ययग्रहणनिवृत्त्यर्थं ' कर्मण्यकर्म यः० ' इत्यादि भगवतः वचनं**—त्यांच्या त्या विपरीत ग्रहणाचे -मिथ्याज्ञानाचें निरसन करण्यासाठीं 'कर्मण्यकर्म यः०' इत्यादि भगवानाचे वचन आहे. ( ' कर्मणि ' व ' अकर्मणि ' या अधिकरणसप्तमी मानतांच येत नाहींत, असे सांगतात-) **—च अत्र कुण्डे बदराणि इव कर्माधिकरणं अकर्म न अस्ति अकर्माधिकरणं कर्म अपि न अस्ति**—आणि या व्यवहारांत, भांड्यांत जशी बोरें त्याप्रमाणे कर्माच्या आधारानें अकर्म रहात नाहीं व अकर्माच्या आधाराने कर्महीं नाहीं. ( कारण भांड्यांत जशीं बोरें दिसतात त्याप्रमाणें कर्म हा आधार असून अकर्म त्यात राहते किंवा अकर्म आधार असून कर्म त्यांत राहते, असा अनुभव येत नाहीं. शिवाय )—**अकर्मणः कर्माभावत्वात्**—अकर्माला कर्माभावत्व आहे. म्ह० कर्माचा अभाव हेच अकर्माचें स्वरूप आहे, ( आणि कोणताही अभाव केव्हांहीं कोणाचेंच अधिकरण होत नाहीं. त्यामुळें ' कर्मणि ' व ' अकर्मणि ' या अधिकरणसप्तमी नव्हेत. ' भांड्यांत बोरें ' येथील ' भांड्यांत ' ही अधिकरणसप्तमी आहे. ' घरावर मोर, ' ' कमलात भ्रमर, ' ' विहिरींत पाणी ' या सर्व अधिकरणसप्तमी आहेत. )—**अतः यथा मृगतृष्णिकायां उदकं शुक्तिकायां वा रजतं तथा लौकिकैः कर्माकर्मणी विपरीतगृहीते एव**—म्हणून ज्याप्रमाणे मृगजलामध्यें उदक किंवा शिंपीमध्ये रजत पहावे त्याप्रमाणें वेदांतशास्त्रसंस्कारशून्य सामान्य लोकांनीं कर्म व अकर्म यांचे विपरीत ग्रहणच केलें आहे. [ कर्मामध्ये जो अकर्म पाहतो व अकर्मात कर्म पाहतो तोच बुद्धिमान, वगैरे म्हटलेले असल्यामुळे व कर्माचे यथार्थ स्वरूप कळले असतां पुरुष संसारातून मुक्त होतो, असेंही सांगितलें असल्यामुळे येथे ब्रह्मस्वरूप विवक्षित आहे. प्राण्यांनीं कर्म व अकर्म यांचें विपरीत ग्रहण केले आहे. यास्तव ती त्यांची विपरीत भावना घालवून यथार्थ स्वरूपज्ञान करून देण्यासाठीं भगवान् ' कर्मणि अकर्म यः पश्येत् ' इत्यादि येथें सांगत आहेत. ' कर्मांत ' अकर्म व ' अकर्मांत ' कर्म या अधिकरणसप्तमी मानतां येत नाहीत. कारण त्यांचा आधार-आधेयभाव संभवत नाहीं. ह्मणून शास्त्रज्ञानशून्य लोक कर्माला अकर्म व अकर्माला कर्म असें भलतेच समजले आहेत. त्यांचा तो भ्रम घालविण्यासाठीं हें भगवद्वचन आहे. ]

**ननु कर्म कर्मैव सर्वेषां न क्वचिद्व्यभिचरति । तन्न नौस्थस्य नावि गच्छन्त्यां तटस्थेष्वगतिषु नगेषु प्रतिकूलगतिदर्शनाद्दूरेषु चक्षुषाऽसंनिकृष्टेषु गच्छत्सु गत्यभावदर्श**

**नात्। एवमिहाप्यकर्मण्यहं करोमीति कर्मदर्शनं कर्मणि चाकर्मदर्शनं विपरीतदर्शनं येन तन्निराकरणार्थमुच्यते कर्मण्यकर्म यः पश्येदित्यादि ॥**

**भाष्यार्थ**—( कर्म व अकर्म हीं दोन्हीं आरोपित आहेत, हें म्हणणें न पटल्यामुळें वादी म्हणतो-)—**ननु कर्म सर्वेषां कर्म एव क्वचित् न व्यभिचरति**—अहो पण जे कर्म ते सर्वांच्या दृष्टीनें कर्मच आहे. त्याचा कोठेंही व केव्हांही व्यभिचार होत नाहीं. [ जे कर्म असतें त्याला सर्व कर्मच समजतात. कर्माला अकर्म कोणीच समजत नाहीत, तसेंच जे अकर्म म्ह० कर्माचा अभाव त्याला सर्व अकर्मच मानतात, अकर्माला कर्म कोणी म्हणत नाहीत: या शंकेचा परिहार करितात- ]—**तत् न**—तर तें बरोबर नाहीं.—**नावि गच्छन्त्यां नौस्थस्य तटस्थेषु अगतिषु नगेषु प्रतिकूलगतिदर्शनात्**—कारण नाव वेगाने जात असतांना त्या नावेंत बसलेल्या मनुष्याला तीरावरील गतिरहित असलेल्या वृक्षांमध्यें प्रतिकूल गति दिसते. ( ज्या दिशेला नाव वेगाने जात असते, त्याच्या उलट दिशेला तीरावरील वृक्ष धांवत आहेत, असें नावेंतील माणसांना स्पष्ट दिसते. म्हणजे जे कर्म ते सर्वांना कर्मच दिसते असें नाहीं. तर कर्माच्या अभावींहि भ्रमाने कर्म दिसते त्याचप्रमाणे-)—**दूरेषु चक्षुषा असंनिकृष्टेषु गच्छत्सु गत्यभावदर्शनात्**—दूर प्रदेशीं असलेले, त्यामुळेंच सामान्यतःच नेत्रानें दिसत असले तरी विशेषतः चक्षूशीं संबद्ध न झालेले लोक वस्तुतः जरी गमन करीत असले तरी त्याच्या ठिकाणीं गतीचा अभाव अनुभवास येतो. ( ते खरोखरी जात असतांनाही उभे आहेत असें दिसते. त्यामुळे लोकांना जे अकर्म वाटते तें वस्तुतः अकर्मच असते, असे नाहीं. )—**एवं इह अपि**—तसेंच या दार्ष्टान्तिकांतहि—**अकर्मणि अहं करोमि इति कर्मदर्शनं कर्मणि च अकर्मदर्शनं**—कर्मरहित-अविक्रिय ब्रह्मामध्ये मी करतों असें कर्माचे दर्शन व सक्रिय द्वैत प्रपंचामध्यें अकर्माचें दर्शन [ म्ह० गतिरहित वृक्षामध्ये जशी भ्रमानें गति पहावी, त्याप्रमाणें क्रियारहित-निर्विकार ब्रह्मामध्यें कर्म पाहणे व दूर असलेल्ले लोक जरी चालत असले तरी ते चालत नाहीत, असें ज्याप्रमाणे वाटते त्याप्रमाणे सक्रिय द्वैतामध्यें कर्माचा अभाव वाटणें असें हें-]—**विपरीतदर्शनं येन, तन्निराकरणार्थं ' कर्मण्यकर्म यः पश्येत्० ' इत्यादि उच्यते**—विपरीत दर्शन ज्या कारणाने संभवतें त्याचें निराकरण करण्यासाठीं ' कर्मण्यकर्म यः पश्येत्० ' इत्यादि सांगितले जात आहे.

**तदेतदुक्तप्रतिवचनमप्यसकृदत्यन्तविपरीतदर्शनभाविततया मोमुह्यमानो लोकः श्रुतमप्यसकृत्तत्त्वं विस्मृत्य मिथ्याप्रसङ्गमवतार्यावतार्य चोदयतीति पुनः पुनरुत्तरमाह भगवान्दुर्विज्ञेयत्वं चाऽऽलक्ष्य वस्तुनः। अव्यक्तोऽयमचिन्त्योऽयं न जायते म्रियत इत्यादिनाऽऽत्मनि कर्माभावः श्रुतिस्मृतिन्यायप्रसिद्ध उक्तो वक्ष्यमाणश्च। तस्मिन्नात्मनि कर्माभावेऽकर्मणि कर्मविपरीतदर्शनमत्यन्तनिरूढम्। यतः ' किं कर्म किमकर्मेति कवयोऽप्यत्र मोहिताः '। देहाद्याश्रयं कर्माऽऽत्मन्यध्यारोप्याहं कर्ता ममैतत्कर्म मयाऽस्य फलं भोक्तव्यमिति च ॥**

**भाष्यार्थ**—( अहो पण कर्म व कर्माचा अभाव हीं दोन्ही आरोपित असल्यामुळें अविक्रिय ब्रह्माचें नुस्तें ज्ञानच जर भगवानांना येथें विवक्षित असेल तर तें दुसऱ्या अध्यायांत ' अव्यक्तोऽयं अचिन्त्योऽयं०' 'न जायते म्रियते०' इत्यादि श्लोकांत सांगितलेलें असल्यामुळें येथे पुनः सांगण्याची आवश्यकता दिसत नाहीं, व सांगूं लागल्यास पुनरुक्ति दोष येतो, अशी शंका घेऊन सांगतात-)—**तत् एतत् असकृत् उक्तप्रतिवचनं अपि**—ते हे आत्म्याचें सक्रियत्व वारंवार जरी निराकृत केले आहे, म्ह० आत्मा सक्रिय आहे, या शंकेचें वारंवार जरी निराकरण केलें आहे तरी—**अत्यन्तविपरीतदर्शनभाविततया मोमुह्यमानः लोकः**—निर्विकार आत्मवस्तूच्या अपेक्षेने अत्यंत विपरीत असलेलें जें मिथ्याज्ञान त्याचे संस्कार अत्यंत दृढ झाल्यामुळें अतिशय मोहाला प्राप्त झालेला लोक ( मिथ्याज्ञान हे आत्मवस्तूच्या अगदी विपरीत ज्ञान आहे. पण त्याचे संस्कार अनादि कालापासून दृढ झाल्यामुळें सर्व लोक अतिशय मोहित होतात, आणि त्या मोहामुळे )—**असकृत् श्रुतं अपि तत्त्वं विस्मृत्य**—वारंवार ऐकलेलेंहि तत्त्व विसरून—**मिथ्याप्रसंगं अवतार्य अवतार्य चोदयति**—थोडासा प्रसंग येतांच किंवा पुन: पुन. मिथ्याप्रसंग आणून आत्म्याच्या सक्रियत्वाविषयींच अज्ञ जन प्रश्न करतो—**इति भगवान् पुनः पुनः उत्तरं आह**—म्हणून भगवान् पुनः पुन. तत्त्वभूत उत्तर सांगतात—**च वस्तुनः दुर्विज्ञेयत्वं आलक्ष्य पुनः पुनः उत्तरं आह**—आणि आत्मवस्तु अत्यंत दुर्ज्ञेय आहे, तिचे ज्ञान होणे फार कठिण आहे, असे पाहून पुन: पुन. झालेल्या भ्रमाचे निरसन करण्यासाठी पुनः पुन भगवान् उत्तर सांगत आहेत. (त्यामुळे पुनरुक्ति दोष येत नाही. आता ' असकृत् उक्तप्रतिवचनं-' असे जे वर भाष्यांत म्हटले आहे त्या असकृत् उक्तप्रतिवचनाचाच अनुवाद करितात-)—'**अव्यक्तोऽयं अचिन्त्योऽयं०** ' '**न जायते म्रियते वा०** '**इत्यादिना श्रुति-स्मृति-न्यायप्रसिद्धः आत्मनि कर्माभावः उक्तः च वक्ष्यमाणः**—' अव्यक्तोऽयं० ' अ. २ श्लो. २५, ' न जायते० ' अ. २ श्लो. २०, इत्यादि वचनांनी श्रुति, स्मृति व न्याय यांनी पूर्णपणे सिद्ध झालेला आत्म्यामधील कर्माचा अभाव सांगितला आहे व पुढे सांगावयाचा आहे. ( न जायते म्रियते वा विपश्चित्०' इत्यादि श्रुति, काठकभाष्यार्थ पृ. ५८, ' न जायते . कदाचित्०' 'अव्यक्तोऽयं०' इत्यादि स्मृति, असंगत्व, निर्विकारत्व इत्यादि न्याय या प्रमाणांनी आत्म्यामध्यें कर्माचा अभाव आहे, आत्मा निष्क्रिय आहे, ही गोष्ट उत्तम प्रकारें सिद्ध झालेली आहे. तीच पूर्वी सांगितली असून ' सर्वकर्माणि मनसा०' अ. ५ श्लो. १३ इत्यादि वचनांनी पुढेही सांगणार आहेत. ' अहो पण शरीर, वाक् व मन यांनी होणारी त्रिविध कर्मे प्रसिद्ध आहेत. कूटस्थस्वभाव आत्मा असंग आहे. त्यामुळे आत्म्यामध्ये कर्म राहत, अशी प्रसिद्धीच नाही. तेव्हां कर्मरहित आत्म्यामध्ये विपरीत कर्माचें दर्शनच संभवत नाहीं,' म्हणून म्हणाल तर सांगतों -)—**तस्मिन्-कर्माभावे-अकर्मणि-आत्मनि-कर्मविपरीतदर्शनं अत्यन्तनिरूढं**—त्या कर्माचा अभाव असलेल्या अकर्मरूप आत्म्यामध्यें कर्म हेंच विपरीतदर्शन अत्यंत रूढ झालें आहे. ( 'मी

कर्ता ' असें प्रत्येक जीवाला वाटतें. त्यामुळें आत्म्यामध्यें कर्माचा भ्रम अत्यंत रूढ झा-लेला आहे. अर्थात् अकर्मा–निष्क्रिय आत्म्यामध्यें विपरीत कर्मदर्शन अनुभवसिद्ध आहे)—**यतः 'किं कर्म किमकर्मेति कवयोऽप्यत्र मोहिताः'**—कारण 'कर्म काय व अकर्म काय, याविषयीं विद्वान्‌ही मोहित झाले आहेत.' ( पृ.३८९ पहा. 'अहो पण आत्मा जर निष्क्रिय आहे तर त्याच्या ठिकाणीं असा भ्रम कसा संभवतो' ? उत्तर-)—**देहादि-आश्रयं कर्म आत्मनि अध्यारोप्य**—देहादिकाच्या आश्रयाने असलेले कर्म आत्म्या-वर आरोपून म्ह० देह, इंद्रिये यांच्या योगानेंच होणाऱ्या कर्माचा आत्म्यावर आरोप करून—**अहं कर्ता मम एतत् कर्म मया अस्य फलं भोक्तव्यं इति च**—मी कर्ता आहे, हें माझें कर्म आहे, मला याचे फल भोगणे अवश्य आहे, असें प्रत्येक अज्ञ जीव म्हणतो. (त्यामुळे कर्मरहित आत्म्यामध्ये कर्म पाहणें, हे विपरीतदर्शन अनुभवसिद्ध आहे.)

**तथाऽहं तूष्णीं भवामि येनाहं निरायासोऽकर्मा सुखी स्यामिति कार्यकरणाश्रयव्या-पारोपरमं तत्कृतं च सुखित्वमात्मन्यध्यारोप्य न करोमि किंचित्तूष्णीं सुखमासमित्य-भिमन्यते लोकः । तत्रेदं लोकस्य विपरीतदर्शनापनयनायाऽऽह भगवान्कर्मण्यकर्म यः पश्येदित्यादि ॥**

**भाष्यार्थ**—(आतां आत्म्यामध्ये अकर्मदर्शन दाखवितात-)—**तथा अहं तूष्णीं भवामि येन अहं निरायासः अकर्मा सुखी स्यां**—त्याचप्रमाणे मी मुकाट्यानें बसतों, म्हणजे मी आयासरहित, अकर्मा, सुखी होईन—**इति कार्यकरणाश्रयव्या-पारोपरमं च तत्कृतं सुखित्वं आत्मनि अध्यारोप्य**—अशा प्रकारे शरीर व इंद्रिये यांच्या आश्रयाने होणाऱ्या व्यापाराचा उपरम–शरीरेंद्रियांच्या योगाने होणाऱ्या हालचालीचा अभाव–व त्यामुळे प्राप्त झालेले सुखित्व आत्म्यामध्ये आरोपून ( शरीरें-द्रियांचा कर्माभाव व त्यामुळे प्राप्त होणारें सुखित्व यांचा आत्म्यावर आरोप करून )—**किंचित् न करोमि तूष्णीं सुखं आसं इति लोकः अभिमन्यते**—मी कांहीं करीत नाहीं. मुकाट्यानें व सुखानें राहिलों आहे, असा सर्व लोक अभिमान धरितात, असें सर्व समजतात. ( मी आतां अगदीं स्वस्त बसतो, कांहीं करीत नाहीं. त्यामुळे मी आयासशून्य, सुखी होतो असें म्हणून व शरीरेंद्रियांच्या हालचालीचा अभाव व त्यामुळे होणारें सुखित्व–मी सुखी आहे, असा भाव या दोन्हींचा आत्म्यावर आरोप करून सर्व जीव ' मी कांहीं करीत नाहीं, स्वस्थ सुखानें बसलों आहे ' असें मानतो. शुक्तीमध्ये अरूप्यत्व–अरजतत्व स्वाभाविक असतें, रूप्यत्व आरोपित असते, रूप्यत्वाचा अभावहि आरोप्याभावरूप असल्यामुळें आरोप्य जे रूप्यत्व त्याच्याच पक्षामध्ये पडतो. त्याचप्रमाणे आत्म्याचें अक्रियत्व स्वाभाविक आहे. सक्रियत्व आरोपित आहे आणि कर्माभाव हा त्या आरोपित सक्रियत्वाचाच अभाव असल्यामुळें तोही आरोपितच आहे, असें समज-णारे आचार्य उपसंहार करितात-)—**तत्र**—याप्रमाणें लोकांना आत्म्यामध्यें कर्मादि-कांचा भ्रम होतो, असें सिद्ध झालें असतां—**भगवान् लोकस्य विपरीतदर्शना-**

**पनयनाय ' कर्मण्यकर्म यः पश्येत्० ' इत्यादि इदं आह**—भगवान् लोकांचें विपरीत ज्ञान घालविण्यासाठीं ' कर्मण्यकर्म यः पश्येत्० ' इत्यादि हें वचन सांगत आहेत.

**अत्र च कर्म कर्मैव सत्कार्यकरणाश्रयं कर्मरहितेऽविक्रिय आत्मनि सर्वैरध्यस्तं यतः पण्डितोऽप्यहं करोमीति मन्यते। अत आत्मसमवेततया सर्वलोकप्रसिद्धे कर्मणि नदीकूलस्थेष्विव वृक्षेषु गतिः प्रातिलोम्येनाकर्म कर्माभावं यथाभूतं गत्यभावमिव वृक्षेषु यः पश्येदकर्मणि च कार्यकरणव्यापारोपरमे कर्मवदात्मन्यध्यारोपिते तूष्णीमकुर्वन्सुखमास इत्यहंकाराभिसंधिहेतुत्वात्तस्मिन्नकर्मणि च कर्म यः पश्येत्। य एवं कर्माकर्मविभागज्ञः स बुद्धिमान्पण्डितो मनुष्येषु स युक्तो योगी कृत्स्नकर्मकृच्च सोऽशुभान्मोक्षितः कृतकृत्यो भवतीत्यर्थः ॥**

**भाष्यार्थ—अत्र च कार्यकरणाश्रयं कर्म कर्म एव सत् कर्मरहिते अविक्रिये आत्मनि सर्वैः अध्यस्तं**—या व्यवहारांत शरीरेंद्रियांच्या आश्रयाने होणारें कर्म स्वतः-च्या कर्म या रूपानेच स्थित असतां कर्मरहित अविक्रिय आत्म्यामध्ये सर्वांकडून आरोपिलें जातें. ( आत्म्यावर शरीरेंद्रियांचा आरोप करून त्यांच्या द्वारा सर्व लोक त्याच्यावर कर्माचाही आरोप करितात )—**यतः पंडितः अपि अहं करोमि इति मन्यते**—कारण विवेकी पंडितसुद्धां ' मी करतो ' असे मानतो. ( मग अविवेक्यामध्ये कर्तृत्वाभिमान असला तर त्यांत काय आश्चर्य आहे ? असो; याप्रमाणे आत्म्यामध्ये कर्माचा आरोप होतो, असें उपपादन करून प्रस्तुत श्लोकाच्या ' कर्मणि अकर्म यः पश्येत्० ' या पहिल्या पादाचें व्याख्यान करितात- )—**अतः आत्मसमवेततया सर्वलोकप्रसिद्धे कर्मणि**—म्हणून आत्म्याशी नित्यसंबद्ध-आत्म्याचा नित्यधर्म, या स्वरूपानें सर्वलोकप्रसिद्ध असलेल्या कर्मामध्ये ( कर्म हा आत्म्याचा-माझा धर्म आहे, कर्म माझे आहे, म्हणून सर्वांना माहित असलेल्या कर्मामध्ये )—**नदीकूलस्थेषु वृक्षेषु प्रातिलोम्येन गतिः इव**—नदीच्या तीरावरील वृक्षांमध्ये प्रतिकूलत्वाने-उलट दिशेने जशी गति दिसते, त्याप्रमाणें आत्म्यामध्ये प्रतीत होणाऱ्या कर्मामध्ये—**वृक्षेषु यथाभूतं गत्यभावं इव अकर्म-कर्माभावं यः पश्येत्**—तीरावरील वृक्षामध्ये वास्तविक जसा गतीचा अभाव असतो त्याप्रमाणे वास्तविक अकर्म-कर्माचा अभाव जो पाहतो, ( तीरावरील वृक्ष वेगानें जात असलेल्या नौकेतील मनुष्याला जोराने धांवत आहेत, असे जरी वाटलें तरी त्यांच्या ठिकाणी धावणे ही क्रिया नाही. असे पाहणे हें यथाभूतदर्शन-सम्यक्दर्शन आहे. त्याचप्रमाणे लौकिकदृष्ट्या आत्म्यामध्ये भासणारें कर्म वस्तुतः आत्म्याचें नव्हे, असे जो पाहतो तो बुद्धिमान्-ज्ञानी असा संबंध. )—**च अकर्मणि-कार्यकरणव्यापारोपरमे कर्मवत् आत्मनि अध्यारोपिते**—आणि अकर्मामध्यें म्ह० शरीरेंद्रियांच्या व्यापाराच्या उपरमांत-शरीरेंद्रियांच्या व्यापाराभावांत कर्माप्रमाणेंच आत्म्यामध्यें आरोपिलेल्या कर्माभावांत म्हणजे—**तूष्णीं अकुर्वन् सुखं आसे इति-अहंकाराभिसंधिहेतुत्वात् तस्मिन् अकर्मणि च कर्म यः पश्येत्**—मी मुकाट्यानें कांही न करिता सुखानें बसलो आहें, अशा प्रकारें अहंकार व

फलाभिलाष यांना कारण होत असल्यामुळें त्या अकर्मामध्यें कर्म जो पाहतो; ( तो बुद्धिमान् इत्यादि )—**यः एवं कर्माकर्मविभागज्ञः सः मनुष्येषु बुद्धिमान्-पंडितः सः युक्तः-योगी च सः कृत्स्नकर्मकृत्**—जो याप्रमाणें कर्म, व अकर्म यांचा विभाग जाणणारा, तो मनुष्यांमध्यें बुद्धिमान्-पंडित, तो युक्त म्ह० योगी व तो सर्व कर्म करणारा—**सः अशुभात् मोक्षितः-कृतकृत्यः भवति इत्यर्थः**—अशुभ संसारापासून मुक्त केला गेलेला तो कृतकृत्य होतो, असा भावार्थ. [अज्ञ लोक आत्म्यावर शरीरेंद्रियांचा आरोप करितात व शरीरेंद्रियांचें कर्म हीं आत्म्याचीच कर्में असें मानूं लागतात. शुक्तीच्या ठिकाणीं रजताचा जसा आरोप करितात, तसाच आत्म्यावर कर्मांचा आरोप होतो. पण शुक्तीच्या ठिकाणीं वस्तुतः रजत नाहीं, हें जसें पहावें त्याप्रमाणें आत्म्यामध्यें वस्तुतः कर्म नाहीं, असें जो पाहतो, त्याचप्रमाणें शरीरेंद्रियांचा व्यापार शांत करून त्याच्या द्वारा मीच आतां कर्मरहित झालों आहे, सुखी-स्वस्थ आहें, अशा प्रकारच्या अकर्माला अहंकारामुळें जो कर्मच समजतो, तो पंडित आहे. कारण रूपें व त्याचा अभाव या दोन्हीं पदार्थांनीं हीन असलेल्या शिंपीला जसें तत्त्वतः पहावें त्याप्रमाणें कर्म व अकर्म यांनीं हीन असलेल्या केवल निर्विकार आत्म्याला जाणणारा पुरुष बुद्धिमान, योगी इत्यादि स्तुतीला पात्र होतो. ]

**अयं श्लोकोऽन्यथा व्याख्यातः कैश्चित्, कथं, नित्यानां किल कर्मणामीश्वरार्थेऽनुष्ठीयमानानां तत्फलाभावादकर्माणि तान्युच्यन्ते गौण्या वृत्त्या । तेषां चाकरणमकर्म तच्च प्रत्यवायफलत्वात्कर्मोच्यते गौण्यैव वृत्त्या । तत्र नित्ये कर्मण्यकर्म यः पश्येत्फलाभावाद्यथा धेनुरपि गौरगौरुच्यते क्षीराख्यं फलं न प्रयच्छतीति तद्वत् । तथा नित्याकरणे त्वकर्मणि च कर्म यः पश्येन्नरकादिप्रत्यवायफलं प्रयच्छतीति ॥**

**भाष्यार्थ**—( याप्रमाणें आपल्या अभिप्रायाला अनुसरून श्लोकाचें व्याख्यान करून आचार्य आतां वृत्तिकारांच्या व्याख्यानाचा अनुवाद करितात-)—**कैश्चित् अयं श्लोकः अन्यथा व्याख्यातः**—कित्येकांनीं ह्या श्लोकाचें याहून अगदीच विपरीत व्याख्यान केलें आहे.—**कथं** —तें कसें?—**ईश्वरार्थं अनुष्ठीयमानानां नित्यानां किल कर्मणां तत्फलाभावात्**—ईश्वरासाठीं अनुष्ठान केल्या जाणाऱ्या प्रसिद्ध नित्य कर्मांच्या-फलाचा अभाव असल्यामुळें—**गौण्या वृत्त्या तानि अकर्माणि उच्यन्ते**—गौणवृत्तीनें तीं अकर्में म्हटलीं जातात. (नित्य कर्में हीं वस्तुतः कर्मेंच आहेत, तथापि कर्त्याला त्यांचें कांहींच फल मिळत नसल्यामुळें 'फलाभाव' या गुणामुळें त्यांना अकर्म म्हणतात. )—**तेषां च अकरणं अकर्म**—आणि त्या नित्य कर्मांचें अनुष्ठान न करणें हेंच अकर्म आहे.—**च प्रत्यवायफलत्वात् तत् गौण्या एव वृत्त्या कर्म उच्यते**—आणि प्रत्यवायप्राप्ति हें त्याचें फल असल्यामुळें तें गौणी वृत्तीनेंच कर्म म्हटलें जातें. ( कारण प्रत्यवाय हें फल उत्पन्न करणें हा कर्माचा गुण त्यांत आहे. म्हणून त्याला गौणवृत्तीनें कर्म म्हणतात-)—**तत्र फलाभावात् नित्ये कर्मणि अकर्म यः पश्येत्**—कर्म व अकर्म यांचा असा अर्थ आहे, म्हणून फलाचा अभाव असल्यामुळें

नित्य कर्मामध्यें जो अकर्म पाहतो,—**यथा धेनुः अपि गौः क्षीराख्यं फलं न प्रयच्छति इति अगौः उच्यते तद्वत्**—ज्याप्रमाणें नुकीच प्रसवलेलीहि गाय दूध हें फल देत नसल्यास तिला ' अगौः ' ही गाय नव्हे, असें म्हणतात त्याचप्रमाणे ( फल न देणाऱ्या नित्य कर्माला अकर्म ह्मणतात. यास्तव नित्य कर्मामध्यें जो अकर्म पाहतो )—**तथा नित्याकरणे अकर्मणि तु नरकादिप्रत्यवायफलं प्रयच्छति इति यः कर्म पश्येत्**—त्याचप्रमाणें नित्य कर्मांचे अनुष्ठान न करणे, या अकर्मामध्ये तर तें अकर्म नरकादि प्रत्यवायफल देते ह्मणून जो कर्म पाहतो, ( तो मनुष्यांमध्ये बुद्धिमान् योगी व सर्व कर्म करणारा आहे. )

**नैतद्युक्तं व्याख्यानमेवंज्ञानादशुभान्मोक्षानुपपत्तेर्यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभादिति भगवतोक्तं वचनं बाध्येत । कथं, नित्यानामनुष्ठानादशुभात्स्यान्नाम मोक्षणं न तु तेषां फलाभावज्ञानात् । न हि नित्यानां फलाभावज्ञानमशुभमुक्तिफलत्वेन चोदितं नित्यकर्मज्ञानं वा । न च भगवतैवेहोक्तम् ॥**

**भाष्यार्थ**—( वृत्तिकाराच्या या व्याख्यानावर दोष देतात- )-**एतत् व्याख्यानं न युक्तं**—हे व्याख्यान सयुक्तिक नाही.—**एवं ज्ञानात् अशुभात् मोक्षानुपपत्तेः**—नित्य कर्म अकर्म आहे व नित्य कर्म न करणे, हेंच कर्म आहे, अशाप्रकारच्या ज्ञानाने संसारापासून मुक्त होण्याची उपपत्ति लागत नसल्यामुळे [ असल्या गौण कर्माकर्मज्ञानाने मोक्ष मिळण्याचा संभव नसल्यामुळे ]—**'यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात्' इति भगवता उक्तं वचनं बाध्येत**—'यज्ज्ञात्वा०' (श्लो.१६ पृ. ३८९) हें भगवानांनी सांगितलेले वचन बाधित होईल. [ कारण असल्या गौणज्ञानाने पापनिवृत्ति होण्याचा संभव नाही, व त्यावांचून मोक्ष मिळणे अशक्य आहे. 'अहो पण ' धर्मेण पापं अपनुदति-' धर्माने पाप घालवितो अशी श्रुति असल्यामुळे नित्यकर्मानुष्ठानाने पापक्षय होतो, ही गोष्ट प्रसिद्ध आहे आणि नित्यकर्मांचे दुसरें कांही फल नसल्यामुळे ते अकर्म आहे, असें जाणून त्याचें अनुष्ठान केल्यास अशुभापासून मोक्ष कां होणार नाही' अशी शंका घेऊन समाधान करितात-]-**कथं**—तें कसे बाधित होते ?—**नित्यानां अनुष्ठानात् अशुभात् मोक्षणं स्यात् नाम तु तेषां फलाभावज्ञानात् न**—नित्य कर्मांच्या अनुष्ठानामुळे अशुभापासून मोक्ष संभवतो, तरी पण त्यांच्या फलाचा अभाव आहे, या ज्ञानाने त्याचा संभव नाही—**हि नित्यानां फलाभावज्ञानं नित्यकर्मज्ञानं वा अशुभमुक्तिफलत्वेन न चोदितं**—कारण नित्यकर्मांच्या फलाचा अभाव आहे, हे ज्ञान किंवा नित्यकर्मांचे ज्ञान, अशुभापासून मुक्ति होणे, या फलाचें साधन या रूपाने विहित नाही. [भगवानांनींच त्याचें विधान केलें आहे, म्हणून म्हणाल तर-]—**च भगवता एव इह न उक्तम्**—व भगवानांनींहि येथे तसें सांगितलेले नाहीं. ['क्षेत्रज्ञस्य ईश्वरज्ञानात् विशुद्धिः परमा मता ' क्षेत्रज्ञच ईश्वर आहे अशा ज्ञानानें परम विशुद्धि होते, असें मानलेले आहे. त्यामुळें कर्मानें अशुभापासून मोक्ष होणें जरी शक्य नसलें तरी तो होतो, असें गृहीत- धरून आचार्य म्हणतात-नित्यकर्मांच्या अनुष्ठानानें अशुभाचा म्ह० संसाराचा क्षय होतो,

असें जरी मानलें तरी या प्रकरणांत तें विवक्षित नाहीं. कारण 'यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात्' या वचनानें भगवान् ज्ञानानें अशुभक्षय होईल अशी प्रतिज्ञा करीत आहेत व तें ज्ञान 'नित्यकर्मांचें फल नाहीं,' हें नव्हे. कारण अशुभ म्ह० संसार 'नित्यकर्मांचे फल नाही,' हें न कळल्यानें उद्भवलेला नाहीं. त्यामुळें नित्यकर्मांचें फल नाहीं, हे कळल्याने त्याची निवृत्ति होणें शक्य नाहीं. नित्य कर्मांचें फल नाहीं, हें न कळल्यामुळेंच जर अशुभाचा उद्भव झाला असता तर त्याच्या ज्ञानाने त्याची निवृत्ति झाली असती. शिवाय जो विषय प्रत्यक्ष नसतो त्याचा निश्चय शास्त्रावरून होतो. पण नित्य कर्मांच्या फलाचा अभाव आहे या ज्ञानानें अशुभनिवृत्ति होते, असे शास्त्र कोठेंहि सांगत नाही. तसेच, नित्य कर्मांचें अनुष्ठान न करणे हेंच कर्म आहे, अशा ज्ञानाने संसारापासून मोक्ष होतो असेहि शास्त्रांत कोठें सांगितलेलें नाहीं. 'यज्ज्ञात्वा०' हे भगवद्वचनच याविषयीं प्रमाण आहे, म्हणून म्हणावे तर भगवानांनी 'जे जाणून तूं संसारांतून मुक्त होशील,' एवढेच म्हटले आहे. नित्यकर्मांच्या फलाचा अभाव आहे, नित्य कर्मांचें फल काही नाहीं, या ज्ञानाने तूं मुक्त होशील, असें म्हटलेलें नाही.]

**एतेनाकर्मणि कर्मदर्शनं प्रत्युक्तम् । न ह्यकर्मणि कर्मेति दर्शनं कर्तव्यतयेह चोद्यते, नित्यस्य तु कर्तव्यतामात्रम् । न चाकरणान्नित्यस्य प्रत्यवायो भवतीति विज्ञानात्किंचित्फलं स्यात् । नापि नित्याकरणं ज्ञेयत्वेन चोदितम् । नापि कर्माकर्मेति मिथ्यादर्शनादशुभान्मोक्षणं बुद्धिमत्त्वं युक्तता कृत्स्नकर्मकृत्वादि च फलमुपपद्यते स्तुतिर्वा । मिथ्याज्ञानमेव हि साक्षादशुभरूपं कुतोऽन्यस्मादशुभान्मोक्षणं, न हि तमस्तमसो निवर्तकं भवति ॥**

**भाष्यार्थ—एतेन अकर्मणि कर्मदर्शनं प्रत्युक्तम्**—याच न्यायाने अकर्मांतील कर्मदर्शनाचे निराकरण केले आहे. ( कर्मामध्ये अकर्मदृष्टि जरी ठेविली तरी त्यानें अशुभापासून मोक्ष होऊं शकत नाही, या न्यायानेच अकर्मामध्यें कर्मदृष्टि ठेवल्यानेही मोक्षसिद्धि होणे शक्य नाही, असे समजावे. ' अहोपण, ' नाम-'च ब्रह्म आहे, इत्यादि उपासना फलासाठीं केल्या जातात. त्याचप्रमाणे अकर्मामध्ये फलासाठी कर्मदृष्टि करावी, असें विधान केलेले असल्यामुळे अशुभापासून मुक्त होणे अशक्य नाही,' म्हणून म्हणाल तर ते बरोबर नाहीं )—**हि अकर्मणि कर्म इति दर्शनं कर्तव्यतया इह न चोद्यते**—कारण अकर्मामध्ये कर्म अशी दृष्टि अवश्य करावी, असे येथे विधान केलेलें नाहीं—**तु नित्यस्य कर्तव्यतामात्रं**—तर नित्य कर्म अवश्य केले पाहिजे, एवढेच या श्लोकांत वृत्तिकारांच्या मती विवक्षित आहे. (त्यामुळें फलासाठी अकर्मामध्यें कर्मदर्शनाचें विधान केलें जाते, ही त्यांची कल्पना त्यांच्याच सिद्धान्ताच्या विरुद्ध आहे. " अहोपण, वृत्तिकारांच्या मतींही नित्य कर्मांचें अनुष्ठान करावें, एवढेंच विवक्षित नाही तर कर्माधिकारी पुरुषानें नित्य कर्मानुष्ठानांत प्रवृत्त व्हावें, म्हणून 'तें न केल्यास प्रत्यवायप्राप्ति होते' हें ज्ञानहि येथें विहित आहे" अशी शंका घेऊन सांगतात—)—**च नित्यस्य अकरणात् प्रत्यवायः भवति इति विज्ञानात् किंचित् फलं न स्यात्**

—आणि नित्य कर्मांचें अनुष्ठान न केल्यास प्रत्यवाय प्राप्त होतो, या विज्ञानामुळें कांहींच फल मिळत नाहीं. ( शास्त्राच्या विधीमुळेंच पुरुषाची नित्य कर्मानुष्ठानांत प्रवृत्ति होते. नित्य कर्मानुष्ठान न केल्यास प्रत्यवायप्राप्ति होते, त्या विज्ञानामुळे त्याची कर्मानुष्ठानांत प्रवृत्ति होत नाही. या विज्ञानाचें दुसरें कांही फलही अनुभवास येत नाही. अर्थात् कर्म न केल्यास प्रत्यवाय लागतो, या ज्ञानाचें कांहींच फळ नसल्यामुळे ते येथे विहित नाही. शिवाय ' अकरणामध्ये कर्मदृष्टि करावी ' या विधींत ' अकरण ' हे आलंबन आहे. म्हणून तें प्रधान आहे. त्यामुळें त्याला जाणले पाहिजे. पण कर्माचे अनुष्ठान न करणे हा अभाव आहे. तेव्हां अभावाला जाणावयाचे कसे ? अशा आशयाने म्हणतात–)—**नित्याकरणं ज्ञेयत्वेन अपि न चोदितं**—शिवाय नित्याकरण–नित्य कर्मांचे अनुष्ठान न करणें, हे जाणावे, असे कोठे विधानही नाही. ( ते ज्ञेयत्वरूपाने विहितही नाही. ' अहोपण, अकरण–अननुष्ठान अभावरूप असल्यामुळे नामादिकांप्रमाणे आश्रयरूपाने ते दिसणे शक्य नाही, हे खरें; पण 'हे रुप' असे सामानाधिकरण्याने त्याचे दर्शन संभवते, अशी शंका घेऊन सांगतात–)—**अपि च कर्म अकर्म इति मिथ्यादर्शनात् अशुभात् मोक्षणं बुद्धिमत्त्वं युक्तता कृत्स्नकर्मकृत्त्वादि च फलं वा स्तुतिः न उपपद्यते**—तसेच कर्म अकर्म आहे व अकर्म कर्म आहे, अशा मिथ्या ज्ञानाने अशुभापासून मुक्त होणे, बुद्धिमत्त्व, योगित्व, सर्वकर्मकर्तृत्व–सर्वोत्कर्ष हे फल किंवा स्तुति उपपन्न होत नाही. ( कारण सम्यग्ज्ञानाचीच स्तुति संभवते व त्याचेच फल मिळूं शकते. मिथ्या ज्ञानाची स्तुतिही संभवत नाही व त्याचे पुरुषार्थरूप फलहि संभवत नाही. ' अहोपण, स्वप्नांत मिथ्याज्ञानाचेही फल अनुभवास येते,' उत्तर–)—**मिथ्याज्ञानं एव हि साक्षात् अशुभरूपं**—मिथ्याज्ञानच अगोदर साक्षात् अशुभरूप आहे.—**अन्यस्मात् अशुभात् कुतः मोक्षणं**—तेव्हां त्याच्यायोगाने दुसऱ्या अशुभापासून मुक्ति कोठून होणार ?—**हि तमः तमसः निवर्तकं न भवति**—कारण अंधकारच अंधकाराला घालवूं शकत नाही. ( चिखलाने चिखल धुतला जात नाही, हे प्रसिद्धच आहे. )

**ननु कर्मणि यदकर्मदर्शनमकर्मणि वा कर्मदर्शनं न तन्मिथ्याज्ञानं किं तर्हि गौणं फलभावाभावनिमित्तम्। न कर्माकर्मविज्ञानादपि गौणात्फलस्याश्रवणात् । नापि श्रुतहान्यश्रुतपरिकल्पनया कश्चिद्विशेषो लभ्यते । स्वशब्देनापि शक्यं वक्तुं नित्यकर्मणां फलं नास्त्यकरणाच्च तेषां नरकपातः स्यादिति । तत्र व्याजेन परव्यामोहरूपेण कर्मण्यकर्म यः पश्येदित्यादिना किम् । तत्रैवं व्याचक्षाणेन भगवतोक्तं वाक्यं लोकव्यामोहार्थमिति व्यक्तं कल्पितं स्यात् । न चैतच्छद्मरूपेण वाक्येन रक्षणीयं वस्तु, नापि शब्दान्तरेण पुनः पुनरुच्यमानं सुबोधं स्यादित्येवं वक्तुं युक्तम् । कर्मण्येवाधिकारस्त इत्यत्र हि स्फुटतर उक्तोऽर्थो न पुनर्वक्तव्यो भवति । सर्वत्र च प्रशस्तं बोद्धव्यं च कर्तव्यमेव न निष्प्रयोजनं बोद्धव्यमित्युच्यते । न च मिथ्याज्ञानं बोद्धव्यं भवति तत्प्रत्युपस्थापितं वा वस्त्वाभासम् ॥**

**भाष्यार्थ**—( कर्मामध्यें अकर्मदर्शन हें मिथ्या ज्ञान नव्हे, गौण ज्ञान आहे, अशी शंका-)—**ननु कर्मणि यत् अकर्मदर्शनं वा अकर्मणि कर्मदर्शनं तत् मिथ्याज्ञानं न**—अहोपण, कर्मामध्ये जें अकर्मदर्शन किंवा अकर्मामध्यें जे कर्मदर्शन तें मिथ्याज्ञान नव्हे—**किं तर्हि फलभावाभावनिमित्तं गौणं**—तर मग काय ? फलाचें अस्तित्व व फलाचा अभाव या निमित्तानें होणारे तें गौण ज्ञान आहे. [कर्म अकर्म आहे, असें पाहतांना त्यांत फलाचा अभाव हा गुण आहे व अकर्म कर्म आहे, असें पाहतांना त्यांत फलाचा भाव हा गुण आहे. म्हणजे नित्यकर्माचे कांही फल नाहीं, म्हणून त्याला अकर्म समजतात व नित्य कर्म न केल्यास प्रत्यवाय लागतो, म्हणून त्याला कर्म समजतात. यास्तव असें समजणें हे गौण ज्ञान आहे, मिथ्या नव्हे. आचार्य या म्हणण्याचें निरसन करितात-]—**न । गौणात् कर्माकर्मविज्ञानात् अपि फलस्य अश्रवणात्**—हे म्हणणें बरोबर नाहीं. कारण असल्या गौण कर्माकर्मविज्ञानापासूनही फल सांगितलेलें नाहीं. [ ह्म० हे ज्ञान गौण जरी असले तरी प्रमाणभूत शास्त्रानें त्याचें कांहींएक फल सांगितलेलें नाहीं. त्यामुळे गौण म्हणता येत नाहीं. ' अहोपण, कर्म अकर्म आहे, व अकर्म कर्म आहे इत्यादि गौणविज्ञानाचा उपन्यास करून त्याच्या मिषाने नित्य कर्म अवश्य करावें असें विवक्षित असल्यामुळे गौणज्ञानाचे कांहींच फल जरी नसले तरी त्यांत काहीं मोठासा दोष नाहीं, ' असे वादी म्हणेल म्हणून आचार्य पुनः म्हणतात-]—**श्रुतिहानि-अश्रुतपरिकल्पनया कश्चित् विशेषः अपि न लभ्यते**—श्रुत अर्थ सोडून अश्रुत अर्थाची कल्पना केल्याने कोणताच विशेषहि प्राप्त होत नाहीं. [ ज्ञानानें अशुभापासून मुक्त होणें हा श्रुत अर्थ आहे तो सोडून अश्रुत असलेल्या नित्यानुष्ठानाची कल्पना करणें, यावर गौरव दोष येतो. पण तो पतकरूनहि विशेष लाभ कांहीच होत नाहीं. शिवाय ]—**नित्यकर्मणां फलं न अस्ति च तेषां अकरणात् नरकपातः स्यात् इति स्वशब्देन अपि वक्तुं शक्यं**—नित्य कर्माचे फल नाहीं व त्यांच्या अकरणामुळें-तीं न केल्यास नरकपात होतो, म्हणून विधींच्या अनुसार त्यांचे अनुष्ठान करावे असें प्रत्यक्ष तद्वाचक शब्दांनीही सांगतां येणे शक्य आहे.—**तत्र**—तेव्हां म्ह० प्रत्यक्ष शब्दांनीं हा अर्थ सांगतां येणें शक्य असतांना—'**कर्मणि अकर्म यः पश्येत्**' **इत्यादिना परव्यामोहरूपेण व्याजेन किं**—'कर्मणि अकर्म यः पश्येत्०' इत्यादि दुसऱ्यांना व्यामोह उत्पन्न करील अशा मिषानें काय करावयाचे आहे ? [ भगवानांना तसें सरळ व उघड उघड सांगतां येणे शक्य असतांना त्यांनीं असें पर्यायानें सांगितले आहे, अशी कल्पना केल्यास परम आप्त जे भगवान् त्यांच्याकडे फसवेगिरीचा दोष येतो, यास्तव वृत्तिकारांच्या या अर्थाची उपेक्षा करावी असें सांगतात-]—**तत्र एवं व्याचक्षाणेन भगवता उक्तं वाक्यं लोकव्यामोहार्थं इति व्यक्तं कल्पितं स्यात्**—म्हणून या श्लोकाचें असें व्याख्यान करणाऱ्या वृत्तिकारानें ' भगवानानें सांगितलेले वाक्य लोकांना व्यामोह पाडण्यासाठीं आहे ' अशी अगदीं स्पष्ट कल्पना केल्यासारखें होईल. ( नित्य कर्माच्या अनुष्ठानाची सिद्धि होण्यासाठीं हें मिष

आहे म्हणून म्हणाल तर-)—**एतत् वस्तु छद्मरूपेण वाक्येन न रक्षणीयं**— ही नित्यानुष्ठानरूप वस्तु अशा ढोंगी वाक्यानें रक्षण करण्यास उचित नाहीं.—**शब्दान्तरेण पुनः पुनः उच्यमानं सुबोधं स्यात् इति एवं अपि वक्तुं न युक्तं**— [ आत्म्याचें ज्ञान होणें फार कठिण असल्यामुळें तें सुबोध होण्यासाठीं त्याचा जसा पुनः पुनः निरनिराळ्या शब्दांनी बोध करितात याप्रमाणें ] हे नित्यानुष्ठान निरनिराळ्या शब्दांनीं पुनः पुनः सांगितलें म्हणजे सुबोध होईल, असेंहि म्हणणें युक्त नव्हे. [ शिवाय ] —'**कर्मण्येवाधिकारस्ते**' **इति अत्र हि स्फुटतरः उक्तः अर्थः पुनः वक्तव्यः न भवति**—' कर्मण्येवाधिकारस्ते ' अ. २ श्लो. ४७ या श्लोकांत अगदी स्पष्टपणें सांगितलेला अर्थ पुनः निराळ्या शब्दांनीं सांगण्यास योग्य होत नाहीं. तोच पुनः अशा निराळ्या अस्पष्ट वाक्यांनीं सांगण्याची कांही गरज नाहीं. ( तसेंच )—**च सर्वत्र प्रशस्तं च कर्तव्यं एव बोद्धव्यं निष्प्रयोजनं बोद्धव्यं इति न उच्यते**—लौकिकांत व वैदिक व्यवहारांत जें देवतादि तत्त्व प्रशस्त असतें व जें अग्निहोत्रादि अनुष्ठानास योग्य असतें तेंच जाणण्यास योग्य आहे असें म्हणतात. ज्याचा काही उपयोग नाहीं, जें निष्फळ असतें तें बोद्धव्य आहे, त्याला अवश्य जाणावें, असें कधीं कोणी म्हणत नाहीं. [कर्माला अकर्म व अकर्माला कर्म जाणणें हे, गौणज्ञान असल्यामुळेंच तें प्रशस्तहि नाहीं व तें अनुष्ठानार्हहि नाहीं. त्यामुळें त्याला बोद्धव्य म्हणतां येत नाहीं, शिवाय कर्मादि मायामात्र असल्यामुळें त्याविषयींचे ज्ञान गौण जरी असले तरी मिथ्या आहे व ]—**मिथ्याज्ञानं बोद्धव्यं न भवति**—कोणतेंही मिथ्याज्ञान ' बोद्धव्य ' नसतें—**वा तत्प्रत्युपस्थापितं वस्त्वाभासं बोद्धव्यं न भवति**—किंवा त्या मिथ्याज्ञानामुळें उपस्थित झालेला आभासरूप विषयही बोद्धव्य नसतो. [ मिथ्याज्ञानामध्येंही जाणण्यासारखें कांही नसतें व त्या मिथ्याज्ञानामुळें उद्भवलेल्या आभासरूप विषयामध्येंही जाणण्यासारखें कांहीं नसतें. यास्तव कर्माला अकर्म व अकर्माला कर्म समजणें हे गौण किंवा मिथ्या ज्ञान जरी असलें तरी त्यांत भगवानांनीं म्हटल्याप्रमाणें (श्लो. १७) बोद्धव्य असें कांहीं नाहीं.]

**नापि नित्यानामकरणादभावात्प्रत्यवायभावोत्पत्तिर्नासतो विद्यते भाव इति वचनात्कथमसतः सज्जायेतेति च दर्शितम् । असतः सज्जन्मप्रतिषेधादसतः सदुत्पत्तिं ब्रुवताऽसदेव सद्भवेत्सच्चासद्भवेदित्युक्तं स्यात् । तच्चायुक्तं सर्वप्रमाणविरोधात् । न च निष्फलं विदध्यात्कर्म शास्त्रं दुःखस्वरूपत्वाद्दुःखस्य च बुद्धिपूर्वकतया कार्यत्वानुपपत्तेः । तदकरणे च नरकपाताभ्युपगमेऽनर्थायैवोभयथाऽपि करणेऽकरणे च शास्त्रं निष्फलं कल्पितं स्यात् । स्वाभ्युपगमविरोधश्च नित्यं निष्फलं कर्मेत्यभ्युपगम्य मोक्षफलायेति ब्रुवतः । तस्माद्यथाश्रुत एवार्थः कर्मण्यकर्म य इत्यादेः । तथा च व्याख्यातोऽस्माभिः श्लोकः १८**

**भाष्यार्थ**—( आतां नित्यकर्मांच्या अकरणापासून प्रत्यवायाची उत्पत्ति होणें, हें अकर्माला कर्म मानण्याचें निमित्त आहे, असें जे वर म्हटलें आहे, त्यावर दोष देतात-)—**नित्यानां अकरणात्-अभावात् प्रत्यवायभावोत्पत्तिः अपि न**— नित्याच्या अकरणापासून म्ह० नित्यकर्मांच्या अभावापासून प्रत्यवायरूप भावाची उत्पत्तिहि

होऊं शकत नाहीं.—'**नासतो विद्यते भावः०**' **इति वचनात्**—'असत् वस्तूचा भाव होत नाहीं,' असें भगवदवचन आहे. (अ. २-१६ पृ. ७५ पहा.)—**कथं असतः सत् जायेत इति च दर्शितं**—अभावापासून भावरूप वस्तु कशी उत्पन्न होईल ? असें छान्दोग्यांत सांगितलें आहे. ( छा. भाष्यार्थ पृ. ४२१ )—**असतः सज्जन्मप्रतिषेधात् असतः सदुत्पत्तिं ब्रुवता असत् एव सत् भवेत् सत् च असत् भवेत् इति उक्तं स्यात्**—असत्-पासून-अभावापासून भावरूप पदार्थांच्या उत्पत्तीचा निषेध केलेला असल्यामुळें असत्-पासून सत्-ची उत्पत्ति होते, असें सांगणाऱ्या वृत्तिकारानें असत्च सत् होतें व सत् असत् होतें, असें म्हटल्यासारखेंच होईल.—**च तत् सर्वप्रमाणविरोधात् अयुक्तं**—आणि तें सर्व प्रमाणांच्या विरुद्ध असल्यामुळे अयुक्त आहे. [ कारण स्वतः अभावरूप असलेल्या वस्तूपासून भावरूप वस्तु होते, असें म्हटल्यास सर्व प्रमाणें अप्रमाण ठरणार ! कारण प्रत्यक्ष, अनुमान, शब्द यांतील एकही प्रमाण त्याला अनुकूल नाहीं. तसेंच नित्य कर्मांचें कांहीं फलच नाहीं, हें त्याला अकर्म म्हणण्याचें निमित्त आहे, असे जे वृत्तिकारांचें म्हणणे आहे त्याचे निरसन करितात-]—**च शास्त्रं निष्फलं कर्म न विदध्यात्**—शिवाय शास्त्र निष्फल कर्माचें कधींच विधान करणार नाहीं.—**दुःखस्वरूपत्वात् दुःखस्य च बुद्धिपूर्वकतया कार्यत्वानुपपत्तेः**—कारण कर्माला दुःखस्वरूपत्व आहे, म्ह० कर्म क्लेशकर आहे, आणि दुःखाला बुद्धिपूर्वकतेनें कार्यत्व संभवत नाहीं म्ह० दुःख हें माझें कर्तव्य आहे, असे कोणीहि बुद्धिपुरःसर समजत नाहीं. कोणीही मनुष्य जाणून बुजून दुःखामध्ये प्रवृत्त होत नाहीं.—**च तदकरणे नरकपाताभ्युपगमे**—आणि नित्यकर्मांचे अनुष्ठान न केल्यास नरकपात होतो,नरकप्राप्ति होते,असें मानल्यास—**शास्त्रं करणे अकरणे च इति उभयथा अपि अनर्थाय एव निष्फलं कल्पितं स्यात्**—शास्त्र कर्मानुष्ठान केलें तरी व न केलें तरी असें दोन्ही प्रकारें अनर्थालाच म्ह० दुःखालाच कारण होणारें असल्यामुळे निष्फल कल्पिल्यासारखें होईल. [ नित्यकर्म केले तरी स्वर्गादि फल नाहीं, परंतु तें यथाविधि करतांना दुःख होणारच. बरे न केले तरी नरकप्राप्ति होणार! मिळून कांहीं केलें तरी दुःख. अर्थात् कांहीं केले तरी दुःखालाच कारण होणाऱ्या कर्माचें विधान करणारें शास्त्र निष्फल ठरतें. नित्य कर्मांचें दुसरे जरी कांहीं फल नसलें तरी तें मोक्षाचें साधन असल्यामुळें मुमुक्षूने नित्य कर्में अवश्य करावीं म्हणून ह्मणाल तर सांगतो-]—**च नित्यं कर्म निष्फलं इति अभ्युपगम्य मोक्षफलाय इति ब्रुवता स्वाभ्युपगमविरोधः**—आणि नित्य कर्म निष्फल आहे असें मानून पुनः तें मोक्षफलाच्या उपयोगी आहे, असें ह्मणणाऱ्या वृत्तिकारांच्या वृत्तीवर स्वाभ्युपगमविरोध हा दोष येतो. —**तस्मात् 'कर्मण्यकर्म यः०' इत्यादिः यथाश्रुतः एव अर्थः**—म्हणून 'कर्मण्यकर्म यः०' इत्यादि श्लोकाचा यथाश्रुतच अर्थ केला पाहिजे. (गौणार्थाची कल्पना करणें

**योग्य नव्हे.)—च अस्माभिः श्लोकः तथा व्याख्यातः**—आणि आम्हीं श्लोकाचें तसेंच-यथाश्रुत अर्थीच व्याख्यान केलें आहे. १८.

---

१ या श्लोकाचा अर्थ-" कर्माचे ठायी अकर्म व अकर्माचे ठायी कर्म ज्याच्या नजरेस येतें तो पुरुष सर्व मनुष्यांत ज्ञानी आणि तोच युक्त म्ह० योगयुक्त व सर्व कर्म करणारा होय " असा करून रहस्यकार पुढें टीपेंत म्हणतात " या व पुढील पांच श्लोकांत कर्म, अकर्म व विकर्म यांचा खुलासा केलेला असून यांत जें कांहीं उणे आहे, तें पुढे १८ व्या अध्यायांत कर्मत्याग, कर्म आणि कर्ता यांच्या त्रिविधभेदांचे जे वर्णन केलें आहे त्यांत भरून काढलें आहे." ( चवथ्या अध्यायातील कर्माकर्मविकर्मासंबधानें जें उणे राहिलें आहे तें अठराव्या अध्यायांत भरून काढले आहे, हा ग्रथसबध फारच अपूर्व होय. नतर ) "या दोन्ही ठिकाणच्या कर्मविवेचनावरून कर्माकर्मविकर्मासंबधानें गीतेचे काय सिद्धान्त आहेत, तें थोडक्यांत सांगणें जरूर आहे " ( असे म्हणून रहस्यकार म्हणतात-)" कारण टीकाकारांनीं याबद्दल फारच घोटाळा केलेला आहे. सन्यासमार्गीयास सर्व कर्मांचा स्वरूपतः त्याग इष्ट म्हणून ते गीतेंतील ' अकर्म' पदाचा अर्थ ओढाताणीने आपल्या मार्गाकडे आणण्यास पाहतात. " ( पण सन्यासमार्गीयांस सर्व कर्मांचा म्ह० गृहस्थाश्रमाला विहित असलेल्या अग्निहोत्रादि श्रौत-स्मार्त कर्मांचाच स्वरूपतः त्याग इष्ट आहे. श्रवण, मनन, ध्यान, धर्मोपदेश, व शरीरधारणार्थ अवश्य असलेल्या स्वाभाविक कर्मांचा त्याग इष्ट नाहीं. शिवाय आचार्य व इतर अद्वैती टीकाकार गीतेतील 'अकर्म 'शब्दाचा अर्थ 'कर्माधिकारी पुरुषानें विहित कर्म न करणें,' असा करितात. (गी. भा. पृ.२७४-७७ पहा. ) पण त्यावरून तो अर्थ सन्यासमार्गाकडे कसा येतो, तें कळत नाहीं. उलट रहस्यकारानीच १६ व्या श्लोकातील ' अकर्म'शब्दाचा अर्थ ' कर्मांचा स्वरूपतः त्याग ' असा केला आहे. पण तो अद्वैती टीकाकारास समत नाहीं. असो. ) " मीमांसकांस यज्ञयागादि काम्य कर्म इष्ट असून त्याखेरीज इतर सर्व ' विकर्म ' वाटत असतें. शिवाय मीमासकाचे नित्य-नैमित्तिकादि कर्मभेदहि त्यातच येतात. " ( त्यात म्ह० कशांत, काम्य कर्मांत ? पण काम्य कर्मांतच जर नित्य-नैमित्तिक कर्म आला तर मग काम्य, नित्य, नैमित्तिक हा भेद करणेंच अयोग्य आहे. काम्य कर्माहून बाकीचे सर्व कर्म ' विकर्म ' असें मीमासकाना वाटत नाहीं. मीमासक नित्य, नैमित्तिक, काम्य व निषिद्ध असे कर्मांचे चार प्रकार मानतात. किंवा पहिल्या तीन प्रकारच्या शास्त्रोक्त कर्मांना विहित व शास्त्रानें ज्यांचा निषेध केला आहे, त्यांना निषिद्ध कर्म म्हणतात. ) " धर्मशास्त्री पुनः त्यांतच आपलें घोडें ढकलू पहात असतात. साराश चोहोकडून अशी ओढाताण झाल्यामुळे गीता ' अकर्म ' कशाला म्हणते व ' विकर्म ' कशाला म्हणते, हे अखेर कळेनासें होतें. " (पण मीमांसक व धर्मशास्त्री यांनीहि गीतेवर टीका लिहिल्या आहेत की काय? जर नाहीत तर गीतेंतील कर्म, अकर्म, विकर्म या शब्दाचा अर्थ समजण्यास रहस्यकाराना इतकी अडचण कां भासावी ? मीमांसकांनी मीमांसेंत व धर्मशास्त्रकारांनी धर्मशास्त्रात म्ह० स्मृतिशास्त्रांत नित्य, नैमित्तिक, काम्य व निषिद्ध श्रौत-स्मार्त कर्मे सागितली आहेत. गीता हें स्वतंत्र शास्त्र नाहीं, तीहि एक स्मृति आहे. स्मृतीला मूळ प्रमाणाची अपेक्षा असते. यास्तव गीतेंतील कर्मशब्दाचा अर्थ श्रौत-स्मार्त कर्मं हाच असला पाहिजे. तथापि येथील कर्म, अकर्म व विकर्म यांचा अर्थ तात्त्विक आहे. मीमांसा व धर्मशास्त्र यांत प्रसिद्ध असलेला अर्थ

येथें विवक्षित नाहीं. कारण हें प्रकरण कर्मसन्यासाचें आहे. चवथ्या अध्यायाला ' ज्ञान कर्मसन्यासयोग ' हे नाव आहे. ज्ञानानें कर्माचा सन्यास, असा त्याचा अर्थ आहे. अर्थात् येथील कर्मशब्दाचा अर्थ शरीरेंद्रियांची क्रिया असा व्यापक आहे. त्यामुळें येथे रहस्यकारांना सन्यासमार्गी, मीमासक, धर्मशास्त्री यांनी आपापली घोटी ढकलल्याचा जो भास झाला आहे तो उगीच आहे. ) "गीतेत निष्कामकर्मयोग्याच्या तात्त्विक दृष्टीनें या प्रश्नाचा विचार केला आहे. काम्य कर्मे करणाऱ्या मीमासकाच्या किंवा कर्मे सोडणाऱ्या सन्यासमार्गीयाच्या दृष्टीनें नव्हे. निजणे, बसणे, निदानपक्षी जिवत राहणे तरी कोणालाच सुटत नाहीं." ( मीमासक केवल काम्य कर्मेच करीत नाहींत व सन्यासमार्गी निजणे, बसणे, जिवत राहणें हीं कर्मे सोडीत नाहींत, अर्थात् रहस्यकारांची वारवार पुढें येणारी ही तक्रार फुकट आहे. असो; असें बरेचसें लिहून शेवटी रहस्यकार या प्रश्नाला गीतेचें उत्तर म्हणून असें सांगतात—) "कर्म म्ह० नुसती क्रिया असे न समजता त्यापासून पुढे शुभाशुभादि जे परिणाम उत्पन्न होतात, त्याचा विचार करून कर्माचे कर्मत्व वा अकर्मत्व ठरवा." ( म्हणजे हा अर्थ काहीसा वृत्तिकाराच्याच अर्थासारखा आहे असे वाटते, पण पुढें तोच ममजूत टिकत नाहीं. कारण वृत्तिकार ' नित्य कर्माचें फल नसल्यामुळें त्याला अकर्म व नित्यकर्माचें अनुष्ठान न केल्यास प्रत्यवाय लागणें हे फल मिळत असल्यामुळे ते कर्म' असे म्हणतात. पण रहस्यकार लिहितात—) " सृष्टि म्हणजेच जर कर्म, तर मनुष्य जोपर्यंत सृष्टीत आहे तोपर्यंत त्याला कर्म चुकत नाहीं. म्हणून कर्माकर्माचा जो विचार करावयाचा तो मनुष्याला ते कर्म कितपत बाधेल एवढ्याच दृष्टीनें केले पाहिजे." (पण सृष्टि म्ह० कर्म हे सांगितले कोणी ?) "जे कर्म करूनही आपल्याला बाधत नाहीं, त्याचें कर्मत्व म्ह० बधकत्व गेले असेच म्हटले पाहिजे आणि कोणत्याही कर्माचें बधकत्व अर्थात कर्मत्व जर याप्रमाणे नाहीसे झाले तर ते कर्म अकर्मच झाले." ( हे जर खरें तर ज्ञानकर्मसमुच्चय गीतेला इष्ट आहे, असे कसे म्हणता ? आचार्य तरी काय म्हणतात ? हेच. गी. भा. पृ. ५५ पहा ).

रहस्यकार शेवटी निष्कर्ष असा काढतात—" म्हणून गीता या श्लोकात विरोधाभासरीत्या मोठ्या खुबीनें असे सांगत आहे की अकर्माच्या ठिकाणीं सुद्धा (कधीं कधीं भयंकरहि) कर्म होते, आणि कर्म करूनहि ते कर्मविपाकदृष्ट्या मेल्यासारखे म्ह० अकर्म होतें. हें ज्याने ओळखलें तो ज्ञानी होय." ( पण अशा ज्ञानाने अशुभापासून मोक्ष कसा होईल ? असे म्हणून आचार्यांनी वर असल्या अर्थाचें अयुक्तत्व स्पष्टपणें दाखविलेच आहे) "कर्माच्या फलाचें बधन न लागण्यास ( कोण विचित्र वाक्यरचना ही ! ) तें कर्म निःसगबुद्धीने म्ह० फलाशा सोडून निष्काम बुद्धीने ( फलाशा सोडल्यावर निष्कामबुद्धि आणखी निराळी राहिली कोठे ? ) करणे एवढे एकच काय ते गीताशास्त्राप्रमाणे खरे साधन आहे." (कशाचे साधन ? मोक्षाचें, मग ज्ञान कशाला ? का ज्ञान झाल्यावरही फलाशा सोडून निष्काम बुद्धीनें कर्म करणें हें मोक्षाचे साधन होते, असें तुमचे म्हणणे आहे ? पण मग वर ' कर्माचें बधकत्व गेले की ते कर्म अकर्मच झाले,' असे जे म्हटले आहे त्याची वाट काय ? पुनः 'साख्य किंवा सन्यास व कर्मयोग हे दोन स्वतंत्र मोक्ष मार्ग आहेत ' व ' गीतेंत ज्ञानकर्मसमुच्चयच विवक्षित आहे ' या वाक्यांची संगति कशी लावावयाची ? सर्वच घोटाळा, व निश्चित असें एकही मत नाहीं !!) पुनः रहस्यकार म्हणतात—" निःसंगबुद्धीनें जें कर्म

केलें तेंच गीतेप्रमाणें प्रशस्त म्ह० सात्त्विक कर्म असून गीतेप्रमाणें तेंच 'अकर्म' होय." (अर्थात् रहस्यकारांच्या मते अठराव्या अध्यायांत सांगितलेलें सात्त्विक कर्म हेंच येथील अकर्म होय.) "मोहानें व अज्ञानानें केलेले जे तामस कर्म तेंच विकर्म, मोहाने कर्म सोडले तरी ते विकर्मच, अकर्म नव्हे.... कोणास पाहिजे असल्यास अशा राजस कर्मांना कर्म हा एकेरी शब्द लावण्यास कांहीं हरकत नाहीं. कर्म का अकर्म हे सदर कर्माच्या बंधकत्वावरून ठरवावयाचें आहे. क्रियात्मक स्वरूपावरून नव्हे. किंवा कोरड्या धर्मशास्त्रावरूनहि नव्हे." (येथील 'कोरड्या' हें विशेषण रहस्यकारांच्या मनांतील धर्मशास्त्राविषयीची भावना प्रकट करतें. असो; पण रहस्यकाराच्या कल्पनेप्रमाणे अकर्म ह्म. सात्त्विक कर्म, विकर्म म्ह० तामस कर्म व कर्म म्ह० राजस कर्म असे जरी मानलें तरी या अर्थाचा 'कर्मणि अकर्म यः पश्येत्' व 'अकर्मणि च कर्म' या श्लोकांतील अक्षरार्थाशीं संबंध कसा लागतो! 'कर्मामध्ये अकर्म व अकर्मामध्यें कर्म ज्याच्या नजरेस येते' असा अक्षरार्थ स्वतः रहस्यकारांनीच केलेला आहे. त्याला अनुसरून या श्लोकाचा स्पष्टार्थ असा होतो–राजस कर्मांत सात्त्विक कर्म ज्याच्या नजरेस येतें व सात्त्विक कर्मांत राजस कर्म ज्याच्या नजरेस येतें तो ज्ञानी, योगी व सर्व कर्म करणारा; हा अर्थ किती सुंदर आहे बरें! त्याच्या सौंदर्याचे वर्णनच करवत नाहीं. सात्त्विक कर्म राजस दिसणें व राजस कर्म सात्त्विक दिसणें, हे तत्त्वज्ञान नसून भ्रामक ज्ञान आहे. रज्जूला सर्प किंवा शिंपीला रूपे समजण्यासारखेंच ते मिथ्याज्ञान आहे. असे भ्रामक ज्ञान असलेल्या पुरुषाला बुद्धिमान् वगैरे म्हणणें म्हणजे त्या शब्दांचा दुरुपयोग करणेंच आहे. प्रकरण कसें चाललें आहे ते पहा—कर्म काय व अकर्म काय याविषयीं मोठमोठ्या लौकिक पंडितांनाहि मोह पडला आहे. म्हणून मी तुला कर्म सांगतो, की ज्या कर्माचें ज्ञान झालें असता, तूं संसारापासून मुक्त होशील. अशी १६ व्या श्लोकात प्रस्तावना करून 'कर्म, विकर्म व अकर्म याचे तत्त्व जाणले पाहिजे. कारण कर्माचे यथार्थस्वरूप कळणें फार कठिण आहे,' असे १७ व्या श्लोकांत म्हणून अठराव्यात 'कर्मामध्ये जो अकर्म पाहतो व अकर्मामध्ये कर्म पाहतो तो मनुष्यांत बुद्धिमान्' असें म्हटलें आहे. म्ह० पंडितांनाहि ज्याविषयीं मोह होतो त्या कर्माकर्माचें तत्त्व येथें सांगितलें आहे व त्यामुळें अशुभापासून म्ह० संसारापासून मोक्ष व्हावयाचा आहे. अर्थात येथील कर्म व अकर्म याचें ज्ञान हें तत्त्वज्ञानच असले पाहिजे. वृत्तिकार म्हणतात तसे गौणज्ञान किंवा रहस्यकार समजतात तसें मिथ्याज्ञान नव्हे. शरीरेंद्रियांची हालचाल हें माझेंच कर्म असें सर्व लोक समजतात, त्याचप्रमाणें शरीरेंद्रियांची हालचाल बंद करून स्वस्थ बसणें हे सुद्धा माझेंच अकर्म आहे, असे ते समजतात. पण आत्मा वस्तुतः अकर्ता असल्यामुळें शरीरेंद्रियांच्या कर्मामध्यें जो अकर्म पाहतो म्ह० 'हें माझें कर्म नव्हे मी अकर्मा आहे' असें समजतो व शरीरेंद्रियांना कर्मशून्य करून 'मीच आतां कर्मरहित झालों आहें' असा त्या अकर्माचा आपल्यावर आरोप करणें, हें त्या अकर्मांतही कर्म पाहतो, तोच ज्ञानी होय. आत्म्याचें यथार्थ निष्क्रिय स्वरूप जाणणें हें तत्त्वज्ञान असून त्यामुळें संसारापासून मोक्ष होणें शक्य आहे. 'म्हणून मी तुला कर्म सांगतो' (श्लो. १६) अशी भगवानांनी प्रतिज्ञा करून 'मी करतों किंवा मी करीत नाहीं असा अभिमान ठेवणें हें कर्म आहे' असें सांगितलें किंवा कर्म व कर्माभाव हा शरीरेंद्रियांचा धर्म आहे माझा

**यस्य सर्वे समारंभाः कामसंकल्पवर्जिताः ।**
**ज्ञानाग्निदग्धकर्माणं तमाहुः पण्डितं बुधाः ॥ १९ ॥**

**अन्वयार्थ—यस्य**—ज्या पूर्वोक्त विवेकी पुरुषाचे—**सर्वे**—समस्त—**समारंभाः**—कर्में—**कामसंकल्पवर्जिताः**—काम-विषयेच्छा व त्याचे कारण संकल्प यांनीं रहित असतात.—**तं**—त्या—**ज्ञानाग्निदग्धकर्माणं**—वरील ज्ञानरूप अग्नीनें ज्याचीं कर्में जळालीं आहेत, अशा त्याला—**बुधाः**—ब्रह्मवेत्ते—**पण्डितं**—खरा पंडित—**आहुः**—म्हणतात. १९.

---

नव्हे असे समजणे हे अकर्म आहे, असे येथे सुचविले आहे. हाच ज्ञानकर्मसन्यास म्ह० आत्मस्वरूपज्ञानाने कर्माचा सन्यास करणे आहे. 'मी कर्ता किंवा मी अकर्ता आहे,'हा अभिमान टाकणे, हे त्या सन्यासाचे स्वरूप आहे. पण हे रहस्य न कळल्यामुळे रहस्यकारांनी परस्परविरुद्ध व अद्वैत सिद्धान्ताला सोडून उगीच काही तरी भाराभर लिहून ठेवले आहे. १७ व्या श्लोकातील कर्म, अकर्म व विकर्म हे शब्द प्रसिद्ध अर्थाच योजिले आहेत. कर्म म्ह० शास्त्रविहित कर्म, अकर्म म्ह०कर्माचा अभाव व विकर्म म्ह० निषिद्ध कर्म. त्यातील कर्म व विकर्म असे दोन्ही प्रकारचे काम तत्त्वदृष्ट्या अकर्म आहे. म्ह० ते शरीरेंद्रियांचे आहे, आत्म्याचे नव्हे, असे पाहणे हे तत्त्वज्ञानच आहे. तसेच अकर्म म्ह० कांही न करणे हाहि देहधर्म आहे व तो आत्म्यावर लादून घेतल्यास तेहि कर्म होते, असे जाणणें हें तत्त्वज्ञान आहे; व आत्मा अकर्ता आहे अशा तत्त्वज्ञानानेंच मोक्ष होतो. म्हणून असें जो जाणतो तोच बुद्धिमान् वगैरे आहे, असें म्हणून भगवानानी त्याची प्रशसा केली आहे. येथे सात्त्विक राजस, तामस कर्मांचा कांही संबध नाहीं. असो; रहस्यकार पुन: म्हणतात—" अष्टावक्र-गीता सन्यासमार्गीय आहे. तथापि तीतहि ' निवृत्तिरपि मूढस्य प्रवृत्तिरुपजायते। प्रवृत्तिरपि धीरस्य निवृत्तिफलभागिनी ॥ '... गीतेतील वरील श्लोकांत हाच अर्थ विरोधाभास-रूपी अलंकारिकरीत्या मजेने वर्णिला आहे." (गी. र. पृ. ६७३.) पण वरील अष्टावक्रगीतेतील वचनहि आचार्यांनी केलेल्या अर्थालाच अधिक अनुकूल आहे. मूढ म्ह० शरीराला आत्मा मानणारा अज्ञ, त्याची शरीरेंद्रियाच्या कर्माची निवृत्तिसुद्धा साभिमान—साहंकार असल्या-मुळें ती प्रवृत्तिच होते, म्ह० पुढील जन्माच्या प्रवृत्तीला कारण होते. पण ज्ञानी पुरुषाच्या शरीरेंद्रियांची प्रवृत्तिहि साहंकार नसल्यामुळे निवृत्तीचे फल देते. म्ह० मी कर्ता नव्हे, शरीरेंद्रियांची हीं कर्मे आहेत, अशा भावनेनें ती होत असल्यामुळें ससारप्रवृत्तीला कारण न होतां त्याच्या निवृत्तीला कारण होतात. आचार्य तरी वरील श्लोकांत हेंच सांगत आहेत. असो, अष्टवक्रगीता मात्र संन्यासमार्गीय आहे व भगवद्गीता नाही, याला प्रमाण काय? दोन्ही गीता साधनरूप कर्मनिष्ठा व साध्यरूप ज्ञाननिष्ठा सांगतात. दोन्ही अद्वैतबोधक आहेत. मग असा भेद करण्याचे कारण काय' 'हाच अर्थ विरोधाभासरूपी अलंकारिकरीत्या मजेनें वर्णिला आहे' असें म्हणून रहस्यकार गीतेचें महत्त्व कमी करीत आहेत. गीता हे तत्त्वार्थ सांगणारें अध्यात्मशास्त्र आहे, मजेनें अलंकारिक वर्णन करणारे काव्य नव्हे, हें लक्षांत ठेवलें पाहिजे.

**तदेतत्कर्मण्यकर्मादिदर्शनं स्तूयते—यस्येति । यस्य यथोक्तदर्शिनः सर्वे यावन्तः समारम्भाः कर्माणि समारभ्यन्त इति समारम्भाः, कामसंकल्पवर्जिताः कामैस्तत्कारणैश्च संकल्पैर्वर्जिता मुधैव चेष्टामात्रा अनुष्ठीयन्ते प्रवृत्तेन चेल्लोकसंग्रहार्थं निवृत्तेन चेज्जीवनमात्रार्थं तं ज्ञानाग्निदग्धकर्माणं कर्मादावकर्मादिदर्शनं ज्ञानं तदेवाग्निस्तेन ज्ञानाग्निना दग्धानि शुभाशुभलक्षणानि कर्माणि यस्य तमाहुः परमार्थतः पण्डितं बुधा ब्रह्मविदः॥**

**भाष्यार्थ—तत् एतत् कर्मणि अकर्मादिदर्शनं 'यस्य०' इति स्तूयते**—तें हें कर्मामध्ये अकर्मादिदर्शन 'यस्य०' या श्लोकानें प्रशंसिले जातें. [ कर्माला अकर्म व अकर्माला कर्म जाणणे, या ज्ञानाची 'यस्य०' इत्यादि श्लोकानें स्तुति केली जाते ]—**यस्य-यथोक्तदर्शिनः सर्वे-यावन्तः समारंभाः-कर्माणि**—ज्या-वर सांगितलेल्या ज्ञानानें संपन्न असलेल्या पुरुषाचे सर्व म्ह० जितके समारंभ-कर्मे (पण 'समारंभ-' शब्दाचा 'कर्म' हा अर्थ रूढ नाहीं. म्हणून तो अर्थ योगानें-व्युत्पत्तीनें कसा प्राप्त होतो तें दाखवितात-)—**समारभ्यन्ते इति समारम्भाः**—ज्यांचा उत्तमप्रकारें आरंभ केला जातो ते समारंभ,—**कामसंकल्पवर्जिताः-कामैः तत्कारणैः च संकल्पैः वर्जिताः**—कामसंकल्परहित म्ह० काम व त्यांचीं कारणें-संकल्प यांनीं रहित असतात. ( पण काम व संकल्प याना सोडल्यावर कर्मानुष्ठान कसें होणार ? उत्तर-) —**मुधा एव चेष्टामात्राः अनुष्ठीयन्ते**—वृथाच केवल शरीरेंद्रियचेष्टारूप अनुष्ठिलें जातात, [ एखाद्याला उगीचच, कांहीं कारणावांचून हात-पाय वगैरे हालविण्याची जशी संवय असते, त्याप्रमाणें ज्यांची शरीरेंद्रियचेष्टा कोणत्याही इच्छेवांचून व संकल्पावाचून सहज होते; अहोपण, कांहीं उद्देश व फल या दोहोंच्या अभावीं ती चेष्टा यदृच्छेनें होईल, तिच्याविषयीं कांहीं नियम राहणार नाहीं, अशी आशंका घेऊन सांगतात-]—**प्रवृत्तेन चेत् लोकसंग्रहार्थं निवृत्तेन चेत् जीवनमात्रार्थं**—प्रवृत्तमार्गानें त्याचीं तीं कर्में होत असतील, तर ती लोकसंग्रहार्थ, निवृत्तमार्गानें होत असतील तर केवल शरीराचें जीवन होण्यासाठीं ( वृथा चेष्टारूप कर्में जो करतो )—**तं ज्ञानाग्निदग्धकर्माणं**—ज्ञानाग्नीनें ज्याचीं कर्में जळून गेलीं आहेत अशा त्याला ( आतां ज्ञानाग्नि कोणता तें सांगतात-)—**कर्मादौ अकर्मादिदर्शनं ज्ञानं तत् एव अग्निः तेन ज्ञानाग्निना दग्धानि शुभाशुभलक्षणानि कर्माणि यस्य तं**—कर्मादिकांमध्यें अकर्मादिदर्शन हें ज्ञान आहे. तें ज्ञान हाच अग्नि, त्या ज्ञानाग्नीनें ज्याचीं शुभाशुभरूप कर्में जळून गेलीं आहेत त्याला—**बुधाः-ब्रह्मविदः-परमार्थतः पण्डितं आहुः**—बुध म्ह० ब्रह्मवेत्ते परमार्थतः पंडित म्हणतात. ( त्याला खरा पंडित-आत्मज्ञानी म्हणतात. कर्माला अकर्म व अकर्माला कर्म जाणणाऱ्या पुरुषाचीं सर्व लौकिक व वैदिक कर्में फलेच्छा व त्याविषयींचे संकल्प यांनीं रहित असतात. तो प्रवृत्तमार्गांत असेल म्ह० कर्माधिकारी गृहस्थ असेल, तर आपलीं सर्व कर्में लोकसंग्रहासाठीं करतो व निवृत्तमार्गांत असेल तर केवल शरीरधारणार्थ अवश्य तेवढींच करतो. पण तीं सर्व कामसंकल्परहित असल्यामुळें केवळ शरीरेंद्रियांची हालचाल या स्वरूपाचींच होत असतात. अशा

त्या ज्ञानाग्नीनें कर्में जाळून टाकलेल्या पुरुषाला ब्रह्मवेत्ते खरा पंडित-आत्मज्ञ म्हणतात. या श्लोकार्थांत आचार्यांनी काय म्हटलें आहे तें वाचकांनी लक्षांत ठेवावें. म्ह०रहस्यकार आचार्यांवर 'ज्ञानी पुरुषानें कर्में करूंच नयेत,' असा जो निरपवाद आरोप करितात त्यांत सत्यांश[१] किती आहे तें कळेल. ] १९.

**यस्त्वकर्मादिदर्शी सोऽकर्मादिदर्शनादेव निष्कर्मा संन्यासी जीवनमात्रार्थचेष्टः सन्कर्मणि न प्रवर्तते यद्यपि प्राग्विवेकतः प्रवृत्तः। यस्तु प्रारब्धकर्मा सन्नुत्तरकालमुत्पन्नात्मसम्यग्दर्शनः स्यात्स कर्मणि प्रयोजनमपश्यन्ससाधनं कर्म परित्यजत्येव स कुतश्चिन्निमित्तात्कर्मपरित्यागासंभवे सति कर्मणि तत्फले च सङ्गरहिततया स्वप्रयोजनाभावाल्लोकसंग्रहार्थं पूर्ववत्कर्मणि प्रवृत्तोऽपि नैव किंचित्करोति ज्ञानाग्निदग्धकर्मत्वात्तदीयं कर्माकर्मैव संपद्यत इत्येतमर्थं दर्शयिष्यन्नाह त्यक्त्वेति॥**

**भाष्यार्थ—तु यः अकर्मादिदर्शी सः अकर्मादिदर्शनात् एव निष्कर्मा -संन्यासी जीवनमात्रार्थचेष्टः सन् कर्मणि न प्रवर्तते यद्यपि विवेकतः प्राक् प्रवृत्तः**—पण जो कर्मामध्यें अकर्मादि पाहणारा विवेकी तो अकर्मादिदर्शनामुळेच निष्कर्मा—संन्यासी केवल जीवनासाठींच अवश्य तेवढी शरीरेंद्रियांची हालचाल करणारा असा होत्साता कर्मामध्ये प्रवृत्त होत नाहीं, जरी तो विवेक होण्यापूर्वी कर्मांत प्रवृत्त झालेला होता तरी आत्मानात्मविवेक झाल्यावर प्रवृत्त होत नाहीं. [ विवेका-

---

१ या श्लोकाच्या अर्थांत रहस्यकार 'समारंभाः' म्ह० उद्योग 'काम-संकल्पवर्जिताः' म्ह० फलेच्छाविरहित, असें म्हणतात. पण सर्व समारंभ म्ह० नुस्ता उद्योग असा संकुचित अर्थ न करितां शरीरेंद्रियांनी होणारी सर्व हालचाल घेणेंच इष्ट आहे. तसेंच काम व संकल्प म्ह० फलेच्छा एवढाच अर्थ नव्हे. कारण काम म्हणजेच फलेच्छा व संकल्प म्ह० चिंतन-उद्देश, असो. या श्लोकाच्या उत्तरार्धाचा अर्थ रहस्यकार असा करितात—'तं-' त्यालाच'ज्ञानाग्निदग्धकर्माणं पंडितं-' ज्ञानाग्नीनें कर्में दग्ध झालेला पंडित असें 'बुधाः-' ज्ञाते पुरुष म्हणतात.पण तो बरोबर नाहीं. कारण 'त पंडित आहुः' त्याला पंडित म्हणतात, हा सयुक्तिक अर्थ असून 'ज्ञानाग्निदग्धकर्माणं' हें 'तं' याचें विशेषण आहे. 'पंडित' याचें नव्हे. तसेंच 'बुधाः' म्ह० नुस्ते ज्ञाते नव्हेत तर 'आत्मवेत्ते' हाच अर्थ सयुक्तिक आहे.येथील 'पंडित' शब्द व अ.२श्लो. ११;अ. ५ श्लो. १८ येथील पंडितशब्द एकाच अर्थी असून त्याचा अर्थ 'खरा आत्मज्ञ' असा आहे.रहस्यकार या श्लोकावरील टीपेत—'ज्ञानानें कर्में भस्म होतात' याचा अर्थ कर्में सोडणें असा नसून 'फलेच्छा सोडून कर्में करणें' असा समजावयाचा, हें यावरून उघड होतें, असें म्हणतात. पण ज्ञानानें कर्में भस्म होतात म्ह० फलेच्छा सोडून कर्में करणें, हा अर्थ मूळ शब्दातून कसा निष्पन्न होतो? फलेच्छा सोडून कर्में केल्यास ती आपल्या फलाचा आरंभ करणार नाहींत. पण त्यामुळें ज्ञानानें संचितादि कर्में जळून कशीं जाणार? ज्ञान व फलेच्छात्याग यांत फार मोठा फरक आहे. कर्माला अकर्म समजणें हें ज्ञान आहे.त्याच्या योगानें सर्व कर्मांचा दाह होतो. ( मुंडकभाष्यार्थ. पृ. ७९; भ. गी अ. ४ श्लो. ३७ पहा. ) तें परमार्थ ज्ञान झाल्यावर सर्व कर्में स्वभावतःच काम व संकल्प यांनीं रहित होतात, त्यासाठीं यत्न करावा लागत नाहीं.

पूर्वी अभिनिवेशानें कर्मामध्यें प्रवृत्त झालेल्या पुरुषाची विवेकानंतर अभिनिवेशाच्या अ॰ भावीं प्रवृत्ति होणें शक्य नाही. तथापि त्याचा केवल शरीरपोषणासाठी अवश्य तेवढ्या कर्मामध्यें प्रवृत्त्याभास संभवतो. ' अहोपण, विवेक जरी झाला तरी तत्त्वसाक्षात्कार झालेला नसल्यामुळें कर्मामध्यें प्रवृत्त झालेल्या पुरुषाला कर्मत्याग कसा करतां येईल ? उत्तर-]—**तु यः प्रारब्धकर्मा सन् उत्तरकालं उत्पन्न-आत्मसम्यग्दर्शनः स्यात् सः कर्मणि प्रयोजनं अपश्यन् ससाधनं कर्म परित्यजति एव**— पण पूर्वी ज्याने कर्मारंभ केलेला असून उत्तरकालीं ज्याला आत्म्याचें सम्यग्दर्शन-आत्मसाक्षात्कार झाला आहे असा पुरुष कर्मामध्यें कांही प्रयोजन नाहीं असे पाहून साधनांसह कर्मांचा परित्याग करतोच. [ ज्यानें ब्रह्मचर्याश्रम संपवून गृहस्थाश्रमाचा स्वीकार केला: पण त्यानंतर त्याला त्याच आश्रमांत आत्मसाक्षात्कार झाला, त्यामुळें आतां या कर्मांत कांहीं अर्थ नाहीं, तीं फुकट आहेत अशी त्याची खात्री झाली म्हणजे मग तो साधनांसह म्ह० शिखा, यज्ञोपवीत, स्त्री, गृह यांसह सर्व कर्मे टाकून संन्यासाश्रमच स्वीकारतो. ] पण—**सः कुतश्चित् निमित्तात् कर्मपरित्यागासंभवे सति**— तो कांही कारणाने कर्मसंन्यासाचा असंभव झाला असतां—**कर्मणि तत्फले च संगरहिततया**—कर्म व कर्मांचे फल यांत संगरहितत्वानें-आसक्तिरहित होऊन— **स्वप्रयोजनाभावात् लोकसंग्रहार्थं**—स्वतःचें कांहीं प्रयोजन नसल्यामुळे लोकसंग्रहासाठीं—**पूर्ववत् कर्मणि प्रवृत्तः अपि**—पूर्वीप्रमाणेंच कर्मामध्ये जरी प्रवृत्त झाला तरी—**किंचित् न करोति एव**—कांहीं करीत नाहीच.—**ज्ञानाग्निदग्धकर्मत्वात् तदीयं कर्म अकर्म एव संपद्यते**—ज्ञानाग्नीने कर्म दग्ध झालेलें असल्यामुळे त्याचे कर्म अकर्मच बनते.—**इति एतं अर्थं दर्शयिष्यन् 'त्यक्त्वा०' इति आह**—असा हा अर्थ दाखविणारे भगवान् ' त्यक्त्वा०' हा श्लोक सांगत आहेत. [ एखादा द्विज विवेकापूर्वी कर्मामध्ये जरी प्रवृत्त झाला असला तरी त्याला आत्मानात्मविवेक होतांच त्याची कर्मामध्यें प्रवृत्ति होत नाहीं, हें खरें: कारण विवेकापूर्वी ' मी कर्ता' वगैरे अभिमान असतो व विवेकानंतर तसा अभिनिवेश उरत नाही. तथापि शरीराचें जीवन होण्यास अवश्य तेवढीच शरीरेंद्रियांची हालचाल तो करतो. पण ती खरी प्रवृत्ति नसून प्रवृत्तीचा आभास आहे. कारण तो त्या कर्मामध्यें-त्या प्रवृत्तीमध्येही १९ व्या श्लोकात सांगितल्याप्रमाणें अकर्म पहात असतो. त्यामुळे तो निष्कर्मा-संन्यासीच आहे. आतां याच्या उलट एखाद्याने ब्रह्मचर्याश्रम संपतांच स्त्रीपरिग्रह करून अग्निहोत्रादि श्रौत-स्मार्त कर्मांना आरंभ केला: पण पुढें दैववशात् त्याला त्याच आश्रमांत आत्मसाक्षात्कार झाला. त्यामुळें कर्मानुष्ठान व्यर्थ आहे, मला आतां त्याचा कांहीं उपयोग नाहीं, असें कळलें; मग तो काय करील ? शिखा-सूत्रादि साधनांसह कर्मांचा त्यागच म्ह० संन्यासच करील, यांत संशय नाहीं. कारण आश्रमत्याग केल्यावांचून कर्मत्याग करतां येत नाहीं. गृहस्थाश्रमांत राहूनच जर कोणी कर्मसंन्यास करील तर तो प्रत्यवायी होईल. यास्तव त्याला संन्यासच करणें प्राप्त आहे. पण कांहीं कारणानें त्याला कर्मपरित्याग करून संन्यासाश्रम स्वीकारणें अशक्य झाल्यास तो पूर्वीप्रमाणें म्ह० ज्ञानापूर्वी जशीं कर्मे करीत

होता तरीच तीं करीत राहतो. ( पण त्याला तीं कर्मे व्यर्थ आहेत असें जर वाटतें 'तर तो तीं कां करतो ? )-त्याला स्वतःचें कांहीं प्रयोजन जरी नसले तरी लोकसंग्रहार्थ करतो. म्ह० आपलें अनुकरण करून लोकांनी उन्मार्गी होऊं नये, म्हणून करतो. ( मग अविवेकी व विवेकी यांत फरक काय ? ) अविवेकी कर्तृत्वाभिमान व फलासक्ति यांनीं युक्त होऊन कर्मे करतो व विवेकी ' कर्मे मी करतों ' हा अभिमान व फलासक्ति हीं दोन्ही सोडून एखाद्या यंत्राप्रमाणें केवल चेष्टारूप कर्मे करतो. ' हीं कर्मे शरीरेंद्रियांचीं आहेत, माझीं नव्हेत, मी अकर्ता आहें,' या ज्ञानानें त्याचीं तीं कर्मे दग्ध झालेलीं असल्यामुळें तीं सर्व अकर्मेच होतात, हा अर्थ भगवानांनीं पुढील ' त्यक्त्वा०' इत्यादि श्लोकांत सांगितला आहे. ]

**त्यक्त्वा कर्मफलासङ्गं नित्यतृप्तो निराश्रयः ।**
**कर्मण्यभिप्रवृत्तोऽपि नैव किञ्चित्करोति सः ॥२०॥**

**अन्वयार्थ**—(यः—जो)—**कर्मफलासङ्गं**—कर्मांविषयीं अभिमान व फलाविषयीं आसक्ति—**त्यक्त्वा**—सोडून—**नित्यतृप्तः**—सतत तृप्त-विषयांविषयीं आकांक्षा न करणारा व—**निराश्रयः**—आश्रयरहित असतो—**सः**—तो—**कर्मणि**—कर्मामध्यें —**अभिप्रवृत्तः अपि**—सर्वप्रकारें जरी प्रवृत्त झाला असला तरी—**किञ्चित्**—कांहीं —**न करोति एव**—करीत नाहीच. २०.

त्यक्त्वा कर्मस्वभिमानं फलासङ्गं च यथोक्तेन ज्ञानेन नित्यतृप्तो निराकाङ्क्षो विषयेष्वित्यर्थः । निराश्रय आश्रयरहितः । आश्रयो नाम यदाश्रित्य पुरुषार्थं सिसाधयिषति । दृष्टादृष्टेष्टफलसाधनाश्रयरहित इत्यर्थः । विदुषा क्रियमाणं कर्म परमार्थतोऽकर्मैव तस्य निष्क्रियात्मदर्शनसंपन्नत्वात् । तेनैवंभूतेन प्रयोजनाभावात्ससाधनं कर्म परित्यक्तव्यमेवेति प्राप्ते ततो निर्गमासंभवाल्लोकसंग्रहचिकीर्षया शिष्टविगर्हणापरिजिहीर्षया वा पूर्ववत्कर्मण्यभिप्रवृत्तोऽपि निष्क्रियात्मदर्शनसंपन्नत्वान्नैव किंचित्करोति सः॥

**भाष्यार्थ—यथोक्तेन ज्ञानेन नित्यतृप्तः कर्मसु अभिमानं फलासंगं च त्यक्त्वा**—वर सांगितलेल्या कूटस्थ आत्मज्ञानानें स्वरूपभूत सुखाचा साक्षात् अनुभव घेऊन नित्यतृप्त झालेला ज्ञानी कर्मांच्या ठिकाणचा अभिमान व फलासक्ति यांना टाकून, (-नित्यतृप्त म्ह०)—**विषयेषु निराकांक्षः इत्यर्थः**—विषयाविषयीं आकांक्षा न ठेव-

---

१ आचार्यांचें हें म्हणणें वाचकांनी विशेषेंकरून लक्षांत ठेवावें. म्हणजे रहस्यकारांचे संन्यासमार्गीयांवरील आरोप किती निराधार आहेत तें सहज कळेल. आचार्यांचें हे म्हणणें इतकें स्पष्ट आहे कीं, त्याबद्दल आम्हांला समर्थनपर असा एक शब्दहि लिहिण्याचें कारण नाही. हें मत वैदिक संप्रदायाला जितकें धरून आहे तितकेंच रहस्यकारांचें त्याला सोडून आहे. किंबहुना रहस्यकारांनी आचार्यांच्या म्हणण्याचाच अनुवाद त्यांत आपल्या आग्रहाची वृथा व अवास्तव भर घालून केला आहे, असेंही म्हणण्यास हरकत नाही.

णारा-विषयांविषयीं निःस्पृह झालेला असा याचा भावार्थ.—**निराश्रयः-आश्रयरहितः**—निराश्रय म्ह० आश्रयरहित,—**आश्रयः नाम यदाश्रित्य पुरुषार्थं सिसाधयिषति**—आश्रय म्ह. ज्या फलसाधनाचा आश्रय करून पुरुषार्थ संपादन करण्याची इच्छा करतो तें साधन, त्याचा आश्रय न करणारा म्ह०—**दृष्टादृष्टेष्टफलसाधनाश्रयरहितः इत्यर्थः**—दृष्ट-प्रत्यक्ष व अदृष्ट-अप्रत्यक्ष अशा इष्ट फलाच्या साधनाचा आश्रय न करणारा असा भावार्थ.—**विदुषा क्रियमाणं कर्म परमार्थतः अकर्म एव तस्य निष्क्रिय-आत्मदर्शनसंपन्नत्वात्**—ज्ञानी पुरुषाकडून केलें जाणारें कर्म परमार्थदृष्ट्या-तात्त्विक दृष्टीनें अकर्मच होते. कारण तो ज्ञानी निष्क्रिय आत्मदर्शनानें संपन्न झालेला असतो, त्याला निष्क्रिय आत्म्याचें साक्षात् ज्ञान झालेलें असतें.—**तेन एवंभूतेन प्रयोजनाभावात् ससाधनं कर्म परित्यक्तव्यं एव**—त्या अशा प्रकारच्या ज्ञानी पुरुषानें कर्मांचे कांहीं प्रयोजनच नसल्यामुळे शिखा सूत्रादि साधनांसह कर्माचा परित्यागच करावा—**इति प्राप्ते**—अशी प्राप्ति झाली असतां—**लोकसंग्रहचिकीर्षया वा शिष्टविगर्हणा-परिजिहीर्षया**—लोकसंग्रह करण्याची इच्छा असल्यामुळें किंवा शिष्टांच्या निंदेचा परिहार करण्याची इच्छा असल्यामुळें—**ततः निर्गमासंभवात्**—त्या साधनांसह कर्मांपासून निवृत्त होणें अशक्य झाल्यास—**पूर्ववत् कर्मणि अभिप्रवृत्तः अपि**—ज्ञान होण्याच्या पूर्वावस्थेत जसा, तसाच तो कर्मांमध्यें जरी लोकदृष्टीनें सर्वप्रकारे प्रवृत्त असला तरी—**सः निष्क्रिय-आत्मदर्शनसंपन्नत्वात् किंचित् न एव करोति**—तो निष्क्रिय आत्मसाक्षात्कारानें संपन्न झालेला असल्यामुळें स्वतःच्या दृष्टीनें कांहीं करीत नाहींच. [कर्म व कर्मफल यांविषयींचा अभिमान व इच्छा टाकून आत्मज्ञानानें-आत्मस्वरूपसुखाच्या अनुभवानें नित्यतृप्त झालेला म्ह० विषयांविषयीं विरक्त झालेला व ऐहिक किंवा पारलौकिक इष्ट फलांच्या लौकिक-वैदिक साधनांचा आश्रय न करणारा ज्ञानी अज्ञानावस्थेंत जसा, तसाच जरी कर्मांमध्यें प्रवृत्त झाला-लोकांना हा पूर्वींप्रमाणेंच कर्मानुष्ठान करीत आहे असें जरी वाटलें तरी स्वतःच्या दृष्टीनें तो कांहींच करीत नाहीं. कारण सर्वकर्मशून्य आत्म्याचें साक्षात् ज्ञान त्याला झालेलें असतें. वस्तुतः अशा अवस्थेंत त्याला कर्मांचा कांहींच उपयोग नसतो. त्यामुळें त्याला शिखा-सूत्रादि साधनांसह सर्व कर्मांचा त्याग करणेंच शास्त्रतः प्राप्त असतें. पण ज्याला प्रारब्धानुसार लोकसंग्रहाची इच्छा असते किंवा शिष्ट जनांनीं आपली निंदा करूं नये, असें वाटत असतें तो कर्मसंन्यास करूं शकत नाहीं. तथापि त्याचीं कर्में आत्मज्ञानानें दग्ध होत असल्यामुळें वस्तुतः तीं कर्मेंच नव्हेत.] २०.

---

१ आचार्यांचें हें म्हणणें कोणत्याहि विचारी वाचकाची खात्री करून देणारें आहे. ज्ञानोत्तर ज्ञानापुरुषाच्या हातून कर्म संभवतच नाहीं, असें आचार्य म्हणत नाहींत. पण तें ज्ञानाग्नीनें दग्ध होत असल्यामुळें कर्म नसून कर्माभासरूप आहे.'मी कर्ता' अशा मिथ्या अभिनिवेशानें होणारें जें कर्म तेंच कर्म असून तेंच पुढील जन्माला कारण होतें. आत्मा

**यः पुनः पूर्वोक्तविपरीतः प्रागेव कर्मारम्भाद्ब्रह्मणि सर्वान्तरे प्रत्यगात्मनि निष्क्रिये संजातात्मदर्शनः स दृष्टादृष्टेष्टविषयाशीर्विवर्जिततया दृष्टादृष्टार्थे कर्मणि प्रयोजनमपश्यन्ससाधनं कर्म संन्यस्य शरीरयात्रामात्रचेष्टो यतिर्ज्ञाननिष्ठो मुच्यत इत्येतमर्थं दर्शयितुमाह निरिति—**

**भाष्यार्थ—पुनः यः पूर्वोक्तविपरीतः**—पण जो पूर्वोक्त लोकसंग्रहाची वगैरे इच्छा करणाऱ्या पुरुषाहून अगदी निराळ्या प्रकारचा म्हणजे—**कर्मारंभात् प्राक् एव**—कर्माचा आरंभ करण्यापूर्वीच—**सर्वान्तरे प्रत्यगात्मनि निष्क्रिये ब्रह्मणि संजात-आत्मदर्शनः**—सर्वांच्या अन्तर्यामी राहणाऱ्या प्रत्यगात्मरूप निष्क्रिय ब्रह्मामध्यें ज्याला आत्मदर्शन झालें आहे, (ज्याला सर्वान्तर्यामी प्रत्यगात्मरूप निष्क्रिय ब्रह्मच मी आहे असा साक्षात् अनुभव आला आहे,)—**सः दृष्टादृष्टेष्टविषयाशीर्विवर्जिततया दृष्टादृष्टार्थे कर्मणि प्रयोजनं अपश्यन्**—तो दृष्ट-प्रत्यक्ष-ऐहिक व अदृष्ट-अप्रत्यक्ष-पारलौकिक इष्ट विषयांविषयींच्या आशेनें अगदीं रहित असल्यामुळें दृष्ट व अदृष्ट फल देणाऱ्या कर्मामध्ये कांहीं प्रयोजन न पाहणारा असा होत्साता—**ससाधनं कर्म संन्यस्य शरीरयात्रामात्रचेष्टः यतिः ज्ञाननिष्ठः मुच्यते**—साधनांसह कर्माचा संन्यास करून शरीरयात्रा-शरीराचें जीवन होण्यापुरतीच हालचाल करणारा यति-संन्यासी-ज्ञाननिष्ठ मुक्त केला जातो.—**इति एतं अर्थं दर्शयितुं 'निराशीः०' इति आह**—असा हा अर्थ दाखविण्यासाठीं 'निराशीः०' इत्यादि सांगतात. [पण वरच्या श्लोकांत सांगितलेल्या लोकसंग्रहादिकांची इच्छा करणाऱ्या पुरुषाहून अगदी निराळ्या म्ह० गृहस्थाश्रम स्वीकारण्याच्या पूर्वींच ज्याला ब्रह्मात्मसाक्षात्कार झाला आहे-मीच सर्वान्तर्यामी निष्क्रिय ब्रह्म आहे-असा अपरोक्षानुभव आला आहे, त्यामुळें ज्याच्या ऐहिक व पारलौकिक विषयांविषयींच्या सर्व इच्छा नाहींशा झाल्या आहेत,

---

अकर्ता, निष्क्रिय आहे, असें जाणणाऱ्या ज्ञानी पुरुषाच्या ठिकाणी तसलें कर्म संभवतं नाहीं, त्यामुळे तो कर्मत्यागच होय. अशा कर्मसंन्यासावांचून मोक्ष मिळणे शक्य नाहीं. (गी. भा. पृ. ७ पहा.) पण रहस्यकार 'निराश्रयः' याचा अर्थ "अमक्यातमक्यासाठीं अमुक करतो अशी कर्मफलाच्या साधनाला आश्रयीभूत बुद्धि न ठेवणारा" असा करितात. पण तो अर्थ नैयायिकाच्या 'घटो नाम घटाभावाभावः' या व्याख्येइतकाहि सुबोध नाहीं. तथापि दुसऱ्यांना दोष द्यावयास तयारच. टीपेंत ते म्हणतात—"निराश्रय या शब्दाचा अर्थ घरदार न करणारा (संन्यासी) असा कित्येक करीत असतात." पण हे कित्येक म्ह० कोण ? श्रीशंकराचार्यांचा अर्थ वर स्पष्ट दिलाच आहे. मधुसूदनसरस्वती—'निराश्रयः—देहेंद्रियाद्यभिमानशून्यः' असा; शंकरानंद- 'निराश्रयः—निष्कामः' असा, श्रीधर- 'योगक्षेमार्थं आश्रयणीयरहितः' नीलकंठ 'निरहंकारः' असा करितात. मध्वाचार्य—'नित्यतृप्तनिराश्रयेश्वरस्वरूपः' रामानुज—'अस्थिरप्रकृतौ आश्रयबुद्धिरहितः' वल. सं. टीका 'कर्मजनितअदृष्टाद्याश्रयरहितः' असा निराश्रयशब्दाचा अर्थ करितात. 'घरदार न करणारा' असा अर्थ कोणीच करीत नाहीं. **अर्थात् त्याविषयीं त्यांनीं जें लिहिलें आहे तें सर्व व्यर्थ आहे.**

तो ऐहिक व पारलौकिक फल देणाऱ्या कर्मांचा आपल्याला कांहीं उपयोग नाहीं, असें पाहतो, आणि आपल्याला या कर्मांचा कांहींच उपयोग नाही, असें समजून साधनांसह कर्मांचा संन्यास करतो व शरीरयात्रा चालण्यास अत्यंत अवश्य तेवढीच हालचाल करतो. तोच ज्ञाननिष्ठ यति मुक्त होतो असें भगवान् सांगतात—]

निराशीर्यतचित्तात्मा त्यक्तसर्वपरिग्रहः ।
शारीरं केवलं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम् ॥ २१ ॥

**अन्वयार्थ—निराशीः**—तृष्णाशून्य—**यतचित्तात्मा**—चित्त व बाह्य शरीरेंद्रियसंघात यांचा ज्याने निग्रह केला आहे असा—**त्यक्तसर्वपरिग्रहः**—ज्यानें सर्वपरिग्रहाचा त्याग केला आहे असा यति—**केवलं शारीरं कर्म**—नुसते शरीरस्थितीला कारण होणारें कर्म—**कुर्वन् अपि**—जरी करीत असला, तरी—**किल्बिषं**—पापाला-दोषाला—**न आप्नोति**—प्राप्त होत नाहीं. त्याला दोष लागत नाहीं. २१

निराशीर्निर्गता आशिषो यस्मात्स निराशीः, यतचित्तात्मा चित्तमन्तःकरणमात्मा बाह्यः कार्यकरणसंघातस्तावुभावपि यतौ संयतौ येन स यतचित्तात्मा, त्यक्तसर्वपरिग्रहस्त्यक्तः सर्वः परिग्रहो येन स त्यक्तसर्वपरिग्रहः, शारीरं शरीरस्थितिमात्रप्रयोजनं केवलं तत्राप्यभिमानवर्जितं कर्म कुर्वन्नाऽऽप्नोति न प्राप्नोति किल्बिषमनिष्टरूपं पापं धर्मं च । धर्मोऽपि मुमुक्षोः किल्बिषमेव बन्धापादकत्वात् ॥

**भाष्यार्थ—निराशीः-निर्गताः आशिषः-यस्मात् सः निराशीः**—ज्याच्यापासून आशा-निरनिराळ्या विषयांविषयींच्या तृष्णा निघून गेल्या आहेत तो 'निराशीः' म्हणजे विषयवितृष्ण, विरक्त—**यतचित्तात्मा चित्तं-अन्तःकरणं आत्मा-बाह्यः कार्यकरणसंघातः तौ उभौ अपि यतौ-संयतौ येन सः यतचित्तात्मा**—'यतचित्तात्मा' चित्त म्ह० अन्तःकरण व आत्मा म्ह० बाह्य शरीरेंद्रियसंघात ते दोन्ही ज्यानें यत म्ह० संयत-नियमित केले आहेत तो यतचित्तात्मा,—**त्यक्तसर्वपरिग्रहः-त्यक्तः सर्वपरिग्रहः येन सः त्यक्तसर्वपरिग्रहः**—'त्यक्तसर्वपरिग्रहः' ज्यानें स्त्री-पुत्र-वित्त-गृह-क्षेत्रादि सर्व परिग्रह सोडला आहे तो त्यक्तसर्वपरिग्रह होय.—**शारीरं-शरीरस्थितिमात्रप्रयोजनं**—शारीर म्ह० शरीराची स्थिति-जीवन, हेंच ज्याचें प्रयोजन आहे असें—**केवलं-तत्रापि अभिमानवर्जितं**—व तेंही केवल म्ह० त्याच्यामध्येंहि अभिमान न ठेवतां-अभिमानरहित—**कर्म कुर्वन् किल्बिषं-अनिष्टरूपं पापं च धर्मं न आप्नोति-न प्राप्नोति**-असें कर्म करणारा किल्बिषाला म्ह० अनिष्टरूप पापाला व धर्माला प्राप्त होत नाही.—**मुमुक्षोः धर्मः अपि किल्बिषं एव**—मुमुक्षूला धर्मंहि किल्बिष-पापच आहे ( तें कां?)—**बन्धापादकत्वात्**—धर्महि जन्मरूप बंध उत्पन्न करणारा आहे. म्हणून ज्याला मोक्ष हवा असतो, त्याला तोहि अनिष्टच आहे.[ विषयाविषयीं विरक्त, चित्त व शरीरेंद्रियसंघात यांचें ज्यानें उत्तम प्रकारें

संयमन केलें आहे, ज्यानें स्त्री-पुत्रादि सर्व परिग्रह सोडला आहे असा ज्ञाननिष्ठ पुरुष शरीरस्थितिपुरतेंच व तेंहि अहंकाररहित कर्म करीत असला तरी त्याला पाप लागत नाहीं. त्या तेवढ्या कर्मानें तो बद्ध होत नाहीं. अर्थात् मी अकर्ता आहें व सर्व क्रिया शरीरेंद्रियांच्या आहेत, असें जाणून केलेले कोणतेंहि कर्म बंध उत्पन्न करीत नाहीं, म्हणजे तें कर्म अकर्मच आहे. अर्थात् 'कर्म कोणालाच सुटत नाहीं,' इत्यादि जें म्हणणें आहे ते निराधार आहे. आत्मा अकर्ता आहे व सर्वकर्में शरीरेंद्रियांची आहेत असें जाणणारा गृहस्थाश्रमी अग्निहोत्रादि कर्मे लोकसंग्रहासाठी जरी करीत असला व संन्यासी शरीर धारणापुरतेंच कर्म जरी करीत असला तरी ते दोघेहि परमार्थसंन्यासीच आहेत. ]

**किं च शारीरं केवलं कर्मेत्यत्र किं शरीरनिर्वर्त्यं शारीरं कर्माभिप्रेतमाहोस्विच्छरीरस्थितिमात्रप्रयोजनं शारीरं कर्मेति । किं चातो यदि शरीरनिर्वर्त्यं शारीरं कर्म यदि वा शरीरस्थितिमात्रप्रयोजनं शारीरमिति। उच्यते—यदा शरीरनिर्वृत्यं कर्म शारीरमभिप्रेतं स्यात्तदा दृष्टादृष्टप्रयोजनं कर्म प्रतिषिद्धमपि शरीरेण कुर्वन्नाऽऽप्नोति किल्बिषमिति ब्रुवतो विरुद्धाभिधानं प्रसज्येत ॥**

**भाष्यार्थ**—('शारीरं केवलं' यांतील 'शारीर-' शब्दाचा अर्थ स्पष्ट करण्यासाठीं विकल्प उपस्थित करितात-)—**किंच 'शारीरं केवलं कर्म' इति अत्र किं शरीरनिर्वर्त्यं शारीरं कर्म अभिप्रेतं**—शिवाय 'शारीरं केवलं कर्म' यांतील 'शारीरं कर्म' याचा अर्थ काय? शरीराने होणारे ते शारीर कर्म हा अर्थ येथे इष्ट आहे—**आहोस्वित् शरीरस्थितिमात्रप्रयोजनं शारीरं कर्म इति**—कीं केवल शरीराच्या स्थितीला कारण होणारे-शरीराचे जीवन हेच ज्याचे प्रयोजन आहे तें शारीर? असा (विकल्प करून विचार करावा. पण अशा विचाराचा उपयोग काय? असें पूर्ववादी विचारतो-)—**किं च अतः यदि शरीरनिर्वृत्यं शारीरं कर्म यदि वा शरीरस्थितिमात्रप्रयोजनं शारीरं इति**—शरीराच्या योगाने होणारें तें शारीर असे मानलें तर त्यापक्षीं काय दोष आहे, किंवा केवल शरीरस्थिति हेच ज्याचें प्रयोजन आहे म्ह० शरीराच्या स्थितीसाठीं जे कर्म ते शारीर यापक्षीं कोणते फल आहे? असा (पूर्ववाद्याने उलट प्रश्न केला असतां सिद्धान्ती पहिल्या पक्षीं दोष सांगतात-)—**उच्यते**—या प्रश्नाचें उत्तर सांगतों—**यदा शरीरनिर्वर्त्यं कर्म शारीरं अभिप्रेतं स्यात्**—जेव्हां शरीराने होणारे जें कर्म ते शारीर, असे इष्ट असेल—**तदा दृष्टादृष्टप्रयोजनं प्रतिषिद्धं अपि कर्म शरीरेण कुर्वन्**—तेव्हां दृष्ट व अदृष्ट फल देणारें निषिद्ध कर्मही शरीरानें करणारा—**किल्बिषं न आप्नोति इति ब्रुवतः विरुद्धाभिधानं प्रसज्येत**—पापाला प्राप्त होत नाहीं, असें बोलणाऱ्या भगवानांचें शास्त्रविरुद्ध कथन होतें. भगवान् शास्त्रविरुद्ध सांगत आहेत, असे म्हणण्याचा प्रसंग येईल. ['शारीरं कर्म' येथील 'शारीर' हा शब्द संशयित आहे. यास्तव त्याच्या अर्थाविषयीं विचार केला पाहिजे. शारीर म्ह० शरीराच्या योगाने होणारें, एवढाच अर्थ घ्यावयाचा की शारीर म्ह० शरीराच्या स्थितीला अत्यंत अवश्य तेवढेंच कर्म घ्यावयाचें?

शरीरानें होणारें तें शारीर, असा अर्थ केल्यास शरीरानें घडणाऱ्या निषिद्ध कर्मांचाहि दोष त्याला लागत नाहीं, असें निषेधशास्त्राच्या विरुद्ध सांगितल्यासारखें होईल. यास्तव तसा त्याचा अर्थ करणें सयुक्तिक नाहीं. ]

**शास्त्रीयं च कर्म दृष्टादृष्टप्रयोजनं शरीरेण कुर्वन्नाऽऽप्नोति किल्बिषमित्यपि ब्रुवतोऽप्राप्तप्रतिषेधप्रसङ्गः। शारीरं कर्म कुर्वन्निति विशेषणात्केवलशब्दप्रयोगाच्च वाङ्मनसनिर्वर्त्यं कर्म विधिप्रतिषेधविषयं धर्माधर्मशब्दवाच्यं कुर्वन्प्राप्नोति किल्बिषमित्युक्तं स्यात्। तत्रापि वाङ्मनसाभ्यां विहितानुष्ठानपक्षे किल्बिषप्राप्तिवचनं विरुद्धमापद्येत। प्रतिषिद्धसेवापक्षेऽपि भूतार्थानुवादमात्रमनर्थकं स्यात्॥**

**भाष्यार्थ—च दृष्टादृष्टप्रयोजनं विहितं कर्म शरीरेण कुर्वन् किल्बिषं न आप्नोति इति अपि ब्रुवतः अप्राप्तप्रतिषेधप्रसङ्गः**—बरें, दृष्ट व अदृष्ट फल देणारें शास्त्रविहित कर्म शरीरानें करणारा पापाला प्राप्त होत नाहीं, असेंही बोलणाऱ्या भगवानांवर ज्याची प्राप्तिच नाहीं त्याचा प्रतिषेध करणें या दोषाचा प्रसंग येतो. [ कारण शास्त्रविहित कर्म केल्याने किल्बिषाची जर प्राप्तिच नाहीं, तर त्याचा निषेध करणेंहि व्यर्थ आहे. पाऊस पडावा म्हणून कारीर्यादि इष्टि करणे, हे दृष्टप्रयोजन–दृष्टफल कर्म आहे व स्वर्गाचें साधन जें ज्योतिष्टोमादिक ते अदृष्टफल कर्म आहे. शरीरानें होणारें जें कर्म तें शारीर कर्म असे म्हटल्यास आणखी कोणता दोष येतो तें सांगतात ]—**शारीरं कर्म कुर्वन् इति विशेषणात्**—'शारीरं कर्म कुर्वन्' असें कर्माला 'शारीर' हें विशेषण दिलेलें असल्यामुळें—**च केवलशब्दप्रयोगात्**—व केवलशब्दाचा प्रयोग केलेला असल्यामुळे—**वाङ्मनसनिर्वर्त्यं विधिप्रतिषेधविषयं धर्माधर्मशब्दवाच्यं कर्म कुर्वन् किल्बिषं प्राप्नोति इति उक्तं स्यात्**—वाक व मन यांनीं घडणारें, विधि-प्रतिषेधांचा विषय होणारें, धर्म व अधर्म या नावाचे कर्म करणारा पापाला प्राप्त होतो, असें सांगितल्यासारखे होईल. ( बरें वाणीने किंवा मनानें कर्माचे अनुष्ठान केल्यास संन्यासाश्रमी पुरुषाला किल्बिष प्राप्ति होतेच, असे कोणी म्हणेल म्हणून आचार्य म्हणतात–)—**तत्र अपि वाङ्मनसाभ्यां विहितानुष्ठानपक्षे किल्बिषप्राप्तिवचनं विरुद्धं आपद्येत**—तसें जरी मानलें तरी वाक् व मन यांच्या योगाने संन्यासाश्रमाला विहित असलेल्या जप-ध्यानादिकर्माचे अनुष्ठान करणें या पक्षीं किल्बिषप्राप्ति होते हें म्हणणें विरुद्धच ठरेल. ( म्हणजे त्यावर विधिविरोध हा दोष येईल. )—**प्रतिषिद्धसेवापक्षे अपि भूतार्थानुवादमात्रं अनर्थकं स्यात्**—संन्यासाश्रमाला निषिद्ध असलेल्या वाक् व मन यांनीं होणाऱ्या कर्माचें अनुष्ठान केल्यास संन्याश्याला पाप लागतें, हा पक्ष जरी घेतला तरी तो नुस्ता भूतार्थाचा अनुवाद झाला. शास्त्रानें सिद्ध असलेल्या गोष्टींचाच तो नुस्ता अनुवाद झाला. त्यामुळेंच तो व्यर्थ ठरतो. [शरीरानें विहित कर्म करणाराला पाप लागत नाहीं, हें सांगणे व्यर्थ आहे. कारण शास्त्रविहित कर्म केल्यानें पाप जर कधी लागतच नाहीं तर तें लागत नाहीं, हें पुनः सांगण्यांत काय अर्थ आहे ? शिवाय 'शारीरं' व 'केवलं' अशीं कर्माला दोन विशेषणें दिलेलीं अस-

त्यामुळें 'शरीरानें जें होणारें कर्म तें शारीर' असा अर्थ केल्यास वाक् व मन यांच्या योगानें होणाऱ्या धर्माधर्मसंज्ञक कर्मापासून पाप लागतें, असें निषेधशास्त्राच्या अगदीं उलट सांगितल्यासारखें होतें. त्यावर 'संन्याश्याला वाचिक व मानसिक कर्मानुष्ठानामें पाप लागतेंच' म्हणून म्हणावें तर कोणतें वाचिक व मानसिक कर्मानुष्ठान केल्यास त्याला पाप लागतें ? शास्त्रविहित कीं शास्त्रनिषिद्ध ? जप, ध्यान वगैरे वाचिक व मानसिक कर्में संन्यासाश्रमाला विहित आहेत. तेव्हां त्यांच्या योगानें संन्याश्याला पाप लागतें हें म्हणणें शास्त्रविधिविरुद्ध आहे. बरें, संन्याश्यानें वाचिक व मानसिक निषिद्ध कर्मानुष्ठान केल्यास त्याला पाप लागतें, हा पक्ष घेतला तरी तसें सांगणें व्यर्थच ठरतें. कारण पापाचरण केल्यास पाप लागतें, हे सांगावयास भगवान् किंवा व्यास नको आहेत. तें निषेधशास्त्रावरून सिद्ध आहे. त्यामुळें हे वचन केवल भूतार्थाचा–सिद्धार्थाचा अनुवाद करणारें आहे, असे ठरते. अर्थात् तें व्यर्थ होय. ]

**यदा तु शरीरस्थितिमात्रप्रयोजनं शारीरं कर्माभिप्रेतं भवेत्तदा दृष्टादृष्टप्रयोजनं कर्म विधिप्रतिषेधगम्यं शरीरवाङ्मनसनिर्वर्त्यमन्यदकुर्वंस्तैरेव शरीरादिभिः शरीरस्थितिमात्रप्रयोजनं केवलशब्दप्रयोगादहं करोमीत्यभिमानवर्जितः शरीरादिचेष्टामात्रं लोकदृष्ट्या कुर्वन्नाऽऽप्नोति किल्बिषम् । एवंभूतस्य पापशब्दवाच्यकिल्बिषप्राप्त्यसंभवात्किल्बिषं संसारं नाऽऽप्नोति ज्ञानाग्निदग्धसर्वकर्मत्वादप्रतिबन्धेन मुच्यत एवेति पूर्वोक्तसम्यग्दर्शनफलानुवाद एवैषः । एवं शारीरं केवलं कर्मेत्यस्यार्थस्य परिग्रहे निरवद्यं भवति ॥ २१ ॥**

**भाष्यार्थ**—( याप्रमाणें 'शरीरानें होणारें जें कर्म तें शारीर' असा अर्थ केल्यास तो कसा अनुपपन्न होतो ते सांगून आतां स्वतःचा अर्थ कसा उपपन्न होतो तें सांगतात–) **—तु यदा शरीरस्थितिमात्रप्रयोजनं शारीरं कर्म अभिप्रेतं भवेत्**—पण तेच जेव्हां शरीराची स्थिति हेच ज्याचें प्रयोजन आहे ते शारीर कर्म असे अभिप्रेत असेल—**तदा दृष्टादृष्टप्रयोजनं विधिप्रतिषेधगम्यं शरीरवाङ्मनसनिर्वर्त्यं अन्यत् कर्म अकुर्वन्**—तेव्हां दृष्ट व अदृष्टफलक, विधिप्रतिषेधावरून ज्ञात होणारें, शरीर-वाणी-मन यांच्या योगानें घडणारें, शरीरस्थितिमात्रहेतुभूत कर्माहून दुसरें कोणतेंही कर्म न करणारा, पण—**तैः एव शरीरादिभिः शरीरस्थितिमात्रप्रयोजनं**—पण त्याच शरीर-वाक्-मनांनीं केवल शरीराच्या स्थितीला कारण होईल–केवल शरीराच्या जीवनाला अवश्य तेवढेच—**केवलशब्दप्रयोगात् अहं करोमि इति अभिमानवर्जितः**—'केवल-' शब्दाचा प्रयोग केलेला असल्यामुळे 'मी करतो' अशा अभिमानानें रहित होऊन—**लोकदृष्ट्या शरीरादिचेष्टामात्रं कुर्वन् किल्बिषं न आप्नोति**—लोकांच्या दृष्टीनें [ स्वदृष्ट्या नव्हे ] शरीर-वाक्-मन इत्यादिकांची नुस्ती हालचाल या स्वरूपाचें कर्म करणारा पापाला प्राप्त होत नाहीं. [ विद्वानाला याप्रमाणें पाप लागत नाहीं, या सांगण्याचा आशय व्यक्त करितात–]—**एवंभूतस्य पापशब्दवाच्यकिल्बिषप्राप्ति-असंभवात् किल्बिषं-संसारं न आप्नोति**—अशा प्रका-

रच्या देहस्थितिहेतुभूत कर्माला सोडून बाकी कोणतेंच कर्म न करणाऱ्या ज्ञानी पुरुषाला पापशब्दानें बोलण्यास योग्य अशा किल्बिषाची प्राप्ति होण्याचा संभवच नसल्यामुळें किल्बिषाला म्ह० संसाराला तो प्राप्त होत नाहीं.—**ज्ञानाग्निदग्धसर्वकर्मत्वात् अप्रतिबन्धेन मुच्यते एव इति पूर्वोक्तसम्यग्दर्शनफलानुवादः एव एषः** —ज्ञानाग्नीने सर्व कर्में दग्ध झालेली असल्यामुळें तो कोणत्याही प्रतिबंधावांचून मुक्तच होतो, असा पूर्वोक्त सम्यग्दर्शनाच्या–आत्मज्ञानाच्या फलाचा हा अनुवादच आहे.—**एवं ' शारीरं केवलं कर्म ' इति अस्य अर्थस्य परिग्रहे निरवद्यं भवति**— याप्रमाणें ' शारीरं केवलं कर्म० ' या वाक्याचा असा अर्थ स्वीकारला असतां ' शारीरं ' व ' केवलं ' हीं दोन्हीं विशेषणें निर्दोष ठरतात–हा अर्थच निर्दोष होतो. [ पण तेंच याच्या उलट शरीराच्या स्थितीला कारण होणारें जेवढें अगदी अवश्य असेल तेवढेंच कर्म शरीरादिकांनीं करणारा व तेंही 'मी करतों' असा अभिमान न धरतां इतर सर्व धर्माधर्मसंज्ञक कर्म सोडून करणारा ज्ञानी किल्बिषाला प्राप्त होत नाहीं. त्याचें तें कर्म लोकांच्या दृष्टीनें कर्म जरी असले तरी त्याच्या दृष्टीने अकर्मच असतें. पण देहस्थितीला अवश्य असलेल्या कर्माला सोडून दुसरें कोणतेंही विधि-निषेधशास्त्राने प्राप्त झालेलें कर्म न करणारा तो ज्ञानी संसाराला प्राप्त होत नाहीं. येथें किल्बिष म्ह० केवल पाप एवढाच अर्थ करणें बरोबर नाहीं, कारण अशा जीवन्मुक्ताला पाप लागण्याचा संभवच नसतो. म्हणून त्याचीं सर्व कर्में ज्ञानाग्नीनें दग्ध झाल्यामुळे तो कोणत्याही प्रकारचा प्रतिबंध न होतां मुक्त होतो. त्याच्या मोक्षाला कांहीं प्रतिबंध होत नाहीं. ] २१.

---

१ रहस्यकार या श्लोकाचा अर्थ असा करितात. " आशीः म्ह० फलवासना सोडणारा, चित्ताचे नियमन करणारा व सर्वसंगमुक्त झालेला पुरुष केवल शारीर म्ह० शरीरानें किंवा कर्मेंद्रियांनीच कर्म करीत असता त्याला पाप लागत नाहीं. " यातील 'आशीः' म्ह० फलकामना सोडणारा हा अर्थ चुकीचा आहे. ' निराशीः ' म्ह० ज्याच्यापासून सर्व आशा निघून गेल्या आहेत तो, अर्थात् सर्व कामनाशून्य; 'यतचित्तात्मा–' म्ह० चित्ताचें नियमन करणारा, हा अर्थ बरोबर नाहीं. कारण चित्त व आत्मा–शरीरेंद्रियसंघात या दोघांचें नियमन करणारा असा अर्थ करावयास पाहिजे. ' त्यक्तसर्वपरिग्रहः–' म्ह० सर्वसंगमुक्त हा अर्थ बरोबर नाहीं. कारण सर्वपरिग्रह म्ह० सर्वसंग नव्हे. परिग्रह म्ह० उपाधि, स्त्री-पुत्र-वित्त-गृह इत्यादिकांनाच परिग्रह म्हणतात. संग हा मनाचा धर्म आहे व परिग्रह म्ह० बाह्य पदार्थ. 'शारीर म्ह० शरीराने' हा अर्थ बरोबर का नाहीं तें वर भाष्यांत सविस्तर सांगितलेंच आहे. ' कर्मेंद्रियांनीं ' हा अर्थ फारच ओढाताणीचा आहे. तथापि 'शारीर म्ह० शरीरपोषणापुरतें भिक्षाटनादिक कर्म असाही अर्थ नाहीं,' असें म्हणून म्ह० आचार्यांच्या वरील सोपपत्तिक अर्थावर दोष देऊन पाचव्या अध्यायाच्या अकराव्या श्लोकांशीं हा अर्थ समानार्थक आहे असें म्हणतात. पण तेथें ' शरीर, मन, बुद्धि व केवल इंद्रियें यांनीं योगी चित्तशुद्धीसाठीं कर्म करितात' असें म्हटलें आहे व येथें ' केवल शारीर कर्म करणारा पापाला प्राप्त होत नाहीं ' असें म्हटलें आहे. दोन्ही ठिकाणचे शब्द निराळे, प्रकरण निराळें व उद्देशही निराळा. शिवाय 'शरीर-' शब्दाचा 'कर्मेंद्रियें-' असा अर्थ करणें

**त्यक्तसर्वपरिग्रहस्य यतेरन्नादेः शरीरस्थितिहेतोः परिग्रहस्याभावाद्याचनादिना शरीरस्थितौ कर्तव्यतायां प्राप्तायाम् 'अयाचितमसंक्लृप्तमुपपन्नं यदृच्छया ' इत्यादिना वचनेनानुज्ञातं यतेः शरीरस्थितिहेतोरन्नादेः प्राप्तिद्वारमाविष्कुर्वन्नाह—यदृच्छेति ॥**

**भाष्यार्थ**—( पूर्वश्लोकाशीं या श्लोकाची संगति दाखवितात- )—**त्यक्तसर्वपरिग्रहस्य यतेः शरीरस्थितिहेतोः अन्नादेः परिग्रहस्य अभावात्**—ज्यानें सर्व परिग्रहाचा त्याग केला आहे अशा यतीच्या शरीरजीवनाला कारण होणाऱ्या अन्नादिपरिग्रहाचाहि अभाव असल्यामुळें ( सर्वपरिग्रहाचा त्याग करणाऱ्या संन्याश्यापाशीं अन्नादि म्ह० अन्न, पादुका,आच्छादन या परिग्रहाचाहि अभाव असल्यामुळें)—**याचनादिना शरीरस्थितौ कर्तव्यतायां प्राप्तायां**—याचना, सेवा, शेती इत्यादि उपायांनीं शरीराची स्थिति करण्याचा प्रसंग आला असतां-शरीराचा निर्वाह याचनादि उपायांनी करणें प्राप्त झालें असतां—**'अयाचितं असंक्लृप्तं उपपन्नं यदृच्छया' इत्यादिवचनेन यतेः अनुज्ञातं शरीरस्थितिहेतोः अन्नादेः प्राप्तिद्वारं आविष्कुर्वन् ' यदृच्छया० ' इति आह**—अयाचित, असंक्लृप्त, यदृच्छेनें प्राप्त झालेलें इत्यादिवचनानें यतीला अनुज्ञात असलेलें शरीरस्थितिहेतुभूत अन्नादिकांच्या प्राप्तीचें द्वार प्रकट करणारे भगवान् 'यदृच्छया०' या श्लोकानें सांगतात-[सर्व परिग्रहाचा त्याग केलेल्या यतीपाशीं शरीराच्या निर्वाहासाठीं अवश्य असलेल्या अन्नाच्छादनादिकांचाहि अभाव असल्यामुळें भीक, सेवा, शेती, इत्यादि उपायांतील एखाद्या उपायानें शरीरनिर्वाह करणें प्राप्त होतें. पण यतीने अयाचित, असंक्लृप्त, यदृच्छाप्राप्त इत्यादि उपायांनी शरीरस्थितीला अवश्य असलेलें अन्नादि संपादन करावे, अशी धर्मशास्त्रानें ' अयाचितं असंक्लृप्तं०' या वचनाने अनुज्ञा दिली आहे. तोच शास्त्रोक्त अन्नप्राप्तीचा मार्ग भगवान् पुढील वाक्यांत प्रकट करीत आहेत. भिक्षाटनासाठी उद्योग आरंभण्यापूर्वी

---

अगदींच अयोग्य आहे. ' शारीर ' म्ह० शरीराने होणारें, हा अर्थ अनुपपन्न आहे, अशा विषयीं आचार्यांनीं जीं कारणें सांगितलीं आहेत त्यांचें निरसन एका अक्षरानेंहि न करितां नुस्तें ' असाही अर्थ नाहीं ' हे म्हणणें कोणालाहि पटणें शक्य नाही. ' शारीर ' म्ह० ' शरीरस्थितिमात्रप्रयोजन ' असा जो अर्थ आचार्यांनीं केला आहे व तो तसाच केला पाहिजे याविषयीं उपपत्ति सांगितली आहे, तिचें सोपपत्तिक निरसन करून मग रहस्यकारानी ' असाही अर्थ नाहीं ' असा शेरा जर मारला असता तर त्याला कांहीं तरी किंमत देतां आली असती ! " इंद्रियें कर्मे करितात खरीं, पण बुद्धि सम असल्यानें त्या कर्मांचें पाप अगर पुण्य कर्त्यास लागत नाहीं " हें म्हणणेंही सयुक्तिक नव्हे. कारण बुद्धि सम असणें एवढेंच पाप-पुण्य न लागण्यास पुरेसें कारण नाहीं. तर कर्तृत्वाभिमान नसणें व फलाभिसंधि न ठेवणे, हें पुण्य-पाप न लागण्याचें कारण आहे.

१ आचार्यांनी ' यदृच्छालाभसंतुष्टः०' या पुढील श्लोकाला दिलेलें हें अवतरण वाचून झाल्यावर रहस्यकारांनी त्याला कांहींच अवतरण दिलेलें नाही, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. पुढील श्लोक, सूत्र किंवा वचन याचा पूर्व श्लोकादिकांशीं संबंध दाखवून तें कोणत्या कारणानें प्रवृत्त झालें आहे हें सांगणें, यास अवतरण म्हणतात. कदाचित् रहस्यकारांना हा

कोणीं योग्य गृहस्थानें निवेदन केलेलें जें अन्नादि तें अयाचित, पतित व ज्यांच्यावर दोषारोप झाला आहे, अशा लोकांना सोडून पूर्वसंकेतावांचून पांच किंवा सात घरांतून आणलेलें जें भिक्षान्न ते असंक्लृप्त, स्वतःच्या प्रयत्नावांचून भक्तजनांनीं समीप आणून पोंचविलेलें जें सिद्ध अन्न ते यदृच्छाप्राप्त. याविषयीं मनुस्मृतीत–' माधुकरमसंक्लृप्तं प्राक्प्रणीतमयाचितम् । तात्कालिकोपपन्नं च भैक्षं पंचविधं स्मृतं' असें वचन आहे.]

**यदृच्छालाभसंतुष्टो द्वन्द्वातीतो विमत्सरः ।**
**समः सिद्धावसिद्धौ च कृत्वाऽपि न निबध्यते ॥२२॥**

**अन्वयार्थ—यदृच्छालाभसंतुष्टः**—यदृच्छेनें–न मागतां जे मिळेल त्यांत संतुष्ट राहणारा,—**द्वन्द्वातीतः**—शीत-उष्ण, सुख-दुःख इत्यादि द्वंद्वांनीं हर्ष-विषादयुक्त न होणारा,—**विमत्सरः**—कोणाचाही मत्सर न करणारा–निर्वैरबुद्धि,—**च**—व—**सिद्धौ**—शरीरस्थितीला अवश्य असलेल्या अन्नादिकांचा लाभ झाला असतां व—**असिद्धौ**—त्यांचा लाभ न झाला असतांहि—**समः**—एकसारखाच राहणारा–हर्ष-विषाद न मानणारा असा संन्यासी—**कृत्वा अपि**—शरीरस्थितीला अवश्य तेवढेंच भिक्षाटनादि कर्म करूनहि—**न निबध्यते**—बद्ध होत नाहीं. २२.

**यदृच्छालाभसंतुष्टोऽप्रार्थितोपनतो लाभो यदृच्छालाभस्तेन संतुष्टः संजातालंप्रत्ययो द्वंद्वातीतो द्वंद्वैः शीतोष्णादिभिर्हन्यमानोऽप्यविषण्णचित्तो द्वंद्वातीत उच्यते । विमत्सरो विगतमत्सरो निर्वैरबुद्धिः समस्तुल्यो यदृच्छालाभस्य सिद्धावसिद्धौ च । य एवंभूतो यतिरन्नादेः शरीरस्थितिहेतोर्लाभालाभयोः समो हर्षविषादवर्जितः कर्मादावकर्मादिदर्शी यथाभूतात्मदर्शननिष्ठः शरीरस्थितिमात्रप्रयोजने भिक्षाटनादिकर्मणि शरीरादिनिर्वर्त्ये नैव किंचित्करोम्यहं ' गुणा गुणेषु वर्तन्ते ' इत्येवं सदा संपरिचक्षाण आत्मनः कर्तृत्वाभावं पश्यन्नैव किंचिद्भिक्षाटनादिकं कर्म करोति ॥**

**भाष्यार्थ—यदृच्छालाभसंतुष्टः–अप्रार्थितोपनतः लाभः यदृच्छालाभः तेन संतुष्टः–संजात-अलं-प्रत्ययः**—याचना केल्यावांचून आपण होऊन चालून आलेला जो लाभ तो यदृच्छालाभ, त्याने संतुष्ट झालेला म्ह० ' पुरे ' असे वाटणें, जें न मागतां प्राप्त होईल तेवढेच बस्स, पुरे झाले, असे ज्याच्या मनाला वाटले आहे, तो यदृच्छालाभसंतुष्ट होय.—**द्वंद्वातीतः–द्वंद्वैः शीतोष्णादिभिः हन्यमानः अपि अविषण्णचित्तः द्वंद्वातीतः उच्यते**—शीतोष्णादि द्वंद्वांकडून पीडा दिली जात असली तरी ज्याचे चित्त खिन्न होत नाहीं, त्याला द्वंद्वातीत म्हटलें जातें.

---

श्लोक विशेष महत्त्वाचा वाटला नसेल. ' यदृच्छालाभसंतुष्ट होणें ' वगैरे या सामान्य गोष्टी कर्मयोग्याला सहज साध्य होण्याजोग्या आहेत, असेंहि वाटलें असेल ! म्हणून त्यांनी शब्दशः अर्थ करण्यापलीकडे कांहीं केलें नाहीं. पण यदृच्छालाभसंतुष्टत्वादि धर्म फार महत्त्वाचे असून ते विरक्त संन्याश्याच्या ठिकाणींच संभवतात.

**विमत्सरः-विगतमत्सरः-निर्वैरबुद्धिः**—विमत्सर म्ह० ज्याचा मत्सर पार निघून गेला आहे म्ह० निर्वैरबुद्धि, कोणाशीहि वैरबुद्धि न धरणारा,—**यदृच्छालाभस्य सिद्धौ च असिद्धौ समः-तुल्यः**—यदृच्छालाभाची सिद्धि झाली किंवा असिद्धि झाली तरी सम म्हणजे तुल्यवृत्ति—**यः एवंभूतः यतिः शरीरस्थितिहेतोः अन्नादेः लाभालाभयोः समः-हर्षविषादवर्जितः**—जो अशा प्रकारचा यति शरीराच्या स्थितीला अवश्य असलेल्या अन्नादिकांचा लाभ झाला, किंवा तो न झाला तरी त्या दोन्ही अवस्थांमध्यें सम म्ह० हर्षविषादरहित असतो,—**कर्मादौ अकर्मादिदर्शी**—कर्मादिकांमध्ये अकर्मादि पाहणारा,—**यथाभूत-आत्मदर्शननिष्ठः**—यथार्थ आत्मदर्शनामध्ये तत्पर झालेला, आत्मज्ञानांत निश्चयानें स्थित झालेला असतो तो—**शरीरस्थितिमात्रप्रयोजने शरीरादिनिर्वर्त्ये भिक्षाटनादिकर्मणि**—शरीराची स्थिति एवढेच ज्याचें प्रयोजन आहे अशा व शरीरादिकांच्या योगानेंच होणाऱ्या ( ‘ मी करतो ’ अशा अभिनिवेशाने न होणाऱ्या ) भिक्षाटनादिकर्मामध्ये—**अहं न एव किंचित् करोमि ‘ गुणा गुणेषु वर्तन्ते ’ इति एवं सदा संपरिचक्षाणः**—मी काहीएक करीत नाहीं ‘ इन्द्रिये विषयांमध्ये प्रवृत्त होतात ’ असे नेहमी-सदा बोलणारा—**आत्मनः कर्तृत्वाभावं पश्यन् भिक्षाटनादिकं किंचित् कर्म न करोति एव**—व आत्म्याचा कर्तृत्वाभाव पाहणारा भिक्षाटनादिक कांहींच कर्म करीत नाहीं. [ अनायासाने व याचनेवांचून जे प्राप्त होईल त्यात संतुष्ट होणारा, शीतोष्णादि द्वंद्वांची कितीहि पीडा होत असली तरी विषाद न मानणारा, कोणाचाहि मत्सर न करणारा, वैरबुद्धि मनांत न बाळगणारा व शरीरयात्रेसाठी अत्यंत अवश्य अशाहि अन्नाच्छादनाचा लाभ झाला असता हर्ष न मानणारा व ते न मिळाल्यास विषाद न करणारा, कर्मादिकांस अकर्मादि समजणारा आत्मज्ञाननिष्ठ पुरुष शरीरस्थिति एवढेच ज्याचे प्रयोजन आहे, अशा शरीरेंद्रियांनी होणाऱ्या भिक्षाटनादिकर्मात जरी प्रवृत्त झाला तरी ते कांही करीत नाही. कारण ते करीत असतांनाहि ‘ गुणा गुणेषु वर्तन्ते ’ ही त्याची भावना कायम असते. त्यामुळेच तो ‘ आत्मा अकर्ता आहे ’ ही गोष्ट केव्हांहि विसरत नाही. त्यामुळें तो स्वतः भिक्षाटनादि कांहीं करीत नाही. ]

**लोकव्यवहारसामान्यदर्शनेन तु लौकिकैरारोपितकर्तृत्वे भिक्षाटनादौ कर्मणि कर्ता भवति। स्वानुभवेन तु शास्त्रप्रमाणादिजनितेनाकर्तैव। स एवं पराध्यारोपितकर्तृत्वं शरीरस्थितिमात्रप्रयोजनं भिक्षाटनादिकं कर्म कृत्वाऽपि न निबध्यते बन्धहेतोः कर्मणः सहेतुकस्य ज्ञानाग्निना दग्धत्वादित्युक्तानुवाद एवैषः॥ २२॥**

**भाष्यार्थ**—( अहोपण, तो यति सुद्धां भिक्षाटनादिक कर्म करीत असल्यासारखा दिसतो, कारण त्यानें जर तें न केलें तर त्याचें जीवनहि संभवणार नाहीं, अशी आशंका घेऊन सांगतात-)—**तु लोकव्यवहारसामान्यदर्शनेन लौकिकैः आरोपितकर्तृत्वे भिक्षाटनादौ कर्मणि कर्ता भवति**—पण अविद्वानांच्या स्नान-आचमन-

भोजनादि व्यवहाराप्रमाणेंच विद्वानाचाहि तो तो व्यवहार होत आहे, असें पाहून इतर लोक त्या विद्वानावर त्या त्या व्यवहाराच्या कर्तृत्वाचा आरोप करितात. त्यामुळें लोकदृष्टीनें ज्यांचें कर्तृत्व त्याच्यावर लादले गेलें आहे, अशा भिक्षाटनादि कर्मांचा तो कर्ता होतो.—**तु शास्त्रप्रमाणादिजनितेन स्वानुभवेन अकर्ता एव**—पण शास्त्रप्रमाणादिकांपासून उत्पन्न झालेल्या स्वानुभवानें तो अकर्ताच आहे. ( चतुर्थ चरणाचे व्याख्यान-)—**एवं पराध्यारोपितकर्तृत्वं शरीरस्थितिमात्रप्रयोजनं भिक्षाटनादिकं कर्म कृत्वा अपि सः न निबध्यते**—याप्रमाणें दुसऱ्यांनीं ज्याचें कर्तृत्व आरोपिलें आहे व शरीरस्थिति एवढेंच ज्याचे प्रयोजन आहे असें भिक्षाटनादिक कर्म करूनही तो बद्ध केला जात नाहीं.—**बन्धहेतोः सहेतुकस्य कर्मणः ज्ञानाग्निना दग्धत्वात् इति एषः उक्तानुवादः एव**—बंधाला कारण होणाऱ्या कर्मांचा त्याच्या अविद्यारूप कारणासह ज्ञानाग्नीनें दाह झालेला असल्यामुळें तें कर्म त्याला बद्ध करूं शकत नाहीं, असा हा वर सांगितलेल्या सिद्धान्ताचाच अनुवाद आहे. [ संन्यासाश्रमी ज्ञानी सुद्धां इतर अज्ञ लोकांप्रमाणें स्नान-भोजनादि व्यवहार करीत असतो असें पाहून लोक त्याच्यावर त्या त्या कर्मांचे कर्तृत्व आरोपितात. त्यामुळे लोकांच्या दृष्टीनें ज्ञानी भिक्षाटनादि कर्मांचा कर्ता होतो, हें खरें; पण शास्त्रप्रमाणानें उत्पन्न झालेल्या स्वानुभवानें तो त्या कर्मांचाहि कर्ता नव्हे. त्यामुळें तो शरीरस्थितीला अत्यंत अवश्य असें कर्म करीत असूनहि त्यानें बद्ध होत नाहीं. कारण बंधाला निमित्त होणारें त्याचें सर्व कर्म अविद्यारूप कारणासह ज्ञानाग्नीनें दग्ध झालेले असते. ‘ शारीरं केवलं ’ येथें सांगितलेल्या गोष्टीचाच हा अनुवाद आहे. असल्या कर्मांचा मुक्तीशीं विरोध नाहीं, हें ‘ कृत्वापि- ’ येथील ‘ अपि ’ शब्दानें सुचविलें आहे. हे ज्ञानाचे प्रकरण असल्यामुळे व २१-२२ श्लोकांतील विशेषणें ज्ञाननिष्ठेलाच लागू होणारीं असल्यामुळें हें ज्ञाननिष्ठ संन्याश्याचें वर्णन आहे. कर्मयोग्याचें नव्हे. ज्ञान झालें तरी कांहीं कारणाने जो संन्यास-आश्रम घेऊं शकत नाहीं, तोहि ज्ञाननिष्ठच होय; कर्मयोगी नव्हे, हें यावरून वाचकांच्या ध्यानांत येईलच ] २२.

**गतसङ्गस्य मुक्तस्य ज्ञानावस्थितचेतसः ।**
**यज्ञायाचरतः कर्म समग्रं प्रविलीयते ॥ २३ ॥**

**अन्वयार्थ—गतसङ्गस्य**—ज्याची कर्म व फल यांविषयींची आसक्ति निवृत्त झाली आहे, ज्याची त्यांत आसक्ति राहिलेली नाहीं,—**मुक्तस्य**—त्यामुळेंच जो धर्माधर्मादि बंधनापासून सुटला आहे,—**ज्ञानावस्थितचेतसः**—ज्याचें चित्त ज्ञानांतच स्थित आहे, अशा—**यज्ञाय**—यज्ञासाठींच—**आचरतः**—कर्म करणाऱ्या पुरुषाचें—**कर्म**—तें कर्म—**समग्रं**—फलासह—**प्रविलीयते**—विनाश पावतें. २३.

**त्यक्त्वा कर्मफलासङ्गमित्यनेन श्लोकेन यः प्रारब्धकर्मा सन्यदा निष्क्रियब्रह्मात्मदर्शनसंपन्नः स्यात्तदा तस्याऽऽत्मनः कर्तृकर्मप्रयोजनाभावदर्शिनः कर्मपरित्यागे प्राप्ते**

**कुतश्चिन्निमित्तात्तदसंभवे सति पूर्ववत्तस्मिन्कर्मण्यभिप्रवृत्तोऽपि नैव किंचित्करोति स इति कर्माभावः प्रदर्शितः । यस्यैवं कर्माभावो दर्शितस्तस्यैव गतसङ्गस्य सर्वतो निवृत्तासक्तेर्मुक्तस्य निवृत्तधर्माधर्मादिबन्धनस्य ज्ञानावस्थितचेतसो ज्ञान एवावस्थितं चेतो यस्य सोऽयं ज्ञानावस्थितचेतास्तस्य यज्ञाय यज्ञनिर्वृत्त्यर्थमाचरतो निर्वर्तयतः कर्म समग्रं सहाग्रेन फलेन वर्तत इति समग्रं कर्म तत्समग्रं प्रविलीयते विनश्यतीत्यर्थः॥**

**भाष्यार्थ**—( पुढील-तेविसाव्या श्लोकाचा मागील २० व्या श्लोकाशी संबंध दाखविण्यासाठीं आचार्य म्हणतात–)—'**त्यक्त्वा कर्मफलासंगं०' इति अनेन श्लोकेन यः प्रारब्धकर्मा सन् यदा निष्क्रियब्रह्मात्मदर्शनसंपन्नः स्यात्**— 'त्यक्त्वा कर्मफलासंगं०' या श्लोकानें जो प्रारब्धकर्मा असून म्ह० ज्यानें कर्माचा आरंभ केलेला आहे असा असून, जेव्हां निष्क्रिय ब्रह्मच आत्मा आहे, या ज्ञानानें संपन्न होतो—**तदा आत्मनः कर्तृकर्मप्रयोजनाभावदर्शिनः तस्य कर्मपरित्यागे प्राप्ते**—तेव्हां आत्म्याला कर्तृत्व नाहीं, क्रिया नाहीं व कांहीं प्रयोजन–फल नाहीं, असें पाहणाऱ्या त्याच्या कर्मांचा संन्यास प्राप्त झाला असतां—**कुतश्चित् निमित्तात् तदसंभवे सति**—लोकसंग्रहेच्छादि कांहीं कारणानें त्याचा असंभव झाल्यास—**पूर्ववत् तस्मिन् कर्मणि अभिप्रवृत्तः अपि**—पूर्वीप्रमाणेंच त्या कर्मात तो जरी सर्वप्रकारें प्रवृत्त झाला तरी—**सः किंचित् न एव करोति**—तो कांहींच करीत नाहीं, —**इति कर्माभावः प्रदर्शितः**—असे म्हणून त्याच्या कर्माचा अभाव प्रदर्शित केला.—**एवं यस्य कर्माभावः प्रदर्शितः**—याप्रमाणें ज्याच्या कर्माचा अभाव दाखविला—**तस्य एव गतसंगस्य सर्वतः निवृत्तासक्तेः**—त्याच गतसंग म्ह० ज्याची आसक्ति सर्व विषयांपासून निवृत्त झाली आहे अशा—**मुक्तस्य-निवृत्तधर्माधर्मादिबंधनस्य**—मुक्त म्ह० ज्याचें धर्माधर्मादिबंधन निवृत्त झाले आहे अशा—**ज्ञानावस्थितचेतसः-ज्ञाने एव अवस्थितं चेतः यस्य-सः अयं ज्ञानावस्थितचेताः तस्य**—ज्ञानामध्येंच[1] ज्याचें चित्त अवस्थित झालें आहे तो हा

१ रहस्यकार 'ज्ञानावस्थितचेतसः' याचा अर्थ–साम्यबुद्धिरूप ज्ञानाचे ठिकाणीं स्थिरचित्त झालेला,–असा करितात. पण साम्यबुद्धि हेंच ज्ञानाचें स्वरूप नव्हे. या श्लोकावरील टीपेंत येथील 'यज्ञाय' हा शब्द पाहून तिसऱ्या अध्यायाच्या नवव्या श्लोकात जो अर्थ वर्णिला आहे तोच या श्लोकांत सांगितला आहे, असे म्हणतात. पण रहस्यकारांचा तिसऱ्या अध्यायांतील ९ व्या श्लोकाचा अर्थ चुकीचा कसा आहे, ते आम्ही वर दाखविलेंच आहे. पृ. २७९-८२ पहा. तथापि 'तिसऱ्या अध्यायातील व या अध्यायांतील यज्ञप्रकरणाचे प्रतिपादनांत मोठा भेद आहे,' असें स्वतः रहस्यकारच म्हणतात. पण तो मोठा भेद कोणता तें सांगतांना मात्र ते म्हणतात—"तिसऱ्या अध्यायांत श्रौत-स्मार्त अनादि यज्ञचक्र म्ह० साक्षात् तेच यज्ञ कायम ठेवले पाहिजेत असें म्हटले आहे. पण भगवान् आतां असें सांगतात की यज्ञ म्ह० केवळ देवतोद्देशानें अग्नींत तीळ, तांदूळ किंवा पशु याचे हवन करणें अगर चातुर्वर्ण्याची कर्में स्वधर्माप्रमाणें पण काम्यबुद्धीनें करणें, एवढाच संकुचित

ज्ञानावस्थितचित्त होय, त्याचें—**यज्ञाय-यज्ञनिर्वृत्यर्थं (कर्म) आचरतः-निर्वर्तयतः कर्म**—यज्ञासाठी-यज्ञ संपादन करण्यासाठी कर्म आचरणाऱ्या-कर्मानुष्ठान करणाऱ्या त्याचें तें कर्म—**समग्रं-सह अग्रेण फलेन वर्तते इति समग्रं प्रविलीयते-विनश्यति इत्यर्थः**—समग्र म्ह० अग्रासह-फलासह जें असतें ते समग्र-फलासह सर्व कर्म प्रविलय पावते म्ह० विनाश पावतें, असा याचा भावार्थ. [ 'त्यक्त्वा कर्मफलासंगं ... नैव किंचित्करोति सः' या श्लोकाने ज्ञानी पुरुषाच्या कर्माचा अभाव प्रदर्शित केला. म्ह० ज्यानें अगोदर कर्मानुष्ठाला आरंभ केला आहे, पण पुढे त्याला निष्क्रिय ब्रह्मच माझा आत्मा आहे, असे आत्मज्ञान झालें आहे, तो 'आत्मा कर्ता आहे, त्याचें हें अमुक कर्तव्य आहे, त्याचें त्याला अमुक फल मिळेल,' असें समजत नाहीं, तर त्याच्या ठिकाणी 'कर्तृ-कर्म-प्रयोजनांचा अभाव आहे' असेंच समजतो, त्याला कर्मत्यागच प्राप्त होतो. अशा स्थितीत तो संन्यासच करील, यांत कांहीं संशय नाहीं. पण कांहीं कारणानें त्याला संन्यास करता न आल्यास तो ज्ञान झाल्यावरहि पूर्वीप्रमाणेंच कर्मानुष्ठान करीत राहतो. तथापि वस्तुतः तो कांहीच करीत नाहीं, असें म्हणून त्याच्या कर्माचा अभाव वर २० व्या श्लोकांत सांगितला आहे. पण ज्याचा याप्रमाणे कर्माभाव प्रदर्शित केला आहे, त्या आसक्तिशून्य, धर्माधर्मादिबंधनरहित व ज्ञानामध्येंच ज्याचें चित्त अवस्थित आहे, अशा ज्ञानी पुरुषानें भगवत्प्रीतीसाठीं किंवा केवल यज्ञाचे स्वरूप सिद्ध होण्यासाठीं केलेले कर्म फलासह विनाश पावते. ते पुढील जन्माला कारण होत नाहीं.] २३

---

अर्थ समजूं नका. अर्थात आहुति टाकतांना अखेरीस 'इद न मम' हे माझे नव्हे, असे जे शब्द उच्चारितात, त्यांतील स्वार्थत्यागरूप निर्ममत्वाचे जें तत्त्व तोच यज्ञांतील प्रधान भाग होय आणि अशा रीतीनें 'न मम' म्ह० ममत्वबुद्धि सोडून आयुष्यांतील सर्व व्यवहार करणे, हाहि एक मोठा यज्ञ किंवा होमच होत असून या यज्ञाने सर्व देवतांची देवता जो परमेश्वर किंवा ब्रह्म त्याचे यजन घडत असते." . इत्यादि म्हणतात. पण हा अर्थ पूर्वोत्तरविरुद्ध नव्हे का ? तिसऱ्या अध्यायात 'तेच यज्ञ केले पाहिजेत' असें म्हणून या अध्यायात 'ममत्वबुद्धि सोडून आयुष्यातील सर्व व्यवहार करणे, हाहि एक मोठा यज्ञ आहे,' असे सांगणे यांत पूर्वोत्तरविरोध स्पष्ट भासतो. यापेक्षा तिसऱ्या अध्यायांतील प्रकरण निराळे व या अध्यायातील निराळे, असे म्हटल्यास काय होईल ? सर्व गीतेंत 'एक कर्मयोगच प्राधान्यानें वर्णिला आहे व बाकी सर्व त्याच्या अनुषगानें वर्णन आहे' या म्हणण्याला बाध येईल, एवढें मात्र खरें ! पण भगवानांच्या प्रतिपादनांतच अशी धरसोड दाखविण्यापेक्षां ज्ञानयोग प्रधान असून कर्मयोग त्याचें अंग आहे, असे म्हणणें अधिक प्रशस्त नव्हे का ? पण मग स्वमताभिनिवेश तो कोणता ? असो; आचार्यांनी प्रकरणभेद मानून तिसऱ्या व चवथ्या अध्यायांतील प्रकरणाची व्यवस्था कशी लाविली आहे, तें मूळ भाष्यार्थावरूनच कळण्यासारखे असल्यामुळे येथें विस्तार करीत नाहीं. या अध्यायांत भगवानांनी जे अकरा गौण यज्ञ सांगितले आहेत, तीं सर्व श्रौत-स्मार्त साधनें आहेत व ज्ञानयज्ञाची स्तुति करण्यासाठीं त्यांना उपचारानें 'यज्ञ' म्हटलें आहे. अर्थात् 'आयुष्यांतील सर्व व्यवहारांची' येथें प्राप्तिच नाहीं.

**ब्रह्मार्पणं ब्रह्म हविर्ब्रह्माग्नौ ब्रह्मणा हुतम् ।**
**ब्रह्मैव तेन गन्तव्यं ब्रह्मकर्मसमाधिना ॥ २४ ॥**

**अन्वयार्थ—अर्पणं**—ज्या मंत्राने किंवा-जुहु-इत्यादि साधनानें ब्रह्मविद् हवि अग्नीत अर्पण करितो, तो मंत्र किंवा ' जुहु ' वगैरे साधन—**ब्रह्म**—ब्रह्म,—**हविः**—तूप, भात वगैरे अग्नीत होमावयाचा पदार्थहि—**ब्रह्म**—ब्रह्म,—**ब्रह्माग्नौ**—ज्यांत होम करावयाचा तो अग्नि ब्रह्म,—**ब्रह्मणा**—हवन करणारा यजमान ब्रह्म व—**हुतं**—प्रत्यक्ष होमक्रियाहि ब्रह्मच. ब्रह्मरूप अग्नीत ब्रह्मरूप यजमानांकडून ब्रह्मरूप होम केला जातो.—**ब्रह्मकर्मसमाधिना**—ब्रह्मच कर्म, त्यांत ज्याच्या चित्ताची समाधि-स्थिरता आहे अशा—**तेन**—त्या ज्ञानी पुरुषाकडून—**ब्रह्म एव**—ब्रह्मच—**गन्तव्यं**—प्राप्तव्य फल आहे. त्याला इष्ट असलेले फलहि ब्रह्मच आहे. २४.

**कस्मात्पुनः कारणात्क्रियमाणं कर्म स्वकार्यारम्भमकुर्वत्समग्रं प्रविलीयत इत्युच्यते यतः ब्रह्मेति । ब्रह्मार्पणं येन करणेन ब्रह्मविद्धविरग्नावर्पयति तद्ब्रह्मैवेति पश्यति तस्याऽऽत्मव्यतिरेकेणाभावं पश्यति यथा शुक्तिकायां रजताभावं पश्यति तदुच्यते ब्रह्मैवार्पणमिति । यथा यद्रजतं तच्छुक्तिकैवेति । ब्रह्म, अर्पणमित्यसमस्ते पदे । यद-र्पणबुद्ध्या गृह्यते लोके तदस्य ब्रह्मविदो ब्रह्मैवेत्यर्थः ॥**

**भाष्यार्थ—क्रियमाणं कर्म स्वकार्यारंभं अकुर्वत् कस्मात् पुनः कार-णात् समग्रं प्रविलीयते इति उच्यते ' ब्रह्म० ' इति**—कर्माचे फल भोगल्या-वांचून दीर्घ काल जरी लोटला तरी तें क्षीण होत नाहीं, अशी स्मृति असल्यामुळे केलेलें कर्म आपल्या कार्याचा-फलाचा आरंभ न करितां कोणत्या बरें कारणानें समग्र नाश पावतें ? असे विचारशील तर ' ब्रह्मार्पणं० ' या श्लोकाने त्याचे उत्तर सांगितले जातें—**यतः ब्रह्मार्पणं-ब्रह्मविद् येन करणेन हविः अग्नौ अर्पयति तत् ब्रह्म एव पश्यति**—कारण ब्रह्मवेत्ता अर्पण म्ह० ज्या साधनाने तूप, दूध इत्यादि हवि अग्नींत अर्पितो ते अर्पण ब्रह्मच पाहतो. म्हणजे—**तस्य आत्मव्यतिरेकेण अभावं पश्यति**—त्याचा आत्म्याहून भिन्नत्वाने अभाव पाहतो. [त्या अर्पणाला-हवि अर्पण करण्याच्या साधनाला तो आत्मरूप पाहतो. ते आत्म्याहून पृथक् पहात नाहीं. क्रिया-कारक-फलरूप सर्व द्वैत ब्रह्मरूप आहे, असें पाहिल्याने ते बाधित होते. त्याला त्या सर्वांचा ब्रह्मात्म-रूपाने अनुभव येतो, द्वैतरूपाने अनुभव येत नाही. ' ब्रह्म अर्पणं ' हें सामानाधि-

---

१ 'हा ब्रह्मार्पणरूपी बडा यज्ञच पुढील श्लोकांत प्रथम वर्णिला आहे' असे रहस्यकार म्हण-तात. पण वरील श्लोकात "यज्ञासाठीं कर्माचरण करणाराचें सर्व कर्म फलासह विनाश पा-वतें" असे सांगितलें आहे. त्याच्याशी या श्लोकाचा संबंध दाखविणें उचित होय. वरील श्लोकांत ब्रह्मार्पणशब्दाचा गंधहि नाहीं. त्यामुळें रहस्यकाराचे वरील अवतरण अप्रासंगिक आहे. त्यापेक्षां आचार्यांनीं जें अवतरण दिलें आहे तेंच अधिक सुसंबद्ध आहे.

करण्य कोणत्या प्रकारचें आहे, तें दृष्टान्तानें व्यक्त करितात-]—**यथा शुक्तिकायां रजताभावं पश्यति**—ज्याप्रमाणें शुक्तिकेमध्यें-शिंपीमध्यें रजताचा-रूप्याचा अभाव पाहतो, तसा ब्रह्मामध्यें अर्पणादिकांचा अभाव पाहतो. [म्ह०जें रुपें म्हणून तूं म्हणतोस ती शिंप आहे, वस्तुतः रूपे नव्हे, असें ज्याप्रमाणें म्हणतात, त्याप्रमाणें जें अर्पण-स्रुक्, स्रुवा वगैरे तें ब्रह्म आहे,असें 'बाधायां सामानाधिकरण्य' आहे. सामानाधिकरण्य म्ह०दोन शब्दांचे एकविभक्तित्व मागे पृ.७८पहा.]—**ब्रह्मार्पणं इति तत् उच्यते**—'ब्रह्मार्पणं०' या दोन शब्दांनी तेच बाधसामानाधिकरण्य सांगितलें जातें. म्हणजे—**यथा यत् रजतं तत् शुक्तिका एव इति**—जसे, जें रूपें म्हणून तूं म्हणतोस ती शिंपच आहे, असें 'ब्रह्म अर्पणं' या पदांनीं सांगितलें आहे.—**' ब्रह्म अर्पणं ' इति असमस्ते पदे**—'ब्रह्म' व 'अर्पणं' ही दोन पृथक् पदें आहे. एक-सामासिक पद नव्हे.त्यांचा समास झालेला नाहीं. (अर्थात्)—**लोके यत् अर्पणबुद्ध्या गृह्यते-तत् अस्य ब्रह्मविदः ब्रह्म एव इति अर्थः**—लौकिक व्यवहारांत जे हवि अर्पण करण्याचें साधन स्रुक्, स्रुवा इत्यादि भावनेनें ग्रहण केलें जातें, तें या ब्रह्मवेत्त्याच्या दृष्टीनें ब्रह्मच आहे, असा याचा भावार्थ. [ कर्तृत्वाभिमान व फलेच्छा यांनी युक्त होऊन केलेले शुभाशुभ कर्म, मध्यें कितीहि जरी काल लोटला तरी फल दिल्यावांचून क्षीण होत नाहीं, असे शास्त्रवचन असल्यामुळे ज्ञानी पुरुषानेहि केलेले कर्म फलाचा आरंभ केल्यावाचून क्षीण होईल असें वाटत नाहीं. पण तुम्ही तर ते समग्र विनाश पावते, असे सांगत आहां. पण तें आपलें फल दिल्यावांचून कां बरे क्षीण व्हावे ? उत्तर—ब्रह्मवेत्त्याला सर्व द्वैत ब्रह्ममात्र भासतें, त्याच्या दृष्टीनें कर्म व कर्माचें साधन ही दोन्ही ब्रह्मरूप आहेत. त्यामुळे बाधित झालेलें कर्म समग्र नाश पावतें. ब्रह्मवेत्ता ज्या साधनानें अग्नींत हवि देतो तें साधन ब्रह्मरूप पाहतो त्याहून पृथक् पहात नाहीं. ]

**ब्रह्म हविस्तथा यद्धविर्बुद्ध्या गृह्यमाणं तद्ब्रह्मैवास्य । तथा ब्रह्माग्नाविति समस्तं पदम् । अग्निरपि ब्रह्मैव यत्र हूयते ब्रह्मणा कर्त्रा ब्रह्मैव कर्तेत्यर्थः । यत्तेन हुतं हवनक्रिया तद्ब्रह्मैव । यत्तेन गन्तव्यं फलं तदपि ब्रह्मैव । ब्रह्मकर्मसमाधिना ब्रह्मैव कर्म ब्रह्मकर्म तस्मिन्समाधिर्यस्य स ब्रह्मकर्मसमाधिस्तेन ब्रह्मकर्मसमाधिना ब्रह्मैव गन्तव्यम्॥**

**भाष्यार्थ—तथा ब्रह्म हविः-यत् हविर्बुद्ध्या गृह्यमाणं तत् अस्य ब्रह्म एव**—वर सांगितलेल्याच न्यायानें ब्रह्मच हवि; जे हवि-तूप, दूध, दहीं, यव, व्रीहि, इत्यादि भावनेने व्यवहारांत ग्रहण केलें जाणारें ते या ब्रह्मज्ञाला ब्रह्मच आहे—**तथा ' ब्रह्माग्नौ ' इति समस्तं पदं**— त्याचप्रमाणें ' ब्रह्माग्नौ ' हें समस्त पद आहे. म्ह० असमस्त पद नव्हे. ब्रह्म व अग्नि या पदांचा येथे कर्मधारय समास झाला आहे. ' ब्रह्म अर्पणं ' यांप्रमाणें तीं पृथक् पदें नव्हेत.—**यत्र हूयते सः अग्निः अपि ब्रह्म एव**—ज्यांत होम केला जातो तो अग्निहि ब्रह्मच ( ब्रह्मवेत्ता ब्रह्मरूप अग्नींतच होम करतो. )—**ब्रह्मणा-कर्त्रा**—ब्रह्मानें म्ह० कर्त्यानें—**ब्रह्म एव कर्ता इत्यर्थः**—ब्रह्मच कर्ता-होम करणारा यजमान, असा याचा भावार्थ—**यत् तेन हुतं-हवन-**

**क्रिया तत् ब्रह्म एव**—जें त्यानें केलेलें हुत म्ह० हवनकर्म तें ब्रह्मच—**यत् तेन गन्तव्यं फलं तत् अपि ब्रह्म एव**—जें त्याच्याकडून प्राप्त केलें जाणारें फल तेंहि ब्रह्मच—**ब्रह्मकर्मसमाधिना-ब्रह्म एव कर्म ब्रह्मकर्म तस्मिन् समाधिः यस्य सः ब्रह्मकर्मसमाधिः तेन ब्रह्मकर्मसमाधिना गन्तव्यं ब्रह्म एव**—ब्रह्मकर्म-समाधिना म्ह०ब्रह्म हेंच कर्म-ब्रह्मकर्म, त्यांत ज्याची समाधि म्ह० चित्तसमाधान आहे तो ब्रह्मकर्मसमाधि, त्या ब्रह्मकर्मसमाधि पुरुषाकडून प्राप्त केलें जाणारें जें फल तेंही ब्रह्मच. [ ज्ञानी पुरुषाला हवि ब्रह्मच दिसतो. ब्रह्मरूप अग्नीत त्या ब्रह्मरूप यजमानाकडून ब्रह्मरूप हवन क्रिया केली जाते. ब्रह्मरूप कर्मामध्यें ज्याचें चित्तसमाधान आहे त्याला संपादन करण्यास योग्य असलेलें फलहि ब्रह्मच आहे. साराश ज्ञानी पुरुषाला क्रिया-कारक-फल-रूप सर्व प्रपंच ब्रह्मरूप भासतो. ब्रह्म ज्ञेय असल्यामुळें किंवा प्राप्य असल्यामुळें त्याला कर्मत्व आहे, असें 'ब्रह्मकर्मसमाधिना' येथील कर्मशब्दांवरून जाणावें.

**एवं लोकसंग्रहं चिकीर्षुणाऽपि क्रियमाणं कर्म परमार्थतोऽकर्म ब्रह्मबुद्ध्युपमृदितत्वात् एवं सति निवृत्तकर्मणोऽपि सर्वकर्मसंन्यासिनः सम्यग्दर्शनस्तुत्यर्थं यज्ञत्वसंपादनं**

---

१ रहस्यकार अवतरणात 'ब्रह्मार्पणरूप बडा यज्ञच सांगतात' असें जरी म्हणत असले, तरी अर्थात 'अर्पण म्ह० हवन करण्याची क्रिया ब्रह्म' असें म्हणतात व टीपेत '' अर्पणशब्दाचा अर्थ अर्पण करण्याचें साधन म्ह०पळी इत्यादि, असा शांकरभाष्यात केला आहे, पण तो जरा क्लिष्ट आहे. यापेक्षां अर्पण म्ह० अर्पण किंवा हवन करण्याची क्रिया, असा अर्थ करणें अधिक सरळ होय'' असें म्हटलें आहे. ब्रह्मार्पण म्ह० ब्रह्माला अर्पण करणें हा बडा यज्ञच जर पुढें सांगावयाचा आहे तर अर्पण-हवन करण्याची क्रिया ब्रह्म,असा अर्थ कसा संभवेल ? हवन क्रिया ब्रह्म आहे,असें म्हटल्यानें ब्रह्मार्पणरूप बडा यज्ञ होऊं शकत नाही. ज्ञानी पुरुष यज्ञाची सर्व सामग्री ब्रह्मरूप पाहतो. त्यामुळें त्याचें कर्म फलासह निवृत्त होतें, असें येथें सांगावयाचें आहे. म्हणून अर्पण म्ह०हवी देण्याचें साधन-करण, हवी-कर्म अग्नि-अधिकरण, कर्ता,हवन-क्रिया व प्राप्तव्य फल हे सर्व ब्रह्म आहे, असे याचें व्याख्यान करणेंच सयुक्तिक आहे. रहस्यकारांचा 'अर्पण म्ह० अर्पणक्रिया ' ( गी. र. पृ. ६७६ ) हा अर्थ फारच सरळ आहे! इतका सरळ अर्थ आचार्यांना कसा करतां येईल? असो; शेवटी ''ब्रह्मार्पण म्ह० नि-ष्कामबुद्धीनें यज्ञ करणारांचें हें वर्णन झालें'' असा 'ब्रह्मार्पणं' या श्लोकाचा साराश सांगितला आहे. पण तो चुकीचा आहे. ब्रह्मार्पण म्ह० निष्कामबुद्धीनें यज्ञ करणें, असें म्हणणें हीच पहिली चूक, कारण स्वतःच 'अर्पण म्ह० हवन करण्याची क्रिया ब्रह्म, अर्पण करावयाचें द्रव्य ब्रह्म' इत्यादि जो अर्थ केला आहे, त्याच्याशीं ते म्हणणें जुळत नाही व अर्पणादि सर्व ब्रह्म आहे, एवढेंच या श्लोकांत सांगितलें आहे. ब्रह्मार्पण करणाऱ्या मनुष्याचें त्यांत वर्णन नाही. या श्लोकाचा आचार्यांनीं जो अर्थ केला आहे तोच सयुक्तिक व मूळाला धरून आहे, हें मूळ भाष्यार्थावरूनच वाचकांच्या लक्षांत येईल. अर्पणादिकांचा निराळा अर्थ कां संभवत नाही, तेंहि भाष्यांत सविस्तर वर्णिलें आहे. रहस्यकारांना हा श्लोक ज्ञानप्रकरणांतील आहे, या गोष्टीचें भानहि नाही. तथापि त्यांनीं 'तिसऱ्या व चवथ्या अध्यायाच्या यज्ञप्रकरणांतील प्रतिपादनांत फार मोठा भेद आहे,' एवढें तरी म्हटलें आहे. हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

**ज्ञानस्य सुतरामुपपद्यते यदर्पणाद्यधियज्ञे प्रसिद्धं तदस्याध्यात्मं ब्रह्मैव परमार्थदर्शिन इति। अन्यथा सर्वस्य ब्रह्मत्वेऽर्पणादीनामेव विशेषतो ब्रह्मत्वाभिधानमनर्थकं स्यात्। तस्माद्ब्रह्मैवेदं सर्वमित्यभिजानतो विदुषः सर्वकर्माभावः॥**

**भाष्यार्थ**—( याप्रमाणें ब्रह्मार्पणमंत्राचा अक्षरार्थ सांगून तात्पर्यार्थ सांगतात-)—**एवं लोकसंग्रहं चिकीर्षुणा अपि क्रियमाणं कर्म परमार्थतः अकर्म ब्रह्मबुद्ध्युपमृदितत्वात्**—याप्रमाणें लोकसंग्रह करण्याची इच्छा करणाऱ्या पुरुषाकडून केलें जाणारें कर्म वस्तुतः-तत्त्वतः अकर्म आहे, कारण तें ब्रह्मबुद्धीने-सर्व ब्रह्मच आहे या भावनेनें बाधित झालेले असते-त्यांतील कार्योत्पादनशक्ति नष्ट झालेली असते. ( पण असे जरी असले तरी कर्मापासून निवृत्त झालेल्या संन्याश्याला उद्देशून या श्लोकाची प्रवृत्ति कशी झाली आहे ? उत्तर-)—**एवं सति निवृत्तकर्मणः सर्वकर्मसंन्यासिनः अपि सम्यग्दर्शनस्तुत्यर्थं ज्ञानस्य यज्ञत्वसंपादनं सुतरां उपपद्यते**—असें सिद्ध झाले असता कर्मापासून निवृत्त झालेल्या सर्वकर्मसंन्यासी पुरुषाच्याहि सम्यग्ज्ञानाच्या स्तुतीसाठी ज्ञानाचें यज्ञत्वसंपादन-ज्ञानामध्यें यज्ञाची कल्पना करणे-फारच उत्तमप्रकारें उपपन्न होते. [ म्ह० बाह्य प्रत्यक्ष यज्ञ करण्यास असमर्थ असलेल्या अज्ञाचाहि संकल्पमात्र यज्ञ जसा शास्त्रांत उपलब्ध होतो, त्याप्रमाणें ज्ञानाची स्तुति करण्यासाठी ज्ञानामध्यें यज्ञत्वाची कल्पना करणें तर अधिकच सयुक्तिक आहे. कारण त्यामुळें ज्ञानाच्या स्तुतीचा लाभ होतो व ज्ञानाला यज्ञ समजणे, हे ज्याच्या त्याच्या स्वाधीन असतें. आतां ज्ञानाच्या ठिकाणी यज्ञत्वाची कल्पना कशी होते ते दाखवितात- ]—**अधियज्ञे यत् अर्पणादि प्रसिद्धं तत् अस्य परमार्थदर्शिनः अध्यात्मं ब्रह्म एव इति**—अधियज्ञांत म्ह० बाह्य प्रसिद्ध यज्ञांत जे प्रसिद्ध असलेलें स्रुक्-स्रुवादि अर्पणसाधन, हवि, अग्नि, यजमान, हवनकर्म व फल तें या तत्त्वदर्शी ज्ञान्याच्या शरीरांतील ब्रह्मच आहे, अशी यज्ञकल्पना उत्तमप्रकारें संभवते. ( पण हे यज्ञत्वसंपादन कोणत्या प्रमाणावरून ठरवावयाचें ? उत्तर )—**अन्यथा सर्वस्य ब्रह्मत्वे अर्पणादिनां एव विशेषतः ब्रह्मत्वाभिमानं अनर्थकं स्यात्**—येथे ज्ञानामध्यें यज्ञत्व कल्पना जर विवक्षित नसती तर सर्वांलाच ब्रह्मत्व असल्यामुळे अर्पणादि कांही यज्ञसंबंधी पदार्थांनाच विशेषेंकरून ब्रह्मत्व आहे, असे सांगणे व्यर्थ होईल. [ज्याअर्थी ते मुद्दाम सांगितले आहे त्याअर्थी ज्ञानामध्ये यज्ञत्वकल्पनाच येथे विवक्षित आहे, ही गोष्ट सिद्ध होते. ]—**तस्मात् ब्रह्म एव इदं सर्वं इति अभिजानतः विदुषः सर्वकर्माभावः**—ज्याअर्थी तत्त्वज्ञाच्या ज्ञानालाच यज्ञत्व आहे, त्याअर्थी ‘ ब्रह्मच हे सर्व आहे ’ असे जाणणाऱ्या विद्वानाच्या सर्व कर्मांचा अभाव आहे. [ लोकसंग्रहादि कांहीं कारणाने ज्ञान झाल्यावरहि गृहस्थाश्रमाचा त्याग न करणाऱ्या पुरुषानें अग्निहोत्रादि कर्म जरी केले तरी तें ब्रह्मबुद्धीनें बाधित होत असल्यामुळें वस्तुतः अकर्मच आहे. अर्थात् लोकसंग्रहार्थ कर्म करणाराहि कर्मयोगी नव्हे, तत्त्वतः संन्यासीच आहे. याप्रमाणें ज्ञानोत्तर कर्मसंन्यास न करितां लोकसंग्रहार्थ कर्में करीत असलेल्या गृहस्थाला उद्देशून या श्लोकाची प्रवृत्ति कशी

होते तें सांगून आतां कर्मसंन्यास करणाऱ्या संन्यासाश्रमी पुरुषाला उद्देशून त्याची प्रवृत्ति कशी होते तेहि सांगितलें आहे. या श्लोकांत ज्ञानाची स्तुति केली आहे. प्रसिद्ध यज्ञांत अर्पणादि जीं साधनें वगैरे आहेत, तीं सर्व ज्ञानी पुरुषाच्या ज्ञानरूप आहेत. परमार्थदर्शी पुरुष अर्पणादि सर्व ब्रह्मच आहे, असे पाहतो. त्यामुळे त्याला प्रत्यक्ष कर्मानुष्ठान करावें लागत नाहीं. अर्थात् सर्व ब्रह्मच आहे, असे जाणणाऱ्या पुरुषाला सर्व कर्मांचा अभाव आहे. या श्लोकांत ज्ञानाच्या स्तुतीसाठीं ज्ञानामध्ये यज्ञाची कल्पना केली आहे, ही गोष्ट यज्ञसाधनांना ब्रह्म म्हटलें आहे, यावरूनच सिद्ध होते. कारण येथे स्तुति जर विवक्षित नसती, तर सर्वच ब्रह्म असताना त्यांतील अर्पणादि कांहीं वस्तूंनाच ब्रह्म म्हणणे उपपन्न झालें नसतें. ]

**कारकबुद्ध्यभावाच्च । न हि कारकबुद्धिरहितं यज्ञाख्यं कर्म दृष्टम् । सर्वमेवाग्निहोत्रादिकं कर्म शब्दसमर्पितदेवताविशेषसंप्रदानादिकारकबुद्धिमत्कर्त्रभिमानफलाभिसंधिमच्च दृष्टं नोपमृदितक्रियाकारकफलभेदबुद्धिमत्कर्तृत्वाभिमानफलाभिसंधिरहितं वा । इदं तु ब्रह्मबुद्ध्युपमृदितार्पणादिकारकक्रियाफलभेदबुद्धि कर्मातोऽकर्मैव तत् ॥**

**भाष्यार्थ**—( हें सर्व आत्माच आहे, व आत्म्याहून भिन्न असलेले सर्व मिथ्या आहे, असे समजणाऱ्या विद्वानाला कर्माचा अभाव आहे, याविषयीं आणखी एक हेतु सांगतात–)—**च कारकबुद्ध्यभावात्**—आणि कारकबुद्धीचा अभाव असल्यामुळेंहि ज्ञानी पुरुषाला कर्माचा अभाव आहे. ( अहो पण, कर्ता, कर्म, करण इत्यादि कारकबुद्धि व त्यांच्याविषयीं 'हा मी व हें माझें' असा अभिमान याचा अभाव जरी असला तरी कर्म कां नसावें ? उत्तर–)—**कारकबुद्धिरहितं यज्ञाख्यं कर्म न दृष्टं हि**—यज्ञसंज्ञक कर्म कर्ता-कर्मादि कारकबुद्धीवांचून होत असल्याचे कोठेच दिसत नाहीं,—**सर्वे एव अग्निहोत्रादिकं कर्म शब्दसमर्पित-देवताविशेषसंप्रदानादिकारकबुद्धिमत् च कर्त्रभिमान-फलाभिसंधिमत् दृष्टम्**—सर्वच अग्निहोत्रादिक कर्म 'इंद्राय, वरुणाय' इत्यादि शब्दांनी समर्पण केलेला विशेषरूप देवता हें संप्रदान; व्रीहियवादि करण, इत्यादि कारकबुद्धीनें युक्त असलेले आणि 'मी याचा कर्ता,' असा कर्त्रभिमान व 'मी याचे फल भोगीन,' ही फलाभिसंधि यांनी युक्त असलेलेच दिसतें;—**उपमृदित-क्रियाकारकफलभेदबुद्धिमत् कर्तृत्वाभिमानफलाभिसंधिरहितं वा न दृष्टं**—ज्यांतील क्रिया-कारक-फलभेदबुद्धि नाहींशी झाली आहे, असें किंवा कर्तृत्वाभिमानपूर्वक जी फलाभिसंधि-फलेच्छा तिने रहित असें कर्म दिसत नाहीं.—**इदं तु कर्म ब्रह्मबुद्धि-उपमृदित-अर्पणादिकारकक्रियाफलभेदबुद्धि**—आणि हे ब्रह्मज्ञाचें कर्म तर ब्रह्मबुद्धीने ज्याविषयींची अर्पणादिकारक, हवनक्रिया, फल इत्यादि भेदबुद्धि बाधित झाली आहे, असें आहे.—**अतः तत् अकर्म एव**—त्यामुळे ते अकर्मच आहे. [ 'यज्ञ' हें ज्याला नांव आहे तें कर्म कर्ता-करण-संप्रदान-इत्यादि कारकबुद्धीवांचून होतें, असें कोठेंच दिसत नाही. अग्निहोत्रादि सर्व कर्म इंद्रादि देवता हे संप्रदान, यजमान हा कर्ता, व्रीह्यादि पदार्थ हे करण इत्यादि कारकबुद्धीनें युक्त असलेलेंच दिसतें.

तसेंच, मी कर्ता, अशा अभिमानावांचून कोणतेंही कर्म होत नाहीं. त्याचप्रमाणें कोणतेंही कर्म फलाच्या इच्छेनेंच होतें. त्यावांचून कोणतेंच कर्म होत नाहीं. पण ब्रह्मवेत्त्याचें दिसणारें जें कर्म तें कर्मच नव्हे,कारण 'मी ब्रह्म आहें' या बुद्धीनें त्याच्या कर्माची वरील सर्व सामग्री बाधित झालेली असते. तत्त्वज्ञान झालें कीं, व्यापक कारकादिबुद्धि व्यावृत्त झाली असतां व्याप्य कर्महि व्यावृत्त होतें. जेथें जेथें कारकबुद्धि तेथें तेथें कर्म अशी व्याप्ति दिसत असल्यामुळें कारकबुद्धि व्यापक व कर्म त्याचें व्याप्य आहे. व्यापकाच्या अभावीं व्याप्याचाहि अभाव होतो. याविषयीं अनुमान–तत्त्ववेत्त्यांची शरीरेंद्रियचेष्टा हें कर्म नव्हे, कर्माभास आहे. कारण कर्मव्यापक जे कारकादि त्याचा त्यांत अभाव असतो. झोंपेंतील चेष्टेप्रमाणें. ]

**तथा च दर्शितं 'कर्मण्यकर्म यः पश्येत्' 'कर्मण्यभिप्रवृत्तोऽपि नैव किंचित्करोति सः' 'गुणा गुणेषु वर्तन्ते' 'नैव किंचित्करोमीति युक्तो मन्येत तत्त्ववित्' इत्यादिभिः। तथा च दर्शयंस्तत्र तत्र क्रियाकारकफलभेदबुद्ध्युपमर्दं करोति। दृष्टा च काम्याग्निहोत्रादौ कामोपमर्देन काम्याग्निहोत्रादिहानिः। तथा मतिपूर्वकामतिपूर्वकादीनां कर्मणां कार्यविशेषस्याऽऽरम्भकत्वं दृष्टम्। तथेहापि ब्रह्मबुद्ध्युपमृदितार्पणादिकारकक्रियाफलभेदबुद्धेर्बाह्यचेष्टामात्रेण कर्मापि विदुषोऽकर्म संपद्यते। अत उक्तं समग्रं प्रविलीयत इति॥**

**भाष्यार्थ**—( विद्वानाचें कर्म हे अकर्मच आहे, याविषयीं भगवानांची अनुमति दाखवितात–)—**तथा च दर्शितं**—तसे गीतेतच प्रदर्शित केलें आहे—'**कर्मणि अकर्म यः पश्येत्** '—कर्मामध्ये जो अकर्म पाहतो. अ. ४-१८—'**कर्मण्यभिप्रवृत्तोऽपि नैव किंचित्करोति सः**'—तो कर्मामध्यें जरी प्रवृत्त झाला तरी कांहीं करीत नाहीच ४-२०.—'**गुणा गुणेषु वर्तन्ते**'—इंद्रियरूप गुण विषयरूप गुणांमध्यें प्रवृत्त होतात. ३-२८.—**नैव किंचित्करोमीति युक्तो मन्येत् तत्त्ववित्**—युक्त तत्त्ववेत्त्यानें मी कांहींच करीत नाहीं, असे जाणावें ५-८—**इत्यादिभिः**—इत्यादि वाक्यांनीं ठिकठिकाणीं तसें दाखविलें आहे. ( ' अहोपण, तत्त्वज्ञाला दृष्ट कर्म नाहीं, असें जरी सांगितले असलें तरी त्याचें कारण तसेंच राहत असल्यामुळें पुनः कर्म संभवेल ! ' उत्तर–)—**च तथा दर्शयन् तत्र तत्र क्रियाकारकफलभेदबुद्धि-उपमर्दं करोति**—आणि तसें दाखविणारे भगवान् ठिकठिकाणीं क्रिया-कारक-फलभेदबुद्धीचा निषेध करितात–ती बुद्धि सर्वथा घालवितात. ( अर्थात् अविद्वानाप्रमाणे विद्वान् जरी कर्म करीत आहे, असें वाटलें तरी त्याचें कर्म हें अकर्मच आहे, याविषयीं दृष्टान्त देतात–)—**च काम्य-अग्निहोत्रादौ कामोपमर्देन काम्याग्निहोत्रादिहानिः दृष्टा**—कारण काम्य अग्निहोत्रादिकांतील कामाची निवृत्ति झाली असतां काम्य अग्निहोत्रादिकांची हानि होते, असें आपण पाहिलें आहे. [ स्वर्गाच्या कामनेनें जोंवर अग्निहोत्रादि कर्म पुरुष करीत असतो तोंवरच तें काम्य. त्यांतील स्वर्गकामना नाहींशी झाली कीं त्या कर्माला काम्यत्व रहात नाहीं. असो; इतरांच्या कर्माप्रमाणें विद्वानाचें कर्महि फलाचा आरंभ करील, अशी शंका कोणी घेईल म्हणून आचार्य म्हणतात–]—**तथा मति-**

**पूर्वक-अमतिपूर्वकादीनांकर्मणांकार्यविशेषस्य आरंभकत्वं दृष्टं**—तसेंच, हें कर्म असें करावें, याचें फल भोगावें, या मतिपूर्वक म्ह० अशा भावनेनें केलेल्या व तशा मतिपूर्वक न केलेल्या म्ह० तशा भावनेने न आचरिलेल्या कर्मांना विशेष कार्यांचें आरंभकत्व प्रसिद्ध आहे. बुद्धिपूर्वक केलेल्या कर्मांचें फल निराळे व अबुद्धिपूर्वक केलेल्या कर्मांचें फल निराळे. दोन्ही प्रकारच्या कर्मांचे फल एकच नाहीं किंवा एकसारखेंहि नाही. **—तथा इह अपि ब्रह्मबुद्धि-उपमृदित-अर्पणादिकारकक्रियाफलभेदबुद्धेः विदुषः बाह्यचेष्टामात्रेण कर्म अपि अकर्म संपद्यते**—तसेच येथें या-विद्वत्प्रकरणांतसुद्धा ज्याची अर्पणादिकारक-क्रिया-फलभेदबुद्धि ब्रह्मज्ञानाने बाधित झाली आहे त्या विद्वानाचे केवल बाह्यचेष्टेने होणारे कर्महि अकर्म बनते.**—अतः समग्रं प्रविलीयते इति उक्तं**—म्हणूनच वर 'समग्रं प्रविलीयते-' फलासह कर्म नाश पावतें असें म्हटले आहे. [ बुद्धिपूर्वक केलेले कर्म व बुद्धिपूर्वक न केलेले कर्म यांच्या फलात फारच मोठे अंतर पडते: त्याच न्यायाने या विद्वत्प्रकरणात सुद्धा ज्या विद्वानाची क्रिया-कारक-फलभेदबुद्धि ब्रह्मबुद्धीने बाधित झालेली असते, त्याचे कर्म केवल शरीरेंद्रियचेष्टारूप असते. मनापासून-अहंकारपूर्वक नसते. म्हणून ते अकर्म. जन्मरूप बंध उत्पन्न करणारे ते कर्म नव्हे. ]

**अत्र केचिदाहुर्यद्ब्रह्म तदर्पणादीनि । ब्रह्मैव किलार्पणादिना पञ्चविधेन कारकात्मना व्यवस्थितं सत्तदेव कर्म करोति । तत्र नार्पणादिबुद्धिर्निवर्त्यते किं त्वर्पणादिषु ब्रह्मबुद्धिराधीयते । यथा प्रतिमादौ विष्ण्वादिबुद्धिर्यथा वा नामादौ ब्रह्मबुद्धिरिति ॥**

**भाष्यार्थ**—( याप्रमाणे ' ब्रह्मार्पणं०' या श्लोकाचे स्वसिद्धान्ताप्रमाणे व्याख्यान करून प्राचीन व्याख्यानाचा अनुवाद करितात-)**—अत्र केचित् आहुः-यत् ब्रह्म तत् अर्पणादीनि**—जे ब्रह्म ते अर्पणादिक ( प्रसिद्ध वस्तूच्या उद्देशाने अप्रसिद्ध वस्तूचे विधान करणे उचित असतांना येथे अप्रसिद्ध ब्रह्माच्या उद्देशाने प्रसिद्ध अर्पणादिकांचें विधान कसे केलें आहे ? उत्तर-)**—ब्रह्म एव किल अर्पणादिना पंचविधेन कारकात्मना व्यवस्थितं सत्**—ब्रह्मच खरोखर अर्पणादि पांच प्रकारच्या कारकरूपाने व्यवस्थित होत्सातें**—तत् एव कर्म करोति**—तेच कर्म करते. [ब्रह्मच कर्ता, कर्म, करण, संप्रदान व अधिकरण या पाच कारकरूपाने अवस्थित होते. तेच त्या त्या कारकरूपाने बनून कर्म करते, असे मानलेले असल्यामुळे ब्रह्म अप्रसिद्ध नाही, ते प्रसिद्धच आहे. त्यामुळे त्याचा अनुवाद करून अर्पणादिकांमध्ये त्याच्या दृष्टीचे विधान करणें यात कांहीच विरोध नाही, असा याचा भावार्थ. या दृष्टिविधिपक्षांत सिद्धान्तपक्षाहून विशेष कोणता आहे ते सांगतात-]**—तत्र न अर्पणादिबुद्धिः निवर्त्यते किंतु अर्पणादिषु ब्रह्मबुद्धिः आधीयते**—त्या पक्षीं अर्पणादिकांविषयींची बुद्धि निवृत्त केली जात नाहीं, तर त्या अर्पणादिकांत ब्रह्मबुद्धीचें आधान केलें जाते. ( अर्पणादिकांमध्यें करावयाची जी ब्रह्मबुद्धि तीच दोन दृष्टान्तांनीं स्पष्ट करितात-)**—यथा प्रतिमादौ विष्ण्वादिबुद्धिः यथा वा नामादौ ब्रह्मबुद्धिः इति**—ज्याप्रमाणें प्रतिमा-

दिकांमध्यें विष्णु, शिव इत्यादिकांची बुद्धि-भावना-दृष्टि करितात किंवा नामादिकांमध्यें ब्रह्माची भावना करितात, त्याप्रमाणें अर्पणादिकांत ब्रह्मबुद्धि करितात, असें कित्येक म्हणतात.

**सत्यमेवमपि स्याद्यदि ज्ञानयज्ञस्तुत्यर्थं प्रकरणं न स्यात्। अत्र तु सम्यग्दर्शनं ज्ञानयज्ञशब्दितमनेकान्यज्ञशब्दितान्क्रियाविशेषानुपन्यस्य 'श्रेयान्द्रव्यमयाद्यज्ञाज्ज्ञानयज्ञः' इति ज्ञानं स्तौति। अत्र च समर्थमिदं वचनं ब्रह्मार्पणमित्यादि ज्ञानस्य यज्ञत्वसंपादनेऽन्यथा सर्वस्य ब्रह्मत्वेऽर्पणादीनामेव विशेषतो ब्रह्मत्वाभिधानमनर्थकं स्यात्। ये त्वर्पणादिषु प्रतिमायां विष्णुदृष्टिवद्ब्रह्मदृष्टिः क्षिप्यते नामादिष्विव चेति ब्रुवते न तेषां ब्रह्मविद्योक्तेह विवक्षिता स्यादर्पणादिविषयत्वाज्ज्ञानस्य। न च दृष्टिसंपादनज्ञानेन मोक्षफलं प्राप्यते 'ब्रह्मैव तेन गन्तव्यम्' इति चोच्यते। विरुद्धं च सम्यग्दर्शनमन्तरेण मोक्षफलं प्राप्यत इति। प्रकृतविरोधश्च। सम्यग्दर्शनं च प्रकृतं 'कर्मण्यकर्म यः पश्येत्' इत्यत्र अन्ते च सम्यग्दर्शनं तस्यैवोपसंहारात्। 'श्रेयान्द्रव्यमयाद्यज्ञाज्ज्ञानयज्ञः' 'ज्ञानं लब्ध्वा परां शान्तिम्' इत्यादिना सम्यग्दर्शनस्तुतिमेव कुर्वन्नुपक्षीणोऽध्यायः। तत्राकस्मादर्पणादौ ब्रह्मदृष्टिरप्रकरणे प्रतिमायामिव विष्णुदृष्टिरुच्यत इत्यनुपपन्नम्। तस्माद्यथाव्याख्यातार्थ एवायं श्लोकः॥ २४॥**

**भाष्यार्थ**—( पण येथें अर्पणादिकांत ब्रह्मदृष्टि करावी, असे विधान केले आहे, असे मानल्यास प्रकरणभंग होतो. कारण अर्पणादिकांमध्ये ब्रह्मदृष्टि करणे, हे मानस कर्मच आहे. त्यामुळें ते सम्यग्ज्ञान नव्हे, पण प्रस्तुत प्रकरण ज्ञानाचे आहे, अशा आशयानें आचार्य वरील म्हणण्याचें निरसन करितात-)—**यदि ज्ञानयज्ञस्तुत्यर्थं प्रकरणं न स्यात् सत्यं एवं अपि स्यात्**—ज्ञानयज्ञाची स्तुति करण्यासाठी जर हे प्रकरण नसते, तर खरोखरच असेंहि म्हणतां आले असते. ( ज्ञानयज्ञाच्या स्तुतीसाठीच हें प्रकरण आहे, हे येथील श्लोकावरून स्पष्ट दिसतें, असे सांगतात-)—**अत्र तु सम्यग्दर्शनं ज्ञानयज्ञशब्दितं**—या प्रकरणात सम्यग्दर्शनाला 'ज्ञानयज्ञ' हें नांव दिलें आहे, व—**अनेकान् यज्ञशब्दितान् क्रियाविशेषान् उपन्यस्य 'श्रेयान् द्रव्यमयात् यज्ञात् ज्ञानयज्ञः' इति ज्ञानं स्तौति**—अनेक 'यज्ञ' या नांवाच्या विशेष क्रियांचा उपन्यास करून 'द्रव्यमय यज्ञांहून ज्ञानयज्ञ अतिशय श्रेष्ठ आहे' अशी ज्ञानाची स्तुति भगवान् करीत आहेत.—**अत्र च 'ब्रह्मार्पणं०' इत्यादि इदं वचनं ज्ञानस्य यज्ञत्वसंपादने समर्थं**—आणि तसेंच येथील 'ब्रह्मार्पणं०' इत्यादि हें वचन ज्ञानाच्या यज्ञत्वसंपादनाविषयीं समर्थ आहे. म्ह० 'ब्रह्मार्पणं०' या वचनांत ज्ञानामध्यें यज्ञाची कल्पना करून सम्यग्ज्ञानाची स्तुति करण्याचें सामर्थ्य उघड दिसतें. —**अन्यथा सर्वस्य ब्रह्मत्वे अर्पणादीनां एव विशेषतः ब्रह्मत्वाभिधानं अनर्थकं स्यात्**—नाहीं तर सर्वालाच ब्रह्मत्व असतांना अर्पणादिकांनाच विशेषतः ब्रह्मत्व आहे, असें सांगणे व्यर्थ होईल—**तु ये प्रतिमायां विष्णुदृष्टिवत् च नामादिषु इव अर्पणादिषु ब्रह्मदृष्टिः क्षिप्यते इति ब्रुवते**—पण जे 'शालग्रामादि प्रतिमेमध्यें जशी

विष्णुदृष्टि करावी व नामादिप्रतीकांमध्यें ब्रह्मदृष्टि करावी, त्याप्रमाणें अर्पणादि यज्ञसामग्रीमध्यें ब्रह्मदृष्टि केली जाते.' असें म्हणतात.—**तेषां इह उक्ता ब्रह्मविद्या न विवक्षिता स्यात्**—त्यांना येथें सांगितलेली ब्रह्मविद्या विवक्षित आहे, असें म्हणतां येणार नाहीं. [ म्ह० अर्पणादि यज्ञसाधनांमध्यें ब्रह्मदृष्टि करणारांना येथें ब्रह्मविद्या विवक्षित आहे, असे म्हणतांच येत नाहीं. कारण ब्रह्मदृष्ट्या नामादिक जसें उपास्य आहे, तसें ब्रह्मदृष्ट्या अर्पणादिक उपास्य–ध्यान–चिंतन करण्यास योग्य आहे, असें म्हटल्यास अर्पणादिक मुख्य ज्ञेय ठरेल, आणि त्यामुळें या वाक्यांत ब्रह्मविद्या विवक्षित आहे, असें त्यांना म्हणतां येणार नाहीं. ] कारण—**ज्ञानस्य अर्पणादिविषयत्वात्**—त्यांच्या ज्ञानाला अर्पणादिविषयत्व आहे, म्ह० त्यांच्या व्याख्यानाप्रमाणे येथील ज्ञानाचा विषय अर्पणादिक आहे.—**च दृष्टिसंपादनज्ञानेन मोक्षफलं न प्राप्यते**—व दृष्टिसंपादन करण्याच्या ज्ञानाने मोक्षफल प्राप्त होत नाहीं.—**'ब्रह्मैव तेन गन्तव्यं' इति च उच्यते**—पण ' ब्रह्मच त्याला प्राप्त होणारे फल आहे, ' असें येथे सांगितले आहे. [ अर्पणादिकांमध्यें ब्रह्मदृष्टि केल्यानेंहि ब्रह्मप्राप्तिरूप फल मिळेल, असें म्हणतां येत नाहीं. कारण प्रतीकाच्या आश्रयाने ब्रह्मोपासना करणारे उपासक ब्रह्माला प्राप्त होत नाहींत, असें ब्रह्ममीमांसेत सांगितलें आहे. अहो पण कर्मठाला विधिबलाने अदृष्ट स्वर्ग जसा प्राप्त होतो, त्याप्रमाणे ' ब्रह्मैव तेन गन्तव्यं ' या शास्त्रविधीच्या बलानेंच उपासकाला अदृष्ट मोक्ष प्राप्त होईल, म्हणून म्हणाल तर सांगतों–] —**सम्यग्दर्शनं अन्तरेण मोक्षफलं प्राप्यते इति विरुद्धं**—आत्म्याच्या साक्षात्कारावांचून मोक्षरूपी फल प्राप्त होतें, हें म्हणणें विरुद्ध आहे. ( ज्ञानानेंच कैवल्यप्राप्ति होते, असें सांगून ज्ञानेतर मार्गाचा निषेध करणाऱ्या श्रुतीने अविद्यानिवृत्तिरूप दृष्ट मोक्ष, अदृष्ट स्वर्गाप्रमाणेंच, शास्त्रविधिबलाने मेल्यावर मिळतो, असें सांगणे विरुद्ध आहे.) —**प्रकृतविरोधः च**—तसेच, अर्पणादिकात ब्रह्मदृष्टि करावी, असें विधान असल्यामुळें त्याचेच मोक्ष हे फल मिळेल, असें म्हणणे हे प्रकृताच्या–प्रकरणाच्याहि विरुद्ध आहे.—**च ' कर्मण्यकर्म यः पश्येत्० ' इत्यत्र सम्यग्दर्शनं प्रकृतं**—' कर्मण्यकर्म० ' श्लो. १८ येथे सम्यग्दर्शन प्रकृत आहे. म्ह० त्या श्लोकापासून आत्मज्ञानाचा उपक्रम केला आहे.—**अन्ते च सम्यग्दर्शनं**—शेवटींहि सम्यग्दर्शनच आहे.—**तस्य एव उपसंहारात्**—कारण त्याचाच उपसंहार केला आहे. ( सम्यग्ज्ञानाने उपक्रम[1] करून त्यानेच उपसंहार केला आहे, इतकेंच केवल नव्हे तर मध्येहि ज्ञानाचीच स्तुति केली आहे, असें सांगतात– )—**' श्रेयान्द्रव्यमयाद्यज्ञात् ज्ञानयज्ञः ' ' ज्ञानं**

---

१ आचार्य प्रत्येक प्रकरणाच्या उपक्रमोपसंहाराकडे किती लक्ष ठेवतात तें यावरून, या पूर्वीच्या भाष्यार्थावरून व पुढील ग्रंथावरूनहि वाचकांच्या लक्षांत येईलच. तथापि रहस्यकार "गीतेचा उपक्रमोपसंहार व फल याकडे संन्यासमार्गीयांनी दुर्लक्ष केलें," अशी तक्रार ठिकठिकाणीं करीतच आले आहेत. पण तिला आतां किती किंमत द्यावयाची ते वाचक ठरवितीलच. रहस्यकारांचे उपक्रमोपसंहार चुकीचे कसे आहेत, तें आम्ही वर दाखविलेंच आहे. गी. भा. पृ. ३७-४० पहा.

**लब्ध्वा परां शांतिं-' इत्यादिना सम्यग्दर्शनस्तुतिं एव कुर्वन् अध्यायः उपक्षीणः**—'द्रव्यमय यज्ञाहून ज्ञानयज्ञ अधिक श्रेयस्कर, ( श्लो. ३३ ) 'ज्ञान होतांच मोक्षाख्यशांति तत्काल प्राप्त होते' ( श्लो. ३९ ) इत्यादि वचनांनीं सम्यग्दर्शनाची स्तुति करीतच हा अध्याय संपला आहे.—**तत्र अकस्मात् अप्रकरणे प्रतिमायां विष्णुदृष्टिः इव अर्पणादौ ब्रह्मदृष्टिः उच्यते इति अनुपपन्नम्**—तेव्हां 'ब्रह्मार्पणं०' या मंत्रांत अकस्मात्-उपासनेचे प्रकरण नसतांना प्रतिमेमध्यें जशी ब्रह्मदृष्टि त्याप्रमाणें अर्पणादिकांमध्ये ब्रह्मदृष्टि सांगितली जाते, असें म्हणणें अनुपपन्न आहे. ( ज्ञानप्रकरणांत उपासनेचा विधि मानणें अयोग्य आहे )—**तस्मात् अयं श्लोकः यथाव्याख्यातार्थः एव**—म्हणून हा श्लोक आम्हीं जसे वर व्याख्यान केलें आहे, तशा अर्थाचाच आहे. [ इतरांचें वरील व्याख्यान सयुक्तिक नसल्यामुळे आचार्य म्हणतात 'ब्रह्मार्पणं०' या श्लोकाचा आम्हीं केलेला अर्थच बरोबर आहे. ] २४.

**दैवमेवापरे यज्ञं योगिनः पर्युपासते ।**
**ब्रह्माग्नावपरे यज्ञं यज्ञेनैवोपजुह्वति ॥ २५ ॥**

**अन्वयार्थ—अपरे**—कांहीं—**योगिनः**—योगी म्ह० कर्मठ लोक—**दैवं एव यज्ञं**—दैवच यज्ञ-इंद्र-अग्नि इत्यादि देव ज्यांत पूजले जातात असा यज्ञ—**पर्युपासते**—करितात.—**अपरे**—दुसरे कांहीं ब्रह्मवेत्ते-ज्ञाननिष्ठ—**यज्ञं**—आत्म्याला-बुद्ध्यादि उपाधियुक्त जीवाला—**ब्रह्माग्नौ**—ब्रह्मरूप अग्नीत—**यज्ञेन एव**—निरुपाधिक परब्रह्मस्वरूपानेच—**उपजुह्वति**—हवन करितात. २५.

**तत्राधुना सम्यग्दर्शनस्य यज्ञत्वं संपाद्य तत्स्तुत्यर्थमन्येऽपि यज्ञा उपक्षिप्यन्ते दैवमेवेत्यादिना—दैवमेव देवा इज्यन्ते येन यज्ञेनासौ दैवो यज्ञस्तमेवापरे यज्ञं योगिनः कर्मिणः पर्युपासते कुर्वन्तीत्यर्थः । ब्रह्माग्नौ "सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म" "विज्ञानमानन्दं ब्रह्म" "यत्साक्षादपरोक्षाद्ब्रह्म" "य आत्मा सर्वान्तरः" इत्यादिवचनोक्तमशनायादिसर्वसंसारधर्मवर्जितं नेति नेतीति निरस्ताशेषविशेषं ब्रह्मशब्देनोच्यते । ब्रह्म च तदग्निश्च स होमाधिकरणत्वविवक्षया ब्रह्माग्निस्तस्मिन्ब्रह्माग्नावपरेऽन्ये ब्रह्मविदो यज्ञं यज्ञशब्दवाच्य आत्माऽऽत्मनामसु यज्ञशब्दस्य पाठात्तमात्मानं यज्ञं परमार्थतः परमेव ब्रह्म सन्तं बुद्ध्याद्युपाधिसंयुक्तमध्यस्तसर्वोपाधिधर्मकमाहुतिरूपं यज्ञेनैवाऽऽत्मनैवोक्तलक्षणेनोपजुह्वति प्रक्षिपन्ति । सोपाधिकस्याऽऽत्मनो निरुपाधिकेन परब्रह्मस्वरूपेणैव यद्दर्शनं स तस्मिन्होमस्तं कुर्वन्ति ब्रह्मात्मैकत्वदर्शननिष्ठाः संन्यासिन इत्यर्थः । सोऽयं सम्यग्दर्शनलक्षणो यज्ञो दैवयज्ञादिषु यज्ञेषूपक्षिप्यते ब्रह्मार्पणमित्यादिश्लोकैः 'श्रेयान्द्रव्यमयाद्यज्ञाज्ज्ञानयज्ञः परंतप' इत्यादिना स्तुत्यर्थम् ॥ २५ ॥**

**भाष्यार्थ—तत्र सम्यग्दर्शनस्य यज्ञत्वं संपाद्य अधुना तत्स्तुत्यर्थं 'दैवमेव०' इत्यादिना अन्ये अपि यज्ञाः उपक्षिप्यन्ते**—'ब्रह्मार्पणं०' या श्लोकांत

सम्यग्ज्ञानाला-आत्मज्ञानाला यज्ञत्व संपादन करून म्ह० आत्मवेत्त्याची सर्वत्र ब्रह्मदृष्टि हाच ज्ञानयज्ञ आहे, असें सांगून आतां त्याच्या स्तुतीसाठीं 'दैवमेव०' इत्यादि श्लोकानें दुसऱ्या यज्ञांचाहि उल्लेख-निर्देश केला जातो.—**दैवं एव-देवाः इज्यन्ते येन यज्ञेन असौ दैवः यज्ञः तं एव यज्ञं**—ज्या यज्ञाच्या योगानें देव पूजले जातात तो दैव यज्ञ, त्याच दैवयज्ञास—**अपरे योगिनः-कर्मिणः पर्युपासते-कुर्वन्ति इत्यर्थः**—दुसरे योगी म्ह० कर्माधिकारी गृहस्थ अनुष्ठितात. कर्माधिकारी गृहस्थ दैव यज्ञच करितात, असा याचा भावार्थः—**ब्रह्माग्नौ**—ब्रह्मरूप अग्नीमध्यें, ( ब्रह्मशब्दाचा अर्थ श्रुतीच्या आधारानें स्पष्ट करितात-)—**सत्यं ज्ञानं अनन्तं ब्रह्म**—सत्य-ज्ञान-अनन्त म्ह० अबाधित, अज, चिद्रूप अपरिच्छिन्न ब्रह्म [त्याचेंच परमानंदत्वानें परम पुरुषार्थत्व सांगतात-]—**विज्ञानं-आनंदं ब्रह्म**—जें विज्ञान व आनंदरूप ब्रह्म [ब्रह्म विज्ञानाचा आधार असल्यामुळें त्याचें ज्ञानत्व गौण आहे, असें कोणी म्हणेल म्हणून-]—**यत् साक्षात् अपरोक्षात् ब्रह्म**—जें साक्षात् अपरोक्ष-स्वयंप्रकाश ब्रह्म आहे, [ अहोपण जीव व ब्रह्म हा विभाग असतांना ब्रह्माला अपरिच्छिन्नत्व कसें ? उत्तर-]—**यः आत्मा सर्वान्तरः**—जो आत्मा सर्वांच्या अन्तर्यामी आहे,—**इत्यादिवचनोक्तं अशनायादि-सर्वसंसारधर्मवर्जितं**—इत्यादि वचनांनी सांगितलेले, भूक, तहान इत्यादि सर्वसंसारधर्मरहित—**नेति नेति इति निरस्त-अशेषविशेषं**—स्थूल नव्हे, सूक्ष्म नव्हे इत्यादि निषेधपर वाक्यांनी ज्यांतील सर्व विशेष सर्वथा घालविले आहेत, असें तत्त्व—**ब्रह्मशब्देन उच्यते**—ब्रह्मशब्दानें सांगितलेलें आहे—**ब्रह्म च तत् अग्निः च सः होमाधिकरणत्वविवक्षया ब्रह्माग्निः**—ब्रह्म हाच अग्नि, होमाचें अधिकरणत्व सांगावयाचें असल्यामुळें त्याला ब्रह्माग्नि म्हटलें आहे.—**तस्मिन् ब्रह्माग्नौ अपरे-अन्ये ब्रह्मविदः यज्ञं**—त्या ब्रह्माग्नींत दुसरे ब्रह्मवेत्ते यज्ञाला—**यज्ञशब्दवाच्यः**

१ रहस्यकार "आता देवतोद्देशानें अर्थात् काम्यबुद्धीनें केलेल्या यज्ञाचें स्वरूप सांगतात-"असें या श्लोकास अवतरण देतात. पण देवतोद्देशानें केलेला यज्ञ म्ह० काम्य यज्ञ, ही समजूत खोटी आहे. कारण तिसऱ्या अध्यायांत सांगितलेला यज्ञ दैव यज्ञच आहे. पण तो काम्य नव्हे. रहस्यकारहि त्याला काम्य म्हणणार नाहींत. मग येथेच दैव यज्ञ काम्य कसा झाला ? वस्तुतः या प्रकारणांत सर्व श्रेयःसाधनांना मुख्य व गौण वृत्तीनें यज्ञ म्हणावयाचें आहे. काम्य यज्ञाचा येथें कांहीं संबंध नाहीं. शिवाय 'योगिनः पर्युपासते' असें म्हटलें आहे, हेंहि लक्षांत ठेविलें पाहिजे.

२ आचार्य येथील 'योगिनः' या पदाचा अर्थ 'कर्मिणः' असा करितात, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. त्यावरून प्रकरण, पूर्वोत्तर संबंध, आसपासचे शब्द यांकडे पाहूनच प्रत्येक शब्दाचा अर्थ आचार्य करितात व हीच मीमांसाशास्त्रप्रमाणें ग्रंथ लावण्याची निर्दोष पद्धति आहे, हें वाचकाच्या लक्षांत येईल. असें असूनहि रहस्यकार आचार्यादि संन्यासमार्गीयांवर सांप्रदायिक आग्रह, ओढाताण, कर्मपरवचनांची उपेक्षा, इत्यादि आरोप करण्यास तयारच आहेत.हें आश्चर्य नव्हे का ? पण त्याहीपेक्षां ते स्वतः आपल्या व्याख्यानात तेच दोष वारंवार करितात, ही त्यांतल्या त्यांत विशेष मौज आहे.

**आत्मा आत्मनामसु यज्ञशब्दस्य पाठात् तं यज्ञं-आत्मानं**—येथें यज्ञशब्दाचा अर्थ आत्मा आहे. कारण आत्म्याच्या नांवांत यज्ञशब्दाचा पाठ आहे, त्या यज्ञाला म्ह० आत्म्याला—**परमार्थतः परं एव ब्रह्म सन्तं बुद्ध्यादि-उपाधिसंयुक्तं अध्यस्तसर्वोपाधिधर्मकं आहुतिरूपं**—वस्तुतः परब्रह्मच असलेल्या बुद्ध्यादि-उपाधींशी संयुक्त झालेल्या, ज्याच्यावर उपाधीचे सर्व धर्म आरोपिले आहेत, अशा आहुतिरूप यज्ञास—**यज्ञेन एव उक्तलक्षणेन आत्मना एव उपजुह्वति प्रक्षिपन्ति**-यज्ञानेंच म्ह०वर ज्याचें लक्षण सांगितलें आहे, अशा आत्म्यानेंच हवन करितात, त्याचा प्रक्षेप-त्याग करितात—**सोपाधिकस्य आत्मनः निरुपाधिकेन परब्रह्मस्वरूपेण एव यत् दर्शनं सः तस्मिन् होमः**– सोपाधिक आत्म्याला निरूपाधिक ब्रह्मस्वरूपानेंच जें पाहणें, तो त्यांत होम होय.—**ब्रह्मात्मैकत्वदर्शननिष्ठाः संन्यासिनः तं कुर्वन्ति इत्यर्थः**—ब्रह्म व आत्मा यांचे एकत्वरूप जें ज्ञान, तन्निष्ठ झालेले–ज्ञाननिष्ठ संन्यासी तो होम करितात, असा भावार्थ—**सः अयं सम्यग्दर्शनलक्षणः यज्ञः ' ब्रह्मार्पणं० ' इत्यादिश्लोकैः दैवयज्ञादिषु यज्ञेषु उपक्षिप्यते**—तो हा ज्ञानरूप यज्ञ 'ब्रह्मार्पणं०' इत्यादि श्लोकांनीं दैवयज्ञादिक यज्ञांमध्ये टाकला जातो. दैवादियज्ञांत त्याचा संग्रह केला जातो. (कशासाठीं ? उत्तर–)—**'श्रेयान् द्रव्यमयाद्यज्ञाज्ज्ञानयज्ञः परंतप' इत्यादिना स्तुत्यर्थं**—'अर्जुना, द्रव्यमय यज्ञाहून ज्ञानयज्ञ श्रेष्ठ आहे (श्लो. ३३.) इत्यादि श्लोकांनी ज्ञानयज्ञाची स्तुति करण्यासाठी त्याची दैवादि यज्ञांत गणना केली जाते. [ ज्यांत देवतांना उद्देशून होमहवन केले जातें, तो दैवयज्ञ कांहीं कर्माधिकारी गृहस्थ करितात. दुसरे ज्ञाननिष्ठ संन्यासी सत्य-ज्ञान-अनन्त-विज्ञान-आनन्द-साक्षात्-अपरोक्ष-सर्वांतर आत्मरूप ब्रह्माग्नींत आत्म्याचा होम करितात. सोपाधिक आत्मा निरूपाधिक ब्रह्मरूप आहे, असें पाहतात. आत्मा बुद्ध्यादि उपाधींनी संयुक्त झाल्यामुळे त्याच्यावर उपाधीचे सर्व धर्म लादले जातात. त्यामुळें तो परब्रह्माहून अगदीं भिन्न आहे, असा भ्रम होतो, तो घालविण्यासाठीं ज्ञाननिष्ठ त्या सोपाधिक आत्म्याचा निरुपाधिक ब्रह्मतत्त्वांत लय करितात. पुढे ३३ व्या श्लोकांत ज्ञानयज्ञाची स्तुति करावयाची असल्यामुळें येथें दैवयज्ञादिकांत त्याची गणना केली आहे. असो; याप्रमाणें येथें गृहस्थांच्या प्रसिद्ध मुख्य यज्ञांची प्रथम गणना करून नंतर ज्ञाननिष्ठाचें ब्रह्मात्मैक्यज्ञान हाहि यज्ञच आहे, असें गौणवृत्तीने म्हटलें आहे. यज्ञांतील गुण यांत दाखविण्यासाठीं सोपाधिक आत्म्याचा निरुपाधिक ब्रह्मरूप अग्नीत सर्वसंसारधर्मवर्जित निर्विशेषस्वरूपानें होम करितात, असें म्हटलें आहे. ] २५.

---

१ पण रहस्यकार या श्लोकाच्या उत्तरार्धाचा असा अर्थ करितात—"आणि कित्येक ब्रह्माग्नींत यज्ञानेंच यज्ञाचें यजन करितात." पण येथील कित्येक म्हणजे कोण, याचा कांहींच उलगडा करीत नाहीत. पूर्वार्धांतील 'योगिनः-' शब्दाचा अर्थ करतांना मात्र 'कित्येक कर्मयोगी' असें म्हणतात आणि 'दैवमेव' या शब्दांचा अर्थ करतांना 'ब्रह्मबुद्धीच्या ऐवजीं देवादिकांच्या उद्देशानें यजन करितात,' असें म्हणतात. पण यांतील 'ब्रह्मबुद्धीच्या ऐवजीं ' हे शब्द त्यांच्या पदरचे आहेत. शिवाय येथून पुढें सहा श्लोकांत मुख्य व गौण यज्ञांची गणना

**श्रोत्रादीनीन्द्रियाण्यन्ये संयमाग्निषु जुह्वति ।**
**शब्दादीन्विषयानन्य इन्द्रियाग्निषु जुह्वति ॥२६॥**

**अन्वयार्थ—अन्ये**—दुसरे योगी-श्रेयःसाधनांचें अनुष्ठान करणारे—**श्रोत्रादीनि इन्द्रियाणि**—श्रोत्रादिक इंद्रियें—**संयमाग्निषु**—पांच इंद्रियांचा पांच प्रकारचा संयम-निग्रह हेच अग्नी, त्यांत—**जुह्वति**—होमितात. इंद्रियाचा संयमाग्नींत होम करितात.—**अन्ये**—दुसरे कांहीं योगी—**शब्दादीन् विषयान्**—शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध, या-वरील श्रोत्रादि ज्ञानेंद्रियांच्या-विषयांस—**इन्द्रियाग्निषु**—इंद्रियरूप अग्नींत—**जुह्वति**—होमितात. २६.

---

करावयाची अमल्यामुळें त्या शब्दाचा येथें काही उपयोगहि नाहीं. वस्तुतः या श्लोकाच्या पूर्वार्धांत गृहस्थाश्रमी अग्निहोत्र-पंचमहायज्ञादि श्रौत-स्मार्त कर्में करितात व हाच मुख्य यज्ञ आहे, हे विवक्षित आहे आणि उत्तरार्धांत 'संन्यासाश्रमी ब्रह्मरूपी अग्नींत सोपाधिक आत्म्याचा आत्म्यानेंच होम करितात म्ह०सोपाधिक आत्म्याला निरुपाधिक स्वरूपानें ब्रह्मरूप पाहतात,' असा अर्थ विवक्षित आहे 'ब्रह्मार्पण०'२४ या श्लोकांत सांगितलेल्या ज्ञानयज्ञाचीच इतर यज्ञामध्यें गणना करण्यासाठीं येथें पुनः त्याचा अनुवाद केला आहे. पण रहस्यकारांनीं 'यज्ञं' व 'यज्ञेन' हीं दोन पदें दिसतांच या श्लोकाचा पुरुषसूक्तांतील 'यज्ञेन यज्ञं अयजन्त देवाः' या मंत्राशीं संबंध जोडण्याचा प्रयत्न केला आहे. पण तो फसला आहे. कारण येथें दैवयज्ञ वर सांगितला असून तो व पुरुषसूक्तांतील यज्ञ यांत फारसा फरक नाहीं. तोहि दैवयज्ञच आहे. शिवाय 'ब्रह्माग्नौ' असें येथें पद असल्यामुळें हा मुख्य यज्ञ नसून गौण आहे, हे उघड होतें. कारण मुख्य यज्ञांत अग्नि, हवि वगैरे प्रत्यक्ष असतात व गौण यज्ञांत त्यांची कल्पना केलेली असते. पुरुषसूक्तांतील यज्ञांत' ब्रह्म हाच अग्नि' अशी कल्पना केलेली नाहीं. यास्तव या ज्ञानयज्ञाचा पुरुषसूक्तांतील यज्ञाशीं कांहीं संबंध नाहीं. रहस्यकारांनीं जो त्याचा संबंध लावून दाखविला आहे, तो अतिशय लटपटीत आहे. ते म्हणतात 'सृष्टीच्या आरंभीं झालेल्या या यज्ञांत ज्या विराट्रूपी पशूचें हवन केलें, तो पशु व ज्या देवाचें यजन केलें तो देव, हे ब्रह्मरूपच असले पाहिजेत हे उघड आहे' पण यावर आम्ही असें म्हणतो कीं, सर्वच जर ब्रह्म आहे, तर पशु व देव हेहि ब्रह्मरूपच असले पाहिजेत, हें निराळें सांगावयासच नको. ब्रह्मज्ञानी सर्वांलाच ब्रह्म मानील हें उघड आहे, पण पुरुषसूक्तांतील यज्ञ ज्या देवांनी केला, त्यांची तशी भावना नव्हती. त्यामुळें कर्मकांडांतील द्रव्य-देवतामय यज्ञ व हा ज्ञानकांडांतील ज्ञानमय यज्ञ हे अगदीं पृथक् आहेत. तसेच, 'सृष्टींतील सर्व पदार्थांत नेहमींच ब्रह्म भरलेलें असल्यामुळें निरिच्छ बुद्धीनें सर्व व्यवहार करीत असतां ब्रह्मानेंच नेहमीं ब्रह्माचें यजन होत असतें, असें जें २४ व्या श्लोकांत वर्णन आहे तेंच तत्त्वदृष्ट्या खरें होय' असे जें रहस्यकार म्हणतात, तेंही निर्मूल आहे. २४ व्या श्लोकांत 'निरिच्छ बुद्धीनें सर्व व्यवहार करणें' वगैरे कांहीं सांगितलेलें नाहीं, हें त्या श्लोकाचा भाष्यार्थ वाचल्यावर वाचकांच्या लक्षांत आलेंच असेल. अर्थात् रहस्यकारांच्या या सर्व निराधार कल्पना आहेत.

**श्रोत्रादीनीति । श्रोत्रादीनीन्द्रियाण्यन्ये योगिनः संयमाग्निषु प्रतीन्द्रियं संयमो भिद्यत इति बहुवचनम्, संयमा एवाग्नयस्तेषु जुह्वतीन्द्रियसंयममेव कुर्वन्तीत्यर्थः । 'शब्दादीन्विषयानन्य इन्द्रियाग्निषु जुह्वति' इन्द्रियाण्येवाग्नयस्तेष्विन्द्रियाग्निषु जुह्वति श्रोत्रादिभिरविरुद्धविषयग्रहणं होमं मन्यन्ते ॥ २६ ॥**

**भाष्यार्थ**—आणखी दोन गौण यज्ञ—'**श्रोत्रादीनि०' इति**—'श्रोत्रादीनि०' या श्लोकानें सांगतात—**अन्ये-योगिनः श्रोत्रादीनि इंद्रियाणि संयमाग्निषु** दुसरे योगी श्रोत्र[1], चक्षु इत्यादि इन्द्रियें संयमरूप अग्नीत होमितात. (अहो पण बाह्य इन्द्रियांचा मनांत जो संयम करावयाचा तो एकच असल्यामुळे 'संयमाग्निषु' असें बहुवचन कां योजलें आहे? उत्तर-)—**प्रतीन्द्रियं संयमः भिद्यते इति बहुवचनं**—प्रत्येक इंद्रियाचा संयम भिन्न भिन्न आहे, म्हणून 'संयमाग्निषु' असें बहुवचन आहे. (समासाचा विग्रह)—**संयमाः एव अग्नयः तेषु जुह्वति-इंद्रियसंयमं एव कुर्वन्ति इति अर्थः**—संयम हेच अग्नि आहेत; त्यात इंद्रियांचा होम करितात, इंद्रियसंयमच करितात, असा भावार्थ. [ प्रत्याहाराचे अधिकरण या रूपानें अवस्थित असलेल्या मनोरूप संयमांना होमाचें आधारत्व आहे. म्ह० मनोरूप संयमांत इंद्रियांचा होम करावयाचा आहे. म्हणून त्यांना अग्नि म्हटले आहे. बाह्य व आंतर इंद्रियांचा मनांत प्रत्याहार करितात, असा याचा भावार्थ. हा तिसरा संयमयज्ञ होय. ]—**अन्ये शब्दादीन् विषयान् इंद्रियाग्निषु जुह्वति**—दुसरे शब्दादि विषयांचा इंद्रियाग्नींत होम करितात.—**इंद्रियाणि एव अग्नयः तेषु इंद्रियाग्निषु जुह्वति**—इंद्रियें हेच अग्नि, त्या इंद्रियाग्नींत विषयांचा होम करितात. ( अहो पण इंद्रियांनी विषयांचा उपभोग सर्वच घेतात. त्यांत विशेष काय आहे? उत्तर- )—**श्रोत्रादिभिः अविरुद्धविषयग्रहणं होमं मन्यन्ते**—श्रोत्रादि इंद्रियांनी अनिषिद्ध विषयांचे ग्रहण करणे, याला ते होम मानतात [म्ह० विहित निषिद्ध विषय सोडून प्राप्त झालेल्या ते विषयांना रागद्वेषरहित होत्साते त्या त्या इंद्रियांनी भोगतात[2]. ] २६.

---

१ रहस्यकार म्हणतात-" श्रोत्रादि ( कान, डोळे इत्यादि ) इंद्रियाचा " ६७८ पण श्रोत्रादि म्ह० कान, डोळे वगैरे नव्हे. कान, डोळे, तोंड, नाक हे गोलक असून त्यांतील ऐकणें, पाहणे वगैरे क्रियांची जी सूक्ष्म साधनें तीच श्रोत्र, चक्षु, इत्यादि इंद्रियें होत.

२ या श्लोकात जे हे दोन यज्ञ सांगितले आहेत, त्याचें स्पष्टीकरण रहस्यकार टीपेंत असें करितात. "( १ ) इंद्रियांचें सयमन करणें म्हणजे त्यास योग्य मर्यादेच्या आंत आपापले व्यवहार करूं देणें; ( २ ) इंद्रियाचे विषय म्हणजे उपभोग्य पदार्थ सर्वस्वी सोडून देऊन इंद्रियें अजिबात मारून टाकणें," पण हें स्पष्टीकरण मुळाला सोडून आहे. 'श्रोत्रादिक इंद्रियें संयमाग्नीत होमितात,' असें मुळांत म्हटलें आहे व 'श्रोत्रादि इंद्रियाचा संयम करतात,' हा त्याचा सरळ अर्थ आहे. पण रहस्यकार 'त्यांस योग्य मर्यादेच्या आंत आपापले व्यवहार करूं देणें,' हा अर्थ कोठून व कां काढतात हें त्यांचे त्यांसच माहीत ! येथे त्यांना इष्ट असलेल्या कर्मयोगाचा कांहीं संबंध नाहीं, तेव्हां अशी ओढाताण करण्याचें वस्तुतः कांहीं

**सर्वाणीन्द्रियकर्माणि प्राणकर्माणि चापरे ।**
**आत्मसंयमयोगाग्नौ जुह्वति ज्ञानदीपिते ॥२७॥**

**अन्वयार्थ—अपरे**—दुसरे कांहीं साधक—**सर्वाणि इन्द्रियकर्माणि**—सर्व इंद्रियांची कर्में—**च**—व—**प्राणकर्माणि**—प्राणापानादि वायूंचीं कर्में—**ज्ञानदीपिते**—विवेकज्ञानानें प्रदीप्त झालेल्या—**आत्मसंयमयोगाग्नौ**—आत्मसंयमरूप योगाग्नीत—**जुह्वति**—होमितात. २७.

**किं च—सर्वाणीति । सर्वाणीन्द्रियकर्माणीन्द्रियाणां कर्माणीन्द्रियकर्माणि तथा प्राणकर्माणि प्राणो वायुराध्यात्मिकस्तत्कर्माण्याकुञ्चनप्रसारणादीनि तानि चापर आत्मसंयमयोगाग्नावात्मनि संयम आत्मसंयमः स एव योगाग्निस्तस्मिन्नात्मसंयमयोगाग्नौ जुह्वति प्रक्षिपन्ति ज्ञानदीपिते स्नेहेनेव प्रदीपिते विवेकविज्ञानेनोज्ज्वलभावमापादिते प्रविलापयन्तीत्यर्थः ॥ २७ ॥**

**भाष्यार्थ—किंच सर्वाणि इति**—' सर्वाणि० ' या श्लोकानें आणखी एक यज्ञ सांगतात—**सर्वाणि इंद्रियकर्माणि-इंद्रियाणां कर्माणि इंद्रियकर्माणि**—

---

कारण नव्हते. येथें जे यज्ञ सांगितले आहेत, ते निरनिराळीं साधनें आहेत. यास्तव त्यांचा अनुवाद जशाचा तसाच करणें उचित होय. भगवानांनीं तो तसाच केला आहे. पण रहस्यकार त्याचीही कशी ओढाताण करीत आहेत ती पहा. तसेंच, दुसरे कित्येक शब्दादि विषयांना इंद्रियाग्नीत होमितात म्ह० अनिषिद्ध विषयांचें सेवन करितात, असा उत्तरार्धाचा सरळ अर्थ असतांना ' इंद्रियांचे विषय सवस्वी सोडून देऊन इंद्रियें अजिबात मारून टाकणें ' हें रहस्यकाराचें स्पष्टीकरण मूळ शब्दांच्या अगदीं उलट दिशेला वहावलें आहे. विषयांचें इंद्रियाग्नीत हवन करितात म्ह० विषयोपभोग घेतात, असाच अर्थ होतो. पण रहस्यकार ' विषय सर्वस्वी सोडून इंद्रियांना अजिबात मारणें ' असा त्याचा भलताच भावार्थ विनाकारण काढीत आहेत. असो. पुढें पृ. ६७७ मनुस्मृतींतील " एतानेके महायज्ञान् यज्ञशास्त्रविदो जनाः । अनीहमानाः सततं इंद्रियेष्वेव जुह्वति०" इत्यादि अ. ४ श्लो. २२–२४ श्लोकांना उद्देश करून "२१ व्या श्लोकांत सांगितलेल्या ऋषियज्ञादि पंचमहायज्ञांपैकीं कांहीं गृहस्थ बाह्य चेष्टा न करतां इंद्रियांमध्यें रूपादिकांच्या ज्ञानाचा संयम करूनच हे पंचयज्ञ संपादन करितात. कांहीं ब्रह्मवेत्ते गृहस्थ वाणी व प्राणवायु यामध्यें केलेला यज्ञ अक्षय फल देतो, असें जाणून वाणींत प्राणाचा व प्राणांत वाणीचा होम करितात व कित्येक ब्रह्मनिष्ठ ब्राह्मण केवल ज्ञानमयच यज्ञ करितात." असें सांगितलें आहे, असें म्हणतात. पण तें मनूंतील वर्णन रहस्यकाराच्या ' प्रत्येक ज्ञानी पुरुषानें ज्ञानोत्तर कर्म केलेंच पाहिजे ' या आग्रहाला अगदीं विरोधी आहे. येथें तर मनु ब्रह्मनिष्ठ गृहस्थालाहि साक्षात् पंचमहायज्ञ न करितां त्याचें इंद्रियसंयम व ज्ञान यांत संपादन करावयास सांगत आहेत. कुल्लुकांनीं तर शेवटीं " श्लोकत्रयेण ब्रह्मनिष्ठानां वेदसंन्यासिनां गृहस्थानामपि विषयः " असें स्पष्ट म्हटलें आहे. म्ह. या तीन श्लोकांनीं ब्रह्मनिष्ठ वेदसंन्यासी गृहस्थांचेंहि विधि सांगितले आहेत, असा भावार्थ.

सर्व इंद्रियकर्में-इंद्रियांचीं ऐकणें, पाहणे इत्यादि कर्मे-इंद्रियकर्मे—**तथा प्राणकर्माणि-प्राणः वायुः आध्यात्मिकः तत्कर्माणि आकुंचन-प्रसारणादीनि**—तशींच प्राणकर्मे-प्राण म्ह० शरीरांतील वायु त्याचीं कर्मे आकुंचन-प्रसारण इत्यादि—**तानि च अपरे आत्मसंयमयोगाग्नौ-आत्मनि संयमः आत्मसंयमः सः एव योगाग्निः तस्मिन् आत्मसंयमयोगाग्नौ**—तीं सर्व इंद्रिय-प्राणकर्मे दुसरे योगी आत्मसंयमयोगाग्नींत-आत्म्यामध्ये जो संयम तोच आत्मसंयम, धारणा-ध्यान-समाधिरूपसंयम, तोच योगाग्नि, त्या आत्मसंयमयोगाग्नींत—**जुहवति-प्रक्षिपन्ति**—होम करितात-त्यांचा प्रक्षेप-त्याग करितात—**ज्ञानदीपिते-स्नेहेन इव प्रदीपिते विवेकविज्ञानेन उज्ज्वलभावं आपादिते प्रविलापयन्ति इत्यर्थः**—ज्ञानानें दीपित केलेल्या योगाग्नींत-तेलानें प्रदीप जसा प्रदीप्त करितात, त्याप्रमाणें विवेकविज्ञानानें उज्ज्वलभावास प्राप्त केलेल्या योगाग्नींत इंद्रियकर्मे व प्राणकर्मे यांना अत्यंत लीन करितात, असा याचा भावार्थ. [ त्यांना त्यांत मिळवून सोडतात. सर्व व्यापारांचा निरोध करून आत्म्यामध्ये चित्ताचें समाधान करितात. ] २७.

**द्रव्ययज्ञास्तपोयज्ञा योगयज्ञास्तथापरे ।**
**स्वाध्यायज्ञानयज्ञाश्च यतयः संशितव्रताः ॥२८॥**

**अन्वयार्थ—द्रव्ययज्ञाः**—सत्पात्रीं द्रव्याचा विनियोग यज्ञाच्या भावनेनें जे करितात, ते द्रव्ययज्ञ होत.—**तपोयज्ञाः**—जे तपश्चर्या करितात, ते तपोयज्ञ,—**तथा अपरे योगयज्ञाः**—तसेच जे दुसरे योगांगांचा अभ्यास करितात, ते योगयज्ञ:—**स्वाध्याययज्ञाः**—जे ऋग्वेदादिकांचे यथाविधि अध्ययन-अभ्यास करितात, ते स्वाध्याययज्ञ—**ज्ञानयज्ञाः**—जे शास्त्रार्थाचा अभ्यास करून शास्त्रार्थज्ञान संपादन करितात, ते ज्ञानयज्ञ;—**संशितव्रताः यतयः**—व ज्यांनीं व्रते अतिशय तीक्ष्ण केलीं आहेत, असे यती-संन्यासी हे व्रतयज्ञ होत. २८.

**द्रव्येति । द्रव्ययज्ञास्तीर्थेषु द्रव्यविनियोगं यज्ञबुद्ध्या कुर्वन्ति ये ते द्रव्ययज्ञाः, तपोयज्ञा ये तपस्विनस्ते तपोयज्ञाः, योगयज्ञाः प्राणायामप्रत्याहारादिलक्षणो योगो यज्ञो येषां ते योगयज्ञास्तथाऽपरे स्वाध्यायज्ञानयज्ञाश्च स्वाध्यायो यथाविधि ऋगाद्यभ्यासो यज्ञो येषां ते स्वाध्याययज्ञा ज्ञानयज्ञा ज्ञानं शास्त्रार्थपरिज्ञानं यज्ञो येषां ते ज्ञानयज्ञाश्च यतयो यतनशीलाः संशितव्रताः सम्यक्शितानि तनूकृतानि तीक्ष्णीकृतानि व्रतानि येषां ते संशितव्रताः ॥ २८ ॥**

**भाष्यार्थ—' द्रव्य० ' इति**—' द्रव्ययज्ञाः० ' या श्लोकानें सहा यज्ञ सांगतात. **—द्रव्ययज्ञाः-ये तीर्थेषु द्रव्यविनियोगं यज्ञबुद्ध्या कुर्वन्ति ते द्रव्ययज्ञाः**—द्रव्ययज्ञ म्ह० जे सत्पात्रीं द्रव्याचा विनियोग यज्ञबुद्धीनें करितात ते द्रव्ययज्ञ होत. **—तपोयज्ञाः-ये तपस्विनः ते तपोयज्ञाः**—तपोयज्ञ म्ह० जे यज्ञबुद्धीनें तप

करणारे ते नियमवान् तपोयज्ञ होत.—**योगयज्ञाः-प्राणायामप्रत्यहारादिलक्षणः योगः यज्ञः येषां ते योगयज्ञाः**—योगयज्ञ म्ह० प्राणायाम-प्रत्यहारादिरूप (यम-नियम-आसन-धारणा-ध्यान-समाधि यांसह अष्टांग) योग हाच ज्यांचा यज्ञ आहे ते योगयज्ञ होत.—**तथा अपरे स्वाध्यायज्ञानयज्ञाः च-स्वाध्यायः यथाविधि ऋगादि-अभ्यासः यज्ञः येषां ते स्वाध्याययज्ञाः**—त्याचप्रमाणें दुसरे स्वाध्याय[1] म्ह० यथाशास्त्र-पूर्वेकडे तोंड करणें, हातांत पवित्रक घालणे, इत्यादि अंगविधींचे उल्लंघन न करितां-ऋगादिकांचा अभ्यास हाच ज्यांचा यज्ञ आहे ते स्वाध्याययज्ञ होत.—**च ज्ञानयज्ञाः ज्ञानं-शास्त्रार्थपरिज्ञानं यज्ञः येषां ते ज्ञानयज्ञाः**—आणि ज्ञानयज्ञ-ज्ञान म्ह० शास्त्रार्थाचे परिज्ञान, तोच ज्यांचा यज्ञ आहे ते ज्ञानयज्ञ—**यतयः-यतनशीलाः**—यती म्ह० यतनशील-प्रयत्नशील—**संशितव्रताः-सम्यक्शितानि तनूकृतानि-तीक्ष्णीकृतानि व्रतानि येषां ते संशितव्रताः**—संशितव्रताः म्ह० उत्तम प्रकारें ज्यांनी व्रतें शित-तनु-तीक्ष्ण, अति दृढ केलेलीं आहेत ते संशितव्रत होत. (शेवटचा हा व्रतयज्ञ होय.) २८.

# अपाने जुह्वति प्राणं प्राणेऽपानं तथाऽपरे ।
# प्राणापानगती रुद्ध्वा प्राणायामपरायणाः ॥२९॥

**अन्वयार्थ—अपरे**—दुसरे कांहीं मुमुक्षु—**अपाने**—अपान वायूंत—**प्राणं**—प्राणाला—**तथा**—त्याचप्रमाणें—**प्राणे**—प्राणवायूंत—**अपानं**—अपानाला—**जुह्वति**—होमितात.—**प्राणापानगती**—प्राण व अपान यांच्या गती—**रुद्ध्वा**—बंद करून—**प्राणायामपरायणाः**—प्राणायामांत परायण होतात. २९.

**किंच अपान इति । अपानेऽपानवृत्तौ जुह्वति प्रक्षिपन्ति प्राणं प्राणवृत्तिं पूरकाख्यं प्राणायामं कुर्वन्तीत्यर्थः । प्राणेऽपानं तथाऽपरे जुह्वति रेचकाख्यं च प्राणायामं कुर्वन्तीत्येतत्, प्राणापानगती मुखनासिकाभ्यां वायोर्निर्गमनं प्राणस्य गतिस्तद्विपर्ययेणाधोग-**

---

१ रहस्यकार 'स्वाध्याय म्हणजे नित्य स्वकर्मानुष्ठानरूप यज्ञ' असें म्हणतात, पण तो अर्थ बरोबर नाहीं. स्वाध्यायशब्दाचा तसा अर्थ होत नाहीं. याच श्लोकांत योगयज्ञ म्हणून जो यज्ञ सांगितला आहे, त्याचा अर्थ कर्मयोगरूपी यज्ञ असा केला पाहिजे. कारण पुढील २९ व्या श्लोकांत 'पूरक, रेचक, कुंभक या अंगानी युक्त असलेला प्राणायाम सांगितला आहे व तोच पातंजल योगरूपी यज्ञ आहे,' असें म्हणतात, पण अगदीं आरंभीं सांगितलेला जो दैवयज्ञ तोच वैदिक कर्मयोग असताना बिचाऱ्या कर्मयोगाला गौण पक्तीस यज्ञांच्या पुनः बसविणें अयोग्य आहे. पण रहस्यकारांनी 'योग म्हणजे कर्मयोग' अशी आपली ठाम समजूत करून घेतल्यामुळें त्यांच्या हातून असे प्रमाद होणें सहाजिकच होतें; तथापि 'योगयज्ञ' या शब्दाचा अर्थ अष्टांगयोग असा जो आचार्यांनीं केला आहे, तोच सर्वथा योग्य असून २९ व्या श्लोकांत मुख्य-पूरक रेचक-कुंभकरूप प्राणायाम सांगितला आहे हें म्हणणेंच अधिक सयुक्तिक होय.

मनमपानस्य ते प्राणापानगती एते रुद्ध्वा निरुध्य प्राणायामपरायणाः प्राणायामतत्पराः कुम्भकाख्यं प्राणायामं कुर्वन्तीत्यर्थः ॥ २९ ॥

**भाष्यार्थ—किंच 'अपाने०' इति**—'अपाने०' या श्लोकानें प्राणायामसंज्ञक यज्ञ सांगतात—**अपाने-अपानवृत्तौ प्राणं-प्राणवृत्तिं जुह्वति-प्रक्षिपन्ति**—अपानांत म्ह० अपानवृत्तींत प्राणाला म्ह० प्राणवृत्तीला होमितात-प्रक्षेप करितात—**पूरकाख्यं प्राणायामं कुर्वन्ति इत्यर्थः**—पूरकनांवाचा प्राणायाम करितात असा भावार्थ.—**तथा अपरे प्राणे अपानं जुह्वति**—त्याचप्रमाणे दुसरे प्राणांत अपानाचा होम करितात. —**रेचकाख्यं च प्राणायामं कुर्वन्ति इति एतत्**—व रेचकनांवाचा प्राणायाम करितात, असा याचा भावार्थ.—**प्राणायामगती-मुखनासिकाभ्यां वायोः निर्गमनं प्राणस्य गतिः**—प्राणापानगति म्ह० मुख व नासिका यांपासून वायूचें बाहेर येणे ही प्राणाची गति आहे—**तद्विपर्ययेण अधोगमनं अपानस्य**—त्याच्या उलट प्रकारे अधोगमन-वायूनें मुख-नासिकांतून आंत-खालीं जाणे ही अपानाची गति—**ते एते प्राणापानगती रुद्ध्वा-निरुध्य**—त्या प्राण व अपानगति रोधून-प्राणापानगतीचा निरोध करून—**प्राणायामपरायणाः-प्राणायामतत्पराः कुंभकाख्यं प्राणायामं कुर्वन्ति इत्यर्थः**—प्राणायामपरायण म्ह० प्राणायामांत तत्पर असतात-कुंभक या नांवाचा प्राणायाम करितात, असा याचा भावार्थ. [ दुसरे कांहीं प्राणायामांत तत्पर असणारे योगी रेचक व पूरक करून कुंभक प्राणायाम करितात ] २९.

अपरे नियताहाराः प्राणान्प्राणेषु जुह्वति ।
सर्वेऽप्येते यज्ञविदो यज्ञक्षपितकल्मषाः ॥ ३० ॥

**अन्वयार्थ—अपरे**—दुसरे कित्येक—**नियताहाराः**—परिमित आहार करणारे—**प्राणान्**—वायुभेदांस-प्राणापानादिकांस—**प्राणेषु एव**—प्राणांमध्येच—**जुह्वति**—होमितात.—**एते सर्वे अपि**—हे सर्वहि—**यज्ञविदः**—यज्ञाला जाणणारे व करणारे-आपापल्या साधनाला यज्ञ समजून त्याचें अनुष्ठान करणारे—**यज्ञक्षपितकल्मषाः**—यज्ञाने पापाचा क्षय केलेले, असे होतात. यज्ञानें निष्पाप होतात. ३०.

किंच—अपर इति । अपरे नियताहारा नियतः परिमित आहारो येषां ते नियताहाराः सन्तः प्राणान्वायुभेदान्प्राणेष्वेव जुह्वति । यस्य यस्य वायोर्जयः क्रियत इतरान्वायुभेदांस्तस्मिंस्तस्मिञ्जुह्वति ते तत्र प्रविष्टा इव भवन्ति । सर्वेऽप्येते यज्ञविदो यज्ञक्षपितकल्मषा यज्ञैर्यथोक्तैः क्षपितो नाशितः कल्मषो येषां ते यज्ञक्षपितकल्मषाः ॥

**भाष्यार्थ—किं च अपरे इति**—श्वास व प्रश्वास या प्राणापानगतींचा निरोध करून काय करितात ते 'अपरे०' या श्लोकानें सांगतात—**अपरे नियताहाराः-येषां आहारः नियतः-परिमितः ते नियताहाराः सन्तः**—दुसरे योगी नियताहार होऊन-ज्यांचा आहार नियत म्ह० परिमित असतो ते नियताहार होत, असे नियता-

हार होऊन—**प्राणान्-वायुभेदान् प्राणेषु एव जुह्वति**—प्राणांना म्ह० वायूच्या निरनिराळ्या भेदांस प्राणांमध्येंच होमितात. ( प्राणापानगतिनिरोधरूप कुंभक करून पुनः पुनः वायूचा जय करितात, असा भावार्थ. त्यांचा आहार परिमित, हितकर व पवित्र असतो. ते प्राणांना प्राणांत होमितात म्हणजे-)—**यस्य यस्य वायोः जयः क्रियते इतरान् वायुभेदान् तस्मिन् तस्मिन् जुह्वति**—ज्या ज्या वायूचा जय केला जातो, त्याच्या त्याच्यामध्यें इतर वायुभेदांचा होम करितात. म्ह०—**ते तत्र प्रविष्टाः इव भवन्ति**—ते त्यांत प्रविष्ट झाले आहेत, असे होतात. [ जिंकलेल्या वायुभेदांत न जिंकलेले वायूचे भेद जणुं काय प्रविष्ट झाले आहेत, असें पाहतात. आतां उत्तरार्धात प्रकृत यज्ञांचा उपसंहार करितात-]—**एते सर्वे अपि यज्ञविदः यज्ञक्षपितकल्मषाः-यथोक्तैः यज्ञैः क्षपितः नाशितः कल्मषः येषां ते यज्ञक्षपितकल्मषाः**—हे सर्वही यज्ञवेत्ते यज्ञक्षपितकल्मष आहेत. वर सांगितलेल्या यज्ञांनीं ज्यांचें कल्मष म्ह० पाप क्षपित म्ह० नाशित झालें आहे-पाप नाहींसें झालें आहे ते यज्ञक्षपितकल्मष होत. [ हे सर्वहि यज्ञवेत्ते-आपापल्या श्रेयःसाधनामध्यें यज्ञकल्पना करणारे-यज्ञांच्या योगानें निष्पाप होतात. आनन्दज्ञान श्लो. २९ व ३० व्या श्लोकाचा पूर्वार्ध यांत ‘ प्राणायाम ’ या नांवाचा एकच यज्ञ सांगितला आहे, असे म्हणतात. त्यामुळें एकंदर यज्ञ बारा होतात. पण कोणी ‘ अपरे ’ या शब्दाचें स्वारस्य रहावें म्हणून तिसाव्या श्लोकांतील यज्ञ निराळा मानतात. ] ३०.

यज्ञशिष्टामृतभुजो यान्ति ब्रह्म सनातनम् ।
नायं लोकोऽस्त्ययज्ञस्य कुतोऽन्यः कुरुसत्तम ॥३१॥

**अन्वयार्थ**—**यज्ञशिष्टामृतभुजः**—यज्ञ करून राहिलेल्या वेळीं अमृतनांवाचे अन्न खाणारे मुमुक्षु—**सनातनं ब्रह्म**—( चित्तशुद्धि-ज्ञानप्राप्तीच्या द्वारा ) नित्य ब्रह्मास—**यान्ति**—प्राप्त होतात.—**हे कुरुसत्तम**—हे कुरुकुलांतील श्रेष्ठा—**अयज्ञस्य**—एकाहि यज्ञ न करणाऱ्या पुरुषाला—**अयं लोकः**—हा लोक—**न अस्ति**—नाहीं—**कुतः अन्यः**—मग दुसरा कोठचा ? ३१.

**एवं यथोक्तान्यज्ञान्निर्वर्त्य—यज्ञशिष्टामृतभुजो यज्ञानां शिष्टं यज्ञशिष्टं यज्ञशिष्टं च तदमृतं च यज्ञशिष्टामृतं तद्भुञ्जत इति यज्ञशिष्टामृतभुजो यथोक्तान्यज्ञान्कृत्वा तच्छिष्टेन कालेन यथाविधि चोदितमन्नममृताख्यं भुञ्जत इति यज्ञशिष्टामृतभुजो यान्ति गच्छन्ति ब्रह्म सनातनं चिरंतनं मुमुक्षवश्चेत्कालातिक्रमापेक्षयेति सामर्थ्याद्गम्यते । नायं लोकः सर्वप्राणिसाधारणोऽप्यस्ति यथोक्तानां यज्ञानामेकोऽपि यज्ञो यस्य नास्ति सोऽयज्ञस्तस्य कुतोऽन्यो विशिष्टसाधनसाध्यः कुरुसत्तम ॥ ३१ ॥**

**भाष्यार्थ**—( हे यज्ञ केल्यानंतर पाप क्षीण झाल्यानें काय होतें तें सांगतात-)—**एवं यथोक्तान् यज्ञान् निर्वर्त्य**—याप्रमाणें हे वर सांगितलेले यज्ञ करून—**यज्ञ-**

**शिष्ट-अमृत-भुजः-यज्ञानां शिष्टं यज्ञशिष्टं यज्ञशिष्टं च तत् अमृतं च यज्ञ-शिष्टामृतं तत् भुञ्जते इति यज्ञशिष्ट-अमृतभुजः**—यज्ञशिष्ट अमृत खाणारे-यज्ञांचे जें शिष्ट ते यज्ञशिष्ट-यज्ञशिष्ट असें अमृत-ते यज्ञशिष्टामृत, तें खातात म्हणून यज्ञशिष्टामृतभुक् होत म्हणजे—**यथोक्तान् यज्ञान् कृत्वा तच्छिष्टेन कालेन यथाविधि चोदितं अन्नं अमृताख्यं भुञ्जते इति यज्ञशिष्टामृतभुजः**—वर सांगितलेले यज्ञ करून त्यांतून राहिलेल्या कालाने यथाशास्त्र अमृत या नांवाचें विहित अन्न भक्षण करितात, म्हणून यज्ञशिष्टामृतभुक्—**सनातनं-चिरंतनं ब्रह्म यान्ति-गच्छन्ति**—सनातन-चिरंतन ब्रह्माला प्राप्त होतात-ब्रह्माला जातात. ( अहोपण, वर सांगितलेले यज्ञ करून अवशिष्ट राहिलेल्या कालीं विहित अन्न भक्षण करणाऱ्या लोकांना ब्रह्मप्राप्ति कशी होते ? उत्तर- )—**मुमुक्षवः चेत् कालातिक्रमापेक्षया इति सामर्थ्यात् गम्यते**—पण ते जर मुमुक्षु असले तर ब्रह्माला प्राप्त होतात. ( पण मुमुक्षु जरी असले तरी त्यांना पूर्वोक्त यज्ञ करून अवशिष्टकाली अमृताख्य अन्न खाल्यानें साक्षात् मोक्ष कसा मिळेल ? कारण तसे म्हटल्यास ब्रह्माला जातात, ( यान्ति ) या गतिश्रुतीशी विरोध येतो. अशी आशंका घेऊन आचार्य म्हणतात)—(**सामर्थ्यात् कालातिक्रमापेक्षया इति गम्यते** )—ब्रह्माला जातात, असा गतीचा उल्लेख केला आहे, याच सामर्थ्यावरून कालातिक्रमाच्या अपेक्षेने म्ह० देहपातानंतर ब्रह्मलोकीं जाऊन तेथून त्या लोकाच्या प्रलयाचे वेळीं ब्रह्माला प्राप्त होतात, असे सूचित होतें.—**यथोक्तानां यज्ञानां एकः अपि यज्ञः यस्य न अस्ति सः अयज्ञः तस्य अयं सर्वप्राणिसाधारणः अपि लोकः न अस्ति**—पूर्वोक्त यज्ञांतील एकहि यज्ञ ज्याचा नाहीं-जो त्यांतील एकहि यज्ञ करीत नाहीं तो अयज्ञ होय. त्याचा हा सर्वप्राणिसाधारण असलेला लोकहि नाहीं,—**हे कुरुसत्तम विशिष्टसाधन-साध्यः अन्यः कुतः**—मग हे कुरुश्रेष्ठा ! विशिष्ट साधनांनी साध्य होणारा दुसरा लोक कोठचा ? [ हा सर्वसाधारण लोकहि जर त्याला मिळत नाहीं, तर दुसरा असाधारण लोक प्राप्त होणें शक्यच नाहीं. मनुष्यलोक सर्व प्राण्यांना संसारचक्रांत भ्रमण करितां करितां दीर्घकालानें प्राप्त होतो. पण एकदा तो प्राप्त झाल्यावर पुन तोच प्राप्त होण्यास वरील यज्ञांतील कोणता तरी यज्ञ अवश्य केला पाहिजे. त्यावांचून हा मनुष्यलोकहि पुनः मिळणें शक्य नाहीं. मग विशिष्ट पुण्याचरणानेच प्राप्त होणारा उत्तम लोक त्याला कोठचा ? ] ३१.

---

१. ३० व ३१ या दोन श्लोकाचा स्वेच्छेने अर्थ करून रहस्यकार टापेंत म्हणतात—"हा यज्ञ एक प्रकारचा असतो असें नाही, प्राणायाम करा, तप करा, वेदाध्ययन करा, अग्निष्टोम करा, पशुयज्ञ करा, तीळ, तांदुळ किंवा तूप यांचें हवन करा, पूजा करा, किंवा नैवेद्य वैश्वदेवादि पांच ग्रहयज्ञ करा, फलासक्ति सुटलेली असली म्हणजे हे सर्व व्यापक अर्थानें यज्ञच होतात." पण येथें 'फलासक्ति सुटलेली असली,' हा अंश रहस्यकारांनी आणला कोठून ? वस्तुतः येथें मुख्य व गौण यज्ञ सांगितले आहेत, त्यांत फलासक्तीचा कांहीं संबंध

एवं बहुविधा यज्ञा वितता ब्रह्मणो मुखे ।
कर्मजान्विद्धि तान्सर्वानेवं ज्ञात्वा विमोक्ष्यसे॥३२॥

**अन्वयार्थ—एवं**—अशा प्रकारें—**बहुविधाः**—बहु प्रकारचे—**यज्ञाः**—यज्ञ—**ब्रह्मणः**—वेदाच्या—**मुखे**—मुखांत-वेदद्वारा—**वितताः**—विस्तारलेले आहेत.—**तान् सर्वान्**—त्या सर्वांस—**कर्मजान्**—कर्मांपासून झालेले—**विद्धि**—तूं जाण.—**एवं**—असें—**ज्ञात्वा**—जाणून—**विमोक्ष्यसे**—तूं अशुभ संसारापासून मुक्त होशील. सोडविला जाशील. ३२.

---

नाहीं. जो जें जें साधन करतो त्या त्या ठिकाणीं यज्ञदृष्टि ठेवतो, हा अर्थ येथें विवक्षित आहे. पुढे पुनः रहस्यकार म्हणतात "मग यज्ञशेषभक्षणासंबंधानें मीमांसकाचे जे सिद्धान्त आहेत, ते सर्व यापैकीं प्रत्येक यज्ञास लागूं पडतात." पण प्राणायामादिकांना यज्ञ म्हणणें मीमांसकांना कितपत संमत आहे, याची आम्हाला शंका वाटते. कर्मकांडी लोक अग्नि-होत्रादि अग्निसाध्य कर्मांनाच यज्ञ म्हणत असतात.ते प्राणायाम, तप, इत्यादि गौण यज्ञांना यज्ञ समजत नाहीत. ती वेदान्ताची दृष्टि आहे व तिचाच अनुवाद भगवानानीं येथें केला आहे. अर्थात् रहस्यकारांना मीमांसकाचे म्हणून ८७९ पानावर जे दोन-तीन नियम दिले आहेत, ते त्याचे नसून धर्मशास्त्राचे आहेत—नंतर यज्ञशब्दाचा व्यापक अर्थ घेऊन 'आप-ल्याला प्रिय असलेल्या काही गोष्टी प्रत्येकाने सोडून दिल्याखेरीज सर्वांनाच सारखीच सव-लत मिळून जगाचे व्यवहार चालणें शक्य नाहीं. या सामाजिक तत्त्वाचाहि त्यांत पर्यायानें समावेश झालेला आहे' इत्यादि जे रहस्यकार म्हणतात व या यज्ञाचा पाश्चात्त्यसमाज-शास्त्रकारांच्या सिद्धांताशीं बादरायण संबंध जोडूं पहातात. तो तर सर्वथा अप्रासंगिक आहे. ज्ञानयज्ञाची स्तुति करण्यासाठीं मोक्षसाधनभूत मुख्य व गौण श्रौत-स्मार्त यज्ञाचा उल्लेख कोठें व पाश्चात्त्याचे विरोचनाच्या किंवा चार्वाकाच्या मतावर उभारलेले समाजशास्त्राचे सि-द्धान्त कोठें! कशाचा कशालाच मेळ नाहीं. तथापि रहस्यकार "गीतेच्या परिभाषेनें हाच अर्थ सांगावयाचा असल्यास प्रत्येकाने आपल्या स्वातंत्र्याचा अंशतः तरी यज्ञ केल्या खेरीज इहलोकाचे व्यवहार चालावयाचे नाहीत, अशी यज्ञपर भाषाच या ठिकाणीं योजावी लागेल"-असे म्हणतात. पण भगवद्गीता येथे स्वातंत्र्याचा यज्ञ करावयास मुळीं सांगतच नाहीं. साधक जे जे मोक्षसाधन करतो, तो तो यज्ञच आहे, अशी दृष्टि ठेवावयास गीता सांगत आहे. इहलोकाचे व्यवहार चालावे ही गीतेला चिंता नसून प्रत्येकाने आपापल्या अधिकाराप्रमाणे स्वधर्माचरण करून परमात्मप्राप्ति करून घ्यावी हाच तिचा आशय आहे. अर्थात् "अशा प्रकारच्या व्यापक व विस्तृत अर्थानें यज्ञ हाच सर्व समाजरचनेचा पाया ठरल्यावर केवळ कर्तव्य म्हणून हे यज्ञ करण्यास प्रत्येक मनुष्य शिकल्याखेरीज समाजव्य-वस्था नीट रहावयाची नाहीं," असें जें रहस्यकारांचे म्हणणें आहे, तेंही गीतेच्या वरील आशयाला धरून नाहीं. चातुर्वर्ण्यव्यवस्थेच्या पलीकडे गीता समाजव्यवस्था म्हणून कांहीं स्वतंत्र व्यवस्था ओळखीतच नाहीं व ती चातुर्वर्ण्यव्यवस्थाहि मुख्यतः धर्म व मोक्ष या-साठीं आहे. इतर धर्म व समाज यांपेक्षां वैदिक धर्म व वेदधर्मानुयायी लोक यांमध्यें जर कांहीं विशेष असेल तर तो हाच होय.

**एवमिति । एवं यथोक्ता बहुविधा बहुप्रकारा यज्ञा वितता विस्तीर्णा ब्रह्मणो वेदस्य मुखे द्वारे वेदद्वारेणावगम्यमाना ब्रह्मणो मुखे वितता उच्यन्ते, तद्यथा वाचि हि प्राणं जुहुम इत्यादयः । कर्मजान्कायिकवाचिकमानसकर्मोद्भवान्विद्धि तान्सर्वाननात्मजान् । निर्व्यापारो ह्यात्मा । अत एवं ज्ञात्वा विमोक्ष्यसेऽशुभात् । न मद्व्यापारा इमे निर्व्यापारोऽहमुदासीन इत्येवं ज्ञात्वाऽस्मात्सम्यग्दर्शनान्मोक्ष्यसे संसारबन्धनादित्यर्थः॥**

**भाष्यार्थ**—हे सर्व यज्ञ केवल काल्पनिक नाहीत, तर वेदमूलक आहेत असें सांगण्यासाठी भगवान्—'**एवं०**' **इति**—'एव०' या श्लोकानें म्हणतात—**एवं यथोक्ताः बहुविधाः-बहुप्रकाराः यज्ञाः**—याप्रमाणे वर सांगितलेले बहुविध-नानाप्रकारचे यज्ञ-**ब्रह्मणः-वेदस्य मुखे-द्वारे वितताः-विस्तीर्णाः**-ब्रह्माच्या[1]-वेदाच्या

---

१ 'ब्रह्मणो मुखे वितताः' याचा अर्थ रहस्यकार "ब्रह्माचेच मुखात चालू आहेत," असा करतात, व टीपेंत त्याचें समर्थन पुढील प्रमाणे करतात. "श्रौतयज्ञ अग्नीत हवन करून करतात. अग्नि हे देवाचें मुख आहे. पण वरील लाक्षणिक यज्ञ त्या देवाच्या मुखात अग्नीत होत असल्यामुळे श्रेयःप्राप्ति कशी होणार ? ही शंका दूर करण्यासाठी हे यज्ञ साक्षात् ब्रह्माच्याच मुखात होतात असे म्हटले आहे." ब्रह्मशब्दाचा वेद हा सरळ अर्थ न करण्यासाठी कोण ही धडपड ! पण 'ब्रह्माच्याच मुखात होतात' याचा अर्थ तरी काय ? आणि हे सर्वच यज्ञ जर ब्रह्माच्याच मुखात होतात तर त्यापेक्षा ज्ञानयज्ञ श्रेष्ठ असे जे पुढें म्हटले आहे ते कशाला ? तात्पर्य रहस्यकारांना युक्तायुक्ततेचा विचार न करता वाटेल तसा गीतेचा अर्थ केला आहे, असे यावरून निष्पन्न होतें. मूळ श्लोकात 'असे अनेकप्रकारचे यज्ञ ब्रह्माच्या मुखात विस्तारलेले आहेत,' असें म्हटले आहे. त्यावरून येथें जेवढे यज्ञ सांगितले आहेत तेवढेच नसून दुसरेहि पुष्कळ आहेत व त्याचें वर्णन ब्रह्मात आहे, असे उघड होतें. त्यामुळें ब्रह्म म्ह० वेद असाच अर्थ करावा लागतो. त्यावाचून 'बहुविधाः' या विशेषणाचें काहीच स्वारस्य उरत नाही. शिवाय 'ते सर्व कर्मापासून निष्पन्न होतात, असें जाण. हें ज्ञान झालें म्हणजे तू मुक्त होशील' असा या श्लोकाच्या उत्तरार्धाचा अर्थ स्वतः रहस्यकारच करितात. कर्मापासून निष्पन्न होणारे यज्ञ साक्षात् ब्रह्माच्याच मुखांत कसे होतील ? शिवाय वर जे यज्ञ सांगितले आहेत त्याचें अधिकरण म्ह० अग्निहि प्रायः सांगितला आहे. दुसऱ्या यज्ञात ब्रह्म हाच अग्नि आहे, तिसऱ्यात संयम हा अग्नि आहे. चवथ्यात इंद्रियें हा अग्नि आहे. पाचव्यात आत्मसंयम हा अग्नि आहे. त्यामुळें फक्त द्रव्य या ज्ञानयज्ञावाचून कोणत्याच यज्ञाचा साक्षात् ब्रह्माशी संबंध नाही, हे उघड होते. तथापि रहस्यकार आपल्या ठराविक पद्धतीला अनुसरून म्हणतात—"यज्ञविधीचें हे व्यापक स्वरूप ज्या पुरुषानें जाणलें त्याची बुद्धि कोती न राहतां ब्रह्मस्वरूप ओळखण्यास तो अधिकारी होतो, असा दुसऱ्या चरणाचा भावार्थ आहे" पण हा भावार्थ मूळ श्लोकाच्या दुसऱ्या अर्धाला (चरणाला नव्हे) धरून नाही, इतकेंच नव्हे तर स्वतःच्या अर्थालाहि धरून नाही. ३२ व्या श्लोकाच्या उत्तरार्धात 'ब्रह्माच्या मुखांत सांगितलेले ते सर्व यज्ञ कर्मापासून होणारे आहेत, असें समज, असें जाणून तू मुक्त होशील' असे म्हटले आहे. स्वतः रहस्यकारांनीहि जवळ जवळ तसाच अर्थ केला आहे, पण भावार्थात 'यज्ञविधीचें व्यापक स्वरूप, बुद्धि कोती न राहणें ब्रह्म-

मुखांत म्ह० द्वारांत सांगितले आहेत. म्ह०—**वेदद्वारेण अवगम्यमाना ब्रह्मणः मुखे वितताः उच्यन्ते**—वेदाच्या द्वारा ज्ञात होणारे यज्ञ वेदाच्या मुखांत विस्तारलेले आहेत, असें म्हटलें जातें. ( वेदाच्या द्वाराच ते ज्ञात होतात, याविषयीं एक उदाहरण-)—**तत् यथा वाचि हि प्राणं जहुम इत्यादयः**—तें कसें, तर पहा. वाक्-मध्यें आम्ही प्राणाचा होम करतो, इत्यादि अनेक यज्ञ वेदांत सांगितले आहेत. [या वाक्यांत ज्ञानशक्तियुक्त विषयामध्ये क्रियाशक्तियुक्त विषयाचा उपसंहार विवक्षित आहे व त्या उपसंहाराला ' होम करतों ' असें म्हणून यज्ञाचें स्वरूप दिले आहे. त्याच्यापुढें 'प्राणे वा वाचं यो ह्येव प्रभवः स एवाप्ययः' असे वाक्य आहे. वेदांतील असलीं अनेक वाक्ये यज्ञसंपादक आहेत. ज्ञानशक्ति व क्रियाशक्ति या एकमेकींच्या उत्पत्ति-प्रलयाला कारण होत असल्यामुळे त्या शक्तींच्या अभावीं अध्ययनादि कार्यांची सिद्धि होत नाहीं, हा अर्थ येथें विवक्षित आहे.]—**तान् सर्वान् कर्मजान्-कायिक-वाचिक-मानसिककर्मोद्भवान्-अनात्मजान् विद्धि**—त्या सर्वांना कर्मज म्ह० शारीर, वाचिक व मानस कर्मांपासून उद्भवलेले-अनात्म्यापासून झालेले तूं जाण. म्हणजे त्या नानाप्रकारच्या यज्ञांतील एकहि यज्ञ आत्म्यापासून होत नाहीं, आत्मा त्यांचा कर्ता नव्हे, असे तूं जाण.—**हि आत्मा निर्व्यापारः**—कारण आत्मा सर्वव्यापारशून्य आहे. ( तो कोणतीहि हालचाल करीत नाहीं व आत्मा सर्वव्यापारशून्य आहे, असे जाणल्याने फार मोठें फल मिळत असल्यामुळे तसें अवश्य जाणावे, असे सांगतात-)—**अतः एवं ज्ञात्वा अशुभात् मोक्ष्यसे**—म्हणून आत्मा निष्क्रिय आहे, असे जाणून अशुभापासून मुक्त होशील.—**इमे मद्व्यापाराः न, अहं निर्व्यापारः उदासीनः इति एवं ज्ञात्वा**—हे माझे व्यापार नव्हेत, मी सर्वव्यापारशून्य उदासीन आहें, असे जाणून—**अस्मात् सम्यग्दर्शनात् संसारबन्धात् मोक्ष्यसे इत्यर्थः**—या सम्यग्ज्ञानामुळे तूं संसारबन्धापासून मुक्त केला जाशील, असा याचा भावार्थ. [ येथे व वेदांत सांगितलेले हे सर्व यज्ञ शरीर, वाक व मन यांच्या योगानें होणारे आहेत. आत्मा कांहीं करीत नाहीं, असे जाणून तूं मुक्त होशील. कारण हेंच सम्यग्ज्ञान आहे व मोक्ष हेंच त्याचे फल आहे. ] ३२.

**श्रेयान्द्रव्यमयाद्यज्ञाज्ज्ञानयज्ञः परंतप ।**
**सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते ॥३३॥**

**अन्वयार्थ—हे परंतप**—हे अर्जुना—**द्रव्यमयात् यज्ञात्**—द्रव्यादि साधनांनीच साध्य होणाऱ्या यज्ञाहून—**ज्ञानयज्ञः**—ज्ञानयज्ञ—**श्रेयान्**—अधिक प्रशस्य

---

स्वरूप ओळखण्यास अधिकारी होणें,' इत्यादि निराधार वाक्यांची उगीच योजना केली आहे. वस्तुतः ' ते सर्व यज्ञ कर्मजन्य आहेत, हें जाणूनच मोक्ष कसा मिळेल ?' हा येथील महत्त्वाचा प्रश्न आहे. वास्तव त्याची सविस्तर चर्चा येथें करावयास पाहिजे होती, पण **मोक्ष म्हणजे काय, हेंच ज्यांच्या मनांत ठसलेलें नाहीं, त्यांना असे प्रश्नहि स्फुरणें अशक्यच आहे.**

आहे.—**हे पार्थ**—हे पार्था!—**सर्वं कर्म**—सर्व कर्म—**अखिलं**—प्रतिबद्ध न होतां—**ज्ञाने**—ज्ञानांत—**परिसमाप्यते**—अन्तर्भूत होतें. ३३.

**ब्रह्मार्पणमित्यादिश्लोकेन सम्यग्दर्शनस्य यज्ञत्वं संपादितं यज्ञाश्चानेक उपदिष्टास्तैः सिद्धपुरुषार्थप्रयोजनैर्ज्ञानं स्तूयते। कथम्—श्रेयानिति। श्रेयान्द्रव्यमयाद्द्रव्यसाधनसाध्याद्यज्ञाज्ज्ञानयज्ञो हे परंतप। द्रव्यमयो हि यज्ञः फलस्याऽऽरम्भको ज्ञानयज्ञो न फलारम्भकोऽतः श्रेयान्प्रशस्यतरः। कथं, यतः सर्वं कर्म समस्तमखिलमप्रतिबद्धं पार्थ ज्ञाने मोक्षसाधने सर्वतःसंप्लुतोदकस्थानीये परिसमाप्यतेऽन्तर्भवतीत्यर्थः। "यथा कृताय विजितायाधरेयाः संयन्त्येवमेनं सर्वं तदभिसमेति यत्किंच प्रजाः साधु कुर्वन्ति यस्तद्वेद यस्स वेद" इति श्रुतेः॥ ३३॥**

**भाष्यार्थ—'ब्रह्मार्पणं०' इत्यादि श्लोकेन सम्यग्दर्शनस्य यज्ञत्वं संपादितं**—'ब्रह्मार्पणं०' इत्यादि श्लोकाने आत्मज्ञानाला यज्ञत्व कल्पिलें—**च यज्ञाः अनेके उपदिष्टाः**—व यज्ञ अनेक सांगितले.—**तैः सिद्धपुरुषार्थप्रयोजनैः ज्ञानं स्तूयते**—ज्यांचे पुरुषाला अपेक्षित असलेलें-पुरुषार्थभूत प्रयोजन सिद्ध आहे अशा त्या पूर्वोक्त यज्ञांनी ज्ञानाची स्तुति केली जाते.—**कथं 'श्रेयान्०' इति**—ती कशी, तें 'श्रेयान्०' या श्लोकाने सांगितलें जाते.—**हे परंतप द्रव्यमयात्-द्रव्यसाधनसाध्यात् यज्ञात् ज्ञानयज्ञः श्रेयान्**—हे शत्रूंना ताप देणाऱ्या अर्जुना, द्रव्यमय म्ह० द्रव्य या साधनानें साध्य होणाऱ्या यज्ञाहून ज्ञानयज्ञ श्रेष्ठ आहे. (येथील द्रव्य हा शब्द स्वाध्यायादिकांच्या उपलक्षणार्थ आहे. कारण ज्ञानयज्ञ स्वाध्यायादि इतर सर्व यज्ञांहूनहि श्रेयस्कर आहे. हेंच अधिक विस्तारानें सांगतात-)—**हि द्रव्यमयः यज्ञः फलस्य आरंभकः**—कारण द्रव्यमय यज्ञ फलाचा आरंभक आहे—**ज्ञानयज्ञः फलारंभकः न अतः श्रेयान्-प्रशस्यतरः**—ज्ञानयज्ञ कोणत्याहि फलाचा आरंभ करणारा नाहीं. (तर नित्यसिद्ध मोक्षाला अभिव्यक्त करणारा आहे.) म्हणून श्रेष्ठ -अधिक प्रशंसनीय आहे.—**कथं**—तो कसा?—**यतः पार्थ सर्वं-समस्तं अखिलं -अप्रतिबद्धं कर्म ज्ञाने-मोक्षसाधने सर्वतःसंप्लुतोदकस्थानीये परिसमाप्यते-अन्तर्भवति इत्यर्थः**—कारण हे पार्थ, सर्व-समस्त अग्निहोत्रादि अखिल-अप्रतिबद्ध-निःशेष कर्म सर्वतःसंप्लुतोदकस्थानीय मोक्षसाधनरूप ज्ञानांत परिसमाप्त होतें-अन्तर्भूत होतें असा भावार्थ.(सर्व बाजूंनीं पाण्यानें तुडुंब भरलेल्या समुद्रासारख्या विस्तीर्ण जला-

१ रहस्यकार या श्लोकाचा अर्थ असा करितात-"द्रव्यमय यज्ञापेक्षां ज्ञानमय यज्ञ श्रेष्ठ" पण 'ज्ञानयज्ञ' या शब्दाचा ज्ञानमय यज्ञ हा अर्थ चिंत्य आहे. 'सर्वं कर्म अखिलं ज्ञाने परिसमाप्यते' याचा "कारण सर्व प्रकारच्या सर्व कर्मांचें पर्यवसान ज्ञानांत होत असतें" हा अर्थहि मुळाला धरून नाहीं. पण आपल्या याच अर्थाचें समर्थन करण्यासाठीं रहस्यकार टीपेंत म्हणतात—"आपण द्रव्यमय यज्ञ करितों, तो परमेश्वरप्राप्त्यर्थ करीत असतों. पण परमेश्वराची प्राप्ति त्याच्या स्वरूपाचें ज्ञान झाल्याखेरीज होत नाहीं. म्हणून परमेश्वरस्वरूपाचें ज्ञान करून घेऊन त्या ज्ञानाला अनुरूप अशा आचरणानें परमे-

शयाच्या स्थानीं असलेल्या ज्ञानांत अग्निहोत्रादि सर्व कर्मांचा अन्तर्भाव होतो, याविषयीं छान्दोग्यश्रुतीचें प्रमाण–)—'**यथा कृताय विजिताय अधरेयाः संयन्ति एवं एनं सर्वं तत् अभिसमेति यत्किंच प्रजाः साधु कुर्वन्ति यः तत् वेद यत् सः वेद' इति श्रुतेः**—ज्याप्रमाणें द्यूतांतील चार चिह्नांनी युक्त असलेला 'कृत-' नांवाचा फांसा जिंकला असतां, त्यांत त्याच्या खालचे तीन, दोन व एक चिह्नांनीं युक्त असलेले त्रेता, द्वापर व कलि या नांवांचे फासे अन्तर्भूत होतात, त्याप्रमाणे सर्व प्रजा जें कांही पुण्य कर्म करते, तें सर्व या विद्वान् पुरुषामध्यें अन्तर्भूत होतें. ( तो विद्वान् कोणता ? ) तो रैक्व जें जाणतो तेच जाणणारा जो विद्वान् त्यामध्यें सर्व कर्म

---

श्वराची प्राप्ति करून घेणें या मार्गास किंवा साधनास 'ज्ञानयज्ञ' असें म्हणतात." या ज्ञानयज्ञाच्या लक्षणांत किती घोटाळा केला आहे तो पहा. भगवान् द्रव्यमय यज्ञापेक्षां ज्ञान-यज्ञ श्रेष्ठ असें म्हणत आहेत. पण तसें सरळ कबूल केल्यास आपल्या आवडत्या कर्मयोगाला गौणत्व येतें. तें येऊं नये, म्हणून हा सर्व द्राविडीप्राणायामाचा प्रकार आहे. आपण द्रव्यमय-यज्ञ परमेश्वरप्राप्त्यर्थच करीत असतों, असा अगोदर नियम नाहीं. पण तसें जरी क्षणभर समजलें तरी परमेश्वराची प्राप्ति त्याच्या स्वरूपाचें ज्ञान झाल्याखेरीज जर होत नाहीं, तर 'द्रव्यमय यज्ञ परमेश्वरप्राप्त्यर्थ करतो' या म्हणण्यांत काय अर्थ आहे ? पण रहस्यकारांना तसें म्हणून मोठाच अर्थ साधावयाचा आहे. तो कोणता, तें पुढील वाक्यावरून उघड होतें. 'परमेश्वरस्वरूपाचें नुस्तें ज्ञान करून घेणें हा ज्ञानयज्ञ नव्हे, किंवा ते ईशप्राप्तीचे साधनहि नव्हे. तर त्या ज्ञानाला अनुरूप असे आचरण करणें, हा ज्ञानयज्ञ आहे व तेंच ईश-प्राप्तीचें साधन आहे,' हा अर्थ 'ज्ञानयज्ञ' या शब्दाला अगदीं धरून, अगदीं सरळ आहे, त्यांत ओढाताण किंवा असांप्रदायिक आग्रह मुळींच नाहीं ! पण पुनः " हा यज्ञ मानस किंवा बुद्धिसाध्य आहे, असें पुढच्याच ओळींत म्हणण्याची तयारी आहेच !" ज्ञानाला अनुरूप असें आचरण बुद्धिसाध्य कसें, याचें सरळ उत्तर कोणी रहस्यभक्त देईल का ? "द्रव्य-मय यज्ञापेक्षां ज्ञानयज्ञाची योग्यता अधिक समजतात." एकूण 'ज्ञानयज्ञाची योग्यता अधिक' असें नुस्तें समजतात. खरोखरीच ती अधिक आहे असा निश्चय नाहीं. " कांही झालें तरी शेवटीं परमेश्वराचें ज्ञान झाले पाहिजे. ज्ञानाखेरीज मोक्ष नाहीं, हा गीतेचा कायम सिद्धान्त आहे." हें जर खरें आहे तर " सांख्य व योग या दोन निष्ठा म्ह० मोक्षमार्ग स्वतंत्र आहेत एक दुसऱ्याचे अंग नव्हे." ( गी. र. पृ. ६४३, ३०१ ) इत्यादि जे म्हटले आहे त्याची वाट काय ? तसेंच " कर्माचें पर्यवसान ज्ञानात होतें, या वचनाचा ज्ञानोत्तर कर्में सोडून द्याव-बयाची असा अर्थ नाहीं ... ...स्वतःसाठी नको तरी लोकसंग्रहार्थ कर्तव्य म्हणून सर्व कर्में केलीच पाहिजेत." पण असा आग्रह गीता कोठेंच करीत नाही. फक्त लोकसंग्रहाची इच्छा करणाऱ्या तत्त्ववेत्त्यानें असक्त राहून कर्में करावीं, येवढेंच गीता सांगत आहे. 'ती केलींच पाहिजेत.' वगैरे ही सर्व रहस्यकारांचा आग्रह आहे, गीतेचा नव्हे. ज्याला लोकसंग्रहाची इच्छा नाहीं व जो लोकसंग्रहाचा अधिकारीहि नाहीं, त्यानेंहि कर्में केलींच पाहिजेत असें भगव-द्गीतेंत कोठेंच सांगितलें नाहीं. अर्थात् " यज्ञ करा पण ते ज्ञानपूर्वक निष्कामबुद्धीनें करा." हा गीतेचा सर्वांस उपदेश नसून रहस्यकारांचा आहे.

अन्तर्भूत होतें, अशा अर्थाची श्रुति आहे. ( गी. भा. पृ. १७०. छान्दोग्यभाष्यार्थ पृ. २५०. पहा. ) ३३.

तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया ।
उपदेक्ष्यन्ति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्वदर्शिनः ॥ ३४ ॥

**अन्वयार्थ—तत्**—तें आत्मज्ञान—**प्रणिपातेन**—आचार्यांजवळ जाऊन साष्टांग नमस्कारानें—**परिप्रश्नेन**—त्याना बंध-मोक्षादिकांविषयीं प्रश्न करून व—**सेवया**—त्यांची सेवा-शुश्रूषा करून तूं—**विद्धि**—संपादन कर.—**तत्त्वदर्शिनः ज्ञानिनः**—तत्त्ववेत्ते ज्ञानी—**ते**—तुला—**ज्ञानं**—ज्ञान—**उपदेक्ष्यन्ति**—सांगतील. ३४.

**तदेतद्विशिष्टं ज्ञानं तर्हि केन प्राप्यत इत्युच्यते—तद्विद्धीति । तद्विद्धि विजानीहि येन विधिना प्राप्यत इत्याचार्यानभिगम्य प्रणिपातेन प्रकर्षेण नीचैः पतनं प्रणिपातो दीर्घनमस्कारस्तेन कथं बन्धः कथं मोक्षः का विद्या का चाविद्येति परिप्रश्नेन सेवया गुरुशुश्रूषयैवमादिना प्रश्रयेणाऽऽवर्जिता आचार्या उपदेक्ष्यन्ति कथयिष्यन्ति ते ज्ञानं यथोक्तविशेषणं ज्ञानिनो ज्ञानवन्तोऽपि केचिद्यथावत्तत्त्वदर्शनशीला अपरे न अतो विशिनष्टि तत्त्वदर्शिन इति । ये सम्यग्दर्शिनस्तैरुपदिष्टं ज्ञानं कार्यक्षमं भवति नेतरदिति भगवतो मतम् ॥ ३४ ॥**

**भाष्यार्थ—तर्हि तत् एतत् विशिष्टं ज्ञानं केन प्राप्यते इति 'तत् विद्धि०' इति उच्यते**—ते हें विशिष्ट-अतिशय प्रशंसनीय ज्ञान जर आहे, तर तें कोणत्या उपायाने प्राप्त होते, ते 'तद्विद्धि०' या श्लोकाने सांगितले जाते—**तत् येन विधिना प्राप्यते इति विद्धि-विजानीहि**—ते ज्ञानसाधन ज्या विधीनें प्राप्त होतें तें तूं जाण-समजून घे—**आचार्यान् अभिगम्य प्रणिपातेन-प्रकर्षेण नीचैः पतनं प्रणिपातः-दीर्घनमस्कारः तेन**—आचार्यांसमीप जाऊन प्रणिपाताने, अतिशय खालीं पडणें हा प्रणिपात, म्ह० दीर्घ नमस्कार ( साष्टांग नमस्कार ) त्या प्रणिपातानें—**कथं बंधः कथं मोक्षः का विद्या का च अविद्या इति' परिप्रश्नेन**—बंध कसा प्राप्त होतो, मोक्ष कसा मिळतो, विद्या कोणती, अविद्या कोणती अशा सर्व प्रकारच्या प्रश्नानें—**सेवया-गुरुशुश्रूषया**—सेवेनें-गुरूंच्या शुश्रूषेनें—**एवं आदिना**—या अशा प्रकारच्या शम-दमादि उपायांनीं तें ज्ञान प्राप्त करून घे.—**प्रश्रयेण आवर्जिताः आचार्याः**—असो; अशाप्रकारच्या प्रश्रयानें म्ह० भक्तिश्रद्धापूर्वक-अत्यंत नम्रपणानें अनुकूल करून घेतलेले आचार्य—**ते ज्ञानं यथोक्तविशेषणं उपदेक्ष्यन्ति-कथयिष्यन्ति**—तुला वर सांगितल्याप्रमाणें अत्यंत प्रशस्त असलेलें ज्ञान उपदेशितील-सांगतील.—**ज्ञानिनः-ज्ञानवन्तः अपि केचित् यथावत् तत्त्वदर्शनशीलाः अपरे न अतः विशिनष्टि तत्त्वदर्शिनः इति**—ज्ञानी आचार्य तुला तें ज्ञान सांगतील. पण ज्ञानवान असलेलेहि कांहीं थोडेच यथावत-पणपणें-यथा-

र्थपणें तत्त्वदर्शनशील असतात. कांहीं थोड्या लोकांनाच तत्त्वाचें साक्षात् ज्ञान झालेलें असतें, बाकीच्या पुष्कळांना तें नसतें. यास्तव त्या ज्ञान्यांना 'तत्त्वदर्शिनः'-तत्त्वाला साक्षात् जाणणारे, असें विशेषण भगवान् देत आहेत. ( त्यामुळें 'ज्ञानिनः' व 'तत्त्वदर्शिनः' या शब्दांवर पुनरुक्त दोष येत नाहीं. 'तत्त्वदर्शिनः' हें विशेषण भगवानांनी कोणत्या आशयानें योजलें आहे तें अधिक स्पष्ट करितात-)—**ये सम्यग्दर्शिनः तैः उपदिष्टं ज्ञानं कार्यक्षमं भवति न इतरत् इति भगवतः मतम्**—जे सम्यग्दर्शी-आत्मसाक्षात्कारवान् असतात, त्यांनीच उपदेशिलेलें ज्ञान कार्यक्षम होतें, फल देण्यास समर्थ होते, दुसऱ्या कोणीं उपदेशिलेले ज्ञान तसे कार्यक्षम होत नाहीं, असे भगवानांचें मत आहे. [ अर्जुना, तें श्रेष्ठ ज्ञान तूं आचार्यांना शरण जाऊन, त्यांना साष्टांग नमस्कार करून, त्यांना बंध-मोक्षासंबंधीं विविध प्रश्न करून, त्यांची शुश्रूषा करून संपादन कर, तत्त्वदर्शी ज्ञानी तुला त्या ज्ञानाचा उपदेश करतील. यावरून 'अर्जुन, ज्ञानी होता व ज्ञानी पुरुषाने ज्ञानोत्तर आयुष्यक्रमण कसं करावें, येथूनच गीतेचा आरंभ आहे,' असे जें कित्येकांचे म्हणणे आहे ते खोटें आहे, हें उघड होते. ] ३४.

यज्ज्ञात्वा न पुनर्मोहमेवं यास्यसि पाण्डव ।
येन भूतान्यशेषेण द्रक्ष्यस्यात्मन्यथो मयि ॥ ३५ ॥

**अन्वयार्थ—हे पाण्डव**—हे पांडवा !—**यत्**—जे ज्ञान—**ज्ञात्वा**—संपादन केल्यावर—**पुनः**—पुनरपि—**एवं**—अशा प्रकारें—**मोहं**—मोहाला—**न यास्यसि**—तूं प्राप्त होणार नाहींस.—**येन**—ज्या ज्ञानाने—**अशेषेण भूतानि**—आब्रह्मस्तबपर्यंत भूतांस—**आत्मनि**—आपल्यामध्ये-प्रत्यगात्म्यामध्ये—**अथो**—व—**मयि**—मजमध्यें-परमेश्वरामध्ये—**द्रक्ष्यसि**—पाहशील. ३५.

**तथा च सतीदमपि समर्थ वचनम्—यदिति । यज्ज्ञात्वा यज्ज्ञानं तैरुपदिष्टमधिगम्य प्राप्य पुनर्भूयो मोहमेवं यथेदानीं मोहं गतोऽसि पुनरेवं न यास्यसि हे पाण्डव। किं च येन ज्ञानेन भूतान्यशेषेण ब्रह्मादीनि स्तम्बपर्यन्तानि द्रक्ष्यसि साक्षादात्मनि प्रत्यगात्मनि मत्संस्थानीमानि भूतानीति, अथो अपि मयि वासुदेवे परमेश्वरे चेमानीति क्षेत्रज्ञेश्वरैकत्वं सर्वोपनिषत्प्रसिद्धं द्रक्ष्यसीत्यर्थः ॥ ३५ ॥**

---

१ रहस्यकार 'तद्विद्धि' याचा अर्थ "ध्यानात ठेव कीं" असा करितात. तो मूळाला धरून नाहीं. "ते ज्ञान प्रणिपातानें, प्रश्नाने आणि सेवेने तत्त्ववेत्ते ज्ञानी पुरुष तुला उपदेशितील." हा अर्थहि सुसंगत नाहीं. कारण 'प्रणिपात, प्रश्न व सेवा यांनीं तत्त्ववेत्ते ज्ञानी उपदेश कसा करणार? म्हणून 'त्या उपायांनीं अनुकूल-प्रसन्न करून घेतलेले ज्ञानी तुला ज्ञानाचा उपदेश करतील,' अशीच संगति लावली पाहिजे. या श्लोकावरून अर्जुन ज्ञानी नसून त्याला ज्ञान संपादन करावयाचें आहे व भगवान् 'तत्त्ववेत्त्या ज्ञानी आचार्यांपासून प्रणिपातादि उपायांनीं तें संपादन कर,' असे सांगत आहेत, हें उघड होतें, पण रहस्यकार त्या संबंधानें एक अक्षरहि बोलत नाहींत.

**भाष्यार्थ—तथा च सति 'यत्०' इति इदं अपि समर्थं वचनं—तत्त्वदर्शी** आचार्यांनी ज्ञानोपदेश केल्यानें तो कार्यक्षम झाला असतां पुढील 'यत् ज्ञात्वा०' हें समर्थ वचन आहे. [ म्ह० त्याचा विषय योग्य असल्यामुळे तें अर्थपूर्ण आहे. ]— **यत् ज्ञात्वा-तैः उपदिष्टं यत् ज्ञानं अधिगम्य-प्राप्य**—जें जाणून-त्या तत्त्वदर्शी ज्ञानी पुरुषांनीं उपदेशिलेलें जें ज्ञान प्राप्त करून घेऊन—**पुनः-भूयः**—पुनरपि— **हे पांडव, मोहं एवं-यथा इदानीं मोहं गतः असि पुनः एवं न यास्यसि** —हे अर्जुना, तूं अशाप्रकारें मोहाला-जसा तूं आतां मोहाला प्राप्त झाला आहेस तसा-पुनः मोहवश होणार नाहीस.[1]—**किंच येन ज्ञानेन भूतानि अशेषेण-ब्रह्मादीनि स्तंबपर्यन्तानि साक्षात् आत्मनि-प्रत्यगात्मनि मत्संस्थानि इमानि भूतानि इति द्रक्ष्यसि**—शिवाय ज्या ज्ञानाने भूतें-निःशेष-ब्रह्मादि-स्तंबपर्यंत सर्व भूते साक्षात् आत्म्यामध्यें-प्रत्यगात्म्यामध्ये 'हीं सर्व भूतें माझ्यामध्येंच उत्तम प्रकारें स्थित आहेत' अशारीतीनें पाहशील.—**अथो-अपि मयि-वासुदेवे परमेश्वरे च इमानि इति क्षेत्रज्ञ-ईश्वर-एकत्वं सर्वोपनिषत्प्रसिद्धं द्रक्ष्यसि इत्यर्थः** —व तसेंच, माझ्या ठिकाणी म्ह० वासुदेवामध्ये-परमेश्वरामध्ये हीं सर्व भूतें आहेत, असें पाहशील म्ह० सर्व उपनिषदांमध्यें प्रसिद्ध असलेलें जें क्षेत्रज्ञ-जीव व ईश्वर यांचे एकत्व तें पाहशील, जीवेश्वरैकत्वाचा अनुभव घेशील[2], असा याचा भावार्थ. [ तत्त्वज्ञ आ-

---

१ रहस्यकारहि 'तुला या प्रकारें मोह होणार नाहीं' असाच अर्थ करितात. म्ह०अर्जुनाला मोह झाला होता, हे त्यांना कबूल आहे. तथापि "अर्जुन ज्ञानी होता, ज्ञानोत्तर आयुष्यक्रमणाचे मार्ग सांगण्यास गीता प्रवृत्त झाली आहे," इत्यादि म्हणण्यासहि ते तयारच आहेत !

२ या श्लोकावरील टीपेंत रहस्यकार म्हणतात. " आत्मा ( आपण ), इतरभूतें व भगवान् हा त्रिविधभेद नाहींसा होतो " ... . . "या महत्त्वाच्या नीतितत्त्वाचा " इत्यादि ( गीता र. पृ. ६८१ ) पण हें महत्त्वाचें नीतितत्त्व कीं आत्मानुभव ? 'एकमेवाद्वितीयं ब्रह्म'असा साक्षात्कार, ही सर्व ज्ञानाची सीमा आहे.त्याला महत्त्वाचें नीतितत्त्व म्हणणें म्हणजे एक प्रकारें त्याची निंदाच करणें आहे. ज्याला मी, तूं व भगवान् हा भेदच उरला नाहीं, त्याला लौकिक नीतीची काय प्रतिष्ठा आहे? स्वतःनीतीनेंच पाहिजे तर त्याची दासी होऊन राहावें. तो तिच्याकडे ढुंकूनहि पाहणार नाहीं. कोठें ब्रह्मात्मैक्यानुभव व कोठें विचारी अनेकरूपा नीति ! सूर्य व काजवा यांची उपमाहि त्यांना लागू होत नाहीं !! पण रहस्यकारांना आपल्याला पाश्चात्त्यांप्रमाणें नीतिशास्त्र नाहीं, ही मोठी उणीव भासली व ती भरून काढण्यासाठीं त्यांनीं गीतेला नीतिशास्त्र बनविण्याचा निश्चय केला. आपल्याला स्वतंत्रसमाजशास्त्र नाहीं, त्यासाठीं त्यांनीं गीतेंतच समाजशास्त्राचीं तत्त्वेंहि आहेत, असें दाखविण्याचा उपक्रम केला. पण त्यामुळें गीतेचें महत्त्व वाढण्याच्या ऐवजीं तें कमी मात्र झालें.संस्कृतवाङ्मयांत राजनीतीला नीतिशास्त्र म्हणतात, कर्तव्याकर्तव्यशास्त्रास धर्मशास्त्र-म्हणतात. पण रहस्यकार म्हणतात—"धर्माधर्मांच्या किंवा कर्माकर्मांच्या या विवेचनास नीतिशास्त्र असें आम्ही या ग्रंथांत म्हटलें आहे !"( गी. र. पृ. ५० ) पण धर्मशास्त्राला नीति-

चार्यांनीं ज्ञानोपदेश केला असतां तुला आत्मसाक्षात्कार होईल. त्यानंतर तुला आतां जसा मोह झाला आहे, तसा पुनः होणार नाहीं. इतकेंच नव्हे, तर त्या ज्ञानाच्या योगानें आब्रह्मस्तंबपर्यंत सर्व भूतें तूं आपल्या आत्म्यामध्ये व त्याचप्रमाणें मजमध्ये पाहशील. म्हणजे क्षेत्रज्ञ व ईश्वर यांचें ऐक्य तुझ्या अनुभवास येईल. अर्जुनाला झालेला मोह हें अज्ञानाचें कार्य असून ज्ञान होतांच तें निवृत्त होईल, असें भगवान् येथें उघड सांगत आहेत. त्यावरून अर्जुन ज्ञानी नव्हता व ज्ञानी पुरुषानें ज्ञानोत्तर काय करावें, हें सांगण्यासाठीं गीता नसून मुमुक्षूनें स्वधर्माचरणानें चित्तशुद्धि करून घेऊन तत्त्वज्ञानी पुरुषाला शरण जाऊन त्याच्या ज्ञानोपदेशानें कृतार्थ व्हावें, हेंच सांगण्यासाठीं आहे, असें सिद्ध होतें. ] ३५.

**अपि चेदसि पापेभ्यः सर्वेभ्यः पापकृत्तमः ।**
**सर्वं ज्ञानप्लवेनैव वृजिनं संतरिष्यसि ॥ ३६ ॥**

**अन्वयार्थ—सर्वेभ्य पापेभ्यः**—सर्व पाप्यांहून—**पापकृत्तमः अपि**—अतिशय पाप करणाराहि—**असि चेत्**—तूं जरी असशील, तरी—**ज्ञानप्लवेन एव**—ज्ञानरूपी नौकेनेंच—**सर्वं वृजिनं**—सर्व पापाला—**संतरिष्यसि**—अनायासानें तरून जाशील. ३६.

**किं चैतस्य ज्ञानस्य माहात्म्यम्—अपीति । अपि चेदसि पापेभ्यः पापकृद्भ्यः सर्वेभ्योऽतिशयेन पापकृत्पापकृत्तमः सर्वं ज्ञानप्लवेनैव ज्ञानमेव प्लवं कृत्वा वृजिनं वृजिनार्णवं पापं संतरिष्यसि, धर्मोऽपीह मुमुक्षोः पापमुच्यते ॥ ३६ ॥**

**भाष्यार्थ—किंच एतस्य ज्ञानस्य माहात्म्यं 'अपि०' इति**—या ज्ञानाचे माहात्म्य 'अपि चेत०' या श्लोकानें आणखी निराळ्या प्रकारें सांगतात—**सर्वेभ्यः पापेभ्यः-पापकृद्भ्यः अतिशयेन पापकृत्-पापकृत्तमः अपि असि चेत्**—पापाचरण करणाऱ्या सर्वांहून तूं अतिशय पाप करणारा-पापकृत्तमहि जरी असलास तरी—**ज्ञानप्लवेन एव ज्ञानं एव प्लवं कृत्वा सर्वं वृजिनं-वृजिनार्णवं -पापं संतरिष्यसि**—ज्ञानरूपी नावेनेंच-ब्रह्मात्मैक्यज्ञानालाच प्लव-नौका करून सर्व पापाला-पापाच्या समुद्राला तूं उत्तम प्रकारें तरून जाशील.—**इह मुमुक्षोः धर्मः अपि पापं उच्यते**—अध्यात्मशास्त्रांत मुमुक्षूचा धर्महि पाप म्हटला जातो. [ येथें मुमुक्षूच्या धर्मालाहि पाप म्हटलें आहे. कारण निषिद्धाचरणाप्रमाणेंच विहिताचरणहि त्याला बंध उत्पन्न करतें, व मुमुक्षूचे धर्माधर्मसंज्ञक सर्व बंध तुटले पाहिजेत, तरच त्याला मोक्ष मिळतो. गी. भा. पृ. १४० पहा. ] ३६.

---

**शास्त्र म्हणणारे तुम्हीं कोण ? शिवाय गीता हें धर्मशास्त्र नव्हे, मोक्षशास्त्र आहे. म्हणूनच तें सोळाव्या अध्यायात 'कार्याकार्यनिश्चयाविषयीं' धर्मशास्त्राचा हवाला देतें, ( श्लो.२४.) स्वतः कांहीं सांगत नाहीं. तात्पर्य साक्षात् मोक्षाचे उपाय सांगणाऱ्या गीतेला लौकिक नीतिशास्त्र बनविण्याचा प्रयत्न करणें, सर्वथा अनुचित होय.**

**यथैधांसि समिद्धोऽग्निर्भस्मसात्कुरुतेऽर्जुन ।**
**ज्ञानाग्निः सर्वकर्माणि भस्मसात्कुरुते तथा ॥ ३७ ॥**

**अन्वयार्थ—हे अर्जुन**—हे अर्जुना !—**यथा**—ज्याप्रमाणें—**समिद्धः अग्निः**—चांगला प्रदीप्त झालेला अग्नि—**एधांसि**—लांकडांना—**भस्मसात् कुरुते**—जाळून भस्म करतो—**तथा**—त्याप्रमाणें—**ज्ञानाग्निः**—ज्ञानरूप अग्नि—**सर्वकर्माणि**—सर्व संचित व क्रियामाण कर्में—**भस्मसात्**—जाळून भस्म—**कुरुते**—करतो. ३७.

**ज्ञानं कथं नाशयति पापमिति सदृष्टान्तमुच्यते—यथेति । यथैधांसि काष्ठानि समिद्धः सम्यगिद्धो दीप्तोऽग्निर्भस्मसाद्भस्मीभावं कुरुतेऽर्जुन ज्ञानमेवाग्निर्ज्ञानाग्निः सर्वकर्माणि भस्मसात्कुरुते तथा निर्बीजी करोतीत्यर्थः । न हि साक्षादेव ज्ञानाग्निः कर्माणीन्धनवद्भस्मीकर्तुं शक्नोति, तस्मात्सम्यग्दर्शनं सर्वकर्मणां निर्बीजत्वे कारणमित्यभिप्रायः । सामर्थ्याद्येन कर्मणा शरीरमारब्धं तत्प्रवृत्तफलत्वादुपभोगेनैव क्षीयतेऽतो यान्यप्रवृत्तफलानि ज्ञानोत्पत्तेः प्राक्कृतानि ज्ञानसहभावीनि चातीतानेकजन्मकृतानि च तान्येव सर्वाणि भस्मसात्कुरुते ॥ ३७ ॥**

**भाष्यार्थ—ज्ञानं पापं कथं नाशयति इति 'यथा०' इति सदृष्टान्तं उच्यते**—ज्ञान पापाचा नाश कसा करतें तें 'यथा एधांसि०' या श्लोकानें दृष्टान्तपूर्वक सांगतात.—**अर्जुन, यथा समिद्धः-सम्यग् इद्धः-दीप्तः अग्निः एधांसि-काष्ठानि भस्मसात्-भस्मीभावं कुरुते**—हे अर्जुना ! ज्याप्रमाणें उत्तम प्रकारें पेटलेला-प्रदीप्त झालेला अग्नि काष्ठांना भस्मरूप करतो, त्याची जाळून राख करतो—**तथा ज्ञानं एव अग्निः ज्ञानाग्निः सर्वकर्माणि भस्मसात् कुरुते-निर्बीजी करोति इत्यर्थः**—त्याप्रमाणे ज्ञान हाच अग्नि, तो ज्ञानाग्नि सर्व कर्मे भस्म करून सोडतो म्ह० त्यांना निर्बीज करतो, असा भावार्थ.—**हि ज्ञानाग्निः कर्माणि इंधनवत् साक्षात् एव भस्मीकर्तुं न शक्नोति**—कारण ज्ञानाग्नि कर्मांना लांकडाप्रमाणें प्रत्यक्षच भस्म करूं शकत नाहीं.—**तस्मात् सम्यग्दर्शनं सर्वकर्मणां निर्बीजत्वे कारणं इति अभिप्रायः**—म्हणून आत्मज्ञान सर्वकर्मांना निर्बीज करण्यास कारण होतें, असा याचा अभिप्राय-आशय आहे. [ कारण ज्ञान काय करतें, तर आपल्या विषयाला आच्छादित करणारें जें अज्ञान त्याला घालवितें. त्याचप्रमाणें अविक्रिय ब्रह्मात्मज्ञानहि ब्रह्मविषयक अज्ञानाला घालवून त्या अज्ञानामुळेंच होणारा कर्तृत्वादि भ्रम घालवितें. तो भ्रमच कर्माचें बीज आहे, आणि 'मी कर्ता' इत्यादि भ्रमरूप कर्मबीज निवृत्त झालें कीं कर्में राहूंच शकत नाहींत. अर्थात् ज्ञान कर्माचें साक्षात् निवर्तक नाहीं, तर तें अज्ञानाचेंच निवर्तक आहे. शिवाय अज्ञानाची निवृत्ति होणेंच इष्ट आहे. कारण ती न झाल्यास कर्तृत्वाभिमानासह पुनः कर्मांचा उद्भव होण्याचा संभव असतो. म्हणून

ज्ञान कर्माला भस्म करतें म्ह० निर्बीज करतें, असें जें भाष्यांत म्हटलें आहे, तें योग्य आहे. ' अहोपण, आत्मज्ञान मूलभूत अज्ञानाचें निवर्तन करून कर्मांची निवृत्ति करतें, असें जर म्हटलें, तर ज्याच्या फलाचा आरंभ झाला आहे, अशा प्रारब्धकर्मांचीहि निवृत्ति होऊन ज्ञानाचा उदय होतांच देहपात होईल म्ह० शरीर मरेल,'अशी शंका घेऊन म्हणतात-] **—सामर्थ्यात् येन कर्मणा शरीरं आरब्धं तत् प्रवृत्तफलत्वात् उपभोगेन एव क्षीयते**—ज्ञानाचा उदय होतांच शरीरपात जर होईल, तर तत्त्वदर्शी ज्ञानी पुरुषांनीं उपदेशिलेलें ज्ञान साक्षात् फल देणारें आहे, हें भगवानांचें म्हणणें बाधित होईल. शिवाय ज्ञान होतांच जर शरीरपात होऊं लागला, तर इतर मुमुक्षूंना ज्ञानोपदेश करणाऱ्या आचार्यांचाच अभाव होईल. त्यामुळें वेदान्तसंप्रदाय विच्छिन्न होईल. पण तसें होणें शक्य नाही. याच सामर्थ्यामुळें ज्या कर्मानें हे शरीर आरंभिलेलें आहे, ते कर्म प्रवृत्तफल झालेले असल्यामुळें म्ह० प्रारब्ध कर्माच्या फलाला आरंभ झालेला असल्यामुळें तें उपभोगानेंच क्षीण होतें. [ या शरीराच्या उत्पत्तीला कारण होणारें जे कर्म तें प्रारब्ध कर्म. त्याच्या फलाला अगोदरच आरंभ झालेला असल्यामुळें तें क्षीण होईतों शरीर ज्ञानानंतरहि जिवंत राहतें. प्रारब्ध कर्म भोगानेंच क्षीण होतें, ज्ञानानें क्षीण होत नाहीं, यास्तव ज्ञान प्रारब्धकर्मफल संपादन करणाऱ्या अज्ञानाच्या लेशाला जाळीत नाहीं, तो अज्ञानलेश ज्ञानोत्तरहि राहतो, असा भावार्थ. ]—**अतः यानि अप्रवृत्तफलानि ज्ञानोत्पत्तेः प्राक् कृतानि ज्ञानसहभावीनि च अतीत-अनेकजन्मकृतानि च तानि एव सर्वाणि भस्मसात् कुरुते**—म्हणून ज्या कर्माच्या फलाला आरंभ झालेला नाही, अशी याच जन्मांत ज्ञानोत्पत्तीच्या पूर्वी केलेली, ज्ञानानंतर शरीर असेपर्यंत म्ह० ज्ञानासहवर्तमान होणारी व मागे होऊन गेलेल्या अनेक जन्मीं केलेली, अशीं संचित-क्रियमाण सर्व कर्में ज्ञानाग्नि जाळून टाकतो. ३७.

---

१ ३६ व ३७ या दोन श्लोकात ज्ञानाचें महत्त्व वर्णिलें आहे. पण रहस्यकाराना त्याचें मुळींच कौतुक वाटत नाही. त्यांनी या श्लोकाचा अर्थ अगदी मोजक्या शब्दांनी सांगून त्यावर सविस्तर टीपहि लिहिलेली नाही. त्यावरून ते सात्त्विक ज्ञानाचे भोक्ते नसून राजस कर्मांचे भोक्ते आहेत, हे उघड दिसते. गीतेत कर्मयोगाचे महत्त्व रहस्यकार म्हणतात तितक्या विस्तारानें व तितकें स्पष्ट कोठेंच वर्णिलेलें नाही. तथापि त्यासाठी त्यांनी नऊशें पानांचा ग्रंथ लिहिला. पण त्यांत ज्ञानासाठी १०५ पानेंहि खर्ची घातली नाहीत.त्यावरून संन्यासाप्रमाणेंच ज्ञानाशींहि त्यांचा किती दीर्घद्वेष आहे, हें उघड होतें. " ज्ञानरूप अग्नि सर्व कर्मांचें ( शुभाशुभ बंधन ) भस्म करून टाकतो,' असा ' ज्ञानाग्निः सर्वकर्माणि भस्मसात् कुरुते' याचा अर्थ ते करितात. त्यांत सर्व कर्में म्ह०कोणतीं ? ' भस्मसात् कुरुते '–भस्म करून टाकतो म्ह० काय करतो? याचा कांहीं खुलासा करीत नाहीत. पण 'सर्व कर्मांचें' याच्या पुढें 'शुभाशुभ बंधन' हें मात्र आपल्या पदरचें जोडतात. इतकेंच नव्हे, तर पुढे टीपेंत 'कर्में याचा अर्थ कर्मांचें बंधन' असा आहे, असेंहि म्हणतात व त्याला मागील १९ व्या श्लोकांतील 'ज्ञानाग्निदग्धकर्माणं' या पदाचा आधार देतात. पण कर्में म्ह० कर्मांचें बंधन,हा अर्थ कसा निष्पन्न होतो, तो करण्यास आधार काय व तसा अर्थ करण्याचें कारण काय,तें कांहींच सांगत नाहीत.

**न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते।**
**तत्स्वयं योगसंसिद्धः कालेनात्मनि विन्दति ॥ ३८ ॥**

**अन्वयार्थ—ज्ञानेन सदृशं**—ज्ञानासारखें—**पवित्रं**—पावन करणारें-शुद्धि करणारें—**इह**—या जगांत—**न हि विद्यते**—कांहीच नाही.—**तत् आत्मनि ज्ञानं**—तें आत्मविषयक ज्ञान—**कालेन** दीर्घ कालानें—**योगसंसिद्धः**—कर्मयोगानें व समाधियोगानें सुसस्कृत झालेला मुमुक्षु **स्वयं विन्दति**—आपोआपच संपादन करतो. ३८.

**यत एवमतः—न हीति। न हि ज्ञानेन सदृशं तुल्यं पवित्रं पावनं शुद्धिकरमिह विद्यते तज्ज्ञानं स्वयमेव योगसंसिद्धो योगेन कर्मयोगेन समाधियोगेन च संसिद्धः संस्कृतो योग्यतामापन्नो मुमुक्षुः कालेन महताऽऽत्मनि विन्दति लभत इत्यर्थः ॥ ३८ ॥**

**भाष्यार्थ**—[ अहोपण अश्वमेधादि दुसऱ्याच एखाद्या परमशुद्धि करणाऱ्या उपायानें परमपुरुषार्थ सिद्ध होईल, त्यासाठीं आत्मज्ञानच कशाला पाहिजे ? उत्तर-]—**यतः एवं अतः ' न हि ' इति**—ज्याअर्थी ज्ञानाचें एवढें माहात्म्य आहे त्याअर्थी 'न हि०' या श्लोकानें म्हणतात—**ज्ञानेन सदृशं-तुल्यं पवित्रं-पावनं-शुद्धिकरं इह न हि विद्यते**—ज्ञानाशीं सदृश-तुल्य-ज्ञानासारखें पवित्र पावन-करणारें, शुद्धि करणारें या लोकीं कांहीं विद्यमान नाहीं. [ज्ञानासारखें परमपुरुषार्थोपयोगी-परमपुरुषार्थाच्या उपयोगी पडेल, असें दुसरें कांहीं नाहीं. मग तें असें अतिशय उपयोगी असलेलें ज्ञान सर्वांनाच झटदिशी कां होत नाहीं ? उत्तर-]—**महता कालेन योगसंसिद्धः-योगेन-कर्मयोगेन च समाधियोगेन संसिद्धः संस्कृतः योग्यतां आपन्नः मुमुक्षुः**—दीर्घकालानें योगसंसिद्ध झालेला योगानें म्हणजे कर्मयोगानें व समाधियोगाने संसिद्ध म्ह० संस्कृत झालेला

---

१ रहस्यकार ' तत्स्वयं योगसंसिद्धः' या उत्तरार्धाचा अर्थ असा करितात-" तें ज्ञान-कालानें ज्यास योग म्ह०कर्मयोग सिद्ध झाला, तो स्वतःच आपल्या ठायीं प्राप्त करून घेतो." यांत ' कालेन ' याचा कालानें असा सरळ अर्थ केला आहे, पण त्यावरून त्यातील मर्म मुळींच लक्षांत येत नाहीं. ते यावें म्हणून पुढील (अ. ६ श्लो. ४५) ' अनेकजन्मसंसिद्धः' या पदाकडे अनुसंधान ठेवून आचार्यांनीं त्याला ' महता ' हें विशेषण दिलें आहे. त्यामुळें ' दीर्घकालानें योगसंसिद्ध होतो, पापक्षयासाठीं अनेक जन्म पुण्याचरण केल्यानें चित्त-शुद्धि होते व मग त्याला आपोआप ज्ञान होतें ' हा अर्थ त्यातून निघतो. पण रहस्यकारांनी त्याचें स्पष्टीकरण करण्याची मुळींच खटपट केलेली नाहीं. उलट ' योगसंसिद्धः ' याचा अर्थ मात्र भलताच केला आहे. 'ज्यास योग म्ह० कर्मयोग सिद्ध झाला तो,' असा अर्थ ते करितात. पण तो बरोबर नाहीं. कारण व्याकरणशास्त्राप्रमाणें ' योगसंसिद्धः ' हा तृतीया तत्पुरुष समासच होऊं शकतो. बहुव्रीहि होऊं शकत नाहीं. ' योगसंसिद्धः ' म्ह० योगानें संसिद्ध झालेला, असा त्याचा विग्रह होतो. आचार्यांनीं तो तसाच केला आहे. इतर सर्व भाष्य-टीकाकारांनींहि तो तसाच केला आहे. कोणीहि संस्कृतज्ञ ' योगसंसिद्धः ' याला

बहुव्रीहि समास म्हणणार नाहीं. पण रहस्यकार त्या सर्वांच्या विरुद्ध ! ' ज्यास योग म्ह० कर्मयोग सिद्ध झाला तो' असा विग्रह करितात. याचे कारण काय ? रहस्यकारांनींच त्याचें कारण सांगून ठेवलें आहे. ते साम्प्रदायिक टीकाकाराना उद्देशून म्हणतात " दृष्टि एकदा सांप्रदायिक बनली, म्हणजे आपलाच संप्रदाय प्रमाणभूत झालेल्या धर्मग्रंथांत वर्णिलेला आहे, असे ज्या रीतीनें दाखवितां येईल तीच रीति सांप्रदायिक टीकाकार स्वीकारीत असतो. कारण आपल्या संप्रदायाखेरीज सदर ग्रंथाचा दुसरा कांहीं अर्थ होत असला तरी तो खरा नव्हे ... अशी त्याची आगाऊच पक्की समजूत झालेली असते ... त्यामुळें शास्त्राच्या कांहीं नियमास बाध आला तरी त्याचे त्यास महत्त्व वाटत नाहीं." पृ. २३, २४. हें वर्णन कांहीं टीकाकारांना विशेषतः अद्वैतविरोधी टीकाकाराना जरी अंशतः लागू होत असलें, तरी रहस्यकारांना मात्र ते पूर्णपणें लागू होते. कांहीं झालें तरी योग हा ज्ञानाचा उपाय आहे, हें कबूल करावयाचें नाहीं, असें रहस्यकारांनीं ठाम ठरवून टाकलें होतें. त्यामुळें त्यांनीं ज्या रीतीनें योग ज्ञानाचे अंग ठरणार नाहीं, तीच रीति आपल्या रहस्यांत स्वीकारली आहे. आपण ठरविलेलाच अर्थ खरा, त्याचा दुसरा कांहीं अर्थ होतच नाहीं, अशी त्याची पक्की समजूत झाल्यामुळे व्याकरणादि शास्त्राच्या नियमाना बाध जरी आला, तरी त्याची त्यानीं पर्वा केलेली नाहीं. त्याची प्रत्यक्ष उदाहरणें अनेक देता येतील, पण येथें हेंच आहे पहा— ' योगानें संसिद्ध झालेला ' असा व्याकरणाच्या नियमांना अनुसरून तृतीया तत्पुरुष समास केल्यास ' योग ' ज्ञानाचें साधन ठरतें. तें तर आपल्याला इष्ट नाहीं. म्हणून व्याकरणाला बाध आला तरी त्याची पर्वा न करितां ' ज्यास कर्मयोग सिद्ध झाला आहे तो ' असा भलताच अर्थ केला आहे. असो; 'तत् स्वयं आत्मनि विन्दति—' याचा अर्थ 'तें ज्ञान स्वतःच आपल्या ठायीं प्राप्त करून घेतो ' असा करितात. ' आत्मनि ' म्ह० आपल्या ठायीं या अर्थांत स्वारस्य कांहीं नाहीं. सर्व ज्ञान आपल्या ठायींच होतें. ते दुसऱ्याच्या ठायीं कधींच होत नाहीं. त्यापेक्षा ' आत्मनि ' म्ह० आत्मविषयक ज्ञान, हा अर्थच सर्वथा उचित आहे. ' स्वयं ' ह्म० स्वतःच, हा अर्थ अगदींच सरळ व स्वारस्यशून्य आहे. त्यापेक्षां 'स्वयं' ह्म० आपोआप, अनायासानें होते, या अर्थांत अधिक स्वारस्य आहे.'कर्मयोग व समाधियोग यांच्या योगानें दीर्घकालानें संसिद्ध झाल्यावर मग आत्मज्ञानासाठीं कांहीं यत्न करावयास नको,' असें त्यायोगें निष्पन्न होतें. रहस्यकारांच्या अर्थावरून असा कांहींच अर्थ निष्पन्न होत नाहीं. येथील योग ह्म० कर्मयोग, एवढाच अर्थ घेऊन चालत नाहीं. कारण नुसत्या निष्काम कर्मयोगानें आत्मज्ञान आपोआप होणें शक्य नाहीं. पण कर्मयोगानें चित्त शुद्ध होऊन, ध्यानयोगानें चित्तसमाधान झाल्यावर आत्मज्ञान आपोआप होऊं शकतें. परंतु रहस्यकार या श्लोकाला असें अवतरण देतात. " स्वतःच्या बुद्धीनें आरंभिलेल्या निष्काम कर्मांनीं ज्ञानप्राप्ति करून घेणें, हा ज्ञानप्राप्तीचा मुख्य किंवा बुद्धिगम्य मार्ग होय. " पण हें म्हणणें वेदान्तसिद्धान्ताच्या विरुद्ध आहे. नुस्त्या निष्काम कर्मांनीं ज्ञानप्राप्ति होत नाहीं. श्रवण, मनन, निदिध्यासन हेच ज्ञानप्राप्तीचे मुख्य उपाय आहेत. निदिध्यासनाचाच समाधीमध्यें परिणाम होत असतो, समाधियोगानें आत्मसाक्षात्कार होतो व आत्मसाक्षात्कार हेंच आत्मज्ञान आहे. त्यामुळें निष्काम कर्मयोग हा ज्ञानप्राप्तीचा मुख्य मार्ग नसून बहिरंग साधन आहे. अर्थात् निष्काम कर्मानें ज्ञानप्राप्ति होते, हें म्हणणें वेदान्त

योग्यतेस प्राप्त झालेला–त्याचा अधिकारी झालेला मुमुक्षु—**स्वयं एव**—आपोआपच-अनायासानें—**तत् आत्मनि ज्ञानं**—तें आत्म्याविषयींचें ज्ञान —**विन्दति–लभते इत्यर्थः**—संपादन करतो. त्याला ते होते, असा भावार्थ. [ कर्मयोग व समाधियोग या साधनांचें दीर्घकाल अनुष्ठान केल्यामुळें ज्याच्यामध्ये ज्ञानाची योग्यता आली आहे, अशा मुमुक्षूला ते आत्मज्ञान अनायासानें होतें. अर्थात् ज्ञानाची योग्यता नसल्यामुळें अज्ञानीस झटकन ज्ञान होत नाहीं. त्याची पात्रता अंगी आणण्यासाठीं अनेक जन्म–दीर्घकाल यत्न करावा लागतो. ] ३८.

---

शास्त्राला सोडून आहे. तसेंच "स्वतःच्या बुद्धीनें आरंभिलेल्या निष्कामकर्मांनीं" यांतील 'स्वतःच्या बुद्धीनें आरंभिलेल्या' हें विशेषण कां योजिलें आहे, याचा कांही पत्ताच लागत नाहीं व त्याचें स्वारस्यहि लक्षात येत नाही. 'निष्काम कर्मांनी ज्ञानप्राप्ति करून घेणें' हेंहि एक गूढच आहे. गीतेचा हा असला अव्यवस्थित अर्थ वाचून कोणाला काय बोध झाला असेल, तो गीतारहस्यवाचकांनाच ठाऊक ! असो. "पण ज्याला स्वतः आपल्या बुद्धीनें याप्रमाणें ज्ञान प्राप्त करून घेतां येत नाही, त्याच्याकरिता श्रद्धेचा दुसरा मार्ग आतां सांगतात." असें पुढील श्लोकास अवतरण देतात. पण या श्लोकात स्वतः आपल्या बुद्धीनें ज्ञान प्राप्त करून घेतां येतें, असें सांगितलेलें नाहीं. उलट ३४ व्या श्लोकांत 'तत्त्वदर्शी ज्ञानी तुला ज्ञानाचा उपदेश करतील,' असें सांगितले आहे. तसेंच पुढील श्लोकात ज्ञानाचा केवल श्रद्धा हाच एक उपाय सांगितलेला नाहीं, तत्परता व जितेंद्रियत्व हे आणखी दोन उपाय सांगितले आहेत. तसेंच, या श्लोकाच्या उत्तरार्धात कोणताच मार्ग सांगितला नसल्यामुळें 'येथ श्रद्धेचा दुसरा मार्ग सांगितला आहे' हें म्हणणेंहि निराधार आहे. रहस्यकार पुढील श्लोकाचा अर्थ "हें ज्ञान जो श्रद्धावान् पुरुष इन्द्रियसयम करून त्याच्याच पाठीस लागला त्यालाहि मिळतें; आणि ज्ञान प्राप्त झाले, म्हणजे त्याला लागलीच परम शांति प्राप्त होते." असा करितात. पण श्रद्धावान्, ज्ञानतत्पर व जितेंद्रिय जो असतो, त्याला ज्ञान होतें, असें मुळात असतानां रहस्यकार तत्पर म्ह० "त्याच्याच पाठीस लागला" असा अर्थ करितात. 'संयतेंद्रियः' हा शब्द 'श्रद्धावान्' व 'तत्परः' या शब्दांप्रमाणेंच प्रथमान्त असताना त्याचा "इन्द्रियसंयमन करून" असा अर्थ करतात व पुढें "त्यालाहि ज्ञान मिळतें," असें म्हणतात. यांत 'त्यालाहि' यांतील 'हि' कोठून आणला ! तर 'श्रद्धेचा दुसरा मार्ग' असें जें वर म्हटलें आहे,त्याच्यासाठीं हा 'हि' पदरचाच आला आहे, पुढें परम शांति प्राप्त होते, असें रहस्यकार म्हणतात; पण 'परा परमशांति' म्ह० स्थितप्रज्ञता, जीवन्मुक्ति व ब्राह्मीस्थिति आहे, हें मात्र स्पष्टपणें सांगत नाहीत. कारण तसें म्हटल्यास ज्ञानानंतर तत्काल मोक्ष–जीवन्मुक्ति मिळते असें सिद्ध होऊन मग कर्मयोगाला अवकाशच रहात नाही, म्हणून येथील 'परमशांति' म्हणजे नुस्ती शांति असें वाचकांनीं समजावें, हा त्यांत उद्देश दिसतो. या श्लोकावरील टीपेंत 'बुद्धीनें जें ज्ञान व शांति प्राप्त होणार, तोच श्रद्धेनेंहि मिळते' असें म्हणून अर्थांतील 'त्यालाहि' येथील 'हि' व अवतरणांतील 'दुसरा मार्ग' यांना सार्थकता आणण्याचा प्रयत्न केला आहे. पण 'बुद्धीनें ज्ञान व शांति प्राप्त होते' असें वर सांगितलेलें नाहीं. 'योगसंसिद्धः' यांतील 'योग' शब्दाचा अर्थ बुद्धि असा होऊ शकत नाहीं.

**श्रद्धावाँल्लभते ज्ञानं तत्परः संयतेन्द्रियः ।**
**ज्ञानं लब्ध्वा परां शान्तिमचिरेणाधिगच्छति ॥ ३९ ॥**

**अन्वयार्थ—श्रद्धावान्**—श्रद्धालु—**तत्परः**—गुरूर्चा उपासना, इत्यादि ज्ञान-प्राप्तीच्या उपायांमध्यें अत्यंत आसक्त व—**संयतेन्द्रियः**—जितेंद्रिय-विषयांपासून इंद्रियांना ज्यानें निवृत्त केलें आहे असा,—**ज्ञानं**—ज्ञानाला—**लभते**—प्राप्त होतो. —**ज्ञानं**—ज्ञान—**लब्ध्वा**—प्राप्त झाल्यावर—**परां शान्तिं**—मोक्ष या नांवाची शांति—**अचिरेण**—सत्वरच—**अधिगच्छति**—त्यास प्राप्त होते. ३९.

**येनैकान्तेन ज्ञानप्राप्तिर्भवति स उपाय उपदिश्यते—श्रद्धावानिति । श्रद्धावाञ्श्रद्धालुर्लभते ज्ञानम् । श्रद्धालुत्वेऽपि भवति कश्चिन्मन्दप्रस्थानोऽत आह तत्परो गुरूपासनादावभियुक्तो ज्ञानलब्ध्युपाये श्रद्धावांस्तत्परोऽप्यजितेन्द्रियः स्यादित्यत आह संयतेन्द्रियः संयतानि विषयेभ्यो निवर्तितानि यस्येन्द्रियाणि स संयतेन्द्रियः । य एवंभूतः श्रद्धावांस्तत्परः संयतेन्द्रियश्च सोऽवश्यं ज्ञानं लभते । प्रणिपातादिस्तु बाह्योऽनैकान्तिकोऽपि भवति मायावित्वादिसंभवान्न तु तच्छ्रद्धावत्त्वादावित्येकान्ततो ज्ञानलब्ध्युपायः । किं पुनर्ज्ञानलाभात्स्यादित्युच्यते ज्ञानं लब्ध्वा परां मोक्षाख्यां शान्तिमुपरतिमचिरेण क्षिप्रमेवाधिगच्छति । सम्यग्दर्शनात्क्षिप्रं मोक्षो भवतीति सर्वशास्त्रन्यायप्रसिद्धः सुनिश्चितोऽर्थः ॥ ३९ ॥**

**भाष्यार्थ**—( कर्मयोग व समाधियोग यांनीं संपन्न असलेल्या साधकाला ज्ञानोत्पत्तीचें अन्तरंगसाधन सांगितलें जातें-)—**येन एकान्तेन ज्ञानप्राप्तिः भवति सः उपायः 'श्रद्धावान्०' इति उपदिश्यते**—ज्याच्या योगाने ज्ञानाची प्राप्ति होते तो उपाय 'श्रद्धावान्०'या श्लोकानें सांगितला जातो]—**श्रद्धावान्-श्रद्धालुः ज्ञानं लभते**—श्रद्धावान् म्ह० श्रद्धालु साधकाला ज्ञान होते-**श्रद्धालुत्वे अपि भवति कश्चित् मन्दप्रस्थानः**—पण एखाद्यामध्ये श्रद्धालुत्व जरी असलें,तरी कोणी मंद प्रयत्न करणारा असतो,अगदी तत्पर झालेला नसतो.—**अतः आह तत्परः**—म्हणून 'तत्पर' असें दुसरें विशेषण योजीत आहेत. 'तत्पर' म्हणजे—**गुरूपासनादौ ज्ञानलब्ध्युपाये अभियुक्तः**—गुरूपासना, श्रवण, मनन इत्यादि ज्ञानप्राप्तीच्या उपायांमध्यें निष्ठावान्.पण कोणी —**श्रद्धावान् तत्परः अपि अजितेंद्रियः स्यात्**—श्रद्धावान् व तत्पर जरी असला तरी जितेंद्रिय नसेल—**इति अतः आह संयतेंद्रियः-यस्य इंद्रियाणि विषयेभ्यः संयतानि निवर्तितानि सः संयतेंद्रियः**—म्हणून 'संयतेंद्रियः' असें भगवान् म्हणत आहेत. ज्यांचीं इंद्रियें विषयांपासून संयत केलेलीं-निवृत्त केलेलीं असतात, तो संयतेंद्रिय होय. (नुस्ती श्रद्धा व तत्परताच पुरेशी नाहीं,तर त्यांच्या बरोबर जितेंद्रियत्वहि पाहिजे. त्यावांचून श्रद्धा व तत्परता कांहीं करूं शकत नाहींत-)—**यः एवंभूतः श्रद्धावान् तत्परः च संयतेंद्रियः सः अवश्यं ज्ञानं लभते**—जो अशाप्रकारचा श्रद्धावान्

तत्पर व जितेंद्रिय मुमुक्षु असतो, तो ज्ञानाला अवश्य प्राप्त होतो, त्याला ज्ञान जरूर होतें. **—प्रणिपातादिः तु बाह्यः अनैकान्तिकः अपि भवति मायावित्त्वादिसंभवात्**—३४ व्या श्लोकांत सांगितलेला प्रणिपातादि उपाय बाह्य व अनिश्चितहि असतो. कारण त्यांत मायावित्त्व म्ह० कपटीपणा वगैरेहि संभवतो.(ढोंगीपणानेंहि गुरूपाशी जाणें, नमस्कार करणें, त्याना प्रश्न करणें, त्यांची सेवा करणें वगैरे संभवतें. )**—तु तत् श्रद्धावत्त्वादौ न इति एकान्ततः ज्ञानलब्धि-उपायः**—पण ते मायावित्त्वादिक श्रद्धावत्त्वादिकांत संभवत नाहीं. म्हणून तो ज्ञानप्राप्तीचा अव्यभिचारी-निश्चित उपाय आहे. [ श्रद्धालुत्व, तत्परता, व जितेंद्रियत्व हे उपाय दांभिकपणें संभवत नाहीत. दंभानें श्रद्धावान्, तत्पर वगैरे होतां येत नाही. म्हणून ते ज्ञानप्राप्तीचे निश्चित उपाय आहेत. प्रणिपातादिक हीं बहिरंग साधनें व श्रद्धादिक हीं अन्तरंग साधनें आहेत. ]**—ज्ञानलाभात् पुनः किं स्यात् इति उच्यते**—पण ज्ञानाचा लाभ झाल्यानें काय होतें,तें या श्लोकाच्या उत्तरार्धात सांगतात—**ज्ञानं लब्ध्वा परां मोक्षाख्यां शान्ति-उपरतिं अचिरेण-क्षिप्रं एव अधिगच्छति**—ज्ञान प्राप्त करून घेऊन 'मोक्ष' या नांवाच्या शांतीला-उपरतीला सत्वरच प्राप्त होतो.**—सम्यग्दर्शनात् क्षिप्रं मोक्षः भवति इति सर्वशास्त्रन्यायप्रसिद्धः सुनिश्चितः अर्थः**—तत्त्वज्ञानामुळें सत्वर मोक्ष होतो, असा हा सर्वशास्त्र व न्याय यांनीं पूर्णपणे सिद्ध झालेला अत्यंत निश्चित अर्थ आहे. ['आत्म्याला जाणूनच मृत्यूचे उल्लंघन करून जातो, ' ( तमेव विदित्वा अतिमृत्युमेति ) 'ज्ञानानेंच कैवल्य प्राप्त होतें,'(ज्ञानादेव तु कैवल्यं) इत्यादि शास्त्र व रज्ज्वादिकांच्या ज्ञानानें त्यांच्या विषयींच्या अज्ञानाची निवृत्ति होते, त्याच न्यायानें केवल आत्मज्ञानानेंच अज्ञान व अज्ञानकार्य यांचा क्षय होणें हाच मोक्ष होतो, हा न्याय; यांनीं वरील सिद्धान्त पूर्णपणें सिद्ध होतो. ] ३९.

**अज्ञश्चाश्रद्दधानश्च संशयात्मा विनश्यति ।**
**नायं लोकोऽस्ति न परो न सुखं संशयात्मनः ॥४०॥**

**अन्वयार्थ**—**अज्ञः**—आत्म्याला न जाणणारा—**च**—व—**अश्रद्दधानः**—अश्रद्धालु—**च**—व—**संशयात्मा**—संशयी—**विनश्यति**—विनाश पावतो.—**संशयात्मनः**—संशयी पुरुषाला—**अयं लोकः**—हा लोक—**न अस्ति**—नाहीं—**परः न**—परलोक नाहीं व—**सुखं न**—सुख नाहीं. ४०.

**अत्र संशयो न कर्तव्यः पापिष्ठो हि संशयः, कथमुच्यते—अज्ञश्चेति । अज्ञश्चानात्मज्ञोऽश्रद्दधानश्च संशयात्मा च विनश्यति । अज्ञाश्रद्दधानौ यद्यपि विनश्यतस्तथाऽपि न तथा यथा संशयात्मा, संशयात्मा तु पापिष्ठः सर्वेषाम् । कथं, नायं साधारणोऽपि लोकोऽस्ति तथा न परो लोको न सुखं तत्रापि संशयोपपत्तेः संशयात्मनः संशयचित्तस्य । तस्मात्संशयो न कर्तव्यः ॥ ४० ॥**

**भाष्यार्थ—अत्र संशयः न कर्तव्यः**—यां सिद्धान्ताविषयीं मनांत संशय आणूं नये—**हि संशयः पापिष्ठः**—कारण संशय अतिशय पापी आहे—**कथं इति 'अज्ञश्च०' इति उच्यते**—तो कसा तें 'अज्ञश्च०' या श्लोकानें सांगतात—**अज्ञः च अनात्मज्ञः**—अज्ञ म्ह० आत्म्याला न जाणणारा—**च अश्रद्दधानः**—आणि श्रद्धा न ठेवणारा-अश्रद्धालु—**च संशयात्मा विनश्यति**—व ज्याचें चित्त संशयानें युक्त आहे तो संशयात्मा, असा मनुष्य विनाश पावतो.—**अज्ञ-अश्रद्दधानौ यद्यपि विनश्यतः तथापि यथा संशयात्मा तथा न**—अज्ञ व अश्रद्धालु हे दोघे जरी विनाश पावत असले, तरी जसा संशयात्मा विनाश पावतो तसे ते विनाश पावत नाहीत.—**संशयात्मा तु सर्वेषां पापिष्ठः**—संशयात्मा तर सर्वांमध्यें मोठा पापी आहे.—**कथं**—तो कसा? **संशयात्मनः-संशयचित्तस्य-अयं साधारणः लोकः अपि न अस्ति तथा न परः न सुखं**—संशयात्म्याला-संशयचित्त पुरुषाला हा साधारण लोकहि नाहीं, तसाच याहून श्रेष्ठ असलेला परलोक नाहीं व त्यांतील सुख नाहीं.—**तत्र अपि संशयोपपत्तेः**—कारण त्याला त्याविषयींहि संशय येण्याचा संभव असतो.—**तस्मात् संशयः न कर्तव्यः**—म्हणून-(तो संशय अनर्थाचें मूळ असल्यामुळे)संशय करूं नये. [आत्म्याला न जाणणारा अज्ञ, अश्रद्धावान व संशयी यांची जरी परमार्थदृष्ट्या फार मोठी हानि होत असली, तरी त्यांतल्या त्यांत संशयचित्त पुरुषाची विशेष हानि होते. कारण त्याला हा लोक, परलोक व त्यांतील सुख या सर्वांविषयींच संशय असतो. त्यामुळे त्याला हा सर्वसाधारण लोकहि नाहीं, तसाच याहून श्रेष्ठ असलेला परलोक नाहीं व सुखहि नाहीं. म्हणून संशयवृत्ति सर्वदा टाकावी.] ४०.

---

१ या श्लोकांत अज्ञ, अश्रद्धालु व संशयात्मा यांचा विनाश होतो, असे सांगितले आहे. पण रहस्यकार "अज्ञ म्ह० ज्याला स्वतः बुद्धि नाहीं व ज्याला स्वतः ज्ञान नाहीं आणि श्रद्धाहि नाहीं,असा संशयखोर मनुष्य नाश पावतो" असे म्हणतात. म्हणजे 'संशयात्मा' या शब्दाचींच अज्ञ व अश्रद्दधान हीं विशेषणे मानतात. पण नुस्ते अज्ञान, नुस्ती अश्रद्धा व नुस्ता संशय हे तीनहि दोष जीवाचा नाश करणारे आहेत व ते तीनहि स्वतंत्रपणे मनुष्यामध्यें राहू शकतात.म्हणून अज्ञान व अश्रद्धा यांचा संशयी मनुष्यामध्ये समुच्चय करून 'संशयखोर मनुष्य मात्र नाश पावतो' या म्हणण्यात विशेष रहस्य नाहीं.शिवाय अज्ञ याचा अर्थ 'ज्याला स्वतः बुद्धि नाहीं व स्वतः ज्ञान नाही' असा करण्यापेक्षा ज्ञानाचें प्रकरण चालू असल्यामुळें.अज्ञ म्ह० ज्याला आत्मज्ञान नाही तो, असाच येथे घेतला पाहिजे. पण रहस्यकारांना ३८ व्या श्लोकांतील 'योगसंसिद्धः' या शब्दाचा अर्थ "स्वतःच्या बुद्धीनें आरंभिलेल्या निष्काम कर्मांनीं,' असा कांहीं तरी करावयाचा आहे व त्यासाठीं त्यांनीं पुढील श्लोकांच्या अर्थांत व अवतरणांत वारवार बुद्धिशब्द योजिला आहे, पण तो सर्वथा अस्थानीं आहे.

२ वर सांगिलेल्या अन्तरंग-बहिरंग ज्ञानसाधनांनीं युक्त असलेल्या पुरुषाला ब्रह्मोपदेशानंतर लागलाच आत्मसाक्षात्कार होतो व ब्रह्मसाक्षात्कार होतांच तत्काल मोक्ष प्राप्त होतो, या सिद्धान्ताविषयीं संशय धरूं नये.

**योगसंन्यस्तकर्माणं ज्ञानसंछिन्नसंशयम् ।**
**आत्मवन्तं न कर्माणि निबध्नन्ति धनंजय ॥४१॥**

**अन्वयार्थ—हे धनंजय**—हे अर्जुना!—**ज्ञानसंछिन्नसंशयं**—आत्मा व ईश्वर यांच्या एकत्वदर्शनरूप ज्ञानानें ज्याचा संशय पार नाहींसा झाला आहे व त्यामुळें—**योगसंन्यस्तकर्माणं**—परमार्थदर्शनरूप योगानें म्ह० ज्ञानयोगानें ज्या परमार्थदर्शी पुरुषानें-ज्ञानी पुरुषानें धर्म व अधर्म या नांवाचीं कर्में सोडलीं आहेत अशा—**आत्मवन्तं**—सावधान पुरुषाला—**कर्माणि**—धर्माधर्माख्य कर्में—**न निबध्नन्ति**—बद्ध करीत नाहीत. ४१.

**कस्मात्—योगेति । योगसंन्यस्तकर्माणं परमार्थदर्शनलक्षणेन योगेन संन्यस्तानि कर्माणि येन परमार्थदर्शिना धर्माधर्माख्यानि तं योगसंन्यस्तकर्माणम् । कथं योगसंन्यस्तकर्मेत्याह ज्ञानेनाऽऽत्मेश्वरैकत्वदर्शनलक्षणेन संछिन्नः संशयो यस्य स ज्ञानसंछिन्नसंशयः । य एवं योगसंन्यस्तकर्मा तमात्मवन्तमप्रमत्तं गुणचेष्टारूपेण दृष्टानि कर्माणि न निबध्नन्त्यनिष्टादिरूपं फलं नाऽऽरभन्ते हे धनंजय ॥ ४१ ॥**

**भाष्यार्थ**–( याप्रमाणें संशय जरी सर्व अनर्थाचें कारण असला तरी त्याला घालविणारा तसाच कांहीं बलवान् उपाय असल्यावांचून तो न येणे शक्य नाहीं, तेव्हां–) —**कस्मात् 'योग०' इति**—संशय कोणत्या विशिष्ट उपायाच्या आश्रयानें करूं नये, तें 'योगसंन्यस्त०'–या श्लोकानें भगवान् सांगतात—**योगसंन्यस्तकर्माणं-येन परमार्थदर्शिना परमार्थदर्शनलक्षणेन योगेन धर्माधर्माख्यानि कर्माणि**

---

१ रहस्यकार या श्लोकाला असें अवतरण देतात. " ज्ञानप्राप्तीचे स्वतःची बुद्धि आणि श्रद्धा हे दोन मार्ग सांगितले" ( हें म्हणणें बरोबर नाहीं, हे आम्हीं वर दाखविलेंच आहे.) " आतां ज्ञान व कर्मयोग यांचे पृथक् उपयोग दाखवून सर्व विषयाचा उपसंहार करतात." असें अवतरण दिल्यावर मूळ श्लोकाचा अर्थ " कर्मयोगाच्या आश्रयानें ज्यानें कर्में म्ह० कर्मबंधनें टाकलीं आणि ज्ञानामुळें ज्याचे संशय छिन्न झाले, अशा आत्मज्ञानी पुरुषाला कर्में बांधूं शकत नाहींत. " असा करितात. पण कर्मयोगाच्या आश्रयानें कर्में कशीं टाकतां येणार? कर्में करून कर्में टाकणें यांत परस्पर विरोध दिसत नाहीं का ? म्हणून तर आचार्यांनीं 'परमार्थदर्शनलक्षण योगानें ज्यानें धर्माधर्मरूप कर्में सोडलीं आहेत,'असा याचा अर्थ केला आहे. ( वरील टीप पहा. ) रहस्यकार कर्में म्ह० 'कर्मबंधनें' असे म्हणतात. पण कर्मांच्या आश्रयानें कर्मबंधनें कशीं टाकतां येतील ? शिवाय मुळांत 'कर्म' असा शब्द असतांना 'कर्मबंधनें' असा त्याचा अर्थ करण्यास प्रमाण काय ? या अध्यायाला ' ज्ञानकर्मसंन्यास ' असें नांव आहे व 'कर्मण्यकर्म यः पश्येत्' श्लो. १८. या श्लोकांत सांगितलेल्या परमार्थदर्शनानें सर्वकर्मांचा संन्यास करतां येणें शक्य आहे, यास्तव येथील ' योगशब्दाचा परमार्थदर्शन ' हाच अर्थ घेणें सर्वथा उचित आहे. अर्थात् " ज्ञान व कर्मयोग यांचे पृथक् उपयोग दाखवून " असें जें वर अवतरणांत म्हटलें आहे, तें बरोबर नाहीं. कारण येथें योग व ज्ञान

**संन्यस्तानि तं योगसंन्यस्तकर्माणं**—ज्या परमार्थदर्शी पुरुषानें परमार्थदर्शनरूप योगानें धर्म-अधर्मसंज्ञक कर्में सोडलीं आहेत तो योगसंन्यस्तकर्मा. त्याला—**योगसंन्यस्तकर्मा कथं इति आह**—योगसंन्यस्तकर्मा कसा ? कारण संशय असल्यास तत्त्वज्ञानानें कर्मसंन्यास संभवत नाहीं, म्हणूनच भगवान् सांगतात—**आत्मेश्वरैकत्वदर्शनलक्षणेन ज्ञानेन यस्य संशयः संछिन्नः सः ज्ञानसंछिन्नसंशयः**—आत्मा व ईश्वर यांचें एकत्वदर्शन याच स्वरूपाच्या ज्ञानानें ज्याचा संशय पार तुटून गेला आहे तो ज्ञानसंछिन्नसंशय होय.—**यः एवं योगसंन्यस्तकर्मा**—असा जो योगसंन्यस्तकर्मा असतो—**तं आत्मवन्तं-अप्रमत्तं गुणचेष्टारूपेण दृष्टानि कर्माणि न निबध्नन्ति**—त्या आत्मवान् म्ह० अतिशय सावधान असलेल्या पुरुषाला शरीरेंद्रियांच्या चेष्टारूपानें पाहिलेलीं कर्में बद्ध करीत नाहींत.—**हे धनंजय अनिष्टादिरूपं फलं न आरभन्ते**—हे अर्जुना, तीं कर्में अनिष्ट, इष्ट, मिश्र इत्यादिरूप फलाचा आरंभ करीत नाहींत. [ आत्मा व ईश्वर यांचें ऐक्य आहे, अशा स्वरूपाच्या ज्ञानानें ज्याचे सर्व संशय गेले आहेत व परमार्थदर्शनरूप योगानें ज्या परमार्थदर्शी पुरुषानें धर्म व अधर्म या नांवाचीं कर्में टाकलेलीं आहेत, त्या अत्यंत सावधान असलेल्या पुरुषाला कर्में बद्ध करूं शकत नाहींत. त्याच्या इष्टानिष्ट जन्मांचा आरंभ करीत नाहींत. कारण तो तीं कर्में शरीरेंद्रियांचीं आहेत, माझीं नव्हेत, असें सतत समजतो. त्यामुळें तीं त्याला कर्मफलांनीं बद्ध करूं शकत नाहींत. ] ४१.

**तस्मादज्ञानसंभूतं हृत्स्थं ज्ञानासिनात्मनः ।**
**छित्त्वैनं संशयं योगमातिष्ठोत्तिष्ठ भारत ॥४२॥**

**इति श्रीमद्भ० ब्रह्मवि० योगशास्त्रे ज्ञान-कर्म-संन्यासयोगो नाम चतुर्थोऽध्यायः ॥**

---

असे दोन शब्द जरी ठिमत असले, तरी त्याचा अर्थ 'कर्मयोग व ज्ञान' असा होऊं शकत नाहीं. 'योग' म्हणजे 'परमार्थयोग, परमार्थदर्शन' व ज्ञान म्हणजे 'एकत्व ज्ञान' हेच अर्थ येथें घेतले पाहिजेत.

१ कर्मयोगानेंच कर्माचा संन्यास संभवत नाहीं. म्हणून येथें 'परमार्थदर्शनरूप योगानें' असें म्हटलें आहे. तें परमार्थदर्शन विविदिषा संन्यासपक्षीं परोक्ष घ्यावें व विद्वत्संन्यासपक्षीं अपरोक्ष घ्यावें. आत्म्यानें परोक्ष ज्ञान झाल्यावर तें अपरोक्ष होण्यासाठीं जो शास्त्रविधीनें प्राप्त झालेला संन्यास-आश्रम स्वीकारला जातो, तो विविदिषासंन्यास होय. शास्त्रविधीनें प्राप्त असल्यामुळें त्याला वैधसंन्यास म्हणतात; व अपरोक्ष आत्मज्ञान झाल्यावर जीवन्मुक्तीचा अनुभव घेण्यासाठीं जो संन्यास केला जातो तो विद्वत्संन्यास होय. त्यालाच फलभूत संन्यास म्हणतात. कारण तो स्वाभाविक असतो. आत्मानुभव हेंच त्याचें लक्षण असतें.

२ आचार्यांच्या भाष्याच्या शेवटीं या अध्यायाला ब्रह्मयज्ञप्रशंसा असें म्हटलें आहे. ब्रह्मयज्ञ म्ह० ज्ञानयज्ञ व त्याचीच या अध्यायांत मुख्यत्वें करून प्रशंसा केली आहे, हे कोणाच्याहि सहज लक्षांत येईल.

**अन्वयार्थ—तस्मात्**—त्याअर्थी—**अज्ञानसम्भूतं**—अज्ञानापासून-अविवेकामुळें उत्पन्न झालेल्या—**हृत्स्थं**—बुद्धींत असलेल्या-**आत्मनः**—आत्म्याविषयींच्या—**एनं संशयं**—या संशयास—**ज्ञानासिना**—शोक-मोहादि दोषांना घालविणाऱ्या यथार्थ-ज्ञानरूप तरवारीनें—**छित्वा**—तोडून—**योगं**—ज्ञानसाधनभूत कर्मानुष्ठान—**आतिष्ठ**—कर—**हे भारत**—हे अर्जुना! आतां अगोदर—**उत्तिष्ठ**—युद्धाला ऊठ. ४२.

**यस्मात्कर्मयोगानुष्ठानादशुद्धिक्षयहेतुकज्ञानसंछिन्नसंशयो न निबध्यते कर्मभिर्ज्ञानाग्निदग्धकर्मत्वादेव यस्माच्च ज्ञानकर्मानुष्ठानविषये संशयवान्विनश्यति—तस्मादिति। तस्मात्पापिष्ठमज्ञानसंभूतमज्ञानादविवेकाज्जातं हृत्स्थं हृदि बुद्धौ स्थितं ज्ञानासिना शोकमोहादिदोषहरं सम्यग्दर्शनं ज्ञानं तदेवासिः खड्गस्तेन ज्ञानासिनाऽऽत्मनः स्वस्याऽऽत्मविषयत्वात्संशयस्य। न हि परस्य संशयः परेण छेत्तव्यतां प्राप्तो येन स्वस्येति विशेष्यतेऽत आत्मविषयोऽपि स्वस्यैव भवति। छित्त्वैनं संशयं स्वविनाशहेतुभूतं योगं सम्यग्दर्शनोपायकर्मानुष्ठानमातिष्ठ कुर्वित्यर्थः। उत्तिष्ठेदानीं युद्धाय भारतेति॥**

इति श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यगोविन्दभगवत्पूज्यपादशिष्यश्रीमच्छंकरभगवतः कृतौ श्रीभगवद्गीताभाष्ये ब्रह्मयज्ञप्रशंसा नाम चतुर्थोऽध्यायः॥ ४॥

**भाष्यार्थ—यस्मात् कर्मयोगानुष्ठानात् अशुद्धिक्षयहेतुकज्ञानसंछिन्नसंशयः कर्मभिः न निबध्यते**—ज्याअर्थी कर्मयोगाच्या अनुष्ठानामुळें अशुद्धीचा क्षय होऊन उत्पन्न होणाऱ्या ज्ञानानें ज्याचा संशय तुटला आहे, तो कर्मांनी बद्ध केला जात नाहीं (कारण)—**ज्ञानाग्निदग्धकर्मत्वात् एव**—त्याचीं कर्में ज्ञानाग्नीनें दग्ध झालेलीं असतात, त्यामुळेंच तो बद्ध होत नाहीं,—**च यस्मात् ज्ञानकर्मानुष्ठानविषये संशयवान् विनश्यति 'तस्मात्०' इति**—आणि ज्याअर्थी ज्ञान व कर्मानुष्ठान याविषयीं ज्याला संशय असतो, तो विनाश पावतो त्याअर्थी ज्ञानानें संशय घालवून कर्मयोगाचें अनुष्ठान कर, असे 'तस्मात्०' इत्यादि श्लोकानें सांगतात.—**तस्मात् पापिष्ठं अज्ञानसंभूतं-अज्ञानात्-अविवेकात् जातं**—म्हणून सर्व अनर्थांचे कारण असल्यामुळें अतिशय पापी व अज्ञानापासून-अविवेकापासून झालेला, अशा या—**हृत्स्थं-हृदि-बुद्धौ स्थितं**—हृदयस्थ-हृदयांत म्ह० बुद्धींत स्थित असलेल्या (आत्म्याच्या आश्रयानें राहणाऱ्या नव्हे) संशयाला—**ज्ञानासिना-शोकमोहादिदोषहरं सम्यग्दर्शनं ज्ञानं तत् एव असिः खड्गः तेन ज्ञानासिना**—ज्ञानखड्गानें-शोकमोहादिकांचें हरण करणारें जें सम्यग्दर्शन-आत्मज्ञान तेच ज्ञान, ते ज्ञान हेंच खड्ग-शस्त्र त्या ज्ञानरूपी खड्गानें-तरवारीनें—**आत्मनः-स्वस्य आत्मविषयत्वात् संशयस्य**—आत्म्याच्या-आपल्या स्वरूपाविषयींच्या संशयाला-कारण येथें संशयाचा विषय आत्मा आहे. म्हणून आत्म्याविषयींच्या संशयाला असें म्हटलें आहे.—**हि परस्य संशयः परेण छेत्तव्यतां न प्राप्तः येन स्वस्य इति विशेष्यते**—कारण एकाचा संशय दुसऱ्यानें घालवावा, अशी कांहीं अवस्था येथें प्राप्त झालेली नाहीं कीं, ज्यासाठीं 'स्वस्य-' स्वतःचा असें विशेषण दिलें आहे, असें म्हणतां

येईल!—**अतः आत्मविषयः अपि स्वस्य एव भवति**—त्यामुळें संशय आत्म्याविषयीं जरी असला तरी तो स्वतःचाच आहे. [ व्यवहारांत खांब, शिंप, दोरी इत्यादिकांविषयींचा संशय त्याविषयींच्या ज्ञानानें घालविला जातो. पण तो संशयहि पुरुषामध्यें असतो व ज्ञानहि त्याच्याचमध्यें असतें. म्हणजे संशयाचा विषय निराळा व आश्रय निराळा. संशयाचा विषय खांब, शिंप वगैरे व आश्रय मनुष्य. पण येथें संशयाचा विषयहि आत्मा व आश्रयहि आत्माच. म्ह० आत्म्याविषयींचा संशय आत्म्यामध्येंच राहतो व तो आत्मनिष्ठ ज्ञानानेंच घालविला जातो. म्हणून 'आत्मनः' हें विशेषण व्यर्थ नाहीं, सार्थच आहे. असो. ]—**स्वविनाशहेतूभूतं एनं संशयं छित्वा**—आपल्या विनाशाला कारण होणाऱ्या या संशयाला ज्ञानखड्गानें तोडून—**योगं सम्यग्दर्शनोपायकर्मानुष्ठानं आतिष्ठ-कुरु इत्यर्थः**—योग-आत्मसाक्षात्काराचा उपाय, असें जें कर्मानुष्ठान तें आचर-कर्म कर, असा भावार्थ. (तुझ्या आज्ञेनें मी अग्निहोत्रादि कर्म क्रमानें करीन, पण युद्ध करणार नाहीं, असें अर्जुन म्हणेल, म्हणून सांगतात—) **भारत, इदानीं युद्धाय उत्तिष्ठ इति**—हे भरतकुलोत्पन्ना! आतां अगोदर तूं युद्ध करावयास ऊठ. [ कर्मयोगानुष्ठानानें अशुद्धीचा क्षय होऊन ज्ञान होतें, ज्ञानानें सर्व

---

१ या श्लोकाच्या अर्थांत 'योग आतिष्ठ' म्हणजे कर्मयोगाचा आश्रय कर, असें रहस्यकार म्हणतात. आचार्यहि 'योग' म्हणजे सम्यग्दर्शनाचा उपाय जें कर्मानुष्ठान तें कर, असेंच म्हणतात. आचार्य 'शोकमोहादिदोषाचें हरण करणारें जें सम्यग्दर्शन तेंच ज्ञान, त्या ज्ञानखड्गानें आत्म्याविषयाचा संशय घालवून आत्मसाक्षात्कार होण्यासाठीं त्याचा उपाय जें कर्मानुष्ठान तें तू कर,' असें सांगतात. रहस्यकार येथील ज्ञान म्ह० आत्मसाक्षात्कारच समजतात. पण आत्मसाक्षात्कारानंतर कर्मानुष्ठान संभवत नाहीं, हें भाष्यांत ठिकठिकाणीं सांगितलेंच आहे. तथापि 'ज्ञान व योग' हे शब्द पाहून रहस्यकारांना ज्ञानकर्मसमुच्चय येथें विवक्षित आहे, असें वाटून येथील ४१ व ४२ या दोन श्लोकांची ईशावास्योपनिषदांतील 'विद्यां चाविद्यां च' या मंत्राशीं एकवाक्यता करण्याचा त्यांनीं प्रयत्न केला आहे. पण वरील मंत्रात 'विद्या' म्ह० उपासना व अविद्या म्ह० कर्म हे अर्थ विवक्षित आहेत. पण आचार्यांच्या भाष्याप्रमाणे हे अर्थ न घेतां विद्या म्ह० ज्ञान व अविद्या म्ह० कर्मयोग असेच अर्थ जरी घेतले, तरी त्यांची एकवाक्यता होऊं शकत नाहीं. कारण ईशोपनिषदांत अविद्या व विद्या यांचें सहअनुष्ठान केल्यानें अविद्येनें मृत्यूला तरून विद्येनें अमृत प्राप्ति होते, असें फल सांगितलें आहे व येथें 'ज्यानें योगानें कर्मसंन्यास केला आहे व ज्ञानानें ज्याचे सर्व संशय तुटले आहेत' असें त्याहून निराळेंच फल सांगितले आहे. याविषयीं सविस्तर विचार आम्ही पुढें करूं. येथें ४१ व्या श्लोकांत 'योगानें ज्यानें कर्मांचा संन्यास व ज्ञानानें संशय घालविले आहेत, त्या सावधान असलेल्या साधकाला कर्में बद्ध करीत नाहींत' असा सामान्य नियम सांगितला आहे आणि 'असें असल्यामुळें तूं ज्ञानखड्गानें सर्व संशय घालवून योगानुष्ठान कर, असें ४२ व्या श्लोकांत अर्जुनाला सांगितलें आहे. यावरून ज्या ज्ञानानें संशय घालविण्यास सांगितलें, तें ज्ञान म्ह० आत्मसाक्षात्कार नव्हे, हें उघड होतें. कारण ज्ञानाचें मुख्य फल मुक्ति आहे, संशयनिवृत्ति नव्हे. संशयनिवृत्ति हें त्याचें अवान्तर फल आहे व तें परोक्ष ज्ञानानेंहि मिळूं शकतें. शिवाय परमार्थ

संशय नाहींसे होतात व ज्ञानाग्नीनें सर्व कर्में दग्ध झाल्यामुळें तो ज्ञानी कर्मांनीं बद्ध होत नाहीं. त्याचप्रमाणें ज्ञान व कर्म यांविषयीं ज्याला संशय असतो तो विनाश पावतो, म्हणून तूं आपल्या बुद्धीतील अविवेकामुळे उत्पन्न झालेल्या अत्यंत पापी संशयाला शोकमोहादि दोष घालविणाऱ्या तत्त्वदर्शनाने म्ह० परोक्ष आत्मज्ञानानें घालवून–ज्ञानरूपी खड्गानें आत्म्याविषयींच्या संशयाला तोडून आत्मसाक्षात्काराचा उपाय असा जो कर्मयोग,त्याचें अनुष्ठान कर. पण हे अर्जुना! आतां अगोदर त्या स्वधर्मरूप कर्मयोगाचा एकदेश असें जें हें प्राप्त युद्ध ते कर. 'भारत' या संबोधनाने मोठ्या क्षत्रियकुलांत उत्पन्न झालेल्या तुला युद्धापासून पराङ्मुख होणें, उचित नाहीं, असें सुचविलें आहे. असो; या समग्र अध्यायांत योगाचे कृत्रिमत्त्व व भगवानाचें अनीश्वरत्व याविषयींची शंका घालवून प्रणिपातादि बहिरंग व श्रद्धादि–अंतरंग साधनांच्या योगानें उत्पन्न झालेल्या कर्मादिकांमध्यें अकर्मादिदर्शनरूप आत्म्याच्या अपरोक्ष ज्ञानानें सर्व अनर्थांची निवृत्ति होऊन ब्रह्मभावप्राप्ति होते, असे सांगितले व शेवटीं संशयरहित असलेल्या पुरुषालाच सर्वोत्तम ज्ञानाचा अधिकार असल्यामुळे सर्व अनर्थाचें बीज असा जो संशय, तो घालवून उत्तम अधिकाऱ्यासाठीं ज्ञाननिष्ठा व मध्यमाधिकाऱ्यासाठीं कर्मनिष्ठा विहित आहे, असें सिद्ध केले. येथील योगशब्दाचा अर्थ आचार्यांनीं 'ज्ञानोपायरूप कर्मानुष्ठान' असा केला आहे, हें ध्यानांत ठेवण्यासारखे आहे. ४२.

---

योग किंवा आत्मसाक्षात्कार तुला भविष्यत्काला प्राप्त होईल, असें भगवानांनीं स्पष्ट सांगितलें आहे. (अ. २ श्लो. ५३ पृ. १८९ अ. ४ श्लो. ३४ पृ. ४५२.) यास्तव परोक्ष आत्मज्ञानानें तूं आपले संशय घालवून अपरोक्ष आत्मसाक्षात्कारासाठीं त्याचा उपाय–कर्मानुष्ठान कर, हेंच व्याख्यान अतिशय ग्राह्य आहे. अर्थात् रहस्यकारांनीं टीपेंत "निष्काम बुद्धियोगानें कर्में केलीं म्ह० कर्मांचीं बंधनें तुटून जाऊन तीं मोक्षाला प्रतिबंधक होत नाहींत आणि ज्ञानानें मनांतले संशय फिटून मोक्ष मिळतो, असा या दोघांचा पृथक् पृथक् उपयोग आहे. म्हणून एकटें कर्म अगर एकटें ज्ञान न स्वीकारता ज्ञानकर्मसमुच्चयात्मक कर्मयोगाचा आश्रय करून युद्ध कर, असा अखेर उपदेश आहे." असें जें म्हटलें आहे तें अग्राह्य आहे. कारण एकटें ज्ञानच सर्व कर्मांचें भस्म करण्यास व मोक्षाख्य परा शांति देण्यास समर्थ आहे. श्लो. ३७ व ३९ यांचे उत्तरार्ध व 'ज्ञानाग्निदग्धकर्माणं,' (१९) 'ज्ञानसंछिन्नसंशयं' (४१) 'ज्ञाननिर्धूतकल्मषाः' (अ. ५ श्लो. १७) हीं पदे पहा. ज्ञानयोग व कर्मयोग या दोन भिन्न निष्ठा असल्यामुळे त्यांचा ज्ञानकर्मसमुच्चय संभवतच नाहीं, तसेंच, शेवटच्या संकल्पांत 'ज्ञानकर्मसंन्यासयोग' असें जें म्हटलें आहे त्यांतील "संन्यासशब्दाचा अर्थ स्वरूपतः कर्मत्याग नसून निष्काम बुद्धीनें परमेश्वराचे ठायीं कर्मांचा संन्यास म्ह० अर्पण करणें असा अर्थ आहे." हें म्हणणेंहि तितकेंच अयोग्य आहे. कारण सर्व अध्यायाचा विषय लक्षांत आणल्यास परमार्थ दर्शनरूपज्ञानानें कर्मसंन्यास करणें हाच अर्थ लक्षांत येतो. निष्काम बुद्धीनें परमेश्वराचे ठायीं कर्में अर्पण करणें, हा प्रस्तुत अध्यायाचा प्रतिपाद्य विषय आहे, असें मुळींच वाटत नाहीं.

इति भगवान् श्रीकृष्णांनीं गायलेल्या–सांगितलेल्या उपनिषदांतील–रहस्यविद्येंतील ब्रह्मविद्येपैकी योग–उपाय–शास्त्रांतील ज्ञान-कर्म-संन्यासयोग नांवाचा चौथा अध्याय विष्णुशर्मकृत सान्वयार्थ-सटीप-भाष्य-भाष्यार्थासह समाप्त झाला.

# अध्याय पांचवा.

## संन्यासयोग.

**'कर्मण्यकर्म यः पश्येत्' इत्यारभ्य 'स युक्तः कृत्स्नकर्मकृत्' 'ज्ञानाग्निदग्धकर्माणं' 'शारीरं केवलं कर्म कुर्वन्' 'यदृच्छालाभसंतुष्टः' 'ब्रह्मार्पणं ब्रह्म हविः' 'कर्मजान्विद्धि तान्सर्वान्' 'सर्वं कर्माखिलं पार्थ' 'ज्ञानाग्निः सर्वकर्माणि' 'योगसंन्यस्तकर्माणम्' इत्यन्तैर्वचनैः सर्वकर्मसंन्यासमवोचद्भगवान्, 'छित्त्वैनं संशयं योगमातिष्ठ' इत्यनेन वचनेन योगं च कर्मानुष्ठानलक्षणमनुतिष्ठेत्युक्तवान् । तयोरुभयोश्च कर्मानुष्ठानकर्मसंन्यासयोः स्थितिगतिवत्परस्परविरोधादेकेन सह कर्तुमशक्यत्वात्कालभेदेन चानुष्ठानविधानाभावादर्थादेतयोरन्यतरकर्तव्यताप्राप्तौ सत्यां यत्प्रशस्यतरमेतयोः कर्मानुष्ठानकर्मसंन्यासयोस्तत्कर्तव्यं नेतरदित्येवं मन्यमानः प्रशस्यतरबुभुत्सयाऽर्जुन उवाच संन्यासं कर्मणां कृष्णेत्यादिना ॥**

**भाष्यार्थ**—( पूर्वोत्तर अध्यायांचा संबंध दाखविणारे भाष्यकार पूर्वी होऊन गेलेल्या विषयाचा अनुवाद करून या अध्यायाच्या आरंभीं अर्जुनानें जो प्रश्न केला आहे, त्याचा आशय दाखविण्यासाठीं विचाराला आरंभ करितात)—**' कर्मण्यकर्म यः पश्येत्० ' इत्यारभ्य**—' कर्मण्यकर्म० ' ४-१८ कर्मांमध्यें जो अकर्म पाहतो, येथून आरंभ करून—**' स युक्तः कृत्स्नकर्मकृत् ' ' ज्ञानाग्निदग्धकर्माणं ' ' शारीरं केवलं कर्म कुर्वन् ' ' यदृच्छालाभसंतुष्टः ' ' ब्रह्मार्पणं ब्रह्म हविः ' 'कर्मजान्विद्धि तान्सर्वान् ' ' सर्वं कर्माखिलं पार्थ ' 'ज्ञानाग्निः सर्वकर्माणि' ' योगसंन्यस्तकर्माणं '**—'तो योगी व तो सर्व कर्में करणारा ' 'ज्ञानाग्नीनें ज्याचीं कर्में दग्ध झालीं आहेत त्याला पण्डित म्हणतात.' १९ 'केवल शरीरस्थितीला अवश्य तेवढेंच कर्म करणारा पापाने लिप्त होत नाहीं. ' २१. ' न मागतां जें प्राप्त होईल त्यांत संतुष्ट होणारा० ' २२. ' अर्पण करण्याचें साधन ब्रह्म, हवि ब्रह्म० ' २४. 'ते सर्व यज्ञ कर्मापासून होणारे आहेत.' ३२. ' ज्ञानांत सर्व कर्मांचा प्रतिबंधावांचून अन्तर्भाव होतो. ' ३३. ' ज्ञानाग्नि सर्व कर्मांचें भस्म करतो. ' ३७. ' परमार्थदर्शनरूप योगानें ज्यानें कर्मांचा संन्यास केला आहे.' ४१.—**इत्यन्तैः वचनैः भगवान् सर्वकर्मसंन्यासं अवोचत्**—येथपर्यंतच्या वचनांनी भगवानांनीं सर्वकर्मसंन्यास सांगितला आहे. [ अठराव्या श्लोकांत कर्मांमध्यें अकर्मदर्शन सांगून तो योगी, तो बुद्धिमान्, तो सर्व कर्में करणारा, अशी त्याची प्रशंसा केली. लोकसंग्रहासाठीं सर्व कर्में करणाऱ्या ज्ञानी पुरुषाला विवेकी लोक ज्ञानाग्निदग्धकर्मा म्हणतात. कारण ज्ञानरूप अग्नीनें त्याचीं सर्व कर्में दग्ध झालेलीं असतात, असें १९ व्या श्लोकांत म्हटल्यामुळें

ज्ञानी पुरुषाला ज्ञानफलभूत संन्यास व विविदिषूला म्ह० जिज्ञासूला साधनरूप संन्यास भगवानांना विवक्षित आहे, असें त्यावरून सिद्ध होतें. 'निराशीः' असा आरंभ करून २१ व्या श्लोकांत शरीरस्थितीमध्येंहि आसक्ति न ठेवतां, शरीरस्थितीला अत्यंत अवश्य तेवढेंच कर्म करणारा, धर्म व अधर्म यांच्या फलांचा अधिकारी होत नाहीं, असें म्हणूनहि भगवानांनीं दोन प्रकारचा संन्यास पूर्वोत्तर अध्यायांनीं सुचविला आहे. 'यदृच्छालाभ०' या २२ व्या श्लोकांतहि संन्यासधर्माचाच उपदेश असल्यामुळें त्यांत संन्यासच सुचविला आहे. 'ब्रह्मार्पणं०' या २४ व्या श्लोकांत ज्ञानाची यज्ञत्वसंपादनपूर्वक प्रशंसा केलेली असल्यामुळेहि ज्ञाननिष्ठाचा कर्मसंन्यास सांगितला आहे.ज्ञानयज्ञाच्या स्तुतीसाठीं नानाप्रकारच्या यज्ञांचा उपन्यास करून ते सर्व यज्ञ शरीर, मन, वाणी यांच्या व्यापारांनीं होणारे असल्यामुळें आत्मा सर्वव्यापारशून्य आहे, असे साक्षात् जाणण्याची इच्छा करणाऱ्या विविदिषूने संन्यासच करावा, त्याचा संन्यासांतच अधिकार आहे, असें ३२ व्या श्लोकांत सुचविलें आहे. सर्व कर्माचें पर्यवसान ज्ञानांत होतें, असें ३३ व्या श्लोकांत सांगितले असल्यामुळें जिज्ञासूचा संन्यासांतच अधिकार आहे, असें ठरतें. 'तद्विद्धि०' इत्यादि श्लोकांनीं ज्ञानप्राप्तीचा प्रणिपातादि उपाय प्रदर्शित करून अतिशय माहात्म्याने युक्त असलेल्या ज्ञानाने सर्व कर्माची निवृत्ति होते, असें भगवानांनीं ३७ व्या श्लोकांत सांगितले. त्यावरून भगवानांच्या मताने जिज्ञासूच्या संन्यासाधिकाराची सिद्धि होते. ज्ञानानें ज्याचे सर्व संशय नाहींसे झाले आहेत व त्या ज्ञानानेंच जो कर्मांचा संन्यास करून जितेन्द्रिय व सावधान आहे, त्याला आभासरूप कर्मे बद्ध करीत नाहीत, असें ४१ व्या श्लोकांत सांगून भगवानांनीं दोन्ही प्रकारचा संन्यास स्पष्टपणें प्रतिपादिला आहे. तात्पर्य 'कर्मणि०' १८ येथून आरंभ करून 'योगसंन्यस्तकर्माणं०' ४१ येथपर्यंतच्या वचनांनीं भगवानांनीं सर्वकर्माचा संन्यास सांगितला आहे. असें जर आहे, तर जिज्ञासु व ज्ञानी या दोघांनींहि कर्मसंन्यासाचाच आदर करणे उचित असल्यामुळें कर्मानुष्ठान अग्राह्य ठरतें, अशी आशंका घेऊन आचार्य म्हणतात-]
—**'छित्त्वैनं संशयं योगं आतिष्ठ' इति अनेन वचनेन कर्मानुष्ठानलक्षणं योगं च अनुतिष्ठ इति उक्तवान्**—'छित्वैनं संशयं०' ४२ या वचनानें कर्मानुष्ठानरूप योगाचें अनुष्ठान कर, असेंहि भगवानांनीं सांगितलें आहे.—**च तयोः उभयोः कर्मानुष्ठानकर्मसंन्यासयोः स्थितिगतिवत् परस्परविरोधात्**—पण कर्मानुष्ठान व कर्मसंन्यास या दोघांचा, स्थिति व गति ( म्ह० उभे राहणें व चालणें ) यांप्रमाणें परस्परविरोध असल्यामुळें—**एकेन सह कर्तुं अशक्यत्वात्**—एकाच पुरुषाला एकाच वेळीं त्यांचें अनुष्ठान करितां येणें अशक्य आहे.—**च कालभेदेन अनुष्ठानविधानाभावात्**—आणि भिन्न भिन्न कालीं एकाच पुरुषानें त्या दोहोंचें अनुष्ठान करावें, असेंहि विधान नाहीं. त्यामुळें—**अर्थात् एतयोः अन्यतरकर्तव्यताप्राप्तौ सत्यां**—अर्थात्च त्या दोहोंतील कांहीं तरी एक अवश्य कर्तव्य आहे, अशी प्राप्ति झाली असतां—**एतयोः कर्मानुष्ठानकर्मसंन्यासयोः यत् प्रशस्यतरं तत् कर्तव्यं न इतरत्**—कर्मानुष्ठान व कर्मसंन्यास यांतील जें अधिक

प्रशस्त असेल तें करावें, दुसरें-प्रशस्त नसलेलें करूं नये.—**इति एवं मन्यमानः अर्जुनः प्रशस्यतरबुभुत्सया ' संन्यासं कर्मणां कृष्ण० ' इत्यादिना उवाच**—असें समजणारा अर्जुन त्या दोहोंतील अधिक चांगलें कोणतें, तें जाणण्याच्या इच्छेनें ' संन्यासं कर्मणां० ' इत्यादि श्लोकानें बोलला. [ तसेंच, या संशयाला ज्ञानरूपी खड्गानें तोडून ज्ञानाचा उपाय असा जो कर्मयोग त्याचे अनुष्ठान कर, असेंहि भगवानांनी शेवटी सांगितलें आहे. पण कर्मानुष्ठान व कर्मसंन्यास यांचा चालणें व उभें राहणें, यांप्रमाणें परस्पर विरोध आहे. त्यामुळे एकाच पुरुषाला एकाच वेळीं त्यांचें अनुष्ठान करतां येणें शक्य नाहीं. भिन्नकालीं त्यांचे अनुष्ठान करावें, असेंही विधान नाहीं. तेव्हां अर्थात्च कर्मसंन्यास व कर्मयोग यांतील कांहीतरी एकच करणें प्राप्त झालें असतां त्यांतल्या त्यांत जे अधिक प्रशस्त असेल तेंच करावे, असे समजून त्यांतील अधिक चांगले कोणते, तें जाणण्याच्या इच्छेने अर्जुन येथे प्रश्न करीत आहे. ]

**ननु चाऽऽत्मविदो ज्ञानयोगेन निष्ठां प्रतिपिपादयिषन्पूर्वोदाहृतैर्वचनैर्भगवान्सर्वकर्मसंन्यासमवोचन्न त्वनात्मज्ञस्यातश्च कर्मानुष्ठानकर्मसंन्यासयोर्भिन्नपुरुषविषयत्वादन्यतरस्य प्रशस्यतरत्वबुभुत्सया प्रश्नोऽनुपपन्नः । सत्यमेव त्वदभिप्रायेण प्रश्नो नोपपद्यते प्रष्टुः स्वाभिप्रायेण पुनः प्रश्नो युज्यत एवेति वदामः । कथं, पूर्वोदाहृतैर्वचनैर्भगवता कर्मसंन्यासस्य कर्तव्यतया विवक्षितत्वात्प्राधान्यमन्तरेण च कर्तारं तस्य कर्तव्यत्वासंभवात्, अनात्मविदपि कर्ता पक्षे प्राप्तोऽनूद्यत एव न पुनरात्मवित्कर्तृकत्वमेव संन्यासस्य विवक्षितमिति एवं मन्वानस्यार्जुनस्य कर्मानुष्ठानकर्मसंन्यासयोरविद्वत्पुरुषकर्तृकत्वमप्यस्तीति पूर्वोक्तेन प्रकारेण तयोः परस्परविरोधादन्यतरस्य कर्तव्यत्वे प्राप्ते प्रशस्यतरं च कर्तव्यं नेतरदिति प्रशस्यतरविविदिषया प्रश्नो नानुपपन्नः । प्रतिवचनवाक्यार्थनिरूपणेनापि प्रष्टुरभिप्राय एवमेवेति गम्यते ॥**

**भाष्यार्थ**—( कर्मयोग व कर्मसंन्यास हे भिन्न भिन्न पुरुषांना अनुष्ठेय आहेत, असें सांगितलेले असल्यामुळें प्रश्न करणाऱ्या अर्जुनाचा असा आशय नाहीं, अशी वादी शंका घेतो- )—**ननु च आत्मविदः ज्ञानयोगेन निष्ठां प्रतिपिपादयिषन् भगवान् पूर्वोदाहृतैः वचनैः सर्वकर्मसंन्यासं अवोचत्**—अहोपण, आत्मज्ञाची ज्ञानयोगानें निष्ठा प्रतिपादन करण्याची इच्छा करणारे भगवान् वर सांगितलेल्या वचनांनीं सर्वकर्मसंन्यास सांगते झाले. [ म्ह० आत्मज्ञाने ज्ञाननिष्ठ व्हावे, हें भगवानांना इष्ट असल्यामुळें त्यांनीं ' कर्मण्यकर्म यः पश्येत् ' इत्यादि पूर्वोक्त वचनांनीं आत्मज्ञासाठीं सर्वकर्मसंन्यास सांगितला. ]—**तु अनात्मज्ञस्य न**—पण अनात्मज्ञाला सर्वकर्मसंन्यास सांगितलेला नाहीं. —**अतः च कर्मानुष्ठानकर्मसंन्यासयोः भिन्नपुरुषविषयत्वात्**—आणि त्यामुळें कर्मानुष्ठान व कर्मसंन्यास यांना भिन्नपुरुषविषयत्व असल्याकारणानें म्ह० त्यांचें अनुष्ठान करणारे भिन्न भिन्न असल्यामुळें—**अन्यतरस्य प्रशस्यतरत्वबुभुत्सया प्रश्नः अनुपपन्नः**—त्यांतील एकाचा अधिक प्रशस्तपणा जाणण्याच्या इच्छेनें प्रश्न करणें अयोग्य आहे. [ भगवानांनीं आत्मज्ञाला ज्ञाननिष्ठा सांगितली आहे, अनात्मज्ञाला

नाहीं. त्यामुळें कर्मानुष्ठान व संन्यास यांचे अधिकारी भिन्न असल्यामुळें त्या दोहोंतील अधिक चांगलें साधन कोणतें ? हें जाणण्यासाठीं अर्जुनानें प्रश्न केला, असें म्हणतां येत नाहीं. या शंकेवर भाष्यकार म्हणतात ]—**सत्यं एव त्वदभिप्रायेण प्रश्नः न उपपद्यते पुनः प्रष्टुः स्वाभिप्रायेण युज्यते एव इति वदामः**—खरेंच आहे. तुझ्या अभिप्रायानें प्रश्न उपपन्न होत नाहीं, पण प्रश्नकर्त्या अर्जुनाच्या अभिप्रायानें प्रश्न युक्तच आहे, असें आम्ही म्हणतों—**कथं**—तो कसा काय ? ( अर्जुनाचा अभिप्राय काय आहे ? )—**भगवता पूर्वोदाहृतैः वचनैः कर्मसंन्यासस्य कर्तव्यतया विवक्षितत्वात् प्राधान्यं**—भगवानांनीं पूर्वी सांगितलेल्या वचनांनीं कर्मसंन्यास कर्तव्यत्वानें विवक्षित आहे. त्यामुळें त्याला प्राधान्य आहे. [ वर सांगितलेल्या वचनांनीं भगवान् कर्मसंन्यास करावा, असे सांगूं इच्छितात. पण ज्याप्रमाणे ' स्वर्गकामो यजेत ' या वचनानें स्वर्ग या कामाच्या उद्देशाने यागाचे विधान केले जाते. पण तेवढ्यावरून ज्याला स्वर्गाची इच्छा असेल, तोच यागाचा अधिकारी, दुसरा कोणी नाही, असें त्याच वाक्यानें प्रतिपादन केले जात नाहीं, कारण तसें मानल्यास वाक्यभेद होतो. त्याप्रमाणें एका पक्षीं प्राप्त झालेल्या अनात्मवित् कर्त्याचा अनुवाद केला जातो. संन्यास आत्मवेत्त्यानेंच करावा, तोच त्याचा अधिकारी आहे, दुसरा अनात्मविद् नाही, असा नियम केला जात नाहीं. कारण ज्याला पूर्ण वैराग्य आलें आहे, अशा अज्ञ पुरुषालाहि संन्यास विहित आहे. यास्तव कर्म व कर्माचा त्याग यांना अविद्वत्कर्तृत्व आहे म्ह० अनात्मज्ञ कर्माचाही अधिकारी आहे व वैराग्य आल्यास तो संन्यासाचाहि अधिकारी आहे, असे समजणाऱ्या अर्जुनाचा प्रश्न संभवतो. येथें वाद्याची शंका अशी आहे—" संन्यास केवल आत्मज्ञासाठींच आहे, अनात्मज्ञासाठीं नाही, त्यामुळें ' कर्म व संन्यास यांतील अधिक चांगलें साधन कोणतें तें सांग, ' असा अर्जुनाचा प्रश्नच उपपन्न होत नाही. " पण त्यावर सिद्धान्त्यांचें असें म्हणणें आहे–"ज्ञानी पुरुषाने संन्यास करावा, असे जरी भगवान् म्हणत आहेत, तरी त्यावरून विरक्त अनात्मज्ञानें तो करूं नये, असे होत नाही. त्यामुळें ज्याला आत्मज्ञान झालेलें नाही, त्याचें कर्मानुष्ठान तर संभवतेंच, पण संन्यासहि संभवतो. असें मानून अर्जुन प्रश्न करीत आहे. " पण असें जरी असलें तरी अर्जुन त्यांतील अधिक प्रशस्त काय तें जाणण्यासाठीं प्रश्न कां करीत आहे ? तर संन्यासाला प्राधान्य आहे म्हणून. ]—**अन्तरेण च कर्तारं तस्य कर्तव्यत्वासंभवात्**—आणि कर्त्यावांचून त्याचें कर्तव्यत्व संभवत नाहीं. संन्यासालाहि कर्ता पाहिजे. —**अनात्मविद् अपि कर्ता पक्षे प्राप्तः अनूद्यते एव**—त्यामुळें एकापक्षीं प्राप्त झालेल्या अनात्मविद् कर्त्याचाहि अनुवाद केला जातोच.—**पुनः संन्यासस्य आत्मवित्कर्तृकत्वं एव न विवक्षितं**—पण संन्यासाला आत्मवित्कर्तृकत्वच आहे, असें येथें विवक्षित नाहीं. [ म्ह० ज्याला आत्मज्ञान–आत्मसाक्षात्कार झालेला असतो त्याला ज्ञानसामर्थ्यानेंच कर्मत्याग नियमानें प्राप्त होतो. त्याचप्रमाणें वैराग्य असल्यास जो आत्मज्ञानी नाहीं, त्यालाहि संन्यास अवश्य आहे. यास्तव त्याच्या कर्त्याचा अनुवाद केला जातो. अर्थात् कर्म व संन्यास हीं दोन्ही साधनें एका अविद्वान् पुरुषाला प्राप्त

होतात, हें उघड आहे. त्यामुळें वरील अभिप्रायानें अर्जुनाचा प्रश्न संभवतो. सारांश ] **—कर्मानुष्ठानकर्मसंन्यासयोः अविद्वत्पुरुषकर्तृकत्वं अपि अस्ति इति एवं मन्वानस्य अर्जुनस्य**—कर्मानुष्ठान व कर्मसंन्यास यांना अविद्वत्पुरुषकर्तृकत्वहि आहे, असें समजणाऱ्या अर्जुनाचा (प्रश्न अयोग्य नाहीं,)—**पूर्वोक्तेन प्रकारेण तयोः परस्परविरोधात् अन्यतरस्य कर्तव्यते प्राप्ते**—वर सांगितलेल्या प्रकारें त्यांच्यामध्यें परस्परविरोध असल्यामुळें त्यांतील कोणत्या तरी एका साधनाला कर्तव्यत्व प्राप्त झालें असतां म्ह० त्यांतील कोणतें तरी एक करण्याची प्राप्ति झाली असतां—**च प्रशस्यतरं कर्तव्यं न इतरत् इति प्रशस्यतरविविदिषया प्रश्नः अनुपपन्नः न**—व जें अधिक चांगलें असेल तेंच करावें, दुसरें करूं नये, असें असल्यामुळें त्यांतील अधिक चांगलें कोणतें, तें जाणण्याच्या इच्छेनें प्रश्न अयोग्य नाहीं. [ अविद्वानाला कर्म व संन्यास या दोन्हींची प्राप्ति आहे पण त्यांचें अनुष्टान एकाच वेळीं संभवत नाहीं. अर्थात् त्यांतील कांहीतरी एक करणें भाग आहे. तेव्हां काय करावें ? हे जाणण्याच्या इच्छेनें अर्जुनाचा प्रश्न उपपन्न होतो. इतकेंच नव्हे तर-]—**प्रतिवचनवाक्यार्थनिरूपणेन अपि प्रष्टुः अभिप्रायः एवं एव इति गम्यते**—भगवानांनीं जें प्रतिवचन-उत्तर दिलें आहे त्या प्रतिवचनवाक्याच्या अर्थाचें निरूपण केल्यानेंहि प्रश्नकर्त्याचा अभिप्राय असाच आहे, असें ज्ञात होते. [ म्ह० प्रतिवचनाकडे पाहिल्यानेंहि अविद्वानानें केलेले कर्मानुष्टान व कर्मसंन्यास यांतील अधिक श्रेयस्कर काय ? हाच प्रश्नकर्त्याचा अभिप्राय व्यक्त होतो. ]

**कथं संन्यासकर्मयोगौ निःश्रेयसकरौ तयोस्तु कर्मयोगो विशिष्यत इति प्रतिवचनमेतन्निरूप्यं किमनेनाऽऽत्मवित्कर्तृकयोः संन्यासकर्मयोगयोर्निःश्रेयसकरत्वं प्रयोजनमुक्त्वा तयोरेव कुतश्चिद्विशेषात्कर्मसंन्यासात्कर्मयोगस्य विशिष्टत्वमुच्यत आहोस्विदनात्मवित्कर्तृकयोः संन्यासकर्मयोगयोस्तदुभयमुच्यत इति । किं चातो यद्यात्मवित्कर्तृकयोः संन्यासकर्मयोगयोर्निःश्रेयसकरत्वं तयोस्तु कर्मसंन्यासात्कर्मयोगस्य विशिष्टत्वमुच्यते यदि वाऽनात्मवित्कर्तृकयोः संन्यासकर्मयोगयोस्तदुभयमुच्यत इति ॥**

**भाष्यार्थ—कथं**—प्रतिवचन कोणते व त्याचें निरूपण कसें करावयाचें ?—**संन्यासकर्मयोगौ निःश्रेयसकरौ तयोस्तु कर्मयोगो विशिष्यते इति प्रतिवचनं**—संन्यास व कर्मयोग हे दोन्ही निःश्रेयसकर आहेत. पण त्यांतील कर्मयोग अधिक चांगला आहे, हें प्रतिवचन आहे.—**एतत् निरूप्यं**—त्याचें निरूपण करणें उचित आहे.—**किं अनेन आत्मवित्कर्तृकयोः संन्यासकर्मयोगयोः निःश्रेयसकरत्वं प्रयोजनं उक्त्वा**—या प्रतिवचनानें काय आत्मवेत्त्यानें केलेला कर्मयोग व कर्मसंन्यास यांचें निःश्रेयसकरत्व हें प्रयोजन सांगून—**तयोः एव कुतश्चित् विशेषात् कर्मसंन्यासात् कर्मयोगस्य विशिष्टत्वं उच्यते**—त्यांचेच कांहीं एका विशेषामुळें कर्मसंन्यासाहून कर्मयोगाचें विशिष्टत्व-श्रेष्ठत्व सांगितलें जात आहे, **—आहोस्वित् अनात्मवित्कर्तृकयोः संन्यासकर्मयोगयोः तत् उभयं उ-**

**च्यते इति**—कीं अनात्मवेत्त्यानें केलेला संन्यास व कर्मयोग यांचें निःश्रेयसकरत्व व कर्मसंन्यासाहून कर्मयोगाचें विशिष्टत्व सांगितलें जात आहे ?—**किं च अतः यदि आत्मवित्कर्तृकयोः संन्यासकर्मयोगयोः निःश्रेयसकरत्वं तयोः तु कर्मसंन्यासात् कर्मयोगस्य विशिष्टत्वं उच्यते**—पण जर आत्मवेत्त्याकडून केल्या जाणाऱ्या संन्यास-कर्मयोगांना निःश्रेयसकरत्व व त्यांतील कर्मसंन्यासाहून कर्मयोगाला श्रेष्ठत्व सांगितलें जातें, असें म्हटलें तर काय होतें?—**यदि वा अनात्मवित्कर्तृकयोः संन्यासकर्मयोगयोः तत् उभयं उच्यते इति**—आणि जर अनात्मवेत्त्याकडून केल्या जाणाऱ्या संन्यास-कर्मयोगांना तें दोन्ही म्ह० निःश्रेयसकरत्व व कर्मयोगाचें श्रेष्ठत्व सांगितले जातें, असें म्हटले तर काय होतें ? [ 'संन्यास व कर्मयोग हे दोन्ही मोक्ष देणारे आहेत, पण त्यांतील कर्मयोग श्रेष्ठ आहे ' हे प्रतिवचन आहे; पण ज्ञानी पुरुषानें केलेला कर्मयोग व कर्मसंन्यास यांना मोक्षकरत्व व यांतील कर्मयोगाला श्रेष्ठत्व आहे कीं, अनात्मज्ञ पुरुषानें केलेल्या त्या दोहोंना मोक्षकरत्व व त्यांतील कर्मयोगाला श्रेष्ठत्व आहे ? या गोष्टींचा विचार केला पाहिजे; पण त्यातील पहिल्या पक्षीं कोणता दोष येतो व दुसऱ्या पक्षीं कोणतें फल आहे ? ]

**अत्रोच्यते, आत्मवित्कर्तृकयोः संन्यासकर्मयोगयोरसंभवात्तयोर्निःश्रेयसकरत्ववचनं तदीयाच्च कर्मसंन्यासात्कर्मयोगस्य विशिष्टत्वाभिधानमित्येतदुभयमनुपपन्नम् । यद्यनात्मविदः कर्मसंन्यासस्तत्प्रतिकूलश्च कर्मानुष्ठानलक्षणः कर्मयोगः संभवेतां तदा तयोर्निःश्रेयसकरत्वोक्तिः कर्मयोगस्य च कर्मसंन्यासाद्विशिष्टत्वाभिधानमित्येतदुभयमुपपद्यते, आत्मविदस्तु संन्यासकर्मयोगयोरसंभवात्तयोर्निःश्रेयसकरत्वाभिधानं कर्मसंन्यासाच्च कर्मयोगो विशिष्यत इति चानुपपन्नम् । अत्राऽऽह, किमात्मविदः संन्यासकर्मयोगयोरप्यसंभव आहोस्विदन्यतरस्यासंभवो यदा चान्यतरस्यासंभवस्तदा किं कर्मसंन्यासस्योत कर्मयोगस्येत्यसंभवे कारणं च वक्तव्यमिति ॥**

**भाष्यार्थ**—(वाद्यानें असें विचारलें असतां सिद्धान्ती पहिल्यापक्षीं दोष सांगतात)—**अत्र उच्यते**—या प्रश्नाचें उत्तर सांगितलें जातें.—**आत्मवित्कर्तृकयोः संन्यासकर्मयोगयोः असंभवात् तयोः निःश्रेयसकरत्ववचनं च तदीयात् कर्मसंन्यासात् कर्मयोगस्य विशिष्टत्व-अभिधानं इति एतत् उभयं अनुपपन्नं**—आत्मवित्कर्तृक संन्यास व कर्मयोग यांचा असंभव असल्यामुळें त्यांना निःश्रेयसकरत्व आहे, असें सांगणें व त्याच्या कर्मसंन्यासाहून कर्मयोगाला विशिष्टत्व आहे, असें सांगणें हें दोन्ही अनुपपन्न—अयोग्य आहे. ( तेंच अनुपपन्नत्व व्यतिरेकद्वारा व्यक्त करितात—)—**यदि अनात्मविदः कर्मसंन्यासः च तत्प्रतिकूलः कर्मानुष्ठानलक्षणः कर्मयोगः संभवेतां**—जर अनात्मवेत्त्याचा कर्मसंन्यास व त्याला प्रतिकूल असलेला कर्मानुष्ठानरूप कर्मयोग, हे दोन्ही संभवतील—**तदा तयोः निःश्रेयसकरत्वोक्तिः च कर्मयोगस्य कर्मसंन्यासात् विशिष्टत्वाभिधानं इति एतद् उभयं उपपद्यते**—तरच त्या दोहोंना चित्तशुद्धि-ज्ञानप्राप्ति या परंपरेनें निःश्रेयस-

करत्व आहे, असें म्हणणें व कर्मयोगाला कर्मसंन्यासाहून विशिष्टत्व आहे, हें सांगणें, हीं दोन्ही उपपन्न होतात. ( कारण संन्यासाला असहायत्व आहे व कर्मयोग चित्तशुद्धीच्या द्वारा ज्ञानाला कारण होतो, म्हणून कर्मयोगाला श्रेष्ठत्व आहे. असो; आत्मज्ञाला कर्मसंन्यास व कर्मयोग या दोहोंचाहि असंभव आहे, असे जे वर म्हटले आहे, त्यावर आक्षेप-)—**अत्र आह**—यावर आक्षेप घेणारा म्हणतो—**किं आत्मविदः संन्यासकर्मयोगयोः अपि असंभवः आहोस्वित् अन्यतरस्य असंभवः**—काय आत्मवेत्त्याला संन्यास व कर्मयोग या दोहोंचाहि असंभव आहे, की त्यांतील एकाचाच असंभव आहे?—**च यदा अन्यतरस्य असंभवः तदा किं कर्मसंन्यासस्य उत कर्मयोगस्य इति**—आणि जर त्यांतील एकाचाच असंभव असेल,तर मग काय कर्मसंन्यासाचा असंभव आहे कीं कर्मयोगाचा? ते सांगावे—**च असंभवे कारणं वक्तव्यं इति**—आणि त्याच्या असंभवाचें कारण सांगावें, असे आक्षेप घेणारा म्हणतो. [ सिद्धान्त्यांनीं आत्मज्ञानीं पुरुषाचा संन्यास व कर्मयोग या दोहींचा असंभव आहे, असें म्हणतांच त्यावर वादी विचारतो-ज्ञान्याचा संन्यास व कर्मयोग या दोन्हींचाहि असंभव आहे कीं एकट्याचाच? एकाचाच असंभव असल्यास तो कोणाचा? संन्यासाचा की कर्मयोगाचा? व त्याचे कारण काय? ]

**अत्रोच्यते, आत्मविदो निवृत्तमिथ्याज्ञानत्वाद्विपर्ययज्ञानमूलस्य कर्मयोगस्यासंभवः स्याज्जन्मादिसर्वविक्रियारहितत्वेन निष्क्रियमात्मानमात्मत्वेन यो वेत्ति तस्याऽऽत्मविदः सम्यग्दर्शनेनापास्तमिथ्याज्ञानस्य निष्क्रियात्मस्वरूपावस्थानलक्षणं सर्वकर्मसंन्यासमुक्त्वा तद्विपरीतस्य मिथ्याज्ञानमूलकर्तृत्वाभिमानपुरःसरस्य सक्रियात्मस्वरूपावस्थानरूपस्य कर्मयोगस्येह शास्त्रे तत्र तत्राऽऽत्मस्वरूपनिरूपणप्रदेशेषु सम्यग्ज्ञानमिथ्याज्ञानतत्कार्यविरोधादभावः प्रतिपाद्यते यस्मात्तस्मादात्मविदो निवृत्तमिथ्याज्ञानस्य विपर्ययज्ञानमूलः कर्मयोगो न संभवतीति युक्तमुक्तं स्यात्। केषु केषु पुनरात्मस्वरूपनिरूपणप्रदेशेष्वात्मविदः कर्माभावः प्रतिपाद्यत इति। अत्रोच्यते, अविनाशि तु तद्विद्धीति प्रकृत्य 'य एनं वेत्ति हन्तारम्' 'वेदाविनाशिनं नित्यम्' इत्यादौ तत्र तत्राऽऽत्मविदः कर्माभाव उच्यते॥**

**भाष्यार्थ—अत्र उच्यते**—या प्रश्नाचें उत्तर सिद्धान्ती सांगतात—**आत्मविदः निवृत्तमिथ्याज्ञानत्वात् विपर्ययज्ञानमूलस्य कर्मयोगस्य असंभवः स्यात्**—आत्मवेत्त्याचें मिथ्याज्ञान निवृत्त झालेले असल्यामुळें विपरीत ज्ञान हेंच ज्याचें मूळ आहे अशा कर्मयोगाचा असंभव होतो. ( याच संग्रहवाक्याचें विवरण-)—**जन्मादिसर्वविक्रियारहितत्वेन निष्क्रियं आत्मानं आत्मत्वेन यः वेत्ति**—आत्मा जन्मादि सर्व विकारांनीं रहित असल्यामुळें सर्व क्रियाशून्य-निष्क्रिय आत्म्याला आत्मत्वानें जो जाणतो-मीच सर्व क्रियाशून्य आत्मा आहें, असें साक्षात् पाहतो—**सम्यग्दर्शनेन अपास्तमिथ्याज्ञानस्य तस्य आत्मविदः निष्क्रियात्मस्वरूपावस्थानलक्षणं सर्वकर्मसंन्यासं उक्त्वा**—सम्यग्दर्शनानें-आत्मज्ञानानें ज्याचें 'मी

देह ' हें मिथ्याज्ञान पार गेलें आहे, अशा त्या आत्मवेत्त्याचा निष्क्रिय आत्मस्वरूपावस्थानरूप सर्वकर्मसंन्यास सांगून—**तद्विपरीतस्य मिथ्याज्ञानमूल-कर्तृत्वाभिमानपुरःसरस्य सक्रिय-आत्मस्वरूपावस्थानरूपस्य कर्मयोगस्य**—त्याच्या उलट असलेल्या मिथ्याज्ञानमूलक कर्तृत्वाभिमानपूर्वक सक्रिय आत्मस्वरूपावस्थानरूप कर्मयोगाचा—**यस्मात् इह शास्त्रे तत्र तत्र आत्मस्वरूपनिरूपणप्रदेशेषु सम्यग्ज्ञान-मिथ्याज्ञानतत्कार्यविरोधात् अभावः प्रतिपाद्यते**—ज्याअर्थी या शास्त्रांत जागोजागीं–आत्मस्वरूपाच्या निरूपणप्रदेशामध्यें सम्यग्ज्ञान-मिथ्याज्ञान व त्यांचीं कार्यें यांमध्यें विरोध असल्यामुळे अभाव प्रतिपादिला जातो—**तस्मात् निवृत्तमिथ्याज्ञानस्य आत्मविदः विपर्ययज्ञानमूलः कर्मयोगः न संभवति इति युक्तं उक्तं स्यात्**—त्याअर्थी ज्याचें मिथ्याज्ञान निवृत्त झालें आहे अशा आत्मवेत्त्याचा विपर्ययज्ञानमूलक कर्मयोग संभवत नाहीं, हें योग्यच सांगितलें आहे, असें होतें. [ आत्मज्ञान झालें म्हणजे ' हें शरीरच मी, कर्ता, भोक्ता, सुखी, दुःखी, संसारी ' इत्यादि मिथ्या अज्ञान निवृत्त होतें. त्यामुळें ' मी शरीरादिरूप आहे ' या मिथ्या अज्ञानामुळेंच होणारा जो कर्मयोग त्याचा ज्ञानी पुरुषाचे ठिकाणीं असंभव होतो. कारण आत्मा जन्मादि सर्व विकारांनीं रहित आहे, त्यामुळें तो निष्क्रिय आहे, सर्वक्रियारहित आहे, आणि असा जो निष्क्रिय आत्मा तोच मी आहें, असें जो जाणतो त्याचे त्याच सम्यग्दर्शनामुळें सर्व मिथ्या अज्ञान निवृत्त झालेलें असते. अशा ज्ञानी पुरुषाला निष्क्रिय आत्मस्वरूपावस्थानरूप सर्वकर्मसंन्यास सांगितलेला आहे. त्याचप्रमाणे असें आत्मज्ञान ज्याला झालेलें नाहीं, त्याला मिथ्याज्ञानामुळे ' मी कर्ता ' असा कर्तृत्वाभिमान होतो. त्या अभिमानामुळें सक्रिय-आत्मस्वरूपावस्थानरूप कर्मयोग त्यालाच विहित आहे. आत्मज्ञानी पुरुषाचे ठिकाणीं तसें मिथ्या अज्ञान नसतें. त्यामुळें त्याला कर्तृत्वाभिमान नसतो. कर्तृत्वाभिमानाच्या अभावी ज्ञानी पुरुषाचा कर्मयोगहि संभवत नाहीं. भगवानांनीं या गीताशास्त्रांत जेथें जेथें आत्मस्वरूपाचें निरूपण केलें आहे, तेथें तेथें ज्ञान व अज्ञान आणि त्यांचें कार्य यांचा विरोध असल्यामुळें ज्ञानी पुरुषाला कर्मांचा असंभव सांगितला आहे, व तो सर्वथा युक्त आहे. ] **केषु केषु पुनरात्मस्वरूपनिरूपणप्रदेशेषु आत्मविदः कर्माभावः प्रतिपाद्यते इति**—पण कोणकोणत्या आत्मस्वरूपनिरूपणप्रदेशामध्यें आत्मवेत्त्याच्या कर्मांचा अभाव प्रतिपादिलेला आहे, असें वादी विचारील तर—**अत्र उच्यते**—त्याचें उत्तर सांगतों.— **'अविनाशि तु तद्विद्धि' इति प्रकृत्य ' य एनं वेत्ति हन्तारं ' ' वेदाविनाशिनं नित्यं० ' इत्यादौ तत्र तत्र आत्मविदः कर्माभावः उक्तः**—' अविनाशी तु०' ( २-१७ ) असा उपक्रम करून ' य एनं वेत्ति०' ( २-१९ ) ' वेदाविनाशिनं०' ( २-२१ ) इत्यादि श्लोकांत ठिकठिकाणीं आत्मवेत्त्याच्या कर्मांचा अभाव सांगितला आहे.

**ननु च कर्मयोगोऽप्यात्मस्वरूपनिरूपणप्रदेशेषु तत्र तत्र प्रतिपाद्यत एव तद्यथा 'तस्माद्युध्यस्व भारत' 'स्वधर्ममपि चावेक्ष्य' 'कर्मण्येवाधिकारस्ते' इत्यादावतश्च कथमा-**

त्मविदः कर्मयोगस्यासंभवः स्यादिति अत्रोच्यते सम्यग्ज्ञानमिथ्याज्ञानतत्कार्यविरोधात् । 'ज्ञानयोगेन सांख्यानाम्' इत्यनेन सांख्यानामात्मतत्त्वविदामनात्मवित्कर्तृककर्मयोगनिष्ठातो निष्क्रियात्मस्वरूपावस्थानलक्षणाया ज्ञानयोगनिष्ठायाः पृथक्करणात् । कृतकृत्यत्वेनाऽऽत्मविदः प्रयोजनान्तराभावात् ' तस्य कार्यं न विद्यते ' इति कर्तव्यान्तराभाववचनाच्च ॥

**भाष्यार्थ**—( यावर कर्मयोगाविषयीं शंका- )—**ननु च आत्मस्वरूपनिरूपणप्रदेशेषु तत्र तत्र कर्मयोगः अपि प्रतिपाद्यते एव**—अहोपण, आत्मस्वरूपनिरूपण प्रदेशांमध्यें ठिकठिकाणीं कर्मयोगहि प्रतिपादिलेला आहेच.—**तत् यथा**—तो कोठें व कसा म्हणून विचाराल तर पहा—' **तस्माद्युध्यस्व भारत** ' ' **स्वधर्मं अपि चावेक्ष्य** ' ' **कर्मण्येवाधिकारस्ते०**' **इत्यादौ**—' म्हणून हे अर्जुना तूं युद्ध कर ' २-१८ ' स्वधर्माकडे पाहूनहि तुला असें युद्धापासून ढळणें योग्य नाहीं'. ३-३१' तुझा कर्मामध्येंच अधिकार आहे.' २.४७ इत्यादि प्रदेशीं कर्मयोगहि प्रतिपादिला आहे.—**अतः च आत्मविदः कर्मयोगस्य असंभवः कथं स्यात्**—तेव्हां आत्मवेत्त्याला कर्मयोगाचा असंभव कसा असेल? [आत्मस्वरूपाचें निरूपण चाललें असतांनाच जर कर्म करण्याविषयीं सांगितलें आहे,तर आत्मज्ञाला कर्मयोगाचा असंभव आहे,असें कसें म्हणतां येईल?]—**इति अत्र उच्यते**—या आक्षेपाचें समाधान सांगतों—**सम्यग्ज्ञानमिथ्याज्ञानतत्कार्यविरोधात्**—सम्यग्ज्ञान व मिथ्याज्ञान यांचा व त्यांच्या कार्यांचा विरोध आहे, त्यामुळें.[आत्मस्वरूपाचें निरूपण चालले असतां ज्ञानाचा उपाय या नात्यानें कर्मांचा उल्लेख जरी केलेला असला,तरी ज्ञानानंतर न्यायाच्या विरुद्ध कर्मांची कल्पना करतां येत नाहीं. आत्म्याच्या यथार्थस्वरूपाचे ज्ञान व ' देहच मी ' हें विपरीत अज्ञान यांचा विरोध आहे. त्याचप्रमाणें ' देहच मी ' या भ्रमाची निवृत्ति हे ज्ञानाचे कार्य व तसा भ्रम होणें हे अज्ञानाचें कार्य यांमध्येंहि विरोध आहे. त्यामुळें आत्मज्ञानानंतर कर्तृत्वादिभ्रममूलक कर्म संभवत नाहीं. आत्मज्ञानी पुरुषाचें कर्म संभवत नाहीं, याविषयीं आणखी एक कारण-]—' **ज्ञानयोगेन सांख्यानां** ' **इति अनेन सांख्यानां आत्मतत्त्वविदां अनात्मवित्कर्तृककर्मयोगनिष्ठातः निष्क्रिय-आत्मस्वरूपावस्थानलक्षणायाः ज्ञानयोगनिष्ठायाः पृथक्करणात्**—' ज्ञानयोगेन सांख्यानां ' ३-३ या वचनानें सांख्यांच्या म्ह० आत्मतत्त्ववेत्त्यांच्या अनात्मवेत्त्यांकडून होणाऱ्या कर्मयोगनिष्ठेहून निष्क्रिय आत्मस्वरूपावस्थानरूप ज्ञानयोगनिष्ठेला पृथक् केलें आहे. [ म्ह० आत्मतत्त्वज्ञ सांख्यांची ज्ञानयोगनिष्ठा अनात्मज्ञांच्या कर्मनिष्ठेहून अगदीं पृथक् दाखविली आहे. त्यावरून ज्ञानी पुरुषाचे ठिकाणीं कर्मयोग संभवत नाहीं, हें उघड होतें. ज्ञानोत्तर कर्मयोग संभवत नाहीं, याविषयीं आणखी एक कारण-]—**आत्मविदः कृतकृत्यत्वेन प्रयोजनान्तराभावात्**—आत्मवेत्ता कृतकृत्य झालेला असल्यामुळें दुसऱ्या प्रयोजनाचा अभाव असतो, त्यामुळें त्याला कर्मयोग नाहीं. ( ज्ञानी पुरुषाला कर्म नाहीं, याविषयीं आणखी एक कारण- )—**च ' तस्य कार्यं न विद्यते' इति**

**कर्तव्यान्तराभाववचनात्**—आणि 'त्याचें कर्तव्य उरत नाहीं' अ. ३-१७ या वचनानें त्याच्या दुसऱ्या कर्तव्याचा अभाव सांगितलेला आहे. [ आत्मज्ञानी कृतकृत्य झालेला असतो, त्यामुळे त्याला कर्मानें दुसरें कोणतेंच प्रयोजन साधावयाचें नसतें. त्याचप्रमाणें 'त्याला दुसरें कोणतेंच कर्तव्य उरत नाहीं,' असेंहि स्वतः भगवानांनींच तिसऱ्या अध्यायांत सांगितलें आहे. त्यामुळें ज्ञानी पुरुषाचा कर्मयोग संभवत नाहीं. ]

**' न कर्मणामनारम्भात् ' ' संन्यासस्तु महाबाहो दुःखमाप्तुमयोगतः ' इत्यादिना चाऽऽत्मज्ञानाङ्गत्वेन कर्मयोगस्य विधानात्, 'योगारूढस्य तस्यैव शमः कारणमुच्यते' इत्यनेन चोत्पन्नसम्यग्दर्शनस्य कर्मयोगाभाववचनात्। 'शारीरं केवलं कर्म कुर्वन्नाऽऽप्नोति किल्बिषम्' इति च शरीरस्थितिकारणातिरिक्तस्य कर्मणो निवारणात् 'नैव किंचित्करोमीति युक्तो मन्येत तत्त्ववित्' इत्यनेन च शरीरस्थितिमात्रप्रयुक्तेष्वपि दर्शनश्रवणादिकर्मस्वात्मयाथात्म्यविदः करोमीति प्रत्ययस्य समाहितचेतस्तया सदाऽकर्तव्यत्वोपदेशादात्मतत्त्वविदः सम्यग्दर्शनविरुद्धो मिथ्याज्ञानहेतुकः कर्मयोगः स्वप्नेऽपि न संभावयितुं शक्यते यस्मात्तस्मादनात्मवित्कर्तृकयोरेव संन्यासकर्मयोगयोर्निःश्रेयसकरत्ववचनं तदीयाच्च कर्मसंन्यासात्पूर्वोक्तात्मवित्कर्तृकसर्वकर्मसंन्यासविलक्षणात्सत्येव कर्तृत्वविज्ञाने कर्मैकदेशविषयाद्यमनियमादिसहितत्वेन च दुरनुष्ठेयत्वात्सुकरत्वेन च कर्मयोगस्य विशिष्टत्वाभिधानमित्येवं प्रतिवचनवाक्यार्थनिरूपणेनापि पूर्वोक्तः प्रष्टुरभिप्रायो निश्चीयत इति स्थितम् ॥**

**भाष्यार्थ**—[तर मग ज्ञानी पुरुषाला कर्मयोग जसा त्याज्य आहे तसाच तो जिज्ञासूलाहि त्याज्यच असला पाहिजे. कारण ज्ञानप्राप्तीनें त्याच्याहि पुरुषार्थाची सिद्धि होते, अशी आशंका घेऊन जिज्ञासूला कर्मयोगाची अपेक्षा आहे, असें सांगतात–]—**' न कर्मणामनारम्भात् ' ' संन्यासस्तु महाबाहो दुःखमाप्तुमयोगतः' इत्यादिना च आत्मज्ञानाङ्गत्वेन कर्मयोगस्य विधानात्**—'कर्माचा आरंभ केल्यावांचून नैष्कर्म्यप्राप्ति होत नाही.' अ. ३-४ 'हे महाबाहो योगावांचून संन्यास प्राप्त होणें फार कठिण आहे;' ५.६ इत्यादि वचनांनीं आत्मज्ञानाच्या अंगत्वानें कर्मयोगाचें विधान केलें आहे. त्यामुळें जिज्ञासूला कर्मयोगाचा आश्रय केला पाहिजे. [ अंगीच्या स्वरूपावर उपकार करणाऱ्या अंगावांचून अंगीच्या स्वरूपाची निष्पत्ति होणे अशक्य असल्यामुळें जिज्ञासूनें चित्तशुद्धि, ज्ञानप्राप्ति यांच्या द्वारा ज्ञानाचें कारण होणाऱ्या कर्मयोगाचा आश्रय करणें उचित आहे. येथें अंगी ज्ञान असून अंग कर्म आहे. कर्मावांचून ज्ञानाचें स्वरूपच सिद्ध होत नाहीं. म्हणून ज्ञानासाठीं जिज्ञासूला कर्मयोगाचा आश्रय करणें उचित आहे. तर मग ज्ञानीपुरुषानेंहि ज्ञानफलावर उपकार करणाऱ्या कर्माचें अनुष्ठान करण्यास कोणती हरकत आहे ? उत्तर–]—**च 'योगारूढस्य तस्यैव शमः कारणमुच्यते'**—६-४ आणि योगारूढ झालेल्या त्यालाच पुढें शम-कर्मसंन्यास करावयास सांगितलेला आहे.—**इति अनेन उत्पन्नसम्यग्दर्शनस्य कर्मयोगाभाववचनात्**—अशा या वचनानें ज्याला आत्मज्ञान झालें आहे, त्याला कर्मयोगाचा अभाव सांगितलेला आहे. [ अहोपण,

तत्त्वज्ञानी पुरुषाला जर कर्माचा अभाव मानला तर त्याच्या शरीरस्थितलि अवश्य असलेल्या कर्माचाहि अभाव होणार त्यामुळें त्याची शरीरस्थितिहि होणें शक्य नाहीं. शरीरच नाहींसें झाल्यावर जीवन्मुक्ति कोठची? जीवन्मुक्तीच्या अभावीं ज्ञानाचा उपदेश कोण करणार व उपदेशाच्या अभावी जिज्ञासूंना ज्ञान कसें होणार? अशी आशंका घेऊन सांगतात-)—**'शारीरं केवलं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषं' इति च शरीरस्थितिकारणातिरिक्तस्य कर्मणः निवारणात्**—'शारीरं केवलं०' अ. ४ श्लो. २१ पृ. ४१६, या वचनानें शरीराच्या स्थितीला कारण होणाऱ्या कर्माहून बाकीच्या सर्व कर्मांचें निवारण केलें आहे. त्यामुळें विद्वानाला कर्मयोग नाहीं. [ अहोपण, ज्ञानी पुरुषाला 'शरीरस्थितीला अवश्य तेवढेंच कर्म' करण्याची सवड दिल्यास त्यासाठीं अवश्य होणाऱ्या दर्शन-श्रवणादि कर्मांविषयीं त्याच्या मनांत कर्तृत्वाभिमान उत्पन्न होईल, अशी आशंका घेऊन सांगतात-]—**नैव किंचित्करोमीति युक्तो मन्येत तत्त्ववित्' इति अनेन च**—आणि 'मी कांहीं करीत नाहीं.' असे योगी तत्त्वज्ञानें मानावें. ५.८-अशा या वचनानें—**शरीरस्थितिमात्रप्रयुक्तेषु अपि दर्शन-श्रवणादिकर्मसु आत्मयाथात्म्यविदः करोमि इति प्रत्ययस्य समाहितचेतस्तया सदा अकर्तव्यत्व-उपदेशात्**—केवल शरीरस्थितीसाठीं अवश्य असलेल्या अशाहि दर्शन-श्रवणादि कर्मामध्यें आत्मयाथात्म्य जाणणाऱ्या ज्ञानी पुरुषाला, चित्त समाहित असल्यामुळे, 'मी करतो' हा प्रत्यय केंव्हांच करूं नये, असा उपदेश केला आहे. [म्ह० शरीरस्थितीला अत्यंत अवश्य अशा पाहणें, ऐकणें, इत्यादि क्रिया करीत असतांनाहि 'त्या मी करतो' असा कर्तृत्वाभिमान तत्त्ववेत्त्याने केंव्हांहि करूं नये, तर चित्त समाहित असल्यामुळे त्याने 'मी त्यांतील कांहींच करीत नाहीं' असे सतत समजावें, असें याच अध्यायांत पुढें सांगितलें आहे. त्यामुळें शरीरस्थितीला अवश्य प्राप्त झालेल्या दर्शनादि क्रियामध्यें त्याचा कर्तृत्वाभिमान संभवत नाहीं. अहोपण या उपदेशाचें अनुसंधान सुटलें म्हणजे विद्वानाचाहि 'मी करतो' या स्वाभाविक प्रत्ययाच्या द्वारा कर्मयोग संभवेल, अशी आशंका घेऊन सांगतात-]—**आत्मतत्त्वविदः सम्यग्दर्शनविरुद्धः मिथ्याज्ञानहेतुकः कर्मयोगः स्वप्ने अपि यस्मात् संभावयितुं न शक्यते**—आत्मतत्त्ववेत्त्याचा सम्यग्दर्शनाच्या विरुद्ध असलेला मिथ्याज्ञानमूलक कर्मयोग स्वप्नांतहि ज्याअर्थी संभवनीय आहे असे म्हणतां येत नाहीं—**तस्मात् अनात्मवित्कर्तृकयोः एव संन्यासकर्मयोगयोः निःश्रेयसकरत्ववचनं**—त्याअर्थी अनात्मज्ञ पुरुषाकडून केल्या जाणाऱ्याच संन्यासाला व कर्मयोगाला निःश्रेयसकरत्ववचन म्ह० दोघांनाहि निःश्रेयसकर म्हणणें—**च तदीयात् कर्मसंन्यासात् कर्मयोगस्य विशिष्टत्वाभिधानं**—व त्या अनात्मज्ञाच्या कर्मसंन्यासाहून कर्मयोगाचें श्रेष्ठत्व कथन करणें—**इत्येवं प्रतिवचनवाक्यार्थनिरूपणेन अपि**—अशाप्रकारच्या प्रतिवचनवाक्यार्थाचें निरूपण केल्यानेंहि—**प्रष्टुः पूर्वोक्तः अभिप्रायः निश्चीयते इति स्थितं**—प्रश्न करणाऱ्या अर्जुनाचा वर सांगितलेलाच आशय आहे, असा नि·

श्रय केला जातो, हें सिद्ध झालें. ( अनात्मज्ञाच्या कर्मसंन्यासाला कांहीं विशेषणें देतात-) —**पूर्वोक्तआत्मवित्कर्तृकसर्वकर्मसंन्यासविलक्षणात्**—पूर्वोक्त आत्मज्ञानें केलेल्या सर्वकर्मसंन्यासाहून विलक्षण असलेल्या त्या अज्ञकृत कर्मसंन्यासाहून तसेंच—**कर्तृत्वविज्ञाने सति एव कर्म-एकदेशविषयात्**—तो अज्ञकृत संन्यास 'मी या संन्यासाचा कर्ता आहें' असें कर्तृत्वविज्ञान असतांना कर्मांच्या एकदेशाला विषय करणारा असतो. अर्थात् ज्ञानी पुरुषाचा संन्यास सर्वकर्मविषयक असतो व अनात्मज्ञाचा संन्यास अग्निहोत्रादि कांहीं कर्मांचाच असतो. अशा त्या एकदेशी कर्मसंन्यासाहून—**च यमनियमादिसहितत्वेन दुरनुष्ठेयत्वात्**—आणि तो अज्ञकृत संन्यास यम-नियमादिकांसहवर्तमान असल्यामुळें अनुष्ठान करण्यास कठिण असतो, म्हणून—**कर्मयोगस्य सुकरत्वेन**—आणि त्यापेक्षां कर्मयोगाला सुकरत्व असतें. म्हणून अशा अज्ञकृत संन्यासाहून अज्ञकृत कर्मयोग विशिष्ट-श्रेष्ठ आहे असे कथन करणें, यावरून अर्जुनाचा पूर्वोक्त आशय निश्चित होतो. [ गीतेंतीलच 'न कर्मणां॰' इत्यादि वचनांनीं कर्मयोगाचें ज्ञानाच्या अंगत्वानें विधान आहे, म्ह॰ कर्मयोग ज्ञानाचें अंग आहे, असें विधान आहे. 'योगारूढस्य तस्यैव॰' या वाक्यानें ज्याला सम्यग्दर्शन झालें आहे, त्याला कर्मयोगाचा अभाव सांगितला आहे. 'शारीरं केवलं॰' या वचनानें ज्ञानी पुरुषाच्या शरीरस्थितीला कारण होणाऱ्या कर्मांवांचून बाकीच्या सर्व कर्मांचें निवारण केलें आहे. 'नैव किंचित्॰' या वचनानें केवल शरीरस्थितीसाठींच अवश्य होणाऱ्या-पाहणें, ऐकणें, इत्यादि कर्मांमध्येंहि शांतचित्त आत्मतत्त्वज्ञानें 'ही मी करतों' असा अभिमान कधींच धरूं नये, असा उपदेश केला आहे. त्यामुळे आत्मज्ञाचा कर्मयोग स्वप्नांतहि संभवत नाहीं. कारण तो सम्यग्दर्शनाच्या विरुद्ध आहे व मिथ्या अज्ञानामुळेंच संभवणारा आहे. आत्मवेत्त्यामध्ये सम्यग्ज्ञान असतें व मिथ्या अज्ञान नसतें. त्यामुळें त्याचे ठिकाणीं स्वप्नांतहि कर्मयोगाची संभावना नाहीं. यास्तव भगवानांनी अनात्मवेत्त्याकडून होणारा कर्मयोग व कर्मसंन्यास यांनाच निश्रेयसकर म्हटलें आहे. तसेंच वर सांगितलेल्या आत्मज्ञाच्या सर्वकर्मसंन्यासाहून विलक्षण असलेल्या, 'मी कर्ता' हें विज्ञान असतांनाच कर्मांच्या एकदेशाच्या-अग्निहोत्रादि कांहीं कर्मांच्या व यम-नियमादिकांनी युक्त असल्यामुळें आचरण्यास अतिशय कठिण अशा अज्ञकृत संन्यासाहून कर्मयोग श्रेष्ठ आहे, कारण तो संन्यासाहून सुकर आहे, असे सांगितलें आहे. भगवानांच्या या प्रतिवचनाचा विचार केला असतांहि अर्जुनाचा आम्हीं वर जसा सांगितला आहे, तसाच आशय निश्चित होतो. अर्थात् अर्जुनानें जो प्रश्न केला आहे, तो अयोग्य नाहीं, ही गोष्ट यावरून सिद्ध होते. ]

---

१ पण याविषयीं रहस्यकार म्हणतात-"चवथ्या अध्यायांतील सिद्धान्तावर संन्यासमार्गीय लोकांची जी शंका येण्याचा संभव आहे, तीच अर्जुनाचे मुखांतून प्रश्नरूपानें वदवून तिचें स्पष्ट उत्तर भगवानांनी या अध्यायांत दिलें आहे." गी. र. पृ. ६८४. तर मग मकूण अर्जुनानें जो पुढें प्रश्न केला आहे, ती चवथ्या अध्यायांतील सिद्धान्तावर संन्यास-

मार्गीयांकडून येणारी शंका आहे ' व तीहि त्याच्या तोंडून मुद्दाम वदविली आहे. पण ही शंका अर्जुनाकडून श्रीकृष्णांनी वदविली की व्यासांनी ? कोणी का वदविली असेना ? आपण ती कशी काय वदविली आहे, तें तर पाहूं या-" ज्ञान हे सर्व कर्मांचें पर्यवसान असून ( ४-३३ ) ज्ञानानेंच जर सर्व कर्में भस्म होतात ( ४.३७ ), व द्रव्यमय यज्ञापेक्षां ज्ञानयज्ञच जर श्रेष्ठ ( ४-३३ ) तर दुसऱ्याच अध्यायात ' धर्म्य ' असें जें युद्ध तेंच करणें क्षत्रियाला श्रेयस्कर होय, ( २-३१ ) असें सांगून ' म्हणून तूं कर्मयोगाचा आश्रय करून युद्धाला ऊठ ' ४-४२ असा चवथ्या अध्यायाचा उपसंहार कां केला ? " (गी. र. ६८४) ही संन्यासमार्गीयांची शंका अर्जुनाच्या तोंडून श्रीकृष्णानीं किंवा व्यासांनी वदविली आहे. पण ' क्षत्रियाला धर्म्ययुद्धच करणें श्रेयस्कर आहे,' असें जे दुसऱ्या अध्यायांत सांगितलें आहे त्याचाच जर ' योग आतिष्ठ उत्तिष्ठ भारत ' ४-४२ याच्याशी संबंध आहे तर संन्यासमार्गीयांना तशी शंका येण्याचें कारणच नाहीं. कारण क्षत्रियानें संन्यास करावा, असे कोणी संन्यासमार्गी म्हणत नाहीं. उलट ' ज्ञानानंतर कर्मसंन्यास जरी प्राप्त असला तरी त्यानें तो करू नये. तर ' गुणा गुणेषु वर्तन्ते ' या न्यायानें कर्मच करीत रहावे. कारण त्याचे तसले शास्त्रीय कर्म व खाणें, पिणे इत्यादि स्वाभाविक कर्म यात कांहीं फरक नाहीं. म्हणूनच तें कर्म नसून कर्माभास आहे. ' असें संन्यासमार्गी उघड उघड म्हणत असतात. ( गी. भा. पृ. ५५-५८ पहा ) तेव्हां संन्यासमार्गीयांची ही शंका आहे, असें कसें म्हणता येईल ? अर्थात् रहस्यकारांनी संन्यासमार्गीयावर ती जबरदस्तीनें लादली आहे, यांत संशय नाहीं.

पुढें रहस्यकार म्हणतात-" गीतेचें या प्रश्नास असें उत्तर आहे कीं, सर्व संशय दूर होऊन मोक्ष मिळण्याकरितां ज्ञान आणि मोक्षाकरिता नको असली तरी कधी न सुटणारीं असल्यामुळे लोकसंग्रहार्थ कर्में मिळून दोहोंच्याहि समुच्चयाची नित्य अपेक्षा आहे. " ( ४-४१ ) हें गीतेचें उत्तर नसून रहस्यकारांचे आहे. चवथ्या अध्यायाच्या एकेचाळीसाव्या श्लोकांत तसें कांहीं सांगितलेलें नाहीं. (गी. भा. पृ. ४६५पहा) कर्मयोग म्ह० श्रौत-स्मार्त कर्में, ती अज्ञानी मनुष्यहि जर टाकूं शकतो, तर ज्ञानी का टाकूं शकणार नाहीं ? खाणें, पिणें, निजणे, हीं स्वाभाविक कर्में देह असेपर्यंत टाकतां येणार नाहींत, पण तशीच श्रौत-स्मार्त कर्मेंहि टाकता येणार नाहींत, असे मुळींच नाहीं. त्यामुळे तीं न सुटणारी नव्हेत. ज्याला लोकसंग्रहाची इच्छा असेल ( चिकीर्षुर्लोकसंग्रह ) त्यानें कर्तृत्वाभिमानादि टाकून कर्में करावीं, असें तिसऱ्या अध्यायांत जरी म्हटलें आहे, तरी त्याचा ४-४१ या श्लोकाशी कांहीं संबंध नाहीं. त्यांत ' ज्ञानी पुरुषाला कर्में बद्ध करीत नाहींत ' एवढेंच सांगितलें आहे. यावरून रहस्यकार गीतेचें म्हणून जें उत्तर सांगतात, तें गीतेचे नसून त्यांचे आहे, हें वाचकांच्या लक्षात येईल.

पुनः रहस्यकार म्हणतात-" परंतु यावरहि अशी शंका निघते कीं, कर्मयोग व सांख्य ( ज्ञान ? ) असे दोन्ही मार्ग जर शास्त्रांत विहित आहेत, तर त्यांपैकीं आपल्या रुचीप्रमाणें सांख्य मार्ग पत्करून कर्मांचा त्याग करण्यास हरकत कोणती ? " पण अशी शंका कोण काढतात ? संन्यासमार्गी म्ह० अद्वैती अशी शंका केव्हांच काढणार नाहींत. कारण ते कर्मयोग व सांख्य (ज्ञानयोग) हे मोक्षाचे दोन स्वतंत्र मार्ग आहेत, असें मानीतच नाहींत. तर

**'ज्यायसी चेत्कर्मणस्ते' इत्यत्र ज्ञानकर्मणोः सहासंभवे यच्छ्रेय एतयोस्तन्मे ब्रूहीत्येवं पृष्टोऽर्जुनेन भगवान्सांख्यानां संन्यासिनां ज्ञानयोगेन निष्ठा पुनः कर्मयोगेन योगिनां निष्ठा प्रोक्तेति निर्णयं चकार । न च संन्यसनादेव केवलात्सिद्धिं समधिगच्छतीति वचनाज्ज्ञानसहितस्य सिद्धिसाधनत्वमिष्टं कर्मयोगस्य च विधानात् । ज्ञानरहितः संन्यासः श्रेयान्किं वा कर्मयोगः श्रेयानित्येतयोर्विशेषबुभुत्सया—**

**भाष्यार्थ**—( 'अहोपण, तिसऱ्या अध्यायांत या प्रश्नाचा भगवानांनी निर्णय केलेला असल्यामुळें येथें पुनः तोच प्रश्न करणें, योग्य नव्हे, ' अशी शंका घेऊन ' तेथें विस्ताराने सांगितलेला संबंधच येथे पुनः संक्षेपतः सागत आहेत,' असे म्हणून समाधान कारितात-)—**'ज्यायसी चेत् कर्मणस्ते०' इत्यत्र ज्ञानकर्मणोः सहासंभवे**—' ज्यायसी०' ३-१ या वचनांत ज्ञान व कर्म यांचा एकाचवेळीं असंभव असल्यामुळें—**एतयोः यच्छ्रेयः तत् मे ब्रूहि इत्येवं अर्जुनेन पृष्टः भगवान्**— ' ज्ञान व कर्म या दोहोंतील जे एक श्रेयस्कर असेल ते मला सांग ' अशाप्रकारे अर्जुनाकडून प्रश्न केला गेलेला भगवान्—**सांख्यानां-संन्यासिनां ज्ञानयोगेन निष्ठा पुनः योगिनां कर्मयोगेन निष्ठा प्रोक्ता इति निर्णयं चकार**—सांख्यांची म्ह० ज्ञानी संन्याद्याची ज्ञानयोगाने निष्ठा व योग्यांची म्ह० अज्ञ गृहस्थांची कर्मयोगाने निष्ठा सांगितली, असा निर्णय करता झाला. [ भगवानांनी तेथे ज्ञान व योग यांचे अधिकारी भिन्न भिन्न आहेत असा निर्णय केला आहे. त्यामुळे पुन. त्याविषयाच प्रश्न संभवत नाही. तसेच ]—**' न च संन्यसनात् एव केवलात् सिद्धिं समधिगच्छति ' इति वचनात्**—नुस्त्या संन्यासानेच काही सिद्धि प्राप्त होत नाही, असे सांगितलेले असल्यामुळे—**ज्ञानसहितस्य सिद्धिसाधनत्वं इष्टं**—ज्ञानसहित संन्यासाला नैष्कर्म्यसिद्धीचें साधनत्व भगवानांना इष्ट आहे, [ ' संन्यसनात् एव ' येथील 'एव-' शब्दावरून केवल म्ह० ज्ञानरहित संन्यासाने नैष्कर्म्यसिद्धि जरी मिळत नाही, तरी ज्ञानसहित संन्यासाने ती मिळते, असे भगवानांचें मत उघड दिसतें. ]—**कर्मयोगस्य च विधानात्**—तसेंच ' छित्त्वैनं संशयं योगं आतिष्ठ-' ४-४२ या वचनानें कर्मयोगाचें विधान केलेलें असल्यामुळें कर्मयोगहि सिद्धीचें साधन आहे, हें भगवानांना इष्ट आहे. (अर्थात् या गोष्टीचा निर्णय झालेला असल्यामुळें त्याविषयी प्रश्नच उपपन्न होत नाहीं. तर

---

कर्मयोग अंग व ज्ञानयोग अंगी म्ह० कर्म साधन व ज्ञान साध्य असें मानतात. शिवाय त्यांतील कोणताहि मार्ग कोणाच्याच खुषीवर अवलंबून नाही. प्रत्येकाच्या अधिकारावर अवलंबून आहे. कर्माधिकारी पुरुषांनी कर्मानुष्ठानच केले पाहिजे व ज्ञानाधिकाऱ्यांनीच ज्ञाननिष्ठ झाले पाहिजे. कर्मानुष्ठानानें ज्ञानाधिकार प्राप्त झाल्यावांचून सांख्य बनतां येत नाही, हा अबाधित वेदिक सिद्धान्त आहे. त्यामुळें ' आपल्या खुषीप्रमाणें सांख्यमार्ग पत्करून ' वगैरे ही शंका अवैदिक आहे. अर्थात् रहस्यकारांनी लावलेली ही पूर्वोत्तरसंगति शास्त्रशुद्ध नाहीं. आचार्यांनी लावलेली संगतीच सर्व प्रकारें समजस आहे.

मग अर्जुनाचा प्रश्न कोणत्या अभिप्रायानें आहे, तें अधिक स्पष्ट करितात-)—**ज्ञानरहितः संन्यासः श्रेयान् किं वा कर्मयोगः श्रेयान् इति एतयोः विशेषबुभुत्सया**—ज्ञानरहित संन्यास श्रेष्ठ आहे कीं, कर्मयोग श्रेष्ठ आहे, असा या दोन उपायांतील विशेष जाणण्याच्या इच्छेनें 'संन्यासं०' इत्यादि श्लोकानें अर्जुन म्हणाला—

**अर्जुन उवाच**—अर्जुन म्हणाला—

**संन्यासं कर्मणां कृष्ण पुनर्योगं च शंससि ।**
**यच्छ्रेय एतयोरेकं तन्मे ब्रूहि सुनिश्चितम् ॥ १ ॥**

**अन्वयार्थ—हे कृष्ण**—हे कृष्णा!—**कर्मणां संन्यासं**—कर्मांचा संन्यास (एकदा सांगतोस)—**च पुनः**—आणि पुनरपि—**कर्मणां योगं**—शास्त्रोक्त कर्मांचें अनुष्ठान करावयास—**शंससि**—सांगतोस (यास्तव)—**एतयोः**—या दोहोंतील—**यत् एकं**—जें एक—**श्रेयः**—अधिक प्रशस्य श्रेयःसाधन असेल—**तत्**—तें—**मे**—मला—**सुनिश्चितं**—अगदीं निश्चयानें—**ब्रूहि**—सांग. १

**संन्यासं परित्यागं कर्मणां शास्त्रीयाणामनुष्ठानविशेषाणां शंससि कथयसीत्येतत्। पुनर्योगं च तेषामेवानुष्ठानमवश्यकर्तव्यत्वं शंसस्यतो मे कतरच्छ्रेय इति संशयः किं कर्मानुष्ठानं श्रेयः किंवा तद्धानमिति प्रशस्यतरं चानुष्ठेयमतश्च यच्छ्रेयः प्रशस्यतरमेतयोः कर्मसंन्यासकर्मानुष्ठानयोर्यदनुष्ठानाच्छ्रेयोऽवाप्तिर्मम स्यादिति मन्यसे तदेकमन्यतरत्सहैकपुरुषानुष्ठेयत्वासंभवान्मे ब्रूहि सुनिश्चितमभिप्रेतं तवेति ॥ १ ॥**

**भाष्यार्थ**—(याप्रमाणे प्रश्न करणाऱ्या अर्जुनाचा आशय प्रदर्शित करून व प्रश्नाची उपपत्ति सांगून प्रश्न उत्थापित करितात-)—**कर्मणां-शास्त्रीयाणां अनुष्ठानविशेषाणां संन्यासं-परित्यागं शंससि-कथयसि इति एतत्**—कर्मांचा-शास्त्रीय विशेष अनुष्ठानाचा संन्यास म्ह० परित्याग सांगतोस, शास्त्रीय कर्मांचा संन्यास करण्याचा उपदेश करितोस, असा याचा भावार्थ.—**च पुनः योगं तेषां एव अनुष्ठानं-अवश्यकर्तव्यत्वं शंससि**—आणि पुनरपि योग म्ह० त्या कर्मांचेच अनुष्ठान-अवश्यकर्तव्यत्व सांगतोस—**अतः मे कतरत् श्रेयः इति संशयः**—त्यामुळें मला त्यांतील कोणतें एक श्रेयस्कर आहे, असा संशय येतो.—**किं कर्मानुष्ठानं श्रेयः किंवा तद्धानं इति**—काय, मला कर्मानुष्ठान श्रेयस्कर आहे की, त्याचा त्याग श्रेयस्कर आहे, असा संशय येतो.—**च प्रशस्यतरं अनुष्ठेयं**—आणि त्या दोन साधनांत जें अधिक प्रशंसनीय असेल त्याचें अनुष्ठान करणें उचित होय.—**अतः च एतयोः कर्मसंन्यास-कर्मानुष्ठानयोः यत् श्रेयः-प्रशस्यतरं**—म्हणून कर्मसंन्यास व कर्मानुष्ठान यांतील जें श्रेय-अधिक प्रशंसनीय असेल—**यदनुष्ठानात् मम श्रेयोऽवाप्तिः स्यात् इति मन्यसे**—ज्याच्या अनुष्ठानानें मला मोक्षप्राप्ति होईल, असें तूं समजतोस—**तत् एकं-अन्यतरत् सह-एकपुरुषानुष्ठेयत्वासंभवात्**

—तें एक—त्या दोहोंतील एक, कारण एकाचवेळीं एका पुरुषाला त्या दोहोंचें अनुष्ठान करतां येणें शक्य नाहीं, म्हणून त्यांतील कोणतें तरी एक—**सुनिश्चितं तव अभिप्रेतं मे ब्रूहि इति**—सुनिश्चित म्ह० तुला इष्ट असलेलें (एक) मला सांग, असें अर्जुन म्हणाला. [ भगवाना ! तूं कर्मांचा संन्यासहि सांगतोस व कर्मांचें अनुष्ठानहि सांगतोस. पण त्यांचा परस्पर विरोध असल्यामुळें एकाचवेळीं त्यांचें अनुष्ठान करतां येणें शक्य नाहीं. यास्तव त्यांतील जें एक तुला अत्यंत श्रेयस्कर वाटत असेल, तेंच तूं मला सांग. ] १.

**श्रीभगवानुवाच**—श्रीकृष्ण म्हणाले—

**संन्यासः कर्मयोगश्च निःश्रेयसकरावुभौ ।**
**तयोस्तु कर्मसंन्यासात्कर्मयोगो विशिष्यते ॥ २ ॥**

**अन्वयार्थ**—**संन्यासः**—अज्ञ मुमुक्षूनें केलेला कर्मांचा परित्याग—**च**—व त्यानें केलेलें—**कर्मयोगः**—कर्मानुष्ठान—**उभौ**—हीं दोन्ही साधनें—**निःश्रेयसकरौ**—मोक्ष देणारीं आहेत.—**तु**—परंतु—**तयोः**—त्या दोन साधनांतील—**कर्मसंन्यासात्**—अनात्मज्ञाच्या कर्मत्यागाहून—**कर्मयोगः**—त्याचें कर्मानुष्ठान—**विशिष्यते**—अधिक चांगलें आहे. २

**स्वाभिप्रायमाचक्षाणो निर्णयाय श्रीभगवानुवाच-संन्यासः कर्मणां परित्यागः कर्मयोगश्च तेषामनुष्ठानं तावुभावपि निःश्रेयसकरौ निःश्रेयसं मोक्षं कुर्वाते ज्ञानोपपत्तिहेतुत्वेनोभौ यद्यपि निःश्रेयसकरौ तथाऽपि तयोस्तु निःश्रेयसहेत्वोः कर्मसंन्यासात्केवलात्कर्मयोगो विशिष्यत इति कर्मयोगं स्तौति ॥ २ ॥**

**भाष्यार्थ**—**निर्णयाय स्वाभिप्रायं आचक्षाणः श्रीभगवान् ' संन्यासः० ' इति उवाच**—अर्जुनाच्या प्रश्नाचा निर्णय करण्यासाठीं आपला अभिप्राय सांगणारे श्रीभगवान् ' संन्यासः० ' या श्लोकानें म्हणाले—**संन्यासः कर्मणां परित्यागः च कर्मयोगः तेषां एव अनुष्ठानं**—संन्यास म्ह० कर्मांचा परित्याग व कर्मयोग म्ह० त्या कर्मांचेंच अनुष्ठान—**तौ उभौ अपि निःश्रेयसकरौ-निःश्रेयसं-मोक्षं कुर्वाते**—ते दोन्ही निःश्रेयसकर-निःश्रेयस-मोक्ष करितात म्हणून निःश्रेयसकर आहेत.—**यद्यपि उभौ ज्ञानोत्पत्तिहेतुत्वेन निःश्रेयसकरौ**—जरी ते दोन्ही ज्ञानोत्पत्तीच्या हेतुत्वानें म्हणजे ज्ञानोत्पत्तीचें साधन या रूपानें निःश्रेयसकर आहेत—**तथापि तु निःश्रेयसहेत्वोः तयोः केवलात् कर्मसंन्यासात् कर्मयोगः विशिष्यते इति कर्मयोगं स्तौति**—तरी पण मोक्षसाधनभूत अशा त्या दोहोंतील केवल-ज्ञानरहित कर्मसंन्यासाहून कर्मयोग श्रेष्ठ आहे, असें म्हणून भगवान् कर्मयोगाची स्तुति करीत आहेत. [ अज्ञ पुरुषाचा कर्मसंन्यास व कर्मानुष्ठान हीं दोन्ही जरी मोक्षाचीं साधनें आहेत, तरी त्यांतील ज्ञानरहित संन्यासाहून कर्मयोग श्रेष्ठ आहे. भगवान् कर्मयोगाची ही स्तुति

करीत आहेत. कारण संन्यासाहून तो सुकर आहे. ज्याअर्थी भगवान् त्याची स्तुति करीत आहेत त्याअर्थी कर्मयोगच अर्जुनाला किंवा त्याच्यासारख्या जिज्ञासूला विहित आहे. ] २

---

१ रहस्यकारांनीं या प्रश्नोत्तररूप दोन श्लोकांवर एक विस्तृत टीप लिहिली आहे. गीतारहस्याची भव्य इमारत यांतील 'कर्मयोगो विशिष्यते' या वाक्यावरच उभारलेली असल्यामुळें प्रस्तुत टीपेचा सविस्तर विचार करणें भाग आहे. रहस्यकार म्हणतात—"वरील प्रश्न व उत्तर दोन्ही निःसंदिग्ध व स्पष्ट आहेत." (अगदीं खरें आहे.) "पहिल्या श्लोकांतील श्रेयःशब्दाचा व्याकरणांत अधिक प्रशस्य अधिक चांगलें असा अर्थ असून" (येथें 'व्याकरणात' या विशेषणाचें स्वारस्य काय ?) "दोन मार्गांतील तारतम्यभावाबद्दलच्या अर्जुनाच्या प्रश्नासच 'कर्मयोगो विशिष्यते' कर्मयोगाची मातब्बरी विशेष, हें उत्तर आहे." (होय हेंहि सर्व कबूल.) "तथापि हा सिद्धान्त ज्ञानोत्तर सर्वकर्मांचा सन्यासच केला पाहिजे या सांख्यमार्गास इष्ट नसल्यामुळें या स्पष्टार्थक प्रश्नोत्तरांची कित्येकांनी फुकट ओढाताण केली आहे व ही ओढाताण करूनहि जेव्हां निभाव लागेना तेव्हां 'विशिष्यते' (योग्यता किंवा मातब्बरी विशेष) या पदानें भगवतांनी कर्मयोगाची अर्थवादात्मक म्हणजे पोकळ स्तुति केली आहे. भगवताचा खरा अभिप्राय तसा नव्हे, असा शेरा मारून कसें तरी आपलें समाधान करून घेतलें आहे." रहस्यकारांनी येथें जरी 'कित्येकांनी' अशा मोघम शब्दांनी हा दोष दिला आहे, तरी तो आचार्यादि अद्वैती भाष्य-टीकाकारांनाच उद्देशून आहे. कारण आचार्यांनी वरील सबधभाष्यांत अर्जुनाच्या प्रश्नांचा आशय काय असावा याबद्दल सविस्तर विचार करून अज्ञकृत सन्यास व अज्ञकृत कर्मयोग इ० मुमुक्षूचा संन्यास व कर्मयोग यांतील श्रेष्ठ काय असा प्रश्नार्थ वर्णिला आहे. इ० त्या दोहोंनाहि अज्ञकृत—अनात्मज्ञकर्तृक हें एक विशेषण अधिक जोडले आहे. म्हणून रहस्यकार त्याला 'फुकट ओढाताण' म्हणतात व दुसऱ्या श्लोकाच्या शेवटीं 'इति कर्मयोग स्तौति' असें जें म्हटलें आहे, त्याला उद्देशून 'निभाव लागेना म्हणून कर्मयोगाची अर्थवादात्मक इ० पोकळ स्तुति केली आहे' वगैरे म्हणतात. अर्थात् आचार्यांचें स्पष्ट नाव जरी घेतले नसलें, तरी प्रस्तुत दोष त्याच्या भाष्यावरच आहे. पण तो भ्रामक आहे, असे आचार्यांचे समग्र संबंधभाष्य वाचल्यावर कोणाच्याहि लक्षांत येईल. 'ज्ञानोत्तर सर्व कर्मांचा स्वरूपतः संन्यासच केला पाहिजे' असे आचार्यांचें म्हणणें नसून तो स्वभावतःच होतो, ती वस्तुस्थिति आहे, मी अकर्ता, अभोक्ता, नित्य, निर्विकार, आत्मा आहे, असा साक्षात् अनुभव आल्यावर मी कर्ता, भोक्ता वगैरे आहें, ही समजूत इ० मिथ्या अज्ञान रहात नाहीं.' त्यामुळें तशा ज्ञानी पुरुषाच्या कर्मयोगाची स्वप्नांतहि सभावना नाही, असें म्हणून (पृ. ४७९) ज्ञानोत्तर सर्व कर्मांचा स्वरूपतः त्याग करावा लागत नाही, तर तो आपोआप होतोच, असे सुचविलें आहे. फार काय पण कांहीं कारणानें कोणी ज्ञानी शास्त्रीय, व्यावहारिक किंवा स्वाभाविक कर्में जरी करीत असला तरी ती कर्में नसून कर्माभासरूप आहेत, असेंहि आचार्यांनीं पूर्वी वारंवार सांगितलें आहे. (अ. ४ श्लो. १९ पृ. ४०९-१३) ज्ञानोत्तर स्वभावतः होणारा जो संन्यास तो फलभूतसंन्यास, परमार्थसंन्यास आहे.' तो केलाच पाहिजे किंवा न केला पाहिजे' असें त्याविषयीं म्हणतां येत नाहीं. कर्तृत्वाभिमान सुटल्यामुळें ज्ञानी पुरुषाचा सर्वकर्मसंन्यास स्वभावसिद्धच आहे. तो विधीचा किंवा निषेधाचा विषयच होत नाहीं. ज्ञानी

कर्में करीत असला तरी व तीं करीत नसला तरी त्याचा तो सर्वकर्मसंन्यास नित्यसिद्ध आहे. त्यामुळें तसला स्वाभाविक–फलभूत संन्यास व कर्मयोग याची येथें तूलना केली आहे, असें म्हणतां येत नाहीं. तर कर्तृत्वाभिमानपूर्वक होणारा संन्यास व कर्मयोग यांचीच येथें तूलना केली आहे. कारण भगवानांनी आपल्या प्रतिवचनात संन्यास व कर्मयोग या दोहोंनाहि निःश्रेयसकर म्हणजे मोक्षाची साधनें म्हटलें आहे. वरील सर्वकर्मसंन्यास हा मोक्षच आहे, जीवन्मुक्ति आहे. त्यामुळें त्याला निःश्रेयसकर म्हणतां येत नाहीं. अर्थात् निःश्रेयसकर संन्यास व कर्मयोग हे दोन्ही अनात्मज्ञाचे आहेत, असें भगवानांच्या प्रतिवचनावरून ठरतें. आचार्यांनी वरील संबन्धभाष्यांत ही गोष्ट स्पष्टपणें प्रतिपादिली आहे. (पृ.४८०पहा) निष्क्रिय-आत्मस्वरूपावस्थान हाच सर्वकर्मसन्यास व तोच मोक्ष. साधनभूत संन्यास एकदेशी असतो. त्यांत कर्तृत्वाभिमान असतो. त्यामुळें त्या संन्यासांत सर्व कर्मांचा संन्यासहि नाहीं व आत्मस्वरूपावस्थानहि नाहीं. त्यात फक्त अग्निहोत्रादि काहीं कर्मांचाच संन्यास केला जातो व तोहि 'मी कर्मसंन्यास करतो' अशा कर्तृत्वाभिमानपूर्वक केला जातो. म्हणून तो निःश्रेयसकर आहे. यास्तव अर्जुनाच्या प्रश्नांतील संन्यास व कर्मयोग अज्ञकृत आहेत, असेंच मानणें सयुक्तिक आहे. तसेंच, 'संन्यासाहून कर्मयोग विशिष्ट आहे' असें जे म्हटलें आहे त्यांतील आशयहि आचार्यांनी स्पष्टपणें वर्णिला आहे. अनात्मज्ञकृत संन्यास यम-नियमादिकासह असल्यामुळें तो दुष्कर आहे व कर्मयोग त्यापेक्षा सुकर आहे. संन्यास आश्रम घेतल्यावर यम-नियमादिकापासून च्युत झाल्यास मोठा प्रत्यवाय लागतो. कर्मयोगांत प्रत्यवायाची तशी फारशी भीति नसते. म्हणून साधकानें पूर्णवैराग्यावाचून संन्यास करणें, इष्ट नाहीं. त्यापेक्षा कर्मयोगच फार चागला. तो सर्वलोकोपयोगी असून संन्यासापेक्षा सुकरहि आहे. अशा आशयानें भगवानांनी 'कर्मयोग श्रेष्ठ आहे' असें म्हटलें आहे. इतकेंच नव्हे तर अर्जुनानें किंवा दुसऱ्याहि कोणी मुमुक्षूनें आरंभी त्याच्याच आश्रय करावा, कठिण संन्यासाच्या भरीस पडू नये, अशी भगवानाची इच्छा असल्यामुळें श्रोत्याच्या मनांत कर्मयोगाविषयीं रुचि उत्पन्न करण्यासाठी त्यांनी त्याची ही प्रशंसा केली आहे. 'अर्थवाद म्ह० पोकळ स्तुति' अशी जी रहस्यकारांची समजूत झाली आहे ती खोटी आहे, भ्रामक आहे, प्रामाणिक नव्हे. जे विहित असतें त्याचीच स्तुति केली जाते; ज्याची स्तुति केली जाते तें श्रोत्यानें करावें, अशीच वक्त्याची इच्छा असते. अर्थात् 'भगवानाचा खरा अभिप्राय तसा नव्हे' हे 'इति कर्मयोग स्तौति' असें म्हटल्यानें ठरत नाहीं. आचार्य तसें म्हणत नाहींत. रहस्यकारांनीच स्तुत्यर्थवादाचा खरा अर्थ न कळल्यामुळें तसें विनाकारण म्हटलें आहे. उलट आचार्यांनी 'इति कर्मयोग स्तौति' असें म्हणून भगवानांना कर्मयोगच अभिप्रेत आहे, असें स्पष्ट सांगितलें आहे. अर्थात् 'असा दोरा मारून कर्में तरी आपलें समाधान करून घेतलें आहे,' हें रहस्यकाराचें म्हणणें अगदीं अप्रासंगिक आहे.

पुढें ते म्हणतात — "ज्ञानोत्तर कर्में नकोत, असें जर भगवंतांचें मत असतें तर अर्जुनाला 'या दोन्हींपैकीं संन्यास श्रेष्ठ' असें उत्तर भगवतास देता येत नव्हतें काय?" पण ज्ञानोत्तर कर्में हवींत कीं नकोत, असा येथें प्रश्नच कोठें आहे ? संन्यास व कर्मयोग यांतील अधिक चांगलें श्रेयःसाधन कोणतें ? असा अर्जुनाचा प्रश्न आहे, व त्याला अनुसरून भगवानांनी संन्यास व कर्मयोग हे दोन्ही जरी निःश्रेयसकर असले, तरी त्यांतील संन्या-

साहून कर्मयोग श्रेष्ठ असे म्हणून अर्जुनानें किंवा त्याच्याच सारख्या दुसऱ्याहि साधकानें चित्तशुद्धीसाठीं कर्मयोगच आचरावा या उद्देशानें कर्मयोगाची स्तुति केली आहे. त्यामुळें ज्ञानोत्तर कर्मे करावीत किंवा नकोत, याची येथें चर्चा केलेली नाहीं. अधिक चांगलें मोक्षसाधन कोणतें? संन्यास की कर्मयोग? तर कर्मयोग संन्यासाहून चांगला, एवढेंच येथें उत्तर आहे. पण त्या दोहोंनाहि निःश्रेयसकर म्हटल्यामुळें तीं दोन्हीं साधनें आहेत, हें निःसंशय ठरतें. पण साधनें ज्ञानोत्तर लागत नाहीत. तीं ज्ञानापूर्वींच व ज्ञानासाठींच लागतात. त्यामुळें येथील चर्चा ज्ञानोत्तर संन्यास व कर्मयोग यासाठीं आहे, असें म्हणतां येत नाहीं. पण रहस्यकारांना 'निःश्रेयसकर' या पदाचें फारसें महत्त्वच वाटलें नाहीं असें दिसतें. कारण ते म्हणतात—"कर्म करणें व सोडणें हे दोन्ही मार्ग सारखेच मोक्षप्रद आहेत, असें दुसऱ्या श्लोकाच्या पहिल्या चरणांत (चरणांत की अर्धांत?) सांगितल्यावर पुढें 'तु' म्हणजे 'पण' हें पद घालून 'तयोः' म्ह० त्या दोन मार्गांपैकीं कर्म सोडण्याच्या मार्गापेक्षा कर्मे करण्याचा पक्षच अधिक प्रशस्त (श्रेयः) होय, असें ज्या अर्थीं भगवानाचें निःसंदिग्ध विधान आहे, त्या अर्थी साधनावस्थेंत ज्ञानप्राप्तीसाठीं जीं निष्कामकर्मे करावयाचीं तींच पुढें सिद्धावस्थेंतहि लोकसंग्रहार्थ ज्ञात्यानें आमरणान्त कर्तव्य म्हणून चालू ठेविलीं पाहिजेत, हेंच मत भगवतास ग्राह्य आहे, असें पूर्ण सिद्ध होतें." पृ. ६८५. दोन्ही मार्ग जर सारखेच मोक्षप्रद तर तें ज्ञानोत्तर कर्म? ज्ञान आणि मोक्ष यामध्यें ज्योतिष्टोम व स्वर्ग याच्याप्रमाणें कालाचें व्यवधान असतें की काय? पण अद्वैत सिद्धान्त 'ज्ञानसमकालमुक्तः' असा आहे. त्यामुळें येथील संन्यास व कर्मयोग ज्ञानसाधनभूत आहेत. त्यामुळें कर्मसंन्यासापेक्षा कर्मयोग अधिक प्रशस्त, असें भगवानाचें 'निःसंदिग्ध विधान (?)' जरी असलें तरी त्यावरून 'साधनावस्थेंत ज्ञानप्राप्तीसाठीं जीं निष्कामकर्मे करावयाचीं तींच पुढें सिद्धावस्थेंतहि लोकसंग्रहार्थ ज्ञात्यानें आमरणान्त कर्तव्य म्हणून चालू ठेवलीं पाहिजेत, हेंच मत भगवतास ग्राह्य आहे,' असें अंशतःहि सिद्ध होत नाहीं. कारण गीतेंत असें कोठेंहि सांगितलें नाहीं. ज्ञात्यावर कोणतेंहि शास्त्र किंवा भगवान् कोणत्याहि प्रकारच्या विधींचा भार घालू शकत नाहींत. तिसऱ्या अध्यायाच्या २५ व्या श्लोकांत ज्या ज्ञानी पुरुषाला पूर्व प्रारब्धामुळें लोकसंग्रहाची इच्छा असेल, त्यानें कर्मे लोकसंग्रहार्थ करावीं अशी नुसती अनुज्ञा दिली आहे. प्रत्येक ज्ञानी पुरुषानें तीं केलींच पाहिजेत, असा विधि कोठेंहि नाहीं.

रहस्यकार पुनः म्हणतात—"गीता ३-७ यांत हाच अर्थ वर्णिला असून 'विशिष्यते' हेंच पद तेथेंहि आहे व त्याच्या पुढील श्लोकांत (३-८) अकर्मापेक्षा कर्म श्रेष्ठ असेंहि पुनः स्पष्ट शब्द आहेत." पण तिसऱ्या अध्यायाच्या ७ व्या व ८ व्या श्लोकांत कर्माधिकाऱ्याचें वर्णन आहे, ज्ञाननिष्ठाचें तें वर्णन नव्हे. त्यामुळें 'विशिष्यते' व 'अकर्मापेक्षां कर्म श्रेष्ठ' असे शब्द जरी तेथें असले तरी त्यावरून ज्ञानी पुरुषाच्या स्वाभाविक सर्वकर्मसंन्यासाहून कर्मयोग श्रेष्ठ असें ठरत नाहीं, अनात्मज्ञाच्या संन्यासाहून कर्मयोग श्रेष्ठ आहे ही गोष्ट सर्वसम्मतच आहे. रहस्यकार पुढें म्हणतात—"उपनिषदांतून कित्येक ठिकाणीं ज्ञानी पुरुष लोकैषणा, पुत्रैषणा, वगैरे न ठेवतां भिक्षा मागत हिंडत असतात, असें वर्णन आहे." 'भिक्षाचर्यं चरन्ति' याचा हा सरळ अर्थ आहे हें खरें, पण (बृ. ४. ४. २२) येथील

'भिक्षाचर्य' या शब्दाचा लाक्षणिक अर्थ संन्यास असा आहे. सर्व एषणा सोडून भिक्षा मागत हिंडणे यांत कांही पुरुषार्थ नाही. पण एषणात्याग करून भिक्षाचर्य म्ह० संन्यास स्वीकारणें यांत पुरुषार्थ आहे. नाहीं तर नुस्ती भिक्षा मागत फिरणें अगदीं सुलभ आहे. त्यासाठीं एषणात्यागहि नको, व आश्रमान्तरहि नको. "पण ज्ञानोत्तर हा एकच मार्ग आहे, दुसरा नाही, असे उपनिषदांतहि म्हटलेलें नाहीं." नाहीं कसें? 'नान्यः पंथा विद्यते अयनाय,' 'ज्ञानादेव तु कैवल्यं,' 'ज्ञानं संन्यासलक्षणं,' इत्यादि वचनांवरून ज्ञान हाच एक मोक्षमार्ग आहे व संन्यास हेच एक त्याचें लक्षण आहे असें स्पष्ट म्हटलें आहे. फार कशाला! खुद्द गीतेंतच 'नैष्कर्म्यसिद्धिं परमां संन्यासेनाधिगच्छति' १८-४९ 'संन्यासयोगयुक्तात्मा विमुक्तो मामुपैष्यसि' ९-२८ अशीं वचनें आहेत. तसेंच कर्मयोग हा दुसरा स्वतंत्र मोक्षमार्ग आहे, असेंहि कोठें—उपनिषदात किंवा गीतेंतसुद्धा सांगितलेलें नाहीं. तथापि "पण कर्मयोग व संन्यास हे दोन्ही मार्ग जरी सारखेच मोक्षप्रद आहेत तरी म्ह० मोक्षदृष्ट्या दोहोंचे फल एकच असताहि, जगाच्या व्यवहाराचा विचार करिता ज्ञानोत्तरहि निष्कामबुद्धीनें कर्में करीत राहणें, हाच मार्ग अधिक प्रशस्त किंवा श्रेष्ठ होय, असें गीतेचें मत आहे. आम्हीं लाविलेला हा अर्थ बहुतेक टीकाकारास मान्य नसून त्यांनीं कर्मयोग गौण ठरविला आहे, पण आमच्या मतें हे अर्थ सरळ नव्हेत व गीतारहस्याच्या अकराव्या प्रकरणांत (पृ. ३०१ ते ३०९) याच्या कारणाचें सविस्तर विवेचन केलेलें असल्यामुळें येथें जास्त सांगून जागा अडवीत नाहीं." असें रहस्यकार याविषयीं म्हणतात. पण मोक्षसाधनाच्या चर्चेंत व्यवहाराचा विचार कशाला? व तो गीतेंत तरी आहे कोठें? गीता व्यवहारासाठीं नाहीं. परमार्थासाठीं आहे. लोकसंग्रहसुद्धा व्यवहारासाठीं नाही. लोकसंग्रहशब्दाचा खरा अर्थ काय तें आम्ही वर (पृ. ३०९.) सांगितलेंच आहे. येथेंहि संन्यास व कर्मयोग या दोन निःश्रेयसकर उपायांतील चांगला उपाय कोणता तें विचारलें असून भगवानांनीहि कर्मयोग चांगला, असें जें म्हटलें आहे तें व्यवहाराच्या दृष्टीनें नव्हे. सुलभता व त्यामुळेंच सर्वोपकारकता या दृष्टीनें आहे व हें आम्हीं वर सांगितलेंच आहे. अध्यात्मशास्त्र व्यवहाराचा फारसा विचार करीत नाहीं. जीवाला व्यवहारापासून सोडविण्यासाठींच त्याची प्रवृत्ति आहे. त्यांत प्रवृत्त करण्यासाठीं नाही. अर्थात् त्यानें मुमुक्षूला स्वधर्मसंज्ञक कर्में करावयाचाहि जो उपदेश केलेला असतो तो व्यवहारासाठीं नसून क्रमानें परमार्थ साधावयाची योग्यता येण्यासाठीं असतो. प्रस्तुत मूळ श्लोकांत किंवा गीतेंतहि कोठें जगाच्या व्यवहाराचा—प्रपंचाचा उल्लेखहि नाहीं. अर्थात् "जगाच्या व्यवहाराचा विचार करितां ज्ञानोत्तरहि निष्कामबुद्धीनें कर्में करीत राहणें, हाच मार्ग अधिक प्रशस्त" वगैरे जें रहस्यकारांनीं म्हटलें आहे तें त्यांच्या पदरचें आहे. अध्यात्मशास्त्राला व्यवहार नको आहे, तो मिथ्या आहे, भ्रामक आहे, स्वप्नतुल्य आहे, असें ठरवावयाचें आहे. मनुष्याच्या स्वाभाविक व्यवहारासक्तीला घालवून त्याला परमार्थामध्यें आसक्त करावयाचें आहे. त्यामुळें तें शास्त्र मुमुक्षूलाहि जर व्यवहाराविषयीं विरक्त व्हावयास सांगतें, तर ज्ञानी पुरुषाला व्यवहार करावयास कसें लावील? ज्ञानी पुरुष ज्ञानोत्तर फक्त प्रारब्धप्राप्त व्यवहारावांचून दुसरें कांहीं करणार नाहीं व करीत नाहीं, हा अबाधित सिद्धान्त आहे. वास्तव रहस्यकारांनीं अकराव्या किंवा दुसऱ्या कोणत्याहि

प्रकारणांत यासंबंधी कितीहि जरी विचार केला असला तरी तो वेदान्तसिद्धान्ताला सोडून असल्यामुळें विचारार्हहि नाहीं. तथापि ज्याअर्थी त्यांनीं मुद्दाम पृ. ३०१–९चा हवाला दिलाच आहे, त्याअर्थी त्यांतील कांही वाक्यांचा विचार करूं. "शंकराचार्य व रामदास यांनीं ज्ञानप्रसारानें जगाच्या उद्धाराची कर्मे केलेलीं आहेत" ( होय, केलीं आहेत, पण तींहि आपापल्या प्रारब्धानुसार केलीं आहेत. कोणत्याहि विधीनें प्रेरित होऊन केलेलीं नाहीत. ) "भीष्म लग्न न करितां आमरणान्त राज्याच्या उलाढाली करीत होते" ( होय, पण तेहि प्रारब्धानुसारच ! पण त्यांच्या राज्याच्या उलाढाली फारशा महत्त्वाच्या नाहींत. ) " ज्ञानोत्तर जगांतील व्यवहार केवल कर्तव्य म्हणून लोककल्याणार्थ करावे की ते मिथ्या म्हणून अजीबात सोडून द्यावे, हा प्रकृतस्थळीं मुख्य मुद्दा आहे. हे व्यवहार जो करतो तो कर्मयोगी होय; मग तो लग्न करो वा न करो. अथवा भगवीं वस्त्रें नेसो वा पांढरीं नेसो, किंबहुना अशीं कर्मे करण्यास विवाह न करणें, भगवीं वस्त्रें घेणें, किंवा शहराबाहेर विरक्त होऊन रहाणेंच कित्येकदा विशेष सोयीचें असते, कारण मग कुटुंबभरणाची उपाधि मागें नसल्यामुळे आपला सर्व वेळ व परिश्रम लोककार्यार्थ खर्ची घालण्यास कांहींच अडचण रहात नाहीं. असे पुरुष वेषानें संन्यासी असले तरी तत्त्वत: ते कर्मयोगीच होत." ( पण गीतेमध्यें कर्मयोगाचें असें लक्षण कोठेंच सांगितलेले नाहीं. वैदिक संप्रदायहि असें म्हणत नाहीं. शंकराचार्य आपल्याला कर्मयोगी म्हणवीत नाहींत. गीतेवरील एकहि टीकाकार कर्मयोग्याचें असें लक्षण करीत नाहीं. अर्थात् रहस्यकारांची ही नुस्ती कल्पना आहे, हेच शेवटीं सिद्ध होतें. ) "पण उलटपक्षी म्ह० जगांतील सर्वच व्यवहार नि:सार समजून व त्यांचा त्याग करून जे स्वस्थ बसतात, ते संन्यासी म्हणावयाचे. मग त्यांनीं प्रत्यक्ष चतुर्थाश्रम घेतला असो वा नसो." ( हेंही लक्षण गीतेला धरून नाहीं. संन्यासी सर्व व्यवहार नि:सार समजतो असें नसून ज्ञानीच तसें समजतो. ज्ञान हेंच संन्यासाचें खरें लक्षण आहे. आत्मज्ञान झाल्यावर 'जगातील व्यवहार आपण करावे,' असें वाटणें शक्यच नाहीं. उलटपक्षीं केवल आश्रमसंन्यासीच अविरक्त असल्यास जगांतील व्यवहार करूं लागेल. गीतेचा, उपनिषदांचा किंबहुना श्रीशंकराचार्यांचाहि मुख्य कटाक्ष पांढरीं किंवा भगवीं वस्त्रें अगर विवाह किंवा ब्रह्मचर्य यावर नसून ज्ञान व अज्ञान यांवर आहे. ज्ञानीच खरा संन्यासी असून वैराग्य हें त्याचें लक्षण आहे व अज्ञानीच कर्मयोगी असून अविरक्ति किंवा विषयासक्ति हेंच त्याचें लक्षण आहे, अर्थात् " ज्ञानी पुरुष जगाचे व्यवहार करतो किंवा न करतो एवढ्या एकाच गोष्टीवर नजर देऊन संन्यास व कर्मयोग या दोन मार्गांचा गीतेंत भेद केलेला आहे." इत्यादि रहस्यकारांचें जे म्हणणे आहे तें खरें नव्हे. बाकीच्या मुद्द्यांविषयीं आम्हीं इतरत्र बरेंच लिहिलें असल्यामुळें त्यांचा येथें अधिक विचार करीत नाहीं. गीतेंतील कर्मयोग ज्ञानोत्तर नाहीं, तो वैदिकसंप्रदायाला अनुसरून चित्तशुद्धीसाठींच सांगितलेला आहे. तात्पर्य आचार्यांनीं प्रस्तुत दोन श्लोकांचा जो अर्थ केला आहे, तोच वैदिक संप्रदायाला धरून आहे. रहस्यकारांचा तसा नाहीं. म्हणूनच त्यांना " आमचा अर्थ बहुतेक टीकाकारांस मान्य नसून त्यांनी कर्मयोग गौण ठरविला आहे " असें म्हणण्याचा प्रसंग आला. कोणत्याच वैदिक सांप्रदायिकाला रहस्यकारांचे म्हणणे मान्य होणें शक्य नाहीं. कारण 'कर्मयोग साधन व ज्ञानयोग साध्य ' हा अबाधित वैदिक सि-

ज्ञेयः स नित्यसंन्यासी यो न द्वेष्टि न काङ्क्षति ।
निर्द्वंद्वो हि महाबाहो सुखं बन्धात्प्रमुच्यते ॥ ३ ॥

**अन्वयार्थ—यः**—जो—**न द्वेष्टि**—द्वेष करीत नाहीं—**न कांक्षति**—व आकांक्षा करीत नाहीं—**सः**—तो—**नित्यसंन्यासी**—नित्य संन्यासीच—**ज्ञेयः**—जाणावा.—**हि**—कारण—**हे महाबाहो**—हे महापराक्रमी अर्जुना—**निर्द्वंद्वः**—द्वंद्वरहित पुरुष—**बन्धात्**—बंधापासून—**सुखं**—अनायासानें—**प्रमुच्यते**—सर्वथा मुक्त होतो. ३.

**कस्मादित्याह—ज्ञेय इति । ज्ञेयो ज्ञातव्यः स कर्मयोगी नित्यसंन्यासीति यो न द्वेष्टि किंचिन्न काङ्क्षति दुःखसुखे तत्साधने चैवंविधो यः कर्मणि वर्तमानोऽपि स नित्यसंन्यासीति ज्ञातव्य इत्यर्थः । निर्द्वंद्वो द्वंद्ववर्जितो हि यस्मान्महाबाहो सुखं बन्धादनायासेन प्रमुच्यते ॥ ३ ॥**

**भाष्यार्थ**—(पण कर्म बंधाला कारण होते हे प्रसिद्ध आहे, तेव्हां तेच निःश्रेयसकर कसें होईल ? अशी शंका-)—**कस्मात् इति 'ज्ञेयः०' इति आह**—कर्म निःश्रेयसकर कसें ? व संन्यासाहून कर्मयोग श्रेष्ठ कां ? ते 'ज्ञेयः०' या श्लोकाने सांगतात.—**सः कर्मयोगी नित्यसंन्यासी इति ज्ञेयः-ज्ञातव्यः**—तो कर्मयोगी नित्यसंन्यासी आहे असे समजावे—**यः किंचित्-दुःखसुखे तत्साधने च न द्वेष्टि न कांक्षति**—जो कशाचाहि म्ह० दुःखसुखे व दुःखसुखाची साधने यांतील कशाचाहि द्वेष करीत नाहीं व कशाचीहि आकांक्षा करीत नाहीं,—**एवंविधः यः कर्मणि वर्तमानः अपि**—अशा प्रकारचा जो कर्मामध्यें प्रवृत्त होणाराहिं असतो—**सः नित्यसंन्यासी इति ज्ञातव्यः इत्यर्थः**—तो नित्यसंन्यासीच आहे, असें जाणावे, असा भावार्थ. [ जो कर्मयोगी सुख व त्याचे साधन यांची आकांक्षा करीत नाहीं, व दुःख आणि त्याचें साधन यांचा द्वेष करीत नाहीं, तो नित्य म्हणजे 'मी अकर्ता, अभोक्ता, आत्मा आहें,' असा साक्षात् अनुभव येण्याच्या पूर्वीहि संन्यासीच आहे, असे सांगितलें आहे. अहोपण, कर्मयोग्याला नित्यसंन्यासी समजणें, हें मिथ्याज्ञान आहे. म्हणून म्हणाल तर तसें नाहीं. कारण कर्मयोगी कर्मानुष्ठान जरी करीत असला तरी

---

द्धान्त आहे. रहस्यकार "ब्रह्मदेवानें मरीच्यादि सात मानसपुत्रांना प्रवृत्तिमार्ग सांगितला व सनत्कुमारादिकांना निवृत्तिमार्ग सांगितला." ३०३ असें जें म्हणतात तें खरें आहे, पण केवल प्रवृत्तिमार्ग मोक्षाचें साधन केव्हांहि होत नाहीं. तो जगच्चक्र चालविण्याच्याच उपयोगी आहे. निवृत्तिमार्ग साक्षात् मोक्षसाधन आहे, त्यामुळें 'ते दोन मार्ग तुल्यबल आहेत' हें म्हणणें सर्वथा अयोग्य आहे. तथापि प्रवृत्तिमार्गाचेंच निष्कामबुद्धीनें ईश्वराराधनार्थ अनुष्ठान केल्यास तो मार्गहि निवृत्त्युपयोगी कसा होतो, तें आचार्यांनीं आरंभींच सांगितलें आहे. (पृ. ९)

त्याच्यामध्यें राग-द्वेष नसल्यामुळें तो संन्यासीच आहे, असें मानणें उचितच आहे. ]

**—हि–यस्मात् हे महाबाहो निर्द्वंद्वः-द्वंद्ववर्जितः सुखं-अनायासेन बंधात् प्रमुच्यते**—कारण हे पराक्रमी अर्जुना, राग द्वेषादिद्वंद्वरहित झालेला कर्मयोगी अनायासानें संसारबंधनांतून पूर्णपणे मुक्त होतो. [ संन्यासाश्रमी पुरुष अग्निहोत्रादि कर्मांचें अनुष्ठान करीत नाहीं. त्यामुळें त्याला तीं कर्में बद्ध करीत नाहींत, त्याच्या हातून आश्रमापूर्वीच जी दुसरीं कर्में घडलेलीं असतात, तीं म्ह० संचित कर्में वैराग्य, इंद्रियनिग्रह इत्यादिकांच्या योगानें निवृत्त होतात. त्याच न्यायानें फलाशा सोडून केलेलीं नित्य-नैमित्तिकादि कर्में कर्मयोग्याला बद्ध करीत नाहींत व त्याच्या संचित पापाची निवृत्ति करितात. त्यामुळं रागद्वेषरहित कर्मयोगी संसारबंधापासून मुक्त होतो.] ३

**सांख्ययोगौ पृथग्बालाः प्रवदन्ति न पण्डिताः ।**
**एकमप्यास्थितः सम्यगुभयोर्विन्दते फलम् ॥ ४ ॥**

**अन्वयार्थ—बालाः**—अज्ञ जन—**सांख्ययोगौ**—संन्यास व योग—**पृथक्**—निरनिराळें फल देणारे आहेत, असें—**प्रवदन्ति**—सांगतात—**पण्डिताः न**—पण पंडित–तत्त्ववेत्ते तसें सांगत नाहींत.—**एकं अपि**—त्या दोहोंतील एका साधनाचाहि—**सम्यक्**—उत्तम प्रकारें—**आस्थितः**—आश्रय केलेला पुरुष—**उभयोः**—त्या दोहोंच्या—**फलं**—फलास—**विन्दते**—संपादन करतो. ४.

**संन्यासकर्मयोगयोर्भिन्नपुरुषानुष्ठेययोर्विरुद्धयोः फलेऽपि विरोधो युक्तो न तूभयोर्निःश्रेयसकरत्वमेवेति प्राप्त इदमुच्यते—सांख्ययोगाविति । सांख्ययोगौ पृथग्विरुद्धभिन्नफलौ बालाः प्रवदन्ति न पण्डिताः । पण्डितास्तु ज्ञानिन एकं फलमविरुद्धमिच्छन्ति । कथम् । एकमपि सांख्ययोगयोः सम्यगास्थितः सम्यगनुष्ठितवानित्यर्थः । उभयोर्विन्दते फलमुभयोस्तदेव हि निःश्रेयसं फलमतो न फले विरोधोऽस्ति ॥**

**भाष्यार्थ**—( संन्यास व कर्मयोग या दोहोंनाहि जें निःश्रेयसकरत्व सांगितले आहे त्यावर आक्षेप- )—**भिन्नपुरुषानुष्ठेययोः विरुद्धयोः संन्यासकर्मयोगयोः फले अपि विरोधः युक्तः**—भिन्न भिन्न पुरुषांनींच अनुष्ठान करण्यास योग्य व परस्पर विरुद्ध अशा संन्यासाच्या व कर्मयोगाच्या फलांतहि विरोध असणेंच युक्त आहे—**न तु उभयोः निःश्रेयसकरत्वं एव**—त्या दोहोंनाहि निःश्रेयसकरत्वच असणे युक्त नाहीं,—**इति**

---

१ यावरून मुख्य किंवा गौण कोणता तरी संन्यास बंधांतून मुक्त होण्यास अवश्य आहे, हें उघड होतें. ज्या विरक्त जिज्ञासूला संन्यासाचा अधिकार नसेल त्यानें ' अकर्तृ-आत्मविज्ञानासाठीं ' निदान गौण सन्यास तरी केलाच पाहिजे. कर्मफलत्याग, रागद्वेषत्याग, ईश्वराराधनार्थ कर्में करणें, कर्तृत्वाभिमान सोडणें, हे संन्यासाचेच प्रकार आहेत. येथें 'रागद्वेषाचा त्याग करणारा नित्य संन्यासीच आहे,' असें जें सांगितलें आहे तें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

**प्राप्ते 'सांख्ययोगौ०' इति इदं उच्यते**—अशी शंका प्राप्त झाली असतां 'सांख्य-योगौ०' या श्लोकानें हें समाधान सांगितलें जातें.—**सांख्ययोगौ पृथक्-विरुद्धभिन्न-फलौ बालाः प्रवदन्ति**—सांख्य व योग हे पृथक् म्ह० एकमेकांच्या विरुद्ध भिन्न फल देणारे आहेत, असें शास्त्रार्थ न जाणणारे अविवेकी सांगतात—**पंडिताः न**—पंडित म्ह० विवेकी तसें सांगत नाहीत.—**तु पंडिताः-ज्ञानिनः एकं-अविरुद्धं फलं इच्छन्ति**—तर पंडित म्ह० ज्ञानी-योगी त्या दोहोंचें एक-अविरुद्ध फल इच्छितात.—**कथं**—तें कसें?—**सांख्ययोगयोः एकं अपि सम्यक् आस्थितः-सम्यक् अनुष्ठितवान् इत्यर्थः**—सांख्य व योग यांतील एकाचा ज्यानें चांगल्याप्रकारें आश्रय केला आहे, एकाचेंच उत्तम अनुष्ठान केलें आहे, असा भावार्थ,—**उभयोः फलं विन्दते**—दोहोंच्याहि फलाला प्राप्त होतो. (पण एकाच साधनाचें अनुष्ठान करणाराला दोहोंचेंहि फल कसें मिळेल?)—**उभयोः तत् एव हि निःश्रेयसं फलं**—संन्यास व कर्मयोग या दोहोंचेंहि तत्त्वज्ञानाच्या द्वारा निःश्रेयस हेंच एक फल आहे.—**अतः फले विरोधः न अस्ति**—त्यामुळे त्यांच्या फलांत विरोध नाहीं.

**ननु संन्यासकर्मयोगशब्देन प्रस्तुत्य सांख्ययोगयोः फलैकत्वं कथमिहाप्रकृतं ब्रवीति। नैष दोषो यद्यप्यर्जुनेन संन्यासं कर्मयोगं च केवलमभिप्रेत्य प्रश्नः कृतो भगवांस्तु तदपरित्यागेनैव स्वाभिप्रेतं च विशेषं संयोज्य शब्दान्तरवाच्यतया प्रतिवचनं ददौ सांख्ययोगाविति। तावेव संन्यासकर्मयोगौ ज्ञानतदुपायसमबुद्धित्वादिसंयुक्तौ सांख्ययोगशब्दवाच्याविति भगवतो मतमतो नाप्रकृतप्रक्रियेति ॥ ४ ॥**

**भाष्यार्थ**—(यावर शंका-)—**ननु संन्यासकर्मयोगशब्देन प्रस्तुत्य इह अप्रकृतं सांख्ययोगयोः फलैकत्वं कथं ब्रवीति**—अहोपण, संन्यास व कर्मयोग या शब्दांनी आरंभ करून येथे प्रकृत नसलेलें सांख्य व योग यांचें फलैकत्व भगवान् कसें सांगत आहेत? [संन्यास व कर्मयोग यांविषयीं प्रकरण आरंभून येथें सांख्य व योग यांचें एकच फल आहे असें सांगणें, अप्रस्तुत आहे, प्रकरणाला सोडून आहे.]—**न एषः दोषः**—हा दोष येथे येत नाहीं. [संन्यास व कर्मयोग यांविषयींच प्रश्न व प्रतिवचन असतांना येथें सांख्य व योग यांचें फल एकच आहे, असें म्हणणें हा प्रकृतविरोध नव्हे, तर काय?]—**यद्यपि अर्जुनेन केवलं संन्यासं कर्मयोगं च अभिप्रेत्य प्रश्नः कृतः**—जरी अर्जुनानें केवल संन्यास व कर्मयोग यांना उद्देशून प्रश्न केला आहे तरी—**भगवान् तु सांख्ययोगौ इति शब्दान्तरवाच्यतया तदपरित्यागेन एव स्वाभिप्रेतं च विशेषं संयोज्य**—पण भगवानांनीं सांख्य व योग अशा शब्दान्तरवाच्यत्वानें संन्यास-कर्मयोगांचा परित्याग न करितांच आपल्याला इष्ट असलेला विशेष त्याच्याशीं संयुक्त करून प्रतिवचन दिलें. (भगवानाला इष्ट असलेला विशेषच दाखवितात-)—**तौ एव संन्यासकर्मयोगौ ज्ञान-तदुपायसमबुद्धित्वादिसंयुक्तौ सांख्ययोगशब्दवाच्यौ**—तेच संन्यास व कर्मयोग ज्ञान व ज्ञानाचा उपाय-समबुद्धित्वादिक यांनीं संयुक्त झाले असतां सांख्य व योग या शब्दांचे

वाच्य म्ह० अर्थ होतात,—**इति भगवतः मतं अतः न अप्रकृतप्रक्रिया इति** —असें भगवानांचें मत आहे. त्यामुळें अप्रकृतप्रक्रिया—प्रस्तुत नसलेल्या विषयाचें प्रतिपादन करणें म्ह० विषयान्तर हा दोष येत नाही. [ अर्जुनानें केवल म्ह० ज्ञानरहित संन्यास व कर्मयोग यांविषयींच प्रश्न केला व भगवानांनींहि प्रथम त्यांविषयींच उत्तर दिलें, हें खरें. पण पुढें भगवानांनी संन्यास व कर्मयोग यांचा सर्वथा त्याग न करितां त्यांच्या अर्थांतच आपल्याला इष्ट असलेला अधिक अर्थ जोडून सांख्य व योग या शब्दांनीं बोलण्यास आरंभ केला आहे. 'संन्यास' या शब्दाच्या अर्थांत ज्ञान घातलें म्हणजे तोच संन्यास सांख्य होतो व कर्मानुष्ठानांत ज्ञानाचा उपाय अशी समत्वबुद्धि, शम, दम इत्यादिकांची योजना केली कीं, तें कर्मानुष्ठानच योग बनतें. अर्थात् सांख्य व योग हे शब्द संन्यास व कर्मयोग या शब्दांच्या अगदीं विरुद्ध नाहींत;तर केवल संन्यास म्ह० विविदिषा संन्यास व केवल कर्मयोग म्ह० विहित कर्मांचें अनुष्ठान आणि सांख्य म्ह० विद्वत्संन्यास व योग म्ह० समत्वबुद्धि, शम, दम इत्यादि ज्ञानोपायानें युक्त असे कर्मानुष्ठान. त्यामुळें येथें भगवानांनीं विषयान्तर केलेले नसून त्यांना गीतेंत जें सांगावयाचें आहे त्याचाच पुनः स्पष्ट उल्लेख केला आहे. सांख्य म्ह० आत्मज्ञान व योग म्ह० त्याचा उपाय. दुसऱ्या अध्यायाच्या ३९ व्या श्लोकांत याच अर्थी सांख्ययोगशब्दांचा उल्लेख केला आहे. ] ४.

यत्सांख्यैः प्राप्यते स्थानं तद्योगैरपि गम्यते ।
एकं सांख्यं च योगं च यः पश्यति स पश्यति॥५॥

**अन्वयार्थ—यत् स्थानं**—जे स्थान—**सांख्यैः**—सांख्यांकडून—**प्राप्यते**—प्राप्त केले जाते—**तत्**—तें—**योगैः**—योग्यांकडूनहि—**गम्यते**—क्रमाने प्राप्त केलें जाते. यास्तव—**यः**—जो—**सांख्यं च योगं च**—सांख्य-ज्ञानलक्षण संन्यास-ज्ञाननिष्ठा व योग-त्याचा उपाय निष्काम ईश्वरार्थ कर्मानुष्ठान—**एकं**—एकच आहे असें—**पश्यति**—पाहतो—**सः**—तो यथार्थ—**पश्यति**—पाहतो-जाणतो. ५.

**एकस्यापि सम्यगनुष्ठानात्कथमुभयोः फलं विन्दत इत्युच्यते यदिति । यत्सांख्यैर्ज्ञाननिष्ठैः संन्यासिभिः प्राप्यते स्थानं मोक्षाख्यं तद्योगैरपि ज्ञानप्राप्त्युपायत्वेनेश्वरे समर्प्य कर्माण्यात्मनः फलमनभिसंधायानुतिष्ठन्ति ये ते योगिनस्तैरपि परमार्थज्ञानसंन्यासप्राप्तिद्वारेण गम्यत इत्यभिप्रायोऽत एकं सांख्यं योगं च यः पश्यति फलैकत्वात्स सम्यक्पश्यतीत्यर्थः ॥ ५ ॥**

**भाष्यार्थ—एकस्य अपि सम्यक् अनुष्ठानात् उभयोः फलं कथं विन्दते इति 'यत्०' इति उच्यते**—सांख्य व योग यांतील एकाचेंहि जरी उत्तम प्रकारें अनुष्ठान केलें तरी दोन्हींचें फल कसे प्राप्त होतें, म्हणून म्हणशील तर त्याचें उत्तर 'यत्सांख्यै०' या श्लोकानें सांगितलें जाते.—**सांख्यैः-ज्ञाननिष्ठैः संन्यासि-**

**भिः यत् मोक्षाख्यं स्थानं प्राप्यते**—सांख्यांकडून म्ह० ज्ञाननिष्ठ-संन्याश्यांकडून जें मोक्षसंज्ञक स्थान प्राप्त केले जातें—**तत् योगैः अपि**—तें स्थान योग्यांकडूनहि (क्रमानें मिळविलें जातें.)—**ये ज्ञानप्राप्त्युपायत्वेन कर्माणि ईश्वरे समर्प्य आत्मनः फलं अनाभिसंधाय अनुतिष्ठन्ति ते योगिनः**—जे ज्ञानप्राप्तीचा उपाय या रूपानें कर्में ईश्वराला समर्पण करून आपल्याला त्यांचें फल मिळावें, अशी इच्छा न धरून ती करितात ते योगी होत.—**तैः अपि परमार्थज्ञानसंन्यासप्राप्तिद्वारेण गम्यते इति अभिप्रायः**—त्यांच्याकडूनहि परमार्थज्ञान, त्यामुळें होणारा स्वाभाविक-सहज-विद्वत्संन्यास यांच्या प्राप्तीच्या द्वारा तेंच स्थान संपादन केलें जातें, असा अभिप्राय. [ ज्ञाननिष्ठ संन्याश्यांना साक्षात् मोक्षसंज्ञक स्थान प्राप्त होतें, हे तर प्रसिद्धच आहे. तेच स्थान योग्यांनाहि मिळते. पण तें कसें? साक्षात् नव्हे, तर जे जिज्ञासु सर्व कर्में त्यांच्या फलाची इच्छा न करितां भगवत्प्रसादार्थ चित्तशुद्धीच्या द्वारा ज्ञानप्राप्तीचा उपाय या रूपानें अनुष्ठितात ते योगी होत. येथील 'योग' हा शब्द 'योगी' या अर्थी आहे. त्यांना सर्व द्वैतप्रपंच खरा नव्हे, तो मायेचा विलास-मायाकार्य आहे, म्हणून मिथ्या; आत्मा अविक्रिय व एक आहे, त्यामुळे तो सत्य आहे असें जें ज्ञान होतें तें परमार्थज्ञान होय. त्या ज्ञानपूर्वक जो संन्यास त्याच्या द्वारा कर्मानुष्ठान करणारांनाहि तेंच स्थान प्राप्त होतें. त्यामुळें सांख्य व योग यांना एकफलत्व आहे, असें म्हणण्यांत कांहीं विरोध नाही. ]—**अतः एकं सांख्यं योगं च यः पश्यति फलैकत्वात् सः सम्यक् पश्यति इत्यर्थः**—यास्तव सांख्य व योग यांचें फल एकच असल्यामुळें, एकच आहेत, असें जो पाहतो तो सम्यक् पाहतो, तोच यथार्थ ज्ञानी होय, असा याचा भावार्थ. [ सांख्य व योग यांचे स्वरूप एक नाहीं, योग्यताहि सारखीच नाहीं. पण दोहोंचे फल एकच आहे, म्हणून फलदृष्ट्या याना जो एकच समजतो तो खरा ज्ञानी होय. ] ५.

**एवं तर्हि योगात्संन्यास एव विशिष्यते। कथं तर्हीदमुक्तं तयोस्तु कर्मसंन्यासात्कर्मयोगो विशिष्यत इति। शृणु तत्र कारणम्। त्वया पृष्टं केवलं कर्मसंन्यासं कर्मयोगं चाभिप्रेत्य तयोरन्यतरः कः श्रेयानिति। तदनुरूपं प्रतिवचनं मयोक्तं कर्मसंन्यासात्कर्मयोगो विशिष्यत इति ज्ञानमनपेक्ष्य। ज्ञानापेक्षस्तु संन्यासः सांख्यमिति मयाऽभिप्रेतः। परमार्थयोगश्च स एव। यस्तु कर्मयोगो वैदिकः स तादर्थ्याद्योगः संन्यास इति चोपचर्यते। कथं तादर्थ्यमि त्युच्यते॥**

**भाष्यार्थ—एवं तर्हि योगात् संन्यासः एव विशिष्यते**—अहोपण, कर्मयोग्यांनाहि पूर्वोक्त ज्ञानपूर्वक संन्यासद्वाराच जर मोक्षप्राप्ति होत असेल तर योगापेक्षां संन्यासच श्रेष्ठ आहे—**तर्हि 'तयोस्तु कर्मसंन्यासात् कर्मयोगो विशिष्यते' इति कथं उक्तं**—मग 'त्यांतील कर्मसंन्यासापेक्षां कर्मयोगच श्रेष्ठ आहे' असें कसें म्हटलें—**तत्र कारणं शृणु**—त्याविषयींचें कारण ऐक.—**त्वया केवलं कर्मसंन्यासं कर्मयोगं च अभिप्रेत्य तयोः अन्यतरः कः श्रेयान् इति पृष्टं**—तूं केवल

म्ह० ज्ञानरहित कर्मयोग व कर्मसंन्यास यांना उद्देशून या दोहोंतील कोणता एक श्रेष्ठ आहे, असें विचारलेंस ?—**मया कर्मसंन्यासात् कर्मयोगः विशिष्यते इति ज्ञानं अनपेक्ष्य तदनुरूपं प्रतिवचनं उक्तं**—मी कर्मसंन्यासाहून कर्मयोग श्रेष्ठ आहे, असें ज्ञानाची अपेक्षा न करितां त्या प्रश्नाला अनुरूप असें प्रतिवचन दिलें.—**ज्ञानापेक्षः तु संन्यासः सांख्यं इति मया अभिप्रेतः**—पण ज्ञानाची अपेक्षा असलेला म्ह० ज्ञानयुक्त जो संन्यास तो सांख्य म्हणून मला संमत आहे. ज्ञानयुक्त संन्यासाला मी सांख्य म्हणतों—**च परमार्थयोगः सः एव**—व परमार्थयोग तोच होय. [ ज्ञानयुक्त संन्यासच सांख्य व तोच दुसऱ्या अध्यायाच्या ५३ श्लोकांत सांगितलेला परमार्थयोग होय. असें जर आहे तर कर्मयोगाला योगशब्द किंवा संन्यासशब्द कसा लावतां ? उत्तर-]—**तु यः वैदिकः कर्मयोगः स तादर्थ्यात् योगः संन्यासः इति च उपचर्यते**—पण जो वैदिक कर्मयोग तो परमार्थज्ञानाचें अंग असल्यामुळे त्याला 'योग' असें व 'संन्यास' असे उपचारानें म्हणतात.—**कथं तादर्थ्यं इति उच्यते**—कर्मयोगाला परमार्थज्ञानार्थत्व कसे ते ' संन्यासस्तु० ' या श्लोकाने सांगितलें जातें. [ ३ते५ श्लोकांच्या अर्थाचा विचार केला असतां योग सांख्याच्या-ज्ञानपूर्वक संन्यासाच्या द्वाराच मोक्षाचे साधन होतो, असें स्पष्ट दिसतें. तर मग कर्मयोग श्रेष्ठ असें कसें म्हणतां ? उत्तर-केवल ज्ञानरहित संन्यास व केवल कर्मयोग यांची तुलना केल्यास संन्यास आचरण्यास कठिण व कर्मयोग सुलभ,संन्यासाश्रमांत आश्रमविरुद्ध वर्तन झाल्यास आरूढपतित होण्याची भीति,कर्मयोग्यांना म्ह० गृहस्थांना तशी भीति नाहीं.म्हणून कर्मयोग अज्ञकृतसंन्यासाहून चांगला असें म्हटलें आहे. पण ज्ञानयुक्त संन्यास म्ह० सांख्य, व तोच परमार्थ-मुख्य योग होय.त्याला उद्देशूनच गीतेला योग किंवा योगशास्त्र म्हटलें आहे. तथापि वैदिक कर्मयोग त्या परमार्थयोगासाठीं, त्याचे साधन असल्यामुळे त्याला 'योग'व 'संन्यास' असे गौणवृत्तीने म्हटले आहे. तसेंच पुढे तेराव्या अध्यायांतहि अमानित्वादि ज्ञानसाधनांना ज्ञान म्हटले आहे. ( अ. १३ श्लो. ११ पहा. ) आतां कर्मयोगाला परमार्थयोगाचें साधनत्व कसें तेच सहाव्या श्लोकांत सांगतात— ]

**संन्यासस्तु महाबाहो दुःखमाप्तुमयोगतः ।**
**योगयुक्तो मुनिर्ब्रह्म न चिरेणाधिगच्छति ॥ ६ ॥**

**अन्वयार्थ—हे महाबाहो**—हे पराक्रमी अर्जुना !—**तु**—पण—**संन्यासः**—खरा संन्यास-परमार्थ संन्यास म्ह० सांख्य—**अयोगतः**—योगावांचून—**आप्तुं**—प्राप्त होणें—**दुःखं**—कठिण आहे.—**योगयुक्तः**—वैदिक कर्मानुष्ठानानें युक्त असलेला—**मुनिः**—ईश्वराच्या स्वरूपाचें मनन करणारा मुनि—**ब्रह्म**—परमार्थ संन्यासाला—**न चिरेण**—लवकरच—**अधिगच्छति**—प्राप्त होतो. ६.

**संन्यासस्तु पारमार्थिको दुःखमाप्तुं प्राप्तुमयोगतो योगेन विना। योगयुक्तो वैदिकेन कर्मयोगेन ईश्वरसमर्पितरूपेण फलनिरपेक्षेण युक्तो मुनिर्मननादीश्वरस्वरूपस्य मुनिर्ब्रह्म**

**परमात्मज्ञानलक्षणत्वात्प्रकृतः संन्यासो ब्रह्मोच्यते " न्यास इति ब्रह्मा ब्रह्मा हि परः" इति श्रुतेः। ब्रह्म परमार्थसंन्यासं परमात्मज्ञाननिष्ठालक्षणं न चिरेण क्षिप्रमेवाधिगच्छति प्राप्नोत्यतो मयोक्तं कर्मयोगो विशिष्यत इति ॥ ६ ॥**

**भाष्यार्थ—तु संन्यासः-पारमार्थिकः अयोगतः-योगेन विना आप्तुं-प्राप्तुं दुःखं**—पण पारमार्थिकसंन्यास म्ह० सम्यग्ज्ञानरूप सांख्य योगावांचून प्राप्त होणें फार कठिण आहे. (कारण सामग्रीच्या अभावीं कार्यनिष्पत्ति होत नाहीं.)—**योगयुक्तः-ईश्वरसमर्पितरूपेण फलनिरपेक्षेण वैदिकेन कर्मयोगेन युक्तः**—योगयुक्त म्ह० ईश्वरसमर्पितरूप, फलनिरपेक्ष वैदिक कर्मयोगानें युक्त असलेला—**मुनिः ईश्वरस्वरूपस्य मननात् मुनिः**—ईश्वराच्या स्वरूपाचें मनन केल्यामुळें मुनि—**ब्रह्म परमात्मज्ञानलक्षणत्वात् प्रकृतः संन्यासः ब्रह्म उच्यते**—ब्रह्माला-परमात्मज्ञानसूचक असल्यामुळे प्रस्तुत संन्यासाला ब्रह्म म्हटलें आहे. (त्याविषयीं तैत्तिरीयश्रुतीचें प्रमाण-)—**न्यासः इति ब्रह्मा**—संन्यास हाच ब्रह्मा आहे. (पण संन्यास या अर्थी हिरण्यगर्भवाची ब्रह्मशब्द कसा योजला आहे? उत्तर-)—**हि ब्रह्मा परः**—कारण ब्रह्मा-हिरण्यगर्भ पर-श्रेष्ठ आहे—**इति श्रुतेः**—अशी श्रुति आहे. (संन्यासहि सर्व साधनांमध्यें उत्कृष्ट आहे. त्यामुळे श्रेष्ठत्व या सामान्यामुळे म्हणजे समानधर्मत्वामुळें संन्यासाला श्रुतींत ब्रह्मा म्हटलें आहे.ब्रह्मशब्द संन्यासपर आहे असें उपपादन करून फलितार्थ सांगतात-)—**ब्रह्म-परमार्थसंन्यासं-परमात्मज्ञाननिष्ठालक्षणं**—(योगयुक्त मुनि) ब्रह्माला म्ह० परमात्मज्ञाननिष्ठारूप परमार्थसंन्यासाला—**न चिरेण-क्षिप्रं एव**—अगदीं कालक्षेप न करितां-सत्वरच—**अधिगच्छति-प्राप्नोति**—प्राप्त होतो. [ नदीचे प्रवाह जसें सखल प्रदेशाकडून वाहतात, त्याप्रमाणें कर्मानुष्ठानानें ज्यांच्या अंतःकरणांतील राग-द्वेषादि दोष पार नाहींसे झाले आहेत, त्यांचीं इंद्रियें सर्व विषयांपासून निवृत्त होऊन-अन्तर्मुख होऊन निर्विशेष-निर्विकार, प्रत्यगात्म्याकडे त्यांची प्रवृत्ति होते. असो; याप्रमाणें कर्मयोग परमार्थसंन्यासप्राप्तीचा उपाय आहे, असें ठरलें असतां फलित सांगतात-]—**अतः 'कर्मयोगो विशिष्यते इति' मया उक्तं**—म्हणून कर्मयोग श्रेष्ठ आहे, असें मी तुला सांगितलें. [ आचार्यांनीं येथें 'ब्रह्म-' शब्दाचा 'परमात्मज्ञानरूप परमार्थसंन्यास' असा अर्थ केला आहे, तो कित्येकांना पटत नाहीं. पण तोच अर्थ प्रकरणाला धरून आहे. 'योगावांचून संन्यास प्राप्त होणें फार कठिण आहे,' इतकें म्हटल्यावर 'योगयुक्त मुनि त्याला-संन्यासाला सत्वर प्राप्त होतो' हें म्हणणें अधिक सयुक्तिक आहे कीं 'योगयुक्त मुनि परब्रह्माला सत्वर प्राप्त होतो' हें म्हणणें सयुक्तिक आहे, याचा विचार वाचकांनींच करावा. संन्यास व योग यांच्या साध्य-साधनभावाचें वर्णन चालूं असतांना मध्येंच अकस्मात् 'योगयुक्त मुनि परब्रह्माला प्राप्त होतो' हें म्हणणें उचित नाहीं. त्यामुळें आचार्यांनीं केलेला अर्थच बरोबर आहे. ] ६.

---

१ या तीन श्लोकावरील टीपेंत रहस्यकार म्हणतात—"सांख्यमार्गानें जो मोक्ष मिळतो तोच कर्मयोगानें म्ह० कर्में न सोडतां कसा मिळतो याचें सविस्तर निरूपण पुढें ७-१७

**योगयुक्तो विशुद्धात्मा विजितात्मा जितेन्द्रियः ।**
**सर्वभूतात्मभूतात्मा कुर्वन्नपि न लिप्यते ॥ ७ ॥**

**अन्वयार्थ**—**योगयुक्तः**—जो वर सांगितलेल्या निष्काम कर्मानुष्ठानानें युक्त आहे, त्यामुळें—**विशुद्धात्मा**—ज्याचें चित्त अतिशय शुद्ध झाले आहे, त्यामुळे—**विजितात्मा**—ज्यानें आपल्या देहाला आपल्या वश ठेविलें आहे व—**जितेन्द्रियः**—इंद्रियांनाहि जिंकिलें आहे तो—**सर्वभूतात्मभूतात्मा**—ज्याचा आत्मा सर्व भूतांच्या

---

अध्यायांपर्यंत केलेलें आहे.' (हें म्हणणें कितपत खरें आहे, ते पुढील अध्यायांचे श्लोक व भाष्य यांच्या अर्थावरून वाचकास कळेलच; म्हणून येथें विस्तार करीत नाहीं.) "मोक्षदृष्ट्या दोहोंत कांहीं फरक नाहीं" (हें म्हणणें खोटें आहे. येथील सहावा श्लोकच त्यांतील साध्य-साधनरूप फरक स्पष्ट सांगत आहे.) "अनादिकालापासून चालत आलेल्या या दोन मार्गांतील भेद फुगवून दाखवून त्याकरिता तटे करीत बसणें योग्य नव्हे." कर्मयोग व ज्ञानयोग यांतील कर्मयोग साधन व ज्ञानयोग साध्य, या रूपानें हे दोन मार्ग अनादि कालापासून चालत आले असून त्याबद्दल गीतेवरील कोणत्याहि टीकाकारांचा मतभेद नाहीं. कर्मयोगाचे अधिकारी निराळे व ज्ञानयोगाचे अधिकारी निराळे, याविषयींहि कोणाचा वाद नाहीं. 'कर्मयोग ज्ञानोत्तर आमरणान्त निष्कामबुद्धीने आचरला पाहिजे' असें भलतेंच मत उपस्थित करून हा तंटा रहस्यकारांनीच उकरून काढला आहे. यासंबंधाने पूर्वी कधींच कोणाचे तटे झालेले नाहींत. त्यांतील भेद कोणींच फुगवून दाखवावयास नको. स्वभावतःच तो फुगलेला आहे. कर्मयोग व ज्ञानयोग याचा जर स्वाभाविक भेद नसता व त्याचे अधिकारीहि निरनिराळे नसते, तर भगवानांनी 'ज्ञानयोगेन सांख्याना कर्मयोगेन योगिना' असे म्हटले नसते. अर्थात् येथे दोघांचें जें ऐक्य सांगितलें आहे, तें स्वाभाविक नसून त्यांतील एक साधन व दुसरें साध्य असल्यामुळें शेवटीं दोहोंचेंहि मोक्ष हें एकच फल मिळतें, या दृष्टीनें आहे. 'उभयोर्विदन्ते फल' व 'तत् योगैरपि गम्यते' या शब्दांवरूनच ही गोष्ट स्पष्ट आहे. "कर्मयोगावाचून सन्यास प्राप्त होणें दुर्घट आहे," यावरूनच कर्मयोग ज्ञानयोगाचें साधन आहे व त्याच्या द्वारा मोक्षानें साधन आहे, साक्षात् नव्हे, हें सिद्ध होतें. पण रहस्यकार म्हणतात—"संन्यासमार्गांत ज्ञान प्रधान मानलें तरी त्या ज्ञानाची सिद्धि कर्में केल्याखेरीज होत नाहीं, आणि कर्ममार्गांत कर्में करीत असतात तरी तीं ज्ञानपूर्वक असल्यामुळे ब्रह्मप्राप्ति व्हावयाची रहात नाही. मग दोन मार्ग निरनिराळे आहेत, असें बंड माजविण्यांत काय हशील?" ज्ञानाची सिद्धि जर कर्में केल्यावांचून होत नाहीं, तर तीं कर्में हाच कर्मयोग नव्हे का? कर्ममार्ग म्हणून त्यावांचून आणखीं कांहीं निराळा आहे वाटतें? कर्ममार्गांत ज्ञानपूर्वक कर्में करितात, याला प्रमाण काय? तिसऱ्या अध्यायाच्या २५ व्या श्लोकावरून कर्ममार्ग हा स्वतंत्र मोक्षमार्ग आहे असें सिद्ध होत नाहीं, हें आम्ही पूर्वी सांगितलेंच आहे. (पृ. २५९ पहा) 'ज्ञानमार्ग निराळा व कर्ममार्ग निराळा, तुल्यबल स्वतंत्र मोक्षमार्ग' हें बंड प्राचीन सांप्रदायिक टीकाकारांतील एकहि टीकाकार माजवीत नसून खुद्द रहस्यकारांनी ते बंड उभारलें आहे. सर्व सांप्रदायिक टीकाकार कर्मयोग ज्ञानयोगाचें अंग असेंच मानीत आहेत.

आत्मरूप झाला आहे, असा ज्ञानी होतो—**कुर्वन् अपि**—तो कर्म जरी करीत असला तरी—**न लिप्यते**—त्यानें बद्ध होत नाही. ७.

**यदा पुनरयं सम्यग्दर्शनप्राप्त्युपायत्वेन योगेन युक्तो योगयुक्तो विशुद्धात्मा विशुद्धसत्त्वो विजितात्मा विजितदेहो जितेन्द्रियश्च सर्वभूतात्मभूतात्मा सर्वेषां ब्रह्मादीनां स्तम्बपर्यन्तानां भूतानामात्मभूत आत्मा प्रत्यक्चेतनो यस्य स सर्वभूतात्मभूतात्मा सम्यग्दर्शीत्यर्थः। स तत्रैवं वर्तमानो लोकसंग्रहाय कर्म कुर्वन्नपि न कर्मभिर्बध्यत इत्यर्थः ॥ ७ ॥**

**भाष्यार्थ**—( अहोपण, संन्यासाश्रम घेऊन वारंवार श्रवणादि साधनाचें अनुष्ठान करणाऱ्या जिज्ञासूला आत्मज्ञान जरी झाले तरी तो पूर्वीप्रमाणेच कर्म करीत असलेला दिसतो. तीं कर्मे त्याच्या बंधाला कारण होतील, अशी आशंका घेऊन सागतात-)—**यदा पुनः अयं सम्यग्दर्शनप्राप्त्युपायत्वेन**—पण जेव्हा हा मुमुक्षु सम्यग्दर्शनाच्या प्राप्तीचा उपाय या रूपाने—**योगेन युक्तः-योगयुक्तः**—योगाने युक्त म्हणजे योगयुक्त,—**विशुद्धात्मा-विशुद्धसत्त्वः**—अत्यंत शुद्धात्मा म्ह० अतिशय शुद्धचित्त,—**विजितात्मा-विजितदेहः**—ज्याने देहाला विशेषेकरून जिकले आहे, स्वाधीन ठेवले आहे—**च जितेन्द्रियः**—आणि जो जितेन्द्रिय आहे—**सर्वभूतात्मभूतात्मा-यस्य आत्मा-प्रत्यक्चेतनः सर्वेषां ब्रह्मादीनां स्तंबपर्यन्तानां भूतानां आत्मभूत सः सर्वभूतात्मभूतात्मा सम्यग्दर्शी इत्यर्थः**—'सर्वभूतात्मभूतात्मा' ज्याचा आत्मा म्ह० सर्वान्तर्यामी चेतन ब्रह्मादिस्तंबपर्यंत सर्वभूतांचा आत्मरूप झाला आहे, तो सर्वभूतात्मभूतात्मा म्ह० सम्यग्दर्शी असा याचा भावार्थ.—**तत्र एवं वर्तमानः सः**—त्या सम्यग्दर्शनात याप्रमाणे असणारा तो—**लोकसंग्रहाय कर्म कुर्वन् अपि न लिप्यते-कर्मभिः न बध्यते इत्यर्थः**—लोकसंग्रहासाठी कर्म करीत असला तरी लिप्त होत नाही, त्या कर्मानी बद्ध होत नाही, असा याचा भावार्थ. [ ज्ञानप्राप्तीचा उपाय या रूपाने जेव्हां हा मुमुक्षु नित्य-नैमित्तिक कर्मानुष्ठान करितो, तेव्हा त्यामुळेच त्याचें चित्त शुद्ध म्ह० रजस्तमोगुणरहित होते, त्यामुळें त्याचें शरीर व इंद्रियें हीं दोन्ही त्याच्या स्वाधीन राहतात, त्याला माझा आत्माच सर्वभूतांचा आत्मा आहे असें सर्वात्मैक्यदर्शन होतें, अशा ज्ञानामध्ये स्थित असलेल्या त्यानें पुढे लोकसंग्रहासाठीं कर्मे जरी केलीं, तरी तीं त्याला बद्ध करीत नाहीत, पुनर्जन्माचीं निमित्तें होऊन रहात नाहीत. अर्थात् ज्ञानोत्तर घडणारीं कर्मे आभासरूप असल्यामुळें त्यांना ' कर्मयोग ' हें नांव देतां येत नाहीं. ] ७.

---

१ रहस्यकार ' विजितात्मा जितेंद्रियः' या पदाचा अर्थ ज्यानें आपलें मन व इंद्रियें जिकलीं' असा करितात. पण ' विशुद्धात्मा ज्याचें अंतःकरण शुद्ध, ' येथील आत्मशब्दाचा अर्थ अन्तःकरण असा एकदा केल्यावर पुनः ' विजितात्मा ' येथेंहि त्याचाच ' मन ' असा अर्थ करणें अयोग्य आहे. म्हणून विजितात्मा म्ह० विजितदेह हाच अर्थ बरोबर आहे. शिवाय अन्तःकरण शुद्ध झाल्यावर मनाला जिंकण्याची आवश्यकताच काय आहे ?

नैव किंचित्करोमीति युक्तो मन्येत तत्त्ववित् ।
पश्यञ्शृण्वन्स्पृशञ्जिघ्रन्नश्नन्गच्छन्स्वपञ्श्वसन् ॥ ८ ॥
प्रलपन्विसृजन्गृह्णन्नुन्मिषन्निमिषन्नपि ।
इन्द्रियाणीन्द्रियार्थेषु वर्तन्त इति धारयन् ॥ ९ ॥

**अन्वयार्थ—तत्त्ववित्**—तत्त्वज्ञ—**पश्यन्**—डोळ्यांनीं पहात—**शृण्वन्**—कानांनी ऐकत—**स्पृशन्**—त्वगिंद्रियानें स्पर्श करीत—**जिघ्रन्**—नाकानें वास घेत—**अश्नन्**—जिभेनें रस चाखीत—**गच्छन्**—पायानें चालत—**स्वपन्**—मन लीन झाल्यामुळें झोंप घेत—**श्वसन्**—श्वासोच्छ्वास करीत—**प्रलपन्**—वागिंद्रियानें बोलत—**विसृजन्**—पायु इंद्रियानें विष्ठेचा त्याग करीत—**गृह्णन्**—हातांनीं घेत—**उन्मिषन्**—पापण्या उघडीत व—**निमिषन् अपि**—पापण्या झांकीत असतांनाहि—**इन्द्रियाणि**—इंद्रियें—**इन्द्रियार्थेषु**—विषयांमध्यें—**वर्तन्ते**—प्रवृत्त होत आहेत ( मी नव्हे ) असें—**धारयन्**—मनांत धरून-समजून—**किंचित्**—कांहीं कोणत्याहि क्रिया—**न एव करोमि**—मी स्वतः करीत नाहीं—**इति**—असें—**युक्तः**—आत्म्यामध्यें चित्ताला स्थिर ठेवून—**मन्येत**—चिंतावें. तत्त्ववेत्त्यानें असें चिंतन करावें. ८–९.

**न चासौ परमार्थतः करोत्यतः—नैव किंचित्करोमीति युक्तः समाहितः सन्मन्येत चिन्तयेत्तत्त्वविदात्मनो याथात्म्यं तत्त्वं वेत्तीति तत्त्ववित्परमार्थदर्शीत्यर्थः कदा कथं वा तत्त्वमवधारयन्मन्येतेत्युच्यते—मन्येतेति पूर्वेण संबन्धः । यस्यैवं तत्त्वविदः सर्वकार्यकरणचेष्टासु कर्मस्वकर्मैव पश्यतः सम्यग्दर्शिनस्तस्य सर्वकर्मसंन्यास एवाधिकारः कर्मणोऽभावदर्शनात् । न हि मृगतृष्णिकायामुदकबुद्ध्या पानाय प्रवृत्त उदकाभावज्ञानेऽपि तत्रैव पानप्रयोजनाय प्रवर्तते ॥ ८, ९ ॥**

**भाष्यार्थ**—( वरील श्लोकांत ज्ञानी लोकसंग्रहार्थ कर्मे करतो, असे गृहीत धरून त्याला तीं बद्ध करीत नाहींत, असे सांगितले. आतां वस्तुतः त्याची कर्मेच संभवत नाहींत, असें सांगतात-)—**च असौ परमार्थतः न करोति**—आणि हा ज्ञानी खरोखर कांहीं करीत नाहीं—**अतः 'नैव किंचित् करोमि' इति युक्तः समाहितः सन् मन्येत-चिन्तयेत्**—म्हणून 'मी कांहीं करीत नाहींच' असें युक्त म्ह० समाहित-शांतचित्त होऊन चिंतन करावें. ( कोणीं ? )—**तत्त्ववित्-आत्मनः याथात्म्यं तत्त्वं वेत्ति इति तत्त्ववित्-परमार्थदर्शी इत्यर्थः**—तत्त्ववेत्त्यानें तसें चिंतन करावें. आत्म्याचें याथात्म्य-यथार्थस्वरूप-तत्त्व जाणतो तो तत्त्ववित्-परमार्थदर्शी असा याचा भावार्थ. [ ज्ञानी लौकिकदृष्टीनें जरी शरीरेंद्रियांची हालचाल करीत असला तरी त्यानें आपल्या तात्त्विक दृष्टीनें मी-आत्मा कांहीं करीत नाहीं, असें चिंतन करावें. ]—**कदा कथं वा तत्त्वं अवधारयन् मन्येत इति उच्यते**—पण केव्हां

व कसें तत्त्वाचें अवधारण-निश्चय करीत असें चिंतन करावें तें 'पश्यन्०' इत्यादि दीड श्लोकानें सांगितलें जातें.—**मन्येत इति पूर्वेण संबंधः**—चक्षुरादि ज्ञानेंद्रियें, वागादि कर्मेंद्रियें, प्राणादि वायुभेद व अन्तःकरणचतुष्टय यांच्यायोगानें ती ती क्रिया करीत असतांना त्या त्या विषयांची सर्व प्रवृत्ति इंद्रियांची आहे, असें अंतःकरणांत अनुसंधान ठेवून मी आत्मा कांही करीत नाहीं, असें चिंतन करावें, असा वरील 'मन्येत' या क्रियापदाशीं संबंध लावावा. ( अशा विद्वानाला उद्देशून संन्यासाविधि जरी नसला तरी विधेच्या बलानें प्रतिपत्तिकर्मभूत फलात्मक कर्मसंन्यास इष्ट आहे, असें सांगतात-)—**यस्य एवं तत्त्वविदः सर्वकार्यकरणचेष्टासु कर्मसु अकर्म एव पश्यतः सम्यग्दर्शिनः** -**तस्य**—अशाप्रकारें तत्त्वाला जाणणाऱ्या-सर्व शरीरेंद्रियांच्या हालचालीमध्यें म्ह० कर्मांमध्यें अकर्मच पाहणाऱ्या-सम्यग्दर्शी पुरुषाचा—**सर्वकर्मसंन्यासे एव अधिकारः**—सर्वकर्मसंन्यासामध्येंच अधिकार आहे.—**कर्मणः अभावदर्शनात्**—कारण तो स्वतःमध्यें कर्मांचा अभाव पहात असतो.—**मृगतृष्णिकायां उदकबुद्ध्या पानाय प्रवृत्तः**— मृगजलामध्यें खऱ्या पाण्याची भावना ठेवून तें प्यावयासाठीं तिकडे गेलेला मनुष्य—**उदकाभावज्ञाने अपि तत्र एव पानप्रयोजनाय न हि प्रवर्तते**—तेथें उदक-जळ नाहीं, तो केवल जलाभास होता, असें समजल्यावरहि तेथेंच पुनः जलपान हें आपलें प्रयोजन साधून घेण्यास प्रवृत्त होत नाहीं, हें प्रसिद्ध आहे. [ त्याच न्यायानें मी अकर्ता आहें, ही कर्में माझीं नव्हेत, माझ्या ठिकाणीं कर्मांचा अभाव आहे, असें स्वानुभवानें कळल्यावरहि ज्ञानी व्यर्थ कर्में करीत राहील, कर्मयोगाचें अनुष्ठान करील, हें शक्य नाहीं. अर्थात् हें रहस्य न जाणतां जे कोणी आत्मसाक्षात्कारानंतरहि कर्माचरण केलेंच पाहिजे, म्हणून आग्रह धरितात त्यांना अद्वैतसिद्धान्ताचें व आत्मसाक्षात्काराचें खरें स्वरूप कळलें नाहीं, असें म्हणावें लागतें. ] ८,९.

---

१ रहस्यकार ७-९ श्लोकावरील टीपेंत म्हणतात—"मी कांहींच करीत नाहीं, याचा अर्थ इंद्रियांना हवें तें करूं द्यावें, असा नाहीं, तर 'मी' ही अहंकारबुद्धि सुटली म्ह० अचेतन इंद्रियें आपण होऊन कांही वाईट काम करूं शकत नाहीत, व आत्म्याच्या ताब्यांत राहतात." अहंकारबुद्धि सुटली म्ह० इंद्रियें वाईट काम करूं शकत नाहींत, हे जर खरें मानावयाचें तर ती कर्मयोग तरी कशीं करतील? आत्म्याच्या प्रेरणेनें करतील म्हणून म्हणावें तर अहंकारबुद्धि सुटल्यावर आत्मा तरी त्यांना प्रेरणा कशी करणार? पुढें रहस्यकार म्हणतात—"पुरुष ज्ञानी झाला तरी श्वासोच्छ्वासादि इंद्रियांचीं कर्में इन्द्रियें करणारच." (श्वासोच्छ्वास हें इंद्रियांचें कर्म नव्हे. प्राण व अपान यांचें तें कर्म आहे.) "किंबहुना क्षणभर जिवंत राहणें हें देखील कर्मच." (होय. पण तें पुरुषाच्या अधीन असलेलें कर्म नव्हे. तो शरीरधर्म आहे, स्वाभाविक कर्म आहे.) "मग संन्यासमार्गी ज्ञानी पुरुष कर्में सोडतो व कर्मयोगी करतो हा भेद राहिला कोठें ?" ( पण संन्यासमार्गी जिवंत राहणें, खाणें, पिणें, निजणें, बसणें, श्वासोच्छ्वास, पाहणें, ऐकणें इत्यादि व शरीरस्थितिमात्रप्रयोजन-सर्व प्राणिसाधारण कर्में सोडतो, असें रहस्यकारांना सांगितलें कोणीं ? रहस्यकारांनीं आपली भलतीच समजूत करून घेऊन हा निराधार प्रश्न केला आहे, असें म्हणण्यास कोणाची भीति आहे काय ? संन्यास करणें म्हणजे साधनांसह

**ब्रह्मण्याधाय कर्माणि संगं त्यक्त्वा करोति यः ।**
**लिप्यते न स पापेन पद्मपत्रमिवाम्भसा ॥ १० ॥**

**अन्वयार्थ—यः**—जो—**कर्माणि**—शास्त्रीय कर्मे—**ब्रह्मणि**—ब्रह्मामध्यें-ईश्वरामध्यें—**आधाय**—अर्पण करून—**संगं**—फलाची आसक्ति—**त्यक्त्वा**—सोडून—**करोति**—करतो—**सः**—तो—**अम्भसा**—पाण्यानें—**पद्मपत्रं इव**—कमलाचें पान किंवा पाकळी जशी, त्याप्रमाणें—**पापेन**—पापानें—**न लिप्यते**—लिप्त होत नाहीं. १०.

**यस्तु पुनरतत्त्ववित्प्रवृत्तश्च कर्मयोगे—ब्रह्मणीश्वर आधाय निक्षिप्य तदर्थं करोमीति भृत्य इव स्वाम्यर्थं सर्वाणि कर्माणि मोक्षेऽपि फले सङ्गं त्यक्त्वा करोति यः सर्वकर्माणि लिप्यते न स पापेन न संबध्यते पद्मपत्रमिवाम्भसोदकेन ॥ १० ॥**

**भाष्यार्थ—तु पुनः यः अतत्त्ववित् च कर्मयोगे प्रवृत्तः**—पण याच्या उलट, जो तत्त्ववेत्ता नसतो व कर्मयोगांत प्रवृत्त झालेला असतो ( त्याला पाप कसें लागत नाहीं तें 'ब्रह्मणि०' या श्लोकानें सांगतात-)—**ब्रह्मणि ईश्वरे सर्वाणि कर्माणि आधाय-निक्षिप्य**—ब्रह्मामध्ये म्ह० ईश्वराचे ठिकाणीं सर्व कर्मांचे आधान करून-निक्षेप करून (टाकून-ठेवून-समर्पण करून)—**भृत्यः स्वाम्यर्थं इव तदर्थं करोमि इति**—चाकर आपल्या धन्यासाठीं जसा त्याप्रमाणें मी ईश्वरासाठीं कर्मे करतों, अशा भावनेनें कर्मे ईश्वरार्पण करून—**मोक्षे अपि फले संगं त्यक्त्वा**—मोक्ष या फलाविषयींचीहि आसक्ति टाकून—**यः सर्वकर्माणि करोति**—जो सर्व कर्मे करितो—**सः पद्मपत्रं अंभसा-उदकेन इव पापेन न लिप्यते-न संबध्यते**— कमलाचें पान उदकानें जसें लिप्त होत नाहीं, त्याप्रमाणे तो पापानें लिप्त होत नाहीं. पापानें बद्ध होत नाहीं. कर्मे त्याला बद्ध करीत नाहींत. [सर्व कर्मे ईश्वरार्पण करून मोक्षफलाचीहि इच्छा न करितां जो अनात्मज्ञ तीं आचरितो त्याला तीं कर्मे बद्ध करीत नाहींत.]

---

पुत्रादिएषणात्रयाचा त्याग करणें म्ह० गृहस्थाश्रमाचीं कर्मे टाकणे व कर्मयोग म्ह० तींच कर्मे करणें. अर्थात् रहस्यकारांनी आपल्या पुस्तकांत वारंवार हा प्रश्न जो पुढें आणिला आहे, तो अप्रस्तुत आहे. शिवाय ज्ञानयोग व कर्मयोग हा भेद खुद्द गीतेनें केलेला आहे.तिसऱ्या अध्यायाचा तिसरा श्लोक पहा. ) " कर्मे करणें दोघांसहि प्राप्त आहे " ( हें म्हणणे खोटें आहे. सन्यासी ज्या कर्मांचा सन्यास करतो तीं त्याला प्राप्त नाहींत. ) " अहंकारयुक्त आसक्ति सुटली म्ह० तींच कर्मे बधक होत नसल्यामुळें आसक्ति सोडणें हेंच कार्यतें त्यांतील मुख्य तत्त्व आहे. " ( फलासक्ति व कर्तृत्वाभिमान यांसह सर्व कर्मे सोडणें हा मुख्य पक्ष. पण तो ज्यांना असाध्य असेल त्यांच्यासाठींच .फलासक्ति व कर्तृत्वाभिमान यांचा त्याग विहित आहे, हें मुख्य तत्त्व आहे, सर्वांनींच कर्तृत्वाभिमान व फलासक्ति टाकावी, कर्मे कोणींच टाकूं नयेत, असें जर भगवानाचें मत असतें,तर त्यांनीं नैष्कर्म्यलक्षण ज्ञाननिष्ठा सांगितलीच नसती. )

कायेन मनसा बुद्ध्या केवलैरिन्द्रियैरपि ।
योगिनः कर्म कुर्वन्ति सङ्गं त्यक्त्वाऽऽत्मशुद्धये ॥११॥

**अन्वयार्थ—योगिनः**—कर्माधिकारी गृहस्थ—**(केवलेन) कायेन**—केवल शरीरानें—**(केवलेन) मनसा**—केवल मनानें—**(केवलया) बुद्ध्या**—केवल बुद्धीने व—**केवलैः इंद्रियैः अपि**—केवल–नुसत्या इंद्रियांनीहि—**सगं**—फलाविषयींची आसक्ति—**त्यक्त्वा**—सोडून—**आत्मशुद्धये**—चित्तशुद्धीसाठी—**कर्म**—नित्य व नैमित्तिक कर्म—**कुर्वन्ति**—करितात. ११

**केवलं सत्त्वशुद्धिमात्रफलमेव तस्य कर्मणः स्यात्, यस्मात्—कायेन देहेन मनसा बुद्ध्या च केवलैर्ममत्ववर्जितैरीश्वरायैव कर्म करोमि न मम फलायेति ममत्वबुद्धिशून्यैरिन्द्रियैरपि, केवलशब्दः कायादिभिरपि प्रत्येकं संबध्यते सर्वव्यापारेषु ममतावर्जनाय, योगिनः कार्मिणः कर्म कुर्वन्ति सङ्गं त्यक्त्वा फलविषयमात्मशुद्धये सत्त्वशुद्धय इत्यर्थः । तस्मात्तत्रैव तवाधिकार इति कुरु कर्मैव ॥ ११ ॥**

**भाष्यार्थ—तस्य कर्मणः केवलं सत्त्वशुद्धिमात्रफलं एव स्यात्**—त्या अविद्वानाच्या कर्माचें केवल सत्त्वशुद्धि हे एवढेंच फल आहे,—**यस्मात्**—कारण—**कायेन-देहेन मनसा च बुद्ध्या**—शरीराने, मनाने व बुद्धीने—**केवलैः-ममत्ववर्जितैः ईश्वराय एव कर्म करोमि मम फलाय न इति ममत्वबुद्धिशून्यैः इंद्रियैः अपि**—केवल म्ह० ममतारहित म्ह० ईश्वरासाठींच मी कर्म करतों माझ्या फलासाठीं-मला कांही फल मिळावें, म्हणून नाहीं, अशा ममत्वबुद्धिशून्य इंद्रियांनीहि—**केवलशब्दः कायादिभिः अपि प्रत्येकं संबध्यते**—केवल हा शब्द शरीर, मन व बुद्धि यांतील प्रत्येकाशीं संबद्ध होतो. ( कशासाठीं ? )—**सर्वव्यापारेषु ममतावर्जनाय**—सर्व व्यापारांवरील ममता-ममत्वबुद्धि सोडण्यासाठीं केवलशब्द शरीरादि प्रत्येकाशीं जोडावा—**योगिनः-कार्मिणः फलविषयं संगं त्यक्त्वा आत्मशुद्धये-सत्त्वशुद्धये इत्यर्थः**—योगी म्ह० कर्मी फलविषयक संग-फलाची आसक्ति टाकून आत्मशुद्धीसाठीं म्ह० चित्तशुद्धीसाठीं असा भावार्थ,[कर्म करितात आणि ज्याअर्थी कर्माचें

---

१ रहस्यकार आत्मशुद्धये म्ह० काय ते सांगण्याच्या भानगडींत मुळींच पडत नाहींत. कारण ' आत्मशुद्ध्यर्थ ' या पलीकडे त्याच्या स्पष्टीकरणार्थ एखादाहि अधिक शब्द वापरल्यास आपल्या कर्मयोगाला कर्मीपणा येईल, हे ते ओळखून होते. याच श्लोकावरील टीपेंत ते म्हणतात—" कायिक, वाचिक, मानसिक इत्यादि कर्मांचे जे भेद आहेत, त्यांना अनुलक्षून शरीर, मन, व बुद्धि हे शब्द या श्लोकांत आले आहेत." पण तें बरोबर नाहीं. कारण येथें शरीर, वाक् व मन हीं तीनच कर्मांची साधनें सांगितलीं नसून बुद्धि व इतर इंद्रियेंहि घेतलीं आहेत. यास्तव शरीर, ज्ञान-कर्मेंद्रियें, मन, बुद्धि इत्यादि सर्व साधनांनीं होणारां सर्व कर्म येथें विवक्षित आहेत.

चित्तशुद्धि हेंच फल असून त्यासाठीं कर्मानुष्ठानच तुला करणें अवश्य आहे.]—**तस्मात् तत्र एव तव अधिकारः इति कर्म एव कुरु**—त्याअर्थी कर्मातच तुझा अधिकार आहे, म्हणून तूं कर्मच कर. ११

**युक्तः कर्मफलं त्यक्त्वा शान्तिमाप्नोति नैष्ठिकीम् ।**
**अयुक्तः कामकारेण फले सक्तो निबध्यते ॥ १२ ॥**

**अन्वयार्थ—युक्तः**—हीं कर्मे ईश्वरासाठीं आहेत, माझ्या फलासाठीं नव्हेत, असें समजून मनांत शांत असलेला मुमुक्षु—**कर्मफलं**—कर्माच्या फलाला—**त्यक्त्वा**—सोडून—**नैष्ठिकीं**—निष्ठाच्या क्रमानें प्राप्त होणाऱ्या—**शान्ति**—मोक्षाख्य शांतीस—**आप्नोति**—प्राप्त होतो.—**अयुक्तः**—पण जो मनांत असमाहित-अशान्त असतो, तो—**कामकारेण**—कामाच्या योगानें प्रेरित झाल्यामुळें—**फले सक्तः**—फलामध्यें आसक्त झालेला असा होत्साता—**निबध्यते**—अत्यंत बद्ध होतो. १२

**यस्माच्च—युक्त ईश्वराय कर्माणि न मम फलायेत्येवं समाहितः सन्कर्मफलं त्यक्त्वा परित्यज्य शान्तिं मोक्षाख्यामाप्नोति नैष्ठिकीं निष्ठायां भवां सत्त्वशुद्धिज्ञानप्राप्तिसर्वकर्मसंन्यासज्ञाननिष्ठाक्रमेणेति वाक्यशेषः । यस्तु पुनरयुक्तोऽसमाहितः कामकारेण करणं कारः कामस्य कारः कामकारस्तेन कामकारेण कामप्रेरिततयेत्यर्थः । मम फलायेदं करोमि कर्मेत्येवं फले सक्तो निबध्यतेऽतस्त्वं युक्तो भवेत्यर्थः ॥ १२ ॥**

**भाष्यार्थ**—( याहि कारणानें तुला फलासक्ति सोडून कर्मच करणें उचित आहे, असें ' युक्तः०' या श्लोकानें सांगतात-)—**च यस्मात्**—आणि ज्याअर्थी—**युक्तः-ईश्वराय कर्माणि न मम फलाय इति एवं समाहितः सन्**—युक्त म्ह० ईश्वरार्थ हीं कर्मे आहेत, माझ्या फलासाठीं नाहींत, अशा प्रकारें शांतचित्त होत्साता-कर्मे करणारा—**कर्मफलं त्यक्त्वा-परित्यज्य मोक्षाख्यां नैष्ठिकींनिष्ठायां-भवां शांतिं आप्नोति**—कर्मफलाचा त्याग-संन्यास करून मोक्ष या नांवाच्या नैष्ठिकी म्ह० निष्ठेंतील शांतीला प्राप्त होतो, ( त्याअर्थी तूं फलासक्ति सोडून कर्म कर. ' नैष्ठिकीं ' या शब्दाच्या अर्थाचें स्पष्टीकरण-)—**सत्त्वशुद्धि-ज्ञानप्राप्ति-सर्वकर्मसंन्यास-ज्ञाननिष्ठाक्रमेण इति वाक्यशेषः**—चित्तशुद्धि, ज्ञानप्राप्ति, सर्वकर्मसंन्यास व ज्ञाननिष्ठा या क्रमानें नैष्ठिकी शांतीला प्राप्त होतो, असा शेष लावावा.—**तु पुनः यः अयुक्तः-असमाहितः**—पण याच्या उलट जो अयुक्त-अशान्त असतो तो—**कामकारेण-करणं कारः कामस्य कारः कामकारः तेन कामकारेण-कामप्रेरिततया इत्यर्थः**—कामकारानें-करणें हाच कार, कामाचा कार-कामकार, त्या कामकारानें म्ह० कामाकडून प्रेरित झाल्यामुळें असा भावार्थ—**मम फलाय इदं कर्म करोमि इत्येवं फले सक्तः निबध्यते**—माझ्या फलासाठीं-मला फल मिळावें म्हणून मी हें कर्म करतों, अशा प्रकारें फलांत आसक्त होऊन पूर्णपणे बद्ध होतो.—

अतः त्वं युक्तः भव इत्यर्थः—याप्रमाणें असमाधानांत मोठा दोष असल्यामुळें तूं युक्त-समाधानयुक्त हो, असा भावार्थ १२.

सर्वकर्माणि मनसा संन्यस्याऽऽस्ते सुखं वशी ।
नवद्वारे पुरे देही नैव कुर्वन्न कारयन् ॥ १३ ॥

**अन्वयार्थ—वशी**—जितेंद्रिय—**देही**—देहवान् आत्मा-मुमुक्षु—**सर्वकर्माणि**—नित्यादि सर्व कर्मे—**मनसा**—मनानें—**संन्यस्य**—सोडून—**नवद्वारे पुरे**—नऊ द्वारांनीं युक्त अशा पुरांत-शरीरांत—**न कुर्वन्**—काहींएक न करीत व—**न एव कारयन्**—कांहीं न करवीत—**सुखं**—सुखानें—**आस्ते**—राहतो. १३

**यस्तु परमार्थदर्शी सः—सर्वाणि कर्माणि सर्वकर्माणि संन्यस्य परित्यज्य नित्यं नैमित्तिकं काम्यं प्रतिषिद्धं च सर्वकर्माणि तानि मनसा विवेकबुद्ध्या कर्मादावकर्मसंदर्शनेन संत्यज्येत्यर्थः । आस्ते तिष्ठति सुखं त्यक्तवाङ्मनःकायचेष्टो निरायासः प्रसन्नचित्त आत्मनोऽन्यत्र निवृत्तबाह्यसर्वप्रयोजन इति सुखमास्त इत्युच्यते । वशी जितेन्द्रिय इत्यर्थः । क्व कथमास्त इत्याह नवद्वारे पुरे सप्त शीर्षण्यान्यात्मन उपलब्धिद्वाराण्यर्वाग्द्वे मूत्रपुरीषविसर्गार्थे तैर्द्वारैर्नवद्वारं पुरमुच्यते, शरीरं पुरमिव पुरमात्मैकस्वामिकं तदर्थप्रयोजनैश्चेन्द्रियमनोबुद्धिविषयैरनेकफलविज्ञानस्योत्पादकैः पौरैरिवाधिष्ठितं तस्मिन्नवद्वारे पुरे देही सर्वं कर्म संन्यस्याऽऽस्ते ॥**

**भाष्यार्थ**—( तर मग फलाची आसक्ति टाकून सर्वांनीच कर्म करावें, असें झाले व त्यामुळें कर्मसंन्यासाला अवकाशच उरला नाहीं, अशी आशंका घेऊन अविद्वानाहून विद्वानामध्यें कोणता विशेष असतो ते 'सर्व०' या श्लोकानें सांगतात-)—**तु यः परमार्थदर्शी सः सर्वाणि कर्माणि सर्वकर्माणि संन्यस्य-परित्यज्य**—पण जो परमार्थदर्शी असतो तो सर्व कर्मे टाकून-सर्व कर्मांचा परित्याग करून—**नित्यं नैमित्तिकं काम्यं प्रतिषिद्धं च सर्वकर्माणि**—नित्य, नैमित्तिक, काम्य व निषिद्ध हीं सर्व कर्मे—**तानि मनसा-विवेकबुद्ध्या कर्मादौ अकर्मसंदर्शनेन संत्यज्य इत्यर्थः**—तीं मनानें म्ह० विवेकबुद्धीनें-कर्मादिकांमध्यें अकर्म पाहणें, या उपायानें पूर्णपणें टाकून-त्यांचा त्याग करून, असा याचा भावार्थ.—**सुखं आस्ते-तिष्ठति**—सुखानें राहतो. म्ह०—**त्यक्तवाङ्मनःकायचेष्टः निरायासः प्रसन्नचित्तः आत्मनः अन्यत्र निवृत्तबाह्यसर्वप्रयोजनः इति सुखं आस्ते इति उच्यते**—ज्यानें वाक्, मन व शरीर यांची हालचाल सोडली आहे, त्यामुळें जो आयासरहित व प्रसन्नचित्त झाला आहे, व ज्याचें आत्म्यावांचून बाकीचें सर्व बाह्य प्रयोजन निवृत्त झालें आहे, असा तो होतो त्यामुळें 'सुखं आस्ते' सुखानें राहतो, अनायासानें राहतो, असें म्हटलें जातें.—**वशी-जितेंद्रियः इत्यर्थः**—तो वशी म्ह० जितेंद्रिय असा भावार्थ [ जितेंद्रियत्वाबरोबर शरीराची स्वाधीनताहि घ्यावी. ज्यानें शरीर व इंद्रियें यांना आपल्या अधीन ठेविलें आहे तो वशी, असा याचा भावार्थ.]—**क्व कथं आस्ते इति**

आहे—तो कोठें व कसा राहतो तें भगवान् सांगतात—**नवद्वारे पुरे-सप्तशीर्षण्यानि आत्मनः उपलब्धिद्वाराणि अर्वाक् द्वे मूत्रपुरीषविसर्गार्थे तैः द्वारैः नवद्वारं पुरं उच्यते**—नऊ द्वारांनी युक्त असलेल्या नगरामध्ये-दोन कान, दोन डोळे, दोन नाकपुड्या व एक वाक् अशी सात मस्तकांतील आत्म्याच्या शब्दादि-विषयानुभवाची स्थानें आणि मूत्र व विष्ठा यांच्या त्यागासाठी अधोमुख दोन द्वारें मिळून अशा नऊद्वारांनी युक्त असलेलें जे पुर ते 'नवद्वारपुर' म्हटले जाते.—**शरीरं पुरं इव पुरं**—हे शरीर जणुं काय पुरच आहे.—**आत्मैकस्वामिकं**—आत्मा हाच एक ज्याचा स्वामी आहे असें तें शरीरपुर आहे—**च तदर्थप्रयोजनैः इन्द्रिय-मनो-बुद्धि-विषयैः अनेकफलविज्ञानस्य उत्पादकैः पौरैः इव अधिष्ठितं**—आणि तें शरीररूपी पुर आत्म्याचा जो अनुभवरूप अर्थ तो संपादन करून देणे एवढेच ज्यांचें प्रयोजन आहे अशा व अनेक प्रकारच्या सुखदुःखरूप फलाच्या विज्ञानाला उत्पन्न करणाऱ्या इंद्रिय, मन, बुद्धि व विषय याच पौरांकडून जणुं काय अधिष्ठित झाले आहे. ( त्या शरीररूपी नवद्वारयुक्त नगरात, त्या नगराचा स्वामी जो आत्मा त्याच्या उपभोगासाठीं, अनेक प्रकारची विज्ञाने उत्पन्न करणारीं इंद्रिये, मन, बुद्धि, व विषय हेच नागरिक जन राहतात. )—**तस्मिन् नवद्वारे पुरे देही सर्वं कर्म संन्यस्य आस्ते**—या नवद्वारयुक्त नगरांत देही-आत्मा सर्व कर्म टाकून राहतो. [ देहाच्या जीवनाला देहाभिमान अत्यंत अवश्य असल्यामुळे तो देहाभिमानावभासाने जरी युक्त असतो तरी जसा एखादा प्रवासी दुसऱ्याच्या घरात त्या गृहस्थाची कोणी पूजा केली किंवा तिरस्कार केला तरी त्यामुळें हर्षविषादयुक्त न होतां राहतो, तसा हा ज्ञानी देहांत त्याचा कोणीं सत्कार केला किंवा तिरस्कार केला तरी हर्षविषादयुक्त न होतां राहतो. ]

**किं विशेषणेन, सर्वो हि देही संन्यास्यसंन्यासी वा देह एवाऽऽस्ते, तत्रानर्थकं विशेषणमिति । उच्यते, यस्त्वज्ञो देही देहेन्द्रियसंघातमात्रात्मदर्शी स सर्वो 'गेहे भूमावासने वाऽऽस' इति मन्यते । न हि देहमात्रात्मदर्शिनो गेह इव देह आस इति प्रत्ययः संभवति । देहादिसंघातव्यतिरिक्तात्मदर्शिनस्तु देह आस इति प्रत्यय उपपद्यते । परकर्मणां च परस्मिन्नात्मन्यविद्ययाऽध्यारोपितानां विद्यया विवेकज्ञानेन मनसा संन्यास उपपद्यते ॥**

**भाष्यार्थ—किं विशेषणेन**—पण येथें ' नवद्वारे पुरे ' हे विशेषण कां योजिलें आहे ? त्याचें प्रयोजन काय ?—**हि सर्वः देही-संन्यासी असंन्यासी वा देहे एव आस्ते**—कारण सर्व देही, मग तो संन्यासी असो कीं, असंन्यासी असो देहांतच राहतो—**तत्र विशेषणं अनर्थकं इति**—देहांत राहणें हे ज्ञानी व अज्ञ या दोघांनाहि समान असल्यामुळे ' देहे आस्ते ' हे विशेषण अनर्थक-व्यर्थ आहे, असा आक्षेप आला असतां—**उच्यते**—त्याचे समाधान सांगितले जाते—**तु यः अज्ञः देही-देहेंद्रियसंघातमात्रात्मदर्शी सः सर्वः गेहे भूमौ आसने वा आसे इति मन्यते**—पण विद्वान् व अविद्वान् यांतील जो अज्ञ देही म्ह० देह व इंद्रियें

यांचा एकरूप संघात हाच आत्मा असें समजणारा तो सर्व-प्रत्येकजण 'मी घरांत, भूमीवर किंवा आसनावर आहे,' असें समजतो, ( त्याचे तें समजणें खरें नव्हे आभासरूप आहे, असेंहि म्हणतां येत नाहीं. कारण-)—**देहमात्रात्मदर्शिनः गेहे इव देहे आसे इति प्रत्ययः न हि संभवति**—देहच आत्मा असें पाहणाऱ्या अज्ञाला मी घरांत जसा, तसाच देहांत राहतों, असा प्रत्यय येणे कधी शक्यच नाहीं,—**तु देहादिसंघातव्यतिरिक्तात्मदर्शिनः देहे आसे इति प्रत्ययः उपपद्यते**—पण आत्मा देहादिसंघाताहून अगदी व्यतिरिक्त-भिन्न-विलक्षण आहे, असें जाणणाऱ्या विद्वानाला 'मी देहांत राहतों' असा प्रत्यय येणे शक्य आहे. [ घरांत, आसनावर वगैरे देह राहतो, पण त्यामुळें 'मी राहतो' असा अज्ञाला भ्रम होतो. त्या भ्रमाची व्यावृत्ति करण्यासाठीं 'विद्वान् देहांत राहतो' हे विशेषण योग्यच आहे. कारण विवेकी पुरुषाला 'मी देहांत राहतो' असा भास होणे शक्य आहे. तथापि त्या विवेकी पुरुषाच्या ठिकाणी शारीर, वाचिक व मानस कर्माचा संभवच नसल्यामुळें त्यांचा त्याग करून त्याचे देहामध्ये अवस्थान कसे होणार ? उत्तर-]—**च अविद्यया परस्मिन् आत्मनि अध्यारोपितानां परकर्मणां विद्यया-विवेकज्ञानेन मनसा संन्यासः उपपद्यते**—आणि अविद्येनें देहादिकाहून अगदी भिन्न असलेल्या परमात्म्यामध्ये अध्यारोपिलेल्या शरीरेंद्रियांच्या कर्माचा विद्येच्या योगाने-विवेकज्ञानाने मनाने संन्यास संभवतो.

**उत्पन्नविवेकज्ञानस्य सर्वकर्मसंन्यासिनोऽपि गेह इव देह एव नवद्वारे पुर आसनं प्रारब्धफलकर्मसंस्कारशेषानुवृत्त्या देह एव विशेषविज्ञानोत्पत्तेर्देह एवाऽऽस्त इत्यस्त्येव विशेषणफलं विद्वदविद्वत्प्रत्ययभेदापेक्षत्वात् ॥**

**भाष्यार्थ**—(अहो पण, 'अखंड, निर्विकार ब्रह्म मी आहे,' असे समजणाऱ्या विवेकी पुरुषाचें देहामध्यें अवस्थान होते, तो देहांत राहतो, हे म्हणणें कसे शक्य आहे ? उत्तर-)—**उत्पन्नविवेकज्ञानस्य सर्वकर्मसंन्यासिनः अपि गेहे इव देहे एव नवद्वारे पुरे आसनं**—ज्याला विवेकज्ञान झाले आहे अशा सर्वकर्मसंन्याशाचेंहि घरांत जसें, तसे देहांतच-नवद्वारयुक्तपुरात अवस्थान संभवते.—**प्रारब्धफलकर्मसंस्कारशेषानुवृत्त्या देहे एव विशेषविज्ञानोत्पत्तेः**—कारण ज्याच्या फलाला आरंभ झाला आहे अशा धर्माधर्मात्मक कर्मांतील उपभोग घेऊन अवशिष्ट राहिलेल्या कर्मामुळे देहादिसंस्कार अनुवृत्त होतो. त्यामुळे विवेकी संन्याशाला 'या देहांतच मी राहतों,' असें विशेष विज्ञान होऊं शकतें. [ अर्थात् अविद्वानाच्या समजुतीच्या अपेक्षेनें विशेषणाचा असंभव जरी असला तरी विद्वत्प्रत्ययाच्या अपेक्षेनें विशेषण व्यर्थ नाहीं, असा उपसंहार करितात-]—**'देहे एव आस्ते' इति विशेषणफलं अस्ति एव विद्वदविद्वत्प्रत्ययभेदापेक्षत्वात्**—त्यामुळें 'देहांतच राहतो' या विशेषणाचे फल आहेच. कारण विद्वान् व अविद्वान् यांच्या भिन्न प्रत्ययांच्या अपेक्षेने ते योजिलें आहे. [देहांत मी राहतों, असा विद्वानाचा प्रत्यय व त्याच्या उलट अविद्वानाचा प्रत्यय असतो. याप्रमाणें विद्वान्

व अविद्वान् यांच्या प्रत्ययाचा भेद असल्यामुळें विद्वानाच्या प्रत्ययाला अनुलक्षून हें विशेषण सार्थच आहे, व्यर्थ नाहीं. ]

**यद्यपि कार्यकरणकर्माण्यविद्ययाऽऽत्मन्यध्यारोपितानि संन्यस्याऽऽस्त इत्युक्तं तथाऽप्यात्मसमवायि तु कर्तृत्वं कारयितृत्वं च स्यादित्याशङ्क्याऽऽह नैव कुर्वन्स्वयं न कार्यकरणानि कारयन्क्रियासु प्रवर्तयन् । किं यत्तत्कर्तृत्वं कारयितृत्वं च देहिनः स्वात्मसमवायि सत्संन्यासान्न भवति यथा गच्छतो गतिर्गमनव्यापारपरित्यागे न स्यात्तद्वत् किं वा स्वत एवाऽऽत्मनो नास्तीति अत्रोच्यते नास्त्यात्मनः स्वतः कर्तृत्वं कारयितृत्वं च । उक्तं हि—'अविकार्योऽयमुच्यते' 'शरीरस्थोऽपि कौन्तेय न करोति न लिप्यते' इति । "ध्यायतीव लेलायतीव" इति च श्रुतेः ॥ १३ ॥**

**भाष्यार्थ**--( अहोपण, आरोपित कर्तृत्वादिकांचा जरी आत्म्याचे ठिकाणीं अभाव असला तरी स्वगतकर्तृत्वादिकांचे निवारण होणे शक्य नाही, अशी आशंका घेऊन तिचा परिहार करितात-)—**यद्यपि अविद्यया आत्मनि अध्यारोपितानि कार्यकरणकर्माणि संन्यस्य आस्ते इति उक्तं**—जरी अविद्येने आत्म्यावर आरोपिलेलीं शरीरेंद्रियांची कर्मे सोडून-त्यांचा संन्यास करून राहतो असे म्हटले आहे—**तथापि तु आत्मसमवायि कर्तृत्वं च कारयितृत्वं स्यात्**—तथापि आत्म्याशीं नित्यसंबद्ध असे कर्तृत्व-कर्तेपण व कारयितृत्व-करवितेपण असेल,—**इति आशंक्य स्वयं न एव कुर्वन् न कार्यकरणानि कारयन्-क्रियासु प्रवर्तयन् ( आस्ते इति ) आह**—अशी आशंका घेऊन स्वतः न करणारा व शरीरेंद्रियांकडून न करविणारा म्ह० त्यांना कर्मामध्ये प्रवृत्त न करणारा असा तो राहतो, असे भगवान् सांगतात. ( आत्म्याला कर्तृत्व व कारयितृत्व नाही, याच गोष्टीचा विचार करितात-)—**यत् देहिनः कर्तृत्वं च कारयितृत्वं तत् किं स्वात्मसमवायि सत् संन्यासात् न भवति**—जे देही-आत्म्याचें कर्तृत्व व कारयितृत्व ते काय स्वात्मसंबद्ध असून संन्यास केल्यामुळे नाहींसें होते—**यथा गच्छतः गतिः गमनव्यापारपरित्यागे न स्यात् तद्वत्**—जशी जाणाऱ्या मनुष्याची गति ' गमन करणे ' हा व्यापार सोडला असतां नाहींशी होते त्याप्रमाणे, आत्म्याचे कर्तृत्व व कारयितृत्व संन्यासाने नाहींसें होते, —**किंवा स्वतः एव आत्मनः नास्ति**—की स्वभावतःच आत्म्याच्या ठिकाणीं तीं दोन्हीं नाहीत ?—**इति अत्र उच्यते**—अशी शंका आली असतां त्याचा निर्णय सांगतो—**आत्मनः स्वतः कर्तृत्वं च कारयितृत्वं न अस्ति**—आत्म्याला स्वाभाविक कर्तृत्व किंवा कारयितृत्व नाहीं.— **'अविकार्योऽयमुच्यते' 'शरीरस्थोऽपि कौन्तेय न करोति न लिप्यते ' इति उक्तं हि**—' हा अविकार्य म्हटला जातो ' २-२५ 'आत्मा शरीरामध्यें जरी स्थित असला तरी कांही करीत नाहीं व लिप्त होत नाहीं.' अ. १३.३१ असे गीतेंतच म्हटलें आहे.—' **ध्यायतीव लेलायतीव ' इति च श्रुतेः**—तसेंच ' तो जणुं काय ध्यान करतो, जणुं काय हालचाल करतो-क्रिया क-

रतो " अशी श्रुतिहि आहे. [बृह. भाष्यार्थ अ. ४.३.७ पृ. ६६ पहा. अर्थात् आत्मा कूटस्थ नित्य आहे.त्याच्या ठिकाणीं विक्रिया नाहीं. सर्वविकार उपाधीचेच आहेत. ]१३.

**न कर्तृत्वं न कर्माणि लोकस्य सृजति प्रभुः ।**
**न कर्मफलसंयोगं स्वभावस्तु प्रवर्तते ॥ १४ ॥**

**अन्वयार्थ—प्रभुः**—आत्मा—**लोकस्य**—लोकांचे—**कर्तृत्वं**—कर्तृत्व-तूं अमुक कर असें म्हणून—**न सृजति**—निर्मीत नाही.—**कर्माणि**—रथ, घट, मोठा वाडा इत्यादि कर्त्याला अतिशय इष्ट असलेले पदार्थ—**न (सृजति)**—उत्पन्न करीत नाही—**च**—आणि—**कर्मफलसंयोगं**—रथादि पदार्थ करणाऱ्या कर्त्याला त्यांच्या फलाशीं संयुक्त—**न ( सृजति )**—करीत नाहीं—**तु**—तर—**स्वभावः**—अविद्यारूप माया-प्रकृति—**प्रवर्तते**—प्रवृत्त होते. १४

**न कर्तृत्वमिति । न कर्तृत्वं स्वतः कुर्विति नापि कर्माणि रथघटप्रासादादीनीप्सिततमानि लोकस्य सृजत्युत्पादयति प्रभुरात्मा नापि रथादिकृतवतस्तत्फलेन संयोगं न कर्मफलसंयोगम् । यदि किंचिदपि स्वतो न करोति न कारयति च देही कस्तर्हि कुर्वन्कारयंश्च प्रवर्तत इत्युच्यते स्वभावस्तु स्वो भावः स्वभावोऽविद्यालक्षणा प्रकृतिर्माया प्रवर्तते दैवी हीत्यादिना वक्ष्यमाणा ॥ १४ ॥**

**भाष्यार्थ—' न कर्तृत्वं०' इति**—आत्म्याला कर्तेपण व करवितेपण नाहीं असें जें वर म्हटले आहे, त्याचाच अधिक विस्तार ' न कर्तृत्वं० ' या श्लोकानें करितात—**प्रभुः**

---

१ रहस्यकार या श्लोकांतील ' मनसा सन्यस्य ' या पदाचा अर्थ करताना " मनानें ( साक्षात नव्हे ) सन्यास करून " असा व ' आस्ते ' याचा " आनंदानें पडला राहतो" असा अर्थ करितात आणि टीपेत " आत्मा हा अकर्ता असून सर्व खेळ प्रकृतीचा आहे हे तो जाणतो आणि त्यामुळे स्वस्थ किंवा उदासीन पडला राहतो. (१३-२०,१८-५९) " इतकेंच स्पष्टीकरण करितात गीतेंत जो जो शब्द किंवा श्लोक ज्ञानोत्तर कर्मयोगाला गौणपणा आणणारा व ज्ञानाचे महत्त्व दाखविणारा आहे,त्याची त्याची रहस्यात अशीच उपेक्षा केली आहे. याच श्लोकावरील आचार्यांचे सविस्तर व सोपपत्तिक भाष्य पहा व रहस्यांतील हें स्पष्टीकरण पहा, म्हणजे आम्ही काय म्हणतो ते लक्षात येईल. असो; " सर्व कर्मांचा मनानें ( साक्षात् नव्हे ) संन्यास करून " याचा अर्थ काय ? शरीर व इंद्रियें यानीं कर्मे करावयाची व मनानें टाकावयाची ही कल्पना ऐकायला चांगली आहे. पण ती प्रत्यक्ष कृतींत आणतां येणें मात्र शक्य नाहीं. असा अर्थ केल्यास कोणकोणते दोष येतात याचा विचार आचार्यांनी सविस्तर गी.भा.पृ. ११३ केला आहे तो वाचकांनी पुनः अवश्य पहावा.'आत्मा आनंदाने स्वस्थ-उदासीन पडला राहतो, ' हा अर्थ कितपत ग्राह्य आहे, हे आचार्यांचें या श्लोकावरील भाष्य वाचल्यानेंच लक्षांत येण्यासारखें असल्यामुळें त्याची विशेष चर्चा करावयास नको.

**–आत्मा लोकस्य कर्तृत्वं-स्वतः कुरु इति न सृजाति-उत्पादयति**—प्रभु-आत्मा लोकाचें कर्तृत्व–' तूं स्वतः हें कर ' असें म्हणून उत्पन्न करीत नाहीं.—**कर्माणि-रथ-घट-प्रासादादीनि ईप्सिततमानि अपि न**—कर्में म्ह० कर्त्याला प्राप्त करून घेण्यास अत्यंत इष्ट असलेलीं रथ, घट, प्रासाद–मोठें गृह इत्यादि कर्मेंहि तो प्रभु उत्पन्न करीत नाहीं.—**न कर्मफलसंयोगं-रथादि कृतवतः तत्फलेन संयोगं अपि न**—कर्मफलसंयोगहि तो उत्पन्न करीत नाहीं म्ह० रथादि कर्में ज्यानें केलीं आहेत, त्याचा त्याच्या फलाशीं जो संयोग तोहि हा आत्मा उत्पन्न करीत नाहीं. [ आत्मा देहादिकांचा स्वामी असल्यामुळें त्याला प्रभु असे म्हटलें आहे. तो कोणालाहि ' तूं हे कर्म कर ' अशी प्रेरणा करून त्याचे कर्तृत्व उत्पन्न करीत नाहीं, म्ह० करविता –कर्त्यांचा प्रयोजक होत नाहीं. व्याकरणांत कर्त्याला प्राप्त करून घेण्यास अत्यंत इष्ट असलेल्या पदार्थाला कर्म म्हणतात. येथें कर्तृत्व उत्पन्न करीत नाहीं, असे कर्त्याचें साहचर्य असल्यामुळे ' कर्माणि ' म्ह० रथ, घट, मोठा राजवाडा इत्यादि–कर्त्याला ईप्सिततम असलेले–पदार्थहि तो उत्पन्न करीत नाहीं. रथादि पदार्थ करणाराला त्याचें फल देऊन त्याच्याशीं संबद्ध करीत नाहीं. म्ह० आत्मा भोजयिता–फलभोग घेवविणाराहि नाहीं. ]—**यदि देही स्वतः किंचित् अपि न करोति न कारयति च तर्हि कः कुर्वन् कारयन् च प्रवर्तते इति उच्यते**—जर देही–आत्मा स्वतः कांहींहि करीत नाहीं व करवीत नाहीं तर कोण बरें स्वतः करीत व दुसऱ्याकडून करवीत असतो, या प्रश्नाचे उत्तर सांगितले जातें-[ आत्मा–देहस्वामी जर कांहीं करीत व करवीत नाहीं, तर दुसरा कोण ते करतो व करवितो, ते सांगतों-]—**स्वभावः तु**—पण स्वभाव हे सर्व करतो व करवितो. ( तर मग भगवान् चार्वाकासारखे स्वभाववादी आहेत, असें म्हणाल म्हणून-)—**स्वः भावः-स्वभावः-अविद्यालक्षणा प्रकृतिः माया प्रवर्तते**—आपला जो भाव तो स्वभाव म्ह० अविद्यारूप प्रकृति–माया प्रवृत्त होते. [ अविद्यानांवाची माया म्हणजेच येथील स्वभाव होय. ती माया–परमेश्वराची अचिंत्य शक्ति सर्व करते व करविते. ती सांख्यांच्या प्रधानाहून अगदीं विलक्षण आहे, असे पुढे सातव्या अध्यायांत भगवान् ]—**' दैवी ह्येषा (गुणमयी) ' इत्यादिना वक्ष्यमाणा**—' दैवी ह्येषा० ' या वचनाने सांगतील. १४.

**नाऽऽदत्ते कस्यचित्पापं न चैव सुकृतं विभुः ।**
**अज्ञानेनाऽऽवृतं ज्ञानं तेन मुह्यन्ति जन्तवः ॥१५॥**

---

१ रहस्यकार १४ व्या श्लोकांतील ' कर्माणि ' याचा ' कर्में ' असा सरळ अर्थ करितात. पण कर्तृत्व व कर्मफलसंयोग यांच्या साहचर्यामुळे येथील कर्में म्ह० व्यापार नव्हे तर व्याकरणांत ' कर्तुरीप्सिततमं कर्म ' पा. सू. अ. १ पा. ४ सू. ४९ या सूत्रानें सांगितलेलें कर्मच विवक्षित आहे.

**अन्वयार्थ—विभुः**—सर्वव्यापी आत्मा—**कस्यचित्**—कोणाचें—**पापं**—पाप—**न आदत्ते**—स्वतः घेत नाहीं—**च**—आणि—**सुकृतं**—कोणाचें पुण्यहि—**न एव (आदत्ते)**—घेत नाहींच—**ज्ञानं**—विवेकविज्ञानाला—**अज्ञानेन**—अज्ञानानें—**आवृतं**—आच्छादित केले आहे,—**तेन**—त्यामुळें—**जन्तवः**—जीव—**मुह्यन्ति**—मोहित होतात. १५

**परमार्थतस्तु—नाऽऽदत्ते न च गृह्णाति भक्तस्यापि कस्यचित्पापं न चैवाऽऽदत्ते सुकृतं भक्तैः प्रयुक्तं विभुः । किमर्थं तर्हि भक्तैः पूजादिलक्षणं यागदानहोमादिकं च सुकृतं प्रयुज्यत इत्याह—अज्ञानेनाऽऽवृतं ज्ञानं विवेकविज्ञानं तेन मुह्यन्ति करोमि कारयामि भोक्ष्ये भोजयामीत्येवं मोहं गच्छन्त्यविवेकिनः संसारिणो जन्तवः ॥ १५॥**

**भाष्यार्थ—तु परमार्थतः**—पण परमार्थदृष्ट्या पाहिल्यास म्ह० वस्तुतः—**विभुः कस्यचित्-भक्तस्य अपि पापं न आदत्ते-न च गृह्णाति**—तो विभु कोणा भक्ताचेंहि पाप घेत नाहीं.—**भक्तैः प्रयुक्तं सुकृतं च न एव आदत्ते**—भक्तांनी अर्पण केलेलें पुण्यहि तो घेत नाहींच—**तर्हि भक्तैः पूजादिलक्षणं यागदानहोमादिकं च सुकृतं किमर्थं प्रयुज्यते इति आह**—तर मग भक्तांकडून पूजादिरूप व याग, दान, होम वगैरे पुण्याचरण कशासाठीं अर्पण केले जातें, तें भगवान् सांगतात—**अज्ञानेन ज्ञानं-विवेकविज्ञानं आवृतं तेन अविवेकिनः संसारिणः जन्तवः मुह्यन्ति**—अज्ञानानें ज्ञानाला म्ह० विवेकविज्ञानाला आच्छादित केले आहे. त्यामुळे अविवेकी संसारी जीव मोहित होतात—**करोमि कारयामि भोक्ष्ये भोजयामि इति एवं मोहं गच्छन्ति**—मी करतों, करवितों, भोग घेतो, घेववितों, अशाप्रकारे मोहाला प्राप्त होतात. [ वरील श्लोकांत आत्म्याचे कर्तृत्व, भोक्तृत्व, ऐश्वर्य अविद्याकृत आहे हे सांगितले. आतां ज्यानें सर्व व्यापार ईश्वरसमर्पण केले आहेत व जो ईश्वरपरायण झाला आहे त्याचे पुण्य किंवा पाप त्याच्यावर अनुग्रह करण्यासाठीं भगवान् घेतो. " हा भक्त मत्परायण झाला आहे, माझ्या प्रीत्यर्थ कर्म करीत आहे. यास्तव त्याचे सर्व पाप घालवून मला त्याच्यावर अनुग्रह केला पाहिजे," असा प्रत्यय तरी ईश्वराच्या ठिकाणीं उद्भवणे शक्य आहे, अशी शंका घेऊन या श्लोकांत वस्तुतः तसा प्रत्ययहि त्याच्या ठिकाणीं संभवत नाहीं. कारण तो विभु अविक्रिय आहे, असे भगवान् या श्लोकांत सांगत आहेत. तर मग भक्त ईश्वरानुग्रहास योग्य आहेत व ईश्वर अनुग्रह करणारा आहे, ही लोकप्रसिद्धि रूढ कशी झाली ? अज्ञानाने ज्ञान झांकलें असल्यामुळे तसा भ्रम[1] होतो. ] १५

---

१ रहस्यकार ' या दोन श्लोकांतील तत्त्व मळचें सांख्यशास्त्रांतिले असून ' इत्यादि टीपेंत म्हणतात, पण तें खोटे आहे. कारण येथे सांख्यदर्शनकाराचा ' प्रकृति ' हा शब्द नसून ' स्वभाव ' असा शब्द आहे, व त्याचें स्पष्टीकरण ' अज्ञानेन आवृतं ज्ञानं तेन मुह्यन्ति जन्तवः ' अशा शब्दांनी केलें आहे. त्यावरून स्वभाव म्ह० अविद्यालक्षण माया, हें उघड होतें. शिवाय गीता सांख्यदर्शनापेक्षां उपनिषदांना अधिक अनुसरणार हें उघड आहे. शिवाय या श्लोकांतील ' प्रभु ' व ' विभु ' हे शब्दहि सांख्यांच्या प्रतिशरीरीं भिन्न असलेल्या पुरुषाला लागू होत नाहींत.

**ज्ञानेन तु तदज्ञानं येषां नाशितमात्मनः ।**
**तेषामादित्यवज्ज्ञानं प्रकाशयति तत्परम् ॥ १६ ॥**

**अन्वयार्थ—तु**—पण—**येषां**—ज्यांचे—**तत् आत्मनः अज्ञानं**—ते आत्म्याविषयींचे अज्ञान आत्म्याच्या—**ज्ञानेन**—ज्ञानानें—**नाशितं**—नष्ट केले आहे—**तेषां**—त्यांचे—**तत्**—ते—**ज्ञानं**—ज्ञान—**आदित्यवत्**—सूर्याप्रमाणें—**परं**—परमात्म्याला—**प्रकाशयति**—प्रकाशित करते. १६

**ज्ञानेनेति । ज्ञानेन तु येनाज्ञानेनाऽऽवृता मुह्यन्ति जन्तवस्तदज्ञानं येषां जन्तूनां विवेकज्ञानेनाऽऽत्मविषयेण नाशितमात्मनो भवति तेषामादित्यवद्यथाऽऽदित्यः समस्तं रूपजातमवभासयति तद्वज्ज्ञानं ज्ञेयं वस्तु सर्वं प्रकाशयति तत्परं परमार्थतत्त्वम्॥१६॥**

**भाष्यार्थ—ज्ञानेन इति**—पण सर्वांचेच ज्ञान अनादि अज्ञानाने जरी आच्छादित झालेले असले, तरी ज्ञानाने त्याचा नाश होऊन संसारनिवृत्ति संभवते असे 'ज्ञानेन०' या श्लोकाने सांगतात —**तु येन अज्ञानेन आवृताः जन्तवः मुह्यन्ति**—पण ज्या अज्ञानाने आच्छादित झालेले प्राणी मोहित होतात,—**तत् आत्मनःअज्ञानं येषां जन्तूनां ज्ञानेन-आत्मविषयेण-विवेकविज्ञानेन नाशितं भवति**—तें आत्म्यांचे अज्ञान, ज्या प्राण्यांचे, ज्ञानानें म्ह० आत्म्याविषयींच्या विवेकविज्ञानाने नाश पावले आहे—**तेषां ज्ञानं तत् परं परमार्थतत्त्वं सर्वं ज्ञेयं वस्तु प्रकाशयति**—त्यांचें ज्ञान त्या परमार्थ तत्त्वाला-संपूर्ण ज्ञेय वस्तूला प्रकाशित करते—**आदित्यवत् यथा आदित्यः समस्तं रूपजातं अवभासयति तद्वत्**—म्ह० ज्याप्रमाणे सूर्य सर्व रूपवर्गाला प्रकाशित करतो त्याप्रमाणें त्याचे ज्ञान त्या परमार्थतत्त्वाला प्रकाशित करते. १६

---

१ रहस्यकार म्हणतात-" पण कर्मयोगी कर्तृत्वाकर्तृत्वाचा हा भेद जाणणारा असल्यामुळें तो कर्मे करूनहि अलिप्तच रहातो, असे आता सागतात-पण ज्याच्या स्वतःचे हें अज्ञान ज्ञानाने नष्ट झाले त्याना सूर्याप्रमाणे त्याचे ज्ञान परमार्थ तत्त्व प्रकाशित करून देते. १६..." येथें कर्मयोग्याचा कांही संबध नाही. १३ व्या श्लोकापासूनच ज्ञाननिष्ठेच्या प्रतिपादनास सुरुवात झाली आहे, त्यामुळे येथे कर्मयोग्याला मध्येच ओढून आणणें योग्य दिसत नाही. येथें मुळांत ' येषाम्, तेषाम् ' असा सामान्य सर्वनामांचा उल्लेख आहे. त्यावरून ' कर्मयोगी ' हा विशेष अर्थ घेण्यास कांहीच कारण दिसत नाहीं. तो कर्मे करूनहि अलिप्तच रहातो, याचा तर पुढील दोन श्लोकांत कोठे पत्ताच नाहीं. " ज्यांच्या स्वतःचें हें अज्ञान " हा ' येषाम् आत्मनः तदज्ञानं ' या शब्दांचा सरळ अर्थ जरी असला तरी त्याचा भावार्थ कांहीच लक्षांत येत नाही. ' ज्यांच्या स्वतःचे हे अज्ञान, ' म्हणजे काय ? ' ज्यांचा स्वतः ' तो कोण ? ' त्यांना सूर्याप्रमाणे त्याचे ज्ञान ' हे शब्दहि असेच भानगडीचे आहेत ' प्रकाशयति ' याचा अर्थ ' प्रकाशित करून देतें ' असा करितात; पण तो बरोबर नाहीं.

**तद्बुद्धयस्तदात्मानस्तन्निष्ठास्तत्परायणाः ।**
**गच्छन्त्यपुनरावृत्तिं ज्ञाननिर्धूतकल्मषाः ॥ १७ ॥**

**अन्वयार्थ—तद्बुद्धयः**—परमार्थ तत्त्वामध्येच ज्यांची बुद्धि आहे.—**तदात्मानः**—जे तद्रूप झालेले आहेत,—**तन्निष्ठाः**—त्यांतच ज्यांची निष्ठा आहे—**तत्परायणाः**—तें तत्त्व हीच ज्यांची परागति आहे, ते—**ज्ञाननिर्धूतकल्मषाः (सन्तः)**—ज्ञानाने ज्यांचें पाप पार नाहींसें झालें आहे असे होत्साते—**अपुनरावृत्तिं**—पुनर्जन्मराहित्यास-मोक्षास—**गच्छन्ति**—प्राप्त होतात. १७.

**यत्परं ज्ञानं प्रकाशितम्—तस्मिन्गता बुद्धिर्येषां ते तद्बुद्धयस्तदात्मानस्तदेव परं ब्रह्माऽऽत्मा येषां ते तदात्मानस्तन्निष्ठा निष्ठाऽभिनिवेशस्तात्पर्यं सर्वाणि कर्माणि संन्यस्य ब्रह्मण्येवावस्थानं येषां ते तन्निष्ठास्तत्परायणाश्च तदेव परमयनं परा गतिर्येषां भवति ते तत्परायणाः केवलात्मरतय इत्यर्थः । येषां ज्ञानेन नाशितमात्मनोऽज्ञानं ते गच्छन्त्येवंविधा अपुनरावृत्तिमपुनर्देहसंबन्धं ज्ञाननिर्धूतकल्मषा यथोक्तेन ज्ञानेन निर्धूतो नाशितः कल्मषः पापादिसंसारकारणदोषो येषां ते ज्ञाननिर्धूतकल्मषा यतय इत्यर्थः॥१७॥**

**भाष्यार्थ**—( विद्वान् व विविदिषु-जिज्ञासु यांच्यासाठीं ज्ञानपरिपाकाची अंतरंग साधनें सांगण्याची इच्छा करणारे भगवान् 'तद्बुद्धयः०'इत्यादि श्लोकानें म्हणतात-)—**यत् परं ज्ञानं प्रकाशितम्-तस्मिन् गता बुद्धिः येषां ते तद्बुद्धयः**—प्रकाशित झालेलें जें परम ज्ञान, त्या परमार्थ तत्त्वामध्ये ज्यांची बुद्धि प्रवृत्त झाली आहे, तें तद्बुद्धि होत. (ज्ञानानें प्रकाशित केलेले जें परमार्थतत्त्व तें ज्ञानरूपच असल्यामुळे येथें 'यत्परं ज्ञानं' असें म्हटले आहे. ज्यांची साक्षात्काररूपबुद्धि बाह्य विषयांना सोडून वारंवार अनुष्ठिलेल्या श्रवण-मनन-निदिध्यासनांनीं प्रवृत्त झालेली असते, ते तद्बुद्धि होत. )—**तदात्मानः-तत् एव परं ब्रह्म आत्मा येषां ते तदात्मानः**—तेंच परब्रह्म ज्यांचा आत्मा आहे ते 'तदात्मे' होत. ( जीव जाणणारा व ब्रह्म ज्ञेय वस्तु हा कल्पित भेद आहे, वास्तविक नव्हे, हे सुचविण्यासाठीं तें परब्रह्मच ज्याचा आत्मा आहे असें येथे म्हटलें आहे. )—**तन्निष्ठाः-निष्ठा-अभिनिवेशः-तात्पर्यं सर्वाणि कर्माणि संन्यस्य ब्रह्मणि एव अवस्थानं येषां ते तन्निष्ठाः**—निष्ठा म्ह० अभिनिवेश, तत्परता, सर्व कर्में सोडून ब्रह्मामध्येंच 'मीच तें' अशा रूपानें जे अवस्थित होतात ते तन्निष्ठ होत. ( देहादिकांविषयींचा आत्माभिमान-मीच ब्रह्म असा अभिनिवेश जे धरतात तेंच ब्रह्मनिष्ठ होत. )—**च तत्परायणाः-तत् एव परं अयनं परा गतिः येषां भवति ते तत्परायणाः-केवल-आत्मरतयः इत्यर्थः**—आणि तत्परायण म्ह० तेंच परब्रह्म ज्यांचे परम अयन म्ह० परागति आहे ते तत्परायण होत. केवल आत्मरति म्ह० आम्यामध्येंच सतत आसक्त असलेले असा याचा भावार्थ.—**येषां आत्मनः अज्ञानं ज्ञानेन नाशितं ते एवंविधाः अपुनरावृत्तिं-अपुनर्देहसंबंधं गच्छन्ति**—ज्यांचें आत्म्याविषयींचें अज्ञान ज्ञानानें नाहींसे झाले आहे, अशा

प्रकारचे ते ज्ञानी अपुनरावृत्तीला म्ह० अपुनर्देहसंबंधाला म्ह० मोक्षाला प्राप्त होतात. —**ज्ञाननिर्धूतकल्मषाः-यथोक्तेन ज्ञानेन निर्धूतः-नाशितः कल्मषः-पापादिसंसारकारणदोषः येषां ते ज्ञाननिर्धूतकल्मषाः-यतयः इत्यर्थः**—वर सांगितलेल्या ज्ञानानें ज्यांचा कल्मष म्ह० संसाराला कारण होणारा पापादि दोष नाहींसा झालेला आहे ते ज्ञाननिर्धूतकल्मष होत. अर्थात् ज्ञानानें पावन झालेले यति-संन्यासी असा याचा भावार्थ. ( ज्ञानाने ज्यांचें आत्मविषयक अज्ञान नाहींसें झाले आहे व त्या ज्ञानानेंच संसाराला कारण होणारा पापादि दोष नाहीसा झाला आहे, ते ज्ञानी संन्यासी मुक्त होतात. ) १७.

विद्याविनयसंपन्ने ब्राह्मणे गवि हस्तिनि ।
शुनि चैव श्वपाके च पण्डिताः समदर्शिनः॥ १८ ॥

**अन्वयार्थ—विद्याविनयसंपन्ने ब्राह्मणे**—विद्या व विनय यांनीं संपन्न असलेल्या ब्राह्मणाचे ठिकाणीं—**गवि**—गाईमध्यें किंवा बैलामध्यें—**हस्तिनि**—हत्तीमध्यें—**शुनि**—कुत्र्यामध्यें—**च श्वपाके**—व चांडालामध्यें—**पण्डिताः**—ब्रह्मज्ञानी-ब्रह्मनिष्ठ—**समदर्शिनः**—समब्रह्म पाहणारे असतात. १८.

**येषां ज्ञानेन नाशितमात्मनोऽज्ञानं ते पण्डिताः कथं तत्त्वं पश्यन्तीत्युच्यते—विद्याविनयसंपन्ने विद्या च विनयश्च विद्याविनयौ विनय उपशमस्ताभ्यां विद्याविनयाभ्यां संपन्नो विद्याविनयसंपन्नो विद्वान्विनीतश्च यो ब्राह्मणस्तस्मिन्ब्राह्मणे गवि हस्तिनि शुनि चैव श्वपाके च पण्डिताः समदर्शिनो विद्याविनयसंपन्न उत्तमसंस्कारवति ब्राह्मणे सात्त्विके मध्यमायां च राजस्यां गवि संस्कारहीनायामत्यन्तमेव केवलतामसे हस्त्यादौ च सत्त्वादिगुणैस्तज्जैश्च संस्कारैस्तथा राजसैस्तथा तामसैश्च संस्कारैरत्यन्तमेवास्पृष्टं सममेकमविक्रियं ब्रह्म द्रष्टुं शीलं येषां ते पण्डिताः समदर्शिनः ॥ १८ ॥**

**भाष्यार्थ—येषां आत्मनः अज्ञानं ज्ञानेन नाशितं ते पंडिताः तत्त्वं कथं पश्यन्ति इति उच्यते**—ज्यांचें आत्म्याविषयींचे अज्ञान ज्ञानानें नाहींसे केले आहे,ते पंडित तत्त्व कसें पाहतात तें ' विद्याविनय०' या श्लोकाने सांगितले जाते—**विद्याविनयसंपन्ने-विद्या च विनयः च विद्याविनयौ विनयः-उपशमः ताभ्यां विद्याविनयाभ्यां संपन्नः विद्याविनयसंपन्नः**—विद्या-वेदार्थविज्ञान व विनय म्ह०उपशम -निरहंकारत्व-नम्रपणा, त्या विद्या-विनयांनीं जो संपन्न असलेला तो विद्याविनयसंपन्न होय.—**विद्वान् च विनीतः यः ब्राह्मणः तस्मिन् ब्राह्मणे**—विद्वान् व अतिशय नम्र असा जो ब्राह्मण त्या ब्राह्मणामध्यें,—**गवि हस्तिनि शुनि च एव श्वपाके च पंडिताः समदर्शिनः**—गाईमध्यें किंवा बैलामध्यें,हत्तीमध्यें व कुत्र्यामध्यें आणि तसेंच चांडालामध्यें पंडित सम-ब्रह्मदर्शी असतात.—**विद्याविनयसंपन्ने उत्तमसंस्कारवति सात्त्विके ब्राह्मणे**—विद्या व विनय यांनीं संपन्न असलेल्या उत्तमसंस्कारवान् सात्त्विक

ब्राह्मणामध्यें,—**मध्यमायां च राजस्यां अत्यन्तं एव संस्कारहीनायां गवि**— व मध्यम राजसी अत्यंत संस्कारशून्य गायीमध्यें—**च केवलतामसे हस्त्यादौ**— आणि केवल तामस अशा हत्ती, कुत्रे, चांडाळ इत्यादिकांमध्यें—**सत्त्वादि-गुणैः च तज्जैः संस्कारैः, तथा राजसैः तथा तामसैः च संस्कारैः अत्यन्तं एव अस्पृष्टं समं एकं अविक्रियं ब्रह्म द्रष्टुं शीलं येषां ते पण्डिताः समदर्शिनः** —सत्त्वादि गुणांनीं व सत्त्वगुणापासून झालेल्या संस्कारांनी त्याचप्रमाणे राजस संस्कारांनीं व तामस संस्कारांनीं अत्यंत अस्पृष्ट–सत्त्वादि गुणांचा व त्यांच्या संस्कारांचा ज्याला मुळींच स्पर्शहि झालेला नाहीं–असें सम, एक व अविक्रिय ब्रह्म पाहण्याचे ज्यांचे शील आहे, ते पंडित समदर्शी होत. [ ब्राह्मणादि सर्वांमध्ये एक निर्विकार सम ब्रह्म पाहणें हें पांडित्य होय. ] १८.

**इहैव तैर्जितः सर्गो येषां साम्ये स्थितं मनः।**
**निर्दोषं हि समं ब्रह्म तस्माद्ब्रह्मणि ते स्थिताः॥१९॥**

**अन्वयार्थ—येषां मनः**—ज्याचें अन्तःकरण—**साम्ये**—सर्व भूतांतील साम्यामध्ये—**स्थितं**—स्थित असते—**तैः**—त्यांनी—**इह एव**—या शरीरात असतांनाच–जिवंतपणीच—**सर्गः**—जन्म—**जितः**—जिकला आहे—**हि**—कारण—**ब्रह्म**—अ-

१ रहस्यकार या श्लोकाला असें अवतरण देतात–" याप्रमाणे ज्याचे अज्ञान नष्ट झाले त्या कर्मयोग्याच्या–( सन्याश्याच्या नव्हे ) ब्रह्मभूत किंवा जीवन्मुक्त अवस्थेचे आतां अधिक वर्णन करितात. " पण ज्याचे अज्ञान नष्ट झाले तो सन्यासी जरी नव्हे तरी कर्मयोगी कसा ? कर्मयोगी जीवन्मुक्त किंवा ब्रह्मभूत अवस्थेत असतो, हा अपूर्व शोध आहे. एखादा जीवन्मुक्त काही कारणाने गृहस्थच राहिल्यास तो गृहस्थाश्रमाचीच कर्मे करीत राहील, यात संशय नाहीं. पण त्या कर्मानुष्ठानाला कर्मयोग म्हणतां येणार नाहीं. मी कर्ता व हें माझे कर्तव्य, मला तें अवश्य केलेच पाहिजे, अशा भावनेने केले जाणारें जे श्रौत-स्मार्त कर्म तोच कर्मयोग होय. अर्थात् पुढील वर्णन कर्मयोग्याचें नव्हे. ज्ञानी ब्रह्मनिष्ठाचेंच आहे. रहस्यकार या १८ व्या श्लोकाचा अर्थ असा करितात–" जे पंडित ह्म० ज्ञानी झाले त्यांची दृष्टि विद्याविनययुक्त ब्राह्मण, गाय, हत्ती तसेंच कुत्रा आणि चांडाल या सर्वांच्या ठायीं समान असत्ये " हा अर्थ सयुक्तिक नाहीं. कारण जे ज्ञानी झाले, त्यांची दृष्टि ब्राह्मणादिकांत समान असते, असें जर म्हटलें तर ज्ञानी पुरुषाला उत्तम, मध्यम, हीन पदार्थांची पारख नसते, तो उत्तम ब्राह्मणाला व हीन कुत्रे किंवा चांडाल यांना एकसारखेंच लेखितो, असे म्हटल्यासारखें होते. पण ज्ञानी तसें करीत नाहीं. तर उत्तम, मध्यम व हीन पदार्थांत सम ब्रह्म पाहतो. त्याच्या शरीररूप उपाधि व सात्त्विकादि स्वभाव यांकडे दृष्टि देत नाहीं, तर सर्व भूतामध्यें सम असलेल्या ब्रह्माकडे दृष्टि ठेवितो. प्रत्येक पदार्थाचें नाम व रूप यांची उपेक्षा करून त्यांतील तत्त्व पाहण्याचा त्यांचा स्वभावच बनून जातो, असें येथें विवक्षित आहे, व हाच अर्थ सयुक्तिक होय. पुढील श्लोकावरूनहि समदर्शी म्ह० ब्रह्मदर्शी हाच अर्थ सिद्ध होतो. ही दृष्टि कर्मयोग्याच्या ठिकाणीं संभवत नाही.

क्षर आत्मतत्त्व—**निर्दोषं**—सर्वदोषशून्य व—**समं**—सर्वत्र सम आहे—**तस्मात्**—म्हणून—**ते**—ते सर्व—**ब्रह्मणि**—ब्रह्मामध्यें—**स्थिताः**—स्थित असतात. १९.

**नन्वभोज्यान्नास्ते दोषवन्तः 'समासमाभ्यां विषमसमे पूजातः' इति स्मृतेर्न ते दोषवन्तः। कथम्—इहैव जीवद्भिरेव तैः समदर्शिभिः पण्डितैर्जितो वशीकृतः सर्गो जन्म येषां साम्ये सर्वभूतेषु ब्रह्मणि समभावे स्थितं निश्चलीभूतं मनोऽन्तःकरणं निर्दोषं यद्यपि दोषवत्सु श्वपाकादिषु मूढैस्तद्दोषैर्दोषवदिव विभाव्यते तथाऽपि तद्दोषैरस्पृष्टमिति निर्दोषं दोषवर्जितं हि यस्मान्नापि स्वगुणभेदभिन्नं निर्गुणत्वाच्चैतन्यस्य, वक्ष्यति च भगवानिच्छादीनां क्षेत्रधर्मत्वमनादित्वान्निर्गुणत्वादिति च नाप्यन्त्या विशेषा आत्मनो भेदकाः सन्ति प्रतिशरीरं तेषां सत्त्वे प्रमाणानुपपत्तेरतः समं ब्रह्मैकं च तस्माद्ब्रह्मण्येव ते स्थितास्तस्मान्न दोषगन्धमात्रमपि तान्स्पृशति देहादिसंघातात्मदर्शनाभिमानाभावात्॥**

**भाष्यार्थ**—( सात्त्विक, राजस व तामस प्राण्यांमध्ये समत्वदर्शन अयोग्य आहे अशी शंका-)—**ननु ते दोषवन्तः अभोज्यान्नाः**—अहोपण, ब्राह्मणापासून चांडालापर्यंत सर्वांमध्ये समदृष्टि ठेवणारे ते मोठे दोषी आहेत, त्यांचें अन्न खाणें योग्य नाहीं, ( ते भ्रष्ट आहेत याविषयीं प्रमाण-)—**'समासमाभ्यां विषम-समे पूजातः' इति स्मृतेः**—अध्ययनादिकांनीं एकसारखे असलेल्या-समान योग्यतेच्या लोकांची वस्त्रालंकारादिकांनीं विषम पूजा करणारा व अध्ययनादि गुणांनीं समान नसलेल्या म्ह० न्यूनाधिक योग्यतेच्या पुरुषांची पूजा समान करणारा यजमान दोषी होतो. तो त्यामुळें धन व धर्म या दोन्हींपासून भ्रंश पावतो, अशी स्मृति याविषयीं प्रमाण आहे. ( या शंकेचें समाधान पुढील श्लोकानें करितात-)—**ते दोषवन्तः न**—ते समदर्शी पंडित दोषी होत नाहींत.—**कथं**—ते कसे ?—**इह एव-जीवद्भिः एव तैः समदर्शिभिः पंडितैः सर्गः-जन्म जितः-वशीकृतः**—येथेंच म्ह० जिवंत असणाऱ्याच त्या समदर्शी पंडितांनीं सर्ग म्ह० पुढील जन्म जिकला आहे. त्यांनीं जीवंतपणींच पुढील जन्म आपल्या वश करून घेतला आहे. ( त्यांनी म्ह० कोणीं ? )—**येषां मनः-अन्तःकरणं साम्ये-सर्वभूतेषु ब्रह्मणि समभावे स्थितं-निश्चलीभूतं**—ज्यांचे मन म्ह० अन्तःकरण साम्यांत म्ह० सर्वभूतांतील ब्रह्मामध्ये-समभावांत स्थित-म्ह० निश्चल झाले आहे, त्यांनीं पुढील जन्म येथेंच जिकला आहे.—**निर्दोषं-यद्यपि दोषवत्सु श्वपाकादिषु मूढैः तद्दोषैः दोषवत् इव विभाव्यते**—यद्यपि दोषांनीं युक्त असलेल्या चांडालादिकांमध्यें मूढांकडून त्यांच्या दोषांनीं ब्रह्महि दोषयुक्त आहे, असें पाहिलें जातें.—**तथापि तद्दोषैः अस्पृष्टं इति निर्दोषं-दोषवर्जितं**—तरी तें ब्रह्म त्यांच्या दोषांनीं अस्पृष्ट आहे, त्यांच्या दोषांशीं ब्रह्माचा मुळींच संसर्ग होत नाहीं, म्हणून ते निर्दोष म्ह० दोषरहित आहे,—**हि-यस्मात्**—ज्याअर्थी तें निर्दोष आहे, त्याअर्थी त्यांत स्थित असलेल्या पंडितांनीं जन्म जिकला आहे.—**चैतन्यस्य निर्गुणत्वात् स्वगुणभेदभिन्नं अपि न**—चैतन्य निर्गुण असल्यामुळें तें स्वगुणांच्या भेदांनींहि भिन्न नाहीं—**च भगवान् इच्छादीनां क्षेत्रधर्मत्वं**

**वक्ष्यति**—आणि भगवान् इच्छादिकांना क्षेत्रधर्मत्व आहे म्ह० इच्छादिक हे क्षेत्राचे धर्म आहेत, असें पुढें तेराव्या अध्यायांत ( श्लो. ६ ) सांगतील.—**च अनादित्वात् निर्गुणत्वात् इति**—तसेंच अनादि असल्यामुळें, निर्गुण असल्यामुळें हा परमात्मा अव्यय आहे, असेंहि त्याच अध्यायांत ( १३.३१ ) सांगतील. ( अहोपण, गुणदोषांमुळें आत्म्याचा भेद जरी न झाला, तरी अन्त्य विशेषांमुळें आत्म्याचा भेद सिद्ध होईल, अन्त्य विशेष म्ह० प्रत्येक कार्याला इतरांपासून पृथक् करणारा एक विशेष धर्म. या शंकेचें समाधान-)—**आत्मनः भेदकाः अन्त्याः विशेषाः अपि न सन्ति**—आत्म्यामध्यें भेद उत्पन्न करणारे अन्त्य विशेषहि नाहींत.—**प्रतिशरीरं तेषां सत्त्वे प्रमाणानुपपत्तेः**—प्रत्येक शरीरांत ते विशेष आहेत, याविषयीं कांहीं प्रमाण संभवत नाहीं. ( कारण प्रत्येक शरीरांत आत्मा भिन्न आहे, असें सिद्ध झाल्यावर त्याचें निमित्त या रूपानें विशेषांचें अस्तित्व मानावें लागणार व विशेषांचे अस्तित्व सिद्ध झाल्यावर आत्म्याचा भेद सिद्ध होणार, मिळून अन्योन्याश्रय दोष येतो. )—**अतः ब्रह्म समं एकं च**—म्हणून ब्रह्म सम व एक आहे. ( ब्रह्म निर्विशेष असल्यामुळें एक आहे व जीवांमध्यें भेद पाडणारा कोणी विशेष हेतु नसल्यामुळें त्यांचें ऐक्य आहे, असे सांगितलें आहे. अर्थात् ब्रह्म व जीव यांचे लक्षण एक असल्यामुळें त्यांचें वास्तविक ऐक्य मानावें, असें सांगतात-)—**तस्मात् ते ब्रह्मणि एव स्थिताः**—म्हणून ते समदर्शी पंडित ब्रह्मामध्येंच स्थित आहेत. ( आणि याप्रमाणें जीवब्रह्मांचें एकत्व सिद्ध झालें असतां ब्रह्माप्रमाणें जीवहि निर्दोष आहेत, असे सिद्ध होते, हें सांगतात-)—**तस्मात् दोषगंधमात्रं अपि तान् न स्पृशति**—त्यामुळे दोषांचा नुस्ता लेशहि त्यांना स्पर्श करींत नाहीं. ( ‘ तस्मात् ’ त्यामुळें त्यांतील ‘ तत्- ’शब्दाचा अर्थच स्पष्ट करितात-) —**देहादिसंघातात्मदर्शनाभिमानाभावात्**—कारण त्यांच्या ठिकाणीं देहादिसंघातालाच आत्मा समजणे, या अभिमानाचा अभाव असतो. [ शरीरेंद्रियसमूहच मी असा अभिमान त्या समदर्शी पंडितांमध्यें नसतो. त्यामुळे त्यांना दोषाचा गंधहि लागत नाहीं. असो; ज्यांचें अन्तःकरण सर्वभूतांतील समभावामध्यें-ब्रह्मामध्यें निश्चल झालेलें असतें त्यांनीं या वर्तमान देहांत जिवंत असतांनाच पुढील जन्म जिंकलेला असतो. चांडालादिकांतील ब्रह्म त्यांच्या दोषांनीं दूषित झालेले आहे, असें अज्ञ समजतात. पण वस्तुतः ब्रह्म निर्दोष व सम आहे. ते सम असल्यामुळेंच एक आहे. कारण चैतन्य निर्गुण आहे. त्यामुळें स्वगुणांच्या भेदामुळेंहि त्याच्यामध्यें भेद उद्भवत नाहीं. इच्छा, द्वेष, सुख, दुःख इत्यादि हे सर्व क्षेत्राचे धर्म आहेत. त्यामुळें प्रत्येक प्राण्याच्या इच्छा, सुख, दुःख इत्यादि भिन्न भिन्न असल्यामुळें प्रतिशरीरांत आत्मा भिन्न आहे, असें ठरत नाहीं. आत्म्याचा भेद मानण्यास दुसरेंहि कांहीं विशेष कारण दिसत नाहीं. यास्तव सर्वत्र समब्रह्म पाहणारे पंडित ब्रह्मामध्येंच स्थित असतात. त्यामुळें त्यांनीं ब्राह्मण व चांडाल यांमध्यें समदृष्टि जरी ठेवली, तरी त्यांना पूर्वोक्त सूत्रांत म्हटल्याप्रमाणें दोष लागत नाहीं. कारण ‘देहादिसंघातच मी’ असा त्यांच्या ठिकाणीं अभिमान नसतो. ]

**देहादिसंघातात्मदर्शनाभिमानवद्विषयं तु तत्सूत्रं "समासमाभ्यां विषमसमे पूजातः" इति पूजाविषयत्वविशेषणात्। दृश्यते हि ब्रह्मवित्षडङ्गविच्चतुर्वेदविदिति पूजादानादौ गुणविशेषसंबन्धः कारणं ब्रह्म तु सर्वगुणदोषसंबन्धवर्जितमित्यतो ब्रह्मणि ते स्थिता इति युक्तम्। कर्मिविषयं च समासमाभ्यामित्यादि, इदं तु सर्वकर्मसंन्यासिविषयं प्रस्तुतं सर्वकर्माणि मनसेत्यारभ्याऽऽध्यायपरिसमाप्तेः ॥ १९ ॥**

**भाष्यार्थ**—( असें जर आहे तर वरील गौतमसूत्र कोणासाठीं आहे ? उत्तर-)—**'समासमाभ्यां विषमसमे पूजातः' इति तत् सूत्रं तु देहादिसंघातात्मदर्शनाभिमानवद्विषयं** 'समासमाभ्यां०' इत्यादि तें सूत्र तर-देहादिसंघातच आत्मा आहे, देहच मी-असा अभिमान धरणाऱ्या लोकांविषयीं आहे. ( याविषयीं सूचक काय ? उत्तर-)—**पूजाविषयत्वविशेषणात्**—कारण त्या सूत्रांत 'पूजातः' असें पूजेविषयींचें विशेषण आहे. [ सर्व चतुर्वेदवेत्ते असतांना त्यांची पूजा-सत्कार सारखा केला नाहीं, न्यूनाधिक केला किंवा कांहीं चतुर्वेदवेत्ते आहेत, कांहीं षडंगज्ञ आहेत व कांहीं ब्रह्मवेत्ते आहेत; पण त्या सर्वांची पूजा एकसारखीच केली, त्यामुळें त्यांतील कित्येकांच्या मनांत क्रोधादि विकार उत्पन्न झाला, तर कर्ता दोषी होतो. यावरूनच प्रस्तुत सूत्र अनात्मज्ञांना उद्देशून आहे, हें उघड होतें. याविषयीं अनुभवाचीहि अनुकूलता दाखवितात- ]—**पूजादानादौ ब्रह्मवित्-षडंगवित्-चतुर्वेदविद् इति गुणविशेषसंबंधः कारणं दृश्यते हि**—पूजा, दान इत्यादिकांमध्यें ब्रह्मविद्, षडंगवित्, चतुर्वेदविद् असा विशेषगुणांचा संबंधच कारण आहे, असें स्पष्ट दिसतें. [ पूजा, दान इत्यादि प्रसंगीं उत्तम, मध्यम किंवा हीन प्रतीची पूजा वगैरे करण्याचें कारण न्यूनाधिक गुण हेच आहे. ]—**तु ब्रह्म सर्वगुणदोषसंबन्धवर्जितं**—पण ब्रह्म सर्व गुण-दोषसंबंधरहित आहे.—**इति अतः ब्रह्मणि ते स्थिताः इति युक्तम्**—त्यामुळें ब्रह्मामध्यें ते स्थित आहेत, हें म्हणणे युक्तच आहे. [ देहच मी असा अभिमान असलेल्या लोकांच्या ठिकाणींच गुणदोषांचा संबंध संभवतो. . त्यामुळें तशा लोकांसाठीं वरील सूत्र आहे. 'ब्रह्मच मी' असें मानणाऱ्या विद्वानांचे ठिकाणीं गुण-दोषांचा संभव नाहीं. त्यामुळें आत्मज्ञासाठीं तें सूत्र नाहीं. याविषयीच आणखी एक कारण सांगतात.-]—**'समासमाभ्यां०' इत्यादि सूत्रं कर्मिविषयं**—'समासमाभ्यां०' हें सूत्र कर्मठाला उद्देशून आहे. कर्मी गृहस्थ त्याचा विषय आहे. [ कारण सत्कार व असत्कार यांचा त्या अवस्थेंतच संभव असतो. अहोपण, जेथें समत्वदर्शन तेथेंच हें सूत्र प्रवृत्त झालें आहे. त्यांत कर्मी किंवा अकर्मी हा विभाग केलेला नाहीं. उत्तर-]—**तु 'सर्वकर्माणि मनसा०' इत्यारभ्य आ-अध्यायपरिसमाप्तेः-इदं सर्वकर्मसंन्यासिविषयं प्रस्तुतं**—पण 'सर्वकर्माणि०' येथून आरंभ करून हा सबंध अध्याय पुरा होईतों हें समत्वदर्शन सर्वकर्मसंन्यास करणाऱ्या आत्मज्ञाविषयीं प्रस्तुत आहे. [ सर्वकर्मसंन्यास करणाऱ्या विद्वानाला उद्देशून हें समत्वदर्शन

सांगितलें आहे. त्यामुळें निरहंकार विद्वानाचे ठिकाणीं वरील सूत्राला अवकाशच मिळत नाहीं, असा याचा भावार्थ. ] १९.

१ पण रहस्यकार या श्लोकाचा अर्थ असा करितात—"याप्रमाणें ज्यांचें मन साम्यावस्थेंत स्थिर झालें, ते तेथल्यातेथेंच म्हणजे मरणाची वाट न पहातां मृत्युलोक जिंकतात, कारण ब्रह्म हें निर्दोष व सम आहे, म्हणून साम्यबुद्धीचे हे पुरुष नेहमी ब्रह्माच्याठायीं स्थित म्हणजे येथल्या येथेंच ब्रह्मभूत झालेले असतात" यांत 'साम्ये' म्ह० साम्यावस्थेंत असा जो अर्थ केला आहे तो बरोबर नाही. वरील श्लोकाच्या अर्थाकडे दृष्टि दिली असतां येथील साम्य म्ह० ब्रह्मभावच आहे असें सहज लक्षांत येते.'इहैव तैः जितस्सर्गः' याचा अर्थ ते तेथल्यातेथेच म्ह० मरणाची वाट न पाहतां मृत्युलोक जिकतात,हा फारच सरळ अर्थ आहे म्हणावयाचा! मृत्युलोक जिंकणें हा मोक्ष आहे,की पुनर्जन्म जिंकणें हा मोक्ष आहे? शिवाय तो जिकण्याला मरणाची वाट पहावी लागते की काय,यापेक्षां 'ज्यांचे मन ब्रह्मभावामध्यें स्थित झाले, ते जिवंत असतांनाच पुढील जन्माचें बीज जाळून टाकतात म्ह०पुनर्जन्माला जिकतात,' हें म्हणणे अधिक सयुक्तिक नव्हे का! तसेंच 'ब्रह्म जरी निर्दोष व सम असले तरी साम्यबुद्धीचे पुरुष त्यामध्ये स्थित कसे होणार ?' कारण साम्यबुद्धि निराळी व समब्रह्म निराळें. वास्तव 'ब्रह्म निर्दोप व सम आहे व ह्या पूर्वोक्त समदर्शी पंडितांचें मन सर्व भूतांमध्यें असलेल्या समत्वामध्ये स्थित असते ह्मणून ते ब्रह्मांतच स्थित आहेत' असें म्हणणेच सर्वथा युक्त आहे. या श्लोकावरील टीपेंत रहस्यकार पुनः म्हणतात—" आत्मस्वरूपी परमेश्वर अकर्ता व सर्व खेळ प्रकृतीचा हें ज्याने ओळखिलें तो ब्रह्मसंस्थ झाला, " पण एवढे ओळखिल्यानेच ' ब्रह्मसंस्थ ' होतां येते असें आम्हांस वाटत नाही. कारण ' ब्रह्मसंस्थ ' म्हणजेच जीवन्मुक्त किंवा स्थितप्रज्ञ होणें आहे, आणि जीवन्मुक्ति किंवा स्थितप्रज्ञता हीच ज्ञाननिष्ठा आहे. वास्तव 'आत्मा अकर्ता व प्रकृति सर्व करणारी इतकें ओळखिल्यानेंच' ती अवस्था प्राप्त होणें शक्य नाही. छान्दोग्यांत 'ब्रह्मसंस्थोऽमृतत्वमेति ' ( छा० भाष्यार्थ, पृ. १४३. ) असें जें म्हटले आहे, ते कर्मयोग्यासाठी नसून संन्याशयासाठीं आहे. कारण यज्ञ, दान व अध्ययन म्हणजे गृहस्थाश्रम हा पहिला स्कंध, ब्रह्मचर्य हा दुसरा स्कंध व नैष्ठिक ब्रह्मचर्य हा तिसरा स्कंध, असे तीन धर्मस्कंध सांगून ' सर्वे एते पुण्यलोका भवन्ति ' म्ह० या सर्वांना पुण्यलोकप्राप्ति होते, असे म्हटले व वरील वचनानें–म्ह० ब्रह्मसंस्थ ब्रह्मनिष्ठ मोक्षाला प्राप्त होतो, या वचनानें चवथ्या आश्रमाचेंच मोक्ष हें फल सांगितलें आहे. त्यामुळें रहस्यकारांनी याच श्लोकावरील टीपेंत " छान्दोग्योपानिषदांतील वाक्याचा शंकराचार्यांनीं सन्यासपर अर्थ लावला आहे, पण मूळ उपनिषदांतील पूर्वापर संभव पाहिला तर ब्रह्मसंस्थ झाल्यावरहि तीन आश्रमांची कर्में करणाराला उद्देशूनच हें वाक्य असण्याचा अधिक सभव आहे, असें दिसून येईल. " इत्यादि जे म्हटलें आहे, तें सर्वथा अयोग्य आहे. कारण तीन आश्रमांनी पुण्यलोकप्राप्ति हें फल मिळतें,असें सांगून त्याहून भिन्न असलेल्या ब्रह्मसंस्थाला मोक्ष हें अगदी भिन्न फल सांगितलें आहे. त्यामुळे ब्रह्मसंस्थ चतुर्थाश्रमी आहे, ही गोष्ट निर्विवाद सिद्ध होते, व आचार्यांनी हीच गोष्ट छान्दोग्यभाष्यांत सविस्तर प्रतिपादिली आहे. (छां. भाष्यार्थ पृ. १४३-५९पहा).

**न प्रहृष्येत्प्रियं प्राप्य नोद्विजेत्प्राप्य चाप्रियम्।**
**स्थिरबुद्धिरसंमूढो ब्रह्मविद्ब्रह्मणि स्थितः॥ २०॥**

**अन्वयार्थ**—**प्रियं**—इष्ट वस्तूला किंवा परिस्थितीला—**प्राप्य**—प्राप्त होऊन—**न प्रहृष्येत्**—अतिशय हृष्ट होऊं नये—**च**—आणि तसेंच—**अप्रियं**—अनिष्ट वस्तूला किंवा अवस्थेला—**प्राप्य**—प्राप्त होऊन—**न उद्विजेत्**—उद्विग्न होऊं नये. —**स्थिरबुद्धिः**—ज्याची बुद्धि स्थिर असते, ब्रह्म निर्दोष व सम आहे, याविषयी ज्याला संशय नसतो—**असंमूढः**—त्यामुळे ज्याला संमोह होत नाहीं, असा पूर्वोक्त —**ब्रह्मवित्**—ब्रह्मवेत्ता—**ब्रह्मणि**—ब्रह्मामध्ये—**स्थितः**—अवस्थित असतो.

**यस्मान्निर्दोषं समं ब्रह्माऽऽत्मा तस्मात्—न प्रहृष्येन्न प्रहर्षं कुर्यात्प्रियमिष्टं प्राप्य लब्ध्वा नोद्विजेत्प्राप्यैव चाप्रिय मनिष्टं लब्ध्वा देहमात्रात्मदर्शिनां हि प्रियाप्रियप्राप्ती हर्षविषादस्थाने न केवलात्मदर्शिनस्तस्य प्रियाप्रियप्राप्त्यसंभवात्। किं च सर्वभूतेष्वेकः समो निर्दोष आत्मेति स्थिरा निर्विचिकित्सा बुद्धिर्यस्य स स्थिरबुद्धिरसंमूढः संमोहवर्जितश्च स्याद्यथोक्तब्रह्मविद्ब्रह्मणि स्थितोऽकर्मकृत्सर्वकर्मसंन्यासीत्यर्थः॥ २०॥**

**भाष्यार्थ**—( अहोपण, विद्वानालाहि इष्टप्राप्ति झाली असतां हर्ष होणें व अनिष्टप्राप्ति झाली असतां विषाद वाटणें साहजिक आहे. तेव्हां निर्दोष ब्रह्मामध्यें त्याला कसें अवस्थित होता येईल? उत्तर-)—**यस्मात् निर्दोषं समं ब्रह्म आत्मा तस्मात्**—ज्याअर्थी निर्दोष व सम ब्रह्म आत्मा आहे त्याअर्थी—**प्रियं इष्टं प्राप्य-लब्ध्वा न प्रहृष्येत्-न प्रहर्षं कुर्यात्**—प्रिय म्ह० इष्ट प्राप्त झाले असतां-इष्टवस्तूचा लाभ झाल्यास प्रहृष्ट होऊं नये, अत्यंत हर्ष मानूं नये—**च अप्रियं-अनिष्टं प्राप्य एव लब्ध्वा न उद्विजेत**—आणि अप्रिय म्ह० अनिष्ट प्राप्त झालें असतां-अनिष्ट वस्तूचा लाभ झाल्यास उद्विग्न होऊं नये. [ अहोपण, प्रियप्राप्ति हें हर्षाचें व अप्रियप्राप्ति हें विषादाचे निमित्त प्रसिद्ध आहे. तेव्हां प्रियाप्रियप्राप्ति जरी झाली तरी हर्षोद्वेग करूं नये, असें कसें म्हणतां येईल? उत्तर-]—**देहमात्र-आत्मदर्शिनां हि प्रियाप्रियप्राप्ती हर्षविषादस्थाने**—देहच आत्मा असे मानणाऱ्या अज्ञानी लोकानाच प्रिय व अप्रिय यांची प्राप्ति हर्ष व विषाद देऊं शकते, [ प्रिय व अप्रिय यांची प्राप्ति देहात्माभिमानी अज्ञांच्याच हर्षविषादाला कारण होते.]—**न केवलात्मदर्शिनः**—प्रियाप्रियप्राप्ति केवल आत्म्याला पाहणाऱ्या-आत्मा निरुपाधिक व निर्विशेष आहे असें जाणणाऱ्या विद्वानाच्या हर्षविषादाचें निमित्त होत नाहीं.—**तस्य प्रियाप्रियप्राप्त्यसंभवात्**—कारण अद्वितीय आत्मदर्शनशील पुरुषाला अनात्मरूप प्रिय व अप्रिय यांची प्राप्तिच होऊं शकत नाही. त्यामुळें त्यांच्या निमित्तानें विद्वानाला हर्ष-शोक होत नाहींत. ( विद्वानाच्या ठिकाणीं हर्षविषादांची संभावनाच नाहीं, याविषयीं आणखी एक कारण-)—**किं च** —शिवाय—**सर्वभूतेषु एकः समः निर्दोषः आत्मा इति स्थिरा-निर्विचिकित्सा बुद्धिः यस्य सः स्थिरबुद्धिः**—सर्व भूतांमध्यें एक सम निर्दोष आत्मा

आहे, अशी ज्याची स्थिर म्ह० निःसंशय बुद्धि आहे तो स्थिरबुद्धि—**च असंमूढः -संमोहवर्जितः स्यात्**—व असंमूढ म्ह० संमोहरहित-विवेकी व्हावें.—**यथोक्त-ब्रह्मविद् ब्रह्मणि स्थितः अकर्मकृत्-सर्वकर्मसंन्यासी इत्यर्थः**—निर्दोष व समब्रह्मच मी, असा ज्याला दृढ प्रत्यय आला आहे, असा ब्रह्मविद् त्या ब्रह्मामध्येंच स्थित असलेला-कर्में न करणारा-सर्वकर्मसंन्यासी होय, असा याचा भावार्थ. [ सर्वकर्मसंन्यास करून ब्रह्मनिष्ठ झालेल्या ब्रह्मवेत्त्यानें इष्टप्राप्ति झाली असतां हर्ष मानूं नये, अनिष्टप्राप्ति झाल्यास विषाद मानूं नये. आत्मा एक, सम, निर्दोष आहे अशी आपली बुद्धि दृढ करून विवेकसंपन्न व्हावें. तोच ब्रह्मनिष्ठ-सर्व कर्म-संन्यासी होय. ] २०

**बाह्यस्पर्शेष्वसक्तात्मा विन्दत्यात्मनि यत्सुखम् ।**
**स ब्रह्मयोगयुक्तात्मा सुखमक्षय्यमश्नुते ॥ २१ ॥**

**अन्वयार्थ—बाह्यस्पर्शेषु**—शब्दादि बाह्यविषयांमध्यें—**असक्तात्मा**—ज्याचें अन्तःकरण सक्त-आसक्त झालेलें नसते, तो—**आत्मनि**—प्रत्यगात्म्यामध्यें—**यत्**—जें—**सुखं**—स्वरूपभूत सुख असतें—**तत्**—तें—**विन्दति**—अनुभवितो—**सः**—तो—**ब्रह्मयोगयुक्तात्मा**—ब्रह्मामध्ये जो योग म्ह० चित्ताची स्थिरता-चित्तसमाधान, त्यानें ज्याचें चित्त युक्त आहे असा तो—**अक्षय्यं सुखं**—क्षय न पावणारे-नित्य सुख—**अश्नुते**—अनुभवितो. २१.

**किं च ब्रह्मणि स्थितः—बाह्यस्पर्शेषु बाह्याश्च ते स्पर्शाश्च बाह्यस्पर्शाः स्पृश्यन्त इति स्पर्शाः शब्दादयो विषयास्तेषु बाह्यस्पर्शेष्वसक्त आत्माऽन्तःकरणं यस्य सोऽयमसक्तात्मा विषयेषु प्रीतिवर्जितः सन्विन्दति लभत आत्मनि यत्सुखं तद्विन्दतीत्येतत् । स ब्रह्मयोगयुक्तात्मा ब्रह्मणि योगः समाधिर्ब्रह्मयोगस्तेन ब्रह्मयोगेन युक्तः समाहितस्तस्मिन्व्यापृत आत्माऽन्तःकरणं यस्य स ब्रह्मयोगयुक्तात्मा सुखमक्षयमश्नुते व्याप्नोति । तस्माद्बाह्यविषयप्रीतेः क्षणिकाया इन्द्रियाणि निवर्तयेदात्मन्यक्षयसुखार्थीत्यर्थः ॥२१॥**

**भाष्यार्थ—किं च ब्रह्मणि स्थितः**—शिवाय ब्रह्मामध्यें स्थित झालेला ब्रह्मविद् वर सांगितलेल्या प्रकारानें केवल हर्षविषादरहित होतो एवढेंच नव्हे तर—**बाह्य-स्पर्शेषु-बाह्याः च ते स्पर्शाः च बाह्यस्पर्शाः**—बाह्य स्पर्शांमध्यें-बाह्य असे जे स्पर्श ते बाह्यस्पर्श—**स्पृश्यन्ते इति स्पर्शाः शब्दादयः विषयाः तेषु बाह्य-स्पर्शेषु**—स्पर्श करितात म्हणून स्पर्श-शब्दादिक विषय, त्या बाह्य स्पर्शांमध्यें—**अ-सक्तः आत्मा-अन्तःकरणं यस्य सः अयं असक्तात्मा**—ज्याचें अन्तःकरण आसक्त झालेलें नसतें तो हा असक्तात्मा—**विषयेषु प्रीतिवर्जितः सन्**—विषया-विषयीं प्रीतिरहित होत्साता—**विन्दति-लभते**—आत्मसुखाला प्राप्त होतो—**आ-त्मनि यत् सुखं तत् विन्दति इति एतत्**—आत्म्यामध्यें जें सुख असतें त्याला प्राप्त होतो, असा याचा भावार्थ. त्याला आत्मसुख होतें. [ विषयासक्ति हेंच आत्म-स्वरूपसुखाचें आवरण आहे. त्यामुळें विषयासक्तिरूप आवरण जसें जसें दूर होऊं लागतें—

बाह्य विषयासक्ति जशी जशी कमी होत जाते, तसें तसें आत्मस्वरूपसुख अभिव्यक्त होऊं लागतें. असक्तात्मा केवल शमामुळेच सुखानुभव घेतो असें नाहीं तर ब्रह्मसमाधी-च्यायोगानें ज्याचे अन्तःकरण समाहित–शांत झाले आहे, तो अनन्त सुखाचा अनुभव घेतो, असें सांगतात–]—**सः ब्रह्मयोगयुक्तात्मा-ब्रह्मणि योगः-समाधिः ब्रह्म-योगः तेन ब्रह्मयोगेन युक्तः-समाहितः**—ब्रह्मामध्ये जो योग म्ह० समाधि तो ब्रह्मयोग, त्या ब्रह्मयोगाने युक्त म्ह० समाहित म्हणजे—**तस्मिन् व्यापृतः आत्मा-अन्तःकरणं यस्य सः ब्रह्मयोगयुक्तात्मा**—ज्याचे अन्तःकरण ब्रह्मयोगामध्यें गढून गेले आहे तो ब्रह्मयोगयुक्तात्मा—**अक्षयं सुखं अश्नुते-व्याप्नोति**—अक्षय सुखाला व्यापितो. अक्षय सुखानुभव घेतो.—**तस्मात् आत्मनि अक्षयसुखार्थी क्षणिकायाः बाह्यविषयप्रीतेः इंद्रियाणि निवर्तयेत् इत्यर्थः**—म्हणून आत्म्यां-तील अक्षय सुखाची इच्छा करणाऱ्या मुमुक्षूनें क्षणिक बाह्य विषयप्रीतीपासून इंद्रि-यांना निवृत्त करावे, असा भावार्थ. [ ज्याचे अन्तःकरण ब्रह्मसमाधींत निमग्न होईल त्याला अक्षय सुख प्राप्त होते. यास्तव अनन्त आत्मसुखाची इच्छा करणाऱ्या साध-कानें मोठ्या प्रयत्नानें इंद्रियांना विषयविमुख करावे ]. २१.

**ये हि संस्पर्शजा भोगा दुःखयोनय एव ते ।**
**आद्यन्तवन्तः कौन्तेय न तेषु रमते बुधः ॥ २२ ॥**

**अन्वयार्थ**—**हि**—कारण—**ये**—जे—**संस्पर्शजाः**—इंद्रिये व विषय यांच्या संबंधापासून होणारे—**भोगाः**—भोग-सुखानुभव—**ते**—ते सर्व—**दुःखयोनयः एव**—दुःखाची बीजेच आहेत. तसेच ते—**आद्यन्तवन्तः**—उत्पत्ति व नाश यांनीं युक्त

---

१ या श्लोकाचा अर्थ रहस्यकार असा करतात–" बाह्य पदार्थांच्या इंद्रियांशीं होणाऱ्या संयोगांत म्हणजे विषयोपभोगात ज्याचें मन आसक्त नाहीं, त्यालाच आत्म्यामध्ये जे काय सुख आहे तें मिळतें." पण हा अर्थ चुकीचा आहे. कारण ' बाह्य स्पर्श ' या शब्दाचा अर्थ बाह्य विषय असा आहे. [ गी. भा. पृ. ७३ वरील टीप पहा. ] बाह्य पदार्थांचे इंद्रियांशीं होणारे संयोग म्हणजे विषयोपभोग कसे ? इंद्रिये व विषय यांच्या संयोगापासून होणारा जो सुखदुःखानुभव तोच भोग होय, नुसता संयोग हा भोग नव्हे. तसेंच 'बाह्यस्पर्शेषु' याचा ' बाह्य पदार्थांच्या इंद्रियांशीं होणाऱ्या संयोगात ' हा अर्थ अशुद्ध आहे. कारण ' बाह्य ' हें विशेषण आहे व ' स्पर्श ' हे विशेष्य आहे, त्यामुळे ' बाह्यस्पर्शांत ' म्हणजे ' शब्दादि बाह्य विषयात ' हा आचार्यांनी केलेला अर्थच योग्य आहे. 'आत्मनि यत्सुखं ' याच्या अर्थांत ' आत्म्यामध्यें जें काय सुख आहे ' असे म्हटलें आहे, पण त्यांतील ' काय ' या शब्दाचें स्वारस्य लक्षांत येत नाहीं. ' त्यालाच' येथें 'च'कार उगाच कशाला जोडला आहे कोण जाणे. ' ब्रह्मयोगयुक्तात्मा ' याचा अर्थ ' ब्रह्माशीं मिळून युक्त झालेला ' असा केला आहे. पण ' ब्रह्मयोग ' म्हणजे ' ब्रह्माशीं मिळून ' व ' युक्तात्मा ' म्हणजे 'युक्त झालेला' हा अर्थ बरोबर आहे, असे कोणीहि संस्कृतज्ञ म्हणणार नाहीं.

आहेत.—**कौन्तेय**—हे अर्जुना !—**बुधः**—पंडित-तत्त्वज्ञ—**तेषु**—त्या विषयांमध्ये **न रमते**—रममाण होत नाही. २२.

**इतश्च निवर्तयेत्—ये हि यस्मात्संस्पर्शजा विषयेन्द्रियसंस्पर्शेभ्यो जाता भोगा भुक्तयो दुःखयोनय एव तेऽविद्याकृतत्वात् । दृश्यन्ते ह्याध्यात्मिकादीनि दुःखानि तन्निमित्तान्येव । यथेह लोके तथा परलोकेऽपीति गम्यत एवशब्दात् । न संसारे सुखस्य गन्धमात्रमप्यस्तीति बुद्ध्वा विषयमृगतृष्णिकाया इन्द्रियाणि निवर्तयेत् । न केवलं दुःखयोनय एव आद्यन्तवन्तश्चाऽऽदिर्विषयेन्द्रियसंयोगो भोगानामन्तश्च तद्वियोग एवात आद्यन्तवन्तोऽनित्या मध्यक्षणभावित्वादित्यर्थः । कौन्तेय न तेषु भोगेषु रमते बुधो विवेक्यवगतपरमार्थतत्त्वोऽत्यन्तमूढानामेव हि विषयेपु रतिर्दृश्यते यथा पशुप्रभृतीनाम् ॥ २२ ॥**

**भाष्यार्थ—इतः च निवर्तयेत्**—याहि कारणाने इंद्रियांना विषयापासून निवृत्त करावें, असे 'ये हि०' या श्लोकाने सांगतात—**हि-यस्मात् ये संस्पर्शजाः-विषयेन्द्रियसंस्पर्शेभ्यः जाताः भोगाः-भुक्तयः**—कारण जे संस्पर्शापासून झालेले-विषय व इंद्रियें याच्या संस्पर्शापासून झालेले भोग-सुखानुभव—**ते अविद्याकृतत्वात् दुःखयोनयः एव**—ते अविद्याकृत असल्यामुळे दुःखाची कारणेच आहेत. —**आध्यात्मिकादीनि दुःखानि तन्निमित्तानि एव हि दृश्यन्ते**—आध्यात्मिक, आधिभौतिक व आधिदैविक दुःखे भोगांच्या निमित्तानेच होतात, विषयोपभोग हेच त्यांचे निमित्त आहे, ही अनुभवसिद्ध गोष्ट आहे. [ अहोपण, ऐहिक भोग जरी दुःखाचे निमित्त असले, तरी पारलौकिक भोग दुःखनिमित्तें नसतील. कारण तेहि दुःखाला कारण होतात, असा अनुभव येत नाही ? उत्तर-]—**यथा इह लोके तथा परलोके अपि इति एवशब्दात् गम्यते**—ज्याप्रमाणे इहलोकी विषयेंद्रियसंयोगापासून होणारे भोग दुःखयोनि-दुःखाचे कारण आहेत, त्याचप्रमाणे परलोकांतील विषयोपभोगहि दुःखयोनि आहेत, असें 'दुःखयोनयः एव-' येथील एवशब्दावरून कळतें. ( याप्रमाणे पूर्वार्धाचा अक्षरार्थ सांगून तात्पर्यार्थ सांगतात-)—**संसारे सुखस्य गन्धमात्रं अपि न अस्ति इति बुद्ध्वा विषयमृगतृष्णिकायाः इंद्रियाणि निवर्तयेत्**—संसारांत सुखाचा नुस्ता गंधहि नाही, असें जाणून विषयरूपी मृगजलापासून इंद्रियांना निवृत्त करावे. [ विषयांपासून इंद्रियांना निवृत्त करावें, याविषयीं आणखी एक कारण उत्तरार्धाने सांगतात-]—**केवलं दुःखयोनयः एव न, च आद्यन्तवन्तः**—भोग नुस्ती दुःखाची निमित्तें आहेत, इतकेंच नव्हे तर आद्यन्तवन्त आहेत.—**विषयेंद्रियसंयोगः भोगानां आदिः**—विषय व इंद्रियें यांचा संयोग हाच भोगांचा आदि आहे—**च तद्वियोगः एव अन्तः**—आणि त्यांचा वियोग हाच अंत आहे. **अतः आद्यन्तवन्तः अनित्याः मध्यक्षणभावित्वात् इत्यर्थः**—म्हणून आद्यन्तवन्त म्ह० अनित्य, कारण ते मध्यक्षणामध्यें मात्र अनुभवास येतात. [ भोग क्षणभंगुर असल्यामुळें मिथ्या-उपेक्षेला पात्र आहेत. ते क्षणिक मनोवृत्तीनेंच व्यक्त होत अस-

त्यामुळें क्षणभंगुर आहेत. त्यांविषयींची मनोवृत्ति लय पावली कीं, विषयभोगहि लोपला. मनोवृत्ति क्षणिक आहे, ही अनुभवसिद्ध गोष्ट आहे.]—**कौन्तेय**—हे अर्जुना—**बुधः** -**विवेकी**-**अवगतपरमार्थतत्त्वः तेषु भोगेषु न रमते**—ज्याला परमार्थतत्त्व कळले आहे, असा विवेकी त्या भोगांमध्यें रममाण होत नाही. [विवेकी भोगांची उपेक्षा करितात, असें दिसतें. त्यावरूनहि त्यांचे आभासत्व व्यक्त होते. अहोपण, कित्येकांची भोगांमध्येहि अभिरुचि दिसते, म्हणून म्हणाल तर सांगतों-]—**अत्यन्तमूढानां एव हि विषयेषु रतिः दृश्यते यथा पशुप्रभृतीनां**—अत्यंत मूढांचीच विषयांमध्यें आसक्ति दिसते. जशी पशुप्रभृति इतर मूढ जीवाची विषय-रति दिसते, [तशीच मूढ मनुष्यांची विषयासक्ति अनुभवास येते, पण विवेकी तसे विषयासक्त होत नाहीत.][१] २२

**शक्नोतीहैव यः सोढुं प्राक्शरीरविमोक्षणात् ।**
**कामक्रोधोद्भवं वेगं स युक्तः स सुखी नरः ॥२३॥**

**अन्वयार्थ**—**यः**—जो—**इह एव**—जिवंतपणीच—**प्राक् शरीरविमोक्षणात्**—शरीराचा नाश होईपर्यंत—**कामक्रोधोद्भवं वेगं**—काम व क्रोध यांपासून उत्पन्न होणारा वेग—**सोढुं**—सहन करण्यास—**शक्नोति**—समर्थ होतो—**सः**—तो—**युक्तः**—योगी व—**सः**—तो—**सुखी**—सुखी—**नरः**—पुरुष आहे. २३.

**अयं च श्रेयोमार्गप्रतिपक्षी कष्टतमो दोषः सर्वानर्थप्राप्तिहेतुर्दुर्निवार्यश्चेति तत्परिहारे यत्नाधिक्यं कर्तव्यमित्याह भगवान्—शक्नोत्युत्सहत इहैव जीवन्नेव यः सोढुं प्रसहितुं प्राक्पूर्वं शरीरविमोक्षणादा मरणात् । मरणसीमाकरणं जीवतोऽवश्यंभावी हि कामक्रोधोद्भवो वेगोऽनन्तनिमित्तवान्हि स इति । यावन्मरणं तावन्न विश्रम्भणीय इत्यर्थः। काम इन्द्रियगोचरप्राप्त इष्टे विषये श्रूयमाणे स्मर्यमाणे वाऽनुभूते सुखहेतौ या गर्धिस्तृष्णा स कामः, क्रोधश्चाऽऽत्मनः प्रतिकूलेषु दुःखहेतुषु दृश्यमानेषु श्रूयमाणेषु स्मर्यमाणेषु वा यो द्वेषः स क्रोधस्तौ कामक्रोधावुद्भवो यस्य वेगस्य स कामक्रोधोद्भवो वेगः, रोमा-**

---

१ रहस्यकार या श्लोकाचा अर्थ "बाह्यपदार्थांच्या संयोगामुळेच उत्पन्न होणारे जे भोग त्यास आदि व अंत असल्यामुळे ते दुःखाचेच कारण होत. त्याचे ठायीं शहाणा पुरुष रत होत नाही" असा करितात. पण 'संस्पर्शजाः' म्हणजे 'बाह्य पदार्थांच्या संयोगामुळेच उत्पन्न होणारे भोग' हा अर्थ बरोबर नाही. कारण इंद्रियें व विषय यांच्या संयोगापासूनच भोग उत्पन्न होतात, तसेच, "आदि व अंत असल्यामुळे ते दुःखाचेंच कारण होत," हेहि म्हणणें विशेष चांगले नाहीं. भोग स्वभावतःच दुःखाचें कारण आहेत, व आद्यंतवत्त्व हा त्यांतील दुसरा मोठा दोष आहे. म्हणून आचार्यांच्या भाष्याप्रमाणेंच त्याचा अर्थ करणें अधिक सयुक्तिक आहे. 'बुधः' म्ह० नुसता लौकिक शहाणा नव्हे, तर बुधशब्दानें येथें ज्ञानी विवेकीच घेतला पाहिजे. कारण पुष्कळ लौकिक शहाणे विषयांसाठीं दीन झालेले दिसतात. या श्लोकाच्या अर्थासंबंधाने आम्ही पूर्वी बराच विचार केलेला असल्यामुळे येथें अधिक विस्तार करीत नाही.

**अनहृष्टनेत्रवदनादिलिङ्गोऽन्तःकरणप्रक्षोभरूपः कामोद्भवो वगो गात्रप्रकम्पप्रस्वेदसंदष्टौष्ठपुटरक्तनेत्रादिलिङ्गः क्रोधोद्भवो वेगस्तं कामक्रोधोद्भवं वेगं य उत्सहते प्रसहते सोढुं प्रसहितुं स युक्तो योगी सुखी चेह लोके नरः ॥ २३ ॥**

भाष्यार्थ—( पुढील श्लोकाचे तात्पर्य- )—**च अयं दोषः श्रेयोमार्गप्रतिपक्षी कष्टतमः सर्वानर्थप्राप्तिहेतुः दुर्निवार्यः च**—आणि हा दोष श्रेयोमार्गाचा प्रतिपक्षी व सर्व अनर्थाचें निमित्त आहे, त्यामुळें अतिशय कष्टकर व ज्याचें निवारण करतां येत नाहीं असा आहे—**इति तत्परिहारे यत्नाधिक्यं कर्तव्यं इति भगवान् आह**—म्हणून त्याच्या परिहारासाठीं अतिशय यत्न करावा असें भगवान् सांगतात—**शक्नोति-उत्सहते**—शकतो-समर्थ होतो—**इह एव-जीवन् एव**—येथेंच-जीवनदशेंत-जिवंत असतांनाच—**यः सोढुं-प्रसहितुं**—जो सहन करण्यास—**प्राक्-पूर्वं शरीरविमोक्षणात्-आमरणात्**—शरीराचा पात होण्यापूर्वी-मरेपर्यंत—**मरणसीमाकरणं जीवतः हि कामक्रोधोद्भवः वेगः अवश्यं भावी**—येथें मरेपर्यंत अशी मरणाची सीमा करण्याचें कारण जिवंत असलेल्या मनुष्याला काम व क्रोध यांच्यापासून होणारा वेग अवश्य होतो, हें आहे.—**हि सः अनन्तनिमित्तवान् इति**—कारण त्याचीं निमित्तें अनन्त आहेत. यास्तव—**यावत् मरणं तावत् न विश्रम्भणीयः इत्यर्थः**—जोवर मरण येई तोंवर त्याचा विश्वास धरूं नये, असा याचा भावार्थ. [ जो जिवंतपणीं कामक्रोधांचा वेग मरेपर्यंत सहन करण्यास समर्थ होतो तो युक्त वगैरे आहे. मरेपर्यंत अशी मरणाची सीमा करण्याचे कारण काय ? कामक्रोधांची निमित्ते अनेक आहेत. त्यामुळें जिवंत असलेल्या मनुष्याला ते अवश्य होतात, हें प्रसिद्ध आहे. म्हणून मरेपर्यंत त्याचा विश्वास धरूं नये, हें सुचविण्यासाठीं 'मरेपर्यंत' असें म्हटलें आहे. ]—**कामः-इंद्रियगोचरप्राप्ते इष्टे विषये श्रूयमाणे स्मर्यमाणे वा अनुभूते सुखहेतौ या गार्धिः-तृष्णा सः कामः**—इंद्रियांशीं संनिकर्ष पावलेल्या म्ह० इंद्रियांशी संयुक्त झालेल्या इष्ट विषयांविषयीं जी तृष्णा-गर्धि तो काम. ज्याचा अनुभव घेतला आहे व जो सुखाचा हेतु-सुखनिमित्त आहे, असा निश्चय झाला आहे, तो इष्ट विषय इंद्रियांसमोर आला असतां, त्याच्याविषयी-त्याचे नांव वर्णन वगैरे ऐकलें असतां, किंवा त्याचें स्मरण झालें असतां, तो आपल्याला प्राप्त व्हावा अशा स्वरूपाचा जो मनोविकार उत्पन्न होतो तो काम होय. त्यालाच गर्धि किंवा तृष्णा म्हणतात.—**च क्रोधः आत्मनः प्रतिकूलेषु दुःखहेतुषु दृश्यमानेषु श्रूयमाणेषु वा स्मर्यमाणेषु यः द्वेषः सः क्रोधः**—आणि क्रोध म्ह० आपल्या प्रतिकूल-दुःखाला कारण होणारे जे विषय ते समोर दिसले असतां, त्यांविषयी ऐकलें असतां किंवा त्यांचें स्मरण झालें असतां, त्यांविषयीं जो द्वेष उत्पन्न होतो तो क्रोध होय.—**तौ कामक्रोधौ उद्भवः यस्य वेगस्य सः कामक्रोधोद्भवः वेगः**—ते कामक्रोध ज्या वेगाचें उत्पत्तिस्थान आहेत तो कामक्रोधोद्भव वेग होय.—**रोमाञ्चन-हृष्टनेत्रवदनादिलिङ्गः अन्तःकरणप्रक्षोभरूपः कामोद्भवः वेगः**—अंगावर रोमांच उठणें, नेत्र, वदन

प्रफुल्लित होणें इत्यादि ज्याचीं चिन्हें आहेत असा हा अन्तःकरणप्रक्षोभरूप कामोद्भव वेग आहे. ( कामोद्भव म्ह० कामापासून उद्भवलेला )—**गात्रप्रकंप-प्रस्वेद-संदष्टौष्ठ-पुट-रक्तनेत्रादिलिङ्गः क्रोधोद्भवः वेगः**—तसाच, शरीर अतिशय कांपूं लागणें, घाम सुटणे, ओष्ठपुट चांवणें, नेत्र लाल होणें, इत्यादि ज्याचीं चिन्हें आहेत, तो क्रोधोद्भव वेग होय.—**तं कामक्रोधोद्भवं वेगं यः सोढुं-प्रसहितुं-उत्सहते-प्रसहते**-त्या कामक्रोधोद्भव वेगाला जो सहन करण्यास समर्थ होतो—**सः युक्तः-योगी सुखी च इह लोके नरः**—तो योगी, सुखी व या लोकीं नर-पुरुष होय. [ काम व क्रोध यांपासून उत्पन्न होणारा वेग जो मरेपर्यंत सहन करूं शकतो, तोच योगी व या लोकीं खरा सुखी पुरुष होय. अर्थात् कर्मयोग्यामध्यें कामक्रोधोद्भव वेग मरेपर्यंत सहन करण्याचें सामर्थ्य संभवत नसल्यामुळे हें ज्ञानयोग्याचेच वर्णन आहे. ] २३.

## योऽन्तःसुखोऽन्तरारामस्तथान्तर्ज्योतिरेव यः ।
## स योगी ब्रह्मनिर्वाणं ब्रह्मभूतोऽधिगच्छति ॥ २४ ॥

**अन्वयार्थ**—**यः**—जो—**अंतःसुखः**—अन्तरात्म्यामध्येंच ज्याचें सुख आहे, असा व—**अन्तरारामः**—आत्म्यामध्येंच ज्याचा आराम-आक्रीडा-करमणूक आहे—**तथा**—त्याचप्रमाणें—**यः**—जो—**अन्तर्ज्योतिः एव**—आत्मा हीच ज्याची ज्योति-प्रकाश आहे—**सः**—तो—**योगी**—आत्मनिष्ठ—**ब्रह्मभूतः सन्**—ब्रह्मरूप होऊन—**ब्रह्मनिर्वाणं**—ब्रह्मामध्यें निर्वाणास-मोक्षास—**अधिगच्छति**—प्राप्त होतो. २४.

**कथंभूतश्च ब्रह्मणि स्थितो ब्रह्म प्राप्नोतीत्याह—योऽन्तःसुखोऽन्तरात्मनि सुखं यस्य सोऽन्तःसुखस्तथाऽन्तरेवाऽऽत्मन्याराम आक्रीडा यस्य सोऽन्तरारामस्तथैवान्तरात्मैव ज्योतिः प्रकाशो यस्य सोऽन्तर्ज्योतिरेव । य ईदृशः स योगी ब्रह्मनिर्वाणं ब्रह्मणि निर्वृतिं मोक्षमिह जीवन्नेव ब्रह्मभूतः सन्नधिगच्छति प्राप्नोति ॥ २४ ॥**

---

१ रहस्यकार " युक्त कोणास म्हणावे याची व्याख्याहि यातच आली आहे" असें म्हणतात. पण हि युक्ताची व्याख्या नसून 'कामक्रोधाच्या वेगाला सहन करणारा पुरुष युक्त व सुखी होय," असें म्हणून नुस्ती स्तुति केली आहे. कारण तसें जर न मानलें तर 'सुखी कोणास म्हणावें' याचीहि व्याख्या यात दिली आहे असे म्हणावें लागेल. ते पुनः म्हणतात, " सुखदुःखांचा त्याग न करतां समबुद्धीने ती सोसणें हेंच युक्तपणाचे खरे लक्षण होय." तर मग सुखदुःखाचा त्याग मनुष्याला स्वेच्छेने करतां येतो म्हणावयाचा ! तथापि तो न करतां युक्तानें सुखदुःखें सोसली पाहिजेत, असे यावरून सिद्ध होतें, पण हें म्हणणें कोणत्या तर्कशास्त्राप्रमाणें उपपन्न होत असेल तें असो. वेदान्तशास्त्राप्रमाणे तरी प्राण्याला सुखदुःखाचा त्याग करतां येत नाहीं, म्हणून तर " साधकानें त्यांना सहन करावे, दुःख झालें असतां उद्विग्न होऊं नये, सुख झालें असतां अधिक सुखाची स्पृहा करूं नये" असें गीतेतच वारंवार सांगितलें आहे. शिवाय सुखदुःखांचा त्याग न करण्यांत युक्ताचा कोणता पुरुषार्थ सिद्ध होणार कोण जाणे ! पण असे अनुपपन्न उल्लेख गीतारहस्यांत कितीतरी आहेत ! !

**भाष्यार्थ**—( केवल आत्म्यामध्येंच अत्यंत रत होणें हें ज्ञानाचें अगदीं अंतरंग साधन आहे, असें दाखविणारे भगवान् आणखी विशेषणें देऊन ब्रह्मवेत्त्याचेंच वर्णन करितात-)—**च कथंभूतः ब्रह्मणि स्थितः ब्रह्म प्राप्नोति इति आह**—आणि कशा प्रकारचा ब्रह्मामध्ये स्थित झालेला ब्रह्मवेत्ता ब्रह्माला प्राप्त होतो, ते भगवान् 'योऽन्तःसुखः०' या श्लोकानें सांगतात—**यः अन्तःसुखः-अन्तरात्मनि सुखं यस्य सः अन्तःसुखः**—जो अन्तःसुख असतो म्ह० अन्तरात्म्यामध्ये ज्याचें सुख असतें तो अन्तःसुख होय. ( म्ह० ज्याला बाह्य विषयांनीं सुख होत नाहीं तर आंतल्या आंत अन्तःकरण स्थिर केल्यामुळें आत्मस्वरूपभूत सुख होते तो अन्तःसुख. )—**तथा अन्तर् एव आत्मनि आरामः-आक्रीडा यस्य सः अन्तरारामः**—त्याचप्रमाणें आंतच म्ह० आत्म्यामध्यें ज्याचा आराम म्ह० आक्रीडा चालते तो अन्तराराम होय.—**तथा एव अन्तर् आत्मा एव ज्योतिः-प्रकाशः यस्य सः अन्तर्ज्योतिः एव**—त्याचप्रमाणे अन्तर् म्ह० आत्माच ज्याची ज्योति म्ह० प्रकाश आहे तो अन्तर्ज्योतिच होय. [ सुखासाठीं बाह्य विषयांची अपेक्षा न करणें, हेंच अन्तःसुखत्व आहे. करमणूक, क्रीडा यांसाठीं बाह्य स्त्री, मित्र इत्यादिकांची अपेक्षा नसणें, त्यांवांचून आंतल्याआंत क्रीडेचें फल प्राप्त होणें हे अन्तरारामत्व आहे. इंद्रियादिकांपासून होणाऱ्या विषयप्रकाशाची अपेक्षा नसणें, विषयज्ञानराहित्य हेंच अन्तर्ज्योतिष्ट्व आहे. अशा विशेषणांनीं संपन्न असलेला, समाहित पुरुष जिवंत असतांनाच ब्रह्मभावास प्राप्त होतो. तो ब्रह्मामध्यें परिपूर्ण शांतीला प्राप्त होतो. ती स्थिति सर्व अनर्थनिवृत्तिरूप असते. तिच्यामध्ये निरतिशय आनंदाचा आविर्भाव होतो, असें उत्तरार्धांत सांगतात-] —**यः ईदृशः सः योगी ब्रह्मनिर्वाणं-ब्रह्मणि निर्वृतिं-मोक्षं इह-जीवन् एव ब्रह्मभूतः सन् अधिगच्छति-प्राप्नोति**—जो अशाप्रकारचा असतो तो योगी ब्रह्मनिर्वाणास म्ह० ब्रह्मांतील शांतीस-मोक्षास या वर्तमान शरीरांत-जिवंत असतानाच ब्रह्मभूत होऊन प्राप्त होतो, [ त्याला जीवन्मुक्ति मिळते. ही सर्व विशेषणे बाह्य सर्व व्यापार सोडून आत्मनिष्ठ झालेल्या संन्याश्यालाच लागू होणारीं आहेत. कर्मयोगी असा अन्तःसुख वगैरे असणें शक्य नाहीं.[1] ] २४.

---

१ या श्लोकाचा अर्थ रहस्यकार असा करितात-"याप्रमाणे ( बाह्य सुखदुःखाची अपेक्षा न ठेवतां ) जो अन्तःसुखी म्ह० अंतःकरणांतच सुखी झाला" पण 'बाह्य दुःखाची अपेक्षा न ठेवतां,' हें येथें कशाला म्हटलें आहे? कोणी बाह्य दुःखाची अपेक्षा ठेवतो की काय ? आम्हांला तर दुःखाची अपेक्षा कोणीच ठेवीत नाहीं, असें वाटतें. 'अन्तःकरणांतच सुखी झाला ' या म्हणण्यांत काय स्वारस्य आहे ? बाकीचे प्राणी अन्तःकरणाच्या बाहेर सुखी होतात वाटतें ! सुख हा अन्तःकरणाचा धर्म आहे. म्हणूनच आचार्यांनीं 'अन्तरात्म्यामध्ये ज्याचें सुख असतें,' असें म्हटलें आहे. तो शब्दादि विषयांपासून होणाऱ्या सुखाची अपेक्षा मुळींच करीत नाहीं तर अन्तरात्म्याच्या स्वरूपभूत सुखाचा अनुभव घेतो, असा याचा आशय आहे. वेदान्तशास्त्रावर ग्रंथ लिहितांना हवे तसे शब्द लिहून भागत नसतें. प्रत्येक शब्द विचारपू-

**लभन्ते ब्रह्मनिर्वाणमृषयः क्षीणकल्मषाः ।**
**छिन्नद्वैधा यतात्मानः सर्वभूतहिते रताः ॥ २५ ॥**

**अन्वयार्थ—क्षीणकल्मषाः**—ज्यांचे पापादि दोष क्षीण झाले आहेत—**छिन्नद्वैधाः**—ज्यांचे सर्व संशय तुटले आहेत—**यतात्मानः**—ज्यांनी इंद्रियांचे नियमन केले आहे व जे—**सर्वभूतहिते रताः**—सर्व प्राण्यांच्या हितामध्ये रत आहेत, असे —**ऋषयः**—ज्ञानी-तत्त्ववेत्ते-संन्यासी—**ब्रह्मनिर्वाणं**—ब्रह्मामध्ये निर्वाण—**लभन्ते** —पावतात. २५

**किं च-लभन्ते ब्रह्मनिर्वाणं मोक्षमृषयः सम्यग्दर्शिनः संन्यासिनः क्षीणकल्मषाः क्षीणपापादिदोषाच्छिन्नद्वैधाश्छिन्नसंशया यतात्मानः संयतेन्द्रियाः सर्वभूतहिते रताः सर्वेषां भूतानां हित आनुकूल्ये रता अहिंसका इत्यर्थः ॥ २५ ॥**

**भाष्यार्थ**—( मुक्तीला कारण होणारे जे ज्ञान त्याचें आणखी एक साधन ‘ लभन्ते० ’ या श्लोकाने सांगतात- )—**किं च**—तसेच—**ब्रह्मनिर्वाणं-मोक्षं लभन्ते**—ब्रह्मनिर्वाणास म्ह० मोक्षास प्राप्त होतात. ( कोण ? उत्तर- )—**ऋषयः-सम्यग्दर्शिनः-संन्यासिनः**—ऋषी म्ह० आत्मयाथात्म्यदर्शी—आत्म्याचे खरे स्वरूप जाणणारे संन्यासी ( ते ऋषी कसे ? उत्तर- )—**क्षीणकल्मषाः-क्षीणपापादिदोषाः**—ज्यांचें कल्मष म्ह० पापादि दोष क्षीण झाले आहेत असे ऋषी मोक्षाला प्राप्त होतात. [ यज्ञादि नित्य कर्माच्या अनुष्ठानामुळे पापादिरूप कल्मष—मल क्षीण होतो. त्यानंतर वारंवार श्रवण, मनन करून सतत निदिध्यासन केल्याने सम्यग्दर्शन—आत्मसाक्षात्कार होतो. त्यामुळे अनायासाने मुक्तीचा लाभ होतो. ज्ञानप्राप्तीचा आणखी उपाय सांगतात- ]—**छिन्नद्वैधाः-छिन्नसंशयाः**—ज्याचे द्वैध म्ह० संशय[1] तुटले आहेत,—**यतात्मानः-सं-**

---

वेक व सोपपत्तिकच लिहावा लागतो. पण गीतारहस्यांत पदोपदी शास्त्रीयस्खलन आढळते. असो, ‘स योगी०’ या उत्तरार्धाचा अर्थ रहस्यकार असा करितात—“तो ( कर्म- ) योगी ब्रह्मरूप होऊन त्यालाच निर्वाण म्ह० ब्रह्मात मिळून जाण्याचा मोक्ष प्राप्त होतो” येथील योगीशब्दाचा कर्मयोगी हा अर्थ प्रकरणाला धरून नाही. येथील योगी म्ह० ज्ञाननिष्ठच होय. ‘ब्रह्मात मिळून जाण्याचा मोक्ष ’ ही भाषा फारच उत्तम-नमुनेदार आहे !

१ रहस्यात ‘छिन्नद्वैधाः’ याचा अर्थ “ज्यांची द्वंद्वबुद्धि सुटली म्ह० सर्व ठिकाणी एकच परमेश्वर आहे हे ज्यांनी जाणले” असा केला आहे. पण द्वैध म्ह० द्वंद्वबुद्धि नव्हे. ‘द्वैधी भवति मे मनः’ असे शाकुंतल नाटकांत दुष्यन्त म्हणतो. पण त्याचा अर्थ माझें मन द्वंद्वबुद्धियुक्त होते असा कोणी करीत नाहीत. तर ‘संशयित होतें, हे करूं की ते करू, याचा निश्चय होत नाही,’ असाच करितात. संशय नेहमी उभयकोटिक असतो. म्हणून त्याला द्वैध म्हणतात. अर्थात् ‘छिन्नद्वैधाः’ म्ह० ज्यांचे संशय तुटले आहेत, हाच अर्थ बरोबर आहे. तसेच ‘द्वंद्वबुद्धि सुटली म्ह० सर्व ठिकाणी एकच परमेश्वर आहे, हे तत्त्व जाणलें’ हें स्पष्टीकरणहि बरो-

**यतेंद्रियाः**—ज्यांनीं इंद्रियांचें नियमन केले आहे—**सर्वभूतहिते रताः-सर्वेषां भूतानां हिते आनुकूल्ये रताः-अहिंसकाः इत्यर्थः**—सर्व भूतांच्या हितांत रत असलेले, सर्व प्राण्यांच्या आनुकूल्यांत निमग्न झालेले म्ह० कोणाचीहि हिंसा न करणारे असा भावार्थ. [ श्रवणादिकांच्या योगानें संशयाचें निरसन करणें, शरीरेंद्रियांचे नियमन करणें, व दयालु होऊन कोणत्याहि प्राण्याला पीडा न देणे, हीं सुद्धां आत्मज्ञानप्राप्तीचीं साधनें आहेत. तीं सुद्धां कर्मयोग्याचे ठिकाणीं पूर्णपणे संभवत नाहींत. ] २५.

## कामक्रोधवियुक्तानां यतीनां यतचेतसाम् ।
## अभितो ब्रह्मनिर्वाणं वर्तते विदितात्मनाम् ॥ २६ ॥

**अन्वयार्थ—कामक्रोधवियुक्तानां**—काम व क्रोध यांनीं रहित असलेल्या **यतचेतसां**—चित्ताचें संयमन केलेल्या—**विदितात्मनां**—आत्म्याला साक्षात् जाणलेल्या—**यतीनां**—संन्याश्यांचा—**ब्रह्मनिर्वाणं**—मोक्ष—**अभितः**—जिवंतपणीं व मेल्यावरही—**वर्तते**—असतो. २६.

**किं च—कामक्रोधवियुक्तानां कामश्च क्रोधश्च कामक्रोधौ ताभ्यां वियुक्तानां यतीनां संन्यासिनां यतचेतसां संयतान्तःकरणानामभित उभयतो जीवतां मृतानां च ब्रह्मनिर्वाणं मोक्षो वर्तते, विदितात्मनां विदितो ज्ञात आत्मा येषां ते विदितात्मानस्तेषां विदितात्मनां सम्यग्दर्शिनामित्यर्थः ॥ २६ ॥**

**भाष्यार्थ**—( २३ व्या श्लोकांत कामक्रोधाचा वेग सहन करावा, असे सांगितलें. आतां कामक्रोधच त्याज्य आहेत, असे सांगतात- )—**किंच**—आणि शिवाय—**कामक्रोधवियुक्तानां-कामश्च क्रोधश्च कामक्रोधौ ताभ्यां वियुक्तानां यतीनां-संन्यासिनां**—काम व क्रोध-ते कामक्रोध, त्या दोन्ही दोषांनीं वियुक्त-विरहित असलेले जे यती त्या संन्याश्याचे—**यतचेतसां-संयतान्तःकरणानां**—ज्यांचें अन्तः-

---

बर नाहीं. कारण द्वंद्व म्ह० शीतोष्ण-सुखदुःख-जयापजय इत्यादि परस्पर विरोधी पदार्थ, त्यांविषयींची बुद्धि सुटणें म्ह० परमेश्वर एक आहे वगैरे कळणें कसें ? याचा व त्याचा संबध काय ? 'सर्वभूतहिते रताः' याचा 'जे आत्मसंयमनानें सर्वभूतांचे हित करण्यांत रत झाले' असा अर्थ केला आहे. पण यांत आत्मसंयमनानें हें उगीच पदरचें पद कशाला पाहिजे ? शिवाय सर्वभूतांचें हित करण्यांत रत होणें म्ह० काय ? हित करण्याची तऱ्हा कोणती ? कोणत्या उपायानें सर्वांचें हित तो करतो व कर्मयोगी गृहस्थाला तें शक्य आहे का ? 'लभन्ते ब्रह्मनिर्वाण' याचा 'त्यांना हा ब्रह्मनिर्वाणरूप मोक्ष मिळत असतो' असा अर्थ केला आहे. तो मुळाला धरून नाहीं. 'ऋषयः ब्रह्मनिर्वाण लभन्ते' याचा सरळ अर्थ- ऋषी ब्रह्मनिर्वाणास म्ह०मोक्षास प्राप्त होतात' असा आहे. तो सुबोध असून वाक्यहि वेडेंवाकडें होत नाहीं. पण तसा अर्थ न करिता 'ब्रह्म निर्वाणरूप मोक्ष' व 'मिळत असतो' असें उगीच म्हटलें आहे. 'मिळतो' असें सरळ न म्हणतां 'मिळत असतो' असें म्हणण्यांत रहस्यकारांचा कोणता आशय आहे तें तेच जाणोत.

करण संयत–उत्तम प्रकारें नियमित आहे, अशा यतचित्त संन्याश्यांचें—**ब्रह्मनिर्वाणं-मोक्षः अभितः-उभयतः जीवतां-मृतानां च वर्तते**—ब्रह्मनिर्वाण–मोक्ष दोन्ही अवस्थेत म्ह० जिवंतपणीं व मेल्यावर असतो. ( यतीचेंच आणखी एक विशेषण–)—**विदितात्मनां-विदितः ज्ञातः आत्मा येषां ते विदितात्मानः तेषां विदितात्मनां-सम्यग्दर्शिनां इत्यर्थः**—ज्यांचा आत्मा विदित म्ह० ज्ञात झाला आहे ते विदितात्मे होत. त्या विदितात्म्यांचें म्ह० सम्यग्दर्शी ज्ञानी पुरुषांचे ब्रह्मनिर्वाण जिवंतपणीं व मरणोत्तरहि असते. [ त्याना जीवन्मुक्ति व विदेहमुक्ति या दोन्ही मुक्ति प्राप्त होतात. या श्लोकांत 'यतीनां' असे प्रत्यक्ष पद आहे. त्यावरून हे सर्व धर्म कर्मयोग्याचे आहेत, असे म्हणतांच येत नाहीं. कामक्रोधरहित, चित्ताचें नियमन केलेल्या, आत्मज्ञानी संन्याश्यांना जीवन्मुक्तीचा लाभ होतो. स्वर्गादि फलाप्रमाणे त्यांना मोक्षहि मेल्यावर मिळतो, असे नाहीं. तर जीवंतपणीच त्याना सद्योमुक्ति प्राप्त होते. त्यांचे मोक्ष हे ज्ञानफल कर्मफलाप्रमाणे परोक्ष नसते प्रत्यक्ष असते. ] २६.

स्पर्शान्कृत्वा बहिर्बाह्यांश्चक्षुश्चैवान्तरे भ्रुवोः ।
प्राणापानौ समौ कृत्वा नासाभ्यन्तरचारिणौ ॥२७॥
यतेन्द्रियमनोबुद्धिर्मुनिर्मोक्षपरायणः ।
विगतेच्छाभयक्रोधो यः सदा मुक्त एव सः ॥२८॥

---

१ या श्लोकातील 'यति'शब्दाचा अर्थ रहस्यकार 'यति-' असाच अगदी सरळ करितात. त्यावरून वाचकांनी आपणच काय ते समजावें. कारण यति म्ह० सन्यासी असा केल्यास कर्मयोगाला मोठाच धक्का बसेल अशी भीति त्याना वाटली असावी! पण २४ व्या श्लोकातील 'योगी'शब्दाचा अर्थ 'कर्मयोगी' असा करण्याम मात्र ते विसरले नाहींत' "अभितः म्ह० सभोंवार अगर समोर ठेवल्याप्रमाणे ( अर्थात् बसल्या ठिकाणीच ) 'ब्रह्मनिर्वाणं वर्तते' ब्रह्मनिर्वाणरूप मोक्ष मिळतो" असा अर्थ रहस्यात केला आहे. पण तो बरोबर नाहीं. 'अभितः' म्ह० सभोंवार हा अर्थ कांहीं तरी बरा आहे, पण पुढे 'अगर' असे म्हणून स्पष्टीकरणासह जो अर्थ केला आहे, तो भलतीकडेच वाहवला आहे. 'अभितः म्ह०समोर ठेवल्याप्रमाणें बसल्या ठिकाणीच' हा अर्थ मुळाला अगदीं सोडून आहे. शिवाय त्यांत स्वारस्य कांहींच नाही. 'मोक्ष समोर ठेवल्याप्रमाणे बसल्याजागी मिळतो' या म्हणण्यांत विशेष काय आहे? मोक्ष कांहीं कोठे जाऊन मिळवावयाचा थोडाच असतो.मोक्ष म्ह० स्वरूपावस्थान. अर्थात् ते स्वरूपीच म्ह० बसल्याठिकाणीच मिळणार! तसेच, मोक्ष स्वरूपाहून भिन्न नाहीं, तेव्हां तो समोर ठेवल्याप्रमाणे कसा मिळणार? त्यापेक्षा 'अभितः म्ह० उभयतः–जिवंत दशेंत व मेल्यावरही मोक्ष असतो म्ह० ते नित्यमुक्त होतात. ज्ञानी यति जिवंत असतांनाहि मोक्षसुखाचा अनुभव घेतात व मेल्यावर तर तो आहेच, या म्हणण्यांत फार गूढ अर्थ आहे व तो आम्हीं वर व्यक्त केलाच आहे

**अन्वयार्थ—यः मुनिः**—जो मुनि-संन्यासी—**बाह्यान् स्पर्शान्**—शब्दस्पर्शादि बाह्य विषयांस—**बहिः कृत्वा**—बाहेरच करून—**च**—आणि—**चक्षुः**—चक्षुरिन्द्रिय—**भ्रुवोः अन्तरे कृत्वा**—दोन्ही भुवयांच्या मध्यें करून—**नासाभ्यन्तरचारिणौ**—नासिका व कंठादि आभ्यंतर भाग यांत संचार करणारे—**प्राणापानौ**—प्राण व अपान हे वायु—**समौ**—सम-तुल्य—**कृत्वा**—करून—**यतेंद्रियमनोबुद्धिः**—ज्यानें इंद्रियें, मन व बुद्धि यांना नियमित केलें आहे, त्यांचा निरोध केला आहे—**मोक्षपरायणः**—जो मोक्षपरायण झाला आहे—**विगतेच्छाभयक्रोधः**—इच्छा, भय व क्रोध ज्याच्या पासून निघून गेले आहेत—**सः**—असा तो—**सदा**—सर्वदा—**मुक्तः एव**—मुक्तच आहे. २७-२८.

**सम्यग्दर्शननिष्ठानां संन्यासिनां सद्योमुक्तिरुक्ता कर्मयोगश्चेश्वरार्पितसर्वभावेनेश्वरे ब्रह्मण्याधाय क्रियमाणः सत्त्वशुद्धिज्ञानप्राप्तिसर्वकर्मसंन्यासक्रमेण मोक्षायेति भगवान्पदे पदेऽब्रवीद्वक्ष्यति च अथेदानीं ध्यानयोगं सम्यग्दर्शनस्यान्तरङ्गं विस्तरेण वक्ष्यामीति तस्य सूत्रस्थानीयाञ्श्लोकानुपदिशति स्म—स्पर्शान्शब्दादीन्कृत्वा बहिर्बाह्याञ्श्रोत्रादिद्वारेणान्तर्बुद्धौ प्रवेशिताः शब्दादयो विषयास्तानचिन्तयतो बाह्या बहिरेव कृता भवन्ति । तानेवं बहिः कृत्वा चक्षुश्चैवान्तरे भ्रुवोः कृत्वेत्युनुषज्यते । तथा प्राणापानौ नासाभ्यन्तरचारिणौ समौ कृत्वा ॥ २७ ॥**

**भाष्यार्थ**—( गतार्थाचा अनुवाद करून पुढील तीन श्लोकांचा तात्पर्यार्थ आचार्य सांगतात-)—**सम्यग्दर्शननिष्ठानां संन्यासिनां सद्योमुक्तिः उक्ता**—सम्यग्दर्शननिष्ठ-आत्मज्ञाननिष्ठ संन्याश्यांची सद्योमुक्ति-जीवन्मुक्ति सांगितली—**च ईश्वरार्पितसर्वभावेन ईश्वरे-ब्रह्मणि आधाय क्रियमाणः कर्मयोगः**—आणि ईश्वरार्पण केलेल्या सर्व भावानें-ईश्वराचे ठिकाणी म्ह० ब्रह्मामध्ये आधान करून-ब्रह्मार्पण करून अनुष्ठिला जाणारा कर्मयोग—**सत्त्वशुद्धि-ज्ञानप्राप्ति-सर्वकर्मसंन्यासक्रमेण मोक्षाय इति भगवान् पदे पदे अब्रवीत् च वक्ष्यति**—चित्तशुद्धि, ज्ञानप्राप्ति व सर्वकर्मसंन्यास या क्रमानें मोक्षाला कारण होतो, असे भगवानानीं पदोपदीं सांगितलें आहे व पुढेंहि सांगतील. [ परमात्म्यामध्येंच देह, इंद्रियें, मन या सर्वांचा भाव म्ह० व्यापार अर्पण करून, सर्व बाह्य व्यापार सोडून असा याचा भावार्थ. सर्व कर्मे ब्रह्मार्पण करून अनुष्ठिलेला कर्मयोग क्रमानें ज्ञाननिष्ठेचें साधन बनतो, असें भगवानांनीं मागें सांगितलें आहे व पुढेंहि सांगतील.]—**अथ इदानीं**—याप्रमाणें कर्मयोग व त्याचें फल सांगितल्यानतर आता—**सम्यग्दर्शनस्य अन्तरंगं ध्यानयोगं विस्तरेण वक्ष्यामि इति तस्य सूत्रस्थानीयान् श्लोकान् उपदिशति स्म**—सम्यग्दर्शनाचें अन्तरंग साधन-ध्यानयोग मी विस्तारानें सांगेन अशा आशयानें त्या ध्यानयोगाच्या सूत्रस्थानीय-सूत्राप्रमाणें असलेले 'स्पर्शान् कृत्वा०' इत्यादि श्लोक भगवानांनीं सांगितले आहेत—**बाह्यान् स्पर्शान् शब्दादीन् बहिः कृत्वा**—बाह्य शब्दादि स्पर्शांना-विषयांना बाहेर करून—**श्रोत्रादिद्वारेण अन्तर् बुद्धौ प्रवेशिताः**

**शब्दादयः विषयाः**—श्रोत्रादि इंद्रियांच्या द्वारा आंत बुद्धीमध्यें शब्दादि विषय शिरलेले असतात.—**तान् अचिन्तयतः बाह्याः बहिः एव कृताः भवन्ति**—त्यांचें चिन्तन न करणाऱ्या पुरुषाचे ते विषय बाह्यच होतात, म्ह० ज्यांना बाहेरच ठेविलें आहे, असे ते होतात,—**तान् एवं बहिः (कृत्वा)**—त्यांना याप्रमाणे बाहेरच करून—**च चक्षुः भ्रुवोः अन्तरे कृत्वा**—आणि चक्षूला-चक्षुरिंद्रियाला दोन्ही भुवयांच्या मध्यें करून म्ह० नेत्र अर्धनिमीलित करून—**' कृत्वा ' इति अनुषज्यते**—' चक्षुश्चैव० ' या वाक्यार्शीहि ' कृत्वा ' याचा अन्वय लागतो.—**तथा नासाभ्यन्तरचारिणौ प्राणापानौ समौ कृत्वा**—त्याचप्रमाणे नासिका व कंठादि आभ्यंतर भाग यांत संचार करणारा प्राण व अपान यांना सम करून ( त्यांना स्थिर करून, कुंभक करून. ) २७.

**यतेन्द्रिय इति । यतेन्द्रियमनोबुद्धिर्यतानि संयतानीन्द्रियाणि मनो बुद्धिश्च यस्य स यतेन्द्रियमनोबुद्धिर्मननान्मुनिः संन्यासी मोक्षपरायण एवं देहसंस्थानो मोक्षपरायणो मोक्ष एव परमयनं परा गतिर्यस्य सोऽयं मोक्षपरायणो मुनिर्भवेत् । विगतेच्छाभयक्रोध इच्छा च भयं च क्रोधश्चेच्छाभयक्रोधास्ते विगता यस्मात्स विगतेच्छाभयक्रोधः । य एवं वर्तते सदा संन्यासी मुक्त एव स न तस्य मोक्षोऽन्यः कर्तव्योऽस्ति ॥ २८ ॥**

**भाष्यार्थ—' यतेंद्रिय० ' इति**—नंतर मग काय करावे तें ' यतेंद्रिय० ' या श्लोकाने सांगतात—**यतेंद्रियमनोबुद्धिः-यतानि-संयतानि इंद्रियाणि मनः च बुद्धिः यस्य सः यतेंद्रियमनोबुद्धिः**—ज्यांची इंद्रियें, मन,व बुद्धि हीं यत-संयत

१ पण रहस्यकार 'बाह्यान् स्पर्शान् ' याचा अर्थ 'बाह्य पदार्थांशीं ( इंद्रियाचे सुखदुःखद ) संयोग' असा करितात. पण तो साफ चुकला आहे. दुसऱ्या अध्यायांतील 'मात्रास्पर्शाः' (श्लो. १४) हा शब्द आणि या अध्यायांतील 'बाह्यस्पर्शेषु' (२१) व 'संस्पर्शजाः भोगाः' ( २२ ) हे शब्द सामासिक असल्यामुळे 'मात्रा व बाह्य' म्ह० बाह्य पदार्थ व 'स्पर्श' म्ह० त्यांचे इंद्रियांशीं होणारे संयोग, असा कसा तरी अर्थ करितां आला. पण येथें 'बाह्यान् स्पर्शान्' असे पृथक शब्द असल्यामुळे ' बाह्य पदार्थांशीं इंद्रियांचे संयोग ' असा त्यांचा अर्थ करतां येणें शक्यच नाहीं. तथापि रहस्यकार बेधडक 'बाह्यान् स्पर्शान्' म्ह० बाह्य पदार्थांशीं इंद्रियांचे सुखदुःखद संयोग, असा अर्थ करितात. पण 'बाह्यान् स्पर्शान्' यांतील 'बाह्य' हे विशेषण व 'स्पर्श' हें विशेष्य आहे, हें दोन्हीं शब्दांची एक विभक्ति असल्यामुळे निःसंशय ठरतें. शिवाय 'बाह्यान्' हें द्वितीयेचें बहुवचन आहे, तेव्हां त्याचा बाह्य पदार्थांशीं असा तृतीयान्त अर्थ करणें अगदी अयोग्य आहे. तसेंच 'बाह्यान् स्पर्शान्' या पदांवरून 'बाह्यस्पर्शेषु' हा समास कोणता मानावयाचा तें उघड होतें. 'बाह्य' म्ह० बाह्यपदार्थ हा अर्थ चुकीचा आहे. 'मात्रास्पर्शाः ' यांतील मात्रा म्ह० बाह्यपदार्थ हाहि अर्थ अनुचित आहे, हे आम्हीं वर सविस्तर दाखविलेंच आहे. यावरून रहस्यकारांनी मूळ शब्द, त्याची विभक्ति, प्रकरण, पूर्वोत्तर संबंध वगैरे शास्त्रीय ग्रंथ लावण्यास अत्यंत अवश्य असलेल्या गोष्टींकडे दुर्लक्ष करून व केवल कर्मयोगाकडेच दृष्टि ठेवून शब्दांचा व वाक्यांचा मनसोक्त अर्थ कसा केला आहे, तें वाचकांच्या लक्षांत येईल.

–उत्तमप्रकारें नियमित केलेलीं आहेत तो यतेंद्रियमनोबुद्धि— **मननात् मुनिः-संन्यासी मोक्षपरायणः**—मननामुळें मुनि–संन्यासी, मोक्षपरायण,असें त्यानें व्हावें.—**एवं देहसंस्थानः मोक्षपरायणः-मोक्षः एव परं अयनं-परा गतिः यस्य सः अयं मोक्षपरायणः मुनिः भवेत्**—असे ज्याचें देहसंस्थान आहे, ज्याचा देह अशा स्थितींत अवस्थित आहे असा मोक्षपरायण म्ह० मोक्ष हेंच ज्याचे परम अयन- परा गति आहे तो हा मोक्षपरायण होय. त्याने अशा प्रकारचा मुनि व्हावें. [ विषयोन्मुखता सोडून विक्षेपाचा परिहार करण्यासाठी चक्षूहि भुवयांच्या मध्यभागीं करून नाकपुड्या व कंठादि आंतील स्थान यांत संचार करण्याचे ज्यांचें शील आहे अशा प्राणापानांना सम–न्यूनाधिक्यरहित करून, कुंभकाच्या योगाने त्यांचा निरोध करून म्ह० सर्व इंद्रियांचे संयमन करून व प्राणायामपरायण होऊन काय करावे, ते या श्लोकांत सांगितले आहे. इंद्रियें, मन व बुद्धि यांचे नियमन करून केवल मोक्षाचीच अपेक्षा करणारा असा मननशील संन्यासी व्हावें, सर्वदा इच्छादिकांनी रहित व अत्यंत ज्ञाननिष्ठ अशा संन्याशाची मुक्ति सहज सिद्ध असल्यामुळे त्याला कांहीच कर्तव्य उरत नाहीं, असे भगवान् या श्लोकाच्या उत्तरार्धात सांगतात–)—**विगतेच्छाभयक्रोधः-इच्छा च भयं च क्रोधः च इच्छाभयक्रोधाः ते विगताः यस्मात् सः विगतेच्छाभयक्रोधः**—इच्छा व भय व क्रोध–इच्छाभयक्रोध, ते ज्याच्यापासून निघून गेले आहेत, तो विगतेच्छाभयक्रोध होय.—**यः संन्यासी एवं सदा वर्तते**—जो संन्यासी सदा असें वर्तन करतो—**सः मुक्तः एव तस्य मोक्षः अन्यः कर्तव्यः न अस्ति**—तो मुक्तच आहे, याला मोक्ष म्हणून निराळा आणखी संपादन करावयाचा रहात नाहीं. २८

## भोक्तारं यज्ञतपसां सर्वलोकमहेश्वरम् ।
## सुहृदं सर्वभूतानां ज्ञात्वा मां शान्तिमृच्छति ॥२९॥

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे संन्यासयोगो नाम पञ्चमोऽध्यायः ॥ ५ ॥**

**अन्वयार्थ—यज्ञतपसां**—यज्ञ व तपश्चर्या यांच्या—**भोक्तारं**—भोक्त्यास—**सर्वलोकमहेश्वरं**—सर्व लोकांच्या महान् ईश्वरास—**सर्वभूतानां सुहृदं**—सर्व भूतांच्या निरपेक्ष उपकारकास—**मां**—मला—**ज्ञात्वा**—जाणून—**शान्ति**—सर्व संसाराच्या शांतीस—**ऋच्छति**—प्राप्त होतो. २९.

**एवं समाहितचित्तेन किं विज्ञेयमित्युच्यते–भोक्तारं यज्ञानां तपसां च कर्तृरूपेण देवतारूपेण च सर्वलोकमहेश्वरं सर्वेषां लोकानां महान्तमीश्वरं सर्वलोकमहेश्वरं सुहृदं सर्वभूतानां सर्वप्राणिनां प्रत्युपकारनिरपेक्षतयोपकारिणं सर्वभूतानां हृदयेशयं सर्वकर्मफलाध्यक्षं सर्वप्रत्ययसाक्षिणं मां नारायणं ज्ञात्वा शान्तिं सर्वसंसारोपरतिमृच्छति प्राप्नोति ॥२९॥**

इति श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यगोविन्दभगवत्पूज्यपादशिष्यश्रीमच्छंकरभगवतः कृतौ श्रीभगवद्गीताभाष्ये प्रकृतिगर्भो नाम पञ्चमोऽध्यायः ॥ ५ ॥

**भाष्यार्थ**—(त्या अधिकाऱ्याला जर कांहीं कर्तव्य नाहीं तर ज्ञातव्यहि नाहीं.उत्तर-) —**एवं समाहितचित्तेन किं विज्ञेयं इति उच्यते**—याप्रमाणें ज्याचें चित्त समाहित झालें आहे, त्यानें काय जाणावें तें ' भोक्तारं० ' या श्लोकानें सांगितलें जातें— **यज्ञानां च तपसां कर्तृरूपेण च देवतारूपेण भोक्तारं**—यज्ञ व तप यांच्या कर्तृरूपानें व देवतारूपानें भोक्ता—**सर्वलोकमहेश्वरं-सर्वेषां लोकानां महान्तं ईश्वरं सर्वलोकमहेश्वरं**—सर्वलोकमहेश्वर-सर्वलोकांचा महान् ईश्वर [ हिरण्यगर्भादि नव्हे त्याहून महेश्वर- ]—**सर्वभूतानां सुहृदं-सर्वप्राणिनां प्रत्युपकारनिरपेक्षतया उपकारिणं**—सर्वभूतांचा सुहृद्-सर्व प्राण्यांवर, प्रत्युपकाराची अपेक्षा न करिता उपकार, करणारा—**सर्वभूतानां हृदयेशयं सर्वकर्मफलाध्यक्षं-सर्वप्रत्ययसाक्षिणं मां नारायणं ज्ञात्वा**—सर्व प्राण्यांच्या हृदयामध्यें राहणारा, सर्वकर्मफलांचा अध्यक्ष, सर्व प्रत्ययांचा साक्षी अशा मला-नारायणाला जाणून—**शान्ति-सर्वसंसारोपरतिं ऋच्छति-प्राप्नोति**—शांतीला म्ह० सर्व संसाराच्या उपरतीला-संसारनिवृत्तीला तो अधिकारी प्राप्त होतो. [ यज्ञ व तप यांचा कर्ता व देवता या रूपानें भोक्ता, सर्वलोकांचा सर्वेश्वर, सर्वभूतांवर निरपेक्ष उपकार करणारा, अशा मला म्ह० सर्वभूतांच्या हृदयात राहून सर्वबुद्धिवृत्तींना पाहणाऱ्या नारायणाला ' तोच मी ' अशा साक्षात्काररूपानें जाणून पुरुष सर्वसंसाराच्या शांतीला म्ह० मोक्षाला प्राप्त होतो. याप्रमाणें या अध्यायांत अमुख्य संन्यासापेक्षां कर्मयोग श्रेष्ठ असला तरी मुख्य संन्यास सर्वांहून श्रेष्ठ असल्यामुळे[१] चित्तशुद्धीनें युक्त असलेल्या, कामक्रोधांचा वेग मरेपर्यंत सहन करण्यास समर्थ असलेल्या, शमदमादिसंपन्न, योगाधिकारी, त्वंपदाचा अर्थ जाणणाऱ्या व परमात्माच माझा प्रत्यगात्मा आहे, असें समजणाऱ्या मुख्यसंन्याश्यालाच मुक्ति प्राप्त होते, हे सिद्ध झालें. आचार्यांच्या भाष्याच्या शेवटीं या अध्यायाला प्रकृतिगर्भ असें नांव दिलें आहे. ] २९

इति भगवान् श्रीकृष्णानीं गायलेल्या-सांगितलेल्या उपनिषदांतील-रहस्यविद्येंतील ब्रह्मविद्येपैकीं योग-उपाय-शास्त्रांतील संन्यासयोगनांवाचा पांचवा अध्याय विष्णुशर्मकृत सान्वयार्थ-सटीप-भाष्य-भाष्यार्थासह समाप्त झाला.

---

१ शेवटीं रहस्यकार म्हणतात—"हे वर्णन जीवन्मुक्तावस्थेचें आहे. पण ते संन्यासमार्गांतील पुरुषाचें आहे, असें टीकाकारांचें जे म्हणणें आहे, ते मात्र आमच्या मतें बरोबर नाहीं." हें वर्णन जीवन्मुक्ताचें आहे याबद्दल वाद नाहीं, पण तें ज्ञाननिष्ठ सांख्याचें नव्हे असें म्हणण्यास रहस्यकारांपाशीं तरी काय आधार आहे? उलट 'सर्व कर्माणि मनसा' श्लो० १३, या श्लोकापासून प्रस्तुत अध्यायाच्या समाप्तीपर्यंत जें वर्णन आहे, तें ज्ञाननिष्ठालाच लागू होण्यासारखें आहे. कर्मयोग्याला तें सर्वथा लागू होणें शक्य नाहीं, त्यांतील कांहीं धर्म अंशतः कर्मयोग्याच्या ठिकाणींहि आढळतील. पण येथें सांगितलेले सर्व धर्म त्याच्याठिकाणीं संभवत नाहींत. टीकाकारांचें म्हणणें रहस्यकारांच्या मतानें कदाचित् बरोबर नसेल, पण या अध्यायाच्या शेवटीं जो समाप्तिसूचक संकल्प आहे, त्यांत या अध्यायाला

संन्यासयोग असें म्हटलें आहे, तेव्हां आतां रहस्यकारांच्या मताला विचारतो कोण? ते पुन: म्हणतात—"संन्यास व कर्मयोग या दोन्ही मार्गांत शांति एकच असते." हें म्हणणें अनुभवसिद्ध नाहीं. ज्ञानी संन्यासी व कर्मयोगी यांच्या शांतींत मेरु व सर्षण (मोहरीचा एक दाणा) यांच्या इतकें अंतर आहे. बिचारा कर्मयोगी कर्में करतां करतां किती विक्षिप्तचित्त होतो याचा अनुभव स्वतः कर्मयोगी होऊनच घेतला पाहिजे, व ज्यांनीं तो घेतला असेल, ते प्रवृत्तिमार्ग व निवृत्तिमार्ग एकच असें कधीहि म्हणणार नाहीत. या अध्यायांतील वर्णन कर्मयोगी जीवन्मुक्ताचेंच आहे याविषयीं रहस्यकार असें म्हणतात—"या अध्यायाच्या आरंभीं कर्मयोग श्रेष्ठ ठरवून नतर पुन: २५ व्या श्लोकात ज्ञानी पुरुष सर्व भूतांचें हित करण्यांत प्रत्यक्ष गढलेले असतात असें जें म्हटलें आहे, त्यावरून हे सर्व वर्णन कर्मयोगी जीवन्मुक्ताचेंच आहे, संन्याश्याचें नव्हे असें उघड दिसून येते."पण या अध्यायाच्या दुसऱ्या श्लोकांत 'कर्मयोगो विशिष्यते' हें भगवानांनी कोणत्या आशयानें म्हटलें आहे, तें आम्ही तेथें स्पष्टपणें सांगितलेच आहे. त्यामुळे हा सर्व अध्यायच कर्मयोगी जीवन्मुक्ताचें वर्णन करण्यासाठीं आहे असें ठरत नाहीं, कारण त्याच्या पुढल्याच श्लोकापासून संन्यासाचें महत्त्व सांगण्यास आरंभ करून ६ व्या व ११ व्या श्लोकांत कर्मयोग मुख्य संन्यासाचें साधन आहे असें स्पष्ट सांगितलें आहे. शिवाय या अध्यायाला 'सन्यासयोग' असें नांव आहे हेहि विसरतां कामा नये. २५ व्या श्लोकातील 'सर्वभूतहिते रताः' हे पद कर्मयोग्यापेक्षां ज्ञाननिष्ठालाच अधिक लागू होतें, हे विचारी वाचकांच्या सहज लक्षांत येईल. कर्मयोगी म्ह० शास्त्रविहित यज्ञ-यागादि नित्य कर्में करणारा गृहस्थ. त्याला जीववधादि गोष्टी अपरिहार्य आहेत. 'पंचसूनादोष' त्याला प्रत्यहीं लागतात, असें शास्त्र स्वतःच सांगतें, गृहस्थाश्रमी पुरुषाला काम, क्रोध, हर्ष, विषाद, सर्वथा टाकतां येणें शक्य नाहीं. यास्तव 'सर्वभूतहिते रतत्वहि' ज्ञाननिष्ठाच्याच ठिकाणीं पूर्णपणे संभवते. पुन: ते म्हणतात—"कर्ममार्गांतहि सर्वभूतांतर्गत परमेश्वर ओळखणें हेंच परमसाध्य आहे, (गी.र. पृ.६९२.)"पण'परमेश्वरज्ञान' हें कर्ममार्गाचें मुख्य ध्येय नव्हे, पुण्याचरणानें पुण्यलोकप्राप्ति हेंच त्याचें परम ध्येय आहे, अर्थात् रहस्यकारांचें म्हणणें शास्त्रसिद्ध नाहीं.

# अध्याय सहावा.

## ध्यानयोग ( अभ्यासयोग. )

अतीतानन्तराध्यायान्ते ध्यानयोगस्य सम्यग्दर्शनं प्रत्यन्तरङ्गस्य सूत्रभूताः श्लोकाः स्पर्शान्कृत्वा बहिरित्यादय उपदिष्टास्तेषां वृत्तिस्थानीयोऽयं षष्ठोऽध्याय आरभ्यते । तत्र ध्यानयोगस्य बहिरङ्गं कर्मेति यावद्ध्यानयोगारोहणासमर्थस्तावद्गृहस्थेनाधिकृतेन कर्तव्यं कर्मेत्यतस्तत्स्तौति । ननु किमर्थं ध्यानयोगारोहणसीमाकरणं यावताऽनुष्ठेयमेव विहितं कर्म यावज्जीवम् । नाऽऽरुरुक्षोर्मुनेर्योगं कर्म कारणमुच्यत इति विशेषणादारूढस्य च शमेनैव संबन्धकरणात् । आरुरुक्षोरारूढस्य च शमः कर्म चोभयं कर्तव्यत्वेनाभिप्रेतं चेत्स्यात्तदाऽऽरुरुक्षोरारूढस्य चेति शमकर्मविषयभेदेन विशेषणं विभागकरणं चानर्थकं स्यात् ॥

**भाष्यार्थ**—(आचार्य पूर्वोत्तरसंगति दाखवितात-)—**अतीतानन्तराध्यायान्ते सम्यग्दर्शनं प्रति अन्तरंगस्य ध्यानयोगस्य 'स्पृर्शान् कृत्वा बहिः०' इत्यादयः सूत्रभूताः श्लोकाः उपदिष्टाः**—नुकत्याच संपलेल्या पांचव्या अध्यायाच्या शेवटीं सम्यग्दर्शनाचे म्ह० आत्मसाक्षात्काराचें अन्तरंग साधन असा जो ध्यानयोग त्याचे 'स्पर्शान् कृत्वा०' इत्यादि सूत्रभूत श्लोक उपदेशिले—**तेषां वृत्तिस्थानीयः अयं षष्ठः अध्यायः आरभ्यते**—त्या श्लोकांच्या विवरणाच्या स्थानीं असलेला हा सहावा अध्याय आरंभिला जातो. ( त्यामुळे पांचवा व सहावा या अध्यायांचा हेतुहेतुमद्भाव-संबंध आहे. पांचव्या अध्यायाच्या शेवटीं जें सांगितले, त्याचाच विस्तार सहाव्या अध्यायांत केलेला असल्यामुळे पांचवा अध्याय हेतु-कारण व सहावा हेतुमत्-कार्य आहे. याप्रमाणे अध्यायाचा संबंध सांगून 'अनाश्रितः कर्मफलं०' इत्यादि दोन श्लोकांचें तात्पर्य आचार्य सांगतात-)-**तत्र**-संन्यासाचा हेतु असा जो कर्मयोग त्याची मर्यादा दाखविण्यासाठीं व सांग योगाचा विचार करण्यासाठीं अध्यायाची प्रवृत्ति झाली असतां—**ध्यानयोगस्य बहिरंगं कर्म इति यावत् ध्यानयोगारोहणासमर्थः तावत् अधिकृतेन गृहस्थेन कर्म कर्तव्यं इत्यतः तत्स्तौति**—ध्यानयोगाचें बहिरंग कर्म आहे म्हणून जोंवर ध्यानयोगावर आरोहण करण्यास असमर्थ आहे तोंवर अधिकृत-अधिकार प्राप्त झालेल्या-गृहस्थानें कर्म करावे, असें आहे, म्हणून भगवान् त्याची स्तुति करितात. ( कर्म कर्तव्य आहे म्हणून तें स्तुतीला योग्य आहे. समुच्चयवादी या सीमाकरणावर आक्षेप घेतो-)—**ननु ध्यानयोगारोहणसीमाकरणं किमर्थं यावता विहितं कर्म यावज्जीवं अनुष्ठेयं एव**—अहोपण, ध्यानयोगारोहणाची कर्मानुष्ठानाला जी सीमा घातली आहे ती कशासाठीं ? कारण विहित कर्म यावज्जीव अनुष्ठेयच असतें, तें यावज्जीव अवश्य करावें लागतें. [ 'यावज्जीवं अग्निहोत्रं जुहुयात्' या श्रुतिवचनानुसार ध्यानारोहणाचें सामर्थ्य जरी आलें, तरी कर्मानुष्ठान सोडतां येत

नाहीं, असा 'यावता०' इत्यादि भाष्याचा अर्थ आहे. पण भार्येचा वियोग होणें इत्यादि प्रतिबंधामुळें 'यावज्जीवादि' श्रुतीनें सांगितलेलें कर्मही जसें सोडावें लागतें, त्याचें अनुष्ठान होत नाहीं, त्याप्रमाणें वैराग्य या प्रतिबंधामुळेंहि त्याच्या अनुष्ठानाचा असंभव होतो, व भगवानांचें विशेषणवचनहि आहे. त्यामुळें यावज्जीव कर्मानुष्ठानाची प्राप्तीच नाहीं, अशा आशयानें वरील आक्षेपाचें आचार्य निरसन करितात-)—**न 'आरुरुक्षोः मुनेः योगं कर्म कारणं उच्यते' इति विशेषणात्**—हें म्हणणें योग्य नाहीं. कारण योगावर आरूढ होण्याची इच्छा करणाऱ्या मुनीला कर्म हें साधन सांगितलें आहे, असे भगवानांनीं विशेषण दिलें आहे.—**च आरूढस्य शमेन एव संबन्धकरणात्**— आणि जो योगारूढ झाला त्याचा शमाशींच संबंध केलेला आहे. [त्यामुळे यावज्जीव कर्मानुष्ठानाची प्राप्तिच नाहीं. याच अर्थाचे व्यतिरेकद्वारा विवरण करितात-]—**आरुरुक्षोः च आरूढस्य शमः च कर्म उभयं कर्तव्यत्वेन अभिप्रेतं चेत् स्यात्** —आरोहण करण्याची इच्छा करणारा व आरूढ झालेला या दोघांनाहि शम व कर्म ही दोन्ही कर्तव्यत्वानें जर इष्ट असतीं-दोघांनीं तीं दोन्ही साधनें करावीं असा जर भगवानांचा आशय असता—**तदा आरुरुक्षोः च आरूढस्य इति शम-कर्मविषयभेदेन विशेषणं च विभागकरणं अनर्थकं स्यात्**—तर आरुरुक्षु म्ह० योगावर आरोहण करण्याची इच्छा करणारा, (येथे आरोहणेच्छा हे विशेषण) व आरूढ म्ह० ज्यानें आरोहण केलें आहे (येथें आरोहण हेच विशेषण) याप्रमाणें शम व कर्म यांच्या विषयांचें भेदानें विशेषण करणें व त्यांचे अधिकारी निरनिराळे आहेत, असें सांगणें हीं दोन्ही 'भगवानांनी कर्माची मर्यादा दाखविली आहे,' असे न मानल्यास व्यर्थ ठरतात. (पण आरुरुक्षु व आरूढ अशीं विशेषणें योजून आणि कर्म व शम असा विभाग करून ज्याअर्थीं त्यांचे विधान केलें आहे, त्याअर्थी आरुरुक्षूनें कर्म करावें व आरूढानें शम-कर्मत्याग करावा, असाच भगवानांचा आशय व्यक्त दिसतो. नाहीं तर विशेषणे व विभाग हीं दोन्ही अयोग्य ठरतात.)

**तत्राऽऽश्रमिणां कश्चिद्योगमारुरुक्षुर्भवत्यारूढश्च कश्चिदन्ये नाऽऽरुरुक्षवो न चाऽऽरूढास्तानपेक्ष्याऽऽरुरुक्षोरारूढस्य चेति विशेषणं विभागकरणं चोपपद्यत एवेति चेत्। न, तस्यैवेति वचनात्। पुनर्योगग्रहणाच्च योगारूढस्येति य आसीत्पूर्वं योगमारुरुक्षुस्तस्यैवाऽऽरूढस्य शम एव कर्तव्यं कारणं योगफलं प्रत्युच्यत इति। अतो न यावज्जीवं कर्तव्यत्वप्राप्तिः कस्यचिदपि कर्मणः, योगविभ्रष्टवचनाच्च। गृहस्थस्य चेत्कर्मिणो योगो विहितः षष्ठेऽध्याये स योगविभ्रष्टोऽपि कर्मगतिं कर्मफलं प्राप्नोतीति तस्य नाशाशङ्काऽनुपपन्ना स्यात्। अवश्यं हि कृतं कर्म काम्यं नित्यं वा मोक्षस्य नित्यत्वादनारभ्यत्वे स्वं फलमारभत एव॥**

१ रहस्यकार 'कर्म मरेपर्यंत सुटत नाहीं व सोडूंहि नये' असें आपल्या ग्रंथांत वारंवार ह्मणत असतात. त्यांना येथें सोपपत्तिक उत्तर दिलें आहे. वाचकांनी तें शेवटपर्यंत लक्षपूर्वक वाचावें, अशी आमची सूचना आहे.

**भाष्यार्थ**—( विशेषण व विभागकरण यांची दुसऱ्या तऱ्हेनेंहि उपपत्ति लागते, अशी शंका-)**तत्र आश्रमिणां कश्चित् योगं आरुरुक्षुः भवति च कश्चित् आरूढः भवति**—व्यवहारांत ब्रह्मचर्यादि आश्रमांनी युक्त असलेल्या लोकांतील कोणी योगावर आरोहण करण्याची इच्छा करणारा असतो व कोणी योगारूढ झालेला असतो—**अन्ये न आरुरुक्षवः न च आरूढाः**—पण बाकीचे सर्व आरुरुक्षुहि नसतात व आरूढहि नसतात. [ म्हणजे याप्रमाणे अधिकारी लोकामध्ये तीन प्रकार संभवतात. त्यांतील तिसऱ्या प्रकारचे आरुरुक्षु किंवा आरूढहि नसलेले जे लोक ]—**तान् अपेक्ष्य आरुरुक्षोः च आरूढस्य इति विशेषणं च विभागकरणं उपपद्यते एव इति चेत्**—त्यांच्या अपेक्षेने ' आरुरुक्षु व आरूढ ' हें विशेषण व विभागकरण उपपन्न होतेंच, असे म्हणाल तर—**न**—ते बरोबर नाही.—**तस्य एव इति वचनात्**—(आरूढस्य) 'तस्य एव' असे वचन आहे [ त्यामुळे तसे म्हणता येत नाही. कारण अनारुरुक्षला उद्देशून 'आरुरुक्षु' हे विशेषण व 'कर्म' हे आरोहणकारण आणि अनारूढाला उद्देशून 'आरूढ' हे विशेषण व 'शम-संन्यास' हे योगफलप्राप्तीचे कारण आहे अशी जर विशेषण व विभागकरण यांची उपपत्ति लावली तर आरुरुक्षु व आरूढ हे दोन भिन्न पुरुष आहेत असे होते, त्यामुळे ' तस्य ' हें प्रकृताचे परामर्श करणारे विशेषण उपपन्न होत नाही. म्हणून त्यांचे असे उपपादन करणे युक्त नव्हे. ]—**च योगारूढस्य इति पुनः योगग्रहणात्**—आणि 'योगारूढस्य' असे म्हणून पुनः योगशब्दाचे ग्रहण केलेले असल्यामुळेहि तसे म्हणता येत नाही.—**यः पूर्वं योगं आरुरुक्षुः आसीत् तस्य एव आरूढस्य योगफलं प्रति शमः एव कर्तव्यं कारणं उच्यते इति**—जो पूर्वी योगावर आरूढ होण्याची इच्छा करणारा होता तोच योगारूढ झाला असतां, त्याला योगफलाची प्राप्ति होण्यासाठी शम म्ह० कर्मसंन्यासच साधन या रूपाने करावा असे सांगितले आहे. [ अगोदर आरुरुक्षु असून पुढे आरूढ झालेल्या साधकाला त्या योगाचे फल प्राप्त व्हावे म्हणून शमसंज्ञक कर्मसंन्यास हेंच कर्तव्य सांगितलेले असल्यामुळे आरुरुक्षु व आरूढ हे भिन्न नाहीत. अर्थात् योगारूढ होईपर्यंत कर्म, नंतर त्यालाच शम विहित आहे, असे ठरते. 'अहोपण, यावज्जीवादि श्रुतीशी विरोध येत असल्यामुळे कर्माला अशी योगारोहणाची मर्यादा घालतां येत नाही.' असे समुच्चयवादी म्हणेल तर सांगतात-]—**अतः कस्यचित् अपि कर्मणः यावज्जीवं न कर्तव्यत्वप्राप्तिः**—म्हणून कोणत्याहि कर्माची यावज्जीव कर्तव्यत्वप्राप्ति नाही. [ वर सांगितल्याप्रमाणें कर्म व कर्मत्याग यांचा विभाग उपपन्न होत असल्यामुळें यावज्जीव श्रुतीचा विषय अगदीं भिन्न आहे. म्हणून योगारूढ झालेल्या मुमुक्षू-जिज्ञासूच्या नित्य-नैमित्तिक कर्मांच्याहि परित्यागाची सिद्धि होते. कर्म यावज्जीव केलें पाहिजे, असें आणखीहि एका कारणाने ठरत नाही, असे सांगतात-]—**च योगविभ्रष्टवचनात्**—योगभ्रष्ट झालेल्या संन्याश्याचा विनाश होतो की काय ? अशी पुढे अर्जुनानें शंका विचारली असल्यामुळेंहि प्रत्येकाने कर्म यावज्जीव केलेंच पाहिजे असें सिद्ध होत

नाहीं. [ अहोपण, योगभ्रष्टशब्दानें येथे गृहस्थाचाच उल्लेख केला आहे, कारण येथें त्याच्यासाठीच योगाचें विधान केले आहे. यास्तव योगारूढ झाल्यावरहि कर्म अवश्य करावेंच या शंकेचा अनुवाद करून समाधान-]—**षष्ठे अध्याये कर्मिणः गृहस्थस्य योगः विहितः चेत्**—या सहाव्या अध्यायात कर्मठ-कर्मयोगी गृहस्थालाच जर योग विहित असता-त्याला उद्देशूनच जर योगाचे विधान केलें असतें तर—**सः योगविभ्रष्टः अपि कर्मगतिं-कर्मफलं प्राप्नोति इति तस्य नाशाशंका अनुपपन्ना स्यात्** —तो गृहस्थ योगापासून जरी च्युत झाला, तरी आपली आश्रमकर्मे करीतच असल्यामुळे कर्मगतीला म्ह० कर्मफलाला प्राप्त होतोच. त्यामुळे त्याचा नाश होतो की काय, ही शंका अनुपपन्न झाली असती. [ अहोपण, त्या मुमुक्षु गृहस्थाने केलेल्या कर्मांचे मोक्षावाचून दुसरे कोणतेच फल संभवत नाही. त्यामुळे तो योगभ्रष्ट झाल्यास छिन्नाभ्रप्रमाणे नाश पावतो की काय, अशी शंका येणे साहजिक आहे.उत्तर-]—**मोक्षस्य नित्यत्वात् अनारभ्यत्वे काम्यं नित्यं वा कृतं कर्म स्वं फलं अवश्यं आरभते एव**— मोक्ष नित्य असल्यामुळे त्याचा फल या रूपाने आरंभच होऊं शकत नाही. त्यामुळे केलेलें काम्य किंवा नित्य कर्म आपल्या फलाचा आरंभ अवश्य करणारच. [ वेद अपौरुषेय असल्यामुळें निर्दोष आहे. त्यावरून कर्माची स्वाभाविक फलदायिनी शक्ति ज्ञात झाली आहे. ब्रह्मभाव नित्य आहे. तो स्वतःसिद्ध आहे. त्यामुळे तो कर्मांचे फल केव्हांच होऊं शकत नाही. त्यामुळे कर्म मोक्षातिरिक्त-मोक्षाहून भिन्न-फलाचाच आरंभ करते, असे मानणे भाग आहे. अर्थात् कर्माधिकारी गृहस्थ योगभ्रष्ट जरी झाला तरी त्याला कर्मफल मिळण्यास कांही हरकत नाहीं. अर्थात् गृहस्थाश्रमी योगभ्रष्टासाठी अर्जुनाचा प्रश्न आहे, अशी कल्पनाच करितां येत नाही. ]

**नित्यस्य च कर्मणो वेदप्रमाणावबुद्धत्वात्फलेन भवितव्यमित्यवोचामान्यथा वेदस्यानर्थार्थत्वप्रसङ्गादिति । न च कर्मणि सत्युभयविभ्रष्टवचनमर्थवत्कर्मणो विभ्रंशकारणानुपपत्तेः । कर्म कृतमीश्वरे संन्यस्येत्यतः कर्तारि कर्म फलं नाऽऽरभत इति चेत् । न ईश्वरे संन्यासस्याधिकतरफलहेतुत्वोपपत्तेः । मोक्षायैवेति चेत्स्वकर्मणां कृतानामीश्वरे न्यासो मोक्षायैव न फलान्तराय योगसहितो योगाच्च विभ्रष्ट इत्यतस्तं प्रति नाशाशङ्का युक्तैवेति चेत् । न 'एकाकी यतचित्तात्मा निराशीरपरिग्रहः ' 'ब्रह्मचारिव्रते स्थितः' इति कर्मसंन्यासविधानात् । न चात्र ध्यानकाले स्त्रीसहायत्वाशङ्का येनैकाकित्वं विधीयते । न च गृहस्थस्य निराशीरपरिग्रह इत्यादिवचनमनुकूलम् । उभयविभ्रष्टप्रश्नानुपपत्तेश्च ॥**

**भाष्यार्थ**—( अहोपण मुमुक्षु काम्य व निषिद्ध कर्मे मुळींच करीत नाहीं. नित्य व नैमित्तिक कर्मे मात्र करतो. पण त्यांचें कांही फल सांगितलेलें नाही. तेव्हां त्याच्या त्या कर्माला नियमानें फलारंभकत्व कसें असेल ? उत्तर-)—**च नित्यस्य कर्मणः वेदप्रमाणावबुद्धत्वात् फलेन भवितव्यं इति अवोचाम**—आणि नित्य-नैमित्तिक कर्म वेदरूपी निर्दोष प्रमाणावरून ज्ञात झालेलें असल्यामुळें त्याचें फल अवश्य प्राप्त झालेंच पाहिजे, असे आम्हीं वर सांगितलेंच आहे.—**अन्यथा वेदस्य अनर्थार्थत्वप्रसंगात्**

**इति**—तसें जर न मानलें तर वेदाला अनर्थार्थत्व आहे, वेद अनर्थासाठीच आहे असें म्हणण्याचा प्रसंग येतो. म्हणून केलेल्या कर्माचें फल मिळणें निश्चित असल्यामुळें गृहस्थ योगभ्रष्ट जरी झाला, तरी त्याला कर्माची गति अवश्य प्राप्त होणारच, त्यामुळें गृहस्थाच्या नाशाची शंका उपपन्न होत नाहीं. ( याविषयींच आणखी एक कारण-)—**च कर्मणि सति उभयविभ्रष्टवचनं न अर्थवत्**—आणि गृहस्थाचें कर्म असतांना उभयविभ्रष्टवचन म्ह० कर्म व योग-ज्ञान या दोहोंपासून भ्रष्ट होऊन नाश तर पावत नाही, हे म्हणणे योग्य-अर्थयुक्त आहे, असें होत नाही.—**कर्मणः विभ्रंशकारणानुपपत्तेः**—कारण त्या कर्मनिष्ठ गृहस्थाचा कर्मापासून विभ्रंश होण्याचें काही कारणच संभवत नाहीं. [ पुनः शंका व समाधान- ]—**कृतं कर्म ईश्वरे संन्यस्य इति अतः कर्तरि कर्म फलं न आरभते इति चेत्**—मुमुक्षूनें केलेलें कर्म ईश्वरार्पण झालेलें असतें. तो कृत कर्म ईश्वरार्पण करतो. त्यामुळें ते कर्म कर्त्याच्या ठिकाणीं फलाचा आरंभच करीत नाहीं. त्यामुळे गृहस्थ मुमुक्षूनेंहि उभयविभ्रष्ट होणें शक्य आहे, म्हणून म्हणाल तर—**न**—ते बरोबर नाही.—**ईश्वरे संन्यासस्य अधिकतरफलहेतुत्वोपपत्तेः**—कारण ईश्वराच्या ठिकाणीं अर्पण केलेल्या कर्माचें अधिकच फल मिळणें शक्य आहे. कर्मांचे जे सामान्य फल मिळतें, त्याहून ईश्वरार्पण केलेल्या कर्माचे अधिक फल मिळणेंच योग्य आहे. ( कारण आपण व्यवहारांत एखाद्या राजाची धनधान्यादिकांच्या योगाने आराधना केल्यास अधिक फल मिळते, हें आपण पाहतों. त्याच न्यायानें ईश्वरार्पण केलेल्या कर्मांचें नेहमींपेक्षां अधिक फल मिळणें अवश्य आहे.-)—**मोक्षाय एव इति चेत्**—तें अधिक फलाला जरी कारण होत असले, तरी मोक्ष याच अधिक फलाचें निमित्त होतें, म्हणून म्हणाल म्ह०—**कृतानां स्वकर्मणां ईश्वरे न्यासः मोक्षाय एव न फलान्तराय**—अनुष्ठिलेल्या स्वकर्मांचा ईश्वराचे ठिकाणीं केलेला संन्यास मोक्षालाच कारण होतो, दुसऱ्या कोणत्याहि फलाला कारण होत नाहीं.—**योगसहितः**—कारण तो संन्यास योगसहित असतो. त्यामुळे 'योग' या सहकारी साधनाच्या सामर्थ्यानें ते ईश्वरार्पित कर्म दुसऱ्या फलाचे साधन होत नाही. ( मग ध्यानासह असलेला संन्यास जर मोक्षोपयोगी होतो, तर योगभ्रष्टाच्या नाशाची शंका कशी येणार ? असें वाद्याला विचारले असतां तो म्हणतो-)—**च योगात् विभ्रष्टः**—आणि तोच संन्यास-योगापासून विभ्रष्ट झालेला असणें यामुळे त्याच्या नाशाची शंका येते. कारण कर्मे ईश्वरार्पण करणे, या संन्यासाला ध्यानयोगाचे साह्य नसल्यास मोक्षफलाची सामग्रीच सिद्ध होत नाहीं. तेव्हां सामग्रीच्या अभावीं फल कोठून मिळणार ?—**इति अतः तं प्रति नाशाशंका युक्ता एव इति चेत्**—त्यामुळें त्याच्या नाशाची शंका येणें साहजिकच आहे म्हणून म्हणाल तर—**न**—ते बरोबर नाही. [ कारण ध्यानासहित ईश्वरार्पण केलेलें कर्म मोक्षाचे साधन होतें. याविषयीं कांहीं प्रमाण नाहीं. त्यामुळें योगभ्रष्टशब्दानें गृहस्थ घेतां येत नाहीं. याविषयींच आणखी एक हेतु ]—**'एकाकी यतचित्तात्मा निराशीरपरिग्रहः' 'ब्रह्मचारिव्रते स्थितः' इति**

**कर्मसंन्यासविधानात्**—‘ एकाकी यतचित्तात्मा०’ ६-१० ‘ ब्रह्मचारिव्रते०’ ६-१४ या वचनांनीं कर्मसंन्यासाचे विधान केले आहे. [ कारण हीं विशेषणें गृहस्थाला उद्देशून आहेत, असें म्हणतांच येत नाही. त्यामुळें ध्यानयोगाचा विधि त्याच्यासाठीं नाहीं. म्हणून योगभ्रष्टशब्दाने गृहस्थ घेतां येत नाहीं. ‘अहोपण, एकाकी हें वचन गृहस्थालाच उद्देशून आहे. ध्यानकाली गृहस्थाला स्त्रीचे साह्य लागत नाहीं, या आशयानें तें विशेषण योजलें आहे ? म्हणून म्हणाल तर सांगतों-]—**अत्र ध्यानकाले स्त्रीसहायत्वाशंका न च (अस्ति) येन एकाकित्वं विधीयते**—येथे ध्यानसमयी साह्य करणारी स्त्री लागते ही मुळीं शंकाच येत नाहीं, की ज्यासाठीं ‘ एकाकित्वाचे विधान केलें आहे, ’ असें म्हणतां येईल. [ अग्निहोत्रादिकर्माप्रमाणें ध्यान पत्नीसाध्य नाहीं. त्यामुळे ध्यानकाली पत्नीची प्राप्तिच नाहीं. तेव्हां शास्त्र अप्राप्तप्रतिषेध कसा करील ? शिवाय पुढील विशेषणें पाहिलीं तरी ‘ एकाकी ’ हें विशेषण गृहस्थाचें आहे असें म्हणतां येत नाहीं,असे सांगतात-]—‘**च निराशीः अपरिग्रहः’ इत्यादि वचनं गृहस्थस्य न अनुकूलं**—आणि सर्वआशारहित, परिग्रहशून्य इत्यादि वचन गृहस्थाला मुळींच अनुकूल नाहीं.—**उभयविभ्रष्टवचनात् च**—शिवाय एकाकित्वादि विशेषणे गृहस्थाला उद्देशून योजलीं आहेत व त्याच्यासाठीच ध्यानाचे विधान आहे,म्हणून म्हणावे तर उभयविभ्रष्टवचन उपपन्न होत नाहीं. [ पण ‘कच्चिन्नोभयविभ्रष्ट.-’ तो दोन्ही मार्गांपासून भ्रष्ट होऊन त्याचा नाश होत नाहीं ना ? असे स्पष्ट वचन आहे. गृहस्थ ज्ञान व कर्म या दोन्हींपासून भ्रंश पावणे शक्यच नाहीं. कारण तो ज्ञानापासून जरी भ्रंश पावला तरी कर्मापासून त्याचा भ्रंश संभवत नाहीं. कदाचित् त्यावेळी मुमुक्षुदशेत करीत असलेल्या कर्मापासून जरी त्याचा भ्रंश मानला, तरी पूर्वी केलेल्या कर्माचे फल त्याला अवश्य प्राप्त होईल. त्यामुळे उभयभ्रंशवचन गृहस्थाला लागू होत नाहीं. अर्थात् ध्यानविधि त्याच्यासाठीं नाहीं, गृहस्थाला उद्देशून सहाव्या अध्यायांत ध्यानयोग सांगितला आहे, असे म्हणतां येत नाहीं. ]

**अनाश्रित इत्यनेन कर्मिण एव संन्यासित्वं योगित्वं चोक्तं प्रतिषिद्धं च निरग्नेरक्रियस्य च संन्यासित्वं योगित्वं चेति चेत् । न ध्यानयोगं प्रति बहिरङ्गस्य सतः कर्मणः फलाकाङ्क्षासंन्यासस्तुतिपरत्वात् । न केवलं निरग्निरक्रिय एव संन्यासी योगी च किं तर्हि कर्म्यपि कर्मफलासङ्गं संन्यस्य कर्मयोगमनुतिष्ठन्सत्त्वशुद्ध्यर्थं स संन्यासी च योगी च भवतीति स्तूयते । न चैकेन वाक्येन कर्मफलासङ्गसंन्यासस्तुतिश्चतुर्थाश्रमप्रतिषेधश्चोपपद्यते । न च प्रसिद्धं निरग्नेरक्रियस्य परमार्थसंन्यासिनः श्रुतिस्मृतिपुराणेतिहासयोगशास्त्रविहितं संन्यासित्वं योगित्वं च प्रतिषेधति भगवान् ॥**

**भाष्यार्थ**—( अहोपण, भगवानांनीं संन्यासाचा निषेध केलेला असल्यामुळें गृहस्थासाठीं ध्यानयोगाचें विधान आहे. यास्तव गृहस्थच योगभ्रष्ट होय, अशी शंका-)—‘ **अनाश्रितः०’ इति अनेन कर्मिणः एव संन्यासित्वं योगित्वं च उक्तं**—अहोपण ‘ अनाश्रितः०’ या श्लोकाने कर्मयोग्यालाच संन्यासित्व व योगित्व भगवानांनीं

सांगितलें आहे.—**च निरग्नेः अक्रियस्य न संन्यासित्वं योगित्वं च प्रतिषिद्धं इति चेत्**—आणि निराग्नि व अक्रिय यांचें संन्यासित्व व योगित्व यांचा त्यांनीं निषेध केला आहे म्हणून म्हणाल तर—**न**—तें भगवद्वाक्य निषेधपर नाहीं. कारण—**ध्यानयोगं प्रति बहिरंगस्य सतः कर्मणः फलाकांक्षासंन्यासस्तुतिपरत्वात्**—ध्यानयोगाचे बहिरंग साधन असलेल्या कर्माच्या फलाची आकांक्षा टाकणें या संन्यासाची म्ह० फलेच्छेच्या संन्यासाची स्तुति करणारें तें वचन आहे. तें फलाकांक्षासंन्यासस्तुतिपर आहे. ( ' अनाश्रितः०' या वाक्याला फलेच्छात्यागस्तुतिपरत्व कसें आहे, तेंच स्पष्ट करून सांगतात-)—**केवलं निराग्निः अक्रियः एव संन्यासी च योगी न**—केवल अग्नि व दानादि कर्मे याचा त्याग करणाराच तेवढा संन्यासी व योगी आहे असें समजूं नको—**किं तर्हि**—तर मग काय—**कर्मफलासंगं संन्यस्य सत्त्वशुद्ध्यर्थं कर्मयोगं अनुतिष्ठन् कर्मी अपि सः संन्यासी योगी च भवति इति स्तूयते**—कर्मफलासक्तीचा संन्यास करून चित्तशुद्धीसाठीं कर्मयोगाचें अनुष्ठान करणारा कर्मी सुद्धां 'तो संन्यासी व योगी आहे' अशी स्तुति केली जाते. [ एखाद्या सामान्य उपायाला कांहीं एकदेशी सादृश्यानें दुसऱ्या उपायाचें नांव देणें, म्हणजे ती त्याची स्तुति होते. मनुष्याला शौर्य या सिंहाच्या किंवा वाघाच्या गुणामुळे 'सिंह' किंवा 'वाघ' म्हणणें ही त्याची स्तुति आहे. त्याच न्यायानें कर्मी पुरुषाला फलसंन्यासामुळें संन्यासी म्हणणें ही त्याची स्तुति आहे. पण मनुष्याला सिंह म्हटल्याने खऱ्या सिंहाचा जसा निषेध होत नाहीं, खरा सिंह जगांत नाहींच, असें होत नाहीं, त्याप्रमाणे कर्मठाला संन्यासी म्हटल्यानें भगवान् खऱ्या संन्यासाचा निषेधच करीत आहेत, असें म्हणतां येत नाहीं. असो: पण या एकाच वाक्यानें दोन्ही अर्थ सिद्ध होतात, असें वादी म्हणेल म्हणून आचार्य सांगतात-]—**न एकेन वाक्येन कर्मफलासंगसंन्यासस्तुतिः च चतुर्थाश्रमप्रतिषेधः न उपपद्यते**—आणि एका वाक्यानें कर्मफलासक्तीच्या संन्यासाची स्तुति व चतुर्थाश्रमाचा प्रतिषेध संभवत नाहीं. ( कारण तसें मानल्यास वाक्यभेद हा दोष येतो. भगवानांना चतुर्थाश्रमाचा प्रतिषेध इष्ट नाहीं, याविषयीं आणखीं एक कारण-)—**च निरग्नेः अक्रियस्य परमार्थसंन्यासिनः श्रुति-स्मृति-पुराण-इतिहास-योगशास्त्रविहितं प्रसिद्धं संन्यासित्वं योगित्वं च भगवान् न प्रतिषेधति**—शिवाय अग्नि व दानादि क्रिया यांचा त्याग केलेल्या खऱ्या संन्यासी पुरुषाचे श्रुति-स्मृति, पुराण, इतिहास व योगशास्त्र यांत विहित असलेलें प्रसिद्ध संन्यासित्व व योगित्व यांचा भगवान् प्रतिषेध करीत नाहींत. [ श्रुति-स्मृत्यादि सर्व विधायक शास्त्रांनीं ज्याचें विधान केलें आहे व त्यामुळेंच जे अतिशय प्रसिद्ध आहे त्या चतुर्थाश्रमी यतीच्या संन्यासित्वाचा व योगित्वाचा भगवान् निषेध कसा करतील ? व शास्त्रसिद्ध चतुर्थाश्रमाचा निषेध करणाऱ्या भगवद्वचनाला प्रमाण तरी कोण मानील ? ]

**स्ववचनविरोधाच्च । 'सर्वकर्माणि मनसा संन्यस्य... नैव कुर्वन्न कारयन्नास्ते' 'मौनी संतुष्टो येन केनचित् । अनिकेतः स्थिरमतिः' 'विहाय कामान्यः सर्वान्पुमांश्चरति नि-**

स्पृहः' 'सर्वारम्भपरित्यागी' इति च तत्र तत्र भगवता स्ववचनानि दर्शितानि तैर्विरुध्येत चतुर्थाश्रमप्रतिषेधः । तस्मान्मुनेर्योगमारुरुक्षोः प्रतिपन्नगार्हस्थ्यस्याग्निहोत्रादि फलनिरपेक्षमनुष्ठीयमानं ध्यानयोगारोहणसाधनत्वं सत्त्वशुद्धिद्वारेण प्रतिपद्यते इति स संन्यासी च योगी चेति स्तूयते ॥

**भाष्यार्थ**—( भगवान् या वचनानें चतुर्थाश्रमाचा निषेध करीत नाहींत, असें म्हणण्यास आणखीहि एक कारण आहे-)—**स्ववचनविरोधात् च**—आणि स्वतःच्याच वचनाशीं विरोध येत असल्यामुळेंहि संन्यासाश्रमाचा प्रतिषेध भगवानांना विवक्षित नाहीं. कारण—'**सर्वकर्माणि मनसा संन्यस्य नैव कुर्वन् न कारयन् आस्ते**' —सर्व कर्में विवेकबुद्धीनें टाकून स्वतः कांहीं न करीत व कोणाकडून कांहीं न करवीत शरीरनगरांत राहतो ( अ. ५ श्लो.१३ पृ. ५०४ ) '**मौनी संतुष्टो येन केनचित् अनिकेतः स्थिरमतिः**'—मौन धारण केलेला, जें कांहीं मिळेल त्यानें संतुष्ट होणारा, ज्याचें एक नियत स्थान नाहीं, परमार्थवस्तूविषयीं ज्याची मति स्थिर आहे ( अ० १२ श्लो. १९)—'**विहाय कामान्यः सर्वान् पुमांश्चरति निस्पृहः**' (अ. २ श्लो. ७१ पृ. २२७ ) जो पुरुष सर्व कामाचा त्याग करून निःस्पृह होऊन संचार करतो,—'**सर्वारंभपरित्यागी**'—सर्व कर्मांचा त्याग करणारा, (अ.१२ श्लो. १६)—**इति च तत्र तत्र भगवता स्ववचनानि दर्शितानि तैः चतुर्थाश्रमप्रतिषेधः विरुध्येत**—आणि अशा प्रकारचीं ठिकाठिकाणीं भगवानांनी आपलीं वचनें दाखविलीं आहेत,त्यांच्याशीं चतुर्थाश्रमाचा प्रतिषेध विरुद्ध होतो. ( ' अनाश्रितः ' या वचनानें भगवान् चतुर्थाश्रमाचा प्रतिषेध करितात, असें म्हटल्यास त्यांच्याच दुसऱ्या अनेक वचनांशीं विरोध येतो. यास्तव हें वचन स्तुतिपरच आहे, या म्हणण्याचा उपसंहार करितात-)—**तस्मात् प्रतिपन्नगार्हस्थ्यस्य योगं आरुरुक्षोः मुनेः फलनिरपेक्षं अनुष्ठीयमानं अग्निहोत्रादि ध्यानयोगारोहणसाधनत्वं सत्त्वशुद्धिद्वारेण प्रतिपद्यते**—म्हणून ज्यानें गृहस्थाश्रमाचा स्वीकार केला आहे अशा, योगावर आरोहण करण्याची इच्छा करणाऱ्या मुनीचें फलाची अपेक्षा न ठेवतां अनुष्ठिलें जाणारें अग्निहोत्रादि कर्म ध्यानयोगारोहणाच्या साधनत्वास चित्तशुद्धीच्या द्वारा प्राप्त होतें.—**इति सः संन्यासी च योगी च इति स्तूयते**—यास्तव तोच गृहस्थ संन्यासी व योगी असें म्हणून ' अनाश्रितः० ' या श्लोकानें स्तविला जातो. [ योगारूढ होण्याची इच्छा करणाऱ्या गृहस्थाश्रमी पुरुषाचें निष्काम कर्म चित्तशुद्धीच्या द्वारा ध्यानयोगारोहणाचें साधन होतें. म्हणून त्या गृहस्थाची ' तोच संन्यासी व योगी ' असें म्हणून स्तुति केली आहे. भाष्यांतील मुनिशब्दाचा अर्थ कर्मफलसंन्यासी असा आहे. ]

---

१ पण रहस्यकार पूर्वोत्तरसंबंध दाखवितांना म्हणतात-" मोक्ष प्राप्त होण्यास ज्ञानाखेरीज दुसऱ्या कशाचीहि अपेक्षा नसली तरी लोकसंग्रहाचे दृष्टीनें ज्ञानी पुरुषानें ज्ञानोत्तरहि कर्में केली पाहिजेत, पण तीं बंधक होऊं नयेत,म्हणून फलाशा सोडून समबुद्धीनें करावीं, यालाच कर्मयोग म्हणतात आणि कर्मसंन्यासमार्गापेक्षां हा अधिक श्रेयस्कर, असें सिद्ध

**श्रीभगवानुवाच**—श्रीकृष्ण म्हणाले—

**अनाश्रितः कर्मफलं कार्यं कर्म करोति यः ।**
**स संन्यासी च योगी च न निरग्निर्न चाक्रियः ॥१॥**

**अन्वयार्थ—कर्मफलं अनाश्रितः**—कर्माच्या फलाचा आश्रय न केलेला—**यः**—जो गृहस्थ—**कार्यं कर्म**—अवश्य कर्तव्य कर्म ह्म० नियत कर्म-नित्य अग्निहोत्रादि कर्म—**करोति**—करतो—**सः**—तो—**संन्यासी**—संन्यासी आहे—**च**—व—**योगी**—योगी आहे. केवळ—**निरग्निः न**—अग्निरहित नव्हे—**च अक्रियः न**—व क्रियारहित नव्हे. अग्निरहित व क्रियारहित पुरुषच संन्यासी व योगी आहे, असें मानूं नये.

झाले. " ६९३ ज्ञानाखेरीज मोक्षाला दुसऱ्या कशाची अपेक्षा नाही, हे जर खरे तर ज्याला मोक्षच पाहिजे आहे, दुसरे काही नको, तो लोकसंग्रहादिकाकडे दृष्टि ठेवतो कशाला? व ज्याला मोक्ष देणारे ज्ञान प्राप्त झाले, जो कृतार्थ झाला, त्याला 'ज्ञानी पुरुषाने ज्ञानोत्तरहि कर्मे केली पाहिजेत,' असें कोणी कितीहि जरी सांगितले तरी तो ऐकतो कशाला? अर्थात् "ती बंधक होऊ नयेत म्हणून फलाशा सोडून समबुद्धीने करावी" इत्यादि म्हणणे ज्ञानी पुरुषाला केव्हाच लागूं होत नाही. ज्ञान होताच सर्व कर्मांचा क्षय होतो, असे श्रुति-स्मृति-प्रमाणांनी सिद्ध झालें आहे त्यामुळे 'ती बंधक होत नाहीत' वगैरे म्हणणे हें अप्रासंगिक नव्हे का? रहस्यकार म्हणतात—"हाच कर्मयोग आहे. आणि कर्मसंन्यासमार्गापेक्षां तो अधिक श्रेष्ठ आहे." पण याला प्रमाण काय? गीतेत असे कोठेहि सांगितलेलें नाहीं. कर्मयोग कोणता व 'कर्मयोगो विशिष्यते' याचा अर्थ काय? हें आम्ही सविस्तर वर सांगितलेंच आहे. ह्मणून पुनः त्याचे येथे चर्वितचर्वण नको. कर्मयोग म्हणजे श्रौतस्मार्त कर्मांचे अनुष्ठान व अशक्त कर्मसन्यासापेक्षा कर्मयोग सुलभ असल्यामुळे श्रेष्ठ, एवढेंच गीता सांगत आहे. 'ज्ञानोत्तर कर्मसन्यासाहून कर्मयोग श्रेष्ठ' हे गीतेचे किंवा श्रीकृष्णांचें म्हणणे नसून रहस्यकाराचें आहे व त्याला कोणत्याहि शास्त्राचा आधार नाही. वस्तुतः सहावा अध्याय पांचव्या अध्यायाच्या २७, २८ श्लोकाच्या व्याख्यानासारखा आहे. पण रहस्यकार त्याचा संबंध तिसऱ्या अध्यायातील 'इंद्रियनिग्रहानें तू कामाला जिंक,' या उपदेशाशी जोडू पहातात, 'इंद्रियनिग्रह कसा करावा आणि ज्ञानविज्ञान म्हणजे काय याचा खुलासा करण्यासाठी सहावा अध्याय आरंभिला आहे' असे त्यांचें म्हणणें आहे. मग ४ थ्या व ५ व्या अध्यायांतच त्याचा खुलासा का केला नाही, असे कोणी विचारील, ह्मणून 'मध्येच अर्जुनाच्या प्रश्नामुळें विषयान्तर करावें लागले' असें ते सांगतात. सारांश "कर्मयोगास लागणारी जी निःसंग किंवा ब्रह्मनिष्ठ स्थिति ती ज्या साधनांनी प्राप्त होऊं शकते त्यांच्या निरूपणास या अध्यायांत सुरुवात केली आहे." असे त्यांचें म्हणणे आहे. पण सहाव्या अध्यायांत अनेक साधने सांगितलेली नाहींत. एक ध्यानयोगच सांगितलेला आहे, आणि ध्यानयोगाची योग्यता प्राप्त होईपर्यंत कर्मे करावीं व पुढें कर्मसन्यास करावा असेंहि येथें स्पष्ट सांगितलें आहे. भाष्यार्थात त्याचा सविस्तर विचार झालेला असल्यामुळे येथें विस्तार करणें नलगे.

अनाश्रितो नाऽऽश्रितोऽनाश्रितः किं कर्मफलं कर्मणः फलं कर्मफलं यत्तदनाश्रितः कर्मफलतृष्णारहित इत्यर्थः । यो हि कर्मफलतृष्णावान्स कर्मफलमाश्रितो भवत्ययं तु तद्विपरीतोऽतोऽनाश्रितः कर्मफलमेवंभूतः सन्कार्यं कर्तव्यं नित्यं काम्यविपरीतमग्निहोत्रादिकं करोति निर्वर्तयति । यः कश्चिदीदृशः कर्मी स कर्म्यन्तरेभ्यो विशिष्यत इत्येवमर्थमाह स संन्यासी च योगी चेति । संन्यासः परित्यागः स यस्यास्ति स संन्यासी च योगी योगश्चित्तसमाधानं स यस्यास्ति स योगी चेत्येवं गुणसंपन्नोऽयं मन्तव्यो न केवलं निरग्निरक्रिय एव संन्यासी योगी चेति मन्तव्यः । निर्गता अग्नयः कर्माङ्गभूता यस्मात्स निरग्निरक्रियश्चानग्निसाधना अप्यविद्यमानाः क्रियास्तपोदानादिका यस्यासावक्रियः ॥ १ ॥

**भाष्यार्थ—अनाश्रितः-न आश्रितः अनाश्रितः**—आश्रय न केलेला, तो अनाश्रित होय.—**किं**—कशाचा आश्रय न केलेला ?—**कर्मफलं-कर्मणः फलं कर्मफलं यत् तत् अनाश्रितः-कर्मफलतृष्णारहितः-इत्यर्थः**—कर्मफलाचा आश्रय न केलेला, कर्मांचें जे फल ते कर्मफल, त्याचा आश्रय न केलेला-कर्मफलतृष्णारहित झालेला असा याचा भावार्थ. [ कर्मफलाविषयीं अभिलाष नाहीं, एवढ्यावरूनच कर्मफलाला अनाश्रित कसा ? या शंकेचे व्यतिरेकमुखाने उत्तर-]—**यः हि कर्मफलतृष्णावान् सः कर्मफलं आश्रितः भवति**—जो कर्मफलाविषयींच्या तृष्णेने युक्त असतो, तो कर्मफलाचा आश्रित असतो.—**तु अयं तद्विपरीतः अतः कर्मफलं अनाश्रितः**—पण हा त्याच्या उलट आहे म्हणून कर्मफलाला अनाश्रित.—**एवंभूतः सन् कार्यं कर्तव्यं नित्यं काम्यविपरीतं अग्निहोत्रादिकं करोति-निर्वर्तयति**—अशा प्रकारचा होऊन कार्य म्ह० अवश्य कर्तव्य-नित्य-काम्यकर्मांच्या विपरीत असलेलें अग्निहोत्रादिक कर्म करतो-त्याचे अनुष्ठान करतो,—**यः कश्चित् ईदृशः कर्मी सः कर्म्यन्तरेभ्यः विशिष्यते इति एवं अर्थं आह ' स संन्यासी च योगी च ' इति**—जो कोणी अशा प्रकारचा कर्मी तो इतर कर्मठ गृहस्थांहून श्रेष्ठ आहे, असा हा अर्थ ' स संन्यासी च० ' याने भगवान् सागतात. [ येथे स्तुति विवक्षित असल्यामुळें त्यांत अनुपपन्न असे कांहींच नाहीं. ]—**संन्यासः-परित्यागः सः यस्य अस्ति सः संन्यासी**—संन्यास म्ह० परित्याग तो ज्याला आहे तो संन्यासी,—**च योगी च योगः चित्तसमाधानं सः यस्य अस्ति सः योगी च इति एवंगुणसंपन्नः अयं मन्तव्यः**—आणि योगीहि; योग म्ह० चित्ताचें समाधान, तो योग ज्याला आहे तो योगी, अशा प्रकारच्या गुणांनीं संपन्न असा हा मानावा;—**केवलं निरग्निः (च) अक्रियः एव संन्यासी योगी च इति न मन्तव्यः**—केवल निरग्नि व अक्रियच तेवढा संन्यासी व योगी आहे, असें समजूं नये.—**निर्गताः अग्नयः कर्मांगभूताः यस्मात् सः निरग्निः**—ज्याच्यापासून कर्मांगभूत अग्नि-गार्हपत्य-आहवनीय-अन्वाहार्यपचन वगैरे श्रौत-स्मार्त अग्नि-निघून गेले आहेत, ज्यानें त्यांचा आत्म्यामध्यें समारोप केला आहे तो निरग्नि,—**च**

**अक्रियः-अनग्निसाधनाः अपि अविद्यमानाः क्रियाः तपोदानादिकाः यस्य असौ अक्रियः**—आणि अक्रिय म्ह० अग्नींनीं साध्य न होणाऱ्याहि तप, दान इत्यादि क्रिया ज्याच्या विद्यमान नाहींत तो अक्रिय होय. [ ज्यानें श्रौत-स्मार्त अग्नींचा त्याग केला आहे व त्यामुळें अग्निसाध्य क्रिया सोडल्या आहेत, तसेंच तप, दान इत्यादि अ-ग्निसाध्य नसलेल्या क्रियांचाहि त्याग केला आहे म्ह० ज्यानें यज्ञ, दान, तपोरूप कर्म सोडलें आहे तोच तेवढा संन्यासी व योगी असें समजूं नये, तर जो कर्मफलाचा अ-भिलाष न करितां अग्निहोत्रादिक नित्य कर्तव्य कर्म करतो तोहि गौण संन्यासीच व योगीच आहे, असें समजावें. ] १.

**ननु च निरग्नेरक्रियस्यैव श्रुतिस्मृतियोगशास्त्रेषु संन्यासित्वं योगित्वं च प्रसिद्धं कथमिह साग्नेः सक्रियस्य संन्यासित्वं योगित्वं चाप्रसिद्धमुच्यत इति । नैष दोषः। कयाचिद्‌गुणवृत्त्योभयस्य संपिपादयिषितत्वात् । तत्कथं कर्मफलसंकल्पसंन्यासात्संन्यासित्वं योगाङ्गत्वेन च कर्मानुष्ठानात्कर्मफलसंकल्पस्य वा चित्तविक्षेपहेतोः परित्यागाद्योगित्वं चेति गौणमुभयं न पुनर्मुख्यं संन्यासित्वं योगित्वं चाभिप्रेतमित्येतमर्थं दर्शयितुमाह ॥**

**भाष्यार्थ**—( पुढील श्लोकाचें तात्पर्य सांगण्यासाठीं त्या श्लोकानें ज्या शंकेचें नि-वारण करावयाचें आहे ती शंका प्रथम दाखवितात-)—**ननु च निरग्नेः अक्रियस्य एव श्रुति-स्मृति-योगशास्त्रेषु संन्यासित्वं च योगित्वं प्रसिद्धं**—अहोपण, निरग्नि व अक्रिय असलेल्या पुरुषालाच श्रुति-स्मृति-योगशास्त्रांत संन्यासित्व व योगित्व प्रसिद्ध आहे. [ म्ह० श्रुत्यादिकांत ज्यानें यथाशास्त्र अग्नींचा व दानादिकांचा त्याग केला आहे, त्यालाच संन्यासित्व व योगित्व सांगितलें आहे. ] मग असे असतांना—**इह**

---

१ पण रहस्यकार या श्लोकाचा अर्थ अगदीं विपरीत करितात-" कर्मफलाशेचें मनांत बिऱ्हाड न ठेवतां जो कर्तव्य कर्म करतो, तोच संन्यासी व तोच कर्मयोगी म्हणावयाचा. अग्निहोत्रादि कर्में सोडून देणारा किंवा कोणतेच कर्म न करता स्वस्थ बसणारा खरा संन्यासी व योगी नव्हे. " म्हणजे याच्या मते फलाची आशा न करतां कर्म करणें हाच संन्यास व योग होय. पण हें रहस्यकारांचें मत झालें, व तेंहि त्यांच्याच मताच्या विरुद्ध आहे. कारण एकदा 'संन्यास व कर्मयोग हे दोन अगदीं स्वतंत्र मार्ग आहेत व त्यांतील कर्म-योग श्रेष्ठ' असें ह्मणून,'खरा संन्यासी व खरा कर्मयोगी कर्मफलाचा त्याग करणाराच होय,' हें म्हणणें उपपन्न कसें होतें ? अग्निहोत्रादि कर्में यथाशास्त्र सोडणारा संन्यासी नव्हे,' तर तीं करणाराच संन्यासी आहे, असें ह्मणण्यासारखेंच हें आहे. भगवान् किंवा व्यास यांतील कोणीहि असा सर्वशास्त्रविरुद्ध व अनुपपन्न अर्थ केव्हांहि सांगणार नाहींत. कर्मांचा त्याग हाच मुख्य संन्यास असून फलत्याग हा गौणसंन्यास आहे. पुढच्या श्लोकावरूनहि हीच गोष्ट सिद्ध होत असतांना तिकडे दुर्लक्ष करून श्रुति-स्मृति-पुराण-इतिहास-योगशास्त्रादि प्रमाण ग्रंथांवरून सिद्ध होणाऱ्या संन्यास-आश्रमाला धुडकावून लावणें, व कर्मानुष्ठानालाच खरा कर्मसंन्यास ह्मणणें, हें मोठें धाडस आहे व तें भगवानांच्या किंवा व्यासांच्या माथी मारणें हें तर पापच आहे. आचार्यांनी याविषयींहि भाष्यांत सविस्तर विचार केला आहे. (पृ. ५४० पहा).

**साग्नेः सक्रियस्य अप्रसिद्धं संन्यासित्वं च योगित्वं कथं उच्यते इति—** येथें साग्नि व सक्रिय म्ह० अग्निहोत्रादिक अग्निसाध्य क्रिया करणारा व दानादिक अनग्निसाध्य क्रिया करणारा जो गृहस्थ त्याला श्रुत्यादिकांत प्रसिद्ध नसलेलें संन्यासित्व व योगित्व कसें सांगितलें जात आहे ? (समाधान-)—**न एषः दोषः**—हा दोष येत नाहीं.—**कयाचित् गुणवृत्त्या उभयस्य संपिपादयिषितत्वात्**—कारण कांहीं एका गौणवृत्तीनें साग्नि व सक्रिय अशा गृहस्थाचें संन्यासित्व व योगित्व संपादन करण्याची भगवानांची इच्छा आहे. [ गृहस्थाला मुख्यवृत्तीनें संन्यासित्व व योगित्व कधीच शक्य नाहीं. पण भगवानांना गौणवृत्तीनें त्याच्या ठिकाणीं तीं दोन्हीं संपादन करावयाचीं आहेत. त्यामुळे पूर्वोक्त दोष येत नाहीं. ]—**तत् कथं**—तें कसें संपादन करावयाचें आहे ?—**कर्मफलसंकल्पसंन्यासात् संन्यासित्वं च योगाङ्गत्वेन कर्मानुष्ठानात् वा चित्तविक्षेपहेतोः कर्मफलसंकल्पस्य परित्यागात् योगित्वं च इति उभयं गौणं**—कर्मफलाविषयींचा संकल्प टाकल्यामुळें-कर्मफलसंकल्पाचा संन्यास केल्यामुळें गृहस्थाला संन्यासित्व आहे व योगाचें अंग-साधन या रूपानें कर्माचें अनुष्ठान केल्यामुळें किंवा चित्ताच्या विक्षेपाला कारण होणाऱ्या कर्मफलाविषयींच्या संकल्पाचा संन्यास केल्यामुळें त्याला योगित्व आहे, असें हे संन्यासित्व व योगित्व गौण आहे. [ पण मुख्य संन्यासित्वादि संभवत असतांना येथें गौण संन्यासित्वादि का घ्यावयाचें ? अशी शंका घेऊन कर्मी गृहस्थाच्या ठिकाणीं मुख्य संन्यासित्व व योगित्व संभवत नाहीं. म्हणून त्याच्या कर्मफलत्यागाची स्तुति सिद्ध होण्यासाठीं येथील संन्यासित्वादिक गौणच इष्ट आहे, अशा आशयानें म्हणतात-]—**पुनः मुख्यं संन्यासित्वं च योगित्वं न अभिप्रेतं**—पण मुख्य संन्यासित्व व योगित्व येथें इष्ट नाहीं; [ अहोपण, चित्ताच्या व्याकुलतेला कारण होणाऱ्या कामनेचा त्याग केल्यामुळें चित्ताच्या समाधानादिकांची सिद्धि होते व त्यामुळे कर्मी गृहस्थाच्याहि योगित्वाची सिद्धि होते, हें ठीक आहे. पण त्याला संन्यासी म्हणणे मात्र विरुद्ध आहे, असा आक्षेप यावर येईल, म्हणून ]—**इति एतं अर्थं दर्शयितुं आह**—अशा प्रकारचा हाच अर्थ प्रदर्शित करण्यासाठीं भगवान् ' यं संन्यासं० ' इत्यादि म्हणतात—

**यं संन्यासमिति प्राहुर्योगं तं विद्धि पांडव ।**
**न ह्यसंन्यस्तसंकल्पो योगी भवति कश्चन ॥ २ ॥**

**अन्वयार्थ—हे पांडव**—हे अर्जुना, श्रुतिस्मृतिवेत्ते—**यं**—ज्याला—**संन्यासं इति**—खरा संन्यास असें—**प्राहुः**—म्हणतात—**तं**—त्याला—**योगं**—योग—**विद्धि**—जाण.—**हि**—कारण—**असंन्यस्तसंकल्पः**—ज्यानें संकल्प टाकलेला नाहीं असा—**कश्चन**—कोणी—**योगी**—योगी—**न भवति**—होत नाहीं. २

**यं सर्वकर्मतत्फलपरित्यागलक्षणं परमार्थसंन्यासमिति प्राहुः श्रुतिस्मृतिविदो योगं कर्मानुष्ठानलक्षणं तं परमार्थसंन्यासं विद्धि जानीहि हे पाण्डव । कर्मयोगस्य प्रवृत्ति-**

क्षणस्य तद्विपरीतेन निवृत्तिलक्षणेन परमार्थसंन्यासेन कीदृशं सामान्यमङ्गीकृत्य तद्भाव उच्यत इत्यपेक्षायामिदमुच्यते। अस्ति परमार्थसंन्यासेन सादृश्यं कर्तृद्वारकं कर्मयोगस्य। यो हि परमार्थसंन्यासी स त्यक्तसर्वकर्मसाधनतया सर्वकर्मतत्फलविषयं संकल्पं प्रवृत्तिहेतुकामकारणं संन्यस्यति। अयमपि कर्मयोगी कर्म कुर्वाण एव फलविषयं संकल्पं संन्यस्यतीत्येतमर्थं दर्शयन्नाह न हि यस्मादसंन्यस्तसंकल्पोऽसंन्यस्तोऽपरित्यक्तः फलविषयः संकल्पोऽभिसंधिर्येन सोऽसंन्यस्तसंकल्पः कश्चन कश्चिदपि कर्मी योगी समाधानवान्भवति न संभवतीत्यर्थः। फलसंकल्पस्य चित्तविक्षेपहेतुत्वात्। तस्माद्यः कश्चन कर्मी संन्यस्तफलसंकल्पो भवेत्स योगी समाधानवानविक्षिप्तचित्तो भवेच्चित्तविक्षेपहेतोः फलसंकल्पस्य संन्यस्तत्वादित्यभिप्रायः। एवं परमार्थसंन्यासकर्मयोगयोः कर्तृद्वारकं संन्याससामान्यमपेक्ष्य 'यं संन्यासमिति प्राहुर्योगं तं विद्धि पाण्डव' इति कर्मयोगस्य स्तुत्यर्थं संन्यासत्वमुक्तम्॥ २॥

भाष्यार्थ—**श्रुतिस्मृतिविदः यं-सर्वकर्मतत्फलपरित्यागलक्षणं परमार्थसंन्यासं इति प्राहुः**—श्रुति-स्मृतिवेत्ते ज्याला सर्वकर्म व त्याचे फल यांचा परित्याग करणे, या स्वरूपाचा परमार्थ संन्यास असे म्हणतात—**हे पांडव**—हे अर्जुना—**कर्मानुष्ठानलक्षणं तं योगं परमार्थसंन्यासं विद्धि-जानीहि**—त्या कर्मानुष्ठानरूप योगालाच तूं परमार्थसंन्यास जाण. जो योग तोच परमार्थ संन्यास आहे असे तूं समज. [ गृहस्थाला गौण संन्यासित्व व योगित्व जे मागितले आहे तेंच या श्लोकाच्या उत्तरार्धाने प्रकट करण्यासाठी म्हणतात-]—**प्रवृत्तिलक्षणस्य कर्मयोगस्य तद्विपरीतेन निवृत्तिलक्षणेन परमार्थसंन्यासेन कीदृशं सामान्यं अंगीकृत्य तद्भावः उच्यते**—प्रवृत्तिलक्षण कर्मयोगाचे त्याच्या अगदी उलट असलेल्या निवृत्तिलक्षण परमार्थ संन्यासाशीं कोणत्या प्रकारचे सामान्य-सारखेपणा स्वीकारून तद्भाव-तद्रूपता सांगितली जाते? [ कर्मयोग व संन्यास यांत असा कोणता समान धर्म आहे कीं, त्याला उद्देशून कर्मयोगच संन्यास आहे, असे म्हणतां येईल ? ]—**इति अपेक्षायां इदं उच्यते**—अशी आकांक्षा झाली असतां हे त्याचे समाधान सांगितले जाते—**कर्मयोगस्य परमार्थसंन्यासेन कर्तृद्वारकं सादृश्यं अस्ति**—कर्मयोगाचें परमार्थसंन्यासाशीं कर्त्याच्या द्वारा सादृश्य आहे. ( ते कसे ? उत्तर-)—**यः हि परमार्थसंन्यासी सः त्यक्तसर्वकर्मसाधनतया सर्वकर्मतत्फलविषयं प्रवृत्तिहेतुकामकारणं संकल्पं संन्यस्यति**—जो प्रसिद्ध परमार्थ संन्यासी असतो तो, सर्व कर्में व त्यांचीं शिखा-सूत्रादि साधने यांचा त्याग केलेला असल्यानें सर्व कर्माविषयींचा व त्यांच्या फलाविषयींचा संकल्प—की जो संकल्प, सर्व प्रवृत्तीचें निमित्त जो काम त्याचे कारण आहे, असा संकल्प—सोडतो. [ खरा संन्यासी काय करतो ? सर्व कर्में व त्यांची साधने सोडतो. त्यामुळे सर्व प्रकारच्या प्रवृत्तीचें कारण असा जो काम, त्याचें कारण-संकल्प, त्याचा त्याग करतो. संकल्पाचा त्याग केला असतां त्याचे कार्य —काम सुटतो. कामाच्या अभावीं प्रवृत्तित्याग सिद्ध होतो. संन्यासी सर्व कर्में व त्यांचीं

फलें याविषयींच्या संकल्पाचा त्याग करतो. ]—**अयं अपि कर्मयोगी कर्म कुर्वाणः एव फलविषयं संकल्पं संन्यस्यति इति एतं अर्थं दर्शयन् आह**—हाहि कर्मयोगी कर्म करीत असतांनाच त्याच्या फलाविषयींचा संकल्प टाकतो, असा हा अर्थ दाखविणारे भगवान् म्हणतात—**हि-यस्मात् असंन्यस्तसंकल्पः-असंन्यस्तः-अपरित्यक्तः फलविषयः संकल्पः-अभिसंधिः येन सः असंन्यस्तसंकल्पः**—कारण ज्यानें फलाविषयींचा संकल्प-आशय टाकलेला नाहीं, तो असंन्यस्तसंकल्प आहे, असा—**कश्चन-कश्चित् अपि कर्मी योगी-समाधानवान् न भवति -न संभवति इत्यर्थः**—कोणीहि कर्मी-गृहस्थ योगी म्ह० समाधानयुक्त होत नाहीं. ज्यानें कर्माच्या फलाविषयींचा अभिलाष सोडलेला नाही, असा कोणीच योगी होऊं शकत नाहीं, असा याचा भावार्थ. [ फलसंकल्प न टाकल्यास चित्ताचें समाधानहि संभवत नाही. ] कारण—**फलसंकल्पस्य चित्तविक्षेपहेतुत्वात्**—फलाविषयींच्या संकल्पाला चित्तविक्षेपहेतुत्व आहे. [ म्ह० फलसंकल्प चित्ताच्या विक्षेपाला कारण होतो. आतां व्यतिरेकमुखानें सांगितलेल्या अर्थाचा अन्वयमुखानें उपसंहार करितात- ]—**तस्मात् यः कश्चन कर्मी संन्यस्तफलसंकल्पः भवेत्**—म्हणून जो कोणी कर्मी फलाविषयींच्या संकल्पाचा त्याग केलेला असा असतो—**सः योगी-समाधानवान् -अविक्षिप्तचित्तः भवेत्**—तो योगी म्ह० समाधानवान्-अविक्षिप्तचित्त असा होतो. **-चित्तविक्षेपहेतोः फलसंकल्पस्य संन्यस्तत्वात् इति अभिप्रायः**—कारण चित्ताच्या विक्षेपाला कारण होणारा जो फलाचा संकल्प त्याचा त्यानें संन्यास केलेला असतो, असा याचा अभिप्राय आहे. [ ज्या कर्मठ गृहस्थानें फलाविषयींच्या संकल्पाचा त्याग केलेला असतो तो योगी होतो, म्ह० तो चित्तसमाधानानें युक्त होतो. त्याचें चित्त विक्षिप्त-चंचल झालेलें नसतें. कारण फलाविषयींचा संकल्पच चित्ताच्या विक्षेपाला कारण होतो. पण यानें तर त्याचा त्याग केलेला असतो.म्हणून तो कर्मीहि योगी होय. ] —**एवं परमार्थसंन्यासकर्मयोगयोः कर्तृद्वारकं संन्याससामान्यं अपेक्ष्य**—याप्रमाणें परमार्थसंन्यास व कर्मयोग यांचें कर्त्याच्या द्वारा असलेलें संन्यासाचें सामान्य-सादृश्य घेऊन-त्याच्या अपेक्षेनें—**'यं संन्यासं इति प्राहुः योगं तं विद्धि पांडव' इति कर्मयोगस्य स्तुत्यर्थं संन्यासत्वं उक्तम्**—'ज्याला संन्यास असें म्हणतात त्याला हे अर्जुना, तूं योग समज,' या वाक्यानें कर्मयोगाच्या स्तुतीसाठीं कर्मयोगाला संन्यासत्व[1] सांगितलें आहे. २

---

१ या श्लोकाच्या अर्थांत "ज्याला सन्यास असें म्हणतात, तोच कर्मयोग आहे असें समज. कारण संकल्पाचा म्हणजे काम्यबुद्धिरूप फलाशेचा संन्यास केल्याखेरीज कोणीहि कर्मयोगी होत नाहीं." असें रहस्यकार म्हणतात. यांत 'संकल्प' म्हणजे काम्यबुद्धिरूप फलाशा असें म्हटलें आहे, तें जरा चमत्कारिक दिसतें. याचा वास्तविक अर्थ वाचकांनीं भाष्यार्थावरून समजून घ्यावा. 'गीतेच्या सिद्धान्ताहून स्मृतिकारांचा सिद्धान्त भिन्न आहे' इत्यादि जें रहस्यकारांचें म्हणणें आहे, तें प्रमाणसिद्ध नसून केवल काल्पनिक असल्यामुळें आम्ही त्याचा अधिक विचार करीत नाहीं.

**आरुरुक्षोर्मुनेर्योगं कर्म कारणमुच्यते ।**
**योगारूढस्य तस्यैव शमः कारणमुच्यते ॥ ३ ॥**

**अन्वयार्थ—योगं**—ध्यानयोगावर—**आरुरुक्षोः मुनेः**—आरूढ होण्याची इच्छा करणाऱ्या मुमुक्षु गृहस्थाला—**कर्म**—फलनिरपेक्ष कर्मानुष्ठान हें—**कारणं**—साधन—**उच्यते**—सांगितलें जातें.—**तस्य एव योगारूढस्य**—पण तोच मुनि कर्माभ्यासानें योगारूढ झाला असतां, त्याला—**शमः**—उपशम-सर्व कर्मापासून उपराम पावणें, हें—**कारणं**—साधन—**उच्यते**—सांगितलें जाते. ३.

**ध्यानयोगस्य फलनिरपेक्षः कर्मयोगो बहिरङ्गं साधनमिति तं संन्यासत्वेन स्तुत्वाऽधुना कर्मयोगस्य ध्यानयोगसाधनत्वं दर्शयति—आरुरुक्षोरारोढुमिच्छतोऽनारूढस्य ध्यानयोगेऽवस्थातुमशक्तस्यैवेत्यर्थः । कस्याऽऽरुरुक्षोर्मुनेः कर्मफलसंन्यासिन इत्यर्थः । किमारुरुक्षोर्योगं कर्म कारणं साधनमुच्यते । योगारूढस्य पुनस्तस्यैव शम उपशमः सर्वकर्मभ्यो निवृत्तिः कारणं योगारूढत्वस्य साधनमुच्यत इत्यर्थः । यावद्यावत्कर्मभ्य उपरमते तावत्तावन्निरायासस्य जितेन्द्रियस्य चित्तं समाधीयते । तथा सति स झटिति योगारूढो भवति । तथा चोक्तं व्यासेन—"नैतादृशं ब्राह्मणस्यास्ति वित्तं यथैकता समता सत्यता च । शीलं स्थितिर्दण्डनिधानमार्जवं ततस्ततश्चोपरमः क्रियाभ्यः" इति ॥**

**भाष्यार्थ**—( अहोपण, याप्रमाणे परमार्थ संन्यासाचा कर्मयोगांतच जर अन्तर्भाव झाला तर कर्मयोगच सदा करणें प्राप्त आहे. कारण तो केल्यानें परमार्थ संन्यासहि केल्यासारखाच होतो, अशी आशंका येथे येण्याचा संभव आहे. म्हणून गतार्थाचा अनुवाद करून पुढील श्लोकाचें तात्पर्य सांगतात- )—**फलनिरपेक्षः कर्मयोगः ध्यानयोगस्य बहिरंगं साधनं इति तं संन्यासत्वेन स्तुत्वा**—फलाची अपेक्षा न करितां आचरिलेला कर्मयोग हें ध्यानयोगाचे बहिरंग साधन आहे, म्हणून त्या कर्मयोगाची संन्यासत्वाने स्तुति करून—**अधुना कर्मयोगस्य ध्यानयोगसाधनत्वं दर्शयति**—आतां ' आरुरुक्षोः० ' या श्लोकाने कर्मयोगाला ध्यानयोगाचें साधनत्व आहे, असें भगवान् दाखवितात—**आरुरुक्षोः-आरोढुं इच्छतः-अनारूढस्य-ध्यानयोगे**

१ रहस्यकार या तिसऱ्या श्लोकाला असें अवतरण देतात. " खरा सन्यास कोणता तें याप्रमाणें सांगून आता ज्ञान होण्याच्या पूर्वी ह्मणजे साधनावस्थेंत जी कर्में करतात, त्यांत व ज्ञानोत्तर ह्मणजे सिद्धावस्थेंत फलाशा सोडून जी कर्में करावयाची, त्यांत भेद कोणता तें सांगतात. " पण पहिल्या व दुसऱ्या श्लोकांत खरा संन्यास सांगितला नसून गौणसंन्यास सांगितला आहे, हें आम्ही वर दाखविलेंच आहे. ज्ञान होण्यापूर्वी साधनावस्थेंत जीं कर्में करतात, त्यांत व सिद्धावस्थेंतील कर्मांत 'फलाशा सोडणें' हा प्रत्यक्ष भेद रहस्यकारांनीं या अवतरणांतच दाखविला आहे, पण तो चुकीचा आहे. कारण साधनावस्थेंतच आसक्ति टाकून चित्तशुद्धीकरितां कर्में केलीं जातात. सर्व कामांचा त्याग केल्यावांचून सिद्धावस्थाच

प्राप्त होत नाहीं, तेव्हां ज्या अवस्थेंत फलाशेचा संभवच नाहीं, त्या अवस्थेंत फलाशा सोडून कर्मं करावयाची कशी? असो. रहस्यकार या महत्त्वाच्या श्लोकाचा अर्थ असा करितात– " जो कर्मयोगारूढ होऊं इच्छितो, त्या मुनीस कर्म हें शमाचें कारण म्हणजे साधन म्हटलें आहे आणि तोच पुरुष योगारूढ ह्म० पूर्ण योगी झाला ह्म० त्यास पुढें शम हे कर्माचें कारण होतें, असें म्हणतात. " पण हा अर्थ अतिशय ओढाताणीचा आहे. येथे योगारूढ असा शब्द असतांना कर्मयोगारूढ असें रहस्यकारांनी आपल्या संप्रदायाला अनुसरून म्हटलें आहे. पण कर्मयोगारूढ याचा अर्थ काय ? आणि जो कर्मयोगारूढ होऊं इच्छितो, त्याला कर्म हे शमाचें साधन आहे, याची संगति कशी काय लागते ? कर्म हें शमाचें साधन आहे हें म्हणणे अनुभवाच्या विरुद्ध आहे. कारण कर्म व शम यांच्यामध्यें दिवस व रात्र यांच्या इतका विरोध आहे.तसेंच योगारूढ झाल्यावर शम हें पुन: कर्माचें कारण होतें, असें म्हटल्यास त्यावर अन्योन्याश्रय दोष येत नाहीं का ? हा श्लोकाचा सरळ अर्थ आहे असें कोण म्हणेल ? पण याहीपेक्षां अधिक आश्चर्य ते पुढेंच आहे.मुळांत कांहीं आधार नसताना 'कर्म हें शमाचें कारण आहे व शम हे कर्माचें कारण होते' असे आपल्या पदरचेच सांगून पुन: "टीकाकारानीं या श्लोकाच्या अर्थाचा अनर्थ करून टाकला आहे " असें म्हणण्यास ते तयारच आहेत! रहस्यकारांनी आपल्या वरील अयोग्य अर्थाच्या समर्थनासाठीं या श्लोकावर विस्तृत टीप लिहिली आहे. तिचा आपल्यालाहि थोडा विचार करणे भाग आहे. ते म्हणतात,—"श्लोकाच्या पूर्वार्धांत योग म्हणजे कर्मयोग हाच अर्थ असून तो सिद्ध होण्यास प्रथम कर्मच कारण होतें, ही गोष्ट सर्वांस मान्य आहे." पण रहस्यकारांचें हें म्हणणें साफ चुकीचे आहे. येथील योग म्हणजे कर्मयोग असें कोणीहि म्हणत नाहीं. अद्वैतवादी तर म्हणत नाहीतच, पण इतर भाष्यकारही येथील 'योग' म्हणजे 'कर्मयोग' असें म्हणत नाहीत. मध्वाचार्य–"योग आरुरुक्षोः' याचा अर्थ 'उपायसंपूर्तिमिच्छोः' असा करितात.त्याचे टीकाकार जयतीर्थ "उपायः समाधिरेव" असें म्हणतात. रामानुजाचार्य–"योग आत्मावलोकनं प्राप्तु इच्छोः मुमुक्षोः कर्मयोग एव कारणं उच्यते" म्हणजे योगाला, आत्मज्ञानाला प्राप्त होण्याची इच्छा करणाऱ्या मुमुक्षूला कर्मयोगच साधन सांगितलें जाते. यावरून रहस्यकारांचें म्हणणें बरोबर नाहीं, हे कोणीहि कबूल करील. शिवाय ' कर्मयोग सिद्ध होण्यास कर्मच कारण होते,' हे म्हणणेहि अयोग्य आहे. कर्मयोगाचेंच कारण कर्म कसें होईल ? कर्म व कर्मयोग यांत काय फरक आहे ? रहस्यकार जो फरक मानतात तो काल्पनिक आहे, प्रमाणसिद्ध नाहीं. शिवाय अर्थामध्यें 'कर्म हें शमाचें कारण आहे' असें रहस्यकारांनी म्हटलें आहे ते निराळेच ! पुन: ते म्हणतात,—"योगारूढ झाल्यावर त्यासच शम हे कारण होते याचा अर्थ टीकाकारांनी संन्यासपर लावला आहे, त्यांचें असें म्हणणें आहे कीं, 'शम' म्हणजे कर्माचा 'उपशम' व ज्याला योग सिद्ध झाला त्यानें कर्मं सोडून दिलीं पाहिजेत ! कारण त्यांच्या मते कर्मयोग, हा संन्यासाचें अंग म्ह० पूर्वसाधन आहे. पण हा अर्थ सांप्रदायिक आग्रहाचा होय; खरा नव्हे." कर्मयोग परमार्थसंन्यासाचें अंग आहे,हें दुसऱ्या कोणाचें मत नसून खुद्द वैदिकसंप्रदायच असा आहे,व्यास व भगवान् श्रीकृष्ण,यांचें तें मत आहे. 'संन्यासस्तु महाबाहो दुःखमाप्तुमयोगतः' हे गीतेचेंच वचन आहे.'कर्मयोगावांचून परमार्थसंन्यास प्राप्त होणें फार कठिण आहे.' (अ. ५. श्लो. ६ पृ.४९५ पहा) याविषयीं सर्व वैदिकांचें ऐकमत्य आहे.म्हणूनच

त्यांना सांप्रदायिक टीकाकार नकोत. कारण ते स्वकपोलकल्पित कल्पना करण्यास तयार नसतात. मध्वाचार्य " योगारूढ म्ह० अपरोक्ष ज्ञानी व त्याला शम म्ह० सर्वोपशमानें समाधि हे परम सुखाचे कारण सांगितले आहे " असे म्हणतात. रामानुजाचार्य-" शम म्ह० कर्मनिवृत्ति " म्हणतात. ज्ञानेश्वरमहाराजहि म्हणतात-"आता योगाचळाचा निमथा। जरी ठाकावा आथी पार्था । तरी सोपाना या कर्मपथा । चुका झणी ॥ ५४ ॥... मग तया मार्गाची धाव । पुरेल प्रवृत्तीची हाव । जेथ साध्यसाधना खेव । समरसें होय ॥ ५९ ॥ जेथ पुढील पैस पारुखे । मागिल स्मरावें ते ठाके । ऐसिये सरिसीये भूमिके । समाधि राहे ॥ ६० ॥ " यात त्यांनी "योगरूपी पर्वताच्या माथ्यावर ज्याला चढावयाचें असते, त्याला कर्ममार्ग हाच जिना आहे. त्याने तो सोडू नये. पण योगपर्वतारूढ झाल्यावर मग त्याचा तो मार्ग सपतो. प्रवृत्तीची हाव पुरी होते. ब्रह्मानंदात साध्यसाधनाची एकरूपता होते. पुढील मार्ग बंद होतो. मागील भानहि रहात नाही व तो योगाचळाच्या माथ्यावरील सपाटीवर निश्चल स्थिर होतो. " असे सांगितले आहे व ते सर्वथा उपपन्न होय. अर्थात् कर्म योगारोहणाचे साधन व शम-उपशम-कर्मनिवृत्ति हे योगारूढाचे साधन आहे, याबद्दल प्राचीन टीकाकारांतील कोणाचाच मतभेद नाही. पण रहस्यकार त्या सर्वांना सांप्रदायिकआग्रही ठरवून मोकळे होत आहेत.

टीकाकाराचा अर्थ सांप्रदायिक आग्रहाचा आहे, खरा नव्हे, याची कारणे ते अशी सांगतात—( १ ) " कर्मफलाचा आश्रय न करिता कर्तव्यकर्म करणारा पुरुषच खरा योगी म्ह० योगारूढ होय. कर्म न करणारा ( अक्रिय ) खरा योगी नव्हे, असें या अध्यायाच्या पहिल्याच श्लोकात जर भगवंतांनी सांगितले आहे तर तिसऱ्या श्लोकात योगारूढ पुरुषाला कर्माचा त्याग करण्यास किंवा कर्मे सोडण्यास भगवान् सांगतील, असें मानणें सर्वथैव अन्याय्य होय. " पण या अध्यायाच्या १ ल्या श्लोकाचा अर्थ रहस्यकारांनी बरोबर केलेला नाही, हें आम्ही वर सांगितलेच आहे. १ ल्या श्लोकात कर्मफलाची इच्छा न धरितां जो कर्माधिकारी गृहस्थ विहित कर्म करतो तो सन्यासी व योगी आहे,अशी त्याची स्तुति केली आहे. कारण योगारोहणासाठी तसल्या कर्माचे तिसऱ्या श्लोकात विधान करावयाचे आहे. ज्याचे विधान करावयाचें असते त्याची अशीच स्तुति केली जाते. अर्थात् कर्मफलाचा आश्रय न करिता कर्मे करणारा हा मुख्य सन्यासी नसून गौणसन्यासी आहे व याविषयी मूळ भाष्यात सविस्तर विचार केलेला असल्यामुळें येथे अधिक विस्तार करण्याची आवश्यकता नाही. कर्मे करणारा खरा योगी किंवा सन्यासी कसा असेल ? एवढी साधी गोष्टहि रहस्यकारांच्या लक्षांत येऊं नये,हे आश्चर्य आहे.असो;खरा प्रकार असा असल्यामुळेच " शांति मिळाल्यावर योगारूढानें कर्मे करू नयेत असे सन्यासमार्गाचे जरी मत असलें तरी गीतेस हे मत मान्य नसून " वगैरे जे रहस्यकारानी ( पृ. ६९५ वर ) म्हटलें आहे तें सर्व अप्रयोजक आहे. सिद्धावस्थेतील पुरुषाला कर्मयोगी म्हणतां येत नाही. गीता तसें सांगत नाही. रहस्यकारांनी गीतेच्या काही श्लोकांचा विपर्यास करून तसा अर्थ ओढाताणीनें काढण्याचा प्रयत्न केला आहे, पण तो फसला आहे. याविषयी प्रस्तुत ( ३ ऱ्या ) श्लोकाचा अर्थ हेंच उदाहरण पुरें आहे.यांत 'योगारूढ होऊं इच्छिणाऱ्या मुनीस कर्म शमाचें कारण-साधन आहे,व योगारूढास शम कर्माचे कारण आहे,' असा भलताच अर्थ केला आहे.

( २ ) " दुसरें कारण असें की, शम या शब्दाचा ' कर्मांचा शम ' हा अर्थ कोठून आला ? शमशब्द गीतेंत दोनचार वेळां आला असून तेथें व प्रचारांतहि त्याचा अर्थ ' मनाची शान्ति ' असा आहे. मग याच श्लोकांत ' कर्मांची शान्ति ' असा अर्थ कां घ्यावयाचा ? " वगैरे. येथें 'शम' हा शब्द कर्मांचा प्रतियोगी आहे. योगारोहणाची इच्छा करणाराला कर्म हें साधन सांगितले आहे व तोच योगारूढ झाला म्ह० त्याला ' शम ' हें साधन सांगितलें आहे. अर्थात येथील 'शम' हा निरपेक्ष शब्द नाही. कर्मसापेक्ष शब्द आहे. त्यामुळें ' कर्मांचा उपशम ' हाच त्याचा योग्य अर्थ आहे. मनाची शांति हा सामान्य गुण असून तो सर्वांनाच–विशेषत: ब्राह्मणाना तरी साधारण आहे. मनाची शांति आरुरुक्षूला पाहिजे, पामराला पाहिजे व आरूढालाहि पाहिजे. पण हा येथील शम तसा साधारण नाहीं. तो फक्त योगारूढासाठींच आहे. शिवाय योगारूढ होईपर्यंत कर्म व योगारूढ झाल्यावर शम अशी कर्मांची व शमाची सीमा येथें स्पष्टपणें दाखविली आहे. त्यामुळे येथील कर्म हें विहित नित्य-नैमित्तिक कर्म व शम म्ह० त्याचा त्याग असाच अर्थ घेतला पाहिजे. ' नियतस्य तु संन्यासः कर्मणो नोपपद्यते ' ( अ. १८ श्लो. ७) नित्यकर्मांचा संन्यास संभवत नाही, हें म्हणणे कर्माधिकाऱ्यासाठीं आहे,ज्ञानयोगाधिकाऱ्यासाठीं नाहीं, कारण तें प्रत्येकासाठीं आहे, असें म्हटल्यास ज्ञाननिष्ठेला अवकाशच उरत नाहीं. पण ती निष्ठा भगवानांनीच सांगितलेली आहे, तेव्हां तिचेहि अधिकारी कोणी असलेच पाहिजेत ! शिवाय गीतेंत यतींचा धर्महि सांगितलेला आहे, असें वैशंपायन म्हणत आहे. त्यामुळें अरुरुक्षूला कर्म व आरूढाला शम–कर्मत्याग हींच योग्य साधनें आहेत.रहस्यकाराच्या म्हणण्याप्रमाणें गीता प्रत्येक ज्ञानी पुरुषानें मरेपर्यंत कर्मच केलें पाहिजे असें सांगत नाही. ती केवळ रहस्यकारांची अन्यथा प्रतिपत्ति आहे. 'शम योगारूढाच्या कर्माचे कारण होतें, ' या म्हणण्यात कांही अर्थच नाहीं. कारण तें मुळाला सोडून व अनुभवाच्याहि विरुद्ध आहे.

( ३ )" टीकाकारांचा अर्थ त्याज्य मानण्याचें तिसरे कारण असें की, संन्यासमार्गाप्रमाणें योगारूढ पुरुषास पुढें कांहींच करावयाचें रहात नाहीं,शमांतच त्याच्या सर्व कर्मांचा शेवट होतो; आणि हें जर खरें तर ' योगारूढाला शम कारण होतें' या वाक्यातील 'कारण' शब्द अगदींच निरर्थक पडतो."(पण येथें संन्यासमार्गाचा काय संबंध आहे?भगवान् योगारूढ झालेल्या त्यालाच शम कारण आहे,असें म्हणतात.) पण रहस्यकार म्हणतात–"तसें म्हटल्यास कारण शब्द निरर्थक पडतो." (तो कसा ? याचें उत्तर ते असें देतात–)–"कारण हा शब्द नेहमींच सापेक्ष आहे, कारण म्हटलें म्ह० त्याला कांही तरी कार्य पाहिजे; व संन्यासमार्गाप्रमाणें योगारूढाला तर कोणतेंच कार्य शिलक राहिलेलें नसतें." ( पण रहस्यकारांची ही चिकित्सा साफ चुकली आहे. कारणाची नेहमींच अपेक्षा ठेवणारा 'कार्य-'शब्द व कर्तव्य या अर्थी असलेला 'कार्य-' शब्द यांच्या अर्थामध्यें जमिन–अस्मानाइतकें अंतर आहे, हें त्यांच्या येथें लक्षांत आलें नाहीं, असें दिसतें. कारणसापेक्ष कार्यशब्दाचा अर्थ परिणाम असा आहे. ' कार्य शिलक नसतें ' यांतील कार्य म्ह० कर्तव्यकर्म आहे. अद्वैतवेदान्तासारख्या युक्तिपूर्ण शास्त्रावर दोष देतांना असले सर्वथा अनुपपन्न तर्क रहस्यकारांना लढवावे व त्यांचा सामान्य लोकांकडून गौरव केला जावा, हा केवळ कालमहिमा आहे! असो; पण या श्लोकाच्या दोन्ही अर्थांतील 'कारण' हा शब्द साधन या अर्थी आहे. स्वत: रहस्यकारांनीहि

पूर्वार्धातील कारणशब्दाचा अर्थ ' साधन ' असाच केला आहे. आचार्यांनी दोन्हीं अर्धातील कारणशब्दाचा अर्थ ' साधन ' असा केलेला आहे. पण तिकडे दुर्लक्ष करून रहस्यकार 'कारणशब्द कार्यसापेक्ष आहे ' इत्यादि म्हणून अप्रासंगिक दोष देण्यास उगीच प्रवृत्त झाले आहेत. पण इतक्यांत त्यांना 'कारण म्ह० साधन' या अर्थाची आठवण होऊन ते म्हणतात "शम म्ह० मोक्षाचें कारण म्ह० साधन म्हणावें तर तें जुळत नाहीं. कारण मोक्षाचे साधन ज्ञान आहे. शम नव्हे. बरें शम हें ज्ञानप्राप्तीचें 'कारण' म्ह० साधन म्हणावें तर योगारूढ झालेल्याचें म्ह० पूर्णावस्थेस पोचलेल्याचेंच हें वर्णन असल्यामुळें त्याला ज्ञानप्राप्ति कर्माच्या साधनानें पूर्वीच झालेली असते. मग 'शम' हें कारण कशाचें? संन्यासमार्गीय टीकाकारास या प्रश्नाचें कांहींच समाधानकारक उत्तर देता येत नाहीं." येथे रहस्यकारांनी सन्यासमार्गीय टीकाकाराना आपल्या मतें निरुत्तर करण्याचा बराच आव आणला आहे, पण तो सर्व व्यर्थ आहे. कारण त्यात उपपत्ति कांहींच नाहीं. ते म्हणतात–'स.मा. टीकाकाराना समाधानकारक उत्तर देतां येत नाहीं,' पण आम्हांला वाटतें कीं, टीकाकाराना प्रस्तुत प्रश्न न करताच त्यांनी आपली ही अशी समजूत करून घेतली आहे. कारण अद्वैतमार्गी कोणतीहि टीका जरी काढली तरी तिच्यामध्यें याचे उत्तर दिलेलें आहे. मग रहस्यकाराचें त्यानें समाधान कां झालें नाहीं ? कारण, रहस्यकाराना टीकाकाराचें म्हणणें कळलें नाहीं व ते प्रश्नहि प्रकरणाला सोडून करीत आहेत. ते कसे ? तर पहा—आचार्य म्हणतात–कर्मानुष्ठानानें ध्यानयोगाची योग्यता प्राप्त होते व ती आल्यावर त्यानेच पूर्णपणे योगारूढ होण्यासाठीं शम करावा. शम म्ह० कर्मसन्यास. त्यानें योगारूढत्वाचा पूर्ण परिपाक होतो. ( गी. भा. पृ.५५५ पहा ). पण रहस्यकार म्हणतात " मोक्षाचें साधन ज्ञान आहे, शम नव्हे." अहो रहस्यकार ! आचार्य योगारूढत्वाचे साधन शम आहे असे म्हणतात. मोक्षाचें साक्षात् साधन शम–सन्यास आहे, असे म्हणत नाहींत. सन्यास ज्ञानाचें सहकारी साधन आहे, हें कोणीहि कबूल करील. रहस्यकार म्हणतात–"पूर्णावस्थेस पोंचलेल्याचें हें वर्णन आहे," पण तें बरोबर नाहीं. कारण, पूर्णावस्थेस पोचलेल्याचे जर हे वर्णन असतें, तर शम हें त्याचें साधन किंवा कारण तरी कशाला पाहिजे ? पण मुळात योगारूढालाहि शम हे कारण सांगितले आहे. त्यामुळे योगारूढ हा सिद्ध नसून साधक आहे, हें सिद्ध होतें. ते म्हणतात–" त्याला ज्ञानप्राप्ति कर्माच्या साधनानें पूर्वीच झालेली असते मग शम हे कारण कशाचे ? " कर्मानें आत्मज्ञान होणे शक्य नाहीं. ते श्रवण-मननादिकाच्या योगानेंच होणार ! कर्मानें चित्तशुद्धि होते, श्रवणादिकाची योग्यता येते, ध्यानाची योग्यता येते. ती आल्यावर श्रवणादिक व ध्यान निर्विघ्नपणें होण्यासाठीं शम –कर्मसंन्यास हेंच साधन विहित आहे. त्यामुळे ' शम हें कारण कशाचे ? ' हा प्रश्नच अस्थानीं आहे. अर्थात् रहस्यकारांना त्याचें समाधानकारक उत्तर मिळत नाहीं, यांत टीकाकारांचा कांहीं दोष नसून अप्रासंगिक प्रश्न करणारांचाच दोष आहे.

रहस्यकार पुढें म्हणतात–" पण संन्यासमार्गीयांचा हा अर्थ सोडून देऊन विचार करूं लागलें, म्हणजे उत्तरार्धाचा अर्थ करतांना पूर्वार्धातील कर्म हे पद सांनिध्यसामर्थ्यानें सहज मनांत येतें व मग योगारूढाला स्वार्थ राहिला नसला तरी लोकसंग्रहकारक कर्म सुटत नसल्यामुळें ( गी. ३. १७-१९ पहा ) तें करण्यास शम हें त्याला आता कारण म्ह०

साधन होतें असा अर्थ निष्पन्न होतो." उत्तरार्धाचा अर्थ करतांना पूर्वार्धांतील कर्म हें पद रहस्यकारांच्या सहज मनांत येत असेल, कारण त्याना गीतेंत ध्यानी-मनी-स्वप्नीं कर्मच दिसूं लागले आहे व ते कर्म तरी कोणते ? शास्त्रीय श्रौत-स्मार्त नव्हे, तर लौकिक—विशेषत: राजकारण त्यांच्या मनांत येते. गीता हें कर्मयोगशास्त्र आहे, अशी त्यांना विप्रतिपत्ति होण्याचे कारणहि तेंच आहे. पण इतरांच्या मनात कर्म सहज तर येत नाहींच, पण पुष्कळ विचार करूनहि येत नाही. कारण 'आरुरुक्षूला कर्म साधन व आरूढाला शम हे साधन' असा स्पष्ट विभाग प्रतीत होत असतांना विचारे कर्म जर मध्येच मनांत येऊं लागले, तर तो कर्माचा दोष नसून मनाचा आहे. बरे, उत्तरार्धाचा अर्थ करतांना पूर्वार्धांतील कर्म सानिध्यसामर्थ्यानें रहस्यकारांच्या मनात आले, असे आपण समजू, पण पूर्वार्धाचा अर्थ करताना 'कर्म हें शमाचे कारण आहे' असा शमहि जो त्याच्या मनांत आला तो कोणत्या सामर्थ्याने ? ही अर्थाची लटपट नव्हे तर काय ? मान्य आचार्यादिकाना विनाकारण दोष न देता ती केली असती, तर आम्ही तिकडे दुर्लक्षहि केले असते. पण आपण चुकीचा अर्थ करून शिवाय सन्यासमार्गी टीकाकार चुकले, असे पदोपदीं दाखविण्याचा प्रयत्न केल्यामुळें वेदान्तशास्त्र व आचार्यांचे भाष्य यावरील आक्षेपाचे निरसन यथामति करणें, हे आमचें पवित्र कर्तव्य आम्ही समजतो. या पुढें रहस्यकारांनी "योगारूढाला स्वार्थ राहिला नमला तरी लोकसंग्रहकारक कर्म सुटत नाही," . "सिद्धावस्थेत कर्मे सुटतात" असा या श्लोकाचा भावार्थ नसून ... "कर्मयोग्याने अखेर कर्मे सोडली पाहिजेत असे गीतेंत कोठेंहि सांगितलें नाही." इत्यादि कोळसा जो वारवार उगाळला आहे, तो व्यर्थ असल्यामुळे यापुढें तिकडे दुर्लक्षच करण्याचें आम्हीं ठरविलें आहे. " प्रथम कर्म शमाचें कारण असतें व मग शम कर्माचे कारण होते. साधनावस्थेतला कार्य-कारणभाव सिद्धावस्थेंत बदलतो " इत्यादि सर्व म्हणणे न्यायशास्त्राच्या विरुद्ध, अत एव अग्राह्य आहे आम्ही रहस्यकाराच्या कर्मयोगासबधी चर्वित चर्वणाकडे यापुढें दुर्लक्ष करण्याचें जरी ठरविले आहे, तरी " सधि सापडेल तेथें काही तरी कल्पीने गीतेतील मधल्याच एखाद्या श्लोकाचा सन्यासपर अर्थ लावणें योग्य नव्हे. गीता हल्ली पुष्कळांस दुर्बोध झाली आहे, त्याचें कारणहि हेंच होय." असल्या वाक्याकडे दुर्लक्ष करतां येणें शक्य नाही. गीताशास्त्र मुख्यत्वे करून निवृत्तिपर आहे, ज्ञानप्रधान आहे. गीतेतील कर्मयोगहि निवृत्तिपर आहे. तो ज्ञाननिष्ठेचें अंग आहे. त्यामुळे गीतेतील प्रतिपादन केवल कर्मयोगपर असणें केव्हांच शक्य नाही. गीताशास्त्रांत पक्षपात न करितां अधिकारपरत्वें द्विविध निष्ठेचें प्रतिपादन केले आहे. यास्तव कोणताहि जरी अध्याय घेतला तरी त्यांत निवृत्त्युपयोगी प्रवृत्तीचा व निव्वल निवृत्तीचा उपदेश न्यूनाधिकपणें असलाच पाहिजे व तो तसा आहेहि. त्यामुळें प्रत्येक अध्यायांत कर्माधिकारी व ज्ञानाधिकारी पुरुषांना उद्देशून वारंवार प्रकरणभेदानें उपदेश आल्यास त्यांत कांहींच वावगें नाही. आचार्यांनी आपल्या भाष्यांत तसा विभाग प्रत्येक अध्यायांत स्पष्टपणें दाखविला आहे. रहस्यकारांना गीतेंत एका कर्मयोगावांचून दुसरे काही दिसत नाही. त्यामुळें त्यांनाच वारंवार शब्दाची ओढाताण करून प्रत्येक श्लोक कर्मयोगपर लावण्याची दगदग करावी लागली व त्यासाठीं 'कर्माचें शम कारण व शमाचें कर्म कारण' अशा कल्पना कराव्या लागतात. गीता आचार्यांच्या भाष्यानेंच अतिशय सुबोध झालेली असून रहस्यकारांच्या व्याख्यामानें ती अतिशय दुर्बोध

**अवस्थातुं अशक्तस्य एव इत्यर्थः**—आरुरुक्षूचें म्ह० आरूढ होण्याची इच्छा करणाऱ्या-आरूढ न झालेल्या-ध्यानयोगावर अवस्थित होण्यास अशक्त-असमर्थच असलेल्या,असा याचा भावार्थ—**आरुरुक्षोः कस्य**—आरूढ होऊं इच्छिणाऱ्या कोणाचें? —**मुनेः-कर्मफलसंन्यासिनः इत्यर्थः**—मुनीचे म्ह० कर्मफलाचा संन्यास करणाऱ्या कर्मी गृहस्थाचें—**किं आरुरुक्षोः**—कशावर आरोहण करण्याची इच्छा करणाऱ्या मुनीचें—**योगं**—योगावर आरूढ होऊं इच्छिणाऱ्या मुनीचें—**कर्म कारणं-साधनं उच्यते**—कर्म कारण म्ह० साधन सांगितलें जाते. [ चित्तशुद्धीच्या द्वारा ध्यानयोगाची प्राप्ति व्हावी, अशी इच्छा असलेल्या मुनीला कर्म हे साधन सांगितलें आहे, येथील 'मुनि-' शब्द कर्मानुष्ठान करणाऱ्या गृहस्थाला उद्देशून तो आरुरुक्षु असल्यामुळें पुढे मुनि होईलच, अशा भावनेने योजला आहे. त्यासाठींच आचार्यांनी मुनि म्ह० कर्मफलसंन्यासी असें भाष्यांत व्याख्यान केलें आहे. तें प्रकरणाला सर्वथा धरून आहे. ]—**पुनः योगारूढस्य तस्य एव शमः**—पण पुढे योगारूढ झालेल्या त्या कर्मी गृहस्थाचेंच शम म्ह०—**उपशमः-सर्वकर्मभ्यः निवृत्तिः कारणं-योगारूढत्वस्य साधनं उच्यते इत्यर्थः**—शम-उपशम म्ह० सर्व कर्मापासून निवृत्ति हेंच एक कारण म्ह० योगारूढत्वाचें साधन सांगितलें जाते, असा याचा भावार्थ. [ सर्व व्यापार सोडणें, या स्वरूपाचा उपशम हेच पूर्णपणे योगारूढ होण्याचे साधन कसें ते अधिक स्पष्ट करून सांगतात ]—**यावत् यावत् कर्मभ्यः उपरमते तावत् तावत् निरायासस्य जितेंद्रियस्य चित्तं समाधीयते**—साधक जों जों कर्मापासून उपराम पावतो तों तो आयासरहित व जितेंद्रिय झालेल्या त्याचे चित्त समाहित होते. तो जशीं जशीं कर्मे सोडतो, तसा तसा निरायास,जितेंद्रिय व शांतचित्त होत जातो—**तथा सति सः झटिति योगारूढः भवति**—आणि तसें झाले असता तो झटकन योगारूढ होतो. [ सर्व कर्मांची निवृत्ति झाली असतां त्याला आयास मुळींच होत नाही. त्यामुळें सर्व इंद्रियें स्वाधीन होतात. चित्तसमाधान होते व चित्तसमाधान होतांच योगारूढत्व सिद्ध होते. आतां सर्व कर्मांचा उपरम हेच पुरुषार्थाचें साधन आहे, याविषयीं पुराणाची संमति दाखवितात ]—**च व्यासेन तथा उक्तं**—आणि व्यासांनी तसें म्हटलें आहे. (ते काय?) —**यथा एकता समता च सत्यता शीलं स्थितिः दंडनिधानं आर्जवं च ततः ततः क्रियाभ्यः उपरमः एतादृशं ब्राह्मणस्य वित्तं न अस्ति**—एकता म्ह० सर्व भूतांमध्यें वस्तुतः अद्वैतभाव आहे, असें ज्ञान, समता-त्या भूतांमध्यें वैषम्य जरी दिसलें तरी ते औपाधिक आहे, त्यांतील आत्मतत्त्व निर्विशेष आहे, अशी भावना, सत्यता-भूतांचेंच हितवचन, शील-स्वभावसंपत्ति, स्थिति-स्थैर्य, दंडनिधान-अहिंसा, आर्जव-सरळपणा, व सर्व क्रियांपासून उपरति हें सर्व जसें आहे, तसें ब्राह्मणाचें दुसरें

---

झाली आहे. त्यांत वेदान्तसिद्धान्त, व्याकरणाचे नियम, न्याय व अनुभव यांचा वारंवार अतिक्रम केला आहे. गीतारहस्याचें पुस्तक हजारो लोकांनी संग्रही ठेविलें आहे,पण त्याचा अर्थबोध किती भाग्यवानांना झाला असेल तें हरि जाणे !

वित्त म्ह० पुरुषार्थाचें साधन नाहीं.—इति—असें भारतांत श्रीव्यासवचन आहे.[अर्थात् योगारूढ होण्यासाठीं सर्वकर्मसंन्यासरूप शमच केला पाहिजे. ध्यान करण्याचें सामर्थ्य येईपर्यंत निष्काम कर्मानुष्ठान व तें आल्यावर कर्मत्याग, ही कर्मानुष्ठानाची व कर्मत्यागाची मर्यादा फार महत्त्वाची आहे. ] ३.

**यदा हि नेन्द्रियार्थेषु न कर्मस्वनुषज्जते ।**
**सर्वसंकल्पसंन्यासी योगारूढस्तदोच्यते ॥ ४ ॥**

**अन्वयार्थ—यदा हि**—जेव्हां योगी—**इंद्रियार्थेषु**—विषयांमध्यें—**न अनुषज्जते**—आसक्त होत नाहीं, त्याचप्रमाणें—**कर्मसु**—नित्य-नैमित्तिकादि कर्मांमध्यें—(**न अनुषज्जते**—)आसक्त होत नाहीं.—**सर्वसंकल्पसंन्यासी**—सर्व संकल्पांचा संन्यास करतो—**तदा**—तेव्हां—**योगारूढः**—योगारूढ—**उच्यते**—म्हटला जातो.४

**अथेदानीं कदा योगारूढो भवतीत्युच्यते—यदा समाधीयमानचित्तो योगी हीन्द्रियार्थेष्विन्द्रियाणामर्थाः शब्दादयस्तेष्विन्द्रियार्थेषु कर्मसु च नित्यनैमित्तिककाम्यप्रतिषिद्धेषु प्रयोजनाभावबुद्ध्या नानुषज्जतेऽनुषङ्गं कर्तव्यताबुद्धिं न करोतीत्यर्थः । सर्वसंकल्पसंन्यासी सर्वान्संकल्पानिहामुत्रार्थकामहेतून्संन्यसितुं शीलमस्येति सर्वसंकल्पसंन्यासी योगारूढः प्राप्तयोग इत्येतत्तदा तास्मिन्काल उच्यते । सर्वसंकल्पसंन्यासीति वचनात्सर्वांश्च कामान्सर्वाणि च कर्माणि संन्यसेदित्यर्थः । संकल्पमूला हि सर्वे कामाः—"संकल्पमूलः कामो वै यज्ञाः संकल्पसंभवाः । काम जानामि ते मूलं संकल्पात्त्वं हि जायसे ॥ न त्वां संकल्पयिष्यामि तेन मे न भविष्यसि" इत्यादिस्मृतेः ॥**

**भाष्यार्थ—**(योगप्राप्तीचें कारण-साधन सांगितल्यानंतर त्याच्या प्राप्तीचा काल दाखविण्यासाठीं आचार्य पुढील श्लोकाला अवतरण देतात-)—**अथ इदानीं कदा योगारूढः भवति इति उच्यते**—आतां अगोदर योगारूढ केव्हां होतो तें 'यदा हि०' या श्लोकानें सांगितलें जातें—**यदा समाधीयमानचित्तः-योगी हि**—ज्या समाधानावस्थेंत, ज्याचें चित्त समाहित केलें जात आहे असा योगी—**इंद्रियार्थेषु-इंद्रियाणां अर्थाः शब्दादयः तेषु इंद्रियार्थेषु**—इंद्रियार्थांमध्यें-इंद्रियांचे अर्थ म्ह० शब्दादि विषय, त्या इंद्रियार्थांत—**च नित्य-नैमित्तिक-काम्य-प्रतिषिद्धेषु कर्मसु**—आणि नित्य, नैमित्तिक, काम्य व प्रतिषिद्ध कर्मांमध्यें—**प्रयोजनाभावबुद्ध्या न अनुषज्जते**—प्रयोजनाचा अभाव आहे, त्यांत कांहीं प्रयोजन नाहीं, अशा बुद्धीनें अनुषक्त होत नाहीं—**अनुषंगं-कर्तव्यताबुद्धिं न करोति इत्यर्थः**—अनुषंग म्ह० कर्तव्यताबुद्धि करीत नाहीं, असा भावार्थ. [ शब्दादि विषय व नित्य-नैमित्तिकादि कर्में यांविषयींची आसक्ति योगारोहणाला प्रतिबंध करीत असते. म्हणून तिचा अभाव हा योगारोहणाचा उपाय आहे, हें प्रसिद्ध आहे, असें भाष्यांतील 'हि'-शब्दानें सुचविलें आहे. सर्व संकल्पहि तसेच योगारोहणाला प्रतिबंध करीत असतात, या आशयानें

'सर्वसंकल्पसंन्यासी' यांतील विवक्षित अर्थ सांगतात-]—**सर्वसंकल्पसंन्यासी-इहामुत्रार्थकामहेतून् सर्वान् संकल्पान् संन्यसितुं शीलं अस्य इति सर्व-संकल्पसंन्यासी**—ऐहिक व पारलौकिक विषयांविषयींच्या कामांना कारण होणारे सर्व संकल्प सोडण्याचें याचें शील आहे म्हणून सर्वसंकल्पसंन्यासी—**तदा-तस्मिन् काले योगारूढः-प्राप्तयोगः इति एतत् उच्यते**—त्यावेळीं योगारूढ म्ह० ज्याला योग प्राप्त झाला आहे, असा याचा भावार्थ, म्हटला जातो. [ ज्यावेळीं किंवा ज्या अवस्थेंत साधक शब्दादिविषयांमध्यें व नित्य-नैमित्तिकादि कर्मांमध्यें आसक्त होत नाहीं, विषय मला अवश्य भोगले पाहिजेत व हीं कर्मे मला अवश्य केलीं पाहिजेत, अशी वृत्ति धरीत नाहीं आणि ऐहिक व पारलौकिक विषयांविषयींचे सर्व संकल्प सोडतो, नुस्ते सोडतो, इतकेंच नव्हे, तर ते सोडणें-संकल्प न करणें हा ज्याचा स्वभावच बनून जातो,त्यावेळीं किंवा त्या अवस्थेंत तो योगारूढ म्हटला जातो. संकल्पांचाच त्याग केल्यावर विषय व कर्मे यांचा त्याग अनायासानें होतो. कारण मूळच उपटून टाकल्यावर कार्याची निवृत्ति होण्यासाठीं निराळा यत्न करावा लागत नाहीं. ]—'**सर्वसंकल्पसंन्यासी' इति वचनात् सर्वान् च कामान् सर्वाणि च कर्माणि संन्यसेत् इत्यर्थः**—'सर्व-संकल्पसंन्यासी' असें वचन असल्यामुळे सर्व काम व सर्व कर्मे यांचा संन्यास करावा,

---

१ पण रहस्यकार या श्लोकाला असें असबद्ध अवतरण देतात—"योगारूढानें कर्मे केलीं पाहिजेत, हाच अर्थ पुढील श्लोकातील व्याख्येवरूनहि व्यक्त होतो" पण वस्तुतः साधक योगारूढ केव्हां म्हटला जातो, तेंच या श्लोकात सांगितलें आहे. म्हणजे त्याचें लक्षणच यांत सांगितलें आहे. 'विषयामध्यें व कर्मांमध्यें आसक्त होत नाहीं व सर्व संकल्पाचा संन्यास करणें, हें ज्याचें शील-स्वभावच बनून गेला आहे त्याला योगारूढ म्हटलें जातें,' असा या श्लोकाचा खरा अर्थ आहे. यावरून 'योगारूढाने कर्मे केलीं पाहिजेत' हा अर्थ व्यक्त होत नाहीं. पण रह-स्यकारांना तो अर्थ तर त्यांतून व्यक्त करून दाखवावयाचा आहे, म्हणून ते 'सर्वसंकल्पसंन्या-सी' याचा अर्थ-"सर्व संकल्पांचा म्ह० काम्यबुद्धिरूप फलाशेचा ( साक्षात् कर्माचा नव्हे ) संन्यास करतो" असा करितात. पण सर्व संकल्प म्ह० काम्यबुद्धिरूप फलाशा हा अर्थ त्यांनीं आणला कोठून? याच अध्यायाच्या दुसऱ्या श्लोकांतहि 'असंन्यस्तसंकल्पः' असा जो शब्द आहे त्याचाहि त्यांनीं असाच अर्थ केला आहे. पण संकल्पाचा हा अर्थ बरोबर नाहीं. कारण संकल्प हें कामाचेंहि कारण आहे. संकल्प म्ह० जवळ जवळ चिंतनच. विषयादि-कांचे संकल्प केल्यानें काम-त्यांविषयीं इच्छा होते, कामामुळें कर्मप्रवृत्ति होते, कर्मप्रवृत्तीमुळें काम्यबुद्धि म्ह० फलाशा अशी यांची परंपरा आहे. पण रहस्यकारांनीं संकल्प म्हणजेच काम्यबुद्धि-फलाशा असा अर्थ ठोकून दिला आहे. पण त्यावेळीं शंकराचार्यादिक संन्यासमा-र्गीयांच्या टीकांकडे नाहीं तर नाहीं निदान गीतेच्या याच अध्यायाच्या २४ व्या श्लोका-कडे तरी पहावयाचें होतें. म्हणजे संकल्प कामांचें कारण आहे, हें त्यांच्या ध्यानांत आलें असतें. कारण 'संकल्पप्रभवान् कामान् त्यक्त्वा सर्वान् अशेषतः' म्ह० 'संकल्पापासून उत्पन्न होणाऱ्या सर्व कामांचा निःशेष त्याग करून' असें तेथें स्पष्ट म्हटलेलें आहे. आचार्यांनीं संकल्पत्यागाविषयीं भाष्यांत सविस्तर लिहिलें आहे. संकल्प हेंच

असा याचा भावार्थ.—**हि सर्वे कामाः संकल्पमूलाः**—कारण सर्व काम संकल्पमूल आहेत. ( सर्व कामांचें मूळ संकल्प आहे. संकल्पत्यागाविषयीं प्रमाण-)—'**कामः संकल्पमूलः वै**'—काम संकल्पमूल आहे, ही गोष्ट सुप्रसिद्ध आहे.—'**यज्ञाः संकल्पसंभवाः**' यज्ञ संकल्पापासून संभवतात.—'**हे काम ते मूलं जानामि**' —हे कामा, मी तुझे मूळ जाणतों.—'**त्वं हि संकल्पात् जायसे**'—तूं संकल्पापासून होतोस.—'**त्वां न संकल्पयिष्यामि**'—तुझ्याविषयीं मी संकल्पच करणार नाहीं.—'**तेन मे न भविष्यसि**' **इत्यादि स्मृतेः**—म्हणजे माझ्या मनांत तूं उत्पन्नच होणार नाहीस, इत्यादि स्मृति याविषयीं प्रमाण आहे.

**सर्वकामपरित्यागे च सर्वकर्मसंन्यासः सिद्धो भवति "स यथाकामो भवति तत्क्रतुर्भवति यत्क्रतुर्भवति तत्कर्म कुरुते" इत्यादिश्रुतिभ्यो 'यद्यद्धि कुरुते कर्म तत्तत्कामस्य चेष्टितम्' इत्यादिस्मृतिभ्यश्च । न्यायाच्च । न हि सर्वसंकल्पसंन्यासे कश्चित्स्पन्दितुमपि शक्तः । तस्मात्सर्वसंकल्पसंन्यासीति वचनात्सर्वान्कामान्सर्वाणि कर्माणि च त्याजयति भगवान् ॥ ४ ॥**

**भाष्यार्थ**—( सर्व संकल्पांचा अभाव झाला असतां कामाच्या अभावाप्रमाणे कर्मांचाहि अभाव सिद्धच आहे. पण कर्में हे कामांचे कार्य असल्यामुळे कामाच्या निवृत्तीमुळेंहि कर्मांची निवृत्ति होते, असें सांगतात-)—**च सर्वकामपरित्यागे सर्वकर्मसंन्यासः सिद्धः भवति**—आणि सर्व कामांचा परित्याग केला असतां सर्वकर्मांचा संन्यास आपोआप सिद्ध होतो. ( कर्म हें कामाचे कार्य आहे, याविषयीं श्रुति-स्मृतिप्रमाण-)—'**सः यथाकामः भवति तत्क्रतुः भवति**'—स्वरूपाला न जाणणारा पुरुष ज्या फलाच्या इच्छेनें युक्त असतो त्याचे साधन आपल्याला आचरिले पाहिजे,

---

सर्व प्रवृत्तींचें निमित्त असल्यामुळें संकल्पत्याग केल्यावर मनुष्य थोडी मुद्धां हालचाल करूं शकत नाहीं, असा अनुभव वर्णिला आहे व येथें 'सर्वसंकल्पसंन्यासी' असें म्हटलें आहे. तेव्हां सर्व संकल्प टाकल्यावर योगारूढाच्या हातून कर्में कशी घडणार ? पण सर्वसंकल्प टाकल्यावर कर्में संभवतात कां नाहीं, याचा विचार करतो कोण ? तसेंच 'सर्वान् कामान् विहाय' २-७१ 'संकल्पप्रभवान् सर्वान् कामान् अशेषतः त्यक्त्वा' ६-२४ इत्यादि वचनांतील 'सर्व, अशेषतः' इत्यादि शब्दांकडे तरी पाहतो कोण ? सर्वसंकल्प, सर्वकाम निःशेष टाकूनहि कर्में केलीच पाहिजेत, असें नुसतें बोलावयास कोणती हरकत आहे ? सर्वसंकल्पसंन्यास किंवा सर्वसंकल्पजन्य कामांचा निःशेष त्याग बोलणाराचें तोंड कांहीं धरीत नाहीं, मग वाटेल तें बोलावयास व हवे ते लिहावयास कमी कां करावें ? अशांतलाच हा सर्व प्रकार आहे. कोणी योगारूढ असो, योगी असो, स्थितप्रज्ञ असो, गुणातीत असो, ज्ञाननिष्ठ असो की सर्वसंकल्पसंन्यासी असो, त्यानें मरेपर्यंत सांसारिक कर्में केलीच पाहिजेत, हा जुलूम गीतेच्या आडून रहस्यकारांना सर्वांवर करावयाचा आहे व त्यासाठीं त्यांनीं शब्द, त्यांचे प्रसिद्ध अर्थ, शक्यता, अशक्यता, न्याय, शास्त्र इत्यादि कशाचीच फारशी पर्वा केलेली दिसत नाहीं. शिवाय त्यांचें तें कर्म कोणतें, तर खाणे, पिणें, पतकरिलेला धंदा वगैरे ! असो;

अशी बुद्धि धारण करतो. [क्रतु म्हणजे निश्चय. तत्क्रतु होतो म्ह० त्या फलसाधनाच्या अनुष्ठानाविषयीं तो निश्चय करतो. ] आणि—' **यत्क्रतुः भवति तत् कर्म कुरुते' इत्यादि श्रुतिभ्यः**— ज्या निश्चयानें युक्त असतो ते कर्म करतो, इत्यादि श्रुति आहेत. [ म्ह० जे साधन आपल्याला केले पाहिजे, अशी त्याची भावना होते तेच कर्म तो बाहेरहि करतो. याप्रमाणे कर्म कामाच्या अधीन आहे, असे श्रुतीनें सांगितलें आहे. ]—**च ' जन्तुः यत् यत् हि कुरुते तत् तत् कामस्य चेष्टितं ' इत्यादिस्मृतिभ्यः**—आणि प्राणी जे जे कर्म करतो, तें ते कामाचे चेष्टित—कामाचा परिणाम आहे, इत्यादि स्मृतिवचनेंहि आहेत. [कर्म कामापासून—विषयेच्छेपासून होतें, ही गोष्ट अन्वय-व्यतिरेकसिद्ध आहे, हे सुचविण्यासाठीं स्मृतिवचनांत ' हि ' हा शब्द आहे. ]—**न्यायात् च**—आणि न्यायानेहि तेच ठरते. ( तो न्यायच दाखवितात-) —**सर्वसंकल्पसंन्यासे कश्चित् स्पन्दितुं अपि न हि शक्तः**—सर्व संकल्पांचा त्याग केल्यावर कोणी नुस्ते स्पंदन—हालचाल करण्यासहि समर्थ नसतो, हे सुषुप्त्यवस्थेत वगैरे प्रसिद्धच आहे. [ संकल्पाच्या अभावीं प्राणी नुस्ती हालचाल—इकडचा हात तिकडे करण्यासहि जर समर्थ नसतो तर संकल्पाच्या अभावीं तो नित्य-नैमित्तिकादि कर्में कशी करणार ? ती तर दूरच राहिली, हे सांगण्यासाठीं भाष्यांत ' अपि ' हा शब्द योजला आहे. असो; याप्रमाणें श्रुति-स्मृति-न्यायानें सिद्ध झालेल्या अर्थाचा उपसंहार करितात-]—**तस्मात् सर्वसंकल्पसंन्यासी इति वचनात् सर्वान् कामान् च सर्वाणि कर्माणि भगवान् त्याजयति**—म्हणून ' सर्वसंकल्पसंन्यासी ' या वचनावरून सर्व काम व सर्व कर्में यांचा त्याग भगवान् करवीत आहेत. ४.

## उद्धरेदात्मनाऽऽत्मानं नात्मानमवसादयेत् ।
## आत्मैव ह्यात्मनो बन्धुरात्मैव रिपुरात्मनः ॥५॥

**अन्वयार्थ—आत्मना**—आत्म्याने—**आत्मानं**—आत्म्यास—**उद्धरेत्**—उद्धरावे, संसारसागरातून वर काढावे—**आत्मानं**—आत्म्याला—**न अवसादयेत्**—अधोगतीस पोचवूं नये.—**हि**—कारण—**आत्मा एव**—स्वतः-आत्माच—**आत्मनः**—आपला-आत्म्याचा—**बन्धुः**—बंधु आहे व—**आत्मा एव**—आत्माच-आपणच—**आत्मनः**—आत्म्याचा-आपला—**रिपुः**—शत्रु आहे. ५.

**यदैवं योगारूढस्तदा तेनाऽऽत्माऽऽत्मनोद्धृतो भवति संसारादनर्थजातादत—उद्धरेत्संसारसागरे निमग्नमात्मनाऽऽत्मानं तत उदूर्ध्वं हरेदुद्धरेद्योगारूढतामापादयेदित्यर्थः । नाऽऽत्मानमवसादयेन्नाधो नयेन्नाधो गमयेत् । आत्मैव हि यस्मादात्मनो बन्धुः । न ह्यन्यः कश्चिद्बन्धुर्यः संसारमुक्तये भवति । बन्धुरपि तावन्मोक्षं प्रति प्रतिकूल एव स्नेहादिबन्धनायतनत्वात्तस्माद्युक्तमवधारणमात्मैव ह्यात्मनो बन्धुरिति । आत्मैव रिपुः शत्रुर्योऽन्योऽपकारी बाह्यः शत्रुः सोऽप्यात्मप्रयुक्त एवेति युक्तमेवावधारणमात्मैव रिपुरात्मन इति ॥ ५ ॥**

**भाष्यार्थ**—( आतां योगारूढ झाल्यानें काय होतें तें सांगतात- )—**यदा एवं योगारूढः तदा तेन आत्मा आत्मना अनर्थजातात् संसारात् उद्धृतः भवति**—ज्यावेळीं याप्रमाणें साधक योगारूढ होतो, तेव्हां त्यानें आत्मा आत्म्याच्या-योगानें सर्व अनर्थरूप अशा संसारांतून वर काढला आहे, असें होतें,—**अतः**—म्हणून—**उद्धरेत्-संसारसागरे निमग्नं आत्मानं आत्मना ततः उत्-ऊर्ध्वं हरेत्-उद्धरेत्-योगारूढतां अपादयेत् इत्यर्थः**—उद्धार करावा. म्ह० संसारसागरांत बुडालेल्या आत्म्याला आत्म्यानेंच त्यांतून ( उत्- ) वर ( हरेत्- ) हरण करावें. योगारूढतेला पोंचवावें, त्याला योगारूढ करावें, असा याचा भावार्थ.—**आत्मानं न अवसादयेत्-न अधः नयेत्-न अधः गमयेत्**—आत्म्याला अवसन्न-नष्ट करूं नये. त्याला अधोगतीला नेऊं नये. त्याला खालीं पोचवूं नये. [ त्याचा अधःपात होईल असें करूं नये. दृष्ट व अदृष्ट उपायांनीं योगारोहण अवश्य करावें, हें सांगण्यासाठीं योगारोहण हा मुक्तीचा हेतु आहे व त्याच्या उलट अवस्था अधःपाताचें निमित्त आहे, असें येथें सांगितलें आहे. आत्म्याला योगारूढ करणे हाच संसारसागरांतून त्याचा उद्धार आहे व तसें न करणें हाच अधःपात आहे. योगप्राप्तीविषयीं अनास्था केव्हांच करूं नये, योगप्राप्तीच्या उपायाचें-निष्काम कर्माचे अनुष्ठान केल्यास योग सिद्ध होत नाहीं. योगाच्या अभावीं संसाराचा परिहार होऊं शकत नाहीं. त्यामुळें आत्म्याला अधोगतीला नेल्यासारखें होतें. अहोपण, संसारसागरांत निमग्न झालेल्या आत्म्याचा उद्धार त्याचा बंधु करील, असें कोणी म्हणेल तर सांगतात- ]—**हि-यस्मात् आत्मा एव आत्मनः बन्धुः**—कारण आत्माच आत्म्याचा बंधु आहे.—**अन्यः कश्चित् बन्धुः न अस्ति यः संसारमुक्तये भवति**—दुसरा कोणी बंधु नाहीं कीं, जो संसारांतून मुक्त करील.—**बन्धुः अपि तावत् मोक्षं प्रति प्रतिकूलः एव**—बंधुहि खरोखर मोक्षाला प्रतिकूलच असतो.—**स्नेहादिबन्धनायतनत्वात्**—कारण बंधु-आप्त वगैरे हे सर्व स्नेहादि बंधनाचीं स्थानें आहेत. [ स्त्री-पुत्र-मित्र-आप्त वगैरे प्रीति, अनुकूल वर्तन इत्यादिकांच्या योगानें मोक्षाला विघ्न करीत असतात. ]—**तस्मात् 'आत्मैव हि आत्मनो बंधुः' इति अवधारणं युक्तं एव**—म्हणून आत्माच आत्म्याचा बंधु आहे, असें जें अवधारण-निश्चय केला आहे तो युक्तच आहे.—**आत्मा एव रिपुः-शत्रुः**—व आत्माच ( आत्म्याचा ) रिपु-शत्रु आहे. ( अहोपण, अपकार करणारा शत्रु आत्म्याहून निराळा असतो, हें प्रसिद्ध आहे ! उत्तर- )—**यः अन्यः अपकारी-बाह्यः शत्रुः सः अपि आत्मप्रयुक्तः एव**—जो दुसरा उपकार करणारा बाह्य शत्रु असतो तोहि आत्मप्रयुक्तच आहे. [ त्याचेंहि प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष कारण आपणच असतों. ]—**इति 'आत्मैव रिपुरात्मनः' इति युक्तं एव अवधारणं**—त्यामुळें 'आत्माच आत्म्याचा शत्रु ' हें अवधारण युक्तच आहे. ५.

**बन्धुरात्मात्मनस्तस्य येनात्मैवात्मना जितः ।**
**अनात्मनस्तु शत्रुत्वे वर्तेतात्मैव शत्रुवत् ॥ ६ ॥**

**अन्वयार्थ—येन**—ज्या पुरुषानें—**आत्मा एव**—शरीरेंद्रियसमुदायच—**आत्मना**—स्वतः—**जितः**—जिंकलेला असतो—**तस्य आत्मनः**—त्याचा म्हणजे स्वतःचा—**आत्मा**—आत्मा—**बंधुः**—हितकर्ता आहे.—**तु**—परंतु—**अनात्मनः**—ज्यानें शरीरेंद्रियांना जिकलेलें नसतें, त्या अनात्म्याचा—**आत्मा एव**—आत्माच—**शत्रुवत्**—शत्रूप्रमाणें—**शत्रुत्वे**—शत्रुत्व करण्यामध्यें—**वर्तेत**—तत्पर राहतो. ६

**आत्मैव बन्धुरात्मैव रिपुरात्मन इत्युक्तं तत्र किंलक्षण आत्मनो बन्धुः किंलक्षणो वाऽऽत्मनो रिपुरित्युच्यते—बन्धुरात्माऽऽत्मनस्तस्य तस्याऽऽत्मनः स आत्मा बन्धुर्येनात्मनाऽऽत्मैव जित आत्मा कार्यकरणसंघातो येन वशीकृतो जितेन्द्रिय इत्यर्थः। अनात्मनस्त्वजितात्मनस्तु शत्रुत्वे शत्रुभावे वर्तेताऽऽत्मैव शत्रुवद्यथाऽनात्मा शत्रुरात्मनोऽपकारी तथाऽऽत्माऽऽत्मनोऽपकारे वर्तेतेत्यर्थः ॥ ६ ॥**

**भाष्यार्थ—आत्मा एव बन्धुः आत्मा एव रिपुः आत्मनः इति उक्तं**—आत्माच बंधु व आत्माच आत्म्याचा रिपु असें वर सांगितले.—**तत्र किंलक्षणः आत्मनः बन्धुः किंलक्षणः वा आत्मनः रिपुः इति उच्यते**—त्यांपैकी कोणत्या स्वरूपाचा आत्मा आत्म्याचा बंधु व कोणत्या स्वरूपाचा आत्मा आत्म्याचा शत्रु आहे तें ' बंधुरात्मा० ' या श्लोकानें सांगितले जाते.—' **बंधुः आत्मा आत्मनः तस्य** '—( म्हणजे )—**तस्य आत्मनः सः आत्मा बंधुः**—त्या आत्म्याचा तो आत्मा बंधु आहे. ( तो कोणता ? उत्तर-)—**येन आत्मना आत्मा एव जितः**—ज्या आत्म्यानें आत्माच जिकला आहे.—**आत्मा-कार्यकरणसंघातः येन वशीकृतः-जितेन्द्रियः इत्यर्थः**—आत्मा म्ह० शरीरेंद्रियसंघात ज्यानें वश केलेला आहे, जो जितेंद्रिय आहे, असा याचा भावार्थ. [ज्यानें शरीरेंद्रियसंघाताला आपल्या अधीन ठेवलें आहे, तो जितेंद्रिय आत्मा त्या आत्म्याचा बंधु आहे. कारण ज्यानें शरीरेंद्रियसमूहाला आपल्या स्वाधीन ठेवले त्याच्या चित्तांत विक्षेपाचा अभाव असतो. त्यामुळें त्याच्या चित्ताचें समाधान संभवतें. म्हणून तो आत्म्याचा बंधु म्ह० हितकर्ता होतो. ]—**तु अनात्मनः तु अजितात्मनः शत्रुत्वे-शत्रुभावे आत्मा एव शत्रुवत् वर्तेत**—पण अनात्म्याच्या म्ह० ज्यानें आपल्या शरीरेंद्रियसंघाताला स्वाधीन ठेवले नाही, त्याच्या शत्रुत्वांत-शत्रुभावांत आत्माच शत्रूप्रमाणे वर्तन करील.—**यथा अनात्मा शत्रुः आत्मनः अपकारी तथा आत्मा आत्मनः अपकारे वर्तेत इत्यर्थः**—जसा अनात्मा-बाह्य शत्रु आत्म्याला अपकार करणारा असतो, तसा आत्माच आत्म्याच्या अपकारामध्यें तत्पर राहील. [ पण ज्यानें शरीरेंद्रियसंघाताला आपल्या स्वाधीन ठेवलेलें नसतें त्याच्या चित्तांत पुनः विक्षेप होतो. त्यामुळें आत्म्यामध्यें चित्ताचें समाधान संभवत नाहीं, म्हणून अजितेंद्रिय आत्मा हाच आत्म्याचा शत्रु आहे. कारण तो प्रसिद्ध बाह्य शत्रूप्रमाणें आपल्यालाच अपकार करतो. नीलकंठ-' आत्मा ' म्ह० मन, ' आत्मना ' म्ह० मनसा,-मनानें 'अनात्मनः'-ज्यानें आपलें चित्त स्वाधीन ठेवलेलें नाहीं, असा अर्थ करितात. मधुसूदनसरस्वती-'आत्मा' म्ह० शरीरेंद्रियसंघात-देह,'आत्मना'-

विवेकयुक्त मनानें, 'आत्मनः'–स्वतःचा–आत्म्याचा, असा करितात. भाष्योत्कर्षदीपिकाकार –'आत्मनः'- जीवाचा, 'आत्मा'–अन्तःकरण हाच बंधु. 'आत्मना'–अन्तःकरणानें, 'आत्मा' –शरीरेंद्रियसमूह, असा करितात. शंकरानन्द–येन 'आत्मना'–ज्या विवेकवैराग्ययुक्त आत्म्यानें 'आत्मा'–शरीरेंद्रियसंघात जिकलेला असतो 'तस्य आत्मनः'–त्या संसारी आत्म्याचा तो विवेकी आत्मा बंधु आहे, इत्यादि करितात. मध्वाचार्य–आत्मा म्ह० मन, आत्मनः म्ह० जीवाचा, आत्मना म्ह० मनानें, आत्मानं–जीवाला, आत्मा एव म्ह० मन इत्यादि अर्थ करितात. ते म्हणतात–" जीवाचा शत्रु व मित्र मनच आहे. " रामानुजाचार्य–" येन–ज्या पुरुषाने, आत्मना–स्वतःच, आत्मा एव–आपलें मन जिकलें त्याचे आत्मा–तें मनच बंधु आहे. " इत्यादि म्हणतात. ज्ञानेश्वरमहाराज–' अहंकार सोडल्यावर आपणच आपला बंधु होतो, व अहंकार ठेवल्यास कोशकार कीटाप्रमाणें आपणच आपला शत्रु होतो " इत्यादि म्हणतात. तथापि या सर्व टीकाकारांचा ' अनासक्त मनानें संसाराची निवृत्ति करावी ' हा एकच आशय आहे. ६. ]

जितात्मनः प्रशान्तस्य परमात्मा समाहितः ।
शीतोष्णसुखदुःखेषु तथा मानापमानयोः ॥ ७ ॥

**अन्वयार्थ—जितात्मनः**—ज्यानें शरीरेंद्रियादि संघाताला जिकलें आहे व त्यामुळें—**प्रशान्तस्य**—ज्याचें अंतःकरण अत्यंत प्रसन्न झालें आहे अशा परमार्थ संन्याश्याचा—**परमात्मा**—साक्षी चिद्रूप आत्मा—**समाहितः**—साक्षात् आत्मभावानें राहतो. त्याचप्रमाणें—**शीतोष्णसुखदुःखेषु**—शीत-उष्ण-सुख-दुःख इत्यादि द्वंद्वांच्या वेळीं—**तथा**—तसेंच—**मानापमानयोः**—मान व अपमान झाल्यावेळीं सम असावें. ७

**जितात्मन इति । जितात्मनः कार्यकरणादिसंघात आत्मा जितो येन स जितात्मा तस्य जितात्मनः प्रशान्तस्य प्रसन्नान्तःकरणस्य सतः संन्यासिनः परमात्मा समाहितः साक्षादात्मभावेन वर्तत इत्यर्थः । किंच शीतोष्णसुखदुःखेषु तथा मानेऽपमाने च मानापमानयोः पूजापरिभवयोः ॥ ७ ॥**

**भाष्यार्थ**—शरीरेंद्रियसंघाताला ज्यानें जिकलें आहे, त्याचा आत्माच बंधु कसा तें —' **जितात्मनः० ' इति**—' जितात्मनः० ' या श्लोकानें सांगतात—**जितात्मनः-कार्यकरणादिसंघातः आत्मा जितः येन सः जितात्मा तस्य जितात्मनः** —शरीरेंद्रियांचा संघात हाच आत्मा, त्याला ज्यानें जिकलें आहे तो जितात्मा होय. त्या जितात्म्याचा—**प्रशान्तस्य-प्रसन्नान्तःकरणस्य सतः संन्यासिनः**—प्रशान्तात्म्याचा म्ह० ज्याचें अन्तःकरण प्रसन्न–स्वस्थ आहे, अशा असलेल्या संन्याश्याचा —**परमात्मा समाहितः-साक्षात् आत्मभावेन वर्तते इत्यर्थः**—परमात्मा समाहित असतो–साक्षात् आत्मभावानें असतो, असा भावार्थ. [ ज्यानें शरीरेंद्रियसमूहाला जिकलें आहे व ज्याचें चित्त प्रसन्न आहे अशा संन्याश्याच्या आत्मभावानें परमात्मा राहतो म्ह० चित्तांतील विक्षेप त्याला वारंवार झांकून टाकीत नाहींत, त्यामुळें तो

त्याच्या चित्तांत निरंतर प्रकट होतो. साक्षात् आत्मरूपानें अनुभवास येती. ]—**किंच शीतोष्णसुखदुःखेषु तथा माने अपमाने च मानापमानयोः-पूजापरिभवयोः ( समः स्यात् )**—इतकेंच नव्हे तर शीतोष्ण, सुखदुःख यांमध्यें, आणि मान व अपमान म्ह० पूजा व परिभव-तिरस्कार यांमध्यें तो सम असतो. [ म्हणजे शीत, उष्ण, सुख, दुःख, मान, अपमान यांच्या योगानें तो तत्त्वज्ञानापासून ढळविला जात नाहीं. ] ७.

**ज्ञानविज्ञानतृप्तात्मा कूटस्थो विजितेन्द्रियः।**
**युक्त इत्युच्यते योगी समलोष्टाश्मकाञ्चनः ॥ ८ ॥**

**अन्वयार्थ—ज्ञानविज्ञानतृप्तात्मा**—शास्त्रोक्त पदांच्या अर्थाचें ज्ञान व त्यांचा तसाच अनुभव घेणें, हें विज्ञान, यांच्यायोगानें ज्याचें चित्त अन्तःकरण तृप्त झालें आहे, त्यामुळें जो—**कूटस्थः**-अप्रकम्प्य,-मनांत न डगमगणारा व—**विजितेन्द्रियः**—जितेंद्रिय होतो—**समलोष्टाश्मकाञ्चनः**—ज्याला मातीचें ढेंकूळ, दगड व सोनें हीं सम झालीं आहेत अशा—**योगी**—योग्याला-विरक्ताला—**युक्तः**—योगारूढ-समाहित—**इति**—असें—**उच्यते**—म्हटले जातें. ८.

**ज्ञानेति । ज्ञानविज्ञानतृप्तात्मा ज्ञानं शास्त्रोक्तपदार्थानां परिज्ञानं, विज्ञानं तु शास्त्रतो ज्ञातानां तथैव स्वानुभवकरणं ताभ्यां ज्ञानविज्ञानाभ्यां तृप्तः संजातालंप्रत्यय आत्माऽन्तःकरणं यस्य स ज्ञानविज्ञानतृप्तात्मा कूटस्थोऽप्रकम्प्यो भवतीत्यर्थः । विजितेन्द्रियश्च । य ईदृशो युक्तः समाहित इति स उच्यते कथ्यते । स योगी समलोष्टाश्मकाञ्चनो लोष्टाश्मकाञ्चनानि समानि यस्य स समलोष्टाश्मकाञ्चनः ॥ ८ ॥**

**भाष्यार्थ—' ज्ञान० ' इति**—चित्तसमाधान हेंच विशिष्ट फल जर इष्ट असेल, तर कशा प्रकारच्या त्याला समाहित म्हटलें जातें तें ' ज्ञानविज्ञान० ' या श्लोकानें सांगतात—**ज्ञानविज्ञानतृप्तात्मा-ज्ञानं शास्त्रोकपदार्थानां परिज्ञानं**—ज्ञान व

---

१ या श्लोकावरील टीपेंत रहस्यकार म्हणतात-"गीतेंत अद्वैत मत प्रतिपादिलेलें नसून विशिष्टाद्वैत किंवा शुद्ध द्वैतच गीतेस ग्राह्य आहे, असें ज्याचें म्हणणें आहे ते परमात्मा असें एक पद न घेतां 'परं' आणि 'आत्मा' अशीं दोन पदें करून 'परं' हें 'समाहितः' याचें क्रियाविशेषण समजतात. हा अर्थ क्लिष्ट आहे. परंतु या उदाहरणावरून सांप्रदायिक टीकाकार आपल्या मताप्रमाणें गीतेची कशी ओढाताण करीत असतात हें लक्षांत येईल. " या पूर्वींहि रहस्यकारांनीं द्वैती सांप्रदायिकांच्या ओढाताणीचीं १।२ उदाहरणें दिलीं आहेत. पण त्यावरून सर्वच टीकाकार 'एका माळेचे मणी' असें समजणें चुकीचें होय. स्वतः रहस्यकारांनींहि कर्मयोगासाठीं पदोपदीं ओढाताण केली आहे. तिचीं अनेक उदाहरणें आम्हीं वर दाखविलीं आहेत व पुढेंहि दाखवूं. सर्वापेक्षां कमी ओढाताण करून गीतेचा अतिशय सयुक्तिक अर्थ प्रकटया श्रीशंकराचार्यांनींच केला आहे, अशी आमची प्रामाणिक समजूत आहे.

विज्ञान यांनीं ज्याचें अन्तःकरण तृप्त झालें आहे तो ज्ञानविज्ञानतृप्तात्मा, ज्ञान म्हणजे आत्मा, अनात्मा इत्यादि शास्त्रोक्त पदार्थांचें परिज्ञान म्ह० परोक्षज्ञान—**तु विज्ञानं शास्त्रतः ज्ञातानां तथा एव स्वानुभवकरणं**—आणि विज्ञान म्ह० शास्त्रावरून ज्ञात झालेल्या पदार्थांचें तसेंच स्वानुभवकरण–शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें आत्मादि पदार्थांचा साक्षात् अनुभव घेणें,—**ताभ्यां–ज्ञानविज्ञानाभ्यां तृप्तः–संजात·अलं·प्रत्ययः आत्मा–अन्तःकरणं यस्य सः ज्ञानविज्ञानतृप्तात्मा**—त्या ज्ञान-विज्ञानांच्या योगानें ज्याचा आत्मा म्ह० अन्तःकरण तृप्त झालें आहे, ज्याला आतां 'पुरे' असा प्रत्यय आला आहे, पूर्ण वैराग्य प्राप्त झालें आहे, तो ज्ञानविज्ञानतृप्तात्मा,—**कूटस्थः–अप्रकम्प्यः भवति इत्यर्थः**—कूटस्थ निर्विकार होतो, असा याचा भावार्थ —**च विजितेन्द्रियः**—आणि जितेंद्रिय होतो.—**यः ईदृशः सः युक्तः–समाहितः इति उच्यते**—जो अशा प्रकारचा असतो तो युक्त–समाहित असें म्हटला जातो. [ ज्याचें अन्तःकरण ज्ञान-विज्ञानांनीं तृप्त झालें आहे, त्यामुळें ज्याच्या मनांत हर्ष-विषाद-काम-क्रोध वगैरे विकार उत्पन्न होत नाहींत, ज्यानें इंद्रियें जिंकलीं आहेत, अशा योग्याला युक्त–समाहित म्हणतात. ]—**सः योगी समलोष्टाश्मकाञ्चनः–लोष्ट·अश्म·कांचनानि समानि यस्य सः समलोष्टाश्मकांचनः**—तो योगी समलोष्टाश्मकांचन असतो. ज्याला मातीचें ढेकूळ, दगड व सोनें हीं एकसारखींच आहेत तो समलोष्टाश्मकांचन होय. [ हे सर्व धर्म परमहंसपरिव्राजकाच्या ठिकाणींच संभवतात. कर्मयोगी गृहस्थाचे ठिकाणीं संभवत नाहींत. असें असतांनाहि येथील योगी म्हणजे कर्मयोगी असें म्हणणे सर्वथा अयोग्य आहे. ]. ८.

सुहृन्मित्रार्युदासीनमध्यस्थद्वेष्यबन्धुषु ।
साधुष्वपि च पापेषु समबुद्धिर्विशिष्यते ॥ ९ ॥

**अन्वयार्थ—सुहृत्·मित्र·अरि·उदासीन·मध्यस्थ·द्वेष्य·बन्धुषु**—प्रत्युपकाराची अपेक्षा न करणारा सुहृद्, स्नेही, शत्रु, कोणत्याहि पक्षाचा अभिनिवेश न धरणारा उदासीन, दोन्ही परस्पर विरुद्ध पक्षांचे हित इच्छिणारा मध्यस्थ, अप्रिय असलेला, व संबंधी या सर्वांतील—**साधुषु**—शास्त्रानुसार वर्तन करणारे—**अपि च**—आणि त्याचप्रमाणें—**पापेषु**—शास्त्रनिषिद्ध आचरण करणारे यांमध्ये—**समबुद्धिः**—समान बुद्धि ठेवणारा, त्या सर्वांकडे समान दृष्टीनें पाहणारा—**विशिष्यते**—उत्तम होय.

**किंच—सुहृदित्यादिश्लोकार्धमेकं पदम् । सुहृदिति प्रत्युपकारमनपेक्ष्योपकर्ता । मित्रं स्नेहवान् । अरिः शत्रुः । उदासीनो न कस्यचित्पक्षं भजते । मध्यस्थो यो विरुद्धयोरुभयोर्हितैषी । द्वेष्य आत्मनोऽप्रियः । बन्धुः संबन्धीत्येतेषु साधुषु शास्त्रानुवर्तिष्वपि च पापेषु प्रतिषिद्धकारिषु सर्वेष्वेतेषु समबुद्धिः कः किंकर्मेत्यव्यापृतबुद्धिरित्यर्थः । विशिष्यते विमुच्यत इति वा पाठान्तरम् । योगारूढानां सर्वेषामयमुत्तम इत्यर्थः ॥ ९ ॥**

**भाष्यार्थ—किं च**—(योगारूढाचें प्रशस्तत्व मानून) योगाचें दुसरें अंग 'सुहृद्०' इत्यादि श्लोकानें दाखवितात—**सुहृदित्यादिश्लोकार्धं एकं पदं**—'सुहृद्०' इत्यादि या श्लोकाचें पाहिलें अर्ध हें एकच सामासिक पद आहे.—**सुहृद् इति प्रत्युपकारं अनपेक्ष्य उपकर्ता**—सुहृद् म्ह० प्रत्युपकाराची अपेक्षा न करितां उपकार करणारा, —**मित्रं-स्नेहवान्**—मित्र म्ह० स्नेहवान्-प्रेम करणारा,—**अरिः-शत्रुः**—अरि म्ह० शत्रु-परोक्ष अपकार करणारा,—**उदासीनः-न कस्यचित् पक्षं भजते**—उदासीन म्ह० कोणाचाच पक्ष न घेणारा,—**मध्यस्थः यः विरुद्धयोः उभयोः हितैषी**—मध्यस्थ म्ह० जो परस्पर विरुद्ध असलेल्या दोघांचें हित इच्छितो तो,—**द्वेष्यः-आत्मनः अप्रियः**—द्वेष्य म्ह० आपल्याला प्रत्यक्ष अप्रिय वाटणारा,—**बन्धुः-संबंधी**—व बंधु म्ह० संबंधी—**इत्येतेषु साधुषु-शास्त्रानुवर्तिषु अपि च पापेषु-प्रतिषिद्धकारिषु**—असे हे साधु म्ह० शास्त्रानुवर्ती व पापी म्ह० निषिद्ध आचरण करणारे यांमध्यें—**सर्वेषु एतेषु समबुद्धिः-कः किंकर्मा इति अव्यापृतबुद्धिः इत्यर्थः**—या सर्वांमध्यें समबुद्धि म्ह० हा कोण, याचे कर्म काय आहे, याविषयीं ज्याची बुद्धि विचार करीत नाहीं, असा याचा भावार्थ.—**विशिष्यते -विमुच्यते इति वा पाठान्तरं**—विशिष्ट आहे, किंवा विमुक्त केला जातो, असा दुसरा पाठ आहे.—**सर्वेषां योगारूढानां अयं उत्तमः इत्यर्थः**—सर्व योगारूढांमध्यें हा उत्तम आहे, असा याचा भावार्थ. [ शास्त्रानुसार वर्तन करणारे किंवा निषिद्धाचरण करणारे जे सुहृद्-मित्रादि त्यांतील हा कोणत्या जातीचा, गोत्राचा आहे, हा आपला कोण, हा आपल्याशीं कसा व्यवहार करितो, इत्यादि कांहीं विचार न करितां सर्वांच्या ठिकाणीं समान वृत्ति ठेवणारा योगारूढ सर्वांत श्रेष्ठ होय. इष्ट-अनिष्ट, स्वकीय-परकीय व सदाचारी-दुराचारी यांना एकसारखेच समजणे, त्यांच्याविषयीं चित्तवृत्ति एकसारखी ठेवणें, हें योगारूढाचें उत्तम लक्षण होय. ] ९.

## योगी युञ्जीत सततमात्मानं रहसि स्थितः ।
## एकाकी यतचित्तात्मा निराशीरपरिग्रहः ॥ १० ॥

**अन्वयार्थ—योगी**—ध्यानाचा अभ्यास करणारा योगी—**रहसि स्थितः**—एकांतांत बसलेला—**एकाकी**—एकटाच—**यतचित्तात्मा**—ज्यानें आपलेंचित्त व देह यांचें नियमन केलें आहे असा—**निराशीः**—तृष्णाशून्य—**अपरिग्रहः**—व सर्वपरिग्रहरहित—(**सन्**—असा होत्साता त्यानें)—**आत्मानं**—अन्तःकरणाला—**सततं**—निरंतर—**युञ्जीत**—समाहित करावें. त्यानें चित्ताला शांत-स्थिर करावें. १०.

**अत एवमुत्तमफलप्राप्तये—योगी ध्यायी युञ्जीत समादध्यात्सततं सर्वदाऽऽत्मानमन्तःकरणं रहस्येकान्ते गिरिगुहादौ स्थितः सन्नेकाक्यसहायः । रहसि स्थित एकाकी चेति विशेषणात्संन्यासं कृत्वेत्यर्थः । यतचित्तात्मा चित्तमन्तःकरणमात्मा देहश्च संयतौ**

यस्य स यतचित्तात्मा निराशीर्वीततृष्णोऽपरिग्रहश्च परिग्रहरहित इत्यर्थः । संन्यासित्वेऽपि त्यक्तसर्वपरिग्रहः सन्युञ्जीतेत्यर्थः ॥ १० ॥

**भाष्यार्थ—अतः एवं उत्तमफलप्राप्तये**—पूर्वोक्त विशेषणांनीं युक्त असलेला योगारूढ सर्वांत श्रेष्ठ असल्यामुळें अशाप्रकारचें उत्तम फल प्राप्त व्हावें, म्हणून योगानुष्ठानाविषयीं प्रयत्न करावा, असें 'योगी०' या श्लोकानें सांगतात. ( मीमांसेच्या भाषेंत हेंच-अंगांच्या कथनानंतर अंगी-प्रधानाचें विधान करितात-असें सांगतां येईल- )—**योगी-ध्यायी आत्मानं-अन्तःकरणं रहसि-एकान्ते-गिरिगुहादौ एकाकी -असहायः स्थितः सन् सततं-सर्वदा युञ्जीत-समादध्यात्**—योगी म्ह० ध्यायी-ध्यान करणारानें आत्म्याला म्ह० अन्तःकरणाला एकान्तांत-पर्वताची गुहा इत्यादि विविक्तस्थानीं एकटाच-कोणत्याहि साह्यकर्त्यावांचून स्थित होऊन सतत-सर्वदा युक्त-समाहित करावें.—**रहसि स्थितः एकाकी च इति विशेषणात् संन्यासं कृत्वा इत्यर्थः**—'एकांतांत स्थित झालेला व एकाकी,' असें विशेषण असल्यामुळें संन्यास करून, असा याचा भावार्थ.—**यतचित्तात्मा-चित्तं-अन्तःकरणं च आत्मा-देहः संयतौ यस्य सः यतचित्तात्मा**—चित्त म्ह० अन्तःकरण व आत्मा म्ह० देह. ज्याचें अन्तःकरण व देह हीं दोन्हीं संयत-उत्तमप्रकारें नियमित केलेलीं असतात तो यतचित्तात्मा होय.—**निराशीः-वीततृष्णः**—निराशी म्ह० तृष्णारहित, —**च अपरिग्रहः-परिग्रहरहितः इत्यर्थः**—आणि अपरिग्रह म्ह० परिग्रहरहित, असा भावार्थ.—**संन्यासित्वे अपि त्यक्तसर्वपरिग्रहः सन् युञ्जीत इत्यर्थः**—संन्यासित्व जरी असलें, तरी सर्वपरिग्रहाचा त्याग करून चित्ताला समाहित करावें, असा याचा भावार्थ. [ एकांतांत, एकटें बसून, सर्व तृष्णा व परिग्रह टाकून, सतत योगाभ्यास करावा, असें येथें स्पष्ट ह्मटलेलें असल्यामुळें हें योगाभ्यासाचें विधान कर्मयोग्यासाठीं नाहीं, हें उघड होतें. ] १०.

---

१ तथापि रहस्यकार येथेंहि बिचाऱ्या कर्मयोग्यालाच खेंचून आणून एकान्त दाखवीत आहेत. ते या श्लोकाच्या अवतरणांत "आतां हा योग सिद्ध होण्यास साधन कोणतें याचें निरूपण करितात." असें म्हणून श्लोकाचा अर्थ "जो योगी म्ह०कर्मयोगी आहे त्यानें एकांतांत एकटें राहून चित्त व आत्मा आंवरून, कोणतीहि काम्य वासना न ठेवितां, परिग्रह म्ह० पाश सोडून, सतत आपल्या योगाभ्यासास लागावें." असा करितात. टीपेंत त्याचें स्पष्टीकरणहि असें केलें आहे—"'युंजीत-या पदानें पातंजल सूत्रांतील योग या ठिकाणीं विवक्षित आहे हें पुढील श्लोकांवरून स्पष्ट होतें, तथापि कर्मयोग प्राप्त करून घेऊं इच्छिणाऱ्या पुरुषानें आपलें सर्व आयुष्य पातंजल योगांत घालवावें, असा याचा अर्थ नाहीं. कर्मयोगांत लागणारी साम्यबुद्धि संपादन करण्यास साधन म्हणून पातंजल योग या अध्यायांत वर्णिला आहे, व एकान्तवासहि तेवढ्यापुरताच होय." रहस्यकारांचें हें म्हणणें ऐकून खरोखर हंसूं येतें. कर्मयोग सिद्ध होण्यास साधन काय तर पातंजल योग ! पातंजल योगाचें स्वरूप काय तर चित्तवृत्तिनिरोध. (पातंजलदर्शन पा. १ सू. २) त्या साधनानें कर्मयोग सिद्ध होणार!

पण सर्वसंकल्प व सर्वकाम अशेषतः टाकल्यावर कर्माचरणाचा जितका संभव तितकाच चित्तवृत्तिनिरोधानंतर त्याचा संभव आहे!! तथापि रहस्यकारांनी रहस्यांत नुस्त्या कर्मयोगाचा विचार केला आहे, संभवासंभवाचा फारसा विचारच केलेला नाहीं. पूर्वोत्तर विरोध जेथें तेथें आहेच. एकदा म्हणतात—"कर्मयेग सिद्ध होण्याचें साधन पातंजल योग आहे" पण पुनः लागलेंच म्हणतात—"जो योगी म्ह० कर्मयोगी आहे त्यानें... योगाभ्यासास लागावें." मग यालाहि 'अन्योन्यालंकार' म्हणावयाची त्यांची इच्छा असल्यास न कळे! कारण ६९६ पृष्ठावर त्यांनीं 'शमाचें कर्म कारण व कर्माचें शम कारण होतें,' या आपल्या अर्थाला अन्योन्यालंकार हें अलंकारशास्त्राधारें नांव दिलें आहे. 'यताचित्तात्मा' याचा अर्थ—'चित्त व आत्मा आंवरून' असा केला आहे. पण आत्म्याला कसे आंवरावयाचें? आत्मा कोणाला आंवरतां येणार? तो तर सर्वांचा प्रभु, नियंता, वास्तव येथील आत्मा म्ह० देह, असाच अर्थ केला पाहिजे व आचार्यादिकांनीं तसाच केला आहे. 'काम्यवासना' म्ह० काय? परिग्रह म्ह० पाश हा अर्थ कोठून आणला? 'सततं आत्मानं युञ्जीत' म्ह० सतत आपल्या योगाभ्यासास लागावें, हा अर्थ मुळाला सोडून आहे. 'आत्मानं' हें 'युञ्जीत' या क्रियापदाचे कर्म आहे. वास्तव 'अंन्तःकरणास समाहित करावें' असाच त्याचा अर्थ केला पाहिजे, पण 'सतत आपल्या योगाभ्यासास लागल्यावर' कर्मयोग कसा संभवेल? असें कोणी म्हणेल म्हणून ते "सर्व आयुष्य पातंजल योगांत घालवावे असा त्याचा अर्थ नव्हे०" इत्यादि म्हणत आहेत. पण कर्मयोगांत लागणारी साम्यबुद्धि पातंजल योगानें प्राप्त होते हा अपूर्व शोध आहे! कर्मयोगाला अपेक्षित असलेलें समत्व कोणतें तें गीतेनें पूर्वीच सांगितलें आहे. सिद्धि व असिद्धि यांना सम मानणें, हें कर्मयोगाला अपेक्षित असलेलें समत्व आहे व पातंजल योगाने प्राप्त होणारें समत्व चित्तवृत्तिनिरोधरूप आहे. वास्तव पातंजल योग कर्मयोगासाठीं आहे, ही कल्पना अशास्त्रीय, अनुभवाच्या विरुद्ध व गीतेलाहि असंमत आहे. 'सततं युंजीत' असें मुळांत आहे. पण रहस्यकार म्हणतात "त्याचा अर्थ जन्मभर असा नव्हे व एकान्तवासहि तेवढ्याच पुरता." कोण ही ओढाताण, ही माध्वांच्या ओढाताणींपेक्षां कमी प्रतीची आहे, असें म्हणण्यास कांहीं कारण दिसत नाहीं.

रहस्यकार पुढें आणखी म्हणतात—"प्रकृतिस्वभावामुळें पातंजलयोगातील समाधि कित्येकांस एकाच जन्मांत साध्य होणें शक्य नसतें. अशा पुरुषानें सर्व आयुष्य पातंजल योगांतच न घालवितां बुद्धि शक्य तितकी स्थिर करून कर्मयोगाचें आचरण करीत जावें, त्यानेंच अनेक जन्मांनी अखेर सिद्धि मिळते, असें याच अध्यायाचे शेवटीं भगवंतांनी सांगितलें आहे." पृ. ७००. पातंजलयोगांतील समाधि एकाच जन्मांत जरी साध्य न झाली, तरी अनेक जन्मांनीं ती साध्य होते नां? आणि पातंजल योगांत सर्व आयुष्य न घालवितां कर्मयोगाचें आचरण करीत राहिलें, तरी अनेक जन्मांनींच सिद्धि मिळते. मग पातंजलयोग न करतां कर्मयोगच करावा असा आग्रह कां? वस्तुतः या अध्यायांत कर्मयोगाचा कांहीं संबंधच नाहीं. पण रहस्यकारांच्या मनानें गीतेंत योग म्हणजे कर्मयोग व योगी म्ह० कर्मयोगी, असें जें एकदा घेतलें आहे, तें त्यांना पदोपदीं नडत आहे. पण 'अनेकजन्मसंसिद्धः' श्लो. ४५. हें म्हणणें ध्यानयोग्यासाठीं आहे, कर्मयोग्यासाठीं नाहीं, हे आम्ही त्या श्लोकाच्या व्याख्यानाच्या वेळीं दाखवूं.

**शुचौ देशे प्रतिष्ठाप्य स्थिरमासनमात्मनः ।**
**नात्युच्छ्रितं नातिनीचं चैलाजिनकुशोत्तरम् ॥११॥**
**तत्रैकाग्रं मनः कृत्वा यतचित्तेन्द्रियक्रियः ।**
**उपविश्यासने युञ्ज्याद्योगमात्मविशुद्धये ॥ १२ ॥**

**अन्वयार्थ—शुचौ देशे**—पवित्र स्थानीं—**आत्मनः**—स्वतःचें—**नात्युच्छ्रितं**—फार उंच नाहीं व—**नातिनीचं**—फार सखल नाहीं, असें व—**चैलाजिनकुशोत्तरं**—खालीं दर्भ, त्यावर हरणाचें किंवा व्याघ्राचें कातडें व त्यावर मऊ वस्त्र असें—**आसनं**—आसन—**स्थिरं**—स्थिर, अचल—**प्रतिष्ठाप्य**—स्थापून-मांडून—**तत्र आसने**—त्या आसनावर—**उपविश्य**—बसून—**यतचित्तेंद्रियक्रियः**—चित्त व इंद्रियें यांच्या क्रिया ज्यानें नियमित केल्या आहेत असा होऊन—**मनः एकाग्रं कृत्वा**—मनाला एकाग्र करून—**आत्मविशुद्धये**—चित्तशुद्धीसाठीं—**योगं**—ध्यान—**युञ्ज्यात्**—करावें. ११-१२.

**अथेदानीं योगं युञ्जत आसनाहारविहारादीनां योगसाधनत्वेन नियमो वक्तव्यः प्राप्तयोगलक्षणं तत्फलादि चेत्यत आरभ्यते । तत्राऽऽसनमेव तावत्प्रथममुच्यते—शुचौ शुद्धे विविक्ते स्वभावतः संस्कारतो वा देशे स्थाने प्रतिष्ठाप्य स्थिरमचलमात्मन आसनं नात्युच्छ्रितं नाप्यतिनीचं तच्च चैलाजिनकुशोत्तरं चैलमाजिनं कुशाश्चोत्तरे यस्मिन्नासने तदासनं चैलाजिनकुशोत्तरं पाठक्रमाद्विपरीतोऽत्र क्रमश्चैलादीनाम् ॥ ११ ॥**

**भाष्यार्थ**—( याप्रमाणें योग व कांहीं योगांगें यांचा उपदेश करून आचार्य पुढील संदर्भाचें तात्पर्य सांगतात-)—**अथ इदानीं योगं युञ्जतः आसन-आहार-विहारादीनां योगसाधनत्वेन नियमः वक्तव्यः**—योगाचें स्वरूप व त्याचीं कांहीं अंगें यांचें प्रदर्शन केल्यानंतर आतां योगाचा अभ्यास करणाऱ्या यतीला आसन, आहार, विहार, आसनादिकांचे अवांतर भेद, इत्यादिकांचा योगाच्या साधनत्वानें नियम सांगावा—**प्राप्तयोगलक्षणं तत्फलादि च इति अतः आरभ्यते**—ज्याला योग प्राप्त झाला आहे त्याचें लक्षण, त्याचें फल, योगाचें फल-सम्यग्ज्ञान, ज्ञानाचें फल-कैवल्य, योगभ्रष्टाचा आत्यंतिक नाश न होणें, इत्यादि सांगावें, म्हणून पुढील संदर्भ-भाग आरंभिला जातो.—**तत्र प्रथमं आसनं एव तावत् ( 'शुचौ०' इति ) उच्यते**—पण त्यांतील योगानुष्ठानाचें मुख्य अंग आसनच प्रथम 'शुचौ०' या श्लोकानें सांगितलें जातें. [ योगाभ्यास जो करावयाचा तो कसा करावा ? बसून मनःसमाधान करावें, कीं उभ्यानें, कीं चालतांना, कीं कांहीं काम करीत असतांना अशी शंका आली असतां 'आसीनः संभवात्' म्ह० चित्त समाधान बसूनच करावें. कारण बसूनच तें निर्विघ्नपणें होऊं शकतें, ब्रह्ममीमांसा अ. ४ पा. १ सू. ७ या न्यायानुसार अगोदर आसनच सांगतात-]

**—शुचौ-शुद्धे-स्वभावतः संस्कारतः वा विविक्ते देशे-स्थाने**—शुचि म्ह० शुद्ध-स्वभावतःच किंवा झाडणें, सारवणें, इत्यादि संस्कारांनीं पवित्र, अशा प्रदेशीं-स्थानीं **—स्थिरं-अचलं आत्मनः आसनं प्रतिष्ठाप्य**—स्थिर म्ह० अचल, असें आपलें स्वतःचें-दुसऱ्याचें नव्हे, आसन स्थापून-मांडून—**न अत्युच्छ्रितं-अतीव उच्छ्रितं न**—तें आसन अति उंच-फारच उंच नसावें,—**अतिनीचं अपि न**—अति नीचहि नसावें,—**तत् च चैलाजिनकुशोत्तरं-चैलं अजिनं च कुशाः उत्तरे यस्मिन् आसने तत् आसनं चैलाजिनकुशोत्तरं**—आणि तें चैलाजिनकुशोत्तर असावें. चैल-वस्त्र, अजिन-मृगचर्म, व दर्भ हे ज्यावर आहेत, तें आसन चैलाजिनकुशोत्तर होय. **—अत्र चैलादीनां पाठक्रमात् विपरीतः क्रमः**—येथे चैलादिकांचा पाठाच्या क्रमाहून उलट क्रम ठेवावा. म्ह० दर्भ खालीं, त्यावर अजिन व त्यावर वस्त्र अशा क्रमानें तीं हांतरावीं. [स्वभावतःच पवित्र असलेल्या किंवा संस्कारानें पवित्र केलेल्या जागी स्वतःचें स्थिर आसन-पाट, चौरंग वगैरे मांडून त्यावर दर्भ, अजिन व वस्त्र हांतरावें. तें लांकडी आसन, पडण्याची भीति वाटूं नये म्हणून, फार उंच नसावें. जमीन, दगड यांच्या संसर्गानें शरीरांतील वातादिकांचा क्षोभ होऊं नये म्हणून अति सखलहि नसावें.]

**प्रतिष्ठाप्य किम्—तत्र तस्मिन्नासन उपविश्य योगं युञ्ज्यात् । कथं, सर्वविषयेभ्य उपसंहृत्यैकाग्रं मनः कृत्वा यतचित्तेन्द्रियक्रियः, चित्तं चेन्द्रियाणि च चित्तेन्द्रियाणि तेषां क्रियाः संयता यस्य स यतचित्तेन्द्रियक्रियः । स किमर्थं योगं युञ्ज्यादित्याहाऽऽत्मविशुद्धयेऽन्तःकरणस्य विशुद्ध्यर्थमित्येतत् ॥ १२ ॥**

**भाष्यार्थ—प्रतिष्ठाप्य किं**—पण असें हें आसन सपादन करून व ते स्थापून पुढें काय करावें तें 'तत्रैकाग्रं०' या श्लोकानें सांगतात—**तत्र-तस्मिन् आसने उपविश्य योगं युञ्ज्यात्**—त्या आसनावर बसून योगाचा अभ्यास करावा. (योगाभ्यास करणाराची सर्व इतिकर्तव्यता म्ह० त्याने काय काय विधि केला पाहिजे तें प्रश्नपूर्वक सांगतात-)—**कथं**—तो कसा ?—**सर्वविषयेभ्यः उपसंहृत्य मनः एकाग्रं कृत्वा**—सर्व विषयांपासून मनाचा उपसंहार करून, त्याला एकाग्र करून—**यतचित्तेंद्रियक्रियः-चित्तं च इंद्रियाणि च चित्तेंद्रियाणि तेषां क्रियाः संयताः यस्य सः यतचित्तेंद्रियक्रियः**—चित्त व इंद्रिये हीं चित्तेंद्रिये, त्यांच्या क्रिया ज्याच्या संयमित आहेत-ज्यानें चित्त व इंद्रियें यांच्या सर्व क्रिया नियमित केल्या आहेत तो यतचित्तेंद्रियक्रिय होय. [म्ह० सर्व विषयांपासून मनाचा निग्रह करून त्याचें एकाच ध्येय विषयांत समाधान करणें व चित्त आणि इंद्रियें यांच्या बाह्य क्रियांचें संयमन करणें, या दोन्ही गोष्टी करून योगानुष्ठान करावें.]—**सः किमर्थं योगं युञ्ज्यात् इति आह**—त्यानें कशासाठीं योगाभ्यास करावा, तें सांगतात—**आत्म-**

---

१ आसन डळमळित असल्यास त्यावर बसून चित्तसमाधान करणाऱ्या योग्याचें चित्त समाहित होणार नाहीं, म्हणून 'अचल' हें विशेषण दिलें आहे.

**विशुद्धये-अन्तःकरणस्य विशुद्ध्यर्थं इति एतत्**—आत्मविशुद्धीसाठी म्ह० अन्तःकरणाच्या विशेष शुद्धीसाठीं योगाभ्यास करावा, असा याचा भावार्थ. १२.

**समं कायशिरोग्रीवं धारयन्नचलं स्थिरः ।**
**संप्रेक्ष्य नासिकाग्रं स्वं दिशश्चानवलोकयन् ॥१३॥**
**प्रशान्तात्मा विगतभीर्ब्रह्मचारिव्रते स्थितः ।**
**मनः संयम्य मच्चित्तो युक्त आसीत मत्परः ॥१४॥**

**अन्वयार्थ—कायाशिरोग्रीवं**—शरीराचा मध्यभाग, शिर व मान यांना—**समं**—सरळ व—**अचलं**—निश्चल—**धारयन्**—धारण करणारा व—**स्थिरः**—स्थिर होऊन—**स्वं नासिकाग्रं**—आपल्या नासिकेचे अग्र—**संप्रेक्ष्य (इव)**—जणुं काय चांगल्या प्रकारें पहात असल्याप्रमाणे राहून—**च दिशः**—व इकडे-तिकडे—**अनवलोकयन्**—न पाहणारा—**प्रशान्तात्मा**—ज्याचे अन्तःकरण अतिशय शांत आहे,—**विगतभीः**—भयरहित—**ब्रह्मचारिव्रते स्थितः**—ब्रह्मचारिव्रतामध्ये स्थित असा होऊन—**मनः**—मनाचें—**संयम्य**—संयमन करून—**मच्चित्तः**—मजमध्यें ज्याचें चित्त आहे असा—**युक्तः**—समाहित—**मत्परः**—मत्पर होऊन—**आसीत**—रहावें. १३-१४.

**बाह्यमासनमुक्तमधुना शरीरधारणं कथमित्युच्यते—समं कायशिरोग्रीवं कायश्च शिरश्च ग्रीवा च कायशिरोग्रीवं तत्समं धारयन्नचलं च समं धारयतश्चलनं संभवत्यतो विशिनष्टि अचलमिति । स्थिरः स्थिरो भूत्वेत्यर्थः । स्वं नासिकाग्रं संप्रेक्ष्य सम्यक्प्रेक्षणं दर्शनं कृत्वेवेतीवशब्दो लुप्तो द्रष्टव्यः । न हि स्वनासिकाग्रसंप्रेक्षणमिह विधित्सितं किं तर्हि चक्षुषोर्दृष्टिसंनिपातः । स चान्तःकरणसमाधानापेक्षो विवक्षितः । स्वनासिकाग्रसंप्रेक्षणमेव चेद्विवक्षितं मनस्तत्रैव समाधीयेत नाऽऽत्मनि । आत्मनि हि मनसः समाधानं वक्ष्यत्यात्मसंस्थं मनः कृत्वेति । तस्मादिवशब्दलोपेनाक्ष्णोर्दृष्टिसंनिपात एव संप्रेक्ष्येत्युच्यते । दिशश्चानवलोकयन्दिशां चावलोकनमन्तराऽकुर्वन्नित्येतत् ॥**

**भाष्यार्थ—बाह्यं आसनं उक्तं अधुना शरीरधारणं कथं इति उच्यते**—बाह्य आसन सांगितलें. आतां शरीरधारण कसें करावें तें 'समं०' या श्लोकानें सांगितलें जातें.—**समं कायशिरोग्रीवं-कायः च शिरः च ग्रीवा च काय-शि-**

---

१ रहस्यकार 'आत्मविशुद्धये' याचा 'आत्मशुद्ध्यर्थं' असा अगदी सरळ अर्थ करितात. पांचव्या अध्यायाच्या ११ व्या श्लोकांतील 'आत्मशुद्धये' याचा अर्थहि 'आत्मशुद्ध्यर्थं' असा केला आहे; हें वाचकांच्या लक्षांत असेलच. येथें 'आत्मशुद्धि' म्हणजे काय, वगैरे कांहीं सांगण्याच्या भानगडीत ते पडले नाहीत, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

**रो-ग्रीवं तत् समं धारयन्**—देह, शिर-मस्तक व मान-कायशिरोग्रीवं, त्यांना सम धारण करणारा [ काय म्ह० शरीराचा कंबरेपासून मानेपर्यंतचा मध्यभाग, मान व मस्तक यांना सम म्ह० सरळ धारण करणारा ]—**च अचलं**—आणि त्याला अचल धारण करणारा—**समं धारयतः चलनं संभवति अतः अचलं इति विशिनष्टि**—काय-शिरो-ग्रीवेला सरळ धारण करणाराचें चलन संभवतें म्हणून 'अचल' असें आणखीं एक विशेषण देत आहेत. [ त्यांना सरळ व अचल धारण करून असा याचा भावार्थ ]—**स्थिरः-स्थिरः भूत्वा इत्यर्थः**—स्थिर म्ह० स्थिर होऊन असा भावार्थ [ म्ह० शरीरेंद्रियांना विषयपरवश न होऊं देतां]—**स्वं नासिकाग्रं संप्रेक्ष्य-सम्यक् प्रेक्षणं-दर्शनं कृत्वा इव इति इवशब्दः लुप्तः द्रष्टव्यः**—आपलें नासिकाग्र उत्तम प्रकारें पाहून-जणुंकाय नासिकेच्या अग्राचें उत्तम प्रकारें प्रेक्षण-दर्शन करून ' संप्रेक्ष्य ' येथील ' इव-' ( जणुकाय ) हा शब्द लुप्त झाला आहे, असे समजावें. ( असें कां समजावयाचें ? नासिकाग्र दर्शनच योगाच्या अंगत्वानें येथें विहित आहे, असें कां मानूं नये ? उत्तर-)—**हि इह स्वनासिकाग्रसंप्रेक्षणं न विधित्सितं**—कारण येथें आपल्या नासिकाग्राचें संप्रेक्षण विधित्सित नाहीं. [ म्ह० स्वनासिकाग्रसंप्रेक्षणाचें विधान करण्याची येथें इच्छा नाहीं. ]—**किं तर्हि**—तर मग काय विधित्सित आहे ?—**चक्षुषोः दृष्टिसंनिपातः**—दोन चक्षूंच्या दृष्टीचा संनिपात-एकत्र संकोच विधित्सित आहे. [ दोन्ही डोळ्यांच्या दृष्टीचा संनिपात करावा, असे येथें विधान करावयाचें आहे. दृष्टीची प्रवृत्ति रूपादिविषयांकडे होऊं देऊं नये, तिचे निवारण करावें, असे येथें विवक्षित आहे. पण तो दृष्टिसंनिपात म्ह० विषयप्रवृत्तिराहित्य अनायासानें कसें सिद्ध होणार ? उत्तर-]—**सः च अन्तःकरणसमाधानापेक्षः विवक्षितः**—आणि तो अन्तःकरणाच्या समाधानाच्या अपेक्षेने विवक्षित आहे. [ म्ह० अन्तःकरणाचें समाधान व्हावें यासाठीं तो सांगावयाचा आहे. कारण चित्तसमाधान हे येथें प्राधान्यानें विवक्षित आहे. पण दृष्टि बाह्य विषयांत आसक्त झाल्यास चित्तसमाधानाचा भंग होण्याचा प्रसंग येईल, तो न यावा म्हणून तिला रूपादिकांपासून व्यावृत्त करून अन्तर्मुख करावें, हाच येथें आशय स्पष्ट दिसतो. म्हणून ' स्वं नासिकाग्रं संप्रेक्ष्य इव ' असा 'इव-'शब्द येथें लुप्त झाला आहे, असें समजावें. अहोपण, येथें ' स्वनासिकाग्र पाहून ' असें प्रत्यक्ष म्हटलेलें असतांना तो विवक्षित अर्थ नव्हे, असें कसें म्हणतां ? उत्तर-]—**स्वनासिकाग्रसंप्रेक्षणं एव विवक्षितं चेत् मनः तत्र एव समाधीयेत आत्मनि न**—स्वनासिकाग्रदर्शनच विवक्षित आहे असें जर म्हटलें तर मन तेथेंच समाहित होईल, आत्म्यामध्यें समाहित होणार नाहीं. पण—' **आत्मसंस्थं मनः कृत्वा** ' ( श्लो. २५ ) **इति आत्मनि हि मनसः समाधानं वक्ष्यति**—'मनाला आत्मसंस्थ करून ' या वचनानें भगवान् आत्म्यामध्यें मनाचें समाधान करावयास पुढें सांगणार आहेत.—**तस्मात् इवशब्दलोपेन अक्ष्णोः दृष्टिसंनिपातः एव संप्रेक्ष्य इति उच्यते**—म्हणून 'इव-'शब्दाच्या लोपानें दोन्ही नेत्रांच्या दृष्टीचा

संनिपात–विषयपराङ्मुखताच 'संप्रेक्ष्य' या शब्दानें सांगितली जात आहे.—**च दिशः अनवलोकयन्–दिशां च अवलोकनं अन्तरा अकुर्वन् इति एतत्**—आणि दिशांकडे न पाहणारा–दिशांचें अवलोकन मध्येंच न करणारा, असा याचा भावार्थ. [अशा रीतीनें त्यानें बसावें, असा पुढें याचा संबंध. मध्येंच इकडे तिकडे पाहणें हेंहि चित्तसमाधानाला प्रतिबंधक आहे, म्हणून त्याचा येथें निषेध केला आहे.] १३.

**किंच—प्रशान्तात्मा प्रकर्षेण शान्त आत्माऽन्तःकरणं यस्य सोऽयं प्रशान्तात्मा विगतभीर्विगतभयो ब्रह्मचारिव्रते स्थितो ब्रह्मचारिणो व्रतं ब्रह्मचर्यं गुरुशुश्रूषाभिक्षाभुक्त्यादि तस्मिन्स्थितस्तदनुष्ठाता भवेदित्यर्थः । किंच मनः संयम्य मनसो वृत्तीरुपसंहृत्येत्येत । मच्चित्तः मयि परमेश्वरे चित्तं यस्य सोऽयं मच्चित्तो युक्तः समाहित सन्नासीतोपविशेन्मत्परोऽहं परो यस्य सोऽयं मत्परः । भवति कश्चिद्रागी स्त्रीचित्तो न तु स्त्रियमेव परत्वेन गृह्णाति, किं तर्हि राजानं महादेवं वाऽयं तु मच्चित्तो मत्परश्च॥ १४ ॥**

**भाष्यार्थ**—( योगाभ्यास करणाराचीं आणखी विशेषणें-)—**किं च-प्रशान्तात्मा-प्रकर्षेण शान्तः आत्मा-अन्तःकरणं यस्य सः अयं प्रशान्तात्मा**—तसेंच, प्रशान्तात्मा- ज्याचा आत्मा–अन्तःकरण आधिक्यानें शान्त आहे, तो हा प्रशान्तात्मा [ अन्तःकरणाची शान्ति म्ह० राग-द्वेषादिदोषराहित्य व तिचा प्रकर्ष–आधिक्य म्हणजे रागादिकांच्या कारणाचीहि निवृत्ति ]—**विगतभीः-विगतभयः**—विगतभी म्ह० सर्वकर्मपरित्यागाविषयीं शास्त्रीय निश्चय झाल्यामुळें बुद्धीनें निःसंदिग्ध होणें, हेंच विगतभयत्व आहे. [ ज्याच्या मनांत ' आपण सर्वकर्मत्याग केला, पण त्यामुळें आपल्याला पातित्य तर प्राप्त होणार नाहीं, ' अशी भीति नसते, कारण आपण जे केलें आहे, किंवा करीत आहों तें शास्त्रसिद्ध आहे, असा त्याचा पूर्ण निश्चय झालेला असतो. ]—**ब्रह्मचारिव्रते स्थितः-ब्रह्मचारिणः व्रतं ब्रह्मचर्यं-गुरुशुश्रूषाभिक्षाभुक्त्यादि तस्मिन् स्थितः-तदनुष्ठाता भवेत् इत्यर्थः**—ब्रह्मचाऱ्याचें जें व्रत तें ब्रह्मचर्य, गुरुशुश्रूषा, भिक्षाभोजन, त्रिकालस्नान, शौच, आचमन इत्यादि, त्यांत स्थित झालेला म्हणजे त्या ब्रह्मचारिव्रताचें अनुष्ठान करणारा व्हावें, असा याचा भावार्थ.—**किं च**—आणि तसेंच—**मनः संयम्य-मनसः वृत्तीः उपसंहृत्य इति-एतत्**—मनाचा संयम करून, अन्तःकरणाच्या वृत्तींचा उपसंहार करून, चित्तवृत्तींचा निरोध करून योगनिष्ठ व्हावें, असा याचा भावार्थ.—**मच्चित्तः-मयि परमेश्वरे चित्तं यस्य सः अयं मच्चित्तः**—मज परमेश्वराचे ठिकाणीं ज्याचें चित्त आहे तो हा मच्चित्त होय.—**युक्तः-समाहितः सन् आसीत-उपविशेत्**—युक्त म्ह० समाहित होऊन त्या आसनावर बसावें. [ अर्थात् दुसऱ्या विषयांपासून मनोवृत्तींचा उपसंहार करून आत्म्यामध्येंच

---

१ रहस्यकार 'संप्रेक्ष्य नासिकाग्रं स्वं ' याचा अर्थ–आपल्या नाकाच्या शेंड्यावर नजर ठेवून–असा अगदीं सरळ करितात पण तो बरोबर कां नाहीं, तें भाष्य व भाष्यार्थ यांवरून वाचकांच्या लक्षांत येईल.

त्याचें नियमन केलें असतां ध्यान उत्तम प्रकारें होऊं शकतें, त्यामुळें मनोनिग्रह केल्यास ध्यानाचा अभ्यासहि संभवणार नाहीं, ही शंका व्यर्थ आहे, असा याचा भावार्थ. ]—**मत्परः-अहं परः यस्य सः अयं मत्परः**—मी ज्याला पर-श्रेष्ठ आहें तो हा मत्पर होय. [ पण साधक मच्चित्त झाल्याने मत्पर अनायासंच होतो, मग 'मत्पर' हें विशेषण पुनः कां दिलें आहे, तें सांगतात-]—**कश्चित् रागी स्त्रीचित्तः भवति तु स्त्रियं एव परत्वेन न गृह्णाति**—कोणी विषयी पुरुष स्त्रीचित्त असतो, पण स्त्रीलाच कांहीं श्रेष्ठ म्हणून समजत नाही,—**किं तर्हि राजानं महादेवं वा**—तर काय, राजाला किंवा महादेवाला श्रेष्ठ मानतो.—**तु अयं मच्चित्तः च मत्परः**—पण हा मच्चित्त व मत्पर असतो. (अन्तःकरणाची शुद्धि हें योगाचें अवांतर फल आहे.) १४.

**युञ्जन्नेवं सदात्मानं योगी नियतमानसः ।**
**शान्तिं निर्वाणपरमां मत्संस्थामधिगच्छति ॥ १५ ॥**

**अन्वयार्थ—एवं**—याप्रमाणें—**आत्मानं**—मनाला—**सदा युञ्जन्**—सतत समाधानयुक्त करणारा-सर्वदा मनाला समाहित करणारा—**योगी**—ध्यानी पुरुष -योगाभ्यासी—**नियतमानसः**—संयतचित्त होऊन—**निर्वाणपरमां**—मोक्ष हीच जिची निष्ठा आहे अशा व—**मत्संस्थां**—माझ्या अधीन असलेल्या-मद्रूप—**शान्तिं**—शांतीला—**अधिगच्छति**—प्राप्त होतो. १५.

**अथेदानीं योगफलमुच्यते—युञ्जन्समाधानं कुर्वन्नेवं यथोक्तेन विधानेन सदाऽऽत्मानं योगी नियतमानसो नियतं संयतं मानसं मनो यस्य सोऽयं नियतमानसः शान्तिमुपरतिं निर्वाणपरमां निर्वाणं मोक्षस्तत्परमा निष्ठा यस्याः शान्तेः सा निर्वाणपरमा तां निर्वाणपरमां मत्संस्थां मदधीनामधिगच्छति प्राप्नोति ॥ १५ ॥**

**भाष्यार्थ—अथ**—योगाचें स्वरूप, त्याचे अंगभूत आसनद्वय, त्याचा विशिष्ट कर्ता, इतकें सांगितल्यावर—**इदानीं**—आतां—**योगफलं उच्यते**—योगाचें परम फल सांगितलें जातें.—**एवं-यथोक्तेन विधानेन आत्मानं सदा युञ्जन्-समाधानं कुर्वन् योगी**—वर सांगितलेल्या आसनादि विधानानें मनाला सर्वदा युक्त -समाहित करणारा योगी-ध्यान करणारा संन्यासी—**नियतमानसः-नियतं-संयतं**

---

१ १०व्या श्लोकांत 'सततं' व येथें 'सदा' असे स्पष्ट शब्द आहेत. पण ते कर्मयोगाला प्रतिकूल असल्यामुळें रहस्यकार " जन्मच्या जन्म योगाभ्यासांत घालवावा असा या वर्णनाचा हेतु नाहीं. 'सदा' या पदानें दररोज २४ तास असा अर्थ घ्यावयाचा नाही. रोज घटिका घटिका यथाशक्ति हा अभ्यास करावा, एतढाच अर्थ विवक्षित आहे." इत्यादि म्हणतात. पण 'सततं' 'सदा' 'प्रयत्नात् यतमानः' इत्यादि पदें 'दीर्घकाल-नैरंतर्य-सत्कार-सेवितो दृढभूमिः' म्ह० दीर्घकाल, निरंतर, सत्कारपूर्वक-अनादरानें नव्हे-अभ्यास केला असतां योग दृढभूमि-सिद्ध-निश्चल-दृढ होतो, या योगसूत्राला (१-१४) अनुलक्षून योजिलीं आहेत. त्या अर्थी रहस्यकारांचें वरील स्पष्टीकरण अनुपपन्न आहे.

मानसं-मनः यस्य सः अयं नियतमानसः—नियत म्ह० अत्यंत नियमित केलेलें आहे मानस म्ह० मन ज्याचें तो हा नियतमानस होय, असा नियतमानस योगी —निर्वाणपरमां-निर्वाणं-मोक्षः तत्परमा निष्ठा यस्याः शान्तेः सा निर्वाणपरमा तां निर्वाणपरमां शान्तिं-उपरतिं—निर्वाण म्ह० मोक्ष, तोच ज्या शान्तीची परमा-निष्ठा आहे, ती निर्वाणपरमा शान्ति, त्या शान्तीला-उपरतीला, सर्वसंसारानिवृत्तीला ( पुनः ती कशी ? उत्तर-)—मत्संस्थां-मदधीनां अधिगच्छति -प्राप्नोति—माझ्यामध्ये उत्तम प्रकारें स्थित असलेली-माझ्या अधीन असलेली-मद्रूप-ब्रह्मस्वरूपावस्थानरूप शान्तीला प्राप्त होतो. १५.

## नात्यश्नतस्तु योगोऽस्ति न चैकान्तमनश्नतः ।
## न चातिस्वप्नशीलस्य जाग्रतो नैव चार्जुन ॥१६॥

**अन्वयार्थ—तु**—पण—**अत्यश्नतः**—जितकें हवें त्याहून अधिक अन्न खाणाऱ्या पुरुषाला—**योगः**—ध्यान-चित्तवृत्तीचा निरोध-योगाभ्यास—**न अस्ति**—होत नाहीं. —**च एकान्तं**—व अगदींच मुळींच—**अनश्नतः**—अन्न न खाणाऱ्या पुरुषालाहि—**(योगः) न (अस्ति)**—योग करतां येत नाहीं.—**अतिस्वप्नशीलस्य**—फार निजण्याचें ज्याचें शील आहे त्याला—**न च**—योगाभ्यास करतां येत नाहीं, व—**अर्जुन**—हे अर्जुना !—**जाग्रतः न एव**—अतिशय जागणाऱ्या पुरुषालाहि योग घडत नाहीं. १६.

**इदानीं योगिन आहारादिनियम उच्यते—नात्यश्नत आत्मसंमितमन्नपरिमाणमतीत्याश्नतो अत्यश्नतो न योगोऽस्ति, न चैकान्तमनश्नतो योगोऽस्ति "यदु ह वा आत्मसंमितमन्नं तदवति तन्न हिनस्ति, यद्भूयो हिनस्ति तद्यत्कनीयो न तदवति " इति श्रुतेः । तस्माद्योगी नाऽऽत्मसंमितादन्नादधिकं न्यूनं वाऽश्नीयात् । अथ वा योगिनो योगशास्त्रे परिपठितादन्नपरिमाणादतिमात्रमश्नतो योगो नास्ति उक्तं हि-"अर्धमशनस्य सव्यंजनस्य तृतीयमुदकस्य तु । वायोः संचरणार्थं तु चतुर्थमवशेषयेत्" इत्यादि परिमाणम् । तथा न चातिस्वप्नशीलस्य योगो भवति नैव चातिमात्रं जाग्रतो योगो भवति चार्जुन ॥१६॥**

**भाष्यार्थ—इदानीं योगिनः आहारादिनियमः उच्यते**—आतां योग्याच्या आहार-विहार-जागरण-झोंप घेणें इत्यादिकांविषयीं नियम सांगितला जातो—**नात्यश्नतः-आत्मसंमितं अन्नपरिमाणं अतीत्य अश्नतः-अत्यश्नतः**—आपल्याला अगदीं पुरेसें-संमित म्ह० आठ ग्रास वगैरे जें अन्नाचें परिमाण, त्याचें उल्लंघन करून अन्न भक्षण करणाऱ्या-अति अशन करणाऱ्या साधकाला—**योगः न अस्ति**—योग प्राप्त होत नाहीं.—**च एकान्तं अनश्नतः योगः न अस्ति**—आणि अगदीं मुळींच अन्न न खाणारालाहि योग साध्य होत नाहीं. ( आहारादिकांच्या नियमाविषयीं शतपथश्रुतीचें प्रमाण देतात-)—**'यत् उ ह वा आत्मसंमितं अन्नं तत् अवति'**—जें आपल्याला अगदीं परिमित अन्न असतें तें-तेवढेंच भक्षण केल्यास अन्नभोक्त्याला तें

धर्मानुष्ठानाची योग्यता प्राप्त करून देतें व धर्मानुष्ठानाच्या द्वारा अन्नभोक्त्याचें रक्षण करतें, —'**तत् न हिनस्ति**'—तें आत्मसंमित अन्न त्याच्या अनर्थाला कारण होत नाहीं.—'**यत् भूयः तत् हिनस्ति**'—जें अन्न परिमाणाहून अधिक खाल्लें जातें, तें भोक्त्याला पीडा देतें.—'**यत् कनीयः तत् न अवति ' इति श्रुते**—अशी श्रुति आहे. जें अन्न अगदींच थोडें असतें, तें धर्मानुष्ठानाची योग्यता देऊन रक्षण करण्यास समर्थ होत नाहीं. (म्हणून ध्यानयोगारूढ होऊं इच्छिणारानें अति अधिक व अति अल्प अन्न न खातां अगदीं परिमित-अन्न खावें,या श्रुतिसिद्ध अर्थाचें निगमन करितात-)—**तस्मात् योगी आत्मसंमितात् अन्नात् अधिकं न्यूनं वा न अश्नीयात्**—यास्तव योग्यानें आत्मसंमित अन्नाहून अधिक किंवा कमी अन्न खाऊं नये. ( ' नात्यश्नतः०' याच पहिल्या श्लोकार्धाचें दुसरें व्याख्यान-)—**अथ वा योगिनः योगशास्त्रे परिपठितात् अन्नपरिमाणात् अतिमात्रं अश्नतः योगः नास्ति**—अथवा योग्याला योगशास्त्रांत सांगितलेल्या अन्नाच्या परिमाणाहून पुष्कळ ( अधिक किंवा कमी ) अन्न खाणाराला योग साध्य होत नाहीं, (ते योगशास्त्रोक्त परिमाणच सांगतात-)—'**सव्यंजनस्य अशनस्य अर्धे**'—भाज्या-चटण्या-कालवण इत्यादि तोंडीं लावण्यांसह अन्नाचे अर्धे-[ म्ह० अन्नानें जठराचे दोन भाग भरावे ]—'**तु तृतीयं उदकस्य**'—पण तिसरा भाग उदकाचा [ जठराचा तिसरा भाग पाण्याने भरावा-]—'**तु वायोः संचरणार्थं चतुर्थं अवशेषयत्**'—आणि वायूच्या संचारासाठीं चवथा भाग रिकामा ठेवावा—**इत्यादि**[1] **परिमाणं उक्तं हि**—इत्यादि प्रमाण सांगितले आहे—**तथा**—ज्याप्रमाणें अगदीं अन्न न खाणाऱ्या किंवा अतिशय अन्न भक्षण करणाऱ्या पुरुषाला योग साध्य होत नाहीं, त्याचप्रमाणें—**अतिस्वप्नशीलस्य योगः न भवति**—अतिशय झोप घेण्याचें ज्याचें शील आहे त्याला योग साध्य होत नाहीं.—**च अर्जुन अतिमात्रं जाग्रतः योगः न एव भवति**—आणि हे पार्था! अतिशयच जागणाऱ्या पुरुषालाहि योग साध्य होत नाहींच. १६.

युक्ताहारविहारस्य युक्तचेष्टस्य कर्मसु ।
युक्तस्वप्नावबोधस्य योगो भवति दुःखहा ॥ १७ ॥

**अन्वयार्थ**—**युक्ताहारविहारस्य**—ज्याचा आहार-अन्नाचें परिमाण व विहार जाणें-येणे वगैरे परिमित असतें, त्याचा—**कर्मसु**—कर्मांमध्यें—**युक्तचेष्टस्य**—परिमित चेष्टा करणाऱ्या योग्याचा—**युक्तस्वप्नावबोधस्य**—झोप व जागणें हीं दोन्हीं ज्याचीं परिमित आहेत,त्याचा—**योगः**—योग—**दुःखहा**—सर्व संसारदुःखांचा घात करणारा—**भवति**—होतो. १७.

---

१ या आदिशब्दानें—' पूरयेदशनेनार्धं तृतीयं उदकेन तु । वायोः संचरणार्थाय चतुर्थं अवशेषयेत्-' हें वाक्य घ्यावें. याचाहि अर्थ वरच्यासारखाच आहे.

कथं पुनर्योगो भवतीत्युच्यते—युक्ताहारविहारस्याऽऽह्रियत इत्याहारोऽन्नं विहरणं विहारः पादक्रमस्तौ युक्तौ नियतपरिमाणौ यस्य तथा युक्तचेष्टस्य युक्ता नियता चेष्टा यस्य कर्मसु तथा युक्तस्वप्नावबोधस्य युक्तौ स्वप्नश्चावबोधश्च तौ नियतकालौ यस्य तस्य युक्ताहारविहारस्य युक्तचेष्टस्य कर्मसु युक्तस्वप्नावबोधस्य योगिनो योगो भवति दुःखहा दुःखानि सर्वाणि हन्तीति दुःखहा सर्वसंसारदुःखक्षयकृद्योगो भवतीत्यर्थः १७

**भाष्यार्थ**—( आहारादिकांविषयीं नियमित असणाराला योग साध्य होतो, असें सांगतात-)—**कथं पुनः योगः भवति इति उच्यते**—तर मग योग कसा साध्य होतो तें सांगितलें जातें.—**युक्ताहारविहारस्य-आह्रियते इति आहारः-अन्नं विहरणं-विहारः-पादक्रमः तौ युक्तौ नियतपरिमाणौ यस्य**—ज्याचें उदरांत आहरण केलें जातें तो आहार-अन्न, विहरण म्ह० विहार-पादक्रम-चालणें-फिरणें, ज्याचे ते दोन्ही-आहार-विहार युक्त म्ह० नियत परिमाणाचे आहेत-ज्याच्या आहार-विहाराचें परिमाण नियत आहे,(योग्याच्या आहाराचें नियत परिमाण वर सांगितलें आहे. एक योजनाहून अधिक चालूं नये, हें विहाराचें नियत परिमाण आहे.)—**तथा कर्मसु युक्तचेष्टस्य-युक्ता-नियता चेष्टा यस्य**—त्याचप्रमाणें कर्मामध्यें ज्याची चेष्टा -हालचाल युक्त-नियत आहे म्ह० ज्यानें वाणीचा वगैरे उत्तमप्रकारें निरोध केला आहे **—तथा युक्तस्वप्नावबोधस्य-युक्तौ स्वप्नः च अवबोधः च तौ नियतकालौ यस्य**—ज्याचें स्वप्न म्ह० निद्रा व अवबोध म्ह० जागें होणें हीं दोन्ही नियतकालीं होतात तो युक्तस्वप्नावबोध होय. [ रात्रीं अवशीं दहा घटिकापर्यंत जागणें, मध्यें दहा घटिका निजणें व पहाटें दहा घटिका पुनः जागणें हें झोंप व जागरण यांच्या कालाचे नियतपरिमाण आहे ]—**तस्य युक्ताहारविहारस्य कर्मसु युक्तचेष्टस्य युक्तस्वप्नावबोधस्य योगिनः**—त्या युक्ताहारविहार, कर्मामध्यें परिमित चेष्टा करणाऱ्या व योग्यकालीं निजून जागा होणाऱ्या योग्याचा—**योगः दुःखहा भवति**—योग दुःखहा होतो—**सर्वाणि दुःखानि हन्ति इति दुःखहा योगः सर्वसंसारदुःखक्षयकृत् भवति इत्यर्थः**—आध्यात्मिकादि सर्व दुःखांचा घात करतो म्हणून दुःखहा; असा यत्न करणाऱ्या योग्याचा पुढें सिद्ध होणारा योग[1] विशुद्धविज्ञानद्वारा सर्व संसार-

---

१ रहस्यकार म्हणतात—"या श्लोकांत 'योग' म्ह० पातंजलयोगाची क्रिया व 'युक्त' म्ह० माफक, बेताची किंवा परिमित असे अर्थ आहेत व पुढेंही एक दोन ठिकाणीं योग म्ह० पातंजलयोग असाच अर्थ आहे.तथापि तेवढ्यानें या अध्यायांत पातंजलयोगच स्वतंत्र प्रतिपाद्य आहे असें होत नाहीं. कर्मयोग सिद्ध करून घेणें हें आयुष्यांतील प्रधान कर्तव्य असून त्याला साधनीभूत म्हणून तेवढ्या पुरतें पातंजलयोगाचें हें वर्णन आहे, असें पूर्वी स्पष्ट सांगितलें असून या श्लोकांतील 'कर्माचें योग्य आचरण' या शब्दांनींहि इतर कर्मे न सोडतां हा योगाभ्यास करावयाचा, हें उघड होतें." पृ.७०१,२. पण हें म्हणणें बरोबर आहे, असें कोण म्हणेल ? या समग्र अध्यायांत ध्यानयोगाचें प्रतिपादन आहे व तेंच साक्षात्काराचें अंतरंग साधन आहे, असें १८ते३२ श्लोकांत स्पष्ट वर्णन आहे. असें असुन या अध्यायांतील

दुःखांचा क्षय करणारा होतो, असा याचा भावार्थ. [झोंपेंतहि सर्व दुःखांची निवृत्ति होते पण ती आत्यंतिक म्ह० नित्य नसते, पण या योगामुळे विज्ञानाच्या द्वारा सर्व संसार-दुःखांची कायमची निवृत्ति होते. ] १७.

**यदा विनियतं चित्तमात्मन्येवावतिष्ठते ।**
**निःस्पृहः सर्वकामेभ्यो युक्त इत्युच्यते तदा ॥१८॥**

**अन्वयार्थ—यदा**—ज्यावेळीं—**विनियतं चित्तं**—विशेषतः नियत केलेलें म्ह० एकाग्रतेस प्राप्त झालेले चित्त—**आत्मनि एव**—आत्म्यामध्येंच—**अवतिष्ठते**—अवस्थित होते व त्या अवस्थेंत योगी—**सर्वकामेभ्यः**—सर्व कामांपासून-दृष्ट व अदृष्ट विषयांपासून—**निस्पृहः**—निस्पृह झालेला-ऐहिक व पारलौकिक सर्व विषयांविषयींची तृष्णा सोडलेला असा होतो—**तदा**—तेव्हां—**युक्तः**—समाहित—**इति**—असें—**उच्यते**—तो म्हटला जातो. १८.

---

योग हें कर्मयोगाचें साधन आहे, असें म्हणणें म्हणजे अर्थविपर्यासाची पराकाष्ठाच करणें आहे व तें वेदान्तसिद्धान्ताच्या विरुद्ध आहे. कर्मयोग विक्षेप उत्पन्न करणारा असून तो ध्यानयोगाच्या अत्यंत विरोधी आहे. आत्मज्ञान, आत्मसाक्षात्कार शांतचित्तांतच होतो व त्यानेंच जीवन्मुक्ति मिळते. विक्षिप्त चित्तांत तो केव्हांच संभवत नाहीं. यास्तव कर्मयोग सिद्ध करणें हे आयुष्यांतील प्रधान कर्तव्य नसून कर्मयोगाने ध्यानाची योग्यता संपादन करणे, त्यानंतर ध्यानयोगाचा अभ्यास करणें व आत्मसाक्षात्काररूप ज्ञानानें जीवन्मुक्तीचा अनुभव घेणे मनुष्याचें प्रधान कर्तव्य आहे. कर्मयोग साध्य नसून साधन आहे व ज्ञानयोग साध्य आहे. ज्ञाननिष्ठा हाच सर्वकर्मसंन्यास व तोच जीवन्मुक्ति किंवा स्थितप्रज्ञता आहे. यास्तव रहस्यकाराचें वरील म्हणणे सर्वथा अनुपपन्न आहे. वेदान्तशास्त्रसंमत नाहीं. 'युक्तचेष्टस्य कर्मसु-' याचा अर्थ त्यांनी 'कर्माचरण बेताचे' असा केला आहे. टीपेत 'युक्त' म्ह० माफक, बेताची, परिमित असे म्हटलें आहे. पण पुढे ' कर्माचे योग्य आचरण' म्ह० इतर कर्मे न सोडता हा योगाभ्यास करावा, असा त्याचाच विस्तार करितात. पण इतर कर्मे तीं कोणतीं? व तीहि पुनः माफक करावयाचीं म्हणजे किती करावयाचीं? व तीं माफक केलीं जाणारीं इतर कर्मे हाच कर्मयोग असे म्हटल्यास त्या कर्मयोगाचें स्वरूप तरी काय आहे? 'सर्व सांसारिक कर्मे, व्यावहारिक कर्मे, वर्णाश्रमविहित कर्मे, जगाच्या उलाढाली' इत्यादि अनेक पर्याय रहस्यकारांनी योजले आहेत. पण मुमुक्षु योगाभ्यासी स्वाभाविकपणेंच त्यांतील कांहींच करीत नाही व करणारहि नाही, म्हणून तर तिसऱ्या श्लोकांत शमाचें विधान केलें आहे. पण त्याकडे व पुढील सर्व प्रतिपादनाकडे दुर्लक्ष करून रहस्यकारांनी ध्यानयोगाला कर्मयोगाचें साधन बनविण्याचा असांप्रदायिक व अप्रस्तुत प्रयत्न वृथा केला आहे, अशी आमची प्रामाणिक समजूत आहे. गीताशास्त्राचें व्याख्यान करणारा कोणीहि वैदिक संप्रदायी, मग तो द्वैती, विशिष्टाद्वैती वगैरे कोणत्याहि पंथाचा असो, असा विपरीत अर्थ करीत नाहीं. अर्थात् शास्त्रज्ञांना रहस्यकारांचे हे व यासारखेच असलेलें बाकीचे सर्व प्रतिपादन कधींच संमत होणें शक्य नाही.

**अथाधुना कदा युक्तो भवतीत्युच्यते—यदा विनियतं चित्तं विशेषेण नियतं संयतमेकाग्रतामापन्नं चित्तं हित्वा बाह्यचिन्तामात्मन्येव केवलेऽवतिष्ठते स्वात्मनि स्थितिं लभत इत्यर्थः। निःस्पृहः सर्वकामेभ्यो निर्गता दृष्टादृष्टविषयेभ्यः स्पृहा तृष्णा यस्य योगिनः स युक्तः समाहित इत्युच्यते तदा तस्मिन्काले ॥ १८ ॥**

**भाष्यार्थ**—( सफल सांग योग सांगितल्यानंतर४थ्या श्लोकांत सांगितलेल्या कालाचा अनुवाद करून युक्ताचें लक्षण सांगण्यासाठी पुढील श्लोकाची प्रवृत्ति आहे असें भाष्यकार दाखवितात- )—**अथ-अधुना कदा युक्तः भवति इति उच्यते**—सफल व सांग योग सांगितल्यानंतर आतां युक्त केव्हां होतो, तें 'यदा०' या श्लोकानें सांगितलें जातें **—यदा विनियतं चित्तं-विशेषेण नियतं-संयतं एकाग्रतां आपन्नं चित्तं—** जेव्हां विनियत चित्त म्ह०विशेषेंकरून नियत-संयत केलेले-एकाग्रतेला प्राप्त झालेलें चित्त **—हित्वा बाह्यचिन्तां आत्मनि एव केवले अवतिष्ठते-स्वात्मनि स्थितिं लभते इत्यर्थः**—बाह्य विषयांची चिंता-बाह्य विषयाचिंतन टाकून केवल-अद्वितीय आत्म्यामध्येंच अवस्थित होतें-स्वात्मस्वरूपांतच स्थितीला प्राप्त होतें, असा याचा भावार्थ. [ चित्त कल्पित आहे. त्याचें तत्त्व-अधिष्ठान आत्मा आहे. त्यामुळें सर्व बाह्य प्रवृत्तीपासून निवारण केलें असतां तें अधिष्ठानांत निमग्न होतें. त्या अवस्थेंत सर्व विषयांविषयीं तृष्णारहित झालेल्या योग्याला युक्त असें म्हणतात, असें सांगतात-]—**निःस्पृहः सर्वकामेभ्यः**—सर्वकामांपासून-विषयांपासून निःस्पृह[१]—**यस्य योगिनः दृष्टादृष्टविषयेभ्यः स्पृहा-तृष्णा निर्गता सः युक्तः-समाहितः इति तदा -तस्मिन् काले उच्यते**—ज्या योग्याची दृष्ट-प्रत्यक्ष-ऐहिक व अदृष्ट-अप्रत्यक्ष-पारलौकिक विषयांपासून स्पृहा म्ह० तृष्णा निघून गेलेली असते तो युक्त-समाहित आहे असें त्यावेळीं म्हटलें जातें. [ जेव्हां विशेषप्रकारें नियमित केलेलें चित्त बाह्य विषयांचें चिंतन सोडून आपल्या आत्मस्वरूपांत निमग्न होऊन राहतें व त्या अवस्थेंत योगी सर्व विषयांविषयीं निःस्पृह-तृष्णाशून्य होतो तेव्हां त्याला युक्त असें म्हणतात. ]१८

## यथा दीपो निवातस्थो नेङ्गते सोपमा स्मृता ।
## योगिनो यतचित्तस्य युञ्जतो योगमात्मनः ॥१९ ॥

**अन्वयार्थ—यथा**—ज्याप्रमाणें—**निवातस्थः दीपः**—वायुरहित प्रदेशांत असलेला दीप-दीपाची ज्योति—**न इंगते**—हालत नाहीं, तर निश्चल तेवत असते—**सा उपमा**—ती उपमा-त्या दीपज्योतीची उपमा-दृष्टान्त—**आत्मनः योगं युं-**

---

१ 'निःस्पृहः सर्वकामेभ्यः' याचा अर्थ रहस्यकार 'कोणत्याहि उपभोगाची इच्छा रहात नाहीं,' असा करितात, पण तो बरोबर नाही. काम म्ह० उपभोग नव्हे, काम म्ह० विषय -उपभोगांचे शब्दादि विषय; 'कामकामः' अ. २.७० 'कामोपभोगपरमाः' १६-११ इत्यादि शब्दांवरून ही गोष्ट सिद्ध होते.

**ज्ञतः**—आत्म्याच्या योगाचें-समाधीचें अनुष्ठान करणाऱ्या—**योगिनः**—योग्याचे—**यतचित्तस्य**—संयतचित्ताला—**स्मृता**—सांगितलेली आहे. १९.

**तस्य योगिनः समाहितं यच्चित्तं तस्योपमोच्यते—यथा दीपः प्रदीपो निवातस्थो निवाते वातवर्जिते देशे स्थितो नेङ्गते न चलति सोपमोपमीयतेऽनयेत्युपमा योगज्ञै-श्चित्तप्रचारदर्शिभिः स्मृता चिन्तिता । योगिनो यतचित्तस्य संयतान्तःकरणस्य युञ्जतो योगमनुतिष्ठत आत्मनः समाधिमनुतिष्ठत इत्यर्थः ॥ १९ ॥**

**भाष्यार्थ—तस्य योगिनः यत् समाहितं चित्तं तस्य उपमा उच्यते—** त्या योग्याचें जे समाहित चित्त त्याची उपमा-उदाहरण-दृष्टान्त सांगितला जातो—**यथा दिपः-प्रदीपः निवातस्थः-निवाते-वातवर्जिते देशे स्थितः न इङ्गते-न चलति**—ज्याप्रमाणें दीप म्ह० प्रदीप निवात—वातरहित प्रदेशीं असलेला प्रदीप हालत नाहीं-स्थिर असतो—**सा उपमा-उपमीयते अनया इति उपमा योगज्ञैः चित्तप्रचारदर्शिभिः स्मृता-चिन्तिता**—ती उपमा (उपमाशब्दाचा विषय प्रदीप आहे,असे सिद्ध होण्यासाठीं त्याची करणव्युत्पत्ति दाखवितात—) जिच्यायोगानें तुलना केली जाते ती उपमा (निवातप्रदेशांतील प्रदीप ही उपमा)योगज्ञांकडून म्ह०चित्ताचा प्रचार जाणणाऱ्या योग्यांकडून सांगितलेली-चिन्तिलेली आहे—**यतचित्तस्य-संयतान्तः-करणस्य आत्मनः योगं-समाधिं युञ्जतः-अनुतिष्ठतः इत्यर्थः योगिनः** [ चित्तस्थैर्यस्य ]—यतचित्त म्ह०ज्याचें अन्तःकरण उत्तमप्रकारें नियमित केलेलें आहे अशा, मनाच्या योगाचें-समाधीचे अनुष्ठान करणाऱ्या, योग्याच्या चित्तस्थैर्याची उपमा

---

१ रहस्यकार म्हणतात—"योगाभ्यास करणाऱ्या योग्यास निवात जागीं ठेवलेल्या दिव्याच्या ज्योतीची उपमा दिली आहे." पण निवातस्थ दिव्याच्या ज्योतीची उपमा योग्याच्या चित्तस्थैर्याला दिली आहे. स्वतः योग्याला ती दिलेली नाही. रहस्यकार प्रस्तुत श्लोकावरील टीपेंत म्हणतात—" योग म्ह० कर्मयोग असा जरी गीतेंतला पारिभाषिक अर्थ असला तरी त्या शब्दाचे इतर अर्थहि गीतेंत आले आहेत. ( ९. ५, १०. ७ ) ... किंबहुना योगशब्दाचे अनेक अर्थ असल्यामुळेच गीतेंत पातंजल योग किंवा सांख्यमार्ग प्रतिपाद्य आहे, असे म्हणण्यास त्या त्या संप्रदायांतील लोकांस सवड झाली आहे." वगैरे ७०२.पण रहस्यकाराना गीतेंत कर्मयोगच प्रतिपाद्य आहे, असा आग्रह धरण्यास योगशब्दाचा मुख्य अर्थहि अनुकूल नाहीं, हें मात्र ते सांप्रदायिकाना दोष देताना विसरतात. 'योग'शब्दाचा कर्मयोग असा वाच्य अर्थ तर नाहींच, पण त्याचा तो लाक्षणिक अर्थ ठरवितांनाहि त्यांची कोण धांदल उडाली आहे. "योग म्ह० युक्ति, कौशल्य, साधन, उपाय, जोड, कर्में करण्याची कांहीं विशेष प्रकारची कुशलता, युक्ति, चतुराई, अगर शैली, कर्मे करण्याचे उत्तम साधन," गी. र. पृ. ५६-५७, इत्यादि अनेक लटपटी करून शेवटीं योग म्ह० कर्मयोग या अर्थावर यावें लागलें आहे. पुनः ' सारखेपणाच्या मनोवृत्तीसच कर्मयोग म्हणतात' ६३४, इत्यादि धरसोड तर पदोपदी केली आहे. गीतेंत प्रतिपाद्य कर्मयोग आहे हें कसें तरी ठरवावें, यासाठीं हा सर्व खटाटोप आहे. पण 'रहस्यकारांनाहि योगशब्दाचा निश्चित एक अर्थ नसल्यामुळेंच

चिंतिली आहे. [ चित्ताचा प्रचार कसा कसा होत असतो तें जाणणाऱ्या योगज्ञांनीं मनाच्या समाधीचा अभ्यास करणाऱ्या नियतचित्त योग्याच्या चित्तस्थैर्याला वायुरहित प्रदेशांतील दिव्याच्या ज्योतीची उपमा दिली आहे. ] १९

यत्रोपरमते चित्तं निरुद्धं योगसेवया ।
यत्र चैवात्मनात्मानं पश्यन्नात्मनि तुष्यति ॥ २० ॥
सुखमात्यन्तिकं यत्तद्बुद्धिग्राह्यमतीन्द्रियम् ।
वेत्ति यत्र न चैवायं स्थितश्चलति तत्त्वतः ॥२१॥
यं लब्ध्वा चापरं लाभं मन्यते नाधिकं ततः ।
यस्मिन्स्थितो न दुःखेन गुरुणापि विचाल्यते ॥२२॥
तं विद्याद्दुःखसंयोगवियोगं योगसंज्ञितम् ।
स निश्चयेन योक्तव्यो योगोऽनिर्विण्णचेतसा ॥२३॥

**अन्वयार्थ—यत्र**—जेव्हां—**योगसेवया**—योगाभ्यासानें-योगानुष्ठानाने—**निरुद्धं**—निरुद्ध केलेलें-सर्व बाजूंनी आवरून धरलेलें,कोठेंहि प्रचार होऊं न दिलेलें—**चित्तं**—चित्त-अन्तःकरण—**उपरमते**—उपरतीस प्राप्त होते, शांत होतें—**च**—आणि—**यत्र**—ज्यावेळी—**आत्मना**—समाधीने अत्यंत शुद्ध झालेल्या अन्तःकरणाने—**आत्मानं**—चैतन्यज्योतिःस्वरूप परमात्म्यास—**पश्यन्**—पाहणारा-त्याचा अनुभव घेणारा योगी—**आत्मनि**—स्वरूपांत—**तुष्यति**—संतुष्ट होतो.—**यत्र**—ज्या वेळीं—**यत्**—जें—**आत्यन्तिकं**—अनन्त—**बुद्धिग्राह्यं**—केवल बुद्धीनेंच ग्राह्य-ग्रहण करण्यास योग्य—**अतीन्द्रियं**—इंद्रियांचा विषय न होणारें—**सुखं**—सुख—**तत्**—तें—**वेत्ति**—तो अनुभवितो—**यत्र**—ज्यावेळीं—**अयं**—हा ज्ञानी—**स्थितः**—आत्मस्वरूपांत स्थित झाला असतां—**तत्त्वतः**—त्या तत्त्वापासून—**न एव चलति**—च्युत होतच नाहीं [ तेव्हां योगसिद्धि होते. ]—**च**—आणि—**यं**—ज्या आत्मलाभाला—**लब्ध्वा**—प्राप्त होऊन—**अपरं लाभं**—दुसऱ्या लाभाला—**ततः**—त्याहून—**अधिकं**—अधिक—**न मन्यते**—मानीत नाहीं,—**यस्मिन्**—ज्या आत्मस्वरूपांत—**स्थितः**—स्थित झालेला हा—**गुरुणा अपि दुःखेन**—फार मोठ्या दुःखानेंहि—**न विचाल्यते**—चंचल होत नाहीं, मोठ्या दुःखांकडूनहि चंचल केला

---

गीतार्थांत अशी ढवळाढवळ करण्यास सवड झाली आहे,' असें उलट म्हणण्यास तरी कोणती हरकत आहे! तात्पर्य रहस्यकार सांप्रदायिक टीकाकारांना जे दोष देतात तेच त्यांनाहि लागू होतात, हें विसरतां कामा नये.

जात नाहीं,—**तं दुःखसंयोगवियोगं**—त्या दुःखसंयोगाच्या वियोगाला—**योगसंज्ञितं**—योगसंज्ञित-योग ही संज्ञा ज्याला प्राप्त झाली आहे, असा—**विद्यात्**—जाणावें.—**सः योगः**—तो योग—**निश्चयेन**—निश्चयानें—**अनिर्विण्णचेतसा**—अखिन्न चित्तानें—**योक्तव्यः**—करावा. २०-२३.

**एवं योगाभ्यासबलादेकाग्रीभूतं निवातप्रदीपकल्पं सत्—यत्र यस्मिन्काल उपरमते चित्तमुपरतिं गच्छति निरुद्धं सर्वतो निवारितप्रचारं योगसेवया योगानुष्ठानेन यत्र चैव यस्मिंश्च काल आत्मना समाधिपरिशुद्धेनान्तःकरणेनाऽऽत्मानं परं चैतन्यज्योतिःस्वरूपं पश्यन्नुपलभमानः स्व एवाऽऽत्मनि तुष्यति तुष्टिं भजते ॥ २० ॥**

**भाष्यार्थ**—( समाधि दोन प्रकारची आहे. एक संप्रज्ञात व दुसरी असंप्रज्ञात. ध्येयैकाकार-ध्येयरूप झालेली चित्तवृत्ति ध्येयाहून भिन्न आहे, अशी यत्किंचित्‌हि प्रतीति येत असल्यास ती संप्रज्ञात समाधि व कोणत्याच प्रकारें भेदप्रतीति येईनाशी झाली कीं तीच असंप्रज्ञात समाधि होते. वर सामान्यतः समाधीचें लक्षण सांगितलें; आतां त्या दोन प्रकारच्या समाधींतील असंप्रज्ञात समाधीचें लक्षण सांगण्याच्या इच्छेनें भगवान् ‘ यत्रोप० ’ या श्लोकांत म्हणतात-)—**एवं योगाभ्यासबलात् एकाग्रीभूतं निवातप्रदीपकल्पं सत्**—याप्रमाणें योगाभ्यासाच्या सामर्थ्यानें एकाग्रीभूत व जवळ जवळ निवात प्रदीपासारखें होत्सातें—**यदा-यस्मिन् काले चित्तं उपरमते -उपरतिं गच्छति**—ज्यावेळी चित्त उपरम पावते-उपरतीला प्राप्त होते ( तें चित्त कसें ? )—**योगसेवया-योगानुष्ठानेन निरुद्धं-सर्वतो निवारितप्रचारं**—योगाच्या सेवेने म्ह० योगानुष्ठानानें निरुद्ध केलेलें चित्त म्ह० ज्याच्या प्रचाराचें सर्व बाजूंनीं निवारण केलें आहे, असे चित्त ज्या समाधिकालीं उपरम पावते—**च यत्र एव -यस्मिन् काले**—आणि ज्या समाधिकालींच—**आत्मना समाधिपरिशुद्धेन अन्तःकरणेन आत्मानं-परं चैतन्यज्योतिःस्वरूपं पश्यन्-उपलभमानः स्वे एव आत्मनि तुष्यति तुष्टिं भजते**—आत्म्याच्या योगानें म्ह० समाधीनें अत्यंत शुद्ध झालेल्या अन्तःकरणाने आत्म्याला म्ह० चैतन्यज्योतिःस्वरूप परमात्म्याला पाहणारा -अनुभव घेणारा असा होत्साता आपल्या स्वरूपांतच संतुष्ट होतो. [ परमात्म्याला आपल्या अन्तर्यामी स्वरूपांतच परमात्मरूपाने साक्षात् पाहणारा योगी संतुष्टच होतो. कारण त्यावेळीं त्याच्या असंतोषाचें कांहीं कारण राहिलेले नसते. अशी अवस्था जेव्हां प्राप्त होते तेव्हां योगसिद्धि होते. ] २०.

**किंच—सुखमात्यन्तिकमत्यन्तमेव भवतीत्यात्यन्तिकमनन्तमित्यर्थः । यत्तद्बुद्धिग्राह्यं बुद्ध्यैवेन्द्रियनिरपेक्षया गृह्यत इति बुद्धिग्राह्यमतीन्द्रियमिन्द्रियगोचरातीतमविषयजनितमित्यर्थः । वेत्ति तदीदृशं सुखमनुभवति यत्र यस्मिन्काले न च एव, अयं विद्वानात्मस्वरूपे स्थितस्तस्मान्नैव चलति तत्त्वतस्तत्त्वस्वरूपान्न प्रच्यवत इत्यर्थः॥२१॥**

**भाष्यार्थ**—( ‘ सुखं० ’ इत्यादि श्लोकानें योगसिद्धीचा काल दुसऱ्या प्रकारें सांगतात-)—**किंच**—आणि तसेंच—**आत्यन्तिकं सुखं-अत्यन्तं एव भवति इति**

**आत्यन्तिकं-अनन्तं इत्यर्थः**—आत्यंतिक सुख, जें अन्ताचें उल्लंघन करून-अन्तरहित असतें तें आत्यन्तिक म्ह० अनन्त असा याचा भावार्थ—**यत् तत् बुद्धिग्राह्यं-बुद्ध्या एव इन्द्रियनिरपेक्षया गृह्यते इति बुद्धिग्राह्यं**—जें अनन्त सुख बुद्धिग्राह्य म्ह० इंद्रियनिरपेक्ष बुद्धीनेंच ग्रहण केलें जातें ते बुद्धिग्राह्य [ येथील बुद्धिशब्दाचा स्वानुभव हा अर्थ आहे. ] अर्थात् जें सुख स्वानुभवगम्य आहे.—**अतीन्द्रियं-इंद्रियगोचरातीतं**—जे अतींद्रिय आहे म्ह० इंद्रियांच्या विषयांचे उल्लंघन केलेलें आहे, (अहोपण इंद्रियनिरपेक्ष स्वानुभवगम्य सुखालाच पुनः अतींद्रिय म्हटल्यास पुनरुक्त दोष येतो, असें कोणी म्हणेल म्हणून म्हणतात-)—**अविषयजनितं इत्यर्थः**—अतींद्रिय म्ह० विषयांपासून उत्पन्न झालेले नव्हे, असा याचा भावार्थ.—**यत्र-यस्मिन् काले वेत्ति-तत् ईदृशं सुखं अनुभवति**—ज्यावेळीं-समाधीच्यावेळीं तें अशा प्रकारचें सुख अनुभवितो—**च यत्र**—आणि ज्या समाधिकालीं—**आत्मस्वरूपे स्थितः अयं विद्वान्**—आत्मस्वरूपांत स्थित झालेला हा विद्वान्—**तस्मात् तत्त्वतः-तत्त्वस्वरूपात् न एव चलति-(न) प्रच्यवते इत्यर्थः**—त्या तत्त्वापासून-तत्त्वस्वरूपापासून ढळत नाहींच-स्वरूपापासून प्रच्युत होत नाहीं, असा याचा भावार्थ. [ त्या समाधिकालीं अतींद्रिय, अनन्त, स्वानुभवगम्य सुखाचा अनुभव घेतो व आत्मस्वरूपांत स्थित झालेला तो योगी त्या स्वरूपापासून च्युत होत नाहीं. असा याचा सारांश. ]

**किंच—यं लब्ध्वा यमात्मलाभं लब्ध्वा प्राप्य चापरमन्यल्लाभान्तरं ततोऽधिकमस्तीति न मन्यते चिन्तयति । किंच यस्मिन्नात्मतत्त्वे स्थितो दुःखेन शस्त्रनिपातादिलक्षणेन गुरुणा महताऽपि न विचाल्यते ॥ २२ ॥**

**भाष्यार्थ**—( 'यं लब्ध्वा०' या श्लोकानें आणखी एका प्रकारानें प्रकृत योगाला विशेषण देतात-)—**किंच-यं लब्ध्वा-यं आत्मलाभं लब्ध्वा-प्राप्य च अपरं-अन्यत् लाभान्तरं ततः अधिकं अस्ति इति न मन्यते-(न) चिन्तयति**—तसेंच, ज्याला प्राप्त होऊन-ज्या आत्मलाभाला प्राप्त झाल्यावर दुसरा कोणताहि लाभ त्याहून अधिक आहे असें मानीत नाहीं, असें समजत नाहीं-चिंतन करीत नाहीं—**किं च यस्मिन् आत्मतत्त्वे स्थितः गुरुणा-महता अपि शस्त्रनिपातादिलक्षणेन दुःखेन न विचाल्यते**—तसेंच ज्या आत्मतत्त्वामध्यें स्थित झालेला योगी शस्त्रप्रहार होणें इत्यादि प्रकारच्या फार मोठ्या दुःखानेंहि स्वरूपापासून प्रच्युत केला जात नाहीं. [ आत्मलाभाहून श्रेष्ठ लाभ दुसरा कोणताहि नाहीं, यास्तव आत्मलाभ झाला असतां त्याहून अधिक पुरुषार्थ या जगांत आहे, असें तो योगी समजत नाहीं, आणि ज्याचा योग परिपक्व झालेला नाहीं, असा योगी शस्त्रप्रहारादिकांमुळें फार मोठें दुःख झालें असतां जसा स्वरूपापासून च्युत होऊन देहभानावर येतो, तसा आत्मस्वरूपांत स्थिर स्थित झालेला हा योगी शस्त्रपातादिकांमुळें केवढेंहि मोठें दुःख जरी झालें तरी त्यामुळें स्वस्वरूपापासून च्युत होत नाहीं. ] २२.

यत्रोपरमत इत्याद्यारभ्य यावद्भिर्विशेषणैर्विशिष्ट आत्मावस्थाविशेषो योग उक्तः—तं विद्याद्विजानीयाद्दुःखसंयोगवियोगं दुःखैः संयोगो दुःखसंयोगस्तेन वियोगो दुःखसंयोगवियोगस्तं दुःखसंयोगवियोगं योग इत्येव संज्ञितं विपरीतलक्षणेन विद्याद्विजानीयादित्यर्थः । योगफलमुपसंहृत्य पुनरन्वारम्भेण योगस्य कर्तव्यतोच्यते निश्चयानिर्वेदयोर्योगसाधनत्वविधानार्थम् । स यथोक्तफलो योगो निश्चयेनाध्यवसायेन योक्तव्योऽनिर्विण्णचेतसा न निर्विण्णमनिर्विण्णं किं तच्चेतस्तेन निर्वेदरहितेन चेतसा चित्तेनेत्यर्थः ॥ २३ ॥

भाष्यार्थ—' यत्रोपरमते० ' ( २० ) **इत्यादि-आरभ्य यावद्भिः विशेषणैः विशिष्टः आत्मावस्थाविशेषः योगः उक्तः**—'यत्रोपरमते०' येथून आरंभ करून जितक्या विशेषणांनी विशिष्ट असा आत्मावस्थाविशेषरूप योग सागितला—**तं दुःखसंयोगवियोगं विद्यात्-विजानीयात्**—त्या दुःखसंयोगवियोगाला जाणावें, —**दुःखैः संयोगः दुःखसंयोगः तेन वियोगः दुःखसंयोगावियोगः तं दुःखसंयोगवियोगं**—दुःखांशी जो संयोग तो दुःखसंयोग त्याच्याशी जो वियोग तो दुःखसंयोगवियोग त्याला—**योगः इति-एव संज्ञितं विद्यात्-विजानीयात्**—' योग ' अशा या नांवाचा जाणावे. [ म्ह० त्याला–त्या दुःखसंयोगाच्या वियोगाला ' योग ' ही संज्ञा आहे, असें समजावे. ' अहोपण, दुःखसंयोगाच्या वियोगाला ' वियोग ' हेंच नांव योग्य आहे. त्याला ' योग ' असे कसे म्हणता येईल ? उत्तर–]—**विपरीतलक्षणेन**—विपरीतलक्षणेने वियोगाला योग समजावे. [ या अवस्थेंत आध्यात्मिकादि सर्व दुःखांचे भेद पार नाहीसे होतात. म्हणून त्या दुःखसंयोगाच्या अभावाला ' योग ' ही संज्ञा संभवते. तो दुःखांचा अभाव ' योग-'संज्ञेला पात्र होतो. या श्लोकाच्या उत्तरार्धात पुनः योगाभ्यास करावा, असे म्हटले आहे. पण एकदा योगाचें विधान करून त्याच्या फलाचाहि उपसंहार केल्यावर पुनः योग करावा, असे कां सांगितले आहे ? असे कोणी म्हणेल म्हणून आचार्य सांगतात–]—**योगफलं उपसंहृत्य पुनः अन्वारम्भेण योगस्य कर्तव्यता उच्यते**—योगाच्या फलाचा उपसंहार करून पुनः अन्वारंभाने योगाची कर्तव्यता सांगितली जाते. [ दुसऱ्या प्रकारानें योगाच्या कर्तव्यतेचा उपदेश आरंभिणें, हाच येथील अन्वारंभशब्दाचा अर्थ आहे. पण ती कर्तव्यता पुनः कां सांगितली जात आहे ? उत्तर– ]—**निश्चय-अनिर्वेदयोः योगसाधनत्वविधानार्थं**—निश्चय व अनिर्वेद–अविरक्ति या दोन्हीला योगसाधनत्व आहे, तीं दोन्ही योगाचीं साधनें आहेत, असें विधान करण्यासाठीं हा अन्वारंभ आहे. [ योगाभ्यास करणाऱ्या योग्याला सिद्धि लवकर न मिळाल्यास त्याला त्याविषयीं संशय येतो व तो योगाभ्यास सोडतो; यास्तव त्यानें तसे निवृत्त होऊं नये, म्हणून पुनः योगाचा उपदेश केला जात आहे. त्याचेंच व्याख्यान करितात–]—**सः यथोक्तफलः योगः निश्चयेन-अध्यवसायेन अनिर्विण्णचेतसा योक्तव्यः**—वर सांगितल्याप्रमाणें ज्याचें फल आहे तो योग निश्चयानें-निर्धारानें अखिन्नमनानें योजावा. [ या

जन्मीं नाहीं तर पुढच्या जन्मीं योगसिद्धि होईल, अशा निश्चयानें ]—**न निर्विण्णं —अनिर्विण्णं किं तत् चेतः तेन निर्वेदरहितेन चेतसा—चित्तेन इत्यर्थः** —जें निर्विण्ण—खिन्न—कंटाळलेलें नव्हे ते अनिर्विण्ण, तें काय ? चित्त, त्या निर्वेदरहित चित्तानें योगाभ्यास करावा, असा याचा भावार्थ. २३.

**संकल्पप्रभवान्कामांस्त्यक्त्वा सर्वानशेषतः ।**
**मनसैवेन्द्रियग्रामं विनियम्य समन्ततः ॥ २४ ॥**
**शनैः शनैरुपरमेद्बुद्ध्या धृतिगृहीतया ।**
**आत्मसंस्थं मनः कृत्वा न किंचिदपि चिन्तयेत् २५**

**अन्वयार्थ—संकल्पप्रभवान्**—संकल्प ह्राच ज्याचा प्रभव—उत्पत्तिकारण आहे अशा—**सर्वान् कामान्**—सर्व कामांना—**अशेषतः**—समूळ—कांहीं बाकी न ठेवतां —**त्यक्त्वा**—टाकून—**मनसा एव**—विवेकयुक्त मनानेंच—**इंद्रियग्रामं**—इंद्रिय-समुदायास—**समंततः**—सर्व बाजूंनी—**विनियम्य**—नियामित करून—त्याचें सर्वतः नियमन करून—**धृतिगृहीतया**—धैर्यानें युक्त अशा—**बुद्ध्या**—बुद्धीने—**शनैः शनैः**—हळूं हळू—**उपरमेत्**—उपरति करावी. अन्तःकरणाला शांत करावें.—**मनः** —मनाला—**आत्मसंस्थं कृत्वा**—आत्म्यामध्ये संस्थित करून—**किंचित् अपि न चिन्तयेत्**—कशाचेंहि चिंतन करूं नये. २४-२५.

**किंच—संकल्पप्रभवान्संकल्पः प्रभवो येषां कामानां ते संकल्पप्रभवाः कामास्तांस्त्यक्त्वा परित्यज्य सर्वानशेषतो निर्लेपेन । किंच मनसैव विवेकयुक्तेनेन्द्रियग्राममिन्द्रियसमुदायं विनियम्य नियमनं कृत्वा समन्ततः समन्तात् ॥ २४ ॥**

**भाष्यार्थ—किंच**—याहि कारणानें योगाच्या कर्तव्यतेची प्रतिज्ञा करितात.—**संकल्पप्रभवान्—संकल्पः प्रभवः येषां कामानां ते संकल्पप्रभवाः कामाः तान् सर्वान् अशेषतः—निर्लेपेन त्यक्त्वा—परित्यज्य**—संकल्प म्ह० हे विषय चांगले आहेत असा अध्यास, अशी मिथ्या कल्पना तोच ज्या कामांचा प्रभव—उत्पत्तीचें कारण आहे, त्या संकल्पप्रभव सर्व कामांना निःशेषपणें—त्यांचा थोडासा लेप—गंध-

---

१ २०-२३ श्लोकांवरील टीपेंत रहस्यकाराचें असें एक असंभाव्य म्हणणें आहे." निग्रही व उद्योगी मनुष्यास सामान्यतः हा योग सहा महिन्यांनीं सिद्ध होतो, असें उपनिषदांत व महाभारतांत सांगितलें आहे. " मैत्र्यु.६-२८ अमृतनाद २९ म.भा.अश्व.अनुगीता १९-६६. पण हें म्हणणें योगशास्त्राच्याच केवल नव्हे तर 'अनेकजन्मसंसिद्धः' या गीतेंतील वचनाच्याहि विरुद्ध आहे. अमृतनादोपनिषदांतील योग हा हठयोग आहे. राजयोग नव्हे. मैत्र्युपनिषद् व अनुगीता यांत ' सहामहिने नित्ययुक्त असलेल्या योग्याचा योग प्रवृत्त होतो' असें म्हटलें आहे, तो सिद्ध होतो असें म्हटलेलें नाहीं.

हि राहूं न देतां टाकून-त्यांचा परित्याग करून—**किंच**—आणि त्याचप्रमाणें—**मनसा एव विवेकयुक्तेन इंद्रियग्रामं-इंद्रियसमुदायं विनियम्य-नियमनं कृत्वा समन्ततः-समन्तात्**—विवेकयुक्त मनानेंच इंद्रियग्रामाचें-इंद्रियांच्या समुदायाचें सर्व बाजूंनीं-सर्व विषयांपासून विशेषतः नियमन करून [ हळू हळू शांत व्हावें, असा पुढील श्लोकाशीं संबंध. ] २४.

**शनैः शनैर्न सहसोपरमेदुपरतिं कुर्यात् । कया बुद्ध्या । किंविशिष्टया धृतिगृहीतया धृत्या धैर्येण गृहीतया धृतिगृहीतया धैर्येण युक्तयेत्यर्थः । आत्मसंस्थमात्मनि संस्थितमात्मैव सर्वं न ततोऽन्यत्किंचिदस्तीत्येवमात्मसंस्थं मनः कृत्वा न किंचिदपि चिन्तयेत् । एष योगस्य परमो विधिः ॥ २५ ॥**

**भाष्यार्थ**—(कामत्यागाच्या द्वारा इंद्रियांचा प्रत्याहार करून मग-)—**शनैः शनैः -न सहसा उपरमेत्-उपरतिं कुर्यात्**—हळू हळू-अकस्मात्-एकाएकीं नाहीं उपरम पावावें, उपरति-शांति करावी.—**कया, बुद्ध्या**—कशानें ? बुद्धीने—**किंविशिष्टया-धृतिगृहीतया-धृत्या-धैर्येण गृहीतया धृतिगृहीतया धैर्येण युक्तया इत्यर्थः**—किंविशिष्ट बुद्धीने-धृतिगृहीत-धृतीनें-धैर्यानें गृहीत, म्हणजे धैर्यानें युक्त अशा बुद्धीनें, असा भावार्थ. [ भूमीपासून अव्याकृतापर्यंत ज्या आठ प्रकृति, त्यांतील पूर्व पूर्व प्रकृतींत मनाचें धारण करून पुढच्या पुढच्या प्रकृतींत त्याचा प्रलय करावा, पूर्व पूर्व प्रकृति उत्तरोत्तर प्रकृतिरूप आहे, अशी कल्पना करावी. ]—**मनः आत्मसंस्थं-आत्मनि संस्थितं-आत्मा एव सर्वं न ततः अन्यत् किंचित् अस्ति इति-एवं आत्मसंस्थं कृत्वा**—मनाला आत्मसंस्थ करून-आत्म्यामध्यें संस्थित-आत्माच सर्व आहे त्याहून दुसरें कांहीं नाहीं, अशा प्रकारें मनाला आत्मसंस्थ करून —**किंचित् अपि न चिन्तयेत्**—कशाचेंहि चिंतन करूं नये.—**एषः योगस्य परमः विधिः**—मनाची निश्चलता हा योगाचा परम विधि आहे. २५.

**यतो यतो निश्चरति मनश्चञ्चलमस्थिरम् ।**
**ततस्ततो नियम्यैतदात्मन्येव वशं नयेत् ॥ २६ ॥**

**अन्वयार्थ**—**मनः**—अन्तःकरण—**चंचलं**—रागादि स्वभावदोषामुळे चंचल व म्हणूनच—**अस्थिरं**—अस्थिर होऊन—**यतः यतः**—ज्या ज्या शब्दादि विषयाच्या निमित्तानें—**निश्चरति**—बाहेर निघतें-आत्म्यापासून दूर होतें—**ततः ततः**—त्या त्या शब्दादि विषयापासून—**एतत्**—त्याला—**नियम्य**—नियमित करून—**आत्मनि एव**—आत्म्यामध्येंच—**वशं**—वश—**नयेत्**—न्यावें, त्याला आत्मवश करावें. २६

**तत्रैवमात्मसंस्थं मनः कर्तुं प्रवृत्तो योगी—यतो यतो यस्माद्यस्मान्निमित्ताच्छब्दादेर्निश्चरति निर्गच्छति स्वभावदोषान्मनश्चञ्चलमत्यर्थं चलमत एवास्थिरं ततस्ततस्तस्मात्तस्माच्छब्दादेर्निमित्तान्नियम्य तत्तन्निमित्तं याथात्म्यनिरूपणेनाऽऽभासीकृत्य वैराग्य-**

**भावनया चैतन्मन आत्मन्येव वशं नयेदात्मवश्यतामापादयेत् । एवं योगाभ्यासबला- द्योगिन आत्मन्येव प्रशाम्यति मनः ॥ २६ ॥**

**भाष्यार्थ**—( शब्दादि विषयांसाठी रागद्वेषवशात् अत्यंत चंचल व अस्थिर होऊन निरनिराळ्या विषयांमध्यें स्वभावतःच प्रवृत्त होणाऱ्या मनाची निश्चलता व निश्चिन्त- पणा कोणत्या उपायानें साध्य होईल तें सांगतात-)—**तत्र एवं मनः आत्मसंस्थं कर्तुं प्रवृत्तः योगी**—योगाभ्यासाच्या आरंभीं अशा प्रकारें-' मनसैव इंद्रियग्रामं०' इत्यादि वचनांत सांगितल्याप्रमाणें मनाला आत्म्यामध्यें स्थित करावयास प्रवृत्त झालेल्या योग्यानें—**यतः यतः-यस्मात् यस्मात् शब्दादेः निमित्तात् मनः स्वभाव- दोषात् चञ्चलं-अत्यर्थं चलं अत एव अस्थिरं** ( सत् ) **निश्चरति-निर्ग- च्छति**—ज्या ज्या शब्दादि निमित्तामुळे मन-रागादि स्वाभाविक दोषांमुळें अत्यंत चल-चंचल, त्यामुळेच अस्थिर होत्साते बाहेर जातें-बाहेर पडते-विषयांच्या मागो- माग धावूं लागते—**ततः ततः-तस्मात् तस्मात् शब्दादेः निमित्तात् नियम्य** —त्या त्या शब्दादि निमित्तापासून त्याचें नियमन करून—**याथात्म्यनिरूपणेन वै- राग्यभावनया च तत् तत् निमित्तं आभासीकृत्य**—शब्दादि विषय, हें नि- मित्त क्षणभंगुर आहे, दुःखमिश्र आहे, इत्यादि त्याच्या यथार्थ स्वरूपाचें आलोचन करून व वैराग्यभावनेनें-हे मला नकोत, हे दुःखद आहेत, अशा चिंतनाने त्या त्या निमि- त्ताला आभासरूप बनवून-शब्दादि निमित्त हे सुखसाधन नसून नुस्ता आभास आहे- मिथ्या आहे असा निश्चय करून-[ त्या त्या निमित्तापासून मनाचे नियमन करावें व ]— **एतत् मनः आत्मनि एव वशं नयेत्-आत्मवश्यतां आपादयेत्**—हें मन आत्म्यामध्येंच वश न्यावे म्ह० त्याला आत्मवश्यतेला प्राप्त करावे. त्याला आत्म्याच्या अधीन करावें. [ स्वाधीन ठेवावे विषयांकडे जाऊं देऊं नये. याप्रमाणें मनाला आत्मवश करून उपरति केली असतां काय होतें तें सांगतात-]—**एवं योगाभ्यासबलात् योगिनः मनः आत्मनि एव प्रशाम्यति**—याप्रमाणे योगाभ्यासाच्या बलाने यो- ग्याचें मन[1] आत्म्यामध्येच प्रशान्त म्ह० प्रलीन होतें. २६.

# प्रशान्तमनसं ह्येनं योगिनं सुखमुत्तमम् ।
# उपैति शान्तरजसं ब्रह्मभूतमकल्मषम् ॥ २७ ॥

**अन्वयार्थ—प्रशान्तमनसं**—ज्याचें मन अत्यंत शांत झालें आहे अशा—**एनं योगिनं**—या योग्याला—**शांतरजसं**—ज्याच्यांतील मोहादि क्लेशरूप मल शांत झाले आहेत,—**ब्रह्मभूतं**—ब्रह्म झालेल्या जीवन्मुक्त—**अकल्मषं**—अधर्मादिरहित —**(एनं योगिनं) हि**—अशा या प्रसिद्ध योग्याला—**उत्तमं सुखं**—निरतिशय सुख —**उपैति**—प्राप्त होतें. २७.

---

१ २४-२६ श्लोकावरील टीपेत ( पृ. ७०४ ) रहस्यकार म्हणतात-"मन एकीकडून आंव- रायला जावें तों दुसरीकडे फुटत असतें." फुटत असतें, हा शब्दप्रयोग ठीक नाहीं.

**प्रशान्तमनसं प्रशान्तं मनो यस्य स प्रशान्तमनास्तं प्रशान्तमनसं ह्येनं योगिनं सुखमुत्तमं निरतिशयमुपैत्युपगच्छति । शान्तरजसं प्रक्षीणमोहादिक्लेशरजसमित्यर्थः । ब्रह्मभूतं जीवन्मुक्तं ब्रह्मैव सर्वमित्येवंनिश्चयवन्तं ब्रह्मभूतमकल्मषमधर्मादिवर्जितम् ॥**

**भाष्यार्थ—प्रशान्तमनसं-प्रशान्तं मनः यस्य सः प्रशान्तमनाः तं प्रशान्तमनसं हि एनं योगिनं**—ज्याचें मन प्रशान्त-प्रलीन झालें आहे, तो प्रशान्तमन होय. प्रशान्तमन झालेल्या या योग्याला—**उत्तमं-निरतिशयं सुखं उपैति -उपगच्छति**—उत्तम म्ह० निरतिशय सुख प्राप्त होतें. [ त्याला निरतिशय आत्मसुखाचा अनुभव येतो. मन व मनाच्या वृत्ति यांचा अभाव झाला असतां स्वरूपसुखाचा आविर्भाव होतो. या गोष्टीचा अनुभव सुषुप्त्यवस्थेत चांगला येतो, हे प्रदर्शित करण्यासाठीं मुळांत ' हि ' असा शब्द घातला आहे. अहोपण, मोहादि क्लेशांकडून प्रतिबंध होत असल्यामुळें योग्याला उत्तम सुखाची प्राप्ति कशी होणार ? उत्तर-]—**शान्तरजसं-प्रक्षीणमोहादिक्लेशरजसं इत्यर्थः**—ज्याचे रजस् शांत झाले आहे-ज्याचें मोहादिक्लेशरूपी रज म्ह० मल प्रक्षीण झालें आहे त्या योग्याला असा याचा भावार्थ.—**ब्रह्मभूतं-जीवन्मुक्तं-ब्रह्म एव सर्वं इति एवं निश्चयवन्तं ब्रह्मभूतं**—ब्रह्मीभूत म्ह० जीवन्मुक्त-ब्रह्मच सर्व, अशा प्रकारच्या निश्चयाने युक्त असलेल्या ब्रह्मभूत व—**अकल्मषं-अधर्मादिवर्जितम्** — निष्पाप-अधर्मादिरहित-धर्माधर्मादिप्रतिबंधरहित योग्याला निरतिशय आत्मसुख प्राप्त होतें. [ प्रशान्तचित्त, मोहादिक्लेशरहित, ब्रह्मभूत व धर्माधर्मादिप्रतिबंधशून्य अशा योग्याला निरतिशय सुख प्राप्त होते. ] २७.

## युञ्जन्नेवं सदात्मानं योगी विगतकल्मषः ।
## सुखेन ब्रह्मसंस्पर्शमत्यन्तं सुखमश्नुते ॥ २८ ॥

**अन्वयार्थ—एवं**—या क्रमानें—**सदा**—सर्वदा—**आत्मानं युञ्जन्**—चित्ताला समाहित करणारा, त्यामुळे—**विगतकल्मषः**—ज्याचें पाप अगदीं नाहींसें झालें आहे असा—**योगी**—निर्विघ्नपणे योगाभ्यास करणारा पुरुष—**ब्रह्मसंस्पर्शं**—परब्रह्माशीं ज्याचा निकट संबंध आहे, ब्रह्मस्वरूप—**अत्यन्तं**—निरतिशय-अन्तरहित-नित्य—**सुखं**—सुखाला—**सुखेन**—अनायासानें—**अश्नुते**—व्यापतो-अनुभवितो. २८.

**युञ्जन्निति । युञ्जन्नेवं यथोक्तेन क्रमेण योगी योगान्तरायवर्जितः सदाऽऽत्मानं विगतकल्मषो विगतपापः सुखेनानायासेन ब्रह्मसंस्पर्शं ब्रह्मणा परेण संस्पर्शो यस्य तद्ब्रह्मसंस्पर्शं सुखमत्यन्तमन्तमतीत्य वर्तत इत्यत्यन्तमुत्कृष्टं निरतिशयमश्नुते व्याप्नोति ॥**

**भाष्यार्थ—' युञ्जन्० ' इति**—योग्याला उत्तम सुख प्राप्त होतें, असें जें म्हटलें आहे, तेंच ' युञ्जन्० ' या श्लोकानें स्पष्ट करितात—**एवं यथोक्तेन क्रमेण योगी-योगान्तरायवर्जितः सदा आत्मानं युञ्जन्**—याप्रमाणे म्ह० 'मनसैव०' इत्यादि पूर्वोक्त क्रमानें योगी-योगान्तरायरहित झालेला-राग-द्वेष इत्यादि योगांच्या वि-

घ्नांनीं रहित असलेला, सदा मनाला समाहित करणारा—**सुखेन-अनायासेन ब्रह्मसंस्पर्शं-ब्रह्मणा परेण संस्पर्शः यस्य तत् ब्रह्मसंस्पर्शं सुखं अत्यन्तं-अन्तं अतीत्य वर्तते इति अत्यन्तं उत्कृष्टं-निरतिशयं अश्नुते-व्याप्नोति**—सुखानें-अनायासानें ब्रह्मसंस्पर्श-परब्रह्माशीं ज्याचा संस्पर्श-संबंध आहे तें ब्रह्मसंस्पर्श सुख ( तें कसें ? ) अत्यंत-अन्ताचें अतिक्रमण करून असणारें म्हणून अत्यंत उत्कृष्ट-निर्विषय-निरतिशय सुख अनुभवितो. तसल्या सुखाला तो व्यापतो. [ब्रह्मसंस्पर्श म्ह० ब्रह्माशीं तादात्म्य पावलेलें-ब्रह्मैकरसरूप सुख त्या योग्यांला होतें. ]. २८.

सर्वभूतस्थमात्मानं सर्वभूतानि चात्मनि ।
ईक्षते योगयुक्तात्मा सर्वत्रसमदर्शनः ॥ २९ ॥

**अन्वयार्थ—योगयुक्तात्मा**—ज्याचें अन्तःकरण योगानें युक्त म्ह० समाहित आहे—**सर्वत्रसमदर्शनः**—आणि ज्याचें ज्ञान सर्व भूतांमध्ये सम आहे, तो—**आत्मानं**—स्वात्म्याला—**सर्वभूतस्थं**—सर्वभूतांमध्यें स्थित—**च सर्वभूतानि**—व सर्वभूतांना—**आत्मनि**—आत्म्यामध्यें स्थित—**ईक्षते**—पाहतो. २९.

**इदानीं योगस्य यत्फलं ब्रह्मैकत्वदर्शनं सर्वसंसारविच्छेदकारणं तत्प्रदर्श्यते—सर्वभूतस्थं सर्वेषु भुतेषु स्थितं स्वमात्मानं सर्वभूतानि चाऽऽत्मनि ब्रह्मादीनि स्तम्बपर्यन्तानि च सर्वभूतान्यात्मन्येकतां गतानीक्षते पश्यति योगयुक्तात्मा समाहितान्तःकरणः सर्वत्रसमदर्शनः सर्वेषु ब्रह्मादिस्थावरान्तेषु विषमेषु सर्व भूतेषु समं निर्विशेषं ब्रह्मात्मैकत्वविषयं दर्शनं ज्ञानं यस्य स सर्वत्रसमदर्शनः ॥ २९ ॥**

**भाष्यार्थ**—( योगानुष्ठान करणाऱ्या ब्रह्मभूत योग्याला सर्व अनर्थांची निवृत्ति व निरतिशयसुखप्राप्ति एतद्रूप मोक्ष कोणत्या कारणानें प्राप्त होतो, तें सांगतात- ) —**इदानीं योगस्य यत् फलं-ब्रह्मैकत्वदर्शनं सर्वसंसारविच्छेदकारणं तत् प्रदर्श्यते**—आतां योगाचें जें फल सर्वसंसाराच्या विच्छेदाचें कारण ब्रह्मैकत्वदर्शन तें ' सर्वभूतस्थं० ' या श्लोकानें प्रदर्शित केलें जातें.—**सर्वभूतस्थं-सर्वेषु भूतेषु स्थितं स्वं आत्मानं**—सर्वभूतास्थित-सर्व भूतांमध्यें स्थित असलेल्या स्वतःला-आत्म्याला पाहतो—**च ब्रह्मादीनि स्तम्बपर्यन्तानि सर्वभूतानि आत्मनि एकतां गतानि ईक्षते-पश्यति**—आणि ब्रह्मादिस्तंबपर्यंत सर्वभूतें आत्म्यामध्यें एकतेला प्राप्त

---

१–२७ व २८ श्लोकांतील योगीशब्दाचा अर्थ रहस्यकारांनीं 'कर्मयोगी' असा चुकीचा केला आहे व त्याच्या समर्थनासाठीं ते "पातंजलयोग तरी कर्मयोगाचें साधन म्हणून सांगितला असल्यामुळें पातंजलयोगाचा अभ्यास करणारा हा पुरुष कर्मयोगीच विवक्षित आहे." इत्यादि म्हणतात. पण ध्यानयोग किंवा पातंजलयोग हें कर्मयोगाचें साधन आहे, असें कोठेंसें सांगितलें आहे ? उलट 'योगारूढस्य तस्यैव शमः कारणं उच्यते' (मागें पृ. ५४९) या वचनानें योग्याच्या शमाचें विधान केलें आहे व पुढें 'उभयविभ्रष्टः' ३८ असें म्हटलें आहे. त्यावरून कर्मयोगच ध्यानयोगाचें किंवा पातंजलयोगाचें साधन आहे, असें ठरतें.

झालेली आहेत असें पाहतो. ( कोण ? )—**योगयुक्तात्मा-समाहित-अन्तःकरणः**—योगयुक्तात्मा म्ह० ज्याचें अन्तःकरण समाहित आहे तो [ अर्थात् चित्तसमाधान हे पूर्वोक्त आत्मदर्शनाचें साधन आहे. पण विषम उपाधींमध्यें विषम दृष्टिच ठेवणाराला सर्वत्र आत्मदर्शन कसें होणार ? उत्तर-]—**सर्वत्रसमदर्शनः-सर्वेषु ब्रह्मादि-स्थावरान्तेषु विषमेषु सर्वभूतेषु समं-निर्विशेषं ब्रह्मात्मैकत्वविषयं दर्शनं-ज्ञानं यस्य सः सर्वत्रसमदर्शनः**—सर्वत्रसमदर्शन म्ह० ब्रह्मादि-स्थावरान्त सर्व विषमभूतांमध्यें ज्याचें सम-निर्विशेष ब्रह्मात्मैकविषय दर्शन म्ह० ज्ञान आहे तो सर्वत्रसमदर्शन होय. [असा समाहितचित्त व सर्वत्र सम ब्रह्म पाहणारा योगी स्वात्म्याला सर्व भूतांमध्यें व सर्वभूतांना आत्म्यामध्ये पाहतो. त्याला ब्रह्मात्मैक्यज्ञान होतें.] २९.

**योमां पश्यति सर्वत्र सर्वं च मयि पश्यति ।**
**तस्याहं न प्रणश्यामि स च मे न प्रणश्यति ॥३०॥**

**अन्वयार्थ**—**यः**—जो—**मां**—मला—**सर्वत्र**—सर्वभूतांमध्यें—**पश्यति**—पाहतो—**च**—व—**सर्वं**—सर्व भूतवर्गास—**मयि**—माझ्यामध्यें—**पश्यति**—पाहतो—**तस्य**—त्याला—**अहं**—मी—**न प्रणश्यामि**—नाहींसा होत नाहीं—**च**—व—**सः**—तो—**मे**—मला—**न प्रणश्यति**—नाहींसा होत नाहीं. ३०.

**एतस्याऽऽत्मैकत्वदर्शनस्य फलमुच्यते—यो मां पश्यति वासुदेवं सर्वस्याऽऽत्मानं सर्वत्र सर्वेषु भूतेषु सर्वं च ब्रह्मादिभूतजातं मयि सर्वात्मनि पश्यति तस्यैवमात्मैकत्वदर्शिनोऽहमीश्वरो न प्रणश्यामि न परोक्षतां गमिष्यामि । स च मे न प्रणश्यति स च विद्वान्मम वासुदेवस्य न प्रणश्यति न परोक्षी भवति तस्य च मम चैकात्मकत्वात् । स्वात्मा हि नामाऽऽत्मनः प्रिय एव भवति । यस्माच्चाहमेव सर्वात्मैकत्वदर्शी ॥३०॥**

**भाष्यार्थ—एतस्य आत्मैकत्वदर्शनस्य फलं उच्यते**—या आत्मैकत्वज्ञानाचें फल 'यो मां०' या श्लोकानें सांगितलें जातें.—**यः मां-वासुदेवं-सर्वस्य आत्मानं सर्वत्र-सर्वेषु भूतेषु पश्यति**—जो मला-वासुदेवाला-सर्वांच्या आत्म्याला सर्वत्र म्ह० सर्व भूतांमध्यें पाहतो—**च सर्वं-ब्रह्मादिभूतजातं मयि-सर्वात्मनि पश्यति**—आणि सर्व ब्रह्मादि भूतजात मज-सर्वात्म्यामध्यें पाहतो, ( याप्रमाणें एकत्वदर्शनाचा अनुवाद करून त्याच्या फलाचा उपन्यास करितात-)—**तस्य एवं आत्मैकत्वदर्शिनः अहं ईश्वरः न प्रणश्यामि-न परोक्षतां गमिष्यामि**—याप्रमाणें आत्म्याचें एकत्व जाणणाऱ्या त्याचा मी ईश्वर नाहींसा होत नाहीं. ( अहोपण, नित्य ईश्वर द्वैतदर्शी पुरुषाला तरी नाहींसा कसा होणार ? उत्तर-) मी त्याच्या परोक्षतेला प्राप्त होत नाहीं. ( मी परमानंदात्मा त्याला परोक्ष होत नाहीं. तर नेहमीं अपरोक्ष-प्रत्यक्ष असतो. )—'**स च मे न प्रणश्यति**'-**सः च विद्वान् मम वासुदेवस्य न प्रणश्यति-न परोक्षी भवति**—आणि तो विद्वान् मज वासुदेवाला प्रनष्ट होत नाहीं. (अहोपण, विद्वानाप्रमाणें अविद्वान्हि ईश्वराला प्रनष्ट होत नाहीं, असें कोणी

म्हणेल म्हणून म्हणतात-) म्ह० तो मला परोक्ष होत नाहीं. ( अविद्वानाचें स्वरूपहि तोच आत्मा आहे, तथापि अविद्येमुळें त्याला तो साक्षात् दिसत नाही. म्हणून ईश्वर त्याच्या स्वरूपानें स्थित असला तरी त्याच्या दृष्टीनें नष्टप्राय आहे. ईश्वर व विद्वान् हे एकमेकाला अपरोक्ष असतात, याविषयी कारण सांगतात-)—**तस्य च मम च एकात्मकत्वात्**—त्याचें व माझें एकात्मकत्व आहे. त्यामुळें आम्ही परस्परांना अपरोक्ष होत नाहीं. ( अहोपण, आत्मा जर एकच आहे तर परस्परांना अपरोक्ष कसा होणार ? कारण परस्पर म्हणतांच द्वैताची कल्पना येते. उत्तर-)—**स्वात्मा हि नाम आत्मनः प्रियः एव भवति**—स्वात्मा हा आत्म्याला प्रियच असतो [अर्थात् 'परस्पर' हा शब्द उपाधिभेदाच्या दृष्टीनें योजला आहे. ज्ञानी ईश्वराचा आत्मा असल्यामुळे व ईश्वर ज्ञानी पुरुषाचा आत्मा असल्यामुळे ते दोघे एकरूपच आहेत. ]— **च यस्मात् अहं एव सर्वात्मैकत्वदर्शी ( तस्मात् एकत्वदर्शनार्थं प्रयतितव्यं )**—आणि ज्याअर्थी मीच सर्वात्म-एकत्वदर्शी-सर्व भूतांतील आत्मा एक आहे असें पाहणारा आहें, त्याअर्थी एकत्वज्ञानासाठी प्रयत्न करावा.[या दोन श्लोकांवरून गीतेंत अद्वैत आत्मतत्त्वाचाच बोध केला आहे हें उघड होतें. हे दोन श्लोक उपनिषदांतील 'तत्त्वमसि, अहं ब्रह्मास्मि' या महावाक्यांसारखेच जीवेश्वरैक्यप्रतिपादन करणारे आहेत. अर्थात् गीतेचें तात्पर्य अद्वैत आत्मबोधांत आहे. ही गोष्ट पुढें तेराव्या अध्यायाच्या दुसऱ्या श्लोकावरील भाष्यांत अधिक विशद होईल. ] ३०.

सर्वभूतस्थितं यो मां भजत्येकत्वमास्थितः ।
सर्वथा वर्तमानोऽपि स योगी मयि वर्तते ॥ ३१ ॥

**अन्वयार्थ—एकत्वं आस्थितः यः**—एकत्वास पूर्णपणें प्राप्त झालेला जो— **सर्वभूतस्थितं मां**—सर्वभूतांमध्ये स्थित असलेल्या मला—**भजति**—भजतो— **सः योगी**—तो योगी—**सर्वथा वर्तमानः अपि**—कोणत्याहि प्रकारें जरी वागत असला तरी—**मयि**—माझ्या ठिकाणीं-परम पदी—**वर्तते**—राहतो. ३१.

**इत्येतत्पूर्वश्लोकार्थं सम्यग्दर्शनमनूद्य तत्फलं मोक्षोऽभिधीयते । सर्वथा सर्वप्रकारैर्वर्तमानोऽपि सम्यग्दर्शी योगी मयि वैष्णवे परमे पदे वर्तते नित्यमुक्त एव स न मोक्षं प्रति केनचित्प्रतिबध्यत इत्यर्थः ॥ ३१ ॥**

---

१ २९व३० या श्लोकांवरील टीपेंत "ब्रह्मात्मैक्यदृष्टिच मोक्ष व कर्मयोग या दोहोंचाहि पाया आहे. सर्वभूतात्मैक्यज्ञान हेंच सर्व अध्यात्माचें व कर्मयोगाचें मूळ होय" इत्यादि म्हटलें आहे. पण तें निराधार आहे. त्याला शास्त्रप्रमाण नाहीं. ती केवळ रहस्यकारांची कल्पना ऊर्फ भ्रामक समजूत आहे.'कर्मयोग ज्ञानयोगाचा साधक आहे,' हें सर्वशास्त्रांनी सिद्ध केलें आहे. पण ब्रह्मात्मैक्यज्ञान कर्मयोगाचें मूळ किंवा पाया आहे, त्याला एका रहस्यकारांच्या कल्पनेवांचून कशाचाहि आधार नाहीं.

**भाष्यार्थ—इति एतत् पूर्वश्लोकार्थं सम्यग्दर्शनं अनूद्य तत्फलं मोक्षः अभिधीयते**—या श्लोकाच्या पूर्वार्धानें पूर्व श्लोकाच्या अर्थाचा म्ह० सम्यग्दर्शनाचा -आत्म्याच्या यथार्थ ज्ञानाचा अनुवाद करून त्याचें फल असा जो मोक्ष तो उत्तरार्धानें सांगितला जातो. ( रागद्वेषादिरहित व यम-नियमादि संस्कारवान् अशा योग्याची स्वैर प्रवृत्ति संभवतच नाहीं. तथापि तिचा अंगीकार करून ज्ञानाची स्तुति करितात-)—**सम्यग्दर्शी योगी सर्वथा-सर्वप्रकारैः वर्तमानः अपि मयि -वैष्णवे परमे पदे वर्तते**—सम्यग्ज्ञानी योगी सर्वथा-सर्व प्रकारांनी जरी वर्तन करीत असला-मनाला वाटेल तसा जरी वागत असला तरी, माझ्या ठिकाणी म्ह० व्यापक परमात्म्याच्या परम पदी-निर्विशेष-निरुपाधिक स्वरूपांत तो राहतो.—**नित्यमुक्तः एव सः**—तो नित्यमुक्तच आहे. ( ज्ञानी योग्याची चेष्टा मुख्य नसून प्रातिभासिक जरी असली तरी त्याचा तो प्रातिभासिक दुराचार त्याच्या मोक्षाला प्रतिबंध करील, अशी शंका घेऊन म्हणतात- )—**मोक्षं प्रति केनचित् न प्रतिबध्यते इत्यर्थः**—त्याच्या मोक्षाला कोणाकडूनच-सदाचरण व दुराचरण यांतील कशानेंहि प्रतिबंध होत नाहीं, असा भावार्थ. [ त्याची सर्वच चेष्टा आमच्या झोंपेतील चळवळीप्रमाणें निरहंकार, निष्काम व यादृच्छिक असल्यामुळे ती पुण्य-पापादि वासनांच्या योगाने मोक्षाला प्रतिबंध करूं शकत नाहीं. ] ३१.

---

१ पण रहस्यकार ' सर्वथा वर्तमानोऽपि०' या अर्धाचा अर्थ-" तो कर्मयोगी सर्वप्रकारें वागत असताहि मजमध्ये असतो " असा करितात. म्ह० सर्वभूतस्थ परमेश्वराची भक्ति करणारा कर्मयोगी सर्वप्रकार म्ह० अनियमाने-वाटेल तसा वागू शकतो, असें यावरून सिद्ध झालें. पण येथील व या पुढालहि योगिशब्दाचा कर्मयोगी असा अर्थ करणें, हे प्रकरणाच्या विरुद्ध आहे. ती केवळ आग्रहपूर्वक ओढाताण आहे; व ती करताना रहस्यकारांनी आपल्या कल्पनाशक्तीच्या पलीकडे दुसऱ्या कशाचेहि साह्य घेतलेलें नाहीं, असें मोठ्या कष्टानें म्हणावें लागतें. कारण त्यांनी आपल्या म्हणण्याच्या समर्थनासाठी प्रमाणभूतशास्त्राचें एकहि प्रमाण दिलेलें नाहीं, व जी कांहीं शास्त्रीय प्रमाणें म्हणून दिली आहेत, ती सर्व भ्रामक आहेत. 'ज्ञानोत्तर कर्मयोग हेंच मनुष्याचे परमसाध्य,' ह्या सिद्धान्ताचें समर्थन करण्यास ती मुळींच उपयोगी पडत नाहीत. ते म्हणतात-"सांख्य-संन्यासी व पातंजल योगी यांना कर्मयोग्याला प्राप्त होणारीच साम्यबुद्धि प्राप्त होते, पण सांख्य व योगी यांना सर्व कर्मांचा त्याग इष्ट असल्यामुळें व्यवहारांत तिचा उपयोग करण्याचा ते प्रसंगच आणीत नाहींत आणि गीतेंतील कर्मयोगी तसें न करितां अध्यात्मज्ञानाने प्राप्त झालेल्या या साम्यबुद्धीचा व्यवहारांतहि नित्य उपयोग करून जगाचीं सर्व कामें लोकसंग्रहार्थ करीत असतो." इत्यादि गी. र. पृ. ७०६. पण अशा प्रकारचा कर्मयोगी जगांत एखादा तरी संभवतो का ? कीं ही नुस्ती कल्पना आहे ? जनकासारखे कांहीं ज्ञानी पूर्वी होऊन गेले, पण त्यांनाहि कर्मयोगी म्हणणें, हें साहस आहे. तेहि वस्तुतः ज्ञानी व ज्ञाननिष्ठच होते. शिवाय गीतेंत जो इतका उपदेश केला आहे, तो साधकासाठीं आहे, ज्ञानी कृतार्थासाठीं नाहीं, असें मानलें तरच गीताशास्त्राचा जनतेला कांहीं उपयोग आहे, असें म्हणतां येईल.

**आत्मौपम्येन सर्वत्र समं पश्यति योऽर्जुन ।**
**सुखं वा यदि वा दुःखं स योगी परमो मतः ॥३२॥**

**अन्वयार्थ—हे अर्जुन,**—हे अर्जुना !—**यः**—जो—**सर्वत्र**—सर्व ठिकाणीं—सर्वभूतांमध्यें—**आत्म्यौपम्येन**—आपल्या उपमेनें—**सुखं वा यदि वा दुःखं**—सुख किंवा दुःख—**समं**—सम—**पश्यति**—पाहतो—**सः**—तो—**परमः योगी** श्रेष्ठ योगी—**मतः**—मानलेला आहे. ३२.

**किंचान्यत्—आत्मौपम्येनाऽऽत्मा स्वयमेवोपमीयते [ अनया ] इत्युपमा तस्या उपमाया भाव औपम्यं तेनाऽऽत्मौपम्येन सर्वत्र सर्वभूतेषु समं तुल्यं पश्यति योऽर्जुन स च किं समं पश्यतीत्युच्यते तथा मम सुखमिष्टं यथा सर्वप्राणिनां सुखमनुकूलम् । वाशब्दश्चार्थे । यदि वा यच्च दुःखं मम प्रतिकूलमनिष्टं यथा तथा सर्वप्राणिनां दुःखमनिष्टं प्रतिकूलमित्येवमात्मौपम्येन सुखदुःखे अनुकूलप्रतिकूले तुल्यतया सर्वभूतेषु समं**

---

कारण आपण सर्व ज्ञानी नसून जिज्ञासु आहों व गीता जर जिज्ञासूला ज्ञानसाधने सांगत असेल तरच ती आमच्या उपयोगी, नाहींपेक्षा तिचा आम्हांला कांहींच उपयोग नाहीं. यास्तव गीतेविषयीं भलतीच कल्पना करून लोकांचा बुद्धिभेद करणे सर्वथा अनुचित आहे. आम्ही या संबंधानें या पूर्वी बरेच वेळां बरेंचसें लिहिलें आहे. यास्तव रहस्यकार वारंवार जरी तेच तें सांगत असले, तरी आम्ही यापुढे विस्तारभयास्तव तिकडे फारसें लक्ष न देता फक्त महत्त्वाच्या मुद्यावरच टीका करण्याचे ठरविले आहे. असो; 'सांख्य व योगी सर्व कर्में सोडतात. त्यामुळें ते साम्यबुद्धीचा व्यवहारांत उपयोग करण्याचा प्रसंगच आणीत नाहींत' हे म्हणणें किती खोटें आहे! ज्ञानी सन्यासी सर्व म्ह० कोणती कर्में सोडतात, याचा रहस्यकारांनीं विचार केलेला नाहीं. तेही देहधर्मभूत कर्मे टाकीत नाहींत. धर्मोपदेश, ज्ञानोपदेश इत्यादि लोकानुग्रहकारक व ज्ञानाशीं अविरुद्ध अशी कर्मेंहि टाकीत नाहीं. तर फक्त देहाभिमानपूर्वकच होणारीं जीं वर्णाश्रमविहित कर्में तीं अकर्तृब्रह्मात्मज्ञानाच्या विरुद्ध असल्यामुळें तेवढींच ते सोडतात. अर्थात् बाकीचीं कर्में म्ह० धर्मोपदेश वगैरे व शरीरस्थितीला अवश्य तेवढींच कर्मे करीत असतांना ते साम्य बुद्धीचा म्हणजे ब्रह्मात्मभावाचा उपयोग करीत नाहींत, हें म्हणणं खोटें आहे. रहस्यकारांच्या समजुतीप्रमाणें 'गीतेंतील कर्मयोगी ज्ञानी आहे, व तो ज्ञानोत्तर सर्व व्यवहार लोकसंग्रहार्थ निष्कामबुद्धीनें करतो व तो करीत असतांना अध्यात्मज्ञानानें प्राप्त झालेल्या साम्यबुद्धीचा नित्य उपयोग करतो.' पण ही नुसती कल्पना आहे. लौकिक व्यवहार आला की साम्यबुद्धि गेली. कारण विषमता—वैषम्य हेंच व्यवहाराचें स्वरूप आहे. लौकिक व्यवहार देहाभिमान वाढविल्यावांचून रहात नाहीं आणि जेथें देहाभिमान आला, 'हा मी व हें माझें' ही वृत्ति उद्भवली, तेथें साम्यबुद्धीचा अभाव झालाच, म्हणून समजावें, शिवाय येथील साम्य म्ह० सर्वत्र ब्रह्मात्मभाव आहे. दुसऱ्या अध्यायांतील 'समत्वं योग उच्यते' येथील साम्य नव्हे, हे याच अध्यायांतील १८-३२ श्लोकांच्या अर्थाकडे विचारपूर्वक लक्ष दिलें असतां कोणाच्याहि सहज लक्षांत येईल.

**पश्यति न कस्यचित्प्रतिकूलमाचरत्यहिंसक इत्यर्थः । य एवमहिंसकः सम्यग्दर्शननिष्ठः स योगी परम उत्कृष्टो मतोऽभिप्रेतः सर्वयोगिनां मध्ये ॥ ३२ ॥**

**भाष्यार्थ**—(ज्ञानी पुरुषाचें स्वैराचरण जर त्याच्या मोक्षाला प्रतिबंधक होत नाहीं, तर त्यानें कोणाला पीडा जरी दिली, तरी त्याच्या ज्ञानाला कांहीं बाध येत नाहीं, असें म्हणणें भाग आहे, अशी शंका आली असतां आचार्य म्हणतात-)—**किंच अन्यत्**—परम योग्याचा निर्देश करून आणखीहि थोडेसें योगमाहात्म्य सांगितलें जातें—**आत्मौपम्येन-आत्मा स्वयं एव उपमीयते अनया इति उपमा तस्याः उपमायाः भावः औपम्यं तेन आत्मौपम्येन**—आत्मा स्वतःच जिच्या योगानें उपमिला जातो ती उपमा-तिचा जो भाव ते औपम्य, त्या आत्मौपम्यानें-[ येथील औपम्य हा शब्द उपमाशब्दापासून करणव्युत्पत्तीनें व भावप्रत्ययानें जरी बनला आहे, तरी तो स्वार्थी आहे. म्हणजे मूळ उपमाशब्दाचा जो अर्थ तोच त्याचा अर्थ आहे. भावप्रत्यय वगैरे जरी लागला असला तरी त्याचा अर्थ बदलत नाही. [ अर्थात् आत्मौपम्येन म्ह० आत्मा याच उपमेनें-स्वतः आत्मा हीच उपमा-हाच दृष्टान्त घेऊन त्यावरून ]—**हे अर्जुन, यः सर्वत्र-सर्वभूतेषु समं-तुल्यं पश्यति**—हे अर्जुना, जो सर्वत्र म्ह० सर्व भूतांमध्यें सम-तुल्य पाहतो—**च सः समं किं पश्यति इति उच्यते**—पण तो सम काय पाहतो, ते सागितले जाते—**यथा मम सुखं इष्टं तथा सर्वप्राणिनां सुखं अनुकूलं**—जसें मला सुख इष्ट आहे, तसे सर्व प्राण्यांना सुख अनुकूल आहे.—**वाशब्दः चार्थे**—येथील 'वा' हा शब्द 'च' या अर्थी आहे.—**यदि वा-यत् च दुःखं यथा मम प्रतिकूलं-अनिष्टं तथा सर्वप्राणिनां दुःखं अनिष्टं -प्रतिकूलं**—आणि जें दुःख ते जसे मला प्रतिकूल-अनिष्ट आहे, तसे सर्व प्राण्यांना दुःख अनिष्ट-प्रतिकूल आहे—**इति एवं आत्मौपम्येन सर्वभूतेषु सुखदुःखे -अनुकूलप्रतिकूले तुल्यतया समं पश्यति**—अशा या प्रकारें आत्मा-स्वतः, याच उपमेनें-स्वतःच्याच दृष्टान्तानें सर्व भूतांमध्ये सुख अनुकूल व दुःख प्रतिकूल आहे असें तुल्यतेनें-सम पाहतो—**कस्यचित् प्रतिकूलं न आचरति-अहिंसकः इत्यर्थः**—कोणाच्याहि प्रतिकूल आचरण करीत नाही-अहिंसक असतो, असा याचा भावार्थ.—**यः एवं अहिंसकः सम्यग्दर्शननिष्ठः सः योगी सर्वयोगिनां मध्ये परमः-उत्कृष्टः मतः-अभिप्रेतः**—जो अशा प्रकारे अहिंसक असलेला सम्यग्ज्ञान-निष्ठ तो योगी सर्व योग्यांमध्ये परम म्ह० उत्कृष्ट मानलेला आहे. तो श्रेष्ठ योगी समजला जातो. [ आपल्याला जसे सुख इष्ट व दुःख अनिष्ट त्याचप्रमाणें सर्व प्राण्यांना सुख इष्ट व दुःख अनिष्ट असें समजून जो ज्ञानी कोणालाहि पीडा देत नाहीं, तो सर्व योग्यांमध्यें श्रेष्ठ योगी होय. ] ३२.

**अर्जुन उवाच**—अर्जुन म्हणाला—

**योऽयं योगस्त्वया प्रोक्तः साम्येन मधुसूदन ।**
**एतस्याहं न पश्यामि चञ्चलत्वात्स्थितिं स्थिराम् ॥ ३३ ॥**

**चंचलं हि मनः कृष्ण प्रमाथि बलवद्दृढम् ।**
**तस्याहं निग्रहं मन्ये वायोरिव सुदुष्करम् ॥ ३४ ॥**

**अन्वयार्थ—हे मधुसूदन**—हे मधुसूदना !—**त्वया**—तूं—**यः अयं योगः**—जो हा योग—**साम्येन**—समत्वानें—**प्रोक्तः**—सांगितलास—**एतस्य**—या योगाची—**स्थिरां स्थितिं**—अचल स्थिति—**चंचलत्वात्**—मनाच्या चंचलपणामुळें—**अहं**—मी—**न पश्यामि**—पहात नाहीं.—**कृष्ण**—(कारण) हे कृष्णा !—**मनः चंचलं**—मन चंचल,—**प्रमाथि**—शरीर व इंद्रियें यांना परवश-व्याकुळ करणारें,—**बलवत्**—अतिशय दुर्निवार व—**दृढं**—अच्छेद्य आहे—**हि**—हें प्रसिद्ध आहे.—**अहं**—मी—**तस्य**—त्याचा—**निग्रहं**—निग्रह—**वायोः इव**—वायूच्या निग्रहाप्रमाणें **सुदुष्करं**—अति दुष्कर—**मन्ये**—समजतों. ३३-३४.

**एतस्य यथोक्तस्य सम्यग्दर्शनलक्षणस्य योगस्य दुःखसंपाद्यतामालक्ष्य शुश्रूषुर्ध्रुवं तत्प्राप्त्युपायम्—योऽयं योगस्त्वया प्रोक्तः साम्येन समत्वेन हे मधुसूदन, एतस्य योगस्याहं न पश्यामि नोपलभे चञ्चलत्वान्मनसः किं स्थिरामचलां स्थितिं प्रसिद्धमेतत् ॥**

**भाष्यार्थ**—(मन चंचल व अस्थिर आहे, हें ऐकून निर्विशेष ब्रह्मामध्यें चित्ताचें स्थैर्य होणें अशक्य आहे, असें समजणारा अर्जुन चित्तस्थैर्याचा उपाय जाणण्याच्या इच्छेनें प्रश्न करीत आहे, अशा प्रकारें आचार्य प्रश्न उत्थापित करितात-)—**एतस्य यथोक्तस्य सम्यग्दर्शनलक्षणस्य योगस्य दुःखसंपाद्यतां आलक्ष्य ध्रुवं तत्प्राप्त्युपायं शुश्रूषुः (अर्जुनः उवाच)**—या पूर्वोक्त सम्यग्ज्ञानरूप योगाचें संपादन मोठ्या कष्टानेंच करतां येतें, असें पाहून त्याच्या प्राप्तीचा निश्चित उपाय ऐकण्याची इच्छा करणारा अर्जुन म्हणाला—**हे मधुसूदन त्वया यः अयं योगः साम्येन-समत्वेन प्रोक्तः**—हे मधुसूदना, तूं जो हा योग साम्यानें म्ह० समत्वाने

---

१ रहस्यकार 'साम्येन योगः' याचा अर्थ-'साम्यबुद्धीनें प्राप्त होणारा योग म्ह०कर्मयोग' असा करितात. पण तो प्रकरणाला धरून नाहीं. ध्यानयोग किंवा अभ्यासयोग, येथें प्रकृत आहे. २९-३२ श्लोकांत ब्रह्मैक्यज्ञान व त्याचें श्रेष्ठ फल वर्णिलें आहे. त्यापूर्वी त्याचें साधन म्हणून आरम्यामध्यें चित्तस्थैर्य सांगितलें आहे व येथें अर्जुनहि 'या साम्यानें सांगितलेल्या योगाची स्थिरस्थिति मनाच्या चंचलतेमुळें मला शक्य दिसत नाहीं,' असेंच म्हणत आहे. पण त्यांतील कशाकडेहि दृष्टि न देतां 'साम्यानें योग' म्ह० 'समत्वबुद्धीनें प्राप्त होणारा कर्मयोग' असा अर्थ करणें, योग्य आहे, असें कोण म्हणेल ? पण रहस्यकार तसें म्हणतात, इतकेंच नव्हे तर आपण म्हणतों तेंच खरें, असा आग्रहहि धरितात.ते म्हणतात-"साम्यानें किंवा साम्यबुद्धीनें प्राप्त होणारा या विशेषणानें योग या शब्दाचा या ठिकाणीं कर्मयोग असाच अर्थ होतो. पातंजल योगांतील समाधीचें जरी पूर्वी वर्णन आलें असलें तरी 'योग-शब्दानें पातंजलयोग या श्लोकांतून विवक्षित नाहीं." पण साम्यानें म्ह० साम्यबुद्धीनें हा अर्थ अप्रासंगिक आहे. वर प्रसंग साम्यबुद्धीचा नसून चित्ताच्या स्थिरतेचा आहे. तसेंच येथें

सांगितलास—**एतस्य योगस्य मनसः चंचलत्वात् अहं न पश्यामि–न उपलभे**—या योगाची ( स्थिर स्थिति ) मनाच्या चंचलपणामुळें मी पहात नाहीं,–मला ती संभवनीय दिसत नाहीं.—**किं**—ती काय ?—**स्थिरां अचलां स्थितिं**—स्थिर –अचल स्थिति मला शक्य दिसत नाहीं.—**प्रसिद्धं एतत्**—ही गोष्ट अत्यंत प्रसिद्ध आहे. [ मन अतिशय चंचल आहे, ही गोष्ट प्रसिद्ध असल्यामुळें मनोनिग्रहाच्या द्वारा योगाचें स्थैर्य संपादन करावें, अशी नुस्ती कल्पनाहि करवत नाहीं. ] ३३.

**चञ्चलमिति । चञ्चलं हि मनः कृष्णेति कृषतेर्विलेखनार्थस्य रूपं भक्तजनपापादिदोषाकर्षणात्कृष्णः । न केवलमत्यर्थं चञ्चलं प्रमाथि च प्रमथनशीलं प्रमथ्नाति शरीरमिन्द्रियाणि च विक्षिपति परवशी करोति । किं च बलवन्न केनचिन्नियन्तुं शक्यम् । किंच दृढं तन्तुनागवदच्छेद्यं तस्यैवंभूतस्य मनसोऽहं निग्रहं निरोधं मन्ये वायोरिव । यथा वायोर्दुष्करो निग्रहस्ततोऽपि मनसो दुष्करं मन्य इत्याभिप्रायः ॥ ३४ ॥**

**भाष्यार्थ—‘ चंचलं ’ इति**—हीच गोष्ट ‘ चंचलं० ’ या श्लोकानें अर्जुन विशद करतो—**(हे कृष्ण) मनः चंचलं हि**—हे कृष्णा, मन अतिशय चंचल आहे, हें प्रसिद्ध आहे. ( कृष्णशब्दाची व्युत्पत्ति व विवक्षित अर्थ आचार्य सांगतात–)—**कृष्ण इति विलेखनार्थस्य कृषतेः रूपं भक्तजनपापादिदोषाकर्षणात् कृष्णः**—‘कृष्ण’ हें विलेखन–कर्षण करणें, ओढणें या अर्थी असलेला जो ‘ कृष् ’ धातु त्यापासून झालेलें रूप आहे. भक्तजनांच्या पापादिदोषांच्या आकर्षणामुळें कृष्ण [ भगवान् भक्तांच्या पापा-

---

कर्मयोग प्रकृत नाहीं, समाधियोग प्रकृत आहे. आरंभापासून शेवटपर्यंत ध्यानयोग, समाधियोग प्रत्यक्ष विवक्षित असतां तो विवक्षित नाहीं, कर्मयोगच विवक्षित आहे, असें म्हणणें हा आग्रहत्व नव्हे तर काय ? पुनः म्हणतात–“ कारण दुसऱ्या अध्यायांत ‘ समत्वं योग उच्यते ’ ( २-४८ ) बुद्धीचा सारखेपणा किंवा समत्व यालाच योग म्हणतात, अशी कर्मयोगाची भगवंतांनींच व्याख्या दिली आहे, ” पण ही व्याख्या कर्मयोगाची नसून योगाची आहे, हें प्रथम लक्षांत ठेवलें पाहिजे. कर्मयोग निराळा व ज्या समत्वरूप योगांत स्थित होऊन कर्में करण्याविषयीं अर्जुनाला भगवानांनीं उपदेश केला आहे,तो योग निराळा. समत्वयोग व कर्मयोग जर एकच असता तर ‘योगस्थ होऊन कर्में कर’ असें भगवानांनीं म्हटलें नसतें. ‘कर्मयोग’ या शब्दांतील समासान्त ‘ योग ’ शब्दापासून तसा अर्थ निष्पन्न होऊं शकत नाहीं. कारण ‘सांख्ययोग’ ‘संन्यासयोग’ इत्यादि सामासिक शब्दांतील योगशब्दाचा अर्थ तसा करतां येत नाहीं. (मागें पृ. २३३-३४ पहा.) अर्थात् ‘भगवानांनींच कर्मयोगाची तशी व्याख्या केली आहे’ हें म्हणणें सर्वथा निराधार आहे. शिवाय सहाव्या अध्यायांतील योगाचा अर्थ दुसऱ्या अध्यायांतील योगशब्दाच्या व्याख्येवरून ठरविण्यापेक्षां तो सहाव्याच अध्यायांतील त्या शब्दाच्या व्याख्येवरून ठरविणें अधिक प्रशस्त नव्हे का ? भगवानांनीं २०-२३ श्लोकांत योग ही संज्ञा कोणत्या अवस्थेला आहे तें सविस्तर सांगितलें आहे. पण तो योग येथें घेतल्यास बिचारा कर्मयोग जाणार ! म्हणून ही सगळी खटाटोप ! ! पण भगवानांनीं अर्जुनाच्या या प्रश्नास पुढें जें उत्तर दिलें आहे ( श्लो. ३५, ३६ ) त्यावरूनहि येथील योग हा कर्मयोग नव्हे, असें सिद्ध होतें.

दि दोषांचें आकर्षण करून घेतो म्हणून कृष्ण]—**न केवलं अत्यर्थं चञ्चलं प्रमाथि च प्रमथनशीलं**—मन केवल अत्यंत चंचल आहे इतकेंच नव्हे तर प्रमाथी आहे. म्ह० प्रमथन–अत्यंत मथन करण्याचें–घुसळण्याचें–क्षुब्ध करण्याचें त्याचें शीलच आहे.—**प्रमथ्नाति शरीरं च इंद्रियाणि विक्षिपति–परवशी करोति**—प्रमथन करतें, शरीर व इंद्रियें यांना विक्षिप्त–चंचल करतें, परवश करतें.—**किंच बलवत्–केनचित् नियन्तुं न शक्यं**—तसेंच तें बलवत् आहे. कोणाकडूनहि त्याचें नियमन करतां येणें शक्य नाहीं. ( तें दुर्निवार आहे. इष्ट विषयापासून त्याला परतवितां येत नाहीं, असा याचा भावार्थ–)—**किंच दृढं–तन्तुनागवत् अच्छेद्यं**—तसेंच तें मन दृढ आहे. तंतुनागाप्रमाणें अच्छेद्य आहे. [ तंतुनाग म्ह० वरुणपाश या नांवाचा एक जलचारी पदार्थ-प्राणी आहे. तो अतिशय दृढ असल्यामुळें त्याला तोडतां येत नाहीं, तसें हें मन अच्छेद्य आहे ]—**अहं तस्य एवंभूतस्य मनसः निग्रहं–निरोधं वायोः इव मन्ये**—मी त्या अशा प्रकारच्या मनाचा निग्रह–निरोध वायूच्या निरोधाप्रमाणें (कठिण) समजतों.—**यथा वायोः निग्रहः दुष्करः ततः अपि मनसः दुष्करं मन्ये इति अभिप्रायः**—जसा वायूचा निग्रह दुष्कर आहे, त्याहूनहि मनाचा निग्रह दुष्कर आहे, असें मी समजतों, असा आशय आहे. ३४.

**श्रीभगवानुवाच**—श्रीकृष्ण म्हणाले—

असंशयं महाबाहो मनो दुर्निग्रहं चलम् ।
अभ्यासेन तु कौन्तेय वैराग्येण च गृह्यते ॥ ३५ ॥

**अन्वयार्थ—महाबाहो**—हे अर्जुना !—**मनः**—मन—**दुर्निग्रहं**—निग्रह करतां येण्याजोगें नाहीं व—**चलं**—चंचल आहे यांत—**असंशयं**—कांहीं संशय नाही.—**तु कौन्तेय**—पण हे कुंतीपुत्रा !—**अभ्यासेन**—अभ्यासानें—**च**—व—**वैराग्येण**—वैराग्यानें—**गृह्यते**—त्याचा निरोध केला जातो. ३५.

**एवमेतद्यथा ब्रवीषि—असंशयं नास्ति संशयो मनो दुर्निग्रहं चलमित्यत्र हे महाबाहो । किंत्वभ्यासेन त्वभ्यासो नाम चित्तभूमौ कस्यांचित्समानप्रत्ययावृत्तिश्चित्तस्य । वैराग्यं नाम दृष्टादृष्टेष्टभोगेषु दोषदर्शनाभ्यासाद्वैतृष्ण्यं तेन च वैराग्येण गृह्यते विक्षेपरूपः प्रचारश्चित्तस्यैवं तन्मनो गृह्यते निगृह्यते निरुध्यत इत्यर्थः ॥ ३५ ॥**

**भाष्यार्थ**—( प्रश्नाचा अंगीकार करून प्रतिवचनाला उत्थापित करितात–)—**यथा ब्रवीषि एवं एतत्**—अर्जुना, तूं जसें सांगत आहेत तसेंच तें आहे, ( असें 'असंशयं०' या श्लोकानें भगवान् सांगतात–)—**मनः दुर्निग्रहं चलं इति–अत्र हे महाबाहो असंशयं–संशयः न अस्ति**—मन दुर्निग्रह व चल आहे याविषयीं हे पराक्रमी अर्जुना, संशय नाहीं—**किंतु अभ्यासेन**—पण अभ्यासानें—**अभ्यासः नाम कस्यांचित् चित्तभूमौ चित्तस्य समानप्रत्ययावृत्तिः**—अभ्यास म्हणजे

कोणत्याहि चित्तभूमीत-आपल्या इष्ट ध्येयविषयांत चित्ताच्या समान प्रत्ययाची आवृत्ति ( विजातीय प्रत्ययाकडून मध्यें मध्यें विच्छिन्न न होतां ध्येयाविषयींचा एकच प्रत्यय सतत टिकविणें, हा अभ्यास- )—**तु वैराग्यं नाम दृष्ट-अदृष्ट-इष्ट-भोगेषु दोषदर्शनाभ्यासात् वैतृष्ण्यं**—आणि वैराग्य म्ह० दृष्ट-ऐहिक व अदृष्ट-पारलौकिक इष्ट भोगाविषयीं तृष्णा मुळींच नसणें -( पण हें वैतृष्ण्य-विराग-वितृष्णता कोणत्या कारणानें प्राप्त होते ? उत्तर- ) त्या विषयांतील दोषांचें चिंतन करण्याचा सतत अभ्यास केल्यानें त्याविषयीं विरक्ति उत्पन्न होते.—**तेन च वैराग्येण चित्तस्य विक्षेपरूपः प्रचारः गृह्यते**—( पूर्वोक्त अभ्यासानें ) व त्या वैराग्यानें मनाच्या विक्षेपरूप प्रचाराचा निग्रह केला जातो, म्ह०—**एवं तत् मनः गृह्यते-निगृह्यते-निरुध्यते इत्यर्थः**—याप्रमाणें त्या मनाचें ग्रहण केलें जातें,त्याचा निग्रह-निरोध केला जातो, असा याचा भावार्थ. [ चित्ताच्या समानप्रत्ययाची आवृत्ति व विषयदोषदर्शनाचा अभ्यास यांच्या योगानें वैराग्य बाणून चित्ताच्या प्रचाराचा-विषयोन्मुखतेचा निरोध केला असतां तें विषयविमुख-अन्तर्निष्ठ होऊन राहतें. ] ३५.

---

१ ३५-३६ या श्लोकांवरील टीपेंत रहस्यकार "येथील अभ्यास व वैराग्य हे शब्द पातंजल सूत्रांतून घेतले आहेत, असें मात्र म्हणता येत नाहीं. " असें म्हणतात व त्याचें कारण ५२६ पृष्ठावर पहावयास सांगतात;गी.र. ५२६ पृष्ठावर ते म्हणतात-"योगसूत्रांत 'योगश्चित्तवृत्तिनिरोधः' 'अभ्यासवैराग्याभ्या तन्निरोधः' अशी सूत्रें आहेत... ...भगवद्गीतेंतहि प्रथम चित्तनिरोध करण्याची आवश्यकता ( गी.६.२० ) व पुढें अभ्यास व वैराग्य या दोन साधानांनी चित्ताचा निरोध करावा. ( ६.२५ ) हें सांगून शेवटीं निर्विकल्प समाधि कशी लावावी व त्यांत सुख काय तें सांगितलें आहे, पण तेवढ्यावरून पातंजलयोगमार्ग भगवद्गीतेस संमत आहे, किंवा पातंजल सूत्रें भगवद्गीतेच्या पूर्वींची आहेत, असेंही म्हणतां येत नाहीं. पातंजल सूत्रांत वर्णन केल्याप्रमाणें समाधि सिद्ध होण्यासाठीं नाक धरून सर्व आयुष्य घालविण्यास भगवान् कोठेंच सागत नाहींत. " ( घाण्याच्या बैलाप्रमाणें मरेपर्यंत लौकिक कर्मेंच करावयास तरी कोठें सांगत आहेत ? अ.३,श्लो.५,अ. १८.११ इत्यादि श्लोकांचा खरा आशय काय आहे, तो त्या त्या श्लोकाच्या व्याख्यानांत सांगितलाच आहे.) "कर्मयोगसिद्ध्यर्थ लागणारी साम्यबुद्धि प्राप्त होण्यास साधन म्हणून गीतेंत चित्तनिरोधाचें व समाधीचें वर्णन आलेले आहे. म्हणून या बाबतींत पातंजलसूत्रापेक्षां श्वेताश्वतर किंवा कठ या उपनिषदांशीं गीतेचें अधिक साम्य आहे. " ... 'कर्मयोगसिद्ध्यर्थ चित्तनिरोधाचें व समाधीचें वर्णन' हा निव्वळ भ्रम आहे. रहस्यकारांना यावज्जीव लौकिक कर्में करावयास पाहिजे आहेत. पण पातंजल योग त्याच्या विरोधी आहे. तो कर्में टाकून चित्तनिरोधाचा अभ्यास वैराग्यपूर्वक करावयास सांगतो. म्हणून त्यांना पातजल योग नको. त्यासाठींच चित्तनिरोध, समाधींतील सर्वोत्तम सुख, अभ्यास, वैराग्य, आसनादि साधनें, हीं सर्व योगशास्त्रांतीलच असल्याची स्पष्ट प्रतीति येत असतांना ' गीतेंतील हें सर्व वर्णन योगशास्त्राला धरून नाहीं तर तें श्वेताश्वतर व कठ या उपनिषदांना धरून आहे,' असें ते म्हणूं लागले आहेत. पण गीतेंतील त्या वर्णनाचें साम्य योगाभ्यासाचें ज्यांत सांगोपांग वर्णन केलें आहे, त्या ध्यानबिंदु, क्षुरिका, इत्यादि उपनिषदांशीं मानण्यास मात्र ते तयार नाहींत. (गी.र.पृ. ५२६ पहा)

**असंयतात्मना योगो दुष्प्राप इति मे मतिः ।**
**वश्यात्मना तु यतता शक्योऽवाप्तुमुपायतः ॥३६॥**

**अन्वयार्थ—असंयतात्मना**—ज्याचें चित्त अभ्यास व वैराग्य यांच्या योगानें अनिरुद्ध असतें त्याच्याकडून—**योगः**—योग—**दुष्प्रापः**—मोठया कष्टानें संपादिला जातो—**इति**—अशी—**मे**—माझी—**मतिः**—मति आहे.—**तु**—पण—**वश्यात्मना**—ज्यानें आपलें अन्तःकरण अभ्यास व वैराग्य यांच्या योगानें स्वाधीन करून घेतलें आहे व—**यतता**—आणखी जो यत्न करीत आहे, त्याच्याकडून—**उपायतः**—पूर्वोक्त उपायानें योग—**अवाप्तुं शक्यः**—संपादन करणें शक्य आहे. ३६.

**यः पुनरसंयतात्मा तेन—असंयतात्मनाऽभ्यासवैराग्याभ्यामसंयत आत्माऽन्तःकरणं यस्य सोऽयमसंयतात्मा तेनासंयतात्मना योगो दुष्प्रापो दुःखेन प्राप्यत इति मे मतिः। यस्तु पुनर्वश्यात्माऽभ्यासवैराग्याभ्यां वश्यत्वमापादित आत्मा मनो यस्य सोऽयं वश्यात्मा तेन वश्यात्मना तु यतता भूयोऽपि प्रयत्नं कुर्वता शक्योऽवाप्तुं योग उपायतो यथोक्तादुपायात् ॥ ३६ ॥**

---

कारण तें त्यांना धरून आहे म्हणून म्हटलें कीं, बिचारा लाडका कर्मयोग गेला ! कोण ही कर्मयोगाची आसक्ति ! व त्यासाठींच केवढा हा कर्मसंन्यासाचा द्वेष !! पण कर्मयोगाच्या बचावासाठीं पातंजलयोगाला लाथाडतांना रहस्यकारांना अनिष्ट असलेली तिसरीच एक गोष्ट त्यांच्याच शब्दांनीं सिद्ध होत आहे, हें मात्र त्यांच्या ध्यानांत आलें नाहीं. 'पातंजल योगमार्ग गीतेस संमत आहे व योगसूत्रें गीतेच्या पूर्वींचीं आहेत ' ही गोष्ट त्यांना कबूल नाहीं. पण प्रसंग व प्रकरण हीं दोन्ही विरुद्ध असतांना गीतेंत अव्यक्त, प्रकृति, गुण, इत्यादि शब्द आले म्हणजे मात्र त्यांना सांख्यशास्त्राची हटकून आठवण होते, हें आश्चर्य नव्हे का ? गीतेंतील योगविषयक वर्णन मात्र श्वेताश्वतर व कठ यांना धरून आहे आणि ' अव्यक्तादीनि भूतानि ' २-२८ ' प्रकृतेः क्रियमाणानि०' ३.२७-२९ ' अव्यक्ताव्यक्तयः सर्वाः ' ८-१८ येथील वर्णन हे कापिल सांख्यशास्त्रांतील सिद्धान्त आहेत ! योगसूत्र गीतेच्या पूर्वींचें नव्हे, पण कापिल सांख्य शास्त्र मात्र गीतेच्या पूर्वींचें, हें म्हणणें सयुक्तिक आहे, असें कोण म्हणत असेल तें म्हणो ! आम्हांला तरी रहस्यकारांनीं योगशास्त्र गीतेच्या पूर्वींचें नव्हे असें म्हटलें कीं त्याच न्यायानें सांख्यहि तिच्या पूर्वींचें नव्हे, असेंच ते म्हणत आहेत, असें वाटतें. कारण दोन्ही एकाच कालांतील असतांना त्यांतील एक गीतेच्या पूर्वी होतें व दुसरें नव्हतें, हें म्हणणें कोणीहि कबूल करणार नाहीं. तसेंच गीतेंतील योगाचें मूळ श्वेताश्वतर व कठ यांत जसें त्यांना दिसतें तसेंच सांख्याचें कां दिसलें नाहीं, याचेंहि आश्चर्य वाटतें. श्वेताश्वतरांत जसा योगाचा उल्लेख आहे,तसाच सांख्याचाहि आहे. (मागें पृ.१२४-२५पहा) व योग जसा कर्मविरोधी तसेंच सांख्यशास्त्रही कर्माचा त्याग करावयास सांगतें.शिवाय श्वेताश्वतर व कठ यांतील योगहि कर्मयोगोपयोगी नाहीं,उलट विरोधी आहे तें निराळेंच! तात्पर्य कर्मयोगाला नसतेंच महत्त्व देऊन गीतेंतील योग, ज्ञान, भक्ति इत्यादिकांना त्याचीं अंगें बनविण्याचें पाप रहस्यकारांनीं वृथा केलें आहे. असो;

**भावार्थ**—( ज्याचें अन्तःकरण उत्तम प्रकारें निगृहीत असतें त्याला योगप्राप्ति सहज होते, असें सांगून चित्तनिग्रहाच्या अभावीं योगप्राप्ति होत नाहीं, असा व्यतिरेक 'असंयतात्मना०' या श्लोकार्धानें दाखवितात-)—**यः पुनः असंयतात्मा तेन असंयतात्मना**—पण जो असंयतात्मा असतो त्या असंयतात्म्याकडून—**अभ्यास-वैराग्याभ्यां असंयतः आत्मा-अन्तःकरणं यस्य सः अयं असंयतात्मा तेन असंयतात्मना**—अभ्यास व वैराग्य यांच्या योगानें ज्याचा आत्मा-अन्तःकरण असंयत-अनिगृहीत आहे तो हा असंयतात्मा. त्या असंयतात्म्याकडून—**योगः दुष्प्रापः-दुःखेन प्राप्यते इति मे मतिः**—योग दुष्प्राप आहे. म्ह० त्याला योग मोठ्या दुःखानें प्राप्त होतो, त्याला योगप्राप्ति होतच नाहीं, असा माझा निश्चय आहे. ( वरील अन्वयार्थाचेंच स्पष्टीकरण करणाऱ्या उत्तरार्धाचें व्याख्यान-)—**तु पुनः यः वश्यात्मा -अभ्यास-वैराग्याभ्यां वश्यत्वं आपादितः आत्मा-मनः यस्य सः अयं वश्यात्मा तेन वश्यात्मना**—पण जो वश्यात्मा असतो-अभ्यास व वैराग्य यांच्या योगानें ज्याचा आत्मा म्ह० मन-अन्तःकरण वश्यत्वास प्राप्त झालें आहे, मन ज्याच्या अधीन आहे तो हा वश्यात्मा, त्या वश्यात्म्याकडून—**तु यतता-भूयः अपि प्रयत्नं कुर्वता**—आणि पुनः प्रयत्न करणाऱ्या अशा त्याच्याकडून—**योगः उपायतः-यथोक्तात् उपायात् अवाप्तुं शक्यः**—योग उपायानें-वर सांगितलेल्या वैराग्यपूर्वक मनोनिरोधरूप उपायानें प्राप्त होणें शक्य आहे. [ अन्तःकरण जरी स्वाधीन झालें तरी वैराग्यादिकांविषयीं अत्यंत आस्था बाळगावी, हें सुचविण्यासाठीं श्लोकांत 'यतता' हें पद आहे. ज्याचें अन्तःकरण स्वाधीन नसतें त्याला योग प्राप्त होणें शक्य नाहीं, पण अभ्यास-वैराग्याच्या योगानें ज्यानें आपल्या अन्तःकरणाला स्वाधीन ठेवलें आहे व पुनः त्यानें विषयोन्मुख होऊं नये, म्हणून जो यत्न करीत आहे,त्याला वैराग्य व अभ्यास यांसह मनोनिग्रहरूप उपायानें योगसिद्धि होणें शक्य आहे. ] ३६.

**अर्जुन उवाच**—अर्जुन म्हणाला—

अयतिः श्रद्धयोपेतो योगाच्चलितमानसः ।
अप्राप्य योगसंसिद्धिं कां गतिं कृष्ण गच्छति ॥३७॥
कच्चिन्नोभयविभ्रष्टश्छिन्नाभ्रमिव नश्यति ।
अप्रतिष्ठो महाबाहो विमूढो ब्रह्मणः पथि ॥ ३८ ॥
एतन्मे संशयं कृष्ण छेत्तुमर्हस्यशेषतः ।
त्वदन्यः संशयस्यास्य छेत्ता न ह्युपपद्यते ॥३९॥

**अन्वयार्थ**—**हे कृष्ण**—हे कृष्णा—**अयतिः**—प्रयत्न न करणारा,—**श्रद्धया उपेतः**—योगमार्गाविषयींच्या श्रद्धेनें युक्त आहे, पण—**योगात् चलितमानसः**—

अंतकाळीं योगापासून ज्याचें मन चलित झालें आहे, ज्याला योगाचें विस्मरण झालें आहे, तो—**योगसंसिद्धिं**—योगाच्या फलाला—**अप्राप्य**—प्राप्त न होऊन—**कां गतिं**—कोणत्या गतीस—**गच्छति**—प्राप्त होतो ?—**हे महाबाहो !**—हे महापराक्रमी अर्जुना !—**उभयविभ्रष्टः**—कर्ममार्ग व योगमार्ग या दोन्ही मार्गांपासून विभ्रष्ट झालेला-भ्रंश पावलेला, त्यामुळें—**अप्रतिष्ठः**—निराधार झालेला—**ब्रह्मणः पथि**—ब्रह्मप्राप्तीच्या मार्गांत—**विमूढः**—अत्यंत मूढ झालेला तो—**छिन्नाभ्रं इव**—आपल्या आधारापासून तुटून निराळ्या झालेल्या अभ्राप्रमाणें—**न नश्यति कच्चित्**—नाश तर पावत नाहींना ?—**कृष्ण**—कारण हे कृष्णा !—**मे एतं संशयं**—माझ्या या संशयास—**अशेषतः**—पूर्णपणें—**छेत्तुं**—तोडण्यास-संशय घालविण्यास—**अर्हसि**—तूं योग्य आहेस—**अस्य संशयस्य छेत्ता**—या संशयाचा छेद करणारा—**त्वत् अन्यः**—तुजवांचून दुसरा कोणी—**न हि उपपद्यते**—संभवत नाहीं. ३७-३९

**तत्र योगाभ्यासाङ्गीकरणेन परलोकेहलोकप्राप्तिनिमित्तानि कर्माणि संन्यस्तानि योगसिद्धिफलं च मोक्षसाधनं सम्यग्दर्शनं न प्राप्तमिति योगी योगमार्गान्मरणकाले चलितचित्त इति तस्य नाशमाशङ्क्य अर्जुन उवाच—अयतिरप्रयत्नवान्योगमार्गे श्रद्धयाऽऽस्तिक्यबुद्ध्या चोपेतो योगादन्तकालेऽपि चलितं मानसं मनो यस्य स चलितमानसो भ्रष्टस्मृतिः सोऽप्राप्य योगसंसिद्धिं योगफलं सम्यग्दर्शनं कां गतिं हे कृष्ण गच्छति ३७**

**भाष्यार्थ—तत्र**—भगवानांनीं याप्रमाणें मनोनिरोधाचा उपाय सांगितला असतां अर्जुन अशी शंका विचारतो—**योगाभ्यासाङ्गीकरणेन परलोक-इहलोकप्राप्तिनिमित्तानि कर्माणि संन्यस्तानि**—योगाभ्यासाचा अंगीकार करून परलोक व इहलोक यांच्या प्राप्तीचीं निमित्तें-कर्में टाकलीं, [ इहलोक-परलोकाच्या प्राप्तीचीं साधनें, अशीं जीं अग्निहोत्रादि श्रौत-स्मार्त कर्में त्यांचा संन्यास करून योगाभ्यासाला आरंभ केला ]—**च योगसिद्धिफलं मोक्षसाधनं सम्यग्दर्शनं न प्राप्तं**—आणि योगसिद्धीचें फल मोक्षाचें साधन असें जें सम्यग्ज्ञान तें प्राप्त झालें नाहीं—**इति योगी मरणकाले योगमार्गात् चलितचित्तः इति तस्य नाशं आशंक्य अर्जुनः उवाच**—त्यामुळें योगी मरणसमयीं योगमार्गापासून चालितचित्त झाला, त्याचें चित्त त्या मार्गापासून भ्रंश पावलें, असें झालें असतां त्याचा नाश होण्याचा प्रसंग येणार, अशी शंका घेऊन अर्जुन म्हणाला—**अयतिः-अप्रयत्नवान् च योगमार्गे श्रद्धया-आस्तिकबुद्ध्या उपेतः**—अयति म्ह० अप्रयत्नवान्-योगसिद्धीसाठीं दीर्घ प्रयत्न न करणारा पण योगमार्गावरील श्रद्धेनें-आस्तिक्यबुद्धीनें युक्त आहे—**योगात् अन्तकाले अपि चलितं**

---

१रहस्यकार 'अयतिः' म्ह० प्रकृतिस्वभावामुळें पुरासा प्रयत्न किंवा संयमन होत नाहीं, असा व 'योगाच्चलितमानसः' म्ह० ज्याचें मन साम्यबुद्धिरूप कर्मयोगापासून चलित झालें, असा अर्थ करितात. पण तो प्रकरणाला सोडून आहे, हें प्रस्तुत अध्यायाचा भाष्यार्थ, विवरण व टीका वाचल्यावर कोणाच्याहि सहज लक्षांत येईल ! त्यासाठीं अधिक विस्तार करीत नाहीं.

**मानसं-मनः यस्य सः चलितमानसः-भ्रष्टस्मृतिः**—योगापासून अन्तकालींहि ज्याचें मन चलित झालें आहे, असा तो चलितमानस-भ्रष्टस्मृति झालेला [ मरणसमयीं ज्याचीं इंद्रियें व्याकुल झालीं आहेत, अशा त्याला योगरूप ज्ञानसाधनाचें अनुष्ठान करण्यास अवकाशच रहात नसल्यामुळें, त्यापासून त्याचें चित्त चलित होणें, त्याला योगानुष्ठानाची आठवणहि न होणें योग्यच आहे. ]—**सः योगसंसिद्धिं-योगफलं-सम्यग्दर्शनं अप्राप्य**—असा तो योगसंसिद्धीला-योगफलाला-सम्यग्ज्ञानाला प्राप्त न होतां—**हे कृष्ण कां गतिं गच्छति**—हे कृष्णा, कोणत्या गतीला-पुरुषार्थाला प्राप्त होतो. [ योगमार्गावर अतिशय श्रद्धा असल्यामुळें कर्मत्याग करून योगाचा अंगीकार केला. पण त्यासाठीं जितका प्रयत्न करावयास पाहिजे तितका केला नाहीं. शिवाय योगसिद्धीला विघ्नें फार. त्यामुळें एका जन्मांत तो सिद्ध होणें शक्य नसते. अशा अनेक कारणांनीं मरणसमयीं इंद्रियादिकांच्या व्याकुलतेमुळें त्याला योगाचें स्मरण झालें नाहीं. तेव्हां तो योगभ्रष्ट योगसिद्धीला म्ह० आत्मसाक्षात्काराला प्राप्त न होतां कोणत्या गतीला जातो? अभ्युदय व निःश्रेयस या दोहोंनाहि मुकणें, हाच येथील नाश होय.]३७.

**कच्चिदिति । कच्चित्किं नोभयविभ्रष्टः कर्ममार्गाद्योगमार्गाच्च विभ्रष्टः संछिन्नाभ्रमिव नश्यति किं वा न नश्यत्यप्रतिष्ठो निराश्रयो हे महाबाहो विमूढः सन्ब्रह्मणः पथि ब्रह्मप्राप्तिमार्गे ॥ ३८ ॥**

**भाष्यार्थ**—वरील प्रश्नाचेंच विवरण—' **कच्चित्०** ' **इति**—' कच्चित्० ' या श्लोकानें करितात—**उभयविभ्रष्टः-कर्ममार्गात् योगमार्गात् च विभ्रष्टः सन्**—कर्ममार्ग व योगमार्ग या दोन्ही मार्गांपासून विशेषतः भ्रष्ट झालेला-दोन्ही मार्गांना मुकलेला तो योगी—**छिन्नाभ्रं इव न नश्यति कच्चित्-किं, किंवा न नश्यति**—मुख्य मेघसमूहापासून वायूमुळे तुटून विलग झालेल्या अभ्राप्रमाणें नाश पावत नाहीं ना—त्याचा नाश तर होत नाहीं? ( पण ही शंका येण्याचें कारण काय? उत्तर-)—**अप्रतिष्ठः-निराश्रयः**—कारण तो प्रतिष्ठारहित-निराश्रय झालेला असतो. [ त्याला कोणत्याच मार्गाचा आधार राहिलेला नसतो. अहोपण, कर्मत्याग केल्यामुळें कर्ममार्गाचा आधार जरी सुटला तरी ज्ञानमार्गाचा आधार त्याला मिळेल, अशी आशंका घेऊन म्हणतात- ]—**हे महाबाहो, ब्रह्मणः पथि-ब्रह्मप्राप्तिमार्गे विमूढः सन्**—हे आजानुबाहो ! ब्रह्माच्या मार्गांत-ब्रह्मप्राप्तीच्या मार्गांत विमूढ होत्साता तो उभयविभ्रष्ट तर होत नाही? [ ही शंका कर्मठाविषयीं संभवत नाहीं. कारण फलाचा अभिलाष सोडून कर्म ईश्वरार्पण करून, किंवा ईश्वरार्पण न करितां, त्याचें अनुष्ठान करणारा त्याच्या फलापासून भ्रंश पावेल हें संभवतच नाहीं. पण सर्व कर्मांचा संन्यास करणाऱ्या योग्यानें विहित कर्मांचा त्याग केल्यामुळें व ज्ञानोपायापासूनहि च्युत झाल्यामुळें त्याला अनर्थ प्राप्त होण्याचा संभव आहे, यास्तव त्याच्याविषयींच अशी शंका संभवते. ] ३८.

**एतदिति । एतन्मे मम संशयं कृष्ण छेत्तुमपनेतुमर्हस्यशेषतस्त्वदन्यस्त्वत्तोऽन्य ऋषिर्देवो वा छेत्ता नाशयिता संशयस्यास्य न हि यस्मादुपपद्यते संभवत्यतस्त्वमेव छेत्तुमर्हसीत्यर्थः ॥ ३९ ॥**

**भाष्यार्थ—'एतत्०' इति**—'एतत्०' या श्लोकानें अर्जुन आपल्या या शंकेचें निराकरण करण्याविषयीं भगवानांस प्रेरणा करतो—**कृष्ण, मे-मम एतं संशयं अशेषतः छेत्तुं-अपनेतुं अर्हसि**—हे कृष्णा, माझ्या या संशयाचा निःशेष छेद करण्यास, हा माझा संशय पूर्णपणें घालविण्यास तूं समर्थ आहेस.—**हि-यस्मात् त्वदन्यः-त्वत्तः अन्यः ऋषिः देवः वा अस्य संशयस्य छेत्ता-नाशयिता न उपपद्यते-संभवति**—कारण तुझ्याहून दुसरा कोणी ऋषि किंवा देव या संशयाचा नाश करणारा-त्याला घालविणारा उपपन्न होत नाहीं, संभवत नाहीं.—**अतः त्वं एव छेत्तुं अर्हसि इत्यर्थः**—यास्तव तूंच छेद करण्यास योग्य आहेस, असा याचा भावार्थ. [माझा हा संशय घालवील असा दुसरा कोणी दिसत नाहीं. यास्तव तूंच तो पूर्णपणें घालीव.]

**श्रीभगवानुवाच**—श्रीकृष्ण म्हणाले—

**पार्थ नैवेह नामुत्र विनाशस्तस्य विद्यते ।**
**न हि कल्याणकृत्कश्चिद्दुर्गतिं तात गच्छति ॥४०॥**

**अन्वयार्थ—हे पार्थ** !—हे अर्जुना !—**तस्य**—त्याचा—**विनाशः**—विनाश—**इह**—या लोकीं—**न एव**—नाहींच व—**अमुत्र**—परलोकींहि—**न विद्यते**—होत नाहीं.—**हि**—कारण—**हे तात** !—अरे बाबा !—**कश्चित्**—कोणीहि—**कल्याणकृत्**—शुभाचरण करणारा—**दुर्गतिं**—दुर्गतीला—**न गच्छति**—जात नाहींच. ४०.

**पार्थेति । हे पार्थ नैवेह लोके नामुत्र परस्मिन्वा लोके विनाशस्तस्य विद्यते नास्ति नाशो नाम पूर्वस्माद्धीनजन्मप्राप्तिः स योगभ्रष्टस्य नास्ति, न हि यस्मात्कल्याणकृच्छुभकृत्कश्चिद्दुर्गतिं कुत्सितां गतिं हे तात तनोत्यात्मानं पुत्ररूपेणेति पिता तात उच्यते पितैव पुत्र इति पुत्रोऽपि तात उच्यते शिष्योऽपि पुत्र उच्यते, गच्छति ॥ ४० ॥**

**भाष्यार्थ—'पार्थ०' इति**—'पार्थ०' या श्लोकानें भगवान् योग्याच्या नाशाविषयींची शंका घालवितात—**हे पार्थ, तस्य इह लोके विनाशः न एव विद्यते अमुत्र-परस्मिन् वा लोके न विद्यते-नास्ति**—हे अर्जुना ! त्याचा या लोकीं विनाश होत नाहींच, किंवा परलोकींहि त्याचा विनाश होत नाहीं. [दोन्ही मार्गांपासून विभ्रष्ट झालेल्या योग्याचा, शिष्टांनीं निंदा करणें, या स्वरूपाचा ऐहिक नाश होत नाहीं. कारण योगमार्गाविषयीं शिष्टांच्या मनांत श्रद्धा-भक्ति वगैरे असते. तथापि पारलौकिक नाशाचा असंभव कसा ? तें सांगण्यासाठीं नाशाचें स्वरूप सांगून त्याचा अभाव दाखवितात-] —**नाशः नाम पूर्वस्मात् हीनजन्मप्राप्तिः सः योगभ्रष्टस्य न अस्ति**—नाश म्ह० पूर्वजन्माहून हीनजन्माची प्राप्ति. अशा स्वरूपाचा नाश योगभ्रष्टाला नाहीं.—**हि-यस्मात् हे तात, कल्याणकृत्-शुभकृत् कश्चित् दुर्गतिं-कुत्सितां गतिं न गच्छति**—कारण हे बाबा, कल्याणाचरण करणारा-शुभाचरण करणारा कोणीहि दुर्गतीला म्ह० कुत्सित गतीला प्राप्त होत नाहीं. [कर्म व ज्ञानोपाय या दोन्ही

पासून भ्रष्ट झालेल्याहि योग्याचे ठिकाणी श्रद्धा, इंद्रियसंयमादि व श्रवण, मनन, निदिध्यासन वगैरे शुभाचरण असतेंच. त्यामुळें तो शुभकृत् होय. अहोपण, पुत्राच्या जागीं असलेल्या शिष्याला 'तात-बाबा' असे कसें म्हटलें आहे ? कारण पित्यालाच 'तात' असें म्हणतात. उत्तर-]—**आत्मानं पुत्ररूपेण तनोति इति पिता तातः उच्यते**—आपल्याला पुत्ररूपानें विस्तृत करतो म्हणून पिता 'तात' असे म्हटला जातो. —**शिष्यः अपि पुत्रः उच्यते**—शिष्यहि पुत्र म्हटला जातो. म्हणून पुत्रस्थानीं असलेल्या शिष्याला 'तात' असें म्हणणे यांत कांहींच दोष नाही. [ योगभ्रष्टाचा शिष्टनिंदारूप ऐहिक नाश किंवा हीन जन्मप्राप्तिरूप पारलौकिक नाश होत नाही. कारण शुभाचरण करणारा कोणीहि निंद्य गतीला प्राप्त होत नसतो, हा अबाधित नियम आहे. ] ४०.

**प्राप्य पुण्यकृतां लोकानुषित्वा शाश्वतीः समाः ।**
**शुचीनां श्रीमतां गेहे योगभ्रष्टोऽभिजायते ॥ ४१ ॥**

**अन्वयार्थ—योगभ्रष्टः**—योगमार्गापासून भ्रष्ट झालेला संन्यासी—**पुण्यकृतां**—पुण्याचरण करणाऱ्या लोकांच्या—**लोकान्**—लोकांस—**प्राप्य**—प्राप्त होऊन—**शाश्वतीः समाः**—हजारों वर्षे—**उषित्वा**—त्या लोकीं राहून—**शुचीनां श्रीमतां गेहे**—शास्त्रोक्त आचरण करणाऱ्या श्रीमंतांच्या घरीं—**अभिजायते**—उत्पन्न होतो.

**किं त्वस्य भवति—योगमार्गे प्रवृत्तः संन्यासी सामर्थ्यात्प्राप्य गत्वा पुण्यकृतामश्वमेधादियाजिनां लोकांस्तत्र चोषित्वा वासमनुभूय शाश्वतीर्नित्याः समाः संवत्सरांस्तद्भोगक्षये शुचीनां यथोक्तकारिणां श्रीमतां विभूतिमतां गेहे गृहे योगभ्रष्टोऽभिजायते ॥**

**भाष्यार्थ—किंतु अस्य भवति**—योगभ्रष्टाचा दोन्ही लोकीं जर नाश होत नाहीं तर होतें तरी काय ? तें 'प्राप्य०' या श्लोकानें सांगतात—**योगमार्गे प्रवृत्तः सामर्थ्यात् संन्यासी पुण्यकृतां-अश्वमेधादियाजिनां लोकान् प्राप्य-गत्वा**—योगमार्गांत प्रवृत्त झालेला पुरुष-अर्थात् योग्यतेमुळे संन्यासी, अश्वमेधादि यज्ञ करणाऱ्या पुण्यवानांच्या लोकांस प्राप्त होऊन [ कर्मामध्यें गढून गेलेल्या कर्मठांची योगमार्गांत प्रवृत्ति होणेंच अगोदर शक्य नाहीं व जरी ती झाली, तरी तो कर्मे ईश्वरार्पणबुद्धीनें करीत असल्यामुळें त्याच्या भ्रंशाची शंका येण्यास कांहीं कारणच नाही, हेंच येथें 'संन्यासी' म्हणण्याचें सामर्थ्य आहे. त्या सामर्थ्यामुळें योगमार्गांत प्रवृत्त झालेला संन्यासी पुण्याचरण करणाऱ्या लोकांच्या उत्तम लोकांस प्राप्त होऊन ]—**तत्र च शाश्वतीः-नित्याः समाः-संवत्सरान् उषित्वा-वासं अनुभूय**—आणि त्या लोकीं शाश्वत झ० नित्य-मनुष्यांच्या संवत्सरांहून फार मोठया प्रमाणाचे संवत्सरपर्यंत-झ० अनेक वर्षें-दीर्घकालपर्यंत राहून-तेथील निवासाचा अनुभव घेऊन—**तद्भोगक्षये शुचीनां-यथोक्तकारिणां श्रीमतां-विभूतिमतां गेहे-गृहे योगभ्रष्टः**

**अभिजायते**—त्याच्या भोगाचा क्षय झाला असतां-तेथील सुखोपभोगानें पुण्यांशाचा क्षय झाला असतां शुची म्ह० शास्त्रानुसार आचरण करणाऱ्या श्रीमान् म्ह० ऐश्वर्यसंपन्न लोकांच्या गृहांत तो योगभ्रष्ट उत्पन्न होतो. [ योगभ्रष्टाच्या मनांत पूर्ण वैराग्य बाणलेलें नसल्यास तो पुण्यवानांच्या लोकीं जाऊन, तेथें दीर्घकाल राहून सुखोपभोगानें पुण्यांशाचा क्षय होतांच येथें शास्त्रविहित आचरण करणाऱ्या श्रीमानांच्या घरीं जन्म घेतो.]

**अथवा योगिनामेव कुले भवति धीमताम् ।**
**एतद्धि दुर्लभतरं लोके जन्म यदीदृशम् ॥ ४२ ॥**

**अन्वयार्थ—अथवा**— किंवा तो योगभ्रष्ट—**धीमतां योगिनां एव कुले**—बुद्धिमान् दरिद्र्यांच्याच कुलांत—**भवति**—उत्पन्न होतो—**लोके हि**—या लोकीं—**यत् ईदृशं जन्म**—जें हें अशाप्रकारचें जन्म-दरिद्री योग्यांच्या घरीं झालेलें जन्म—**एतत्**—तें—**दुर्लभतरं**—अतिशय दुर्लभ आहे. ४२.

**अथेति । अथवा श्रीमतां कुलादन्यस्मिन्योगिनामेव दरिद्राणां कुले भवति जायते धीमतां बुद्धिमताम् । एतद्धि जन्म यद्दरिद्राणां योगिनां कुले दुर्लभतरं दुःखलभ्यतरं पूर्वमपेक्ष्य लोके जन्म यदीदृशं यथोक्तविशेषणे कुले ॥ ४२ ॥**

**भाष्यार्थ—'अथ०' इति**—पण त्याच्यामध्यें श्रद्धा, वैराग्य इत्यादि कल्याणगुणांचें आधिक्य असल्यास कोणता दुसरा पक्ष संभवतो तें ' अथवा०' या श्लोकानें सांगतात—**अथवा श्रीमतां कुलात् अन्यस्मिन् योगिनां एव-दरिद्राणां धीमतां-बुद्धिमतां कुले भवति-जायते**—अथवा श्रीमानांच्या कुलाहून भिन्न अशा योग्यांच्याच म्ह० धीमान्-बुद्धिमान दरिद्री लोकांच्याच कुलांत तो होतो-जन्म घेतो.( येथील योगिशब्दानें कर्मी गृहस्थांचा बोध होऊं नये म्हणून 'धीमतां' हें विशेषण भगवानांनीं मुद्दाम योजलें आहे. अशा ब्रह्मविद्यावान् पवित्र दरिद्री लोकांच्या कुलांत जन्म होणें अत्यंत दुर्लभ आहे. कारण त्या कुलांत श्रीमानांच्या कुलांप्रमाणें ऐश्वर्याच्या बलावर प्रमाद घडण्याचा मुळींच संभव नसतो, असें उत्तरार्धानें सांगतात-)—**यत् दरिद्राणां योगिनां कुले जन्म एतत् हि पूर्वं अपेक्ष्य दुर्लभतरं-दुःखलभ्यतरं**—जें दरिद्री योग्यांच्या कुलांतील जन्म तें पूर्वीच्या श्रीमानांच्या कुलांतील जन्माच्या अपेक्षेनें अधिक दुर्लभ-फारच कष्टानें प्राप्त होणारें आहे.—**लोके यत् ईदृशं यथोक्तविशेषणे कुले जन्म**—या लोकीं जें अशाप्रकारचें पूर्वोक्त विशेषणविशिष्ट कुलांत जन्म होणें तें अत्यंत दुर्लभ आहे. [ ऐश्वर्यवान् व सदाचारसंपन्न अशा लोकांच्या घरांत जन्म होणें जरी सुलभ नाहीं, कारण तेंहि मोठ्या पुण्याचेंच फल आहे, तथापि त्यापेक्षां शुचि, दरिद्री व विद्यावान् लोकांच्या कुलांत जन्म होणें त्याहूनहि अधिक दुर्लभ आहे. ] ४२.

**तत्र तं बुद्धिसंयोगं लभते पौर्वदेहिकम् ।**
**यतते च ततो भूयः संसिद्धौ कुरुनन्दन ॥ ४३ ॥**

**अन्वयार्थ—तत्र**—त्या दरिद्री योग्यांच्या कुलांत—**तं**—त्या—**पौर्वदेहिकं**—पूर्वदेहांतील—**बुद्धिसंयोगं**—बुद्धिसंयोगास—**लभते**—तो योगभ्रष्ट प्राप्त होतो—**च कुरुनन्दन**—आणि हे कुरुनंदना—**संसिद्धौ**—योगसिद्धीसाठीं—**ततः**—पूर्वजन्मांतील अभ्यासाच्या संस्कारामुळें, किंवा त्याहून—**भूयः**—अधिकच—**यतते**—यत्न करतो.

**यस्मात् तत्र योगिनां कुले तं बुद्धिसंयोगं बुद्ध्या संयोगं बुद्धिसंयोगं लभते पौर्वदेहिकं पूर्वस्मिन्देहे भवं पौर्वदेहिकं यतते च प्रयत्नं करोति ततस्तस्मात्पूर्वकृतात्संस्काराद्भूयो बहुतरं संसिद्धौ संसिद्धिनिमित्तं हे कुरुनन्दन ॥ ४३ ॥**

**भाष्यार्थ—यस्मात्**—वर जें सर्वोत्तम जन्म सांगितलें त्याच्या सर्वोत्तमत्वाचें कारण 'तत्र०' या श्लोकानें सांगतात—**तत्र योगिनां कुले**—त्या योग्यांच्या कुलांत—**पौर्वदेहिकं-पूर्वस्मिन् देहे भवं पौर्वदेहिकं तं बुद्धिसंयोगं-बुद्ध्या संयोगं बुद्धिसंयोगं लभते**—पौर्वदेहिक म्ह० पूर्व देहांतील त्या बुद्धिसंयोगास-आत्मविषयक बुद्धीशीं जो संयोग तो बुद्धिसंयोग, त्यास प्राप्त होतो. [ पूर्व जन्मीं अनुष्ठिलेल्या विशेष साधनांनीं युक्त, अशा आत्मविषयक बुद्धिसंयोगास तो योगभ्रष्ट या उत्तम जन्मीं प्राप्त होतो. तर मग या जन्मीं साधनानुष्ठानावांचूनच त्याला ज्ञान होईल, असें कोणी म्हणेल म्हणून सांगतात-]—**च हे कुरुनंदन ततः-तस्मात् पूर्वकृतात् संस्कारात् भूयः-बहुतरं प्रयत्नं संसिद्धौ-संसिद्धिनिमित्तं करोति**—आणि हे कुरुवंशजा, त्याहून-त्या पूर्वकृत संस्काराहून पुष्कळ-फारच अधिक प्रयत्न संसिद्धीसाठीं करतो. [ या उत्तम जन्मांत त्याला पूर्व जन्मांतील बुद्धीचा लाभ होतो व त्यामुळें पूर्वीपेक्षां फारच मोठ्या प्रमाणावर तो श्रवणादिकांविषयीं प्रयत्न करतो. ] ४३.

पूर्वाभ्यासेन तेनैव ह्रियते ह्यवशोऽपि सः ।
जिज्ञासुरपि योगस्य शब्दब्रह्मातिवर्तते ॥ ४४ ॥

**अन्वयार्थ—हि**—कारण—**तेन एव पूर्वाभ्यासेन**—त्याच पूर्वजन्मीं केलेल्या अभ्यासानें—**अवशः अपि सः**—तो अवश असलेलाहि योगभ्रष्ट—**ह्रियते**—हरण केला जातो—**योगस्य जिज्ञासुः अपि**—योगाचें स्वरूप जाणण्याची इच्छा करणाराहि—**शब्दब्रह्म**—शब्दब्रह्माचें-वेदोक्तकर्मानुष्ठानफलाचें — **अतिवर्तते** —उल्लंघन करून जातो. ४४.

**कथं पूर्वदेहबुद्धिसंयोग इति तदुच्यते—यः पूर्वजन्मनि कृतोऽभ्यासः स पूर्वाभ्यासस्तेनैव बलवता ह्रियते हि यस्मादवशोऽपि स योगभ्रष्टो न कृतं चेद्योगाभ्याससंस्काराद्बलवत्तरमधर्मादिलक्षणं कर्म तदा योगाभ्यासजनितेन संस्कारेण ह्रियते । अधर्मश्चेद्बलवत्तरः कृतस्तेन योगजोऽपि संस्कारोऽभिभूयत एव । तत्क्षये तु योगजः संस्कारः स्वयमेव कार्यमारभते न दीर्घकालस्थस्यापि विनाशस्तस्यास्तीत्यर्थः । जिज्ञासुरपि योगस्य स्वरूपं ज्ञातुमिच्छन्योगमार्गे प्रवृत्तः संन्यासी योगभ्रष्टः सामर्थ्यात्सोऽपि**

**शब्दब्रह्म वेदोक्तकर्मानुष्ठानफलमतिवर्ततेऽपाकरिष्यति किमुत बुद्ध्वा यो योगं तन्निष्ठोऽभ्यासं कुर्यात् ॥ ४४ ॥**

भाष्यार्थ—**पूर्वदेहबुद्धिसंयोगः कथं इति तत् उच्यते**—त्या योगभ्रष्टाला पूर्वदेहांतील बुद्धीचा संयोग कसा प्राप्त होतो ? असें कोणी विचारील म्हणून 'पूर्वाभ्यासेन०' या श्लोकानें सांगितलें जातें—**यः पूर्वजन्मनि कृतः अभ्यासः सः पूर्वाभ्यासः**—जो पूर्वजन्मामध्यें केलेला अभ्यास तो पूर्वाभ्यास,—**हि-यस्मात् तेन एव बलवता अवशः अपि सः योगभ्रष्टः ह्रियते**—ज्याअर्थी बलवान् अशा त्या पूर्वाभ्यासाकडूनच तो अवश असलेलाही योगभ्रष्ट या जन्मीं हरण केला जातो [ त्याअर्थी त्याची योगप्रवृत्ति स्वेच्छेनें होत नाहीं. तो योगभ्रष्ट परतंत्र जरी असला तरी मागील जन्मांतील संस्कारामुळें या पुढील जन्मीं, त्याची इच्छा नसली तरी, योगाभ्यासाकडूनच आकर्षिला जातो. पण त्या आकर्षणाला प्रतिबंध नसला तरच ही गोष्ट घडते असें सांगतात-] —**योगाभ्याससंस्कारात् बलवत्तरं अधर्मादिलक्षणं कर्म न कृतं-चेत् तदा योगाभ्यासजनितेन संस्कारेण ह्रियते**—योगाभ्यासाचा जो संस्कार झालेला असतो त्याहून अधिक सामर्थ्यानें युक्त असें अधर्मादिरूप कर्म जर त्यानें केलें नसेल तर तो योगाभ्यासापासून झालेल्या सस्काराकडून हरण केला जातो. पण—**बलवत्तरः अधर्मः कृतः चेत् तेन योगजः अपि संस्कारः अभिभूयते एव**—त्या योगाभ्यासजनित संस्काराहून अधिक प्रबल अधर्म जर केला असेल तर त्याच्या योगानें योगजन्य संस्कारहि प्रतिबद्ध होतोच.—**तु तत्क्षये योगजः संस्कारः स्वयं एव कार्यं आरभते**—पण त्या अधर्माचा फलभोगानें क्षय झाला असतां योगाभ्यासापासून झालेला संस्कार आपोआपच आपल्या कार्याला आरंभ करतो. [ अधर्माचा प्रतिबंध क्षीण होतांच तो योगभ्रष्टाला पुनः योगाभ्यासांत प्रवृत्त करतो. ]—**दीर्घकालस्थस्य अपि तस्य विनाशः न इत्यर्थः**—दीर्घकाल प्रतिबद्ध होऊन राहिलेल्याहि त्याचा विनाश होत नाहीं, असा याचा भावार्थ.—**जिज्ञासुः अपि-योगस्य स्वरूपं ज्ञातुं इच्छन्-योगमार्गे प्रवृत्तः-सामर्थ्यात् संन्यासी योगभ्रष्टः**—जिज्ञासूहि-योगाचें स्वरूप जाणण्याची इच्छा करणारा-योगमार्गांत प्रवृत्त झालेला-अर्थात् सामर्थ्यामुळें संन्यासी योगभ्रष्ट—**सः अपि शब्दब्रह्म वेदोक्तकर्मानुष्ठानफलं अतिवर्तते-अपाकरिष्यति**—तोहि वैदिक कर्म व त्याच्या अनुष्ठानाचें फल यांचें अतिवर्तन करतो, त्याचें निराकरण करतो. कर्माच्या फलाहून अधिक फलास प्राप्त होतो, मग—**यः योगं बुद्ध्वा तन्निष्ठः अभ्यासं कुर्यात् सः किं उत**—जो योगाचें स्वरूप जाणून योगनिष्ठ होऊन त्याचा सदा अभ्यास करतो तो कर्म व कर्मफल यांचें उल्लंघन करितो हें काय सांगावें ? [ कर्ममार्गांत प्रवृत्त झालेला कर्मी त्या मार्गापासून भ्रष्ट होतो, असें म्हणतां येत नाहीं, या सामर्थ्यामुळेंच येथील योगभ्रष्टहि संन्यासी घेतला पाहिजे; अधर्मरूप प्रबल प्रतिबंध नसल्यास पूर्व संस्कार त्या परवश असलेल्या योगभ्रष्टालाहि योगाभ्यासांत त्याची

इच्छा नसली तरी प्रवृत्त करतो. अधर्मरूप प्रबल प्रतिबंध असल्यास तो दुःखभोगानें क्षीण झाल्यावर योगाभ्यासजन्य संस्कार त्याला अभ्यासांत प्रवृत्त करतो. तात्पर्य मध्यें कितीहि काल लोटला तरी तो संस्कार नष्ट होत नाहीं. योगाचें स्वरूप जाणण्याच्या इच्छेनें कर्मत्याग करून योगामध्यें प्रवृत्त झालेला योगभ्रष्टहि जर वेदोक्त कर्म व त्याच्या अनुष्ठानापासून प्राप्त होणारें फल यांचें उल्लंघन करून जातो ह्म० त्याहून अधिक फलास पात्र होतो, तर योगाचें स्वरूप जाणून व तन्निष्ठ होऊन जो सतत अभ्यास करतो, त्याच्या अधिक फलप्राप्तीविषयीं काय सांगावें ? ] ४४.

**प्रयत्नाद्यतमानस्तु योगी संशुद्धकिल्बिषः ।**
**अनेकजन्मसंसिद्धस्ततो याति परां गतिम् ॥ ४५ ॥**

**अन्वयार्थ—तु**—आणि—**प्रयत्नात् यतमानः**—अधिक यत्न करणारा—**योगी**—विद्वान्—**संशुद्धकिल्बिषः**—ज्याचे पाप संशुद्ध–अत्यंत शुद्ध झालें आहे असा, होऊन—**अनेकजन्मसंसिद्धः भवति**—अनेक जन्मांतील थोड्या थोड्या अभ्यासानें संसिद्ध होतो.—**ततः**—नंतर योगसंसिद्धीमुळें तो—**परां गतिं**—मोक्ष-नांवाच्या श्रेष्ठगतीस—**याति**—प्राप्त होतो. ४५.

**कुतश्च योगित्वं श्रेय इति—प्रयत्नाद्यतमानोऽधिकं यतमान इत्यर्थः। तत्र योगी विद्वान्संशुद्धकिल्बिषो विशुद्धकिल्बिषः संशुद्धपापोऽनेकेषु जन्मसु किंचित्किंचित्संस्कार-जातमुपचित्य तेनोपचितेनानेकजन्मकृतेन संसिद्धोऽनेकजन्मसंसिद्धस्ततो लब्धसम्य-ग्दर्शनः सन्याति परां प्रकृष्टां गतिम् ॥ ४५ ॥**

**भाष्यार्थ—च योगित्वं श्रेयः कुतः इति**—आणि योगित्व श्रेयस्कर आहे, योगनिष्ठ श्रेष्ठ आहे, असें म्हणण्याचें आणखी कारण ' प्रयत्नात्० ' या श्लोकानें सांगतात—**प्रयत्नात् यतमानः-अधिकं यतमानः इत्यर्थः**—दीर्घ प्रयत्नानें योगाभ्यास करणारा–अधिक यत्न करणारा, असा याचा भावार्थ—**तत्र योगी-विद्वान् संशुद्धकिल्बिषः-विशुद्ध-किल्बिषः-संशुद्धपापः**—त्या योगासाठीं अतिशय प्रयत्न झाला असतां योगी–विद्वान् अतिशय शुद्धपाप–विशुद्धपाप–म्ह० निष्पाप—**अनेकेषु जन्मसु किंचित् किंचित् संस्कारजातं उपचित्य**—अनेक जन्मांमध्यें थोडथोडा संस्कार जमत जमत–सं-स्कारजाताचा मोठा संचय होऊन—**तेन उपचितेन-अनेकजन्मकृतेन संसिद्धः -अनेकजन्मसंसिद्धः**—त्या संचय पावलेल्या अनेकजन्मकृत संस्कारानें संसिद्ध झा-लेला–अनेकजन्मसंसिद्ध योगी—**ततः लब्धसम्यग्दर्शनः सन् परां प्रकृष्टां गतिं याति**—त्या संचितसंस्कारसमूहापासून ज्याला सम्यग्ज्ञान प्राप्त झालें आहे, असा हो-त्साता परागतीला म्ह० मोक्षसंज्ञक सर्वोत्तम फलाला प्राप्त होतो. [ योगसिद्धीसाठीं भगीरथ प्रयत्न करणारा योगी प्रयत्नाची पराकाष्ठा झाली असतां विद्वान् व निष्पाप होतो, प्रत्येक जन्मांत थोडाथोडा असा योगाभ्यासजन्य संस्कार जमतां जमतां अनेक

जन्मांनीं योगजन्य संस्कारांचा फार मोठा संचय होऊन त्यामुळें तो संसिद्ध होतो. त्याला सम्यग्ज्ञान होतें व त्या ज्ञानामुळें तो संन्यासी श्रेष्ठ गतीला प्राप्त होतो. यास्तव ज्याला शीघ्र मुक्ति मिळावी, असे वाटत असेल त्यानें पुष्कळ प्रयत्न करावा. ] ४५.

**तपस्विभ्योऽधिको योगी ज्ञानिभ्योऽपि मतोऽधिकः ।**
**कर्मिभ्यश्चाधिको योगी तस्माद्योगी भवार्जुन ॥४६ ॥**

**अन्वयार्थ—तपस्विभ्यः**—कृच्छ्र-चांद्रायणादि तप करणाऱ्या तपस्व्यांहून—**योगी**—वर सांगितल्याप्रमाणें योगाभ्यास करणारा—**अधिकः**—अधिक आहे.—**ज्ञानिभ्यः अपि**—ज्ञानी पुरुषांहूनहि–शास्त्रपांडित्यवानांहूनहि योगी—**अधिकः मतः**—अधिक-श्रेष्ठ मानलेला आहे.—**योगी**—योगी-योगाभ्यासी—**कर्मिभ्यः च**—अग्निहोत्रादि कर्में करणारांहून—**अधिकः**—श्रेष्ठ आहे.—**अर्जुन**—हे अर्जुना !—**तस्मात्**—म्हणून तूं—**योगी**—योगी—**भव**—हो. ४६.

**यस्मादेवं तस्मात्—तपस्विभ्योऽधिको योगी ज्ञानिभ्योऽपि, ज्ञानमत्र शास्त्रपाण्डित्यं तद्वद्भ्योऽपि मतो ज्ञातोऽधिकः श्रेष्ठ इति कर्मिभ्योऽग्निहोत्रादि कर्म तद्वद्भ्योऽधिको योगी विशिष्टो यस्मात्तस्माद्योगी** भवार्जुन ॥ ४६ ॥

**भाष्यार्थ—यस्मात् एवं तस्मात्**—ज्याअर्थी योग सम्यग्ज्ञानाच्या द्वारा मोक्षाला कारण होतो त्याअर्थीं योगाभ्यासी सर्व साधकांत श्रेष्ठ आहे असें 'तपस्विभ्यः०' इत्यादि श्लोकानें सांगतात—**तपस्विभ्यः योगी अधिकः**—कृच्छ्र-चांद्रायणादि तप करणारांहून ध्यानयोगी श्रेष्ठ आहे.—**ज्ञानिभ्यः अपि–ज्ञानं अत्र शास्त्रपांडित्यं तद्वद्भ्यः अपि अधिकः–श्रेष्ठः इति मतः–ज्ञातः**—ज्ञानी पुरुषांहूनहि–येथें ज्ञान म्ह० शब्दपांडित्य,त्यानें युक्त असलेल्यांहूनहि योगी अधिक श्रेष्ठ–असें मानलेला

---

१ "४०ते ४५ श्लोकांतून योग, योगभ्रष्ट व योगी हे शब्द कर्मयोग,कर्मयोगापासून भ्रष्ट व कर्मयोगी या अर्थींच वापरलेले आहेत," असें रहस्यकार म्हणतात व त्याला कारण काय सांगतात? तर 'श्रीमान् कुलांत जन्मणें ही स्थिति इतरांस इष्ट असणें संभवनीय नाहीं,' पण योगादिशब्दांचा तसा अर्थ येथें करितां येत नाहीं, हें आम्हीं वर दाखविलेंच आहे. रहस्यकार तसाच अर्थ करण्याचें कारण जें सांगतात तेंहि सयुक्तिक नाहीं. कारण 'श्रीमंत कुलांत जन्मणें' ही स्थिति योगभ्रष्टाला इष्ट असते असें मुळींच नाहीं. त्याच्या पुण्यप्रभावामुळें प्राप्त होणारें तें अवांतर फल आहे. एखाद्या श्रीमान् कुलांत झालेलाहि मनुष्य स्वभावतःच सात्त्विक, शांत, निवृत्तधर्मी असतो, असें आपण पाहतों. त्यामुळें योगभ्रष्ट कर्मयोगी असला, तरच तो श्रीमंताच्या घरीं जन्म घेईल, असें म्हणतां येत नाहीं. शिवाय गीतेंतील कर्मयोगी ज्ञानी आहे, असें अगोदर ठासून सांगावयाचें व पुनः त्यालाच योगभ्रष्ट बनवून अनेक जन्म खितपत ठेवावयाचें, हा न्याय अपूर्वच खरा ! वैदिकसंप्रदाय सोडून मनसोक्त शास्त्रार्थ सांगूं लागलें, म्हणजे पदोपदीं असेंच स्खलन व्हावयाचें !

—समजलेला आहे.—**यस्मात् कर्मिभ्यः-अग्निहोत्रादिकर्म तद्वद्भ्यः योगी अधिकः-विशिष्टः**—ज्याअर्थी कर्मानुष्ठान करणारांहून-येथें अग्निहोत्रादिकर्म विवक्षित आहे, तें करणारांहून म्ह० कर्मयोग्याहून ध्यानयोगी अधिक विशिष्ट आहे,—**तस्मात् अर्जुन योगी भव**—म्हणून हे अर्जुना, तूं योगी-ध्यानयोगी हो. [ध्यानयोग हें ज्ञानाचें सर्वांहून श्रेष्ठ साधन आहे. यास्तव प्रत्येक मुमुक्षूनें ध्यानयोगी अवश्य झालें पाहिजे, हें सुचविण्यासाठीं ध्यानयोगयाचें श्रेष्ठत्व येथें प्रतिपादिलें आहे व अर्जुनालाहि ' ध्यानयोगी हो, ' असें सांगितलें आहे. ] ४६.

---

१ या श्लोकाचा अर्थ रहस्यकारांनी फारच बहारीचा केला आहे. " तपस्वी म्ह० पातंजल योगी-हठयोगी कायक्लेशकर व्रतांनी सिद्धि मिळविणारे, ज्ञानी म्ह० सांख्यमार्गी, ( गी. र. ७०६ व ७११ ) आणि कर्मी म्हणजे कर्मठ मीमांसक, या सर्वांपेक्षा कर्मयोगी श्रेष्ठ आहे, म्हणून तू कर्मयोगी हो, " असा अर्थ ते करितात, व 'ज्ञानी म्ह० 'ज्ञानयोगेन सांख्यानां' ३.३ या श्लोकात वर्णिलेले' असें स्पष्टीकरण करितात,पण तें अगदी अयोग्य असून वैदिक संप्रदायाच्या अगदीं उलट आहे. गी. ३.८, ५.२, २.४८, ४.४२, व येथील ६.४६ या वचनांवरून ज्ञाननिष्ठेहून कर्मयोग श्रेष्ठ असें त्रिकाली सिद्ध होणें शक्य नाही. त्या त्या श्लोकाचा भाष्यार्थ पहा; रहस्यकार म्हणतात—" कर्मयोग याप्रमाणे श्रेष्ठ न मानला तर 'तस्मात् योगी भवार्जुन ' यांतील 'तस्मात्–' म्हणून–हे पद निरर्थक होईल." तें कां बरे निरर्थक होईल ? त्यात असें काय मोठें गूढ आहे की, ज्यामुळें त्या पदावरून 'योगी म्ह०कर्मयोगी हो,' असेच म्हणावें लागतें? "अर्जुनाला युद्धास प्रवृत्त करावयाचें आहे. त्यामुळे येथें 'तू ध्यानयोगी-पातंजल योगी हो ' असा उपदेश संभवत नाही, म्हणून 'तूं योगी म्ह० कर्मयोगी हो' असाच अर्थ करावा लागतो," अशी एक 'कोटी' रहस्यकार लढवितात. पण ती शुद्ध कोटीच आहे. त्यांत उपपत्ति मुळीच नाही. कारण युद्धाच्या अगदी विरोधी, युद्धप्रसंगी ज्याचा संभवच नाही, अशी पुष्कळ साधनें गीतेत अर्जुनाला उपदेशिली आहेत. जसें 'निस्त्रैगुण्यो निर्द्वंद्वो नित्यसत्त्वस्थो निर्योगक्षेमः भव' अ.२.४५. 'मा कर्मफलहेतुर्भूः ' २-४७. 'योगस्थः कुरु कर्म ' २-४८ 'बुद्धौ शरणमन्विच्छ ' २-४९ 'यदा ते मोहकलिलं बुद्धिर्व्यतितरिष्यति तदा निर्वेदं गन्तासि ' २.५२ 'ते श्रुतिविप्रतिपन्ना बुद्धिः समाधौ निश्चला स्थास्यति तदा योगं अवाप्स्यसि' २.५३. 'असक्तः सततं कार्यं कर्म समाचर' ३-१९. 'मयि सर्वाणि कर्माणि सन्यस्य निराशीः निर्ममः भूत्वा' ३.३० 'इंद्रियाणि नियम्य पाप्मानं प्रजहिहि'३.४१,'कामरूप दुरासदं शत्रु जहि'३.४३'तत् प्रणिपातेन परिप्रश्नेन विद्धि' ४.३४ 'ज्ञात्वा मोहं न यास्यसि' ४.३५ इत्यादि उपदेशहि जर त्या प्रसंगासाठी नाहीत, पुढें क्रमानें स्वस्थपणें आचरण्यासाठी सांगितले आहेत, तर सर्व ध्यानयोगाचें अंगोपांगांसह व परम फलासह प्रतिपादन केल्यावर 'तूंहि ध्यानयोगी हो, ' असें सांगणेंच उचित आहे. तपस्वी, शास्त्रार्थज्ञानी, व कर्मठ यांहून ध्यानयोगी श्रेष्ठ आहे, या म्हणण्यांत कांहीच शास्त्रविरोध नाहीं. पण ज्ञाननिष्ठ स्थितप्रज्ञापेक्षां किंवा जीवन्मुक्तापेक्षां कर्मयोगी श्रेष्ठ आहे, या म्हणण्यांत मात्र शास्त्रीयता मुळींच नाहीं. अर्थात् रहस्यकार कर्मयोगाचें ढोलकें मोठमोठ्यानें बडविण्यासाठी ज्ञाननिष्ठेलाहि जरी गौण ठरवीत असले, तरी शास्त्रज्ञ त्याला कांहींच किंमत देणार नाहींत, हें उघड असल्यामुळें आम्हीं आतां संन्यासमार्गीय टीकाकारांवरील त्यांच्या अप्रस्तुत व वृथा आक्षेपांकडे केवळ दुर्लक्ष करण्याचाच निश्चय केला आहे.

**योगिनामपि सर्वेषां मद्गतेनान्तरात्मना ।**
**श्रद्धावान्भजते यो मां स मे युक्ततमो मतः ॥ ४७॥**

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे ध्यानयोगो ( अभ्यासयोगो ) नाम षष्ठोऽध्यायः ॥ ६ ॥**

**अन्वयार्थ—सर्वेषां योगिनां अपि**—रुद्र-आदित्यादिकांचें ध्यान करणाऱ्या दुसऱ्या सर्व योग्यांमध्येंहि—**यः श्रद्धावान्**—जो श्रद्धावान् योगी-ध्यानी—**मद्गतेन अन्तरात्मना**—माझ्या ठिकाणी स्थिर केलेल्या अन्तःकरणानें—**मां भजते**—मला भजतो—**सः मे युक्ततमः**—तो मला अतिशय योगी म्हणून—**मतः**—मान्य आहे.

**योगिनामिति । योगिनामपि सर्वेषां रुद्रादित्यादिध्यानपराणां मध्ये मद्गतेन मयि वासुदेवे समाहितेनान्तरात्मनाऽन्तःकरणेन श्रद्धावाञ्श्रद्दधानः सन्भजते सेवते यो मां स मे मम युक्ततमोऽतिशयेन युक्तो मतोऽभिप्रेत इति ॥ ४७ ॥**

इति श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यगोविन्दभगवत्पूज्यपादशिष्यश्रीमच्छंकरभगवतः कृतौ श्रीभगवद्गीताभाष्येऽभ्यासयोगो नाम षष्ठोऽध्यायः ॥ ६ ॥

**भाष्यार्थ—'योगिनां इति०'**—अहोपण, आदित्य, विराडात्मा, हिरण्यगर्भ, अव्याकृत, अक्षरब्रह्म इत्यादिकांची उपासना करणारे अनेक उपासक आहेत, त्यांतील कोणता उपासक श्रेष्ठ, तें ' योगिनां० ' या श्लोकानें सांगतात—**रुद्रादित्यादिध्यानपराणां सर्वेषां योगिनां अपि मध्ये**—रुद्र, आदित्य इत्यादिकांचे ध्यान तत्परतेने

---

१ येथील 'सर्वेषा योगिनां' याचा अर्थ 'सर्व कर्मयोग्यामध्यें' असा रहस्यकार करितात. पण येथील सर्व म्ह० जितके कर्मयोगी आहेत त्यामध्यें, असा अर्थ विवक्षित नसून 'निरनिराळ्या इतर देवतांची उपासना करणारे जेवढे उपासक आहेत, त्या सर्वांत माझी अनन्यमनानें भक्ति करणारा योगीच श्रेष्ठ होय' असा अर्थ विवक्षित आहे. असा अर्थ केल्यावांचून 'सर्वेषां योगिना' व 'मां भजते' या शब्दांचे कांहीच स्वारस्य व्यक्त होत नाही. 'निष्काम कर्मयोगापेक्षांहि भक्ति श्रेष्ठ असा याचा अर्थ नाही.' पण या त्याच्या म्हणण्याला प्रमाण काय ? कीं रहस्यकारांचे वचन हेच याला प्रमाण ? रहस्यकार पुढें म्हणतात—"बाराव्या अध्यायांत ध्यानापेक्षां कर्मफलत्याग श्रेष्ठ असें स्पष्ट म्हटले आहे. " पण तें तसें कां म्हटलें आहे, हें रहस्यकारांच्या लक्षांत न आल्यामुळे ते त्या वचनाचा आधार दाखवीत आहेत. त्या मूळ वचनाचा अर्थ तेथेंच अधिक स्पष्ट करूं. रहस्यकार 'निष्कामकर्म व भक्ति याचा समुच्चय श्रेष्ठ' असें गीतेचें तात्पर्य समजतात. पण भागवत पुराण " सर्व प्रकारचे क्रियायोग आत्मज्ञानविघातक " १-५-३४ असें म्हणतें. अर्थात् रहस्यकारांना ते आवडत नाहीं. म्हणून ते भागवताची वाट अशी लावतात—" आम्हांला गीतेचें तात्पर्य काय, तें पहावयाचें आहे. भागवत काय सांगतें, तें पहावयाचें नाहीं. दोहोंचें प्रयोजन व कालहि भिन्न आहेत. यासाठीं त्यांची सर्वेस्वीं एकवाक्यता करणें युक्त नव्हे. " पण गीतेचा काल व भागवताचा

करणाऱ्या सर्वहि योग्यांमध्यें—**मद्गतेन-मयि वासुदेवे समाहितेन अन्तरात्मना -अन्तःकरणेन**—मद्गत म्ह० मज वासुदेवाचे ठिकाणीं समाहित-स्थिर-एकाग्र केलेल्या अन्तरात्म्यानें म्ह० अन्तःकरणानें—**श्रद्धावान्-श्रद्दधानः सन् यः मां भजते -सेवते**—श्रद्धावान्-श्रद्धा ठेवणारा असा होऊन जो माझें भजन-सेवन करतो—**सः मे-मम युक्ततमः-अतिशयेन युक्तः मतः-अभिप्रेतः इति**—तो मला युक्ततम—अतिशय युक्त—समाहित योगी म्हणून अभिमत-इष्ट आहे. [ जो सगुण किंवा निर्गुण भगवंताचे, त्याच्या ठिकाणीं अन्तःकरण स्थिर करून मोठ्या श्रद्धेनें, सतत चिंतन करतो, तो इतर सर्व उपासकांमध्यें श्रेष्ठ योगी आहे, असें भगवन्तांचे मत आहे. या अध्यायांत संन्यासाचें साधन असा जो कर्मयोग त्याची मर्यादा-तो कोठपर्यंत आचरावा तें सांगितलें. सांग योगाचे विवरण केलें. मनोनिग्रहाच्या दोन उपायांचा उपदेश केला. योगभ्रष्टाचा आत्यंतिक नाश होतो कीं काय, या शंकेचें निरसन केले व त्वंपदाचा अर्थ जाणणाऱ्या साधकाचें ज्ञाननिष्ठत्व सांगून वाक्यार्थज्ञानानें म्ह० अपरोक्ष आत्मसाक्षात्कारानें मुक्ति मिळते, हें सिद्ध केलें. ] ४७.

इति भगवान् श्रीकृष्णांनीं गायलेल्या-सांगितलेल्या उपनिषदांतील-रहस्यविद्येतील ब्रह्मविद्येपैकीं योग-उपाय-शास्त्रांतील ध्यानयोग ( अभ्यासयोग ) नावाचा सहावा अध्याय विष्णुशर्मकृत सान्वयार्थ-सटीप-भाष्य-भाष्यार्थासह समाप्त झाला.

---

काल जरी भिन्न असला, तरी त्याचे प्रयोजनहि भिन्न आहे हें कसें ठरते? पण प्रयोजन भिन्न मानल्यावांचून गीता कर्मयोगप्रधान आहे हें कसें म्हणतां येईल? आमच्या मतें भागवत व गीता यांचें प्रयोजन भिन्न नसून एकच आहे. यास्तव वेदान्तशास्त्रावरील कोणताहि ग्रंथ जरी पाहिला, तरी त्यांत कर्मयोग अंग-साधन व ज्ञाननिष्ठा साध्य असेंच प्रतिपादन केलेलें असणार, हें निर्विवाद होय. हा वेदान्ताचा सिद्धान्त कधींच कोणाला खोडून काढतां येणें शक्य नाहीं. रहस्यकार शब्दार्थाची भयंकर ओढाताण कशी करितात याचें येथें ( म्ह० गी. र. पृ. ७१२ ) एक उदाहरण आहे. त्यांनीं 'नैष्कर्म्यमप्यच्युतभाववर्जितं न शोभते ज्ञानमलं निरंजनं' हे भागवतांतील अर्धेंच वाक्य घेऊन त्याचा अर्थ-'नैष्कर्म्य म्ह० निष्काम कर्महि भगवद्भक्तीवांचून शोभत नाहीं, फुकट आहे.' असा केला आहे. पण 'ज्ञानं निरंजनं' ही पदे त्यांतच असल्यामुळें 'नैष्कर्म्य' म्ह० निष्कर्मता असाच अर्थ केला पाहिजे. नैष्कर्म्य व निरंजन ही दोन्ही ज्ञानाची विशेषणे आहेत. या वचनाचा उत्तरार्ध 'कुतः पुनः शश्वदभद्रमीश्वरे न चार्पितं कर्म यदप्यकारणं' असा असून संबंध श्लोकाचें तात्पर्य असें आहे—निष्कर्मतारूप व निरुपाधिक ज्ञानहि जर अच्युतभावावांचून अतिशय शोभत नाहीं, तर सकाम किंवा निष्काम कर्म भक्तीवांचून कसें शोभणार? पण त्यांचे मन कर्मयोगाविष्ट झाल्यामुळें त्यांना तसा अर्थ स्फुरणें शक्य नव्हतें. तात्पर्य अमार्गानें विचार केल्यामुळें गीतारहस्यकारांना गीतेचा यथार्थ अर्थ कळला नाहीं, असें मोठ्या कष्टानें म्हणावें लागते.

# अध्याय सातवा.

ज्ञान-विज्ञानयोग.

**श्रीभगवानुवाच**—श्रीकृष्ण म्हणाले—

**मय्यासक्तमनाः पार्थ योगं युञ्जन्मदाश्रयः ।**
**असंशयं समग्रं मां यथा ज्ञास्यसि तच्छृणु ॥ १ ॥**

**अन्वयार्थ—हे पार्थ**—हे अर्जुना! **मयि**—माझ्यामध्यें—**आसक्तमनाः**—ज्याचें मन आसक्त झालें आहे,—**मदाश्रयः**—माझाच ज्यानें आश्रय केला आहे व —**योगं युञ्जन्**—योगाभ्यास करणारा-मनःसमाधान करणारा असा तूं—**समग्रं मां**—विभूति-बल-ऐश्वर्य इत्यादि समस्त गुणांनी युक्त अशा मला—**यथा**—ज्या प्रकारें—**असंशयं**—निःसंशय—**ज्ञास्यसि**—जाणशील—**तत् शृणु**—तें ऐक. १.

**"योगिनामपि सर्वेषां मद्गतेनान्तरात्मना । श्रद्धावान्भजते यो मां स मे युक्ततमो मतः" इति प्रश्नबीजमुपन्यस्य स्वयमेवेदृशं मदीयं तत्त्वमेवं मद्गतान्तरात्मा स्यादित्येतद्विवक्षुः श्रीभगवानुवाच—मयि वक्ष्यमाणविशेषणे परमेश्वर आसक्तं मनो यस्य स मय्यासक्तमना हे पार्थ योगं युञ्जन्मनःसमाधानं कुर्वन्मदाश्रयोऽहमेव परमेश्वर आश्रयो यस्य स मदाश्रयो यो हि कश्चित्पुरुषार्थेन केनचिदर्थी भवति स तत्साधनं कर्माग्निहोत्रादि तपो दानं वा किंचिदाश्रयं प्रतिपद्यतेऽयं तु योगी मामेवाऽऽश्रयं प्रतिपद्यते हित्वाऽन्यत्साधनान्तरं मय्येवाऽऽसक्तमना भवति । यस्त्वमेवंभूतः सन्नसंशयं समग्रं समस्तं विभूतिबलशक्त्यैश्वर्यादिगुणसंपन्नं मां तथा येन प्रकारेण ज्ञास्यसि संशयमन्तरेणैवमेव भगवानिति तच्छृणूच्यमानं मया ॥ १ ॥**

**भाष्यार्थ**—( कर्मसंन्यासरूप साधन व 'त्वं-'पदाचा अर्थ ज्यांत प्रधान आहे, अशा पहिल्या षट्काचें व्याख्यान करून उपास्यनिष्ठ-तत्पदनिष्ठ असलेल्या मध्यम षट्काच्या व्याख्यानास आरंभ करणारे भाष्यकार सातव्या अध्यायाला अवतरण देतात-)—**'योगिनामपि सर्वेषां०' इति**—सहाव्या अध्यायाच्या शेवटीं सर्व उपासकांमध्यें माझ्या ठिकाणीं स्थिर केलेल्या अन्तःकरणानें जो माझी भक्ति करतो, तो मला युक्ततम म्हणून संमत आहे, असा—**प्रश्नबीजं उपन्यस्य**—प्रश्नाच्या बीजाचा उपन्यास करून [म्ह० भगवत्तत्त्व कसें आहे व तद्गतचित्त कसें व्हावें, या दोन प्रश्नांचें बीज त्यांत सुचवून]—**ईदृशं मदीयं तत्त्वं एवं मद्गत-अन्तरात्मा स्यात् इति एतत् विवक्षुः**

**स्वयं एव श्रीभगवान् उवाच**—माझें तत्त्व अशा प्रकारचें आहे व अशा प्रकारें मद्गत-अन्तरात्मा व्हावें, हें सांगण्याची इच्छा करणारे श्रीभगवान् 'मय्यासक्त०' इत्यादि म्हणाले—**हे पार्थ**—अर्जुना!—**मयि वक्ष्यमाणविशेषणे परमेश्वरे आसक्तं मनः यस्य सः मय्यासक्तमनाः**—माझ्यामध्यें म्ह० पुढे सांगितल्या जाणाऱ्या विशेषणांनीं युक्त अशा परमेश्वरामध्ये ज्याचें मन आसक्त आहे तो 'मय्यासक्तमनाः' होय,—**योगं युञ्जन्-मनःसमाधानं कुर्वन्**—योग करणारा-मनाचें समाधान करणारा—**मदाश्रयः-अहं एव परमेश्वरः आश्रयः यस्य सः मदाश्रयः**—मीच परमेश्वर ज्याचा आश्रय आहें, तो मदाश्रय ( याचेंच उपपादन करितात-)—**हि यः कश्चित् केनाचित् पुरुषार्थेन अर्थी भवति सः तत्साधनं कर्म अग्निहोत्रादि तपः दानं वा किंचित् आश्रयं प्रतिपद्यते**—कारण जो कोणी कोणत्याहि पुरुषार्थानें अर्थी होतो म्ह० ज्याला ज्या एखाद्या फलाची इच्छा असते, तो त्याचें साधन कर्म-अग्निहोत्रादि, तप किंवा दान यांतील कशाचा तरी आश्रय करतो.—**तु अयं योगी मां एव आश्रयं प्रतिपद्यते**—पण हा योगी मलाच आपल्या पुरुषार्थाचा आश्रय करितो, म्ह०—**अन्यत् साधनान्तरं हित्वा मयि एव आसक्तमनाः भवति**—दुसरें सर्व साधन सोडून माझ्या ठिकाणींच आसक्तचित्त होतो. (आतां दुसऱ्या अर्धाचें व्याख्यान-)— **यः त्वं एवंभूतः सन् समग्रं-समस्तं विभूति-बल-शक्ति-ऐश्वर्यादिगुणसंपन्नं मां**—जो तूं पूर्वोक्त ध्याननिष्ठ पुरुषाप्रमाणें माझ्यामध्यें आसक्तचित्त होत्साता समग्र म्ह० समस्त विभूति—नानाविध ऐश्वर्योपसंपत्ति, बल-शरीरगत सामर्थ्य, शक्ति-मनांतील प्रागल्भ्य, ऐश्वर्य-सर्व अनीश्वरांचें

---

१ रहस्यकारांनीं या अध्यायाच्या आरंभीं बराचसा मजकूर लिहिला आहे व त्यांत "कर्मयोग सांख्यमार्गाइतकाच मोक्षप्रद पण स्वतंत्र व त्याहून श्रेष्ठ आहे." इत्यादि तेंच तें चर्वितचर्वण केलें आहे. त्या विषयींचें आमचें म्हणणें यापूर्वींच सविस्तर आचार्य-भाष्याधारें सांगितलें असल्यामुळें यापुढें आलेला असल्या पुनरुक्त मजकुराकडे दुर्लक्ष करण्याचेंच ठरविलें आहे. तथापि आचार्यभाष्यावर यापुढे जें प्रत्यक्ष दोष दिलेले असतील, त्यांचा आम्हांलाहि विचार करावा लागेल, हें उघड आहे. तरीसुद्धा ग्रंथविस्तार अधिक न होईल अशी खबरदारी घेणें भाग आहे. याच आरंभाच्या मजकुरांत गीतेची पहिली षडाध्यायी कर्मपर, दुसरी भक्तिपर व तिसरी ज्ञानपर आहे, असे जें अद्वैती टीकाकार समजतात ते "तत्त्वतः खरे नव्हे, स्थूलमानानें ते तिन्ही विषय गीतेत आले असले, तरी ते स्वतन्त्र नसून कर्मयोगाचीं अंगें आहेत." पृ. ७१४. असें जें रहस्यकार म्हणतात तें अयोग्य आहे. कर्मकांड, उपासनाकांड व ज्ञानकांड यांचा परस्परसंबंध कसा आहे याचा विचार न केल्यामुळें त्यांची ही अशी विपरीत भावना झाली आहे. साधनाला साध्य व साध्याला साधन समजणें, हा या समजुतींत मोठा दोष आहे.

२ सकलजगदाधारत्व, नानाविध विभूतिमाक्त्व इत्यादि. ३ मनानें इतर विषयांचा परिहार करून तन्निष्ठ होणें हीच आसक्ति होय. ईश्वराबांचून इतर सर्व विषयांचा परिहार केला असतां मन भगवानांतच प्रतिष्ठित होतें.

नियमन करण्याचें सामर्थ्य व ज्ञानेच्छादि गुणांनीं संपन्न असलेल्या मला—**असंशयं -संशयं अन्तरेण-एवं-एव भगवान् इति**—असंशय-संशयावांचून असाच भगवान् आहे, असें—**यथा-येन प्रकारेण ज्ञास्यसि तत् मया उच्यमानं शृणु** —ज्याप्रकारें तूं जाणशील तें मी सांगतों, ऐक. [ माझ्या ठिकाणींच ज्याचें मन आसक्त झालेलें आहे व मीच ज्याचा आधार आहें, अशा योगाभ्यास करणाऱ्या योग्याप्रमाणें तूंहि योगी होऊन मला पूर्णपणे, निसंशय कसा जाणशील तें मी सांगतों, ऐक. ] १.

ज्ञानं तेऽहं सविज्ञानमिदं वक्ष्याम्यशेषतः ।
यज्ज्ञात्वा नेह भूयोऽन्यज्ज्ञातव्यमवशिष्यते ॥ २ ॥

**अन्वयार्थ**—**अहं**—मी—**ते**—तुला—**इदं**—हे—**सविज्ञानं ज्ञानं**—साक्षात्कारासह-अनुभवासह ज्ञान—**अशेषतः**—संपूर्णपणे—**वक्ष्यामि**—सांगेन.—**यत्** —जें ज्ञान—**ज्ञात्वा**—जाणून—**इह**—येथे—**भूयः**—पुनः—**अन्यत्**—दुसरें—**ज्ञातव्यं**—जाणण्यास योग्य असें कांही—**न अवशिष्यते**—रहात नाहीं. २.

**तच्च मद्विषयम्—ज्ञानं ते तुभ्यमहं सविज्ञानं विज्ञानसहितं स्वानुभवसंयुक्तमिदं वक्ष्यामि कथयिष्याम्यशेषतः कार्त्स्न्येन । तज्ज्ञानं विवक्षितं स्तौति श्रोतुरभिमुखीकरणाय । यज्ज्ञात्वा यज्ज्ञानं ज्ञात्वा नेह भूयः पुनर्ज्ञातव्यं पुरुषार्थसाधनमवशिष्यते नावशेषो भवतीति मत्तत्त्वज्ञो यः स सर्वज्ञो भवतीत्यर्थः । अतो विशिष्टफलत्वाद्दुर्लभं ज्ञानम् ॥ २ ॥**

**भाष्यार्थ—च अहं ते-तुभ्यं तत् मद्विषयं ज्ञानं सविज्ञानं-विज्ञानसहितं स्वानुभवसंयुक्तं इदं अशेषतः-कार्त्स्न्येन वक्ष्यामि-कथयिष्यामि**—आणि मी तुला तें माझ्याविषयीचें ज्ञान विज्ञानासह-स्वानुभवानें संयुक्त असें हें पूर्णपणें सांगेन [ अपरोक्ष अनुभवासह हें ज्ञान मी तुला सांगतों ]—**श्रोतुः अभिमुखीकरणाय तत् विवक्षितं ज्ञानं स्तौति**—श्रोत्याला तदभिमुख करण्यासाठी—त्याला तें ऐक-

---

१ या श्लोकाच्या अर्थांत ' योगं युञ्जन् ' याचा अर्थ 'कर्मयोग आचरीत असतां' असा केला आहे; पण तो त्यांच्याच पूर्वीच्या ' योगी युजीत ' ६. १०, ' युंजन् एवं ' ६. १५, 'युंज्यात्' ६. १२, या ठिकाणी केलेल्या अर्थाहून विपरीत आहे. ६९९ पृष्ठावरील टीपेंत ' युंजीत ' या पदानें पातंजल सूत्रांतील योग या ठिकाणी विवक्षित आहे असें सांगतात, पण येथें त्याच ' युंजन् ' शब्दाचा अर्थ 'कर्मयोग आचरीत असतां' असा करितात. तेव्हां तो कितपत यथार्थ आहे, याचा विचार वाचकांनीच करावा. ' मद्योगमाश्रितः ' 'मत्परः' हे शब्द पुढें कर्मयोगाला अनुलक्षून आलेले आहेत, हें म्हणणें सर्वथैव चूक आहे. ' मद्योग ' म्ह० माझ्याठिकाणीं चित्ताचें समाधान व 'मत्परः' किंवा 'मत्परमः' म्ह० मलाच श्रेष्ठ मानून असा त्या शब्दांचा अर्थ असून ईश्वरपरायणता हेंच गीतेंतील मुख्य प्रतिपाद्य आहे, कर्मयोग नव्हे.

ण्याविषयीं उत्सुक करण्याकरितां त्या विवक्षित ज्ञानाची स्तुति करितात—**यत् ज्ञात्वा -यत् ज्ञानं ज्ञात्वा इह भूयः-पुनः ज्ञातव्यं पुरुषार्थसाधनं न अवशिष्यते-अवशेषः न भवति**—जें ज्ञान जाणून या जगांत पुनरपि जाणण्यास योग्य असें पुरुषार्थाचें साधन अवशिष्ट रहात नाहीं. ज्ञातव्याचा अवशेष उरत नाही—**इति यः मत्तत्त्वज्ञः सः सर्वज्ञः भवति इत्यर्थः**—यास्तव जो माझ्या तत्त्वाला जाणतो तो सर्वज्ञ होतो, असा भावार्थ. ( छान्दोग्यांतील एकविज्ञानानें सर्व विज्ञान सांगणाऱ्या श्रुतीच्या आधारानेंच ही येथील स्तुति आहे. छांन्दोभाष्यार्थ पृ. ४१२ पहा )—**अतः विशिष्टफलत्वात् ज्ञानं दुर्लभम्**—म्हणून या भगवत्तत्त्वज्ञानाचें विशिष्ट फल असल्यामुळें हें ज्ञान दुर्लभ आहे. [ मी तुला हें अनुभवज्ञानासह तत्त्वज्ञान सांगतों. तें ज्ञान झाल्यावर या जगांत जाणावयाचें म्हणून कांहीं शिल्लक रहात नाही. अर्थात् असें विशिष्ट फलानें युक्त असलेलें हें ज्ञान अतिशय दुर्लभ आहे. ] २.

## मनुष्याणां सहस्रेषु कश्चिद्यतति सिद्धये ।
## यततामपि सिद्धानां कश्चिन्मां वेत्ति तत्त्वतः ॥३॥

**अन्वयार्थ—मनुष्याणां सहस्रेषु कश्चित्**—हजारों मनुष्यांतील कोणी एखादाच—**सिद्धये**—ज्ञानप्राप्तीसाठीं—**यतति**—यत्न करतो.—**यततां अपि सिद्धानां**—यत्न करणाऱ्याहि सिद्धांतील—**कश्चित्**—कोणी एखादाच—**मां**—मला—**तत्त्वतः**—वस्तुतः-खरोखर-यथार्थपणें—**वेत्ति**—जाणतो. ३

कथमित्युच्यते—**मनुष्याणां मध्ये सहस्रेष्वनेकेषु कश्चिद्यतति प्रयत्नं करोति सिद्धये सिद्ध्यर्थं तेषां यततामपि सिद्धानां सिद्धा एव हि ते ये मोक्षाय यतन्ते तेषां कश्चिदेव मां वेत्ति तत्त्वतो यथावत् ॥ ३ ॥**

**भाष्यार्थ—कथं इति उच्यते**—हें ज्ञान दुर्लभ कसें तेंच सांगितले जाते—**मनुष्याणां मध्ये सहस्रेषु-अनेकेषु कश्चित् सिद्धये-सिद्ध्यर्थं यतति-प्रयत्नं करोति**—मनुष्यांतील सहस्रावधि-अनेक लोकांतील कोणी एखादा सिद्धीसाठीं म्ह० चित्तशुद्धीच्या द्वारा ज्ञानोत्पत्तीसाठीं प्रयत्न करितो.—**तेषां यततां अपि सिद्धानां**—त्या प्रयत्न करणाऱ्या सिद्धांतील ( अहोपण, सिद्धीसाठीं प्रयत्न करणारांना भगवानांनीं सिद्ध कसें म्हटलें आहे? उत्तर-)—**ये मोक्षाय यतन्ते ते सिद्धाः एव हि**—जे मोक्षासाठीं यत्न करितात ते सिद्धच होत. ( कारण, त्यांना ज्ञान होऊन सिद्धत्व प्राप्त होणें सुलभ असतें. )—**तेषां कश्चित् एव मां तत्त्वतः-यथावत् वेत्ति**—त्या सिद्धांतील कोणी एखादाच मला तत्त्वतः-यथार्थपणें जाणतो. [ असंख्य मनुष्यांतील कोणी एखादाच ज्ञानप्राप्तीसाठीं प्रयत्न करितो व अशा त्या प्रयत्न करणाऱ्या विरल सिद्धांतील एखादाच मला पूर्णपणें जाणतो. येथें प्रयत्न करणारांनाहि भगवानांनीं सिद्ध म्हटलें आहे, कारण त्यांना ज्ञानद्वारा सिद्धि प्राप्त होणें सुलभ असतें. ] ३.

भूमिरापोऽनलो वायुः खं मनो बुद्धिरेव च ।
अहंकार इतीयं मे भिन्ना प्रकृतिरष्टधा ॥ ४ ॥
अपरेयमितस्त्वन्यां प्रकृतिं विद्धि मे पराम् ।
जीवभूतां महाबाहो ययेदं धार्यते जगत् ॥ ५ ॥

**अन्वयार्थ—भूमिः**—गंधतन्मात्र,—**आपः**—रसतन्मात्र,—**अनलः**—रूपतन्मात्र,—**वायुः**—स्पर्शतन्मात्र,—**खं**—शब्दतन्मात्र,—**मनः**— मनाचें कारण अहंकार,—**च बुद्धिः एव**—आणि अहंकाराचे कारण महत्तत्त्व,—**अहंकारः**—अहंकाराच्या वासनेनें युक्त असलेलें अव्यक्त—**इति**—अशी—**इयं**—ही—**मे प्रकृतिः**—माझी प्रकृति-मायाशक्ति—**अष्टधा**—आठ प्रकारें—**भिन्ना**—भेदाला प्राप्त झाली आहे.—**इयं अपरा**—ही अपरा-निकृष्ट प्रकृति आहे—**तु**—पण—**महाबाहो**—हे पराक्रमी अर्जुना !—**इतः**—या अपरा प्रकृतीहून—**अन्यां**—दुसऱ्या प्रकारच्या—**जीवभूतां**—क्षेत्रज्ञरूप—**मे**—माझ्या—**प्रकृतिं**—प्रकृतीला तूं—**परां**—परा प्रकृति—**विद्धि**—समज.—**यया**—ज्या परा प्रकृतीकडून—**इदं जगत्**—हे जगत्—**धार्यते**—धारण केलें जातें. ४-५.

**श्रोतारं प्ररोचनेनाभिमुखीकृत्याऽऽह—भूमिरिति पृथिवीतन्मात्रमुच्यते न स्थूला 'भिन्ना प्रकृतिरष्टधा' इति वचनात् । तथाऽबादयोऽपि तन्मात्राण्येवोच्यन्ते । आपोऽनलो वायुः खं मन इति मनसः कारणमहंकारो गृह्यते । बुद्धिरित्यहंकारकारणं महत्तत्त्वम् । अहंकार इत्यविद्यासंयुक्तमव्यक्तम् । यथा विषसंयुक्तमन्नं विषमुच्यत एवमहंकारवासनावदव्यक्तं मूलकारणमहंकार इत्युच्यते प्रवर्तकत्वादहंकारस्य । अहंकार एव हि सर्वस्य प्रवृत्तिबीजं दृष्टं लोके । इतीयं यथोक्ता प्रकृतिर्मे ममैश्वरी मायाशक्तिरष्टधा भिन्ना भेदमागता ॥ ४ ॥**

**भाष्यार्थ**—( ज्ञानासाठीं प्रयत्न करणारा दुर्लभ आहे, त्याच्या द्वारा ज्ञान प्राप्त होणें दुर्लभ व त्या दोहोंच्या द्वारा मुक्ति दुर्लभ, असें सांगून-)—**प्ररोचनेन श्रोतारं अभिमुखी कृत्य आह**—प्ररोचनाने म्ह० रुचि उत्पन्न करणाऱ्या वाक्यानें श्रोत्याला पुढील ज्ञान ऐकण्याविषयीं उत्सुक करून भगवान् 'भूमिः०' इत्यादि श्लोकानें ज्ञान सांगतात—**भूमिः इति पृथिवीतन्मात्रं उच्यते न स्थूला**—'भूमि' या शब्दानें पृथ्वीतन्मात्र-सूक्ष्म भूमितत्त्व-गंधतन्मात्र सांगितलें जातें. आपल्या व्यवहाराला योग्य असलेली जी ही स्थूल पृथ्वी, ती भूमिशब्दानें येथें विवक्षित नाहीं. कारण—**'भिन्ना प्रकृतिः अष्टधा' इति वचनात्**—प्रकृति आठ प्रकारें भिन्न झाली आहे-भेद पावली आहे, असें याच श्लोकांत शेवटीं म्हटलें आहे [ म्हणजे येथें प्रकृतीचें कथन करावयाचें आहे; 'गंधतन्मात्र' ही स्थूल पृथ्वीची प्रकृति आहे. तिचाच पुढील विकार ही स्थूल पृथ्वी आहे. ]—**तथा अबादयः अपि तन्मात्राणि एव उच्यन्ते**—त्याचप्रमाणें

आप्, तेज इत्यादिकहि तन्मात्रेंच सांगितलेलीं आहेत.—**आपः अनलः वायुः खं**—आप्, अग्नि, वायु व आकाश. [ म्ह० रसतन्मात्र, रूपतन्मात्र, स्पर्शतन्मात्र व शब्द-तन्मात्र अर्थात् सर्व सूक्ष्म भूतें तसेंच ]—**मनः इति मनसः कारणं अहंकारः गृह्यते**—' मन ' या शब्दानें मनाचें कारण अहंकार ग्रहण केला जातो. [ कारण अहं-काराच्या अभावी संकल्प-विकल्पांचा असंभव असल्यामुळें अहंकारात्मक मन संभवतें. ' निश्चयलक्षणा बुद्धिः ' असें बुद्धीचें लक्षण केलेलें असल्यामुळें येथील बुद्धिशब्दाचा ' निश्चयात्मक अंतरिंद्रिय ' असा अर्थ कोणी समजेल, म्हणून आचार्य सांगतात- ]—**बुद्धिः इति अहंकारकारणं महत्तत्त्वं**—बुद्धि या शब्दानें अहंकाराचें कारण महत्तत्त्व घ्यावें [ कारण हिरण्यगर्भाच्या समष्टिबुद्धिरूप महत्तत्त्वावांचून व्यष्टिबुद्धि सिद्ध होत नाहीं. आतां अहंकारशब्दानें अभिमानविशेषरूप अन्तःकरणाचा एक भेद कोणी समजेल म्हणून सांगतात- ]—**अहंकारः इति अविद्यासंयुक्तं अव्यक्तं**—अहंकार या शब्दानें अविद्यासंयुक्त-अविद्यात्मक अव्यक्त घ्यावे. ( पण त्या मूल कारणाला ' अहंकार ' कसें म्हणतां येईल ? उत्तर- )—**यथा विषसंयुक्तं अन्नं विषं उच्यते एवं अहंकारवासनावद् अव्यक्तं-मूलकारणं अहंकारः इति उच्यते**—ज्या-प्रमाणें विषसंयुक्त अन्नाला विष म्हटले जातें, त्याप्रमाणे अहंकाराच्या वासनेने-सूक्ष्मसं-स्कारानें युक्त असलेल्या अव्यक्ताला-मूलकारणाला ' अहंकार ' असें म्हटलें जातें. ( त्याचें कारण- )—**अहंकारस्य प्रवर्तकत्वात्**—कारण अहंकाराला प्रवर्तकत्व आहे. म्ह० अहंकार प्रवर्तक आहे, त्यामुळें मूलकारणाला ' अहंकार ' म्हटलें आहे. ( अहंका-राचें प्रवर्तकत्वच विशद करितात- )—**लोके अहंकारः एव हि सर्वस्य प्रवृत्ति-बीजं दृष्टं**—व्यवहारांत अहंकारच सर्वांच्या प्रवृत्तीचें बीज-मूळ कारण आहे, ही प्र-त्यक्षसिद्ध गोष्ट आहे. ( ' अहं ' अशी वृत्ति असली म्ह० ' मम-' माझें ही वृत्ति उद्भ-वते, आणि ' अहं ' व ' मम ' या दोन वृत्ति असल्या म्हणजेच प्राण्याची प्रवृत्ति संभ-वते, हें प्रसिद्ध आहे. याप्रमाणें सांगितलेल्या प्रकृतीचा उपसंहार करितात- )—**इति इयं यथोक्ता प्रकृतिः मे-मम ऐश्वरी-मायाशक्तिः अष्टधा भिन्ना-भेदं आगता**—अशाप्रकारें ही पूर्वोक्त-वर सांगितलेली प्रकृति-मज ईश्वराची-ईश्वरसंबंधी मायाशक्ति आठ प्रकारें भिन्न आहे, अशा आठ प्रकारांनीं भेदाला प्राप्त झाली आहे. [ 'इयं' या शब्दाने तिचें अपरोक्षत्व म्ह० ती साक्षीला दृश्य आहे, हें सांगितलें. 'ऐश्वरी' म्ह० ईश्वराच्या आश्रयानें असलेली, त्याच्या ईश्वरत्वाची उपाधिभूत. प्रकृति म्ह० जी महत्-अहंकार इत्यादि आकारानें परिणाम पावते ती प्रकृति. ' त्रिगुणयुक्त व जगाचें उपादान, असें प्रधान हीच प्रकृति' असें जें सांख्यशास्त्राचें मत आहे,त्याचें निरसन करण्या-साठीं त्या प्रकृतीला ' माया ' असें म्हटलें आहे. तिलाच ' शक्ति ' असें म्हणून तिच्या-मध्यें निरनिराळ्या कार्यांच्या आकारानें परिणाम पावण्याचें सामर्थ्य आहे हें सुचविलें आहे. ] ४.

**अपरेति । अपरा न परा निकृष्टाऽशुद्धाऽनर्थकरी संसारबन्धनात्मिकेयमितोऽस्या यथोक्तायास्त्वन्यां विशुद्धां प्रकृतिं ममाऽऽत्मभूतां विद्धि मे परां प्रकृष्टां जीवभूतां क्षेत्रज्ञलक्षणां प्राणधारणनिमित्तभूतां हे महाबाहो यया प्रकृत्येदं धार्यते जगदन्तःप्रविष्टया ॥**

**भाष्यार्थ**—सर्व अचेतनवर्गाला एकरूप करण्यासाठी प्रकृतीचा आठ प्रकारें होणारा परिणाम सांगितला. आतां प्रत्येक विकारांत जणुंकाय कार्याप्रमाणें बनलेल्या चेतनवर्गाला एकरूप करण्यासाठीं अविद्यावच्छिन्न—अविद्याशक्तीनें मर्यादित झालेल्या पुरुषाला म्ह० चैतन्याला प्रकृतित्व आहे, असें पूर्वोक्त प्रकृतीचा अनुवाद करून—'**अपरा०**' **इति** 'अपरा०' या श्लोकानें दाखवितात—**इयं अपरा-न परा-निकृष्टा-अशुद्धा-अनर्थकरी-संसारबंधनात्मिका**—ही अष्टधा भिन्न असलेली प्रकृति अपरा आहे म्ह० परा-श्रेष्ठ नव्हे. निकृष्ट, अशुद्ध म्ह० अनर्थ करणारी-संसारबंधनरूप आहे.—**तु इतः-अस्याः यथोक्तायाः अन्यां-विशुद्धां प्रकृतिं मम-आत्मभूतां मे परां-प्रकृष्टां जीवभूतां-क्षेत्रज्ञलक्षणां प्राणधारणनिमित्तभूतां विद्धि**—पण या पूर्वोक्त अपरा प्रकृतीहून अन्य-अगदीं विलक्षण अतिशय शुद्ध असलेली जी प्रकृति ( सांख्याप्रमाणें स्वतंत्र नव्हे तर ) माझ्या स्वरूपभूत आहे, ती माझी परा म्ह० प्रकृष्ट-श्रेष्ठ जीवभूत म्ह० क्षेत्रज्ञरूप-प्राणधारणाचें निमित्त असलेली अशी आहे, असें तूं जाण. ( सांख्यांच्या प्रकृतीहून या प्रकृतीचा आणखी एक विशेष सांगतात-)—**हे महाबाहो, यया अन्तःप्रविष्टया प्रकृत्या इदं जगत् धार्यते**—हे आजानुबाहो, ज्या प्रत्येक कार्यांत प्रवेश केलेल्या प्रकृतीकडून हें जगत् धारण केलें जातें, ती माझी परा-भोक्तृरूप प्रकृति आहे, असें तूं जाण. [ जीवावांचून जगाचें धारण करतां येणें शक्य नाही, म्हणून 'आंत प्रवेश केलेल्या' वगैरे म्हटलें आहे. ]

**एतद्योनीनि भूतानि सर्वाणीत्युपधारय ।**
**अहं कृत्स्नस्य जगतः प्रभवः प्रलयस्तथा ॥ ६ ॥**

**अन्वयार्थ—सर्वाणि भूतानि**—सर्व भूतें—**एतद्योनीनि**—या दोन प्रकृतींपासून उत्पन्न झालेलीं आहेत, या दोन प्रकृति सर्वभूतांचें कारण आहे,—**इति**—असें—**उपधारय**—जाण—**अहं कृत्स्नस्य जगतः**—मी सर्व जगाची—**प्रभवः**—उत्पत्ति—**तथा**—त्याचप्रमाणें—**प्रलयः**—विनाश आहें. ६.

**एतदिति । एतद्योनीन्येते परापरे क्षेत्रक्षेत्रज्ञलक्षणे प्रकृती योनिर्येषां भूतानां तान्येतद्योनीनि भूतानि सर्वाणीत्येवमुपधारय जानीहि । यस्मान्मम प्रकृती योनिः कारणं सर्वभूतानामतोऽहं कृत्स्नस्य समस्तस्य जगतः प्रभव उत्पत्तिः प्रलयो विनाशस्तथा प्रकृतिद्वयद्वारेणाहं सर्वज्ञ ईश्वरो जगतः कारणमित्यर्थः ॥ ६ ॥**

**भाष्यार्थ**—या दोन प्रकृतींविषयीं कार्यलिंगक अनुमान-म्ह० कार्य या लिंगावरून होणारें अनुमान हेंच प्रमाण आहे, असें—'**एतत्०**' **इति** 'एतत्०' या

श्लोकानें सांगतात—**एतत्-योनीनि-एते पर-अपरे क्षेत्रक्षेत्रज्ञलक्षणे प्रकृती योनिः येषां भूतानां तानि एतद्योनीनि भूतानि सर्वाणि इति एवं उपधारय-जानीहि**—या पर व अपर म्ह० क्षेत्र व क्षेत्रज्ञरूप दोन प्रकृति ज्या भूतांची योनि-कारण आहे, तीं हीं सर्व भूतें 'एतद्योनीनि' आहेत, असा 'तूं निश्चय कर, असें समज. [ सर्व चराचर भूतें, याच कार्यावरून त्यांच्या कारणभूत दोन-परापर प्रकृतींचें अनुमान कर. अहोपण, परापर प्रकृतिच जर चराचर जगाचें कारण आहेत तर 'मी जगाचें कारण आहे' असें भगवानाला कसे म्हणतां येईल ? उत्तर-]—**यस्मात् मम प्रकृती सर्वभूतानां योनिः-कारणं अतः अहं कृत्स्नस्य-समस्तस्य जगतः प्रभवः-उत्पत्तिः**—ज्याअर्थी माझ्या या दोन प्रकृति सर्वभूतांची योनि म्ह० कारण आहेत, त्याअर्थी मी समस्त जगाचा प्रभव म्ह० उत्पत्ति आहें.—**तथा प्रलयः-विनाशः**—तसाच प्रलय म्ह० विनाश आहें. ( त्या दोन्ही प्रकृति माझ्या असल्यामुळें मुख्य कारण मीच आहें. कारण अपर प्रकृति जड आहे व पर प्रकृति जीवरूप-चेतन जरी असली तरी किंचिज्ज्ञ आहे. त्यामुळें ईश्वरालाच सर्वज्ञत्व व सर्वकारणत्व आहे असें सांगतात-)—**प्रकृतिद्वयद्वारेण अहं सर्वज्ञः ईश्वरः जगतः कारणं इत्यर्थः**—दोन प्रकृतींच्या द्वारा मी सर्वज्ञ ईश्वर जगाचें कारण आहें, असा याचा भावार्थ. ६

**मत्तः परतरं नान्यत्किंचिदस्ति धनंजय ।**
**मयि सर्वमिदं प्रोतं सूत्रे मणिगणा इव ॥ ७ ॥**

**अन्वयार्थ—हे धनंजय,**—अर्जुना !—**मत्तः**—मजहून—**परतरं अन्यत्**—अधिक श्रेष्ठ असें दुसरें—**किंचित् न अस्ति**—कांहींएक नाहीं.—**सूत्रे मणिगणाः इव**—दोऱ्यांत जसे मणिगण-पुष्कळ मणी त्याप्रमाणें—**मयि इदं सर्वं प्रोतं**—माझ्या ठिकाणीं हें सर्व ओंवलेलें आहे. ७.

**यतस्तस्मात्—मत्तः परमेश्वरात्परतरमन्यत्कारणान्तरं किंचिन्नास्ति न विद्यतेऽहमेव जगत्कारणमित्यर्थः । हे धनंजय यस्मादेवं तस्मान्मयि परमेश्वरे सर्वाणि भूतानि सर्वमिदं जगत्प्रोतमनुस्यूतमनुगतमनुविद्धं ग्रथितमित्यर्थः । दीर्घतन्तुषु पटवत्सूत्रे च मणिगणा इव ॥ ७ ॥**

**भाष्यार्थ**—सर्वांचें कारण असें जें अक्षर प्रधान त्याचें कारण जसा पुरुष त्याप्रमाणें त्या पुरुषाचें म्ह० परमात्म्याचेंहि दुसरें कांहीं कारण असेल, असें कोणी म्हणेल, म्हणून पूर्वोक्त दोन प्रकृतींच्या द्वारा ईश्वरालाच सर्वकारणत्व आहे, असें जें वर सांगितलें आहे, त्याच्याच आधारानें म्हणतात-)—**यतः तस्मात् मत्तः-परमेश्वरात् परतरं-अन्यत् कारणान्तरं किंचित् न अस्ति-न विद्यते**—ज्याअर्थी मीच जगत्कारण आहें, त्याअर्थी मज परमेश्वराहून दुसरें-भिन्न असें स्वतंत्र कारण कांहींहि विद्यमान नाहीं.—**अहं एव जगत्कारणं इत्यर्थः**—मीच जगाचें कारण आहें, असा भावार्थ.—

**हे धनंजय यस्मात् एवं तस्मात् मयि परमेश्वरे सर्वाणि भूतानि-सर्वं इदं जगत् प्रोतं-अनुस्यूतं-अनुगतं-अनुविद्धं-ग्रथितं इत्यर्थः**—हे अर्जुना, ज्याअर्थी असें आहे, त्याअर्थी मज परमेश्वरामध्यें सर्व भूतें, हें सर्व जगत् ओंवलेलें—अनुगत—अनुविद्ध—ग्रथित केलेलें आहे, असा याचा भावार्थ. [ उभ्या व आडव्या तंतूंच्या रचनेमध्यें पटाचें-वस्त्राचें भान जसें होतें, त्याप्रमाणें माझ्याच ठिकाणीं जगाचें भान होतें, असें सांगतात-]— **दीर्घतंतुषु पटवत्**—दीर्घ तंतूंमध्यें जसा पट—वस्त्र तसें माझ्याच ठिकाणीं सर्व जगत्—**च सूत्रे मणिगणाः इव**—आणि सूत्रामध्यें जसे मण्याचे समूह त्याप्रमाणें. [ माळेचे मणी दोऱ्यांत ओंवलेले असतात. त्या दोऱ्याकडूनच धारण केले जातात, दोऱ्याच्या अभावीं इतस्ततः पसरतात, त्याप्रमाणें आत्मभूत अशा मींच हें सर्व व्यापलें आहे. माझ्यावांचून हें सर्व विनाशच पावेल. त्याची स्थितिच संभवणार नाहीं. ] ७.

रसोऽहमप्सु कौन्तेय प्रभास्मि शशिसूर्ययोः ।
प्रणवः सर्ववेदेषु शब्दः खे पौरुषं नृषु ॥ ८ ॥

**अन्वयार्थ—कौन्तेय**—हे अर्जुना !—**अहं**—मी—**अप्सु**—जलांत—**रसः**—रस—**अस्मि**—आहें.—**शशिसूर्ययोः**—चंद्र व सूर्य यांमध्यें—**प्रभा**—तेज—(**अस्मि**)—आहे.—**सर्ववेदेषु**—सर्व वेदांमध्यें—**प्रणवः (अस्मि)**—मी ओंकार आहें.—**खे**—आकाशांत—**शब्दः**—मी शब्द आहे व—**नृषु**—पुरुषांमध्यें मी—**पौरुषं** पुरुषत्व आहें. ८.

---

१ रहस्यकार, सहाव्या अध्यायांतील योगाला पातंजल योगाचा आधार आहे, असें मानण्यास तयार नाहीत, हें दाखविलें; पण येथें "सांख्यशास्त्रांत प्रकृतीचे जे भेद केलेले आहेत, तेच थोड्याशा फरकानें गीतेंत ग्राह्य धरले आहेत."... "सांख्यांनीं केलेलें प्रतिपादन म्हणजे गुणोत्कर्षाचें तत्त्वहि गीतेस मान्य आहे," इत्यादि म्हणतात. पण सांख्य व योग हीं दोन्हीं दर्शनें एकाच कक्षेंतील असतांना रहस्यकारांना त्यांतील सांख्यशास्त्र तेवढें गीतेंत दिसावें व योगशास्त्राचा गीतेशीं कांहीच संबंध नाहीं असें वाटावें, याचें आश्चर्य वाटतें ! कदाचित् सांख्यशास्त्र केवल तर्कप्रधान व योगशास्त्र केवल आचारप्रधान असल्यामुळें सांख्यदर्शन मात्र आवडतें व योगदर्शन नावडतें झालें असावें, कारण योगाभ्यास करूं लागलें कीं, कर्मयोग लटपटलाच ! वेदान्त संप्रदाय असा पक्तिप्रपंच करीत नाहीं. वेदान्ताला श्रुत्यनुसारी तर्कहि ग्राह्य आहे व योगहि सम्मत आहे. पण त्या दोहोंनाहि मूळ आधार श्रुतींतच असून त्यावरच पुढें त्या दोन्ही दर्शनांचा कपिल व पतंजलि यांनीं अधिक विस्तार केला आहे. अर्थात् गीतेंत कांहीं भाग जसा सांख्यशास्त्राचा आहे, तसाच योगशास्त्राचाहि आहे. तथापि प्रकृति, महत, अहंकार, कर्मेन्द्रियें, ज्ञानेन्द्रियें इत्यादिकांचा उल्लेख उपनिषदांतून असल्यामुळें गीतेंत जेथें जेथें ते शब्द येतील, तेथें तेथें त्यांचा सांख्यशास्त्राशीं संबंध जोडण्यापेक्षां तो उपनिषदांशींच लावणें अधिक सयुक्त होय व आचार्यांनीं तसेंच केलें आहे, हें आम्ही पुढें दाखवूं.

केन केन धर्मेण विशिष्टे त्वयि सर्वमिदं प्रोतमित्युच्यते—रसोऽहमपां यः सारः स रसस्तस्मिन्रसभूते मय्यापः प्रोता इत्यर्थः। एवं सर्वत्र। यथाऽहमप्सु रस एवं प्रभाऽस्मि शशिसूर्ययोः। प्रणव ओंकारः सर्ववेदेषु तस्मिन्प्रणवभूते मयि सर्वे वेदाः प्रोताः। तथा खे आकाशे शब्दः सारभूतस्तस्मिन्मयि खं प्रोतम्। तथा पौरुषं पुरुषस्य भावो यतः पुंबुद्धिर्नृषु तस्मिन्मयि पुरुषाः प्रोताः ॥ ८ ॥

**भाष्यार्थ**—( पण, जलादि पदार्थ रसादिकांत ओतप्रोत आहेत असें दिसतें. त्यामुळें सर्व तुझ्या ठिकाणीं अनुगत आहे, हे म्हणणे अयोग्य आहे, असे समजून अर्जुन प्रश्न करतो-)—**केन केन धर्मेण विशिष्टे त्वयि सर्वं इदं प्रोतं इति उच्यते**—कोणत्या कोणत्या धर्मांने विशिष्ट असलेल्या तुझ्यामध्यें हें सर्व जगत् प्रथित आहे? म्हणून विचारशील तर ‘ रसः० ’ या श्लोकानें सांगतात—**रसः अहं**—मी रस आहें.—**अपां यः सारः सः रसः**—पाण्याचें जें सार तो रस—**तस्मिन् रसभूते मयि आपः प्रोताः इत्यर्थः**—त्या रसरूप अशा माझ्यामध्यें आप प्रोत-प्रथित-अनुगत आहेत.—**यथा अहं अप्सु रसः एवं शशिसूर्ययोः प्रभा अस्मि**—ज्याप्रमाणे मी आपामध्यें रस आहें,त्याचप्रमाणें चंद्र व सूर्य यांमध्ये प्रभा आहें.[म्ह० चंद्र-सूर्यांची जी प्रभा तद्रूप अशा माझ्या ठिकाणीं ते दोघे गुंफलेले आहेत. ]—**सर्ववेदेषु प्रणवः-ओंकारः**—सर्व वेदांमध्यें प्रणव म्ह० ओंकार हें सार आहे.—**तस्मिन् प्रणवभूते मयि सर्वे वेदाः प्रोताः**—त्या प्रणवभूत अशा माझ्यामध्यें सर्व वेद प्रोत आहेत.—**तथा खे-आकाशे शब्दः सारभूतः तस्मिन् मयि खं प्रोतं**—त्याचप्रमाणें आकाशांत शब्द हा सारभूत गुण आहे, त्या शब्दरूप अशा माझ्यामध्यें आकाश प्रोत आहे.—**तथा पौरुषं-पुरुषस्य भावः यतः नृषु पुंबुद्धिः तस्मिन् मयि पुरुषाः प्रोताः**—त्याचप्रमाणें पौरुष म्ह० पुरुषाचा भाव-पुरुषत्व, ज्यामुळें मनुष्यांमध्यें हा पुरुष अशी बुद्धि होते, तद्रूप अशा मजमध्यें पुरुष प्रोत आहेत. [ परमेश्वर पुंस्त्वसामान्यरूप आहे. त्यामध्यें त्याचे विशेष प्रथित आहेत. कारण ईश्वरांतील सामान्य पुंस्त्व हेंच यांच्या पुंस्त्वाचें उपादान कारण आहे. त्यामुळें त्यांना ईश्वरस्वभावत्व आहे, असा याचा भावार्थ. ] ८.

पुण्यो गन्धः पृथिव्यां च तेजश्चास्मि विभावसौ ।
जीवनं सर्वभूतेषु तपश्चास्मि तपस्विषु ॥ ९ ॥

**अन्वयार्थ**—**च**—आणि—**पृथिव्यां**—पृथिवीमध्यें—**पुण्यः गन्धः**—पुण्यगंध-सुवास—**च**—आणि—**विभावसौ**—अग्नीमध्यें—**तेजः**—दीप्ति—**अस्मि**—मी आहें—**सर्वभूतेषु**—सर्व भूतांमध्यें—**जीवनं**—जीवनशक्ति—**च तपस्विषु**—व तपस्व्यांमध्यें—**तपः**—तप—**(अहं) अस्मि**—मी आहें. ९.

पुण्य इति। पुण्यः सुरभिर्गन्धः पृथिव्यां चाहं तस्मिन्मयि गन्धभूते पृथिवी प्रोता। पुण्यत्वं गन्धस्य स्वभावत एव पृथिव्यां दर्शितमबादिषु रसादेः पुण्यत्वोपलक्षणार्थम्।

अपुण्यत्वं तु गन्धादीनामविद्याधर्माद्यपेक्षं संसारिणां भूतविशेषसंसर्गनिमित्तं भवति। तेजो दीप्तिश्चास्मि विभावसावग्नौ। तथा जीवनं सर्वभूतेषु येन जीवन्ति सर्वाणि भूतानि तज्जीवनम्। तपश्चास्मि तपस्विषु तस्मिंस्तपसि मयि तपस्विनः प्रोताः॥९॥

**भाष्यार्थ—पुण्यः इति**— माझ्यामध्यें हें सर्व ग्रथित आहे, असें जें वर म्हटलें आहे त्याचें परिमाण दाखविण्यासाठीं 'पुण्यः०' या श्लोकानें दुसरा प्रकार सांगतात—**च पृथिव्यां पुण्यः-सुरभिः गन्धः अहं**—आणि पृथ्वींत पुण्य म्ह० घ्राणेंद्रियाला तृप्त करणारा सुवास मी आहें.—**तस्मिन् गन्धभूते मयि पृथिवी प्रोता**—त्या सुगन्धभूत अशा मजमध्यें पृथिवी ग्रथित आहे.—**पृथिव्यां गन्धस्य (यत्) पुण्यत्वं स्वभावतः एव दर्शितं (तत्) रसादेः पुण्यत्वोपलक्षणार्थं**—पृथ्वीमध्ये गंधाचें जें पुण्यत्व स्वभावतःच प्रदर्शित केलें आहे, तें रसादिकांच्या स्वाभाविक पुण्यत्वाच्या उपलक्षणासाठीं आहे. [ अगदीं प्रथम उत्पन्न झालेले पांचीं गुण पुण्यच—चांगलेच—इंद्रियांना तृप्त करणारेच होते. कारण ते सिद्धादि श्रेष्ठ जीवांचेच उपभोग्य होते. तर मग त्यांच्यामध्यें अपुण्यत्वाचा भास कां होतो ? उत्तर-)—**गन्धादीनां अपुण्यत्वं तु संसारिणां अविद्याधर्मादि-अपेक्षं भूतविशेषसंसर्गनिमित्तं भवति**—पण गंधादिकाचे अपुण्यत्व संसारी जीवाच्या अविद्या, अधर्म इत्यादिकांच्या अपेक्षेनें भूतविशेषांच्या संसर्गाच्या निमित्ताने होतें. [म्हणजे फक्त सिद्धांच्याच उपभोगास योग्य असे गंधादि सूक्ष्म गुण पुण्यच असतात. पण पुढे त्या तन्मात्ररूप गुणांपासून परस्पर संसर्गानें-पंचीकरण न्यायानें—पृथिव्यादि भूतें जेव्हां परिणाम पावूं लागतात, तेव्हां त्या आपल्या कार्यभूत भूतांबरोबर परिणाम पावणारे ते गुण प्राण्यांच्या पापादि कारणांमुळे अपुण्यरूप होतात. ]—**च विभावसौ-अग्नौ तेजः-दीप्तिः अहं अस्मि**—आणि विभावसूंत म्ह० अग्नींत तेज—दीप्ति मी आहे.—**तथा सर्वभूतेषु जीवनं**—तसेंच सर्व भूतांतील जीवन—**येन जीवन्ति सर्वाणि भूतानि तत् जीवनं**—ज्या अमृतसंज्ञक अन्नरसाच्या योगाने सर्व भूते जिवंत राहतात तें जीवन, मी आहें. [ म्ह० अग्नितेजोरूप माझ्यामध्ये अग्नि व प्राणिजीवनरूप माझ्यामध्यें सर्व भूतें ओतप्रोत आहेत. ]—**च तपस्विषु तपः अहं अस्मि**—आणि तपस्व्यांमध्यें तप मी आहें.—**तस्मिन् तपसि मयि तपस्विनः प्रोताः**—चित्तैकाग्र्यरूप किंवा उपवासरूप तपामध्यें—त्या तपोरूप मजमध्यें तपस्वी ओतप्रोत आहेत. ९.

**बीजं मां सर्वभूतानां विद्धि पार्थ सनातनम्।**
**बुद्धिर्बुद्धिमतामस्मि तेजस्तेजस्विनामहम्॥ १० ॥**
**बलं बलवतामस्मि कामरागविवर्जितम्।**
**धर्माविरुद्धो भूतेषु कामोऽस्मि भरतर्षभ॥ ११ ॥**

**अन्वयार्थ—हे पार्थ,**—हे अर्जुना!—**मां**—मला—**सर्वभूतानां**—सर्व भूतांचें—**सनातनं बीजं**—अनादि-नित्य बीज—**विद्धि**—तूं जाण.—**बुद्धिमतां बुद्धिः**—बुद्धिमान् लोकांची बुद्धि-विवेकशक्ति—**अस्मि**—मी आहें.—**तेजस्विनां**—तेजस्वी लोकांतील—**तेजः**—तेज-प्रगलभता—**अहं (अस्मि)**—मी आहें.—**बलवतां**—बलवान् लोकांचें—**कामरागविवर्जितं**—तृष्णा व आसक्ति यांनीं रहित असें—**बलं**—बल—**अस्मि**—मी आहें.—**हे भरतर्षभ**—हे अर्जुना!—**भूतेषु**—भूतांतील—**धर्माविरुद्धः**—धर्माशीं-शास्त्राच्या अर्थाशीं विरुद्ध नसलेली—**कामः**—अवश्य वस्तू-विषयींची इच्छा—**अस्मि**—मी आहें. १०-११.

**बीजमिति। बीजं प्ररोहकारणं मां विद्धि सर्वभूतानां हे पार्थ सनातनं चिरंतनम्। किंच बुद्धिर्विवेकशक्तिरन्तःकरणस्य बुद्धिमतां विवेकशक्तिमतामस्मि तेजः प्रागल्भ्यं तद्वतां तेजस्विनामहम् ॥ १० ॥**

**भाष्यार्थ—'बीजं०' इति**—अहोपण, सर्वभूतें आपापल्या कारणांत ओतप्रोत असतात, तेव्हां तीं तुझ्यामध्यें ओतप्रोत कशीं असणार? या प्रश्नाचें उत्तर 'बीजं०' या श्लोकानें सांगतात—**हे पार्थ, मां सर्वभूतानां सनातनं-चिरंतनं बीजं-प्ररोह-कारणं विद्धि**—हे अर्जुना, तूं मला सर्वभूतांचें सनातन-नित्य बीज-प्ररोहाचें-उत्पत्तीचें कारण जाण.—**किं च बुद्धिमतां-विवेकशक्तिमतां बुद्धिः-अन्तःकरणस्य विवेकशक्तिः अस्मि**—तसेंच, बुद्धिमानांची म्ह० विवेकशक्तिमानांची बुद्धि म्ह० अन्तःकरणाची विवेकशक्ति मी आहे. [ जें चैतन्याचें अभिव्यंजक, तत्त्वनिश्चयाचें सामर्थ्य तीच बुद्धि, तद्रूप अशा मजमध्यें सर्व बुद्धिमान् पुरुष ओतप्रोत आहेत. ]—**तेजः-प्रागल्भ्यं तद्वतां-तेजस्विनां अहं**—तेज म्ह० प्रगलभता-दुसऱ्याचा अभि-भव-पराभव करण्याचें व दुसऱ्याकडून पराभूत न होण्याचें सामर्थ्य. अशा प्रागल्भ्यानें युक्त असलेल्या तेजस्वी लोकांचें तेज मी आहें. [ प्रागल्भ्यरूप माझ्यामध्यें प्रागल्भ्यवान् लोक ओतप्रोत आहेत, असा याचा भावार्थ. ] १०.

**बलमिति। बलं सामर्थ्यमोजो बलवतामहम्। तच्च बलं कामरागविवर्जितं कामश्च रागश्च कामरागौ कामस्तृष्णाऽसंनिकृष्टेषु विषयेषु रागो रञ्जना प्राप्तेषु विषयेषु ताभ्यां विवर्जितं देहादिधारणमात्रार्थं बलमहमस्मि न तु यत्संसारिणां तृष्णारागकारणम्। किं च धर्मविरुद्धो धर्मेण शास्त्रार्थेनाविरुद्धो यः प्राणिषु भूतेषु कामो यथा देहधार-णमात्राद्यर्थोऽशनपानादिविषयः कामोऽस्मि हे भरतर्षभ ॥ ११ ॥**

**भाष्यार्थ—'बलं०' इति**—'बलं०' इत्यादि श्लोकानें आणखी काय काय ओत-प्रोत आहे तें सांगतात—**बलवतां बलं-सामर्थ्यं-ओजः अहं**—बलवानांचें बल-सामर्थ्य-ओज मी आहें.—**तत् च बलं काम-रागविवर्जितं-कामः च रागः च कामरागौ**—आणि तें बल कसें? तर काम-रागशून्य; काम व राग, ते

**कामराग—कामः-असंनिकृष्टेषु विषयेषु तृष्णा**—काम म्ह० इंद्रियांशीं संबद्ध न झालेल्या–इंद्रियगोचर न झालेल्या विषयाविषयींची तृष्णा,—**रागः-रञ्जना प्राप्तेषु विषयेषु**—राग म्ह० प्राप्त झालेल्या विषयांतील रंजना–अनुराग–प्रीति–आसक्ति,—**ताभ्यां विवर्जितं देहादिधारणमात्रार्थं बलं अहं अस्मि**—त्या काम-रागांनीं विरहित असलेलें, देहादिकांचे धारण होणें, एवढेंच ज्याचें प्रयोजन आहे तें बल मी आहें. ( या विशेषणाच्या सामर्थ्यानें कोणत्या बलाची व्यावृत्ति होते तें दाखवितात–) **—तु यत् संसारिणां तृष्णारागकारणं तत् न**—पण जें संसारी जीवांचें तृष्णा व राग यांच्यापासून प्राप्त झालेलें बल तें मी नव्हे.—**किंच धर्माविरुद्धः धर्मेण-शास्त्रार्थेन अविरुद्धः यः प्राणिषु-भूतेषु कामः**—तसेंच धर्माच्या अविरुद्ध म्ह० धर्माशीं–शास्त्रार्थाशीं विरुद्ध नसलेला जो प्राण्यांतील–भूतांतील काम ( धर्माविरुद्ध कामाचें उदाहरण देतात– )—**यथा देहधारणमात्रादि-अर्थः अशन-पानादिविषयः कामः**—जसा–देहधारण-एवढेंच किंवा या सारखेंच ज्याचें प्रयोजन आहे अशा अन्न-पानादिकांविषयाचा काम—**अस्मि हे भरतर्षभ**—मी आहें, हे भरतश्रेष्ठा, तसला धर्माविरुद्ध काम मी आहें. ११.

**ये चैव सात्त्विका भावा राजसास्तामसाश्च ये ।**
**मत्त एवेति तान्विद्धि न त्वहं तेषु ते मयि ॥ १२ ॥**

**अन्वयार्थ—च**—आणि—**ये**—जे—**सात्त्विकाः भावाः**—सात्त्विक पदार्थ आहेत—**ये**—जे—**राजसाः च तामसाः एव (भावाः)**—राजस व तामस भाव आहेत—**तान् मत्तः एव**—त्यांना माझ्यापासूनच झालेले—**इति विद्धि**—असें तूं जाण.—**तु अहं**—पण मी—**तेषु न**—त्यांच्यामध्ये नाहीं–त्यांच्या अधीन नाहीं. **—ते मयि**—ते माझ्या अधीन आहेत. १२.

**किंच—ये चैव सात्विकाः सत्त्वनिर्वृत्ता भावाः पदार्था राजसा रजोनिर्वृत्तास्तामसास्तमोनिर्वृत्ताश्च ये केचित्प्राणिनां स्वकर्मवशाज्जायन्ते भावास्तान्मत्त एव जायमानानित्येवं विद्धि सर्वान्समस्तानेव । यद्यपि ते मत्तो जायन्ते तथाऽपि न त्वहं तेषु तदधीनस्तद्वशो यथा संसारिणस्ते पुनर्मयि मद्वशा मदधीनाः ॥ १२ ॥**

**भाष्यार्थ**—( चिद् व आनंद यांचे अभिव्यंजक–यांना अभिव्यक्त करणारे जे भाव –पदार्थ त्यांना ईश्वररूपत्व आहे, असें येथवर सांगितल्यामुळें बाकीचे भाव–पदार्थ ईश्वररूप नाहींत, अशी आशंका आली असतां 'ये चैव०' या श्लोकानें तिचें निरसन

---

१ रहस्यकार 'काम' या शब्दाचा अर्थ वासना असा करितात, व 'काम आणि राग हीं दोन वजा करून बलवान् लोकांचें बल मी आहें.' असा सर्व पूर्वार्धाचा अर्थ करितात,तो कितपत सयुक्तिक आहे हे वाचकांनीच ठरवावें. वासना वजा केलेलें बल कोणतें हें आम्हांला कांहीं समजत नाहीं.

करितात-)—**किं च ये च एव सात्त्विकाः-सत्त्वनिर्वृताः भावाः-पदार्थाः**— तसेंच जे सात्त्विक म्ह० सत्त्वगुणापासून झालेले भाव-पदार्थ,—**राजसाः-रजोनिर्वृताः तामसाः-तमोनिर्वृताः च**—राजस-रजोगुणापासून झालेले व तामस म्ह० तमोगुणापासून झालेले—**ये केचित् भावाः प्राणिनां स्वकर्मवशात् जायन्ते**—जे कांहीं पदार्थ प्राण्यांच्या स्वकर्मांमुळें उत्पन्न होतात—**तान् सर्वान्-समस्तान् एव मत्तः एव जायमानान् इति एवं विद्धि**—ते सर्व-समस्तच भाव मजपासूनच उत्पन्न झालेले आहेत असे तूं समज.—**यद्यपि ते मत्तः जायन्ते**—जरी ते मजपासून उत्पन्न होतात—**तथापि यथा संसारिणः तथा अहं तेषु-तदधीनः-तद्वशः न**—तथापि जसे दुसरे संसारी जीव त्यांच्या अधीन असतात तसा मी त्या पदार्थांत-त्यांच्या अधीन नाहीं, तद्वश नाहीं.—**पुनः ते मयि-मद्वशाः-मदधीनाः**—पण ते माझ्यामध्यें म्ह० माझ्या वश-मदधीन आहेत. [ कारण मी सत्य आहें व ते सर्व कल्पित आहेत. त्यामुळे त्यांचे गुणदोष माझ्या ठिकाणीं येत नाहींत. तसेच त्या त्रिविध भावांना स्वातंत्र्य नाहीं. कारण ते ईश्वराचे कार्य असल्यामुळे तदधीन आहेत. कल्पित पदार्थ अधिष्ठानाच्या सत्तेने व प्रतीतीनेंच सत्तावान् व प्रतीतिमान् होतात. त्यामुळे त्यांना अधिष्ठानमात्रत्व असते, म्हणून ते सर्व स्वतःसत्ताशून्य असून माझ्या सत्ताधीन आहेत, असा भावार्थ. ] १२.

त्रिभिर्गुणमयैर्भावैरेभिः सर्वमिदं जगत् ।
मोहितं नाभिजानाति मामेभ्यः परमव्ययम् ॥ १३ ॥

**अन्वयार्थ—इदं जगत्**—हे जगत्—**एभिः त्रिभिः गुणमयैः भावैः**—या तीन गुणमय-गुणविकाररूप पदार्थांनीं-राग-द्वेष-मोह इत्यादि प्रकारांनीं—**मोहितं सत्**—मोहित होत्सातें-अविवेकावस्थेस प्राप्त झालेले जगत्—**एभ्यः परं अव्ययं मां**—या गुणांहून व्यतिरिक्त-अगदीं विलक्षण व अविनाशी अशा मला—**न अभिजानाति**—जाणत नाहीं. १३

**एवंभूतमपि परमेश्वरं नित्यशुद्धबुद्धमुक्तस्वभावं सर्वभूतात्मानं निर्गुणं संसारदोषबीजप्रदाहकारणं मां नाभिजानाति जगदित्यनुक्रोशं दर्शयति भगवान् । तच्च किंनिमित्तं जगतोऽज्ञानमित्युच्यते—त्रिभिर्गुणमयैर्गुणविकारै रागद्वेषमोहादिप्रकारैर्भावैः पदार्थैरेभिर्यथोक्तैः सर्वमिदं प्राणिजातं जगन्मोहितमविवेकतामापादितं सन्नाभिजानाति मामेभ्यो यथोक्तेभ्यो गुणेभ्यः परं व्यतिरिक्तं विलक्षणं चाव्ययं व्ययरहितं जन्मादिसर्वभावविकारवर्जितमित्यर्थः ॥ १३ ॥**

**भाष्यार्थ**—( ईश्वराला स्वातंत्र्य व नित्यशुद्धत्वादिक जर आहे, तर तदात्मक जगाला संसारित्व कसें ? अशी आशंका घेऊन 'त्याच्या अज्ञानामुळें,' असें समाधान पुढील श्लोकांत सांगतात-)—**परमेश्वरं नित्यशुद्ध-बुद्ध-मुक्तस्वभावं सर्वभूतात्मानं निर्गुणं संसारदोषबीजप्रदाहकारणं एवंभूतं अपि मां**—परम ईश्वर, नित्यशु-

द्धस्वभाव, नित्यज्ञानस्वभाव, नित्यमुक्तस्वभाव, सर्व भूतांचा आत्मा, निर्गुण, संसारदोषाच्या बीजाला भस्मसात् करण्याचें कारण–निमित्त अशा प्रकारच्याहि मला—**जगत् न अभिजानाति इति भगवान् अनुक्रोशं दर्शयति**—जगत् पूर्णपणें जाणत नाहीं, असें म्हणून भगवान् अनुक्रोश–दया दाखवितात ( अरेरे, मी जरी असा आहें तरी मला कोणी जाणत नाहीं ! )—**तत् च जगतः अज्ञानं किंनिमित्तं इति उच्यते**—पण ते जगाचें अज्ञान कोणत्या निमित्तानें–कोणत्या कारणानें आहे, हें ‘त्रिभिः०’ या श्लोकानें सांगतात—**एभिः यथोक्तैः-त्रिभिः गुणमयैः-गुणविकारैः रागद्वेषमोहादिप्रकारैः भावैः-पदार्थैः**—या वर सांगितलेल्या तीन गुणमय[1] म्ह० गुणांचे विकार अशा राग-द्वेष-मोह इत्यादि प्रकारच्या भावांनीं-पदार्थांनीं—**इदं सर्वं प्राणिजातं जगत् मोहितं-अविवेकतां आपादितं सत्**—हें सर्व प्राणिजात -जगत् मोहित–अविवेकतेला प्राप्त केलें गेलेलें असें होत्साते—**मां एभ्यः यथोक्तेभ्यः गुणेभ्यः परं-व्यतिरिक्तं-विलक्षणं**—मला या यथोक्त गुणांहून पर म्ह०व्यतिरिक्त -विलक्षण—**च अव्ययं-व्ययरहितं-जन्मादिसर्वभावविकारवर्जितं इत्यर्थः न अभिजानाति**—व अव्यय–व्ययरहित म्ह० जन्मादि सर्वभावविकाररहित, असा याचा भावार्थ, जाणत नाहीं. [ या तीन गुणविकाररूप म्ह० राग-द्वेष-मोहात्मक भावांनीं मोहित झालेले हें जगत् मी या गुणांहून अगदीं विलक्षण व निर्विकार आहे हें जाणत नाहीं. ] १३.

## दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया ।
## मामेव ये प्रपद्यन्ते मायामेतां तरन्ति ते ॥ १४ ॥

**अन्वयार्थ—हि**—कारण—**एषा मम दैवी गुणमयी माया**—ही माझी अलौकिक सत्त्वादि गुणरूप शक्ति—**दुरत्यया (अस्ति)**—जिचें उल्लंघन मोठ्या कष्टानेंच करतां येतें, अशी आहे.—**ये**—जे लोक—**मां एव**—मलाच—**प्रपद्यन्ते**—शरण येतात,—**ते**—ते—**एतां मायां**—या मायेला—**तरन्ति**—तरून जातात. १४.

**कथं पुनर्दैवीमेतां त्रिगुणात्मिकां वैष्णवीं मायामतिक्रामन्तीत्युच्यते—दैवी देवस्य ममेश्वरस्य विष्णोः स्वभूता हि यस्मादेषा यथोक्ता गुणमयी मम माया दुरत्यया दुःखेनात्ययोऽतिक्रमणं यस्याः सा दुरत्यया । तत्रैवं सति सर्वधर्मान्परित्यज्य मामेव मायाविनं स्वात्मभूतं सर्वात्मना ये प्रपद्यन्ते ते मायामेतां सर्वभूतमोहिनीं तरन्त्यतिक्रामन्ति संसारबन्धनान्मुच्यन्त इत्यर्थः ॥ १४ ॥**

---

१ ‘गुणमय म्ह० गुणात्मक’ असें रहस्यकार म्हणतात. पण गुणात्मक म्ह० काय ? तर गुणरूप, म्हणजे गुण हेच भाव. पण सत्त्व, रज आणि तम हे गुणच जगाला मोहित कसे करणार ? यास्तव गुणमय या शब्दांतील ‘मय’ या प्रत्ययाकडे लक्ष देऊन आचार्यांनीं जसा अर्थ केला आहे तसा तो करणेंच अधिक सयुक्तिक होय.

**भाष्यार्थ**—( असें जर आहे तर अनादिसिद्ध मायेमुळें प्राप्त झालेलें पारतंत्र्य नाहींसें होणें शक्य नाहीं आणि मायापरवशता असेपर्यंत तत्त्वबोधाचा उदय होणेंहि शक्य नाहीं, अशी आशंका घेऊन 'दैवी०' या श्लोकानें तिचें निरसन करितात-)—**दैवीं एतां त्रिगुणात्मिकां वैष्णवीं मायां कथं पुनः अतिक्रामन्ति इति उच्यते**—या दैवी त्रिगुणात्मिका वैष्णवी मायेला कसे बरें उल्लंघितात ? त्या मायेचें उल्लंघन-अतिक्रमण कसें करितात तें सांगितलें जातें—**हि-यस्मात् दैवी-देवस्य मम ईश्वरस्य विष्णोः स्वभूता एषा यथोक्ता मम गुणमयी माया**—कारण दैवी म्ह०देवाची -मज ईश्वराची विष्णूची-व्यापक परमात्म्याची स्वभूत-[ परमात्मपरतंत्र सांख्यांच्या प्रधानाप्रमाणें स्वतंत्र नव्हे ] अशी ही वर सांगितलेल्या प्रकारची माझी गुणमयी-सत्त्वादि गुणसाम्यावस्थारूप माया—**दुरत्यया-दुःखेन अत्ययः-अतिक्रमणं यस्याः सा दुरत्यया**—दुरत्यय आहे. जिचा अत्यय म्ह० अतिक्रमण मोठ्या दुःखाने होतें अशी ती दुरत्यय आहे.—**तत्र एवं सति सर्वधर्मान् परित्यज्य मां एव स्वात्मभूतं मायाविनं सर्वात्मना ये प्रपद्यन्ते**—याप्रमाणें-माया अशी दुरत्यय असल्यामुळें सर्व धर्मांचा परित्याग करून मलाच म्ह० स्व-आत्मभूत मायावी ईश्वराला सर्व मनोभावानें-कर्मानुष्ठानादिकांची व्यग्रता न ठेवतां जे शरण येतात—**ते एतां सर्वभूतमोहिनीं मायां तरन्ति-अतिक्रामन्ति-संसारबंधनात् मुच्यन्ते इत्यर्थः**—ते या सर्व भूतांना मोह पाडणाऱ्या मायेला[१] तरून जातात. तिचे अतिक्रमण करितात. संसारबंधनांतून मुक्त होतात, असा याचा भावार्थ. [ मायेचा अतिक्रम केला असतां मोहाचा अतिक्रम होतो व त्यामुळें संसारबंध तुटतो, असा याचा भावार्थ.] १४.

**न मां दुष्कृतिनो मूढाः प्रपद्यन्ते नराधमाः ।**
**माययाऽपहृतज्ञाना आसुरं भावमाश्रिताः ॥१५॥**

**अन्वयार्थ**—**दुष्कृतिनः**—दुराचरण करणारे—**मूढाः**—अविवेकी—**मायया अपहृतज्ञानाः**—मायेने ज्यांच्या ज्ञानाचा अपहार केला आहे असे—**आसुरं भावं आश्रिताः**—आसुरभावाचा आश्रय केलेले—**नराधमाः**—अधम लोक—**मां**—मला—**न प्रपद्यन्ते**—शरण येत नाहीत. १५.

**यदि त्वां प्रपन्ना मायामेतां तरन्ति कस्मात्त्वामेव सर्वे न प्रपद्यन्त इत्युच्यते—न मां परमेश्वरं दुष्कृतिनः पापकारिणो मूढाः प्रपद्यन्ते नराधमा नराणां मध्येऽधमा निकृष्टास्ते च माययाऽपहृतज्ञानाः संमुषितज्ञाना आसुरं भावं हिंसानृतादिलक्षणमाश्रिताः॥**

---

१ रहस्यकार म्हणतात "सांख्य शास्त्रांतील त्रिगुणात्मक प्रकृतीसच गीतेंत भगवान् आपली माया म्हणतात, हें यावरून उघड होतें." व यासाठीं 'माया ह्येषा मया सृष्टा ' हें शान्तिपर्वांतील वचन प्रमाण म्हणून देतात, पण तें अगदीं असंबद्ध आहे. कारण या श्लोकांत मायेला दैवी हें विशेषण योजिलें आहे व शांतिपर्वांतील वचनांत 'माया' हा शब्द प्रकृति या अर्थीं योजिलेला नाहीं, हें तज्ज्ञांच्या लक्षांत येईलच.

**भाष्यार्थ—यदि त्वां प्रपन्नाः एतां मायां तरन्ति सर्वे त्वां एव कस्मात् न प्रपद्यन्ते इति उच्यते**—जर तुला शरण आलेले या मायेचें उल्लंघन करितात तर सर्व तुलाच कां शरण येत नाहींत, म्हणून म्हणाल तर 'न मां०' या श्लोकानें सांगितलें जातें.—**दुष्कृतिनः-पापकारिणः मूढाः नराधमाः नराणां मध्ये अधमाः-निकृष्टाः**—दुष्कर्म करणारे म्ह० पापाचरण करणारे, मूढ, नराधम म्ह० मनुष्यांमध्यें अधम-निकृष्ट असलेले—**ते च मायया अपहृतज्ञानाः-संमुषितज्ञानाः आसुरं-हिंसानृतादिलक्षणं भावं आश्रिताः मां परमेश्वरं न प्रपद्यन्ते**—आणि ते मायेकडून अपहृतज्ञान झालेले म्ह० ज्यांचें ज्ञान मायेने हरण केलें आहे, मायेमुळें ज्यांचें ज्ञान तिरस्कृत झाले आहे, [ मायेनें ज्यांचे ज्ञान-स्वरूपचैतन्य झांकून टाकलें आहे ] व आसुर म्ह० हिंसा, असत्य इत्यादिरूप भावाचा ज्यांनीं आश्रय केला आहे ते मज परमेश्वराला शरण येत नाहींत. [ पापाचरणामुळें अविवेकाची वृद्धि होऊन हिंसा, अनृत, इत्यादि राजसवृत्ति उद्भवतात. त्यामुळे पापी लोक भगवन्निष्ठ होऊं शकत नाहींत.] १५

**चतुर्विधा भजन्ते मां जनाः सुकृतिनोऽर्जुन ।**
**आर्तो जिज्ञासुरर्थार्थी ज्ञानी च भरतर्षभ ॥ १६ ॥**

**अन्वयार्थ—अर्जुन**—हे अर्जुना!—**चतुर्विधाः सुकृतिनः जनाः**—चार प्रकारचे पुण्यवान् जन—**मां**—मला—**भजन्ते**—भजतात—**भरतर्षभ**—हे भरतश्रेष्ठा! एक—**आर्तः**—पीडा होत असलेला—**जिज्ञासुः**—भगवानांचे तत्त्व जाणण्याची इच्छा करणारा—**अर्थार्थी**—धनाची इच्छा असलेला—**च ज्ञानी**—व भगवतत्त्व जाणणारा. १६.

**ये पुनर्नरोत्तमाः पुण्यकर्माणः—चतुर्विधाश्चतुष्प्रकारा भजन्ते सेवन्ते मां जनाः सुकृतिनः पुण्यकर्माणो हेऽर्जुन । आर्त आर्तिपरिगृहीतस्तस्करव्याघ्ररोगादिनाऽभिभूत आपन्नो जिज्ञासुर्भगवत्तत्त्वं ज्ञातुमिच्छति योऽर्थार्थी धनकामो ज्ञानी विष्णोस्तत्त्वविच्च हे भरतर्षभ ॥ १६ ॥**

**भाष्यार्थ—पुनः ये पुण्यकर्माणः नरोत्तमाः**—( ते भगवन्तं भजन्ते)-पण जे पुण्यकर्म करणारे नरोत्तम ते भगवंतांचें भजन करितात,असें 'चतुर्विधाः' या श्लोकानें सांगतात-)—**हे अर्जुन-चतुर्विधाः-चतुष्प्रकाराः सुकृतिनः-पुण्यकर्माणः जनाः मां भजन्ते-सेवन्ते**—हे अर्जुना, चार प्रकारचे सुकृति म्ह० पुण्यकर्मे करणारे जन माझें भजन-सेवन करितात.—**आर्तः-आर्तिपरिगृहीतः तस्करव्याघ्ररोगादिना अभिभूतः-आपन्नः**—आर्त म्ह० आर्तीनें ज्याला व्याकुल केलें आहे, चोर, व्याघ्र, रोग इत्यादिकांनीं ज्यांला पीडलें आहे, म्ह० आपत्तींत पडलेला,—**जिज्ञासुः यः भगवत्तत्त्वं ज्ञातुं इच्छति**—जिज्ञासु-जो भगवानांचें तत्त्व जाणण्याची इच्छा करितो तो—**अर्थार्थी-धनकामः**-अर्थाची इच्छा करणारा-धनकाम,

**—च ज्ञानी-विष्णोः तत्त्ववित्**—आणि ज्ञानी-विष्णूचें-मज व्यापक परमात्म्याचें तत्त्व जाणणारा—**हे भरतर्षभ**—हे भरतकुलतिलका, [असे चार प्रकारचे पुण्यवान् जन मला भजतात. त्यांतील पहिला व तिसरा भक्त मायेचें उल्लंघन करूं शकत नाहीं. जिज्ञासु प्रथम शब्दज्ञानवान् होतो व ज्ञानी भक्त बनतो आणि शेवटीं चवथ्या ज्ञानी भक्ताप्रमाणेंच केवल तत्त्वसाक्षात्काराचीच इच्छा करणारा तो ज्ञानानें मायेचें उल्लंघन करितो.] १६.

**तेषां ज्ञानी नित्ययुक्त एकभक्तिर्विशिष्यते ।**
**प्रियो हि ज्ञानिनोऽत्यर्थमहं स च मम प्रियः ॥१७॥**

**अन्वयार्थ—तेषां**—त्या चार प्रकारच्या भक्तांपैकीं—**ज्ञानी**—ज्ञानी-तत्त्ववेत्ता—**नित्ययुक्तः**—सतत भगवानामध्यें ज्याचें चित्त स्थिर झालेलें असतें व—**एकभक्तिः**—एका भगवानामध्येंच ज्याची भक्ति आहे असा ज्ञानी—**विशिष्यते**—सर्वात अधिक आहे.—**हि**—कारण—**अहं**—मी—**ज्ञानिनः**—आत्मतत्त्वज्ञाला—**अत्यर्थं**—अतिशय—**प्रियः**—प्रिय असतों—**च**—व—**सः**—तो—**मम**—मला—**प्रियः**—प्रिय असतो. १७.

**तेषामिति । तेषां चतुर्णां मध्ये ज्ञानी तत्त्ववित्तत्त्ववित्त्वान्नित्ययुक्तो भवत्येकभक्तिश्चान्यस्य भजनीयस्यादर्शनादतः स एकभक्तिर्विशिष्यते विशेषमाधिक्यमापद्यतेऽतिरिच्यत इत्यर्थः । प्रियो हि यस्मादहमात्मा ज्ञानिनोऽतस्तस्याहमत्यर्थं प्रियः । प्रसिद्धं हि लोक आत्मा प्रियो भवतीति । तस्माज्ज्ञानिन आत्मत्वाद्वासुदेवः प्रियो भवतीत्यर्थः । स च ज्ञानी मम वासुदेवस्याऽऽत्मैवेति ममात्यर्थं प्रियः ॥ १७ ॥**

**भाष्यार्थ—'तेषां०' इति**—पण त्या चारी भक्तांची योग्यता एकसारखीच नाहीं, हें 'तेषां०' या श्लोकानें सांगतात—**तेषां चतुर्णां मध्ये ज्ञानी-तत्त्ववित् तत्त्ववित्त्वात् नित्ययुक्तः भवति**—त्या चारी भक्तांमध्यें ज्ञानी म्ह० आत्मतत्त्वज्ञ तत्त्वज्ञत्वामुळेंच नित्य युक्त-नित्य समाहित होतो.—**अन्यस्य भजनीयस्य अदर्शनात् एकभक्तिः च भवति**—त्याला दुसरा भजनीय पदार्थ दिसतच नसल्यामुळें तो एकभक्ति होतो. (या असार संसारांत भगवान्च सार आहे व तोच मी आहें, अशा रीतीनें एक अद्वितीय, आपल्याहून अत्यंत अभिन्न-एकरूप भगवानामध्यें याची भक्ति म्ह० निरतिशय स्नेह असतो म्हणून हा एकभक्ति.]—**अतः सः एकभक्तिः-विशिष्यते-विशेषं-आधिक्यं आपद्यते-अतिरिच्यते इत्यर्थः**—म्हणून तो एकभक्ति विशिष्ट आहे, विशेषाला म्ह० आधिक्याला तो प्राप्त होतो. इतर भक्तांहून अति-

---

१ "ज्ञानी म्हणजे परमेश्वराचें ज्ञान होऊन कृतार्थ झाल्यामुळें पुढें कांहीं मिळवावयाचें नसलें तरी निष्काम बुद्धीनें भक्ति करणारे," असा अर्थ रहस्यकार करतात. तो अगदींच अग्राह्य जरी नसला, तरी निष्कामबुद्धीनें भक्ति करणें म्हणजे काय ? तसल्या भक्तीचें स्वरूप काय तेंच कळत नाही.

रिक्त-श्रेष्ठ आहे, असा याचा भावार्थ. (सर्वांत तोच अधिक कां? उत्तर-)—**प्रियः हि-यस्मात् अहं ज्ञानिनः आत्मा अतः अहं तस्य अत्यर्थं प्रियः**—ज्याअर्थी मी ज्ञानी भक्ताचा आत्मा आहे त्याअर्थी मी त्याला अतिशय प्रिय आहें—**आत्मा प्रियः भवति इति हि लोके प्रसिद्धं**—आत्मा प्रिय असतो हें या लोकांत प्रसिद्ध आहे. —**तस्मात् ज्ञानिनः आत्मत्वात् वासुदेवः प्रियः भवति इत्यर्थः**—यास्तव वासुदेव हाच ज्ञानी पुरुषाचा आत्मा असल्यामुळें त्याला वासुदेव प्रिय होतो, असा भावार्थ.—**च सः ज्ञानी मम वासुदेवस्य आत्मा एव इति मम अत्यर्थं प्रियः**—आणि तो ज्ञानी मज वासुदेवाचा आत्माच असल्यामुळे मला अत्यंत प्रिय आहे.

**उदाराः सर्व एवैते ज्ञानी त्वात्मैव मे मतम् ।**
**आस्थितः स हि युक्तात्मा मामेवानुत्तमां गतिम् ॥**

**अन्वयार्थ—सर्वे एव एते उदाराः**—हे सर्वच उत्कृष्ट आहेत;—**तु**—पण—**ज्ञानी**—आत्मवेत्ता—**मे**—माझा—**आत्मा एव**—आत्माच—**मतः**—मानलेला आहे.—**हि**—कारण—**सः**—तो—**युक्तात्मा**—समाहितचित्त होऊन—**मां एव**—मलाच—**उत्तमां गतिं**—उत्तम गतीला—**आस्थितः**—येऊन पोचण्यास प्रवृत्त झाला आहे. १८.

**न तर्ह्यार्तादयस्त्रयो वासुदेवस्य प्रियाः । न, किं तर्हि—उदारा उत्कृष्टाः सर्व एवैते त्रयोऽपि मम प्रिया एवेत्यर्थः । न हि कश्चिन्मद्भक्तो मम वासुदेवस्याप्रियो भवति ज्ञानी त्वत्यर्थं प्रियो भवतीति विशेषः । तत्कस्मादित्याह ज्ञानी त्वात्मैव नान्यो मत्त इति मे मम मतं निश्चयः । आस्थित आरोढुं प्रवृत्तः स ज्ञानी हि यस्मादहमेव भगवान्वासुदेवो नान्योऽस्मीत्येवं युक्तात्मा समाहितचित्तः सन्मामेव परं ब्रह्म गन्तव्यमनुत्तमां गतिं गन्तुं प्रवृत्त इत्यर्थः ॥ १८ ॥**

**भाष्यार्थ—तर्हि आर्तादयः त्रयः वासुदेवस्य न प्रियाः**—तर मग आर्त, जिज्ञासु व अर्थार्थी हे तीन भक्त वासुदेवाला प्रिय नाहीत, असे झालें—**न**—छेः, असें नाहीं—**किं तर्हि**—तर मग काय ते, 'उदाराः०-' या श्लोकाने सांगतात—**उदाराः-उत्कृष्टाः सर्वे एव एते-त्रयः अपि मम प्रियाः इत्यर्थः**—उदार म्ह० उत्कृष्ट-हे सर्वच-तिन्ही भक्त

---

१ या श्लोकांतील 'एकभक्ति' व १९ व्या श्लोकांतील 'वासुदेव' हीं पदें भागवत धर्मांतील आहेत. किंबहुना भक्तांचें वरील सर्व वर्णन भागवत धर्मांतलेंच आहे इत्यादि रहस्यकार म्हणतात व (पृ. ७२०) 'चतुर्विधा मम जना०' इत्यादि श्लोकाचा आधार देतात. (गी. भा. पृ. ३५४ पहा.) पण गीतेंतील याच वर्णनावरून नारायणीयांतील तें वर्णन केलें नसेल, म्हणून कशावरून? महाभारतांत गीता अगोदर आली असून नारायणीयोपाख्यान मागून आलें आहे, अर्थात् गीतेतीलच हे शब्द व वर्णन तेथें घेतले असावे असे म्हटल्यास फारसा बाध येणार नाहीं.

उत्कृष्ट,मला प्रियच आहेत असा याचा भावार्थ—**हि कश्चित् मद्भक्तः मम-वासुदेवस्य अप्रियः न भवति**—कारण कोणी भक्त मज वासुदेवाला अप्रिय होत नाहीं—**तु ज्ञानी अत्यर्थं प्रियः भवति इति विशेषः**—पण ज्ञानी अत्यन्त प्रिय असतो,हा त्यांतल्या त्यांत विशेष आहे.—**तत् कस्मात् इति आह**—पण असे कां ? ज्ञानीच अत्यंत प्रिय कां? तर त्याचें उत्तर भगवान् सांगतात—**ज्ञानी तु आत्मा एव मत्तः अन्यः न इति मे-मम मतं-निश्चयः**—ज्ञानी तर आत्माच आहे, तो माझ्याहून निराळा नाहीं, असे माझें मत-निश्चय आहे.—**हि-यस्मात् सः-ज्ञानी आस्थितः-आरोढुं प्रवृत्तः**—कारण तो ज्ञानी आरूढ होण्यास प्रवृत्त झाला आहे. ( आरूढ होण्यास कसा प्रवृत्त झाला आहे ? उत्तर-)—**अहं एव भगवान् वासुदेवः अन्यः न अस्मि इति एवं**—मीच भगवान् वासुदेव आहें, मी त्याहून भिन्न नाहीं, अशा प्रकारें आरूढ होण्यास प्रवृत्त झाला आहे.—**युक्तात्मा-समाहितचित्तः सन्**—युक्तात्मा ह्म० समाहितचित्त होऊन—**मां एव गन्तव्यं परं ब्रह्म-अनुत्तमां गतिं गन्तुं प्रवृत्तः इत्यर्थः**—मलाच ह्म० गमन करण्यास-पोंचण्यास योग्य अशा परब्रह्माला-सर्वोत्तम गतीला जाण्यास प्रवृत्त झाला, असा याचा भावार्थ. [ आर्तादिक तीन भक्त उत्तम आहेत खरे, पण ज्ञानी तर आत्माच, असा माझा निश्चय आहे. कारण समाहितचित्त ज्ञानी मलाच ह्म० सर्वोत्तम गतीला जाऊन पोचण्यास प्रवृत्त झाला आहे. ] १८.

बहूनां जन्मनामन्ते ज्ञानवान्मां प्रपद्यते ।
वासुदेवः सर्वमिति स महात्मा सुदुर्लभः ॥ १९ ॥

**अन्वयार्थ—बहूनां जन्मनां अन्ते**—अनेक जन्मांच्या शेवटीं—**ज्ञानवान्**—ज्याचें ज्ञान परिपक्व झालें आहे असा ज्ञानी—**वासुदेवः सर्वं इति**—वासुदेवच हें सर्व आहे, असा—**मां प्रपद्यते**—मला प्राप्त होतो.—**सः महात्मा**—तो ज्ञानी—**सुदुर्लभः**—अत्यंत दुर्लभ आहे. १९.

**ज्ञानी पुनरपि स्तूयते—बहूनां जन्मनां ज्ञानार्थसंस्काराश्रयाणामन्ते समाप्तौ ज्ञानवान्प्राप्तपरिपाकज्ञानो मां वासुदेवं प्रत्यगात्मानं प्रत्यक्षतः प्रपद्यते । कथं, वासुदेवः सर्वमिति । य एवं सर्वात्मानं मां प्रतिपद्यते स महात्मा न तत्समोऽन्योऽस्त्यधिको वा । अतः सदुर्लभो मनुष्याणां सहस्रेष्वित्युक्तम् ॥ १९ ॥**

**भाष्यार्थ—ज्ञानी पुनरपि स्तूयते**—ज्ञानी पुरुषाची पुनरपि स्तुति केली जाते—**बहूनां जन्मनां-ज्ञानार्थसंस्काराश्रयाणां अन्ते-समाप्तौ ज्ञानवान्-प्राप्तपरिपाकज्ञानः**—अनेक जन्मांच्या शेवटीं त्या त्या जन्मांतील पुण्यकर्मानुष्ठानापासून उत्पन्न झालेली जी चित्तशुद्धि तोच ज्ञानार्थसंस्कार-वासना होय. तशा संकाराचे आश्रय ह्म० तशा ज्ञानार्थ संस्कारांनीं युक्त, अशा अनंत जन्मांच्या शेवटीं-त्यांची समाप्ति झाली असतां ज्ञानवान् झालेला ह्म० ज्याच्या ज्ञानाचा पूर्ण परिपाक झाला आहे, असा ज्ञानी—**मां-वासुदेवं-प्रत्यगात्मानं प्रत्यक्षतः प्रपद्यते**—मला-वासुदेवाला-आपल्या

प्रत्यगात्म्याला प्रत्यक्षपणें शरण येतो.—**कथं**—तो कसा ?—**सर्वं वासुदेवः इति**—हें सर्व चराचर जगत् वासुदेव आहे, अशा प्रकारें मला शरण येतो.—**यः एवं सर्वात्मानं मां प्रतिपद्यते सः महात्मा**—जो ज्ञानी अशा रीतीनें सर्वांचा आत्मा अशा मला शरण येतो तो महात्मा होय.—**अन्यः तत्समः अधिकः वा न अस्ति**—दुसरा कोणी त्याच्या तोडीचा किंवा त्याहून अधिक असा नाही.—**अतः मनुष्याणां सहस्रेषु सुदुर्लभः इति उक्तं**—म्हणून मनुष्यांच्या अनेक सहस्रांमध्यें-असंख्य मनुष्यांत असला ज्ञानी फारच दुर्लभ आहे, असें सांगितलें आहे. ( ही ज्ञानी पुरुषाची स्तुति असल्यामुळें तिसऱ्या श्लोकांतील अर्थच येथें पुनः सांगितला आहे, असे समजून यावर पुनरुक्तीचा दोष येत नाहीं. ) १९.

कामैस्तैस्तैर्हृतज्ञानाः प्रपद्यन्तेऽन्यदेवताः ।
तं तं नियममास्थाय प्रकृत्या नियताः स्वया ॥२०॥

**अन्वयार्थ—तैः तैः कामैः**—त्या त्या पुत्र-पशु-स्वर्गादिकांच्या कामांनीं—**हृतज्ञानाः**—ज्यांचें विवेकज्ञान हरण केले आहे, ते—**स्वया प्रकृत्या**—आपल्या प्रकृतीकडून—**नियताः**—नियमित होत्साते—**तं तं नियमं**—त्या त्या नियमाचा—**आस्थाय**—आश्रय करून—**अन्यदेवताः**—दुसऱ्या देवतांना—**प्रपद्यन्ते**—शरण जातात.२०

**आत्मैव सर्वं वासुदेव इत्येवमप्रतिपत्तौ कारणमुच्यते—कामैस्तैस्तैः पुत्रपशुस्वर्गादिविषयैर्हृतज्ञाना अपहृतविवेकविज्ञानाः प्रपद्यन्तेऽन्यदेवताः प्राप्नुवन्ति वासुदेवादात्मनोऽन्या देवतास्तं तं नियमं देवताराधने प्रसिद्धो यो यो नियमस्तं तमास्थायाऽऽश्रित्य प्रकृत्या स्वभावेन जन्मान्तरार्जितसंस्कारविशेषेण नियता नियमिताः स्वयाऽऽत्मीयया॥**

**भाष्यार्थ—आत्मा एव वासुदेवः सर्वं इति एवं अप्रतिपत्तौ कारणं उच्यते**—आत्माच वासुदेव हे सर्व आहे,अशा प्रकारचे ज्ञान सर्वांनाच न होण्याचें कारण ‘कामैः०’ या श्लोकाने सांगितलें जातें.—**पुत्र-पशु-स्वर्गादिविषयैः तैः तैः कामैः हृतज्ञानाः-अपहृतविवेकविज्ञानाः**—पुत्र, पशु, स्वर्ग इत्यादिविषयक निरनिराळ्या कामांनीं ज्यांचें विवेकज्ञान हरण केलेलें आहे, त्या त्या कामांनी ज्यांच्या विवेकविज्ञानाचा अपहार केला आहे ते सकाम पुरुष—**अन्यदेवताः-वासुदेवात् आत्मनः अन्याः देवताः प्रपद्यन्ते-प्राप्नुवन्ति**—अन्य देवतांना-वासुदेवाहून म्ह०आत्म्याहून अन्य देवतांना शरण जातात-प्राप्त होतात—**तं तं नियमं-देवताराधने प्रसिद्धः यः यः नियमः तं तं (नियमं) आस्थाय-आश्रित्य**—त्या त्या नियमास धरून म्ह० देवतांच्या आराधनेविषयीं प्रसिद्ध असलेला जो जो नियम त्या त्या नियमाचा आश्रय करून—**स्वया-आत्मीयया प्रकृत्या-स्वभावेन-जन्मान्तरार्जितसंस्कारविशेषेण नियताः-नियमिताः**—आपल्या-स्वकीय प्रकृतीकडून[1]-स्वभा-

१ ‘प्रकृत्या नियताः स्वया’ याचा अर्थ रहस्यकार ‘आपापल्या प्रकृतिनियमाप्रमाणें’ असा करितात. पण तो कितपत सुबोध आहे, तें वाचकांनींच ठरवावें.

वाकडून–जन्मान्तरार्जित विशेष संस्काराकडून नियत–नियमित झालेले [ असे इतर सर्व लोक देवतांच्या आराधनेविषयींचे जे जप, उपवास, प्रदक्षिणा, नमस्कार इत्यादि नियम त्यांचा आश्रय करून अन्य देवतांची आराधना करितात. त्यामुळें ते प्रत्यगात्मभूत परदेवतेला प्राप्त होत नाहींत, तर अन्य देवतांना प्राप्त होतात. ] २०.

**यो यो यां यां तनुं भक्तः श्रद्धयार्चितुमिच्छति ।**
**तस्य तस्याचलां श्रद्धां तामेव विदधाम्यहम् ॥२१॥**

**अन्वयार्थ—यः यः भक्तः**—जो जो कामी भक्त—**यां यां तनुं**—ज्या ज्या देवतेच्या तनूची—**श्रद्धया आर्चितुं**—श्रद्धेने पूजा करण्याची—**इच्छति**—इच्छा करतो—**तस्य तस्य**—त्याच्या त्याच्या—**तां एव श्रद्धां**—त्याच श्रद्धेला—**अहं अचलां**—मी अचल–स्थिर—**विदधामि**—करतों. २१.

**तेषां च कामिनाम्—यो यः कामी यां यां देवतातनुं श्रद्धया संयुक्तो भक्तश्च सन्नर्चितुं पूजयितुमिच्छति तस्य तस्य कामिनोऽचलां स्थिरां श्रद्धां तामेव विदधामि स्थिरी करोमि ययैव पूर्वं प्रवृत्तः स्वभावतो यो यां देवतातनुं श्रद्धयाऽर्चितुमिच्छतीति ॥२१॥**

**भाष्यार्थ**—( पण देवतांच्या प्रसादाने त्या कामी पुरुषाच्याहि मनात सर्वात्मक सर्वेश्वर–वासुदेवाविषयीं भक्ति उत्पन्न होईल, म्हणून म्हणाल तर सागतात–)—**च तेषां कामिनां**—आणि त्या कामी पुरुषांपैकीं—**यः यः कामी श्रद्धया संयुक्तः च भक्तः सन् यां यां देवतातनुं आर्चितुं–पूजयितुं इच्छति**—जो जो कामी श्रद्धेनें संयुक्त व भक्त होत्साता ज्या ज्या देवतातनूची अर्चा–पूजा करण्याची इच्छा करतो.—**तस्य तस्य कामिनः तां एव श्रद्धां अचलां–स्थिरां विदधामि–स्थिरी करोमि**—त्या त्या कामी पुरुषाच्या त्याच श्रद्धेला अचल–स्थिर म्हणजे त्याची तीच श्रद्धा स्थिर करतो. (ती म्ह० कोणती? उत्तर–)—**यया श्रद्धया एव पूर्वं स्वभावतः प्रवृत्तः यः यां देवतातनुं आर्चितुं इच्छति इति**—ज्या श्रद्धेनेंच पूर्वी जन्मान्तरीय संस्कारवशात् प्रवृत्त झालेला जो ज्या देवतातनूची पूजा करण्याची इच्छा करितो, त्या श्रद्धेला मी स्थिर करतो [ भगवानांनीं स्थिर केलेल्या व पूर्व संस्काराधीन असलेल्या श्रद्धेनें विशेष देवतेची आराधना करणाऱ्या पुरुषालाहि भगवानांच्या अनुग्रहानेंच फलप्राप्ति होते. ] २१

**स तया श्रद्धया युक्तस्तस्या राधनमीहते ।**
**लभते च ततः कामान् मयैव विहितान्हि तान् ॥२२**

**अन्वयार्थ—सः**—तो देवतापूजक—**तया श्रद्धया युक्तः**—त्या श्रद्धेनें युक्त होऊन—**तस्याः**—त्या देवतेचें—**राधनं ईहते**—आराधन करितो—**च**—आणि

**ततः**—त्या देवतेपासून—**मयाएव हि**—मीच—**विहितान्**—निर्मिलेल्या—**तान् कामान्**—त्या कामांस—**लभते**—तो प्राप्त होतो. २२.

**स तयेति । स तया मद्विहितया श्रद्धया युक्तः संस्तस्या देवतातन्वा राधनमाराधनमीहते चेष्टते लभते च ततस्तस्या आराधितायाः देवतातन्वाः कामानीप्सितान्मयैव परमेश्वरेण सर्वज्ञेन कर्मफलविभागज्ञतया विहितान्निर्मितांस्तान्हि यस्मात्ते भगवता विहिताः कामास्तस्मात्तानवश्यं लभत इत्यर्थः । हितानिति पदच्छेदे हितत्वं कामानामुपचरितं कल्प्यं न हि कामा हिताः कस्यचित ॥ २२ ॥**

**भाष्यार्थ—'सः तया०' इति**—'स तया०'या श्लोकानें हीच गोष्ट विशद करितात. —**सः मद्विहितया तया श्रद्धया युक्तः सन्**—तो मीं स्थिर केलेल्या त्या श्रद्धेनें युक्त होत्साता—**तस्याः देवतातन्वाः राधनं-आराधनं ईहते-चेष्टते**—त्या देवतातनूचें राधन म्ह० आराधन करतो—**च ततः तस्याः आराधितायाः देवतातन्वाः कामान्-ईप्सितान् लभते**—आणि त्या आराधना केलेल्या देवतातनूपासून इष्ट कामांस संपादन करतो.—**मया एव-परमेश्वरेण सर्वज्ञेन कर्मफलविभागज्ञतया विहितान्-निर्मितान् तान् (लभते)**—मीच परमेश्वरानें-सर्वज्ञानें कर्मफलविभागाचें ज्ञान असल्यामुळें विहित म्ह० निर्माण केलेल्या त्या कामांस प्राप्त होतो.[आराधित देवतेच्या प्रसादानेंच काहीं फल मिळत नाहीं. कारण प्रत्येकाचें कर्म व फल यांचा विभाग जाणणाऱ्या सर्वज्ञ भगवानाला देवतांचे अधिष्ठातृत्व आहे,त्यामुळें मुख्य फलदाता तोच आहे. कारण 'एको बहूनां यो विदधाति कामान'— जो एकच परमेश्वर अनेक जीवांचे इष्ट पदार्थ त्यांस निर्माण करून देतो, अशी श्रुति आहे. ]—**हि-यस्मात् ते भगवता विहिताः कामाः तस्मात् तान् अवश्यं लभते इत्यर्थः**—ज्याअर्थी ते भगवानांनीं निर्मिलेले काम आहेत,त्याअर्थी त्यांना तो देवतापूजक अवश्य प्राप्त होतो, असा याचा भावार्थ. ( कित्येक 'हि तान्' असा पदच्छेद न करितां 'हितान्' असें कामाचे विशेषण मानतात, म्हणून आचार्य म्हणतात–)—**'हितान्' इति पदच्छेदे कामानां हितत्वं उपचरित कल्प्यं**—'हितान्' असा जर पदच्छेद केला, तर कामांचें हितत्व गौण कल्पावे लागेल.—**हि कामाः कस्यचित् हिताः न**—कारण काम कोणालाच कधीं हितावह नसतात. त्यामुळे त्यांचे मुख्य हितत्व केव्हांच संभवत नाहीं. २२.

## अन्तवत्तु फलं तेषां तद्भवत्यल्पमेधसाम् ।
## देवान्देवयजो यान्ति मद्भक्ता यान्ति मामपि ॥२३॥

**अन्वयार्थ—तु**—पण—**तेषां अल्पमेधसां**—त्या मतिमंदांचें—**तत् फलं**—तें फल—**अन्तवत्**—विनाशी—**भवति**—असतें.—**देवयजः**—देवांची पूजा करणारे—**देवान्**—देवांस—**यान्ति**—प्राप्त होतात.—**मद्भक्ताः**—माझे भक्त—**मां अपि**—मलाहि—**यान्ति**—प्राप्त होतात. २३.

यस्मादन्तवत्साधनव्यापारा अविवेकिनः कामिनश्च तेऽतः—अन्तवद्विनाशि तु फलं तेषां तद्भवत्यल्पमेधसामल्पप्रज्ञानां देवान्देवयजो यान्ति देवान्यजन्तीति देवयजस्ते देवान्यान्ति । मद्भक्ता यान्ति मामपि । एवं समानेऽप्यायासे मामेव न प्रपद्यन्तेऽनन्तफलायाहो खलु कष्टं वर्तन्त इत्यनुक्रोशं दर्शयति भगवान् ॥ २३ ॥

**भाष्यार्थ**—( विचारपूर्वक प्रवृत्ति करणाऱ्या पुरुषाला काम केव्हांच हितावह होत नाहींत,याचें कारण सांगतात-)—**यस्मात् ते कामिनः अन्तवत्साधनव्यापाराः अविवेकिनः**—ज्याअर्थी ते कामी पुरुष नाशवंत फलाचीं साधनें करणारे-विनाशी फल देणाऱ्या कर्माचें अनुष्ठान करणारे व अविवेकी असतात—**अतः अल्पमेधसां-अल्पप्रज्ञानां तेषां तत् फलं अन्तवत्-विनाशि तु भवति**—त्याअर्थी अल्पबुद्धि-अल्पप्रज्ञ-मतिमंद असलेल्या त्यांचें तें फल अंतवत् म्ह० विनाशीच असतें. ( मतिमंद असल्यामुळेंच ते अनित्य फल देणाऱ्याहि कामांमध्यें निष्ठा ठेवतात-)—'**देवान् देवयजः यान्ति**-' **देवान् यजन्ति इति देवयजः ते देवान् यान्ति**—देवांना देवयज जातात. म्ह० देवांचें यजन-पूजन जे करितात ते देवयज. असले देवयज-देवपूजक देवांस प्राप्त होतात. ( तर मग अनन्तफलाचें साधन काय ? उत्तर-)—**मद्भक्ताः मां अपि यान्ति**—माझे भक्त मलाहि येऊन पोंचतात. ( याप्रमाणें श्लोकाचा अक्षरार्थ सांगून तात्पर्यार्थ सांगतात-)—**एवं आयासे समाने अपि अनन्तफलाय मां एव न प्रपद्यन्ते**—याप्रमाणें देवतांची व माझी आराधना करण्यांत आयास समान-एकसारखाच जरी असला, तरी अनन्तफल संपादन करण्यासाठी मलाच शरण येत नाहींत, लोक माझेच भक्त बनत नाहीत.—**अहो खलु कष्टं वर्तन्ते इति भगवान् अनुक्रोशं दर्शयति**—अरे अरे खरोखर ते फार वाईट गोष्ट करितात, अशी भगवान् सर्वांविषयीं आपली अनुकंपा प्रकट करितात. [ याचें कारण अविवेकावांचून दुसरें कांहीं नाहीं. ] २३.

**अव्यक्तं व्यक्तिमापन्नं मन्यन्ते मामबुद्धयः ।**
**परं भावमजानन्तो ममाव्ययमनुत्तमम् ॥ २४ ॥**

**अन्वयार्थ—अबुद्धयः**—अविवेकी जन—**मम**—माझ्या—**अव्ययं अनुत्तमं परं भावं**—अक्षय उत्कृष्ट परम स्वरूपास—**अजानन्तः**—न जाणणारे—**अव्यक्तं मां**—पूर्वी अव्यक्त-अप्रकट असलेल्या मला—**व्यक्तिं आपन्नं**—आतां व्यक्त-प्रकट झालेला—**मन्यन्ते**—समजतात. २४.

किंनिमित्तं मामेव न प्रपद्यन्त इत्युच्यते—अव्यक्तमप्रकाशं व्यक्तिमापन्नं प्रकाशं गतमिदानीं मन्यन्ते मां नित्यप्रसिद्धमीश्वरमपि सन्तमबुद्धयोऽविवेकिनः परं भावं परमात्मस्वरूपमजानन्तोऽविवेकिनो ममाव्ययं व्ययरहितमनुत्तमं निरतिशयं मदीयं भावमजानन्तो मन्यन्त इत्यर्थः ॥ २४ ॥

**भाष्यार्थ—मां एव किंनिमित्तं न प्रपद्यन्ते इति उच्यते**—माझी भक्ति असें श्रेष्ठ फल देणारी जरी असली, तरी सर्व लोक मलाच कोणत्या कारणानें शरण येत नाहींत, मन्निष्ठ कां होत नाहींत, तें 'अव्यक्तं०' या श्लोकानें सांगितलें जातें—**अबुद्धयः-अविवेकिनः**—अबुद्धिमान् म्ह० अविवेकी लोक—**मम परं भावं परमात्मस्वरूपं अजानन्तः अविवेकिनः**—माझ्या श्रेष्ठ भावास म्ह० परमात्मस्वरूपास न जाणणारे अविवेकी ( भाव कसा ? )—**अव्ययं-व्ययरहितं अनुत्तमं-निरतिशयं मदीयं भावं अजानन्तः**—अव्यय म्ह० व्ययरहित व अनुत्तम म्ह० निरतिशय अशा माझ्या स्वरूपाला न जाणणारे अविवेकी—**अव्यक्तं-अप्रकाशं मां**—शरीरग्रहण करण्यापूर्वी अव्यक्त म्ह० अप्रकाश-अप्रकट असलेल्या मला—**नित्यप्रसिद्धं ईश्वरं अपि सन्तं**—नित्य प्रसिद्ध असलेल्याहि ईश्वराला—**इदानीं व्यक्तिं आपन्नं प्रकाशं गतं मन्यते**—या लीलाविग्रह घेतलेल्या अवस्थेंत व्यक्तीला प्राप्त झालेला-प्रकाश पावलेला-प्रकट झालेला समजतात.—( **अजानन्तः** ) **मन्यन्ते इत्यर्थः**—माझें श्रेष्ठ निरुपाधिक स्वरूप न जाणणारे अविवेकी पूर्वी अव्यक्त असलेला मी आतां व्यक्त झालों आहें असें समजतात, असा याचा भावार्थ. २४.

## नाहं प्रकाशः सर्वस्य योगमायासमावृतः ।
## मूढोऽयं नाभिजानाति लोको मामजमव्ययम् ॥२५॥

**अन्वयार्थ—योगमायासमावृतः अहं**—योगमायेनें आच्छादित झालेला मी—**सर्वस्य**—सर्व लोकांना—**प्रकाशः न**—प्रकट होत नाहीं. सर्व लोकांना प्रत्यक्ष दिसत नाहीं.—**अयं मूढः लोकः**—हा मूढ झालेला लोक—**अजं अव्ययं मां**—अज व अव्यय अशा मला—**न अभिजानाति**—सर्व प्रकारें जाणत नाहीं. २५.

**तदीयमज्ञानं किंनिमित्तमित्युच्यते—नाहं प्रकाशः सर्वस्य लोकस्य केषांचिदेव मद्भक्तानां प्रकाशोऽहमित्याभिप्रायः । योगमायासमावृतो योगो गुणानां युक्तिर्घटनं सैव माया योगमाया तया योगमायया समावृतः संछन्न इत्यर्थः । अत एव मूढो लोकोऽयं नाभिजानाति मामजमव्ययम् ॥ २५ ॥**

· **भाष्यार्थ—तदीयं अज्ञानं किंनिमित्तं इति उच्यते**—पण त्यांचें तें अज्ञान कोणत्या कारणानें आहे तें 'नाहं०' या श्लोकानें सांगितलें जातें. [ अविवेकरूप अज्ञान भगवन्निष्ठेला प्रतिबंध करतें, असें जें वर सांगितलें, त्या अज्ञानाचेंच कारण या श्लोकांत सांगतात-]—**अहं सर्वस्य लोकस्य प्रकाशः न**—मी सर्व लोकांचा प्रकाश नाहीं. तर—**केषांचित् एव मद्भक्तानां अहं प्रकाशः इति अभिप्रायः**—कांहीं थोड्याशाच माझ्या भक्तांचा मी प्रकाश आहें, असा याचा आशय. ( सर्वांचाच प्रकाश नाहीं, याविषयीं कारण-)—**योगमायासमावृतः-योगः गुणानां युक्तिः-घटनं सा एव माया योगमाया तया योगमायया समावृतः-संछन्नः इत्यर्थः**—योगमायेनें

समावृत झालेला, योग म्ह० गुणांची युक्ति-घटना तीच माया-योगमाया, त्या योगमायेनें मी उत्तम प्रकारें आवृत-आच्छादित झालों आहें. [अनादि अनिर्वाच्य अज्ञानानें आच्छादित झाल्यामुळेंच माझ्याविषयीं लोकांचा हा अविवेक आहे.]—**अतः एव अयं मूढः लोकः अजं अव्ययं मां न अभिजानाति**—म्हणूनच म्ह० माझ्या स्वरूपाच्या विवेकाभावामुळें हा मूढ लोक अज व अव्यय अशा मला जाणत नाहीं. [मी गुणसाम्यरूप योगमायेनें आच्छादित झाल्यामुळें सर्वांच्याच ज्ञानाचा विषय होत नाहीं. माझ्या भक्तावांचून मला कोणी जाणत नाहींत. योगमायेनें आच्छादित झाल्यामुळेंच मूढ झालेला हा सर्व प्राणिवर्ग अज व अव्यय अशा मला जाणत नाहीं.]. २५.

**वेदाहं समतीतानि वर्तमानानि चार्जुन ।**
**भविष्याणि च भूतानि मां तु वेद न कश्चन ॥२६॥**

**अन्वयार्थ—अर्जुन,**—हे अर्जुना!—**अहं**—मी—**समतीतानि**—भूतकालांतील—**च वर्तमानानि**—व वर्तमानकालांतील—**च भविष्याणि**—व भविष्यत्कालांतील—**भूतानि**—भूतांना—**वेद**—जाणतों.—**तु**—पण—**मां**—मला—**कश्चन**—कोणी—**न वेद**—जाणत नाहीं. २६.

**यया योगमायया समावृतं मां लोको नाभिजानाति नासौ योगमाया मदीया सती ममेश्वरस्य मायाविनो ज्ञानं प्रतिबध्नाति यथाऽन्यस्यापि मायाविनो माया ज्ञानं तद्वत् । यत एवमतः—अहं तु वेद जाने समतीतानि समतिक्रान्तानि भूतानि वर्तमानानि चार्जुन भविष्याणि च भूतानि वेदाहं मां तु वेद न कश्चन मद्भक्तं मच्छरणमेकं मुक्त्वा मत्तत्त्ववेदनाभावादेव न मां भजते ॥ २६ ॥**

**भाष्यार्थ**—(मायेनें जर भगवान् आच्छादित झालेला आहे तर लोकाप्रमाणें त्याच्याहि ज्ञानाला प्रतिबंध होईल, अशी आशंका घेऊन आचार्य म्हणतात-)—**यया**

---

१ रहस्यकार "योग म्हणजे अव्यक्त स्वरूप सोडून व्यक्त स्वरूप धारण करण्याची युक्ति, हिलाच वेदान्ती माया असें म्हणतात." इत्यादि, या मायेविषयीं बराचसा मजकूर लिहितात. पण तो सर्व निराधार आहे. कारण योग म्हणजे सत्त्वादि गुणांची घटना-साम्यावस्था व तीच माया. अव्यक्त परमेश्वर व्यक्त कधींच होत नाहीं. तेव्हां 'त्यानें अव्यक्तस्वरूप सोडून व्यक्त स्वरूप धारण करण्याची युक्ति' हीच माया कशी असेल? 'माया म्हणजे अनादि लीला' हाहि अर्थ वेदान्ताला सम्मत नाहीं. 'माया म्हणजे इन्द्रियांनीं उत्पन्न केलेला देखावा' हेंहि म्हणणं बरोबर नाहीं, कारण स्वतः इन्द्रियें हाच मुळीं मायेचा विकास आहे. यास्तव माया ही रहस्यकारांच्या म्हणण्याप्रमाणें युक्ति वगैरे कांहीं नसून ती गुणसाम्यरूप सदसद्विलक्षण कल्पित ईशशक्ति आहे. ईश्वर स्वतः केव्हांच व्यक्त होत नाहीं. अर्थात् रहस्यकारांच्या येथील सर्व कल्पना वेदान्तशास्त्राला धरून नाहींत. २४व्या श्लोकाचा भाष्यार्थ पाहिल्यावरहि रहस्यकारांच्या कल्पना किती निराधार आहेत, हें सहज कळण्यासारखें आहे.

**योगमायया समावृतं मां लोकः न अभिजानाति**—ज्या योगमायेच्या योगानें आच्छादित झालेल्या मला लोक जाणत नाहींत—**असौ योगमाया मदीया सती मम ईश्वरस्य मायाविनः ज्ञानं न प्रतिबध्नाति**—ती योगमाया माझी असल्यामुळे मज मायावान् ईश्वराच्या ज्ञानास प्रतिबंध करीत नाहीं.—**यथा अन्यस्य अपि मायाविनः मायाः ज्ञानं (न प्रतिबध्नाति) तद्वत्**—ज्याप्रमाणें दुसऱ्याहि लौकिक मायाव्याची-गारुड्याची माया त्याच्या ज्ञानाला प्रतिबंध करीत नाहीं, त्याप्रमाणें [ माझी माया माझ्या ज्ञानाला प्रतिबंध करीत नाही. गारुड्याची माया त्याच्या ज्ञानाला प्रतिबंध करीत नाहीं, पण गारुड पाहणाऱ्या लोकाच्या ज्ञानाला प्रतिबंध करते, हे प्रसिद्ध आहे. त्याचप्रमाणें ईश्वराची माया ईश्वराच्या ज्ञानाला प्रतिबंध करीत नाहीं, पण इतर जीवांच्या ज्ञानाला प्रतिबंध करते. ]—**यतः एवं अत**.—ज्याअर्थी असें आहे त्याअर्थी—**अहं तु वेद-जाने**-मी तर जाणतों ( काय ? )—**समतीतानि-समतिक्रान्तानि भूतानि च वर्तमानानि**—समतीत म्ह०मागें होऊन गेलेलीं भूतें व वर्तमानसमयीं सृष्टींत विद्यमान असलेलीं भूतें, यास मी जाणतो.—**च अर्जुन भविष्याणि भूतानि अहं वेद**—आणि हे अर्जुना ! भविष्यत्कालीं होणाऱ्या भूतांना मी जाणतों—**तु एकं मद्भक्तं मच्छरणं मुक्त्वा मां कश्चन न वेद**—पण एकट्या माझ्या भक्ताला-मला शरण आलेल्याला-सोडून मला कोणीं जाणत नाहीं.—**मत्तत्त्ववेदनाभावात् एव मां न भजते** माझ्या तत्त्वाचें-स्वरूपाचे ज्ञान नसल्यामुळेच मला कोणी भजत नाहीं. [ एखादा विवेकवान्च मला भजतो, बाकीचे विवेकशून्य मला भजत नाहींत. ] २६.

इच्छाद्वेषसमुत्थेन द्वंद्वमोहेन भारत ।
सर्वभूतानि संमोहं सर्गे यान्ति परंतप ॥ २७ ॥

**अन्वयार्थ**—**परंतप भारत**—हे शत्रूंना ताप देणाऱ्या अर्जुना !—**सर्वभूतानि**—सर्व प्राणी—**सर्गे**—उत्पत्तीच्या वेळीं—**इच्छाद्वेषसमुत्थेन**—राग व द्वेष यांपासून उत्पन्न झालेल्या—**द्वंद्वमोहेन**—शीतोष्ण-सुख-दुःखादि द्वंद्वमोहानें—**संमोहं**—अविवेकास—**यान्ति**—प्राप्त होतात. २७.

**केन पुनर्मत्तत्त्ववेदनप्रतिबन्धेन प्रतिबद्धानि सन्ति जायमानानि सर्वभूतानि मां न विदन्तीत्यपेक्षायामिदमाह—इच्छाद्वेषसमुत्थेनेच्छा च द्वेषश्चेच्छाद्वेषौ ताभ्यां समुत्तिष्ठतीतीच्छाद्वेषसमुत्थस्तेनेच्छाद्वेषसमुत्थेन। केनेति विशेषापेक्षायामिदमाह—द्वंद्वमोहेन द्वंद्वनिमित्तो मोहो द्वंद्वमोहस्तावेवेच्छाद्वेषौ शीतोष्णवत्परस्परविरुद्धौ सुखदुःखतद्धेतुविषयौ यथाकालं सर्वभूतैः संबध्यमानौ द्वंद्वशब्देनाभिधीयेते। तत्र यदेच्छाद्वेषौ सुखदुःखतद्धेतुसंप्राप्त्या लब्धात्मकौ भवतस्तदा तौ सर्वभूतानां प्रज्ञायाः स्ववशापादनद्वारेण परमार्थात्मतत्त्वविषयज्ञानोत्पत्तिप्रतिबन्धकारणं मोहं जनयतः । न हीच्छाद्वेषदोषवशीकृतचित्तस्य यथाभूतार्थविषयज्ञानमुत्पद्यते बहिरपि किमु वक्तव्यं ताभ्यामाविष्टबुद्धेः संमूढस्य प्रत्यगात्मनि बहुप्रतिबन्धे ज्ञानं नोत्पद्यत इति । अतस्तेनेच्छाद्वे-**

षसमुत्थेन द्वंद्वमोहेन भारत भरतान्वयज सर्वभूतानि संमोहितानि सन्ति संमोहं संभूततां सर्गे जन्मन्युत्पत्तिकाल इत्येतद्यान्ति गच्छन्ति हे परंतप। मोहवशान्येव सर्वभूतानि जायमानानि जायन्त इत्यभिप्रायः। यत एवमतस्तेन द्वंद्वमोहेन प्रतिबद्धप्रज्ञानानि सर्वभूतानि संमोहितानि मामात्मभूतं न जानन्त्यत एवाऽऽत्मभावेन मां न भजन्ते ॥ २७ ॥

**भाष्यार्थ—केन पुनः मत्तत्त्ववेदनप्रतिबन्धेन प्रतिबद्धानि सन्ति जायमानानि सर्वभूतानि मां न विदन्ति**—मूल अज्ञानाहून आणखीं दुसऱ्या कोणत्या बरें तत्त्वज्ञानप्रतिबंधानें-माझ्या तत्त्वज्ञानाला प्रतिबंध करणाऱ्या कारणानें, प्रतिबद्ध होत्सातीं उत्पन्न होणारीं सर्व भूतें मला जाणत नाहींत—**इति अपेक्षायां इदं आह**—हें जाणण्याची आकांक्षा झाली असतां 'इच्छा०' इत्यादि श्लोकानें त्याचे हे-प्रत्यक्षसिद्ध कारण सांगतात—**इच्छाद्वेषसमुत्थेन-इच्छा च द्वेषः च इच्छाद्वेषौ ताभ्यां समुत्तिष्ठति इति इच्छाद्वेषसमुत्थः तेन इच्छा-द्वेषसमुत्थेन**—इच्छा-द्वेषांपासून उत्पन्न झालेल्या-इच्छा व द्वेष-ते इच्छाद्वेष, त्यापासून उत्पन्न होतो-उद्भवतो म्हणून इच्छाद्वेषसमुत्थ, अशा त्या इच्छा-द्वेषसमुत्पन्नाकडून—**केन इति विशेषापेक्षायां इदं आह**—पण अशा कोणाकडून, अशी त्याचा विशेष जाणण्याची अपेक्षा झाली असतां हें सांगतात—**द्वंद्वमोहेन-द्वंद्वनिमित्तः मोहः द्वंद्वमोहः**—द्वंद्वमोहाकडून; द्वंद्वाच्या निमित्ताने होणारा जो मोह तो द्वंद्वमोह. त्याच्या योगाने (पण इच्छा व द्वेष यांचेंहि द्वंद्वशब्दाने ग्रहण होते. तथापि येथे फक्त त्या दोहोंचेंच जें ग्रहण केलें आहे, तें बाकीच्या सर्वद्वंद्वांच्या उपलक्षणार्थ आहे, अशा आशयाने भाष्यकार म्हणतात-)—**तौ एव इच्छाद्वेषौ शीतोष्णवत् परस्परविरुद्धौ सुख-दुःख-तद्धेतुविषयौ यथाकालं सर्वभूतैः संबध्यमानौ द्वंद्वशब्देन अभिधीयेते**—तेच इच्छा व द्वेष शीत व उष्ण यांप्रमाणे (मागें पृ. ७२ पहा.) परस्पर विरुद्ध असलेले, सुख, दुःख व त्यांचीं निमित्तें यांविषयींचे, वेळोवेळीं सर्वभूतांशीं संबंध पावणारे असे ते द्वंद्वशब्दानें सांगितले जातात. [ इच्छा व द्वेष शीतोष्णांप्रमाणें परस्पर विरुद्ध आहेत. सुख व सुखाचें अनुकूल निमित्त-विषय हा इच्छेचा विषय आहे आणि दुःख व त्याचें प्रतिकूल निमित्त हा द्वेषाचा विषय आहे. सर्वभूतांच्या ठिकाणी त्यांचा निरनिराळ्या वेळीं उद्भव होतो. अशा वेळोवेळीं उद्भवणाऱ्या त्यांना द्वंद्व म्हणतात. ]—**तत्र यदा इच्छाद्वेषौ सुखदुःखतद्धेतुसंप्राप्त्या लब्धात्मकौ भवतः**—प्राण्यांमध्यें जेव्हां ते इच्छा-

---

१ रहस्यकार "इच्छाद्वेषसमुत्थेन-याचा इंद्रियांच्या इच्छा व द्वेष यांपासून उद्भवणाऱ्या" असा अर्थ करितात. पण इच्छा व द्वेष यांना 'इंद्रियांच्या' असें कसें म्हणतां येईल ? इच्छा व द्वेष हे अंतःकरणाचे धर्म आहेत. इंद्रियांचे नव्हेत. तसेंच 'सर्गे म्ह० या सृष्टींत' असें म्हणतात, पण तेंहि बरोबर नाहीं. कारण सर्ग म्हणजे उत्पत्ति-म्हणूनच आचार्यांनीं 'सर्गे-जन्मनि उत्पत्तिकाले' असें म्हटलें आहे. सर्वप्राणी जन्मतःच द्वंद्वमोहानें मोहित झालेले दिसतात.

द्वेष सुख, दुःख व त्यांचीं निमित्तें यांची प्राप्ति झाल्यानें उत्पन्न होतात–तीं तीं कारणें घडल्यामुळें त्यांचा उद्भव होतो—**तदा तौ सर्वभूतानां प्रज्ञायाः स्ववश-आपादनद्वारेण**—तेव्हां ते इच्छा-द्वेष सर्वभूतांच्या प्रज्ञेला आपल्या वश करून घेणें या कार्याच्या द्वारा—**परमार्थ-आत्मतत्त्वविषयज्ञानोत्पत्तिप्रतिबंधकारणं मोहं जनयतः**—परमार्थ आत्मतत्त्वाच्या ज्ञानोत्पत्तीला प्रतिबंध होण्याचें कारण–ज्ञानाचा प्रतिबंध असा जो मोह त्याला उत्पन्न करितात. [सुख व त्याचें निमित्त प्राप्त झालें असतां, त्याविषयीं इच्छा आणि दुःख व दुःखनिमित्त झालें असतां, त्याविषयीं द्वेष उत्पन्न होतो. ते दोन्ही उत्पन्न होतांच प्राण्यांच्या बुद्धि आपल्या अधीन करून घेतात व आत्मतत्त्वज्ञानाला प्रतिबंध करणाऱ्या मोहाला उत्पन्न करितात. ]—**इच्छाद्वेषदोषवशीकृतचित्तस्य बहिः अपि यथाभूतार्थविषयज्ञानं न उत्पद्यते हि**—इच्छा व द्वेष या दोषांनीं ज्याच्या चित्ताला आपल्या अधीन करून घेतलें आहे म्ह० ज्याचें चित्त इच्छाद्वेषरूप दोषांनीं दूषित झालें आहे, त्याला बाहेर–लौकिकांतहि जर यथाभूतार्थ–अगदी बरोबर–विषयज्ञान होऊं शकत नाहीं हें प्रसिद्ध आहे, तर—**ताभ्यां आविष्टबुद्धेः संमूढस्य बहुप्रतिबन्धे प्रत्यगात्मनि ज्ञानं न उत्पद्यते इति किमु वक्तव्यं**—त्या इच्छाद्वेषांनीं ज्याच्या बुद्धींत आवेश–प्रवेश केला आहे व त्यामुळें जो संमूढ झाला आहे, त्याला अनेक प्रतिबंधांनीं युक्त असलेल्या प्रत्यगात्म्याचें ज्ञान होत नाहीं, हें काय सांगावें ? ते निराळें सांगण्याची गरजच नाहीं. [ इच्छा व द्वेष यांनीं दूषित झालेल्या चित्तांत लौकिकपदार्थाचें यथार्थ ज्ञानहि जर संभवत नाहीं, तर ज्याचें ज्ञान होण्यास अहंकारादि प्रतिबंध एकसारखे प्रतिबंध करीत असतात, त्या अलौकिक प्रत्यगात्म्याचें यथार्थ ज्ञान–सम्यग्दर्शन राग-द्वेषवानाला कसें होणार ? ]—**अतः भारत-भरतान्वयज तेन इच्छाद्वेषसमुत्थेन द्वंद्वमोहेन सर्वभूतानि संमोहितानि सन्ति**—यास्तव हे भरतवंशजा अर्जुना ! त्या इच्छाद्वेषापासून उत्पन्न झालेल्या द्वंद्वमोहानें सर्व भूतें संमोहित होत्सातीं—**सर्गे-जन्मनि-उत्पत्तिकाले इति-एतत्**—सर्गाचे वेळीं म्ह० जन्मसमयीं–जेव्हां उत्पत्ति होते तेव्हांच, असा याचा भावार्थ. **संमोहं-संमूढतां यान्ति-गच्छन्ति हे परंतप**—संमोहास म्ह० अत्यंत मूढतेस प्राप्त होतात, हे अर्जुना ! [सर्वभूतें इच्छाद्वेषजन्य द्वंद्वमोहानें संमूढ होत्सातीं जन्माचे वेळींच मूढतेला प्राप्त होतात.]—**जायमानानि सर्वभूतानि मोहवशानि एव जायन्ते इति अभिप्रायः**—उत्पन्न होणारीं सर्व भूतें मोहवश होऊनच उत्पन्न होतात, असा याचा आशय.—**यतः एवं अतः तेन द्वंद्वमोहेन प्रतिबद्धप्रज्ञानानि सर्वभूतानि संमोहितानि ( सन्ति )**—ज्याअर्थीं असें आहे, त्याअर्थीं त्या द्वंद्वमोहानें ज्यांचें प्रज्ञान प्रतिबद्ध झालें आहे, अशीं सर्व भूतें संमोहित होत्सातीं—**आत्मभूतं मां न जानन्ति**—त्यांचा आत्माच असलेला जो मी त्या मला जाणत नाहींत.—**अतः एव मां आत्मभावेन न भजन्ते**—त्यामुळेंच मला आत्मभावानें भजत नाहींत. २७.

**येषां त्वन्तगतं पापं जनानां पुण्यकर्मणाम् ।**
**ते द्वंद्वमोहनिर्मुक्ता भजन्ते मां दृढव्रताः ॥ २८ ॥**

**अन्वयार्थ**—**तु**—पण—**येषां पुण्यकर्मणां जनानां**—ज्या पुण्यकर्मे करणाऱ्या जनांचें—**पापं**—पाप—**अन्तगतं**—क्षीण झालेलें असतें—**ते**—ते पुण्यवान् लोक—**द्वंद्वमोहनिर्मुक्ताः**—द्वंद्वमोहापासून सर्वथा मुक्त व—**दृढव्रताः**—दृढव्रत होत्साते—**मां**—मला—**भजन्ते**—भजतात. २८.

**के पुनरनेन द्वंद्वमोहेन निर्मुक्ताः सन्तस्त्वां विदित्वा यथाशास्त्रमात्मभावेन भजन्त इत्यपेक्षितमर्थं दर्शयितुमुच्यते—येषां तु पुनरन्तगतं समाप्तप्रायं क्षीणं पापं जनानां पुण्यकर्मणां पुण्यं कर्म येषां सत्त्वशुद्धिकारणं विद्यते ते पुण्यकर्मणस्तेषां पुण्यकर्मणां ते द्वंद्वमोहनिर्मुक्ता यथोक्तेन द्वंद्वमोहेन निर्मुक्ता भजन्ते मां परमात्मानं दृढव्रता एवमेव परमार्थतत्त्वं नान्यथेत्येवं निश्चितविज्ञाना दृढव्रता उच्यन्ते ॥ २८ ॥**

**भाष्यार्थ**—( उत्पन्न होणारीं सर्वच भूतें जर द्वंद्वमोहानें मोहित होऊन उत्पन्न होतात व त्यामुळें तीं भगवज्ज्ञानशून्य असतात, तर शास्त्रानुरोधानें भगवद्भजन करणारे अधिकारीच नसल्यामुळें शास्त्रविधि व्यर्थ होणार, अशी शंका घेऊन भगवद्भक्तीचे अधिकारी दाखवितात-)—**के पुनः अनेन द्वंद्वमोहेन निर्मुक्ताः सन्तः त्वां विदित्वा यथाशास्त्रं आत्मभावेन भजन्ते**—तर मग कोण बरे या द्वंद्वमोहापासून पूर्णपणें मुक्त होत्साते-तुला जाणून यथाशास्त्र आत्मभावानें भजतात,—**इति अपेक्षितं अर्थं दर्शयितुं उच्यते**—हा अपेक्षित अर्थ दाखविण्यासाठीं 'येषां०' या श्लोकानें सांगितले जातें—**तु पुनः**—पण याच्या उलट—**येषां पुण्यकर्मणां जनानां**—ज्या पुण्यकर्मी जनांचें—**सत्त्वशुद्धिकारणं पुण्यं कर्म येषां विद्यते ते पुण्यकर्मणः**—चित्तशुद्धीचें कारण असें पुण्य कर्म ज्यांचें असतें ते पुण्यकर्मे होत.—**तेषां पुण्यकर्मणां पापं अन्तगतं-समाप्तप्रायं-क्षीणं**—त्या पुण्यकर्म्यांचें पाप अन्त पावते-जवळ जवळ समाप्त होतें-क्षीण झालेलें असतें, [ अनेक जन्मांत केलेल्या पुण्यामुळें ज्यांचे पाप क्षीण झालेलें असतें, त्यामुळें ज्यांचा द्वंद्वमोह क्षय पावतो, जे ब्रह्मचर्यादि नियमानें युक्त असतात ते भगवद्भजनाचे अधिकारी होत. अर्थात् शास्त्रविधि निर्विषय नाहीं. असल्या पुण्यवानांसाठींच शास्त्रविधीची प्रवृत्ति झाली आहे. त्यामुळें शास्त्र व्यर्थ ठरत नाहीं. ]—**ते द्वंद्वमोहनिर्मुक्ताः-यथोक्तेन द्वंद्वमोहेन निर्मुक्ताः दृढव्रताः मां-परमात्मानं भजन्ते**—ते पूर्वोक्त द्वंद्वमोहापासून पूर्णपणें मुक्त झालेले-द्वंद्वमोहानिर्मुक्त व दृढव्रत पुण्यवान् पुरुष मला-परमात्म्याला भजतात.—**परमार्थतत्त्वं एवं एव न अन्यथा इति-एवं निश्चितविज्ञानाः दृढव्रताः उच्यन्ते**—परमार्थतत्त्व हें असेंच आहे, याहून अन्य प्रकारचें-विपरीत नाहीं, अशाप्रकारें ज्यांचें विज्ञान निश्चित आहे ते दृढव्रत म्हटले जातात. [ इच्छाद्वेषादि द्वंद्वांपासून होणाऱ्या मोहाची निवृत्ति पुण्याचरणामुळें होते. आणि मोहनिवृत्तीचें पर्यवसान भगवद्भक्तींत होतें. ] २८.

जरामरणमोक्षाय मामाश्रित्य यतन्ति ये ।
ते ब्रह्म तद्विदुः कृत्स्नमध्यात्मं कर्म चाखिलम् ॥२९॥

**अन्वयार्थ—ये**—जे—**जरामरणमोक्षाय**—म्हातारपणा व मरण यांपासून मुक्त होण्यासाठीं—**मां**—माझाच—**आश्रित्य**—आश्रय करून—**यतन्ति**—यत्न करितात—**ते**—ते भक्त—**तत् ब्रह्म**—त्या परब्रह्माला—**विदुः**—जाणतात.—**कृत्स्नं**—समग्र—**अध्यात्मं**—प्रत्यगात्म वस्तु—**च अखिलं कर्म**—व सर्व कर्म (यांस)—**विदुः**—जाणतात. २९.

**ते किमर्थं भजन्त इत्युच्यते—जरामरणमोक्षाय जरामरणमोक्षार्थं मां परमेश्वरमाश्रित्य मत्समाहितचित्ताः सन्तो यतन्ति प्रयतन्ते ये ते यद्ब्रह्म परं तद्विदुः कृत्स्नं समस्तमध्यात्मं प्रत्यगात्मविषयं वस्तु तद्विदुः कर्म चाखिलं समस्तं विदुः ॥ २९ ॥**

**भाष्यार्थ—ते किमर्थं भजन्ते इति उच्यते**—ते कशासाठीं भजतात, तें 'जरामरण०' या श्लोकानें सांगितलें जातें.—**ये जरामरणमोक्षाय-जरामरणमोक्षार्थं मां-परमेश्वरं आश्रित्य-मत्समाहितचित्ताः सन्तः यतन्ति-प्रयतन्ते**—जे जरामरणापासून मुक्त होण्यासाठीं-जरा व मरण यांतून सुटण्यासाठीं मज परमेश्वराचा आश्रय करून माझ्या ठिकाणीं ज्यांनीं आपलें चित्त समाहित केलें आहे, असे होत्साते यत्न करितात, प्रयत्न करितात—**ते यत् परं ब्रह्म तत् विदुः**—ते जें परब्रह्म त्याला जाणतात.—**कृत्स्नं-समस्तं अध्यात्मं-प्रत्यगात्मविषयं वस्तु तत् विदुः**—जें समस्त अध्यात्म म्ह० प्रत्यगात्मविषयक तत्त्व तें जाणतात.—**च अखिलं-समस्तं कर्म विदुः**—आणि अखिल म्ह० समस्त कर्म जाणतात. [ जरामरणादिरूप बंध नाहींसा होण्यासाठीं भगवद्भजन विहित आहे. उत्तमाधिकारी मोक्षासाठीं निर्गुण व निष्प्रपंच अशा मला जाणतात, हें 'मामेव ये प्रपद्यन्ते०' या वाक्यानें सांगितलें व येथें मध्यमाधिकाऱ्यांनीं परमेश्वराचा आश्रय करावा, असें सांगत आहेत. विषयांपासून विमुख होऊन भगवन्निष्ठ होणें, म्हणजेच परमेश्वराचा आश्रय करणें आहे. भगवन्निष्ठा सिद्ध होण्यासाठीं यज्ञादि बहिरंग व श्रवणादि अन्तरंग साधनांचें अनुष्ठान करणें, हाच प्रयत्न येथें विवक्षित आहे. पूर्वीं जगाचें उपादान परब्रह्म सांगितलें. तेव्हां त्या ब्रह्माला कसें जाणतात, अशी अपेक्षा झाली असतां समस्त अध्यात्मवस्तु व सकल कर्म या रूपानें त्याला जाणतात, असें येथें सांगितलें आहे. ] २९.

साधिभूताधिदैवं मां साधियज्ञं च ये विदुः ।
प्रयाणकालेऽपि च मां ते विदुर्युक्तचेतसः ॥ ३० ॥

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे ज्ञानविज्ञानयोगो नाम सप्तमोऽध्यायः ॥ ७ ॥**

**अन्वयार्थ—ये**—जे—**साधिभूताधिदैवं**—अधिभूत व अधिदैव यांसह—**साधियज्ञं च**—आणि अधियज्ञासह—**मां**—मला—**विदुः**—जाणतात—**ते युक्तचेतसः**—ते समाहितचित्त झालेले-शांतचित्त भक्त—**प्रयाणकाले अपि च**—मरणाच्या वेळीहि—**मां**—मला—**विदुः**—जाणतात. ३०.

साधीति । **साधिभूताधिदैवमधिभूतं चाधिदैवं चाधिभूताधिदैवं सहाधिभूताधिदैवेन साधिभूताधिदैवं च मां ये विदुः साधियज्ञं च सहाधियज्ञेन साधियज्ञं ये विदुः प्रयाणकालेऽपि च मरणकालेऽपि च मां ते विदुर्युक्तचेतसः समाहितचित्ता इति ॥ ३० ॥**

इति श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यगोविन्दभगवत्पूज्यपादशिष्यश्रीमच्छंकरभगवतः कृतौ श्रीभगवद्गीताभाष्ये ज्ञानविज्ञानयोगो नाम सप्तमोऽध्यायः ॥७॥

**भाष्यार्थ**—( भगवन्निष्ठांना केवल सर्व अध्यात्म-कर्मात्मक ब्रह्माचें ज्ञानच नाहीं, तर अधिभूत, अधिदैव, व अधियज्ञ यांसह ब्रह्मज्ञान होतें, असें )—'**साधि०' इति**—'साधि०' या श्लोकानें सांगतात—'**साधिभूताधिदैवं**-' **अधिभूतं च अधिदैवं च अधिभूताधिदैवं अधिभूताधिदैवेन सह साधिभूताधिदैवं च मां ये विदुः**—अधिभूत व अधिदैव मिळून अधिभूताधिदैव—अधिभूताधिदैवासह म्ह० साधिभूताधिदैव अशा मला जे जाणतात.—**साधियज्ञं च अधियज्ञेन सह साधियज्ञं ये विदुः**—आणि साधियज्ञ म्ह० अधियज्ञासह मला जे जाणतात [ म्ह० अध्यात्म, कर्म, अधिभूत, अधिदैव व अधियज्ञ, हें पंचक ब्रह्मच आहे असें जे जाणतात, त्या यथोक्तज्ञानवान् व समाहितचित्त पुरुषाचें भगवत्तत्त्वज्ञान आपत्कालींहि अप्रतिहत—अखंड राहतें, असें सांगतात—]—**ते युक्तचेतसः समाहितचित्ताः प्रयाणकाले अपि च-मरणकाले अपि च मां विदुः इति**—ते युक्तचित्त म्ह० समाहितचित्त ज्ञानी प्रयाणसमयींहि म्ह० मरणकालींहि मला जाणतात. [ या श्लोकांतील ' प्रयाणकाले अपि च ' येथील ' अपि च ' या दोन अव्ययांवरून मरणसमयीं इंद्रियसमुदाय व्यग्र झाल्यामुळें ज्ञानाचा जरी संभव नसला, तरी वर सांगितलेल्या प्रकारच्या ज्ञानी समाहितचित्त पुरुषाला भगवत्तत्त्वज्ञान सुलभ आहे, हें व्यक्त होतें. या सातव्या अध्यायांत उत्तम 'अधिकाऱ्यासाठीं ज्ञेय ब्रह्माचें निरूपण करणाऱ्या भगवानांनी त्यासाठींच त्याच्या सर्वात्मकत्वादिकांचा उपदेश केला. परा व अपरा प्रकृतीच्या द्वारा ब्रह्म सर्वांचें कारण आहे, असें सांगितलें आणि हें सर्व करीत असतांनाच तत्पदवाच्य व तत्पदलक्ष्य वस्तूचाहि निर्देश केला. मायाशक्तिमान् ईश्वर हें ' तत् ' या पदाचें वाच्य व शुद्ध-निर्गुण ब्रह्म हें त्याचें लक्ष्य आहे. ]३०

इति भगवान् श्रीकृष्णांनीं गायलेल्या—सांगितलेल्या उपनिषदांतील—रहस्यविद्येंतील ब्रह्मविद्येपैकीं योग—उपाय-शास्त्रांतील ज्ञानविज्ञानयोगनांवाचा सातवा अध्याय विष्णुशर्मकृत सान्वयार्थ-सटीप-भाष्य-भाष्यार्थासह समाप्त झाला.

# अध्याय आठवा.

तारकब्रह्मयोग ( ब्रह्माक्षरनिर्देश )

**अर्जुन उवाच**—अर्जुन म्हणाला—

**किं तद्ब्रह्म किमध्यात्मं किं कर्म पुरुषोत्तम ।**
**अधिभूतं च किं प्रोक्तमधिदैवं किमुच्यते ॥ १ ॥**
**अधियज्ञः कथं कोऽत्र देहेऽस्मिन्मधुसूदन ।**
**प्रयाणकाले च कथं ज्ञेयोऽसि नियतात्मभिः ॥ २ ॥**

**अन्वयार्थ—हे पुरुषोत्तम**—हे पुरुषोत्तमा कृष्णा—**तत् ब्रह्म किं**—तें ब्रह्म काय आहे, सोपाधिक आहे कीं निरुपाधिक ?—**अध्यात्मं किं**—या शरीरांत राहणारें अध्यात्म काय आहे ?—**कर्म किं**—कर्म काय आहे ?—**च**—आणि—**अधिभूतं**—अधिभूत म्ह० भूतांतील तत्त्व—**किं प्रोक्तं**—काय सांगितलें आहे ?—**अधिदैवं किं उच्यते**—अधिदैव कशाला म्हणतात—**मधुसूदन,**—हे मधुसूदना !—**अत्र**—यांतील—**अधियज्ञः**—अधियज्ञ—**कः**—कोणता ?—**कथं**—त्याचें चिंतन कसें करावें ?—**अस्मिन् देहे**—तो या देहांत आहे कीं कोठें ?—**च**—आणि—**प्रयाणकाले**—मरणाच्या वेळीं—**नियतात्मभिः**—शांतचित्त पुरुषांकडून—**कथं ज्ञेयः असि**—तूं कसा जाणण्यास योग्य आहेस ? १,२.

**ते ब्रह्म तद्विदुः कृत्स्नमित्यादिना भगवताऽर्जुनस्य प्रश्नबीजान्युपदिष्टान्यतस्तत्प्रश्नार्थम्—( अर्जुन उवाच ) ॥ १ ॥ २ ॥**

**भाष्यार्थ**—( सातव्या अध्यायाच्या शेवटीं 'येषां त्वन्तगतं पापं०' इत्यादि वचनांनीं ज्या ब्रह्मादिकांचें अनुसंधान करावयास सांगितले व मरणसमयीं जे भगवानांचें स्मरण सांगितलें, तें सर्व जाणण्याची इच्छा करणारा अर्जुन प्रश्न करीत आहे, असे सांगण्याच्या इच्छेनें भाष्यकार या सर्व प्रश्नांच्या समुदायास अवतरण देतात-)—**'ते ब्रह्म तद्विदुः कृत्स्नं०' इत्यादिना भगवता अर्जुनस्य प्रश्नबीजानि उपदिष्टानि**—'ते ब्रह्म तद्विदुः' इत्यादि श्लोकानें भगवानांनीं अर्जुनाच्या प्रश्नाचीं बीजें उपदेशिलीं. म्ह०

१ रहस्यकार या अध्यायाच्या आरंभी एक सविस्तर अवतरण देतात, त्याचा आरंभच "कर्मयोगांतर्गत ज्ञानविज्ञानाचे निरूपण" असा अपसिद्धान्तानें केला असल्यामुळे व अध्यात्म याचा अर्थ " एकच आत्मा सर्व ठिकाणी, असें प्रतिपादन करणारें शास्त्र असा आहे. " असा वेदान्तसिद्धान्ताच्या अगदी विपरीत अर्थ केल्यामुळें आम्ही विस्तारभयास्तव त्याचा विचार करीत नाही.

प्रश्नांच्या बीजांचा निर्देश केला.—**अतः तत्प्रश्नार्थं**—( अर्जुन उवाच- ) म्हणून त्या॰ विषयीं प्रश्न करण्यासाठीं अर्जुन म्हणाला. १,२.

**श्रीभगवानुवाच**—श्रीकृष्ण म्हणाले—

**अक्षरं ब्रह्म परमं स्वभावोऽध्यात्ममुच्यते ।**
**भूतभावोद्भवकरो विसर्गः कर्मसंज्ञितः ॥ ३ ॥**

**अन्वयार्थ—परमं अक्षरं**—जें निरतिशय अविनाशी तत्त्व तेंच—**ब्रह्म**—ब्रह्म आहे.—**स्वभावः**—त्या परम अक्षर ब्रह्माचाच प्रत्येक देहांतील प्रत्यगात्मभाव हेंच —**अध्यात्मं**—अध्यात्म तत्त्व आहे—**भूतभावोद्भवकरः**—भूतांचा सद्भाव उत्पन्न करणारा—**विसर्गः**—देवतांना उद्देशून चरु-पुरोडाशादि द्रव्यांचा जो त्याग—**कर्म॰ संज्ञितः**—त्यालाच कर्म ही संज्ञा आहे. ३.

**एषां प्रश्नानां यथाक्रमं निर्णयाय—अक्षरं न क्षरतीति पर आत्मा "एतस्य वा अ- क्षरस्य प्रशासने गार्गि" इतिश्रुतेः । ओंकारस्य चोमित्येकाक्षरं ब्रह्मेति परेण विशेषणा- दग्रहणम् । परममिति च निरतिशये ब्रह्मण्यक्षर उपपन्नतरं विशेषणम् । तस्यैव परस्य ब्रह्मणः प्रतिदेहं प्रत्यगात्मभावः स्वभावः । स्वभावोऽध्यात्ममुच्यते, आत्मानं देहमधि- कृत्य प्रत्यगात्मतया प्रवृत्तं परमार्थब्रह्मावसानं वस्तु स्वभावोऽध्यात्ममुच्यतेऽध्यात्मश- ब्देनाभिधीयते । भूतभावोद्भवकरो भूतानां भावो भूतभावस्तस्योद्भवो भूतभावोद्भ- वस्तं करोतीति भूतभावोद्भवकरो भूतवस्तूत्पत्तिकर इत्यर्थः । विसर्गो विसर्जनं देव- तोद्देशेन चरुपुरोडाशादेर्द्रव्यस्य परित्यागः स एष विसर्गलक्षणो यज्ञः कर्मसंज्ञितः क- र्मशब्दित इत्येतत् । एतस्माद्धि बीजभूताद्वृष्ट्यादिक्रमेण स्थावरजङ्गमानि भूतान्यु- द्भवन्ति ॥ ३ ॥**

**भाष्यार्थ—एषां प्रश्नानां यथाक्रमं निर्णयाय (श्रीभगवान् उवाच)**—या प्रश्नांचा अनुक्रमानेंच निर्णय करण्यासाठीं श्रीभगवान् 'अक्षरं॰' इत्यादि म्हणाले—**अ- क्षरं-न क्षरति इति परः आत्मा**—ज्याचें क्षरण-व्यय-क्षय होत नाहीं, तें अक्षर म्ह॰ पर आत्मा—**'एतस्य वै अक्षरस्य प्रशासने गार्गि॰' इति श्रुतेः**— हे गार्गि, याच अक्षराच्या प्रशासनांत-अधिकारांत सूर्य, चंद्र विशेषेंकरून धारण केलेले असे राहतात, अशी अक्षर म्ह॰ ब्रह्म-परमात्मा, याविषयीं प्रमाणभूत श्रुति आहे. ( अहोपण, 'न क्षरति इति अक्षरं' या व्युत्पत्तीनें अक्षर म्ह॰ अक्षय ब्रह्म असें जरी

---

१ 'कोऽत्र देहेऽस्मिन्' याचा अर्थ रहस्यकार "या देहांत अधिदेह कोण आहे," असा एक आठवा प्रश्न कल्पितात, व तो चवथ्या श्लोकांतील 'आधियज्ञोऽहमेवात्र देहे देहभृतांवर' या भग- वानांच्या उत्तराला अनुसरून आहे असें म्हणतात. आपण याचा विचार त्याच श्लोका- वरील टीपेंत करूं.

म्हणतां आलें तरी ' ब्रह्म ' या अर्थीं अक्षरशब्द रूढ नाही; म्हणून ' ओं ' हें अक्षर येथें विवक्षित असावें, अशी आशंका घेऊन आचार्य म्हणतात-)—**' ओं इति एकाक्षरं ब्रह्म ' इति परेण विशेषणात् ओंकारस्य अग्रहणं**—' ओं ' हें एकाक्षर ब्रह्म आहे, ( पुढें श्लो. १३ ) असें पुढें विशेषण दिलेलें असल्यामुळें येथील अक्षरशब्दानें ओंकाराचें ग्रहण करितां येत नाहीं. ( ' अहोपण, आरंभीं ज्याचा उपक्रम केला आहे, त्या ओंकारसंज्ञक अक्षराचाच तो पुढील विशेषणपूर्वक उल्लेख आहे, ' अशी वादी पुनः शंका घेईल म्हणून आचार्य म्हणतात-)—**' परमं ' इति च विशेषणं निरतिशये अक्षरे ब्रह्मणि उपपन्नतरं**—या श्लोकांत ' परमं ' असें जे विशेषण आहे तें निरातिशय अक्षर ब्रह्मांतच अतिशय उपपन्न होतें. [ ' अक्षर ' या शब्दानें जर ' ओं ' हें अक्षर येथें विवक्षित असते तर ' परम अक्षर हेच ब्रह्म आहे, ' असें जें अक्षराला ' परम ' हें विशेषण दिलें आहे, तें अयोग्य झाले असते. म्हणून येथील अक्षरशब्दानें मूळ ब्रह्मच घ्यावे. ( ' किं अध्यात्मं ' या दुसऱ्या प्रश्नाचें ' स्वभावोऽध्यात्मं ' हें उत्तर आहे, त्याचें व्याख्यान-)—**तस्य एव परस्य ब्रह्मणः प्रतिदेहं प्रत्यगात्मभावः स्वभावः**—त्याच पर ब्रह्माचा प्रत्येक देहांत जो प्रत्यगात्मभाव तो स्वभाव, व —**' स्वभावः अध्यात्मं उच्यते '**—स्वभावच अध्यात्म म्हटला जातो. [ स्वभावालाच अध्यात्म म्हणतात. जो स्वकीयभाव तो स्वभाव म्ह० श्रोत्रादि इंद्रियसमुदाय. तो आत्म्यामध्ये म्ह० देहामध्यें ' अहं—मी ' या प्रत्ययानें वेद्य-जाणण्यास योग्य आहे. म्हणून या प्रतिभासाची व्यावृत्ति करून स्वभावशब्दाचें ग्रहण केलें आहे. ]—**आत्मानं -देहं अधिकृत्य प्रत्यगात्मतया प्रवृत्तं परमार्थब्रह्मावसानं वस्तु स्वभावः -अध्यात्मं उच्यते**—आत्म्यापासून म्ह० देहापासून आरंभ करून प्रत्यगात्मरूपानें-जीवात्मरूपानें प्रवृत्त झालेलें व परमार्थब्रह्मामध्यें अंत पावणारें जें तत्त्व त्याला स्वभाव-अध्यात्म म्हटलें जातें.—**अध्यात्मशब्देन अभिधीयते**—देहापासून परमार्थ ब्रह्मापर्यंत उत्तरोत्तर आंत आंत असलेलें जें जीवात्मतत्त्व तें ' अध्यात्म ' या शब्दानें सांगितलें जातें. [ परब्रह्मच देहादिकांत प्रवेश करून प्रत्यगात्मभावाचा-जीवात्मत्वाचा अनुभव घेतें. याविषयीं ' तत्सृष्ट्वा तदेवानुप्राविशत् ' त्याला उत्पन्न करून त्यांतच मागून प्रविष्ट झालें, अशी तैत्तिरीयश्रुति प्रमाण आहे. तैत्ति. भाष्यार्थ पृ.१३३ पहा. आतां ' किं कर्म ' या तिसऱ्या प्रश्नाचें उत्तर-]—**भूतभावोद्भवकरः-भूतानां भावः भूतभावः तस्य उद्भवः भूतभावोद्भवः तं करोति इति भूतभावोद्भवकरः-भूतवस्तूत्पत्तिकरः इत्यर्थः**—' भूतभावोद्भवकर ' भूतांचा भाव-सद्भाव-वस्तुभाव त्याचा जो उद्भव-—उत्पत्ति, तो भूतभावोद्भव, त्याला करतो तो भूतभावोद्भवकर-भूतवस्तूंची उत्पत्ति करणारा, असा याचा भावार्थ. असा—**विसर्गः-विसर्जनं-देवतोद्देशेन चरुपुरोडाशादेः द्रव्यस्य परित्यागः**—विसर्ग म्ह० विसर्जन, देवतांच्या उद्देशानें चरुपुरोडाशादि द्रव्याचा परित्याग करणें—**सः एषः विसर्गलक्षणः यज्ञः कर्मसंज्ञितः-कर्मशब्दितः इति एतत्**—तो हा विसर्गरूप यज्ञ कर्मसंज्ञित आहे. तो विसर्गच

कर्म या नांवाला-शब्दाला पात्र आहे. त्यालाच कर्म म्हणतात, असा याचा भावार्थ.— **एतस्मात् हि बीजभूतात् वृष्ट्यादिक्रमेण स्थावरजंगमानि भूतानि उद्भवन्ति**—याच बीजभूत कर्मसंज्ञक यज्ञापासून वृष्ट्यादिकांच्या क्रमानें चराचर भूतें-प्राणिशरीरें उत्पन्न होतात. ( मागे पृ. २८७ पहा. )

**अधिभूतं क्षरो भावः पुरुषश्चाधिदैवतम् ।**
**अधियज्ञोऽहमेवात्र देहे देहभृतां वर ॥ ४ ॥**

**अन्वयार्थ—क्षरः भावः**—विनाशी भाव हेच—**अधिभूतं**—सर्व भूतांतील-प्राण्यांतील तत्त्व आहे.—**च**—आणि—**पुरुषः**—सर्वांच्या शरीरांत राहणारा पुरुष, हेंच—**अधिदैवतं**—अधिदैवत-देवांतील तत्त्व आहे.—**हे देहभृतां वर**—हे देह धारण करणारांतील श्रेष्ठ अर्जुना !—**अत्र देहे**—या देहांत—**अधियज्ञः**—अधियज्ञ-यज्ञाभिमानी देवता—**अहं एव**—मीच आहें. ४.

**अधिभूतमिति । अधिभूतं प्राणिजातमधिकृत्य भवतीति । कोऽसौ क्षरः क्षरतीति क्षरो विनाशी भावो यत्किंचिज्जनिमद्वस्त्वित्यर्थः । पुरुषः पूर्णमनेन सर्वमिति पुरि शयनाद्वा पुरुष आदित्यान्तर्गतो हिरण्यगर्भः सर्वप्राणिकरणानामनुग्राहकः सोऽधिदैवतम् । अधियज्ञः सर्वयज्ञाभिमानिनी देवता विष्ण्वाख्या "यज्ञो वै विष्णुः" इति श्रुतेः । स हि विष्णुरहमेवात्रास्मिन्देहे यो यज्ञस्तस्याहमधियज्ञो यज्ञो हि देहनिर्वर्त्यत्वेन देहसमवायीति देहाधिकरणो भवति देहभृतां वर ॥ ४ ॥**

**भाष्यार्थ—अधिभूतं इति**—आणखी तीन प्रश्नांचे उत्तर 'अधिभूतं०' या श्लोकानें देतात—**अधिभूतं-प्राणिजातं अधिकृत्य भवति इति**—सर्व प्राणिवर्गाला धरून जें असतें तें अधिभूत.—**कः असौ क्षरः-क्षरति इति क्षरः विनाशी भावः यत्किंचित् जनिमत् वस्तु इत्यर्थः**—(क्षरभाव हें अधिभूत आहे. पण) तो क्षरभाव कोणता ? क्षरतो-क्षय पावतो म्हणून क्षर-विनाशी भाव-कोणतीहि उत्पन्न होणारी वस्तु, असा याचा भावार्थ. [ सर्व कार्यसमूह हेंच अधिभूत होय. आधिदैव कोण ? या चवथ्या प्रश्नाचें उत्तर-]—**पुरुषः-पूर्णं अनेन सर्वं इति-पुरि शयनात् वा**

---

१ रहस्यकार "भूतमात्रादि पदार्थांची उत्पत्ति करणारा जो विसर्ग म्हणजे सृष्टिव्यापार, त्याचें नांव कर्म," असा कर्मशब्दाचा अर्थ करितात व त्याला नासदीयसूक्तांतील 'विसृष्टि' शब्दाचा आधार दाखवितात. पण हा अर्थ चुकीचा आहे. कारण तेथें 'ही विसृष्टि कोठून उत्पन्न झाली' इत्यादि प्रश्न आहेत व येथें भूतभावांचा उद्भव करणारा, म्हणजे भूतांच्या अस्तित्वाची उत्पत्ति करणारा जो विसर्ग म्हणजे त्याग तें कर्म असें म्हटलें आहे. त्यामुळें विसृष्टि व कर्म यांचा कांहींच संबंध नाहीं. अर्थात् "विसर्ग म्हणजे यज्ञांतील हविरुत्सर्ग असा अर्थ करण्याची कांहीं जरूर नाहीं," असें म्हणून आचार्यादि टीकाकारांना रहस्यकारांनीं जो दोष दिला आहे, तो फारसा सयुक्तिक नाहीं.

**पुरुषः**—पुरुष-ज्यानें हें सर्व परिपूर्ण आहे-भरलेलें आहे तो पुरुष, किंवा शरीराख्य-पुरांत शयन करणारा-राहणारा असल्यामुळें पुरुष-म्ह०—**आदित्यान्तर्गतः हिरण्यगर्भः सर्वप्राणिकरणानां अनुग्राहकः**—विराट्-शरीरास प्राप्त होऊन आदित्यमण्डलादि-दैवतामध्यें-आंत राहिलेला-हिरण्यगर्भ-लिंगात्मा-व्यष्टींच्या इंद्रियांवर अनुग्रह करणारा ( हा येथील 'पुरुष' शब्दाचा अर्थ आहे. )—**सः अधिदैवतं**—तो पुरुषच अधिदैवत आहे. ( आतां पांचव्या प्रश्नाचे उत्तर- )—**अधियज्ञः-सर्वयज्ञाभिमानिनी विष्णु-आख्या देवता-'यज्ञो वै विष्णुः' इति श्रुतेः**—अधियज्ञ म्ह० सर्व यज्ञांची अभिमानिनी 'विष्णु' या नांवाची देवता, कारण याविषयीं 'यज्ञ हाच विष्णु आहे' अशी श्रुति प्रमाण आहे. [ परादेवताच अधियज्ञशब्दानें सांगितली जाते.]—**सः हि विष्णुः अहं एव**—ती परा देवता विष्णुच मी आहें. म्ह० ती परब्रह्माहून अगदीं भिन्न नाहीं. तर अत्यंत अभिन्न आहे.—**अत्र अस्मिन् देहे यः यज्ञः तस्य अहं अधियज्ञः**—या शास्त्रीय व्यवहारभूमीतील या देहांत जो यज्ञ आहे, त्याचा मी अधियज्ञ आहे. [किंवा 'अत्र' याचेच भाष्यांत 'अस्मिन्' हे व्याख्यान आहे, असें समजावें म्ह० 'अत्र-अस्मिन् देहे' याचा अर्थ या देहांत एवढाच समजावा, तो अधियज्ञ देहाच्या बाहेर आहे कीं आंत आहे अशी शंका येऊं नये, म्हणून 'देहे' तो या देहांत आहे, असे म्हटले आहे. अहोपण देह हें यज्ञाचें अधिकरण नव्हे. मग तसल्या यज्ञाचें अभिमानिदेवतात्व भगवान् कसें सांगत आहेत, तर त्याचे उत्तर-]—**यज्ञः हि देहनिर्वर्त्यत्वेन देहसमवायी इति देहाधिकरणः भवति**—यज्ञ देहाच्या योगानें निष्पन्न होणारा असल्यामुळें देहसंबद्ध आहे. म्हणून तो देहाधिकरण आहे म्ह० देह हे त्याचें अधिकरण आहे. [ यावरून यज्ञ बुद्ध्यादिकांहून अगदी भिन्न आहे हें सिद्ध झाले. वर सांगितल्याप्रमाणें जी अधियज्ञनांवाची परा देवता तिचा बुद्ध्यादिकांत अन्तर्भाव होणे उचित नाहीं.]—**हे देहभृतां वर**—हे देह धारण करणाऱ्या सर्व प्राण्यांमध्यें श्रेष्ठ असलेल्या अर्जुना, [ मीच या देहांतील अधियज्ञ-यज्ञाभिमानी देवता आहें. अध्यात्मादि सर्व पदार्थ ब्रह्ममय आहेत, असे विद्वान् पाहतो. ] ४.

**अन्तकाले च मामेव स्मरन्मुक्त्वा कलेवरम् ।**
**यः प्रयाति स मद्भावं याति नास्त्यत्र संशयः ॥५॥**

---

१ "ज्याला अधियज्ञ म्हणजे सर्व यज्ञाचा अधिपति म्हणतात, तो मीच या देहाच्या ठायीं अधिदेह आहें." असा या श्लोकार्धाचा अर्थ करून रहस्यकार टीपेत पुनः म्हणतात—"अधियज्ञशब्दाची व्याख्या भगवंतांनी येथें दिली नाही. कारण मागें याचें सविस्तर वर्णन झालें आहे. वगैरे" पण हा अर्थ मुळाला धरून नाहीं, हें कोणीहि सांगेल. अर्जुनाने 'या देहांत अधियज्ञ कोण' असें विचारलें, व भगवानांनीं 'मीच या देहांतील अधियज्ञ आहें' असें सांगितले, हाच प्रश्न व उत्तर यांचा सरळ अर्थ आहे. असे असतांना अधिदेहाची निराधार कल्पना करून भगवानांनीं अधियज्ञशब्दाची व्याख्याच सांगितली नाहीं, असें म्हणणें किती सयुक्तिक आहे, याचा विचार वाचकांनींच करावा.

**अन्वयार्थ—च**—आणि—**अन्तकाले**—मरणसमयीं—**मां एव स्मरन्**—माझेंच स्मरण करणारा असा होत्साता—**कलेवरं मुक्त्वा**—शरीराचा त्याग करून—**यः**— जो—**प्रयाति**—जातो—**सः**— तो -**मद्भावं**—मद्भावास-वैष्णवतत्त्वास—**याति**—प्राप्त होतो,—**अत्र**—यांत—**संशयः**—संशय—**न अस्ति**—नाहीं. ५.

**अन्तकाल इति । अन्तकाले च मरणकाले मामेव परमेश्वरं विष्णुं स्मरन्मुक्त्वा परित्यज्य कलेवरं शरीरं यः प्रयाति गच्छति स मद्भावं वैष्णवं तत्त्वं याति नास्ति न विद्यतेऽत्रास्मिन्नर्थे संशयो याति वा न वेति ॥ ५ ॥**

**भाष्यार्थ—'अन्तकाले०' इति**—आतां शेवटच्या सातव्या प्रश्नाचें उत्तर-'अन्तकाले० ' या श्लोकानें देतात—**अन्तकाले च-मरणकाले मां एव-परमेश्वरं विष्णुं स्मरन्**—आणि अन्तकालीं म्ह० मरणसमयीं मलाच-परमेश्वराला-विष्णूला स्मरत-विष्णूचें स्मरण करीत—**कलेवरं-शरीरं मुक्त्वा-परित्यज्य यः प्रयाति -गच्छति**—कलेवराला म्ह० शरीराला टाकून-शरीराचा त्याग करून जो मरून जातो —**सः मद्भावं-वैष्णवं तत्त्वं याति**—तो मद्भावास म्ह० वैष्णवतत्त्वास प्राप्त होतो. —**अत्र-अस्मिन् अर्थे संशयः न अस्ति-न विद्यते**—याविषयीं-तो वैष्णव तत्त्वास प्राप्त होतो यांत कांहीं संशय नाहीं.—**याति वा न वा इति**—तो मद्भावास जातो की नाहीं, असा मुळींच संशय नाहीं. [ आचार्य शिव व विष्णु हा भेद मानीत होते, अशी ज्यांची समजूत असेल, त्यांनीं त्याचा हा व असेच आणखी इतर ठिकाणचे उल्लेख जरूर पहावे, म्हणजे ती अवश्य बदलेल. ] ५.

**यं यं वाऽपि स्मरन्भावं त्यजत्यन्ते कलेवरम् ।**
**तं तमेवैति कौन्तेय सदा तद्भावभावितः ॥ ६ ॥**

---

१ अर्जुनाचा प्रश्न ' मरणसमयीं नियतचित्त पुरुषाकडून तू कसा ज्ञेय आहेस, ' असा आहे, व 'येथें जो अंतकालीं माझेंच स्मरण करीत जातो, तो मलाच प्राप्त होतो' असें त्याचें उत्तर दिलें आहे. त्यावरून एखाद्यानें सर्व जन्मभर ईश्वराचें स्मरण केलें, पण मरणकालीं मात्र त्यास त्याचें स्मरण झालें नाहीं, तर तो ईश्वराला प्राप्त होत नाहीं, असें स्पष्ट होतें, त्याचप्रमाणें एखाद्यानें जन्मभर ईश्वराचें स्मरण केलें नाहीं,पण मृत्युसमयीं मात्र तें केलें तर त्याला निश्चयानें ईश्वरप्राप्ति होते, हें येथें सांगावयाचें आहे. आता, जन्मभर ज्या गोष्टीचा ध्यास लागलेला असतो, तिचेंच स्मरण अंतकालीं होतें,म्हणून जन्मभर ईश्वरप्राप्तिसाठीं ईश्वराचाच ध्यास करणें अवश्य आहे. पण एखाद्या भाग्यवानाला जन्मभर ईश्वरचिंतन न करतांच मरणसमयीं जर ईश्वराची आठवण होईल, तर त्याच्या ईश्वरप्राप्तीला कांहीं बाध येणार नाहीं, हा सिद्धान्त आहे. अर्थात् " तेवढ्यावरून केवल मरणसमयीं हें स्मरण केल्यानें भागतें, अशीहि कोणाची गैरसमजूत होण्याचा संभव आहे. " असें जें रहस्यकारांनीं म्हटलें आहे तें बरोबर नाहीं. ( गी. भा. पृ. २३०-३२ पहा. )

**अन्वयार्थ—वा कौन्तेय**—अथवा हे अर्जुना ! —**यं यं अपि भावं**—ज्या ज्या पदार्थाचें—**स्मरन्**—स्मरण करीत—**अन्ते**—अंतसमयी—**कलेवरं**—शरीराला—**त्यजति**—सोडतो,—**तं तं एव**—त्या त्या पदार्थालाच—**सदा**—सर्वदा—**तद्भावभावितः**—त्या पदार्थाच्या वासनेचा अभ्यास केलेला पुरुष—**एति**—प्राप्त होतो. ६.

**न मद्विषय एवायं नियमः किं तर्हि—यं यं वाऽपि यं यं भावं देवताविशेषं स्मरंश्चिन्तयंस्त्यजति परित्यजत्यन्ते प्राणवियोगकाले कलेवरं तं तमेव स्मृतं भावमेवैति नान्यं कौन्तेय सदा सर्वदा तद्भावभावितस्तास्मिन्भावस्तद्भावः स भावितः स्मर्यमाणतयाऽभ्यस्तो येन स तद्भावभावितः सन् ॥ ६ ॥**

**भाष्यार्थ—अयं मद्विषयः एव नियमः न**—हा केवल माझ्याविषयींच नियम आहे, असें नाहीं. [ अन्तकालीं भगवानाचे ध्यान करणाऱ्या पुरुषाला भगवत्प्राप्ति होते, हा फक्त माझ्यापुरताच नियम नाहीं ]—**किं तर्हि**—तर मग काय नियम आहे ? ( ते 'यं यं०' या श्लोकानें सांगतात- )—**यं यं वा अपि भावं -देवताविशेषं स्मरन्-चिन्तयन् अन्ते-प्राणवियोगकाले कलेवरं त्यजति -परित्यजति**—ज्या ज्या कोणत्याहि भावाचे-विशेषदेवतेचे स्मरण-चिंतन करीत अन्तसमयी-प्राणाचा वियोग होण्याचे वेळीं शरीराला सोडतो-शरीराचा त्याग करतो—**तं तं एव स्मृतं भावं एव एति**—त्या त्याच स्मरण केलेल्या भावालाच तो प्राप्त होतो.—**हे कौन्तेय अन्यं न**—हे अर्जुना, तो अन्यभावाला प्राप्त होत नाहीं.—**सदा-सर्वदा तद्भावभावितः-तस्मिन् भावः तद्भावः सः भावितः स्मर्यमाणतया अभ्यस्तः येन सः तद्भावभावितः सन्**—सदा-सर्वदा तद्भावभावित होऊन तो त्या स्मृत पदार्थालाच प्राप्त होतो. त्या देवताविशेषाविषयीं जो भाव म्ह० भावना-वासना तो तद्भाव. ज्याच्याकडून तो भावित झाला आहे, वारंवार-सतत स्मरण करणे, या रूपानें ज्यानें त्याला संपादन केलें आहे, तो तद्भावभावित होय. [ याप्रमाणे त्या भावाविषयी वासना सतत अभ्यासाने दृढ केल्यामुळे त्याचेच चिंतन करीत जो शरीर सोडतो, तो त्या भावालाच प्राप्त होतो. जन्मभर जी वासना दृढ केलेली असेल, तीच अन्त्यसमयीं आठवते व तिच्या अनुसार त्या स्मृत भावाचीच मरणोत्तर प्राप्ति होते. मरणसमयीं इंद्रियादि व्याकुल जरी होत असली तरी दीर्घ अभ्यासानें त्या वेळीं भगवानाचें स्मरण जसे होऊं शकतें, तसेंच तें इतर स्मृत पदार्थाचेंहि होते. ] ६.

**तस्मात्सर्वेषु कालेषु मामनुस्मर युध्य च ।**
**मय्यर्पितमनोबुद्धिर्मामेवैष्यस्यसंशयः ॥ ७ ॥**

**अन्वयार्थ—तस्मात्**—म्हणून—**सर्वेषु कालेषु**—सर्वकालीं-अहोरात्र—**मां**—मला—**अनुस्मर**—आठव-माझें स्मरण कर—**च**—आणि—**युध्य**—युद्ध—कर.

**मयि अर्पितमनोबुद्धिः**—माझ्या ठिकाणीं ज्यानें आपलें मन व बुद्धि अर्पिलीं आहेत असा तूं—**मां एव**—मलाच—**एष्यसि**—प्राप्त होशील—**असंशयः**—यांत संशय नाहीं. ७.

**यस्मादेवमन्त्या भावना देहान्तरप्राप्तौ कारणम्—तस्मात्सर्वेषु कालेषु मामनुस्मर यथाशास्त्रं युध्य च युद्धं च स्वधर्मं कुरु मयि वासुदेवेऽर्पिते मनोबुद्धी यस्य तव स त्वं मय्यर्पितमनोबुद्धिः सन्मामेव यथास्मृतमेष्यस्यागमिष्यस्यसंशयो न संशयोऽत्र विद्यते ॥ ७ ॥**

**भाष्यार्थ—यस्मात् एवं अन्त्या भावना देहान्तरप्राप्तौ कारणं**—ज्याअर्थी याप्रमाणें अन्त्य भावना दुसऱ्या देहाच्या प्राप्तीचें कारण आहे—**तस्मात् सर्वेषु कालेषु मां यथाशास्त्रं अनुस्मर**—त्याअर्थी सर्व कालीं माझें यथाशास्त्र अनुस्मरण कर. ( सर्व काली मोठया आदराने निरंतर माझें स्मरण कर, आणि तें भगवदनुसंधान करीत असतांना–त्याच्या बरोबरच )—**युध्य च–युद्धं च स्वधर्मं कुरु**—युद्ध कर, युद्ध हा स्वधर्म कर.—**मयि–वासुदेवे अर्पिते मनोबुद्धी यस्य तव सः त्वं मय्यर्पितमनोबुद्धिः सन्**—ज्या तुझे मन व बुद्धि मज वासुदेवाचे ठिकाणी अर्पिलेलीं आहेत, तो तूं मदर्पितमनोबुद्धि होऊन—**मां एव यथा स्मृतं एष्यसि–आगमिष्यसि असंशयः–न संशयः अत्र विद्यते**—ज्याप्रमाणें माझें स्मरण केलें असशील, तशा मलाच तूं प्राप्त होशील यांत कांहींएक संशय नाहीं. ७.

## अभ्यासयोगयुक्तेन चेतसा नान्यगामिना ।
## परमं पुरुषं दिव्यं याति पार्थानुचिन्तयन् ॥ ८ ॥

**अन्वयार्थ—हे पार्थ**—हे अर्जुना—**अभ्यासयोगयुक्तेन**—चित्ताला माझ्या ठिकाणीं स्थिर करण्याचा वारंवार प्रयत्न करणें, याच अभ्यासरूप योगानें–उपायानें

---

१ या श्लोकावरील टीपेंत रहस्यकार "भगवद्गीतेंत संसार सोडून केवळ भक्तिच प्रतिपाद्य आहे, असें म्हणणारांनी सातव्या श्लोकातील सिद्धान्ताकडे अवश्य लक्ष पुरवावें," वगैरे बजावितात, व "भगवद्भक्तानें कर्में सोडलीं पाहिजेत, असा गीतेचा अभिप्राय नाहीं. उलट त्यानें तीं सर्व निष्काम बुद्धीनें केलींच पाहिजेत," असें म्हणतात व त्याला 'माझें नेहमीं चिंतन कर व युद्ध कर' या अर्थाच्या 'सर्वेषु कालेषु मामनुस्मर युध्य च' या वचनाचा आधार दाखवितात. पण पूर्वोत्तर प्रतिपादनाकडे लक्ष दिलें असतां ईश्वराचें सतत चिंतन करणें हें येथील विधेय असून 'युध्य च' हा केवळ आनुषंगिक अनुवाद आहे, हें निर्विवाद ठरतें. कारण पूर्वोत्तर प्रकरण पाहिलें असतां "जो सतत ईश्वराचें अनुचिंतन करतो तो परमेश्वराला प्राप्त होतो" हा सामान्य सिद्धान्त असून तो सर्वलोकोपयोगी व सार्वकालिक आहे व 'युध्य च' हा केवळ अर्जुनापुरताच व त्या प्रसंगाला अनुलक्षून आहे. त्यामुळें भगवच्चिंतन करणाऱ्या ज्ञाननिष्ठानेंहि कर्मेंच केलीं पाहिजेत, असें म्हणणें हा शुद्ध आग्रह आहे.

युक्त असलेल्या व—**नान्यगामिना**—मला सोडून दुसऱ्या कोणत्याहि विषयाकडे न जाणाऱ्या अशा—**चेतसा**—चित्तानें—**अनुचिन्तयन्**—पुरुषाचें ध्यान करणारा भक्त —**परमं दिव्यं पुरुषं**—निरतिशय, सूर्यमंडलांत व्यक्त होणाऱ्या पुरुषाला—**याति** —प्राप्त होतो. ८.

**किंच—अभ्यासयोगयुक्तेन मयि चित्तसमर्पणविषयभूत एकस्मिंस्तुल्यप्रत्ययावृत्तिलक्षणो विलक्षणप्रत्ययानन्तरितोऽभ्यासः स चाभ्यासो योगस्तेन युक्तं तत्रैव व्यापृतं योगिनश्चेतस्तेन चेतसा नान्यगामिना नान्यत्र विषयान्तरे गन्तुं शीलमस्येति नान्यगामि तेन नान्यगामिना परमं निरतिशयं पुरुषं दिव्यं दिवि सूर्यमण्डले भवं याति गच्छति हे पार्थ, अनुचिन्तयञ्शास्त्राचार्योपदेशमनु ध्यायन्नित्येतत् ॥ ८ ॥**

**भाष्यार्थ—किं च**—पूर्वश्लोकांत सांगितल्याप्रमाणें अनुष्ठान करणारा अन्तकालीं भगवानालाच प्राप्त होतो, याविषयीं आणखीं एक कारण ' अभ्यास० ' या श्लोकानें सांगतात.—**अभ्यासयोगयुक्तेन**—अभ्यासयोगानें युक्त अशा चित्तानें ( अभ्यासाचें स्वरूप सांगतात-)—**चित्तसमर्पणविषयभूते एकस्मिन् मयि तुल्यप्रत्ययावृत्तिलक्षणः विलक्षणप्रत्ययानन्तरितः अभ्यासः**—चित्तसमर्पणाचा विषय अशा एका माझ्याच ठिकाणी तुल्यप्रत्ययाची आवृत्ति हेच ज्याचे स्वरूप आहे, व विलक्षणप्रत्ययानें जो अन्तरित होत नाहीं, तो अभ्यास [ म्ह० माझें अविच्छिन्न चिंतन करणें हाच अभ्यास. ]—**सः च अभ्यासः योगः**—आणि तो अशा प्रकारचा अभ्यास हाच योग—**तेन युक्तं-तत्र एव व्यापृतं योगिनः चेतः तेन चेतसा** —त्या योगानें युक्त, त्यांतच व्यापृत-त्यांतच गढून गेलेले जे योग्याचे चित्त त्या चित्ताने ( पण तें चित्त कसें ? )—**न अन्यगामिना-अन्यत्र-विषयान्तरे गन्तुं यस्य शीलं न ( अस्ति ) इति न अन्यगामि तेन नान्यगामिना**—नान्यगामी चित्तानें-अन्यत्र म्ह० अन्य विषयांमध्यें जाण्याचें ज्याचें शील नाहीं तें नान्यगामी, त्या नान्यगामी चित्तानें—**अनुचिन्तयन्-शास्त्राचार्योपदेशं अनुध्यायन् इति एतत्**—अनुचिंतन करणारा म्ह० शास्त्र व आचार्य यांच्या उपदेशानुसार ध्यान करणारा, असा याचा भावार्थ.—**परमं-निरतिशयं दिव्यं-दिवि-सूर्यमण्डले भवं पुरुषं याति-गच्छति**—परम म्ह० निरतिशय आणि दिव्य म्ह० द्युलोकांत -सूर्यमंडलांत असलेल्या पुरुषास प्राप्त होतो.—**हे पार्थ**—अर्जुना ! [अभ्यासयोगयुक्त व भगवानावांचून दुसऱ्या कोठेंहि न जाणाऱ्या स्थिर चित्तानें भगवानाचें चिंतन करणारा साधक निरतिशय सूर्यमंडलस्थ पुरुषाला प्राप्त होतो. ] ८.

---

१ रहस्यकार "अभ्यासयोगयुक्तेन" या शब्दाचा अर्थ "अभ्यासाच्या साहाय्यानें स्थिर करून" असा करितात, पण तो मुळाला धरून नाही, इतकेंच नव्हे तर तें पद 'चेतसा' याचें विशेषण असल्यामुळें त्याचा अर्थ तसा होऊंच शकत नाहीं.

**कविं पुराणमनुशासितारमणोरणीयांसमनुस्मरेद्यः ।**
**सर्वस्य धातारमचिन्त्यरूपमादित्यवर्णं तमसः परस्तात् ॥९॥**

**अन्वयार्थ—यः**—जो कोणी—**कविं**—सर्वज्ञ,—**पुराणं**—नित्य,—**अनुशासितारं**—सर्व जगाचा शास्ता,—**अणोः अणीयांसं**—सूक्ष्माहून अति सूक्ष्म अशा,—**सर्वस्य धातारं**—सर्व कर्मांचे फल सर्व प्राण्यांना देणारा,—**अचिंत्यरूपं**—ज्याचें रूप अचिंत्य आहे,—**आदित्यवर्णं**—सूर्याच्या प्रकाशाप्रमाणे ज्याचा नित्य चैतन्यप्रकाश आहे व जो—**तमसः परस्तात्**—अज्ञानलक्षण मोहान्धकाराच्या पलीकडे आहे, अशा माझें-ईश्वराचें मरणसमयीं—**अनुस्मरेत्**—ध्यान करितो तो त्यालाच प्राप्त होतो. ९-

**किंविशिष्टं च पुरुषं यातीत्युच्यते—कविं क्रान्तदर्शिनं सर्वज्ञं पुराणं चिरंतनमनुशासितारं सर्वस्य जगतः प्रशासितारमणोः सूक्ष्मादप्यणीयांसं सूक्ष्मतरमनुस्मरेदनुचिन्तयेद्यः कश्चित्सर्वस्य कर्मफलजातस्य धातारं विचित्रतया प्राणिभ्यो विभक्तारं विभज्य दातारमचिन्त्यरूपं नास्य रूपं नियतं विद्यमानमपि केनचिच्चिन्तयितुं शक्यत इत्यचिन्त्यरूपस्तमादित्यवर्णमादित्यस्येव नित्यचैतन्यप्रकाशो वर्णो यस्य तमादित्यवर्णं तमसः परस्तादज्ञानलक्षणान्मोहान्धकारात्परं तमनुचिन्तयन्यातीति पूर्वेणैव संबन्धः ॥९॥**

**भाष्यार्थ—किंविशिष्टं च पुरुषं याति इति उच्यते**—कोणत्या विशेषणांनीं विशिष्ट अशा पुरुषाचे अनुचिंतन करणारा त्याला प्राप्त होतो तें 'कविं०' या श्लोकानें सांगितलें जातें.—**कविं-क्रान्तदर्शिनं-सर्वज्ञं**—कवीला म्ह० क्रान्तदर्शी सर्वज्ञाला,—**पुराणं-चिरंतनं**—पुराण म्ह० चिरंतन-नित्य पुरुषाला—**अनुशासितारं-सर्वस्य जगतः प्रशासितारं**—सर्व जगाच्या प्रशास्त्याला—**अणोः-सूक्ष्मात् अपि अणीयांसं-सूक्ष्मतरं**—अणूहून-सूक्ष्माहूनहि अति अणु-अति सूक्ष्म असलेल्या पुरुषाला—**यः कश्चित् अनुस्मरेत्-अनुचिन्तयेत्**—जो कोणीहि ( उत्तमाधम पुरुष ) अनुस्मरेल, त्याचें जो अनुचिन्तन करील-( त्याच पुरुषाची आणखी विशेषणें-)—**सर्वस्य-कर्मफलजातस्य धातारं-विचित्रतया प्राणिभ्यः विभक्तारं-विभज्य दातारं**—सर्वकर्मफलसमूहाच्या धात्यास-विचित्रपणे प्राण्यांना विभागून देणाऱ्या [ निरनिराळ्या प्राण्यांच्या निरनिराळ्या कर्मांप्रमाणें निरनिराळें फल देणाऱ्या ईश्वरास, आणि तो कसा आहे ? उत्तर-]—**अचिन्त्यरूपं-अस्य रूपं नियतं विद्यमानं अपि केनचित् चिन्तयितुं न शक्यते इति अचिन्त्यरूपः तं**—अचिन्त्यरूप-याचें नियतरूप जरी विद्यमान आहे, तरी कोणालाहि त्याचें चिंतन करतां येणें शक्य नाहीं, म्हणून अचिंत्यरूप, त्या तसल्या अचिन्त्यरूपाला—**आदित्यवर्णं-आदित्यस्य इव नित्यचैतन्यप्रकाशः वर्णः यस्य तं आदित्यवर्णं**—आदित्यवर्णाला म्ह० आदित्याच्या वर्णाप्रमाणें नित्यचैतन्यप्रकाश हाच ज्याचा वर्ण आहे त्या आदित्यवर्णाला,—**तमसः परस्तात्-अज्ञानलक्षणात् मोहान्धकारात्**

**परं**—तमाच्या पलीकडे असलेल्या म्ह० अज्ञानरूप मोहान्धकाराच्या पलीकडे-त्याहून अगदी विलक्षण अशा—**तं अनुचिन्तयन् याति इति पूर्वेण एव संबन्धः**—त्याला अनुचिन्तन करणारा, अशा त्याचे अनुस्मरण करणारा जातो, दिव्य पुरुषाला प्राप्त होतो, असा पूर्वश्लोकाशींच याचा संबंध. [ मूळ कारण अज्ञान व त्याचे कार्य या दोहोंच्या वर असलेल्या, वस्तुतः अज्ञान व त्याचें कार्य याचा ज्याला स्पर्शहि झालेला नाही, अशा अर्थात् कवि, पुराण इत्यादि विशेषणांनी विशिष्ट, अशा त्याचे सतत स्मरण करणारा त्या पूर्वोक्त दिव्य पुरुषाला प्राप्त होतो. ] ९.

**प्रयाणकाले मनसाचलेन भक्त्या युक्तो योगबलेन चैव ।**
**भ्रुवोर्मध्ये प्राणमावेश्य सम्यक् स तं परं पुरुषमुपैति दिव्यम्॥**

**अन्वयार्थ**—**प्रयाणकाले**—मरणसमयीं—**भक्त्या**—भक्तीने—**च**—व—**योगबलेन एव**—चित्ताचे समाधान, याच बलाने—**युक्तः**—युक्त होऊन—**भ्रुवोः मध्ये**—भुवयांच्या मध्यें—**प्राणं**—प्राणाला—**सम्यक्**—सावधानपणाने—**आवेश्य**—स्थापून—( **यः**—जो )—**अचलेन मनसा**—अचल मनाने—( **अनुस्मरेत्**—अनुचितन करतो,)—**सः**—तो—**तं परं दिव्यं पुरुषं**—त्या श्रेष्ठ दिव्य पुरुषाला—**उपैति**—प्राप्त होतो. १०.

**किंच—प्रयाणकाले मरणकाले मनसाऽचलेन चलनवर्जितेन भक्त्या युक्तो भजनं भक्तिस्तया युक्तो योगबलेन चैव योगस्य बलं योगबलं तेन समाधिजसंस्कारप्रचयजनितचित्तस्थैर्यलक्षणं योगबलं तेन च युक्त इत्यर्थः । पूर्वं हृदयपुण्डरीके वशीकृत्य चित्तं तत ऊर्ध्वगामिन्या नाड्या भूमिजयक्रमेण भ्रुवोर्मध्ये प्राणमावेश्य स्थापयित्वा सम्यगप्रमत्तः सन्स एवं बुद्धिमान्योगी कविं पुराणमित्यादिलक्षणं तं परं पुरुषमुपैति प्रतिपद्यते दिव्यं द्योतनात्मकम् ॥ १० ॥**

**भाष्यार्थ—किं च**—भगवानाचे अनुस्मरण सफल असल्यामुळे याहि आणखी एका कारणानें ते करावे असे ‘ प्रयाणकाले० ’ या श्लोकानें सागतात—**प्रयाणकाले-मरणकाले अचलेन-चलनवर्जितेन मनसा**—प्रयाणकाली म्हणजे मरणाचे वेळीं अचल म्ह० चलनरहित मनानें—**भक्त्या युक्तः-भजनं भक्तिः तया युक्तः**—भक्तीनें युक्त, भजन ही भक्ति, त्या भक्तीनें युक्त—**योगबलेन च एव**—आणि योगबलानें युक्त—**योगस्य बलं योगबलं तेन**—योगाचें जें बल तें योगबल, त्यानें—**समाधिजसंस्कारप्रचयजनितचित्तस्थैर्यलक्षणं योगबलं तेन च युक्तः इत्यर्थः**—योग म्ह० समाधि-चित्ताच्या विषयान्तरवृत्तीचा निरोध करून परमात्म्यामध्येंच त्याला स्थापणे, त्याचें बल म्ह० संस्काराचा संग्रह-ध्येयाच्या ठिकाणीं त्याला एकाग्र करणें, त्यामुळें चित्ताचें तेथेंच-आत्मस्वरूपांत स्थैर्य होणे, अशा प्रकारच्या योगबलानें युक्त होत्साता असा याचा भावार्थ. [ **मरणाचे वेळीं भगवानाच्या चिंतनाविषयीं फारच प्रयत्न केला पाहिजे. यास्तव त्या वेळीं अचल मनानें,**

भगवदनुस्मरणापासून न ढळणाऱ्या मनानें, त्याचें स्मरण करावें. विषयचिंतन सोडून ईशचिंतन करावें. परमात्म्याविषयीं परम प्रेमानें युक्त व्हावें व आत्मस्वरूपांत चित्ताचें जें स्थैर्य, त्याच बलानें ईशस्मरणास समर्थ व्हावें. त्यानंतर काय करावें तें सांगतात-]—**पूर्वं हृदयपुण्डरीके चित्तं वशीकृत्य ततः ऊर्ध्वगामिन्या नाड्या भूमिजयक्रमेण**—अगोदर हृदयकमलांत चित्ताला वश करून तेथून ऊर्ध्वगामिनी सुषुम्ना नाडीच्या द्वारा क्रमानें भूम्यादि पंचभूतांचा जय करीत—**भ्रुवोः मध्ये प्राणं आवेश्य-स्थापयित्वा**—दोन्ही भुवयांच्या मध्यें प्राणाचा प्रवेश-प्राणाची स्थापना करून—**सम्यक्-अप्रमत्तः सन्**—प्रमादरहित होऊन—**सः एवं बुद्धिमान् योगी कविं पुराणं इत्यादिलक्षणं तं परं पुरुषं दिव्यं-द्योतनात्मकं उपैति-प्रतिपद्यते**—तो अशाप्रकारें बुद्धिमान् योगी 'कविं पुराणं०' इत्यादि पूर्वोक्त लक्षणाच्या त्या पर दिव्य-द्योतनात्मक-प्रकाशरूप पुरुषास प्राप्त होतो. [ चित्त स्वभावतःच विषयांकडे धांवत असतें. त्याला विषयांपासून विमुख करून कमलाकार हृदयांत म्ह० परमात्म्याच्या स्थानांत मोठ्या यत्नानें स्थिर करावें. त्यानंतर इडा व पिंगला या नांवाच्या उजवीकडील व डावीकडील अशा ज्या दोन नाड्या बाहेर निघाल्या आहेत, त्यांचा निरोध करून, त्याच हृदयाच्या अग्रापासून वर जाण्याचेंच जिचें शील आहे, अशा सुषुम्नानाडीनें हृदयांतील प्राणाला वर चढवून कंठांत लोंबणाऱ्या मांसखंडाच्या द्वारा दोन भुवयांच्यामध्ये त्याचा प्रवेश करवून सावधानपणें ब्रह्मरंध्रांतून बाहेर पडून 'कविं पुराणं०' इत्यादि विशेषणांनीं विशिष्ट अशा परम पुरुषास तो योगी प्राप्त होतो. 'भूमिजयक्रमेण' असा जो एक भाष्यांत शब्द आहे त्याचा अर्थ असा-भूमि, जल, तेज, वायु व आकाश या पांच भूताना वश करून घेणे म्ह० त्या त्या भूताची चेष्टा आपल्या स्वाधीन ठेवणें, या सिद्धीच्या द्वारा प्राणाला भ्रूमध्यभागीं स्थापावें, असा याचा भावार्थ. ] १०.

**यदक्षरं वेदविदो वदन्ति विशन्ति यद्यतयो वीतरागाः ।**
**यदिच्छन्तो ब्रह्मचर्यं चरन्ति तत्ते पदं संग्रहेण प्रवक्ष्ये ॥**

**अन्वयार्थ**—**वेदविदः**—वेदार्थ जाणणारे—**यत्**—ज्याला—**अक्षरं**—अविनाशी—**वदन्ति**—म्हणतात—**वीतरागाः यतयः**—ज्यांचा रागआसक्ति नाहींशी झाली आहे,असे विरक्त यती—**यत् विशन्ति**—ज्यांत प्रवेश करितात—**यत् इच्छन्तः**—ज्याला जाणण्याची इच्छा करणारे—**ब्रह्मचर्यं**—ब्रह्मचर्यव्रत ( गुरूपाशीं राहून ) —**चरन्ति**—पाळतात—**तत् पदं**—तें अक्षरसंज्ञक पद—**ते**—तुला—**संग्रहेण**—संक्षेपानें—**प्रवक्ष्ये**—मी सांगेन. ११.

**पुनरपि वक्ष्यमाणेनोपायेन प्रतिपित्सितस्य ब्रह्मणो वेदविद्वदनादिविशेषणविशेष्यस्याभिधानं करोति भगवान्—यदक्षरं न क्षरतीत्यक्षरमविनाशि वेदविदो वेदार्थज्ञा वदन्ति "तद्वा एतदक्षरं गार्गि ब्राह्मणा अभिवदन्ति" इति श्रुतेः । सर्वविशेषनिवर्त-**

**कत्वेनाभिवदन्त्यस्थूलमनण्वित्यादि । किंच विशन्ति प्रविशन्ति सम्यग्दर्शनप्राप्तौ सत्यां यद्यतयो यतनशीलाः संन्यासिनो वीतरागा विगतो रागो येभ्यस्ते वीतरागाः । यच्चाक्षरमिच्छन्तो ज्ञातुमिति वाक्यशेषः । ब्रह्मचर्यं गुरौ चरन्ति तत्ते पदं तदक्षराख्यं पदं पदनीयं ते तुभ्यं संग्रहेण संग्रहः संक्षेपस्तेन संक्षेपेण प्रवक्ष्ये कथयिष्यामि ॥११॥**

**भाष्यार्थ**—( येथें भाष्यांत असें एक वाक्य अधिक आहे.—**योगमार्गानुगमनेन एव ब्रह्मविद्यां अन्तरेण अपि ब्रह्म प्राप्यते इत्येवं प्राप्ते इदं उच्यते** —म्ह० योगमार्गाचें अनुवर्तन केल्यानेंच ब्रह्मविद्येवांचूनहि ब्रह्मप्राप्ति होते, अशी आशंका प्राप्त झाली असतां हे सांगितले जातें. पण आनंदज्ञानांची टीका व पुढील भाष्य यांवरून हे भाष्य प्रक्षिप्त आहे असें वाटतें. म्हणून तें आम्हीं वर मूळ भाष्यांत दिलें नाहीं. )—**पुनरपि भगवान् वक्ष्यमाणेन उपायेन प्रतिपित्सितस्य वेदविद्वदनादिविशेषणविशेष्यस्य ब्रह्मणः अभिधानं करोति**—पुनरपि भगवान् पुढे सांगितल्या जाणाऱ्या ओंकाराख्य उपायाने ज्याचे प्रतिपादन करण्याची इच्छा आहे व 'ज्याला वेदवेत्ते बोलतात' इत्यादि विशेषणांचें जें विशेष्य आहे अशा ब्रह्माचें 'यदक्षरं०' या श्लोकानें कथन करितात.—**यत् अक्षरं**—जे अक्षर,—**न क्षरति इति अक्षरं -अविनाशि**—ज्याचे क्षरण-क्षय होत नाहीं ते अक्षर म्ह० अविनाशी ब्रह्म—**वेदविदः-वेदार्थज्ञाः वदन्ति**—वेदवेत्ते म्ह० वेदार्थ जाणणारे बोलतात,—**'तत् वै एतत् अक्षरं गार्गि ब्राह्मणाः अभिवदन्ति' इति श्रुतेः**—हे गार्गि, ब्राह्मण-ब्रह्मवेत्ते त्याच अक्षराला अस्थूल, अनणु इत्यादि म्हणतात. अशी याविषयीं श्रुति प्रमाण आहे. ( बृह.भाष्यार्थ अ. ३,८,८, पृ. १९५ पहा. अहोपण कोणत्याहि प्रमाणाचा विषय न होणाऱ्या सर्वान्तर्यामी ब्रह्माविषयीं वेदार्थज्ञांची तरी वचनप्रवृत्ति कशी होते ? या शंकेचें समाधान करण्यासाठीं वरील श्रुतीचे प्रमाण दिलेले असून तिचाच भावार्थ सांगतात-)—**सर्वविशेषनिवर्तकत्वेन 'अस्थूलं अनणु' इत्यादि (अभिवदन्ति)** —सर्व विशेषांच्या निवर्तकत्वाने अस्थूल, अनणु इत्यादि बोलतात. [ निर्विषय ब्रह्माचे साक्षात् प्रतिपादन करता येत नाहीं. तथापि अनात्मरूप सर्वविशेषांचे निवर्तन करण्यासाठीं स्थूल, सूक्ष्म, ऱ्हस्व, दीर्घ इत्यादि विशेषांचा निषेध करून त्या सर्वांच्या आधाररूप ब्रह्माचा लक्षणेनें बोध करितात. अर्थात् ब्रह्म विद्वानांच्या अनुभवाने सिद्ध आहे, इतकेंच. नव्हे तर मुक्त पुरुषांना प्राप्त होण्यास योग्य असेंहि ते असल्यामुळे त्यावरूनहि त्याची सिद्धि होते, असे सांगतात-)—**किंच यतयः-यतनशीलाः-संन्यासिनः वीतरागाः-विगतः रागः येभ्यः ते वीतरागाः सम्यग्दर्शनप्राप्तौ यत् विशन्ति-प्रविशन्ति**—तसेंच यति म्ह० यत्नशील संन्यासी ( संन्यासित्वाचें लक्षण सांगतात-) वीतराग संन्यासी ज्यांच्यापासून राग-विषयासक्ति पार निघून गेली आहे ते वीतराग संन्यासी आत्मसाक्षात्काररूप सम्यग्ज्ञान प्राप्त झालें असतां ज्याच्यामध्यें प्रवेश करितात, [ ज्ञानासाठी ब्रह्मचर्याचें विधान केलेलें असल्यामुळेंहि ब्रह्म ज्ञेयत्वानें प्रसिद्ध आहे, असें सांगतात-]—**च यत् अक्षरं इच्छन्तः**—आणि ज्या अ-

क्षराची इच्छा करणारे—**ज्ञातुं इति वाक्यशेषः**—येथें या वाक्याला 'ज्ञातुं' असा एक शब्द जास्त जोडावा–म्ह० जें अक्षर ब्रह्म जाणण्याची इच्छा करणारे—**ब्रह्मचर्यं गुरौ चरन्ति**—गुरुसमीप वास करून ब्रह्मचर्य पाळतात—**तत् ते पदं–तत् अक्षराख्यं पदं-पदनीयं ते–तुभ्यं संग्रहेण संग्रहः–संक्षेपः तेन संक्षेपेण प्रवक्ष्ये–कथयिष्यामि**—तें पद–तें अक्षरसंज्ञक पद म्ह० प्राप्त करून घेण्यास योग्य असें स्थान तुला संग्रहानें–संग्रह म्ह० संक्षेप, संक्षेपानें मी सांगेन. [ वेदार्थवेत्ते अर्थात् आत्मज्ञानी ब्राह्मण ज्या अक्षराचें अस्थूल, अनणु इत्यादि निषेधमुखानें वर्णन करितात, निष्काम, विरक्त, यति–संन्यासी ज्ञानप्राप्ति होतांच ज्यांत प्रवेश करितात, व ज्याला जाणण्याच्या इच्छेनें गुरुसमीप राहून जिज्ञासु ब्रह्मचर्यव्रत पाळतात, ते प्राप्त करून घेण्यास योग्य असलेलें पद मी तुला संक्षेपतः सांगतों. ] ११.

**"स यो ह वै तद्भगवन्मनुष्येषु प्रायणान्तमोंकारमभिध्यायीत कतमं वाव स तेन लोकं जयतीति तस्मै सहोवाच, एतद्वै सत्यकाम परं चापरं च ब्रह्म यदोंकारः" इत्युपक्रम्य "यः पुनरेतं त्रिमात्रेणोमित्येतेनैवाक्षरेण परं पुरुषमभिध्यायीत," इत्यादिना वचनेन "अन्यत्र धर्मादन्यत्राधर्मात्" इति चोपक्रम्य "सर्वे वेदा यत्पदमामनन्ति तपांसि सर्वाणि च यद्वदन्ति। यदिच्छन्तो ब्रह्मचर्यं चरन्ति तत्ते पदं संग्रहेण ब्रवीम्योमित्येतत्" इत्यादिभिश्च वचनैः परस्य ब्रह्मणो वाचकरूपेण प्रतिमावत्प्रतीकरूपेण च परब्रह्मप्रतिपत्तिसाधनत्वेन मन्दमध्यमबुद्धीनां विवक्षितस्योंकारस्योपासनं कालान्तरे मुक्तिफलमुक्तं यत्तदेवेहापि "कविं पुराणमनुशासितारम्" "यदक्षरं वेदविदो वदन्ति" इति चोपन्यस्तस्य परस्य ब्रह्मणः पूर्वोक्तरूपेण प्रतिपत्त्युपायभूतस्योंकारस्य कालान्तरमुक्तिफलमुपासनं योगधारणासहितं वक्तव्यं प्रसक्तानुप्रसक्तं च यत्किंचिदित्येवमर्थ उत्तरो ग्रन्थ आरभ्यते ॥**

**भाष्यार्थ**—( ११ व्या श्लोकाच्या अवतरणांत 'पुढे सांगितला जाणारा उपाय' असें जें म्हटलें होतें, तो उपाय व्यक्त करणारे भगवान् श्रुतींत सांगितलेल्या ओंकारद्वारा ब्रह्मोपासनेचें विधान करितात–)—'**स यो ह वै तद्भगवन्...यदोंकारः**' **इति उपक्रम्य**—प्रश्नोपनिषदांत 'स यो ह वै०' इत्यादि श्रुति आहे. अभिध्यानाचें फल जाणण्याची इच्छा करणारा सत्यकाम आपल्या पिप्पलाद गुरूस म्हणतो–हे भगवन्, पूज्य–गुरो! मनुष्यांतील जो कोणी मरेपर्यंत ओंकाराचे अभिध्यान करतो, तो त्या ध्यानाच्या योगानें कोणत्या लोकास जिंकतो? शिष्यानें असा प्रश्न केला असतां, त्याला तो पिप्पलाद गुरु म्हणाला—हे सत्यकाम, ओंकार हेंच पर व अपर ब्रह्म आहे, असा उपक्रम करून—**यः पुनः एतं त्रिमात्रेण ओं इति एतेन एव अक्षरेण परं पुरुषं अभिध्यायीत**—म्ह० पण जो 'ओं' याच–'अ-उ-म' या तीन मात्रांनीं युक्त अशा अक्षरानें परम पुरुषाचें ध्यान करील, तो त्यासच प्राप्त होईल. (प्रश्नो. भाष्यार्थ पृ. ७४–७५ पहा )—**इत्यादिना वचनेन**—इत्यादि वचनानें, तसेंच काठकोपनिषदांत—'**अन्यत्र धर्मात् अन्यत्र अधर्मात्' इति उपक्रम्य**—धर्माधर्मांहून अगदीं वि-

लक्षण असा आरंभ करून—**'सर्वे वेदाः यत्पदं आमनन्ति'**—सर्व वेद जें पद कथन करितात–उपनिषदें साक्षात् व कर्मश्रुति परंपरेनें ज्याचे वर्णन करितात—**'च सर्वाणि तपांसि यत् वदन्ति'**—व सर्व तपे जें बोलतात–सर्व तपांचेंहि चित्तशुद्धीच्या द्वारा ज्या तत्त्वामध्यें पर्यवसान होतें—**'यत् इच्छन्तः ब्रह्मचर्यं चरन्ति'**—ज्याची इच्छा करणारे साधक–ज्याच्या ज्ञानासाठीं मुमुक्षु कडकडीत ब्रह्मचर्यव्रत पाळतात—**'तत् पदं ते संग्रहेण ब्रवीमि ओं इति एतत्'**—तें प्राप्त करून घेण्यास योग्य असलेलें ब्रह्म तुला मी संक्षेपतः सांगतों–'ओं' हेंच तें पद आहे. ( काठ.भाष्यार्थ ५६. त्या ब्रह्माचें ओंकारद्वारा संक्षेपतः कथन करतों. )—**इत्यादिभिः च वचनैः परब्रह्मणः वाचकरूपेण च प्रतिमावत् प्रतीकरूपेण**—इत्यादि वचनांनी परब्रह्माच्या वाचकरूपानें म्ह० परब्रह्माचें नांव या रूपाने किंवा प्रतिमेप्रमाणे त्याच्या प्रतीकरूपानें—**मंदमध्यमबुद्धीनां परब्रह्मप्रतिपत्तिसाधनत्वेन**—मंदबुद्धि व मध्यमबुद्धि पुरुषांना परब्रह्माच्या ज्ञानाचें साधन या रूपानें—**विवक्षितस्य ओंकारस्य उपासनं कालान्तरे मुक्तिफलं यत् उक्तं**—विवक्षित असलेल्या ओंकाराची कालान्तरीं मोक्ष हें फल देणारी जी उपासना सांगितली आहे—**तत् एव इह अपि 'कविं पुराणं अनुशासितारं०' 'यदक्षरं वेदविदः वदन्ति०' इति च उपन्यस्तस्य परस्य ब्रह्मणः पूर्वोक्तरूपेण**—तेंच उपासन येथेंहि 'कविं पुराणं०' ९,व 'यदक्षरं०' ११, या वाक्यांनीं उपन्यास केलेल्या परब्रह्माच्या अभिधानत्वानें व प्रतीकत्वानें—**प्रतिपत्त्युपायभूतस्य ओंकारस्य कालान्तरमुक्तिफलं उपासनं योगधारणासंहितं वक्तव्यं**—ज्ञानोपायभूत ओंकाराचे कालान्तरीं मुक्ति हें फल देणारें उपासन योगधारणेसहवर्तमान सांगावें, व तसेंच—**प्रसक्तानुप्रसक्तं च यत्किंचित्** ( वक्तव्यं ) **इत्येवमर्थः उत्तरः ग्रन्थः आरभ्यते**—प्रसक्तानुप्रसक्त[1] असें जे कांहीं असेल तें सांगावें, म्हणून पुढील ग्रंथ आरंभिला जात आहे. [ प्रश्नोपनिषदांत व काठकोपनिषदांत पूर्वोक्त वचनांनीं मंद व मध्यमबुद्धीच्या अधिकाऱ्यांसाठीं ओंकाराची उपासना ब्रह्मज्ञानाचें साधन या रूपानें सांगितली आहे. ओंकार हें ब्रह्माचे नांव आहे, या रूपानें किंवा प्रतिमेप्रमाणे तो त्याचे प्रतीक आहे, या रूपानें त्याची उपासना सांगितलेली असून त्या उपासनेचें कालान्तरीं मुक्ति मिळणें हे फल आहे, तसेंच येथेंहि 'कविं पुराणं०' व 'यदक्षरं०' या वचनांनीं सांगितलेल्या परब्रह्माचे ओंकारोपासन सांगावें व प्रसंगप्राप्त दुसरें कांहीं सांगावें, यासाठीं या अध्यायांतील पुढील भाग आरंभिला जात आहे. ]११

**सर्वद्वाराणि संयम्य मनो हृदि निरुध्य च ।**
**मूर्ध्न्याधायात्मनः प्राणमास्थितो योगधारणाम् ॥**

---

[1] येथें ओंकाराची उपासना प्रसक्त आहे. त्यानंतर त्या उपासनेचें फल अनुप्रसक्त आहे. त्याच्या द्वारा पुनर्जन्माचा अभावहि सांगणें भाग आहे, तें सर्व सांगण्यासाठीं पुढील ग्रंथ आहे.

**ओमित्येकाक्षरं ब्रह्म व्याहरन्मामनुस्मरन् ।**
**यः प्रयाति त्यजन्देहं स याति परमां गतिम् ॥१३॥**

**अन्वयार्थ—सर्वद्वाराणि**—ज्ञानाच्या सर्व द्वारांचा—**संयम्य**—संयम करून—**च**—आणि—**मनः**—मनाला—**हृदि**—हृदयकमलांत—**निरुध्य**—अडकवून, त्याला हृदयांतच अडवून धरून—**आत्मनः प्राणं**—आपल्या प्राणवायूलाहि सुषुम्नानाडीच्या द्वारा—**मूर्ध्नि**—मस्तकांत—**आधाय**—स्थापून—**योगधारणां**—योगधारणा धरण्यास—**आस्थितः**—प्रवृत्त झालेला जो पुरुष, तशीच धारणा धरीत असतांना—**ओं इति एकाक्षरं ब्रह्म**—ओं असें हें एक अक्षररूप ब्रह्म-परब्रह्माचें नांव—**व्याहरन्**—उच्चारणारा व—**मां**—त्या नांवाचा अर्थ, अशा मला—**अनुस्मरन्**—अनुचिंतणारा-माझें ध्यान करणारा—**यः देहं त्यजन्**—जो देहाचा त्याग करून—**प्रयाति**—मरून जातो—**सः**—तो—**परमां गतिं**—परम गतीला—**याति**—पोंचतो.

**सर्वद्वाराणि सर्वाणि च तानि द्वाराणि च सर्वद्वाराण्युपलब्धौ तानि सर्वाणि संयम्य संयमनं कृत्वा मनो हृदि हृदयपुण्डरीके निरुध्य निरोधं कृत्वा निष्प्रचारमापाद्य तत्र वशीकृतेन मनसा हृदयादूर्ध्वगामिन्या नाड्योर्ध्वमारुह्य मूर्धन्याधायाऽऽत्मनः प्राणमास्थितः प्रवृत्तो योगधारणां धारयितुम् ॥ १२ ॥**

**भाष्यार्थ—सर्वद्वाराणि-सर्वाणि च तानि द्वाराणि च सर्वद्वाराणि उपलब्धौ**—श्रोत्रादि सर्व द्वारें-सर्व अशीं तीं द्वारें-सर्वद्वारे (कशाचीं ?) उपलब्धीचीं, ज्ञानाचीं सर्व द्वारें—**तानि सर्वाणि संयम्य-संयमनं कृत्वा**—श्रोत्रादि सर्व ज्ञानसाधनांचें संयमन करून—**मनः हृदि-हृदयपुंडरीके निरुध्य-निरोधं कृत्वा**—मनाला हृदयांत-हृदयकमलांत निरुद्ध करून-मनाचा हृदयांतच निरोध करून म्ह०—**निष्प्रचारं आपाद्य**—त्या मनाला प्रचाररहित करून-त्याला विषयाकार न होऊं देतां—**तत्र वशीकृतेन मनसा हृदयात् ऊर्ध्वगामिन्या नाड्या-ऊर्ध्वं आरुह्य**—तेथे वश केलेल्या मनाने हृदयापासून वर जाणाऱ्या नाडीनें वर आरोहण करून—**आत्मनः प्राणं मूर्धनि आधाय**—आपल्या प्राणाला मूर्धास्थानीं स्थापून—**योगधारणां धारयितुं आस्थितः-प्रवृत्तः**—योगधारणा धारण करण्यास प्रवृत्त झालेला योगी [ परम गतीला जातो, असा पुढील श्लोकार्शी संबंध. श्रोत्रादि सर्व ज्ञानद्वारांचा निरोध करून, वायूचाहि सर्व बाजूंनी निरोध करून, त्याला हृदयांत आणून, हृदयांतून निघालेल्या सुषुम्ना नाडीनें कंठ, भ्रूमध्य, ललाट या क्रमानें प्राणाचें मूर्धास्थानीं आधान करून, योगधारणेवर आरूढ झालेला योगी ब्रह्माचा उच्चार करीत व त्याचा अर्थ जो मी, त्याचें अनुस्मरण करीत परम गतीला प्राप्त होतो. ] १२.

**तत्रैव च धारयन्—ओमित्येकाक्षरं ब्रह्म ब्रह्मणोऽभिधानभूतमोंकारं व्याहरन्नुच्चारयंस्तदर्थभूतं मामीश्वरमनुस्मरन्ननुचिन्तयन्यः प्रयाति म्रियते स त्यजन्परित्यजन्देहं**

**शरीरं त्यजन्देहमिति प्रयाणविशेषणार्थं देहत्यागेन प्रयाणमात्मनो न स्वरूपनाशेने-त्यर्थः । स एवं त्यजन्याति गच्छति परमां प्रकृष्टां गतिम् ॥ १३ ॥**

**भाष्यार्थ—तत्र एव च धारयन्**—आणि त्या मस्तकांतच प्राणाला धारण करणाऱ्या योग्यानें काय करावें, तें ' ओं० ' इत्यादि श्लोकानें सांगतात—**'ओं' इति एकाक्षरं ब्रह्म-ब्रह्मणः अभिधानभूतं ओंकारं व्याहरन्-उच्चारयन्**—'ओं' या एकाक्षर ब्रह्माचा म्ह० पर ब्रह्माचें नांव अशा या ओंकाराचा उच्चार करणारा व—**तदर्थभूतं मां-ईश्वरं अनुस्मरन्-अनुचिन्तयन्**—त्या ओंकाराचा अर्थ अशा मज ईश्वराचें अनुस्मरण-अनुचिंतन करणारा—**देहं-शरीरं त्यजन्-परित्यजन्-यः प्रयाति-म्रियते**—देहाचा-शरीराचा परित्याग करणारा जो जातो-मरतो—**'त्यजन् देहं' इति प्रयाणविशेषणार्थं**—'त्यजन् देहं' हे प्रयाणाच्या म्ह० मरणाच्या विशेषणासाठीं आहे. म्ह०—**आत्मनः देहत्यागेन प्रयाणं न स्वरूपनाशेन इत्यर्थः**—आत्म्याचें देहत्यागानें प्रयाण होतें स्वरूपनाशानें होत नाहीं, असा याचा भावार्थ. त्यामुळें ' देहं त्यजन् ' व 'प्रयाति' यावर पुनरुक्तिदोष येत नाही —**सः एवं त्यजन् परमां प्रकृष्टां गतिं याति-गच्छति**—तो याप्रमाणें देहत्याग करणारा परम म्ह० प्रकृष्ट-उत्तम गतीला प्राप्त होतो. [ मूर्धास्थानीं प्राणाची स्थापना करून 'ओं'

---

१ नऊ ते तेरा श्लोकांना रहस्यकार असें अवतरण देतात-" अंतकाळीं देखील दिव्य परमपुरुषाचे जें चिंतन करावयाचे ते परमेश्वरार्पणबुद्धीनें जन्मभर निष्काम कर्म करणारे कर्मयोगी कोणत्याप्रकारें करतात त्याचें आतां वर्णन करितात." एकूण यापुढे चिंतन करण्याचा जो प्रकार सांगितला आहे तो कर्मयोग्यांचा आहे, इतराचा नव्हे. पण ओढाताण ती याहून आणखी निराळी असते की काय ? हेच आम्हांला कळत नाहीं. येथे वस्तुतः कर्मयोग्याचा काय संबंध आहे ? यापुढील सर्व वर्णन योग्याचें आहे, कर्मयोग्याचें नव्हे. पुढें ज्या दोन गति सांगितल्या आहेत, त्यांतील एक योग्यासाठीं व दुसरी कर्मयोग्यासाठीं आहे. योगबल, दोन भुवयांमध्यें प्राणांची स्थापना करणें, सर्व द्वारांचा संयम, मनाचा हृदयांत निरोध, प्राणांचें मूर्धास्थानी आधान, योगधारणा, हे सर्व शब्द योगसूचक आहेत. कर्मयोगसूचक नाहीत. पण रहस्यकार या सर्व शब्दांचा अर्थ कसातरी करून वेळ मारून नेतात. ' योगबलेन' याचा अर्थ 'इन्द्रियनिग्रहरूप योगाच्या सामर्थ्यानें' 'भ्रुवोर्मध्ये प्राणं आवेश्य सम्यक् ' याचा अर्थ "प्राण दोन भुवयांच्यामध्ये नीट ठेवून" असा करितात. 'मूर्ध्नि आधाय आत्मनः प्राणं' याचा अर्थ 'आपला प्राण मस्तकांत नेऊन' व 'आस्थितो योगधारिणाम्' याचा अर्थ 'समाधियोगांत स्थित झालेला' इत्यादि केला आहे. पण तो मुळींच सुबोध नाहीं. त्याचप्रमाणें ११ व्या श्लोकांतील 'अक्षर व पद' यांचा अर्थ 'ओंकार ब्रह्म' असा करितात. पण तोहि बरोबर नाहीं. कारण वेदवेत्ते ज्याला अक्षर म्हणतात, विरक्त यति ज्यांत प्रवेश करितात, व ज्याच्या इच्छेनें ब्रह्मचर्य पाळतात, तें पद म्हणजे 'ओंकार ब्रह्म' कसें असेल ? अर्थात 'ओं' हें ज्याचें नांव आहे किंवा प्रतीक आहे, तें मुख्य ब्रह्मच येथें 'अक्षर' व 'पद' शब्दांनी विवक्षित आहे. काठक व प्रश्न या उपनिषदांतून जी ओंकारोपासना सांगितली आहे, तीहि परब्रह्माचीच उपासना आहे. केवळ 'ओं' हें अक्षर कधींच उपास्य होऊं शकत नाही,

हें ब्रह्माचें नांव उच्चारीत व त्याच्या अर्थाचें म्ह० ब्रह्माचें चिंतन करीत जो शरीर सोडून जातो तो सर्वोत्तम गतीला प्राप्त होतो. ] १३.

**अनन्यचेताः सततं यो मां स्मरति नित्यशः ।**
**तस्याहं सुलभः पार्थ नित्ययुक्तस्य योगिनः ॥ १४ ॥**

**अन्वयार्थ—हे पार्थ,**—हे अर्जुना!—**यः**—जो—**अनन्यचेताः**—ईश्वरावांचून दुसऱ्या कोणत्याहि विषयांत चित्त न ठेवणारा साधक—**नित्यशः**—रोज रोज-प्रतिदिवशीं—**सततं**—निरंतर—**मां**—मला—**स्मरति**—स्मरतो-माझें चिंतन करतो,—**तस्य नित्ययुक्तस्य योगिनः**—त्या सदा शांतचित्त योग्याला—**अहं सुलभः**—मी सुलभ आहे. १४

**किंच—अनन्यचेता नान्यविषये चेतो यस्य सोऽयमनन्यचेता योगी सततं सर्वदा यो मां परमेश्वरं स्मरति नित्यशः । सततमिति नैरन्तर्यमुच्यते । नित्यश इति दीर्घकालत्वमुच्यते । न षण्मासं संवत्सरं वा किं तर्हि यावज्जीवं नैरन्तर्येण यो मां स्मरतीत्यर्थः । तस्य योगिनोऽहं सुलभः सुखेन लभ्यः पार्थ नित्ययुक्तस्य सदा समाहितस्य योगिनः । यत एवमतोऽनन्यचेताः सन्मयि सदा समाहितो भवेत् ॥ १४ ॥**

**भाष्यार्थ**—( अहोपण ज्यांना वायूचा निरोध करतां येत नाही, त्यांना असे स्वेच्छामरण येणें शक्य नाहीं. तेव्हां अशा लोकांना परम गति कशी मिळणार? तें पुढील 'अनन्यचेताः०' या श्लोकानें सांगतात.—)—**किंच यः अनन्यचेताः-न अन्यविषये चेतः यस्य सः अयं अनन्यचेताः योगी**—तसेंच जो अनन्यचित्त, ज्याचें चित्त अन्याविषयामध्ये नाहीं, तर केवल एका परमेश्वरामध्येंच आहे तो हा अनन्यचित्त योगी—**सततं-सर्वदा मां-परमेश्वरं नित्यशः स्मरति**—सतत म्ह० सर्वदा मज परमेश्वराला नित्यशः स्मरतो (पण 'सततं' व 'नित्यशः' या शब्दांवर पुनरुक्तिदोष येऊं नये म्हणून म्हणतात-)—**सततं इति नैरन्तर्यं उच्यते नित्यशः इति दीर्घकालत्वं उच्यते**—'सततं' या शब्दानें नैरंतर्य-निरंतरता सांगितली जाते व 'नित्यशः' या शब्दानें दीर्घकालत्व सांगितलें आहे. अर्थात्—**षण्मासं संवत्सरं वा न किं तर्हि यावज्जीवं नैरंतर्येण यः मां स्मरति इत्यर्थः**—सहा महिने किंवा वर्षभरच नव्हे, तर काय? यावजीव-मरेपर्यंत निरंतर जो माझें स्मरण करितो असा याचा भावार्थ,—**पार्थ तस्य योगिनः अहं सुलभः-सुखेन लभ्यः**—हे अर्जुना! त्या योग्याला मी सुलभ-सुखानें लभ्य-अनायासानें प्राप्त होण्यासारखा आहें-(योगी कसा? उत्तर-)—**नित्ययुक्तस्य-सदा समाहितस्य योगिनः**—नित्ययुक्त-सदा समाहित योग्याला मी सुलभ आहें—**यतः एवं अतः अनन्यचेताः सन् मयि सदा समाहितः**

१ 'नित्ययुक्तस्य योगिनः' याचा अर्थ रहस्यकार 'नित्ययुक्त कर्मयोग्यास' असा करितात, पण तो प्रकृत विषयालाहि धरून नाही, व 'नित्ययुक्त' या विशेषणालाहि अनुसरून नाहीं.

**भवेत्**—ज्याअर्थी असें आहे त्याअर्थी अनन्यचित्त होऊन माझ्या ठिकाणीं सदा समाहित व्हावें ( यावरून रहस्यकारांनी सहाव्या अध्यायांतील 'सततं' श्लो. १० 'सदा,' १५ या शब्दांच्या अर्थाचा जो संकोच केला आहे तो किती अप्रयोजक आहे, तें वाचकांच्या लक्षांत येईल गी. भा. पृ. ५६७ व ५७३ पहा. ) १४

**मामुपेत्य पुनर्जन्म दुःखालयमशाश्वतम् ।**
**नाप्नुवन्ति महात्मानः संसिद्धिं परमां गताः ॥ १५**

**अन्वयार्थ—परमां संसिद्धिं गताः**—मोक्ष या नावाच्या श्रेष्ठ सिद्धीला प्राप्त झालेले—**महात्मानः**—महात्मे—**मां**—मला—**उपेत्य**—प्राप्त होऊन—**अशाश्वतं**—अनित्य व—**दुःखालयं**—दुःखाचे आगर अशा—**पुनर्जन्म**—पुनर्जन्मास—**न आप्नुवन्ति**—प्राप्त होत नाहीत. १५.

**तव सौलभ्येन किं स्यादित्युच्यते शृणु तन्मम सौलभ्येन यद्भवति—मामुपेत्य मामीश्वरमुपेत्य मद्भावमापाद्य पुनर्जन्म पुनरुत्पत्तिं न प्राप्नुवन्ति । किंविशिष्टं पुनर्जन्म न प्राप्नुवन्तीति तद्विशेषणमाह दुःखालयं दुःखानामाध्यात्मिकादीनामालयमाश्रयमालीयन्ते यस्मिन्दुःखानीति दुःखालयं जन्म । न केवलं दुःखालयमशाश्वतमनवस्थितस्वरूपं च नाऽऽप्नुवन्तीदृशं पुनर्जन्म महात्मानो यतयः संसिद्धिं मोक्षाख्यां परमां प्रकृष्टां गताः प्राप्ताः । ये पुनर्मां न प्राप्नुवन्ति ते पुनरावर्तन्ते ॥ १५ ॥**

**भाष्यार्थ**—( पण तुला प्राप्त झालेले तुझ्यामध्येंच राहतात कीं चंद्रलोकास प्राप्त झालेल्या कर्मठांप्रमाणे परत येतात ? अशी शंका आल्यामुळें अर्जुन विचारतो- )—**तव सौलभ्येन किं स्यात् इति उच्यते यत् मम सौलभ्येन भवति तत् शृणु**—तुझ्या सुलभतेने काय होईल ? म्हणून विचारशील तर सांगितले जातें-जे माझ्या सौलभ्यानें होतें, मी सुलभ झाल्याने कोणता लाभ होतो तें ऐक—**मां उपेत्य-मां ईश्वरं उपेत्य-मद्भावं आपाद्य पुनर्जन्म-पुनरुत्पत्तिं न प्राप्नुवन्ति**—मला प्राप्त होऊन—मज ईश्वराला प्राप्त होऊन म्ह० केवल सामीप्यास नव्हे, तर मद्भावास प्राप्त होऊन पुनर्जन्माला-पुनरुत्पत्तीला प्राप्त होत नाहींत. ( पुनर्जन्माचे अनिष्टत्व प्रश्नद्वारा व्यक्त करितात- )—**किंविशिष्टं पुनर्जन्म न प्राप्नुवन्ति इति तद्विशेषणं आह**—कशाप्रकारच्या पुनर्जन्माला प्राप्त होत नाहींत, असें अर्जुन विचारील म्हणून भगवान् त्या पुनर्जन्माचें विशेषण सांगतात—**दुःखालयं ·दुःखानां आध्यात्मिकादीनां आलयं-आश्रयं**—दुःखांचें घर-आध्यात्मिकादि दुःखांचें आलय म्ह० आश्रयस्थान असें पुनर्जन्म-**यस्मिन् दुःखानि आलीयन्ते इति दुःखालयं जन्म**—ज्यांत दुःखें सर्वतः लीन होऊन राहतात तें दुःखालय जन्म—**केवलं दुःखालयं न अशाश्वतं-अनवस्थितस्वरूपं च**—जन्म केवल दुःखालयच नव्हे, तर अशाश्वत म्ह० अनवस्थित स्वरूप,—**परमां-प्रकृष्टां मोक्षाख्यां संसिद्धिं गताः-प्राप्ताः महात्मानः**

**यतयः-ईदृशं पुनर्जन्म न आप्नुवन्ति**—अत्यंत श्रेष्ठ-मोक्षसंज्ञक संसिद्धीला प्राप्त झालेले महात्मे ज्यांना ईश्वराचे अपरोक्ष ज्ञान झालें आहे, असे यति अशाप्रकारच्या पुनर्जन्माला प्राप्त होत नाहींत.—**पुनः ये मां न प्राप्नुवन्ति ते पुनः आवर्तन्ते**—पण जे मला प्राप्त होत नाहींत ते पुनः जन्म घेतात. [ मोक्षसंज्ञक श्रेष्ठ गतीला प्राप्त झालेले महात्मे माझ्या स्वरूपास प्राप्त होऊन सर्व दुःखांचें घर व अस्थिर स्वरूप अशा पुनर्जन्मास प्राप्त होत नाहींत. ] १५

**आब्रह्मभुवनाल्लोकाः पुनरावर्तिनोऽर्जुन ।**
**मामुपेत्य तु कौन्तेय पुनर्जन्म न विद्यते ॥ १६ ॥**

**अन्वयार्थ—हे पार्थ**—हे अर्जुना !—**आब्रह्मभुवनात् लोकाः**—ब्रह्मलोकापर्यंत -ब्रह्मलोकासह सर्वलोक—**पुनरावर्तिनः**—पुनः आवर्तन पावणारे-पुनरावृत्ति-पुनर्जन्म घेणारे-पुनः उत्पन्न होणारे आहेत.—**तु**—परंतु—**कौन्तेय**—हे कुंतिपुत्रा—**मां**—मला—**उपेत्य**—प्राप्त होऊन —**पुनर्जन्म**—पुनः जन्म—**न विद्यते**—नाहीं.

किं पुनस्त्वत्तोऽन्यत्प्राप्ताः पुनरावर्तन्त इत्युच्यते—आब्रह्मभुवनाद्भवन्ति यस्मिन्भूतानीति भुवनं ब्रह्मभुवनं ब्रह्मलोक इत्यर्थः । आब्रह्मभुवनात्सह ब्रह्मभुवनेन लोकाः सर्वे पुनरावर्तिनः पुनरावर्तनस्वभावा हेऽर्जुन । मामेकमुपेत्य तु कौन्तेय पुनर्जन्म पुनरुत्पत्तिर्न विद्यते ॥ १६ ॥

**भाष्यार्थ**—( अहोपण, ' अपाम सोमं अमृता अभूम ' म्ह० आम्हीं सोमपान केलें व अमृत झालों, अशी श्रुति असल्यामुळें स्वर्गादिस्थानीं गेलेल्या सर्वांना अनावृत्ति म्ह० मुक्ति एकसारखीच मिळते, अशी शंका घेतात-)—**किं पुनः त्वत्तः अन्यत् प्राप्ताः पुनः आवर्तन्ते**—पण तुझ्यावांचून दुसऱ्या स्थानाला प्राप्त झालेले पुनर्जन्म कां घेतात—**इति उच्यते**—असें कोणी विचारील तर त्याचें उत्तर ' आब्रह्म० ' या श्लोकानें सांगितलें जातें—**आब्रह्मभुवनात्-भवन्ति यस्मिन् भूतानि इति भुवनं ब्रह्मभुवनं-ब्रह्मलोकः इत्यर्थः**—ब्रह्मभुवनापर्यंत (सर्व लोक) ज्यांत भूतें होतात तें भुवन, ब्रह्मभुवन म्ह० ब्रह्मलोक असा याचा भावार्थ—**आब्रह्मभुवनात्-ब्रह्मभुवनेन सह सर्वे लोकाः पुनरावर्तिनः-पुनरावर्तनस्वभावाः हे अर्जुन**—ब्रह्मभुवनापर्यंत म्ह० ब्रह्मभुवनासह सर्व लोक पुनरावर्ती आहेत-पुनः जन्म घेणें, याच स्वभावाचे ते आहेत; हे अर्जुना,—**तु मां एकं उपेत्य कौन्तेय पुनर्जन्म-पुनरुत्पत्तिः न विद्यते**—पण एकट्या मलाच प्राप्त होऊन हे कुंतिपुत्रा ! पुनर्जन्म-पुनरुत्पत्ति होत नाहीं. [ अर्थात् स्वर्गादिकांचें नित्यत्व या लोकाच्या अपेक्षेनें आहे. स्वर्गातील अमरत्व नित्य नाहीं. यावरूनच भूः, भुवः स्वः, महः या लोकीं गेलेल्या जीवांची पुनरावृत्ति जरी होत असली तरी, जन, तप, सत्य या लोकीं गेलेल्यांची पुनरावृत्ति होत नाहीं, ते पुनः या लोकीं येऊन जन्म घेत नाहींत, असें जें कित्येकांचें म्हणणें आहे तें खोटें आहे. त्याचप्रमाणें ईश्वराला प्राप्त झालेल्या विद्यावानांची पुनरावृत्ति होते, हें म्हणणेंहि खोटेंच

आहे. ज्याची स्वाभाविक व आनुवंशिक शुद्धि असते त्यालाच ईश्वराविषयींची बुद्धि होते, हें सुचविण्यासाठीं 'कौन्तेय व अर्जुन' अशीं दोन संबोधनें योजलीं आहेत. ] १६

**सहस्रयुगपर्यन्तमहर्यद्ब्रह्मणो विदुः ।**
**रात्रिं युगसहस्रान्तां तेऽहोरात्रविदो जनाः ॥ १७ ॥**

**अन्वयार्थ—ते अहोरात्रविदः जनाः**—दिवस व रात्र यांना जाणणारे ते प्रसिद्ध जन—**यत् ब्रह्मणः अहः**—जो ब्रह्मदेवाचा दिवस—**(तत्)सहस्रयुगपर्यन्तं**—तो एक सहस्र युगांनीं संपणारा—**च**—व—**रात्रिं**—रात्र—**युगसहस्रान्तां**—सहस्र युगांनी संपणारी आहे, असे—**विदुः**—जाणतात. १७

**ब्रह्मलोकसहिता लोकाः कस्मात्पुनरावर्तिनः कालपरिच्छिन्नत्वात्कथम्—सहस्रयुगपर्यन्तं सहस्रं युगानि पर्यन्तः पर्यवसानं यस्याह्नस्तदहःसहस्रयुगपर्यन्तं ब्रह्मणः प्रजापतेर्विराजो विदुः, रात्रिमपि युगसहस्रान्तामहःपरिमाणामेव । के विदुरित्याह तेऽहोरात्रविदः कालसंख्याविदो जना इत्यर्थः । यत एवं कालपरिच्छिन्नास्तेऽतः पुनरावर्तिनो लोकाः ॥ १७ ॥**

**भाष्यार्थ—ब्रह्मलोकसहिताः लोकाः कस्मात् पुनः आवर्तिनः**—ब्रह्मलोकासह सर्व लोक कोणत्याकारणानें बरें पुनरावर्ती आहेत-(त्यांना पुनः पुनः कां बरें जन्म घ्यावा-लागतो ? उत्तर-)—**कालपरिच्छिन्नत्वात्**—कारण ते कालाने परिच्छिन्न असतात. (म्हणून त्याची पुनरावृत्ति होते, पुनरावृत्ति म्ह० पुनर्जन्म)—**कथं**—ते कालपरिच्छिन्न कसे आहेत, ते 'सहस्र०' या श्लोकानें सांगतात—**सहस्रयुगपर्यन्तं-सहस्रं युगानि पर्यन्तः-पर्यवसानं यस्य अह्नः**—ज्या दिवसाचें पर्यवसान-परिमाण सहस्रयुगें आहे, ( एक सहस्र चतुर्युगें झालीं म्हणजे जो दिवस संपतो, कोणाचा तें सांगतात-)—**तत् ब्रह्मणः-प्रजापतेः विराजः अहः सहस्रयुगपर्यन्तं विदुः**—तें ब्रह्मदेवाचे-प्रजापतीचें-विराट्पुरुषाचें 'अहः' म्ह० दिवस सहस्रयुगपर्यन्त आहे, असें समजतात.—**रात्रिं अपि युगसहस्रान्तां-अहःपरिमाणां एव**—रात्रीलाहि युगसहस्रान्तच म्ह० दिवसाच्या परिमाणा एवढीच समजतात—**के विदुः इति आह**—असे कोण जाणतात-कोण समजतात, तें सांगतात—**ते अहोरात्रविदः-कालसंख्याविदः जनाः इत्यर्थः**—ते अहोरात्र[१] जाणणारे-कालाची संख्या कालाचे परिमाण जाणणारे लोक, असा भावार्थ.[ ब्रह्मदेवाच्या दिवसाचें प्रमाण एक सहस्र चतुर्युगें

---

१ 'अहोरात्रविदः' या शब्दाचा अर्थ रहस्यकार 'अहोरात्र म्हणजे काय हे तत्त्वतः जाणणारे पुरुष' असा करितात. पण तो बरोबर नाहीं, कारण तत्त्वतः म्हणजे काय याचा येथें स्पष्ट बोध होत नाहीं. तसेंच अहोरात्र म्हणजे काय हें तत्त्वतः कसें जाणावयाचे ? यास्तव 'अहोरात्रविदः' म्हणजे कालाची संख्या, कालाचें परिमाण जाणणारे लोक हाच भावार्थ समुचित आहे.

हें आहे व त्याच्या रात्रीचें प्रमाणहि तितकेंच आहे, असें ते जाणतात.]—**यतः एवं ते लोकाः कालपरिच्छिन्नाः अतः पुनरावर्तिनः**—ज्याअर्थी याप्रमाणें ते लोक कालपरिच्छिन्न आहेत, त्याअर्थी पुनरावर्ती आहेत. [ आपल्याप्रमाणेंच ब्रह्मदेवाच्या आयुष्याचें प्रमाणहि शतवर्ष आहे. त्यामुळे त्याचा नाश होतांच त्याच्या लोकीं राहिलेल्या लोकांची पुनरावृत्ति होते. ] १७

## अव्यक्ताद्व्यक्तयः सर्वाः प्रभवन्त्यहरागमे ।
## रात्र्यागमे प्रलीयन्ते तत्रैवाव्यक्तसंज्ञके ॥ १८ ॥

**अन्वयार्थ—अहरागमे**—ब्रह्मदेवाचा दिवस उगवला असतां,—**अव्यक्तात्**—ब्रह्मदेवाच्या स्वापावस्थेपासून—**सर्वाः व्यक्तयः**—स्थावर-जंगमरूप सर्व प्रजा—**प्रभवन्ति**—अभिव्यक्त होतात.—**रात्र्यागमे**—ब्रह्मदेवाची रात्र झाली असतां,—**तत्र एव अव्यक्तसंज्ञके**—त्याच अव्यक्तनांवाच्या स्वापावस्थेत—**प्रलीयन्ते**—प्रलीन होतात. १८

**प्रजापतेरहनि यद्भवति रात्रौ च तदुच्यते—अव्यक्ताद्व्यक्तं प्रजापतेः स्वापावस्था तस्माद्व्यक्ताद्व्यक्तयो व्यज्यन्त इति व्यक्तयः स्थावरजङ्गमलक्षणाः सर्वाः प्रभवन्त्यभिव्यज्यन्तेऽह्न आगमोऽहरागमस्तस्मिन्नहरागमे काले ब्रह्मणः प्रबोधकाले तथा रात्र्यागमे ब्रह्मणः स्वापकाले प्रलीयन्ते सर्वा व्यक्तयस्तत्रैव पूर्वोक्तेऽव्यक्तसंज्ञके ॥ १८ ॥**

**भाष्यार्थ—प्रजापतेः अहनि यत् भवति रात्रौ च तत् उच्यते**—प्रजापतीच्या दिवसांत जे होतें व रात्रीं जे कांहीं होते, तें 'अव्यक्तात्०' या श्लोकाने सांगितले जातें.—**अव्यक्तात्-अव्यक्तं-प्रजापतेः स्वापावस्था तस्मात् अव्यक्तात्**—अव्यक्तापासून–अव्यक्त[१] म्ह० प्रजापतीची स्वापावस्था–सुषुप्त्यवस्था, त्या अव्यक्तापासून

---

१ "अव्यक्त म्ह० सांख्यशास्त्रातील अव्यक्त प्रकृति असा येथे अर्थ आहे" असें रहस्यकार म्हणतात. पण हें म्हणणे सयुक्तिक नाहीं, कारण येथें प्रजापतीचा दिवस व रात्र म्हणजेच जागृति व सुषुप्ति या अवस्थांचें परिमाण सांगून दिवसाला आरंभ झाला म्ह० अव्यक्तांतून सर्व व्यक्ति उत्पन्न होतात व रात्र सुरू झाली असता, त्याच अव्यक्तात त्या लीन होतात, असें वर्णन केलें आहे. तेव्हां येथे मध्येच सांख्याची प्रकृति आली कोठून ? त्यापेक्षां अव्यक्त म्ह० प्रजापतीची स्वापावस्था, हेंच किती सयुक्तिक आहे ? रहस्यकार म्हणतात.–"हें अव्यक्त म्हणजे परब्रह्म नव्हे." अव्यक्त म्ह० परब्रह्म नव्हे, ही गोष्ट खरी, पण तेवढ्यावरून अव्यक्त म्हणजे सांख्यांची प्रकृति हे कसें सिद्ध होतें ? शिवाय या अव्यक्ताहून अव्यक्त पुरुष पर आहे, असे येथे म्हटलें आहे, व उपनिषदांतहि तसेच वर्णन आहे. सांख्यशास्त्रांत प्रकृतीहून पुरुष पर आहे, असें मानलेले नाहीं. पुरुष व प्रकृति हीं दोन स्वतंत्र तत्त्वें मानलेलीं आहेत. त्यामुळें गीतेतील 'अव्यक्त' शब्दावरून सांख्यांच्या प्रकृतीची कल्पना करणें अयोग्य आहे. ( गी. भा. पृ. १२४-२६ पहा. ) वेदान्तांत अव्यक्त म्हणजे अव्याकृत व सुषुप्त्यवस्था यांचें साम्य वर्णिलेलें आहे.

—**व्यक्तयः-व्यज्यन्ते इति व्यक्तयः सर्वाः-स्थावरजंगमलक्षणाः**—व्यक्ति-व्यक्त होतात म्हणून व्यक्ति, सर्व स्थावर-जंगमरूप शरीरें—**प्रभवन्ति-अभिव्यज्यन्ते**—उद्भवतात-अभिव्यक्त होतात ( केव्हां ? उत्तर- )—**अह्नः आगमः अहरागमः तस्मिन् अहरागमे काले**—अह्नाचा म्ह० दिवसाचा जो आगम-आरंभ उत्पत्ति तो अहरागम; त्या अहरागमकालीं म्हणजे—**ब्रह्मणः प्रबोधकाले**—ब्रह्मदेवाच्या प्रबोधाच्या-जागे होण्याच्या वेळीं ( त्याच्या सुषुप्तीपासून सर्व स्थावर-जंगमरूप व्यक्ति उत्पन्न होतात- )—**तथा राज्यागमे-ब्रह्मणः स्वापकाले सर्वाः व्यक्तयः तत्र एव पूर्वोक्ते अव्यक्तसंज्ञके प्रलीयन्ते**—त्याचप्रमाणें रात्रीचा आरंभ झाला असतां -ब्रह्मदेवाच्या सुषुप्तिकालीं सर्व व्यक्ति त्याच पूर्वोक्त अव्यक्तसंज्ञक सुषुप्त्यवस्थेंत प्रलीन होतात. [ प्रजापति जागा झाला की त्याच्या दिवसाला आरंभ होतो, त्यावेळीं स्थावर-जंगमरूप सर्व प्राणी त्याच्या सुषुप्त्यवस्थेतूनच उत्पन्न होतात व त्याच्या निद्रेच्या वेळी म्ह० त्याची रात्र सुरू होतांच ते सर्व प्राणी त्याच त्याच्या स्वापावस्थेंत लीन होतात. अव्यक्तसंज्ञक स्वापावस्थ ब्रह्मालाच प्रजापति हे नांव आहे. त्यांत सर्व व्यक्ति लीन होतात. ] १८

भूतग्रामः स एवायं भूत्वा भूत्वा प्रलीयते ।
रात्र्यागमेऽवशः पार्थ प्रभवत्यहरागमे ॥ १९ ॥

**अन्वयार्थ—हे पार्थ**—हे अर्जुना !—**सः एव अयं भूतग्रामः**—तोच हा भूतसमुदाय-प्राण्यांचा समूह—**भूत्वा भूत्वा**—पुनः पुनः उत्पन्न होऊन—**रात्र्यागमे**—ब्रह्मदेवाची रात्र झाली असतां—**अवशः**—परतंत्र होऊन-कर्माधीन होऊन—**प्रलीयते**—प्रलीन होतो व ब्रह्मदेवाचा—**अहरागमे**—दिवस उगवला असतां -प्रजापति जागा झाला असतां,कर्माधीन होऊनच तो प्राणिसमूह—**प्रभवति**—उत्पन्न होतो.

**अकृताभ्यागमकृतविप्रणाशदोषपरिहार्थं बन्धमोक्षशास्त्रप्रवृत्तिसाफल्यप्रदर्शनार्थमविद्यादिक्लेशमूलकर्माशयवशाच्चावशो भूतग्रामो भूत्वा भूत्वा प्रलीयत इत्यतः संसारे वैराग्यप्रदर्शनार्थं चेदमाह—भूतग्रामो भूतसमुदायः स्थावरजङ्गमलक्षणो यः पूर्वस्मिन्कल्प आसीत्सएवायं नान्यो भूत्वा भूत्वाऽहरागमे, प्रलीयते पुनः पुना राम्यागमेऽह्नः-क्षयेऽवशोऽस्वतन्त्र एव पार्थ प्रभवति अवश एवाहरागमे ॥ १९ ॥**

**भाष्यार्थ—अकृत-अभ्यागम-कृतविप्रणाशदोषपरिहारार्थं**—पूर्वी न केलेल्या पुण्य-पापांचें फल प्राप्त होणें व केलेल्या पुण्य पापांचा, फल न मिळतांच, नाश होणें,या दोषांच्या परिहारासाठीं (प्रत्येक कल्पांतील प्राणी भिन्न भिन्न मानल्यास हे दोन दोष येतात. म्हणजेच पूर्वजन्म न मानल्यास यांतील पहिला दोष व पुढचा जन्म न मानल्यास दुसरा दोष येतो, यास्तव ते दोन्ही दोष न यावे म्हणून ) त्याचप्रमाणें—**बन्धमोक्षशास्त्रप्रवृत्तिसाफल्यप्रदर्शनार्थं**—स्थावर-जंगमरूप प्राणिसमूह प्रत्येक कल्पांत भिन्न भिन्न मानल्यास बंध व मोक्ष यांच्याशी संबंध ठेवणाऱ्या एका जीवाचा अभाव होऊन

कर्मकांड-ज्ञानकांडरूप बंध व मोक्ष सांगणाऱ्या शास्त्राची प्रवृत्ति व्यर्थ होते, म्हणून त्या बंध-मोक्ष सांगणाऱ्या शास्त्राची प्रवृत्ति व्यर्थ नाहीं, तर त्याची प्रवृत्ति सफळ आहे, हें प्रदर्शित करण्यासाठीं,—**च अविद्यादिक्लेशमूलकर्माशयवशात् अवशः भूतग्रामः भूत्वा भूत्वा प्रलीयते इत्यतः संसारे वैराग्यप्रदर्शनार्थं च इदं आह**—आणि अविद्यादिक्लेशमूलक कर्माशयामुळें परवश झालेला भूतसमूह पुनः पुनः उत्पन्न होऊन लीन होतो, यास्तव संसाराविषयीं वैराग्यप्रदर्शन करण्यासाठीं भगवान् ‘ भूतग्रामः०’ इत्यादि सांगतात. [ अविद्या,-अज्ञान, अस्मिता-मी असा अहंकार, राग, द्वेष व अभिनिवेश-देहाचा वियोग न व्हावा हा अभिमान, यांना क्लेशपंचक म्हणतात. त्याच्यापासून धर्माधर्मात्मक कर्मसमूह उद्भवतो. त्या कर्मसमूहामुळेंच अस्वतंत्र-कर्माधीन झालेला भूतसमूह जन्म व नाश यांचा वारंवार अनुभव घेतो. यास्तव कर्मपरवश होऊन संसारांत परिवर्तन करीत असलेल्या जीवांना आतां हा जन्ममरणपरंपरारूप संसार पुरे झाला, असें वाटून त्याचा कंटाळा यावा, त्याच्याविषयीं विरक्ति यावी म्हणून हें पुढील वाक्य आहे ] **भूतग्रामः-भूतसमुदायः स्थावरजंगमलक्षणः यः पूर्वस्मिन् कल्पे आसीत् सः एव अयं न अन्यः**—भूतग्राम म्ह० भूतसमुदाय-स्थावर-जंगमरूप भूतसमूह की,जो पूर्व कल्पांत होता तोच हा, दुसरा-त्याहून निराळा नव्हे—**अहरागमे भूत्वा भूत्वा पुनः पुनः राज्यागमे प्रलीयते**—दिवसाचा आरंभ होतांच पुनः पुनः उत्पन्न होऊन पुनः पुनः रात्र सुरू होतांच लीन होतो. [ रात्र होतांच प्रलयाचा अनुभव घेणाऱ्या व दिवसाचा आरंभ होतांच जन्म घेणाऱ्या प्राणिसमूहाला एकसारखेंच पारतंत्र्य आहे, अशा आशयानें सांगतात- ]—**पार्थ अह्नः क्षये अवशः-अस्वतंत्रः एव ( प्रलीयते ) अहरागमे अवशः एव प्रभवति**—हे पार्था, दिवसाचा क्षय झाला असतां अवश-अस्वतंत्रच असलेला भूतसंघ प्रलीन होतो व दिवसाचा आरंभ झाला असतां, परतंत्रच असलेला तो उत्पन्न होतो.

**परस्तस्मात्तु भावोऽन्योऽव्यक्तोऽव्यक्तात्सनातनः ।**
**यः स सर्वेषु भूतेषु नश्यत्सु न विनश्यति ॥ २० ॥**
**अव्यक्तोऽक्षर इत्युक्तस्तमाहुः परमां गतिम् ।**
**यं प्राप्य न निवर्तन्ते तद्धाम परमं मम ॥ २१ ॥**

**अन्वयार्थ**—**तु**—परंतु—**तस्मात् अव्यक्तात्**—त्या अव्यक्ताहून—**परः**—निराळा—**अन्यः**—अगदीं विलक्षण—**अव्यक्तः**—इंद्रियांचा विषय न होणारा व—**सनातनः**—नित्य असा—**यः भावः**—जो भाव आहे—**सः**—तो—**सर्वेषु भूतेषु नश्यत्सु**—सर्व भूतें नाश पावत असतांहि—**न विनश्यति**—स्वतः नाश पावत नाहीं.—**यः अव्यक्तः अक्षरः इति उक्तः**—जो हा अव्यक्त व अक्षर म्हणून म्हटलेला भाव—**तं**—त्यालाच—**परमां गतिं**—परमा गति—**आहुः**—म्हणतात—**यं**

—ज्या भावाला—**प्राप्य**—प्राप्त होऊन—**न निवर्तन्ते**—पुनः संसारमार्गांत परत येत नाहींत—**तत् मम परमं धाम**—तें माझें परम स्थान-परम पद आहे. २०-२१

यदुपन्यस्तमक्षरं तस्य प्राप्त्युपायो निर्दिष्ट ओमित्येकाक्षरं ब्रह्मेत्यादिनाऽथेदानीमक्षरस्यैव स्वरूपनिर्दिदिक्षयेदमुच्यतेऽनेन योगमार्गेणेदं गन्तव्यमिति—परो व्यतिरिक्तो भिन्नः । कुतस्तस्मात्पूर्वोक्तात् । तुशब्दोऽक्षरस्य विवक्षितस्याव्यक्ताद्वैलक्षण्यविशेषणार्थः । भावोऽक्षराख्यं परं ब्रह्म । व्यतिरिक्तत्वे सत्यपि सालक्षण्यप्रसङ्गोऽस्तीति तद्विनिवृत्त्यर्थमाह—अन्य इति । अन्यो विलक्षणः स चाव्यक्तोऽनिन्द्रियगोचरः । परस्तस्मादित्युक्तं, कस्मात्पुनः परः पूर्वोक्ताद्भूतग्रामबीजभूतादविद्यालक्षणादव्यक्तात् सनातनश्चिरंतनः । यः स भावः सर्वेषु भूतेषु ब्रह्मादिषु नश्यत्सु न विनश्यति ॥२०॥

**भाष्यार्थ**— ( 'अहोपण, 'अक्षरं ब्रह्म परमं' असा उपक्रम करून त्याच्या उपयोगी नसलेलें हे भलतेंच काय सांगत बसला आहांत' अशी शंका घेऊन सांगतात-)—**यत् उपन्यस्तं अक्षरं तस्य प्राप्त्युपायः 'ओमित्येकाक्षरं ब्रह्म०' इत्यादिना निर्दिष्टः**—आरंभीं ज्या अक्षरब्रह्माचा उपन्यास केला त्याच्या प्राप्तीचा उपाय 'ओमित्येकाक्षरं ब्रह्म०' या वचनानें सांगितला-अक्षरब्रह्माच्या प्राप्त्युपायाचा निर्देश केला.—**अथ इदानीं अक्षरस्य एव स्वरूपनिर्दिदिक्षया अनेन योगमार्गेण इदं गन्तव्यं इति इदं उच्यते**—त्यानंतर आतां अक्षर ब्रह्माच्याच स्वरूपाचा निर्देश करण्याच्या इच्छेनें या योगमार्गानें हें स्थान संपादन करावे, म्हणून हे सांगितलें जातें. ( त्यामुळें मध्यें सांगितलेला योगमार्ग व्यर्थ नाही.)—**परः-व्यतिरिक्तः भिन्नः**—पर म्ह० व्यतिरिक्त-भिन्न—**कुतः**—कोणाहून भिन्न—**तस्मात् पूर्वोक्तात्**—त्या पूर्वोक्त अव्यक्ताहून—' **तु-'शब्दः विवक्षितस्य अक्षरस्य अव्यक्तात् वैलक्षण्यविशेषणार्थः** ' तस्मात् ' येथील ' तु ' हा शब्द विवक्षित अक्षराचें अव्यक्ताहून वैलक्षण्य-विलक्षणता दाखविण्यासाठीं पुढें जो ' अन्य ' शब्द आहे त्याच्या विशेषणासाठीं आहे.—**भावः-अक्षराख्यं परं ब्रह्म**—भाव म्ह० अक्षरसंज्ञक पर ब्रह्म, ( अहोपण, 'पर' शब्दाचा व्यतिरिक्त हा अर्थ करून, 'तु'शब्दानें वैलक्षण्य दाखवून पुनः ' अन्य 'शब्द योजला आहे. तेव्हां त्यावर पुनरुक्तदोष येत नाही का ? ' उत्तर-)—**व्यतिरिक्तत्वे सति अपि सालक्षण्यप्रसंगः अस्ति इति तद्विनिवृत्त्यर्थं अन्यः इति आह**—अक्षरब्रह्माला व्यतिरिक्तत्व जरी असलें तरी सालक्षण्य म्ह० समान लक्षणता आहे, असें तरी ठरण्याचा प्रसंग येतो. म्हणून त्याची सर्वथा निवृत्ति करण्यासाठीं ' अन्य ' असें भगवान् म्हणतात.—**अन्यः-विलक्षणः सः च अव्यक्तः-अनिन्द्रियगोचरः**—अन्य-विलक्षण व तोच अव्यक्त-इंद्रियांचा विषय न होणारा,—**' परस्तस्मात् ' इति उक्तं कस्मात् पुनः परः पूर्वोक्तात् भूतग्रामबीजभूतात् अविद्यालक्षणात् अव्यक्तात्**—'परः तस्मात्' असें या श्लोकाच्या आरंभींच म्हटलें-पण तो पर-भिन्न कोणाहून ? तर पूर्वोक्त भूतसमूहाच्या बीजभूत-अविद्यारूप अव्यक्ताहून भिन्न,—**सनातनः-चिरंतनः**—सनातन म्ह० चिरंतन-नित्य—**यः सः भावः**

**ब्रह्मादिषु सर्वेषु भूतेषु नश्यत्सु न विनश्यति**—असा जो भाव तो ब्रह्मादि-स्तंबपर्यंत सर्वभूतें नाश पावत असतांहि स्वतः नाश पावत नाहीं. [ विनाश पावणारा प्रत्येक विकार पुरुषापर्यंत विनाश पावतो. अक्षरसंज्ञक पुरुष मात्र विनाश पावत नाही. कारण त्याच्या विनाशाचें निमित्तच संभवत नाहीं. [अ. २ श्लो. २४ पृ. ११७ पहा.]२०

**अव्यक्त इति । योऽसावव्यक्तोऽक्षर इत्युक्तस्तमेवाक्षरसंज्ञकमव्यक्तं भावमाहुः परमां प्रकृष्टां गतिम् । यं भावं प्राप्य गत्वा न निवर्तन्ते संसाराय तद्धाम स्थानं परमं प्रकृष्टं मम विष्णोः परमं पदमित्यर्थः ॥२१॥**

**भाष्यार्थ—' अव्यक्तः०' इति**—' अव्यक्तः० ' या श्लोकाने पूर्वोक्त अव्यक्त भावाविषयीं श्रुतिसंमति सांगतात—**यः असौ अव्यक्तः अक्षरः इति उक्तः**—जो हा अव्यक्त अक्षर[१] असें श्रुतीत म्हटलेला—**तं एव अक्षरसंज्ञकं अव्यक्तं भावं परमां-प्रकृष्टां गतिं आहुः**—त्याच-अक्षरसंज्ञक अव्यक्तभावाला 'परमा-श्रेष्ठ गति' म्हणतात. —**यं भावं प्राप्य-गत्वा संसाराय न निवर्तन्ते तत् मम-विष्णोः परमं-प्रकृष्टं धाम-स्थानं-परमं पदं इत्यर्थः**—ज्या भावाला प्राप्त होऊन जन्म-मरण-सुख दुःखप्राप्तिरूप संसारासाठी परत फिरत नाहीत, ते मज व्यापक परमात्म्याचें परम -श्रेष्ठ धाम-स्थान आहे. तें विष्णूचें-व्यापक परमात्म्याचे परम पद आहे, असा भावार्थ. [ ' येनाक्षरं पुरुषं वेद सत्यं ' मुंडकभाष्यार्थ पृ. ४७ या श्रुतींत ' अक्षर ' असें म्हटलें आहे. ' पुरुषान्न परं किंचित् सा काष्ठा सा परा गतिः ' काठक-भाष्यार्थ पृ. ८१. या श्रुतींत त्याला परा गति म्हटले आहे. ' तद्धाम परमं मम ' हाच अर्थ सांगणारी ' तद्विष्णोः परमं पदं ' ही श्रुति आहे. ] २१.

## पुरुषः स परः पार्थ भक्त्या लभ्यस्त्वनन्यया ।
## यस्यान्तःस्थानि भूतानि येन सर्वमिदं ततम् ॥२२॥

**अन्वयार्थ—हे पार्थ,**—हे अर्जुना !—**यस्य अन्तःस्थानि भूतानि**—ज्याच्या आंत हीं सर्व भूते आहेत व—**येन इदं सर्वं ततं**—ज्याने हे सर्व व्यापलें आहे—**सः परः पुरुषः**—तो परम पुरुष—**अनन्यया भक्त्या तु**—अनन्य भक्तीनेच—**लभ्यः**—प्राप्त होण्याजोगा आहे. २२

**तल्लब्धेरुपाय उच्यते—पुरुषः पुरि शयनात्पूर्णत्वाद्वा स परः पार्थ परो निरतिशयो यस्मात्पुरुषान्न परं किंचित्स भक्त्या लभ्यस्तु ज्ञानलक्षणयाऽनन्ययाऽऽत्मविषयया ।**

---

१ रहस्यकार 'अव्यक्तोऽक्षर इत्युक्तः' याचा अर्थ "ज्या अव्यक्ताला अक्षर असेंहि म्हणतात." असा करतात. पण तो बरोबर नाही. कारण 'अव्यक्तः' आणि 'अक्षरः' या दोन्ही प्रथमा आहेत. शिवाय कोण म्हणतात, तेहि सांगितलेलें नाही. वास्तव 'अव्यक्त व अक्षर असें श्रुतींत म्हटलेला' हाच याचा सरळ व खरा अर्थ आहे. अर्थात् ७३४ पृष्ठावरील टीपेंत रहस्यकार ' गीतेंत अक्षर व अव्यक्त हे शब्द कोठें प्रकृतीला तर कोठें पुरुषाला उद्देशून योजिले आहेत,' वगैरे जें सांगतात, तें प्रमाणसिद्ध नाही.

**यस्य पुरुषस्यान्तःस्थानि मध्यस्थानि कार्यभूतानि भूतानि । कार्यं हि कारणस्यान्तर्वर्ति भवति । येन पुरुषेण सर्वमिदं जगत्ततं व्याप्तमाकाशेनेव घटादि ॥ २२ ॥**

**भाष्यार्थ—तल्लब्धेः उपायः उच्यते**—अव्यक्ताहून भिन्न, त्याहून विलक्षण अशा परम पुरुषाच्या प्राप्तीचा उपाय ' पुरुषः० ' या श्लोकानें सांगितला जातो.—**पार्थ पुरुषः-पुरि शयनात् पूर्णत्वात् वा सः परः**—हे पार्थ, पुरुष-शरीरसंज्ञक पुरांत शयन केल्यामुळें किंवा पूर्ण असल्यामुळें पुरुष, तो पर,—**परः-निरतिशयः यस्मात् पुरुषात् परं किंचित् न**—पर म्ह० निरतिशय, ज्या पुरुषाहून कांहीं पर नाहीं,—**सः ज्ञानलक्षणया अनन्यया-आत्मविषयया भक्त्या तु लभ्यः**—तो पुरुष ज्ञानरूप अनन्य म्ह० आत्मविषयक भक्तीनेच लभ्य-प्राप्त होण्यास योग्य आहे.—**यस्य पुरुषस्य अन्तःस्थानि-मध्यस्थानि कार्यभूतानि भूतानि**—ज्या पुरुषाच्या अन्तस्थ म्ह० मध्यस्थ हीं कार्यभूत भूतें आहेत,(पण भूते त्या पुरुषाच्या अन्तःस्थ कशीं ? उत्तर-)—**हि कार्यं कारणस्य अन्तर्वर्ति भवति**—कारण कार्य कारणाच्या अन्तर्वर्ति असतें, हे प्रसिद्ध आहे.—**येन पुरुषेण इदं सर्वं जगत् ततं-व्याप्तं आकाशेन इव घटादि**—ज्या पुरुषानें हें सर्व जगत् व्यापलें आहे. आकाशाने जसे घटादिक व्यापलेले असतें, [ त्याप्रमाणे ज्या पुरुषाने हे सर्व व्यापले आहे, व ज्याच्यामध्ये हीं सर्व कार्यरूप भूते राहतात तो श्रेष्ठ पुरुष ज्ञानलक्षण आत्मविषयक भक्तीनेच प्राप्त होतो. ] २२.

**यत्र काले त्वनावृत्तिमावृत्तिं चैव योगिनः ।**
**प्रयाता यान्ति तं कालं वक्ष्यामि भरतर्षभ ॥ २३ ॥**

**अन्वयार्थ—तु भरतर्षभ**—पण हे अर्जुना !—**योगिनः**—योगी व कर्मी—**यत्र काले**—ज्या वेळीं—**प्रयाताः**—मरून गेले असतां—**अनावृत्तिं**—मोक्षाला—**च एव**—आणि—**आवृत्तिं**—पुनर्जन्माला—**यान्ति**—प्राप्त होतात—**तं कालं**—तो काल मी तुला—**वक्ष्यामि**—सांगेन. २३

**प्रकृतानां योगिनां प्रणवावेशितब्रह्मबुद्धीनां कालान्तरमुक्तिभाजां ब्रह्मप्रतिपत्तय उत्तरो मार्गो वक्तव्य इति यत्र काल इत्यादि विवक्षितार्थसमर्पणार्थमुच्यते । आवृत्तिमार्गोपन्यास इतरमार्गस्तुत्यर्थः—यत्र काले प्रयाता इति व्यवहितेन संबन्धः । यत्र यस्मिन्काले त्वनावृत्तिमपुनर्जन्माऽऽवृत्तिं तद्विपरीतां चैव । योगिन इति योगिनः कर्मिणश्चोच्यन्ते । कर्मिणस्तु गुणतः ' कर्मयोगेन योगिनाम् ' इति विशेषणाद्योगिनः । यत्र काले प्रयाता मृता योगिनोऽनावृत्तिं यान्ति यत्र काले च प्रयाता आवृत्तिं यान्ति तं कालं वक्ष्यामि भरतर्षभ ॥ २३ ॥**

**भाष्यार्थ**—( ज्ञानानें परम पुरुषार्थाची प्राप्ति होते. पण ज्ञान या मार्गाची अपेक्षा **करून फल देण्यास समर्थ होत नाहीं. कारण** विद्वानाची गति व **उत्क्रांति-मरण यांचा श्रुतीनें निषेध केला आहे. (बृहदा.भाष्यार्थ अ.४ पृ. २७५ पहा) त्यामुळें येथें पुढें मार्गाचें**

जें कथन केलें आहे तें अयोग्य आहे, अशी शंका घेऊन सगुणोपासकांसाठीं त्यांचा उपदेश आहे अशा आशयानें सांगतात-)—**प्रणवावेशितब्रह्मबुद्धीनां कालान्तरमुक्तिभाजां प्रकृतानां योगिनां ब्रह्मप्रतिपत्तये उत्तरः मार्गः वक्तव्यः इति**— ज्यांनीं प्रणवामध्यें ब्रह्माची भावना दृढ केली आहे-ब्रह्मबुद्धीनें ओंकारोपासना केली आहे, त्यामुळें जे कालान्तरीं-कल्पाच्या अंतीं प्राप्त होणाऱ्या मुक्तीस पात्र असतात, अशा प्रकृत योग्यांच्या ब्रह्मप्राप्तीसाठीं उत्तर मार्ग सांगावा, म्हणून—**'यत्र काले०' इत्यादि विवक्षितार्थसमर्पणार्थं उच्यते**—'यत्र काले०' इत्यादि विवक्षित अर्थ समर्पण करण्यासाठीं सांगितलें जातें. [ उत्तरमार्ग हा विवक्षित अर्थ आहे. त्यासाठीं कालाची उक्ति आहे. अर्थात् सुषुम्नानाडीशीं संबद्ध असलेल्या देवयान मार्गाचें विधान करावयाचें असतांना मध्येंच कालाचा निर्देश कशाला केला आहे, ही शंका रहात नाहीं. 'देवयान मार्गाचेंच जर विधान करावयाचे आहे, तर पितृयाणमार्गाचा उपन्यास करण्याचें काय कारण ?' उत्तर-]—**आवृत्तिमार्गोपन्यासः इतरमार्गस्तुत्यर्थः**—आवृत्तिमार्गाचा जो येथे उपन्यास-उल्लेख केला आहे तो दुसऱ्या-देवयान किंवा उत्तरमार्गाच्या स्तुतीसाठीं आहे. [ दक्षिण किंवा पितृयाण मार्ग पुनर्जन्म हें फल देतो व उत्तर किंवा देवयानमार्ग अनावृत्ति-अपुनर्जन्म हें फल देतो, अर्थात् पहिल्या मार्गापेक्षां दुसरा मार्ग उत्तम आहे, अशी स्तुति येथें विवक्षित आहे. ]—**यत्र काले प्रयाताः इति व्यवहितेन संबन्धः**—'यत्र काले' या शब्दांचा 'प्रयाताः' या दूरच्या पदाशीं संबंध— **यत्र-यस्मिन् काले तु**—पण ज्याकाळीं-( मेलेले )—**अनावृत्तिं-अपुनर्जन्म च आवृत्तिं तद्विपरीतां एव**—अनावृत्तीला म्ह० अपुनर्जन्माला व आवृत्तीला म्ह० तद्विपरीत पुनर्जन्मालाच—**'योगिनः' इति योगिनः च कर्मिणः उच्यन्ते**— येथील 'योगिनः' या शब्दानें ध्यान करणारे व कर्म करणारे सांगितले आहेत. [ कारण ध्यान करणाऱ्या उपासकांकरितां पुढील श्लोकांत उत्तरायण किंवा देवयान मार्ग

---

१ रहस्यकारानीं या 'योगि' शब्दाचा अर्थ 'कर्मयोगी' असा केला आहे, पण तो अप्रस्तुत आहे. कारण 'कर्मयोगी' केवल विशिष्ट काळीं मेल्यानेंच आवृत्ति व अनावृत्ति या अत्यंत विलक्षण फलाला प्राप्त होणें शक्य नाहीं. पुढील दोन श्लोकावरूनहि या 'योगि' शब्दाचा केवल कर्मयोगी हा अर्थ उचित नाहीं हें सिद्ध होतें. एकाच कर्मयोग्याला देवयानमार्ग व पितृयाणमार्ग असे भिन्न मार्ग प्राप्त होणें शक्य नाहीं. २४ व्या श्लोकांत 'ब्रह्मविद् जन ब्रह्माला पोंचतात' व २५ व्या श्लोकांत 'योगी चांद्रमस ज्योतीला प्राप्त होऊन निवृत्त होतो,' असें स्पष्ट वर्णन आहे. त्यावरून येथील 'योगि' शब्द ब्रह्मोपासक व कर्मयोगी या दोघांना उद्देशून आहे हें सिद्ध होतें. 'ब्रह्मोपासक देवयान मार्गानें जातात, ते ब्रह्माला जाऊन पोंचतात व पुनः परत येत नाहीत. कर्मयोगी पितृयान मार्गानें चांद्रमस ज्योतीला जातात व तेथून परत फिरतात' असें पुढें म्हटलेलें असल्यामुळें या २३ व्या श्लोकांतील 'योगिनः' शब्दाचा अर्थ 'ध्यान करणारे व कर्म करणारे' असा करणेंच उचित होय. म्हणून आचार्यांनीं तसाच अर्थ केला आहे.

सांगितला असून २५ व्या श्लोकांत कर्मठांसाठीं दक्षिणायन किंवा पितृयाण मार्ग सांगावयाचा आहे. अर्थात् त्याच्या अनुरोधानें येथील 'योगि'शब्दाचा अर्थ केला पाहिजे, हें उघड आहे. पण कर्मठांना उद्देशून ' योगी ' या शब्दाची प्रवृत्ति कशी होते ? उत्तर-] **—कार्मिणः तु गुणतः योगिनः ' कर्मयोगेन योगिनां ' इति विशेषणात्—** पण कर्मी लोक अनुष्ठान या गुणामुळें योगी. कारण 'कर्मयोगेन योगिनां' गी. अ.३.३ पृ. २५५ असें विशेषण दिलेलें आहे. [ अनुष्ठान हा गुण कर्मी लोकांमध्येंहि असल्यामुळें त्यांना योगी असें गुणतः—गौणवृत्तीनें म्हणतां येतें; व भगवानांनीं तिसऱ्या अध्यायांत ' कर्मयोगानें योग्यांची-कर्मठांची निष्ठा मीं सांगितली आहे' असें म्हणून कर्मठ या अर्थी ' योगि 'शब्द वापरला आहे. ]—**भरतवर्षभ**—हे भरतकुलश्रेष्ठा !—**यत्र काले प्रयाताः मृताः योगिनः अनावृत्तिं यान्ति**—ज्याकालीं मृत झालेले योगी-ध्यायी-उपासक अनावृत्तीला म्ह० अपुनर्जन्माला प्राप्त होतात—**च यत्र काले प्रयाताः आवृत्तिं यान्ति तं कालं वक्ष्यामि**—व ज्याकालीं मृत झालेले कर्मी आवृत्तीला म्ह० पुनर्जन्माला प्राप्त होतात त्या कालाला मी सांगेन, तो काल मी तुला सांगेन. २३.

अग्निर्ज्योतिरहः शुक्लः षण्मासा उत्तरायणम् ।
तत्र प्रयाता गच्छन्ति ब्रह्म ब्रह्मविदो जनाः ॥२४॥

**अन्वयार्थ—अग्निः**—'अग्नि' या नांवाची कालाभिमानिनी देवता—**ज्योतिः**—'ज्योति' या नांवाची कालाभिमानिनी देवता—**अहः**—दिवसाची अभिमानिनी देवता —**शुक्लः**—शुक्लपक्षाभिमानिनी देवता—**षण्मासाः उत्तरायणं**—उत्तरायणाच्या सहा महिन्यांची देवता. या देवता ज्यांत आहेत—**तत्र**—त्या मार्गांत—**प्रयाताः** —शरीर सोडलेले-मेलेले—**ब्रह्मविदः जनाः**—ब्रह्मोपासक-ब्रह्माचें ध्यान करणारे जन क्रमानें—**ब्रह्म**—ब्रह्माला —**गच्छन्ति**—प्राप्त होतात. २४.

**तं कालमाह अग्निः कालाभिमानिनी देवता तथा ज्योतिर्देवतैव कालाभिमानिनी । अथवाऽग्निज्योतिषी यथाश्रुते एव देवते । भूयसां तु निर्देशो यत्र काले तं कालमित्याम्रवणवत् । तथाऽहर्देवताऽहः शुक्लः शुक्लपक्षदेवता षण्मासा उत्तरायणं तत्रापि देवतैव मार्गभूतेति स्थितोऽन्यत्र न्यायः । तत्र तस्मिन्मार्गे प्रयाता मृता गच्छन्ति ब्रह्म ब्रह्मविदो ब्रह्मोपासनपरा जनाः । क्रमेणेति वाक्यशेषः । न हि सद्योमुक्तिभाजां सम्यग्दर्शननिष्ठानां गतिरागतिर्वा क्वचिदस्ति "न तस्य प्राणा उत्क्रामन्ति " इति श्रुतेः । ब्रह्मसंलीनप्राणा एव ते ब्रह्ममया ब्रह्मभूता एव ते । क्रमेण तु गच्छन्ति ब्रह्म ब्रह्मविदो जनाः ॥ २४ ॥**

**भाष्यार्थ—तं कालं आह**—तो काल 'अग्निः०' या दोन श्लोकांनीं सांगतात—**अग्निः-कालाभिमानिनी देवता**—अग्नि ही कालाची अभिमानिनी देवता—**तथा**

**ज्योतिः कालाभिमानिनी देवता एव**—तशीच ज्योतिहि कालाभिमानिनी देवताच, [ तो काल सांगतों, असा उपक्रम असल्यामुळें 'अग्नि' व 'ज्योति' या शब्दांचा कालप्राधान्यानें–कालाभिमानिनी देवता असा अर्थ करून,आतां यथाश्रुत देवताच घ्याव्या असा विकल्प सांगतात-] **अथवा अग्निज्योतिषी यथाश्रुते एव देवते**—किंवा अग्नि व ज्योति या दोन्ही यथाश्रुत म्ह० त्याच नांवाच्या देवता घ्याव्या. [ कारण त्या देवताच मृतांना त्या मार्गातून नेत असतात.मग असे जर आहे तर'कालं वक्ष्यामि–'मी काल सांगतों असा कालप्राधान्यानें निर्देश कसा केला आहे ? उत्तर-]—**भूयसां तु निर्देशः 'यत्र काले तं कालं ' इति आम्रवणवत्**—'यत्र काले तं कालं' हा बाहुल्याच्या अपेक्षेनें निर्देश आहे 'आम्रवणं' या निर्देशाप्रमाणें [ एखाद्या उपवनांत इतर वृक्षांपेक्षां आंब्यांची झाडेंच पुष्कळ असल्यास त्याला जसें 'आम्रवण' असे म्हणतात, त्याप्रमाणें दोन्ही मार्गामध्यें असलेल्या कालादिकांच्या अभिमानिनी देवतांचा 'काल' शब्दानें उल्लेख केला आहे. कारण त्या सर्वदेवतांमध्ये कालाभिमानिनी देवता अधिक आहेत. त्यामुळें कालशब्दानेच त्यांचा निर्देश केला आहे. ]—**तथा अहः-अहर्देवता**—त्याचप्रमाणें 'अहः' ही अहर्देवता–दिवसाची अभिमानिनी देवता,—**शुक्लः-शुक्लपक्षदेवता**—शुक्ल म्ह० शुक्लपक्षदेवता—**षण्मासाः उत्तरायणं-तत्र अपि मार्गभूता-देवता एव**—सहा महिने उत्तरायण, त्यांतीलहि मार्गभूत देवताच घ्यावी—**इति अन्यत्र न्यायः स्थितः**—असा न्याय शारीरक मीमांसेंत सिद्ध केलेला आहे. [ अग्नि, ज्योति इत्यादि हीं मार्गाची चिह्नें आहेत, किंवा त्या भोगभूमि आहेत, असें समजणें शक्य असतांना देवतांचें ग्रहण काय म्हणून करावयाचें,अशी शंका घेऊन 'आतिवाहिकाः तल्लिंगात् ' ब्रह्मसूत्र अ.४, पा.३, सूत्र ४ यांत मृत जीवांना वाहून नेणाऱ्या या देवता आहेत व श्रुतींत त्या देवतांचेंच स्पष्ट लिंग आहे, असा न्याय सिद्ध केला आहे. ]—**तत्र-तस्मिन् मार्गे प्रयाताः-मृताः ब्रह्मविदः-ब्रह्मोपासनपराः जनाः ब्रह्म गच्छन्ति**—त्या अग्न्यादिकांच्या सामीप्यांत–त्या मार्गांत गेलेले ब्रह्मविद्[1] म्ह० सगुण ब्रह्मोपासनेंत तत्पर असलेले लोक ब्रह्माला प्राप्त होतात.—**क्रमेण इति वाक्यशेषः**—क्रमानें ब्रह्माला प्राप्त होतात, असा येथें या वाक्याला शेष जोडावा–[ येथें ब्रह्म म्ह० कार्यब्रह्म–हिरण्यगर्भ असें समजावें. हिरण्यगर्भाच्या लोकीं जाऊन त्याच्या आयुष्याचा क्षय झाल्यावर त्याच्याबरोबर ते मुख्य ब्रह्माला प्राप्त होतात. किंवा परब्रह्मच परंपरेनें त्यांच्या मुक्तीचें आलंबन–आश्रयस्थान होतें. म्हणून 'क्रमेण' असें भाष्यांत मुद्दाम म्हटलें आहे.कारण–]—**सम्यग्दर्शननिष्ठानां सद्योमुक्तिभाजां गतिः आगतिः वा न हि क्वचित् अस्ति**—सम्यग्दर्शननिष्ठ म्ह०निर्गुण ब्रह्मच मी आहें असे आत्मसाक्षात्कारवान् ज्ञाननिष्ठ अर्थात् सद्योमुक्तीला ह्म०जीवन्मुक्तीला पात्र असलेले जे ज्ञानी त्यांना जाणें किंवा येणें यांतील कांहीं नसतें. **'न तस्य प्राणाः उत्क्रामन्ति' इति श्रुतेः**—त्याचे प्राण शरीराला सो-

---

१ रहस्यकार या 'ब्रह्मविद' शब्दाचा 'ब्रह्मवेत्ते लोक' असा अर्थ करितात. पण तो वरील योगी म्हणजे कर्मयोगी या शब्दार्थाच्या विरुद्ध आहे.

हून कोठें जात नाहींत, अशी श्रुति आहे. बृह.भाष्यार्थ अ.४पृ.२७५ पहा.—**ते ब्रह्मसंलीनप्राणाः एव**—ज्यांचे प्राण ब्रह्मामध्यें पूर्णपणें लीन झाले आहेत असेच ते आहेत. —**ते ब्रह्ममयाः-ब्रह्मभूताः एव**—ते ब्रह्ममय-ब्रह्मभूतच होत.—**तु ब्रह्मविदः जनाः क्रमेण ब्रह्म गच्छन्ति**—पण ब्रह्मोपासक जन क्रमानें ब्रह्माला प्राप्त होतात. २४.

**धूमो रात्रिस्तथा कृष्णः षण्मासा दक्षिणायनम् ।**
**तत्र चान्द्रमसं ज्योतिर्योगी प्राप्य निवर्तते ॥ २५ ॥**

**अन्वयार्थ—धूमः**—धूमाभिमानिनी देवता—**रात्रिः**—रात्रीची देवता—**तथा**—त्याचप्रमाणें—**कृष्णः**—कृष्णपक्षाची देवता—**षट् मासाः दक्षिणायनं**—दक्षिणायनाच्या सहा महिन्यांची देवता—**तत्र**—या देवता ज्या मार्गांतील चिह्नें आहेत त्या मार्गांत—**(प्रयातः) योगी**—मरून गेलेला कर्मठ—**चांद्रमसं ज्योतिः**—चंद्रांतील ज्योतीला-कर्मफलाला—**प्राप्य**—प्राप्त होऊन त्याचा भोगानें क्षय होतांच—**निवर्तते**—तेथून परत येतो. २५.

**धूम इति । धूमो रात्रिर्धूमाभिमानिनी राज्यभिमानिनी च देवता । तथा कृष्णः कृष्णपक्षदेवता । षण्मासा दक्षिणायनमिति च पूर्ववद्देवतैव । तत्र चन्द्रमसि भवं चान्द्रमसं ज्योतिः फलमिष्टादिकारी योगी कर्मी प्राप्य भुक्त्वा तत्क्षयान्निवर्तते ॥२५॥**

**भाष्यार्थ—'धूमः०' इति**—'धूमः०' या श्लोकानें प्रकृत देवयान मार्गाची स्तुति करण्यासाठीं पितृयाण मार्गाचा उपन्यास करितात—**धूमः रात्रिः-धूमाभिमानिनी देवता राज्यभिमानिनी च देवता**—'धूम' म्ह० धूमाभिमानिनी देवता व रात्रि

---

१ रहस्यकार पितृयाण मार्गाच्या आरंभीं धूराच्या पूर्वी 'अग्नि' हा शब्द अध्याहृत घेतात, व त्याचें कारण "मेलेल्या मनुष्याच्या देहास अग्नि दिल्यानंतर म्हणजे अग्नीपासूनच या दोन्ही मार्गांस सुरुवात होते," असें सांगतात. पण तें अयोग्य आहे. कारण देवयान मार्गांत आरंभीं 'अग्नि' असा जो शब्द आहे, तो मेलेल्या मनुष्याच्या देहास अग्नि देतात, म्हणून घातलेला नाहीं. तर ती त्या मार्गांतील एक देवता आहे, या उद्देशानें तो शब्द योजिला आहे. कांहीं ध्यानयोगी जलसमाधि घेतात, कांहीं ब्रह्मोपासक संन्यासी असतात, त्यांच्या देहाला अग्नि देत नाहींत, हें प्रसिद्धच आहे. तेव्हां 'अग्नीपासूनच या दोन्ही मार्गांना सुरवात होते,' असें जर म्हटलें तर त्या ध्यानयोग्यांना देवयानमार्ग मिळणें शक्य नाहीं. यास्तव येथील 'अग्नि' शब्दाचा साक्षात् अग्नि असा अर्थ घेतां येत नाहीं. अग्निदेवताच घेतली पाहिजे. तसें केलें तरच 'कालं वक्ष्यामि' म्ह० 'मी तो काल सांगतो' असें जें भगवानांनीं २३ व्या श्लोकांत म्हटलें आहे, तें उपपन्न होतें. शिवाय पितृयाणमार्गाला 'धूमादिमार्ग' हें दुसरें नांव आहे, असें रहस्यकारच ७३५ पृष्ठावर सांगतात. पण त्या मार्गाच्या आरंभीं अग्नि जर अध्याहृत घ्यावयाचा असता तर त्याला धूमादिमार्ग म्हणतां आलें नसतें. वरील अग्निशब्दाप्रमाणेंच येथील 'धूम'शब्दानेंहि देवता विवक्षित आहे. साक्षात् बाह्य धूम विवक्षित नाहीं. रहस्यकारांनीं या संबंधीं २९२–२९५ पृष्ठांवर अधिक विचार केला आहे.

म्ह० रात्रीची अभिमानिनी देवता—**तथा कृष्णः-कृष्णपक्षदेवता**—तसाच कृष्ण म्ह० कृष्णपक्षाची देवता—**षण्मासाः दक्षिणायनं इति च पूर्ववत् देवता एव**—सहा महिने दक्षिणायन ही सुद्धां पूर्वींप्रमाणें देवताच—**तत्र योगी-कर्मी चन्द्रमसि भवं चांद्रमसं ज्योतिः-फलं**—त्या देवतांच्या समीप गेलेला योगी म्ह० कर्मी चन्द्रमामध्यें असलेली जी चांद्रमस ज्योति त्या फलास—**प्राप्य-भुक्त्वा तत्क्षयात् निवर्तते**—प्राप्त होऊन तें चांद्रमस ज्योतिरूप फल भोगून त्याच्या क्षयामुळें -कर्मजन्य पुण्याचा फलोपभोगानें क्षय झाल्यानें पुनःनिवृत्त होतो. यालोकीं परत येतो.२५

## शुक्लकृष्णे गती ह्येते जगतः शाश्वते मते ।
## एकया यात्यनावृत्तिमन्ययाऽऽवर्तते पुनः ॥ २६ ॥

**अन्वयार्थ—जगतः**—ज्ञान-कर्माधिकृत जनांच्या—**एते**—या दोन—**शुक्लकृष्णे**—प्रकाश-अप्रकाशरूप—**गती**—गती-मार्ग—**शाश्वते मते**—नित्य मानलेल्या आहेत—**एकया**—यांतील एका गतीनें योगी-ध्यानी—**अनावृत्तिं**—क्रममुक्तीला—**याति**—प्राप्त होतो व—**अन्यया**—दुसऱ्या गतीनें कर्मी—**पुनः आवर्तते**—पुनः परत येतो. २६

**शुक्लेति । शुक्लकृष्णे शुक्ला च कृष्णा चेति शुक्लकृष्णे ज्ञानप्रकाशकत्वाच्छुक्ला तदभावात्कृष्णा । एते शुक्लकृष्णे हि गती जगत इत्यधिकृतानां ज्ञानकर्मणोर्न जगतः सर्वस्यैते गती संभवतः । शाश्वते नित्ये संसारस्य नित्यत्वान्मते अभिप्रेते । तत्रैकया शुक्लया यात्यनावृत्तिमन्ययेतरयाऽऽवर्तते पुनर्भूयः ॥ २६ ॥**

**भाष्यार्थ—'शुक्ल०' इति**—'शुक्लकृष्णे०' या श्लोकानें या दोन मार्गांचें नित्यत्व सांगतात—**शुक्लकृष्णे-शुक्ला च कृष्णा च इति शुक्लकृष्णे ज्ञानप्रकाशकत्वात् शुक्ला तद्भावात् कृष्णा**—शुक्ला व कृष्णा=शुक्लकृष्ण, ज्ञानप्रकाशकत्वामुळें शुक्ला व त्याच्या अभावामुळें कृष्णा.[ विद्याप्राप्यत्वामुळें म्ह०उपासनेनें-देवताज्ञानानें प्राप्त होण्यास योग्य असल्यामुळें व अर्चिः, दिवस इत्यादि प्रकाशानें उपलक्षित झाल्यामुळें देवयानगति शुक्ला आहे व ज्ञानप्रकाशकत्वाच्या अभावामुळें म्ह० धूमादि अप्रकाशानें उपलक्षित व अविद्याप्राप्य-कर्मानें प्राप्त होण्यास योग्य असल्यामुळें पितृयाणगति कृष्णा आहे—**शुक्लकृष्णे हि एते गती**—शुक्ला व कृष्णा या श्रुतींत प्रसिद्ध असलेल्या दोन गती—**जगतः इति ज्ञानकर्मणोः अधिकृतानां सर्वस्य जगतः एव एते गती न संभवतः**—'जगतः' म्ह० ज्ञान व कर्म यांचे जे अधिकृत आहेत, शास्त्रानें ज्यांना ज्ञानाचा व कर्माचा अधिकार दिला आहे त्यांच्या (या दोन गती शाश्वत आहेत.) कारण

---

पण त्याला संक्षिप्त उत्तर वर येऊन गेलेंच असल्यामुळें आम्ही येथें अधिक विस्तार करीत नाहीं. ब्रह्मसूत्रशांकरभाष्यार्थांत त्याचा सविस्तर विचार करूं.कारण त्याचा त्या भाष्यार्थी अधिक संबंध आहे.

सर्व जगाच्याच या दोन गती संभवत नाहींत.—**शाश्वते-नित्ये संसारस्य नित्यत्वात् मते-अभिप्रेते**—शाश्वत म्ह० नित्य, संसार नित्य असल्यामुळें त्या दोन गतीहि नित्य मानलेल्या आहेत. त्या नित्य अभिप्रेत म्ह० इष्ट आहेत. [ज्ञानावांचून संसाराची निवृत्ति होत नाहीं, व ज्ञान अत्यंत दुर्लभ आहे, म्हणून संसार नित्य होय. अर्थात् नित्य म्ह० अत्यंत अविनाशी नव्हे. संसार असेपर्यंत या गतीहि असणारच.]—**तत्र एकया शुक्लया अनावृत्तिं याति अन्यया इतरया-पुनः-भूयः आवर्तते**—त्या दोन गतींतील एका म्ह० शुक्ल गतीनें अनावृत्तीला म्ह० क्रममुक्तीला प्राप्त होतो व इतर म्ह० कृष्णगतीनें पुनरपि म्ह० भोक्तव्य पुण्यकर्मांचा क्षय झाला असतां अवशिष्ट राहिलेल्या कर्मानें येथें जन्म घेण्यासाठीं परत येतो. २६.

**नैते सृती पार्थ जानन्योगी मुह्यति कश्चन ।**
**तस्मात्सर्वेषु कालेषु योगयुक्तो भवार्जुन ॥ २७ ॥**

**अन्वयार्थ**—**हे पार्थ**—हे अर्जुना !—**एते सृती**—हे दोन मार्ग—**जानन्**—जाणणारा—**कश्चन योगी**—कोणीहि योगी—**न मुह्यति**—मोहित होत नाहीं—**तस्मात्**—म्हणून—**हे अर्जुन**—हे पार्था !—**सर्वेषु कालेषु**—सर्व कालीं—**योगयुक्तः**—तूं समाहित चित्त—**भव**—हो. २७

**नैते इति । नैते यथोक्ते सृती मार्गौ पार्थ जानन्संसारायैकाऽन्या मोक्षाय चेति योगी न मुह्यति कश्चन कश्चिदपि । तस्मात्सर्वेषु कालेषु योगयुक्तः समाहितो भवार्जुन॥**

**भाष्यार्थ**—**'नैते०' इति**—या गतींना उपास्यत्व आहे, हें सुचविण्यासाठीं त्यांच्या विज्ञानाची 'नैते०' या श्लोकानें स्तुति करितात—**पार्थ एते यथोक्ते सृती-मार्गौ संसाराय एका च मोक्षाय अन्या इति जानन् कश्चन-कश्चित् अपि योगी न मुह्यति**—अर्जुना ! या पूर्वोक्त दोन सृतींना म्ह० दोन मार्गांना त्यांतील एक संसाराला व दुसरा मोक्षाला-क्रममुक्तीला कारण होतो, असें जाणणारा कोणीहि योगी मोहित होत नाहीं. [ गतीचेंहि ध्यान करणारा ध्याननिष्ठ योगी मोहित होत नाहीं. दक्षिणमार्ग देणारें केवल कर्म आपलें कर्तव्य आहे, असें समजत नाहीं. असो; याप्रमाणें योग म्ह० ध्यान क्रममुक्ति हें फल देणारें असल्यामुळें तें नित्य कर्तव्य आहे असें सिद्ध झालें, असा आतां उपसंहार करितात-]—**अर्जुन तस्मात् सर्वेषु कालेषु**

---

१ मुळांत 'नैते सृती जानन् योगी' असें जरी म्हटलें आहे तरी रहस्यकार त्याचा अर्थ 'या दोन सृति-मार्ग तत्त्वतः जाणणारा कोणताहि कर्मयोगी' असा करतात. पण येथें गतीचें नुसतें ज्ञान विवक्षित नसून ध्यान विवक्षित आहे. वास्तव 'तत्त्वतः जाणणारा' हे शब्द येथें अप्रस्तुत आहेत. तसेंच 'योगयुक्तो भवार्जुन' याचा अर्थ कर्मयोगयुक्त हो, असा करणेंहि प्रकरणाला सोडून आहे. येथील योगी म्हणजे ध्यानयोगीच होय, हें पुढील श्लोकांवरून स्पष्ट होत आहे.

योगयुक्तः-समाहितः भव—अर्जुना ! म्हणून तूं सर्वकालीं योगयुक्त-समाहित-चित्त हो. २७.

**वेदेषु यज्ञेषु तपःसु चैव दानेषु यत्पुण्यफलं प्रदिष्टम्।**
**अत्येति तत्सर्वमिदं विदित्वा योगी परं स्थानमुपैति चाद्यम्॥**

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे तारकब्रह्मयोगो नामाष्टमोऽध्यायः॥ ८॥

**अन्वयार्थ—योगी**—ध्यान-उपासना करणारा पुरुष—**इदं विदित्वा**—या अध्यायांत सात प्रश्नांचा निर्णय करून जें कांहीं सांगितलें आहे तें जाणून—**वेदेषु**—वेदाध्ययनांत—**यज्ञेषु**—यज्ञानुष्ठानांत—**तपःसु**—तपश्चर्येत—**च एव**—आणि—**दानेषु**—दानांत—**यत् पुण्यफलं प्रदिष्टं**—जें पुण्यफल सांगितलें आहे—**तत् सर्वं**—तें सर्व—**अत्येति**—उल्लंघन करून जातो—**च**—आणि—**आद्यं परं स्थानं**—अगदीं मूळ कारणरूप ब्रह्मपदाला—**उपैति**—प्राप्त होतो. २८

**शृणु योगस्य माहात्म्यम्—वेदेषु सम्यगधीतेषु यज्ञेषु च साद्गुण्येनानुष्ठितेषु तपःसु च सुतप्तेषु दानेषु च सम्यग्दत्तेषु यदेतेषु पुण्यफलं पुण्यस्य फलं पुण्यफलं प्रदिष्टं शास्त्रेणात्येत्यतीत्य गच्छति तत्सर्वं फलजातमिदं विदित्वा सप्तप्रश्ननिर्णयद्वारेणोक्तं सम्यगवधार्यानुष्ठाय योगी परं प्रकृष्टमैश्वरं स्थानमुपैति प्रतिपद्यते, आद्यमादौ भवं कारणं ब्रह्मेत्यर्थः**

इति श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यगोविन्दभगवत्पूज्यपादशिष्यश्रीमच्छंकरभगवतः कृतौ श्रीभगवद्गीताभाष्ये ब्रह्माक्षरनिर्देशो नाम अष्टमोऽध्यायः॥ ८॥

**भाष्यार्थ**—( श्रद्धावृद्धि होण्यासाठीं योगाची स्तुति-)—**योगस्य माहात्म्यं शृणु**—तूं आतां योगाचें माहात्म्य ऐक.—**वेदेषु-सम्यक् अधीतेषु**—उत्तम प्रकारें म्ह० हातांत पवित्रकें घालून, पूर्वाभिमुख बसून वगैरे नियमपूर्वक अध्ययन केलेल्या वेदांमध्यें—**च साद्गुण्येन अनुष्ठितेषु यज्ञेषु**—व साद्गुण्यानें-सद्गुणत्वानें-म्ह० अंगोपांगांसह अनुष्ठिलेल्या यज्ञांमध्यें,—**च सुतप्तेषु तपःसु**—आणि उत्तम प्रकारें म्ह० मन, बुद्धि इत्यादिकांच्या ऐकाग्र्यपूर्वक आचरिलेल्या तपांमध्यें—**च सम्यग्दत्तेषु दानेषु**—आणि उत्तम प्रकारें-यथाशास्त्र-देश, काल, पात्र पाहून दिलेल्या दानांमध्यें—**एतेषु शास्त्रेण यत् पुण्यफलं-पुण्यस्य फलं पुण्यफलं प्रदिष्टं**—या सर्वांमध्यें शास्त्रानें जें पुण्यफल-पुण्याचें जें फल तें पुण्यफल, सांगितलेलें आहे—**तत् सर्वं फलजातं इदं विदित्वा अत्येति-अतीत्य गच्छति**—तें सर्व प्रकारचें फल हें जाणून उल्लंघून जातो-त्या सर्वांचें उल्लंघन करितो-त्या सर्वांच्या पुण्यफलाहून अधिक फलास प्राप्त होतो. ( आतां 'इदं-हें'-या शब्दाचा अर्थ व्यक्त करि-

---

१ भगवद्गीतेंत वैदिकसंप्रदायाला अनुसरून यज्ञ, दान व तप यांनाच कर्मयोग म्हटलें आहे. तिसऱ्या अध्यायांतहि पंचमहायज्ञरूप कर्मयोग सांगितला आहे. या श्लोकांत

तात-)—**सप्तप्रश्ननिर्णयद्वारेण उक्तं**—हें म्ह० सात प्रश्नांच्या निर्णयाच्या द्वारा सांगितलेलें हें जाणून, [ पूर्वोक्त सर्व फलाचें उल्लंघन करतो. 'अधियज्ञः कथं कः अत्र' यांतील 'कथं' व 'कः' यावरून दोन प्रश्नांची कल्पना करून एकंदर आठ प्रश्न कोणी मानतात. पण भगवानांचें प्रतिवचन पाहिल्यावर अर्जुनानें एकंदर सातच प्रश्न केले आहेत, असा निश्चय होतो ]—**(विदित्वा) सम्यक् अवधार्य-अनुष्ठाय**—हें सर्व सांगितलेलें उत्तम प्रकारें जाणून म्ह० अनुष्ठानानें निश्चित करून—**योगी-परं-प्रकृष्टं ऐश्वरं स्थानं उपैति-प्रतिपद्यते**—प्रकृत ध्यानयोगी सर्वोत्तम,ईश्वराच्या-व्यापक परमात्म्याच्या स्थानास जातो-प्राप्त होतो-[ ज्यांत सर्व राहतें तें स्थान परमपद.त्याचेंच आणखी एक विशेषण-]—**आद्यं-आदौ भवं कारणं ब्रह्म इत्यर्थः**—आद्य म्ह० आरंभीं असते तें आद्य म्ह० कारण, ब्रह्म असा याचा भावार्थ.[ ध्यानरूप योगाचें अनुष्ठान केल्यानें तो योगी सर्व फलांहून श्रेष्ठ अशा मोक्षरूप फलास क्रमाने प्राप्त होतो. या अध्यायांत अर्जुनाच्या सात प्रश्नांचें उत्तर देऊन व योगमार्गाचें दिग्दर्शन करून तत्पदार्थाचे 'ध्येय' या रूपानें व्याख्यान केलें. ] २८.

इति भगवान् श्रीकृष्णांनीं गायलेल्या उपनिषदांतील-रहस्यविद्येतील ब्रह्मविद्येपैकीं योग-उपाय-शास्त्रांतील तारकब्रह्मयोग (अक्षरब्रह्मनिर्देश) नांवाचा आठवा अध्याय विष्णुशर्मकृत सान्वयार्थ-सटीप-भाष्य-भाष्यार्थासह समाप्त झाला.

---

वेदाध्ययन, यज्ञ,दान,तप यांच्या पुण्यफलांचे उल्लंघन योगी करतो, असें म्हटलें आहे. त्यावरून येथील योगी म्हणजे रहस्यकार म्हणतात त्याप्रमाणें कर्मयोगी नव्हे हें उघड होतें.

# अध्याय नववा.

## राजविद्या-राजगुह्ययोग.

**अष्टमे नाडीद्वारेण धारणायोगः सगुण उक्तः । तस्य च फलमग्न्यर्चिरादिक्रमेण कालान्तरे ब्रह्मप्राप्तिलक्षणमेवानावृत्तिरूपं निर्दिष्टम् । तत्रानेनैव प्रकारेण मोक्षप्राप्तिफलमधिगम्यते नान्यथेति तदाशङ्काव्याविवृत्सया श्रीभगवान् उवाच—**

**भाष्यार्थ**—(पूर्वोत्तर अध्यायांची संगति-)—**अष्टमे नाडीद्वारेण सगुणः धारणायोगः उक्तः**—आठव्या अध्यायांत सुषुम्ना नाडीच्या द्वारा 'धारणा' या अंगानें युक्त असा धारणायोग, सर्वद्वारांचें संयमन करणें या गुणासह सांगितला—**च तस्य अग्निः-अर्चिरादिक्रमेण कालान्तरे ब्रह्मप्राप्तिलक्षणं एव अनावृत्तिरूपं फलं निर्दिष्टं**—आणि त्याचें अग्नि, ज्योति इत्यादि क्रमानें—देवयान मार्गानें कालान्तरीं ब्रह्मप्राप्ति होणें या स्वरूपाचेंच अनावृत्तिरूप फल सांगितलें—**तत्र अनेन एव प्रकारेण मोक्षप्राप्तिफलं अधिगम्यते अन्यथा न इति**—पण असा अर्थ सिद्ध झाला असतां,याच प्रकारानें मोक्षप्राप्तिरूप फल प्राप्त होतें दुसऱ्या कोणत्याही प्रकारें नाहीं, [म्ह० मोक्ष देवयानमार्गानें गेल्यानेंच होतो, दुसऱ्या कोणत्याहि मार्गानें किंवा ज्ञानानें नाहीं, अशी शंका येते.-]—**तदाशंकाव्याविवृत्सया श्रीभगवान् उवाच**—त्या शंकेची व्यावृत्ति करण्याच्या इच्छेनें श्रीभगवान् म्हणाले—

---

१ या अध्यायाच्या आरंभींच रहस्यकार म्हणतात-" कर्मयोगाचें आचरण करणाऱ्या पुरुषास परमेश्वराचें पूर्ण ज्ञान होऊन मनाची शांति किंवा मुक्तावस्था कशी प्राप्त होते..." इत्यादि. पण ज्ञानोत्तर आयुष्यक्रमणाचे दोन मार्ग सांगण्यासाठी गीतेचा आरंभ आहे, या म्हणण्याशीं प्रस्तुत म्हणणें जुळत नाहीं. कारण येथें कर्मयोगाचें आचरण करणाऱ्या पुरुषाला पूर्ण ज्ञान होतें, असें म्हटल्यामुळें कर्मयोग ज्ञानाचें साधन ठरतें, व गीतेचा आरंभ तर ज्ञानोत्तर काय करावें, हें सांगण्यासाठीं आहे. तेव्हां याची संगति कशी काय लावावयाची ? असो. रहस्यकार म्हणतात-" यासच भक्तिमार्ग म्हणतात व अव्यक्तोपासना म्ह० ज्ञानमार्ग व व्यक्तोपासना म्ह० भक्तिमार्ग ( गी. र. ४१२ ). या मार्गांत परमेश्वराचें स्वरूप प्रेमगम्य व व्यक्त म्ह० प्रत्यक्ष कळणारें असतें, व त्या व्यक्त स्वरूपाचें ९-१२ या चार अध्यायांत विस्तृत निरूपण केलें आहे. पण हा भक्तिमार्गहि स्वतंत्र नसून सातव्या अध्यायांत कर्मयोगसिद्ध्यर्थ आरंभिलेल्या ज्ञानविज्ञानाचाच एक भाग आहे." वगैरे पण व्यक्तोपासना म्ह० भक्तिमार्ग व अव्यक्तोपासना म्ह० ज्ञानमार्ग हें म्हणणें प्रमाणशून्य आहे. ती नुस्ती कल्पना आहे. कारण ज्ञान व कर्म हे दोन परस्परप्रतियोगी शब्द आहेत. ज्ञानमार्ग म्ह० शास्त्रोक्त कर्मांचा ज्यांत लेशहि नाहीं तो मार्ग, अर्थात् तो भक्तिमार्गाचा प्रतियोगी होऊं शकत नाहीं. उपासना व्यक्त—सगुण ब्रह्माची असो, कीं अव्यक्त—निर्गुण ब्रह्माची असो, ती केव्हांहि उपासनाच. उपासना हा ज्ञानमार्ग केव्हांच होणार नाहीं.

**श्रीभगवान् उवाच**—श्रीभगवान् म्हणाले—

**इदं तु ते गुह्यतमं प्रवक्ष्याम्यनसूयवे ।**
**ज्ञानं विज्ञानसहितं यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात् ॥१॥**

**अन्वयार्थ**—**तु**—आतां—**इदं गुह्यतमं विज्ञानसहितं ज्ञानं**—हें अतिशय गुह्य अनुभवासह आत्मज्ञान—**अनसूयवे**—माझ्या गुणांमध्ये दोषदृष्टि न ठेवणाऱ्या—**ते**—तुला—**प्रवक्ष्यामि**—सांगेन—**यत्**—जें ज्ञान—**ज्ञात्वा**—जाणून-झालें असतां—**अशुभात्**—अशुभ संसारापासून—**मोक्ष्यसे**—तूं मुक्त होशील. १.

**इदं ब्रह्मज्ञानं वक्ष्यमाणमुक्तं च पूर्वेष्वध्यायेषु तद्बुद्धौ संनिधीकृत्येदमित्याह । तुशब्दो विशेषनिर्धारणार्थः । इदमेव सम्यग्ज्ञानं साक्षान्मोक्षप्राप्तिसाधनं "वासुदेवः सर्वमिति" "आत्मैवेदं सर्वम्" "एकमेवाद्वितीयम्" इत्यादिश्रुतिस्मृतिभ्यः । नान्यत् । "अथ येऽन्यथाऽतो विदुरन्यराजानस्ते क्षय्यलोका भवन्ति" इत्यादिश्रुतिभ्यश्च । ते तुभ्यं गुह्यतमं गोप्यतमं प्रवक्ष्यामि कथयिष्याम्यनसूयवेऽसूयारहिताय । किं तत्, ज्ञानं, किंविशिष्टं विज्ञानसहितमनुभवयुक्तम् । यज्ज्ञानं ज्ञात्वा प्राप्य मोक्ष्यसेऽशुभात्संसारबन्धनात् ॥**

**भाष्यार्थ**—**इदं-ब्रह्मज्ञानं वक्ष्यमाणं च पूर्वेषु अध्यायेषु उक्तं तत् बुद्धौ संनिधीकृत्य 'इदं' इति आह**—हें ब्रह्मज्ञान कीं, जें पुढें सांगावयाचें आहे व पूर्वींच्या अध्यायांत सागितलेलें आहे तें बुद्धींत संनिध करून-पूर्वोत्तरग्रंथाच्या आलोचनानें ते सर्व अन्तःकरणात आणून 'हे ब्रह्मज्ञान' असे भगवान् म्हणत आहेत.—**'तु'-शब्दः विशेषनिर्धारणार्थः**—येथील 'तु' हा शब्द प्रकृत ध्यानाहून ज्ञान विशिष्ट आहे, हें द्योतित करण्यासाठीं आहे. ( त्याच्या अर्थाचेंच स्पष्टीकरण करितात-)—**इदं एव सम्यग्ज्ञानं साक्षात् मोक्षप्राप्तिसाधनं**—हेंच सम्यग्ज्ञान साक्षात् मोक्षप्राप्तीचें साधन आहे. ( याविषयीं श्रुतिस्मृतींचे प्रमाण-)—**'वासुदेवः सर्वं इति' 'आत्मैवेदं सर्वं' 'एकं एवाद्वितीयं' इत्यादिश्रुतिस्मृतिभ्यः**—'वासुदेव हे सर्व आहे ' असे जाणणारा ज्ञानी मला प्राप्त होतो. (गी.भा.अ. ७.१९ पृ.६२२ पहा) 'हें सर्व आत्माच आहे'

---

तथापि रहस्यकारांनी ज्ञानमार्ग व ज्ञाननिष्ठा या शब्दांच्या अर्थात भेद दाखविण्याचा यत्न ४१२ पृष्ठावर केला आहे. पण तो पृ. ३०३, ६४३ येथील 'ज्ञाननिष्ठा व कर्मनिष्ठा हे दोन स्वतंत्र तुल्यबल मार्ग ' इत्यादि उपपादनाच्या विरुद्ध आहे. ' भक्तिमार्गांत परमेश्वराचें स्वरूप व्यक्त असते ' हे म्हणणें प्रामादिक आहे. ईश्वराचे स्वरूप व्यक्त केव्हांच नसतें. प्रतिमा, प्रतीक वगैरे हे ईश्वराचे व्यक्त स्वरूप नव्हे. तें मदाधिकाऱ्यांच्या उपासनेसाठीं कल्पिलेलें, अर्थात् मायिक स्वरूप आहे. ते खरें नव्हे. परमात्मा इंद्रियांचा विषय नाहीं. अवाङ्मनसगोचर आहे. त्यामुळे ९-१२ अध्यायांत व्यक्त स्वरूपाचे विस्तृत निरूपण केलें आहे, हें म्हणणें बरोबर नाहीं, व तें पुढील अध्यायांचें विचारपूर्वक विवेचन केलें असतां कोणालाहि सहज कळेल. ' कर्मयोगाच्या सिद्ध्यर्थ ज्ञानविज्ञानाचा आरंभ ' ही सत् कल्पना नसून असत् कल्पना आहे, हें आम्हीं वर दाखविलेंच आहे.

–छान्दो.भाष्यार्थ पृ. ५६८ 'एकच व अद्वितीय' छान्दो.भाष्यार्थ पृ. ४१५. इत्यादि श्रुतिस्मृतीवरून हेच सिद्ध होतें—**अन्यत् न**—दुसरें कोणतेंहि मोक्षाचें साधन नाहीं. [ अर्थात् अद्वैत ज्ञानाहून भिन्न असलेलें जे द्वैतज्ञान तेंहि मोक्षाचें साधन आहे, असें जें कित्येकांचें मत आहे ते बरोबर नाही. द्वैतज्ञान मोक्ष देण्यास समर्थ नाहीं, याविषयी श्रुतीचें प्रमाण देतात–]—'**अथ येऽन्यथातो विदुः अन्यराजानः ते क्षय्यलोका भवन्ति**–'**इत्यादि श्रुतिभ्यः च**—'पण जे याहून उलट जाणतात ते 'अन्यराजानः' होतात म्ह० त्यांचा स्वामी त्यांहून निराळा असतो. ते क्षय्यलोक होतात. त्यांचे लोक म्ह० फल क्षय पावणारें असते,' अशा–द्वैतज्ञानानें मोक्ष मिळत नाहीं, असे सांगणाऱ्याहि श्रुति आहेत.—**ते–तुभ्यं–अनसूयवे–असूयारहिताय गुह्यतमं–गोप्यतमं प्रवक्ष्यामि**–तुला–असूयारहित अशा तुला गुह्यतम म्ह० अतिशय गुप्त ठेवण्यास योग्य असलेलें सांगेन—**किं तत्, ज्ञानं**—तें काय, तर ज्ञान—**किंविशिष्टं विज्ञानसहितं–अनुभवयुक्तं**—किंविशिष्ट–कोणत्या विशेषणाने विशिष्ट असें ते गुह्यतम ज्ञान ? विज्ञानसहित–अनुभवयुक्त ज्ञान,—**यत्–ज्ञानं ज्ञात्वा–प्राप्य अशुभात्–संसारबन्धनात् मोक्ष्यसे**—जे ज्ञान प्राप्त झाले असतां अशुभापासून म्ह० संसारबंधनांतून मुक्त होशील. १.

## राजविद्या राजगुह्यं पवित्रमिदमुत्तमम् ।
## प्रत्यक्षावगमं धर्म्यं सुसुखं कर्तुमव्ययम् ॥ २ ॥

**अन्वयार्थ—राजविद्या**—हे ज्ञान विद्यांचा राजा,—**राजगुह्यं**—गुह्यांचा राजा,—**पवित्रं**—अत्यंत पावन—**इदं उत्तमं**—असें हें उत्तम ज्ञान आहे.—**प्रत्यक्षावगमं**—याचें ज्ञान–अनुभव प्रत्यक्ष येतो —**धर्म्यं**—हे धर्माला धरून आहे.—**कर्तुं सुसुखं**—हें संपादन करण्यास सुलभ व—**अव्ययं**—अव्यय आहे. कर्मांच्या फलाप्रमाणें याचें फल क्षीण होत नाहीं. २.

**तच्च—राजविद्या विद्यानां राजा दीप्त्यतिशयत्वात् । दीप्यते हीयमतिशयेन ब्रह्मविद्या सर्वविद्यानाम् । तथा राजगुह्यं गुह्यानां राजा । पवित्रं पावनमिदमुत्तमं सर्वेषां पावनानां शुद्धिकारणमिदं ब्रह्मज्ञानमुत्कृष्टतमम् । अनेकजन्मसहस्रसंचितमपि धर्माधर्मादि समूलं कर्म क्षणमात्राद्भस्मी करोति यतोऽतः किं तस्य पावनत्वं वक्तव्यम् । किंच प्रत्यक्षावगमं प्रत्यक्षेण सुखादेरिवावगमो यस्य तत्प्रत्यक्षावगमम् । अनेकगुणवतोऽपि धर्मविरुद्धत्वं दृष्टं न तथाऽऽत्मज्ञानं धर्मविरोधि किंतु धर्म्यं धर्मादनपेतम् । एवमपि स्याद्दुःसंपाद्यमित्यत आह सुसुखं कर्तुं यथा रत्नविवेकविज्ञानम् । तत्राल्पायासानां कर्मणां सुखसंपाद्यानामल्पफलत्वं दुष्कराणां च महाफलत्वं दृष्टमितीदं तु सुखसंपाद्यत्वात्फलक्षयाद्व्येतीति प्राप्त इत आहाव्ययं नास्य फलतः कर्मवद्व्ययोऽस्तीत्यव्ययमतः श्रद्धेयमात्मज्ञानम् ॥२॥**

**भाष्यार्थ—तम्**—त्या ज्ञानाकडे श्रोत्यांची प्रवृत्ति व्हावी, म्हणून त्याची 'राजविद्या०' या श्लोकानें स्तुति करितात—**राजविद्या-विद्यानां राजा दीप्त्यतिशयत्वात्**—राजविद्या म्ह० विद्यांचा राजा–ही ब्रह्मविद्या सर्व विद्यांचा राजा–सर्व विद्यांमध्यें श्रेष्ठ आहे. कारण तिच्यामध्ये दीप्तीचे आधिक्य आहे—**इयं ब्रह्मविद्या सर्वविद्यानां अतिशयेन दीप्यते हि**—ही ब्रह्मविद्या सर्व विद्यांमध्यें फारच–अतिशय देदिप्यमान होते, हे प्रसिद्ध आहे. सर्वापेक्षां ब्रह्मज्ञांचा आदर लौकिकांतहि फार होत असतो.—**तथा राजगुह्यं-गुह्यानां राजा**—त्याचप्रमाणें हें ज्ञान राजगुह्य म्ह० गुह्यांतील राजा –श्रेष्ठ गुह्य आहे.—**इदं उत्तमं पवित्रं-पावनं**—हें उत्तम पवित्र–पावन आहे.—**इदं ब्रह्मज्ञानं सर्वेषां पावनानां उत्कृष्टतमं शुद्धिकारणं**—हे ब्रह्मज्ञान सर्व पावन वस्तूंतील अत्यंत उत्कृष्ट शुद्धिकारण आहे.—**यतः अनेकजन्मसहस्रसंचितं अपि धर्माधर्मादि कर्म क्षणमात्रात् समूलं भस्मी करोति**—ज्या अर्थी अनेक सहस्र जन्मांमध्यें संचय केलेल्याहि धर्माधर्मादि कर्माला ब्रह्मज्ञान एका क्षणांत समूल भस्म करते—**अतः तस्य पावनत्वं किं वक्तव्यं**—त्याअर्थी त्याचे पावनत्व–पवित्रत्व काय सांगावें ? **किंच प्रत्यक्षावगमं-प्रत्यक्षेण सुखादेः इव अवगमः यस्य तत् प्रत्यक्षावगमं**—तसेच हें ब्रह्मज्ञान प्रत्यक्षावगम आहे म्ह० प्रत्यक्षपणे सुखादिकांप्रमाणे ज्याचा अनुभव येतो ते प्रत्यक्षावगम [ म्ह० प्रत्यक्ष–स्वानुभव हेच या ज्ञानाविषयीं अवगम म्ह० प्रमाण आहे. किंवा ज्याचा अवगम म्ह० फल प्रत्यक्ष आहे, स्वर्गाप्रमाणे परोक्ष नाही, ते प्रत्यक्षावगम ज्ञान होय. ]—**अनेकगुणवतः अपि धर्मविरुद्धत्वं दृष्टं तथा आत्मज्ञानं धर्मविरोधि न किंतु धर्म्यं-धर्मात् अनपेतं**—एखाद्या अनेक गुणयुक्त पदार्थालाहि धर्मविरुद्धत्व असलेले दिसतें. म्ह० एखादा अनेक गुणांनी संपन्न असलेला पदार्थहि धर्मविरुद्ध असतो:पण तसें हें आत्मज्ञान धर्मविरोधि नाहीं तर धर्म्य म्ह० धर्माला सोडून नाही, धर्माला धरून–धर्माविरुद्ध आहे. ( तरी सुद्धां धर्माप्रमाणें तें क्लेशसाध्य असेल, म्हणून म्हणशील तर–)—**एवं अपि दुःसंपाद्यं स्यात् इति अतः आह**—तें ज्ञान धर्म्य जरी असलें तरी दुःसंपाद्य म्ह० संपादन करण्यास फार कठिण असेल, असे कोणी म्हणेल म्हणून भगवान् म्हणतात —**यथारत्नविवेकविज्ञानं ( तथा ) कर्तुं सुसुखं**—जसे रत्नाचें विवेकज्ञान अनायासानें होतें, रत्नाची परीक्षा कशी करावी, हे एकदा तज्ज्ञाने सांगितले की मग नुसत्या संवयीनेंच अनायासानें ती जशी करितां येते, त्याप्रमाणें हें ब्रह्मज्ञान संपादन करण्यास फार क्लेश होत नाहींत, सहज अनायासानें तें होतें. (आतां 'अव्ययं' या विशे-

---

१ 'प्रत्यक्षावगमं' म्ह० प्रत्यक्ष बोध होणार, असा जो रहस्यकारांनी अर्थ केला आहे तो बरोबर नाहीं. कारण ब्रह्मज्ञानाचा प्रत्यक्ष बोध कसा होणार ? अर्थात् विज्ञानासह ज्ञानाला 'प्रत्यक्ष बोध होणारें' असें म्हणणें अयोग्य आहे. यास्तव त्याचा अर्थ भाष्यार्थांत जसा केला आहे, तसाच करणें सर्वथा उचित होय. शिवाय गुह्य ज्ञान सांगतों असें स्पष्ट म्हटलें असतांना, त्याला भक्तिमार्ग म्हणणे अगदीच अनुचित होय.

षणाचें विवरण-)—**तत्र अल्पायासानां सुखसंपाद्यानां कर्मणां अल्पफलत्वं च दुष्कराणां महाफलत्वं इति दृष्टं**—व्यवहारांत ज्यांच्यामध्यें आयास थोडे असून जीं आनायासानें सहज-संपादन करतां येतात, त्या कर्मांचे फल अल्प मिळतें व जीं कर्में दुष्कर असतात, त्यांचें फल मोठें मिळतें, असें आपण पाहिलें आहे.—**इदं तु सुखसंपाद्यत्वात् फलक्षयात् व्येति इति प्राप्तं**—पण हें तर सुखसंपाद्य असल्यामुळें म्ह० या ब्रह्मज्ञानाचें अनायासानें संपादन करितां येणें शक्य असल्यामुळें तें फलाचा क्षय झाल्यामुळें क्षय पावतें, असें येथें प्राप्त होतें, अशी शंका येते—**अतः आह-अव्ययं-कर्मवत् अस्य फलतः व्ययः नास्ति इति अव्ययं**—म्हणून भगवान् सांगतात-हें ब्रह्मज्ञान अव्यय आहे. याचा फलाच्या द्वारा व्यय होत नाहीं म्हणून हें अव्यय—**अतः आत्मज्ञानं श्रद्धेयं**—यास्तव हें आत्मज्ञान श्रद्धा ठेवण्यास योग्य आहे. २

**अश्रद्दधानाः पुरुषा धर्मस्यास्य परंतप ।**
**अप्राप्य मां निवर्तन्ते मृत्युसंसारवर्त्मनि ॥ ३ ॥**

**अन्वयार्थ— परंतप**—हे अर्जुना!—**अस्य धर्मस्य अश्रद्दधानाः**—या आत्मज्ञानरूप धर्मावर श्रद्धा न ठेवणारे—**पुरुषाः**—पुरुष—**मां**—मला—**अप्राप्य** प्राप्त न होऊन—**मृत्युसंसारवर्त्मनि**—मृत्युयुक्त संसारमार्गांत—**निवर्तन्ते**—निवृत्त होतात.संसारमार्गांत फिरून येतात. ३.

**ये पुनः—अश्रद्दधानाः श्रद्धाविरहिता आत्मज्ञानस्य धर्मस्यास्य स्वरूपे तत्फले च नास्तिकाः पापकारिणोऽसुराणामुपनिषदं देहमात्रात्मदर्शनमेव प्रतिपन्ना असुतृपः पुरुषाः परंतपाप्राप्य मां परमेश्वरं मत्प्राप्तौ नैवाऽऽशङ्केति मत्प्राप्तिमार्गसाधनभेदभक्तिमात्रमप्यप्राप्येत्यर्थः । निवर्तन्ते निश्चयेनाऽऽवर्तन्ते । क्क मृत्युसंसारवर्त्मनि मृत्युयुक्तः संसारो मृत्युसंसारस्तस्य वर्त्म नरकतिर्यगादिप्राप्तिमार्गस्तस्मिन्नेव वर्तन्त इत्यर्थः ॥ ३ ॥**

**भाष्यार्थ—**( आत्मज्ञानाख्य धर्मावर श्रद्धा ठेवणाऱ्या तन्निष्ठ पुरुषांना परम पदाची प्राप्ति होते, असें सांगून त्यापासून विमुख झालेल्या पुरुषांना संसाराची प्राप्ति होते, असें ‘ अश्रद्दधानाः० ’ या श्लोकानें सांगतात- )—**परंतप ये पुनः अश्रद्दधानाः- श्रद्धाविरहिताः**—हे अर्जुना,पण याच्या उलट जे अश्रद्धालु-श्रद्धाविरहित-श्रद्धाशून्य —**अस्य आत्मज्ञानस्य धर्मस्य स्वरूपे तत्फले च नास्तिकाः पापकारिणः असुराणां उपनिषदं-देहमात्र-आत्मदर्शनं एव प्रतिपन्नाः असुतृपः पुरुषाः**—(कशा विषयीं श्रद्धाशून्य?) या आत्मज्ञानरूप धर्माच्या स्वरूपाविषयीं व त्याच्या फलाविषयीं नास्तिक, पापाचरण करणारे, असुरींचें उपनिषद्-रहस्यविद्या म्ह० देह हाच आत्मा अशा प्रकारचें जें असुरांचें आत्मज्ञान त्यालाच प्राप्त झालेले प्राणांची इंद्रियांची तृप्ति करणारे पुरुष—**मां-परमेश्वरं अप्राप्य**—मला-परमेश्वराला प्राप्त न होतां

( पण अशा आत्मंभरी लोकांना भगवत्प्राप्तीची संभावनाच नाहीं. त्यामुळें 'अप्राप्य मां' हा अप्रसक्तप्रतिषेध ठरेल, अशी आशंका घेऊन सांगतात–)—**मत्प्राप्तौ आशंका एव न इति मत्प्राप्तिमार्गसाधनभेदभक्तिमात्रं अपि अप्राप्य च इत्यर्थः**—अशा लोकांना माझ्या प्राप्तीची तर शंकाच नको, यास्तव 'अप्राप्य मां' याचा–माझ्या प्राप्तीचा जो मार्ग ज्ञाननिष्ठा तिच्या साधनाचा एक प्रकार अशी जी भक्ति तिलाहि प्राप्त न होऊन–असा भावार्थ आहे. असो; माझ्या प्राप्तीच्या मार्गाच्या साधनालाहि प्राप्त न होतां—**निवर्तन्ते–निश्चयेन आवर्तन्ते**—निवृत्त होतात. निश्चयानें परत फिरतात;—**क्व मृत्युसंसारवर्त्मनि–मृत्युयुक्तः संसारः मृत्युसंसारः तस्य वर्त्म–नरक-तिर्यगादिप्राप्तिमार्गः तस्मिन् एव वर्तन्ते इत्यर्थः**—कोठें ? मृत्युसंसारमार्गामध्यें; मृत्युयुक्त जो संसार तो मृत्युसंसार· त्याचा मार्ग म्ह० नरक, तिर्यक्-योनि इत्यादिकांच्या प्राप्तीचा मार्ग, त्या मार्गांतच ते राहतात, असा याचा भावार्थ. [ या आत्मज्ञानरूप धर्मावर श्रद्धा न ठेवणारे अनात्मज्ञ मूढ ज्ञानप्राप्तीचा उपाय अशी जी भक्ति तिलाहि प्राप्त न होतां मृत्युयुक्त संसारमार्गांत फिरत राहतात. ] ३.

**मया ततमिदं सर्वं जगदव्यक्तमूर्तिना ।**
**मत्स्थानि सर्वभूतानि न चाहं तेष्ववस्थितः ॥ ४ ॥**
**न च मत्स्थानि भूतानि पश्य मे योगमैश्वरम् ।**
**भूतभृन्न च भूतस्थो ममात्मा भूतभावनः ॥ ५ ॥**

**अन्वयार्थ—मया अव्यक्तमूर्तिना**—ज्याचें स्वरूप व्यक्त नाहीं अशा मीं—**इदं सर्वं जगत्—हे** सर्व जगत्—**ततं**—व्यापलें आहे.—**सर्वभूतानि**—सर्व भूतें—**मत्स्थानि**—माझ्यामध्यें स्थित आहेत.—**च**—पण—**अहं**—मी—**तेषु**—त्या भूतांमध्यें—**न अवस्थितः**—अवस्थित नाहीं. मी त्या भूतांत राहिलेलों नाहीं.—**भूतानि**—सर्व प्राणी—**मत्स्थानि**—वस्तुतः माझ्यामध्यें—**न च**—नाहींत—**मे**—माझें—**ऐश्वरं**—ईश्वरसंबंधी—**योगं**—स्वरूप—**पश्य**—पहा.—**भूतभृत्**—मी सर्व भूतांचे धारण-पोषण करणारा आहे.—**च**—पण—**भूतस्थः न**—भूतांत राहिलेलों नाहीं.—**मम आत्मा**—माझें स्वरूप—**भूतभावनः**—सर्व भूतांना उत्पन्न करणारें आहे. ४-५

**स्तुत्याऽर्जुनमभिमुखीकृत्याऽऽह—मया मम यः परो भावस्तेन ततं व्याप्तं सर्वमिदं जगदव्यक्तमूर्तिना न व्यक्ता मूर्तिः स्वरूपं यस्य मम सोऽहमव्यक्तमूर्तिस्तेन मयाऽव्यक्तमूर्तिना करणागोचरस्वरूपेणेत्यर्थः । तस्मिन्मय्यव्यक्तमूर्तौ स्थितानि मत्स्थानि सर्वभूतानि ब्रह्मादीनि स्तम्बपर्यन्तानि । न हि निरात्मकं किंचिद्भूतं व्यवहारायावकल्पतेऽतो मत्स्थानि मयाऽऽत्मनाऽऽत्मवत्त्वेन स्थितान्यतो मयि स्थितानीत्युच्यन्ते ।**

**तेषां भूतानामहमेवाऽऽत्मेत्यतस्तेषु स्थित इति मूढबुद्धीनामवभासतेऽतो ब्रवीमि न चाहं तेषु भूतेष्ववस्थितो मूर्तवत्संश्लेषाभावेऽऽकाशस्याप्यन्तरतमो ह्यहम्। न ह्यसंसर्गि वस्तु क्वचिदाधेयभावेनावस्थितं भवति ॥ ४ ॥**

**भाष्यार्थ**—( स्तुति व निंदा यांच्या योगानें ज्ञाननिष्ठेचें श्रेष्ठत्व सिद्ध करून ज्ञानाचें व्याख्यान आरंभितात-)—**स्तुत्या अर्जुनं अभिमुखीकृत्य आह**—याप्रमाणें स्तुतीच्या योगाने अर्जुनाला ज्ञानाभिमुख करून भगवान् म्हणतात—**मया-मम यः परः भावः तेन-अव्यक्तमूर्तिना-न व्यक्ता मूर्तिः-स्वरूपं यस्य मम सः अहं अव्यक्तमूर्तिः तेन मया अव्यक्तमूर्तिना-करणागोचरस्वरूपेण इत्यर्थः**—मीं-माझा जो पर भाव त्यानें-अव्यक्त मूर्ति म्ह० ज्या माझी मूर्ति-स्वरूप व्यक्त नाहीं तो मी अव्यक्तमूर्ति; त्या मीं अव्यक्तमूर्तीने म्ह० ज्याचे स्वरूप इंद्रियांचा विषय होत नाहीं, अशा मीं असा याचा भावार्थ,—**इदं सर्वं जगत् ततं-व्याप्तं**—हें सर्व जगत् व्यापले आहे —**तस्मिन् मयि अव्यक्तमूर्तौ स्थितानि-मत्स्थानि सर्वभूतानि-ब्रह्मादीनि स्तम्बपर्यन्तानि**—त्या मज अव्यक्तमूर्तीमध्यें स्थित म्ह० मत्स्थ-सर्वभूतें-ब्रह्मादिस्तंभपर्यंत सर्व भूतें माझ्यामध्ये स्थित आहेत. ( तर मग भगवान् आधार व सर्वभूतें आधेय, असा भेद प्राप्त झाला. असे कोणी म्हणेल, म्हणून सांगतात-)—**निरात्मकं किंचित् भूतं व्यवहाराय न हि अवकल्पते अतः मत्स्थानि**—निरात्मक-आत्मरहित असें कोणतेंहि भूत व्यवहाराला समर्थ होत नाहीं. यास्तव सर्वभूतें मत्स्थ आहेत. म्हणजे—**मया आत्मना आत्मवत्त्वेन स्थितानि अतः मयि स्थितानि इति उच्यन्ते**—मज आत्म्याच्या योगानें आत्मवत्त्वानें-आत्मयुक्त होऊन तीं सर्व भूतें स्थित आहेत. म्हणून माझ्या ठिकाणीं तीं स्थित आहेत, अशीं म्हटलीं जातात.—**तेषां भूतानां अहं एव आत्मा इति अतः तेषु स्थितः इति मूढबुद्धीनां अवभासते**—त्या भूतांचा मीच आत्मा आहे. त्यामुळे मी त्यांच्यामध्यें स्थित आहें. असें मूढबुद्धि पुरुषांना भासते,—**अतः ब्रवीमि न च अहं तेषु भूतेषु अवस्थितः**—म्हणून म्हणतों कीं, मी त्या भूतांमध्यें अवस्थित नाहीं—**हि मूर्तवत् संश्लेषाभावेन अहं आकाशस्य अपि अन्तरतमः**—कारण मूर्त पदार्थाप्रमाणें संश्लेषाचा अभाव असल्यामुळें म्ह० साकार पदार्थाप्रमाणे माझा दुसऱ्या कोणाशीच संसर्ग होण्याचा संभव नसल्यामुळें मी आकाशाच्याहि अगदीं आंत राहणारा आहें. ( पण संश्लेषाभाव जरी असला तरी तुला आधेयत्व कां नाहीं ? तूं भूतांच्या आधारानें राहतोस, असें म्हणण्यास कोणती हरकत आहे ? उत्तर- )—**असंसर्गि वस्तु क्वचित् आधेयभावेन अवस्थितं न भवति हि**—कोणाशींहि संसर्ग न पावणारी वस्तु कोठेंच व केव्हांच आधेयभावानें अवस्थित होत नाहीं, हें प्रसिद्ध आहे. [ ज्याचें स्वरूप इंद्रियांचा विषय होत नाहीं, अशा मीं हें सर्व जगत् व्यापलें आहे. सर्व भूतें मजमध्यें स्थित आहेत, म्ह० मी त्यांचा आत्मा आहें व माझ्यामुळें तीं आत्मवान् झालीं आहेत. पण मी असंग असल्यामुळें त्यांच्यामध्यें स्थित नाहीं. ] ४.

**अत एवासंसर्गित्वान्मम—न च मत्स्थानि भूतानि ब्रह्मादीनि पश्य मे योगं युक्तिं घटनं मे ममैश्वरमीश्वरस्येममैश्वरं योगमात्मनो याथात्म्यमित्यर्थः। तथा च श्रुतिरसंसर्गित्वादसङ्गतां दर्शयति "असङ्गो न हि सज्जते" इति। इदं चाऽऽश्चर्यमन्यत्पश्य भूतभृदसंगोऽपि सन्भूतानि बिभर्ति न च भूतस्थो यथोक्तेन न्यायेन दर्शितत्वाद्भूतस्थत्वानुपपत्तेः। कथं पुनरुच्यतेऽसौ ममाऽऽत्मेति, विभज्य देहादिसंघातं तस्मिन्नहंकारमध्यारोप्य लोकबुद्धिमनुसरन्व्यपदिशति ममाऽऽत्मेति, न पुनरात्मन आत्माऽन्य इति लोकवदजानन्। तथा भूतभावनो भूतानि भावयत्युत्पादयति वर्धयतीति वा भूतभावनः॥ ५॥**

**भाष्यार्थ**—( अहोपण परमेश्वर जरी सर्व भूतामध्यें अवस्थित नसला तरी भूतें त्याच्यामध्ये आहेत, तेव्हां त्याला असंगत्व कसे ? उत्तर-)—**अतः एव असंसर्गित्वात् मम**—म्हणूनच म्ह० मला असंसर्गित्व असल्यामुळेंच—**ब्रह्मादीनि भूतानि मत्स्थानि न च**—ब्रह्मादि भूते मत्स्थ नाहींत,—**मे योगं-युक्तिं घटनं पश्य**—माझ्या योगाला म्ह० युक्तीला-घटनेला पहा—**मे-मम ऐश्वरं-ईश्वरस्य इमं ऐश्वरं योगं-आत्मनः याथात्म्यं इत्यर्थः**—माझ्या ऐश्वर-ईश्वराच्या या ऐश्वर योगाला म्ह० आत्म्याच्या यथात्म्याला-यथार्थस्वरूपाला असा याचा भावार्थ, [ तूं माझ्या निरुपाधिक असंग स्वरूपाला पहा-त्याकडे दृष्टि दे. ]—**तथा च 'असंगो न हि सज्जते' इति श्रुतिः असंसर्गित्वात् असंगतां दर्शयति**—त्याचप्रमाणें 'असंग आत्मा कोठेच सक्त होत नाहीं' ही श्रुति आत्म्याच्या असंसर्गित्वामुळें असंगत्व

---

१ रहस्यकार "ऐश्वर योग पश्य" याचा "पहा कशी ही माझी ईश्वरी करणी किंवा योगसामर्थ्य !" असा करितात, आणि टीपेत, "योग या शब्दाचा अर्थ अलौकिक सामर्थ्य किंवा युक्ति असा जरी केला तरी अव्यक्ताचे व्यक्त बनण्याचा हा योग किंवा युक्ति म्हणजेच माया होय, हें गी. ७.२५ वरील टीपेत व रहस्याच्या ९ व्या प्रकरणांत प्रतिपादन केले आहे. हा योग परमेश्वरास अत्यंत सुलभ किंबहुना परमेश्वराचा दास असल्यामुळे योगेश्वर," असे म्हणतात. पण ते बरोबर नाहीं. कारण योगशब्दाचा अर्थ यथार्थ स्वरूप असा आहे. आचार्यांनी योग म्ह० युक्ति, व युक्ति म्ह०घटना असा अर्थ केला आहे. पण रहस्यकार युक्ति म्ह० प्राकृत युक्ति असें समजून त्याचा अर्थ 'अव्यक्ताचें व्यक्त बनण्याची युक्ति म्ह० माया' असें म्हणतात, तें चूक आहे. अव्यक्ताचे व्यक्त बनण्याची युक्ति म्ह० माया नव्हे. माया ही एक परमात्म्याची अनिर्वचनीय शक्ति आहे. शिवाय व्यक्त बनण्याची युक्ति पाहिल्यानें 'भूतें मत्स्थ नाहींत' हे कसें सिद्ध होणार ? त्यापेक्षां 'माझें याथात्म्य पहा, माझें स्वरूप असंग आहे. माझा संसर्ग कोणाशींहि होत नाहीं. म्हणून भूते मत्स्थ नाहींत,' हें म्हणणें किती सयुक्तिक व सुबोध आहे ? 'योग परमेश्वराचा दास किंवा त्याला सुलभ असल्यामुळे त्याला योगेश्वर म्हणतात' ही असत्कल्पना आहे. 'योगेश्वर' या शब्दाचा खरा अर्थ काय आहे तो अ. ११ श्लोक ४ व अ. १८ श्लो. ७८, यावरील भाष्यांतच स्पष्ट होईल.

दाखविते. ( ईश्वर जर असंग आहे तर ' भूतें मत्स्थ आहेत ' असें कसें सांगितलें व एकदा तसें सांगून फिरून 'तीं मत्स्थ नाहीत ' असें त्याच्या विरुद्ध कसें सांगितलें आहे? उत्तर-)—**इदं च अन्यत् आश्चर्यं पश्य**—आणि हेंहि दुसरें आश्चर्य पहा—**भूतभृत्-असंगः अपि सन् भूतानि बिभर्ति च भूतस्थः न**—मी भूतभृत् आहें. असंग असूनहि भूतांना धारण करतो तो भूतभृत्; पण मी भूतस्थ नाहीं. भूतामध्यें स्थित नाहीं.—**यथोक्तेन न्यायेन दर्शितत्वात् भूतस्थत्वानुपपत्तेः**—कारण वर सांगितलेला जो असंगत्व न्याय त्या न्यायानें माझ्या भूतस्थत्वाची अनुपपत्ति आहे. [ परमात्मा असंग असल्यामुळें त्याचा भूतांशीं वस्तुतः संबंध होणें जरी शक्य नसलें तरी काल्पनिक संबंध होणें शक्य आहे. त्यामुळें त्यांत कांहीं विरोध नाहीं.]—**कथं पुनः उच्यते असौ मम आत्मा इति**—अहोपण आत्म्याहून आत्मा जर अन्य नाहीं तर भगवान् ' हा माझा आत्मा ' असे कसे म्हणत आहेत !—**लोकबुद्धिं अनुसरन् देहादिसंघातं विभज्य तस्मिन् अहंकारं अध्यारोप्य मम आत्मा इति व्यपदिशति**—( जसा अज्ञ मनुष्य वस्तुतत्त्वाला न जाणतां भेदाचा आरोप करून ' हा माझा ' अशा संबंधाचा अनुभव घेतो त्याप्रमाणें येथें संबंधाचा निर्देश नाहीं. कारण आत्म्यामध्ये स्वाभाविक भेद नाही. त्यामुळें वास्तविक आत्मभेद नसतांनाच ) व्यवहारांतील सामान्यलोकांच्या संबंधबुद्धीला अनुसरून भगवान् आत्म्याहून देहादिसंघाताला विभक्त करून त्यामध्यें अहंकाराचा अध्यारोप करून ' हा माझा आत्मा ' असा भेदाचा उल्लेख करितात. [ अर्थात् देहेंद्रियसंघाताचा ' माझा ' या शब्दानें उल्लेख केल्यामुळें त्याहून अगदीं भिन्न असलेल्या स्वरूपाचा ' आत्म 'शब्दानें निर्देश केला आहे. त्यामुळें हा भूतस्थ नाही, असा याचा भावार्थ. ]—**पुनः लोकवत् अजानन् आत्मनः आत्मा अन्यः इति न ( व्यपदिशति )**—पण भगवान् इतर लोकांप्रमाणें न जाणतां आत्म्याहून आत्मा निराळा आहे, असा उल्लेख करीत नाहींत. ( असो; पूर्वोक्त असंगत्वाचा अंगीकार करूनच आत्मा भूतांना उत्पन्न करतो, असे सांगतात-)—**तथा भूतभावनः भूतानि भावयति-उत्पादयति-वर्धयति इति वा भूतभावनः**—त्याचप्रमाणें माझा आत्मा भूतभावन आहे. भूतांची भावना करितो, त्यांना उत्पन्न करितो किंवा वाढवितो म्हणून भूतभावन. [ वस्तुतः भूतें माझ्यामध्यें स्थित नाहींत. माझें तात्त्विक स्वरूप पहा. मी भूतभृत्-भूतांना धारण करणारा आहें. पण भूतामध्यें स्थित नाहीं, माझा आत्मा भूतांना उत्पन्न करणारा आहे. ]५.

**यथाकाशस्थितो नित्यं वायुः सर्वत्रगो महान् ।**
**तथा सर्वाणि भूतानि मत्स्थानीत्युपधारय ॥ ६ ॥**

**अन्वयार्थ—यथा**—ज्याप्रमाणें—**सर्वत्रगः**—सर्व जागीं जाणारा—**महान्**—मोठा—**वायुः**—वायु—**नित्यं**—नेहमीं-हमेष—**आकाशस्थितः**—आकाशांत स्थित असतो—**तथा**—त्याप्रमाणें—**सर्वाणि भूतानि**—सर्व भूतें—**मत्स्थानि**—माझ्यामध्यें स्थित आहेत—**इति**—असा—**उपधारय**—निश्चय कर. ६.

**यथोक्तेन श्लोकद्वयेमोक्तमर्थं दृष्टान्तेनोपपादयन्नाह—यथा लोक आकाशस्थित आकाशे स्थितो नित्यं सदा वायुः सर्वत्र गच्छतीति सर्वत्रगो महान्परिमाणतस्तथाऽऽकाशवत्सर्वगते मय्यसंश्लेषेणैव स्थितानीत्येवमुपधारय जानीहि ॥ ६ ॥**

**भाष्यार्थ—यथोक्तेन श्लोकद्वयेन उक्तं अर्थं दृष्टान्तेन उपपादयन् आह** —पूर्वोक्त दोन श्लोकांनीं सांगितलेल्याच अर्थाचें [ म्ह० सृष्टि-स्थिति-संहारांचा आधार असंग आत्मा आहे, या अर्थाचें ] दृष्टान्तानें उपपादन करणारे भगवान् म्हणतात— **यथा लोके वायुः आकाशस्थितः-नित्यं-सदा आकाशे स्थितः**—ज्याप्रमाणें लौकिकांत वायु नित्य–सदा आकाशांत स्थित असतो, (वायु कसा ? उत्तर –) **—सर्वत्र गच्छति इति सर्वत्रगः**—सर्व ठिकाणीं जातो, म्हणून सर्वत्रग व— **महान्-परिमाणतः**—परिमाणानें फार मोठा [ असा वायु ज्याप्रमाणे नित्य आकाशांत स्थित असतो ]—**तथा आकाशवत् सर्वगते मयि असंश्लेषेण एव ( आकाशादीनि भूतानि ) स्थितानि इति एवं उपधारय-जानीहि**—त्याप्रमाणें–आकाशाप्रमाणें सर्वगत असलेल्या माझ्या ठिकाणीं असंबंधानेंच आकाशादिक भूतें स्थित आहेत, असे तूं जाण. [ सर्वत्र गमन करणारा व त्यामुळेच महत्परिमाणाचा वायु सदा म्ह० उत्पत्ति-स्थिति-लयकालीं जसा आकाशांत, त्याला कोणत्याहि प्रकारें संश्लेश न करितां राहतो, त्याप्रमाणें आकाशादि महाभूते आकाशासारख्या पूर्ण असंग प्रत्यगात्म्यामध्यें संश्लेषावांचून स्थितें आहेत, असे समज. ] ६.

**सर्वभूतानि कौन्तेय प्रकृतिं यान्ति मामिकाम् ।**
**कल्पक्षये पुनस्तानि कल्पादौ विसृजाम्यहम् ॥७॥**

---

१ रहस्यकार ४–६ श्लोकांवरील टीपेंत "परमेश्वर निर्गुण व सगुण असल्यामुळे हा विरोधाभास होतो," असे म्हणतात. पण परमेश्वर वस्तुतः सगुण नाहीं. त्यामुळें वरील वर्णन सोपाधिक व निरुपाधिक अवस्थेचें आहे. परमार्थदृष्ट्या ईश्वर असंग, उदासीन वगैरे आहे, व मायिकदृष्ट्या भूतभृत्, भूतभावन इत्यादि आहे, व ही गोष्ट सहाव्या श्लोकांतील दृष्टान्तावरून अगदीं स्पष्ट होते. पण रहस्यकारांनीं 'मयि' ७.७, 'मम माया' ७.१४, 'मत्तः' ७.७, 'समोऽहं' ९.२९, 'मया ततं' ९.४, 'ब्रह्मणः प्रतिष्ठाहं' १४.२७, 'अहं पुरुषोत्तमः प्रथितोऽस्मि' १५.१८, 'सर्वधर्मान् परित्यज्य माम्' 'अहं मोक्षयिष्यामि' १८.६६, इत्यादि ठिकाणीं भगवानांनीं आपला 'मी, माझा' असा जो उल्लेख केला आहे, तो सगुण व व्यक्त स्वरूपाला अनुलक्षून आहे, असें ४१६ पानावर म्हटले आहे, पण तें बरोबर नाहीं. कारण भगवानांनी गीतेंत जगत्कारण, जगाचा नियंता–कर्मफलदाता इत्यादि रूपानें जेथें जेथें उल्लेख केला आहे, तेथें तेथें तो आपल्या अव्यक्त चित्स्वरूपाला अनुलक्षूनच आहे, व्यक्त स्वरूपाला अनुलक्षून नाहीं. कारण सर्व जगाला व्यापणें वगैरे हे धर्म सगुण व्यक्त स्वरूपाचे केव्हांच संभवत नाहींत.

**अन्वयार्थ—कौन्तेय**—हे कुंतिपुत्रा अर्जुना!—**कल्पक्षये**—कल्पाचा क्षय झाला असतां,—**सर्वभूतानि**—सर्व भूतें—**मामिकां प्रकृतिं**—माझ्या अपरा प्रकृतीला—**यान्ति**—प्राप्त होतात.—**पुनः**—पण पुनः—**कल्पादौ**—कल्पाच्या आरंभीं—**अहं**—मी—**तानि**—त्याच भूतांना—**विसृजामि**—उत्पन्न करतों. ७.

**एवं वायुराकाश इव मयि स्थितानि सर्वभूतानि स्थितिकाले तानि—सर्वभूतानि कौन्तेय प्रकृतिं त्रिगुणात्मिकामपरां निकृष्टां यान्ति मामिकां मदीयां कल्पक्षये प्रलयकाले। पुनर्भूयस्तानि भूतान्युत्पत्तिकाले कल्पादौ विसृजाम्युत्पादयाम्यहं पूर्ववत् ॥७॥**

**भाष्यार्थ—एवं वायुः आकाशे इव सर्वभूतानि स्थितिकाले मयि स्थितानि**—याप्रमाणें वायु जसा आकाशांत, तशीं सर्वभूतें स्थितिकालीं माझ्यामध्यें स्थित आहेत,—**कौन्तेय तानि सर्वभूतानि मामिकां-मदीयां प्रकृतिं-त्रिगुणात्मिकां अपरां-निकृष्टां कल्पक्षये-प्रलयकाले यान्ति**—हे अर्जुना, तीं सर्व भूतें माझ्या प्रकृतीला-त्रिगुणात्मिका अपर-निकृष्ट प्रकृतीला कल्पक्षय झाला असतां-प्रलयकालीं प्राप्त होतात.—**पुनः-भूयः तानि-भूतानि उत्पत्तिकाले-कल्पादौ अहं विसृजामि-उत्पादयामि पूर्ववत्**—पुनरपि तीं भूतें उत्पत्तिसमयीं-कल्पाच्या आरंभीं मी उत्पन्न करतो-पूर्वीप्रमाणेच त्यांना निर्माण करतों. [ अर्जुना, कल्पाचा क्षय झाला असतां प्रलयसमयीं सर्व भूतें माझ्या अधीन असलेल्या त्रिगुणात्मिका अपर ( अ. ७ श्लो. ४-५ पृ. ६१७ पहा ) प्रकृतीला प्राप्त होतात, आणि पुनः उत्पत्तिकाल प्राप्त होतांच म्ह० कल्पाच्या आरंभीं मी त्यांना उत्पन्न करतों. ] ७.

**प्रकृतिं स्वामवष्टभ्य विसृजामि पुनः पुनः।**
**भूतग्राममिमं कृत्स्नमवशं प्रकृतेर्वशात् ॥ ८ ॥**

**अन्वयार्थ—स्वां प्रकृतिं**—आपल्या प्रकृतीला—**अवष्टभ्य**—स्वाधीन करून—**प्रकृतेः वशात् अवशं**—स्वभाववशात् परतंत्र झालेल्या—**इमं कृत्स्नं भूतग्रामं**—या सर्व भूतसमूहास—**पुनः पुनः**—पुनः पुनः—**विसृजामि**—मी उत्पन्न करतों. ८.

**एवमविद्यालक्षणाम्—प्रकृतिं स्वां स्वीयामवष्टभ्य वशीकृत्य विसृजामि पुनः पुनः प्रकृतितो जातं भूतग्रामं भूतसमुदायमिमं वर्तमानं कृत्स्नं समग्रमवशमस्वतन्त्रमविद्यादिदोषैः परवशीकृतं प्रकृतेर्वशात्स्वभाववशात् ॥ ८ ॥**

**भाष्यार्थ—एवं अविद्यालक्षणां स्वां-स्वीयां प्रकृतिं अवष्टभ्य-वशीकृत्य**—याप्रमाणे अविद्यारूप आपल्या प्रकृतीला वश करून घेऊन—**प्रकृतितः**

---

१ 'प्रकृतिं स्वां अवष्टभ्य' याचा अर्थ रहस्यकार 'मी आपल्या प्रकृतीला हातीं धरून' असा करितात. पण तो चांगलासा नाहीं. येथें 'मी आपल्या प्रकृतीचा अधिष्ठाता होऊन, तिला आपल्या अधीन ठेवून, आपापल्या स्वभावाच्या अधीन झालेल्या भूतसमुदायाला पुनः

**जातं इमं-वर्तमानं कृत्स्नं-समग्रं अवशं-अस्वतन्त्रं प्रकृतेः वशात्-स्वभाववशात् अविद्यादिदोषैः परवशीकृतं भूतग्रामं-भूतसमुदायं पुनः पुनः विसृजामि**—प्रकृतीपासून उत्पन्न झालेल्या या वर्तमानकालीन, समग्र, अवश-परतंत्र स्वभाववशात्-स्वभावामुळें अविद्या, अस्मिता इत्यादि दोषांनीं परवश केलेल्या भूतसमुदायाला पुनः पुनः मी उत्पन्न करतों. [ मी आपल्या अविद्यारूप प्रकृतीला आपल्या स्वाधीन ठेवून या सर्व वर्तमानकालीं असलेल्या भूतसमूहाला पुनः पुनः उत्पन्न करतों. अर्थात् हा संसार अनादि आहे. स्वभाववशात् अविद्या, अस्मिता इत्यादि दोषांनीं त्या भूतसमूहाला अवश-अस्वतंत्र केलें आहे. ] ८.

**न च मां तानि कर्माणि निबध्नन्ति धनंजय ।**
**उदासीनवदासीनमसक्तं तेषु कर्मसु ॥ ९ ॥**

**अन्वयार्थ—च**—आणि— **धनंजय**—हे अर्जुना !—**तानि कर्माणि**—तीं कर्में—**उदासीनवत् आसीनं**—उदासीनाप्रमाणें असणाऱ्या—**तेषु कर्मसु असक्तं**—त्या कर्माच्या फलाची इच्छा न ठेवणाऱ्या—**मां**—मला—**न निबध्नन्ति**—बद्ध करीत नाहींत. ९.

**तर्हि तस्य ते परमेश्वरस्य भूतग्रामं विषमं विदधतस्तन्निमित्ताभ्यां धर्माधर्माभ्यां संबन्धः स्यादितीदमाह भगवान्—न च मामीशं तानि भूतग्रामस्य विषमविसर्गनिमित्तानि कर्माणि निबध्नन्ति धनंजय । तत्र कर्मणामसंबद्धत्वे कारणमाह—उदासीनव-**

---

पुनः उत्पन्न करितो,' असा या श्लोकाचा खरा अर्थ आहे. त्यावरून ईश्वराची ही प्रकृति व सांख्यदर्शनकाराची प्रकृति एक नाहीं, हे व्यक्त होतें. येथील प्रकृति स्वतंत्र कर्त्री नाहीं, तर ईशपरतंत्र-जड आहे व खरा कर्ता चेतन ईश्वर आहे, हेच येथे सांगावयाचें आहे. अर्थात् रहस्यकार गीतेंत अव्यक्त, प्रकृति यासारखा एखादा शब्द आला कीं हा 'मूळ सांख्यशास्त्रांतील -कापिल सांख्यदर्शनांतील आहे ' असें जें वारंवार सांगत असतात तें निर्मूल आहे. असो; तसेंच रहस्यकार ' त्या प्रकृतीच्या ताब्यांत गेल्याने अवश म्ह० परतंत्र झालेला हा भूतसमुदाय ' असा ' अवश प्रकृतेर्वशात् ' याचा अर्थ करितात. पण तोहि बरोबर नाहीं. कारण ईश्वराची प्रकृति निराळी व जीवाची प्रकृति निराळी. ईश्वराची शुद्धसत्त्वप्रधान तर जीवाची मलिन सत्त्वप्रधान, ईश्वराची एकरूप तर जीवाची अनेकरूप-विचित्र, ईश्वराची त्याच्या अधीन तर जीव तिच्या अधीन. अशी त्या दोन प्रकृतींत विलक्षणता असल्यामुळे ' ज्या प्रकृतीला ईश्वर आपल्या हातीं धरितो त्याच प्रकृतीच्या ताब्यात गेल्याने जीव अवश -परतंत्र होतो, ' हें म्हणणें वेदान्तसिद्धान्ताला सोडून आहे. मुळात' प्रकृतिं ' व ' प्रकृतेः' असे शब्द जरी असले म्ह० प्रकृति हा एकच शब्द जरी दोन्हीं जागीं असला तरी एक ईश्वराची प्रकृति व दुसरी जीवाची असा त्यांत फरक असल्यामुळ त्यांच्या अर्थांतहि फरक आहे, व आचार्यांनीं भाष्यांत तो स्पष्टपणें दाखविला आहे. जीवांची प्रकृति म्ह० स्वभाव व स्वभाव म्ह० काय तें गी. भा. पृ. ३३१ वर पहा.

दासीनं यथोदासीन उपेक्षकः कश्चित्तद्वदासीनमात्मनोऽविक्रियत्वादसक्तं फलासङ्गर-हितमभिमानवर्जितमहं करोमीति तेषु कर्मसु । अतोऽन्यस्यापि कर्तृत्वाभिमानाभावः फलासङ्गाभावश्चाबन्धकारणमन्यथा कर्मभिर्बध्यते मूढः कोशकारवदित्यभिप्रायः ॥९॥

**भाष्यार्थ—तर्हि भूतग्रामं विषमं विदधतः तस्य ते परमेश्वरस्य तन्नि-मित्ताभ्यां धर्माधर्माभ्यां संबन्धः स्यात्**—तर मग उत्तमाधम-सुखी-दुःखी-श्रीमान्-दरिद्री इत्यादि विषम भूतसमुदायाला उत्पन्न करणाऱ्या त्या तुज ईश्वराचा त्यामुळें उद्भवणाऱ्या धर्माधर्मांशीं संबंध होईल, म्हणजे तूं तन्निमित्त धर्माधर्मांनीं लिप्त होशील,—**इति भगवान् इदं आह**—असें कोणी म्हणेल म्हणून भगवान् हें सांगतात—**धनंजय मां -ईशं तानि भूतग्रामस्य विषमविसर्गनिमित्तानि कर्माणि न च निबध्नन्ति**—अर्जुना, मज ईश्वराला भूतसमूहाच्या विषम उत्पत्तीमुळें उत्पन्न झालेलीं तीं कर्में बद्ध करीत नाहींत.—**तत्र कर्मणां असंबद्धत्वे कारणं आह**—परमेश्वरामध्यें कर्मांच्या असंबद्धत्वाचें कारण सांगतात—( ईश्वराला विषमसृष्टिप्रयुक्त धर्माधर्मांचा लेप कां लागत नाहीं त्याचें कारण-)—**उदासीनवत् आसीनं-यथा कश्चित् उदासीनः-उपेक्षकः तद्वत् आसीनं**—उदासीनाप्रमाणें असणाऱ्या-ज्याप्रमाणें एखादा उदासीन-उपेक्षा करणारा असतो त्याप्रमाणें राहणाऱ्या,—**अहं करोमि-इति तेषु कर्मसु असक्तं**—मी करतों, याप्रमाणें त्या कर्मांमध्यें सक्त न झालेल्या,—**आत्मनः अविक्रियत्वात् फलासंगरहितं-अभिमानवर्जितं**—आत्मा अविक्रिय असल्यामुळें कर्मांमध्यें असक्त म्ह॰ फलासक्तिरहित असलेल्या-मी करतों, अशा अभिमानानें रहित-अभिमानशून्य अशा मला तीं कर्में बद्ध करीत नाहींत. ( हाच न्याय इतरालाहि लागू आहे, असें सांगतात-)—**अतः अन्यस्य अपि कर्तृत्वाभिमानाभावः-च फलासंगाभावः अबन्धकारणं**—यास्तव दुसऱ्या कोणाच्याहि, कर्तृत्वाभिमानाचा अभाव व फलासक्तीचा अभाव हें, अबन्धाचें कारण आहे.—**अन्यथा मूढः कोशकारवत् कर्मभिः बध्यते इति अभिप्रायः**—पण याच्या उलट जर कर्मांविषयीं कर्तृत्वाभिमान व फलासक्ति असली तर तो मूढ कोशकार कीटाप्रमाणें-आपल्याच भोंवतीं घर करणाऱ्या कोळ्याप्रमाणें कर्मांनीं बद्ध होतो, असा याचा आशय. [ मज ईश्वराला विषमसृष्टि उत्पन्न केल्यामुळें उद्भवणारीं शुभाशुभ कर्में बद्ध करीत नाहींत. कारण मला कर्तृत्वाभिमान नसतो व फलासक्ति नसते. त्याप्रमाणेंच दुसराहि जो कोणी आसक्तिरहित असतो, तोहि तसाच कर्मांनीं बद्ध होत नाहीं. अ. ४ श्लो. ९ पृ. ३७३ पहा. ] ९.

**मयाध्यक्षेण प्रकृतिः सूयते सचराचरम् ।**
**हेतुनानेन कौन्तेय जगद्विपरिवर्तते ॥ १० ॥**

**अन्वयार्थ—मया अध्यक्षेण**—केवल ज्ञानस्वरूप अशा मज अध्यक्षामुळें-माझ्या निमित्तानें—**प्रकृतिः**—माझी त्रिगुणात्मिका माया—**सचराचरं**—सचराचर जगाला

—**सूयते**—उत्पन्न करते.—**कौन्तेय**—हे कुंतिपुत्रा !—**अनेन हेतुना**—या अध्यक्षत्वाच्या निमित्तानें—**जगत्**—सर्व सृष्टि—**विपरिवर्तते**—प्रवृत्त होते. १०.

तत्र भूतग्राममिमं विसृजाम्युदासीनवदासीनमिति च विरुद्धमुच्यत इति तत्परिहारार्थमाह—मया सर्वतो दृशिमात्रस्वरूपेणाविक्रियात्मनाऽध्यक्षेण मम माया त्रिगुणात्मिकाऽविद्यालक्षणा प्रकृतिः सूयत उत्पादयति सचराचरं जगत्। तथा च मन्त्रवर्णः—"एको देवः सर्वभूतेषु गूढः सर्वव्यापी सर्वभूतान्तरात्मा। कर्माध्यक्षः सर्वभूताधिवासः साक्षी चेता केवलो निर्गुणश्च" इति। हेतुना निमित्तेनानेनाध्यक्षत्वेन कौन्तेय जगत्सचराचरं व्यक्ताव्यक्तात्मकं विपरिवर्तते सर्वास्ववस्थासु। दृशिकर्मत्वापत्तिनिमित्ता हि जगतः सर्वा प्रवृत्तिरहमिदं भोक्ष्ये पश्यामीदं शृणोमीदं सुखमनुभवामि दुःखमनुभवामि तदर्थमिदं करिष्याम्येतदर्थमिदं करिष्य इदं ज्ञास्यामीत्याद्यऽवगतिनिष्ठावगत्यवसानैव। "यो अस्याध्यक्षः परमे व्योमन्" इत्यादयश्च मन्त्रा एतमर्थं दर्शयन्ति। ततश्चैकस्य देवस्य सर्वाध्यक्षभूतचैतन्यमात्रस्य परमार्थतः सर्वभोगानभिसंबन्धिनोऽन्यस्य चेतनान्तरस्याभावे भोक्तुरन्यस्याभावात्किंनिमित्तेयं सृष्टिरित्यत्र प्रश्नप्रतिवचने अनुपपन्ने "को अद्धा वेद क इह प्रवोचत्कुत आजाता कुत इयं विसृष्टिः" इत्यादिमन्त्रवर्णेभ्यः। दर्शितं च भगवताऽज्ञानेनाऽऽवृतं ज्ञानं तेन मुह्यन्ति जन्तव इति ॥ १० ॥

**भाष्यार्थ—तत्र 'इमं भूतग्रामं विसृजामि' 'उदासीनवत् आसीनं' इति च विरुद्धं उच्यते**—पूर्व ग्रंथांत मी या भूतसमूहास उत्पन्न करतों व उदासिनाप्रमाणें असणाऱ्या मला तीं कर्में बद्ध करीत नाहींत, हें विरुद्ध सांगितलें जात आहे—**इति तत्परिहारार्थं आह**—असें कोणी म्हणेल, म्हणून त्याच्या परिहारासाठीं भगवान् म्हणतात—**मया सर्वतः दृशिमात्रस्वरूपेण-अविक्रियात्मना अध्यक्षेण**—माझ्यामुळें-केवल ज्ञानस्वरूप-अविक्रियात्मा अशा मज अध्यक्षामुळें—

---

१ रहस्यकार या श्लोकाचा अर्थ "मी अध्यक्ष होऊन प्रकृतीकडून सर्व चराचरसृष्टि प्रसवितों. या कारणामुळें जगाची ही घडामोड चालली आहे," असा करितात. पण 'मया अध्यक्षेण' ही तृतीया 'हेतु-निमित्त' या अर्थी आहे. अर्थात् 'मी अध्यक्ष-अधिष्ठाता-स्वामी असणें या कारणानें-निमित्तानें, असा अर्थ केला पाहिजे. तसेंच 'प्रकृतिः सचराचरं सूयते' याचा 'मी प्रकृतीकडून सर्व चराचर सृष्टि प्रसवितों' हा अर्थ तर मुळाला सोडून भलतीकडेच गेला आहे. कारण येथें 'प्रकृतिः' हें प्रथमान्त पद कर्ता आहे. 'सचराचरं' हें द्वितीयान्त पद कर्म आहे व 'सूयते' हें 'षूङ्-प्राणिप्रसवे' या दिवादि म्ह० चवथ्या गणाच्या धातूचें कर्तरि वर्तमानकाळीं तृतीय (प्रथम) पुरुषाचें एकवचन आहे.वास्तव या वाक्याचा अगदीं शब्दशः सरळ अर्थ 'प्रकृति चराचर जगाला प्रसवते' असा आहे व आचार्यांनीं तो अगदीं तसाच केला आहे. पण रहस्यकार 'मी प्रकृतीकडून चराचर सृष्टि प्रसवितों' असा करितात. तो बरोबर नाहीं. मुळाला अगदीं सोडून व सिद्धान्ताच्या अगदीं विरुद्ध आहे. रहस्यकार या श्लोकावरील टीपेंत म्हणतात—"शास्त्रीय प्रतिपादनांत हीं तत्त्वें ए-

**मम माया त्रिगुणात्मिका अविद्यालक्षणा प्रकृतिः**—माझी माया त्रिगुणात्मिका अविद्यारूप प्रकृति,—**सचराचरं जगत् सूयते-उत्पादयति**—चराचरभूतांसह जगाला प्रसवते-उत्पन्न करते.—**तथा च मन्त्रवर्णः**—तसाच अर्थ प्रतिपादन करणारा हा मंत्रवर्ण आहे.—'**एकः देवः सर्वभूतेषु गूढः**'—एक देव सर्वभूतांमध्यें गूढ-गुप्त आहे.—'**सर्वव्यापी सर्वभूतान्तरात्मा**'—तो सर्वव्यापी व सर्वभूतांचा अन्तरात्मा आहे.—'**कर्माध्यक्षः सर्वभूताधिवासः**'—कर्मांचा अध्यक्ष, सर्वभूतांमध्यें सत्तास्फूर्ति देणारा या रूपानें राहणारा—'**साक्षी चेता केवलः निर्गुणः च' इति**—हा केवल कर्मांचाच अध्यक्ष नाहीं तर कर्मवानांचा-कर्मकर्त्या जीवांचाहि अध्यक्ष-सर्वसाक्षी आहे. तो चिद्रूप आहे. निरुपाधिक व निर्गुण आहे. [ तो सर्वविशेषशून्य आहे, असें सांगणारा हा मंत्र याविषयी प्रमाण आहे. याप्रमाणें उदासीन असलेल्याहि या ईश्वराच्या केवल साक्षित्वाला निमित्त करून हें जगत् पुनः पुनः उत्पन्न होऊन नाश पावते, असे सांगतात-]—**कौन्तेय अनेन अध्यक्षत्वेन हेतुना-निमित्तेन सचराचरं जगत् व्यक्ताव्यक्तात्मकं सर्वासु अवस्थासु विपरिवर्तते**—हे अर्जुना ! या अध्यक्षत्वहेतूनें-मी अध्यक्ष असणे या निमित्तानें चराचरासह हें सर्व व्यक्त-अव्यक्तरूप जगत् सृष्टि-स्थिति-संहाररूप सर्व अवस्थांमध्यें विशेष प्रकारें परिवर्तन पावत असतें. [ कार्याप्रमाणें कारणाची प्रवृत्तिहि साक्षीच्या अधीन आहे, हें सुचविण्यासाठीं व्यक्ताव्यक्तात्मक असें म्हटलें आहे. परमात्मा या सर्वांचा अध्यक्ष असणें याच निमित्तानें व्यक्ताव्यक्त दशेंतील सर्व चराचर जगाची प्रवृत्ति होते, असा याचा भावार्थ. अहोपण, जगाची सृष्टि-स्थिति वगैरे प्रवृत्ति जरी ईश्वराधीन असली तरी

---

काच ठिकाणीं सांगण्यांत येतात. गीतेंतील पद्धत संवादात्मक असल्यामुळें एकच विषय प्रसंगानुसार थोडा एक ठिकाणीं व थोडा दुसरे ठिकाणीं सांगितला आहे." ही कबुली आम्हांला अतिशय इष्ट आहे. कारण मग "कर्मयोगाच्या प्रतिपादनांत मध्येंच उपटसुळासारखें कर्म सोडणे उत्तम असे कोणीहि समंजस मनुष्य म्हणणार नाहीं" ( गी. र. ६५४) या म्हणण्यास विशेष महत्त्व उरत नाहीं. गीतेच्या प्रत्येक अध्यायांत साधक व सिद्ध, आणि श्वेत-गृहस्थ व यति यांचे धर्म प्रसगानुसार आले आहेत, असेंच आचार्यांचें म्हणणें आहे, व त्या दृष्टीनें त्यांनी भाष्य लिहिलें आहे. गी. भा. पृ. १४२ पहा.

'हेतुना-अनेन कौन्तेय०' या उत्तरार्धाच्या अर्थात 'या कारणामुळें जगाची ही घडामोड चालली आहे' असें म्हणून टीपेंत 'म्ह० व्यक्ताचें अव्यक्त आणि पुन्हा अव्यक्ताचें व्यक्त होत असतें' असें त्याचेंच स्पष्टीकरण केलें आहे. पण 'या कारणामुळें' म्ह० कोणत्या कारणामुळें ? 'मी प्रकृतीकडून जगत् प्रसवितों, ' या कारणामुळें ? त्यापेक्षां 'अनेन हेतुना' म्ह० या माझ्या अध्यक्षत्वामुळें-माझ्या सत्तेमुळें-मी प्रकृतीचा अधिष्ठाता असल्यामुळें हा अर्थ किती शास्त्रशुद्ध आहे.तसेंच 'विपरिवर्तते' म्ह० 'घडामोड चालली आहे, व्यक्ताचें अव्यक्त व अव्यक्ताचें व्यक्त होतें' असें म्हणण्यापेक्षां, जगाची सर्व प्रवृत्ति माझ्या अध्यक्षत्वामुळें होते; त्याची सर्व अवस्थांतील सर्व प्रवृत्ति मन्निमित्त आहे, हें आचार्यांचें म्हणणें किती सुबोध व सयुक्तिक आहे. आचार्यांचें 'विपरिवर्तते' यावरील सर्वच भाष्य विचार करण्यासारखें आहे.

बाकीची सर्व प्रवृत्ति स्वाभाविकच आहे कीं नाहीं ? कीं तीहि ईश्वराधीनच ? उत्तर-]—**दृशिकर्मत्वापत्तिनिमित्ता हि जगतः सर्वा प्रवृत्तिः**—केवल ज्ञानस्वरूपाचा विषय होणें, ज्ञानाच्या कर्मत्वास प्राप्त होणें, या निमित्तानेंच जगाची सर्व प्रवृत्ति होते. ज्ञानव्याप्यत्वावांचून जड-वर्गाची कोणतीच प्रवृत्ति होऊं शकत नाहीं.—**अहं इदं भोक्ष्ये इदं पश्यामि इदं शृणोमि सुखं अनुभवामि दुःखं अनुभवामि तदर्थं इदं करिष्यामि एतदर्थं इदं करिष्ये इदं ज्ञास्यामि इत्याद्या (प्रवृत्तिः) अवगतिनिष्ठा अवगति-अवसाना एव**—मी हें भोगीन, हें पाहतों, हें ऐकतों, सुखाचा अनुभव घेतों, दुःखाचा अनुभव घेतों, त्यासाठीं हे करीन, यासाठीं हे करीन, हें समजून घेईन-जाणेन इत्यादि सर्व प्रवृत्ति अवगतिनिष्ठ-ज्ञाननिष्ठ व ज्ञानामध्यें पर्यवसान पावणारीच आहे. [ जगाची सर्व प्रवृत्ति ज्ञानामुळे व ज्ञानाच्या आधारानें होत असते. परमात्म्याच्या केवल अध्यक्षत्वानेच जगाची सर्व चेष्टा होते, याविषयीं प्रमाण-]—**'यो अस्य अध्यक्षः परमे व्योमन्' इत्यादयः च मन्त्राः एतं अर्थं दर्शयन्ति**—या जगाचा जो अध्यक्ष निर्विकार साक्षी तो श्रेष्ठ हृदयाकाशांत स्थित आहे. त्यामुळें दुर्ज्ञेय आहे इत्यादि मंत्र हा अर्थ दाखवितात. [ असो, ईश्वराच्या केवल साक्षित्वानेच त्याचें स्रष्टृत्व सिद्ध झालें असतां काय निष्पन्न होतें तें सांगतात-]—**ततः च एकस्य देवस्य सर्वाध्यक्षभूतचैतन्यमात्रस्य परमार्थतः सर्वभोगानभिसंबन्धिनः अन्यस्य चेतनान्तरस्य अभावे अन्यस्य भोक्तुः अभावात्**—त्यामुळें एक-अद्वितीय, स्वयंप्रकाश, सर्वाध्यक्षभूत केवल चैतन्य-स्वरूप, परमार्थतः-वस्तुतः कोणत्याच भोगाशीं अगदींच संबंध नसलेला, अशा याची दुसऱ्या भिन्न चेतनाचा अभाव असता दुसऱ्या भोक्त्याचाहि अभावच होत असल्यामुळें ही सृष्टि किंनिमित्त आहे ? [ परमात्म्याची ही सृष्टि कोणत्या निमित्तानें आहे ? तो ही सृष्टि कां बरें उत्पन्न करतो ? भोगासाठीं करतो, असें म्हणतां येत नाहीं. कारण त्या परमेश्वराचा भोगाशीं वस्तुतः कांहीं संबंध नाहीं. कारण त्याचें स्वरूप सर्वसाक्षिभूत केवल चैतन्य हेंच आहे. बरें, दुसरा कोणी भोक्ता असेल व त्याच्यासाठीं ही सृष्टि असेल असें म्हणावें, तर दुसरा भोक्ता नाहीं. कारण दुसरा चेतन नाहीं. चेतन एक परमात्माच आहे. त्याच्यावांचून बाकीचे सर्व अचेतन आहे. अचेतनाला भोक्तृत्व कधींच संभवत नाहीं. बरें, स्रष्ट्याच्या मोक्षासाठीं ही सृष्टि आहे म्हणून ह्मणावें तर तेंहि बरोबर नाहीं. कारण मोक्षासाठीं सृष्टि ही कल्पनाच विरोधी आहे. यास्तव]—**इयं सृष्टिः किंनिमित्ता इति अत्र प्रश्नप्रतिवचने अनुपपन्ने**—ही सृष्टि किंनिमित्त आहे, ईश्वरानें ही सृष्टि कशासाठीं उत्पन्न केली, असा याविषयीं प्रश्न करणें किंवा त्याचें उत्तर देणें हीं दोन्ही अनुपपन्न आहेत. [ कारण ईश्वराची ही सृष्टि मायिक आहे. त्यामुळें असल्या प्रश्नप्रतिवचनाला अवकाशच नाहीं. परमात्मा दुर्विज्ञेय आहे, याविषयीं श्रुतीचा उल्लेख करितात-]—**'को अद्धा वेद'**—परमेश्वराला साक्षात् कोण जाणतो ? कोणी नाहीं !—**'क इह प्रवोचत्'**—त्याविषयीं या संसारमंडलांत बोलणारा तरी कोण आहे ? कोणी

नाहीं.—**'कुतः आजाता'**— जगाच्या उत्पत्तीचा कर्ता या रूपानें तरी त्याला जाणतां येईल म्हणून म्हणावें, तर तो कूटस्थ-निर्विकार असल्यामुळें ही सृष्टि त्याच्यापासून झाली असेंहि म्हणतां येत नाहीं. तेव्हां ही सृष्टि कोठून झाली आहे? कोणापासूनहि झालेली नाहीं.—**'कुतः इयं विसृष्टिः'**—ही विविध सृष्टि दुसऱ्या कोणापासूनहि होणें शक्य नाहीं. कारण परमात्म्याहून अन्य सत्य पदार्थांचाच अभाव आहे.—**इत्यादि मन्त्रवर्णेभ्यः**—इत्यादि मंत्राक्षरांवरून परमेश्वर दुर्विज्ञेय आहे, ही गोष्ट सिद्ध होते. ( तर मग ही सृष्टि कशी झाली? याचें उत्तर अज्ञानापासून झाली असें भगवानांनीच दिलें आहे, असें सांगतात-)—**भगवता ' अज्ञानेनावृतं ज्ञानं तेन मुह्यन्ति जन्तवः ' इति दर्शितं च**—भगवानांनीं ' अज्ञानानें ज्ञान आच्छादित झालें आहे, त्यामुळें प्राणी मोहित होतात' असें (अ. ५.श्लो. १५, पृ. ५०९) दाखविलेंच आहे.१०.

**अवजानन्ति मां मूढा मानुषीं तनुमाश्रितम् ।**
**परं भावमजानन्तो मम भूतमहेश्वरम् ॥ ११ ॥**

**अन्वयार्थ—मूढाः**—अविवेकी लोक—**मम**—माझ्या—**भूतमहेश्वरं परं भावं**—सर्व भूतांचा महान् ईश्वर अशा श्रेष्ठ भावास—**अजानन्तः**—न जाणणारे असे होऊन—**मानुषीं तनुं आश्रितं मां**—मनुष्याची तनु धारण केलेल्या मला—**अवजानन्ति**—तुच्छ लेखितात, माझी अवज्ञा करितात.११.

**एवं मां नित्यशुद्धबुद्धमुक्तस्वभावं सर्वजन्तूनामात्मानमपि सन्तं अवजानन्त्यवज्ञां परिभवं कुर्वन्ति मां मूढा अविवेकिनो मानुषीं मनुष्यसंबन्धिनीं तनुं देहमाश्रितं मनुष्यदेहेन व्यवहरन्तमित्येतत् । परं प्रकृष्टं भावं परमात्मतत्त्वमाकाशकल्पमाकाशादप्यन्तरतममजानन्तो मम भूतमहेश्वरं सर्वभूतानां महान्तमीश्वरं स्वमात्मानम् । ततश्च तस्य ममावज्ञानभावनेनाऽऽहता वराकास्ते ॥ ११ ॥**

**भाष्यार्थ—एवं नित्यशुद्धबुद्धमुक्तस्वभावं सर्वजन्तूनां आत्मानं अपि सन्तं मां**—याप्रमाणें नित्यशुद्धस्वभाव, ज्ञानस्वभाव व मुक्तस्वभाव, सर्वजंतूंचा आत्मा, अशाहि असलेल्या मला—**मूढाः-अविवेकिनः मां अवजानन्ति-अवज्ञां-परिभवं कुर्वन्ति**—मूढ-अविवेकी लोक माझी अवज्ञा करितात-अवज्ञा-परिभव करितात-मला तुच्छ लेखितात—**मानुषीं-मनुष्यसंबंधिनीं तनुं-देहं आश्रितं मनुष्यदेहेन व्यवहरन्तं इति एतत्**—मानुषी म्ह० मनुष्यसंबंधि तनूचा-देहाचा आश्रय केलेल्या-मनुष्यदेहानें व्यवहार करीत असलेल्या, असा याचा भावार्थ. [इतर मनुष्यांप्रमाणें देहावर ' हा मी ' असा अभिमान न ठेवतां केवल देहानें व्यवहार करणाऱ्या माझा तिरस्कार करितात. मग ते माझें आत्मत्वानें भजन कसे करणार? भगवानांनीं मनुष्यदेह धारण केल्यामुळें अज्ञ लोकांचा असा विपर्यास होणें शक्य आहे. पण भगवानांची अशी अवज्ञा करण्याचें कारण काय, तें सांगतात-]—**मम परं-प्रकृष्टं भावं-परमा-**

त्मतत्त्वं-आकाशकल्पं आकाशात् अपि अन्तरतमं अजानन्तः—माझ्या पर म्ह० अत्यंत श्रेष्ठ भावास परमात्मतत्त्वास–आकाशासारख्या-किंबहुना आकाशाहून अत्यंत आन्तर असलेल्या श्रेष्ठ भावास न जाणणारे—भूतमहेश्वरं-सर्वभूतानां महान्तं ईश्वरं स्वं आत्मानं—भूतमहेश्वरास-सर्वभूतांच्या फार मोठ्या ईश्वरास म्ह० स्वतःला-आत्म्याला न जाणणारे ते माझी अवज्ञा करितात [अविवेकमूलक अज्ञान हेंच त्यांच्या अवज्ञेचें कारण आहे. ईश्वराची अशी अवज्ञा केल्यामुळें ज्यांच्या बुद्धि कुंठित झाल्या आहेत, असे ते शोच्य होतात, असें सांगतात-]—ततः च तस्य मम अवज्ञानभावनेन ते वराकाः आहताः—त्यामुळे त्या माझ्या अवज्ञेच्या भावनेनें ते पामर जीव सर्व पुरुषार्थहीन झाले आहेत. [ भगवानांचा अनादर करणें किंवा निंदा करणें हेंच अवज्ञान, तें पुनः पुनः करणे हेंच त्याचें भावन;-वारंवार भगवन्निंदा किंवा भगवदनादर केल्यामुळें त्यांना मोठें पाप लागतेः व त्या पापाच्या प्रभावानें त्यांच्या बुद्धि प्रतिबद्ध होतात. ]११.

मोघाशा मोघकर्माणो मोघज्ञाना विचेतसः ।
राक्षसीमासुरीं चैव प्रकृतिं मोहिनीं श्रिताः ॥१२॥

अन्वयार्थ—मोघाशाः—त्यांच्या सर्व आशा व्यर्थ होतातः—मोघकर्माणः—त्यांचीं सर्व कर्मेंहि व्यर्थ होतात—मोघज्ञानाः—त्याचें ज्ञानहि निष्फल असतें—विचेतसः—ते विवेकशून्य होतात—च एव—आणि ते—राक्षसीं—राक्षसांच्या व—आसुरीं—असुरांच्या—मोहिनीं—मोह पाडणाऱ्या—प्रकृतिं—प्रकृतीचा—श्रिताः—आश्रय केलेले असतात.१२

कथम्—मोघाशा वृथाऽऽशा आशिषो येषां ते मोघाशाः । तथा मोघकर्माणो यानि याग्निहोत्रादीनि तैरनुष्ठीयमानानि कर्माणि तानि च तेषां भगवत्परिभवात्स्वात्मभूतस्यावज्ञानान्मोघान्येव निष्फलानि कर्माणि भवन्तीति मोघकर्माणः । तथा मोघज्ञाना निष्फलज्ञाना ज्ञानमपि तेषां निष्फलमेव स्यात् । विचेतसो विगतविवेकाश्च ते भवन्तीत्यभिप्रायः । किंच ते भवन्ति राक्षसीं रक्षसां प्रकृतिं स्वभावमासुरीमसुराणां च प्रकृतिं मोहिनीं मोहकरीं देहात्मवादिनी श्रिता आश्रिताश्छिन्धि भिन्धि पिब खाद परस्वमपहरेत्येवंवदनशीलाः क्रूरकर्माणो भवन्तीत्यर्थः । " असुर्या नाम ते लोकाः०" इति श्रुतेः ॥ १२ ॥

भाष्यार्थ—कथं—भगवानांची अवज्ञा केल्यामुळें ते शोच्य कसे होतात, तें 'मोघाशाः०' या श्लोकानें सांगतात—मोघाशाः-वृथा आशाः-आशिषः येषां ते मोघाशाः—मोघाशा म्ह० ज्यांच्या आशा–आकांक्षा वृथा आहेत ते 'मोघाशाः'होत.—तथा च मोघकर्माणः-तैः अनुष्ठीयमानानि यानि अग्निहोत्रादीनि कर्माणि तानि च तेषां भगवत्परिभवात् स्वात्मभूतस्य अवज्ञानात् मोघानि एव निष्फलानि भवन्ति इति मोघकर्माणः—त्याचप्रमाणें ते मोघकर्मे होत म्ह० त्यांच्याकडून अनुष्ठान

केलीं जाणारीं जीं अग्निहोत्रादिक कर्मे तीं त्यांचीं कर्में भगवानांच्या परिभवामुळें–तिरस्कारा-मुळें–स्वात्मभूत परमेश्वराच्या अवज्ञेमुळें मोघच–निष्फलच होतात, म्हणून ते **मोघकर्में** होत.—**तथा मोघज्ञानाः–निष्फलज्ञानाः–तेषां ज्ञानं अपि निष्फलं एव स्यात्**—तसेंच, मोघज्ञान म्ह॰ ज्यांचे ज्ञान निष्फल आहे, असे ते आहेत. त्यांचें ज्ञानहि निष्फलच होतें.—**विचेतसः–विगतविवेकाः च ते भवन्ति इति अभि-प्रायः**—विचेतस म्ह॰ ते विगतविवेक–विवेकशून्य होतात, असा याचा आशय. [ ईश्वराची निंदा–भगवद्द्रोह करणाऱ्या त्यांची कोणतीहि इच्छा नित्य फल देण्यास समर्थ होत नाहीं. त्यांचीं नित्य-नैमित्तिक कर्मेहि निष्फल होतात. त्यांचें शास्त्रार्थज्ञानहि फुकट जातें. त्यांच्या ठिकाणी विवेकाचाहि अभाव असतो. भगवानांचा तिरस्कार किंवा अना-दर करणारांच्या इच्छा, कर्मे व ज्ञान फुकट जातें, इतकेंच नव्हे तर मेल्यावर त्यांना अतिशय क्रूर योनि प्राप्त होते, असे सांगतात– ]—**किंच ते भवन्ति**—आणखी ते कसे होतात —**राक्षसीं–रक्षसां प्रकृतिं–स्वभावं आसुरीं–असुराणां च प्रकृतिं मोहिनीं–मोहकरीं देहात्मवादिनीं श्रिताः–आश्रिताः**—राक्षसी म्ह॰ राक्ष-सांच्या प्रकृतीस–स्वभावास व आसुरी प्रकृतीस म्ह॰ असुरांच्या स्वभावास ( त्या दोन्ही प्रकृति कशा ? उत्तर– ) मोहनी–मोह पाडणाऱ्या, 'देहच मी–आत्मा' असे म्हण-णाऱ्या त्या दोनहि स्वभावास आश्रित होतात. राक्षसी व आसुरी प्रकृतीचा आश्रय केलेले असे ते ईश्वरद्वेष्टे निपजतात.—**छिंधि भिन्धि पिब खाद परस्वं अपहर इत्येवं वदनशीलाः क्रूरकर्माणः भवन्ति इत्यर्थः**—तोड, फोड, पी, खा, दुसऱ्याचें धन लुबाड असें बोलण्याचें ज्यांचे शील आहे असे ते क्रूरकर्मे होतात, असा भावार्थ. [ प्राण्यांची हिंसा करणें, पीडा देणे या स्वरूपाचा राक्षसांचा स्वभाव असतो. त्याचा अनुवाद छिंधि, भिंदि, खाद, पिब, म्ह॰ तोड, फोड, खा, पी या शब्दांनीं केला आहे व कोणाला देऊं नको, यज्ञ-याग करूं नको, इत्यादि असदुपदेश करणे व वृत्तिछेद करणे, हा असुरांचा स्वभाव आहे. त्याचा अनुवाद भाष्यांत 'परस्वं अपहर' परधनाचा अपहार कर, या शब्दाने केला आहे. याविषयीं प्रमाण– ]—**'असुर्या नाम ते लोकाः' इति श्रुतेः**—ते असुरांचे लोक अज्ञानान्धकारानें आच्छादित झालेले आहेत. मूढ लोक मेल्यावर त्या लोकांस प्राप्त होतात, अशी याविषयीं श्रुति आहे. (ईशोपनिषद्भाष्यार्थ पृ. १४ पहा. ) १२.

महात्मानस्तु मां पार्थ दैवीं प्रकृतिमाश्रिताः ।
भजन्त्यनन्यमनसो ज्ञात्वा भूतादिमव्ययम् ॥१३॥

**अन्वयार्थ—तु**—पण—**पार्थ**—हे अर्जुना !—**दैवीं प्रकृतिं आश्रिताः**—दैवी प्रकृतीचा आश्रय केलेले—**महात्मानः**—महात्मे—**मां**—मला—**अव्ययं भूतादिं**—नित्य, भूतांचें कारण—**ज्ञात्वा**—जाणून—**अनन्यमनसः**—अनन्यचित्त होऊन—**भजन्ति**—भजतात. १३.

ये पुनः श्रद्दधाना भगवद्भक्तिलक्षणे मोक्षमार्गे प्रवृत्ताः—महात्मानस्त्वक्षुद्रचित्ता मामीश्वरं पार्थ दैवीं देवानां प्रकृतिं शमदमदयाश्रद्धादिलक्षणामाश्रिताः सन्तो भजन्ति सेवन्तेऽनन्यमनसोऽनन्यचित्ता ज्ञात्वा भूतादिं भूतानां वियदादीनां प्राणिनां चाऽऽदिं कारणमव्ययम् ॥ १३ ॥

**भाष्यार्थ—ये पुनः श्रद्दधानाः भगवद्भक्तिलक्षणे मोक्षमार्गे प्रवृत्ताः**—पण त्यांच्या उलट जे श्रद्धावान् लोक भगवद्भक्तिरूप मोक्षमार्गांत प्रवृत्त झालेले असतात ते ईश्वराला भजतात असें 'महात्मानः' या श्लोकाने सांगतात.—**पार्थ महात्मानः तु अक्षुद्रचित्ताः**—हे पार्थ, पण महात्मे म्ह० अक्षुद्रचित्त, [ज्यांचें चित्त यज्ञादि नित्य कर्मांनीं शुद्ध झालें आहे ते महात्मे-अक्षुद्रचित्त होत. आणखी ते कसे? उत्तर-]—**दैवीं-देवानां प्रकृतिं-शम-दम-दया-श्रद्धादिलक्षणां आश्रिताः सन्तः मां ईश्वरं भजन्ति-सेवन्ते**—दैवी म्ह० देवांच्या प्रकृतीचा शम-दम-दया-श्रद्धा इत्यादिरूप प्रकृतीचा आश्रय केलेले असे होत्साते मज ईश्वराला भजतात, माझें सेवन करितात,—**अनन्यमनसः-अनन्यचित्ताः**—अनन्यचित्त होऊन-ज्यांचें चित्त सर्वान्तर्यामी परमेश्वरामध्यें आसक्त झालें आहे ते अनन्यचित्त होत.—**भूतादिं-भूतानां वियदादीनां प्राणिनां च आदिं-कारणं अव्ययं ज्ञात्वा**—भूतादि म्ह० आकाशादि भूतांचा व प्राण्यांचा . आदि-कारण व अव्यय-अविनाशी अशा मला जाणून [अनन्यचित्त व दैवी प्रकृतीचा आश्रय केलेले महात्मे माझें भजन करितात.] १३.

**सततं कीर्तयन्तो मां यतन्तश्च दृढव्रताः ।**
**नमस्यन्तश्च मां भक्त्या नित्ययुक्ता उपासते ॥१४॥**

**अन्वयार्थ—सततं**—अहोरात्र—**मां कीर्तयन्तः**—माझें कीर्तन-नामस्मरण करणारे—**च**—आणि—**यतन्तः**—इंद्रियनिग्रह, शम-दम इत्यादि धर्मांनीं यत्न करणारे,—**दृढव्रताः**—ज्यांचें अचांचल्य हेंच व्रत आहे, किंवा ज्यांचें ब्रह्मचर्यादि व शमादि व्रत दृढ आहे ते दृढव्रत—**च**—आणि—**मां**—मला—**नमस्यन्तः**—नमस्कार करणारे,—**भक्त्या**—परमप्रेमानें—**नित्ययुक्ताः**—नित्ययुक्त होऊन—**उपासते**—उपासना करितात. १४.

कथम्—सततं सर्वदा भगवन्तं ब्रह्मस्वरूपं मां कीर्तयन्तो यतन्तश्चेन्द्रियोपसंहारशमदमदयाहिंसादिलक्षणैर्धर्मैः प्रयतन्तश्च दृढव्रता दृढं स्थिरमचाल्यं व्रतं येषां ते दृढव्रता नमस्यन्तश्च मां हृदयेशयमात्मानं भक्त्या नित्ययुक्ताः सन्त उपासते सेवन्ते १४

**भाष्यार्थ—कथं**—ते कसे भजन करितात तें 'सततं०' या श्लोकानें सांगतात—**सततं-सर्वदा भगवन्तं ब्रह्मस्वरूपं मां कीर्तयन्तः**—सतत-सर्वकाल भगवान् ब्रह्मस्वरूप अशा मला-अशा माझें कीर्तन करणारे [सतत माझें कीर्तन करणारे म्ह० वेदान्तश्रवण व प्रणवाचा जप करणारे]—**च यतन्तः-इंद्रियोपसंहार-शम-दम-**

**दया-अहिंसादिलक्षणैः धर्मैः प्रयतन्तः**—आणि यत्न करणारे म्ह॰ इंद्रियांचा विषयांपासून उपसंहार, शम, दम, दया, अहिंसा इत्यादि रूप धर्मांनीं प्रयत्न करणारे —**दृढव्रताः-दृढं स्थिरं-अचांचल्यं व्रतं येषां ते दृढव्रताः**—दृढव्रत म्ह॰ दृढ-स्थिर अचांचल्य हेंच ज्याचें व्रत-ब्रह्मचर्यादि आहे, ते दृढव्रत होत,—**च मां -हृदयेशयं आत्मानं भक्त्या नमस्यन्तः नित्ययुक्ताः सन्तः उपासते-सेवन्ते** —आणि मला हृदयांत राहणाऱ्या आत्म्याला भक्तीनें-परम प्रेमानें नमस्कार करणारे नित्ययुक्त-नित्य समाहित होत्साते उपासना करितात-माझें सेवन करितात. १४.

**ज्ञानयज्ञेन चाप्यन्ये यजन्तो मामुपासते ।**
**एकत्वेन पृथक्त्वेन बहुधा विश्वतोमुखम् ॥१५॥**

**अन्वयार्थ—च अपि**—पण—**अन्ये**—कांहीं उत्तम अधिकारी—**ज्ञानयज्ञेन** —भगवानाविषयींचे ज्ञान हाच यज्ञ त्यानें—**यजन्तः**—पूजा करणारे—**मां**—मला —**एकत्वेन**—एकच परब्रह्म आहे, अशा ज्ञानानें—**उपासते**—उपासितात. कोणी —**पृथक्त्वेन**—सूर्य, चंद्र इत्यादि भेदानें माझी उपासना करितात व कोणी—**विश्वतोमुखं**—तोच भगवान् सर्वतोमुख आहे, विश्वरूप आहे, असें समजून त्या विश्वरूपाला—**बहुधा**—अनेक प्रकारांनीं उपासितात. १५.

**ते केन केन प्रकारेणोपासत इत्युच्यते—ज्ञानयज्ञेन ज्ञानमेव भगवद्विषयं यज्ञस्तेन ज्ञानयज्ञेन यजन्तः पूजयन्तो मामीश्वरं चाप्यन्येऽन्यामुपासनां परित्यज्योपासते। तच्च ज्ञानमेकत्वेनैकमेव परं ब्रह्मेति परमार्थदर्शनेन यजन्त उपासते। केचिच्च पृथक्त्वेनाऽऽदित्यचन्द्रादिभेदेन स एव भगवान्विष्णुरादित्यादिरूपेणावस्थित इत्युपासते। केचिद्बहुधाऽवस्थितः स एव भगवान्सर्वतोमुखो विश्वतोमुखो विश्वरूप इति तं विश्वरूपं सर्वतोमुखं बहुधा बहुप्रकारेणोपासते ॥ १५ ॥**

**भाष्यार्थ—ते केन केन प्रकारेण उपासते इति उच्यते**—ते कोणकोणत्या प्रकारानें उपासना करितात तें सांगितले जातें—**ज्ञानयज्ञेन-भगवद्विषयं ज्ञानं एव यज्ञः तेन ज्ञानयज्ञेन**—ज्ञानयज्ञानें-भगवानाविषयींचें ज्ञान हाच यज्ञ, त्या ज्ञानयज्ञानें —**मां ईश्वरं च अपि यजन्तः-पूजयन्तः अन्ये**—मज ईश्वराचेच यजन-पूजन करणारे दुसरे-म्ह॰ ब्रह्मनिष्ठ—**अन्यां उपासनां परित्यज्य उपासते**—दुसऱ्या उपासनेचा परित्याग करून माझी उपासना करितात.—**तत् च ज्ञानं एकत्वेन-एकं एव परं ब्रह्म इति परमार्थदर्शनेन यजन्तः उपासते**—व तें ज्ञान एकत्वानें-एकच परब्रह्म आहे अशा स्वरूपाच्या परमार्थ ज्ञानानें पूजा करणारे ब्रह्मनिष्ठ माझी उपासना करितात. [ परमार्थदर्शन हाच येथील ज्ञानयज्ञ आहे. ज्ञाननिष्ठ त्यानें ईश्वराची उपासना करितात. याप्रमाणें उत्तम अधिकाऱ्यांच्या उपासनेचा प्रकार सांगून मध्यमाधिकाऱ्यांच्या उपासनेचा प्रकार सांगतात-]—**केचित् च पृथक्त्वेन-आदित्यचंद्रादिभेदेन सः एव भगवान् विष्णुः आदित्यादिरूपेण अवस्थितः इति**

**उपासते**—दुसरे कित्येक पृथक्त्वानें म्ह० आदित्य, चंद्र इत्यादि भेदानें ह्म० तोच भगवान् विष्णु आदित्यादिरूपानें अवस्थित आहे, अशी उपासना करितात.—**बहुधा अवस्थितः सः एव भगवान् सर्वतोमुखः-विश्वतोमुखः-विश्वरूपः इति केचित् तं विश्वरूपं-सर्वतोमुखं बहुधा-बहुप्रकारेण उपासते**—बहुप्रकारांनीं अवस्थित असलेला तोच भगवान् सर्वतोमुख, विश्वतोमुख, विश्वरूप आहे, असें समजून कित्येक मध्यमाधिकारी त्या विश्वरूपाला-सर्वतोमुखाला बहुधा—बहुप्रकारांनी उपासितात—[ तोच सर्वरूपांनीं अवस्थित आहे, असें जाणून त्याचीच कित्येक बहुप्रकारें उपासना—ध्यान करितात. ] १५.

## अहं क्रतुरहं यज्ञः स्वधाऽहमहमौषधम् ।
## मन्त्रोऽहमहमेवाज्यमहमग्निरहं हुतम् ॥ १६ ॥

**अन्वयार्थ—अहं क्रतुः**—मी क्रतु-यज्ञ म्हणजे एक प्रकारचे वेदोक्त कर्म आहें. —**अहं यज्ञः**—मी वैश्वदेवादि स्मार्त कर्म आहे.—**अहं स्वधा**—मी पितरांना दिलेले अन्न आहे.—**अहं औषधं**—मी तांदुळ, गहूं, इत्यादि धान्य ज्यांपासून होतें, त्या औषधि आहे.—**मन्त्रः अहं**—मंत्र मी आहें.—**अहं एव आज्यं**—मीच आज्य म्ह० घृतादि हवि आहें.—**अहं अग्निः**—मीच अग्नि आहें —**अहं हुतं**—मीच हवनकर्म आहें. १६.

**यदि बहुभिः प्रकारैरुपासते कथं त्वामेवोपासत इत्यत आह—अहं क्रतुः श्रौतकर्मभेदोऽहमेवाहं यज्ञः स्मार्तः । किंच स्वधाऽन्नमहं पितृभ्यो यद्दीयते । अहमौषधं सर्वप्राणिभिर्यदद्यते तदौषधशब्दवाच्यम् । अथवा स्वधेति सर्वप्राणिसाधारणमन्नमौषधमिति व्याध्युपशमार्थं भेषजम् । मन्त्रोऽहं येन पितृभ्यो देवताभ्यश्च हविर्दीयते । अहमेवाऽऽज्यं हविश्चाहमग्निर्यस्मिन्हूयते सोऽग्निरहमेवाहं हुतं हवनकर्म च ॥ १६ ॥**

**भाष्यार्थ—यदि बहुभिः प्रकारैः उपासते कथं त्वां एव उपासते इति अतः आह**—जर बहु प्रकारांनीं उपासना करितात तर ती तुझीच उपासना कशी होते, असें अर्जुन विचारील म्हणून भगवान् 'अहं०' या श्लोकांत सांगतात—**अहं क्रतुः-श्रौतकर्मभेदः अहं एव**—मी क्रतु म्ह० श्रौतकर्मांचा एक प्रकार मीच आहें. —**अहं यज्ञः-स्मार्तः**—स्मार्त यज्ञ मीच आहें.—**किं च स्वधा अन्नं अहं पितृभ्यः यत् दीयते**—तसेंच स्वधा-पितरांना जें दिलें जातें तें अन्न मी आहें.—**अहं औषधं-सर्वप्राणिभिः यत् अद्यते तत् औषधशब्दवाच्यं**—मी औषध आहें. सर्व प्राण्यांकडून जें खाल्लें जातें, तें औषधशब्दवाच्य आहे ह्म० त्याला येथें औषध म्हटलें आहे. —**अथवा स्वधा इति सर्वप्राणिसाधारणं अन्नं**—किंवा स्वधा म्ह० सर्वप्राणिसाधारण अन्न व—**औषधं इति व्याध्युपशमार्थं भेषजं**—औषध म्ह० व्याधीच्या शांतीसाठीं जें औषध तें, असें समजावें—**मन्त्रः अहं येन पितृभ्यः देवताभ्यः च हविः दीयते**—मंत्र मी आहें, ज्या मंत्रानें पितरांना व देवतांना हवि

दिला जातो तो मंत्र मीच आहें.—**अहं एव आज्यं हविः च अहं**—मीच आज्य आहें म्ह० हवि मीच आहें.—**अहं अग्निः यस्मिन् हूयते सः अग्निः अहं एव**—मी अग्नि; ज्यांत होम केला जातो तो अग्नि मीच;—**च अहं हुतं-हवनकर्म**—आणि मीच हुत म्ह० हवन कर्म आहें. [अर्थात् क्रिया-कारक-फलजात भगवानांहून भिन्न नाहीं, हा या सर्व श्लोकाचा भावार्थ आहे.] १६.

## पिताहमस्य जगतो माता धाता पितामहः।
## वेद्यं पवित्रमोंकार ऋक्सामयजुरेव च ॥ १७ ॥

**अन्वयार्थ—अहं अस्य जगतः**—मी या जगाचा—**पिता**—जनक आहें.—**माता**—जननी आहें.—**धाता**—प्राण्यांना कर्मफल देणारा आहें.—**पितामहः**—पित्याचा पिता आहें.—**वेद्यं**—ब्रह्मादि ज्ञेय वस्तु मी आहें.—**पवित्रं**—पावन करणारें यज्ञ-यागादि पुण्यकर्म मी आहें.—**ओंकारः**—प्रणव मी आहें.—**ऋक्**—ऋग्वेद,—**साम**—सामवेद,—**च यजुः एव**—आणि यजुर्वेद मी आहे. १७.

**किंच—पिता जनयिताऽहमस्य जगतो माता जनयित्री धाता कर्मफलस्य प्राणिभ्यो विधाता पितामहः पितुः पिता वेद्यं वेदितव्यं पवित्रं पावनमोंकारश्च ऋक्साम यजुरेव च ॥ १७ ॥**

**भाष्यार्थ—किंच**—आणि तसेंच—**अस्य जगतः पिता-जनयिता अहं**—या जगाचा पिता-उत्पादक मी आहें.—**माता-जनयित्री, धाता-कर्मफलस्य प्राणिभ्यः विधाता, पितामहः-पितुः पिता**—जगाची माता म्ह० उत्पन्न करणारी-जगाला प्रसवणारी आई मी, धाता-प्राण्यांना त्यांच्या कर्मांचें फल देणारा, जगाचा पितामह-पित्याचा पिता,—**वेद्यं-वेदितव्यं**—जाणण्यास योग्य असलेलें ब्रह्म—**पवित्रं-पावनं**—अत्यंत शुद्धीचें कारण पुण्यकर्म,—**ओंकारः च ऋक्-साम-यजुः एव च**—वेद्य ब्रह्माचें ज्ञानसाधन ओंकार, ब्रह्माचें प्रमाण ऋग्वेदादिक, हें सर्व मीच आहें. [अर्थात् भगवान् सर्वात्मक आहे, असें यावरून अनुमान करावें.] १७.

## गतिर्भर्ता प्रभुः साक्षी निवासः शरणं सुहृत्।
## प्रभवः प्रलयः स्थानं निधानं बीजमव्ययम् ॥ १८ ॥

**अन्वयार्थ—गतिः**—कर्मांचें फल मी आहें.—**भर्ता**—कर्मफल देऊन पोषण करणारा मी आहें.—**प्रभुः**—सर्वांचा स्वामी मी आहें.—**साक्षी**—प्राण्यांनीं केलेलें व न केलेलें पुण्यपापादि पाहणारा मी आहें.—**निवासः**—सर्व प्राण्यांचें निवासस्थान मी आहें.—**शरणं**—रोगादिकांच्या योगानें आर्त होऊन शरण आलेल्या भक्तांची आर्ति-पीडा नाहींशी करणारा मी आहें.—**सुहृत्**—उलट उपकाराची अपेक्षा न करितां उपकार करणारा मी आहें.—**प्रभवः**—जगाचा उत्पादक,—**प्रलयः**—जगाचा संहार

करणारा,—**स्थानं**—जगाची स्थिति करणारा—**निधानं**—कर्मफलांचा निधि, व—**अव्ययं बीजं**—जगाचें अक्षय बीज मी आहें. १८.

**किंच गतिः कर्मफलं,भर्ता पोष्टा,प्रभुः स्वामी, साक्षी प्राणिनां कृताकृतस्य,निवासो यस्मिन्प्राणिनो निवसन्ति, शरणमार्तानां मत्प्रपन्नानामार्तिहरः,सुहृत्प्रत्युपकारानपेक्षः सन्नुपकारी, प्रभव उत्पत्तिर्जगतः, प्रलयः प्रलीयते यस्मिन्निति । तथा स्थानं तिष्ठत्यस्मिन्निति । निधानं निक्षेपः कालान्तरोपभोग्यं प्राणिनां, बीजं प्ररोहकारणं प्ररोहधर्मिणाम् । अव्ययं यावत्संसारभावित्वादव्ययम् । न ह्यबीजं किंचित्प्ररोहति । नित्यं च प्ररोहदर्शनाद्बीजसंततिर्न व्येतीति गम्यते ॥ १८ ॥**

**भाष्यार्थ—किंच गतिः-कर्मफलं भर्ता-पोष्टा प्रभुः-स्वामी प्राणिनां कृताकृतस्य साक्षी**—तसेंच गति म्ह० कर्मफल,भर्ता म्ह० पोषण करणारा,प्रभु-स्वामी, प्राण्यांच्या कृताकृतांचा साक्षी,—**यस्मिन् प्राणिनः निवसन्ति ( सः ) निवासः**—ज्याच्यामध्यें सर्व प्राणी राहतात, तो निवास,—**शरणं-आर्तानां मत्प्रपन्नानां आर्तिहरः**—शरण म्ह० मला शरण आलेल्या आर्तांच्या आर्तीचें-पीडेचें हरण करणारा,—**सुहृद्-प्रत्युपकारानपेक्षः सन् उपकारी**—सुहृद् म्ह० प्रत्युपकाराची अपेक्षा न करणारा असा होत्साता उपकार करणारा—**प्रभवः-जगतः उत्पत्तिः**—प्रभव म्ह० जगाची उत्पत्ति,—**प्रलयः यस्मिन् प्रलीयते इति**—प्रलय म्ह० ज्यांत सर्व जगत् पूर्णपणें लीन होतें तो प्रलय,—**तथा स्थानं-अस्मिन् तिष्ठति इति**—त्याचप्रमाणें स्थान-यांत जगत् राहतें म्हणून स्थान—**निधानं-निक्षेपः प्राणिनां कालान्तरोपभोग्यं**—निधान म्ह० निक्षेप-प्राण्यांना कालान्तरीं उपभोग घेण्यास योग्य असें,—**बीजं-प्ररोहधर्मिणां प्ररोहकारणं**—बीज म्ह० प्ररोह-उत्पन्न होणें-अंकुर येणें, हा ज्यांचा धर्म आहे त्या पदार्थांच्या प्ररोहाचें अंकुराचें कारण, ( पण तें बीज कसें ? उत्तर-)—**अव्ययं-यावत्संसारभावित्वात् अव्ययं**—अव्यय बीज-जोंवर संसार आहे, तोंवर असणारें म्हणून अव्यय—**हि अबीजं किंचित् न प्ररोहति**—कारण बीजावांचून कांहींच उगवत नाहीं.—**च नित्यं प्ररोहदर्शनात् बीजसंततिः न व्येति इति गम्यते**—आणि नित्य नवीन प्ररोह दिसत असल्यामुळें-नवीन नवीन कार्यें उत्पन्न होत असल्याचें प्रत्यक्ष दिसत असल्यामुळें त्यांच्या बीजाची परंपरा कधींच क्षीण होत नाहीं, असें अनुमान होतें. १८.

## तपाम्यहमहं वर्षं निगृह्णाम्युत्सृजामि च ।
## अमृतं चैव मृत्युश्च सदसच्चाहमर्जुन ॥ १९ ॥

**अन्वयार्थ—अहं**—मी सूर्यरूपानें—**तपामि**—ताप देतों, तापतों,—**अहं वर्षं निगृह्णामि**—मी पावसाचा निग्रह करतों.—**च—च—उत्सृजामि**—मीच वृष्टि-

पाऊस पाडतों.—**अर्जुन**—हे अर्जुना !—**अहं**—मी—**अमृतं**—देवांचें अमृत—**च एव**—व—**मृत्युः**—मर्त्यांचा मृत्यु आहें—**च**—आणि—**सत्**—कार्य-नामरूपांनीं व्यक्त होणारें सर्व—**च**—व—**असत्**—कारण-नामरूपांनीं व्यक्त न होणारें मी आहें. १९.

**किंच—तपाम्यहमादित्यो भूत्वा कैश्चिद्रश्मिभिरुल्बणैरहं वर्षं कैश्चिद्रश्मिभिरुत्सृजामि । उत्सृज्य पुनर्निगृह्णामि कैश्चिद्रश्मिभिरष्टभिर्मासैः पुनरुत्सृजामि प्रावृषि । अमृतं चैव देवानां मृत्युश्च मर्त्यानाम् । सद्यस्य यत्संबन्धितया विद्यमानं तद्विपरीतमसच्चैवाहमर्जुन । न पुनरत्यन्तमेवासद्भगवान्स्वयं कार्यकारणे वा सदसती । ये पूर्वोक्तैरनुवृत्तिप्रकारैरेकत्वपृथक्त्वादिविज्ञानैर्यज्ञैर्मां पूजयन्त उपासते ज्ञानविदस्ते यथाविज्ञानं मामेव प्राप्नुवन्ति ॥ १९ ॥**

**भाष्यार्थ—किंच अहं आदित्यः भूत्वा कैश्चित् उल्बणैः रश्मिभिः तपामि**—तसेंच, मी सूर्य होऊन ग्रीष्मऋतूंत कांहीं प्रखर किरणांनीं ताप देतों.—**अहं कैश्चित् रश्मिभिः वर्षं उत्सृजामि**—मी कांहीं किरणांनीं वर्षाकाळीं वृष्टि सोडतों.—**उत्सृज्य कैश्चित् रश्मिभिः पुनः निगृह्णामि**—वृष्टीचा उत्सर्ग करून-वृष्टीला सोडून कांहीं किरणांनीं पुनः वृष्टीचा निग्रह करतो.—**अष्टभिः मासैः पुनः उत्सृजामि प्रावृषि**—आठ महिने वृष्टीचा निग्रह करून आठ महिन्यांनीं पुनः वर्षासमयीं तिला सोडतों.—**अमृतं च एव देवानां च मृत्युः-मर्त्यानां**—व देवांचें अमृत आणि मनुष्यांचा मृत्यु मी आहें.—**सत् यस्य यत्संबंधितया विद्यमानं**—ज्या कारणाच्या संबंधित्वानें जे कार्य अभिव्यक्त होतें, त्याला सत्-विद्यमान म्हणतात—**च तद्विपरीतं असत् अहं एव अर्जुन**—आणि जें त्याच्या उलट असलेलें ह्म० कारणसंबंधानें अभिव्यक्त न झालेलें तें असत्-ज्याच्यापासून नामरूप व्यक्त झालेलें नाहीं, तें कारणच असत् होय. तें सत् व असत् हे अर्जुना ! मीच आहें. ( माध्यमिक बौद्धांच्या शून्यवादाचें निरसन करितात-)—**स्वयं भगवान् न पुनः अत्यन्तं एव असत् वा कार्यकारणे सदसती**—स्वतः भगवान् अत्यंत असत्च आहे, असें नाहीं. कार्य व कारणहि सत्-असत् नाहीं. [ भगवान् जर अत्यंत असत् असता तर कार्यकारणाची कल्पनाच झाली नसती. कारण कोणतीहि कल्पना अधिष्ठानावांचून होऊंच शकत नाहीं. त्याचप्रमाणे कार्याचे सत्त्व व कारणाचें असत्त्वहि मानतां येत नाहीं. कारण कार्यालाहि अत्यंत सत् म्हणतां येत नाहीं. कारण कार्य वाङ्मात्र -शब्दमात्र आहे, असें छांदोग्यांत सांगितलें आहे. कारणाला अत्यंत असत्त्वहि नाहीं. कारण हें सर्व कार्य मूळावांचून कसें होईल ? अशी श्रुति आहे. ( छां. भाष्यार्थ पृ. ४१३ व ४२१ पहा. ) या वर सांगितलेल्या ज्ञानयज्ञांनीं भगवत्सेवा करणारांना कोणतें फल मिळतें, अशी आशंका घेऊन सद्योमुक्ति किंवा क्रममुक्ति हें फल मिळतें, असें सांगतात-]—**ये ज्ञानविदः पूर्वोक्तैः अनुवृत्तिप्रकारैः एकत्व-पृथक्त्वादिविज्ञानैः यज्ञैः मां पूजयन्तः उपासते ते यथाविज्ञानं मां एव प्राप्नुवन्ति—**

जे ज्ञानवेत्ते वर सांगितलेल्या अनुवर्तन प्रकारांनीं म्ह० एकत्व-पृथक्त्वादिविज्ञानें, याच यज्ञांनीं माझी पूजा करीत होत्साते उपासना करितात, ते आपल्या विज्ञानाप्रमाणें मलाच प्राप्त होतात. १९.

**त्रैविद्या मां सोमपाः पूतपापा यज्ञैरिष्ट्वा स्वर्गतिं प्रार्थयन्ते ।**
**ते पुण्यमासाद्य सुरेन्द्रलोकमश्नन्ति दिव्यान्दिवि देवभोगान् ॥**

**अन्वयार्थ—त्रैविद्याः**—ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेद या तीन वेदांचें अध्ययन करणारे, त्यांत सांगितलेलीं कर्मे करणारे—**सोमपाः**—सोमपान करणारे व त्यामुळें—**पूतपापाः**—निष्पाप झालेले—**मां**—मला-माझी—**यज्ञैः**—यज्ञांच्या योगानें—**इष्ट्वा**—पूजा करून—**स्वर्गतिं**—स्वर्गगतीची—**प्रार्थयन्ते**—प्रार्थना करितात.—**ते**—ते-त्रैविद्य—**पुण्यं सुरेन्द्रलोकं**—पवित्र इंद्रलोकास—**आसाद्य**—प्राप्त होऊन—**दिवि**—स्वर्गांत—**दिव्यान् देवभोगान्**—अलौकिक देवभोगांस—**अश्नन्ति**—उपभोगितात. २०.

ये पुनरज्ञाः कामकामाः—त्रैविद्या ऋग्यजुःसामविदो मां वस्वादिदेवरूपिणं सोमपाः सोमं पिबन्तीति सोमपास्तेनैव सोमपानेन पूतपापाः शुद्धकिल्बिषा यज्ञैरग्निष्टोमादिभिरिष्ट्वा पूजयित्वा स्वर्गतिं स्वर्गगमनं स्वर्गतिस्तां प्रार्थयन्ते । ते च पुण्यं पुण्यफलमासाद्य संप्राप्य सुरेन्द्रलोकं शतक्रतोः स्थानमश्नन्ति भुञ्जते दिव्यान्दिवि भवानप्राकृतान्देवभोगान्देवानां भोगास्तान् ॥ २० ॥

**भाष्यार्थ—ये पुनः अज्ञाः कामकामाः**—पण जे अज्ञ व विषयेच्छु असलेले—**त्रैविद्याः-ऋग्यजुःसामविदः**—त्रैविद्य म्ह० ऋक्-यजुः-सामवेत्ते-कर्मठ वैदिक—**सोमपाः-सोमं पिबन्ति इति सोमपाः**—सोमप म्ह० सोमाचें पान करितात म्हणून सोमप—**तेन एव सोमपानेन पूतपापाः शुद्धकिल्बिषाः**—त्याच सोमपानानें पूतपाप म्ह० ज्याचें पाप नाहींसें झालें आहे, ज्यांचे किल्बिष-पाप शुद्ध झालें आहे-निष्पाप झालेले—**मां-वस्वादिदेवरूपिणं यज्ञैः-अग्निष्टोमादिभिः इष्ट्वा-पूजयित्वा**—मला-वसु, रुद्र इत्यादि देवस्वरूपी मला अग्निष्टोमादि यज्ञांनीं पुजून-अग्निष्टोमादिकांनीं माझें यजन-पूजन करून—**स्वर्गतिं-स्वर्गगमनं-स्वर्गतिः तां प्रार्थयन्ते**—स्वर्गति, स्वर्गगमन-स्वर्गगति, तिला इच्छितात. स्वर्गप्राप्तीची इच्छा करितात.—**ते च पुण्यं-पुण्यफलं सुरेन्द्रलोकं-शतक्रतोः स्थानं आसाद्य-संप्राप्य**—व ते पुण्य म्ह० पुण्याचें फल अशा देवेंद्राच्या लोकास-शतक्रतूच्या स्थानास प्राप्त होऊन-त्या लोकाची संप्राप्ति करून घेऊन—**दिव्यान्-दिविभवान् अप्राकृतान् देवभोगान्-देवानां भोगाः तान् अश्नन्ति-भुञ्जते**—दिव्य म्ह० स्वर्गांतील-अप्राकृत-अलौकिक देवभोगांस-देवांचे जे भोग त्यांस भोगतात-त्यांचा अनुभव-उपभोग घेतात. २०.

**ते तं भुक्त्वा स्वर्गलोकं विशालं क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति।**
**एवं त्रैधर्म्यमनुप्रपन्ना गतागतं कामकामा लभन्ते ॥२१॥**

**अन्वयार्थ—ते**—ते सर्व वैदिक कर्मी—**तं विशालं स्वर्गलोकं**—त्या विस्तीर्ण स्वर्गलोकास—**भुक्त्वा**—भोगून—**पुण्ये क्षीणे**—पुण्य क्षीण झालें असतां—**मर्त्यलोकं**—मर्त्यलोकांत—**विशन्ति**—शिरतात.—**एवं**—याप्रमाणें—**त्रैधर्म्यं**—वैदिक कर्ममार्गास—**अनुप्रपन्नाः**—अनुसरणारे—**कामकामाः**—विषयांची कामना करणारे-सकाम पुरुष—**गतागतं**—जा-ये या अवस्थेस—**लभन्ते**—प्राप्त होतात.२१

**ते तमिति । ते तं भुक्त्वा स्वर्गलोकं विशालं विस्तीर्णं क्षीणे पुण्ये मर्त्यलोकमिमं विशन्त्याविशन्ति । एवं हि यथोक्तेन प्रकारेण त्रैधर्म्यं केवलं वैदिकं कर्मानुप्रपन्ना गतागतं गतं चाऽऽगतं च गतागतं गमनागमनं कामकामाः कामान्कामयन्त इति कामकामा लभन्ते गतागतमेव न तु स्वातंत्र्यं क्वचिल्लभन्त इत्यर्थः ॥ २१ ॥**

**भाष्यार्थ—'ते तं०' इति**—पण स्वर्गप्राप्ति भगवत्प्राप्तीसारखी नाहीं,हे 'ते तं०' या श्लोकाने सांगतात—**ते तं विशालं-विस्तीर्णं स्वर्गलोकं भुक्त्वा**—ते त्या विशाल-विस्तीर्ण स्वर्गलोकास भोगून—**पुण्ये क्षीणे इमं मर्त्यलोकं विशन्ति-आविशन्ति**—पुण्य क्षीण झालें असता या मर्त्यलोकांत शिरतात-प्रवेश करितात.—**एवं हि-यथोक्तेन प्रकारेण त्रैधर्म्यं-केवलं वैदिकं कर्म अनुप्रपन्नाः**—याप्रमाणें -पूर्वोक्त प्रकारें त्रैधर्म्यास म्ह० केवल वैदिक कर्मास शरण झालेले-वैदिक कर्माचेंच आचरण करणारे—**कामकामाः-कामान् कामयन्ते इति कामकामाः**—कामकाम पुरुष,कामांची-विषयांची इच्छा करितात, म्हणून कामकाम पुरुष—**गतागतं-गतं च आगतं च गतागतं-गमनागमनं लभन्ते**—गतागतास-गत-जाणें व आगत-येणें तें गतागत म्ह० गमन व आगमन यांस प्राप्त होतात.—**गतागतं एव तु स्वातन्त्र्यं क्वचित् न लभन्ते इत्यर्थः**—गमन व आगमन यांसच प्राप्त होतात आणि स्वातंत्र्यास केव्हांहि प्राप्त होत नाहींत, असा याचा भावार्थ. [ कर्मांच्या योगानें स्वर्गलोकास प्राप्त झालेले ते, विस्तीर्ण स्वर्गलोकाचा उपभोग घेऊन, स्वर्गाच्या प्राप्तीचें निमित्त -पुण्य क्षीण झालें असतां या मनुष्यलोकांत परत येतात. वेदोक्त कर्मरूप धर्माचा आश्रय करणारे विषयेच्छु पुरुष जा-ये या अवस्थेस प्राप्त होतात. ] २१

**अनन्याश्चिन्तयन्तो मां ये जनाः पर्युपासते ।**
**तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम् ॥२२॥**

**अन्वयार्थ—अनन्याः चिन्तयन्तः**—परम देव जो नारायण, त्याच्याशीं एकरूप होऊन चिंतन करणारे—**ये**—जे—**जनाः**—लोक—**मां**—मला—**पर्युपासते** सर्व प्रकारें उपासितात—**तेषां नित्याभियुक्तानां**—त्या सतत ध्यान करीत असलेल्या विरक्तांचा—**योगक्षेमं**—योगक्षेम—**अहं**—मी—**वहामि**—वहातों. २२.

**ये पुनर्निष्कामाः सम्यग्दर्शिनः—अनन्या अपृथग्भूताः परं देवं नारायणमात्मत्वेन गताः सन्तश्चिन्तयन्तो मां ये जनाः संन्यासिनः पर्युपासते तेषां परमार्थदर्शिनां नित्याभियुक्तानां सतताभियोगिनां योगक्षेमं योगोऽप्राप्तस्य प्रापणं क्षेमस्तद्रक्षणं तदुभयं वहामि प्रापयाम्यहम् । ज्ञानी त्वात्मैव मे मतं स च मम प्रियो यस्मात्तस्मात्ते ममाऽऽत्मभूताः प्रियाश्चेति । नन्वन्येषामपि भक्तानां योगक्षेमं वहत्येव भगवान् । सत्यमेवं वहत्येव । किं त्वयं विशेषोऽन्ये ये भक्तास्ते स्वात्मार्थं स्वयमपि योगक्षेममीहन्तेऽनन्यदर्शिनस्तु नाऽऽत्मार्थं योगक्षेममीहन्ते । न हि ते जीविते मरणे वाऽऽत्मनो गृधिं कुर्वन्ति केवलमेव भगवच्छरणास्ते । अतो भगवानेव तेषां योगक्षेमं वहतीति ॥२२॥**

**भाष्यार्थ—ये पुनः निष्कामाः सम्यग्दर्शिनः**—पण त्यांच्या उलट जे निष्काम सम्यग्दर्शननिष्ठ असतात, त्यांचा योगक्षेम कसा चालतो तें 'अनन्याः०' या श्लोकानें सांगतात—**अनन्याः-अपृथग्भूताः-परं देवं नारायणं आत्मत्वेन गताः सन्तः**—अनन्य म्ह० अपृथक् झालेले-पर देव जो नारायण त्याला आत्मत्वानें जाणणारे असे होत्साते—**मां चिन्तयन्तः**—माझें चिन्तन करणारे—**ये जनाः-संन्यासीनः पर्युपासते**—जे जन-संन्यासी [म्ह० मीच सर्वात्मा वासुदेव आहें माझ्याहून दुसरें कांहीं नाहीं, असें जाणून त्याच प्रत्यक्स्वरूपाचे सतत ध्यान करणारे जे मुख्याधिकारी संन्यासी] माझी उपासना करितात-सर्वतः अखंड आत्मरूपानें पाहतात—**तेषां परमार्थदर्शिनां नित्याभियुक्तानां-सतताभियोगिनां**—त्या परमार्थदर्शी-नित्य आदरानें ध्यान करणाऱ्या-सतत ध्याननिष्ठांचा—**योगक्षेमं-योगः-अप्राप्तस्य प्रापणं क्षेमः-तद्रक्षणं तत् उभयं वहामि-अहं प्रापयामि**—योग व क्षेम मी वाहतों. योग म्ह० अप्राप्त वस्तूची प्राप्ति करून देणें व क्षेम म्ह० त्याचें रक्षण करणें-तीं दोन्हीं मी करतों, तीं मी त्याला पोचवितो. (ते कां ? उत्तर-)—**ज्ञानी तु आत्मा एव मे मतं**—ज्ञानी तर माझा आत्माच आहे, असें माझें मत आहे. —**यस्मात् सः च मम प्रियः तस्मात् ते मम आत्मभूताः च प्रियाः इति**—आणि ज्याअर्थी ज्ञानी मला प्रिय आहे, त्याअर्थी माझें नित्य चिंतन करणारे ते माझे आत्मभूत व प्रिय आहेत, म्हणून मी त्यांचा योगक्षेम चालवितों—**ननु अन्येषां अपि भक्तानां योगक्षेमं भगवान् वहति एव**—अहोपण, इतर भक्तांचाहि योगक्षेम भगवान् वाहतोच —**सत्यं एवं वहति एव**—असें खरें; भगवान् अन्य भक्तांचा योगक्षेम वाहतोच—**किं तु अयं विशेषः**—पण त्यांत हा विशेष आहे.—**ये अन्ये भक्ताः ते स्वात्मार्थं स्वयं अपि योगक्षेमं ईहन्ते**—जे अन्य भक्त असतात ते स्वतः-साठीं स्वतःहि योगक्षेमार्थ यत्न करितात —**तु अनन्यदर्शिनः आत्मार्थं योगक्षेमं न ईहन्ते**—पण जे एकत्वदर्शी आहेत, ते स्वात्म्यासाठीं योगक्षेमाला उद्देशून कांहीं हालचाल करीत नाहींत—**ते आत्मनः जीविते मरणे वा गृधिं न हि कुर्वन्ति**—ते आपल्या जीवताविषयीं किंवा मरणाविषयींहि आकांक्षा करीत नाहीत.—**ते केवलं भगवच्छरणाः एव**—ते केवल भगवच्छरणच झालेले असतात.—**अतः भगवान्**

**एव तेषां योगक्षेमं वहति इति**—यास्तव भगवान्च त्यांचा योगक्षेम वाहतो, हा त्यांत विशेष आहे. २२.

---

१. रहस्यकार या श्लोकावरील टीपेंत म्हणतात–" कर्मयोगमार्गांत या श्लोकाचा अर्थ काय होतो, त्याचा विचार गी. र.च्या १२ प्रकरणांत (पृ.३-८२-८३) केला आहे तो पहा. त्याचप्रमाणें नारायणीय धर्मांतहि याचप्रमाणे 'मनीषिणो हि ये केचित् यतयो मोक्षधर्मिणः। तेषां विच्छिन्नतृष्णानां योगक्षेमवहो हरिः ॥ ' (म. भा. शां. ३४८.७२.) असें म्हटलें असून हे पुरुष एकान्त भक्त असले तरी प्रवृत्तिमार्गांतले म्ह० निष्कामबुद्धीनें कर्में करणारे असतात, असें तेथें म्हटलें आहे." गी. र. पृ. ३८२-८३, येथे काय म्हटलें आहें, तें आपण मग पाहूं. अगोदर नारायणीयधर्मांतील श्लोकाचा विचार करू. हा श्लोक महा-भारत शांतिपर्व कुंभकोण प्रत अ. ३५८ मध्यें ७२ वा आहे. तेथें प्रकरण असें चालू आहे–जनमेजयानें वैशंपायनाला ' विद्वानांनी आचरिलेल्या या नारायणीय धर्माचें नाना व्रतांमध्ये स्थित असलेले दुसरे विप्र अनुष्ठान कां करीत नाहीत ? ' असा प्रश्न केला असतां वैशपायन म्हणाला– " राजन् देहबंधामध्ये तीन प्रकृति उत्पन्न केलेल्या आहेत. सात्त्विकी, राजसी व तामसी. त्यांतील सात्त्विकी प्रकृतीचा पुरुष श्रेष्ठ, तो मोक्षाप्राप्तीसाठींच निश्चित झालेला असतो. तो मोक्षामध्ये नारायणच श्रेष्ठ आहे, असें समजतो, म्हणून तो सात्त्विक होय. पुरुषोत्तमाचें चिन्तन करणाराला इष्ट पदार्थांची प्राप्ति होते. एकान्तभक्त सतत नारायणपरायण म्ह० नारायणच आपली परागति–परम फल आहे, असें जाणणारा असतो." वगैरे, त्या पुढे हा वरील श्लोक आहे. याचा सरळ अर्थ असा आहे—" जे कित्येक ज्ञानी मोक्षधर्मी, यति–संन्यासी असतात त्या तृष्णाशून्यांचा योगक्षेम वहाणारा हरि आहे " यांत 'यति' असा प्रत्यक्ष शब्द असतांना त्यांना ' प्रवृत्तिमार्गांतले–निष्कामबुद्धीनें कर्में करणारे ' असें म्हणणें म्ह० ओढाताणीची पराकाष्ठाच झाली म्हणावणाची ! या श्लोकांतील 'यति' शब्द 'संन्यासी' या अर्थीं नाही,असे म्हणावें तर याच अध्यायांत 'यतीनां चापि यो धर्मः स ते पूर्वं नृपोत्तम । कथितो हरिगीतासु० ' व ' श्वेताना यतिनां चाह एकान्तगतिमव्ययाम् ' हे श्लोक आहेत. त्यांतील यति म्ह० कर्मयोगी–निष्कामबुद्धीनें कर्म करणारे असें म्हणतांच येत नाही. अर्थात् नारायणीय धर्मांतच 'यति' हा शब्द 'संन्यासी' याअर्थीं वापरलेला असल्यामुळें त्याच अध्यायांत तोच शब्द अन्य अर्थी योजला आहे, असें म्हणतांच येत नाही. तसेंच ७१ व्या श्लोकांत ' पुरुषोत्तमाचें चिंतन करणाऱ्या एकान्तभक्ताला इष्ट पदार्थांची प्राप्ति होते,' असें सांगून ' विरक्त मोक्षधर्मी यतीचा योगक्षेम चालविणारा हरि आहे ' असें ७२ व्या श्लोकांत म्हटलें आहे. म्ह० 'एकान्तभक्ताला इष्टप्राप्ति होते, त्यांना जें हवें असतें ते प्राप्त होतें' असें सांगून मग 'यतीचा योगक्षेम हरि चालवितो,' असें म्हटल्यामुळें यतिशब्दाचा संन्यासी हाच अर्थ संभवतो.यावरून आचार्यांनी आपल्या भाष्यांत 'त्या संन्यासी भक्तांचा योगक्षेम मी वाहतों ' असें जें म्हटलें आहे, त्याचें स्वारस्य लक्षांत येतें. तसेंच, एकान्तभक्त म्ह० ज्ञानी कर्मयोगी,असें जे रहस्यकारांचें म्हणणें आहे, तेंहि नारायणीय धर्माला अनुसरून नाहीं. एकान्त भक्त सुद्धां एक प्रकारचे संन्यासीच आहेत. कारण याच ३५८ अध्यायांत " एकान्तिनो हि पुरुषा दुर्लभा बहवो नृप । यद्येकान्तिभिराकीर्णं जगत्स्यात्कुरुनंदन" ॥६२॥ 'अहिंसकैरात्मविद्भिः सर्वभूतहिते रतैः । भवेत्कृतयुगप्राप्तिः आशीःकर्मविवर्जिता ' ॥६३॥ "सांख्य

योगेन तुल्यो हि धर्म एकान्तिसेवितः ” ॥ ७४ ॥ “ प्रवृत्तिलक्षणैः युक्तं नावेक्षति स्वयं हरिः ” ७६ अशीं वचनें आहेत. त्यांचा आशय असा–‘हे राजा या जगांत पुष्कळ एकान्ति पुरुष असणें शक्य नाहीं. अहिंसक, आत्मज्ञ व सर्वभूतांच्या हितामध्यें रत असलेल्या एकान्ति लोकांकडून जर हें जगत् व्याप्त झालें असतें, तर सर्व आशा व कर्मे यांनी रहित अशा कृतयुगाचीच प्राप्ति झाली असती. एकान्ति लोकांनीं आचरिलेला धर्म सांख्य-योगाशीं तुल्य आहे, सांख्ययोगासारखाच आहे. प्रवृत्तिलक्षणांनी युक्त असलेल्या मनुष्या-कडे स्वतः हरि पहात नाही, तर लोकपितामह ब्रह्मा त्याला उत्पन्न होत असलेला, असाच पाहतो. म्ह० तो मुक्त होत नाहीं.’ ‘एकान्तभक्त सतत नारायण परायण असतो ’ इत्यादि अनेक वचनांवरून नारायणीय धर्महि प्रवृत्तिधर्म नसून निवृत्ति धर्म आहे, हें उघड होतें व गीतेंत निवृत्ति धर्म सांगितला आहे, हेच आचार्यांचें म्हणणें आहे.

आतां रहस्यकारांनीं वर ज्या पृष्ठांचा हवाला दिला आहे त्यांकडे वळूं. “ सर्वच भू-तांचा एकच आत्मा आहे, असें मानून प्रत्येक पुरुष जर सदा सर्वदा सर्वभूतहितच करूं लागला तर त्याचा स्वतःचा चरितार्थ तरी कसा चालावा ? ” “ तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहं (गी. ९.२२ ) असें भक्तिमार्गदृष्ट्या भगवन्तांनीं गीतेतच या प्रश्नाचें उत्तर दिलें आहे.” ( एकूण भगवानांनी ‘ सर्व भूतांचा एकच आत्मा मानून सदा सर्वदा सर्वभूतहित करणाराचा चरितार्थ मी चालवितों, ’ असें या वचनात सांगितलें आहे ! ‘ अनन्य मनानें माझें चिन्तन करणारे जे माझी सर्व प्रकारें उपासना करितात त्यांचा योगक्षेम मी चालवितों ’ हा सरळ असला तरी त्याचा खरा अर्थ नव्हे. तसेंच, सर्व भू-तांचा आत्मा एक आहे असें ते नुसतें मानतात, तशी नुस्ती कल्पना करितात, खरोखर कांही आत्मैक्य नाही !! पण सर्वांचा आत्मा एक मानल्यावर ‘ मी व सर्व भूतें, ’ ‘ मी व माझा देश ’ इत्यादि भेदबुद्धि कशी संभवते ? तसेंच सर्वभूतहित म्ह० काय ? त्याचें स्वरूप कोठेंच व्यक्त केलेलें नाही. असो. ) “ लोककल्याण करण्याची बुद्धि ज्याला झाली त्यानें जेवणखाण सोडून द्यावें असें होत नाहीं. तर मी आपले देहधारणहि लोकोपयोगार्थच करितों, अशी त्याची बुद्धि असली पाहिजे. अशी बुद्धि असेल तेव्हांच इंद्रियें ताब्यांत राहून लोककल्याण होतें असे जनकानें म्हटले आहे. ” ( महाभा. अश्व. ३२ ) ( पण लोककल्याण करणारानें जेवणखाण सोडावें, असें म्हणतो कोण ? व त्याचा येथें प्रसंग काय आहे ? सर्व संग सोडून भगवच्चिंतन करणारांचा म्ह० एकान्त भक्तांचा योग-क्षेम मी चालवितो, असे भगवान् म्हणत आहेत, येथें जेवणाखाणाचा किंवा लोककल्याणाचा कांही संबंध नाही. ‘ मी आपले देहधारणहि लोकोपयोगार्थच करितो, अशी बुद्धि असेल तेव्हांच इंद्रियें ताब्यांत राहून लोककल्याण होतें,’ असें जनकाने म्हटलेले नाही. जनकाचें उदाहरण येथें अगदी अस्थानीं दिलें आहे. ‘ ममता ’ सोडणें, हें पुरुषार्थाचें साधन आहे, हें सुचविण्यासाठी दृष्टान्तरूपानें जनक व ब्राह्मण यांचा संवाद आश्वमेधिकपर्वांत दिला आहे, एका ब्राह्मणाला कांहीं एका कारणानें जनकानें आपल्या देशांतून निघून जावयास सांगितलें. पण तो ब्राह्मण स्वतः धर्मच असल्यामुळें त्यानें राजाला ‘तुझा देश कोठपासून कोठवर आहे तें सांग, म्हणजे मी त्याच्या बाहेर जाईन’ असें म्हटलें; पण राजा त्याचें उत्तर न देतां विचार करीत बसला. बराच वेळ विचार केल्यावर तो म्हणतो–“मला माझा देश कोणता

**येऽप्यन्यदेवताभक्ता यजन्ते श्रद्धयान्विताः ।**
**तेऽपि मामेव कौन्तेय यजन्त्यविधिपूर्वकम् ॥ २३ ॥**

**अन्वयार्थ—ये**—जे—**अन्यदेवताभक्ताः अपि**—दुसऱ्या देवतांचे भक्तहि—**श्रद्धया**—श्रद्धेनें—**अन्विताः**—युक्त होऊन—**यजन्ते**—त्या अन्य देवतांची पूजा करितात,—**ते अपि**—ते सुद्धां—**कौन्तेय**—हे कुंतिपुत्रा!—**मां एव**—माझीच—**अविधिपूर्वकं**—अज्ञानानें—**यजन्ति**—पूजन करितात. २३.

**नन्वन्या अपि देवतास्त्वमेव चेत्तद्भक्ताश्च त्वामेव यजन्ते सत्यमेवम्—येऽप्यन्यदेवताभक्ता अन्यासु देवतासु भक्ता अन्यदेवताभक्ताः सन्तो यजन्ते पूजयन्ते श्रद्धयाऽऽस्तिक्यबुद्ध्याऽन्विता अनुगतास्तेऽपि मामेव कौन्तेय यजन्त्यविधिपूर्वकमविधिरज्ञानं तत्पूर्वकमज्ञानपूर्वकं यजन्त इत्यर्थः ॥ २३ ॥**

---

तेंच कळत नाहीं. यास्तव माझा–विषय म्हणून कोठेंच नाहीं, किंवा हा सर्वच विषय माझा आहे. पण जसा तो माझा आहे तसाच प्रत्येकाचा आहे. यास्तव तुला वाटेल तेथें रहा व हवा तसा त्याचा उपभोग घे." त्यावर ब्राह्मण म्हणाला–"एवढें मोठें राज्य तुझ्या ताब्यांत असतांना तूं त्यावरील ममत्व कोणत्या बुद्धीचा आश्रय करून सोडलेंस ? किंवा सर्व विषय माझाच आहे, हें कशावरून जाणलेंस" त्यावर जनक पुनः म्हणाला–"अन्तवन्त इहारम्भा विदिताः सर्वकर्मसु। नाध्यगच्छमहं तस्मात् ममेदमिति यद्भवेत् ॥" या श्लोकीं सर्व कर्मांतील आरंभ नाशवंत आहेत, हें मी जाणलें आहे. त्यामुळें हे माझें असें ज्याला म्हणतां येईल, असें मला कांहींच उपलब्ध होत नाहीं. 'एतां बुद्धिं समाश्रित्य ममत्वं वर्जितं मया' या बुद्धीचा आश्रय करून मीं ममत्व टाकलें. नंतर 'किंवा सर्व विषय माझाच आहे. हें मी कोणत्या आशयानें म्हणतों ते ऐक,' असें बोलून 'माझ्या घ्राणेंद्रियांत असलेल्या गंधाचीहि मी आत्म्यासाठीं इच्छा करीत नाहीं. त्यामुळें मी भूमीला जिंकलें असून ती सदा माझ्या अधीन आहे. माझ्या तोंडांत असलेल्या रसानाहि मीं आत्म्यासाठीं इच्छीत नाहीं. त्यामुळें मी आपाला जिंकलें आहे' इत्यादि आकाशान्त सर्वभूतें व मन या सर्वांना मी जिंकलें असून तीं सर्व माझ्या स्वाधीन आहेत. अर्थात् हे सर्व समारंभ देव, पितर, अतिथींसह सर्वभूतें यांसाठी आहेत, आत्म्यासाठीं नाहींत. अर्थात् या बुद्धीनें सर्वच माझा विषय आहे, असें मी समजतों" इत्यादि. यावरून जनकाचा मूळ आशय काय आहे व रहस्यकार कोणत्या अर्थीं त्याचा आधार दाखवितात तें वाचकांनीच जाणावें. रहस्यकारांचे सर्व आधार नेहमीं अशाच स्वरूपाचे असतात. त्यांनीं आपल्या असल्या सर्व विरुद्ध प्रतिपादनाला 'लोककल्याण' या मोहक शब्दाचा आधार घेतला आहे. पण हल्लीं रूढ झालेलें 'लोककल्याण' एकदेशी आहे, तें केवल ऐहिक आहे, रागद्वेषप्रयुक्त आहे, त्यांत रजोगुणाचें प्राधान्य आहे. तें केवळ राजकीय आहे. त्यामुळें प्रचलित लोककल्याणाचा व जनकाच्या पूर्वोक्त व्यापक ज्ञानाचा मुळींच संबंध नाहीं. साधु पुरुष जें लोककल्याण करितात तें पारमार्थिक असतें. खरें कल्याण तेंच आहे. लौकिक लोककल्याण क्षणिक व त्यामुळेंच तुच्छ होय. गीता लौकिक लोककल्याण करण्याचा उपदेश करीत नाहीं.

**भाष्यार्थ—ननु अन्याः अपि देवताः त्वं एव चेत् तद्भक्ताः च त्वां एव यजन्ते**—अहो पण अन्य देवताहि जर तूंच आहेस, तर त्या देवतांचे भक्तहि तुझीच पूजा करितात, असें म्हटलें पाहिजे,—**सत्यं एवं**—(तर भगवान् म्हणतात–) होय, हेंच खरें आहे.—**ये अपि अन्यदेवताभक्ताः-अन्यासु देवतासु भक्ताः अन्यदेवताभक्ताः सन्तः**—जे अन्यदेवताभक्त-अन्य देवतांचे ठायीं भक्ति ठेवणारे, असे अन्य देवताभक्त होत्साते—**श्रद्धया-आस्तिक्यबुद्ध्या अन्विताः-अनुगताः यजन्ते-पूजयन्ते**—श्रद्धेने-आस्तिक्यबुद्धीनें युक्त-अनुगत होऊन यजन करितात-पूजतात—**कौन्तेय ते अपि मां एव यजन्ति**—हे अर्जुना! ते सुद्धां माझेंच पूजन करितात.—**अविधिपूर्वकं-अविधिः-अज्ञानं तत्पूर्वकं-अज्ञानपूर्वकं यजन्ते इत्यर्थः**—( पण तें कसें? उत्तर–) अविधिपूर्वक-अविधि म्ह० अज्ञान तत्पूर्वक-अज्ञानपूर्वक यजन करितात, असा याचा भावार्थ. [ हाच माझे भक्त व इतर देवतांचे भक्त यांच्या पूजेंतील फरक आहे.] २३

---

१ 'तेऽपि मामेव अविधिपूर्वक यजन्ति' याचा अर्थ रहस्यकार–"तेहि विधिपूर्वक नसलें तरी ( पर्यायाने ) माझेंच यजन करितात. " असा करितात. पण त्यात कांहींच स्वारस्य नाहीं. कारण अन्य देवताचे भक्त अन्य देवताचे जे पूजन करितात, तें विधिपूर्वक नसतें, असें म्हणण्यास कांहीं आधार नाहीं. उलट अन्य देवताचे श्रद्धाळु भक्त आपल्या उपास्य देवतेचें यजन अविधीनें करतील, हे शक्यच नाहीं. यास्तव 'अविधिपूर्वकं म्ह० अज्ञानपूर्वक' असा अर्थ करणेंच अतिशय सयुक्तिक आहे. कारण अन्यदेवताभक्त अन्य देवतांचें यजन जेव्हा करीत असतात, तेव्हां 'आम्हीं हें परमात्म्याचेंच यजन करीत आहों,' याचें त्यांना भान नसतें, हें भगवानाना सांगावयाचें आहे. त्यामुळे 'तेहि अज्ञानपूर्वक माझेंच यजन करितात' या म्हणण्यांतच अधिक स्वारस्य आहे. शिवाय हा अर्थ पुढील श्लोकार्थाशींहि जुळतो. कारण पुढील श्लोकांत ' मीच सर्व यज्ञांचा भोक्ता व प्रभु आहें, पण अन्य देवताभक्त मला तत्त्वतः जाणत नाहींत, त्यामुळें यागफलापासून च्युत होतात, ' असें स्पष्ट म्हटलें आहे. त्याच्याशीं या शब्दाचा संबध दाखविण्यासाठींच आचार्यांनीं त्या श्लोकावरील भाष्यांत –" अतः अविधिपूर्वक–इष्टवा यागफलात् ते च्यवन्ति–" असें म्हटले आहे. यावरून आचार्य शब्दांचा अर्थ करितांना पूर्वोत्तर प्रकरणाकडे कसें व किती अनुसंधान ठेवतात, तें वाचकांच्या लक्षांत येईल. रहस्यकार मनसोक्त अर्थ कसा करितात व तो करीत असतांना पूर्वोत्तर विरोधाची कशी पर्वा करीत नाहींत, याचें एक उदाहरण येथें आहे. या श्लोकांत टीपेंत 'कोणतीहि देवता घ्या, ती भगवंताचें एकप्रकारचे स्वरूप आहे' हें तत्त्व वैदिक धर्मांत फार प्राचीन काळापासून चालत आलें आहे, हें दाखविण्यासाठीं 'एकं सद्विप्रा बहुधा वदन्ति०' या ऋग्वेदस्थ ऋचेचा उल्लेख केला आहे. याच वाक्याचा उल्लेख पूर्वींहि, गी. र. पृ. २२१ वर आहे. त्यांतील 'सत्'शब्दाचा अर्थ 'सत्य' 'ब्रह्म' असा केला आहे. पण तो तसा होऊं शकत नाहीं, हें आम्हीं गी. भा. पृ. ८४ वर दाखविलेंच आहे. रहस्यकारांनीं येथें त्याचाच अर्थ निराळा केला आहे. "परमेश्वर एक असून त्याला पंडित लोक अग्नि, यम मातरिश्वा अशीं अनेक नांवें देतात" असा बरोबर अर्थ केला आहे. पण तो त्यांच्याच पूर्वींच्या 'सत् म्ह० सत्य व ब्रह्म ' या अर्थाशी जुळत नाहीं. ( गी. र. पृ. २२१ व ६१७ आणि गी. भा. पृ. ८४ पहा.)

**अहं हि सर्वयज्ञानां भोक्ता च प्रभुरेव च ।**
**न तु मामभिजानन्ति तत्त्वेनातश्च्यवन्ति ते ॥२४॥**

**अन्वयार्थ—हि**—कारण—**अहं**—मी—**सर्वयज्ञानां**—सर्व यज्ञांचा—**भोक्ता** देवतारूपानें भोक्ता—**च**—व—**प्रभुः एव च**—प्रभुच आहें.—**तु**—पण—**ते**—अन्य देवतांचे भक्त—**मां**—मला—**तत्त्वेन**—अशा तात्त्विक रूपानें—**न अभिजानन्ति**—जाणत नाहींत—**अतः**—म्हणून—**च्यवन्ति**—मुख्य फलापासून च्युत होतात. २४.

**कस्मात्तेऽविधिपूर्वकं यजन्त इत्युच्यते यस्मात्—अहं हि सर्वयज्ञानां श्रौतानां स्मार्तानां च सर्वेषां यज्ञानां देवतात्मत्वेन भोक्ता च प्रभुरेव च । मत्स्वामिको हि यज्ञोऽधियज्ञोऽहमेवात्रेति ह्युक्तम् । तथा न तु मामभिजानन्ति तत्त्वेन यथावत् । अतश्चाविधिपूर्वकमिष्ट्वा यागफलाच्च्यवन्ति प्रच्यवन्ते ते ॥ २४ ॥**

**भाष्यार्थ—ते अविधिपूर्वकं कस्मात् यजन्ते इति उच्यते**—ते अविधिपूर्वक यजन कशासाठीं करितात ते सांगितले जातें.—**यस्मात् अहं हि सर्वयज्ञानां श्रौतानां स्मार्तानां च सर्वेषां यज्ञानां देवतात्मत्वेन भोक्ता च प्रभुः एव च**—कारण कीं, मीच सर्व यज्ञांचा-श्रौत व स्मार्त अशा सर्व यज्ञांचा, देवतांचा आत्मा या रूपानें भोक्ता व अन्तर्यामी या रूपानें प्रभु आहें.—**हि मत्स्वामिकः यज्ञः**—कारण यज्ञ मत्स्वामिकच आहे. मीच यज्ञाचा स्वामी आहें.—**'अधियज्ञोऽहमेवात्र' इति हि उक्तं**—या देहांत अधियज्ञ मीच आहे, असें वर (पृ. ६४८)सांगितलेंच आहे.—**तु तथा मां तत्त्वेन-यथावत् न अभिजानन्ति**—पण मीच यज्ञांतील भोक्ता व प्रभु असतांना मला तत्त्वतः पूर्णपणें लोक जाणत नाहींत,—**अतः च अविधिपूर्वकं इष्ट्वा यागफलात् ते च्यवन्ति-प्रच्यवन्ते**—म्हणून अविधिपूर्वक यज्ञ करून ते त्या यज्ञाच्या फलापासून च्युत होतात. त्यांचा यागफलापासून भ्रंश होतो. २४.

**यान्ति देवव्रता देवान्पितॄन्यान्ति पितृव्रताः ।**
**भूतानि यान्ति भूतेज्या यान्ति मद्याजिनोऽपि माम् ॥२५॥**

**अन्वयार्थ—देवव्रताः**—देवांमध्यें ज्यांचें व्रत, नियम किंवा भक्ति असते-देवांची जे भक्ति करितात, ते—**देवान्**—देवांस—**यान्ति**—प्राप्त होतात.—**पितृव्रताः**—पितृभक्त—**पितॄन्**—पितरांस—**यान्ति**—प्राप्त होतात.—**भूतेज्याः**—भूतांची पूजा करणारे—**भूतानि**—विनायक, मातृगण इत्यादि भूतगणांस—**यान्ति**—प्राप्त होतात—**मद्याजिनः अपि**—व माझी पूजा करणारेहि—**मां**—मला—**यान्ति**—प्राप्त होतात. २५.

**येऽप्यन्यदेवताभक्तिमत्त्वेनाविधिपूर्वकं यजन्ते तेषामपि, यागफलमवश्यंभावि, कथम्—यान्ति गच्छन्ति देवव्रता देवेषु व्रतं नियमो भक्तिश्च येषां ते देवव्रता**

देवान्यान्ति। पितॄनग्निष्वात्तादीन्यान्ति पितृव्रताः श्राद्धादिक्रियापराः पितृभक्ताः। भूतानि विनायकमातृगणचतुर्भगिन्यादीनि यान्ति भूतेज्या भूतानां पूजकाः। यान्ति मद्याजिनो मद्यजनशीला वैष्णवा मामेव। समानेऽप्यायासे मामेव न भजन्तेऽज्ञानात्। तेन तेऽल्पफलभाजो भवन्तीत्यर्थः॥ २५॥

**भाष्यार्थ—ये अन्यदेवताभक्तिमत्त्वेन अपि अविधिपूर्वकं यजन्ते तेषां अपि यागफलं अवश्यंभावि**—जे इतर देवतांच्या भक्तीनें युक्त होऊनहि अविधि–अज्ञानपूर्वक यजन करितात, त्यांनाहि त्या यागाचें फल अवश्य मिळणारच. [म्ह० तें त्यांचें यजनहि व्यर्थ नाहीं. इतर देवतांच्या पूजनाचे अनावृत्ति–मोक्ष हें फल जरी न मिळालें तरी त्या पूजेच्या अनुसार इतर फल प्राप्त होतेंच.]—**कथं**—तें कसे ? तेंच 'यान्ति०' या श्लोकानें सांगतात—**यान्ति-गच्छन्ति**—जातात.—**देवव्रताः-देवेषु व्रतं-नियमः च भक्तिः येषां ते देवव्रताः-देवान् यान्ति**—देवव्रत म्ह० ज्यांचे देवांमध्यें व्रत म्ह० नियम व भक्ति आहे, ते देवव्रत देवांस प्राप्त होतात.—**पितृव्रताः-श्राद्धादिक्रियापराः पितृभक्ताः-पितॄन्-अग्निष्वात्तादीन् यान्ति**—पितृव्रत म्ह० श्राद्धादिक्रियांमध्ये तत्पर असलेले पितृभक्त अग्निष्वात्तादिक पितरांस प्राप्त होतात. —**भूतेज्याः-भूतानां पूजकाः भूतानि-विनायक-मातृगण-चतुर्भगिन्यादीनि यान्ति**—भूतेज्य म्ह० भूतांचे पूजक भूतांस–विनायक, मातृगण, चतुर्थभगिनी इत्यादिकांस प्राप्त होतात.—**मद्याजिनः-मत्-यजनशीलाः वैष्णवाः मां एव यान्ति**—माझें यजन करण्याचे ज्याचें शील आहे, ते मद्याजी वैष्णव मलाच प्राप्त होतात. —**आयासे समाने अपि अज्ञानात् मां एव न भजन्ते**—देवतांचें व माझें पूजन करण्यांत आयास जरी एकसारखाच असला तरी अज्ञानामुळे मलाच भजत नाहींत. —**तेन ते अल्पफलभाजः भवन्ति इत्यर्थः**—त्यामुळे ते अल्पफलास प्राप्त होतात असा भावार्थ. २५.

**पत्रं पुष्पं फलं तोयं यो मे भक्त्या प्रयच्छति।**
**तदहं भक्त्युपहृतमश्नामि प्रयतात्मनः॥ २६॥**

**अन्वयार्थ—यः**—जो—**मे**—मला—**पत्रं**—पान-पत्र, **पुष्पं**—फूल-पुष्प,—**फलं**—फल—**तोयं**—जल,—**भक्त्या**—भक्तीने—**प्रयच्छति**—देतो—**(तस्य) प्रयतात्मनः**—त्या शुद्धचित्त पुरुषाचे—**भक्त्युपहृतं**—भक्तीने अर्पण केलेले—**तत्**—तें पत्र-पुष्पादिक—**अहं**—मी—**अश्नामि**—स्वीकारतो. त्याचा मी स्वीकार करतों.

न केवलं मद्भक्तानामनावृत्तिलक्षणमनन्तफलं सुखाराधनश्चाहं कथम्—पत्रं पुष्पं फलं तोयमुदकं यो मे मह्यं भक्त्या प्रयच्छति तदहं पत्रादि भक्त्योपहृतं भक्तिपूर्वकं प्रापितं भक्त्युपहृतमश्नामि गृह्णामि प्रयतात्मनः शुद्धबुद्धेः॥ २६॥

---

१ गी. भा. पृ. ६५० पहा. विष्णु व शिव हा भेद आचार्यांच्या मनांत नाहीं. गी. भा. ९०

**भाष्यार्थ—मद्भक्तानां अनावृत्तिलक्षणं अनन्तफलं केवलं न च सुखाराधनः अहं**—माझ्या भक्तांना अनावृत्ति–मोक्ष हें अनन्तफल मिळतें, एवढेंच नव्हे तर मी सुखाराधनहि आहें म्ह० माझें आराधन करणें अतिशय सुकरहि आहे. **—कथं**—तें कसें ? तें ' पत्रं० ' या श्लोकानें सांगतात.—**पत्रं पुष्पं फलं तोयं-उदकं**—पत्र, पुष्प, फल व जल-उदक—**यः मे-मह्यं भक्त्या प्रयच्छति**—जो मला भक्तीने अर्पण करितो—**अहं प्रयतात्मनः-शुद्धबुद्धेः तत् पत्रादि भक्त्या उपहृतं-भक्तिपूर्वकं प्रापितं-भक्त्युपहृतं अश्नामि-गृह्णामि**—मी त्या प्रयत-चित्त-शुद्धबुद्धि पुरुषाचें ते पत्र-पुष्पादिक भक्तांने अर्पण केलेले-भक्तिपूर्वक दिलेले-भक्त्युपहृत पत्रादिक स्वीकारतो. [ ज्या अर्थी हा भक्त हे पुष्पादिक मला भक्तीनें अर्पीत आहे, त्याअर्थी हा शुद्धचित्त तपस्वी माझी आराधना करीत आहे, असा मी निश्चय करतों व तसेंच फल देतों. ] २६

**यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत् ।**
**यत्तपस्यसि कौन्तेय तत्कुरुष्व मदर्पणम् ॥ २७ ॥**

**अन्वयार्थ—कौन्तेय**,—हे अर्जुना ! तूं—**यत्**—जें—**करोषि**—करतोस—**यत् अश्नासि**—जे खातोस,—**यत् जुहोषि**—जे हवन करतोस—**यत् ददासि**—जे दान देतोस,—**यत् तपस्यसि**—जे तप करतोस—**तत्**—ते सर्व—**मदर्पणं**—मला समर्पण—**कुरुष्व**—कर. २७.

**यत एवमतः—यत्करोषि स्वतः प्राप्तं यदश्नासि यच्च जुहोषि हवनं निर्वर्तयसि श्रौतं स्मार्तं वा, यद्ददासि प्रयच्छसि ब्राह्मणादिभ्यो हिरण्यान्नाज्यादि, यत्तपस्यसि तपश्चरसि कौन्तेय तत्कुरुष्व मदर्पणं मत्समर्पणम् ॥ २७ ॥**

**भाष्यार्थ—यतः एवं अतः**—ज्याअर्थी माझें आराधन असें सुकर आहे त्या-अर्थी—**यत् स्वतः प्राप्तं करोषि**—जें तूं स्वतःच-शास्त्रावांचून प्राप्त झालेलें गमनादि

---

१ या श्लोकावरील टीपेंत " कर्मापेक्षा बुद्धि श्रेष्ठ ( गी. २.४९ ) असे जें कर्मयोगातील तत्त्व त्याचेंच भक्तिमार्गातील रूपान्तर वरील श्लोकात वर्णिलें आहे " असें म्हणून गी. र. प्र. १५ पृ. ४७१-७२ पहा असें सांगतात. पण गीतेत कर्मयोग व ज्ञानयोग यांचीच तुलना केलेली असून कर्म व बुद्धि यांची तुलना केलेली नाहीं, हें आम्ही पूर्वी सविस्तर सांगितलें आहे. गी. भा. पृ. १८१-८४, २५४ पहा.

२ रहस्यकार या श्लोकावरील टीपेंत " भगवद्भक्तानें देखील कृष्णार्पणबुद्धीनें सर्व कर्मे करावयाचीं, सोडावयाचीं नाहींत हे यावरून उघड होतें, " असें म्हणतात. पण ती ' सर्व कर्मे ' कोणतीं ? खाणे, पिणे, वगैरे कीं, चातुर्वर्ण्यविहित कीं, इतर जाणें, येणें, बसणें वगैरे ? मूळ श्लोकाच्या अर्थाकडे लक्ष दिलें असतां शरीरानें, मनानें व वाणीनें तूं जें जें कांहीं विहित किंवा अविहित, शास्त्रोक्त किंवा स्वाभाविक, प्राप्त किंवा अप्राप्त कर्म-हालचाल करशील ती मला अर्पण कर, असें म्हटलें आहे, हें उघड दिसतें. पण याला कर्मयोग म्हणतां

**कर्म** करतोस—**यत् अश्नासि यत् च जुहोषि-श्रौतं स्मार्तं वा हवनं निर्वर्तयसि**—जें खातोस, आणि जें श्रौत किंवा स्मार्त हवन करतोस—**ब्राह्मणादिभ्यः हिरण्य-अन्न-आज्यादि यत् ददासि-प्रयच्छसि**—ब्राह्मणादिकांना हिरण्य-अन्न-घृत इत्यादि जे कांहीं देतोस—**कौन्तेय यत् तपस्यासि-तपः चरसि तत् मदर्पणं-मत्समर्पणं कुरुष्व**—व हे कुंतिपुत्रा, जें तप करतोस-तपश्चर्या करतोस तें मदर्पण-मत्समर्पण कर. [ ते सर्व मला अर्पण कर. ] २७.

**शुभाशुभफलैरेवं मोक्ष्यसे कर्मबन्धनैः ।**
**संन्यासयोगयुक्तात्मा विमुक्तो मामुपैष्यासि ॥ २८ ॥**

**अन्वयार्थ—एवं**—याप्रमाणें तूं करूं लागलास म्हणजे—**शुभाशुभफलैः**—शुभ व अशुभ फलें देणाऱ्या—**कर्मबंधनैः**—कर्मरूप बंधनांकडून—**मोक्ष्यसे**—मुक्त केला जाशील व—**संन्यासयोगयुक्तात्मा**—ज्याचें अन्तःकरण संन्यास-योगानें युक्त आहे असा तूं—**विमुक्तः**—अगदीं मुक्त होऊन—**मां**—मला—**उपैष्यासि**—प्राप्त होशील. २८.

---

येत नाहीं. कर्मयोग म्ह० वेदशास्त्रोक्त कर्मे असाच अर्थ गीतेतहि विवक्षित आहे. 'कर्मणि एव ते अधिकारः' पृ. १७२ ' योगस्थः कर्माणि कुरु' १७५, 'कर्म अवर०'१७८,'कर्मणः बुद्धिः ज्यायसी ' २५०. ' कर्मयोगेन०' २५५ ' कर्मणा अनारभात्०' २६२, ' नियतं कर्म कुरु' २७७ ' कार्यं कर्म समाचर ' ३०१ ' कर्मणा एव ससिद्धिं आस्थिता: ' ३०७ ' पूर्वैः पूर्वतरं कर्म कृत०' ' कुरु कर्म एव ' ३८५ ' कर्मयोगो विशिष्यते ' ४८४ 'आरुरुक्षोः मुनेः कर्म कारणं०' ५४९ इत्यादि ठिकाणीं कर्मशब्दाचा अर्थ वेदशास्त्रोक्त कर्म-चातुर्वर्ण्यविहित कर्मेच आहे व तीं कर्मे कर्तृत्वाभिमान व फलाशा सोडून केल्यास चित्ताची शुद्धि होऊन ज्ञाननिष्ठेची योग्यता येते. पण 'कश्चित्क्षण अपि अकर्मकृत् न तिष्ठति ' पृ. २७० 'देहभृता सर्वाणि कर्माणि त्यक्तु न हि शक्यं १८.११ इत्यादि ठिकाणीं सर्व हालचाल, शरीरेंद्रिय-चेष्टा हा कर्मशब्दाचा अर्थ आहे. त्याला कर्मयोग असे म्हणतां येत नाहीं. पण हा भेद रहस्यकारांनी कोठेंहि व्यक्त केलेला नाही. येथें सर्व कर्मे म्ह० लौकिक, स्वाभाविक, शास्त्रीय, निषिद्ध वगैरे जे जे कर्म करशील ते ते मला अर्पण कर, असा उपदेश आहे. त्यामुळे ज्यांची आवश्यकता नाही, तीं कर्मेंहि भक्तानें ओढावयाचीं नाहीत, असे यावरून होत नाहीं. ' जें करशील, खाशील, हवन करशील, दान देशील तें मदर्पण कर ' असें येथें भगवान् सांगत आहेत; जें प्राप्त नाहीं, जे तुला करावयाचें नसेल,ज्याची तुला आवश्यकता नाही तेंहि सर्व तू करच, असा बलात्कार करीत नाहीत. हें लक्षांत ठेवलें पाहिजे. येथें सर्व कर्मे म्ह०विहित कर्मयोग एवढाच अर्थ विवक्षित नसल्यामुळेंच पुढील श्लोकांत 'याप्रमाणें सर्व कर्मे मला समर्पण करणारा तू शुभ व अशुभ फल देणाऱ्या कर्मबंधनापासून मुक्त होशील ' असें म्हटलें आहे. ज्ञानोत्तर कर्मयोगच जर येथें विवक्षित असता तर ' अशुभफलैः कर्मबंधनैः मोक्ष्यसे ' असें म्हणण्याचें कारणच नव्हतें. कारण विहित कर्मयोगाचें अशुभफल केव्हांच मिळत नाहीं. अर्थात् रहस्यकारांना इष्ट असलेला ज्ञानोत्तर कर्मयोग या श्लोकावरून सिद्ध होत नाहीं.

**एवं कुर्वतस्तव यद्भवति तच्छृणु शुभाशुभफलैरेवं शुभाशुभे इष्टानिष्टफले येषां तानि शुभाशुभफलानि कर्माणि तैः शुभाशुभफलैः कर्मबन्धनैः कर्माण्येव बन्धनानि तैः कर्मबन्धनैरेवं मत्समर्पणं कुर्वन्मोक्ष्यसे । सोऽयं संन्यासयोगो नाम संन्यासश्चासौ मत्समर्पणतया कर्मत्वाद्योगश्चासाविति तेन संन्यासयोगेन युक्त आत्माऽन्तःकरणं यस्य तव स त्वं संन्यासयोगयुक्तात्मा सन्विमुक्तः कर्मबन्धनैर्जीवन्नेव पतिते चास्मिञ्शरीरे मामुपैष्यस्यागमिष्यसि ॥ २८ ॥**

**भाष्यार्थ—एवं कुर्वतः तव यत् भवति तत् शृणु**—असें करणाऱ्या तुला जें फल प्राप्त होईल तें ' शुभाशुभ० ' या श्लोकानें ऐक.—'**शुभाशुभफलैः एवं**' **–शुभाशुभे इष्टानिष्टफले येषां तानि शुभाशुभफलानि कर्माणि**—ज्यांचीं फलें शुभ व अशुभ–म्हणजे इष्ट व अनिष्ट असतात तीं शुभाशुभफल कर्में होत.— **तैः शुभाशुभफलैः कर्मबन्धनैः–कर्माणि एव बन्धनानि तैः कर्मबन्धनैः एवं–मत्समर्पणं कुर्वन् मोक्ष्यसे**—त्या शुभाशुभफल कर्मबंधनांकडून–कर्में हींच बंधनें, त्या कर्मबंधनांकडून याप्रमाणें–सर्व मत्समर्पण करणारा तूं मुक्त केला जाशील. [ भगवदर्पणबुद्धीनें सर्व कर्म करणाऱ्या जीवन्मुक्ताचें प्रारब्धकर्म क्षीण होतांच विदेह कैवल्य अवश्य प्राप्त होतें. तर मग सर्व कर्में भगवदर्पण केल्यानें मुक्ति मिळते व संन्यास-योगानेंहि मुक्ति मिळते, म्हणजे मुक्तीचीं दोन साधनें झालीं, असें कोणी म्हणेल म्हणून सांगतात–]—**सः अयं संन्यासयोगः नाम**—संन्यासयोग म्हणून ज्याला म्हणतात तो हाच होय.—**मत्समर्पणतया असौ संन्यासः च कर्मत्वात् योगः च असौ इति**—कारण मला सर्व समर्पण करणें या गुणामुळें हा संन्यास आहे व त्यांत कर्मत्व हा गुण असल्यामुळे हा योगहि आहे. त्यामुळें हा संन्यासयोग होय.—**तेन**

---

१ ' संन्यासयोगयुक्तात्मा ' याचा अर्थ रहस्यकार "कर्मफलांचा संन्यास करण्याचा जो हा योग त्यानें युक्तात्मा म्ह० शुद्धान्तःकरण," असा करितात. पण तो बरोबर नाहीं. कारण युक्तात्मा म्ह० शुद्धान्तःकरण हा अर्थ अगदींच चुकीचा आहे. कारण युक्त म्ह० शुद्ध असें म्हणतां येत नाहीं. तसेंच 'कर्मफलांचा सन्यास करण्याचा जो हा योग' हा समासाचा विग्रह चिन्त्य आहे. अगोदर कर्मफलाचा संन्यास येथें प्रकृत नाहीं. 'तूं जें जें बरें-वाईट कर्म करशील तें तें मदर्पण कर' असें वर प्रकृत आहे. प्रत्यक्ष कर्म मदर्पण कर, असें वर म्हट-लेलें असतांना ' कर्मफलांचा संन्यास ' असा त्याचा अर्थ करणें ही ओढाताण आहे. येथील संन्यास 'सर्व कर्म ईश्वरार्पण करणें' या स्वरूपाचा आहे, हें आचार्यांनाहि संमत आहे. इत-केंच नव्हे तर 'कर्में ईश्वरार्पण करणें, या कारणानें संन्यास व तें आचरणे या कारणानें योग, अशा संन्यासयोगानें ज्याचा आत्मा–अन्तःकरण युक्त आहे तो संन्यास-योगयुक्तात्मा,' असा त्यांनीं त्याचा स्पष्ट अर्थ केला आहे. त्यावरून संन्यास म्ह० स्वरूपतः सर्व कर्मांचा त्याग हाच अर्थ त्यांना मान्य आहे, असें कोणालाहि म्हणतां येणें शक्य नाहीं. आचार्य मुख्य व गौण अशा दोन्ही प्रकारच्या संन्यासाला संन्यास म्हणण्यास तयार आहेत. त्यांनीं जो कर्म ईश्वरार्पण करतो त्यालाहि संन्यासी म्हटलें आहे आणि

कर्तृत्वाभिमानाचा त्याग, फलाभिसंधीचा त्याग, रागद्वेषत्याग इत्यादिकांनाहि गौण संन्यास वारंवार म्हटलें आहे, यावरून त्यांचीं आग्रहशून्य मनोवृत्ति उघड दिसते. पण रहस्यकार मात्र तसें आग्रहशून्य नाहींत. ते आश्रमसंन्यासच गीतेला मान्य नाहीं, कर्मफलसंन्यासालाच गीतेंत संन्यास म्हटलें आहे, असा वृथा आग्रह धरून वारंवार अर्थाची ओढाताण करण्यास प्रवृत्त झाले आहेत. याची उदाहरणें येथेंच–याच श्लोकावरील टीपेंत आहेत. कशीं तीं पहा–ते म्हणतात—"ब्रह्मार्पणं ब्रह्म हविः" हे ज्ञानयज्ञाचें तत्त्वच आतां २७ व्या श्लोकांत भक्तीच्या परिभाषेप्रमाणें सांगितलें आहे. पण ही कल्पना किती असत् आहे! ज्ञानी पुरुष 'अर्पणादि सर्व ब्रह्मरूप पाहतो' जसें तेथें (गी. भा. पृ. ४२७–३६ पहा.) म्हटलें आहे व येथें 'तूं जें जें कांहीं करशील तें ईश्वरार्पण कर' असें म्हटलें आहे. अर्थात् दोन्ही श्लोकांच्या अर्थाचा कांहीं संबंध नाहीं. सर्व ईश्वरार्पण करणें निराळें व सर्व ब्रह्मरूप पाहणें निराळें. पण 'ब्रह्मार्पण' व 'मदर्पण' हे शब्द एकसारखे आहेत, असें पाहून रहस्यकारांनीं त्यांचा वृथा संबंध जोडला आहे, 'मयि सर्वाणि कर्माणि संन्यस्य' गी. भा. पृ. ३२८ 'ब्रह्मण्याधाय कर्माणि०' गी. भा. पृ. ५०१ या व असल्याच दुसऱ्याहि वचनांनीं कर्में ईश्वरार्पण करणें,या स्वरूपाचा गौण संन्यास सांगितला आहे, याबद्दल आचार्यांचाहि वाद नाहीं. पण रहस्यकार मात्र 'गीतेप्रमाणें हाच खरा संन्यास असून' असें निःशंकपणें म्हणतात व त्याला १८–२ श्लोकाचा आधार दाखवितात. (गी. र. पृ. ७४६.) पण हा आधार अप्रस्तुत आहे. कारण 'त्यात काम्यानां कर्मणां न्यास सन्यास कवयो विदुः' असें म्हटलें आहे. पण 'काम्यकर्मांचा त्याग' व 'सर्व कर्में मदर्पण, ब्रह्मार्पण, ईश्वरार्पण करणें' हीं दोन्ही एक नाहींत. "कर्मफलाशा सोडून (संन्यस्य) सर्व कर्में करणारा पुरुषच 'नित्यसंन्यासी' होय. (गी. ५.३)" असें जें त्यांचें म्हणणें आहे तेंहि पांचव्या अध्यायाच्या तिसऱ्या श्लोकाला धरून नाहीं. पाचव्या अध्यायाच्या तिसऱ्या श्लोकांत 'जो दुःखादि अनिष्टाचा द्वेष करीत नाहीं व सुखादि इष्टाची आकांक्षा करीत नाहीं, तो नित्य संन्यासी आहे असें जाणावें,'असें म्हटलें आहे.फलाशा सोडून कर्म करणारा, असें तेथें म्हटलेलें नाहीं. अर्थात् रहस्यकार आपल्या म्हणण्याला पुष्टि देण्यासाठीं म्हणून जे आधार दाखवितात ते निराळ्याच अर्थी असतात. पण मग आपलें म्हणणें खरें करण्यासाठीं त्यांच्या अर्थांची ओढाताण करितात. "कर्मत्यागरूप संन्यास गीतेस संमत नाहीं." गी. र. पृ. ७४६ असें त्याचें म्हणणें आहे. पण मग 'संन्यासं कर्मणां कृष्ण पुनर्योगं च शंससि' कृष्णा! तूं कर्मांचा संन्यास सांगतोस व पुनः कर्मांचा योग सांगतोस, हें अर्जुनाचें म्हणणें खोटेंच समजावयाचें कीं काय? तसेंच 'संन्यासः कर्मयोगश्च निःश्रेयसकरौ उभौ' हें खुद्द भगवानांचें म्हणणेंहि खोटेंच कीं काय? 'यतीनां चापि धर्मः हरिगीतासु कथितः' हें वैशंपायनाचें म्हणणेंहि फुकटच कीं काय? तात्पर्य रहस्यकारांचा पक्ष कोणीं कितीहि जरी उचलून धरला तरी त्यांत सत्यांश फारच थोडा असल्यामुळें तो अखेरपर्यंत टिकणारा नाहीं. कर्मादि सर्व ईश्वरार्पण करणें हा उपासनेचा प्रकार आहे. त्यांत कर्मयोगाचा कांहीं संबंध नाहीं. निष्काम कर्म ही सुद्धां उपासना, तो कर्मयोग नव्हे. उपासना चित्तशुद्धीसाठीं, ज्ञानप्राप्तीसाठीं विहित आहे. यास्तव काम्य कर्मांचा त्याग,सर्वकर्मफलत्याग, सर्व कर्में ईश्वरार्पण करणें, संकल्पत्याग, कर्तृत्वाभिमानत्याग इत्यादि, हे सर्व गौण संन्यास आहेत. त्यांतील कोणालाच

**संन्यासयोगेन यस्य तव आत्मा-अन्तःकरणं युक्तः**—त्या संन्यासयोगानें ज्या तुझा आत्मा म्ह० अन्तःकरण युक्त आहे—**सः त्वं संन्यासयोगयुक्तात्मा सन्**—तो तूं संन्यासयोगयुक्तात्मा होऊन—**जीवन् एव कर्मबन्धनैः विमुक्तः**—जिवंत असतांनाच कर्मबंधनाकडून विशेषकरून मुक्त केला गेलेला असा होत्साता—**च अस्मिन् शरीरे पतिते**—व हे शरीर पडले असतां—**मां उपैष्यासि-आगमिष्यासि**—मला प्राप्त होशील. [ याप्रमाणें सर्व मत्समर्पण केल्यानें तूं सर्व शुभाशुभ फल देणाऱ्या कर्मबंधनांतून मुक्त होशील. सर्व मदर्पण करणे हाच संन्यासहि आहे व योगहि आहे. तुझें चित्त त्यानें युक्त होईल. तूं जीवन्मुक्तीचा अनुभव घेऊन मरणानंतर मला प्राप्त होशील. ] २८.

समोऽहं सर्वभूतेषु न मे द्वेष्योऽस्ति न प्रियः ।
ये भजन्ति तु मां भक्त्या मयि ते तेषु चाप्यहम् ॥

**अन्वयार्थ—अहं सर्वभूतेषु**—मी सर्वभूतांमध्ये—**समः**—सम आहें.—**मे द्वेष्यः न**—माझा कोणी द्वेष्य-द्वेषपात्र-शत्रु नाहीं व—**प्रियः**—प्रिय—**न**—नाहीं.—**तु**—पण—**ये**—जे—**मां**—मला—**भक्त्या**—भक्तीने—**भजन्ति**—भजतात—**ते**—ते—**मयि**—माझ्यामध्यें-मजपाशीं स्वभावतःच असतात—**च**—आणि—**अहं अपि**—मीहि—**तेषु**—त्यांच्यामध्ये स्वभावतःच असतो. २९.

**रागद्वेषवांस्तर्हि भगवान्यतो भक्ताननुगृह्णाति नेतरानिति तन्न—समस्तुल्योऽहं सर्वभूतेषु न मे द्वेष्योऽस्ति न प्रियोऽग्निवदहं दूरस्थानां यथाऽग्निः शीतं नापनयति समीपमुपसर्पतामपनयति तथाऽहं भक्ताननुगृह्णामि नेतरान् । ये भजन्ति तु मामीश्वरं भक्त्या मयि ते स्वभावत एव न मम रागनिमित्तं मयि वर्तन्ते । तेषु चाप्यहं स्वभावत एव वर्ते नेतरेषु नैतावता तेषु द्वेषो मम ॥ २९ ॥**

**भाष्यार्थ—तर्हि भगवान् राग-द्वेषवान् यतः भक्तान् अनुगृह्णाति इतरान् न इति तत् न**—तर मग भगवान् रागद्वेषवान् आहे. कारण तो भक्तांवर मात्र अनुग्रह करतो, इतरांवर करीत नाहीं, म्हणून म्हणाल तर तसें नाहीं, असे 'समः०' या श्लोकानें सांगतात—**अहं सर्वभुतेषु समः तुल्यः**—मी सर्वभूतांमध्ये सम-तुल्य

---

कर्मयोग म्हणतां येत नाहीं. रहस्यकारांनीं याच टीपेंत भागवतांतील कांहीं श्लोकांचा आधार दिला आहे. पण त्यांतहि वरील गीतावचनांप्रमाणें उपासनाच विहित असल्यामुळें त्यांचा सांख्यांच्या ज्ञाननिष्ठेशीं कांहीं विरोध येत नाहीं. रहस्यकारांच्या कर्मयोगाशीं मात्र विरोध येतो. कारण उपासनेला आरंभ झाला कीं तत्त्वतः कर्मयोग संपला.

१ रहस्यकार या श्लोकाला असें अवतरण देतात—"भक्तीचा मार्ग सुखकर व सुलभ असें अध्यायाच्या आरंभीं वर्णन केलें. आतां त्यांतील समत्वरूपी जो दुसरा मोठा विशिष्ट गुण त्याचें वर्णन करितात." पण हें अवतरण असंबद्ध आहे. कारण 'मी सर्व भूतांमध्यें सम

आहे.—**मे द्वेष्यः न अस्ति न प्रियः**—मला कोणी द्वेष्य-द्वेषास योग्य असा नाहीं व कोणी प्रिय नाहीं.—**अहं अग्निवत्**—मी अग्नीसारखा आहे.—**तथा अग्निः दूर-स्थानां शीतं न अपनयति समीपं उपसर्पतां अपनयति**—जसा अग्नि दूर असलेल्यांचे शीत घालवीत नाही, अग्नीपासून दूर बसलेल्या प्राण्यांच्या थंडीचें निवारण करीत नाही, तर त्याच्या समीप बसणाराचेंच शीत घालवितो—**तथा अहं भक्तान् अनुगृह्णामि इतरान् न**—त्याचप्रमाणें मी भक्तावर अनुग्रह करतो, इतरांवर करीत नाही. [ असें जर आहे तर भगवानांच्या ठिकाणी रागद्वेष नाहीत कसे ? उत्तर-]—**तु ये मां-ईश्वरं भक्त्या भजन्ति**—परंतु जे मला-ईश्वराला भक्तीने भजतात—**ते मयि-स्वभावतः एव, न मम रागनिमित्तं मयि वर्तन्ते**—ते माझ्यामध्यें स्वभावतःच राहतात. माझ्या प्रीतीमुळे माझ्यामध्यें रहात नाहीत.—**तेषु च अपि अहं स्वभावतः एव वर्ते न इतरेषु**—आणि त्यांच्या ठिकाणींहि मी स्वभावतःच राहतो. इतर अभक्तांमध्यें राहत नाही.—**एतावता तेषु मम द्वेषः न**—स्वभावतःच हें होत असल्यामुळें मी अभक्तांमध्ये राहत नाही,एवढयावरून त्यांच्याशीं माझा द्वेष आहे, असे म्हणता येत नाही. [ जे वर्णाश्रमधर्मांच्या योगाने माझे भजन करितात, ते त्याच भजनाच्या अचिन्त्य माहात्म्यानें शुद्धचित्त होऊन माझ्या समीप राहतात. त्यांचें चित्त माझ्या अभिव्यक्तीला योग्य होतें. त्यामुळें मीहि स्वभावतःच त्यांच्या समीप राहून त्यांच्यावर अनुग्रह करितों. जसे सूर्याचे तेज व्यापक-सर्वत्र पसरलेले जरी असलें तरी तें स्वच्छ आरशांतच प्रतिबिंबित होतें,त्याप्रमाणे ज्यांचे चित्त भक्तीने अत्यंत शुद्ध झालेलें असतें, त्यांच्यामध्येंच प्रकट होतों. ] २९

## अपि चेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक् ।
## साधुरेव स मन्तव्यः सम्यग्व्यवसितो हि सः ॥३०॥

**अन्वयार्थ—अपि चेत्**—जरी कदाचित्—**सुदुराचारः**—अतिशय निंद्य आचरण करणारा एखादा—**अनन्यभाक्**—अनन्य भक्त होऊन—**मां**—मला—**भजते**—भजूं लागला तर—**सः**—तो—**साधुः एव**—सदाचरणसंपन्नच आहे असे—**मन्तव्यः**—मानावें—**हि**—कारण—**सः**—तो—**सम्यक्**—चांगल्या प्रकारें—**व्यवसितः**—निश्चित झालेला असतो. ३०.

---

आहे. मला सर्व भूते सारखींच. मला कोणी अप्रिय नाही व कोणी प्रिय नाही. तर जे भक्तीनें माझी उपासना करितात ते स्वभावतःच माझ्यामध्यें व मी त्यांच्यामध्यें असतों' असें पुढील श्लोकांत म्हटलें आहे. त्यावरून ' त्यांतील म्ह० भक्तिमार्गातील समत्वरूपी जो दुसरा मोठा गुण त्याचे वर्णन या श्लोकांत आहे,' हें म्हणणें खरे नाही,याविषयी कोणाचीहि खात्री होईल. त्यापेक्षां आचार्यांचें अवतरण किती सुसंबद्ध आहे, तें वाचकांनीच ठरवावें.

शृणु मद्भक्तेर्माहात्म्यम्—अपि चेद्यद्यपि सुष्ठु दुराचारः सुदुराचारोऽतीव कुत्सिताचारोऽपि भजते मामनन्यभागनन्यभक्तिः सन्साधुरेव सम्यग्वृत्त एव स मन्तव्यो ज्ञातव्यः सम्यग्यथावद्व्यवसितो हि यस्मात्साधुनिश्चयः सः ॥ ३० ॥

**भाष्यार्थ—शृणु मद्भक्तेः माहात्म्यं**—माझ्या भक्तीचें माहात्म्य ऐक—**अपि चेत्-यद्यपि सुष्ठु दुराचारः-सुदुराचारः अतीव कुत्सिताचारः अपि मां अनन्यभाक्-अनन्यभक्तिः सन् भजते**—जरी अत्यंत दुराचरण करणारा-अतिशय निंद्य आचरण करणाराहि मला अनन्यभाक् म्ह० ज्याची भक्ति मजवांचून दुसऱ्या कोणावरहि नाहीं, असा होऊन माझें भजन करूं लागला तर—**सः साधुः एव-सम्यक्वृत्तः एव मन्तव्यः-ज्ञातव्यः**—तो साधूच-उत्तम वर्तन करणाराच आहे, असें समजावें, असें जाणावें—**हि-यस्मात् सः सम्यक्-यथावत् व्यवसितः-साधुनिश्चयः**—कारण तो सम्यक्-यथावत्-यथार्थ व्यवसित असतो. म्हणजे त्यानें साधु निश्चय-उत्तम निश्चय केलेला असतो. [एखादा अत्यंत दुराचारी असलेलाहि मनुष्य जर माझी अनन्यभक्ति करूं लागला, तर तो साधुच आहे, सदाचरण करणाराच आहे, असें समजावें, कारण माझी भक्ति करणें, हा त्यानें फारच उत्तम निश्चय केलेला असतो.] ३०

**क्षिप्रं भवति धर्मात्मा शश्वच्छान्तिं निगच्छति ।**
**कौन्तेय प्रतिजानीहि न मे भक्तः प्रणश्यति ॥३१॥**

**अन्वयार्थ**—(**सः**—तो)—**क्षिप्रं**—सत्वर—**धर्मात्मा**—धर्मात्मा-धार्मिक—**भवति**—होतो आणि—**शश्वत्**—नित्य—**शान्तिं**—शांतीला—**निगच्छति**—प्राप्त होतो.—**कौन्तेय**—हे अर्जुना!—**मे भक्तः**—माझा भक्त—**न प्रणश्यति**—कधींहि नाश पावत नाहीं, अशी तूं—**प्रतिजानीहि**—प्रतिज्ञा कर. ३१.

उत्सृज्य च बाह्यां दुराचारतामन्तः सम्यग्व्यवसायसामर्थ्यात्—क्षिप्रं शीघ्रं भवति धर्मात्मा धर्मचित्त एव शश्वन्नित्यं शान्तिं चोपशमं निगच्छति प्राप्नोति । शृणु परमार्थं कौन्तेय प्रतिजानीहि निश्चितां प्रतिज्ञां कुरु न मे मम भक्तो मयि समर्पितान्तरात्मा मद्भक्तो न प्रणश्यतीति ॥ ३१ ॥

**भाष्यार्थ—च बाह्यां दुराचारतां उत्सृज्य अन्तः सम्यग्व्यवसायसामर्थ्यात्**—आणि बाह्य दुराचारता सोडून मनांत उत्तम निश्चय करणें, या सामर्थ्यामुळें—**क्षिप्रं-शीघ्रं धर्मात्मा-धर्मचित्तः एव भवति**—सत्वर-शीघ्र धर्मात्मा-धर्मचित्तच तो होतो. [त्याचें चित्त धर्मामध्येंच आसक्त होतें.]—**च शश्वत् नित्यं शान्तिं-उपशमं निगच्छति-प्राप्नोति**—आणि शश्वत्-नित्य शांतीला-उपशमाला प्राप्त होतो. [त्याच्या दुराचरणाचा नित्य उपशम होतो. तो आपलें दुराचरण सोडतो. याचें कारण-]—**परमार्थं शृणु**—मी एक अबाधित सिद्धान्त सांगतों तो तूं ऐक—**कौन्तेय**

**मे-मम भक्तः-मयि समर्पितान्तरात्मा मद्भक्तः न प्रणश्यति इति प्रतिजानीहि-निश्चितां प्रतिज्ञां कुरु**—अर्जुना, माझा भक्त म्ह० माझ्यामध्यें ज्यानें आपला अन्तरात्मा समर्पिला आहे, तो माझा भक्त सर्वथा नाश पावत नाहीं, अशी तूं निश्चित प्रतिज्ञा कर. [माझा भक्त दुराचारी जरी असला तरी तो सत्वर धर्मचित्त होतो, दुराचरणापासून कायमचा निवृत्त होतो. कारण अर्जुना, माझा भक्त कधीं नाश पावत नाहीं, अशी तूं प्रतिज्ञा कर. ] ३१

**मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः।**
**स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यान्ति परां गतिम्॥३२॥**

**अन्वयार्थ—हि**—कारण—**पार्थ**—हे अर्जुना !—**मां**—मला—**व्यपाश्रित्य**—आश्रय या रूपाने स्वीकारून—**स्त्रियः**—स्त्रिया—**वैश्याः**—वैश्य—**तथा शूद्राः**—त्याचप्रमाणे शूद्र असे—**ये**—जे—**पापयोनयः अपि**—पापजातींत उत्पन्न झालेलेहि—**स्युः**—असतात—**ते अपि**—तेसुद्धां—**परां गतिं**—परम गतीला—**यान्ति**—जातात. ३२.

**किंच—मां हीति । मां हि यस्मात्पार्थ व्यपाश्रित्य मामाश्रयत्वेन गृहीत्वा येऽपि स्युर्भवेयुः पापयोनयः पापा योनिर्येषां ते पापयोनयः पापजन्मानः। के त इत्याह स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यान्ति गच्छन्ति परां गतिं प्रकृष्टां गतिम्॥ ३२॥**

**भाष्यार्थ—किं च ' मां हि० ' इति**—आणखी याहि एका कारणानें माझी भक्ति करावी असें ' मां हि० ' या श्लोकानें सांगतात.—**पार्थ हि-यस्मात् मां व्यपाश्रित्य—मां आश्रयत्वेन गृहीत्वा ये पापयोनयः अपि स्युः-भवेयुः**—हे पार्थ, कारण माझा आश्रय करून-माझें आश्रय या रूपानें ग्रहण करून जे पापयोनिहि असतील—**पापा योनिः येषां ते पापयोनयः-पापजन्मानः**—ज्यांची योनि पापी असते ते पापयोनी. म्ह० ज्यांचे जन्म पापाचें फल आहेत, ते पापयोनि—**के ते इति आह**—ते कोणते ? तें सांगतात—**स्त्रियः वैश्याः तथा शूद्राः**—स्त्रिया, वैश्य व शूद्र—**ते अपि परां गतिं-प्रकृष्टां गतिं यान्ति-गच्छन्ति**—तेहि परागतीला-श्रेष्ठ फलाला

---

१ २९–३१ श्लोकावरील टीपेंत रहस्यकार म्हणतात—" सारांश सहाव्या अध्यायात (६.४४) कर्मयोग जाणण्याची नुस्ती इच्छा झाली तरी चरकांत घातल्याप्रमाणें अवश होऊन मनुष्य शब्दब्रह्मापलीकडे जातो, असा जो सिद्धान्त केला आहे, तोच आतां भक्तिमार्गाला लागू करून दाखविला आहे."(गी. र. पृ. ७४७) पण हा संबंध कितीसा सुसबद्ध आहे याचा विचार वाचकांनींच करावा. अ. ६ श्लो. ४४ याचा खरा अर्थ काय आहे तो मागें ६०५ पृष्ठावर पहावा. आमच्या मतें या श्लोकांचा त्या श्लोकाशीं कांहीं संबंध नाहीं. येथील ३०–३१ श्लोकांत ईश्वराच्या भक्तीचें माहात्म्य सांगितलें आहे व त्या (६·४४) श्लोकांत योगमार्गांत नुस्ता प्रवृत्त झालेला योगी-संन्यासी कर्मफलाचें उल्लंघन करून जातो असें म्हटलें आहे.

प्राप्त होतात. [माझा आश्रय केल्यावर पापयोनी–स्त्रिया,वैश्य व शूद्र हेहि क्रमानें मोक्षाला प्राप्त होतात.] ३२.

---

१ रहस्यकार या श्लोकांतील 'पापयोनयः' या शब्दाचा "अंत्यजादि जे पापयोनी असतील" असा अर्थ करितात व श्रीशंकराचार्यादि अद्वैती व रामानुजादिक इतर भाष्यकार 'ये पापयोनयः अपि स्युः के ते, स्त्रियो वैश्याः तथा शूद्राः ते अपि परां गतिं यान्ति' असें म्हणून पापयोनी कोण? तर स्त्रिया, वैश्य व शूद्र असा जो अर्थ करितात तो बरोबर नाही, असें म्हणतात व 'पापयोनिशब्दानें अलीकडे सरकार दरबारांत ज्यांना गुन्हेगार जाति म्हणून म्हणतात,तशा प्रकारचा अर्थ विवक्षित असून त्या जातींतील लोकांनाहि भगवद्भक्तीने सिद्धि मिळते, असा या श्लोकांतील सिद्धान्त आहे.' असे लिहितात. रहस्यकारांचें हें म्हणणें लोकरजनाच्या दृष्टीने ठीक आहे. कारण हल्लीच्या सुशिक्षित व बहुश्रुत स्त्रिया 'आपण पुरुषांपेक्षां कमी योग्यतेच्या आहो की काय? आम्हांला पुरुषांच्या बरोबरीनें हक्क पाहिजेत' असें म्हणूं लागल्या आहेत. सत्यशोधक व अस्पृश्यांची उन्नति करणारे लोक, 'आम्हीहि मनुष्य आहो, मग ब्राह्मण उच्च व शूद्र अधम, चांडाल अस्पृश्य व क्षत्रिय स्पृश्य हा भेद कोठून आला?' इत्यादि म्हणू लागले आहेत. अशा स्थितीत रहस्यकार करितात तसा अर्थ करणेंच अतिशय सोईचे आहे. तसेच 'धर्मामध्ये सर्वांचे हक्क सारखेच!' असें जें एक मत हल्ली रूढ झाले आहे त्याला अनुलक्षून "जातींचा, वर्णाचा, स्त्री-पुरुषादिकांचा किंवा काळ्या-गोऱ्या रंगांचा वगैरे कोणताच भेद न ठेविता सर्वांस एकच सद्गति देणारा भगवद्भक्तीचा जो हा राजमार्ग०" इत्यादि रहस्यकारांनी जे म्हटलें आहे, तेंहि ऐकायला फारच गोड आहे. पण स्वतः गीताकारांचा तसाच आशय आहे की काय, याबद्दल मात्र शंका वाटते. कारण ब्राह्मणादि भिन्न, भिन्न योनींत जन्म होणें हें कोणाच्याहि हातांतले नाहीं. तें केवल पूर्वकर्माच्या अधीन आहे. श्रीमान् कुलात उत्पन्न होणें, उच्च कुलांत जन्मास येणे, एखाद्या विद्वान् व सच्छील कुलांत जन्म घेणें, हें जसें पूर्व पुण्याचेंच फल मानावें लागतें, व दरिद्री, रोगी, अज्ञ, मूढ, इत्यादि कुलांत जन्म होणें हें पापाचें फल मानणें भाग पडते, त्याला 'नुस्ती यदृच्छा' म्हणून भागत नाहीं, त्याचप्रमाणें ब्राह्मण, स्त्री, शूद्र इत्यादि योनींत उत्पन्न होणें, हेहि पूर्व कर्माचेंच फल मानणे भाग आहे. अशा दृष्टीनें पाहिल्यास ब्राह्मण व क्षत्रिय यांच्या अपेक्षेनें स्त्रिया, वैश्य व शूद्र यांना पापयोनि म्हणणें, यात कांहीच दोष नाहीं. भगवान् व्यास याच समजुतीनें प्रस्तुत श्लोकात स्त्रिया. वैश्य व शूद्र यांना पापयोनि म्हणत आहेत. पण श्रीमान् कुलाप्रमाणे ब्राह्मण कुलात जन्म होणें हे जरी पूर्व पुण्याचें फल असलें, तरी त्यावरून गर्भश्रीमंत जन्मभर श्रीमान्च राहील किंवा ब्राह्मण खरा ब्राह्मण–सदाचरणशीलच असेल, असें म्हणतां येत नाहीं. त्याप्रमाणेंच स्त्रीजन्म हे जरी पापाचें फल असलें, तरी त्यामुळें स्त्र्यादिकांची खरी योग्यता कमी होते, असें म्हणतां येत नाहीं. जन्माचें कारण निराळें व जन्मानंतरचें प्रत्यक्ष आचरण निराळें. स्त्र्यादिकाना पापयोनि म्हणणें व ब्राह्मणांना पुण्ययोनि म्हणणें, हें जन्माच्या कारणाला उद्देशून आहे व त्यांची त्यांची साक्षात् योग्यता त्यांच्या प्रस्तुत परिस्थितीवर अवलंबून आहे. त्यामुळें गीतेंत स्त्र्यादिकांना पापयोनि म्हणणें म्हणजे स्त्रिया, वैश्य व शूद्र यांना व्यावहारिक दृष्ट्या हीन समजणें, असा त्याचा अर्थ नव्हे. मूळ श्लोकाचा

**किं पुनर्ब्राह्मणाः पुण्या भक्ता राजर्षयस्तथा ।**
**अनित्यमसुखं लोकमिमं प्राप्य भजस्व माम् ॥ ३३॥**

**अन्वयार्थ—पुनः—मग—पुण्याः ब्राह्मणाः**—पुण्ययोनीत जन्मलेले ब्राह्मण—**तथा**—त्याचप्रमाणें—**भक्ताः राजर्षयः**—भक्त राजर्षि-ज्ञानी क्षत्रिय श्रेष्ठ गतीला

---

अर्थ रहस्यकार समजतात तसा होऊं शकत नाही. कारण ‘ये पापयोनयः तेऽपि परां गतिं यान्ति किं पुनः पुण्याः ब्राह्मणाः च भक्ताः राजर्षयः’ असा येथें विषय आहे. जे पापयोनि ते परागतीला जातात. मग पुण्यवान् ब्राह्मण व भक्त क्षत्रिय, याविषयीं काय सांगावें ? इतका अर्थ स्पष्ट असल्यावर पापयोनि कोण ? हे उघड होतें. शिवाय ‘यत्’ व ‘तत्’ यांचा नित्य संबध असतो. तेव्हां ‘ये’ शब्दाचें स्पष्टीकरणव ‘स्त्रियो वैश्यास्तथा शूद्राः’ या शब्दांनीं केलें आहे, असाच सरळ संबंध लागतो. रहस्यकार लावतात तसा लागत नाहीं. महाभारताच्या अश्वमेधपर्वांत हेच श्लोक आहेत. त्यांत ‘क्षत्रिया वा बहुश्रुताः’ एवढाच पाठभेद आहे. यावरून व्यासांना चार वर्णांचे लोक व त्या वर्णांच्याच स्त्रिया, यांचाच येथें उल्लेख करावयाचा होता हें उघड दिसतें. धर्मशास्त्राप्रमाणें चांडालादिक हे सर्वधर्मबहिष्कृत आहेत. त्यामुळे ‘अलीकडे सरकार दरबारात ज्याना गुन्हेगार जाती म्हणतात’ त्यांचाच उल्लेख व्यासानीं केला असेल, अशी कल्पना करितां येत नाही.

आता रहस्यकार ‘भक्तिमार्ग सर्वांस एकच सद्गति देतो’ असें जें म्हणतात त्याचा विचार करूं. वैदिकधर्मांत असा एकहि मार्ग नाहीं, कीं जो यथाशास्त्र पूर्णपणे आचरिला असता त्याचें एकसारखेंच फल मिळत नाही. आत्मसाक्षात्कारानें प्राप्त होणाऱ्या मुक्तीमध्यें तरी भेद कोठें असतो ? रहस्यकार तर‘ज्ञानमार्गाने जो मोक्ष मिळतो, तोच कर्मयोगानें मिळतो’ असें म्हणणारे आहेत. मग ‘जातीचा, वर्णाचा, काळ्यागोऱ्या रंगाचा वगैरे भेद न ठेवतां भक्तिमार्ग एकच सद्‌गति देतो,’ हे येथेंच सागण्यात काय अर्थ आहे ? तथापि कर्म, भक्ति व ज्ञान या तिन्हींचें फल एकच, असें कोणालाच म्हणतां येणें शक्य नाही. कारण कर्माचें फल निराळें, भक्तीचें निराळे व ज्ञानाचे निराळे. कर्माधिकारी पुरुषांतीलहि ज्यांनी ज्या प्रकारें अनुष्ठान केलें असेल, त्यांना तसेच व तितकेंच फल मिळतें. भक्तांचेंहि फल ‘राम राम,’ किंवा ‘विठ्ठल विठ्ठल’ म्हणणाऱ्या सर्वांना सारखेंच मिळेल, ही आशा व्यर्थ आहे. कारण भक्ताचें अंतःकरण भक्तीमुळें जितक्या प्रमाणाने सुसंकृत झालें असेल तितक्याच योग्यतेचें फल त्याला मिळणार ! ज्ञानालाहि तोच न्याय लागू आहे. ज्यांचें कर्म सर्व अंगोपांगांनीं परिपूर्ण झालेलें असते, त्यांनाच कर्मांचे फल एकसारखें मिळतें, बाकीच्यांना अनुष्ठानतारतम्यानें न्यूनाधिक फल मिळणार हें उघड आहे, ज्यांची भक्ति अगदी पूर्णतेला पोंचलेली असते, म्ह० ज्यांचें अन्तःकरण ईश्वरमय झालेलें असतें, त्यांनाहि एकसारखेंच फल मिळते. पण असे भक्त व साक्षात्कारवान् ज्ञानी यांमध्यें कांहीं फरकच नसतो. अर्थात ज्यांचें अभेदज्ञान अत्यंत परिपक्व झालेले असतें त्या सर्वांना मुक्ति हे फल एकसारखेंच मिळतें. तात्पर्य पारमार्थिक फल कोणत्याहि एका पंथावर किंवा त्याच्या बाह्य देखाव्यावर अवलंबून नसतें, तर त्या त्या पंथाच्या आचरणामुळें अंतःकरण जसें व जितकें सुसंस्कृत झालेले असतें त्या मानानेंच तें न्यूनाधिक मिळतें, हा खरा सिद्धान्त होय.

जातील हें—**किं**—काय सांगावें ? यास्तव—**इमं अनित्यं असुखं लोकं**—या अनित्य व सुखरहित लोकास—**प्राप्य**—प्राप्त होऊन,—**मां भजस्व**—मला भज. ३३

**किं पुनरिति । किं पुनर्ब्राह्मणाः पुण्याः पुण्ययोनयो भक्ता राजर्षयस्तथा राजानश्च त ऋषयश्चेति राजर्षयः । यत एवमतोऽनित्यं क्षणभङ्गुरमसुखं च सुखवर्जितमिमं लोकं मनुष्यलोकं प्राप्य पुरुषार्थसाधनं दुर्लभं मनुष्यत्वं लब्ध्वा भजस्व सेवस्व माम् ॥**

**भाष्यार्थ**—आणि पापाचरण करणारे व पापयोनिहि जर ईश्वराच्या भक्तीनें परमगतीला प्राप्त होतात, तर मग उत्तम जन्माच्या निमित्तानें होणारीं संन्यासादि साधनें व सदाचरणादिक यांचा काय उपयोग? याचें उत्तर—'**किं पुनः०' इति**—'किं पुनः०'या श्लोकानें देतात.—**किं पुनः पुण्याः-पुण्ययोनयः ब्राह्मणाः तथा भक्ताः राजर्षयः** —पापी व पापयोनि जर भक्तीनें मुक्त होतात तर मग पुण्यजन्म ब्राह्मण व तसेच भक्त राजर्षि-म्ह०—**राजानः च ते ऋषयः च इति राजर्षयः**—राजे व तेच ऋषी-ज्ञानी म्हणून राजर्षि, त्यांना त्यापेक्षांहि श्रेष्ठ फल प्राप्त होईल हे काय सांगावें ?—**यतः एवं अतः अनित्यं-क्षणभंगुरं च असुखं-सुखवर्जितं इमं लोकं-मनुष्यलोकं प्राप्य**—ज्याअर्थी असे आहे त्याअर्थी अनित्य म्ह० क्षणभंगुर व असुख -सुखरहित अशा या लोकाला-मनुष्यलोकाला प्राप्त होऊन—**पुरुषार्थसाधनं-दुर्लभं मनुष्यत्वं लब्ध्वा मां भजस्व-सेवस्व**—पुरुषार्थाचें साधन अशा या दुर्लभ मनुष्यत्वास प्राप्त होऊन माझे भजन कर-माझी सेवा-ध्यान कर. [ पापी व स्त्रिया वगैरे पापयोनिहि जर भक्तीनें परम गतीला प्राप्त होतात, तर मग पुण्यामुळेंच उत्तम जन्म पावलेल्या ब्राह्मणांविषयी व भक्त क्षत्रियांविषयी काय सांगावें ? पश्वादि शरीरांत भगवद्भजनाची योग्यता नाहीं. म्हणून मनुष्यत्वास प्राप्त झालेल्या जीवांनीं ईश्वराच्या ध्यानादिकांविषयीं यत्न करावा. ] ३३.

**मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ।**
**मामेवैष्यसि युक्त्वैवमात्मानं मत्परायणः ॥ ३४ ॥**

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे राजविद्या-राजगुह्ययोगो नाम नवमोऽध्यायः ॥ ९ ॥**

**अन्वयार्थ**—**मन्मनाः भव**—माझ्या ठिकाणींच ज्याचें मन आहे, असा तूं हो. —**मद्भक्तः (भव)**—माझाच भक्त हो.—**मद्याजी (भव)**—माझीच पूजा करण्याचें ज्याचें शील आहे, असा हो.—**मां नमस्कुरु**—मला नमस्कार कर.—**एवं**—याप्रमाणें भगवानांचे ठिकाणीं चित्ताला—**युक्त्वा**—समाहित करून शांत-स्थिर करून —**मत्परायणः**—मत्परायण झालेला तूं—**आत्मानं मां एव**—सर्वांचा आत्मा असा जो मी ईश्वर त्याला—**एष्यसि**—प्राप्त होशील. ३४.

**कथम्—मयि मनो यस्य स त्वं मन्मना भव । तथा मद्भक्तो भव । मद्याजी मद्यजनशीलो भव । मामेव च नमस्कुरु मामेवेश्वरमेष्यस्यागामिष्यसि युक्त्वा समाधाय चित्तम् । एवमात्मानमहं हि सर्वेषां भूतानामात्मा परा च गतिः परमयनं तं मामेवंभूतमेष्यसीत्यतीतेन पदेन संबन्धः । मत्परायणः सन्नित्यर्थः ।। ३४ ।।**

इति श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यगोविन्दभगवत्पूज्यपादशिष्यश्रीमच्छंकरभगवतः कृतौ श्रीभगवद्गीताभाष्ये राजविद्या-राजगुह्ययोगो नाम नवमोऽध्यायः ।।९।।

**भाष्यार्थ—कथं—**भक्ति कशी करावी तें 'मन्मना०' या श्लोकानें सांगतात—**मयि मनः यस्य सः त्वं मन्मनाः भव—**माझ्या ठिकाणीं ज्याचें मन आहे, असा तूं 'मन्मनाः' हो.—**तथा मद्भक्तः भव—**तसाच तूं माझा भक्त हो.—**मद्याजी -मत्-यजनशीलः भव—**माझें यजन करण्याचें ज्याचें शील आहे असा तूं मद्याजी हो.—**च मां एव नमस्कुरु—**आणि मलाच नमस्कार कर.—**युक्त्वा-चित्तं समाधाय मां एव-ईश्वरं एष्यसि-आगमिष्यसि—**याप्रमाणें भगवानांमध्येंच चित्ताचें समाधान करून-भगवत्स्वरूपींच चित्ताला स्थिर करून मलाच-ईश्वराला प्राप्त होशील -येऊन पोंचशील—**एवं आत्मानं-अहं हि सर्वेषां भूतानां आत्मा परा च गतिः परं अयनं तं एवंभूतं मां एष्यसि इति अतीतेन पदेन संबन्धः—**याप्रमाणें आत्म्याला-मीच सर्व भूतांचा आत्मा व परा गति-परम अयन आहें त्या -अशा प्रकारच्या मला येऊन पोंचशील असा 'आत्मानं' या पदाचा 'एष्यसि' या मागील पदाशीं संबंध.—**मत्परायणः सन् इत्यर्थः—**मीच ज्याचें परम अयन-परम गति-फल आहें, असा होऊन, असा याचा भावार्थ. [ याप्रमाणे या अध्यायांत मध्यमा-

---

१ रहस्यकार या श्लोकावरील टीपेंत म्हणतात—"प्रकृतीचा पसारा किंवा नामरूपात्मक दृश्य सृष्टि अनित्य आणि परमात्माच काय तो नित्य, असा जो अध्यात्मशास्त्राचा सिद्धान्त त्याला अनुसरून 'अनित्य' हें पद ३३ व्या श्लोकांत आलेलें आहे व 'असुख ते या पदानें या संसारांत सुखापेक्षां दुःख अधिक आहे, या सिद्धान्ताचा अनुवाद केला आहे. तथापि हें वर्णन अध्यात्मांतलें नव्हे भक्तिमार्गांतलें आहे." रहस्यकारांची ही नुस्ती कल्पना आहे. अगोदर असुख म्ह० सुखापेक्षां दुःख अधिक ही कल्पनाच खोटी आहे. दुःख म्हणजे रडणें, एवढाच जर त्या शब्दाचा अगदीं स्थूल अर्थ घेतला तर दुःख अधिक आहे, असेहि म्हणण्याचें कारण नाहीं. कारण आम्ही सर्व आयुष्यांत फारच थोडे रडतों ! त्यापेक्षां आमच्या हंसण्याचें प्रमाणहि अधिक असतें. मग निरनिराळ्या विषयांपासून होणारें सुख दुःखापेक्षां किती तरी अधिक असतें, असें म्हणण्यास तरी कोणती हरकत आहे ? व विषयी लोक तसें म्हणतातहि. पण असमाधान-अशान्ति-विक्षेप हेंच दुःख आहे, असें म्हटल्यास मात्र सर्व जन्म दुःखमय आहे, असेंच म्हणावें लागतें. विषयसुख हें सुखच नव्हे, तें दुःखाचें मूळ असल्यामुळें दुःख आहे. (अ. ५ श्लो. २२, पृ. ५२१अ.८-१५ पृ. ६६३) व याच दृष्टीनें भगवानांनीं 'अनित्य व असुख लोक ' असें येथें म्हटलें आहे व तें अध्यात्मदृष्ट्याच म्हटलें आहे. भक्तिमार्गांतलें वर्णन निराळें व अध्यात्म्यांतलें निराळें, ही निराधार कल्पना आहे.

धिकाऱ्यांचें ध्येय सांगूनच अधम अधिकाऱ्यांनाहि मी आराधना करण्यास योग्य आहें, असें वर्णन केलें. आपल्या पारमार्थिक प्रत्यक्-स्वरूपानें आपणाला साक्षात् जाणणें हें ज्ञानच परमेश्वराचें परम आराधन आहे, असेंहि सुचविलें. अर्थात् तत्पदवाच्य सोपाधिक ब्रह्म व तत्पदलक्ष्य निरुपाधिक ब्रह्म यांचे व्याख्यान केले. ] ३४

इति भगवान् श्रीकृष्णांनीं गायलेल्या उपनिषदांतील–रहस्यविद्येतील ब्रह्मविद्येपैकीं योग–उपाय-शास्त्रांतील राजविद्या-राजगुह्ययोगनांवाचा नववा अध्याय विष्णुशर्मकृत सान्वयार्थ-सटीप-भाष्य-भाष्यार्थासह समाप्त झाला.

---

वेदान्तशास्त्र व भक्तिमार्ग यांचा संबध माहीत नसणे, हेच असल्या कल्पनांचें मूळ आहे. हें वर्णन भक्तिमार्गांतले आहे, असें म्हणण्यास त्यांनी जें कारण दाखविलें आहे तेंहि असेंच पोकळ आहे. ते म्हणतात—" म्हणून परमात्मा किंवा परब्रह्म असें न म्हणतां ' मला भज, माझ्या ठायीं मन ठेव, मला नमस्कार कर ' असा व्यक्त स्वरूपाचा दर्शक प्रथम पुरुषी निर्देश भगवंतांनी केला आहे. " यावरूनच रहस्यकारांना गीतेचें रहस्य किती यथार्थ कळलें होतें, त्याची कल्पना होते. येथें भगवान् ' अहं ' हा शब्द शास्त्रदृष्ट्या योजीत आहेत, हें रहस्यकारांच्या ध्यानांतहि आलेलें नाहीं. त्यामुळे त्यांची अशी असत्कल्पना झाली आहे. पण भगवान् येथें ' प्रथम पुरुषी निर्देशानें ' परमेश्वराचाच उल्लेख करीत आहेत. आपल्या व्यक्तस्वरूपाचा उल्लेख करीत नाहींत. येथील व्यक्त स्वरूप म्ह० वसुदेव-पुत्राचें शरीर, पण तें येथील उपास्य होऊं शकत नाहीं. कारण ' असें उपासन केल्यानें तूं मलाच मिळशील ' असें जे फल सांगितले आहे, ते श्रीकृष्णाच्या व्यक्त रूपाशीं जुळत नाहीं. म्हणूनच भाष्यकारांनीं ' मां एव ईश्वरं एष्यसि–आगमिष्यसि ' असें म्हटलें आहे. तसेंच ' मम भूतमहेश्वरं परं भावं ' ११ ' मां भूतादि अव्ययं ज्ञात्वा भजन्ति ' १३ ' अहं क्रतुः० ' १६ ' अहं जगतः पिता, माता, धाता, पितामहः० ' १७ ' गतिः भर्ता, प्रभुः साक्षी, निवासः प्रभवः प्रलयः स्थानं, ' १८. ' अहं सर्वयज्ञानां भोक्ता च प्रभुः मां तत्त्वेन न अभिजानन्ति ' २४ इत्यादि या पूर्वींचे ' अहं ' शब्दप्रयोगहि व्यक्त स्वरूपाला उद्देशून नाहींत, ते ' शास्त्रदृष्ट्या तूपदेशो वामदेववत् ' (ब्रह्मसूत्र अ. १ पा. १ सू. ३०-पंचदशी प्र. ७श्लो. ११-१३) या न्यायानें शास्त्रदृष्ट्या आहेत. या सूत्रांत ' प्राणोऽस्मि प्रज्ञात्मा ... तं मां उपास्स्व... मामेव विजानीहि ' ' ऋषिः वामदेवः प्रतिपेदे अहं मनुरभवं सूर्यश्च ' इत्यादि वाक्यांत इंद्र, वामदेव इत्यादि आत्मज्ञानी पुरुषांनी शिष्याला उपदेश करतांना ' अहं ' असा जो शब्द योजला आहे, तो आपल्या शुद्ध परमात्मस्वरूपाला उद्देशून आहे, शरीर, देवता, इत्यादिकांना उद्देशून नाहीं, असा सिद्धान्त सांगितला आहे. पण वेदान्तशास्त्रपरिचयाच्या अभावीं असले प्रमाद घडणें अपरिहार्य आहे व अद्वैताचार्य किंवा संन्यासमार्गी टीकाकार यांवर वृथा दोषारोप न करितां जर ते घडले असते तर क्षम्यहि झाले असते.

# अध्याय दहावा.

## विभूतियोग.

**श्रीभगवानुवाच**—श्रीकृष्ण म्हणाले—

**भूय एव महाबाहो शृणु मे परमं वचः ।**
**यत्तेऽहं प्रीयमाणाय वक्ष्यामि हितकाम्यया ॥१॥**

**अन्वयार्थ—महाबाहो,**—हे शूर अर्जुना !—**भूयः एव**—पुनरपि—**मे**—माझें—**परमं वचः**—श्रेष्ठ वचन—**शृणु**—ऐक.—**यत्**—जें—**अहं**—मी—**प्रीयमाणाय ते**—ऐकून संतुष्ट होणाऱ्या तुला—**हितकाम्यया**—तुझें हित व्हावें, या इच्छेनें—**वक्ष्यामि**—सांगत आहे. १.

सप्तमेऽध्याये भगवतस्तत्त्वं विभूतयश्च प्रकाशिता नवमे च । अथेदानीं येषु येषु भावेषु चिन्त्यो भगवांस्ते ते भावा वक्तव्याः । तत्त्वं च भगवतो वक्तव्यमुक्तमपि दुर्विज्ञेयत्वादित्यतः—भूय एव भूयः पुनर्हे महाबाहो शृणु मे मदीयं परमं प्रकृष्टं निरतिशयवस्तुनः प्रकाशकं वचो वाक्यं, यत्परमं ते तुभ्यं प्रीयमाणाय मद्वचनात्प्रीयसे त्वमतीवामृतमिव पिबंस्ततो वक्ष्यामि हितकाम्यया हितेच्छया ॥ १ ॥

**भाष्यार्थ—सप्तमे अध्याये च नवमे भगवतः तत्त्वं च विभूतयः प्रकाशिताः**—सातव्या अध्यायांत व नवव्या अध्यायांत भगवानांचें सोपाधिक-निरुपाधिक तत्त्व व सविशेष-निर्विशेषरूपाच्या ज्ञानाला उपयोगी असलेल्या विभूति प्रकाशित केल्या.—**अथ इदानीं येषु येषु भावेषु भगवान् चिन्त्यः ते ते भावाः वक्तव्याः**—त्यानंतर आतां पुढे ज्या ज्या पदार्थांमध्ये भगवान् चिन्त्य-चिंतन करण्यास योग्य आहे ते ते भाव-पदार्थ सविशेषध्यानाच्या व निर्विशेषज्ञानाच्या अंगत्वानें सांगावे—**च भगवतः तत्त्वं वक्तव्यं**—आणि भगवानांचें तत्त्व सांगावे—**उक्तं अपि दुर्विज्ञेयत्वात्-इति-अतः (भगवान्)' भूयः०' इति (उवाच)**—भगवानांचें सविशेष व निर्विशेष रूप पूर्वीं ठिकठिकाणीं जरी सांगितलें आहे, तरी तें अतिशय दुर्विज्ञेय असल्यामुळें पुनः सांगणें उचित आहे, असें ज्याअर्थीं भगवान् समजत आहेत, त्याअर्थीं ते '**भूयः०**' या श्लोकानें म्हणतात—**भूयः एव-भूयः पुनः हे महा-**

---

१ रहस्यकार आपल्या ठराविक पद्धतीला अनुसरून " कर्मयोगसिद्ध्यर्थ परमेश्वराच्या व्यक्त स्वरूपाच्या उपासनेचा जो राजमार्ग मागील अध्यायांत सांगितला " अशा अपसिद्धान्तानेंच या अध्यायास आरंभ करीत असल्यामुळे त्याचा आम्हीं अधिक विचार करीत नाहीं. ' कर्मयोगाच्या सिद्धीसाठी उपासना ' हा अपसिद्धान्त असून ९ व्या अध्यायांत

**बाहो**—पुनरपि हे आजानुबाहो !—**मे-मदीयं परमं-प्रकृष्टं निरतिशयवस्तुनः प्रकाशकं वचः-वाक्यं शृणु**—माझें हें परम-श्रेष्ठ-निरतिशय वस्तूचें प्रकाशक वचन-हें माझें वाक्य ऐक,—**यत् परमं ते-तुभ्यं प्रीणमाणाय**—जें माझें परम -श्रेष्ठ वाक्य, ( श्रेष्ठ वस्तूचें प्रकाशक असल्यामुळें तें वचनहि श्रेष्ठ आहे. ) तुला-संतुष्ट होणाऱ्या तुला, ( सांगेन )—**मद्वचनात् त्वं अमृतं इव पिबन् अतीव प्रीयसे ततः हितकाम्यया-हितेच्छया वक्ष्यामि**—माझ्या वचनामुळें तूं जणुं-काय अमृतच पीत असल्याप्रमाणें अतिशयच संतुष्ट होतोस, म्हणून हिताच्या इच्छेनें मी जें परम वचन तुला सांगतों, तें तूं ऐक. १.

**न मे विदुः सुरगणाः प्रभवं न महर्षयः ।**
**अहमादिर्हि देवानां महर्षीणां च सर्वशः ॥२॥**

**अन्वयार्थ—मे**—माझ्या—**प्रभवं**—प्रभावाला किंवा उत्पत्तीला—**सुरगणाः**—ब्रह्मदेवादि देवांचे गण—**न विदुः**—जाणत नाहींत.—**महर्षयः न**—भृगु इत्यादि महर्षीहि माझ्या प्रभावाला किंवा उत्पत्तीला जाणत नाहीत.—**हि**—कारण—**अहं**—मी—**देवानां च महर्षीणां**—देवांचें व महर्षींचें—**सर्वशः**—सर्व प्रकारें—**आदिः**—कारण आहे. २.

**किमर्थमहं वक्ष्यामीत्यत आह—न मे विदुर्न जानन्ति सुरगणा ब्रह्मादयः । किं ते न विदुः, मम प्रभवं प्रभावं प्रभुशक्त्यतिशयम्, अथ वा प्रभवं प्रभवनमुत्पत्तिम् । नापि महर्षयो भृग्वादयो विदुः । कस्मात्ते न विदुरित्युच्यतेऽहमादिः कारणं हि यस्माद्देवानां महर्षीणां च सर्वशः सर्वप्रकारैः ॥ २ ॥**

**भाष्यार्थ—किमर्थं अहं वक्ष्यामि इति अतः आह**—मीच तें कशासाठीं सांगणार आहें, असें अर्जुन म्हणेल यास्तव भगवान् ' न मे० ' या श्लोकानें सांगतात. —**ब्रह्मादयः-सुरगणाः मे न विदुः-न जानन्ति**—ब्रह्मदेवादिक देवगण माझ्या(प्रभवाला ) जाणत नाहींत.—**ते किं न विदुः**—ते काय जाणत नाहींत ?—**मम प्रभवं-प्रभावं-प्रभुशक्ति-अतिशयं**—माझ्या प्रभवाला म्ह० प्रभावाला-प्रभुशक्तीच्या

---

व्यक्तोपासना सांगितली आहे, ही असत्कल्पना आहे, हें आम्हीं पूर्वी सांगितलेंच आहे. परमेश्वराच्या विभूति हें सोपाधिकरूप आहे. त्याला व्यक्तरूप असें म्हणतां येत नाहीं. परमेश्वराचें रूप व्यक्त केव्हांच नाहीं. म्हणूनच नवव्या अध्यायात ' मया अव्यक्तमूर्तिना जगत् ततं' (श्लो.४पृ. ६८५) असें म्हटले आहे. सोपाधिक रूप म्ह०व्यक्त रूप नव्हे.९-१२ अध्यायांत भगवानांनीं आपल्या व्यक्त रूपाचीच उपासना जर सांगितली असती, तर अकराव्या अध्यायांत अर्जुनानें 'द्रष्टुं इच्छामि ते रूपं ऐश्वरं'(श्लो.३)असें म्हटलें नसतें व भगवानांनाहि 'न तु मां शक्यसे द्रष्टुं अनेनैव स्वचक्षुषा' व 'दिव्यं ददामि ते चक्षुः' (श्लो. ८) असें म्हणण्याची गरज नव्हती. तस्मात् रहस्यकारांची ईश्वराच्या व्यक्त स्वरूपाच्या उपासनेविषयींची कल्पना भ्रामक व निराधार आहे.

आधिक्याला जाणत नाहींत.—**अथवा प्रभवं-प्रभवनं-उत्पत्तिं**—किंवा प्रभव म्ह० प्रभवन-होणें-उत्पत्ति, माझ्या उत्पत्तीला ब्रह्मादि देव जाणत नाहींत.—**भृग्वादयः महर्षयः अपि न विदुः**—भृगुप्रभृति महर्षीहि माझ्या प्रभावाला किंवा उत्पत्तीला जाणत नाहींत.—**कस्मात् ते न विदुः**—कोणत्या कारणामुळें ते जाणत नाहींत,—**इति उच्यते**—असें म्हणशील तर सांगतों—**हि-यस्मात् अहं देवानां च महर्षीणां सर्वशः-सर्वप्रकारैः आदिः-कारणं**—कारण मी देवांचा व महर्षींचा सर्व प्रकारांनीं आदि म्ह० कारण आहें. [ सर्व देव व ऋषी यांचें मी कारण आहें, त्यामुळें माझ्या प्रभावाला किंवा उत्पत्तीला त्यांतील कोणी जाणत नाहींत.] २.

## यो मामजमनादिं च वेत्ति लोकमहेश्वरम्।
## असंमूढः स मर्त्येषु सर्वपापैः प्रमुच्यते ॥३॥

**अन्वयार्थ—यः**—जो—**मां**—मला—**अजं**—जन्मरहित—**अनादिं**—कारणरहित—**च**—व—**लोकमहेश्वरं**—सर्व लोकांचा महेश्वर—**वेत्ति**—जाणतो—**सः** तो—**मर्त्येषु**—मर्त्यांमध्यें-मनुष्यामध्यें—**असंमूढः**—मोहित न झालेला—**सर्वपापैः**—सर्व पापांपासून—**प्रमुच्यते**—सर्वथा मुक्त होतो. ३.

किंच—**यो मामजमनादिं च यस्मादहमादिर्देवानां महर्षीणां च न ममान्य आदिर्विद्यतेऽतोऽहमजोऽनादिश्चानादित्वमजत्वे हेतुस्तं मामजमनादिं च यो वेत्ति विजानाति लोकमहेश्वरं लोकानां महान्तमीश्वरं तुरीयमज्ञानतत्कार्यवर्जितमसंमूढः संमोहवर्जितः स मर्त्येषु मनुष्येषु सर्वपापैः सर्वैः पापैर्मतिपूर्वामतिपूर्वकृतैः प्रमुच्यते प्रमोक्ष्यते ॥ ३ ॥**

**भाष्यार्थ—किंच**—याहि कारणानें भगवत्प्रभाव कोणी एखादाच जाणतो, असें 'यो मां०' या श्लोकानें सांगतात—**यः मां अजं च अनादिं**—जो अज व अनादि अशा मला ( जाणतो )—**यस्मात् अहं देवानां च महर्षीणां आदिः मम अन्यः आदिः न विद्यते**—ज्याअर्थी मी देवाचा व महर्षींचा आदि-कारण आहे, माझा दुसरा आदि-कारण विद्यमान नाही,—**अतः अहं अजः च अनादिः**—त्याअर्थी मी अज व अनादि आहें.—**अनादित्वं अजत्वे हेतुः**—अनादित्व हे अजत्वाचें कारण आहे. म्ह० मी अनादि आहें म्हणून अज.—**तं मां अजं अनादिं च यः वेत्ति-विजानाति**—त्या मला अज व अनादि जो जाणतो—**लोकमहेश्वरं-लोकानां महान्तं ईश्वरं तुरीयं अज्ञानतत्कार्यवर्जितं**—मला म्ह० लोकमहेश्वराला-लोकांच्या महान् ईश्वराला-तुरीयाला म्ह० अज्ञान व अज्ञानाचें कार्य यांनीं रहित अशा निर्गुण ईश्वराला [मांडूक्यभाष्यार्थ आगमप्र. पृ.५९ का. १०पृ.६८ पहा]—**सः मर्त्येषु-मनुष्येषु असंमूढः-संमोहवर्जितः**—तो मर्त्यांमध्यें-मनुष्यांमध्ये असंमूढ-संमोहरहित-विवेकी असलेला पुरुष—**सर्वपापैः-सर्वैः मतिपूर्व-अमतिपूर्वकृतैः पापैः प्रमुच्यते-प्रमोक्ष्यते**—सर्व पापांकडून सर्व म्ह० बुद्धिपूर्व व अबुद्धिपूर्व के-

लेल्या पापांपासून सर्वथा मुक्त केला जातो–सोडला जातो. [ जो अज, अनादि व सर्व लोकांचा महान् ईश्वर अशा मला जाणतो, तो सर्व मनुष्यांतील विवेकी पुरुष सर्व पापांपासून मुक्त होतो. ] ३.

**बुद्धिर्ज्ञानमसंमोहः क्षमा सत्यं दमः शमः ।**
**सुखं दुःखं भवोऽभावो भयं चाभयमेव च ॥४॥**
**अहिंसा समता तुष्टिस्तपो दानं यशोऽयशः ।**
**भवन्ति भावा भूतानां मत्त एव पृथग्विधाः ॥५॥**

**अन्वयार्थ—बुद्धिः**—अंतःकरणांतील सूक्ष्म विषय जाणण्याचें सामर्थ्य,—**ज्ञानं**—आत्मा, प्रकृति इत्यादि शब्दांच्या अर्थाचा बोध,—**असंमोहः**—ज्ञातव्य व कर्तव्य पदार्थामध्यें विवेकपूर्वक प्रवृत्ति,—**क्षमा**—कोणी शिव्या दिल्या किंवा ताडन केले असतांहि चित्ताला विकार होऊं न देणे,—**सत्यं**—जसें कळले असेल तसेंच दुसऱ्याला सांगणे,—**दमः**—बाह्य इंद्रियांचा उपशम,—**शमः**—अंतःकरणाचा उपशम,—**सुखं** आह्लाद,—**दुःखं**—संताप—**भवः**—उद्भव,—**अभावः**—नाश,—**च भयं**—आणि भीति,—**च अभयं एव**—अभयच,—**अहिंसा**—प्राण्यांना पीडा न करणे,—**समता**—समचित्तत्व,—**तुष्टिः**—संतोष,—**तपः**—इंद्रियांचा संयम करून शरीराला पीडणें—**दानं**—द्रव्यादिक यथाशक्ति सत्पात्री देणें,—**यशः**—धर्मसंबंधी कीर्ति,—**अयशः**—अधर्मसंबंधी अपकीर्ति इत्यादि—**भूतानां पृथग्विधाः भावाः मत्तः एव भवन्ति**—प्राण्यांचे नाना प्रकारचे भाव माझ्यापासूनच होतात. ४, ५.

---

१ रहस्यकार १-३ श्लोकावरील टीपेंत "देवाच्याहि पूर्वी भगवान् किंवा परब्रह्म आहे, देव मागून झाले " वगैरे म्हणतात. पण हें म्हणणे आपल्या मागच्या " परब्रह्म किंवा परमात्मा हे शब्द न योजतां ' मला भज, माझ्या ठायीं मन ठेव ' असा व्यक्त स्वरूपाचा दर्शक प्रथमपुरुषी निर्देश भगवतांनी केला आहे " (गी. र. पृ. ७४९) या म्हणण्याच्या विरुद्ध आहे, हे त्याच्या लक्षात आलें नाही ! कारण तेथें ते स्वतः ज्याला भगवान् किंवा परब्रह्म म्हणतात त्याचाच निर्देश भगवानानी 'अहं आदिर्हि देवानां०' या वचनात 'अहं' या प्रथम पुरुषी शब्दाने केला आहे. त्यामुळे ' अहं ' असा प्रथम (उत्तम) पुरुषी निर्देश करणें, हें व्यक्त स्वरूपाचें दर्शक नाहीं, हे त्याच्याच लेखानें सिद्ध झालें. (गी. भा. पृ. ७२६ वरील टीप पहा. ) तसेंच तिसऱ्या श्लोकातील ' लोकमहेश्वरं ' याचा अर्थ " पृथिव्यादि सर्व लोकांचा मोठा ईश्वर " असा करितात. पण तो चिंत्य आहे. कारण लोक म्ह० पृथिव्यादिकच कां घ्यावयाचे ? पातालादि अधोलोक कां घ्यावयाचे नाहीत ? वास्तव 'सर्व लोक म्ह० सर्व चराचर सृष्टि' असाच अर्थ येथ विवक्षित आहे. लोकशब्दानें पृथिव्यादि गोल येथें विवक्षित नाहींत. तसेंच ' अज ' व ' अनादि ' यांचा अर्थ ' मला जन्म व आदि नाहीं ' असा करितात. पण जन्म व आदि यात काय फरक आहे, याचा त्यावरून कांहींच खुलासा होत नाहीं; पण तेंच भाष्यांत पहा, त्याचा स्पष्ट खुलासा केला आहे.

**इतश्चाहं महेश्वरो लोकानाम्—बुद्धिरन्तःकरणस्य सूक्ष्माद्यर्थावबोधनसामर्थ्यम्। तद्वन्तं बुद्धिमानिति हि वदन्ति। ज्ञानमात्मादिपदार्थानामवबोधः। असंमोहः प्रत्युपपन्नेषु बोद्धव्येषु विवेकपूर्विका प्रवृत्तिः। क्षमाऽऽक्रुष्टस्य ताडितस्य वाऽविकृतचित्तता। सत्यं यथादृष्टस्य यथाश्रुतस्य चाऽऽत्मानुभवस्य परबुद्धिसंक्रान्तये तथैवोच्चार्यमाणा वाक्सत्यमुच्यते। दमो बाह्येन्द्रियोपशमः। शमोऽन्तःकरणस्य। सुखमाह्लादः। दुःखं संतापः। भव उद्भवोऽभावस्तद्विपर्ययः। भयं च त्रासोऽभयमेव च तद्विपरीतम् ॥४॥**

**भाष्यार्थ—इतः च अहं लोकानां महेश्वरः**—याहि कारणानें मी लोकांचा महेश्वर आहे, असे ' बुद्धिः० ' या श्लोकाने सांगतात.—**बुद्धिः-अन्तःकरणस्य सूक्ष्मादि-अर्थावबोधन-सामर्थ्यं**—बुद्धि म्ह० अन्तःकरणाचे सूक्ष्म, सूक्ष्मतर, सूक्ष्मतम इत्यादि अर्थ जाणण्याचे सामर्थ्य—**तद्वन्तं बुद्धिमान् इति हि वदन्ति**—असें सामर्थ्य ज्याच्या ठिकाणीं असते त्याला व्यवहारांत बुद्धिमान् असें म्हणतात, हें प्रसिद्ध आहे.—**ज्ञानं-आत्मादिपदार्थानां अवबोधः**—ज्ञान म्ह० आत्मा, अनात्मा इत्यादि पदार्थांचा अवबोध—**असंमोहः-प्रत्युपपन्नेषु बोद्धव्येषु विवेकपूर्विका प्रवृत्तिः**—असंमोह म्ह० जाणण्यास योग्य असे अनेक विषय पुढे प्राप्त झाले असतां त्यांत विवेकपूर्वक प्रवृत्ति होणें,—**क्षमा-आक्रुष्टस्य ताडितस्य वा अविकृतचित्तता**—क्षमा म्ह० कोणीं शिव्या दिल्या किंवा ताडन केलें तरी चित्ताला विकार न होणें, अविकृतचित्तत्व—**सत्यं-यथादृष्टस्य च यथाश्रुतस्य आत्मानुभवस्य परबुद्धिसंक्रान्तये तथा एव उच्चार्यमाणा वाक् सत्यं उच्यते**—सत्य म्ह० आपण जसें पाहिलें असेल व जसें ऐकलें असेल, तशाच आपल्या अनुभवाचें दुसऱ्याच्या बुद्धींत संक्रमण करण्यासाठीं-आपला अनुभव दुसऱ्याला सांगण्यासाठीं तशीच उच्चारली जाणारी वाणी,तिला सत्य म्हटलें जातें.—**दमः-बाह्येन्द्रियोपशमः**—दम म्ह० बाह्य इंद्रियांचा उपशम—**शमः-अन्तःकरणस्य**—शम म्ह० अन्तःकरणाचा उपशम,—**सुखं-अह्लादः**—सुख म्ह० आह्लाद,—**दुःखं-संतापः**—दुःख म्ह० संताप,—**भवः-उद्भवः अभावः-तद्विपर्ययः**—भव म्ह० उद्भव व अभाव त्याचा विपर्यय-अनुद्भव—**भयं-त्रासः च अभयं एव च-तद्विपरीतं**—भय म्ह० त्रास व अभय म्ह० त्याच्या उलट भयराहित्य. ४.

**अहिंसेति। अहिंसाऽपीडा प्राणिनाम्। समता समचित्तता। तुष्टिः संतोषः पर्याप्तबुद्धिर्लाभेषु। तप इन्द्रियसंयमपूर्वकं शरीरपीडनम्। दानं यथाशक्ति संविभागः। यशो धर्मनिमित्ता कीर्तिः। अयशस्त्वधर्मनिमित्ताकीर्तिः। भवन्ति भावा यथोक्ता बुद्ध्यादयो भूतानां प्राणिनां मत्त एवेश्वरात्पृथग्विधा नानाविधाः स्वकर्मानुरूपेण ॥५॥**

**भाष्यार्थ—' अहिंसा० ' इति**—' अहिंसा० ' इत्यादि श्लोकानें आणखी कांहीं भाव सांगतात—**अहिंसा-प्राणिनां अपीडा**—अहिंसा म्ह० प्राण्यांची अपीडा-प्राण्यांना पीडा न देणें—**समता-समचित्तता**—समता म्ह० समचित्तत्व—**तुष्टिः**-

**संतोषः लाभेषु पर्याप्तबुद्धिः**—तुष्टि म्ह० संतोष-जे लाभ होतील तेवढेच पुरेत अशी भावना—**तपः-इन्द्रियसंयमपूर्वकं शरीरपीडनं**—तप म्ह० इंद्रियसंयम करून शरीराला पीडणें, इंद्रियसंयमाच्या द्वारा शरीराला क्षीण करणें—**दानं-यथाशक्तिसंविभागः**—सत्पात्री श्रद्धेनें आपल्या शक्तीप्रमाणें धनादिकांचा देशकालानुसार विनियोग करणें—**यशः-धर्मनिमित्ता कीर्तिः**—यश म्ह० धर्मानुष्ठानामुळें होणारी कीर्ति,—**तु अयशः-अधर्मनिमित्ता अकीर्तिः**—पण अयश म्ह अधर्माचरणामुळें झालेली अपकीर्ति—**भूतानां-प्राणिनां यथोक्ताः बुद्ध्यादयः भावाः**—भूतांचे म्ह० सर्व प्राण्यांचे वर सांगितलेले बुद्ध्यादि पदार्थ—**मत्तः एव-ईश्वरात् स्वकर्मानुरूपेण पृथग्विधाः-नानाविधाः भवन्ति**—मजपासूनच म्हणजे ईश्वरापासून स्वकर्मानुसार-त्या त्या प्राण्याच्या कर्माप्रमाणें पृथक्-प्रकारचे-नानाप्रकारचे ( ते सर्व भाव ) होतात. ( कारण ते आत्म्याहून भिन्नत्वाने राहूंच शकत नाहीत. म्हणून 'मत्तः एव० ' असें म्हटलें आहे. ) ५.

---

१ रहस्यकारांनी वर ' लोकमहेश्वरं ' म्ह० पृथिव्यादि सर्व लोकांचा मोठा ईश्वर असें जरी म्हटलें असलें तरी ४-५ श्लोकाला अवतरण मात्र " आतां मी सर्वांचा ईश्वर कसा याचें भगवान् निरूपण करितात, " असें देतात; आणि तें निरूपण कोणतें तर " बुद्धि, ज्ञान, असंमोह, क्षमा, सत्य, दम इत्यादि भाव माझ्यापासून होतात" हें ! पण मग "पृथिव्यादिलोकांचा मोठा ईश्वर " या अर्थाशीं या अवतरणाचा संबंध कसा लागतो ? त्यापेक्षां आचार्यांचें अवतरण कितीं सुसंबद्ध आहे तें पहा-२ऱ्याश्लोकांत 'मी देव, महर्षी या सर्वांचा आदि म्ह० कारण आहें,' हें एक लोकमहेश्वर असल्याचें कारण सुचविलें व या श्लोकांत त्याचेंच दुसरें कारण सांगत आहेत, असें आचार्य म्हणतात. माझ्यापासून देवादिक जसे होतात तसेच बुद्ध्यादि भाव होतात, म्हणून मी लोकमहेश्वर आहें, असा याचा भावार्थ. ५ व्या श्लोकांत 'भवन्ति भावाः भूतानां०' असें म्हटलेलें पाहून म्ह० त्यात 'भाव' हा शब्द आलेला पाहून रहस्यकारांनी पुनः त्याचा सांख्यकारिकातील ' भाव ' शब्दांशीं संबंध जोडण्याचा वृथा यत्न केला आहे.४० व्या सांख्यकारिकेमध्यें 'भावैः अधिवासितं लिङ्गं' असें म्हटलें आहे.त्यांतील भावशब्दाचा अर्थहि तेथें (का.२३) स्पष्ट सांगितला आहे.धर्म,अधर्म,ज्ञान, अज्ञान, वैराग्य, अवैराग्य, ऐश्वर्य, अनैश्वर्य हे भाव आहेत. बुद्धि त्यांनीं युक्त असते व सूक्ष्मशरीर त्या बुद्धीनें युक्त असतें, म्हणून सूक्ष्मशरीरहि त्या धर्माधर्मादि भावांनीं अधिवासित असतें, म्ह० चाफा, मोगरा इत्यादि सुवासिक फुलांनी वस्त्र जसें सुवासिक होतें, त्याप्रमाणेंच या भावांनी बुद्धि अधिवासित होते. पुढें याच भावांचे सांसिद्धिक व वैकृत असे दोन भेद त्रेचाळीसाव्या सांख्यकारिकेंत सांगून ५५ व्या कारिकेपर्यंत त्यांचेच पोटभेद सविस्तर सांगितले आहेत. पण रहस्यकार म्हणतात " तेच भाव बहुतेक वरील दोन श्लोकांत वर्णिले आहेत. " पण हें म्हणणें सर्वथा चूक आहे. कारण येथील बुद्धि म्ह० अन्तःकरणाचें एक विशिष्ट सामर्थ्य विवक्षित आहे व सांख्यशास्त्रांतील वरील कारिकांत सांगितलेली बुद्धि अन्तःकरण-महत् या अर्थी आहे. शिवाय येथील 'बुद्धि' हा शब्द ज्ञान, असंमोह, क्षमा, सत्य, इत्यादि शब्दांबरोबर पठित असल्यामुळें तो अन्तःकरणवृत्ति या अर्थींच घेतला

**महर्षयः सप्त पूर्वे चत्वारो मनवस्तथा ।**
**मद्भावा मानसा जाता येषां लोक इमाः प्रजाः ॥६॥**

**अन्वयार्थ—पूर्वे**—पूर्वीचे—**सप्त**—सात—**महर्षयः**—भृगु वगैरे ऋषी—**तथा** तसेच—**चत्वारः**—चार—**मनवः**—सावर्ण मनु हे सर्व—**मद्भावाः**—माझ्यामध्येंच भावना ठेवणारे असून,—**मानसाः जाताः**—मीं मनानेंच उत्पन्न केलेले असे झाले आहेत. —**येषां**—ज्यांच्या—**लोके**—या लोकांत—**इमाः प्रजाः**—या सर्व प्रजा आहेत. ६.

**किंच—महर्षयः सप्त भृग्वादयः पूर्वेऽतीतकालसंबन्धिनश्चत्वारो मनवस्तथा सावर्णा इति प्रसिद्धाः । ते च मद्भावा मद्गतभावना वैष्णवेन सामर्थ्येनोपेता मानसा मनसैवोत्पादिता मया जाता उत्पन्ना येषां मनूनां महर्षीणां च सृष्टिर्लोक इमाः स्थावरजङ्गमाः प्रजाः ॥ ६ ॥**

**भाष्यार्थ—किं च महर्षयः पूर्वे सप्त भृग्वादयः**—त्याचप्रमाणें आद्य सप्तर्षि म्ह० भृगूपासून वसिष्ठापर्यंत सर्वज्ञ विद्यासंप्रदायप्रवर्तक ऋषि—**तथा पूर्वे-अतीतकालसंबंधिनः चत्वारः मनवः सावर्णाः इति प्रसिद्धाः**—तसेच, पूर्वीचे म्हणजे भूतकालसंबंधी-भूतकालीन चार मनु-पुराणांत सावर्णमनु म्हणून प्रसिद्ध असलेले चार प्रजापालक व स्वतः ईश्वर,—**ते च मद्भावाः-मद्गतभावनाः वैष्णवेन सामर्थ्येन उपेताः**—ते ऋषि व मनु कसे? तर ‘ मद्भावाः० ’ म्हणजे म[1]ज सर्वज्ञ ईश्वराचे ठिकाणीं

---

पाहिजे. स्वतः रहस्यकारच टीपेंत “ भाव म्ह० अवस्था, स्थिति, वृत्ति ” असें म्हणतात. पण पुनः येथील बुद्धीचा साख्यांच्या बुद्धीशीं संबंध जोडतात, हे केवढें आश्चर्य आहे ? येथें बुद्धीलाहि ‘ भाव ’ म्हटलें आहे. पण साख्यकारिकेंत धर्मादि भाव हे बुद्धीचे धर्म मानले आहेत. येथील भावशब्दाचा अर्थ ‘ पदार्थ ’ असा आहे. स्वतः रहस्यकारांनींच अ. ७ श्लो. १२ येथें भाव म्ह० पदार्थ असा अर्थ केला आहे. त्यांना तेथें सांख्यकारिकेचें स्मरण झालें नाहीं. पण येथेंच झालें ! तें कां ? देव जाणे ! पण त्यांत दम, तप, दान, यज्ञ, इत्यादि भाव कसे अन्तर्भूत होतात ? सांख्य त्यांना बुद्धीचे भाव म्हणत नाहींत. पण ही शंका घालविण्यासाठीं रहस्यकार म्हणतात–“ तप, दान, यज्ञ, इत्यादि शब्दांनीं तन्निष्ठक बुद्धीचे भावच समजावयाचे ” हे समाधान त्यांच्या अधभक्तांवांचून दुसऱ्या कोणालाच समजणार नाहीं व पटणारहि नाहीं ‘ तन्निष्ठक बुद्धीचे ’ म्हणजे काय ? शिवाय तप, दान, यज्ञ, दम इत्यादिकांबरोबर बुद्धीचीहि जर एक भाव म्हणून गणना केली आहे तर ते बुद्धीचे भाव कसे ? शिवाय हे सर्व निरनिराळे भाव माझ्यापासूनच झाले आहेत, असें भगवान् सांगतात, पण सांख्य तसें मुळींच मानीत नाहींत. यास्तव रहस्यकारांच्या वरील म्हणण्यांत उपपत्ति मुळींच नाहीं.

१ रहस्यकार ‘ माझेच मनानें उत्पन्न केलेले भाव ’ असा अर्थ करितात, पण भाव म्ह० काय ? वरील श्लोकांतील ‘भाव’शब्दाचा सांख्यशास्त्रांतील ‘भाव’शब्दाशीं जसा बादरायण संबंध जोडला तसाच येथें जोडावयाचा कीं काय ?

ज्यांची भावना आहे असे ते, त्यामुळें वैष्णव सामर्थ्यानें युक्त असलेले-वैष्णवी शक्तीकडून अधिष्ठित असल्यामुळें ज्ञानैश्वर्यसंपन्न झालेले—**मानसाः-मया मनसा एव उत्पादिताः**—मानस-मी मनानेंच उत्पन्न केलेले—**जाताः-उत्पन्नाः**—असे उत्पन्न झाले आहेत.—**येषां-मनूनां च महर्षीणां सृष्टिः लोके इमाः स्थावरजंगमाः प्रजाः**—ज्या मनूंची व महर्षींची सृष्टि-विद्या व जन्म यांच्या योगानें बनलेली संतति या लोकांतील ही सर्व स्थावर-जंगमरूप प्रजा आहे. [ या लोकांतील ही सर्व चराचर प्रजा त्या मनूंची व महर्षींची संतति आहे. ] ६.

---

१ रहस्यकारांनी या श्लोकावर बरीच मोठी टीप लिहिली असून त्यांत 'सात ऋषी व मनु कोणते' या प्रश्नाची चर्चा केली आहे. आचार्यांनी भृगु, मरीचि, अत्रि, पुलस्त्य, पुलह, क्रतु, व वसिष्ठ हे सात महर्षी व चार सावर्ण मनु मानले आहेत व 'पूर्वे म्ह० भूतकालसबंधी' हें त्या महर्षींचें व मनूंचेंहि विशेषण केले आहे. पण रहस्यकार म्हणतात-"हल्लींच्या म्ह० वैवस्वत अथवा ज्या मन्वंतरांत गीता सांगितली त्याच्या पूर्वींच्या मन्वतराचे सप्तर्षी येथें सांगण्याचें कारण नाहीं. म्हणून हल्लींच्या मन्वतरांतलेच सप्तर्षी घेतले पाहिजेत. त्यांची नांवें मरीचि, अंगिरस्, अत्रि, पुलस्त्य, पुलह, क्रतु व वासिष्ठ अशीं मभा. शां. नारायणीयोपाख्यानांत दिलेलीं आहेत व तींच या ठिकाणीं विवक्षित आहेत, असें आमचें मत आहे. कारण नारायणीय किंवा भागवत धर्मच त्याच्या विधीसह गीतेंत प्रतिपाद्य आहे." नारायणीय किंवा भागवत धर्मच गीतेत प्रतिपाद्य आहे, हें रहस्यकारांचे म्हणणें भ्रामक आहे. गीता कोणत्याहि विशिष्ट पंथाचा उपदेश करीत नाहीं. ती शुद्ध दोन प्रकारच्या वैदिक धर्माचा उपदेश करीत आहे, याविषयीं आम्हीं पूर्वी बरेंच लिहिले आहे. (गी.भा.पृ ३४९-३६५ पहा.) रहस्यकार म्हणतात "ज्या मन्वतरांत गीता सांगितली, त्याच मन्वतराचे सप्तर्षी घेतले पाहिजेत," आम्हीं म्हणतो तें कां ? एका कल्पात चवदा मन्वंतरें होतात, हें तुम्हांला कबूल आहे ना ? आहे.( गी. र. पृ.१९० व ६५१पहा.)मन्वतराचा आरंभ होतांच नवीन सृष्टीचा तर आरंभ होत नाहींना ! कल्पाच्या आरंभींच नवीन सृष्टीचा आरंभ होतो हें तुम्हालाहि कबूल आहे.मग 'येषां लोक इमाः प्रजाः' असें ज्यांच्याविषयीं म्हटले आहे,ते सप्तर्षी कल्पाच्या आरंभींचे घेणे उचित नव्हे का ? भृग्वादि-वासिष्ठान्त महर्षी कल्पाच्या आरंभीं झालेले आहेत, याला पुराणाचा आधार आहे.आम्ही या टीपेच्या आरंभीं ज्यांचा उल्लेख केला आहे ते पुराणोक्त भृग्वादि-वसिष्ठान्त सप्तर्षी कल्पाच्या आरंभीं झाले, याविषयीं विष्णुपुराणांतहि आधार आहे. (विष्णुपु. अंश १ अ. ७ श्लो. ५ पहा.) ब्रह्मदेवानें प्रजावृद्धीसाठींच या मानस पुत्रांना उत्पन्न केलें असल्यामुळें 'येषां लोक इमाः प्रजाः' असें त्यांच्याविषयींच म्हणता येणें शक्य आहे. प्रस्तुत वैवस्वत मन्वन्तराच्या पूर्वी सहा मन्वंतरें होऊन गेलीं होतीं, त्यांत प्रजा होती. यास्तव ज्या मन्वन्तरांत गीता सांगितली, त्या मन्वन्तराचे महर्षी प्रजोत्पादक होऊं शकत नाहींत. म्हणून रहस्यकारांचें महर्षींविषयींचें म्हणणें अनुपपन्न आहे. भृग्वादि म्ह० वैवस्वत मन्वंतराच्या पूर्वींच्या चाक्षुष मन्वन्तराचे सप्तर्षी" असें रहस्यकारांसारखे ( गी. र. पृ. ७५१ ) कोणी समजतील, म्हणून तर टीकाकारांनीं मुद्दाम 'भृग्वादि-वासिष्ठान्ताः' असें म्हटले आहे. चाक्षुष मन्वन्तरांतील सप्तर्षींचा आरंभ जरी भृगूपासून असला तरी

शेवटचा ऋषि वसिष्ठ नाही, सहिष्णु आहे. यास्तव ‘ पूर्वे ’ म्ह० कल्पाच्या आरंभीचे–स्वायंभुव मन्वन्तरांतले ब्रह्मदेवाचे मानसपुत्र असा याचा अर्थ आहे.

आतां ‘ पूर्वे चत्वारो ’ व ‘ मनवस्तथा ’ यांच्या अर्थाचा विचार करूं. आचार्यांनीं ‘पूर्वे भृग्वादयः सप्त महर्षयः’ असा अर्थ केला आहे, तो विष्णु पुराणादिकांना धरून आहे, हें सांगितलेंच आहे. भगवानांनींहि ‘ महर्षीणां भृगुरहं ’ गी. १०-२६ असें जें म्हटलें आहे तेंहि भृगु कल्पाच्या आरंभीं झालेला ब्रह्मदेवाचा पहिला मानसपुत्र या दृष्टीनेंच आहे. आचार्यांनीं जेथें ‘ महर्षि ’ शब्द आला आहे तेथे ‘ भृग्वादयः ’ असेंच म्हटलें आहे, व त्याचें कारण भृगु हा आदि महर्षि हेंच आहे. तसेंच, “ चत्वारो मनवः सावर्णाः इति प्रसिद्धाः” असे आचार्य म्हणतात. पण मधुसुदनसरस्वती, नीलकंठ, श्रीधर वगैरे इतर टीकाकार “भृग्वादिक सप्तर्षी, सनकादिक चार ऋषी व चवदा मनु” असा अर्थ करितात. शंकरानन्द ‘पूर्वे सर्वेभ्यः प्राक्तनाः सप्त भृग्वादयः वसिष्ठान्ताः तथा पूर्वे प्राचीनाः स्वायंभुवादयः चत्वारो मनवः ’ असा अर्थ करितात. रहस्यकार म्हणतात–“ सनक, सनंद, सनातन व सनत्कुमार हे चारी ऋषी यद्यपि ब्रह्मदेवाचे मानसपुत्र आहेत, तरी ते सर्व जन्मतःच संन्यासी असून प्रजावृद्धि करीनात म्हणून ब्रह्मदेव त्याच्यावर रागावला होता. ( भाग.अ. ३-१२ वि. १.७ ) अर्थात् ‘ ज्यापासून या लोकामध्ये ही प्रजा झाली–’ ‘येषां लोक इमाः प्रजाः’–हें वाक्य या चार ऋषींस बिलकुल लागू पडत नाही. ” पण प्रजा म्ह० ‘जन्मना च विद्यया च संततिभूता इमा ब्राह्मणाद्याः सर्वाः प्रजाः’ असेंहि टीकाकार शास्त्राला धरूनच म्हणतात, हें रहस्यकाराच्या लक्षात आले नाही. शिवाय प्रजा म्ह० केवल मनुष्यच नव्हे, तर चराचररूप सर्व प्रजा हेंहि लक्षात ठेवलें पाहिजे. पण आचार्यांनीं ‘सनकादिक’ व ‘चतुर्दश’ या पदांचा अध्याहार विनाकारण करण्यात अर्थ नाही, असे जाणून ‘पूर्वे’ व ‘सप्त’ हीं विशेषणे सप्तर्षींचीं आणि ‘पूर्वे’ ‘चत्वारः’ हीं मनूंचीं मानून अर्थ केला आहे व तो तसा न करिता मधुसूदनादिक किंवा शंकरानंद जसा करितात तसा केला तरी कांहीं बिघडत नाही, हें उघड आहे. तथापि ‘चत्वारो मनवः तथा’ अशीं पदें असल्यामुळें एकाच कालीं उत्पन्न झालेल्या चार सावर्ण मनूंचें ब्रह्मांडपुराणांत ४-१ विशेष महत्त्व-वर्णन असल्यामुळे आचार्यांनीं त्याचेंच ग्रहण केलें आहे. पण रहस्यकार “ पुढें होणाऱ्या [ म्ह० प्रस्तुत मन्वंतरानंतर एका मन्वंतरानें होणाऱ्या] त्याची ही हल्लींची प्रजा कशी?” अशी कुशंका घेऊन “चार पूर्व ऋषी म्ह० वासुदेवादि चतुर्व्यूह घ्यावे” असें म्हणतात, पण ते अयोग्य आहे, कारण वासुदेवादि चतुर्व्यूह ही अवैदिक कल्पना आहे. शिवाय वासुदेवादिक चतुर्व्यूह ऋषी नव्हेत, हेंहि विसरतां कामा नये. गीतेला पांचरात्रमतातील ही कल्पना संमत असल्याचें दिसत नाही. तात्पर्य रहस्यकारांनी आपल्या मतें जरी पुष्कळशी चिकित्सा केली आहे तरी, व ‘ सप्त महर्षयः ’ मरीच्यादि सात ऋषी ‘ पूर्वे चत्वारः ’ वासुदेवादि चतुर्व्यूह व ‘ तथा मनवः’ म्ह० स्वायंभुवादि वैवस्वतान्त सात मनु असें जरी ठरविलें आहे तरी तें ग्राह्य होण्यासारखें नाहीं, त्यापेक्षां टीकाकारांचें व्याख्यानच अधिक सोपपत्तिक आहे.‘ सावर्ण मनु अतीत कालसंबंधी घ्यावें,’ असें टीकाकारांचें म्हणणें लक्षांत न घेतां रहस्यकारांनीं वरील कुशंका केली आहे.

**एतां विभूतिं योगं च मम यो वेत्ति तत्त्वतः ।**
**सोऽविकंपेन योगेन युज्यते नात्र संशयः ॥७॥**

**अन्वयार्थ—यः**—जो—**मम**—माझ्या—**एतां विभूतिं**—या विभूतीला—**च**—व—**योगं**—घटनेला—**तत्त्वतः**—तत्त्वतः—**वेत्ति**—जाणतो—**सः**—तो—**अविकंपेन योगेन**—निश्चल योगानें-सम्यग्दर्शनाच्या स्थैर्यरूप योगानें—**युज्यते**—युक्त होतो.—**अत्र**—यांत—**संशयः न**—कांहीं संशय नाहीं. ७.

**एतामिति । एतां यथोक्तां विभूति विस्तारं योगं च युक्तिं चाऽऽत्मनो घटनमथवा योगैश्वर्यसामर्थ्यं सर्वज्ञत्वं योगजं योग उच्यते । मम मदीयं यो वेत्ति तत्त्वतस्तत्त्वेन यथावदित्येतत् । सोऽविकम्पेनाप्रचालितेन योगेन सम्यग्दर्शनस्थैर्यलक्षणेन युज्यते संबध्यते नात्र संशयो नास्मिन्नर्थे संशयोऽस्ति ॥ ७ ॥**

**भाष्यार्थ—'एतां०' इति**—याप्रमाणें भगवानांचा सोपाधिक प्रभाव सांगून 'एतां०' या श्लोकानें त्यांच्या ज्ञानाचें फल सांगतात—**एतां यथोक्तां विभूतिं-विस्तारं च योगं-युक्तिं च आत्मनः घटनं**—या पूर्वोक्त विभूतीला म्ह० विस्ताराला व योगाला[1] म्ह० युक्तीला-आत्म्याच्या घटनेला—**अथवा योगजं योगैश्वर्यसामर्थ्यं सर्वज्ञत्वं योगः उच्यते**—किंवा योगापासून झालेलें योगैश्वर्यसामर्थ्य-सर्वज्ञत्व वगैरे, याला 'योग' म्हटलें जातें [बुद्ध्यादिकांचे उपादन कारण या रूपानें नाना प्रकारचे होणें हेंच वैभव आहे. त्या योगानें ईश्वराला सर्वात्मकत्व आहे. ईश्वराच्या निरनिराळ्या पदार्थांच्या संपादनसामर्थ्याला योग म्हणतात. ऐश्वर्य, सर्वज्ञत्व, सर्वेश्वरत्व हें त्याचें फल आहे. माझ्या शक्ति व ज्ञान यांच्या लेशाचा आश्रय करून मन्वादिक व भृग्वादिक सर्वांवर अधिकार चालवितात व सर्व जाणतात.]—**मम मदीयं यः तत्त्वतः-तत्त्वेन-यथावत् इति एतत् वेत्ति**—माझ्या योगाला व विभूतीला जो तत्त्वतः-तत्त्वानें, पूर्णपणें असा याचा भावार्थ, जाणतो—**सः-अविकम्पेन-अप्रचलितेन योगेन सम्यग्दर्शनस्थैर्यलक्षणेन युज्यते-संबध्यते**—तो-निश्चल-अप्रचल-स्थिर योगानें[2]-

१ येथील 'योगं' या शब्दाचा अर्थ करतांना रहस्यकार पुनः घसरले आहेत. वर 'योगं' म्ह० अव्यक्ताचें व्यक्त होण्याची युक्ति असें ते म्हणतात. गी. र. पृ. ७२२ व ७३८ पहा व येथें 'योग म्ह० हा विस्तार करण्याची युक्ति' असें म्हणतात. आचार्य 'योगः-युक्तिः-घटनं' असें म्हणतात. पण त्यांच्या 'युक्ति' शब्दाचा अर्थ संस्कृत आहे व रहस्यकारांच्या 'युक्ति' शब्दाचा अर्थ 'हेतु' शब्दाच्या (गी. भा. पृ. १७४ पहा.) अर्थाप्रमाणें प्राकृत आहे. त्यामुळेंच आचार्यांचा अर्थ अतिशय ग्राह्य व रहस्यकारांचा अग्राह्य झाला आहे. संस्कृतांत योग म्ह० युक्ति, घटना, रचना, स्वरूप, असा होतो व प्राकृतांत अमुक एक करण्याची युक्ति म्ह० विशिष्ट उपाय किंवा कौशल्य असा आहे.

२ रहस्यकार या श्लोकांतील 'सः अविकम्पेन योगेन युज्यते' या पदांचा अर्थ "त्याला स्थिर कर्मयोग प्राप्त होतो" असा करितात. पण स्थिर कर्मयोग म्ह० काय? अविकंप योग म्ह०

सम्यग्दर्शनस्थैर्यरूप योगानें युक्त-संबद्ध होतो—**न अत्र संशयः-अत्र-अस्मिन् अर्थे संशयः न अस्ति**—याविषयीं कांहीं संशय नाहीं. [ हीं वर सांगितलेली बुद्धीपासून अयशापर्यंत माझी विभूति व महर्षि, मनु यांतील योग-ऐश्वर्यादिक यांना जो पूर्णपणें-अगदीं बरोबर जाणतो, तो यथार्थ ज्ञानाची स्थिरता याच योगास प्राप्त होतो. म्ह० जो माझें सोपाधिक ज्ञान संपादन करतो त्याला त्याच्या द्वारा निरुपाधिक ज्ञान होतें. ] ७.

**अहं सर्वस्य प्रभवो मत्तः सर्वं प्रवर्तते ।**
**इति मत्वा भजन्ते मां बुधा भावसमन्विताः ॥ ८ ॥**

**अन्वयार्थ**—**अहं**—मी वासुदेवसंज्ञक परब्रह्म—**सर्वस्य**—सर्व जगाची—**प्रभवः**—उत्पत्ति आहे.—**मत्तः**—मजपासून—**सर्वं**—सर्व जगत्—**प्रवर्तते**—प्रवृत्त होतें—**इति**—असें—**मत्वा**—समजून—**भावसमन्विताः**—परमार्थतत्त्वाविषयींच्या भावनेनें युक्त असलेले—**बुधाः**—तत्त्ववेत्ते—**मां**—मला—**भजन्ते**—भजतात-माझी भक्ति-सेवा करितात. ८.

**कीदृशेनाविकम्पेन योगेन युज्यत इत्युच्यते—अहं परं ब्रह्म वासुदेवाख्यं सर्वस्य जगतः प्रभवः उत्पत्तिर्मत्त एव स्थितिनाशक्रियाफलोपभोगलक्षणं विक्रियारूपं सर्वं जगत्प्रवर्तत इत्येवं मत्वा भजन्ते सेवन्ते मां बुधा अवगततत्त्वार्था भावसमन्विता भावो भावना परमार्थतत्त्वाभिनिवेशस्तेन समन्विताः संयुक्ता इत्यर्थः ॥ ८ ॥**

**भाष्यार्थ—कीदृशेन अविकम्पेन योगेन युज्यते इति उच्यते**—तो कशा-प्रकारच्या निश्चल योगाने युक्त होतो ते 'अहं०' या श्लोकाने सांगितले जाते—**अहं-वासुदेवाख्यं परं ब्रह्म सर्वस्य-जगतः प्रभवः-उत्पत्तिः**—मी वासुदेव या नांवाचे परब्रह्म सर्व जगाचा प्रभव म्ह० उत्पत्ति आहें. [ मी सर्वांची प्रकृति-सर्वांचा आत्मा आहें, ]—**मत्तः एव स्थिति-नाश-क्रिया-फलोपभोगलक्षणं विक्रियारूपं सर्वं जगत् प्रवर्तते**—माझ्यामुळेंच म्ह० सर्वज्ञ व सर्वेश्वर अशा माझ्या निमित्तानेंच स्थिति, नाश, क्रिया, तिच्या फलाचा उपभोग या स्वरूपाचें विक्रियात्मक सर्व जगत् प्रवृत्त होतें. [ मज अन्तर्यामीकडून प्रेरित झालेले हें सर्व आपापल्या अधिकाराप्रमाणें मर्यादेचें उल्लंघन न करितां सर्व व्यवहार करितें. ]—**इति एव मत्वा बुधाः-अवगततत्त्वार्थाः मां भजन्ते-सेवन्ते**—असे जाणून बुधे म्ह० ज्यांना तत्त्वार्थ अव-

---

स्थिर कर्मयोग, व तो कोणाला प्राप्त होतो ? जो ईश्वराची ही विभूति व योग जाणतो त्याला. गीतेचा अर्थ करण्याची अपूर्व पद्धत शोधून काढली खरी ! धन्य आहे !!

१'मत्तः सर्वं प्रवर्तते-' याचा अर्थ ते 'माझ्यापासून सर्व वस्तूंची प्रवृत्ति' असा करितात. पण तो फारसा सुबोधहि नाहीं व सयुक्तिक नाहीं. वस्तूंची प्रवृत्ति मात्र ईश्वरापासून व अवस्तूंची कोणापासून ? २ 'बुधाः' म्ह० शहाणे, असें ते म्हणतात. पण येथें खरा अर्थ तसा नाहीं. त्याचा खरा अर्थ भाष्यावरूनच स्पष्ट होतो.

गत झाला आहे–ज्यांना तत्त्वार्थ कळला आहे, असे ज्ञानी मला भजतात–माझें सेवन करितात [ माझें सर्वात्मत्व, सर्वप्रकृतित्व, सर्वेश्वरत्व, सर्वज्ञत्व इत्यादि सर्व माहात्म्य जाणून माझ्या ठिकाणींच निष्ठा ठेवितात. हा संसार असार आहे, असें ज्यांना निश्चित कळले आहे तेच ईश्वराच्या भक्तीचे अधिकारी आहेत, हें सुचविण्यासाठीं भाष्यांत ' अवगततत्त्वार्थाः ' असे म्हटलें आहे. वर सांगितल्याप्रमाणें परमार्थ तत्त्व ज्ञात झालें असतां प्रेम व आदर यांचा उद्भव होतो. त्यांनीं युक्त असणें हेंहि भगवद्भक्तीचें निमित्त आहे, असें सांगतात-]—**भावसमन्विताः-भावः भावना परमार्थतत्त्वाभिनिवेशः तेन समन्विताः-संयुक्ताः इत्यर्थः**—बुध कसे, तर भावसमन्वित[1], भाव म्ह० भावना–परमार्थतत्त्वाविषयींचा अभिनिवेश–प्रेम व आदर, त्या भावानें समन्वित–संयुक्त झालेले बुध माझें भजन करितात, असा भावार्थ. ८.

**मच्चित्ता मद्गतप्राणा बोधयन्तः परस्परम् ।**
**कथयन्तश्च मां नित्यं तुष्यन्ति च रमन्ति च ॥९॥**

**अन्वयार्थ**—(**ते**)—ते माझे भक्त तत्त्ववेत्ते—**मच्चित्ताः**—ज्यांचें चित्त मज वासुदेवामध्ये आहे असे,—**मद्गतप्राणाः**—माझ्या मध्येच ज्यांची सर्व इंद्रियें आहेत असे—**परस्परं बोधयन्तः**—शिष्य आचार्यापासून ऐकलेलें भगवत्तत्त्व आपापसांत समजावून देत असतात—**च**—व—**मां**—मला—**नित्यं**—सतत—**कथयन्तः**—ज्ञानबल-वीर्यादिकांच्या योगानें विशिष्ट म्हणून सांगतात,—**च**—आणि त्यामुळें—**तुष्यन्ति**—संतोष पावतात—**च**—व—**रमन्ति**—रममाण होतात. ९.

**किंच—मच्चित्ता मयि चित्तं येषां ते मच्चित्ता मद्गतप्राणा मां गताः प्राप्ताश्चक्षुरादयः प्राणा येषां ते मद्गतप्राणा मय्युपसंहृतकरणा इत्यर्थः। अथवा मद्गतप्राणा मद्गतजीवना इत्येतत् । बोधयन्तोऽवगमयन्तः परस्परमन्योन्यं कथयन्तो ज्ञानबलवीर्यादिधर्मैर्विशिष्टं मां तुष्यन्ति च परितोषमुपयान्ति रमन्ति च रतिं च प्राप्नुवन्ति प्रियसंगत्येव ॥ ९ ॥**

**भाष्यार्थ—किं च 'मच्चित्ताः०' इति**—भगवद्भजनाचें हें वर सांगितलें एवढेंच साधन नाहीं, तर दुसरेंहि आहे, असें ' मच्चित्ताः०' या श्लोकानें सांगतात—**मच्चित्ताः-मयि चित्तं येषां ते मच्चित्ताः**—मच्चित्त म्ह० माझ्या ठिकाणींच ज्यांचें चित्त आहे ते मच्चित्त होत. [ वर सांगितलेल्या सर्वान्तर्यामी ईश्वराहून दुसऱ्या कोणत्याहि पदार्थामध्यें चित्ताचा प्रचार न होणें, चित्तानें प्रत्यगात्म्यावांचून दुसऱ्या कशाचेंहि चिंतन न करणें ]—**मद्गतप्राणाः-मां गताः प्राप्ताः चक्षुरादयः प्राणाः येषां ते मद्गतप्राणाः**—मद्गतप्राण–ज्यांचे प्राण–चक्षुरादिक इंद्रियें, मला प्राप्त झाले आहेत ते मद्गतप्राण होत. ('अहोपण, चक्षुरादि इंद्रियांची भगवानांच्या ठिकाणीं प्राप्ति संभवत नाहीं,

---

१ 'भावसमन्विताः' याचाहि अर्थ केवल ' भावयुक्त ' एवढाच केल्यानें त्यांतील स्वारस्य कांहींच ध्यानांत येत नाहीं.

कारण भगवान् इंद्रियांचा विषय होत नाहीं.' उत्तर-)—**मयि उपसंहृतकरणाः इत्यर्थः**—माझ्या ठिकाणीं ज्यांनीं आपल्या इंद्रियांचा उपसंहार केला आहे ते मद्गतप्राणाः, असा याचा भावार्थ.—**अथवा मद्गतप्राणाः-मद्गतजीवनाः इति एतत्**—किंवा मद्गतप्राण म्ह० ज्यांचें जीवन माझ्या ठिकाणीं प्राप्त झालें आहे ते; असा याचा भावार्थ. [ भगवानावांचून भक्तांचा आपल्या जीवनामध्येंहि आदर नसतो. त्यांनीं आपलें जीवनहि ईश्वरार्पण केलेलें असते, यापेक्षां आणखी संन्यास निराळा तो काय उरला ? असो. ]—**परस्परं-अन्योन्यं बोधयन्तः-अवगमयन्तः**—परस्पर म्ह० एकमेकांस बोध करणारे, त्याचें स्वरूप सांगणारे [ आचार्यांपासून श्रवण करून सहाध्यायी वादकथेनें एकमेकांस भगवानांचें ज्ञान करून देतात, हेंहि भगवद्भजनाचें साधन आहे. ]—**ज्ञानबलवीर्यादिधर्मैः विशिष्टं मां कथयन्तः**—मी भगवान् ज्ञान, बल, वीर्य इत्यादि धर्मांनीं विशिष्ट आहे, असें माझें कथन करणारे [ आचार्य शिष्यांना आगम-शास्त्र व उपपत्ति यांच्यायोगानें विशिष्ट धर्मांनीं युक्त अशा माझा बोध करितात. तेंहि एक भजनसाधन होय. ]—**तुष्यन्ति च परितोषं उपयान्ति**—असे ते माझे भक्त तुष्ट होतात, अत्यंत संतोषास प्राप्त होतात. [ मनोरथ पूर्ण झाल्यामुळें संतुष्ट होतात ]—**च रमन्ति-प्रियसंगत्या इव रतिं च प्राप्नुवन्ति**—आणि रममाण होतात. प्रिय मनुष्याच्या संगतीनें जसे, तसेच त्या भजनांत रतीला प्राप्त होतात. रममाण होतात. [ यावरून भजनाचे अनेक प्रकार आहेत, हें सिद्ध झालें. ] ९.

## तेषां सततयुक्तानां भजतां प्रीतिपूर्वकम् ।
## ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयान्ति ते ॥१०॥

**अन्वयार्थ—सततयुक्तानां**—सतत माझ्यामध्यें चित्ताला स्थिर केलेल्या—**प्रीतिपूर्वकं**—प्रीतिपूर्वक-मोठ्या प्रेमानें—**भजतां तेषां**—मला भजणाऱ्या त्यांना मी—**तं बुद्धियोगं**—तो बुद्धियोग-ज्ञानयोग—**ददामि**—देतो कीं—**येन**—ज्याच्या योगानें—**ते**—ते—**मां**—मला—**उपयान्ति**—प्राप्त होतात. १०.

**ये यथोक्तप्रकारैर्भजन्ते मां भक्ताः सन्तः—तेषां सततयुक्तानां नित्याभियुक्तानां निवृत्तसर्वबाह्यैषणानां भजतां सेवमानानां, किमर्थित्वादिना कारणेन नेत्याह प्रीतिपूर्वकं प्रीतिः स्नेहस्तत्पूर्वकं मां भजतामित्यर्थः । ददामि प्रयच्छामि बुद्धियोगं बुद्धिः सम्यग्दर्शनं मत्तत्त्वविषयं तेन योगो बुद्धियोगस्तं बुद्धियोगम् । येन बुद्धियोगेन सम्यग्दर्शनलक्षणेन मां परमेश्वरमात्मभूतमात्मत्वेनोपयान्ति प्रतिपद्यन्ते । के ते ये मच्चित्तत्वादिप्रकारैर्मां भजन्ते ॥ १० ॥**

**भाष्यार्थ**—( ७ व्या श्लोकांत तो निश्चलयोगानें युक्त होतो, असें जें सांगितलें होतें, त्याच्यासाठीं दोन श्लोकांनीं भूमिका तयार करून आतां तोच योग सांगतात-)—**ये भक्ताः सन्तः यथोक्तप्रकारैः मां भजन्ते**—जे माझे भक्त होऊन वर सांगितलेल्या

प्रकारानें माझें भजन करितात—**तेषां सततयुक्तानां-नित्याभियुक्तानां निवृत्त-सर्वबाह्य-एषणानां भजतां-सेवमानानां**—त्या सतत युक्त म्ह० नित्य अभि-युक्त-सतत भगवानांमध्येंच चित्तैकाग्र्याने संपन्न असलेल्या ज्यांच्या सर्व बाह्य विषयांविषयींच्या एषणा निवृत्त झाल्या आहेत अशा, माझें भजन-सेवन करणाऱ्या [ माझ्या भक्तांना मी बुद्धियोग देतों ]—**किं अर्थित्वादिना कारणेन**—ते तुझी भक्ति पुत्रादि लोकत्रयप्राप्तीसाठीं किंवा ऐहिक धनादिकांच्या प्राप्तीसाठीं करतात कीं काय ?—**न इति आह**—छे, असें नाहीं, असे भगवान् सांगतात.—**प्रीतिपूर्वकं-प्रीतिः स्नेहः तत्पूर्वकं मां भजतां इत्यर्थः**—प्रीतिपूर्वक-प्रीति म्ह० स्नेह, तत्पूर्वक माझें भजन करणाऱ्या, असा याचा भावार्थ. ( वर सांगितलेली ज्ञानाख्य भक्ति स्नेहानें करणाऱ्या त्यांना मी तत्त्वज्ञान देतों, असे उत्तरार्धानें सांगतात-)—**बुद्धियोगं ददामि-प्रयच्छामि**—त्यांना मी बुद्धियोग देतों—**बुद्धिः-मत्तत्त्वविषयं सम्यग्दर्शनं तेन योगः बुद्धियोगः तं बुद्धियोगं**—बुद्धि म्ह० माझ्या तत्त्वाविषयींचें यथार्थ

---

१ या सर्वच श्लोकाचा व त्यांतल्या त्यांत 'बुद्धियोग' या शब्दाचा अर्थ रहस्यकार असा करितात—" याप्रमाणें नेहमी युक्त म्ह० समाधानानें राहून प्रीतिपूर्वक मला भजणाऱ्या लोकांस ते मला येऊन पोंचतील, असा समत्वबुद्धीचा योग मीच देत असतों. " 'बुद्धियोग म्ह० समत्वबुद्धीचा योग,व तो सतत समाधानानें राहून प्रीतिपूर्वक भजणाऱ्या लोकास ईश्वरच देतो,' हें जर खरें तर पूर्वी 'योगस्थ होऊन कर्म कर, समत्व हाच योग आहे' इत्यादि जे आरंभींच सांगितलें आहे तें फुकटच म्हणावयाचें ! कारण सतत समाधानानें न राहणाऱ्यांना व प्रीतिपूर्वक न भजणाऱ्यांना ईश्वरच समत्वबुद्धियोग देत नाहीं. अर्जुन दुसऱ्याच अध्यायात असा नव्हता व गीतेच्या उपदेशानतरहि युद्धांत व्यग्र होणार ! तेव्हां त्याला समाधानानें राहण्यास व प्रीतिपूर्वक भजन करण्यास अवकाशच नाहीं. तेव्हां 'योगस्थ होऊन कर्म कर ' हा उपदेश वायफळ ठरतो. तसेच 'मीच देत असतो ' यांतील 'च' या शब्दयोगी अव्ययाचें स्वारस्य काय ? 'मी देतों ' एवढेंच म्हटलें असतें, तर काय बिघडलें असतें ? ' बुद्धियोग ' म्ह० समत्वबुद्धीचा योग, येथील योगशब्दाचा अर्थ काय ? योग म्ह० कर्मयोग की युक्ति ? कारण ' रामाचें धनुष्य ' यांत राम निराळा व धनुष्य निराळें, त्याप्रमाणें येथेंहि समत्वबुद्धि निराळी व योग निराळा. तेव्हां योग म्ह० समत्व असें म्हणतां येणें शक्य नाहीं. 'येन मां उपयान्ति ते ' याचा 'ते मला येऊन पोंचतील असा' हा अर्थ बरोबर किंवा निर्दोष आहे असें कोण म्हणेल ? ' ज्या बुद्धियोगानें ते मला येऊन पोंचतील तो बुद्धियोग मी त्यांना देतों, ' हा त्याचा सरळ अर्थ आहे. अर्थात् हा बुद्धियोग म्ह० ज्ञानयोग होय. कारण ज्ञानयोगावांचून भगवत्प्राप्ति शक्य नाहीं. परम भक्तांना भगवान् बुद्धियोग देतात व त्या बुद्धियोगानें ते भक्त भगवानांना प्राप्त होतात. पण रहस्यकारांना ज्ञान व मोक्ष यांचा असा साक्षात् संबंध इष्ट नाहीं.त्याना ज्ञानानंतरहि ज्ञानी पुरुषाला मरेपर्यंत कर्मयोगास जुंपावयाचें आहे. म्हणून ही सर्व खटपट व लटपट ! पण हा बुद्धियोग म्ह० ज्ञानयोगच आहे, हें पुढील श्लोकावरूनहि सिद्ध होतें. पुढील श्लोकावरील भाष्यार्थ पहा.

ज्ञान, त्याच्याशीं योग म्ह० संबंध, तो बुद्धियोग. त्या बुद्धियोगाला मी देतों. [ माझ्या भक्तांना मी तत्त्वज्ञान देतों. ]—**येन-सम्यग्दर्शनलक्षणेन बुद्धियोगेन मां-आत्मभूतं परमेश्वरं आत्मत्वेन उपयान्ति-प्रतिपद्यन्ते**—ज्या तत्त्वज्ञानरूप बुद्धियोगानें माझे भक्त मला-आत्मरूप परमेश्वराला 'हाच मी-आत्मा' अशा भावनेनें प्राप्त होतात, ( या योगाचे अधिकारी कोण ते सांगतात-)—**के ते ये मच्चित्तत्वादिप्रकारैः मां भजन्ते**—ते कोण ? तर जे ९ व्या श्लोकांत सांगितल्याप्रमाणें मच्चित्तत्वादि प्रकारांनीं मला भजतात, त्यांना मी तो बुद्धियोग देतों. १०.

**तेषामेवानुकम्पार्थमहमज्ञानजं तमः ।**
**नाशयाम्यात्मभावस्थो ज्ञानदीपेन भास्वता ॥११॥**

**अन्वयार्थ—अहं**—मी—**तेषां एव अनुकंपार्थं**—त्यांच्यावरच दया करण्यासाठीं—**आत्मभावस्थः (सन्)**—त्यांच्या अंतःकरणांत स्थित होऊन,—**भास्वता ज्ञानदीपेन**—देदीप्यमान ज्ञानदीपानें—**अज्ञानजं तमः**—अज्ञानामुळें उत्पन्न झालेला अविवेक—**नाशयामि**—घालवितों. ११

**किमर्थं कस्य वा त्वत्प्राप्तिप्रतिबन्धहेतोर्नाशकं बुद्धियोगं तेषां त्वद्भक्तानां ददासीत्याकाङ्क्षायामाह—तेषामेव कथं नाम श्रेयः स्यादित्यनुकम्पार्थं दयाहेतोरहमज्ञानजमविवेकतो जातं मिथ्याप्रत्ययलक्षणं मोहान्धकारं तमो नाशयाम्यात्मभावस्थ आत्मनो भावोऽन्तःकरणाशयस्तस्मिन्नेव स्थितः सन् । ज्ञानदीपेन विवेकप्रत्ययरूपेण भक्तिप्रसादस्नेहाभिषिक्तेन मद्भावनाभिनिवेशवातेरितेन ब्रह्मचर्यादिसाधनसंस्कारवत्प्रज्ञावर्तिना विरक्तान्तःकरणाधारेण विषयव्यावृत्तचित्तरागद्वेषाकलुषितनिवातापवरकस्थेन नित्यप्रवृत्तैकाग्र्यध्यानजनितसम्यग्दर्शनभास्वता ज्ञानदीपेनेत्यर्थः ॥ ११ ॥**

**भाष्यार्थ—किमर्थं**—त्यांना तूं बुद्धियोग कशासाठी देतोस ?—**वा कस्य त्वत्प्राप्तिप्रतिबन्धहेतोः नाशकं बुद्धियोगं तेषां त्वद्भक्तानां ददासि इति आकांक्षायां आह**—किंवा कोणत्या भगवत्प्राप्तीच्या प्रतिबंधक[1] हेतूचा नाश करणारा बुद्धियोग तूं त्या आपल्या भक्तांना देतोस ? अशी आकांक्षा झाली असतां भगवान् 'तेषां०' या श्लोकानें सांगतात.—**तेषां एव कथं नाम श्रेयः स्यात् इति अनुकंपार्थं-दयाहेतोः**—त्यांच्याच, यांचें कल्याण कसें बरें होईल, अशा अनुकंपेसाठीं-दयेसाठीं, त्यांचें कल्याण व्हावें, या कारणानें-दयेनें—**अहं अज्ञानजं-अविवेकतः जातं मिथ्याप्रत्ययलक्षणं तमः-मोहान्धकारं नाशयामि**—मी अज्ञानापासून-अविवेकापासून झालेलें मिथ्याप्रत्ययरूप तम-मोहान्धकार घालवितों-मोहान्धकाराचा मी नाश करतों [ अविवेक म्ह० अज्ञान व त्यापासून झालेलें मिथ्याज्ञान या

---

१ बुद्धियोग भगवत्प्राप्तीच्या प्रतिबंधाचें निवारण करणारा आहे; पण तो प्रतिबंध कोणता, तें सांगण्यासाठीं या श्लोकाची प्रवृत्ति आहे.

दोघांना मिळून 'तम' असें येथें म्हटलें आहे. तेंच भक्तांच्या ज्ञानप्राप्तीला प्रतिबंध करतें. त्याचा नाश करण्याचें सामर्थ्य कोणत्याहि जड वस्तूमध्यें संभवत नाहीं. कारण सर्व जड वस्तूंचा अन्तर्भाव या तमांतच होत असतो. त्यामुळें मी त्या तमाचा नाश करतों असें जें येथें म्हटलें आहे ते योग्यच आहे. पण तूं तरी त्याचा नाश कसा करतोस ? कारण केवल चैतन्यरूप असलेल्या तुला त्याचा नाश करितां येणार नाहीं, अशी आशंका घेऊन सांगतात-]—**आत्मभावस्थः-आत्मनः भावः अन्तःकरणाशयः तस्मिन् एव स्थितः सन्**—आत्मभावस्थ होऊन तमाचा नाश करितों. आत्म्याचा जो भाव तो आत्मभाव म्ह० अन्तःकरणाचा आशय, त्यांतील एक विशेष वृत्ति, त्या आत्मभावांत स्थित होऊन [ मी तमाचा नाश करतों.अर्थात् महावाक्याच्या श्रवणानें उत्पन्न झालेल्या बुद्धिवृत्तीत अभिव्यक्त झालेला चिदात्मा सहायाच्या सामर्थ्यानें अज्ञानादिकांच्या नाशाचें कारण होतो. याप्रमाणे बुद्धींत व्यक्त झालेल्या बोधामुळें अज्ञानादिकांची निवृत्ति होते, असे सांगून बोधानें अभिव्यक्त झालेल्या बुद्धीमुळें त्यांची निवृत्ति होते, असा दुसरा पक्ष सांगतात-]—**ज्ञानदीपेन-विवेकप्रत्ययरूपेण**—विवेकप्रत्ययरूप ज्ञानदीपानें मी त्याचा नाश करितों.( त्या दीपाचींच विशेषणें-) —**भक्तिप्रसादस्नेहाभिषिक्तेन**—सतत केलेल्या भगवद्भक्तीनें भगवत्प्रसाद प्राप्त होतो. भगवत्प्रसाद-भगवदनुग्रह हाच स्नेह-तेल त्यानें परिपूर्ण असलेल्या दीपानें म्ह० भगवद्भक्तीमुळें झालेला भगवदनुग्रह, त्याच स्नेहाचा सतत सेक झाल्यामुळें उत्पन्न झालेल्या ज्ञानदीपानें—**मद्भावनाभिनिवेशवातेरितेन**—माझ्याच विषयींच्या भावनेचा जो अभिनिवेश, तोच वायु त्याच्या प्रेरणेनें उत्पन्न झालेल्या ज्ञानदीपानें ( वायूच्या प्रेरणेवांचून आरंभीं दिव्याची उत्पत्ति होत नाहीं. दिवा पेटण्यासहि सूक्ष्म वायूचें साह्य लागतेंच. )—**ब्रह्मचर्यादिसाधनसंस्कारवत्प्रज्ञावर्तिना**—ब्रह्मचर्य, शम, दम इत्यादि साधनांच्या योगानें जिच्यामध्यें संस्कार झाले आहेत, अशी प्रज्ञा हीच त्या ज्ञानदीपाची वात आहे, [ वातीवाचून प्रदीप पेटत नाहीं, हें प्रसिद्ध आहे.] —**विरक्तान्तःकरणाधारेण**—विरक्त अन्तःकरण हाच त्याचा आधार आहे. (समई, पणती इत्यादि आधारावांचून प्रदीप पेटत नाहीं, हें सर्वांना माहीत आहेच )—**विषयव्यावृत्तचित्तरागद्वेषाकलुषितनिवात-अपवरकस्थेन**—जे विषयांपासून निवृत्त झालेलें व त्यामुळे राग-द्वेषांनीं कलुषित न होणारें चित्त तेच वायुरहित अपवरक म्ह० खिडकी, कोनाडा वगैरे होय. त्यांत ठेवलेल्या—त्यांतील प्रदीपानें— **नित्यप्रवृत्त-ऐकाग्र्यध्यानजनितसम्यग्दर्शनभास्वता ज्ञानदीपेन इत्यर्थः** —नित्य एकाग्र मनानें होणाऱ्या ध्यानापासून उत्पन्न झालेला जो आत्मसाक्षात्कार त्याच प्रकाशानें युक्त असलेल्या ज्ञानदीपानें मी अविवेकजन्य मोहान्धकाराला घालवितों, असा याचा भावार्थ. ११.

---

१ रहस्यकारांनीं मागच्या श्लोकांतील 'बुद्धियोग' व या श्लोकांतील 'ज्ञानदीप' यांचा कांहींच संबंध नाहीं, हें दाखविण्यासाठीं "आणि त्यांवर अनुग्रह करण्यासाठींच मी त्यांच्या आत्मभावांत म्ह० अन्तःकरणांत शिरून तेजस्वी ज्ञानदीपानें त्यांच्या मनांत अज्ञा-

**अर्जुन उवाच**—अर्जुन म्हणाला—

**परं ब्रह्म परं धाम पवित्रं परमं भवान्।**
**पुरुषं शाश्वतं दिव्यमादिदेवमजं विभुम् ॥१२॥**
**आहुस्त्वामृषयः सर्वे देवर्षिर्नारदस्तथा।**
**असितो देवलो व्यासः स्वयं चैव ब्रवीषि मे ॥१३॥**

**अन्वयार्थ—सर्वे ऋषयः**—सर्व ऋषि—**त्वां**—तुला—**भवान्**—आपण—**परं ब्रह्म**—परमात्मा आहां—**परं धाम**—परम तेज आहां—**परमं पवित्रं**—परम पावन आहां—**पुरुषं**—पुरुष—**शाश्वतं**—शाश्वत—**दिव्यं**—दिव्य—**आदिदेवं**—सर्वांच्या अगोदर झालेला देव,—**अजं**—अज—**विभुं**—प्रभु आहां, असें—**आहुः**—म्हणतात.—**तथा**—त्याचप्रमाणे—**देवर्षिः नारदः**—देवर्षि नारद,—**असितः देवलः**—असित देवल व—**व्यासः**—व्यास तुला तसेंच म्हणतात—**च**—आणि—**स्वयं एव**—तूं स्वतःच—**मे**—मला—**ब्रवीषि**—तसें सांगतोस.१२-१३

**यथोक्तां भगवतो विभूतिं योगं च श्रुत्वा—परं ब्रह्म परमात्मा परं धाम परं तेजः पवित्रं पावनं परमं प्रकृष्टं भवान्पुरुषं शाश्वतं नित्यं दिव्यं दिवि भवमादिदेवं सर्वदेवानामादौ भवं देवमजं विभुं विभवनशीलम् ॥ १२ ॥**

**भाष्यार्थ**—( भगवानांचे सर्वविशेषशून्य निरुपाधिक स्वरूप व सर्वात्मत्वादि सोपाधिक स्वरूप व त्या स्वरूपाच्या ज्ञानाचें फल ऐकून अर्जुन त्यांतील सर्वांच्या बुद्धीला ग्राह्य होणारें सोपाधिक रूप मन्द अधिकाऱ्यांवर अनुग्रह करण्यासाठीं भगवानांच्या तोंडून सविस्तर वदवावें, म्हणून येथे प्रश्न करीत आहे. निरुपाधिक रूप सामान्य अधि-

---

नापासून उत्पन्न झालेल्या अंधकाराचा नाश करितों. ” असा अर्थ केला आहे. त्यांतील ‘ आणि ’ हा शब्द पदरचा असून त्यामुळें ‘बुद्धियोग देतों व ज्ञानदीपानें अंधकार घालवितों,’ असा अर्थ निघतो. पण वस्तुतः तसें नसून मी त्याना बुद्धियोग देतो. कशासाठीं ? तर अज्ञानजन्य तमाचा म्ह० मोहाचा नाश करण्यासाठीं, व त्याच देदीप्यमान ज्ञानदीपानें तो मोहान्धकार घालवितों, असा या दोन श्लोकांचा संबंध आहे.

७–११ श्लोकावरील टीपेंत रहस्यकार म्हणतात–“सातव्या अध्यायात निरनिराळ्या देवतांवरील श्रद्धा देखील परमेश्वर देतो, असें जें म्हटलें आहे ( ७·२१ ) त्याप्रमाणेच आतांहि भक्तिमार्गास लागलेल्या मनुष्याची समत्वबुद्धि वाढविण्याचें कामहि परमेश्वरच करतो....कर्मयोगाची एकदा जिज्ञासा झाल्यावर मनुष्य चरकांत घातल्याप्रमाणें पूर्णसिद्धीकडे ओढिला जातो,(गी.६.४४) असें जे वर्णन आलें आहे,त्याशीं भक्तिमार्गांतील हा सिद्धान्त समानार्थक आहे.” पण हें सर्व म्हणणें असंबद्ध आहे. त्यांत शास्त्रीयता मुळींच नाहीं. पण त्याच अधिक छाननी करूं लागल्यास विस्तार होईल म्हणून दुर्लक्ष करितों.“ज्ञानदृष्ट्या म्ह०कर्मविपाक प्रक्रियेप्रमाणें” ( गी. र. पृ. ७६४ ) इत्यादि उल्लेखहि निराधार आहेत.

काऱ्यांच्या उपयोगाचें नाहीं, हें जाणूनच त्यानें हा प्रश्न केला आहे. )—**यथोक्तां भगवतः विभूतिं योगं च श्रुत्वा**—वर सांगितलेल्या प्रकारची भगवानांची विभूति व योग ऐकून अर्जुन म्हणाला—**भवान् परं ब्रह्म-परमात्मा**—आपण परब्रह्म म्ह० परमात्मा आहां— **परं धाम-परं तेजः**—परम धाम म्ह० श्रेष्ठ-सर्वोत्तम तेज, —**परमं पवित्रं-प्रकृष्टं पावनं**—परम पवित्र म्ह० अत्यंत पावन अत्यंत शुद्ध आहां [चैतन्य निर्विकार आहे,म्हणूनच तें 'परम पवित्र' होय. निरातिशय निर्विकार तेज व अत्यंत शुद्ध असे परब्रह्म-परमात्मा आपणच आहां, दुसरें कोणी नाहीं. पण हें तूं कशावरून जाणलेंस ? म्हणून विचाराल तर सांगतों. आप्तवाक्यावरून मीं हें जाणलें, अशा आशयानें अर्जुन म्हणतो-]—**पुरुषं शाश्वतं-नित्यं दिव्यं-दिवि भवं आदिदेवं-सर्वदेवानां आदौ भवं देवं अजं विभुं-विभवनशीलं**—तुला पुरुष, शाश्वत म्ह० नित्य, दिव्य-परम आकाशांत असणारा, आदिदेव-सर्वदेवांच्या आरंभीं झालेला देव, अज व विभु-विविध होण्याचें ज्याचे शील आहे असा-सर्वगत [ असें तुला सर्व ऋषि वगैरे म्हणतात, असा पुढील श्लोकाशीं संबंध ] १२.

**ईदृशम्—आहुः कथयन्ति त्वामृषयो वसिष्ठादयः सर्वे देवर्षिर्नारदस्तथाऽसितो देवलोऽप्येवमेवाऽऽह व्यासश्च स्वयं चैव ब्रवीषि मे ॥ १३ ॥**

**भाष्यार्थ—ईदृशं त्वां आहुः-कथयन्ति**—तूं अशा प्रकारचा आहेस, असें सांगतात-असें कथन करितात ( कोण ? )—**सर्वे ऋषयः वसिष्ठादयः**—वसिष्ठादिक सर्व ऋषि,—**देवर्षिः नारदः**—देवर्षि नारद,—**तथा असितः देवलः अपि एवं एव आह**—त्याचप्रमाणें असित देवलहि असेंच सांगतो.—**च व्यासः**—आणि व्यासहि असेंच सांगतो.—**स्वयं च एव मे ब्रवीषि**—आणि तूं स्वतःहि स्वरूपाविषयीं मला असेंच सांगतोस. १३.

## सर्वमेतदृतं मन्ये यन्मां वदसि केशव ।
## न हि ते भगवन्व्यक्तिं विदुर्देवा न दानवाः ॥१४॥

**अन्वयार्थ—केशव,**—हे केशवा ! —**यत्**—जें—**मां**—मला—**वदसि**—तूं सांगत आहेस,—**एतत् सर्वं**—हें सर्व—**ऋतं**—खरें—**मन्ये**—मी समजतों.—**भगवन्**—हे भगवन्,—**ते व्यक्तिं**—तुझ्या निरुपाधिक स्वरूपाला—**देवाः न विदुः**—देव जाणत नाहींत व—**दानवाः न (विदुः)**—दानव जाणत नाहींत. १४.

**सर्वमिति । सर्वमेतद्यथोक्तमृषिभिस्त्वया च तदृतं सत्यमेव मन्ये यन्मां प्रति वदसि भाषसे हे केशव । न हि ते तव भगवन्व्यक्तिं प्रभवं विदुर्न देवा न दानवाः॥**

**भाष्यार्थ—'सर्व०' इति**—'सर्व०' या श्लोकाने अर्जुन त्यावरील आपला विश्वास व्यक्त करून ईश्वराचें दुर्ज्ञेयत्व व्यक्त करितो—**ऋषिभिः त्वया च-यथोक्तं सर्वं एतत् तत् ऋतं-सत्यं एव मन्ये**—ऋषींनीं व स्वतः तूं वर सांगितलेलें जे हें सर्व, तें खरेंच-अबाधित आहे, असें मी समजतों.—**हे केशव यत् मां प्रति वदसि**

-**भाषले**—हे केशवा, तूं जें मला सांगत आहेस, मला स्वरूपाचें कथन करीत आहेस तें सर्व मी खरेंच मानतों. पण—**हे भगवन्, ते-तव व्यक्ति-प्रभवं देवाः न विदुः दानवाः न (विदुः)**—हे भगवन्,तुझ्या व्यक्तीला[1]–तुझ्या प्रभवाला–निरुपाधिक स्वभावाला देव जाणत नाहींत व दानव जाणत नाहींत. [ मग मनुष्यांची काय कथा ? ] १४.

**स्वयमेवात्मनात्मानं वेत्थ त्वं पुरुषोत्तम ।**
**भूतभावन भूतेश देवदेव जगत्पते ॥१५॥**

**अन्वयार्थ—हे पुरुषोत्तम**—हे पुरुषोत्तमा,—**भूतभावन—हे** भूतांना उत्पन्न करणाऱ्या,—**भूतेश**—हे भूतांच्या नियामका,—**देवदेव**—हे देवाच्याहि देवा,—**जगत्पते**—हे जगत्पालका—**त्वं**—तूं—**स्वयं एव**—स्वतःच—**आत्मना**—ज्ञान-स्वरूपानें—**आत्मानं**—निरतिशय ज्ञानैश्वर्यसंपन्न अशा स्वतःला—**वेत्थ**—जाणतोस.

**यतस्त्वं देवादीनामादिरतः—स्वयमेवाऽऽत्मनाऽऽत्मानं वेत्थ त्वं निरतिशयज्ञानैश्वर्यबलादिशक्तिमन्तमीश्वरं पुरुषोत्तम । भूतानि भावयतीति भूतभावनो हे भूतभावन भूतेश भूतानामीशितः, हे देवदेव जगत्पते ॥ १५ ॥**

**भाष्यार्थ—यतः त्वं देवादीनां आदिः अतः**—ज्याअर्थी तूं देवादिकांचा आदि आहेस, त्याअर्थी—**पुरुषोत्तम त्वं स्वयं एव**—हे पुरुषोत्तमा, तूं स्वतःच–कोणाच्या उपदेशादिकांवांचूनच—**आत्मना आत्मानं वेत्थ**—प्रत्यक्त्वानें–अविषयत्वानें आपल्या निरुपाधिक स्वरूपाला जाणतोस. ( सोपाधिक रूपालाहि दुसरा कोणी जाणत नाहीं, असें सांगतात– )—**निरतिशय-ज्ञानैश्वर्यबलादिशक्तिमन्तं ईश्वरं**—निरतिशय ज्ञान, ऐश्वर्य, बलादिशक्ति यांनीं युक्त असलेल्या ईश्वरास तूं जाणतोस.[ आतां संबोधनांनी सर्वप्रकृतित्व,सर्वकर्तृत्व व सर्वेश्वरत्व सांगतात– )—**भूतानि भावयति इति भूतभावनः हे भूतभावन**—भूतांना उत्पन्न व्हावयास लावतो,त्यांची प्रकृति बनतो, म्हणून भूतभावन, हे भूतभावन,—**भूतेश-भूतानां ईशितः**—हे भूतेश भूतांच्या शास्त्या—**हे देवदेव जगत्पते**—देवांचा देव–सोपाधिक स्वरूप देवांनाहि आराधना करण्यास योग्य आहे, म्हणून हे देवांच्या देवा,हे जगाच्या पालका, [ ईश्वर सर्व जगाचा स्वामी व त्यामुळें पालक आहे. ] १५.

**वक्तुमर्हस्यशेषेण दिव्या ह्यात्मविभूतयः ।**
**याभिर्विभूतिभिर्लोकानिमांस्त्वं व्याप्य तिष्ठसि ॥**

---

१ रहस्यकार 'व्यक्ति म्ह० मूळ' असा अर्थ करितात. तो बरोबर नाहीं. त्याचा खरा अर्थ निरुपाधिक स्वरूप असा आहे व तुझी व्यक्ति देव, दानव वगैरे जाणत नाहींत 'तूं स्वतःच आपल्या स्वरूपाला जाणतोस' या पुढील वाक्यावरून हाच अर्थ बरोबर आहे, अशी कोणाचीहि खात्री होईल.

**अन्वयार्थ—याभिः विभूतिभिः**—ज्या विभूतींनीं—**त्वं**—तूं—**इमान् लोकान्**—या लोकांस—**व्याप्य**—व्यापून—**तिष्ठसि**—राहतोस—**ताः दिव्याः आत्मविभूतयः**—त्या आपल्या दिव्य विभूति—**अशेषेण**—संपूर्णपणें—**वक्तुं अर्हसि**—सांगण्यास तूं योग्य आहेस. १६

**वक्तुमिति । वक्तुं कथयितुमर्हस्यशेषेण दिव्या ह्यात्मविभूतय आत्मनो विभूतयो यास्ता वक्तुमर्हसि । याभिर्विभूतिभिरात्मनो माहात्म्यविस्तरैरिमाँल्लोकांस्त्वं व्याप्य तिष्ठसि ॥ १६ ॥**

**भाष्यार्थ—' वक्तुं० ' इति**—ज्याअर्थी तुझे स्वरूप आमच्या सारख्यांचा विषय होऊं शकत नाहीं, पण आम्हांला ते जाणण्याची इच्छा मात्र आहे, त्याअर्थी तूंच तें रूप मला सांग, असें अर्जुन ' वक्तुं० ' या श्लोकानें म्हणतो—**वक्तुं-कथयितुं अर्हसि**—तूच सांगण्यास-कथन करण्यास योग्य आहेस ( काय सांगण्यास ? )—**दिव्याः हि आत्मविभूतयः-आत्मनः याः विभूतयः ताः अशेषेण वक्तुं अर्हसि**—दिव्य म्ह० अप्राकृत-अलौकिक अशा आत्मविभूति-आत्म्याच्या ज्या विभूति-विस्तार त्या सर्व-कांहीं शिल्लक न ठेवतां सांगण्यास तूं योग्य आहेस.—**याभिः विभूतिभिः-आत्मनः माहात्म्यविस्तरैः त्वं इमान् लोकान् व्याप्य तिष्ठसि**—ज्या विभूतींच्या योगानें म्ह० आपल्या माहात्म्याच्या विस्तारांनीं तूं या लोकांस व्यापून -भरून राहत आहेस [ त्या विभूति अशेषतः सांगण्यास तूं योग्य आहेस, असा संबंध. ]

कथं विद्यामहं योगिंस्त्वां सदा परिचिन्तयन् ।
केषु केषु च भावेषु चिन्त्योऽसि भगवन्मया ॥१७॥
विस्तरेणात्मनो योगं विभूतिं च जनार्दन ।
भूयः कथय तृप्तिर्हि शृण्वतो नास्ति मेऽमृतं ॥१८॥

**अन्वयार्थ—योगिन्**—हे योगिन्—**त्वां**—तुझें—**सदा परिचिन्तयन् अहं**—सर्वदा चिंतन करणाऱ्या मीं—**त्वां**—तुला—**कथं**—कसें बरें—**विद्याम्**—जाणावें—**भगवन्**—हे भगवन् !—**केषु केषु च भावेषु**—कोणकोणत्या भावांमध्यें-पदार्थांमध्यें—**मया**—मजकडून—**चिन्त्यः असि**—( तूं )चिन्त्य-चिंतन करण्यास योग्य आहेस—**जनार्दन**—हे जनार्दना ! तूं—**आत्मनः**—तुझें-आत्म्याचे—**योगं**—विशेष प्रकारचे योगैश्वर्य—**च**—व—**विभूतिं**—ध्यानास योग्य असलेल्या पदार्थांचा विस्तार—**विस्तरेण**—सविस्तर—**भूयः**—पुनरपि—**कथय**—सांग—**हि**—कारण—**अमृतं शृण्वतः मे**—तुझ वाक्यामृत ऐकणाऱ्या माझी—**तृप्तिः**—तृप्ति—**नास्ति**—होत नाहीं. १७-१८.

**कथमिति । कथं विद्यां विजानीयामहं हे योगिंस्त्वां सदा परिचिन्तयन् केषु केषु च भावेषु वस्तुषु चिन्त्योऽसि ध्येयोऽसि भगवन्मया ॥ १७ ॥**

**भाष्यार्थ—' कथं० ' इति**—तूं माझ्या विभूति कशासाठीं ऐकण्याची इच्छा करतोस, असें भगवान् विचारतील तर ' मी तुझें ध्यान कसें करावें, तें कळावें म्हणून विभूति ऐकण्याची इच्छा करितों ' असें सांगण्यासाठीं अर्जुन ' कथं० ' या श्लोकानें म्हणतो **—हे योगिन् अहं त्वां सदा परिचिन्तयन् कथं विद्यां-विजानीयां** —हे योगिन्-हे ऐश्वर्यसंपन्न ईश्वरा, मी-स्थूलबुद्धि तुझें कोणत्या प्रकारानें सदा परिचिंतन-अनुसंधान करीत होत्साता शुद्धचित्त होऊन निरुपाधिक अशा तुला जाणूं शकेन ? ( दुसरा प्रश्न- )—**हे भगवन् मया केषु केषु च भावेषु-वस्तुषु ( त्वं ) चिन्त्यः असि-ध्येयः असि**—तसेंच, हे भगवन् मजकडून कोणत्या कोणत्या भावांमध्यें-पदार्थांमध्यें तूं चिन्तन केला जाण्यास योग्य आहेस ? कोणकोणत्या वस्तूंमध्यें मी तुझें ध्यान करावें ? [ चेतन व अचेतन यांच्या भेदामुळें व उपाधींच्या बहुत्वामुळें ' केषु केषु भावेषु ' असें बहुवचन योजिलें आहे. ] १७.

**विस्तरेणेति । विस्तरेणाऽऽत्मनो योगं योगैश्वर्यशक्तिविशेषं विभूतिं च विस्तरं ध्येयपदार्थानां हे जनार्दन, अर्दतेर्गतिकर्मणो रूपम् । असुराणां देवप्रतिपक्षभूतानां जनानां नरकादिगमयितृत्वाज्जनार्दनः । अभ्युदयनिःश्रेयसपुरुषार्थप्रयोजनं सर्वैर्जनैर्याच्यत इति वा । भूयः पूर्वमुक्तमपि कथय तृप्तिर्हि परितोषो यस्मान्नास्ति मे शृण्वतस्त्वन्मुखनिःसृतवाक्यामृतम् ॥ १८ ॥**

**भाष्यार्थ—' विस्तरेण० ' इति**—' विस्तरेण० ' या श्लोकानें अर्जुन प्रकृत प्रश्नाचा उपसंहार करतो.—**हे जनार्दन, विस्तरेण आत्मनः योगं-योगैश्वर्यशक्तिविशेषं विभूतिं च ध्येयपदार्थानां विस्तरं ( भूयः कथय )**—हे जनार्दना, विस्तारानें आपला योग म्ह० एक प्रकारची योगैश्वर्यशक्ति व विभूति म्हणजे

---

१. रहस्यकार म्हणतात—"विभूति व योग हे शब्द याच अध्यायाच्या ७ व्या श्लोकांत आलेले असून त्यांचाच अर्जुनानें येथें अनुवाद केला आहे. 'योग' शब्दाचा अर्थ पूर्वी गी. ७-२५ केला आहे तो पहा." पण तोच अर्थ बरोबर का नाहीं, तें आम्ही तेथेंच दाखविलें आहे, तेंहि पहा. (गी. भा. पृ. ६३८) या अध्यायाच्या सातव्या किंवा या श्लोकांत योग कशाला म्हटलें आहे, तें ठरविण्यास सातव्या अध्यायाच्या २५ व्या श्लोकांतील 'योगमायासमावृतः' या शब्दापर्यंत धाव घ्यावयास नको. कारण येथें सातव्या श्लोकांतच ' एतां विभूतिं योगं च ' असें म्हणून विभूति व योग या शब्दांचा २ ते ६ या पूर्व श्लोकांतील वर्णनाशीं संबंध असल्याचें व्यक्त केलें आहे.

रहस्यकार पुनः म्हणतात—" भगवताच्या विभूति अर्जुन विचारितो, याचें कारण निरनिराळ्या विभूतींचें देवता म्हणून ध्यान करण्याकरितां नव्हे, तर विभूतींत सर्वव्यापी परमेश्वराचीच भावना ठेवण्याकरितां होय. कारण एकच परमेश्वर सर्व ठिकाणीं आहे हें ओळखणें आणि परमेश्वराच्या निरनिराळ्या विभूति निरनिराळ्या देवता आहेत, असें मानणें यांत भक्तिमार्गदृष्ट्या महदन्तर आहे " हें जर खरें आहे, तर मागें ९ व्या अध्यायाच्या शेवटीं ' व्यक्तस्वरूपाचा दर्शक ' वगैरे जें म्हटलें आहे किंवा त्याच अध्या-

ध्येयपदार्थांचा विस्तार ( मला पुनः सांग, असा पुढें संबंध. )—**अर्दतेः गतिकर्मणः रूपं**—जनार्दन, हें गतिक्रिया हा ज्याचा अर्थ आहे अशा अर्द्-धातूचें रूप आहे.—**असुराणां-देवप्रतिपक्षभूतानां जनानां नरकादिगमयितृत्वात् जनार्दनः** —असुरांना म्ह० देवांच्या प्रतिपक्षभूत लोकांना नरकादिकांत घालवीत असल्यामुळें जनार्दन—**वा अभ्युदयनिःश्रेयसपुरुषार्थप्रयोजनं सर्वैः जनैः याच्यते इति जनार्दनः**—किंवा अभ्युदय व निःश्रेयस या दोन पुरुषार्थांसाठीं सर्वलोकांकडून याचना केला जातो म्हणून जनार्दन [ अर्द्–याचने या धातूपासून झालेलें हें रूप आहे. पण सातव्या व नवव्या अध्यायांत ईश्वराची विभूति व ऐश्वर्य यांचें वर्णन केलें आहे. पुनः आणखी तें ऐकण्याची इच्छा कां करतोस ? उत्तर-]—**भूयः पूर्वं उक्तं अपि कथय**—पुनः सांग, पूर्वीं जरी सांगितलें आहे, तरी पुनः सांग.—**हि–यस्मात् त्वन्मुख-निसृतवाक्यामृतं शृण्वतः मे तृप्तिः-परितोषः न अस्ति**—कारण तुझ्या मुखांतून निघालेलें वाक्यामृत श्रवण करण्याऱ्या माझी तृप्ति-सर्वप्रकारें संतोष होत नाहीं, [ म्हणून पुनः सांग. वाक्यामृत म्ह० अमृतासारखें वाक्य. ] १८.

**श्रीभगवान् उवाच**—श्रीकृष्ण ह्मणाले—

**हन्त ते कथयिष्यामि दिव्या ह्यात्मविभूतयः ।**
**प्राधान्यतः कुरुश्रेष्ठ नास्त्यन्तो विस्तरस्य मे ॥१९॥**

**अन्वयार्थ—हन्त**—बरें आहे, आतां मी—**ते**—तुला—**दिव्याः आत्मविभूतयः**—दिव्य आत्मविभूति—**प्राधान्यतः**—मुख्य मुख्यच—**कथयिष्यामि**—सांगेन —**हि**—कारण—**हे कुरुश्रेष्ठ**—हे कुरुकुलांतील श्रेष्ठा—**मे विस्तरस्य**—माझ्या विस्ताराचा—**अन्तः**—अन्त—**नास्ति**—नाहीं. १९

**हन्त त इति । हन्तेदानीं ते दिव्या दिवि भवा आत्मविभूतय आत्मनो मम विभूतयो यास्ताः कथयिष्यामीत्येतत्प्राधान्यतो यत्र यत्र प्रधाना या या विभूतिस्तां तां प्रधानां प्राधान्यतः कथयिष्याम्यहं कुरुश्रेष्ठ । अशेषतस्तु वर्षशतेनापि न शक्या वक्तुं यतो नास्त्यन्तो विस्तरस्य मे मम विभुतीनामित्यर्थः ॥ १९ ॥**

**भाष्यार्थ**—प्रश्न करणाऱ्या अर्जुनाला आश्वासन देण्यासाठीं श्रीभगवान्—'**हन्त ते० ' इति**—' हन्त ते०' या श्लोकानें म्हणतात—**हन्त-इदानीं ते दिव्याः-दिवि-भवाः-आत्मविभूतयः-आत्मनः मम याः विभूतयः**—बरें तर, आतां तुला

---

याच्या आरंभीं " परमेश्वराचें स्वरूप प्रेमगम्य व व्यक्त म्ह० प्रत्यक्ष कळणारें असतें आणि त्या व्यक्त स्वरूपाचेंच ९, १०, ११ व १२ या चार अध्यायांत निरूपण केलें आहे. " असें जें म्हटलें आहे त्याची वाट काय ? सर्वांमध्यें एकच परमेश्वर आहे हें ओळखणें म्ह० परमेश्वराचें स्वरूप प्रत्यक्ष कळणें कीं काय ? विभूति म्ह० परमेश्वर नव्हे, हें जर खरें तर परमेश्वर व्यक्त कसा ? सर्वच असंबद्ध !

मी दिव्य म्ह० द्युलोकांतील—अलौकिक आत्मविभूति-आत्म्याच्या माझ्या ज्या विभूति **—ताः कथयिष्यामि इति एतत्**—त्या सांगेन असा याचा भावार्थ. (त्या कशा ?)**—कुरुश्रेष्ठ-प्राधान्यतः-यत्र यत्र प्रधाना या या विभूतिः तां तां प्रधानां-प्राधान्यतः अहं कथयिष्यामि**—हे कुरुकुलश्रेष्ठा 'प्राधान्यतः' म्ह० ज्या ज्या सजातीय पदार्थसमूहांत जी जी प्रधान विभूति आहे, त्या त्या प्रधान विभूतिला-अर्थात् प्राधान्यतः मी सांगेन.**—तु अशेषतः वर्षशतेन अपि वक्तुं न शक्याः**—कारण पूर्णपणें-सर्व विभूति शंभर वर्षें सांगत राहिल्यानेंहि संपणार नाहींत. शंभर वर्षांतहि सर्व विभूति सांगतां येणें शक्य नाहीं.**—यतः मे-मम विस्तरस्य-विभूतीनां इत्यर्थः अन्तः नास्ति**—कारण माझ्या विस्ताराचा म्ह० माझ्या विभूतींचा असा भावार्थ, अन्त नाहीं. [ माझा विस्तार अनंत आहे. त्यामुळें तो पूर्णपणें सांगतां येणे शक्य नाहीं. ] १९.

## अहमात्मा गुडाकेश सर्वभूताशयस्थितः ।
## अहमादिश्च मध्यं च भूतानामन्त एव च ॥२०॥

**अन्वयार्थ—गुडाकेश**—हे अर्जुना**—अहं**—मी**—सर्वभूताशयस्थितः**—सर्व प्राण्यांच्या हृदयांत स्थित असलेला**—आत्मा**—आत्मा आहें.**—अहं**—मी—**भूतानां**—सर्व भूतांचा**—आदिः**—आदि म्ह० कारण**—च मध्यं**—व मध्य म्ह० स्थिति**—च अन्तः एव**—व अन्त म्ह० प्रलय आहें. २०

तत्र प्रथममेव तावच्छृणु—अहमात्मा प्रत्यगात्मा गुडाकेश गुडाका निद्रा तस्या ईशो गुडाकेशो जितनिद्र इत्यर्थः, घनकेश इति वा । सर्वेषां भूतानामाशयेऽन्तर्हृदि स्थितोऽहमात्मा प्रत्यगात्मा नित्यं ध्येयः । तदशक्तेन चोत्तरेषु भावेषु चिन्त्योऽहं चिन्तयितुं शक्यो यस्मादहमेवाऽऽदिर्भूतानां कारणं तथा मध्यं च स्थितिरन्तः प्रलयश्च ॥

**भाष्यार्थ—तत्र प्रथमं एव तावत् शृणु**—त्यांतील आतां अगोदर प्रथम विस्तार-माझी पहिली विभूतिच तूं ऐक**—हे गुडाकेश-गुडाका निद्रा तस्याः ईशः गुडाकेशः-जितनिद्रः इत्यर्थः**—हे गुडाकेश,-गुडाका म्ह० निद्रा तिचा ईश तो गुडाकेश, म्ह० ज्यानें निद्रेला जिंकलें आहे तो,असा याचा भावार्थ**—घनकेश इति वा**—किंवा गुडाकेश म्ह० घनकेश-हे अर्जुना**—अहं आत्मा-प्रत्यगात्मा सर्वेषां भूतानां आशये अन्तर्हृदि स्थितः (अहं आत्मा-प्रत्यगात्मा) नित्यं ध्येयः**—मी आत्मा-प्रत्यगात्मा सर्व भूतांच्या आशयांत-अन्तर्हृदयांत जेथें कर्म व ज्ञान यांचे संस्कार राहतात, त्या हृदयांत स्थित असलेला मी आत्मा-प्रत्यगात्मा आहें, असें नित्य ध्यान करावें. ( पण जो मंद किंवा मध्यम अधिकारी परमात्म्याचें आत्मत्वानें ध्यान करूं शकत नाहीं, त्याच्यासाठीं, सांगतात-)**—तदशक्तेन च उत्तरेषु भावेषु अहं चिन्त्यः-चिन्तयितुं शक्यः**—पण तसें ध्यान करण्यास जो असमर्थ असेल त्यानें पुढें सांगितलेल्या पदार्थांमध्यें माझें चिंतन करावें, त्यांतहि माझेंच चिंतन करणें

शक्य आहे.—**यस्मात् अहं एव भूतानां आदिः-कारणं तथा मध्यं च स्थितिः च अन्तः-प्रलयः**—कारण मीच आदित्यादि सर्व भूतांचें कारण, तसेंच मध्य म्ह० स्थिति व अन्त म्ह० प्रलय आहे. [ परमात्मा सर्वकारण, सर्वज्ञ, व सर्वेश्वर असल्यामुळें तोच सर्वत्र ध्यान करण्यास योग्य आहे. दुसरा कोणीहि नाहीं. ] २०.

## आदित्यानामहं विष्णुर्ज्योतिषां रविरंशुमान् ।
## मरीचिर्मरुतामस्मि नक्षत्राणामहं शशी ॥२१॥

**अन्वयार्थ—अहं**—मी—**आदित्यानां**—आदित्यांतील—**विष्णुः**—विष्णु आहें. —( **अहं** )—मी—**ज्योतिषां**—ज्योतींतील—**अंशुमान्**—किरणवान्—**रविः**—सूर्य आहें.—**मरुतां**—मरुत् या नांवाच्या देवातील मी—**मरीचिः**—मरीचि—**अस्मि**—आहें.—**अहं**—मी—**नक्षत्राणां**—नक्षत्रांतील—**शशी**—चंद्र आहे. २१

**एवं च ध्येयोऽहम्—आदित्यानां द्वादशानां विष्णुर्नामाऽऽदित्योऽहं ज्योतिषां रविः प्रकाशयितॄणामंशुमान्रश्मिमान्मरीचिर्नाम मरुतां मरुद्देवताभेदानामस्मि नक्षत्राणामहं शशी चन्द्रमाः ॥ २१ ॥**

**भाष्यार्थ—एवं च अहं ध्येयः**—वर सांगितल्याप्रमाणें ध्यान करण्यास अशक्त असलेल्या साधकांस व्यस्त विभूतियोग सांगण्याच्या उद्देशानें-आणि असे माझे ध्यान करावें, असे ' आदित्यानां० ' या श्लोकानें सांगतात—**द्वादशानां आदित्यानां विष्णुः नामा आदित्यः अहं**—बारा आदित्यांतील विष्णु या नांवाचा आदित्य मी आहें. —**ज्योतिषां-प्रकाशयितॄणां-अंशुमान् रश्मिमान् रविः**—ज्योतींतील म्ह० प्रकाशित करणारांतील रश्मिमान्-किरणवान् सूर्य मी,—**मरुतां-मरुद्देवताभेदानां मरीचिः नाम अस्मि**—मरुत्-नांवाच्या देवताभेदांतील मरीचिनामक मरुत् मी आहें.—**नक्षत्राणां अहं शशी-चंद्रमाः**—नक्षत्रांतील मी शशी म्ह० चंद्रमा आहें.

## वेदानां सामवेदोऽस्मि देवानामस्मि वासवः ।
## इन्द्रियाणां मनश्चास्मि भूतानामस्मि चेतना ॥२२॥

**अन्वयार्थ—वेदानां सामवेदः अस्मि**—वेदांतील सामवेद मी आहे—**देवानां वासवः अस्मि**—देवांतील इंद्र मी आहें—**च इंद्रियाणां अहं मनः अस्मि**—आणि इंद्रियांतील मन मी आहे.—**भूतानां चेतना अस्मि**—भूतांची चेतना मी आहें. २२

**वेदानामिति । वेदानां मध्ये सामवेदोऽस्मि, देवानां रुद्रादित्यादीनां वासव इन्द्रोऽस्मि, इन्द्रियाणामेकादशानां चक्षुरादीनां मनश्चास्मि संकल्पविकल्पात्मकं मनश्चास्मि । भूतानामस्मि चेतना कार्यकरणसंघाते नित्याभिव्यक्ता बुद्धिवृत्तिश्चेतना ॥ २२ ॥**

**भाष्यार्थ—'वेदानां०' इति—**'वेदानां०' या श्लोकानें आणखी कांहीं प्रधान विभूति सांगतात—**वेदानां मध्ये सामवेदः अस्मि**—वेदांतील मी सामवेद आहें. —**देवानां-रुद्रादित्यादीनां वासवः-इंद्रः अस्मि**—रुद्र, आदित्य इत्यादि देवांतील इंद्र मी आहें.—**चक्षुरादीनां एकादशानां इंद्रियाणां मनः च अस्मि**—चक्षुरादिक अकरा इंद्रियांतील मन मी आहे. म्ह०—**संकल्पविकल्पात्मकं मनः च अस्मि**—संकल्पविकल्पात्मक मन मी आहे.—**भूतानां चेतना अस्मि**—भूतांतील चेतना मी आहें.—**कार्यकरणसंघाते नित्याभिव्यक्ता बुद्धिवृत्तिः चेतना**—शरीर व इंद्रियें यांच्या संघातांत नित्य अभिव्यक्त होणारी जी बुद्धिवृत्ति ती चेतना होय. २२

## रुद्राणां शंकरश्चास्मि वित्तेशो यक्षरक्षसाम् ।
## वसूनां पावकश्चास्मि मेरुः शिखरिणामहम् ॥२३॥
## पुरोधसां च मुख्यं मां विद्धि पार्थ बृहस्पतिम् ।
## सेनानीनामहं स्कन्दः सरसामस्मि सागरः ॥२४॥

**अन्वयार्थ—अहं रुद्राणां शंकरः अस्मि**— मी अकरा रुद्रांतील शंकर आहे —**यक्ष-रक्षसां वित्तेशः**—यक्ष-राक्षस यांतील कुबेर मी आहे.—**वसूनां पावकः च अस्मि**—आठ वसूंतील पावक-अग्नि या नावाचा वसु मी आहे—**अहं शिखरिणां मेरुः**—मी शिखरयुक्त पर्वतांतील मेरु आहे—**पार्थ**—हे पार्था!—**मां पुरोधसां मुख्यं बृहस्पतिं विद्धि**—मी पुरोहितांतील मुख्य बृहस्पति आहे असे तूं जाण.—**अहं सेनानीनां स्कन्दः**—मी सेनापतींतील स्कंद आहे—**अहं सरसां सागरः अस्मि**—मी देवनिर्मित सरोवरांतील सागर आहें. २३-२४

**रुद्राणामिति । रुद्राणामेकादशानां शंकरश्चास्मि । वित्तेशः कुबेरो यक्षरक्षसां यक्षाणां रक्षसां च । वसूनामष्टानां पावकश्चास्म्यग्निर्मेरुः शिखरिणां शिखरवतामहम् ॥**

**भाष्यार्थ—' रुद्राणां०' इति—**' रुद्राणा०' या श्लोकाने आणखी प्रधान विभूति सांगतात—**एकादशानां रुद्राणां शंकरः च अस्मि**—अकरा रुद्रांतील शंकर मी आहें—**यक्षरक्षसां-यक्षाणां च रक्षसां वित्तेशः-कुबेरः**—यक्ष-राक्षसांतील म्ह० यक्ष व राक्षस यांतील वित्तेश म्ह० कुबेर मी आहें.—**अष्टानां वसूनां पावकः च -अग्निः अस्मि**—आठ वसूंतील पावक म्ह० अग्नि मी आहे.—**शिखरिणां-शिखरवतां मेरुः अहं**—शिखरवानांतील म्ह० शिखरानी युक्त असलेल्या पर्वतांतील मेरु मी आहे. २३.

**पुरोधसामिति । पुरोधसां राजपुरोहितानां मुख्यं प्रधानं मां विद्धि जानीहि हे पार्थ बृहस्पतिम् । स हीन्द्रस्येति मुख्यः स्यात्पुरोधाः । सेनानीनां सेनापतीनामहं**

स्कन्दो देवसेनापतिः । सरसां यानि देवखातानि सरांसि तेषां सरसां सागरोऽस्मि भवामि ॥ २४ ॥

**भाष्यार्थ—'पुरोधसां०' इति-हे पार्थ पुरोधसां-राजपुरोहितानां मुख्यं-प्रधानं मां बृहस्पतिं विद्धि-जानीहि**—'पुरोधसां०' या श्लोकाचें व्याख्यान-हे पार्था, पुरोधसांतील म्ह० राजपुरोहितांतील मुख्य-प्रधान असलेला जो बृहस्पति तो मी आहें, असें समज.—**हि सः इन्द्रस्य मुख्यः पुरोधाः स्यात्**—कारण तो इंद्राचा मुख्य पुरोहित आहे.—**सेनानीनां-सेनापतीनां अहं स्कन्दः-देवसेनापतिः**—सेनानींतील म्ह० सेनापतींतील मी स्कंद म्ह० देवांचा सेनापति आहें.—**सरसां-यानि देवखातानि सरांसि तेषां सरसां सागरः अस्मि-भवामि**—सरोवरांतील-जीं देवनिर्मित सरोवरें आहेत त्यांतील मी सागर आहें. २४

महर्षीणां भृगुरहं गिरामस्म्येकमक्षरम् ।
यज्ञानां जपयज्ञोऽस्मि स्थावराणां हिमालयः ॥२५॥

**अन्वयार्थ—अहं महर्षीणां भृगुः**—मी महर्षींतील भृगु आहे.—**अहं गिरां एकं अक्षरं अस्मि**—मी पदरूप वाणींतील ॐ हें एकाक्षर आहें—**अहं यज्ञानां जपयज्ञः अस्मि**—मी यज्ञांतील जपयज्ञ आहे.—**अहं स्थावराणां हिमालयः**—मी स्थावरांतील हिमालय आहे. २५

महर्षीणामिति । महर्षीणां भृगुरहं गिरां वाचां पदलक्षणानामेकमक्षरमोंकारोऽस्मि । यज्ञानां जपयज्ञोऽस्मि, स्थावराणां स्थितिमतां हिमालयः ॥ २५ ॥

**भाष्यार्थ—'महर्षीणां०' इति**—'महर्षीणां०' या श्लोकाचें व्याख्यान—**महर्षीणां अहं भृगुः**—महर्षींतील मी भृगु आहें.—**गिरां-वाचां-पदलक्षणानां एकं अक्षरं ओंकारः अस्मि**—वाणींतील-पदलक्षण-शब्दरूप वाणींतील एक अक्षर म्ह० ओंकार मी आहें. [ ओंकार ब्रह्माचें नांव व प्रतीक असल्यामुळें प्रधान अक्षर आहे ]—**यज्ञानां जपयज्ञः अस्मि**—यज्ञांतील जपयज्ञ मी आहें. [ जपयज्ञ हिंसादि दोषांनीं रहित असल्यामुळें इतर यज्ञांहून प्रधान आहे.]—**स्थावराणां-स्थितिमतां हिमालयः**—स्थावरांतील-स्थितिमान् पदार्थांतील हिमालय मी आहें. २५.

अश्वत्थः सर्ववृक्षाणां देवर्षीणां च नारदः ।
गन्धर्वाणां चित्ररथः सिद्धानां कपिलो मुनिः ॥२६॥

**अन्वयार्थ—सर्ववृक्षाणां अश्वत्थः**—सर्व वृक्षांतील-वनस्पतींतील मी अश्वत्थ-पिंपळ आहें—**च देवर्षीणां नारदः**—आणि देवर्षींतील मी नारद आहें.—**गंधर्वाणां चित्ररथः**—गंधर्वांतील मी चित्ररथ आहें.—**सिद्धानां कपिलः मुनिः**—सिद्धांतील कपिल मुनि मी आहें. २६

**अश्वत्थ इति । अश्वत्थः सर्ववृक्षाणां देवर्षीणां च नारदो देवा एव सन्त ऋषित्वं प्राप्ता मन्त्रदर्शित्वात्ते देवर्षयस्तेषां नारदोऽस्मि । गन्धर्वाणां चित्ररथो नाम गन्धर्वोऽस्मि । सिद्धानां जन्मनैव धर्मज्ञानवैराग्यैश्वर्यातिशयं प्राप्तानां कपिलो मुनिः ॥ २६ ॥**

**भाष्यार्थ—' अश्वत्थः०' इति**—' अश्वत्थः०' या श्लोकाचे व्याख्यान—**सर्व-वृक्षाणां अश्वत्थः**—सर्व वृक्षांतील-वनस्पतींतील अश्वत्थ,—**च देवर्षीणां नारदः**—आणि देवर्षींतील नारद मी आहें.—**देवाः एव सन्तः मन्त्रदर्शित्वात् ऋषित्वं प्राप्ताः ते देवर्षयः तेषां नारदः अस्मि**—जे देवच असून मन्त्रदर्शित्वामुळे ऋषित्वास प्राप्त होतात ते देवर्षि, अशा देवर्षींतील नारद मी आहे.—**गन्धर्वाणां चित्ररथः नाम गन्धर्वः ( अहं ) अस्मि**—गंधर्वांतील चित्ररथनांवाचा गंधर्व मी आहें.—**सिद्धानां-जन्मना एव धर्म-ज्ञान-वैराग्य-ऐश्वर्यातिशयं प्राप्तानां कपिलः मुनिः**—सिद्धांतील म्ह० जन्मतःच धर्म, ज्ञान, वैराग्य व ऐश्वर्य यांच्या आधिक्याला प्राप्त झालेल्या सिद्धांतील मी कपिल[1] मुनि आहे. २६.

## उच्चैःश्रवसमश्वानां विद्धि माममृतोद्भवम् ।
## ऐरावतं गजेन्द्राणां नराणां च नराधिपम् ॥२७॥

**अन्वयार्थ—मां**—मला—**अश्वानां**—अश्वांतील—**अमृतोद्भवं**—अमृतासाठीं केलेल्या क्षीरसागराच्या मंथनांतून उत्पन्न झालेला—**उच्चैःश्रवसं**—उच्चैःश्रवा अश्व—**विद्धि**—जाण—**गजेंद्राणां ऐरावतं**—मी गजेंद्रांतील ऐरावत आहे—**च**—व—**नराणां नराधिपं**—मनुष्यांतील राजा मी आहे. २७

**उच्चैरिति । उच्चैःश्रवसमश्वानामुच्चैःश्रवा नामाश्वस्तं मां विद्धि जानीह्यमृतोद्भवममृतनिमित्तमथनोद्भवम् । ऐरावतमिरावत्या अपत्यं गजेन्द्राणां हस्तीश्वराणां तं मां विद्धीत्यनुवर्तते । नराणां मनुष्याणां च नराधिपं राजानं मां विद्धि जानीहि ॥ २७ ॥**

**भाष्यार्थ—' उच्चैः०' इति**—' उच्चैः०' इत्यादि श्लोकाने आणखी प्रधान विभूति सांगतात—**' उच्चैःश्रवसं अश्वानां' उच्चैःश्रवा नाम अश्वः तं मां विद्धि-जानीहि**—अश्वांतील 'उच्चैःश्रवा' नांवाचा जो अश्व आहे तो मी आहे, असे समज-असें तूं जाण.—**अमृतोद्भवं-अमृतनिमित्तमथनोद्भवं**—अमृतोद्भव म्ह० अमृतासाठीं

---

१ रहस्यकार या कपिलांनाच सांख्यशास्त्रकार समजतात. ( गी. र. पृ. १५२ ) पण तें बरोबर नाहीं. पुराणे व महाभारतादि ग्रंथ यांत सनकादिकाबरोबर ज्याना ब्रह्मदेवाचे मानसपुत्र म्हणून म्हटलें आहे.ते कपिल ईश्वरवादी आहेत व तेच हे सिद्ध होत.सांख्यदर्शनकार कपिल निरीश्वरवादी होते. आचार्यांनी हा भेद ब्रह्मसूत्रशारीरभाष्यांत स्पष्ट दाखविला आहे.पुराणांदिकांत नामसादृश्यामुळे हा भेद स्पष्टपणे दाखविलेला नाहीं.तथापि भागवतांतील विष्णवंशभूत कपिलांनी आपल्या आईला-देवहूतीला जो वैदिक सांख्ययोग सांगितला आहे, तो सांख्यदर्शनाहून निराळ्या प्रकारचा आहे, हें बहुश्रुतांना अवगत आहेच.

केलेलें जें समुद्रमंथन त्यांतून उत्पन्न झालेला उच्चैःश्रवा मी आहें असें समज.—**ऐरावतं-इरावत्याः अपत्यं**—ऐरावत म्ह० इरावतीचें अपत्य—**गजेन्द्राणां-हस्तीश्वराणां तं मां विद्धि इति अनुवर्तते**—गजेंद्रांतील म्ह० श्रेष्ठ हत्तींतील ऐरावत हत्ती मी आहें, असें जाण, अशी 'विद्धि-जाण' या क्रियापदाची अनुवृत्ति होते.—**नराणां-मनुष्याणां च नराधिपं-राजानं मां विद्धि-जानीहि**—आणि नरांतील म्ह० मनुष्यांतील नराधिप-राजा मी आहें, असें तूं जाण. २७.

आयुधानामहं वज्रं धेनुनामस्मि कामधुक् ।
प्रजनश्चास्मि कंदर्पः सर्पाणामस्मि वासुकिः ॥ २८ ॥

**अन्वयार्थ—अहं आयुधानां वज्रं**—मी आयुधांतील वज्र आहें.—**अहं धेनूनां कामधुक् अस्मि**—मी धेनूंतील कामधेनु आहे,—**प्रजनः कंदर्पः अस्मि**—मी प्रजोत्पादनाचें कारण कंदर्प-काम-आहें.—**अहं सर्पाणां वासुकिः अस्मि**—मी सर्पातील वासुकि आहे. २८.

आयुधानामिति । आयुधानामहं वज्रं दधीच्यस्थिसंभवं धेनूनां दोग्ध्रीणामस्मि कामधुक्, वसिष्ठस्य सर्वकामानां दोग्ध्री सामान्या वा कामधुक् । प्रजनः प्रजनयिताऽस्मि कंदर्पः कामः सर्पाणां सर्पभेदानामस्मि वासुकिः सर्पराजः ॥ २८ ॥

**भाष्यार्थ—'आयुधानां०' इति**—'आयुधानां०' याचे व्याख्यान—**आयुधानां अहं दधीचि-अस्थिसंभवं वज्रं**—आयुधांतील मी दधीचि-मुनींच्या अस्थीपासून झालेलें वज्र आहें.—**धेनूनां-दोग्ध्रीणां कामधुक् अस्मि**—धेनूंतील म्ह० दुभत्या गायींतील कामधेनु मी आहें.—**वसिष्ठस्य सर्वकामानां दोग्ध्री वा सामान्या कामधुक्**—वसिष्ठाची सर्व काम पूर्ण करणारी किंवा दुसरी एखादी सामान्य कामधेनु —**प्रजनः-प्रजनयिता कंदर्पः कामः अस्मि**—प्रजन-प्रजोत्पादन करणारा कंदर्प-काम मी आहे.—**सर्पाणां-सर्पभेदानां ( अहं ) वासुकिः -सर्पराजः अस्मि**—सर्पातील म्ह० सर्पाच्या एक प्रकारांतील मी वासुकि-सर्पराज आहें. २८.

अनन्तश्चास्मि नागानां वरुणो यादसामहम् ।
पितॄणामर्यमा चास्मि यमः संयमतामहम् ॥ २९ ॥

**अन्वयार्थ—अहं नागानां अनन्तः अस्मि**—मी नागांतील अनन्त आहें —**(अहं) यादसां वरुणः**—मी जलदेवतांतील वरुण आहें—**च पितॄणां अर्यमा अस्मि**—आणि पितरांतील मी अर्यमा नांवाचा पितृराज आहें.—**अहं संयमतां यमः**—मी संयमन करणारांतील यम आहें. २९.

**अनन्त इति । अनन्तश्चास्मि नागानां नागविशेषाणां नागराजश्चास्मि । वरुणो यादसामहमब्देवतानां राजाऽहम् । पितॄणामर्यमा नाम पितृराजश्चास्मि, यमः संयमतां संयमनं कुर्वतामहम् ॥ २९ ॥**

**भाष्यार्थ—'अनन्तः०' इति—**'अनन्तः०' या श्लोकाचें व्याख्यान—**'अनन्तः च अस्मि नागानां'-नागविशेषाणां-नागराजः च अस्मि**—नागांतील म्ह० नागांच्या जातींतील नागराज-अनन्त मी आहें.—**यादसां अहं वरुणः-अब्देवतानां राजा अहं**—यादसांतील म्ह० जलदेवतांतील मी वरुण राजा आहें.—**पितॄणां अर्यमा नाम पितृराजः च ( अहं ) अस्मि**—पितरांतील अर्यमानांवाचा पितृराज मी आहें.—**संयमतां-संयमनं कुर्वतां यमः अहं**—संयमन करणारांतील यम मी आहे. २९

**प्रह्लादश्चास्मि दैत्यानां कालः कलयतामहम् ।**
**मृगाणां च मृगेन्द्रोऽहं वैनतेयश्च पक्षिणाम् ॥३०॥**

**अन्वयार्थ—च अहं दैत्यानां प्रह्लादः अस्मि**—व मी दैत्यांतील प्रह्लाद आहे,—**अहं कलयतां कालः**—मी गणना करणारांतील काल आहें.—**च अहं मृगाणां मृगेंद्रः**—आणि मी मृगांतील-पशूंतील सिंह किंवा वाघ आहें.—**च पक्षिणां वैनतेयः**—व पक्ष्यांतील गरुड आहे. ३०.

**प्रह्लाद इति । प्रह्लादो नाम चास्मि दैत्यानां दितिवंश्यानां,कालः कलयतां कलनं गणनं कुर्वतामहं, मृगाणां च मृगेन्द्रः सिंहो व्याघ्रो वाऽहं, वैनतेयश्च गरुत्मान्विनतासुतः पक्षिणां पतत्रिणाम् ॥ ३० ॥**

**भाष्यार्थ—'प्रह्लादः०' इति—**'प्रह्लादः०' याचें व्याख्यान—**दैत्यानां-दितिवंश्यानां प्रह्लादः नाम च अस्मि**—दैत्यांतील म्ह० दितीच्या वंशांत झालेल्यांतील 'प्रह्लाद' नांवाचा दैत्य मी आहे.—**कलयतां-कलनं-गणनं कुर्वतां अहं कालः**—कलन म्ह० गणना करणाऱ्यांतील काल मी आहे.—**मृगाणां च मृगेन्द्रः सिंहः व्याघ्रः वा अहं**—पशूंतील मृगेंद्र-सिंह किंवा वाघ मी आहें.—**पक्षिणां-पतत्रिणां च वैनतेयः गरुत्मान्-विनतासुतः ( अहं )**—आणि पक्ष्यांतील वैनतेय-गरुड-विनतेचा पुत्र मी आहें. ३०.

**पवनः पवतामस्मि रामः शस्त्रभृतामहम् ।**
**झषाणां मकरश्चास्मि स्रोतसामस्मि जाह्नवी ॥ ३१ ॥**

**अन्वयार्थ—पवतां पवनः अस्मि**—पावन करणारांतील मी वायु आहें.—**अहं शस्त्रभृतां रामः**—मी शस्त्र धारण करणारांतील दाशरथि राम आहें—**अहं**

**झषाणां मकरः अस्मि**—मी मासे, कांसव इत्यादि जलचर प्राण्यांतील सुसर-मगर आहें. **–अहं स्रोतसां जाह्नवी अस्मि**—मी प्रवाहांतील गंगा आहें. ३१.

**पवन इति । पवनो वायुः पवतां पावयितॄणामस्मि, रामः शस्त्रभृतामहं शस्त्राणां धारयितॄणां दाशरथी रामोऽहं, झषाणां मत्स्यादीनां मकरो नाम जातिविशेषोऽहं स्रोतसां स्रवन्तीनामस्मि जाह्नवी गङ्गा ॥ ३१ ॥**

**भाष्यार्थ—' पवनः०' इति**—' पवन०:' या श्लोकाचें व्याख्यान—**पवतां-पावयितॄणां पवनः-वायुः अस्मि**—पावन करणारांतील पवन म्ह० वायु मी आहें. **—शस्त्रभृतां-शस्त्राणां धारयितॄणां रामः अहं-दाशरथिः रामः अहं**— शस्त्रभृतांतील म्ह० शस्त्रांचें धारण करणारांतील राम मी आहें–दाशरथि राम मी आहें. **—झषाणां-मत्स्यादीनां मकरः नाम जातिविशेषः अहं**—झष म्ह० मत्स्यादि जलचर प्राणी, त्यांतील मकर या नांवाचा जो एका जातीचा प्राणी आहे तो मी आहें, **—स्रोतसां-स्रवन्तीनां जाह्नवी गंगा**—प्रवाहांतील–प्रवाहानें वाहणाऱ्या ज्या नद्या आहेत त्यांतील जाह्नवी–गंगा मी आहें. ३१.

**सर्गाणामादिरन्तश्च मध्यं चैवाहमर्जुन ।**
**अध्यात्मविद्या विद्यानां वादः प्रवदतामहम् ॥ ३२ ॥**

**अन्वयार्थ—पार्थ**—हे अर्जुन—**अहं**—मी—**सर्गाणां**—सृष्टीचा—**आदिः च अन्तः च मध्यं एव**—उत्पत्ति, स्थिति व लय आहे.—**विद्यानां**—विद्यांतील— **अहं**—मी—**अध्यात्मविद्या**—आत्मविद्या आहें.—**अहं प्रवदतां वादः**—मी वाद–जल्प–वितंडा यांतील वाद आहे. कारण वाद अर्थाच्या निर्णयाला कारण होतो. ३२

**सर्गाणामिति । सृष्टीनामादिरन्तश्च मध्यं चैवाहमुत्पत्तिस्थितिलया अहमर्जुन । भूतानां जीवाधिष्ठितानामेवाऽऽदिरन्तश्चेत्याद्युक्तमुपक्रम इह तु सर्वस्यैव सर्गमात्रस्येति विशेषः । अध्यात्मविद्या विद्यानां मोक्षार्थत्वात्प्रधानमास्मि । वादोऽर्थनिर्णयहेतुत्वात्प्रवदतां प्रधानमतः सोऽहमस्मि । प्रवक्तृद्वारेण वदनभेदानामेव वादजल्पवितण्डानामिह ग्रहणं प्रवदतामिति ॥ ३२ ॥**

**भाष्यार्थ—' सर्गाणां०' इति**—' सर्गाणां०' या श्लोकाचे व्याख्यान—**अर्जुन सृष्टीनां आदिः अन्तः च मध्यं च अहं एव उत्पत्ति-स्थिति-लयाः अहं**— हे अर्जुना, सृष्टींचा आदि, अन्त व मध्य मीच आहें. सृष्टींचे उत्पत्ति-स्थिति-लय मी आहें. ( अहोपण, हें एकदा वर श्लो. २० यांत सांगितलें आहे, मग पुनः येथें सांगण्याचें कारण काय ? उत्तर–)—**जीवाधिष्ठितानां भूतानां एव आदिः च अन्तः इत्यादि उपक्रमे उक्तं**—जीवांकडून अधिष्ठित झालेल्या भूतांचाच ' आदि व अन्त इत्यादि मी आहे ' असें आरंभीं सांगितलें—**तु इह सर्वस्य एव सर्गमात्रस्य इति विशेषः**—पण येथें सर्वच सर्गाचे म्ह० सर्व कार्यांचे आदि-अन्त-मध्य मी आहें,

असें सांगतात; हा त्यांत विशेष आहे.—**विद्यानां-अध्यात्मविद्या मोक्षार्थत्वात् प्रधानं अस्मि**—विद्यांतील अध्यात्मविद्या मी, ती मोक्षासाठी असल्यामुळें प्रधान आहे व ती मी आहें;—**वादः अर्थनिर्णयहेतुत्वात् प्रवदतां प्रधानं अतः सः अहं अस्मि**—वाद-वीतरागांची कथा अर्थाचा निर्णय करण्यास कारण होत असल्यामुळें-तत्त्व निर्णयामध्ये तिचें पर्यवसान होत असल्यामुळें वाद, जल्प, वितंडा, यांतील वाद मुख्य आहे, ह्मणून तो मी आहें—**इह प्रवदतां इति प्रवक्तृद्वारेण वदनभेदानां एव वाद-जल्प-वितंडानां ग्रहणं**—येथे 'प्रवदतां' शब्दानें प्रवक्त्याच्या द्वारा बोलण्याचे-भाषणाचे जे वाद, जल्प व वितंडा असे भेद-प्रकार, त्यांचें ग्रहण करावें. ३२

**अक्षराणामकारोऽस्मि द्वंद्वः सामासिकस्य च ।**
**अहमेवाक्षयः कालो धाताऽहं विश्वतोमुखः ॥ ३३ ॥**

**अन्वयार्थ—(अहं) अक्षराणां अकारः अस्मि**—मी अक्षरांतील अकार हें अक्षर आहे.—**च सामासिकस्य द्वंद्वः**—व समासांच्या समूहांतील द्वंद्वसमास मी आहें. (कारण त्यांतील सर्व पदें अर्थामध्यें येतात).—**अक्षयः कालः अहं एव**—अक्षय काल मीच आहें.—**अहं विश्वतोमुखः धाता अस्मि**—मी सर्व जगाच्या कर्माचें फल देणारा सर्वतोमुख धाता आहे. ३३

अक्षराणामिति । अक्षराणां वर्णानामकारो वर्णोऽस्मि द्वंद्वः समासोऽस्मि सामासिकस्य समाससमूहस्य । किं चाहमेवाक्षयोऽक्षीणः कालः प्रसिद्धः क्षणाद्याख्यः, अथवा परमेश्वरः कालस्यापि कालोऽस्मि, धाताऽहं कर्मफलस्य विधाता सर्वजगतो विश्वतोमुखः सर्वतोमुखः ॥ ३३ ॥

**भाष्यार्थ—'अक्षराणां०' इति**—'अक्षराणां॰' याचे व्याख्यान—**अक्षराणां-वर्णानां अकारः वर्णः (अहं) अस्मि**—अक्षरांतील म्ह० अ, इ, उ, क, च, ट, त, प, इत्यादि वर्णांतील अकार हा वर्ण मी आहें.—**सामासिकस्य-समाससमूहस्य द्वंद्वः समासः अस्मि**—सामासिकांतील म्ह० समासांच्या समूहांतील द्वंद्व समास मी आहें—**किंच अहं एव अक्षयः-अक्षीणः प्रसिद्धः कालः -क्षणाद्याख्यः**—तसेच, मीच अक्षय म्ह० क्षीण न होणारा प्रसिद्ध क्षणादिसंज्ञक काल आहें.—**अथवा परमेश्वरः-कालस्य अपि कालः अस्मि**—किंवा परमेश्वर-कालाचाहि

१ रहस्यकार 'वादः प्रवदता अह' याचा अर्थ-'वादकरणारांचा वाद मी आहे' असा करितात. पण तो बरोबर नाहीं. कारण येथील वर्णनाचा जो ओघ आहे, तो त्या त्या जातीच्या पदार्थांतील जो एक श्रेष्ठ पदार्थ असेल, तो मी असे सांगण्याचा आहे. 'अनेक विद्यांतील अध्यात्मविद्या मी' असें पूर्वी व 'अक्षरांतील अकार मी' असें पुढें ह्मटलें आहे. त्यांच्या मागें व पुढेंहि प्रायः असें निर्धारणच आहे. यास्तव संवादाचे जे वाद, जल्प व वितंडा असे तीन प्रकार आहेत, त्यांतील वाद तत्त्वनिर्णयाला कारण होणारा असल्यामुळें तोच मी असा अर्थ करणेंच सयुक्तिक होय.

काल मी आहें.—**अहं धाता-सर्वजगतः कर्मफलस्य विधाता**—मी धाता म्ह० सर्व जगाला कर्मांचें फल देणारा आहें व—**विश्वतोमुखः-सर्वतोमुखः**—मी विश्वतोमुख म्ह० सर्वतोमुख आहे. ३३.

**मृत्युः सर्वहरश्चाहमुद्भवश्च भविष्यताम् ।**
**कीर्तिः श्रीर्वाक्च नारीणां स्मृतिर्मेधा धृतिः क्षमा ॥३४॥**

**अन्वयार्थ—अहं सर्वहरः मृत्युः अस्मि**—मी सर्वांच्या धनादिकांचें व प्राणांचें हरण करणारा मृत्यु आहे.—**च भविष्यतां उद्भवः**—व पुढें होणाऱ्या उत्कर्षांचा उत्कर्ष-पुढील अभ्युदयाचा हेतु मी आहें.—**च नारीणां**—आणि स्त्रियांतील उत्तम स्त्रिया अशा—**कीर्तिः श्रीः वाक् स्मृतिः मेधा धृतिः क्षमा**—कीर्ति, श्री, वाक्, स्मृति, मेधा-धारणाशक्ति धृति व क्षमा या देवता मी आहे.३४

**मृत्युर्द्विविधो धनादिहरः प्राणहरश्च सर्वहर उच्यते सोऽहमित्यर्थः । अथवा पर ईश्वरः प्रलये सर्वहरणात्सर्वहरः सोऽहम् । उद्भव उत्कर्षोऽभ्युदयस्तत्प्राप्तिहेतुश्चाहं, केषां भविष्यतां भाविकल्याणानामुत्कर्षप्राप्तियोग्यानामित्यर्थः । कीर्तिः श्रीर्वाक्च नारीणां स्मृतिर्मेधा धृतिः क्षमेत्येता उत्तमाः स्त्रीणामहमस्मि यासामाभासमात्रसंबन्धेनापि लोकः कृतार्थमात्मानं मन्यते ॥ ३४ ॥**

**भाष्यार्थ—मृत्युः द्विविधः धनादिहरः च प्राणहरः सर्वहरः उच्यते सः अहं इत्यर्थः**—मृत्यु दोन प्रकारचा म्ह० धनादिकांचे हरण करणारा व प्राणाचें हरण करणारा आहे, म्हणून त्याला सर्वहर म्हणतात. सर्वहर मृत्यु मी आहे, असा भावार्थ.—**अथवा परः ईश्वरः प्रलये सर्वहरणात् सर्वहरः सः अहं**—किंवा परमेश्वर प्रलयसमयीं सर्वांचें हरण करीत असल्यामुळें सर्वहर आहे. तोच मी. ( हा 'सर्वहर'-शब्दाचा मुख्य अर्थ आहे, )—**उद्भवः-उत्कर्षः-अभ्युदयः तत्प्राप्तिहेतुः च अहं**—उद्भव म्ह० उत्कर्ष-अभ्युदय व त्याच्या प्राप्तीचा हेतु मी आहे.—**केषां**—पण उत्कर्ष कोणाचा ?—**भविष्यतां-भाविकल्याणानां-उत्कर्षप्राप्तियोग्यानां इत्यर्थः**—ज्यांचें कल्याण पुढे व्हावयाचें आहे त्यांचा उद्भव मी आहें. म्ह० जे उत्कर्षाच्या प्राप्तीला योग्य आहेत, त्यांचा उद्भव असा याचा भावार्थ—**कीर्तिः श्रीः वाक् च नारीणां स्मृतिः मेधा धृतिः क्षमा इति एताः स्त्रीणां उत्तमाः अहं अस्मि**—कीर्ति-धार्मिकतेविषयींची ख्याति, श्री-लक्ष्मी-कांति-शोभा, वाक्-वाणी-सर्वप्रकाशन करणारी, स्मृति-फार वेळा पूर्वी अनुभविलेल्या गोष्टीची स्मरणशक्ति, मेधा-ग्रंथ धारणशक्ति, धृति-धैर्य,क्षमा-मान व अपमान या दोन्ही वेळीं मन निर्विकार ठेवणे, स्त्रियांतील या उत्तम स्त्रिया मी आहें—**यासां आभासमात्रसंबन्धेन अपि लोकः आत्मानं कृतार्थं मन्यते**—ज्यांच्या आभासमात्र संबंधानेंहि लोक आपल्याला कृतार्थ समजतात त्या कीर्त्यादिक मी आहें. ३४

**बृहत्साम तथा साम्नां गायत्री छन्दसामहम् ।**
**मासानां मार्गशीर्षोऽहमृतूनां कुसुमाकरः ॥ ३५ ॥**

**अन्वयार्थ—तथा साम्नां बृहत्साम (अहं अस्मि)**—त्याचप्रमाणें सामांतील बृहत्साम या नांवाचें साम मी आहें.—**अहं छन्दसां गायत्री**—मी छंदांतील गायत्री-छंद आहें.—**अहं मासानां मार्गशीर्षः**—मी चैत्रादि बारा महिन्यांतील मार्गशीर्ष मास आहें व—**ऋतूनां कुसुमाकरः**—वसंतादि ऋतूंतील मी वसंत आहें. ३५

**बृहत्सामेति । बृहत्साम तथा साम्नां प्रधानमस्मि । गायत्री छन्दसामहं गायत्र्यादि छन्दोविशिष्टानामृचां गायत्र्यृगहमित्यर्थः । मासानां मार्गशीर्षोऽहमृतूनां कुसुमाकरो वसन्तः ॥ ३५ ॥**

**भाष्यार्थ—'बृहत्साम०' इति**—वेदांतील सामवेद मी आहें, हे सांगितलें. आता 'बृहत्साम०' यानें त्यांतील अवान्तर विशेष सांगतात—**तथा साम्नां प्रधानं बृहत्साम अस्मि**—त्याचप्रमाणें सामांतील प्रधान असलेले बृहत्साम मी आहें. —**छन्दसां गायत्री अहं-गायत्र्यादिछन्दोविशिष्टानां ऋचां गायत्री ऋक् अहं इत्यर्थः**—छन्दांतील गायत्री मी आहे. गायत्री, उष्णिक, अनुष्टुप्, त्रिष्टुभ् इत्यादि छन्दांनी युक्त असलेल्या ऋचांतील गायत्री ऋक् मी आहे, असा याचा भावार्थ. ( कारण गायत्री द्विजांच्या दुसऱ्या जन्माची जननी आहे. )—**मासानां मार्गशीर्षः अहं**—मासांतील मार्गशीर्ष मास मी आहे. ( कारण तो महिना परिपक्क धान्यानें युक्त असतो. )—**ऋतूंना कुसुमाकरः वसन्तः**—ऋतूंतील वसंत ऋतु मी आहे. ( कारण तो ऋतु फार रमणीय असतो. ) ३५.

**द्यूतं छलयतामस्मि तेजस्तेजस्विनामहम् ।**
**जयोऽस्मि व्यवसायोऽस्मि सत्त्वं सत्त्ववतामहम् ॥ ३६**

**अन्वयार्थ—अहं छलयतां द्यूतं अस्मि**—मी फसविणाऱ्या वस्तूंतील द्यूत आहे. **(अहं) तेजस्विनां तेजः**—मी तेजस्वी लोकांतील तेज आहे—**अहं जयः (अस्मि)**—मी विजयीजनांचा जय आहें.—**व्यवसायः अस्मि**—व्यवसायी जनांचा मी व्यवसाय आहें.—**सत्त्ववतां सत्त्वं अहं (अस्मि)**—सात्त्विक लोकांचें सत्त्व मी आहें. ३६.

**द्यूतमिति । द्यूतमक्षदेवनादिलक्षणं छलयतां छलस्य कर्तॄणामस्मि, तेजस्तेजस्विनामहं, जयोऽस्मि जेतॄणां, व्यवसायोऽस्मि व्यवसायिनां, सत्त्वं सत्त्ववतां सात्त्विकानामहम् ॥ ३६ ॥**

**भाष्यार्थ—'द्यूतं०' इति**—'द्यूतं०' याचें व्याख्यान—**छलयतां-छलस्य कर्तॄणां अक्षदेवनादिलक्षणं द्यूतं ( अहं ) अस्मि**—छल करणाऱ्या-कपट करणाऱ्या पदार्थांतील फाशांनीं खेळणें वगैरे स्वरूपाचें द्यूत मी आहें. [ तें सर्वस्व घालवि-

ण्यास कारण होतें. निराळ्याच मिषानें दुसऱ्याच्या इष्टाचा घात करणें व आपलें इष्ट साधणें, हा छल होय. तो करणारामध्यें द्यूत श्रेष्ठ आहे, हें प्रसिद्ध आहे. निदान अर्जुनाला तरी त्याचा चांगलाच अनुभव आलेला आहे. ]—**तेजस्विनां तेजः अहं**—तेजस्वी लोकांतील तेज–आज्ञा पाळली जाणे मी आहें.—**जेतॄणां जयः अस्मि**—विजयी लोकांचा जय–उत्कर्ष मी आहें.—**व्यवसायिनां व्यवसायः ( अहं )अस्मि**—व्यवसायि लोकांचा व्यवसाय–फलाला कारण होणारा उद्यम मी आहें.—**सत्त्ववतां-सात्त्विकानां सत्त्वं अहं**—सत्त्ववानांचें म्ह० सात्त्विकांचें सत्त्व म्ह० धर्म, ज्ञान-वैराग्य इत्यादि सत्त्वकार्य मी आहें. ३६.

**वृष्णीनां वासुदेवोऽस्मि पाण्डवानां धनंजयः ।**
**मुनीनामप्यहं व्यासः कवीनामुशना कविः ॥ ३७ ॥**

**अन्वयार्थ**—**अहं वृष्णीनां वासुदेवः अस्मि**—मी वृष्णींच्या मध्यें वासुदेव आहें.—**पांडवानां धनंजयः**—पांडवांमध्ये धनंजय आहे.—**अहं मुनीनां अपि व्यासः**—मुनींमध्येंहि मी व्यास आहे.—**कवीनां उशना कविः (अस्मि)**—सर्वज्ञ विद्वानांतील शुक्राचार्य या नांवाचा कवि–सर्वज्ञ मी आहे. ३७.

वृष्णीनामिति । वृष्णीनां वासुदेवोऽस्म्ययमेवाहं त्वत्सखा, पाण्डवानां धनंजयस्त्वमेव, मुनीनां मननशीलानां सर्वपदार्थज्ञानिनामप्यहं व्यासः, कवीनां क्रान्तदर्शिनामुशना कविरस्मि ॥ ३७ ॥

**भाष्यार्थ**—'**वृष्णीनां०' इति**—'वृष्णीनां०' या श्लोकाचे व्याख्यान—**वृष्णीनां वासुदेवः अयं एव अहं त्वत्सखा अस्मि**—वृष्णिकुलोत्पन्न यादवांतील वासुदेव हाच मी तुझा सखा आहे.—**पांडवानां धनंजयः–त्वं एव**—पांडवांतील धनंजय म्ह० तूंच मी आहें.—**मुनीनां-मननशीलानां सर्वपदार्थज्ञानिनां अपि अहं व्यासः**—मुनींतील म्ह० मननशील, सर्व पदार्थांचे ज्ञानी असे जे मुनि त्यांतीलहि मी व्यास आहें.—**कवीनां-क्रान्तदर्शिनां उशना कविः अस्मि**—कवि म्ह० सर्वज्ञ लोकांतील उशना कवि म्ह० सर्व जाणणारा शुक्र मी आहें. ३७

**दण्डो दमयतामस्मि नीतिरस्मि जिगीषताम् ।**
**मौनं चैवास्मि गुह्यानां ज्ञानं ज्ञानवतामहम् ॥ ३८ ॥**

**अन्वयार्थ**—**(अहं) दमयतां दण्डः अस्मि**—मी दमन करणारांतील दंड आहें.—**जिगीषतां नीतिः अस्मि**—जयाची इच्छा० करणारांमध्यें मी नीति आहें.—**गुह्यानां च एव मौनं अस्मि**—आणि गुह्यांतील मौन मी आहें.—**ज्ञानवतां ज्ञानं अहं (अस्मि)**—ज्ञानवानांतील ज्ञान मी आहें. ३८.

**दण्ड इति ।** दण्डो दमयतां दमयितृणामस्म्यदान्तानां दमकारणं, नीतिरस्मि जिगीषतां जेतुमिच्छतां, मौनं चैवास्मि गुह्यानां गोप्यानां, ज्ञानं ज्ञानवतामहम् ॥ ३८ ॥

**भाष्यार्थ**—'**दण्डः०' इति**—'दण्डः०' या श्लोकाचें व्याख्यान—**दमयतां-दमयितॄणां दण्डः अदान्तानां दमकारणं अस्मि**—दमन करणारांचा दंड म्ह० अदान्तांच्या-अनम्रांच्या-उन्मार्गगामींच्या दमनाचें-निग्रहाचें कारण-उद्धटांना नम्र करण्याचें साधन-दंड मी आहें.—**जिगीषतां-जेतुं इच्छतां नीतिः अस्मि**—जिंकण्याची इच्छा करणारांतील नीति म्ह० जयाचा उपाय जो धर्म त्याला प्रकाशित करणारा न्याय मी आहें.—**गुह्यानां-गोप्यानां मौनं च एव अस्मि**—गुह्य म्ह० गोप्य, गुप्त ठेवण्यास योग्य अशा गुह्यांतील मौन-वाणीचा निरोध किंवा उत्तम चतुर्थाश्रमप्रवृत्ति मी आहें.—**ज्ञानवतां ज्ञानं अहं**—ज्ञानी लोकांचें ज्ञान म्ह० श्रवणादिकांच्या द्वारा परिपक्व झालेल्या चित्तसमाधीपासून उद्भवलेलें सम्यग्ज्ञान मी आहे. ३८.

**यच्चापि सर्वभूतानां बीजं तदहमर्जुन ।**
**न तदस्ति विना यत्स्यान्मया भूतं चराचरम् ॥ ३९ ॥**

**अन्वयार्थ**—**अर्जुन**—हे अर्जुना !—**अपि च**—या शिवाय—**यत् सर्वभूतानां बीजं**—जे सर्व भूतांचें बीज—**तत्**—तें—**अहं (अस्मि)**—मी आहें.—**यत् चराचरं भूतं**—जे चर किंवा स्थिर भूत-प्राणी—**मया विना स्यात्**—माझ्यावांचून असेल—**तत्**—तें—**न अस्ति**— नाहींच. ३९.

**यच्चापीति ।** यच्चापि सर्वभूतानां बीजं प्ररोहकारणं तदहमर्जुन, प्रकरणोपसंहारार्थं विभूतिसंक्षेपमाह न तदस्ति भूतं चराचरं चरमचरं वा मया विना यत्स्याद्भवेन्मयाऽपकृष्टं परित्यक्तं निरात्मकं शून्यं हि तत्स्यादतो मदात्मकं सर्वमित्यर्थः ॥ ३९ ॥

**भाष्यार्थ**—'**यच्चापि०' इति**—'यच्चापि०' याचें व्याख्यान—**अर्जुन च यत् अपि सर्वभूतानां बीजं-प्ररोहकारणं तत् अहं**—हे अर्जुन, आणि जे सर्व भूतांचें बीज-उत्पत्तिकारण ते मी आहें. [ सर्व जाड्यसमूहांत प्रतिबिंबित झालेलें चैतन्य हेंच बीज होय. ]—**प्रकरणोपसंहारार्थं विभूतिसंक्षेपं आह**—प्रकरणाचा उपसंहार करण्यासाठीं विभूतीचा संक्षेप सांगतात—**तत् भूतं चराचरं-चरं अचरं वा न अस्ति**—तें भूत-चराचर म्ह० चर किंवा अचर विद्यमान नाहीं, ( तें कोणतें ? तर ) **यत् मया विना स्यात्-भवेत्**—कीं जें भूत मजवांचून असेल, ( कोणतेंहि स्थावर किंवा जंगम भूत मजवांचून नाहीं, )—**मया अपकृष्टं-परित्यक्तं तत् निरात्मकं शून्यं हि स्यात्**—माझ्याकडून अपकृष्ट झालेलें-मीं सोडलेलें भूत स्वरूपरहित-शून्यच होईल. कारण तें आत्मरहितच होणार हें उघड आहे.—**अतः मदात्मकं सर्वं इत्यर्थः**—सच्चिदानन्दस्वरूप अशा माझ्यामुळेंच सर्व चराचराची सिद्धि होत असल्याकारणानें सर्व मद्रूप आहे, असा भावार्थ. ३९.

नान्तोऽस्ति मम दिव्यानां विभूतीनां परंतप ।
एष तूद्देशतः प्रोक्तो विभूतेर्विस्तरो मया ॥ ४० ॥

**अन्वयार्थ—परंतप**—अर्जुना!—**मम**—माझ्या—**दिव्यानां विभूतीनां**—दिव्य-अलौकिक विभूतींचा-विस्तारांचा—**अन्तः**—अन्त-सीमा—**न अस्ति**—नाहीं.—**तु**—परंतु—**एषः**—हा—**विभूतेः विस्तरः**—विभूतीचा विस्तार—**मया**—मीं—**उद्देशतः**—संक्षेपानें-थोडासा—**प्रोक्तः**—सांगितला आहे. ४०

**नान्तोऽस्तीति । नान्तोऽस्ति मम दिव्यानां विभूतीनां विस्तराणां परंतप । न हीश्वरस्य सर्वात्मनो दिव्यानां विभूतीनामियत्ता शक्या वक्तुं ज्ञातुं वा केनचित् । एष तूद्देशत एकदेशेन प्रोक्तो विभूतेर्विस्तरो मया ॥ ४० ॥**

**भाष्यार्थ—' नान्तोऽस्ति० ' इति**—' नान्तोऽस्ति० ' या श्लोकाने विभूतींना अन्त नाहीं, असें सांगतात—**हे परंतप, मम दिव्यानां विभूतीनां-विस्तराणां अन्तः न अस्ति**—हे शत्रुतापना, माझ्या दिव्य विभूतींचा म्ह० विस्तारांचा अन्त नाहीं.—**सर्वात्मनः ईश्वरस्य दिव्यानां विभूतीनां इयत्ता केनचित् वक्तुं वा ज्ञातुं न हि शक्या**—सर्वांचा आत्मा अशा ईश्वराच्या दिव्य विभूतींची मर्यादा कोणालाहि सांगणे किंवा जाणणे शक्य नाहीं. त्याची मर्यादा कोणालाहि ठाऊक नाहीं—त्याचा अन्त कोणालाहि लागला नाहीं. त्यामुळे तो कोणालाहि सांगतां येत नाहीं.—**मया तु एषः विभूतेः विस्तरः उद्देशतः-एकदेशेन प्रोक्तः**—पण मी तर हा विभूतीचा विस्तार संक्षेपाने-एकदेशाने सांगितला आहे. ४०.

यद्यद्विभूतिमत्सत्त्वं श्रीमदूर्जितमेव वा ।
तत्तदेवावगच्छ त्वं मम तेजोंशसंभवम् ॥ ४१ ॥

**अन्वयार्थ—यत् यत्**—जें जें—**विभूतिमत्**—ऐश्वर्ययुक्त—**श्रीमत्**—समृद्धि किंवा कांति यांनी युक्त—**वा**—किंवा—**ऊर्जितं**—बलाढ्य—**सत्त्वं अस्ति**—सत्त्व-वस्तु-प्राणी असतो—**तत् तत् एव**—ते तेच—**त्वं**—तूं—**मम तेजोंशसंभवं**—माझ्या तेजाच्या अंशापासून झालेलें—**अवगच्छ**—जाण. ४१

**यद्यदिति—यद्यल्लोके विभूतिमद्विभूतियुक्तं सत्त्वं वस्तु श्रीमदूर्जितमेव वा श्रीर्लक्ष्मीस्तया सहितमुत्साहोपेतं वा तत्तदेवावगच्छ त्वं जानीहि ममेश्वरस्य तेजोंशसंभवं तेजसोंऽश एकदेशः संभवो यस्य तत्तेजोंशसंभवमित्यवगच्छ त्वम् ॥ ४१ ॥**

**भाष्यार्थ—यद्यदिति**—' यत् यत्० ' या श्लोकानें न सांगितलेल्याहि ईश्वराच्या विभूतींचा संग्रह करण्यासाठीं विभूतींचें लक्षण सांगतात—**लोके यत् यत् विभूतिमत्-विभूतियुक्तं सत्त्वं-वस्तु**—या लोकीं जें जें बिभूतियुक्त सत्त्व-वस्तु-प्राणि

जात-आहे—**श्रीमत् ऊर्जितं एव वा-श्रीः लक्ष्मीः तया सहितं वा उत्साहोपेतं**—( आणि ते कसें ? उत्तर-) श्रीमत् किंवा ऊर्जितच, श्री म्ह० लक्ष्मी तिनें युक्त किंवा उत्साहानें युक्त असतें—**तत् तत् एव मम-ईश्वरस्य तेजोंशसंभवं इति त्वं अवगच्छ-जानीहि**—ते तें सत्त्व-प्राणिजात मज ईश्वराच्या तेजोंशापासून झालें आहे असें तूं जाण. [ माझ्या तेजाचा म्ह० चैतन्याचा किंवा ईश्वरशक्तीचा जो अंश तोच त्याचा संभव आहे, त्यापासून तें झालें आहे, असें तूं जाण. ४१. ]

## अथवा बहुनैतेन किं ज्ञातेन तवार्जुन ।
## विष्टभ्याहमिदं कृत्स्नमेकांशेन स्थितो जगत् ॥४२॥

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे विभूतियोगो नाम दशमोऽध्यायः ॥ १० ॥**

**अन्वयार्थ—अथवा**—किंवा—**अर्जुन**—हे पार्था !—**बहुना एतेन ज्ञातेन**—हें असें पुष्कळ जरी तूं जाणलेस, तरी—**तव किं**—तुला काय लाभ होणार ?—**अहं**—मी—**इदं कृत्स्नं जगत्**—हे सर्व जगत्—**एकांशेन**—आपल्या एका अंशानें—**विष्टभ्य**—दृढ धारण करून—**स्थितः (अस्मि)**—राहिलो आहें. ४२

**अथवेति । अथवा बहुनैतेनैवमादिना किं ज्ञातेन तवार्जुन स्यात्सावशेषेण । अशेषतस्त्वमिममुच्यमानमर्थं शृणु विष्टभ्य विशेषतः स्तम्भनं दृढं कृत्वेदं कृत्स्नं जगदेकांशेनैकावयवेनैकपादेन सर्वभूतस्वरूपेणेत्येतत् । तथा च मन्त्रवर्णः—" पादोऽस्य विश्वा भूतानि " इति स्थितोऽहमिति ॥ ४२ ॥**

इति श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यगोविन्दभगवत्पूज्यपादशिष्यश्रीमच्छंकरभगवतः कृतौ श्रीभगवद्गीताभाष्ये विभूतियोगो नाम दशमोऽध्यायः ॥१०॥

**भाष्यार्थ—' अथवा० ' इति**—सर्वांना सुगम होण्यासाठीं अवयवशः विभूति सांगून समर्थ अधिकाऱ्यांना साकल्यानें ती ' अथवा ' या श्लोकानें सांगतात—**अर्जुन अथवा बहुना एतेन-एवमादिना सावशेषेण तव ज्ञानेन किं स्यात्**—अर्जुना, किंवा अशाप्रकारें कितीहि सांगितल तरी-आणखी शिल्लक राहणारी अशी ही विभूति कितीहि जरी तूं जाणलीस, तरी त्याच्या योगानें तुला काय होणार ? (कारण तूं मला साकल्यानें जाणण्यास असमर्थ आहेस. ) यास्तव—**त्वं इमं अशेषतः उच्यमानं अर्थं शृणु**—तूं या अशेषतः-साकल्यानें सांगितल्या जाणाऱ्या अर्थाला-माझ्या सकल विभूतीला एक.—**विष्टभ्य-विशेषतः स्तंभनं दृढं कृत्वा इदं कृत्स्नं जगत् एकांशेन-एकावयवेन-एकपादेन-सर्वभूतस्वरूपेण इति एतत् स्थितः अहं (अस्मि)**—एकांशानें-एका अवयवानें सर्वभूतस्वरूप, सर्व प्रपंचाची उपादान शक्ति, याच उपाधीनें युक्त अशा एका पादानें, असा याचा भावार्थ. हे सर्व जगत् दृढ करून, त्याचें विशेषतः स्तंभन-धारण करून मी स्थित आहे.—**तथा च मंत्रवर्णः**

**'पादोऽस्य विश्वा भूतानि' इति**—याविषयीं 'सर्व भूतें हा याचा पाद-एक अंश आहे,' असा मंत्रवर्ण-ही श्रुति प्रमाण आहे. [ याप्रमाणें या अध्यायांत भगवानांच्या नानाप्रकारच्या विभूति ध्येयरूपानें व ज्ञेयरूपानें सांगितल्या आहेत, व सर्व प्रपंचात्मक ध्येयरूप प्रदर्शित करून ' याचे तीन पाद निरुपाधिक अवस्थेंत आहेत, ' अशा अर्थाच्या श्रुतिवचनानें निरुपाधिक प्रपंचांतीत तत्त्वाचा उपदेश करणाऱ्या भगवानांनीं तत्पदाचा परिपूर्ण सच्चिदानंदैकरस आत्मा हा लक्ष्यार्थ निश्चित केला आहे. ] ४२.

इति भगवान् श्रीकृष्णांनी गायलेल्या उपनिषदांतील-रहस्यविद्येतील ब्रह्मविद्येपैकीं योग-उपाय-शास्त्रांतील विभूतियोगनांवाचा दहावा अध्याय विष्णुशर्मकृत सान्वयार्थ-सटीप-भाष्य-भाष्यार्थासह समाप्त झाला.

# अध्याय अकरावा.

विश्वरूपदर्शन.

**अर्जुन उवाच**—अर्जुन म्हणाला—

**मदनुग्रहाय परमं गुह्यमध्यात्मसंज्ञितम् ।**
**यत्त्वयोक्तं वचस्तेन मोहोऽयं विगतो मम ॥१॥**

**अन्वयार्थ**—(**हे भगवन्**—हे कृष्णा!)—**मदनुग्रहाय**—माझ्यावर अनुग्रह करण्यासाठीं—**परमं गुह्यं अध्यात्मसंज्ञितं**—अत्यंत गुह्य अध्यात्म या नांवाचें—**यत् वचः**—जें वचन—**त्वया**—तूं—**उक्तं**—सांगितलेंस—**तेन**—त्याच्या योगानें—**मम**—माझा—**अयं**—हा—**मोहः**—मोह-अविवेक—**विगतः**—पार निघून गेला आहे. १.

भगवतो विभूतय उक्तास्तत्र च 'विष्टभ्याहमिदं कृत्स्नमेकांशेन स्थितो जगत्' इति भगवताऽभिहितं श्रुत्वा यज्जगदात्मरूपमाद्यमैश्वरं तत्साक्षात्कर्तुमिच्छन्—मदनुग्रहाय ममानुग्रहार्थं परमं निरतिशयं गुह्यं गोप्यमध्यात्मसंज्ञितमात्मानात्मविवेकविषयं यत्त्वयोक्तं वचो वाक्यं तेन ते वचसा मोहोऽयं विगतो ममाविवेकबुद्धिरपगतेत्यर्थः॥१॥

**भाष्यार्थ**—( पूर्वोत्तर संगति )—**भगवतः विभुतयः उक्ताः**—भगवानांच्या विभूती सांगितल्या. [ परमात्म्याचें सोपाधिक रूप ध्येयत्वानें व निरुपाधिक रूप ज्ञेयत्वानें सांगितलें ]—**तत्र च 'विष्टभ्याहमिदं कृत्स्नं एकांशेन स्थितो जगत्' इति भगवता अभिहितं श्रुत्वा**—त्यांत 'मी एका अंशानें या सर्व जगाला दृढ धारण करून स्थित आहें' असें भगवानांनीं सांगितलेलें ऐकून—**यत् आद्यं ऐश्वरं जगदात्मरूपं तत् साक्षात्कर्तुं इच्छन् ( अर्जुनः उवाच )**—जें सोपाधिक ईश्वराचें आद्य सर्व जगदात्मक विश्वरूप त्याला साक्षात् पाहण्याची इच्छा करणारा अर्जुन म्हणाला—

—**मदनुग्रहाय-मम अनुग्रहार्थं**—मदनुग्रहार्थ-माझ्यावर अनुग्रह करण्यासाठीं—**परमं-निरतिशयं गुह्यं-गोप्यं अध्यात्मसंज्ञितं-आत्मानात्मविवेकविषयं यत् वचः-वाक्यं त्वया उक्तं**—परम म्ह० निरतिशय, गुह्य-गोप्य-गुप्त ठेवण्यास योग्य असें, अध्यात्म ही ज्याला संज्ञा-नांव प्राप्त झालें आहे असें, म्ह० आत्मानात्मविवेकविषयक जें वचन-वाक्य तूं सांगितलेंस—**तेन ते वचसा अयं मोहः विगतः मम अविवेकबुद्धिः अपगता इत्यर्थः**—त्या तुझ्या वचनानें हा मोह गेला-माझी अविवेकबुद्धि निघून गेली, असा याचा भावार्थ. [ मजवर करुणा करून-उपकार करण्यासाठीं-म्ह० अनुग्रह करण्यासाठीं तूं जें हें 'अशोच्यान् अन्वशोचः०' इत्यादि त्वंपदार्थप्रधान गुह्य अध्यात्मसंज्ञक परम म्ह० परम पुरुषार्थाचें

साधनभूत वाक्य बोललास त्यानें माझा मोह पार निघून गेला, माझी अविवेकबुद्धि नष्ट झाली. ] १.

भवाप्ययौ हि भूतानां श्रुतौ विस्तरशो मया ।
त्वत्तः कमलपत्राक्ष माहात्म्यमपि चाव्ययम् ॥२॥

**अन्वयार्थ**—**कमलपत्राक्ष**—हे कमलनयना !—**मया**—मीं—**भूतानां भवाप्ययौ**—सर्व भूतांची उत्पत्ति व लय तुझ्यापासून होतात हें—**त्वत्तः**—तुझ्या तोंडून—**विस्तरशः**—सविस्तर—**श्रुतौ**—ऐकलें—**च**—व—**अव्ययं**— अव्यय —**माहात्म्यं अपि**—माहात्म्यहि—**श्रुतं**—ऐकिलें. २.

**किंच—भव उत्पत्तिरप्ययः प्रलयो भूतानां तौ भवाप्ययौ श्रुतौ विस्तरशो मया न संक्षेपतस्त्वत्तस्त्वत्सकाशात्कमलपत्राक्ष कमलस्य पत्रं कमलपत्रं तद्वदक्षिणी यस्य तव स त्वं कमलपत्राक्षो हे कमलपत्राक्ष माहात्म्यमपि चाव्ययमक्षयं श्रुतमित्यनुवर्तते ॥ २**

**भाष्यार्थ**—**किंच**—सातव्या अध्यायापासून तत्पदार्थाचा निर्णय करण्यासाठीं तूं जें सांगितलेंस तेहि मी ऐकले, असें ' भवाप्ययौ० ' या श्लोकानें अर्जुन सांगतो—**भवः-उत्पत्तिः अप्ययः-प्रलयः**—भव म्ह० उत्पत्ति व अप्यय म्ह० प्रलय.—**भूतानां तौ भवाप्ययौ त्वत्तः-त्वत्सकाशात् मया विस्तरशः-न संक्षेपतः श्रुतौ**—भूतांचे ते भवाप्यय-उत्पत्तिप्रलय तुझ्यापासून-तुझ्यामुळे होतात असें मीं सविस्तर-संक्षेपाने नव्हे, ऐकलें. तुझ्यापासून होणारे उत्पत्ति-प्रलय तुझ्याच मुखानें मी ऐकले.—**कमलपत्राक्षः कमलस्य पत्रं कमलपत्रं तद्वत् अक्षिणी यस्य तव सः त्वं कमलपत्राक्ष**—कमलाचे जे पत्र-पान-पाकळी ते कमलपत्र त्या कमलाच्या पाकळी माणें ज्या तुझे नेत्र आहेत, तो तूं कमलपत्राक्ष आहेस.—**हे कमलपत्राक्ष अव्ययं-अक्षयं माहात्म्यं अपि च श्रुतं इति अनुवर्तते**—हे कमलपत्रनयना ! तुझे अव्यय-अक्षय माहात्म्यहि मी ऐकले, अशी ' श्रुत-'पदाचा अनुवृत्ति होते. [ माहात्म्य म्ह० पारमार्थिक किंवा सोपाधिक सर्वात्मत्वादिरूप मी ऐकले. ] २.

एवमेतद्यथाऽऽत्थ त्वमात्मानं परमेश्वर ।
द्रष्टुमिच्छामि ते रूपमैश्वरं पुरुषोत्तम ॥३॥

**अन्वयार्थ**—**परमेश्वर**—हे परमेश्वरा !—**त्वं**—तूं—**आत्मानं**—आपल्याला—**यथा**—ज्याप्रकारें—**आत्थ**—सांगतोस—**एवं एतत्**—तसेंच ते आहे.—**पुरुषोत्तम**—हे पुरुषोत्तमा !—**ते ऐश्वरं रूपं**—तुझें वैष्णवरूप—**द्रष्टुं** - पाहण्यास—**इच्छामि**—मीं इच्छितों. ३.

**एवमिति। एवमेतन्नान्यथा यथा येन प्रकारेणाऽऽत्थ कथयसि त्वमात्मानं परमेश्वर तथाऽपि द्रष्टुमिच्छामि ते तव ज्ञानैश्वर्यशक्तिबलवीर्यतेजोभिः संपन्नमैश्वरं वैष्णवं रूपं पुरुषोत्तम ॥ ३ ॥**

**भाष्यार्थ—'एवं०' इति—**'एवं०' याचें व्याख्यान—**परमेश्वर यथा-येन प्रकारेण त्वं आत्मानं आत्थ-कथयसि एवं एतत्-अन्यथा न**—हे परमेश्वरा, जसें-ज्या सोपाधिक किंवा निरुपाधिक प्रकारें तूं आपलें स्वरूप सांगत आहेस तसेंच तें आहे, त्याहून निराळ्या प्रकारचें नाहीं—**तथापि पुरुषोत्तम ते-तव ज्ञान-ऐश्वर्य-शक्ति-बल-वीर्य-तेजोभिः संपन्नं ऐश्वरं वैष्णवं रूपं द्रष्टुं इच्छामि**—तथापि हे पुरुषोत्तमा, तुझें ज्ञान ऐश्वर्य-शक्ति-बल-वीर्य-तेज यांनीं संपन्न असलेलें ईश्वरसंबंधी वैष्णवरूप मी पाहूं इच्छितों. [तुझ्या वचनावर माझा विश्वास नाहीं म्हणून नव्हे, तर मला तें पाहण्याची इच्छा झाली आहे, म्हणून मी तुझी प्रार्थना करीत आहे.] ३.

**मन्यसे यदि तच्छक्यं मया द्रष्टुमिति प्रभो ।**
**योगेश्वर ततो मे त्वं दर्शयात्मानमव्ययम् ॥ ४ ॥**

**अन्वयार्थ—प्रभो**—हे स्वामिन् !—**यदि**—जर—**मया तत् द्रष्टुं शक्यं**—मी ते पाहणे शक्य आहे—**इति मन्यसे**—असे तूं समजत असशील—**ततः**—तर मग,—**योगेश्वर**—हे योगेश्वर !—**त्वं**—तूं—**मे**—मला—**अव्ययं आत्मानं**—आपलें अव्यय स्वरूप—**दर्शय**—दाखीव. ४.

**मन्यस इति । मन्यसे चिन्तयसि यदि मयाऽर्जुनेन तच्छक्यं द्रष्टुमिति प्रभो स्वामिन्योगेश्वर योगिनो योगास्तेषामीश्वरो योगेश्वर हे योगेश्वर। यस्मादहमतीवार्थी द्रष्टुं ततस्तस्मान्मे मदर्थं दर्शय त्वमात्मानमव्ययम् ॥ ४ ॥**

**भाष्यार्थ—'मन्यसे०' इति—**'मन्यसे०' या श्लोकाचे व्याख्यान—**प्रभो-स्वामिन् यदि मया अर्जुनेन तत् द्रष्टुं शक्यं इति मन्यसे-चिन्तयसि**—हे प्रभो-स्वामिन् जर मज अर्जुनाकडून तें पाहणें शक्य आहे, असे तुला वाटत असेल-मला ते दिसणे शक्य आहे, असें जर तूं समजत असशील तर—**योगेश्वर-योगिनः-योगाः तेषां ईश्वरः-योगेश्वरः हे योगेश्वर**—'योगेश्वर-' योगी हेच योग, त्यांचा जो ईश्वर तो योगेश्वर. हे योगेश्वरा-योग्याच्या ईश्वरा-योग्यांना योगसिद्धि देणाऱ्या,—**यस्मात् अहं द्रष्टुं अतीव अर्थी ततः-तस्मात् मे-मदर्थं त्वं आत्मानं अव्ययं दर्शय**—ज्याअर्थी मी ते विश्वरूप पाहण्यासाठीं अतिशय उत्सुक आहें-तें पाहण्याची मला फार इच्छा आहे, त्याअर्थी माझ्यासाठी तूं आपलें अव्यय स्वरूप दाखीव. [ईश्वर सृष्टि स्थिति-संहार-प्रवेश व प्रशासन करण्यास समर्थ आहे, म्हणून त्याला प्रभो, असें येथें म्हटलें आहे.] ४.

---

१ रहस्यकार १-४ श्लोकावरील टीपेंत म्हणतात-" ७ व्या अध्यायांत ज्ञानविज्ञान सांगण्यास सुरवात करून ७ व ८ या अध्यायांत अक्षर किंवा अव्यक्त रूपाचें व ९-१० अध्यायांत व्यक्त रूपाचें जें ज्ञान सांगितलें त्यालाच 'अध्यात्म' ही संज्ञा अर्जुनानें दिली आहे." हें म्हणणें बरोबर नाही. कारण भगवानांनी 'अशोच्यानन्वशोचस्त्वं' (गी.भा.२.११

पृ. ६५ ) येथूनच अध्यात्म सांगण्यास आरंभ केला आहे. सातव्या अध्यायापासून नाहीं. यास्तव गीताशास्त्राला आरंभ झाल्यापासून जो उपदेश केला आहे, त्या सर्वाला ‘ अध्यात्म ’ असें म्हणणें उचित होय. ‘ नवव्या व दहाव्या अध्यायांत परमेश्वराच्या अनेक व्यक्त रूपांचें ज्ञान सांगितले ’ ही कल्पना निराधार व शास्त्रविरुद्ध आहे, हें आम्ही वर दाखविलेंच आहे. (गी. भा. पृ.७२६व७४७ पहा.)“ एका अव्यक्तापासून अनेक व्यक्त पदार्थ कसे निर्माण होतात याचें सातव्या (श्लो.४-१५) आठव्या (श्लो.१६-२१) व नवव्या (श्लो.४-७) अध्यायांत जें वर्णन आहे तेंच ‘ भूतांची उत्पत्ति व लय ’ या शब्दांनीं दुसऱ्या श्लोकांत अभिप्रेत आहे.” हें म्हणणें मुळाला धरून नाही. अ. ७ श्लो. ४ ते १५ यांत परा व अपरा प्रकृति, सर्व भूतें त्या दोन प्रकृतींपासून होतात, मी सर्व जगाची उत्पत्ति व प्रलय आहें, माझे कारण दुसरें कांहीं नाही, माझ्यामध्ये सर्व स्थित आहे, मी जलादिकांतील रस वगैरे आहें, मी सर्वभूतांचें बीज आहें, बुद्धिमानादिकांची बुद्धि वगैरे मी आहें, सात्त्विकादि सर्व भाव माझ्यापासूनच झाले आहेत, रागादि तीन गुणविकाररूप भावांनी मोहित झालेले जगत् मला जाणत नाही, ही माझी दैवी त्रिगुणात्मिका माया दुरुल्लघ्य आहे, मलाच जे शरण येतात ते हिचें उल्लंघन करितात, पापी, मूढ, नराधम, आसुर प्रकृतीचे लोक मला शरण येत नाहीत ” असें वर्णन आहे. त्यांत ‘ अव्यक्तापासून अनेक व्यक्त पदार्थ कसे होतात ’ याचें वर्णन नाही. ‘ मीच सर्व जगाच्या उत्पत्ति–प्रळयाचें कारण आहें. ’ असें ६ व्या व ‘ मजपासूनच सर्व भाव झाले’असें १२व्या श्लोकांत म्हटलें आहे.म्ह० एका अव्यक्तापासून अनेक व्यक्त पदार्थ कसे होतात, हें यांत सांगितलें नसून सर्व भूतांची उत्पत्ति ईश्वरापासून होते व लयहि त्याच्यामुळें व त्याच्यामध्यें होतो, असेच सागितले आहे. त्याचप्रमाणे आठव्या अध्यायाच्या १६ ते २१ श्लोकांत “ ब्रह्मभुवनासह सर्व लोक पुनः उत्पन्न होणारे आहेत. पण मला प्राप्त झाल्यावर पुनर्जन्म होत नाही. ब्रह्मदेवाचा दिवस सहस्र युगांचा व रात्रहि तितकीच आहे. ब्रह्मदेवाच्या दिवसाच्या–कल्पाच्या आरंभी अव्यक्तापासून म्ह० प्रजापतीच्या स्वापावस्थेपासून (गी. भा. पृ. ६६६ पहा ) सर्व स्थावर-जंगमरूप व्यक्ति उत्पन्न होतात,व त्याची रात्र होतांच–प्रलयकालीं त्यांतच त्या लीन होतात. तोच हा भूतग्राम कल्पाच्या आरंभीं पुनः पुनः उत्पन्न होऊन कल्पांती पुनः पुनः लय पावतो. त्या अव्यक्ताहून अगदीं विलक्षण असलेला जो दुसरा सनातन भाव तो सर्व भूतें जरी नाश पावलीं तरी नाश पावत नाही. त्याला उपनिषदांत अव्यक्त व अक्षर म्हटलें आहे. त्यालाच परमगति म्हणतात. ज्याला प्राप्त होऊन जीव पुनः संसारांत परत येत नाहींत, तें माझें परम धाम आहे.” असें वर्णन आहे आणि ‘ मला प्राप्त झाल्यावर मात्र पुनर्जन्म नाहीं, बाकीचीं सर्व फलें अनित्य आहेत, कारण ब्रह्मलोकापर्यंत सर्व लोक पुनः पुनः उत्पन्न होऊन नाश पावणारे आहेत. अव्यक्त ही त्यांची अखेरची सीमा आहे. तेथपर्यंतच ते जातात व तेथून परत येतात. पण त्या अव्यक्ताच्या पलीकडे असलेला जो दुसरा अव्यक्त भाव म्हणजेच मी, तो मात्र ही सर्व भूतें नाश पावत असलीं तरी नाश पावत नाहीं. म्हणून मला प्राप्त झालेले जीव मात्र पुनर्जन्म घेत नाहींत,’ असें त्याचें तात्पर्य आहे. त्यावरूनहि ‘ एका अव्यक्तापासून अनेक व्यक्त पदार्थ कसे होतात, ’ हें सांगण्यासाठीं तें प्रकरण (अ. ८ श्लो. १६–२१) नाहीं, हें उघड होतें. ९ व्या अध्यायाच्या ४ ते ७ श्लोकांतहि “ अव्यक्तरूप अशा मीं हें सर्व जगत् व्यापलें आहे, ”

इत्यादि वर्णन असून, " सर्व भूतें माझ्या प्रकृतीला म्ह० पूर्वोक्त अव्यक्ताला कल्पाच्या अंती प्राप्त होतात व मी पुनः त्याना कल्पाच्या आरंभीं उत्पन्न करतों " असें स्पष्ट म्हटले आहे. त्यावरूनहि ईश्वरापासून व ईश्वरामुळे जगाचे उत्पत्ति-प्रलय होतात, हेच व्यक्त होते. ' एका अव्यक्तापासून अनेक व्यक्त पदार्थ कसे निर्माण होतात ' तें सांगितलेले दिमत नाहीं. त्यांतील विशेषतः अ. ७ श्लो. ६ व १२, अ. ९ श्लो. ४ व ७ यांवरून ' भूतांची उत्पत्ति व लय परमेश्वरापासून व परमेश्वरामुळें होतात ' हें व्यक्त होतें व तेच येथें ' त्वत्तः भूतानां भव-अप्ययो' तुझ्यापासून भूताचे उत्पत्ति-प्रलय होतात,हें मी तुझ्यामुखाने सविस्तर ऐकिले, असें अर्जुन सांगत आहे. पण रहस्यकारानी 'त्वत्तः' याचा संबंध 'श्रुतौ' या पदार्शी जोडून "भूतांची उत्पत्ति व लय आणि तुमचे अक्षय माहात्म्यहि तुमच्यापासून मी सविस्तर ऐकले" असा दुसऱ्या श्लोकाचा अर्थ केला आहे. तो त्याच्याच टीपेतील वरील मजकुराशीं कितपत जुळतो ते आता वाचकानींच पहावे. तिसऱ्या श्लोकाचा अर्थ-" हे परमेश्वरा ! तुम्ही आपलें हे जसे वर्णन केले तशाप्रकारे तुमचे ईश्वरी स्वरूप, हे पुरुषोत्तमा ! मी प्रत्यक्ष पाहू इच्छितो " असा करून 'दोन अर्धांची दोन वाक्ये कल्पून तसा अर्थ करण्यापेक्षा हाच अर्थ बरा' असे रहस्यकार म्हणतात. पण ' यथा त्व आत्मान आत्थ एव एतत्-' ज्याप्रकारे तू आपले स्वरूप सांगत आहेस तसेच ते आहे. त्याहून निराळ्या प्रकारचे नाहीं. म्हणजे तू जे सांगत आहेस त्यावर माझा पूर्ण विश्वास आहे ते खोटे आहे, असे नाहीं. तथापि तेंच तुझे ऐश्वर रूप मी प्रत्यक्ष पाहू इच्छितो. या अर्थात अधिक स्वारस्य आहे. हा अर्थच वरच्या श्लोकार्थाशा चांगला जुळतो. दहाव्या अध्यायाच्या १४-१८ श्लोकांतहि अर्जुन असेच म्हणत आहे. ( गी. भा. पृ. ७४४ ते ७४८ पहा ) शिवाय रहस्यकार जसा अर्थ करितात, तसा केल्यास पूर्वार्धांतील ' त्व आत्मान यथा आत्थ एव एतत् ' या शब्दाचें कांहीच महत्त्व रहात नाहीं. नुसत्या उत्तरार्धानेच रहस्यकाराचा विवक्षित अर्थ निष्पन्न होतो. ' तें खरं आहे म्ह० मी समजलो, असा अर्थ टीकाकार करितात,' म्हणून जे रहस्यकारानी म्हटलें आहे ते बरोबर नाहीं. 'तर ते खरे आहे. तसेच आहे,याबद्दल मला संशय नाही' असा त्याच्या म्हणण्याचा आशय आहे.चवथ्या श्लोकातील 'योगेश्वर'शब्दाविषयीं ते टीपेत म्हणतात " चवथ्या श्लोकात योगेश्वर असा जो शब्द आहे, त्याचा अर्थ योगाचा ( योग्याचा नव्हे ) ईश्वर असा आहे. ( गी. १८·७५ ) योग म्ह० अव्यक्त रूपापासून व्यक्त सृष्टि निर्माण करण्याचे सामर्थ्य किंवा युक्ति, असा अथ पूर्वी ( गी. ७-२५ व ९-५ ) दिला असून त्या सामर्थ्यानेंच विश्वरूप दाखवावयाचे असल्यामुळें 'योगेश्वर' हे संबोधन येथें सहेतुक योजिलेलें दिसते"रहस्यकारानी ७-२५ व ९-५ येथें योगशब्दाचा अर्थ केला आहे, हे खरे, पण तो बरोबर नाहीं, हेहि आम्ही त्याच श्लोकांवरील टीपेत सांगितले आहे. ( गी. भा. पृ. ६३८ व ६८७ पहा. ) रहस्यकार तेथे ' अव्यक्त स्वरूप सोडून व्यक्त स्वरूप धारण करण्याची युक्ति' असा अर्थ करितात व येथे अव्यक्त रूपापासून व्यक्त सृष्टि निर्माण करण्याचे सामर्थ्य किंवा युक्ति ' म्हणतात. पण अव्यक्त स्वरूप सोडून व्यक्त स्वरूप धारण करणें निराळे व अव्यक्तापासून व्यक्त सृष्टि निर्माण करणे निराळें. तरी रहस्यकार जणुंकाय त्यांत कांहीं फरकच नाही, असेंच समजत आहेत. येथील अर्थ कांही--अंशतः तरी उपपन्न आहे. पण पूर्वीचा अर्थ अगदींच अनुपपन्न आहे. शिवाय योग म्ह० युक्ति व युक्ति म्ह०

**श्रीभगवानुवाच**—श्रीकृष्ण म्हणाले—

**पश्य मे पार्थ रूपाणि शतशोऽथ सहस्रशः।**
**नानाविधानि दिव्यानि नानावर्णाकृतीनि च ॥ ५ ॥**

---

सामर्थ्य हा अर्थहि बरोबर नाही. कारण योग म्ह० युक्ति असें आचार्यांनीं म्हटलें आहे. पण ती युक्ति म्ह० घटना–रचना असा अर्थ आहे, वगैरे आम्ही वर (पृ. ६३८) सांगितलेंच आहे. रहस्यकार योगेश्वर म्ह० योगांचा ईश्वर असे म्हणतात. योगांचा म्ह० युक्तींचा ईश्वर. 'हा योग परमेश्वरास अत्यंत सुलभ किंबहुना परमेश्वराचा दास असल्यामुळें योगेश्वर' अशी त्यांची व्युत्पत्तिहि (गी. र. ७३८.) सांगतात. पण 'योग' हा शब्द वरील सर्व ठिकाणीं 'योग' असा एकवचनी आहे. तेव्हां 'योगाचा ईश्वर,' असें कसें म्हणतां येईल? तसेच 'योग म्ह० युक्ति व योगांचा ईश्वर म्ह० युक्तींचा ईश्वर' हा अर्थ सयुक्तिक आहे, असें कोण म्हणेल? बरें योग म्ह० सामर्थ्य असे आपण समजू–कारण रहस्यकार युक्ति म्ह० सामर्थ्य असेंहि म्हणतात. पण अव्यक्तापासून व्यक्त सृष्टि निर्माण करण्याचें सामर्थ्यहि एकच असणार! तेव्हां 'योगांचा (योग्यांचा नव्हे) ईश्वर' हे म्हणणें उपपन्न कसें होतें? शिवाय 'सामर्थ्यांचा ईश्वर' म्ह० काय? योगशब्दाचा नुसते 'सामर्थ्य' हा अर्थ रहस्यकाराना कोणत्या कोशांत सांपडला? आचार्यांनी योगशब्दाचा 'योगजन्य सामर्थ्य–योगसामर्थ्य' असा अर्थ कांहीं ठिकाणीं केला आहे, (पृ. ७४८, ७७३) पण नुसते 'सामर्थ्य' हा त्याचा अर्थ संभवत नाही. 'योग अत्यंत सुलभ किंबहुना त्याचा दास म्हणून परमेश्वर योगेश्वर' ही व्युत्पत्तिहि मनाला पटत नाहीं, त्यापेक्षा योग्यांचा ईश्वर हाच अर्थ सर्वथा ग्राह्य व सयुक्तिक आहे. कारण योग हा शब्द गीतेतच योगी या अर्थी योजलेला आहे. अ. ५ श्लो. ५. यांत 'सांख्यैः यत् स्थानं प्राप्यते तत् योगैः अपि गम्यते' असें म्हटलें आहे. यांतील सांख्य व योग हे दोन्ही तृतीया बहुवचनी शब्द ज्ञानी संन्यासी पुरुष व योगी पुरुष या अर्थी योजिले आहेत. रहस्यकारांनींहि 'ज्या मोक्षस्थानीं सांख्यमार्गांतले लोक पोंचतात तेथेंच योगी म्ह० कर्मयोगीहि जातात–' असा अर्थ केला आहे. म्हणजे 'योग' हा शब्द 'योगी' या अर्थींहि आहे, हे त्यांना कबूल आहे. पण योगेश्वर म्हणजे मात्र योग्यांचा ईश्वर हे त्यांना संमत नाही. पण तें का बरें? सर्व योग्याना योगफल देणारा या अर्थी योगेश्वर हा शब्द योजलेला असणेंच, सयुक्तिक नव्हे का? त्यावांचून 'योगाचा ईश्वर' असा बहुवचनी विग्रह कसा संभवेल? योगशब्दाचा 'इन्' असा प्रत्यय लागून ज्याला योग असतो तो योगी अशा अर्थी योगिन्–शब्द जसा बनतो, तसाच योगशब्दाला त्याच अर्थी 'अ' (अच्) प्रत्यय लागून योग असा शब्द योगी–योगवान् या अर्थी बनतो. जो सर्व योग्यांचाहि ईश्वर आहे, त्याला एकदेशी सामर्थ्याचा किंवा युक्तीचा ईश्वर म्हणणें, यांत परमात्म्याचा उत्कर्ष नसून अपकर्ष आहे. सार्वभौम नृपतीला एका खेड्याचा राजा म्हणण्यासारखेंच तें आहे. वास्तव रहस्यकारांचा 'योगेश्वर' शब्दाचा अर्थ अग्राह्य असून आचार्यांचाच सर्वथा ग्राह्य आहे. पुढील ९ व्या श्लोकांतील 'महायोगेश्वरः हरिः' या शब्दावरूनहि महान् योगेश्वर म्ह० योगांचा–सर्व प्रकारच्या योग्यांचा महान् ईश्वर–सर्व ईश्वरांचा ईश्वर हाच अर्थ निष्पन्न होतो.

**अन्वयार्थ—पार्थ**—हे अर्जुना !—**मे**—माझीं—**नानाविधानि दिव्यानि** अनेक प्रकारचीं दिव्य-अलौकिक—**च**—व—**नानावर्णाकृतीनि**—नाना वर्णांची व नाना आकृतींचीं—**रूपाणि**—रूपें—**शतशः अथ सहस्रशः**—शेंकडों व हजारों प्रकारें म्ह० अनेकशः—**पश्य**—पहा. ५

**एवं चोदितोऽर्जुनेन—पश्य मे मम पार्थ रूपाणि शतशोऽथ सहस्रशोऽनेकश इत्यर्थः। तानि च नानाविधान्यनेकप्रकाराणि दिवि भवानि दिव्यान्यप्राकृतानि नानावर्णाकृतीनि च नाना विलक्षणा नीलपीतादिप्रकारा वर्णास्तथाऽऽकृतयोऽवयवसंस्थानविशेषा येषां रूपाणां तानि नानावर्णाकृतीनि च ॥ ५ ॥**

**भाष्यार्थ—एवं अर्जुनेन चोदितः**—( श्रीभगवान् उवाच- )—याप्रमाणें अर्जुनाकडून प्रेरणा-प्रार्थना केले गेलेले श्रीभगवान् म्हणाले—**पार्थ मे-मम शतशः अथ सहस्रशः-अनेकशः इत्यर्थः रूपाणि पश्य**—हे पार्था, माझीं शेकडों व हजारों, अनेक प्रकारचीं-असा याचा भावार्थ-रूपें पहा.—**तानि च नानाविधानि-अनेकप्रकाराणि दिवि भवानि-दिव्यानि-अप्राकृतानि**—तीं नानाप्रकारचीं-अनेक जातींचीं, द्युलोकांतील-दिव्य, अप्राकृत-अलौकिक—**च नानावर्णाकृतीनि-नाना -विलक्षणाः नीलपीतादिप्रकाराः वर्णाः तथा आकृतयः-अवयवसंस्थान-विशेषाः येषां रूपाणां तानि नानावर्णाकृतीनि च**—व नाना वर्ण व आकार यांनीं युक्त असलेलीं-नाना म्ह० विलक्षण-नील, पीत इत्यादि प्रकारचे वर्ण, तशाच नाना म्ह० विलक्षण आकृति-विशेषप्रकारच्या अवयवरचना-ज्या रूपांच्या आहेत तीं रूपें नानावर्णाकृति होत. [ माझीं नानाप्रकारचीं, अलौकिक, नाना वर्ण व आकृति यांनीं विशिष्ट अशी अनेक रूपें पहा. ] ५.

**पश्याऽऽदित्यान्वसून्रुद्रानश्विनौ मरुतस्तथा ।**
**बहून्यदृष्टपूर्वाणि पश्याश्चर्याणि भारत ॥ ६ ॥**

**अन्वयार्थ—आदित्यान्**—बारा आदित्यांस,—**वसून्**—आठ वसूंस,—**रुद्रान्**—अकरा रुद्रांस—**अश्विनौ**—दोन अश्विनीकुमारांस—**तथा**—त्याचप्रमाणें—**मरुतः**—एकुणपन्नास मरुतांना—**पश्य**—पहा.—**भारत**—हे भरतकुलांतील श्रेष्ठ अर्जुना—**बहूनि**—पुष्कळ—**अदृष्टपूर्वाणि आश्चर्याणि**—पूर्वीं कधीं न पाहिलेलीं आश्चर्यें.—**पश्य**—पहा. ६.

**पश्याऽऽदित्यानिति । पश्याऽऽदित्यान्द्वादश वसूनष्टौ रुद्रानेकादशाश्विनौ द्वौ । मरुतः सप्तसप्तगणा ये तांस्तथा बहून्यन्यान्यप्यदृष्टपूर्वाणि मनुष्यलोके त्वया त्वत्तोऽन्येन वा केनचित्पश्याऽऽश्चर्याण्यद्भुतानि भारत ॥ ६ ॥**

**भाष्यार्थ—'पश्यादित्यान्०' इति**—'पश्यादित्यान्०' या श्लोकानें त्यांतील कांहीं रूपांचा उल्लेख करितात—**द्वादश आदित्यान् पश्य**—बारा आदित्यांना पहा. —**अष्टौ वसून् एकादश रुद्रान् द्वौ अश्विनौ**—आठ वसु, अकरा रुद्र, दोन

अश्विनीकुमार,—**ये सप्तसप्तगणाः मरुतः तान्**—जे एकूणपन्नास देवतांचे सात सप्तगण, त्या एकूणपन्नास मरुतांस—**तथा भारत मनुष्यलोके त्वया त्वत्तः अन्येन वा केनचित् अदृष्टपूर्वाणि अन्यानि अपि आश्चर्याणि-बहूनि अद्भुतानि पश्य**—त्याचप्रमाणे हे भरतकुलोत्पन्ना, मनुष्यलोकीं तूं किंवा तुझ्याहून दुसऱ्याहि कोणी कधीच न पाहिलेली अशी दुसरींहि अनेक आश्चर्ये-अद्भुत प्रकार तूं पहा.

**इहैकस्थं जगत्कृत्स्नं पश्याद्य सचराचरम् ।**
**मम देहे गुडाकेश यच्चान्यद्द्रष्टुमिच्छसि ॥ ७ ॥**

**अन्वयार्थ—अद्य**—आज—**हे गुडाकेश**—हे निद्रेला स्वाधीन ठेवणाऱ्या अर्जुना !—**इह मम देहे**—या माझ्या देहांत—**एकस्थं**—एकाच अवयवांत असलेलें—**कृत्स्नं जगत्**—सर्व जगत्—**सचराचरं**—चराचर प्राण्यांसह—**पश्य**—पहा—**च**—आणि—**यत्**—जे—**अन्यत्**—दुसरें कांहीं—**द्रष्टुं इच्छसि**—पाहण्यास इच्छीत असशील तेंहि पहा. ७.

**न केवलमेतावदेव इहैकस्थमेकस्मिन्स्थितं जगत्कृत्स्नं समस्तं पश्याद्येदानीं सचराचरं सह चरेणाचरेण च वर्तते मम देहे गुडाकेश यच्चान्यज्जयपराजयादि यच्छङ्कसे 'यद्वा जयेम यदि वा नो जयेयुः' इति यदवोचस्तदपि द्रष्टुं यदीच्छसि ॥ ७ ॥**

**भाष्यार्थ—एतावत् एव केवलं न**—माझें फक्त आदित्यादिरूपच तुला दिसेल, असें समजूं नको, तर सर्व जगत् माझ्या देहात तूं पहा, असें 'इहैकस्थं०' या श्लोकानें सांगतात—**अद्य-इदानीं इह एकस्थं-एकस्मिन् स्थितं कृत्स्नं-समस्तं जगत् पश्य**—आतां येथे एकाच अवयवात स्थित असलेलें समस्त जगत् पहा—**सचराचरं-सह चरेण अचरेण च वर्तते**—चर व अचर यांसहवर्तमान असतें तें सचराचर समस्त जगत्—**हे गुडाकेश मम देहे ( पश्य )**—हे अर्जुना, माझ्या देहांत [ एकाच अवयवांत स्थित असलेले हे समस्त चराचर जगत् तूं पहा, असा संबंध ] —**च यत् अन्यत्-जयपराजयादि यत् शंकसे 'यद्वा जयेम यदि वा नो जयेयुः' इति यत् अवोचः तत् अपि यदि द्रष्टुं इच्छसि ( तर्हि इह एव पश्य-)**—आणि जें कांहीं दुसरें जय-पराजयादिक ज्याविषयीं तुला शंका असेल 'आम्ही यांना जिंकूं कीं हे आम्हांला जिंकतील, अ. २ श्लो. ५ पृ. ३० इत्यादि जें तूं म्हटलेंस तेंहि जर तुला पाहण्याची इच्छा असेल तर तें येथेच पहा. ७.

**न तु मां शक्यसे द्रष्टुमनेनैव स्वचक्षुषा ।**
**दिव्यं ददामि ते चक्षुः पश्य मे योगमैश्वरम् ॥८॥**

**अन्वयार्थ—तु**—पण—(**त्वं**—तूं)—**मां**—मला—**अनेन एव**—याच—**स्वचक्षुषा**—आपल्या नेत्रानें—**द्रष्टुं**—पाहण्यास—**न शक्यसे**—समर्थ होणार नाहींस. मी—**ते**—तुला—**दिव्यं चक्षुः**—दिव्य दृष्टि—**ददामि**—देतों.—**मे**—माझा—**ऐश्वरं योगं**—ईश्वरसंबंधी योग—**पश्य**—पहा. ८.

**किंतु—न तु मां विश्वरूपधरं शक्यसे द्रष्टुमनेन प्राकृतेन स्वचक्षुषा स्वकीयेन चक्षुषा येन तु शक्यसे द्रष्टुं दिव्येन तद्दिव्यं ददामि ते तुभ्यं चक्षुस्तेन पश्य मे योगमैश्वरमीश्वरस्य ममैश्वरं योगं योगशक्त्यतिशयमित्यर्थः ॥ ८ ॥**

**भाष्यार्थ—किंतु-मां तु विश्वरूपधरं अनेन प्राकृतेन स्वचक्षुषा-स्वकीयेन चक्षुषा द्रष्टुं न शक्यसे**—पण विश्वरूप धारण करणाऱ्या ( तथापि अमर्याद अशा ) मला तूं या प्राकृत स्वचक्षूनें-आपल्या बाह्य दृष्टीनें पाहूं शकणार नाहीस.—**तु येन दिव्येन द्रष्टुं शक्यसे तत् दिव्यं चक्षुः ते-तुभ्यं ददामि**—पण ज्या दिव्य चक्षूनें तूं मला पाहूं शकशील तें दिव्य चक्षु मी तुला देतों—**तेन मे योगं ऐश्वरं-पश्य ईश्वरस्य मम ऐश्वरं योगं योगशक्त्यतिशयं इत्यर्थः**—त्या चक्षूनें माझ्या ऐश्वर योगास तूं पहा. मज ईश्वराचा जो योग तो ऐश्वर योग म्ह० योगशक्तीचें आधिक्य, असा भावार्थ. ८.

**संजय उवाच**—संजय म्हणाला—

> एवमुक्त्वा ततो राजन्महायोगेश्वरो हरिः ।
> दर्शयामास पार्थाय परमं रूपमैश्वरम् ॥ ९ ॥

**अन्वयार्थ—ततः**—त्यानंतर—**राजन्**—हे राजा धृतराष्ट्रा,—**एवं उक्त्वा**—असे बोलून—**महायोगेश्वरः हरिः**—महायोगेश्वर हरि—**पार्थाय**—पार्थाला **परमं ऐश्वर्यं रूपं**—परम ईश्वरसंबंधी रूप—**दर्शयामास**—दाखविता झाला. ९.

**एवं यथोक्तप्रकारेणोक्त्वा ततोऽनन्तरं राजन्धृतराष्ट्र महायोगेश्वरो महांश्चासौ योगेश्वरश्च हरिर्नारायणो दर्शयामास दर्शितवान्पार्थाय पृथासुताय परमं रूपं विश्वरूपमैश्वरम् ॥ ९**

---

१ रहस्यकार या 'ऐश्वरं योग' शब्दाचा अर्थ 'ईश्वरी योग म्ह० योगसामर्थ्य' असा करितात. पण येथील योगशब्दाचा खरा अर्थ स्वरूप असा आहे व आचार्यांनी 'योगशक्तीचा अतिशय-आधिक्य' असा जो अर्थ केला आहे, तो याच अर्थी आहे. माझें स्वरूप किती विलक्षण, कल्पनातीत व निरतिशय शक्तीने युक्त आहे तें पहा, असा त्याचा आशय आहे. कारण वर तिसऱ्या श्लोकात 'ऐश्वर रूप' असें अर्जुन म्हणतो. भगवान् त्याचाच या आठव्या श्लोकात 'ऐश्वर योगं' असा उल्लेख करितात व संजय नवव्या श्लोकात 'त्यालाच पुनः 'रूपं ऐश्वरं' असें म्हणतो. वास्तव येथील योग म्ह० नुस्तें योगसामर्थ्य हा अर्थ बरोबर नाहीं.

**भाष्यार्थ—एवं यथोक्तप्रकारेण उक्त्वा ततः-अनंतरं राजन्-धृतराष्ट्र —असें**-वर सांगितलेल्या प्रकारे बोलून त्यानंतर, हे राजा धृतराष्ट्रा,—**महायोगेश्वरः -महान् च असौ योगेश्वरः च हरिः-नारायणः**—महायोगेश्वर-मोठा असा हा योगेश्वर हरि-नारायण—**पार्थाय-पृथासुताय परमं रूपं-विश्वरूपं ऐश्वरं दर्शयामास-दर्शितवान्**—पार्थाला म्ह० पृथेच्या-कुंतीच्या पुत्राला परमरूप ऐश्वर-ईश्वरसंबंधी विश्वरूप दाखविता झाला. ९

अनेकवक्त्रनयनमनेकाद्भुतदर्शनम् ।
अनेकदिव्याभरणं दिव्यानेकोद्यतायुधम् ॥ १० ॥
दिव्यमाल्याम्बरधरं दिव्यगन्धानुलेपनम् ।
सर्वाश्चर्यमयं देवमनन्तं विश्वतोमुखम् ॥ ११ ॥

**अन्वयार्थ—'अनेकवक्त्रनयनं'**—अनेक मुखें व नेत्र ज्याला आहेत असें विश्वरूप,—**अनेकाद्भुतदर्शनं**—ज्यांत अनेक विस्मयकारक दर्शनें आहेत असे—**अनेकदिव्याभरणं**—ज्यांत अनेक दिव्य आभरणे आहेत असें,—**दिव्यानेकोद्यतायुधम्**—ज्यांत अनेक दिव्य आयुधें उचललेलीं आहेत,—**दिव्यमाल्याम्बरधरम्**—दिव्यपुष्पें व वस्त्रे धारण करणारें,—**दिव्यगंधानुलेपनम्**—दिव्य गंधाचें ज्याला अनुलेपन केलें आहे,—**सर्वाश्चर्यमयं**—सर्व आश्चर्यमय—**देवं**—प्रकाशमय,—**अनन्तं**—अन्तरहित—**विश्वतोमुखं**—व सर्वतोमुख असे विश्वरूप भगवानानें त्याला दाखविलें. १०, ११.

**अनेकेति । अनेकवक्त्रनयनं अनेकानि वक्त्राणि नयनानि च यस्मिन्रूपे तदनेकवक्त्रनयनम्, अनेकाद्भुतदर्शनमनेकान्यद्भुतानि विस्मापकानि दर्शनानि यस्मिन्रूपे तदनेकाद्भुतदर्शनं तथाऽनेकदिव्याभरणमनेकानि दिव्यान्याभरणानि यस्मिंस्तदनेकादिव्याभरणं तथा दिव्यानेकोद्यतायुधं दिव्यान्यनेकान्युद्यतान्यायुधानि यस्मिंस्तद्दिव्यानेकोद्यतायुधं दर्शयामासेति पूर्वेण संबन्धः ॥ १० ॥**

**भाष्यार्थ—'अनेक०' इति—**'अनेक०' इत्यादि श्लोकानें त्या रूपाचेच वर्णन संजय करितो—**अनेकवक्त्रनयनं-अनेकानि वक्त्राणि नयनानि च यस्मिन् रूपे तत् अनेकवक्त्रनयनं**—ज्या रूपांत अनेक मुखें व नेत्र आहेत, ते रूप अनेकवक्त्रनयन होय.—**अनेकाद्भुतदर्शनं-अनेकानि अद्भुतानि विस्मापकानि-दर्शनानि यस्मिन् रूपे तत् अनेकाद्भुतदर्शनं**—ज्या रूपांत अनेक अद्भुत-आश्चर्यकारक दर्शनें आहेत, तें अनेक-अद्भुत दर्शन होय.—**तथा अनेकदिव्याभरणं-अनेकानि दिव्यानि आभरणानि यस्मिन् तत् अनेकदिव्याभरणं**—तशीच ज्या रूपांत अनेक दिव्य हार-केयूरादि भूषणे आहेत तें अनेक दिव्याभरण रूप होय.

**—तथा दिव्यानेकोद्यतायुधं-दिव्यानि अनेकानि उद्यतानि आयुधानि यस्मिन् तत् दिव्यानेकोद्यतायुधं दर्शयामास इति पूर्वेण संबन्धः**—त्याचप्रमाणें ज्या रूपांत दिव्य अनेक आयुधें वर उचललेलीं आहेत, असें तें दिव्यानेकोद्यतायुध रूप पार्थाला दाखविलें, असा मागील श्लोकांतील क्रियापदाशीं संबंध. १०.

**किंच—दिव्यमाल्याम्बरधरं दिव्यानि माल्यानि पुष्पाण्यम्बराणि वस्त्राणि च ध्रियन्ते येनेश्वरेण तं दिव्यमाल्याम्बरधरं दिव्यगन्धानुलेपनं दिव्यं गन्धानुलेपनं यस्य तं दिव्यगन्धानुलेपनं सर्वाश्चर्यमयं सर्वाश्चर्यप्रायं देवमनन्तं नास्यान्तोऽस्तीत्यनन्तस्तं विश्वतोमुखं सर्वतोमुखं सर्वभूतात्मत्वात्तं दर्शयामासार्जुनो ददर्शेति वाऽध्याह्रियते ॥ ११ ॥**

**भाष्यार्थ—किंच दिव्यमाल्याम्बरधरं-दिव्यानि माल्यानि-पुष्पाणि अम्बराणि-वस्त्राणि च ध्रियन्ते येन ईश्वरेण तं दिव्यमाल्याम्बरधरं**—तसेंच दिव्य-अलौकिक माल्यें-पुष्पे-माळा व वस्त्रें ज्या ईश्वराकडून धारण केलीं जातात त्या दिव्यमाल्यांबर धारण करणाराला—**दिव्यगन्धानुलेपनं-दिव्यं गन्धानुलेपनं यस्य तं दिव्यगन्धानुलेपनं**—ज्याचे गन्धानुलेपन-अंगाला लावलेली उटी दिव्य आहे त्या दिव्यगन्धानुलेपनयुक्त ईश्वराला—**सर्वाश्चर्यमयं-सर्वाश्चर्यप्रायं देवं**—सर्वाश्चर्यमय-प्रायः सर्वच आश्चर्यांने युक्त अशा देवाला—**अनन्तं-न अस्य अन्तः अस्ति इति अनन्तः तं**—याचा अन्त नाहीं म्हणून अनन्त, अशा त्या अनन्ताला—**विश्वतोमुखं-सर्वभूतात्मत्वात् सर्वतोमुखं**—विश्वतोमुख म्ह० सर्वभूतांचा आत्मा असल्यामुळे सर्वतोमुख, त्या सर्वतोमुखाला—**तं दर्शयामास, वा अर्जुनः ददर्श इति अध्याह्रियते**—अशा त्या देवाला भगवान् दाखविता झाला किंवा अर्जुन त्याला पहाता झाला, असा अध्याहार केला जातो. ११.

दिवि सूर्यसहस्रस्य भवेद्युगपदुत्थिता ।
यदि भाः सदृशी सा स्याद्भासस्तस्य महात्मनः १२

**अन्वयार्थ—यदि**—जर—**दिवि** — द्युलोकांत-आकाशांत — **सूर्यसहस्रस्य भाः**—सहस्र सूर्यांची प्रभा—**युगपत्**—एकाच वेळीं—**उत्थिता भवेत्**—उत्थित-उत्पन्न होईल तर—**सा**—ती प्रभा—**तस्य महात्मनः**—त्या महात्म्याच्या—**भासः सदृशी**—प्रभेच्या सारखी—**स्यात्**—होईल. १२.

**या पुनर्भगवतो विश्वरूपस्य भास्तस्या उपमोच्यते—दिव्यन्तरिक्षे तृतीयस्यां वा दिवि सूर्याणां सहस्रं सूर्यसहस्रं तस्य युगपदुत्थितस्य या युगपदुत्थिता भाः सा यदि सदृशी स्यात्तस्य महात्मनो विश्वरूपस्यैव भासो यदि वा न स्यात्ततोऽपि विश्वरूपस्यैव भा अतिरिच्यत इत्यभिप्रायः ॥ १२ ॥**

**भाष्यार्थ—या पुनः विश्वरूपस्य भगवतः भाः तस्याः उपमा उच्यते**—पण जी त्या विश्वरूप भगवानाची कांति-तेज त्या कान्तीची उपमा ' दिवि० ' या

श्लोकानें सांगितली जाते—**दिवि-अन्तरिक्षे वा तृतीयस्यां दिवि**—द्युलोकांत म्ह० अन्तरिक्षांत किंवा तिसऱ्या स्वर्गलोकांत—**सूर्याणां सहस्रं सूर्यसहस्रं तस्य युगपदुत्थितस्य या युगपत् उत्थिता भाः**—सूर्यांचें जें सहस्र तें सूर्यसहस्र, त्या एकाच वेळीं उदय पावलेल्या सूर्यसहस्राची-सहस्र सूर्यांच्या समूहाची जी एकाच वेळीं उदय पावलेली कांति-तेज-प्रकाश—**सा यदि स्यात्**—ती तसली कांति जर कदाचित् संभवलीच तर ती—**तस्य महात्मनः विश्वरूपस्य भासः सदृशी स्यात्**—त्या महात्म्या विश्वरूपाच्या कांतीसारखी-त्याच्या कांतीच्या बरोबरीची-तुल्य कदाचित् झालीच तर होईल !—**यदि वा न स्यात्**—किंवा तीहि त्याच्या बरोबरीची होणार नाहींच !—**ततः अपि विश्वरूपस्य एव भाः अतिरिच्यते इति अभिप्रायः**—त्या सहस्रसूर्यांच्या कांतीहूनहि विश्वरूपाचीच कांति अधिक आहे. असा याचा आशय. १२.

**तत्रैकस्थं जगत्कृत्स्नं प्रविभक्तमनेकधा ।**
**अपश्यद्देवदेवस्य शरीरे पाण्डवस्तदा ॥ १३ ॥**

**अन्वयार्थ—तदा**—त्या वेळीं—**पांडवः**—अर्जुन—**तत्र देवदेवस्य शरीरे**—त्या देवाधिदेवाच्या शरीरांत—**एकस्थं**—एकाच अवयवांत स्थित असलेलें—**कृत्स्नं जगत्**—सर्व जगत्—**अनेकधा**—अनके प्रकारें—**प्रविभक्तं**—अत्यंत विभागलेलें—**अपश्यत्**—पाहता झाला. १३.

**किंच—तत्र तस्मिन्विश्वरूप एकस्मिन्स्थितमेकस्थं जगत्कृत्स्नं प्रविभक्तमनेकधा देवपितृमनुष्यादिभेदैरपश्यद्दृष्टवान्देवदेवस्य हरेः शरीरे पाण्डवोऽर्जुनस्तदा ॥ १३ ॥**

**भाष्यार्थ—किंच**—अर्जुनानें एवढेंच त्या विश्वरूपांत पाहिलें असें नाहीं तर सर्व जगत् एकत्र अवस्थित असलेलें त्याने अवलोकन केलें असें 'तत्र०' या श्लोकानें सांगतात.—**तत्र-तस्मिन् विश्वरूपे-एकस्मिन् स्थितं-एकस्थं**—त्या विश्वरूपांत एकत्र स्थित असलेलें म्हणून एकस्थ असे—**देव-पितृ-मनुष्यादिभेदैः अनेकधा प्रविभक्तं कृत्स्नं जगत् देवदेवस्य हरेः शरीरे पांडवः-अर्जुनः तदा अपश्यत्-दृष्टवान्**—देव, पितर, मनुष्य इत्यादि भेदांनीं अनेक प्रकारें अत्यंत विभक्त झालेलें समस्त जगत् देवाधिदेव जो हरि त्याच्या शरीरांत पांडव-अर्जुन त्यावेळीं पाहता झाला. [ भगवानाचें विश्वरूप पाहण्याच्या वेळीं अर्जुनानें त्यांत सर्व जगत् पाहिलें. ] १३

**ततः स विस्मयाविष्टो हृष्टरोमा धनंजयः ।**
**प्रणम्य शिरसा देवं कृताञ्जलिरभाषत ॥ १४ ॥**

**अन्वयार्थ—ततः**—त्यानंतर—**सः धनंजयः**—तो अर्जुन—**विस्मयाविष्टः**—विस्मयानें युक्त व—**हृष्टरोमा**—ज्याच्या अंगावर रोमांच उभे राहिले आहेत,

असा होऊन—**शिरसा**—मस्तकानें—**देवं**—देवाला—**प्रणम्य**—प्रणाम करून—**कृताञ्जलिः**—ज्यानें आपले हात जोडले आहेत असा तो—**अभाषत**—त्याला बोलला.

**तत इति । ततस्तं दृष्ट्वा स विस्मयेनाऽऽविष्टो विस्मयाविष्टो हृष्टानि रोमाणि यस्य सोऽयं हृष्टरोमा चाभवद्धनंजयः प्रणम्य प्रकर्षेण नमनं कृत्वा प्रह्वीभूतः सञ्शिरसा देवं विश्वरूपधरं कृताञ्जलिर्नमस्कारार्थं संपुटीकृतहस्तः सन्नभाषतोक्तवान् ॥ १४ ॥**

**भाष्यार्थ—'ततः०'इति**—विश्वरूप धारण करणाऱ्या भगवानांचें स्वरूप व त्यांच्या त्या स्वरूपांत एकीभूत झालेले जगत्, यांस पाहून अर्जुनानें काय केलें तें 'ततः०' या श्लोकाने संजय सांगतो—**ततः तं दृष्ट्वा सः धनंजयः विस्मयेन आविष्टः-विस्मयाविष्टः च हृष्टानि रोमाणि यस्य सः अयं हृष्टरोमा अभवत्**—त्यानंतर त्याला पाहून तो धनंजय विस्मयाने आविष्ट-विस्मयाविष्ट व ज्याचे रोम हृष्ट झाले आहेत तो हा हृष्टरोमा झाला. [ अर्जुन भगवानांचें ते विश्वरूप पाहून आश्चर्यचकित झाला व त्याच्या अंगावर रोमांच उठले]—**विश्वरूपधरं देवं शिरसा प्रणम्य-प्रकर्षेण नमनं कृत्वा प्रह्वीभूतः सन् कृताञ्जलिः-नमस्कारार्थं संपुटीकृतहस्तः सन् अभाषत-उक्तवान्**—विश्वरूप धारण करणाऱ्या देवाला मस्तकाने प्रणाम करून-साष्टांग नमस्कार करून नम्र होत्साता, कृतांजलि म्ह० नमस्कारासाठी दोन्ही हात संपुटाकार जुळवून बोलला-हांत जोडून असें बोलला. १४.

**अर्जुन उवाच**—अर्जुन म्हणाला—

## पश्यामि देवांस्तव देव देहे सर्वांस्तथा भूतविशेषसंघान् ।
## ब्रह्माणमीशं कमलासनस्थमृषींश्च सर्वानुरगांश्च दिव्यान् ॥

**अन्वयार्थ—देव**—हे श्रीकृष्णा ! —**(अहं)**—मी—**तव देहे**—तुझ्या देहांत **सर्वान् देवान्**—सर्व देवांना—**तथा**—त्याचप्रमाणे—**भूतविशेषसंघान्**—निरनिराळ्या जातींच्या स्थावर-जंगम प्राण्यांच्या समूहांस—**पश्यामि**—पाहतो—**ईशं कमलासनस्थं ब्रह्माणं**—सर्व प्रजाचे नियमन करणारा, पृथ्वीकमलाच्या मेरुकर्णिकेंत स्थित असलेला जो चतुर्मुख ब्रह्मदेव त्याला,—**च**—व—**सर्वान् ऋषीन्**—सर्व ऋषींना—**च**—आणि—**दिव्यान् उरगान्**—दिव्य सर्पांना मी पहातो. १५.

**कथं यत्त्वया दर्शितं विश्वरूपं तदहं पश्यामीति स्वानुभवमाविष्कुर्वन्-पश्याम्युपलभे हे देव तव देहे देवान्सर्वांस्तथा भूतविशेषसंघान्भूतविशेषाणां स्थावरजङ्गमानां नानासंस्थानविशेषाणां संघा भूतविशेषसंघास्तान् । किंच ब्रह्माणं चतुर्मुखमीशमीशितारं प्रजानां कमलासनस्थं पृथिवीपद्ममध्ये मेरुकर्णिकासनस्थमित्यर्थः । ऋषींश्च वसिष्ठादीन् सर्वानुरगांश्च वासुकिप्रभृतीन्दिव्यान्दिवि भवान् ॥ १५ ॥**

**भाष्यार्थ—कथं**—भगवानांना अर्जुन कसें काय बोलला?—**त्वया यत् विश्वरूपं दर्शितं तत् अहं पश्यामि इति स्वानुभवं आविष्कुर्वन् (अर्जुन उवाच-)**—

तूं जें विश्वरूप दाखविलेंस तें मी पहात आहे, असा स्वतःचा अनुभव प्रकट करीत अर्जुन म्हणाला—**हे देव तव देहे सर्वान् देवान् तथा भूतविशेषसंघान्-भूतविशेषाणां नानासंस्थानविशेषाणां स्थावरजंगमानां संघाः भूतविशेषसंघाः तान् पश्यामि-उपलभे**—हे देव, तुझ्या देहांत सर्व देवांना त्याचप्रमाणें भूतविशेषसंघांना-नानाप्रकारच्या भूतांच्या-अनेक जातींच्या आकारांनीं युक्त असलेल्या स्थावरजंगमाच्या समुदायांस मी पाहतों. मी त्याचा अनुभव घेत आहें.—**किंच ब्रह्माणं-चतुर्मुखं ईशं-प्रजानां ईशितारं कमलासनस्थं-पृथिवीपद्ममध्ये मेरुकर्णिकासनस्थं इत्यर्थः**—तसेंच, ब्रह्मदेवाला म्ह० चतुर्मुखाला की जो चतुर्मुख ईश-प्रजांचा ईशिता-नियमन करणारा व कमलासनस्थ आहे म्ह० पृथिवीरूपी कमलांतील मेरुरूपी कर्णिका, याच आसनावर बसलेला आहे, असा भावार्थ-अशा प्रजेश कमलासनस्थ चतुर्मुखाला पाहतों.—**च वसिष्ठादीन् सर्वान् ऋषीन् च वासुकिप्रभृतीन् दिव्यान्-दिवि भवान् उरगान् पश्यामि**—आणि वसिष्ठादि सर्व ऋषींना, वासुकिप्रभृति देवलोकांतील सर्व सर्पांस मी तुझ्या शरीरांत पहातों. १५.

# अनेकबाहूदरवक्त्रनेत्रं पश्यामि त्वां सर्वतोऽनन्तरूपम् ।
# नान्तं न मध्यं न पुनस्तवादिं पश्यामि विश्वेश्वर विश्वरूप ॥

**अन्वयार्थ—विश्वेश्वर विश्वरूप**—हे विश्वेश्वरा ! हे विश्वरूप कृष्णा ! —**( अहं )**—मी—**त्वां**—तुला—**अनेकबाहूदरवक्त्रनेत्रं**—अनेक हात, उदरें, तोंडें व नेत्र यांनीं युक्त असलेला—**सर्वतः अनन्तरूपं**—सर्व बाजूंनीं अनन्तरूपांनी युक्त असलेला असा—**पश्यामि**—पाहतों—**(अहं)**—मी—**तव**—तुझा—**आदिं**—आरंभ—**न पश्यामि**—पहात नाहीं,—**मध्यं न (पश्यामि)**—मध्य पहात नाहीं—**पुनः**—आणि पुनः—**अन्तं**—तुझा अंत पहात नाहीं. १६.

**अनेकबाहूदरवक्त्रनेत्रमनेके बाहव उदराणि वक्त्राणि नेत्राणि च यस्य तव स त्वमनेकबाहूदरवक्त्रनेत्रस्तमनेकबाहूदरवक्त्रनेत्रं पश्यामि त्वा त्वां सर्वतः सर्वत्रानन्तरूपमनन्तानि रूपाण्यस्येत्यनन्तरूपस्तमनन्तरूपं नान्तमन्तोऽवसानं न मध्यं मध्यं नाम द्वयोः कोट्योरन्तरं न पुनस्तवाऽऽदिं तव देवस्य नान्तं पश्यामि न मध्यं पश्यामि न पुनरादिं पश्यामि हे विश्वेश्वर हे विश्वरूप ॥ १६ ॥**

**भाष्यार्थ—अनेकबाहूदरवक्त्रनेत्रं-अनेके बाहवः उदराणि वक्त्राणि नेत्राणि च यस्य तव सः त्वं अनेकबाहूदरवक्त्रनेत्रः तं त्वा-अनेकबाहूदरवक्त्रनेत्रं त्वां पश्यामि**—अनेक बाहू, उदरें, मुखें व नेत्र ज्या तुला आहेत, तो तूं अनेकबाहूदरवक्त्रनेत्र आहेस, त्या तुज अनेक बाहूदरवक्त्रनेत्राला मी पाहतों. (त्याचेंच विशेषण-)—**सर्वतः-सर्वत्र अनन्तरूपं-अनन्तानि रूपाणि अस्य इति अनन्तरूपः तं अनन्तरूपं**—सर्व ठिकाणीं अनन्तरूप-ज्याचीं रूपें सर्वत्र अनन्त-अन्तरहित आहेत त्या तुज सर्वतः अनन्तरूपाला मी पहातों.—**न अन्तं-अन्तः-अवसानं न**

**मध्यं-मध्यं नाम द्वयोः कोट्योः अन्तरं न पुनः तव आदिं**—तुझा अन्त नाहीं. अन्त म्ह० समाप्ति. मध्य नाहीं, मध्य म्ह० दोन टोकांतील अन्तर-मध्यभाग व तसाच तुझा आदि म्ह० मूल-आरंभ नाहीं.—**हे विश्वेश्वर हे विश्वरूप तव देवस्य अन्तं न पश्यामि मध्यं न पश्यामि न पुनः आदिं पश्यामि**—हे विश्वेश्वरा, हे विश्वरूपा! तुज देवाचा अन्त-समाप्ति मी पहात नाहीं. तुझें स्वरूप कोठें संपलें आहे तें कळत नाहीं, तुझा मध्य मला दिसत नाहीं व तुझा आरंभ कोठून झाला आहे, तेंहि दिसत नाहीं. १६.

## किरीटिनं गदिनं चक्रिणं च तेजोराशिं सर्वतो दीप्तिमन्तम्।
## पश्यामि त्वां दुर्निरीक्ष्यं समन्ताद्दीप्तानलार्कद्युतिमप्रमेयम् ॥

**अन्वयार्थ**—( **अहं** )—मी—**त्वां**—तुला—**किरीटिनं**—ज्याच्या मस्तकावर किरीट आहे असा,—**गदिनं**—ज्याच्या हातात गदा आहे असा,—**च**—व—**चक्रिणं**—ज्याच्या हातांत चक्र आहे, असा—**तेजोराशिं**—तेजःपुंज,—**सर्वतः दीप्तिमन्तं**—सर्व बाजूंनीं दीप्तिमान्-प्रकाशवान्, त्यामुळे—**दुर्निरीक्ष्यं समन्तात्**—सर्व बाजूंनीं ज्याच्याकडे पाहतां येत नाहीं असा—**दीप्तानलार्कद्युतिं**—प्रदीप्त अग्नि व सूर्य यांप्रमाणें ज्याची द्युति म्ह० कांति आहे असा व—**अप्रमेयम्**—कोणत्याहि प्रमाणाचा विषय न होणारा, असा—**पश्यामि**—पाहतो. १७.

**किंच—किरीटिनं किरीटं नाम शिरोभूषणविशेषस्तद्यस्यास्ति स किरीटी तं किरीटिनं तथा गदिनं गदा यस्य विद्यत इति गदी तं गदिनं तथा चक्रिणं चक्रमस्यास्तीति चक्री तं चक्रिणं च तेजोराशिं तेजःपुञ्जं सर्वतोदीप्तिमन्तं सर्वतो दीप्तिर्यस्यास्ति स सर्वतोदीप्तिमांस्तं सर्वतोदीप्तिमन्तं पश्यामि त्वां दुर्निरीक्ष्यं दुःखेन निरीक्ष्यो दुर्निरीक्ष्यस्तं दुर्निरीक्ष्यं समन्तात्समन्ततः सर्वत्र दीप्तानलार्कद्युतिमनलश्चार्कश्चानलार्कौ दीप्तावनलार्कौ दीप्तानलार्कौ तयोर्दीप्तानलार्कयोर्द्युतिरिव द्युतिस्तेजो यस्य तव स त्वं दीप्तानलार्कद्युतिस्तं त्वां दीप्तानलार्कद्युतिम्। अप्रमेयं न प्रमेयमप्रमेयमशक्यपरिच्छेदमित्यर्थः॥**

**भाष्यार्थ—किंच**—'किरीटिनं०' या श्लोकानें अर्जुन विश्वरूपधर भगवानांचेंच आणखी निराळ्या प्रकारें वर्णन करितो—**किरीटिनं किरीटं नाम शिरोभूषणविशेषः तत् यस्य अस्ति सः किरीटी तं किरीटिनं**—किरीट म्ह० एकप्रकारचें शिरोभूषण-मुकुट, ते ज्याला असतें तो किरीटी, त्या किरीटीला—**तथा गदिनं-गदा यस्य विद्यते इति गदी तं गदिनं**—त्याचप्रमाणें गदा ज्याला आहे तो गदी, त्या गदावानाला—**तथा चक्रिणं-चक्रं अस्य अस्ति इति चक्री तं चक्रिणं**—तसेंच ज्याला चक्र असतें तो चक्री-त्या चक्रयुक्ताला—**तेजोराशिं-तेजःपुंजं**—तेजाच्या राशीला-तेजःपुंजाला—**सर्वतोदीप्तिमन्तं-सर्वतः दीप्तिः यस्य अस्ति सः सर्वतो-दीप्तिमान् तं सर्वतोदीप्तिमन्तं त्वां पश्यामि**—ज्याची दीप्ति सर्वतः-सर्व दिशांमध्ये पसरली आहे

तो सर्वतोदीप्तिमान् होय; त्या तुज सर्वतोदीप्तिमानाला मी पाहतों—**दुर्निरीक्ष्यं-दुःखेन निरीक्ष्यः दुर्निरीक्ष्यः तं समन्तात्-समन्ततः-सर्वत्र दुर्निरीक्ष्यं**—दुःखानें -मोठ्या कष्टानेच जो निरीक्षण करितां येण्याजोगा आहे तो दुर्निरीक्ष्य होय. त्या समन्ततः-सर्व बाजूंनीं-सर्वत्र दुर्निरीक्ष्य असलेल्या तुला मी पहात आहें—**दीप्तानलार्कद्युति-अनलः च अर्कः च अनलार्कौ दीप्तौ अनलार्कौ-दीप्तानलार्कौ तयोः दीप्तानलार्कयोः द्युतिः इव द्युतिः-तेजः यस्य तव सः त्वं दीप्तानलार्कद्युतिः तं त्वां दीप्तानलार्कद्युतिं**—अग्नि व सूर्य-मिळून अग्निसूर्य-अनलार्क, प्रदीप्त असे जे अग्नि-सूर्य तेच दीप्तानलार्क, त्या दीप्त अनल-अर्कांच्या द्युतीसारखें-तेजासारखें ज्या तुझें तेज आहे तो तूं दीप्तानलार्कद्युति आहेस, त्या तुज दीप्तनलार्कद्युतीला—**अप्रमेयं-न प्रमेयं अप्रमेयं-अशक्यपरिच्छेदं इत्यर्थः**—अप्रमेयाला-जो प्रमेय -प्रमाणाचा विषय होत नाहीं तो अप्रमेय होय, ज्याच्या स्वरूपाचा परिच्छेद-प्रमाणपूर्वक निश्चय करितां येत नाहीं तो अप्रमेय होय, त्याला असा भावार्थ [ या सर्व विशेषणांनीं विशिष्ट असलेल्या तुला मी पहातों. ] १७

**त्वमक्षरं परमं वेदितव्यं त्वमस्य विश्वस्य परं निधानम् ।**
**त्वमव्ययः शाश्वतधर्मगोप्ता सनातनस्त्वं पुरुषो मतो मे ॥१८॥**

**अन्वयार्थ**—**त्वं**—तूं—**परमं अक्षरं**—परब्रह्म आहेस असें—**वेदितव्यं**—जाणावें.—**त्वं**—तूं—**अस्य विश्वस्य** –या जगाचें—**परं निधानं**—परम आश्रय-स्थान आहेस.—**त्वं**—तूं—**अव्ययः**—क्षय न पावणारा आहेस.—**शाश्वतधर्मगोप्ता**—शाश्वत धर्माचें रक्षण करणारा आहेस.—**त्वं**—तूं—**सनातनः पुरुषः**—चिरंतन पुरुष आहेस, असा तूं—**मे**—मला—**मतः**—मान्य झालेला आहेस. १८.

**इत एव ते योगशक्तिदर्शनादनुमिनोमि—त्वमक्षरं न क्षरतीति परमं ब्रह्म वेदितव्यं ज्ञातव्यं मुमुक्षुभिस्त्वमस्य विश्वस्य समस्तस्य जगतः परं प्रकृष्टं निधानं निधीयतेऽस्मिन्निति निधानं पर आश्रय इत्यर्थः । किंच त्वमव्ययो न तव व्ययो विद्यत इत्यव्ययः शाश्वतधर्मगोप्ता शश्वद्भवः शाश्वतो नित्यो धर्मस्तस्य गोप्ता शाश्वतधर्मगोप्ता सनातनश्चिरंतनस्त्वं पुरुषः परो मतोऽभिप्रेतो मे मम ॥ १८ ॥**

**भाष्यार्थ**—**इतः एव ते योगशक्तिदर्शनात् अनुमिनोमि**—या योगशक्तिदर्शनावरून तुझ्या निरुपाधिक स्वरूपाचें मी अनुमान करितों, असें अर्जुन म्हणतो—**मुमुक्षुभिः त्वं अक्षरं-न क्षरति इति-परमं ब्रह्म वेदितव्यं-ज्ञातव्यं**—मुमुक्षूंनीं तूं परम अक्षर-क्षरण होत नाहीं म्हणून अक्षर परब्रह्म आहेस, असें जाणावें—**त्वं अस्य विश्वस्य-समस्तस्य जगतः परं-प्रकृष्टं निधानं -निधीयते अस्मिन् इति निधानं-परः आश्रयः इत्यर्थः**—तूं या विश्वाचें-समस्त जगाचें सर्वोत्तम निधान आहेस. ज्यांत जगत् ठेवलें जातें तें,

निधान म्ह० परम आश्रय-सर्व जगाचा सर्वोत्तम आधार असा याचा भावार्थ—**किंच त्वं अव्ययः-तव व्ययः न विद्यते इति अव्ययः**—तसेंच, तूं अव्यय आहेस तुझा व्यय होत नाहीं, म्हणून अव्यय.—**शाश्वतधर्मगोप्ता-शश्वत् भवः शाश्वतः नित्यः धर्मः तस्य गोप्ता-शाश्वतधर्मगोप्ता**—शाश्वत धर्माचा रक्षक-जो सतत असणारा तो शाश्वत, म्ह० नित्य धर्म, त्याचा रक्षक-शाश्वतधर्मरक्षक—**त्वं सनातनः चिरंतनः परः पुरुषः मे-मम मतः-अभिप्रेतः**—तूं सनातन-चिरंतन-नित्य परम पुरुष म्हणून मला अभिमत आहेस. १८.

**अनादिमध्यान्तमनन्तवीर्यमनन्तबाहुं शशिसूर्यनेत्रम् ।**
**पश्यामि त्वां दीप्तहुताशवक्त्रं स्वतेजसा विश्वमिदं तपन्तम् १९**

**अन्वयार्थ—त्वां**—तुला मी—**अनादिमध्यान्तं**—आदि-मध्य-अन्तरहित,—**अनन्तवीर्यं**—ज्याचे वीर्य अन्तरहित-अनन्त आहे,—**अनन्तबाहुं**—ज्याचे बाहु अनन्त आहेत,—**शशि-सूर्यनेत्रं**—चंद्र व सूर्य हे ज्याचे नेत्र आहेत,—**दीप्तहुताशवक्त्रं**—प्रदीप्त अग्नि हेंच ज्याचें मुख आहे, व—**स्वतेजसा इदं विश्वं**—आपल्या तेजाने या विश्वाला—**तपन्तं**—ताप देणारा, असा—**पश्यामि**—पाहतों. १९.

**किंच—अनादिमध्यान्तमादिश्च मध्यं चान्तश्च न विद्यते यस्य सोऽयमनादिमध्यान्तस्तं त्वामनादिमध्यान्तमनन्तवीर्यं न तव वीर्यस्यान्तोऽस्तीत्यनन्तवीर्यस्तं त्वामनन्तवीर्यं तथाऽनन्तबाहुमनन्ता बाहवो यस्य तव स त्वमनन्तबाहुस्तं त्वामनन्तबाहुं शशिसूर्यनेत्रं शशिसूर्यौ नेत्रे यस्य तव स त्वं शशिसूर्यनेत्रस्तं त्वां शशिसूर्यनेत्रं चंद्रादित्यनयनं पश्यामि त्वां दीप्तहुताशवक्त्रं दीप्तश्चासौ हुताशश्च स वक्त्रं यस्य तव स त्वं दीप्तहुताशवक्त्रस्तं त्वां दीप्तहुताशवक्त्रं स्वतेजसा विश्वमिदं तपन्तं तापयन्तम् १९**

**भाष्यार्थ—किंच**—भगवानांचें विश्वरूपसंज्ञक रूपाचेच पुनः 'अनादि०' या श्लोकानें वर्णन करितात—**अनादिमध्यान्तं-आदिः च मध्यं च अन्तः च न विद्यते यस्य सः अयं अनादिमध्यान्तः तं त्वां अनादिमध्यान्तं**—'अनादिमध्यान्त' आदि व मध्य व अन्त ज्याला नाहींत तो हा अनादिमध्यान्त, त्या तुला अनादिमध्यान्ताला—**अनन्तवीर्यं-न तव वीर्यस्य अन्तः अस्ति इति अनन्तवीर्यः तं त्वां अनन्तवीर्यं**—'अनन्तवीर्य' तुझ्या वीर्याचा अन्त नाहीं, म्हणून अनन्तवीर्य, त्या तुज अनन्तवीर्याला—**तथा अनन्तबाहुं-अनन्ताः बाहवः यस्य तव सः त्वं अनन्तबाहुः तं त्वां अनन्तबाहुं**—त्याचप्रमाणे अनन्तबाहु ज्या तुला आहेत, तो तूं अनन्त बाहु त्या तुज अनन्त बाहूला—**शशिसूर्यनेत्रं-शशिसूर्यौ नेत्रे यस्य तव स त्वं शशिसूर्यनेत्रः तं त्वां शशिसूर्यनेत्रं**—चंद्र सूर्य ज्या तुझे नेत्र आहेत, तो तूं शशिसूर्यनेत्र आहेस—**चन्द्रादित्यनयनं त्वां पश्यामि**—चंद्र व आदित्य यांच नयनांनीं युक्त असलेल्या तुला मी पाहतों.—**दीप्तहुताशवक्त्रं**

**-दीप्तः च असौ हुताशः च सः-वक्त्रं यस्य तव सः त्वं दीप्तहुताशवक्त्रः तं त्वां दीप्तहुताशवक्त्रं**—दीप्त असा जो हुताश-अग्नि तो दीप्त हुताश-प्रदीप्त अग्नि, तोच ज्या तुझें मुख आहे तो तूं दीप्तहुताशमुख आहेस, त्या तुज दीप्तहुताशमुखाला,—**स्वतेजसा इदं विश्वं तपन्तं-तापयन्तं**—व आपल्या तेजानें या विश्वाला ताप देणाऱ्या अशा तुला मी पाहतों. १९.

**द्यावापृथिव्योरिदमन्तरं हि व्याप्तं त्वयैकेन दिशश्च सर्वाः।**
**दृष्ट्वाऽद्भुतं रूपमुग्रं तवेदं लोकत्रयं प्रव्यथितं महात्मन्२०**

**अन्वयार्थ—त्वया एकेन**—तूं एकट्यानें—**द्यावापृथिव्योः इदं अन्तरं हि**—आकाश व पृथिवी यांच्यामधील हे अंतर—**व्याप्तं**—व्यापिल आहेस—**च**—व—**सर्वाः दिशः**—सर्व दिशा—(**व्याप्ताः**—व्यापिल्या आहेस)—**महात्मन्**—हे महात्म्या! —**तव**—तुझें—**इदं अद्भुतं उग्रं रूपं**—हे अद्भुत उग्र रूप—**दृष्ट्वा**—पाहून —**लोकत्रयं**—त्रिभुवन—**प्रव्यथितं**—अतिशय व्यथित-भयभीत झाले आहे. २०.

**द्यावापृथिव्योरिदमन्तरं ह्यन्तरिक्षं व्याप्तं त्वयैकेन विश्वरूपधरेण दिशश्च सर्वा व्याप्ता दृष्ट्वोपलभ्याद्भुतं विस्मापकं रूपमिदं तवोग्रं क्रूरं लोकानां त्रयं लोकत्रयं प्रव्यथितं भीतं प्रचलितं वा हे महात्मन्नक्षुद्रस्वभाव ॥ २० ॥**

**भाष्यार्थ—द्यावापृथिव्योः इदं अन्तरं हि-अन्तरिक्षं विश्वरूपधरेण त्वया एकेन व्याप्तं**—द्युलोक व पृथिवी यांतील हें अन्तर म्ह० अन्तरिक्ष विश्वरूप धारण करणाऱ्या अशा तुझ्या एकट्याकडूनच व्यापिले गेले आहे. (या अन्तरिक्षाला तूंच एकट्याने व्यापिले आहेस.)—**च सर्वाः दिशः व्याप्ताः**—आणि तशाच सर्व दिशाहि तूं व्यापिल्या आहेस.—**तव इदं अद्भुतं-विस्मापकं उग्रं-क्रूरं रूपं दृष्ट्वा -उपलभ्य**—तुझे हे अद्भुत म्ह० विस्मय उत्पन्न करणारे उग्र-क्रूर रूप पाहून--त्याचा प्रत्यक्ष अनुभव घेऊन—**हे महात्मन्-अक्षुद्रस्वभाव लोकानां त्रयं लोकत्रयं प्रव्यथितं-भीतं वा प्रचलितं**—हे महात्म्या, ज्याचा स्वभाव क्षुद्र नाहीं, अशा हे देवा, हे लोकांचें त्रय म्ह० त्रैलोक्य भ्याले आहे किंवा हें त्रिभुवन प्रचलित झाले आहे. स्वस्थानापासून ढळले आहे. कांपूं लागलें आहे. २०

**अमी हि त्वां सुरसंघा विशन्ति**
**केचिद्भीताः प्राञ्जलयो गृणन्ति ।**
**स्वस्तीत्युक्त्वा महर्षिसिद्धसंघाः**
**स्तुवन्ति त्वां स्तुतिभिः पुष्कलाभिः ॥ २१ ॥**

**अन्वयार्थ—अमी हि सुरसंघाः**—हे भूलोकीं अवतीर्ण झालेले देवांचे संघ—**त्वां**—तुला-तुझ्यामध्यें—**विशन्ति**—प्रवेश करीत आहेत.—**केचित् भीताः**—

त्यांतील कांहीं भ्यालेले—**प्राञ्जलयः**—हात जोडलेले असे होऊन-हात जोडून—**गृणन्ति**—तुझी स्तुति करितात.—**महर्षिसिद्धसंघाः**—मोठमोठे ऋषि व सिद्ध यांचे संघ—**स्वस्ति इति उक्त्वा**—स्वस्ति असो, असे बोलून—**त्वां**—तुला—**पुष्कलाभिः स्तुतिभिः**—पुष्कळ स्तुतींनीं—**स्तुवन्ति**—स्तवित आहेत. २१.

**अथाधुना पुरा यद्वा जयेम यदि वा नो जयेयुरित्यर्जुनस्य संशय आसीत्तन्निर्णयाय पाण्डवजयमैकान्तिकं दर्शयामीति प्रवृत्तो भगवांस्तं पश्यन्नाह, किंच अमी हि युध्यमाना योद्धारस्त्वा त्वां सुरसंघा येऽत्र भूभारावतारायावतीर्णा वस्वादिदेवसंघा मनुष्यसंस्थानास्त्वां विशन्ति प्रविशन्तो दृश्यन्ते । तत्र केचिद्भीताः प्राञ्जलयः सन्तो गृणन्ति स्तुवन्ति त्वामन्ये पलायनेऽप्यशक्ताः सन्तः । युद्धे प्रत्युपस्थित उत्पातादिनिमित्तान्युपलक्ष्य स्वस्त्यस्तु जगत इत्युक्त्वा महर्षिसिद्धसंघा महर्षीणां सिद्धानां च संघाः स्तुवन्ति त्वां स्तुतिभिः पुष्कलाभिः संपूर्णाभिः ॥ २१ ॥**

**भाष्यार्थ**—('अमी हि०' या श्लोकाचे तात्पर्य भाष्यकार सांगतात-)—**अथ अधुना**—आतां या पुढे—**पुरा 'यद्वा जयेम यदि वा नो जयेयुः' इति अर्जुनस्य संशयः आसीत्**—पूर्वी 'आम्ही त्यांना जिंकूं कीं ते आम्हांला जिंकतील' असा अर्जुनाचा संशय होता—**तन्निर्णयाय पाण्डवजयं ऐकान्तिकं दर्शयामि इति भगवान् प्रवृत्तः**—त्याचा निर्णय करण्यासाठीं पांडवांचा जय निश्चित आहे, असें दाखवावें म्हणून भगवान् तो दाखवावयास प्रवृत्त झाले असतां—**तं पश्यन् आह**—त्याला पाहणारा (अर्जुन) म्हणतो.—**किंच अमी हि युध्यमानाः-योद्धारः त्वा-त्वां सुरसंघाः ये अत्र भूभारावताराय अवतीर्णाः वस्वादिदेवसंघाः मनुष्यसंस्थानाः त्वां विशन्ति-प्रविशन्तः दृश्यन्ते**—तसेच हे युद्ध करणारे योद्धे-देवसंघ-जे येथे भूमीचा भार कमी करण्यासाठीं अवतीर्ण झालेले मनुष्याकार वस्वादि देवसंघ, ते तुझ्यामध्यें प्रवेश करीत असलेले दिसतात. [ 'त्वा सुरसंघाः' येथे 'त्वा असुरसंघाः' असाहि पदच्छेद संभवतो. यास्तव तसा पदच्छेद करून भूमिभारभूत दुर्योधनादिक असुरसंघहि तुझ्यामध्यें प्रवेश करीत असलेले दिसतात, असा अर्थ जाणावा. दोन्ही सैन्यात युद्धाच्या इच्छेनें स्थित असलेल्या लोकांतील अवांतर विशेष सांगतात-]—**तत्र केचित् भीताः अन्ये पलायने अपि अशक्ताः सन्तः प्राञ्जलयः सन्तः त्वां गृणन्ति-स्तुवन्ति**—त्यांतील कित्येक भयभीत झालेले दुसरे योद्धे पलायन करण्यासहि असमर्थ होत्साते हात जोडून तुझी स्तुति करितात.—**युद्धे प्रत्युपस्थिते उत्पातादिनिमित्तानि उपलक्ष्य 'स्वस्ति अस्तु जगतः' इति उक्त्वा**—युद्ध उपस्थित झालें असतां उत्पातादि दुर्निमित्ते पाहून 'जगाचे कुशल असो' असें बोलून—**महर्षिसिद्धसंघाः-महर्षीणां सिद्धानां च संघाः त्वां पुष्कलाभिः-संपूर्णाभिः स्तुतिभिः स्तुवन्ति**—महर्षिसिद्धसंघ म्ह० महर्षींचे व सिद्धांचे संघ तुला पुष्कळ म्ह० संपूर्ण स्तुतींनीं स्तवितात. [ युद्ध पाहण्यासाठीं समरभूमीवर आलेल्या नारदादि ऋषींना वगैरे जगाच्या

विनाशाची शंका आल्यामुळें ते जगाचें कुशल असो, असें म्हणून तुम्ही अतिशय स्तुति करीत आहेत. ] २१.

**रुद्रादित्या वसवो ये च साध्या विश्वेऽश्विनौ मरुतश्चोष्मपाश्च**
**गन्धर्वयक्षासुरसिद्धसंघा वीक्षन्ते त्वां विस्मिताश्चैव सर्वे २२**

**अन्वयार्थ—रुद्रादित्याः**—अकरा रुद्र व बारा आदित्य,—**वसवः**—आठ वसु—**ये च साध्याः**—व जे साध्य—**विश्वे**—विश्वेदेव,—**अश्विनौ**—अश्विनीकुमार—**मरुतः**—मरुद्गण—**च**—व—**ऊष्मपाः**—पितर—**च**—व—**गन्धर्वयक्षासुरसिद्धसंघाः**—गंधर्व, यक्ष, असुर व सिद्ध यांचे संघ—**सर्वे**— हे सर्व—**विस्मिताः एव**—विस्मित होऊनच—**त्वां**—तुला—**वीक्षन्ते**—पाहतात. २२.

**किंचान्यत्—रुद्रादित्या वसवो ये च साध्या रुद्रादयो गणा विश्वेऽश्विनौ च देवौ मरुतश्च, ऊष्मपाश्च पितरो गन्धर्वयक्षासुरसिद्धसंघा गन्धर्वा हाहाहूहूप्रभृतयो यक्षाः कुबेरप्रभृतयोऽसुरा विरोचनप्रभृतयः सिद्धाः कपिलादयस्तेषां संघा गन्धर्वयक्षासुरसिद्धसंघास्ते वीक्षन्ते पश्यन्ति त्वा त्वां विस्मिता विस्मयमापन्नाः सन्तस्त एव सर्वे २२**

**भाष्यार्थ—किंच अन्यत्**—दिसणारे भगवद्रूप आश्चर्यकारक असण्याचे आणखी कारण अर्जुन 'रुद्रादित्या०'या श्लोकानें सांगतो—**रुद्रादित्याः वसवः ये च साध्याः रुद्रादयः गणाः विश्वे अश्विनौ च देवौ मरुतः च**—रुद्र, आदित्य, वसु व जे साध्य हे सर्व रुद्रादिक गणदेव, दहा विश्वदेव, अश्विनीकुमारदेव, मरुत्,—**ऊष्मपाः च पितरः**—व ऊष्मपा पितर—**गन्धर्वयक्षासुरसिद्धसंघाः-गन्धर्वाः-हाहाहूहूप्रभृतयः यक्षाः-कुबेरप्रभृतयः असुराः-विरोचनप्रभृतयः सिद्धाः-कपिलादयः तेषां संघाः-गन्धर्वयक्षासुरसिद्धसंघाः**—हाहा, हूहू इत्यादि गंधर्व, कुबेरादिक यक्ष, विरोचनप्रभृति असुर, कपिलादिक सिद्ध यांचे जे संघ ते गन्धर्वयक्षासुरसिद्ध संघ होत.—**ते त्वा-त्वां वीक्षन्ते-पश्यन्ति**—ते तुला पाहतात.—**ते एव सर्वे विस्मिताः-विस्मयं आपन्नाः सन्तः वीक्षन्ते**—तेच रुद्रादिक सर्व विस्मित होत्साते—विस्मयास प्राप्त होऊन तुला पाहतात. २२

**रूपं महत्ते बहुवक्त्रनेत्रं महाबाहो बहुबाहूरुपादम् ।**
**बहूदरं बहुदंष्ट्राकरालं दृष्ट्वा लोकाः प्रव्यथितास्तथाऽहम् २३**

**अन्वयार्थ—महाबाहो**—हे महापराक्रमी कृष्णा !—**ते**—तुझें—**रूपं**—हें रूप—**महत्**—फार मोठें—( **अस्ति**—आहे. )—**बहुवक्त्रनेत्रं**—याला पुष्कळ मुखें व नेत्र आहेत.—**बहुबाहूरुपादं**—पुष्कळ बाहु, मांड्या व पाय आहेत.—**बहूदरं**—याला पुष्कळ उदरें आहेत.—**बहुदंष्ट्राकरालं**—हें अनेक दाढांनीं विकाळ झालें आहे. अशा या रूपाला—**दृष्ट्वा**—पाहून—**लोकाः**—हे सर्व लोक—**प्रव्यथिताः**

—अतिशय व्यथा पावले आहेत—**तथा**—त्याचप्रमाणें—**अहं**—मी—(**प्रव्यथितः**) —अतिशय व्यथित झालों आहें. २३.

**यस्मात्—रूपं महदतिप्रमाणं ते तव बहुवक्त्रनेत्रं बहूनि वक्त्राणि मुखानि नेत्राणि चक्षूंषि च यस्मिंस्तद्रूपं बहुवक्त्रनेत्रं हे महाबाहो बहुबाहूरुपादं बहवो बाहव ऊरवः पादाश्च यस्मिन्रूपे तद्बहुबाहूरुपादं, किंच बहूदरं बहून्युदराणि यस्मिन्निति बहूदरं बहुदंष्ट्राकरालं बह्वीभिर्दंष्ट्राभिः करालं विकृतं तद्बहुदंष्ट्राकरालं दृष्ट्वा रूपमीदृशं लोका लौकिकाः प्राणिनः प्रव्यथिताः प्रचलिता भयेन तथाऽहमपि ॥ २३ ॥**

**भाष्यार्थ**—( 'लोकत्रयं प्रव्यथितं०' श्लो. २० असें जे वर म्हटलें होतें त्याचा 'रूपं महत्ते०' या श्लोकानें अर्जुन उपसंहार करितो-)—**यस्मात् ते-तव रूपं महत्-अतिप्रमाणं**—ज्याअर्थी तुझें रूप महत्-फार मोठें-प्रमाणातीत आहे तसेंच ते—**बहुवक्त्रनेत्रं-बहूनि वक्त्राणि-मुखानि नेत्राणि-चक्षूंषि च यस्मिन् तद्रूपं बहुवक्त्रनेत्रं**—बहुवक्त्रनेत्र आहे. पुष्कळ वक्त्रें म्ह० मुखें व नेत्र म्ह० चक्षु ज्यांत आहेत तें रूप बहुवक्त्रनेत्र होय.—**हे महाबाहो**—हे आजानुबाहो —**बहुबाहूरुपादं -बहवः बाहवः ऊरवः पादाः च यस्मिन् रूपे तत् बहुबाहूरुपादं**—तें रूप बहुबाहूरुपाद आहे. पुष्कळ बाहु, मांड्या व पाय ज्या रूपात आहेत, तें रूप बहुबाहूरुपाद आहे.—**किंच बहूदरं-बहूनि उदराणि यस्मिन् इति बहूदरं**—तसेंच तें बहूदर म्ह० ज्यांत अनेक उदरें-पोटें आहेत तें बहूदर होय,—**बहुदंष्ट्राकरालं-बह्वीभिः दंष्ट्राभिः करालं-विकृतं तत् बहुदंष्ट्राकरालं**—जें अनेक दाढांनीं कराल ह्म० विकृत-विकराल झालेलें तें बहुदंष्ट्राकराल होय.—**ईदृशं रूपं दृष्ट्वा लोकाः -लौकिकाः प्राणिनः प्रव्यथिताः भयेन प्रचलिताः तथा अहं अपि**—अशा प्रकारचें रूप पाहून लोक ह्म० लौकिक प्राणी प्रव्यथित झाले आहेत ह्म०भयानें अतिशय कापूं लागले आहेत. तसाच मीहि भयभीत होऊन थरथर कापूं लागलो आहे. [ज्याअर्थी तुझें रूप असें उग्र आहे, त्याअर्थी तें पाहून हे सर्व प्राणी व मीहि भयानें चळचळ कांपत आहेत. ] २३.

नभःस्पृशं दीप्तमनेकवर्णं
व्यात्ताननं दीप्तविशालनेत्रम् ।
दृष्ट्वा हि त्वां प्रव्यथितान्तरात्मा
धृतिं न विन्दामि शमं च विष्णो ॥२४॥

**अन्वयार्थ—विष्णो**—हे व्यापक देवा! —**नभःस्पृशं**—आकाशाला स्पर्श करणारें—**दीप्तं**—प्रदीप्त झालेलें—**अनेकवर्णं**—ज्यांत नाना प्रकारचे वर्ण-रंग आहेत असें,—**व्यात्ताननं**—ज्यांत उघडलेली-पसरलेलीं तोंडें अनेक आहेत असें—**दीप्त-**

**विशालनेत्रं**—आणि ज्याचे नेत्र दीप्त–प्रदीप्त व विशाल आहेत, अशा भयंकर स्वरू-पानें युक्त असलेल्या—**त्वां**—तुला—**दृष्ट्वा हि**—पाहूनच—**प्रव्यथितान्तरात्मा**—ज्याचा अन्तरात्मा–अन्तःकरण अतिशय पीडित झालें आहे, ज्याचें मन भ्यालें आहे असा मी—**धृतिं**—धैर्याला—**च**—व—**शमं**—मनःसमाधानाला—**न विंदामि**—प्राप्त होत नाहीं. २४.

**तत्रेदं कारणम्—नभःस्पृशं द्युस्पर्शमित्यर्थः, दीप्तं प्रज्वलितमनेकवर्णमनेके वर्णा भयंकरा नानासंस्थाना यस्मिंस्त्वयि तं त्वामनेकवर्णं व्यात्ताननं व्यात्तानि विवृतान्यननानि मुखानि यस्मिंस्त्वयि तं त्वां व्यात्ताननं दीप्तविशालनेत्रं दीप्तानि प्रज्वलितानि विशालानि विस्तीर्णानि नेत्राणि यस्मिंस्त्वयि तं त्वां दीप्तविशालनेत्रं दृष्ट्वा हि त्वां प्रव्यथितान्तरात्मा प्रव्यथितः प्रभीतोऽन्तरात्मा मनो यस्य मम सोऽहं प्रव्यथितान्तरात्मा सन्धृतिं धैर्यं न विन्दामि न लभे शमं चोपशमं मनस्तुष्टिं हे विष्णो ॥ २४ ॥**

**भाष्यार्थ— तत्र इदं कारणं**—विश्वरूप पाहून मी भयभीत होण्याचें हे कारण आहे—**नभःस्पृशं-द्युस्पर्शं इत्यर्थः**—नभःस्पृशं म्ह० स्वर्गलोकाला जाऊन भिडणाऱ्या असा याचा भावार्थ —**दीप्तं-प्रज्वलितं**—दीप्त म्ह० प्रज्वलित झालेल्या—**अनेकवर्णं-अनेके वर्णाः भयंकराः नानासंस्थानाः यस्मिन् त्वयि तं त्वां अनेकवर्णं**—अनेक वर्णांचें म्ह० अनेक वर्ण--भयंकर नाना आकाराचे ज्या तुझ्यामध्ये आहेत त्या तुज अनेकवर्णाला,—**व्यात्ताननं-व्यात्तानि-विवृतानि आननानि-मुखानि यस्मिन् त्वयि तं-त्वां व्यात्ताननं**—व्यात्त म्ह० उघडलेलीं पसरलेलीं मुखें ज्या तुझ्यामध्यें आहेत, त्या तुज व्यात्ताननाला,—**दीप्तविशालनेत्रं-दीप्तानि-प्रज्वलितानि विशालानि-विस्तीर्णानि नेत्राणि यस्मिन् त्वयि तं-त्वां दीप्तविशालनेत्रं**—दीप्त म्ह० प्रज्वलित व विशाल म्ह० विस्तीर्ण नेत्र ज्या तुझ्यामध्यें आहेत त्या तुज दीप्तविशालनेत्राला, **त्वां दृष्ट्वा हि**— अशा तुला पाहूनच—**प्रव्यथितान्तरात्मा प्रव्यथितः-प्रभीतः अन्तरात्मा-मनः यस्य मम सः अहं प्रव्यथितान्तरात्मा सन्**—प्रव्यथित म्ह० अत्यंत भयभीत झाला आहे अन्तरात्मा म्ह० मन ज्या माझें [म्ह० ज्या माझें मन अशा तुला पाहून अतिशय भ्याले आहे ] तो मी प्रव्यथितचित्त होऊन—**हे विष्णो धृतिं-धैर्यं न विन्दामि न लभे च शमं-उपशमं-मनस्तुष्टिं**—हे विष्णो–व्यापक देवा, मला धृति म्ह० धैर्य प्राप्त होत नाहीं व शम म्ह० उपशम–मनाला संतोषहि होत नाहीं. २४

**दंष्ट्राकरालानि च ते मुखानि दृष्ट्वैव कालानलसंनिभानि।**
**दिशो न जाने न लभे च शर्म प्रसीद देवेश जगन्निवास ।**

**अन्वयार्थ—च**—आणि—**ते**—तुझीं—**दंष्ट्राकरालानि**—दाढांनीं विकराळ झालेलीं—**कालानलसंनिभानि**—प्रलयकालच्या अग्नीसारखीं—**मुखानि**—मुखें—

**दृष्ट्वा एव**—पाहूनच—**दिशः**—दिशांना—**न जाने**—मी जाणत नाहीं—**च**—व (मला)—**शर्म**—सुख—**न लभे**—होत नाहीं.—**हे देवेश**—हे देवांच्या ईश्वरा,—**हे जगन्निवास**—हे जगाच्या आश्रयभूत देवा,—**प्रसीद**—प्रसन्न हो. २५.

**कस्मात् —दंष्ट्राकरालानि दंष्ट्राभिः करालानि विकृतानि ते तव मुखानि दृष्ट्वैवोपलभ्य कालानलसंनिभानि प्रलयकाले लोकानां दाहकोऽग्निः कालानलस्तत्संनिभानि कालानलसदृशानि दृष्ट्वेत्येतद्दिशः पूर्वापरविवेकेन न जाने दिङ्मूढो जातोऽस्म्यतो न लभे च नोपलभे च शर्म सुखमतः प्रसीद प्रसन्नो भव हे देवेश जगन्निवास ॥ २५ ॥**

**भाष्यार्थ—कस्मात्**—भगवद्रूप प्रत्यक्ष पहात असूनहि तुला संतोष का बरें होत नाहीं, म्हणून म्हणशील तर सांगतों—**दंष्ट्राकरालानि-दंष्ट्राभिः करालानि-विकृतानि ते-तव मुखानि दृष्ट्वा एव-उपलभ्य**—दाढांनी कराल विकृत–विकराल झालेलीं तुझीं मुखें पाहून–साक्षात् त्यांचे दर्शन घेऊन ( ती मुखें कशी ? उत्तर–) —**कालानलसंनिभानि-प्रलयकाले लोकानां दाहकः अग्निः कालानलः तत्संनिभानि-कालनलसदृशानि-दृष्ट्वा इति एतत्**—कालानलासारखीं –प्रलयकाली लोकाना जाळणारा जो अग्नि तो कालानल, त्याच्या सारखीं तुझीं मुखें पाहून, असा याचा भावार्थ.—**दिशः-पूर्वापरविवेकेन न जाने** -दिशांना–ही पूर्व, ही पश्चिम इत्यादि विवेकानें मी जाणत नाहीं, म्ह०—**दिङ्मूढः जातः अस्मि**—मी दिङ्मूढ झालो आहे.—**अतः शर्म-सुखं च न लभे-न उपलभे**—त्यामुळें मला सुख होत नाहीं. मला सुखाचा–स्वास्थ्याचा अनुभव येत नाहीं.—**अतः हे देवेश जगन्निवास प्रसीद-प्रसन्नः भव**—म्हणून देवांच्या ईश्वरा, जगाच्या निवासस्थाना–जगन्निवासा, प्रसन्न हो. २५.

**अमी च त्वां धृतराष्ट्रस्य पुत्राः सर्वे सहैवावनिपालसङ्घैः ।**
**भीष्मो द्रोणः सूतपुत्रस्तथासौ सहास्मदीयैरपि योधमुख्यैः २६**
**वक्त्राणि ते त्वरमाणा विशन्ति दंष्ट्राकरालानि भयानकानि ।**
**केचिद्विलग्ना दशनान्तरेषु संदृश्यन्ते चूर्णितैरुत्तमाङ्गैः ॥२७॥**

**अन्वयार्थ—अवनिपालसंघैः सह एव**—पृथ्वीपालांच्या सहवर्तमानच—**अमी सर्वे**—हे सर्व—**धृतराष्ट्रस्य पुत्राः**—धृतराष्ट्राचे पुत्र—**च भीष्मः**—पितामह, भीष्माचार्य,—**द्रोणः**—आचार्य द्रोणाचार्य,—**तथा**—याचप्रमाणे **अस्मदीयै अपि**—आमच्याहि—**योधमुख्यैः सह**—मुख्य योद्ध्यांसह—**असौ सूतपुत्रः**—हा सूतपुत्र–कर्ण इत्यादि सर्व—**त्वरमाणाः**—त्वरा करणार असे होत्साते–मोठया त्वरेनें—**ते**—तुझ्या—**दंष्ट्राकरालानि**—दाढांनी विकराल दिसणाऱ्या—**भयानकानि**—भयानक—**वक्त्राणि**—मुखांत—**त्वां विशन्ति**—तुजमध्यें प्रवेश करितात.—**केचित्**

—त्यांतील कांहीं—**चूर्णितैः उत्तमाङ्गैः**—चूर्ण झालेल्या मस्तकांनीं—**दशनान्तरेषु विलग्नाः**—दांतांच्या फटींत अडकून राहिलेले—**संदृश्यन्ते**—दिसतात. २६-२७.

**येभ्यो मम पराजयाशङ्काऽऽसीत्सा चापगता यतः—अमी च त्वां धृतराष्ट्रस्य पुत्रा दुर्योधनप्रभृतयस्त्वरमाणा विशन्तीति व्यवहितेन संबन्धः। सर्वे सहैव संहता अवनिपालसंघैरवनिं पृथ्वीं पालयन्तीत्यवनिपालास्तेषां संघैः। किंच भीष्मो द्रोणः सूतपुत्रः कर्णस्तथाऽसौ सहास्मदीयैरपि धृष्टद्युम्नप्रभृतिभिर्योधमुख्यैर्योधानां मुख्यैः प्रधानैःसह॥**

**भाष्यार्थ—येभ्यः मम पराजयाशंका आसीत् सा च अपगता**—ज्यांच्यापासून मला पराजय प्राप्त होण्याची शंका वाटत होती ती माझ्या पराजयाची शंका गेली—**यतः अमी धृतराष्ट्रस्य पुत्राः-दुर्योधनप्रभृतयः त्वां त्वरमाणाः विशन्ति**—कारण हे धृतराष्ट्राचे पुत्र-दुर्योधनादिक तुझ्यामध्यें मोठया त्वरेनें युक्त होत्साते प्रवेश करीत आहेत.—(**धृतराष्ट्रस्य पुत्राः त्वरमाणाः विशन्ति**) **इति व्यवहितेन संबंधः**—धृतराष्ट्रपुत्र या शब्दाचा 'त्वरमाणाः विशन्ति' या २७-व्या श्लोकांतील शब्दांशीं अन्वय लागतो—**सर्वे सह एव अवनिपालसंघैः संहताः**—धृतराष्ट्राचे सर्व पुत्र अवनिपालांच्या संघासहवर्तमानच, त्यांच्याशी संघात पावून-मिळून-एकरूप होऊन तुझ्यामध्ये त्वरेने शिरत आहेत.—**अवनीं-पृथ्वीं पालयन्ति इति अवनिपालाः तेषां संघैः**—अवनीला म्ह० पृथ्वीला पाळतात-तिचें रक्षण करितात म्हणून अवनिपाल त्यांच्या संघांसह, (असा संबंध,)—**किंच भीष्मः द्रोणः तथा असौ सूतपुत्रः-कर्णः**—तसाच भीष्म, द्रोण, तसाच हा सूतपुत्र कर्ण—**अस्मदीयैः अपि सह-धृष्टद्युम्नप्रभृतिभिः योधमुख्यैः-योधानां मुख्यैः-प्रधानैः सह**—आमच्या लोकांसहहि-धृष्टद्युम्नप्रभृति आमच्या पक्षांतील योद्ध्यांपैकीं मुख्य-प्रधान योद्ध्यांसह. २६.

**किंच—वक्त्राणि मुखानि ते तव त्वरमाणास्त्वरायुक्ताः सन्तो विशन्ति। किंविशिष्टानि मुखानि दंष्ट्राकरालानि भयानकानि भयंकराणि। किंच केचिन्मुखानि प्रविष्टानां मध्ये विलग्ना दशनान्तरेषु दन्तान्तरेषु मांसमिव भक्षितं संदृश्यन्त उपलभ्यन्ते चूर्णितैश्चूर्णीकृतैरुत्तमाङ्गैः शिरोभिः॥ २७॥**

**भाष्यार्थ—किं च**—हे सर्व वीर—**ते-तव वक्त्राणि-मुखानि त्वरमाणाः-त्वरायुक्ताः सन्तः विशन्ति**—तुझ्या मुखांमध्यें त्वरायुक्त होऊन प्रवेश करितात.—**किंविशिष्टानि मुखानि**—कोणत्या विशेषणांनीं विशिष्ट अशीं तुझीं तीं मुखें आहेत—**दंष्ट्राकरालानि भयानकानि-भयंकराणि**—दाढांनीं विकराल असलेलीं, भयानक म्ह० भयंकर आहेत. अशा मुखांत ते त्वरेनें शिरतात.—**किंच मुखानि प्रविष्टानां मध्ये केचित् दशनान्तरेषु-दन्तान्तरेषु विलग्नाः**—तसेंच, मुखांत शिरलेल्या त्यांतील कित्येक दांतांच्या फटींत अडकून राहिलेले—**भक्षितं मांसं इव**—भक्षण केलेल्या मांसाप्रमाणें दांतांत अडकून राहिलेले—**चूर्णितैः-चूर्णीकृतैः उत्तमाङ्गैः-शिरोभिः संदृश्यन्ते-उपलभ्यन्ते**—चूर्ण झालेल्या उत्तमांगांनीं-चुरून गे-

लेल्या मस्तकांनीं दिसतात–उपलब्ध होतात. [ तुझ्या विकराल व भयंकर मुखांत शिर-लेल्या त्या सर्व योद्ध्यांतील कित्येक दांतांच्या फटींत अडकून राहिलेले दिसतात. खाल्लेलें मांस जसें दातांत अडकून राहिलेलें दिसते तसे ते दिसतात. त्यांचीं मस्तकें तुझ्या दातां-खालीं चुरडून गेलेलीं दिसतात. ] २७.

**यथा नदीनां बहवोऽम्बुवेगाः समुद्रमेवाभिमुखा द्रवन्ति ।**
**तथा तवामी नरलोकवीरा विशन्ति वक्त्राण्यभिविज्वलन्ति ॥**

**अन्वयार्थ**—**यथा**—ज्याप्रमाणें—**नदीनां**—नद्यांचे —**बहवः**—पुष्कळ—**अम्बुवेगाः**—जलप्रवाह—**समुद्रं एव अभिमुखाः**—समुद्राच्याच बाजूला वाहत जाऊन त्यांतच—**द्रवन्ति** -शिरतात—**तथा**—त्याप्रमाणे—**अमी**—हे—**नरलोकवीराः**—मनुष्यलोकांतील वीर—**तव**—तुझ्या—**अभिविज्वलन्ति वक्त्राणि**—सर्व बाजूंनीं प्रकाशमान होणाऱ्या मुखांत—**विशन्ति**—प्रवेश करितात. २८.

**कथं प्रविशन्ति मुखानीत्याह—यथा नदीनां स्रवन्तीनां बहवोऽनेकेऽम्बूनां वेगा अम्बुवेगास्त्वराविशेषाः समुद्रमेवाभिमुखाः प्रतिमुखा द्रवन्ति तथा तद्वत्तवामी भीष्मादयो नरलोकवीरा मनुष्यलोकशूरा विशन्ति वक्त्राण्यभिविज्वलन्ति प्रकाशमानानि ॥**

**भाष्यार्थ**—**मुखानि कथं प्रविशन्ति इति आह**—मुखांमध्ये कसे प्रवेश करितात तें अर्जुन सांगतो—**यथा नदीनां-स्रवन्तीनां बहवः-अनेके अम्बूनां वेगाः अम्बुवेगाः-त्वराविशेषाः समुद्रं एव अभिमुखाः-प्रतिमुखाः द्रवन्ति-प्रविशन्ति**—ज्याप्रमाणे नद्यांचे-स्रवन्तींचे-प्रवाहवतींचे अनेक जलाचे वेग त्वराविशेष-पाण्याचे वाहणारे अनेक प्रवाह समुद्राच्याच संमुख-समुद्रांतच जाऊन मिळतात—**तथा-तद्वत्-अमी-भीष्मादयः नरलोकवीराः-मनुष्यलोकशूराः तव अभिविज्वलन्ति-प्रकाशमानानि वक्त्राणि विशन्ति**—त्याप्रमाणें हे भीष्मादिक नरलोकवीर-मनुष्यलोकातील शूर तुझ्या प्रज्वलित होणाऱ्या-प्रकाशमान मुखांत प्रवेश करितात. २८.

**यथा प्रदीप्तं ज्वलनं पतङ्गा विशन्ति नाशाय समृद्धवेगाः ।**
**तथैव नाशाय विशन्ति लोकास्तवापि वक्त्राणि समृद्धवेगाः ॥**

**अन्वयार्थ**—**यथा**—ज्याप्रमाणे—**पतङ्गाः**—पतंग—**समृद्धवेगाः**—ज्यांच्यामध्यें मोठा वेग उत्पन्न झाला आहे असे होत्साते—**प्रदीप्तं ज्वलनं**—प्रदीप्त अग्नींत—**नाशाय**—नाशासाठीं—**विशन्ति**—प्रवेश करितात—**तथा एव**—त्याचप्रमाणें—**लोकाः अपि समृद्धवेगाः सन्तः**—हे सर्व लोकहि ज्यांचा वेग अतिशय वाढला आहे असे होत्साते—**तव वक्त्राणि**—तुझ्या मुखांमध्ये—**नाशाय**—नाश पावण्यासाठीं—**विशन्ति**—प्रवेश करितात. २९.

**ते किमर्थं प्रविशन्ति कथं चेत्याह—यथा प्रदीप्तं ज्वलनमग्निं पतङ्गाः पक्षिणो विशन्ति नाशाय विनाशाय समृद्धवेगाः समृद्ध उद्भूतो वेगो गतिर्येषां ते समृद्धवेगास्तथैव नाशाय विशन्ति लोकाः प्राणिनस्तवापि वक्त्राणि समृद्धवेगाः ॥ २९ ॥**

**भाष्यार्थ—ते किमर्थं प्रविशन्ति कथं च इति आह**—ते कशासाठीं प्रवेश करितात व कसे प्रवेश करितात, तें अर्जुन सांगतो—**यथा पतङ्गाः-पक्षिणः प्रदीप्तं ज्वलनं-अग्निं नाशाय-विनाशाय समृद्धवेगाः-समृद्धः उद्भूतः वेगः-गतिः येषां ते समृद्धवेगाः विशन्ति**—ज्याप्रमाणें पतंग म्ह० पक्षी प्रदीप्त ज्वलनांत-अग्नींत नाशासाठीं-आपलाच विनाश करून घेण्यासाठीं ज्यांचा वेग [म्ह० गति] अतिशय उद्भवला आहे, ज्यांची गति फार वाढली आहे, असे होत्साते प्रवेश करितात—**तथा एव लोकाः-प्राणिनः अपि समृद्धवेगाः तव वक्त्राणि नाशाय विशन्ति**—त्याचप्रमाणें लोकहि-प्राणी अतिशय वेगवान् होऊन-ज्यांची गति फार वाढली आहे असे होऊन तुझ्या मुखांत नाशासाठीं प्रवेश करितात. २९.

# लेलिह्यसे ग्रसमानः समन्ताल्लोकान्समग्रान्वदनैर्ज्वलद्भिः ।
# तेजोभिरापूर्य जगत्समग्रं भासस्तवोग्राः प्रतपन्ति विष्णो ॥

**अन्वयार्थ—हे विष्णो**—हे व्यापक देवा !—( **त्वं** )—तूं—**समन्ततः**—सर्व बाजूंनीं—**समग्रान् लोकान्**—सर्व लोकांना—**ज्वलद्भिः वदनैः**—जळत असलेल्या तोंडांनी—**ग्रसमानः**—ग्रासणारा-गिळणारा असा होत्साता—**लेलिह्यसे**—त्यांचा स्वाद घेतोस.—**तव**—तुझ्या—**उग्राः भासः**—उग्र कांति—**समग्रं जगत्**—समग्र जगाला—**तेजोभिः**—तेजांनी—**आपूर्य**—भरून सोडून—**प्रतपन्ति**—अतिशय ताप देतात. ३०.

**त्वं पुनः—लेलिह्यस आस्वादयसि ग्रसमानोऽन्तः प्रवेशयन्समन्ततो लोकान्समग्रान्समस्तान्वदनैर्वक्त्रैर्ज्वलद्भिर्दीप्यमानैस्तेजोभिरापूर्य संव्याप्य जगत्समग्रं सहाग्रेण समस्तमित्येतत् । किंच भासो दीप्तयस्तवोग्राः क्रूराः प्रतपन्ति प्रतापं कुर्वन्ति हे विष्णो व्यापनशील ॥ ३० ॥**

**भाष्यार्थ—त्वं पुनः**—आणि तूं—**ज्वलद्भिः-दीप्यमानैः वक्त्रैः-वदनैः समग्रान्-समस्तान् लोकान् समन्ततः ग्रसमानः-अन्तः प्रवेशयन्**—आपल्या देदीप्यमान वदनांनी-आपल्या जळत असलेल्या-पेटलेल्या मुखांनीं समस्त लोकांना सर्व बाजूंनी ग्रासणारा-घशांत कोंबणारा असा होऊन—**लेलिह्यसे-आस्वादयसि**—त्यांचा आस्वाद घेतोस.आपल्या प्रदीप्त मुखांत त्यांना टाकून व गिळून त्यांचा स्वाद घेतोस, त्यांची रुचि घेतोस.—**तेजोभिः समग्रं-सह अग्रेण-समस्तं इति एतत् जगत् आपूर्य-संव्याप्य**—तेजांनीं समग्र-जें अग्रासह असतें ते समग्र,समस्त असा याचा भावार्थ-आपल्या तेजांनीं समस्त जगाला भरून सोडून-पूर्णपणें व्यापून तूं

सर्व लोकांना खातोस व स्वाद घेतोस.—**किंच हे विष्णो-व्यापनशील तव उग्राः -क्रूराः भासः-दीप्तयः प्रतपन्ति-प्रतापं कुर्वन्ति**—तसेच, हे विष्णो-व्यापनशील तुझ्या उग्र म्ह० क्रूर दीप्ति अतिशय ताप देतात. ३०.

**आख्याहि मे को भवानुग्ररूपो नमोऽस्तु ते देववर प्रसीद ।**
**विज्ञातुमिच्छामि भवन्तमाद्यं न हि प्रजानामि तव प्रवृत्तिम् ॥**

**अन्वयार्थ—उग्ररूपः भवान कः**—भयंकर रूप घेतलेले आपण कोण आहां, तें—**मे**—मला—**आख्याहि**—सांगा.—**ते नमः अस्तु**—हे देवा, तुला नमस्कार असो.—**हे देववर**—हे देवांतील श्रेष्ठ देवा !—**प्रसीद**—मजवर प्रसन्न हो.—**भवन्तं आद्यं**—आपण जे जगाचे आदि कारण, त्या तुम्हांला—**विज्ञातुं इच्छामि**—मी जाणण्याची इच्छा करतो.—**हि**—कारण—**तव प्रवृत्तिं**—तुझ्या या चेष्टेला—**न प्रजानामि**—मी जाणूं शकत नाहीं. ३१.

**यत एवमुग्रस्वभावोऽतः—आख्याहि कथय मे मह्यं को भवानुग्ररूपः क्रूराकारः । नमोऽस्तु ते तुभ्यं हे देववर देवानां प्रधान प्रसीद प्रसादं कुरु विज्ञातुं विशेषेण ज्ञातुमिच्छामि भवन्तमाद्यमादौ भवमाद्यम् । न हि यस्मात्प्रजानामि तव त्वदीयां प्रवृत्तिं चेष्टाम् ॥ ३१ ॥**

**भाष्यार्थ—यतः एवं उग्रस्वभावः अतः**—ज्याअर्थी तूं असा उग्र स्वभावाचा आहेस त्याअर्थी—**मे-मह्यं आख्याहि-कथय**—तूं मला सांग-कथन कर.—**भवान् उग्ररूपः-क्रूराकारः कः**—तूं उग्ररूप, क्रूर आकाराचा असा कोण आहेस ?—**ते -तुभ्यं नमः अस्तु**—तुला नमस्कार असो.—**हे देववर-देवानां प्रधान प्रसीद -प्रसादं कुरु**—हे देववरा-देवांतील प्रधान देवा प्रसन्न हो—मजवर प्रसाद-अनुग्रह कर. —**भवन्त आद्यं-आदौ भवं-आद्यं विज्ञातुं-विशेषेण ज्ञातुं इच्छामि**—मी आपल्याला आद्य म्ह० आदि-आरंभी झालेल्या अशा आद्याला विशेषतः जाणण्याची इच्छा करितों.—**हि-यस्मात् तव-त्वदीयां प्रवृत्तिं-चेष्टां न प्रजानामि**—कारण तुझी ही प्रवृत्ति-ही चेष्टा-असा हा व्यापार कां होत आहे ते मला कळत नाहीं. [तूं असा उग्र कां झाला आहेस, ते काहीं मला कळत नाहीं. मी तुला नमस्कार करितों. तूं कोण आहेस ते मला सांग. ] ३१

**श्रीभगवान् उवाच**—श्रीकृष्ण म्हणाले—

**कालोऽस्मि लोकक्षयकृत्प्रवृद्धो**
**लोकान्समाहर्तुमिह प्रवृत्तः ।**
**ऋतेऽपि त्वां न भविष्यन्ति सर्वे**
**येऽवस्थिताः प्रत्यनीकेषु योधाः ॥ ३२ ॥**

**अन्वयार्थ**—(**अहं**)—मी—**लोकक्षयकृत् कालः**—लोकांचा क्षय करणारा काल—**प्रवृद्धः अस्मि**—अतिशय वृद्धि पावलों आहें.—**इह**—यावेळीं—**लोकान्**—लोकाना—**समाहर्तुं**—मारण्यास, त्यांचा संहार करण्यास—**प्रवृत्तः**—प्रवृत्त झालों आहें.—**ये**—जे—**प्रत्यनीकेषु योधाः अवस्थिताः**—शत्रूंच्या प्रत्येक सैन्यांत योद्धे स्थित आहेत—**ते सर्वे**—ते सर्व—**त्वां ऋते अपि**—तुझ्यावांचूनहि—**न भविष्यन्ति**—नाहींसे होतील. ३२.

कालोऽस्मीति । कालोऽस्मि लोकक्षयकृल्लोकानां क्षयं करोतीति लोकक्षयकृत्प्रवृद्धो वृद्धिं गतो यदर्थं प्रवृद्धस्तच्छृणु लोकान्समाहर्तुं संहर्तुमिहास्मिन्काले प्रवृत्तः । ऋतेऽपि विनाऽपि त्वा त्वां न भविष्यन्ति भीष्मद्रोणकर्णप्रभृतयः सर्वे येभ्यस्तवाऽऽशङ्का येऽवस्थिताः प्रत्यनीकेष्वनीकमनीकं प्रति प्रत्यनीकेषु प्रतिपक्षभूतेष्वनीकेषु योधा योद्धारः॥

**भाष्यार्थ**—'**कालोऽस्मि०**' **इति**—'कालोऽस्मि०' या श्लोकाने भगवान् स्वतः आपली ही प्रवृत्ति कशासाठीं आहे ते सांगतात—**लोकक्षयकृत्-लोकानां क्षयं करोति इति लोकक्षयकृत् कालः प्रवृद्धः-वृद्धिं गतः अस्मि**—लोकक्षयकृत् म्ह० लोकाचा क्षय करितो म्हणून लोकक्षयकृत् काल मी प्रवृद्ध झालो आहे. मी लोकाचा क्षय करणारा काल हा असा वृद्धिगत झालो आहे.—**यदर्थं प्रवृद्धः तच्छृणु**—कशासाठीं प्रवृद्ध झालो आहे ते ऐक.—**लोकान् समाहर्तुं संहर्तुं इह-अस्मिन् काले प्रवृत्तः**—लोकांचा संहार करण्यासाठीं मी या वेळीं प्रवृत्त झालो आहे.—**त्वा-त्वां ऋते अपि-विना अपि भीष्मद्रोणकर्णप्रभृतयः सर्वे येभ्यः तव आशंका न भविष्यन्ति**—तुजवांचूनहि-तूं नसलास तरीहि भीष्म, द्रोण, कर्ण, इत्यादि सर्व, की ज्या भीष्मादिकांपासून तुला आशंका वाटते, माझ्यावांचून हे भीष्मादि महावीर कसे मरतील असे तुला वाटते ते सर्व नाहींसे होतील, ते सर्व तुझ्या साह्यावांचूनहि मरून जातील.—**प्रत्यनीकेषु-अनीकं अनीकं प्रति-प्रत्यनी केषु-प्रतिपक्षभूतेषु अनीकेषु ये योधाः-योद्धारः अवस्थिताः**—प्रति सैन्यांत-दरएक सैन्यामध्ये-प्रतिपक्षी होऊन-प्रत्येक सैन्यांत-शत्रूंच्या सर्व सैन्यांत जे योद्धे उभे राहिलेले आहेत ते सर्व तुझ्यावांचूनहि मरतील.

## तस्मात्त्वमुत्तिष्ठ यशो लभस्व जित्वा शत्रून्भुंक्ष्व राज्यं समृद्धम् ।
## मयैवैते निहताः पूर्वमेव निमित्तमात्रं भव सव्यसाचिन् ॥३३॥

**अन्वयार्थ**—**तस्मात्**—म्हणून—**त्वं**—तूं—**उत्तिष्ठ**—ऊठ.—**यशः लभस्व**—यश संपादन कर.—**शत्रून् जित्वा**—शत्रूंना जिंकून,—**समृद्धं राज्यं**—संपन्न राज्य—**भुंक्ष्व**—भोग.—**एते**—हे भीष्मादिक—**मया एव**—मींच—**पूर्वं**—पूर्वी **निहताः**—मारले आहेत.—**सव्यसाचिन्**—हे अर्जुना!—**निमित्तमात्रं भव**—तूं नुसता निमित्त हो. ३३.

यस्मादेवम्—तस्मात्त्वमुत्तिष्ठ भीष्मद्रोणप्रभृतयोऽतिरथा अजेया देवैरप्यर्जुनेन जिता इति यशो लभस्व केवलं पुण्यैर्हि तत्प्राप्यते जित्वा शत्रून्दुर्योधनप्रभृतीन्भुङ्क्ष्व

**राज्यं समृद्धमसपत्नमकण्टकम् । मयैवैते निहता निश्चयेन हताः प्राणैर्वियोजिताः पूर्वमेव । निमित्तमात्रं भव त्वं हे सव्यसाचिन्सव्येन वामेनापि हस्तेन शराणां क्षेपात्सव्यसाचीत्युच्यतेऽर्जुनः ॥ ३३ ॥**

**भाष्यार्थ—यस्मात् एवं तस्मात् त्वं उत्तिष्ठ**—ज्याअर्थी तुझ्यावांचूनहि हे सर्व निश्चयानें मरणार आहेत, त्याअर्थी तूं युद्धाला ऊठ—**भीष्मद्रोणप्रभृतयः देवैः अपि अजेयाः अतिरथाः अर्जुनेन जिताः इति यशः लभस्व**—भीष्म, द्रोण इत्यादि देवांनाहि अजिंक्य असलेले अतिरथी अर्जुनानें जिंकले, असें यश संपादन कर. —**केवलं पुण्यैः तत् प्राप्यते**—कारण तें यशहि केवल पुण्यांनींच प्राप्त होतें.— **दुर्योधनप्रभृतीन् शत्रून् जित्वा समृद्धं-असपत्नं-अकंटकं राज्यं भुङ्क्ष्व** —दुर्योधनादि शत्रूंना जिंकून समृद्ध-शत्रुरहित निष्कंटक राज्य भोग.—**मया एव एते पूर्वं एव निहताः-निश्चयेन हताः प्राणैः वियोजिताः**—मींच हे पूर्वींच मारले आहेत—त्यांना मींच निश्चयानें मारले आहे, प्राणाशीं वियुक्त केले आहे,-मींच यांना अगोदरच प्राणरहित करून सोडलें आहे,—**हे सव्यसाचिन्-त्वं निमित्तमात्रं भव**—हे अर्जुना तूं केवल निमित्त[१] हो.—**सव्येन वामेन अपि हस्तेन शराणां क्षेपात् सव्यसाची इति अर्जुनः उच्यते**—सव्य म्ह० डाव्या हातानेंहि बाण फेकल्यामुळे अर्जुन 'सव्यासाची' असें म्हटला जातो. ३३.

**द्रोणं च भीष्मं च जयद्रथं च**
**कर्णं तथान्यानपि योधवीरान् ।**
**मया हतांस्त्वं जहि मा व्यथिष्ठा**
**युद्ध्यस्व जेतासि रणे सपत्नान् ॥ ३४ ॥**

---

१ या श्लोकावरील टीपेंत रहस्यकार म्हणतात—"दुष्ट मनुष्यें आपल्या कर्मांनींच मरत असून त्यांना मारणारा फक्त निमित्तमात्र असल्यामुळे मारणाराकडे त्याचा दोष येत नाहीं, हा कर्मविपाकप्रक्रियेचा सिद्धान्तहि ३३ व्या श्लोकांत आला आहे." दुष्ट मनुष्यें आपल्या कर्मांनीं मरतात व अदुष्ट मनुष्यें कशानें मरतात ? दुष्टांना मारणारा जसा निमित्तमात्र असल्यामुळे दोषरहित, तसाच अदुष्टांना मारणाराहि निमित्तमात्र असल्यामुळे निर्दोष कां नव्हे ? कर्मविपाकप्रक्रियेचा सिद्धान्त असा लटपटित किंवा पक्षपाती कां ? बरें, दुर्योधनादिक एक दुष्ट होते; पण भीष्म, द्रोण, शल्य, पांडवाकडील धृष्टद्युम्न, अभिमन्यु, इत्यादि तर दुष्ट नव्हतेना ? मग 'त्यांना मारणारे मात्र निमित्तमात्र नव्हेत' असें म्हणावयाचें कीं काय ? तात्पर्य रहस्यकाराची ही उपपत्ति अग्राह्य आहे. भगवानांनीं येथें 'मीच या सर्वांना मारलें आहे, यांचा मृत्यु जवळ आला आहे, तूं केवळ निमित्त हो व यश संपादन कर, शत्रूला जिंकून समृद्ध राज्याचा उपभोग घे' असें सांगून अर्जुनाची 'यद्वा जयेम यदि वा नो जयेयुः' ही शंका घालविली आहे. रहस्यकार समजतात, तसा कांहींएक सिद्धान्त सांगितलेला नाहीं.

**अन्वयार्थ—द्रोणं**—द्रोणाला,—**च भीष्मं**—व भीष्माला,—**च जयद्रथं**—व जयद्रथाला—**च कर्णं**—व कर्णाला—**तथा**—तसेच—**अन्यान् अपि**—दुसऱ्याहि—**मया हतान्**—मी मारलेल्या—**योधवीरान्**—वीर योद्धयांस—**त्वं**—तूं—**जहि**—मार.—**मा व्यथिष्ठाः**—अशी व्यथा पावूं नकोस. त्यांना भिऊं नकोस.—**युद्ध्यस्व**—युद्ध कर.—**रणे**—रणात—**सपत्नान्**—शत्रूंना **जेतासि**—तूं जिंकशील. ३४.

द्रोणं चेति । द्रोणं च येषु येषु योधेष्वर्जुनस्याऽऽशङ्का तांस्तान्व्यपदिशति भगवान्मया हतानिति । तत्र द्रोणभीष्मयोस्तावत्प्रसिद्धमाशङ्काकारणं द्रोणो धनुर्वेदाचार्यो दिव्यास्त्रसंपन्न आत्मनश्च विशेषतो गुरुर्गरिष्ठो भीष्मः स्वच्छन्दमृत्युर्दिव्यास्त्रसंपन्नश्च परशुरामेण द्वंद्वयुद्धमगमन्न च पराजितः । तथा जयद्रथो यस्य पिता तपश्चरति मम पुत्रस्य शिरो भूमौ पातयिष्यति यस्तस्यापि शिरः पतिष्यतीति । कर्णोऽपि वासवदत्तया शक्त्या त्वमोघया संपन्नः सूर्यपुत्रः कानीनो यतोऽतस्तन्नाम्नैव निर्देशः । मया हतांस्त्वं जहि निमित्तमात्रेण मा व्यथिष्ठास्तेभ्यो भयं मा कार्षीर्युध्यस्व जेतासि दुर्योधनप्रभृतीन्रणे युद्धे सपत्नाञ्शत्रून् ॥ ३४ ॥

**भाष्यार्थ**—'**द्रोणं च०**' **इति**-'द्रोणं च०' या श्लोकानें 'मीच यांना मारिलें आहे' याचाच अधिक विस्तार करितात—**द्रोणं च**—द्रोणाला व—**येषु येषु योधेषु अर्जुनस्य आशंका तान् तान् भगवान् मया हतान् इति व्यपदिशति**—ज्यां ज्या योद्धयांविषयीं अर्जुनाला शंका होती, त्यांना त्यांना भगवान् 'मी मारलेले' म्हणून ह्मणतात-त्यांचा त्याचा 'मी मारलेले' असा उल्लेख करितात—**तत्र द्रोणभीष्मयोः आशंकाकारणं तावत् प्रसिद्धं**—त्यांतील द्रोण व भीष्म यांच्याविषयींच्या आशंकेचे कारण तर प्रसिद्धच आहे.—**द्रोणः धनुर्वेदाचार्यः दिव्यास्त्रसंपन्नः च विशेषतः आत्मनः गरिष्ठः गुरुः**—द्रोण धनुर्वेदाचा आचार्य, दिव्य अस्त्रांनी संपन्न असलेला, व विशेषकरून आपला सर्वोत्तम गुरु—**भीष्मः स्वच्छंदमृत्युः च दिव्यास्त्रसंपन्नः परशुरामेण द्वंद्वयुद्धं अगमत् न च पराजितः**—भीष्म आपल्या इच्छेला येईल तेव्हां मरणारा, व दिव्य अस्त्रांनी संपन्न असलेला, परशुरामाशी द्वंद्वयुद्ध केलें, पण त्यांत पराभूत झाला नाहीं.—**तथा जयद्रथः यस्य पिता यः मम पुत्रस्य शिरः भूमौ पातयिष्यति तस्य अपि शिरः पतिष्यति इति तपः चराति**—तसाच जयद्रथ कीं ज्याचा पिता, जो माझ्या पुत्राचें शिर भूमीवर पाडवील त्याचेंहि शिर तत्काल पडेल, म्हणून तप करीत आहे,—**कर्णः अपि वासवदत्तया तु अमोघया शक्त्या संपन्नः सूर्यपुत्रः कानीनः यतः अतः तन्नाम्ना एव निर्देशः**—कर्णहि 'वासवदत्ता' या नांवाच्या इंद्रानें दिलेल्या अमोघ शक्तीनें संपन्न असलेला, सूर्याचा पुत्र पण तो ज्याअर्थी कानीन-कुंतीला कुमारिकावस्थेत झालला होता त्याअर्थी त्याचा 'कर्ण' या नांवानेंच उल्लेख केला आहे.—**मया हतान् त्वं निमित्तमात्रेण जहि**—मींच मारलेल्या या सर्वांना तूं नुसता निमित्तमात्र होऊन

मार.—**मा व्यथिष्ठाः तेभ्यः भयं मा कार्षीः**—व्यथित होऊन, त्यांना भिऊं नकोस.—**युद्धयस्व रणे-युद्धे दुर्योधनप्रभृतीन् सपत्नान्-शत्रून् जेतासि**—तूं युद्ध कर, रणांत म्ह० युद्धांत दुर्योधनादि सपत्नांना-शत्रूंना जिकशील. ३४

**संजय उवाच**—संजय म्हणाला—

# एतच्छ्रुत्वा वचनं केशवस्य कृताञ्जलिर्वेपमानः किरीटी ।
# नमस्कृत्वा भूय एवाह कृष्णं सगद्गदं भीतभीतः प्रणम्य ३५

**अन्वयार्थ—केशवस्य**—केशवाचें-श्रीकृष्णाचें—**एतत् वचनं**—हें वचन—**श्रुत्वा**—ऐकून—**कृतांजलिः**—ज्यानें हात जोडले आहेत असा—**वेपमानः**—कांपणारा—**किरीटी**—अर्जुन—**नमस्कृत्वा**—कृष्णाला नमस्कार करून—**भीतभीतः**—अतिशय भ्यालेला तो—**प्रणम्य**—अत्यंत नम्र होऊन—**भूयः एव**—पुनरपि—**कृष्णं**—कृष्णाला—**सगद्गदं**—कापऱ्या आवाजानें-कंठ दाटल्यामुळें अडखळत—**आह**—म्हणाला. ३५.

एतच्छ्रुत्वेति । एतच्छ्रुत्वा वचनं केशवस्य पूर्वोक्तं कृताञ्जलिः सन्वेपमानः कम्पमानः किरीटी नमस्कृत्वा भूयः पुनरेवाऽऽहोक्तवान्कृष्णं सगद्गदं भयाविष्टस्य दुःखाभिघातात्स्नेहाविष्टस्य च हर्षोद्भवादश्रुपूर्णनेत्रत्वे सति श्लेश्मणा कण्ठावरोधस्ततश्च वाचोऽपाटवं मन्दशब्दत्वं यत्स गद्गदस्तेन सह वर्तत इति सगद्गदं वचनमाहेति वचनक्रियाविशेषणमेतत्, भीतभीतः पुनः पुनर्भयाविष्टचेताः सन्प्रणम्य प्रह्वो भूत्वाऽऽहेति व्यवहितेन संबन्धः । अत्रावसरे संजयवचनं साभिप्रायम् । कथं द्रोणादिष्वर्जुनेन निहतेष्वजेयेषु चतुर्षु निराश्रयो दुर्योधनो निहत एवेति मत्वा धृतराष्ट्रो जयं प्रति निराशः सन्संधिं करिष्यति ततः शान्तिरुभयेषां भविष्यतीति । तदपि नाश्रौषीद्धृतराष्ट्रो भवितव्यवशात्

**भाष्यार्थ**—'एतच्छ्रुत्वा०' इति—या संजयाच्या वाक्याचें व्याख्यान—**एतत् केशवस्य पूर्वोक्तं वचनं श्रुत्वा**—हें केशवाचें पूर्वोक्त श्लो० ३२ पासूनचें वचन ऐकून—**कृताञ्जलिः सन् वेपमानः-कम्पमानः किरीटी**—दोन्ही हात जोडून कांपणारा अर्जुन—**नमस्कृत्वा भूयः-पुनः एव कृष्णं आह-उक्तवान्**—नमस्कार करून पुनरपि कृष्णाला असें बोलला. (कसें बोलला? उत्तर-)—**सगद्गदं-भयाविष्टस्य दुःखाभिघातात् स्नेहाविष्टस्य च हर्षोद्भवात् अश्रुपूर्णनेत्रत्वे सति श्लेष्मणा कंठावरोधः ततः च वाचः अपाटवं-मन्दशब्दत्वं यत् सः गद्गदः**—सगद्गद होऊन बोलला. ज्याच्या अन्तःकरणांत भय उद्भवलें आहे, अशा त्याला दुःखाचा अभिघात झाल्यामुळें व ज्याच्या मनांत स्नेह उद्भवला आहे अशा त्याच्या चित्तांत हर्षाचा उद्भव झाल्यामुळें त्याचे नेत्र अश्रूंनीं भरून आले असतां श्लेष्म्यानें-कफानें कंठाचा अवरोध झाला, त्यामुळें वाणीचें जें अपटुत्व व शब्द मंद होणें तो गद्गद होय. [ अर्जुनाच्या

मनांत त्यावेळीं भय उत्पन्न झालें होतें, त्यामुळें त्याला दुःखाचा आघात झाला व ईश्वराविषयी स्नेहहि उत्पन्न झाला होता,त्यामुळे त्याच्या हर्षाचाहि प्रादुर्भाव झाला. अर्थात् भय व स्नेह आणि दुःख व हर्ष या परस्पर विरुद्ध वृत्तींनी त्याचें मन व्याकुळ झालें. त्याचे नेत्र भरून आले. कंठ श्लेष्म्यामुळे दाटला. अर्थात् अक्षरांचा स्पष्ट उच्चार करितां येईनासा झाला व स्वर मंद झाला. यालाच गद्गद म्हणतात.—**तेन सह वर्तते इति सगद्गदं वचनं आह इति एतत् वचनक्रियाविशेषणं**—त्या गद्गदासह असतो म्हणून सगद्गद, असा सगद्गद होऊन वचन बोलला, असें हें वचनक्रियेचें विशेषण आहे. —**भीतभीतः पुनः पुनर्भयाविष्टचेताः सन् प्रणम्य-प्रह्वी भूत्वा आह इति व्यवहितेन संबंधः**—भीतभीत म्ह० पुनः पुनः भयाविष्टचित्त होऊन-वारंवार ज्याच्या मनांत भय उत्पन्न होत आहे असा होऊन प्रणाम करून म्ह० नम्र होऊन बोलला असा दूरच्या 'आह' या क्रियापदाशीं संबंध. [ विश्वरूपदर्शनदशेंत अर्जुनाचें भगवानांशी झालेलें संवादवचन संजय राजाला कां सांगत आहे ? उत्तर-]- **अत्र-अवसरे संजयवचनं साभिप्रायं**—या प्रसंगी संजयाचे वचन साभिप्राय आहे, ते सहेतुक आहे—**कथं**—तें कसें काय ?—**अजेयेषु द्रोणादिषु चतुर्षु अर्जुनेन निहतेषु निराश्रयः दुर्योधनः निहतः एव इति मत्वा**—जिकण्यास अशक्य असलेले हे द्रोणादि चार वीर अर्जुनाच्या हातुन मारले गेले असतां निराश्रय-निराधार झालेला दुर्योधन निश्चयाने मेलाच आहे, असे समजून—**धृतराष्ट्रः जयं प्रति निराशः सन् संधिं करिष्यति ततः उभयेषां शान्तिः भविष्यति इति**— धृतराष्ट्र जयाविषयीं निराश होऊन संधि करील, त्यामुळे पांडव व कौरव या दोघांची शान्ति होईल, या आशयाने संजयाचे हे कथन आहे.—**भवितव्यवशात् धृतराष्ट्रः तत् अपि न अश्रौषीत्**—पण भवितव्यामुळे-अवश्य होणारी गोष्ट टाळतां येणे शक्य नसल्यामुळे धृतराष्ट्राने तें ऐकिलें नाहीं. ३५.

**अर्जुन उवाच**—अर्जुन म्हणाला—

# स्थाने हृषीकेश तव प्रकीर्त्या जगत्प्रहृष्यत्यनुरज्यते च ।
# रक्षांसि भीतानि दिशो द्रवन्ति सर्वे नमस्यन्ति च सिद्धसंघाः ॥

**अन्वयार्थ—हे हृषीकेश**—हे हृषीकेशा !-इंद्रियांच्या ईश्वरा-इंद्रियप्रेरका !—**तव प्रकीर्त्या**—तुझे माहात्म्य ऐकून—**जगत्**—सर्व जगत्—**प्रहृष्यति**—अत्यंत हृष्ट होतें—**च**—व—**अनुरज्यते**—अनुरक्त होतें, तुझ्यावर प्रीति करते—**तत् स्थाने** —तें योग्यच आहे.—**रक्षांसि भीतानि**—राक्षस भयभीत होऊन—**दिशः द्रवन्ति** —दशदिशांकडे पळतात व—**सर्वे सिद्धसंघाः**—सर्व सिद्धांचे संघ—**नमस्यन्ति** —नमस्कार करितात.—(**तत् अपि**—तेंहि—**स्थाने**—योग्य आहे. ) ३६.

**स्थान इति । स्थाने युक्तं किं तत्, तव प्रकीर्त्या त्वन्माहात्म्यकीर्तनेन श्रुतेन हे हृषीकेश यज्जगत्प्रहृष्यति प्रहर्षमुपैति तत्स्थाने युक्तमित्यर्थः । अथवा विषयविशेषणं**

**स्थान इति, युक्तो हर्षादिविषयो भगवान्। यत ईश्वरः सर्वात्मा सर्वभूतसुहृच्चेति। तथाऽनुरज्यतेऽनुरागं चोपैति तच्च विषय इति व्याख्येयम्। किंच रक्षांसि भीतानि भयाविष्टानि दिशो द्रवन्ति गच्छन्ति तच्च स्थाने विषये। सर्वे नमस्यन्ति नमस्कुर्वन्ति च सिद्धसंघाः सिद्धानां समुदायाः कपिलादीनां तच्च स्थाने ॥ ३६ ॥**

**भाष्यार्थ—'स्थाने०' इति—**'स्थाने०' इत्यादि श्लोकांनी अर्जुन सगद्गद होऊन काय बोलला तेंच संजय सांगतो—**स्थाने-युक्तं—**'स्थाने' म्ह० योग्यच आहे.—**किं तत्—**काय, योग्य काय आहे ?—**हे हृषीकेश तव प्रकीर्त्या-त्वन्माहात्म्यकीर्तनेन श्रुतेन यत् जगत् प्रहृष्यति प्रहर्षं उपैति तत् स्थाने युक्तं इत्यर्थः—**हे इंद्रियांच्या ईश्वरा ! तुझ्या श्रेष्ठ कीर्तीनें तुझ्या-माहात्म्याच्या कीर्तनानें-तें ऐकल्यानें जे जगत्-अतिशय हृष्ट होतें-अत्यंत हर्षाला प्राप्त होतें तें योग्यच आहे, असा याचा भावार्थ.—**अथवा स्थाने इति विषयविशेषणं—**किंवा 'स्थाने' हे विषयाचें विशेषण आहे.—**भगवान् हर्षादिविषयः युक्तः—**भगवान् हर्षादिकांचा विषय आहे, हे युक्तच आहे.—**यतः ईश्वरः सर्वात्मा सर्वभूतसुहृत् च इति—**कारण ईश्वर सर्वांचा आत्मा आहे व सर्व भूतांचा सुहृद् आहे, म्हणून तो हर्षादिकांचा विषय आहे, हें योग्यच आहे.—**तथा अनुरज्यते-अनुरागं च उपैति तत् च विषये इति व्याख्येयं—**तसेंच जगत् अनुरक्त होतें-अनुरागाला प्राप्त होतें, ते अनुरागगमन योग्यच-योग्य विषयामध्येंच आहे, असें व्याख्यान करावें.—**किं च रक्षांसि भीतानि-भयाविष्टानि दिशः द्रवन्ति-गच्छन्ति तत् च स्थाने विषये—**तसेंच राक्षस भयभीत-भयाविष्ट होऊन दशादिशांस पळून जातात हें योग्य स्थानी-योग्य विषयातच आहे.—**च सर्वे सिद्धसंघाः-सिद्धानां-कपिलादीनां संघाः -समुदायाः नमस्यन्ति-नमस्कुर्वन्ति तत् च स्थाने—**आणि सर्व सिद्धसंघ म्ह० कपिलादि सिद्धांचे संघ-समुदाय तुला नमस्कार करितात तेंहि योग्य-योग्य विषयामध्येंच आहे. ३६.

## कस्माच्च ते न नमेरन्महात्मन् गरीयसे ब्रह्मणोऽप्यादिकर्त्रे। अनन्त देवेश जगन्निवास त्वमक्षरं सदसत्तत्परं यत् ॥३७॥

**अन्वयार्थ—हे महात्मन्—**हे महात्म्या!—**गरीयसे—**अतिशय गुरु व—**ब्रह्मणः अपि आदिकर्त्रे—**ब्रह्मदेवाचाहि आदिकर्ता अशा—**ते—**तुलाहि—**कस्मात् च—**कां बरें ते सिद्धादिक—**न नमेरन्—**नमस्कार करणार नाहींत ?—**हे अनन्त देवेश जगन्निवास—**हे अनन्ता, हे देवाधिदेवा, हे जगन्निवासा—**यत् सदसत्परं—**जे सत् व असत् यांहून पर-विलक्षण असलेलें—**अक्षरं—**अक्षर ब्रह्म—**तत्—**तें—**त्वं (एव)—**तूंच आहेस. ३७.

**भगवतो हर्षादिविषयत्वे हेतुं दर्शयति—कस्माच्च हेतोस्ते तुभ्यं न नमेरन्न नमस्कुर्युर्हे महात्मन्गरीयसे गुरुतराय यतो ब्रह्मणो हिरण्यगर्भस्याप्यादिकर्ता कारणमतस्त-**

स्मादादिकर्त्रे कथमेते न नमस्कुर्युरतो हर्षादीनां नमस्कारस्य च स्थानं त्वमर्हो विषय इत्यर्थः । हेऽनन्त देवेश जगन्निवास त्वमक्षरं तत्परं यद्वेदान्तेषु श्रूयते किं तत्सदसद्विद्यमानमसच्च यत्र नास्तीति बुद्धिस्ते उपधानभूते सदसती यस्याक्षरस्य यद्द्वारेण सदसदित्युपचर्यते । परमार्थतस्तु सदसतः परं तद्यदक्षरं वेदविदो वदन्ति तत्त्वमेव नान्यदित्यभिप्रायः ॥ ३७ ॥

**भाष्यार्थ—भगवतः हर्षादिविषयत्वे हेतुं दर्शयति**—भगवान् हर्षादिकांचा हेतु-विषय आहे यांविषयी कारण-निमित्त 'कस्मात्०' या श्लोकानें अर्जुन दाखवितो—**हे महात्मन् कस्मात् च हेतोः ते-तुभ्यं गरीयसे-गुरुतराय न नमेरन् न नमस्कुर्युः**—आणि हे महात्मन् कोणत्या बरें कारणानें अतिशय गुरु अशा तुला ते नमस्कार करणार नाहींत,—**यतः ब्रह्मणः-हिरण्यगर्भस्य अपि आदिकर्ता-कारणं**—ज्याअर्थी तूं कार्य ब्रह्माचा-हिरण्यगर्भाचाहि आदिकर्ता-कारण आहेस—**अतः तस्मात् आदिकर्त्रे एते कथं न नमस्कुर्युः**—त्याअर्थी आदिकर्ता अशा तुला हे सर्व नमस्कार कसे करणार नाहींत ?—**अतः हर्षादीनां नमस्कारस्य च त्वं स्थानं -अर्हः विषयः इत्यर्थः**—म्हणून हर्षादिकांचे व नमस्काराचें तूं स्थान आहेस, योग्य विषय आहेस, असा भावार्थ. ( त्याविषयींच आणखी कारणे-)—**हे अनन्त देवेश जगन्निवास**—हे अपरिच्छिन्न, हे देवांच्या नियंत्या व हे सर्व जगाच्या आश्रया [ तुला ते कां नमस्कार करणार नाहींत ? कारण अनवच्छिन्नत्व, सर्वदेवनियन्तृत्व व सर्वजगदाश्रयत्व हे तुझ्या नमस्कारादियोग्यत्वाचे कारण आहे ]—**यत् वेदान्तेषु श्रूयते-तत् परं अक्षर त्वं**—जे वेदान्तात श्रुत आहे ते परम अक्षर तूं आहेस.—**किं तत्**—तें काय?—**सदसत्-विद्यमानं असत् च यत्र नास्ति इति बुद्धिः**—सत्-असत्-सत् म्ह० विद्यमान व असत् म्ह० जेथे कांहीं नाहीं अशी बुद्धि होते ते-सत्-असत् -विद्यमान-अविद्यमान ( पण एकालाच सदसद्रूपत्व कसे ? उत्तर-)—**ते सदसती उपधानभूते यस्य-अक्षरस्य**—ज्या अक्षराचे सत् व असत् हे उपधानभूत आहेत [ म्ह० ज्या अक्षराच्या त्या दोन उपाधी आहेत, पण सत् व असत् यांना अक्षराचें उपाधित्व कसे ? उत्तर-]—**यद्द्वारेण सत्-असत् इति उपचर्यते**—ज्यांच्या द्वारा तें ब्रह्म 'सत् व असत्' असें गौणवृत्तीने-उपचाराने म्हटले जाते ( ते सत् व असत् त्याच्या उपाधि आहेत. आतां श्लोकातील 'तत्परं यत्' या शेवटच्या शब्दांचें व्याख्यान करितात-)—**परमार्थतः तु सदसतः परं तत् यत् अक्षरं वेदविदः वदन्ति तत् त्वं एव न अन्यत् इति अभिप्रायः**—पण वस्तुतः ते सत् व असत् यांहून अगदीं विलक्षण आहे, ( ते म्ह० कोण ? )—ज्याला वेदवेत्ते 'अक्षर' म्हणतात तें तूंच आहेस, तुझ्याहून तें भिन्न नाहीं.[1] ( अर्थात् तूं असा असल्यामुळे नमस्कारादिकांना योग्यच आहेस. ) ३७.

---

१ रहस्यकार म्हणतात-" सत व असत् या शब्दांचे अर्थ या ठिकाणीं अनुक्रमें व्यक्त व अव्यक्त किंवा क्षर व अक्षर या शब्दांशी समानार्थक आहेत, असे गी. ७. २४, ८.२०;

**त्वमादिदेवः पुरुषः पुराणस्त्वमस्य विश्वस्य परं निधानम् ।**
**वेत्ताऽसि वेद्यं च परं च धाम त्वया ततं विश्वमनन्तरूप ॥**

**अन्वयार्थ**—**त्वं**—तूं—**आदिदेवः**—आद्य देव—**पुराणः पुरुषः**—पुराण पुरुष आहेस—**त्वं**—तूं—**अस्य विश्वस्य**—या विश्वाचें—**परं निधानं**—परम निधान–आधार आहेस.—**त्वं**—तूं—**वेत्ता वेद्यं च परं च धाम असि**—सर्वांना जाणणारा, जाणावयाची वस्तु, व परम पद आहेस.—**हे अनन्तरूप**!—हे अनंतरूपा **त्वया**—तूं—**विश्वं**—विश्वाला—**ततं**—व्यापिलें आहेस. ३८.

**पुनरपि स्तौति—त्वमादिदेवो जगतः स्रष्टृत्वात्, पुरुषः पुरि शयनात्, पुराणश्चिरंतनस्त्वमेवास्य विश्वस्य परं प्रकृष्टं निधानं निधीयतेऽस्मिञ्जगत्सर्वं महाप्रलयादाविति। किंच वेत्ताऽसि वेदिताऽसि सर्वस्यैव वेद्यजातस्य । यच्च वेद्यं वेदनार्हं तच्चासि । परं च धाम परमं पदं वैष्णवम् । त्वया ततं व्याप्तं विश्वं समस्तमनन्तरूपान्तो न विद्यते तव रूपाणाम् ॥ ३८ ॥**

**भाष्यार्थ—पुनरपि स्तौति**—‘ त्वं० ’ या श्लोकानें अर्जुन पुनरपि स्तुति करितो.—**जगतः स्रष्टृत्वात् त्वं आदिदेव**.—जगाच्या स्रष्टत्वामुळे–तूं जगाचा स्रष्टा असल्यामुळे आदिदेव आहेस.—**पुरि शयनात् पुरुषः**—शरीररूपी पुरांत शयन केल्यामुळे–वास केल्यामुळे पुरुष—**पुराणः-चिरंतनः**—पुराण म्ह० चिरंतन–नित्य, —**त्वं एव अस्य विश्वस्य परं प्रकृष्टं निधानं**—तूंच या विश्वाचें श्रेष्ठ निधान आहेस.—**महाप्रलयादौ निधीयते अस्मिन् सर्वं जगत् इति (निधानं)**—महाप्रलयाच्या आरंभी सर्व जगत् यांत ठेविलें जातें–स्थापिलें जातें म्हणून निधान.—**किंच सर्वस्य एव वेद्यजातस्य वेत्ता असि-वेदिता असि**—शिवाय सर्व विषयवर्गाचा वेत्ता आहेस, सर्व विषयांना–वेद्य वस्तूंना जाणणारा आहेस.—**च यत्**

---

किंवा १५.१६ वरून दिसून येईल. ” पण तें बरोबर नाहीं. कारण गी. ७-२४श्लोकांत “ अज्ञ लोक माझें अव्यय श्रेष्ठ स्वरूप जाणत नाहीत. त्यामुळे अव्यक्त असलेलाच मी व्यक्त झालो आहे, असे समजतात,” ( गी भा. पृ. ६३६ ) असें म्हटलें आहे. त्याच्याशी सत् व असत् या शब्दाच्या अर्थाचा काही संबंध नाही. ८ व्या अध्यायाच्या २० श्लोकात “अव्यक्ताहून अगदी भिन्न व श्रेष्ठ असेलेला जो अव्यक्त सनातन भाव तो सर्व भूतांचा नाश झाला तरी नाश पावत नाहीं,” असें म्हटलें आहे. ( गी. भा. पृ. ६६८. ) अ. १५ श्लो. १६ यात “ क्षर व अक्षर असे दोन पुरुष आहेत, सर्व भूतें हा क्षर पुरुष व कूटस्थ हा अक्षर पुरुष होय ” असें म्हटलें आहे, व त्याचा येथील ‘ सत् व असत् ’ या शब्दांच्या अर्थाशी काही संबंध नाही, हें वाचकांच्या सहज लक्षांत येईल. यास्तव आचार्यांनी या पदांचा सत्–विद्यमान असत्–अविद्यमान असा जो अर्थ केला आहे तोच निर्दोष व सयुक्तिक आहे.

**वेद्यं-वेदनार्हं तत् च असि**—आणि जे वेद्य म्ह० जाणण्यास योग्य असलेलें तेंहि तूं आहेस.—**च परं धाम परमं वैष्णवं पदं**—आणि परम धाम-परम वैष्णव पद तूं आहेस.—**त्वया विश्वं-समस्तं ततं-व्याप्तं**—तूं सर्वांना व्यापलें आहेस.——**हे अनन्तरूप तव रूपाणां अन्तः न विद्यते**—हे अनन्तरूप तुझ्या रूपांचा अन्त नाही. ३८.

# वायुर्यमोऽग्निर्वरुणः शशाङ्कः प्रजापतिस्त्वं प्रपितामहश्च । नमो नमस्तेऽस्तु सहस्रकृत्वः पुनश्च भूयोऽपि नमो नमस्ते ॥

**अन्वयार्थ**—**त्वं**—तूं—**वायुः**—वायु—**यमः**—यम, —**अग्निः**—अग्नि,—**वरुणः**—वरुण,—**शशांकः**—चंद्र,—**प्रजापतिः**—कश्यपादिक—**च**—व—**प्रपितामहः**—ब्रह्मदेवाचाहि पिता आहेस.—**ते**—तुला—**सहस्रकृत्वः**—हजार वेळां—**नमः नमः अस्तु**—नमस्कार नमस्कार असो.—**पुनः च**—आणि पुनरपि—**भूयः अपि**—आणखीहि—**ते**—तुला—**नमः नमः अस्तु**—हजारों नमस्कार असोत. ३९

**किंच—वायुस्त्वं यमश्चाग्निर्वरुणोऽपांपतिः शशाङ्कश्चन्द्रमाः प्रजापतिस्त्वं कश्यपादिः प्रपितामहश्च पितामहस्यापि पिता प्रपितामहो ब्रह्मणोऽपि पितेत्यर्थः । नमो नमस्ते तुभ्यमस्तु सहस्रकृत्वः पुनश्च भूयोऽपि नमो नमस्ते । बहुशो नमस्कारक्रियाभ्यासावृत्तिगणनं कृत्वसुचोच्यते । पुनश्च भूयोऽपीति श्रद्धाभक्त्यतिशयादपरितोषमात्मनो दर्शयति ॥ ३९ ॥**

**भाष्यार्थ**—**किं च**—भगवान् सर्वात्मा आहे, याविषयीं 'वायुः०' या श्लोकानें आणखीं एक कारण सांगतात—**वायुः त्वं**—वायु तूं आहेस.—**यमः च अग्निः वरुणः-अपां पतिः शशाङ्कः-चन्द्रमाः प्रजापतिः त्वं कश्यपादिः**—यम व अग्नि, वरुण-जलांचा स्वामी, शशांक म्ह० चंद्रमा व कश्यपादि[1] प्रजापति तूं आहेस.—**च प्रपितामहः पितामहस्य अपि पिता-प्रपितामहः ब्रह्मणः अपि पिता इत्यर्थः**—आणि प्रपितामह-पितामहाचाहि पिता प्रपितामह-ब्रह्मदेवाचाहि पिता-सूत्रात्मा-अन्तर्यामी असा याचा भावार्थ. ( सर्व देवता तूंच आहेस असे सांगितले असतां फलितार्थ सांगतात-)—**नमः नमः ते-तुभ्यं सहस्रकृत्वः अस्तु**—तुला सहस्रवार

---

१ रहस्यकार म्हणतात—"प्रजापतिशब्दाचा कश्यपादि प्रजापति असा कोणी अर्थ करितात. पण प्रजापति हें पद येथें एकवचनी असल्यामुळें प्रजापति म्ह० ब्रह्मदेव हा अर्थ अधिक ग्राह्य दिसतो." पण 'प्रजापति' हा शब्द कश्यपापासून ब्रह्मदेवापर्यंत सर्वांना जर एक सारखाच लागू होतो तर त्यांतील एक ब्रह्मदेवच येथें घेण्याचें कांहीं कारण दिसत नाहीं. म्हणूनच आचार्यांनीं प्रजापति म्ह० 'कश्यपादिः-' कश्यपापासून ब्रह्मदेवापर्यंत सर्व प्रजापति असा अर्थ केला आहे. जेथें 'ब्रह्मदेव' हाच अर्थ घेण्याचें विशेष कारण होतें तेथें तोच अर्थ घेतला आहे. ( गी. भा. पृ. २८२ पहा. )

नमस्कार असोत.—**पुनः च भूयः अपि ते नमः नमः**—तुला पुनःहि नमस्कार असोत.— **बहुशः नमस्कारक्रियाभ्यासावृत्तिगणनं कृत्वसुचा उच्यते** —पुष्कळ वेळां केलेल्या नमस्कारक्रियेच्या अभ्यासाच्या आवृत्तीची गणना 'सहस्रकृत्वः' यांतील 'कृत्वस्' या प्रत्ययाने सांगितली जाते—अनेक सहस्रवेळां मी तुला नमस्कार करितों; असो.—'**पुनश्च भूयः अपि' इति श्रद्धाभक्त्यतिशयात् आत्मनः अपरितोष दर्शयति**—'पुनश्च भूयोऽपि' या शब्दांनीं श्रद्धा व भक्ति यांच्या आधिक्यामुळें असे सहस्रवार नमस्कार जरी केले, तरी आपला असंतोष—अन्तःकरणाची अतृप्ति अर्जुन प्रदर्शित करितो. [अर्थात् आपली अतृप्ति व्यक्त करण्यासाठीं ही पुनरुक्ति आहे.] ३९.

## नमः पुरस्तादथ पृष्ठतस्ते नमोऽस्तु ते सर्वत एव सर्व ।
## अनन्तवीर्यामितविक्रमस्त्वं सर्वं समाप्नोषि ततोऽसि सर्वः ४०

**अन्वयार्थ—ते**—तुला—**पुरस्तात्**—पूर्व दिशेत नमस्कार असो.—**अथ**—त्यानंतर—**पृष्ठतः नमः**—पश्चिम दिशेत तुला नमस्कार असो.—**हे सर्व,सर्वतः एव ते**—हे सर्व,सर्व दिशामध्ये स्थित असलेल्या तुला—**नमः अस्तु**—नमस्कार असो.—**अनंतवीर्यामितविक्रमः**—ज्याचे सामर्थ्य अनंत व पराक्रम अमर्याद आहे असा—**त्वं**—तूं—**सर्वं**—सर्व जगाला—**समाप्नोषि**—व्यापतोस—**ततः**—त्यामुळें तूं—**सर्वः**—सर्व—**असि**—आहेस. ४०.

तथा—नमः पुरस्तात्पूर्वस्यां दिशि तुभ्यमथ पृष्ठतस्ते पृष्ठतोऽपि च ते । **नमोऽस्तु ते सर्वत एव सर्वासु दिक्षु सर्वत्र स्थिताय हे सर्वानन्तवीर्यामितविक्रमोऽनन्तं वीर्यमस्यामितो विक्रमोऽस्य वीर्यं सामर्थ्यं विक्रमः पराक्रमः । वीर्यवानपि कश्चिच्छस्त्रादिविषये न पराक्रमते मन्दपराक्रमो वा । त्वं त्वनन्तवीर्योऽमितविक्रमश्चेत्यनन्तवीर्यामितविक्रमः सर्वं समस्तं जगत्समाप्नोषि सम्यगेकेनाऽऽत्मना व्याप्नोषि यतस्तस्मादसि भवसि सर्वस्त्वया विनाभूतं न किंचिदस्तीत्यर्थः ॥ ४० ॥**

**भाष्यार्थ—तथा**—त्याचप्रमाणें 'नमः०' या श्लोकानें अर्जुन भगवानांची स्तुति दुसऱ्या प्रकारें करितो—**पुरस्तात्-पूर्वस्यां दिशि तुभ्यं नमः**—पुढे म्ह० पूर्वदिशेंत असलेलें सर्व तूंच आहेस त्या तुला नमस्कार असो.—**अथ 'पृष्ठतःते' अपि च**

---

१ 'नमः पुरस्तात् अथ पृष्ठतस्ते' व 'सर्वतः' याचा अर्थ रहस्यकार 'पुढून नमस्कार, पाठिमागून नमस्कार, सर्वबाजूंनां नमस्कार' वगैरे करितात व "हे शब्द परमेश्वराचे सर्वव्यापित्व दाखवितात," असेंहि म्हणतात. पण पुढून, पाठीमागून, व सर्वबाजूंनी असा ज्याचा देशपरिच्छेद होऊं शकतो तो परमेश्वर सर्वव्यापी कसा? त्यासाठींच आचार्यांनी 'पूर्व, पश्चिम इत्यादि सर्व दिशांमध्ये' तूंच व्यवस्थित आहेस,' असे व्याख्यान केले आहे. रहस्यकार टीपेंत 'ब्रह्मैवेदं अमृतं पुरस्तात्, ब्रह्म पश्चात् ब्रह्म दक्षिणतश्चोत्तरेण अधश्चोर्ध्वं च प्रसृतं०' (मुंड. भाष्यार्थ पृ. ८६.) या मुंडकश्रुतीचा आधार दाखवितात. 'स एव अध०

**ते पृष्ठतः**—तसेंच पश्चिम दिशेंत असलेलें सर्व तूंच, त्या तुला नमस्कार असो.—**सर्व सर्वतः एव-सर्वासु दिक्षु-सर्वत्र स्थिताय ते नमः अस्तु**—हे सर्व, सर्वतःच म्ह० सर्व दिशामध्यें सर्वत्र स्थित असलेल्या तुला नमस्कार असो; [ फार काय पण जितक्या दिशा आहेत त्या सर्वांत जें जें कांहीं आहे ते तूंच आहेस, त्या तुला नमस्कार असो. ]—**अनन्तवीर्यामितविक्रमः-अनन्तं वीर्यं अस्य-अमितः विक्रमः अस्य**—ज्याचें वीर्य अनन्त आहे, ज्याचा विक्रम अमित-अपरिमित आहे, तो अनंतवीर्य-अमिताविक्रम होय.—**वीर्यं-सामर्थ्यं विक्रमः-पराक्रमः**—वीर्य म्ह० सामर्थ्य व विक्रम म्ह० पराक्रम.—**कश्चित् वीर्यवान् अपि शस्त्रादिविषये न पराक्रमते वा मन्दपराक्रमः**—कोणी एखादा वीर्यवान्-सामर्थ्यवान् जरी असला तरी शस्त्रादिविषयांत पराक्रम दाखवींत नाही, किंवा त्याचा त्या विषयांत मंद पराक्रम दिसतो.—**तु त्वं अनन्तवीर्यः अमितविक्रमः च इति अनन्तवीर्यामितविक्रमः**—पण तूं अनन्तवीर्य व अमितपराक्रमी आहेस. म्हणून अनन्तवीर्यामितविक्रम,—**सर्वं-समस्तं जगत् समाप्नोषि-यतः एकेन आत्मना: सम्यक् व्याप्नोषि**—सर्व म्ह० समस्त जगत् उत्तमप्रकारें व्यापतोस-ज्याअर्थी एका आत्म्यानें सर्व जगाला उत्तमप्रकारें व्यापतोस—**तस्मात् सर्वः असि-भवसि**—त्याअर्थी तूं सर्व आहेस—

---

स्तात् स उपरिष्टात् स पश्चात् स पुरस्तात् स दक्षिणतः स उत्तरतः ’ (छा.भा पृ. ५६७.) तसेंच ‘आत्मैवाधस्तात् आत्मोपरिष्टात्० ’ (छा. भा. पृ ५६८) या श्रुतिवचनाचाहि निर्देश करितात. पण अर्थ करतांना मात्र ‘ पुढून नमस्कार, पाठीमागून नमस्कार ’ इत्यादि अगदी सदोष शब्दप्रयोग करितात. पण याहिपेक्षां अधिक आश्चर्य तें पुढेंच आहे. वरील श्रुतींचा उल्लेख करून ते म्हणतात “असे जे ब्रह्माचें वर्णन येतें त्याला अनुसरून भक्तिमार्गांतील ही नमनात्मक स्तुति आहे ” तेथे ‘भक्तिमार्गांतील’ हें विशेषण कशाला ? ज्ञानमार्गांत अशी स्तुति संभवत नाही कीं काय ! आणि भक्तिमार्ग व ज्ञानमार्ग हे अत्यंत विलक्षण, एकमेकाच्या अगदी विरुद्ध असे मार्ग आहेत कीं काय ! ‘ नमो ब्रह्मादिभ्यो ब्रह्मविद्यासंप्रदायकर्तृभ्यः०’ ‘ नमः परमऋषिभ्यो नमः परमऋषिभ्यः ’ ‘ एवं उपासितव्यं एवमुत्रैवमुपास्यं ’ इत्यादि ज्ञानकाडातील शेंकडों वाक्येंच ज्ञानमार्ग व भक्तिमार्ग याना भिन्न मानणारांची समजूत भ्रामक आहे,अशी साक्ष देत आहेत. उपासना किंवा भक्ति हें ज्ञानाचें अंतरंग साधन आहे, असा वेदान्तांत घोष केलेला असतांना भक्तिमार्गाला ज्ञानमार्गापासून फोडून अलग करू पाहणें, म्ह०वेदान्ताचें रहस्य आपल्याला कळलें नाही, असेंच स्वमुखानें सांगणें होय. वैदिक धर्माचे मुख्य मार्ग दोन, एक प्रवृत्तिमार्ग व दुसरा निवृत्तिमार्ग.निष्काम कर्मांपासून तों ध्यानयोगापर्यंत सर्व निवृत्तिमार्गाच्याच यथाधिकार कक्षा आहेत. पण ही दृष्टि सोडल्यानेंच गीतारहस्यकार व गीतेचा विचार करणारे इतर आधुनिक, गीतेच्या खऱ्या अर्थाला पारखे झाले आहेत. असो;अर्जुन आपल्या तोंडानेंच जर ‘ नान्तं न मध्यं न पुनः तवादिं पश्यामि ’ ‘सर्वतोऽनन्तरूपं’ (श्लो. १६) ‘अनादिमध्यान्तं’ ( १९ ) इत्यादि म्हणत आहे, तर तोच पुनः त्याच्या विरुद्ध ‘तुम्हांला पुढून नमस्कार,पाठीमागून नमस्कार सर्व बाजूंनीं नमस्कार ’ असें म्हणेल कसा !

**त्वया विनाभूतं किंचित् न अस्ति इत्यर्थः**—तुझ्या विरहित–तूं ज्यांत नाहींस असे काहीं एक नाहीं, असा याचा भावार्थ. ४०.

सखेति मत्वा प्रसभं यदुक्तं हे कृष्ण हे यादव हे सखेति ।
अजानता महिमानं तवेदं मया प्रमादात्प्रणयेन वापि ॥४१॥
यच्चावहासार्थमसत्कृतोऽसि विहारशय्यासनभोजनेषु ।
एकोऽथवाप्यच्युत तत्समक्षं तत्क्षामये त्वामहमप्रमेयम् ॥४२॥

**अन्वयार्थ—तव**—तुझ्या—**महिमानं**—माहात्म्यास—**इदं**—या विश्वरूपास—**अजानता मया**—न जाणणाऱ्या मीं—**प्रमादात्**—अनवधानामुळें—**अपि वा प्रणयेन**—किंवा प्रेमामुळें—**सखा इति मत्वा**—तूं माझ्या बरोबरीचा मित्र आहेस, असें जाणून—**हे कृष्ण, हे यादव हे सखे,—इति**—असें—**प्रसभं**—अनादरानें—**यत् उक्तं**—जे म्हटलें—**च**—आणि—हे **अच्युत-यत्**—जे—**अवहासार्थं**—थट्टा करण्यासाठीं—**विहारशय्यासनभोजनेषु**—विहार करतांना, शय्येवर निजतांना,आसनावर बसतांना व जेवतांना—**एकः**—एकटा असतांना—**अथवा**—किंवा—**तत्समक्षं**—लोकांच्या देखत—**असत्कृतः असि**—असत्कार केला गेला आहेस—**तत्**—ते सर्व—**त्वां अप्रमेयं**—तुज अप्रमेय देवाला—**अहं**—मी—**क्षामये**—क्षमा करण्याची प्रार्थना करतों. ४१, ४२

यतोऽहं त्वन्माहात्म्यापरिज्ञानापराध्यतः—सखा समानवया इति मत्वा ज्ञात्वा विपरीतबुद्ध्या प्रसभमभिभूय प्रसह्य यदुक्तं हे कृष्ण हे यादव हे सखेति चाजानताऽज्ञानिना मूढेन । किमजानतेत्याह महिमानं माहात्म्यं तवेदमीश्वरस्य विश्वरूपम् तवेदं महिमानमजानतेति वैयधिकरण्येन संबन्धः । तवेममिति पाठो यद्यस्ति तदा सामानाधिकरण्यमेव । मया प्रमादाद्विक्षिप्तचित्ततया प्रणयेन वाऽपि प्रणयो नाम स्नेहनिमित्तो विश्रम्भस्तेनापि कारणेन यदुक्तवानस्मि ॥ ४१ ॥

**भाष्यार्थ—यतः अहं त्वन्माहात्म्यापरिज्ञानापराध्यतः**—ज्याअर्थी मी तुझ्या माहात्म्याचें पूर्णपणें ज्ञान नसणें, या अपराधामुळें—**सखा-समानवयाः इति मत्वा**—तूं माझा सखा-समान वयाचा-बरोबरीचा सोबती आहेस असे मानून—**विपरीतबुद्ध्या ज्ञात्वा**—असें विपरीत भावनेनें समजून—**प्रसभं-अभिभूय-प्रसह्य**—बलात्काराने, तुझा तिरस्कार करून-हठानें—**हे कृष्ण, हे यादव, हे सखे इति अजानता-अज्ञानिना-मूढेन यद् उक्तं**—हे कृष्णा, हे यादवा, हे मित्रा,असें न जाणणाऱ्या-मीं अज्ञानी मूढानें जें म्हटलें—**किं अजानता इति आह**—काय न जाणणाऱ्या तूं म्हटलेंस? तें सांगतो—**महिमानं-माहात्म्यं तव ईश्वरस्य इदं विश्वरूपं**—महिम्यास-माहात्म्यास-तुज ईश्वराच्या या विश्वरूपास,—**तव इदं महिमानं अजानता इति वैयधिकरण्येन संबन्धः**—तुझे हे ( विश्वरूप याच) महि-

म्यास असा ‘ इदं ’ व ‘ महिमानं ’ याचा व्यधिकरणानें संबंध लावावा.—**तव इमं इति पाठः यदि अस्ति तदा सामानाधिकरण्यं एव**—पण ‘तव इमं महिमानं ’ असा पाठ जर असेल तर ‘ इमं ’ व ‘महिमानं’ यांचें सामानाधिकरण्यच आहे. (सामानाधिकरण्य म्ह० एका अर्थी एकविभक्तित्व. )—**मया प्रमादात्-विक्षिप्तचित्ततया प्रणयेन वा अपि**—मी प्रमादामुळे-अनवधानामुळें-विक्षिप्तचित्तत्वामुळे किंवा प्रणयानेंहि—**प्रणयः नाम स्नेहनिमित्तः विश्वासः**—प्रणय म्ह० स्नेहाच्या निमित्तानें जडलेला विश्वास—**तेन अपि कारणेन यत् उक्तवान् असि**—त्याहि कारणानें जे बोललों [ त्याची मी तुजकडून क्षमा करवितों, असा पुढील श्लोकांतील ‘ क्षामये ’ या क्रियापदाशीं संबंध ] ४१.

यच्चेति । **यच्चावहासार्थं परिहासप्रयोजनायासत्कृतः परिभूतोऽसि भवसि,क्क विहारशय्यासनभोजनेषु विहरणं विहारः पादव्यायामः शयनं शय्याऽऽसनमास्थायिका भोजनमदनमित्येतेषु विहारशय्यासनभोजनेष्वेकः परोक्षः सन्नसत्कृतोऽसि परिभूतोऽस्यथवाऽपि हेऽच्युत तत्समक्षं तच्छब्दः क्रियाविशेषणार्थः प्रत्यक्षं वाऽसत्कृतोऽसि तत्सर्वमपराधजातं क्षामये क्षमां कारये त्वामहमप्रमेयं प्रमाणातीतम् ॥ ४२ ॥**

**भाष्यार्थ—‘ यत् च० ’ इति**—‘यत् च०’ या श्लोकाने मीं जे अयुक्त भाषण केलें त्याचीच तेवढी क्षमा कर असे नव्हे, तर क्रीडादि प्रसंगीं थट्टेने मी जो तुझा तिरस्कार केला त्याचीहि क्षमा कर असें अर्जुन म्हणतो—**च यत् अवहासार्थं-परिहासप्रयोजनाय असत्कृतः-परिभूतः असि-भवसि**—आणि जे थट्टेनें हंसण्यासाठी-थट्टामस्करी-करून हंसविण्यासाठी-स्वतः हंसून दुसऱ्याला हंसविण्यासाठी असत्कार-पराभव -तिरस्कार केला गेला आहेस, विनोदानें मी जो तुझा अपमान केला,—**क्व**—तो कोठें केला ?—**विहार-शय्या-आसन-भोजनेषु-विहरणं विहारः पादव्यायामः शयनं-शय्या आसनं-आस्थायिका भोजनं-अदनं इति एतेषु विहार-शय्यासनभोजनेषु**—विहार, शय्या, आसन व भोजन या प्रसंगी, विहरण म्ह० विहार-क्रिडा, किंवा पायांचा व्यायाम-फिरणे, शय्या म्ह० शयन-पर्यंकादिक, आसन-बैठक, सिंहासन वगैरे, भोजन-अन्नभक्षण-जेवण इत्यादि प्रसंगी—**एकः परोक्षः सन् असत्कृतः असि-परिभूतः असि**—एकटाच एकांतांत असतांना लोकांच्या परोक्ष, असत्कृत आहेस, माझ्याकडून परिभूत झाला आहेस—**अथवा अपि हे अच्युत तत् समक्षं**—किंवा हे अच्युता, लोकांच्या समक्ष तें परिभवन होईल अशा प्रकारें—**तत्-शब्दः क्रियाविशेषणार्थः**—येथील ‘ तत् ’ हा शब्द परिभव करणें या क्रियेच्या विशेषणार्थ आहे.—**प्रत्यक्षं वा असत्कृतः असि**—किंवा तूं प्रत्यक्ष -लोकांच्या समोर असत्कृत झाला आहेस, किंवा मीं लोकांच्या समोर जो तुझा अपमान केला आहे—**तत् सर्वं अपराधजातं अहं अप्रमेयं-प्रमाणातीतं त्वां क्षामये -क्षमां कारये**—तें सर्व अपराधजात मी अप्रमेय-प्रमाणातीत-प्रमाणाचा विषय न होणाऱ्या अशा तुजकडून क्षमा करवितों. [तुजकडून त्या सर्व अपराधांची क्षमा संपादन

करतों. लोकांच्या परोक्ष–एकांतांत किंवा त्यांच्या समोर तुझा अपमान होईल असें जें वर्तन मीं तुझ्याशीं विहारादिप्रसंगीं केलें आहे, त्या सर्वांबद्दल मी क्षमा मागतों. मला त्याची क्षमा कर. ] ४२.

# पितासि लोकस्य चराचरस्य त्वमस्य पूज्यश्च गुरुर्गरीयान् । न त्वत्समोऽस्त्यभ्यधिकः कुतोऽन्यो लोकत्रयेऽप्यप्रतिमप्रभाव ॥

**अन्वयार्थ**—**त्वं**—तूं—**अस्य चराचरस्य लोकस्य**—या चराचर लोकाचा—**पिता**—जनक—**च**—व—**पूज्यः**—पूज्य—**गरीयान्**—फार मोठा—**गुरुः**—गुरु आहेस.—**अप्रतिमप्रभाव**—ज्याचा प्रभाव अप्रतिम आहे, अशा हे श्रीकृष्णा! —**लोकत्रये अपि**—या तिन्हीं लोकांत—**त्वत्समः अन्यः**—तुझ्यासारखा दुसरा —**न अस्ति**—कोणी नाहीं. मग—**अभ्यधिकः कुतः**—तुझ्यापेक्षां अधिक कोठून असणार ? ४३.

यतस्त्वम्—पिताऽसि जनयिताऽसि लोकस्य प्राणिजातस्य चराचरस्य स्थावरजङ्गमस्य न केवलं त्वमस्य जगतः पिता पूज्यश्च पूजार्हो यतो गुरुर्गरीयान्गुरुतरः । कस्माद्गुरुतरस्त्वमित्याह न च त्वत्समस्त्वत्तुल्योऽन्योस्ति । न हीश्वरद्वयं संभवत्यनेकेश्वरत्वे व्यवहारानुपपत्तेः । त्वत्सम एव तावदन्यो न सभवति कुत एवान्योऽभ्यधिकः स्यात् । लोकत्रयेऽपि सर्वस्मिन्नप्रतिमप्रभाव प्रतिमीयते यया सा प्रतिमा न विद्यते प्रतिमा यस्य तव प्रभावस्य स त्वमप्रतिमप्रभावो हेऽप्रतिमप्रभाव निरतिशयप्रभावेत्यर्थः ॥ ४३ ॥

**भाष्यार्थ**—**यतः त्वं चराचरस्य-स्थावरजंगमस्य लोकस्य-प्राणिजातस्य पिता असि-जनयिता असि**—कारण तूं चराचर म्ह० स्थावर-जंगम लोकाचा–प्राणिवर्गाचा पिता आहेस, उत्पन्न करणारा आहेस—**त्वं केवलं अस्य जगतः पिता न**—तूं केवल या जगाचा पिताच नाहीस, तर—**यतः पूज्यः-पूजार्हः अतः गरीयान्-गुरुतरः गुरुः**—ज्याअर्थीं पूज्य म्ह० पूजार्ह–पूजेला योग्य आहेस त्याअर्थीं अत्यंत श्रेष्ठ गुरु आहेस. [ गुणांच्या आधिक्यामुळें पूजार्हत्व, धर्मादिकांच्या ज्ञानाचा संप्रदाय प्रवृत्त करणारा असल्यामुळें शिक्षक या रूपानें गुरुत्व, सूत्रात्मा, अन्तर्यामी इत्यादि गुरूंचाहि गुरु असल्यामुळें श्रेष्ठ गुरु, हाच अर्थ प्रश्नद्वारा प्रकट करितात–] —**त्वं गुरुतरः कस्मात् इति आह**—तूं अत्यंत गुरु कोणत्या कारणानें, तें अर्जुन सांगतो—**त्वत्समः-त्वत्तुल्यः अन्यः न च अस्ति**—तुझ्या सारखा, त्वत्तुल्य दुसरा कोणी नाहीं, [ ईश्वरा-सारखाच दुसरा ईश्वर असेल, असे कोणी म्हणेल म्हणून अर्जुन म्हणतो–]—**ईश्वरद्वयं न हि संभवति अनेकेश्वरत्वे व्यवहारानुपपत्तेः**—दोन ईश्वर संभवत नाहींत, कारण ईश्वराचें अनेकत्व झाल्यास व्यवहारच संभवणार नाहीं. [ कारण दोघेहि ईश्वर म्ह० स्वतंत्र. त्यामुळें त्यांच्या मनांत जगाच्या

उत्पत्ति-स्थिति-लयादिकांविषयीं एकाच वेळीं परस्पर विरुद्ध कल्पना उद्भवल्यास व्यवहाराचा लोप होईल ! यास्तव दोन ईश्वर संभवत नाहींत. ]—**सर्वस्मिन्-लोकत्रये अपि त्वत्समः एव तावत् अन्यः न संभवति अन्यः अभ्यधिकः कुतः एव स्यात्**—या सर्व त्रिभुवनांतहि तुझ्यासारखाच जर अगोदर दुसरा कोणी संभवत नाहीं तर तुझ्याहून दुसरा सर्वप्रकारें अधिक कसा संभवेल ?—**अप्रतिमप्रभाव-प्रतिमीयते यया सा प्रतिमा न विद्यते प्रतिमा यस्य तव प्रभावस्य सः त्वं अप्रतिमप्रभावः हे अप्रतिमप्रभाव-निरातिशयप्रभाव इत्यर्थः**—जिच्या योगानें वस्तूचें प्रतिमान-प्रतिप्रमाण-केलें जाते ती प्रतिमा-उपमा-दृष्टान्त, ज्या तुझ्या प्रभावाला प्रतिमा नाहीं तो तूं अप्रतिमप्रभाव आहेस. हे अप्रतिमप्रभाव म्ह० निरतिशयप्रभाव, असा याचा भावार्थ. ४३.

## तस्मात्प्रणम्य प्रणिधाय कायं प्रसादये त्वामहमीशमीड्यम् ।
## पितेव पुत्रस्य सखेव सख्युः प्रियः प्रियायार्हसि देव सोढुम् ॥

**अन्वयार्थ—तस्मात्**—म्हणून—**कायं प्रणिधाय**—शरीर भूमीवर दंडाप्रमाणें ठेवून—**प्रणम्य**—प्रणाम करून—**अहं**—मी—**ईशं ईड्यं त्वां**—सर्वांचा ईश्वर व स्तुतीला पात्र अशा तुला—**प्रसादये**—प्रसन्न करतो. हे देवा !—**पुत्रस्य पिता इव**—पुत्राचा अपराध पिता जसा सहन करतो—**सख्युः सखा इव**—मित्राचा अपराध मित्र जसा सहन करतो,—**प्रियायाः प्रियः (इव)**—प्रियेचा-पत्नीचा अपराध प्रिय-पति जसा सहन करतो, तसा—**त्वं**—तूं माझा अपराध—**सोढुं**—सहन करण्यास—**अर्हसि**—योग्य आहेस. ४४.

**यत एवम्—तस्मात्प्रणम्य नमस्कृत्य प्रणिधाय प्रकर्षेण नीचैर्धृत्वा कायं शरीरं प्रसादये प्रसादं कारये त्वामहमीशमीशितारमीड्यं स्तुत्यं त्वं पुनः पुत्रस्यापराधं पिता यथा क्षमते सर्वं सखेव च सख्युरपराधं यथा वा प्रियाया अपराधं प्रियः क्षमत एवमर्हसि हे देव सोढुं प्रसहितुं क्षन्तुमित्यर्थः ॥ ४४ ॥**

**भाष्यार्थ—यतः एवं तस्मात् प्रणम्य-नमस्कृत्य कायं-शरीरं प्रणिधाय-प्रकर्षेण नीचैः धृत्वा**—ज्याअर्थी असें आहे त्याअर्थी प्रणाम म्ह० नमस्कार करून, शरीराला अत्यंत नीच-खालीं भूमीवर धारण करून-साष्टांग लोटांगण घालून—**अहं ईशं-ईशितारं ईड्यं-स्तुत्यं त्वां प्रसादये-प्रसादं कारये**—मी ईश-ईशन-नियमन करणाऱ्या व ईड्य म्ह० स्तुत्य अशा तुला प्रसन्न करितों. तुजकडून प्रसाद करवितों.—**त्वं पुनः पुत्रस्य सर्वं अपराधं पिता यथा क्षमते**—पण तूं पुत्राचा सर्व अपराध पिता जसा सहन करतो,—**च सख्युः अपराधं सखा यथा वा प्रियायाः अपराधं प्रियः क्षमते**—व मित्राचा अपराध मित्र सहन करितो किंवा जसा प्रियेचा अपराध प्रिय सहन करतो—**एवं हे देव त्वं प्रसहितुं-क्षन्तुं इत्यर्थः**

अर्हसि—त्याप्रमाणें देवा, तूं माझे सर्व अपराध पूर्णपणें सहन करण्यास-मला क्षमा करण्यास, असा भावार्थ, योग्य आहेस. ४४.

---

१ रहस्यकार ‘प्रिय. प्रियायार्हसि’ या शब्दाच्या अर्थाविषयी बरीच चर्चा करितात—ते म्हणतात-“या शब्दांचा ‘प्रिय पुरुष ज्याप्रमाणें आपल्या प्रिय स्त्रीला’ असा कित्येक अर्थ करितात. पण आमच्या मतें तो बरोबर नाही. आचार्य ‘प्रियः प्रियायाः अर्हसि’ अशीं पदे तोडून “प्रिय जसा आपल्या प्रियेचा अपराध सहन करतो तसा माझा अपराध सहन करण्यास तू योग्य आहेस” असा अर्थ करितात, हें वर दाखविलेंच आहे. पण रहस्यकार म्हणतात-“व्याकरणरीत्या ‘प्रियायाः अर्हसि’ अशी पदे पडत नाहीत.” ते व्याकरणाच्या चर्चेत पडले नसते तर बरें झाले असतें! कारण व्याकरणरीत्या ‘हे सखे इति’ श्लो. ४१ अशी तरी पदे पडतात का? ‘शक्य अह’ श्लो. ४८ व ५४ ‘यतति,’ ७-३ ‘यततः’ २-६० ‘यतन्ति’ ७-२९ इत्यादि प्रयोग तरी व्याकरणरीत्या शुद्ध आहेत का? मग ‘प्रियायाः अर्हसि’ याच एका प्रयोगाने रहस्यकारांचें काय घोडें मारलें आहे, कोण जाणे! ‘सखे इति’ याचा ‘सखेति’ हा संधि जसा आर्ष आहे तसाच ‘प्रियायाः अर्हसि’ यांचा ‘प्रियायार्हसि’ हा संधि आर्ष आहे. असे संधि गीतेंतच आणखीहि दाखविता येतील. आचार्यादि अद्वैतसंप्रदायी टीकाकारांचा अर्थ बरोबर नाही, असें म्हणण्याचे आणखा एक कारण ते असें सांगतात—या अर्धांत ‘इव-’ शब्द दोन आहेत. त्यांचा ‘पुत्रस्य पिता इव, सख्युः सखा इव’ असा अन्वय लाविल्यावर ‘प्रियः प्रियायाः इव’ असा अन्वय लावण्यास तिसरा ‘इव-’ शब्द नाहीं. “तो अध्याहृत घेणें व तीहि शृंगारिक अत एव अप्रासंगिक उपमा मानणे आमच्या मतें युक्त नाहीं.” पण अशी मागील पदें पुढील वाक्यांत अनुवृत्त होत नाहींतच कीं काय? गीतेंतच अशी अनेक उदाहरणे आहेत. (अ. २ श्लो. ४७, अ. ५ श्लो. ११, १४. अ. १० २१-२४.२७ पहा) पुत्राचे सर्व अपराध पिता, मित्राचे अपराध मित्र व प्रिय पत्नीचे अपराध प्रिय पति, असाच येथील दृष्टान्ताचा ओघ स्वभावतःच वाचकाच्या मनांत उभा राहतो. पण शेवटच्या उपमेला रहस्यकार ‘शृंगारिक अत एव अप्रासंगिक’ म्हणतात. पुत्राच्या व मित्राच्या अपराधाप्रमाणे पत्नीचे अपराध सहन करणे, यात शृंगारिकपणा तो कोणता झाला? जगात पुत्र, मित्र, पत्नी हींच सर्वोत्तम प्रीतिपात्रें असल्यामुळें त्याचे दृष्टान्त देऊन तितक्याच प्रीतीने ‘तूं माझे अपराध सहन कर’ अशी अर्जुनानें प्रार्थना करणे, यांत कांहींच वावगें दिसत नाहीं. बरें, हा अर्थ सदोष मानून जरी सोडला तरी स्वतः रहस्यकार त्याचा निर्दोष अर्थ कसा करितात तो पाहूं. ‘प्रियः प्रियाय सोढुं अर्हसि’ असा पदच्छेद करून त्याचा अर्थ—“प्रियानें म्ह० तुम्हीं प्रियाय म्ह० तुमचा प्रिय जो मी त्याला किंवा तत्प्रीत्यर्थ (माझे सर्व) अपराध क्षमा करावे” असा करितात. हा अर्थ वरील आचार्यांच्या अर्थाहून फार बहारीचा आहे, असेंच रहस्यकार समजले असतील! पण तो कितीसा उपपन्न आहे, तें आतां वाचकच ठरवितील. विस्तारभयास्तव आम्ही त्याची अधिक चर्चा करीत नाहीं, फक्त-‘प्रियः’ ही प्रथमा आहे व ‘अर्हसि’ हा वर्तमानकाळ आहे. ‘प्रियाय’ या शब्दापासून “तुमचा प्रिय जो मी त्याला किंवा तत्प्रीत्यर्थ माझे सर्व अपराध” इतका अर्थ कसा निघतो तें एक रहस्यकारांसच माहीत—पर्वतेच सुचवितों। पिता, सखा व प्रिय हे

**अदृष्टपूर्वं हृषितोऽस्मि दृष्ट्वा भयेन च प्रव्यथितं मनो मे ।**
**तदेव मे दर्शय देव रूपं प्रसीद देवेश जगन्निवास ॥ ४५ ॥**

**अन्वयार्थ—अदृष्टपूर्वं**—यापूर्वी मीं किंवा दुसऱ्या कोणीं न पाहिलेलें हें—**रूपं दृष्ट्वा**—विश्वरूप पाहून—**हृषितः अस्मि**—मीं हृष्ट झालों आहें.—**च**—व—**भयेन**—भयानें—**मे**—माझें—**मनः**—मन—**प्रव्यथितं**—अतिशय व्यथित झालें आहे.—**जगन्निवास**—हे जगन्निवासा—**देव**—हे देवा,—**देवेश**—हे देवेशा,—**प्रसीद**—प्रसन्न हो.—**तत् एव**— तेंच रूप—**मे**—मला—**दर्शय**—दाखीव. ४५.

**अदृष्टपूर्वमिति । अदृष्टपूर्वं न कदाचिदपि दृष्टपूर्वमिदं विश्वरूपं तव मयाऽन्यैर्वा तदहं दृष्ट्वा हृषितोऽस्मि भयेन च प्रव्यथितं मनो मेऽतस्तदेव मे मम दर्शय हे देव रूपं यन्मत्सखं प्रसीद देवेश जगन्निवास जगतो निवासो जगन्निवासो हे जगन्निवास ॥**

**भाष्यार्थ—' अदृष्टपूर्वं० ' इति**—' अदृष्टपूर्वं० ' या श्लोकानें विश्वरूपाचा उपसंहार करण्याची प्रार्थना करितो.—**अदृष्टपूर्वं-मया अन्यैः वा कदाचित् अपि न दृष्टपूर्वं इदं तव विश्वरूपं**—अदृष्टपूर्वं म्ह० मीं किंवा दुसऱ्या कोणीं कधीं-हि यापूर्वी न पाहिलेलं हे तुझें विश्वरूप—**अहं तत् दृष्ट्वा हृषितः अस्मि**—मी ते पाहून हृष्ट-संतुष्ट झालो आहें.—**च भयेन मे मनः प्रव्यथितं**—आणि भयानें माझें मन अतिशय व्यथित झालें आहे.—**अतः हे देव तत् एव रूपं मे-मम दर्शय**—म्हणून हे देवा, तेंच रूप तूं मला दाखीव, कीं—**यत् मत्सखं**—जें माझे मित्ररूप आहे.—**हे देवेश, जगन्निवास प्रसीद**—हे देवेशा, जगन्निवासा, प्रसन्न हो.—**जगतः निवासः-जगन्निवासः**—जगाचा जो निवास-आधार तो जगन्निवास. ४५.

**किरीटिनं गदिनं चक्रहस्तमिच्छामि त्वां द्रष्टुमहं तथैव ।**
**तेनैव रूपेण चतुर्भुजेन सहस्रबाहो भव विश्वमूर्ते ॥ ४६ ॥**

**अन्वयार्थ—अहं**—मी—**किरीटिनं गदिनं चक्रहस्तं**—मस्तकास मुकुट घातलेल्या, गदा घेतलेल्या व हातांत चक्र असलेल्या—**त्वां**—तुला—**तथा एव**—पूर्वीप्रमाणेंच—**द्रष्टुं**—पाहण्यास—**इच्छामि**—इच्छितो.—**सहस्रबाहो विश्व-मूर्ते**—ज्याला सहस्रबाहु आहेत व सर्व विश्व हीच ज्याची मूर्ति आहे. अशा देवा !

---

जसे पुत्र, मित्र, कलत्र यांचे अपराध सहन करतात तसे तूं माझे अपराध सहन कर, हाच आचार्यांनीं केलेला अर्थ अतिशय सरळ व सुबोध आहे. 'प्रियायाः अर्हसि' हा एकच जर आर्ष प्रयोग गीतेंत असता तर रहस्यकारांची ही सर्व खटपट कांहीं तरी ग्राह्य वाटली असती, पण गीतेंतच असे अनेक आर्ष संधि असतांना या एकाच संधीला व्याकरणशुद्ध ठर-विण्यासाठीं इतकी ओढाताण करणें अगदीं अयोग्य आहे, असें आम्ही समजतो.



किरीटिनं गदिनं चक्रहस्तमिच्छामि त्वां द्रष्टुमहं तथैव।
तेनैव रूपेण चतुर्भुजेन सहस्रबाहो भव विश्वमूर्ते ॥ ११-४६ ॥

**—तेन एव**—त्याच पूर्वींच्या—**चतुर्भुजेन रूपेण**—चतुर्भुजरूपानें—**भव**—तूं प्रकट हो. ४६,

**किरीटिनमिति । किरीटिनं किरीटवन्तं तथा गदिनं गदावन्तं चक्रहस्तमिच्छामि त्वां प्रार्थये त्वां द्रष्टुमहं तथैव पूर्ववदित्यर्थः । यत एवं तस्मात्तेनैव रूपेण वसुदेवपुत्ररूपेण चतुर्भुजेन सहस्रबाहो वार्तमानिकेन विश्वरूपेण भव विश्वमूर्ते उपसंहृत्य विश्वरूपं तेनैव रूपेण वसुदेवपुत्ररूपेण भवेत्यर्थः ॥ ४६ ॥**

**भाष्यार्थ—'किरीटिनं०' इति**—तें रूप कोणते त्याचे वर्णन अर्जुन या श्लोकानें करितो.—**किरीटिनं-किरीटवन्तं तथा गदिनं-गदावन्तं चक्रहस्तं त्वां तथा एव-पूर्ववत् इत्यर्थः द्रष्टुं अहं इच्छामि-त्वां प्रार्थये**—किरीटी-किरीटवान्, तसाच गदी-गदावान् व ज्याच्या हातात चक्र आहे अशा तुला, तसेंच म्ह० पूर्वीप्रमाणे, असा भावार्थ; मी पाहण्याची इच्छा करितो-तसेंच तुझें रूप पाहण्याची माझी इच्छा आहे.—**यतः एवं तस्मात् तेन एव रूपेण-वसुदेवपुत्ररूपेण चतुर्भुजेन भव**—ज्याअर्थी असें आहे, त्याअर्थी त्याच रूपाने-चतुर्भुज वसुदेवपुत्ररूपाने तूं हो.—**वार्तमानिकेन विश्वरूपेण हे सहस्रबाहो**—वर्तमानकालच्या-या वेळच्या या विश्वरूपाने हे सहस्रबाहो!—**हे विश्वमूर्ते**-हे सर्वात्मन्—**विश्वरूपं उपसंहृत्य तेन एव रूपेण-वसुदेवपुत्ररूपेण भव इत्यर्थः**—या विश्वरूपाचा उपसंहार करून त्याच रूपाने-वसुदेवपुत्राच्या रूपाने तूं प्रकट हो, असा याचा भावार्थ. ४६

**श्रीभगवान् उवाच**—श्रीकृष्ण म्हणाले—

## मया प्रसन्नेन तवार्जुनेदं रूपं परं दर्शितमात्मयोगात् ।
## तेजोमयं विश्वमनन्तमाद्यं यन्मे त्वदन्येन न दृष्टपूर्वम् ॥४७॥

**अन्वयार्थ—अर्जुन**—हे अर्जुना!—**प्रसन्नेन मया**—प्रसन्न झालेल्या मी—**आत्मयोगात्**—माझ्या योगसामर्थ्यामुळें—**तव**—तुला—**इदं**—हें—**मे**—माझें—**परं तेजोमयं**—श्रेष्ठ तेजोमय,—**विश्वं**—समस्त—**अनन्तं**—अमर्याद—**आद्यं**—अगदीं आरंभींचें—**रूपं**—विश्वरूप—**दर्शितं**—दाखविलें—**यत्**—की जें—**त्वदन्येन**—तुझ्यावांचून दुसऱ्या कोणीं—**न दृष्टपूर्वं**—पूर्वी पाहिलेलें नाहीं. ४७

**अर्जुनं भीतमुपलभ्योपसंहृत्य विश्वरूपं प्रियवचनेनाऽऽश्वासयन्—मया प्रसन्नेन प्रसादो नाम त्वय्यनुग्रहबुद्धिस्तद्वता प्रसन्नेन मया तव हेऽर्जुनेदं परं रूपं विश्वरूपं दर्शितमात्मयोगादात्मन ऐश्वर्यस्य सामर्थ्यात्तेजोमयं तेजःप्रायं विश्वं समस्तमनन्तमन्तरहितमादौ भवमाद्यं यद्रूपं मे मम त्वदन्येन त्वत्तोऽन्येन केनचिन्न दृष्टपूर्वम् ॥ ४७ ॥**

**भाष्यार्थ—अर्जुनं भीतं उपलभ्य विश्वरूपं उपसंहृत्य प्रियवचनेन आश्वासयन् (श्रीभगवान् उवाच)**—अर्जुन भ्याला आहे, असें पाहून विश्वरूपाचा

उपसंहार करून प्रियवचनानें त्याच्या मनाचें सांत्वन करणारे श्रीभगवान् म्हणाले—**प्रसन्नेन मया**—प्रसन्न झालेल्या मी—**प्रसादः नाम त्वयि अनुग्रहबुद्धिः तद्वता प्रसन्नेन मया**—प्रसाद म्ह० तुझ्यावर अनुग्रह करण्याची बुद्धि, त्या बुद्धीनें युक्त असलेल्या अशा-प्रसन्न झालेल्या मीं—**हे अर्जुन, इदं परं रूपं-विश्वरूपं आत्मयोगात्-आत्मनः ऐश्वर्यस्य सामर्थ्यात् तव दर्शितं**—हे अर्जुना, हें श्रेष्ठ रूप-विश्वरूप आत्मयोगानें-आपल्या ऐश्वर्याच्या सामर्थ्यामुळे तुला दाखविलें. ( तें कसें ? ) —**तेजोमयं-तेजःप्रायं**—तेजोमय म्ह० तेजःप्रचुर-तेजाचे ज्यांत प्राचुर्य-आधिक्य आहे असें—**विश्वं-समस्तं**—विश्व म्ह० समस्त-सर्वरूप,—**अनन्तं-अन्तरहितं** —अनन्त म्ह० अन्तरहित,—**आदौ भवं-आद्यं**—अगदी आरंभी-सर्वांच्या पूर्वीं झालेलें-आद्य—**यत् मे-मम रूपं तत् त्वदन्येन त्वत्तः अन्येन केनचित् न दृष्टपूर्वं**—असे जे माझें रूप तें तुजवांचून दुसऱ्या कोणीहि पूर्वी पाहिलेलें नाहीं. ४७.

**न वेदयज्ञाध्ययनैर्न दानैर्न च क्रियाभिर्न तपोभिरुग्रैः ।**
**एवंरूपः शक्य अहं नृलोके द्रष्टुं त्वदन्येन कुरुप्रवीर ॥४८॥**

**अन्वयार्थ—कुरुप्रवीर**—हे अर्जुना !—**नृलोके**—या मनुष्यलोकीं—**त्वदन्येन**—तुझ्यावांचून दुसऱ्या कोणाकडून—**अहं**—मी—**एवंरूपः**—अशा रूपाचा—**द्रष्टुं**—पाहण्यास—**वेदयज्ञाध्ययनैः**—वेद व यज्ञ यांच्या अध्ययनांनीं—**न शक्यः** —शक्य नाहीं—**दानैः न**—दानांनीं नाहीं—**क्रियाभिः न**—कर्मांनीं नाहीं व—**उग्रैः तपोभिः (न शक्यः)**—उग्र तपांनीं शक्य नाहीं. ४८

**आत्मनो मम रूपदर्शनेन कृतार्थ एव त्वं संवृत्त इति तत्स्तौति—न वेदयज्ञाध्ययनैर्न दानैश्चतुर्णामपि वेदानामध्ययनैर्यथावद्यज्ञाध्ययनैश्च, वेदाध्ययनैरेव यज्ञाध्ययनस्य सिद्धत्वात्पृथग्यज्ञाध्ययनग्रहणं यज्ञविज्ञानोपलक्षणार्थम्, तथा न दानैस्तुलापुरुषादिभिर्न च क्रियाभिरग्निहोत्रादिभिः श्रौतादिभिर्नापि तपोभिरुग्रैश्चान्द्रायणादिभिरुग्रैर्घोरैरेवंरूपो यथादर्शितं विश्वरूपं यस्य सोऽहमेवंरूपः शक्यो न शक्योऽहं नृलोके मनुष्यलोके द्रष्टुं त्वदन्येन त्वत्तोऽन्येन कुरुप्रवीर ॥ ४८ ॥**

**भाष्यार्थ—आत्मनः मम रूपदर्शनेन त्वं कृतार्थः एव संवृत्तः इति तत् स्तौति**—आत्मरूप अशा माझें हें रूप पाहून तूं कृतार्थच झाला आहेस, असें सुचविण्यासाठीं भगवान् या श्लोकानें त्या दर्शनाची स्तुति करितात—**वेदयज्ञाध्ययनैः न दानैः न**—वेद-यज्ञाध्ययनांनीं नाहीं, दानांनीं नाहीं,—**चतुर्णां अपि वेदानां यथावत् अध्ययनैः च यज्ञाध्ययनैः** चारी वेदांच्या यथाविधि अध्ययनांनीं व यज्ञा-

---

१ रहस्यकार या शब्दाचा अर्थ—'वेदानें, यज्ञांनीं व स्वाध्यायानें' असा करितात, पण तो चिन्त्य आहे. 'वेदानें' म्हणजे काय ? व वेदाहून स्वाध्याय आणखी निराळा कोणता ? वास्तव या सामासिक शब्दाचा आचार्यांनीं केलेला अर्थच सर्वथा उपपन्न आहे.

ध्ययनांनीं ( पण वेदाध्ययनाहून यज्ञाध्ययन निराळें कोठें आहे ? उत्तर- )—**वेदाध्ययनैः एव यज्ञाध्ययनस्य सिद्धत्वात् पृथक् यज्ञाध्ययनग्रहणं यज्ञविज्ञानोपलक्षणार्थं**—वेदाध्ययनांच्या योगानेच यज्ञाध्ययन सिद्ध होत असल्यामुळें यज्ञाध्ययनाचें येथें जे पृथक् ग्रहण केलें आहे तें यज्ञविज्ञानाच्या उपलक्षणार्थ आहे. [ नुसतें अक्षरग्रहण-वेद तोंडपाठ करणें हे वेदाध्ययन आहे व मीमांसेच्या द्वारा त्याचा अर्थ समजून घेऊन यज्ञाची सर्व इतिकर्तव्यता जाणणें हे यज्ञाध्ययन आहे. ]—**तथा दानैः-तुलापुरुषादिभिः न**—तसेंच तुला[1]पुरुषादि दानांनीं नाहीं,—**क्रियाभिः-अग्निहोत्रादिभिः श्रौतादिभिः न च**—अग्निहोत्रादि श्रौत-स्मार्त क्रियांनी नाहीं,—**तपोभिः उग्रैः-चांद्रायणादिभिः उग्रैः घोरैः अपि न**—उग्र तपांनीं-चांद्रायणादि उग्र-घोर तपांनीहि नाहीं, ( काय नाहीं ? उत्तर- )—**एवंरूपः यथादर्शितं विश्वरूपं यस्य सः अहं एवंरूपः**—जसें दाखविलें तसें विश्वरूप ज्याचें आहे तो मी एवंरूप—**हे कुरुप्रवीर अहं नृलोके मनुष्यलोके त्वदन्येन-त्वत्तः अन्येन द्रष्टुं न शक्यः**—हे कुरुकुलश्रेष्ठा, असा एवंरूप मी नृलोकीं-या मनुष्यलोकीं तुझ्यावांचून दुसऱ्या कोणाकडून पाहिला जाणें शक्य नाहीं. ( माझें हें अशाप्रकारचें रूप तुझ्यावांचून दुसऱ्या कोणालाहि वेदाध्ययनादि कोणत्याहि उपायानें दिसणें शक्य नाहीं. ) ४८.

## मा ते व्यथा मा च विमूढभावो दृष्ट्वा रूपं घोरमीदृङ्ममेदम्।
## व्यपेतभीः प्रीतमनाः पुनस्त्वं तदेव मे रूपमिदं प्रपश्य ४९

**अन्वयार्थ—मम**—माझें—**इदं ईदृक् घोरं रूपं**—हे अशा प्रकारचें घोर रूप—**दृष्ट्वा**—पाहून—**ते**—तुला—**व्यथा**—पीडा—**मा ( भूत् )**—न होवो,—**च**—आणि—**विमूढभावः**—तुझ्या चित्ताचा अत्यंत मूढभाव—**मा (भूत्)**—न होवो.—**त्वं**—तू—**पुनः**—पुनरपि—**व्यपेतभीः**—निर्भय व—**प्रीत मनाः**—संतुष्टचित्त होऊन—**तत् एव**—तेच—**इदं**—हे—**मे रूपं**—माझें रूप—**प्रपश्य**—पहा ४९.

**मा ते व्यथेति । मा ते व्यथा मा भूत्ते भयं मा च विमूढभावो विमूढचित्तता दृष्ट्वोपलभ्य रूपं घोरमीदृग्यथादर्शितं ममेदं व्यपेतभीर्विगतभयः प्रीतमनाश्च सन्पुनर्भूयस्त्वं तदेव चतुर्भुजं शङ्खचक्रगदाधरं तवेष्टं रूपमिदं प्रपश्य ॥ ४९ ॥**

**भाष्यार्थ—' मा ते व्यथा०' इति**—भगवान् सांगतात—**मा ते व्यथा मा भूत् ते भयं**—तुला व्यथा न होवो, तुला भय न वाटो,—**च विमूढभावः मम इदं-ईदृक् यथादर्शितं घोरं रूपं दृष्ट्वा-उपलभ्य विमूढचित्तता मा**—आणि विमूढभाव म्ह० माझें हे अशाप्रकारचें रूप-मीं जसें दाखविलें तसें हें घोर रूप पाहून तुझें चित्त विमूढ न होवो, असा मोहित होऊं नकोस.—**व्यपेतभीः-विगतभयः च प्रीतमनाः सन् पुनः-भूयः त्वं तत् एव चतुर्भुजं-शंखचक्रगदाधरं तव इष्टं**

---

१ स्वतःला सुवर्णादिकांनी तोलून ते ब्राह्मणांस दान देणें.

**इदं रूपं प्रपश्य**—तर भयरहित व प्रसन्नचित्त होऊन पुनरपि तूं तेंच चतुर्भुज-शंख, चक्र, गदा, धारण करणारें तुला इष्ट असलेलें हें रूप पहा, ( तें माझें रूप तूं आतां पूर्णपणे पहा. ) ४९.

**संजय उवाच**—संजय म्हणाला—

**इत्यर्जुनं वासुदेवस्तथोक्त्वा स्वकं रूपं दर्शयामास भूयः ।**
**आश्वासयामास च भीतमेनं भूत्वा पुनः सौम्यवपुर्महात्मा ॥**

**अन्वयार्थ**—**इति**—याप्रमाणें—**वासुदेवः**—वासुदेव—**अर्जुनं**—अर्जुनाला—**तथा**—तसें वचन—**उक्त्वा**—बोलून—**भूयः**—पुनः—**स्वकं रूपं**—आपले रूप—**दर्शयामास**—दाखविता झाला—**च**—आणि तो—**महात्मा**—महात्मा—**पुनः**—पुनरपि—**सौम्यवपुः**—सौम्य स्वरूपाचा—**भूत्वा**—होऊन—**भीतं एनं**—भ्यालेल्या त्याला-अर्जुनाला—**आश्वासयामास**—धीर देऊन त्याचें समाधान करिता झाला.

इत्यर्जुनमिति । इत्येवमर्जुनं वासुदेवस्तथाभूतं वचनमुक्त्वा स्वकं वसुदेवगृहे जातं रूपं दर्शयामास दर्शितवान् । भूयः पुनराश्वासयामास चाऽऽश्वासितवांश्च भीतमेनं भूत्वा पुनः सौम्यवपुः प्रसन्नदेहो महात्मा ॥ ५० ॥

**भाष्यार्थ**—'**इति अर्जुनं०' इति**—असें हें घडलेलें वृत्त सूत-संजय राजाला निवेदन करितो—**इति एवं अर्जुनं वासुदेवः तथाभूतं वचनं उक्त्वा स्वकं वसुदेवगृहे जातं रूपं दर्शयामास-दर्शितवान्**—याप्रमाणें अर्जुनाला वासुदेव 'मया प्रसन्नेन०' अशा प्रकारचें वचन बोलून आपले म्ह० वसुदेवाच्या घरीं उत्पन्न झालेलें आपलें चतुर्भुज रूप दाखविता झाला ( वासुदेवानें अर्जुनाला तसें बोलून आपलें चतुर्भुज-रूप दाखविलें )—**च भूयः पुनः भीतं एनं आश्वासयामास च आश्वासितवान्**—आणि पुनः भ्यालेल्या याला आश्वासन देता झाला. [ भगवानाने त्याच्या चित्ताचें समाधान केलें. भ्यालेल्या अर्जुनाला धीर दिला. तो कसा ? उत्तर-]—**महात्मा पुनः सौम्यवपुः-प्रसन्नदेहः भूत्वा**—तो महात्मा पुनरपि सौम्य शरीरानें युक्त होऊन, प्रसन्न शरीर होऊन त्याला धीर देता झाला. [ ज्याचें स्वरूप फार मोठें आहे असा तो पुनः सौम्य-प्रसन्न स्वरूप झाला व त्यायोगे त्यानें अर्जुनाचे सांत्वन केले. ] ५०.

**अर्जुन उवाच**—अर्जुन म्हणाला—

**दृष्ट्वेदं मानुषं रूपं तव सौम्यं जनार्दन ।**
**इदानीमस्मि संवृत्तः सचेताः प्रकृतिं गतः ॥ ५१ ॥**

**अन्वयार्थ**—**हे जनार्दन**—हे जनार्दना !—**तव**—तुझें—**इदं मानुषं सौम्यं रूपं**—हें मनुष्याकार सौम्य रूप—**दृष्ट्वा**—पाहून मी—**इदानीं**—आतां—**सचेताः**—प्रसन्नचित्त व—**प्रकृतिं गतः**—स्वभावास प्राप्त—**संवृत्तः**—झालों—**अस्मि**—आहे. ५१.

दृष्ट्वेदमिति । दृष्ट्वेदं मानुषं रूपं मत्सखं प्रसन्नं तव सौम्यं जनार्दनेदानीमधुनाऽस्मि संवृत्तः संजातः किं सचेताः प्रसन्नचित्तः प्रकृतिं स्वभावं गतश्चास्मि ॥ ५१ ॥

**भाष्यार्थ—'दृष्ट्वेदं०' इति**—या श्लोकानें भगवानांकडून आश्वासन केला गेलेला अर्जुन त्यांना बोलला—**जनार्दन तव सौम्यं-प्रसन्नं इदं मानुषं रूपं मत्सखं दृष्ट्वा**—हे जनार्दना, तुझें सौम्य म्ह० प्रसन्न असलेले हे मनुष्याचे रूप कीं जें माझें मित्ररूप आहे, असे हें पाहून—**इदानीं अधुना अहं संवृत्तः-संजातः अस्मि** आतां याक्षणीं मी झालों आहे.—**किं**—काय झाला आहेस ?—**सचेताः-प्रसन्नचित्तः**—सचेत-प्रसन्नचित्त झालो आहें.—**च प्रकृतिं-स्वभावं गतः अस्मि**—व प्रकृतीस-स्वभावास प्राप्त झालो आहें. [ हें तुझें मनुष्यरूप पाहून मी आतां स्वस्थचित्त झालो आहे. आतां मी देहभानावर आलों आहे.] ५१

**श्रीभगवान् उवाच**—श्रीकृष्ण म्हणाले—

**सुदुर्दर्शमिदं रूपं दृष्टवानसि यन्मम ।**
**देवा अप्यस्य रूपस्य नित्यं दर्शनकांक्षिणः ॥ ५२ ॥**

**अन्वयार्थ—यत् मम रूपं**—जे माझें रूप—**दृष्टवान् असि**—तूं पाहिले आहेस—**इदं सुदुर्दर्शं अस्ति**—तें हे रूप दिसणे अतिशयच कठिण आहे.—**देवाः अपि**—देवसुद्धां—**नित्यं**—नेहमीं—**अस्य रूपस्य**—या रूपाच्या—**दर्शनकांक्षिणः (सन्ति)**—दर्शनाची आकांक्षा करणारे आहेत. ५२.

सुदुर्दर्शमिति सुदुर्दर्शं सुष्ठु दुःखेन दर्शनमस्येति सुदुर्दर्शमिदं रूपं दृष्टवानसि यन्मम देवा अप्यस्य मम रूपस्य नित्यं सर्वदा दर्शनकाङ्क्षिणो दर्शनेप्सवोऽपि न त्वमिव दृष्टवन्तो न द्रक्ष्यन्ति चेत्यभिप्रायः ॥ ५२ ॥

**भाष्यार्थ—'सुदुर्दर्शं०' इति**—हे अर्जुनाला दाखविलेले विश्वरूप उपासना करण्यास योग्य आहे, असे सुचविण्यासाठीं भगवान् त्याची स्तुति करितात—**यत् मम इदं रूपं दृष्टवान् असि तत् सुदुर्दर्शं-सुष्ठु दुःखेन दर्शनं अस्य इति सुदुर्दर्शं**—जे माझें हे रूप तूं पाहिले आहेस ते अत्यंत दुर्दर्श आहे. फार दुःखाने-कष्टानें याचे दर्शन होते म्हणून सुदुर्दर्श. ( तुझ्यावांचून दुसऱ्या कोणालाहि हे रूप दिसणें शक्य नाहीं, हेच अधिक स्पष्ट करितात-)—**देवाः अपि अस्य मम रूपस्य नित्यं-सर्वदा दर्शनकाङ्क्षिणः**—देवहि या माझ्या रूपाचें दर्शन व्हावें अशी नित्य-सर्वदा आकांक्षा करितात. पण—**दर्शनेप्सवः अपि त्वं इव न दृष्टवन्तः न द्रक्ष्यन्ति च इति अभिप्रायः**—ते देव आपल्याला या रूपाचें दर्शन व्हावें,अशी सतत आकांक्षा जरी करीत असले तरी तुझ्याप्रमाणें त्यांनी तें अद्यापि पाहिलेलें नाहीं व पुढेंहि पाहणार नाहींत, असा याचा आशय. ५२

नाहं वेदैर्न तपसा न दानेन न चेज्यया ।
शक्य एवंविधो द्रष्टुं दृष्टवानसि मां यथा ॥ ५३ ॥

**अन्वयार्थ—यथा**—ज्याप्रमाणे तूं—**मां**—मला—**दृष्टवान् आसि**—पाहिलें आहेस—**एवंविधः अहं**—अशा प्रकारचा मी—**वेदैः**—वेदांनीं—**न द्रष्टुं शक्यः**—दिसणे शक्य नाहीं.—**तपसा न**—तपानें नाहीं,—**दानेन न**—दानानें नाहीं,—**च इज्यया न**—व यज्ञानें किंवा पूजेनेंहि दिसण्यासारखा नाही. ५३.

**कस्मात्—नाहं वेदैर्ऋग्यजुःसामाथर्ववेदैश्चतुर्भिरपि न तपसोग्रेण चान्द्रायणादिना न दानेन गोभूहिरण्यादिना न चेज्यया यज्ञेन पूजया वा शक्य एवंविधो यथादर्शितप्रकारो द्रष्टुं दृष्टवानसि मां यथा त्वम् ॥ ५३ ॥**

**भाष्यार्थ—कस्मात्**—कां वरें तें रूप दुर्दर्श आहे? तें 'नाहं०' या श्लोकानें सांगतात - **अहं वेदैः-ऋक्-यजुः-साम-अथर्ववेदैः चतुर्भिः अपि न**—मी वेदांनीं—ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद व अथर्ववेद या चार वेदांनींहि दिसणे शक्य नाहीं,—**उग्रेण चान्द्रायणादिना तपसा न**—उग्र चान्द्रायणादि तपाच्या योगानें नाहीं,—**गो-भू-हिरण्यादिना दानेन न**—गाय, भूमि, सुवर्ण इत्यादि दानानें नाहीं,—**इज्यया-यज्ञेन न च**—इज्येनें म्ह० यज्ञानेंहि नाही,—**वा पूजया**—किंवा पूजेने—**एवंविधः-यथादर्शितप्रकारः द्रष्टुं शक्यः**—अशा प्रकारचा म्ह० जशा प्रकारचें रूप मीं तुला दाखविलें तशा प्रकारचा मी दिसणे शक्य नाही. कीं—**यथा त्वं मां दृष्टवान् असि**—जशाप्रकारें तूं मला पाहिलें आहेस तशा प्रकारें मी वेद, तप, दान व यज्ञ यांनीं दिसणें शक्य नाही. ५३.

भक्त्या त्वनन्यया शक्य अहमेवंविधोऽर्जुन ।
ज्ञातुं द्रष्टुं च तत्त्वेन प्रवेष्टुं च परंतप ॥ ५४ ॥

**अन्वयार्थ—हे परंतप अर्जुन**—हे शत्रूंना ताप देणाऱ्या अर्जुना!—**तु**—पण—**एवंविधः अहं**—अशा प्रकारचा मी—**अनन्यया भक्त्या**—अनन्य भक्तीनें—**तत्त्वेन**—तत्त्वतः—**ज्ञातुं**—जाणण्यास—**द्रष्टुं**—पाहण्यास—**च**—व—**प्रवेष्टुं**—प्रवेश करण्यास—**शक्यः**—शक्य आहें. ५४.

**कथं पुनः शक्य इत्युच्यते—भक्त्या तु किंविशिष्टयेत्याह—अनन्ययाऽपृथग्भूतया भगवतोऽन्यत्र पृथङ्न कदाचिदपि या भवति सा त्वनन्या भक्तिः सर्वैरपि करणैर्वासुदेवादन्यन्नोपलभ्यते यया साऽनन्या भक्तिस्तया भक्त्या शक्योऽहमेवंविधो विश्वरूपप्रकारो हेऽर्जुन ज्ञातुं शास्त्रतो न केवलं ज्ञातुं शास्त्रतो द्रष्टुं च साक्षात्कर्तुं तत्त्वेन तत्त्वतः प्रवेष्टुं च मोक्षं च गन्तुं परंतप ॥ ५४ ॥**

**भाष्यार्थ—कथं पुनः शक्यः इति उच्यते**—तर मग तूं कसा-कोणत्या उपायानें दिसणें शक्य आहेस ? म्हणून विचारशील तर सांगतो—**भक्त्या तु**—पण भक्तीनें मी दिसणें शक्य आहें—**किं विशिष्टया इति आह अनन्यया-अपृथग्भूतया**—पण किंविशिष्ट भक्तीने-कोणत्या विशेष प्रकारच्या भक्तीने, ते सांगतात-अनन्य-अपृथग्भूत अशा भक्तीनें—**या भगवतः अन्यत्र-पृथक् न कदाचित् अपि भवति सा तु अनन्या भक्तिः**—जी भगवानाहून अन्यत्र-पृथक् केव्हांहि नसते ती अनन्य भक्ति होय. म्हणजे—**यया सर्वैः अपि करणैः वासुदेवात् अन्यत् न उपलभ्यते सा अनन्या भक्तिः**—ज्या भक्तीच्या योगाने सर्वहि इंद्रियांनी वासुदेवाहून दुसरें कांहीं उपलब्ध होत नाहीं,-प्रत्येक इंद्रियाने वासुदेवाचाच अनुभव येतो ती अनन्या भक्ति होय.—**हे अर्जुन तया भक्त्या अहं एवंविधः विश्वरूपप्रकारः शास्त्रतः ज्ञातुं शक्यः**—हे अर्जुना, त्या भक्तीने मी अशा प्रकारचा म्ह० विश्वरूप हा ज्याचा प्रकार आहे असा मी शास्त्राच्या योगाने जाणण्यास शक्य आहे—**केवलं शास्त्रतः ज्ञातुं न द्रष्टुं च साक्षात्कर्तुं तत्त्वेन-तत्त्वतः**—केवल शास्त्रतः जाणण्यासच शक्य आहे, असें नाहीं तर पाहण्यास-साक्षात्कार होण्यास-तत्त्वत. प्रत्यक्ष-अपरोक्ष अनुभवासहि शक्य आहें—**च हे परंतप प्रवेष्टुं-मोक्षं गन्तुं शक्यः**—आणि हे शत्रुतापना, प्रवेश करण्यास-मोक्षाला प्राप्त होण्यासहि शक्य आहे. [ म्ह० अनन्यभक्तीनें माझें हे विश्वरूप दिसणे शक्य आहे, माझे शास्त्रत. ज्ञान होणेंहि शक्य आहे, माझे तत्त्वतः अपरोक्ष ज्ञान होणेंहि शक्य आहे, व माझ्यामध्ये प्रवेश होणे-मोक्ष मिळणेहि शक्य आहे. ] ५४.

**मत्कर्मकृन्मत्परमो मद्भक्तः सङ्गवर्जितः ।**
**निर्वैरः सर्वभूतेषु यः स मामेति पांडव ॥ ५५ ॥**

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे विश्वरूपदर्शनं नामैकादशोऽध्यायः ॥ ११ ॥**

---

१ रहस्यकार 'ज्ञातुं द्रष्टुं च तत्त्वेन प्रवेष्टुं च' यातील तत्त्वेन याचा अन्वय 'ज्ञातुं' किंवा 'द्रष्टुं' यातील एकाशीहि न लावता 'प्रवेष्टुं' या शब्दाशीच लावून 'तत्त्वाने प्रवेश करणे' असा अगदी सरळ अर्थ करितात. पण 'तत्त्वाने प्रवेश करणे' म्हणजे काय ? रहस्यकार या श्लोकावरील टीपेंत म्हणतात—"भक्तीनें परमेश्वराचे प्रथम ज्ञान होते, व नंतर शेवटी भक्ताचें परमेश्वराशी तादात्म्य होते, हाच सिद्धान्त पूर्वी ४-२९ व पुढे १८-५५ या श्लोकांत पुनः आला असून त्याचा खुलासा गीतारहस्याच्या १३ व्या प्रकरणात ( पृ. ४२५-४२७ ) आम्हीं केला आहे तो पहा." चवथ्या अध्यायाच्या २९ व्या श्लोकात प्राणायामरूप गौण यज्ञ सांगितला आहे,त्यामुळे हा आधार बरोबर नाहीं.कदाचित् ती छपाईची चूक असेल.चवथ्या अध्यायाच्या ३९ व्या श्लोकात 'श्रद्धावान्, तत्पर व जितेंद्रिय पुरुषाला ज्ञान होतें व ज्ञान होऊन लागलाच तो परम शांतीला प्राप्त होतो,' असें म्हटलें आहे; कदाचित् हा श्लोक रहस्यकारांना विवक्षित असेल, पण तोहि ते सांगतात त्या सिद्धान्ताला आधार होऊं शकत नाही. १८.५५ श्लोकांत मात्र ते म्हणतात तसा अर्थ आहे. पण त्याचें तात्पर्य तेथेंच अधिक स्पष्ट होईल.

**अन्वयार्थ—पांडव**—हे अर्जुना!—**यः**—जो—**मत्कर्मकृत्**—माझ्यासाठीं कर्म करणारा,—**मत्परमः**—मीच ज्याची परम गति आहे,—**मद्भक्तः**—माझा भक्त,—**संगवर्जितः**—कोणामध्येंहि आसक्ति न ठेवणारा—**सर्वभूतेषु**—सर्वभूतांमध्यें—**निर्वैरः**—वैररहित असतो—**सः**—तो—**मां**—मला—**एति**—प्राप्त होतो. ५५.

**अधुना सर्वस्य गीताशास्त्रस्य सारभूतोऽर्थो निःश्रेयसार्थोऽनुष्ठेयत्वेन समुच्चित्योच्यते—मत्कर्मकृन्मदर्थं कर्म मत्कर्म तत्करोतीति मत्कर्मकृन्मत्परमः करोति भृत्यः स्वामिकर्म न त्वात्मन परमा प्रेत्य गन्तव्या गतिरिति स्वामिनं प्रतिपद्यते, अयं तु मत्कर्मकृन्मामेव परमां गतिं प्रतिपद्यत इति मत्परमोऽहं परमः परा गतिर्यस्य सोऽयं मत्परमस्तथा मद्भक्तो मामेव सर्वप्रकारैः सर्वात्मना सर्वोत्साहेन भजत इति मद्भक्तः। सङ्गवर्जितो धनपुत्रमित्रकलत्रबन्धुवर्गेषु सङ्गवर्जितः सङ्गः प्रीतिः स्नेहस्तद्वर्जितो निर्वैरो निर्गतवैरः सर्वभूतेषु शत्रुभावरहित आत्मनोऽत्यन्तापकारप्रवृत्तेष्वपि य ईदृशो मद्भक्तः स मामेत्यहमेव तस्य परा गतिर्नान्या गतिः काचिद्भवत्ययं तवोपदेश इष्टो मयोपदिष्टो हे पाण्डवेति ॥ ५५ ॥**

इति श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यगोविंदभगवत्पूज्यपादशिष्यश्रीमच्छंकरभगवतः कृतौ श्रीभगवद्गीताभाष्ये विश्वरूपदर्शनं नाम एकादशोऽध्यायः ॥ ११ ॥

**भाष्यार्थ—अधुना सर्वस्य गीताशास्त्रस्य सारभूतः अर्थः-निःश्रेयसार्थः अनुष्ठेयत्वेन समुच्चित्य उच्यते**—आता गीताशास्त्राचा सारभूत अर्थ म्ह० मोक्ष हे ज्याचे परम प्रयोजन आहे असा सारभूत अर्थ अनुष्ठेय-अनुष्ठानास योग्य अशा स्वरूपानें एकत्र संग्रहीत करून संक्षेपतः सांगितला जातो—**'मत्कर्मकृत्'-मदर्थं कर्म मत्कर्म तत्करोति इति मत्कर्मकृत्**—माझ्यासाठीं जे कर्म तें मत्कर्म, असें मत्कर्म-मदर्थकर्म करितो म्हणून मत्कर्मकृत्—**मत्परमः-भृत्यः स्वामिकर्म करोति तु स्वामिनं आत्मनः परमा-प्रेत्य गन्तव्या गतिः इति न प्रतिपद्यते**—मत्परम म्ह० चाकर आपल्या स्वामीचे-धन्याचें काम करतो, पण त्या स्वामीला आपली 'परमा गति'-मेल्यावर प्राप्त करून घ्यावयाची गति-फल असें समजत नाही, [माझा धनी हीच माझी मरणोत्तर गति-प्राप्तव्य फल आहे,असें समजत नाही.]—**तु अयं मत्कर्मकृत् मां एव परमां गतिं प्रतिपद्यते इति मत्परमः**—पण हा माझ्यासाठीं कर्म करणारा मलाच परमागति-मरणोत्तर प्राप्त करून घेण्यास योग्य फल असे समजतो, म्हणून मत्परम—**अहं परमः-परा गतिः यस्य सः अयं मत्परमः**—मी परम म्ह० ज्याची परा गति आहें तो हा मत्परम होय. (भगवान्च परम गति आहे असा ज्याचा निश्चय झालेला असतो त्याची भगवन्निष्ठा सिद्ध होते, असें सांगतात-)—**तथा मद्भक्तः-मां एव सर्वप्रकारैः सर्वात्मना सर्वोत्साहेन भजते इति मद्भक्तः**—तसाच माझा भक्त म्ह० मलाच सर्व प्रकारांनीं, सर्वभावानें, सर्व उत्साहानें भजतो म्हणून माझा भक्त [पण त्याचें चित्त धनादिकांच्या योगानें आकर्षित होत असल्यास सर्वभावानें भजन संभवणार नाहीं, म्हणून म्हणतात-]—**सङ्गवर्जितः-धनपुत्रमित्र-**

**कलत्रबन्धुवर्गेषु सङ्गवर्जितः-सङ्गः प्रीतिः-स्नेहः तद्वर्जितः**-संगरहित-धन, पुत्र, मित्र, पत्नी, इतर आप्तवर्ग यांविषयीं ज्याच्या मनांत संग नाहीं तो संगवर्जित होय. संग म्ह० प्रीति, स्नेह, त्याने रहित—**निर्वैरः-निर्गतवैरः आत्मनः अत्यन्त-अपकार-प्रवृत्तेषु अपि सर्वभूतेषु-शत्रुभावरहितः**—निर्वैर म्ह० ज्याचें वैर-द्वेषपूर्वक अनिष्ट आचरण करणें, ही वृत्ति नाहींशी झाली आहे-आपल्याला अतिशय अपकार करण्यास प्रवृत्त झालेल्याहि सर्वभूतांमध्यें शत्रुभावरहित-अशा प्रतिकूल भूतामध्येहि शत्रुत्वाची भावना न करणारा—**यः ईदृशः मद्भक्तः सः मां एति**—जो अशा प्रकारचा माझा भक्त असतो तो मला प्राप्त होतो.—**अहं एव तस्य परा गतिः अन्या काचित् गतिः न भवति**—मीच त्याची परा गति आहे, दुसरी कोणतीहि गति नाहीं-त्याला माझीच प्राप्ति होते, दुसऱ्या कोणत्याहि फलाची प्राप्ति होत नाहीं.—**हे पांडव, अयं तव इष्टः उपदेशः मया उपदिष्टः इति**—हे अर्जुना, हा तुला अत्यंत इष्ट असा उपदेश मी उपदेशिला-केला आहे.[1] [ याप्रमाणें तूं

---

१ रहस्यकार 'मत्कर्मकृत्' या पदाचा अर्थ " सर्व कर्मे माझीं म्ह० परमेश्वराचीं होत, या बुद्धीनें कर्मे करणारा " असा करितात. पण तो बरोबर नाहीं. सर्व कर्मे परमेश्वराचीं होत म्ह० काय ? व सव कर्मे कोणतीं ? टीपेंत याचा ते असा खुलासा करितात-" परमेश्वरार्पणबुद्धीनें म्ह० जगातील सर्व कर्म परमेश्वराचें असून तोच खरा कर्ता व करविता आहे, पण हे कर्म आपणास निमित्तमात्र करून तो करवीत आहे, अशा निरभिमान बुद्धीनें जगातील व्यवहार भगवद्भक्तानें करावे, ( वर श्लो. ३३ पहा. ) म्हणजे तीं कर्मे शांतीच्या किंवा मोक्षप्राप्तीच्या आड येत नाहींत, असा वरील श्लोकाचा अर्थ आहे.... गीतेतील भक्तिमार्ग स्वस्थ 'हरि हरि' म्हणण्यास सांगणारा नसून जाज्वल्य भक्तीबरोबरच उत्साहानें सकल निष्काम कर्मे करण्यास सांगणारा आहे, हे यावरून उघड होते." परमेश्वरार्पणबुद्धीनें या शब्दाचा अर्थ त्यांनीं जो वर केला आहे तो बरोबर नाहीं. कारण कर्मे ईश्वरार्पण करणें निराळें व कर्ता-करविता ईश्वर आहे, वगैरे समजणें निराळें. कर्म ईश्वरार्पण करण्याचें तत्त्व अ. ९ श्लो. २७ यात सांगितलें आहे. ( गी. भा. पृ. ७१४ वरील भाष्यार्थ व टीप पहा. ) जगातील सर्व कर्मे ईश्वराचीं आहेत, असें समजणें, हे तत्त्वज्ञान नसून मिथ्या ज्ञान आहे. भगवान् स्वतःच 'तस्य कर्तारं अपि मां विद्धि अकर्तारं अव्ययं' ( अ. ४ श्लो. १३ पृ. ३८० ) यांत मला अकर्ता व अव्यय जाण, असे सांगतात, व रहस्यकार 'तोच खरा कर्ता व करविता आहे' असें म्हणतात. 'न कर्तृत्वं न कर्माणि लोकस्य सृजति प्रभुः' ( अ. ५. १४. पृ. ५०८ ) प्रभु-ईश्वर-आत्मा कोणाचें कर्तृत्व उत्पन्न करीत नाहीं, व कर्मे उत्पन्न करीत नाहीं, 'नादत्ते कस्यचित्पापं' (५-१५ पृ. ५१०) असें भगवान् म्हणतात. पण रहस्यकार 'हें कर्म आपणास निमित्तमात्र करून तो करवीत आहे, असें समजून भगवद्भक्तानें जगातील सर्व व्यवहार करावे' असें त्याच्या उलट सांगत आहेत. भगवद्भक्तानें जगातील व्यवहार निरहंकारबुद्धीनें करावे, हे खरें; पण त्या जगांतील व्यवहाराला कांहीं मर्यादा आहे कीं नाहीं? कीं त्यानें आपलें व्यवहाराचाच गुलाम झालें पाहिजे ? ज्ञानी भगवद्भक्तानें जगांतील सर्व वृथा खटाटोप सोडून शरीरधारणाला अवश्य तेवढा व्यवहार करावा, याबद्दल वाद

अनुष्ठान केलेंस म्हणजे तुला भगवत्प्राप्ति अवश्य होईल. या अध्यायांत येणेंप्रमाणें विश्वरूप, सर्वात्मा, सर्वज्ञ, सर्वेश्वर अशा भगवानांचें 'मत्कर्मकृत्' इत्यादि न्यायानें क्रममुक्ति हें फल देणारें ध्यान सांगणाऱ्या भगवानांनीं तत्पदाचा वाच्य अर्थ निश्चित केला.]५५

इति भगवान् श्रीकृष्णांनी गायलेल्या उपनिषदांतील–रहस्यविद्येतील ब्रह्मविद्येपैकी योग–उपाय-शास्त्रांतील विश्वरूपदर्शननांवाचा अकरावा अध्याय विष्णुशर्मकृत सान्वयार्थ-सटीप-भाष्य-भाष्यार्थासह समाप्त झाला.

---

नाहीं व त्यासाठीं विधीहि नको. तसल्या व्यवहारानें त्याच्या मोक्षाला बाध येत नाहीं, हे पूर्वी 'शारीर केवलं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिष'(अ. ४-२१पृ.४१६)यांत सांगितलेंच आहे. पण रहस्यकाराचा जगाचा व्यवहार निराळाच आहे. त्याना वस्तुतः आत्मज्ञानहि नको आहे व श्रेष्ठ भक्तिहि नको आहे. त्याना जगांतील उपव्याप मात्र पाहिजे आहेत. म्हणूनच ते वर "गीतेंतील भक्तिमार्ग 'हरि हरि' म्हणण्यास सांगणारा नसून " वगैरे म्हणत आहेत, पण त्याबरोबरच–तसा एखादा भक्त संभवतो तरी का? याचा मुळींच विचार करीत नाहींत. पुढील अध्यायांत १३–२० श्लोकांत गीतेंतील भक्तिमार्ग काय सांगतो, ते स्पष्टच आहे. भक्तानें काय करावें व कसें वागावें ते त्यावरून कोणालाहि सहज कळण्यासारखे असल्यामुळे त्याबद्दल येथें अधिक चर्चा नको. रहस्यकार पुनः म्हणतात–"निर्वैरः म्ह० सन्यास मार्गीयाप्रमाणे निष्क्रिय असा अर्थ येथें विवक्षित नाहीं " पण निर्वैर म्ह० निष्क्रिय असा अर्थ कोणीच करीत नाहीं.अर्थात् " हें व्यक्त करण्यासाठीं त्याला 'मत्कर्मकृत् म्ह० सर्व कर्में परमेश्वराचीं आहेत, आपलीं नव्हेत, असें मानून परमेश्वरार्पणबुद्धीनें ती करणारा ' हें विशेषण जोडलें आहे" इत्यादि जें रहस्यकार म्हणतात तें अगदीं अयोग्य आहे.ते म्हणतात तसा 'मत्कर्मकृत्' याचा अर्थ होऊं शकत नाहीं.मग त्यासाठीं त्यांनीं (गी.र.पृ.३८९-३९६) पर्यंत कितीहि कां असंबद्ध विस्तार केलेला असेना!'मत्कर्मकृत्' याचा अर्थ 'मदर्थमपि कर्माणि कुर्वन् सिद्धिं अवाप्स्यसि' (१२–१०) इत्यादि भगवद्वचनांना अनुसरूनच केला पाहिजे.

# अध्याय बारावा.

## भक्तियोग.

द्वितीयप्रभृतिष्वध्यायेषु विभूत्यन्तेषु परमात्मनो ब्रह्मणोऽक्षरस्य विध्वस्तसर्वविशेषणस्योपासनमुक्तं सर्वयोगैश्वर्यसर्वज्ञानशक्तिमत्सत्त्वोपाधेरीश्वरस्य तव चोपासनं तत्र तत्रोक्तं विश्वरूपाध्याये त्वैश्वरमाद्यं समस्तजगदात्मरूपं विश्वरूपं त्वदीयं दर्शितमुपासनार्थमेव त्वया तच्च दर्शयित्वोक्तवानसि मत्कर्मकृदित्याद्यतोऽहमनयोरुभयोः पक्षयोर्वैशिष्टतरबुभुत्सया त्वां पृच्छमीति—

**भाष्यार्थ**—( पूर्वोत्तरसंबंध- )--**द्वितीयप्रभृतिषु विभूत्यन्तेषु अध्यायेषु परमात्मनः अक्षरस्य विध्वस्तसर्वविशेषणस्य ब्रह्मणः उपासनं उक्तं**--द्वितीयाध्यायांतील ' अशोच्यानन्वशोचस्त्वं० ' या श्लोकापासून-म्ह० दुसऱ्या अध्यायापासून विभूतिसंज्ञक दहाव्या अध्यायाच्या अन्तापर्यंत-या सर्व अध्यायांत परमात्म्याचे -अक्षराचे-सर्वविशेषणशून्य-अशा निर्विशेष ब्रह्माचे उपासन सांगितले म्ह० निरुपाधिक ब्रह्म ज्ञेय-जाणण्यास योग्य आहे असे अनुसंधान करावयास सांगितलें—**तत्र तत्र च सर्वयोगैश्वर्य-सर्वज्ञानशक्तिमत्सत्त्वोपाधेः ईश्वरस्य तव उपासनं उक्तं**—आणि त्याच अध्यायांत ठिकठिकाणीं सर्वयोगैश्वर्य, सर्वज्ञानशक्ति यांनी युक्त, असे सत्त्व हीच ज्याची उपाधि आहे अशा सोपाधिक ईश्वराचे म्ह० तुझेच ध्येयत्वाने उपासन सांगितले. [ ध्यानाचा विषय या रूपानें तुझें चिन्तन करावयास सांगितले. सर्व प्रपंचाचा योग म्ह० जन्म, स्थिति, नाश, प्रवेश, नियमन या नांवाची घटना, त्या घटनेचे-योगाचे ऐश्वर्य म्ह० सामर्थ्य, त्या सामर्थ्यानें, सर्व ज्ञेयामध्ये प्रतिबंधशून्य अशा ज्ञानशक्तीनें विशिष्ट व सत्त्वादि उपाधीनें युक्त अशा भगवानाचें ध्यान प्रत्येक अध्यायांत प्रसंग आणून मंद व मध्यम अधिकाऱ्यांवर अनुग्रह करण्यासाठीं सांगितले, असा याचा भावार्थ. ]—**तु विश्वरूपाध्याये ऐश्वरं आद्यं समस्तजगदात्मरूपं त्वदीयं विश्वरूपं उपासनार्थं एव त्वया दर्शितं**—पण विश्वरूपाध्यायांत ईश्वरासंबंधी आद्य समस्त जगदात्मरूप असे तुझें विश्वरूप उपासनेसाठींच तूं दाखविलेंस.—**च तत् दर्शयित्वा ' मत्कर्मकृत्० ' इत्यादि उक्तवान् असि**—आणि ते दाखवून तूं शेवटीं 'मत्कर्मकृत्०'इत्यादि सांगितलें आहेस—**अतः अनयोः उभयोः पक्षयोः विशिष्टतरबुभुत्सया त्वां पृच्छामि इति (अर्जुन उवाच-)**—यास्तव या दोन पक्षांतील

---

१ रहस्यकारानो आपल्या संप्रदायाला अनुसरून या अध्यायाचा पूर्वाध्यायाशी संबंध दाखवितांना कर्मयोगाचेंच चर्वितचर्वण केलें आहे. पण त्याचे निरसन पूर्वीच केलेले असल्यामुळें ते ' कर्मयोगासिद्ध्यर्थ सातव्या अध्यायांत ज्ञानविज्ञाननिरूपणास आरंभ होऊन ' इत्यादि पुनः पुनः अनेकदा जरी म्हणत असले तरी आम्ही तिकडे दुर्लक्ष करितों. अकराव्या अ-

ध्यायाच्या शेवटच्या श्लोकांत ' भक्तीने व निःसंगबुद्धीने सर्व कर्में करण्याबद्दल... उपदेश केला ' हें म्हणणें असंबद्ध कसे आहे तेंहि वर ( पृ. ८१७) दाखविलेंच आहे. " आठव्या अध्यायांत अक्षर, अनिर्देश्य व अव्यक्त ब्रह्माचें स्वरूप सांगितलें"..."सातव्या व आठव्या अध्यायांत क्षराक्षरविचारपूर्वक परमेश्वराचे अव्यक्तरूपच श्रेष्ठ असे सिद्ध करून अव्यक्ताची किंवा अक्षराची उपासना सांगितली. ( ७.१९ व २४, ८.२१. ) व ' युक्तचित्तानें युद्ध कर, ' असा उपदेश केला. ८-७ " " नवव्या अध्यायात व्यक्तोपासनेचा प्रत्यक्ष धर्म सांगून सर्व कर्मे परमेश्वरार्पणबुद्धीने करावी (९.२७, ३४, ११.५५) असें सांगितले, यांतील श्रेष्ठ मार्ग कोणता ? ' व्यक्तोपासना म्ह० भक्ति, " " उपास्य किंवा प्रतीक कोणतेंहि असलें तरी त्यांत एकाच सर्वव्यापी परमेश्वराची भावना ठेवून जी भक्ति करितात ती खरी व्यक्तोपासना होय." इत्यादि प्रतिपादन शास्त्रदृष्ट्या चुकीचें आहे.कारण ७.१९ श्लोकात "अनेक जन्मांच्या शेवटी ज्याचें ज्ञान परिपक्व झाले आहे असा ज्ञानी वासुदेवच सर्व आहे, असा मला शरण येतो तो महात्मा अत्यंत दुर्लभ आहे. " असे सांगितले आहे. ७.२४ श्लोकांत " अविवेकी, माझ्या अक्षय उत्कृष्ट परम स्वरूपास न जाणणारे जन पूर्वी अव्यक्त –अप्रकट असलेल्या मला आता व्यक्त–प्रकट झालेला समजतात. " असें म्हटलें आहे. ८.२१ श्लोकांतहि–" श्रुतीत जो अव्यक्त व अक्षर असे म्हटला गेलेला त्याच अक्षरसंज्ञक अव्यक्त भावाला परमगति म्हणतात. " असे म्हटले आहे. यावरून रहस्यकाराचे वरील म्हणणें किती असंबद्ध आहे ते वाचकाच्या लक्षात येईल. ८.७ या श्लोकाचा अर्थहि वर गी. भा. पृ. ६५१, ६५२ यावर पहा. ९.२७ व ३४ या श्लोकाचा अर्थहि क्रमाने गीताभाष्यार्थ पृ. ७१४ व ७२४ वर पहा. ११.५५ चा अर्थ पृ. ८१५वर पहा. म्हणजे रहस्यकारांचें म्हणणे मुळाला सोडून कसे आहे ते लक्षांत येईल. रहस्यकार म्हणतात–"अव्यक्तोपासना व व्यक्तोपासना यातील श्रेष्ठ मार्ग कोणता व व्यक्तोपासना म्ह० भक्ति" पण हे म्हणणे बरोबर नाही. "अबुद्धिमान् लोक माझा परम भाव न जाणता अव्यक्त असलेल्या मला व्यक्त झालेला समजतात."(गी. भा. पृ. ६३६) असे म्हणून ईश्वराला व्यक्त मानणाऱ्या लोकांना स्वतः भगवानच ' अबुद्धिमान् ' ही संज्ञा देत आहेत हे लक्षात ठेवले पाहिजे. पण उपास्य व प्रतीक याना एकच मानणाऱ्या रहस्यकाराना हा भेद स्फुरणें शक्य नाही. ' तदेव ब्रह्म त्वं विद्धि नेदं यदिदमुपासते ' (केन. भाष्यार्थ. पृ. ३७–३९ पहा.) इंद्रियांचा जें विषय न होणारें तेच ब्रह्म आहे असे तूं समज. ज्याची उपासना केली जाते ते ब्रह्म नव्हे. ' ब्रह्मदृष्टिरुत्कर्षात् ' ( ब्र. सू. अ. ४ पा. १ सू. ५ ) इत्यादि श्रुति-सूत्रप्रमाणांवरून सर्वत्र ब्रह्मच उपास्य असून ओंकार,आदित्य,शालग्राम इत्यादि प्रतीकें हें त्याच्या उपासनेचे आलंबन आहे. व्यक्त प्रतीक केव्हांच उपास्य किंवा ध्येय होऊं शकत नाही. ' येऽप्यन्यदेवता भक्ताः...तेऽपि मां एव' ' अहं सर्वयज्ञानां भोक्ता०' ( गीता भा. पृ. ७१० व १२ पहा. ) इत्यादि येथेंहि म्हटलें आहे. ' निरनिराळ्या अनेक उपास्यांची ' ही शब्दयोजनाहि सदोष आहे. "कोणत्याहि प्रतीकामध्यें सर्वव्यापी परमेश्वराची भावना ठेवून जी भक्ति करितात ती खरी व्यक्तोपासना " हे व्यक्तोपासनेचें लक्षण जरा चमत्कारिक दिसतें. लहानशा एका प्रतीकांत सर्वव्यापी ईश्वराची भावना करावयाची, हें जर खरें तर त्या उपासनेला व्यक्त कां म्हणावयाचें ? प्रतीक व्यक्त असतें म्हणून कीं काय ? रहस्यकारांचा तोच

अधिक विशिष्ट–अधिक चांगले उपासन कोणते ते जाणण्याच्या इच्छेनें मी तुला विचारितों, असें अर्जुन म्हणाला—

**अर्जुन उवाच**—अर्जुन म्हणाला—

**एवं सततयुक्ता ये भक्तास्त्वां पर्युपासते ।**
**ये चाप्यक्षरमव्यक्तं तेषां के योगवित्तमाः ॥ १ ॥**

**अन्वयार्थ—एवं**—अकराव्या अध्यायाच्या शेवटीं सांगितल्याप्रमाणे—**सततयुक्ताः**—अहोरात्र–भगवत्कर्मादिकांत युक्त होऊन—**ये भक्ताः**—जे भक्त—**त्वां**—तुला—**पर्युपासते**—भजतात–तुझे ध्यान करितात—**अपि च**—आणि—**ये**—जे भक्त—**अव्यक्तं अक्षरं पर्युपासते**—अव्यक्त ब्रह्माची उपासना–भक्ति–ध्यान करितात—**तेषां**—त्या दोन प्रकारच्या भक्तांतील—**योगवित्तमाः के**—अधिक योगवेत्ते कोण ? त्यांतील श्रेष्ठ भक्त कोण ? १.

**एवमित्यतीतानन्तरश्लोकेनोक्तमर्थं परामृशति मत्कर्मकृदित्यादिना। एवं सततयुक्ता नैरन्तर्येण भगवत्कर्मादौ यथोक्तेऽर्थे समाहिताः सन्तः प्रवृत्ता इत्यर्थः। ये भक्ता अनन्यशरणाः सन्तस्त्वां यथादर्शितं विश्वरूपं पर्युपासते ध्यायन्ति ये चान्येऽपि त्यक्तसर्वैषणाः संन्यस्तसर्वकर्माणो यथाविशेषितं ब्रह्माक्षरं निरस्तसर्वोपाधित्वादव्यक्तमकरणगोचरं यद्धि लोके करणगोचरं तद्व्यक्तमुच्यतेऽञ्जेर्धातोस्तत्कर्मकत्वादिदं त्वक्षरं तद्विपरीतं शिष्टैश्चोच्यमानैर्विशेषणैर्विशिष्टं तद्ये चापि पर्युपासते तेषामुभयेषां मध्ये के योगवित्तमाः केऽतिशयेन योगविद इत्यर्थः ॥ १ ॥**

**भाष्यार्थ—एवं इति ' मत्कर्मकृत्० ' इत्यादिना अतीत-अनन्तरश्लोकेन उक्तं अर्थं परामृशति**—' एवं० ' या शब्दानें आतांच वर होऊन गेलेल्या

---

आशय दिसतो. पण त्याला विशेष आधार नाहीं, सोपाधिक उपासना हे अशा उपासनेला यथार्थ नांव आहे. शिवाय परमेश्वराची भावना ठेवून भक्ति करणे म्हणजे काय ? भक्तीचें स्वरूप काय ! भक्ति करणे म्ह० काय करितात. मूर्तीची पूजा करीत बसणे, का राम राम, हरि हरि, विठ्ठल विठ्ठल म्हणणे ? रहस्यकारानी त्याचा सविस्तर खुलासा काहीच केलेला दिसत नाहीं. " या अध्यायात तीच व्यक्त उपासना उद्दिष्ट आहे," असे ते म्हणतात. आपण तेंच आता पाहूं.

१ ' एवं सततयुक्ताः– ' या शब्दाचा 'याप्रमाणे नेहमी युक्त म्ह० युक्तचित्त' असा अगदी सरळ अर्थ रहस्यकारांनी केला आहे. तसेंच–'त्वा पर्युपासते–' म्ह० "तुमची उपासना करितात" असे ते म्हणतात, पण 'याप्रमाणे' म्ह० कशाप्रमाणे 'तुमची' म्ह० कोणाची याचा उलगडा होत नाहीं. आचार्यांनी या दोन्ही शब्दांचा उलगडा अगदी स्पष्ट केला आहे. या एका उदाहरणावरूनच आचार्यांचे भाष्य व रहस्य यात केवढे मोठे अन्तर आहे ते कोणालाहि सहज दिसून येईल.

'मत्कर्मकृत्०' इत्यादि श्लोकानें सांगितलेल्या अर्थाचा परामर्श-उल्लेख करितात.—**एवं सततयुक्ताः-नैरंतर्येण भगवत्कर्मादौ यथोक्ते अर्थे समाहिताः सन्तः प्रवृत्ताः इत्यर्थः**—याप्रमाणें सतत युक्त झालेले म्ह० निरंतर-सतत भगवत्कर्मादि पूर्वोक्त अर्थामध्यें समाहित होत्साते प्रवृत्त झालेले असा याचा भावार्थ.—**ये भक्ताः-अनन्यशरणाः सन्तः त्वां-यथादर्शितं विश्वरूपं पर्युपासते-ध्यायन्ति**—जे ( मंद व मध्यम अधिकारी ) भक्त अनन्यशरण होत्साते अकराव्या अध्यायांत जसें दाखविले आहे तशा प्रकारच्या तुज विश्वरूपाची-सगुण ब्रह्माची उपासना करितात-तुज विश्वरूपाचें ध्यान करितात—**च ये अन्ये अपि त्यक्तसर्वैषणाः संन्यस्तसर्वकर्माणः यथाविशेषितं ब्रह्म**—व जे दुसरे निर्गुण ब्रह्मनिष्ठ, उत्तमाधिकारीहि ज्यांनीं सर्व एषणांचा-कामांचा त्याग केला आहे, सर्व कर्मांचा संन्यास केला आहे असे होत्साते 'अनिर्देश्य, सर्वत्रग, अचिन्त्य,कूटस्थ' इत्यादि पुढे तिसऱ्या श्लोकांत सांगितलेल्या विशेषणांनीं विशिष्ट अशा ब्रह्माची (उपासना करितात, असा संबंध. ब्रह्म कसें ? )—**निरस्तसर्वोपाधित्वात् अक्षरं**—सर्व उपाधिशून्य असल्यामुळे अक्षर ( ब्रह्माच्या 'अव्यक्त' या विशेषणाचें स्पष्टीकरण )—**अव्यक्तं-अकरणगोचरं**—अव्यक्त म्ह० इंद्रियांचा विषय न होणारें—**लोके यत् हि करणगोचरं तत् व्यक्तं उच्यते**—व्यवहारांत जें इंद्रियांचा विषय होतें त्याला व्यक्त असें म्हणतात. कारण—**अञ्जेः धातोः तत्कर्मकत्वात्**—'अञ्ज' या धातूला तत्कर्मकत्व आहे. म्ह० अञ्ज या धातूचा इंद्रियांचा विषय होणें हा अर्थ आहे.—**तु इदं अक्षरं तद्विपरीतं**—पण हें अक्षर त्याहून विपरीत म्ह० इंद्रियांचा विषय न होणारें,म्हणून अव्यक्त आहे,—**च शिष्टैः उच्यमानैः विशेषणैः विशिष्टं**—आणि पुढे सांगितल्या जाणाऱ्या दुसऱ्याहि विशेषणांनी विशिष्ट, अशा—**तत च अपि ये पर्युपासते**—त्या अव्यक्त अक्षराचीहि जे उपासना करितात—**तेषां-उभयेषां मध्ये के योगवित्तमाः-अतिशयेन योगविदः इत्यर्थ**—त्या दोघांमध्यें कोण योगवित्तम[१] आहेत म्ह०अतिशय योगवेत्ते-उत्तम योगी कोण आहेत, असा भावार्थ.[सगुणोपासक चांगले की निर्गुणोपासक चांगले? त्यांतील अधिक चांगले कोण?]

**श्रीभगवान् उवाच**—श्रीकृष्ण म्हणाले—

**मय्यावेश्य मनो ये मां नित्ययुक्ता उपासते ।**
**श्रद्धया परयोपेतास्ते मे युक्ततमा मताः ॥ २ ॥**

**अन्वयार्थ—ये**—जे—**मयि**—माझ्या ठिकाणीं-माझ्या सगुण स्वरूपांत—**मनः**—मन—**आवेश्य**—स्थिर करून-माझ्या सगुण विश्वस्वरूपांत मन लावून—**नित्य-**

---

१ रहस्यकार 'के योगवित्तमाः' याचा अर्थ "उत्तम कर्मयोगवेत्ते कोण ?" असा करितात. पण तो अप्रासंगिक आहे. उपासना करणारोला उपासक म्हणावयाचे की कर्मयोगी म्हणावयाचें ! पण रहस्यकार जर ज्ञानी जीवन्मुक्ताला सुद्धां कर्मयोगी म्हणण्यास कचरत नाहीत तर बिचाऱ्या उपासकाची काय कथा !

**युक्ताः**—सतत-हमेश-अहोरात्र युक्तचित्त होऊन व—**परया श्रद्धया उपेताः**—अत्यंत श्रद्धेनें युक्त होऊन—**मां**—माझी—**उपासते**—उपासना करितात-मला भजतात—**ते**—ते सगुणभक्त—**मे**—मला—**युक्ततमाः**—अतिशय उत्तम भक्त-श्रेष्ठ उपासक, असे—**मताः**—संमत आहेत. सगुण ईश्वरार्चा उपासना करणारे श्रेष्ठ असें मी समजतो.

ये त्वक्षरोपासकाः सम्यग्दर्शिनो निवृत्तैषणास्ते तावत्तिष्ठन्तु तान्प्रति यद्वक्तव्यं तदुपरिष्टाद्वक्ष्यामः । ये त्वितरे—मयि विश्वरूपे परमेश्वर आवेश्य समाधाय मनो ये भक्ताः सन्तो मां सर्वयोगेश्वराणामधीश्वरं सर्वज्ञं विमुक्तरागादिक्लेशतिमिरदृष्टिं नित्ययुक्ता अतीतानन्तराध्यायान्तोक्तश्लोकार्थन्यायेन सततयुक्ताः सन्त उपासते श्रद्धया परया प्रकृष्टयोपेतास्ते मे मम मता अभिप्रेता युक्ततमा इति । नैरन्तर्येण हि ते मच्चित्ततयाऽहोरात्रमतिवाहयन्त्यतो युक्तं तान्प्रति युक्ततमा इति वक्तुम् ॥ २ ॥

**भाष्यार्थ—तु ये अक्षरोपासकाः सम्यग्दर्शिनः निवृत्तैषणाः ते तावत् तिष्ठन्तु**—पण जे अक्षरोपासक-सम्यग्ज्ञानी-एषणाशून्य ते अगोदर राहूं देत.—**तान् प्रति यत् वक्तव्यं तत् उपरिष्टात् वक्ष्यामः**—त्यांच्याविषयीं मला जे सांगावयाचें आहे तें मी पुढें-मागाहून सांगेन.—**तु ये इतरे**—पण जे दुसरे—**मयि विश्वरूपे परमेश्वरे मनः आवेश्य-समाधाय**—माझ्या ठिकाणी म्ह० विश्वरूप परमेश्वराचे ठिकाणी मन स्थिर करून-समाहित करून—**ये भक्ताः सन्तः**—जे माझे भक्त होत्साते—**मां सर्वयोगेश्वराणां अधीश्वरं सर्वज्ञं विमुक्तरागादिक्लेशतिमिरदृष्टिं**—मला म्ह० योगारूढ झालेल्या-योगेश्वर बनलेल्या सर्व योग्यांच्या श्रेष्ठ ईश्वराला-सर्वज्ञाला-रागादिक्लेशांचे निमित्त अशा तिमिरनांवाच्या दृष्टीचा ज्याने त्याग केला आहे-म्ह० अविद्यासंज्ञक मिथ्या बुद्धीचा ज्याने त्याग केला आहे अशा मला—**नित्ययुक्ताः-अतीत-अनन्तर-अध्यायान्त-उक्त-श्लोकार्थन्यायेन सततयुक्ताः सन्तः**—नित्ययुक्त म्ह० नुकत्याच संपलेल्या अकराव्या अध्यायाच्या शेवटी सांगितलेल्या श्लोकाच्या अर्थाप्रमाणे-त्या न्यायाने सततयुक्त होत्साते—**परया प्रकृष्टया श्रद्धया उपेताः उपासते**—श्रेष्ठ-सर्वोत्तम श्रद्धेने युक्त होत्साते उपासितात. [ जे भक्त परम श्रद्धायुक्त मनाने नित्ययुक्त होत्साते माझी उपासना माझे सतत चिंतन करितात ]—**ते मे-मम युक्ततमाः इति मताः-अभिप्रेताः**—ते मला अतिशय योगी म्हणून संमत आहेत.—**हि ते नैरंतर्येण मच्चित्ततया अहोरात्रं अतिवाहयन्ति**—कारण ते निरंतरतेने-सतत-एक क्षणहि फुकट न घालवितां माझ्या ठिकाणी आपले चित्त लावून-अहोरात्र घालवितात-सर्व दिवसभर व रात्री एक क्षणहि न घालवितां-दुसऱ्या कशाचेंहि चिंतन न करिता केवळ माझेच चिंतन करितात,—**अतः तान् प्रति युक्ततमाः इति वक्तुं युक्तं**—म्हणून त्यांना अतिशय-श्रेष्ठ योगी असे म्हणणें योग्यच आहे. २.

**ये त्वक्षरमनिर्देश्यमव्यक्तं पर्युपासते ।**
**सर्वत्रगमचिन्त्यं च कूटस्थमचलं ध्रुवम् ॥ ३ ॥**

संनियम्येन्द्रियग्रामं सर्वत्र समबुद्धयः ।
ते प्राप्नुवन्ति मामेव सर्वभूतहिते रताः ॥ ४ ॥

**अन्वयार्थ**—**तु**—पण—**ये सर्वत्र समबुद्धयः सर्वभूतहिते रताः**—जे सर्व ठिकाणी समबुद्धि-प्रत्येक वस्तूमध्ये ब्रह्मबुद्धि-ठेवणारे व सर्व प्राण्यांच्या हितामध्यें निमग्न असलेले निर्गुणोपासक-निर्गुण ब्रह्माची उपासना करणारे भक्त—**इन्द्रियग्रामं संनियम्य**—इंद्रियसमूहाचे म्ह० सर्व इंद्रियाचें संयमन करून-सर्व इंद्रियांना आपल्या ताब्यांत ठेवून—**अनिर्देश्यं**—ज्याचा नांवानें निर्देश करितां येत नाहीं,—**अव्यक्तं**—जें व्यक्त नाही,—**सर्वत्रगं**—सर्व सृष्टींत व्यापून राहणारें,—**अचिंत्यं**—ज्याचे चिंतनहि करतां येत नाहीं—**कूटस्थं**—ज्याच्यामध्ये कोणताहि विकार होत नाहीं,—**अचलं**—जे आपल्या अवस्थेपासून ढळत नाहीं.—**ध्रुवं**—म्हणूनच जे नित्य आहे अशा—**अक्षरं**— अक्षराची-ब्रह्माची—**पर्युपासते**—उपासना करितात-त्याचें अहोरात्र ध्यान करितात—**ते**—ते निर्गुण ब्रह्माची उपासना करणारे—**मां एव**—मलाच—**प्राप्नुवन्ति**—प्राप्त होतात. ते मला म्ह० निर्गुण ब्रह्माला प्राप्त होतात. ३. ४.

**किमितरे युक्ततमा न भवन्ति न किंतु तान्प्रति यद्वक्तव्यं तच्छृणु—ये त्वक्षरमनिर्देश्यमव्यक्तत्वादशब्दगोचरमिति न निर्देष्टुं शक्यतेऽतोऽनिर्देश्यमव्यक्तं न केनापि प्रमाणेन व्यज्यत इत्यव्यक्तं पर्युपासते परि समन्तादुपासते । उपासनं नाम यथाशास्त्रमुपास्यस्यार्थस्य विषयीकरणेन सामीप्यमुपगम्य तैलधारावत्समानप्रत्ययप्रवाहेण दीर्घकालं यदासनं तदुपासनमाचक्षते । अक्षरस्य विशेषणमाह सर्वत्रगं व्योमवद्व्याप्याचिन्त्यं चाव्यक्तत्वादचिन्त्यम् । यद्धि करणगोचरं तन्मनसाऽपि चिन्त्यं तद्विपरीतत्वादचिन्त्यमक्षरं कूटस्थं दृश्यमानगुणमन्तर्दोषं वस्तु कूटं कूटरूपं कूटसाक्ष्यमित्यादौ कूटशब्दः प्रसिद्धो लोके । तथा चाविद्याद्यनेकसंसारबीजमन्तर्दोषवन्मायाव्याकृतादिशब्दवाच्यतया 'मायां तु प्रकृतिं विद्यान्मायिनं तु महेश्वरम्' 'मम माया दुरत्यया' इत्यादौ प्रसिद्धं यत्तत्कूटं तस्मिन्कूटे स्थितं कूटस्थं तदध्यक्षतयाऽथवा राशिरिव स्थितं कूटस्थमत एवाचलं यस्मादचलं तस्माद्ध्रुवं नित्यमित्यर्थः ॥ ३ ॥**

**भाष्यार्थ—इतरे युक्ततमाः न भवन्ति किं**—तर मग इतर म्ह० निर्गुणोपासक-अक्षरब्रह्मोपासक युक्ततम नव्हेत कीं काय ?—**न, किंतु तान् प्रति यत् वक्तव्यं तत् शृणु**—नाहीं, तसें नाहीं, तर त्यांच्याविषयीं जें काय सांगावयाचें आहे, वर जें पुढें सांगूं असे म्हटलें होते, तें आतां ऐक.—**तु ये अक्षरं-अनिर्देश्यं-अव्यक्तत्वात् अशब्दगोचरं इति न निर्देष्टुं शक्यते अतः अनिर्देश्यं**—पण त्या सगुणोपासकाच्या उलट जे अक्षराला ( उपासितात तें अक्षर कसें ? ) अनिर्देश्य म्ह० अव्यक्त असल्यामुळें शब्दाचा-वाणीचा विषय न होणारे, त्यामुळे त्याचा शब्दांनीं निर्देश करतां येत नाहीं, म्हणून अनिर्देश्य; अशा अनिर्देश्य अक्षरब्रह्माची जे उत्तमाधिकारी उपासना करितात ( पुनः तें ब्रह्म कसें ? )—**अव्यक्तं-केन अपि प्रमाणेन न**

**व्यज्यते इति अव्यक्तं**—अव्यक्त म्ह० कोणत्याहि प्रमाणानें व्यक्त केलें जात नाहीं म्हणून अव्यक्त ( आणि अव्यक्त असल्यामुळें अनिर्देश्य,अशा अक्षराची )—**पर्युपासते -परि समन्तात् उपासते**—जे पर्युपासना करितात म्ह० सर्व प्रकारें उपासना करितात ( पण निरुपाधिक ईश्वराची उपासना कशी संभवते ? उत्तर-)—**उपासनं नाम उपास्यस्य अर्थस्य यथाशास्त्रं विषयीकरणेन सामीप्यं उपगम्य तैलधारावत् समानप्रत्ययप्रवाहेण दीर्घकालं यत् आसनं तत् उपासनं आचक्षते**—उपासन म्ह० उपासना करण्यास योग्य-उपास्य असा जो अर्थ-पदार्थ त्याला शास्त्रप्रमाणानें विषय करून-यथाशास्त्र अक्षराला जाणून, त्याच्या सामीप्याप्त प्राप्त होऊन -तेंच मी असें आत्मत्वाने ओळखून तेलाच्या धारेप्रमाणें समान-एकाच प्रत्ययाच्या प्रवाहानें-तोच प्रत्यय स्थिर ठेवून दीर्घकाल जे राहणें त्याला उपासन म्हणतात. [मीच ते अक्षर ब्रह्म आहें,असें जाणून-पूर्णचिदेकरस अक्षर आत्म्याचीच जे सदा भावना करितात] —**अक्षरस्य विशेषणं आह**—अक्षराचें विशेषण सांगतात—**सर्वत्रगं-व्योमवत् व्यापी**—सर्वत्रग म्ह० आकाशाप्रमाणे व्यापी—**च अचिन्त्यं-अव्यक्तत्वात् अचिन्त्यं**—आणि अचिन्त्य-अव्यक्त असल्यामुळे अचिन्त्य—**यत् हि करणगोचरं तत् मनसा अपि चिन्त्यं**—जें इंद्रियांचा विषय होते त्याचे मनानेंहि चिन्तन करितां येते —**अक्षरं तद्विपरीतत्वात् अचिन्त्यं**—अक्षर त्याच्या विपरीत असल्यामुळे म्ह० इंद्रियांचा विषय होणारे नसल्यामुळें अचिंत्य आहे—**कूटस्थं-दृश्यमानगुणं अन्तर्दोषं वस्तु कूटं**—कूटस्थ-बाहेरून ज्याचे गुण दिसतात पण आत दोष आहेत, वरून दिसायला फार चांगलें, अनेक गुणांनीं युक्त, पण आंतून फार वाईट-अनेक दोषांनीं भरलेले असे जें असतें तें कूट होय. ( याविषयीं वृद्धांच्या प्रयोगांचा आधार देतात-)—**लोके कूटरूपं कूटसाक्ष्यं इत्यादौ कूटशब्दः प्रसिद्धः**—व्यवहारांत कूटरूप, कूटसाक्ष्य इत्यादि ठिकाणीं कूटशब्द या अर्थी प्रसिद्ध आहे—**तथा च अविद्यादि-अनेकसंसारबीजं अन्तर्दोषवत् यत् माया-अव्याकृतादिशब्दवाच्यतया 'मायां तु प्रकृतिं विद्यात् मायिनं तु महेश्वरं' 'मम माया दुरत्यया' इत्यादौ प्रसिद्धं तत् कूटं** —त्यामुळें ज्यांत अज्ञान-अनृत इत्यादि अनेक प्रकारच्या संसाराचें बीज आहे, व निरूपण करूं लागलें असतां ज्याच्या स्वरूपांत नानाप्रकारचे दोष दिसतात, जे 'माया' 'अव्याकृत' इत्यादि शब्दांचा अर्थ या रूपानें म्ह० त्या त्या नांवानें 'मायां तु प्रकृतिं विद्यात्०' म्ह० मायेला प्रकृति व मायावानाला महेश्वर समजावे व 'माझी माया दुरत्यय आहे' ( अ. ७ श्लो. १४ पृ. ६२७ ) इत्यादि[1] श्रुति-स्मृतिवचनांत प्रसिद्ध आहे तें अविद्यादिक कूट होय.—**तस्मिन् कूटे तदध्यक्षतया स्थितं-कूटस्थं**-त्या मायाख्य कूटांत त्याचा अधिष्ठाता-अध्यक्ष या रूपानें स्थित असलेले अक्षर कूटस्थ होय. ( कूटस्थशब्दाचा निष्क्रियत्व हा दुसरा अर्थ सांगतात-)—**अथवा राशिः इव स्थितं कूटस्थं**— किंवा राशिप्रमाणें स्थित असलेले. रास जशी सर्व क्रियारहित असते तसें निष्क्रिय

---

१ येथें अव्याकृतनांवासाठीं ' तद्वेदं तर्हि अव्याकृतं आसीत ' ही श्रुति घ्यावी,

असलेलें-कूटस्थ[1]—**अतः एव अचलं**—कूटस्थ-निष्क्रिय असल्यामुळेंच अचल—**यस्मात् अचलं तस्मात् ध्रुवं-नित्यं इत्यर्थः**—ज्याअर्थी अचल आहे त्याअर्थी ध्रुव, नित्य असा याचा भावार्थ. [ अशा अक्षराची जे उपासना करितात, असा मागील क्रियापदाशी संबंध. ] ३.

**संनियम्येति । संनियम्य सम्यङ्नियम्य संहृत्येन्द्रियग्राममिन्द्रियसमुदायं सर्वत्र सर्वस्मिन्काले समबुद्धयः समा तुल्या बुद्धिर्येषामिष्टानिष्टप्राप्तौ ते समबुद्धयस्ते य एवंविधास्ते प्राप्नुवन्ति मामेव सर्वभूतहिते रताः । न तु तेषां वक्तव्यं किंचिन्मां ते प्राप्नुवन्तीति । ज्ञानी त्वात्मैव मे मतमिति ह्युक्तम् । न हि भगवत्स्वरूपाणां सतां युक्तमत्वमयुक्तमत्वं वा वाच्यम् ॥ ४ ॥**

**भाष्यार्थ—' संनियम्य० ' इति**—अक्षराची कशी उपासना करितात व ती केल्याने काय होतें ते ' संनियम्य० ' या श्लोकाने भगवान् सांगतात.—**इंद्रियग्रामं-इंद्रियसमुदायं संनियम्य-सम्यक् नियम्य-संहृत्य**—इंद्रियग्रामाला म्ह० इंद्रियाच्या समुदायाला उत्तम प्रकारें नियमित करून, त्याचे चांगल्या प्रकारें नियमन करून, सर्व इंद्रियांचा विषयापासून उपसंहार करून—**सर्वत्र-सर्वस्मिन् काले समबुद्धयः -येषां बुद्धिः इष्टानिष्टप्राप्तौ समा-तुल्या ते समबुद्धयः**—सर्वत्र म्हणजे सर्वकाली समबुद्धि- ज्यांची बुद्धि इष्ट व अनिष्ट यांची प्राप्ति झाली असता सम-तुल्य-एकसारखीच-निर्विकार-हर्षविषादरहित असते ते समबुद्धि होत—**ते ये एवंविधाः सर्वभूतहिते रताः ते मां एव प्राप्नुवन्ति**—ते जे अशा प्रकारचे सर्वभूतांच्या हितामध्यें रत असलेले-सर्व भूतांचे हित चिन्तणारे व हितकर आचरण करणारे ते मलाच प्राप्त होतात.[2] [ ज्ञानी पुरुषांना त्यांच्या ज्ञानाप्रमाणे भगवत्प्राप्ति होते ही गोष्ट सिद्धच असल्यामुळे ]—**ते मां प्राप्नुवन्ति इति तेषां किंचित् न तु वक्तव्यं**—ते मला प्राप्त होतात, असे त्याच्याविषयीं कांहीएक सांगावयासच नको. ( ज्ञानी पुरुषाची भगवत्प्राप्ति सिद्धच आहे, याविषयीं प्रमाण-)—**' ज्ञानी तु आत्मा एव मे मतं ' इति उक्तं हि**—ज्ञानी तर माझा आत्माच आहे, असे सांगितलेंच आहे. (गी. भा. पृ. ६३१ पहा.) अहोपण, ज्ञानी पुरुषाना भगवत्प्राप्ति होत असल्यास त्यांनाच

---

१ ' कूटस्थ 'शब्दाचा अर्थ ' सर्वांच्या बुडाशी असणारे ' असा रहस्यकार करितात. पण कूट म्ह० सर्वांचें बुड, असें म्हणण्यास कांहीं प्रमाण नाही.

२ ' सर्वभूतहितेरताः ' हें विशेषण येथें अक्षरोपासकांना लाविलेले आहे, हें लक्षांत ठेवण्यासारखे आहे. रहस्यकार ' ते मां एव प्राप्नुवन्ति-' याचा अर्थ ' ते लोक देखील मलाच येऊन पोंचतात ' असा करितात. येथे ' देखील ' हा शब्द त्यांच्या पदरचा आहे. तो अक्षरोपासकांना व त्यांच्या साक्षात् ईश्वरप्राप्तिरूप मुख्य फलाला गौणत्व देऊन सगुणोपासकांना व त्यांच्या फलाला महत्त्व देण्यासाठीं मुद्दाम योजला आहे. पण तो मी ' त्यांचा संसारातून उद्धार करितों ' या पुढील सातव्या श्लोकांतील वचनाशीं विरुद्ध आहे.

युक्ततम म्हटलें पाहिजे, असें असतांना तुम्ही सगुणोपासकांना युक्ततम कसें म्हणतां ? उत्तर-)—**भगवत्स्वरूपाणां सतां युक्ततमत्वं अयुक्ततमत्वं वा न हि वाच्यं**—भगवत्स्वरूप असलेल्या त्यांचे युक्ततमत्व किंवा अयुक्ततमत्व बोलतांच येणें शक्य नाही. [ भगवत्स्वरूप झालेल्या ज्ञानी पुरुषांना युक्ततम किंवा अयुक्ततम यातील कोणताच शब्द लावतां येत नाही. ] ४.

क्लेशोऽधिकतरस्तेषामव्यक्तासक्तचेतसाम् ।
अव्यक्ता हि गतिर्दुःखं देहवद्भिरवाप्यते ॥ ५ ॥

**अन्वयार्थ—अव्यक्तासक्तचेतसां तेषां**—अव्यक्त ब्रह्मामध्ये ज्यांचें मन आसक्त झालें आहे अशा त्यांना—**क्लेशः**—क्लेश-दुःख—**अधिकतरः**—सगुणोपासकापेक्षां पुष्कळच अधिक होतें.—**हि**—कारण—**देहवद्भिः**—व्यक्त देहावर अभिमान ठेवणाऱ्या-' हा देहच मी ' असें समजणाऱ्या लोकांना—**अव्यक्ता गतिः**—अव्यक्त ब्रह्माची गति—**दुःखं**—मोठ्या कष्टानें—**अवाप्यते**—प्राप्त होते. ( म्हणून निर्गुणोपासकांपेक्षां सगुणोपासक चांगले.) ५.

**किंतु—क्लेशोऽधिकतरो यद्यपि मत्कर्मादिपराणां क्लेशोऽधिक एव क्लेशोऽधिकतरस्त्वक्षरात्मनां परमार्थदर्शिनां देहाभिमानपरित्यागनिमित्तोऽव्यक्तासक्तचेतसामव्यक्त आसक्तं चेतो येषां तेऽव्यक्तासक्तचेतसस्तेषामव्यक्तासक्तचेतसाम् । अव्यक्ता हि यस्माद्या गतिरक्षरात्मिका दुःखं सा देहवद्भिर्देहाभिमानवद्भिरवाप्यतेऽतः क्लेशोऽधिकतरः । अक्षरोपासकानां यद्वर्तनं तदुपरिष्टाद्वक्ष्यामः ॥ ५ ॥**

**भाष्यार्थ—किं तु**—पण असें जरी आहे तरी—**क्लेशः अधिकतरः**—त्यांना होणारा क्लेश अतिशय अधिक आहे.—**यद्यपि मत्कर्मादिपराणां क्लेशः अधिकः एव**—जरी मत्कर्मादिकामध्यें-माझ्यासाठीं कर्मे करणें, इत्यादिकांमध्ये तत्पर झालेल्या सगुणोपासकांचा क्लेश इतर द्वैतदर्शी कामी पुरुषांपेक्षां अधिकच असतो—**तु अक्षरात्मनां परमार्थदर्शिनां देहाभिमानपरित्यागनिमित्तः क्लेशः अधिकतरः**—तथापि अक्षरब्रह्मरूप झालेल्या परमार्थदर्शी पुरुषांना देहाभिमानाचा त्याग करणें, यामुळें होणारा क्लेश त्याहून अधिक आहे. (त्यांचेच विशेषण- )—**अव्यक्तासक्तचेतसां -अव्यक्ते आसक्तं चेतः येषां ते अव्यक्तासक्तचेतसः तेषां अव्यक्तासक्तचेतसां**—' अव्यक्तासक्तचेतसां० ' अव्यक्तामध्ये ज्यांचें चित्त आसक्त असते ते अव्यक्तासक्तचित्त होत. त्या अव्यक्तासक्तचित्त पुरुषांना क्लेश फार होतात [ अव्यक्त म्ह० अत्यंत सूक्ष्म-निर्विशेष अक्षर, त्यांत ज्यांचें चित्त आसक्त असतें ' मीच तें ' असें अभिनिविष्ट असतें त्यांचा क्लेश अतिशय अधिक असतो. त्यांना अधिक क्लेश होण्याचे कारण भगवान् सांगतात-]—**हि-यस्मात् अव्यक्ता या अक्षरात्मिका गतिः**—कारण अव्यक्त असलेली जी अक्षरात्मिका गति—**सा देहवद्भिः-देहाभिमानवद्भिः दुःखं अवा-**

च्यते—ती देहवानांकडून-देहाभिमान असलेल्या पुरुषांकडून मोठ्या कष्टानें प्राप्त केली जाते:[ज्यांचा देहाभिमान सुटलेला नाहीं त्यांना अव्यक्त अक्षरात्मिका गति मोठ्या कष्टानें-दुःखानें प्राप्त होते]—**अतः क्लेशः अधिकतरः**—त्यामुळे म्ह० देहाभिमानाचा त्याग करावा लागत असल्यामुळें त्यांना अधिकतर क्लेश होतो.—**अक्षरोपासकानां यत् वर्तनं तत् उपरिष्टात् वक्ष्यामः**—अक्षरोपासकांचें जें वर्तन तें पुढें म्ह० १३ते२० श्लोकांत सांगूं. [ अक्षरोपासक कसे वागतात त्याचें वर्णन पुढे सविस्तर करूं.] ५

**ये तु सर्वाणि कर्माणि मयि संन्यस्य मत्पराः ।**
**अनन्येनैव योगेन मां ध्यायन्त उपासते ॥ ६ ॥**
**तेषामहं समुद्धर्ता मृत्युसंसारसागरात् ।**
**भवामि न चिरात्पार्थ मय्यावेशितचेतसाम् ॥ ७ ॥**

**अन्वयार्थ—तु**—पण—**पार्थ**—हे अर्जुना—**ये**—जे सगुणभक्त—**मयि**—माझे ठिकाणीं—**सर्वाणि कर्माणि संन्यस्य**—सर्व कर्मांचा संन्यास करून-सर्व कर्में मला अर्पण करून—**मत्पराः**—मत्परायण होऊन-मीच ज्यांना श्रेष्ठ आहें, मजवांचून दुसरा कोणी श्रेष्ठ नाही, असे होऊन—**अनन्येन एव योगेन**—विश्वरूप परमेश्वर जो मी, त्या मला सोडून दुसऱ्या कोणाच्याहि ठिकाणीं ज्यांचें चित्त जात नाहीं, अशा अनन्य योगानेच-केवल माझ्याच ठिकाणीं चित्ताला स्थिर करून—**मां ध्यायन्तः**—माझें ध्यान करणारे ( असे जे भक्त )—**उपासते**—माझी भक्ति करितात—**मयि**—माझ्या ठिकाणी—**आवेशितचेतसां तेषां**—ज्यांनीं आपलें चित्त स्थिर ठेवले आहे, अशा त्यांचा—**अहं**—मी—**न चिरात्**—अगदीं लवकर—**मृत्युसंसारसागरात्**—मृत्यूनें युक्त अशा या संसारसागरापासून—**समुद्धर्ता**—उत्तमप्रकारें उद्धार करणारा—**भवामि**—होतों. ६. ७.

**ये त्विति । ये तु सर्वाणि कर्माणि मयीश्वरे संन्यस्य मत्परा अहं परो येषां ते मत्पराः सन्तोऽनन्येनैवाविद्यमानमन्यदालम्बनं विश्वरूपं देवमात्मानं मुक्त्वा यस्य सोऽनन्यस्तेनानन्येनैव केन योगेन समाधिना मां ध्यायन्तश्चिन्तयन्त उपासते ॥६॥**

**भाष्यार्थ—'ये तु०' इति**—( अक्षरोपासक मलाच प्राप्त होतात, असें तूं वर म्हटले आहेस. पण मग त्यावरून सगुणोपासक तुला प्राप्त होत नाहींत, असें समजावयाचें कीं काय, असे अर्जुन विचारील म्हणून भगवान् ) 'ये तु०' या श्लोकानें ते मला क्रमानें प्राप्त होतात, असें सांगतात—**तु ये सर्वाणि कर्माणि मयि-ईश्वरे संन्यस्य**—पण जे सर्व कर्में मज ईश्वराचे ठिकाणीं समर्पण करून—**मत्पराः-अहं परः येषां ते मत्पराः सन्तः**—मी ज्यांना पर-श्रेष्ठ आहें असे ते मत्पर होत्साते—**अनन्येन एव-यस्य विश्वरूपं देवं आत्मानं मुक्त्वा अन्यत् आलंबनं**

**अविद्यमानं (अस्ति) सः अनन्यः तेन अनन्येन एव**—अनन्य अशाच म्ह० ज्याचें विश्वरूप देवाला-आत्म्याला सोडून दुसरें कांहींच आलंबन-ध्यानाचा विषय विद्यमान नाहीं तो अनन्य होय. त्या अनन्य अशाच—**केन**—कशानें?—**योगेन-समाधिना मां ध्यायन्तः-चिन्तयन्तः उपासते**—अनन्य अशा योगानें-चित्त-समाधानानें माझें ध्यान-चिन्तन करणारे असे होत्साते उपासना करितात, ( त्यांचा मी संसारांतून उद्धार करितों, असा पुढें संबंध ) ६.

**तेषां किम्—तेषां मदुपासनैकपराणामहमीश्वरः समुद्धर्ता । कुत इत्याह मृत्युसंसारसागरात्, मृत्युयुक्तः संसारो मृत्युसंसारः स एव सागर इव सागरो दुरुत्तरत्वात्तस्मान्मृत्युसंसारसागरादहं तेषां समुद्धर्ता भवामि न चिरात्किं तर्हि क्षिप्रमेव हे पार्थ मय्यावेशितचेतसां मयि विश्वरूप आवेशितं समाहितं प्रवेशितं चेतो येषां ते मय्यावेशितचेतसस्तेषाम् ॥ ७ ॥**

**भाष्यार्थ—तेषां किं**—भगवानांचें ध्यान करणाऱ्या त्यांना कोणतें फल प्राप्त होतें तें 'तेषां०' या श्लोकानें सांगतात—**तेषां मदुपासनैकपराणां अहं ईश्वरः समुद्धर्ता**—त्या केवल माझी उपासना करण्यांतच गढून गेलेल्या सगुणोपासकांचा मी ईश्वर समुद्धार करणारा आहे, [ त्यांना ज्ञानाचा आधार देऊन उत्तम प्रकारें वर नेणारा मी आहें. ]—**कुतः इति आह**—कोठून वर काढणारा, तें सांगतात—**मृत्यु-संसारसागरात्-मृत्युयुक्तः संसारः मृत्युसंसारः**—मृत्युसंसारसागरांतून-मृत्युयुक्तसंसार तो मृत्युसंसार [ येथें मृत्यु म्ह० अज्ञान, कारण तें मरणादि अनर्थांचें कारण आहे. त्या अज्ञान-कार्यत्वानें युक्त असलेला संसार ] **सः एव सागरः इव सागरः दुरुत्तरत्वात्**—तोच जणुंकाय सागर, दुरुत्तर-दुस्तर असल्यामुळें सागर,—**तस्मात् मृत्युसंसारसागरात् अहं तेषां समुद्धर्ताभवामि**—त्या मृत्युसंसार-सागरांतून मी त्यांचा उत्तम प्रकारें उद्धार करणारा होतों.—**चिरात् न**—फार उशी-रानें नव्हे —**किं तर्हि**—तर मग काय?—**हे पार्थ क्षिप्रं एव**—हे पार्थ, अगदीं सत्वर मी त्यांचा संसारसागरांतून उद्धार करितों—**मयि आवेशितचेतसां-मयि विश्वरूपे आवेशितं-समाहितं-प्रवेशितं चेतः येषां ते मयि-आवेशित-चेतसः तेषां**—( कोणाचा? ) ज्यांनीं आपलें चित्त मज विश्वरूपाचे ठिकाणीं आवे-शित म्ह० समाहित-प्रवेशित केलें आहे ते 'मयि-आवेशितचित्त' होत, त्यांचा मी संसार-सागरांतून उद्धार करितों. ७

**मय्येव मन आधत्स्व मयि बुद्धिं निवेशय ।**
**निवसिष्यसि मय्येव अत ऊर्ध्वं न संशयः ॥ ८ ॥**

---

१ रहस्यकार 'मृत्युसंसारसागरात्' याचा अर्थ 'मृत्युमय संसारसागरांतून' असा करितात. पण त्यापेक्षां 'मृत्यु म्ह० अज्ञान, त्या मृत्युयुक्त संसारसागरांतून' हा अर्थ अधिक सयुक्तिक आहे.

**अन्वयार्थ—मयि एव**—माझ्यामध्येंच—**मनः**—आपलें मन—**आधत्स्व**—स्थिर कर; तूं आपल्या मनाला माझ्या सगुण विश्वरूपांत स्थाप—**मयि बुद्धिं निवेशय**—माझ्यामध्यें निश्चय करणाऱ्या बुद्धीला प्रविष्ट कर. तिलाहि माझ्या स्वरूपांतच राहूं दे. तूं आपलें मन व बुद्धि या दोन्ही चित्तवृत्तींना माझ्याच ठिकाणी स्थिर केलेंस म्हणजे—**अतः ऊर्ध्वं**—मेल्यावर—**मयि एव**—माझ्या ठिकाणींच—**निवसिष्यसि**—तूं राहशील—**न संशयः**—यांत कांहीं शंका नाहीं. ८.

**यत एवं तस्मात्—मय्येव विश्वरूप ईश्वरे मनः संकल्पविकल्पात्मकमाधत्स्व स्थापय मय्येवाध्यवसायं कुर्वतीं बुद्धिमाधत्स्व निवेशय । ततस्ते किं स्यादिति शृणु निवसिष्यसि निवत्स्यसि निश्चयेन मदात्मना मयि निवासं करिष्यस्येवातः शरीरपातादूर्ध्वं न संशयः संशयोऽत्र न कर्तव्यः ॥ ८ ॥**

**भाष्यार्थ— यतः एवं तस्मात्**—ज्याअर्थी भगवदुपासना असें विशिष्ट फल देणारी आहे त्याअर्थी—**मयि एव-विश्वरूपे ईश्वरे संकल्पविकल्पात्मकं मनः आधत्स्व-स्थापय**—माझ्या ठिकाणींच म्ह० विश्वरूप ईश्वराचे ठिकाणींच संकल्प व विकल्प करणारें मन स्थिर कर. माझ्यामध्येंच त्याची स्थापना कर.—**मयि एव अध्यवसायं कुर्वतीं बुद्धिं आधत्स्व-निवेशय**—माझ्या ठिकाणींच निश्चय करणाऱ्या बुद्धीला समाहित-निवेशित कर, [ बुद्धीलाहि माझ्या ठिकाणींच स्थिर कर. ]—**ततः ते किं स्यात् इति शृणु**—त्यामुळें तुला कोणतें फल मिळेल तें ऐक—**निवसिष्यसि-निवत्स्यसि-निश्चयेन मदात्मना मयि एव निवासं करिष्यसि**—राहशील, निवास करशील, निश्चयानें मद्रूपानें माझ्या ठिकाणींच निवास करशील—**अतः-शरीरपातात् ऊर्ध्वं**—या शरीराच्या मरणानंतर तूं माझ्यामध्येंच निश्चयानें राहशील—**न संशयः-अत्र संशयः न कर्तव्यः**—भगवन्निष्ठाला भगवत्प्राप्ति होते, याविषयीं संशय मुळींच बाळगूं नये. ८.

---

१ रहस्यकार २–८ श्लोकांवरील टीपेंत म्हणतात—"भक्तिमार्गाचें श्रेष्ठत्व यांत प्रतिपादिलें आहे." ( हें म्हणणें बरोबर नाहीं. कारण 'मत्कर्मकृत्०' (११.५५ पृ.८१५) या श्लोकांत सांगितल्याप्रमाणें सतत युक्तचित्त होऊन तुझ्या सगुण विश्वरूपाची उपासना करणारे व अव्यक्त अक्षराची उपासना करणारे, यांच्यामध्ये अधिक योगवेत्ते-उत्तम उपासक कोण ? असा येथे अर्जुनाचा प्रश्न आहे. दुसऱ्या श्लोकांत भगवानांनी 'माझ्याच ठिकाणीं म्ह०माझ्या विश्वरूपांत मन स्थिर करून व नित्य समाहितचित्त होऊन मोठ्या श्रद्धेनें युक्त होत्साते जे माझी उपासना करितात-माझें ध्यान-चिंतन करितात ते मला योगवित्तम म्हणून संमत आहेत,' असें सांगितलें आहे. ) पण रहस्यकार म्हणतात—" दुसऱ्या श्लोकांत भगवद्भक्त उत्तम योगी हा सिद्धान्त प्रथम देऊन नंतर तिसऱ्या श्लोकांत 'तु' हें पक्षान्तरबोधक अव्यय घालून त्या व चवथ्या मिळून दोन श्लोकांत अव्यक्ताची उपासना करणारेहि मलाच पोंचतात असें विधान केलें आहे." ( दुसऱ्या श्लोकांतील 'सिद्धान्त' पांचव्या अध्यायांतील 'कर्मयोगो विशिष्यते' या 'सिद्धान्ता-'सारखाच आहे. कारण तेथें 'संन्यासाहून कर्मयोग

श्रेष्ठ' असें ज्या कारणानें म्हटलें आहे, त्याच कारणानें येथें सगुणोपासकाला 'योगवित्तम' म्हटलें आहे. वास्तव ते दोन्ही परम सिद्धान्त नसून अवान्तर सिद्धान्त आहेत व दोन्ही साधकाला उद्देशून आहेत. कारण तेथें सन्यास व कर्मयोग या दोहोंनाहि 'निःश्रेयसकर' जसे म्हटलें आहे, तसेंच येथें 'अक्षरोपासक मलाच येऊन पोंचतात व सगुणोपासकांचा मृत्युससारसागरातून मी उद्धार करणारा होतों,' असे म्हटलें आहे. ज्ञानी जीवन्मुक्ताला उद्देशून असें म्हणतां येत नाहीं. पाचव्या अध्यायात कर्मयोग श्रेष्ठ आहे, हें सांगून लागलीच पुढच्या श्लोकांत 'जो कशाचा द्वेष करीत नाहीं व कशाची आकांक्षा करीत नाहीं तो नित्य सन्यासीच जाणावा' असें म्हणून रागद्वेषरहित कर्मयोग्याचीहि सन्यासित्वाने प्रशंसा केली आहे. येथे 'अक्षरोपासक साक्षात् मलाच येऊन पोचतात,' असे सागून अक्षरोपासकाला श्रेष्ठ फल सागितले आहे. तेथें 'कर्मयोगावांचून खरा सन्यास प्राप्त होणे कठिण आहे' असे म्हणून कर्मयोगाला श्रेष्ठ का म्हटलें तें सुचविलें आहे. तसेंच येथे 'अव्यक्तामध्ये ज्याचे चित्त आसक्त असते त्याना क्लेश अतिशय होतात,' असे म्हणून सगुणोपासना सुलभ आहे, म्हणून अधिक चागली, असे सुचविले आहे. पण रहस्यकार या दृष्टीने गीतेचा विचार न करिता अर्थवादानाच विधि किंवा सिद्धान्त मानून खऱ्या शास्त्रार्थाला पारखे झाले आहेत, आणि खऱ्या शास्त्रार्थाला खोटें ठरवू पहात आहेत. तिसऱ्या श्लोकातील 'तु' हें पक्षान्तरबोधक अव्यय आहे हे त्याना येथे मात्र आठवले, पण 'यस्तु आत्मरतिरेव स्यात्०' येथे आठवलें नाहीं. (गी. भा. पृ. ३०२ व ३०३ पहा.) तिसऱ्या अध्यायातील १७ ते १९, हे तीन श्लोक टीकाकारानीं "अर्थप्रवाहास वगैरे न जुमानिता फोडून पृथक केले" असे म्हणतात. पण येथे स्वतः रहस्यकारच 'तीन व चार मिळून दोन श्लोकात अव्यक्ताची उपासना करणारेहि मलाच पोंचतात' असे म्हणतात. 'करणारेहि' येथील 'हि' हा शब्द रहस्यकारांनी आपल्याच पदरचा का जोडला आहे तें वरच्या टीपेत सांगितलेंच आहे. असो, 'व्यक्तोपासनेचें सुलभत्व' रहस्यकारांनाहि संमत आहे. (गी.र. पृ.७७५,) पण सगुणोपासना सुलभ, त्यामुळें सर्व साधकाना साध्य, म्हणून तिला येथें श्रेष्ठ म्हटलें आहे, हें मात्र त्यांना समत नाही! कर्मयोग हे जसे ज्ञानयोगनिष्ठेचे साधन तसेंच, सगुण उपासना हे निर्गुण उपासनेचें साधन आहे. कर्मयोग साक्षात् मोक्षाचे साधन नव्हे, तर ज्ञानयोगाच्या द्वारा मोक्षसाधन आहे.त्याचप्रमाणें सगुण उपासना साक्षात् मोक्षसाधन नव्हे, तर निर्गुण उपासनेच्या द्वारा मोक्षाचे साधन आहे. म्हणूनच कर्मयोग किंवा सगुण उपासना ही मोक्षाची परंपरासाधनें,बहिरंग साधने असून ज्ञानयोग किंवा निर्गुण उपासना हे अन्तरंग साधन आहे.कारण कर्मयोगाचे पर्यवसान चित्तशुद्धीच्या द्वारा ज्ञानांत व सगुण उपासनेचें निर्गुण उपासनेंत होत असतें, ही अनुभवसिद्ध गोष्ट आहे. पण गीतारहस्यकार केवल तार्किक असल्यामुळें त्यांनी शक्याशक्यतेचा किंवा वस्तुस्थितीचा फारसा विचार केलेला नाही,असें मोठ्या कष्टानें म्हणावें लागतें. फारसा म्हणण्याचें कारण कोठें कोठे त्यानींहि 'ज्ञानमार्ग व भक्तिमार्ग परिणामीं एकच,' (गी. र. पृ. ४११) 'बुद्धीनें व भक्तीनें अखेर एकच अद्वैत ब्रह्मज्ञान होतें' असे उद्गार (गी. र. पृ. ४२७) काढले आहेत.तथापि पुनः पुनः ते आपल्या मूळ पदावर येतच असतात. जसें—"अव्यक्तोपासना कष्टमय असली तरी तीहि मोक्षप्रदच आहे" तेथें 'तीहि'

असें म्हणून सगुण उपासना साक्षात् मोक्षप्रद आहे, असें भासविण्याचा प्रयत्न केलाच आहे. पण त्याला अनुभवाचा किंवा शास्त्राचाहि आधार नाही. असो; "भक्तिमार्ग झाला तरी त्यांत कर्मे न सोडतां तींच ईश्वरार्पण करून अवश्य करावयाची आहेत, हें भक्तिमार्गीयांनीं लक्षांत ठेवावें" पण उपासक गृहस्थ नसून संन्यासी असला तर, त्यानेंहि 'कर्मे अवश्य करावींच' कीं काय व तीं कर्मे कोणतीं? रहस्यकार म्हणतात–"याच हेतूनें सहाव्या श्लोकांत 'माझेच ठायीं सर्व कर्मांचा संन्यास करून' हे शब्द घातलेले आहेत. भक्तियोगांतहि कर्मे स्वरूपतः सोडावयाचीं नाहींत, तर परमेश्वराचे ठिकाणीं तीं म्ह० त्यांची फलें अर्पण करावयाचीं, असा त्याचा स्पष्ट अर्थ आहे." होय; हें खरें; पण हा अशा प्रकारचा भक्तियोग ज्ञानोत्तर सांगितलेला आहे कीं काय? जर आत्मज्ञानोत्तर सांगितलेला असेल तर 'त्यांचा मी संसारसागरातून उद्धार करणारा होतो' हे म्हणणे जुळत नाहीं. भक्तियोग ह्म० उपासना कोणत्याहि आश्रमात संभवते. अर्थात् 'ये तु सर्वाणि कर्माणि मयि संन्यस्य' याचा अर्थ आश्रमानुसार केला पाहिजे. कारण अग्निहोत्रादि कर्मे आचरणे किंवा तीं स्वरूपतः सोडणे, हे मनुष्याच्या मर्जीवर अवलंबून नाहीं. त्याच्या आश्रमावर अवलंबून आहे. उपासक गृहस्थ असेल तर त्याने तीं प्रत्यक्ष आचरून ईश्वरार्पण करावीं. 'कर्मे ईश्वरार्पण करणे, म्ह० फल अर्पण करणे' हें म्हणणे बरोबर नाहीं. ईश्वरार्थ कर्मे करणें निराळें व कर्मफलाचा त्याग करणे निराळे, हें या पुढील दहा व अकरा या श्लोकांवरूनच सिद्ध होत आहे. पण ते दोन्ही गौण संन्यास आहेत, हे विसरता कामा नये. (गी. भा. पृ.७१७-१८ वरील टीप पहा) पण तोच उपासक संन्यासी असेल तर तो अग्निहोत्रादि कर्मे स्वरूपतःच सोडील! दोन्ही झाले तरी कर्मांचा त्याग हा केलाच पाहिजे. मग तो स्वरूपतः असो की, ईश्वरार्पणरूप असो; त्यावाचून ज्ञान नाहीं व ज्ञानावांचून मोक्ष नाहीं. निर्गुणोपासक साक्षात् ब्रह्माला प्राप्त होतात व सगुणोपासकाचा स्वतः ईश्वर उद्धार करतो. हा फलभेद अवश्य लक्षांत ठेवला पाहिजे; व तो भाष्यकारांनी भाष्यात स्पष्ट केलेला असल्यामुळें आम्ही येथें अधिक विस्तार करीत नाहीं. रहस्यकार म्हणतात—"जो भक्तिमान् पुरुष मला प्रिय ह्मणून भगवंतांनी या अध्यायाच्या अखेर सांगितला तोहि याच ह्म० निष्काम कर्मयोगांतला समजावयाचा, स्वरूपतः कर्मसंन्यासी नव्हे हेहि यावरून उघड होतें." 'पण सर्वकर्मे मदर्पण करून अनन्ययोगानेच माझे ध्यान करणारे जे माझी उपासना करितात०' या एवढ्यावरूनच भगवानांना प्रिय होणारा भक्त निष्काम कर्मयोगी आहे, कर्मसंन्यासी नव्हे, हें कसें सिद्ध होतें? कर्मे ईश्वरार्पण करणें म्ह० निष्काम कर्मयोगी होणें, ही कल्पना बरोबर नाहीं. शिवाय १३ ते २० श्लोकांत भगवद्भक्ताचे जे धर्म सांगितले आहेत ते कर्मयोग्याच्या ठिकाणीं पूर्णपणें संभवत नाहींत, हे आम्ही पुढें दाखवू.

भगवानांनीं दुसऱ्या श्लोकांत ज्यांना 'युक्ततम' म्हटले आहे, त्यांच्याच साधनाचा आठव्या श्लोकांत अर्जुनाला उपदेश केला आहे. "माझ्याच ठायीं मन स्थिर कर, माझ्याच ठिकाणीं बुद्धीचा निवेश कर, म्हणजे तूं मरणोत्तर माझ्याच ठिकाणीं राहशील" असा तो उपदेश आहे. यांत निष्कामकर्माचा कांहींच उल्लेख केलेला नाहीं. अर्थात् विश्वरूप–सगुण ईश्वरामध्यें सर्व चित्तवृत्ति ठेवणारा उत्तम योगी होय, व त्याला सगुण ईश्वरप्राप्ति हें फल मिळतें. पण तो स्वरूपावस्थानरूप मोक्ष नव्हे. रहस्यकार 'अत: ऊर्ध्वं' याचा अर्थ 'पुढें' असा अगदीं सरळ करितात. पण पुढें म्हणजे केव्हां? असो;

**अथ चित्तं समाधातुं न शक्नोषि मयि स्थिरम् ।**
**अभ्यासयोगेन ततो मामिच्छाप्तुं धनंजय ॥ ९ ॥**

**अन्वयार्थ—अथ**—आतां जर ( मी वर सांगितल्याप्रमाणें )—**मयि**—माझ्या ठिकाणी—**चित्तं**—आपल्या मनाला—**स्थिरं**—अचल—**समाधातुं**—स्थापावयास—**न शक्नोषि**—तूं समर्थ नसशील—**ततः**—तर मग—**हे धनंजय**—हे अर्जुना!—**मां**—मला—**अभ्यासयोगेन**—अभ्यासयोगानें-मनाला वारंवार आंवरून धरून माझ्याच ठिकाणी तें स्थिर करण्याचा प्रयत्न करणे, या अभ्यासपूर्वक योगाने—**आप्तुं**—प्राप्त होण्याची—**इच्छ**—तूं इच्छा कर. ९

अथेति । अथैवं यथाऽवोचाम तथा मयि चित्तं समाधातुं स्थापयितुं स्थिरमचलं न शक्नोषि चेत्ततः पश्चादभ्यासयोगेन चित्तस्यैकस्मिन्नालम्बने सर्वतः समाहृत्य पुनः पुनः स्थापनमभ्यासस्तत्पूर्वको योगः समाधानलक्षणस्तेनाभ्यासयोगेन मां विश्वरूपमिच्छ प्रार्थयस्वाऽऽप्तुं प्राप्तुं हे धनंजय ॥ ९ ॥

**भाष्यार्थ—'अथ०' इति**—स्वमतप्रदर्शनपूर्वक भगवत्प्राप्तीचे दुसरे उपाय 'अथ०' या श्लोकाने सांगितले जातात—**अथ-एवं-यथा अवोचाम तथा**—आतां याप्रमाणें म्ह० आम्ही वर जसें सांगितले आहे त्याप्रमाणे—**मयि चित्तं स्थिरं-अचलं समाधातुं-स्थापयितुं न शक्नोषि चेत्**—माझ्या ठिकाणी चित्त स्थिर-अचल स्थापण्यास जर तूं समर्थ नसशील—**ततः-पश्चात् अभ्यासयोगेन**—तर मग अभ्यासयोगानें म्ह०—**चित्तस्य एकस्मिन् आलम्बने सर्वतः समाहृत्य पुनः पुनः स्थापनं अभ्यासः**— चित्ताला एका स्थूल प्रतिमादि आलंबनामध्ये-ध्यानाच्या आधारामध्ये सर्व बाजूंनीं आकर्षण करून-सर्वतः त्याचा उपसंहार करून पुनः पुनः स्थापणे, हाच अभ्यास होय.—**तत्पूर्वकः समाधानलक्षणः योगः**—त्या अभ्यासपूर्वक समाधान म्ह० त्या आलंबनाच्याहि आत असलेल्या विश्वरूपांत चित्ताची एकाग्रता करणे हा योग—**तेन अभ्यासयोगेन हे धनंजय, मां विश्वरूपं आप्तुं-प्राप्तुं इच्छ-प्रार्थयस्व**—त्या अभ्यासयोगाने हे धनंजया, मज विश्वरूपाला प्राप्त होण्याची इच्छा कर; मला मिळण्याची आकांक्षा धर. ९.

**अभ्यासेऽप्यसमर्थोऽसि मत्कर्मपरमो भव ।**
**मदर्थमपि कर्माणि कुर्वन् सिद्धिमवाप्स्यसि ॥१०॥**

**अन्वयार्थ—अभ्यासे अपि**—वर जसा सांगितला तसा अभ्यास करण्यासहि—( **चेत्**—जर तूं )—**असमर्थः**[1]—असमर्थ—**असि**—असशील तर मग—

---

[1] रहस्यकार 'अभ्यासयोगेन' याचा अर्थ "अभ्यासाच्या साहाय्यानें म्ह० पुनः पुनः प्रयत्न करून" असा करितात. पण पुनः पुनः प्रयत्न कशाचा वगैरे कांही सांगत नाहींत.

**मत्कर्मपरमः भव**—माझ्यासाठीं कर्म करणे, हेंच एक काम कर. ईश्वरासाठीं कर्म करणें हेच आपलें मुख्य कर्तव्य समज. कारण—**मदर्थं अपि**—माझ्यासाठींहि—**कर्माणि कुर्वन्**—कर्मे करणारा असा तूं—**सिद्धिं**—सिद्धीला-चित्तशुद्धि, योग-ज्ञानप्राप्ति या क्रमाने मोक्ष या सिद्धीस—**अवाप्स्यसि**—प्राप्त होशील. १०

अभ्यासेऽपीति । अभ्यासेऽप्यसमर्थोऽस्यशक्तोऽसि तर्हि मत्कर्मपरमो भव मदर्थं कर्म मत्कर्म तत्परमो मत्कर्मप्रधान इत्यर्थः । अभ्यासेन विना मदर्थमपि कर्माणि केवलं कुर्वन्सिद्धिं सत्त्वशुद्धियोगज्ञानप्राप्तिद्वारेणावाप्स्यसि ॥ १० ॥

**भाष्यार्थ**—'**अभ्यासे अपि०' इति**—पण द्वैताच्या अभिमानामुळें अभ्यासाधीन असलेला योग संपादन करण्यास जर तूं असमर्थ असशील तर 'अभ्यासे अपि०' या श्लोकाने आणखी उपाय सांगतात—**अभ्यासे अपि असमर्थः असि-अशक्तः असि**—असा अभ्यास करण्यासहि जर तूं असमर्थ असशील-अशक्त असशील—**तर्हि मत्कर्मपरमः भव**—तर मत्कर्मपरम हो, म्ह० भगवानासाठीं कर्मे करण्यांत तत्पर हो.—**मदर्थं कर्म-मत्कर्म तत्परम.-मत्कर्मप्रधानः इत्यर्थः**—माझ्यासाठीं जें कर्म तें मत्कर्म, तत्परम म्ह० मत्कर्मप्रधान हो, असा याचा भावार्थ. [प्राधान्याने-मुख्यत्वेंकरून माझ्यासाठीं कर्म कर.]—**अभ्यासेन विना केवलं मदर्थं कर्माणि कुर्वन् अपि सिद्धिं सत्त्वशुद्धियोगज्ञानप्राप्तिद्वारेण अवाप्स्यसि**—अभ्यासावाचून केवल माझ्यासाठीं कर्मे करणाराहि तूं सिद्धीला म्ह० ब्रह्मभावाला-चित्तशुद्धि, योग, ज्ञानप्राप्ति यांच्या द्वारा प्राप्त होशील. [ येथील 'अपि' शब्द ईश्वरार्थ केलेल्या कर्मांचें ब्रह्मभाव हें साक्षात् फल नसून चित्तशुद्धयादि क्रमाने मिळणारें फल आहे, हे सुचविण्यासाठीं आहे.]

## अथैतदप्यशक्तोऽसि कर्तुं मद्योगमाश्रितः ।
## सर्वकर्मफलत्यागं ततः कुरु यतात्मवान् ॥ ११ ॥

**अन्वयार्थ**—**अथ(चेत्)** आतां जर—**एतत् अपि**—हेंहि—**कर्तुं**—करण्यास तूं—**अशक्तः**—असमर्थ—**असि**—असशील—**ततः**—तर मग—**मद्योगं**—सर्व कर्मे मला अर्पण करून त्यांचें अनुष्ठान करणे, या योगाचा—**आश्रितः**—आश्रय करून व—**यतात्मवान्**—आपल्या चित्ताचे संयमन करून—**सर्वकर्मफलत्यागं**—सर्व कर्मांच्या फलांचा त्याग—**कुरु**—कर. ११

अथैतदिति । अथ पुनरेतदपि यदुक्तं मत्कर्मपरमत्वं तत्कर्तुमशक्तोऽसि मद्योगमाश्रितो मयि क्रियमाणानि कर्माणि संन्यस्य यत्करणं तेषामनुष्ठानं स मद्योगस्तमाश्रितः

---

१ रहस्यकार "मत्कर्मपरमः-मदर्थं म्ह० मत्प्राप्त्यर्थं" असा अर्थ करितात, व येथील कर्मांचें-शास्त्रांत सांगितलेलीं ज्ञान-ध्यान-भजन-पूजनादि-असें स्पष्टीकरण केले आहे. त्यांतील ज्ञानावांचून बाकीचें कर्मांचें स्पष्टीकरण ठीक आहे. पण 'मत्कर्मपरमः' याचा मत्प्राप्त्यर्थ हा अर्थ बरोबर नाहीं. कारण 'मत्कर्मकृत्' 'मत्कर्मपरमः' 'मदर्थं कर्माणि' यांचा एकच अर्थ आहे.

सन्सर्वकर्मफलत्यागं सर्वेषां कर्मणां फलसंन्यासं सर्वकर्मफलत्यागं ततोऽनन्तरं कुरु यतात्मवान्संयतचित्तः सन्नित्यर्थः ॥ ११ ॥

**भाष्यार्थ—' अथ एतत्०' इति**—भगवत्कर्मपरमत्वाहि अशक्य आहे, असें म्हटल्यास ' अथैतत्०' या श्लोकानें दुसरा उपाय सांगतात—**अथ-पुनः एतत् अपि यत् मत्कर्मपरमत्वं उक्तं तत् कर्तुं अशक्तः असि**—आतां पुनः बाह्य विषयांनीं चित्ताचें आकर्षण केल्यामुळें हेंहि म्ह० जे वरील श्लोकांत मत्कर्मपरमत्व सांगितलें आहे तें करण्यासहि जर तूं अशक्त असशील—**ततः-अनन्तरं**—तर मग-त्यानंतर—**मद्योगं आश्रितः-मयि क्रियमाणानि कर्माणि संन्यस्य यत्करणं-तेषां अनुष्ठानं सः मद्योगः तं आश्रितः सन्**—मद्योगाचा आश्रय करून म्ह० केलीं जाणारीं सर्व कर्मे माझ्या ठिकाणीं अर्पण करून त्यांचें जे अनुष्ठान करणें तोच मद्योग होय. त्याचा आश्रय केलेला असा होत्साता—**सर्वकर्मफलत्यागं-सर्वेषां कर्मणां फलसंन्यासं-सर्वकर्मफलत्यागं कुरु**—सर्व कर्मांच्या फलाचा त्याग-सर्व कर्मांच्या फलाचा संन्यास-सर्वकर्मफलत्याग कर.—**यतात्मवान् संयतचित्तः सन् इत्यर्थः**—यतचित्तवान्-नियतचित्त होत्साता सर्वकर्मफलत्याग कर, असा याचा भावार्थ. ११.

**श्रेयो हि ज्ञानमभ्यासाज्ज्ञानाद्ध्यानं विशिष्यते ।**
**ध्यानात्कर्मफलत्यागस्त्यागाच्छान्तिरनन्तरम् ॥ १२ ॥**

**अन्वयार्थ—अभ्यासात्**—वर सांगितलेल्या अभ्यासाहून—**ज्ञानं**—ज्ञान—**श्रेयः हि**—अधिक प्रशंसनीय आहे, हे तर प्रसिद्धच आहे. पण—**ज्ञानात्**—त्या ज्ञानाहूनहि—**ध्यानं**—ज्ञानासह केलेले ध्यान—**विशिष्यते**—अधिक चांगलें आणि त्या तसल्या—**ध्यानात्**—ध्यानाहूनहि—**कर्मफलत्यागः**—ज्ञान-ध्यानयुक्त कर्माच्या फलाचा त्याग अधिक चांगला आहे. कारण—**त्यागात्**—कर्मफलाचा त्याग केल्यानंतर—**अनन्तरं शान्तिः**—लागलीच संसाराची शांति होते १२

इदानीं सर्वकर्मफलत्यागं स्तौति—श्रेयो हि प्रशस्यतरं ज्ञानं कस्म दविवेकपूर्वका दभ्यासात्तस्मादपि ज्ञानाज्ज्ञानपूर्वकं ध्यानं विशिष्यते । ज्ञानवतो ध्यानादपि कर्मफलत्यागो विशिष्यत इत्यनुषज्यते । एवं कर्मफलत्यागात्पूर्वविशेषणवतः शान्तिरुपशमः सहेतुकस्य संसारस्यानन्तरमेव स्यान्न तु कालान्तरमपेक्षते ॥

**भाष्यार्थ—इदानीं सर्वकर्मफलत्यागं स्तौति**—आता 'श्रेयो हि०' या श्लोकानें भगवान् सर्वकर्मफलत्यागाची स्तुति करितात.—**ज्ञानं श्रेयः हि-प्रशस्यतरं**—ज्ञान म्ह० शब्द व उपपत्ति किंवा श्रवण व मनन यांनीं केलेला आत्मनिश्चय अतिशय प्रशंसनीय आहे.—**कस्मात्**—कोणापेक्षां ?—**अविवेकपूर्वकात् अभ्यासात्**—अविवेकपूर्वक अभ्यासाहून म्ह० ज्ञानासाठी केलेल्या श्रवणाभ्यासाहून किंवा ध्यानाभ्यासाहून ज्ञान–आत्मनिश्चय श्रेष्ठ आहे. कारण तो आत्मनिश्चय साक्षात्काराला कारण होतो. **—तस्मात् अपि ज्ञानात्-ज्ञानपूर्वकं ध्यानं विशिष्यते**—त्या ज्ञानाहूनहि ज्ञान-

पूर्वक ध्यान श्रेष्ठ आहे.—**ज्ञानवतः ध्यानात् अपि कर्मफलत्यागः विशिष्यते इति अनुषज्यते**—ज्ञानवानाच्या ध्यानाहूनहि कर्मफलत्याग विशिष्ट–श्रेष्ठ आहे, असा ' विशिष्यते ' या क्रियापदाचा येथें अन्वय लागतो. (या त्यागाच्या विशिष्टत्वाचें कारण–)—**एवं पूर्वविशेषणवतः कर्मफलत्यागात् शान्तिः–उपशमः सहेतुकस्य संसारस्य अनन्तरं एव स्यात् न तु कालान्तरं अपेक्षते**—याप्रमाणें ' नियतचित्त ' या पूर्वोक्त विशेषणानें विशिष्ट असलेल्या पुरुषाच्या कर्मफलत्यागापासून शांति म्ह० कारणासह संसाराचा उपशम त्यानंतर लागलाच होतो. तो दुसऱ्या–भविष्यत्कालाची अपेक्षा करीत नाही.

**अज्ञस्य कर्मणि प्रवृत्तस्य पूर्वोपदिष्टोपायानुष्ठानाशक्तौ सर्वकर्मणां फलत्यागः श्रेयःसाधनमुपादिष्टं न प्रथममेवातश्च श्रेयो हि ज्ञानमभ्यासादित्युत्तरोत्तरविशिष्टत्वोपदेशेन सर्वकर्मफलत्यागः स्तूयते संपन्नसाधनानुष्ठानाशक्तावनुष्ठेयत्वेन श्रुतत्वात् । केन साधर्म्येण स्तुतित्वं " यदा सर्वे प्रमुच्यन्ते " इति सर्वकामप्रहाणादमृतत्वमुक्तं तत्प्रसिद्धम् । कामाश्च सर्वे श्रौतस्मार्तसर्वकर्मणां फलानि । तत्यागे च विदुषो ज्ञाननिष्ठस्यानन्तरैव शान्तिरिति सर्वकामत्यागसामान्यमज्ञकर्मफलत्यागस्यास्तीति तत्सामान्यात्सर्वकर्मफलत्यागस्तुतिरियं प्ररोचनार्था । यथाऽगस्त्येन ब्राह्मणेन समुद्रः पीत इतीदानींतना अपि ब्राह्मणा ब्राह्मणत्वसामान्यात्स्तूयन्ते । एवं कर्मफलत्यागात्कर्मयोगस्य श्रेयःसाधनत्वमभिहितम् ॥ १२ ॥**

**भाष्यार्थ**—( अहोपण, सर्वकर्मफलत्यागच जर सद्यःशांति देत असेल तर 'तत्त्वज्ञानच मोक्षाख्यशांति देणारें आहे,' ही श्रुति-स्मृतींतील प्रसिद्धि खोटी ठरते,अशी आशंका घेऊन सांगतात– )—**अज्ञस्य कर्मणि प्रवृत्तस्य पूर्वोपदिष्ट-उपायानुष्ठानाशक्तौ सर्वकर्मणां फलत्यागः श्रेयःसाधनं उपदिष्टं**—कर्मांमध्यें प्रवृत्त झालेल्या अज्ञाला पूर्वी उपदेशिलेल्या–८,९ व १० या तीन श्लोकांत सांगितलेल्या–उपायांचें अनुष्ठान करण्याचें सामर्थ्य नसल्यास सर्वकर्मांच्या फलाचा त्याग हें श्रेयःसाधन सांगितलें आहे. —**प्रथमं एव न**—अगदीं आरंभींच कांहीं सांगितलेलें नाहीं. [ दीर्घकाल निरंतर सत्कारानें केलेल्या ध्यानाच्या योगानें तत्त्वसाक्षात्कार होऊन संसारदुःखाची शांति होत असते. म्ह० ध्यान हें साक्षात्काराचें अन्तरंग साधन आहे. पण तसल्या ध्यानाहून कर्मफलत्याग श्रेष्ठ आहे, असें शेवटीं सांगितलें आहे. त्यामुळें त्या त्यागाची स्तुतिच येथें इष्ट आहे, असें आचार्य सांगतात–]—**अतः च 'श्रेयो हि ज्ञानं अभ्यासात्० ' इति उत्तरोत्तरविशिष्टत्वोपदेशेन सर्वकर्मफलत्यागः स्तूयते**—आणि म्हणून ' श्रेयो हि ज्ञानं० ' या श्लोकानें उत्तरोत्तर श्रेष्ठत्वाच्या–उत्तम श्रेयःसाधनाच्या–उपदेशानें सर्वकर्मफलाच्या त्यागाची स्तुति केली जाते. ( असेंच मानण्याचें कारण–)—**संपन्नसाधनानुष्ठानाशक्तौ अनुष्ठेयत्वेन श्रुतत्वात्**—अक्षरोपासनादिक प्राप्त साधनांतील पूर्वपूर्वसाधनाचें अनुष्ठान करण्याचें सामर्थ्य नाहीं, असें झाल्यास उत्तरोत्तर साधनाचा उपदेश करून सर्वांच्या शेवटीं कर्मफलत्याग करण्याविषयीं सांगितलें आहे. त्यामुळें त्यागाची स्तुतिच या श्लोकांत विवक्षित आहे. ( पण हा त्याग

ध्यानापेक्षांहि श्रेष्ठ आहे, अशी स्तुति कोणत्या साधर्म्यामुळें केली जात आहे ? असा प्रश्न करून त्याचें उत्तर-)—**केन साधर्म्येण स्तुतित्वं**—कोणत्या साधर्म्यानें या श्लोकाला कर्मफलत्यागाचे स्तुतित्व आहे?—'**यदा सर्वे प्रमुच्यन्ते०' इति सर्वकामप्रहाणात् अमृतत्वं उक्तं**—'जेव्हां पुरुषाच्या हृदयांतील सर्व काम नाहींसे होतात,तेव्हां तो अमृत होतो व येथेंच ब्रह्मानुभव घेतो,' (का.भाष्यार्थ१५५) या श्रुतींत सर्व कामांच्या त्यागानें अमृतत्वप्राप्ति सांगितली आहे—**तत् प्रसिद्धं**—आणि ते कामत्यागाचे मोक्षार्थत्व 'अथ अकामयमानः' इत्यादि बृहदारण्यकादि (बृ. भा. अ. ४, पृ. २७५ ) श्रुतींत प्रसिद्ध आहे.(अहोपण,कामत्याग हे जरी मोक्षाचे निमित्त असलें तरी कर्मफलत्याग मोक्षाचा हेतु कसा ? उत्तर-)—**च सर्वे कामाः श्रौतस्मार्तसर्वकर्मणां फलानि**—आणि सर्व काम हीं श्रौत-स्मार्तसर्वकर्मांचीं फलें आहेत. [अहोपण, कर्मफलत्यागानेंच जर शांति प्राप्त झाली तर ज्ञाननिष्ठेची उपेक्षा करण्यास कांहीं हरकत नाहीं, अशी आशंका घेऊन सांगतात-]—**च तत्त्यागे ज्ञाननिष्ठस्य विदुषः अनन्तरा एव शान्तिः**—आणि सर्व कामांचा त्याग केला असतां ज्ञाननिष्ठ विद्वानाला लागलीच शांति प्राप्त होते. (तथापि अज्ञाच्या कर्मफलत्यागाची स्तुति कशी संभवते ? उत्तर-)—**इति सर्वकामत्यागसामान्य अज्ञकर्मफलत्यागस्य अस्ति**—याप्रमाणे सर्वकामत्यागाचें साधर्म्य-सामान्य-सादृश्य अज्ञांच्या कर्मफलत्यागाला आहे. [ विद्वानाच्या कामत्यागाप्रमाणे अविद्वानाच्या फलत्यागालाहि 'त्यागत्व' या सामान्यामुळे विशिष्ट म्हणणें योग्यच आहे,असा उपसंहार करितात-]—**इति तत्सामान्यात् इयं सर्वकर्मफलत्यागस्तुतिः प्ररोचनार्था**—याप्रमाणे विद्वानाच्या कामत्यागाशी अविद्वानाच्या फलत्यागाचे सामान्य-साधर्म्य असल्यामुळें ही सर्वकर्मांच्या फलत्यागाची स्तुति आहे. (ती कशासाठी ? उत्तर-) प्ररोचनार्थ-त्यागाविषयीं रुचि उत्पन्न करून त्यांत प्रवृत्त करण्यासाठी ही स्तुति आहे. ( हीच गोष्ट दृष्टान्ताने स्पष्ट करितात-)—**यथा अगस्त्येन ब्राह्मणेन समुद्रः पीतः इति इदानींतनाः अपि ब्राह्मणाः ब्राह्मणत्वसामान्यात् स्तूयन्ते**—ज्याप्रमाणें अगस्त्य ब्राह्मणाने समुद्राचे प्राशन केले म्हणून आजकालचेहि ब्राह्मण 'ब्राह्मणत्व' या सामान्यामुळे-ब्राह्मणत्व या सादृश्यामुळे स्तुति केले जातात, ( अहोपण, फलत्यागच जर मोक्षाचें कारण असेल तर कर्मत्यागानेंहि फलत्यागाची सिद्धि होत असल्यामुळे कर्मानुष्ठान मुळींच करावयास नको ! कारण ते व्यर्थ आहे. उत्तर-)—**एवं कर्मफलत्यागात् कर्मयोगस्य श्रेयःसाधनत्वं अभिहितं**—त्याप्रमाणे कर्मफलत्यागामुळें कर्मयोगाचे श्रेयःसाधनत्व सांगितले आहे. [ येथे फलाचा अभिलाष सोडून ईश्वरार्पणबुद्धीने केलेल्या कर्माला श्रेयःसाधनता आहे-तसले कर्मानुष्ठान मोक्षाचे परंपरासाधन होतें, असे येथें विवक्षित आहे. त्यामुळें कर्म व्यर्थ नाही. ] १२.

---

१ रहस्यकारांनी ९-१२ श्लोकांवर विस्तृत टीप लिहिली आहे. प्रस्तुत श्लोक वादग्रस्त असल्यामुळें त्या टीपेतील महत्त्वाच्या वाक्यांचें परीक्षण करणें भाग आहे. " कर्मयोगदृष्ट्या हे श्लोक महत्त्वाचे आहेत; व त्यांत भक्तियुक्त कर्मयोग सिद्ध होण्यास अभ्यास-ज्ञान-भजनादि कर्मे वगैरे साधने सांगून या व इतर साधनांच्या तारतम्यविचारान्ती अखेर म्ह०

बाराव्या श्लोकांत कर्मफलत्यागाचें म्ह० निष्काम कर्मयोगाचें श्रेष्ठत्व वर्णिले आहे." हें म्हणणें प्रमाणशुद्ध नाही. कारण येथें 'माझ्याच ठिकाणी मन ठेव, माझ्याच ठिकाणी बुद्धि लाव, म्हणजे तूं मरणोत्तर माझ्या ठिकाणींच येऊन पोचशील,' ( श्लोक ८ ) असें म्हणून भगवानांनी वर २ ऱ्या श्लोकांत 'युक्ततम' म्हणून ज्यांना म्हटलें आहे, त्या सगुण ब्रह्मोपासकांचा परम धर्म फलासह सांगितला आहे. आपले मन व बुद्धि, अर्थात् सर्व अन्तःकरण-वृत्ति ईश्वराच्या सगुण स्वरूपांत स्थिर करणें हें भक्ताचें श्रेष्ठ साधन होय. पण तें आरंभींच साध्य होत नाही, म्हणून श्रेष्ठ सगुणोपासकानें काय केले पाहिजे हं अगोदर सांगून ९, १० व ११ श्लोकांत क्रमानें उत्तरोतर सुलभ उपाय सांगितले आहेत. 'तू आपले चित्त माझ्या ठिकाणीं समाहित करण्यास समर्थ नसशील तर अभ्यासयोगानें मला प्राप्त होण्याची म्ह० माझ्या ठिकाणीं चित्त स्थिर करण्याची इच्छा कर म्ह० अभ्यासयोगाचा आश्रय कर. चित्तसमाधानाचा अभ्यास कर,' हा दुसरा उपाय सांगितला. 'तसा अभ्यास करण्यासहि असमर्थ असशील तर मत्कर्मपरम हो व हेहि करण्यास समर्थ नसशील तर सर्वकर्मफलाचा त्याग कर,' असें म्हटलें आहे. अर्थात् सर्वकर्मफलत्याग हा चित्तसमाधानाचा अखेरचा उपाय आहे. अर्थात् कर्मफलत्यागानें कांही दिवसांनी ईश्वरार्पण कर्म करण्याची योग्यता येते, ईश्वरार्पण कर्म करितां करिता चित्तसमाधानाचा अभ्यास करण्याची योग्यता येते, व अभ्यासानें सगुणभक्ताची जी परम निष्ठा म्ह० ईश्वरामध्येच सर्व चित्तवृत्ति स्थिर करणे, ती प्राप्त होते, व तिच्या योगानें मरणोत्तर सगुण ईश्वराची प्राप्ति होते. आठव्या अध्यायांत सांगितल्याप्रमाणे ( गी. भा. पृ. ६७४ पहा. ) या सगुण ब्रह्मोपासकाला शुक्लगतीनें कार्यब्रह्माची प्राप्ति होते, असा येथील विषय आहे. त्यामुळे कर्मफलत्याग हा अगदीं शेवटचा मंद अधिकाऱ्यासाठी सांगितलेला उपाय आहे, हें उघड होतें. पण रहस्यकार "भक्तियुक्त कर्मयोग सिद्ध होण्यास अभ्यास, ज्ञान, भजनादि कर्में वगैरे साधने सांगून" असें खुशाल म्हणतात. पण येथे कर्मयोगासिद्धीचे प्रकरण तरी आहे का? 'माझ्या ठिकाणी अन्तःकरण स्थिर कर म्ह० तूं माझ्याचठिकाणी येऊन राहशील' असें भगवान् सांगत आहेत व 'तें न साधल्यास अभ्यास कर, तोहि शक्य नसल्यास मत्कर्मपरम हो व तेंहि न झाल्यास सर्वकर्मफलत्याग कर' असें म्हटलें आहे. त्यांत कर्मयोगाचा गंधहि नाही. कर्मफलत्याग हा कर्मयोग नसून एकप्रकारचा गौण संन्यासच आहे. (गी. भा. पृ. ७१७,१८ पहा. ) तथापि त्यालाच निष्काम कर्मयोग जरी मानलें, तरी तो इतर उत्तरोत्तर अन्तरंग साधनाचे अनुष्ठान करण्याचे सामर्थ्य नसल्यास सांगितलेला असल्यामुळे अगदी आरंभींचा उपाय आहे, मंद अधिकाऱ्यासाठींच तो आहे, यांत शंका नाही. अर्थात् त्याच्या सिद्धीसाठी ज्ञान-अभ्यास-भजन ही साधनें आहेत, असें म्हणणें सर्वथा अनुपपन्न आहे. ती विपरीत भावना आहे. रहस्यकार म्हणतात-" १२ व्या श्लोकांत कर्मफलत्यागाचें म्ह० निष्काम कर्मयोगाचे श्रेष्ठत्व वर्णिलें आहे." होय; ध्यानापेक्षांहि कर्मफलत्याग श्रेष्ठ आहे, असें १२ व्या श्लोकांत म्हटले आहे, हें खरें; पण तो सिद्धान्त नव्हे,'ती कर्मफलत्यागाची स्तुति आहे' असें आचार्यांनीं वर भाष्यांत सविस्तर व सकारण सांगितलेंच आहे. म्हणून आम्ही येथें अधिक विस्तार करीत नाही. 'ध्यानाद्धनहि कर्मफलत्याग श्रेष्ठ' हा जर सिद्धान्त मानला, तर वरील ९ते११ श्लोकांतील 'पूर्व पूर्व साधन आचर-

ण्यास जर तूं असमर्थ असशील तर पुढचें पुढचें सोपें साधन आचर ' असें सांगून अगदी शेवटीं जो कर्मफलत्याग सांगितला आहे, त्याची उपपत्ति लागत नाहीं. पण ' यद्धि स्तूयते तद्विधीयते ' या मीमांसेच्या न्यायास अनुसरून ही स्तुति आहे, असें मानल्यासच 'आरुरुक्षोः मुनेः योग कर्म कारणं उच्यते' (गी. भा. पृ. ५५९) इत्यादि भगवद्वचनें सार्थ होतात. अर्जुन किंवा त्याच्यासारखा त्याच्याच अवस्थेंतील दुसरा कोणी मंद अधिकारी, यास आरंभीं कर्मफलत्यागच विहित असल्यामुळें त्याच्याविषयीं श्रोत्याच्या मनांत रुचि उत्पन्न होण्यासाठीं ही स्तुति केली आहे. असो;

रहस्यकार म्हणतात—" निष्काम कर्मयोगाचे हे श्रेष्ठत्व येथेंच वर्णिले आहे, असे नाहीं. तर पूर्वी ३.८, ५.२, ६.४६ येथें हाच अर्थ स्पष्टरीत्या वर्णिला असून त्याप्रमाणे फलत्यागरूप कर्मयोगाचे आचरण करण्यासहि ठिकठिकाणी अर्जुनास उपदेश केला आहे. " ( पण ३.८, ५.२, व ६.४६ या श्लोकाचा वास्तविक अर्थ काय आहे, तो क्रमानें गी. भाष्यार्थ पृ. २७७ ७८, ४८४-८५, ६०८-९; येथे पहा. ३. ८ श्लोकात ' अकर्माहून कर्म श्रेष्ठ, ' ५.२ श्लोकात 'कर्मसन्यासाहून कर्मयोग श्रेष्ठ, ' व ६.४६ श्लोकांत ' तपस्वी, ज्ञानी व कर्मी याहून योगी श्रेष्ठ ' असे स्पष्ट म्हटले आहे. 'निष्काम कर्मयोग श्रेष्ठ ' असे म्हटलेले नाही. ' फलत्यागरूप कर्मयोग ' हे म्हणणे बरोबर नाही. फलत्याग हाच कर्मयोग नव्हे. कारण फलत्याग भावनात्मक आहे व कर्मयोग कृतिरूप आहे. तेव्हा फलत्यागच कर्मयोग कसा होईल ? अर्थात् रहस्यकारांची ही भाषा चुकली. तसेच, 'आचरण करण्यासहि अर्जुनास उपदेश केला आहे ' हा प्रयोग मराठी भाषापद्धतीला धरून नाहीं, असे आम्हाला वाटते. गीतारहस्यांत असे प्रमाद शतशः घडलेले आहेत, त्यातील हा एक नमुन्यासाठीच येथे दिला आहे.

रहस्यकार पुढें म्हणतात–" पण गीताधर्माहून ज्याचा संप्रदाय भिन्न आहे त्यांना ही गोष्ट विरुद्ध पडल्ये " ( हा मुद्दां एक भाषेचा नमूनाच आहे ! ! ) " म्हणून त्यांनीं वरील श्लोकाचे व विशेषत: बाराव्या श्लोकातील पदांचे अर्थ बदलण्याचा प्रयत्न केला आहे. " ( हें रहस्यकाराचें म्हणणें किती धाडसाचे आहे ? गीताधर्म तो कोणता ? व त्याहून भिन्न संप्रदाय कोणता ? अद्वैतसंप्रदाय गीताधर्माहून भिन्न आहे, हे म्हणणें धाडसाचें नव्हे का ? गीता व्यासांनी रचली हे जर खर असेल, तर गीताधर्म अद्वैतसंप्रदायाहून भिन्न असणे शक्यच नाहीं. आचार्यांनी गीताभाष्यात रहस्यकारासारखी आग्रही वृत्ति धरलेली नाही. वैदिकसंप्रदायाला व शास्त्रार्थाला सोडलेले नाहीं.मीमांसा,योग,कर्मकांड,ज्ञानकांड याच्या विरुद्ध कांही प्रतिपादन केलेले नाही. आग्रह, ओढाताण, राग-द्वेष इत्यादि सर्व प्रकार आचार्यांच्या पाठीमागून सुरू झाले; व स्वतः रहस्यकारहि त्यासच अनुसरले आहेत. आम्हां यापूर्वी ठिकठिकाणी हें दाखविलें आहे व पुढेहि दाखवूं ) " निव्वळ ज्ञानमार्गी म्ह० सांख्य टीकाकारास ज्ञानापेक्षा कर्मफलत्याग श्रेष्ठ ठरविलेला आवडत नाहीं, म्हणून एक तर ज्ञानशब्दानें पुस्तकी ज्ञान घ्यावें किंवा कर्मफलत्यागाची ही प्रशंसा अर्थवादात्मक म्ह० पोकळ समजावी, असे त्यांनीं म्हटलें आहे " ( रहस्यकाराचे हे म्हणणें अयोग्य आहे. ज्ञानमार्गी टीकाकार म्ह० शंकराचार्य व त्यांचे अनुयायी शंकरानन्द, मधुसूदनसरस्वती वगैरे. पण रहस्यकार म्हणतात तशी मात्र त्यांची स्थिति नाही. त्यांची

स्वतःची आवडनावड त्यांनीं भाष्यांत किंवा टीकांत घुसडलेली नाहीं. शुद्ध वैदिक संप्रदायाला धरून कर्म, उपासना व ज्ञान यांची व्यवस्था लाविली आहे. गीताधर्म वैदिक संप्रदायाला सोडून आहे, असे मात्र ते समजत नाहीत. रहस्यकार तसें समजतात. त्यामुळें त्यांना ज्ञानमार्गी–संन्यासमार्गी मोठे दुष्ट दिसतात. पण ज्ञानापेक्षां कर्मफलत्याग श्रेष्ठ मानणे हें वैदिक संप्रदायाला सोडून आहे. वैदिक सप्रदाय ज्ञानासाठी कर्माचरण सांगतो. गीताहि 'कर्मानेंच जनकादि चित्तशुद्धीच्याद्वारा सिद्धि पावले,' 'कर्मठ चित्तशुद्धीसाठी संग सोडून कर्म करितात,' 'यज्ञ,दान, तप, हीं पावन करणारीं आहेत.''ज्ञानासारखें पावन करणारे दुसरे कांहीं नाहीं,' 'ज्ञाने सर्वं कर्म अखिलं परिसमाप्यते ' ' योगसंसिद्धः ज्ञानं लभते ' इत्यादि सांगते. तेव्हा रहस्यकारांचा ज्ञानमार्गीयावरील पूर्वोक्त आरोप खोटा आहे, हे कोणीहि कबूल करील. ) ते म्हणतात––" ज्ञानमार्गी–सांख्य टीकाकारांस ज्ञानापेक्षां कर्मफलत्याग श्रेष्ठ ठरविलेला आवडत नाही. म्हणून एकतर ते ज्ञान म्ह० पुस्तकी ज्ञान ध्यावे किंवा कर्मफलत्यागाची ही प्रशसा अर्थवादात्मक म्ह० पोकळ समजावी " (पण आम्ही उलट असे विचारतो की, ज्या ज्ञानाहून ध्यान विशिष्ट–श्रेष्ठ आहे असे भगवान् सांगतात, ते ज्ञान म्हणजे अपरोक्ष ज्ञान असेल कसे ? ध्यान कशाकरिता करावयाचे ? अपरोक्ष अनुभवासाठी; म्ह० ध्यान साधन व ज्ञान–अपरोक्ष साक्षात्कार साध्य झाले. तेव्हां साध्याहून साधन श्रेष्ठ कसे असेल ? यास्तव ज्याला ज्ञान व ध्यान याचा साध्यसाधनसबंध ठाऊक आहे तो येथील ज्ञान म्ह० शास्त्रज्ञान, परोक्ष ज्ञानच समजेल, हे उघड आहे ज्याला ध्यान कशासाठी करितात हे ठाऊकच नसेल, तो मात्र येथील ज्ञान हें ब्रह्मात्मैक्य ज्ञानच आहे, असेहि म्हणेल व त्यापेक्षा ध्यान श्रेष्ठ आहे, हेहि कबूल करील. पण प्रत्यक्ष ध्यानादि करून अपरोक्ष आत्मानुभव घेणाऱ्या अद्वैतवाद्यांना ती गोष्ट कधींच मान्य होणार नाही. रहस्यकार ज्ञानशब्दाने परोक्ष ज्ञान व कर्मफलत्यागाची प्रशसा याचा अद्वैती टीकाकार विकल्प मानतात असे म्हणतात. पण वस्तुस्थिति तशी नाही. तर सर्व अद्वैती येथील ज्ञान म्ह० परोक्ष ब्रह्मज्ञान; व ही कर्मफलत्यागाची स्तुति आहे, असेच समजतात. 'एकतर ज्ञान म्ह० पुस्तकीज्ञान किंवा ही कर्मफलत्यागाची प्रशंसा आहे,' असें कोणी म्हणत नाहीत. अर्थात् रहस्यकाराचें हे म्हणणें निराधार आहे, तसेंच 'प्रशसा अर्थवादात्मक म्ह० पोकळ ' हे त्याचे म्हणणेंहि निराधार–शास्त्रपरिभाषेला सोडून आहे. प्रशसावाक्य हाच अर्थवाद आहे व अर्थवाद पोकळ नसतो, हे आम्ही पूर्वी सविस्तर सांगितले आहे. ( गी. भा. पृ. ४०, ४८५–८६ पहा.) पुढे रहस्यकार पुनः म्हणतात––"पातंजल योगमार्गीयांस अभ्यासापेक्षां कर्मफलत्याग अधिक ठरलेला खपत नाही, आणि नुसत्या भक्तिमार्गीयांस म्ह० भक्तीखेरीज दुसरी कांही कर्मे करू नयेत असे म्हणणारांस ध्यानापेक्षां म्ह० भक्तीपेक्षां कर्मफलत्यागाचें श्रेष्ठत्व मान्य होत नाहीं." (खरेंच आहे. पातजल योगमार्गी किंवा भक्तिमार्गींच कशाला, भक्ति व योग यांना ज्ञानाचें अन्तरग साधन मानणारे ज्ञानमार्गीहि केवल कर्मफलत्याग अभ्यास व भक्ति यांहून श्रेष्ठ आहे, असें म्हणणार नाहींत. कारण कर्मफलत्याग हें निवृत्तिमार्गांतील अगदीं आरंभींचे साधन आहे. तेव्हां धडधडीत खोटी गोष्ट कोणाला मान्य होणार ? म्हणून कर्मफलत्यागाची ही स्तुति मानणेंच सर्वथा युक्त आहे व सर्व भाष्य व टीकाकारांनीं ती स्तुतिच मानली आहे.पण ते सर्व खोटे व एकटे रहस्यकार मात्र खरे !! )

रहस्यकारांचा अर्थ अपूर्व आहे याविषयीं त्यांचेंच वचन प्रमाण आहे. तें असे—" पातंजल योग, ज्ञान किंवा भक्ति या तीन संप्रदायांहून भिन्न म्ह० गीतेतील भक्तियुक्त कर्मयोगसंप्रदाय हल्लीं बहुतेक लुप्त आहे, व त्यामुळे त्या संप्रदायाचा टीकाकारहि उरला नाही. म्हणून हल्लीं गीतेवर ज्या उपलब्ध टीका आहेत, त्यांत कर्मफलत्यागाचें श्रेष्ठत्व अर्थवादात्मक ठरविलें आहे. पण आमच्या मतें ही चूक होय." (गी. र. पृ. ७७७) पण आधी योग, ज्ञान व भक्ति हे तीन भिन्नभिन्न पथ आहेत, असे समजण्यांत रहस्यकारांचीच मोठी चूक झाली आहे. गीतेवर स्वतंत्र पातंजल योगी किंवा स्वतंत्र भक्तिमार्गी याच्या टीका नाहीत. ज्या आहेत, त्या सर्व अद्वैत वेदान्ती व द्वैती वेदान्ती वगैरे यांच्या आहेत. पण ते सर्व वेदान्ती योग व भक्ति यांचा उपासनेतच अन्तर्भाव करितात, व उपासना ब्रह्मसाक्षात्कारासाठी मानतात हे प्रसिद्ध आहे. तसेंच 'गीतेतील भक्तियुक्त कर्मयोगसंप्रदाय त्या तीन संप्रदायांहून भिन्न आहे,' असे मानण्यात त्यांची आणखी दुसरी मोठी चूक झाली आहे. ते म्हणतात—" हल्ली हा गीतेतील संप्रदाय लुप्त झाला आहे." पण पूर्वी तरी तो कधी होता ?' गीतेतील भक्तियुक्त कर्मयोग' कधी काळी तरी अस्तित्वात होता, असे कोणालाहि दाखविता येणे शक्य नाही. गीतेचा संप्रदाय म्ह० वैदिक संप्रदाय, वैदिक संप्रदाय म्ह० प्रवृत्ति-निवृत्तिधर्म किंवा कर्म आणि उपासना व ज्ञान. गीतेत कर्म आहे, उपासनाहि आहे व ज्ञानहि आहे. तिच्यामध्ये प्रवृत्ति व निवृत्ति दोन्ही आहेत. सर्व टीकाकारांनी याच एका दृष्टीने गीतेचे व्याख्यान केले आहे. गीतेचा संप्रदायच जर निराळा नाही तर " त्या संप्रदायाचा टीकाकारहि उरला नाही," हे म्हणणे फुकटच नव्हे का ? आचार्यांनी ज्याच्या ज्ञानकर्मसमुच्चयाचे खंडन केले आहे ते वृत्तिकार म्ह० 'भक्तियुक्त कर्मयोगसंप्रदायी' नव्हेत. तर ते श्रौतस्मार्त कर्म व ज्ञान याचा समुच्चय हें मोक्षाचे साधन मानणारे आहेत. ( गी. भा. पृ. ४३ पहा. ).

सर्व टीकाकारांचा अर्थ चूक आहे, असे सांगून रहस्यकार पुढे म्हणतात—" गीतेत निष्काम कर्मयोगच प्रतिपाद्य आहे, असे मानले म्हणजे या श्लोकाच्या अर्थाबद्दल काहीच अडचण रहात नाही. कर्म सोडून चालत नाही, निष्काम कर्म केलेच पाहिजे, असे म्हटले म्हणजे स्वरूपतः कर्मत्याग करणारा ज्ञानमार्ग, किंवा नुसती इंद्रियाची कसरत करणारा पातंजलयोग अगर सर्व कर्मे सोडून देणारा भक्तिमार्ग हे सर्वच कर्मयोगापेक्षा कमी योग्यतेचे ठरतात." पण गीतेत निष्काम कर्मयोगच प्रतिपाद्य आहे, असे मानावयाचे कसे ? त्याला काही आधार पाहिजे की नको ? ' कर्म सोडून चालत नाही, निष्काम कर्म केलेंच पाहिजे ' असे म्हणण्यास गीतेत आधार नाही. रहस्यकारांनी जे काही आधाराभास दाखविले आहेत, त्यांचे आभासत्व आम्हीं सविस्तर सिद्ध केलेच आहे. ( गी. भा. पृ. ३११-३२४ पहा. ) ' स्वरूपतः कर्मत्याग करणारा ज्ञानमार्ग व सर्व कर्में सोडून देणारा भक्तिमार्ग ' यांत काय फरक आहे ? पातंजलयोगाला ' नुसती इंद्रियाची कसरत करणारा ' असे म्हणणें म्ह० योगाचे स्वरूप आपल्याला कळले नाही असेच जगाला सांगणे होय. केवल कर्मयोगाच्या आसक्तीने रहस्यकारांनी वेदान्त व योग या सर्वोत्तम शास्त्रांवर भलभलते आरोप करण्याचे पाप विनाकारण केलें आहे ! ज्या योगाचे सांगोपांग प्रतिपादन खुद्द भगवानांनी किंवा व्यासांनी एका समग्र अध्यायांत केले व ज्या प्रधानयोगासाठीच गीतेला 'योग' हें नांव दिलें, त्या योगाला रहस्यकारांनी 'नुसती इंद्रियांची कसरत' असें म्हणून

तुच्छ लेखावें व जनतेने त्यालाच मान तुकवावी हा केवल कालमहिमा आहे ! पण शास्त्रज्ञ किंवा अनुभवी तज्ज्ञ ज्ञान, योग व भक्ति, यांहून कर्मयोग श्रेष्ठ आहे, असें कदापि म्हणणार नाहीत; व गीताहि तसे सांगत नाही. ती केवल रहस्यकारांची निराधार असंबद्ध कल्पना आहे. त्यामुळेच " निष्काम कर्मयोग याप्रमाणे श्रेष्ठ ठरल्यावर त्यांत अवश्य लागणारी भक्तियुक्त साम्यबुद्धि संपादन करण्यास उपाय काय ? एवढाच काय तो प्रश्न शिल्लक राहतो. " इत्यादि वृथा शब्दावडंबर माजवून " अभ्यास, ज्ञान व ध्यान हे त्याचे तीन उपाय आहेत" असे सर्वथा शास्त्रविरुद्ध प्रतिपादन त्यांनी केले आहे. निष्काम कर्मयोग श्रेष्ठ त्यांत भक्तियुक्त साम्यबुद्धि अवश्य लागते, व तिचे उपाय अभ्यास, ज्ञान व ध्यान, ही किती उत्तम शास्त्रव्यवस्था आहे ! शिवाय हे तीन उपायहि स्वतत्र आहेत, परस्पर उपकारक नव्हेत!! म्हणूनच रहस्यकार म्हणतात—" पैकी कोणाला अभ्यास करवत नसला तर त्याने ज्ञान किंवा ध्यान यांपैकी कोणताहि उपाय स्वीकारावा. हे उपाय आचरण्यास यथोक्त क्रमानें सुलभ आहेत, असे गीता सांगत आहे. " रहस्यकारांना गीतेचे विपरीत ज्ञान कसें झाले आहे हें सिद्ध करण्यास हें एकच उदाहरण पुरे आहे. गीता असें कोठे सांगत आहे ? येथेच ना ? १२ व्या श्लोकात " अभ्यासापेक्षां ज्ञान श्रेयः—अधिक चागले ( हा रहस्यकारांचाच अर्थ आहे ) ज्ञानापेक्षा ध्यान आधिक योग्यतेचे व ध्यानापेक्षा कर्मफलत्याग श्रेष्ठ " असे सांगितलें आहे. त्यावरून अभ्यास, ज्ञान व ध्यान हे तीन निष्काम कर्मयोगाचे स्वतंत्र—परस्पर निरपेक्ष व तेहि उत्तरोत्तर सुलभ उपाय आहेत हे कसे ठरतें ? ९ ते ११ श्लोकात " चित्त समाधान करण्यास असमर्थ असशील तर अभ्यास कर, अभ्यास करता येत नसेल तर मत्कर्मपरम हो, तेंहि शक्य नसेल तर निदान कर्मफलत्याग कर " असें म्हटले आहे. त्यांत अभ्यास, ईश्वरार्थ कर्म करणे व कर्मफलत्याग हे ईश्वरामध्यें चित्तसमाधान करण्याचे उत्तरोत्तर सुलभ उपाय सागितले आहेत. पण रहस्यकार हा भेद ध्यानात न आणतां अभ्यास, ज्ञान व ध्यान यानाच कर्मयोगाचे उत्तरोत्तर सुलभ उपाय म्हणत आहेत! हें आश्चर्य नव्हे का ? पण आचार्यांच्या ' सांप्रदायिक छापेंतून ' स्वतःला सोडवून घेतलेल्या रहस्यकारांची या श्लोकाची व्यवस्था लावताना आणखी किती व कशी तारंबळ उडाली आहे ती पहा—ते पुढे म्हणतात—" पण हेंहि न साधले तर मनुष्याने कर्मयोगाच्या आचरणासच एकदम सुरवात करावी, म्हणजे झाले, असें बाराव्या श्लोकात सागितलें आहे. " ( गी. र. पृ. ७७७ ) बाराव्या श्लोकांत तसें सागितलेलें नाहीं, याविषयीं वाचकांनीं श्लोकार्थावरून आपली खात्री करून घ्यावी. पुढें ते म्हणतात—" आता येथें अशी एक शंका येते कीं ज्याला अभ्यास, ज्ञान किंवा ध्यानहि होत नाही तो कर्मयोग तरी कसा चालविणार ? तेव्हां कर्मयोग सर्वांपेक्षां सुलभ हें म्हणणेंच निरर्थक आहे, असें कित्येकांनीं ठरविलें आहे ( कोणीं ? ) पण जरा विचार केला तर या आक्षेपात काहीं अर्थ नाहीं, असें दिसून येईल. " अशी प्रस्तावना करून रहस्यकार त्याचें समाधान कसें मजचे करितात तें पहा—" १२व्या श्लोकांत सर्वकर्मफलत्याग 'एकदम ' कर असें म्हटलेलें नाहीं. तर भगवंतांनीं वर्णिलेल्या कर्मयोगाचा आश्रय प्रथम करून (ततः) म्हणजे तदनंतर हळूहळू ही गोष्ट अखेर सिद्ध करून घ्यावयाची आहे; आणि असा अर्थ केला म्ह० कांहींच विसंगतता रहात नाहीं." (गी. र. पृ. ७७८) पण अगोदर हें समाधान ७७७ पृष्ठावरील शेवटच्या दोन ओळींत 'मनुष्यानें

कर्मयोगाच्या आचरणासच एकदम सुरुवात करावी म्हणजे झालें, असें १२ व्या श्लोकांत सांगितलें आहे' असें जे म्हटलें आहे त्याच्या विरुद्ध आहे. कारण तेथें म्हणतात 'एकदम सुरुवात करावी' व येथें म्हणतात 'एकदम कर, असें म्हटलेलें नाहीं.' दहाच ओळीच्या आंत असें परस्पर विरुद्ध प्रतिपादन केलेले असावें, हें खरोखर मोठें आश्चर्य होय! कदाचित् वर 'कर्मयोग' व येथें 'कर्मफलत्याग' असा शब्दभेद असल्यामुळे त्याच्याच आधाराने विरोधाचा परिहार करण्याचा कोणी यत्न करील.पण रहस्यकारांनीं ७७७ पृष्ठावर 'कर्मफलत्याग म्ह०निष्कामकर्मयोग' 'फलत्यागरूप कर्मयोग' असें म्हटलें आहे.तेव्हा त्यांचा भेद मानतां येत नाही. शिवाय रहस्यकार म्हणतात तसा 'प्रथम कर्मयोगाचा आश्रय करून नंतर हळूहळू ही गोष्ट सिद्ध करून घ्यावी' असें सुचविणारा 'ततः' हा शब्द १२ व्या श्लोकांत नाहीं. तो अकराव्या श्लोकांत आहे व त्याचा अर्थ–हें होत नसेल 'तर' कर्मफलत्याग कर–असा आहे. ९ व्या श्लोकांतील 'ततः' शब्दासारखाच हा 'ततः' आहे.

पुढे रहस्यकार म्हणतात—"कर्मफलाचें स्वल्पाचरणच नव्हे (२.४०) तर जिज्ञासाहि (गी. ६.४४) झाल्यानें मनुष्य चरकात घातल्याप्रमाणे अखेर सिद्धीकडे ओढिला जातो." पण हा अर्थ मुळाला धरून नाही. (गी. भा.पृ.१५२ व ६०५ पहा) तथापि रहस्यकार त्या असंबद्ध अर्थालाच सुसबद्ध मानून पुढें म्हणतात--"म्हणून कर्मयोगाचा आश्रय करणें म्ह० त्या मार्गानें जावे, असे मनात येणें हेच त्या मार्गांत सिद्धि मिळविण्याचें पहिलें साधन किंवा पहिली पायरी आहे, आणि हें साधन अभ्यास, ज्ञान, व ध्यान यापेक्षां सुलभ नाहीं, असे कोण म्हणेल? आणि बाराव्या श्लोकाचा भावार्थहि हाच आहे." अर्थात् 'कर्मयोग मार्गानें जाण्याचें मनात येणें,' हें पहिलें साधन व ते अभ्यासादिकाहून खरोखरच सुलभ आहे, हे आम्हीहि कबूल करितो. पण १२ व्या श्लोकांतील कर्मफलत्याग म्ह०'हें मनांत येणेंच' आहे, हें मात्र एखादा मूर्खहि कबूल करणार नाही. शिवाय 'तसें मनांत येणे' या पहिल्या साधनाने मिळणारी त्या मार्गांतील सिद्धि कोणती? तात्पर्य येथें असबद्धतेची पराकाष्ठा झाली आहे.

यापुढें 'बुडत्याला गवताचा आधार' या न्यायानें सूर्यगीतेंतील "ज्ञानादुपास्तिरुत्कृष्टा कर्मोत्कृष्टमुपासनात्। इति यो वेद वेदान्तैः स एव पुरुषोत्तमः" हें वचन देऊन शेवटीं "कर्मफलत्यागरूपी योग म्ह० ज्ञानभक्तियुक्त निष्काम कर्मयोगच सर्व मार्गांत श्रेष्ठ असें भगवद्गीतेचें ठाम मत असून त्याला अनुकूलच नव्हे, तर पोषक युक्तिवाद १२ व्या श्लोकांत आहे. दुसऱ्या कोणत्या सम्प्रदायास तो पटत नसला तर त्यानीं तो सोडून द्यावा पण अर्थाची फुकट ओढाताण करू नये." असे म्हणतात. रहस्यकारांना सूर्यगीतेसारख्या एका अप्रसिद्ध 'नकली' गीतेतील वचन आधार देण्याचा प्रसंग यावा, यावरूनच त्यांचा सिद्धान्त शिष्टसंमत नाहीं, हें उघड होतें. गीतेला मूळ आधार उपनिषदांचा आहे, त्यांतील एखादें वचन जर त्यांनीं पुढें केले असतें तर आम्ही त्याचा विचार केला असता. शिवाय सूर्यगीतेंतील वचनहि प्रत्यक्ष पाहिल्यावर रहस्यकार म्हणतात त्याच अर्थी ते आहे, असें सिद्ध होईलसें वाटत नाहीं. रहस्यकारांचें वरील उपसंहारात्मक वाक्य तर फारच बहारीचें आहे. ते म्हणतात तसें गीतेचें ठाम मत नाही. १२ व्या श्लोकांत त्याला अनुकूल असा युक्तिवादहि नाहीं. आचार्यादिकांचें 'या श्लोकांत कर्मफलत्यागाची स्तुति केली

अत्र चाऽऽत्मेश्वरभेदमाश्रित्य विश्वरूप ईश्वरे चेतःसमाधानलक्षणो योग उक्त ईश्वरार्थं कर्मानुष्ठानादि च। 'अथैतदप्यशक्तोऽसि' इत्यज्ञानकार्यसूचनान्नाभेददर्शिनोऽक्षरोपासकस्य कर्मयोग उपपद्यत इति दर्शयति। तथा कर्मयोगिनोऽक्षरोपासनानुपपत्तिं दर्शयति भगवान्॥'ते प्राप्नुवन्ति मामेव' इति अक्षरोपासकानां कैवल्यप्राप्तौ स्वातन्त्र्यमुक्त्वेतरेषां पारतन्त्र्यमीश्वराधीनतां दर्शितवांस्तेषामहं समुद्धर्तेति। यदि हीश्वरस्याऽऽत्मभूतास्ते मता अभेददर्शित्वादक्षररूपा एव त इति समुद्धरणकर्मवचनं तान्प्रत्यपेशलं स्यात्। यस्माच्चार्जुनस्यात्यन्तमेव हितैषी भगवांस्तस्य सम्यग्दर्शनानन्वितं कर्मयोगं भेददृष्टिमन्तमेवोपदिशति। न चाऽऽत्मानमीश्वरं प्रमाणतो बुद्ध्वा कस्यचिद्गुणभावं जिगमिषति कश्चिद्विरोधात्। तस्मादक्षरोपासकानां सम्यग्दर्शननिष्ठानां संन्यासिनां त्यक्तसर्वैषणानाम् 'अद्वेष्टा सर्वभूतानाम्' इत्यादिधर्मपूगं साक्षादमृतत्वकारणं वक्ष्यामीति प्रवर्तते—

**भाष्यार्थ**—( आतां 'अद्वेष्टा०' इत्यादि पुढील ग्रंथाला अवतरण देण्यासाठीं मागील अर्थाचा अनुवाद करितात-)—**अत्र च आत्मेश्वरभेदं आश्रित्य विश्वरूपे ईश्वरे चेतःसमाधानलक्षणः योगः उक्तः**—येथें आत्मा व ईश्वर यांच्या भेदाचा आश्रय करून विश्वरूप ईश्वरांचे ठिकाणीं चित्तसमाधानरूप योग सांगितला—**च ईश्वरार्थं कर्मानुष्ठानादि**—आणि ईश्वरासाठीं कर्मानुष्ठान वगैरेहि सांगितले [त्यांचा जर आत्यंतिक-नित्य अभेद असेल तर ईश्वराचे ठिकाणी मनःसमाधानरूप योग अशक्य आहे. कारण आत्मा व ईश्वर यांचा जर अत्यंत अभेद असेल तर आत्मा ध्यान करणारा व ईश्वर ध्येय-ध्यानाचा विषय, हा त्यांचा संबंधच संभवत नाही. त्याचप्रमाणें त्यांचा आत्यंतिक अभेद आहे, असें ज्ञान झाल्यावर कर्मानुष्ठान किंवा त्याच्या फलाचा त्याग यांचा संभव नाहीं. भगवानांच्या वचनावरूनहि ज्याला अभेदज्ञान झालें आहे त्याच्यासाठीं कर्मयोगादिक आहे, असें सिद्ध होत नाही, असें सांगतात-]—**'अथैतदप्यशक्तोऽसि०' इति अज्ञानकार्यसूचनात्**—'आतां जर हेंहि करण्यास असमर्थ असशील तर सर्वकर्मफलत्याग कर' असें म्हणून असमर्थ असणे हें अज्ञानाचें कार्य सुचाविले आहे. त्यामुळें—**अभेददर्शिनः अक्षरोपासकस्य कर्मयोगः न उपपद्यते इति दर्शयति**—आत्मा व ईश्वर यांचा अभेद पाहणाऱ्या अक्षरोपासकाचा कर्मयोग उपपन्न होत नाही, असेंच भगवान् प्रदर्शित करीत आहेत. —**तथा भगवान् कर्मयोगिनः अक्षरोपासनानुपपत्तिं दर्शयति**—अक्षरोपासकांच्या कर्मयोगाचा असंभव जसा सांगितला आहे त्याचप्रमाणें भगवान् कर्मयोग्याच्या अक्षरोपासनेची अनुपपत्ति दाखवीत आहेत. [ तत्त्वज्ञाननिष्ठ अक्षरोपासक

---

आहे.' हें म्हणणेंच सर्वथा उपपन्न असल्यामुळें आम्ही रहस्यकारांनाच उलट असें म्हणतों—कीं, महाराज ! तुम्हीच या गीतेच्या बिकट मार्गाकडे वळूं नकां व 'फुकट ओढाताणहि' करूं नका. प्रपंचप्रधान व अविरक्त असलेल्या तुमच्या सारख्यांचा हा विषय नव्हे. गीता हा परमार्थप्रधान विरक्तांचा विषय आहे.

आपल्या ज्ञानाप्रमाणें ईश्वरालाच प्राप्त होतात पण कर्मी साक्षात् त्याला प्राप्त होण्यास योग्य नसतात. त्यामुळें अज्ञ कर्मठांच्या अक्षरोपासनेची सिद्धि होत नाहीं. तसेंच-]—**' ते प्राप्नुवन्ति मां एव० ' इति अक्षरोपासकानां कैवल्यप्राप्तौ स्वातन्त्र्यं उक्त्वा**—' तें मलाच प्राप्त होतात ' या वचनानें अक्षरोपासकांचें कैवल्यप्राप्ती-विषयीं स्वातंत्र्य सांगून—**'तेषां अहं समुद्धर्ता०' इति इतरेषां पारतन्त्र्यं-ईश्वराधीनतां दर्शितवान्**—'त्यांचा मी उद्धार करणारा आहे,' या वचनानें इतरांचें पारतंत्र्य-ईश्वराधीनता भगवानांनी दाखविलीं आहे. [ त्यामुळे अक्षरोपासना व कर्मा-नुष्ठान ही एकत्र संभवत नाहींत. 'अहोपण अक्षरोपासकांप्रमाणें इतरहि जर ईश्वररूपच आहेत तर ते ईश्वराधीन कसे ? ' असें कोणी विचारील म्हणून सांगतात-]—**यदि हि ते ईश्वरस्य आत्मभूताः मताः अभेददर्शित्वात् ते अक्षररूपाः एव इति समुद्धरणकर्मवचनं तान् प्रति अपेशलं स्यात्**—जर ते ईश्वराचे आत्म-भूत आहेत असें मानले तर अभेददर्शित्वामुळे म्ह० ईश्वर व आत्मा यांचा अभेद पहात असल्यामुळें ते अक्षररूपच आहेत. यास्तव ' मी त्यांचा उद्धार करणारा होतों ' हें म्हणणें त्यांच्याविषयीं व्यर्थ होतें [ कर्मयोग व अक्षरोपासना यांचा एकत्र संभवच नाही, याविषयी आणखी कारण-]—**यस्मात् च अर्जुनस्य अत्यन्तं एव हितैषी भगवान् तस्य सम्यग्दर्शनानन्वितं भेददृष्टिमन्तं कर्मयोगं एव उपदिशति**—आणि ज्याअर्थी अर्जुनाचा अत्यन्तच हितेच्छु, त्याचें अत्यंत हित व्हावे अशीच इच्छा करणारा भगवान् सम्यग्दर्शनाशी ज्याचा कांहीं संबंध नाहीं असा भेददृष्टीने युक्त असलेला कर्मयोगच त्याला ' कुरु कर्मैव० ' इत्यादि वचनानें सांगत आहे, [ शिवाय अक्षरोपासक महावाक्यावरून ईश्वरच आत्मा आहे, असें जाणतो. तो क्रियेमध्ये गुणत्वाने कर्तृत्वाचा अनुभव घेत नाहीं, म्ह० मुख्य ईश्वरत्व सोडून गौणभावास प्राप्त होऊन ' मी या क्रियेचा कर्ता आहे ' असें केव्हांच समजत नाहीं. कारण गौण कर्तृत्व व मुख्य ईश्वरत्व यांचा एकत्र असंभव आहे, त्या-मुळें अक्षरोपासन व कर्मानुष्ठान हीं एकाच पुरुषामध्यें संभवत नाहीत, असें सांगता-त-]—**च आत्मानं ईश्वरं प्रमाणतः बुद्ध्वा कश्चित् कस्यचित् गुणभावं न जिगमिषति**—आणि आत्मा ईश्वर आहे,असे महावाक्यरूप प्रमाणानें जाणून कोणी कोणाच्याच गुणभावास प्राप्त होण्याची इच्छा करीत नाहीं: [ ईश्वर असतांना अनी-श्वर होऊं शकत नाहीं. तें कां ? उत्तर-]—**विरोधात्**—कारण मुख्य व गौण यांचा परस्पर विरोध आहे, [ याप्रमाणें अक्षरोपासना व कर्मयोग यांचा एकत्र असंभव आहे, असें सिद्ध झाले असतां काय निष्पन्न होते तें सांगतात-]—**तस्मात् अक्षरोपासकानां सम्यग्दर्शननिष्ठानां त्यक्तसर्वैषणानां संन्यासिनां 'अद्वेष्टा सर्वभूतानां ' इत्यादिधर्मपूगं साक्षात् अमृतत्वकारणं वक्ष्यामि इति प्रवर्तते**—त्याअर्थी अक्षरोपासक, तत्त्वज्ञाननिष्ठ, ज्यांनीं सर्व एषणांचा त्याग केला आहे, अशा संन्याश्यांना ' अद्वेष्टा सर्वभूतानां० ' इत्यादि धर्मांचा समूह कीं जो साक्षात् अमृतत्वाचें कारण-निमित्त आहे, तो धर्मसमूह मी सांगेन या आशयानें भगवान् प्रवृत्त होतात.

[ अज्ञ कर्मी पुरुषांच्या ठिकाणीं पुढील सर्व धर्म पूर्णपणें संभवत नाहींत. वास्तव अक्षरब्रह्मनिष्ठांसाठींच हे धर्म मुख्यत्वेंकरून आहेत. तथापि त्यांतील जे सामान्य धर्म ज्या इतरांनाहि जितक्या प्रमाणानें आचरितां येतील तितके त्यांनी ते अवश्य आचरावे, हें इष्टच आहे. कारण कर्मयोग्यानेंहि शक्य तितका द्वेष टाकणें, सर्वांशीं मित्रत्वानें वागणें, वगैरे केव्हांहि चांगलेंच; पण ते सर्व पूर्णपणें निष्काम ज्ञाननिष्ठ संन्याश्याच्या हातूनच घडणें शक्य आहे. ]

**अद्वेष्टा सर्वभूतानां मैत्रः करुण एव च ।**
**निर्ममो निरहंकारः समदुःखसुखः क्षमी ॥ १३ ॥**

**अन्वयार्थ—सर्वभूतानां अद्वेष्टा**—कोणत्याहि प्राण्याचा द्वेष न करणारा–(स्वतःला दुःख देणाऱ्या प्राण्याचाहि द्वेष न करणें हें भगवद्भक्ताचे लक्षण आहे. )—**मैत्रः**—सर्वांशीं मित्रत्वाने राहणारा,—**करुणः एव च**—दुःखी जीवांवर दया करणारा असाच तो असतो.—**निर्ममः**—हा अमुक पदार्थ माझा आहे, असें त्याला कधी वाटत नाहीं.—**निरहंकारः**—' हा मी ' हा अभिमान त्याच्या ठिकाणीं नसतो.—**समदुःखसुखः**—दुःख व सुख हीं दोन्ही त्याला एकसारखींच वाटतात. ( दुःख द्वेषाची प्रवृत्ति करिते व सुख आसक्तीला वाढविते. सामान्य मनुष्य ज्याच्यापासून दुःख होतें, त्याचा द्वेष करितो व ज्याच्यापासून सुख होतें त्यावर प्रेम करितो. पण भगवद्भक्त त्या दोघांनाहि समान मानतो.)—**क्षमी**—क्षमावान्, कोणी शिव्या दिल्या किंवा मारले तरी हा मनांत क्षुब्ध होत नाहीं तर अगदीं शांत असतो. १३.

**अद्वेष्टा सर्वभूतानां न द्वेष्टाऽऽत्मनो दुःखहेतुमपि न किंचिद्द्वेष्टि सर्वाणि भूतान्यात्मत्वेन हि पश्यति । मैत्रो मित्रभावो मैत्री मित्रतया वर्तत इति मैत्रः । करुण एव च करुणा कृपा दुःखितेषु दया तद्वान्करुणः सर्वभूताभयप्रदः संन्यासीत्यर्थः । निर्ममो**

---

१ आचार्यांनी येथवर पुढील सर्व धर्म आत्मैक्यदर्शी अक्षरोपासकासाठींच आहेत, हें सविस्तर सांगितलें. पण रहस्यकार ' अद्वेष्टा० ' इत्यादि या श्लोकांस असें अवतरण देतात—" कर्मफलत्याग याप्रमाणें श्रेष्ठ ठरवून आतां त्या मार्गाने जाणारास ( कर्म स्वरूपतः सोडणारास नव्हे ) जी सम व शांत स्थिति अखेर प्राप्त होते तिचें वर्णन करून शेवटीं या प्रकारचाच भक्त मला अत्यंत प्रिय होय, असें भगवान् सांगतात." पण कर्मफलत्यागमार्गानें जाणारास जी सम व शांत स्थिति अखेर प्राप्त होते तिचें वर्णन पुढें आहे, स्वरूपतः कर्में सोडणारास प्राप्त होणाऱ्या सम व शांत स्थितीचें तें नव्हे, हें कशावरून ठरवावयाचें ? की रहस्यकारांचें वचनच याला प्रमाण ! ' अखेर प्राप्त होणाऱ्या सम व शांत स्थितीचें पुढील वर्णन आहे, ' असें खुद्द रहस्यकारच म्हणत आहेत, हें एकाअर्थी बरें आहे. कारण त्यावरून तें खुद्द कर्मयोग्याचें वर्णन नसून कर्मयोगानें अखेर प्राप्त होणाऱ्या सम व शांत स्थितीचें आहे, हें उघड होतें व तसली स्थिति हीच सिद्धावस्था किंवा ज्ञाननिष्ठा होय. त्यामुळें रहस्यकारांच्या व आचार्यांच्या अवतरणांत शब्दमात्र भेद जरी असला तरी अर्थतः भेद नाहीं.

**ममप्रत्ययवर्जितो निरहंकारो निर्गताहंप्रत्ययः। समदुःखसुखः समे सुखदुःखे द्वेषरागयोरप्रवर्तके यस्य स समदुःखसुखः क्षमी क्षमावानाक्रुष्टोऽभिहतो वाऽविक्रिय एवाऽऽस्ते॥**

**भाष्यार्थ—सर्वभूतानां अद्वेष्टा न द्वेष्टा**—सर्वभूतांचा अद्वेष्टा-द्वेष न करणारा, ('अहोपण जो आपल्या दुःखाला कारण होतो त्याचा द्वेष विद्वान्हि करितोच,' उत्तर-) **—आत्मनः दुःखहेतुं अपि किंचित् न द्वेष्टि**—आपल्या दुःखाला कारण होणाऱ्याहि कशाचा द्वेष करीत नाही.—**हि सर्वाणि भूतानि आत्मत्वेन पश्यति**—कारण सर्व भूतांना आत्मत्वानें पाहतो.—**मैत्रः-मित्रभावः मैत्री मित्रतया वर्तते इति मैत्रः**—मैत्र म्ह० मित्रभाव-मैत्री अर्थात् सर्व भूतांशी मित्रत्वानें वागतो, म्हणून मैत्र.—'**करुणः एव च'-करुणा-कृपा दुःखितेषु दया तद्वान् करुणः सर्वभूताभयप्रदः संन्यासी इत्यर्थः**—आणि करुणच, करुणा म्ह० कृपा-दुःखितावर दया, जो दयेने युक्त असलेला तो करुण, सर्वभूतांना अभय देणारा संन्यासी, असा याचा भावार्थ—**निर्ममः-ममप्रत्ययवर्जितः**—निर्मम म्ह० देहाच्या ठिकाणीहि 'हा माझा' अशा प्रत्ययाने रहित असलेला—**निरहंकारः-निर्गत-अहंप्रत्ययः**—निरहंकार म्ह० मी असा उत्तम-सदाचरणशील विद्वान् वगैरे आहे, अशा प्रकारचा अहंप्रत्यय ज्याच्यापासून निघून गेला आहे असला, अहंकार ज्याने टाकला आहे तो,—**सम-दुःखसुखः-समे दुःखसुखे रागद्वेषयोः अप्रवर्तके यस्य सः समदुःखसुखः**—समदुःख-सुख म्ह० ज्याला दुःख-सुख सम आहेत म्ह० राग व द्वेष यांना प्रवृत्त करणारी नाहीत तो समदुःखसुख होय—**क्षमी-क्षमावान्-आक्रुष्टः अभिहतः वा अविक्रियः एव आस्ते**—क्षमी म्ह० क्षमावान्, कोणी शिव्या दिल्या किंवा मारलें तरी जो अविक्रियच असतो. [ ज्याला क्रोध येत नाही, किंवा दुःख होत नाही, तो क्षमी होय. ] १३.

**संतुष्टः सततं योगी यतात्मा दृढनिश्चयः।**
**मय्यर्पितमनोबुद्धिर्यो मद्भक्तः स मे प्रियः॥ १४॥**

**अन्वयार्थ—सततं संतुष्टः**—सदा संतुष्ट-जिवंत राहण्यास अवश्य असलेल्या वस्तु मिळाल्या तरी ठीक, न मिळाल्या तरी ठीक, दोन्हीमध्यें सदा आनंदी,—(**सततं) योगी**—सदोदित शांतचित्त असणारा, मनाला केव्हांहि विक्षिप्त होऊं न देणारा,—**यतात्मा**—स्वभावाचें नियमन करणारा, मनाच्या प्रत्येक स्वाभाविक वृत्तीचा निरोध करणारा, किंवा शरीरेंद्रिय-संघाताचें नियमन करणारा,—**दृढनिश्चयः**—आत्मतत्त्वाविषयीं ज्याचा निश्चय अतिशय दृढ झाला आहे,—**मयि अर्पितमनोबुद्धिः**

---

२ या श्लोकात 'सर्व भूतांचा अद्वेष' वगैरे जे धर्म सांगितले आहेत ते कर्मयोग्याचे ठिकाणीं किंवा अज्ञ संन्याश्याच्या ठिकाणीहि संभवत नाहीत. ज्ञानी संन्याशी, व ज्ञानी भक्त यांच्या ठिकाणीच अक्षरशः संभवतात. कर्मयोग निष्काम जरी असला तरी त्यांत राग-द्वेष, अहं-मम इत्यादि भाव अवश्य उद्भवतात.

—जो माझ्या ठिकाणीं आपलें मन व बुद्धि यांना स्थिर करून राहिला आहे.—**यः मद्भक्तः**—असा जो माझा भक्त आहे, ज्या माझ्या भक्तामध्यें हे सर्व गुण आहेत **सः**—तो—**मे प्रियः**—मला प्रिय आहे. १४.

**संतुष्ट इति । संतुष्टः संततं नित्यं देहस्थितिकारणस्य लाभेऽलाभे चोत्पन्नालंप्रत्ययस्तथा गुणवल्लाभे विपर्यये च संतुष्टः सततं योगी समाहितचित्तो यतात्मा संयतस्वभावो दृढनिश्चयो दृढः स्थिरो निश्चयोऽध्यवसायो यस्याऽऽत्मतत्त्वविषये स दृढनिश्चयो मय्यर्पितमनोबुद्धिः संकल्पात्मकं मनोऽध्यवसायलक्षणा बुद्धिस्ते मय्येवार्पिते स्थापिते यस्य संन्यासिनः स मय्यर्पितमनोबुद्धिर्य ईदृशो मद्भक्तः स मे प्रियः 'प्रियो हि ज्ञानिनोऽत्यर्थमहं स च मम प्रियः' इति सप्तमेऽध्याये सूचितं तदिह प्रपञ्च्यते ॥ १४**

**भाष्यार्थ—'संतुष्टः०' इति**—'संतुष्टः०' या श्लोकानें ज्ञानी अक्षरोपासकाचीं आणखी विशेषणें सांगतात—**संतुष्टः सततं-नित्यं देहस्थितिकारणस्य लाभे अलाभे च उत्पन्न-अलंप्रत्ययः**—सतत-नित्य संतुष्ट, देहस्थितीला कारण होणाऱ्या अन्नादि पदार्थांचा लाभ झाला किंवा लाभ न झाला म्ह० शरीराच्या निर्वाहासाठीं अत्यंत अवश्य असलेले अन्न व वस्त्र मिळाले तरी व न मिळालें तरी ज्याच्या चित्तांत अलंप्रत्यय म्ह० तृप्ति उत्पन्न झालेली आहे, अन्नादि मिळालें तरी ठीक न मिळालें तरी ठीक, अशी ज्याची वृत्ति आहे,—**तथा गुणवल्लाभे च विपर्यये संतुष्टः**—त्याचप्रमाणें गुणयुक्त–चांगल्या वस्तूचा लाभ झाला किंवा त्याच्या उलट वाईट वस्तु मिळाली तरी संतुष्ट,—**सततं योगी–समाहितचित्तः**—सतत योगी[1] म्ह० समाहितचित्त–ज्याचें चित्त सतत समाहित आहे, असा,—**यतात्मा–संयतस्वभावः**—यतात्मा म्ह० ज्याचा स्वभाव–शरीरेंद्रियसंघात सतत उत्तम प्रकारें नियमित केलेला आहे तो,—**दृढनिश्चयः-दृढः-स्थिरः निश्चयः-अध्यवसायः यस्य आत्मतत्त्वविषये सः दृढनिश्चयः**—दृढनिश्चय–दृढ म्ह० स्थिर, निश्चय म्ह० आत्मतत्त्वविषयीं अध्यवसाय–ज्याचा आत्मतत्त्वविषयींचा निश्चय स्थिर आहे म्ह० ज्याचा निश्चय कुतर्कादिकांच्या योगानें डळमळत नाहीं, तो दृढनिश्चय पुरुष होय,—**मयि अर्पितमनोबुद्धिः-संकल्पात्मकं मनः अध्यवसायलक्षणा बुद्धिः ते यस्य संन्यासिनः मयि एव अर्पिते-स्थापिते सः मयि अर्पितमनोबुद्धिः**—माझ्या ठिकाणीं ज्याचें मन व बुद्धि अर्पिलेलीं आहेत, संकल्पात्मक मन व निश्चयरूप बुद्धि, ज्या संन्याशाचें मन व बुद्धि हीं दोन्हीं माझ्या ठिकाणींच अर्पण केलेलीं–स्थापित–स्थिर केलेलीं आहेत तो 'मयि अर्पितमनोबुद्धिः' होय.—**यः ईदृशः मद्भक्तः सः मे प्रियः**—जो अशा प्रकारचा माझा भक्त-मद्भजनपरायण ज्ञानी तो मला प्रिय आहे. [ भगवानांना

---

१ रहस्यकारानीं येथील 'योगी' याचा 'कर्मयोगी' असा अर्थ केला आहे. पण संतुष्ट, सतत योगी, यतात्मा, दृढनिश्चय इत्यादि विशेषणाच्या प्रवाहांतील 'योगि'शब्दाचा तसा अर्थ करणें अयोग्य आहे. रामानुजाचार्य 'सततं योगी' याचा अर्थ–'प्रकृतिवियुक्तात्मानुसंधानपरः' असा करितात.

ज्ञानी प्रिय असतो याविषयीं प्रमाण-]—'**प्रियो हि ज्ञानिनोऽत्यर्थं अहं स च मम प्रियः '-इति सप्तमे अध्याये सूचितं तत् इह प्रपञ्च्यते**—'कारण ज्ञानी भक्ताला मी अत्यंत प्रिय आहें व तो मला अत्यंत प्रिय आहे,' असें जें सातव्या अध्यायांत ( पृ. ६३० पहा. ) सुचविलें आहे त्याचाच येथें विस्तार केला जात आहे.१४

**यस्मान्नोद्विजते लोको लोकान्नोद्विजते च यः ।**
**हर्षामर्षभयोद्वेगैर्मुक्तो यः स च मे प्रियः ॥ १५ ॥**

**अन्वयार्थ—यस्मात्**—ज्या माझ्या भक्तापासून—**लोकः**— कोणताहि प्राणी—**न उद्विजते**—उद्विग्न होत नाहीं, ज्या भगवद्भक्तापासून कोणालाहि संताप -क्षोभ होत नाहीं,—**च**—त्याचप्रमाणें—**यः**—जो—**लोकात्**—कोणत्याहि प्राण्यापासून—**न उद्विजते**—उद्वेग पावत नाहीं—**च**—आणि—**यः**—जो—**हर्ष-अमर्ष-भय-उद्वेगैः**—हर्ष, क्रोध, भय व खेद यांनी—**मुक्तः**—मुक्त असतो—**सः**—तो—**मे**—मला—**प्रियः**—प्रिय आहे. १५.

**यस्मादिति । यस्मात्संन्यासिनो नोद्विजते नोद्वेगं गच्छति न संतप्यते न संक्षुभ्यते लोकः । तथा लोकान्नोद्विजते च यः । हर्षामर्षभयोद्वेगैर्हर्षश्चामर्षश्च भयं चोद्वेगश्च तैर्हर्षामर्षभयोद्वेगैर्मुक्तः । हर्षः प्रियलाभेऽन्तःकरणस्योत्कर्षो रोमाञ्चनाश्रुपातादिलिङ्गः, अमर्षोऽसहिष्णुता भयं त्रासः उद्वेग उद्विग्नता तैर्मुक्तो यः स च मे प्रियः ॥ १५ ॥**

**भाष्यार्थ—' यस्मात्० ' इति**—उद्वेगादिराहित्य हेहि ज्ञानी पुरुषाचें विशेषण -लक्षण आहे, असें 'यस्मात्०' या श्लोकानें सांगतात—**यस्मात् संन्यासिनः लोकः न उद्विजते-न उद्वेगं गच्छति-न संतप्यते-न संक्षुभ्यते**—ज्या संन्याश्यापासून लोक उद्विग्न होत नाहीं, उद्वेगास प्राप्त होत नाहीं, संतप्त होत नाहीं अत्यंत क्षुब्ध केला जात नाहीं,—**तथा च यः लोकात् न उद्विजते**—आणि तसाच जो लोकापासून उद्विग्न होत नाहीं, [ म्ह० जो कोणाच्या उद्वेगाचें निमित्त होत नाहीं व स्वतः दुसऱ्याच्या निमित्ताने उद्वेग पावत नाहीं ] संताप पावत नाहीं—'**हर्षामर्षभयोद्वेगैः '-हर्षः च अमर्षः च भयं च उद्वेगः च तैः हर्षामर्षभयोद्वेगैः मुक्तः**—हर्ष, असहिष्णुता, भय व उद्वेग यांच्याकडून मुक्त केला गेलेला—**हर्षः-प्रियलाभे अन्तःकरणस्य उत्कर्षः रोमाञ्चन-अश्रुपातादिलिङ्गः**—हर्ष म्ह० प्रियवस्तूचा लाभ झाला असतां अन्तःकरणाचा उत्कर्ष-शरीरावर रोमांच उठणें, नेत्रांतून अश्रु येणे वगैरे ज्याचीं चिह्नें आहेत, तो हर्ष—**अमर्षः-असहिष्णुता**—दुसऱ्याचा उत्कर्ष सहन न होणें,हा अमर्ष—**भयं-त्रासः**—भय म्ह०चोर,सर्प,इत्यादिकांना पाहिल्यामुळें होणारा त्रास,—**उद्वेगः-उद्विग्नता**—उद्वेग-उद्विग्नता [ कोणी कांहीं प्र-

१ " ज्याला लोक कंटाळत किंवा त्रासत नाहीत आणि लोकांनाहि जो कंटाळत नाही," हा रहस्यकारांचा अर्थ चिन्त्य आहे. उद्वेग म्ह० कंटाळा नव्हे. निर्वेद म्ह० कंटाळा.

तिकूल आचरण केलें असतांहि चित्ताला खिन्न होऊं न देणें ]—**तैः मुक्तः यः सः च मे प्रियः**—त्यांनीं जो मुक्त असतो तो मला प्रिय आहे. १५.

**अनपेक्षः शुचिर्दक्ष उदासीनो गतव्यथः ।**
**सर्वारंभपरित्यागी यो मद्भक्तः स मे प्रियः ॥१६॥**

**अन्वयार्थ—अनपेक्षः**—देहादिकांसाठी ज्यांची अत्यंत अपेक्षा-गरज असते अशा अन्न-वस्त्रादिकांविषयींहि अनपेक्ष-निःस्पृह-निरिच्छ—**शुचिः**—बाह्य शरीरशुद्धि व आंतील मनाची शुद्धि यानी युक्त म्हणजे दोन्ही प्रकारें शुद्ध-पवित्र,—**दक्षः**—कर्तव्यें प्राप्त झालीं असतां त्यांना बरोबर जाणण्यास समर्थ, यावेळीं मला अमुक करणेंच योग्य आहे, असे समजून ते करणारा,—**उदासीनः**—मित्रादिकांचा पक्ष न घेणारा -निःपक्षपात—**गतव्यथः**—निर्भय—**सर्वारंभपरित्यागी**—काम हेच ज्यांचें कारण आहे अशा या लोकच्या व परलोकच्या फलासाठीं केल्या जाणाऱ्या सर्व कर्मांचा त्याग करणारा-सर्व सकाम कर्में सोडणारा—**यः मद्भक्तः**—असा जो माझा भक्त—**सः मे प्रियः**—तो मला प्रिय आहे. १६.

अनपेक्ष इति । देहेन्द्रियविषयसंबन्धादिष्वपेक्षाविषयेष्वनपेक्षो निःस्पृहः शुचिर्बाह्येनाभ्यन्तरेण च शौचेन संपन्नो दक्षः प्रत्युत्पन्नेषु कार्येषु सद्यो यथावत्प्रतिपत्तुं समर्थः । उदासीनो न कस्यचिन्मित्रादेः पक्षं भजते यः स उदासीनो यतिर्गतव्यथो गतभयः । सर्वारम्भपरित्यागी, आरभ्यन्त इत्यारम्भा इहामुत्रफलभोगार्थानि कामहेतूनि कर्माणि सर्वारम्भास्तान्परित्यक्तुं शीलमस्येति सर्वारम्भपरित्यागी यो मद्भक्तः स मे प्रियः ॥ १६ ॥

**भाष्यार्थ—'अनपेक्षः०' इति**—'अनपेक्षः०' इत्यादि श्लोकानें ज्ञानी पुरुषाचीं निरपेक्षत्वादि विशेषणे सांगतात.—**देहेन्द्रियविषयसंबंधादिषु अपेक्षाविषयेषु अनपेक्षः निःस्पृहः**—देह, इन्द्रियें, विषय, संबंध व आणखीहि सर्व अपेक्षित पदार्थ, या सर्व अपेक्षाविषयांविषयीं अनपेक्ष म्ह० निःस्पृह-निरिच्छ असणारा —**शुचिः -बाह्येन आभ्यन्तरेण च शौचेन संपन्नः**—शुचि म्ह० बाह्य व आंतर शौचानें संपन्न [ मृत्तिका, जल इत्यादिकांनीं शरीराला निर्मल करणें हें बाह्य शौच व कामक्रोधराहित्य हें आभ्यन्तर शौच या दोन्ही प्रकारच्या शौचानें युक्त असलेला ]—**दक्षः-प्रत्युत्पन्नेषु कार्येषु सद्यः यथावत् प्रतिपत्तुं समर्थः**—दक्ष म्हणजे अनेक कर्तव्यें उपस्थित-प्राप्त झाली असतां त्यांत जीं जाणण्यास योग्य असतील तीं तत्काल जाणण्यास व जीं करण्यास योग्य असतील तीं तत्काल करण्यास जो समर्थ असतो तो दक्ष होय.—**उदासीनः-यः[1] कस्यचित् मित्रादेः पक्षं न भजते सः उदासीनः यतिः गतव्यथः-गतभयः**—उदासीन म्ह० कोणाहि

१ 'उदासीनः' याचा अर्थ "फलाबद्दल उदासीन" असा रहस्यांत केला आहे. तो **सहेतुक आहे. पण त्याचा खरा अर्थ दोन्ही पक्षांविषयीं तटस्थ, कोणताहि पक्ष न घेणारा असा आहे.**

मित्रादिकांचा पक्ष धरीत नाहीं, तो उदासीन यति होय. तसाच तो गतव्यथ[1] म्ह० निर्भय असतो, कोणी कांहीं अपकार केला तरी ज्याला त्याची भीति वाटत नाहीं, [क्षमा म्ह० कोणी अपकार केला असतां त्याला उलट अपकार न करणें व गतव्यथ–अपकार करणाराची मनांत भीतिच न बाळगणे, कोणी मारण्यासाठीं तरवार उपसली तरी न डगमगणें, असा तेराव्या श्लोकांतील ' क्षमी ' व येथील ' गतव्यथः ' या शब्दांच्या अर्थांत फरक आहे. ]—**सर्वारम्भपरित्यागी-आरभ्यन्ते इति आरंभाः-इह-अमुत्रफलभोगार्थानि कामहेतूनि कर्माणि सर्वारंभाः तान् परित्यक्तुं शीलं अस्य इति सर्वारम्भपरित्यागी**—सर्व आरंभांचा त्याग करणारा–ज्यांचा आरंभ केला जातो ते आरंभ–प्रारंभ केला जातो म्हणून आरंभ, इहलोक व परलोक यांतील दुःखनिवृत्तिपूर्वक सुखप्राप्तिरूप फलाच्या भोगासाठीं केलीं जाणारीं–कामाला –विषयाभिलाषाला कारण होणारीं जी कर्में तेच सर्व आरंभ होत. त्यांचा परित्याग करण्याचें ज्याचे शीलच आहे तो सर्वारंभपरित्यागी[2]—**यः मद्भक्तः सः मे प्रियः**—असा जो माझा भक्त असतो तो मला प्रिय आहे. १६

**योन हृष्यति न द्वेष्टि न शोचति न काङ्क्षति ।**
**शुभाशुभपरित्यागी भक्तिमान्यः स मे प्रियः ॥ १७ ॥**

**अन्वयार्थ—यः न हृष्यति**—जो इष्ट वस्तूची प्राप्ति झाली असतां हृष्ट होत नाही, हर्ष मानीत नाहीं,—**न द्वेष्टि**—जो अनिष्ट वस्तूची प्राप्ति झाली असतां द्वेष करीत नाही,—**न शोचति**—जो प्रिय वस्तूचा वियोग झाला असतां शोक करीत नाहीं व—**न कांक्षति**—न मिळालेल्या वस्तूची इच्छा करीत नाहीं,—**शुभाशुभ-परित्यागी**—शुभ व अशुभ कर्मांचा परित्याग करणारा—**भक्तिमान् यः**—असा जो भक्तिमान् असतो,—**सः मे प्रियः**—तो मला प्रिय आहे. १७.

**किंच—यो न हृष्यतीष्टप्राप्तौ न द्वेष्ट्यनिष्टप्राप्तौ न शोचति प्रियवियोगे न चाप्राप्तं काङ्क्षति शुभाशुभे कर्मणी परित्यक्तुं शीलमस्येति शुभाशुभपरित्यागी भक्तिमान्यः स मे प्रियः ॥ १७ ॥**

**भाष्यार्थ—किं च**—द्वेष-हर्षादिराहित्य हेंहि ज्ञानी पुरुषाचे लक्षण आहे, असें ' यो न० ' या श्लोकाने सांगतात—**यः इष्टप्राप्तौ न हृष्यति अनिष्टप्राप्तौ न द्वेष्टि प्रियवियोगे न शोचति च अप्राप्तं न कांक्षति**—जो इष्टप्राप्ति

---

१ 'गतव्यथः' म्ह० "ज्याला कोणताच विकार चाळवू शकत नाहीं," असा अर्थ रहस्यांत केला आहे तो मूळाला धरून नाहीं.

२ " सर्वारंभपरित्यागी म्ह० काम्य फलाचे सर्व आरभ म्ह० उद्योग ज्यानें सोडले " असा ते अर्थ करितात. पण 'सर्व आरंभ' असा शब्द असतांना त्याचा 'फक्त काम्य फलाचे सर्वारंभ–उद्योग ' असा संकोच करण्यास 'सांप्रदायिक' आग्रहावांचून दुसरे कांहीं कारण नाहीं.

झाली असतां हृष्ट होत नाहीं, अनिष्ट प्राप्ति झाली असतां तिचा द्वेष[1] करीत नाहीं, प्रिय वस्तूचा किंवा मनुष्याचा वियोग झाला असतां शोक करीत नाहीं व अप्राप्त वस्तूची आकांक्षा करीत नाहीं,[वर 'सर्वारंभपरित्यागी' असें विशेषण आहे. पण त्यानें सर्व विहित काम्य कर्मांचा त्याग सांगितला आहे, त्यावरून निष्काम नित्य-नैमित्तिक कर्में करण्यास कांहीं हरकत नाहीं, असें कोणी म्हणेल ह्मणून भगवान् सांगतात–]—**शुभाशुभे कर्मणी परित्यक्तुं शीलं अस्य इति शुभाशुभपरित्यागी**—शुभ व अशुभ कर्में टाकण्याचें–त्यांचा परित्याग–संन्यास करण्याचें ज्याचें शीलच–स्वभावच आहे, म्हणून शुभाशुभपरित्यागी[2]—**यः भक्तिमान् सः मे प्रियः**—असा जो भक्तिमान् तो मला प्रिय आहे. १७.

**समः शत्रौ च मित्रे च तथा मानापमानयोः ।**
**शीतोष्णसुखदुःखेषु समः संगविवर्जितः ॥ १८ ॥**
**तुल्यनिन्दास्तुतिर्मौनी संतुष्टो येनकेनचित् ।**
**अनिकेतः स्थिरमतिर्भक्तिमान्मे प्रियो नरः ॥ १९ ॥**

**अन्वयार्थ**—**शत्रौ च मित्रे च समः**—शत्रु व मित्र या दोघांच्याहि ठिकाणीं एकसारखा व्यवहार करणारा—**तथा**—त्याचप्रमाणे—**मानापमानयोः**— मान व अपमान यांमध्यें सम–त्या दोहोंनाहि एकसारखाच मानणारा—**शीतोष्णसुखदुःखेषु समः**—शीत, उष्ण, सुख, दुःख यांमध्यें एकसारखीच भावना ठेवणारा,—**संगवर्जितः**—कोठेंहि आसक्ति न ठेवणारा,—**तुल्यनिंदास्तुतिः**—निंदा व स्तुति यांना समान मानणारा,—**मौनी**—वाणीचें नियमन करणारा—**येन केनचित् संतुष्टः**—शरीर जीवंत राहण्यापुरतें जें कांहीं मिळेल त्यानें संतुष्ट होणारा,—**अनिकेतः**—ज्याचें एक नियत–नेमलेलें राहण्याचे स्थान नाहीं, जेथें राहील तेंच त्याचें घर असा जो—**स्थिर-मतिः**—स्थिरबुद्धि–ज्याची परमार्थाविषयींची बुद्धि स्थिर असते, डळमळीत नसते—**भक्तिमान् नरः**—असा जो भक्तिमान् पुरुष—**सः मे प्रियः**—तो मला प्रिय आहे.

**सम इति । समः शत्रौ च मित्रे च तथा मानापमानयोः पूजापरिभवयोः शीतोष्ण-सुखदुःखेषु समः सर्वत्र च सङ्गवर्जितः ॥ १८ ॥**

---

१ 'अद्वेष्टा' या पदानें सर्व भूतांचा सामान्यतः स्वाभाविक द्वेषाभाव सांगितला व येथें अप्रियप्राप्ति झाली असतां तिचा द्वेष करू नये असें ह्मटलें आहे.

२ 'शुभाशुभपरित्यागी' म्ह० "ज्यानें कर्मांचें शुभ व अशुभ फल सोडिलें आहे" असा अर्थ रहस्यकार करितात. पण रामानुजादि दुसरे कोणीहि तसा अर्थ करीत नाहींत तर 'पापवत् पुण्यस्यापि बन्धहेतुत्वाविशेषात् उभयपरित्यागी' असेंच म्हणतात.

**भाष्यार्थ—'समः०' इति**—'समः०' या श्लोकानें तत्त्ववेत्त्याचें आणखी विशेषण सांगतात—**समः शत्रौ च मित्रे च**—शत्रु व मित्र या दोघांच्याहि ठिकाणीं सम-तुल्यवृत्ति,—**तथा मानापमानयोः-पूजापरिभवयोः**—त्याचप्रमाणें मान व अपमान म्ह०पूजा-सत्कार व परिभव-तिरस्कार, यांमध्यें सम-हर्षविषादरहित—**शीतोष्ण-सुखदुःखेषु समः**—शीत व उष्ण यांमुळें प्राप्त होणाऱ्या सुख-दुःखांमध्यें सम-तुल्य [ तेराव्या श्लोकांतील 'समदुःखसुखः' या पदानें सामान्यतः सर्व प्रकारच्या सुखदुःखांचें ग्रहण करावें, व येथे शीतोष्णांमुळे होणाऱ्या सुखदुःखांचें ग्रहण करावें म्हणजे पुनरुक्ति होणार नाहीं, त्याप्रमाणें येथील 'समः' या शब्दानें सर्वांविषयीं व सर्व अवस्थांमध्यें चित्ताचें आविकृतत्व-विकाररहित्य सांगितलें आहे असें समजावें ] —**सर्वत्र च सङ्गवर्जितः**—आणि-सर्वत्र म्ह० चेतन स्त्री वगैरे व अचेतन चंदन-पुष्पमाला वगैरे पदार्थांमध्यें संग न ठेवणारा. [ त्यांच्याशी संसर्ग न करणारा. संग म्ह० संसर्ग किंवा आसक्ति-प्रीति, सर्व दोषांचें निमित्त आहे. त्यामुळें हा यति कोठेंच संग -आसक्ति ठेवीत नाही. ] १८

**किंच—तुल्यनिन्दास्तुतिः, निन्दा च स्तुतिश्च निन्दास्तुती ते तुल्ये यस्य स तुल्य-निन्दास्तुतिर्मौनी मौनवान्संयतवाक्संतुष्टो येन केनचिच्छरीरस्थितिमात्रेण । तथा चोक्तम्—"येन केनचिदाच्छन्नो येन केनचिदाशितः । यत्र क्वचन शायी स्यात्तं देवा ब्राह्मणं विदुः" इति । किंचानिकेतो निकेत आश्रयो निवासो नियतो न विद्यते यस्य सोऽनिकेतो 'नागार' इत्यादिस्मृत्यन्तरात् । स्थिरमतिः स्थिरा परमार्थवस्तुविषया मतिर्यस्य स स्थिरमतिर्भक्तिमान्मे प्रियो नरः ॥ १९ ॥**

**भाष्यार्थ—किं च**—तत्त्ववेत्त्याचीं आणखी कांहीं विशेषणें 'तुल्यनिन्दा०' या श्लोकानें सांगतात—**तुल्यनिन्दास्तुतिः-निन्दा च स्तुतिः च निन्दास्तुती ते तुल्ये यस्य सः तुल्यनिन्दास्तुतिः**—तुल्यनिंदास्तुति-निन्दा व स्तुति मिळून निन्दास्तुति, त्या दोन्ही ज्याला समान आहेत तो तुल्यनिन्दास्तुति होय [ एखाद्याच्या खऱ्या किंवा खोट्या दोषांचे वर्णन करणें ही निंदा व तसल्याच गुणांचें वर्णन करणें ही स्तुति. कोणी निंदा केली किंवा स्तुति केली तरी ज्याच्या मनांत विषाद किंवा हर्ष होत नाहीं तो तुल्यनिंदास्तुति ]—**मौनी-मौनवान्-संयतवाक्**—मौनी म्ह० मौन धारण करणारा; ज्यानें वाणीचें नियमन केलें आहे असा [ अर्थात् जो स्वतःहि कोणाची निंदा किंवा स्तुति करीत नाहीं. ]—**शरीरस्थितिमात्रेण येन केनचित् संतुष्टः**—केवल शरीरस्थितीला अवश्य अशा ज्या कोणत्याहि--अन्नादि प्राप्त

---

१ 'मौनी' म्ह० मितभाषी हा अर्थ मूळ शब्दार्थाला सोडून आहे.

२ रहस्यकार 'संतुष्टो येन केनचित्' म्ह० "जें कांहीं मिळेल तेवढ्यानेंच संतुष्ट" असा अर्थ करितात. 'जगाच्या सर्व उलाढाली करणाऱ्या कर्मयोग्याला' हे शक्य आहे का? एवढाच आमचा कर्मयोगवाद्यांस प्रश्न आहे.

वस्तूनें संतुष्ट होणारा, (ज्ञानी केवल शरीरधारण होईल, एवढयाच अन्नादिकांच्या लाभानें संतुष्ट होतो, याविषयीं स्मृतीचें [महाभा. शांतिपर्व २४५.१२] प्रमाण-)—**तथा च उक्तं** —आणि तसें सांगितलेंहि आहे—'**येन केनचित् आच्छन्नः**'—ज्या कशानेंहि आच्छादित झालेला, यदृच्छेनें प्राप्त होईल त्या फाटक्या-तुटक्या वस्त्रानें शरीराचे आच्छादन करणारा—'**येन केनचित् आशितः**'—जें कांहीं चांगले-वाईट अन्न मिळेल तें खाऊन शरीररक्षण करणारा,—'**यत्र क्वचन शायी स्यात्**'—ज्या कोठेंहि शयन करणारा-प्रसंगी-झोंप आली असतां जें कांहीं प्राप्त होईल-'क्वचित्भूमौ शय्या क्वचित् अपि च पर्यंकशयनं' या न्यायानें भूमीवर, दगडावर, व यदृच्छेनें प्राप्त झालेल्या पर्यंकावरहि शयन करणारा, असा जो असतो—'**तं देवाः ब्राह्मणं विदुः' इति**—त्याला देव 'ब्राह्मण' असे समजतात, असे म्हटले आहे. ( ज्ञानी पुरुषाचें नियत निवासस्थानहि नसतें, असें सांगतात-)—**किं च अनिकेतः-यस्य निकेतः-आश्रयः-निवासः नियतः न विद्यते सः अनिकेतः**—तसाच अनिकेत म्ह० ज्याचा निकेत-आश्रय-निवास नियत-निश्चित नसतो तो अनिकेत होय.—'**नागारे०' इत्या**-

---

१ "अनिकेत म्ह० ज्याचें कर्मफलाशारूप बिऱ्हाड कोठंच राहिलेले नाहीं असा" असें रहस्यकार म्हणतात व त्यावर एक विस्तृत टीप लिहितात. म्हणून या अर्थाचे परीक्षण करणे भाग आहे. ते म्हणतात—"अनिकेत हा शब्द गृहस्थाश्रम सोडून सन्यास घेऊन रानांत भिक्षा मागत हिंडणाऱ्या यतींच्या वर्णनांतहि पुष्कळदा येत असतो. ( मनु ६. २५ पहा )" ( रानांत यतींना भिक्षा झाडें घालतात की काय ? कदाचित् भवभूतीच्या उत्तररामचरित्रांतील वासंतिकेने आत्रेयीचे जे स्वागत केले आहे, त्यावरून किंवा रघूंतील शरभंगाच्या आश्रमवृक्षाचे रामाने केलेले वर्णन वाचून (रघु. १३.४६) रहस्यकारांची रानांतहि भिक्षा मिळते, अशी समजूत झाली असेल. पण 'संन्याश्यांनी रानांत भिक्षा मागत हिंडावें' असें विधान नाहीं तर 'अनग्निः अनिकेतः' मनु. ६.२५ 'शरणेषु अममः' 'वृक्षमूलनिकेतनः' ६.२६ 'वानप्रस्थेभ्यः ब्राह्मणेभ्यः, अन्येभ्यः वनवासिभ्यः, गृहस्थेभ्यः, च द्विजेभ्यः प्राणमात्रधारणोचितं भैक्ष्यं आहरेत्' ६.२७ असे याविषयी विधान आहे. पण रहस्यकारांना संन्याश्यांचा अतिशय तिटकारा आलेला असल्यामुळें त्यांनी हा असा तिरस्कारानें उल्लेख केलेला दिसतो; असो ) "त्याचा धात्वर्थ घर नसणारा असा आहे." ( धात्वर्थ की मूळ शब्दार्थ ? ) "म्हणून या अध्यायांतील 'निर्मम' 'सर्वारंभपरित्यागी' व 'अनिकेत' आणि इतरत्र गीतेत 'त्यक्तसर्वपरिग्रहः' ( ४-२१ ) किंवा 'विविक्तसेवी' (१८-५२) इत्यादि जे शब्द आहेत त्यांवरून "घरदार सोडून निरिच्छपणानें रानांत आयुष्याचे दिवस काढणें" असें जें संन्यासाश्रममार्गाचें परम ध्येय तेंच गीतेंत प्रतिपाद्य आहे, असें संन्यासमार्गीय टीकाकारांचें म्हणणें असून त्यास आधार म्हणून स्मृतिग्रंथांतील संन्यासाश्रमप्रकरणांतील श्लोक ते दाखवीत असतात. पण गीतावाक्यांचे हे केवळ संन्यासपर अर्थ संन्याससंप्रदायदृष्टया जरी महत्त्वाचे असले तरी ते खरे नव्हेत. कारण 'निरग्नि' किंवा 'निष्क्रिय' होणें हा गीतेप्रमाणे खरा संन्यास होत नसून फक्त फलाशा सोडावी, कर्में कधीच सोडूं नयेत असा गीतेचा कायम सिद्धान्त आहे; हें मागें अनेक वेळां

सांगितलें आहे. गी. ५. २ व ६.१, २ पहा ) " ( आम्हीहि त्यांच्या या अशास्त्रीय म्हणण्याचें सविस्तर परीक्षण तेथल्या तेथेंच केलें आहे, तेंहि वाचकांनीं अवश्य पहावें. गी. भा. पृ. ३०२ ते ३०६; ४६९ ते ४९०; ५३५ ते ५५९ पहा. येथें एकच गोष्ट सांगणें अवश्य आहे, ती ही कीं, गीता हा ग्रंथ जर वैदिकसंप्रदायाचा असून वेदार्थसारभूत असेल, सुगत बुद्धाच्या दर्शनाप्रमाणें भगवानांचें तें स्वकपोलकल्पित मत नसेल 'तर निरग्नि व निष्क्रिय होणें हा खरा संन्यास होत नाहीं' हें म्हणणें सर्वथा अप्रयोजक आहे. भगवानांच्या स्वकपोलकल्पित मताचा वेदाचार्य व्यासांनीं श्लोकरूपानें कधींहि संग्रह केला नसता, शिष्टांनीं त्याचा परिग्रह केला नसता, उत्तरमीमांसेंत तिचा 'स्मृति' म्हणून प्रमाणत्वाने उल्लेख झाला नसता. गीतेत यतीचा धर्म सांगितलेला आहे. भगवानांनीं ज्ञानी व अज्ञानी जिज्ञासु यांसाठीं ज्ञाननिष्ठा व कर्मनिष्ठा अशा दोन निष्ठा सांगितल्या आहेत. निष्क्रिय योगी उभयविभ्रष्ट होऊन नाश पावत नाहीं ना ? गी. भा. पृ. ५९९ असे विचारले आहे. त्याअर्थीं 'कर्मे कधींच सोडूं नयेत, असा गीतेचा कायम सिद्धान्त आहे' हें म्हणणें भयंकर धाडसाचे आहे. 'ज्ञानाधिकार प्राप्त होण्यापूर्वी कर्माधिकाऱ्याने कर्मत्याग करूं नये,' हा गीतेचा कायम सिद्धान्त असून तो वैदिक संप्रदायाला मुळींच सोडून नाही. ) " म्हणून 'अनिकेत' या पदाचा अर्थ घरदार सोडणे, असा न घेतां गीतेंतील कर्मयोगाला जुळेल असाच घेतला पाहिजे. " ( पण संन्यासमार्गी अर्थात् अद्वैती टीकाकार ' घरदार सोडणें ' असा अर्थ करीत नाहींत. आचार्यांनी केलेला अर्थ वर प्रत्यक्ष आहेच. शंकरानंद, मधुसूदन, श्रीधर, भाष्योत्कर्षदीपिकाकार वगैरे इतर टीकाकारहि आचार्यांप्रमाणें 'नियत निवासरहित' असाच अर्थ करितात. नीलकंठ ' अनिकेतः गृहशून्यः कुटीमपि वासार्थं नारभते ' असा करितात. असें जरी आहे तरी 'अनिकेत' हा संन्याश्याचा धर्म आहे, असें त्यांचे म्हणणें आहे व ते सकारण आहे, याबद्दल वाद नाहीं. पण रहस्यकाराना तेच नको आहे, म्हणून ते म्हणतात–) "अनिकेत म्ह० घरदार सोडणारा असा अर्थ न करिता गृहादिकाचे ठायीं ज्याच्या मनाचे बिऱ्हाड गुतून राहिलेले नाही, असा अर्थ होतो. " ( वर अर्थात 'ज्याचें कर्मफलाशारूप बिऱ्हाड ' असे म्हटलें आहे व येथें ' मनाचे बिऱ्हाड ' असें म्हटले आहे. हा विरोध लक्षात ठेवण्यासारखा आहे. 'निकेत व आश्रय या दोन शब्दांचा अर्थ जरी एकच ' असला तरी ' निकेत ' शब्दाचा मुख्य अर्थ 'निवासस्थान' हा आहे, हें विसरतां कामा नये. आश्रय म्ह० आधार या अर्थीं 'निकेत'शब्द योजितां येणार नाही. उदा०–'याला मोठ्या माणसाचा आश्रय आहे,' या ठिकाणी 'याला मोठ्याचा निकेत आहे,' असें म्हणता येणार नाही. शिवाय 'अनिकेत ' हा शब्द संन्यासप्रकरणांतच येतो, कर्मकांडात–कर्मप्रकरणांत येत नाहीं, हेंहि लक्षांत ठेवलें पाहिजे. )

रहस्यकार पुनः म्हणतात–"तसेंच वर सोळाव्या श्लोकांत 'सर्वारंभपरित्यागी' असा जो शब्द आहे त्याचा अर्थहि 'सर्व कर्मे किंवा उद्योग सोडणारा' असा न करितां (आचार्य तसा करीत नाहीत.) 'ज्याचे समारंभ फलाशाविरहित, त्याची कर्मे ज्ञानाने दग्ध होतात' (गी.४.१९) या श्लोकाशीं समानार्थक अर्थात् 'काम्य आरंभ म्ह० कर्मे सोडणारा' असाच करावा लागतो, हें १८.२ आणि १८-४८-४९ या श्लोकांवरून सिद्ध होतें." पण अ. ४ श्लो. १९ याचा अर्थ ते म्हणतात तसा नाहीं. (गी.भा. पृ. ४११ पहा.) शिवाय 'ज्याचे सर्व समारंभ फलाशारहित

त्याचीं कर्मे ज्ञानानें दग्ध होतात ' हा कार्यकारणभावच चुकीचा आहे. कारण ज्ञानाग्नि सर्वच कर्मांना जर दग्ध करण्यास समर्थ आहे तर' ज्याचे समारंभ फलाशारहित,' हें आणखी त्या ज्ञानाच्या गळ्यांत लोढणें कशाला पाहिजे ? ' ज्ञानाग्निः सर्वकर्माणि भस्मसात् कुरुते ' ( गी. भा. ५-३७ पृ. ४५६ ) येथें तसें कांही सांगितलेलें नाहीं. अर्थात् रहस्यकारांचा त्या श्लोकाचा अर्थ चुकला आहे. अ. १८. श्लोक २ यांत 'काम्य कर्मांच्या त्यागाला संन्यास म्हणतात व सर्व कर्मफलत्यागाला त्याग म्हणतात'असा दोन प्रकारचा गौण संन्यास सांगितला आहे. त्याचा 'सर्वारंभपरित्यागी ' या श्लोकाशी कांही संबंध नाही. कारण येथें सर्वारंभाचा साक्षात् परित्याग सांगितला आहे. गौण परित्याग सांगितला नाही. त्यामुळें 'सर्वारंभ' म्ह० 'नुस्तीं काम्य कर्मे–उद्योग' हा अर्थ अग्राह्य होय. ते पुढें म्हणतात–"घरादारांत,बायकामुलांत किंवा जगाच्या इतर व्यवहारांत ज्याचें चित्त गुंतलेलें असतें त्याला त्यापासून पुढें दुःख होतें, म्हणून या सर्व गोष्टींत मन गुतवून ठेवूं नये. एवढेंच गीतेचें सांगणें आहे. " एकूण गीता 'घरादारात वगैरे मन गुंतविल्यास पुढें दुःख होतें म्हणून तें त्यांत गुंतवून ठेवूं नये,' एवढेंच सागते. या पेक्षां अधिक कांहीच सांगत नाहीं ! आणि तेवढ्यानेच मोक्ष मिळतो! ठीक, फार सोपी युक्ति आहे! गीतेचा अर्थ अगदीं निःसंशय कळला, यांत शंका नाहीं. पण पुष्कळ व्यसनी लोकाचेंहि मन घरादारांत, बायकामुलांत वगैरे गुंतलेले नसतें. तेव्हां तेहि स्थितप्रज्ञ कर्मयोगीच की काय ! रहस्यकार म्हणतात––" गीतेंत मनाची वैराग्ययुक्त स्थिति दाखविण्यास 'अनिकेत' 'सर्वारंभपरित्यागी ' इत्यादि शब्द स्थितप्रज्ञाच्या वर्णनांत येतात. हेच शब्द स्मृतिग्रंथांतून संन्याशांच्या वर्णनांत आले आहेत. पण तेवढ्यावरून कर्मत्यागरूप संन्यासच गीतेंत प्रतिपाद्य आहे, असें म्हणतां येत नाही. कारण ज्याच्या बुद्धीत हें वैराग्य पूर्ण भिनलें अशा ज्ञानी पुरुषानेंहि याच विरक्त बुद्धीनें फलाशा सोडून शास्त्रतः प्राप्त होणारीं कर्मे केलींच पाहिजेत, असा या बरोबरच गीतेचा दुसरा निश्चित सिद्धान्त आहे. "( आम्ही रहस्यकारांना झालेला भ्रम म्हणतो तो हाच होय. 'वैराग्य पूर्ण भिनलें आहे व ज्ञानहि आहे, पण संन्यास मात्र नव्हे,' हा दुराग्रह नव्हे का ? आचार्य निवृत्तिमार्गाला 'ज्ञान-वैराग्यलक्षण ' म्हणतात ( गी. भा. पृ. २ पहा. ) रहस्यकार गीतेंत ज्ञानवैराग्य कबूल करितात. पण ज्ञाननिष्ठा मात्र कबूल करीत नाहीत ! ते ' शास्त्रतः प्राप्त कर्मे ' 'चातुर्वर्ण्यविहितकर्मे' असा एक शब्द मध्येंच घालून ठेवीत असतात. पण कर्मे जशीं शास्त्रतः प्राप्त तसा कर्मत्याग शास्त्रतः प्राप्त नाही कीं काय ? शिवाय ज्ञाननिष्ठानेंहि कर्मे केलींच पाहिजेत असा आग्रह गीता मुळींच करीत नाहीं. कर्माधिकाऱ्यानें कर्मेच केलीं पाहिजेत, हा वैदिक संप्रदायाचाच आग्रह आहे. एकट्या गीतेचाच नव्हे. आचार्यहि अविरक्त अज्ञ कर्माधिकाऱ्यानें कर्मसंन्यास करावा, असें कधींच व कोठेंच म्हणत नाहींत. अर्थात् रहस्यकारांचा संन्यासमार्गी–अद्वैती भाष्य-टीकाकारांवरील गहजब व्यर्थ आहे. प्रस्तुत टीपेच्या शेवटीं रहस्यकार म्हणतात—" आणि हा पूर्वापर-सर्व संबंध लक्षांत न घेतां 'अनिकेत ' शब्दासारखे वैराग्यबोधक शब्द गीतेंत आढळले की तेवढ्यावर मदार ठेवून कर्मसंन्यासपर मार्गच गीतेंत प्रतिपाद्य आहे, असें म्हणणें बरोबर नाहीं. " पण वस्तुतः रहस्यकारच पूर्वापर संबंध लक्षांत न घेतां निराधार प्रतिपादन करीत सुटतात; येथवर आम्ही त्यांचीं पुष्कळ उदाहरणें दिलीं आहेत, तथापि सयुक्तिक व अगदीं सुसंबद्ध व्याख्यान

**दिस्मृत्यन्तरात्**—कारण 'नागारे०' इत्यादि याविषयीं दुसरीहि स्मृति आहे. ( 'न कुड्ये नोदके सङ्गो न चैले न त्रिपुष्करे, नागारे नासने नान्ने यस्य वै मोक्षवित्तु सः' असें तें सर्व स्मृतिवचन आहे. त्याचा अर्थ-ज्याचा संग-आसक्ति घराची भिंत किंवा कुड वगैरे, पाणी, वस्त्र, पुष्कर तीर्थ किंवा वैकुंठादिक लोक, घर, आसन, अन्न यांमध्यें नसते तो मोक्षवेत्ता-मोक्षाधिकारी होय, )—**स्थिरमतिः-स्थिरा परमार्थवस्तुविषया मतिः यस्य सः स्थिरमतिः**—स्थिरमति म्ह० ज्याची परमार्थवस्तुविषयक मति-बुद्धि स्थिर असते तो स्थिरमति होय. ( ज्याची मति परमात्म्यामध्यें अगदीं स्थिर-दृढ झालेली असते तो स्थिरमति )—**भक्तिमान् नरः मे प्रियः**—असा भक्तिमान् नर मला प्रिय आहे. [ येथें पुनः पुनः भक्तीचें जे ग्रहण केलें आहे तें भक्ति परमार्थ ज्ञानाचा उपाय आहे व परमार्थ ज्ञान हाच मोक्षमार्ग आहे हें सुचविण्यासाठीं आहे. ] १९

**ये तु धर्म्यामृतमिदं यथोक्तं पर्युपासते ।**
**श्रद्दधाना मत्परमा भक्तास्तेऽतीव मे प्रियाः ॥ २० ॥**

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे भक्तियोगो नाम द्वादशोऽध्यायः ॥ १२ ॥**

**अन्वयार्थ—तु**—पण—**ये श्रद्दधानाः मत्परमाः भक्ताः**—जे श्रद्धावान् मत्परम झालेले भक्त-माझे एकनिष्ठ भक्त—**इदं यथोक्तं धर्म्यामृतं**—हे वर सांगितलेले धर्माला सोडून नसलेले-धर्मरूप अमृत-मोक्षाचे साधन—**पर्युपासते**—करितात-वरील मोक्षसाधनाचें अनुष्ठान करितात-तसे आचरण करितात—**ते**—ते श्रेष्ठ भक्त—**मे**—मला-परमेश्वराला—**अतीव**—अतिशयच—**प्रियाः**—प्रिय आहेत.

**अद्वेष्टा सर्वभूतानामित्यादिनाऽक्षरस्योपासकानां निवृत्तसर्वैषणानां संन्यासिनां परमार्थज्ञाननिष्ठानां धर्मजातं प्रक्रान्तमुपसंह्रियते—ये तु संन्यासिनो धर्म्यामृतं धर्मादनपेतं धर्म्यं च तदमृतं च तदमृतत्वहेतुत्वादिदं यथोक्तमद्वेष्टा सर्वभूतानामित्यादिना पर्युपासतेऽनुतिष्ठन्ति श्रद्दधानाः सन्तो मत्परमा यथोक्तोऽहमक्षरात्मा परमो निरतिशया गतिर्येषां ते मत्परमा मद्भक्ताश्चोत्तमां परमार्थज्ञानलक्षणां भक्तिमाश्रितास्तेऽतीव मे प्रियाः। प्रियो हि ज्ञानिनोऽत्यर्थमिति यत्सूचितं तद्व्याख्यायेहोपसंहृतं भक्तास्तेऽतीव मे प्रिया इति। यस्माद्धर्म्यामृतमिदं यथोक्तमनुतिष्ठन्भगवतो विष्णोः परमेश्वरस्या-**

---

करणारांवरच उलट स्वतःचा दोष लादण्यास तयार! तेव्हां आता या 'कौशलाची' ऊर्फ योगाची तारिफच करावयास पाहिजे की नको? गीतेत गौण किंवा मुख्य कर्मसंन्यासपर वचने शतशः आहेत. किंबहुना अर्जुनास सांगितलेला कर्मयोग हाहि एक प्रकारचा संन्यासच आहे. तो सात्त्विक त्याग आहे. तथापि रहस्यकारांची गीतेला कर्मयोगशास्त्र म्हणण्याची तयारीच आहे. असा प्रकारची शुद्ध वकीली आचार्यादि पारमार्थिकांच्या कृतीत आढळणें केव्हांच शक्य नाहीं.

**तीव मे प्रियो भवति तस्मादिदं धर्म्यामृतं मुमुक्षुणा यत्नतोऽनुष्ठेयं विष्णोः प्रियं परं धाम जिगमिषुणेति वाक्यार्थः ॥ २० ॥**

इति श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यगोविंदभगवत्पूज्यपादशिष्यश्रीमच्छंकरभगवतः कृतौ श्रीभगवद्गीताभाष्ये भक्तियोगो नाम द्वादशोऽध्यायः ॥ १२ ॥

**भाष्यार्थ—अक्षरस्य उपासकानां निवृत्तसर्वैषणानां परमार्थज्ञाननिष्ठानां संन्यासिनां 'अद्वेष्टा सर्वभूतानां' इत्यादिना प्रक्रान्तं धर्मजातं उपसंह्रियते**—अक्षराची उपासना करणाऱ्या, सर्व एषाणांपासून निवृत्त झालेल्या परमार्थ ज्ञाननिष्ठ संन्याशाच्या ' अद्वेष्टा सर्वभूतानां०' या श्लोकापासून सांगावयास आरंभिलेल्या सर्व धर्मांचा उपसंहार केला जातो. [ 'अद्वेष्टा०' या श्लोकापासून सांगण्यास सुरू केलेल्या संन्याश्यांच्या धर्मांचा उपसंहार 'ये तु०' या श्लोकानें करितात–]—**ये तु संन्यासिनः**—जे संन्यासी—**धर्म्यामृतं-धर्मात् अनपेतं धर्म्यं च तत् अमृतं च तत् अमृतत्वहेतुत्वात्**—धर्म्यामृताला-धर्मापासून अनपेत-दूर न झालेलें-धर्माला सोडून नसलेलें असे, व तेच अमृत–अमृतत्वाचे निमित्त असल्यामुळे अमृत–धर्म्यामृत–धर्मरूप मोक्षसाधन—**इदं ' अद्वेष्टा सर्वभूतानां० ' इत्यादिना यथोक्तं**—असे हे 'अद्वेष्टा सर्वभूतानां० ' इत्यादि गत ग्रंथानें सांगितलेले धर्म्यामृत—**श्रद्दधानाः सन्तः पर्युपासते-अनुतिष्ठन्ति**—परम श्रद्धावान् होत्साते उपासितात, त्याचें अनुष्ठान करितात—**मत्परमाः-यथोक्तः अहं अक्षरात्मा परमः-निरतिशया गतिः येषां ते मत्परमाः**—मत्परम म्ह० वर सांगितलेल्या प्रकारचा मी अक्षरात्मा, ज्यांची निरतिशय गति आहें ते मत्परम होत.—**च मद्भक्ताः-उत्तमां परमार्थज्ञानलक्षणां भक्तिं आश्रिताः**—व माझे भक्त-उत्तम परमार्थ ज्ञानरूप भक्तीचा आश्रय केलेले असे असतात—**ते मे अतीव प्रियाः**—ते मला अतिशयच प्रिय आहेत. ( चवथ्या पादाचें

---

१ येथें मुळात 'भक्तास्ते अतीव मे प्रियाः' असें असताना रहस्यकारांनी 'भगवद्भक्त कर्मयोग्याचें या श्लोकात वर्णन केले आहे' असे बेधडक म्हटले आहे. पण या सबंध अध्यायांत कर्मयोग्याचा कोठं अस्पष्टहि उल्लेख नाही. सगुण व निर्गुण उपासकांचेच यात वर्णन आहे, हें वाचकांच्या सहज लक्षांत येईल. असो; रहस्यकारांनी शेवटच्या म्ह० २० व्या श्लोकावरील टीपेंत गी ६. ४७. ७. १८. यांतील 'ज्ञानी भक्त श्रेष्ठ' या म्हणण्याचा गी. ९. २९. यांतील 'मला सर्व सारखे, अमुक प्रिय व अमुक द्वेष्य नाही' या वर्णनाशी विरोध येतो असें मानून त्यांतील एक वर्णन सगुणोपासनेचें किंवा भक्तिमार्गातील आणि दुसरे अध्यात्मदृष्ट्या किंवा कर्मविपाकदृष्ट्या असा विरोधपरिहार करण्याचा प्रयत्न केला आहे, पण तो निराधार असल्यामुळे सर्वथा उपेक्ष्य होय. ती दोन्हीं वर्णनें ज्ञानमार्गदृष्ट्याच–तत्त्वदृष्ट्याच आहेत. ज्ञान निराळें, अध्यात्म निराळें, भक्तिमार्ग निराळा, कर्मयोग निराळा, या सर्व निराधार कल्पना आहेत. एकाच ज्ञानयोगाचीं ती सर्व अंगें आहेत; व गीतेंत याच दृष्टीनें त्याचें अगांगिभावानें वर्णन आहे. हें परमरहस्य न कळल्यामुळें रहस्यकारांचे गीतारहस्य सर्वथा सदोष व अग्राह्य झालें आहे.

तात्पर्य सांगतात-)—'**प्रियो हि ज्ञानिनोऽत्यर्थं०' इति यत् सूचितं तत् व्याख्याय 'भक्तास्तेऽतीव मे प्रियाः' इति इह उपसंहृतं**—'मी ज्ञान्याला अत्यंत प्रिय आहे' असें (गी.भा.७.१७ पृ.६३०) जे सुचविले होतें त्याचेंच व्याख्यान करून 'भक्तास्तेऽतीव०' या चरणानें त्याचाच येथें उपसंहार केला आहे. [ हे पूर्वोक्त सर्व धर्म ज्ञानी पुरुषाचीं लक्षणें जरी असलीं तरी जिज्ञासूचीं तींच साधनें आहेत यास्तव जिज्ञासूनें त्यांचें मोठया यत्नानें अनुष्ठान करावें, असें सांगतात-]—**यस्मात् यथोक्तं इदं धर्म्यामृतं अनुतिष्ठन्**—ज्याअर्थी वर सांगितलेल्या या धर्म्यामृताचें अनुष्ठान करणारा—**मे भगवतः विष्णोः परमेश्वरस्य अतीव प्रियः भवति**—मला-भगवान् विष्णूला-व्यापक परमेश्वराला अतिशय प्रिय होतो—**तस्मात् विष्णोः प्रियं परं धाम जिगमिषुणा मुमुक्षुणा इदं धर्म्यामृतं यत्नतः अनुष्ठेयं इति वाक्यार्थः**—त्याअर्थी विष्णूच्या प्रिय परमधामास-परम पदास प्राप्त होण्याची इच्छा करणाऱ्या मुमुक्षूनें या धर्म्यामृताचें मोठया प्रयत्नानें अनुष्ठान करावें, असा या सर्व 'अद्वेष्टा०' इत्यादि वाक्याचा भावार्थ आहे. [ याप्रमाणें या अध्यायांत-सोपाधिक-ईशस्वरूपाच्या ध्यानाचा परिपाक झाला असता निरुपाधिक स्वरूपाचें अनुसंधान करणाऱ्या, 'अद्वेष्टा सर्वभूतानां०' इत्यादि ग्रंथानें सांगितलेल्या धर्मांनीं युक्त असलेल्या व श्रवणादिकांची आवृत्ति करीत असलेल्या मुख्य अधिकाऱ्यालाच तत्त्वसाक्षात्कार होतो व त्यामुळेंच ज्याअर्थी मुक्ति मिळते, त्याअर्थी साक्षात्काराला कारण होणाऱ्या वाक्यार्थज्ञानाचा विषय असा जो तत्पदार्थ त्याचें अनुसंधान करावें, असें सिद्ध झालें. ] २०.

इति भगवान् श्रीकृष्णांनीं गायलेल्या उपनिषदांतील-रहस्यविद्येतील ब्रह्मविद्येपैकीं योग-उपाय-शास्त्रांतील भक्तियोगनावाचा बारावा अध्याय विष्णुशर्मकृत सान्वयार्थ-सटीप-भाष्य-भाष्यार्थासह समाप्त झाला.



# अध्याय तेरावा.

प्रकृतिपुरुषविवेकयोग ( क्षेत्रक्षेत्रज्ञयोग. )

**सप्तमेऽध्याये सूचिते द्वे प्रकृती ईश्वरस्य । त्रिगुणात्मिकाऽष्टधा भिन्नाऽपरा संसार-हेतुत्वात्परा चान्या जीवभूता क्षेत्रज्ञलक्षणेश्वरात्मिका । याभ्यां प्रकृतिभ्यामीश्वरो जगदुत्पत्तिस्थितिलयहेतुत्वं प्रतिपद्यते । तत्र क्षेत्रक्षेत्रज्ञलक्षणप्रकृतिद्वयनिरूपणद्वारेण तद्वत ईश्वरस्य तत्त्वनिर्धारणार्थं क्षेत्राध्याय आरभ्यते ॥**

**भाष्यार्थ**—( गीतेच्या पहिल्या षट्कांत त्वंपदार्थ व मधल्या षट्कांत तत्पदार्थ सांगितला. आतां हें तिसरें षट्क आरंभिलें जातें. हें तत्त्वज्ञानप्रधान आहे. त्यांत महावाक्याचा अर्थ निश्चित केला आहे. या षट्काच्या पहिल्या क्षेत्राध्यायाचे व्याख्यान आरंभण्यासाठीं मागील अर्थाचा अनुवाद करितात-)—**सप्तमे अध्याये ईश्वरस्य द्वे प्रकृती निर्दिष्टे**—सातव्या अध्यायांत ईश्वराच्या दोन प्रकृती सुचविल्या ( ' ईश्वराच्या दोन प्रकृती ' असें म्हणून त्यांच्या स्वातंत्र्याचे निवारण केले आहे. म्ह० त्या प्रकृती स्वतंत्र नाहींत ईश्वराधीन आहेत, असें सुचविलें आहे.)—**त्रिगुणात्मिका अष्टधा भिन्ना अपरा**—त्यांतील सत्त्वादि त्रिगुणात्मिका व भूमि, जल, इत्यादि आठ प्रकारें भिन्न झालेली प्रकृति अपरा आहे. ( ती अपरा का ? उत्तर-)—**संसारहेतुत्वात्**—संसाराला कारण होणारी असल्यामुळे अपरा—**च अन्या जीवभूता-क्षेत्रज्ञलक्षणा परा**—आणि दुसरी जीवभूत-क्षेत्रज्ञरूप प्रकृति परा ( ती परा कां ? उत्तर-)—**ईश्वरात्मिका**—ती ईश्वरस्वरूप असल्यामुळें परा. ( पण ईश्वराला या दोन प्रकृति कशासाठीं आहेत ? त्याने जगत्कारण व्हावे म्हणून त्या आहेत, असें उत्तर-)—**याभ्यां-प्रकृतिभ्यां ईश्वरः जगदुत्पत्तिस्थितिलयहेतुत्वं प्रतिपद्यते**—ज्या दोन प्रकृतींच्या योगानें ईश्वर जगाची उत्पत्ति, स्थिति व लय यांच्या कारणत्वास प्राप्त होतो, त्या दोन प्रकृतींमुळें परमात्मा सृष्ट्यादिकांचे कारण होतो. (याप्रमाणे गतार्थाचा अनुवाद करून प्रस्तुत अध्यायाच्या आरंभाचा प्रकार सांगतात-)—**तत्र क्षेत्रक्षेत्रज्ञलक्षण-प्रकृतिद्वयनिरूपणद्वारेण तद्वतः ईश्वरस्य तत्त्वनिर्धारणार्थं क्षेत्राध्यायः आरभ्यते**—असें असल्यामुळें क्षेत्र व क्षेत्रज्ञ या स्वरूपाच्या दोन प्रकृतींच्या निरूपणद्वारा प्रकृतिमान् ईश्वराच्या तत्त्वाचें निर्धारण करण्यासाठीं हा क्षेत्राध्याय आरंभिला जातो. [ क्षेत्र-क्षेत्रज्ञस्वरूप दोन प्रकारच्या प्रकृतींचे निरूपण करून त्यांच्या द्वारा ईश्वराच्या स्वरूपाचा निश्चय करण्यासाठीं हा अध्याय आरंभिला आहे. ]

**अतीतानन्तराध्याये चाद्वेष्टा सर्वभूतानामित्यादिना यावदध्यायपरिसमाप्तिस्तावत्तत्त्वज्ञानिनां संन्यासिनां निष्ठा यथा ते वर्तन्त इत्येतदुक्तं, केन पुनस्ते तत्त्वज्ञानेन युक्ता यथोक्तधर्माचरणाद्भगवतः प्रिया भवन्तीत्येवमर्थश्चायमध्याय आरभ्यते । प्रकृ-**

तिश्च त्रिगुणात्मिका सर्वकार्यकरणविषयाकारेण परिणता पुरुषस्य भोगापवर्गार्थकर्तव्यतया देहेन्द्रियाद्याकारेण संहन्यते सोऽयं संघात इदं शरीरं तदेतत्—

**भाष्यार्थ**—( याप्रमाणें दूरच्या सातव्या अध्यायाशी असलेला या अध्यायाचा संबंध दाखवून आतां, त्याचा मागच्या अध्यायाशी काय संबंध आहे, ते सांगण्यासाठीं त्या अध्यायांतील मुख्य विषयाचा अनुवाद करितात-)—**अतीत-अनन्तराध्याये च ' अद्वेष्टा सर्वभूतानां०' इत्यादिना यावद्अध्यायपरिसमाप्तिः तावत् तत्त्वज्ञानिनां संन्यासिनां निष्ठा ( उक्ता )**—आणि मागें नुकत्याच संपलेल्या १२ व्या अध्यायांत ' अद्वेष्टा सर्वभूतानां०' इत्यादि श्लोकानें जोंवर अध्यायाची परिसमाप्ति होई तोंवर तत्त्वज्ञानी संन्याश्यांची निष्ठा सांगितली. ( पण ' निष्ठा ' म्हणजे काय तें सांगतात-)—**यथा ते वर्तन्ते इति एतत् उक्तं**—ज्याप्रकारें ते वर्तन करितात-धर्मानुष्ठान करितात, तें सर्व पूर्वोक्त प्रकारें सांगितले. ( याप्रमाणें अव्यवहित म्ह० अगदीं मागच्याच अध्यायांतील अर्थाचा अनुवाद करून त्याचा या अध्यायाशीं संबंध काय आहे तो सांगतात-)—**ते पुनः केन तत्त्वज्ञानेन युक्ताः यथोक्तधर्माचरणात् भगवतः प्रियाः भवन्ति**—पण ते कोणत्या तत्त्वज्ञानानें युक्त होत्साते बाराव्या अध्यायांत सांगितलेल्या धर्मांचें आचरण करून भगवानास प्रिय होतात ? [ भगवानाला आवडतात ? ]—**इति एवमर्थः च अयं अध्यायः आरभ्यते**—तें तत्त्वज्ञान सांगण्यासाठीहि हा अध्याय आरंभिला जातो. [ या अध्यायाच्या आरंभाचें हें दुसरें प्रयोजन आहे. अहोपण, विचित्र सुखदुःख भोगणाऱ्या व प्रत्येक शरीरांत भिन्नभिन्न

---

१ आचार्यांनी या अध्यायाच्या आरभाची दोन कारणे सांगितलीं. एक व्यवहित सबंधानें म्ह० दूरच्या सातव्या अध्यायाशी असलेल्या सबंधाने व दुसरे अव्यवहित सबंधाने म्ह० गेल्या बाराव्या अध्यायाशी असलेल्या सबधानें. ' सातव्या अध्यायांत सागितलेल्या पर व अपर या दोन प्रकृतीच्या निरूपणाच्या द्वारा ईश्वराच्या स्वरूपाचा निश्चय करणे, हे एक व बाराव्या अध्यायांत सागितलेल्या धर्मांचें आचरण करून कोणत्या तत्त्वज्ञानाने युक्त झालेले ज्ञानी भक्त भगवानास प्रिय होतात,ते सांगणें,हें दुसरे अध्यायाच्या आरंभाचें कारण आहे,' असें आचार्य म्हणतात. रहस्यकारांनीहि तसाच कांहीसा सबध लावण्याचा यत्न केला आहे. तथापि त्यांत सिद्धान्तापेक्षां अपसिद्धान्तच अधिक आहे. कसा तो पहा—"अनिर्देश्य व अव्यक्त परमेश्वराचे बुद्धीनें चिंतन करून अखेर मोक्ष मिळतो, हे जरी खरं आहे तरी त्यापेक्षां श्रद्धेनें परमेश्वराच्या प्रत्यक्ष व व्यक्त स्वरूपाची भक्ति करून परमेश्वरार्पण बुद्धीनें सर्व कर्मे करीत गेल्यानें तोच मोक्ष सुलभ रितीनें मिळतो." ( अव्यक्त परमेश्वराचें मात्र बुद्धीनें चिंतन करितात, व व्यक्त परमेश्वराची भक्ति डोळ्यांनी करितात वाटते ? शिवाय परमेश्वराचें प्रत्यक्ष किंवा व्यक्त स्वरूप कोणतें ? दगडाची मूर्ति, हे ? पण भगवान् म्हणतात-' अबुद्धयः मां व्यक्तिमापन्नं मन्यन्ते [अ. ७श्लो. २४ गी. भा.पृ. ६३६]' व्यक्त स्वरूपाची भक्ति करून परमेश्वरार्पण बुद्धीनें सर्व कर्मे करीत गेल्यानें ' यांतील ' सर्व कर्मे ' कोणती ? तसेंच, भक्त भक्ति जर करीत आहे तर त्याबरोबरच सर्व कर्मे कशाला ? भक्तीची योग्यता प्राप्त होण्यासाठी नित्य-नैमित्तिक कर्मे विहित आहेत.असो; 'तोच मोक्ष' या म्हणण्यांत काय.

स्वारस्य आहे ? मोक्ष कांही दहा-पांच आहेत की काय ? ‘ सुलभ रीतीनें,’ म्हणजे काय ? क्रमाक्रमानेच कीं त्याहून कांही निराळा अर्थ आहे ? असो ) पुढें म्हणतात–“ सातव्या अध्यायांत जें ज्ञानविज्ञान सांगण्यास सुरवात केली तें एवढ्यानेच संपत नाही. ” ( तर-मग ‘अशेषतः सविज्ञानं ज्ञानं वक्ष्यामि यज्ज्ञात्वा अन्यत् ज्ञातव्यं न अवशिष्यते’[गी.भा.अ.७. २ पृ.६१५] हें भगवानांनी खोटेच सांगितलें आहे म्हणावयाचे ! ) “ परमेश्वराचें पूर्णज्ञान होण्यास बाह्य सृष्टीच्या क्षराक्षरविचाराबरोबरच मनुष्याचे शरीर आणि आत्मा किंवा क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ यांचाहि विचार करावा लागतो. ” ( क्षेत्र म्ह० नुस्तें मनुष्याचे शरीर व क्षेत्रज्ञ म्ह० मनुष्याचा आत्मा हें म्हणणे अयोग्य आहे. क्षेत्र म्ह० शरीरमात्र–अपरा प्रकृति व क्षेत्रज्ञ म्ह०जीव–परा प्रकृति.या अध्यायाचा सातव्या अध्यायाशी या दोन प्रकारच्या प्रकृतीपुरताच संबंध आहे. त्यांतील ज्ञान-विज्ञानाशीं याचा संबंध नाही. गीतेंतील प्रत्येक अध्याय हा एकेक स्वतंत्र पूर्ण योग आहे. त्यांतील मुख्य प्रतिपाद्य अपूर्ण केव्हांच नसतें तथापि त्यांतील कांही प्रासंगिक उल्लेखांचा विस्तार करण्यासाठी निराळा अध्याय आरभिलेला दिसतो. पण त्या त्या अध्यायाचा प्रतिपाद्य विषय अपूर्ण आहे,असें कोणालाहि दाखवितां येणें शक्य नाही. सातव्या अध्यायांतील या प्रकृतिद्वयाप्रमाणेंच नवव्या अध्यायांतील दैवी व आसुरी किंवा राक्षसी प्रकृतिहि सोळाव्या अध्यायात सविस्तर वर्णिली आहे. पण तेवढ्यावरून ‘नवव्या अध्यायांतील राजविद्या-राजगुह्ययोग तेवढ्यानेंच पुरा होत नाही, ह्मणून सोळावा अध्याय आरंभिला आहे,’ असें ह्मणतां येत नाहीं. तसेंच ‘ बाह्य सृष्टीच्या क्षराक्षरविचाराबरोबरच ’ ह्मणजे काय ? बाह्य सृष्टीचा क्षराक्षरविचार या शब्दांपासून कांही अर्थबोधच होत नाही. )“ तसेंच जड प्रकृतीपासून सर्वव्यक्त पदार्थ निर्माण होतात, हें जरी सामान्यतः कळलें, तरी प्रकृतीच्या कोणत्या गुणामुळे हा विस्तार होतो व त्याचा क्रम काय हें सांगितल्याखेरीज ज्ञान-विज्ञानाचे निरूपण पूर्ण होत नाही. म्हणून तेराव्या अध्यायांत प्रथम क्षेत्रक्षेत्रज्ञविचार व पुढें चार अध्यायांत गुणत्रयविभाग सांगून अठराव्या अध्यायांत एकंदर सर्व विषयाचा उपसंहार केला आहे. ” ( हा पूर्वोत्तर संबध किती असंबद्ध आहे, हे थोड्याशा विचारानेच दाखवितां येण्यासारखें आहे–‘कोणत्या गुणामुळें हा विस्तार होतो व त्याचा क्रम ’ पुढील अध्यायांत दाखविलेला नाही. तसेंच पुढील चार अध्यायांत गुणत्रयविभाग सांगितलेला नाही फक्त चवदाव्या अध्यायांत गुणत्रयविभाग आहे. पण तोहि विभाग ‘ कोणत्या गुणामुळें हा विस्तार होतो,’ हे सांगण्यासाठी नसून सत्त्वादि गुण क्षेत्रज्ञाला बद्ध कसे करितात व गुणातीत कसें व्हावे, हें मुख्यतः सांगितलें आहे व या ज्ञानालाहि ‘ सर्व ज्ञानांतील उत्तम ज्ञान ’ म्हणून ‘या ज्ञानानें सर्व मुनी परमगतीला गेले आहेत. या ज्ञानाच्या आश्रयानें माझ्या स्वरूपास प्राप्त झालेले ज्ञानी कल्पाच्या आरंभीं उत्पन्न होत नाहींत व कल्पान्ती मरत नाहीत,’ अशी त्याची स्तुति केली आहे. त्यावरून ‘ हें ज्ञान सातव्या अध्यायांतील ज्ञानविज्ञानाच्या पूर्तीसाठी आहे,’ हें त्यांचें म्हणणें अयोग्य आहे. पंधराव्या अध्यायांत गुणत्रयविभागाचे नांवहि नसून संसारवृक्षाचें वर्णन आहे व त्यालाच ‘ गुह्यतम शास्त्र ’ म्हटले आहे. सोळाव्या अध्यायांत दैव व आसुर संपत्तीचें वर्णन आहे. सतराव्या अध्यायांत मात्र सात्त्विकादि भेदानें त्रिविध श्रद्धा, तीन प्रकारचा यज्ञ, त्रिविध दान व तप सांगितलें आहे. पण तेंहि गुणत्रयविभाग

असणाऱ्या जीवांचें क्षेत्रज्ञाशीं ऐक्य संभवत नाहीं, अशी आशंका घेऊन सुखदुःखादिरूप संसार हा आत्म्याचा धर्म नसून क्षेत्राचा धर्म आहे हें सांगण्यासाठीं क्षेत्राच्या म्ह० शरीरेंद्रियसंघाताच्या उत्पत्तीचा प्रकार सांगतात-)—**च त्रिगुणात्मिका प्रकृतिः सर्वकार्यकरणविषयाकारेण परिणता** (सती) **पुरुषस्य भोगापवर्गार्थकर्तव्यतया देहेन्द्रियादि-आकारेण संहन्यते**—आणि ती त्रिगुणात्मिका प्रकृति सर्व शरीरें, इंद्रियें व विषय यांच्या आकारानें परिणत होत्साती पुरुषाचा भोग व मोक्ष हीं दोन प्रयोजनें सिद्ध करून देण्यासाठीं देह व इन्द्रियें यांच्या आकाराने संघात पावते, या आकाराने मूर्त बनते.—**सः अयं संघातः इदं शरीरं**—तो हा शरीरेंद्रियसंघातच हें शरीर आहे.—**तत् एतत्** (श्रीभगवान् उवाच)—तेच हे शरीर भगवान् सांगत आहेत.

**श्रीभगवान् उवाच**—श्रीकृष्ण म्हणाले—

**इदं शरीरं कौन्तेय क्षेत्रमित्यभिधीयते ।**
**एतद्यो वेत्ति तं प्राहुः क्षेत्रज्ञ इति तद्विदः ॥ १ ॥**

**अन्वयार्थ—हे कौन्तेय**—हे कुंतिपुत्रा अर्जुना !—**इदं शरीरं**—हे शरीर—**क्षेत्रं इति**—क्षेत्र आहे, असे—**अभिधीयते**—म्हटले जातें.—**यः**—जो—**एतत्**—याला—**वेत्ति**—जाणतो—**तं**—त्याला—**क्षेत्रज्ञः**—क्षेत्रज्ञ—**इति**—असे—**तद्विदः**—क्षेत्र-क्षेत्रज्ञवेत्ते—**प्राहुः**—सागतात. १.

**इदमिति सर्वनाम्नोक्तं विशिनष्टि शरीरमिति । हे कौन्तेय क्षतत्राणात्क्षयात्क्षरणात्क्षेत्रवद्वाऽस्मिन्कर्मफलनिर्वृत्तेः क्षेत्रमिति । इतिशब्द एवंशब्दपदार्थकः क्षेत्रमित्येवमभिधीयते कथ्यते । एतच्छरीरं क्षेत्रं यो वेत्ति विजानात्यापादतलमस्तकं ज्ञानेन विषयी करोति स्वाभाविकेनौपदेशिकेन वा वेदनेन विषयी करोति विभागशस्तं वेदितारं प्राहुः कथयन्ति क्षेत्रज्ञ इति । इतिशब्द एवंशब्दपदार्थक एव पूर्ववत्क्षेत्रज्ञ इत्येवमाहुः । के तद्विदस्तौ क्षेत्रक्षेत्रज्ञौ ये विदन्ति ते तद्विदः ॥ १ ॥**

---

सांगण्यासाठीं नसून राजस व तामस श्रद्धा, यज्ञ, दान व तप यांचा त्याग करून सात्त्विक श्रद्धेनें सात्त्विक यज्ञादिकांचें अनुष्ठान करावें म्हणून आहे. कारण त्यालाहि जर ' गुणत्रयविभाग सांगण्यासाठीं ' म्हटलें तर अठराव्या अध्यायानेंच काय अपराध केला आहे? कारण त्यातहि ज्ञान, कर्म, कर्ता, बुद्धि, धृति, व सुख यांचा सात्त्विकादि भेद सांगितला आहे. वास्तव रहस्यकाराची वरील पूर्वोत्तर संगति सर्वथा चुकीची आहे. तथापि ते पुढें म्हणतात–) " तृतीय षडाध्यायी ' ही स्वतंत्र नसून कर्मयोगसिद्ध्यर्थ ज्या ज्ञानविज्ञानाच्या निरूपणास सातव्या अध्यायात सुरुवात झाली त्याचीच पूर्तता या षडाध्यायीत केली आहे. ( गी. र. पृ. ४५७ ते ४५९ पहा ) " ( पण हें म्हणणें आतां कितपत खरें मानावयाचें तें वाचक जाणतीलच ! कारण त्याविषयीं आम्हीं या पूर्वींहि बरेंच लिहिलें आहे. ( पृ. ६१४, ८१९ पहा. )

**भाष्यार्थ—इदं इति सर्वनाम्ना उक्तं शरीरं इति विशिनष्टि**—' इदं-हें' या सर्वनामानें सांगितलेले-म्ह० प्रत्यक्ष दिसण्यास योग्य असलेलें जें कांहीं तेंच 'शरीरं' -शरीर या शब्दानें विशेषरूपानें व्यक्त करितात. [ ' इदं ' म्ह० हे, अर्थात्च ते द्रष्ट्याचा विषय होणारें, यावरूनच द्रष्टा आत्मा त्याहून भिन्न आहे, हें सिद्ध होते. शरीर आत्म्याहून भिन्न आहे, हें ' क्षेत्र ' या शब्दाची व्युत्पत्ति सांगून त्यावरूनहि व्यक्त करितात-]—**हे कौन्तेय, क्षतत्राणात् क्षयात् क्षरणात् वा क्षेत्रवत् अस्मिन् कर्मफलनिर्वृतेः क्षेत्रं इति**—हे कुंतीपुत्रा, क्षतापासून रक्षण करीत असल्यामुळें, स्वतः क्षय-नाश पावत असल्यामुळे, क्षरण-हळू हळू क्षय होत असल्यामुळें किंवा क्षेत्राप्रमाणें-शेताप्रमाणे शेतांत पेरलेले बी जसे फल देतें त्याप्रमाणें यांत कर्मफलाची निष्पत्ति होत असल्यामुळें ' क्षेत्र ' असे ( 'क्षेत्रमिति' येथील 'इति'शब्दाचा अर्थ-)—**इतिशब्दः एवंशब्दपदार्थकः**—' क्षेत्रं ' या शब्दापुढील 'इति' हा शब्द ' एवं ' या शब्दाचा जो अर्थ त्याअर्थी आहे, म्हणजे—**क्षेत्रं इति एवं अभिधीयते-कथ्यते**—क्षेत्र असें म्हटले जाते, शरीर 'क्षेत्र' या शब्दाने सांगितलें जाते. शरीराला क्षेत्र असें म्हणतात. ( याप्रमाणे दृश्य असलेला देह सांगून त्याहून भिन्न असलेला त्याचा द्रष्टा सांगतात-)—**एतत्-शरीरं क्षेत्रं यः वेत्ति-विजानाति आपादतलमस्तकं ज्ञानेन विषयी करोति**—या शरीराला-क्षेत्राला जो जाणतो, ज्ञानाने पायाच्या तळव्यापासून मस्तकापर्यंत त्याला विषय करतो, ( कोणत्या ज्ञानाने ? )—**स्वाभाविकेन औपदेशिकेन वा वेदनेन विभागशः विषयी करोति तं वेदितारं ' क्षेत्रज्ञः ' इति प्राहुः-कथयन्ति**—मी मनुष्य आहे, अशा स्वाभाविक ज्ञानानें किंवा देह आत्मा नव्हे, कारण तो दृश्य आहे, अशा तत्त्वज्ञांच्या उपदेशानें झालेल्या ' देह आपल्याहून निराळा आहे ' अशा ज्ञानाने, जो देहाला विषय करितो, त्या जाणणाऱ्याला ' क्षेत्रज्ञ ' असें म्हणतात, ' क्षेत्रज्ञ ' असें सांगतात. —**पूर्ववत् इतिशब्दः एवंशब्दपदार्थकः एव ' क्षेत्रज्ञः ' इति एवं आहुः**—पूर्वीप्रमाणेंच येथील 'इति'शब्द 'एवं'शब्दाचा जो अर्थ त्याच अर्थी आहे. त्यामुळें ' क्षेत्रज्ञः' असेंच म्हणतात.—**के**—कोण म्हणतात ?—**तद्विदः-तौ क्षेत्रक्षेत्रज्ञौ ये विदन्ति ते तद्विदः**—तद्विद् म्ह० त्या क्षेत्र-क्षेत्रज्ञांना जे जाणतात ते तद्विद् होत. [ क्षेत्र-क्षेत्रज्ञांना जाणणारे तत्त्वज्ञ या शरीराला क्षेत्र व त्याला ' हे मी ' किंवा ' मी आत्मा द्रष्टा व हें माझें दृश्य ' असें जाणणारा क्षेत्रज्ञ असे सांगतात. ] १.

---

१ पण रहस्यकार म्हणतात—" पहिल्या श्लोकांत ' क्षेत्र ' व ' क्षेत्रज्ञ ' या शब्दांचे अर्थ दिले आहेत. " एकूण पहिला श्लोक येथें कोशाचे काम करीत आहे ! पण ' क्षेत्र'शब्दाचा ' शरीर ' हा एकच अर्थ नाहीं. तर क्षेत्र म्ह० स्थान, तीर्थ, शेत, स्त्री, शरीर असे अनेक अर्थ आहेत. यास्तव येथें ' क्षेत्र ' या शब्दाचा पारिभाषिक अर्थ सांगावयाचा आहे, नुस्ता अर्थ सांगावयाचा नाहीं. छान्दोग्यांत ज्याला ' ब्रह्मपुर ' म्हटलें आहे ( छां भा. पृ. ५१५) व गीतेंतच ज्याला ' नवद्वार पुर ' (गी. भा. पृ. ५०४) म्हटलें आहे तें तर येथील क्षेत्र

क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि सर्वक्षेत्रेषु भारत ।
क्षेत्रक्षेत्रज्ञयोर्ज्ञानं यत्तज्ज्ञानं मतं मम ॥ २ ॥

**अन्वयार्थ—हे भारत**—हे अर्जुना !—**सर्वक्षेत्रेषु**—सर्वशरीररूपक्षेत्रांतील **क्षेत्रज्ञं**—क्षेत्रज्ञ—**मां च अपि**—मलाच-मी आहें,असेहि—**विद्धि**—जाण.—**यत्**—जें—**क्षेत्रक्षेत्रज्ञयोः ज्ञानं**—क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांचें ज्ञान—**तत् ज्ञानं**—तें यथार्थज्ञान म्हणून—**मम**—मला—**मतं**—संमत आहे. २.

**एवं क्षेत्रक्षेत्रज्ञावुक्तौ किमेतावन्मात्रेण ज्ञानेन ज्ञातव्याविति नेत्युच्यते—क्षेत्रज्ञं यथोक्तलक्षणं चापि मां परमेश्वरमसंसारिणं विद्धि जानीहि । सर्वक्षेत्रेषु यः क्षेत्रज्ञो ब्रह्मादिस्तम्बपर्यन्तानेकक्षेत्रोपाधिप्रविभक्तस्तं निरस्तसर्वोपाधिभेदं सदसदादिशब्दप्रत्ययागोचरं विद्धीत्यभिप्रायः । हे भारत,यस्मात्क्षेत्रक्षेत्रज्ञेश्वरयाथात्म्यव्यतिरेकेण न ज्ञानगोचरमन्यदवशिष्टमस्ति तस्मात्क्षेत्रक्षेत्रज्ञयोर्ज्ञेयभूतयोर्यज्ज्ञानं क्षेत्रक्षेत्रज्ञौ येन ज्ञानेन विषयी क्रियेते तज्ज्ञानं सम्यग्ज्ञानमिति मतमभिप्रायो ममेश्वरस्य विष्णोः ॥**

**भाष्यार्थ—एवं क्षेत्रक्षेत्रज्ञौ उक्तौ**—याप्रमाणे क्षेत्र व क्षेत्रज्ञ सांगितले. [प्रत्येक प्राण्यामध्यें भेद उत्पन्न करणारे व देह असेपर्यंत अवश्य असणारे जे दुःखादि भाव ते अनात्मधर्म आहेत हे सिद्ध व्हावें म्हणून द्रष्टा देहाहून भिन्न आहे हें सांगितलें. पण सांख्यांच्या सिद्धान्ताप्रमाणें तेवढ्याच ज्ञानाने मुक्ति मिळते असें कोणी समजूं नये, म्हणून सर्व देहांतील द्रष्टा क्षेत्रज्ञ एक आहे, असें सांगून आपल्या पारमार्थिक अक्षर स्वरूपाशी त्याचे ऐक्य आहे असें गतार्थाचा अनुवाद करून प्रश्नाच्या द्वारा दाखवितात-]—**एतावन्मात्रेण ज्ञानेन ज्ञातव्यौ किं इति 'न' इति उच्यते**—पण एवढयाच ज्ञानानें त्यांना जाणावें का ? म्हणजे शरीर क्षेत्र आहे व त्याला जो जाणतो तो क्षेत्रज्ञ आहे, इतकें ज्ञान झालें कीं आपल्याला मुक्ति मिळेल का? अशी आशंका आली असतां 'नाही' एवढयाच ज्ञानाने मोक्ष मिळत नाही, असें 'क्षेत्रज्ञं०' या श्लोकानें सांगितले जातें.—**क्षेत्रज्ञं-यथोक्तलक्षणं मां च अपि परमेश्वरं असंसारिणं विद्धि-जानीहि**—व क्षेत्रज्ञ,ज्याचे लक्षण वर-दृश्य देहाहून द्रष्टा भिन्न आहे-असें सांगितलें आहे तो क्षेत्रज्ञ मीच परमेश्वर असंसारी आहें असेहि तूं जाण. [ श्लोकात 'च' व 'अपि' असे जे दोन निपात आहेत, ते 'जीवच अक्षर आहे' या ज्ञानाचा तो देहाहून भिन्न आहे या ज्ञानाशीं समुच्चय करण्यासाठी आहेत. यास्तव कापिल सांख्यदर्शनाप्रमाणे क्षेत्रज्ञ दृश्याहून अन्य आहे एवढेच जाणूं नकोस तर 'क्षेत्रज्ञं मां चापि विद्धि'

---

**आहेच, पण सर्व अपर प्रकृतीला येथें क्षेत्र म्हणावयाचे आहे.(पुढे श्लो. ५ व ६ पहा.)तसेंच क्षेत्रज्ञ म्ह० नुस्ता क्षेत्रीला-शरीराला जाणणारा, एवढाच अर्थ येथें विवक्षित नाही, तर त्या क्षेत्रावर 'हूं मी' किंवा 'हे माझें' असा अभिमान ठेवणारा, अर्थात् क्षेत्रज्ञ म्ह० ईश्वराची परा-जीवभूत प्रकृति, हा येथील 'क्षेत्रज्ञ'शब्दाचा अर्थ आहे.**

क्षेत्रज्ञ मीच आहें, असेंहि जाण, असा याचा अन्वय व अर्थ करावा. जो सर्वक्षेत्रांमध्यें एक क्षेत्रज्ञ आहे तो मीच आहें असें समज, असा संबंध भाष्यकार सुचवितात-]—

---

१ पण रहस्यकार म्हणतात-"दुसऱ्या श्लोकात क्षेत्रज्ञ म्ह० मी परमेश्वर किंवा जें पिंडीं तेच ब्रह्मांडीं असे क्षेत्रज्ञाचे स्वरूप सांगितलें आहे." पण ते बरोबर नाही. कारण तो पहिल्या श्लोकांत सांगितलेला क्षेत्रज्ञ-जीव—माझी परा प्रकृति मीच असंसारी परमेश्वर आहे, असेंहि जाण, असा त्याचा अर्थ आहे. आचार्यांनी वर भाष्यांत ही गोष्ट अधिक स्पष्ट केली आहे. येथे क्षेत्रज्ञाचे स्वरूप सांगितलें नसून क्षेत्रज्ञ-ईश्वरैक्य सांगितलें आहे. पण यालाच रहस्यकार 'जे पिंडी ते ब्रह्मांडी' समजतात, व त्याचा संबंध आठव्या अध्यायांतील 'पुरुषश्चाधिदैवतं' याच्याशींहि लावितात. पण ती कल्पना साफ चुकीची आहे. तेथे पुरुष म्ह० आदित्यादि देवतांत राहणारा पुरुष अधिदैवत आहे, असे म्हटले आहे व येथें तो क्षेत्रज्ञहि मीच आहें, असें म्हटलें आहे. म्हणजे हे वाक्य 'तत्त्वमसि, अहं ब्रह्मास्मि' यांसारखे महावाक्य—ब्रह्मात्मैक्य सांगणारें वाक्य आहे. 'पिंडी ते ब्रह्मांडी' याचा अर्थ काय? शरीर हे ब्रह्मांडाचेंच एक सूक्ष्म रूप आहे, शरीरांत जे जे आहे ते तें ब्रह्मांडांत आहे, अशा अर्थी ते वाक्य आहे. क्षेत्रज्ञ म्ह० मीच जसें त्यांत सांगितलेले नाही. पुढे रहस्यकार म्हणतात-" दुसऱ्या श्लोकातील 'चापि' सुद्धा या शब्दाचा क्षेत्रज्ञच नव्हे तर क्षेत्र देखील मीच आहे, असा अर्थ होतो."( ही कल्पना मात्र फारच विचित्र आहे ! पण रहस्यकार त्याचे कारण काय सांगतात ते पहा-)"कारण क्षेत्र किंवा शरीर ज्या पंच महाभूताचे बनते ती प्रकृतीपासून झालेलीं असून प्रकृति परमेश्वराचीच कनिष्ठ विभूति आहे, हे सातव्या व आठव्या अध्यायांत वर्णिले आहे." ( रहस्यकारांचे हे वाक्य वाचून कोणीहि तज्ज्ञ पोट धरधरून हसल्यावाचून राहणार नाही. अगोदर प्रकृतीला 'कनिष्ठ' विभूति म्हणणें हे जरा अप्रयोजकच आहे. तथापि आपण शब्दाकडे दुर्लक्ष करून विचारांकडेच पाहूं. ते म्हणतात-'क्षेत्र-शरीर ज्या महाभूतांचें बनतें ती पंच महाभूते प्रकृतीपासून झाली' होय, झाली. बरें पुढे? 'ती ईश्वराचीच कनिष्ठ विभूति आहे' होय ती ईश्वराची अपरा प्रकृति आहे, हे खरें; 'म्हणून क्षेत्र देखील मीच आहे' हे मात्र सपशेल चुकलें!' प्रकृति जरी ईश्वराची असली तरी ती ईश्वर नव्हे. तेराव्या अध्यायाला रहस्यकारच 'प्रकृतिपुरुषविवेक म्ह० क्षेत्रक्षेत्रज्ञविभागयोग' असें नांव देतात. त्यावरूनहि ही त्यांची कल्पना किती भ्रामक आहे हे उघड होते. क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांचा विभाग हाच जर या अध्यायाचा विषय आहे तर 'क्षेत्र देखील मीच' असें भगवान् म्हणतील कसे? क्षेत्र ज्ञेय व क्षेत्रज्ञ ज्ञातृ-याचें ऐक्य संभवेल तरी कसें? हा सर्व अध्याय तर जाऊं देच, पण नुस्ता याचा शेवटचा उपसंहारात्मक ( ३४ वा.) श्लोक जरी रहस्यकारांनी पाहिला असता तरी त्यांचें त्यांनाच आपलें हे म्हणणें किती निराधार आहे, ते कळलें असतें. त्या श्लोकांत 'क्षेत्रक्षेत्रज्ञयोरेवं अन्तरं ज्ञानचक्षुषा ये विदुः' असे स्पष्ट म्हटले आहे. या एका उदाहरणावरूनच रहस्यकारांचें या अध्यायावरील बाकीचें प्रतिपादन किती सयुक्तिक असेल ते उघड दिसतें आहे. तथापि संन्यासमार्गी—अद्वैती भाष्य-टीकाकारांना—आग्रही, सांप्रदायिक, गीतार्थावर सारवण घालणारे, ओढाताण करणारे-वगैरे ठरवून 'कर्मयोगशास्त्र' या नवीन शास्त्राची इमारत रचण्याचा उद्योग आरंभिल्यामुळे त्यांच्या 'क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांचें जें ज्ञान तेंच माझें

**सर्वक्षेत्रेषु यः क्षेत्रज्ञः ब्रह्मादिस्तंबपर्यन्त-अनेकक्षेत्रोपाधिप्रविभक्तः**—सर्वक्षेत्रांमध्ये जो क्षेत्रज्ञ ब्रह्मादिस्तंबपर्यंत अनेक क्षेत्ररूप उपाधींमुळें अत्यंत भिन्न झालेला—**तं निरस्तसर्वोपाधिभेदं सदसदादिशब्दप्रत्ययागोचरं विद्धि इति अभिप्रायः**—त्याला सर्वउपाधिभेदरहित सत्–असत् इत्यादि शब्द व तसाच अनुभव, यांचा विषय न होणारा जाण, असा याचा आशय आहे. [ क्षेत्रज्ञ क्षेत्ररूप विविध उपाधींमुळे प्रत्येक शरीरांत भिन्न भिन्न आहे, असे जरी वाटत असले तरी तो वस्तुतः तसा नाहीं, निरुपाधिक व निर्विशेष आहे, असे तूं जाण.]—**हे भारत**—हे भरतकुलनंदना ! (आणि मीच तो क्षेत्रज्ञ आहे, असें समज. उत्तरार्धाचे व्याख्यान–)—**यस्मात् क्षेत्र-क्षेत्रज्ञ-ईश्वरयाथात्म्यव्यतिरेकेण अन्यत् ज्ञानगोचरं न अवशिष्टं अस्ति**—ज्याअर्थी क्षेत्र, क्षेत्रज्ञ, ईश्वर याच्या यथार्थस्वरूपावांचून दुसरा कांहीं ज्ञानाचा विषयच अवशिष्ट राहिलेला नसतो—**तस्मात् ज्ञेयभूतयोः क्षेत्र-क्षेत्रज्ञयोः यत् ज्ञानं**—त्याअर्थी जाणण्यास योग्य असलेल्या क्षेत्र-क्षेत्रज्ञांचें जे ज्ञान म्ह० —**क्षेत्र-क्षेत्रज्ञौ येन ज्ञानेन विषयी क्रियेते**—क्षेत्र व क्षेत्रज्ञ ज्या ज्ञानानें विषय केले जातात, जाणले जातात—**तत् ज्ञानं सम्यक् ज्ञानं इति मतं-मम-ईश्वरस्य विष्णोः अभिप्रायः**—ते ज्ञान हे सम्यक् ज्ञान आहे, असे माझे मत आहे, असा मज ईश्वराचा विष्णूचा अभिप्राय–आशय आहे. [ अहोपण, क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांचें ज्ञान हे भेदज्ञान आहे. तेव्हां त्याला सम्यक्ज्ञान कसे म्हणतां येईल ? उत्तर–क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांचे विवेकज्ञान म्ह० दृश्य क्षेत्र निराळे व त्याचा द्रष्टा क्षेत्रज्ञ निराळा, हे ज्ञान महावाक्यार्थज्ञानाच्या द्वारा मोक्षोपयोगी असल्यामुळे सम्यक् ज्ञानच आहे, असा याचा भावार्थ. ]

**ननु सर्वक्षेत्रेष्वेक एवेश्वरो नान्यस्तद्व्यतिरिक्तो भोक्ता विद्यते चेत्तत ईश्वरस्य संसारित्वं प्राप्तमीश्वरव्यतिरेकेण वा संसारिणोऽन्यस्याभावात्संसाराभावप्रसङ्गस्तच्चोभयमनिष्टं बन्धमोक्षतद्धेतुशास्त्रानर्थक्यप्रसङ्गात्प्रत्यक्षादिप्रमाणविरोधाच्च । प्रत्यक्षेण तावत्सुखदुःखतद्धेतुलक्षणः संसार उपलभ्यते । जगद्वैचित्र्योपलब्धेश्च धर्माधर्मनिमित्तः संसारोऽनुमीयते । सर्वमेतदनुपपन्नमात्मेश्वरैकत्वे ॥**

**भाष्यार्थ**—( जीवेश्वराच्या या एकत्वावर आक्षेप घेतात– )—**ननु सर्वक्षेत्रेषु एकः एव ईश्वरः तद्व्यतिरिक्तः अन्यः भोक्तः न विद्यते चेत्**—अहोपण, सर्व क्षेत्रांमध्ये एकच ईश्वर आहे, त्याहून व्यतिरिक्त दुसरा भोक्ता विद्यमानच नाहीं, असे जर म्हटले—**ततः ईश्वरस्य संसारित्वं प्राप्तं**—तर ईश्वराला संसारित्व प्राप्त झालें.—**वा ईश्वरव्यतिरेकेण अन्यस्य संसारिणः अभावात् संसाराभावप्रसङ्गः**—किंवा ईश्वराहून निराळ्या–त्याहून भिन्न अशा दुसऱ्या संसारी जीवाचा अभाव असल्यामुळे संसाराच्याच अभावाचा प्रसंग येतो. [जीव व ईश्वर यांचें जर एकत्व

---

म्ह० परमेश्वराचे ज्ञान ’ अशा निराधार अर्थाकडे दुर्लक्ष करवत नाही. या अर्थात ‘ माझे –परमेश्वराचें ’ हे शब्द निराधार–मूळाला सोडून आहेत.

असेल तर जीवाचा ईश्वरांत अन्तर्भाव होतो कीं ईश्वराचा जीवांत ? यांतील पहिला पक्ष मानल्यास संसाराचा आश्रय ईश्वर आहे म्ह० ईश्वर कर्ता, भोक्ता, सुखी, दुःखी आहे, असें ठरतें. कारण हा कर्तृत्वादिरूप संसार निराधार असणें शक्य नाहीं. पण 'अनश्नन् अन्योऽभिचाकशीति ' म्ह० शरीररूपी एकाच वृक्षावर दोन पक्षी राहतात. त्यांतील एक कर्मफल भोगतो व दुसरा कर्मफल न खाणारा नुस्तें पाहतो, अशी मुंडक-(भाष्यार्थ पृ.८८) श्रुति असल्यामुळें ईश्वराला संसारित्व नाहीं. म्हणून ईश्वराचा जीवांत अन्तर्भाव होतो, हा दुसरा पक्ष घेतल्यास दुसरा कोणी संसारी नसल्यामुळें व त्यालाच संसारी मानणें इष्ट नसल्यामुळें जगांतून संसारच नाहींसा होईल.] **—तत् च उभयं अनिष्टं बंधमोक्षतद्धेतुशास्त्रानर्थक्यप्रसंगात्**—पण ते दोन्ही प्रसंग अनिष्ट आहेत.कारण बंध,मोक्ष व त्यांचें कारण, यांचे प्रतिपादन करणाऱ्या शास्त्रावर आनर्थक्य प्रसंग येतो, [-म्हणजे संसाराचा अभाव मानल्यास ' तयोरन्यः पिप्पलं स्वाद्वत्ति ' त्यांतील एक मधुर कर्मफल भोगतो इत्यादि बंधशास्त्र म्ह० बंधाला कारण होणारें जें कर्मविषयक कर्मकांड तें व्यर्थ होतें व संसार ईश्वराश्रित आहे, असें म्हटल्यास ईश्वर अभोक्ता आहे, अशी श्रुति असल्यामुळें मोक्षाला कारण होणाऱ्या ज्ञानासाठींच असलेलें ज्ञानकांड व्यर्थ होतें.त्यामुळें यांतील एकहि प्रसंग इष्ट नाहीं, असा याचा भावार्थ. संसाराभाव होण्याचा प्रसंग इष्ट नाहीं, याविषयीं आणखीं कारण- ]**—च प्रत्यक्षादिप्रमाणविरोधात्**—आणि प्रत्यक्षादि प्रमाणांशीं विरोध येत असल्यामुळेंहि संसाराचा अभाव मानणें शक्य नाहीं. ( आतां अगोदर प्रत्यक्ष विरोध कसा येतो तें दाखवितात-)**—प्रत्यक्षेण तावत् सुखदुःखतद्धेतुलक्षणः संसारः उपलभ्यते**—प्रत्यक्ष प्रमाणानें म्ह० इंद्रियांच्या योगानें तर सुख, दुःख व त्यांचीं कारणें या स्वरूपाचा संसार साक्षात् अनुभवास येतो. ( तसाच संसाराचा अभाव मानल्यास अनुमान-प्रमाणाशींहि विरोध येतो, असें सांगतात-)**—च जगवैचित्र्योपलब्धेः धर्माधर्मनिमित्तः संसारः अनुमीयते**—त्याचप्रमाणें जगामध्यें वैचित्र्याची उपलब्धि होत असल्यामुळे म्ह० प्रत्येक पदार्थ निरनिराळ्या आकाराचा, स्वभावाचा, विचित्र सुखदुःखादिकांचा अनुभव घेणारा वगैरे दिसत असल्यामुळें धर्म व अधर्म या निमित्तानें झालेल्या संसाराचें अनुमान होतें. [ 'हें जगत् विचित्र-विषम कारणापासून झालेलें आहे. कारण तें विचित्र-कार्य आहे. जसा मोठा राजवाडा.' याप्रमाणें प्रत्यक्ष, अनुमान व आगम या तिन्ही प्रमाणांशीं विरोध येत असल्यामुळें आत्मा व ईश्वर यांचें ऐक्य अनुपपन्न आहे, असा उपसंहार करितात-]**—आत्मेश्वरैकत्वे सर्वं एतत् अनुपपन्नं**—आत्मा व ईश्वर यांचें जर ऐक्य असेल तर हें सर्व अनुपपन्न होतें.

**न । ज्ञानाज्ञानयोरन्यत्वेनोपपत्तेः । "दूरमेते विपरीते विषूची अविद्या या च विद्येति ज्ञाता" । तथा च तयोर्विद्याविद्याविषययोः फलभेदोऽपि विरुद्धो निर्दिष्टः-" श्रेयश्च प्रेयश्च " इति । विद्याविषयः श्रेयः प्रेयस्त्वविद्याकार्यमिति । तथा च व्यासः—द्वाविमावथ पन्थानौ इत्यादि, इमौ द्वावेव पन्थानावित्यादि च । इह च द्वे निष्ठे उक्ते ।**

**अविद्या च सह कार्येण विद्यया हातव्येति श्रुतिस्मृतिन्यायेभ्योऽवगम्यते । श्रुतयस्ता-वत्—"इह चेदवेदीदथ सत्यमस्ति न चेदिहावेदीन्महती विनष्टिः । तमेवं विद्वानमृत इह भवति, नान्यः पन्था विद्यतेऽयनाय, विद्वान्न बिभेति कुतश्चन ॥ "**

**भाष्यार्थ**—( आत्मा व ईश्वर यांचें जरी ऐक्य असलें तरी अविद्येमुळें संसारित्व व विद्येमुळें असंसारित्व, असा विभाग होत असल्यामुळें त्यांत अनुपपन्न कांहींच नाहीं, असें उत्तर सांगतात-)—**न । ज्ञानाज्ञानयोः अन्यत्वेन उपपत्तेः**—प्रत्यक्षादि प्रमाणांनीं प्रतीत होणारा संसार अनुपपन्न नाहीं. कारण ज्ञान व अज्ञान या अवस्थांमध्यें संसारित्व व असंसारित्व या विभागाची उपपत्ति लागते. ( किंवा ज्ञान व अज्ञान यांचीच अन्यत्वानें उपपत्ति लागते. ज्ञान व अज्ञान यांचें स्वरूपतःच वैलक्षण्य आहे,याविषयीं प्रमाण-)—**'दूरमेते विपरीते विषूची अविद्या या च विद्या इति ज्ञाता'**—अविद्या व विद्या म्हणून प्रसिद्ध असलेल्या या विद्याविद्या अत्यंत विपरीत आहेत. त्या विषूची आहेत. म्ह० त्यांचें फल एक नाहीं. भिन्न भिन्न फल आहे. (का. भा. पृ.४१) [ याप्रमाणें विद्या व अविद्या यांचा स्वरूपतः विरोध दाखवून फलतःहि विरोध दाखवितात-]—**तथा च तयोः विद्याविद्याविषययोः फलभेदः अपि ' श्रेयश्च प्रेयश्च' इति विरुद्धः निर्दिष्टः**—तसाच त्या विद्या व अविद्या यांच्या विषयांचा फलभेदहि ' श्रेयश्च प्रेयश्च ' या वाक्यानें विरुद्ध सांगितला आहे.—**विद्याविषयः श्रेयः तु प्रेयः अविद्या-कार्यं इति**—विद्येचा विषय श्रेय आहे व प्रेय हें अविद्येचें कार्य आहे, असा त्यांच्या भिन्न भिन्न फलांचा निर्देश केला आहे. ( विद्या व अविद्या यांच्या विलक्षणत्वाविषयीं व्यासांची संमतिहि दाखवितात-)—**तथा च व्यासः ' द्वौ इमौ अथ पन्थानौ ' इत्यादि ' इमौ द्वौ एव पन्थानौ' इत्यादि च**—तसेंच व्यासांनींहि ' हे दोन मार्ग आहेत०' इत्यादि व ' हे दोनच मार्ग आहेत' असे म्हटलें आहे. (याविषयीं भगवानांची संमतिहि दाखवितात-)—**इह च द्वे निष्ठे उक्ते**—या गीतेंतहि दोन निष्ठा सांगि-तल्या आहेत. ( पण त्या दोन्ही निष्ठांना एकसारखेच ग्राह्यत्व आहे, या शंकेचें निरसन करितात-)—**च विद्यया अविद्या कार्येण सह हातव्या इति श्रुति-स्मृति-न्यायेभ्यः अवगम्यते**—आणि विद्येच्या योगानें अविद्येचा तिच्या कार्यासह त्याग करावा, असे श्रुति, स्मृति व न्याय यांवरून ज्ञात होतें. ( याविषयीं श्रुतिवचनांचा निर्देश करितात-)—**श्रुतयः तावत्**—त्याविषयीं अगोदर श्रुतिच पहा—**इह चेत् अवेदीत् अथ सत्यं अस्ति न चेत् इह अवेदीत् महती विनष्टिः**—( केनो. भाष्यार्थ पृ. ६० पहा. ) याच मनुष्य जन्मांत जिवंत असेपर्यंतच जर ' मी परब्रह्म आहें ' असें जाणलें तर लागलेंच-त्या ज्ञानाबरोबरच सत्य-पुनरावृत्तिरहित मोक्ष आहे. पण याच जन्मांत जर तसें न जाणलें तर मोठी हानि होते म्ह० सम्यग्ज्ञानावांचून ज्याची निवृत्ति होणें शक्य नाहीं असा जन्म-मरणादिरूप संसार प्राप्त होतो. ( विद्याविषयांतील आणखी श्रुति-)—**तं एवं विद्वान् अमृतः इह भवति**—परमात्म्याला प्रत्यगा-त्मरूपानें ज्यानें साक्षात् जाणलें तो जिवंत असतांनाच मुक्त होतो. ( विद्येवांचून अन्य

उपायानें मोक्ष मिळेल, अशी शंका घेऊन सांगतात-)—**न अन्यः पन्थाः विद्यते अयनाय**—या संसारांतून पार पडण्यास दुसरा मार्ग विद्यमान नाहीं; विद्या-आत्मज्ञान हाच एक मोक्षाचा मार्ग आहे. ( विद्या भयाला कारण होणाऱ्या अविद्येचें निरसन करून अविद्याजन्य भयाचेंहि निरसन करिते, याविषयीं श्रुति-)—**विद्वान् न बिभेति कुतश्चन**—विद्वान् कोणत्याहि निमित्तानें भीत नाहीं. ( तैत्तिरीयभाष्यार्थ. १.९.पृ.१७२)

**अविदुषस्तु—" अथ तस्य भयं भवति " " अविद्यायामन्तरे वर्तमानाः" " ब्रह्म वेद ब्रह्मैव भवति" " अन्योऽसावन्योऽहमस्मीति न स वेद यथा पशुरेवं स देवानाम् " " आत्मविद्यः स इदं सर्वं भवति " " यदा चर्मवत् " इत्याद्याः सहस्रशः। स्मृतयश्च—'अज्ञानेनाऽऽवृतं ज्ञानं तेन मुह्यन्ति जन्तवः' 'इहैव तैर्जितः सर्गो येषां साम्ये स्थितं मनः' 'समं पश्यन्हि सर्वत्र' इत्याद्याः। न्यायतश्च—" सर्पान्कुशाग्राणि तथोदपानं ज्ञात्वा मनुष्याः परिवर्जयन्ति। अज्ञानतस्तत्र पतन्ति केचिज्ज्ञाने फलं पश्य यथा विशिष्टम् " ॥**

**भाष्यार्थ**—( अविद्याविषयांतील आणखी श्रुति-)—**तु अविदुषः ' अथ तस्य भयं भवति '**—( तैत्ति. भाष्यार्थ २.७ पृ. १४६ ) पण अविद्वानाला-'एकरसरूप अखंड प्रत्यागात्म्यामध्यें जो थोडासाहि भेद पहातो त्याला मोठें भय प्राप्त होते तो, संसारपरंपरेंत पडतो'—**'अविद्यायां अन्तरे वर्तमानाः'**—(का भाष्यार्थ २.५ पृ.४२) अविद्येमध्यें पराधीन असणारे, ( आपल्याला मोठे पंडित व बुद्धिमान् समजणारे, पण तत्त्वाला न जाणणारे देहाभिमानी मूढ संसारात पडतात—इत्यादि वाक्यांनीं मोठा दोष सांगितला आहे. आतां पुनः विद्याविषयातील श्रुतिवचन-) —**'ब्रह्म वेद ब्रह्म एव भवति'** —(मुंडक.भाष्यार्थ.३.२.९पृ. ११८) जो ब्रह्माला 'तेच मी' असे आत्मत्वाने जाणतो तो ब्रह्मच होतो. ( अविद्याविषयातील आणखी श्रुति-)—**'अन्योऽसावन्योऽहमस्मीति न स वेद यथा पशु एवं स देवानां'**—(बृ. भाष्यार्थ अ.१ पृ.३३४) हा निराळा व मी निराळा आहे, असे जो समजतो तो आत्मतत्त्वाला जाणत नाही. जसा पशु आम्हां मनुष्यांना मोठा उपकारक वाटतो तसा तो अज्ञ देवांना उपकारक वाटतो. (विद्याविषयांतील वाक्य-)—**'यः आत्मविद् सः इदं सर्वं भवति'**—जो आत्मवेत्ता असतो तो हें सर्व प्रत्यगात्मभूत पूर्ण ब्रह्म होतो. (ज्ञानानेच कैवल्य याविषयीं आणखीं एक वचन-)—**'यदा चर्मवत्०'**—मनुष्य आकाशाला चामड्यानें मढवूं शकत नाहीं.त्याप्रमाणेंच परमात्म्याचा प्रत्यगात्मरूपानें अनुभव घेतल्यावांचून जीव मुक्त होत नाही (श्वेता.६.२०)—**इत्याद्याः सहस्रशः**—इत्यादि विद्याविषय व अविद्याविषय यांतील फलभेद सांगणाऱ्या सहस्रशः श्रुति आहेत. —**स्मृतयः च**—असा विद्याविद्यांचा फलभेद सांगणाऱ्या स्मृतिहि आहेत-( अविद्याविषयांतील वाक्य-)—**' अज्ञानेन आवृतं ज्ञानं तेन मुह्यन्ति जन्तवः'**—(अ. ५ श्लो. १५ पृ.५१०) अज्ञानानें ज्ञानाला आच्छादित केले आहे.त्यामुळे प्राणी मोहित होतात. ( आतां विद्याविषयांतील दोन वाक्यें-)—**' इहैव तैः जितः सर्गः येषां साम्ये स्थितं मनः'**—(अ.५श्लो.१९पृ.५१४) ज्यांचें मन साम्यामध्यें-सम-

ह्मामध्ये स्थित आहे त्यांनी येथें या जिवंतदशेतच पुढील जन्म जिंकला आहे.—**'समं श्यन् हि सर्वत्र' इत्याद्या**ः—सर्वत्र उत्तम प्रकारें स्थित असलेल्या सम ब्रह्माला ाहणारा आपणच आपला नाश करून घेत नाही. ( अनर्थाचा नाश हे विद्येचे फल ाहे व अनर्थाची प्राप्ति हे अविद्येचें फल आहे, हे अन्वय-व्यतिरेकन्यायानेहि सिद्ध होतें, ासे सागतात-)—**न्यायत. च**—आणि न्यायानेहि असेच ठरते-पण या न्यायावि· यी अगोदर पुराणाची समति दाखवितात—**' सर्पान् कुशाग्राणि तथा उदपानं ात्वा मनुष्या· परिवर्जयन्ति '**—सर्प, दर्भाची अग्रे-काटे वगैरे, तशीच विहीर- ड्डा वगैरे याना पुढे पाहून मनुष्य दुसऱ्या मार्गाने-त्याना सोडून पलीकडून जातात. सर्प काटे यावर पाय देत नाहीत व खड्डयात पडत नाहींत. अर्थात् अशा अनर्थात न पडणे, ज्ञानाचें फल आहे.—**केचित् अज्ञानतः तत्र पतन्ति**—पुढे सर्प आहे, हें न ळल्यामुळे मनुष्य त्यावर पाय देतो अज्ञानामुळेच काट्यावर पाय पडून ते पायात ोचतात व तो विहिरीतहि पडतो —**'यथा ज्ञाने विशिष्टं फलं (स्यात् तथा ) श्य '**—यावरून जसे ज्ञानामध्ये-आत्मज्ञानात विशिष्ट फल असते तसे पहा-[ याच यायाने आत्मज्ञानात विशिष्ट फल आहे, असे पहा. असा भावार्थ. ]

**तथा च देहादिष्वात्मबुद्धिरविद्वान्रागद्वेषादिप्रयुक्तो धर्माधर्मानुष्ठानकृज्जायते म्रियते ात्यवगम्यते । देहादिव्यतिरिक्तात्मदर्शिनो रागद्वेषादिप्रहाणापेक्षधर्माधर्मप्रवृत्त्युपशमा- मुच्यन्त इति न केनचित्प्रत्याख्यातुं शक्यं न्यायतः । तत्रैवं सति क्षेत्रज्ञस्येश्वरस्यैव ातोऽविद्याकृतोपाधिभेदतः संसारित्वमिव भवति । यथा देहाद्यात्मत्वमात्मनः । सर्वज- तूनां हि प्रसिद्धो देहादिष्वनात्मस्वात्मभावो निश्चितोऽविद्याकृतः । यथा स्थाणौ पुरुषनि- ायो न चैतावता पुरुषधर्मः स्थाणोर्भवति स्थाणुधर्मो वा पुरुषस्य तथा न चैतन्यधर्मो हस्य वा देहधर्मो चेतनस्य । सुखदु.खमोहात्मकत्वादिरात्मनो न युक्तोऽविद्याकृतत्वा- वेशेषाज्जरामृत्युवत् ॥**

**भाष्यार्थ**—( वर ' न्यायत च ' असे म्हणून सुचविलेल्या अन्वय-व्यतिरेकन्यायाचें वेवरण-) —**तथा च**—तो न्यायच कसा आहे, पहा—( अगोदर अन्वय दाखवि- ात-)—**देहादिषु आत्मबुद्धिः अविद्वान् रागद्वेषादिप्रयुक्त· धर्माधर्मानु· ानकृत् जायते म्रियते च इति अवगम्यते**—देह, इन्द्रिये इत्यादिकामध्यें याची आत्मबुद्धि आहे, असा देहादिकांनाच आत्मा मानणारा अविद्वान् म्ह० अनादि ।विद्येने आच्छादित झालेला चिदात्मा देहादि अनात्म्यामध्ये आत्मबुद्धीचा आरोप क- ेतो. अशा देहाध्यासाने युक्त असलेला तो राग-द्वेषादिकांकडून प्रेरणा केला जातो. ाग-द्वेषानी प्रेरित झालेला तो धर्माधर्मादि कर्माचे अनुष्ठान करितो, व ते कर्म करणारा ो आपल्या कर्माप्रमाणे नवीन देह घेऊन जुना देह टाकतो, [ नवीन देह घेणे हाच न्म, व जुना टाकणे हाच नाश आहे' ] याप्रमाणे अविद्यावानाचें संसारित्व ज्ञात होते. जेव्हा आत्म्याचे अज्ञान असते तेव्हाच संसारित्व असते, ही गोष्ट सिद्ध झाली. या- ्माणें अन्वयन्याय दाखवून व्यतिरेकन्याय दाखवितात-]—**देहादिव्यतिरिक्त·**

**आत्मदर्शिनः रागद्वेषादिप्रहाणापेक्षधर्माधर्मप्रवृत्त्युपशमात् मुच्यन्ते इति केनाचित् न्यायतः प्रत्याख्यातुं न शक्यं**—आत्मा देहादिकांहून व्यतिरिक्त आहे, भिन्न आहे, असें पाहणारे ज्ञानी राग-द्वेष इत्यादिकांच्या त्यागाच्या अपेक्षेनें धर्म व अधर्म यांच्या प्रवृत्तीचा उपशम झाल्यामुळे मुक्त होतात [म्ह० त्यांनीं रागद्वेषादिकांचा त्याग केल्यामुळें त्यांच्या धर्माधर्मादि प्रवृत्तीचाहि उपशम होतो व त्यामुळें ते संसारबंधांतून मुक्त होतात-] हें कोणालाहि न्यायानें नाकबूल करतां येणें शक्य नाहीं. [श्रुति, स्मृति व युक्ति, यांवरून देह व आत्मा यांचा अत्यंत भेद आहे, असें निश्चित ज्ञान झालें असतां राग व द्वेष यांचा अभाव होतो.रागद्वेषांच्या अभावीं धर्माधर्मसंज्ञक कर्मांचा अभाव होतो. त्यामुळे सर्व प्रकारच्या संसाराचा अभाव होतो. याप्रमाणें अविद्या नाहींशी झाली कीं बंधाचा नाश होतो, व ही गोष्ट अन्वय-व्यतिरेकादिन्यायाला मानणाऱ्या कोणाहि वाद्याला न्यायदृष्ट्या अमान्य होणें शक्य नाही. कारण या अन्वय-व्यतिरेकांची व्यवस्था दुसऱ्या कोणत्याहि मार्गानें लावतां येत नाहीं. ]—**तत्र एवं सति क्षेत्रज्ञस्य ईश्वरस्य एव सतः अविद्याकृत-उपाधिभेदतः संसारित्वं इव भवति**—याप्रमाणें या अन्वय-व्यतिरेकांची अन्यरीतीनें उपपत्ति लागत नसल्यामुळें क्षेत्रज्ञ ईश्वरच असतांना अविद्याकृत उपाधिभेदामुळें त्याला जणुंकाय संसारित्वसें प्राप्त होतें. [ वर सांगितलेल्या न्यायानें ज्ञान व अज्ञान यांचें स्वरूप व कार्य या दोहोंचाहि भेद आहे. त्यामुळें पर व अपर म्ह० ईश्वर व जीव याचें स्वभावतः जरी ऐक्य असलें तरी बुद्धि, इंद्रियें, मन, देह, इत्यादि उपाधींच्या भेदामुळें आत्म्याचें कल्पित संसारित्व सिद्ध होतें. अहोपण आत्म्याचें ब्रह्मत्व जर स्वतःसिद्ध असेल तर ' अहं ' अशा आत्मभावानें तीं ब्रह्मताहि भासेल ! अशी आशंका घेऊन सांगतात-]—**यथा देहाद्यात्मत्वं आत्मनः**—जसें आत्म्याचें देहादिरूपत्व स्वतःच भासतें त्याप्रमाणें [म्ह० आत्मा देहादिकांहून अगदीं पृथक् आहे ही गोष्ट वैदिकपक्षांत जरी स्वतःसिद्ध असली तरी तो आत्मा ' मी ' या रूपानें भासत असतांनाच त्याचें देहादिकांहून भिन्नत्व भासत नाहीं. तर अविद्येमुळें ' देहादिच मी ' असें विपरीत ज्ञान होतें. त्याचप्रमाणें आत्म्याचें ब्रह्मत्व स्वाभाविक जरी असलें तरी ते भासत असतांनाच त्याचे ब्रह्मत्व भासत नाहीं. तर अविद्येमुळें त्याचें अब्रह्मत्वच भासतें. आत्म्याचें देहाद्यात्मत्व अविद्येनें भासतें, असें जें सांगितलें तेंच अनुभवानें स्पष्ट करितात-]—**सर्वजन्तूनां हि देहादिषु अनात्मसु अविद्याकृतः निश्चितः आत्मभावः प्रसिद्धः**—सर्व प्राण्यांचा देहादि अनात्म्यामध्यें अविद्याकृत निश्चित आत्मभाव प्रसिद्ध आहे. [ अज्ञानामुळे प्रत्येक प्राणी देहेंद्रियसमूहाला 'मी' असें निश्चित जाणतो. त्याला त्याविषयीं संशयहि येत नाहीं. अज्ञानामुळें एका वस्तूमध्यें दुसऱ्या वस्तूची कल्पना होते, याविषयीं दृष्टान्त-]—**यथा स्थाणौ पुरुषनिश्चयः**—ज्याप्रमाणें स्थाणूमध्यें म्ह० खांबामध्यें पुरुषाचा निश्चय. [ पुढील खांब हा मनुष्य आहे किंवा चोर आहे, हें जसें खांबाच्या अज्ञानामुळें भासतें त्याप्रमाणें देहामध्यें आत्मभान होतें. ]—**च एतावता पुरुषधर्मः स्थाणोः न भवति**—

पण अज्ञानामुळें खांबाला पुरुष जरी मानलें तरी तेवढ्यावरून पुरुषाचा जो हात-पाय-मस्तक इत्यादि धर्म तो स्थाणूचा आहे, असें होत नाहीं.—**स्थाणुधर्मः वा पुरुषस्य ( न भवति )**—किंवा स्तंभाचा जो वांकडेपणा वगैरे धर्म हा पुरुषाचा धर्म आहे, असे होत नाही—**तथा चैतन्यधर्मः देहस्य वा देहधर्मः चेतन्यस्य न**—त्याच न्यायानें चैतन्य हा देहाचा धर्म किंवा जरा-मरणादि देहधर्म हा चेतनाचा धर्म केव्हांहि होणें शक्य नाहीं. ( जरादिक हा जरी अनात्म्याचा धर्म असला तरी सुखादिक हा आत्मधर्म आहे, असें कित्येक म्हणतात. म्हणून आचार्य त्या मताचे निरसन करितात-)—**सुखदुःखमोहात्मकत्वादिः जरामृत्युवत् आत्मनः न युक्तः अविद्याकृतत्वाविशेषात्**—सुख, दुःख, मोहात्मकत्व इत्यादिक हा जरा-मरणाप्रमाणेच आत्म्याचा धर्म असणे युक्त नव्हे. [ कारण काम, संकल्प, संशय, इत्यादि हे सर्व मनच आहे, अशा अर्थाची श्रुति असून ती सुखादि सर्व धर्म मनाचे म्ह० अनात्म्याचे आहेत, असे सांगते. अर्थात् जरा व मरण हे देहधर्म असून ते आत्म्याचे आहेत, असे पुरुष ज्याप्रमाणे अज्ञानाने समजतो त्याचप्रमाणें सुख, दुःख हे मनाचे-अन्तःकरणाचे धर्म असून पुरुष अज्ञानानेंच ते माझे असे मानतो. ]

**नातुल्यत्वादिति चेत्, स्थाणुपुरुषौ ज्ञेयावेव सन्तौ ज्ञात्राऽन्योन्यस्मिन्नध्यस्तावविद्यया देहात्मनोस्तु ज्ञेयज्ञात्रोरेवेतरेतराध्यास इति न समो दृष्टान्तोऽतो देहधर्मो ज्ञेयोऽपि ज्ञातुरात्मनो भवतीति चेत् । नाचैतन्यादिप्रसङ्गात् । यदि हि ज्ञेयस्य देहादेः क्षेत्रस्य धर्माः सुखदुःखमोहेच्छादयो ज्ञातुर्भवन्ति तर्हि ज्ञेयस्य क्षेत्रस्य धर्माः केचनाऽऽत्मनो भवन्त्यविद्याध्यारोपिता जरामरणादयस्तु न भवन्तीति विशेषहेतुर्वक्तव्यः । न भवन्तीत्यस्त्यनुमानमविद्याध्यारोपितत्वाज्जरादिवदिति हेयत्वादुपादेयत्वाच्चेत्यादि ॥**

**भाष्यार्थ**—( पण स्तंभाच्या ठिकाणी अज्ञानाने पुरुषाची बुद्धि जशी होते तशी देहाचे ठिकाणी अज्ञानानें आत्मबुद्धि होते, हे म्हणणे अयोग्य आहे, अशी शंका-)—**न । अतुल्यत्वात् इति चेत्**—पण हे म्हणणे बरोबर नाही. कारण दृष्टान्त व दार्ष्टान्तिक यांचे साम्य नाही, वैषम्य आहे. म्हणून म्हणाल तर ( ते बरोबर नाही, असा पुढे संबंध. आतां अगोदर या संक्षिप्त वाक्याचाच अर्थ विशद करितात-)—**स्थाणुपुरुषौ ज्ञेयौ एव सन्तौ ज्ञात्रा अविद्यया अन्योन्यस्मिन् अध्यस्तौ**—स्थाणु-स्तंभ व पुरुष हे दोन्ही ज्ञेयच असून ज्ञात्या पुरुषानें अविद्येने त्यांचा एकमेकांवर आरोप केला आहे.—**तु देहात्मनोः ज्ञेयज्ञात्रो एव इतरेतराध्यासः इति न समः दृष्टान्तः**—पण देह व आत्मा कीं ज्यांतील देह ज्ञेय असून आत्मा ज्ञाता आहे, अशा दोघांचाच इतरेतराध्यास होतो, त्यामुळे स्थाणुपुरुषाचा दृष्टान्त सम नाही विषम आहे.—**अतः देहधर्मः ज्ञेयः अपि ज्ञातुः आत्मनः भवति**—यास्तव देहधर्म ज्ञेय जरी असला तरी ज्ञात्या आत्म्याचा 'तो होतो.—**इति चेत्**—असें म्हणाल तर —**न । अचैतन्यादिप्रसंगात्**—ते बरोबर नाहीं. कारण उपाधीचे सुखादि धर्म वस्तुतः उपहित जीवामध्यें आहेत,असें मानल्यास जीवाचे ठिकाणीं अचैतन्यादि उपाधि-

धर्महि आहेत असें म्हणण्याचा प्रसंग येईल. [ म्हणजे हा अतिप्रसंगच आहे; तो कसा, तेंच स्पष्ट करितात-]—**यदि हि ज्ञेयस्य देहादेः क्षेत्रस्य सुखदुःखमोहेच्छादयः धर्माः ज्ञातुः भवन्ति**—कारण जर ज्ञेयाचे म्ह० देहादि क्षेत्राचे सुख, दुःख, मोह, इच्छा इत्यादिक धर्म ज्ञात्याचे होऊं लागले—**तर्हि ज्ञेयस्य-क्षेत्रस्य धर्माः केचन अविद्याध्यारोपिताः आत्मनः भवन्ति**—तर ज्ञेय जें क्षेत्र त्याचे कांहीं धर्मच अविद्येच्यायोगाने अध्यारोपित झालेले असे होत्साते आत्म्याचे होतात—**तु जरामरणादयः न भवन्ति**—पण जरा-मरणादिक होत नाहीत—**इति विशेषहेतुः वक्तव्यः**—याविषयीं काहीं विशेष हेतु सांगितला पाहिजे. [ क्षेत्र म्ह० शरीरेंद्रियसमूह, ते ज्ञेय आहे. म्ह० ज्ञानाचा विषय आहे व आत्मा ज्ञाता आहे. त्यामुळे वर स्थाणुपुरुषाचा जो दृष्टान्त दिला होता तो येथे लागू होत नाहीं. कारण स्थाणु व पुरुष हे दोन्ही ज्ञेय आहेत, त्यांना जाणणारा पुरुष तिसराच असतो व तो अज्ञानामुळें त्या दोघाचा अन्योन्याध्यास करितो. म्ह० खांबाला अज्ञानाने पुरुष समजतो. त्यामुळे खांबाचे धर्म पुरुषामध्ये व पुरुषाचे धर्म खांबामध्ये येत नाहीत, हे ठीकच आहे, पण प्रस्तुत विषयांत देह -ज्ञेय व आत्मा-ज्ञाता याचा अन्योन्याध्यास झाला आहे. त्यामुळे देहाचे धर्म हे आत्मधर्म होऊं शकत नाहीत, असे म्हणतां येत नाहीं, असे वाद्यानें म्हटले असतां आचार्य म्हणतात—अनात्म्याचे धर्म आत्म्याच्या ठिकाणीं खरोखरच येतात असे म्हटल्यास अनात्म्याचे सर्व धर्म हे आत्म्याचे धर्म झाले पाहिजेत.मग आत्मा जडहि होईल. कारण अनात्मा-देह जड आहे.बरे सुखदुःखादि काही धर्मच अविद्येमुळे आत्म्याचे ठिकाणी येतात व जरा-मरण अचैतन्य वगैरे काहीं येत नाहीत, असे मानावे, तर त्याचेहि तसेच कांहीं तरी विशेष कारण सांगितलें पाहिजे. पण ते तर सांगतां येत नाही. यास्तव सुखादिकहि आत्मधर्म नव्हेत, तर ते उपाधीचे धर्म आहेत. अर्थात् सुखादिक हे आत्मधर्म आहेत व अचैतन्य, जरा, मरण हे आत्मधर्म नाहीत, याविषयीं कांहीं विशेष कारण सांगतां येत नाहीं. पण याच्या उलट सुखादिकहि आत्म्याचे धर्म नव्हेत, याविषयीं मात्र असे अनुमान करितां येतें, असे सांगतात-]—**न भवन्ति इति अनुमानं अस्ति**—पण सुखादिक हे उपाधीचे धर्म, आत्मधर्म कधीच होऊं शकत नाहीत, याविषयीं अनुमानप्रमाण आहे—**अविद्याध्यारोपितत्वात् जरादिवत् इति**—सुखादिक हा आत्मधर्म नव्हे. कारण तो अज्ञानाने आत्म्यावर आरोपिलेला आहे. जरा, मरण इत्यादिकांप्रमाणे. ( तसेंच दुसरे अनुमान-)—**हेयत्वात् उपादेयत्वात् च इत्यादि**—सुखादि आत्मधर्म नव्हे, कारण त्याला हेयत्व व उपादेयत्व आहे. सुखादिक उत्पन्न होणारें व नाश पावणारे आहे. संसाराप्रमाणे. तसेच सुखादिक दृश्य आहे; जड आहे, देहाप्रमाणे, इत्यादि अनुमानप्रमाणाने सुखादिक आत्मधर्म नव्हेत हे सिद्ध होते.

**तत्रैवं सति कर्तृत्वभोक्तृत्वलक्षणः संसारो ज्ञेयस्थो ज्ञातर्यविद्ययाऽध्यारोपित इति न तेन ज्ञातुः किंचिद्दुष्यति। यथा बालैरध्यारोपितेनाऽऽकाशस्य तलमलवत्त्वादिना एवं च सति सर्वक्षेत्रेष्वपि सतो भगवतः क्षेत्रज्ञस्येश्वरस्य संसारित्वगन्धमात्रमपि नाऽऽशङ्क्यम्। न हि क्वचिदपि लोकेऽविद्याध्यस्तेन धर्मेण कस्यचिदुपकारोऽपकारो वा दृष्टः॥**

**भाष्यार्थ—तत्र एवं सति**—जरा-मरण-अचैतन्य इत्यादिकांप्रमाणें सुख, दुःख, मोह, इच्छा इत्यादिकाहि आत्मधर्म नव्हेत, असें सिद्ध झाले असतां—**कर्तृत्व-भोक्तृत्वलक्षणः संसारः ज्ञेयस्थः ज्ञातरि अविद्यया अध्यारोपितः**—कर्तृत्व-भोक्तृत्वरूप संसार ज्ञेयामध्ये असलेला ज्ञात्यामध्ये अविद्येनें आरोपिलेला आहे. [ म्ह० कर्तृत्वादिरूप संसार वस्तुतः ज्ञेय जे क्षेत्र त्याचा धर्म असतांना अज्ञानामुळे तो ज्ञात्या आत्म्याचा आहे, असे मानले जातें. ]—**इति तेन ज्ञातुः किंचित् न दुष्यति**—त्यामुळे तसल्या त्या आरोपित संसाराच्या योगाने ज्ञात्याचे कांहीच दूषित होत नाही. [ म्ह० ज्ञात्याला त्याचा कांही लेप लागत नाही. आरोपिताचा अधिष्ठानाला वस्तुतः स्पर्शहि होत नाही, याविषयीं दृष्टान्त-]—**यथा बालैः अध्यारोपितेन आकाशस्य तलमलवत्त्वादिना**—ज्याप्रमाणे मूढांनी आरोपिलेल्या-भ्रमानें कल्पिलेल्या आकाशाच्या तलमलवत्त्वादिकांच्या योगाने आकाश दूषित होत नाही, [ म्ह० मूढांनी आकाशाला तळ आहे, ते मळकट आहे, लाल, नीलवर्ण इत्यादि आहे असे जरी कल्पिलें तरी आकाश वस्तुतः तल, मल इत्यादि दोषांनी युक्त होत नाही. ]—**एवं च सति**—आणि याप्रमाणे परमात्म्याहून पृथक् नसलेल्या आत्म्यामध्ये संसार आरोपित आहे, असे सिद्ध झाले असता—**सर्वक्षेत्रेषु अपि सतः भगवतः क्षेत्रज्ञस्य-ईश्वरस्य संसारित्वगन्धमात्रं अपि न आशंक्यं**—सर्वक्षेत्रांमध्येहि असलेल्या भगवानाला-क्षेत्रज्ञाला-ईश्वराला संसारित्वाचा नुस्ता गंध तरी असेल अशी नुस्ती शंकाहि घेऊं नये. ( आत्म्याच्या ठिकाणी संसार आरोपित असल्यामुळे आत्मस्वरूप परमात्म्यामध्यें त्या संसाराची नुस्ती कल्पना करणेहि अयुक्त आहे, असे उपपादन करितात-)—**लोके क्वचित् अपि अविद्याध्यस्तेन धर्मेण कस्यचित् उपकारः अपकारः वा न हि दृष्टः**—व्यवहारांत कोठेहि अविद्येने आरोपिलेल्या-भ्रमाने भासलेल्या धर्माने कोणालाहि अपकार किंवा उपकार झालेला दिसत नाही, हे प्रसिद्ध आहे. [ भ्रमाने भासलेल्या गुणाने किंवा दोषाने त्याचे अधिष्ठान गुणयुक्त किंवा दोषयुक्त होत नाही, असे आपण व्यवहारांत नेहमी पाहतो. ]

**यत्तूक्तं न समो दृष्टान्त इति । तदसत् । कथम् । अविद्याध्यासमात्रं हि दृष्टान्तदार्ष्टान्तिकयोः साधर्म्यं विवक्षितम् । तन्न व्यभिचरति । यत्तु ज्ञातरि व्यभिचरतीति मन्यसे तस्याप्यनैकान्तिकत्वं दर्शितं जरादिभिः । अविद्यावत्त्वात्क्षेत्रज्ञस्य संसारित्वमिति चेत् । न, अविद्यायास्तामसत्वात् । तामसो हि प्रत्यय आवरणात्मकत्वादविद्या विपरीतग्राहकः संशयोपस्थापको वाऽग्रहणात्मको वा । विवेकप्रकाशभावे तदभावात् । तामसे चाऽऽवरणात्मके तिमिरादिदोषे सत्यग्रहणादेरविद्यात्रयस्योपलब्धेः ॥**

**भाष्यार्थ—तु दृष्टान्तः समः न इति यत् उक्तं**—पण स्थाणुपुरुषाचा दृष्टान्त सम नाही. कारण स्थाणु व पुरुष हे दोन्हीही ज्ञेय असून त्यांच्यावर अन्योन्याध्यास करणारा ज्ञाता निराळाच असतो, म्ह० अध्यास दोन ज्ञेयांमध्ये होतो, पण दार्ष्टान्तिकात ज्ञेय व ज्ञाता यांचा अन्योन्याध्यास होतो. त्यामुळें पूर्वोक्त दृष्टान्त विषम आहे, म्हणून

जें वर म्हटलें आहे—**तत् असत्**—तें खोटें आहे. दृष्टान्त व दार्ष्टान्तिक यांमध्यें वैषम्य नाहीं, साम्यच आहे.—**कथं**—तें कसें ?—**दृष्टान्त-दार्ष्टान्तिकयोः अविद्याध्यासमात्रं हि साधर्म्यं विवक्षितं**—दृष्टान्त-स्थाणुपुरुष व दार्ष्टान्तिक-आत्मा व अनात्मा यांमध्ये केवल अविद्याध्यास हेच साधर्म्य विवक्षित आहे.-अज्ञानानें एकाचा अध्यास दुसऱ्या पदार्थावर होणें, हें साम्य येथें इष्ट आहे.—**तत् न व्यभिचरति**—त्याचा येथे व्यभिचार होत नाहीं. [ तें दृष्टान्त व दार्ष्टान्तिक या दोहोंमध्यें एकसारखेंच आहे. अहोपण, एका ज्ञेयाचा दुसऱ्या ज्ञेयाच्या ठिकाणीच आरोप होतो, असा नियम असल्यामुळें ज्ञात्या-आत्म्याच्या ठिकाणी ज्ञेय-अनात्म्याचा आरोप होणें शक्य नाहीं, अशी आशंका घेऊन सांगतात-]—**तु ज्ञातरि व्यभिचरति इति यत् मन्यसे**—पण ज्ञात्याच्या ठिकाणी त्याचा व्यभिचार होतो, म्हणजे दोन ज्ञेयांचा परस्पर अध्यारोप जरी होत असला तरी ज्ञाता जो आत्मा त्यावर अनात्म्याचा अध्यारोप होत नाहीं, असें जे तूं समजतोस—**तस्य अपि जरादिभिः अनैकान्तिकत्वं दर्शितं**—त्याचेंहि म्ह० एका ज्ञेयाचाच दुसऱ्या ज्ञेयाच्या ठिकाणी अध्यारोप होतो, या नियमाचें जरादिकांशीं व्यभिचारित्व दाखविलें. [ज्ञात्याच्या ठिकाणींहि जरा-मरणादिकांचा आरोप होतो, हें दाखविलें, अर्थात् वरील नियम अबाधित नाहीं. त्यामुळे ज्ञात्याच्या ठिकाणीं ज्ञेयाचा आरोप होऊं शकत नाहीं, अशी नुसती शंकाहि येण्याचें काहीं कारण नाहीं. अहोपण, आत्म्यावर अविद्येचा अध्यास होत असल्यामुळे आत्म्यामध्ये ती स्वाभाविकच आहे. अर्थात् अविद्येमुळेंच आत्म्याचे ठिकाणीं प्राप्त होणारें संसारित्वाहि स्वाभाविक आहे अशी शंका-]—**अविद्यावत्त्वात् क्षेत्रज्ञस्य संसारित्वं इति चेत्**—क्षेत्रज्ञाला अविद्यावत्त्व असल्यामुळे म्ह० क्षेत्रज्ञ अविद्यावान् असल्यामुळें त्याला संसारित्व आहे, असे म्हणशील तर—**न**—तें बरोबर नाहीं, कारण—**अविद्यायाः तामसत्वात्**—अविद्येला तामसत्व आहे.—**तामसः हि प्रत्ययः आवरणात्मकत्वात् अविद्या**—तामस प्रत्ययच आवरणात्मक असल्यामुळे अविद्या होय.—**विपरीतग्राहकः संशयोपस्थापकः वा अग्रहणात्मकः वा**—मग तो तामस प्रत्यय विपरीत ग्रहण करविणारा असो, संशय उत्पन्न करणारा असो, की अग्रहणात्मक-वस्तूचें ज्ञानच न होणें, या स्वरूपाचा असो. [ तो कोणत्याहि स्वरूपाचा जरी असला तरी मूळ वस्तुस्वरूपाला आच्छादित करणारा असल्यामुळे तीच अविद्या आहे. विपरीत ग्रहणादिकांना अविद्याकार्यत्व आहे, हें विद्येच्या योगानें त्याचा बाध होतो, त्यावरूनच ठरतें, असें सांगतात- ]—**विवेकप्रकाश-भावे तदभावात्**—कारण विवेकरूप प्रकाश उत्पन्न होतांच त्या तामस प्रत्ययाचा अभाव होतो. म्हणून विपरीतग्रहणादि तामस प्रत्यय हें अविद्याकार्य आहे. [ कारण-अविद्या अनादि व अनिर्वाच्य आहे. त्यामुळें ती आत्मधर्म होऊं शकत नाहीं. कारण ती अनिर्वाच्य असल्यामुळेंच आत्म्याचा धर्म आहे, असेंहि म्हणतां येत नाहीं. शिवाय विपरीत ग्रहणादिक दोषांमुळें होते, असें अन्वय-व्यतिरेकन्यायानें सिद्ध होते. त्यामुळेंहि विपरीत ग्रहणादिक हा आत्म्याचा धर्म नव्हे, असें सांगतात-]—**तामसे च आवर-**

**णात्मके तिमिरादिदोषे सति अग्रहणादेः अविद्यात्रयस्य उपलब्धेः—** तामस आवरणात्मक तिमिरादिदोष विद्यमान असला म्हणजेच अग्रहणादि अविद्यात्रयाचा अनुभव येतो. [ तिमिर, काचबिंदु इत्यादि नेत्रगत दोष आहेत. त्यामुळें वस्तूचें खरें स्वरूप कळत नाही. कारण ते दोष वस्तूच्या स्वरूपज्ञानास प्रतिबंध करीत असतात. त्यामुळें वस्तूचें ज्ञान होत नाही. वस्तूविषयीं विपरीत कल्पना होते, म्ह० ती एक असतांना भलतीच दिसते किंवा तिच्याविषयीं संशय येतो, अर्थात् जेव्हां ज्ञानप्रतिबंधक दोष असतो तेव्हां अविद्या, मिथ्या ज्ञान व संशय यांचा प्रत्यय येतो. पण ज्यावेळीं असा कांही प्रकाशप्रतिबंधक दोष नसतो त्यावेळीं अविद्यादित्रयाचा अनुभव येत नाहीं. या अन्वय-व्यतिरेकन्यायानें विपरीत ग्रहणादिक दोषाधीन आहे. तिमिरादि दोषामुळें मिथ्या ज्ञान वगैरे होतें, असे सिद्ध होतें, त्यामुळे विपरीत ग्रहणादिक हे केवळ आत्म्याचे धर्म नव्हेत. ]

**अत्राऽऽहैवं तर्हि ज्ञातृधर्मोऽविद्या । न, करणे चक्षुषि तैमिरिकत्वादिदोषोपलब्धेः । यत्तु मन्यसे ज्ञातृधर्मोऽविद्या तदेव चाविद्याधर्मवत्त्वं क्षेत्रज्ञस्य संसारित्वम् । तत्र यदुक्तमीश्वर एव क्षेत्रज्ञो न संसारीत्येतदयुक्तमिति । तन्न यथा करणे चक्षुषि विपरीतग्राहकादिदोषस्य दर्शनान्न विपरीतादिग्रहणं तन्निमित्तो वा तैमिरिकत्वादिदोषो ग्रहीतुः । चक्षुषः संस्कारेण तिमिरेऽपनीते ग्रहीतुरदर्शनान्न ग्रहीतुर्धर्मो यथा तथा सर्वत्रैवाग्रहणविपरीतसंशयप्रत्ययास्तन्निमित्ताः करणस्यैव कस्यचिद्भवितुमर्हन्ति न ज्ञातुः क्षेत्रज्ञस्य ॥**

**भाष्यार्थ—अत्र आह**—यावर-विपरीतग्रहणादिक दोषांमुळे होतें, या म्हणण्यावर वादी आक्षेप घेतो—**एवं तर्हि अविद्या ज्ञातृधर्मः**—असे जर असेल म्ह० विपरीत ग्रहणादिकांचें निमित्त जर दोष असतील तर कोणत्याहि भावरूप कार्याचे उपादान कारण अवश्य असतेच, असा नियम असल्यामुळे आत्माच विपर्ययादिकांचे उपादान मानणें भाग आहे. अर्थात् अग्रहण, मिथ्या ग्रहण व संशय, अशी त्रिविध अविद्या हा ज्ञात्याचा धर्म आहे. [ पण विपरीतग्रहणादिकांचे उपादान सत्य आहे, असें मानल्यास विपरीत ग्रहणादिकहि सत्य आहेत, असे मानण्याचा प्रसंग येणार; पण त्यांना सत्य मानतां येत नाही, म्हणून आत्मा त्यांचे उपादान नव्हे, इत्यादि आशयाने या आक्षेपाचें समाधान-]—**न**—त्रिविध अविद्या हा ज्ञात्याचा-आत्म्याचा धर्म नव्हे.—**करणे चक्षुषि तैमिरिकत्वादिदोषोपलब्धेः**—कारण करण-इंद्रिय-साधन असा जो चक्षु त्यांत तैमिरिकादि दोषांची उपलब्धि होते. दोष इंद्रियांमध्यें दिसतो. ज्ञात्यामध्ये नाही. [ आतां याच आक्षेपाचें व समाधानाचे स्पष्टीकरण-] —**तु अविद्या ज्ञातृधर्मः**—पण अविद्या हा ज्ञात्याचा धर्म आहे.—**च तत् अविद्याधर्मवत्त्वं एव क्षेत्रज्ञस्य संसारित्वं इति यत् मन्यसे**—आणि तें अविद्याधर्मवत्त्व हेंच क्षेत्रज्ञाचें संसारित्व आहे, असें जें तूं ( वादी ) समजतोस—**तत्र ईश्वरः एव क्षेत्रज्ञः न संसारी इति एतत् अयुक्तं इति यत् उक्तं**—व याप्रमाणें क्षेत्रज्ञाला संसारित्व असल्यामुळे 'ईश्वरच क्षेत्रज्ञ आहे, तो संसारी नव्हे ' हें आमचें म्हणणें अयुक्त आहे असें जें तूं म्हटलेंस—

**तत् न**—तें बरोबर नाहीं.—**करणे चक्षुषि विपरीतग्राहकादिदोषस्य दर्शनात्**—करण—इंद्रिय असा जो चक्षु—चक्षुरिंद्रिय त्यांत विपरीतग्रहण करविणारा वगैरे दोष दिसत असल्यामुळें—**विपरीतादिग्रहणं वा तन्निमित्तः तैमिरिकत्वादिदोषः यथा ग्रहीतुः न**—विपरीतग्रहण वगैरे किंवा त्याचें निमित्त असा तैमिरिकत्वादि दोष हीं दोन्हीं जशीं ग्रहण करणाऱ्या ज्ञात्याचीं नव्हेत—कारण—**चक्षुषः संस्कारेण तिमिरे अपनीते ग्रहीतुः अदर्शनात्**—चक्षूला अंजन-औषधादिकांचे संस्कार करून त्यांतील तिमिरदोष घालविला असतां ग्रहण करणारा जो ज्ञाता जीव त्याच्या ठिकाणीं विपरीतग्रहणादि अविद्या किंवा तिमिर दिसत नाहीं. त्यामुळें—**ग्रहीतुः यथा धर्मः न**—ग्रहण करणाऱ्या ज्ञात्याचा जसा तो धर्म होऊं शकत नाहीं—**तथा सर्वत्र एव तन्निमित्ताः अग्रहण-विपरीत-संशयप्रत्ययाः कस्यचित् करणस्य एव भवितुं अर्हन्ति**—त्याप्रमाणे सर्वच ठिकाणीं दोषांच्या निमित्तानें—तिमिरादि दोषांमुळे येणारे जे अग्रहण, विपरीतग्रहण व संशय हे तीन प्रत्यय, ते कोणत्या तरी इंद्रियाचेच असणें योग्य आहेत.—**ज्ञातुः क्षेत्रज्ञस्य न**—ज्ञाता जो क्षेत्रज्ञ त्याचे ते प्रत्यय नव्हेत. [ विपरीत ग्रहण, अग्रहण व संशय दोषामुळें होतात असे जे वर म्हटलें आहे त्यासंबंधानें वादी म्हणतो—“ विपरीत ज्ञानादिकांचे कारण जर दोष असतील तर त्या दोषांचें उपादान कारण आत्माच असणे युक्त आहे. त्यामुळे विपरीत दर्शनादिरूप अविद्या हा ज्ञात्याचा म्ह० क्षेत्रज्ञाचा धर्म आहे आणि क्षेत्रज्ञाने अविद्याधर्मानें युक्त असणे हेच त्याचे संसारित्व आहे, अर्थात् ‘ ईश्वरच क्षेत्रज्ञ आहे व तो संसारी नव्हे,’ असे जे तुमचें म्हणणें आहे तें युक्त नव्हे ” या आक्षेपाचें समाधान आचार्य असें करितात—“ हे तुमचे म्हणणे बरोबर नाही. कारण विपरीत ज्ञान करून देणारा, म्ह० वस्तु एक असतांना ती भलतीच भासविणारा किंवा वस्तूचे मुळीच ज्ञान होऊं न देणारा, किंवा वस्तूविषयीं हा खांब आहे कीं, कोणी मनुष्य—चोर वगैरे आहे इत्यादि संशय उत्पन्न करणारा तैमिरादि दोष चक्षुः-श्रोत्र इत्यादि इंद्रियांमध्यें असतो. त्या वस्तूला पाहणारा जो ज्ञाता—आत्मा त्याच्यामध्यें दोष नसतो. कारण चक्षुः-श्रोत्र इत्यादि इंद्रियांना अंजन—औषध वगैरे घालून संस्कार केला असतां तिमिर, बहिरेपणा वगैरे जातो व मग ज्ञात्या-क्षेत्रज्ञाला वस्तूचें विपरीतज्ञान वगैरे होत नाहीं. जर दोष ज्ञात्यामध्यें असता तर तो इंद्रियाला संस्कार केल्यानें गेला नसता. अर्थात् दोषाचें उपादान आत्मा नव्हे.करण-इंद्रिय आहे. हाच न्याय सर्व प्रकारच्या अविद्येला लागू आहे. त्यामुळें तिमिरादि दोष व त्या दोषांमुळे येणारे विपरीतग्रहणादि प्रत्यय कोणत्या तरी इंद्रियाचे धर्म आहेत, क्षेत्रज्ञाचे नव्हेत, ही गोष्ट सिद्ध झाली. ” ]

**संवेद्यत्वाच्च तेषां प्रदीपप्रकाशवन्न ज्ञातृधर्मत्वम् । संवेद्यत्वादेव स्वात्मव्यतिरिक्तसंवेद्यत्वम् । सर्वकरणवियोगे च कैवल्ये सर्ववादिभिरविद्यादिदोषवत्त्वानभ्युपगमात् । आत्मनो यदि क्षेत्रज्ञस्याग्न्युष्णवत्स्वो धर्मस्ततो न कदाचिदपि तेन वियोगः स्यात् । अविक्रियस्य च व्योमवत्सर्वगतस्यामूर्तस्याऽऽत्मनः केनचित्संयोगवियोगानुपपत्तेः । सिद्धं क्षेत्रज्ञस्य नित्यमेवेश्वरत्वम् । अनादित्वान्निर्गुणत्वादित्यादीश्वरवचनाच्च ॥**

**भाष्यार्थ**—( विपरीतग्रहणादिक हा आत्म्याचा धर्म नव्हे, यविषयीं आणखीं कारण सांगतात-)—**च तेषां संवेद्यत्वात् प्रदीपप्रकाशवत् न ज्ञातृधर्मत्वं**—आणि त्या विपरीतग्रहणादिकांना संवेद्यत्व असल्यामुळे म्ह० ते ज्ञानाचे विषय होणारे-ज्ञेय असल्यामुळे प्रदीप, प्रकाश इत्यादि वेद्य-ज्ञेय पदार्थाप्रमाणे ज्ञात्या-क्षेत्रज्ञाचे धर्म नव्हेत.—**संवेद्यत्वात् एव स्वात्मव्यतिरिक्तसंवेद्यत्वं**—तसेंच त्यांना संवेद्यत्व असल्यामुळे म्ह० ते विषय ज्ञेय-वेद्य असल्यामुळे स्वतःहून भिन्न अशा दुसऱ्याकडून जाणले जाण्यास योग्य आहेत. [ तसेंच, विपरीतज्ञानादि हा तत्त्वतः आत्मधर्म नव्हे. कारण त्याला कृशत्वादिकांप्रमाणें व्यभिचारित्व आहे, असे सांगतात-]—**च सर्वकरणवियोगे कैवल्ये सर्ववादिभिः अविद्यादिदोषवत्त्व-अनभ्युपगमात्**—आणि ज्यांत सर्व इंद्रियाचा वियोग होतो अशा कैवल्यात सर्व वाद्यांकडून अविद्यादि-दोषवत्त्वाचा स्वीकार केलेला नाहीं, म्ह० कैवल्यावस्थेंत-केवल आत्मस्वरूपावस्थेंत आत्म्यामध्यें अविद्यादि दोष असतात, असे कोणताच आत्मवादी मानीत नाहीं. [ याचेंच अधिक विवरण करणारे भाष्यकार विपरीतग्रहणादिक हा आत्म्याचा स्वाभाविक धर्म आहे की आगंतुक असा विकल्प करून त्यातील पहिल्या पक्षाचे निरसन करितात-]—**यदि अग्नि-उष्णवत् क्षेत्रज्ञस्य आत्मनः स्वः धर्मः ततः कदाचित् अपि तेन वियोगः न स्यात्**—जर अग्नीच्या उष्णाप्रमाणे क्षेत्रज्ञ-आत्म्याचा अविद्यादिक स्वाभाविक धर्म असेल तर केव्हांहि त्याच्याशी त्याचा वियोग होणार नाहीं. [ त्यामुळे मोक्षाची आशाच करावयास नको. कारण अविद्या व अविद्याकार्य यांना स्वाभाविक मानल्यास त्यांचा ध्वंस नाश शक्यच नाहीं, आणि अविद्यादिकाचा ध्वंस झाल्यावांचून कैवल्याचा संभव नाहीं. म्हणून अविद्यादिक हा आत्म्याचा आगंतुक धर्म आहे असेंच मानणे भाग आहे. पण तो आगंतुक धर्म स्वतः आहे की परतः, असा विचार करूं लागल्यास स्वतः आहे म्ह० काही निमित्तावांचूनच तो प्राप्त होतो, असे म्हटल्यास पुनः मोक्षाचा असंभव होतो. कारण कांही निमित्तावाचूनच प्राप्त होणारा अविद्यादिधर्म केव्हा प्राप्त होईल, त्याचा काही नियमच नाही. म्हणून तो परतःच मानला पाहिजे. यास्तव त्याविषयी आचार्य म्हणतात-]—**च व्योमवत् अविक्रियस्य सर्वगतस्य अमूर्तस्य आत्मनः केनचित् संयोगवियोगानुपपत्तेः**—आणि आकाशाप्रमाणें अविक्रिय, सर्वगत, अमूर्त आत्म्याचा कोणाशींहि संयोग किंवा वियोग होण्याचा संभव नाहीं. [ आत्मा विभु, अविक्रिय व अमूर्त असल्यामुळें आकाशाप्रमाणेच त्याचा कोणत्याहि पदार्थाशी संयोग किंवा वियोग होत नाहीं. आत्मा आकाशाप्रमाणें असंग आहे. त्यामुळे दुसऱ्या पदार्थाशीं संसर्ग झाल्यामुळेंहि त्याच्या ठिकाणीं विपरीतग्रहादि संभवत नाहीत. याप्रमाणे विपरीतग्रहादि हा आत्मधर्म नव्हे असें सिद्ध झालें असतां कोणती गोष्ट निष्पन्न होते ते सांगतात-]—**क्षेत्रज्ञस्य नित्यं एव ईश्वरत्वं सिद्धं**—क्षेत्रज्ञाचे नित्यच ईश्वरत्व सिद्ध आहे. ( आत्म्याच्या सर्वधर्मराहित्याविषयी भगवानांची अनुमति दाखवितात-)—**च ' अनादित्वात् निर्गुणत्वात्० ' इत्यादि ई-**

**श्वरवचनात्**—आणि 'अनादित्वात् निर्गुणत्वात्०' इत्यादि ईश्वरवचनाचाहि आत्म्याच्या सर्वधर्मराहित्याला आधार आहे. [ विपरीतग्रहणादि वेद्य आहेत त्यामुळें इतर वेद्य-विषयांप्रमाणे ते ज्ञात्याचे-क्षेत्रज्ञाचे धर्म नव्हेत. ते वेद्य असल्यामुळेंच त्यांहून अगदीं पृथक् असलेल्या दुसऱ्या ज्ञात्याचेच विषय आहेत. सर्व इंद्रियादिकांचा वियोग होऊन कैवल्यप्राप्ति झाली असतां त्या अवस्थेंत आत्म्यामध्ये अविद्यादि दोष असतात असें कोणीहि मोक्षवादी मानीत नाहीं. शिवाय अविद्यादिक हा क्षेत्रज्ञ-आत्म्याचा जर स्वाभाविक दोष असेल तर त्याच्याशी त्याचा वियोग कधींच होणार नाही. त्यामुळें आत्म्याचें कैवल्य अशक्यच होईल. तसेच आत्मा आकाशाप्रमाणे विभु, अविक्रिय, अमूर्त व असंग असल्यामुळे त्याचा अविद्यादि दुसऱ्या कशाशींहि संयोग किंवा वियोग होऊं शकत नाही. त्यामुळे क्षेत्रज्ञाला नित्य ईश्वरत्व आहे हे सिद्ध झाले. भगवानांनींहि याच अध्यायांत पुढे ( श्लो. ३१ ) 'आत्मा सर्व धर्मशून्य आहे' असें सांगितले आहे. ]

**नन्वेवं सति संसारसंसारित्वाभावे शास्त्रानर्थक्यादिदोषः स्यादिति । न सर्वैरभ्युपगतत्वात् । सर्वैर्ह्यात्मवादिभिरभ्युपगतो दोषो नैकेन परिहर्तव्यो भवति । कथमभ्युपगत इति मुक्तात्मनां संसारसंसारित्वव्यवहाराभावः सर्वैरेवाऽऽत्मवादिभिरिष्यते । न च तेषां शास्त्रानर्थक्यादिदोषप्राप्तिरभ्युपगता । तथा नः क्षेत्रज्ञानामीश्वरैकत्वे सति शास्त्रानर्थक्यं भवतु । अविद्याविषये चार्थवत्त्वम् यथा द्वैतिनां सर्वेषां बन्धावस्थायामेव शास्त्राद्यर्थवत्त्वं न मुक्तावस्थायां एवम् ॥**

**भाष्यार्थ**—( अहोपण, आत्म्याला ईश्वरत्व आहे असें म्हटल्यास तो असंसारी आहे, असे म्हणावें लागते. पण मग विधिशास्त्र व प्रत्यक्षादिप्रमाणें ही सर्व व्यर्थ होतात, म्हणून आत्म्याचे संसारित्व तात्त्विकच मानले पाहिजे, असें वादी म्हणतो-)—**ननु एवं सति संसार-संसारित्वाभावे शास्त्रानर्थक्यादिदोषः स्यात् इति**—अहोपण, आत्मा ईश्वर आहे व त्यामुळेंच तो असंसारी आहे, असे मानल्यास संसार व संसारित्व यांचा अभाव होतो. त्यामुळे शास्त्राचे आनर्थक्य इत्यादि दोष येतो असे म्हणाल तर ( ते बरोबर नाहीं, असा पुढे संबंध. पण हें शास्त्राचे आनर्थक्य विद्यावस्थेंत होणार की अविद्यावस्थेत ? असा विकल्प करून पहिल्या पक्षीं सांगतात-)—**न**—तें बरोबर नाहीं.—**सर्वैः अभ्युपगतत्वात्**—कारण हा विद्यावस्थेंतील शास्त्रानर्थक्य दोष सर्व वाद्यांनीं स्वीकारलेला आहे. ( या संग्रहवाक्याचें विवरण-)—**सर्वैः हि आत्मवादिभिः अभ्युपगतः दोषः एकेन परिहर्तव्यः न भवति**—सर्व आत्मवाद्यांनीं स्वीकारलेला जो दोष त्याचा एकाच वाद्यानें परिहार करावा, असें होत नाहीं. —**कथं अभ्युपगतः इति**—सर्व वाद्यांनीं तो कसा स्वीकारलेला आहे ? असें म्हणाल तर सांगतो—**मुक्तात्मनां संसारसंसारित्वव्यवहाराभावः सर्वैः एव आत्मवादिभिः इष्यते**—ज्याचा आत्मा मुक्त झालेला आहे अशा मुक्तांच्या संसार व संसारित्व या व्यवहाराचा अभाव सर्वच आत्मवाद्यांकडून मानलेला आहे.—**च तेषां शास्त्रानर्थक्यादिदोषप्राप्तिः न अभ्युपगता**—पण मुक्तांना विधिशास्त्र व प्रत्यक्षादि-

प्रमाणें हीं सर्व व्यर्थ होतात, इत्यादि दोषांची प्राप्ति त्यांनीं स्वीकारलेली नाहीं. ( कारण व्यवहारातीत झालेल्या मुक्तांच्या ठिकाणीं गुणदोषांची शंकाच येत नाहीं. )—**तथा नः क्षेत्रज्ञानां ईश्वरैकत्वे सति शास्त्रानर्थक्यं भवतु**—द्वैत्यांच्या मतीं मुक्तात्म्यांचे ठिकाणीं शास्त्राचें आनर्थक्य वगैरे झालेलें जसें चालतें, त्याप्रमाणेंच आमच्या पक्षीं क्षेत्रज्ञांचें ईश्वराशीं एकत्व झालें असतां शास्त्राचे आनर्थक्य होऊं दे.—**च अविद्याविषये अर्थवत्त्वं**—व अविद्यावस्थेंत अर्थवत्त्व असूं दे.—**यथा सर्वेषां द्वैतिनां बन्धावस्थायां एव शास्त्रादि-अर्थवत्त्वं मुक्तावस्थायां न एवं**—ज्याप्रमाणे द्वैत्यांच्या पक्षीं बंधावस्थेतच शास्त्रादिकांचें अर्थवत्त्व आहे व मुक्तावस्थेत नाही, त्याप्रमाणे [ " अहो- पण, क्षेत्रज्ञच ईश्वर आहे व तो असंसारी आहे असें जर मानले तर संसारी जीवांसाठींच प्रवृत्त झालेले विधिशास्त्र-धर्मोपदेश करणारे वेदशास्त्र व प्रत्यक्षादि प्रमाणे हीं सर्व व्यर्थ होतील. पण विधिशास्त्र व प्रत्यक्षादि प्रमाणें यांवरून जीवांचा संसार व संसारित्व याचा व्यवहारात अनुभव येतो. यास्तव क्षेत्रज्ञाचे संसारित्व काल्पनिक नसून तात्त्विकच आहे, असें म्हटलें पाहिजे. " अशी वादी शंका घेईल म्हणून आचार्य म्हणतात. "हा दोष एकट्या अद्वैतवाद्यांवरच येत नाही. तर सर्व आत्मवाद्यांना तो दोष स्वीकारावा लागतो,आणि सर्वांनीच जो दोष कबूल केलेला असतो, त्याचा एकानेच परिहार करण्याचें काहीं कारणहि नसतें. सर्वांनीच शास्त्रानर्थक्यादि दोष कसा कबूल केला आहे ? म्हणून विचाराल तर सांगतों–सर्व द्वैती वादी मुक्त झालेल्या आत्म्यांचा संसार व संसारित्व, यांच्या व्यवहाराचा अभाव मानतात. मुक्तात्म्यांच्या ठिकाणीं त्या दोन्ही प्रकारचा व्यवहार संभवत नाहीं, असेच मानतात. पण त्यामुळे शास्त्राचें आनर्थक्य वगैरे दोष ते कबूल करीत नाहीत. कारण व्यवहारातीत झालेल्या त्यांच्या ठिकाणी गुण व दोष यांची शंकाच संभवत नाही. त्याच न्यायानें क्षेत्रज्ञाचे ईश्वराशीं ऐक्य झाल्यावर आमच्या पक्षींहि शास्त्रादि व्यर्थ ठरलीं तर ठरेनात. द्वैती वाद्यांच्या मुक्तात्म्यांना जसा शास्त्रांचा उपयोग नाहीं त्याचप्रमाणे आमच्या अद्वैत ज्ञानी पुरुषाला शास्त्राचा उपयोग नाही . पण अद्वैत आत्मसाक्षात्कार होण्यापूर्वी म्ह० अविद्यावस्थेत त्यांचा उपयोग आम्हांलाहि आहे म्ह० सर्व द्वैती वाद्यांना बंधावस्थेतच शास्त्रादिकांचा उपयोग असून मुक्तावस्थेत जसा तो नसतो त्याप्रमाणें आम्हांला अविद्यावस्थेंत शास्त्रादिकांचा उपयोग असून विद्यावस्थेत त्यांचा उपयोग नाहीं. " ]

**नन्वात्मनो बन्धमुक्तावस्थे परमार्थत एव वस्तुभूते द्वैतिनां नः सर्वेषामतो हेयोपादेयतत्साधनसद्भावे शास्त्राद्यर्थवत्त्वं स्यादद्वैतिनां पुनर्द्वैतस्यापरमार्थत्वादविद्याकृतत्वाद्बन्धावस्थायाश्चाऽऽत्मनोऽपरमार्थत्वे निर्विषयत्वाच्छास्त्राद्यानर्थक्यमिति चेत् । नाऽऽत्मनोऽवस्थाभेदानुपपत्तेः । यदि तावदात्मनो बन्धमुक्तावस्थे युगपत्स्यातां क्रमेण वा । युगपत्तावद्विरोधान्न संभवतः स्थितिगती इवैकस्मिन् । क्रमभावित्वे च निर्निमित्तत्वेऽनिर्मोक्षप्रसङ्गोऽन्यनिमित्तत्वे च स्वतोऽभावादपरमार्थत्वप्रसङ्गः । तथा च सत्यभ्युपगमहानिः ॥**

**भाष्यार्थ**—( पण या बाबतींत द्वैत्यांशी अद्वैत्यांचें साम्य नाहीं, अशी शंका-)— **ननु नः सर्वेषां द्वैतिनां आत्मनः बन्धमुक्तावस्थे परमार्थतः एव वस्तुभूते** -अहोपण, आम्हां सर्व द्वैत्यांच्या मतीं आत्म्याच्या बन्ध-मुक्तावस्था परमार्थतःच आहेत, त्या खऱ्याच आहेत,—**अतः हेय-उपादेय-तत्साधनसद्भावे शास्त्रादि-अर्थवत्त्वं स्यात्**—त्यामुळे त्याज्य, ग्राह्य व त्यांची साधनें यांच्या अस्तित्वाविषयीं शास्त्रादिकांचा उपयोग होतो. [ बंध व मोक्ष या दोन्ही अवस्था सत्य असल्यामुळें अमुक अनुष्ठेय आहे, अमुक अननुष्ठेय आहे, अमुक विहित आहे, अमुक अविहित आहे, अमुक धर्मसाधन आहे, अमुक अधर्मसाधन आहे इत्यादि ज्ञान होण्यासाठीं आम्हा द्वैत्यांना शास्त्रादिकांचा फार उपयोग होतो. ]—**पुनः अद्वैतिनां द्वैतस्य अपरमार्थत्वात् अविद्याकृतत्वात् च आत्मनः बन्धावस्थायाः अपरमार्थत्वे निर्विषयत्वात् शास्त्रादि-आनर्थक्यं**—पण अद्वैत्यांच्या मतीं द्वैत मिथ्या असल्यामुळे-अविद्याकृत[1] असल्यामुळे व आत्म्याची बन्धावस्था खरी नसल्यामुळे-बन्धावस्थाहि मिथ्या असल्यामुळे शास्त्रादिप्रमाणांना कांहीं विषयच उरत नाहीं, त्यामुळें शास्त्रादिकांना आनर्थक्य येते-अद्वैत्यांच्या मतीं शास्त्रादिक व्यर्थ ठरतात,—**इति चेत् न**—असें जर म्हणाल तर तें बरोबर नाहीं.—**आत्मनः अवस्थाभेदानुपपत्तेः**—कारण आत्म्याच्या अवस्थांचा भेद संभवत नाहीं. ( आत्म्याच्या अवस्थाभेदाची अनुपपत्तिच दाखविण्यासाठीं विकल्प करितात-)—**यदि तावत् आत्मनः बन्धमुक्तावस्थे युगपत् स्यातां क्रमेण वा**—जर आत्म्याला बंध-मुक्तावस्था आहेत असे मानलें तर त्या त्याला एकाच वेळीं होतात कीं क्रमाने?—**एकस्मिन् स्थितिगती इव विरोधात् युगपत् न संभवतः**—एकाच पुरुषाचे ठिकाणीं एकाच वेळीं स्थिति व गति या परस्पर विरोधी क्रिया जशा संभवत नाहींत, याप्रमाणेच विरोधामुळे त्या दोन अवस्था एकाच वेळीं आत्म्यामध्ये संभवत नाहींत. ( वास्तव त्या क्रमानेच प्राप्त होणाऱ्या आहेत, असें म्हटल्यास त्या क्रमाने होणाऱ्या अवस्था तरी कांहीं निमित्तानेच होतात कीं निमित्तावांचून होतात, असा विकल्प करून प्रत्येक पक्षीं कोणता दोष येतो, ते सांगतात-)—**च क्रमभावित्वे निर्निमित्तत्वे अनिर्मोक्षप्रसंगः**—पण त्या अवस्थांना क्रमभावित्व जर असेल व त्या कांहीं निमित्तावाचूनच प्राप्त होत असतील तर अनिर्मोक्ष प्रसंग येतो. म्ह० आत्म्याचा मोक्ष केव्हाच होणे शक्य नाहीं, असें होते. ( कारण बन्ध व मोक्ष होण्यास निमित्त कांहींच नाहीं, तेव्हां वाटेल तेव्हां बंध व वाटेल तेव्हां मोक्ष-अवस्था प्राप्त होईल. कारण, त्याला निमित्त कांहींच नाहीं.)—**च अन्यनिमित्तत्वे स्वतः अभावात् अपरमार्थत्वप्रसङ्गः**—बरें, त्या अवस्थांचें दुसरें कांहीं निमित्त आहे, आत्म्याला बंध व मोक्ष, या अवस्था प्राप्त होण्यास अन्य निमित्त

---

१ पण व्यावहारिक द्वैत अद्वैतीहि मानतात, असें यावर कोणी म्हणेल, म्हणून 'अविद्याकृतत्वात्' असें दुसरें विशेषण दिलें आहे. त्यावरून कल्पितद्वैतानेंहि व्यवहार होऊं शकत असल्यामुळें त्याला सत्यत्व नाहीं, हे सिद्ध होतें.

**आहे**, त्यामुळेच त्याला त्या अवस्था प्राप्त होतात, म्हणून म्हणावें तर त्या अवस्था खऱ्या-पारमार्थिक नव्हेत, असें ठरण्याचा प्रसंग येतो. [ आत्म्याच्या बंध व मोक्ष या अवस्था खऱ्या नाहीत. कारण त्या स्फटिकाच्या लालीप्रमाणे अस्वाभाविक आहेत, असें सिद्ध झालें असतां निष्पन्न काय होतें ते सांगतात-]—**तथा च सति अभ्युपगमहानिः**—आणि असें झालें असतां 'आत्म्याच्या या अवस्था सत्य आहेत' या सिद्धान्ताची हानि होते.

**किंच बन्धमुक्तावस्थयोः पौर्वापर्यनिरूपणायां बन्धावस्था पूर्वं प्रकल्प्याऽनादिमत्यन्तवती च तच्च प्रमाणविरुद्धं तथा मोक्षावस्थाऽऽदिमत्यनन्ता च प्रमाणविरुद्धैवाभ्युपगम्यते । न चावस्थावतोऽवस्थान्तरं गच्छतो नित्यत्वमुपपादयितुं शक्यम् । अथानित्यत्वदोषपरिहाराय बन्धमुक्तावस्थाभेदो न कल्प्यतेऽतो द्वैतिनामपि शास्त्रानर्थक्यादिदोषोऽपरिहार्य एवेति समानत्वान्नाद्वैतवादिना परिहर्तव्यो दोषः ॥**

**भाष्यार्थ**—( आत्म्याच्या बंध-मुक्तावस्था खऱ्या नाहीत, याविषयीं आणखीं कारण-)—**किंच बन्धमुक्तावस्थयोः पौर्वापर्यनिरूपणायां बन्धावस्था पूर्वं प्रकल्प्या**—शिवाय बंधावस्था व मुक्तावस्था यांतील पूर्वावस्था कोणती व उत्तरावस्था कोणती, याविषयीं विचार करूं लागले असतां बंधावस्था पूर्वी अशीच कल्पना करावी लागते.—**अनादिमती अन्तवती च**—तशीच ती अनादिमती व अन्तवती आहे म्ह० ती अनादि व सान्त आहे, अशी कल्पना होते.—**च तत् प्रमाणविरुद्धं**—पण ते प्रमाणविरुद्ध आहे.—**तथा मोक्षावस्था आदिमती च अनन्ता प्रमाणविरुद्धा एव अभ्युपगम्यते**—तशीच मोक्षावस्था आदिमती व अनन्त आहे असें प्रमाणाच्या विरुद्धच स्वीकारले जातें.—**अवस्थान्तरं गच्छतः अवस्थावतः नित्यत्वं उपपादयितुं न च शक्यं**—दुसऱ्या अवस्थेला प्राप्त होणाऱ्या अवस्थावानाच्या नित्यत्वाचे उपपादन करितां येणें शक्य नाहीं. [ बंध व मोक्ष या दोन अवस्थांतील पहिली अवस्था कोणती, असा विचार करूं लागल्यास बंधावांचून मोक्षाची प्राप्तिच नसल्यामुळे, बंधासाठींच मोक्ष, बंध नसेल तर मोक्षाचीहि आवश्यकता नाहीं, अशी वस्तुस्थिति असल्यामुळे बंध पूर्वी व मोक्ष नंतर, असाच निर्णय होतो. त्याचप्रमाणें ' बंध पूर्वी ' म्हणून म्हटले कीं तो अनादि आहे-म्ह० त्याचा आरंभ झालेला नसून तो सृष्टीबरोबरच सिद्ध आहे. पण मोक्ष होतांच त्याचा अंत-नाश होतो, त्यामुळे तो अनादि-सान्त आहे असें द्वैतवाद्यांना मानावें लागते. त्याच न्यायानें मोक्ष सादि म्ह० उत्पन्न होणारा पण मुक्तात्म्यांची पुनरावृत्ति होत नसल्यामुळें अनन्त-नाश न पावणारा आहे, असेंहि म्हणावें लागते. पण जो उत्पन्न झालेला नाहीं त्याचा नाश होतो व ज्याची उत्पत्ति झाली आहे तो नाश पावत नाहीं, असें म्हणणें प्रमाणाच्या विरुद्ध आहे. तसेंच, आत्मा अवस्थावान् आहे, बंध व मोक्ष या त्याच्या खऱ्या अवस्था आहेत, असें म्हटल्यास तो अनित्य ठरतो. कारण एक अवस्था सोडून दुसऱ्या अवस्थेला प्राप्त होणारा पदार्थ नित्य असतो, असें कोणालाहि कधींच उपपादन करितां येणें शक्य

नाहीं. ]—**अथ अनित्यत्वदोषपरिहाराय बन्धमुक्तावस्थाभेदः न कल्पते**—**वरें**, ह्या अनित्यत्व-दोषाचा परिहार करण्यासाठीं बंध व मुक्त या अवस्थांचा भेद आत्म्यामध्यें आहे. या अवस्था आत्म्याच्या आहेत, असें जर मानलेंच नाहीं—**अतः द्वैतिनां अपि शास्त्रानर्थक्यादिदोषः अपरिहार्यः एव**—तर द्वैत्यांनाहि शास्त्राचें आनर्थक्य, प्रत्यक्षविरोध हे दोष अपरिहार्यच आहेत.—**इति समानत्वात् अद्वैतवादिना दोषः न परिहर्तव्यः**—यास्तव शास्त्रानर्थक्यादि दोष सर्व वाद्यांना समान असल्यामुळे एकट्या अद्वैतवाद्यालाच त्याचा परिहार करावयास नको. [ बंध व मोक्ष, या आत्म्याच्या अवस्था आहेत असें म्हटल्यास आत्मा अनित्य ठरतो, असे पाहून त्या अवस्थांशीं आत्म्याचा कांहीं संबंध नाहीं, म्हणून म्हणावे तर मग शास्त्र कोणासाठीं ? आत्म्याला जर बंध नाहीं व मोक्षहि नाहीं, तर विधिशास्त्र कर्मादिकांचें विधान कोणाला उद्देशून करणार? त्याला विषयच उरत नाहीं;म्हणून सर्व द्वैत्यांच्या मतींहि शास्त्राचें आनर्थक्य-व्यर्थत्व वगैरे दोष येतातच;त्यामुळें एकट्या अद्वैतवाद्यालाच त्यांचा परिहार करावयास नको.]

**न च शास्त्रानर्थक्यं यथाप्रसिद्धाविद्वत्पुरुषविषयत्वाच्छास्त्रस्य । अविदुषां हि फलहेत्वोरनात्मनोरात्मदर्शनम् । न विदुषां, विदुषां हि फलहेतुभ्यामात्मनोऽन्यत्वदर्शने सति तयोरहमित्यात्मदर्शनानुपपत्तेः । न ह्यत्यन्तमूढ उन्मत्तादिरपि जलाग्न्योश्छायाप्रकाशयोर्वैकात्म्यं पश्यति किमुत विवेकी । तस्मान्न विधिप्रतिषेधशास्त्रं तावत्फलहेतुभ्यामात्मनोऽन्यत्वदर्शिनो भवति । न हि देवदत्त त्वमिदं कुर्विति कस्मिंश्चित्कर्मणि नियुक्ते विष्णुमित्रोऽहं नियुक्त इति तत्रस्थो नियोगं शृण्वन्नपि प्रतिपद्यते । नियोगविषयविवेकाग्रहणात्तूपपद्यते प्रतिपत्तिस्तथा फलहेत्वोरपि ॥**

**भाष्यार्थ**—( दोन्हीं पक्षीं जर दोष एकसारखाच आहे, तर आम्हीं अद्वैतमतावरच अधिक प्रीति काय म्हणून करावी ? या प्रश्नाचे उत्तर वर .' अविद्याविषये च० ' इत्यादि जे दिलें आहे ( पृ. ८८० ) त्याचेंच अधिक विवरण करितात-)—**शास्त्रानर्थक्यं न च**—अद्वैतमतावर 'शास्त्राचें आनर्थक्य हा दोषच येऊं शकत नाहीं.—**शास्त्रस्य यथाप्रसिद्ध-अविद्वत्पुरुषविषयत्वात्**—कारण व्यवहारांत 'मी व माझे' असे मानणारा प्रसिद्ध अविद्वान् पुरुष हा शास्त्राचा विषय आहे. ( त्याच संक्षिप्त वाक्याचें स्पष्टीकरण-)—**फलहेत्वोः अनात्मनोः अविदुषां आत्मदर्शनं हि**—भोक्तृत्व हें फल व कर्तृत्व हा हेतु, या अनात्म्यांमध्यें अविद्वानांचें आत्मदर्शन प्रसिद्ध आहे, (अविद्वान् मी भोक्ता व कर्ता, असें समजतो हें प्रसिद्ध आहे. किंवा फल म्ह० विशेष प्रकारचा देह व हेतु म्ह० त्याच्या उत्पत्तीला कारण होणारें अदृष्ट,त्या दोन्ही अनात्म्यांमध्यें 'मी कर्ता, भोक्ता मनुष्य' इत्यादि प्रकारें आत्मदृष्टि ठेवणें हेंच शास्त्राधिकाराचें निमित्त आहे.त्यामुळें विधि-निषेधशास्त्र अविद्वानासाठीं आहे. अहोपण, विद्वानांचाहि ' मी मनुष्य आहें ' असा व्यवहार चालतो. तेव्हां तेहि शास्त्राचा विषय कां नव्हेत ? उत्तर-)—**विदुषां न**—विद्वानांचें तसे मिथ्यादर्शन नसतें. ( या संक्षिप्तवाक्याचेंच स्पष्टीकरण-)—**विदुषां हि फलहेतुभ्यां आत्मनः अन्यत्वदर्शने सति तयोः अहं इति आत्मदर्शनानु-**

**पपत्तेः**—कारण विद्वानांना फल व हेतु यांहून आत्म्याचें अन्यत्व साक्षात् कळलें असतां त्यांच्या ठिकाणीं 'मी' असें आत्मदर्शन संभवत नाहीं. ( आत्मा शरीरादिकांहून अगदी भिन्न आहे, असें ज्ञान झालें असतां विद्वान् त्यांनाच 'मी' असे म्हणेल हें संभवत नाहीं. )—**हि अत्यन्तमूढः उन्मत्तादिः अपि जलाग्न्योः छायाप्रकाशयोः वा ऐकात्म्यं न पश्यति किमुत विवेकी**—कारण अत्यंत मूढ व वेडा वगैरेहि जल व अग्नि यांचें किंवा छाया व प्रकाश यांचें एकरूपत्व–ऐक्य पाहत नाहीं मग विवेकी परस्परविरुद्ध पदार्थांचें ऐक्य कसें पाहील ? [ अर्थात् देहादिकांहून आत्मा भिन्न आहे असें जाणणारा ज्ञानी आत्मा व अनात्मा यांचें ऐक्य त्रिकालीं मानणार नाहीं. अर्थात् विद्वानाला विधिनिषेधशास्त्राचा अधिकार नाहीं. या उक्त विषयाचा उपसंहार करितात–]—**तस्मात् फलहेतुभ्यां आत्मनः अनन्यत्वदर्शिनः तावत् विधिप्रतिषेधशास्त्रं न भवति**—म्हणून फल व हेतु यांहून आत्मा अगदीं भिन्न आहे, असे जाणणाऱ्या विद्वानाला तर विधिनिषेधशास्त्र नाहीं [ विद्वान् हा त्याचा विषय नव्हे, ही गोष्ट सिद्ध झाली. अद्वैतपक्षीं शास्त्रानर्थक्य हा दोषच येत नाहीं. कारण शास्त्र अविद्वानासाठीं आहे. अविद्वान् 'देहच मी, मी ब्राह्मण, माझें हे कर्तव्य' इत्यादि अनात्म्याला आत्मा समजतो. पण विद्वान् तसे समजत नाहीं. कारण त्याला आत्मा देहादिकांहून भिन्न आहे, असें साक्षात् ज्ञान झालेलें असते. आत्मा व अनात्मा हे छाया व प्रकाश किंवा जल व अग्नि यांप्रमाणें अगदीं विलक्षण आहेत. अशा विरोधी पदार्थांचें ऐक्य एखादा मूढहि जर कधीं मानीत नाहीं, तर विवेकी कसा मानणार ? अर्थात् त्यांचे ऐक्य न मानणारा आत्मज्ञ विधिनिषेधशास्त्राचा विषय नव्हे. आतां शास्त्राचें श्रवण अविद्वानाप्रमाणें विद्वानहि करीत असल्यामुळें तोहि त्याचा विषय आहे, अशी शंका घेऊन आचार्य म्हणतात–]—**'देवदत्त त्वं इदं कुरु' इति कस्मिंश्चित् कर्मणि नियुक्ते तत्रस्थः विष्णुमित्रः नियोगं शृण्वन् अपि अहं नियुक्तः इति न हि प्रतिपद्यते**—'हे देवदत्ता, तूं हें कर,' असे म्हणून एकाद्या कर्मामध्यें देवदत्ताला नियुक्त केलें असतां तेथेंच असलेला विष्णुमित्र तो नियोग–तो विधि ऐकत असूनहि 'मीच या कार्यात नियुक्त केला गेलों आहें, मलाच हे कर्म करण्याची प्रेरणा केली आहे,' असें समजत नाहीं, हे प्रसिद्ध आहे.—**तु नियोगविषयाविवेकाग्रहणात् प्रतिपत्तिः उपपद्यते**—पण या नियोगाचा विषय कोण आहे, 'मीच की दुसरा कोणी,' याचा विवेक न झाल्यास मात्र देवदत्ताला प्रेरणा केली असतां ती ऐकणारा विष्णुमित्र 'मीच या कर्मांत नियुक्त केला जात आहें,' असें समजेल, हें संभवतें.—**तथा फलहेत्वोः अपि**—त्याच न्यायानें फल व हेतु यांच्या ठिकाणीं आत्मदृष्टि ठेवणारा म्ह० कर्तृत्व-भोक्तृत्वादि हा माझा धर्म आहे व देहादि मी आहें, असे मानणारा अविवेकी मी शास्त्राचा अधिकारी आहें, असें मानील. [ अर्थात् विधिनिषेधशास्त्र अविद्वानासाठीं असल्यामुळें म्ह० अविद्वान् हा त्याचा विषय असल्यामुळें 'क्षेत्रज्ञ ईश्वर आहे असें मानल्यास तें व्यर्थ होईल' ही भीति बाळगावयास नको. ]

**ननु प्राकृतसंबन्धापेक्षया युक्तैव प्रतिपत्तिः शास्त्रार्थविषया फलहेतुभ्यामन्यात्मत्व-दर्शनेऽपि सतीष्टफलहेतौ प्रवर्तितोऽस्म्यनिष्टफलहेतोश्च निवर्तितोऽस्मीति । यथा पितृ-पुत्रादीनामितरेतरात्मान्यत्वदर्शने सत्यप्यन्योन्यनियोगप्रतिषेधार्थप्रतिपत्तिः ॥**

**भाष्यार्थ**—(अहोपण, शास्त्राचा विषय विद्वान् आहे, या दृष्टीनेंहि शास्त्राचे अर्थ-वत्त्व सांगतां येणे शक्य आहे,अशी शंका-)—**ननु प्राकृतसंबन्धापेक्षया शास्त्रा-र्थविषया प्रतिपत्तिः फलहेतुभ्यां अन्यात्मत्वदर्शने सति अपि युक्ता एव**—अहोपण, आत्मसाक्षात्कार होण्यापूर्वी अनुभविलेला जो प्राकृत-प्रकृतिजन्य देहाभिमान-रूप संबंध, त्याच्या अपेक्षेनें विधींकडून मी प्रवृत्त केला गेलों आहे व निषेधाकडून मी निवृत्त केला गेलो आहे, अशा प्रकारची शास्त्रविषयक बुद्धि फल व हेतु यांहून आत्मा भिन्न आहे असे ज्ञान झाले असले तरी होणे युक्तच आहे.(तीं कशी तेच व्यक्त करितात-) —**इष्टफलहेतौ प्रवर्तितः अस्मि च अनिष्टफलहेतोः निवर्तितः अस्मि इति**—इष्ट फलाच्या हेतूमध्ये मी प्रवृत्त केला गेलों आहे व अनिष्टफलाच्या हेतूपासून निवृत्त केला गेलों आहें, अशी बुद्धि होणे युक्तच आहे. ( 'अहोपण, अविद्वानाला जसा मिथ्या अभिमान असतो तसा विद्वानाला नसतो. त्यामुळे अविद्यासंबंधामुळेच होणारी तसली बुद्धि विद्वानाच्या ठिकाणी संभवत नाहीं, ' असे सिद्धान्ती यावर म्हणतील असे समजून शंकावादीच आपलें म्हणणें दृष्टान्ताने स्पष्ट करतो-)—**यथा पितृपुत्रादी-नां इतरेतर-आत्मान्यत्वदर्शने सति अपि अन्योन्यनियोगप्रतिषेधार्थ-प्रतिपत्तिः**—ज्याप्रमाणे पिता, पुत्र, भ्राता यांचे आत्मे परस्पर भिन्न आहेत. ते पर-स्परांहून पृथक् आहेत, अशी दृष्टि-असें ज्ञान जरी असले तरी त्यांच्या परस्पर विधींचे व निषेधांचें ज्ञान परस्परांस असते.[ पित्याला उद्देशून केलेला विधि किंवा निषेध पित्या-च्या हातून घडणें शक्य नसल्यास पुत्राला त्याविषयींचे ज्ञान होते, असे आपण पाहतो. म्ह० पित्याला उद्देशून केलेल्या विधींचें अनुष्ठान त्याच्या हातून न घडल्यास पुत्र ते करितो, म्हणूनच बृहदारण्यकांत संप्रत्ति कर्म सांगितले आहे. 'मी आतां मरणार ' अशी जेव्हां पित्याची खात्री होते तेव्हां तो पुत्राला जवळ बोलावून ' तूं ब्रह्म आहेस, तूं यज्ञ आहेस, तूं लोक आहेस ' असे सांगतो व पुत्र त्या सर्वांचा स्वीकार करतो. म्ह० अध्ययन, यज्ञ, इत्यादि पित्याचे सर्व कर्तव्य तो आपल्याकडे घेतो. त्याचप्रमाणें पुत्राला उद्देशून केलेला विधि-निषेध आचरण्यास पुत्र असमर्थ असल्यास पिता त्याचें अनुष्ठान करितो. भ्राता, पत्नी इत्यादिकांविषयींहि असेच समजावे. याच न्यायानें विद्वान् ' मी हेतुफलाहून अगदीं भिन्न आहे. ' असा जरी साक्षात् अनुभव घेत असला तरी पूर्वीच्या मिथ्या देहादिसंबंधामुळे त्याला विधि-निषेधार्थांचें ज्ञान होण्यास कांहींच प्रत्यवाय नाहीं. ]

**न। व्यतिरिक्तात्मदर्शनप्रतिपत्तेः प्रागेव फलहेत्वोरात्माभिमानस्य सिद्धत्वात् । प्रति-पन्ननियोगप्रतिषेधार्थो हि फलहेतुभ्यामात्मनोऽन्यत्वं प्रतिपद्यते न पूर्वं तस्माद्विधिप्रति-षेधशास्त्रमविद्वद्विषयमिति सिद्धम् ॥**

**भाष्यार्थ**—( पुत्रादिकांना मिथ्याभिमान असल्यामुळें परस्परनियोगाचें ज्ञान होणें योग्यच आहे. पण तत्त्वदर्शी ज्ञानी पुरुषाच्या ठिकाणी तसा अभिमानच नसल्यामुळें देहादिसंबंधानेंच होणारी तशी बुद्धि त्याला होत नाहीं,असें सांगून सिद्धान्ती वरील शंकेचा परिहार करितात-)—**न**—हें तुमचें म्हणणें बरोबर नाही.कारण—**व्यतिरिक्त-आत्मदर्शनप्रतिपत्तेः प्राक् एव फलहेत्वोः आत्माभिमानस्य सिद्धत्वात्**—आत्मा शरीरेंद्रियादि सर्व अनात्मवर्गाहून अगदी भिन्न आहे, असें साक्षात् ज्ञान होण्यापूर्वीच फल व हेतु यांच्या ठिकाणी ' हाच आत्मा ' असा अभिमान सिद्ध असतो. [ ज्ञानापूर्वीच अनात्माभिमान सिद्ध असतो. पण तो ज्ञानानंतर जातो. त्यामुळें विधिनिषेधशास्त्र त्याला विषय करीत नाही.शिवाय ब्रह्ममीमांसेत 'सर्वापेक्षा०' या अधिकरणांत आत्म्याचें सम्यग्ज्ञान पुण्यसंज्ञक अदृष्टाने निष्पन्न होते, असे सांगितलें आहे. त्यामुळें विधिनिषेधांचे अनुष्ठान सम्यग्ज्ञानाच्या पूर्वीच संभवते. तेव्हां विद्वान् त्याचें अनुष्ठान कसें करणार? असे आचार्य म्हणतात -]—**प्रतिपन्ननियोगप्रतिषेधार्थः हि फलहेतुभ्यां आत्मनः अन्यत्वं प्रतिपद्यते**—ज्याने विधिप्रतिषेधार्थाचे अनुष्ठान केले आहे, म्ह० विहित कर्माचें अनुष्ठान करून निषिद्ध कर्माचा त्याग केला आहे, त्याच्याच पापाचा क्षय होऊन त्याला आत्मा हेतुफलाहून अगदी पृथक् आहे, असे ज्ञान होते,—**न पूर्वं**—विहितानुष्ठान व निषिद्धाचा परिहार केल्यावांचून, त्यापूर्वीच त्याला आत्मज्ञान होत नाही.—**तस्मात् विधिप्रतिषेधशास्त्रं अविद्वद्विषयं इति सिद्धं**—यास्तव विधिनिषेधशास्त्राचा विषय अविद्वान् आहे-विद्वान् नव्हे, ही गोष्ट सिद्ध झाली.

**ननु स्वर्गकामो यजेत कलञ्जं न भक्षयेदित्यादावात्मव्यतिरेकदर्शिनामप्रवृत्तौ केवलदेहाद्यात्मदृष्टीनां च । अतः कर्तुरभावाच्छास्त्रानर्थक्यमिति चेत् । न, यथाप्रसिद्धित एव प्रवृत्तिनिवृत्त्युपपत्तेः । ईश्वरक्षेत्रज्ञैकत्वदर्शी ब्रह्मवित्तावन्न प्रवर्तते । तथा नैरात्म्यवाद्यपि नास्ति परलोक इति न प्रवर्तते । यथाप्रसिद्धितस्तु विधिप्रतिषेधशास्त्रश्रवणान्यथानुपपत्त्याऽनुमितात्मास्तित्व आत्मविशेषानभिज्ञः कर्मफलसंजाततृष्णः श्रद्दधानतया च प्रवर्तत इति सर्वेषां नः प्रत्यक्षमतो न शास्त्रानर्थक्यम् ॥**

**भाष्यार्थ**—( अविद्वान् पुरुष, हा शास्त्राचा विषय असल्यामुळे शास्त्र व्यर्थ नाही, असें जें वर सांगितले आहे, त्याचाच आक्षेप व समाधान याच्या योगाने विस्तार करण्यासाठी आक्षेप घेतात-)—**ननु ' स्वर्गकामः यजेत, कलञ्जं न भक्षयेत् ' इत्यादौ आत्मव्यतिरेकदर्शिनां अप्रवृत्तौ च केवलदेहाद्यात्मदृष्टीनां (अप्रवृत्तिः)**—अहो पण 'स्वर्गाची इच्छा करणाराने यज्ञ करावा, विषलिप्त बाणाने मारलेल्या हरिणाचें मांस खाऊं नये "इत्यादि विधिनिषेधांमध्यें आत्मा देहादि अनात्म्याहून—फलहेतूंहून भिन्न आहे, असे जाणणारांची अप्रवृत्ति झाली असतां केवल देहादिकच आत्मा आहे, असें जाणणारांचीहि विधींमध्ये प्रवृत्ति व निषिद्धापासून निवृत्ति होत नाहीं [आत्मा देहाहून भिन्न आहे, असें जाणणाऱ्या विद्वानांच्या ठिकाणीं 'देहादिकांनाच मी'असें समजणें या प्रकारचें जें अभिमानरूप अधिकाराचें निमित्त त्याचा अभाव असतो. त्यामुळें

विधितः-शास्त्रविधीमुळें त्यांची यागादिकांत प्रवृत्ति होत नाहीं, व अभक्ष्यभक्षणादि निषेधापासूनहि निवृत्ति होत नाही. याप्रमाणें त्यांच्या प्रवृत्ति-निवृत्तींचा अभाव झाला असतां देहादिकांनाच आत्मा समजणाऱ्या अविद्वानांचीहि प्रवृत्तिनिवृत्ति होणें युक्त नाहीं. कारण पारलौकिक फल भोगणाऱ्या भोक्त्याचें त्यांना ज्ञानच नसतें, असा याचा भावार्थ. पण विद्वान् व अविद्वान् या दोघांच्याहि प्रवृत्ति-निवृतीचा याप्रमाणे अभाव झाला असतां काय निष्पन्न होतें तें सांगतात-]—**अतः कर्तुः अभावात् शास्त्रानर्थक्यं इति चेत् न**—त्यामुळें कर्त्याचाच अभाव झाल्यामुळें शास्त्र व्यर्थ-निरुपयोगी ठरतें, असें ह्मणाल तर ते बरोबर नाही.—**यथाप्रसिद्धितः एव प्रवृत्ति-निवृत्त्युपपत्तेः**—जशी शास्त्रीयप्रसिद्धि आहे त्याप्रमाणेच प्रवृत्ति व निवृत्ति यांची उपपत्ति लागते. [ आत्मा देहादिकांहून भिन्न आहे, हें परोक्ष ज्ञान व तो देहादिरूपच आहे, हें अपरोक्ष ज्ञान ज्याला असते म्ह० ज्याला आत्मा देहादिकाकडून पृथक् आहे,असें नुस्तें शाब्दिक ज्ञान असतें, अनुभव तसा आलेला नसतो, पण देहच आत्मा हे ज्ञान मात्र अनुभवसिद्ध असतें-सर्व व्यवहार 'देहच आत्मा आहे,' अशा भावनेने चालतो, त्याची शास्त्राप्रमाणे प्रवृत्ति व निवृत्ति होऊं शकते. त्यामुळे शास्त्र व्यर्थ ठरत नाही. आतां याच मुद्याचें विवरण करण्यासाठीं अगोदर ब्रह्मवेत्त्याच्या प्रवृत्ति-निवृत्तीचा अभाव दाखवितात-]—**ईश्वरक्षेत्रज्ञ-एकत्वदर्शी ब्रह्मविद् तावत् न प्रवर्तते**—ईश्वर व क्षेत्रज्ञ यांचें एकत्व साक्षात् जाणणारा-अपरोक्ष ब्रह्मज्ञानी तर शास्त्राप्रमाणे प्रवृत्त होत नाहीं, व निवृत्तहि होत नाही.—**तथा नैरात्म्यवादी अपि ' परलोकः न अस्ति ' इति न प्रवर्तते**—त्याचप्रमाणें शरीराहून आत्मा निराळा नाहीं, असें समजणारा नैरात्म्यवादीहि ' परलोकच नाहीं ' असें समजत असल्यामुळें शास्त्राप्रमाणे प्रवृत्त किंवा निवृत्त होत नाही.—**तु यथाप्रसिद्धितः विधिप्रतिषेधशास्त्रश्रवण-अन्यथा-अनुपपत्त्या अनुमित-आत्मास्तित्वः आत्मविशेषानभिज्ञः कर्मफलसंजाततृष्णः श्रद्दधानतया च प्रवर्तते इति सर्वेषां नः प्रत्यक्षं**—पण विधि-निषेधाधीन असलेली जी प्रसिद्धि तिच्या अनुसार आत्मा जर नसता तर विधि व निषेध या शास्त्राचें श्रवणच उपपन्न झाले नसतें.पण ज्याअर्थी विधिनिषेधशास्त्राचें श्रवण होत आहे त्याअर्थी परलोकाशी संबंध ठेवणारा आत्मा असलाच पाहिजे, असें ज्यानें आत्म्याच्या अस्तित्वाविषयीं अनुमान केले आहे, पण आत्म्याच्या विशेष स्वरूपाविषयीं जो अनभिज्ञ आहे, त्यामुळें ज्याला कर्मफलाविषयीं तृष्णा उत्पन्न झाली आहे,असा पुरुष श्रद्धाळुपणानें शास्त्राप्रमाणें प्रवृत्त व निवृत्त होतो, असें आपणां सर्वांना प्रत्यक्ष दिसतें.—**अतः शास्त्रानर्थक्यं न**—त्यामुळें शास्त्राला आनर्थक्य नाहीं. [ ' ज्याला स्वर्ग हवा असेल त्यानें याग करावा ' हा विधि व ' कलंजमांस खाऊं नये ' हा निषेध. यांमध्यें आत्मा देहादिकांहून भिन्न व नित्य आहे असें जाणणारा ज्ञानी जर प्रवृत्त झाला नाहीं, तर ' देहच मी ' असें समजणारा नास्तिक मुळींच प्रवृत्त होणार नाही. याप्रमाणें कर्त्याचाच अभाव झाल्यामुळें शास्त्र व्यर्थ ठरतें, अशी शंका येते. पण तिचें समाधान

करण्यासाठीं आचार्य म्हणतात—"ब्रह्म व आत्मा-क्षेत्रज्ञ याचें ऐक्य जाणणारा अपरोक्ष ज्ञानी शास्त्रानुसार प्रवृत्त किंवा निवृत्त होणार नाही, हें उघड आहे, त्याचप्रमाणे परलोक नाहीं,परलोकसंबंधी देहातिरिक्त आत्मा नाहीं, असें जाणणारा देहात्मवादीहि प्रवृत्त-निवृत्त होणार नाही, हें उघड आहे. पण ज्याअर्थी विधिप्रतिषेधशास्त्र धर्माधर्मांचें विधान करीत आहे, त्याअर्थी परलोकसंबंधी आत्मा व परलोक वगैरे असलाच पाहिजे, असे जाणणारा व त्यामुळेंच ज्याला ऐहिक व पारलौकिक फलविषयींची तृष्णा उत्पन्न झाली आहे, असा अधिकारी पुरुष मोठ्या श्रद्धेनें शास्त्राप्रमाणे विधीमध्ये प्रवृत्त व निषेधापासून निवृत्त होतो, हें आपल्याला प्रत्यक्ष दिसते. त्यामुळे आत्मज्ञानी व नास्तिक याना सोडून बाकीचे 'आत्मा देहादिकांहून भिन्न आहे,' असे परोक्ष व 'देहादिकच आत्मा' असे प्रत्यक्ष स्वानुभवाने जाणणारे लोक शास्त्राधिकारी असल्यामुळे शास्त्राला व्यर्थ म्हणतां येत नाही." ]

**विवेकिनामप्रवृत्तिदर्शनात्तदनुगामिनामप्रवृत्तौ शास्त्रानर्थक्यमिति चेत् । न कस्यचिदेव विवेकोपपत्तेः । अनेकेषु हि प्राणिषु कश्चिदेव विवेकी स्याद्यथेदानीम् । न च विवेकिनमनुवर्तन्ते मूढा रागादिदोषतन्त्रत्वात्प्रवृत्तेः । अभिचरणादौ च प्रवृत्तिदर्शनात् । स्वाभाव्याच्च प्रवृत्तेः । स्वभावस्तु प्रवर्तत इति ह्युक्तम् । तस्मादविद्यामात्रं संसारो यथादृष्टविषय एव ॥**

**भाष्यार्थ**—(आता दुसऱ्या प्रकारे शास्त्राच्या आनर्थक्याची शंका-)—**विवेकिनां अप्रवृत्तिदर्शनात् तदनुगामिनां अप्रवृत्तौ शास्त्रानर्थक्यं**—विवेकी लोकांची विधि-निषेधामध्यें प्रवृत्ति होत नाही, असे दिसते. ( आत्मा देहादिकांहून अगदी भिन्न आहे, असे जाणणाऱ्या त्यांना विधि-निषेधाचा अधिकारच नाही, त्यामुळे त्याना शास्त्राचा कांही उपयोग नाही. पण 'देहच मी' असे समजणारे लोकहि 'यद्यदाचरति श्रेष्ठः०' [ गी. भा. अ. ३, श्लो. २१ पृ. ३१२ ] या न्यायाने विवेक्यांचेच जर अनुकरण करूं लागले, तर ) विवेक्यांचे अनुवर्तन करणाऱ्या अविवेक्यांचीहि विधि-निषधांमध्ये अप्रवृत्ति झाल्यास शास्त्र व्यर्थ होते, (विवेकी शास्त्रार्थात प्रवृत्त होत नाहीत, असें पाहून त्याचे अविवेकी अनुयायीहि शास्त्रार्थापासून निवृत्त झाले, तर शास्त्र व्यर्थ नाही का होत,)—**इति चेत्**—असे म्हणाल तर—**न । कस्यचित् एव विवेकोपपत्तेः**—ते बरोबर नाही. कारण कोणा एखाद्यासच तसा विवेक होऊं शकतो.—**अनेकेषु हि प्राणिषु कश्चित् एव विवेकी स्यात् यथा इदानीं**—अनेक प्राण्यांतील कोणी एखादाच विवेकी असतो, जसा या वर्तमानसमयी कोणी एखादाच क्वचित् विरळा विवेकी संभवतो.—**च मूढाः विवेकिनं न अनुवर्तन्ते**—व मूढ लोक विवेक्याचें अनुवर्तन करीत नाहींत.—**प्रवृत्तेः रागादिदोषतन्त्रत्वात्**—कारण प्रवृत्ति राग-द्वेषादि दोषांच्या अधीन असते—**अभिचरणादौ च प्रवृत्तिदर्शनात्**—अभिचारादि-जारण-मारण-उच्चाटनादि कर्मामध्ये लोकांची प्रवृत्ति होत असल्याचें दिसते. ( अज्ञ लोक विवेक्याचेंच जर नियमाने अनुकरण करणारे असते, तर त्यांची अभिचारादि कर्मामध्यें

प्रवृत्ति झाली नसती. कारण विवेकी असल्या कर्मांत प्रवृत्त होत नाहींत.)—**च प्रवृत्तेः स्वाभाव्यात्**—शिवाय प्रवृत्तीला स्वाभाविकत्व आहे.—'**स्वभावस्तु प्रवर्तते' इति हि उक्तं**—प्रवृत्ति 'स्वभाव' या नांवाच्या अज्ञानाचे कार्य आहे, असें भगवानांनींहि सांगितले आहे—**तस्मात् अविद्यामात्रं संसारः यथादृष्टविषयः एव**—याप्रमाणें सर्व प्रवृत्ति अज्ञानजन्य असल्यामुळें विधि व निषेध याच्या अधीन असलेल्या प्रवृत्ति-निवृत्तिरूप बंधाला—संसाराला अविद्यामात्रत्व आहे, हा संसार अविद्यामात्र आहे. जे दृष्ट आहे, त्याचेंच अनुवर्तन करणाऱ्या अज्ञ पुरुषाला यथादृष्ट म्हणतात. असला पुरुषच संसाराचा आश्रय आहे. [ अर्थात् प्रवृत्ति-निवृत्त्यात्मक संसाराला अविद्वद्विषयत्व असल्यामुळे त्यांचे निमित्तभूत शास्त्रहि अविद्वद्विषयच आहे. अविद्वानच शास्त्राचा विषय आहे. त्यामुळे शास्त्राला आनर्थक्य नाही. या जगांत विवेकी फार विरळा आढळतो व देहात्मवादी जीव त्याचे अनुवर्तनहि करीत नाहीत. त्यांची सर्व प्रवृत्ति रागद्वेषप्रयुक्त असते. म्हणूनच विवेकी ज्या घोर कर्मांत कधींच प्रवृत्त होत नाही, तसली जारण-मारणादि कर्मे अविवेकी करितात. देहात्मवाद्यांची प्रवृत्ति स्वाभाविक आहे, म्हणूनच भगवानांनी 'स्वभावस्तु प्रवर्तते' असें म्हटले आहे. अर्थात् सर्व संसार अविद्यामात्र आहे व तो अनात्मज्ञाच्याच आश्रयानें राहतो. ]

**न क्षेत्रज्ञस्य केवलस्याविद्या तत्कार्यं च । न च मिथ्याज्ञानं परमार्थवस्तु दूषयितुं समर्थम् । न ह्यूषरदेशं स्नेहेन पङ्कीकर्तुं शक्नोति मरीच्युदकं तथाऽविद्या क्षेत्रज्ञस्य न किंचित्कर्तुं शक्नोति । अतश्चेदमुक्तं 'क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि' 'अज्ञानेनाऽऽवृतं ज्ञानम्' इति च ॥**

**भाष्यार्थ**—('अहोपण, क्षेत्रज्ञाचा आश्रय करून राहणारी अविद्या आपले कार्य असा जो संसार त्याचाहि त्याच्यावर आरोप करते. त्यामुळे त्या क्षेत्रज्ञालाच शास्त्राचें अधिकारित्व आहे' अशी आशंका घेऊन सांगतात—)—**केवलस्य क्षेत्रज्ञस्य अविद्या च तत्कार्यं न**—केवळ क्षेत्रज्ञाला अविद्या नाहीं व अविद्येचें कार्यहि नाही. ('अहोपण, शुद्ध क्षेत्रज्ञाशी अविद्यादिकांचा जरी वस्तुतः संबंध नसला, तरी त्याच्यावर आरोपित केलेला संसार त्यालाच दुःखी करतो,' या शंकेचे समाधान—)—**मिथ्याज्ञानं परमार्थवस्तु दूषयितुं न च समर्थं**—मिथ्या अज्ञान परमार्थ वस्तूला दूषित करण्यास समर्थ नाहीं.—**मरीच्युदकं उषरदेशं स्नेहेन पंकीकर्तुं न शक्नोति हि**—मृगजल माळ जमिनीला आपल्या स्नेहानें ओली करण्यास समर्थ होत नाहीं, हें प्रसिद्ध आहे.—**तथा अविद्या क्षेत्रज्ञस्य किंचित् कर्तुं न हि शक्नोति**—त्याचप्रमाणें अविद्या क्षेत्रज्ञाला कांहीं करूं शकत नाही.—**अतः च 'क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि' इदं उक्तं**—म्हणूनच 'व क्षेत्रज्ञहि मी आहें असें तूं समज' असें म्हटलें आहे. (क्षेत्रज्ञ व ईश्वर याचें जर ऐक्य आहे तर 'मी' अशा रूपानें आत्म्याला जाणणाराहि हा पुरुष आपलें ईश्वरत्व—मी ईश्वर आहे, असें कां ओळखीत नाहीं. स्वतःच्या ईश्वरत्वाचें त्याला भान कां होत नाहीं ? उत्तर—)—'**अज्ञानेनावृतं ज्ञानं' इति**

च—( अ. ५ श्लो. १५ पृ. ५०९ ) अज्ञानानें ज्ञानाला झांकून टाकलें आहे. त्यामुळें सर्व प्राणी मोहित होतात, असेंहि भगवानांनी त्याचे कारण सांगितले आहे. [ आरोपित अविद्या किंवा तिचे कार्य शुद्ध क्षेत्रज्ञाला कांही करूं शकत नाही. कारण अविद्यादि मिथ्या आहे व मृगजलादि कोणतीच मिथ्यावस्तु आपल्या अधिष्ठानाला दूषित करूं शकत नाहीं, हे प्रसिद्ध आहे, म्हणूनच ' क्षेत्रज्ञ मीच आहे असे समज ' इत्यादि भगवानांनीं सांगितलें आहे. ]

**अथ किमिदं संसारिणामिवाहमेवं ममैवेदमिति पण्डितानामपि । शृण्विदं तत्पाण्डित्यं यत्क्षेत्र एवाऽऽत्मदर्शनम् । यदि पुनः क्षेत्रज्ञमविक्रियं पश्येयुस्ततो न भोगं कर्म वाऽऽकाङ्क्षेयुर्मम स्यादिति । विक्रियैव भोगकर्मणी । अथैवं सति फलार्थित्वादविद्वान्प्रवर्तते ॥**

**भाष्यार्थ**—( अहोपण, आत्म्याला वस्तुतः संसाराचा स्पर्शहि नाही, म्हणून जर म्हटले तर विद्वानांच्या अनुभवाशीं विरोध येतो, अशी शंका-)—**अथ संसारिणां इव पण्डितानां अपि अहं एवं मम एव इदं इति इदं किं**—तर मग संसारी जीवांप्रमाणेंच पंडितांचाहि ' मी असा मोठा कुलीन, विद्वान् वगैरे आहें, हें क्षेत्र, गृह, पत्नी वगैरे माझेंच आहे,' असा जो अभिनिवेश दिसतो तो कां, त्याचें काय कारण ? ( संसारी जीवांप्रमाणें पंडितांचेंहि ' मी व माझे ' हे संसारित्व दिसते ! ते कां ? )—**शृणु**—त्यांचें पांडित्य कोणत्या प्रकारचें आहे ते तूं ऐक—**यत् क्षेत्रे एव आत्मदर्शनं तत् इदं पाण्डित्यं**—जे क्षेत्राचे ठिकाणीच आत्मदर्शन ते हे त्यांचे पांडित्य आहे.—**यदि पुनः क्षेत्रज्ञं अविक्रियं पश्येयुः ततः भोगं कर्म वा मम स्यात् इति न आकांक्षेयुः**—पण ते जर क्षेत्रज्ञ अविक्रिय आहे, असे पाहतील तर भोग मला प्राप्त व्हावा किंवा मी कर्म करावें, अशी आकांक्षा करणार नाहींत. [ संसारित्व हा कूटस्थ आत्म्याचा धर्म आहे, अशी प्रतीति केव्हांच येत नाही. त्यामुळे आत्मा असंसारी आहे, या सिद्धान्ताला कांहीच बाध येत नाही. आत्मा अविक्रिय आहे असे जाणणाऱ्या विद्वानाचाहि भोग व कर्म कां संभवूं नये ? त्याला कोणती हरकत आहे ? उत्तर-]—**भोगकर्मणी विक्रिया एव**—भोग व कर्म ही विक्रियाच आहे. त्यामुळे ती कूटस्थ आत्म्याचे ठिकाणी संभवत नाही. ( आत्मा विक्रियाशून्य आहे, असें ज्याला साक्षात् ज्ञान झाले आहे, त्याचा भोग व कर्म यांचा असंभव आहे, असे जर म्हटले तर मग शास्त्रामध्ये प्रवृत्ति कोणाची होणार ? उत्तर-)—**अथ एवं सति फलार्थित्वात् अविद्वान् प्रवर्तते**—विद्वानाला फलाची इच्छा नसते, त्यामुळें तो कर्मामध्ये प्रवृत्त होत नाही, असें सिद्ध झालें असतां फलाची आकांक्षा असल्यामुळें अविद्वान् त्या फलाचा उपाय असे जे कर्म त्यांत प्रवृत्त होतो, अविद्वान् शास्त्राचा अधिकारी आहे. [आत्म्याच्या ठिकाणीं जर खरोखर संसार नाही तर अविद्वानाप्रमाणे विद्वान् 'हा मी, हें माझे' इत्यादि जो व्यवहार करितो तो कां ? अशी वाद्याने शंका विचारली असतां सिद्धान्ती म्हणतात-" तूं पांडित्य तरी कशाला म्हणतोस ? देहादिकांना आत्मा समजणें, याला

पांडित्य म्हणतोस कीं, आत्मा कूटस्थ आहे असें साक्षात् जाणणें याला, कीं ' मी संसारी आहें ' असे समजणें याला ? जे ' हा मी व हें माझें ' असें म्हणणारे ते यांतील पहिल्याप्रकारचे पंडित होत. दुसऱ्या प्रकारचे पंडित भोग व त्यांचें साधन कर्म यांतील कशाचीच अपेक्षा करीत नाहींत. कारण भोग व कर्म या दोन्ही विक्रियाच आहेत. पण आपल्याला संसारी मानणारा जो अविद्वान् तोच कर्मामध्यें फलाच्या आशेनें प्रवृत्त होतो. यास्तव तोच शास्त्राचा अधिकारी असून त्याचीच कर्मामध्ये प्रवृत्ति संभवते. अर्थात् 'मी व माझे' म्हणणारा देहात्मवादी खरा पंडित नसून अविद्वान् आहे. ]

**विदुषः पुनरविक्रियात्मदर्शिनः फलार्थित्वाभावात्प्रवृत्त्यनुपपत्तौ कार्यकरणसंघातव्यापारोपरमे निवृत्तिरुपचर्यते । इदं चान्यत्पाण्डित्यं कस्यचिदस्तु क्षेत्रज्ञ ईश्वर एव क्षेत्रं चान्यत्क्षेत्रज्ञस्य विषयः । अहं तु संसारी सुखी दुःखी च । संसारोपरमश्च मम कर्तव्यः क्षेत्रक्षेत्रज्ञविज्ञानेन ध्यानेन चेश्वरं क्षेत्रज्ञं साक्षात्कृत्वा तत्स्वरूपावस्थानेनेति । यश्चैवं बुध्यते यश्च बोधयति नासौ क्षेत्रज्ञ इति । एवं मन्वानो यः स पण्डितापसदः संसारमोक्षयोः शास्त्रस्य चार्थवत्त्वं करोमीति । आत्महा स्वयं मूढोऽन्यांश्च व्यामोहयति शास्त्रार्थसंप्रदायरहितत्वाच्छ्रुतहानिमश्रुतकल्पनां च कुर्वन् । तस्मादसंप्रदायवित्सर्वशास्त्रविदपि मूर्खवदेवोपेक्षणीयः ॥**

**भाष्यार्थ**—( अहोपण, विद्वानाच्या शास्त्रविहित प्रवृत्तीचा जरी अभाव असला तरी निवृत्तिहि निषेधाच्या अधीन असल्यामुळें विद्वान् निवृत्तिनिष्ठ आहे असेंहि म्हणतां येत नाहीं, अशी आशंका घेऊन म्हणतात-)—**पुनः अविक्रिय-आत्मदर्शिनः विदुषः फलार्थित्वाभावात् प्रवृत्ति-अनुपपत्तौ कार्य-करणसंघातव्यापारोपरमे निवृत्तिः उपचर्यते**—पण आत्मा सर्वविकारशून्य आहे, असें जाणणाऱ्या विद्वानाच्या फलार्थित्वाचा अभाव असल्यामुळे म्ह० त्याला फलाची इच्छा नसल्यामुळे प्रवृत्तीची अनुपपत्ति झाली असतां-त्याच्या प्रवृत्तीचाच असंभव झाला असतां, शरीर व इंद्रिय याच्या संघाताचा व्यापार शांत होतो, व त्या शरीरेंद्रियांच्या व्यापाराभावालाच ' निवृत्ति ' असे गौणवृत्तीने म्हटले जाते. [म्ह० आत्मा कूटस्थ नित्य आहे, असें जाणणाऱ्या विद्वानाला कोणत्याहि फलाची इच्छा नसते. फलेच्छेच्या अभावीं त्याची प्रवृत्तिच संभवत नाहीं. त्यामुळे स्वभावतःच त्याच्या शरीरेंद्रियांची हालचाल शांत होते. तिलाच निवृत्ति म्हणतात. ती स्वाभाविक असल्यामुळे निषेधशास्त्राधीन नाही. आतां वर सांगितलेल्या तीन प्रकारच्या पांडित्यांतील ' संसारित्वादिबुद्धि ' हें पांडित्य, असा जो तिसरा पक्ष त्याविषयीं विचार करितात- ]—**च कस्यचित् इदं अन्यत् पांडित्यं**—आणि कोणाचें हें असलें आणखीं एका प्रकारचें पांडित्य आहे—**क्षेत्रज्ञः ईश्वरः एव अस्तु**—क्षेत्रज्ञ ईश्वरच असू दे—**च क्षेत्रं अन्यत्-क्षेत्रज्ञस्य विषयः**—पण क्षेत्र त्याहून वस्तुतः निराळें आहे. तो क्षेत्रज्ञाचा विषय आहे.—**तु अहं संसारी सुखी दुःखी च**—पण मी संसारी सुखी व दुःखी आहें. [ क्षेत्रज्ञच ईश्वर

असें जरी या पक्षामध्यें मानलेलें असले तरी क्षेत्र त्याहून वस्तुतः पृथक् आहे, कारण तें क्षेत्रज्ञाचा विषय आहे. त्याचप्रमाणें आत्म्याचें संसारित्व खरें आहे. त्यामुळे अद्वैत-सिद्धान्ताहून हें मत निराळे आहे. पण आत्म्याचे संसारित्व खरे आहे, असे जर मानले तर त्याची निवृत्ति होणें शक्य नाहीं, असें कोणी म्हणेल म्हणून तत्पक्षीय लोक त्याचें असें समाधान करतात-]—**च मम संसारोपरमः कर्तव्यः क्षेत्रक्षेत्रज्ञविज्ञानेन च ध्यानेन ईश्वरं क्षेत्रज्ञं साक्षात्कृत्वा तत्स्वरूपावस्थानेन इति**—आणि मला संसाराचा उपरम–संसाराची शांति–अभाव करावयाचा आहे. ( पण उपायावांचून तो कसा होईल ? उत्तर–) क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांच्या विज्ञानाने मला संसारोपरम करावयाचा आहे. ( पण क्षेत्र अमुक एक प्रकारचे आहे असें जाणून क्षेत्रज्ञ त्याहून अगदीं निराळा आहे, असे नुस्ते जाणल्यानेच संसाराचा अभाव कसा होणार ? उत्तर–) व ध्यानाने क्षेत्रज्ञ जो ईश्वर त्याला साक्षात् जाणून त्याच्या स्वरूपाने अवस्थित होणें, या उपायाने मला संसारोपरम करावयाचा आहे, असे कोणाचे पांडित्य असते. [ म्ह० तो आत्मा संसारी आहे व त्यामुळेंच असंसारी क्षेत्रज्ञाहून पृथक् आहे, असे हे तिसरे मत आहे. आत्मा व क्षेत्रज्ञ यांच्या अन्यत्वाचेंच उपपादन-]—**यः च एवं बुध्यते यः च बोधयति असौ क्षेत्रज्ञः न इति**—पण जो असे जाणतो म्ह० संसारी असलेला जो मी त्या मला असंसारी ईश्वरत्व संपादन करावयाचे आहे, असे जो स्वतः जाणतो किंवा जो तशा प्रकारचे ज्ञान तुला संपादन करावयाचे आहे, असा दुसऱ्याला उपदेश करितो तो क्षेत्रज्ञ नव्हे, क्षेत्रज्ञ ईश्वराहून तो निराळा आहे, असें समजावे. कारण त्यावांचून तसा उपदेश करणेंच व्यर्थ होतें. ( आत्मा संसारी आहे, परमात्म्याहून भिन्न आहे, ध्यानाच्या योगानें होणाऱ्या त्याच्या ज्ञानाने संसारी आत्म्याला ईश्वरत्व संपादन करावयाचें आहे, हें ज्ञान तिसऱ्या प्रकारचें पांडित्य आहे. आचार्य या मताचे आतां निरसन करितात–)—**यः एवं संसारमोक्षयोः शास्त्रस्य च अर्थवत्त्वं करोमि इति मन्वानः सः पण्डितापसदः**—जो अशाप्रकारें संसार, मोक्ष व शास्त्र यांचे अर्थवत्त्व मी करितों, ही सर्व उपयोगी आहेत, व्यर्थ नाहींत, असे सिद्ध करितों, असें समजतो, तो पंडिताधम आहे. ( कारण—'**अयं आत्मा ब्रह्म**'—हा आत्मा ब्रह्म आहे, या आत्म्याचें ब्रह्मत्व सांगणाऱ्या श्रुतीशीं त्या मताचा विरोध आहे. ' अहोपण, संसार खरा आहे, असें मानल्यामुळे ज्या अवस्थेत संसाराची प्रतीति येते त्या अवस्थेंत कर्मकांड उपयोगी आहे. पुढें संसारित्वाचें निरसन करून ध्यानादिकांच्या योगाने आत्म्याचे ब्रह्मत्व संपादन केलें असतां मोक्षावस्थेत ज्ञानकांडाला अर्थवत्त्व आहे म्ह० त्या अवस्थेंत ज्ञानकांडाचा उपयोग आहे. तेव्हां अशाप्रकारचें ज्ञान ज्याला आहे, त्याला पंडितापसद–अधम पंडित कसें म्हणतां ?' उत्तर–कल्पितसंसाराला उद्देशून साध्य-साधनसंबंधाचा बोध करणारें कर्मकांड अर्थवत्–उपयोगी आहे, असें मानलेले आहे. त्याचप्रमाणें कल्पित संसारित्वाचें निरसन करून अखंड एकरस प्रत्यक् ब्रह्मामध्यें पर्यवसान पावणारें ज्ञानकांडहि

अर्थवत् आहे. पण असें असतांना आत्म्याचें शास्त्रसिद्ध ब्रह्मत्व सोडून अब्रह्मत्वाची कल्पना करणारा वादी स्वतः आत्मघाती होऊन दोन्ही लोकांपासून भ्रंश पावतो, असें सांगतात-)—**शास्त्रार्थसंप्रदायरहितत्वात् श्रुतहानिं अश्रुतकल्पनां च कुर्वन् स्वयं मूढः आत्महा च अन्यान् व्यामोहयति**—तो स्वतःचाच घात करणारा शास्त्रार्थाच्या संप्रदायानें रहित असल्यामुळें श्रुत अर्थाचा त्याग व अश्रुत अर्थाची कल्पना करीत होत्साता स्वतः मूढ व आत्मघाती होऊन दुसऱ्यांना अत्यंत मोहित करतो.—**तस्मात् असंप्रदायविद् सर्वशास्त्रार्थविद् अपि मूर्खवत् एव उपेक्षणीयः**—म्हणून संप्रदायाला न जाणणारा सर्व शास्त्रार्थज्ञ जरी असला तरी त्याची मूर्खाप्रमाणेंच उपेक्षा करावी. [ 'तत्त्वमसि' या महावाक्याप्रमाणें प्रसिद्ध क्षेत्रज्ञाचा अनुवाद करून त्याचें अप्रसिद्ध असलेलें ईश्वरत्व येथे उपदेशद्वारा श्रुत आहे. त्याचा त्याग करणारा व कोठेंहि न सांगितलेला म्ह० अश्रुत असलेला जो जीवेश्वरांचा तात्त्विक भेद त्याची कल्पना करणारा अत्यंत मूढ कसा होणार नाही ? यास्तव या श्लोकाचें व्याख्यान करणारांनीं आपलें केवढेंहि जरी पांडित्य व्यक्त केलें असलें तरी ते शास्त्रार्थसंप्रदायरहित असल्यामुळें त्याज्य होय. ]

**यत्तूक्तमीश्वरस्य क्षेत्रज्ञैकत्वे संसारित्वं प्राप्नोति क्षेत्रज्ञानां चेश्वरैकत्वे संसारिणोऽभावात्संसाराभावप्रसङ्ग इति । एतौ दोषौ प्रत्युक्तौ विद्याविद्ययोर्वैलक्षण्याभ्युपगमादिति । कथम् । अविद्यापरिकल्पितदोषेण तद्विषयं वस्तु पारमार्थिकं न दुष्यतीति । तथा च दृष्टान्तो दर्शितो मरीच्यम्भसोषरदेशो न पङ्कीक्रियत इति । संसारिणोऽभावात्संसाराभावप्रसङ्गदोषोऽपि संसारसंसारिणोरविद्याकल्पितत्वोपपत्त्या प्रत्युक्तः ॥**

**भाष्यार्थ**—( 'क्षेत्रज्ञं०' या श्लोकांत क्षेत्रज्ञ व ईश्वर यांचे ऐक्य सांगितलें आहे, असा जो आचार्यांना अत्यंत अभीष्ट असलेला सिद्धान्त, तोच अधिक स्पष्ट करण्यासाठी एकदा ज्याचें निरसन केलें आहे त्याच शंकावाद्याच्या म्हणण्याचा अनुवाद करितात-)—**तु ईश्वरस्य क्षेत्रज्ञ-एकत्वे संसारित्वं प्राप्नोति क्षेत्रज्ञानां च ईश्वर-एकत्वे संसारिणः अभावात् संसाराभावप्रसङ्गः इति यत् उक्तं**—पण ईश्वराचें क्षेत्रज्ञाशीं एकत्व आहे, असें म्हटल्यास ईश्वराला संसारित्व प्राप्त होतें व क्षेत्रज्ञांचें ईश्वराशीं एकत्व आहे म्हणून म्हटलें, तर संसारी जीवांचाच अभाव झाल्यामुळें संसाराचाच अभाव होण्याचा प्रसंग येतो, असें जें म्हटलें होतें—**एतौ दोषौ विद्याविद्ययोः वैलक्षण्य-अभ्युपगमात् इति प्रत्युक्तौ**—ते दोन्ही दोष विद्या व अविद्या यांचें वैलक्षण्य मानलेलें असल्यामुळें, असें म्हणून घालविले आहेत. विद्या व अविद्या यांच्या विलक्षणपणामुळें त्या दोन्ही दोषांचा असंभव कसा आहे, तें सांगितलें. [ क्षेत्रज्ञ व ईश्वर यांचें एकत्व तात्त्विक आहे व क्षेत्रज्ञांचें संसारित्व अतात्त्विक-मिथ्या आहे, असा अंगीकार करून संसारित्व अविद्यावस्थेंत व असंसारित्व विद्यावस्थेंत, असें वर या शंकेचें समाधान सांगितलें आहे ]—**कथं**—पण विद्या व अविद्या यांचें वैलक्षण्य जरी असलें तरी त्या वैलक्षण्यानें ईश्वराचें संसारित्व व संसारी क्षेत्रज्ञाच्या अभावीं संसा-

राचा अभाव, या दोन दोषांचें निरसन कसे होतें ?—**अविद्यापरिकल्पितदोषेण तद्विषयं पारमार्थिकं वस्तु न दुष्यति इति**—अविद्येनें परिकल्पिलेल्या-अज्ञानानें आरोपित-दोषानें तद्विषयक पारमार्थिक वस्तु-त्या कल्पनेचें अधिष्ठान-दूषित होत नाहीं, असे म्हणून त्यांचें निरसन केलें [ म्ह० कल्पितसंसाराने त्या कल्पनेचें अधिष्ठान अशी जी अद्वय वस्तु ती संबद्ध होत नाहीं,असे सांगून ते दोष घालविले,]—**तथा च मरीचि-अम्भसा उषरदेशः न पङ्की क्रियते इति दृष्टान्तः दर्शितः**—आणि कल्पित वस्तूचा अधिष्ठानाशी संसर्ग होत नाहीं, याविषयी मृगजळाकडून उषरप्रदेश ओला केला जात नाही, असा दृष्टान्तहि दाखविला-असा त्याविषयी वर दृष्टान्तहि दिला आहे. ( पृ. ८९० पहा. याप्रमाणें ईश्वराला संसारित्व कसे प्राप्त होत नाही, तें प्रकट करून वर दुसऱ्या दोषाचे जे निरसन केलें आहे त्याचेंहि स्मरण देतात-)—**संसारिणः अभावात् संसाराभावदोषप्रसंगः अपि संसारसंसारिणोः अविद्याकल्पितत्वोपपत्त्या प्रत्युक्तः**—संसारी जीवाचा अभाव झाल्यामुळे संसाराचा अभाव होण्याचा प्रसंग येतो, या दोषाचेंहि संसार व संसारी जीव हे दोन्ही अविद्याकल्पित आहेत या उपपत्तीने निरसन केले आहे.

**नन्वविद्यावत्त्वमेव क्षेत्रज्ञस्य संसारित्वदोषस्तत्कृतं च दुःखित्वादि प्रत्यक्षमुपलभ्यते । न ज्ञेयस्य क्षेत्रधर्मत्वाज्ज्ञातुः क्षेत्रज्ञस्य तत्कृतदोषानुपपत्तेः । यावत्किंचित्क्षेत्रज्ञस्य दोषजातमविद्यमानमासञ्जयसि तस्य ज्ञेयत्वोपपत्तेः क्षेत्रधर्मत्वमेव न क्षेत्रज्ञधर्मत्वम् । न च तेन क्षेत्रज्ञो दुष्यति ज्ञेयेन ज्ञातुः संसर्गानुपपत्तेः । यदि हि संसर्गः स्याज्ज्ञेयत्वमेव नोपपद्येत । यद्यात्मनो धर्मोऽविद्यावत्त्वं दुःखित्वादि च कथं भोः प्रत्यक्षमुपलभ्यते । कथं वा क्षेत्रज्ञधर्मः । ज्ञेयं च सर्वं क्षेत्रं ज्ञातैव क्षेत्रज्ञ इत्यवधारितेऽविद्यादुःखित्वादेः क्षेत्रज्ञविशेषणत्वं क्षेत्रज्ञधर्मत्वं तस्य च प्रत्यक्षोपलभ्यत्वमिति विरुद्धमुच्यतेऽविद्यामात्रावष्टम्भात्केवलम् ॥**

**भाष्यार्थ**—( अहोपण, संसार व संसारित्व यांची कल्पना अविद्या करते, असें म्हणता येत नाही. कारण तिला स्वतंत्र मानली तर तत्त्वाचा व्याघात होतो. परतंत्र मानली तर तिचा दुसरा कोणी आश्रय नसल्यामुळे क्षेत्रज्ञच तिचा आश्रय मानावा लागतो. त्यामुळे क्षेत्रज्ञाकडे संसारित्व येते, अशी शंका-)—**ननु अविद्यावत्त्वं एव क्षेत्रज्ञस्य संसारित्वदोषः तत्कृतं च दुःखित्वादि प्रत्यक्षं उपलभ्यते**—अहोपण अविद्यावत्त्व हाच क्षेत्रज्ञाचा संसारित्वदोष आहे व त्या अविद्यावत्त्वामुळेंच त्याचें दुःखित्वादि प्रत्यक्ष उपलब्ध होतें. [ क्षेत्रज्ञाचें अविद्यावत्त्व हेंहि अविद्याकृतच आहे, अविद्येमुळेच क्षेत्रज्ञ अविद्यावान् होतो, असें म्हटल्यास अनवस्था दोष येतो. कारण ज्या अविद्येमुळें क्षेत्रज्ञ अविद्यावान् होतो, ती अविद्याहि जर दुसऱ्या अविद्येमुळें, त्याच्या ठिकाणीं येते, म्हणून म्हटलें तर ती दुसरी अविद्या तिसऱ्या अविद्येमुळें, तिसरी चवथीमुळें अशी परंपरा लागते. अहोपण, दांत उपटून काढलेल्या सर्पाप्रमाणें ती बाधित झालेली अविद्या काय करणार,म्हणून म्हणाल तर तें बरोबर नाहीं.कारण त्या अविद्येमुळेंच

तर क्षेत्रज्ञाचें दुःखित्वादि प्रतीत होते. यास्तव अविद्या क्षेत्रज्ञाच्या आश्रयानें जरी रहात असली तरी त्यांत कांहीं हानि नाहीं, असें म्हणतां येत नाहीं. पण अविद्या व अविद्येमुळें भासणारे संसारित्व ही दोन्ही ज्ञेय-ज्ञानाचा विषय आहेत. त्यामुळें त्यांना आत्म्याचा धर्म म्हणतां येत नाहीं, असे या शंकेचें समाधान आचार्य करितात-)—**न। ज्ञेयस्य क्षेत्रधर्मत्वात् ज्ञातुः क्षेत्रज्ञस्य तत्कृतदोषानुपपत्तेः**—ही शंका बरोबर नाहीं. कारण ज्ञेय-क्षेत्रज्ञाच्या अनुभवाचा विषय होणारी-अविद्या हा क्षेत्राचा धर्म आहे. त्यामुळें ज्ञाता जो क्षेत्रज्ञ त्याच्या ठिकाणीं त्या अविद्याकृत दोषाचा संभव नाहीं.—**यावत्किंचित् क्षेत्रज्ञस्य अविद्यमानं दोषजातं आसयञ्जासि तस्य ज्ञेयत्वोपपत्तेः क्षेत्रधर्मत्वं एव क्षेत्रज्ञधर्मत्वं न**—क्षेत्रज्ञाच्या ठिकाणी विद्यमान नसलेले जेवढे म्हणून दोष तूं त्याच्यावर लादशील,त्या सर्वांना ज्ञेयत्व उपपन्न होत असल्यामुळे क्षेत्रधर्मत्वच आहे, क्षेत्रज्ञधर्मत्व नाही. ते सर्व ज्ञेय असल्यामुळे क्षेत्राचे धर्म आहेत, क्षेत्रज्ञाचे नव्हेत. ( 'अहोपण, जे जे ज्ञेय-ज्ञानाचा विषय-तो तो क्षेत्राचा धर्म अशी व्याप्ति जरी मानली तरी क्षेत्राच्या द्वारा क्षेत्रज्ञाचे ठिकाणी त्याचे दोष येतील' अशी शंका घेऊन आचार्य म्हणतात-)—**च तेन क्षेत्रज्ञः न दुष्यति ज्ञेयेन ज्ञातुः संसर्गानुपपत्तेः**—व त्या क्षेत्राच्या धर्मांनीं क्षेत्रज्ञ दूषित होऊं शकत नाही. कारण ज्ञेयाशी ज्ञात्याचा संसर्ग होऊं शकत नाही, ( या म्हणण्याचेच अधिक उपपादन करितात-)—**हि यदि संसर्गः स्यात् ज्ञेयत्वं एव न उपपद्येत**—कारण क्षेत्रधर्माचा-ज्ञेयाचा जर ज्ञात्या क्षेत्रज्ञाशी संसर्ग झाला तर त्याचें-ज्ञेयाचे ज्ञेयत्वच उपपन्न होणार नाहीं. म्ह० त्याचें ज्ञेयत्वच उरणार नाहीं. ( अहोपण, एक धर्म व दुसरा धर्मी या नात्याने ज्ञेय व ज्ञाता यांचा जरी संसर्ग झाला तरी ज्ञेयाच्या ज्ञेयत्वाला कोणता बाध येणार ? अशी आशंका घेऊन सांगतात-)—**यदि अविद्यावत्त्वं च दुःखित्वादि आत्मनः धर्मः कथं भोः प्रत्यक्षं उपलभ्यते**—जर अविद्यावत्त्व व दुःखित्वादि हा आत्म्याचा धर्म असेल तर अरे बाबा,तो प्रत्यक्ष अनुभवास कसा येईल? [आत्म्याचा धर्महि जर आत्म्याचा विषय झाला तर स्वतः आत्माहि ज्ञेय होऊन कर्तृकर्मविरोध येईल.दीपच दीपाला प्रकाशित करतो, नेत्रच नेत्राला पाहतो, आपणच आपल्या खांद्यावर बसून जातो, असे होईल. शिवाय " अविद्यावत्त्व व तत्कृत दुःखित्वादि क्षेत्रज्ञाच्या आश्रयाने राहिलेलें नाहीं. ते क्षेत्रज्ञाचे धर्म नव्हेत. कारण ते त्याचे वेद्य आहेत. रूपादि इतर विषयांप्रमाणें " असें याविषयी अनुमान संभवते. तेव्हां ]—**वा क्षेत्रज्ञधर्मः कथं**—अविद्यावत्त्वादि हा क्षेत्रज्ञाचा धर्म कसा ? ( तसेंच, 'महाभूतानि अहंकार.०' इत्यादि ५ व ६ व्या श्लोकांत जेवढें म्हणून ज्ञेय आहे त्या सर्वांचा क्षेत्रामध्ये अन्तर्भाव केलेला असल्यामुळे अविद्यादिक हा ज्ञात्याचा धर्म नव्हे, असें सांगतात-)—**ज्ञेयं च सर्वं क्षेत्रं ज्ञाता एव क्षेत्रज्ञः इति अवधारिते**—आणि जेवढे म्हणून 'ज्ञेय' आहे तें सर्व क्षेत्र व 'ज्ञाता' हाच क्षेत्रज्ञ असा निश्चय केला असतां म्ह० या क्षेत्राला जो जाणतो तो क्षेत्रज्ञ असें पहिल्याच श्लोकांत म्हटलेलें असल्यामुळें क्षेत्रज्ञाच्या ज्ञातृत्वाचा निर्णय झाला आहे. त्यामुळें त्यांत ज्ञेयाचा प्रवेशच होऊं शकत नाहीं, असें झालें असतां

**—अविद्यादुःखित्वादेः क्षेत्रज्ञविशेषणत्वं क्षेत्रज्ञधर्मत्वं च तस्य प्रत्यक्षोपलभ्यत्वं इति केवलं अविद्यामात्रावष्टम्भात् विरुद्धं उच्यते**—अविद्या-दुःखित्व इत्यादिकांचे क्षेत्रज्ञविशेषणत्व, क्षेत्रज्ञधर्मत्व व प्रत्यक्ष उपलभ्यत्व असें हे केवल अविद्येचाच आश्रय करून विरुद्ध सांगितलें जाते. [ वर वर्णन केल्याप्रमाणें क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांचा स्वभाव निश्चित झाला असतां प्रमाण, युक्ति इत्यादिकांना सोडून व केवल अविद्येचा आश्रय करून अविद्या, दुःखित्व इत्यादि सर्व क्षेत्रज्ञाचीं विशेषणें, क्षेत्रज्ञाचे धर्म आहेत व ते प्रत्यक्ष ज्ञानाचे विषयहि आहेत असे म्हणणे सर्वथा अयोग्य, परस्परविरुद्ध आहे. ]

**अत्राऽऽह साऽविद्या कस्येति । यस्य दृश्यते तस्यैव । कस्य दृश्यत इति । अत्रोच्यतेऽविद्या कस्य दृश्यत इति प्रश्नो निरर्थकः । कथं, दृश्यते चेदविद्या तद्वन्तमपि पश्यसि । न च तद्वत्युपलभ्यमाने सा कस्येति प्रश्नो युक्तः । न हि गोमत्युपलभ्यमाने गावः कस्येति प्रश्नोऽर्थवान्भवेत् ॥**

**भाष्यार्थ**—( ज्या अविद्येच्या योगाने विरुद्ध अनुभवाचाहि निर्वाह करतां येतो तिला स्वातंत्र्य असणे शक्य नाही. चित्-हून दुसरा सत्य पदार्थ तर विद्यमान नाही, त्यामुळें त्या अविद्येचा चित्-हून दुसरा कोणी आश्रय मानता येत नाही, चित्-ला तिचा आश्रय मानावे तर विद्या-ज्ञान हाच तिचा स्वभाव असल्यामुळे-चित् विज्ञानरूप असल्यामुळे तिला अविद्येचा आश्रय मानणे विरुद्धच आहे. तेव्हां त्या अविद्येचा आश्रय कोण? अशा जिज्ञासेने प्रश्न-)—**अत्र कस्य सा अविद्या इति आह**—याविषयीं ती अविद्या कोणाची आहे, असा वादी प्रश्न करितो. ( तूं तिचा केवल सामान्य आश्रयच विचारीत आहेस की, त्या आश्रयाचाहि विशेष विचारतोस ? यांतील पहिल्या पक्षीं सांगतात-)—**यस्य दृश्यते तस्य एव**—ज्याला ती अविद्या दिसते त्याचीच ती आहे. ( पण ही अविद्या दृश्य आहे की अदृश्य ? दृश्य असेल तर परतंत्र झाली, त्यामुळें ती कोणाच्या तरी आश्रयानेच असली पाहिजे. आश्रयावांचून स्वतंत्रपणें तिचा अनुभव येणें शक्य नाही. यास्तव तिच्या सामान्य आश्रयाविषयी प्रश्न न करितां तिचा विशेष आश्रयच विचारणे उचित आहे. बरें, ती मुळीच अदृश्य आहे, म्हणून म्हणाल तर बरेंच झालें. अदृश्य असलेल्या तिचे भानच होत नसल्यामुळे तिचें अस्तित्वच मानण्याचें कारण नाही. यास्तव अविद्येच्या विशेष आश्रयाविषयींच प्रश्न-)—**कस्य दृश्यते इति**—ती अविद्या कोणाला दिसते ? ( अहोपण, अविद्या दृश्य असल्यामुळें व तिचा आश्रय आत्मा स्वानुभवसिद्ध असल्यामुळे या प्रश्नाला अवकाशच नाही, असें आचार्य म्हणतात-)—**अत्र उच्यते**—या प्रश्नाचे उत्तर सांगतो.—**अविद्या कस्य दृश्यते इति प्रश्नः निरर्थकः**—अविद्या कोणाला दिसते, हा प्रश्न निरर्थक -व्यर्थ आहे—**कथं**—तो कसा —**अविद्या दृश्यते चेत् तद्वन्तं अपि पश्यसि**—अविद्या जर दिसत असेल तर तूं अविद्यावानालाहि पाहतोसच. ( तथापि प्रश्न निरर्थक कसा ? उत्तर-)—**च तद्वति उपलभ्यमाने सा कस्य इति प्रश्नः**

**न युक्तः**—आणि अविद्यावान्–अविद्येचा आश्रय उपलब्ध होत असतांना 'ती कोणाची' हा प्रश्नच योग्य नाहीं.( हीच गोष्ट दृष्टान्तानें स्पष्ट करितात–)—**हि गोमति उपलभ्यमाने गावः कस्य इति प्रश्नः अर्थवान् न भवेत्**—कारण गायींचा स्वामी प्रत्यक्ष दिसत असतांना ' या गायी कोणाच्या ' हा प्रश्न योग्य–सार्थ ठरत नाहीं.

**ननु विषमो दृष्टान्तो गवां तद्वतश्च प्रत्यक्षत्वात्संबन्धोऽपि प्रत्यक्ष इति प्रश्नो निरर्थको न तथाऽविद्या तद्वांश्च प्रत्यक्षौ यतः प्रश्नो निरर्थकः स्यात् । अप्रत्यक्षेणाविद्यावताऽविद्यासंबन्धे ज्ञाते किं तव स्यात् । अविद्याया अनर्थहेतुत्वात्परिहर्तव्या स्यात् । यस्याविद्या स तां परिहरिष्यति । ननु ममैवाविद्या । जानासि तर्ह्यविद्यां तद्वन्तं चाऽऽत्मानम् । जानामि न तु प्रत्यक्षेण ॥**

**भाष्यार्थ**—( पण हा दृष्टान्त व दार्ष्टान्तिक यांचे साम्य नाहीं, असा आक्षेप–)—**ननु विषमः दृष्टान्तः**—अहोपण, हा दृष्टान्त विषम आहे, दार्ष्टान्तिकाशीं जुळेल असा नाहीं.—**गवां च तद्वतः प्रत्यक्षत्वात् संबन्धः अपि प्रत्यक्षः इति प्रश्नः निरर्थकः**—गायी व त्या गायींचा धनी या दोहोंनाहि प्रत्यक्षत्व आहे. गायीहि प्रत्यक्ष दिसतात व गायींचा धनीहि प्रत्यक्ष दिसतो, त्यामुळे त्यांचा संबंधहि प्रत्यक्ष आहे. ह्मणून ' गायी कोणाच्या ' हा प्रश्न निरर्थक ठरतो—**तथा अविद्या तद्वान् च प्रत्यक्षौ न**—पण त्याप्रमाणे अविद्या व अविद्यावान् प्रत्यक्ष नाहींत—**यतः प्रश्नः निरर्थकः स्यात्**—की ज्यामुळे प्रश्न निरर्थक होईल ! ( पण अज्ञानाचा आश्रय परोक्ष जरी असला तरी प्रश्न व्यर्थच ठरतो, असे आचार्य सांगतात–)—**अप्रत्यक्षेण अविद्यावता अविद्यासंबन्धे ज्ञाते किं तव स्यात्**—अप्रत्यक्ष असलेल्या अविद्यावानाशीं अविद्यासंबंध आहे असे जरी ज्ञात झाले, असें जरी कळले, तरी प्रश्न सार्थ आहे, असे दाखविण्यास तुला काय आधार आहे ? [ म्ह० अविद्येचा आश्रय अप्रत्यक्ष जरी असला तरी त्याच्याशी अविद्येचा संबंध आहे, असे सिद्ध करून दाखविले असता तुला आपला प्रश्न व्यर्थ नाहीं, हें कसे म्हणतां येईल ? यावर वादी म्हणतो– ]—**अविद्यायाः अनर्थहेतुत्वात् परिहर्तव्या स्यात्**—अविद्येला अनर्थाचे हेतुत्व असल्यामुळे–अविद्या अनर्थाचें कारण असल्यामुळे–ती परिहार करण्यास योग्य आहे,असें होईल.(पण सिद्धान्ती म्हणतात–)—**यस्य अविद्या सः तां परिहरिष्यति**—ज्याची अविद्या आहे, तो तिचा परिहार करील. ( त्यासाठी दुसऱ्याला प्रयत्न करण्याचे कारण नाहीं. पण वादी म्हणतो–)—**ननु मम एव अविद्या**—अहोपण, अविद्या माझीच आहे. [ मीच अविद्यावान् असल्यामुळें मलाच तिच्या परिहारासाठीं प्रयत्न केला पाहिजे. असे जर आहे, तर अविद्या कोणाची ? हा तुझा प्रश्न व्यर्थ आहे, असें तुझ्याच तोंडाने सिद्ध होते, असें आचार्य म्हणतात– ]—**तर्हि अविद्यां तद्वन्तं आत्मानं च जानासि**—तर मग तूं अविद्येला व तिने युक्त असलेल्या स्वतःला–आत्म्याला जाणतोस (त्यावर वादी म्हणतो–)—**जानामि तु प्रत्यक्षेण न**—मीच अविद्यावान् आहें, हें जरी मी जाणत असलों तरी प्रत्यक्षपणें जाणत नाहीं. [ त्याला प्रत्यक्ष जाणत नसल्यामुळें प्रश्न करितों. ]

**अनुमानेन चेज्जानासि कथं संबन्धग्रहणम् । न हि तव ज्ञातुर्ज्ञेयभूतयाऽविद्यया तत्काले संबन्धो ग्रहीतुं शक्यते । अविद्याया विषयत्वेनैव ज्ञातुरुपयुक्तत्वात् । न च ज्ञातुरविद्यायाश्च संबन्धस्य यो ग्रहीता ज्ञानं चान्यत्तद्विषयं संभवत्यनवस्थाप्राप्तेः । यदि ज्ञाताऽपि ज्ञेयसंबन्धो ज्ञायेतान्यो ज्ञाता कल्प्यः स्यात्तस्याप्यन्यस्तस्याप्यन्य इत्यनवस्थाऽपरिहार्या । यदि पुनरविद्या ज्ञेयाऽन्यद्वा ज्ञेयं ज्ञेयमेव तथा ज्ञाताऽपि ज्ञातैव न ज्ञेयं भवति । यदा चैवमविद्यादुःखित्वाद्यैर्न ज्ञातुः क्षेत्रज्ञस्य किंचिद् दुष्यति ॥**

**भाष्यार्थ**—( अविद्यावान् प्रत्यक्ष दिसत नाही, असें म्हणणाऱ्या वाद्याला आचार्य विचारतात–'तर मग तूं त्या अविद्यावानाला कोणत्या प्रमाणाने जाणतोस?')—**अनुमानेन चेत् जानासि कथं संबन्धग्रहणं**—अनुमानानें जर अविद्यावानाला जाणत असशील तर अविद्या व आत्मा यांच्या संबंधाचे ग्रहण, त्यांच्या परस्पर संबंधाचें ज्ञान तुला कसे होते ? [ ज्ञाता आत्माच आपल्या अविद्यासंबंधाला जाणतो, म्हणून म्हणशील तर-]—**तव ज्ञातुः ज्ञेयभूतया अविद्यया संबंधः तत्काले ग्रहीतुं नहि शक्यते**—तुज ज्ञात्याचा ज्ञेयभूत अविद्येशी असलेला संबंध तूं जेव्हां आपल्या अविद्येचा ज्ञाता असतोस, त्यावेळा तुला जाणतां येणे शक्य नाही. [ कारण त्यावेळीं अविद्या हा माझा विषय आहे, अशा रूपाने तिचें ग्रहण करून आत्म्याचा तिच्या ज्ञातृत्वाकडेच उपयोग झालेला असल्यामुळे आपल्याशीं अविद्येचा संबंध आहे, हें त्याला त्याच वेळी कळणे शक्य नाही, कारण एकाच्याच ठिकाणीं कर्तृत्व व कर्मत्व संभवत नाहीं, अशा आशयाने सांगतात-]—**अविद्यायाः विषयत्वेन एव ज्ञातुः उपयुक्तत्वात्**—कारण अविद्येच्या विषयत्वानेच ज्ञात्याचा उपयोग झालेला असतो, ज्ञाता-आत्मा अविद्येचें आपल्या विषयत्वानें ग्रहण करण्यांतच गुंतलेला असतो. [ बरें, ज्ञात्या आत्म्याहून दुसराच कोणी त्याच्या संबंधाचें ग्रहण करणारा असेल म्हणून म्हणावें तर-]—**ज्ञातुः च अविद्यायाः संबन्धस्य यः ग्रहीता ( सः न संभवति ) च तद्विषयं अन्यत् ज्ञानं न च संभवति**—ज्ञाता व अविद्या यांच्या संबंधाचा जो ग्रहण करणारा तो संभवत नाही, आणि तसेच ज्ञाता व अविद्या यांच्या संबंधाविषयींचें दुसरें ज्ञानहि संभवत नाहीं—**अनवस्थाप्राप्तेः**—कारण ज्ञात्याचा दुसरा ज्ञाता व ज्ञानाचे दुसरें ज्ञान मानल्यास अनवस्थादोषाची प्राप्ति होते, ( ती अशी-)—**यदि ज्ञेयसंबंधः ज्ञाता अपि ज्ञायेत अन्यः ज्ञाता कल्प्यः (स्यात्)**—जर ज्ञेयसंबंध ज्ञाता असूनहि जाणला जाईल तर त्याचाहि दुसरा ज्ञाता मानावा लागेल—**तस्य अपि अन्यः तस्य अपि अन्यः इति अनवस्था अपरिहार्या स्यात्**—मग त्याचाहि दुसरा ज्ञाता, त्याचाहि आणखी ज्ञाता, अशी अनवस्था अपरिहार्य होईल. [ कारण मग ज्ञाता दुसऱ्या ज्ञात्याकडून जाणला जातो, अशी व्याप्तिच ठरेल व त्यामुळे मूळ ज्ञाता कोण याचा निर्णयच होणार नाहीं.आत्माच स्वतःला व दुसऱ्यालाहि जाणतो, असे म्हणतां येणें शक्य नाहीं. त्यामुळें त्याच्यामध्यें अविद्यासंबंध आहे, असें मानण्यास कांहीं प्रमाण नाहीं. त्यामुळें आत्मा नित्य अनुभवगम्य आहे, असें सिद्ध झालें असतां कोणते फल निष्पन्न

होतें तें आचार्य सांगतात-]—**यदि पुनः अविद्या ज्ञेया अन्यत् वा ज्ञेयं ज्ञेयं एव तथा ज्ञाता अपि ज्ञाता एव ज्ञेयं न भवति**—पण जर अविद्या ज्ञेय आहे, किंवा दुसरें कांहीं ज्ञेय आहे, तर ते जसें ज्ञेयच असतें, तें ज्ञाता केव्हांहि होऊं शकत नाही, त्याप्रमाणे ज्ञाताहि नेहमीं ज्ञाताच असतो तो ज्ञेय कधीं होत नाही.—**यदा च एवं ( तदा ) अविद्यादुःखित्वाद्यैः ज्ञातुः क्षेत्रज्ञस्य न किंचित् दुष्यति**—आणि जेव्हां असें आहे तेव्हां अविद्या, दुःखित्व इत्यादि धर्मांनी ज्ञात्या क्षेत्रज्ञाचें कांहीं दूषित होत नाही.

**नन्वयमेव दोषो यद्दोषवत्क्षेत्रविज्ञातृत्वम् । न । विज्ञानस्वरूपस्यैवाविक्रियस्य विज्ञातृत्वोपचारात् । यथोष्णतामात्रेणाग्नेस्तप्तिक्रियोपचारस्तद्वत् । तथाऽत्र भगवता क्रियाकारकफलात्मत्वाभाव आत्मनि स्वत एव दर्शितोऽविद्याध्यारोपितैरेव क्रियाकारकाद्यात्मन्युपचर्यंते तथा तत्र तत्र ' य एनं वेत्ति हन्तारं ' ' प्रकृतेः क्रियमाणानि गुणैः कर्माणि सर्वशः' ' नाऽऽदत्ते कस्यचित्पापम् ' इत्यादिप्रकरणेषु दर्शितस्तथैव च व्याख्यातमस्माभिः। उत्तरेषु च प्रकरणेषु दर्शयिष्यामः ॥**

**भाष्यार्थ**—( पण ज्ञात्या आत्म्याचें कांहीं दूषित होत नाही, हें म्हणणे सहन न होऊन वादी पुनः शंका घेतो -)—**ननु यत् दोषवत्-क्षेत्रविज्ञातृत्वं अयं एव दोषः**—अहोपण, जें दोषयुक्त क्षेत्राचें विज्ञातृत्व-अविद्यादि दोषांनीं युक्त असलेल्या क्षेत्राला जाणणें हाच ज्ञात्याचा दोष आहे ! [ पण तूं ज्ञातृत्व म्हणजे काय समजतोस ? ज्ञान या क्रियेचें कर्तृत्व की ज्ञानस्वरूपत्व ? आत्म्याला ज्ञानक्रियेचे कर्तृत्व आहे, असा आमचा सिद्धान्तच नाहीं. त्यामुळे तसें मानल्यामुळे प्राप्त होणाऱ्या दोषांचा असंभव आहे; आणि ज्ञातृत्व म्ह० ज्ञानस्वरूपत्व समजत असशील, तर ज्ञानस्वरूप आत्म्याचें ज्ञानकर्तृत्व औपचारिक असल्यामुळें आत्मा तत्कृत दोषाने दूषित होत नाहीं, अशा आशयानें आचार्य म्हणतात-]—**न**—नाहीं, हा आत्म्याचा दोष होऊं शकत नाहीं.—**अविक्रियस्य विज्ञानस्वरूपस्य एव विज्ञातृत्वोपचारात्**—कारण सर्व विकारशून्य असलेल्या विज्ञानस्वरूप आत्म्याच्याच विज्ञातृत्वाचा उपचार केलेला आहे. ( क्रिया नसतांनाहि क्रियेचा उपचार कसा होतो, याविषयीं दृष्टान्त-)—**यथा उष्णतामात्रेण अग्नेः तप्तिक्रियोपचारः तद्वत्**—ज्याप्रमाणें केवल उष्णता या स्वभावामुळे अग्नीच्या तप्ति-ताप देणें या क्रियेचा उपचार होतो [ त्याप्रमाणें विक्रियारहित आत्म्यामध्ये त्याच्या ज्ञानस्वभावामुळें ज्ञानक्रियेचा उपचार होतो. आत्म्याच्या ठिकाणी वस्तुतः विक्रियेचा अभाव आहे,याविषयीं भगवानांची अनुमति दाखवितात-]—**तथा अत्र स्वतः एव आत्मनि क्रिया-कारक फलात्मत्वाभावः भगवता दर्शितः**—तसाच या गीताशास्त्रांत स्वभावतःच आत्म्यामध्यें क्रिया-कारक-फलात्मत्वाचा अभाव,भगवानांनीं दाखविला आहे. ( तसेंच आम्हींहि त्याचें व्याख्यान केले आहे.तर मग आत्म्यामध्यें क्रियादिकांचा आभास कसा होतो? उत्तर-)—**अविद्याध्यारोपितैः एव क्रियाकारकादि आत्मनि उपचर्यंते**—अविद्येमुळें अध्यारोप केलेल्या कर्तृत्वादिकांनींच आत्म्यामध्यें क्रियाकार-

कादिकांचा उपचार केला जातो. [ आत्म्यामध्यें वस्तुतः क्रिया, कारक व फल नाहीं. अविद्येमुळें उपचारानें तें भासतें, हें सांगण्याचा यत्न भगवानांनीं मागील प्रकरणांत ठिकठिकाणीं केला आहे, असे सांगतात - ]—**तथा तत्र तत्र 'य एनं वेत्ति हन्तारं' (अ. २.१९) 'प्रकृतेः क्रियमाणानि गुणैः कर्माणि सर्वशः' ( ३.२७ ) 'नादत्ते कस्यचित् पापं०' ( ५.१५ ) इत्यादिप्रकरणेषु दर्शितः**—त्याचप्रमाणें ठिकाठिकाणीं 'जो आत्म्याला हननक्रियेचा कर्ता समजतो,' (गी.भा.पृ. ९४) 'प्रकृतीच्या गुणांकडून सर्व कर्मे केली जातात, पण अहंकारानें ज्याचें चित्त मूढ झालें आहे तो मी कर्ता आहें, असें मानतो' (पृ.३२३)' तो प्रभु आत्मा कोणाचे पाप व पुण्य घेत नाहीं' (पृ.५१०)इत्यादि प्रकरणांत आत्म्यामध्यें क्रिया-कारकादिकांचा अभाव भगवानांनीं दाखविला आहे.—**तथा एव च अस्माभिः व्याख्यातं**—आणि त्याचप्रमाणें आम्हीं त्याचें व्याख्यान केलें आहे. ( भगवानांनी केवल या पूर्वीच्या प्रकरणांतच हा सिद्धान्त सांगितला आहे, असे नाहीं. तर यापुढील प्रकरणांतहि तो सांगितला आहे. )—**उत्तरेषु च प्रकरणेषु दर्शयिष्यामः**—आणि भगवानांच्या कथनानुसार आम्हींहि या पुढील प्रकरणांत तो दाखवूं. [ आत्म्यामध्ये वस्तुतः क्रियाकारकादिकांचा अभाव असून केवल आत्मस्वरूपाच्या अज्ञानामुळें-भ्रमानें ते सर्व भासते, हाच तो सिद्धान्त होय. ]

**हन्त तर्ह्यात्मनि क्रियाकारकफलात्मतायाः स्वतोऽभावेऽविद्यया चाध्यारोपितत्वे कर्माण्यविद्वत्कर्तव्यान्येव न विदुषामिति प्राप्तम् । सत्यमेवं प्राप्तम् । एतदेव च 'न हि देहभृता शक्यं' इत्यत्र दर्शयिष्यामः । सर्वशास्त्रार्थोपसंहारप्रकरणे च 'समासेनैव कौन्तेय निष्ठा ज्ञानस्य या परा' इत्यत्र विशेषतो दर्शयिष्यामः । अलमिह बहुप्रपञ्चेनेत्युपसंह्रियते ॥ २ ॥**

**भाष्यार्थ**—( अहोपण, आत्म्यामध्ये वस्तुतः क्रिया-कारक-फलांचा अभाव आहे व अध्यासामुळे त्याच्या ठिकाणी त्यांचा भास होतो, असे म्हटल्यास कर्मकांडाचा अधिकार अविद्वानाला आहे, असें ठरते. पण मग 'विद्वान् यजेत' 'ज्ञात्वा कर्म आरभेत' इत्यादि शास्त्राशी विरोध येतो, अशी शंका-)—**हन्त तर्हि आत्मनि क्रियाकारकफलात्मतायाः स्वतः अभावे अविद्यया च अध्यारोपितत्वे कर्माणि अविद्वत्कर्तव्यानि एव विदुषां न इति प्राप्तम्**—बरें, तर मग आत्म्यामध्यें क्रिया-कारक-फलरूपतेचा स्वभावतः अभाव असून त्याच्या ठिकाणीं क्रिया-कारकादि अध्यारोपितच जर असतील, तर कर्मे अविद्वानांचीं कर्तव्येच आहेत, विद्वानांची नव्हेत असें म्हणणें प्राप्त होतें. [ म्ह० आत्म्यामध्यें क्रियाकारकफलरूपत्व स्वाभाविक नसून आरोपित आहे, असें म्हटल्यास कर्मांचा अधिकार अविद्वानांचाच आहे, विद्वानांचा नाहीं, हें सिद्ध होतें. 'विद्वान् यजेत' इत्यादि वाक्यांतील विद्वत्ता आत्मा शरीरेंद्रियसंघाताहून निराळा व परलोकसंबंधी आहे, याच स्वरूपाची आहे. त्यामुळें आत्मा क्षुधा, तृषा, इत्यादि सर्वसंसारधर्मरहित, नित्य, निर्विकार आहे, असें ज्ञान नसलेल्या पुरुषालाच कर्मकांडाचा अधिकार आहे, या गोष्टीचा आचार्य स्वीकार करितात-]—**सत्यं एवं प्राप्तम्**—

खरें आहे, असेंच ह्मणावें लागतें. ( पण तें उपपन्न कसें होतें ? उत्तर- ) —**एतत् एव च 'न हि देहभृता शक्यं०' इति-अत्र दर्शयिष्यामः**—आणि हेंच आम्ही 'न हि देहभृता शक्यं०' ( १८-२१ ) या श्लोकाच्या व्याख्यानांत दाखवूं. ( ज्ञानी पुरुषाचा ज्ञाननिष्ठेंतच अधिकार व अज्ञाचाच कर्मनिष्ठेमध्यें अधिकार ही गोष्ट उपसंहार प्रकरणांत विशेषतः दाखवूं असें सांगतात- )—**च सर्वशास्त्रोपसंहारप्रकरणे 'समासेनैव कौन्तेय निष्ठा ज्ञानस्य या परा' इति-अत्र विशेषतः दर्शयिष्यामः**—आणि सर्वशास्त्रांच्या उपसंहारप्रकरणांत 'समासेनैव कौन्तेय० ' (१८.५०) या ठिकाणीं विशेषें-करून प्रदर्शित करूं. ( तात्पर्य जीव व ब्रह्म यांचे ऐक्य मानले असतां कोणत्याहि प्रकारचा दोष येत नाही, अशा आशयाने प्रस्तुत श्लोकाच्या व्याख्यानाचा उपसंहार करितात- )—**इह बहुप्रपंचेन अलं इति उपसंह्रियते**—येथें अधिक विस्तार करण्यांत कांहीं अर्थ नाही, म्हणून हें व्याख्यान पुरें केले जातें. २.

**तत्क्षेत्रं यच्च यादृक्च यद्विकारि यतश्च यत् ।**
**स च यो यत्प्रभावश्च तत्समासेन मे शृणु ॥ ३ ॥**

**अन्वयार्थ—तत् क्षेत्रं**—तें क्षेत्र—**यत्**—कोणतें—**च**—व—**यादृक्**—कोणत्या प्रकारचें—**च**—आणि—**यद्विकारि**—कोणकोणत्या विकारांनी युक्त असलेले—**यतः च यत्**—व ज्या कारणाचें जे कार्य आहे,—**च**—त्याचप्रमाणें—**यः**—जो क्षेत्रज्ञ—**सः**—तो कोण—**च**—व—**यत्प्रभावः**—ज्याप्रभावानें युक्त आहे,—**तत्**—तें—**मे**—मजपासून—**समासेन**—संक्षेपतः—**शृणु**—ऐक. ३

**इदं शरीरमित्यादिश्लोकोपदिष्टस्य क्षेत्राध्यायार्थस्य संग्रहश्लोकोऽयमुपन्यस्यते तत्क्षेत्रं यच्चेत्यादिः व्याचिख्यासितस्य ह्यर्थस्य संग्रहोपन्यासो न्याय्य इति—यन्निर्दिष्टमिदं शरीरमिति तत्तच्छब्देन परामृशति । यच्चेदं निर्दिष्टं क्षेत्रं तद्यादृग्यादृशं स्वकीयैर्धर्मैः । चशब्दः समुच्चयार्थः । यद्विकारि यो विकारोऽस्य तद्यद्विकारि यतो यस्माच्च यत्कार्यमुत्पद्यत इति वाक्यशेषः । स च यः क्षेत्रज्ञो निर्दिष्टः स यत्प्रभावो ये प्रभावा उपाधिकृताः शक्तयो यस्य स यत्प्रभावश्च तत्क्षेत्रक्षेत्रज्ञयोर्याथात्म्यं यथाविशेषितं समासेन संक्षेपेण मे मम वाक्यतः शृणु श्रुत्वाऽवधारयेत्यर्थः ॥ ३ ॥**

**भाष्यार्थ—'इदं शरीरं०' इत्यादिश्लोकोपदिष्टस्य क्षेत्राध्यायार्थस्य अयं 'तत्क्षेत्रं यच्च०' इत्यादिः संग्रहश्लोकः उपन्यस्यते**—'इदं शरीरं०' या पहिल्या श्लोकाने सांगितलेल्या प्रस्तुत क्षेत्राध्यायाच्या अर्थाचा हा 'तत्क्षेत्रं०' इत्यादि संग्रहश्लोक येथें उपन्यस्त केला जातो. [ म्ह० या अध्यायाच्या पहिल्या श्लोकांत समग्र क्षेत्राध्यायाच्या विषय सांगितला, व या श्लोकांत त्याचाच थोडक्यांत उपन्यास केला आहे. पण या संक्षेपाचा उपयोग काय ? उत्तर- ]—**व्याचिख्यासितस्य हि अर्थस्य संग्रहोपन्यासः न्याय्यः इति**—ज्या विषयाचें सविस्तर व्याख्यान करावयाचें असतें त्याचा संक्षेपतः उपन्यास करणें न्याय्यच आहे, त्यामुळें त्या विषयाचें ज्ञान

सुलभ होतें, म्हणून त्याचा संक्षेपतः निर्देश करणें योग्यच होय.—' **इदं शरीरं ' इति यत् निर्दिष्टं तत् तच्छब्देन परामृशति**—' इदं शरीरं० ' या श्लोकानें ज्याचा निर्देश केला त्या शरीराचा या श्लोकांतील पहिल्या ' तत् ' या शब्दानें परामर्श करितात. ( तें क्षेत्र जाणावें, असा ' ज्ञातव्यं–जाणावें ' या क्रियापदाचा अध्याहार करावा– )—**च यत् इदं निर्दिष्टं क्षेत्रं तत् यादृक्–यादृशं स्वकीयैः धर्मैः**—आणि जे हे वर निर्दिष्ट केलेलें क्षेत्र तें कशाप्रकारचें आहे, स्वकीय धर्मांनीं कशाप्रकारचें आहे ?—**चशब्दः समुच्चयार्थः**—येथील पांचां 'च'–शब्द समुच्चय या अर्थी आहेत—**यद्विकारि–यः विकारः अस्य तत् यद्विकारि**—याचा जो विकार आहे ते यद्विकारि,—**'यतः'–यस्मात् 'च' 'यत्'–कार्यं उत्पद्यते इति वाक्यशेषः**—आणि ज्या कारणापासून जे सर्व कार्य ' उत्पन्न होते,' असा येथें वाक्यशेष लावावा. [ या वाक्याला 'उत्पद्यते' हे क्रियापद जोडावे, सर्व कार्य ज्या कारणापासून उत्पन्न झालें, तें कारण जाणावे. आता क्षेत्राप्रमाणेच क्षेत्रज्ञालाहि जाणावे, असे सांगतात– ]—**सः च यः क्षेत्रज्ञः निर्दिष्टः सः**—आणि तो जो क्षेत्रज्ञ म्हणून निर्दिष्ट केलेला त्याला जाणावें.—**यत्प्रभावः–ये प्रभावाः उपाधिकृताः शक्तयः यस्य सः यत्प्रभावः च**—'यत्प्रभाव' जे प्रभाव म्ह० चक्षुरादि उपाधिकृत शक्ति ज्याच्या आहेत तो यत्प्रभाव होय, [ त्या प्रभावांनींच तो जाणण्यास योग्य आहे. ]—**तत् क्षेत्रक्षेत्रज्ञयोः यथाविशेषितं याथात्म्यं समासेन–संक्षेपेण मे–मम वाक्यतः शृणु–श्रुत्वा अवधारय इत्यर्थः**—ते क्षेत्र व क्षेत्रज्ञ याचे वर जसे विशेषित केलें आहे तसले, यथार्थ स्वरूप–वर सांगितलेल्या प्रकारचे क्षेत्रक्षेत्रज्ञांचे परमार्थ स्वरूप संक्षेपाने थोडक्यात माझ्या वाक्यावरून तूं ऐक व मी संक्षेपानें सांगत असलेलें हे क्षेत्रक्षेत्रज्ञाचे याथात्म्य श्रवण करून तूं त्याविषयीं निश्चय कर, असा भावार्थ. ३

**ऋषिभिर्बहुधा गीतं छन्दोभिर्विविधैः पृथक् ।**
**ब्रह्मसूत्रपदैश्चैव हेतुमद्भिर्विनिश्चितैः ॥ ४ ॥**

**अन्वयार्थ—ऋषिभिः**—वसिष्ठादि ऋषींनीं—**बहुधा**—अनेक प्रकारांनीं—**गीतं**—गायलेले—**विविधैः छन्दोभिः**—नाना प्रकारच्या वेदानी—**पृथक् ( गीतं )** अगदीं विवेकतः गायलेले—**च**—आणि—**हेतुमद्भिः**—युक्तियुक्त—**विनिश्चितैः**—अत्यंत निश्चित अशा—**ब्रह्मसूत्रपदैः**—ब्रह्मसूत्रपदांनीं—**एव (बहुधा गीतं)**—अनेक प्रकारे गायलेले असे हे आहे. ४,

**तत्क्षेत्रक्षेत्रज्ञयोर्याथात्म्यं विवक्षितं स्तौति श्रोतृबुद्धिप्ररोचनार्थम्—ऋषिभिर्वसिष्ठादिभिर्बहुधा बहुप्रकारं गीतं कथितं छन्दोभिश्छन्दांसि ऋगादीनि तैश्छन्दोभिर्विविधैर्नानाप्रकारैःपृथग्विवेकतो गीतम् । किंच ब्रह्मसूत्रपदैश्चैव ब्रह्मणः सूचकानि वाक्यानि ब्रह्मसूत्राणि तैः पद्यते गम्यते ज्ञायते ब्रह्मेति तानि पदान्युच्यन्ते । तैरेव च क्षेत्रक्षेत्र-**

ज्ञयोर्याथात्म्यं गीतमित्यनुवर्तते । " आत्मेत्येवोपासीत " इत्यादिभिर्हि ब्रह्मसूत्रपदै-रात्मा ज्ञायते । हेतुमद्भिर्युक्तियुक्तैर्विनिश्चितैर्न संशयरूपैर्निश्चितप्रत्ययोत्पादकैरित्यर्थः ॥

**भाष्यार्थ—तत् विवक्षितं क्षेत्रक्षेत्रज्ञयोः याथात्म्यं श्रोतृबुद्धिप्ररोचनार्थं स्तौति**—त्या विवक्षित असलेल्या क्षेत्र-क्षेत्रज्ञांच्या याथात्म्याची श्रोत्यांच्या बुद्धींत रुचि उत्पन्न करण्यासाठीं भगवान् स्तुति करितात—**ऋषिभिः वसिष्ठादिभिः बहुधा-बहुप्रकारं गीतं-कथितं**—वसिष्ठादि ऋषींनीं बहुत प्रकारें-कथन केलेलें—**छन्दोभिः-छन्दांसि-ऋगादीनि तैः छन्दोभिः विविधैः-नानाप्रकारैः पृथक्-विवेकतः गीतं**—छंदांनी-येथे छंद म्ह० ऋगादि वेद, त्या छंदांनी अनेक शाखाभेदांमुळें विविध-नानाप्रकारच्या वेदांनीं पृथक् म्ह० अगदी विवेकपूर्वक कथन केलेलें ( तें क्षेत्रक्षेत्रज्ञांचें याथात्म्य केवल श्रुतिस्मृतींनीं कथन केलेलेच नाही, तर तें युक्तिपूर्णहि आहे, उपनिषदांत ते युक्तींनी सिद्ध केलेले आहे, असे सांगतात-)—**र्किं च ब्रह्मसूत्रपदैः च एव**—आणि तसेच ब्रह्मसूत्रपदांनीच कथन केलेलें—**ब्रह्मणः सूचकानि वाक्यानि ब्रह्मसूत्राणि तैः ब्रह्म पद्यते-गम्यते-ज्ञायते इति तानि पदानि उच्यन्ते**—ब्रह्माचीं जीं सूचक वाक्यें तीं ब्रह्मसूत्रे, त्यांच्या योगाने ब्रह्म जाणले जातें म्हणून तीच पदें म्हटलीं जातात.—**तैः एव च क्षेत्रक्षेत्रयोः-याथात्म्यं गीतं इति अनुवर्तते**—त्याच ब्रह्मसूत्रपदांनी क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांचे याथात्म्य कथन केले आहे, असें 'गीतं' हे पद येथे अनुवृत्त होतें. ( त्यांतील कांहीं ब्रह्मसूचक पदांचाच उल्लेख करितात -)—**'आत्मेत्येवोपासीत ' इत्यादिभिः हि ब्रह्मसूत्रपदैः आत्मा ज्ञायते**—' आत्मा ' अशीच त्याची उपासना करावीं, इत्यादि ब्रह्मसूत्रपदांनी आत्मा जाणला जातो. ( 'इत्यादि' या शब्दाने ' ब्रह्मविद् आप्नोति परं ' ' सत्यं ज्ञानं अनन्तं ब्रह्म ' [तैत्तिरीय-भाष्यार्थ २,१ पृ.७५,७८] 'योऽन्यां देवतां उपास्ते' [बृह.भाष्यार्थ १, ४ पृ. ३३४] 'यतो वा इमानि भूतानि जायन्ते' [तैत्तिरी. भाष्यार्थ ३.१ पृ.१७७] इत्यादि विद्या-अविद्या-सूत्रें घ्यावीं. ' अथातो ब्रह्मजिज्ञासा-इत्यादि सूत्रेहि येथे घेतली जातात. कारण तसें न मानल्यास 'छन्दोभिः' याच्याशीं पुनरुक्ति होते,' असें कोणी म्हणेल असें समजून आचार्य ' ब्रह्मसूत्रपदैः ' याला दोन विशेषणें देतात- )—**हेतुमद्भिः-युक्तियुक्तैः**—हेतुमत्-युक्तियुक्त अशा ब्रह्मसूचक पदांनीं—**विनिश्चितैः-न संशयरूपैः निश्चितप्रत्ययोत्पादकैः इत्यर्थः**—अत्यंत निश्चित अशा म्ह० संशयरूप नव्हे तर निश्चित प्रत्यय उत्पन्न करणाऱ्या अशा ब्रह्मसूत्रपदांनीं[१] क्षेत्रक्षेत्रज्ञांचें याथात्म्य कथन केलें आहे, असा याचा भावार्थ. ४.

---

१ रहस्यकार या श्लोकाचा अर्थ-" बहुत प्रकारें, विविध छंदांनीं, पृथक् पृथक्, (अनेक) ऋषींनी आणि (कार्यकारणरूप) हेतु दाखवून पूर्ण निश्चित केलेल्या ब्रह्मसूत्रातील पदांनींहि हें म्ह० हा विषय गाइला आहे " असा करितात. तो वरील भाष्यार्थाशीं ताडून पहावा. म्हणजे त्यांतील युक्तायुक्तता सहज ध्यानांत येईल. 'छन्दोभिः' याचा अर्थ विविध छंद असा करितात. पण येथील ' छंद ' या शब्दाचा अर्थ वेद असा आहे. रहस्यकार

' पृथक् ' या क्रियाविशेषणाचा अर्थ ऋषीच्या विशेषणासारखा करून त्याचा ' पृथक् पृथक् (अनेक) ऋषींनी ' असा करितात व त्याचें कारण ' उपनिषदें हा एकाच ऋषीचा एकच ग्रंथ नसून, अनेक ऋषीस भिन्न भिन्न काली किंवा स्थली ज्या अध्यात्मविचारांचें स्फुरण झालें; ' इत्यादि सांगतात. पण उपनिषदांतच मात्र क्षेत्र-क्षेत्रज्ञांचें स्वरूप सांगितले आहे असें नाही. दुसरेहि अनेक स्मृतिग्रंथ व पुराणे, यांतून तें सागितलेलें आहे. त्यामुळें ' विविध व पृथक् हे शब्द उपनिषदांच्या सकीर्ण स्वरूपासच उद्देशून आहेत ' या म्हणण्यांत मुळीच स्वारस्य नाही. शिवाय अर्थांत 'विविध' हे छंदाचें विशेषण केलें आहे. पण येथें उपनिषदांतच हा विषय गायला, असें म्हटल्यास उपनिषदांस प्राय: छंद नाहीत. संहितेलाच छंद असतात. त्यामुळेहि हे म्हणणे अयुक्त ठरते. छंद म्ह० वेद म्हणावे, तर गीतेत कर्मकांडाचाच वेदशब्दाने उल्लेख केला आहे. म्हणून रहस्यकारांना ' छंदोभि: ' म्ह० वेदांनी, असें स्पष्ट म्हणण्याचीहि पचाईत पडली. म्हणून त्यांनी ' छदोभि: ' म्ह० छदानी असे मोघम सांगून वेळ मारून नेली आहे. पण आचार्यांची परिभाषा ' मंत्रब्राह्मणात्मको हि वेद: ' अशी असल्यामुळें त्यांना ' छन्दोभि: ' म्ह० ' वेदै: ' असे नि:शकपणें म्हणण्यास कांहीच अडचण भासली नाही. शिवाय ' वेदैश्च सर्वै: ' ( १५–१५. ) ' यदक्षरं वेदविदो वदन्ति ' (८. ११ गी. भा. ६५६) ही वाक्ये ' छन्दोभि: ' म्ह० ' वेदै: ' असाच अर्थ करण्यास अनुकूल आहेत. असो; रहस्यकार " या श्लोकांत ब्रह्मसूत्रशब्दानें प्रस्तुतचीं वेदान्तसूत्रे उद्दिष्ट आहेत, हे गीतारहस्याचे परिशिष्ट प्रकरणांत आम्हीं सविस्तर दाखविले आहे." असे म्हणतात. पण आचार्य 'उपनिषदातील ब्रह्मसूचक वाक्ये हीच पदें, त्यांनी' असे म्हणतात, हे भाष्यार्थावरून उघडच होत आहे. यास्तव रहस्यकाराच्या म्हणण्याचा विचार आपल्यालाहि केला पाहिजे—ते म्हणतात " येथील ब्रह्मसूत्रे व हल्लींचीं वेदान्तसूत्रे एकच मानिल्यास हल्लींच्या वेदान्तसूत्रानतर हल्लींची गीता झाली, असे प्राप्त होते. ... हल्लींच्या ब्रह्मसूत्रानंतर गीता झाली असावी हे म्हणणे शोभत नाही. कारण गीता याहून प्राचीन आहे, अशी परपरागत समजूत आहे. प्राय: ही अडचण लक्षांत आणूनच शांकरभाष्यात 'ब्रह्मसूत्रपदै:' याचा अर्थ श्रुतींतील किंवा उपनिषदांतील 'ब्रह्मप्रतिपादकवाक्यें' असा केला असावा असे दिसते " (याचा भावार्थ असा की, शकराचार्य नुस्त्या परपरागत समजुतीला बळी पडून त्यानी असा अर्थ केला ! पण आचार्यांचें प्रस्थानत्रय भाष्य पाहिले, म्हणजे ते अयोग्य परपरागत समजुतीचा ओघ वळवून त्याला इष्ट मार्गास लावणारे होते, परंपरागत अंध समजुतीला मान तुकविणारे नव्हते, हें उघड दिसते. तसे नसते तर अद्वैत सिद्धान्त प्रस्थापित करण्याचे महत्कार्य त्यांच्या हातून कधीच घडलें नसते. असो. ) पुढें ते म्हणतात—"उलटपक्षीं शांकरभाष्यावरील टीकाकार आनंदगिरि आणि रामानुजाचार्य, मध्वाचार्य, वगैरे गीतेवरील दुसरे भाष्यकार ' ब्रह्मसूत्रपदैश्चैव ' या शब्दांनी " अथातो ब्रह्मजिज्ञासा " या बादरायणाचार्यांच्या ब्रह्मसूत्रांचाच या ठिकाणीं निर्देश आहे, असें म्हणतात व श्रीधरस्वामी दोन्ही अर्थ देतात. तेव्हां या श्लोकाचा खरा अर्थ, कोणता, हें स्वतंत्र रीतीनेच आपणांस ठरविले पाहिजे." पण यांतील आनंदगिरीचा निर्देश सर्वथा बरोबर नाही. कारण आनंदगिरि आचार्यांच्या भाष्याच्याविरुद्ध कांही सांगत नसून—'अथातो ब्रह्मजिज्ञासा' इत्यादीनि अपि अत्र गृहीतानि अन्यथा छन्दोभिरित्यादिना पौनरुक्त्याद् इति मत्वा विशिनष्टि हेतुमद्भिरिति।

भाष्यांतील 'इत्यादीनि' या पदानें 'अथातो ब्रह्मजिज्ञासा' इत्यादि सूत्रांचेंहि ग्रहण केलें आहे. कारण तसें न केल्यास 'छन्दोभिः' याच्याशी पुनरुक्ति होते, असें समजून 'हेतुमद्भिः' इत्यादि विशेषण 'ब्रह्मसूत्रपदैः' याला देतात, अशी भाष्याची योजना करीत आहेत शंकरानद, भाष्योत्कर्षदीपिकाकार, श्रीधर वगैरेहि असे व्याख्यान करितात. त्यामुळें वस्तुत फारसा वाद रहात नाही. आचार्यांच्या भाष्याप्रमाणे उपनिषदांतील व ब्रह्मसूत्रांतील ब्रह्मप्रतिपादक हेतुमत् व विनिश्चित वाक्ये घ्यावीं, असें होतें व रहस्यकार, माध्व व रामानुज यांच्या म्हणण्याप्रमाणें फक्त बादरायणसूत्रेंच घ्यावीं, असें ठरतें. पण उपनिषदांतील आत्मप्रतिपादक वाक्येंच ब्रह्मसूत्रापेक्षा अधिक हेतुमत् व विनिश्चित आहेत आणि ब्रह्मसूत्रेंच अतिशय सदिग्ध आहेत. तथापि 'ब्रह्मसूत्रपदैः०' या शब्दाने ती घेण्यास अद्वैतवाद्यांची कांही हरकत नाही, एवढेच आह्मांला येथें सांगावयाचे आहे. पण 'ब्रह्मसूत्र' पदाने वेदान्त सूत्रे घेतल्यास ती गीतेच्या पूर्वी होती असें म्हणावें लागतें. पण ब्रह्मसूत्रात 'स्मृति' या शब्दाने गीतेचाच उल्लेख केलेला दिसतो. म्हणून ही अडचण घालविण्यासाठी रहस्यकारांनी अशी 'चिकित्सा' केली आहे. "मूळ महाभारत व तदन्तर्गत गीता यांस हल्लीचे स्वरूप देण्याचें व ब्रह्मसूत्रे रचण्याचे काम एकाच बादरायणाचार्यांनी केलें असावे ... ... हल्लीच्या गीतेस आधारभूत झालेली गीता बादरायणाचार्यांच्याहि पूर्वी उपलब्ध असल्या मुळें तिचा ब्रह्मसूत्रात 'स्मृति' या शब्दाने निर्देश केला व महाभारताची शुद्धि करितान क्षेत्रक्षेत्रज्ञांचा सविस्तर विचार ब्रह्मसूत्रांत केलेला आहे, असें गीतेंत सांगितले आहे.' आतां ही त्याची मीमांसा सदोष आहे की, निर्दोष हे ठरविण्याचे काम आम्ही वाचकांवरच सोपवितो. आमचे त्याविषयीं एवढेच म्हणणे आहे की, बादरायणव्यासांनी ब्रह्मसूत्रें रचली व 'लुप्त किंवा विस्खलित व त्रुटित महाभारताचे शोधन करिताना' त्यांत आपल्याच ब्रह्मसूत्रांची जाहिरात देऊन ठेवली, हा दोष ब्रह्मसूत्रकारांवर येतो, तो बरोबर नाही. कारण गीतेसारख्या प्रमाण ग्रंथात आपल्याच ब्रह्मसूत्रपदांचा उल्लेख आपणच करावा, हें ब्रह्मसूत्रकारांच्या यशाला बाध आणणारे आहे शिवाय 'ब्रह्मसूत्रे' अत्यंत संदिग्ध आहेत. भाष्यावांचून त्यांचा अर्थबोधच संभवत नाही त्यापेक्षां उपनिषदांतील ब्रह्मप्रतिपादक वाक्येंच अधिक निश्चित व हेतुमत् आहेत. 'सत् एव इदं अग्र आसीत्' 'कुतस्तु सोम्य एवं स्यात्... कथ असतः सत् जायेत । सत्त्वेव सोम्य इदं अग्र आसीत् एकं एव अद्वितीयं' (छां. भा. पृ. ४१५ ते २१) 'नेदं अमूलं भविष्यति' 'मूलं अन्विच्छ' 'ऐतदात्म्यं इदं सर्वं तत्सत्यं स आत्मा तत्त्वमसि' (छा. भा. ४७५) 'को ह्येवान्यात् कः प्राण्यात्। यदेष आकाश आनन्दो न स्यात्। एष ह्येव आनंदयाति-' (तैत्ति भाष्यार्थ पृ. १४४.) इत्यादि शतशः वाक्यें हेतुमत् व विनिश्चित आहेत. वास्तव केवल 'हेतुमत्' व 'विनिश्चित' या विशेषणांची उपपत्ति लावण्यासाठीं वेदान्तसूत्रेंच घेतलीं पाहिजेत व त्यांची उपपत्ति लावण्यासाठीं महाभारत पूर्वीच कोरीं केलेलें असून 'लुप्त, विस्खलित किंवा त्रुटित' झालेल्या त्यांचें शोधन करितांना त्या संधीचा फायदा घेऊन बादरायणांनी आपलींच ब्रह्मसूत्रें गीतेंत घुसडून दिलीं, अशी अत्यंत क्लिष्ट व अनुपपन्न कल्पनाच केली पाहिजे, असें आम्हांला वाटत नाही. त्यापेक्षां आनंदगिरीची भाष्ययोजनाहि क्षणभर बाजूला सारून मधुसूदनसरस्वती, नीलकंठ, वल्लभसंप्रदायी अमृततरंगिणी टीका यांना अनुसरून 'ब्रह्मसू

त्रपदैः' या शब्दानें भाष्यांत म्हटल्याप्रमाणें उपनिषद्वाक्येंच घेणें अधिक सयुक्तिक व निर्दोष आहे. 'वसिष्ठादि ऋषींनी योगशास्त्रांत ध्यानधारणादिविषयत्वानें क्षेत्रक्षेत्रज्ञांच्या याथात्म्याचें बहुत प्रकारें निरूपण केलें आहे. मंत्र-ब्राह्मणात्मक ऋग्वेदादि विविध छंदांनीं त्याचेंच निरूपण केलें आहे व उपनिषदांतील हेतुमत् व विनिश्चित अशा ब्रह्मसूचक वाक्यांनींहि त्याचेंच निरूपण केलें आहे, अर्थात् यांतील पहिल्या अर्थानें क्षेत्रक्षेत्रज्ञांचें याथात्म्य धर्मशास्त्रप्रतिपाद्य आहे, दुसऱ्या अर्थानें तें कर्मकांडप्रतिपाद्य आहे व तिसऱ्या अर्थानें ज्ञानकांडप्रतिपाद्य आहे असे सिद्ध होतें' असें जे मधुसूदनसरस्वतीचे म्हणणे आहे, तें सर्वथा सयुक्तिक होय.

सर्व भाष्य व टीकाकार 'ऋषिभिः बहुधा गीतं,विविधैः छन्दोभिः पृथक् गीतं,च हेतुमद्भिः विनिश्चितैः ब्रह्मसूत्रपदैः गीत' अशी यांची तीन वाक्यें करितात. पण रहस्यकार म्हणतात—"ऋषींनीं अनेक प्रकारें पृथक् ( चैव ) त्या खेरीज आणखीहि ब्रह्मसूत्रपदांनीं अशीं क्षेत्रक्षेत्रज्ञविचाराची दोन भिन्नभिन्न स्थलें या श्लोकांत वर्णिलीं आहेत, हे'चैव' (आणखीहि) या पदांवरून उघड होतें.... त्यांतील पाहिलें म्ह० ऋषींनीं केलेलें वर्णन 'विविध छंदांनीं पृथक् पृथक् म्ह० तुटकें व अनेक प्रकारचें' असून 'ऋषिभिः' या अनेकवचनी तृतीयान्त पदानें तें अनेक ऋषींनी केलेल आहे आणि ब्रह्मसूत्रपदांतील दुसरें वर्णन हेतुयुक्त व विनिश्चयात्मक आहे, असाहि या दोन वर्णनांतील विशेष भेद याच श्लोकात स्पष्ट केला आहे.... हेतुमत् म्ह० नैयायिक पद्धतीने कार्यकारणे दाखवून केलेलें प्रतिपादन वगैरे" (गी. र. पृ. ५२८') पण सर्व टीकाकारांच्या विरुद्ध अशी दोन वाक्येंच काय म्हणून करावयाची ? छंन्दोभिः' ही 'ऋषिभिः' व 'ब्रह्मसूत्रपदैः' याप्रमाणे 'कर्तरि' तृतीया न समजतां 'करणे' तृतीया समजण्यांत कांहीं स्वारस्य तर नाहींच उलट अर्थहानि मात्र आहे. ब्रह्मसूत्राची वकीली पतकरून ऋषींचें वर्णन तुटके व अनेक प्रकारचे म्हणणें,यात कांहीं मोठासा पुरुषार्थ नाही. 'ऋषिभिः' हें जरी बहुवचन असले व त्यावरून अनेक ऋषींनी क्षेत्रक्षेत्रज्ञाच्या स्वरूपाचें वर्णन केले असलें, तरी तेवढ्यावरून तें तुटके व अनेक प्रकारचेंच असलें पाहिजे, असा कांही नियम नाही. नाहींपेक्षां 'आहुस्त्वा ऋषयः सर्वे०' (गी.भा. अ.१०श्लो. १३ पृ.७४३) येथेंहि तसेच म्हणावे लागेल.तस्मात् रहस्यकाराची ही सर्व चिकित्सा अस्थानी असून त्यानी केलेला अर्थहि सयुक्तिक नाहीं, हें एवढ्या दिग्दर्शनावरून तत्त्वजिज्ञासुवाचकाच्या सहज लक्षांत येईल उपनिषदातील प्रतिपादनहि 'हेतुमत्' म्ह० 'कार्यकारणे' नव्हे तर 'कारणे' दाखवून केलेले असल्यामुळे तेवढ्यासाठीं दुर्बोध ब्रह्मसूत्रेंच घेतली पाहिजेत असें होत नाहीं. या श्लोकांतील 'ब्रह्मसूत्र' शब्दान प्रसिद्ध सूत्रच घ्यावें,याला आधार दाखविण्यासाठी म्हणून रहस्यकार म्हणतात—"त्याच्याच तोडीचे सूत्रग्रथांचे दुसरे उल्लेख हल्लींच्या महाभारतांत आहेत. उदाहरणार्थ–अनुशासनपर्वांत अष्टावक्रादिकसंवादांत 'अनृताः स्त्रिय इत्येवं सूत्रकारो व्यवस्यति' ( अनु. १९-६ ) असें वाक्य आहे. तसेच शतपथ ब्राह्मण ( शांति ३१८.१६-२३ ) पंचरात्रे ( शांति ३३९-१०७ ) यास्काचें निरुक्त ( शांति ३४२,७१. ) आणि मनु ( अनु ३७. १६ ) यांचाहि इतरत्र स्पष्ट उल्लेख आहे." पण हा आधार अगदीं निरुपयोगी आहे. कारण महाभारतांत या व आणखीहि दुसऱ्या सर्व शास्त्रादिकांचा उल्लेख जरी असला तरी गीता व ब्रह्मसूत्र यांचा जसा अन्योन्यसंबंध

आहे तसा महाभारताचा व त्यांचा नाहीं.गीतेचा उल्लेख'स्मृति'म्हणून ब्रह्मसूत्रांत केला आहे व त्याच ब्रह्मसूत्रांचा उल्लेख गीतेंत आहे असें म्हटल्यास त्यावर अन्योन्याश्रय दोष येतो. यास्तव ' ब्रह्मसूत्रपदैः ' या शब्दानें आचार्यभाष्यानुसार आम्हीं वर म्हटल्याप्रमाणें ' उपनिषदांतील ब्रह्मसूचक वाक्यांनीं ' असा अर्थ करणेंच अधिक सयुक्तिक होय.

गीतारहस्याच्या ५३२ पानावरील टीपेंत रहस्यकार म्हणतात—" ब्रह्मसूत्रें हा वेदान्तावरील मुख्यग्रंथ आहे. " ( हें खरें नाहीं. उपनिषदे हा वेदान्तावरील मुख्य ग्रंथ आहे व ब्रह्ममीमांसा ही, कर्मकांडाचा विचार करणाऱ्या पूर्वमीमांसे-प्रमाणें उपासनासहित ज्ञानकांडाचा विचार करणारी उत्तरमीमांसा आहे. ) " गीता हा कर्मयोगावरील प्रधान ग्रंथ आहे. " ( हें म्हणणेंहि तितकेंच किंबहुना त्याहून अधिक म्ह० सर्वथा खोटें आहे. कारण कर्मयोग म्ह० कर्मकांडच; त्याहून निराळें शास्त्र नव्हे. रहस्यकार कर्मयोग हें एक निराळेंच शास्त्र गीतेंतून निर्माण करण्याचा प्रयत्न करीत आहेत. पण तो निराधार आहे. त्याला वैदिकसंप्रदायांत कोठेंच आधार मिळणे शक्य नाही. म्हणूनच गीताशास्त्रावरील कोणीहि भाष्यकार किंवा टीकाकार फार काय, पण ज्ञानेश्वरमहाराज व वामनपंडित हे प्राकृत टीकाकारहि गीता हे कर्मयोग या नांवाचें निराळे शास्त्र आहे, असें मानीत नाहीत. तर वैदिक कर्मयोग व ज्ञानयोग यांचेच गीतेत प्रतिपादन केलेलें असून त्यांतील कर्मयोग हे चित्तशुद्धीच्या द्वारा ज्ञानयोगाचें साधन-अंग आहे, असेंच मानणारे आहेत. अर्थात् रहस्यकारांची कल्पना निराधार आहे. कांहीं पाश्चात्त्य विद्वानांचा आपल्या म्हणण्यास आधार असल्याचें त्यांनीं प्रस्तावनेत म्हटलें आहे. पण त्यावरूनच त्यांचें रहस्य वैदिकसंप्रदायाला सोडून अत एव अग्राह्य आहे, हे ठरतें. गीता ही स्मृति आहे, एवढें कबूल केलें की त्याचें मुख्यत्व व स्वतंत्रत्व गेलें. मन्वादि स्मृति श्रुतीला-विशेषतः कर्मकांडरूप श्रुतिभागाला अनुसरतात, त्याच न्यायानें गीता ही स्मृति ज्ञानकांडाला, उपनिषदांना अनुसरते.म्हणूनच 'सर्वोपनिषदो गावो दोग्धा गोपालनन्दनः'असें गीतेच्या स्तुतीत म्हटलेलें असून खुद्द गीतेच्या प्रत्येक अध्यायाच्या शेवटींहि तिला 'ब्रह्मविद्येंतील योगशास्त्र' म्हटलें आहे. गीता व ब्रह्मसूत्रें एकानेंच म्ह० व्यासानें रचलीं, या आपल्या अनुमानास त्यांनी कुंभकोणं येथें छापलेल्या महाभारताच्या प्रतींतच फक्त आढळणाऱ्या एका श्लोकाचा आधार दिला आहे. तो श्लोक असा—"वेदान्तकर्मयोगं च वेदविद् ब्रह्मविद्विभुः । द्वैपायनो निजग्राह शिल्पशास्त्रं भृगुः पुनः" यांत 'वेदान्तं कर्मयोगं च ' असा पाठ असावा, असें स्वतः रहस्यकारच म्हणतात. तो पाठ आम्हांला सर्वथा कबूल आहे. पण ते त्याचा अर्थ मात्र असा विचित्र करितात-" वेदान्त म्ह० ब्रह्मसूत्र व कर्मयोग-गीता हीं दोन्ही शास्त्रें व्यासास प्राप्त झाली." पण हा अर्थ साफ चुकलेला आहे. कारण 'वेदविद् ब्रह्मविद् विभुः द्वैपायनः वेदान्तं कर्मयोग च निजग्राह'असा त्याचा अन्वय असून 'वेदवेत्ता व ब्रह्मवेत्ता अशा विभु द्वैपायनानें वेदान्त-वैदिक ज्ञानकांड व कर्मयोग-वैदिक कर्मकांड यांचें ग्रहण केले ' असा अर्थ आहे. यांतील वेदविद्, व ब्रह्मविद् ही विशेषणे वेदान्त व कर्मयोग या शब्दांचा अर्थ स्पष्ट सुचवीत असतांना वेदान्त म्ह० ब्रह्मसूत्र व कर्मयोग म्ह० गीता असा अर्थ करणें सर्वथा अयोग्य आहे.

रहस्यकारांनीं गी. र. ७८४ पानावर " शारीरक सूत्रें, म्ह० शरीर किंवा क्षेत्र यांचा विचार करणारीं सूत्रें, असेंहि म्हणतात " असा ' शारीरक 'शब्दाचा अर्थ दिला आहे.

**महाभूतान्यहंकारो बुद्धिरव्यक्तमेव च ।**
**इन्द्रियाणि दशैकं च पञ्च चेन्द्रियगोचराः ॥ ५ ॥**
**इच्छा द्वेषः सुखं दुःखं संघातश्चेतना धृतिः ।**
**एतत्क्षेत्रं समासेन सविकारमुदाहृतम् ॥ ६ ॥**

**अन्वयार्थ—महाभूतानि**—पृथिव्यादि पंच सूक्ष्म भूतें,—**अहंकारः**—त्यांचें कारण अहंकार,—**बुद्धिः**—त्याचें कारण निश्चयात्मिका बुद्धि,—**अव्यक्तं एव च**—आणि बुद्धीचें कारण अव्यक्त,—**दश (च) एकं च इन्द्रियाणि**—दहा व एक अशीं अकरा इंद्रियें—**च पंच इंद्रियगोचराः**—आणि पांच इंद्रियांचे विषय—**इच्छा**—सुखाला कारण झालेल्या पदार्थाला ग्रहण करण्याची इच्छा—**द्वेषः**—प्रतिकूल पदार्थाविषयीं द्वेष,—**सुखं**—अनुकूल असलेले सुख,—**दुःखं**—अप्रिय वाटणारें दुःख—**संघातः**—शरीर व इंद्रियें याचा समुदाय—**चेतना**—देहांत व्यक्त झालेली चिदाभासयुक्त अंतःकरणवृत्ति व—**धृतिः**—धैर्य,—**एतत् क्षेत्रं**—हें क्षेत्र—**समासेन**—संक्षेपतः—**सविकारं**—विकारांसह—**उदाहृतम्**—सांगितलें आहे. ५, ६

**स्तुत्याऽभिमुखीभूतायार्जुनायाऽऽह भगवान्—महाभूतानि इति महान्ति च तानि सर्वविकारव्यापकत्वाद्भूतानि च सूक्ष्माणि । स्थूलानि त्विन्द्रियगोचरशब्देनाभिधास्यिष्यन्ते । अहंकारो महाभूतकारणमहंप्रत्ययलक्षणः । अहंकारकारणं बुद्धिरध्यवसायलक्षणा । तत्कारणमव्यक्तमेव च न व्यक्तमव्यक्तमव्याकृतमीश्वरशक्तिर्मम माया दुरत्ययेत्युक्तम् । एवशब्दः प्रकृत्यवधारणार्थः । एतावत्येवाष्टधा भिन्ना प्रकृतिः । चशब्दो भेदसमुच्चयार्थः । इन्द्रियाणि दश श्रोत्रादीनि पञ्च बुद्ध्युत्पादकत्वाद्बुद्धीन्द्रियाणि वाक्पाण्यादीनि पञ्च कर्मनिर्वर्तकत्वात्कर्मेन्द्रियाणि तानि दश । एकं च किं तन्मन एकादशं संकल्पाद्यात्मकम् । पञ्च चेन्द्रियगोचराः शब्दादयो विषयाः । तान्येतानि सांख्याश्चतुर्विंशतितत्त्वान्याचक्षते ॥ ५ ॥**

**भाष्यार्थ**—( क्षेत्रादिकांच्या याथात्म्याची स्तुति ऐकून श्रोत्याला तें समजून घेण्याची इच्छा झाली असतां भगवान् अगोदर क्षेत्र म्ह० काय ते सांगण्यास आरंभ करितात, असें म्हणून आचार्य या श्लोकाला अवतरण देतात-)—**स्तुत्या अभिमुखीभूताय अर्जुनाय भगवान् 'महाभूतानि०' इति आह**—क्षेत्र-क्षेत्रज्ञांच्या याथात्म्याच्या स्तुतीनें तें जाणण्यास उत्सुक झालेल्या अर्जुनाला भगवान् 'महाभूतानि०' इत्यादि सांगतात—**सर्वविकारव्यापकत्वात् महान्ति च तानि भूतानि च सू-**

---

पण तो चुकीचा आहे. कारण शरीर ( शरीरक ) या शब्दापासून त्यांत राहणारा जीव या अर्थी 'शारीरक' शब्द बनला असून शारीरकसूत्रांत त्या जीवात्म्याचाच परमात्मत्वानें विचार केला आहे.

**क्ष्माणि**—सर्वविकारांचीं व्यापक असल्यामुळें-जेथें जेथें विकारत्व तेथें तेथें भूतत्व अशी त्यांची व्याप्ति असल्यामुळें महत् अशीं ती सूक्ष्म भूतें (पण भूतशब्दानें स्थूलभूतांचेंहि ग्रहण होतें, असें असतांना येथें सूक्ष्मभूते कां घ्यावयाचीं ? उत्तर-)—**स्थूलानि तु इन्द्रियगोचरशब्देन अभिधायिष्यन्ते**—कारण स्थूलभूतें पुढें याच श्लोकांत इंद्रियगोचरशब्दानें सांगितली जाणार आहेत. म्हणून येथें सूक्ष्मभूतेंच घ्यावी. ( सर्ववि-कारव्यापकत्वामुळे त्यांना 'महा' हें विशेषण जोडलें आहे, हे आरंभीं सांगितलेंच आहे.) —**अहंकारः-महाभूतकारणं अहंप्रत्ययलक्षणः**—अहंकार म्ह० महाभूतांचें कारण, 'अहं' असा जो प्रत्यय-अनुभव तेच ज्याचे लक्षण आहे तो अहंकार,('महतः परं' या काठक [काठ. भा. पृ.८१.]वचनांतील महत्-बुद्धि, हे अहंकारकारण सांगतात-)—**अहंकारकारणं बुद्धिः-अध्यवसायलक्षणा**—अहंकाराचें कारण बुद्धि,अध्यवसाय-निश्चय हे जिचे लक्षण आहे ती,—**तत्कारणं अव्यक्तं एव च-न व्यक्तं अव्यक्तं-अव्याकृतं ईश्वरशक्तिः**—तिचें कारण अव्यक्तच, जे व्यक्त नव्हे ते अव्यक्त, ज्याला अव्याकृत असें म्हणतात, ईश्वराची शक्ति,(पण नुस्ती ईश्वरशक्ति असें ह्मटल्यास चैतन्य असेंहि कोणी समजेल, ह्मणून आचार्य म्हणतात-)—'**मम माया दुरत्यया**' **इति उक्तं**—माझी माया दुरत्यय आहे,असें वर (गी.भा. ७,१४ पृ.६२७) सांगितलेंच आहे. ( 'अव्यक्तं एव' येथील एवशब्दाचा अवधारण हा अर्थ स्पष्ट करितात-)—**एवशब्दः प्रकृति अवधारणार्थः**—'एव'शब्द प्रकृतीच्या अवधारणार्थ आहे.—**अष्टधा भिन्ना प्रकृतिः एतावती एव**—पांच सूक्ष्म महाभूतें, अहंकार, महत् व अव्यक्त अशी आठप्रकारें भेद पावलेली प्रकृति ही एवढीच आहे.—'**च**'**शब्दः भेदसमुच्चयार्थः**—'अव्यक्तमेव च' येथें जो 'च' शब्द आहे तो मूलप्रकृतीशीं तन्मात्रादि इतर भेदांचा समुच्चय करण्यासाठीं आहे.—**इन्द्रियाणि दश-श्रोत्रादीनि पञ्च बुद्ध्युत्पादकत्वात् बुद्धींद्रियाणि**—इंद्रियें दहा-ज्ञानाचें उत्पादकत्व असल्यामुळें श्रोत्रादि पांच ज्ञानेंद्रियें—**वाक्पाण्यादीनि पञ्च कर्मनिर्वर्तकत्वात् कर्मेंद्रियाणि तानि दश**—कर्म करणारीं असल्यामुळे वाक् हस्त-पाद इत्यादि पांच कर्मेंद्रियें-अशी दोन्हीं मिळून दहा इंद्रियें,—**एकं च किं तत् मनः एकादशं संकल्पाद्यात्मकं**—व आणखी एक, तें कोणतें? मन अकरावें-संकल्पविकल्पादि करणारें अन्तरिन्द्रिय,—**च पञ्च इन्द्रियगोचराः-शब्दादयः विषयाः**—व पांच इन्द्रियांचे गोचर-शब्दादिक विषय. [ येथील शब्दादि विषय या शब्दानें स्थूल भूतांचे ग्रहण केलें जातें. कारण तसें न करितां प्रत्यक्ष ज्ञानेंद्रियांचे विषयच येथें क्षेत्ररूपानें सांगितले आहेत, असें म्हटल्यास मग कर्मेंद्रियांचे विषय कां सांगितलेले नाहींत, अशी शंका येते.

---

१ पण रहस्यकार 'महाभूतानि' या शब्दाचा सरळ 'पृथिव्यादि पांच स्थूल महाभूतें,' असा व 'पंच चेंद्रियगोचराः' याचा 'इंद्रियांचे शब्दादि पाच सूक्ष्म विषय' असा अर्थ करितात. पण तो रामानुजभाष्याला धरून जरी असला तरी बरोबर कां नाहीं, तें भाष्यार्थावरूनच स्पष्ट होत असल्यामुळें आम्ही निराळें सांगत नाहीं.

शिवाय क्षेत्राचें स्वरूप येथें प्रकृत आहे. यास्तव स्थूल भूतेंच घेणें उचित आहे. या तन्मात्रादिकांविषयीं दुसऱ्या तंत्राची म्ह० कापिल सांख्यदर्शनाची संमति आहे, असें सांगतात-)—**तानि एतानि सांख्याः चतुर्विंशतितत्त्वानि आचक्षते**—त्या या श्रौत प्रकृतिभेदांनाच 'चोवीस तत्त्वें' असे सांख्य म्हणतात. [ ' मूलप्रकृतिरविकृतिः महदाद्याः प्रकृतिविकृतयः सप्त । षोडशकश्च विकारः ' अशी याविषयीं सांख्यकारिका आहे. तिचा अर्थ—मूल प्रकृति हें एकतत्त्व, ती कोणाची विकृति म्ह० विकार नाहीं. महत् , अहंकार व पंचतन्मात्रें मिळून सात प्रकृति-विकृति आहेत. हीं सात तत्त्वे आपापल्या प्रकृतीच्या विकृति आहेत व पुढील विकारांच्या प्रकृति आहेत. जसें—महत् मूल प्रकृतीची विकृति व अहंकाराची प्रकृति आहे. तशींच पंचतन्मात्रें आकाशादि भूतांच्या प्रकृति व अहंकाराच्या विकृति आहेत. म्हणून त्यांना 'प्रकृतिविकृतयः' म्हणतात. पांच महाभूतें व अकरा इंद्रिये, यांचा समूह हा सर्व विकार आहे. ] ५

**अथेदानीमात्मगुणा इति यानाचक्षते वैशेषिकास्तेऽपि क्षेत्रधर्मा एव न तु क्षेत्रज्ञस्येत्याह भगवान्—इच्छा यज्जातीयं सुखहेतुमर्थमुपलब्धवान्पूर्वं पुनस्तज्जातीयमुपलभमानस्तमादातुमिच्छति सुखहेतुरिति सेयमिच्छाऽन्तःकरणधर्मो ज्ञेयत्वात्क्षेत्रम् । तथा द्वेषो यज्जातीयमर्थं दुःखहेतुत्वेनानुभूतवान्पुनस्तज्जातीयमुपलभमानस्तं द्वेष्टि सोऽयं द्वेषो ज्ञेयत्वात्क्षेत्रमेव । तथा सुखमनुकूलं प्रसन्नं सत्त्वात्मकं ज्ञेयत्वात्क्षेत्रमेव । दुःखं प्रतिकूलात्मकं ज्ञेयत्वात्तदपि क्षेत्रम् । संघातो देहेन्द्रियाणां संहतिः । तस्यामभिव्यक्ताऽन्तःकरणवृत्तिस्तप्त इव लोहपिण्डेऽग्निरात्मचैतन्याभासरसविद्धा चेतना सा च क्षेत्रं ज्ञेयत्वात् । धृतिर्ययाऽवसादप्राप्तानि देहेन्द्रियाणि ध्रियन्ते सा च ज्ञेयत्वात्क्षेत्रम् । सर्वान्तःकरणधर्मोपलक्षणार्थमिच्छादिग्रहणं यत उक्तं तदुपसंहरति—एतत्क्षेत्रं समासेन सविकारं सह विकारेण महदादिनोदाहृतमुक्तम् । यस्य क्षेत्रभेदजातस्य संहतिरिदं शरीरं क्षेत्रमित्युक्तं तत्क्षेत्रं व्याख्यातं महाभूतादिभेदभिन्नं धृत्यन्तम् ॥ ६ ॥**

**भाष्यार्थ**—( याप्रमाणें ' तत्क्षेत्रं यच्च यादृक च ' यांचे व्याख्यान केलें. आतां ' यद्विकारि ' याचे व्याख्यान करितात-)—**अथ इदानीं वैशेषिकाः आत्मगुणाः इति यान् आचक्षते**—आतां या-' इच्छा० ' इत्यादि श्लोकांत वैशेषिक ' आत्मगुण ' म्हणून ज्याना म्हणतात—**ते अपि क्षेत्रधर्माः एव तु क्षेत्रज्ञस्य न इति भगवान् आह**—ते सुद्धां क्षेत्राचेच धर्म आहेत, क्षेत्रज्ञाचे नव्हेत, असे भगवान् सांगतात—**इच्छा-पूर्वं यज्जातीयं सुखहेतुं अर्थं उपलब्धवान्**—इच्छा म्हणजे काय ते सांगतात—पूर्वी ज्या जातीच्या सुखाला कारण होणाऱ्या विषयाचा अनुभव आला होता **—तज्जातीयं उपलभमानः ' सुखहेतुः ' इति तं आदातुं इच्छति**—त्याच जातीचा विषय पुनः दिसला असतां हा सुखाचा हेतु आहे, यापासून सुख होतें, असें मानून मनुष्य त्याचें ग्रहण करण्याची इच्छा करितो.—**सा इयं इच्छा अन्तःकरणधर्मः**—ती ही इच्छा अन्तःकरणाचा धर्म आहे **व—ज्ञेयत्वात् क्षेत्रं**—तिला

ज्ञेयत्व–ज्ञानविषयत्व असल्यामुळें म्ह० ती इच्छा ज्ञात्या–क्षेत्रज्ञाच्या ज्ञानाचा विषय होत असल्यामुळें क्षेत्र होय.—**तथा द्वेषः**—तसाच द्वेषहि अन्तःकरणाचा धर्म आहे. (इच्छेप्रमाणेंच द्वेषाचेंहि स्पष्टीकरण करितात–)—**यज्जातीयं अर्थं दुःखहेतुत्वेन अनुभूतवान् पुनः तज्जातीयं (अर्थं) उपलभमानः तं द्वेष्टि**—ज्या जातीच्या विषयाचा पूर्वी दुःखाचा हेतु–दुःखाचें निमित्त, या रूपानें अनुभव घेतलेला होता, त्याच जातीचा विषय पुनः दिसला असतां त्याचा द्वेष करितो,—**सः अयं द्वेषः ज्ञेयत्वात् क्षेत्रं एव**—तो हा द्वेष ज्ञेय असल्यामुळें क्षेत्रच आहे. (इच्छा व द्वेष यांप्रमाणें सुखहि बुद्धिधर्मच आहे, असें सांगतात–)—**तथा सुखं अनुकूलं प्रसन्नं सत्त्वात्मकं ज्ञेयत्वात् क्षेत्रं एव**—तसेंच सुख, जे अनुकूल वाटतें, प्रसन्न व सत्त्वात्मक असतें ते सुख ज्ञेय असल्यामुळे क्षेत्रच आहे.—**दुःखं प्रतिकूलात्मकं ज्ञेयत्वात् तत् अपि क्षेत्रं**—दुःख, प्रतिकूलात्मक–प्राणिमात्राला प्रतिकूल वाटणारें, तेंहि ज्ञेय असल्यामुळे क्षेत्रच होय. ( ‘देहच आत्मा व इंद्रियें हाच आत्मा’ या दोन वादांचें निरसन करण्यासाठीं भगवान् म्हणतात–)—**संघातः–देहेंद्रियाणां संहतिः**—संघात म्हणजे देह, इन्द्रियें, इत्यादिकांचा समूह–एकरूप समुदाय, हाहि क्षेत्रांतच अन्तर्भूत होतो. ( ‘विज्ञानं एव आत्मा’ या विज्ञानवादी बौद्धांच्या ( बौद्धदर्शन पृ. ८०–८७ ) मताचें निरसन–)—**तस्यां अभिव्यक्ता अन्तःकरणवृत्तिः**—त्या देहेंद्रियसंहतीमध्यें अभिव्यक्त झालेली जी अन्तःकरणाची वृत्ति ( ती चेतना, असा संबंध )—**तप्ते लोहपिण्डे अग्निः इव**—तापलेल्या लोखंडाच्या गोळ्यांत अग्नि जसा अभिव्यक्त होतो त्याप्रमाणें देहेंद्रियसंघातांत अभिव्यक्त झालेली—**आत्मचैतन्याभासरसविद्धा चेतना**—आत्मचैतन्याचा आभास, याच रसानें व्याप्त असलेली जी चेतना—**सा च क्षेत्रं ज्ञेयत्वात्**—ती क्षेत्र आहे. कारण ती ज्ञेय आहे. [संघात म्ह० शरीरेंद्रियांचा संघात, तप्त लोहपिण्डांत जसा अग्नि त्याप्रमाणें त्या शरीरेंद्रियसंघातांत व्यक्त झालेली व चैतन्याभासरसानें भरलेली जी अन्तःकरणवृत्ति ती चेतना होय. तो संघात व ती

---

१ तापवून लाल केलेला लोखंडाचा गोळा, लोखंडालाच अग्निरूपानें भासवितो. त्यांतील लोखंडाविषयीची बुद्धि लुप्त होऊन अग्नि-बुद्धि प्रतीत होऊं लागते. त्याचप्रमाणे बुद्धिवृत्तींत व्यक्त झालेलें आत्मचैतन्य त्या वृत्तीलाच आत्मरूपानें भासवितें, म्हणून त्या चैतन्याच्या आभासानें व्याप्त असलेली ती चेतनाहि क्षेत्रच आहे. कारण मुख्य–साक्षिचेतनाचा ती विषय–ज्ञेय होते.

२ “चेतना म्ह० जड देहांत प्राणादिकांचे जे व्यापार दृग्गोचर होतात, ते किंवा जिवंतपणाच्या चेष्टा, एवढाच अर्थ विवक्षित असून जडांतहि चेतना ज्यामुळें उत्पन्न होते ती चिच्छक्ति किंवा चैतन्य क्षेत्रज्ञ या रूपानें क्षेत्राहून निराळें असतें”–इत्यादि रहस्यकार म्हणतात. त्यांतील शेवटचें वाक्य आचार्यांच्या वरील अर्थाला अनुलक्षून आहे असें दिसतें, पण रहस्यकारांचा अर्थ चुकला आहे. त्यांनीं चेतनाशब्दाचा लोकप्रसिद्ध प्राकृत अर्थ घेतल्यामुळें ही चूक झाली आहे. प्रकरण ‘क्षेत्र’ सांगण्याचें असून इच्छा, द्वेष, इत्यादि अन्तःकरणाच्या वृत्ति हेंहि क्षेत्र आहे, असें येथें विवक्षित आहे.

चेतना हीं दोन्ही क्षेत्रच, कारण तीहि ज्ञेय आहेत, आणि जें ज्ञेय तें क्षेत्र व जो ज्ञाता तो क्षेत्रज्ञ, हा सिद्धान्त दुसऱ्या श्लोकावरील भाष्यांत निश्चित झाला आहे. ]—**धृतिः यया अवसादप्राप्तानि देहेन्द्रियाणि ध्रियन्ते सा च ज्ञेयत्वात् क्षेत्रं**—धृति, कीं ज्या धृतीकडून अवसादास प्राप्त झालेली–श्रान्त झालेलीं देहेन्द्रियें–थकलेला देह व इन्द्रिये धारण केलीं जातात ती धृति ज्ञेय असल्यामुळे क्षेत्र होय. (अहोपण, संकल्पादिक दुसरेहि मनोधर्म आहेत, मग त्यांचाहि येथे क्षेत्र या रूपानें निर्देश कां केला नाहीं ? उत्तर–)—**यतः यत् उक्तं तत् उपसंहरति अतः इच्छादिग्रहणं सर्वान्तःकरणधर्मोपलक्षणार्थं**—इच्छादिकांप्रमाणें संकल्पादिकांनाहि क्षेत्रत्व आहेच, ही गोष्ट सिद्ध असल्याप्रमाणेंच मानून प्रकरणाचा विभाग करण्यासाठीं ज्याअर्थी भगवान् उक्त क्षेत्राचा उपसंहार करीत आहेत, त्याअर्थी इच्छादिकांचें जे येथें ग्रहण केलें आहे ते येथें न सागितलेल्या सर्व बुद्धिधर्माच्या उपलक्षणार्थ आहे.—**एतत् क्षेत्रं समासेन सविकारं–महदादिना विकारेण सह उदाहृतं**–**उक्तं**—हें क्षेत्र संक्षेपाने सविकार–महत्-अहंकार इत्यादि विकारासह सांगितलें. ( विरक्तालाच ज्ञानाधिकार असतो, यास्तव जिज्ञासूचे वैराग्य दृढ होण्यासाठीं येथे हे क्षेत्राचें व्याख्यान केले आहे, यास्तव त्याचा अनुवाद करितात–)—**यस्य क्षेत्रभेदजातस्य संहतिः इदं शरीरं क्षेत्रं इति उक्तं तत् महाभूतादिभेदभिन्नं धृत्यन्तं क्षेत्रं व्याख्यातं**—ज्या क्षेत्रभेदजाताची म्ह० सर्व व्यष्टि देहांच्या विभागाची संहति म्ह० समष्टि असे हे शरीर 'क्षेत्र' म्हणून म्हटलेले आहे, त्या महाभूतांपासून धृतीपर्यंत क्षेत्राचे व्याख्यान केले. [ सर्व प्राण्यांच्या शरीरांच्या समूहाला समष्टिशरीर म्हणतात. त्यालाच क्षेत्र म्हटलेलें असून महाभूतापासून धृतीपर्यंत त्याचेच व्याख्यान केले. ] ६.

**क्षेत्रज्ञो वक्ष्यमाणविशेषणो यस्य सप्रभावस्य क्षेत्रज्ञस्य परिज्ञानादमृतत्वं भवति तं ज्ञेयं यत्तत्प्रवक्ष्यामीत्यादिना सविशेषणं स्वयमेव वक्ष्यति भगवानधुना तु तज्ज्ञानसाधनगणममानित्वादिलक्षणं यस्मिन्सति तज्ज्ञेयविज्ञाने योग्योऽधिकृतो भवति यत्परः संन्यासी ज्ञाननिष्ठ उच्यते, तममानित्वादिगणं ज्ञानसाधनत्वाज्ज्ञानशब्दवाच्यं विदधाति भगवान्—**

**भाष्यार्थ**—( क्षेत्राचे व्याख्यान केल्यावर आतां क्षेत्रज्ञाचें व्याख्यान करणेच उचित असतांना मध्येंच दुसरा अप्रस्तुत विषय कां आणिला आहे ? असे कोणी म्हणेल म्हणून

---

म्हणून आचार्यांनी चैतन्याभासरसानें परिपूर्ण अशी अन्तःकरणाची वृत्ति हीच चेतना असें म्हटले आहे. इच्छा, द्वेष, सुख, दुःख व धृति याच्या बरोबर सांगितलेली ही वृत्तिच असणें योग्य आहे. पण चेतना म्ह० चिच्छक्ति किंवा चैतन्य असे आचार्यादि समजतात, अशी खोटीच समजूत करून घेऊन 'चैतन्य म्ह० क्षेत्रज्ञ' इत्यादि अस्थानींच दोषप्रदर्शन केले आहे. 'चेतना म्ह० जड देहांत दिसणारे प्राणादिकांचे व्यापार किंवा जिवंतपणाच्या चेष्टा' हा अगदी प्राकृत अर्थ आहे. पण बाह्य व्यापार किंवा चेष्टा या क्रिया आहेत, त्यांना क्षेत्र म्हणतां येत नाही.

सांगतात-)—**वक्ष्यमाणविशेषणः क्षेत्रज्ञः**—' अनादि मत् परं ब्रह्म ' इत्यादि विशेषणांनीं विशिष्ट असा क्षेत्रज्ञ आहे.—**सप्रभावस्य यस्य क्षेत्रज्ञस्य परिज्ञानात् अमृतत्वं भवति**—सर्व प्रभावासह ज्या क्षेत्रज्ञाचे साक्षात् ज्ञान झालें असतां अमृतत्वाची म्ह० मोक्षाची प्राप्ति होते—**तं सविशेषणं ' ज्ञेयं यत्तत्प्रवक्ष्यामि ' इत्यादिना स्वयं एव भगवान् वक्ष्यति**—त्याला सर्वविशेषणांसह ' ज्ञेयं यत्तत्प्रवक्ष्यामि०' ( १२ ) इत्यादि श्लोकाने स्वतःच भगवान् सांगतील. [' ज्ञेयं०' इत्यादि श्लोकानें स्वतः भगवान्च त्याचें विशेषणासह वर्णन करतील]—**तु अधुना तज्ज्ञानसाधनगणं अमानित्वादिलक्षणं** ( विदधाति )—पण आतां अगोदर ' ज्ञेयं यत्तत्०' या श्लोकापर्यंत त्याच्या ज्ञानाच्या साधनांचा समूह-अमानित्वादिरूप ज्ञानसाधने ( भगवान् सांगतात, असा पुढें ' विदधाति ' या क्रियापदाशीं संबंध. पण या ज्ञानसाधनसमूहाच्या उपदेशाचा उपयोग काय ? उत्तर-)—**यस्मिन् सति तज्ज्ञेयविज्ञाने योग्यः-अधिकृतः भवति**—जो ज्ञानसाधनसमूह प्रयत्नाने संपादन केला असतां त्या ज्ञेय-क्षेत्रज्ञाच्या साक्षात्कारास पुरुष योग्य-अधिकृत होतो,(त्या योग्य-अधिकृताचेच विवरण-) —**यत्परः संन्यासी-ज्ञाननिष्ठः (इति) उच्यते**—ज्या ज्ञानसाधनांमध्ये तत्पर झालेला पुरुष ' संन्यासी '-ज्ञाननिष्ठ असे म्हटला जातो, ( अहोपण, अकराव्या श्लोकाच्या शेवटी ' एतत् ज्ञानं इति प्रोक्तं ' असे म्हटलेले असतांना तुम्ही त्याला ज्ञानसाधन कसें म्हणतां ? उत्तर-)—**ज्ञानसाधनत्वात् ज्ञानशब्दवाच्यं तं अमानित्वादिगणं भगवान् विदधाति**—ज्ञानाचे साधन असल्यामुळे ' ज्ञान ' या शब्दानें ज्याचा उल्लेख केला आहे-ज्ञानाचें साधन असल्यामुळे ज्याला ज्ञान म्हटले आहे, अशा या अमानित्वादि साधनसमूहाचें विधान भगवान् ' अमानित्वं०' इत्यादि श्लोकांनीं करितात—

---

१ पण रहस्यकार म्हणतात—"आतां ज्ञान कशाला म्हणावयाचें हे सदर ज्ञानाचे मनुष्याच्या स्वभावावर जे परिणाम घडतात त्यांचे वर्णन करून सागतात"—अर्थात् त्यांच्या मते अमानित्वादिक ही ज्ञानाची साधने नसून ज्ञानाचे परिणाम आहेत. पण तें बरोबर नाही. कारण 'एतत् ज्ञान इति प्रोक्त अज्ञानं यदतोऽन्यथा ' असा याचा उपसंहार केला आहे. त्यांत ज्ञान व अज्ञान याच शब्दांचा उपयोग केला आहे. वास्तव अमानित्वादिकांना ज्ञानाचा परिणाम म्हणतां येत नाहीं. अमानित्वादिक हे यम व नियम आहेत व ज्ञानासाठीच त्यांचें विधान केलें जातें. ज्ञानाचे परिणाम म्हणून त्याचा उल्लेख केला जात नाहीं. 'निर्मानमोहाः जितसंगदोषाः अध्यात्मनित्याः ' (अ. १५ श्लो. ५ ) या वचनांत अमानित्वादिकांचाच ' ज्ञानसाधन ' या रूपानें उल्लेख केला आहे, ज्ञानाचे परिणाम म्हणून केलेला नाहीं. कारण 'असले साधक त्या अव्यय पदाला प्राप्त होतात' असें तेथेच त्यांचें फल सांगितले आहे. शिवाय 'ज्ञान कशाला म्हणावयाचें ' तें त्याच्या परिणामाचें वर्णन करून सांगणें, ही उपदेशाची अपूर्वच शैली आहे !

**अमानित्वमदंभित्वमहिंसा क्षांतिरार्जवम् ।
आचार्योपासनं शौचं स्थैर्यमात्मविनिग्रहः ॥ ७ ॥**

**अन्वयार्थ—अमानित्वं**—मी मोठा आहे, मी विद्वान् आहें इत्यादि आत्मश्लाघा करणें व स्वतःला तसें समजणे, हें मानित्व होय, पण तसा मानीपणा न धरणें,—**अदंभित्वं**—खरोखर धार्मिक नसतांना तसा आव आणणे, वरवर धार्मिकता प्रकट करणें, हा दांभिकपणा आहे, तसा दांभिकपणा न दाखविणें,—**अहिंसा**—प्राण्यांना पीडा न देणे,—**क्षान्तिः**—दुसऱ्यानें अपराध केला असतांहि मनांत क्रोध हा विकार उत्पन्न होऊं न देणे,—**आर्जवं**—अन्तःकरणाचा सरळपणा,—**आचार्योपासनं**—मोक्षाच्या साधनांचा उपदेश करणाऱ्या आचार्यांची शुश्रूषा वगैरे करणें,—**शौचं**—शरीराचे मल पाण्यानें वगैरे धुऊन टाकणे व मनाचे रागादि मल वैराग्यादिकांनी घालविणे असें हें दोन प्रकारचे शौच-शुद्धि,—**स्थैर्यं**—मोक्षमार्गाविषयीच दृढनिश्चय—**आत्मविनिग्रहः**—शरीरेंद्रियसमूहाला असन्मार्गापासून परतवून सन्मार्गातच ठेवणें ( ही सर्व ज्ञानाची साधने आहेत, असा पुढे याचा संबंध आहे. ) ७

**अमानित्वं मानिनो भावो मानित्वमात्मनः श्लाघनं तदभावोऽमानित्वम् । अदम्भित्वं स्वधर्मप्रकटीकरणं दम्भित्वं तदभावोऽदम्भित्वम् । अहिंसाऽहिंसनं प्राणिनामपीडनम् । क्षान्तिः परापराधप्राप्तावविक्रिया । आर्जवमृजुभावोऽवक्रत्वम् । आचार्योपासनं मोक्षसाधनोपदेष्टुराचार्यस्य शुश्रूषादिप्रयोगेण सेवनम् । शौचं कायमलानां मृजलाभ्यां प्रक्षालनमन्तश्च मनसः प्रतिपक्षभावनया रागादिमलानामपनयनं शौचम् । स्थैर्यं स्थिरभावो मोक्षमार्ग एव कृताध्यवसायत्वम् । आत्मविनिग्रह आत्मनोऽपकारकस्याऽऽत्मशब्दवाच्यस्य कार्यकरणसंघातस्य विनिग्रहः स्वभावेन सर्वतः प्रवृत्तस्य सन्मार्ग एव निरोध आत्मविनिग्रहः ॥ ७ ॥**

**भाष्यार्थ**—( अमानित्वादि साधननिष्ठ झालेल्या अन्तर्मुख पुरुषालाच ज्ञान होतें, असा नियम करण्यासाठी भगवान् म्हणतात- )—**अमानित्वं-मानिनः भावः मानित्वं-आत्मनः श्लाघनं तदभावः अमानित्वं**—अमानित्व-ज्याला मान म्ह० एक प्रकारचा गुप्त गर्व-असतो तो मानी, त्याचा भाव म्ह० मानिपणा, तेच मानित्व म्ह० आपली श्लाघा, त्या मानित्वाचा अभाव असणे हेंच अमानित्व होय.—**अदंभित्वं-स्वधर्मप्रकटीकरणं दम्भित्वं तदभावः अदम्भित्वं**—अदंभित्व-स्वधर्माचें प्रकटीकरण हेच दंभित्व, त्याचा अभाव, हेच अदंभित्व,—**अहिंसा-अहिंसनं प्राणिनां अपीडनं**—अहिंसा म्ह० अहिंसन-शरीर, वाणी व मन यांनीं प्राण्यांना पीडा न देणे,—**क्षान्तिः-परापराधप्राप्तौ अविक्रिया**—क्षान्ति म्ह० चित्ताच्या विकाराला कारण होणारा जो दुसऱ्याचा अपराध, तो घडला असतां-असा अपराध कोणी केला असतांहि चित्ताला विकृत होऊं न देतां तो सहन करणें,—**आर्जवं-ऋजु-**

**भावः-अवक्रत्वं**—आर्जव म्ह० सरळपणा-अकौटिल्य-मन, वाक् व कर्म यांत विसंगतपणा नसणें—**आचार्योपासनं-मोक्षसाधनोपदेष्टुः आचार्यस्य शुश्रूषादिप्रयोगेण सेवनं**—आचार्यांची उपासना-सेवा ( पण बटूचें उपनयन करून त्याला वेदाध्ययन सांगणारा, हा आचार्यशब्दाचा अर्थ येथे विवक्षित नसल्यामुळें आचार्य म्हणतात-)-मोक्षाच्या साधनांचा उपदेश करणारा जो आचार्य त्याचें शुश्रूषा, नमस्कार इत्यादि प्रकारांनी सेवन-सेवा करणें,—**शौचं-कायमलानां मृज्जलाभ्यां प्रक्षालनं अन्तः च मनसः रागादिमलानां प्रतिपक्षभावनया अपनयनं शौचं**—शौच म्ह० द्विविधशुद्धि-शरीराच्या मलांचें माती व पाणी यांनी प्रक्षालन करणें, व अन्तः-शौच म्ह० अन्तःकरणाच्या राग-द्वेषादि मलांचें-वैराग्य, अद्वेष इत्यादि त्यांच्या प्रतिपक्षभूत उपायांच्या अभ्यासाने म्ह० विषयांमध्यें दोषदर्शीनें प्रवृत्त होणें, त्यांना दोषदर्शीनें पाहणें, या उपायानें अपनयन-निरसन करणे—**स्थैर्य-स्थिरभावः-मोक्षमार्गे एव कृताध्यवसायत्वं**—स्थैर्य म्ह० स्थिरभाव-स्थिरता, म्ह० मोक्षमार्गातच कृतनिश्चयित्व-मोक्षमार्गाविषयींचाच निश्चय करणें—**आत्मविनिग्रहः**—व आत्म्याचा विशेष प्रकारचा निग्रह (पण नित्यसिद्ध व ज्याच्यामध्यें कोणत्याहि प्रकारच्या विशेषाचें आधान करितां येत नाहीं, त्याचा विनिग्रह कसा शक्य आहे ? उत्तर-)—**आत्मनः-अपकारकस्य आत्मशब्दवाच्यस्य-कार्यकरणसंघातस्य विनिग्रहः**—आत्म्याला म्ह० जीवाला अपकार करणारा, व आत्मा या शब्दाने बोलला जाणारा जो शरीरेंद्रियसमूह त्याचा विनिग्रह म्ह०—**स्वभावेन सर्वतः प्रवृत्तस्य सन्मार्गे एव निरोधः आत्मविनिग्रहः**—स्वभावतःच सर्व कर्मामध्ये प्रवृत्त झालेल्या त्याचा सन्मार्गातच निरोध करणें हा आत्मविनिग्रह होय. ७

इन्द्रियार्थेषु वैराग्यमनहंकार एव च ।
जन्ममृत्युजराव्याधिदुःखदोषानुदर्शनम् ॥ ८ ॥

**अन्वयार्थ—इंद्रियार्थेषु वैराग्यं**—ऐहिक व पारलौकिक विषयांविषयी वैराग्य—**अनहंकारः एव च**—आणि गर्वरहित, मी अमुक अमुक अशा प्रकारचा आहे, असा केव्हांहि गर्व-अभिमान न वाहणें—**जन्ममृत्युजराव्याधिदुःखदोषानुदर्शनं**—जन्म, मरण, म्हातारपण, रोग व दुःख या प्रत्येकांतील दोषांचा विचार करणे किंवा जन्म-मरण-जरा-रोग यांतील असह्य दुःख, ह्याच दोषाचें चिंतन करणें; ( हीं ज्ञानसाधनें आहेत. ) ८

**किंच—इन्द्रियार्थेषु शब्दादिषु दृष्टादृष्टेषु भोगेषु विरागभावो वैराग्यम् । अनहंकारोऽहंकाराभाव एव च । जन्ममृत्युजराव्याधिदुःखदोषानुदर्शनं जन्म च मृत्युश्च जरा च व्याधयश्च दुःखानि च तेषु जन्मादिदुःखान्तेषु प्रत्येकं दोषानुदर्शनं, जन्मनि गर्भवासयोनिद्वारा निःसरणं दोषस्तस्यानुदर्शनमालोचनं, तथा मृत्यौ दोषानुदर्शनं, तथा जरायां प्रज्ञाशक्तितेजोनिरोधदोषानुदर्शनं परिभूतता चेति । तथा व्याधिषु शिरोरोगा-**

**दिषु दोषानुदर्शनं, तथा दुःखेष्वध्यात्माधिभूताधिदैवनिमित्तेषु । अथवा दुःखान्येव दोषो दुःखदोषस्तस्य जन्मादिषु पूर्ववदनुदर्शनम् । दुःखं जन्म दुःखं मृत्युर्दुःखं जरा दुःखं व्याधयः । दुःखनिमित्तत्वाजन्मादयो दुःखं न पुनः स्वरूपेणैव दुःखमिति । एवं जन्मादिषु दुःखदोषानुदर्शनाद्देहेन्द्रियविषयभोगेषु वैराग्यमुपजायते । ततःप्रत्यगात्मनि प्रवृत्तिः करणानामात्मदर्शनाय । एवं ज्ञानहेतुत्वाज्ज्ञानमुच्यते जन्मादिदुःखदोषानुदर्शनम् ॥ ८ ॥**

**भाष्यार्थ—किंच**—केवल अमानित्वादि हींच ज्ञानाचीं अन्तरंग साधनें नव्हेत, तर वैराग्यादिकहि तशीच दुसरीं अन्तरंग साधनें आहेत, असें 'इन्द्रियार्थेषु०' इत्यादि श्लोकानें सांगतात—**इन्द्रियार्थेषु-शब्दादिषु दृष्टादृष्टेषु भोगेषु विरागभावः-वैराग्यं**—इन्द्रियार्थांमध्यें म्ह० शब्दादि दृष्ट व अदृष्ट विषयांविषयीं विरागभाव, वैराग्य, [ऐहिक किंवा पारलौकिक विषयांविषयीं आसक्ति असल्यास ज्ञान होत नाहीं.कारण आसक्ति-राग त्याला प्रतिबंध करतो. ]—**अनहंकारः-अहंकाराभावः एव च**—आणि तसाच अनहंकार म्ह० अहंकाराचा अभाव [ आविर्भूत झालेला गर्व हाच अहंकार, याचा अभावहि ज्ञानाचे कारण-साधन आहे. इंद्रियार्थांविषयीं वैराग्य जे सांगितले त्याचेंच उपपादन-]—**जन्म-मृत्यु-जरा-व्याधि-दुःखदोषानुदर्शनं-जन्म च मृत्युः च जरा च व्याधयः च दुःखानि च तेषु जन्मादिदुःखान्तेषु प्रत्येकं दोषानुदर्शनं**—जन्म व मृत्यु व जरा, व नानाप्रकारचे व्याधि-रोग, व दुःखे-या जन्मापासून दुःखापर्यंत प्रत्येकामध्ये दोषाचे अनुचिंतन करणे,—**जन्मनि गर्भवास-योनिद्वारा निःसरणं दोषः तस्य अनुदर्शनं-आलोचनं**—जन्मामध्ये गर्भवास -योनिद्वारा बाहेर पडणे, हा दोष आहे. त्याचें अनुदर्शन म्ह० आलोचन-विचार करणें —**तथा मृत्यौ दोषानुदर्शनं**—तसेंच, मृत्यूमध्ये-अनंत क्लेश, वियोगदुःख वगैरे दोषांचे आलोचन करणे,—**तथा जरायां-प्रज्ञाशक्तितेजोनिरोधदोषानुदर्शनं परिभूतता च इति**—त्याचप्रमाणे जरेमध्ये प्रज्ञा, शक्ति, तेज, यांचा निरोध होणें, या दोषाचे आलोचन करणे व त्याचप्रमाणे पराभव पावणे-पुत्रादिकांनी वारंवार तिरस्कारादि वगैरे करणे, हाहि जरेंतील दोष आहे. त्याचें चिंतन करणे,—**तथा व्याधिषु-शिरोरोगादिषु दोषानुदर्शनं**—तसेंच, मस्तकशूल, पोटशूल, ज्वर,इत्यादि व्याधींमध्यें क्लेशरूपी दोषाचें आलोचन करणे,—**तथा दुःखेषु-अध्यात्म-अधिभूत-अधिदैवनिमित्तेषु**—त्याचप्रमाणें अध्यात्म, अधिभूत, अधिदैव इत्यादि कारणांनीं होणाऱ्या दुःखांतील दोषांचें अनुचिंतन करणें,—**अथवा दुःखानि एव दोषः दुःखदोषः तस्य जन्मादिषु पूर्ववत् अनुदर्शनम्**—किंवा दुःखे हाच दोष, त्या दुःखदोषाचें जन्मादिकांमध्यें वर वर्णन केल्याप्रमाणें अनुचिंतन करणें,—**जन्म दुःखं, मृत्युः दुःखं जरा दुःखं व्याधयः दुःखं**—जन्म हें दुःख आहे,मृत्यु दुःख आहे,जरा दुःख आहे व व्याधी दुःख आहे,असें चिंतन करणें—**दुःखनिमित्तत्वात् जन्मादयः दुःखं न पुनः स्वरूपेण एव दुःखं इति**—जन्मादिक हीं दुःखांचीं निमित्ते असल्यामुळें-

त्यांना दुःख म्हटलें आहे. स्वरूपानेंच तें दुःख आहे, ह्मणून नव्हे. कारण बाह्य इंद्रियांनीं ग्राह्य असलेल्या जन्मादिकांनाच दुःख म्हणतां येत नाहीं. ( अशा दुःखानुदर्शनाचें फल-)—**एवं जन्मादिषु दुःखदोषानुदर्शनात् देहेंद्रियविषयभोगेषु वैराग्यं उपजायते**—याप्रमाणे जन्म-मृत्यु इत्यादिकांमध्ये दुःखरूप दोषांचें अनुचितन–आलोचन केल्यानें देह, इंद्रियें व विषयोपभोग यांविषयीं वैराग्य उत्पन्न होतें.—**ततः करणानां आत्मदर्शनाय प्रत्यगात्मनि प्रवृत्तिः**—वैराग्य उत्पन्न झालें असतां इंद्रियांची आत्मदर्शनासाठीं प्रत्यगात्म्यामध्यें प्रवृत्ति होते.—**एवं ज्ञानहेतुत्वात् जन्मादिदुःखदोषानुदर्शनं ज्ञानं उच्यते**—याप्रमाणे ज्ञानाचें निमित्त-साधन असल्यामुळे जन्मादिकांतील दुःखदोषांचें आलोचन करणे, याला ज्ञान म्हटले आहे. ८.

**असक्तिरनभिष्वंगः पुत्रदारगृहादिषु ।**
**नित्यं च समचित्तत्वमिष्टानिष्टोपपत्तिषु ॥९॥**

**अन्वयार्थ**—**असक्तिः**—विषयांवर प्रीति न ठेवणे,—**पुत्र-दार-गृहादिषु अनभिष्वंगः**—पुत्र, स्त्री, गृह इत्यादिकांमध्ये अत्यंत आसक्ति न ठेवणे,—**च**—आणि—**इष्टानिष्टोपपत्तिषु**—इष्ट व अनिष्ट यांची प्राप्ति झाली असतां,—**नित्यं**—हमेश–नेहमीं—**समचित्तत्वं**—समचित्त ठेवणे, ( इष्टप्राप्तींने हृष्ट न होणें व अनिष्टप्राप्तीने खिन्न न होणें हीं ज्ञानसाधनें आहेत. ) ९

**किंच—असक्तिः सक्तिः सङ्गनिमित्तेषु विषयेषु प्रीतिमात्रं तदभावोऽसक्तिः । अनभिष्वङ्गोऽभिष्वङ्गाभावोऽभिष्वङ्गो नाम सक्तिविशेष एवानन्यात्मभावनालक्षणः । यथाऽन्यस्मिन्सुखिनि दुःखिनि वाऽहमेव सुखी दुःखी च जीवति मृते वाऽहमेव जीवामि मरिष्यामि चेति । क्केत्याह । पुत्रदारगृहादिषु पुत्रेषु दारेषु गृहेष्वादिग्रहणादन्येष्वप्यत्यन्तेष्टेषु दासवर्गादिषु । तच्चोभयं ज्ञानार्थत्वाज्ज्ञानमुच्यते । नित्यं च समचित्तत्वं तुल्यचित्तता, क्क इष्टानिष्टोपपत्तिषु, इष्टानामनिष्टानां चोपपत्तयः संप्राप्तयस्तास्विष्टानिष्टोपपत्तिषु नित्यमेव तुल्यचित्तता, इष्टोपपत्तिषु न हृष्यति न कुप्यति चानिष्टोपपत्तिषु । तच्चैतन्नित्यं समचित्तत्वं ज्ञानम् ॥ ९ ॥**

**भाष्यार्थ—किंच**—ज्ञानाचींच आणखीं अन्तरंग साधनें ' असक्ति० ' या श्लोकानें सांगतात—**असक्तिः-सक्तिः संगनिमित्तेषु विषयेषु प्रीतिमात्रं तदभावः असक्तिः**—असक्ति-सक्ति म्ह० आसक्तीचीं निमित्तें असे जे विषय त्यांविषयीं सामान्य प्रीति, तिचा जो अभाव ती असक्ति–सामान्य विषयप्रीतीचा अभाव,—**अनभिष्वङ्गः-अभिष्वङ्गाभावः-अभिष्वङ्गः नाम सक्तिविशेषः एव**—अनभिष्वंग म्ह० अभिष्वंगाचा अभाव, अभिष्वंग म्हणजे एक प्रकारची आसक्तिच होय. (त्याचें स्वरूप सांगून उदाहरणानें स्पष्टीकरण करितात- )—**अनन्य-आत्मभावनालक्षणः**—अन्य मनुष्याला आपल्याहून भिन्न न समजतां–तोच मी अशी भावना करणें, हेंच त्या आ-

सक्तिविशेषाचें स्वरूप आहे.—**यथा अन्यस्मिन् सुखिनि दुःखिनि वा अहं एव सुखी दुःखी च**—जसें दुसरा मनुष्य सुखी किंवा दुःखी झाला असतां, मीच सुखी किवा दुःखी आहें—**जीवति मृते वा अहं एव जीवामि मरिष्यामि च इति**—दुसरा जिवंत असता किवा मृत झाला असतां मीच जिवंत आहे व मीच मरेन–मीच मरतों, अशी अन्यामध्यें अनन्य आत्मभावना ठेवणें, हाच तो अभिष्वंग होय.—**क इति आह**—पण मनुष्य अशी भावना कोठें ठेवतो, असें कोणी म्हणेल म्हणून भगवान् सांगतात—**पुत्रदारगृहादिषु-पुत्रेषु दारेषु गृहेषु आदिग्रहणात् अन्येषु अपि अत्यन्त इष्टेषु दासवर्गादिषु**—पुत्रांमध्ये, पत्नीमध्यें, गृहांमध्ये व आदि-शब्द असल्यामुळे दुसऱ्याहि अत्यन्त इष्ट अशा दासवर्गादिकांमध्ये ' तोच मी ' अशा प्रकारचा अभिष्वंग नसणे,—**तत् च उभयं ज्ञानार्थत्वात् ज्ञानं उच्यते**—आणि तीं दोन्हीं म्ह० असक्ति व अनभिष्वंग ज्ञानासाठीं असल्यामुळे त्यांना ज्ञान म्हटले जातें. ( मन सदा हर्षविषादरहित असणे, हेहि ज्ञानसाधन आहे, असें सांगतात-)—**च नित्यं समचित्तत्वं-तुल्यचित्तता**—आणि नित्य समचित्तता–तुल्यचित्तता–चित्त-वृत्ति एकसारखी असणे,—**क**—कोठें ? कशामध्ये समचित्तत्व ?—**इष्टानिष्टोपपत्तिषु-इष्टानां अनिष्टानां च उपपत्तयः-संप्राप्तयः तासु-इष्टानिष्टोपपत्तिषु नित्यं एव तुल्यचित्तता**—इष्ट व अनिष्ट प्राप्तीमध्ये-इष्ट पदार्थाची व अनिष्ट पदार्थाची प्राप्ति झाली असतां-अशा अनेक पदार्थाच्या अनेक इष्टानिष्टप्राप्ती झाल्या असतां, त्या इष्टानिष्टप्राप्तीमध्ये नेहमींच तुल्यचित्तता म्ह०—**इष्टोपपत्तिषु न हृष्यति च अनिष्टोपपत्तिषु न कुप्यति**—इष्टांच्या प्राप्ती झाल्या असता हर्ष पावत नाही व अनिष्टाच्या प्राप्ती झाल्या असता रागावत नाही,—**तत् च एतत् नित्यं समचित्तत्वं ज्ञानं**—तें हे अशा प्रकारचे नित्य समचित्तत्व ज्ञान म्हणजे ज्ञान-साधन आहे. ९.

**मयि चानन्ययोगेन भक्तिरव्यभिचारिणी ।**
**विविक्तदेशसेवित्वमरतिर्जनसंसदि ॥ १० ॥**

**अन्वयार्थ—च मयि अनन्ययोगेन अव्यभिचारिणी भक्तिः**—आणि माझ्या ठिकाणीं अनन्ययोगानें म्ह० वासुदेवाहून श्रेष्ठ कोणी नाही, अशा चित्तसमाधा-नानें अढळ भक्ति,—**विविक्तदेशसेवित्वं**—एकान्त, निर्भय, पवित्र प्रदेशांत राहणें-अरण्य, नदीकांठ इत्यादि प्रदेशाचे सेवन करणें,—**जनसंसदि अरतिः**—सामान्य जनांच्या समूहांत मिसळण्याची आवड नसणे, ही ज्ञानसाधनें आहेत. १०.

**किंच-मयि चेश्वरेऽनन्ययोगेनापृथक्समाधिना नान्यो भगवतो वासुदेवात्परोऽस्त्यतः स एव नो गतिरित्येवं निश्चिताऽव्यभिचारिणी बुद्धिरनन्ययोगस्तेन भजनं भक्तिर्न व्यभि-चरणशीला अव्यभिचारिणी । सा च ज्ञानम् । विविक्तदेशसेवित्वं विविक्तः स्वभावतः संस्कारेण वाऽशुच्यादिभिः सर्पव्याघ्रादिभिश्च रहितोऽरण्यनदीपुलिनदेवगृहादिभिर्वि-**

विक्तो देशस्तं सेवितुं शीलमस्येति विविक्तदेशसेवी तद्भावो विविक्तदेशसेवित्वम्। विविक्तेषु हि देशेषु चित्तं प्रसीदति यतस्तत आत्मादिभावना विविक्त उपजायतेऽतो विविक्तदेशसेवित्वं ज्ञानमुच्यते । अरतिररमणं जनसंसदि जनानां प्राकृतानां संस्कारशून्यानामविनीतानां संसत्समवायो जनसंसन्न संस्कारवतां विनीतानां संसत्तस्या ज्ञानोपकारकत्वादतः प्राकृतजनसंसद्यरतिर्ज्ञानार्थत्वाज्ज्ञानम् ॥ १० ॥

**भाष्यार्थ— किंच**—' मयि० ' या श्लोकानें आणखीं ज्ञानसाधनें सांगतात—**च मयि-ईश्वरे अनन्ययोगेन-अपृथक्समाधिना**—आणि मज-ईश्वराचे ठिकाणीं अनन्ययोगानें म्ह० अपृथक्समाधीने—**अन्यः-भगवतः वासुदेवात् परः न अस्ति अतः सः एव नः गतिः**—अन्य म्ह० भगवान् वासुदेवाहून पर-श्रेष्ठ-दुसरा कोणी नाहीं, यास्तव तोच आमची गति आहे,—**इति-एवं निश्चिता-अव्यभिचारिणी बुद्धिः अनन्ययोगः**—अशाप्रकारची निश्चित म्ह० अव्यभिचारिणी बुद्धि हाच अनन्ययोग होय.—**तेन भजनं-भक्तिः**—त्या तसल्या अनन्ययोगाने भजन करणे हीच भक्ति—**न व्यभिचरणशीला-अव्यभिचारिणी**—ती भक्ति कशी, तर जिचे व्यभिचार पावण्याचे शील नाही, ती म्ह० अव्यभिचारिणी—**सा च ज्ञानं**—ती अव्यभिचारिणी भक्ति हें ज्ञानसाधन असल्यामुळे ज्ञान आहे.—**विविक्तदेशसेवित्वं-विविक्तः -स्वभावतः संस्कारेण वा अशुच्यादिभिः च सर्पव्याघ्रादिभिः रहितः अरण्य-नदीपुलिन-देवगृहादिभिः विविक्तः देशः**—विविक्तदेशसेवित्व-विविक्त म्ह० स्वभावतःच किंवा संस्काराने अशुचि इत्यादि पदार्थांनीं किंवा सर्प-व्याघ्रादिकांनी रहित असलेला-अरण्य, नदीचे तीर, देवगृह इत्यादिकाच्यायोगाने विविक्त देश [ म्ह० पवित्र, निर्भय व एकान्त देश ]—**तं सेवितुं शीलं अस्य इति विविक्तदेशसेवी**—तसल्या त्या विविक्त देशाचें सेवन करण्याचे-तसल्या स्थानी राहण्याचें याचे शील आहे, म्हणून विविक्तदेशसेवी—**तद्भावः-विविक्तदेशसेवित्वं**—त्याचा जो भाव [ म्ह० पणा ] तें विविक्तदेशसेवित्व-विविक्तदेशसेवीपणा, ( त्याला ज्ञानसाधनत्व कसें ? उत्तर-)—**विविक्तेषु हि देशेषु यतः चित्तं प्रसीदति ततः आत्मादिभावना विविक्ते उपजायते**—विविक्त प्रदेशातच ज्याअर्थी चित्त प्रसन्न होतें त्याअर्थी आत्मा, परमात्मा, वाक्यार्थ इत्यादिकांविषयींची भावना विविक्तस्थानीं उत्पन्न होते,—**अतः विविक्तदेशसेवित्वं ज्ञानं उच्यते**—म्हणून विविक्तदेशसेवित्व हें ज्ञान म्हटलें जातें.—**जनसंसदि अरतिः-अरमणं**—लोकांच्या समुदायामध्यें अरति म्ह० रममाण न होणें.—**प्राकृतानां संस्कारशून्यानां अविनीतानां जनानां संसत्-समवायः-जनसंसत्**—प्राकृत संस्कारशून्य अनम्र लोकांची संसत्-सभा-म्ह० समवाय-अशा लोकांचा समुदाय, ही येथील ' जनससत् ' होय—**संस्कारवतां विनीतानां संसत् न**—संस्कारवान्, नम्र व सुशिक्षित लोकांची संसत् येथें विवक्षित नाहीं. कारण—**तस्याः ज्ञानोपकारकत्वात्**— तसल्या लोकांची संसत् [ समुदाय ] ज्ञानाला उपकारक होते,—**अतः प्राकृतजनसंसदि अरतिः**

**ज्ञानार्थत्वात् ज्ञानं**—यास्तव प्राकृतलोकांच्या समवायामध्यें-त्यांच्या समुदायांत अरति-अप्रीति ज्ञानाला कारण होत असल्यामुळें ज्ञान आहे. १०.

**अध्यात्मज्ञाननित्यत्वं तत्त्वज्ञानार्थदर्शनम् ।**
**एतज्ज्ञानमिति प्रोक्तमज्ञानं यदतोऽन्यथा ॥ ११ ॥**

**अन्वयार्थ—अध्यात्मज्ञाननित्यत्वं**—आत्मा व अनात्मा यांच्या विवेकज्ञानांमध्यें सतत गढून जाणे व—**तत्त्वज्ञानार्थदर्शनं**—तत्त्वज्ञानाचा अर्थ-फल जो मोक्ष, त्याचें आलोचन करणे—**एतत् ज्ञानं**—हें सर्व ज्ञान म्हणजे ज्ञानाचे साधन आहे,—**इति**—असें—**प्रोक्तं**—सांगितले आहे.—**यत् अतः अन्यथा ( तत् ) अज्ञानं**—जें याच्या उलट, ते अज्ञान होय. ११.

**किंच—अध्यात्मज्ञाननित्यत्वमात्मादिविषयं ज्ञानमध्यात्मज्ञानं तस्मिन्नित्यभावो नित्यत्वममानित्वादीनां ज्ञानसाधनानां भावनापरिपाकनिमित्तं तत्त्वज्ञानं तस्यार्थो मोक्षः संसारोपरमस्तस्याऽऽलोचनं तत्त्वज्ञानार्थदर्शनम् । तत्त्वज्ञानफलालोचने हि तत्साधनानुष्ठाने प्रवृत्तिः स्यादिति । एतदमानित्वादितत्त्वज्ञानार्थदर्शनान्तमुक्तं ज्ञान-**

---

१ 'विविक्तदेशसेवित्व'व'अरतिर्जनसंसदि' या शब्दाचे व्याख्यान आचार्यांनी कसे केले आहे ते पाहून आता रहस्यकार काय म्हणतात तेंहि पहा—"विविक्त म्ह० निवडक किंवा एकान्त जागीं राहणे," व 'अरतिर्जनसंसदि' म्ह० सामान्य जनांचा चव्हाटा न आवडणे" असा अर्थ करून ते टीपेत म्हणतात—"दहाव्या श्लोकांत 'विविक्त जागी राहणे व चव्हाटा न आवडणे' असे जे ज्ञानाचे एक लक्षण दिले आहे, त्यावरून संन्यासमार्गच गीतेस अभिप्रेत आहे असे दाखविण्याचा कित्येकांनी प्रयत्न केला आहे. ( कोणी ? आचार्यांचे भाष्य तर आता वाचकांपुढेच आहे. ) "पण हे मत खरे नसून असा अर्थ करणे युक्तहि नाहीं... ज्ञान म्ह० काय एवढ्याचा या ठिकाणी विचार केलेला आहे व ते ज्ञान म्ह० बायका-मुले घरदार किंवा लोकांचा चव्हाटा या ठिकाणी अनासक्ति होय, याबद्दल कोणताच वाद नाहीं." ( रहस्यकाराची ज्ञानाची ही व्याख्या फारच बहारीची आहे. पण आचार्यादिक 'असक्तिः अनभिष्वंगः, अरतिः जनसंसदि ' ही सर्व ज्ञानसाधने मानतात. त्यांना ज्ञान म्हणत नाहीत. अर्थात् रहस्यकारांचे हे सर्व ' अलक्ष्ये शरसंधान ' आहे. पण हे सर्व कशाकरिता तर ते म्हणतात-)-"हे ज्ञान झाल्यावर याच अनासक्तबुद्धीने बायकामुलांत किंवा जगांत राहून सर्वभूतहितार्थ जगाचे व्यवहार करावे की नाहीं हा या पुढला प्रश्न आहे." ( पण तो गीतेचा प्रश्न नसून रहस्यकारांनी आपल्या कल्पनाशक्तीने उत्पन्न केलेला असल्यामुळें विचारार्ह नाहीं. गीतेत असा प्रश्न कोठेच उपस्थित केलेला नसल्यामुळे रहस्यकारांचें या विषयींचें चर्वितचर्वण व्यर्थ आहे. अमानित्वादिक हें साक्षात् ज्ञान नसून ती ज्ञानसाधनें आहेत, असे श्रीशंकराचार्यादि सर्व अद्वैती भाष्य-टीकाकारच म्हणतात असें नाही, तर मध्वाचार्य-' तज्ज्ञानसाधनान्याह ' असें व रामानुजाचार्य-'आत्मज्ञानसाधनतया उपादेया गुणाः प्रोच्यन्ते' असें म्हणतात.

मिति प्रोक्तं ज्ञानार्थत्वात् । अज्ञानं यदतोऽस्माद्यथोक्तादन्यथा विपर्ययेण मानित्वं दम्भित्वं हिंसाऽक्षान्तिरनार्जवमित्याद्यज्ञानं विज्ञेयं परिहरणाय संसारप्रवृत्तिकारणत्वादिति ॥ ११ ॥

**भाष्यार्थ—किंच**—'अध्यात्म०' या श्लोकाने आणखी ज्ञानसाधने सांगतात—**अध्यात्मज्ञाननित्यत्वं-आत्मादिविषयं ज्ञानं अध्यात्मज्ञानं तस्मिन् नित्यभावः नित्यत्वं**—अध्यात्मज्ञाननित्यत्व-आत्मा व अनात्मा याविषयींचें जें ज्ञान-विवेक ते अध्यात्मज्ञान, त्यांत नित्यभाव म्ह० नित्यत्व[1] म्ह० त्यांतच निष्ठा ठेवणें ( कारण विवेकनिष्ठालाच महावाक्यार्थाचे ज्ञान होते. 'तत्त्वज्ञानार्थदर्शन' याचें व्याख्यान-) **—अमानित्वादीनां ज्ञानसाधनानां भावनापरिपाकनिमित्तं तत्त्वज्ञानं**—अमानित्वादि-ज्ञानसाधनांच्या भावनेचा जो परिपाक म्ह० त्यांतील प्रत्येक साधन पूर्णपणे साध्य होईपर्यंत त्याचा अभ्यास करणें, अभ्यासाने त्यांतील प्रत्येक साधन हे आपलें शील किंवा स्वभावच बनविणे, त्या निमित्ताने होणारे जे तत्त्वज्ञान ब्रह्मात्मैक्यसाक्षात्कार—**तस्य अर्थः-मोक्षः-संसारोपरमः तस्य आलोचनं तत्त्वज्ञानार्थदर्शनं**—त्या तत्त्वज्ञानाचा अर्थ-म्ह० फल असा जो मोक्ष म्ह० सर्व ससाराचा उपशम, त्याचें आलोचन करणें, हें तत्त्वज्ञानार्थदर्शन होय. (पण असे तत्त्वज्ञानाच्या फलाचे आलोचन कशासाठीं करावयाचे? उत्तर-)—**हि तत्त्वज्ञानफलालोचने तत्साधनानुष्ठाने प्रवृत्तिः स्यात् इति**—कारण तत्त्वज्ञानाच्या फलाचें आलोचन केले असतां त्याच्या साधनाचें अनुष्ठान करण्याकडे प्रवृत्ति होते, म्हणून त्याचे आलोचन करावयाचें. ( याप्रमाणे सांगितलेल्या तत्त्वज्ञानाच्या अन्तरंगसाधनाचा उपसंहार करितात-)—**एतत्-अमानित्वादि-तत्त्वज्ञानार्थदर्शनान्तं उक्तं ज्ञानं इति प्रोक्तं-ज्ञानार्थत्वात्** —हें जे अमानित्वापासून तत्त्वज्ञानार्थदर्शनापर्यंत सागितलेले साधनजात त्याला 'ज्ञान' असे म्हटले आहे. कारण ते ज्ञानासाठीं आहे.—**अज्ञानं यत् अतः-अस्मात् यथोक्तात् अन्यथा-विपर्ययेण**—अज्ञान कोणतें ? तर जें या वर सागितलेल्या अमानित्वादिकांहून अन्यप्रकारचें म्ह० त्याच्या विपर्ययाने-उलट असलेले—**मानित्वं दम्भित्वं हिंसा अक्षान्तिः अनार्जवं इत्यादि अज्ञानं विज्ञेयं**—मानित्व, दंभित्व, हिंसा, अक्षमा, कुटिलता इत्यादि, ते अज्ञान जाणावे, तें अज्ञान आहे, असे समजावें. ( त्याला जाणून काय लाभ होणार ? उत्तर-)—**परिहरणाय संसारप्रवृत्तिकारणत्वात् इति**—त्याचा परिहार करण्यासाठीं त्याला जाणावें, कारण तें अज्ञान संसाराच्या प्रवृत्तीचे-उत्पत्तीचे कारण आहे, ह्मणून तें अमानित्वादि त्याज्य असून, तें त्याज्य आहे, हें कळेल तेव्हांच त्याचा त्याग होणार, ह्मणून त्याला जाणावें.—**इति**—हा भाष्याच्या शेवटचा शब्द साधनाचे प्रकरण समाप्त झालें असें सुचविण्यासाठीं आहे. ११.

---

१ या शब्दाचा अर्थ 'अध्यात्मज्ञान नित्य आहे अशी बुद्धि होणें' असा रहस्यकार करितात, तो कितपत योग्य आहे ते वाचकांनींच ठरवावें.

**यथोक्तेन ज्ञानेन ज्ञातव्यं किमित्याकाङ्क्षायामाह ज्ञेयं यत्तदित्यादि । ननु यमा नियमाश्चामानित्वादयो न तैर्ज्ञेयं ज्ञायते । न ह्यमानित्वादि कस्यचिद्वस्तुनः परिच्छेदकं दृष्टम् । सर्वत्रैव च यद्विषयं ज्ञानं तदेव तस्य ज्ञेयस्य परिच्छेदकं दृश्यते । न ह्यन्यविषयेण ज्ञानेनान्यदुपलभ्यते । यथा घटविषयेण ज्ञानेनाग्निः । नैष दोषो ज्ञाननिमित्तत्वाज्ज्ञानमुच्यत इति ह्यवोचाम । ज्ञानसहकारिकारणत्वाच्च ।**

**भाष्यार्थ**—( पुढील ग्रंथाला अवतरण देतात- )—**यथोक्तेन ज्ञानेन किं ज्ञातव्यं इति आकांक्षायां 'ज्ञेयं यत्तत्०' इत्यादि आह**—वर सांगितलेल्या ज्ञानानें जाणण्यास योग्य असें काय आहे, अशी आकांक्षा झाली असतां ' ज्ञेयं यत् तत्०' असें भगवान् सांगतात. ( अमानित्वादिकांच्या ज्ञानत्वाविषयी आक्षेप- )—**ननु अमानित्वादयः यमाः च नियमाः**[1] **तैः ज्ञेयं न ज्ञायते**—अहोपण, अमानित्वादिक हे यम व नियम आहेत. त्यांच्या योगानें ज्ञेय ज्ञात होणें शक्य नाही.—**हि अमानित्वादि कस्याचित् वस्तुनः परिच्छेदकं न दृष्टं**—कारण अमानित्वादिक हें कोणत्याहि वस्तूचे परिच्छेदक होत असल्याचे दिसत नाही. [ अमानित्वादिक ' ही अमुक व अशी अशी वस्तु आहे' असा परिच्छेद-असा निर्णय करूं शकत नाही.पण असा वस्तुपरिच्छेद करणारें जे असतें त्यालाच ज्ञान म्हणतात- ]—**सर्वत्र एव च यद्विषयं ज्ञानं तत् एव तस्य ज्ञेयस्य परिच्छेदकं दृश्यते**—सर्व ठिकाणींच ज्या विषयाचें ज्ञान असते तेच त्या ज्ञेयाचे परिच्छेदक असलेले दिसतें [ ज्ञान आपल्या विषयाचाच परिच्छेद करते, हीच गोष्ट व्यतिरेकानें विशद करितात- ]—**अन्यविषयेण ज्ञानेन अन्यत् न हि उपलभ्यते**—एका पदार्थाविषयींच्या ज्ञानानें दुसरा पदार्थ ज्ञात होत नाही, हें प्रसिद्ध आहे.—**यथा घटविषयेण ज्ञानेन अग्निः**—ज्याप्रमाणे घटविषयक ज्ञानानें अग्नि ज्ञात होत नाही [ या आक्षेपाचे समाधान- ]—**न एषः दोषः**—हा दोष येत नाहीं—**ज्ञाननिमित्तत्वात् ज्ञानं उच्यते इति हि अवोचाम**—अमानित्वादिक ही ज्ञानाची निमित्तें असल्यामुळें त्यांना ज्ञान म्हटलें जाते, असे आम्हीं वर सांगितलेच आहे. [ त्यांना ज्ञान म्हणण्याचें आणखी एक कारण- ]—**च ज्ञानसहकारिकारणत्वात्**—आणि ज्ञानसहकारी कारणामुळेंहि त्यांना ज्ञान म्हटले आहे.

**ज्ञेयं यत्तत्प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वाऽमृतमश्नुते ।**
**अनादिमत्परं ब्रह्म न सत्तन्नासदुच्यते ॥ १२ ॥**

---

१ " ब्रह्मचर्यं दया क्षान्तिर्दानं सत्यमकल्कता । अहिंसास्तेयमाधुर्ये दमश्चेति यमाः स्मृताः ॥ ३१२ ॥ स्नानं मौनोपवासेज्यास्वाध्यायोपस्थनिग्रहाः । नियमा गुरुशुश्रूषा शौचाक्रोधाप्रमादता ॥ ३१३ ॥" या याज्ञवल्क्यस्मृतीच्या ( अ. ३ ) दोन वचनांत क्रमानें यम व नियम सांगितले आहेत. पातंजलयोगसूत्रांत " अहिंसासत्यास्तेयब्रह्मचर्यापरिग्रहा यमाः ॥ २.३० ॥ शौचसंतोषतपःस्वाध्यायेश्वरप्रणिधानानि नियमाः ॥ २. ३२ ॥ " अहिंसा, सत्य, अचौर्य, ब्रह्मचर्य व अपरिग्रह हे यम आणि शौच, संतोष, तप, स्वाध्याय, व ईश्वरप्रणिधान हे नियम आहेत, असे म्हटलें आहे.

**अन्वयार्थ**—**यत् ज्ञेयं**—जें ज्ञेय—**तत्**—तें—**प्रवक्ष्यामि**—मी सांगतों.—**यत् ज्ञात्वा**—जे जाणून—**अमृतं**—अमरणभावास—**अश्नुते**—प्राप्त होतो.—**अनादिमत्**—जे आदिमत् नसलेलें—**परं ब्रह्म**—निरतिशय ब्रह्म तें ज्ञेय होय.—**तत्**—तें—**न सत्**—सत् म्हटलें जात नाहीं—**न असत् उच्यते**—व असत् म्हटलें जात नाहीं. १२

**ज्ञेयं ज्ञातव्यं यत्तत्प्रवक्ष्यामि प्रकर्षेण यथावद्वक्ष्यामि । किं फलं तदिति प्ररोचनेन श्रोतुरभिमुखीकरणायाऽऽह यज्ज्ञेयं ज्ञात्वाऽमृतममृतत्वमश्नुते न पुनर्म्रियत इत्यर्थः । अनादिमदादिरस्यास्तीत्यादिमन्नाऽऽदिमदनादिमत् । किं तत्परं निरतिशयं ब्रह्म ज्ञेयमिति प्रकृतम् । अत्र केचिदनादि मत्परमिति पदं छिन्दन्ति बहुव्रीहिणोक्तेऽर्थे मतुप आनर्थक्यमनिष्टं स्यादिति । अर्थविशेषं च दर्शयन्ति अहं वासुदेवाख्या परा शक्तिर्यस्य तन्मत्परमिति ॥**

**भाष्यार्थ**—( त्याप्रमाणे अमानित्वादिकांना ज्ञानत्व आहे, असें सांगून आतां ज्ञातव्याच्या व्याख्यानास आरंभ करितात-)—**ज्ञेयं-ज्ञातव्यं यत् तत् प्रवक्ष्यामि -प्रकर्षेण यथावत् वक्ष्यामि**—ज्ञेय म्ह० अवश्य ज्ञातव्य-जे जाणणें अत्यंत अवश्य आहे तें, मी आतां आधिक्यानें-पूर्णपणें जसेंच्या तसेंच सांगेन—**किं फलं तत् इति**—त्या ज्ञेयाच्या ज्ञानाचें फल काय आहे ? ज्ञेयाला जाणल्यानें कोणता लाभ होतो ! असा प्रश्न उत्पन्न करून—**प्ररोचनेन श्रोतुः अभिमुखीकरणाय आह**—त्याच्या प्ररोचनानें-त्याच्याविषयीं जिज्ञासा उत्पन्न करण्यासाठीं, त्याची स्तुति करून श्रोत्याला तें ऐकावयास उत्सुक करण्यासाठीं भगवान् म्हणतात—**यत् ज्ञेयं ज्ञात्वा अमृतं-अमृतत्वं अश्नुते-पुनः न म्रियते इत्यर्थः**—जे ज्ञेय जाणून अमृतास म्ह० अमृतत्वास प्राप्त होतो, पुनः मरत नाहीं, असा भावार्थ. [ ते ज्ञेयच सांगतात-]—**अनादिमत्-आदिः अस्य अस्ति इति आदिमत् । न आदिमत्-अनादिमत्**—अनादिमत्-ज्याला आदि-आरंभ किंवा कारण आहे तें आदिमत्, तसें आदिमत् जें नव्हे तें अनादिमत् ( पण आदिमत्त्वराहित्य अव्याकृतालाहि आहे, म्हणून या ज्ञेयांतील विशेष दाखवितात-)—**किं तत् परं-निरतिशयं ब्रह्म ज्ञेयं इति प्रकृतं**—तें अनादिमत् काय ? पर-निरतिशय ब्रह्म-'ज्ञेय' या शब्दानें जे प्रकृत-प्रस्तुत आहे ते, [ याविषयीं एका मताचा अनुवाद करून त्याचें निरसन करितात-]—**अत्र केचित् अनादि मत्परं इति पदं छिन्दन्ति**—येथे कित्येक ' अनादि ' व ' मत्परं ' असा पदच्छेद करितात [ तो कां ? ]—**बहुव्रीहिणा उक्ते अर्थे मतुपः आनर्थक्यं अनिष्टं स्यात् इति**—' याला आदि नाहीं ' असा बहुव्रीहीनें सांगितलेला जो अर्थ त्यांतच आदिमत्त्वाचा निषेध होत असल्यामुळें ' अनादिमत् ' अशा ' मत् ' प्रत्यायाचा कांहीं उपयोग नाही, ' अनादि ' एवढाच बहुव्रीहि समास मानल्यानें त्या प्रत्ययाचें कार्य त्यांतच होऊन जातें. त्यामुळें ' मत् ' प्रत्यय व्यर्थ ठरतो. अर्थात् ' मतुप् ' म्ह० मत् या प्रत्ययाचें इष्ट नसलेलें आनर्थक्य प्राप्त होईल. [ विनाकारण तो प्रत्यय व्यर्थ

ठरेल ] म्हणून ' अनादि ' व ' मत्परं ' असा पदच्छेद करावा, म्हणजे कांहीं दोष येत नाहीं, [ शिवाय असा पदच्छेद केल्यानें ' मत्परं ' याचा विशेष अर्थहि निष्पन्न होतो, असें सांगतात- ]—**च अर्थविशेषं दर्शयन्ति**—आणि त्याचा विशेष अर्थहि दाखवितात [ तो कसा ? ]—**अहं वासुदेवाख्या परा शक्तिः यस्य तत् मत्परं इति**—मी वासुदेव या नांवाची परा शक्ति ज्याची आहे तें ज्ञेय ' मत्पर ' होय, असा विशेष अर्थ दाखवितात.

**सत्यमेवमपुनरुक्तं स्यादर्थश्चेत्संभवति न त्वर्थः संभवति ब्रह्मणः सर्वविशेषप्रतिषेधेनैव विजिज्ञापयिषितत्वान्न सत्तन्नासदुच्यत इति । विशिष्टशक्तिमत्त्वप्रदर्शनं विशेषप्रतिषेधश्चेति विप्रतिषिद्धम् । तस्मान्मतुपो बहुव्रीहिणा समानार्थत्वेऽपि प्रयोगः श्लोकपूरणार्थः । अमृतत्वफलं ज्ञेयं मयोच्यत इति प्ररोचनेनाभिमुखीकृत्याऽऽह न सत्तज्ज्ञेयमुच्यत इति नाप्यसत्तदुच्यते ॥**

**भाष्यार्थ**—( पण हें व्याख्यान अयुक्त असल्यामुळे ते पुनरुक्ति दोषाचें निरसन करूं शकत नाही, असे सांगतात- )—**सत्यं एवं अपुनरुक्तं स्यात् अर्थः चेत् संभवति**—खरेंच, असा पदच्छेद केल्यानें अपुनरुक्त होईल, हे खरें, पण त्याचा अर्थ जर संभवेल तरच पुनरुक्त दोषाचें निरसन झालें, असे म्हणतां येईल.—**तु अर्थः न संभवति**—पण त्याचा अर्थ संभवत नाहीं (तो का संभवत नाहीं ? उत्तर- )—**ब्रह्मणः सर्वविशेषप्रतिषेधेन एव ' न सत् तत् न असत् उच्यते '-इति विजिज्ञापयिषितत्वात्**—ब्रह्माचें सर्व विशेषांच्या प्रतिषेधानेच-' त्याला सत् म्हटले जात नाहीं ' व ' असत्-हि म्हटले जात नाहीं, अशाप्रकारें सर्वविशेषप्रतिषेधानेंच ज्ञान करून देणे इष्ट आहे. [ सर्व विशेषांचा निषेध करूनच ब्रह्माचा बोध करून देणें भगवानांना इष्ट आहे. त्यांना सर्वविशेषानिषेधानेंच ब्रह्माचा बोध करावयाचा आहे. असें जरी असले तरी ते विशिष्ट शक्तीने युक्त कां असणार नाहीं ? उत्तर- ]—**विशिष्टशक्तिमत्त्वप्रदर्शनं च विशेषप्रतिषेधः इति विप्रतिषिद्धं**—ब्रह्म विशिष्टशक्तीनें युक्त आहे, असें प्रदर्शित करणे व सर्व विशेषांचा प्रतिषेध करणें, हे परस्परविरुद्ध आहे.—**तस्मात् मतुपः बहुव्रीहिणा समानार्थत्वे अपि प्रयोगः श्लोकपूरणार्थः**—यास्तव ' मतुप्- ' मत् या प्रत्ययाचें बहुव्रीहीशीं समान अर्थत्व जरी असलें, मत्-प्रत्यय व बहुव्रीहि समास यांचा अर्थ एकच जरी असला तरी 'मत्'प्रत्ययाचा प्रयोग श्लोकांतील अक्षरें भरून काढण्यासाठी आहे. [ याप्रमाणे ' अनादि ' व ' मत्परं ' या दुसऱ्या पक्षाचें निरसन करून आपल्या ' अनादिमत् परं ' या पक्षाचें समर्थन केलें. आतां ब्रह्माला ब्रह्मत्व असल्यामुळें कार्यकारणरूपत्वहि प्राप्त होतें, म्हणून पूर्वोक्त अर्थाचा अनुवाद करून ' न सत्॰ ' इत्यादि विशेषणाचें व्याख्यान करितात- ] —**अमृतत्वफलं ज्ञेयं मया उच्यते इति प्ररोचनेन अभिमुखीकृत्य आह -तत् ज्ञेयं सत् न उच्यते तत् असत् अपि न उच्यते इति**—अमृतत्व-

मोक्ष हें ज्याचें फल आहे तें ज्ञेय मजकडून सांगितलें जातें, अशा प्ररोचनानें-स्तुतीनें श्रोत्याला श्रवणाभिमुख करून भगवान् सांगतात-' तें ज्ञेय सत् म्हटलें जात नाहीं व तें असत्‌हि म्हटले जात नाही,' असें भगवान् म्हणतात. [ सत् म्ह०कार्य होय.कारण त्याचें नाम व रूप अभिव्यक्त असते. असत्-कारण, त्याचें नामरूप अभिव्यक्त नसते. ]

**ननु महता परिकरबन्धेन कण्ठरवेणोद्‌घुष्य ज्ञेयं प्रवक्ष्यामीत्यननुरूपमुक्तं न सत्तन्नासदुच्यत इति । न, अनुरूपमेवोक्तम् । कथं सर्वासु ह्युपनिषत्सु ज्ञेयं ब्रह्म "नेति नेत्यस्थूलमनणु" इत्यादिविशेषप्रतिषेधेनैव निर्दिश्यते नेदं तदिति वाचोऽगोचरत्वात्॥**

**भाष्यार्थ**—(यावर आक्षेप-)—**ननु महता परिकरबन्धेन कण्ठरवेण ज्ञेयं प्रवक्ष्यामि इति उद्‌घुष्य**—अहोपण, मोठा आव आणून-कंबर बांधून मोठ्या कंठरवानें 'ज्ञेय सांगेन' असा मोठा घोष करून—' **तत् सत् न असत् न उच्यते' इति अननुरूपं उक्तं**—' ते सत् म्हटलें जात नाही व असत् म्हटले जात नाहीं,' असें हे त्याला अगदीं अननुरूप सांगितले आहे. ( या आक्षेपाचे समाधान-)—**न अनुरूपं एव उक्तं**—नाहीं, हे असें सांगणें अननुरूप नाही, तर तें अनुरूपच सांगितलें आहे.—**कथं**—तें कसे ?—**सर्वासु हि उपनिषत्सु ज्ञेयं ब्रह्म ' नेति नेति ' ' अस्थूलं अनणु ' इत्यादि विशेषप्रतिषेधेन एव निर्दिश्यते**—सर्व उपनिषदांत ज्ञेय ब्रह्म ' हें स्थूल भूतत्रय ते ब्रह्म नव्हे, सूक्ष्मभूतद्वय ते नव्हे ' ' ते स्थूल नाही, सूक्ष्म नाही. ' इत्यादि प्रकारें सर्व विशेषांच्या प्रतिषेधानेच निर्देश केलें जातें —' **इदं तत् ' इति न**—'हें ते' असा त्याचा निर्देश केला जात नाही.कारण—**'वाचः अगोचरत्वात्'**—तें वाणीचा विषय होत नाहीं. [ येथील ज्ञेयवस्तु सर्वविषयशून्य आहे. त्यामुळे त्याचा उपदेश असाच करितां येणे शक्य आहे. ब्रह्मात्मप्रकाश सिद्ध आहे. त्यामुळें त्याचा उपदेश विधिमुखानें करितां येत नाही. वेदान्तामध्येंहि त्याच्यावर आरोपिलेल्या धर्मांची निवृत्ति करण्यासाठी त्याचा निषेधमुखानेच उपदेश केलेला आहे, हे प्रसिद्ध आहे. यास्तव हें ब्रह्माचें प्रवचनहि आरोपित विशेषांच्या निषेधरूप आहे. ब्रह्म वाणीचा विषय होणारें नसल्यामुळें त्याचा विधिमुखाने उपदेश संभवत नाही. ]

**ननु न तदस्ति यद्वस्त्वस्तिशब्देन नोच्यते । अथास्तिशब्देन नोच्यते नास्ति तज्ज्ञेयम् । विप्रतिषिद्धं च ज्ञेयं तदस्तिशब्देन नोच्यत इति च । न तावन्नास्ति नास्तिबुद्ध्यविषयत्वात् । ननु सर्वा बुद्धयोऽस्तिनास्तिबुद्ध्यनुगता एव । तत्रैवं सति ज्ञेयमप्यस्तिबुद्ध्यनुगतप्रत्ययविषयं वा स्यान्नास्तिबुद्ध्यनुगतप्रत्ययविषयं वा स्यात् ॥**

**भाष्यार्थ**—( यावर आक्षेप- )—**ननु यत् वस्तु अस्तिशब्देन न उच्यते तत् न अस्ति**—अहोपण, जी वस्तु ' अस्ति ' आहे, या शब्दानें सांगितली जात नाहीं, ती विद्यमानच नाही.—**अथ तत् ज्ञेयं अस्तिशब्देन न उच्यते तत् नास्ति**—त्याच न्यायानें तें ज्ञेय ' अस्ति ' आहे, या शब्दानें जर सांगितलें जात नसेल तर तें नाहींच.—**ज्ञेयं च तत् अस्तिशब्देन न उच्यते इति च विप्रति-**

**विरुद्धं**—तें ज्ञेय आहे, पण ' अस्ति'शब्दानें मात्र सांगितलें जात नाहीं, हें म्हणणें अतिशय विरुद्ध आहे. ( आचार्य या आक्षेपाचे समाधान करितात-)—**न तावत् नास्ति**—तें ब्रह्म नाही, असे तर नाहीच. कारण—**' नास्ति-' बुद्धि-अविषयत्वात्**—' नास्ति-' नाही, या बुद्धीचा तें विषय होत नाहीं. [ ' नास्ति ' या बुद्धीचा विषय होणे हेंच पदार्थ नाहीं, असें म्हणण्याचें निमित्त आहे. पण ब्रह्माविषयीं तशी बुद्धि होत नाही. त्यामुळे तें नाहीच असे म्हणता येत नाही, हीच गोष्ट अधिक स्पष्ट करण्यासाठी आक्षेप घेतात-]—**ननु सर्वाः बुद्धयः अस्ति-नास्तिबुद्ध्यनुगताः एव**—अहोपण, सर्व बुद्धि 'अस्ति-' आहे किंवा 'नास्ति-' नाही या बुद्धींतील कोणत्या तरी एका बुद्धीनें अनुगत असतात. [ कोणतीहि जरी बुद्धि घेतली तरी ती या दोन प्रकारच्या बुद्धीतून कोणत्या तरी एका प्रकारची असणार, यांत कांहीं शंका नाही. ]—**तत्र एवं सति ज्ञेयं अपि अस्तिबुद्ध्यनुगतप्रत्ययविषयं वा स्यात् नास्तिबुद्ध्यनुगतप्रत्ययविषयं वा स्यात्**—आणि असे असल्यामुळें ज्ञेयहि 'अस्ति-' बुद्धि-अनुगतप्रत्ययाविषय तरी असेल किंवा ' नास्ति- ' बुद्धि-अनुगतप्रत्ययविषय तरी असेल. [ म्ह० ज्ञेय ब्रह्म ' आहे ' या बुद्धीचा विषय तरी असेल किंवा ' नाही' या बुद्धिप्रत्ययाचा विषय तरी असेल. यांतील कोणत्याच बुद्धिप्रत्ययाचा विषय तें होत नाही, असें म्हणता येत नाही, आणि ते जर खरोखरच त्यातील कोणत्याहि बुद्धिप्रत्ययाचा विषय होत नसेल तर ते अनिर्वाच्यच आहे, असे म्हटले पाहिजे. ]

**न । अतीन्द्रियत्वेनोभयबुद्ध्यनुगतप्रत्ययाविषयत्वात् । यद्धीन्द्रियगम्यं वस्तु घटादिकं तदस्तिबुद्ध्यनुगतप्रत्ययविषयं वा स्यान्नास्तिबुद्ध्यनुगतप्रत्ययविषयं वा स्यात् । इदं तु ज्ञेयमतीन्द्रियत्वेन शब्दैकप्रमाणगम्यत्वान्न घटादिवदुभयबुद्ध्यनुगतप्रत्ययविषयमित्यतो न सत्तन्नासदित्युच्यते । यत्तूक्तं विरुद्धमुच्यते ज्ञेयं तन्न सत्तन्नासदुच्यत इति । न विरुद्धम् । "अन्यदेव तद्विदितादथो अविदितादधि" इति श्रुतेः । श्रुतिरपि विरुद्धार्थेति चेद्यथा यज्ञाय शालामारभ्य को हि तद्वेद यद्यमुष्मिँल्लोकेऽस्ति वा न वेतीत्येवमिति चेत् । न । विदिताविदिताभ्यामन्यत्वश्रुतेरवश्यविज्ञेयार्थप्रतिपादनपरत्वात् । यद्यमुष्मिन्नित्यादि तु विधिशेषोऽर्थवादः ॥**

**भाष्यार्थ**—( ब्रह्म घटादिपदार्थांहून अगदीं विलक्षण आहे, त्यामुळे ते या दोन्ही बुद्धींचा विषय जरी न झाले तरी त्याला सर्वथा अनिर्वाच्य म्हणतां येत नाही, असे आचार्य समाधान करितात-)—**न**—तसे नाही,—**अतीन्द्रियत्वेन उभयबुद्ध्यनुगतप्रत्ययाविषयत्वात्**—ते ब्रह्म अतींद्रिय असल्यामुळे त्या दोन्ही बुद्धींच्या अनुगत प्रत्ययाचा विषय होणारे नाही. ( या संक्षिप्त वाक्याचाच विस्तार-)—**यत् हि घटादिकं इंद्रियगम्यं वस्तु तत् अस्ति-बुद्धि-अनुगतप्रत्ययविषयं वा स्यात् नास्ति-बुद्धि-अनुगत-प्रत्ययविषयं वा स्यात्**—जी घटादि इंद्रियगम्य-इंद्रियाचा विषय होणारी वस्तु असते ती अस्तिबुद्धि-अनुगतप्रत्ययाचा विषय तरी होते किंवा नास्तिबुद्धि-अनुगत प्रत्ययाचा विषय तरी होते,—**तु इदं ज्ञेयं अतींद्रिय-**

**त्वेन शब्दैकप्रमाणगम्यत्वात्**—पण हे ज्ञेय ब्रह्म अतींद्रिय असल्यामुळें-इंद्रियांचा विषय न होणारें असल्यामुळे शब्द याच एका प्रमाणाचा विषय होणारें आहे. त्यामुळे —**घटादिवत् उभयबुद्ध्यनुगत-प्रत्यय-विषयं न**—तें घटादिकाप्रमाणें दोन्ही बुद्धींच्या अनुगत प्रत्ययाचा विषय नाही.—**इति अतः ' न सत् तत् नासत् ' इति उच्यते**—यास्तव ' ते सत् नाही व असत् नाहीं, ' असें म्हटलें जातें. —**तु तत् ज्ञेयं 'न सत् तत् न असत् उच्यते इति विरुद्धं उच्यते' इति यत् उक्तं**—पण ते ज्ञेय 'सत् म्हटलें जात नाही, व असत् म्हटलें जात नाही हें विरुद्ध सांगितलें जातें,'असें जे तूं (वाद्याने) म्हटलें आहेस —**न विरुद्धं**—ते तसें विरुद्ध नाही.कारण —**' अन्यदेव तत् विदितात् अथो अविदितात् अधि-' इति श्रुतेः**—ते ब्रह्म विदित-ज्ञात झालेल्या व अविदित-ज्ञात न झालेल्या, अशा दोन्ही प्रकारच्या पदार्थांहून अगदीच विलक्षण आहे, अशा अर्थाची श्रुति याविषयीं प्रमाण आहे.— **श्रुतिः अपि विरुद्धार्था इति चेत्**—बरें, ही श्रुतिसुद्धां विरुद्ध अर्थ सांगणारी आहे, असे म्हणाल, (विरुद्ध अर्थ सांगणारी श्रुति प्रमाणभूत नसते, याविषयी दृष्टान्त-) —**यथा यज्ञाय शालां आरभ्य कः हि तत् वेद यदि अमुष्मिन् लोके अस्ति वा न वा इति एवं इति चेत्**—जसे पारलौकिक फल देणाऱ्या यज्ञाचे अनुष्ठान करण्यासाठी ' प्राचीनवंशं करोति ' या वाक्यानें यज्ञशाला निर्माण करण्याचे प्रकरण आरंभून ' परलोक आहे की नाहीं, हे कोणाला ठाऊक ? ' असे म्हणून ज्यासाठीं यज्ञ करावयाचा त्या परलोकाविषयींच संशय प्रकट करणारी श्रुति जशी विरुद्ध अर्थ सांगणारी असल्यामुळे अप्रमाण आहे, त्याप्रमाणे ही वरील श्रुति अप्रमाण आहे; म्हणून म्हणाल तर—**न**— ही श्रुति तशी अप्रमाण नाही. कारण—**विदित-अविदिताभ्यां अन्यत्वश्रुतेः अवश्यविज्ञेयार्थप्रतिपादनपरत्वात्**—विदित-ज्ञात व अविदित-अज्ञात या दोन्ही प्रकारच्या पदार्थांहून ब्रह्म अगदी विलक्षण आहे, असे सांगणारी श्रुति अवश्य विज्ञेय-जाणण्यास योग्य-असलेल्या अर्थाचें प्रतिपादन करणारी आहे, ती विज्ञेय ब्रह्मपर आहे, [ ' विरुद्धार्थ सांगणारी म्हणून अप्रमाण ' असे म्हणून या श्रुतीचा त्याग करिता येत नाहीं, कारण अद्वितीय ब्रह्माचे निर्विषयत्वानें प्रतिपादन करून ती श्रुति प्रमाणभूत झाली आहे. आतां तूं ( वाद्याने ) ज्या विरुद्ध अर्थ सांगणाऱ्या श्रुतीचें उदाहरण दिले आहेस तीहि अप्रमाण नाही, असे दाखवितात-]— **' यदि अमुष्मिन्०' इत्यादि तु विधिशेषः अर्थवादः**—' परलोक आहे की नाहीं, कोणाला ठाऊक ! ' इत्यादि श्रुति हा विधीचा शेष-अर्थवाद आहे. त्यामुळे त्याचें स्वार्थी तात्पर्य नाही.

---

१ इंद्रियांचे विषय असे जे घटादि पदार्थ ते ' अस्ति ' व ' नास्ति ' यातील कोणत्या तरी एका बुद्धीचे विषय जरी होत असले तरी अतींद्रिय ब्रह्म त्या बुद्धीचा विषय होत नाहीं, तथापि तेवढ्यावरून त्याला अनिर्वाच्य म्हणतां येत नाही. कारण सच्चित्-स्वरूप असलेल्या त्याच्या विषयी शब्दप्रमाण आहे व त्याचा अविषयत्वानेच अनुभव येतो.

**उपपत्तेश्च सदसदादिशब्दैर्ब्रह्म नोच्यत इति। सर्वो हि शब्दोऽर्थप्रकाशनाय प्रयुक्तः श्रूयमाणश्च श्रोतृभिर्जातिक्रियागुणसंबन्धद्वारेण संकेतग्रहणसव्यपेक्षोऽर्थं प्रत्याययति। नान्यथाऽदृष्टत्वात्। तद्यथा गौरश्व इति वा जातितः, पचति पठतीति वा क्रियातः, शुक्लः, कृष्ण इति वा गुणतः, धनी गोमानिति वा संबन्धतः, न तु ब्रह्म जातिमदतो न सदादिशब्दवाच्यं नापिगुणवद्येन गुणशब्देनोच्येत निर्गुणत्वान्नापि क्रियाशब्दवाच्यं निष्क्रियत्वात् "निष्कलं निष्क्रियं शान्तम्" इति श्रुतेः। न च संबन्ध्येकत्वादद्वयत्वाद्-विषयत्वादात्मत्वाच्च न केनचिच्छब्देनोच्यत इति युक्तं "यतो वाचो निवर्तन्ते" इत्यादिश्रुतिभ्यश्च ॥ १२ ॥**

**भाष्यार्थ**—(शिवाय जेथे जाति, गुण, क्रिया इत्यादि धर्म असतात तेथेच म्ह० गाय, वगैरे पदार्थामध्यें शब्दप्रवृत्ति होते, ब्रह्मामध्ये जाति, गुण, क्रिया वगैरे नाहींत, म्हणून ते अनिर्वाच्य आहे, त्यामुळें त्याचा निषेधमुखानेंच बोध करणे भाग आहे असे आतां सांगतात–) **—च सदसदादिशब्दैः ब्रह्म न उच्यते इति उपपत्तेः (निषेधेन एव तस्य उपदेशः)**—आणि सत्-असत् इत्यादि शब्दांनी ब्रह्म सांगितले जात नाही, तें सांगतां येणें शक्य नाहीं, याविषयीं उपपत्तिहि असल्यामुळे निषेधमुखानेच त्याचा उपदेश संभवतो. **—अर्थप्रकाशनाय प्रयुक्तः च श्रोतृभिः श्रूयमाणः सर्वः हि शब्दः जाति-क्रिया-गुण-संबन्धद्वारेण संकेतग्रहणसव्यपेक्षः अर्थं प्रत्याययति**—विषयाचें प्रकाशन–मनांतील अर्थाचें प्रकटीकरण करण्यासाठी वक्त्याने उच्चारलेला व श्रोत्याकडून ऐकला जाणारा सर्वच शब्द जाति-क्रिया-गुण-संबंध यांच्या द्वारा 'या शब्दाचा हा अर्थ जाणावा' अशा संकेताचें ज्ञान असणे, याच्या अपेक्षेने अर्थाचा प्रत्यय आणून देतो.—**अन्यथा न अदृष्टत्वात्**—त्यावांचून कोणताहि शब्द आपल्या अर्थाचा प्रत्यय आणून देतोसे दिसत नाहीं.—**तत् यथा गौः अश्वः इति वा जातितः**—त्याविषयीं उदाहरणे–गाय किंवा घोडा हे शब्द जातितः,—**पचति पठति इति वा क्रियातः**—पाक करितो म्हणून पाचक, पढतो म्हणून पाठक, हे शब्द क्रियेमुळे,—**शुक्लः कृष्णः इति वा गुणतः**—शुक्ल–शुभ्र, कृष्ण–काळा असे हे गुणांच्यायोगाने—**धनी गोमान् इति वा संबन्धतः**—किंवा ज्याच्याशीं धनाचा संबंध आहे तो धनी, ज्याच्याशीं गायींचा संबंध आहे तो गोमान्, हे शब्द संबंधाच्या द्वारा आपापल्या अर्थाचा प्रत्यय आणून देतात.—**तु ब्रह्म जातिमत् न अतः सदादिशब्दवाच्यं न**—पण ब्रह्म जातिमत्–जाति-युक्त नाही. (कारण श्रुतीने 'अगोत्रं अवर्णं' इत्यादि त्याचें वर्णन केलें आहे) त्यामुळें तें सद्-असद् इत्यादि शब्दांनी वाच्य–बोलण्यास योग्य नाहीं.—**गुणवत् अपि न येन गुणशब्देन उच्येत**—तें गुणवत्हि नाही, कीं ज्यामुळें तें गुणशब्दानें सांगितले जाईल! (गुणवत् कां नाहीं?)—**निर्गुणत्वात्**—कारण 'केवलो निर्गुणश्च' इत्यादि श्रुतीनें सांगितल्याप्रमाणे तें निर्गुण आहे. (त्यामुळें गुणांच्या द्वारा त्याचें शब्दवाच्यत्व संभवत नाहीं.)—**क्रियाशब्दवाच्यं अपि न निष्क्रियत्वात् 'निष्कलं निष्क्रियं शान्तं' इति श्रुतेः**—तें क्रियाशब्दांनीं वाच्यहि

नाहीं.कारण तें निष्क्रिय आहे,त्याला निष्क्रियत्व आहे. कारण 'तें कलारहित,क्रियारहित व शांत आहे'अशी श्रुति आहे—**न च संबन्धि एकत्वात् अद्वयत्वात् अविषयत्वात् च आत्मत्वात् केनचित् शब्देन न उच्यते इति युक्तं**—तें ब्रह्म संबंधीहि नाहीं. कारण उपनिषदांत त्याचे एकत्व,अद्वयत्व अविषयत्व व आत्मत्व सांगितलेले आहे,त्यामुळें तें कोणत्याहि शब्दानें बोललें जात नाहीं, हें युक्तच आहे—**'यतो वाचो निवर्तन्ते' इत्यादिश्रुतिभ्यश्च**—ज्याच्यापासून वाक्-वृत्ति त्याला प्रकाशित केल्यावांचूनच निवृत्त होतात, इत्यादि अर्थाच्या अनेक श्रुतीहि हेंच सांगत आहेत. त्यामुळे ब्रह्मतत्त्वामध्यें शब्दाची प्रत्यक्ष प्रवृत्ति होत नाहीं. १२.

**सर्वतःपाणिपादं तत् सर्वतोऽक्षिशिरोमुखम् ।**
**सर्वतःश्रुतिमल्लोके सर्वमावृत्य तिष्ठति ॥ १३ ॥**

**अन्वयार्थ—तत्**—ते ज्ञेय—**सर्वतःपाणिपादं**—सर्व बाजूंनी ज्याला हात-पाय आहेत, असें आहे.—**सर्वतःआक्षिशिरोमुखं**—सर्व बाजूंनीं ज्याला नेत्र, मस्तकें व मुखे आहेत, असें आहे.—**सर्वतःश्रुतिमत्**—ज्याला सर्व बाजूंनी श्रवणेन्द्रियें आहेत, असे आहे —**लोके**—या प्राणिसमूहांत—**सर्वं**—सर्वांला—**आवृत्य**—व्यापून—**तिष्ठति**—तें तत्त्व रहातें. १३

**सच्छब्दप्रत्ययाविषयत्वादसत्त्वाशङ्कायां ज्ञेयस्य सर्वप्राणिकरणोपाधिद्वारेण तदस्तित्वं प्रतिपादयंस्तदाशङ्कानिवृत्त्यर्थमाह—सर्वतःपाणिपादं सर्वतः पाणयः पादाश्चा-**

---

१ 'न सत् तन्नासत् उच्यते' या वाक्याने ज्ञेय अनिर्वाच्य आहे, एवढेच सांगावयाचें आहे. पण रहस्यकारांनी त्या विषयी उगीच अस्थानीं पुष्कळसा विचार केला आहे. पण तो असंबद्ध असल्यामुळे विस्तारभयास्तव त्याकडे आम्ही दुर्लक्ष करितो. 'सदसच्चाहमर्जुन' (९. १९.) येथील सत् व असत् हे शब्द निराळ्या प्रसंगाने आले आहेत व येथील अन्य प्रसंगाने आहेत. " व्यक्त (क्षर) व अव्यक्त (अक्षर) सृष्टि ही दोन्हीं परमेश्वराचींच स्वरूपें असली तरी खरें परमेश्वर तत्त्व या दोहों पलीकडले म्ह० पूर्णपणे अज्ञेय आहे, हा सिद्धान्त गीतेंतच पूर्वी ' भूतभृन्न च भूतस्थः' (९-५) या श्लोकात व पुनः पुढें ( १५.१६, १७ ) पुरुषोत्तम लक्षणांतहि स्पष्ट सांगितला आहे " पण क्षर व अक्षर ही परमेश्वराचींच रूपें आहेत, हा सिद्धान्त नसून अपसिद्धान्त आहे. परमेश्वर जर 'पूर्णपणे अज्ञेय ' तर 'ज्ञेयं यत्तत्प्रवक्ष्यामि ' हें म्हणणें फुकटच म्हणावयाचे ? ९-५ व १५. १६-१७ येथें परमेश्वर पूर्णपणें अज्ञेय असें सांगितलेलें नाही. ते ते श्लोक पहा, म्हणजे खात्री होईल. " नानात्वाच्या ठिकाणी एकत्व पाहणें हे सात्त्विक ज्ञानाचे लक्षण होय १८. २०. हें सात्त्विक ज्ञान म्हणजेच ब्रह्म होय." याला सिद्धान्त कोण म्हणेल. सात्त्विक ज्ञानच जर ब्रह्म तर ' सत्त्वं ज्ञानसंगेन निबध्नाति' ( १४.६ ) हें खोटेंच म्हटले पाहिजे. शिवाय सात्त्विक ज्ञानच जर ब्रह्म असेल तर मग गुणातीत होण्याविषयीं जो आग्रह केला आहे तो फुकटच म्हटला पाहिजे. तात्पर्य रहस्यकारांचें प्रतिपादन पदोपदीं शास्त्राला सोडून असतें, हें यावरून कोणाच्याहि लक्षांत येईल.

स्येति सर्वतःपाणिपादं तज्ज्ञेयम् । सर्वप्राणिकरणोपाधिभिः क्षेत्रज्ञास्तित्वं विभाव्यते । क्षेत्रज्ञश्च क्षेत्रोपाधित उच्यते । क्षेत्रं च पाणिपादादिभिरनेकधा भिन्नम् । क्षेत्रोपाधिभेदकृतं विशेषजातं मिथ्यैव क्षेत्रज्ञस्येति तदपनयनेन ज्ञेयत्वमुक्तं न सत्तन्नासदुच्यत इति । उपाधिकृतं मिथ्यारूपमप्यस्तित्वाधिगमाय ज्ञेयधर्मवत्परिकल्प्योच्यते सर्वतः, पाणिपादमित्यादि । तथाहि संप्रदायविदां वचनम्—'अध्यारोपापवादाभ्यां निष्प्रपञ्चं प्रपञ्च्यते इति ॥

**भाष्यार्थ**—('सर्वतःपाणिपादं॰' या श्लोकानें ज्या आक्षेपाचें निरसन करावयाचें आहे त्याचा अनुवाद करून श्लोकाला अवतरण देतात-)—**ज्ञेयस्य 'सत्'शब्दप्रत्ययाविषयत्वात् असत्त्वाशंकायां सर्वप्राणिकरणोपाधिद्वारेण तदस्तित्वं प्रतिपादयन् तदाशंकानिवृत्त्यर्थं आह**—ज्ञेयाला 'सत्' या शब्दाच्या प्रत्ययाचें अविषयत्व असल्यामुळे म्ह॰ 'सत्' शब्द ज्ञेय ब्रह्माला विषय करीत नसल्यामुळें ते नाहीच, त्याचा अभावच आहे, अशी शंका आली असतां सर्व प्राण्यांची इंद्रियें, याच उपाधींच्या द्वारा त्या ज्ञेयब्रह्माच्या अस्तित्वाचें प्रतिपादन करणारे भगवान् त्याच्या असत्त्वाविषयींच्या शंकेची निवृत्ति करण्यासाठीं 'सर्वतः पाणिपादं॰' या श्लोकानें म्हणतात—**'सर्वतःपाणिपादं' सर्वतः पाणयः पादाः च अस्य इति सर्वतःपाणिपादं तत् ज्ञेयं**—सर्वतःपाणिपाद-ज्याला सर्व बाजूंनीं हात व पाय आहेत तें ज्ञेय सर्वतःपाणिपाद आहे.—**सर्वप्राणिकरण-उपाधिभिः क्षेत्रज्ञास्तित्वं विभाव्यते**—सर्व प्राण्यांच्या इंद्रियोपाधींनी क्षेत्रज्ञाचें अस्तित्व अनुमानप्रमाणानें जाणलें जातें. [ब्रह्म सर्व विशेषरहित आहे त्यामुळे ते वाक् व मन यांचा विषय होत नाहीं. म्ह॰ वाणीनें त्याच्याविषयीं कांहीं बोलतां येत नाहीं व मनानें त्याचें चिंतन करवत नाहीं. त्यामुळें ज्याचा अनुभवच येणें शक्य नाहीं ते ब्रह्म नाहींच, अशी शंका येते, पण तें ब्रह्म सर्वान्तर्यामी असल्यामुळे इंद्रियांच्या प्रवृत्तीचें वगैरे निमित्त आहे. तेंच कल्पित द्वैताला सत्ता व स्फूर्ति देणारें आहे, व सर्वांचें नियमन करणारें आहे. त्यावरून त्याचें अस्तित्व सिद्ध होतें, असे दाखविणारे भगवान् रथादिकांप्रमाणें अचेतन असलेल्या देहेंद्रियादिकांची प्रवृत्ति चेतन प्रेरकावांचून संभवत नाहीं, सारथि व घोडे यांच्या सान्निध्यानेंच जड रथाची प्रवृत्ति संभवते त्याचप्रमाणें जड देहादिकांची प्रवृत्ति त्यांचा अधिष्ठाता तो प्रत्यक् चेतन त्याच्यामुळेंच संभवते,व त्यावरूनच ब्रह्माचें अस्तित्व सिद्ध होतें. अहोपण, इंद्रियांची प्रवृत्ति रथादिकांच्या प्रवृत्तीप्रमाणें चेतनाधिष्ठानपूर्वकच जरी असली तरी त्यावरून फार तर चेतन-अधिष्ठात्याची सिद्धि होईल, क्षेत्रज्ञाची सिद्धि कशी होणार ? उत्तर-] —**क्षेत्रज्ञः च क्षेत्रोपाधितः उच्यते**—व क्षेत्र या उपाधीमुळें तोच चेतन अधिष्ठाता 'क्षेत्रज्ञ'असे म्हटला जातो. ( क्षेत्र ही जरी त्याची उपाधि असली,तरी त्याला हात,पाय, नेत्र,मस्तक, मुख इत्यादि अवयव कसे प्राप्त होतात ? उत्तर-)—**च क्षेत्रं पाणिपादादिभिः अनेकधा भिन्नं**—आणि क्षेत्र हात-पाय इत्यादिक अवयवांच्या योगानें अनेक प्रकारें भिन्न आहे. ( अहोपण, उपाधीच्या द्वारा त्याच्यामध्यें विशेषांची कल्पना

केली जाते, असें जर आहे तर ' न सत् तत् नासत् उच्यते ' या वचनानें त्याचें निर्विशेषत्व जें सांगितलें आहे तें कसें? उत्तर-)—**क्षेत्रज्ञस्य-क्षेत्रोपाधिभेदकृतं विशेषजातं मिथ्या एव इति तदपनयनेन 'न सत्तन्नासदुच्यते' इति ज्ञेयत्वं उक्तं**—क्षेत्रज्ञाचें क्षेत्रोपाधिभेदकृत विशेषजात म्ह० क्षेत्र या उपाधीच्या भेदामुळे क्षेत्रज्ञाच्या ठिकाणीं प्राप्त होणारे सर्व विशेष मिथ्याच आहेत, ते सर्व आरोपित आहेत, खरे नव्हेत, म्हणून त्या सर्व विशेषांचें निरसन करून ' न सत्तन्नासदुच्यते ' या वाक्याने त्या क्षेत्रज्ञाचें ज्ञेयत्व सांगितले आहे. [ अहोपण, क्षेत्रज्ञाचे पाणिपादादिमत्त्व जर औपाधिक व त्यामुळेच मिथ्या आहे तर ज्ञेय ब्रह्माचें प्रवचन चालू असतां त्यांचा उल्लेख कां केला? उत्तर-]—**उपाधिकृतं मिथ्यारूपं अपि अस्तित्वाधिगमाय ज्ञेयधर्मवत् परिकल्प्य ' सर्वतःपाणिपादं ' इत्यादि उच्यते**—उपाधिकृत-औपाधिक मिथ्यारूपहि ज्ञेयाचें अस्तित्व कळण्यासाठीं-ज्ञेय आहे असें ज्ञान होण्यासाठीं, तो ज्ञेयाचाच धर्म आहे, अशी कल्पना करून 'सर्वतःपाणिपादं०' इत्यादि सांगितलें जाते. [ मिथ्यारूपहि ज्ञेयवस्तूचें ज्ञान होण्याच्या उपयोगी आहे, या विषयी वृद्धांची संमति दाखवितात-]—**तथा हि संप्रदायविदां वचनं**—यासंबंधानें अद्वैतसंप्रदायवेत्त्यांचें असें वचन आहे,—' **अध्यारोपापवादाभ्यां निष्प्रपञ्चं प्रपञ्च्यते** ' **इति**—अध्यारोप व अपवाद यांच्या योगानें-या उपायांनी निष्प्रपंच-सर्व विशेषशून्य अशा ब्रह्माचा प्रपंच केला जातो [ निरुपाधिक तत्त्वावरहि औपाधिक धर्मांचा आरोप करून व त्याच्या योगानें त्याचें अस्तित्व सिद्ध करून नंतर त्याचेंच शुद्ध स्वरूप दाखविण्यासाठीं त्या आरोपितधर्मांचा अपवाद केला जातो, असे प्राचीन अद्वैतसंप्रदायवेत्त्यांचें वचन आहे. अर्थात् मायावाद आचार्यांनीच उत्पन्न केला, असे जे कित्येकांचे म्हणणे आहे तें यावरून खोटे ठरते. ]

**सर्वत्र सर्वदेहावयवत्वेन गम्यमानाः पाणिपादादयो ज्ञेयशक्तिसद्भावनिमित्तस्वकार्या इति ज्ञेयसद्भावे लिङ्गानि ज्ञेयस्येत्युपचारत उच्यन्ते । तथा व्याख्येयमन्यत्सर्वतःपाणिपादं तज्ज्ञेयम् । सर्वतोक्षिशिरोमुखं सर्वत्राक्षीणि शिरांसि मुखानि च यस्य तत्सर्वतोक्षिशिरोमुखम् । सर्वतःश्रुतिमच्छ्रुतिः श्रवणेन्द्रियं तद्यस्य तच्छ्रुतिमल्लोके प्राणिनिकाये सर्वमावृत्य संव्याप्य तिष्ठति स्थितिं लभते ॥ १३ ॥**

**भाष्यार्थ**—( पण पाणि-पादादि अनात्मधर्मांचा ' आत्म्याचेच ते धर्म आहेत, ' असा निर्देश करण्यांत भगवानांचा हेतु तरी काय आहे? उत्तर-)—**सर्वत्र सर्वदेहावयवत्वेन गम्यमानाः पाणिपादादयः ज्ञेयशक्तिसद्भावनिमित्तस्वकार्याः इति ज्ञेयसद्भावे लिङ्गानि ज्ञेयस्य इति उपचारतः उच्यन्ते**—सर्व ठिकाणी व सर्वदा सर्व देहांचे अवयव या रूपानें ज्ञात होणारे हस्त-पादादिक ज्ञेयशक्तीच्या अस्तित्वामुळें आपापलें कार्य करितात.[म्ह०ज्ञेय जें ब्रह्म त्याची शक्ति म्ह०केवळ सांनिध्यानें त्या सर्वांना आपापल्या कार्यांत प्रवृत्त करण्याचें जे सामर्थ्य, त्यांच्या अस्तित्वामुळें-त्या सामर्थ्याच्या

सत्तेनेंच हस्तपादादिक आपापले-वस्तु घेणें, चालणें, इत्यादि व्यवहार करूं शकतात. ] त्यामुळें ते हस्तपादादिक ज्ञेय ब्रह्माच्या अस्तित्वाचीं लिंगें म्ह० सूचक चिन्हें होऊं शकतात. म्हणून गौणवृत्तीनें-उपचारानें हस्तपादादिक हे त्या ज्ञेयाचेच अवयव आहेत, असें म्हटलें जातें.—**तत् ज्ञेयं सर्वतःपाणिपादं तथा व्याख्येयं अन्यत्**—तें ज्ञेय सर्वतः पाणिपाद आहे, हें जसें व्याख्यान केले तसेंच म्ह० त्याच न्यायानें-त्याच दृष्टीनें 'सर्वतोक्षिशिरोमुखं' इत्यादि पुढील विशेषणांचेहि व्याख्यान करावें.—**सर्वतोक्षिशिरोमुखं सर्वत्र अक्षीणि शिरांसि मुखानि च यस्य तत् सर्वतोक्षिशिरोमुखं**—तें ज्ञेय सर्वतोक्षिशिरोमुख आहे. म्ह० सर्वत्र-सर्व ठिकाणीं नेत्र, मस्तकें व मुख ज्याला आहेत ते सर्वतोक्षि-शिरो-मुख, असें ते ज्ञेय आहे.—**सर्वतः श्रुतिमत्-श्रुतिः-श्रवणेन्द्रियं तत् यस्य तत् श्रुतिमत्**—तें ज्ञेय सर्वतः श्रुतिमत् आहे, श्रुति म्ह० श्रवणेंद्रिय ते ज्याला सर्वतः आहे तें श्रुतिमत्—**लोके-प्राणिनिकाये**—लोकांत म्ह० प्राणिसमूहांत—**सर्वं आवृत्य-संव्याप्य तिष्ठति-स्थितिं लभते**—सर्वांना आच्छादित करून पूर्णपणें व्यापून राहतें. तें सर्वांना व्यापून स्थित होते [ येथील अक्षि व श्रवण या इंद्रियांचें ग्रहण बाकीच्या ज्ञानेंद्रियांच्या उपलक्षणार्थ व पाणि-पाद-मुख यांचें ग्रहण इतर कर्मेन्द्रियांच्या उपलक्षणार्थ व मन, बुद्धि इत्यादि अन्तरिंद्रियांच्याहि उपलक्षणार्थ आहे. एकच तत्त्व सर्व सृष्टीला व्यापून रहात असल्यामुळें त्यानें सर्वत्र सर्व इंद्रियादिकांनीं युक्त असणे यांत कांहींच विरोध नाहीं. ] १३

**सर्वेन्द्रियगुणाभासं सर्वेन्द्रियविवर्जितम् ।**
**असक्तं सर्वभृच्चैव निर्गुणं गुणभोक्तृ च ॥ १४ ॥**

**अन्वयार्थ—सर्वेन्द्रियगुणाभासं**—ज्याचा अवभास-प्रकाश सर्व इंद्रियांच्या गुणांनीं होतो, पण जे वस्तुतः—**सर्वेन्द्रियविवर्जितं**—सर्व इंद्रियांनीं रहित आहे, त्यामुळें— **असक्तं**—कोठेंहि आसक्त न होणारें—**च एव**—तथापि—**सर्वभृत्**—सर्वांला धारण करणारें, सर्वांचें अधिष्ठान,—**निर्गुण**—ते गुणरहित आहे;—**च**—पण—**गुणभोक्तृ**—गुणांचा-सुख, दुःख व मोह या कार्यांचा भोग घेणारें असे तें ज्ञेय आहे. १४.

उपाधिभूतपाणिपादादीन्द्रियाध्यारोपणाज्ज्ञेयस्य तद्वत्ताशङ्का मा भूदित्येवमर्थः श्लोकारम्भः—सर्वेन्द्रियगुणाभासं सर्वाणि च तानीन्द्रियाणि श्रोत्रादीनि बुद्धीन्द्रियकर्मेन्द्रियाख्यान्यन्तःकरणे च बुद्धिमनसी ज्ञेयोपाधित्वस्य तुल्यत्वात्सर्वेन्द्रियग्रहणेन गृह्यन्ते । अपि चान्तःकरणोपाधिद्वारेणैव श्रोत्रादीनामप्युपाधित्वमित्यतोऽन्तः-

१रहस्यकार या श्लोकाचा अर्थ 'त्याला सर्व बाजूंनीं हातपाय आहेत, सर्व बाजूंना डोळे, डोकीं, तोंडें आहेत ' इत्यादि अगदी सरळ करितात. पण अशा वर्णनांतील आशय काय ते कांहींच सांगत नाहींत. जणुंकाय ज्ञेय क्षेत्रज्ञाला खरोखरच सर्वबाजूंनीं हात, पाय, तोंडें, डोकीं वगैरे आहेत !

**करणबाह्यकरणोपाधिभूतैः सर्वेन्द्रियगुणैरध्यवसायसंकल्पश्रवणवचनादिभिरवभासत इति सर्वेन्द्रियगुणाभासं सर्वेन्द्रियव्यापारैर्व्यापृतमिव तज्ज्ञेयमित्यर्थः। "ध्यायतीव लेलायतीव" इति श्रुतेः। कस्मात्पुनः कारणान्न व्यापृतमेवेति गृह्यत इत्यत आह सर्वेन्द्रियविवर्जितं सर्वकरणरहितमित्यर्थः। अतो न करणव्यापारैर्व्यापृतं तज्ज्ञेयम्॥**

**भाष्यार्थ**—( आरोपावांचून साक्षात्च ज्ञेयाला हस्तपादादिमत्त्व आहे, अशी आशंका घेऊन सांगतात- )—**उपाधिभूतपाणिपादादि-इन्द्रियाध्यारोपणात् ज्ञेयस्य तद्वत्ताशंका मा भूत् इति-एवमर्थः श्लोकारंभः**—उपाधिभूत हात, पाय इत्यादि इंद्रियांच्या अध्यारोपामुळे-उपाधिभूत इंद्रियांचा आरोप केल्यामुळे, तें ज्ञेय ब्रह्म खरोखरच त्यांनी युक्त आहे, अशी आशंका कोणाला येऊं नये, यासाठीं ह्या श्लोकाचा आरंभ आहे—**सर्वेन्द्रियगुणाभासं-सर्वाणि च तानि इन्द्रियाणि**—सर्वेन्द्रियगुणाभास-सर्व अशीं तीं इन्द्रियें—**श्रोत्रादीनि-बुद्धीन्द्रियकर्मेंद्रियाख्यानि च अन्तःकरणे-बुद्धिमनसी सर्वेन्द्रियग्रहणेन गृह्यन्ते**—श्रोत्रादिक-ज्ञानेंद्रियें व कर्मेन्द्रिये या नांवांचीं बाह्येंद्रिये आणि बुद्धि व मन हीं अन्तरिन्द्रियेंहि 'सर्वेन्द्रिय' या शब्दाच्या ग्रहणाने ग्रहण केली जातात. कारण—**ज्ञेयोपाधित्वस्य तुल्यत्वात्**—ज्ञेयाचे उपाधित्व हे त्या सर्वांना एकसारखेच आहे. [ म्हणून सर्वेन्द्रियशब्दानें बुद्धि व मन यांचे ग्रहण करणे योग्यच आहे. शिवाय मन व बुद्धि यांच्या द्वाराच श्रोत्रादिक ज्ञेयाच्या उपाधि होतात, त्यामुळेंहि त्यांचें येथें ग्रहण करणे उचित आहे, असे सांगतात- ]—**अपि च अन्तःकरणोपाधिद्वारेण एव श्रोत्रादीनां अपि उपाधित्वं**—शिवाय अन्तःकरण या उपाधीच्या द्वाराच श्रोत्रादिकांनाहि क्षेत्रज्ञाचें उपाधित्व आहे, साक्षात् उपाधित्व नाही,—**इति-अतः अन्तःकरण-बहिष्करण-उपाधिभूतैः सर्वेन्द्रियगुणैः-अध्यवसाय-संकल्प-श्रवण-वचनादिभिः अवभासते इति सर्वेन्द्रियगुणाभासं**—यास्तव अन्तःकरणें व बहिष्करणे अशा या उपाधिभूत सर्वेन्द्रियांच्या गुणांनी म्ह० निश्चय, संकल्प, श्रवण, भाषण इत्यादि क्रियांनी तें भासतें-त्यांच्या द्वारा त्याचा अवभास होतो, म्हणून ते ज्ञेय सर्वेन्द्रियगुणाभास आहे.—**तत् ज्ञेयं सर्वेन्द्रियव्यापारैः व्यापृतं इव इत्यर्थः**—तें ज्ञेय सर्व इन्द्रियांच्या व्यापारांनी जणुंकाय व्यापारयुक्त असल्यासारखे भासते, असा याचा भावार्थ. ( उपाधीच्या द्वारा ते कल्पित व्यापारयुक्त होतें, याविषयां प्रमाण- )—**ध्यायति इव लेलायति इव इति श्रुतेः**—तो आत्मा, बुद्धि चिंतन करूं लागली असतां जणुंकाय ध्यान करीत आहेसें भासतें, प्राण चलन करूं लागला असतां तो जणुंकाय हालत आहे, असा भास होतो अशी याविषयीं श्रुति आहे. ( बृ. भा. अ. ४ पृ. ६७ पहा. ) (ज्ञेय क्षेत्रज्ञाचे व्यापारवत्त्व-सक्रियत्व कल्पितच आहे, वास्तविक नव्हे, याविषयां भगवानांची संमति प्रश्नपूर्वक दाखवितात- )—**कस्मात् पुनः कारणात् व्यापृतं एव इति न गृह्यते**—कोणत्या बरें कारणाने तें व्यापारयुक्तच आहे, असें ग्रहण केलें जात नाहीं, स्वतःच तें ज्ञेय त्या त्या क्रिया करितें असें कां बरें समजलें जात नाहीं ? निश्चय

व संकल्प करणें, ऐकणें, बोलणें इत्यादि क्षेत्रज्ञाच्याच क्रिया आहेत, असेंच न मानण्याचें कारण काय ? ]—**इति-अतः आह-सर्वेन्द्रियविवर्जितं-सर्वकरणरहितं इत्यर्थः**—असें कोणी म्हणेल म्हणून भगवान् म्हणतात तें सर्वेंद्रियविवर्जित—सर्व-इंद्रियरहित आहे, असा याचा भावार्थ—**अतः तत् ज्ञेयं करणव्यापारैः न व्यापृतं**—यास्तव तें ज्ञेय इंद्रियव्यापारांनीं व्यापारयुक्त होत नाहीं.

**यस्त्वयं मन्त्रः—" अपाणिपादो जवनो ग्रहीता पश्यत्यचक्षुः स शृणोत्यकर्णः " इत्यादिः स सर्वेन्द्रियोपाधिगुणानुगुण्यभजनशक्तिमत्तज्ज्ञेयमित्येवंप्रदर्शनार्थो न तु साक्षादेव जवनादिक्रियावत्त्वप्रदर्शनार्थः । " अन्धो मणिमाविन्दत् " इत्यादिमन्त्रार्थवत्तस्य मन्त्रस्यार्थः । यस्मात्सर्वकरणवर्जितं ज्ञेयं तस्मादसक्तं सर्वसंश्लेषवर्जितम् । यद्यप्येवं तथाऽपि सर्वभृच्चैव । सदास्पदं हि सर्वं सर्वत्र सद्बुद्ध्यनुगमात् । न हि मृगतृष्णिकादयोऽपि निरास्पदा भवन्ति । अतः सर्वभृत्सर्वं बिभर्तीति । स्यादिदं चान्यज्ज्ञेयस्य सत्त्वाधिगमद्वारं निर्गुणं सत्त्वरजस्तमांसि गुणास्तैर्वर्जितं तज्ज्ञेयं तथाऽपि गुणभोक्तृ च गुणानां सत्त्वरजस्तमसां शब्दादिद्वारेण सुखदुःखमोहाकारपरिणतानां भोक्तृ चोपलब्धृ तज्ज्ञेयमित्यर्थः ॥ १४ ॥**

**भाष्यार्थ**—( अहोपण, श्वेताश्वतरोपनिषदांत ज्ञेय साक्षात् वेगानें विहार करणें वगैरे क्रिया करितें, असें वर्णन आहे. तेव्हा त्याला स्वतः व्यापारवत्त्व नसून इंद्रियांच्या व्यापारांनीं ते व्यापारयुक्त होतें असें कसें म्हणता ? अशी आशंका घेऊन आचार्य म्हणतात-)—**तु 'अपाणिपादो जवनो ग्रहीता पश्यत्यचक्षुः स शृणोत्यकर्णः' इत्यादिः यः अयं मन्त्रः**—पण 'ज्याला हात व पाय नाहींत तथापि जो मोठा वेगवान् व ग्रहण करणारा आहे, जो चक्षूरहित असूनहि पाहतो व श्रोत्ररहित असूनहि ऐकतो इत्यादि जो हा मंत्र आहे—**सः सर्वेन्द्रिय-उपाधिगुण-अनुगुण्यभजनशक्तिमत् तत् ज्ञेयं इति एवं प्रदर्शनार्थः**—तो सर्व इंद्रियरूप उपाधींचे जे गुण तदनुगुण होण्याची जी शक्ति—त्या इंद्रियगुणांना अनुकूल होण्याची जी शक्ति, त्या शक्तीनें तें ज्ञेय युक्त आहे. इंद्रियांच्या क्रियांना अनुसरण्याचा धर्म त्याच्या ठिकाणीं आहे, हें प्रदर्शित करण्यासाठीं तो मंत्र आहे—**तु साक्षात् एव जवनादिक्रियावत्त्वप्रदर्शनार्थः न**—पण साक्षात् त्याच्या ठिकाणींच जवनादिक्रिया आहेत, तो स्वतःच साक्षात् वेगवान् वगैरे आहे, हें प्रदर्शित करण्यासाठीं तो मंत्र नाहीं. ( अहोपण, जवन-ग्रहण इत्यादि साक्षात् क्रियाच त्याच्या ठिकाणीं आहेत, असें म्हटल्यास त्या मंत्राचा मुख्य-वाच्य अर्थच केला असें होईल, व तसें करणेंच युक्त आहे, अशी आशंका घेऊन आचार्य म्हणतात-)—**' अन्धः मणिं अविन्दत् ' इत्यादिमन्त्रार्थवत् तस्य मन्त्रस्य अर्थः**—आंधळ्याला रत्न सांपडलें, इत्यादि मंत्राच्या अर्थाप्रमाणें त्या मंत्राचा अर्थ आहे. [ मुख्य अर्थाचा असंभव असल्यामुळें जेथे ' आंधळयाला मणि सांपडला ' या अर्थवादवचनाप्रमाणे त्या मंत्राचेंहि श्रुत अर्थामध्यें तात्पर्य नाहीं. त्यामुळें ' अपाणिपादो० ' हा मंत्र प्रकृत अर्थाला प्रतिकूल नाहीं. क्षेत्रज्ञानें सर्व इंद्रियांनीं रहित असणें हें त्यानें त्या

इंद्रियांच्या व्यापारांनीं रहित असण्याचें उपलक्षण आहे, या गोष्टीचा अंगीकार करून त्याच कारणानें क्षेत्रज्ञ वस्तुतः सर्वसंगरहित आहे,असें सांगतात-]—**यस्मात् ज्ञेयं सर्वकरण-वर्जितं तस्मात् असक्तं-सर्वसंश्लेषवर्जितं**—ज्याअर्थी ज्ञेय सर्वकरणरहित-सर्वे-न्द्रियरहित आहे त्याअर्थी तें असक्त-सर्वसंबंधशून्य आहे. (वस्तुतः तें सर्व संगशून्य जरी असलें तरी सर्वाधिष्ठान आहे असें सांगतात- )—**यद्यपि एवं तथापि सर्वभृत् च एव**—जरी असें आहे तरी तें सर्वभृत्-च आहे. [ म्ह० स्वतःच्या केवल सत्तेनें -अधिष्ठानत्वाने सर्वांचें पोषण करतें म्हणून तें ज्ञेय सर्वभृत् आहे. याचेंच आतां उपपा-दान करितात-]—**सर्वं सत्-आस्पदं हि**—सर्व जगत्-वस्तुजात सत्-आस्पदच आहे. सत् हेंच सर्व वस्तुजाताचे अधिष्ठान आहे.—**सर्वत्र सद्बुद्धि-अनुगमात्**—कारण सर्व पदार्थामध्ये सत्-बुद्धीचा अनुगम होत असतो. सर्वत्र सद्बुद्धीची अनुवृत्ति होते. (प्रत्येक पदार्थ 'आहे आहे' असाच भासतो.फार काय पण-)—**मृगतृष्णिकादयः अपि निरास्पदाः न हि भवन्ति**—मृगजळासारखे मिथ्या पदार्थहि निरास्पद-अ-धिष्ठानशून्य नसतात. [ जे जें कल्पित असते ते ते साधिष्ठान असतें; त्यामुळे मृगजळा-सारख्या काल्पित पदार्थांचेंहि ' सत् ' हेच अधिष्ठान आहे, असें विचार केला असतां कळतें. याप्रमाणे सर्वांचें अधिष्ठान या रूपानें ज्ञेय ब्रह्माचें अस्तित्व सिद्ध करून त्याचाच उपसंहार करितात-]—**अतः सर्वभृत्-सर्वं बिभर्ति इति (सर्वभृत्)**—म्हणून तें सर्वभृत् आहे. सर्वांचे भरण-पोषण-धारण करतें म्हणून सर्वभृत्. ( याहि कारणानें तें ज्ञेय ब्रह्म आहे, असे सांगतात-)—**च इदं अन्यत् ज्ञेयस्य सत्त्वाधिगमद्वारं स्यात्**—आणि हे दुसरे ज्ञेयाच्या अस्तित्वाचें ज्ञान होण्यास साधन आहे ( याहि आणखी एका कारणानें ज्ञेयाचे अस्तित्व मानावे लागतें)—**निर्गुणं-सत्त्व-रजः-तमां-सि गुणाः तैः वर्जितं तत् ज्ञेयं**—ते ज्ञेय निर्गुण आहे. सत्त्व, रज व तम हे गुण आहेत, त्यानीं रहित, असे ते ज्ञेय आहे.—**तथापि गुणभोक्तृ च**—तथापि ते गुण-भोक्तृ आहे.—**गुणानां-सत्त्व-रजस्तमसां शब्दादिद्वारेण सुख-दुःख-मोहा-कारपरिणतानां भोक्तृ च उपलब्धृ तत् ज्ञेयं इत्यर्थः**—गुणांचें म्ह० सत्त्व, रज व तम, या शब्दादि विषयांच्या द्वारा सुख, दुःख व मोह, यांच्या आकारानें परिणत झालेल्या गुणांचें भोक्तृ-भोग म्ह० अनुभव घेणारे, असें ते ज्ञेय आहे, असा याचा भावार्थ. १४

## बहिरन्तश्च भूतानामचरं चरमेव च ।
## सूक्ष्मत्वात्तदविज्ञेयं दूरस्थं चान्तिके च तत् ॥ १५ ॥

**अन्वयार्थ—भूतानां**—ते सर्व प्राण्यांच्या—**बहिः**—बाहेर—**च**—व—**अन्तः**—आत आहे. तेंच—**अचरं च चरं एव**—अचर आहे व चरहि आहे.—**तत्**—तें ज्ञेय—**सूक्ष्मत्वात्**—सूक्ष्म असल्यामुळें—**अविज्ञेयं**—विशेषतः ज्ञेय होत नाहीं. त्याचें झाड, दगड यांप्रमाणें प्रत्यक्ष ज्ञान होत नाहीं—**तत् च**—व तें—**दूरस्थं**—अज्ञदृष्ट्या

अत्यंत दूर आहे—**च अन्तिके**—व ज्ञानीपुरुषाच्या दृष्टीनें अगदींजवळ हृदयांत आहे. १५.

**किंच—बहिस्त्वक्पर्यन्तं देहमात्मत्वेनाविद्याकल्पितमपेक्ष्य तमेवावधिं कृत्वा बहिरुच्यते। तथा प्रत्यगात्मानमपेक्ष्य देहमेवावधिं कृत्वाऽन्तरुच्यते। बहिरन्तश्चेत्युक्ते मध्येऽभावे प्राप्त इदमुच्यतेऽचरं चरमेव च यच्चराचरं देहाभासमपि तदेव ज्ञेयं यथा रज्जुसर्पाभासः। यद्यचरं चरमेव च व्यवहारविषयं सर्वं ज्ञेयं किमर्थमिदमिति सर्वैर्न विज्ञेयमिति। उच्यते, सत्यं सर्वाभासं तत्तथाऽपि व्योमवत्सूक्ष्ममतः सूक्ष्मत्वात्स्वेन रूपेण तज्ज्ञेयमप्यविज्ञेयमविदुषाम्। विदुषां त्वात्मैवेदं सर्वं ब्रह्मैवेदं सर्वमित्यादिप्रमाणतो नित्यं विज्ञातमविज्ञाततया दूरस्थं वर्षसहस्रकोट्याऽप्यविदुषामप्राप्यत्वादन्तिके च तदात्मत्वाद्विदुषाम्॥ १५॥**

**भाष्यार्थ—किं च**—याहि कारणानें ब्रह्म आहे, असें 'बहिरन्तश्च०' या श्लोकानें सांगतात—**बहिः त्वक्पर्यन्तं आत्मत्वेन अविद्याकल्पितं देहं अपेक्ष्य तं एव अवधिं कृत्वा 'बहिः' उच्यते**—'बहिः' म्ह० त्वचेपर्यंत अविद्येनें 'हाच आत्मा' असा आत्मत्वानें कल्पिलेला जो हा देह त्याच्या अपेक्षेनें–त्यालाच अवधि–मर्यादा करून म्ह०देहापासून 'बहिः'–बाहेर, असें म्हटलें जातें. ( शरीररूप भूतांच्या बाहेर म्हणजे बाह्य विषयादि रूप असा भावार्थ.आतां 'अन्तः' शब्दाचा अर्थ सांगतात–) **—तथा प्रत्यगात्मानं अपेक्ष्य देहं एव अवधिं कृत्वा 'अन्तः' उच्यते**—त्याचप्रमाणे प्रत्यगात्म्याच्या अपेक्षेनें देहालाच अवधि करून 'आत' असें म्हटलें जातें ( चराचर भूताच्या आंत–भूतांमध्ये प्रत्यक्‌-भूत असा भावार्थ. आतां 'अचरं चरमेव च' या दुसऱ्या पादाला अवतरण देऊन त्याचें व्याख्यान–)—**बहिः अन्तः च इति उक्ते मध्ये अभावे प्राप्ते इदं उच्यते**—बाहेर व आत तें ज्ञेय आहे, असें म्हटलें असतां मध्यें त्याचा अभाव आहे, असें आपोआपच प्राप्त होतें. म्हणून हें सांगितलें जातें. **—अचरं चरं एव च**—अचर व चरहि तें ज्ञेयच होय.—**यत् चराचरं देहाभासं तत् अपि ज्ञेयं एव**—जें मध्यें चराचर भूतात्मक–नाना प्रकारच्या देहरूपानें भासणारें तेंहि ज्ञेयच–ज्ञेयामध्यें अन्तर्भूत होणारें सत्‌तत्त्वच–आहे. ( पण चराचरात्मक भूतजाताला ज्ञेयत्व कसें?उत्तर–)—**यथा रज्जुसर्पाभासः**—ज्याप्रमाणे अधिष्ठानभूत रज्जूमध्यें कल्पितसर्पादिकांचा अन्तर्भाव होतो त्याप्रमाणें देहाभासाचाहि ज्ञेयामध्यें अन्तर्भाव होत असल्यामुळें देहाच्या आंत व बाहेर,यांच्यामध्यें त्याचा अभाव आहे अशी शंकाहि घेऊं नये ( अहोपण, ते ज्ञेय जर सर्वात्मक आहे तर सर्व लोक 'हे' अशा रीतीने त्याचे ग्रहण का करीत नाहीत? अशी शंका– )—**यदि अचरं चरं एव च व्यवहारविषयं सर्वं ज्ञेयं सर्वैः 'इदं' इति किमर्थं न विज्ञेयं**—जर अचर व चर असे व्यवहाराचा विषय होणारें सर्व ज्ञेय आहे तर सर्वांकडूनच जें 'इदं–हें' अशा रीतीनें कां ग्रहण केलें जात नाहीं? 'हें तें ज्ञेय' अशा रीतीनें त्याचें विज्ञान कां होत नाहीं.—**इति उच्यते**—असें कोणी विचारील तर सांगितलें जातें—**सत्यं सर्वाभासं तत् तथापि व्योमवत्**

**सूक्ष्मं**—खरें आहे, सर्व पदार्थांच्या रूपानें तेंच भासतें, हें खरें; तथापि तें आका-शाप्रमाणें सूक्ष्म आहे—**अतः स्वेन रूपेण सूक्ष्मत्वात् तत् ज्ञेयं अपि अविदुषां अविज्ञेयं**—यास्तव-स्वतःच्या रूपानें तें अतिशय सूक्ष्म-अतीन्द्रिय असल्यामुळें तें ज्ञेय जरी असलें तरी अविद्वानांना अविज्ञेय आहे—**तु विदुषां 'आत्मा एव इदं सर्वं ब्रह्म एव इदं सर्वं ' इत्यादि प्रमाणतः नित्यं विज्ञातं**—पण विद्वानांना 'आत्माच हें सर्व आहे, ब्रह्मच हें सर्व आहे' इत्यादि प्रमाणांच्या योगानें नित्य विज्ञातच आहे. (अहोपण, विद्वानांना जर तें आत्मत्वानें ज्ञात असेल तर त्याला दूरस्थत्व कसें?)—**अविज्ञाततया दूरस्थं-अविदुषां वर्षसहस्रकोट्या अपि अप्राप्यत्वात्**—तें ज्ञेय अविज्ञातत्वानें दूरस्थ आहे. कारण तें अविद्वानांना एक सहस्रकोटी वर्षांनींहि प्राप्त होण्याजोगें नसल्यामुळें दूर स्थित आहे—**च विदुषां आत्मत्वात् तत् अन्तिके**—व विद्वानांच्या प्रत्यगात्मत्वामुळें तें जवळ-अगदीं समीप आहे. [ विद्वान् व अविद्वान् यांच्या भेदाच्या अपेक्षेनें 'दूरात्सुदूरे तादिहान्तिके च' अशी जी श्रुति आहे तिच्या अर्थाचा येथें प्रसंगानें अनुवाद केला आहे ] १५.

## अविभक्तं च भूतेषु विभक्तमिव च स्थितम्।
## भूतभर्तृ च तज्ज्ञेयं ग्रसिष्णु प्रभविष्णु च ॥१६॥

**अन्वयार्थ**—**तत्**—ते ज्ञेय—**भूतेषु**—प्राण्यांमध्यें-प्रत्येक देहामध्ये—**अविभक्तं**—एक-भिन्न भिन्न नसलेलें, असें आहे.—**च**—पण—**विभक्तं इव स्थितं**—विभक्त असल्यासारखे राहिलें आहे. प्रत्येक शरीरांत भिन्न भिन्न असल्यासारखें दिसतें—**तत् ज्ञेयं**—तें ज्ञेय—**भूतभर्तृ**—स्थितिकाली भूतांचें भरण-धारण-पोषण करणारें आहे. तसेंच तें—**ग्रसिष्णु**—प्रलयकालीं भूतांचा ग्रास-संहार करणारें—**च प्रभविष्णु**—व सृष्टिसमयीं त्या भूतांना प्रकट करणारे आहे. १६

किंच— अविभक्तं च प्रतिदेहं व्योमवत्तदेकं भूतेषु सर्वप्राणिषु विभक्तमिव च स्थितं देहेष्वेव विभाव्यमानत्वाद्भूतभर्तृ च भूतानि बिभर्तीति तज्ज्ञेयं भूतभर्तृ च स्थितिकाले। प्रलयकाले ग्रसिष्णु ग्रसनशीलम्। उत्पत्तिकाले प्रभविष्णु च प्रभवनशीलं यथा रज्ज्वादिः सर्पादेर्मिथ्याकल्पितस्य ॥ १६ ॥

**भाष्यार्थ**—**किंच**—ज्ञेयाच्या अस्तित्वाविषयीं आणखी हेतु 'अविभक्तंच०' या श्लोकानें सांगतात—**अविभक्तं च प्रतिदेहं व्योमवत् तत् एकं**—आणि तें अविभक्त, प्रत्येक देहांत आकाशाप्रमाणें एक आहे. [ कारण त्याचा भेद आहे, असें मानण्यास कांहीं प्रमाण नाहीं. उलट तें जर भिन्न असेल तर घटादिकांप्रमाणें अनात्मा आहे असें होईल, यास्तव अद्वितीय व सर्वत्र प्रत्यगात्मभूत असें ज्ञेय नाहीं, असें समजणें हें साहस आहे. तर मग प्रतिदेहांत तें भिन्न आहे अशी प्रतीति कशी येते? उत्तर-] —**भूतेषु-सर्वप्राणिषु विभक्तं इवं च स्थितं**—पण भूतांमध्यें म्ह० सर्व प्राण्यांमध्यें विभक्त असल्यासारखें स्थित आहे. ( प्रतिदेहांत भासणारा भेद काल्पनिक आहे. खरा नव्हे. कारण-)—**देहेषु एव विभाव्यमानत्वात्**—कारण देहामध्येंच

याची प्रतीति येत असते. [ देहावांचून त्या ज्ञेयाची प्रतीति येत नाहीं, व प्रत्येक देह र भिन्न भिन्न; त्यामुळें त्यांतील ज्ञेयहि तसेच भिन्न असावे, अशी अविचारी लोकांची कल्पना होते. ते ज्ञेय कार्यांच्या स्थितीला कारण होत असल्यामुळेंहि आहे, असें सांगतात-]—**भूतभर्तृ च-भूतानि बिभर्ति इति तत् ज्ञेयं भूतभर्तृ च स्थितेकाले**—आणि तें भूतभर्तृ आहे. भूतांचें भरण-पोषण करितें म्हणून तें ज्ञेय स्थितेकालीं भूतभर्तृ; ( तें सर्व भूतांचें उत्पत्ति व प्रलय समयीं निमित्तकारण व उपादानकारण असल्यामुळेंहि आहे, असें सांगतात-)—**प्रलयकाले ग्रसिष्णु-ग्रसनशीलं**—प्रलयसमयीं ग्रास करणारें-सर्वांचा ग्रास-नाश--संहार करण्याचें ज्याचें शील आहे, असे तें ज्ञेय आहे.—**उत्पत्तिकाले प्रभविष्णु च-प्रभवनशीलं**—व उत्पत्तिसमयीं प्रभविष्णु म्ह० प्रभवनाचें-उत्पन्न करण्याचें ज्याचें शील आहे असें तें आहे. [ तर मग कार्यकारणत्वाला वस्तुत्व असल्यामुळें अद्वैतासिद्धि होत नाहीं ? उत्तर-)—**यथा मिथ्याकल्पितस्य सर्पादेः रज्ज्वादिः**—ज्याप्रमाणे मिथ्याकल्पित सर्पादिकांच्या उत्पत्ति-स्थिति-लयांचें कारण रज्जु वगैरे अधिष्ठान असतें त्याप्रमाणे ज्ञेय कल्पित भूतांच्या उत्पत्त्यादिकांचें कारण आहे. १६.

ज्योतिषामपि तज्ज्योतिस्तमसः परमुच्यते ।
ज्ञानं ज्ञेयं ज्ञानगम्यं हृदि सर्वस्य विष्ठितम् ॥१७॥

**अन्वयार्थ—तत्**—तें ज्ञेय—**ज्योतिषां अपि**—सूर्य, अग्नि इत्यादि जड ज्योतींचीहि—**ज्योतिः**—ज्योत आहे. प्रकाशांनाहि प्रकाशित करणारें आहे.—**तमसः परं**—तमाचा-अज्ञानाचा त्याला स्पर्शहि झालेला नाहीं, असें—**उच्यते**—म्हटलें जातें.—**ज्ञानं**—अमानित्वादि ज्ञान—**ज्ञेयं**—(१२-१७ श्लोकांत सांगितलेलें) ज्ञेय व—**ज्ञानगम्यं**—त्याच्या ज्ञानाचे फल, असे ते त्रिविध ज्ञेय—**सर्वस्य**—सर्व प्राण्यांच्या—**हृदि**—बुद्धीत—**विष्ठितं**—विशेषतः स्थित आहे. १६.

**किंच— सर्वत्र विद्यमानं सन्नोपलभ्यते चेज्ज्ञेयं तमस्तर्हि । न, किं तर्हि—ज्योतिषामादित्यादीनामपि तज्ज्ञेयं ज्योतिः । आत्मचैतन्यज्योतिषेद्धानि ह्यादित्यादीनि ज्योतींषि दीप्यन्ते " येन सूर्यस्तपति तेजसेद्धः " " तस्य भासा सर्वमिदं विभाति " इत्यादिश्रुतिभ्यः । स्मृतेश्चेहैव ' यदादित्यगतं तेजः ' इत्यादेः । तमसोऽज्ञानात्परमस्पृष्टमुच्यते । ज्ञानादेर्दुःसंपादनबुद्ध्या प्राप्तावसादस्योत्तम्भनार्थमाह ज्ञानममानित्वादि । ज्ञेयं 'ज्ञेयं यत्तत्प्रवक्ष्यामि' इत्यादिनोक्तम् । ज्ञानगम्यं ज्ञेयमेव ज्ञातं सज्ज्ञानफलमिति ज्ञानगम्यमुच्यते । ज्ञायमानं तु ज्ञेयम् । तदेतत्त्रयमपि हृदि बुद्धौ सर्वस्य प्राणिजातस्य विष्ठितं विशेषेण स्थितम् । तत्रैव हि त्रयं विभाव्यते ॥ १७ ॥**

**भाष्यार्थ—किंच**—शिवाय याहि कारणानें ज्ञेय आहे, असें सांगण्यासाठीं शंका—**ज्ञेयं सर्वत्र विद्यमानं सत् न उपलभ्यते चेत् तर्हि तमः**—अहोपण,

तें ज्ञेय सर्वत्र विद्यमान असूनहि जर उपलब्ध होत नसेल तर तें तमच झालें,—**न किं तर्हि**—नाहीं, ते तम नाहीं. तर मग त्याचें स्वरूप काय आहे ?—**तत् ज्ञेयं आदित्यादीनां ज्योतिषां अपि ज्योतिः**—तें ज्ञेय आदित्यादि ज्योतीचीहि ज्योति आहे. [ सूर्यादिक व बुद्ध्यादिक यांचेंहि तें ज्ञेय ब्रह्म प्रकाशक आहे. त्यामुळें तें नाहीं, असें म्हणतां येत नाहीं. याचेंच अधिक उपपादन करितात-]—**आत्मचैतन्यज्योतिषा इद्धानि हि आदित्यादीनि ज्योतींषि दीप्यन्ते**—आत्मचैतन्यज्योतीनें इद्ध म्ह० प्रदीप्त झालेल्याच आदित्यादि ज्योति देदीप्यमान होतात.—'**येन सूर्यः तपति तेजसेद्धः**'—ज्या तेजाने प्रदीप्त झालेला सूर्य ताप देतो,—'**तस्य भासा सर्वं इदं विभाति**'—त्याच्या प्रकाशानें हें सर्व प्रकाशमान होतें.—**इत्यादिश्रुतिभ्यः**—इत्यादि श्रुति याविषयीं म्ह० ब्रह्म सर्व ज्योतीचीहि ज्योति आहे, याविषयीं प्रमाण आहे.—**स्मृतेः च**—आणि स्मृतिहि याविषयीं प्रमाण आहे ( येथीलच पुढील वचनाचें प्रमाण देतात-)—**इह एव 'यत आदित्यगतं तेजः' इत्यादेः**—या गीतेंतच पुढें ' जें आदित्यामध्यें असलेलें तेज . . ते माझेंच आहे, ' असें भगवद्वचन आहे. त्यावरूनहि तेंच सिद्ध होतें. (ज्ञेय तम जरी नसले तरी तें तमाने युक्त तरी असेल, अशी आशंका घेऊन सांगतात-)—**तमसः-अज्ञानात् परं अस्पृष्टं उच्यते**—तमाच्या म्ह० अज्ञानाच्या पर म्ह०त्याच्याकडून अस्पृष्ट-तमानें ज्याला स्पर्शहि केलेला नाही, असे म्हटलें जातें. [ज्ञेय-क्षेत्रज्ञाशीं तमाचा थोडासाहि संसर्ग झालेला नाहीं. याप्रमाणें पूर्वार्धाचें व्याख्यान करून उत्तरार्धाचें तात्पर्य सांगतात-]—**ज्ञानादेः दुःसंपादनबुद्ध्या प्राप्तावसादस्य उत्तम्भनार्थं आह**—ज्ञानादिकांना संपादन करणे फारच दुर्घट आहे, अशा बुद्धीने खिन्न-निरुत्साह झालेल्या साधकाचें उद्दीपन करण्यासाठीं-त्याच्या मनांत उत्साह उत्पन्न करण्यासाठीं भगवान् म्हणतात—**ज्ञानं-अमानित्वादि**—ज्ञान म्ह० ज्याच्यायोगानें ज्ञान होते तें ज्ञानसाधन, अमानित्वादिक—**ज्ञेयं-'ज्ञेयं यत्तत्प्रवक्ष्यामि' इत्यादिना उक्तं**—ज्ञेय म्ह० 'ज्ञेयं यत्तत्प्रवक्ष्यामि०' इत्यादि ग्रंथानें ( श्लो. १२ ते १७ ) सांगितलेलें ज्ञेय,—**ज्ञानगम्यं-ज्ञेयं एव ज्ञातं सत ज्ञानफलं इति ज्ञानगम्यं उच्यते**—व ज्ञानगम्य म्हणजे ज्ञेयच ज्ञात झालें असतां ज्ञानफल होतें, म्हणून त्यालाच ज्ञानगम्य असे म्हटलें आहे.—**तु ज्ञायमानं ज्ञेयं**—पण तेंच जेव्हां ज्ञायमान-जाणलें जाण्याच्या अवस्थेंत असतें तेव्हां ज्ञेय म्हटलें जातें. ( ते तिन्ही प्रकारचें तत्त्व बुद्धिस्थ असल्यामुळे अगदीं प्रकट आहे असें दाखवितात-)—**तत् एतत् त्रयं अपि**—तें हे त्रयहि-म्ह० ज्ञान, ज्ञेय व ज्ञानगम्य असे हें तीन प्रकारचें तत्त्व—**सर्वस्य-प्राणिजातस्य हृदि-बुद्धौ विष्ठितं-विशेषेण स्थितं**—सर्व प्राणिजाताच्या-प्राणिवर्गाच्या हृदयांत म्ह० बुद्धींत विष्ठित-विशेषतः स्थित आहे. (याविषयीं अनुभवाचें आनुकूल्य दाखवितात-)—**तत्र एव हि त्रयं विभाव्यते**—बुद्धीमध्येंच या त्रयाचा अनुभव येतो, हें प्रसिद्ध आहे. १७.

**इति क्षेत्रं तथा ज्ञानं ज्ञेयं चोक्तं समासतः ।**
**मद्भक्त एतद्विज्ञाय मद्भावायोपपद्यते ॥ १८ ॥**

**अन्वयार्थ—इति**—येणेंप्रमाणें—**क्षेत्रं**—क्षेत्र-शरीर—**ज्ञानं**—अमानित्वादि ज्ञानसाधनें,—**तथा च**—आणि त्याचप्रमाणें—**ज्ञेयं**—जाणण्यास योग्य असें परब्रह्म—**समासतः**—संक्षेपतः—**उक्तं**—सांगितलें.—**मद्भक्तः**—माझ्या ठिकाणींच ज्यानें आपला सर्व भाव ठेवला आहे असा माझा परमभक्त—**एतत्**—हें सर्व—**विज्ञाय**—जाणून—**मद्भावाय**—माझ्या भावाला-माझ्या स्वरूपाला—**उपपद्यते**—प्राप्त होतो. १८

**यथोक्तार्थोपसंहारार्थोऽयं श्लोक आरभ्यते—इत्येवं क्षेत्रं महाभूतादि धृत्यन्तं तथा ज्ञानममानित्वादि तत्त्वज्ञानार्थदर्शनपर्यन्तं ज्ञेयं च 'ज्ञेयं यत्तत्' इत्यादि 'तमसः परमुच्यते' इत्येवमन्तमुक्तं समासतः संक्षेपतः । एतावान्सर्वो हि वेदार्थो गीतार्थश्चोपसंहृत्योक्तः । अस्मिन्सम्यग्दर्शने कोऽधिक्रियत इत्युच्यते मद्भक्तो मयीश्वरे सर्वज्ञे परमगुरौ वासुदेवे समर्पितसर्वात्मभावो यत्पश्यति शृणोति स्पृशति वा सर्वमेव भगवान्वासुदेव इत्येवंग्रहाविष्टबुद्धिर्मद्भक्तः स एतद्यथोक्तं सम्यग्दर्शनं विज्ञाय मद्भावाय मम भावो मद्भावः परमात्मभावस्तस्मै मद्भावायोपपद्यते मोक्षं गच्छति ॥ १८ ॥**

**भाष्यार्थ**—( याप्रमाणें 'त्वं-'अर्थाच्या शुद्धीसाठीं क्षेत्र, पदांचा अर्थ व वाक्यांचा अर्थ, यांच्या विवेकाचे साधन अमानित्वादि व तद्भावप्राप्ति होते हें सांगण्यासाठी शुद्ध तत्पदार्थ सांगून त्यांच्या फलाचा उपसंहार करण्यासाठी हा श्लोक आहे, असें आचार्य सांगतात-)—**यथोक्त-अर्थोपसंहारार्थः अयं श्लोकः आरभ्यते**—येथवर सांगितलेल्या अर्थाचा उपसंहार करण्यासाठीं हा श्लोक आरंभिला जातो—**इति-एवं**—याप्रमाणें—**क्षेत्रं-महाभूतादि-धृत्यन्तं**—क्षेत्र म्ह० महाभूतांपासून धृतीपर्यंत—**तथा ज्ञानं-अमानित्वादि-तत्त्वज्ञानार्थदर्शनपर्यन्तं**—तसेच ज्ञान अमानित्वापासून

---

१ रहस्यकार येथील ज्ञान म्ह०' दुसऱ्या श्लोकात क्षेत्रक्षेत्रज्ञाचे जे ज्ञान त्यालाच मी ज्ञान समजतों' असे जें सांगितले आहे,तेंच समजतात आणि पुढें म्हणतात—" ज्या अर्थी क्षेत्रक्षेत्रज्ञविचार म्हणजेच परमेश्वराचे ज्ञान होय, त्या अर्थी त्याचें फलहि मोक्षच असले पाहिजे, हे पुढे ओघानेच प्राप्त होतें व तोच सिद्धान्त अठराव्या श्लोकांत सांगितला आहे. " पण ओघानेच प्राप्त होणारा जो अर्थ त्याला सिद्धान्त कसें म्हणणार ? शिवाय क्षेत्रक्षेत्रज्ञविचार म्हणजेच परमेश्वराचें ज्ञान हा अपूर्व शोध होय ! 'विचार' या शब्दाच्या ऐवजी 'विवेक' हा शब्द जरी योजला असता तरी तो 'प्रकृतिपुरुषविवेक,' 'क्षेत्रक्षेत्रज्ञयोः अन्तरं' या शब्दांना धरून आहे, असें म्हणतां आलें असतें-पण रहस्यकार इतका विचार करितात कशाला ? जो शब्द आठवला तो दिला दडपून, असेंच बहुधा गीतारहस्यांत केलेलें आढळतें ! व येथील 'विचार' व 'सिद्धान्त' हे शब्दच त्याची उदाहरणे होत. वस्तुतः येथें 'तत्क्षेत्रं यच्च०' ( श्लो. ३ पृ. ९०२ ) येथून ज्या विषयाचा उपक्रम

तत्त्वज्ञानार्थदर्शनापर्यंत—**च ज्ञेयं ' ज्ञेयं यत्तत्० ' इत्यादि ' तमसः परमुच्यते ' इत्येवमन्तं**—आणि ज्ञेय म्ह० ' ज्ञेयं यत्तत्० ' येथून ' तमाहून अगदीं विलक्षण, अज्ञानरूपतमानें अस्पृष्ट ' अशा अर्थाच्या पूर्वोक्त श्लोकापर्यंत—**समासतः-संक्षेपतः उक्तं**—समासानें म्ह० संक्षेपाने सांगितलें. ( अहोपण, दुसऱ्या अनेक गोष्टी सांगण्यासारख्या असतांना हें त्रितयच-क्षेत्र, ज्ञान व ज्ञेय-कां सांगितलें ? उत्तर- )—**एतावान् हि सर्वः वेदार्थः गीतार्थः च उपसंहृत्य उक्तः**—कारण सर्व वेदार्थ व गीतार्थ हा एवढाच काय तो आहे. असा उपसंहार करून संक्षेपानें तो सांगितला. (उत्तरार्धाचें आकांक्षापूर्वक व्याख्यान- )—**अस्मिन्सम्यग्दर्शने कः अधिक्रियते इति उच्यते**—या सम्यग्दर्शनामध्यें अधिकारी कोण आहे तें सांगितलें जातें—**मद्भक्तः -मयि सर्वज्ञे ईश्वरे परमगुरौ वासुदेवे समर्पितसर्वात्मभावः**—माझा भक्त म्ह० मी जो सर्वज्ञ-ईश्वर परमगुरु वासुदेव त्याच्यामध्यें ज्याने आपला सर्वात्मभाव समर्पिला आहे म्हणजे—**यत् पश्यति शृणोति स्पृशति वा**—तो जें पाहतो, ऐकतो किंवा ज्याला स्पर्श करितो तें—**सर्वं एव भगवान् वासुदेवः इति-एवंग्रहाविष्टबुद्धिः सः मद्भक्तः**—सर्वच भगवान् वासुदेव आहे,अशा ग्रहाने ज्याची बुद्धि आविष्ट झाली आहे, अशी ज्याची पक्की समजूत झाली आहे, तो माझा भक्त—**एतत् यथोक्तं सम्यग्दर्शनं विज्ञाय**—हे वर सांगितलेल्या प्रकारचे सम्यग्दर्शन जाणून-त्याला प्राप्त होऊन—**मद्भावाय-मम भावः मद्भावः-परमात्मभावः**—मद्भावास, माझा जो भाव तो मद्भाव म्ह० परमात्मभाव—**तस्मै मद्भावाय उपपद्यते मोक्षं गच्छति**—त्या मद्भावाला योग्य होतो, मोक्षाला जातो. १८.

**प्रकृतिं पुरुषं चैव विद्ध्यनादी उभावपि ।**
**विकारांश्च गुणांश्चैव विद्धि प्रकृतिसंभवान् ॥ १९ ॥**

**अन्वयार्थ—प्रकृतिं**—आठ प्रकारच्या प्रकृतीला—**च एव**—आणि—**पुरुषं**—क्षेत्रज्ञाला —**उभौ अपि**—अशा दोघांनाही—**अनादी**—तूं अनादी-नित्य—**विद्धि**—जाण.—**विकारान्**—बुद्धि,इंद्रियें-देह इत्यादि विकारांस—**च**—आणि—**गुणान् च एव**—सुख-दुःख-मोहरूप गुणांना तूं—**प्रकृतिसंभवान्**—ईश्वराच्या त्रिगुणात्मक मायाख्य प्रकृतीपासून झालेले—**विद्धि**—जाण. १९

---

केला होता त्याचा या अठराव्या श्लोकांत उपसंहार केला आहे. वास्तव ' इति क्षेत्रं तथा ज्ञानं ज्ञेयं चोक्तं ' यांतील क्षेत्र ५-६ श्लोकांत सांगितलेलें, ज्ञान ७-११ श्लोकांत सांगितलेलें व ज्ञेय १२-१७ श्लोकांत सांगितलेलेंच घेतलें पाहिजे,व ' मद्भक्त एतद्विज्ञाय मद्भावाय उपपद्यते ' यांत माझा भक्त हें सर्व जाणून-साक्षात् जाणून मद्भावास योग्य होतो, असें त्याचें फल सांगितलें आहे. येथें 'आत्मसाक्षात्कारानें मोक्ष' हा सिद्धान्त प्रत्यक्ष शब्दांनीं सांगितला आहे. यांत ओघानें प्राप्त झालेलें वगैरे कांहीं सांगितलेलें नाहीं.

**तत्र सप्तम ईश्वरस्य द्वे प्रकृती उपन्यस्ते परापरे क्षेत्रक्षेत्रज्ञलक्षणे । एतद्योनीनि भूतानीति चोक्तम् । क्षेत्रक्षेत्रज्ञप्रकृतिद्वययोनित्वं कथं भूतानामित्ययमर्थोऽधुनोच्यते—प्रकृतिं पुरुषं चैवेश्वरस्य प्रकृती तौ प्रकृतिपुरुषावुभावप्यनादी विद्धि । न विद्यत आदिर्ययोस्तावनादी । नित्येश्वरत्वादीश्वरस्य तत्प्रकृत्योरपि युक्तं नित्यत्वेन भवितुम् । प्रकृतिद्वयवत्त्वमेव हीश्वरस्येश्वरत्वम् । याभ्यां प्रकृतिभ्यामीश्वरो जगदुत्पत्तिस्थितिप्रलयहेतुस्ते द्वे अनादी सत्यौ संसारस्य कारणम् ॥**

**भाष्यार्थ**—( पुढील ग्रंथाचा या अध्यायांतील गत अर्थाशी संबंध नसून फार दूर संबंध आहे, असें सांगतात- )—**तत्र सप्तमे ईश्वरस्य द्वे पर-अपरे क्षेत्रक्षेत्रज्ञ-लक्षणे प्रकृती उपन्यस्ते**—सातव्या अध्यायात ईश्वराच्या दोन-पर व अपर-क्षेत्र व क्षेत्रज्ञ या स्वरूपाच्या दोन प्रकृतींचा उपन्यास केला.—'**एतद्योनीनि भूतानि' इति च उक्तं**—तसेंच तेथें सर्व भूतांचें कारण याच दोन प्रकृति आहेत, असेंहि सांगितले. पण—**भूतानां क्षेत्रक्षेत्रज्ञप्रकृतिद्वययोनित्वं कथं इति अयं अर्थः अधुना उच्यते**—भूतांना क्षेत्र व क्षेत्रज्ञ या दोन प्रकृतींचे कारणत्व कसें? म्ह० या दोन प्रकृति हेंच सर्व भूतांचे कारण कसे, हें सांगण्यासाठी आतां ' प्रकृति०' इत्यादि

१ सातव्या अध्यायात ईश्वराच्या क्षेत्रक्षेत्रज्ञरूप दोन प्रकृति सांगितल्या व त्या दोन प्रकृति हें सर्वभूतांचें कारण आहे, असेंहि तेथेंच सांगितलें. पण भूतांचें क्षेत्रक्षेत्रज्ञरूप दोन प्रकृति हेंच कारण कसें तें सांगण्यासाठी पुढील ग्रंथ आहे, असें आचार्य म्हणतात. पण रहस्यकार या श्लोकाला जे अयोग्य अवतरण देतात त्यांतील महत्त्वाचीं वाक्यें अशीं आहेत–" वेदान्तशास्त्रातील क्षेत्रक्षेत्रज्ञविचार येथें संपला. .क्षेत्रक्षेत्रज्ञविचार म्ह० सांख्यदृष्ट्या प्रकृतिपुरुषविवेक होतो.सांख्याप्रमाणें गीताशास्त्र प्रकृति व पुरुष हीं दोन तत्त्वे स्वतंत्र मानीत नसून एकाच परमेश्वराची हीं कनिष्ठ व श्रेष्ठ दोन रूपें आहेत, असें सातव्या अध्यायांत सांगितलें आहे. ( ७.४–५ ). परंतु सांख्याच्या द्वैताऐवजीं गीताशास्त्रातले हे अद्वैत एकदा पत्करिल्यावर मग प्रकृति व पुरुष यांच्या परस्परसंबधाचे सांख्यांचें ज्ञान गीतेस अमान्य नाहीं. किंबहुना क्षेत्र-क्षेत्रज्ञज्ञानाचेंच प्रकृतिपुरुषविवेक हे रूपांतर होते ... ... म्हणून एवढा वेळ उपनिषदाच्या आधारें जें क्षेत्र-क्षेत्रज्ञज्ञान सांगितले तेंच ज्ञान आतां सांख्याच्या परिभाषेंत पण सांख्याचें द्वैत न स्वीकारता प्रकृतिपुरुषविवेक या दुसऱ्या रूपानें सांगण्यास सुरुवात करितात"—यावरूनच रहस्यकारास वेदान्त व सांख्य यांचें ज्ञान किती निर्दोष झालें आहे, तें उघड होतें. क्षेत्रक्षेत्रज्ञविचार वेदान्तांतील व प्रकृतिपुरुषयोग हा सांख्यदर्शनातील हा विभाग, केवल भ्रामक आहे.सांख्यदर्शनाला अनुसरून गीतेंत सिद्धान्तरूप असें कांहीं सांगितले आहे,असे म्हणणे हेंच मुळीं चुकीचे आहे. गीता ही स्मृति आहे,व्यासानीं ती रचली आहे,त्यानीं नुस्ते प्राचीन गीतेचें शोधनच केलें, हें म्हणणे खोटें आहे. ब्रह्मसूत्रांत सांख्यदर्शनाला प्रामाण्य मानलेले नाहीं. उपनिषदांतील सांख्य व योग हें क्रमानें ज्ञान व ध्यान आहे. गीतेंतहि सांख्य व योग हे शब्द त्याच अर्थी योजलेले आहेत. गीतेंतील प्रतिपादन उपनिषदांना अनुसरूनच असलें पाहिजे. तरच ब्रह्मसूत्रांतील तिन्ही

'स्मृति' या नांवानें केलेला उल्लेख उपपन्न होईल. गीता हें जर सांख्य, केवल तर्कमय वेदान्त, मीमांसक, भागवतधर्म इत्यादि अठरा धान्यांचे कडबोळें आहे, असें म्हटलें तर तिला 'स्मृति' म्हणतां येणार नाहीं. स्मृति श्रुत्युपजीविनीच असली पाहिजे. ती कोणतेहि दर्शन किंवा पंथ यांना अनुसरणारी असणें, योग्य नाहीं. दर्शनादिकांनी पाहिजे तर स्मृतीचें अनुकरण करावें. नारायणीय धर्मानें पाहिजे तर गीतेशी आपलें नातें सांगावें. ती त्याला ओळखीतहि नाही. म्हणूनच आचार्यांनी ५ व्या श्लोकावरील भाष्यांत "यानाच सांख्य चोवीस तत्त्वें म्हणतात" असें म्हटले आहे. (गी. भा. पृ. ९०९ व ९११ पहा.) भगवानांनी ही तत्त्वे साख्यदर्शनाला अनुसरून सांगितली आहेत, असे म्हटलें नाहीं. वैदिक संप्रदायदृष्टि व असंप्रदायदृष्टि यांत कसा व केवढा फरक पडतो, तो पहा.

'वेदान्तशास्त्रातील क्षेत्रक्षेत्रज्ञविचार येथें संपला,' असे मिथ्या ज्ञान रहस्यकारांना कां बरें झालें? प्रकृति व पुरुष हे शब्द पाहिल्यामुळें त्यांना असा भ्रम झाला असावा, असे दिसतें. पण येथील पुरुष हा साख्यांचा प्रतिशरीरीं पृथक् असलेला पुरुष नव्हे. येथील पुरुष हा वस्तुतः परमात्माच आहे. म्हणूनच त्याला २२ व्या श्लोकांत उपद्रष्टा, अनुमता, भर्ता, भोक्ता, महेश्वर, परमात्मा इत्यादि म्हणता आले. गीतेत 'परा प्रकृति' म्हणून ज्याला म्हटलें आहे, तोच हा. सांख्याचे पुरुष अनेक आहेत. प्रकृतिमान् ईश्वर–परम पुरुष ते मानीतच नाहींत. अर्थात गीतेतील प्रकृति व पुरुष हे शब्द मूळ उपनिषदांतील आहेत. साख्याचे नव्हेत. 'वेदाहमेतं पुरुषं महान्तं' 'इहैवान्तःशरीरे सोम्य स पुरुषः' 'अव्यक्तात्पुरुषः परः, पुरुषान्न परं किंचित्' इत्यादि उपनिषदांत अनेक ठिकाणीं परमात्म्याला पुरुष म्हटले आहे. तसेच 'मायां तु प्रकृतिं' 'देवात्मशक्तिं स्वगुणैः निगूढां' इत्यादि ठिकाणीं प्रकृतीचा उल्लेख आहे. पण हें रहस्य न जाणल्यामुळें गीतेंत जेथें जेथें असले साधारण शब्द आले आहेत तेथें तेथें त्यांनीं सांख्यदर्शनाकडे फुकट धांव मारली आहे, आणि इतकें करूनहि 'सांख्यांचें द्वैत गीतेला कबूल नाहीं, साख्य प्रकृति व पुरुष यांना अनादी, स्वतंत्र, स्वयंभू मानतात.' इत्यादि म्हणण्याचा त्यांना प्रसंग आलाच आहे. अर्थात् गीतेचा सिद्धान्त व सांख्यसिद्धान्त यांत फरक आहे, हें त्यांनाहि कबूल करावें लागतेंच, मग 'गीतेनें साख्यदर्शनाप्रमाणें अमुक सांगितले आहे,' हे म्हणण्यांत तरी काय अर्थ राहिला! त्यापेक्षा 'गीतेचें सर्वच प्रतिपादन उपनिषदांना धरून आहे, असें म्हटलें असतें तर इतकी भानगड व धरसोड करावयाचें कांहीं कारणच पडलें नसतें. पण गीता सर्वथा उपनिषदांना अनुसरते, असे म्हटले की ज्ञाननिष्ठा बोकांडी बसलीच, असा खरा प्रकार असल्यामुळें ही सर्व टाळाटाळी आहे. पण सांख्यदर्शनहि कर्माचा सर्वथा त्याग करावयास सांगतें, हें कोठे ठाऊक आहे! सारांश वेदान्तशास्त्राची यथार्थ प्रतिपत्ति न झाल्यामुळे रहस्यकारांचें हें अशाप्रकारचें प्रतिपादन सर्वथा अनुपपन्न व अग्राह्य झालें आहे. गीतेंतील सर्व वर्णन उपनिषदांना धरून केलेलें आहे. कापिल सांख्य किंवा पातंजलयोग यांतील कोणत्याहि दर्शनाच्या आधारानें तें केलेलें नाहीं. कारण गीता स्मृति आहे. सांख्य, योग व वेदान्त या शास्त्रांतील विरोध पंचदशीकारांनी एकाच श्लोकांत दिला आहे. तो वाचला म्हणजे रहस्यकारांची त्याविषयींची शेंकडों पानें लिहून केलेली सर्व 'चिकित्सा' नीरस, दुर्बोध व अग्राह्य वाटते. तो श्लोक असा–'आत्मभेदो जगत्सत्यं ईशोऽन्य इति चेत्त्रयं। त्यज्यते तैस्तदा सांख्य-योग-वेदान्तसंमतिः॥'(६-२२१.)

म्हणतात-हा अर्थ आतां सांगितला जातो—**'प्रकृतिं पुरुषं च एव' ईश्वरस्य प्रकृती**—प्रकृति व पुरुष-ईश्वराच्या अपर व पर प्रकृति—**तौ प्रकृति-पुरुषौ उभौ अपि अनादी विद्धि**—प्रकृति व पुरुष, अशा हीं दोन्ही अनादी आहेत, असें तूं जाण.—**न विद्यते आदिः ययोः तौ अनादी**—ज्याना आदि म्ह० कारण नाहीं, ती दोन्ही अनादी. ( तीं कशी ? उत्तर-)—**ईश्वरस्य नित्येश्वरत्वात् तत्प्रकृत्योः अपि नित्यत्वेन भवितुं युक्तं**—ईश्वराला नित्य ईश्वरत्व असल्यामुळे त्याच्या या दोन प्रकृतींनाहि नित्यत्व असणें युक्त आहे-त्या प्रकृतीहि नित्यच असणें उचित आहे.—**प्रकृतिद्वयवत्त्वं एव हि ईश्वरस्य ईश्वरत्वं**—दोन प्रकृतींनीं युक्त असणे हेंच ईश्वराचे ईश्वरत्व होय. ( क्षेत्र व क्षेत्रज्ञ या दोन प्रकृतीचें नियामकत्व हेंच ईश्वरत्व आहे. अहोपण जगाला उत्पन्न करणे इत्यादि कार्यांतील स्वातंत्र्य हेच ईश्वरत्व आहे, वरील दोन प्रकृतींनीं युक्त असणे हे ईश्वरत्व नव्हे, अशी शंका घेऊन आचार्य म्हणतात-)—**याभ्यां प्रकृतिभ्यां ईश्वरः जगदुत्पत्ति-स्थिति-प्रलयहेतुः**—ज्या दोन प्रकृतीच्या योगाने ईश्वर जगाची उत्पत्ति, स्थिति व लय यांचा हेतु आहे,—**ते द्वे अनादी सत्यौ संसारस्य कारणं**—त्या दोन प्रकृती अनादी असून संसाराचे कारण आहेत.

**नाऽऽदी अनादी इति तत्पुरुषसमासं केचिद्वर्णयन्ति । तेन हि किलेश्वरस्य कारणत्वं सिध्यति । यदि पुनः प्रकृतिपुरुषावेव नित्यौ स्यातां तत्कृतमेव जगन्नेश्वरस्य जगतः कर्तृत्वम् । तदसत्, प्राक्प्रकृतिपुरुषयोरुत्पत्तेरीशितव्याभावादीश्वरस्यानीश्वरत्वप्रसङ्गात् । संसारस्य निर्निमित्तत्वेऽनिर्मोक्षत्वप्रसङ्गाच्छास्त्रानर्थक्यप्रसङ्गाद्बन्धमोक्षाभावप्रसङ्गाच्च । नित्यत्वे पुनरीश्वरस्य प्रकृत्योः सर्वमेतदुपपन्नं भवेत् ॥**

**भाष्यार्थ**—(याविषयीं मतान्तर-)—**न आदी-अनादी इति तत्पुरुषसमासं केचित् वर्णयन्ति**—आदि नव्हत त्या अनादी, असा याचा तत्पुरुष समास कित्येक

' प्रत्येक शरीरांत आत्मा भिन्न आहे, जगत सत्य आहे व ईश्वर नाही,' हे म्हणणे जर सांख्य सोडतील व 'आत्मभेद, जगत् सत्य आहे' हे म्हणणे व 'आत्म्याहून ईश्वर भिन्न आहे,' हें मत जर योगी सोडतील तर सांख्य, योग व वेदान्त म्ह० औपनिषददर्शन यांचा एकवाक्यता होईल; गीता या तीन मतांतील कोणत्या मताची आहे ? अर्थात् आत्मभेद न मानणारी, व आत्म्यालाच ईश्वर समजणारी "सम सर्वेषु भूतेषु तिष्ठन्तं परमेश्वरं, विनश्यत्सु अविनश्यन्तं " ( अ. १३ श्लो. २७ ) वगैरे, तसेच, जगाला असत्य मानणारी ' अनित्यं असुखं लोकं ' (अ.९ श्लो. ३३ पृ. ७२३) वगैरे आहे. अर्थात् ती वेदान्तमताचेंच प्रतिपादन करणारी आहे. सांख्य किंवा योगदर्शनाचे प्रतिपादन करणारी नाही. अर्थात् या संबंधानें रहस्यकारांनी रहस्यांत वारंवार तेच ते चर्वितचर्वण कितीहि जरी केलेलं असले तरी तें असंबद्ध असल्यामुळें सर्वथा अग्राह्य होय. (गी. भा. पृ. १२४,६६६,६९०,७३२ पहा.) वेदान्ती ' प्रकृति पुरुषापासून उत्पन्न झालेली समजतात ' वगैरे रहस्यकारांचें म्हणणें निर्मूल आहे. प्रकृतीला उत्पन्न होणारी मानल्यास कोणता दोष येतो तें पुढील भाष्यांत सविस्तर सांगितलें आहे, तें वाचकांनी अवश्य पहावें.

वर्णितात. म्ह० ज्या प्रकृति आदि-मूळ नव्हेत त्या अनादी—**तेन हि किल ईश्वरस्य कारणत्वं सिध्यति**—असा विग्रह केल्यानें ईश्वराचें कारणत्व सिद्ध होतें. —**यदि पुनः प्रकृति-पुरुषौ एव नित्यौ स्यातां तत्कृतं एव जगत् ईश्वरस्य जगतः कर्तृत्वं न**—पण जर प्रकृति व पुरुष हींच नित्य झालीं तर हें जगत् तत्कृतच -त्यांनीं केलेलें आहे, असें होतें. ईश्वराचें श्रुतिस्मृतिसिद्ध जगत्कर्तृत्व त्यायोगानें निश्चित होत नाहीं. (या शंकेचें निरसन-)—**तत् असत्**—हें म्हणणें बरोबर नाहीं. (कारण प्रकृति व पुरुष हीं दोन्हीं उत्पन्न होणारीं आहेत असें म्हटल्यास-)—**प्रकृति-पुरुषयोः उत्पत्तेः प्राक् ईशितव्याभावात् ईश्वरस्य अनीश्वरत्वप्रसंगात्**—प्रकृति व पुरुष यांच्या उत्पत्तीच्या पूर्वी ज्यांचें ईशन-नियमन करावयाचें त्यांचाच अभाव असल्यामुळें ईश्वराला अनीश्वरत्व प्रसंग येतो. [कारण प्रकृति व पुरुष यांची ज्यावेळीं उत्पत्तिच झालेली नसते त्यावेळी नियमन करण्यास योग्य असें कांहीच नसतें. त्यामुळें त्याला त्या अवस्थेत ईश्वरहि म्हणतां येत नाहीं. कारण नियम्य असेल तर नियामक, प्रजेच्याच अभावी राजा कोठला? शिवाय या दोन प्रकृतीची अपेक्षा न करितांच जर ईश्वर संसाराचा हेतु होत असेल तर संसार उत्पन्न करणें किंवा न करणे हें त्याच्या मर्जीवर अवलंबून राहील. कारण तो स्वतंत्र आहे, त्यामुळें मुक्तांनाहि संसाराची प्राप्ति नच होईल, असा भरंवसा राहणार नाहीं, मोक्षशास्त्राला प्रामाण्य उरणार नाहीं. त्यामुळें त्यालाच संसारहेतुत्व नाहीं, असें सांगतात- ]—**संसारस्य निर्निमित्तत्वे अनिर्मोक्षत्वप्रसंगात् शास्त्रानर्थक्यप्रसंगात् च बंधमोक्षाभावप्रसंगात्**—संसाराला कांहीं निमित्तच नाहीं, तो निमित्तावांचूनच प्राप्त होतो, असे म्हटल्यास अनिर्मोक्षप्रसंग, शास्त्रानर्थक्यप्रसंग व बंधमोक्षाभावप्रसंग येतो.[म्ह०पूर्वोक्त दोन प्रकृतींच्या अपेक्षेवांचून केवल ईश्वरच जगाचें निमित्त आहे असे म्हटल्यास हे असे दोष येतात. दोन प्रकारच्या प्रकृतीला नित्यत्व नाहीं, त्या दोन्ही कार्यरूप आहेत, असे म्हटल्यास त्या उत्पन्न होण्याच्या पूर्वी बंधाचा अभाव असणार, हे उघडच आहे. बंधाच्या अभावीं तो तुटणें, या स्वरूपाच्या मोक्षाचाहि अभावच असतो, आणि कदाचित् त्या दोघांचाहि जर अभाव असला तर पुनः त्याचा संभवच नाहीं. यास्तव दोन्ही प्रकृतींना नित्य मानिलें पाहिजे. त्यांना मूळ कारण मानल्यानें संसार, शास्त्र व बंध-मोक्ष या सर्वांची उपपत्ति लागते, असें सांगतात-]—**पुनः ईश्वरस्य प्रकृत्योः नित्यत्वे सर्वं एतत् उपपन्नं भवेत्**—पण तेंच ईश्वराच्या या दोन प्रकृतींना नित्यत्व आहे, असें मानलें असतां हें सर्व उपपन्न होतें.

**कथं, विकारांश्च गुणांश्चैव वक्ष्यमाणान्विकारान्बुद्ध्यादिदेहेन्द्रियान्तान्गुणांश्च सुखदुःखमोहप्रत्ययाकारपरिणतान्विद्धि जानीहि प्रकृतिसंभवान्प्रकृतिरीश्वरस्य विकारकारणशक्तिस्त्रिगुणात्मिका माया सा संभवो येषां विकाराणां गुणानां च तान्विकारान्गुणांश्च विद्धि प्रकृतिसंभवान्प्रकृतिपरिणामान् ॥ १९ ॥**

**भाष्यार्थ—कथं**—तें कसें उपपन्न होतें तें सांगतात—**विकारान् च गुणान्**—विकार व गुण यांस—**वक्ष्यमाणान् बुद्ध्यादिदेहेन्द्रियान्तान् विकारान् च सुख-दुःख-मोहप्रत्ययाकारपरिणतान् गुणान्**—व पुढें सांगितल्या जाणाऱ्या बुद्धीपासून देहेंद्रियांपर्यंत विकारांस व सुख, दुःख व मोह यांच्या प्रत्ययांच्या—अनुभवांच्या आकारानें परिणत झालेल्या गुणांस—**प्रकृतिसंभवान् विद्धि-जानीहि**—प्रकृतिसंभव जाण, प्रकृति हेंच त्यांना सत्ता देणारें निमित्त आहे, असें तूं समज.—**प्रकृतिः ईश्वरस्य विकारकारणशक्तिः त्रिगुणात्मिका माया**—प्रकृति म्हणजे ईश्वराची विकारकारणशक्ति-सर्व विकारांना कारण होणारी शक्ति-त्रिगुणात्मिका माया—**सा संभवः येषां विकाराणां गुणानां च तान् विकारान् गुणान् च प्रकृतिसंभवान्-प्रकृतिपरिणामान् विद्धि**—ती प्रकृति ज्या विकारांचा व गुणांचा संभव-सत्ता देणारा हेतु-कारण आहे, त्या विकारांना व गुणांना प्रकृतिसंभव-प्रकृतीचे परिणाम तूं जाण. [ प्रकृति अनादि आहे, असें मानलें म्हणजे गुण व विकार हें तिचें कार्य असल्यामुळें आत्मा निर्गुण व निर्विकार आहे, हें सिद्ध होतें. ] १९.

कार्यकरणकर्तृत्वे हेतुः प्रकृतिरुच्यते ।
पुरुषः सुखदुःखानां भोक्तृत्वे हेतुरुच्यते ॥ २० ॥

**अन्वयार्थ—कार्यकरणकर्तृत्वे**—कार्य म्ह० शरीर व करण म्ह० सर्व इंद्रियें यांच्या कर्तृत्वाविषयीं—**प्रकृतिः**—वरील प्रकृति—**हेतुः**—निमित्त—**उच्यते**—सांगितली जाते. त्याचप्रमाणें—**सुखदुःखानां भोक्तृत्वे**—सुखदुःखांच्या भोक्तृत्वाविषयीं—**पुरुषः**—पुरुष-क्षेत्रज्ञ-जीव—**हेतुः**—निमित्त—**उच्यते**—सांगितला जातो. २०

**के पुनस्ते विकारा गुणाश्च प्रकृतिसंभवाः— कार्यकरणकर्तृत्वे कार्यं शरीरं करणानि तत्स्थानि त्रयोदश। देहस्याऽऽरम्भकाणि भूतानि विषयाश्च प्रकृतिसंभवा विकाराः पूर्वोक्ता इह कार्यग्रहणेन गृह्यन्ते गुणाश्च प्रकृतिसंभवाः सुखदुःखमोहात्मकाः करणाश्रयत्वात्करणग्रहणेन गृह्यन्ते। तेषां कार्यकरणानां कर्तृत्वमुत्पादकत्वं यत्तत्कार्यकरणकर्तृत्वं तस्मिन्कार्यकरणकर्तृत्वे हेतुः कारणमारम्भकत्वेन प्रकृतिरुच्यते । एवं कार्यकरणकर्तृत्वेन संसारस्य कारणं प्रकृतिः ॥**

**भाष्यार्थ—पुनः ते प्रकृतिसंभवाः गुणाः च विकाराः के**—पण ते प्रकृतिसंभव-प्रकृतिकार्यभूत विकार व गुण कोणते ?—**कार्यकरणकर्तृत्वे-कार्यं-शरीरं करणानि-तत्स्थानि त्रयोदश**—कार्य व करण यांच्या कर्तृत्वामध्यें-कार्य-शरीर व करण-शरीरांतील तेरा[1] इंद्रियें-तशींच—**देहस्य आरंभकाणि भूतानि च विषयाः प्रकृतिसंभवाः विकाराः पूर्वोक्ताः इह कार्यग्रहणेन गृह्यन्ते**—देहाचीं आरंभक-देहाचा आरंभ करणारीं भूतें व विषय

१ पांच ज्ञानेंद्रियें, पांच कर्मेंद्रियें, मन, बुद्धि व अहंकार अशीं तेरा.

हे पूर्वोक्त प्रकृतिसंभव विकार येथें कार्यग्रहणानें ग्रहण केले जातात.—**च प्रकृतिसंभवाः गुणाः सुखदुःखमोहात्मकाः करणाश्रयत्वात् करणग्रहणेन गृह्यन्ते**—व प्रकृतिसंभव सुख-दुःख-मोहात्मक गुण करणाश्रय असल्यामुळें करणग्रहणानें ग्रहण केले जातात.—**यत् तेषां कार्यकरणानां कर्तृत्वं-उत्पादकत्वं तत् कार्यकरणकर्तृत्वं**—जें त्या कार्यकरणांचें कर्तृत्व म्ह० उत्पादकत्व ते कार्यकरण-कर्तृत्व होय.—**तस्मिन् कार्यकरणकर्तृत्वे हेतुः आरम्भकत्वेन कारणं प्रकृतिः उच्यते**—त्या कार्य-करण-कर्तृत्वामध्यें हेतु म्ह० आरंभक या रूपाने कारण, प्रकृति सांगितली जाते.—**एवं कार्यकरणकर्तृत्वेन प्रकृतिः संसारस्य कारणं**—याप्रमाणें शरीरेंद्रियांच्या कर्तृत्वामुळे प्रकृति संसाराचें कारण[1] आहे. [ देहाचीं आरंभक म्ह० देह ज्यांच्यापासून उत्पन्न होतो तीं भूतें, विषय व शरीरें, हे विकार हा येथील कार्यशब्दाचा अर्थ आहे. त्याचप्रमाणें तेरा इंद्रियें व त्यांचा आश्रय करून राहणारे सुख, दुःख व मोह हे गुण हा येथील करणशब्दाचा अर्थ आहे.त्याचे कर्तृत्व प्रकृतीला आहे, त्यांना उत्पन्न करणें, या रूपानें प्रकृति त्याचें कारण आहे. याप्रमाणें कार्यकरण-कर्तृत्वामुळे प्रकृति संसारकारण आहे. ]

**कार्यकारणकर्तृत्व इत्यस्मिन्नपि पाठे कार्यं यद्यस्य विपरिणामस्तत्तस्य कार्यं विकारो विकारि कारणं तयोर्विकारविकारिणोः कार्यकारणयोः कर्तृत्व इति । अथवा षोडश विकाराः कार्यं सप्त प्रकृतिविकृतयः कारणं तान्येव कार्यकारणान्युच्यन्ते । तेषां कर्तृत्वे हेतुः प्रकृतिरुच्यत आरम्भकत्वेनैव ॥**

**भाष्यार्थ**—( याचाच दुसरा पाठ घेऊन,त्याचें व्याख्यान व अर्थ-)—**कार्यकारणकर्तृत्वे इति अस्मिन् अपि पाठे**—'कार्यकारणकर्तृत्वे' हा पाठ घेतला तरी त्याचा अर्थ असा—**कार्यं-यत् यस्य विपरिणामः तत् तस्य कार्यं-विकारः**-कार्य जो ज्याचा परिणाम तें त्याचें कार्य म्ह० विकार,—**विकारि-कारणं**—व विकारि-विकार पावणारें तें कारण—**तयोः विकारविकारिणोः-कार्यकारणयोः कर्तृत्वे इति**—त्या विकारविकारींच्या-कार्य-कारणांच्या कर्तृत्वामध्यें प्रकृति हेतु आहे. असा भावार्थ [ विकार-परिणाम व कारण यांच्या कर्तृत्वाचे कारण प्रकृति आहे. याचेंच दुसरें व्याख्यान-]—**अथवा षोडश विकाराः कार्यं सप्त प्रकृतिविकृतयः कारणं तानि एव कार्य-कारणानि उच्यते**—किंवा पूर्वोक्त ( पृ. ९११ पहा.) सांख्यदर्शनोक्त सोळा विकारांचा समुदाय हे कार्य व सात प्रकृतिविकृति हे कारण, तींच कार्यकारणें येथें सांगितली जातात.—**तेषां कर्तृत्वे हेतुः आरंभकत्वेन**

---

१ रहस्यकार "देह व इंद्रियें यांच्या कर्तृत्वास प्रकृति कारण आहे" असे म्हणतात. पण त्याचा अर्थ काय, ते त्यांचे त्यांसच माहीत ! शरीरेंद्रियांचें जें कर्तृत्व-कर्तेपणा हा-धर्म, त्यास प्रकृति कारण आहे, असा त्याचा अर्थ होतो: पण तो चुकीचा आहे. कारण येथें प्रकृतीपासून शरीरेंद्रियें होतात, हें सांगावयाचें आहे.

**एव प्रकृतिः उच्यते**—त्यांच्या कर्तृत्वामध्ये हेतु-आश्रय आरंभकत्व-कर्तृत्व या निमित्तानेंच प्रकृति सांगितली जाते. [ या व्याख्यानानें आचार्यांनीं श्रुतिस्मृतींशीं अविरुद्ध असलेला सांख्य-योगदर्शनांतील अंश ग्राह्य असल्याचें सुचविलें आहे. पण तेवढ्यावरून गीतेंत सांख्यशास्त्राप्रमाणेच हे सर्व सांगितलें आहे, असे म्हणणें अयोग्य आहे.]

**पुरुषश्च संसारस्य कारणं यथा स्यात्तदुच्यते पुरुषो जीवः क्षेत्रज्ञो भोक्तेति-पर्यायः सुखदुःखानां भोग्यानां भोक्तृत्व उपलब्धृत्वे हेतुरुच्यते । कथं पुनरनेन कार्यकरणकर्तृत्वेन सुखदुःखभोक्तृत्वेन च प्रकृतिपुरुषयोः संसारकारणत्वमुच्यत इति अत्रोच्यते कार्यकरणसुखदुःखरूपेण हेतुफलात्मना प्रकृतेः परिणामाभावे पुरुषस्य चेतनस्यासति तदुपलब्धृत्वे कुतः संसारः स्यात् । यदा पुनः कार्यकरणसुखदुःखरूपेण हेतुफलात्मना परिणतया प्रकृत्या भोग्यया पुरुषस्य तद्विपरीतस्य भोक्तृत्वेनाविद्यारूपः संयोगः स्यात्तदा संसारः स्यादिति । अतो यत्प्रकृतिपुरुषयोः कार्यकरणकर्तृत्वेन सुखदुःखभोक्तृत्वेन च संसारकारणत्वमुक्तं तद्युक्तम् । कः पुनरयं संसारो नाम, सुखदुःखसंभोगः संसारः पुरुषस्य च सुखदुःखानां संभोक्तृत्वं संसारित्वमिति ॥ २० ॥**

**भाष्यार्थ**—(उत्तरार्धाचें तात्पर्य-)—**च पुरुषः संसारस्य कारणं यथा स्यात् तत् उच्यते**—आतां पुरुष संसाराचे कारण ज्याप्रकारें होतो. तो प्रकार सांगितला जातो.—**पुरुषः-जीवः-क्षेत्रज्ञः-भोक्ता इति पर्यायः**—पुरुष म्ह० येथे निरुपाधिक परमात्मा नव्हे, तर जीव, क्षेत्रज्ञ, भोक्ता, हे ज्याचे पर्याय आहेत तो पुरुष—**सुखदुःखानां-भोग्यानां भोक्तृत्वे-उपलब्धृत्वे हेतुः उच्यते**—सुखदुःखांच्या म्ह० भोग्यांच्या भोक्तृत्वाविषयीं-अनुभवाविषयीं हेतु म्ह० निमित्त सांगितलेला आहे. [ प्राणांचें धारण करणे, या निमित्ताने पुरुषाला जीव असे म्हणतात. पण त्याचे चेतनत्व हेंच प्राणधारणाचें निमित्त आहे, हे सुचविण्यासाठीं 'क्षेत्रज्ञ' हें नांव दिले आहे व तो पुरुष निरुपाधिक नाही, सोपाधिक आहे, हें 'भोक्ता' या पर्यायानें सुचविलें आहे. सुखदुःखादि भोग्यांचा अनुभव येण्याचें निमित्त हा चेतन जीव आहे. आतां प्रकृति व पुरुष यांच्या संसारकारणत्वाचे उपपादन करण्यासाठीं शंका-]—**पुनः अनेन कार्यकरणकर्तृत्वेन च सुखदुःखभोक्तृत्वेन प्रकृतिपुरुषयोः संसारकारणत्वं कथं उच्यते**—पण या शरीरेंद्रियांच्या कर्तृत्वाने व सुखदुःखांच्या भोक्तृत्वानें प्रकृति व पुरुष यांचें संसारकारणत्व कसे सांगितलें जात आहे—**इति अत्र उच्यते**—असे विचाराल तर त्याचें उत्तर सांगतो. (अन्वय-व्यतिरेकाने त्याचे संसारकारणत्व सांगतो, असे म्हणून

---

१ पण रहस्यकारांनी हा पुरुषाचा विशेष स्पष्टपणे दाखविलेला नाही. भोक्ता होणारा पुरुष निरुपाधिक असणें केव्हाच शक्य नाही. पुरुषानें स्वरूपाला विसरून प्रकृतिस्थ होणे म्हणजेच ससारी होणें आहे. पण रहस्यकार तत्त्वविचाराच्या इतक्या खोल पाण्यात शिरण्याच्या भानगडींत पडत नाहीत. पण सांख्य पुरुषाचे भोक्तृत्व असें मिथ्या मानीत नाहींत. त्यामुळे येथील वर्णन सांख्यशास्त्राप्रमाणें आहे हें म्हणणें खोटें आहे.

प्रथम व्यतिरेकच दाखवितात-) —**हेतु-फलात्मना कार्यकरणसुखदुःखरूपेण प्रकृतेः परिणामाभावे**—हेतु व फल या स्वरूपाच्या कार्य, करण, सुख व दुःख या रूपानें प्रकृतीचा परिणाम जर न झाला-म्ह० प्रकृति शरीर व इंद्रियें या हेतुरूपानें आणि सुख व दुःख या फलरूपानें परिणाम जर न पावली तर, त्याचप्रमाणें-**चेतनस्य पुरुषस्य तदुपलब्धृत्वे असति**-चेतन पुरुषाला त्यांचे उपलब्धृत्व-भोक्तृत्व जर नसेल तर —**कुतः संसारः स्यात्**—संसार कोठून सिद्ध होईल ? [ नित्य मुक्त आत्म्याला स्वभावतःच संसार असणे शक्य नाही, असा याचा भावार्थ. याप्रमाणे प्रकृतीचें कर्तृत्व व पुरुषाचें भोक्तृत्व याच्या अभावीं संसाराचाहि अभाव, हा व्यतिरेक दाखवून आतां अन्वय दाखवितात-]—**पुनः यदा हेतुफलात्मना कार्यकरणसुखदुःखरूपेण परिणतया भोग्यया प्रकृत्या तद्विपरीतस्य पुरुषस्य भोक्तृत्वेन अविद्यारूपः संयोगः स्यात् तदा संसारः स्यात् इति**—पण जेव्हां हेतुफलात्मक-शरीरेंद्रिय सुखदुःखरूपाने परिणाम पावलेल्या भोग्य प्रकृतीशीं तिच्या अगदीं उलट -तिच्या स्वरूपाहून अगदीं विलक्षण स्वरूपाच्या पुरुषाचा भोक्ता या रूपानें जेव्हां अविद्यात्मक संयोग होतो तेव्हां संसार संभवतो, हें प्रसिद्ध आहे.—**अतः प्रकृति-पुरुषयोः कार्यकरणकर्तृत्वेन च सुखदुःखभोक्तृत्वेन यत् संसारकारणत्वं उक्तं तत् युक्तं**—यास्तव प्रकृति व पुरुष यांचें कार्यकरणकर्तृत्वाच्या योगानें व सुख-दुःखभोक्तृत्वाच्या योगाने जे संसारकारणत्व सांगितलें म्ह० प्रकृति शरीरेंद्रियांच्या कर्तृत्वाने व पुरुष-जीव-भोक्ता सुखदुःखांच्या भोक्तृत्वानें संसाराचें कारण होतात, असें जें सांगितलें आहे ते योग्यच आहे. ( पण अविक्रिय आत्म्याचें संसरण उचित नाही, त्यानें संसारी होणें संभवत नाही, असा आक्षेप-)—**पुनः अयं संसारः नाम कः**—अहोपण हा संसार म्हणजे काय ? ( या आक्षेपाचे समाधान-)—**सुखदुःखसंभोगः संसारः**—सुख व दुःख यांतील कशाचा तरी संभोग-साक्षात्कार-अनुभव हाच संसार आहे.—**च सुखदुःखानां संभोक्तृत्वं पुरुषस्य संसारित्वं इति**—व सुखदुःखांचें भोक्तृत्व हेंच पुरुषाचें संसारित्व आहे. [ सुखदुःखांचा साक्षात्कार हाच अविक्रिय आत्म्याचा-द्रष्ट्याचा संसार, व तशा प्रकारचे भोक्तृत्व हे त्याचें संसारित्व होय. शेवटचा ‘ इति ’ शब्द श्लोकाचें व्याख्यान संपलें, असें सुचवितो. ] २०.

**पुरुषः प्रकृतिस्थो हि भुंक्ते प्रकृतिजान्गुणान् ।**
**कारणं गुणसंगोऽस्य सदसद्योनिजन्मसु ॥ २१ ॥**

**अन्वयार्थ—हि**—कारण—**पुरुषः**—पुरुष—**प्रकृतिस्थः**—शरीरेंद्रियांच्या रूपानें परिणत झालेल्या-शरीरेंद्रियाकार प्रकृतींत स्थित होऊन,‘ हेंच मी ’ असें मानून —**प्रकृतिजान् गुणान्**—प्रकृतीपासून उत्पन्न झालेल्या सुख-दुःख-मोहात्मक गुणांस —**भुंक्ते**—भोगतो. त्यांचा अनुभव घेतो—**अस्य**—या भोक्त्याचा—**गुणसंगः**—गुणांवरील संग-आसक्ति हेंच त्याचा—**सदसद्योनिजन्मसु**—देवादि सत् योनि व पश्वादि असत् योनि, यांत जन्म होण्याचें—**कारणं**—कारण-निमित्त आहे. २१

**यत्पुरुषस्य सुखदुःखानां भोक्तृत्वं संसारित्वमित्युक्तं तस्य तत्किंनिमित्तमित्युच्यते—पुरुषो भोक्ता प्रकृतिस्थः प्रकृतावविद्यालक्षणायां कार्यकरणरूपेण परिणतायां स्थितः प्रकृतिस्थः प्रकृतिमात्मत्वेन गत इत्येतद्धि यस्मात्तस्माद्भुक्त उपलभत इत्यर्थः। प्रकृतिजान्प्रकृतितो जातान्सुखदुःखमोहाकाराभिव्यक्तान्गुणान्सुखी दुःखी मूढः पण्डितोऽहमित्येवम्। सत्यामप्यविद्यायां सुखदुःखमोहेषु गुणेषु भुज्यमानेषु यः सङ्ग आत्मभावः संसारस्य स प्रधानं कारणं जन्मनः " स यथाकामो भवति तत्क्रतुर्भवति " इत्यादिश्रुतेः ॥**

**भाष्यार्थ—सुखदुःखानां भोक्तृत्वं पुरुषस्य संसारित्वं इति यत् उक्तं तस्य तत् किंनिमित्तं इति उच्यते**—सुखदुःखांचें भोक्तृत्व हेच पुरुषाचे संसारित्व आहे असे जें सांगितलें ते त्याचें संसारित्व कोणत्या कारणानें संभवतें ? असा प्रश्न उपस्थित झाला असतां निमित्त सांगण्यासाठीं अगोदर संसारित्व अविद्येच्या योगानें-ऐक्याध्यासामुळे आहे, असें 'पुरुषः०' या श्लोकानें सांगितले जातें.—**पुरुषः-भोक्ता**-पुरुष म्ह० भोक्ता-जीव-क्षेत्रज्ञ—**प्रकृतिस्थः-अविद्यालक्षणायां कार्यकरणरूपेण परिणतायां प्रकृतौ स्थितः प्रकृतिस्थः**—प्रकृतिस्थ म्ह० अविद्यारूप शरीरेंद्रियांच्या आकाराने परिणत झालेल्या प्रकृतींत स्थित झालेला-प्रकृतिस्थ होऊन म्ह०—**प्रकृतिं आत्मत्वेन गतः इति एतत्**—प्रकृतीला आत्मत्वाने प्राप्त झालेला, शरीरेन्द्रियाकार प्रकृतिच मी असें समजणारा,असा याचा भावार्थ.—**हि-यस्मात् तस्मात् भुङ्क्ते-उपलभते इत्यर्थः**—ज्याअर्थी पुरुष प्रकृतीला आत्मत्वाने जाणतो त्याअर्थी तो भोगतो-अनुभव घेतो, असा याचा भावार्थ. ( काय भोगतो ? उत्तर-) —**प्रकृतिजान्-प्रकृतितः जातान् सुखदुःखमोहाकाराभिव्यक्तान् गुणान्**—प्रकृतिज म्ह० प्रकृतीपासून उत्पन्न झालेल्या-सुख, दुःख व मोह यांच्या आकारानें अभिव्यक्त झालेल्या गुणांना—**अहं सुखीः दुःखीः मूढः पण्डितः इति-एवं**—मी सुखी, दुःखी, मूढ, पण्डित आहें, या अशा प्रकारें त्या गुणांचा अनुभव घेतो. ( अहोपण, अविद्या हे भोगाचे निमित्त असतांना आणखी दुसऱ्या कारणाला हुडकावयास कशाला पाहिजे ? उत्तर-)—**अविद्यायां सत्यां अपि सुख-दुःख-मोहेषु गुणेषु भुज्यमानेषु यः सङ्गः आत्मभावः सः जन्मनः-संसारस्य प्रधानं कारणं**—अविद्या हे सामान्य कारण विद्यमान असतांनाहि उपभोग घेतला जाणाऱ्या सुख, दुःख, मोह इत्यादि गुणांमध्ये जो संग म्ह० मीच सुखी, दुःखी वगैरे आत्मभाव, तो जन्मादिरूप संसाराचें मुख्य कारण आहे. ( याविषयीं प्रमाण-)—'**सः यथाकामो भवति तत्क्रतुः भवति**' **इत्यादिश्रुतेः**—'तो जशा प्रकारच्या कामानें युक्त होतो तशा निश्चयाचा होतो,' इत्यादि श्रुति याविषयीं प्रमाण आहे. (बृह. भाष्यार्थ अ. ४. ब्रा. ४ क. ५ पृ. २६७. )

१ रहस्यकार 'पुरुषः प्रकृतिस्थः प्रकृतिजान् गुणान् भुंक्ते' याचा अर्थ "कारण प्रकृतींत पुरुष अधिष्ठित झाला म्ह० प्रकृतीच्या गुणांचा तो उपभोग घेतो' असा करितात. 'प्रकृतींत पुरुष अधिष्ठित झाला' म्हणजे काय ? २ व प्रकृतीचे गुण कोणते ?

**तदेतदाह कारणं हेतुर्गुणसङ्गो गुणेषु सङ्गोऽस्य पुरुषस्य भोक्तुः,सदसद्योनिजन्मसु सत्यश्चासत्यश्च योनयः सदसद्योनयस्तासु सदसद्योनिषु जन्मानि सदसद्योनिजन्मानि तेषु सदसद्योनिजन्मसु विषयभूतेषु कारणं गुणसङ्गः। अथवा सदसद्योनिजन्मस्वस्य संसारस्य कारणं गुणसङ्ग इति संसारपदमध्याहार्यम् । सद्योनयो देवादियोनयोऽसद्योनयः पश्वादियोनयः। सामर्थ्यात्सदसद्योनयो मनुष्ययोनयोऽप्यविरुद्धा द्रष्टव्याः। एतदुक्तं भवति प्रकृतिस्थत्वाख्याऽविद्या गुणेषु च संगः कामः संसारस्य कारणमिति। तच्च परिवर्जनायोच्यते। अस्य च निवृत्तिकारणं ज्ञानवैराग्ये ससंन्यासे गीताशास्त्रे प्रसिद्धम्। तच्च ज्ञानं पुरस्तादुपन्यस्तं क्षेत्रक्षेत्रज्ञविषयम्। यज्ज्ञात्वाऽमृतमश्नुत इत्युक्तं चान्यापोहेनातद्धर्माध्यारोपेण च ॥ २१ ॥**

**भाष्यार्थ**—(याच अर्थी असलेल्या द्वितीयार्धाचे व्याख्यान-)—**तत् एतत् आह**—तेंच हें भगवान् सांगतात—**अस्य पुरुषस्य भोक्तुः गुणसङ्गः-गुणेषु सङ्गः कारणं-हेतुः**—या पुरुषाचा-भोक्त्याचा गुणसंग, गुणांमध्ये संग हेंच कारण-हेतु आहे. ( कशाचा हेतु आहे ? उत्तर-)—**सदसद्योनिजन्मसु-सत्यः च असत्यः योनयः-सदसद्योनयः तासु सदसद्योनिषु जन्मानि सदसद्योनिजन्मानि तेषु सदसद्योनिजन्मसु विषयभूतेषु कारणं गुणसङ्गः**—सत्-असत्-योनिजन्मांमध्ये—उत्तम व अधम योनी,या सत्-असत् योनि, सदसत् योनींमध्यें जे जन्म ते सदसद्योनि-जन्म त्या सदसद्योनिजन्मामध्ये–विषयभूत जन्मांमध्ये–म्ह० त्या जन्माचे गुणसंग हे कारण आहे ( किंवा ' जन्मसु ' या सप्तमीचा संबंध अधिक स्पष्टपणे लागावा म्हणून अध्याहारपूर्वक दुसरी योजना करितात-) —**अथवा सदसद्योनिजन्मसु अस्य संसारस्य कारणं गुणसङ्गः इति संसारपदं अध्याहार्यं**—किंवा सदसद्योनींत जन्म घेऊन त्या जन्मांतील या संसाराचे कारण गुणसंग आहे, असें येथें संसारपद अध्याहृत घ्यावें. ( आता सत् व असत् योनींचे विवेचन करितात– )—**देवादियोनयः-सद्योनयः असद्योनयः-पश्वादियोनयः**—सत् योनी म्ह० देवादि-योनि व असत्-योनि-पश्वादिकांच्या योनि—**सामर्थ्यात् सदसद्योनयः मनुष्ययोनयः अपि अविरुद्धाः द्रष्टव्याः**—देव व तिर्यक् या दोन उत्तमाधम योनींचा निर्देश केलेला आहे, याच सामर्थ्यावरून सदसद्योनी म्ह० मध्यवर्ती मनुष्ययोनिहि अविरुद्ध आहेत-मनुष्यांतील सद्-असत् योनीहि येथे सूचित होतात, असें जाणावें. [ अहो पण, संगच जर संसाराचें कारण असेल तर अविद्या संसारकारण नव्हे, कारण कोणत्याहि कार्याचें एकच कारण असणें, उचित होय, अशी आशंका घेऊन सांगतात. ]—

---

१तसेच 'कारणं गुणसंगोऽस्य०' याचा अर्थ "आणि प्रकृतीच्या गुणांचा हा संयोग पुरुषाला बऱ्यावाईट योनींत जन्म घेण्यास कारण होतो "असा करितात. पण ' गुणसंग ' म्ह० 'गुणांचा संयोग' हें म्हणणे चुकीचें आहे. या सर्व श्लोकाचा बरोबर व निःसंदेह अर्थ कळण्यासाठीं वाचकांनीं वरील सर्व भाष्य व भाष्यार्थ पहावा.

**एतत् उक्तं भवति**—यावरून हें सिद्ध होतें, म्ह० या सर्वांचें तात्पर्य असें आहे—**प्रकृतिस्थत्वाख्या अविद्या च गुणेषु सङ्गः-कामः संसारस्य कारणं इति**—शरीरेंद्रियरूप प्रकृतीमध्यें 'हीच मी' अशा अभिमानानें स्थित होणें, या नांवाची अविद्या व गुणांमध्ये संग-काम हे संसाराचें कारण आहे, [म्ह० अविद्या हे संसाराचें उपादान कारण व गुणसंग निमित्तकारण आहे, असा भावार्थ. पण असें हें दोन प्रकारचें संसारकारण सांगण्याचे प्रयोजन काय, तें सांगतात-]—**च तत् परिवर्जनाय उच्यते**—व तें द्विविध संसारकारण त्याचें परिवर्जन करण्यासाठीं सांगितले जातें. [अज्ञान व आसक्ति ह्या दोन्ही संसारकारणांचे निरसन करावें, म्हणून तीं येथें सांगितलीं आहेत. पण त्यांची आपोआपच निवृत्ति होणें शक्य नसल्यामुळें त्यांचा निवर्तक उपाय सांगितला पाहिजे, या आशयाने म्हणतात-]—**अस्य च निवृत्तिकारणं ससंन्यासे ज्ञानवैराग्ये गीताशास्त्रे प्रसिद्धं**—व या कारणद्वयाच्या निवृत्तींचें साधन-त्याच्या निवृत्तीचा उपाय संन्यासासह ज्ञान व वैराग्य हा आहे, हे गीताशास्त्रांत प्रसिद्ध आहे. [वैराग्य असलें म्ह० संन्यास, व संन्यासपूर्वक ज्ञान आसक्तीसह अज्ञानाची निवृत्ति करिते. याविषयीं प्रमाण-]—**च तत् क्षेत्रक्षेत्रज्ञविषयं ज्ञानं पुरस्तात् उपन्यस्तं**—आणि त्या क्षेत्रक्षेत्रज्ञांच्या ज्ञानाचा पूर्वी उपन्यास केला आहे. [व 'यज्ज्ञात्वामृतमश्नुते०' येथून 'न सत् तत् न असत् उच्यते' येथपर्यंतच्या वाक्यांत अन्यनिषेधानें व 'सर्वतः पाणिपादं०' इत्यादि वाक्यांत अनात्मधर्मांच्या अध्यारोपानें तेंच ज्ञान सांगितले आहे, असे म्हणतात-]—**च अन्यापोहेन अतद्धर्माध्यारोपेण च 'यज्ज्ञात्वामृतमश्नुते' इति उक्तं**—आणि अन्यधर्मांच्या निषेधानें व अनात्मधर्मांच्या अध्यारोपानें 'यज्ज्ञात्वा०' इत्यादि वाक्यानें तेच क्षेत्रज्ञज्ञान सांगितले आहे. २१.

उपद्रष्टानुमन्ता च भर्ता भोक्ता महेश्वरः ।
परमात्मेति चाप्युक्तो देहेऽस्मिन्पुरुषः परः ॥ २२ ॥

**अन्वयार्थ—उपद्रष्टा**—समीप राहून पाहणारा—**अनुमन्ता**—अनुमोदन देणारा,—**च**—आणि—**भर्ता**—भरण-पोषण करणारा—**भोक्ता**—भोग घेणारा,—**महेश्वरः**—सर्व ईश्वरांचाहि ईश्वर,—**परमात्मा इति च अपि**—परमात्मा असेंहि पण—**उक्तः**—बोललेला—**अस्मिन् देहे**—या देहांत—**परः पुरुषः**— पर पुरुष आहे. २२.

**तस्यैव पुनः साक्षान्निर्देशः क्रियते— उपद्रष्टा समीपस्थः सन्द्रष्टा स्वयमव्यापृतो यथर्त्विग्यजमानेषु यज्ञकर्मव्यापृतेषु तटस्थोऽन्योऽव्यापृतो यज्ञविद्याकुशल ऋत्विग्यजमानव्यापारगुणदोषाणामीक्षिता तद्वत्कार्यकरणव्यापारेष्वव्यापृतोऽन्यो विलक्षणस्तेषां कार्यकरणानां सव्यापाराणां सामीप्येन द्रष्टोपद्रष्टा । अथवा देहचक्षुर्मनोबुद्ध्यात्मानो द्रष्टारस्तेषां बाह्यो द्रष्टा देहस्तत आरभ्यान्तरतमश्च प्रत्यक्समीप आत्मा द्रष्टा । यतः परोक्ष-**

**न्तरो नास्ति द्रष्टा सोऽतिशयसामीप्येन द्रष्टृत्वादुपद्रष्टा स्यात् । यज्ञोपद्रष्टृवद्वा सर्वविषयीकरणादुपद्रष्टा ॥**

**भाष्यार्थ—तस्य एव पुनः साक्षात् निर्देशः क्रियते**—त्या प्रकृत मोक्षसाधनभूत ज्ञानाचाच 'उपद्रष्टा०' या श्लोकांत साक्षात् निर्देश केला जातो.—**उपद्रष्टा-समीपस्थः सन् द्रष्टा**—उपद्रष्टा म्ह० समीप स्थित होऊन पाहणारा, ( तथापि लौकिक द्रष्टयाप्रमाणे हा द्रष्टाहि आपल्या व्यापारानें विशिष्ट असेल व त्यामुळे त्याच्या निष्क्रियत्वाशीं विरोध येईल, अशी आशंका घेऊन सागतात-)—**स्वयं अव्यापृतः**—व स्वतः अव्यापृत-काहीच व्यापार-हालचाल न करणारा. [ स्वतःच्या व्यापारावांचून केवल सानिध्य हेच द्रष्टृत्व आहे. तेच दृष्टान्ताने स्पष्ट करितात-]—**यथा ऋत्विग्यजमानेषु यज्ञकर्मव्यापृतेषु अव्यापृतः यज्ञविद्याकुशलः ऋत्विग्यजमानव्यापारगुणदोषाणां ईक्षिता तटस्थः अन्यः**—ज्याप्रमाणें ऋत्विक् व यजमान यज्ञकर्मामध्यें व्यापृत असतांना स्वतः अव्यापृत पण यज्ञविद्येमध्ये कुशल असा, ऋत्विक् व यजमान यांच्या व्यापारातील गुण व दोष यांचा द्रष्टा-गुणदोष पाहणारा असा, दुसरा एक तटस्थ-ब्रह्मा असतो—**तद्वत् कार्यकरणव्यापारेषु अव्यापृतः अन्यः विलक्षणः तेषां सव्यापाराणां कार्यकरणानां सामीप्येन द्रष्टा उपद्रष्टा**—त्याप्रमाणे शरीर व इंद्रिये व्यापार करीत असतांना स्वतः कांहीं व्यापार न करणारा त्याहून अगदी निराळा-अगदी विलक्षण, असा त्या व्यापारयुक्त कार्यकरणांचा सामीप्यानें-समीपतेने-अगदी जवळ राहून द्रष्टा-पाहणारा-तो उपद्रष्टा ( उपद्रष्टा या शब्दाचा दुसरा अर्थ-)—**अथवा देह-चक्षुः-मनोबुद्ध्यात्मानः द्रष्टारः**—देह, चक्षु, मन, बुद्धि व आत्मा हे द्रष्टे आहेत.—**तेषां बाह्यः द्रष्टा देहः**—त्यांतील बाह्य द्रष्टा देह आहे.—**ततः आरभ्य आन्तरतमः च प्रत्यक्-समीपः आत्मा द्रष्टा स्यात्**—त्या देहापासून आरंभ करून सगळ्याच्या आतिशय आंत व प्रत्यक् म्ह० समीप असलेला जो आत्मा तो द्रष्टा आहे. [ 'उपद्रष्टा-' यांतील 'उप' या उपसर्गाचा सामीप्य हा अर्थ आहे. त्यामुळें त्या उपसर्गाला प्रत्यक्-अर्थत्व आहे. म्ह० त्याचा 'प्रत्यक्' हा अर्थ आहे. कारण त्यांतच सामीप्याचें पर्यवसान होतें. याप्रमाणें प्रत्यक्-आत्मा व तोच द्रष्टा-म्हणून उपद्रष्टा म्ह० सर्वसाक्षी प्रत्यगात्मा असा याचा भावार्थ. हाच अर्थ अधिक व्यक्त करितात-]—**यतः परः अन्तरः द्रष्टा नास्ति सः अतिशयसामीप्येन द्रष्टृत्वात् उपद्रष्टा स्यात्**—ज्याहून दुसरा आंतील द्रष्टा नाहीं, तो अतिशय सामीप्यानें द्रष्टृत्वामुळें-अतिशय समीप राहून पहात असल्यामुळें उपद्रष्टा आहे.—**वा यज्ञोपद्रष्टृवत् सर्वविषयीकरणात् उपद्रष्टा**—किंवा यज्ञाच्या उपद्रष्टयाप्रमाणें सर्वांना विषय करीत असल्यामुळें उपद्रष्टा.

**[ ज्याप्रमाणें यजमान व ऋत्विक् यांच्या यज्ञकर्मातील गुण किंवा दोष यांस समीप बसून पाहणारा सर्वयज्ञकुशल विद्वान् सर्व जाणतो त्याप्रमाणें हा चिन्मात्रस्वभाव आत्मा सर्व पाहतो म्हणून उपद्रष्टा होय. ]**

अनुमन्ता चानुमोदनमनुमननं कुर्वत्सु तत्क्रियासु परितोषस्तत्कर्ताऽनुमन्ता च । अथवाऽनुमन्ता कार्यकरणप्रवृत्तिषु स्वयमप्रवृत्तोऽपि प्रवृत्त इव तदनुकूलो विभाव्यते तेनानुमन्ता । अथवा प्रवृत्तान्स्वव्यापारेषु तत्साक्षिभूतः कदाचिदपि न निवारयतीत्यनुमन्ता । भर्ता भरणं नाम देहेन्द्रियमनोबुद्धीनां संहतानां चैतन्यात्मपारार्थ्येन निमित्तभूतेन चैतन्याभासानां यत्स्वरूपधारणं तच्चैतन्यात्मकृतमेवेति भर्ताऽऽत्मेत्युच्यते । भोक्ताऽग्न्युष्णवन्नित्यचैतन्यस्वरूपेण बुद्धेः सुखदुःखमोहात्मकाः प्रत्ययाः सर्वविषयविषयाश्चैतन्यात्मग्रस्ता इव जायमाना विभक्ता विभाव्यन्त इति भोक्ताऽऽत्मोच्यते ॥

**भाष्यार्थ**—( आतां ' अनुमन्ता च' याचें व्याख्यान करितात- )—**अनुमन्ता च -कुर्वत्सु तत्क्रियासु परितोषः अनुमोदनं-अनुमननं-तत्कर्ता अनुमन्ता च** —आणि अनुमन्ता-जे स्वतः व्यापार करणारे असतात ते तो तो व्यापार करीत असतांना ज्या त्यांच्या क्रिया त्याविषयीं परितोष व्यक्त करणे हेंच अनुमोदन-अनुमनन होय. तें करणारा हाच अनुमन्ता होय. ( याचेच दुसरें व्याख्यान- )—**अथवा अनुमन्ता-कार्यकरणप्रवृत्तिषु स्वयं अप्रवृत्तः अपि प्रवृत्तः इव तदनुकूलः विभाव्यते तेन अनुमन्ता**—किंवा अनुमन्ता म्ह० शरीरेंद्रियांच्या प्रवृत्तीमध्ये म्ह० त्यांची प्रवृत्ति सुरू असतांना क्षेत्रज्ञ-आत्मा स्वतः अप्रवृत्त असला तरी जणुंकाय स्वतः प्रवृत्त झाल्याप्रमाणेच त्या प्रवृत्तीला अनुकूल असल्याप्रमाणे प्रतीत होतो. म्हणून अनुमन्ता. ( याचाच आणखी एक अर्थ- )—**अथवा स्वव्यापारेषु प्रवृत्तान् तत्साक्षिभूतः कदाचित् अपि न निवारयति इति अनुमन्ता**—किंवा आपापल्या व्यापारांमध्यें प्रवृत्त झालेल्यांना त्यांचा साक्षिभूत आत्मा केव्हांहि निवारीत नाही, त्यांचे निवारण करीत नाहीं, म्हणून अनुमन्ता.—**भर्ता-भरणं नाम**—' भर्ता ' भरण म्हणजे —**निमित्तभूतेन चैतन्यात्मपारार्थ्येन संहतानां देहेन्द्रियमनोबुद्धीनां चैतन्याभासानां यत् स्वरूपधारणं तत् चैतन्यात्मकृतं एव**—निमित्तभूत अशा चैतन्यात्मपरार्थत्वानें संघात पावलेल्या-देह, इंद्रियें, मन व बुद्धि-यांच्या चैतन्याभासांचें जें स्वरूपधारण तें चैतन्यआत्मकृतच आहे.—**इति आत्मा भर्ता इति उच्यते**—म्हणून आत्मा ' भर्ता ' आहे, असे म्हटलें जाते. [ देह, इंद्रियें, मन व बुद्धि हीं सर्व चैतन्य-आत्म्यासाठीं प्रवृत्त होणारी आहेत. तीं सर्व त्याच्या भोगावपर्गासाठींच म्ह० भोग व मोक्ष यासाठींच प्रवृत्त होणारी आहेत. चैतन्य आत्म्याचा अर्थ-प्रयोजन साधण्यासाठींच म्ह० त्या निमित्तानेंच तीं परस्पर संघात पावतात, म्ह० एकरूप होतात. त्यांच्यामध्ये चैतन्याभास व्यक्त होतो. याप्रमाणें चैतन्याच्या आभासाने युक्त असलेल्या त्या देहेंद्रियांचे जें स्वरूपधारण ते चैतन्यात्म्यामुळेंच होय. म्हणून त्याला ' भर्ता[1] ' असे

---

१ रहस्यकार ' भर्ता ' म्ह० प्रकृतीच्या गुणात भर घालणारा, असा अर्थ करितात. पण तो कोणत्या शास्त्राप्रमाणें ? सांख्याप्रमाणे कीं वेदान्ताप्रमाणें ? पण त्यांतील कोणत्याच शास्त्राप्रमाणें तें बरोबर नाहीं.

म्हटलें आहे.—**भोक्ता**—आत्मा भोक्ता आहे. ( पण त्याला भोक्ता असें म्हटल्यास तो क्रियावान् आहे, असे म्हणावें लागतें, म्हणून ' भोगः चिदवसानता '–चैतन्यांत पर्यवसान पावणें हाच भोग आहे, या न्यायाने त्याचें स्पष्टीकरण करितात–)—**अग्न्युष्णवत् नित्यचैतन्यस्वरूपेण**—अग्नीच्या उष्णत्वाप्रमाणे नित्यचैतन्यस्वरूपानें भोक्ता म्हणजे—**बुद्धेः सुखदुःखमोहात्मकाः प्रत्ययाः सर्वविषयविषयाः चैतन्यात्मग्रस्ताः इव जायमानाः विभक्ताः विभाव्यन्ते**—बुद्धीचे सुखदुःखमोहात्मक प्रत्यय सर्वविषयांविषयींचे ह्म०सर्व विषयांचे सुख-दुःख-मोहरूप प्रत्यय चैतन्यआत्म्याकडून ग्रासले गेलेले असे उत्पन्न होणारे, अगदी पृथक् पृथक् प्रतीत होतात.—**इति आत्मा भोक्ता उच्यते**—म्हणून आत्मा भोक्ता म्हटला जातो. [ बुद्धीचे सर्व विषयानुभव आत्मचैतन्यानें व्याप्त, असेच उत्पन्न होत असलेले दिसतात. कारण चैतन्याच्या व्याप्तीवाचून त्यांचा अनुभवच संभवत नाही, म्हणून आत्म्याला भोक्ता म्हटलें आहे.

**महेश्वरः सर्वात्मत्वात्स्वतन्त्रत्वाच्च महानीश्वरश्चेति महेश्वरः । परमात्मा देहादीनां बुद्ध्यन्तानां प्रत्यगात्मत्वेन कल्पितानामविद्यया परम उपद्रष्टृत्वादिलक्षण आत्मेति परमात्मा सोऽन्तः परमात्मेत्यनेन शब्देन चाप्युक्तः कथितः श्रुतौ । क्वासावस्मिन्देहे पुरुषः परोऽव्यक्तात् । 'उत्तमः पुरुषस्त्वन्यः परमात्मेत्युदाहृतः' इति यो वक्ष्यमाणः 'क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि' इत्युपन्यस्तो व्याख्यायोपसंहृतश्च ॥ २२ ॥**

**भाष्यार्थ**—(आतां पुढील विशेषण घेऊन त्याचे व्याख्यान–)—**महेश्वरः-सर्वात्मत्वात् च स्वतंत्रत्वात् च महान् ईश्वरः इति महेश्वरः**—आत्मा महेश्वर आहे. त्याला सर्वात्मत्व असल्यामुळें व स्वतंत्रत्व असल्यामुळें व तो महान् ईश्वर–ईश्वरांचाहि ईश्वर आहे, म्हणून महेश्वर होय.—**परमात्मा**—तो परमात्मा आहे. ( त्याच्या परमात्मत्वाचेंच उपपादन–)—**देहादीनां बुद्ध्यन्तानां अविद्यया प्रत्यगात्मत्वेन कल्पितानां परमः उपद्रष्टृत्वादिलक्षणः आत्मा इतिः परमात्मा**—देहापासून बुद्धीपर्यंत अविद्येनें प्रत्यगात्मत्वानें कल्पिलेल्या–देहादिबुद्ध्यन्त पदार्थांतील परम-प्रकृष्ट–सर्वोत्तम 'उपद्रष्टा' इत्यादि लक्षणाचा–उपद्रष्टृत्वादि–स्वरूपाचा आत्मा म्हणून तो परमात्मा—**'सः अन्तः परमात्मा' इति अनेन शब्देन च अपि उक्तः-कथितः श्रुतौ**—'स अन्तः परमात्मा' अशा शब्दानेंहि श्रुतींत उक्त आहे. तोच श्रुतींत 'अन्तः परमात्मा ' म्हणून सांगितलेला आहे. ( तो कोठें तरी दूर–आत्म्याहून निराळा कोणी तरी असेल या शंकेचे समाधान प्रश्नद्वारा करितात–)—**असौ क्व अस्मिन् देहे परः पुरुषः**—तो कोठें आहे ? या देहांत पर-श्रेष्ठ पुरुष आहे. ( कोणाहून पर ? उत्तर– )—**अव्यक्तात् (परः)**—अव्यक्ताहून पर–श्रेष्ठ ( याविषयीं पुढील वाक्याचें आनुकूल्य दाखवितात– )—**' उत्तमः पुरुषः त्वन्यः परमात्मेत्युदाहृतः' इति यः वक्ष्यमाणः**—'पण परमात्मा ह्मणून म्हटलेला, उत्तम पुरुष या क्षर-अक्षर पुरुषांहून निराळा आहे ' या वाक्यानें पुढें पंधराव्या अध्यायांत जो सांगितला

जाणारा [तो या देहांतील पर पुरुष आहे.]—**'क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि ' इति उपन्यस्तः च व्याख्याय उपसंहृतः**—त्याचप्रमाणें ' क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि'-क्षेत्रज्ञहि मलाच जाण, असा ज्याचा उपन्यास केलेला असून व व्याख्यान करून उपसंहार केला गेलेला तोच पर पुरुष होय. २२.

**य एवं वेत्ति पुरुषं प्रकृतिं च गुणैः सह ।**
**सर्वथा वर्तमानोऽपि न स भूयोऽभिजायते ॥ २३ ॥**

**अन्वयार्थ—यः**—जो—**एवं**—या प्रकारे—**पुरुषं**—पुरुषाला—**च**—व—**गुणैः सह प्रकृतिं**—गुणांसह प्रकृतीला—**वेत्ति**—जाणतो—**सः**—तो—**सर्वथा वर्तमानः अपि**—कसाही जरी वागत असला तरी—**भूयः**—पुनरपि—**न अभिजायते**—उत्पन्न होत नाही. जन्म घेत नाही. २३

**तमेवं यथोक्तलक्षणमात्मानम्—य एवं यथोक्तप्रकारेण वेत्ति पुरुषं साक्षादहमिति प्रकृतिं च यथोक्तामविद्यालक्षणां गुणैः स्वविकारैः सह निवर्तितामभावमापादितां विद्यया सर्वथा सर्वप्रकारेण वर्तमानोऽपि स भूयः पुनः पतितेऽस्मिन्विद्वच्छरीरे देहान्तराय नाभिजायते नोत्पद्यते देहान्तरं न गृह्णातीत्यर्थः ॥ अपिशब्दात्किमु वक्तव्यं स्ववृत्तस्थो न जायत इत्यभिप्रायः ॥**

**भाष्यार्थ—तं एवं यथोक्तलक्षणं आत्मानं**—त्या अशा प्रकारच्या-वर सांगितलेल्या स्वरूपाच्या आत्म्याला—**यः एवं यथोक्तप्रकारेण पुरुषं साक्षात् अहं इति वेत्ति**—जो वर सांगितलेल्या प्रकाराने म्ह० जीव-ईश्वर इत्यादि सर्व विकल्पांच्या अधिष्ठानत्वाने पुरुषाला साक्षात् ' मी ' अशा प्रकारे जाणतो—**च यथोक्तां अविद्याल-**

---

१ पण रहस्यकार २१ व २२-२३ या श्लोकांचा संबंध असा लावितात— " प्रकृति व पुरुष यांच्या परस्परसंबंधाचें व भेदाचें हे वर्णन सांख्यशास्त्रांतलें आहे. " ( हे म्हणणे सर्वथा निराधार आहे. ) " आता त्यांपैकी पुरुषाला वेदान्ती परमात्मा म्हणतात, असे सांगून सांख्य व वेदान्त यांची जोड घालतात व तसे केलें म्ह० प्रकृतिपुरुषविचार व क्षेत्रक्षेत्रज्ञविचार यांची पुरी एकवाक्यता होते " पण ही अशी जोड घालण्याचे कारण काय ? भगवान् अर्जुनाला परम पुरुषार्थाचें साधन सांगावयास प्रवृत्त झाले आहेत की, सांख्य व वेदान्त यांची जोड घालावयास तयार झाले आहेत ? प्रकृति व पुरुष या शब्दांवरूनच अशी असत्कल्पना करणे केव्हांहि युक्त नव्हे. प्रकृति व पुरुष म्ह० माया व मायावी किंवा अनात्मा व आत्माच आहे आणि क्षेत्र व क्षेत्रज्ञ म्ह० प्रकृति -माया व सोपाधिक-निरुपाधिक ईश्वर. अर्थात् केवल शब्दाभासामुळें घाबरून जाऊन ' भगवान् सांख्य व वेदान्त यांचा एकवाक्यतेच करीत आहेत ' इतका अपसिद्धान्त सांगावयास तयार होणें अनुचित होय. गीतेंतील तत्त्वोपदेश केवल उपनिषदांनाच धरून आहे, हें आम्ही पुनः एकदा सांगून ठेवतों.

**क्षणां प्रकृतिं**—आणि वर सांगितलेल्या प्रकारच्या म्ह० अनादि-अनिर्वाच्य, सर्व अनर्थांची उपाधिभूत, अशा अविद्यारूप प्रकृतीला—**विद्यया गुणैः-स्वविकारैः सह निवर्तितां-अभावं आपादितां ( यः वेत्ति )**—पूर्वोक्त एकत्वज्ञानाने गुणांसह-तिच्या विकारांसह निवृत्त केलेली-अभावास प्राप्त केलेली जो जाणतो. [ पूर्वोक्त आत्म्याला-पुरुषाला ‘ हाच मी ’ अशा रीतीने जो जाणतो व गुणांसह म्ह० आपल्या विकारांसह ज्ञानानें निवृत्त केलेल्या प्रकृतीला, ब्रह्मात्मैक्यज्ञानाच्यायोगानें कार्यासह अविद्येचा अभाव आहे, असे जो जाणतो-]—**सः सर्वथा-सर्वप्रकारेण वर्तमानः अपि**—तो सर्वथा म्ह० सर्व प्रकारे-विहित किंवा निषिद्ध आचरणाने जरी वागत असला तरी—**भूयः-पुनः अस्मिन् विद्वच्छरीरे पतिते देहान्तराय न अभिजायते-न उत्पद्यते**—पुनरपि हें विद्वत्-शरीर पडले असतां-ज्या शरीरांत ज्ञान झाले तें शरीर मृत झाले असतां दुसरा देह घेण्यासाठीं जन्मतच नाहीं-उत्पन्न होत नाही—**देहान्तरं न गृह्णाति इत्यर्थः**—दुसरा देह ग्रहण करीत नाही, असा याचा भावार्थ—**अपिशब्दात् स्ववृत्तस्थः न जायते इति किमु वक्तव्यं इति अभिप्रायः**—‘ सर्वथा वर्तमानः अपि-’ कसाहि वागत असला तरी येथील ‘ अपि ’ या शब्दावरून-मग जो आपल्या सदाचरणात स्थित आहे, सदाचरण संपन्न आहे तो उत्पन्न होत नाही, हे काय सांगावें, असा याचा आशय ध्वनित होतो.

**ननु यद्यपि ज्ञानोत्पत्त्यनन्तरं पुनर्जन्माभाव उक्तस्तथाऽपि प्राग्ज्ञानोत्पत्तेः कृतानां कर्मणामुत्तरकालभाविनां च यानि चातिक्रान्तानेकजन्मकृतानि तेषां फलमदत्त्वा नाशो न युक्त इति स्युस्त्रीणि जन्मानि । कृतविप्रणाशो हि न युक्त इति । यथा फले प्रवृत्तानामारब्धजन्मनां कर्मणाम् । न च कर्मणां विशेषोऽवगम्यते । तस्मात्त्रिप्रकाराण्यपि कर्माणि त्रीणि जन्मान्यारभेरन्संहतानि वा सर्वाण्येकं जन्माऽऽरभेरन् । अन्यथा कृतविनाशे सति सर्वत्रानाश्वासप्रसङ्गः शास्त्रानर्थक्यं च स्यादित्यत इदमयुक्तमुक्तं न स भूयोऽभिजायत इति ॥**

**भाष्यार्थ**—( ‘न स भूयः अभिजायते ’ असे जे म्हटले आहे त्यावर आक्षेप-)—**ननु यद्यपि ज्ञानोत्पत्त्यनन्तरं पुनर्जन्माभावः उक्तः**—अहोपण, जरी ज्ञानोत्पत्ति झाल्याबरोबर लागलाच पुनर्जन्माचा अभाव सांगितलेला आहे—**तथापि ज्ञानोत्पत्तेः प्राक् कृतानां कर्मणां उत्तरकालभाविनां च यानि च अतिक्रान्त-अनेकजन्मकृतानि तेषां फलं अदत्त्वा नाशः न युक्तः**—तरी ज्ञानोत्पत्तीच्या पूर्वी केलेल्या कर्मांचा व ज्ञान झाल्यावर होणाऱ्या कर्मांचा आणि जीं या पूर्वीच्या अनेक जन्मीं केलेली कर्में त्या सर्वांचा फल न देतां नाश होणें योग्य नव्हे,—**इति त्रीणि जन्मानि स्युः**—म्हणून आणखी तीन जन्म तरी अवश्य होतील. [ कारण, प्रस्तुत जन्मांत ज्ञानाच्या पूर्वी केलेल्या शुभाशुभ कर्मांसाठी एक जन्म, ज्ञानानंतर घडणाऱ्या कर्मांसाठीं दुसरा जन्म व ‘ नाभुक्तं क्षीयते कर्म ’ भोगावांचून कर्मक्षय होत नाहीं, या स्मृतिवचनाप्रमाणे पूर्व अनेक जन्मकृत कर्मांसाठीं तिसरा जन्म, असे तीन जन्म तरी

अवश्य होणारच. कारण फल दिल्यावांचून कर्मांचा नाश होणे अयोग्य आहे, असें सांगतात-]—**हि कृतविप्रणाशः न युक्तः इति**—कारण कृतकर्मांचा फलावांचून नाश होणे, अयोग्य आहे. म्ह० कृतविप्रणाश हा दोष येणें योग्य नव्हे, म्हणून फल न देतां कर्मांचा नाश होत नाहीं. ( याविषयीं दृष्टान्त-)—**यथा फले प्रवृत्तानां आरब्धजन्मनां कर्मणाम्**—ज्याप्रमाणें फलामध्यें प्रवृत्त झालेल्या, ज्यांनीं जन्माचा आरंभ केला आहे अशा कर्मांचा क्षय ज्ञानानें होत नाहीं, त्याप्रमाणेंच पूर्वोक्त कर्मांचाहि नाश ज्ञानानें होणार नाहीं ('अहोपण, फलोन्मुख न झालेल्या कर्मांचा ज्ञानानें नाश होणें युक्त आहे. कारण त्यांचे फल प्रवृत्त झालेलें नसतें, पण प्रारब्धकर्मांचा तसा नाश होऊं शकत नाहीं. कारण त्याच्या फलाला पूर्वींच आरंभ झालेला असल्यामुळें प्रारब्धकर्म प्रबल असतें,' म्हणून तुम्ही वेदान्ती म्हणाल तर ते बरोबर नाहीं. कारण-)—**च कर्मणां विशेषः न अवगम्यते**—कर्मांचा विशेष अवगत होत नाहीं. [सर्वच कर्में अज्ञानापासून उद्भवलेलीं असल्यामुळे त्यांचा ज्ञानाशीं एकसारखाच विरोध आहे. त्यामुळें त्यांतील अप्रवृत्तफल-संचित व क्रियमाण कर्मे मात्र ज्ञानाने क्षीण होतात व प्रवृत्तफल-प्रारब्धकर्मैं ज्ञानाने क्षीण होत नाहीत, असा विशेष उपपन्न होत नाहीं. याप्रमाणे फल दिल्यावांचून कर्मांचा नाश संभवत नाहीं, असे ठरले असतां काय निष्पन्न होतें तें वादी सांगतो-] —**तस्मात् त्रिप्रकाराणि अपि कर्माणि त्रीणि जन्मानि आरभेरन्**—म्हणून तीन प्रकारचींहि कर्मे तीन जन्माचा आरंभ करतील. [ अहोपण कर्मे बहुत असल्यामुळे त्याचे फल. असे जे जन्म ते तीनच होऊन कसें भागेल ? पूर्वसंचित कर्म, या जन्मांतील ज्ञानपूर्वकालीन कर्म व ज्ञानोत्तर क्रियमाण कर्म असे त्याचे तीन प्रकार संभवत असल्यामुळे त्या तीन प्रकारच्या कर्मासाठीं तीन जन्म होतील, म्हणून म्हणाल तर ते बरोबर नाहीं. कारण त्या तिन्ही प्रकारच्या कर्मांचा अनारब्ध-संचित कर्म या एकाच प्रकारात अन्तर्भाव होतो, असे कोणी म्हणेल म्हणून वादी म्हणतो-]—**वा संहतानि सर्वाणि एकं जन्म आरभेरन्**—किंवा तीं तिन्ही प्रकारचीं कर्मे एकत्र मिळून एका जन्माचा आरंभ करतील. [ त्यामुळे ज्ञानाला नित्य-अव्यभिचारी-फलत्व नाहीं. ज्ञान नियमाने मोक्ष हें फल देते असे म्हणता येत नाहीं. अर्थात् वर सांगितलेल्या तीन प्रकारच्या कर्मामुळे जन्म घ्यावा लागत नाहीं, असें म्हटल्यास अतिप्रसंग कसा ओढवतो ते वादी सांगतो-]—**अन्यथा कृतविनाशे सति सर्वत्र अनाश्वासप्रसंगः शास्त्रानर्थक्यं च स्यात्**—पूर्वोक्त तीन प्रकारच्या कर्मामुळें तीन जन्म, निदान त्या त्रिविध कर्मांमुळे एक तरी जन्म घ्यावा लागतोच असें न मानल्यास सर्वत्र म्ह० प्रारब्धकर्मावरहि कांहीं विश्वास नाहीं, असें म्हणण्याचा प्रसंग येतो. [म्हणजे प्रारब्धकर्म फल देतेंच असा निश्चय करितां येत नाहीं. ] तसेंच कर्में जन्माचा आरंभ करित नाहींत, असें झाल्यास कर्मकांडरूप शास्त्राला आनर्थक्य येतें. पारलौकिक फलासाठीं कर्मांचें विधान करावयास प्रवृत्त झालेलें कर्मकांड व्यर्थ ठरतें. [ अर्थात् ज्ञान जरी झालें तरी अप्रवृत्तफल-संचित कर्मामुळें दुसरा जन्म होणे, अपरिहार्य आहे, असें ठरलें असतां फलित सांगतात-]—**इति-अतः ' न स भूयोऽभिजायते ' इति अयुक्तं उक्तं**—यास्तव 'तो पुनः जन्म घेत नाहीं' हें भगवानांनीं अयुक्त सांगितलें आहे,

न, " क्षीयन्ते चास्य कर्माणि " " ब्रह्म वेद ब्रह्मैव भवति " " तस्य तावदेव चिरमिषीकातूलवत्सर्वकर्माणि प्रदूयन्ते " इत्यादिश्रुतिशतेभ्य उक्तो विदुषः सर्वकर्मदाहः। इहापि चोक्तो यथैधांसीत्यादिना सर्वकर्मदाहः। वक्ष्यति चोपपत्तेश्च । अविद्याकामक्लेशबीजनिमित्तानि हि कर्माणि जन्मान्तराङ्कुरमारभन्ते। इहापि च साहंकाराभिसंधीनि कर्माणि फलारम्भकाणि नेतराणीति तत्र तत्र भगवतोक्तम् । " बीजान्यग्न्युपदग्धानि न रोहन्ति यथा पुनः । ज्ञानदग्धैस्तथा क्लेशैर्नाऽऽत्मा संपद्यते पुनः " इति च ॥

**भाष्यार्थ**—( आचार्य श्रुतींच्या आधारानें या शंकेचा परिहार करितात-)—**न " क्षीयन्ते च अस्य कर्माणि " " ब्रह्म वेद ब्रह्मैव भवति " " तस्य तावदेव चिरं० " "इषीकातूलवत् सर्वकर्माणि प्रदूयन्ते" इत्यादि श्रुतिशतेभ्यः**—हा आक्षेप बरोबर नाही. कारण ' ज्ञान होतांच या विद्वानाचीं सर्व कर्मे क्षीण होतात. ' ( मुंड. भाष्यार्थ. पृ. ७९ ) ' जो या पर ब्रह्माला जाणतो तो ब्रह्मच होतो. ' ( मुं. भा. पृ. ११८ ) ' त्याच्या सद्रूपतेला शरीरपात होईपर्यंतच काय तो अवधि असतो ' ( छां. भा. पृ. ४९२ ) ' अग्नींत टाकलेलें तृणाचें अग्र जसें जळून जातें, त्याप्रमाणें सर्व कर्मे जळतात. ' ( छा. भा. पृ. ४०८ ) इत्यादि अनेक श्रुतींवरून-अशा अनेक श्रुति प्रमाण असल्यामुळे—**विदुषः सर्वकर्मदाहः उक्तः**—विद्वानाच्या सर्व कर्मांचा दाह सांगितला आहे. ( ज्ञानानें अनारब्ध-आरब्धेतर कर्मांचा दाह भगवानांनाहि संमत आहे, असें सांगतात-)—**इह अपि च ' यथा एधांसि ' इत्यादिना सर्वकर्मदाहः उक्तः**—आणि येथेंहि-या गीताशास्त्रांत ' यथा एधांसि ' ( अ. ४ श्लो. ३७ पृ. ४५६ ) इत्यादि श्लोकानें सर्वकर्मांचा दाह सांगितला आहे.—**वक्ष्यति च उपपत्तेः**—ज्ञानाधीन सर्वकर्मदाह आहे, याविषयीं भगवान् 'सर्वधर्मान् परित्यज्य०' अ. १८.६६ इत्यादि पुढे सांगतील. तशीच 'ज्ञानानें सर्व अनारब्ध म्ह० संचित व क्रियमाण कर्मांचा नाश होतो,' याविषयीं युक्तिहि सांगता येणें शक्य आहे. ( त्या युक्तीचेंच विवरण-)—**अविद्या-काम-क्लेशबीजनिमित्तानि हि कर्माणि जन्मान्तरांकुरं आरभन्ते**—अज्ञाची अविद्या-अस्मिता-राग-द्वेष-अभिनिवेश या नांवाचीं जीं क्लेशात्मक सर्व अनर्थांचीं बीजें त्यांच्या निमित्तानें होणारीं धर्माधर्मसंज्ञक कर्मे दुसऱ्या जन्माच्या अंकुराचा आरंभ करितात, हें शास्त्रांत प्रसिद्ध आहे. [ पण विद्वानाचीं तीं क्लेशरूप जन्मबीजें आत्मज्ञानानें दग्ध झालेलीं असतात. त्यामुळें तीं नुस्तीं प्रतिभासरूप असतात. तीं त्याच्या दुसऱ्या जन्माचीं आरंभक होत नाहींत. कारण दग्धपटाप्रमाणें तीं आपलें कार्य करण्यास समर्थ नसतात. प्रतीतिमात्रस्वरूप कर्माभासांना फलारंभकत्व नाहीं, याविषयीं भगवानांची संमति दाखवितात-]—**इह अपि च साहंकाराभिसंधीनि कर्माणि फलारम्भकाणि इतराणि न इति तत्र तत्र भगवता उक्तम्**—येथेंहि-या गीताशास्त्रांतहि ' मी कर्ता ' हा अहंकार व फलाची इच्छा यांनीं युक्त असलेलीं कर्मे फलचा आरंभ करणारीं होतात, इतर कर्मे

तशीं फलारंभक नसतात, असें ठिकठिकाणीं भगवानांनी सांगितलें आहे. ( तत्त्वज्ञानानंतर केवल प्रतीतिमात्र भासणाऱ्या क्लेशांना कर्माच्या द्वारा देहाचें अनारंभकत्व आहे, याविषयीं दुसरें एक वाक्य प्रमाण देतात-)—'**यथा अग्न्युपदग्धानि बीजानि पुनः न रोहन्ति तथा ज्ञानदग्धैः क्लेशैः आत्मा पुनः न संपद्यते' इति च**—ज्याप्रमाणे अग्नींत किंवा अग्नीवर भाजलेली बीजें पुनः उगवत नाहींत, त्यांच्यापासून अंकुर निघत नाहीं त्याप्रमाणे ज्ञानानें दग्ध झालेल्या क्लेशांनी पुनः शरीराची उत्पत्ति होत नाहीं, असें वचन आहे.

**अस्तु तावज्ज्ञानोत्पत्त्युत्तरकालकृतानां कर्मणां ज्ञानेन दाहो ज्ञानसहभावित्वात् । न त्विह जन्मनि ज्ञानोत्पत्तेः प्राक्कृतानामतीतानेकजन्मान्तरकृतानां च दाहो युक्तः । न । सर्वकर्माणीतिविशेषणात् । ज्ञानोत्तरकालभाविनामेव सर्वकर्मणामिति न, संकोचे कारणानुपपत्तेः ॥**

**भाष्यार्थ**—( वादी 'ज्ञानानंतर होणाऱ्या भावि कर्माचा ज्ञानाने दाह होतो,' एवढी गोष्ट कबूल करितो-)—**ज्ञानोत्पत्ति-उत्तरकालकृतानां कर्मणां ज्ञानेन दाहः अस्तु तावत्**—ज्ञानाची उत्पत्ति झाल्यावर-ज्ञानोत्तरकालीं केलेल्या कर्माचा ज्ञानाने दाह होत असेल तर तो एक होवो—**ज्ञानसहभावित्वात्**—कारण त्या कर्मांना ज्ञानसहभावित्व असतें म्ह० तीं कर्में ज्ञान असताना घडत असतात.—**तु इह जन्मनि ज्ञानोत्पत्तेः प्राक् कृतानां च अतीत-अनेकजन्मान्तरकृतानां (कर्मणां) दाहः न युक्तः**—पण या जन्मीं ज्ञान उत्पन्न होण्यापूर्वी केलेल्या व मागील अनेक जन्मान्तरीं केलेल्या कर्माचा ज्ञानाने दाह होणें योग्य नव्हे.(आचार्य या म्हणण्याचा निषेध करितात-)—**न । सर्वकर्माणि इति विशेषणात्**—असें म्हणतां येत नाहीं. कारण पूर्वोक्त श्रुति व स्मृति यांत 'सर्व कर्म' असें विशेषण दिलें आहे. म्ह० कर्मशब्दाला 'सर्व' हें विशेषण लावलें आहे. ( वादी सर्वशब्दाच्या अर्थाचा संकोच करावा, असें म्हणतो-)—**ज्ञानोत्तरकालभाविनां एव सर्वकर्मणां इति चेत्**—ज्ञानोत्तरकालीं घडणाऱ्याच तेवढ्या सर्व कर्माचा ज्ञानाने दाह होतो, असें समजावें, म्हणून म्हणशील तर ( आचार्य या संकोचाचा निषेध करितात-)—**न । संकोचे कारणानुपपत्तेः**—तसा संकोच करितां येत नाहीं. कारण तसा संकोच करण्याचें कांहीं कारणच उपपन्न होत नाहीं.

**यत्तूक्तं यथा वर्तमानजन्मारम्भकाणि कर्माणि न क्षीयन्ते फलदानाय प्रवृत्तान्येव सत्यपि ज्ञाने तथाऽनारब्धफलानामपि कर्मणां क्षयो न युक्त इति । तदसत् । कथं, तेषां मुक्तेषुवत्प्रवृत्तफलत्वात् । यथा पूर्वं लक्ष्यवेधाय मुक्त इषुर्धनुषो लक्ष्यवेधोत्तरकालमप्यारब्धवेगक्षयात्पतनेनैव निवर्तते एवं शरीरारम्भकं कर्म शरीरस्थितिप्रयोजने निवृत्तेऽप्यासंस्कारवेगक्षयात्पूर्ववद्वर्तत एव । स एवेषुः प्रवृत्तिनिमित्तानारब्धवेगस्त्वमुक्तो धनुषि प्रयुक्तोऽप्युपसंह्रियते तथाऽनारब्धफलानि कर्माणि स्वाश्रयस्थान्येव ज्ञानेन**

**निर्बीजी क्रियन्त इति पतितेऽस्मिन्विद्वच्छरीरे 'न स भूयोऽभिजायते' इति युक्तमेवोक्तमिति सिद्धम् ॥ २३ ॥**

**भाष्यार्थ**—( आतां आक्षेप करितांना वाद्याने जें म्हटलें होतें त्याचाच, समाधान करण्यासाठीं,आचार्य अनुवाद करितात-)—**यत् तु उक्तं**—आतां तुम्ही आपेक्ष घेतांना जें म्हटले की,—**यथा वर्तमानजन्मारम्भकाणि कर्माणि फलदानाय प्रवृत्तानि एव ज्ञाने सति अपि न क्षीयन्ते**—ज्याप्रमाणें वर्तमानजन्माचीं आरंभक कर्मे, तीं आपलें फल देण्यास प्रवृत्त झालेलींच असतांना ज्ञान जरी झालें तरी क्षीण होत नाहींत.—**तथा अनारब्धफलानां कर्मणां अपि क्षयः न युक्तः इति**—त्याप्रमाणें ज्यांच्या फलाचा आरंभ झालेला नाहीं अशा कर्माचाहि क्षय ज्ञानाने होणें युक्त नव्हे, ( असें जें वर म्हटलें )—**तत् असत्**—ते अयुक्त आहे [ त्या तुमच्या म्हणण्याला आभासत्व आहे. अहोपण व्याप्ती वगैरे असतांना त्याला आभास कसे म्हणता येईल? अशा आशयाने वादी विचारतो-]—**कथं**—ते म्हणणे अयुक्त कसे ? [ प्रवृत्तफलत्व या उपाधीमुळें 'कर्मत्व' या हेतूच्या, जेथे जेथें कर्म तेथे तेथे फलारंभकत्व, या व्याप्तीचा भंग होतो. त्यामुळें तुमच्या म्हणण्याला आभासत्व आहे, असें आचार्य सांगतात-]—**तेषां मुक्तेषुवत् प्रवृत्तफलत्वात्**—त्या प्रारब्ध कर्मांना सोडलेल्या बाणाप्रमाणें प्रवृत्तफलत्व आहे. म्ह० त्यांच्या फलाला आरंभ झालेला आहे.—**यथा पूर्वं लक्ष्यवेधाय धनुषः मुक्तः इषुः लक्ष्यवेधोत्तरकालं अपि आरब्धवेगक्षयात् पतनेन एव निवर्तते**—ज्याप्रमाणें पूर्वी लक्ष्याला वेध करण्यासाठी धनुष्यापासून सोडलेला बाण लक्ष्याला वेध केल्यावरहि-त्यानंतरहि आरब्ध वेगाचा क्षय झाल्यामुळे खाली पडूनच निवृत्त होतो—**एवं शरीरारंभकं कर्म शरीरस्थितिप्रयोजने निवृत्ते अपि**—त्याप्रमाणें प्रस्तुत शरीराचा आरंभ करणारें कर्म, शरीरस्थितीचें प्रयोजन जरी होऊन गेलें असलें तरी,—**आसंस्कारवेगक्षयात् पूर्ववत् वर्तते एव**—कर्माच्या संस्काराचा वेग क्षीण होईपर्यंत पूर्वीप्रमाणें राहतेच. [ धनुष्यापासून सोडलेला बाण, त्याला मध्येंच जर त्याहून बलाढ्य असा दुसरा प्रतिबंध न झाला तर,मध्येच पडत नाहीं. त्याचप्रमाणें, तसाच काहीं तरी प्रबल प्रतिबंध असल्यावाचून प्रारब्ध कर्माचा भोगाशिवाय क्षय होत नाहीं.तत्त्वज्ञान हा काहीं प्रारब्धकर्माचा तसा प्रबळ प्रतिबंध नव्हे.कारण ज्ञान जेव्हां उत्पन्न होतें तेव्हांच पूर्वप्रवृत्त कर्माकडून त्याची प्रारब्धाला जाळण्याची शक्ति प्रतिबद्ध केली जाते. असो; 'जेथें ज्ञानानें अदाह्यत्व तेथेंच प्रवृत्तफलत्व' असा अन्वय जरी असला तरी जेथें 'अप्रवृत्तफलत्व तेथें ज्ञानदाह्यत्व' अशा व्यतिरेकाची सिद्धि होत नाहीं, अशी आशंका घेऊन सांगतात- ]—**तु सः एव प्रवृत्तिनिमित्त-अनारब्धवेगः अमुक्तः इषुः धनुषि प्रयुक्तः अपि उपसंह्रियते**—पण तोच, ज्यानें आपल्या प्रवृत्तीला निमित्त अशा वेगाला आरंभ केलेला नाहीं म्ह० धनुष्यापासून न सोडलेला बाण धनुष्याला जरी जोडलेला असला तरी त्याचा उपसंहार केला जातो, त्याला परत घेतां येतें,—**तथा अनारब्धफलानि कर्माणि स्वाश्रयस्थानि एव**

**ज्ञानेन निर्बीजीक्रियन्ते**—त्याच प्रमाणें ज्यांनी आपल्या फलाचा आरंभ केलेला नाहीं व जीं आभासयुक्त अन्तःकरण याच आश्रयांत स्थित आहेत, तीच कर्मे ज्ञानाकडून निर्बीज केलीं जातात. [ अनारब्ध कर्में तत्त्वज्ञानानें निवृत्त होतात. कारण त्यांच्या आश्रयभूत कारणाची ज्ञानाने निवृत्ति होते. रज्जुसर्पादिकांप्रमाणें. तात्पर्य विद्वानाचें वर्तमान शरीर मृत झालें असतां, दुसऱ्या देहाच्या उत्पत्तीचें कांहीं निमित्तच उरत नसल्यामुळें तत्त्वज्ञान 'नित्य मोक्ष' हें फल नियमानें देणारें आहे, असा उपसंहार करितात-]—**इति अस्मिन् विद्वत्-शरीरे पतिते ' न स भूयो अभिजायते ' इति युक्तं एव उक्तं इति सिद्धं**—यास्तव विद्वानाचें हें शरीर पतित-मृत झालें असतां-' तो पुनरपि जन्म घेत नाहीं ' असें जे म्हटलें आहे ते युक्तच आहे हें सिद्ध झालें.

---

१ रहस्यकार २२ व २३ श्लोकांवरील टीपेंत म्हणतात-" पुरुष म्ह० देहांतील परमात्मा असें २२ व्या श्लोकात ठरविल्यावर सांख्यशास्त्राप्रमाणें पुरुषाचे जें उदासीनत्व व अकर्तृत्व तेंच आतां आत्म्याचे अकर्तृत्व होतें व सांख्यांच्या उपपत्तीची व वेदान्ताची एकवाक्यता होते " ( पण हा इतका असंबद्ध व निरर्थक घोटाळा करण्याचें भगवानांना किंवा व्यासींनाहि काहीं कारण दिसत नाहीं. अर्थात् रहस्यकारांची ही कल्पना सर्वथा अनुपपन्न आहे.) " सांख्य म्ह० वेदान्ताचे शत्रु होत, अशा वेदान्तातील कित्येक ग्रंथकाराची समजूत असून पुष्कळ वेदान्ती सांख्यउपपत्ति सर्वथा त्याज्य मानितात. पण गीतेंत तसें न करितां क्षेत्रक्षेत्रज्ञविचार हा एकच विषय एकदां वेदान्तदृष्ट्या व एकदा (वेदान्ताचे मत न सोडिता ) सांख्यदृष्ट्या प्रतिपादन केला आहे. यावरून गीताशास्त्राची समबुद्धि व्यक्त होते. " ( पण रहस्यकार ज्याना ब्रह्मसूत्रकार समजतात त्या बादरायण व्यासांपर्यंत सांख्याला वेदान्ताचे शत्रु मानणारांची परंपरा जाते, हे मात्र येथे रहस्यकार विसरलेसें दिसतें कारण, ब्रह्मसूत्रात सांख्यदर्शनाचें खंडन वारंवार केले आहे, व त्याच ब्रह्मसूत्रकारानी प्राचीन गीतेचें शोधन केलें, इतकेच नव्हे तर आपल्या ब्रह्मसूत्रांनाहि त्यांत घुसडून दिलें! ( गी र. पृ. ५२९ व गी. भा. पृ. ९०६,७ पहा ) गीतेशीं इतका अतिप्रसंग ज्याना करिता आला त्यांनी ब्रह्मसूत्रांत पुनः पुनः प्रसंग आणून ' प्रधानमल्लनिबर्हण-'न्यायानें ज्याचा खरपूस समाचार घेतला, त्याच कापिल सांख्याची गीतेंत वेदान्ताशीं केलेली एकवाक्यता, तिचे शोधन करण्याचा निरंकुश अधिकार प्राप्त झाला असतां तशीच राहूं दिली असेल, हें संभवते तरी कसें ? अर्थात् रहस्यकारांची ही कल्पना अतिशय क्लिष्ट व सर्व भाष्यकार आणि टीकाकार यांच्या विरुद्ध असल्यामुळे सर्वथा त्याज्य होय.) अर्थात् " किंबहुना उपनिषदांतील आणि गीतेंतील विवेचनांतला हा एक महत्त्वाचा भेद होय. " इत्यादि रहस्यकाराची वाक्ये केवल उपेक्ष्यच होत. " सांख्यांचा द्वैतवाद गीतेस मान्य नसला तरी सांख्यांच्या प्रतिपादनांत जें कांहीं सयुक्तिक दिसेल ते गीतेस अमान्य नाहीं, हें यावरून दिसून येतें " पण रहस्यकार ज्याला ' सांख्यांच्या प्रतिपादनांतील सयुक्तिक' म्हणतात तेंच जर उपनिषदांत असेल तर गीता अगोदर ते घेईल की अगोदर सांख्यांना कवटाळील ? कारण गीता स्मृति आहे. उपनिषदांत अद्वैत आहे. गीताहि अद्वैतमताचें प्रतिपादन करते, असें रहस्यकारच म्हणतात. शिवाय गीतेला उपनिषद्, ब्रह्मविद्या, योग-

ध्यानेनात्मनि पश्यन्ति केचिदात्मानमात्मना ।
अन्ये सांख्येन योगेन कर्मयोगेन चापरे ॥ २४ ॥

**अन्वयार्थ—केचित्**—कांहीं योगी—**आत्मानं**—प्रत्यगात्म्याला—**आत्मनि**—बुद्धीत—**ध्यानेन**—ध्यानानें—**आत्मना**—ध्यानानें सुसंस्कृत झालेल्या अन्तःकरणानें—**पश्यन्ति**—पाहतात—**अन्ये**—दुसरे—**सांख्येन योगेन**—सांख्य योगानें—**च**—आणि—**अपरे**—दुसरे कित्येक—**कर्मयोगेन**—ईश्वरार्पण बुद्धीनें केलेल्या कर्मानुष्ठानानें—( **पश्यन्ति** )—त्याला पाहतात. २४.

**अत्राऽऽत्मदर्शन उपायविकल्पा इमे ध्यानादय उच्यन्ते—ध्यानेन ध्यानं नाम शब्दादिभ्यो विषयेभ्यः श्रोत्रादीनि करणानि मनस्युपसंहृत्य मनश्च प्रत्यक्चेतयितर्येकाग्रतया यच्चिन्तनं तद्ध्यानम् । तथा ध्यायतीव बको ध्यायतीव पृथिवी ध्यायन्तीव पर्वता इत्युपमोपादानात्तैलधारावत्संततोऽविच्छिन्नप्रत्ययो ध्यानं तेन ध्यानेनाऽऽत्मनि बुद्धौ पश्यन्त्यात्मानं प्रत्यक्चेतनमात्मना ध्यानसंस्कृतेनान्तःकरणेन केचिद्योगिनः । अन्ये सांख्येन योगेन सांख्यं नाम—इमे सत्त्वरजस्तमांसि गुणा मया दृश्या अहं तेभ्योऽन्यस्तद्व्यापारसाक्षिभूतो नित्यो गुणविलक्षण आत्मेति चिन्तनमेष सांख्यो योगस्तेन पश्यन्त्यात्मानमात्मनेति वर्तते । कर्मयोगेन कर्मैव योग ईश्वरार्पणबुद्ध्याऽनुष्ठीयमानं घटनरूपं योगार्थत्वाद्योग उच्यते गुणतः । तेन सत्त्वशुद्धिज्ञानोत्पत्तिद्वारेण चापरे॥**

**भाष्यार्थ—अत्र आत्मदर्शने इमे ध्यानादयः उपायविकल्पाः उच्यन्ते**—आतां या आत्मदर्शनाविषयीं हे ध्यानादिक उपायविकल्प-निरनिराळे उपाय सांगितले जातात.—**ध्यानेन-ध्यानं नाम शब्दादिभ्यः विषयेभ्यः श्रोत्रादीनि करणानि मनसि उपसंहृत्य**—ध्यानानें-ध्यान म्हणजे ? ( उत्तर-) शब्दादि विषयांपासून श्रोत्रादि इंद्रियांचा मनांमध्यें उपसंहार करून—**च मनः प्रत्यक चेतयितरि एकाग्रतया यत् चिन्तनं तत् ध्यानं**—व मनाचा प्रत्यगात्म्यामध्ये एकाग्रतेने उपसंहार करून प्रत्यक् चेतयिता जो आत्मा त्याच्याविषयींचें जे चिंतन करणे तें ध्यान होय. (तें चिंतनच दृष्टान्तानें स्पष्ट करितात-)—**तथा बकः ध्यायति इव पृथिवी ध्यायति इव पर्वताः ध्यायन्ति इव-इति उपमोपादानात्**—या विवक्षित ध्यानाच्या अनुरोधानें ' बगळा जणुं काय ध्यान करतो आहे. पृथिवी जणुं काय ध्यान करीत आहे. पर्वत जणुं काय ध्यान करीत आहेत' अशा उपमांचें ग्रहण केले जात असल्यामुळें—**तैलधारावत् संततः अविच्छिन्नः प्रत्ययः ध्यानं**—तेलाच्या धारेप्रमाणें संतत-अविच्छिन्न प्रत्यय हेंच ध्यान होय.—**तेन ध्यानेन केचित्-योगिनः**

---

शास्त्र वगैरे म्हटले आहे. या सर्व गोष्टींचा विचार केला असता गीतेला वेदान्त व सांख्यदर्शन यांची खिचडी बनविण्याचा रहस्यकारांनीं जो प्रयत्न केला आहे, तो सर्वथा अनुपपन्न आहे, हे कोणाच्याहि लक्षांत येईल.

**आत्मनि-बुद्धौ आत्मानं-प्रत्यक्चेतनं आत्मना ध्यानसंस्कृतेन अन्तः-करणेन पश्यन्ति**—त्या ध्यानानें कित्येक योगी–ध्यायी–ध्यान करणारे उत्तमाधिकारी आत्म्यामध्यें म्ह०बुद्धींत आत्म्याला–प्रत्यक्-चेतनाला परमात्मत्वानें आत्म्यानें म्ह० ध्यानानें संस्कृत झालेल्या अन्तःकरणानें पाहतात.—**अन्ये सांख्येन योगेन**—दुसरे कांही मध्यमाधिकारी सांख्य योगाने,—**सांख्यं नाम**—पण सांख्य म्हणजे काय?(उत्तर-)—**इमे सत्त्वरजस्तमांसि गुणाः मया दृश्याः**—हे सत्त्व, रज व तम गुण मजकडून दृश्य–पाहिले जाण्यास योग्य आहेत—**अहं तेभ्यः अन्यः तद्व्यापार-साक्षिभूतः नित्यः गुणविलक्षणः आत्मा इति चिन्तनं**—मी त्या गुणांहून अन्य, त्यांच्या व्यापारांचा साक्षिभूत, नित्य, गुणांहून अगदीं विलक्षण स्वभावाचा आत्मा आहें, असें चिंतन करणे,—**एषः सांख्यः योगः तेन पश्यन्ति आत्मानं आत्मना इति वर्तते**—हा सांख्ययोग होय. या सांख्ययोगाने 'प्रत्यगात्म्याला सुसंस्कृत अन्तः-करणाने पाहतात,' अशी मागील पदांची अनुवृत्ति होते. [ सांख्य म्ह० विचारजन्य ज्ञान, तेच ज्ञान आत्मसाक्षात्काराला हेतु असल्यामुळे योगासारखे आहे, म्हणून योग होय. आतां अधम अधिकाऱ्यांचे साधन सांगतात– ]—**कर्मयोगेन-कर्म एव योगः ईश्वरार्पणबुद्ध्या अनुष्ठीयमानं घटनरूपं योगार्थत्वात् योगः गुणतः उच्यते**—कर्मयोगाने–कर्म हाच योग–ईश्वरार्पणबुद्धीने अनुष्ठान केलें जाणारें प्रयत्न-रूप–कृतिरूप–कर्म, तेच योगासाठी असल्यामुळे 'योग' असे गुणतः–गौणवृत्तीने म्हटलें जातें. [ चित्तैकाग्र्य हा मुख्य योग होय. चित्तशुद्धीला कारण होणारे कर्म, त्या चित्तै-काग्र्यरूप योगासाठी असल्यामुळे गौणवृत्तीने 'योग' होय. ]—**च अपरे तेन सत्त्वशुद्धि-ज्ञान-प्राप्तिद्वारेण ( आत्मानं पश्यन्ति )**—आणि दुसरे–अधम अ-धिकारी त्या कर्मयोगाने चित्तशुद्धि-ज्ञानप्राप्ति यांच्या द्वारा आत्म्याला पाहतात. २४.

> अन्ये त्वेवमजानन्तः श्रुत्वाऽन्येभ्य उपासते ।
> तेऽपि चातितरन्त्येव मृत्युं श्रुतिपरायणाः ॥ २५ ॥

**अन्वयार्थ**—**तु**—पण—**एवं**—वर सांगितलेल्या प्रकारांतील एकाहि प्रकारानें—**अजानन्तः**—आत्म्याला न जाणणारे—**अन्ये**—दुसरे काही साधक—**अन्येभ्यः**—दुसऱ्या आचार्यांपासून—**श्रुत्वा**—याचेंच चिंतन करा, असे ऐकून—**उपासते**—श्रद्धेनें उपासना करितात.—**ते श्रुतिपरायणाः अपि**—ते श्रवणपरायण असलेले साधकहि–ज्यांच्या मोक्षमार्गप्रवृत्तीचे श्रवण हेंच परम साधन आहे ते सुद्धां—**मृत्युं**—मृत्युयुक्त संसारास—**अतितरन्ति एव च**—उल्लंघून जातातच. २५.

---

१ रहस्यकार या श्लोकाचा अर्थ "कांही लोक आपण होऊनच आपल्या ठायीं ध्यानाने आत्म्याला पाहतात," असा करितात.पण 'आपण होऊनच व आपल्या ठायीं'ह्मणजे काय ते कळत नाही. तेच आचार्यांचें भाष्य पहा, म्हणजे सोने कोणते व पितळ कोणती याची परीक्षा लागलीच होईल.

**अन्ये त्विति । अन्ये त्वेषु विकल्पेष्वन्यतरेणाप्येवं यथोक्तमात्मानमजानन्तोऽन्येभ्य आचार्येभ्यः श्रुत्वेदमेव चिन्तयतेत्युक्ता उपासते श्रद्दधानाः सन्तश्चिन्तयन्ति तेऽपि चातितरन्त्येवातिक्रामन्त्येव मृत्युं मृत्युयुक्तं संसारमित्येतत् । श्रुतिपरायणाः श्रुतिः श्रवणं परमयनं गमनं मोक्षमार्गप्रवृत्तौ परं साधनं येषां ते श्रुतिपरायणाः केवलपरोपदेशप्रमाणाः स्वयं विवेकरहिता इत्यभिप्रायः । किमु वक्तव्यं प्रमाणं प्रति स्वतन्त्रा विवेकिनो मृत्युमतितरन्तीत्यभिप्रायः ॥ २५ ॥**

**भाष्यार्थ—अन्ये तु इति**—‘ अन्ये तु० ’ या श्लोकानें अत्यंत अधम आधिकाऱ्याची मोक्षमार्गांत कशी प्रवृत्ति होते तें सांगतात—**अन्ये तु एषु विकल्पेषु अन्यतरेण अपि एवं-यथोक्तं आत्मानं अजानन्तः**—पण दुसरे-अत्यंत अधमाधिकारी या पूर्वोक्त विकल्पांतील एकाहि उपायाने याप्रमाणे पूर्वोक्त आत्म्याला न जाणणारे—**अन्येभ्यः-आचार्येभ्यः श्रुत्वा**—अन्यांपासून म्ह० आचार्यांपासून उपायाचें श्रवण करून—**इदं एव चिन्तयत इति उक्ताः**—‘याचेच चिन्तन करा,’ असें सांगितले गेलेले—**उपासते-श्रद्दधानाः सन्तः चिन्तयन्ति**—उपासना करितात-अतिशय श्रद्धावान् होत्साते चिंतन करितात.—**ते अपि च अतितरन्ति एव-अतिक्रामन्ति एव**—तेसुद्धां अतितरण-उल्लंघन करितातच. ( कोणाचें ? उत्तर- )—**मृत्युं-मृत्युयुक्तं संसारं इति एतत्**—मृत्यूला म्ह० मृत्युयुक्त संसाराला, असा याचा भावार्थ.मृत्युयुक्त संसाराला उल्लंघून, त्याचे अतिक्रमण करून जातात; [ म्ह० परोपदेशाने आत्मचिंतनांत प्रवृत्त झालेल्या त्यांचीहि प्रवृत्ति व्यर्थ होत नाहीं. पण ते मुख्य अधिकारी नव्हेत, असें सुचवितात-]—**श्रुतिपरायणाः श्रुतिः-श्रवणं परं अयनं-गमनं येषां मोक्षमार्गप्राप्तौ परं साधनं येषां ते श्रुतिपरायणाः**—श्रुतिपरायण--श्रुति म्ह० श्रवण, तेच श्रेष्ठ अयन-गमन ज्यांच्या मोक्षमार्गप्रवृत्तीतील श्रेष्ठ साधन आहे-श्रवण हेच ज्यांच्या मोक्षमार्गप्रवृत्तीचे श्रेष्ठ साधन आहे ते श्रुतिपरायण होत.—**केवलपरोपदेशप्रमाणाः स्वयं विवेकरहिताः इति अभिप्रायः**—केवल परोपदेशालाच प्रमाण मानणारे स्वतः विवेकरहित असा याचा भावार्थ. ( ‘तेऽपि-’तेहि येथील ‘ अपि’शब्दानें सूचित होणारा अर्थ सांगतात-)—**प्रमाणं प्रति स्वतन्त्राः विवेकिनः मृत्युं अतितरन्ति इति किमु वक्तव्यं इति अभिप्रायः**—मग प्रमाणाविषयीं स्वतंत्र असलेले विवेकी-प्रमाणकुशल मृत्यूचें उल्लंघन करितात, हे काय सांगावें, असा याचा आशय. २५.

---

१ या दोन श्लोकांवरील टीपेंत रहस्यकार म्हणतात—“ पातंजल योगाप्रमाणें ध्यान, सांख्यमार्गाप्रमाणें ज्ञानोत्तर कर्मसंन्यास, व कर्मयोगमार्गाप्रमाणे निष्कामबुद्धीनें ईश्वरार्पणपूर्वक कर्म करणें ” वगैरे. हें म्हणणें उगीच कांहीं तरी आहे. ध्यान पातंजल योगाप्रमाणेंच आहे, व ज्ञानमार्ग, संन्यासमार्ग, भक्तिमार्ग, यांप्रमाणें ध्यान नाहीं, याविषयीं प्रमाण काय ? कीं ज्ञानमार्गी, संन्यासी, भक्तिमार्गी ईश्वराचें ध्यान करूं शकतच नाहींत, असा कांहीं रहस्यकारांचा अनुभव आहे ? ते एकदा म्हणतात-“ पातंजलयोग-

**यावत्संजायते किंचित्सत्त्वं स्थावरजंगमम्।**
**क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगात्तद्विद्धि भरतर्षभ ॥ २६ ॥**

**अन्वयार्थ—भरतर्षभ**—हे भरतश्रेष्ठा—**यावत् किंचित्**—जेवढें कांहीं—**स्थावरजंगमं**—अचर किंवा चर—**सत्त्वं**—प्राणिजात—**संजायते**—उत्पन्न होतें—**तत्**— तें सर्व तूं—**क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगात्**— क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांच्या संयोगापासून होते, असे—**विद्धि**—जाण. २६.

**क्षेत्रज्ञेश्वरैकत्वविषयं ज्ञानं मोक्षसाधनं यज्ज्ञात्वाऽमृतमश्नुत इत्युक्तं तत्कस्माद्धेतोरिति तद्धेतुप्रदर्शनार्थं श्लोक आरभ्यते—यावद्यत्किंचित्संजायते समुत्पद्यते सत्त्वं वस्तु किमविशेषेणेत्याह स्थावरजङ्गमं स्थावरं जङ्गमं च क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगात्तज्जायत इत्येवं विद्धि जानीहि हे भरतर्षभ। कः पुनरयं क्षेत्रक्षेत्रज्ञयोः संयोगोऽभिप्रेतः। न तावद्रज्ज्वेव घटस्यावयवसंश्लेषद्वारकः संबन्धविशेषः संयोगः क्षेत्रेण क्षेत्रज्ञस्य संभवत्याकाशवन्निरवयवत्वात्। नापि समवायलक्षणस्तन्तुपटयोरिव क्षेत्रक्षेत्रज्ञयोरितरेतरकार्यकारणभावानभ्युपगमादिति ॥**

---

मार्ग भगवद्गीतेस संमत आहे किंवा पातंजल सूत्रें भगवद्गीतेच्या पूर्वींचीं आहेत, असेंहि म्हणतां येत नाहीं." (गी. र. ५२६) व येथें त्याच्या विरुद्ध 'पातंजलयोगाप्रमाणें ध्यान' असे म्हणतात. पातंजल योग जर गीतेला संमतच नाहीं, तर त्या योगाप्रमाणें गीता ध्यान हा मोक्ष मिळविण्याचा मार्ग कसा सांगते ? तसेंच 'ज्ञानोत्तर कर्मसंन्यास व निष्काम बुद्धीने परमेश्वरार्पणपूर्वक कर्म करणे' हे मार्ग कशाचे ? अवतरणाप्रमाणे पाहिल्यास ते मोक्षाचे मार्ग आहेत, असे ठरते. कारण अवतरणांत त्यांनीं "देहांतील परमेश्वराचें हे ज्ञान संपादन करून मोक्ष मिळविण्याचे मार्ग कोणते हे सांगतात" असे म्हटले आहे. पण पुढे टीपेंत "असे आत्मज्ञानाचे निरनिराळे मार्ग या दोन श्लोकांत सांगितले आहेत.कोणत्याहि मार्गानें गेलें तरी अखेर भगवंताचें ज्ञान होऊन मोक्ष मिळतो" असे ते म्हणतात. तेव्हां ध्यान, ज्ञानोत्तर संन्यास व कर्मयोग हे मोक्षाचे मार्ग कीं आत्मज्ञानाचे ? "यातील कोणत्याहि मार्गानें गेले तरी अखेर भगवताचे ज्ञान होऊन मोक्ष मिळतो" हें आम्हालाहि अंशतः कबूल आहे. अंशतः म्हणण्याचें कारण,त्यांतहि ध्यान अन्तरंग,सांख्ययोग त्याच्याहून बहिरंग, कर्मयोग त्याहून बहिरंग व दुसऱ्यापासून ऐकून साधनानुष्ठान करणें, त्याहून बहिरंग आहे व तीं क्रमानें अधम, मंद, मध्यम व उत्तम अधिकाऱ्यांसाठीं आहेत, हा वेदान्तसिद्धान्त आहे. वास्तव ते सर्व भगवज्ज्ञानाचे एकसारख्याच योग्यतेचे उपाय आहेत, असें म्हणतां येत नाहीं. तथापि 'ते सर्व ज्ञानाचे उपाय आहेत' हे कबूल आहे. पण त्यांना ज्ञानाचे उपाय मानिल्यावर 'ज्ञानोत्तर संन्यास' वगैरे जे म्हटलें आहे त्याची वाट काय ? तसेंच "तथापि लोकसंग्रहदृष्ट्या कर्मयोग श्रेष्ठ असा जो पूर्वी सिद्धान्त केला आहे तो यामुळें बाधित होत नाहीं," हे म्हणणें उपपन्न कसें होतें ? लोकसंग्रहदृष्ट्या कर्मयोगाच्या श्रेष्ठत्वाचा किंवा अश्रेष्ठत्वाचा येथें प्रसंग काय आहे ?

**भाष्यार्थ—क्षेत्रज्ञ-ईश्वर-एकत्वविषयं ज्ञानं मोक्षसाधनं ' यज्ज्ञात्वामृतमश्नुते ' इति उक्तं**—क्षेत्रज्ञ व ईश्वर यांच्या एकत्वाविषयींचें ज्ञान मोक्षाचें साधन आहे, असें ' जें जाणून मोक्ष मिळतो ' ( १३.१२ ) या वचनानें सांगितलें—**तत् कस्मात् हेतोः इति तद्धेतुप्रदर्शनार्थं श्लोकः आरभ्यते**—तें कोणत्या कारणाने असें कोणी विचारील म्हणून त्याचा हेतु प्रदर्शित करण्यासाठी ' यावत्० ' हा श्लोक आरंभिला जातो. [ सर्वप्राणिजाताची उत्पत्ति क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांच्या संबंधामुळे होते. त्यामुळें क्षेत्रज्ञरूप परमात्म्याहून निराळ्या प्राणिसमूहाचा अभावच आहे. यास्तव ऐक्यज्ञानानेच मुक्ति होते, असे सांगण्यासाठीं हा श्लोक आहे- ]—**यावत् यत् किंचित् सत्त्वं-वस्तु संजायते-समुत्पद्यते**—जेवढे म्हणून सत्त्व-वस्तु-पदार्थ-जन्मास येतो-उत्पन्न होतो—**किं अविशेषेण इति आह**—काय अविशेषानें-कांहीं विशेष न ठेवतां सर्वच वस्तु, असे कोणी विचारील म्हणून भगवान् सागतात—**स्थावरजङ्गमं-स्थावरं जङ्गमं च**—स्थावर-जंगम सत्त्व-वृक्षादि स्थावर व मनुष्यादि जंगम प्राणी यातील जे जे सत्त्व उत्पन्न होते—**तत् क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगात् जायते इति विद्धि**—तें क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांच्या संयोगापासून उत्पन्न होते, असें तूं जाण—**हे भरतर्षभ एवं जानीहि**—हे भरतश्रेष्ठा ! याप्रमाणें तूं समज. ( या उक्त क्षेत्रक्षेत्रज्ञसंबंधावर आक्षेप- )—**अयं क्षेत्रक्षेत्रज्ञयोः संयोगः कः पुनः अभिप्रेतः**—हा क्षेत्र व क्षेत्रज्ञ याचा संयोग कोणता अभिप्रेत आहे ? ( क्षेत्रज्ञाचा क्षेत्राशीं कोणता संबंध आहे, संयोग की समवाय ? यांतील पहिल्या संयोगसंबंधाचें निरसन- )—**घटस्य रज्ज्वा इव अवयवसंश्लेषद्वारकः संबन्धविशेषः संयोगः क्षेत्रेण क्षेत्रज्ञस्य न तावत् संभवति**—घटाचा रज्जूशी-दोरीशीं जसा अवयवांचा परस्पर संश्लेष होऊन त्याच्या द्वारा एक प्रकारचा संबंधरूप संयोग होतो तसा क्षेत्रज्ञाचा क्षेत्राशीं अवयवसंश्लेषद्वारा संबंध तर होऊंच शकत नाहीं.—**आकाशवत् निरवयवत्वात्**—कारण आत्म्याला-क्षेत्रज्ञाला आकाशाप्रमाणे निरवयवत्व आहे. ( सावयव पदार्थांचाच संयोग होतो निरवयव पदार्थाचा संयोग संभवत नाहीं. आत्मा आकाशाप्रमाणे निरवयव आहे. त्यामुळे त्याचा क्षेत्राशीं संयोग संभवत नाहीं. तसाच त्यांचा समवायसंबंधहि संभवत नाहीं, असे सांगतात- )—**तन्तुपटयोः इव क्षेत्रक्षेत्रज्ञयोः समवायलक्षणः अपि न**—तंतु व पट याच्या समवायसंबंधाप्रमाणें क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांचा समवायरूप संबंधहि संभवत नाहीं.—**कार्यकारणभावानभ्युपगमात्**—कारण-तंतु कारण व पट कार्य, यांप्रमाणें क्षेत्रज्ञ कारण व क्षेत्र कार्य असा त्यांचा कार्यकारणभाव स्वीकारलेला नाहीं.—**इति ( उच्यते )**—असा आक्षेप घ्याल तर त्याचें समाधान सांगितलें जातें-असा संबंध. [ क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांच्या संयोगापासून सर्व स्थावर-जंगमप्राणिजात उत्पन्न होते, असे भगवान् येथे सांगतात. पण तो संबंध कोणता ? संयोग कीं समवाय ? सावयव पदार्थांचा संयोग होतो, पण क्षेत्रज्ञ निरवयव आहे. कार्य व कारण यांचाच समवाय संबंध असतो. पण क्षेत्रज्ञ क्षेत्राचें

कारण आहे, असें तुम्ही मानीत नाहीं. त्यामुळें क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोग संभवत नाहीं, असा आक्षेप झाला असतां त्याचें समाधान सांगतात—]

**उच्यते, क्षेत्रक्षेत्रज्ञयोर्विषयविषयिणोर्भिन्नस्वभावयोरितरेतरतद्धर्माध्यासलक्षणः संयोगः क्षेत्रक्षेत्रज्ञस्वरूपविवेकाभावनिबन्धनो रज्जुशुक्तिकादीनां तद्विवेकज्ञानाभावादध्यारोपितसर्परजतादिसंयोगवत् । सोऽयमध्यासस्वरूपः क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगो मिथ्याज्ञानलक्षणः ॥**

**भाष्यार्थ—उच्यते**—त्यांचा वास्तविक संबंध जरी याप्रमाणें शक्य नसला तरी आध्यासिक संबंध संभवतो, असें सांगितलें जातें.—**क्षेत्रक्षेत्रज्ञयोः-भिन्नस्वभावयोः विषयविषयिणोः इतरेतरतद्धर्माध्यासलक्षणः क्षेत्रक्षेत्रज्ञस्वरूपविवेकाभावनिबन्धनः संयोगः**—क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांचा (पण ते क्षेत्र व क्षेत्रज्ञ कशी आहेत ?) भिन्न स्वभावाचीं-ज्यांचा स्वभाव-स्वरूप अगदीं एकमेकांच्या विरुद्ध आहे, कारण त्यांतील क्षेत्र विषय आहे व क्षेत्रज्ञ विषयी आहे, अशा त्या क्षेत्र-क्षेत्रज्ञांचा परस्पर म्ह० क्षेत्राचा क्षेत्रज्ञावर व क्षेत्रज्ञाचा क्षेत्रावर अध्यास होणें, त्यांच्या धर्मांचा परस्परांच्या धर्मांवर अध्यारोप होणें, असा हा अध्यासरूप संयोग संभवतो. [ क्षेत्रज्ञाच्या चैतन्याचा क्षेत्रावर व क्षेत्राच्या जाड्यादिकांचा क्षेत्रज्ञावर आरोप होतो. त्याचें कारण-] क्षेत्र व क्षेत्रज्ञ याच्या स्वरूपाच्या विवेकाचा अभाव, हेंच ज्याचें कारण आहे, अशा प्रकारचा इतरेतराध्यासरूप संयोग संभवतो. ( क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांचें यथार्थस्वरूप न कळणें, हेंच त्यांच्या अध्यासाचे कारण आहे. याविषयीं दृष्टान्त-)—**रज्जुशुक्तिकादीनां तद्विवेकज्ञानाभावात् अध्यारोपितसर्परजतादिसंयोगवत्**—रज्जु, शुक्तिका इत्यादिकांच्या स्वरूपाचे विवेकज्ञान नसणे, या कारणाने अध्यारोपित सर्प, रजत इत्यादिकांचा रज्ज्वादिकांशीं संयोग जसा होतो, तसा क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांचा आध्यासिक संयोग संभवतो. [ या उक्त संबंधाचा उपसंहार करितात-]—**सः अयं अध्यासस्वरूपः क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगः मिथ्याज्ञानलक्षणः**—तो हा अध्यासस्वरूप क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोग मिथ्या-अज्ञानलक्षण आहे.

**यथाशास्त्रं क्षेत्रक्षेत्रज्ञलक्षणभेदपरिज्ञानपूर्वकं प्राग्दर्शितरूपात्क्षेत्रान्मुञ्जादिवेषीकां यथोक्तलक्षणं क्षेत्रज्ञं प्रविभज्य न सत्तन्नासदुच्यत इत्यनेन निरस्तसर्वोपाधिविशेषं ज्ञेयं ब्रह्म स्वरूपेण यः पश्यति क्षेत्रं च मायानिर्मितहस्तिस्वप्नदृष्टवस्तुगन्धर्वनगरादिवदसदेव सदिवावभासत इत्येवं निश्चितविज्ञानो यस्तस्य यथोक्तसम्यग्दर्शनविरोधादपगच्छति मिथ्याज्ञानं । तस्य जन्महेतोरपगमात् ‘य एवं वेत्ति पुरुषं प्रकृतिं च गुणैः सह’ इत्यनेन विद्वान्भूयो नाभिजायत इति यदुक्तं तदुपपन्नमुक्तम् ॥ २६ ॥**

**भाष्यार्थ**—( त्या मिथ्या अज्ञानाची निवृत्ति कशी होते ? उत्तर-)—**यथाशास्त्रं क्षेत्रक्षेत्रज्ञलक्षणभेदपरिज्ञानपूर्वकं मुञ्जात् इषीकां इव प्राक्-दर्शितरूपात् क्षेत्रात् यथोक्तलक्षणं क्षेत्रज्ञं प्रविभज्य**-‘ योऽयं विज्ञानमयः प्राणेषु ’

—जो हा प्राणांतील विज्ञानमय, या त्वंपदार्थविषय शास्त्राला अनुसरून विवेकज्ञान संपादन करून म्ह० क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांच्या लक्षणाचा जो भेद तत्परिज्ञानपूर्वक-म्ह० अर्थात् शास्त्रानुसार क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांचे स्वरूप अगदी एकमेकांच्या विरुद्ध आहे, असें विवेकज्ञान संपादन करून मुञ्जातृणांतील जशी काडी त्याप्रमाणें पूर्वी प्रदर्शित केलेल्या म्ह० महाभूतांपासून धृतीपर्यंत सांगितलेल्या क्षेत्राहून उपद्रष्टा, अनुमन्ता इत्यादि पूर्वोक्त लक्षणाच्या क्षेत्रज्ञाला अगदीं पृथक् करून—**' न सत् तन्नासत् उच्यते ' इति अनेन निरस्तसर्वोपाधिविशेषं ज्ञेयं ब्रह्म स्वरूपेण यः पश्यति**—' ते सत्हि नाहीं व असत्हि नाही,' असें म्हटले जातें. या वाक्यानें सर्व उपाधिविशेषरहित असें ज्ञेय ब्रह्म स्वरूपानें जो जाणतो, अशा ज्ञेय ब्रह्माचा ' मीच तें ' असा जो अनुभव घेतो [म्ह० शास्त्रानुसार क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांचे विवेकज्ञान संपादन करून पूर्वोक्त क्षेत्राहून क्षेत्रज्ञ अगदीं पृथक् आहे हें जाणून तेच सर्वोपाधिशून्य ज्ञेय ब्रह्म मी आहें असा जो अनुभव घेतो, त्याचप्रमाणे– ]—**क्षेत्रं च मायानिर्मितहस्ति-स्वप्नदृष्टवस्तु-गन्धर्वनगरवत् असत् एव सत् इव अवभासते इति-एवं निश्चितविज्ञानः यः**—व क्षेत्र मायेनें निर्माण केलेला हत्ती, स्वप्नांत पाहिलेली वस्तु, गंधर्वनगर इत्यादिकांप्रमाणे असत् असतांनाच सत् असल्याप्रमाणें भासतें-तें मिथ्या असतांनाच सत् असल्यासारखें भासतें, अशा प्रकारच्या निश्चित ज्ञानानें जो युक्त असतो-असें निश्चित ज्ञान ज्याला असते— **तस्य मिथ्याज्ञानं यथोक्तसम्यग्दर्शनविरोधात् अपगच्छति**—त्याचे मिथ्याज्ञान पूर्वोक्त तत्त्वज्ञानाच्या विरोधामुळे-तत्त्वज्ञानाशीं त्याचा विरोध असल्यामुळे-पार निघून जातें.—**तस्य जन्महेतोः अपगमात्**—याप्रमाणे त्याच्या जन्माच्या निमित्ताचा क्षय होत असल्यामुळे—**' यः एवं वेत्ति पुरुषं प्रकृतिं च गुणैः सह ' इति-अनेन**—जो पुरुषाला व गुणासह प्रकृतीला याप्रमाणें जाणतो, ( श्लो. २३, पृ. ९५७) या वचनानें—**विद्वान् न भूयः अभिजायते इति यत् उक्तं तत् उपपन्नं उक्तं**—'विद्वान् पुनः जन्म घेत नाहीं,' असें जे सांगितले आहे ते सर्वथा उपपन्न आहे.[आत्मसाक्षात्काराने ज्याचें अज्ञान निवृत्त झालें आहे,त्याच्या पुढील जन्माचे कांहीं कारणच उरत नसल्यामुळें ज्ञानी पुनः उत्पन्न होत नाही, असे जें वर सांगितलें आहे, तें सर्वथा योग्य आहे.] २६.

**न स भूयोऽभिजायत इति सम्यग्दर्शनफलमविद्यादिसंसारबीजनिवृत्तिद्वारेण जन्माभाव उक्तः । जन्मकारणं चाविद्यानिमित्तकः क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोग उक्तः । अतस्तस्या अविद्याया निवर्तकं सम्यग्दर्शनमुक्तमपि पुनः शब्दान्तरेणोच्यते ॥**

**भाष्यार्थ—' न स भूयोऽभिजायते ' इति सम्यग्दर्शनफलं अविद्यादिसंसारबीजनिवृत्तिद्वारेण जन्माभावः उक्तः**—' तो पुनरपि उत्पन्न होत नाहीं' असें सम्यग्दर्शनाचें फल अविद्यादि म्ह० अनादि अनिर्वाच्य अज्ञान-मिथ्याज्ञान, त्याचा संस्कार, या संसारबीजाच्या निवृत्तीच्या द्वारा जन्माचा अभाव सांगितला. [ जन्माचा अभाव हें फल सांगितलें. ]—**च जन्मकारणं अविद्यानिमित्तकः क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगः उक्तः**—आणि जन्माचें कारण अविद्यानिमित्तक-म्ह० आध्यासिक क्षेत्रक्षेत्र-

ज्ञांचा संयोग सांगितला. [ क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोग हें जन्माचें कारण सांगितलें. अर्थात् अज्ञान सर्व अनर्थाचें मूळ असल्यामुळें त्याची निवृत्ति करणारें सम्यग्ज्ञान सांगणें उचित आहे, असें सांगतात–]—**अतः तस्याः अविद्यायाः निवर्तकं सम्यग्दर्शनं उक्तं अपि पुनः शब्दान्तरेण उच्यते**—यास्तव त्या अविद्येचे निवर्तक–अज्ञानाची निवृत्ति करणारें सम्यग्दर्शन जरी यापूर्वी वारंवार सांगितलेले असलें तरी त्याचा विषय अतिशय सूक्ष्म असल्यामुळे पुनः दुसऱ्या शब्दांनी सांगितलें जाते. [ज्ञानाचा विषय अतिसूक्ष्म असल्यामुळें त्याचेच निरनिराळ्या शब्दांनी पुनः पुनः प्रतिपादन केल्यानें मंद अधिकाऱ्यांवर मोठा अनुग्रहच होत असतो. म्हणून त्यावर पुनरुक्ति दोष येऊं शकत नाही. ]

## समं सर्वेषु भूतेषु तिष्ठन्तं परमेश्वरम् ।
## विनश्यत्स्वविनश्यन्तं यः पश्यति स पश्यति ॥२७॥

**अन्वयार्थ**—**यः**—जो—**विनश्यत्सु**—विनाश पावणाऱ्या—**सर्वेषु भूतेषु**—सर्व भूतांमध्ये—**समं तिष्ठन्तं**—सम असलेल्या—**अविनश्यन्तं**—विनाश न पावणाऱ्या—**परमेश्वरं**—परमेश्वराला—**पश्यति**—पाहतो—**सः**—तो—**पश्यति**—यथार्थपणें पाहतो. २७.

**समं निर्विशेषं तिष्ठन्तं स्थितिं कुर्वन्तं क सर्वेषु भूतेषु ब्रह्मादिस्थावरान्तेषु प्राणिषु कं परमेश्वरं देहेन्द्रियमनोबुद्ध्यव्यक्तात्मनोऽपेक्ष्य परमेश्वरस्तं सर्वेषु भूतेषु समं तिष्ठन्तम् । तानि विशिनष्टि विनश्यत्स्विति । तं च परमेश्वरमविनश्यन्तमिति भूतानां परमेश्वरस्य चात्यन्तवैलक्षण्यप्रदर्शनार्थम् । कथं सर्वेषां हि भावविकाराणां जनिलक्षणो भावविकारो मूलं जन्मोत्तरभाविनोऽन्ये सर्वे भावविकारा विनाशान्ताः । विनाशात्परो न कश्चिदस्ति भावविकारो भावाभावात् । सति हि धर्मिणि धर्मा भवन्त्यतोऽन्त्यभावविकाराभावानुवादेन पूर्वभाविनः सर्वे भावविकाराः प्रतिषिद्धा भवन्ति सह कार्यैः । तस्मात्सर्वभूतवैलक्षण्यमत्यन्तमेव परमेश्वरस्य सिद्धं निर्विशेषत्वमेकत्वं च ॥**

**भाष्यार्थ**—( पर ब्रह्म सर्वत्र एक असल्यामुळे त्याला उत्कर्षापकर्षादि कांहीं नाहीं, असें सांगतात–)—**समं-निर्विशेषं तिष्ठन्तं-स्थितिं कुर्वन्तं**—सम म्ह॰ निर्विशेष–कोणत्याहिप्रकारच्या विशेषावांचून राहणाऱ्या–स्थिति करणाऱ्या—**क**—कोठें निर्विशेष स्थित होणाऱ्या ?—**सर्वेषु भूतेषु ब्रह्मादि-स्थावरान्तेषु प्राणिषु**—सर्व भूतांमध्यें ब्रह्मादि-स्थावरापर्यंत प्राण्यांमध्यें—**कं परमेश्वरं**—कोणाला ! परम ईश्वराला ( त्याचें परमत्व व ईश्वरत्व यांचें उपपादन–)—**देह-इन्द्रिय-मनो-बुद्धि-अव्यक्तात्मनः अपेक्ष्य परमः-ईश्वरः**—देह, इंद्रियें, मन, बुद्धि, अव्यक्त व जीवात्मा यांच्या अपेक्षेनें परम–श्रेष्ठ ईश्वर—**तं सर्वेषु भूतेषु समं तिष्ठन्तं**—अशा त्या सर्व भूतांमध्यें सम स्थित असणाऱ्या—**तानि ' विनश्यत्सु ' इति विशिनष्टि**—त्या भूतांनाच ' विनश्यत्सु ' अशा विशेषणानें विशिष्ट करितात–म्ह॰ विनाश

पावणाऱ्या अशा त्या सर्वभूतांत राहणाऱ्या—**च तं परमेश्वरं अविनश्यन्तं-इति**—आणि त्या परमेश्वराला ‘ अविनश्यन्तं ’ या विशेषणानें विशिष्ट करितात. [ भूतांचा म्ह० आश्रयाचा नाश झाल्यानें आश्रिताचाहि म्ह० त्यांत राहणाऱ्या परमेश्वराचाहि नाश होईल अशी आशंका घेऊन हें विशेषण योजलें आहे.] म्ह० विनाश न पावणाऱ्या त्या ईश्वराला ( पण अशी ही दोन विशेषणें देण्याचें प्रयोजन सांगतात- )—**भूतानां परमेश्वरस्य च अत्यन्तवैलक्षण्यप्रदर्शनार्थं**—भूतांचें व परमेश्वराचें अत्यंत वैलक्षण्य प्रदर्शित करण्यासाठीं अशीं दोघांना दोन विशेषणें दिलीं आहेत. ( अहोपण नाश होणे व तो न होणें, यांमुळें क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांच्यामध्यें वैलक्षण्य जरी असलें तरी त्यांच्यामध्यें अत्यन्त वैलक्षण्य कसें ? कारण सविशेषत्व व भिन्नत्व हे धर्म दोन्हींमध्यें सारखेच आहेत, अशी शंका- )—**कथं**—त्यांच्यामध्ये अत्यन्त वैलक्षण्य कसें ? ( भूतें जरी सविशेष वगैरे असलीं तरी परमेश्वर तसा नाहीं, त्यामुळे त्यांच्यामध्यें अत्यंत वैलक्षण्य आहेच, असें सांगण्यासाठीं आचार्य म्हणतात- )—**सर्वेषां हि भावविकाराणां जनिलक्षणः भावविकारः मूलं**—सर्व भावविकारांमध्यें-पदार्थांना होणाऱ्या सर्व विकारांमध्यें ‘ जन्म ’ या स्वरूपाचा भावविकार मूळ आहे हें प्रसिद्ध आहे.—**अन्ये विनाशान्ताः सर्वे भावविकाराः जन्मोत्तरभाविनः**—बाकीचे विनाशापर्यंतचे सर्वभावाविकार जन्मानन्तर होणारे आहेत,—**विनाशात् परः कश्चित् भावविकारः न अस्ति**—विनाशाच्या नंतर होणारा कोणताच भावविकार नाहीं.—**भावाभावात्**—कारण पदार्थाचा विनाश झाल्यावर त्याला भावत्वच नसतें.—**धर्मिणि सति हि धर्माः भवन्ति**—धर्मी असला तरच धर्म संभवतात हें प्रसिद्ध आहे. ( याप्रमाणें नाश हा अन्त्य विकार आहे, असें ठरलें असतां त्याचें फलित सांगतात- )—**अतः अन्त्यभावविकाराभावानुवादेन पूर्वभाविनः सर्वे भावविकाराः कार्यैः सह प्रतिषिद्धाः भवन्ति**—यास्तव अन्त्यभावविकाराच्या अभावाचा ‘ अविनश्यन्तं ’ या पदानें अनुवाद करून त्याच्या पूर्वी होणारे सर्व भावविकार, त्यांच्या कांहीं काल अस्तित्वांत राहणें, इत्यादि कार्यांसह प्रतिषिद्ध होतात. म्ह० त्यांचा निषेध-निराकरण केले आहे, असें होतें. ( याप्रमाणें परमेश्वराचें भूतांहून अत्यंत वैलक्षण्य सिद्ध करून त्याचा उपसंहार करितात- )—**तस्मात् परमेश्वरस्य सर्वभूतैः वैलक्षण्यं अत्यन्तं एव सिद्धं निर्विशेषत्वं च एकत्वं ( सिद्धं )**—म्हणून परमेश्वराचें सर्वभूतांशीं वैलक्षण्य अत्यंतच आहे, हें सिद्ध झालें. त्याचप्रमाणें त्याचें निर्विशेषत्व व एकत्वहि सिद्ध झालें. [ निर्विशेषत्व म्ह० सर्वभावविकाररहितत्व, कूटस्थत्व व एकत्व म्ह० अद्वितीयत्व. ]

**य एवं यथोक्तं परमेश्वरं पश्यति स पश्यति । ननु सर्वोऽपि लोकः पश्यति किं विशेषणेनेति, सत्यं पश्यति किंतु विपरीतं पश्यत्यतो विशिनष्टि स एव पश्यतीति । यथा तिमिरदृष्टिरनेकं चन्द्रं पश्यति तमपेक्ष्यैकचन्द्रदर्शी विशिष्यते स एव पश्यतीति तथैवेहाप्येकमविभक्तं यथोक्तमात्मानं यः पश्यति स विभक्तानेकात्मविपरीतदर्शिभ्यो**

**विशिष्यते स एव पश्यतीति । इतरे पश्यन्तोऽपि न पश्यन्ति विपरीतदर्शित्वादनेकचन्द्रदर्शिवदित्यर्थः ॥ २७ ॥**

**भाष्यार्थ**—( आतां ' यः पश्यति ' याचें व्याख्यान- )—**यः एवं यथोक्तं परमेश्वरं पश्यति सः पश्यति**—जो अशाप्रकारें उक्त विशेषणांनीं विशिष्ट अशा परमेश्वराला पाहतो तो पाहतो. ( याविषयीं आक्षेप- )—**ननु सर्वः अपि लोकः पश्यति किं विशेषणेन इति**—अहोपण सर्वहि लोक पाहतो, मग ' तो पाहतो ' या विशेषणाचा काय उपयोग ? असें ( कोणी म्हणेल तर आचार्य सांगतात- )—**सत्यं पश्यति किं तु विपरीतं पश्यति**—खरें आहे, पाहतो, पण विपरीत-उलट पाहतो,—**अतः सः एव पश्यति इति विशिनष्टि**—म्हणून ' तोच पाहतो ' असें विशेषण देत आहेत [ ईश्वरपराङ्मुख अनात्मनिष्ठ आत्म्याला ' मी ' असें जरी पहात असला तरी तो विपरीत पाहतो. त्यामुळें ईश्वरनिष्ठ असलेल्यालाच सम्यग्दर्शित्व आहे, हें सांगण्याच्या इच्छेनें ' सः पश्यति ' हे विशेषण आहे. असो; हीच गोष्ट दृष्टान्तानें विशद करितात- ]—**यथा तिमिरदृष्टिः अनेकं चन्द्रं पश्यति तं अपेक्ष्य एकचन्द्रदर्शी ' सः एव पश्यति ' इति विशिष्यते**—ज्याप्रमाणें तिमिरदृष्टि-ज्याच्या दृष्टीला तिमिररोग झाला आहे, असा मनुष्य दोन चन्द्र पाहतो त्याच्या अपेक्षेने जो एक चन्द्र पाहणारा 'तोच पाहतो' असें विशेषण दिलें जातें, म्ह० असे म्हटलें जातें.—**तथा एव इह अपि एकं अविभक्तं यथोक्तं आत्मानं यः पश्यति**—त्याचप्रमाणें येथेहि-या दार्ष्टान्तिकांतहि एक अविभक्त अशा पूर्वोक्त आत्म्याला जो पाहतो—**सः विभक्त-अनेक-आत्मविपरीतदर्शिभ्यः ' सः एव पश्यति ' इति विशिष्यते**—तो प्रत्येक शरीरांत भिन्न भिन्न अनेक आत्मे आहेत, असे विपरीत पाहणाऱ्या अज्ञांहून ' तोच पाहतो ' असें म्हणून 'विशिष्ट आहे' असे सांगितलें जाते. —**इतरे पश्यन्तः अपि न पश्यन्ति**—परम वस्तुनिष्ठांहून इतर पहात असले तरी पहात नाहीत. ( कारण- )—**विपरीतदर्शित्वात् अनेकचन्द्रदर्शिवत् इत्यर्थः**—अनेक चन्द्र पाहणारांप्रमाणें त्यांना विपरीतदर्शित्व आहे, ते विपरीतदृष्टि असल्यामुळें पहात नाहीत, असा याचा भावार्थ. २७.

**समं पश्यन्हि सर्वत्र समवस्थितमीश्वरम् ।**
**न हिनस्त्यात्मनात्मानं ततो याति परां गतिम् ॥**

**अन्वयार्थ**—**हि**—कारण—**सर्वत्र**—सर्व भूतांमध्यें—**समवस्थितं**—समानत्वानें-एकरूपानें अवस्थित असलेल्या—**ईश्वरं**—ईश्वराला—**समं**—सम—**पश्यन्**—पाहणारा—**आत्मना आत्मानं**—आपणच आपल्याला—**न हिनस्ति**—मारीत नाहीं-हिंसा करीत नाहीं.—**ततः**—त्यामुळें—**परां गतिं**—परमगतीला—**याति**—जातो. २८.

**यथोक्तस्य सम्यग्दर्शनस्य फलवचनेन स्तुतिः कर्तव्येति श्लोक आरभ्यते—समं पश्यन्नुपलभमानो हि यस्मात्सर्वत्र सर्वभूतेषु समवस्थितं तुल्यतयाऽवस्थितमीश्वरमतीतानन्तरश्लोकोक्तलक्षणमित्यर्थः । समं पश्यन्किं न हिनस्ति हिंसां न करोत्यात्मना स्वेनैव स्वमात्मानं ततस्तदहिंसनाद्याति परां प्रकृष्टां गतिं मोक्षाख्याम् । ननु नैव कश्चित्प्राणी स्वयं स्वमात्मानं हिनस्ति कथमुच्यतेऽप्राप्तं न हिनस्तीति । यथा न पृथिव्यामग्निश्चेतव्यो नान्तरिक्ष इत्यादि ॥**

**भाष्यार्थ—यथोक्तस्य सम्यग्दर्शनस्य फलवचनेन स्तुतिः कर्तव्या इति श्लोकः आरभ्यते**—या पूर्वोक्त सम्यग्दर्शनाचे फल कथन करून त्या फलवचनानें स्तुति करावी, म्हणून श्लोकाचा आरंभ केला जातो—**हि-यस्मात् समं पश्यन्-उपलभमानः सर्वत्र-सर्वभूतेषु समवस्थितं-तुल्यतया अवस्थितं ईश्वरं अतीत-अनन्तरश्लोकोक्तलक्षणं इत्यर्थः**—कारण-ज्याअर्थी सम पाहणारा-सम असल्याचा अनुभव घेणारा, ( कोठें? ) सर्वत्र-सर्वभूतांमध्यें समवस्थित म्ह० तुल्यत्वानें अवस्थित अशा ईश्वराला-म्ह० या श्लोकाच्या मागच्याच श्लोकांत सांगितलेल्या लक्षणाच्या ईश्वरास सम पाहणारा असा याचा भावार्थ.—**समं पश्यन् किं**—सम पाहणारांचें काय होतें ?—**न हिनस्ति-हिंसां न करोति आत्मना-स्वेन एव स्वं -आत्मानं**—हनन-हिंसा करीत नाहीं-स्वतःच-आपली-आपणच आपली हिंसा करीत नाहीं.—**ततः-तस्मात् अहिंसनात् परां प्रकृष्टां मोक्षाख्यां गतिं याति**—त्यामुळें-त्या अहिंसनामुळें पर-सर्वांहून श्रेष्ठ अशा मोक्षसंज्ञक गतीला प्राप्त होतो. [ सर्व भूतांमध्ये तुल्यत्वाने अवस्थित असलेल्या निर्विशेष आत्म्याला पाहणारा ज्याअर्थी आपणच आपली हिंसा करीत नाहीं, त्याअर्थी तो ' मोक्ष ' नांवाच्या श्रेष्ठ गतीला प्राप्त होतो. या श्लोकाच्या पहिल्या तीन पादांनी ज्ञानाने अज्ञानाचा नाश झाला असतां सर्व अनर्थांचा नाश होतो, असे सांगितले व चवथ्या पादानें अज्ञान आणि मिथ्याज्ञान या आवरणांचा नाश झाला असतां तो ज्ञानी सर्वोत्तम गतीला प्राप्त होतो म्ह० परम पुरुषार्थाचा-परमानंदाचा अनुभव घेतो, असें सांगितले. असो, तो आपणच आपला घात करून घेत नाहीं, असा यथाश्रुत अर्थ घेऊन आक्षेप-]—**ननु कश्चित् प्राणी स्वयं स्वं आत्मानं न एव हिनस्ति**—अहोपण, कोणताच प्राणी स्वतःच स्वतःचा-आत्म्याचा घात करीतच नाहीं—**अप्राप्तं न हिनस्ति इति कथं उच्यते**—मग आत्मघात प्राप्तच नसतांना ' आपणच आपला घात करीत नाहीं ' असें कसे सांगितले जात आहे ?—**यथा न पृथिव्यां अग्निः चेतव्यः न अन्तरिक्षे इत्यादि**—ज्याप्रमाणें पृथ्वीमध्यें अग्निचयन करूं नये. आकाशांत करूं नये, अंतरिक्षांत करूं नये इत्यादि [ पृथिवीमध्यें अग्निचयनाची प्राप्ति आहे. यास्तव ' न पृथिव्यां ' हा जसा प्राप्तिद्वारा निषेध आहे तसा ' न अंतरिक्षे न दिवि ' हा निषेध प्राप्त नाहीं. त्याच्या प्राप्तीचा अभाव आहे. कारण अन्तरिक्षांत व आकाशांत अग्निचयनाचा संभवच नाहीं, यास्तव त्या निषेधाला मुख्य न मानतां गौण जसें मानतात त्याप्रमाणें येथील ' न हिनस्ति ' हा निषेध प्राप्तीवांचून असल्यामुळें गौण आहे. ]

**नैष दोषः । अज्ञानामात्मतिरस्करणोपपत्तेः । सर्वो ह्यज्ञोऽत्यन्तप्रसिद्धं साक्षादपरोक्षादात्मानं तिरस्कृत्यानात्मानमात्मत्वेन परिगृह्य तमपि धर्माधर्मौ कृत्वोपात्तमात्मानं हत्वाऽन्यमात्मानमुपादत्ते नवं तं चैवं हत्वाऽन्यमेवं तमपि हत्वाऽन्यमित्येवमुपात्तमुपात्तमात्मानं हन्तीत्यात्महा सर्वोऽज्ञः । यस्तु परमार्थात्मासावपि सर्वदाऽविद्यया हत इव विद्यमानफलाभावादिति सर्वे आत्महन एवाविद्वांसः । यस्त्वितरो यथोक्तात्मदर्शी स उभयथाऽप्यात्मनाऽऽत्मानं न हिनस्ति ततो याति परां गतिं यथोक्तं फलं तस्य भवतीत्यर्थः ॥ २८ ॥**

**भाष्यार्थ**—( अज्ञ लोक आपणच आपली हिंसा करितात, विद्वान् करीत नाहीं, हें म्हणणे योग्यच आहे,असें समाधान- )—**एषः दोषः न**—येथें हा अप्राप्तप्रतिषेध-दोष येत नाहीं.—**अज्ञानां आत्मतिरस्करणोपपत्तेः**—कारण अनात्मज्ञांच्या आत्मतिरस्काराचा संभव आहे. [ आत्म्याला न जाणणारे अज्ञ आत्म्याचा तिरस्कार करितात, याच संक्षिप्त वाक्याचें विवरण-]—**हि सर्वः अज्ञः अत्यन्तप्रसिद्धं साक्षात् अपरोक्षात् आत्मानं तिरस्कृत्य**—कारण सर्व अज्ञ अत्यंत प्रसिद्ध-साक्षात्-अपरोक्ष असलेल्या आत्म्याचा तिरस्कार करून-त्याला विसरून—**अनात्मानं आत्मत्वेन परिगृह्य**—देहादि अनात्म्याचें आत्मत्वानें सर्वप्रकारें ग्रहण करून म्ह० ‘ देहादिकच मी ’ असे मानून—**धर्माधर्मौ कृत्वा तं अपि उपात्तं आत्मानं हत्वा**—धर्म व अधर्म या नांवाचीं कर्में करून-कर्मानेंच संपादन केलेल्या त्या आत्म्यालाहि मारून—**अन्यं नवं आत्मानं उपादत्ते**—दुसऱ्या नवीन आत्म्याचे ग्रहण करितो—**एवं तं च हत्वा अन्यं**—तसेच त्याला मारून दुसऱ्या आत्म्याचा स्वीकार करितो.—**एवं तं अपि हत्वा अन्यं**—त्याचप्रमाणें त्यालाहि मारून तिसऱ्या देहादि-आत्म्याचें संपादन करितो—**इति एवं उपात्तं उपात्तं आत्मानं हन्ति इति सर्वः अज्ञः आत्महा**—या अशा क्रमानें पुनः पुनः धर्माधर्मादि कर्मानें संपादन केलेल्या आत्म्याचा घात करतो, म्हणून सर्व अज्ञ आत्मघाती आहे. (असे जरी असले तरी खरा आत्मा मारला जात नाहीं, देहादि मिथ्या आत्मा मारला जातो. त्यामुळे त्या अनात्मज्ञांनाहि वास्तविक आत्महन्तृत्व नाहीं, अशी आशंका घेऊन आचार्य म्हणतात-)—**तु यः परमार्थात्मा असौ अपि अविद्यया सर्वदा हतः इव**—पण जो परमार्थभूत आत्मा-मुख्य चैतन्यात्मा तोहि अविद्येच्यायोगानें सर्वदा जणुंकाय मारल्यासारखाच होतो. कारण —**विद्यमानफलाभावात्**—आत्मा विद्यमान असण्याचे जें फल-नित्यानन्दानुभव व संसाराभाव त्याचा अभाव असतो, त्यामुळे तो स्वरूपतः नित्यसिद्ध जरी असला तरी अज्ञाच्या अविद्येमुळें,त्याला तो नसल्यासारखाच होतो.—**इति सर्वे अविद्वांसः आत्महनः एव**—यास्तव सर्व अविद्वान् आत्मघातीच होत. ( पण विद्वान् तसा आत्मघाती नाहीं, असे सांगतात-)—**तु यः इतरः यथोक्त-आत्मदर्शी सः उभयथा अपि आत्मना आत्मानं न हिनस्ति**—पण जो दुसरा-अनात्मज्ञांहून भिन्न असलेला-पूर्वोक्त आत्मदर्शी तो आरोप व अनारोप या दोन्ही प्रकारें स्वतःच

आपली हिंसा करीत नाहीं. [ देहाला आत्मा समजून त्याचा नाश करीत नाहीं व अवि॰द्येमुळें विद्यमान आत्म्याला न जाणूनहि त्याला असून नसल्यासारखें करीत नाहीं, असा भावार्थ. याप्रमाणें आत्मज्ञानाने सर्व अनर्थभ्रमाचा नाश झाला असतां परमानंदप्राप्तीनें पूर्वोक्त तृप्ति होणे योग्यच आहे, असें सांगतात- ]—**ततः परां गतिं याति-यथोक्तं फलं तस्य भवति इत्यर्थः**—त्यामुळें तो परमगतीला प्राप्त होतो, पूर्वोक्त फल त्याला मिळतें, असा याचा भावार्थ. २८.

**प्रकृत्यैव च कर्माणि क्रियमाणानि सर्वशः ।**
**यः पश्यति तथात्मानमकर्तारं स पश्यति ॥ २९ ॥**

**अन्वयार्थ—यः**—जो—**कर्माणि**—सर्व कर्में—**प्रकृत्या एव च**—प्रकृतीकडूनच-ईश्वराच्या शरीरेंद्रियाकार बनलेल्या मायेकडूनच—**सर्वशः**—सर्व प्रकारें—**क्रियमाणानि**—केलीं जाणारीं—**पश्यति**—पाहतो—**तथा**—त्याचप्रमाणें—**आत्मानं अकर्तारं**—आत्म्याला अकर्ता—**पश्यति**—पाहतो—**सः पश्यति**—तोच वास्तविक तत्त्व पाहतो. २९

**सर्वभूतस्थमीशं समं पश्यन्न हिनस्त्यात्मनाऽऽत्मानमित्युक्तं तदनुपपन्नं स्वगुणकर्मवैलक्षण्यभेदभिन्नेष्वात्मस्विवत्येतदाशङ्क्याऽऽह—प्रकृत्या प्रकृतिर्भगवतो माया त्रिगुणात्मिका, "मायां तु प्रकृतिं विद्यात्" इति मन्त्रवर्णात्तया प्रकृत्यैव च नान्येन महदादिकार्यकरणाकारपरिणतया कर्माणि वाङ्मनःकायारभ्याणि क्रियमाणानि निर्वर्त्यमानानि सर्वशः सर्वप्रकारैर्यः पश्यत्युपलभते तथाऽऽत्मानं क्षेत्रज्ञमकर्तारं सर्वोपाधिविवर्जितं सः पश्यति स परमार्थदर्शीत्यभिप्रायः । निर्गुणस्याकर्तुर्निर्विशेषस्याऽऽकाशस्येव भेदे प्रमाणानुपपत्तिरित्यर्थः ॥ २९ ॥**

**भाष्यार्थ—सर्वभूतस्थं ईशं समं पश्यन् आत्मना आत्मानं न हिनस्ति इति उक्तं**—सर्व भूतस्थ ईश्वराला सम पाहणारा आपणच आपला नाश करीत नाहीं, असें सांगितलें. पण—**स्वगुणकर्मवैलक्षण्यभेदभिन्नेषु आत्मसु तत् अनुपपन्नं**—सुखदुःखादि स्वगुण व धर्माधर्मादि स्वकर्में यांच्या वैलक्षण्यामुळें-ते गुण व कर्में प्रतिदेहांत अगदीं भिन्न भिन्न असल्यामुळें त्यांच्या त्या भेदामुळें प्रतिशरीरांत भिन्न असलेल्या आत्म्यामध्यें समदर्शन अयोग्य आहे-विषम आत्म्यामध्यें समदृष्टि संभवत नाहीं, —**इति एतत् आशंक्य आह**—अशी आशंका घेऊन भगवान् म्हणतात—**प्रकृत्या -प्रकृतिः-भगवतः माया-त्रिगुणात्मिका**—प्रकृतीकडून-प्रकृति म्ह॰ भगवानांची त्रिगुणात्मिका माया—" **मायां तु प्रकृतिं विद्यात्** " ( श्वेताश्वतर ४.१० )—**इति मंत्रवर्णात्**—याविषयीं ' मायेला प्रकृति समजावें ' अशी श्रुति व मंत्रवर्ण प्रमाण आहे.—**तया प्रकृत्या एव-न अन्येन**—त्या प्रकृतीकडूनच दुसऱ्या कोणाकडूनहि नव्हे—**महदादिकार्यकरणाकारपरिणतया**—महत्, अहंकार इत्यादि कार्य-कर-

णांच्या-शरीरेंद्रियांच्या आकारानें परिणत झालेल्या [ प्रकृतीकडूनच ]—**वाङ्मनः-कायारभ्याणि कर्माणि**—वाक्, मन व शरीर यांच्यायोगाने होणारीं कर्में—**क्रियमाणानि-निर्वर्त्यमानानि**—केलीं जाणारीं-घडणारीं—**सर्वशः-सर्वप्रकारैः**—सर्वशः म्ह० काम्य-निषिद्ध इत्यादि सर्व प्रकारांनीं ( कायिक, वाचिक व मानसिक कर्में प्रकृतीकडूनच केलीं जातात असें-)—**यः पश्यति-उपलभते**—जो पाहतो-जाणतो -हीं सर्व कर्में शरीरेंद्रियाकार प्रकृतीकडूनच केलीं जातात आत्म्याकडून केव्हांहि नव्हेत असा जो साक्षात् अनुभव घेतो—**तथा आत्मानं क्षेत्रज्ञं अकर्तारं-सर्वोपाधि-विवर्जितं पश्यति**—त्याचप्रमाणें आत्म्याला-क्षेत्रज्ञाला जो अकर्ता-सर्व उपाधिशून्य पाहतो—**सः परमार्थदर्शी इति अभिप्रायः**—तो परमार्थदर्शी, असा याचा आशय आहे.—**निर्गुणस्य अकर्तुः निर्विशेषस्य आकाशस्य इव भेदे प्रमाणानुपपत्तिः इत्यर्थः**—निर्गुण, अकर्ता व निर्विशेष अशा क्षेत्रज्ञाच्या भेदाविषयीं आकाशाच्या भेदांप्रमाणेच कांहीं प्रमाण संभवत नाहीं, असा भावार्थ. २९.

**यदा भूतपृथग्भावमेकस्थमनुपश्यति ।**
**तत एव च विस्तारं ब्रह्म संपद्यते तदा ॥ ३० ॥**

**अन्वयार्थ—यदा**—जेव्हां—**भूतपृथग्भावं**—भूतांचा पृथक्पणा—**एकस्थं**—एका आत्म्यामध्येंच स्थित आहे, असें—**अनुपश्यति**—शास्त्र व आचार्य यांच्या उपदेशाप्रमाणें पाहतो—**च**—आणि—**ततः एव**—त्या एक आत्म्यापासूनच—**विस्तारं**—भूतांचा विस्तार—(**पश्यति**)—पाहतो—**तदा**—त्यावेळीं—**ब्रह्म संपद्यते**—साधक ब्रह्म बनतो.३०

**पुनरपि तदेव सम्यग्दर्शनं शब्दान्तरेण प्रपञ्चयति—यदा यस्मिन्काले भूतपृथग्भावं भूतानां पृथग्भावं पृथक्त्वमेकस्थमेकस्मिन्नात्मनि स्थितमेकस्थमनुपश्यति शास्त्राचार्योपदेशतो मत्वाऽऽत्मप्रत्यक्षत्वेन पश्यत्यात्मैवेदं सर्वमिति । तत एव च तस्मादेव च विस्तारमुत्पत्तिं विकाशमात्मतः प्राण आत्मत आशा आत्मतः स्मर आत्मत आकाश आत्मतस्तेज आत्मत आप आत्मत आविर्भावतिरोभावावात्मतोऽन्नमित्येवमादिप्रकारैर्विस्तारं यदा पश्यति ब्रह्म संपद्यते ब्रह्मैव भवति तदा तस्मिन्काल इत्यर्थः ॥ ३० ॥**

**भाष्यार्थ—पुनरपि तत् एव सम्यग्दर्शनं शब्दान्तरेण प्रपंचयति**—पुनरपि तेंच सम्यग्दर्शन-तत्त्वज्ञान दुसऱ्या शब्दांनी वर्णितात-त्याचेंच दुसऱ्या शब्दांनीं वर्णन-विस्तार करितात—**यदा यस्मिन्काले**—जेव्हां-ज्या वेळीं—**भूतपृथग्भावं -भूतानां पृथग्भावं-पृथक्त्वं**—भूतपृथग्भाव-भूतांचा पृथग्भाव-भूतांचें पृथक्त्व —**एकस्थं-एकस्मिन् आत्मनि स्थितं-एकस्थं अनुपश्यति**—एकस्थ-एका आत्म्यामध्यें स्थित आहे, असें ' अनु-'मागून पहातो. म्ह० **शास्त्राचार्योपदेशतः मत्वा आत्मप्रत्यक्षत्वेन ' आत्मा एव इदं सर्वं ' इति पश्यति**—शास्त्र व आचार्य यांच्या उपदेशावरून-त्यांच्या उपदेशानुसार मनन करून स्वतःच्या प्रत्यक्ष-

त्वानें [ उपदेशापासून झालेल्या प्रत्यक्ष दर्शनानें ] ‘ हें सर्व आत्माच आहे ’ असें पाहतो, [ म्ह० सर्व भूतें व विकार यांचें नानात्व प्रकृतीसह आत्मरूप झाले आहे, तें सर्व आत्ममय आहे, असें पाहतो, आणि त्याचप्रमाणें- ]—**ततः एव च-तस्मात् एव च विस्तारं उत्पत्ति-विकाशं**—त्याच्यापासूनच विस्तार-उत्पत्ति-विकास-परिपूर्ण आत्म्यापासूनच प्रकृतिप्रभृति-शरीरान्त सर्व पदार्थांना स्वरूपलाभ झाला आहे, असें पाहून [ त्या सर्वांना आत्मरूप पाहतो, तो ब्रह्मरूप होतो, असा पुढें संबंध. हाच विस्तार श्रुतीच्या आधाराने स्पष्ट करितात- ]—**आत्मतः प्राणः आत्मतः आशा आत्मतः स्मरः आत्मतः आकाशः आत्मतः तेजः आत्मतः आपः आत्मतः आविर्भावतिरोभावौ आत्मतः अन्नं इति-एवं-आदिप्रकारैः विस्तारं यदा पश्यति**—आत्म्यापासून प्राण, आत्म्यापासून आशा, स्मर, आकाश, तेज, जल, आत्म्यापासून आविर्भाव व तिरोभाव, आत्म्यापासून अन्न (छां. भा.अ.७.२६. १ पृ.५७१) या अशा प्रकारांनीं विस्ताराला जेव्हा पाहतो—**तदा-तस्मिन् काले ब्रह्म संपद्यते-ब्रह्म एव भवति इत्यर्थः**—त्यावेळीं तो विद्वान् ब्रह्मसंपन्न होतो-ब्रह्मच होतो, असा याचा भावार्थ. [ ब्रह्मसंपत्ति म्ह० पूर्णत्वानें अभिव्यक्ति, अपूर्णत्वाचें सर्व कारण आत्मरूप पाहिल्यानें आत्मा परिपूर्ण आहे, हा अनुभव येतो. ‘ जेव्हां पाहतो, तेव्हा ब्रह्म होतो, ’ या भगवद्वचनावरून ज्ञान होतांच मुक्ति होते, हे सिद्ध झालें. ] ३०.

अनादित्वान्निर्गुणत्वात्परमात्मायमव्ययः ।
शरीरस्थोऽपि कौन्तेय न करोति न लिप्यते ॥

**अन्वयार्थ—अयं परमात्मा**—हा परमात्मा—**अनादित्वात्**—अनादित्वामुळें व—**निर्गुणत्वात्**—निर्गुणत्वामुळे—**अव्ययः**—अक्षय आहे—**कौन्तेय**—हे कुंतीपुत्रा ! हा—**शरीरस्थः अपि**—शरीरात स्थित असलेलाहि—**न करोति**—कांहीं करीत नाहीं व—**न लिप्यते**—कर्मफलानें लिप्त होत नाहीं. ३१

**एकस्याऽऽत्मनः सर्वदेहात्मत्वे तद्दोषसंबन्धे प्राप्त इदमुच्यते—अनादित्वादनादेर्भावोऽनादित्वमादिः कारणं यद्यस्य नास्ति तदनादि । यद्ध्यादिमत्तत्स्वेनाऽऽत्मना व्येत्ययं त्वनादित्वान्निरवयव इति कृत्वा न व्येति । तथा निर्गुणत्वात्सगुणो हि गुणव्ययाद्व्येत्ययं तु निर्गुणत्वान्न व्येतीति परमात्माऽयमव्ययो नास्य व्ययो विद्यत इत्यव्ययः । यत एवमतः शरीरस्थोऽपि शरीरेष्वात्मन उपलब्धिर्भवतीति शरीरस्थ उच्यते तथाऽपि न करोति । तदकरणादेव तत्फलेन न लिप्यते । यो हि कर्ता स कर्मफलेन लिप्यतेऽयं त्वकर्ताऽतो न फलेन लिप्यत इत्यर्थः ॥**

**भाष्यार्थ—एकस्य आत्मनः सर्वदेहात्मत्वे तद्दोषसंबंधे प्राप्ते इदं उच्यते**—एकाच परिपूण आत्म्याला सर्व देहांचें आत्मत्व आहे, असें म्हटल्यास देहादिकांचे कर्तृत्वादि धर्म त्याच्याशीं संसर्ग पावतील, म्ह० देहादिकांच्या दोषांनीं आत्मा दूषित होईल,

अशी आशंका आली असतां हें 'अनादित्वात्०' इत्यादि सांगितलें जातें—**अनादित्वात्-अनादेः भावः अनादित्वं**—अनादित्वामुळें-अनादीचा जो भाव ते अनादित्व-अनादिपणा—**आदिः-कारणं तत् यस्य न अस्ति तत् अनादि**—आदि म्ह० कारण, तें ज्याला नसते ते अनादि—**यत् हि आदिमत् तत् स्वेन आत्मना व्येति**—कारण जे आदिमत् म्ह० कारणयुक्त असते तें कार्य स्वतःच्या स्वरूपानें व्यय पावतें-त्याच्या स्वरूपाचा क्षय होतो—**तु अयं अनादित्वात् निरवयवः इति कृत्वा न व्येति**—पण हा अनादि असल्यामुळे-निरवयव असणें या कारणानें व्यय पावत नाहीं—**तथा निर्गुणत्वात्**—त्याचप्रमाणे निर्गुणत्वामुळें त्याचा व्यय होत नाहीं.—**सगुणः हि गुणव्ययात् व्येति**—सगुण-गुणयुक्त पदार्थच गुणांच्या व्ययामुळें व्यय पावतो—**अयं तु निर्गुणत्वात् न व्येति**—पण हा निर्गुण असल्यामुळे व्यय पावत नाहीं.—**इति परमात्मा अयं अव्ययः**—त्यामुळें हा परमात्मा व्यय पावत नाहीं. [ निरवयव असल्यामुळेंच अवयवांच्या द्वारा व निर्गुण असल्यामुळे गुणांच्या द्वारा याचा क्षय होत नाहीं. त्याचप्रमाणे त्याचा स्वभावतःहि व्यय होत नाहीं- ]—**अस्य व्ययः न विद्यते इति अव्ययः**—याचा व्यय विद्यमान नाहीं, याचा कोणत्याच निमित्तानें व्यय होत नाहीं, म्हणून अव्यय—**यतः एवं अतः शरीरस्थः अपि**—ज्याअर्थी आत्म्याचा स्वतः किंवा परतःहि व्यय संभवत नाहीं, त्याअर्थी तो शरीरस्थ असला तरी—**शरीरेषु आत्मनः उपलब्धिः भवति इति शरीरस्थः उच्यते**—शरीरांत आत्म्याची उपलब्धि होते-शरीरांत त्याचा अनुभव येतो ह्मणून त्याला ' शरीरस्थ ' म्हटले जातें. —**तथापि न करोति**—तो शरीरांत जरी उपलब्ध होत असला-शरीरस्थ असला तरी स्वतः किंवा देहादि रूपाने कांहीं कर्म करीत नाहीं, [कारण स्वतः कूटस्थ आहे व देहादिक कल्पित आहे. आत्म्याला कर्तृत्व जरी नसले तरी सांख्याच्या ह्मणण्याप्रमाणें भोक्तृत्व असेल अशी आशंका घेऊन सांगतात-]—**तदकरणात् एव तत्फलेन न लिप्यते**—त्याच्या अकरणामुळेंच-तो कांहीं कर्म करीत नसल्यामुळेंच त्याच्या फलानें लिप्त होत नाहीं. ( याचेच उपपादन- )—**हि यः कर्ता सः कर्मफलेन लिप्यते**—कारण जो कर्ता असतो तो त्या कृतकर्मांच्या फलाने लिप्त होतो.—**तु अयं अकर्ता अतः फलेन न लिप्यते इत्यर्थः**—पण हा अकर्ता आहे, त्यामुळें फलानें लिप्त होत नाहीं, असा भावार्थ.

**कः पुनर्देहेषु करोति लिप्यते च यदि तावदन्यः परमात्मनो देही करोति लिप्यते च तत इदमनुपपन्नमुक्तं क्षेत्रज्ञेश्वरैकत्वं क्षेत्रज्ञं चापि मां विद्धीत्यादि । अथ नास्तीश्वरादन्यो देही कः करोति लिप्यते चेति वाच्यं परो वा नास्तीति । सर्वथा दुर्विज्ञेयं दुर्वाच्यं चेति भगवत्प्रोक्तमौपनिषदं दर्शनं परित्यक्तं वैशेषिकैः सांख्यार्हतबौद्धैश्च ॥**

**भाष्यार्थ—कः पुनः देहेषु करोति लिप्यते च**—तर मग देहांमध्यें करतो कोण व लिप्त कोण होतो ?—**यदि तावत् परमात्मनः अन्यः देही**

**करोति च लिप्यते**—पण जर परमात्म्याहून निराळा असलेला देहाभिमानी जीव करतो व लिप्त होतो, म्हणून म्हणावें—**ततः ' क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि ' इत्यादि इदं क्षेत्रज्ञेश्वर-एकत्वं अनुपपन्नं उक्तं**—तर '"क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि' (पृ. ८६६) –क्षेत्रज्ञहि मला समज, इत्यादि हें क्षेत्रज्ञ-ईश्वर-एकत्व अयुक्त सांगितलें आहे, असें होईल. ( म्ह० त्यांत सांगितलेले जीवेश्वरांचें ऐक्य अयोग्य आहे, असें म्हणावें लागेल.) **—अथ ईश्वरात् अन्यः देही नास्ति कः करोति च लिप्यते इति-वाच्यं** —बरें, ईश्वराहून निराळा जीव नाहीं, तर कोण करतो व लिप्त होतो तें सांगणें उचित आहे.—**वा परः नास्ति इति**—किंवा परमात्मा मुळीं नाहींच, असे तरी म्हटलें पाहिजे. [ ईश्वराहून निराळा जीव नाहीं, असें म्हणावें तर या अध्यायाच्या पहिल्याच श्लोकांत क्षेत्रज्ञाचा उपक्रम जो केला आहे त्याच्याशीं विरोध येतो, शिवाय या प्रत्यक्ष प्रतीत होणाऱ्या कर्तृत्वादिकांचा आधार कोण ? 'परमात्माच त्याचा आधार आहे, त्यामुळें कर्ता कोण हें सांगावयासच नको,' म्हणून म्हणाल तर मग परमात्मा आहे या म्हणण्यांत तरी काय अर्थ आहे ? कारण तो जर कर्तृत्वादि धर्मांनीं युक्त असेल तर आम्हांप्रमाणें तोहि अनीश्वर होईल. अर्थात्-]—**सर्वथा दुर्विज्ञेयं दुर्वाच्यं च**—हें तत्त्व सर्वथा दुर्विज्ञेय म्ह० कळण्यास अतिशय कठिण व सांगण्यासहि अतिशय कठिण आहे. म्ह० तें कळणेंहि शक्य नाहीं व समजून सांगतां येणेंहि शक्य नाही.—**इति भगवत्प्रोक्तं औपनिषदं दर्शनं वैशेषिकैः सांख्य-आर्हत-बौद्धैः च परित्यक्तं**—त्यामुळें भगवानांनी सांगितलेलें हें उपनिषदांतील ज्ञान म्ह० आत्मा शरीरांत स्थित असूनहि कांहीं करीत नाही व लिप्त होत नाही, असें भगवानांनी सांगितलेलें हें दर्शन उपनिषदांच्या आधारानेच जरी सांगितलेलें असलें तरी वैशेषिक, सांख्य, जैन व बौद्ध यांनी त्याचा परित्याग केला आहे. [ तें दुर्विज्ञेय व दुर्वाच्य असल्यामुळे वैशेषिकादि सर्व परीक्षकांनी त्याचा स्वीकार केलेला नाही. ]

**तत्रायं परिहारो भगवता स्वेनैवोक्तः 'स्वभावस्तु प्रवर्तते ' इति । अविद्यामात्रस्वभावो हि करोति लिप्यत इति व्यवहारो भवति न तु परमार्थत एकस्मिन्परमात्मनि तदस्ति । अत एतस्मिन्परमार्थसांख्यदर्शने स्थितानां ज्ञाननिष्ठानां परमहंसपरिव्राजकानां तिरस्कृताविद्याव्यवहाराणां कर्माधिकारो नास्तीति तत्र तत्र दर्शितं भगवता॥**

**भाष्यार्थ—तत्र ' स्वभावस्तु प्रवर्तते ' इति अयं परिहारः भगवता स्वेन एव उक्तः**—पण या शंकेचा परिहार ' स्वभाव-अविद्यारूप माया-प्रकृति हें सर्व करिते ' ( अ. ५ श्लोक १४ पृ. ५०९ ) या वाक्यानें स्वतः भगवानांनींच सांगितला आहे. ( त्या परिहाराचेंच आचार्य स्पष्टीकरण करितात-)—**अविद्यामात्रस्वभावः हि करोति लिप्यते इति व्यवहारः भवति**—अविद्यामात्रस्वभाव-अविद्यामात्रस्वरूप आत्मा करितो व लिप्त होतो, ०असा व्यवहार होतो.—**तु परमार्थतः एकस्मिन् परमात्मनि तत् न अस्ति**—पण परमार्थतः एकाच परमात्म्यामध्यें तें-कर्तृत्वादिक नाहीं. [ आत्मा वस्तुतः अकर्ता व अभोक्ता आहे, तथापि अविद्येमुळें त्या-

ऱ्यावर कर्तृत्व भोक्तृत्वाचा आरोप होतो. अर्थात् त्याचें कर्तृत्वादि व्यावहारिक आहे, पारमार्थिक नव्हे. कारण एकच व अद्वितीय असलेल्या परमात्म्यामध्यें पारमार्थिक कर्तृत्वादिकांचा संभवच नाही. आत्म्याला वास्तविक कर्तृत्व नाही, याविषयीं सूचक चिह्नांचा उपन्यास करितात-]—**अतः एतस्मिन् परमार्थसांख्यदर्शने स्थितानां ज्ञाननिष्ठानां परमहंसपरिव्राजकानां तिरस्कृत-अविद्याव्यवहाराणां कर्माधिकारः नास्ति इति तत्र तत्र भगवता दर्शितम्**—यास्तव या परमार्थ सांख्यदर्शनामध्यें म्ह० परमार्थ आत्मतत्त्वज्ञानामध्ये स्थित झालेल्या ज्ञाननिष्ठांचा [ कर्मामध्यें अधिकार नाहीं. त्या ज्ञाननिष्ठांचीच दोन सहेतुक विशेषणे ] परमहंसपरिव्राजक व ज्यांनीं सर्व अविद्याव्यवहाराचा तिरस्कार केला आहे-सर्व अविद्याव्यवहार सोडला आहे अशा ज्ञाननिष्ठांचा कर्मामध्यें अधिकार नाहीं, असें ठिकठिकाणीं भगवानांनीं प्रदर्शित केलें आहे. ३१

**यथा सर्वगतं सौक्ष्म्यादाकाशं नोपलिप्यते ।**
**सर्वत्रावस्थितो देहे तथात्मा नोपलिप्यते ॥ ३२ ॥**

**अन्वयार्थ—यथा**—ज्याप्रमाणें—**सर्वगतं आकाशं**—सर्वव्यापी आकाश—**सौक्ष्म्यात्**—सूक्ष्मत्वामुळे—**न उपलिप्यते**—कोणत्याहि लेपानें लिप्त होत नाहीं—**तथा**—त्याप्रमाणे—**देहे सर्वत्र**—देहांत सर्व ठिकाणीं—**अवस्थितः आत्मा**—अवस्थित असलेला-व्यापून राहिलेला आत्मा देहधर्मांनी—**न उपलिप्यते**—संबद्ध होत नाहीं. ३२

**किमिव न करोति न लिप्यत इत्यत्र दृष्टान्तमाह—यथा सर्वगतं व्याप्यपि सत्सौक्ष्म्यात्सूक्ष्मभावादाकाशं खं नोपलिप्यते न संबध्यते सर्वत्रावस्थितो देहे तथाऽऽत्मा नोपलिप्यते ॥ ३२ ॥**

**भाष्यार्थ—किं इव न करोति न लिप्यते इति-अत्र दृष्टान्तं आह**—कोणाप्रमाणें तो करीत नाहीं व लिप्त होत नाहीं,याविषयीं भगवान् दृष्टान्त सांगतात—**यथा सर्वगतं-व्यापि अपि सत्**—ज्याप्रमाणे सर्वगत म्ह० व्यापी असूनहि—**सौक्ष्म्यात्-सूक्ष्मभावात्**—सूक्ष्मत्वामुळे-सूक्ष्मपणामुळे—**आकाशं-खं**—आकाश—**न उपलिप्यते-न संबध्यते**—धूळ, चिखल इत्यादिकांनी उपलिप्त होत नाहीं, संबद्ध होत नाहीं,—**तथा देहे सर्वत्र अवस्थितः आत्मा न उपलिप्यते**—त्याचप्रमाणें देहांत सर्वत्र अवस्थित असलेला आत्मा उपलिप्त-संबद्ध होत नाही. ३२.

**यथा प्रकाशयत्येकः कृत्स्नं लोकमिमं रविः ।**
**क्षेत्रं क्षेत्री तथा कृत्स्नं प्रकाशयति भारत ॥ ३३ ॥**

**अन्वयार्थ—भारत**—हे अर्जुना !—**यथा**—ज्याप्रमाणें—**एकः रविः**—एक सूर्य—**कृत्स्नं इमं लोकं**—या सर्व लोकाला—**प्रकाशयति**—प्रकाशमान करतो,

—**तथा**—त्याप्रमाणें—**क्षेत्री**—क्षेत्रज्ञ आत्मा—**कृत्स्नं क्षेत्रं**—सर्व क्षेत्राला—**प्रकाशयति**—प्रकाशित करतो. ३३.

**किंच— यथा प्रकाशयत्यवभासयत्येकः कृत्स्नं लोकमिमं रविः सविताऽऽदित्यस्तथा तद्वन्महाभूतादिधृत्यन्तं क्षेत्रमेकः सन्प्रकाशयति कः क्षेत्री परमात्मेत्यर्थः। रविदृष्टान्तोऽत्राऽऽत्मन उभयार्थोऽपि भवति रविवत्सर्वक्षेत्रेष्वेक आत्माऽलेपकश्चेति ॥ ३३ ॥**

**भाष्यार्थ—किंच**—तसेंच 'यथा०' या श्लोकानें 'तो करीत नाही व लिप्त होत नाही' याविषयीं 'आत्मा द्रष्टा असल्यामुळे दृश्यधर्मरहित आहे' हा हेतु सांगतात—**यथा एकः रविः-सविता-आदित्यः कृत्स्नं इमं लोकं प्रकाशयति-अवभासयति**—ज्याप्रमाणे एक रवि-सविता-आदित्य या सर्व लोकाला प्रकाशित-अवभासित करितो—**तथा-तद्वत् महाभूतादि-धृत्यन्तं क्षेत्रं एकः सन् प्रकाशयति**—त्याप्रमाणे महाभूतापासून धृतीपर्यंत सर्वक्षेत्राला एकच असून प्रकाशित करितो,—**कः-क्षेत्री-परमात्मा इत्यर्थः**—कोण? क्षेत्री-क्षेत्रवान्-क्षेत्रज्ञ परमात्मा असा याचा भावार्थ. (दृष्टान्तानें विवक्षित असलेला अर्थ आचार्य प्रदर्शित करितात-)—**अत्र आत्मनः रविदृष्टान्तः उभयार्थः अपि भवति**—येथे आत्म्याचा हा सूर्यदृष्टान्त-आत्म्याला दिलेला हा सूर्याचा दृष्टान्त दोन्ही अर्थी आहे. (दोन प्रकारचा अर्थ कोणता, ते सांगतात-)—**रविवत् सर्वक्षेत्रेषु आत्मा एकः च अलेपकः इति**—सूर्याप्रमाणें सर्व क्षेत्रांमध्ये आत्मा एक व लेपरहित आहे, या दोन्ही अर्थी हा दृष्टान्त आहे. ३३.

**क्षेत्रक्षेत्रज्ञयोरेवमन्तरं ज्ञानचक्षुषा ।**
**भूतप्रकृतिमोक्षं च ये विदुर्यान्ति ते परम् ॥ ३४ ॥**

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे प्रकृतिपुरुषविवेकयोगो नाम त्रयोदशोऽध्यायः ॥ १३ ॥**

**अन्वयार्थ—ये**—जे—**एवं**—याप्रमाणे—**क्षेत्रक्षेत्रज्ञयोः**—क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांच्यामधील—**अन्तरं**—परस्पर विलक्षणता-फरक—**च**—व—**भूतप्रकृतिमोक्षं**—भूतांच्या प्रकृतीचा ज्ञानानें होणारा अभाव—**ज्ञानचक्षुषा**—ज्ञानदर्शने—**विदुः**—जाणतात—**ते**—ते ज्ञानी—**परं**—परमात्मतत्त्वास—**यान्ति**—प्राप्त होतात. ३४

**समस्ताध्यायार्थोपसंहारार्थोऽयं श्लोकः क्षेत्रक्षेत्रज्ञयोर्यथाव्याख्यातयोरेवं यथाप्रदर्शितप्रकारेणान्तरमितरेतरवैलक्षण्यविशेषं ज्ञानचक्षुषा शास्त्राचार्योपदेशजनितमात्मप्रत्ययिकज्ञानं चक्षुस्तेन ज्ञानचक्षुषा भूतप्रकृतिमोक्षं च भूतानां प्रकृतिरविद्यालक्षणाऽव्यक्ताख्या तस्या भूतप्रकृतेर्मोक्षणमभावगमनं च ये विदुर्विजानन्ति यान्ति गच्छन्ति ते परं परमार्थतत्त्वं ब्रह्म न पुनर्देहमाददत इत्यर्थः ॥ ३४ ॥**

इति श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यगोविंदभगवत्पूज्यपादशिष्यश्रीमच्छंकरभगवतः कृतौ श्रीभगवद्गीताभाष्ये क्षेत्रक्षेत्रज्ञयोगो नाम त्रयोदशोऽध्यायः ॥ १३ ॥

**भाष्यार्थ—समस्त-अध्यायार्थोपसंहारार्थः अयं श्लोकः**—समग्र अध्यायाच्या अर्थाचा उपसंहार करण्यासाठीं 'क्षेत्रक्षेत्रज्ञयोः०' हा श्लोक आहे.—**यथा व्याख्यातयोः क्षेत्रक्षेत्रज्ञयोः**—पूर्वी जसे व्याख्यान केले आहे, तशा प्रकारच्या क्षेत्र-क्षेत्रज्ञाचें—**एवं-यथाप्रदर्शितप्रकारेण**—याप्रमाणे-वर जसें प्रदर्शित केलें आहे तशा प्रकारानें—**अन्तरं-इतरेतरवैलक्षण्यविशेषं**—अन्तरास-परस्परांच्या विलक्षणतेच्या विशेषास-त्यांतील प्रत्येकाचें-एक कूटस्थ दुसरें परिणामी, एक चेतन दुसरें जड इत्यादि वैशिष्टयास—**ज्ञानचक्षुषा-शास्त्राचार्योपदेशजनितं आत्मप्रत्ययिकज्ञानं चक्षुः तेन-ज्ञानचक्षुषा**—ज्ञानचक्षूनें-शास्त्र व आचार्य यांच्या उपदेशाने उत्पन्न झालेलें आत्मसाक्षात्काररूप ज्ञान हा चक्षु, त्या ज्ञानचक्षूनें-[ जे जाणतात, असा पुढें संबंध. ]—**च भूतप्रकृतिमोक्षं-भूतानां प्रकृतिः-अविद्यालक्षणा-अव्यक्ताख्या तस्याः भूतप्रकृतेः मोक्षणं-अभावगमनं च ये विदुः-विजानन्ति**—आणि भूतप्रकृतिमोक्षाला-भूतांची प्रकृति-अविद्यारूप-अव्यक्तसंज्ञक भूतप्रकृति, त्या भूतप्रकृतीचें मोक्षण म्ह० अभावगमन-भूतप्रकृतीचा अभाव होणे, जे जा-

---

१ रहस्यकार-'ज्ञानचक्षुषा-' म्ह० ज्ञानरूप डोळ्यानें, असा अगदींच प्राकृत अर्थ करितात; व 'भूतप्रकृतिमोक्ष च' याचा सर्व भूतांच्या मूलभूत प्रकृतीचा मोक्ष, असा करितात. इतकेंच नव्हे तर पुढें टीपेंत म्हणतात-"भूतप्रकृतिमोक्ष-या शब्दाचा अर्थ आम्हीं सांख्यशास्त्राच्या सिद्धान्ताप्रमाणें केला आहे" (तो का बरे ? गीता हें सांख्यशास्त्र आहे कीं काय?) "मोक्ष मिळणे किंवा न मिळणे या अवस्था आत्म्याच्या नाहींत. कारण तो नेहमीच अकर्ता व असंग आहे."(पण हा सांख्याचा सिद्धान्त नसून उपनिषदाचा सिद्धान्त आहे.'निर्गुणं निष्क्रियं शान्तं' 'असंगो ह्ययं पुरुषः' [बृ. ४.३.१४.पृ.१३७] 'न निरोधो न चोत्पत्तिः न बद्धो न च साधकः। न मुमुक्षुः न वै मुक्तः इत्येषा परमार्थता' माण्डूक्य. भाष्यार्थ पृ.१२८.) "परंतु प्रकृतिगुणाच्या संगाने तो आपल्या ठायीं कर्तृत्वाचा आरोप करीत असल्यामुळे त्याचे हें अज्ञान नाहींसे झाले म्हणजे त्याच्याशीं संयुक्त असलेली प्रकृति सुटते, म्हणजे तिचाच मोक्ष होतो.... बंध व मोक्ष या दोन्ही अवस्था प्रकृतीच्याच आहेत, असें सांख्य प्रतिपादन करितात. या सांख्य सिद्धान्ताला अनुसरूनच 'प्रकृतीचा मोक्ष' हे शब्द या श्लोकांत आले आहेत, असें आम्हाला वाटतें." (पण हे वाटणे भ्रामक आहे. कारण सांख्याचा तसा सिद्धान्त जरी असला तरी तोच उपपन्न होत नाहीं. बंध व मोक्ष हे प्रकृतीचे धर्म होऊं शकत नाहींत. कारण प्रकृति जड आहे. दगडाला बंध कसला व मोक्ष तरी कसला? बंध व मोक्ष हे चेतनाचेच भ्रमाने आरोपिलेले धर्म आहेत. प्रकृति पुरुषाच्य भोगासाठीं व मोक्षासाठीं प्रवृत्त होते, असा सांख्याचाच सिद्धान्त आहे. 'प्रतिपुरुषविमोक्षार्थं आरंभः' ( सां. का. ५६ ) म्ह० प्रत्येक पुरुषाच्या मोक्षासाठी प्रकृतीची प्रवृत्ति आहे. 'वत्सविवृद्धिनिमित्तं क्षीरस्य यथा प्रवृत्तिरज्ञस्य पुरुषविमोक्षनिमित्तं तथा प्रवृत्तिः प्रधानस्य' ( सां. का. ५७ ) म्ह० वत्साच्या-वासराच्या वृद्धीसाठी अज्ञ-जड दुधाची जशी प्रवृत्ति होते तशीच पुरुषाच्या मोक्षासाठीं प्रधानाची प्रवृत्ति होते, इत्यादि. आता ६२ च्या कारिकेंत प्रकृतीचेच बंध-मोक्ष पुरुषावर आरोपिले जातात, असें म्हटलें

णतात-विशेषेंकरून जाणतात—**ते परं-परमार्थतत्त्वं ब्रह्म यान्ति-गच्छन्ति**—ते परब्रह्माला-परमार्थतत्त्वाला प्राप्त होतात, ते परब्रह्माला जाऊन पोंचतात-तद्रूप होतात.—**पुनः देहं न आददते इत्यर्थः**—पुनरपि देह धारण करीत नाहीत, असा याचा भावार्थ. [याप्रमाणे अमानित्वादि ज्ञानसाधनांमध्यें तत्पर झाल्यामुळें क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांच्या यथार्थस्वरूपाचें ज्याला विज्ञान झालें आहे, त्याच्या सर्व अनर्थाची निवृत्ति होऊन परिपूर्ण परमानंदाचा आविर्भाव होणें, या स्वरूपाचा पुरुषार्थ सिद्ध होतो, हें या अध्यायांत सांगितलें. ] ३४.

इति भगवान् श्रीकृष्णांनी गायलेल्या उपनिषदांतील-रहस्यविद्येंतील ब्रह्मविद्येपैकीं योग-उपाय-शास्त्रांतील प्रकृतिपुरुषविवेकयोग (क्षेत्रक्षेत्रज्ञयोग) नावाचा तेरावा अध्याय विष्णुशर्मकृत सान्वयार्थ-सटीप-भाष्य-भाष्यार्थासह समाप्त झाला.

---

आहे हे खरें, पण चेतन पुरुष भोक्ता आहे, असेंहि सांख्य म्हणतात आणि तो जर सुखदुःखभोक्ता आहे, तर बद्ध कसा नाही? सुखदुःखानुभव हाच संसार व तो चेतन पुरुषामध्येंच संभवतो. जड प्रकृतींत संभवत नाहीं. मोक्षहि संसारदुःखानें तापलेल्या पुरुषालाच हवा असतो. दगडासारख्या प्रकृतीला त्याची गरज नाहीं. कारण तिला जर दुःखच नाहीं तर 'त्रिविधदुःखाचा अत्यंत अभावरूप अत्यंत पुरुषार्थ' तरी कशाला हवा? आचार्यांनी या सिद्धान्ताचें अनुपपन्नत्व शारीरक-सूत्रभाष्यांत फारच उत्तम रीतीनें दाखविलें आहे. अशा अनुपपन्न सिद्धान्ताचा स्वीकार भगवानांनीं केला आहे, असें समजणें सर्वथा अयोग्य आहे, त्यामुळे 'प्रकृतीचा मोक्ष' हा रहस्यकारांनीं केलेला अर्थहि तितकाच अनुपपन्न आहे.) "कित्येक 'भूतेभ्यः प्रकृतेश्च मोक्षः' म्ह० पंच महाभूतें व प्रकृति यांच्यापासून अर्थात् मायात्मक कर्मांपासून आत्म्याचा मोक्ष होतो, असाहि अर्थ लावितात." (पण कोणीहि अद्वैती भाष्य व टीकाकार असा अर्थ करीत नाहींत. मध्वाचार्यांनीं 'भूतेभ्यः प्रकृतेश्च मोक्षः' असें म्हटलें आहे, पण त्याचा अर्थ रहस्यकार म्हणतात तसा नाहीं. कारण भूतें व प्रकृति म्ह० मायात्मक कर्में, असा अर्थ वैष्णव कधींच करणार नाहीत. असो; शेवटीं रहस्यकार म्हणतात-) "हा क्षेत्रक्षेत्रज्ञविवेक ज्ञानचक्षूनें कळणारा, तर नवव्या अध्यायांतील राजविद्या प्रत्यक्ष म्ह० चर्मचक्षूनें कळणारी (९.२) आणि विश्वरूपदर्शन परम भगवद्भक्तासहि केवल दिव्य चक्षूनेंच दिसणारें (११.८) हा नऊ, अकरा व तेरा या अध्यायांतील ज्ञानविज्ञाननिरूपणांतला भेद लक्षांत ठेवण्यासारखा आहे."(या सर्वांना ज्ञानविज्ञाननिरूपण म्हणणें कांहींसें चिन्त्यच आहे. तथापि नवव्या अध्यायांतील राजविद्या प्रत्यक्ष चर्मचक्षूनें कळणारी आहे, हे म्हणणें अगदींच अयोग्य आहे. ज्ञान चर्मचक्षूला प्रत्यक्ष दिसणार कसें? गी. भा. पृ. ६८३ भाष्यार्थ व टीप पहा.)

# अध्याय चवदावा.

## गुणत्रयविभागयोग.

**सर्वमुत्पद्यमानं क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगादुत्पद्यत इत्युक्तं तत्कथमिति तत्प्रदर्शनार्थं 'परं भूयः' इत्यादिरध्याय आरभ्यते, अथवेश्वरपरतन्त्रयोः क्षेत्रक्षेत्रज्ञयोर्जगत्कारणत्वं न तु सांख्यानामिव स्वतन्त्रयोरित्येवमर्थं प्रकृतिस्थत्वं गुणेषु च सङ्गः संसारकारणमित्युक्तं कस्मिन्गुणे कथं सङ्गः के वा गुणाः कथं वा ते बध्नन्तीति गुणेभ्यश्च मोक्षणं कथं स्यान्मुक्तस्य च लक्षणं वक्तव्यमित्येवमर्थं च—**

**भाष्यार्थ**—( पूर्वोत्तर अध्यायांची संगति-)—**सर्वं उत्पद्यमानं क्षेत्र-क्षेत्रज्ञसंयोगात् उत्पद्यते इति उक्तं**—जें जें उत्पन्न होणारे ते सर्व क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांच्या संयोगापासून उत्पन्न होते, असे तेराव्या अध्यायांत सांगितले,—**तत् कथं इति तत्प्रदर्शनार्थं 'परं भूयः०' इत्यादिः अध्यायः आरभ्यते**—पण ते कसे, हें प्रदर्शित करण्यासाठीं 'परं भूयः०' इत्यादि चवदावा अध्याय आरंभिला जातो.—**अथवा ईश्वरपरतन्त्रयोः क्षेत्रक्षेत्रज्ञयोः जगत्कारणत्वं**—किंवा ईश्वराच्या अधीन-ईशपरतंत्र असलेल्या क्षेत्र-क्षेत्रज्ञांना जगत्कारणत्व आहे,—**तु सांख्यानां इव स्वतन्त्रयोः न**—पण सांख्यांच्या मताप्रमाणें स्वतंत्र असलेल्या पुरुष-प्रकृतीला जगत्कारणत्व नाहीं,—**इति एवं अर्थं**—हा सिद्धान्त सागण्यासाठीं या अध्यायाचा आरंभ केला जातो. तसेंच—**प्रकृतिस्थत्वं गुणेषु च सङ्गः संसारकारणं इति** ( अ. १३ श्लो. २१ ) **उक्तं**—प्रकृतिस्थत्व म्ह० पुरुषाचा प्रकृतीशी ऐक्याध्यास व त्याचीच गुणांमध्ये म्ह० सुख-दुःख-मोहांमध्ये आसक्ति–हे माझे असा अभिनिवेश, हे संसाराचें कारण आहे असें ( वर पृ. ९५१ ) सांगितले. पण—**कस्मिन् गुणे कथं संगः**—कोणत्या गुणांत कसा आसंग होतो,—**के वा गुणाः**—तसेंच ते गुण कोणते,—**वा ते कथं बध्नन्ति इति**—किंवा ते गुण पुरुषाला बद्ध कसे करितात, हे सांगण्यासाठीं—**च गुणेभ्यः मोक्षणं कथं स्यात्**—व गुणांपासून मोक्षण–सुटणुक-मुक्ति कशी होईल ?—**च मुक्तस्य लक्षणं वक्तव्यं इति एवं अर्थं च ( श्रीभगवान् उवाच)**—आणि मुक्ताचें लक्षण सांगावे यासाठीं श्रीभगवान् म्हणाले. (अशा एकंदर सहा प्रश्नाचे उत्तर देण्यासाठीं हा अध्याय आरंभिला आहे. )

---

१ पण रहस्यकार म्हणतात— "तेराव्या अध्यायात क्षेत्रक्षेत्रज्ञविचार एकदा वेदान्तदृष्टया व एकदां सांख्यदृष्टया सांगितला." हे म्हणणें बरोबर नाहीं, हे आम्ही तेथेच दाखविलें आहे. [ गी. भा. पृ. ९४३ पहा.] "त्यांतच सर्व कर्तृत्व प्रकृतीचें, पुरुष–क्षेत्रज्ञ उदासीन. पण प्रकृतीचें कर्तृत्व कसे चालू राहते ? याचें विवेचन अद्यापि झाले नाही. म्हणून एकाच प्रकृतीपासून नानाविध सृष्टि, विशेषतः सजीव सृष्टि कशी उत्पन्न होते, याचें

या अध्यायांत निरूपण करितात." ( पण निर्जीव प्रकृतीपासून सजीव सृष्टि कशी होईल ? शिवाय वेदान्तसिद्धान्ताप्रमाणे सर्व सृष्टि हेच मुळीं शरीर आहे. गीताहि 'भूमिरापोऽनलो०' ७.४. 'महाभूतानि०' १३.५-६. यांत सर्व भौतिक सृष्टीला अपरा प्रकृति-क्षेत्र म्हणत आहे. प्रकृतीच्या कार्यांत सजीव व निर्जीव हा भेदच संभवत नाहीं. मनुष्य, पशु, पक्षी यांची शरीरें चर व वृक्ष-पाषाणादि शरीरें अचर, हा त्यांतील अवान्तर भेद होय व तोहि प्रकृतिकृत नव्हे, चेतनकृत-क्षेत्रज्ञकृत आहे. प्रकृति नेहमी जडच व तिला जडाचेंच-कार्यकरणांचेंच कर्तृत्व आहे. जीवभूत परा प्रकृतीचें कर्तृत्व प्रकृतीला नाहीं. तेव्हां 'प्रकृतीपासून सजीव सृष्टि उत्पन्न होते,' हे म्हणणे शास्त्रसिद्धान्ताच्या विरुद्ध आहे. शिवाय या अध्यायात तसें सांगितलेलेंहि नाहीं.५ ते १८ श्लोकात आचार्यांनी वर म्हटल्याप्रमाणें तेराव्या अध्यायांत सांगितलेले प्रकृतिस्थत्व व गुणसंग या संसारकारणाचें स्पष्टीकरण करण्यासाठी गुण कोणते, कोणत्या गुणात कसा संग होतो, गुण पुरुषाला बद्ध कसे करितात, सात्त्विकादिकांना मरणोत्तर फल कोणतें मिळते ते सांगितलें आहे. १९-२० श्लोकांत या गुणांपासून मोक्ष कसा होतो, तें सांगितलें आहे व २१-२७ श्लोकात गुणातीताची लक्षणें व गुणातीत होण्याचा उपाय सांगिला आहे. अर्थात् ५ ते २७ श्लोकात "प्रकृतीपासून नानाविध सृष्टि, विशेषतः सजीव सृष्टि कशी होते " ते सांगितलेलें नाहीं, हें कोणीहि कबूल करील. या अध्यायाच्या १ व २ श्लोकात येथील ज्ञानाची स्तुति केली आहे. ३ व ४ या दोन श्लोकात मात्र-"'माझी योनि महद्ब्रह्म-प्रकृति-माया आहे. तिच्यामध्ये मी सर्वभूताच्या उत्पत्तीचें बीजारोपण करतो. त्यापासून सर्व भूतांची उत्पत्ति होते. देव-मनुष्य-पश्वादि सर्व योनींमध्यें ज्या मूर्ति-देहाकार उत्पन्न होतात, त्याचें कारण माझी प्रकृति व मी त्याचा बीजप्रद पिता अ[illegible]" असे सांगितले आहे; ते आचार्यांनी अगदी आरंभी जें म्हटलें आहे, त्याला धरून आहे. रहस्यकार म्हणतात तशा अर्थाचें ते नाहीं. उत्पन्न होणारें सर्व क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांच्या संयोगापासूनच उत्पन्न कर्में होतें ते किंवा ईश्वराधीन असलेल्या क्षेत्र क्षेत्रज्ञांना अपरा व परा प्रकृतींना जगत्कारणत्व आहे, हें सांगण्यासाठीं हे दोन श्लोक आहेत. 'माझी योनि प्रकृति आहे. तिच्यामध्यें मी क्षेत्रज्ञरूप बीजाचें आधान करितों व त्यापासून सर्व भूतांचा उद्भव होतो,' हें ह्मणणे किती सयुक्तिक आहे? आणि रहस्यकाराचें 'प्रकृतीपासून नानाविध सृष्टि विशेषतःसजीव सृष्टि होते' हे म्हणणे किती अयोग्य आहे, त्याचा विचार आता वाचकानीच करावा. सर्व भूतें म्ह० सजीव सृष्टि हें खरें; पण त्या सजीव सृष्टींत शरीरेंद्रियसमूह किंवा कार्यकरणसंघात हा एक भाग व त्या सर्वांना धारण करणारा व त्यांना 'मी' म्हणणारा हा दुसरा भाग आहे. त्यांतील पहिल्या भौतिक भागाचें कारण प्रकृति आहे व दुसऱ्या अभौतिक भागाचें कारण चेतन परमात्मा आहे. चवथ्या श्लोकात हा भेद अगदीं स्पष्ट करून सांगितला आहे. 'सर्व योनींमध्यें ज्या मूर्ति म्ह० व्यक्त कार्ये-शरीरेंद्रियसंघात उत्पन्न होतात त्यांची योनि माझी प्रकृति व मी बीजप्रद पिता. ' यावरून प्रकृति फक्त मूर्तींचेंच कारण व पुरुष त्यांतील जीवभावाचें कारण, हे अगदीं स्पष्ट होतें. पण सरळ मार्ग सोडून नास्तिक सांख्यांच्या नादाला लागल्यामुळें रहस्यकारांची अशी पदोपदीं दिशाभूल झालेली पाहून फार खेद होतो. पुनः ते म्हणतात-) " केवळ मानवी सृष्टीचाच विचार केला तर हा विषय क्षेत्राबद्दलचा म्ह० शरी-

राचा असल्यामुळे त्याचा क्षेत्रक्षेत्रज्ञविचारांत समावेश होऊं शकतो " ( पण क्षेत्र म्हणजे नुस्ती मानवी सृष्टीच हें रहस्यकारांना सांगितलें कोणी ? क्षेत्र म्ह० सूक्ष्म पंचभूतांपासून धृतीपर्यंत सर्व भूत-भौतिक. मनुष्याचे मात्र शरीर आणि पशु, पक्षी, सर्पादिक, वृक्ष, वेली यांची शरीरें नव्हेत की काय ? अर्थात् ) "स्थावर सृष्टीसुद्धां त्रिगुणात्मक प्रकृतीचाच पसारा असल्यामुळे प्रकृतीच्या गुणभेदाचें हें विवेचन क्षराक्षरविचाराचाहि भाग होऊ शकतें. म्हणून क्षेत्रक्षेत्रज्ञविचार हे संकुचित नाव सोडून देऊन सातव्या अध्यायांत जे ज्ञानविज्ञान सांगण्यास सुरवात केली तेंच ज्ञानविज्ञान जास्त खुलासेवार आता तुला पुन: सांगतों. " ··· हें सर्व म्हणणे अनुपपन्न व असंबद्ध आहे. कारण क्षेत्रक्षेत्रज्ञविचार हें गीतेच्या दृष्टीनें संकुचित नांव नाही. तेराव्या अध्यायांत "यावत्सजायते किंचित् सत्त्वं स्थावरजगम। क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगात् तद्विद्धि भरतर्षभ " ( श्लो. २६ पृ. ९६७ ) असें भगवान् स्पष्ट म्हणत आहेत, व येथील ४ थ्या श्लोकात तेच सांगितलें आहे. गीतेत क्षराक्षरविचाराचें कोठें नांवहि नाही. क्षर व अक्षर हे शब्द गीतेंत आले आहेत. पण रहस्यकार समजतात तशा अर्थी त्यांचा उपयोग केलेला नाही. ' अधिभूत क्षर: भाव: ' ८.४ ' द्वौ पुरुषौ क्षरश्च अक्षर:, क्षर: सर्वाणि भूतानि' १५.१६ असा २-३ ठिकाणीच 'क्षर' शब्द आला आहे व त्याचा अर्थ सर्व भूते म्ह० शरीरे हाच आहे, व अक्षरशब्द–ब्रह्म ३.१५, ८.३, ८.२१, ११.१८, १२.१,३, ' ओं ' हे अक्षर ८.१३, १०.२५, अकारादिक अक्षर १०.३३ व मायाशक्ति १५. १६, १८–या अर्थी याजला आहे व रहस्यकार म्हणतात त्याप्रमाणे व्यापक अर्थी क्षराक्षरशब्द योजलेले नाहीत. क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांचा जोडीनें विचार करण्यासाठी एक सबंध अध्याय गीतेत आहे. तसा क्षराक्षराच्या विचारासाठी एखादा श्लोकहि नाही. अर्थात् क्षराक्षरविचार ही केवल कल्पना आहे, तिला गीतेंत किंवा उपनिषदांतहि आधार नाही. सातव्या अध्यायांतील ज्ञानविज्ञान अपूर्ण नाही, हे आम्ही वर दाखविलेच आहे. यास्तव तेच 'ज्ञानविज्ञान खुलासेवार सांगण्यासाठी हा अध्याय भगवान् सुरू करीत आहेत' ही असत्कल्पना आहे. कारण सातव्या अध्यायांतील ज्ञानविज्ञानाचाच जर हा विस्तार असता तर याचा निराळा अध्याय करून निराळे नाव देण्याचे कांही कारण नव्हते. प्रत्येक अध्यायांत ईश्वराचे ज्ञान होण्यासाठी निरनिराळ्या प्रकारें प्रतिपादन केलें आहे. ज्ञानाचे निरनिराळे उपाय सांगितले आहेत, हे खरे, पण त्यामुळे एका अध्यायातील विषय अपुरा असल्यामुळें तोच पुढे अनेक अध्यायांत चालू ठेवला आहे, हें म्हणणे सयुक्तिक नाहीं. आतां पूर्व अध्यायांत ज्याचा प्रसंगोपात्त उल्लेख आला असून सविस्तर वर्णन केलें नाहीं त्या विषयाचा विस्तार दुसऱ्या अध्यायांत केला आहे. पण तेवढ्यावरून तो सातव्या अध्यायाचाच विषय १७व्या अध्यायापर्यंत चालविला आहे हें म्हणणें अयोग्य आहे. ( गी. भा. पृ. ६८२ पहा. )

रहस्यकार पुढे म्हणतात, " त्रिगुणांच्या पसाऱ्याचे वर्णन अनुगीतेंत व मनुस्मृतीच्या बाराव्या अध्यायांतहि आलें आहे. " पण ते सुद्धां सांख्यदर्शनांतीलच की काय ? वेदानुसारी मनुस्मृतींत निरीश्वरवादी सांख्यांनी गुणविस्तारवर्णन घेतलें असेल, अशी कल्पनाहि करवत नाही. तें वैदिक सांख्यांतून घेतलें आहे, याबद्दल वाद नाही, आणि वैदिक सांख्य म्ह० ज्ञान व वैदिक योग म्ह० ध्यान होय, असें आचार्यांनी शारीरभाष्यांत ( अ. २.१.३)

**श्रीभगवानुवाच**—श्रीकृष्ण म्हणाले—

**परं भूयः प्रवक्ष्यामि ज्ञानानां ज्ञानमुत्तमम् ।**
**यज्ज्ञात्वा मुनयः सर्वे परां सिद्धिमितो गताः ॥ १ ॥**

**अन्वयार्थ—भूयः**—पुनरपि—**ज्ञानानां उत्तमं परं ज्ञानं**—सर्व ज्ञानांतील उत्तम व परम ज्ञान—**प्रवक्ष्यामि**—मी तुला सांगेन.—**यत्**—जे ज्ञान—**ज्ञात्वा**—जाणून—**सर्वे मुनयः**—सर्व मुनि—**इतः**—या शरीराच्या नाशानंतर—**परां सिद्धिं**—सर्वोत्तम सिद्धीला—**गताः**—प्राप्त झाले आहेत. १

**परं ज्ञानमिति व्यवहितेन संबन्धः । भूयः पुनः पूर्वेषु सर्वेष्वध्यायेष्वसकृदुक्तमपि प्रवक्ष्यामि । तच्च परं परवस्तुविषयत्वात्, किं तत्, ज्ञानं सर्वेषां ज्ञानानामुत्तममुत्तमफलत्वात् । ज्ञानानामिति नामानित्वादीनां किं तर्हि यज्ञादिज्ञेयवस्तुविषयाणामिति । तानि न मोक्षायेदं तु मोक्षायेति परोत्तमशब्दाभ्यां स्तौति श्रोतृबुद्धिरुच्युत्पादनार्थम् । यज्ज्ञात्वा यज्ज्ञानं ज्ञात्वा प्राप्य मुनयः संन्यासिनो मननशीलाः सर्वे परां सिद्धिं मोक्षाख्यामितोऽस्माद्देहबन्धनादूर्ध्वं गताः प्राप्ताः ॥ १ ॥**

**भाष्यार्थ—परं ज्ञानं इति व्यवहितेन संबंधः**—'परं' या पदाचा पुढील 'ज्ञानं' या पदाशी संबंध म्ह० श्रेष्ठ ज्ञान—**भूयः-पुनः पूर्वेषु सर्वेषु अध्यायेषु असकृत् उक्तं अपि प्रवक्ष्यामि**—भूयः पुनरपि म्ह० पूर्वीच्या सर्व अध्यायांमध्ये वारंवार-अनेकदा जरी सांगितलें आहे तरी पुनः मी सविस्तर सांगेन—**च तत् परवस्तु-विषयत्वात् परं**—आणि तें परवस्तूविषयी असल्यामुळे पर आहे. पर वस्तु-परब्रह्म हा त्याचा विषय असल्यामुळें ते पर होय.—**किं तत्**—पण तें पर काय ?—**ज्ञानं**—ज्ञान—**सर्वेषां ज्ञानानां उत्तमं उत्तमफलत्वात्**—सर्व ज्ञानांतील उत्तम ज्ञान.

---

स्पष्ट म्हटलें आहे. मन्वादि स्मृतींत त्याच्याच आधारानें प्रकृति, महत्तत्त्व, अहंकार, पंचतन्मात्रें इत्यादिकांच्या द्वारा सृष्टीच्या उत्पत्तीचें वर्णन केले आहे. अ. १ श्लो. ५-२० पहा. मनुस्मृतींतील वर्णन निरीश्वरवादी कापिल सांख्यशास्त्राच्या आधारानें केलेले असेल अशी नुसती कल्पनाहि करवत नसल्यामुळें ते उपनिषदांना अनुसरूनच आहे. गीतेला तोच न्याय लागू आहे. उलट हल्लींच्या कापिल दर्शनानेंच प्रकृति, महत् इत्यादि वैदिक नांवें घेऊन आपलें स्वतंत्र दर्शन बनविलें आहे. (गी भा. पृ. १२४ २५, ६६६ पहा) तात्पर्य रहस्यकारांनी गीतेंत नास्तिक सांख्यदर्शनाचें घोडे ढकलण्याचा जो यत्न केला आहे, तो अप्रस्तुत आहे. वैदिक सांख्य निराळें व अवैदिक सांख्यदर्शन निराळें, हा भेद न कळल्यामुळें पुष्कळ आधुनिकांची अशी फसगत झालेली दिसते. पण या अर्वाचीन सांख्याला एकटे श्रीशंकराचार्यच मानीत नाहीत असे नाहीं, तर रामानुजादि इतर वैदिक संप्रदायहि मानीत नाहींत, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. इतकेंच नव्हे तर खुद्द ब्रह्मसूत्रकार बादरायण व्यासहि त्याच्या विरुद्ध आहेत, हें आम्ही वर सांगितलेंच आहे. (पृ. ९६३ पहा.)

कारण त्याचें फल उत्तम असल्यामुळें तें उत्तम.—**ज्ञानानां इति अमानित्वादीनां न**—ज्ञानांतील याचा अर्थ तेराव्या अध्यायांत सांगितलेल्या अमानित्वादिकांतील असा नव्हे.—**किं तर्हि**—तर मग कोणत्या ज्ञानांतील—**यज्ञादिज्ञेयवस्तुविषयाणां इति**—यज्ञादि ज्या ज्ञेय वस्तु, त्याविषयींच्या ज्ञानांतील, असा त्याचा अर्थ आहे, त्यामुळें येथील ' ज्ञानानां ' या शब्दानें अमानित्वादिकांचें ग्रहण करितां येत नाहीं. ( यज्ञादिकाविषयीच्या ज्ञानाहून हें ज्ञान श्रेष्ठ कां ते सांगतात-)—**तानि न मोक्षाय इदं तु मोक्षाय इति पर-उत्तम-शब्दाभ्यां श्रोतृबुद्धिरुच्युत्पादनार्थं स्तौति**—यज्ञादिकांविषयींची ज्ञाने मोक्षाला कारण होत नाहींत, पण हे मोक्षाला कारण होतें, हें मोक्षाचें अन्तरंग साधन आहे, म्हणून 'परं' व 'उत्तमं' या शब्दांनीं श्रोत्यांच्या अन्तःकरणांत त्या ज्ञानाविषयीं रुचि उत्पन्न करण्यासाठीं भगवान् त्याची स्तुति करितात.—**सर्वे मुनयः-संन्यासिनः-मननशीलाः यत् ज्ञात्वा-यत् ज्ञानं ज्ञात्वा-प्राप्य**—सर्व मुनि-संन्यासी-मननशील जें ज्ञान जाणून[1]-ज्या ज्ञानाला प्राप्त होऊन—**इतः-अस्मात् देहबन्धनात् ऊर्ध्वं परां सिद्धिं-मोक्षाख्यां गताः-प्राप्ताः**—यानंतर-या-प्रत्यक्षसिद्ध देहबंधनांतून सुटल्यानंतर ' मोक्ष ' या नांवाच्या श्रेष्ठ सिद्धीला गेले आहेत-' मोक्ष ' या सिद्धीला प्राप्त झाले आहेत. १

इदं ज्ञानमुपाश्रित्य मम साधर्म्यमागताः ।
सर्गेऽपि नोपजायन्ते प्रलये न व्यथन्ति च ॥ २ ॥

**अन्वयार्थ—इदं ज्ञानं**—या ज्ञानाचा—**उपाश्रित्य**—आश्रय करून—**मम**—माझ्या—**साधर्म्यं**—सारूप्यास—**आगताः**—आलेले ज्ञानी—**सर्गे अपि**—सृष्टीच्या वेळींहि—**न उपजायन्ते**—उत्पन्न होत नाहीत—**च**—आणि—**प्रलये**—प्रलयाच्या वेळीं—**न व्यथन्ति**—व्यथा-नाश पावत नाहीत. २.

अस्याश्च सिद्धेरैकान्तिकत्वं दर्शयति— इदं ज्ञानं यथोक्तमुपाश्रित्य ज्ञानसाधनमनुष्ठायेत्येतत् । मम परमेश्वरस्य साधर्म्यं मत्स्वरूपतामागताः प्राप्ता इत्यर्थो न तु समानधर्मतां साधर्म्यं क्षेत्रज्ञेश्वरयोर्भेदानभ्युपगमाद्गीताशास्त्रे । फलवादश्चायं स्तुत्यर्थमुच्यते । सर्गेऽपि सृष्टिकालेऽपि नोपजायन्ते नोत्पद्यन्ते प्रलये ब्रह्मणोऽपि विनाशकाले न व्यथन्ति च व्यथां नाऽऽपद्यन्ते न च्यवन्तीत्यर्थः ॥ २ ॥

**भाष्यार्थ**—( ज्ञानाचें फल कर्माच्या फलाहून अगदीं विलक्षण आहे,असें सांगतात-)—**च अस्याः सिद्धेः ऐकान्तिकत्वं दर्शयति**—आणि भगवान् या सिद्धीचें अव्यभिचारित्व-नित्यत्व दाखवितात—**इदं यथोक्तं ज्ञानं उपाश्रित्य-ज्ञानसाधनं अनुष्ठाय इति एतत्**—या वर सांगितलेल्या प्रकारच्या-सर्व ज्ञानांतील श्रेष्ठ ज्ञा-

---

१ पण ' ज्ञानाला जाणून ' असें म्हटल्यास ' ज्ञान ' ज्ञेय होतें, हा दोष घालविण्यासाठीं जाणून म्ह० प्राप्त होऊन असा अर्थ केला आहे.

नाचा आश्रय करून म्ह०ज्ञानसाधनाचें अनुष्ठान करून,असा याचा भावार्थ—**मम-परमेश्वरस्य साधर्म्यं आगताः-मत्स्वरूपतां प्राप्ताः इत्यर्थः**—मज परमेश्वराच्या साधर्म्यास आलेले म्ह० माझ्या स्वरूपतेस प्राप्त झालेले असा याचा भावार्थ. ( गाय व गवा यांचेंहि साधर्म्य असते, तसेंच विद्वान् व ईश्वर यांचे साधर्म्य असल्यास त्यांचा भेद आहे, असें मानावे लागेल, म्हणून माझ्या स्वरूपतेस प्राप्त झालेले असे म्हटलें आहे. कारण येथील साधर्म्य जर मुख्य मानले तर विद्वान् व ईश्वर यांचा नियमाने भेदच सिद्ध होईल व त्यामुळे गीताशास्त्राशी विरोध येईल, असे सांगतात-)—**तु समानधर्मतां साधर्म्यं न**—पण येथे समानधर्मता हेच साधर्म्य इष्ट नाही. कारण—**गीताशास्त्रे क्षेत्रज्ञ-ईश्वरयोः भेदानभ्युपगमात्**—गीताशास्त्रांत क्षेत्रज्ञ व ईश्वर यांचा भेद मानलेला नाहीं. ( शिवाय ज्ञानाच्या स्तुतीसाठीं त्याचे फल येथे विवक्षित असल्यामुळें ‘ सारूप्य ’ मानतांच येत नाहीं, असें सांगतात-)—**च अयं फलवादः स्तुत्यर्थं उच्यते**—आणि हा फलवाद स्तुतीसाठी सांगितला जात आहे. [ सारूप्य हेच फल येथे विवक्षित आहे, असे जर म्हटलें, तर ते ज्ञानाचे फल नसून ध्यानाचें फल सांगितले आहे, असे होईल. पण ध्यानाचे फल येथे प्रस्तुत नाहीं. ज्ञानाचें फल प्रस्तुत आहे. अहोपण, ईश्वरात्मतेला प्राप्त झालेल्या ज्ञानी पुरुषांना अवान्तर सृष्टि व प्रलय यात जरी जन्म व नाश यांचा अनुभव घ्यावा लागत नसला तरी महासर्गाचे वेळी त्यांना जन्म अवश्य प्राप्त होईल, अशी आशंका घेऊन सांगतात-]—**सर्गे अपि-सृष्टिकाले अपि न उपजायन्ते-न उत्पद्यन्ते**—सर्गाच्या वेळीहि म्ह० सृष्टीच्या वेळीहि ते उत्पन्न होत नाहीत-त्यांचा जन्म होत नाही.—**च प्रलये-ब्रह्मणः अपि विनाशकाले न व्यथन्ति-व्यथां न आपद्यन्ते न च्यवन्ति इत्यर्थः**—आणि प्रलयामध्यें म्ह० ब्रह्मदेवाच्याहि विनाशकाली व्यथित होत नाहीत, व्यथेला-पीडेला-दुःखाला प्राप्त होत नाहीत,ते आत्मस्वरूपापासून च्युत होत नाहीत,असा याचा भावार्थ.

## मम योनिर्महद्ब्रह्म तस्मिन्गर्भं दधाम्यहम् ।
## संभवः सर्वभूतानां ततो भवति भारत ॥ ३ ॥

**अन्वयार्थ —मम**—माझी—**योनिः**—त्रिगुणात्मिका प्रकृति (हें सर्व भूतांचें कारण आहे. ती सर्व कार्यांहून मोठी असल्यामुळे )—**महत् ब्रह्म**—महती-मोठी व आपल्या विकारांचें भरण-पोषण करीत असल्यामुळें ब्रह्म आहे —**तस्मिन्**—त्या महत् ब्रह्मांत म्ह० भूतांच्या कारणांत—**अहं**—मी—**गर्भं**—सर्व भूतांच्या जन्माचे कारण-बीज—**दधामि**—स्थापितों—**हे भारत**—हे अर्जुना! **ततः**—त्यापासून—**सर्वभूतानां**—सर्व भूतांची—**संभवः**—उत्पत्ति—**भवति**—होते. ३.

**क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोग ईदृशो भूतकारणमित्याह—मम स्वभूता मदीया माया त्रिगुणात्मिका प्रकृतिर्योनिः सर्वभूतानां सर्वकार्येभ्यो महत्त्वाद्भरणाच्च स्वविकाराणां, महद्ब्रह्मेति योनिरेव विशिष्यते । तस्मिन्महति ब्रह्मणि योनौ गर्भं हिरण्यगर्भस्य जन्मनो बीजं**

सर्वभूतजन्मकारणं बीजं दधामि निक्षिपामि क्षेत्रक्षेत्रज्ञप्रकृतिद्वयशक्तिमानीश्वरोऽहम-विद्याकामकर्मोपाधिस्वरूपानुविधायिनं क्षेत्रज्ञं क्षेत्रेण संयोजयामीत्यर्थः । संभव उत्पत्तिः सर्वभूतानां हिरण्यगर्भोत्पत्तिद्वारेण ततस्तस्माद्गर्भाधानाद्भवति हे भारत ॥ ३ ॥

**भाष्यार्थ**—( ज्ञानाची स्तुति ऐकून तदभिमुख झालेल्या व लक्ष लावून ऐकणाऱ्या अर्जुनाला भगवान् म्हणतात-)—**ईदृशः क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगः भूतकारणं इति आह**—अशा प्रकारचा क्षेत्र-क्षेत्रज्ञसंयोग भूतांचे कारण आहे, असे भगवान् सांगतात—**—मम-स्वभूता मदीया माया त्रिगुणात्मिका प्रकृतिः सर्वभूतानां योनिः** माझी स्वभूत-माझें वित्त असलेली, पण स्वभूत म्ह० स्वरूप नव्हे, तर माझी माया म्ह० चिच्छक्ति नव्हे-त्रिगुणात्मिका प्रकृति सर्वभूताची योनि आहे. [ ' योनि ' या शब्दाने उत्पन्न होणाऱ्या सर्व कार्यांचे उपादानकारणत्व विवक्षित आहे,अशा आशयानें म्हणतात-] **—सर्वकार्येभ्यः महत्त्वात् च स्वविकाराणां भरणात् महत् ब्रह्म इति योनिः एव विशिष्यते**—सर्व कार्यांहून महत्त्व-मोठेपणा असल्यामुळे व आपल्या विकारांचे भरण-पोषण-धारण करीत असल्यामुळे ' महत् ब्रह्म ' असें त्या योनीलाच विशेषण दिले जाते. ( सर्व कार्यांना व्यापून राहणे, या धर्मामुळे त्या योनीला ब्रह्म, असे म्हटलें आहे. महत् ब्रह्म या शब्दाचें नपुंसकलिंग असल्यामुळें त्याचा दुसरा कांहीं अर्थ असेल, असे कोणाला वाटेल, म्हणून योनिशब्दाचेच ते विशेषण आहे, असें मुद्दाम सांगितले आहे. )—**तस्मिन् महति ब्रह्मणि योनौ**—त्या महत् ब्रह्म, या योनीमध्ये—**गर्भे-हिरण्यगर्भस्य जन्मनः बीजं-सर्वभूतजन्मकारणं बीजं दधामि-निक्षिपामि**—गर्भाला म्ह० हिरण्यगर्भाच्या जन्माच्या बीजाला-सर्व भूतांच्या जन्माचे कारण अशा बीजाला मी धारण करितो, अशा प्रकारच्या बीजाचा निक्षेप-आधान मी त्या योनीत करितो.—**क्षेत्र-क्षेत्रज्ञप्रकृतिद्वयशक्तिमान् ईश्वरः अहं**—क्षेत्र व क्षेत्रज्ञ या प्रकृतिद्वयरूप शक्तीने युक्त असलेला मी ईश्वर,—**अविद्या-कामकर्मोपाधिस्वरूपानुविधायिनं क्षेत्रज्ञं क्षेत्रेण संयोजयामि इत्यर्थः**—अविद्या-काम-कर्म, या उपाधिस्वरूपाच्या अनुसार वर्तन करणाऱ्या क्षेत्रज्ञाला क्षेत्राशी संयुक्त करितों, असा याचा भावार्थ. [ अविद्या-काम-कर्मादिकांच्या संस्कारांनी युक्त असलेल्या क्षेत्रज्ञाचा क्षेत्राशी संयोग करून देतो. ]—**हे भारत, ततः तस्मात् -गर्भाधानात् हिरण्यगर्भोत्पत्तिद्वारेण सर्वभूतानां संभवः-उत्पत्तिः भवति**—हे भरतवंशजा, त्या तसल्या गर्भाधानापासून हिरण्यगर्भाच्या उत्पत्तीच्या द्वारा सर्वभूताचा संभव म्ह० उत्पत्ति होते. [ स्मृतीमध्ये ' आदिकर्ता स भूतानां ' या वचनाने सर्व भूतें हिरण्यगर्भाचीं कार्ये आहेत असे सांगितलेलें असल्यामुळे भाष्यात 'हिरण्यगर्भाच्या उत्पत्तीच्या द्वारा ' सर्व भूतांची उत्पत्ति त्या गर्भाधानापासून होते असे म्हटलें आहे.] ३

---

१ पण रहस्यकार या श्लोकाला असें अवतरण देतात-" आतां प्रकृति हें माझेच स्वरूप आहे असें प्रथम सांगून सांख्यांचे द्वैत काढून टाकल्यावर सत्त्व, रज व तम या प्रकृतीच्या

**सर्वयोनिषु कौन्तेय मूर्तयः संभवन्ति याः ।**
**तासां ब्रह्म महद्योनिरहं बीजप्रदः पिता ॥ ४ ॥**

**अन्वयार्थ—कौन्तेय**—हे अर्जुना ! —**सर्वयोनिषु**—देवादि सर्व योनींमध्यें—**याः मूर्तयः**—ज्या मूर्ति-जे आकार-जीं शरीरें—**संभवन्ति**—उत्पन्न होतात—**तासां**—त्या सर्व मूर्तींचे—**महत् ब्रह्म**—माझी प्रकृति—**योनिः**—उत्पत्तिस्थान आहे व—**अहं**—मी—**बीजप्रदः**—बीज देणारा—**पिता**—जनक आहें. ४.

---

तीन गुणांमुळे सृष्टीतील नानाविध व्यक्त पदार्थ कसे निर्माण होतात याचें वेदान्तशास्त्राशी विरोध न आणता निरूपण करितात–" पण भगवानाना एवढा द्राविडी प्राणायाम करण्याचे कारण काय ? अगोदर सांख्याच्या प्रकृतीचा स्वीकार करावयाचा, मग त्यांतील द्वैत काढून टाकावयाचें, नंतर प्रकृतीच्या त्रिगुणामुळे सृष्टींत नानाविध व्यक्त पदार्थ कसे निर्माण होतात त्याचें वेदान्ताशी विरोध न येईल अशा बेताने निरूपण करावयाचें ! कोण ही क्लिष्ट कल्पना !! पण अशा प्रतिपादनानें उपनिषदे, भगवान् व व्यास या सर्वांच्याच पदरी असमंजसपणा येतो, याची काय वाट ? भगवानाना निरीश्वरवादी सांख्यदर्शनाची मात्र इतकी आवड असावी आणि सेश्वरवादी व धारणा-ध्यान-समाधीच्या द्वारा आत्मसाक्षात्कारापर्यंत नेऊन पोचविणाऱ्या योगशास्त्राशी मात्र त्यांनी अगदी फटकून वागावे, हेंहि त्यांच्या ईश्वरत्वाला शोभण्यासारखे नाहीं. पण इतका अव्यापारेषु व्यापार करण्यापेक्षा 'मायां तु प्रकृतिं विद्यात्' 'देवात्मशक्तिं स्वगुणैः निगूढां' 'स्वभावमेके' (श्वेताश्वतरोपनिषद्) 'यत् अग्ने रोहित रूपं तेजसस्तद्रूपं' (छा.भा.पृ.४४१) इत्यादि श्रुतींना अनुसरूनच मनुस्मृति, अनुशासनपर्व, गीता यांतील प्रतिपादन आहे व त्याला अनुसरूनच पुढें सांख्यांनी आपल्या परिभाषेप्रमाणे आपल्या दर्शनात विस्तार केला आहे, असें म्हटल्यास काय होईल ? सर्वच वाद मिटेल. उपनिषदांतील प्रकृति स्वगुणांनी गूढ आहे, व 'अजां एकां लोहितशुक्लकृष्णां' असेहि तिचेंच वर्णन श्वेताश्वतरोपनिषदांत केलें आहे. म्हणूनच आचार्यहि आपल्या भाष्यात प्रकृतीला त्रिगुणात्मिका,' वगैरे म्हणतात. तस्मात् रहस्यकाराचा 'गीतेत सांख्य व वेदान्त यांची जोड घातलेली आहे,' ही समजूत बरोबर नाहीं. 'प्रकृति हे माझेंच स्वरूप आहे' इत्यादि जें रहस्यकाराचें म्हणणे आहे तें अगदीच चुकीचें आहे. जड प्रकृति माझें स्वरूप आहे, असें भगवान् कधींच म्हणणार नाहींत. या श्लोकांत 'मम योनिः महत् ब्रह्म' असे शब्द आहेत. त्यावरून 'माझें स्वरूप' असा अर्थ निष्पन्न होत नाहीं, व 'प्रकृति माझें स्वरूप' असें म्हणणे हा द्वैत काढून टाकण्याचा उपायहि नव्हे. अर्थात् या अध्यायाच्या पुढील श्लोकावरील टीपांतून रहस्यकारांनी काहीं समानार्थक सांख्यकारिकांचा वगैरे उल्लेख करून "प्रकृति व पुरुष हें सांख्यांचें द्वैत गीतेस मान्य नसल्यामुळें ... सांख्याच्या वरील सिद्धान्ताचें गीतेत रूपान्तर होतें ..." इत्यादि जे म्हटलें आहे तें सर्व उपेक्षणीय आहे. "प्रकृति व पुरुष हेंच द्वैत व त्यांच्या पलीकडे जो एक आत्मस्वरूपी परमेश्वर किंवा परब्रह्म आहे, तें निर्गुण ब्रह्म जो ओळखील" वगैरे पृ. ७९७ रहस्यकारांचें म्हणणें सर्वथा अशास्त्रीय आहे. फार काय पण ही भाषाहि सदोष आहे !

**सर्वयोनिष्विति । देवपितृमनुष्यपशुमृगादिसर्वयोनिषु कौन्तेय मूर्तयो देहसंस्थानलक्षणा मूर्च्छिताङ्गावयवा मूर्तयः संभवन्ति यास्तासां मूर्तीनां ब्रह्म महत्सर्वावस्थं योनिः कारणमहमीशो बीजप्रदो गर्भाधानस्य कर्ता पिता ॥ ४ ॥**

**भाष्यार्थ**—( अहोपण, देवादि निरनिराळ्या जातींतील निरनिराळ्या व्यक्तींचें कारण निरनिराळेंच दिसते, मग असें असतांना त्या गर्भाधानामुळें हिरण्यगर्भाच्या द्वारा सर्व भूतांची उत्पत्ति होते, हें म्हणणे कसे उपपन्न होतें ?-)—**'सर्वयोनिषु०' इति**—'सर्वयोनिषु०' या श्लोकानें या शंकेचें समाधान करितात—**कौन्तेय देव-पितृ-मनुष्य-पशु-मृगादिसर्वयोनिषु याः मूर्तयः-देहसंस्थानलक्षणाः मूर्च्छिताङ्गावयवाः मूर्तयः संभवन्ति**—हे कुंतीपुत्रा, देव, पितर, मनुष्य, पशु, मृग-हरणे इत्यादि सर्व योनीमध्यें ज्या मूर्ति-देहाकाररूप-ज्यांत अंगें व अवयव-उपांगें यांची उत्तम रचना आहे अशा मूर्ति-आकार उत्पन्न होतात—**तासां मूर्तीनां ब्रह्म महत् सर्वावस्थं योनिः-कारणं**—त्या मूर्तींचे महत् ब्रह्म हीच सर्वावस्थेतील योनि म्ह० कारण आहे —**अहं ईशः बीजप्रदः-गर्भाधानस्य कर्ता-पिता**—मी ईश बीजप्रद-गर्भाधानाचा कर्ता-पिता आहें. [ प्रत्येक कार्याचें निरानिराळे कारण दिसतें. तेव्हा महत् ब्रह्मच सर्वाचे कारण कसें ? ही शंका घालविण्यासाठी त्याला 'सर्वावस्थं' असे विशेषण योजलें आहे. अर्थात् त्या त्या कारणाच्या रूपानें तेंच अवस्थित असल्यामुळे सर्व मूर्तींचें कारण-महत् ब्रह्मच आहे. ] ४.

## सत्त्वं रजस्तम इति गुणाः प्रकृतिसंभवाः ।
## निबध्नन्ति महाबाहो देहे देहिनमव्ययम् ॥ ५ ॥

**अन्वयार्थ—महाबाहो**—हे पराक्रमी अर्जुना! **सत्त्वं**—सत्त्व—**रजः**—रज व—**तमः**—तम—**इति**—असे हे—**प्रकृतिसंभवाः गुणाः**—प्रकृतीपासून उत्पन्न झालेले गुण—**देहे**—देहांत—**अव्ययं देहिनं**—अव्यय देहवान् आत्म्याला—**निबध्नन्ति**—बद्ध करितात. ५.

**के गुणाः कथं बध्नन्तीत्युच्यते— सत्त्वं रजस्तम इत्येवंनामानो गुणा इति पारिभाषिकः शब्दो न रूपादिवद्द्रव्याश्रिताः । न च गुणगुणिनोरन्यत्वमत्र विवक्षितम् । तस्माद्गुणा इव नित्यपरतन्त्राः क्षेत्रज्ञं प्रत्यविद्यात्मकत्वात्क्षेत्रज्ञं निबध्नन्तीव तमास्पदीकृत्याऽऽत्मानं प्रतिलभन्त इति निबध्नन्तीत्युच्यते । ते च प्रकृतिसंभवा भगवन्मायासंभवा निबध्नन्तीव हे महाबाहो महान्तौ समर्थतरावाजानुप्रलम्बौ बाहू यस्य स महाबाहुः हे महाबाहो देहे शरीरे देहिनं देहवन्तमव्ययमव्ययत्वं चोक्तमनादित्वादित्यादिश्लोके । ननु देही न लिप्यत इत्युक्तं तत्कथमिह निबध्नन्तीत्यन्यथोच्यते, परिहृतमस्माभिरिवशब्देन निबध्नन्तीवेति ॥ ५ ॥**

**भाष्यार्थ**—( याप्रमाणें क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांच्या संयोगापासून जगाची उत्पत्ति होते असें दाखविणाऱ्या भगवानांनीं ब्रह्मच अविद्येच्यायोगानें संसार करतें, असें सांगितलें. आतां अध्यायाच्या आरंभीं सांगितलेल्या दोन प्रश्नांचा अनुवाद करून या श्लोकानें उत्तरें सांगतात-)—**के गुणाः कथं बध्नन्ति इति उच्यते**—गुण कोणते व ते कसे बद्ध करितात तें सांगितलें जातें—**सत्त्वं रजः तमः इति एवं नामानः**—सत्त्व, रज व तम अशा या नांवाचे—**गुणाः इति पारिभाषिकः शब्दः**—येथील गुण हा पारिभाषिक शब्द आहे.—**रूपादिवत् द्रव्याश्रिताः न**—रूप, रस इत्यादिकांप्रमाणें द्रव्यांचा आश्रय करून राहणारे गुण हा येथे अर्थ नाही. [ कारण प्रकृतिरूप असलेले सत्त्वादि गुण सर्वांचे आश्रय आहेत. अहोपण, सत्त्वादि गुण निराळे व प्रकृति निराळी, तेव्हां त्यांना प्रकृतिरूप कसे म्हणतां येईल? उत्तर-]—**अत्र गुणगुणिनोः अन्यत्वं न च विवक्षितं**—येथें गुण व गुणी-प्रकृति याचे अन्यत्व विवक्षित नाही. ( तर मग त्यांना गुण हें नांव कां दिलें? उत्तर-)—**तस्मात् गुणाः इव क्षेत्रज्ञं प्रति नित्यपरतंत्राः**—म्हणून गुणांप्रमाणे क्षेत्रज्ञाप्रत ते नित्यपरतंत्र आहेत. ( क्षेत्रज्ञाप्रत त्यांनी नित्य परतंत्र असण्याचे कारण-)—**अविद्यात्मकत्वात् क्षेत्रज्ञं निबध्नन्ति इव**—अविद्यात्मक असल्यामुळे ते गुण क्षेत्रज्ञाला जणुंकाय बद्ध करितात. म्हणजे—**तं आस्पदीकृत्य आत्मानं प्रतिलभन्ते**—त्या क्षेत्रज्ञाला आपलें आस्पद करून स्वरूपाला प्राप्त होतात.—**इति निबध्नन्ति इति उच्यते**—म्हणून ते क्षेत्रज्ञाला बद्ध करितात, असें म्हटले जातें.—**ते च प्रकृतिसंभवाः-भगवन्मायासंभवाः**—ते सत्त्वादिगुण प्रकृतिसभव आहेत. प्रकृति हाच ज्यांचा संभव-उत्पत्तिस्थान आहे, ते प्रकृतिसंभव होत. म्हणजे भगवानाच्या मायेपासून झालेले आहेत. ( अर्थात् येथील प्रकृति म्ह० सांख्याची स्वतंत्र प्रकृति नव्हे. ) ते गुण—**निबध्नन्ति इव**—जणुं काय क्षेत्रज्ञाला अत्यंत बद्ध करितात. म्ह० तो आपल्या विकारानीं युक्त आहे, असें दाखवितात.—**हे महाबाहो-महान्तौ समर्थतरौ आजानुप्रलम्बौ बाहू यस्य सः महाबाहुः**—हे महाबाहो! मोठे म्ह० अतिशय समर्थ जानूपर्यंत-गुडघ्यापर्यंत लोंबणारे ज्याचे बाहू आहेत तो महाबाहु, हे आजानुबाहो!—**देहे-शरीरे देहिनं-देहवन्तं अव्ययं**—देहांत-शरीरांत देहीला-देहवानाला-'देहच मी' असे मानणाऱ्या अव्यय देही आत्म्याला [ जणुं काय बद्ध करितात ]—**अनादित्वात् इत्यादि श्लोके अव्ययत्वं च उक्तं**—'अनादित्वात्०' (अ. १३ श्लो. ३१ पृ. ९७८) इत्यादि श्लोकांत आत्म्याचें अव्ययत्व सांगितलें आहे—**ननु देही न लिप्यते इति उक्तं**—अहोपण, 'लिप्यते न स पापेन' (पृ.५०१) या वचनांत देही-आत्मा पापानें लिप्त होत नाहीं, असें सांगितलें आहे.—**तत् इह निबध्नन्ति इति कथं अन्यथा उच्यते**—मग त्याच्या उलट येथें सत्त्वादि गुण त्याला अत्यंत बद्ध करितात, असें विपरीत कसें सांगितलें जात आहे?—**निबध्नन्ति इव इति इवशब्देन अस्माभिः परिहृतं**—जणुंकाय बद्ध करितात, असें म्हणून 'इव 'शब्दानें आम्हीं या शंकेचा परिहार केला आहे. ५

**तत्र सत्त्वं निर्मलत्वात्प्रकाशकमनामयम् ।**
**सुखसङ्गेन बध्नाति ज्ञानसङ्गेन चानघ ॥ ६ ॥**

**अन्वयार्थ—तत्र**—त्या तीन गुणांतील—**सत्त्वं**—सत्त्व हा गुण—**निर्मलत्वात्**—निर्मल-स्वच्छ असल्यामुळे—**प्रकाशकं**—प्रकाशक व—**अनामयं**—पीडारहित-उपद्रवरहित—**(अस्ति)**—आहे.—**हे अनघ**—हे निष्पाप अर्जुना!—**तत्**—ते सत्त्व—**सुखसंगेन**—सुखाच्या संगाने-आसक्तीनें—**च**—व—**ज्ञानसंगेन**—ज्ञानाच्या संगानें—**बध्नाति**—( आत्म्याला ) बांधतें. ६.

**तत्र सत्त्वमिति । तत्र सत्त्वादीनां सत्त्वस्यैव तावल्लक्षणमुच्यते निर्मलत्वात्स्फटिकमणिरिव प्रकाशकमनामयं निरुपद्रवं सत्त्वं तन्निबध्नाति कथं सुखसङ्गेन सुख्यहमिति विषयभूतस्य सुखस्य विषयिण्यात्मनि संश्लेषापादनं मृषैव सुखे सञ्जनमिति सैषाऽविद्या । न हि विषयधर्मो विषयिणो भवति । इच्छादि च धृत्यन्तं क्षेत्रस्यैव विषयस्य धर्म इत्युक्तं भगवता । अतोऽविद्ययैव स्वकीयधर्मभूतया विषयाविषय्याविवेकलक्षणयाऽस्वात्मभूते सुखे सञ्जयतीव सक्तमिव करोत्यसुखिनं सुखिनमिव । तथा ज्ञानसङ्गेन च । ज्ञानमिति सुखसाहचर्यात्क्षेत्रस्यैवान्तःकरणस्य धर्मो नाऽऽत्मनः । आत्मधर्मत्वे सङ्गानुपपत्तेर्बन्धानुपपत्तेश्च । सुख इव ज्ञानादौ सङ्गो मन्तव्यो हेऽनघाव्यसन ॥**

**भाष्यार्थ—' तत्र सत्त्वं० ' इति**—त्यांतील कोणत्या स्वरूपाचा गुण कोणत्या उपायाने क्षेत्रज्ञाला बद्ध करितो, ते ' तत्र सत्त्वं० ' या श्लोकानें सांगतात—**तत्र-सत्त्वादीनां**—त्या सत्त्वादिकांतील—**सत्त्वस्य एव तावत् लक्षणं उच्यते**—सत्त्व गुणाचेच प्रथम लक्षण सांगितले जाते—**सत्त्वं स्फटिकमणिः इव निर्मलत्वात् प्रकाशकं अनामयं-निरुपद्रवं**—सत्त्व स्फटिकमण्याप्रमाणें निर्मल असल्यामुळे प्रकाशक व अनामय म्ह० निरुपद्रव आहे.—**तत् निबध्नाति**—ते बद्ध करितें—**कथं**—कसें बद्ध करिते ?—**सुखसङ्गेन**—सुखसंगाने बद्ध करिते,—**अहं सुखी इति विषयभूतस्य सुखस्य विषयिणि आत्मनि मृषा एव संश्लेषापादनं सुखे सञ्जनं**—मी सुखी अशा अभिमानाने विषयरूप सुखाचा विषयी आत्म्यामध्यें खोटाच जो संबंध जोडणे तेच सुखामध्ये आसक्त करणें आहे.—**इति सा एषा अविद्या**—असा मिथ्या संबंध जोडणे, विषयाचा विषयीमध्ये आरोप करणे हीच ती अविद्या आहे.—**हि विषयधर्मः विषयिणः न भवति**—कारण विषयाचा धर्म हा विषयीचा धर्म केव्हांच होऊं शकत नाहीं.—**इच्छादि-धृत्यन्तं क्षेत्रस्य एव-विषयस्य धर्मः इति उक्तं भगवता**—इच्छादिकांपासून धृतीपर्यंत सर्व धर्म क्षेत्राचेच म्ह० विषयाचेच आहेत, असें भगवानांनी क्षेत्राध्यायांत सांगितले आहे.—**अतः स्वकीयधर्मभूतया विषय-विषयि-अविवेकलक्षणया अविद्यया एव अस्वात्मभूते सुखे सञ्जयति इव**—यास्तव आपलाच धर्मभूत म्ह०

आत्म्याचाच धर्म अशा, विषय व विषयी यांच्या अविवेकरूप अशाच अविद्येच्या योगानें स्वरूपभूत नसलेल्या-आत्म्याचा धर्म नव्हे, अशा सुखामध्यें तो सत्त्वगुण जणुंकाय आसक्त करितो. ( हे अविद्येचें माहात्म्य आहे. तेंच विशद करितात-)—**सक्तं इव-असुखिनं सुखिनं इव करोति**—जणुंकाय सक्त करितो-असुखी असलेल्या म्ह० सुख या धर्मानें युक्त नसलेल्या त्याला सुखी असल्याप्रमाणें करतो. ( दुसऱ्या प्रकारानेंहि सत्त्व कसें बद्ध करितें तें सांगतात-)—**तथा ज्ञानसङ्गेन च**—आणि तसेंच ज्ञाना-विषयींच्या संगानें सत्त्वगुण बद्ध करितो. ( ज्याच्या योगानें विषयादिक जाणले जातात तें ज्ञान म्ह० अन्तःकरणाचा परिणाम, त्याच्या योगाने 'मी ज्ञानी आहें' अशा विपरीत अभिमानानें सत्त्वगुण आत्म्याला बद्ध करितो, असे सांगतात-)—**ज्ञानं इति सुखसाहचर्यात् क्षेत्रस्य एव-अन्तःकरणस्य धर्मः आत्मनः न**—ज्ञान हा 'सुख' या शब्दाच्या साहचर्यामुळें क्षेत्राचाच म्ह० अन्तःकरणाचा धर्म आहे, आत्म्याचा नव्हे. कारण—**आत्मधर्मत्वे सङ्गानुपपत्तेः च बन्धानुपपत्तेः**—त्याला आत्मधर्मत्व असतें म्ह० येथील ज्ञान हा जर आत्मधर्म असता, तर त्यांतील संगाची व बंधाचीहि अनुपपत्ति झाली असती. कारण आत्मधर्मभूत ज्ञान स्वाभाविक असतें. त्यामुळे ते नित्यप्राप्तच होय. म्हणून त्यांत सत्त्वगुणकृत संग किंवा बंध संभवत नाहीं. यास्तव येथील ज्ञान हा क्षेत्रधर्म-अन्तःकरणधर्मच मानला पाहिजे. ( ज्ञान-ऐश्वर्य इत्यादि क्षेत्रधर्मांतील संगहि पूर्वीप्रमाणे अविद्याकृतच आहे, असे सुचवितात-) —**हे अनघ-अव्यसन सुखे इव ज्ञानादौ सङ्गः मन्तव्यः**—हे निष्पाप-व्यसन-शून्य अर्जुना ! सुखामध्यें जसा, तसाच ज्ञान, ऐश्वर्य इत्यादिकांतील आसंगहि अविद्या-कृतच मानावा. ( येथील 'अनघ' या पदाने पापादि दोषरहित पुरुषाचाच या शास्त्रांत अधिकार आहे असे सुचविलें आहे. ) ६.

**रजो रागात्मकं विद्धि तृष्णासङ्गसमुद्भवम् ।**
**तन्निबध्नाति कौन्तेय कर्मसङ्गेन देहिनम् ॥ ७ ॥**

**अन्वयार्थ—तृष्णासंगसमुद्भवं**—विषयतृष्णा व विषयासक्ति यांचें कारण असे **—रजः**—रज-रजोगुण—**रागात्मकं**—कामात्मक आहे असें—**विद्धि**—जाण.—**कौन्तेय**—हे कुंतीपुत्रा !—**तत्**—ते रज—**देहिनं**—देही आत्म्याला—**कर्मसंगेन**—कर्माच्या आसक्तीने—**निबध्नाति**—बद्ध करितें. ७.

**रजो रागात्मकमिति । रजो रागात्मकं रञ्जनाद्रागो गैरिकादिवद्रागात्मकं विद्धि जानीहि तृष्णासङ्गसमुद्भवं तृष्णाऽप्राप्ताभिलाष आसङ्गः प्राप्ते विषये मनसः प्रीति-**

---

१ वस्तुतः अविद्येचा आत्म्याशीं संबंध नाहीं. तथापि तिचा संबंधी दुसरा कोणी नसल्यामुळें व तिला स्वातंत्र्य नसल्यामुळें तिला आत्मधर्मत्वच आहे, असें मानून 'स्वकीय-धर्मभूतया' असे म्हटलें आहे. २ वृत्तियुक्त अन्तःकरण हा विषय आहे व आत्म्यावांचून त्याची सिद्धि होत नाहीं, म्हणून आत्म्याला त्याचें विषयित्व आहे. विषयाविषयींचा अविवेक हेच अविद्येचें स्वरूप आहे.

**लक्षणः संश्लेषः, तृष्णासङ्गयोः समुद्भवं तृष्णासङ्गसमुद्भवं तन्निबध्नाति तद्रजः कौन्तेय कर्मसङ्गेन दृष्टादृष्टार्थेषु कर्मसु सञ्जनं तत्परता कर्मसङ्गस्तेन निबध्नाति रजो देहिनम् ॥ ७ ॥**

**भाष्यार्थ—' रजो रागात्मकं० ' इति**—तर मग रजाचें लक्षण काय, ते पुरुषाला कसे बद्ध करिते, ते ' रजो रागात्मकं० ' या श्लोकाने सांगतात—**रजः रागात्मकं-रञ्जनात् रागः गैरिकादिवत् रागात्मकं विद्धि-जानीहि**—रजोगुण रागात्मक-पुरुषाचा दृश्यांशी ज्याच्याकडून संसर्ग केला जातो तो राग-आसक्ति, तद्रूप आहे, असें तूं जाण. गेरु वगैरे प्रमाणें तो रंजन करितो, म्हणून त्याला राग म्हणतात. रजोगुण रागात्मक आहे, असे तूं समज.—**तृष्णासंगसमुद्भवं-तृष्णा-अप्राप्ताभिलाषः आसङ्गः-प्राप्ते विषये मनसः प्रीतिलक्षणः संश्लेषः-तृष्णासंगयोः समुद्भवं तृष्णासंगसमुद्भवं**—तृष्णा व आसंग यांचा समुद्भव-तृष्णा म्हणजे अप्राप्त वस्तूचा अभिलाष, आसंग म्ह० प्राप्त विषयामध्ये मनाचा प्रीतिरूप संश्लेष-संबंध, त्या तृष्णा-आसंगांचा समुद्भव, तो तृष्णासंगसमुद्भव म्ह० तृष्णा व आसक्ति यांस उत्पन्न करणारा आहे.—**कौन्तेय तत् निबध्नाति-तत् रजः कर्मसङ्गेन -दृष्टादृष्टार्थेषु कर्मसु सञ्जनं-तत्परता कर्मसंगः तेन रजः देहिनं निबध्नाति**—हे कुंतिपुत्रा ! तें निबद्ध करिते-ते रज कर्मसंगानें-ज्याचें फल दृष्ट व अदृष्ट आहे, अशा कर्मामध्ये आसक्ति-तत्परता हाच कर्मसंग आहे, त्या कर्मसंगाने रज देहवानाला निश्चयाने बद्ध करिते. [ अकर्ताच असलेल्या पुरुषाला ' मी करितों ' अशा अभिमानाने रजोगुण प्रवृत्त करितो, असा भावार्थ. ] ७.

## तमस्त्वज्ञानजं विद्धि मोहनं सर्वदेहिनाम् ।
## प्रमादालस्यनिद्राभिस्तन्निबध्नाति भारत ॥ ८ ॥

**अन्वयार्थ—तु**—परंतु—**सर्वदेहिनां मोहनं**—सर्व देहवानांना मोह पाडणारें -अविवेकी करणारे—**तमः**—तम ( म्ह० तिसरा तमोगुण )—**अज्ञानजं**—अज्ञानापासून झालेले आहे, असे—**विद्धि**—तूं जाण.—**हे भारत**—हे भरतकुलोत्पन्न अर्जुना !—**तत्**—ते तम—**प्रमादालस्यनिद्राभिः**—प्रमाद, आलस्य व निद्रा यांच्यायोगानें प्राण्याला—**निबध्नाति**—बद्ध करिते. ८.

**तमस्त्विति । तमस्तृतीयो गुणोऽज्ञानजमज्ञानाज्जातमज्ञानजं विद्धि मोहनं मोहकरमविवेककरं सर्वदेहिनां सर्वेषां देहवतां प्रमादालस्यनिद्राभिः प्रमादश्चाऽऽलस्यं च निद्रा च प्रमादालस्यनिद्रास्ताभिस्तत्तमो निबध्नाति भारत ॥ ८ ॥**

**भाष्यार्थ—' तमः तु० ' इति**—तमाचें लक्षण काय आहे व तें कसें बद्ध करितें तें ' तमस्तु० ' या श्लोकानें सांगतात.—**तमः तृतीयः गुणः**—तम म्ह० तिसरा गुण—**अज्ञानजं-अज्ञानात् जातं अज्ञानजं विद्धि**—तम अज्ञानज म्ह० अज्ञा-

नापासून उत्पन्न झालेलें-म्हणून अज्ञानज असें तूं जाण.—**सर्वदेहिनां-सर्वेषां देहवतां मोहनं-मोहकरं-अविवेककरं**—सर्व देहवानांचें-सर्व देहधारी प्राण्यांचें मोहन-सर्वांना मोह पाडणारें, अविवेक करणारें-सर्वांच्या विवेकाला प्रतिबंध करणारें आहे. [ सर्व गुण प्रकृतीपासूनच जरी झालेले असले, तरी त्यांतील एकट्या तमालाच ' अज्ञानजं ' असें जे विशेषण दिलें आहे, ते त्याला अज्ञानाहून विपरीत स्वभाव प्राप्त झाला नाहीं, हें सुचविण्यासाठी आहे. सत्त्व व रज हे अज्ञानाहून अगदी विपरीतस्वभावास प्राप्त झाले आहेत, हें वरील वर्णनावरून कोणाच्याहि सहज लक्षांत येईल.]—**प्रमादालस्यनिद्राभिः-प्रमादः च आलस्यं च निद्रा च-प्रमादालस्यनिद्राः ताभिः तत् तमः भारत निबध्नाति**—प्रमाद, आलस्य व निद्रा, त्या प्रमाद-आलस्य-निद्रांनी, त्यांच्या योगानें तें तम हे भारता, निबद्ध करितें. [ दुसऱ्या कार्यांमध्ये आसक्त झाल्यामुळें एखादे करावयास इष्ट असलेले कर्तव्यहि न करणें, हा प्रमाद होय; निरिच्छेमुळे उत्साहाला प्रतिबंध होणे हे आलस्य आहे; व गाढ निद्रा. यांच्या योगानें निर्विकार असलेल्या आत्म्याला तमहि विकृत करितें, असा याचा भावार्थ. ] ८.

**सत्त्वं सुखे सञ्जयति रजः कर्मणि भारत ।**
**ज्ञानमावृत्य तु तमः प्रमादे सञ्जयत्युत ॥ ९ ॥**

**अन्वयार्थ**—**हे भारत**—हे अर्जुना! —**सत्त्वं**—सत्त्वगुण—**सुखे** —सुखांत **सञ्जयति**—संसक्त-आसक्त करतो.—**रजः**—रजोगुण—**कर्मणि**—कर्मामध्यें आसक्त करतो.—**तु**—आणि—**तमः**—तमोगुण—**उत**—हि—**ज्ञानं आवृत्य**—ज्ञानाला आच्छादित करून —**प्रमादे सञ्जयति**—अनवधानांत संयुक्त करतो. ९.

**पुनर्गुणानां व्यापारः संक्षेपत उच्यते—सत्त्वं सुखे सञ्जयति संश्लेषयति रजः कर्मणि हे भारत सञ्जयतीति वर्तते । ज्ञानं सत्त्वकृतं विवेकमावृत्याऽऽच्छाद्य तु तमः स्वेनाऽऽवरणात्मना प्रमादे सञ्जयत्युत प्रमादो नाम प्राप्तकर्तव्याकरणम् ॥ ९ ॥**

**भाष्यार्थ**—( वर सांगितलेल्या गुणांतील कोणत्या कार्यात कोणत्या गुणाचा उत्कर्ष होतो तें सांगतात-)—**पुनः गुणानां व्यापारः संक्षेपतः उच्यते**—पुनरपि गुणांचा व्यापार संक्षेपतः सांगितला जातो.—**सत्त्वं सुखे संजयति-संश्लेषयति**—सत्त्वगुण सुखामध्ये आसक्त करितो-सुख साधावयाचे असतां सत्त्वगुण विषयामध्ये उत्कर्ष पावतो. —**हे भारत रजः कर्मणि संजयति इति वर्तते**—हे अर्जुना! रजोगुण कर्मामध्यें संश्लिष्ट करितो-कर्म साधावयाचे असतां रजोगुण उत्कर्ष पावतो.—**तु तमः ज्ञानं-सत्त्वकृतं विवेकं स्वेन आवरणात्मना आवृत्य-आच्छाद्य**—पण तमोगुण ज्ञानाला म्ह० सत्त्वकृत विवेकाला आपल्या आवरणात्मक स्वरूपानें आच्छादित करून—**प्रमादे संजयति उत**—प्रमादामध्यें, संश्लिष्ट करितो-प्रमादांत आसक्त करितो.—**प्रमादः नाम प्राप्तकर्तव्याकरणं**—प्रमाद म्ह० प्राप्त कर्तव्य न करणें. [ त्या प्रमादांत तमोगुण संयुक्त करितो. ] ९.

रजस्तमश्चाभिभूय सत्त्वं भवति भारत ।
रजः सत्त्वं तमश्चैव तमः सत्त्वं रजस्तथा ॥ १० ॥

**अन्वयार्थ—हे भारत,**—हे अर्जुना!—**सत्त्वं**—सत्त्वगुण—**रजः च तमः**—रजोगुण व तमोगुण यांना—**अभिभूय**—पराभूत करून—**भवति**—वाढतो.—**रजः**—रजोगुण—**सत्त्वं च तमः**—सत्त्वगुण व तमोगुण यांना—**(अभिभूय)**—पराभूत करून—**(भवति)**—उत्कर्ष पावतो—**तथा**—आणि तसेच—**तमः**—तमोगुण—**सत्त्वं च रजः**—सत्त्वगुण व रजोगुण यांना—**(अभिभूय भवति)**—पराभूत करून स्वतः वृद्धि पावतो. १०.

**उक्तं कार्यं कदा कुर्वन्ति गुणा इत्युच्यते—रजस्तमश्चोभावप्यभिभूय सत्त्वं भवत्युद्भवति वर्धते यदा तदा लब्धात्मकं सत्त्वं स्वकार्यं ज्ञानसुखाद्यारभते हे भारत। तथा रजोगुणः सत्त्वं तमश्चैवोभावप्यभिभूय वर्धते यदा तदा कर्मतृष्णादि स्वकार्यमारभते। तमआख्यो गुणः सत्त्वं रजश्चोभावप्याभिभूय तथैव वर्धते यदा तदा ज्ञानावरणादि स्वकार्यमारभते ॥ १० ॥**

**भाष्यार्थ—गुणाः उक्तं कार्यं कदा कुर्वन्ति इति उच्यते**—हे गुण वर सांगितलेलें कार्य केव्हा करितात, ते ' रजः० ' या श्लोकानें सांगितले जातें—**रजः च तमः उभौ अपि अभिभूय-यदा सत्त्वं भवति-उद्भवति-वर्धते**—रजोगुण व तमोगुण या दोहोंचा पराभव करून-त्यांना निर्बल करून, सत्त्वगुण जेव्हा उद्भवतो-वृद्धि पावतो—**तदा हे भारत लब्धात्मकं सत्त्वं स्वकार्यं ज्ञान-सुखादि आरभते**—तेव्हां हे भारत, स्वरूपाला प्राप्त झालेले-उत्कर्ष पावलेलें तें सत्त्व, आपलें ज्ञान-सुखादि कार्य आरंभितें.—**तथा रजोगुणः सत्त्वं तमः च उभौ अपि अभिभूय यदा वर्धते तदा कर्म-तृष्णादि स्वकार्यं आरभते**—त्याचप्रमाणें रजोगुण सत्त्व व तम या दोन्ही गुणाना पराभूत करून जेव्हां वाढतो, तेव्हा कर्म, तृष्णा इत्यादि स्वकार्याचा आरंभ करितो.—**तम-आख्यः गुणः सत्त्वं रजः च उभौ अपि अभिभूय तथा एव यदा वर्धते तदा ज्ञानावरणादि स्वकार्यं आरभते**—तमःसंज्ञक गुण सत्त्व व रज या दोहोंचा पराभव करून तसाच जेव्हां वृद्धि पावतो, तेव्हां ज्ञानाला आच्छादित करणें इत्यादि आपल्या कार्याचा आरंभ करितो. १०.

सर्वद्वारेषु देहेऽस्मिन्प्रकाश उपजायते ।
ज्ञानं यदा तदा विद्याद्विवृद्धं सत्त्वमित्युत ॥ ११ ॥

**अन्वयार्थ—यदा**—ज्यावेळीं—**अस्मिन् देहे**—या देहांत—**सर्वद्वारेषु**—श्रोत्रादि सर्व ज्ञानसाधनांच्या निमित्तानें—**प्रकाशः**—प्रकाश म्ह०—**ज्ञानं**—ज्ञान—

**उपजायते**—उत्पन्न होतें—**तदा**—त्यावेळीं—**सत्त्वं उत**—सत्त्वहि—**विवृद्धं**—वृद्धि पावलें आहे,—**इति**—असें—**विद्यात्**—जाणावें. ११.

यदा यो गुण उद्भूतो भवति तदा तस्य किं लिङ्गमित्युच्यते—सर्वद्वारेष्वात्मन उपलब्धिद्वाराणि श्रोत्रादीनि सर्वाणि करणानि तेषु सर्वद्वारेष्वन्तःकरणस्य बुद्धेर्वृत्तिः प्रकाशो देहेऽस्मिन्नुपजायते । तदेव ज्ञानम् । यदैवं प्रकाशो ज्ञानाख्य उपजायते तदा ज्ञानप्रकाशेन लिङ्गेन विद्याद्विवृद्धमुद्भूतं सत्त्वमित्युतापि ॥ ११ ॥

**भाष्यार्थ—यदा यः गुणः उद्भूतः भवति तदा तस्य किं लिङ्गं इति उच्यते**—जेव्हां जो गुण उद्भूत होतो, तेव्हा त्याचे कोणते चिह्न दिसते, तें सांगितलें जातें—**सर्वद्वारेषु-आत्मनः उपलब्धिद्वाराणि-श्रोत्रादीनि सर्वाणि करणानि तेषु सर्वद्वारेषु**—सर्व द्वारामध्यें-आत्म्याच्या विषयानुभवाची द्वारे श्रोत्रादि सर्व इंद्रियें, त्या सर्व द्वारामध्यें म्ह० सर्व द्वारांच्या निमित्तानें—**अस्मिन् देहे अन्तःकरणस्य-बुद्धेः वृत्तिः-प्रकाशः उपजायते**—या देहांत अन्तःकरणची-बुद्धीची वृत्ति-प्रकाश उत्पन्न होतो—**तत् एव ज्ञानं**—तेच ज्ञान होय,—**यदा एवं ज्ञानाख्यः प्रकाशः उपजायते**—जेव्हां अशा रीतीनें ज्ञानसंज्ञक प्रकाश उत्पन्न होतो—**तदा ज्ञानप्रकाशेन लिङ्गेन सत्त्वं विवृद्धं-उद्भूतं इति उत-अपि विद्यात्**—तेव्हां त्या ज्ञानप्रकाशरूप चिह्नावरून सत्त्व विवृद्ध झाले, उदभूत झालें-अतिशय वृद्धि पावले आहे, असेंहि जाणावे. ११.

## लोभः प्रवृत्तिरारम्भः कर्मणामशमः स्पृहा ।
## रजस्येतानि जायन्ते विवृद्धे भरतर्षभ ॥ १२ ॥

**अन्वयार्थ—हे भरतर्षभ,**—हे अर्जुना!—**रजसि विवृद्धे ( सति )**—रजोगुणाची अतिशय वृद्धि झाली असतां—**लोभः**—लोभ,—**प्रवृत्तिः**—प्रवृत्ति—**कर्मणां आरम्भः**—कर्माचा आरंभ—**अशमः**—अशांति—**स्पृहा**—इच्छा-तृष्णा—**एतानि**—हीं चिह्नें—**जायन्ते**—उत्पन्न होतात. १२.

रजस उद्भूतस्येदं चिह्नम्— लोभः परद्रव्यादित्सा, प्रवृत्तिः प्रवर्तनं सामान्यचेष्टा, आरम्भः, कस्य कर्मणाम् । अशमोऽनुपशमः, हर्षरागादिप्रवृत्तिः, स्पृहा सर्वसामान्यवस्तुविषया तृष्णा, रजसि गुणे विवृद्ध एतानि लिङ्गानि जायन्ते हे भरतर्षभ ॥१२॥

**भाष्यार्थ—उद्भूतस्य रजसः इदं चिह्नं**—उद्भूत झालेल्या रजाचें हें चिह्न आहे.—**लोभः-परद्रव्यादित्सा**—लोभ म्ह० पर द्रव्य घेण्याची इच्छा,—**प्रवृत्तिः-प्रवर्तनं-सामान्यचेष्टा**—प्रवृत्ति म्ह० प्रवर्तन-सामान्यचेष्टा,शरीरेंद्रियाची हालचाल—**आरंभः, कस्य कर्मणां**—आरंभ-उपक्रम, कशाचा? काम्य व निषिद्ध लौकिक कर्मांचा,—**अशमः-अनुपशमः**—अशान्ति-उपशमराहित्य, बाह्य व अंतर इंद्रियांची अशान्ति, म्ह०—**हर्षरागादिप्रवृत्तिः**—हर्ष, राग इत्यादिकांची प्रवृत्ति,—**स्पृहा**-

**सर्वसामान्यवस्तुविषया तृष्णा**—स्पृहा म्ह० सर्वसामान्य वस्तूविषयींची तृष्णा; —**हे भरतर्षभ, रजसि गुणे विवृद्धे एतानि लिङ्गानि जायन्ते**—हे भरतश्रेष्ठा! रजोगुणाची अतिशय वृद्धि झाली असतां हीं चिह्ने होतात. १२.

**अप्रकाशोऽप्रवृत्तिश्च प्रमादो मोह एव च ।**
**तमस्येतानि जायन्ते विवृद्धे भरतर्षभ ॥ १३ ॥**

**अन्वयार्थ—हे भरतर्षभ**—हे अर्जुना!—**तमसि विवृद्धे (सति)**—तमोगुण विशेषें करून वाढला असतां—**अप्रकाशः**—अविवेक, अज्ञान,—**च**—व—**अप्रवृत्तिः**—प्रवृत्तीचा अभाव—**प्रमादः**—अनवधान—**मोहः एव च**—व मोहच—**एतानि**—हीं चिह्नें—**जायन्ते**—होतात. १३.

अप्रकाश इति । अप्रकाशोऽविवेकोऽत्यन्तमप्रवृत्तिश्च प्रवृत्त्यभावस्तत्कार्यं प्रमादो मोह एव चाविवेको मूढतेत्यर्थः । तमसि गुणे विवृद्ध एतानि लिङ्गानि जायन्ते हे कुरुनन्दन ॥ १३ ॥

**भाष्यार्थ—' अप्रकाशः०' इति**—' अप्रकाशः० ' या श्लोकानें वृद्धि पावलेल्या तमोगुणाचें चिह्न सांगतात—**अप्रकाशः-अविवेकः**—अप्रकाश म्ह० अविवेक—**च अत्यन्तं अप्रवृत्तिः-प्रवृत्त्यभावः**—व अत्यन्त अप्रवृत्ति, प्रवृत्तीचा अभाव, [ म्ह० सर्वथा ज्ञान व कर्म याचा अभाव या दोन विशेषणांनी सांगितला.]—**तत्कार्यं प्रमादः**—व त्या अविवेकाचें कार्य प्रमाद,—**च मोहः एव-अविवेकः-मूढता इत्यर्थः**—आणि मोहच म्ह० अविवेक-मूढत्व असा याचा भावार्थ. [ म्ह० ज्ञेय वस्तूला विपरीत जाणणे ]—**हे कुरुनन्दन, तमसि गुणे विवृद्धे एतानि लिङ्गानि जायन्ते**—हे कुरुवंशजा! तमोगुणाची अतिशय वृद्धि झाली असतां हीं चिह्ने होतात. १३.

**यदा सत्त्वे प्रवृद्धे तु प्रलयं याति देहभृत् ।**
**तदोत्तमविदां लोकानमलान्प्रतिपद्यते ॥ १४ ॥**

**अन्वयार्थ—तु**—परंतु—**यदा**—जेव्हां—**सत्त्वे प्रवृद्धे**—सत्त्वगुणाची अतिशय वृद्धि झाली असतां—**देहभृत्**—देहधारण करणारा आत्मा—**प्रलयं याति**—प्रलयास प्राप्त होतो-मरतो—**तदा**—तेव्हां—**उत्तमविदां**—हिरण्यगर्भादिकांच्या तत्त्वाला जाणणाऱ्या लोकांच्या—**अमलान् लोकान्**—निर्मल-शुद्ध लोकांस—**प्रतिपद्यते**—तो प्राप्त होतो. १४.

**मरणद्वारेणापि यत्फलं प्राप्यते तदपि संगरागहेतुकं सर्वं गौणमेवेति दर्शयन्नाह— यदा सत्त्वे प्रवृद्ध उद्भूते तु प्रलयं मरणं याति प्रतिपद्यते देहभृदात्मा तदोत्तमविदां महदादितत्त्वविदामित्येतत् । लोकानमलान्मलरहितान्प्रतिपद्यते प्राप्नोतीत्येतत् ॥ १४ ॥**

**भाष्यार्थ—मरणद्वारेण अपि यत्फलं प्राप्यते तत् अपि संगरागहेतुकं सर्वं गौणं एव इति दर्शयन् आह**—मरणाच्या द्वाराहि जें फल प्राप्त होतें, तेंहि संग व राग म्ह० आसक्ति व तृष्णा यांमुळें प्राप्त होणारें सर्व फल गौणच आहे, असें दाखविणारे भगवान् म्हणतात—**यदा सत्त्वे प्रवृद्धे-उद्भूते तु देहभृत् आत्मा प्रलयं-मरणं याति-प्रतिपद्यते**—जेव्हां सत्त्वगुणाची अतिशय वृद्धि झाली असतां देह धारण करणारा आत्मा प्रलयास-मरणास प्राप्त होतो-मरतो—**तदा उत्तमविदां-महदादितत्त्वविदां अमलान्-मलरहितान् लोकान् प्रतिपद्यते-प्राप्नोति इति एतत्**—तेव्हां उत्तमवेत्त्यांच्या-महदादितत्त्ववेत्त्यांच्या, असा याचा भावार्थ. त्या तत्त्वज्ञांच्या अमल-मलरहित लोकांस प्राप्त होतो-रजोगुण व तमोगुण, यांतील कोणत्या तरी गुणाचा उद्भव होणें हाच मल आहे. त्या मलानें रहित अशा आगमसिद्ध ब्रह्मलोकादिकांस प्राप्त होतो, असा याचा आशय. १४.

**रजसि प्रलयं गत्वा कर्मसंगिषु जायते ।**
**तथा प्रलीनस्तमसि मूढयोनिषु जायते ॥ १५ ॥**

**अन्वयार्थ—रजसि प्रलयं गत्वा**—रजोगुणात प्रलयाला प्राप्त होऊन म्ह० रजोगुण वाढला असतां जो मरतो तो—**कर्मसंगिषु जायते**—कर्मामध्यें आसक्ति ठेवणाऱ्या मनुष्यांमध्यें उत्पन्न होतो.—**तथा**—त्याचप्रमाणें—**तमसि प्रलीनः**—तमोगुणांत प्रलीन झालेला-तमोगुण वृद्धि पावला असतां मरण पावलेला—**मूढयोनिषु**—पश्वादि मूढ योनीमध्यें—**जायते**—उत्पन्न होतो. १५.

**रजसि गुणे विवृद्धे प्रलयं मरणं गत्वा प्राप्य कर्मसंगिषु कर्मासक्तियुक्तेषु मनुष्येषु जायते । तथा तद्वदेव प्रलीनो मृतस्तमसि विवृद्धे मूढयोनिषु पश्वादियोनिषु जायते ॥**

**भाष्यार्थ—रजसि गुणे विवृद्धे प्रलयं-मरणं गत्वा कर्मसंगिषु-कर्मासक्तियुक्तेषु मनुष्येषु जायते**—रजोगुणाची अतिशय वृद्धि झाली असता प्रलयाला म्ह० मरणाला प्राप्त होऊन कर्मसंगी म्ह० कर्मासक्तीनें युक्त अशा मनुष्यांमध्यें उत्पन्न होतो.—**तथा-तद्वत् एव तमसि विवृद्धे प्रलीनः-मृतः मूढयोनिषु-पश्वादियोनिषु जायते**—त्याचप्रमाणें म्ह० सत्त्व व रज यांची अत्यंत वृद्धि झाली असता मृत झालेले जीव, क्रमानें ब्रह्मलोकादिकांत देवादियोनीत व मनुष्यलोकी मनुष्यांमध्यें जसे शरीर ग्रहण करितात, त्याप्रमाणें तमोगुण अतिशय वाढला असतां प्रलीन म्ह० मृत झालेला मनुष्य पश्वादि मूढ योनींमध्यें उत्पन्न होतो. १५.

**कर्मणः सुकृतस्याऽऽहुः सात्त्विकं निर्मलं फलम् ।**
**रजसस्तु फलं दुःखमज्ञानं तमसः फलम् ॥ १६ ॥**

**अन्वयार्थ—सुकृतस्य कर्मणः**—पुण्य कर्माचें—**सात्त्विकं निर्मलं फलं**—सात्त्विक निर्मल फळ मिळतें असें—**आहुः**—सांगतात.—**तु**—पण—**रजसः**—रजो-

गुणाचें—**फलं**—फल—**दुःखं**—दुःख आहे.—**तमसः फलं** -तमोगुणाचें फल—**अज्ञानं**—अज्ञान आहे. १६.

**अतीतश्लोकार्थस्यैव संक्षेप उच्यते—कर्मणः सुकृतस्य सात्त्विकस्येत्यर्थः। आहुः शिष्टाः सात्त्विकमेव निर्मलं फलमिति। रजसस्तु फलं दुःखं राजसस्य कर्मण इत्यर्थः। कर्माधिकारात्फलमपि दुःखमेव कारणानुरूप्याद्राजसमेव। तथाऽज्ञानं तमसस्तामसस्य कर्मणोऽधर्मस्य पूर्ववत् ॥ १६ ॥**

**भाष्यार्थ—अतीतश्लोकार्थस्य एव संक्षेपः उच्यते**—वरील दोन श्लोकांतील अर्थाचाच संक्षेप सांगतात-[ वर सात्त्विकादिभावांचें फल सांगितलें, येथें सात्त्विकादि कर्माचें फल सांगितलें जातें, असा याचा भावार्थ. ]—**सुकृतस्य कर्मणः-सात्त्विकस्य इत्यर्थः**—सुकृताचे म्ह० शोभनकृताचे-पुण्याचें-सात्त्विक-अशुद्धिरहित कर्माचे असा याचा भावार्थ.—**सात्त्विकं एव निर्मलं फलं इति शिष्टाः आहुः**—सात्त्विकच सत्त्वगुणकृत निर्मल म्ह० रज व तम यांपासून उद्भवणाऱ्या मलानें रहित असें फल प्राप्त होतें, असें शिष्ट सांगतात.—**तु रजसः-राजसस्य कर्मणः इत्यर्थः फलं दुःखं**—पण रजाचे म्ह० राजस कर्माचें, असा भावार्थ, त्याचें फल दुःख आहे, असें शिष्ट सांगतात. (पण रजःशब्दाचा राजस कर्म असा अर्थ कां करावयाचा? उत्तर-)—**कर्माधिकारात्**—येथें प्रकरण कर्माचें असल्यामुळे तसा अर्थ करणें उचित आहे.—**फलं अपि दुःखं एव**—त्याचें फलहि दुःखच म्ह० दुःखबहुल, ( असें कां म्हणतां ? उत्तर-)—**कारणानुरूप्यात् राजसं एव**—रजोनिमित्त पापमिश्र पुण्य, हें कारण असल्यामुळें त्याच्या अनुरोधानें त्याचें फलहि राजस-दुःखच असणें युक्त आहे.—**तथा-पूर्ववत् अज्ञानं तमसः-तामसस्य कर्मणः-अधर्मस्य**—त्याचप्रमाणें-पूर्वीप्रमाणेंच अविवेकप्राय दुःख हें तमाचें-तामस कर्माचें-अधर्माचें फल आहे.१६

## सत्त्वात्संजायते ज्ञानं रजसो लोभ एव च।
## प्रमादमोहौ तमसो भवतोऽज्ञानमेव च ॥ १७ ॥

**अन्वयार्थ—सत्त्वात्**—उत्कर्ष पावलेल्या सत्त्वगुणापासून—**ज्ञानं**—ज्ञान—**संजायते**—उत्पन्न होतें—**च**—आणि—**रजसः**—रजोगुणापासून—**लोभः एव**—लोभच उत्पन्न होतो.—**तमसः**—तमोगुणापासून—**प्रमादमोहौ**—प्रमाद व मोह—**भवतः**—होतात—**च**—आणि—**अज्ञानं एव**—अज्ञानच उत्पन्न होतें. १७.

**किंच गुणेभ्यो भवति— सत्त्वाल्लब्धात्मकात्संजायते समुत्पद्यते ज्ञानं रजसो लोभ एव च। प्रमादमोहौ चोभौ तमसो भवतोऽज्ञानमेव च भवति ॥ १७ ॥**

**भाष्यार्थ—किंच गुणेभ्यः भवति**—आणि गुणांपासून काय होतें ? तें ' सत्त्वात्० ' या श्लोकानें सांगतात—**सत्त्वात्-लब्धात्मकात् ज्ञानं संजायते-समुत्पद्यते**—उत्कर्ष पावलेल्या सत्त्वगुणापासून ज्ञान उत्पन्न होतें. सर्व ज्ञानेंद्रियांच्या

द्वारा होणारें ज्ञान सत्त्वगुणाच्या उत्कर्षामुळें होतें.—**रजसः लोभः एव च**—रजोगुणाचा उत्कर्ष झाला असतां लोभ हाच धर्म उत्पन्न होतो—**च तमसः प्रमाद-मोहौ उभौ भवतः च अज्ञानं एव भवति**—आणि तमोगुणापासून प्रमाद व मोह हे दोन्ही होतातः व अज्ञान-विवेकाचा अभाव होतो. १७

**ऊर्ध्वं गच्छन्ति सत्त्वस्था मध्ये तिष्ठन्ति राजसाः ।**
**जघन्यगुणवृत्तस्था अधो गच्छन्ति तामसाः ॥ १८ ॥**

**अन्वयार्थ—सत्त्वस्थाः**—सत्त्वगुणवृत्तीमध्यें स्थित असलेले सात्त्विक—**ऊर्ध्वं**—देवादिकांच्या लोकीं—**गच्छन्ति**—जातात.—**राजसाः**—राजसलोक—**मध्ये**—मध्यलोकीं म्ह० मनुष्यांमध्यें—**तिष्ठन्ति**—राहतात.—**जघन्यगुणवृत्तस्थाः**—शेवटच्या निकृष्ट गुणाच्या वृत्तींत स्थित असलेले—**तामसाः**—तामसवृत्ति जन—**अधः** अधोलोकीं—**गच्छन्ति**—जातात. १८.

किंच— ऊर्ध्वं गच्छन्ति देवलोकादिषूत्पद्यन्ते सत्त्वस्थाः सत्त्वगुणवृत्तस्थाः । मध्ये तिष्ठन्ति मनुष्येषूत्पद्यन्ते राजसाः । जघन्यगुणवृत्तस्था जघन्यश्चासौ गुणश्च जघन्यगुणस्तमस्तस्य वृत्तं निद्रालस्यादि तस्मिन्स्थिता जघन्यगुणवृत्तस्था मूढा अधो गच्छन्ति पश्वादिषूत्पद्यन्ते तामसाः ॥ १८ ॥

**भाष्यार्थ**—( सात्त्विक, राजस व तामस ज्ञान, कर्म व फल सांगून जें प्रत्यक्ष सांगितलेलें नाहीं, त्याचा संग्रह करण्यासाठीं 'ऊर्ध्व०' या श्लोकानें सामान्यतः उपसंहार करितात- )—**किंच**—पुढील फलादिकांवरूनहि सत्त्वादिकांचे ज्ञान होतें—**सत्त्वस्थाः-सत्त्वगुणवृत्तस्थाः ऊर्ध्वं गच्छन्ति-देवलोकादिषु उत्पद्यन्ते**—सत्त्वस्थ म्ह० सत्त्वगुणाच्या वृत्तामध्यें म्ह० शुभ ज्ञान किंवा कर्म, यांत निष्ठा ठेवून राहणारे ऊर्ध्व जातात म्ह० देवलोकादिकांमध्यें उत्पन्न होतात.—**राजसाः मध्ये तिष्ठन्ति-मनुष्येषु उत्पद्यन्ते**—राजस म्ह० रजोगुणापासून होणारे ज्ञान किंवा कर्म यांमध्यें निरत असलेले राजस मध्यें राहतात, म्ह० मनुष्यांमध्यें उत्पन्न होतात.—**जघन्यगुणवृत्तस्थाः-जघन्यः च असौ गुणः च जघन्यगुणः तमः तस्य वृत्तं निद्रालस्यादि तस्मिन् स्थिताः जघन्यगुणवृत्तस्थाः-मूढाः**—जघन्य गुणाच्या वृत्तामध्ये स्थित असलेले-जघन्य म्ह० शेवटचा असा जो गुण तो जघन्यगुण म्ह० तमोगुण, त्याचे वृत्त-निद्रा, आलस्य इत्यादि, त्यांमध्यें स्थित असलेले ते जघन्यगुणवृत्तस्थ होत; असे मूढ-अविवेकी—**तामसाः अधः गच्छन्ति-पश्वादिषु उत्पद्यन्ते**—तामस लोक अधोलोकीं जातात. पश्वादिकांमध्यें उत्पन्न होतात. १८

पुरुषस्य प्रकृतिस्थत्वरूपेण मिथ्याज्ञानेन युक्तस्य भोग्येषु गुणेषु सुखदुःखमोहात्मकेषु सुखी दुःखी मूढोऽहमस्मीत्येवंरूपो यः संगस्तत्कारणं पुरुषस्य सदसद्योनिजन्मप्राप्तिलक्षणस्य संसारस्येति समासेन पूर्वाध्याये यदुक्तं तदिह सर्वं रजस्तम इति गुणाः प्रकृ-

**तिसंभवा इत्यत आरभ्य गुणस्वरूपं गुणवृत्तं स्ववृत्तेन च गुणानां बन्धकत्वं गुणवृत्त-निबद्धस्य च पुरुषस्य या गतिरित्येतत्सर्वं मिथ्याज्ञानमज्ञानमूलं बन्धकारणं विस्तरेणोक्त्वाऽधुना सम्यग्दर्शनान्मोक्षो वक्तव्य इत्याह भगवान्—**

**भाष्यार्थ**—( कोणत्या गुणामध्यें कसा बद्ध होतो, इत्यादि प्रश्नांचें उत्तर देऊन गुणांपासून मोक्षण कसे होतें, हें सांगण्यासाठीं गतार्थाचा अनुवाद करून मिथ्या ज्ञानाची निवृत्ति करणाऱ्या सम्यग्ज्ञानाचा प्रस्ताव करितात-)—**प्रकृतिस्थत्वरूपेण मिथ्याज्ञानेन युक्तस्य पुरुषस्य**—प्रकृतिस्थत्वरूप मिथ्याज्ञानाने युक्त असलेल्या पुरुषाचा—**सुखदुःखमोहात्मकेषु भोग्येषु गुणेषु अहं सुखी दुःखी मूढः अस्मि इति-एवंरूपः यः सङ्गः**—सुख दुःख-मोहरूप भोग्य गुणांमध्ये ' मी सुखी, दुःखी, मूढ आहे ' हा अशा प्रकारचा जो संग,—**तत् पुरुषस्य सदसद्योनिजन्म-प्राप्तिलक्षणस्य संसारस्य कारणं**—ते पुरुषाच्या सदसद्योनींमध्यें जन्म प्राप्त होणें या स्वरूपाच्या संसाराचे कारण आहे,—**इति समासेन पूर्वाध्याये यत् उक्तं**-असे संक्षेपतः पूर्वाध्यायांत जे सांगितलें—**तत् इह ' सत्त्वं रजस्तम इति गुणाः प्रकृतिसंभवाः ' इत्यतः आरभ्य**—तेच येथे ' सत्त्व, रज व तम हे प्रकृतीपासून उत्पन्न झालेले गुण आहेत, ' (श्लो० ५) या श्लोकापासून आरंभ करून—**गुणस्वरूपं-गुणवृत्तं स्ववृत्तेन च गुणानां बन्धकत्वं**—गुणाचे स्वरूप, गुणांचे वृत्त-ज्ञान-कर्मादि, त्या स्ववृत्ताने गुणांचे बन्धकत्व,—**च गुणवृत्तनिबद्धस्य पुरुषस्य या गतिः**—व गुणांच्या ज्ञान-कर्म फलादि वृत्तीने अत्यंत बद्ध झालेल्या पुरुषाची जी गति ती—**इति एतत्सर्वं मिथ्याज्ञानं-अज्ञानमूलं बन्धकारणं विस्तरेण उक्त्वा**—इत्यादि हे सर्व मिथ्याज्ञान-अज्ञानमूलक बंधाचें कारण विस्तारानें सांगून—**अधुना सम्यग्दर्शनात् मोक्षः वक्तव्यः इति भगवान् आह**—आतां सम्यग्दर्शनानें म्ह० आत्म्याच्या यथार्थ ज्ञानानें मोक्ष म्ह० गुणांपासून सुटून ब्रह्मभावप्राप्ति होते, असे सांगावें म्हणून भगवान् म्हणतात—

## नान्यं गुणेभ्यः कर्तारं यदा द्रष्टानुपश्यति ।
## गुणेभ्यश्च परं वेत्ति मद्भावं सोऽधिगच्छति ॥ १९ ॥

**अन्वयार्थ**—**यदा**—ज्या वेळीं—**द्रष्टा**—विद्वान्—**गुणेभ्यः अन्यं कर्तारं**—शरीर, इंद्रिये व विषय यांच्या आकाराने परिणत झालेल्या गुणांहून दुसरा कोणी कर्ता—**न पश्यति**—पहात नाही,—**च**—आणि—**गुणेभ्यः**—गुणांहून—**परं**—अगदीं विलक्षण असलेल्या साक्षिभूत आत्म्याला—**वेत्ति**—जाणतो—**सः**—तो विद्वान्—**मद्भावं**—माझ्या ईश्वरभावाला-माझ्या स्वरूपास—**अधिगच्छति**—प्राप्त होतो.

**नान्यं कार्यकरणविषयाकारपरिणतेभ्यो गुणेभ्यः कर्तारमन्यं यदा द्रष्टा विद्वान्सन्नानुपश्यति । गुणा एव सर्वावस्थाः सर्वकर्मणां कर्तार इत्येवं पश्यति । गुणेभ्यश्च परं गुणव्यापारसाक्षिभूतं वेत्ति मद्भावं मम भावं स द्रष्टाऽधिगच्छति ॥ १९ ॥**

**भाष्यार्थ—'नान्यं' यदा द्रष्टा-विद्वान् सन् कार्यकरणविषयाकार-परिणतेभ्यः गुणेभ्यः अन्यं कर्तारं न अनुपश्यति**—जेव्हां द्रष्टा म्ह० विद्वान् होत्साता शरीर-इंद्रिय-विषयाकाराने परिणाम पावलेल्या गुणांहून निराळा कर्ता आहे, असें आत्मज्ञानानंतर पहात नाही, तर अर्थात्—**सर्वावस्थाः गुणाः एव सर्व-कर्मणां कर्तारः इति-एवं पश्यति**—कार्य-करणांच्या-शरीरेंद्रियांच्या आकारानें परिणत झालेले गुणच सर्व म्ह० कायिक, वाचिक, मानसिक, विहित व निषिद्ध कर्मांचे कर्ते आहेत, असें पाहतो—**च गुणेभ्यः परं-गुणव्यापारसाक्षिभूतं वेत्ति**—व गुणांहून पर-अगदीं पृथक् असलेल्या गुणव्यापारांच्या साक्षिभूत निर्गुण ब्रह्मात्म्याला जाणतो—**सः द्रष्टा मद्भावं-मम भावं अधिगच्छति**—तो द्रष्टा-विद्वान् मद्भावाला-माझ्या भावाला-ब्रह्मात्मतेला प्राप्त होतो, त्याचा ब्रह्मभाव अभिव्यक्त होतो, असा भावार्थ. १९

## गुणानेतानतीत्य त्रीन्देही देहसमुद्भवान् ।
## जन्ममृत्युजरादुःखैर्विमुक्तोऽमृतमश्नुते ॥ २० ॥

**अन्वयार्थ—देही**—देहवान् आत्मा—**देहसमुद्भवान्-एतान् त्रीन् गुणान्**—देहाच्या उत्पत्तीचें बीज अशा या तीन गुणांस—**अतीत्य**—उल्लंघून—**जन्म-मृत्यु-जरा-दुःखैः**—जन्म, मृत्यु, जरा व दुःखे यांजकडून—**विमुक्तः(सन्)**—सोडला गेलेला असा होत्साता—**अमृतं**—अमृतभावास—**अश्नुते**—प्राप्त होतो. अमृताचा-मोक्षाचा अनुभव घेतो. २०

**कथमधिगच्छतीत्युच्यते— गुणानेतान्यथोक्तानतीत्य जीवन्नेवातिक्रम्य मायोपाधि-भूतांस्त्रीन्देही देहसमुद्भवान्देहोत्पत्तिबीजभूतान्, जन्ममृत्युजरादुःखैः, जन्म च मृत्युश्च जरा च दुःखानि च तैर्जीवन्नेव विमुक्तः सन्विद्वानमृतमश्नुते । एवं मद्भावमधिगच्छती-त्यर्थः ॥ २० ॥**

**भाष्यार्थ—कथं अधिगच्छति इति उच्यते**—विद्वान् सर्व अनर्थांचे निरसन करून ब्रह्मात्मभावाला कसा प्राप्त होतो, म्हणून विचारशील तर सांगतो—**एतान् यथोक्तान्**—या वर सांगितलेल्या म्ह०—**मायोपाधिभूतान् त्रीन् देहसमुद्भवान्-देहोत्पत्तिबीजभूतान् गुणान् अतीत्य**—मायोपाधिभूत माया हीच उपाधि-तद्रूप-अनर्थरूप अशा या तीन देहसमुद्भव म्ह० देहाच्या उत्पत्तीच्या बीजभूत गुणांचें—**देही जीवन् एव अतीत्य-अतिक्रम्य**—देहवान् आत्मा जीवद्-अवस्थेंतच उल्लंघन करून-अतिक्रमण करून—**जन्ममृत्युजरादुःखैः-जन्म च मृत्युः च जरा च दुःखानि च तैः जीवन् एव विमुक्तः सन् विद्वान् अमृतं अश्नुते**—जन्म-मृत्यु-जरा-दुःखांनीं-जन्म व मृत्यु व जरा-वृद्धावस्था व दुःखें, त्यांच्याकडून जीवंत असतांनाच-जीवदवस्थेंतच विमुक्त केलेला असा होत्साता विद्वान् अमृतास-मोक्षास प्राप्त होतो.—**एवं मद्भावं अधिगच्छति इत्यर्थः**—याप्रमाणें मद्भावास प्राप्त होतो,

असा याचा भावार्थ. [ विद्वान् वर सांगितलेल्या या मायोपाधिभूत-अनर्थरूप-देहोत्पत्तीच्या बीजभूत अविद्यामय तीन गुणांना उल्लंघून जन्म-मरणादिकांनीं रहित होत्साता मुक्त होतो. ] २०

**अर्जुन उवाच**—अर्जुन म्हणाला—

**कैर्लिङ्गैस्त्रीन्गुणानेतानतीतो भवति प्रभो ।**
**किमाचारः कथं चैतांस्त्रीन्गुणानतिवर्तते ॥ २१ ॥**

**अन्वयार्थ—हे प्रभो**—हे प्रभो—**कैः लिंगैः**—कोणत्या लिंगांनीं—**एतान् त्रीन् गुणान्**—या तीन गुणांना—**अतीतः**—उल्लंघिलेला असा हा पुरुष—**भवति**—होतो—**किमाचारः**—याचा आचार कसा असतो?—**च**—आणि—**एतान् त्रीन् गुणान्**—या तीन गुणानां तो—**कथं**—कोणत्या प्रकारें—**अतिवर्तते**—उल्लंघितो.

**जीवन्नेव गुणानतीत्यामृतमश्नुत इति प्रश्नबीजं प्रतिलभ्य— कैर्लिङ्गैश्चिह्नैस्त्रीनेतान्व्याख्यातान्गुणानतीतोऽतिक्रान्तो भवति प्रभो । किमाचारः कोऽस्याऽऽचार इति किमाचारः । कथं केन च प्रकारेणैतांस्त्रीन्गुणानातिवर्तते ॥ २१ ॥**

**भाष्यार्थ—जीवन् एव गुणान् अतीत्य अमृतं अश्नुते इति प्रश्नबीजं प्रतिलभ्य ( अर्जुनः उवाच )**—जीवंत असतांनाच गुणांचे अतिक्रमण करून अमृताचा अनुभव घेतो, असे प्रश्नबीज उपलब्ध झाले असता अर्जुन म्हणाला—**प्रभो कैः लिङ्गैः-चिह्नैः एतान् त्रीन् व्याख्यातान् गुणान् अतीतः-अतिक्रान्तः भवति**—हे प्रभो ! कोणत्या लिगानीं-चिह्नांनी या तीन-वर ज्यांचे व्याख्यान केले आहे, अशा या सत्त्वादि तीन गुणांचें व त्यांच्या परिणामभूत अध्यासाचे अतिक्रमण केलेला असा होतो ? गुणातीत झालेला विद्वान् कोणत्या लिगांनी-चिह्नांनी ज्ञात होतो ?—**किमाचारः-कः अस्य आचारः इति किमाचारः**—याचा आचार काय असतो, हा किमाचार असतो ?—**च कथं-केन प्रकारेण एतान् त्रीन् गुणान् अतिवर्तते**—आणि कसा-कोणत्या प्रकारानें या तीन गुणांचें अतिवर्तन-उल्लंघन करितो ?

---

१ १९-२०. श्लोकांवरील टीपेंत रहस्यकार म्हणतात—"वेदान्तात ज्याला ( ? ) माया म्हणतात, त्यालाच सांख्य त्रिगुणात्मक प्रकृति असें म्हणत असल्यामुळे त्रिगुणातीत होणें, म्हणजे मायेंतून सुटून परब्रह्म ओळखणें होय." वेदान्तात मायेला 'त्रिगुणात्मिका प्रकृति' म्हणत नाहींत कीं काय? 'लोहितशुक्लकृष्णा' 'स्वगुणैर्निगुढा' इत्यादि उपनिषद्वाक्यें आहेत.'दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया' असें भगवान् म्हणतात. 'त्रिगुणात्मिकां वैष्णवीं स्वां मायां मूलप्रकृतिं' इत्यादि आचार्य म्हणतात. रामानुजाचार्य 'मम एषा गुणमयी सत्त्वरजस्तमोमयी माया' असें म्हणतात. तसेच 'गुणातीत होणें म्ह० मायेंतून सुटून परब्रह्म ओळखणें' हेंहि म्हणणें बरोबर नाहीं. गुणातीत होणे म्हणजे ब्रह्मस्वरूपाने अवस्थित होणें, स्वरूपीं स्थित होणे, जीवन्मुक्त होणें.

[ पूर्वी सिद्धीसाठीं प्रयत्नानें अनुष्ठिलेलीं पण पुढें यत्नावांचूनच सिद्ध झालेलीं अशीं गुणातीताचीं स्वाभाविक चिह्नें कोणतीं ? गुणातीत होण्याचा ज्ञान हा उपाय पूर्वीच सांगितलेला असल्यामुळें त्या उपायाचा प्रकार जाणण्याच्या इच्छेनें येथें तिसरा प्रश्न आहे.]

**श्रीभगवान् उवाच**—श्रीकृष्ण म्हणाले—

**प्रकाशं च प्रवृत्तिं च मोहमेव च पांडव ।**
**न द्वेष्टि संप्रवृत्तानि न निवृत्तानि कांक्षति ॥ २२ ॥**

**अन्वयार्थ—हे पांडव**—हे अर्जुना ! —**प्रकाशं**—सत्त्वगुणाचें कार्य ज्ञान व सुख—**प्रवृत्तिं**—रजो गुणाचें कार्य लोभ, दुःख वगैरे—**च मोहं एव च**—आणि तमोगुणाचे कार्य अविवेक वगैरे हीं—**संप्रवृत्तानि**—प्रवृत्त झाली असतां त्यांचा—**न द्वेष्टि**—द्वेष करीत नाही व—**निवृत्तानि**—निवृत्ति झाली असतां त्यांची—**न कांक्षति**—आकांक्षा करीत नाही. २२.

गुणातीतस्य लक्षणं गुणातीतत्वोपायं चार्जुनेन पृष्टोऽस्मिञ्श्लोके प्रश्नद्वयार्थं प्रतिवचनम्—श्रीभगवानुवाच—यत्तावत्कैर्लिङ्गैर्युक्तो गुणातीतो भवतीति तच्छृणु—प्रकाशं च सत्त्वकार्यं प्रवृत्तिं च रजःकार्यं मोहमेव च तमःकार्यमित्येतानि न द्वेष्टि संप्रवृत्तानि सम्यग्विषयभावेनोद्भूतानि । मम तामसः प्रत्ययो जातस्तेनाहं मूढस्तथा राजसी प्रवृत्तिर्ममोत्पन्ना दुःखात्मिका तेनाहं रजसा प्रवर्तितः प्रचलितः स्वरूपात्कष्टं मम वर्तते योऽयं मत्स्वरूपावस्थानाद्भ्रंशस्तथा सात्त्विको गुणः प्रकाशात्मा मां विवेकित्वमापादयन्सुखे च संजयन्बध्नातीति तानि द्वेष्ट्यसम्यग्दर्शित्वेन । तदेवं गुणातीतो न द्वेष्टि संप्रवृत्तानि । यथा च सात्त्विकादिपुरुषः सात्त्विकादिकार्याण्यात्मानं प्रति प्रकाश्य निवृत्तानि काङ्क्षति न तथा गुणातीतो निवृत्तानि काङ्क्षतीत्यर्थः । एतन्न परप्रत्यक्षं लिङ्गं किं तर्हि स्वात्मप्रत्यक्षत्वादात्मविषयमेवैतल्लक्षणम् । न हि स्वात्मविषयं द्वेषमाकाङ्क्षां वा परः पश्यति ॥

**भाष्यार्थ—गुणातीतस्य लक्षणं गुणातीतत्वोपायं च अर्जुनेन पृष्टः श्रीभगवान्**—गुणातीताचें लक्षण व गुणातीत होण्याचा उपाय अर्जुनाकडून विचारले गेलेले श्रीभगवान्—**अस्मिन् श्लोके प्रश्नद्वयार्थं प्रतिवचनं उवाच**—या श्लोकांत त्या दोन प्रश्नांसाठीं प्रतिवचन-त्याचें उत्तर देण्याच्या उद्देशानें म्हणाले—**यत् तावत् कैः लिङ्गैः युक्तः गुणातीतः भवति इति तत् शृणु**—आतां अगोदर कोणत्या चिह्नांनीं युक्त झालेला विद्वान् गुणातीत होतो असे जें विचारले होतेंस तेंच ऐक—**प्रकाशं च सत्त्वकार्यं प्रवृत्तिं च रजःकार्यं मोहं एव च तमःकार्यं इति-एतानि**—प्रकाश सत्त्वगुणाचें कार्य, प्रवृत्ति-रजोगुणाचे कार्य, व मोह-तमोगुणाचे कार्य, अशीं हीं तीन गुणांचीं कार्यें—**संप्रवृत्तानि-सम्यग्विषयभावेन उद्भूतानि न द्वेष्टि**—संप्रवृत्त-उत्तमप्रकारें विषयरूपानें उद्भूत झालीं असतां ज्ञानी त्यांचा द्वेष करीत नाहीं.—**मम तामसः प्रत्ययः जातः तेन अहं मूढः**—माझ्या अंतःकरणांत

तामस प्रत्यय उत्पन्न झाला आहे, त्यामुळें मी मूढ-अविवेकी झालों आहें.—**तथा मम राजसी दुःखात्मिका प्रवृत्तिः उत्पन्ना**—त्याचप्रमाणें माझ्या ठिकाणीं राजसी दुःखरूप प्रवृत्ति उत्पन्न झाली आहे.—**तेन रजसा प्रवर्तितः अहं स्वरूपात् प्रचलितः**—त्या रजोगुणाकडून प्रवृत्त केला गेलेला मी स्वरूपापासून प्रचलित झालों आहें.—**यः अयं मत्स्वरूपावस्थानात् भ्रंशः कष्टं मम वर्तते**—जो हा माझा स्वरूपावस्थानापासून झालेला भ्रंश ही माझी मोठी दुःखद अवस्था आहे. मला त्यामुळें दुःख होतें.—**तथा सात्त्विकः प्रकाशात्मा गुणः मां विवेकित्वं आपादयन् च सुखे संजयन् बध्नाति**—त्याचप्रमाणें सात्त्विक प्रकाशरूप-ज्ञानरूप गुण मला विवेकित्वाला प्राप्त करून व सुखामध्ये आसक्त करून बद्ध करितो—**इति असम्यग्दर्शित्वेन तानि द्वेष्टि**—याप्रमाणें अयथार्थदर्शित्वामुळे अनात्मज्ञ त्यांचा द्वेष करितो. **तत् गुणातीतः एवं संप्रवृत्तानि न द्वेष्टि**—पण गुणातीत-सम्यग्दर्शी गुणातीत याप्रमाणें प्रवृत्त झालेल्या प्रकाशादिकांचा द्वेष करीत नाहीं. (आतां 'न निवृत्तानि कांक्षति' याचें व्याख्यान-)—**च यथा सात्त्विकादिपुरुषः सात्त्विकादिकार्याणि आत्मानं प्रति प्रकाश्य निवृत्तानि काङ्क्षति**—आणि ज्याप्रमाणे सात्त्विक, राजस किंवा तामस पुरुष सात्त्विकादि कार्ये-आत्म्याप्रत प्रकाशित करून निवृत्त झालेलीं कार्यें इच्छितो, स्वरूप दाखवून निवृत्त झालेल्या त्या कार्याची आकांक्षा करितो—**तथा गुणातीतः निवृत्तानि न कांक्षति इत्यर्थः**—त्याप्रमाणे गुणातीत विद्वान् निवृत्त झालेल्या त्या सात्त्विकादि कार्याची आकांक्षा करीत नाहीं, असा याचा भावार्थ.[तीं सर्व कार्ये अनात्म्याचीं आहेत असें यथार्थ जाणणारा त्यांच्या ठिकाणीं अनुकूलता किंवा प्रतिकूलता यांचा आरोप करून त्यांची इच्छा करीत नाहीं व द्वेषहि करीत नाहीं.]—**एतत् न परप्रत्यक्षं लिङ्गं**—हें गुणातीताचे दुसऱ्याला प्रत्यक्ष दिसणारे चिह्न नव्हे.—**किं तर्हि**—तर मग काय?—**स्वात्मप्रत्यक्षत्वात् एतत् आत्मविषयं एव लक्षणं**—स्वबुद्धिप्रत्ययगम्य-स्वानुभवसिद्ध असल्यामुळें हें आत्मविषय-स्वसंवेद्यच लक्षण आहे. स्वतःच्याच आश्रयानें राहणारें ते लक्षण आहे.—**हि स्वात्मविषयं द्वेषं आकांक्षां वा परः न पश्यति**—कारण आपल्या अन्तःकरणाचाच आश्रय करून राहणाऱ्या द्वेषाला किंवा आकांक्षेला दुसरा कोणी पाहूं शकत नाहीं, हे प्रसिद्ध आहे. २२.

## उदासीनवदासीनो गुणैर्यो न विचाल्यते ।
## गुणा वर्तन्त इत्येव योऽवतिष्ठति नेङ्गते ॥ २३ ॥

**अन्वयार्थ**—**उदासीनवत्**—उदासीनाप्रमाणें—**आसीनः**—राहणारा—**यः**—जो—**गुणैः**—गुणांकडून—**न विचाल्यते**—विशेषेंकरून विवेकदर्शनावस्थेपासून ढळविला जात नाहीं-आत्मतत्त्वापासून दूर केला जात नाहीं, तर—**यः**—जो—**गुणाः**—शरीर व इंद्रियें यांच्या आकारानें परिणत झालेले गुण—**वर्तन्ते**—एकमेकांमध्यें राहतात,—**इति एव**—अशा प्रकारेंच-असें समजूनच—**अवतिष्ठति**—स्वरूपांत राहतो;—**न इङ्गते**—तत्त्वापासून चलन पावत नाहीं. २३.

अथेदानीं गुणातीतः किमाचार इति प्रश्नस्य प्रतिवचनमाह— उदासीनवद्यथोदासीनो न कस्यचित्पक्षं भजते तथाऽयं गुणातीतत्वोपायमार्गेऽवस्थित आसीन आत्मविद् गुणैर्यः संन्यासी न विचाल्यते विवेकदर्शनावस्थातः। तदेतत्स्फुटी करोति गुणाः कार्यकरणविषयाकारपरिणता अन्योन्यस्मिन्वर्तन्त इति योऽवतिष्ठति । छन्दोभंगभयात्परस्मैपदप्रयोगः। योऽनुतिष्ठतीति वा पाठान्तरम्। नेङ्गते न चलति स्वरूपावस्थ एव भवतीत्यर्थः॥ २३॥

**भाष्यार्थ—अथ इदानीं ' गुणातीतः किमाचारः ' इति प्रश्नस्य प्रतिवचनं आह**—आतां यापुढें ' गुणातीताचा आचार कसा असतो ' या प्रश्नाचें प्रतिवचन भगवान् सांगतात—**उदासीनवत्-यथा उदासीनः न कस्यचित् पक्षं भजते**—उदासीनाप्रमाणे-जसा उदासीन-उपेक्षा करणारा कोणाचाच पक्ष घेत नाहीं, ( कारण त्यानें कोणाचाहि जरी पक्ष घेतला तरी त्याचे उदासीनत्व नष्ट होतें)—**तथा अयं गुणातीतत्वोपायमार्गे अवस्थितः**—त्याप्रमाणे हा गुणातीत होण्याचा जो उपाय म्ह० ज्ञान त्याच्या मार्गात असलेला-अवस्थित झालेला—**यः आत्मविद् आसीनः संन्यासी**—जो आत्मा कूटस्थ आहे अशा ज्ञानानें राहणारा म्ह० ज्याचा कर्तृत्वाभिमान निवृत्त झाला आहे, असा संन्यासी—**गुणैः विवेकदर्शनावस्थातः न विचाल्यते**—गुणांकडून-शब्दादि विषयांकडून विवेकदर्शनावस्थेपासून-निर्विकार आत्मज्ञानापासून ढळविला जात नाहीं,—**तत् एतत् स्फुटी करोति**—तेंच हें स्पष्ट करितात—**गुणाः-कार्यकरणविषयाकारपरिणताः अन्योन्यस्मिन् वर्तन्ते इति यः अवतिष्ठति**—गुण-शरीरें, इंद्रियें व विषय यांच्या आकाराने परिणाम पावलेले गुण परस्परांमध्यें प्रवृत्त होतात, असें समजून-अशा निश्चयाने जो राहतो ( त्याला गुणातीत म्हटलें जातें, असा पुढे संबंध. पण ' अवतिष्ठते ' असें आत्मनेपद न योजण्याचे कारण-)—**छन्दोभङ्गभयात् परस्मैपदप्रयोगः**—आत्मनेपद योजल्यास छंदाचा भंग होईल, या भीतीनें ' अवतिष्ठति ' असें परस्मैपद योजलें आहे.—**वा ' योऽनुतिष्ठति ' इति पाठान्तरं**—किंवा ' यः अनुतिष्ठति ' असें पाठान्तर घ्यावे. ( असा पाठ घेतल्यास जो केवल बाधितानुवृत्तीनें अनुष्ठान करितो, असा त्याचा अर्थ करावा. इन्द्रियांच्या आकारानें परिणत झालेल्या गुणांची विषयांच्या आकारानें परिणत झालेल्या गुणांमध्यें प्रवृत्ति होते, माझी-आत्म्याची नव्हे, असें पाहणारा तो अचल होऊन रहात असल्यामुळें आत्म्याची कूटस्थ दृष्टि सोडीत नाहीं,असें सांगतात-) —**न इङ्गते-न चलति-स्वरूपावस्थः एव भवति इत्यर्थः**—तो हालत नाहीं, चलन पावत नाहीं, स्वरूपामध्येंच अवस्थित होतो, असा याचा भावार्थ.

**समदुःखसुखः स्वस्थः समलोष्टाश्मकाञ्चनः ।**
**तुल्यप्रियाप्रियो धीरस्तुल्यनिंदात्मसंस्तुतिः ॥ २४ ॥**

**अन्वयार्थ—समदुःखसुखः**—ज्याला सुख व दुःख सम आहे,—**स्वस्थः**—जो स्वात्म्यामध्यें स्थित-प्रसन्न आहे—**समलोष्टाश्मकाञ्चनः**—मातीचें ढेकूळ, दगड व सोनें ज्याला सम आहे,—**तुल्यप्रियाप्रियः**—ज्याला प्रिय व अप्रिय समान आहे, **धीरः**—धीमान्—**तुल्यनिंदात्मसंस्तुतिः**—ज्याला निंदा व आत्मस्तुति तुल्य आहे.

**किंच— समदुःखसुखः समे दुःखसुखे यस्य स समदुःखसुखः । स्वस्थः स्वे आत्मनि स्थितः प्रसन्नः । समलोष्टाश्मकाञ्चनो लोष्टं चाश्मा च काञ्चनं च समानि यस्य स समलोष्टाश्मकाञ्चनः । तुल्यप्रियाप्रियः प्रियं चाप्रियं च प्रियाप्रिये तुल्ये समे यस्य सोऽयं तुल्यप्रियाप्रियः । धीरो धीमान् । तुल्यनिन्दात्मसंस्तुतिर्निन्दा च आत्मसंस्तुतिः च निन्दात्मसंस्तुतौ तुल्ये निन्दात्मसंस्तुती यस्य यतेः स तुल्यनिन्दात्मसंस्तुतिः॥२४॥**

**भाष्यार्थ—किंच**—गुणातीताचें आणखी एक लिंग-‘ समदुःखसुखः० ’ या श्लोकानें सांगतात—**समदुःखसुखः-समे दुःखसुखे यस्य सः समदुःखसुखः**—समदुःखसुख-ज्याला दुःख व सुख सम-तुल्य आहेत, तो समदुःखसुख होय.—**स्वस्थः-स्वे आत्मनि स्थितः प्रसन्नः**—स्वस्थ म्हणजे स्वतःमध्ये म्ह० आत्म्यामध्ये स्थित म्ह० प्रसन्न—**समलोष्टाश्मकाञ्चनः-लोष्टं च अश्मा च काञ्चनं च समानि यस्य सः समलोष्टाश्मकाञ्चनः**—समलोष्टाश्मकांचन-लोष्ट-मातीचें ढेकूळ, अश्मा-दगड व कांचन-सोनें हीं तिन्ही ज्याला समान-तुल्य आहेत तो समलोष्टाश्मकांचन—**तुल्यप्रियाप्रियः-प्रियं च अप्रियं च प्रियाप्रिये तुल्ये-समे यस्य सः अयं तुल्यप्रियाप्रियः**—तुल्यप्रियाप्रिय-प्रिय व अप्रिय, ते प्रियाप्रिय, ज्याला प्रिय व अप्रिय हीं दोन्ही सम-तुल्य आहेत तो हा तुल्यप्रियाप्रिय होय.—**धीरः-धीमान्**—धीर म्ह० धीमान्—**तुल्यनिन्दात्मसंस्तुतिः -निन्दा च आत्मसंस्तुतिः च निन्दात्मसंस्तुती तुल्ये निन्दात्मसंस्तुती यस्य यतेः सः तुल्यनिन्दात्मसंस्तुतिः**—तुल्यनिन्दात्मसंस्तुति-निंदा म्हणजे दोषकथन, आत्मसंस्तुति-आपल्या गुणांचें वर्णन, ती निंदात्मसंस्तुति, ज्या यतीला आपली निंदा व स्तुति हीं दोन्ही तुल्य आहेत तो तुल्यनिन्दात्मसंस्तुति होय. [ सुख व दुःख ज्याच्या मनांत रागद्वेष उत्पन्न करूं शकत नाहीत व तीं ‘माझीं आहेत’ अशा अभिमानाचा विषय होत नाहींत, हेंच त्यांचे समत्व होय. प्रसन्नत्व म्ह० स्वास्थ्यापासून च्युत न होणें, अविक्रियत्व. विद्वानाच्या दृष्टीनें प्रिय व अप्रिय यांचा जरी अभाव असला तरी लोकदृष्टीचा आश्रय करून तुल्य-प्रियाप्रिय असें म्हटलें आहे. ] २४.

**मानापमानयोस्तुल्यस्तुल्यो मित्रारिपक्षयोः ।**
**सर्वारंभपरित्यागी गुणातीतः स उच्यते ॥२५॥**

**अन्वयार्थ—मानापमानयोः तुल्यः**—मान व अपमान यांविषयीं तुल्य, त्यांना सम मानणारा,—**मित्रारिपक्षयोः तुल्यः**—मित्रपक्ष व शत्रुपक्ष या दोन्ही पक्षीं समान—

**सर्वारंभपरित्यागी**—सर्व कर्मांचा सर्व प्रकारें त्याग करणारा असा जो पुरुष असतो, —**सः**—तो—**गुणातीतः**—गुणातीत—**उच्यते**—म्हटला जातो. २५

**किंच–मानापमानयोस्तुल्यः समो निर्विकारः। तुल्यो मित्रारिपक्षयोः, यद्यप्युदासीना भवन्ति केचित्स्वाभिप्रायेण तथाऽपि पराभिप्रायेण मित्रारिपक्षयोरिव भवन्तीति तुल्यो मित्रारिपक्षयोरित्याह। सर्वारम्भपरित्यागी दृष्टादृष्टार्थानि कर्माण्यारभ्यन्त इत्यारम्भाः सर्वानारम्भान्परित्यक्तुं शीलमस्येति सर्वारम्भपरित्यागी देहधारणमात्रनिमित्तव्यतिरेकेण सर्वकर्मपरित्यागीत्यर्थः। गुणातीतः स उच्यते। उदासीनवदित्यादि गुणातीतः स उच्यत इत्येतदन्तमुक्तं यावद्यत्नसाध्यं तावत्संन्यासिनाऽनुष्ठेयं गुणातीतत्वसाधनं मुमुक्षोः स्थिरीभूतं तु स्वसंवेद्यं सद्गुणातीतस्य यतेर्लक्षणं भवतीति ॥ २५ ॥**

**भाष्यार्थ—किंच**—याहि चिह्नांवरून गुणातीत ओळखतां येतो असें सांगतात — **मानापमानयोः तुल्यः-समः निर्विकारः**—मान व अपमान यांमध्यें तुल्य-सम -निर्विकार [ मान म्ह० सत्कार व अपमान-तिरस्कार, त्यांतील कशानेंहि ज्याच्या चित्तांत काहीच विकार होत नाहीं, तो मानापमानांमध्यें तुल्य होय. ]—**मित्रारिपक्षयोः तुल्यः**—दुसऱ्यांच्या दृष्टीनें जे मित्र व शत्रु त्यांच्या पक्षामध्यें सम त्यांतील कोणाचाच पक्ष तो घेत नाहीं; कोणत्याच पक्षांत रहात नाहीं, ( अहोपण, विद्वानाचा कोणी मित्र नाहीं व शत्रुहि नाहीं. यास्तव गुणातीताला 'मित्र व शत्रु यांच्या पक्षांमध्यें तुल्य असतो,' असें म्हणणें अयोग्य आहे, अशी आशंका घेऊन आचार्य म्हणतात-)—**यद्यपि केचित् स्वाभिप्रायेण उदासीनाः भवन्ति**—जरी कित्येक आपल्या अभिप्रायानें-आपल्या दृष्टीनें उदासीन असतात—**तथापि पराभिप्रायेण 'मित्रारिपक्षयोः' इव भवन्ति**—तथापि दुसऱ्यांच्या अभिप्रायानें-त्यांच्या दृष्टीनें-त्यांच्या समजुतीनें मित्र व शत्रु यांच्या पक्षांमध्येंच जणुंकाय असतात—**इति 'तुल्यो मित्रारिपक्षयोः' इति आह**—म्हणून भगवान् येथें 'तुल्यो मित्रारिपक्षयोः' असें सांगत आहेत.—**सर्वारंभपरित्यागी-दृष्टादृष्टार्थानि कर्माणि आरभ्यन्ते इति आरम्भाः**—सर्वारंभपरित्यागी-दृष्टार्थ-दृष्ट फल देणारीं व अदृष्टार्थ-अदृष्ट फल देणारीं कर्में आरंभिलीं जातात म्हणून आरंभ—**सर्वान् आरंभान् परित्यक्तुं शीलं अस्य इति सर्वारंभपरित्यागी**—सर्व आरंभांचा परित्याग-संन्यास करण्याचें याचें शील आहे म्हणून सर्वारंभपरित्यागी—**देहधारणमात्रनिमित्तव्यतिरेकेण सर्वकर्मपरित्यागी इत्यर्थः**—केवल देहधारणेला कारण होणाऱ्या-शरीर जिवंत राहण्यास अत्यंत अवश्य अशा कर्मांना सोडून-अशा शरीरधारणमात्रनिमित्त कर्मावांचून बाकीचीं सर्व कर्में सोडण्याचें ज्याचें शील आहे, बाकीच्या सर्व कर्मांचा परित्याग करणारा, असा याचा भावार्थ.—**सः गुणातीतः उच्यते**—तो यां सर्व विशेषणांनीं युक्त असलेला विद्वान् गुणातीत म्हटला जातो.—**'उदासीनवत्' इत्यादि 'गुणातीतः सः उच्यते' इति एतत् अन्तं यावत् यत्नसाध्यं उक्तं**—'उदासीनवत्०' येथून 'गुणातीतः सः उच्यते' येथवर जेवढें यत्नसाध्य साधनजात सांगितलें आहे—**तावत्**

**गुणातीतत्वसाधनं संन्यासिना अनुष्ठेयं**—तेवढें ते सर्व गुणातीतत्वाचें साधन संन्यासी पुरुषानें अनुष्ठावें.—**तु स्थिरीभूतं स्वसंवेद्यं सत् गुणातीतस्य यतेः लक्षणं भवति इति**—पण स्थिर झालेलें ते धर्मजात स्वसंवेद्य होत्साते गुणातीत यतीचें लक्षण होतें. [ वर उपेक्षकत्वादि जे धर्मजात सांगितलें ते ज्ञानाचा उदय होई-पर्यंत यत्नसाध्य असतें. यास्तव विद्याधिकाऱ्यानें ज्ञानाचें साधन या रूपानें त्याचें अनुष्ठान करावें.पण पुढें ज्ञानाचा उदय झाला असतां जीवन्मुक्ताचें स्थिर झालेलें-स्वभावतःच सिद्ध झालेलें तें धर्मजात स्वानुभवसिद्ध लक्षण होऊन राहते. असा मुमुक्षु व मुक्त यांच्या धर्मांत फरक आहे. ] २५.

---

१ रहस्यकार २१–२५. श्लोकावरील टीपेंत म्हणतात—"यावरून मागील अध्यायांत सांगितलेल्या ( १३. २४–२५. ) चार मार्गांपैकीं कोणताहि मार्ग स्वीकारला, तरी सिद्धि पावलेल्या पुरुषाचा आचार व लक्षणें सर्व मार्गांत एकच असतात हे उघड होतें." (ही समजूत भ्रामक आहे. अगोदर तेथें सांगितलेलीं ध्यानादिक चारी साधनें तुल्यबल नाहींत. त्यांतील ध्यान अगदीं अन्तरंग व सांख्ययोग, कर्मयोग व गुरूपासून उपायाचें श्रवण करून त्याप्रमाणें वागणें हीं क्रमानें बहिरंग, हे आम्हीं तेथेंच सांगितलें आहे. [ गी. भा. पृ. ९६७ पहा ] तथापि तीं चारी तुल्यबल आहेत, असें जरी क्षणभर मानलें तरी 'सिद्धि पावलेल्या पुरुषाचा आचार व लक्षणें सर्व मार्गांत सारखींच' हें यावरून उघड कसें होतें ? सिद्धि पावल्यावर मार्ग कशाला ? रहस्यकाराच्याच म्हणण्याप्रमाणें ज्ञानासाठीं जर ध्यानादि उपाय तर ज्ञान झाल्यावर त्यांचा काय उपयोग ? कीं ज्ञानी सिद्ध झाल्यावरहि ते उपायच करीत राहतात ? कर्मयोगी सिद्ध, सांख्ययोगी सिद्ध, ध्यानयोगी सिद्ध, वगैरे सिद्धांचीं लक्षणें जरी कदाचित् एक सारखींच असलीं तरी त्यांचा आचार एकच कसा असणार ? सांख्ययोगी सिद्ध व योगी सिद्ध हे दोन्ही संन्यासीच असल्यामुळें त्यांचा आचार एकच जरी असला तरी कर्मयोगी सिद्धाचा व त्या दोघांचा आचार एकच कसा ? )

पुढें रहस्यकार म्हणतात—" तथापि मागें तिसऱ्या, चवथ्या, पांचव्या वगैरे अध्यायांतून निष्काम कर्में कोणालाच चुकलीं नाहींत, असा जो एक ठाम सिद्धान्त केला तो अबाधित असल्यामुळें हे स्थितप्रज्ञ, भगवद्भक्त किंवा त्रिगुणातीत सर्व कर्मयोगमार्गांतील आहेत, हें लक्षांत ठेवलें पाहिजे" ( आग्रह म्हणून जो म्हणतात तो हाच होय. ३–५, अध्यायांत 'निष्काम कर्में कोणालाच चुकलीं नाहींत' असा ठाम सिद्धान्तच जर केलेला नाहीं तर तो अबाधित आहे, या म्हणण्यांत काय अर्थ आहे?वांझेचा पुत्र मेला नाहीं, जिवंत आहे, असें म्हणण्यापैकींच ते आहे. पण यासंबंधानें आम्ही पूर्वी बरेंच लिहिलेलें असल्यामुळें येथें पुनरुक्ति नको. )" सिद्धावस्थेस पोंचलेल्या पुरुषांचीं हीं वर्णनें स्वतंत्र आहेत असें कल्पून संन्यासमार्गांतील टीकाकार आपलाच संप्रदाय गीतेंत प्रतिपाद्य आहे, असें वर्णन करीत असतात. पण तो अर्थ पूर्वापर संदर्भाच्या विरुद्ध आहे,खरा नव्हे." वगैरे,रहस्यकार संन्यासमार्गी टीकाकारांवर हा निराधार आरोप करीत आहेत. सिद्धांचीं हीं स्वतंत्र वर्णनें आहेत, असें कोणीच म्हणत नाहींत. उलट ज्ञानी जीवन्मुक्तालाच स्थितप्रज्ञ, भगवद्भक्त व गुणातीत म्हटलें आहे, किंबहुना तेराव्या अध्यायांत ( श्लो. ७–११, ) जीं ज्ञानसाधनें

मां च योऽव्यभिचारेण भक्तियोगेन सेवते ।
स गुणान्समतीत्यैतान्ब्रह्मभूयाय कल्पते ॥२६॥

**अन्वयार्थ—च**—आणि—**यः**—जो—**मां**—मला—**अव्यभिचारेण भक्तियोगेन**—अव्यभिचारी भक्तियोगानें—**सेवते**—सेवितो-माझी सेवा करतो—**सः**—तो—**एतान् गुणान्**—या गुणांचें—**समतीत्य**—उल्लंघन करून—**ब्रह्मभूयाय**—ब्रह्मभावास—**कल्पते**—समर्थ होतो. २६.

**अधुना कथं च त्रीन्गुणानतिवर्तत इति प्रश्नस्य प्रतिवचनमाह·— मां चेश्वरं नारायणं सर्वभूतहृदयाश्रितं यो यतिः कर्मी वाऽव्यभिचारेण न कदाचिद्यो व्यभिचरति भक्तियोगेन भजनं भक्तिः सैव योगस्तेन भक्तियोगेन सेवते स गुणान्समतीत्यैतान्यथोक्तान्ब्रह्मभूयाय भवनं भूयो ब्रह्मभूयाय ब्रह्मभवनाय मोक्षाय कल्पते समर्थो भवतीत्यर्थः ॥ २६ ॥**

**भाष्यार्थ—अधुना च त्रीन् गुणान् कथं अतिवर्तते इति प्रश्नस्य प्रतिवचनं आह**—आतां तीन गुणांचे उल्लंघन कसे करितो, या प्रश्नाचे प्रतिवचन भगवान् सांगतात—**च यः यतिः कर्मी वा**—आणि जो यति किंवा कर्मी [ अर्थात् मुख्य किंवा अमुख्य अधिकारी ]—**मां ईश्वरं-नारायणं सर्वभूतहृदयाश्रितं**—मज ईश्वराला-नारायणाला सर्व भूतांच्या हृदयाचा आश्रय करून राहिलेल्या मला—**अव्यभिचारेण-यः कदाचित् न व्यभिचरति**—अव्यभिचार म्ह० जो केव्हांहि व्यभिचार पावत नाही अशा—**भक्तियोगेन-भजनं भक्तिः सा एव योगः तेन भक्तियोगेन**—भक्तियोगाने-भजन-परम प्रेम हीच भक्ति, ती भक्ति हाच योग, त्या भक्तियोगानें—**सेवते**—सेवितो, माझे अव्यभिचारी भक्तियोगानें सदा चिंतन करतो—**सः**

---

सांगितली आहेत, तीहि ज्ञानी जीवन्मुक्ताची लक्षणें आहेत, असेच सर्व अद्वैती भाष्य-टीकाकारांचें म्हणणे आहे. बरें, संन्यासमार्गी टीकाकार त्या वर्णनाना स्वतंत्र कल्पितात, असें जरी क्षणभर कल्पिलें, तरी तेवढ्यावरून आपलाच संप्रदाय गीतेत प्रतिपाद्य आहे असे वर्णन त्यांना कसे करिता येईल ? कारण ती वर्णनें स्वतंत्र मानणे, व संन्याससंप्रदायच गीतेंत प्रतिपाद्य आहे, असें म्हणणे, यांत कार्यकारणसंबंध काहीच नाही. कारण गीता निवृत्तिपर आहे, हें ती सर्व वर्णनें जीवन्मुक्ताची आहेत, असे मानूनहि सिद्ध करिता येण्यासारखे आहे. कारण ती वर्णनेंच स्वतः तितकीं खंबीर आहेत. अर्थात् रहस्यकारांचा निष्काम कर्मयोगच पूर्वापार संदर्भाच्या विरुद्ध अत एव त्याज्य आहे.

१ 'यः अव्यभिचारेण भक्तियोगेन' याचा अर्थ रहस्यकार—"जो सर्व कर्मे मलाच अर्पण करण्याच्या अव्यभिचार म्ह० एकनिष्ठ भक्तियोगाने " असा करितात. त्यांतील 'सर्व कर्मे मलाच अर्पण करण्याच्या' हे त्यांच्या पदरचे व अप्रासंगिक आहे. याला 'ओढाताण' म्हणावयाचे नसेल तर आमचा आग्रह नाही. पण येथें 'कर्मे मलाच अर्पण करण्याचा' प्रसंग मात्र नाही, एवढें आम्ही म्हणतों.

**एतान् यथोक्तान् गुणान् समतीत्य**—तो या वर वर्णन केलेल्या तीन गुणांस उल्लंघून–त्यांचें अतिक्रमण करून—**ब्रह्मभूयाय-भवनं भूयः ब्रह्मभूयाय-ब्रह्मभवनाय-मोक्षाय कल्पते-समर्थः भवति इत्यर्थः**—ब्रह्मभूयास, होणें हेच भूय होय. ब्रह्मभूयास म्ह० ब्रह्म होण्यास–मोक्षास समर्थ–योग्य होतो, असा याचा भावार्थ. [सर्वान्तर्यामी अशा माझें नित्य भक्तियोगाने जो चिंतन करितो तो मोक्षाला पात्र होतो. भगवानांच्या अनुग्रहाने ज्ञानी होऊन तो जीवंतपणीच मोक्षाचा अनुभव घेतो.] २६.

**ब्रह्मणो हि प्रतिष्ठाऽहममृतस्याव्ययस्य च ।**
**शाश्वतस्य च धर्मस्य सुखस्यैकान्तिकस्य च ॥२७॥**

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे गुणत्रयविभागयोगो नाम चतुर्दशोऽध्यायः ॥ १४ ॥**

**अन्वयार्थ—हि**—कारण—**अहं**—मी–प्रत्यगात्मा—**अमृतस्य च अव्ययस्य**—अविनाशी व विकार न पावणाऱ्या—**च**—व—**शाश्वतस्य धर्मस्य**—नित्य धर्मरूप—**च**—आणि—**ऐकान्तिकस्य सुखस्य**—अव्यभिचारी–नित्य सुख अशा—**ब्रह्मणः**—ब्रह्माची–परमात्म्याची—**प्रतिष्ठा**—प्रतिष्ठा आहे. २७.

**कुत एतदित्युच्यते— ब्रह्मणः परमात्मनो हि यस्मात्प्रतिष्ठाऽहं प्रतितिष्ठत्यस्मिन्निति प्रतिष्ठाऽहं प्रत्यगात्मा । कीदृशस्य ब्रह्मणोऽमृतस्याविनाशिनोऽव्ययस्याविकारिणः शाश्वतस्य च नित्यस्य धर्मस्य ज्ञानयोगधर्मप्राप्यस्य सुखस्याऽऽनन्दरूपस्यैकान्तिकस्याव्यभिचारिणः । अमृतादिस्वभावस्य परमात्मनः प्रत्यगात्मा प्रतिष्ठा सम्यग्ज्ञानेन परमात्मतया निश्चीयते । तदेतद्ब्रह्मभूयाय कल्पत इत्युक्तम् । यया चेश्वरशक्त्या भक्तानुग्रहादिप्रयोजनाय ब्रह्म प्रतिष्ठते प्रवर्तते सा शक्तिर्ब्रह्मैवाहं शक्तिशक्तिमतोरनन्यत्वादित्यभिप्रायः । अथवा ब्रह्मशब्दवाच्यत्वात्सविकल्पकं ब्रह्म तस्य ब्रह्मणो निर्विकल्पकोऽहमेव नान्यः प्रतिष्ठाऽऽश्रयः । किंविशिष्टस्यामृतस्यामरणधर्मकस्याव्ययस्य व्ययरहितस्य । किंच शाश्वतस्य च नित्यस्य धर्मस्य ज्ञाननिष्ठालक्षणस्य सुखस्य तज्जनितस्यैकान्तिकस्यैकान्तनियतस्य च प्रतिष्ठाऽहमिति वर्तते ॥ २७ ॥**

इति श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यगोविंदभगवत्पूज्यपादशिष्यश्रीमच्छंकरभगवतः कृतौ श्रीभगवद्गीताभाष्ये गुणत्रयविभागयोगो नाम चतुर्दशोऽध्यायः ॥ १४ ॥

**भाष्यार्थ—कुतः एतत् इति उच्यते**—पण विद्वान् ब्रह्मच आहे, याचें कारण काय, तें सांगितलें जातें.—**हि-यस्मात् ब्रह्मणः-परमात्मनः अहं प्रतिष्ठा**

---

१ रहस्यकार या श्लोकाला असें अवतरण देतात—"त्रिगुणातीतावस्था सांख्यमार्गातली असताना तीच कर्मपर भक्तियोगाने कशी प्राप्त होत्ये ? अशी शंका या श्लोकावर येण्याचा संभव आहे."...(पण येथें कर्मपर भक्तियोगाचा संबंध काय आहे ? नंतर टीपेत ते म्हणतात—)

—ज्याअर्थीं ब्रह्माची-परमात्म्याची मी प्रतिष्ठा आहें—**प्रतितिष्ठति अस्मिन् इति प्रतिष्ठा अहं-प्रत्यगात्मा**—ज्यांत प्रतिष्ठित होतो ती प्रतिष्ठा मी-प्रत्यगात्मा परमात्म्याची प्रतिष्ठा आहें, माझ्यामध्यें ब्रह्म प्रतिष्ठित होतें. ( जें ब्रह्म प्रत्यगात्म्यामध्यें प्रतिष्ठित होतें त्याचें विशेषण प्रश्नपूर्वक सांगतात-)—**कीदृशस्य ब्रह्मणः अमृतस्य-अविनाशिनः**—कशा प्रकारच्या ब्रह्माची प्रत्यगात्मा प्रतिष्ठा आहे ? अमृत-अविनाशी ब्रह्माची तो प्रतिष्ठा आहे.—**अव्ययस्य-अविकारिणः**—आणि अव्यय म्ह० अविकारी ब्रह्माची प्रतिष्ठा—**च शाश्वतस्य-नित्यस्य धर्मस्य**—आणि शाश्वत म्ह० नित्य धर्माचा ( पण तो हा प्रसिद्ध धर्म नव्हे तर )—**ज्ञानयोगधर्मप्राप्यस्य**—ज्ञान व योग या धर्मांनीं प्राप्त होणाऱ्या—**ऐकान्तिकस्य सुखस्य-अव्यभिचारिणः-आनन्दरूपस्य**—व ऐकान्तिक सुखाची-अव्यभिचारी-नित्य आनन्दरूप ब्रह्माची मी-प्रत्यगात्मा प्रतिष्ठा आहें. ( याप्रमाणें अक्षरार्थ सांगून वाक्यार्थ सांगतात-)—**(यस्मात्) अमृतादिस्वभावस्य परमात्मनः प्रत्यगात्मा प्रतिष्ठा**—ज्या अर्थी अमृत, अव्यय, शाश्वत धर्म व ऐकान्तिक सुख या स्वभावाच्या-

---

—"सांख्यांचें द्वैत सोडून दिल्यावर सर्वत्र एकच परमेश्वर असल्यामुळें भक्तीनें त्रिगुणातीतावस्थाहि प्राप्त होत्ये असा या श्लोकाचा भावार्थ आहे." ( 'ब्रह्मणो हि प्रतिष्ठाऽहं' या श्लोकाचा असा भावार्थ निघू शकत नाहीं. मूळ श्लोकार्थ पहा. ) "परमेश्वर एक आहे एवढें कबूल केल्यावर साधनासवधानें गीतेचा कोणताहि आग्रह नाही." ( हें म्हणणे खरें नाहीं. वैदिक साम्प्रदायानुसार गीतेचा यथाधिकार साधनानुष्ठान केलें पाहिजे, असा आग्रह जर नसता तर 'कर्मण्येवाधिकारः०' २.४७. 'लोके द्विविधा निष्ठा०' ३. ३. 'कुरु कर्मैव' ४. १५. 'योगं आरुरुक्षोः कर्म कारणं आरूढस्य तस्य एव शमः कारण' ६, ३.'चित्त समाधातु न शक्नोषि' इत्यादि १२. ९-११. 'ध्यानेन, साख्ययोगेन, कर्मयोगेन' १३. २४. असे गीतेंत सागितलें नसतें. रहस्यकार सर्व साधनाना तुल्यबल समजतात हीच मोठी चूक आहे. ) "भक्तिमार्ग हा सुलभ अत एव सर्वांस ग्राह्य, असे गीतेत म्हटले आहे खरे. तथापि इतर मार्ग त्याज्य होत, असें गीतेत कोठेंहि म्हटलें नाहीं." ( अगदी कबूल. ) "गीतेत भक्ति किंवा ज्ञान अगर योगच प्रतिपाद्य आहे, हीं मते त्या त्या सप्रदायाच्या अभिमान्यानीं मागाहून गीतेवर लादलेली आहेत,"(आणि रहस्यकारानीं आता तिच्यावर कर्मयोग लादला आहे, पण शंकराचार्य वैदिकसंप्रदायानुसार गीतेत प्रवृत्ति व निवृत्ति हे दोन्ही धर्म सागितले आहेत, असें स्पष्ट म्हणतात.प्रवृत्ति अंग व निवृत्ति अगी,कर्मयोग,भक्तियोग,ध्यानयोग हे सर्व ज्ञानाचे यथाधिकार उपाय, व ज्ञानानेंच मोक्ष, हाच गीतेचा वैदिक संप्रदायशुद्ध अतएव निर्दोष सिद्धान्त आहे, व आचार्यांनीं त्याचेंच समर्थन केले आहे. अर्थात् ) " मार्ग कोणताहि असो, परमेश्वराचें ज्ञान झाल्यावर संसारातील कर्में लोकसंग्रहार्थ करावी किंवा नाहीं, हा गीतेंतील मुख्य प्रश्न आहे व त्याचे उत्तर कर्मयोग श्रेष्ठ असें पूर्वींच साफ दिलें आहे. " ( पण असा गीतेंतील मुख्य प्रश्न नाही व 'कर्मयोग श्रेष्ठ' हें त्या प्रश्नानें उत्तरहि नव्हे, असें आम्हीं पूर्वीं सविस्तर व सोपपत्तिक सागितलें आहे. [ गी. भा. पृ. ४८५-४९७ ] अर्थात रहस्यकारांचें हें म्हणणें अगदीं अनुचित व त्यामुळेंच अग्राह्य आहे. )

या स्वरूपाच्या परमात्म्याची प्रत्यगात्मा प्रतिष्ठा आहे—( **तस्मात्** ) **प्रत्यगात्मा सम्यग्ज्ञानेन परमात्मतया निर्धार्यते**—त्या अर्थी प्रत्यगात्मा सम्यग्ज्ञानानें–यथार्थ आत्मज्ञानानें–साक्षात्कारानें परमात्मत्वाने–परमात्मरूपानें निश्चित केला जातो.(या श्लोकाची पूर्वश्लोकाशीं एकवाक्यता करून दाखवितात– )—**तत् एतत् ब्रह्मभूयाय कल्पते इति उक्तं**—तेच हें ' ब्रह्मभवनास–मोक्षास समर्थ होतो ' असें वरच्या श्लोकांत सांगितले आहे. ( हाच वाक्यार्थ अधिक विशद करितात– )—**यया च ईश्वर-शक्त्या भक्तानुग्रहादिप्रयोजनाय ब्रह्म प्रतिष्ठते–प्रवर्तते सा शक्तिः ब्रह्म एव अहं**—ज्या ईश्वरशक्तीने भक्तावर अनुग्रह करणें इत्यादि कार्यासाठीं ब्रह्म प्रतिष्ठित होतें म्ह० प्रवृत्त होतें ती शक्ति ब्रह्मच मी आहें. ( पण शक्तिच ब्रह्म कशी ? उत्तर– )—**शक्तिशक्तिमतोः अनन्यत्वात् इति अभिप्रायः**—शक्ति व शक्तिमान् यांना अनन्यत्व असते. ते दोन पृथक पदार्थ नसतात, असा याचा अभिप्राय–असा आशय. ( याचेच आणखी दुसरे व्याख्यान– )—**अथवा ब्रह्मशब्दवाच्यत्वात् सविकल्पकं ब्रह्म**—किंवा ब्रह्मशब्दवाच्य असल्यामुळे म्ह० ब्रह्म या शब्दाने उल्लेख–निर्देश केल्यामुळे येथील ब्रह्म सविकल्पक आहे,—**तस्य ब्रह्मण· निर्विकल्पकः अहं एव प्रतिष्ठा–आश्रयः न अन्यः**—त्या सविकल्प ब्रह्माची निर्विकल्प असा मीच प्रतिष्ठा म्ह० आश्रय आहे, दुसरा कोणी नाहीं.—**किंविशिष्टस्य–अमृतस्य–अमरणधर्मकस्य–अव्ययस्य–व्ययरहितस्य**—कोणत्या विशेषणांनीं विशिष्ट अशा ब्रह्माची ? अमृत–अमरण धर्मवान् अशा ब्रह्माची–अव्यय–व्ययरहित अशा ब्रह्माची—**किंच शाश्वतस्य च नित्यस्य ज्ञाननिष्ठालक्षणस्य धर्मस्य**—तसेंच, शाश्वत म्ह० नित्य अशा ज्ञाननिष्ठालक्षण धर्माची—**च तज्जनितस्य ऐकान्तिकस्य–एकान्तनियतस्य सुखस्य**—आणि त्या शाश्वत धर्मापासून उत्पन्न झालेल्या ऐकान्तिक–एकान्तनियत–एकाच स्वरूपाच्या नित्य सुखाची—**प्रतिष्ठा अहं इति वर्तते**—प्रतिष्ठा मी आहे, अशी प्रतिष्ठाशब्दाची अनुवृत्ति होते. [ या श्लोकाचा ब्रह्माची म्ह० परमात्म्याची मी प्रत्यगात्मा प्रतिष्ठा आहे. म्ह० मी प्रत्यगात्मा अपरोक्ष अनुभवाने परमात्मत्वानें निश्चित केला जातो, असा एक अर्थ व ब्रह्माची म्ह० सविकल्पक ब्रह्माची मी निर्विकल्प ब्रह्म प्रतिष्ठा म्ह० आधार आहे, असा दुसरा अर्थ केला जातो. अमृतादि चारहि विशेषणे दोन्ही पक्षी ब्रह्माचीच आहेत. असो; या अध्यायांत क्षेत्र–क्षेत्रज्ञांचा संयोग हे संसाराचें कारण सांगितलें, पांच प्रश्नांच्या निरूपणानें सम्यग्ज्ञानच सर्व संसाराचें निवर्तक आहे, असें उपपादन केले, आणि गुणांकडून चंचल केलें न जाणे, हें मुमुक्षूचें यत्नसाध्य साधन व मुक्ताचें तेच अयत्नसिद्ध लक्षण निश्चित केलें. ] २७.

इति भगवान् श्रीकृष्णांनीं गायलेल्या उपनिषदांतील–रहस्यविद्येतील ब्रह्मविद्येपैकी योग–उपाय–शास्त्रांतील गुणत्रयविभागयोगनांवाचा चवदावा अध्याय विष्णुशर्मकृत सान्वयार्थ–सटीप–भाष्य–भाष्यार्थासह समाप्त झाला.

# अध्याय पंधरावा.

## पुरुषोत्तमयोग.

**यस्मान्मदधीनं कर्मिणां कर्मफलं ज्ञानिनां च ज्ञानफलमतो भक्तियोगेन मां ये सेवन्ते ते मत्प्रसादाज्ज्ञानप्राप्तिक्रमेण गुणातीता मोक्षं गच्छन्ति किमु वक्तव्यमात्मनस्तत्त्वमेव सम्यग्विजानन्त इत्यतो भगवानर्जुनेनापृष्टमप्यात्मनस्तत्त्वं विवक्षुरुवाच— ऊर्ध्वमूलमित्यादि । तत्र तावद्वृक्षरूपककल्पनया वैराग्यहेतोः संसारस्वरूपं वर्णयति विरक्तस्य हि संसाराद्भगवत्तत्त्वज्ञानेऽधिकारो नान्यस्येति—**

**भाष्यार्थ**—( ज्ञानाने गुणाचे उल्लंघन करितां येतें, असे चवदाव्या अध्यायांत सांगितलें, पण ते गुण जर नाशवंत असतील तर त्यांचें ज्ञानावाचूनहि उल्लंघन होईल व गुण अविनाशी असतील तर ज्ञानानेंहि त्यांचे उल्लंघन होणार नाहीं, यास्तव ज्ञान हें गुणातीत होण्याचे साधन नव्हे, या आक्षेपाचे निरसन करून श्रवणादिकांचें साक्षात् कारण असा जो संन्यास त्याचे विधान करण्याची इच्छा करणारे व ब्रह्मरूप होणे हाच परम पुरुषार्थ आहे, असें सांगण्याची इच्छा करणारे भगवान् पुढील अध्यायाचा आरंभ करीत आहेत. आचार्य त्याची संगति दाखवितात-)—**यस्मात् कर्मिणां कर्मफलं च ज्ञानिनां ज्ञानफलं मदधीनं**—ज्या अर्थी कर्म करणारांचे कर्मफल व ज्ञानी पुरुषाचे ज्ञानफल माझ्या अधीन आहे ( कारण ब्रह्मसूत्रांत ' फलमत उपपत्तेः ' अ. ३ पा. २ सू. ३८ व 'ततो ह्यस्य बन्धविपर्ययौ' अ.३ पा.२सू.५. या सूत्रांत तसे सांगितले आहे.) **—अतः ये मां भक्तियोगेन सेवन्ते ते मत्प्रसादात् ज्ञानप्राप्तिक्रमेण गुणातीताः मोक्षं गच्छन्ति**—त्याअर्थी जे माझी भक्तियोगाने सेवा-उपासना-चिंतन करितात ते माझ्या प्रसादानें ज्ञानप्राप्तीच्या द्वारा गुणातीत होऊन मोक्षास प्राप्त होतात. (मग असें जर आहे तर-)—**आत्मनः तत्त्वं एव सम्यक विजानन्तः ( मुक्ताः भवन्ति इति) किमु वक्तव्यं**—आत्म्याचें तत्त्वच जे निःसंदेहपणें जाणतात ते त्याच ज्ञानानें गुणातीत होत्साते मुक्त होतात, हें काय सांगावें?—**इति अतः अर्जुनेन अपृष्टः अपि आत्मनः तत्त्वं विवक्षुः भगवान् 'ऊर्ध्वमूलं' इत्यादि उवाच**— ज्याअर्थी आत्मतत्त्वाचें अज्ञान संसाराला कारण होतें व ज्ञान मोक्षानुकूल आहे त्याअर्थी अर्जुनानें तें ज्ञान कोणतें, असा प्रश्न जरी केला नव्हता तरी आत्म्याचें तत्त्व सांगण्याची इच्छा करीत होत्साते भगवान् 'ऊर्ध्वमूलं' इत्यादि म्हणाले; ( पण तत्त्व जर विवक्षित आहे तर संसाराचें वर्णन कां आरंभिलें आहे? उत्तर-)—**तत्र तावत्**—अध्यायाच्या आरंभीं अगोदर—**वैराग्यहेतोः वृक्षरूपककल्पनया संसारस्वरूपं वर्णयति**—वैराग्य उत्पन्न व्हावें म्हणून वृक्षाच्या रूपकाची कल्पना करून संसाराच्या स्वरूपाचें वर्णन करितात. ( पण वैराग्याची तरी इतकी काय आवश्यकता आहे?

उत्तर-)—**हि संसारात् विरक्तस्य भगवत्तत्त्वज्ञाने अधिकारः न अन्यस्य**—कारण संसाराविषयीं विरक्त झालेल्या पुरुषालाच भगवानांच्या तत्त्वज्ञानाचा अधिकार असतो, इतर-अविरक्ताला नाहीं.—**इति ( भगवान् उवाच )**—म्हणून श्रीभगवान् म्हणाले.—

**श्रीभगवान् उवाच**—श्रीकृष्ण म्हणाले—

**ऊर्ध्वमूलमधःशाखमश्वत्थं प्राहुरव्ययम् ।**
**छन्दांसि यस्य पर्णानि यस्तं वेद स वेदवित् ॥ १ ॥**

**अन्वयार्थ—ऊर्ध्वमूलं**—सर्वोत्तम ब्रह्म ज्याचें मूळ आहे,—**अधःशाखं**—ज्याच्या शाखा त्या मूळाच्या अपेक्षेनें खालीं आहेत म्ह० अगदीं निकृष्ट आहेत,—**अव्ययं**—जो कधींहि क्षय पावत नाहीं, असा—**अश्वत्थं**—वृक्ष-क्षणभंगुर-संसारवृक्ष—**प्राहुः**—सांगतात.—**यस्य**—ज्या संसारवृक्षाची—**पर्णानि**—पानें—**छन्दांसि**-

---

१ आचार्य असें म्हणतात. पण रहस्यकार या अध्यायाची संगति कशी लावितात ती पहा—"क्षेत्रक्षेत्रज्ञविचाराला जोडून तेराव्या अध्यायांत तत्सदृश सांख्यांचा प्रकृतिपुरुषविवेक सांगितला," (हें म्हणणें खोटें आहे. क्षेत्रच अपरा प्रकृति असून पुरुषच क्षेत्रज्ञ आहे. क्षेत्र म्ह० सातव्या अध्यायातील अपरा प्रकृतिच आहे, हें क्षेत्राचें विकारांसह जें वर्णन केलं आहे, त्यावरून स्पष्ट होते.पण रहस्यकाराना हा असा भ्रम का झाला ते आम्ही तेराव्या अध्यायांतील १८-१९ श्लोकावरील टीपेत व त्यापूर्वीहि सांगितलेले असल्यामुळे येथे अधिक विस्तार करीत नाहीं.) "चवदाव्या अध्यायातील सर्व निरूपण सांख्यांचे परिभाषेत आहे खरें; तथापि सांख्यांचें द्वैत न पतकरितां०" (इत्यादि जे म्हटलें आहे, तेंहि सर्व असबद्ध आहे,हें आम्ही चवदाव्या अध्यायात दाखविले आहे.)"परमेश्वरानेच निर्माण केलेल्या सृष्टीच्या पसाऱ्याचे किंवा परमेश्वराच्या नामरूपात्मक विस्ताराचेच कधीं कधीं वृक्षरूपानें किंवा वनरूपाने जे वर्णन येते, त्यातील बीज काय हे प्रथम सांगून नंतर परमेश्वराच्या सर्व स्वरूपात श्रेष्ठ असे जें पुरुषोत्तमस्वरूप त्याचे या अध्यायांत वर्णन केले आहे." ( यांतील 'परमेश्वराचा नामरूपात्मक विस्तार' हे म्हणणे शास्त्रविरुद्ध आहे. नामरूपात्मक विस्तार ईश्वराचा नव्हे, तो मायेचा-प्रकृतीचा आहे. ईश्वराचाच जर तो विस्तार असला तर ईश्वर निर्गुण व निर्विकार कसा ? 'वृक्षरूपाने किंवा वनरूपानें जें वर्णन येत त्यांतील बीज काय ?' हे येथे सांगितलेलं नाहीं, हें पुढील वर्णन लक्षपूर्वक वाचलें असतां कोणाच्याहि लक्षांत येईल. 'परमेश्वराच्या सर्व स्वरूपांत श्रेष्ठ असे जें पुरुषोत्तम स्वरूप' हें म्हणणें खरें नव्हे. कारण परमेश्वराचीं अनेक स्वरूपें नाहींत. नित्य सत्ता व आनंद यांशीं अभिन्न असे नित्य ज्ञान हेंच एक त्याचें स्वरूप आहे. बाकीचीं सर्व सगुण रूपें कल्पित आहेत, खरीं नव्हेत. बरें, त्यांतीलच हें पुरुषोत्तम स्वरूप श्रेष्ठ आहे, म्हणून म्हणावें तर 'पुरुषोत्तम' हे स्वरूप नसून ईश्वराचे कल्पित नाम आहे. त्यासाठींच पुढें भगवानांनीं 'अतोऽस्मि लोके वेदे च प्रथितः पुरुषोत्तमः' असें म्हटलें आहे.

वेद आहेत.—**यः**—जो—**तं**—त्या वृक्षाला—**वेद**—जाणतो—**सः**—तो—**वेद-वित्**—वेदवेत्ता-वेदाला जाणणारा आहे. १.

**ऊर्ध्वमूलं कालतः सूक्ष्मत्वात्कारणत्वान्नित्यत्वान्महत्त्वाच्चोर्ध्वमुच्यते ब्रह्माव्यक्तमायाशक्तिमत्तन्मूलमस्येति सोऽयं संसारवृक्ष ऊर्ध्वमूलः। श्रुतेश्च—'ऊर्ध्वमूलोऽर्वाक्शाखः' इति। पुराणे च—"अव्यक्तमूलप्रभवस्तस्यैवानुग्रहोत्थितः। बुद्धिस्कन्धमयश्चैव इन्द्रियान्तरकोटरः॥ महाभूतविशाखश्च विषयैः पत्रवांस्तथा। धर्माधर्मसुपुष्पश्च सुखदुःखफलोदयः॥ आजीव्यः सर्वभूतानां ब्रह्मवृक्षः सनातनः। एतद्ब्रह्मवनं चैव ब्रह्माऽऽचरति नित्यशः। एतच्छित्त्वा च भित्त्वा च ज्ञानेन परमासिना। ततश्चाऽऽत्मरतिं प्राप्य यस्मान्नाऽऽवर्तते पुनः" इत्यादि॥**

**भाष्यार्थ—ऊर्ध्वमूलं**—ऊर्ध्व-उत्तम हे ज्याचें मूल आहे.—**कालतः सूक्ष्मत्वात्**—कालतः सूक्ष्म असल्यामुळे ( कालतः सूक्ष्मत्व कसे ? उत्तर-)—**कारणत्वात्**—कारणत्वामुळे कालतः सूक्ष्मत्व ( पण त्याला कारणत्व कसे ? )—**नित्यत्वात्**—नित्यत्वामुळें म्ह० कार्याच्या अपेक्षेने नियमाने पूर्वी राहणारें असल्यामुळें कारणत्व, ( सर्व व्यापित्वामुळेहि त्याच्या उत्कर्षाची संभावना दाखवितात-)—**च महत्त्वात्**—आणि महत्त्वामुळें—**ब्रह्म ऊर्ध्वं उच्यते**—ब्रह्म ऊर्ध्व म्हटले जातें. ऊर्ध्व म्ह० उंच-उत्कृष्ट असा याचा भावार्थ ( पण कूटस्थ ब्रह्माला संसाराचे मूलत्व कसे ? उत्तर-)—**अव्यक्तमायाशक्तिमत् तत् मूलं अस्य**—अव्यक्त मायाशक्तीनें युक्त असलेलें ते ब्रह्म या संसाराचे मूळ आहे—**इति सः अयं संसारवृक्षः ऊर्ध्वमूलः**—म्हणून तो हा संसारवृक्ष ऊर्ध्वमूल आहे. ( या स्मृतीचें मूलभूत श्रुतिवचन दाखवितात-)—**'ऊर्ध्वमूलोऽर्वाक्शाखः' इति श्रुतेः च**—ज्याचे मूल ऊर्ध्व आहे व शाखा त्या मुळाच्या अपेक्षेने नीच-निकृष्ट आहेत, अशा अर्थाची याविषयीं मूलभूत श्रुति आहे. (काठ.भा.१३४)—**पुराणे च**—आणि पुराणांतहि त्याविषयीं आधार आहे. ( तो असा-)—**'अव्यक्तमूलप्रभवः'**— अव्यक्त म्ह० अव्याकृत तेच मूळ, त्यापासून ज्याची उत्पत्ति आहे तो हा संसारवृक्ष अव्यक्तमूलप्रभव होय.—**'तस्य एव अनुग्रहोत्थितः'**—त्या अव्यक्तमूळाच्याच अनुग्रहामुळे वृद्धि पावलेला (या संसारवृक्षाचें लौकिक वृक्षाशीं साम्य दाखवितात-)—**'बुद्धिस्कन्धमयः च एव'**— आणि बुद्धि याच स्कंधानें युक्त-बुद्धिस्कंधमय-असलेला [ लौकिक वृक्षाच्या स्कंधापासून शाखा फुटतात व येथे बुद्धीपासून संसाराचे अनेक परिणाम उद्भवतात. त्यामुळे बुद्धि हाच संसारवृक्षाचा स्कंध, तन्मय-तत्प्रचुर-त्याचे ज्यांत प्राचुर्य-आधिक्य आहे तो संसारवृक्ष बुद्धिस्कंधमय आहे. ]—**'इन्द्रियान्तरकोटरः'**—इंद्रियांचीं अन्तरें-छिद्रे हीच ज्या वृक्षाचीं कोटरें म्ह० ढोली आहेत तो इंद्रियान्तरकोटर' होय.—**'च महाभूतविशाखः'**— आणि पृथिवीपासून आकाशापर्यंत जीं महाभूतें त्याच ज्याच्या विशाखा म्ह० उपशाखा-स्तंभ आहेत,—**'तथा विषयैः पत्रवान्'**—त्याचप्रमाणें जो शब्दादि विषयांच्या योगानें पत्रवान्-पर्णयुक्त आहे,—**'च धर्माधर्मसुपुष्पः'**—आणि जो धर्म

व अधर्म या सुपुष्पांनीं युक्त आहे,—'**सुखदुःखफलोदयः**'—त्या धर्माधर्म पुष्पांपासून ज्याच्या सुखदुःखफलांचा उदय झाला आहे—'**सर्वभूतानां आजीव्यः**'—सर्व भूतांचा उपजीव्य, सर्व भूतांना उपजीविका करण्यास योग्य,असा हा—'**ब्रह्मवृक्षः**'—ब्रह्माकडून अधिष्ठित असा वृक्ष, ज्ञानावांचून त्याचा छेद होणे अशक्य असल्यामुळें—'**सनातनः**'—चिरंतन आहे.—'**एतत् ब्रह्मवनं चैव नित्यशः ब्रह्म आचरति**'—हें ब्रह्माचे वन म्ह० वननीय-भजनीय आहे, व यांतच ब्रह्म नित्य प्रतिष्ठित आहे. त्या संसारसंज्ञक वृक्षाचे तेच ब्रह्म सारभूत आहे. किंवा या ब्रह्मवृक्षाचें म्हणजे अमर्याद संसारमंडलाचें हें ब्रह्म जणुं काय वन-वननीय-संभजनीय आहे. ब्रह्मावांचून या संसारमंडळाचें दुसरें कांहींच आस्पद नाहीं, ब्रह्मच अविद्येने संसाराचा अनुभव घेते, असा सिद्धान्त आहे. [ आतां 'अहं ब्रह्म' या दृढ ज्ञानानें या उक्त संसारवृक्षाला तोडून व कांहीच प्रतिबंध न राहिल्यामुळे आत्मनिष्ठ होऊन ज्ञानी पुनरावृत्तिरहित कैवल्यास प्राप्त होतो, असें पुराण वचनच सांगतें- ]—'**एतत् ज्ञानेन परमासिना छित्त्वा च भित्वा**'—ज्ञानरूप दृढ खड्गानें या संसारवृक्षाला तोडून व त्याला फोडून—'**च ततः आत्मरतिं प्राप्य**'—आणि त्यानंतर कांहींच प्रतिबंध रहात नसल्यामुळे आत्मरतीला प्राप्त होऊन-आत्मरति होऊन—'**यस्मात् पुनः न आवर्तते**'—ज्या अवस्थेपासून पुनः परत येत नाहीं त्या कैवल्यावस्थेस तो प्राप्त होतो. '**इत्यादि**' असें पुराणांतहि याचें वर्णन केले आहे. [ म. भा. अश्व. ४७,१२-१५. ]

**तमूर्ध्वमूलं संसारमायामयं वृक्षमधःशाखं महदहंकारतन्मात्रादयः शाखा इवास्याधो भवन्तीति सोऽयमधःशाखस्तमधःशाखं न श्वोऽपि स्थातेत्यश्वत्थस्तं क्षणप्रध्वंसिनं अश्वत्थं प्राहुः कथयन्ति। अव्ययं संसारमायामयमनादिकालप्रवृत्तत्वात्सोऽयं संसारवृक्षोऽव्ययोऽनाद्यनन्तदेहादिसंतानाश्रयो हि सुप्रसिद्धस्तमव्ययम् ॥**

**भाष्यार्थ—तं ऊर्ध्वमूलं संसारमायामयं वृक्षं**—त्या ऊर्ध्वमूल-संसारमायामय वृक्षास, ( 'अधःशाखं' याचे व्याख्यान- )—**अधःशाखं-महदहंकारतन्मात्रादयः शाखाः इव अस्य अधः भवन्ति इति सः अयं अधःशाखः तं अधःशाखं**—अधःशाख म्ह० महत्, अहंकार, तन्मात्रा, इन्द्रियें इत्यादि शाखांप्रमाणें याच्या 'अधः-' खाली असतात. म्हणून तो हा वृक्ष अधःशाख आहे.—**श्वः अपि न स्थाता इति अश्वत्थः**—जो उद्यांहि राहणारा नाही, म्हणून अ-श्व-त्थ—**तं क्षणप्रध्वंसिनं अश्वत्थं प्राहुः कथयन्ति**—त्या क्षणभंगुर वृक्षाला 'अश्वत्थ' म्हणतात.—**अव्ययं**—त्या अव्यय अश्वत्थाला-( पण क्षणभंगुर संसाराला अव्ययत्व संभवत नाही, अशी शंका घेऊन सांगतात- )—**संसारमायामयं-अनादिकालप्रवृत्तत्वात् सः अयं संसारवृक्षः अव्ययः**—संसारमायामय, अनादिकालापासून प्रवृत्त झालेला असल्यामुळें तो हा संसारवृक्ष अव्यय आहे. (याचेच उपपादन-)—**अनादि-अनन्तदेहादिसंतानाश्रयः हि सुप्रसिद्धः तं अव्ययं**—अनादि-अनन्तदेहादिपरंपरेचा आश्रय असा हा संसारवृक्ष सुप्रसिद्ध आहे. त्या अव्यय संसारवृक्षाला ( जो जाणतो तो वेदवित्, असा पुढें संबंध. )

**तस्यैव संसारवृक्षस्येदमन्यद्विशेषणं छन्दांसि छादनादृग्यजुःसामलक्षणानि यस्य संसारवृक्षस्य पर्णानीव पर्णानि । यथा वृक्षस्य परिरक्षणार्थानि पर्णानि तथा वेदाः संसारवृक्षपरिरक्षणार्था धर्माधर्मतद्धेतुफलप्रकाशनार्थत्वात् । यथाव्याख्यातं संसारवृक्षं समूलं यस्तं वेद स वेदविद्वेदार्थविदित्यर्थः । नहि संसारवृक्षादस्मात्समूलाज्ज्ञेयोऽन्योऽणुमात्रोऽप्यवशिष्टोऽस्त्यतः सर्वज्ञः स यो वेदार्थविदिति समूलवृक्षज्ञानं स्तौति ॥ १ ॥**

भाष्यार्थ—**तस्य एव संसारवृक्षस्य इदं अन्यत् विशेषणं**—त्याच संसारवृक्षाचें हें आणखीं दुसरें विशेषण—**छन्दांसि-छादनात् ऋग्यजुःसामलक्षणानि यस्य संसारवृक्षस्य पर्णानि इव पर्णानि**—छंद म्ह० ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, या स्वरूपाचे छंद-छादनामुळे म्ह० रक्षण किंवा आच्छादन करणें, या कारणानें छंद हींच ज्या संसारवृक्षाचीं जणुंकाय पानांसारखीं पानेंच आहेत. [ आरोह व अवरोह हें ज्यांचें फल आहे अशीं नानाप्रकारच्या अर्थवादानें युक्त असलेलीं कर्मकांडें संसारवृक्षाचें रक्षण करितात व त्यांतील दोषाला आच्छादित करितात, म्हणून ऋग्वेदादिरूप कर्मकांडें हेच छंद संसारवृक्षाचीं पानें आहेत. भाष्यकार याचेंच उपपादन करितात-]—**यथा वृक्षस्य परिरक्षणार्थानि पर्णानि**—ज्याप्रमाणें वृक्षाच्या परिरक्षणासाठीं त्याचीं पानें असतात—**तथा वेदाः संसारवृक्षपरिरक्षणार्थाः**—त्याप्रमाणें वेद संसारवृक्षाचें परिरक्षण करण्यासाठीं आहेत.—**धर्माधर्मतद्धेतुफलप्रकाशनार्थत्वात्**—कारण कर्मकांडरूप वेदांना धर्म, अधर्म, त्यांचे हेतु-विहित-निषिद्ध कर्में, त्यांचीं सुख दुःखरूप फलें यांचें प्रकाशनार्थत्व आहे. म्ह० कर्मकांड त्यांचें प्रकाशन करण्यासाठीं आहे.—**तं यथाव्याख्यातं संसारवृक्षं समूलं यः वेद**—त्या-वर जसें व्याख्यान केलें आहे तशा प्रकारच्या संसारवृक्षाला समूल-मूलासह जो जाणतो—**सः वेदविद्-वेदार्थविद् इत्यर्थः**—तो वेदविद्-वेदार्थाला जाणणारा आहे, असा याचा भावार्थ. [ समूल संसारवृक्षाचें ज्ञान झालें असतां जें मूळ नव्हे त्या विकाराला सोडून त्याहून अगदीं विलक्षण असलेलें मूळ अगदीं पृथक्पणें जाणतां येणें शक्य आहे. यास्तव त्याच्या ज्ञानासाठीं मुमुक्षूनें यत्न करावा, अशा आशयानें येथें ज्ञानस्तुति विवक्षित आहे, असें सांगतात- ]—**हि अस्मात् समूलात् संसारवृक्षात् अन्यः ज्ञेयः अणुमात्रः अपि अवशिष्टः न अस्ति**—कारण या समूल संसारवृक्षाहून दुसरा ज्ञेय विषय अणुमात्रहि अवशिष्ट राहिलेला नाहीं.—**अतः यः वेदार्थविद् सः सर्वज्ञः इति समूलवृक्षज्ञानं स्तौति**—यास्तव जो वेदार्थवेत्ता तो सर्वज्ञ, असें म्हणून समूल संसारवृक्षज्ञानाची भगवान् स्तुति करीत आहेत. १.

---

१ रहस्यकार या श्लोकाचा अर्थ करितांना म्हणतात- 'ऊर्ध्वमूलं' मूळ एक वर व 'अधःशाखं' शाखा अनेक खालीं-व याच आपल्या अर्थाच्या समर्थनार्थ टीपेंत म्हणतात-"वैदिक धर्मांतच नव्हे तर इतर प्राचीन धर्मांतहि ही विश्ववृक्षाची कल्पना किंवा रूपक आहे. ऋग्वेदांत वरुणाच्या लोकीं एक वृक्ष असून त्या वृक्षाच्या किरणाचें मूळ वर ( ऊर्ध्व ) असून त्याचे किरण वरून खालीं ( निचीनाः ) पसरतात (१. २४. ७ ) असें वर्णन आहे. विष्णु-

सहस्रनामांत 'वारुणो वृक्षः' ( वरुणाचा वृक्ष ) असें नाव आहे. यम आणि पितर ज्या वृक्षाखाली बसून सहपान करितात ( ऋ. १०. १३५. १.) किंवा ज्याच्या "अग्रभागीं स्वादु पिप्पल असून ज्यावर दोन सुपर्ण म्ह० पक्षी राहतात." ( ऋ. १. १६४. २२.) अगर 'ज्या पिप्पलाला ( पिंपळाला ) वायुदेवता हालवितात.' ( ऋ. ५. ५४. १२.) तो वृक्षहि हाच असून 'देवसदन अश्वत्थवृक्ष तिसऱ्या स्वर्गलोकात (वरुणलोकात)आहे'असें जें वर्णन आहे, तेंहि याच वृक्षास अनुलक्षून आहेसें दिसतें." पण हे म्हणणे बरोबर नाहीं. कारण वरील वर्णन संसारवृक्षाचें आहे. वरुणलोकांतील वृक्ष परिच्छिन्न असून ( कारण तो वरुणलोकात राहतो. मनुष्यलोकीं नाही ) हा संसारवृक्ष अपरिच्छिन्न आहे. 'नान्तो न चादिर्न च संप्रतिष्ठा' असा हा आहे. वारुण वृक्षाचे 'वृक्ष' म्हणून वर्णन आहे व येथे 'सर्व सृष्टीचें वृक्ष या रूपानें' वर्णन आहे. 'अग्रभागी स्वादु पिप्पल' याचा अर्थ 'गोड फल' असा आहे. कारण 'स्वादु' हे विशेषण फलाला लागू शकते. पिपळवृक्षाला लागू शकत नाहीं. अर्थात् वरील वृक्ष व हा वृक्ष एकच आहे,हे म्हणणे अयोग्य आहे.येथील वर्णन काठकोपनिषदांतील 'ऊर्ध्वमूलोऽवाक्शाख एषोऽश्वत्थः सनातनः । तदेव शुक्रं तद्ब्रह्म तदेवामृतमश्नुते तस्मिँल्लोकाः श्रिताः सर्वे' (का. भा. ६–१ पृ. १३४) या मंत्राला अनुसरून आहे, ही गोष्ट रहस्यकारहि कबूल करितात. तथापि 'वारुण वृक्ष व हा ब्रह्ममय अमृत अश्वत्थवृक्ष' एकच आहेत, असेंहि त्याना दिसतें ! आश्चर्य आहे ! ! पुढे 'अश्वत्थ' या नावाविषयी रहस्यकार म्हणतात–"अग्नि किंवा यज्ञप्रजापति पितृयाणकालीं देवलोकातून नष्ट होऊन या वृक्षात अश्वाचें रूप धारण करून एक वर्ष गुप्त राहिला म्हणून या वृक्षास अश्वत्थ नांव पडलें. अशी तैत्तिरीय ब्राह्मणात 'अश्वत्थ' या शब्दाची व्युत्पत्ति दिली आहे, व कित्येक नैरुक्तिकांचें असेंहि मत आहे कीं, पितृयाणातील दीर्घरात्रीत सूर्याचे घोडे यमलोकीं या झाडाखालीं विश्रांति घेतात म्हणून यास अश्वत्थ म्ह० घोड्याचे ठाणे हे नांव प्राप्त झालें असावें" ( असेल, मग पुढे काय ! पुढे रहस्यकार म्हणतात–) 'अ' म्ह० नाहीं, 'श्व' म्ह० उद्या व 'त्थ' म्ह० टिकणारे ही आध्यात्मिक व्युत्पत्ति मागाहून कल्पिलेली असावी." ( पण वरील व्युत्पत्ति 'अश्वत्थ' या एका–पिपळवृक्षाच्या नावाची आहे व ही कल्पित संसारवृक्षाची आहे हे लक्षात ठेविले पाहिजे. पुनः ते म्हणतात–) "नामरूपात्मक मायेचे स्वरूप विनाशी किंवा दर घडीस पालटणारें असल्यामुळे त्याला 'उद्यापर्यंत न टिकणारें' असें म्हणतां येईल हें खरें; पण ही दृष्टि येथे अभिप्रेत नाही. हे 'अव्यय म्ह० कधीहि ज्याचा व्यय होत नाही' या विशेषणावरून स्पष्ट होतें." पण हें जर संसारवृक्षाचे वर्णन आहे तर तो क्षणभंगुर आहे हें सांगण्यासाठी 'अश्वत्थ' व ज्ञानावांचून त्याचा कधीच क्षय होत नाहीं हें सांगण्यासाठी 'अव्यय' अशी दोन विशेषणें असली म्हणून काय बिघडलें ? त्या संसारवृक्षाचें यथार्थज्ञान ज्या रीतीने होईल तसें वर्णन करावयाचें कीं अव्यय व क्षणभंगुर याचा विरोध येतो म्हणून संसारवृक्षाला निरर्थक 'अश्वत्थ' हे नांव द्यावयाचें. वरील तैत्तिरीय ब्राह्मणांतील किंवा नैरुक्तिकांची व्युत्पत्ति तरी या संसारवृक्षाला कशी लागू होणार ? शिवाय येथील 'अव्यय' हे विशेषण 'नित्य–अक्षय' या अर्थी नाहीं, हें 'असंगशस्त्रेण दृढेन छित्त्वा' यावरूनच स्पष्ट होतें. शिवाय असे विरोधी वर्णन गीतेंतच पुष्कळ ठिकाणीं आहे, जसें—'भूतभृत् न च भूतस्थः' 'भूतानि

मत्स्थानि–न च मत्स्थानि भूतानि ' इत्यादि. त्याच न्यायाने हा संसारवृक्ष व्यक्तिदृष्ट्या क्षणभंगुरहि आहे व प्रवाहरूपाने अव्ययहि आहे, असे म्हणण्यांत कांहींच दोष नाहीं. हें रूपक असल्यामुळें ससारवृक्षाला रूढ–वाच्यवृत्तीने ' अश्वत्थ–पिपळ ' म्हणता येणें शक्य नाहीं. यौगिक–लाक्षणिकवृत्तीनेंच त्याला 'अश्वत्थ' म्हणतां येणें शक्य आहे. कारण 'वेद हीं त्याची पानें ' सांगितली आहेत. खऱ्या अश्वत्थाची वेद हीं पाने असणें शक्य नाही.

रहस्यकार पुन: म्हणतात—" परमेश्वर स्वर्गांत असून त्यापासून निघालेला जगद्वृक्ष खाली म्ह० मनुष्यलोकीं आलेला असल्यामुळे त्या वृक्षाचें मूळ म्ह० परमेश्वर वर आणि त्या वृक्षाच्या अनेक शाखा म्हणजे जगाचा पसारा खालीं फुटलेला असल्याबद्दल वर्णन केले आहे. परंतु वडाच्या झाडाच्या पारंब्याहि वरून खालीं वाढत जात असल्यामुळे हा संसारवृक्ष वटवृक्ष असावा पिपळ नव्हे...." पण ही सर्व चर्चा अस्थानी आहे. कारण ससारमायावृक्ष हे मुळींच जर रूपक आहे तर त्याच्या जातीचा इतका विचार करण्याचे कारणच दिसत नाही. हा जर दृष्टान्त असता तर पूर्ण उपमा आहे की अपूर्ण ? दृष्टान्त व्यापक आहे की एकदेशी, वगैरे चर्चा करणें काहीं तरी उपपन्न झाले असते. पण हे जर मुळीच रूपक आहे व स्वत: भगवान्च ' न रूपं अस्य इह तथा उपलभ्यते ' असे स्पष्ट सांगत आहेत, तर तो वृक्ष पिपळ आहे की वड वगैरे प्रश्न उपस्थित करून " अश्वत्थ हा आदित्याचा वृक्ष, ' न्यग्रोधो वारुणो वृक्ष: ' वट हा वरुणाचा वृक्ष, प्रलयकालीं बालरूपी परमेश्वर अव्यय न्यग्रोधाच्या–वटवृक्षाच्या खादीवर ऋषींनी पाहिला, छान्दोग्यांत अव्यक्त परमेश्वरापासून अवाढव्य जगत् कसें झाले याविषयीं न्यग्रोधाच्या बीजाचाच दृष्टान्त देणे " वगैरे प्रस्तुत प्रकरणाशी असबद्ध गोष्टींचा उगीच पाहळाल लावणे व्यर्थच होय. तसेच " संसारवृक्षाच्या स्वरूपाची तिसरी कल्पना म्हटली म्ह० औदुंबर होय, पुराणातून हा दत्तात्रेयाचा वृक्ष मानिला आहे.... विष्णुसहस्रनामात ' न्यग्रोधोदुंबरोऽश्वत्थ: ' अशी विष्णुची वृक्षात्मक तीन नावे दिली असून ... प्रचारातहि हे तीन वृक्ष देवतात्मक व पूजार्ह मानीत असतात. विष्णुसहस्रनाम व गीता हे दोन्ही महाभारताचे भाग आहेत व विष्णुसहस्रनामात औदुंबर, वड व अश्वत्थ अशी तीन निराळी नावे दिलेली आहेत तर अश्वत्थशब्दाने गीतेंतहि पिंपळ ( औदुबर अगर वट नव्हे ) हाच अर्थ घेतला पाहिजे " हा निर्णय अगदी लटपटीत वाटतो. कारण ' ऊर्ध्वमूलं अध:शाख ' येथील वृक्ष औदुंबर किंवा वट नसून पिंपळच आहे, असे समजण्यात विशेष फल कांहीच नाही. तो पिंपळ आहे असे मानलें तरच ब्रह्मवेत्त्याला मोक्ष मिळतो, औदुंबर, वट, किंवा आणखी कोणता तरी वृक्ष मानलें तर ब्रह्मज्ञाच्या मोक्षाला प्रतिबंध होतो, असे थोडेंच आहे ! तेव्हां हा सर्व विस्तार फुकट आहे. ब्रह्म सर्व संसाराचें कारण आहे व त्याच्यापासून हा सर्व स्थूल-सूक्ष्म–भूत-भौतिक प्रपंच बीजापासून जसा वृक्ष त्या न्यायाने उद्भवला आहे, एवढाच अर्थ येथे विवक्षित असून तो वृक्षाचें रूपक करून सांगितला आहे. यापेक्षां या श्लोकांत ' त्या वृक्षाला अश्वत्थच मानलें पाहिजे 'वगैरे दुसरा कांही विवक्षित अर्थ नाहीं. रहस्यकारांनी गीतेतल्या ' अश्वत्थ-'शब्दाचा महाभारत, पुराण, लौकिक समजूत, विष्णुसहस्रनाम इत्यादिकांशी बादरायणसबंध जोडून तो पिंपळच आहे असे ठरविलें. पण मग काठकोपनिषदांत ' ऊर्ध्वमूलोऽवाक्शाख एषोऽश्वत्थ: सनातन: ' असा जो ' अश्वत्थ'शब्द आहे त्याचा अर्थ ते काय करणार ? त्याचाहि पिंपळ हाच

**अधश्चोर्ध्वं प्रसृतास्तस्य शाखा गुणप्रवृद्धा विषयप्रवालाः ।**
**अधश्च मूलान्यनुसंततानि कर्मानुबन्धीनि मनुष्यलोके ॥२॥**

**अन्वयार्थ—तस्य**—त्या संसारवृक्षाच्या—**शाखाः**—शाखा—**अधः च ऊर्ध्वं** खाली व वर—**प्रसृताः**—पसरल्या आहेत.—**गुणप्रवृद्धाः**—त्या सत्त्व, रज व तम यांच्या योगानें विशेषेंकरून वाढलेल्या आहेत.—**विषयप्रवालाः**—विषय हेच त्या शाखांचे कोमल पल्लवांकुर आहेत.—**मनुष्यलोके**—या मनुष्यशरीरांत—**कर्मानुबंधीनि**—कर्मांना कारण होणारीं—**मूलानि**—वासनारूप मुळें—**अधः च**—खालीं व वरहि—**अनुसन्ततानि**—परंपरेनें-संतत पसरलेलीं आहेत. २.

**तस्यैव संसारवृक्षस्यापराऽवयवकल्पनोच्यते— अधो मनुष्यादिभ्यो यावत्स्थावरमूर्ध्वं च यावद्ब्रह्मा विश्वसृजो धर्म इत्येतदन्तं यथाकर्म यथाश्रुतं ज्ञानकर्मफलानि तस्य वृक्षस्य शाखा इव शाखाः प्रसृताः प्रगता गुणप्रवृद्धा गुणैः सत्त्वरजस्तमोभिः प्रवृद्धाः स्थूलीकृता उपादानभूतैर्विषयप्रवाला विषयाः शब्दादयः प्रवाला इव देहादिकर्मफलेभ्यः शाखाभ्योऽङ्कुरी भवन्तीव तेन विषयप्रवालाः शाखाः ॥**

**भाष्यार्थ—तस्य एव संसारवृक्षस्य अपरा अवयवकल्पना उच्यते—** त्याच संसारवृक्षाची पूर्वोक्त अवयवकल्पनेहून निराळी अवयवकल्पना[1] सांगितली जाते— **अधः-मनुष्यादिभ्यः यावत् स्थावरं**—अधः म्ह० मनुष्यलोकापासून स्थावरांपर्यंत—**ऊर्ध्वं च यावत् ब्रह्मा विश्वसृजः धर्मः इति-एतत्-अन्तं**—आणि ऊर्ध्व म्ह० मनुष्यादिकापासून ब्रह्मलोकापर्यंत-सत्यलोकापर्यंत विश्वस्रष्ट्याच्या धर्मापर्यंत, असा याचा भावार्थ.—**यथाकर्म यथाश्रुतं**—ज्याचें जसे-जे कर्म व ज्याचें जसें ज्ञान असेल त्याप्रमाणें-ज्याच्या त्याच्या ज्ञानकर्माप्रमाणे ( शाखाशब्दाचा अर्थ सांगतात-) —**ज्ञान-कर्मफलानि**—ज्ञान व कर्म यांची फले असे हे अधोलोक व ऊर्ध्वलोक याच —**तस्य वृक्षस्य शाखाः इव शाखाः प्रसृताः-प्रगताः**—त्या संसारवृक्षाच्या

---

अर्थ आहे, असें ठरविण्यास यातील एकहि प्रमाण उपयोगी नाहीं व याच उपनिषद्वचनाच्या आधाराने गीतेतील वर्णन आहे, असेंहि ते कबूल करितात. (गी. र. पृ. ८०२ पहा) तेव्हां वरील पिपळाची चर्चा व्यर्थच नाहीं का ठरत? असो; 'परमेश्वर स्वर्गांत असून वगैरे' जें त्यानीं वर म्हटले आहे तेंहि अनुपपन्नच आहे. कारण 'परमेश्वर स्वर्गांत आहे व त्यापासून निघालेला जगद्वृक्ष खालीं मनुष्यलोकीं आलेला आहे' ही कल्पना फारच स्थूल आहे. ती वेदान्तशास्त्र व गीता यांतील कोणालाच धरून नाहीं. प्रस्तुत श्लोकांत असा अर्थ मुळीच विवक्षित नाही. व्यापक परमात्म्याला परिच्छिन्न-एकदेशी बनविणारी ती कल्पना सर्वथा हेय-त्याज्य आहे. ऊर्ध्व म्ह० वर असा अगदी 'सरळ' अर्थ केल्यामुळें रहस्यकारांच्या हातून हा प्रमाद घडला आहे. यास्तव गीतेचा खरा, तात्त्विक व निर्दोष अर्थ कळण्यास आचार्यभाष्यच शरण आहे.

१ आचार्यांच्या या शब्दावरूनच संसारवृक्ष ही नुस्ती कल्पना आहे, हें उघड होतें.

शाखांसारख्या शाखा पसरल्या–त्या वृक्षापासून निघाल्या आहेत. [ ऊर्ध्व व अधोलोक याच जणुंकाय लौकिक वृक्षाच्या शाखांसारख्या या संसारवृक्षाच्या शाखा आहेत. 'यथाकर्म' व 'यथाश्रुतं' या शब्दांनीं त्यांच्या विचित्र हेतूंचा निर्देश केला आहे. अर्थात् त्यांचा असा विचित्र हेतु असल्यामुळें त्या शाखाहि त्याप्रमाणेंच नानाप्रकारच्या बनल्या आहेत. ]—**गुणप्रवृद्धाः–गुणैः उपादानभूतैः सत्त्वरजस्तमोभिः प्रवृद्धाः–स्थूलीकृताः**—गुणप्रवृद्ध शाखा म्ह० गुणांकडून[1]–उपादानभूत सत्त्व, रज व तम या गुणांकडून प्रवृद्ध–स्थूल केल्या गेलेल्या अशा त्या शाखा आहेत.—**विषयप्रवालाः–विषयाः शब्दादयः प्रवालाः इव**—त्या शाखांचे विषय हेच प्रवाल आहेत. विषय म्ह० शब्दादिक, तेच जणुंकाय त्या शाखांचे प्रवाल आहेत. [ शब्दादि प्रत्यक्ष विषयांचें प्रवालत्व म्ह० शाखांमध्यें पल्लवत्व, त्यांचें अंकुरत्व प्रकट करितात–]—**देहादिकर्मफलेभ्यः शाखाभ्यः अङ्कुरीभवन्ति इव तेन विषयप्रवालाः शाखाः**—देहादि कर्मफलें याच शाखा, त्यांपासून विषयरूप पल्लवांचे जणुंकाय अंकुर फुटतात त्यामुळें त्या ऊर्ध्व-अधोलोकरूप शाखांचे विषय हेच प्रवाल–पल्लव आहेत. त्यामुळें त्या शाखा विषयप्रवाल होत.

**संसारवृक्षस्य परममूलमुपादानं कारणं पूर्वमुक्तमथेदानीं कर्मफलजनितरागद्वेषादिवासना मूलानीव धर्माधर्मप्रवृत्तिकारणान्यवान्तरभावीनि तान्यधश्च देहाद्यपेक्षया मूलान्यनुसंततान्यनुप्रविष्टानि कर्मानुबन्धीनि कर्म धर्माधर्मलक्षणमनुबन्धः पश्चाद्भावी येषामुद्भूतिमनुभवतीति तानि कर्मानुबन्धीनि मनुष्यलोके विशेषतोऽत्र हि मनुष्याणां कर्माधिकारः प्रसिद्धः ॥ २ ॥**

**भाष्यार्थ**—( 'ऊर्ध्वमूलं' या शब्दानें पहिल्या श्लोकांत संसारवृक्षाचें मूळ सांगितलें. मग आतां पुनः 'अधश्च मूलानि०' हे कां सांगितलें जात आहे ? असें कोणी विचारील म्हणून सांगतात–)—**पूर्वं संसारवृक्षस्य परममूलं–उपादानं कारणं उक्तं**—पूर्वीं संसारवृक्षाचें परममूल–उपादान कारण सांगितलें.—**अथ इदानीं कर्मफलजनितरागद्वेषादिवासनाः मूलानि इव**—आणि आतां येथें कर्मफलांपासून उत्पन्न झालेल्या ज्या राग-द्वेषांच्या वासना तीच जणुंकाय मुळें आहेत, ( तीं मुळें कशीं ? उत्तर–)—**धर्माधर्मप्रवृत्तिकारणानि अवान्तरभावीनि**—धर्म व

---

१ या तीन गुणांकडे पाहून रहस्यकारांना सांख्यशास्त्राची आठवण झाली आहे. ते अवतरणांत म्हणतात–"( पहिल्या श्लोकांत ) येणेंप्रमाणें वैदिक वर्णन झालें. आतां याच वृक्षाचें दुसऱ्या प्रकारें म्ह० सांख्यशास्त्राप्रमाणें वर्णन करितात" पण गीतेंत असें सांख्यदर्शनाचें सिद्धान्तरूपानें–सांख्य व वेदान्त यांची एकवाक्यता करून–प्रतिपादन करणें अयोग्य आहे, तसें करण्याचें कांहीं कारणहि नाहीं व वैदिक संप्रदायांतील गीतेला सांख्यदर्शन प्रमाणभूत आहे, अशी कल्पना करणेंहि अयोग्य आहे. याविषयीं आम्ही पूर्वीं बरेंच लिहिलेलें असल्यामुळें त्यासंबधान रहस्यकारांच्या चर्वितचर्वणाकडे आतां दुर्लक्षच करितों.

**अधर्म** यांतील प्रवृत्तीचीं कारणें-धर्मप्रवृत्ति व अधर्मप्रवृत्ति यांचीं कारणें (पुनः तीं कशीं ? उत्तर-)-संसारप्रवृत्ति झाल्यावर मग मध्यें उद्भवणारीं-मूळ कारणाच्या मागून होणारीं अशीं आहेत,—**च तानि मूलानि देहादि-अपेक्षया अधः अनुसंततानि-अनुप्रविष्टानि**—आणि तीं मुळें देहादिकांच्या अपेक्षेनें खालीं अनुवृत्त आहेत -तीं वासनामुळें सर्व लिंगशरीरांत अनुगत असल्यामुळें त्यांचा प्रवाह अविच्छिन्न चालतो, त्यांचा मध्येंच विच्छेद होत नाहीं. (रागादिक कर्मफलापासूनच उद्भवतात, असें भगवान् सांगतात-)—**कर्मानुबन्धीनि**—तीं मुळें कर्मानुबंधी आहेत.—**कर्म-धर्माधर्मलक्षणं अनुबंधः-पश्चाद्भावी-येषां उद्भूतिं-अनु-भवति इति तानि कर्मानुबन्धीनि**—कर्म म्ह० धर्म व अधर्मरूप कर्म, अनुबंध-पश्चाद्भावी-मागून असणारा ज्यांच्या उत्पत्तीच्या मागे असतो किंवा ज्यांच्या उत्पत्तीच्या मागून धर्माधर्मरूप कर्म होतें, म्हणून कर्मानुबंधी (कर्मे व रागादिक यांना परस्पर कार्यकारण-भाव आहे. कर्मामुळें रागादिक व रागादिवासनांपासून धर्माधर्माख्य कर्मे असा, त्यांचा परस्पर कार्यकारणभाव आहे.)—**मनुष्यलोके विशेषतः**—विशेषेंकरून मनुष्यलोकांत त्यांची अविच्छिन्न प्रवृत्ति होते. (कारण-)—**अत्र हि मनुष्याणां कर्माधिकारः प्रसिद्धः**—येथे म्ह० या मनुष्यशरीरांतच मनुष्याचा कर्माधिकार प्रसिद्ध आहे. [मनुष्य असा लोक म्ह० देह, अधिकृत-ब्राह्मण्यादिविशिष्ट देह हाच मनुष्यलोक होय.]

**न रूपमस्येह तथोपलभ्यते नान्तो न चादिर्न च संप्रतिष्ठा**
**अश्वत्थमेनं सुविरूढमूलमसङ्गशस्त्रेण दृढेन छित्वा ॥ ३ ॥**
**ततः पदं तत्परिमार्गितव्यं यस्मिन्गता न निवर्तन्ति भूयः ।**
**तमेव चाद्यं पुरुषं प्रपद्ये यतः प्रवृत्तिः प्रसृता पुराणी ॥ ४ ॥**

**अन्वयार्थ—इह**—या संसारांत असलेल्या प्राण्यांना—**अस्य रूपं**—या संसार-वृक्षाचे रूप—**तथा**—येथे जसें वर्णिलें आहे तसें—**न उपलभ्यते**—उपलब्ध होत नाहीं.—**न अन्तः**—याचा अन्त कळत नाहीं—**च आदिः न**—आणि याचा आरंभ कोठून झाला आहे तें कळत नाहीं.—**च संप्रतिष्ठा न**—याची स्थिति कळत नाहीं. —**सुविरूढमूलं**—ज्याचीं मुळे फार खोल गेलीं आहेत अशा—**एनं अश्वत्थं**—

---

१ रहस्यकार ‘विषयप्रवालाः’ म्ह० “ज्यापासून शब्दादि विषयांचे अंकुर फुटलेले आहेत,” असें म्हणतात. पण तो अर्थ रूपकाला धरून नाहीं. शब्दादि विषय हेच त्या (ऊर्ध्व व अधो) उच्च-नीच, जन्मरूप शाखांचे पल्लवांकुर आहेत, असा त्याचा भावार्थ आहे. ‘अधश्च मूलानि अनुसंततानि कर्मानुबंधीनि मनुष्यलोके’ या उत्तरार्धाचा अर्थ ते “आणि अखेर कर्माचें रूप पावणाऱ्या त्याच्या मुळ्या खालीहि मनुष्यलोकांत वाढत वाढत लांब गेल्या आहेत.” असा करितात. तो कितपत सुबोध किंवा सयुक्तिक आहे, हें आचार्यांच्या भाष्याचा अर्थ वाचून नंतर वाचकांनींच ठरवावें.

या क्षणभंगुर संसारवृक्षाला—**दृढेन असंगशस्त्रेण**—अत्यंत दृढ-मजबूत अशा असंगरूप शस्त्रानें—**छित्वा**—तोडून—**ततः**—त्यानंतर—**यस्मिन् गताः**—ज्या पदीं गेलेले—**भूयः**—पुनरपि—**न निवर्तन्ति**—निवृत्त होत नाहींत—**तत् पदं**—त्या पदाला (शोधावें, त्याला जाणावें)—**यतः**—ज्याच्यापासून ही—**पुराणी**—अनादि—**प्रवृत्तिः**—संसारप्रवृत्ति—**प्रसृता**—पसरली आहे—**तं एव च**—त्याच—**आद्यं पुरुषं**—आद्य पुरुषाला—**प्रपद्ये**—मी शरण आहें.—**इति**—अशा भावनेनें—**परिमार्गितव्यं**—सर्वप्रकारें शोधावें, जाणावें. ३-४.

**यस्त्वयं वर्णितः संसारवृक्षः—न रूपमस्येह यथा वर्णितं तथा नैवोपलभ्यते स्वप्नमरीच्युदकमायागन्धर्वनगरसमत्वाद्दृष्टनष्टस्वरूपो हि स इति। अत एव नान्तो न पर्यन्तो निष्ठा समाप्तिर्वा विद्यते। तथा न चाऽऽदिरित आरभ्यायं प्रवृत्त इति न केनचिद्गम्यते। न च संप्रतिष्ठा स्थितिर्मध्यमस्य न केनचिदुपलभ्यते अश्वत्थमेनं यथोक्तं सुविरूढमूलं सुष्ठु विरूढानि विरोहं गतानि मूलानि यस्य तमेनं सुविरूढमूलमसङ्गशस्त्रेणासङ्गः पुत्रवित्तलोकैषणादिभ्यो व्युत्थानं तेनासङ्गशस्त्रेण दृढेन परमात्माभिमुख्यनिश्चयदृढीकृतेन पुनः पुनर्विवेकाभ्यासाश्मनिशितेन छित्त्वा संसारवृक्षं सबीजमुद्धृत्य ॥३॥**

**भाष्यार्थ**—( पण पुनः पुनः रागादिकांमुळें संसारवृक्ष प्रवृत्त होत असल्याकारणानें त्याला अनादित्व आहे. त्यामुळें तो नाश पावत नाहीं. शिवाय त्याचा नाशहि कोणाला करितां येत नाहीं, अशी आशंका घेऊन सांगतात-)—**तु यः अयं संसारवृक्षः वर्णितः**—पण जो हा संसारवृक्ष वर्णिला आहे.—**अस्य रूपं इह यथा वर्णितं तथा न एव उपलभ्यते**—याचें रूप येथें वर जसें वर्णिले आहे किंवा तें जसें प्रसिद्ध आहे तसें उपलब्ध होत नाहीच. [ तर केवल शास्त्रावरून त्याचें अनुमान केले जातें. त्यामुळें ज्ञानानेंच त्याचा बाध होणें शक्य आहे. पण ते रूप प्रमाणाचा विषय कां होत नाहीं ? उत्तर- ]—**स्वप्नमरीच्युदक-माया-गन्धर्वनगरसमत्वात् दृष्टनष्टस्वरूपः हि सः इति**—स्वप्न, मृगजळ, गारुड्याची माया, आकाशांत दिसणारें गंधर्वनगर यांचे त्या वृक्षाला साम्य आहे, संसारवृक्ष दृष्ट-नष्टस्वरूप आहे. कांहीं काल दिसणें व नष्ट होणें, हें त्याचे स्वरूप आहे, हें प्रसिद्ध आहे. त्यामुळे तो स्वप्नादिकांसारखा आहे. ( म्हणून प्रत्यक्ष प्रमाणाचा विषय होत नाहीं. त्यामुळेंच त्याचा अन्तहि कळत नाहीं, असें सांगतात-)—**अतः एव न अन्तः-पर्यन्तः-निष्ठा-समाप्तिः वा न विद्यते**—म्हणूनच त्याला अन्त नाहीं. अन्त म्ह० पर्यवसान-निष्ठा-समाप्ति नाहीं. ( ज्ञानावांचून भ्रांति, वासना व कर्म हीं परस्परांना कारण होत असल्यामुळें संसारवृक्षाला अन्त नाहीं. त्याचें पर्यवसान होत नाहीं. बरें उपलब्ध होत असलेला हा संसारच पहिला आहे, म्हणून म्हणावे तर तसाहि निश्चय करवत नाहीं, असें सांगतात-)—**तथा न च आदिः-इतः आरभ्य अयं प्रवृत्तः इति न केनचित् गम्यते**—त्याचप्रमाणें आदि नाहीं, येथून आरंभ करून-येथपासून हा प्रवृत्त झाला आहे-येथून याची सुरुवात झाली आहे, असेंहि कोणाकडून जाणलें जात नाहीं, असेंहि

कोणाला कळत नाहीं.—**न च संप्रतिष्ठा-स्थितिः मध्यं अस्य न केनचित् उपलभ्यते**—याची संप्रतिष्ठा-स्थिति-मध्यहि कोणाला उपलब्ध होत नाही. ( 'अहो-पण या 'अश्वत्थ'नांवाच्या क्षणभंगुर संसारवृक्षाचा उच्छेद-नाश आपोआपच होणें शक्य आहे. त्यामुळें त्याच्या उच्छेदासाठीं प्रयत्न करावयास नको,' असें कोणी म्हणेल म्हणून भगवान् उत्तरार्धानें सांगतात-)—**एनं यथोक्तं अश्वत्थं**—या वर सांगित-लेल्या प्रकारच्या अश्वत्थाला-( तो कसा ? तर-)—**सुविरूढमूलं-यस्य मूलानि सुष्ठु विरूढानि-विरोहं गतानि तं एनं सुविरूढमूलं**—सुविरूढमूल-ज्याचीं मुळें उत्तमप्रकारें विरूढ झालीं आहेत-विरोहास प्राप्त झालीं आहेत-फार खोल गेलीं आहेत त्या या सुविरूढमूल अश्वत्थाला—**असङ्गशस्त्रेण-असङ्गः-पुत्रवित्तलो-कैषणादिभ्यः व्युत्थानं तेन असङ्गशस्त्रेण**—असंगशास्त्राने असंग म्ह० पुत्र, वित्त, व लोक या तीन एषणादिकांपासून व्युत्थान करणे म्ह० वैराग्यपूर्वक पारिव्राज्य स्वीकारणें, त्या असंगशस्त्राने ( त्याचेंच विशेषण-)—**दृढेन-परमात्माभिमुख्य-निश्चयदृढीकृतेन पुनः पुनर्विवेकाभ्यास-अश्मनिशितेन (असंगशस्त्रेण)**—दृढ म्ह० परमात्म्याच्या अभिमुख होण्याविषयींचा जो निश्चय त्यानें दृढ केलेल्या म्हणजेच पुनः पुनः विवेक करणें याच अभ्यासरूपी पाषाणावर धार लावून तीक्ष्ण केलेल्या असंगशस्त्रानें—**छित्त्वा-संसारवृक्षं सबीजं उद्धृत्य**—तोडून म्ह० या संसारवृक्षाला बीजासह वर उपटून काढून ( परमात्मपदाला जाणावे, असा पुढील श्लोकाशीं संबंध ) ३.

**तत इति । ततः पश्चात्पदं वैष्णवं तत्परिमार्गितव्यं परिमार्गणमन्वेषणं ज्ञातव्यमि-त्यर्थः । यस्मिन्पदे गताः प्रविष्टा न निवर्तन्ति नाऽऽवर्तन्ते भूयः पुनः संसाराय । कथं परिमार्गितव्यमित्याह तमेव च यः पदशब्देनोक्त आद्यमादौ भवं पुरुषं प्रपद्य इत्येवं परिमार्गितव्यं तच्छरणतयेत्यर्थः । कोऽसौ पुरुष इत्युच्यते यतो यस्मात्पुरुषात्संसारमा-यावृक्षप्रवृत्तिः प्रसृता निःसृतैन्द्रजालिकादिव माया पुराणी चिरंतनी ॥ ४ ॥**

**भाष्यार्थ—' ततः० ' इति**—संसारवृक्षाला उपटून काय करावें ते 'ततः०' या श्लोकानें सांगतात—**ततः-पश्चात्**—त्यानंतर-त्या संसारवृक्षाला वैराग्यपूर्वक पारि-व्राज्य या दृढ असंगशस्त्रानें तोडून मग—**तत् वैष्णवं पदं परिमार्गितव्यं-परि-मार्गणं-अन्वेषणं-ज्ञातव्यं इत्यर्थः**—त्या वैष्णव पदाचे परिमार्गण करावें, परिमार्गण म्ह० अन्वेषण-शोध करणें, हुडकणें, त्याला जाणावें, असा याचा भावार्थ. (तें पद कोणतें ? कीं ज्याचा शोध करून जाणावें, म्हणून म्हणतां ? उत्तर-)—**यस्मिन्-पदे गताः-प्रविष्टाः भूयः-पुनः संसाराय न निवर्तन्ति-न आवर्तन्ते**—ज्या पदामध्यें गेलेले-प्रविष्ट झालेले ज्ञानी पुनरपि संसारासाठीं निवृत्त होत नाहींत-पुनः जन्म घेत नाहींत.—**कथं परिमार्गितव्यं इति आह**—त्याचें परिमार्गण-शोध कसा करावा, तें भगवान् सांगतात—**यः पदशब्देन उक्तः तं एव आद्यं-आदौ भवं आद्यं पुरुषं प्रपद्ये इति एवं परिमार्गितव्यं**—जो ' पद ' या शब्दानें वर सांगितला

गेलेला त्याच आद्य म्ह० आरंभीं असलेला म्हणून आद्य, व ज्यानें हें सर्व परिपूर्ण आहे किंवा शरीरपुरांत राहणारा, म्हणून पुरुष, अशा त्याच आद्य पुरुषाला मी शरण गेलों आहें, या प्रकारें त्याचेंच परिमार्गण करावे,—**तच्छरणतया इत्यर्थः**—त्या पुरुषाला शरण होऊन-त्याचाच अनन्यमनानें आश्रय करून त्याचा शोध करावा व त्याला जाणावें, असा याचा भावार्थ.—**कः असौ पुरुषः इति उच्यते**—तो पुरुष कोण, तें सांगितले जातें—**यतः-यस्मात् पुरुषात् ऐन्द्रजालिकात् माया इव पुराणी-चिरंतनी संसारमायावृक्षप्रवृत्तिः प्रसृता-निःसृता**—ज्या पुरुषापासून ऐंद्रजालिकापासून-गारुड्यापासून जशी माया त्याप्रमाणे ही पुराणी-सनातन-चिरंतन संसारमायावृक्षाची प्रवृत्ति पसरली, निघालेली आहे. [ ज्याच्यापासून या सनातन संसारवृक्षाचा आरंभ झाला आहे त्या आद्य पुरुषाला मी शरण आहें, अशा भावनेने त्या पदाचा शोध करावा व त्याला जाणावे. ] ४

**निर्मानमोहा जितसङ्गदोषा अध्यात्मनित्या विनिवृत्तकामाः।**
**द्वन्द्वैर्विमुक्ताः सुखदुःखसंज्ञैर्गच्छन्त्यमूढाः पदमव्ययं तत् ५**

**अन्वयार्थ—निर्मानमोहाः**—ज्यांच्यापासून मान म्ह० अहंकार-गर्व व मोह म्ह० अविवेक हे दोन्ही दोष निघून गेले आहेत—**जितसङ्गदोषाः**—संग म्ह० आसक्ति हाच दोष ज्यांनी जिंकला आहे—**अध्यात्मनित्याः**—परमात्म्याचें स्वरूप पाहण्यामध्यें जे तत्पर आहेत—**विनिवृत्तकामाः**—ज्यांचे सर्व काम विशेषतः निवृत्त झाले आहेत—**सुखदुःखसंज्ञैः द्वंद्वैः**—सुख व दुःख या नांवाच्या द्वंद्वांनीं ज्यांना—**विमुक्ताः**—सर्वथा सोडलें आहे, असे—**अमूढाः**—विवेकी-अनादि अज्ञानरहित—**तत् अव्ययं पदं**—त्या अव्यय पदाला—**गच्छन्ति**—प्राप्त होतात. ५.

**कथंभूतास्तत्पदं गच्छन्तीत्युच्यते—निर्मानमोहा मानश्च मोहश्च मानमोहौ तौ निर्गतौ येभ्यस्ते निर्मानमोहा मानमोहवर्जिता जितसङ्गदोषाः सङ्ग एव दोषः सङ्गदोषो जितः सङ्गदोषो यैस्ते जितसङ्गदोषा अध्यात्मनित्याः परमात्मस्वरूपालोचननित्यास्तत्परा विनिवृत्तकामा विशेषतो निर्लेपेन निवृत्ताः कामा येषां ते विनिवृत्तकामा यतयः संन्यासिनो द्वंद्वैः प्रियाप्रियादिभिर्विमुक्ताः सुखदुःखसंज्ञैः परित्यक्ता गच्छन्त्यमूढा मोहवर्जिताः पदमव्ययं तद्यथोक्तम् ॥ ५ ॥**

**भाष्यार्थ—कथंभूताः तत् पदं गच्छन्ति इति उच्यते**—कशा प्रकारचे, कोणत्या अन्तरंग साधनांनीं संपन्न असलेले त्या पदाला प्राप्त होतात तें ' निर्मान० ' या श्लोकानें सांगितले जाते—**निर्मानमोहाः-मानः च मोहः च मानमोहौ तौ निर्गतौ येभ्यः ते निर्मानमोहाः-मानमोहवर्जिताः**—निर्मानमोह-मान-अहंकार व मोह-अविवेक ते मानमोह, ते मानमोह ज्यांच्यापासून निघून गेले आहेत ते निर्मानमोह-मानमोहरहित,—**जितसङ्गदोषाः-सङ्गः एव दोषः सङ्गदोषः**

**जितः सङ्गदोषः यैः ते जितसङ्गदोषाः**—जितसंगदोष–संग हाच दोष, तो संगदोष. ज्यांनीं संगदोष जिकला आहे ते जितसंगदोष होत,—[ शत्रु व मित्र संनिध आले तरी द्वेष-प्रीतिरहित ]—**अध्यात्मनित्याः-परमात्मस्वरूप-आलोचन-नित्याः-तत्पराः**—अध्यात्मनित्य–परमात्मस्वरूपाच्या आलोचनामध्ये नित्य म्ह० तत्पर झालेले–परमात्मस्वरूपदर्शनांत सतत गढून गेलेले–[ श्रवण-मननादिकांत तत्पर झालेले ]—**विनिवृत्तकामाः-विशेषतः निर्लेपेन निवृत्ताः कामाः येषां ते विनिवृत्तकामाः**—विनिवृत्तकाम–विशेषतः–निर्लेपानें–वासनासह ज्यांचे काम–विषयेच्छा निवृत्त झाल्या आहेत ते विनिवृत्तकाम—**यतयः-संन्यासिनः**—असे यति-संन्यासी—**द्वंद्वैः-सुखदुःखसंज्ञैः-प्रियाप्रियादिभिः विमुक्ताः-परित्यक्ताः अमूढाः-मोहवर्जिताः तत् यथोक्तं अव्ययं पदं गच्छन्ति**—सुखदुःखसंज्ञक प्रिय-अप्रिय, त्यांचे हेतु इत्यादि द्वंद्वांकडून विमुक्त–परित्याग केले गेलेले, [ सुखदुःखादि द्वंद्वरहित] अमूढ म्ह० मोहवर्जित–ज्यांना सम्यग्ज्ञान झालें आहे असे यति, त्या यथोक्त अव्यय पदाला प्राप्त होतात. ५

**न तद्भासयते सूर्यो न शशांको न पावकः ।**
**यद्गत्वा न निवर्तन्ते तद्धाम परमं मम ॥ ६ ॥**

**अन्वयार्थ—सूर्यः**—सूर्य—**तत्**—त्या तेजोरूप पदाला—**न भासयते**—प्रकाशित करीत नाहीं.—**शशांकः न**—चंद्र त्याला प्रकाशित करीत नाहीं—**पावकः न**—अग्नि त्याला प्रकाशित करीत नाहीं—**यत्**—ज्याला—**गत्वा**—प्राप्त होऊन (यति)—**न निवर्तन्ते**—संसारात परत येत नाहीत—**तत्**—तें—**मम**—माझें—**परमं**—परम–श्रेष्ठ—**धाम**—पद–स्वरूप–तेज आहे. ६.

**तदेव पदं पुनर्विशिष्यते—तद्धामेति व्यवहितेन धाम्ना संबन्धः। धाम तेजोरूपं पदं न भासयते सूर्य आदित्यः सर्वावभासनशक्तिमत्त्वेऽपि सति । तथा न शशाङ्कश्चन्द्रो न पावको नाग्निरपि । यद्धाम वैष्णवं पदं गत्वा प्राप्य न निवर्तन्ते यच्च सूर्यादिर्न भासयते तद्धाम पदं परमं मम विष्णोः ॥ ६ ॥**

**भाष्यार्थ—तत् एव पदं पुनः विशिष्यते**—त्याच पदाचें पुनः विशेष वर्णन करितात—**तत् धाम इति व्यवहितेन धाम्ना संबन्धः**—'तें धाम' असा 'तत्' या पदाचा पुढील ' धाम ' शब्दाशीं संबंध—**सूर्यः-आदित्यः सर्वावभासनशक्तिमत्त्वे अपि सति तत् धाम-तेजोरूपं पदं न भासयते**—सूर्य म्ह० आदित्य सर्वाला प्रकाशित करण्याच्या शक्तीनें युक्त असतांनाहि–सर्वांना प्रकाशित करण्याचें सामर्थ्य असूनहि त्या धामाला–तेजोरूप पदाला प्रकाशित करीत नाहीं.—**तथा न शशाङ्कः-चन्द्रः न पावकः-न अग्निः अपि**—त्याचप्रमाणें शशांक म्ह० चंद्र प्रकाशित करीत नाहीं व पावक म्ह० अग्नि त्या तेजोरूप पदाला प्रकाशित करीत

नाहीं.—**यत् धाम-वैष्णवं पदं गत्वा-प्राप्य न निवर्तन्ते**—ज्या धामाला म्ह० वैष्णव पदाला प्राप्त होऊन ज्ञानी परत फिरत नाहीत-संसारमार्गांत येत नाहींत—**च यत् सूर्यादिः न भासयते तत् मम-विष्णोः परमं धाम पदं**—तें मज व्यापक परमात्म्याचें परमधाम-पद आहे. ६

**ममैवांशो जीवलोके जीवभूतः सनातनः ।**
**मनःषष्ठानीन्द्रियाणि प्रकृतिस्थानि कर्षति ॥ ७ ॥**

**अन्वयार्थ—जीवलोके**—या जीवलोकांत म्ह० संसारांत—**जीवभूतः**—कर्ता-भोक्ता म्हणून प्रसिद्ध असलेला—**मम एव**—माझाच—**सनातनः**—पुरातन—**अंशः(अस्ति)**—अंश आहे.—**(सः)**—तो जीवभूत माझा अंश—**प्रकृतिस्थानि**—आपापल्या कर्णादिक प्रकृतींत स्थित असलेल्या—**मनःषष्ठानि इंद्रियाणि**—मनासह सहा इंद्रियांना—**कर्षति**—आकर्षण करतो. ७.

**यद्गत्वा न निवर्तन्त इत्युक्तम् । ननु सर्वा हि गतिरागत्यन्ता संयोगा विप्रयोगान्ता इति हि प्रसिद्धं कथमुच्यते तद्धामगतानां नास्ति निवृत्तिरिति, शृणु तत्र कारणम्—ममैव परमात्मनोऽंशो भागोऽवयव एकदेश इत्यनर्थान्तरं जीवलोके जीवानां लोके संसारे जीवभूतो भोक्ता कर्तेति प्रसिद्धः सनातनः । यथा जलसूर्यकः सूर्यांशो जलनिमित्तापाये सूर्यमेव गत्वा न निवर्तते तथाऽयमप्यंशस्तेनैवाऽऽत्मना संगच्छत्येवमेव यथा वा घटाद्युपाधिपरिच्छिन्नो घटाद्याकाश आकाशांशः सन्घटादिनिमित्तापाय आकाशं प्राप्य न निवर्तत इत्येवमत उपपन्नमुक्तं यद्गत्वा न निवर्तन्त इति ॥**

**भाष्यार्थ—यत् गत्वा न निवर्तन्ते इति उक्तं**—ज्या पदाला प्राप्त होऊन ज्ञानी निवृत्त होत नाहींत, असें सांगितलें—**ननु सर्वा हि गतिः आगत्यन्ता**—पण सर्व गति आगत्यन्त असते. म्ह० कोणतीहि गति आगतिपर्यंत असते. गतीचें पर्यवसान आगतीत होतें. ( याविषयीं लोकप्रसिद्धीचे प्रमाण देतात- )—' **संयोगाः विप्रयोगान्ताः** ' **इति हि प्रसिद्धं**—संयोग विप्रयोगान्त असतात-संयोगाचे पर्यवसान वियोगांत होतें, हें तर सुप्रसिद्ध आहे. अर्थात् जर त्या पदी गमन होत आहे तर तेथून आगमनहि अवश्य होईल. असें असतांना—**तद्धामगतानां निवृत्तिः नास्ति इति कथं उच्यते**—'त्या धामास-पदास प्राप्त झालेल्यांची निवृत्ति होत नाहीं,' असें कसें सांगितलें जात आहे ?—**इति शृणु तत्र कारणं**—असें जर म्हणशील तर त्याचें कारण ऐक-भगवत्प्राप्ति तशी निवृत्त्यन्त नाहीं, याचें कारण सांगतों.—**मम एव-परमात्मनः अंशः-भागः-अवयवः-एकदेशः इति अनर्थान्तरं**—माझाच-परमात्म्याचा अंश, अंश-भाग, अवयव, एकदेश या सर्व शब्दांचा अर्थ निरनिराळा नाहीं, एकच आहे.—**जीवलोके-जीवानां लोके-संसारे**—जीवलोकीं-जीवांच्या लोकीं-संसारांत—**जीवभूतः-भोक्ता कर्ता इति प्रसिद्धः**

**सनातनः**—जीवभूत-भोक्ता, कर्ता, म्हणून प्रसिद्ध असलेला सनातन आहे [ माझाच अंश या जीवलोकांत कर्ता भोक्ता जीव आहे. जीव परमेश्वराचाच जरी अंश असला तरी तेवढयानें परमेश्वराला प्राप्त झालेले पुनः संसारमार्गात परत येत नाहींत, हें कसें सिद्ध होतें ? उत्तर-]—**यथा जलसूर्यकः-सूर्यांशः जलनिमित्तापाये सूर्यं एव गत्वा न निवर्तते**—जसें-जलांत पडलेलें सूर्याचे प्रतिबिंब हा सूर्याचाच अंश असतो व जल या निमित्ताच्या अभावीं तो सूर्यालाच प्राप्त होऊन पुनः परत येत नाहीं—**तथा अयं अपि अंशः तेन एव आत्मना संगच्छति एवं एव**—तसाच हाहि जीवभूत अंश त्याच आत्म्याशीं जाऊन मिळतो व त्याच न्यायाने तो पुनः परत येत नाहीं. [ याप्रमाणें जीव हें परमात्म्याचे प्रतिबिंब आहे, यापक्षीं दृष्टान्त देऊन अवच्छेदपक्षाचा आश्रय करून दुसरा दृष्टान्त देतात- ]—**यथा वा घटादि-उपाधिपरिच्छिन्नः घटादि-आकाशः आकाशांशः सन् घटादिनिमित्तापाये आकाशं प्राप्य न निवर्तते इति एवं**—किंवा ज्याप्रमाणे घटादि-उपाधींनी परिच्छिन्न झालेले घटादि-आकाश आकाशाचा अंशच असून घटादिनिमित्ताचा नाश झाला असतां आकाशास प्राप्त होऊन निवृत्त होत नाही, या दृष्टान्ताप्रमाणे तो जीवभूत अंश परमात्म्यास प्राप्त होऊन संसारांत परत येत नाहीं.—**अतः ' यद्गत्वा न निवर्तन्ते ' इति उपपन्नं उक्तं**—यास्तव ज्याला प्राप्त होऊन पुनः संसारात निवृत्त होत नाहीत, असें योग्यच म्हटलें आहे.

**ननु निरवयवस्य परमात्मनः कुतोऽवयव एकदेशोंऽश इति। सावयवत्वे च विनाशप्रसङ्गोऽवयवविभागात् । नैष दोषोऽविद्याकृतोपाधिपरिच्छिन्न एकदेशोंऽश इव कल्पितो यतः । दर्शितश्चायमर्थः क्षेत्राध्याये विस्तरशः । स च जीवो मदंशत्वेन कल्पितः कथं संसरत्युत्क्रामति चेत्युच्यते मनःषष्ठानीन्द्रियाणि श्रोत्रादीनि प्रकृतिस्थानि स्वस्थाने कर्णशष्कुल्यादौ प्रकृतौ स्थितानि कर्षत्याकर्षति ॥ ७ ॥**

**भाष्यार्थ—ननु निरवयवस्य परमात्मनः अवयवः एकदेशः अंशः कुतः इति**—अहोपण, निरवयव परमात्म्याला अवयव, एकदेश, अंश इत्यादि कोठचा ? —**च सावयवत्वे अवयवविभागात् विनाशप्रसंगः**—बरें, त्याला सावयव म्हणावें तर अवयवांच्या विभागामुळें त्याच्या विनाशाचा प्रसंग येतो-कारण कोणताहि सावयव पदार्थ नित्य नसतो, विनाशी असतो. त्यामुळें त्याला सावयत्वाहि नाहीं. [परमेश्वर वस्तुतः निरंश जरी असला तरी जीव हा त्याचा काल्पनिक अंश आहे, असा परिहार करितात-]—**एषः दोषः न**—हा दोष येत नाही.—**यतः अविद्याकृत-उपाधिपरिच्छिन्नः एकदेशः अंशः इव कल्पितः**—ज्याअर्थी अविद्याकृत उपाधीनें परिच्छिन्न झालेला एकदेश अंशासारखा कल्पिलेला आहे [ त्याअर्थी हा दोष येत नाही. जीव हा परमात्म्यांचा वास्तविक अंश नव्हे. ]—**च अयं अर्थः क्षेत्राध्याये विस्तरशः दर्शितः**—आणि हा अर्थ क्षेत्राध्यायामध्यें सविस्तर प्रदर्शित केला आहे. ( यावर पुनः शंका-) —**सः च मदंशत्वेन कल्पितः जीवः कथं सं-**

**सरति उत्क्रामति च इति उच्यते**—आणि तो माझ्या अंशत्वानें कल्पिलेला जीव ( वस्तुतः तद्रूप असल्यामुळें ) संसार कसा करितो व शरीर सोडून कसा जातो ? असें विचारशील तर जीवाचें संसरण व उत्क्रमण कसें होतें तेच उत्तरार्धानें सांगितलें जातें. **—मनःषष्ठानि श्रोत्रादीनि इन्द्रियाणि प्रकृतिस्थानि-स्वस्थाने-कर्णशष्कुल्यादौ प्रकृतौ स्थितानि कर्षति-आकर्षति**—तो सनातन जीवभूत माझा अंश मन हें ज्यांतील सहावे आहे अशा श्रोत्रादि पाच ज्ञानेंद्रियांना कीं जीं इन्द्रियें प्रकृतिस्थ -स्वस्थानामध्यें स्थित-कानांचें छिद्र वगैरे, या प्रकृतींत स्थित असतात त्या इंद्रियांना आकर्षण करतो. ७.

**शरीरं यदवाप्नोति यच्चाप्युत्क्रामतीश्वरः ।**
**गृहीत्वैतानि संयाति वायुर्गन्धानिवाशयात् ॥ ८ ॥**

**अन्वयार्थ—यत् च अपि**—आणि ज्या वेळीं—**ईश्वरः**—तो ईश्वर—**उत्क्रामति**—शरीर सोडून जातो व—**यत्**—जेव्हां—**शरीरं**—शरीराला—**अवाप्नोति** प्राप्त होतो—**( तदा )**—त्यावेळीं—**एतानि**—या मनासह सहा इंद्रियांना—**गृहीत्वा** —घेऊन—**वायुः**—वारा—**आशयात्**—पुष्पादिकांपासून—**गंधान् इव**—गंधांना घेऊन जसा जातो तसा (तो)—**संयाति**—जातो. ८.

**कस्मिन्काले—यच्चापि यदा चाप्युत्क्रामतीश्वरो देहादिसंघातस्वामी जीवस्तदा कर्षतीति श्लोकस्य द्वितीयपादोऽर्थवशात्प्राथम्येन संबध्यते । यदा च पूर्वस्माच्छरीराच्छरीरान्तरमाप्नोति तदा गृहीत्वैतानि मनःषष्ठानीन्द्रियाणि संयाति सम्यग्याति गच्छति । किमिवेत्याह वायुः पवनो गन्धानिवाऽऽशयात्पुष्पादेः ॥ ८ ॥**

**भाष्यार्थ—कस्मिन् काले**—स्वस्थानीं-आपल्या प्रकृतींत स्थित असलेल्या इंद्रियांचें आकर्षण जीव केव्हां करितो तें पुढील श्लोकांत सांगतात—**यत् च अपि-यदा च अपि ईश्वरः-देहादिसंघातस्वामी जीवः उत्क्रामति तदा कर्षति**— आणि ज्यावेळीं ईश्वर-शरीरेंद्रियादिसंघाताचा स्वामी जीव शरीरांतून वर निघून जातो-शरीर सोडतो तेव्हां त्या इन्द्रियाचें आकर्षण करितो—**इति श्लोकस्य द्वितीयपादः अर्थवशात् प्राथम्येन संबध्यते**—याप्रमाणें श्लोकाचा दुसरा पाद अर्थवशात् प्रथमत्वानें संबद्ध होतो. शरीर सोडल्यानंतरच गतीचा संभव असणें, या अर्थाकडे दृष्टि देऊन दुसरा पाद ‘ कर्षति ’ या क्रियापदाशीं अगोदर संबद्ध होतो.—**च यदा पूर्वस्मात् शरीरात् शरीरान्तरं आप्नोति तदा एतानि मनःषष्ठानि इंद्रियाणि गृहीत्वा संयाति-सम्यक् याति-गच्छति**—आणि जेव्हां पूर्वशरीरापासून दुसऱ्या शरीरास प्राप्त होतो तेव्हां हीं मनासह सहा इन्द्रियें घेऊन उत्तमरीतीनें जातो. **—किं इव इति अतः आह**—कोणाप्रमाणें असें कोणी विचारील, म्हणून भगवान् दृष्टान्त सांगतात.—**वायुः-पवनः पुष्पादेः-आशयात् गन्धान् इव**—वायु म्ह॰

पवन पुष्पादि अधिष्ठानांतून सुवासांना घेऊन जसा जातो त्याप्रमाणें माझा अंश मनासह श्रोत्रादि इंद्रियांना आकर्षण करून घेऊन जातो. ८.

**श्रोत्रं चक्षुः स्पर्शनं च रसनं घ्राणमेव च ।**
**अधिष्ठाय मनश्चायं विषयानुपसेवते ॥ ९ ॥**

**अन्वयार्थ**—**अयं**—हा जीव—**श्रोत्रं**—ऐकण्याचें साधन,—**चक्षुः**—पाहण्याचें साधन,—**स्पर्शनं**—स्पर्श जाणण्याचें साधन,—**रसनं**—रस चाखण्याचें साधन,—**च**—आणि—**घ्राणं एव च**—वास घेण्याचें साधन—**मनः च अधिष्ठाय**—आणि त्या पांची इंद्रियांशी संबद्ध होणारें मन, यांचा अधिष्ठाता होऊन—**विषयान्**—शब्दादि विषयांचें—**उपसेवते**—सेवन करतो-उपभोग घेतो. ९.

कानि पुनस्तानीति— **श्रोत्रं चक्षुः स्पर्शनं च त्वगिन्द्रियं रसनं घ्राणमेव च मनश्च षष्ठं प्रत्येकमिन्द्रियेण सहाधिष्ठाय देहस्थो विषयाञ्शब्दादीनुपसेवते ॥ ९ ॥**

**भाष्यार्थ**—**कानि पुनः तानि इति**—तीं ' मनःषष्ठानि ' इन्द्रियें कोणतीं ? तें ' श्रोत्रं० ' या श्लोकाने सांगतात—**श्रोत्रं, चक्षुः, स्पर्शनं च त्वगिन्द्रियं रसनं घ्राणं एव च**—श्रोत्र श्रवणेंद्रिय, चक्षु, स्पर्शन म्ह० त्वगिंद्रिय, रसन व घ्राण—**च षष्ठं मनः प्रत्येकं इन्द्रियेण सह अधिष्ठाय**—व सहावें मन याचा प्रत्येक इन्द्रियासह अधिष्ठाता होऊन—**देहस्थः, शब्दादीन् विषयान् उपसेवते**—देहस्थ जीवभूत ईशांश शब्दादिविषयांचें उपसेवन करतो-विषयोपभोग घेतो ९.

**उत्क्रामन्तं स्थितं वाऽपि भुंजानं वा गुणान्वितम् ।**
**विमूढा नानुपश्यन्ति पश्यन्ति ज्ञानचक्षुषः ॥ १० ॥**

**अन्वयार्थ**—**उत्क्रामन्तं**—देहापासून निघून जाणाऱ्या—**अपि वा**—किंवा—**स्थितं**—देहांत असलेल्या—**भुंजानं**—शब्दादि विषयांचा उपभोग घेणाऱ्या—**वा**—किंवा—**गुणान्वितं**—सुख दुःख मोहसंज्ञक गुणांनीं युक्त असलेल्या या जीवाला—**विमूढाः**—नानाप्रकारें मूढ झालेले जन—**न अनुपश्यन्ति**—पहात नाहींत.—**ज्ञानचक्षुषः**—ज्ञानदृष्टि जन—**पश्यन्ति**—पाहतात. १०.

**एवं देहगतं देहात्— उत्क्रामन्तं परित्यजन्तं देहं पूर्वोपात्तं स्थितं वा देहे तिष्ठन्तं भुञ्जानं वा शब्दादींश्चोपलभमानं गुणान्वितं सुखदुःखमोहाद्यैर्गुणैरन्वितमनुगतं संयुक्तमित्यर्थः । एवंभूतमप्येनमत्यन्तदर्शनगोचरप्राप्तं विमूढा दृष्टादृष्टविषयभोगबलाकृष्टचेतस्तयाऽनेकधा मूढा नानुपश्यन्त्यहो कष्टं वर्तत इत्यनुक्रोशति च भगवान् । ये तु पुनः प्रमाणजनितज्ञानचक्षुषस्ते एनं पश्यन्ति ज्ञानचक्षुषो विविक्तदृष्टय इत्यर्थः ॥१०॥**

**भाष्यार्थ**—( आठव्या श्लोकांत आत्मा देहाहून अतिरिक्त-भिन्न आहे, असे सांगून ९ व्या श्लोकांत तो श्रोत्रादि इन्द्रियांना आपल्या इष्ट असलेल्या विषयांत प्रेरणा कर-

फार असल्यामुळें त्याहूनहि अतिरिक्त आहे हें सांगितलें. पण मग स्वरूपभूत असलेला आत्मा उत्क्रमणादि करीत असतांना सर्वांना दिसत कसा नाहीं? उत्तर-)—**एवं देहगतं देहात् उत्क्रामन्तं-पूर्वोपात्तं देहं परित्यजन्तं**—याप्रमाणे देहांत असलेल्या, देहापासून उत्क्रमण करणाऱ्या-पूर्वी संपादन केलेल्या देहाचा परित्याग करणाऱ्या—**वा स्थितं-देहे तिष्ठन्तं**--किंवा स्थित-देहांत राहणाऱ्या—**वा भुंजानं-शब्दादीन् च उपलभमानं**—किंवा भोग घेणाऱ्या-शब्दादि विषयांचा अनुभव घेणाऱ्या—**गुणान्वितं-सुख-दुःख-मोहाख्यैः गुणैः अन्वितं-अनुगतं-संयुक्तं इत्यर्थः**—गुणान्वित असलेल्या-सुख,दुःख,मोह या नांवाच्या गुणांनीं अन्वित-अनुगत संयुक्त असलेल्या असा याचा भावार्थ.—**एवंभूतं अपि एनं अत्यंतगोचरप्राप्तं**—अशा प्रकारच्या म्ह० अत्यंत समीप असल्यामुळें सर्वथा दर्शनविषयास प्राप्त झालेल्या-दर्शनयोग्य असलेल्याहि याला—**विमूढाः-दृष्टादृष्टविषयभोगबलाकृष्टचेतस्तया अनेकधा मूढाः न अनुपश्यन्ति**—विमूढ म्ह० दृष्ट-ऐहिक किंवा प्रत्यक्ष व अदृष्ट-पारलौकिक-अप्रत्यक्ष-परोक्ष विषयांच्या भोगबलाने चित्त आकृष्ट झाल्यामुळे-चित्त विषयपरवश झाल्यामुळें अनेक प्रकारें मूढ झालेले लोक ( अशा या आत्म्याला ) पहात नाहींत.—**अहो कष्टं वर्तते इति च अनुक्रोशति भगवान्**—अरेरे फार वाईट आहे, मोठी दुःखाची गोष्ट आहे, अशी भगवान् मूढांविषयीं दया प्रकट करितात.—**तु पुनः ये प्रमाणजनितज्ञानचक्षुषः ते एनं पश्यन्ति**—पण याच्या उलट जे महावाक्यादि प्रमाणापासून उत्पन्न झालेल्या ज्ञानदृष्टीने युक्त असतात ते ज्ञानचक्षु विद्वान् याला पाहतात.—**ज्ञानचक्षुषः-विविक्तदृष्टयः इत्यर्थः**—ज्ञानचक्षु म्ह० ज्यांची दृष्टि विविक्त-अत्यंत शुद्ध-विवेक करण्यास समर्थ असते-ते ज्ञानचक्षु होत, असा याचा भावार्थ. १०.

**यतन्तो योगिनश्चैनं पश्यन्त्यात्मन्यवस्थितम् ।**
**यतन्तोऽप्यकृतात्मानो नैनं पश्यन्त्यचेतसः ॥ ११ ॥**

**अन्वयार्थ—यतन्तः**—यत्न करणारे—**योगिनः**—योगी—**एनं**— याला—**आत्मनि**—बुद्धींत—**अवस्थितं**—असलेला—**पश्यन्ति**—पाहतात. पण—**यतन्तः**

१ ' भुजानं वा गुणान्वित ' याचा अर्थ रहस्यकार-" गुणांनी युक्त होऊन ( स्वतः नव्हे ) उपभोग घेणारास " असा करितात. म्ह० ' गुणान्वित भुजान ' असा संबंध लावितात; पण 'भुजानं ' याप्रमाणेच ' गुणान्वितं ' हेंहि जीवभूत अंशाचे विशेषण असल्यामुळें तसा अर्थ करितां येत नाहीं. आचार्यांनीं केलेला अर्थच बरोबर आहे. ' गुणान्वितं ' हें पुल्लिंगी द्वितीयान्त पद आहे. त्याचा 'गुणांनीं युक्त होऊन ' असा अर्थ होऊच शकत नाहीं. शिवाय जीवभूत अंश जर इंद्रियांचें आकर्षण, शरीरांतून उत्क्रमण व शरीरांत स्थिति करूं शकतो तर 'स्वतः' भोगच तेवढा कां घेऊ शकणार नाहीं? त्याला कांही विशेष कारण आहे का? जीवच भोक्ता आहे, याला श्रुतिस्मृतिप्रमाण आहे. ' आत्मेंद्रियमनोयुक्तं भोक्तेत्याहुर्मनीषिणः' शरीर, इंद्रियें व मन यांनी युक्त असलेल्या आत्म्याला विवेकी भोक्ता म्हणतात ( काठक भाष्यार्थ पृ. अ. १-३, ४, पृ. ७४. )

**अपि**—यत्न करणारेहि—**अकृतात्मानः**—असंस्कृतचित्त—**अचेतसः**—अविवेकी पुरुष—**एनं**—या आत्म्याला—**न पश्यन्ति**—पहात नाहीं. ११.

**केचित्तु— यतन्तः प्रयत्नं कुर्वन्तो योगिनश्च समाहितचित्ता एनं प्रकृतमात्मानं पश्यन्त्ययमहमस्मीत्युपलभन्त आत्मनि स्वस्यां बुद्धाववस्थितं यतन्तोऽपि शास्त्रादिप्रमाणैरकृतात्मानोऽसंस्कृतात्मानस्तपसेन्द्रियजयेन च दुश्चरितादनुपरता अशान्तदर्पात्मानः प्रयत्नं कुर्वन्तोऽपि नैवं पश्यन्त्यचेतसोऽविवेकिनः ॥ ११ ॥**

**भाष्यार्थ**—( वर ज्ञानचक्षुःशब्दानें न्यायानुग्रहीत शास्त्र हें ज्ञानाचें साधन सांगितलें. तर मग काय न्यायाने युक्त असलेल्या केवल शास्त्राने आत्मसाक्षात्कार होईल ? उत्तर-)—**केचित् तु यतन्तः प्रयत्नं कुर्वन्तः च योगिनः-समाहितचित्ताः**—कित्येक-कांही थोडा यत्न करणारे-श्रवण-मननरूप प्रयत्न करणारे व योगी म्ह०ज्यांचें चित्त समाहित झाले आहे असे—**एनं प्रकृतं आत्मानं पश्यन्ति-अयं अहं अस्मि इति उपलभन्ते**—या प्रकृत आत्म्याला पाहतात-हा मी आहें, असा अनुभव घेतात.—**आत्मनि-स्वस्यां बुद्धौ अवस्थितं**—आत्म्यामध्यें म्ह० स्वतःच्या बुद्धीमध्यें अवस्थित असलेल्या या प्रकृत आत्म्याला [ श्रवण-मननादि यत्न करणारे व शांतचित्त योगी ' हा मी ' असा या बुद्धिस्थ आत्म्याचा अनुभव घेतात-]—**शास्त्रादिप्रमाणैः यतन्तः अपि अकृतात्मानः-तपसा च इन्द्रियजयेन असंस्कृतात्मानः**—शास्त्रादिप्रमाणांनीं यत्न करणारेहि कृतात्मे म्ह० सतराव्या अध्यायांत सांगितलेल्या सात्त्विक तपानें व इंद्रियजयानें ज्यांच्या अन्तःकरणाला संस्कार झालेला नाही-ज्यांचें चित्त शुद्ध झालेलें नाही—**दुश्चरितात् अनुपरताः-अशांतदर्पात्मानः**—दुश्चरितापासून-दुराचरणापासून विरत न झालेले-दुराचरणाचा त्याग न केलेले व त्यामुळे ज्यांच्या चित्तांतील दर्प शांत झालेला नाहीं असे—**अचेतसः-अविवेकिनः प्रयत्नं कुर्वन्तः अपि एनं न पश्यन्ति**—अचेतस म्ह० अशुद्धचित्त अविवेकी श्रवणादि प्रयत्न जरी करीत असले तरी या आत्म्याला पहात नाहीत. [चित्तशुद्धीच्या अभावीं त्यांचा तो यत्न फुकट जातो. ] ११.

**यत्पदं सर्वस्यावभासकमप्यग्न्यादित्यादिकं ज्योतिर्नावभासयते यत्प्राप्ताश्च मुमुक्षवः पुनः संसाराभिमुखा न निवर्तन्ते यस्य च पदस्योपाधिभेदमनुविधीयमाना जीवा घटाकाशादय इवाऽऽकास्यांशास्तस्य पदस्य सर्वात्मत्वं सर्वव्यवहारास्पदत्वं च विवक्षुश्चतुर्भिः श्लोकैर्विभूतिसंक्षेपमाह भगवान्—**

---

१. रहस्यकार १०-११ श्लोकांवरील टीपेंत " १०-११ श्लोकांत ज्ञानचक्षूनें किंवा कर्मयोगमार्गानें आत्मज्ञान होतें, असे सांगून " वगैरे म्हणतात. ज्ञानचक्षूनें म्ह० कर्मयोग मार्गानें, हा अर्थ अश्रुतपूर्व आहे. कदाचित् 'योगिनः' या शब्दावरून तसा अर्थ खेंचून काढला असेल, पण तो अप्रासंगिक आहे.

**भाष्यार्थ**—(या पुढील चार श्लोकांचें तात्पर्य गतार्थाचा अनुवाद करून सांगतात-)—**यत् पदं सर्वस्य अवभासकं अपि अग्नि-आदित्यादिकं ज्योतिः न अवभासयते**—ज्या पदाला सर्वांना प्रकाशित करणारे असेहि अग्नि-आदित्यादिक ज्योति प्रकाशित करीत नाहींत—**च यत्प्राप्ताः मुमुक्षवः पुनः संसाराभिमुखाः न निवर्तन्ते**—आणि ज्याला प्राप्त झालेले मुमुक्षु पुनरपि संसारोन्मुख होऊन निवृत्त होत नाहींत—**च यस्य पदस्य उपाधिभेदं अनुविधीयमानाः जीवाः आकाशस्य घटाकाशादयः इव अंशाः**—आणि ज्या पदाचे देहादि-उपाधिभेदाच्या अनुसार स्वतः भिन्न भिन्न झालेले जीव आकाशाचे घटाकाशादिक जसे, तसे कल्पित अंश आहेत.—**तस्य पदस्य सर्वात्मत्वं सर्वव्यवहारास्पदत्वं विवक्षुः भगवान् चतुर्भिः श्लोकैः विभूतिसंक्षेपं आह**—त्या पदाचें सर्वात्मत्व व सर्वव्यवहारास्पदत्व -तें पदच सर्वांचा आत्मा आहे व सर्वव्यवहारांचा आधार आहे, असे सांगण्याची इच्छा करणारे भगवान् चार श्लोकांनीं विभूतीचा संक्षेप सांगतात-थोडक्यांत आपल्या विभूतीचें वर्णन करितात—

**यदादित्यगतं तेजो जगद्भासयतेऽखिलम् ।**
**यच्चन्द्रमसि यच्चाग्नौ तत्तेजो विद्धि मामकम् ॥१२॥**

**अन्वयार्थ**—**यत्**—जें—**आदित्यगतं**—आदित्यांतील—**तेजः**—तेज—**अखिलं जगत्**—सर्व जगाला—**भासयते**—प्रकाशित करतें—**यत्**—जें—**चंद्रमसि**—चंद्रामध्यें—**यत् च अग्नौ**—व जे अग्नीत तेज आहे—**तत्**—तें—**तेजः**—तेज—**मामकं**—माझें आहे असें—**विद्धि**—जाण. १२.

**यदादित्यगतमादित्याश्रयं किं तत्तेजो दीप्तिः प्रकाशो जगद्भासयते प्रकाशयत्यखिलं समस्तं यच्चन्द्रमसि शशभृति तेजोऽवभासकं वर्तते यच्चाग्नौ हुतवहे तत्तेजो विद्धि विजानीहि मामकं मदीयं मम विष्णोस्तज्ज्योतिः । अथवा यदादित्यगतं तेजश्चैतन्यात्मकं ज्योतिर्यच्चन्द्रमसि यच्चाग्नौ तत्तेजो विद्धि मामकं मदीयं मम विष्णोस्तज्ज्योतिः ॥**

**भाष्यार्थ**—( ब्रह्माचें जीवात्मत्वानें चिद्रूपत्व सांगून त्याच्या चैतन्याने आदित्यादिकांचें अवभासकत्व असल्यामुळेहि ब्रह्माला चिद्रूपत्व आहे, असें सांगतात- ) —**यत् आदित्यगतं-आदित्याश्रयं**—जे आदित्यगत म्ह० आदित्याचा आश्रय करून राहणारें—**किं तत् तेजः-दीप्तिः-प्रकाशः अखिलं-समस्तं जगत् भासयते-प्रकाशयति**—तें काय ? ते तेज म्ह० दीप्ति प्रकाश अखिल-समस्त जगाला भासवितो-प्रकाशित करतो—**यत् चन्द्रमसि-शशभृति, तेजः-अवभासकं**—जे चन्द्रामध्यें-शशधारकामध्यें अवभासक-प्रकाशित करणारें तेज आहे—**यत् च अग्नौ हुतवहे**—आणि जें तेज अग्नीमध्यें-हुतवहामध्यें आहे—**तत् तेजः मामकं-मदीयं-मम विष्णोः तत् ज्योतिः विद्धि-विजानीहि**—तें तेज माझें-मज विष्णूचें तें तेज-ती ज्योति आहे असें तूं जाण. [ आदित्यादिकांत स्थित असलेली ब्रह्म-

चैतन्यज्योतिच सर्वांना प्रकाशित करणारी आहे, असा याचा भावार्थ. किंवा सर्वज्ञत्वामुळें ब्रह्माला चिद्रूपत्व आहे, असें येथें विवक्षित आहे, असें दुसरें व्याख्यान करितात-]—**अथवा यद् आदित्यगतं तेजः चैतन्यात्मकं ज्योतिः यत् चन्द्रमसि यत् च अग्नौ**—किंवा जे आदित्यांतील तेज म्ह० चैतन्यात्मक ज्योति जें चंद्रामध्यें व अग्नीमध्ये—**तत् तेजः मामकं-मदीयं मम विष्णोः तत् ज्योतिः विद्धि**—तें तेज माझें-मज विष्णूची ती ज्योति आहे, असे तूं समज.

**ननु स्थावरेषु जङ्गमेषु च तत्समानं चैतन्यात्मकं ज्योतिस्तत्र कथमिदं विशेषणं यदादित्यगतमित्यादि । नैष दोषः । सत्त्वाधिक्यादाधिक्योपपत्तेः । आदित्यादिषु हि सत्त्वमत्यन्तप्रकाशमत्यन्तभास्वरमतस्तत्रैवाऽऽविस्तरां ज्योतिरिति तद्विशिष्यते, न तु तत्रैव तदधिकमिति । यथा हि लोके तुल्येऽपि मुखसंस्थाने न काष्ठकुड्यादौ मुखमाःविर्भवत्यादर्शादौ तु स्वच्छे स्वच्छतरे च तारतम्येनाऽऽविर्भवति तद्वत् ॥ १२ ॥**

भाष्यार्थ—( यावर आक्षेप-)—**ननु स्थावरेषु जङ्गमेषु च तत् चैतन्यात्मकं ज्योतिः समानं**—अहोपण, स्थावर व जंगम म्ह० स्थिर व चर प्राण्यांमध्यें म्ह० सर्वांत ती चैतन्यात्मक ज्योति सम-एकसारखीच आहे,—**तत्र 'यदादित्यगतं' इत्यादि विशेषणं कथं**—मग असें असतांना 'जे आदित्यामध्यें असलेलें' इत्यादि विशेषण त्याला का दिले आहे? [ तें जर सर्वांत आहे तर 'आदित्यगतं' इत्यादि विशेषणांनीं त्याला मर्यादित का केले आहे? ]—**एषः दोषः न**—हा कांहीं दोष नव्हे.—**सत्त्वाधिक्यात् आधिक्योपपत्तेः**—त्याचें सर्वत्र सत्त्व-अस्तित्व जरी असलें तरी जेथे त्याच्या सत्त्वाची अभिव्यक्ति अधिक होते, तेथें त्या आधिक्यामुळें त्याचें आधिक्य योग्यच आहे. ( या संक्षिप्त वाक्याचेच स्पष्टीकरण-)—**आदित्यादिषु हि सत्त्वं अत्यन्तप्रकाशं-अत्यन्तभास्वरं**—आदित्यादिकांतील त्याचे सत्त्व अत्यन्त प्रकाश-अत्यन्त भास्वर-दुसऱ्याला प्रकाशित करणारे आहे, हे प्रसिद्ध आहे—**अतः तत्र एव आविस्तरां ज्योतिः**—यास्तव त्यांतच ब्रह्मज्योति अत्यंत प्रकट झालेली आहे—**इति तत् विशिष्यते**—म्हणून तेथेच त्याला विशेषणानें विशिष्ट केलें आहे. —**तु तत्र एव तत् अधिकं न**—पण त्यांतच तें अधिक आहे, म्हणून नव्हे. [ चैतन्यज्योति सर्वत्र सम जरी असली तरी त्याची अभिव्यक्ति क्वचित्च होते. त्यामुळें विशेषण अनुपपन्न नाहीं, हें दृष्टान्तानें स्पष्ट करितात-]—**यथा हि लोके मुखसंस्थाने तुल्ये अपि काष्ठकुड्यादौ मुखं न आविर्भवति**—जसें व्यवहारांत मुखाचें सांनिध्य जरी एकसारखेच असलें तरी काष्ठ, भिंत इत्यादिकांत मुख आविर्भूत होत नाहीं, [ समोर असलेलेंहि मुख भिंत, लांकूड यांत प्रतिबिंबित होत नाहीं. ]—**तु आदर्शादौ स्वच्छे स्वच्छतरे च तारतम्येन आविर्भवति तद्वत्**—पण तेंच आरशासारख्या स्वच्छ व अधिक स्वच्छ पदार्थांत तारतम्यानें म्ह० न्यूनाधिकतेनें-कमी-अधिक आविर्भूत होतें, त्याप्रमाणें ब्रह्मचैतन्य स्वच्छ, स्वच्छतर, स्वच्छतम उपाधींत उत्तरोत्तर अधिक प्रकट होतें. १२.

**गामाविश्य च भूतानि धारयाम्यहमोजसा ।**
**पुष्णामि चौषधीः सर्वाः सोमो भूत्वा रसात्मकः॥१३॥**

**अन्वयार्थ—अहं**—मी—**गां**—पृथ्वींत—**आविश्य**—प्रवेश करून—**ओजसा**—बलानें-स्वसामर्थ्यानें—**भूतानि**—सर्व प्राण्यांना—**धारयामि**—धारण करतों. —**च**—त्याचप्रमाणें मी—**रसात्मकः**—रसरूप—**सोमः**—चंद्र—**भूत्वा**—होऊन—**सर्वाः ओषधीः**—सर्व औषधींना—**पुष्णामि**—पोसतों. १३.

किंच—गां पृथिवीमाविश्य प्रविश्य धारयामि भूतानि जगदहमोजसा बलेन यद्बलं कामरागविवर्जितमैश्वरं जगद्विधारणाय पृथिव्यां प्रविष्टं येन गुर्वी पृथिवी नाधः पतति न विदीर्यते च। तथा च मन्त्रवर्णः—" येन द्यौरुग्रा पृथिवी च दृढा " इति। " स दाधार पृथिवीम् " इत्यादिश्च । अतो गामाविश्य च भूतानि चराचराणि धारयामीति युक्तमुक्तम् । किंच पृथिव्यां जाता ओषधीः सर्वा व्रीहियवाद्याः पुष्णामि पुष्टिमती रसस्वादुमतीश्च करोमि सोमो भूत्वा रसात्मकः सोमः सर्वरसात्मको रसस्वभावः सर्वरसानामाकरः सोमः स हि सर्वा ओषधीः स्वात्मरसानुप्रवेशेन पुष्णाति ॥ १३ ॥

**भाष्यार्थ—किंच**—याहि कारणानें प्रकृत पदाला सर्वात्मत्व युक्तच आहे, असें ' गां० ' इत्यादि श्लोकानें सांगतात—**गां-पृथिवीं आविश्य-प्रविश्य अहं ओजसा-बलेन भूतानि-जगत् धारयामि**—पृथ्वींत प्रवेश करून मी बलानें भूतांना म्ह० जगाला धारण करितो.—**यत् ऐश्वरं कामरागविवर्जितं बलं जगद्विधारणाय पृथिव्यां प्रविष्टं**—जें ईश्वराचें कामरागरहित बळ जगाचें विशेषेंकरून धारण करण्यासाठीं पृथ्वीमध्यें प्रविष्ट झालें—**येन गुर्वी पृथिवी अधः न पतति च न विदीर्यते**—ज्याच्यायोगानें गुरु-भारी जड झालेली पृथिवी खालीं पडत नाहीं व विदीर्ण होत नाहीं, [ ईश्वर पृथिवीदेवतारूपानें पृथ्वींत प्रवेश करून भूतसंज्ञक सर्व जगत् आपल्या ऐश्वर बलानें धारण करितो, त्यामुळें अतिशय जड-भारी असलेली पृथ्वी विदीर्ण होऊन खालीं पडत नाहीं. याविषयीं प्रमाण-]—**तथा च मन्त्रवर्णः**—याविषयीं असा मंत्रवर्ण-अशी श्रुति प्रमाण आहे—" **येन द्यौः उग्रा पृथिवी च दृढा" इति**—ज्याच्यायोगानें द्युलोक उग्र व पृथिवी दृढ झाली आहे, असा मंत्रवर्ण आहे.—" **सः दाधार पृथिवीं०" इत्यादि च**—तो पृथिवीला धारण करिता झाला, इत्यादिहि मंत्रवर्ण आहे. [ पण ' हें सर्व वर्णन हिरण्यगर्भाचें आहे परमात्म्याचें नव्हे ' असें कोणी म्हणेल तर तें बरोबर नाहीं. कारण परब्रह्मच हिरण्यगर्भरूपानें अवस्थित झाल्यामुळें हा मंत्र परमात्मपर नाहीं, असें म्हणतां येत नाहीं. ]—**अतः गां आविश्य चरा-**

---

१. रहस्यकार 'ओजसा म्ह० तेजानें ' असें म्हणतात. पण येथें भूतांना धारण करण्याचा प्रसंग असल्यामुळें 'तेजानें ' हा अर्थ अयोग्य आहे. बलानेंच धारण करितां येतें तेजानें नाहीं. शिवाय 'ओजः' याचा बल हा प्रसिद्ध अर्थ असून 'तेज' हा अप्रसिद्ध अर्थ आहे.

**चराणि भूतानि धारयामि इति युक्तं उक्तं**—यास्तव पृथ्वींत प्रवेश करून मी चराचर भूतांचें धारण करितो,असें जें म्हटलें आहे तें योग्यच आहे.—**किंच पृथिव्यां जाताः सर्वाः व्रीहियवाद्याः ओषधीः पुष्णामि-पुष्टिमतीः च रसस्वादुमतीः करोमि** –तसेंच ( मी सोम होऊन ) पृथिवींत उत्पन्न झालेल्या सर्व व्रीहियवादि ओषधींना पुष्ट करितों. त्यांना पुष्टियुक्त व मधुररसाने युक्त करितों.—**रसात्मकः सोमः भूत्वा**—रसात्मक सोम–चंद्र होऊन—**सोमः-सर्वरसात्मकः-रसस्वभावः-सर्वरसानां आकरः सोमः**—सोम सर्वरसात्मक–रसस्वभाव आहे. तो सोम सर्व रसांचा आकर–समूह–खाण आहे.—**सः हि सर्वाः ओषधीः स्वात्मरसानुप्रवेशेन पुष्णाति**—कारण तो सर्व ओषधींमध्यें आपल्या स्वरूपभूत रसाच्या प्रवेशाने–रसरूपानें त्यांत प्रवेश करून त्यांचे पोषण करितो. १३.

**अहं वैश्वानरो भूत्वा प्राणिनां देहमाश्रितः ।**
**प्राणापानसमायुक्तः पचाम्यन्नं चतुर्विधम् ॥१४॥**

**अन्वयार्थ—अहं**—मी—**प्राणिनां**—प्राण्याच्या—**देहं**—देहाला—**आश्रितः**—आश्रय केलेला—**वैश्वानर**—जाठर अग्नि—**भूत्वा**—होऊन—**प्राणापानसमायुक्तः**—प्राण व अपान यांनीं युक्त होत्साता–**चतुर्विधं**—चार प्रकारचें——**अन्नं**—अन्न—**पचामि**—पचवितो. १४.

**किंच—अहमेव वैश्वानर उदरस्थोऽग्निर्भूत्वा " अयमग्निर्वैश्वानरो योऽयमन्तःपुरुषे येनेदमन्नं पच्यते " इत्यादिश्रुतेर्वैश्वानरः सन्प्राणिनां प्राणवतां देहमाश्रितः प्रविष्टः प्राणापानसमायुक्तः प्राणापानाभ्यां समायुक्तः संयुक्तः पचामि पक्तिं करोमि चतुर्विधं चतुष्प्रकारमन्नमशनं भोज्यं भक्ष्यं चोष्यं लेह्यं च भोक्ता वैश्वानरोऽग्निर्भोज्यमन्नं सोमस्तदेतदुभयमग्नीषोमौ सर्वमिति पश्यतोऽन्नदोषलेपो न भवति ॥ १४ ॥**

**भाष्यार्थ—किंच-अहं एव वैश्वानरः उदरस्थः अग्निः भूत्वा**—तसेंच मीच वैश्वानर म्ह० उदरांतील अग्नि होऊन ( येथील ' अहं 'शब्दानें परमात्मा लक्षित होतो, परमात्माच जाठर अग्नीच्या रूपाने स्थित आहे याविषयीं श्रुतिप्रमाण–)—'**अयं अग्निः वैश्वानरः-यः अयं अन्तःपुरुषे येन इदं अन्नं पच्यते**–' **इत्यादि श्रुतेः**—हा अग्नि वैश्वानर आहे. ( हा कोणता ? ) जो हा शरीरांत आहे तो, ( तिसरें भूत–तेज की काय ? नाहीं–) ज्याच्याकडून या खाल्लेल्या अन्नाचा पाक केला जातो, अन्न पचविलें जातें तो, इत्यादि श्रुति ( बृ. भाष्यार्थ अ. ५.९ पृ. ४९ ) याविषयीं प्रमाण आहे.—**वैश्वानरः सन् प्राणिनां-प्राणवतां देहं आश्रितः-प्रविष्टः**—याप्रमाणें वैश्वानर होऊन प्राण्यांच्या म्ह० प्राणवानांच्या शरीराचा आश्रय केलेला असा –त्यांच्या देहांत प्रविष्ट झालेला असा—**प्राणापानसमायुक्तः-प्राणापानाभ्यां समायुक्तः-संयुक्तः**—प्राणापानांनीं समायुक्त म्ह० संयुक्त होऊन [ म्ह० त्या सह•

कारी कारणाच्या योगानें क्षुब्ध होऊन-]—**पचामि-पक्तिं करोमि**—पाक करितों-पचवितों ( काय ? उत्तर-)—**चतुर्विधं-चतुष्प्रकारं अन्नं-अशनं-भोज्यं-भक्ष्यं-चोष्यं-लेह्यं च**—चार प्रकारचें अन्न-अशन-खाण्याचें, पिण्याचें, चोखण्याचें व चाटण्याचें असें चार प्रकारचें अन्न पचवितों.—**भोक्ता वैश्वानरः अग्निः भोज्यं अन्नं सोमः-तत् एतत् उभयं अग्निषोमौ सर्वं इति पश्यतः अन्नदोषलेपः न भवति**—भोक्ता वैश्वानर-अग्नि, व भोज्य अन्न-सोम हे दोघे-अग्नि व सोम हें सर्व आहे, असे पाहणाऱ्या पुरुषाला अन्नदोषाचा लेप लागत नाहीं. १४.

**सर्वस्य चाहं हृदि संनिविष्टो मत्तः स्मृतिर्ज्ञानमपोहनं च ।**
**वेदैश्च सर्वैरहमेव वेद्यो वेदान्तकृद्वेदविदेव चाहम् ॥१५॥**

**अन्वयार्थ—अहं**—मी—**सर्वस्य**—सर्वांच्या—**हृदि**—बुद्धीत—**संनिविष्टः**—उत्तमप्रकारें आत्मरूपाने प्रवेश केला आहे.—**च मत्तः**—आणि मज आत्म्यापासून—**स्मृतिः ज्ञानं**—स्मरण, ज्ञान—**च**—व—**अपोहनं**—त्यांची निवृत्ति होते—**च सर्वैः वेदैः**—व सर्व वेदांनी—**अहं एव**—मीच—**वेद्यः**—जाणण्यास योग्य आहे.—**वेदान्तकृत्**—वेदान्ताच्या विषयाचा संप्रदाय करणारा—**च**—व—**वेदविद्**—वेदार्थवेत्ता—**अहं एव**—मीच आहे. १५

किंच सर्वस्य प्राणिजातस्याहमात्मा सन्हृदि बुद्धौ संनिविष्टोऽतो मत्त आत्मनः सर्वप्राणिनां स्मृतिर्ज्ञानं तदपोहनं च । येषां पुण्यकार्मिणां पुण्यकर्मानुरोधेन ज्ञानस्मृती भवतस्तथा पापकार्मिणां पापकर्मानुरूपेण स्मृतिज्ञानयोरपोहनं चापायनमपगमनं च । वेदैश्च सर्वैरहमेव परमात्मा वेद्यो वेदितव्यो वेदान्तकृद्वेदान्तार्थसंप्रदायकृदित्यर्थः । वेदविद्वेदार्थविदेव चाहम् ॥ १५ ॥

**भाष्यार्थ—किंच**—तसेंच,—**अहं सर्वस्य प्राणिजातस्य आत्मा सन्**—मी सर्व प्राणिवर्गाचा आत्मा होऊन—**हृदि-बुद्धौ संनिविष्टः**—हृदयांत-बुद्धींत संनिविष्ट झालों आहें. [ मी ब्रह्मादिस्तंबपर्यंत सर्व प्राण्यांच्या बुद्धींत प्रवेश केला आहे. बुद्धींत प्रवेश करणें म्हणजे तिच्या सर्व गुणदोषांनें निरूपण करणें-गुणदोष पाहणें. ]—**अतः मत्तः आत्मनः सर्वप्राणिनां स्मृतिः ज्ञानं च तत्-अपोहनं**—बुद्धीमध्यें स्थित असलेल्या मला गुणदोषांचें द्रष्टृत्व-साक्षित्व असल्यामुळे मजपासून-सर्व कर्मांचा अध्यक्ष व जगद्यंत्राचा सूत्रधार अशा मज आत्म्यापासून सर्व प्राण्यांची स्मृति, ज्ञान व त्यांचा नाश होतो, ( अहोपण, सर्व प्राण्यांची स्मृति, ज्ञान व त्यांचा अपाय ही जर भगवानापासून होत असतील तर त्याच्या ठिकाणीं वैषम्य हा दोष येतो, अशी आशंका घेऊन आचार्य सांगतात-)—**येषां पुण्यकार्मिणां पुण्यकर्मानुरोधेन ज्ञानस्मृती भवतः**—ज्या पुण्यकर्म्यांच्या-पुण्यकर्म करणारांच्या पुण्यकर्मानुसार त्यांस ज्ञान, व स्मृति होते—**तथा पापकर्मिणां पापकर्मानुरूपेण स्मृतिज्ञानयोः अपोहनं**

**च अपायनं-अपगमनं च**—त्याचप्रमाणें पापकर्मी लोकांच्या पापकर्मानुरूप त्यांच्या स्मृतीचें व ज्ञानाचें अपोहन म्ह० अपायन-अपगमन-त्यांचा अभाव होतो [ स्मृति म्ह० जन्मान्तरीं वगैरे अनुभव घेतलेल्याची आठवण आणि देश, काल, स्वभाव यांनीं दूर असलेल्याचाहि अनुभव-ज्ञान, अर्थात् धर्म व अधर्म यांच्यामुळे विचित्र जगत् निर्माण करणाऱ्या ईश्वराकडे वैषम्य दोष येत नाहीं. आतां वेदावरून जाणण्यास योग्य असलेले परब्रह्म भगवानाहून निराळे आहे, या शंकेचे निवारण करितात-]—**च सर्वैः वेदैः अहं एव परमात्मा वेद्यः वेदितव्यः**—आणि सर्व वेदांच्या योगानें मीच परमात्मा वेद्य-जाणण्यास योग्य आहे.—**वेदान्तकृत्-वेदान्तार्थसंप्रदायकृत् च इत्यर्थः**—वेदान्तकृत्-वेदान्तार्थाचा संप्रदाय करणारा, असा याचा भावार्थ—**च वेदवित्-वेदार्थवित् अहं एव**—व वेदान्तार्थाचा संप्रदायप्रवर्तक होण्यासाठीं वेदवित् म्ह० वेदाचा यथार्थ अर्थ जाणणारा मीच आहे. १५

**भगवत ईश्वरस्य नारायणाख्यस्य विभूतिसंक्षेप उक्तो विशिष्टोपाधिकृतो यदादित्यगतं तेज इत्यादिना, अथाधुना तस्यैव क्षराक्षरोपाधिप्रविभक्ततया निरुपाधिकस्य केवलस्य स्वरूपनिर्दिधारयिषयोत्तरश्लोका आरभ्यन्ते। तत्र सर्वमेवातीतानागतानन्तराध्यायार्थजातं त्रिधा राशीकृत्याऽऽह ॥**

**भाष्यार्थ**—( पुढील श्लोकांचें तात्पर्य सांगण्यासाठीं गतार्थाचा अनुवाद-)—**भगवतः नारायणाख्यस्य ईश्वरस्य विशिष्ट-उपाधिकृतः विभूतिसंक्षेपः 'यदादित्यगतं तेजः' इत्यादिना उक्तः**—भगवानाचा-नारायणसंज्ञक ईश्वराचा आदित्यादि विशिष्ट उपाधीमुळें झालेला विभूतिसंक्षेप 'यदादित्यगतं०' इत्यादि चार श्लोकांनीं सांगितला. ( आतां या अध्यायाच्या अखेरपर्यंत जो ग्रंथसंदर्भ आहे त्याचे तात्पर्य सांगतात-)—**अथ अधुना क्षर-अक्षर उपाधिप्रविभक्ततया तस्य एव निरुपाधिकस्य केवलस्य स्वरूपनिर्दिधारयिषया उत्तरश्लोकाः आरभ्यन्ते**—त्यानंतर आतां क्षर व अक्षर या दोन उपाधींहून अगदीं पृथक्, त्यांहून अगदीं विलक्षण, या रूपानें त्याच केवल निरुपाधिक नारायणाच्या स्वरूपाचा निर्धार-निश्चय करण्याच्या इच्छेने पुढील श्लोक आरंभिले जातात. [ पुढील ग्रंथ केवल निरुपाधिक आत्मस्वरूपाचा निर्धार करण्यासाठींच नाहीं तर सर्वच गीताशास्त्राच्या अर्थाचा

---

१ 'वेदान्तकृत्' याचा अर्थ रहस्यकार-'वेदान्ताचा कर्ता' असा अगदीं सरळ करितात पण तो वैदिक संप्रदायाला सोडून आहे. परमात्माहि वेदाचा व वेदान्तर्गत वेदान्ताचा कर्ता नव्हे त्या-त्यापासून ते पुरुषाच्या श्वासोच्छ्वासाप्रमाणे स्वयं उत्पन्न झाले आहेत. म्हणजे अपौरुषेय आहेत. त्यासाठींच आचार्यांनीं 'वेदान्तार्थाचा संप्रदाय करणारा' असा त्याचा अर्थ केला आहे. रहस्यकार-वेदान्त हा शब्द गीताकालीं प्रवृत्त झाला नव्हता, असें कल्पून हा श्लोक प्रक्षिप्त असावा, किंवा त्यांत वेदान्तशब्दाचा अर्थ दुसरा कांहींतरी घेतला पाहिजे, असे जे तर्क कित्येकांनीं काढले आहेत ते सर्व निर्मूल होत. 'वेदान्त' हा शब्द मुंडक ( ३.२, ६ ) व श्वेताश्वतर ( ६-२२ ) या उपनिषदांतून आलेला असून-इत्यादि जे म्हणतात, तें सर्वथा योग्यच आहे.

निश्चय करण्यासाठींहि आहे, असें सांगतात- ]—**तत्र सर्व एव अतीत-अनागत-अनन्तराध्यायार्थजातं त्रिधा राशीकृत्य आह**—तसेंच त्या पुढील ग्रंथांत सर्वच मागील, पुढील व अगदीं जवळच्या अध्यायांचें अर्थजात-सर्व गीताध्यायांचा तात्पर्यार्थ तीन भागांत विभागून सांगतात—

**द्वाविमौ पुरुषौ लोके क्षरश्चाक्षर एव च ।**
**क्षरः सर्वाणि भूतानि कूटस्थोऽक्षर उच्यते ॥ १६ ॥**

**अन्वयार्थ—लोके**—या संसारांत—**क्षरः**—क्षर—**च**—व—**अक्षरः एव**—अक्षरच—( **इति** )—असे—**इमौ द्वौ पुरुषौ**—हे दोन पुरुष आहेत.—**सर्वाणि भूतानि**—सर्व भूतें हा—**क्षरः**—क्षर पुरुष आहे—(**च**)—आणि—**कूटस्थः**—ईश्वराची मायाशक्ति—**अक्षरः**—अक्षर पुरुष आहे असें—**उच्यते**—सांगितलें जातें.

द्वाविमौ पृथग्राशीकृतौ पुरुषावित्युच्येते लोके संसारे । क्षरश्च क्षरतीति क्षरो विनाश्येको राशिरपरः पुरुषोऽक्षरस्तद्विपरीतो भगवतो मायाशक्तिः क्षराख्यस्य पुरुषस्योत्पत्तिबीजमनेकसंसारिजन्तुकामकर्मादिसंस्काराश्रयोऽक्षरः पुरुष उच्यते । कौ तौ पुरुषावित्याह स्वयमेव भगवान्क्षरः सर्वाणि भूतानि समस्तं विकारजातमित्यर्थः । कूटस्थः कूटो राशी राशिरिव स्थितः, अथवा कूटो माया वञ्चना जिह्मता कुटिलतेति पर्यायाः, अनेकमायादिप्रकारेण स्थितः कूटस्थः संसारबीजानन्त्यान्न क्षरतीत्यक्षर उच्यते ॥१६॥

**भाष्यार्थ—द्वौ इमौ पृथक् राशीकृतौ पुरुषौ इति लोके-संसारे उच्येते**—हे दोन-पृथक राशी केलेले-पुरुष म्हणून या लोकांत-संसारांत सांगितले जातात. [ या संसारांत हे दोन पृथक् राशी केलेले ‘ पुरुष ’ या नांवाने सांगितलेले आहेत.-पुरुषाची उपाधि असल्यामुळे पुरुष, साक्षात् पुरुष नव्हेत. ]—**क्षरः च क्षरति इति क्षरः विनाशी एकः राशिः अपरः पुरुषः**—क्षर-क्षरतो-क्षय पावतो म्हणून क्षर-विनाशी-हा एक राशी-वर्ग अपर पुरुष.—**अक्षरः तद्विपरीतः भगवतः मायाशक्तिः**—व अक्षर, त्याच्या विपरीत असलेला (म्ह० पर पुरुषच की काय ? उत्तर-नव्हे, ) भगवानाची मायाशक्ति ( तिच्याविषयीं कार्यलिंगक अनुमान सुचवितात-)—**क्षराख्यस्य पुरुषस्य उत्पत्तिबीजं अनेकसंसारिजन्तुकामकर्मादिसंस्काराश्रयः अक्षरः पुरुषः उच्यते**—क्षरसंज्ञक पुरुषाच्या उत्पत्तीचें बीज, अनेक संसारी प्राण्यांच्या काम, कर्म, ज्ञान यांच्या संस्कारांचा आश्रय अक्षर पुरुष म्हटला जातो. [ अर्थात् भोक्त्याचे काम-कर्मादिकांचे संस्कार, हें शरीरांच्या उत्पत्तीचें निमित्तकारण असून मायाशक्ति हें त्यांचें उपादान कारण आहे. या शक्तीच्या आश्रयानेंच वरील संस्कार राहतात. तेराव्या अध्यायांत ‘ प्रकृतिं पुरुषं चैव ’ येथें सांगितलेले प्रकृति-पुरुषच येथें विवक्षित आहेत, असें कोणी समजेल म्हणून स्वतः भगवान्च त्याचें निवारण करितात, असें आचार्य प्रश्नपूर्वक सांगतात- ]—**कौ तौ पुरुषौ इति**

**स्वयं एव भगवान् आह**—ते दोन पुरुष कोण ? तें स्वतःच भगवान् सांगतात—**क्षरः सर्वाणि भूतानि-समस्तं विकारजातं इत्यर्थः**—क्षर म्ह० सर्व भूतें, समस्त विकारजात, सर्व विकार, असा याचा भावार्थ.—**कूटस्थः-कूटः-राशिः-राशिः इव स्थितः**—कूटस्थ-कूट म्ह० रास, ढीग, राशीप्रमाणें स्थित असलेला—**अथवा कूटः-माया-वञ्चना-जिह्मता-कुटिलता इति पर्यायाः**—किंवा कूट म्ह० माया-वञ्चना-जिह्मता-कुटिलता हे त्याचे पर्याय शब्द आहेत.—**अनेकमायादिप्रकारेण स्थितः कूटस्थः**—अनेक मायादि प्रकाराने स्थित असलेला तो कूटस्थ,—**संसारबीजानन्त्यात् न क्षरति इति अक्षरः उच्यते**—संसाराच्या बीजाला अनन्तत्व असल्यामुळे-ब्रह्मज्ञानावांचून त्याचा विनाश होत नसल्यामुळे तो अक्षर असे म्हटला जातो. [ सर्व विकारजात हाच क्षर पुरुष व त्याचें कारण अशी जी भगवानाची मायाशक्ति-कूटस्थ तो अक्षर पुरुष होय. ] १६

---

१ रहस्यकार म्हणतात—" क्षर म्ह० सर्व नाशवत भूतें, नाशवत पचभूतात्मक व्यक्त पदार्थ-व्यक्त सृष्टि व अक्षर म्ह० अव्यक्त प्रकृति-साख्यांची अव्यक्त प्रकृति वगैरे " पण या संबंधाने आचार्यांनी वर स्पष्ट खुलासा केलेला असून आम्हीहि रहस्यकाराची ही कल्पना कशी चुकली आहे ते तेराव्या अध्यायांत सविस्तर सागितले आहे, म्हणून येथे अधिक विस्तार करीत नाही. क्षर म्ह०सर्वभूते व अक्षर म्ह०कूटस्थ, असे भगवान् सागत आहेत व ते'अक्षरात्परतः परः' (मु. भा. २.१.२ पृ.५२) या श्रुतीला धरून आहे. क्षर म्ह०व्यक्त सृष्टि असे भगवान् म्हणत नाहीत. आकाश, वायु, अहकार, बुद्धि, पचतन्मात्रे ही सृष्टी व्यक्त नाही. पण तीहि क्षर पुरुष आहे. यास्तव क्षर म्ह०सर्व विकार व अव्यक्त म्ह०सर्व विकाराची प्रकृति हाच अर्थ निर्दोष असून येथे साख्यांच्या प्रकृतीचा काही सबध नाही. पूर्वोक्त श्रुतीतील 'अक्षर-' शब्दच येथें योजला आहे. गीता श्रुत्यनुसारिणी आहे. सांख्यदर्शनानुसारिणी नाही. रहस्यकार ८०९ पानावर 'जुन्या पिपळांतील तत्त्व ' असे म्हणतात. पण ते'अश्वत्थ' १५-१,३ या शब्दाला अनुलक्षूनच जर असेल तर ते चूक आहे, हे आम्ही वर सांगितलेंच आहे. हरिदास जसे पुनः पुनः मूळ पदावर येतात, त्याप्रमाणे रहस्यकार पुनः पुनः कर्मयोगाचे स्मरण करितात. येथहि 'सर्वाभूतीं एक आत्मा ' "ही ओळख ज्याच्या मनांत मरेपर्यंत कायम राहिली तो कर्मयोग आचरित असतांच परमेश्वरप्राप्ति करून घेतो, हा या ज्ञानविज्ञान-प्रकरणाचा अखेर निष्कर्ष आहे. कर्मे न करिता केवळ परमेश्वरभक्तीने मोक्ष मिळत नाही, असें नाहीं; पण गीतेतील ज्ञानविज्ञाननिरूपणाचे ते तात्पर्य नसून ज्ञानाने किंवा भक्तीने परिपूत झालेल्या निष्काम बुद्धीने सर्व सांसारिक कर्मे करावी व ती करीत असतांनाच मोक्ष कसा मिळतो हें दाखविण्यासाठीच ज्ञानविज्ञानाच्या या निरूपणास सुरुवात केली आहे" वगैरे, उगीच असंबद्ध पाल्हाळ केला आहे. त्यांत शास्त्रार्थ मुळीच नाही. सर्व सांसारिक कर्मे करावी असें गीता सांगत नाही. 'ज्ञान किंवा भक्ति यांनी परिपूत झालेली निष्काम बुद्धि व तसल्या बुद्धीने सर्व सांसारिक कर्मे करणे' हा केवळ 'वांझेचा मुलगा, आकाशाचे पुष्प ' यांसारखा अर्थरहित शब्दविकल्प आहे. 'सासारिक कर्मे करावीं व ती करीत असतांनाच मोक्ष कसा मिळतो, हे दाखविण्यासाठी ज्ञानविज्ञान ' हे म्हणणें सुसबद्ध आहे, असे कोण

**उत्तमः पुरुषस्त्वन्यः परमात्मेत्युदाहृतः ।**
**यो लोकत्रयमाविश्य बिभर्त्यव्यय ईश्वरः ॥१७॥**

**अन्वयार्थ**—**तु**—परंतु—**उत्तमः पुरुषः**—उत्तम पुरुष — **अन्यः**—यांहून निराळा आहे —**परमात्मा**—देहादि मिथ्या आत्म्यांहून श्रेष्ठ असलेला सर्व भूतांचा आत्मा-प्रत्यक् चेतन-परमात्मा—**इति उदाहृतः**—असें वेदान्तांत ह्मटलेला आहे. वेदान्तांत याला परमात्मा असें ह्मटलें आहे—**यः अव्ययः ईश्वरः**—जो अव्यय ईश्वर —**लोकत्रयं आविश्य**—तीन लोकांत प्रवेश करून—**बिभर्ति**—त्याला धारण करतो. १७

**आभ्यां क्षराक्षराभ्यां विलक्षणः क्षराक्षरोपाधिद्वयदोषेणास्पृष्टो नित्यशुद्धबुद्धमुक्तस्वभावः— उत्तम उत्कृष्टतमः पुरुषस्त्वन्योऽत्यन्तविलक्षण आभ्यां परमात्मेति परमश्चासौ देहाद्यविद्याकृतात्मभ्य आत्मा च सर्वभूतानां प्रत्यक्चेतन इत्यतः परमात्मेत्युदाहृत उक्तो वेदान्तेषु । स एव विशेष्यते यो लोकत्रयं भूर्भुवःस्वराख्यं स्वकीयया चैतन्यबलशक्त्याऽऽविश्य प्रविश्य बिभर्ति स्वरूपसद्भावमात्रेण बिभर्ति धारयत्यव्ययो नास्य व्ययो विद्यत इत्यव्यय ईश्वरः सर्वज्ञो नारायणाख्य ईशनशीलः ॥ १७ ॥**

**भाष्यार्थ**—( कार्य व कारण या नांवाच्या दोन राशी दाखवून तिसरा रास दाखवितात- )--**आभ्यां क्षराक्षराभ्यां विलक्षणः क्षराक्षरोपाधिद्वयदोषेण अस्पृष्टः नित्यशुद्धबुद्धमुक्तस्वभावः**—या दोन्ही क्षराक्षरांहून अगदीं विलक्षण-क्षर व अक्षर या दोन उपाधांच्या दोषानें अस्पृष्ट-उपाधिदोषानें रहित, नित्यशुद्ध बुद्ध-मुक्तस्वभाव, असा—**उत्तमः-उत्कृष्टतमः पुरुषः तु आभ्यां अन्यः-अत्यन्तविलक्षणः**—उत्तम म्ह० अतिशय उत्कृष्ट पुरुष तर अन्य म्ह० त्या क्षराक्षर पुरुषांहून अत्यन्त विलक्षण आहे.—**परमात्मा इति-देहादि अविद्याकृत-आत्मभ्यः परमः च असौ आत्मा च सर्वभूतानां प्रत्यक्चेतन**—परमात्मा असें, देहादि अविद्याकृत आत्म्याहून परम-श्रेष्ठ असा आत्मा सर्वभूतांचा प्रत्यक् चेतन-सर्वान्तर्यामी आत्मा —**इत्यतः परमात्मा इति उदाहृतः-वेदान्तेषु उक्तः**—यास्तव 'परमात्मा' असें म्हटला गेलेला, वेदान्तांत सांगितलेला [ उत्तम व अन्य हे शब्द परमात्मा क्षराक्षरांहून अत्यन्त विलक्षण आहे, हे प्रदर्शित करण्यासाठीं आहे. ]—**सः एव विशेष्यते**—त्याचाच विशेष सांगतात.—**यः भूर्भुवःस्वराख्यं लोकत्रयं स्वकीयया चैतन्यबलशक्त्या आविश्य-प्रविश्य**—जो परमात्मा उत्तम पुरुष ' भूः-भुवः व स्वः ' या नांवाच्या लोकत्रयांत-म्ह० सर्व जगांत आपल्या चैतन्यबलशक्तीनें म्हणजे चैतन्य हेंच बल, त्यांतील मायाशक्तीनें आवेश-प्रवेश करून—**बिभर्ति-स्वरूप-**

---

म्हणेल? गीतेंत तर 'यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात्' 'यज्ज्ञात्वामृतमश्नुते ' 'ज्ञात्वा मां शान्तिमृच्छति ' असें सांगितलें आहे. रहस्यकार म्हणतात तसें कोठेंहि सांगितलेलें नाहीं. अर्थात् रहस्यकारांचा सिद्धान्त निराधार आहे.

**सद्भावमात्रेण बिभर्ति-धारयति**—त्याला धारण करतो.केवल स्वरूपसत्तेनें धारण करतो. ( पण स्वतः अचल असलेल्या त्याला धारण करणारा दुसरा कोणी नाहीं, असें सांगतात-)—**अव्ययः-अस्य व्ययः न विद्यते इति अव्ययः**—अव्यय-याचा व्यय होत नाहीं, म्हणून अव्यय. (' संयुक्तमेतत्क्षरमक्षरं च व्यक्ताव्यक्तं भरते विश्व- मीशः ' या श्रुतीचा अर्थ मनांत धरून भगवान् म्हणतात-)—**ईश्वरः-सर्वज्ञः नारायणाख्यः ईशः**—ईश्वर-सर्वज्ञ-नारायणसंज्ञक ईश ( सर्व जगाचें धारण करितो. ) १७.

**यस्मात्क्षरमतीतोऽहमक्षरादपि चोत्तमः ।**
**अतोऽस्मि लोके वेदे च प्रथितः पुरुषोत्तमः ॥१८॥**

**अन्वयार्थ—यस्मात्**—ज्याअर्थी—**अहं क्षरं अतीतः**—मी क्षरसंज्ञक पुरुषाहूनहि निराळा आहें—**अक्षरात् अपि च**—आणि अक्षरसंज्ञक पुरुषाहूनहि—**उत्तमः**—उत्तम आहे,—**अतः**—त्याअर्थी—**अहं लोके च वेदे**—लोकात व वेदांत मी—**पुरुषोत्तमः**—पुरुषोत्तम ह्मणून—**प्रथितः अस्मि**—प्रसिद्ध आहे. १८.

**यथाव्याख्यातस्येश्वरस्य पुरुषोत्तम इत्येतन्नाम प्रसिद्धं तस्य नामनिर्वचनप्रसिद्ध्याऽर्थवत्त्वं नाम्नो दर्शयन्निरतिशयोऽहमीश्वर इत्यात्मानं दर्शयति भगवान्—यस्मात्क्षरमतीतोऽहं संसारमायावृक्षमश्वत्थाख्यमतिक्रान्तोऽहमक्षरादपि संसारवृक्षबीजभूतादपि चोत्तम उत्कृष्टतम ऊर्ध्वतमो वाऽतः क्षराक्षराभ्यामुत्तमत्वादस्मि भवामि लोके वेदे च प्रथितः प्रख्यातः पुरुषोत्तम इत्येवं मां भक्तजना विदुः कवयः काव्यादिषु चेदं नाम निबध्नन्ति पुरुषोत्तम इत्यनेनाभिधानेनाभिगृणन्ति ॥ १८ ॥**

**भाष्यार्थ—यथा व्याख्यातस्य ईश्वरस्य पुरुषोत्तमः इति-एतत् नाम प्रसिद्धं**—वर जसे व्याख्यान केले आहे, तशा ईश्वराचे पुरुषोत्तम असें नांव प्रसिद्ध आहे—**नामनिर्वचनप्रसिद्ध्या तस्य नाम्नः अर्थवत्त्वं दर्शयन् भगवान् अहं निरतिशयः ईश्वरः इति आत्मानं दर्शयति**—यास्तव त्या नांवाची व्युत्पत्ति सांगून त्या नामनिर्वचनप्रसिद्धीनेच पुरुषोत्तम या नांवाचे अर्थवत्त्व-सार्थत्व दाखविणारे भगवान् मी निरतिशय ईश्वर आहे, असें आपल्याला दाखवितात. [ पुरुषोत्तम या नांवांतलि अवयवांचा अर्थ सांगून त्यावरून आपले हें नांव अर्थशून्य-केवल रूढ नसून अर्थयुक्तच आहे, हे दाखवून मी निरतिशय ईश्वर आहें, हेहि सागतात, आपल्या पुरुषोत्तम स्वरूपाचें ज्ञान करून देतात-]—'**यस्मात् क्षरं अतीतः अहं**'-**संसारमायावृक्षं अश्वत्थाख्यं अतिक्रान्तः अहं**—ज्याअर्थी क्षराचें अतिक्रमण केलेला मी आहे म्ह० अश्वत्थ नावाच्या संसारमायावृक्षाचें अतिक्रमण केलेला-त्याहून अगदीं विलक्षण असा मी आहें—**अक्षरात् अपि-संसारवृक्षबीजभूतात् अपि च उत्तमः-उत्कृष्टतमः वा ऊर्ध्वतमः**—अक्षराहूनहि म्ह० संसारवृक्षबीजभूत

अशा कूटस्थाहून–मायाशक्तीहूनहि उत्तम–अतिशय उत्कृष्ट किंवा अतिशय ऊर्ध्व आहें, **—अतः क्षराक्षराभ्यां उत्तमत्वात्**—त्याअर्थी क्षर व अक्षर या दोहोंहूनहि मी उत्तम असल्यामुळे—**लोके वेदे च पुरुषोत्तमः इति एवं प्रथितः-प्रख्यातः अस्मि-भवामि**—लोकांमध्यें व वेदांत ' पुरुषोत्तम ' अशा प्रकारें प्रथित–प्रसिद्ध आहे. मी पुरुषोत्तम ह्मणून प्रख्यात आहे.—**भक्तजनाः मां**—( ' पुरुषोत्तमः ' इति ) **—विदुः**—भक्तजन मला ' पुरुषोत्तम ' या नांवाने ओळखितात—**कवयः च काव्यादिषु इदं नाम निबध्नन्ति**—आणि कवी काव्यादिकात हें नांव ग्रथित करितात—**पुरुषोत्तमः इति अनेन अभिधानेन अभिगृणन्ति**—पुरुषोत्तम अशा या नांवानें बोलतात. पुरुषोत्तम या नावानें माझा उल्लेख करितात. [ अर्थात् क्षर म्ह० संसारमायावृक्ष व अक्षर म्ह० त्याचे बीज मायाशक्ति या दोन पुरुषोपाधींहून मी अत्यंत विलक्षण असल्यामुळे लोकव्यवहारात व वेदातहि ' पुरुषोत्तम ' म्हणून प्रसिद्ध आहे. ] १८

**यो मामेवमसंमूढो जानाति पुरुषोत्तमम् ।**
**स सर्वविद्भजति मां सर्वभावेन भारत ॥१९॥**

**अन्वयार्थ—भारत**—हे अर्जुना !—**यः असंमूढः**—जो संमोहरहित असलेला पुरुष—**एवं**—वर सांगितल्याप्रमाणे—**पुरुषोत्तमं मां**—पुरुषोत्तम अशा मला—**जानाति**—जाणतो—**सः**—तो—**सर्वविद्**—सर्वज्ञ—**मां सर्वभावेन**—मला सर्व भावाने–सर्वत्र माझा भाव ठेवून—**भजति**—भजतो. १९

**अथेदानीं यथानिरुक्तमात्मानं यो वेद तस्येदं फलमुच्यते—यो मामीश्वरं यथोक्तविशेषणमेवं यथोक्तेन प्रकारेणासंमूढः संमोहवर्जितः सन्नयमहमस्मीति पुरुषोत्तमं स सर्ववित्सर्वात्मना सर्वं वेत्तीति सर्वज्ञः सर्वभूतस्थं भजति मां सर्वभावेन सर्वात्मचित्ततया हे भारत ॥ १९ ॥**

**भाष्यार्थ—अथ इदानीं यथानिरुक्तं आत्मानं यः वेद तस्य इदं फलं उच्यते**—आतां या पुढील श्लोकांत, ज्याच्या नांवाचा अर्थ वर स्पष्ट करून सांगितलेला आहे अशा आत्म्याला जो जाणतो त्याचे हे फल सांगितले जातें—**यः मां-यथोक्तविशेषणं ईश्वरं-पुरुषोत्तमं**—जो मला–पूर्वी सांगितलेल्या सर्वात्मत्व, सर्वोत्तमत्व इत्यादि विशेषणांनीं विशिष्ट असलेल्या ईश्वराला–पुरुषोत्तमाला—**एवं यथोक्तेन प्रकारेण**—तो क्षराक्षराहून अतीत आहे, या पूर्वोक्त प्रकारानें—**असंमूढः-संमोहवर्जितः सन् अयं अहं अस्मि इति जानाति**—असंमूढ म्ह० संमोहवर्जित–देहादिकांविषयींच्या 'हीं मी व माझीं' या बुद्धीनें रहित होत्साता ' हा मी आहे ' असें जाणतो.—**सः सर्ववित्-सर्वात्मना सर्वं वेत्ति इति-सर्वज्ञः**—तो सर्वविद् म्ह० सर्वांचा आत्मा या रूपानें सर्व जाणतो म्हणून सर्वज्ञ—**सर्वभूतस्थं मां हे भारत**

**सर्वभावेन-सर्वात्मचित्ततया भजति**—सर्वभूतांत असलेल्या मला हे अर्जुना, सर्वांचा आत्मा या भावनेने भजतो. [ जो देहाला आत्मा न मानणारा पुरुष मज पुरुषोत्तमाला-क्षराक्षराहून अगदीं विलक्षण अशा स्वरूपानें पाहतो,तो सर्वज्ञ मला सर्वात्म-भावनेनें भजतो. ] १९

इति गुह्यतमं शास्त्रमिदमुक्तं मयानघ ।
एतद्बुद्ध्वा बुद्धिमान्स्यात्कृतकृत्यश्च भारत ॥२०॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे
पुरुषोत्तमयोगो नाम पंचदशोऽध्यायः ॥ १५ ॥

**अन्वयार्थ—अनघ भारत**—हे निष्पापा अर्जुना !—**इदं इति गुह्यतमं शास्त्रं**—असे हें अत्यंत गुह्य शास्त्र—**मया उक्तं**—मी सांगितलें.—**एतत्**—हें—**बुद्ध्वा**—जाणून—**बुद्धिमान्**—बुद्धिमान्—**च कृतकृत्यः**—व कृतकृत्य—**स्यात्**—होतो.

आस्मिन्नध्याये भगवत्तत्त्वज्ञानं मोक्षफलमुक्त्वाऽथेदानीं तत्स्तौति—इत्येतद्गुह्यतमं गोप्यतममत्यन्तरहस्यमित्येतत् । किं तच्छास्त्रम् । यद्यपि गीताख्यं समस्तं शास्त्रमुच्यते तथाऽप्ययमेवाध्याय इह शास्त्रमित्युच्यते स्तुत्यर्थं प्रकरणात् । सर्वो हि गीताशास्त्रार्थोऽस्मिन्नध्याये समासेनोक्तो न केवलं, सर्वश्च वेदार्थ इह परिसमाप्तो ‘ यस्तं वेद स वेदवित् ’ ‘ वेदैश्च सर्वैरहमेव वेद्यः ’ इति चोक्तम् ॥

**भाष्यार्थ—अस्मिन् अध्याये मोक्षफलं भगवत्तत्त्वज्ञानं उक्त्वा अथ इदानीं तत्स्तौति**—याप्रमाणें या अध्यायात मोक्ष हे ज्याचे फल आहे, असे भगवत्तत्त्वज्ञान सांगून आतां ‘इति गुह्यतमं०’ या उपसंहार श्लोकांत त्याची स्तुति करितात—**इति-एतत् गुह्यतमं-गोप्यतमं-अत्यन्तरहस्यं इति एतत्**—असें हें गुह्यतम-अतिशय गुप्त ठेवण्यास योग्य-अत्यंत रहस्य असा याचा भावार्थ—**किं तत् शास्त्रं**—ते गुह्यतम काय ? तर शास्त्र, ( अहोपण, सर्व गीतेलाच शास्त्र असें ह्मणणे उचित असतांना याच अध्यायाला शास्त्र कां ह्मटलें आहे ? उत्तर-)—**यद्यपि गीताख्यं समस्तं शास्त्रं उच्यते तथापि अयं एव अध्यायः इह शास्त्रं इति स्तुत्यर्थं उच्यते**—जरी गीताख्य समस्त शास्त्र म्हटलें जातें, सर्व गीतेलाच शास्त्र म्हणतात,तरी हाच अध्याय स्तुतीसाठी ‘शास्त्र’ असें म्हटला जातो. [ या अध्यायाची स्तुति करण्यासाठीं त्याला शास्त्र ह्मटले आहे. कशावरून ? उत्तर-]—**प्रकरणात्**—प्रकरण स्तुतीचे आहे. येथें विधान कांहींच नसून पूर्वोक्त विधीचें फल सांगण्याचा हा प्रसंग आहे. म्हणून या अध्यायाची स्तुति करण्यासाठीं यालाच शास्त्र म्हटले आहे. ( प्रस्तुत अध्यायाची स्तुति करण्याचा जरी प्रसंग असला तरी त्याला शास्त्र ह्मणण्याचें काय कारण ? उत्तर-)—**सर्वः हि गीताशास्त्रार्थः केवलं अस्मिन् अध्याये**

**समासेन न उक्तः**—सर्व गीताशास्त्रार्थच केवल या अध्यायांत संक्षेपतः सांगितलेला नाहीं तर—**सर्वः च वेदार्थः इह परिसमाप्तः**—सर्वच वेदार्थ या अध्यायांत अंतर्भूत झाला आहे. सर्व वेदार्थांचा यांत अंतर्भाव झाला आहे. (याविषयीं या अध्यायांतीलच सूचक प्रमाण सांगतात-)—' **यस्तं वेद स वेदवित्**—( श्लो. १ पृ. १०१९) अशा संसारवृक्षाला जो जाणतो तो वेदवेत्ता व—**वेदैश्च सर्वैः अहमेव वेद्यः**—( श्लोक १५ पृ. १०४२) आणि सर्व वेदांनीं मीच वेद्य आहें,—**इति च उक्तं**—असें वर सांगितलेंच आहे.

**इदमुक्तं कथितं मया हेऽनघापाप । एतच्छास्त्रं यथादर्शितार्थं बुद्ध्वा बुद्धिमान्स्याद्भवेन्नान्यथा कृतकृत्यश्च भारत कृतं कृत्यं कर्तव्यं येन स कृतकृत्यो विशिष्टजन्मप्रसूतेन ब्राह्मणेन यत्कर्तव्यं तत्सर्वं भगवत्तत्त्वे विदिते कृतं भवेदित्यर्थः । न चान्यथा कर्तव्यं परिसमाप्यते कस्यचिदित्यभिप्रायः । ' सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते ' इति चोक्तम् । " एतद्धि जन्मसामग्र्यं ब्राह्मणस्य विशेषतः । प्राप्यैतत्कृतकृत्यो हि द्विजो भवति नान्यथा " ॥ इति च मानवं वचनम् । यत एतत्परमार्थतत्त्वं मत्तः श्रुतवानसि ततः कृतार्थस्त्वं भारतेति ॥ २० ॥**

इति श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यगोविंदभगवत्पूज्यपादशिष्यश्रीमच्छंकरभगवतः कृतौ श्रीभगवद्गीताभाष्ये पुरुषोत्तमयोगो नाम पचदशोऽध्यायः ॥ १५ ॥

**भाष्यार्थः**—( 'इदं उक्तं०' इत्यादि अवशिष्ट भागाचें व्याख्यान-)—**मया हे अनघ-अपाप इदं उक्तं-कथितं**—हे अनघ-निष्पाप मीं असें हें गुह्यतम शास्त्र तुला सांगितलें.—**एतत् यथादर्शितार्थं शास्त्रं बुद्ध्वा बुद्धिमान् स्यात्-भवेत् न अन्यथा**—वर जसा याचा अर्थ प्रदर्शित केला आहे, तसे हे शास्त्र जाणून बुद्धिमान् होतो-मनुष्य ज्ञानी होतो; याला जाणल्यावांचून मात्र तो ज्ञानी होऊं शकत नाहीं व केवल ज्ञानीच नव्हे तर—**भारत कृतकृत्यः च-कृतं कृत्यं-कर्तव्यं येन सः कृतकृत्यः**—हे भारत-तो कृतकृत्य होतो. ज्यानें आपले कर्तव्य केलें आहे तो कृतकृत्य होय. ( भगवत्तत्त्वज्ञान झालें असता कृतकृत्यता प्राप्त होते, याचेंच उपपादन-)—**विशिष्टजन्मप्रसूतेन ब्राह्मणेन यत् कर्तव्यं तत् सर्वं भगवत्तत्त्वे विदिते कृतं भवेत् इत्यर्थः**—विशिष्ट जन्म घेऊन उत्पन्न झालेल्या-विशिष्ट कुळांत जन्म घेतलेल्या ब्राह्मणानें जें अवश्य कर्तव्य, जें त्यानें अवश्य करावें, तें सर्व भगवत्तत्त्व साक्षात् जाणलें असतां त्यानें केलें आहे असें होतें, असा याचा भावार्थ.—**अन्यथा च कस्यचित् कर्तव्यं न परिसमाप्यते इति अभिप्रायः**—त्यावांचून म्ह० भगवत्तत्त्वाला साक्षात् जाणल्यावांचून कोणाचेंहि कर्तव्य पूर्णपणें संपत नाहीं, असा याचा आशय आहे.—' **सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते ' इति च उक्तं**—हे अर्जुन, सर्व कर्म प्रतिबद्ध न होतां ज्ञानांत अंतर्भूत होतें, (गी.भा.अ. ४ श्लो.३३ पृ. ४४९) असें येथेंच सांगितलें आहे. (तत्त्वज्ञानानें पुरुष कृतार्थ होतो, याविषयीं मनूची संमति दाखवितात-)—'**विशेषतः ब्राह्मणस्य एतत् हि**

**जन्मसामग्र्यं'**—विशेषतः ब्राह्मणाचें आत्मज्ञान-वेदाभ्यासादि हेंच जन्मसाफल्य आहे.— ' **एतत् प्राप्य हि द्विजः कृतकृत्यः भवति अन्यथा न** '—या आत्मज्ञान-वेदाभ्यासादिकाला प्राप्त होऊनच द्विज कृतकृत्य होतो, त्यावांचून तो कृतकृत्य होत नाहीं,—**इति मानवं वचनं**—असें मनूचें वचन आहे.—**हे भारत यतः एतत् परमार्थतत्त्वं त्वं मत्तः श्रुतवान् असि ततः कृतार्थः इति**—हे भरतवंशजा ! ज्या अर्थी हें परमार्थतत्त्व तूं मजपासून ऐकलें आहेस, त्या अर्थी तूं कृतकृत्य आहेस-धन्य आहेस. [ तुझ्या भरतकुलांतील जन्माचें साफल्य झालें आहे. याप्रमाणें या अध्यायांत आत्म्याचें देहादिकांहून भिन्नत्व, चिद्रूपत्व, सर्वात्मत्व, व कार्यकारणरहित असल्यामुळे असंसारित्व सांगून तो आत्माच अखंड एकरस ब्रह्मरूप आहे, असा साक्षात् अनुभव आला असतां पुरुषार्थाची परिसमाप्ति सांगितली आहे. ] २०

इति भगवान् श्रीकृष्णांनीं गायलेल्या उपनिषदांतील—रहस्यविद्येंतील ब्रह्मविद्येपैकीं योग—उपाय-शास्त्रांतील पुरुषोत्तमयोगनांवाचा पंधरावा अध्याय विष्णुशर्मकृत सान्वयार्थ-सटीप-भाष्य-भाष्यार्थासह समाप्त झाला.



# अध्याय सोळावा.

## दैवासुरसंपद्विभागयोग.

**दैव्यासुरी राक्षसी चेति प्राणिनां प्रकृतयो नवमेऽध्याये सूचितास्तासां विस्तरेण प्रदर्शनायाभयं सत्त्वसंशुद्धिरित्यादिरध्याय आरभ्यते । तत्र संसारमोक्षाय दैवी प्रकृतिर्निबन्धनायाऽऽसुरी राक्षसी चेति दैव्या आदानाय प्रदर्शनं क्रियत इतरयोः परिवर्जनाय॥**

**भाष्यार्थ**—( पूर्वोत्तरसंगति-)—**नवमे अध्याये** ( पृ. ६९७-९८ ) **प्राणिनां दैवी आसुरी राक्षसी च इति प्रकृतयः सूचिताः**—नवव्या अध्यायांत प्राण्यांची दैवी, आसुरी व राक्षसी अशा तीन प्रकृती सुचविल्या.—**तासां विस्तरेण प्रदर्शनाय 'अभयं सत्त्वसंशुद्धिः' इत्यादिः अध्यायः आरभ्यते**—त्यांचें विस्ताराने स्वरूप-प्रदर्शन करण्यासाठीं 'अभयं सत्त्वसंशुद्धिः० ' इत्यादि अध्याय आरंभिला जातो. (पण त्यांच्या या स्वरूपप्रदर्शनाचा उपयोग काय ते विभागपूर्वक सांगतात-)—**तत्र दैवी प्रकृतिः संसारमोक्षाय आसुरी राक्षसी च निबन्धनाय**—त्यांतील दैवी-प्रकृति संसारांतून मुक्त होण्यास कारण होते व आसुरी आणि राक्षसी अत्यन्त बंधाला कारण होते.—**इति दैव्याः आदानाय इतरयोः परिवर्जनाय प्रदर्शनं क्रियते**—यास्तव दैवीप्रकृतीचें ग्रहण करण्यासाठीं व दुसऱ्या दोन प्रकृतीचें परिवर्जन करण्यासाठीं या अध्यायांत प्रदर्शन केलें जाते.

---

१. आचार्य असें म्हणतात; पण रहस्यकार आपल्या नेहमींच्या पद्धतीला अनुसरून अशी असंबद्ध पूर्वोत्तरसंगति दाखवितात—" पुरुषोत्तमयोग ही क्षराक्षरज्ञानाची परमावधि झाली. " ( पण पुरुषोत्तमयोग ही क्षराक्षर ज्ञानाची परमावधि कशी ? 'यो मां एव असंमूढः जानाति' [१०४५] या वचनाप्रमाणे ईश्वरज्ञान ही ज्ञानाची परमावधि आहे.क्षराक्षरज्ञान हा गीतेचा विषय नव्हे, हे आम्हीं वर सांगितलेच आहे. [पृ. ९८७ पहा] पंधराव्या अध्यायांत क्षर म्ह० सर्व व्यक्ताव्यक्त भूतें व अक्षर म्ह० मायाशक्ति यांना 'पुरुष' असें म्हणून त्यांचा जो निर्देश केला आहे तोहि परमात्मा उत्तम पुरुष आहे, हें सांगण्यासाठीं आहे. क्षराक्षरांचें प्रतिपादन करण्यासाठीं नव्हे. शिवाय रहस्यकार समजतात त्याअर्थी ते शब्द नाहींत. ) " खरें म्हटलें म्हणजे कर्मयोग आचरीत असतां त्यानेंच ईश्वराचे ज्ञान होऊन मोक्ष कसा मिळतो हे दाखविण्यासाठीच सातव्या अध्यायापासून जें ज्ञानविज्ञान सांगण्यास सुरवात केली " वगैरे जें रहस्यकारांचें म्हणणें आहे तें निराधार व असंबद्ध असल्यामुळें उपेक्ष्य समजून आम्ही त्याचें परीक्षण करीत नाहीं. तथापि ' कर्मयोग आचरीत असतां त्यानेंच ईश्वराचें ज्ञान होऊन मोक्ष कसा मिळतो, हें दाखविण्यासाठीं सातव्या अध्यायापासून ज्ञान-विज्ञानास सुरवात केली' असें म्हटल्यास कर्मयोग ज्ञानाचे साधन आहे,असें रहस्यकारांच्या मुखानेंच सिद्ध होतें. पण मग त्यांनीं मोठ्या जोरानें " कर्मयोग व सांख्य हे स्वतंत्र तुल्य

**श्रीभगवान् उवाच**—श्रीकृष्ण म्हणाले—

**अभयं सत्त्वसंशुद्धिर्ज्ञानयोगव्यवस्थितिः ।**
**दानं दमश्च यज्ञश्च स्वाध्यायस्तप आर्जवम् ॥१॥**

**अन्वयार्थ—अभयं**—शास्त्राने उपदेशिलेल्या अर्थाचे निर्भयपणें-निःशंकपणे अनुष्ठान करणे,—**सत्त्वसंशुद्धिः**—चित्ताची अतिशय शुद्धि-कपटादिकांचा त्याग करून शुद्धभावानें व्यवहार करणे—**ज्ञानयोगव्यवस्थितिः**—ज्ञान व योग यांतील तन्निष्ठता,—**दानं**—यथाशक्ति अन्नादिक वाटणे—**च दमः**—बाह्य इंद्रियांचा निग्रह,—**च यज्ञः**—व श्रौत अग्निहोत्र आणि स्मार्त देवयज्ञ,—**स्वाध्यायः**—ऋग्वेदादिकांचें पुण्यासाठी अध्ययन—**तपः**—कायिक, वाचिक व मानसिक तप—**आर्जवं**—अंतःकरणाचा सरलपणा. १

**अभयमभीरुता सत्त्वसंशुद्धिः सत्त्वस्यान्तःकरणस्य संव्यवहारेषु परवञ्चनमायानृतादिपरिवर्जनं शुद्धभावेन व्यवहार इत्यर्थः । ज्ञानयोगव्यवस्थितिर्ज्ञानं शास्त्रत आचार्यतश्चाऽऽत्मादिपदार्थानामवगमोऽवगतानामिन्द्रियाद्युपसंहारेणैकाग्रतया स्वात्मसंवेद्यतापादनं योगस्तयोर्ज्ञानयोगयोर्व्यवस्थितिर्व्यवस्थानं तन्निष्ठतैषा प्रधाना दैवी सात्त्विकी संपत् । यत्र च येषामधिकृतानां या प्रकृतिः संभवति सात्त्विकी सोच्यते । दानं यथाशक्ति संविभागोऽन्नादीनां, दमश्च बाह्यकरणानामुपशमोऽन्तःकरणस्योपशमं शान्तिं वक्ष्यति, यज्ञश्च श्रौतोऽग्निहोत्रादिः, स्मार्तश्च देवयज्ञादिः, स्वाध्याय ऋग्वेदाद्यध्ययनमदृष्टार्थं, तपो वक्ष्यमाणं शारीरादि, आर्जवमृजुत्वं सर्वदा ॥ १ ॥**

**भाष्यार्थ**—( पंधराव्या अध्यायांत ' कर्मानुबन्धीनि अधश्च मूलानि अनुसंततानि ' या वाक्यांत कर्मशब्दावरून ध्वनित ज्या होणाऱ्या वासना संसाराच्या अवान्तर मूलत्वानें सांगितल्या त्याच मनुष्यदेहांत पूर्वजन्मांतील कर्माच्या अनुसार सात्त्विकादि भेदानें व्यक्त होतात. सात्त्विक प्रकृति हीच दैवी प्रकृति असून आसुरी व राक्षसी या राजस व तामस प्रकृती आहेत. त्या तीन प्रकृतींचाच विस्तार करण्यासाठी भगवान् म्हणतात-) —**अभयं-अभीरुता**—अभय-अभीरुत्व म्ह० शास्त्राने सांगितलेल्या अर्थामध्यें संदेह सोडून प्रवृत्त होणे-त्याचें तत्परतेनें अनुष्ठान करणें—**सत्त्वसंशुद्धिः-सत्त्वस्य अन्तःकरणस्य संव्यवहारेषु परवञ्चन माया-अनृतादिपरिवर्जनं**—सत्त्व-

---

बल मोक्षाचे मार्ग आहेत,' एक दुसऱ्याचें अंग नव्हे, ज्ञान झाल्यावर आयुष्यक्रमण कसें करावें, येथून गीतेला आरंभ आहे" इत्यादि जें सांगितलें आहे ते सर्व खोटे ठरते ! शिवाय कर्मयोगानेंच ईश्वराचें ज्ञान कसे होणार ? कर्मयोगानें चित्तशुद्धि होईल, ईश्वराची प्रसन्नता होईल, म्हणजे ज्ञानाची पूर्व तयारी होईल.पण त्यानेंच साक्षात् ईश्वरज्ञान होणें शक्य नाही.

संशुद्धि–सत्त्वाची–अन्तःकरणाची शुद्धि म्ह० दुसऱ्याशीं व्यवहार करितांना परवंचन–दुसऱ्याला फसवून वश करून घेणे, माया–मनांत निराळाच आशय धरून बाहेर त्याच्या अगदी उलट व्यवहार करणें, अनृत–जसे ठाऊक असेल तसे न सांगतां–भलतेच सांगणें, फसविणे, इत्यादिकांना सर्वथा वर्ज करणे, म्हणजे—**शुद्धभावेन व्यवहारः इत्यर्थः**—शुद्धभावाने व्यवहार करणे, असा याचा भावार्थ —**ज्ञानयोगव्यवस्थितिः–ज्ञानं शास्त्रतः आचार्यतः च आत्मादिपदार्थानां अवगमः**—ज्ञानयोगव्यवस्थितिः–ज्ञान म्ह० शास्त्रावरून व आचार्यांच्या मुखाने आत्मा-अनात्मा इत्यादि पदार्थांचा अवबोध—**अवगतानां इन्द्रियादि-उपसंहारेण एकाग्रतया आत्मसंवेद्यतापादनं योगः**—आणि अवगत–ज्ञात झालेल्या त्या पदार्थांना इन्द्रियादिकांच्या उपसंहाराने मनाच्या एकाग्रतनें स्वसंवेद्यतेला प्राप्त करणे, त्यांचा साक्षात् अनुभव घेणें, हा योग,—**तयोः ज्ञान-योगयोः व्यवस्थितिः–व्यवस्थानं–तन्निष्ठता**—त्या ज्ञानयोगांमध्यें व्यवस्थिति विशेषप्रकारचें अवस्थान–तन्निष्ठता–त्या ज्ञानयोगामध्यें निश्चयानें स्थित होणे,—**एषा प्रधाना दैवी–सात्त्विकी संपत्**—ही तीन प्रकारची मुख्य दैवी म्ह० सात्त्विकी संपत्ति आहे. ( याच सात्त्विकी प्रकृतीला अधिक स्पष्ट करून सांगतात–)—**यत्र च येषां अधिकृतानां या प्रकृतिः संभवति सा सात्त्विकी उच्यते**—ज्या ज्ञानामध्ये किंवा कर्मामध्ये अधिकृत असलेल्या लोकांची जी अभीरुत्वादि प्रकृति संभवते, तीच त्यांची त्यांतील सात्त्विकी संपत् म्हटली जाते.(असो; याप्रमाणे महाभाग्यवानांची अत्युत्तम दैवी संपत्ति सांगून आतां इतर लोकांची सर्वसा-

---

१. रहस्यकार 'सत्त्वसंशुद्धिः' याचा अर्थ ' शुद्धसात्त्विक वृत्ति ' असा करितात. पण तो मूळ शब्दांतून कसा निष्पन्न होतो ते त्यांचे त्यांसच माहीत. वस्तुतः यांत सत्त्व व संशुद्धि असे दोन शब्द आहेत आणि सत्त्व म्ह० अंतःकरण, त्याची संशुद्धि, हाच त्याचा सरळ व व्याकरणशुद्ध अर्थ आहे.

२. 'ज्ञानयोगव्यवस्थितिः ' याचा अर्थ " ज्ञानमार्ग व कर्ममार्ग यांची तारतम्याने व्यवस्था " असा अर्थ ते करितात व टीपेत म्हणतात—" ज्ञानयोगव्यवस्थिति–या शब्दाचा अर्थ आम्ही गीता ४.४१ व ४२ याश्लोकांच्या आधारे कर्मयोगपर केला आहे." पण त्याचा अर्थ तसा होऊं शकत नाही. 'ज्ञानयोगयोः व्यवस्थितिः' असाच त्याचा विग्रह होऊं शकतो. ज्ञान व योग यांतील व्यवस्थिति म्ह० विशेष अवस्थिति–अवस्थान–निष्ठा–तत्परता, हाच सरळ व व्याकरणशुद्ध अर्थ आहे. 'तारतम्याने व्यवस्था' हा अर्थ रहस्यकारांच्या पदरचा आहे व तो मुळाला सोडून आहे. त्यांत स्वारस्यहि कांहीच नाही. गी. ४.४१ व ४२ यांत ज्ञान व योग असे नुस्ते शब्द आले आहेत. पण त्यांवरून असाच अर्थ येथें केला पाहिजे असें मानण्यास कांहीं कारण नाही. शिवाय ज्ञानमार्ग व कर्ममार्ग यांची व्यवस्था हा दैवीसंपत्तीचा एक गुण कसा होईल? कारण अभयादि दुसरे सर्व पुरुषाचे धर्म–स्वभाव आहेत, व ही व्यवस्था ज्ञान-कर्ममार्गांची आहे. ज्ञान-कर्म-व्यवस्था हा पुरुषाचा स्वभाव होऊं शकत नाही. तसेच ' ज्ञान-कर्ममार्गांची तारतम्यानं व्यवस्था ' असा जरी अर्थ केला तरी तो कर्मयोगपर कसा होतो ? तात्पर्य, सर्वच असबद्ध !

धारण यथासंभव दैवी संपत्ति सांगतात-)—**दानं-अन्नादीनां यथाशक्ति संविभागः**—दान म्ह० अन्नादिकांचा यथाशक्ति संविभाग-उत्तम विभाग करून देणें, क्षुधितादिकांना यथाशक्ति अन्नादिक देणें,—**दमः च बाह्यकरणानां उपशमः**—दम म्ह० श्रोत्रादि बाह्य इन्द्रियांचा उपशम, ('बाह्य इन्द्रियांचा' असेंच कां म्हटलें ? उत्तर-)—**अन्तःकरणस्य उपशमं-शान्तिं वक्ष्यति**—कारण अन्तःकरणाचा उपशम पुढें 'शान्ति' या शब्दानें भगवान् सांगणार आहेत.—**यज्ञः च श्रौतः अग्निहोत्रादिः**—व यज्ञ म्ह० श्रौत अग्निहोत्रादि—**स्मार्तः च देवयज्ञादिः**—आणि स्मार्त देवयज्ञादि हा यज्ञ,—**स्वाध्यायः अदृष्टार्थं ऋग्वेदादि-अध्ययनं**—स्वाध्याय म्ह० अदृष्टासाठीं-पुण्यासाठीं ऋग्वेदादिकांचें अध्ययन,—**तपः-शारीरादि वक्ष्यमाणं**—तप म्ह० पुढें सांगितलेलें शारीरादिक तप (अ.१७श्लो १४-१६)—**आर्जवं-सर्वदा ऋजुत्वं**—आर्जव म्ह० सर्वदा मनाचा सरळपणा. १.

**अहिंसा सत्यमक्रोधस्त्यागः शान्तिरपैशुनम् ।**
**दया भूतेष्वलोलुप्त्वं मार्दवं ह्रीरचापलम् ॥२॥**
**तेजः क्षमा धृतिः शौचमद्रोहो नातिमानिता ।**
**भवन्ति संपदं दैवीमभिजातस्य भारत ॥३॥**

**अन्वयार्थ—अहिंसा**—प्राण्यांना पीडा न देणे—**सत्यं**—अप्रिय व अनृत भाषण न करणें—**अक्रोधः**—क्रोध आला असताहि त्याला शांत करणे,—**त्यागः**—संन्यास—**शान्तिः**—अन्तःकरणाचा उपशम—**अपैशुनं**—एखाद्याची गुप्त गोष्ट दुसऱ्याला न सांगणे,—**भूतेषु दया**—दुःखी जीवांवर कृपा करणे,—**अलोलुप्त्वं**—विषय समीप असले तरी इंद्रियांचे विकाररहित्य,—**मार्दवं**—मृदुत्व—**ह्रीः**—अकार्याविषयीं लोकलज्जा,—**अचापलं**—कारणावांचून हात-पाय इत्यादिकांचा व्यापार न करणें.—**तेजः**—प्रगल्भता-विशिष्ट सामर्थ्य-धीटपणा—**क्षमा**—कोणी कांहीं अपराध केला असताहि मनांत विकार उत्पन्न न होऊं देणें—**धृतिः**—शरीर, इंद्रिये इत्यादिकांना उत्साह देणारे धैर्य,—**शौचं**—बाह्य व आंतर शुद्धि,—**अद्रोहः**—दुसऱ्यांना मारण्याची इच्छा न करणे,—**न अतिमानिता**—अतिशय मानित्व न धारण करणे—**हे भारत**—हे अर्जुना!—**दैवीं संपदं**—दैवी संपत्तीला—**अभिजातस्य**—अनुलक्षून उत्पन्न झालेल्या पुरुषामध्यें हे गुण—**भवन्ति**—असतात. ३.

**अहिंसाऽहिंसनं प्राणिनां पीडावर्जनं, सत्यमप्रियानृतवर्जितं यथाभूतार्थवचनम्, अक्रोधः परैराक्रुष्टस्याभिहतस्य वा प्राप्तस्य क्रोधस्योपशमनं, त्यागः संन्यासः पूर्वं**

---

१ येथील 'आदि' शब्दानें पितृयज्ञ, भूतयज्ञ व मनुष्ययज्ञ हे तीन यज्ञ घ्यावे. ब्रह्मयज्ञ स्वाध्यायशब्दानें पृथक् सांगितला आहे.

दानस्योक्तत्वात्, शान्तिरन्तःकरणस्योपशमः, अपैशुनमपिशुनता परस्मै पररन्ध्रप्रकटीकरणं पैशुनं तदभावोऽपैशुनं, दया कृपा भूतेषु दुःखितेषु, अलोलुप्त्वमिन्द्रियाणां विषयसंनिधावविक्रिया, मार्दवं मृदुताऽक्रौर्यं ह्रीर्लज्जा, अचापलमसति प्रयोजने वाक्पाणिपादादीनामव्यापारयितृत्वम् ॥ २ ॥

**भाष्यार्थ—किंच**—दैवी संपत्तीला अनुलक्षून उत्पन्न झालेल्या पुरुषाचीं आणखीं विशेषणें 'अहिंसा०' इत्यादि दोन श्लोकांनीं सांगतात—**अहिंसा-अहिंसनं प्राणिनां पीडावर्जनं**—अहिंसा म्ह० अहिंसन-प्राण्यांची पीडा वर्ज करणें,—**सत्यं अप्रियानृतवर्जितं यथाभूतार्थवचनं**—सत्य म्ह० अप्रिय व अनृत वर्ज करून वस्तुस्थिति जशी असेल तसें सांगणे—**अक्रोधः-परैः आक्रुष्टस्य अभिहतस्य वा प्राप्तस्य क्रोधस्य उपशमनं**—अक्रोध म्ह० दुसऱ्यांनीं ज्याला शिव्या दिल्या किंवा मारलें आहे त्यानें स्वभावतःच आलेल्या क्रोधाचें उपशमन करणें,—**त्यागः-संन्यासः पूर्वं दानस्य उक्तत्वात्**—त्याग म्ह० संन्यास,कारण पूर्वीं दान सांगितलें आहे. ( म्हणून येथील त्यागशब्दाचा संन्यास असाच अर्थ केला पाहिजे. )—**शान्तिः-अन्तःकरणस्य उपशमः**—शांति म्ह० अन्तःकरणाचा उपशम,—**अपैशुनं-अपिशुनता-परस्मै पररन्ध्रप्रकटीकरणं पैशुनं-तदभावः अपैशुनं**—अपैशुन म्ह० अपिशुनता-दुसऱ्याला दुसऱ्याचें रंध्र प्रकट करणें-दुसऱ्याचें छिद्र सांगणे, हें पैशुन आहे, त्याचा जो अभाव तें अपैशुन—**दया-दुःखितेषु भूतेषु कृपा**—दया म्ह० दुःखित भूतांवर कृपा—**अलोलुप्त्वं-इन्द्रियाणां विषयसंनिधौ अविक्रिया**—अलोलुप्त्व म्ह० विषयाच्या सानिध्यामध्यें इंद्रियांची अविक्रिया—**मार्दवं-मृदुता-अक्रौर्यं**—मार्दव म्ह० मृदुता-अक्रूरता,—**ह्रीः-लज्जा**—अकार्यामुळें होणारी जी निंदा तिच्यायोगानें होणारी एक प्रकारची मनोवृत्ति, हीच ह्री म्ह० लज्जा होय.—**अचापलं-असति प्रयोजने वाक्पाणिपादानां अव्यापारयितृत्वं**—अचापल-कांहीं कारण नसतांना वाक्, हात, पाय इत्यादिकांची हालचाल न करणें. २.

किंच—तेजः प्रागल्भ्यं न त्वग्गता दीप्तिः, क्षमाऽऽक्रुष्टस्य ताडितस्य वाऽन्तर्विक्रियानुत्पत्तिरुत्पन्नायां विक्रियायां प्रशमनमक्रोध इत्यवोचम, इत्थं क्षमाया अक्रोधस्य च विशेषः, धृतिर्देहेन्द्रियेष्ववसादं प्राप्तेषु तस्य प्रतिषेधकोऽन्तःकरणवृत्तिविशेषो येनोत्तम्भितानि करणानि देहश्च नावसीदन्ति, शौचं द्विविधं मृज्जलकृतं बाह्यमाभ्यन्तरं च मनोबुद्ध्योर्नैर्मल्यं मायारागादिकालुष्याभाव एवं द्विविधं शौचम्, अद्रोहः परजिघांसाभावोऽहिंसनं, नातिमानिताऽत्यर्थं मानोऽतिमानः सः यस्य विद्यते सोऽतिमानी तद्भावोऽतिमानिता तदभावो नातिमानिताऽऽत्मनः पूज्यतातिशयभावनाभाव इत्यर्थः । भवन्त्यभयादीन्येतदन्तानि संपदमभिजातस्य । किंविशिष्टां संपदं दैवीं देवानां संपदमभिलक्ष्य जातस्य दैवविभूत्यर्हस्य भाविकल्याणस्येत्यर्थो हे भारत ॥ ३ ॥

**भाष्यार्थ—किंच**—तसेंच,—**तेजः-प्रागल्भ्यं-त्वग्गता दीप्तिः न**—तेज म्ह० प्रगल्भपणा-धीटपणा-एक प्रकारचें सामर्थ्य, येथें तेज म्ह० त्वचेंतील दीप्ति नव्हे.

कारण हें अध्यात्म प्रकरण आहे.—**क्षमा-आक्रुष्टस्य ताडितस्य वा अन्तर्विक्रिया-अनुत्पत्तिः**—क्षमा म्ह० शिव्या दिलेल्या किंवा ताडन केलेल्या पुरुषाच्या मनांत विकारच उत्पन्न न होणें,—**उत्पन्नायां विक्रियायां प्रशमनं अक्रोधः इति अवोचाम**—विक्रिया उत्पन्न झाली असतां तिचे पूर्णपणे शमन करणें हा अक्रोध, असें आम्हीं वर सांगितलेंच आहे.—**इत्थं क्षमायाः अक्रोधस्य च विशेषः**—याप्रमाणें क्षमा व अक्रोध यांमध्ये विशेष आहे-असा क्षमा व अक्रोध या शब्दांच्या अर्थांत फरक आहे.—**धृतिः-देहेन्द्रियेषु अवसादं प्राप्तेषु तस्य प्रतिषेधकः अन्तःकरणवृत्तिविशेषः**—धृति म्ह० देह व इंद्रियें थकलीं असतां-श्रान्त झालीं असतां त्या थकव्याचा निषेध करणारी एक प्रकारची अन्तःकरणवृत्ति-वृत्तिविशेष—**येन उत्तम्भितानि करणानि देहः च न अवसीदन्ति**—ज्या धृतिसंज्ञक वृत्तिविशेषाकडून उद्दीपित-उत्साहयुक्त केलीं गेलेलीं इंद्रियें व देह अवसन्न-खिन्न-कार्याला असमर्थ होत नाहींत,—**शौचं-द्विविधं**—दोन प्रकारचे शौच—**मृज्जलकृतं बाह्यं च मनोबुद्धयोः नैर्मल्यं आभ्यन्तरं माया-रागादिकालुष्याभावः एवं द्विविधं शौचं**—मृत्तिका व जल याच्यायोगानें केलेले जे शौच ते बाह्य आणि मन व बुद्धि यांची निर्मलता हे आभ्यंतर म्ह० माया, राग-आसक्ति, द्वेष, इत्यादिकलुषतेचा-मलिनतेचा अभाव, याप्रमाणे दोन प्रकारचे शौच—**अद्रोहः-परजिघांसाभावः-अहिंसनं**—अद्रोह म्ह० दुसऱ्याचा घात करण्याची इच्छा नसणे, हिंसा न करणे,—**नातिमानिता-अत्यर्थं मानः-अतिमानः सः यस्य विद्यते सः अतिमानी-तद्भावः-अतिमानिता तदभावः-नातिमानिता**—न अतिमानिता-अतिशय मान हाच अतिमान, तो अतिमान ज्याला असतो तो अतिमानी, त्याचा भाव म्ह० अतिमानीपणा हीच अतिमानिता, तिचा अभाव-नातिमानिता म्ह०—**पूज्यतातिशय-भावनाभावः इत्यर्थः**—आपल्या अतिशय पूज्यतेविषयींची जी भावना तिचा अभाव असणे, हीच ' नातिमानिता ' होय, असा भावार्थ. ( ही सर्व विशेषणे कोणाचीं, अशी आकांक्षा झाली असता सांगतात-)—**अभयादीनि एतदन्तानि संपदं-अभिजातस्य भवन्ति**—अभयापासून नातिमानिता येथपर्यंत सांगितलेलीं विशेषणे संपत्तीला अनुलक्षून उत्पन्न झालेल्या पुरुषाचीं आहेत—**किंविशिष्टां संपदं**—कोणत्या विशेषणाने विशिष्ट संपत्तीला अनुलक्षून झालेल्या पुरुषाची?—**दैवीं-देवानां संपदं अभिलक्ष्य जातस्य-दैवविभूति-अर्हस्य-भाविकल्याणस्य इत्यर्थः हे भारत**-दैवी-देवाच्या संपत्तीला अनुलक्षून उत्पन्न झालेल्या-देवांच्या विभूतीला योग्य असलेल्या-पुढें ज्याचे कल्याण व्हावयाचे आहे, त्याचीं हीं सर्व विशेषणे आहेत असा याचा भावार्थ. हे अर्जुना! ( दैवी संपत्तीला प्राप्त झालेल्या पुरुषाचीं हीं सर्व विशेषणे आहेत ) ३.

**दम्भो दर्पोऽतिमानश्च क्रोधः पारुष्यमेव च ।**
**अज्ञानं चाभिजातस्य पार्थ संपदमासुरीम् ॥४॥**

**अन्वयार्थ—हे पार्थ**—हे अर्जुना!—**आसुरीं संपदं**—आसुरी संपत्तीला—**अभिजातस्य**—अनुलक्षून उत्पन्न झालेल्या पुरुषाचे—**दम्भः**—धार्मिकता प्रकट करणें—**दर्पः**—गर्व,—**च**—व—**अतिमानः**—मी उत्कृष्ट आहे, असें मानणें—**क्रोधः**—कोप,—**पारुष्यं एव**—कठोर भाषण-मर्मभेदक शब्द बोलणें—**च**—व—**अज्ञानं**—मिथ्या प्रत्यय-कर्तव्य व अकर्तव्य याविषयींचे अविवेकज्ञान,—हे गुण असतात.४

**अथेदानीमासुरी संपदुच्यते—दम्भो धर्मध्वजित्वम्, दर्पो धनस्वजनादिनिमित्त उत्सेकोऽतिमानः पूर्वोक्तः क्रोधश्च, पारुष्यमेव च परुषवचनं यथा काणं चक्षुष्मान्, विरूपं रूपवान्, हीनाभिजनमुत्तमाभिजन इत्यादि। अज्ञानं चाविवेकज्ञानं मिथ्याप्रत्ययः कर्तव्याकर्तव्यादिविषयमभिजातस्य पार्थ। किमभिजातस्येत्याह—असुराणां संपदासुरी तामभिजातस्येत्यर्थः॥ ४॥**

**भाष्यार्थ**—(ग्राह्य म्हणून दैवीसंपत्ति सांगून त्याज्य म्हणून आसुरी संपत्ति सांगतात-)—**अथ इदानीं आसुरी संपद् उच्यते**—आता यापुढील श्लोकात आसुरी संपद् सांगितली जाते.—**दम्भः-धर्मध्वजित्वं**—दंभ म्ह० धार्मिकतेचे ढोंग, मी मोठा धार्मिक आहे, असें बाह्य वेष व आचार यांवरून लोकांस भासविणें,—**दर्पः-धनस्वजनादिनिमित्तः उत्सेकः**—दर्प म्ह० धन, स्वजन इत्यादि निमित्ताने उद्भवणारा मद-[पुष्कळ धन असणे, किंवा बाप, बंधु, वगैरे आप्त मोठा अधिकारी-राजा, प्रधान वगैरे असणे, यांमुळे सामान्य मनुष्याचे ठिकाणी मद उत्पन्न होतो. त्यामुळे मोठमोठया विद्वान् व शीलसंपन्न पुरुषांचाहि तो धिक्कार करितो.]—**अतिमानः च पूर्वोक्तः क्रोधः**—अतिमान-स्वतःमध्यें उत्कृष्टत्वाचा आरोप करणे, व पूर्वोक्त क्रोध (पृ. १०५६)—**पारुष्यं एव च-परुषवचनं यथा काणं चक्षुष्मान् विरूपं रूपवान् हीनाभिजनं उत्तमाभिजनः इत्यादि**—व पारुष्य कठोर-कर्कश वचन, जसें-काण्या मनुष्याला हा सुंदर नेत्रांनी युक्त आहे-याचे नेत्र फार चांगले आहेत, असें म्हणणे; कुरूपाला सुस्वरूप म्हणणे, हीन कुलांत झालेल्याला उत्तम कुलांत झालेला वगैरे म्हणणे—**अज्ञानं च-कर्तव्य-अकर्तव्यादिविषयं अविवेकज्ञानं-मिथ्याप्रत्ययः**—आणि अज्ञान-कर्तव्य, अकर्तव्य, इत्यादिकाविषयींचे अविवेकज्ञान-मिथ्याप्रत्यय-हीं विशेषणे—**पार्थ अभिजातस्य**—हे पार्थ, अभिजाताचीं असतात—**किं अभिजातस्य इति आह**—कशाला अनुलक्षून उत्पन्न झालेल्या, तें सांगतात—**असुराणां संपद् आसुरी तां अभिजातस्य इत्यर्थः**—असुरांची जी संपत्ति-ती आसुरी संपत्ति, तिला अनुलक्षून उत्पन्न झालेल्या पुरुषाची, असा याचा भावार्थ. [आसुरसंपत्तीला प्राप्त झालेल्या पुरुषाची हीं विशेषणें आहेत.] ४

**दैवी संपद्विमोक्षाय निबन्धायासुरी मता।**
**मा शुचः संपदं दैवीमभिजातोऽसि पांडव॥५॥**

**अन्वयार्थ—दैवी संपद्**—देवांची संपत्ति—**विमोक्षाय**—संसारांतून मुक्त होण्यासाठी आहे व—**आसुरी (संपद्)**—असुरांची संपत्ति—**निबन्धाय**—नियत बंधासाठी आहे, असे—**मता**—मानलेलं आहे.—**पांडव**—हे अर्जुना!—**मा शुचः**—तूं शोक करूं नको. तूं—**दैवीं संपदं**—दैवी संपत्तीला—**अभिजातः असि**—अनुलक्षून उत्पन्न झाला आहेस. ५.

अनयोः संपदोः कार्यमुच्यते—दैवी संपद्या सा विमोक्षाय संसारबन्धनात्, निबन्धाय नियतो बन्धो निबन्धस्तदर्थमासुरी संपन्मताऽभिप्रेता तथा राक्षसी। तत्रैवमुक्तेऽर्जुनस्यान्तर्गतं भावं किमहमासुरसंपद्युक्तः किं वा दैवसंपद्युक्त इत्येवमालोचनारूपमालक्ष्याऽऽह भगवान्मा शुचः शोकं मा कार्षीः. संपदं दैवीमभिजातोऽस्यभिलक्ष्य जातोऽसि भाविकल्याणस्त्वमसीत्यर्थो हे पाण्डव ॥ ५ ॥

**भाष्यार्थ—अनयोः संपदोः कार्यं उच्यते**—या दोन संपत्तींचें कार्य म्ह० फलविभाग सांगितला जातो—**या दैवी संपद् सा संसारबन्धात् विमोक्षाय**—जी दैवी संपत् ती संसारबन्धापासून विशेषेकरून मुक्त होण्यासाठी आहे.—**निबन्धाय-नियतः बन्धः निबन्धः तदर्थं आसुरी संपत् मता-अभिप्रेता**—जो नियत बंध तो निबंध, त्या निबंधासाठी आसुरी संपद् अभिमत-अभिप्रेत-इष्ट आहे,—**तथा राक्षसी**—त्याचप्रमाणे राक्षसी संपत्तिहि निबंधालाच कारण होते.—**तत्र एवं उक्ते**—याप्रमाणे त्या संपत्तींचा फलविभाग सांगितला असतां—**अर्जुनस्य अन्तर्गतं भावं-किं अहं आसुरसंपद्युक्तः किंवा दैवसंपद्युक्तः इति-एवं आलोचनारूपं आलक्ष्य भगवान् आह**—अर्जुनाचा अन्तर्गत भाव म्ह० मी आसुरसंपत्तीने युक्त आहें कीं दैवसंपत्तीने युक्त आहे, अशा प्रकारचा विचार मनांत करणें, या स्वरूपाचा त्याचा आशय ओळखून भगवान् म्हणतात—**मा शुचः-शोकं मा कार्षीः**—शोक करूं नको: तूं चिंता करूं नको-खिन्न होऊं नको.—**हे पाण्डव (त्वं) दैवीं संपदं अभिजातः असि-अभिलक्ष्य जातः असि**—हे अर्जुना! तूं दैवी संपत्तीला अनुलक्षून-उत्पन्न झाला आहेस. तिला अभिलक्षित करून-दैवी संपत्तीला उद्देशून जन्म घेतला आहेस—**भाविकल्याणः त्वं असि इत्यर्थः**—तूं भाविकल्याण आहेस-तुझे पुढे अतिशय कल्याण होणार आहे, असा याचा भावार्थ. ५

**द्वौ भूतसर्गौ लोकेऽस्मिन्दैव आसुर एव च।**
**दैवो विस्तरशः प्रोक्त आसुरं पार्थ मे शृणु ॥६॥**

**अन्वयार्थ—अस्मिन् लोके**—या लोकीं—**दैवः च आसुरः एव**—दैव व आसुरच असे—**द्वौ भूतसर्गौ**—दोन मनुष्यांचे सर्ग आहेत. त्यांतील—**दैवः**—देवांची सृष्टि-सर्ग—**विस्तरशः**—विस्तारपूर्वक—**प्रोक्तः**—सांगितला.—**पार्थ**—हे पार्था!—**मे**—मजपासून—**आसुरं सर्गं**—असुरांचा सर्ग तूं—**शृणु**—ऐक. ६.

**द्वौ भूतेति द्वौ द्विसंख्याकौ भूतसर्गौ भूतानां मनुष्याणां सर्गौ सृष्टी भूतसर्गौ सृज्येते इति सर्गौ भूतान्येव सृज्यमानानि दैवासुरसंपद्युक्तानि द्वौ भूतसर्गावित्युच्येते "द्वया ह प्राजापत्या देवाश्चासुराश्च" इति श्रुतेः। लोकेऽस्मिन्संसार इत्यर्थः। सर्वेषां द्वैविध्योपपत्तेः। कौ तौ भूतसर्गावित्युच्येते प्रकृतावेव दैव आसुर एव च। उक्तयोरेव पुनरनुवादे प्रयोजनमाह दैवो भूतसर्गोऽभयं सत्त्वसंशुद्धिरित्यादिना विस्तरशो विस्तरप्रकारैः प्रोक्तः कथितो न त्वासुरो विस्तरशोऽतस्तत्परिवर्जनार्थमासुरं पार्थ मे मम वचनादुच्यमानं विस्तरशः शृण्ववधारय ॥ ६ ॥**

**भाष्यार्थ—'द्वौ भूत०' इति**—दयाशून्य राक्षसांची तिसरी प्रकृति आहे. पण ती येथे का सांगितली नाहीं, अशी आशंका घेऊन आसुरीमध्येच तिचा अन्तर्भाव होतो, या आशयानें 'द्वौ भूतसर्गौ०' या श्लोकानें सांगतात—**द्वौ-द्विसंख्याकौ-भूतसर्गौ-भूतानां-मनुष्याणां सर्गौ सृष्टी-भूतसर्गौ**—दोन-'द्वि' या संख्येचे भूतसर्ग-भूतांचे-मनुष्यांचे सर्ग-सृष्टि-दोन भूतसर्ग आहेत.—**सृज्येते इति सर्गौ**—जे दोन उत्पन्न केले जातात ते सर्ग.—**भूतानि एव सृज्यमानानि दैवासुरसंपद्युक्तानि द्वौ भूतसर्गौ इति उच्येते**—दैव व आसुर या संपत्तीने युक्त अशी उत्पन्न केली जाणारीं भूतेंच 'दोन भूतसर्ग' म्हणून म्हटले जातात.—**द्वयाः ह प्राजापत्याः देवाः च आसुराः च इति श्रुते**—प्रजापतीचे दोन पुत्र आहेत एक देव व दुसरे असुर, ( बृ० भाष्यार्थ अ. १. ३. १. पृ. ८१ ) अशी याविषयी श्रुति आहे—**लोके-अस्मिन् संसारे इत्यर्थः**—लोकांमध्ये म्ह० या संसारांत, असा याचा भावार्थ. (अहोपण, या दोन प्रकृतींच्या लोकांहून निराळ्या प्रकृतींचे प्राणीहि संभवतात मग 'दोनच' असें कसे म्हणतां? उत्तर-)—**सर्वेषां द्वैविध्योपपत्तेः**—कारण सर्व प्राण्यांचे असें द्विविधत्वच संभवतें—**कौ तौ भूतसर्गौ इति उच्येते**—कोणते ते 'दोन भूतसर्ग' म्हणून म्हटलें जातात.—**प्रकृतौ एव दैवः च आसुरः एव**—प्रकृत असलेलेच दैव व आसुर हेच ते दोन भूतसर्ग होत.—**उक्तयोः एव पुनरनुवादे प्रयोजनं आह**—सांगितलेल्याच त्या दोन भूतसर्गांचा पुनः अनुवाद करण्यांत कोणतें प्रयोजन आहे ते-पुनरनुवादाचे कारण सांगतात—**दैवः भूतसर्गः 'अभयं सत्त्वसंशुद्धिः०'इत्यादिना विस्तरशः-विस्तरप्रकारैः प्रोक्तः-कथितः**—दैव भूतसर्ग 'अभयं सत्त्वसंशुद्धिः०' इत्यादि श्लोकांनीं विस्तारपूर्वक-सविस्तर सांगितला—**तु आसुरः विस्तरशः न ( उक्तः )**—पण आसुर सर्ग विस्तारपूर्वक सांगितला नाहीं.—**अतः पार्थ तत्परिवर्जनार्थं विस्तरशः उच्यमानं आसुरं मे-मम वचनात् शृणु-अवधारय**—यास्तव हे पृथापुत्रा, त्याचें परिवर्जन करण्यासाठीं सविस्तर सांगितला जाणारा आसुर सर्ग माझ्या वचनावरून तूं ऐक-निश्चित कर-समजून घे. ६

प्रवृत्तिं च निवृत्तिं च जना न विदुरासुराः ।
न शौचं नापि चाचारो न सत्यं तेषु विद्यते ॥७॥

**अन्वयार्थ—आसुराः जनाः**—आसुरी प्रकृतीचे जन—**प्रवृत्तिं च निवृत्तिं च**—प्रवृत्ति कोठें करावी व निवृत्त कशापासून व्हावें, तें—**न विदुः**—जाणत नाहींत—**तेषु**—त्यांच्या ठिकाणीं—**शौचं न**—शुचिर्भूतपणा नसतो.—**अपि च**—आणि तसाच—**आचारः**—सदाचार—**न**—नसतो व—**सत्यं न विद्यते**—सत्य नसते. ७

**आऽध्यायपरिसमाप्तेरासुरी संपत्प्राणिविशेषणत्वेन प्रदर्श्यते प्रत्यक्षीकरणेन च शक्यतेऽस्याः परिवर्जनं कर्तुमिति—प्रवृत्तिं च प्रवर्तनं यस्मिन्पुरुषार्थसाधने कर्तव्ये प्रवृत्तिस्तां निवृत्तिं च तद्विपरीतां यस्मादनर्थहेतोर्निवर्तितव्यं सा निवृत्तिस्तां च जना आसुरा न विदुर्न जानन्ति । न केवलं प्रवृत्तिनिवृत्ती एव न विदुर्न शौचं नापि चाऽऽचारो न सत्यं तेषु विद्यते । अशौचा अनाचारा मायाविनोऽनृतवादिनो ह्यासुराः ॥७॥**

**भाष्यार्थ—आ अध्यायपरिसमाप्तेः आसुरी संपत् प्राणिविशेषणत्वेन प्रदर्श्यते**—आतां या अध्यायाच्या परिसमाप्तीपर्यंत आसुरी संपत् प्राण्यांच्या विशेषणत्वानें प्रदर्शित केली जाते. ( एवढा विस्तार करण्याचें काय कारण? उत्तर-)—**प्रत्यक्षीकरणेन च अस्याः परिवर्जनं कर्तुं शक्यते इति**—प्रत्यक्ष ज्ञान झाल्यानें हिचें परिवर्जन करणे शक्य आहे-आसुरी संपत्ति कोणती हें प्रत्यक्ष कळलें म्हणजे तिला वर्ज करितां येतें, म्हणून तिचा येथें विस्तार केला आहे.—**प्रवृत्तिं च प्रवर्तनं यस्मिन् पुरुषार्थसाधने कर्तव्ये प्रवृत्तिः तां**—प्रवृत्ति म्ह० प्रवर्तन. ज्या अवश्य कर्तव्य असलेल्या पुरुषार्थसाधनांत प्रवृत्ति, त्या प्रवृत्तीला—**निवृत्तिं च तद्विपरीतां**—आणि त्या प्रवृत्तीच्या विपरीत असलेल्या निवृत्तीला—**यस्मात् अनर्थहेतोः निवर्तितव्यं सा निवृत्तिः तां च**—ज्या अनर्थाच्या हेतूपासून संसारसाधनापासून निवृत्त होणें उचित आहे ती निवृत्ति, त्या निवृत्तीला —**आसुराः जनाः नः विदुः—न जानन्ति**—आसुरजन जाणत नाहींत. आसुरजनांना पुरुषार्थाच्या विहित साधनानुष्ठानांत प्रवृत्त व्हावे व निषिद्ध संसारसाधनानुष्ठानापासून निवृत्त व्हावें, हें कळत नाहीं.—**केवलं प्रवृत्तिनिवृत्ती एव न विदुः इति न**—त्यांना केवल विहितप्रवृत्ति व निषिद्धनिवृत्तिच कळत नाहीं, असे नाहीं तर—**तेषु शौचं न आचारः अपि च न सत्यं न विद्यते**—त्यांच्या ठिकाणीं पूर्वोक्त द्विविध शौच नसतें, सदाचारहि नसतो व सत्य नसतें.—**आसुराः-अशौचाः अनाचाराः मायाविनः अनृतवादिनः हि**—आसुर जन अशुचि, दुराचरणी, मायावी-कपटी व असत्य भाषण करणारे असतात, हे प्रसिद्ध आहे. ७.

असत्यमप्रतिष्ठं ते जगदाहुरनीश्वरम् ।
अपरस्परसंभूतं किमन्यत्कामहैतुकम् ॥ ८ ॥

**अन्वयार्थ—ते**—आसुरी प्रकृतीचे जन—**जगत्**—हें सर्व जगत्—**असत्यं**—आम्हांप्रमाणें खोटें,—**अप्रतिष्ठं**—धर्माधर्मादि प्रतिष्ठारहित,—**अनीश्वरं**—ज्याचा कोणी शास्ता-ईश्वर नाहीं, असें—**अपरस्परसंभूतं**—कामी स्त्रीपुरुषांपासून उत्पन्न झालेलें—**किं अन्यत्**—दुसरें काय ?—**कामहैतुकं**—काम या हेतूपासूनच झालेलें आहे, असें—**आहुः**—सांगतात. ८

**किंच— असत्यं यथा वयमनृतप्रायास्तथेदं जगत्सर्वमसत्यमप्रतिष्ठं च नास्य धर्माधर्मौ प्रतिष्ठाऽतोऽप्रतिष्ठं चेति त आसुरा जना जगदाहुरनीश्वरं न च धर्माधर्मसव्यपेक्षकोऽस्य शासितेश्वरो विद्यत इत्यतोऽनीश्वरं जगदाहुः । किं चापरस्परसंभूतं कामप्रयुक्तयोः स्त्रीपुरुषयोरन्योन्यसंयोगाज्जगत्सर्वं संभूतम् । किमन्यत्कामहैतुकं कामहेतुकमेव कामहैतुकं किमन्यज्जगतः कारणं न किंचिददृष्टं धर्माधर्मादि कारणान्तरं विद्यते जगतः काम एव प्राणिनां कारणमिति लोकायतिकदृष्टिरियम् ॥ ८ ॥**

**भाष्यार्थ—किंच**—आसुर जनांची आणखीहि विशेषणे आहेत, असे पुढील 'असत्यं॰ ' या श्लोकाने सांगतात—**असत्यं-यथा वयं अनृतप्रायाः तथा इदं सर्वं जगत् असत्यं**—असत्य म्ह॰ जसे आम्ही बहुतेक असत्य-असत्यप्रचुर तसें हें सर्व जगत् असत्य आहे-( आम्हांमध्ये जसें असत्य फार व सत्य फारच थोडे, तसें हें सर्व जगत् असत्यप्रचुर आहे.)—**अप्रतिष्ठं च-अस्य धर्माधर्मौ प्रतिष्ठा न अतः अप्रतिष्ठं च इति ते आसुराः जनाः जगत् आहुः**—आणि अप्रतिष्ठ म्ह॰ याची धर्म व अधर्म ही प्रतिष्ठा नाहीं, म्हणून अप्रतिष्ठ, असें ते आसुरजन या जगाला म्हणतात.—**च धर्माधर्मसव्यपेक्षकः अस्य शासिता-ईश्वरः न विद्यते**—तसेच, धर्म व अधर्म यांची ज्याला विशेष अपेक्षा आहे, असा याचा शास्ता-ईश्वर नाहीं, —**इति-अतः जगत् अनीश्वरं आहुः**—त्यामुळे जगत् ईश्वररहित आहे, असें म्हणतात. ( अहोपण, केवल शास्त्रगम्य अदृष्टाच्या निमित्ताने प्रकृतीचा अधिष्ठाता होणारा ईश्वर जर नाहीं तर जगाची उत्पत्ति कशी होते ? अशी आशंका घेऊन सांगतात- )—**किंच अपरस्परसंभूतं-कामप्रयुक्तयोः स्त्रीपुरुषयोः अन्योन्यसंयोगात् सर्वं जगत् संभूतं**—आणि तें अपरस्परसंभूत आहे. म्हणजे कामानें प्रेरित झालेली स्त्री व पुरुष यांच्या अन्योन्यसंयोगापासून सर्व जगत् उत्पन्न झालें आहे.

---

१ 'अपरस्परसंभूतं' याचा अर्थ रहस्यकार-''अ-परस्परसंभूत म्ह॰ एकमेकांपासूनहि न झालेलें'' असा करितात.तो चिन्त्य आहे. तथापि या श्लोकावरील टीपेंत त्यांनी त्याचा बराच विचार केला आहे. ते म्हणतात—'' आमच्या मतें वेदान्त किंवा कापिल या दोन्ही शास्त्रांचे जगाच्या रचनेबद्दलचे सिद्धान्त नाकबूल करणाऱ्या चार्वाकादि नास्तिकांच्या मताचें हें वर्णन आहे. '' पण येथें वेदान्ताबरोबर कापिलसांख्य घेण्याचे कारण काय ? भगवान् व व्यास श्रौत सिद्धान्त सांगावयास प्रवृत्त झाले आहेत. निरीश्वरवादी सांख्यांच्या सिद्धान्त सांगावयास प्रवृत्त झालेले नाहींत. उलट 'अनीश्वरं जगत् आहुः ' या

वाक्यानें ईश्वराला न मानणारे कापिल सांख्य, जैन, बौद्ध, चार्वाक या सर्वांचा आसुरभावच व्यक्त होतो. रहस्यकारांनीं येथे कापिल सांख्याचा उल्लेख अगदी अप्रासंगिक केला आहे. पण त्यांना वेदान्ताबरोबर कापिल निरीश्वर सांख्यांच्या सिद्धान्ताचीच तेवढी कां बरें आठवण झाली ? व सेश्वरवादी योग, नैयायिक, वैशेषिक यांची आठवण कां झाली नाही ? कारण चार्वाकादिक नास्तिक या सर्वांचे सारखेच प्रतिस्पर्धी आहेत. अर्थात् ही त्याची कल्पनाच चुकलेली आहे. गीतेंत सांख्यदर्शनाचा सिद्धान्त सांगितलेला नाहीं, केवल वैदिक सिद्धान्त सांगितला आहे,हें आम्हीं वारंवार बोलून दाखविलें आहे,म्हणून येथे अधिक विस्तार करीत नाहीं. वस्तुतः आसुरी प्रकृतीचे लोक प्रत्यक्ष-एक-प्रमाणवादी असतात, एवढेंच येथें सांगावयाचे आहे. त्यापेक्षा उगीच अधिक कल्पना करणे व्यर्थ आहे. पण रहस्यकार आपल्या म्हणण्याचे समर्थन करण्यासाठीं म्हणतात. " वेदान्ती जग विनाशी मानून त्यातलें अविनाशी सत्य शोधून काढीत असतो. तेच सत्याचे सत्य तत्त्व जगाचा मूळ आधार किंवा प्रतिष्ठा आहे,असें मानितो 'ब्रह्म पुच्छं प्रतिष्ठा.' पण आसुरी लोक हे जग अ-सत्य म्ह० ज्यांत सत्य नाहीं आणि मग अर्थात्च अप्रतिष्ठ म्ह० ज्याला प्रतिष्ठा किंवा आधारहि नाहीं, असें मानितात. याप्रमाणें अध्यात्मशास्त्रांतील अव्यक्त परब्रह्म जरी आसुरी लोकास मान्य नसले तरी भक्तिमार्गांतील व्यक्त ईश्वर त्यांस मान्य असेल, अशी शंका येण्याचा संभव आहे. म्हणून 'अनीश्वर' हे तिसरे पद घालून आसुरी लोक ईश्वरहि मानीत नाहींत असें म्हटले आहे. " पण हा सर्व द्राविडी प्राणायाम फुकट आहे. कारण येथे आसुरी प्रकृतीच्या लोकांची सर्व साधारण समजूत सांगितली आहे. प्रत्येक शब्दानें ते वेदान्ती, भक्तिमार्गी सांख्य यांच्या म्हणण्याचे निरसन करीत बसले आहेत असें नाहीं. आसुरी लोक प्रत्यक्ष-एक-प्रमाणवादी असल्यामुळे प्रत्यक्ष दिसणाऱ्या जगाला असत्य मानतील हे शक्य नाहीं. ते जगत् सत्य आहे, असेच म्हणतात, व म्हणणार, हे उघड आहे. अर्थात असत्य म्ह० खोटे, आम्ही जसे खोटे तसे सर्व जगत् खोटे, हाच अर्थ बरोबर आहे. तसेच 'अप्रतिष्ठ' याची व्यवस्था लावण्यासाठीं 'ब्रह्म पुच्छं प्रतिष्ठा' या वाक्यापर्यंत जाण्याचें कारण नाहीं. शिवाय त्या श्रुतींत ब्रह्माला आनदमयाची प्रतिष्ठा म्हटले आहे. पंचकोशप्रकरणात नाभीच्या खालचा भाग ही जशी अन्नमयकोशाची प्रतिष्ठा, पृथिवी जशी प्राणमयकोशाची प्रतिष्ठा, अथर्वांगिरस ही जशी मनोमयकोशाची प्रतिष्ठा; महः-महत्तत्त्व ही जशी विज्ञानमयाची प्रतिष्ठा तशीच ब्रह्म ही आनदमयाची प्रतिष्ठा —पुच्छ आहे. ( तैत्ति भाष्यार्थ ब्रह्म. २ अनु. १-५ पृ. १०२ ते १२३ पहा ) अर्थात् येथें प्रतिष्ठाशब्दानें ब्रह्म न घेतां धर्माधर्मच घेणे उचित आहे. वेदान्ती अव्यक्त ब्रह्म मानितात व भक्तिमार्गी व्यक्त ईश्वर मानतात, ही समजूतहि भ्रामक आहे. अगोदर वेदान्त व भक्तिमार्ग हे भिन्न मार्ग आहेत, असें गीतेच्या दृष्टीनें म्हणतांच येत नाहीं; शिवाय भक्तिमार्गांतील ईश्वर व्यक्त, वगैरे कल्पनाहि निराधारच आहे. असो; पुढें ते म्हणतात—" आत्म्यापासून आकाश, आकाशापासून वायु वगैरे उपनिषदांतील क्रम किंवा प्रकृति व पुरुष हीं दोन स्वतंत्र मूलतत्त्वें मानून सत्त्व, रज, व तम या तीन गुणांच्या अन्योन्याश्रयानें म्ह० परस्पर मिश्रणाने सर्व व्यक्त पदार्थ उत्पन्न झाले आहेत, हा सांख्य शास्त्रांतील सृष्ट्युत्पत्तिक्रमहि सोडून द्यावा लागतो." ( आणि मग नैयायिक, वैशेषिक यांची ईश्वराच्या इच्छेनें

परमाणूंत क्रिया उत्पन्न होते. नंतर दोन परमाणूंचें द्व्यणुक, तीन द्व्यणुकांचें त्र्यणुक वगैरे क्रमानें जगत् होतें, हा पक्ष कां टाकतां ? नास्तिकांना तोहि सोडावा लागतोच ! पण रहस्य-कारांना सांख्य तेवढे प्रिय आहेत, योग, वैशेषिक वगैरे नाहींत, म्हणून त्यांनीं सांख्यांची तेवढी तरफदारी केली आहे. फार काय पण वेदान्ताला गौणत्व आणूनहि त्यांची अवास्तव तरफदारी केली आहे ! असो; ) " कारण ही सांखळी किंवा परंपरा जर कबूल केली तर दृश्य सृष्टीतील पदार्थांपासून मागे जातां जातां या जगाला कांहीं तरी मूळ आहे, असें मानावे लागेल, म्हणून आसुरी लोक जगातील पदार्थ अपरस्परसंभूत म्ह० एकमेकांपासून कोणत्यातरी क्रमाने उत्पन्न झालेले आहेत, असे कबूल करीत नाहीत. " ( पण हा संबंध केवळ युक्तिशून्य आहे. आसुर प्रकृतीचे लोक जर दृश्याच्या पलीकडे काहीं जाणतच नाहीत तर ते रहस्यकारांच्या म्हणण्याप्रमाणे वेदान्त किंवा सांख्य यांच्या क्रमाकडे पहातात तरी कशाला ? नास्तिकाची सामान्य समजूत जगाचा कर्ता कोणी नाही, ते स्वभावतःच स्त्री-पुरुषसंयोगापासून झालें आहे व त्यामुळेच होत आहे, अशी असते व तिलाच अनु-सरून ' अपरस्परसंभूत ' असे म्हटलें आहे व ते 'किमन्यत् कामहैतुकं' यावरून उघड होतें. अर्थात् रहस्यकाराचा अर्थ बरोबर नाहीं. ' सांख्यशास्त्रातील गुणाच्या अन्योन्य लट-पटीत ' आसुर लोक पडतात कशाला ? ते सांख्याचे म्हणणे काय आहे, ते तरी कशाला पाहतात व वेदान्ताकडे कशाला जातात, त्यांना जे दिसते तेच ते बोलतात. रहस्यकार आपल्या अर्थाच्या समर्थनार्थ पुनः व्याकरणाच्या खटपटींत पडले आहेत. ते म्हणतात-) " अ-परस्परसंभूतं हा अ-सत्य अ-प्रतिष्ठ याप्रमाणे नञ् समास आहे. " " अपरश्च परश्च असा विलक्षण विग्रह कित्येक करितात." "अपर व पर यांचा 'अपरपर' याचा समास होईल. 'अपरस्पर' असा होणार नाहीं" वगैरे; पण असत्य व अप्रतिष्ठ हे जरी नञ् समास असले तरी 'अपर-स्पर हाहि नञ् समासच असला पाहिजे, असें म्हणण्यास काय आधार आहे? 'अपरश्च परःच' असा सरळ द्वंद्वसमास मानून केलेला विग्रह त्यास विलक्षण वाटतो ! त्याचे कारण काय तर 'अपर व पर' असे जर शब्द असते तर समास 'अपरपर' असा झाला असता, असें ते म्हणतात. पण त्यात कांही अर्थ नाहीं. कारण नीलकंठादि कांही टीकाकारांनी ' अपरस्पराः क्रियासातत्ये ' ( ६.१.१४४) या पाणिनीसूत्राचा उल्लेख करून 'अपरःच परःच-अपरस्परौ' असा 'सुट्' -सकारयुक्त प्रयोग क्रियेचा सततपणा याअर्थी होत असल्याचे स्पष्ट सांगितले आहे. अर्थात् सांख्याच्या अप्रकृत सिद्धान्ताशी संबंध जोडण्याच्या लोभानें केलेली ही व्याकरणाची मी-मांसा सदोष झाली आहे. रहस्यकारानी हा सर्व अर्थ " अन्योन्याभिभवाश्रयजननमिथुनवृत्त-यश्च गुणाः ' (सा. का. १२) या लटपटित पायावर रचला आहे. ते म्हणतात—" परस्पर-संभूत या शब्दाने सांख्यशास्त्रांत गुणांपासून गुणाचे अन्योन्य जनन वर्णिले आहे. तेच या ठिकाणीं विवक्षित आहे... अन्योन्य व परस्पर हे दोन्ही शब्द समानार्थक असून सां-ख्यशास्त्रांतील गुणांच्या अन्योन्य लटपटीचें वर्णन करिताना हे दोन्ही शब्द येत असतात." [ सां. का. १२ महा. भा. शां. ३०५ ] पण वरील सांख्यकारिकेवरूनहि रहस्यकार समजतात तो अर्थ निष्पन्न होत नाहीं. वरील वाक्याचा अर्थ इतकाच की, ते तीन गुण परस्परांकडून पराभव पावणारे, परस्परांच्या आश्रयानें क्रिया करणारे, परस्परांच्या अपे-

—**'किं अन्यत् कामहैतुकं' कामहेतुकं एव-कामहैतुकं किं अन्यत् जगतः कारणं**—दुसरे काय ? कामहैतुक आहे. काम हाच ज्याचा हेतु आहे ते कामहेतुक-कामहेतुकच कामहैतुक होय. जगाचे आणखी कोणते कारण असणार ?—**जगतः अदृष्टं धर्माधर्मादि किंचित् कारणान्तरं न विद्यते**—जगाचें अदृष्ट असें-'अदृष्ट' या नांवाचे धर्माधर्मादि दुसरें कांही कारण विद्यमान नाहीं.—**कामः एव प्राणिनां कारणं**—कामच प्राण्यांचें कारण आहे.—**इति इय लोकायतिक-दृष्टिः**—अशी ही लोकायतिकदृष्टि आहे. ८.

**एतां दृष्टिमवष्टभ्य नष्टात्मानोऽल्पबुद्धयः ।**
**प्रभवन्त्युग्रकर्माणः क्षयाय जगतोऽहिताः ॥९॥**

**अन्वयार्थ—एतां दृष्टिं**—या दृष्टीस—**अवष्टभ्य**—आश्रय करून—**नष्टात्मानः**—ज्यांचा स्वभाव नष्ट झाला आहे,—**अल्पबुद्धयः**—ज्यांची बुद्धि अल्प आहे,—**अहिताः**—जगाचे शत्रु—**उग्रकर्माणः**—ज्यांची कर्मं उग्र-क्रूर आहेत असे ते—**जगतः**—जगाचा—**क्षयाय**—क्षय करण्यासाठी—**प्रभवन्ति**—उत्पन्न होतात. ९.

**एतामिति । एतां दृष्टिमवष्टभ्याऽऽश्रित्य नष्टात्मानो नष्टस्वभावा विभ्रष्टपरलोकसाधना अल्पबुद्धयो विषयविषयाऽल्पैव बुद्धिर्येषां तेऽल्पबुद्धयः प्रभवन्त्युद्भवन्त्युग्रकर्माणः क्रूरकर्माणो हिंसात्मकाः क्षयाय जगतः प्रभवन्तीति संबन्धः । जगतोऽहिताः शत्रव इत्यर्थः ॥ ९ ॥**

---

क्षेने परिणाम पावणारे व परस्पर सहचर आहेत. यावरून रहस्यकार म्हणतात तो अर्थ मुळीच निघत नाही. रहस्यकार म्हणतात "गुणापासून गुणाचे अन्योन्यजनन होते" हे म्हणणे सांख्यशास्त्राच्याच विरुद्ध आहे. सत्त्वगुणापासून रजोगुण होतो व रजोगुणापासून सत्त्वगुण होतो, असा त्याचा अर्थ नव्हे. कारण सांख्याच्या परिभाषेप्रमाणेच सत्त्वादि गुण उत्पन्न होणारे नाहीत. कारण त्यांची प्रकृति गुणरूप आहे. सात्त्विक परिणाम राजस परिणामापासून व राजस परिणाम सात्त्विक परिणामापासून उत्पन्न होतात, असेहि म्हणता येत नाही. कारण ते परिणाम परस्पर विरोधी असल्यामुळे एकमेकापासून उत्पन्न होऊ शकत नाहीत. वास्तव 'अन्योन्यजननवृत्तयः' याचा अर्थ आम्ही वाचस्पतिमिश्राच्या तत्त्वकौमुदीप्रमाणें जसा केला आहे, तसाच करणें उचित होय. महा.भा. शांतिपर्वातील वर्णन वैदिक सांख्यांचे आहे, निरीश्वरवादी सांख्यदर्शनाचे नव्हे, हे त्यातील 'भगवान् हे सर्व उत्पन्न करतो,' या वाक्यावरूनच सिद्ध होते. अर्थात् पुढेहि रहस्यकारांनी "तथापि गीतेतील अपरस्परसंभूत या पदाने उपनिषदातील सृष्ट्युत्पत्तिक्रमापेक्षां सांख्याचा सृष्ट्युत्पत्ति क्रमच जास्त विवक्षित आहे,असें आमचे मत आहे."वगैरे जें म्हटले आहे ते अगदी निराधार असल्यामुळे उपेक्ष्य होय.आसुर प्रकृतीचे लोक इतक्या खोल पाण्यात शिरतील,हे शक्यच नाही. वास्तव त्यांच्या स्थूल दृष्टीला व नास्तिकतेला सर्वथा अनुरूप असाच 'हे जगत् कामप्रयुक्त स्त्रीपुरुषसंयोगापासून झाले आहे,' असा अर्थ करणें उचित होय.

**भाष्यार्थ—'एतां०' इति**—ही दृष्टि ब्रह्मदृष्टीप्रमाणें इष्टच आहे, असें कोणी म्हणेल, म्हणून सांगतात—**एतां दृष्टिं अवष्टभ्य-आश्रित्य नष्टात्मानः-नष्टस्वभावाः-विभ्रष्टपरलोकसाधनाः**—या लोकायतिक दृष्टीचा आश्रय-अवलंब करून नष्टात्मे म्ह० ज्यांचा स्वभाव नष्ट झाला आहे-जे परलोकाच्या साधनांपासून विशेषेकरून भ्रष्ट झाले आहेत, असे नष्टात्मे,—**अल्पबुद्धयः-विषयविषया अल्पा एव बुद्धिः येषां ते अल्पबुद्धयः**—अल्पबुद्धि-ज्याची विषयांविषयींची अल्पच बुद्धि असते ते अल्पबुद्धि होत. (दृष्ट विषयांविषयींच प्रवृत्त होणे हेंच विषयबुद्धीचें अल्पत्व होय.)—**उग्रकर्माणः-क्रूरकर्माणः हिंसात्मकाः प्रभवन्ति-उद्भवन्ति**—असे ते उग्रकर्मे-क्रूर कर्में करणारे-हिंसात्मक-हिंसास्वभावाचे आसुरलोक उत्पन्न होतात.—**जगतः क्षयाय प्रभवन्ति इति संबन्धः**—जगाच्या-सर्व प्राण्यांच्या क्षयासाठीं उत्पन्न होतात, असा संबंध.—**जगतः अहिताः-शत्रवः इत्यर्थः**—जगाचे-सर्व प्राणिजाताचे अहित म्ह० शत्रु, असा याचा भावार्थ. ९.

**काममाश्रित्य दुष्पूरं दम्भमानमदान्विताः ।**
**मोहाद्गृहीत्वासद्ग्राहान्प्रवर्तन्तेऽशुचिव्रताः ॥१०॥**

**अन्वयार्थ—दुष्पूरं कामं आश्रित्य**—ज्याची पूर्ति-तृप्ति होणें अशक्य आहे अशा कामाचा आश्रय करून—**दम्भमानमदान्विताः**—दंभ, मान व मद यांनी युक्त होत्साते—**मोहात्**—अविवेकामुळें—**असद्ग्राहान्**—असत् ग्रह-अशुभ निश्चय—**गृहीत्वा**—करून घेऊन—**अशुचिव्रताः**—ज्यांची व्रते अशुचि आहेत, असे—**प्रवर्तन्ते**—प्रवृत्त होतात. १०.

**ते च— काममिच्छाविशेषमाश्रित्यावष्टभ्य दुष्पूरमशक्यपूरणं दम्भमानमदान्विता दम्भश्च मानश्च मदश्च दम्भमानमदास्तैरन्विता दम्भमानमदान्विता मोहादविवेकतो गृहीत्वोपादायासद्ग्राहानशुभनिश्चयान्प्रवर्तन्ते लोकेऽशुचिव्रता अशुचीनि व्रतानि येषां तेऽशुचिव्रताः ॥ १० ॥**

**भाष्यार्थ—ते च दुष्पूरं-अशक्यपूरणं कामं-इच्छाविशेषं-आश्रित्य-अवष्टभ्य**—आणि ते दुष्पूर म्ह०ज्याची पूर्ति-तृप्ति अशक्य आहे अशा कामाचा-एक प्रकारच्या इच्छेचा आश्रय करून-दुष्पूर कामाचा अवलंब करून—**दम्भमानमदान्विताः-दम्भः च मानः च मदः च-दम्भमानमदाः तैः अन्विताः-दम्भमानमदान्विताः**—दंभमानमदान्वित-दंभ व मान व मद ते दंभ-मान मद, त्यांनीं जे युक्त असतात ते दंभमानमदान्वित होत.—**मोहात्-अविवेकतः असद्ग्राहान्-अशुभनिश्चयान् गृहीत्वा-उपादाय लोके प्रवर्तन्ते**—मोहामुळे-अविवेकामुळें असद्ग्रह-अशुभ निश्चय ग्रहण करून-अशुभ निश्चय करून-त्यानेंच या लोकांत प्रवृत्त होतात. अशुभ निश्चयानेंच जगांतील व्यवहार करितात. (त्यांचेंच आणखी एक विशेषण-)—

**अशुचिव्रताः-अशुचीनि व्रतानि येषां ते अशुचिव्रताः**—अशुचिव्रत म्ह० ज्यांची व्रतें अशुचि-अपवित्र असतात ते अशुचिव्रत होत. १०.

**चिन्तामपरिमेयां च प्रलयान्तामुपाश्रिताः ।**
**कामोपभोगपरमा एतावदिति निश्चिताः॥११॥**

**अन्वयार्थ—च**—आणि ते आसुरलोक—**अपरिमेयां**—जिचें प्रमाण-इयत्ता कळत नाहीं, अशा—**प्रलयान्तां**—मरणापर्यंत टिकणाऱ्या-मरणानेंच संपणाऱ्या—**चिन्तां**—चिंतेस—**उपाश्रिताः**—आश्रय केलेले असतात—**कामोपभोगपरमाः**—शब्दादि विषयांचा उपभोग घेण्यामध्येंच तत्पर असलेले आणि—**एतावत्**—विषयोपभोग घेणे, हाच काय तो परमपुरुषार्थ आहे—**इति निश्चिताः**—असा निश्चय केलेले असतात. ११

किंच—चिन्तामपरिमेयां च न परिमातुं शक्यते यस्याश्चिन्ताया इयत्ता साऽपरिमेया तामपरिमेयां प्रलयान्तां मरणान्तामुपाश्रिताः सदा चिन्तापरा इत्यर्थः । कामोपभोगपरमाः, काम्यन्त इति कामाः शब्दादयस्तदुपभोगपरमाः, अयमेव परमः पुरुषार्थो यः कामोपभोग इत्येवंनिश्चितात्मान एतावदितिनिश्चिताः ॥ ११ ॥

**भाष्यार्थ—किंच**—आसुरांचींच आणखीं विशेषणें—'**चिन्तां अपरिमेयां च-यस्याः चिन्तायाः इयत्ता न परिमातुं शक्यते सा अपरिमेया तां अपरिमेयां**—व चिंतेला-अपरिमेय चिंतेला-ज्या चिंतेची इयत्ता निश्चित करतां येत नाहीं, जिचें प्रमाणच करितां येत नाहीं, ती अपरिमेया होय. त्या तसल्या अपरिमेय—**प्रलयान्तां मरणान्तां**—व प्रलयान्त-मरणान्त-मरणापर्यंत नाहींशी न होणारी-मरेपर्यंत टिकणारी, अशा अपरिमेय व मरणान्त चिन्तेचा—**उपाश्रिताः**—आश्रय केलेले—**सदा चिन्तापराः इत्यर्थः**—सदा चिन्तापर झालेले असा याचा भावार्थ.—**कामोपभोगपरमाः-काम्यन्ते इति कामाः-शब्दादयः तदुपभोगपरमाः**—कामोपभोगपरम-ज्यांची कामना-इच्छा केली जाते ते काम-शब्दादिक विषय, त्यांच्या उपभोगालाच श्रेष्ठ मानणारे—**यः कामोपभोगः अयं एव परमः पुरुषार्थः इति-एवं निश्चितात्मानः**—जो विषयांचा उपभोग हाच परम पुरुषार्थ आहे अशाप्रकारें निश्चितस्वभाव,—**एतावत् इति निश्चिताः**—या जगांत हें एवढेंच आहे, आणखीं कांहीं नाहीं, असा निश्चय केलेले. [ आपल्या योगक्षेमाच्या उपायांची मरेपर्यंत सतत चिन्ता करणारे व त्या चिन्तेचे विषय असंख्य असल्यामुळे ती चिन्ताहि अपरिमेय, अशा चिन्तेचा त्यांनी आश्रय केलेला असतो व विषयोपभाग हेंच काय तें एक सुख, या पलीकडे पारलौकिक सुख वगैरे कांहीं नाहीं,असा त्यांचा निश्चय झालेला असतो. ]

**आशापाशशतैर्बद्धाः कामक्रोधपरायणाः ।**
**ईहन्ते कामभोगार्थमन्यायेनार्थसंचयान् ॥१२॥**

**अन्वयार्थ—आशापाशशतैः**—आशा हेच शेंकडों पाश, त्यांनीं—**बद्धाः**—बांधले गेलेले,—**कामक्रोधपरायणाः**—काम व क्रोध ज्यांचा परम आश्रय आहे,असे ते आसुर प्रकृतीचे लोक—**कामभोगार्थं**—विषयोपभोगासाठीं—**अन्यायेन**—अन्यायानें—**अर्थसंचयान्**—द्रव्यसंचय—**ईहन्ते**—करितात. १२

**आशापाशेति । आशापाशशतैराशा एव पाशास्तच्छतैराशापाशशतैर्बद्धा नियन्त्रिताः सन्तः सर्वत आकृष्यमाणाः कामक्रोधपरायणाः कामक्रोधौ परमयनं पर आश्रयो येषां ते कामक्रोधपरायणाः, ईहन्ते चेष्टन्ते कामभोगार्थं कामभोगप्रयोजनाय न धर्मार्थमन्यायेनार्थसंचयानर्थप्रचयानन्यायेन परस्वापहरणादिनेत्यर्थः ॥ १२ ॥**

**भाष्यार्थ—'आशापाश०' इति—**'आशापाश०' या श्लोकानें त्या आसुरांचींच आणखी विशेषणे—**आशापाशशतैः-आशाः एव पाशाः तच्छतैः आशापाशशतैः बद्धाः-नियन्त्रिताः सन्तः**—आशारूप पाशशतांनी-आशा हेच पाश, त्यांच्या शतांनीं-हजारों आशारूपी पाशानी बद्ध म्ह० नियंत्रित-निगडित होत्साते—**सर्वतः आकृष्यमाणाः**—सर्व बाजूंनीं आकर्षण केले जाणारे,—**कामक्रोधपरायणाः-कामक्रोधौ परं अयनं-परः आश्रयः येषां ते कामक्रोधपरायणाः**—काम-क्रोधपरायण म्ह० काम व क्रोध हेच ज्याचे परम अयन-श्रेष्ठ आश्रय असतो ते काम-क्रोध-परायण होत. असे ते आसुर लोक—**कामभोगार्थं-कामभोगप्रयोजनाय धर्मार्थं न अन्यायेन अर्थसंचयान्-अर्थप्रचयान् ईहन्ते-चेष्टन्ते**—विषयोपभोगासाठीं–विषयभोग हे प्रयोजन सिद्ध व्हावें म्हणून, धर्मासाठीं नव्हे. अन्यायानें द्रव्यसंचय, द्रव्याचा संग्रह करितात.—**अन्यायेन-परस्वापहरणादिना इत्यर्थः**—अन्यायानें म्ह० दुसऱ्याच्या धनाचा अपहार करणे इत्यादि उपायानें द्रव्य संपादन करितात. [ येथील आशा म्ह० ज्याच्या प्राप्तीचा उपाय अशक्य आहे, अशा किंवा ज्याचा उपाय ठाऊकच नाहीं अशा विषयांविषयी इच्छा,अशा शेंकडो आशापाशांनीं बांधल्याप्रमाणेच श्रेयापासून भ्रष्ट करून इकडे तिकडे नेले जाणारे, असा 'आशापाशशतैः बद्धाः' या पदांचा स्पष्टार्थ आहे. ] १२.

## इदमद्य मया लब्धमिदं प्राप्स्ये मनोरथम् ।
## इदमस्तीदमपि मे भविष्यति पुनर्धनम् ॥१३॥

**अन्वयार्थ—अद्य**—आतां—**मया**—मी—**इदं**—हें धन—**लब्धं**—संपादन केलें आहे—**इदं प्राप्स्ये**—हें मिळवीन—**मनोरथं इदं अस्ति**—मनाला संतोष देणारें हे धन आहे.—**मे इदं अपि धनं पुनः भविष्यति**—माझें हेंहि धन पुनः भविष्यत्कालीं होईल. १३

**ईदृशश्च तेषामभिप्रायः— इदं द्रव्यमद्येदानीं मया लब्धमिदमन्यत्प्राप्स्ये मनोरथं मनस्तुष्टिकरमिदं चास्तीदमपि मे भविष्यत्यागामिनि संवत्सरे पुनर्धनं तेनाहं धनी विख्यातो भविष्यामि ॥ १३ ॥**

**भाष्यार्थ—ईदृशः च तेषां अभिप्रायः**—आणि त्या आसुर लोकांचा असा विवेकविरोधी अभिप्राय असतो—**इदं-द्रव्यं अद्य-इदानीं मया लब्धं**—हें गाय, सुवर्ण इत्यादि द्रव्य आज-यावेळीं मी संपादन केले आहे.—**इदं अन्यत् प्राप्स्ये—**हें दुसरें जे-अवश्य मिळावे म्हणून मनांत ध्यास लागला आहे,ते द्रव्य मी संपादन करीन—**मनोरथं-मनस्तुष्टिकरं इदं च अस्ति**—आणि मनाला संतोष देणारें हें धन आहे. —**मे इदं अपि धनं पुनः आगामिनि संवत्सरे भविष्यति**—आणि माझें हेंहि धन पुनः दुसऱ्या वर्षी होईल. [ म्ह० मला हवे असलेलें हे दुसरे धनहि पुढच्या वर्षी मिळेल. ]—**तेन अहं धनी विख्यातः भविष्यामि**—त्याच्यायोगें मी धनवान् म्हणून प्रसिद्ध होईन. १३.

**असौ मया हतः शत्रुर्हनिष्ये चापरानपि ।**
**ईश्वरोऽहमहं भोगी सिद्धोऽहं बलवान्सुखी ॥१४॥**

**अन्वयार्थ—मया**—मीं—**असौ शत्रुः**—हा शत्रु—**हतः**—मारला—**च**—आणि—**अपरान् अपि**—दुसऱ्या शत्रूंनाहि—**हनिष्ये**—मारीन—**अहं ईश्वरः**—मी ईश्वर आहे.—**अहं भोगी**—मी भोगी आहे.—**अहं सिद्धः**—मी सिद्ध आहें—**बलवान् सुखी**—बलाढ्य सुखी आहे. १४

असौ मयेति । असौ देवदत्तनामा मया हतो दुर्जयः शत्रुः, हनिष्ये चान्यान्वराकानपरानपि किमेते करिष्यन्ति तपस्विनः सर्वथाऽपि नास्ति मत्तुल्य ईश्वरोऽहमहं भोगी सर्वप्रकारेण च सिद्धोऽहं संपन्नः पुत्रैः पौत्रैर्नप्तृभिर्न केवलं मानुषोऽहं बलवान्सुखी चाहमेवान्ये तु भूमिभारायावतीर्णाः ॥ १४ ॥

**भाष्यार्थ—' असौ मया० ' इति**—' असौ मया० ' या श्लोकानें माझ्या या इच्छेला प्रतिबंध करणारा शत्रुहि संभवत नाहीं, असें तो आसुर प्रकृतीचा मनुष्य सांगतो—**असौ देवदत्तनामा दुर्जयः शत्रुः मया हतः**—हा देवदत्तनांवाचा दुर्जय शत्रु मी मारला आहे—**च अन्यान् वराकान्-अपरान् अपि हनिष्ये**—आणि दुसऱ्या दुष्ट व क्षुद्र शत्रूंनाहि मारीन—**एते तपस्विनः किं करिष्यन्ति**—हे गरिब बिचारे काय करणार? ( अरेपण, तुझ्यापेक्षा दुर्बल असलेल्या शत्रूंचा तूं जरी पराभव केलास, तरी बरोबरीच्या शत्रूंचाहि पराभव तुझ्या हातून होईलच असा भरंवसा धरितां येत नाहीं, अशी आशंका घेऊन तो म्हणतो-)—**सर्वथा अपि मत्तुल्यः न अस्ति**—तात्पर्य कांहीं जरी झाले तरी माझ्या बरोबरीचा कोणी नाहीं. —**अहं ईश्वरः**—मी ईश्वर आहें-( अरे पण तुझ्यामध्यें ऐश्वर्याचा अतिरेक जरी झाला असला, तरी त्याचा उपभोग घेण्याचे सामर्थ्य जर तुला नसेल तर त्याचा काय उपयोग? या शंकेचें निरसन करितो-)—**अहं भोगी**—मी सर्व ऐश्वर्याचा उपभोग घेणारा आहें—**च सर्वप्रकारेण अहं सिद्धः**—आणि सर्व प्रकारें मी सिद्ध आहें म्ह०—**पुत्रैः पौत्रैः नप्तृभिः संपन्नः**—मी पुत्र, नातु व पणतु यांनीं संपन्न आहें,

—**अहं न केवलं मानुषः**—मी कांहीं साधारण मनुष्य नव्हे—**अहं एव बलवान् सुखी च**—मीच बलवान्-ओजस्वी व सुखी-नीरोगी आहें—**तु अन्ये भूमिभाराय अवतीर्णाः**—पण दुसरे सर्व केवळ भूमीला भार होण्यासाठीं उत्पन्न झाले आहेत. १४

**आढ्योऽभिजनवानस्मि कोऽन्योऽस्ति सदृशो मया ।**
**यक्ष्ये दास्यामि मोदिष्य इत्यज्ञानविमोहिताः ॥१५॥**
**अनेकचित्तविभ्रान्ता मोहजालसमावृताः ।**
**प्रसक्ताः कामभोगेषु पतन्ति नरकेऽशुचौ ॥१६॥**

**अन्वयार्थ**—**आढ्यः**—मी धनानें संपन्न आहे,—**अभिजनवान् अस्मि**—उत्तम कुलीन आहे—**मया सदृशः**—माझ्यासारखा—**कः अन्यः अस्ति**—दुसरा कोण आहे ?—**यक्ष्ये**—यज्ञ करीन,—**दास्यामि**—दान देईन,—**मोदिष्ये**—आनंदी होईन.—**इति**—याप्रमाणें—**अज्ञानविमोहिताः**—ते अज्ञानानें नानाप्रकारें अविवेकी होतात.—**अनेकचित्तविभ्रान्ताः**—याप्रमाणें अनेक चित्तसंकल्पांनीं अतिशय भ्रान्ति पावलेले—**मोहजालसमावृताः**—अविवेकाच्या आवरणानें आच्छादित झालेले-अज्ञानरूप जाळ्यांत अडकलेले—**कामभोगेषु**—विषयभोगांमध्यें—**प्रसक्ताः**—आसक्त झालेले ते—**अशुचौ नरके**—अशुचि नरकांत—**पतन्ति**—पडतात.

आढ्य इति । आढ्यो धनेनाभिजनेनाभिजनवान्सप्तपुरुषं श्रोत्रियत्वादिसंपन्नस्तेनापि न मम तुल्योऽस्ति कश्चित्कोऽन्योऽस्ति सदृशस्तुल्यो मया, किंच यक्ष्ये यागेनाप्यन्यानभिभविष्यामि दास्यामि नटादिभ्यो मोदिष्ये हर्षं चातिशयं प्राप्स्यामीत्येवमज्ञानेन विमोहिता अज्ञानविमोहिता विविधमविवेकभावमापन्नाः ॥ १५ ॥

**भाष्यार्थ**—'**आढ्यः०' इति**—' आढ्यः० ' या श्लोकानें विद्या, वर्तन, धन व कुल यांत माझ्या तोडीचा कोणी नाहीं, असें सांगतो—**धनेन आढ्यः**—धनानें संपन्न—**अभिजनेन-अभिजनवान् सप्तपुरुषं श्रोत्रियत्वादिसंपन्नः**—वंशानें अत्यंत कुलीन, म्हणजे सात पुरुषांपर्यंत श्रोत्रियत्वानें संपन्न—**अस्मि**—असा मी आहें.—**तेन अपि कश्चित् मम तुल्यः न अस्ति**—त्यामुळेंहि कोणीच माझ्या बरोबरीचा नाहीं—**मया सदृशः-तुल्यः कः अन्यः अस्ति**—माझ्यासारखा दुसरा कोण आहे ( अरेपण, धन आणि कुल यात जरी तुझ्या बरोबरीचा कोणी नसला तरी यज्ञ, दान, व त्याचें फल यांत तुझ्याहून कोणी तरी अधिक असेल,अशी आशंका घेऊन आसुर प्रकृतीचा मनुष्य म्हणतो-)—**किंच-यक्ष्ये**—तसेच; मी यज्ञ करीन—**यागेन अपि अन्यान् अभिभविष्यामि**—यज्ञाच्या योगानेंहि मी इतरांचा पराभव करीन—**नटादिभ्यः दास्यामि**—नटादिकांना दान देईन—**मोदिष्ये-अतिशयं हर्षं च प्राप्स्यामि**—आणि अत्यंत हर्षाला प्राप्त होईन. ( पण हा त्यांचा आशय चांगला

नाहीं, असें भगवान् चवथ्या चरणानें सुचवितात–)—**इति एवं अज्ञानेन विमोहिताः–अज्ञानविमोहिताः–विविधं अविवेकभावं आपन्नाः**—या अशाप्रकारें अज्ञानानें अतिशय मोहित झालेले असे ते आसुर प्रकृतीचे लोक असतात. [ ' अज्ञानविमोहित ' म्ह० नानाप्रकारच्या अविवेकभावास प्राप्त झालेले. ] १५.

**अनेकेति । अनेकचित्तविभ्रान्ता उक्तप्रकारैरनेकैश्चित्तैर्विविधं भ्रान्ता अनेकचित्तविभ्रान्ता मोहजालसमावृता मोहोऽविवेकोऽज्ञानं तदेव जालमिवाऽऽवरणात्मकत्वात्तेन समावृताः प्रसक्ताः कामभोगेषु तत्रैव निषण्णाः सन्तस्तेनोपचितकल्मषाः पतन्ति नरकेऽशुचौ वैतरण्यादौ ॥ १६ ॥**

**भाष्यार्थ—' अनेक० ' इति—**' अनेक० ' या श्लोकानें याप्रमाणें कर्तव्याकर्तव्यविवेकरहित झालेल्या त्यांची काय अवस्था होते, ते सांगतात—**अनेकचित्तविभ्रान्ताः–उक्तप्रकारैः अनेकैः चित्तैः विविधं भ्रान्ताः अनेकचित्तविभ्रान्ताः**—अनेकचित्तविभ्रात–वर सांगितलेल्या प्रकारच्या अनेक चित्तानीं अनेक प्रकारे भ्रान्त झालेले ते अनेकचित्तविभ्रान्त होत.—**मोहजालसमावृताः–मोहः–अविवेकः–अज्ञानं तत् एव जालं इव आवरणात्मकत्वात् तेन समावृताः**—मोहजालसमावृत–मोह म्ह० अविवेक, अज्ञान, तेच आवरणात्मक–आच्छादनरूप असल्यामुळें जणंकाय जाळे होय, त्या जाळयांनं पूर्णपणे आच्छादित झालेले—**कामभोगेषु प्रसक्ताः–तत्र एव निषण्णाः सन्तः**—काम म्ह० विषय, त्याच्या भोगामध्यें अत्यन्त आसक्त असलेले, त्या भोगांतच गढून गेलेले असे होत्साते—**तेन उपचितकल्मषाः अशुचौ–वैतरण्यादौ नरके पतन्ति**—त्यामुळें ज्याच्या पापाचा फार मोठा संचय झाला आहे, असे ते अपवित्र वैतरण्यादि नरकात पडतात. १६.

## आत्मसंभाविताः स्तब्धा धनमानमदान्विताः ।
## यजन्ते नामयज्ञैस्ते दंभेनाविधिपूर्वकम् ॥१७॥

**अन्वयार्थ—ते**—आसुरलोक—**आत्मसंभाविताः**—आम्हीं अनेक उत्तम गुणांनी युक्त आहो, असें स्वतःच स्वतःला मानणारे—**स्तब्धाः**—अनम्रस्वभावाचे —**धनमानमदान्विताः**—धनाविषयींचा मान व मद यानीं युक्त असलेले असे—**दंभेन**—दंभाने—**नामयज्ञैः**—नाममात्रयज्ञांनी—**अविधिपूर्वकं**— अविधीनें—**यजन्ते**—यजन करितात. १७

आत्मेति । आत्मसंभाविताः **सर्वगुणविशिष्टतयाऽऽत्मनैव संभाविता आत्मसंभाविता न साधुभिः, स्तब्धा अप्रणतात्मानो धनमानमदान्विता धननिमित्तो मानो मदश्च ताभ्यां धनमानमदाभ्यामन्विता यजन्ते नामयज्ञैर्नाममात्रैर्यज्ञैस्ते दम्भेन धर्मध्वजितयाऽविधिपूर्वकं विहिताङ्गेतिकर्तव्यतारहितैः ॥ १७ ॥**

**भाष्यार्थ—' आत्म० ' इति—**' आत्म० ' या श्लोकाने त्यांच्यांतीलहि कित्येकांची वैदिक याग-दानादि कर्मामध्यें प्रवृत्ति होत असल्यामुळें सर्वांनीच नरकांत पडणें

अयुक्त आहे, अशी आशंका घेऊन भगवान् सांगतात—**आत्मसंभाविताः-सर्वगुणविशिष्टतया आत्मना एव संभाविताः-आत्मसंभाविताः न साधुभिः**—आत्मसंभावित-सर्वगुणविशिष्टत्वाने आपल्याकडूनच संभावना केले गेलेले, सज्जनाकडून नव्हे, [ मी सर्वगुणसंपन्न आहे, अशा रातीने स्वतःच स्वतःची प्रशंसा करणारे असा याचा भावार्थ. ]—**स्तब्धाः-अप्रणतात्मानः**—स्तब्ध म्हणजे कोणापुढेंहि शरीर नम्र न केलेले—**धनमानमदान्विताः-धननिमित्तः मानः च मदः ताभ्यां धनमानमदाभ्यां अन्विताः ते**—धनमानमदान्वित-धनामुळे प्राप्त होणारा मान व मद अशा त्या धनमान-मदानीं युक्त असलेले ते आसुर जन—**नामयज्ञैः-नाममात्रैः यज्ञैः-दम्भेन-धर्मध्वजितया अविधिपूर्वकं-विहितांग-इतिकर्तव्यतारहितैः यजन्ते**—नाममात्र यज्ञांनीं-दंभानें म्ह० धार्मिकता प्रकट करण्याच्या हेतूने अविधिपूर्वक म्ह० विहित अंग व इतिकर्तव्यता यानीं रहित अशा यज्ञानेंच यजन करितात. [ त्यांचे ते यज्ञ केवल नांवाचे असतात, त्यांत ढोंग फार असते आणि विधि मुळीच नसतो. तात्पर्य आसुरसंपत्तीचे लोक वैदिकमार्गांत जरी प्रवृत्त झाले, तरी त्यांत पुण्यापेक्षां पापच अधिक जोडतात. ] १७.

अहंकारं बलं दर्पं कामं क्रोधं च संश्रिताः ।
मामात्मपरदेहेषु प्रद्विषन्तोऽभ्यसूयकाः ॥१८॥

**अन्वयार्थ—अहंकारं**—अहंकार,—**बलं**—बल—**दर्पं**—दर्प,—**कामं**—काम,—**च**—व—**क्रोधं**—क्रोध याचा—**संश्रिताः**—आश्रय केलेले ते आसुरलोक—**आत्मपरदेहेषु**—आपल्या व दुसऱ्यांच्या देहांमध्ये—**मां**—माझा—**प्रद्विषन्तः**—अतिशय द्वेष करणारे व—**अभ्यसूयकाः**—अतिशय असूया करणारे असतात. १८

अहमिति । अहंकारमहंकरणमहंकारो विद्यमानैरविद्यमानैश्च गुणैरात्मन्यध्यारोपितैर्विशिष्टमात्मानमहमिति मन्यते सोऽहंकारोऽविद्याख्यः कष्टतमः सर्वदोषाणां मूलं सर्वानर्थप्रवृत्तीनां च तथा बलं पराभिभवनिमित्तं कामरागान्वितं दर्पं दर्पो नाम यस्योद्भवे धर्ममतिक्रामति सोऽयमन्तःकरणाश्रयो दोषविशेषः । कामं स्त्र्यादिविषयं क्रोधमनिष्टविषयमेतानन्यांश्च महतो दोषान्संश्रिताः । किंच ते मामीश्वरमात्मपरदेहेषु स्वदेहे परदेहेषु च तद्बुद्धिकर्मसाक्षिभूतं मां प्रद्विषन्तो मच्छासनातिवर्तित्वं प्रद्वेषस्तं कुर्वन्तोऽभ्यसूयकाः सन्मार्गस्थानां गुणेष्वसहमानाः ॥ १८ ॥

**भाष्यार्थ—' अहं० ' इति—**' अहं० ' या श्लोकानें आसुर प्रकृतीचे लोक ब्रह्मज्ञानापासून फारच दूर राहतात, असें भगवान् सांगतात—**अहंकारं-अहंकरणं अहंकारः**—अहंकार-अहं म्ह० ' मी ' असें म्हणणे हाच अहंकार. ( त्याचेंच स्पष्टीकरण करितात- )—**विद्यमानैः च अविद्यमानैः आत्मनि अध्यारोपितैः गुणैः विशिष्टं आत्मानं अहं इति मन्यते सः अहंकारः**—विद्यमान किंवा अविद्यमान

अशा आत्म्यावर आरोपिलेल्या गुणांनीं विशिष्ट अशा आपल्याला 'अहं' असें समजतो, तो अहंकार.—**अविद्याख्यः**—या अहंकाराचें मूळ अविद्या असल्यामुळे त्यालाच 'अविद्या' असें नांव आहे.—**कष्टतमः**—तो अतिशय कष्ट देणारा आहे. ( विवेकी लोकांनी मोठया यत्नांनी त्याचा त्याग करावा असें या विशेषणाने सुचविलें आहे. अहंकाराचें कष्टतमत्वच स्पष्ट करितात- )—**सर्वदोषाणां सर्वानर्थप्रवृत्तीनां च मूलं**—तो अहंकार सर्व दोषांचें व सर्व अनर्थप्राप्तीचें मूळ आहे. ( आसुर लोक अशा अहंकाराचा आश्रय केलेले असतात असा पुढें संबंध. )—**तथा बलं-पराभिभवनिमित्तं कामरागान्वितं**—तसेंच बल, दुसऱ्याच्या पराभवाला कारण होणारें व विषयासक्तीनें युक्त असलेलें शरीरेंद्रियसामर्थ्य—**दर्पं-दर्पः नाम यस्य उद्भवे धर्मं अतिक्रामति सः अयं अन्तःकरणाश्रयः दोषविशेषः**—दर्पाला-दर्प म्ह० ज्याचा उद्भव झाला असतां मनुष्य धर्माचें अतिक्रमण करितो तो हा अंतःकरणाचा आश्रय करून असलेला एक प्रकारचा दोष, त्या दर्पाला—**कामं-स्त्र्यादिविषयं**—स्त्री इत्यादिकांविषयींच्या कामाला—**क्रोधं-अनिष्टविषयं**—अनिष्ट विषयांविषयींचा क्रोध, त्याला—**एतान् च अन्यान् महतः दोषान् संश्रिताः**—या व अशाच मात्सर्यादि दुसऱ्या मोठया दोषाचा आश्रय केलेले—**किंच ते मां-ईश्वरं आत्मपरदेहेषु-स्वदेहे परदेहेषु च तद्बुद्धिकर्मसाक्षिभूतं मां प्रद्विषन्तः**—तसेच ते मज ईश्वराचा म्ह० त्याच्या स्वदेहांत व परदेहांत त्याचे ज्ञान व कर्म यांचा साक्षिभूत अशा माझा अत्यंत द्वेष करणारे—**मच्छासनातिवर्तित्वं प्रद्वेषः तं कुर्वन्तः**—माझ्या शासनाचें-उपदेशाचें उल्लंघन करणें हाच माझा प्रद्वेष, तो करणारे—**अभ्यसूयकाः-सन्मार्गस्थानां गुणेषु असहमानाः**—व अभ्यसूया करणारे, म्हणजे सन्मार्गस्थांच्या गुणांमध्ये दोषदृष्टि ठेवणारे, त्यांचे गुण सहन न करणारे. [ श्रुति व स्मृति हेंच ईश्वराचे शासन व त्यांत सांगितल्याप्रमाणे ज्ञान व कर्म यांचें अनुष्ठान न करणें हेच त्याचे उल्लंघन होय. ] १८

**तानहं द्विषतः क्रूरान्संसारेषु नराधमान् ।**
**क्षिपाम्यजस्रमशुभानासुरीष्वेव योनिषु ॥१९॥**

**अन्वयार्थ—अहं**—मी—**तान् द्विषतः क्रूरान्**—त्या माझा द्वेष करणाऱ्या क्रूरांस—**अशुभान् नराधमान्**—अशुभ नराधमांस—**संसारेषु**—संसारांतील—**आसुरीषु योनिषु एव**—आसुरी योनींतच—**क्षिपामि**—टाकतो. १९

**तानहमिति । तानहं सर्वान्सन्मार्गप्रतिपक्षभूतान्साधुद्वेषिणो द्विषतश्च मां क्रूरान्संसारेष्वेव नरकसंसरणमार्गेषु नराधमानधर्मदोषवत्त्वात्क्षिपामि प्रक्षिपाम्यजस्रं संततमशुभानशुभकर्मकारिण आसुरीष्वेव क्रूरकर्मप्रायासु व्याघ्रसिंहादियोनिषु क्षिपामीत्यनेन संबन्धः ॥ १९ ॥**

**भाष्यार्थ**—' **तानहं०** ' **इति**—' तानहं० ' या श्लोकानें या आसुरांचें शेवटीं काय होतें तें सांगतात—**अहं सन्मार्गप्रतिपक्षभूतान् साधुद्वेषिणः तान् सर्वान् च मां द्विषतः क्रूरान् नराधमान्**—मी सन्मार्गाचे प्रतिपक्षभूत-शत्रूच म्ह० साधूंचा द्वेष करणारे व माझा द्वेष करणारे अशा त्या क्रूर नराधमांस—**संसारेषु एव-नरकसंसरणमार्गेषु क्षिपामि-प्रक्षिपामि**—संसारातच म्हणजे नरकगमनमार्गातच टाकतों, त्याना मी नरकमार्गातच घालतों ( तर मग भगवान् निर्दय आहे, असें म्हणण्याचा प्रसंग येतो, असे कोणी म्हणेल म्हणून आचार्य सांगतात-)—**अधर्मदोषवत्त्वात्**—कारण अधर्म या दोषानें ते युक्त असतात, म्हणून मी त्यांना नरक हे फल देतो—**अशुभान्-अशुभकर्मकारिणः आसुरीषु एव क्रूरकर्मप्रायासु व्याघ्रसिंहादियोनिषु अजस्रं-संततं-क्षिपामि इति अनेन संबन्धः**—त्या अशुभाना म्ह० अशुभ कर्मे करणाराना आसुरीयोनीमध्येच म्ह० ज्यांत क्रूरकर्मांचें आधिक्य आहे अशा व्याघ्रसिंहादि योनींतच निरंतर-सतत टाकतों, असा ' क्षिपामि ' या क्रियापदाशीं संबंध. १९

**आसुरीं योनिमापन्ना मूढा जन्मनि जन्मनि ।**
**मामप्राप्यैव कौन्तेय ततो यान्त्यधमां गतिम् ॥२०॥**

**अन्वयार्थ**—**हे कौन्तेय**—हे कुंतीपुत्रा—**मूढाः**—ते मूढ जन—**जन्मनि जन्मनि**—प्रत्येक जन्मात—**आसुरीं योनिं आपन्नाः**—आसुरी योनीतच उत्पन्न होतात व—**मां**—मला—**अप्राप्य एव**—प्राप्त न होताच—**ततः**—त्याहूनहि **अधमां गतिं**—अधमगतीला - **यान्ति**—प्राप्त होतात. २०

आसुरीमिति । आसुरीं योनिमापन्नाः प्रतिपन्ना मूढा जन्मनि जन्मन्यविवेकिनः प्रतिजन्म तमोबहुलास्वेव योनिषु जायमाना अधो गच्छन्तो मूढा मामीश्वरमप्राप्यानासाद्यैव हे कौन्तेय ततस्तस्मादपि यान्त्यधमां निकृष्टतमां गतिम् । मामप्राप्यैवेति न मत्प्राप्तौ काचिदप्याशङ्काऽस्त्यतो मच्छिष्टसाधुमार्गमप्राप्येत्यर्थः ॥ २० ॥

**भाष्यार्थ**—' **आसुरीम्०** ' **इति** ' आसुरीं० ' या श्लोकाने त्यांचेंहि क्रमानें अनेक जन्माच्या शेवटीं कल्याण होईल, म्हणून म्हणाल तर तसे होत नाही उलट आसुरप्रकृतीचे लोक उत्तरोत्तर अधम योनीलाच प्राप्त होतात असें सागतात—**आसुरीं योनिं आपन्नाः-प्रतिपन्नाः मूढाः-अविवेकिनः**—आसुरी योनीला प्राप्त झालेले मूढ-अविवेकी—**जन्मनि जन्मनि-प्रतिजन्म तमोबहुलासु एव योनिषु जायमानाः-अधः गच्छन्तः मूढाः**—जन्मोजन्मी-प्रत्येक जन्मामध्यें तमोबहुल-ज्यांत अज्ञानसंज्ञक तमाचें बाहुल्य आहे, अशा योनींमध्यें उत्पन्न होणारे-खालीं जाणारे मूढ—**मां-ईश्वरं अप्राप्य-अनासाद्य एव**—मला-ईश्वराला प्राप्त न होतांच-मला न पोंचतांच—**हे कौन्तेय, ततः-तस्मात् अपि अधमां निकृष्ट-**

**तमां गतिं यान्ति**—हे अर्जुना! त्याहून-त्यापेक्षांहि अधम म्ह० अत्यंत निकृष्ट गतीला प्राप्त होतात. ( अहोपण, अशा दुष्ट लोकांना ईश्वराची प्राप्ति होईल, अशी शंका येण्याचें जर कारणच नाहीं तर त्या प्राप्तीचा निषेध करण्याचें तरी कारण काय ? उत्तर-)—**मां अप्राप्य एव इति मत्प्राप्तौ काचित् अपि आशंका न अस्ति अतः मच्छिष्टसाधुमार्गं अप्राप्य इत्यर्थः**—'मला प्राप्त न होतांच' असे जरी म्हटलें आहे तरी अशा लोकांना माझी प्राप्ति होईल, अशी नुस्ती शंका येण्याचेहि कारण नाहीं, म्हणून मीं सांगितलेल्या सन्मार्गाला प्राप्त न होतांच असा त्याचा भावार्थ समजावा. २०

त्रिविधं नरकस्येदं द्वारं नाशनमात्मनः ।
कामः क्रोधस्तथा लोभस्तस्मादेतत्त्रयं त्यजेत् ॥२१॥

**अन्वयार्थ—कामः क्रोधः तथा लोभः**—काम, क्रोध व लोभ—(**इति**) **इदं**—असें हें—**त्रिविधं**—तीन प्रकारचें—**आत्मनः नाशनं**—आत्म्याचा नाश करणारें—**नरकस्य द्वारं**—नरकाचें द्वार आहे—**तस्मात्**—म्हणून—**एतत् त्रयं**—या त्रयाचा—**त्यजेत्**—त्याग करावा. २१.

**सर्वस्या आसुर्याः संपदः संक्षेपोऽयमुच्यते, यस्मिंस्त्रिविधे सर्व आसुरसंपद्भेदोऽनन्तोऽप्यन्तर्भवति, यत्परिहारेण परिहृतश्च भवति, यन्मूलं सर्वस्यानर्थस्य तदेतदुच्यते—त्रिविधं त्रिप्रकारं नरकस्य प्राप्ताविदं द्वारं नाशनमात्मनो यद्द्वारं प्रविशन्नेव नश्यत्यात्मा कस्मैचित्पुरुषार्थाय योग्यो न भवतीत्येतदत उच्यते द्वारं नाशनमात्मन इति । किं तत्कामः क्रोधस्तथा लोभस्तस्मादेतत्त्रयं त्यजेत् । यत एतद्द्वारं नाशनमात्मनस्तस्मात्कामादित्रयमेतत्त्यजेत्त्यागस्तुतिरियम् ॥ २१ ॥**

**भाष्यार्थ**—( अहोपण, अनन्त भेदांना युक्त असलेल्या आसुरी संपत्तीचा शंभर वर्षांनीहि परिहार करितां येणे शक्य नाहीं, असे कार्णी म्हणेल म्हणून आचार्य सांगतात-)—**सर्वस्याः आसुर्याः संपदः अयं संक्षेपः उच्यते**—सर्व आसुरी संपत्तीचा हा संक्षेप सांगितला जातो. ( संक्षेप मागण्याचें प्रयोजन-)—**यस्मिन्** ( **कामादौ** ) **त्रिविधे सर्वः आसुरसंपद्भेदः अनन्तः अपि अन्तर्भवति**—ज्या कामादि त्रिविध संक्षेपांत आसुरसंपत्तीचा सर्वच भेद, तो जरी अनन्त असला तरी, अन्तर्भूत होतो—**च यत्परिहारेण परिहृतः भवति**—आणि ज्याच्या परिहाराने त्या सर्व अनन्त भेदयुक्त आसुरसंपत्तीचा परिहार होतो—**यत् सर्वस्य अनर्थस्य मूलं**—व जें सर्व अनर्थांचें मूळ आहे—**तत् एतत् उच्यते**—तें हें 'त्रिविधं०' या श्लोकानें सांगितलें जातें.—**त्रिविधं-त्रिप्रकारं इदं नरकस्य प्राप्तौ द्वारं**—त्रिविध म्ह० तीन प्रकारचें, हें नरकप्राप्तीचें द्वार आहे.—**आत्मनः नाशनं-यत् द्वारं प्रविशन् एव आत्मा नश्यति**—आत्म्याचें नाशन-ज्या द्वारांत प्रवेश करितांच आत्मा नाश पावतो ( नित्य आत्म्याचा नाश कसा ?- )—**कस्मैचित् पुरुषार्थाय योग्यः न**

**भवति इति एतत्**—आत्मा कोणत्याच पुरुषार्थाला योग्य होत नाहीं, त्याच्यामध्यें पुरुषार्थाची योग्यता रहात नाहीं, असा याचा भावार्थ—**अतः द्वारं आत्मनः नाशनं इति उच्यते**—म्हणून द्वार-आत्म्याचा[1] नाश करणारें द्वार असें म्हटलें जातें—**किं तत् कामः क्रोधः तथा लोभः**—तें कोणतें? काम, क्रोध व तसाच लोभ, हें तें नरकाचे त्रिविध द्वार आहे.—**तस्मात् एतत् त्रयं त्यजेत्**—यास्तव या त्रयाचा त्याग करावा. (याचेच अधिक स्पष्टीकरण-)—**यतः एतत् द्वारं आत्मनः नाशनं तस्मात् कामादित्रयं एतत् त्यजेत्**—ज्याअर्थी हें द्वार आत्म्याचा नाश करणारें आहे त्याअर्थी हें कामादित्रय टाकावे, कामादित्रयाचा त्याग करावा—**इयं त्यागस्तुतिः**—ही त्यागाची स्तुति आहे. [ कामादिकाचा त्याग केला असतां श्रेयःप्राप्तीच्या प्रतिबन्धाची निवृत्ति होते, असा या स्तुतीचा भावार्थ आहे. ] २१.

**एतैर्विमुक्तः कौन्तेय तमोद्वारैस्त्रिभिर्नरः ।**
**आचरत्यात्मनः श्रेयस्ततो याति परां गतिम् ॥२२॥**

**अन्वयार्थ**—**कौन्तेय**—हे अर्जुना ! **एतैः त्रिभिः तमोद्वारैः**—या तीन तमोद्वारांनीं—**विमुक्तः**—विमुक्त झालेला—**नरः**—पुरुष—**आत्मनः**—आपले—**श्रेयः**—कल्याणाचें-मोक्षाचे साधन—**आचरति**—आचरितो—**ततः**—त्यामुळें—**परां गतिं**—मोक्षनांवाच्या परागतीला—**याति**—प्राप्त होतो. २२

**एतैरिति । एतैर्विमुक्तः कौन्तेय तमोद्वारैस्तमसो नरकस्य दुःखमोहात्मकस्य द्वाराणि कामादयस्तैरेतैस्त्रिभिर्विमुक्तो नर आचरत्यनुतिष्ठति । किमात्मनः श्रेयो यत्प्रतिबद्धः पूर्वं नाऽऽचरति तदपगमादाचरति ततस्तदाचरणाद्याति परां गतिं मोक्षमपीति ॥२२॥**

**भाष्यार्थ**—'**एतैः०**' **इति**—' एतैः० ' या श्लोकाने प्रस्तुत कामादित्यागाचे फल सांगतात-)—'**एतैः विमुक्तः कौन्तेय**' **तमोद्वारैः-तमसः-नरकस्य दुःखमोहात्मकस्य द्वाराणि कामादयः तैः एतैः त्रिभिः विमुक्तः नरः**—हे कुंतीपुत्रा ! या तमोद्वारांनीं-तमाची दुःखमोहात्मक नरकाची कामादिक द्वारें, त्या या तीन द्वारांनीं विशेषेकरून मुक्त केलेला मनुष्य—**आचरति-अनुतिष्ठति**—आचरण करितो-अनुष्ठान करितो.—**किं आत्मनः श्रेयः**—काय आचरितो-आपल्या श्रेयःसाधनाचें अनुष्ठान करितो,—**यत्प्रतिबद्धः पूर्वं नाचरति तदपगमात् आचरति**—ज्या त्रिविध नरकद्वाराने प्रतिबद्ध होत्साता पूर्वी आचरीत नव्हता ते द्वार सोडल्यामुळें-त्याचा प्रतिबंध निघून गेल्यामुळें आतां पुरुष आपलें श्रेयःसाधन आचरितो—**ततः-तदाचरणात् परां गतिं मोक्षं अपि याति इति**—त्यामुळें-त्याच्या आचरणामुळें श्रेष्ठ गतीला-मोक्षालाहि प्राप्त होतो. [ कल्याणाचरण करणाराला व आसुरी-

---

१ 'आत्मनः' म्ह० आपला नाश करणारें, हा रहस्यकारांचा अर्थ बरोबर नाहीं. येथें आत्मा म्ह० जीवात्माच विवक्षित आहे व त्याचा नाश म्ह० त्याला अधोगतीला नेणें.

संपत्तीचा त्याग करणाराला ज्ञानद्वारा केवल मोक्षच मिळतो, असें नव्हे तर त्याला लौकिकसुखहि प्राप्त होते, असा भाष्यांतील ‘ अपि’शब्दाचा भावार्थ. शेवटचा ‘ इति ’ शब्द श्लोकाचें व्याख्यान संपले, हें सुचवितो. ] २२.

**यः शास्त्रविधिमुत्सृज्य वर्तते कामकारतः ।**
**न स सिद्धिमवाप्नोति न सुखं न परां गतिम् ॥२३॥**

**अन्वयार्थ**—**यः**—जो—**शास्त्रविधिं**—शास्त्राचा विधि-वेदाचा विधि—**उत्सृज्य**—सोडून-वेदविधीचा त्याग करून—**कामकारतः**—कामप्रेरित होऊन-कामाकडून प्रेरणा केला गेलेला असा होत्साता—**वर्तते**—वर्तन करतो—**सः**—तो—**सिद्धिं**—पुरुषार्थाच्या योग्यतेला—**न अवाप्नोति**—प्राप्त होत नाही.—**न सुखं**—त्याला या लोकीं सुख होत नाहीं व—**न परां गतिं ( अवाप्नोति )**—स्वर्ग व मोक्ष यांतील एकाहि उत्तम गतीला प्राप्त होत नाहीं. २३

**सर्वस्यैतस्याऽऽसुरसंपत्परिवर्जनस्य श्रेयआचरणस्य च शास्त्रं कारणं शास्त्रप्रमाणादुभयं शक्यं कर्तुं नान्यथाऽतः— यः शास्त्रविधिं कर्तव्याकर्तव्यज्ञानकारणं विधिप्रतिषेधाख्यमुत्सृज्य त्यक्त्वा वर्तते कामकारतः कामप्रयुक्तः सन्न स सिद्धिं पुरुषार्थयोग्यतामाप्नोति । नाप्यस्मिँल्लोके सुखं नापि परां प्रकृष्टां गतिं स्वर्गं मोक्षं वा ॥ २३ ॥**

**भाष्यार्थ**—(आसुरी संपत्तीचें परिवर्जन व श्रेयःसाधनाचें आचरण याचें कारण काय ते सांगतात- )—**सर्वस्य एतस्य आसुरसंपत्परिवर्जनस्य च श्रेयआचरणस्य शास्त्रं कारणं**—या सर्व आसुरसंपत्तीच्या परित्यागाचे व श्रेयःसाधनाचरणाचें शास्त्र कारण आहे. ( तें कसें ? उत्तर-)—**शास्त्रप्रमाणात् उभयं कर्तुं शक्यं अन्यथा न**—शास्त्रप्रमाणावरून ते दोन्ही करतां येणें शक्य आहे,त्यावांचून नाहीं.—**अतः यः शास्त्रविधिं-कर्तव्याकर्तव्यज्ञानकारणं-विधिप्रतिषेधाख्यं उत्सृज्य-त्यक्त्वा कामकारतः-कामप्रयुक्तः सन् वर्तते**—यास्तव जो शास्त्रविधीला म्ह० विधि व प्रतिषेध या नांवाच्या कर्तव्य व अकर्तव्य यांचें ज्ञान होण्याच्या साधनाला सोडून ‘ कामकारतः ’ म्ह० कामानें प्रेरित होत्साता वर्तन करतो—**सः सिद्धिं-पुरुषार्थयोग्यतां न ( अवाप्नोति ) आप्नोति**—तो सिद्धीला म्ह० पुरुषार्थयोग्यतेला प्राप्त होत नाहीं.—**अस्मिन् लोके सुखं अपि न (आप्नोति)**—या लोकीं सुखालाहि प्राप्त होत नाहीं.—**परां प्रकृष्टां गतिं अपि-स्वर्गं मोक्षं वा न (आप्नोति)**—व पुरा-सर्वोत्तम गतीलाहि म्ह० स्वर्गाला किंवा मोक्षालाहि प्राप्त होत नाहीं. [ ज्याच्या योगानें अपूर्व अर्थ ज्ञात होतो ते शास्त्र. विधि व निषेध हें त्याचें स्वरूप आहे. विधीवरून कर्तव्य व निषेधावरून अकर्तव्य यांचें ज्ञान होतें. अर्थात् विधिनिषेधरूप शास्त्र हेच कर्तव्य व अकर्तव्य यांच्या ज्ञानाचें साधन आहे. शास्त्रविमुख पुरुषाची प्रवृत्ति कामाधीन असते. पण असे लोक पुरुषार्थाला अयोग्य असतात. हा व

या पुढील श्लोक गीतेंतील कर्मादिशब्दांचा अर्थ निश्चित करितांना डोळ्यांपुढें ठेवणें अत्यंत अवश्य आहे. ] २३.

**तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्यव्यवस्थितौ ।**
**ज्ञात्वा शास्त्रविधानोक्तं कर्म कर्तुमिहार्हसि ॥२४॥**

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे दैवासुरसंपद्विभागयोगो नाम षोडशोऽध्यायः ॥ १६ ॥**

**अन्वयार्थ—तस्मात्**—म्हणून—**कार्याकार्यव्यवस्थितौ**—कर्तव्य व अकर्तव्य यांच्या निश्चयाविषयीं—**ते**—तुला—**शास्त्रं प्रमाणं**—शास्त्र हेंच प्रमाण आहे. यास्तव—**शास्त्रविधानोक्तं ज्ञात्वा**—शास्त्रविधानानें सांगितलेलें जाणून—**इह**—या कर्माधिकारभूमींत—**कर्म**—कर्म-कर्तव्य-धर्म—**कर्तुं**—करण्यास—**अर्हसि**—तूं योग्य आहेस. २४

**तस्मादिति । तस्माच्छास्त्रं प्रमाणं ज्ञानसाधनं ते तव कार्याकार्यव्यवस्थितौ कर्तव्याकर्तव्यव्यवस्थायामतो ज्ञात्वा बुद्ध्वा शास्त्रविधानोक्तं विधिर्विधानं शास्त्रेण विधानं शास्त्रविधानं कुर्यान्न कुर्यादित्येवंलक्षणं तेनोक्तं स्वकर्म यत्तत्कर्तुमिहार्हसि । इहेति कर्माधिकारभूमिप्रदर्शनार्थमिति ॥ २४ ॥**

इति श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यगोविंदभगवत्पूज्यपादशिष्यश्रीमच्छंकरभगवतः कृतौ श्रीभगवद्गीताभाष्ये सपद्विभागयोगो नाम षोडशोऽध्यायः ॥ १६ ॥

**भाष्यार्थ—'तस्मात्०' इति**—शास्त्राला सोडून केलेलें कर्म निष्फल आहे, असें सुचवून त्यावरून निष्पन्न होणारा अर्थ 'तस्मात्०' या श्लोकानें सांगतात—**तस्मात् ते-तव कार्याकार्यव्यवस्थितौ-कर्तव्याकर्तव्यव्यवस्थायां शास्त्रं प्रमाणं -ज्ञानसाधनं**—म्हणून तुला कार्याकार्यांची व्यवस्था करावयाची झाल्यास-कर्तव्य व अकर्तव्य यांची व्यवस्था करावयास-'हें कर्तव्य असून हें अकर्तव्य आहे' असा निर्णय करावयाचा झाल्यास शास्त्र हेंच एक प्रमाण आहे. ('अहोपण, धर्माधर्मविषयीं शास्त्र

---

१ रहस्यकार म्हणतात—"या श्लोकांतील 'कार्याकार्यव्यवस्थिति' या पदावरून कर्तव्यशास्त्राची म्ह० नीतिशास्त्राची कल्पना डोळ्यापुढे ठेवून गीता उपदेशिली आहे, हें उघड होतें. यासच कर्मयोगशास्त्र असें म्हणतात." पण हे म्हणणें सर्वथा अनुपपन्न आहे. कर्तव्यशास्त्र म्ह० नीतिशास्त्र हें म्हणणें निराधार आहे. त्याला संस्कृत वाङ्मयांत कोठें आधार नाहीं. गीतेंतहि त्याविषयीं कांहीं प्रमाण नाहीं. येथील कार्य म्ह० कर्तव्य-विहित कर्म व अकार्य म्ह० निषिद्ध कर्म होय. त्यांचा निर्णय करण्यासाठीं भगवान् ज्या शास्त्राचा हवाला देत आहेत तें शास्त्र म्ह० श्रुतिस्मृति हेंच शास्त्र होय. गीता ज्याचा हवाला देते, तें शास्त्र खुद्द गीताच कसें असेल ? अर्थात् 'यालाच कर्मयोगशास्त्र

जरी प्रमाण असलें तरी माझें कर्तव्य काय, अशी आशंका घेऊन सांगतात-)—**अतः शास्त्रविधानोक्तं ज्ञात्वा-बुद्ध्वा**—यास्तव शास्त्रविधानोक्त जाणून-समजून घेऊन —**विधिः-विधानं शास्त्रेण विधानं शास्त्रविधानं कुर्यात् न कुर्यात् इतिं-एवं लक्षणं**—जो विधि तेंच विधान, [ म्ह० येथील ' विधान'शब्द ' विधि ' या अर्थी आहे. ] शास्त्रानें केलेलें जें विधान-जो विधि तें शास्त्रविधान-करावें, न करावें, इत्यादि स्वरूपाचें जें शास्त्रविधान—**तेन उक्तं स्वकर्म यत् तत् कर्तुं इह अर्हसि**—त्या शास्त्रविधानानें सांगितलेलें जे स्वकर्म [ अर्थात् क्षत्रियाचें युद्धादिक ] तेंच येथें-या कर्माधिकार भूमींत करणे तुला योग्य आहे.—**' इह ' इति कर्माधिकारभूमिप्रदर्शनार्थं**—'इह' हा शब्द कर्माधिकारभूमि प्रदर्शित करण्यासाठीं आहे—**इति** —भाष्यातील शेवटचा 'इति' हा शब्द अध्यायाची समाप्ति सुचवितो. [ असो; याप्रमाणें

---

म्हणतात ' हें रहस्यकाराचें म्हणणे सर्वथा अग्राह्य आहे. तें केवळ काल्पनिक आहे; " गीतारहस्यात पृ. ४९-५१ तें स्पष्ट करून दाखविलें आहे " असे ते म्हणतात. पण त्यांत तरी ते अधिक काय सांगतात ?—" नीतिशास्त्र हा शब्द जुन्या संस्कृत ग्रंथांतून प्रायः राजनीतिशास्त्रास लावण्यांत येत असून कर्तव्याकर्तव्यशास्त्रास ' धर्मशास्त्र ' असें म्हणण्याची प्राचीन पद्धत आहे. पण ' नीति ' या शब्दांत कर्तव्य किंवा सद्वर्तन यांचाहि संग्रह होत असल्यामुळें आम्ही हल्लींच्या पद्धतीप्रमाणे धर्माधर्माच्या किंवा कर्माकर्माच्या या विवेचनासच ' नीतिशास्त्र ' असें या ग्रंथांत म्हटलें आहे." ( पण स्वतः गीताच जर कर्तव्याकर्तव्याचा निर्णय करण्यासाठीं शास्त्राचा हवाला देत आहे तर तिलाच हल्लींच्या पद्धतीने ' नीतिशास्त्र ' म्हणण्याचा रहस्यकाराना काय अधिकार आहे ? गीतेचा अर्थ करिताना रहस्यकारानी आपल्या मनांतील अर्थ तिच्यावर लादण्याचा जो यत्न केला आहे,तो तत्त्वज्ञांना केव्हाहि संमत होणार नाही व असा लादलेला अर्थ हा तिचा खरा-मूळ अर्थ आहे, असेहि म्हणता येणार नाही. गीतेत, महाभारतात व इतर संस्कृत वाङ्मयात 'नीति' हा शब्द जर राजनीति या अर्थी रूढ आहे तर त्याच गीतेचा अर्थ करिताना तिला नीतिशास्त्र बनविणे कितपत न्याय्य होईल याचा विचार वाचकानीच करावा. हल्लीची पद्धत म्हणजे पाश्चात्त्य पद्धत. आमच्या ग्रंथाचा अर्थ करितानाहि त्याची पद्धत स्वीकारणे, म्हणजेच वैदिक संप्रदायांतील ग्रंथाकडे इंग्लिश शब्दांच्या अर्थानें पाहणे आहे. पण अशानें आमच्या ग्रंथाचा खरा अर्थ कळणें मुळींच शक्य नाहीं. आमचे कर्तव्याकर्तव्यशास्त्र अगदी स्वतंत्र आहे. कोणाला कितीहि जरी कर्तव्यमोह पडला असला तरी त्याला हॅम्लेट प्रमाणे रडत बसावयास नको. कर्तव्याकर्तव्यशास्त्र हाच त्याला मार्गदर्शक प्रदीप आहे.गीता हें कार्याकार्यव्यवस्थिति सांगणारें जर शास्त्र असतें तर त्यानें 'ते शास्त्रं प्रमाणं' व 'शास्त्रविधानोक्तं ज्ञात्वा कर्म कर्तुं अर्हसि' असें म्हटलें नसतें. धर्माधर्माच्या किंवा कर्माकर्माच्या विवेचनास नीतिशास्त्र म्हणता येत नाही. रहस्यकारानीं विधीच्या उल्लंघनाविषयी व धर्माच्या सूक्ष्मत्वाविषयी वगैरे चाक्रायणादिकांचीं जीं उदाहरणें दिलीं आहेत त्यांनी विधिनिषेधशास्त्राला बाध येत नाही. कारण ते सर्व अपवाद आपद्धर्म आहेत. यास्तव " वेदान्तातील गहन तत्त्वज्ञानाच्या आधारें कार्याकार्यव्यवस्थिति लावणारा गीतेसारखा दुसरा ग्रंथ नाहीं. " हें रहस्यकाराचें म्हणणें केवळ काल्पनिक आहे,

या अध्यायांत पूर्वजन्मांतील कर्मवासनांच्या अनुसार या जन्मांत अभिव्यक्त होणाऱ्या ज्या सात्त्विकादि तीन प्रकृति त्यांचा दैवी व आसुरी असा विभाग करून त्यांतील पहिल्या संपत्तीचा स्वीकार करून दुसरीचा त्याग करावा, असा उपदेश केला, आणि परम पुरुषार्थाची इच्छा करणाऱ्या मुमुक्षूनें काम, क्रोध व लोभ यांना टाकून शास्त्रदृष्टि व्हावें आणि शास्त्रविधीच्या अनुसार वर्तन करावें, असा निर्धार केला ] २४.

इति भगवान् श्रीकृष्णांनी गायलेल्या उपनिषदांतील—रहस्यविद्येंतील ब्रह्मविद्येपैकीं योग—उपाय-शास्त्रांतील दैवासुरसंपद्विभागयोगनांवाचा सोळावा अध्याय विष्णुशर्मकृत सान्वयार्थ-सटीप-भाष्य-भाष्यार्थासह समाप्त झाला.

# अध्याय सतरावा.

श्रद्धात्रयविभागयोग.

**अर्जुन उवाच**—अर्जुन म्हणाला—

**ये शास्त्रविधिमुत्सृज्य यजन्ते श्रद्धयान्विताः ।**
**तेषां निष्ठा तु का कृष्ण सत्त्वमाहो रजस्तमः ॥१॥**

**अन्वयार्थ**—**हे कृष्ण**—हे कृष्णा !—**तु**—पण—**ये**—जे—**श्रद्धया अन्विताः**—श्रद्धेने युक्त होत्साते—**शास्त्रविधिं**—शास्त्रोक्त विधीचा—**उत्सृज्य**—त्याग करून—**यजन्ते**—देवादिकांची पूजा करितात—**तेषां**—त्यांची—**निष्ठा**—निष्ठा—**का**—कोणती—**सत्त्वं**—सात्त्विक—**आहो**—की—**रजः**—राजस—**उत**—की—**तमः**—तामस. १.

तस्माच्छास्त्रं प्रमाणं त इति भगवद्वाक्याल्लब्धप्रश्नबीजः-ये केचिदविशेषिताः शास्त्रविधिं शास्त्रविधानं श्रुतिस्मृतिशास्त्रचोदनामुत्सृज्य परित्यज्य यजन्ते देवादीन्पूजयन्ति श्रद्धयाऽऽस्तिक्यबुद्ध्याऽन्विताः संयुक्ताः सन्तः श्रुतिलक्षणं स्मृतिलक्षणं वा कंचिच्छास्त्रविधिमपश्यन्तो वृद्धव्यवहारदर्शनादेव श्रद्दधानतया ये देवादीन्पूजयन्ति त इह ये शास्त्रविधिमुत्सृज्य यजन्ते श्रद्धयाऽन्विता इत्येवं गृह्यन्ते । ये पुनः कंचिच्छास्त्रविधिमुपलभमाना एव तमुत्सृज्यायथाविधि देवादीन्पूजयन्ति त इह 'ये शास्त्रविधिमुत्सृज्य यजन्ते' इति न परिगृह्यन्ते ॥

**भाष्यार्थ**—( नास्तिक व शास्त्रैकदृष्टि आस्तिक यांची गति सांगितली. आतां आस्तिकच पण शास्त्र न जाणणारे, असे जे पुष्कळसे असतात त्यांची गति जाणण्याच्या इच्छेने अर्जुन प्रश्न करीत आहे, असे आचार्य सांगतात-)—'**तस्मात् शास्त्रं प्रमाणं ते' इति भगवद्वाक्यात् लब्धप्रश्नबीजः**—( अर्जुनः उवाच- )—'तस्मात् शास्त्रं-' म्हणून तुला कर्तव्याकर्तव्याचा निर्णय करण्यास शास्त्र प्रमाण आहे, अशा या भगवानाच्या वाक्यावरून, ते वाक्य ऐकून, ज्याला प्रश्नाचे बीज सांपडलें आहे असा अर्जुन म्हणाला—**ये-केचित् अविशेषिताः**—जे कित्येक सर्वसाधारण लोक-सामान्य मानव—**शास्त्रविधिं-शास्त्रविधानं-श्रुति-स्मृतिशास्त्रचोदनां उत्सृज्य-परित्यज यजन्ते-देवादीन् पूजयन्ति**—शास्त्रविधीला-शास्त्रविधानाला श्रुति-स्मृतिशास्त्राच्या चोदनेला सोडून,विधीचा परित्याग करून यजन-देवादिकांचे पूजन करितात ( तें कसें ? उत्तर-)—**श्रद्धया-आस्तिक्यबुद्ध्या अन्विताः-संयुक्ताः सन्तः**—श्रद्धेनें म्ह० आस्तिक्यबुद्धीनें अन्वित-संयुक्त होत्साते ( देवादिकांचें पूजन

करितात, येथील यजनाबरोबर दानादिकांचेंहि ग्रहण करावें. ' अहोपण वेदशास्त्रोक्त-विधीचा त्याग केल्यावर ते श्रद्धेनें युक्त होऊन देवादिकांचें पूजन कसें करितात ? कारण शास्त्रीय प्रमाणावांचून नुसत्या श्रद्धेनें याग-दानादि संभवत नाहीं ? ' उत्तर-)— **श्रुतिलक्षणं स्मृतिलक्षणं वा कंचित् शास्त्रविधिं अपश्यन्तः**—श्रुतिलक्षण किंवा स्मृतिलक्षण असा कोणताच शास्त्रविधि न पाहणारे—**वृद्धव्यवहारदर्शनात् एव श्रद्दधानतया ये देवादीन् पूजयन्ति**—केवल वृद्धव्यवहार पाहूनच-वृद्धांचा व्यवहार-नुस्ती रूढि पाहूनच श्रद्धाळुपणाने जे देवादिकाचे पूजन करितात—**ते इह ' ये शास्त्रविधिं उत्सृज्य यजन्ते श्रद्धयान्विताः ' इति एवं गृह्यन्ते**— ते येथें ' ये शास्त्रविधिं० ' या वचनाने घेतलेले आहेत. ( शास्त्रविधि जाणत असूनहि त्याचा त्याग करून आपल्याच कल्पनेने जे यागादि करितात ते येथे या वचनाने घ्याव-याचे नाहींत, असे सांगतात-)—**ये पुनः कंचित् शास्त्रविधिं उपलभमानाः एव तं उत्सृज्य अयथाविधि देवादीन् पूजयन्ति**—पण जे कोणी एखाद्या शास्त्रविधीला प्रत्यक्ष पहात असतानाच त्याला सोडून अयथाविधि-देवादिकांचें पूजन करितात—**ते इह ' ये शास्त्रविधिं उत्सृज्य यजन्ते ' इति न परिगृह्यन्ते**— ते येथें ' जे शास्त्रविधीला सोडून यजन करितात ' या वाक्यात घेतले जात नाहींत.

**कस्माच्छ्रद्धयाऽन्वितत्वविशेषणात् । देवादिपूजाविधिपरं किंचिच्छास्त्रं पश्यन्त एव तदुत्सृज्याश्रद्दधानतया तद्विहितायां देवादिपूजायां श्रद्धयाऽन्विताः प्रवर्तन्त इति न शक्यं कल्पयितुं यस्मात्तस्मात्पूर्वोक्ता एव ' ये शास्त्रविधिमुत्सृज्य यजन्ते श्रद्धयाऽन्विताः ' इत्यत्र गृह्यन्ते । तेषामेवंभूतानां निष्ठा तु का कृष्ण सत्त्वमाहो रजस्तमः किं सत्त्वं निष्ठाऽवस्थानमाहोस्विद्रजोऽथ वा तमः । एतदुक्तं भवति या तेषां देवादिविषया पूजा सा किं सात्त्विक्याहोस्विद्राजस्युत तामसीति ॥ १ ॥**

**भाष्यार्थ—कस्मात्**—विधि काय आहे, हे ठाऊक असूनहि जे त्याला सोडून यज्ञ करितात त्यांचें येथें ग्रहण कां करावयाचे नाहीं ? ( उत्तर-)—**श्रद्धाया अन्वि-तत्वविशेषणात्**—कारण त्यांना' श्रद्धया अन्विताः ' या शब्दांनीं श्रद्धेने युक्त असणें हें विशेषण लावलें आहे. (यास्तव शास्त्रज्ञ असूनहि शास्त्रविधि सोडून यजन करणारांचें येथें ग्रहण करितां येत नाहीं. ते कां? शास्त्रज्ञांचेंच ग्रहण केल्यास काय होते? असें कोणी विचा-रील म्हणून त्यांचें ग्रहण केल्यास व्याघात हा दोष येतो, असें आचार्य सांगतात-)— **देवादिपूजाविधिपरं किंचित् शास्त्रं पश्यन्तः एव अश्रद्दधानतया तत् उत्सृज्य तद्विहितायां देवादिपूजायां श्रद्धया अन्विताः प्रवर्तन्ते इति यस्मात् कल्पयितुं न शक्यं**—देवादिपूजाविधिपर-देवादिकांची पूजा कशी करावी हें सांगणारें कांहीं शास्त्र पहात-जाणत असतानाच अश्रद्धाळुपणानें त्याला सोडून शास्त्रानें सांगितलेल्या-शास्त्रविहित देवादिकांच्या पूजेमध्यें श्रद्धेनें युक्त होऊन प्रवृत्त होतात अशी ज्याअर्थी कल्पना करितां येणे शक्य नाहीं—**तस्मात् पूर्वोक्ताः एव ' ये शास्त्र-विधिं उत्सृज्य यजन्ते श्रद्धयान्विताः ' इति अत्र गृह्यन्ते**—त्याअर्थी वर

**सांगितलेलेच** म्ह० शास्त्रविधीला जाणतच नसल्यामुळे त्याला सोडून श्रद्धायुक्त होत्साते यजन करणारेच 'ये शास्त्रविधिं०' या ठिकाणीं घेतले जातात. [कारण शास्त्रोक्तविधि ठाऊक असूनहि तो सोडून–त्याचा तिरस्कार करून स्वच्छेने देवपूजनादिकांत प्रवृत्त होणारांचा आसुर प्रकृतीच्या लोकांमध्येंच अन्तर्भाव होतो, हे गेल्याच अध्यायात सिद्ध झालें आहे. यास्तव आस्तिक लोकाच्या प्रकरणांत त्यांना अवकाशच मिळणें शक्य नाहीं, असा याचा भावार्थ. तस्मात् शास्त्र माहीत नसले तरी वृद्धांच्या व्यवहाराप्रमाणें श्रद्धेनें धर्माचरण करणारांचें पर्यवसान कशांत होतें ? असे अर्जुन विचारतो–]—**कृष्ण, तु तेषां एवंभूतानां निष्ठा का**—हे कृष्णा, पण त्या अशा प्रकारच्या लोकांची निष्ठा कोणती ?—'**सत्त्वं आहो रजः तमः**' **किं सत्त्वं निष्ठा-अवस्थानं आहोस्वित् रजः अथ वा तमः**—सत्त्व, रज, की तम म्ह० त्यांची सत्त्व ही निष्ठा म्ह० अवस्थान–अवस्थिति आहे कीं रज की तम ?—**एतत् उक्तं भवति**—याचा भावार्थ असा—**तेषां या देवादिविषया पूजा सा किं सात्त्विकी आहोस्विद् राजसी उत तामसी इति**—त्यांची जी देवादिकांची पूजा ती काय सात्त्विकी आहे कीं राजसी कीं तामसी, असा याचा भावार्थ आहे. १.

---

१ सोळाव्या अध्यायाच्या शेवटी 'म्हणून कार्य व अकार्य याच्या निर्णयाविषयी तुला श्रुति-स्मृति-लक्षण विधिनिषेधशास्त्रच प्रमाण आहे' असे भगवानांनी सांगितलेलें ऐकून त्यावरून सुचलेला प्रश्न अर्जुन या अध्यायात विचारीत आहे, एवढीच आचार्य या अध्यायाची पूर्व अध्यायाशी संगति लावितात; आणि वस्तुतः या अध्यायाचा विषय पाहिला असतां तीच अगदी योग्य आहे, असे कोणीहि तत्त्वदृष्टि पुरुष कबूल करील. पण रहस्यकार या अध्यायाची संगति लावतानाहि कशा ओढाताण करितात ती पहा–"कर्मयोगशास्त्राप्रमाणे जगाचे धारण-पोषण करणारे पुरुष कोणत्या प्रकारचे आणि त्याच्या उलट जगाचा नाश करणारे पुरुष कोण, याचे याप्रमाणे वर्णन झाल्यावर मनुष्यामनुष्यांमध्ये असे भेद कां होतात, असा प्रश्न सहज उत्पन्न होतो." पण 'दैवी संपत्तीचे पुरुष कर्मयोगशास्त्राप्रमाणे जगाचे धारण-पोषण करणारे असतात' असे सोळाव्या अध्यायात मुळीच वर्णन नाहीं. त्यांत अगोदर दैवीसंपत्तीचे गुण सांगितले आहेत. पण ते सर्व सात्त्विक असल्यामुळे 'शठं प्रति शाठ्यं' या किंवा 'धटासी आणावा धट उद्धटासी उद्धट' या स्वरूपाचे नाहीत. तर सत्त्वसंशुद्धि, आर्जव, तप, अहिंसा, सत्य, अक्रोध, शांति, भूतेषु दया, क्षमा, अद्रोह, नातिमानिता इत्यादि स्वरूपाचे आहेत. म्ह० 'शठ प्रत्यपि सत्य' या जातीचे आहेत. त्यांच्या योगानें जगाचे धारण-पोषण कसे होणार ? शिवाय भगवान्हि 'सात्त्विक प्रकृति कर्मयोगशास्त्राप्रमाणें जगाचे धारण-पोषण करणाऱ्या पुरुषाची आहे' असे सांगत नाहीत. तर 'दैवी संपत् विमोक्षाय' असे म्हणून मोक्षाकडे तिचा विनियोग सांगतात. तसेंच 'मनुष्यामनुष्यामध्यें असे भेद कां होतात ? असा प्रश्न सहज उत्पन्न होतो,' हे म्हणणेहि अयोग्य आहे. कारण या प्रश्नाचे उत्तर पूर्वींच (अ. १६ श्लो. ३-५) 'अभिजात' या शब्दाने दिलें आहे. अभिजात म्ह० त्या त्या संपत्तीला अनुलक्षून उत्पन्न झालेला पुरुष. अर्थात् पूर्व शरीर सोडतांना ज्या संपत्तीला अनुलक्षून त्याची अन्त्यमति उत्पन्न झाली असेल व त्याने जिच्या

अनुसार हा जन्म घेतला असेल तदनुरूप पुरुषामध्यें दैवी किंवा आसुरी प्रकृति व्यक्त होते; शिवाय पूर्वींहि ' प्रकृति यान्ति भूतानि ' [ गी. भा. ३.३३.पृ. ३३१ ] ' प्रकृत्या नियताः स्वया ' [ गी. भा. ७,२० पृ. ६३३ ] इत्यादि शब्दांनी पूर्व प्रकृतीच्या अनुसार या जन्मांतील स्वभाव बनतो असे सांगितले आहे. अर्थात् हा प्रश्न येथे उत्पन्न होण्याचें कारण नाही. येथे अर्जुनाचा प्रश्न स्पष्ट आहे. शास्त्रविधीला सोडून जे श्रद्धेने यजन करितात त्यांची निष्ठा कोणती ? सात्त्विकी, राजसी की तामसी ? हा प्रश्न आहे व तो मागच्या अध्यायातील ' तस्मात् शास्त्रं प्रमाणं ते ' या भगवद्वचनावरून अर्जुनाच्या मनांत उपस्थित झाला आहे. यास्तव रहस्यकाराची संगति बरोबर नाही. तसेच " ज्ञानविज्ञानाचे एकदर निरूपण या अध्यायात पुरे केले आहे.' हे म्हणणेंहि अयोग्य आहे. कारण ज्ञानविज्ञान सातव्या अध्यायातच संपले व आठव्यात तारक ब्रह्म, नवव्यात राजविद्या राजगुह्य, दहाव्यांत विभूति वगैरे निरनिराळे विषय आले आहेत.

पुढें याच श्लोकावरील टीपेत ते ह्मणतात--" शास्त्रावर श्रद्धा असूनहि मनुष्य अज्ञानाने चुकतो. उदाहरणार्थ, सर्वव्यापी परमेश्वराचे भजनपूजन करावे हा शास्त्रविधि सोडून देवतांच्याच नादीं लागतो. " पण हें म्हणणें बरोबर नाही. कारण या श्लोकांतील ' श्रद्धया ' या शब्दाचा संबंध शास्त्राकडे नसून पूजेकडे आहे. शास्त्राकडे त्याचा संबंध लाविल्यास 'श्रद्धेने शास्त्रविधि सोडून' असा भलताच कांही तरी अर्थ होईल 'शास्त्रविधि माहीत नाही, तथापि वाडवडिलांच्या पद्धतीला अनुसरून श्रद्धेने पूजा करितो, त्याची निष्ठा कोणती ?' असा प्रश्न आहे. शास्त्रावर जर श्रद्धा असेल व केवल अज्ञानाने चुकत असेल, तर तो शास्त्रविधि समजून घेईल. पण येथे ज्यांच्या विषयी प्रश्न आहे ते कुलधर्माप्रमाणे वाडवडिलांचा धर्म आचरण करणारे आहेत. अर्थात् त्यांनी जे उदाहरण दिलें आहे तेहि अस्थानी आहे. रहस्यकार पुढे म्हणतात--" शास्त्राचा व धर्माचा अश्रद्धेने तिरस्कार करणाऱ्या म्ह० आसुरी लोकांबद्दल हा प्रश्न नव्हे, " ( तर मग ४,५ व ६ श्लोकांत यक्ष-राक्षस-प्रेत-भूत याच्या पूजेचे वर्णन करून घोर तप करणारास आसुर निश्चयाचे कां ह्मटले आहे, असें कोणी विचारील म्हणून ते लागलेच पुढे म्हणतात-) " तथापि प्रसंगानुसार त्यांच्या कर्माची फलेंहि या अध्यायांत वर्णिली आहेत " पण या संबंध अध्यायात आसुर लोकाच्या कर्माचे फल एका शब्दानेहि कोठें सांगितलेले नाही. वाचकांनी संबंध अध्याय अवश्य वाचून पहावा, म्हणजे रहस्यकारांचें म्हणणे किती प्रामाणिक आहे, तें कळेल. त्याच्याच बरोबर आचार्यांचें या श्लोकावरील भाष्यहि पुनः वाचावें, ह्मणजे त्यांनी या श्लोकांची किती सुंदर व्यवस्था लाविली आहे,तेंहि कळेल. वंशपरंपरेनें पूजन करणारांमध्येंहि सात्त्विक, राजस व तामस असे भेद संभवतात,हें येथे विवक्षित आहे. शास्त्राचा, धर्माचा तिरस्कार करणारे तेवढेच आसुर लोक आणि राजस व तामस पूजा, आहार, यज्ञ, दान, तप करणारे आसुर नव्हेत, असें म्हणतां येत नाही. रहस्यकारांच्या म्हणण्याप्रमाणें शास्त्राचा व धर्माचा तिरस्कार करणारे प्रायः सर्वच आधुनिक सुशिक्षित आसुर लोक ठरतात व ही व्याप्ति त्यांच्या अगदी घरापर्यंत पोंचते, हें त्यांच्या ध्यानांत कसें आलें नाहीं, कांहीं कळत नाही ! असो.

**श्रीभगवान् उवाच**—श्रीकृष्ण म्हणाले—

**त्रिविधा भवति श्रद्धा देहिनां सा स्वभावजा ।**
**सात्त्विकी राजसी चैव तामसी चेति तां शृणु ॥२॥**

**अन्वयार्थ—देहिनां**—देहवान् जीवांची—**सात्त्विकी राजसी च तामसी एव**—सात्त्विकी, राजसी व तामसी—**इति त्रिविधा श्रद्धा**—अशी त्रिविधा-तीन प्रकारची श्रद्धा—**भवति**—असते.—**सा**—ती तिन्ही प्रकारची श्रद्धा—**स्वभावजा**—जन्मान्तरांतील धर्मादिकांचा जो संस्कार त्या मरणसमयीं अभिव्यक्त झालेला असतो, त्यापासून ती उत्पन्न झालेली असते.—**तां**—त्या त्रिविध श्रद्धेला तूं—**शृणु**—ऐक २.

**सामान्यविषयोऽयं प्रश्नो नाप्रविभज्य प्रतिवचनमर्हतीति— त्रिविधा त्रिप्रकारा भवति श्रद्धा । यस्यां निष्ठायां त्वं पृच्छसि देहिनां सा स्वभावजा । जन्मान्तरकृतो धर्मादिसंस्कारो मरणकालेऽभिव्यक्तः स्वभाव उच्यते ततो जाता स्वभावजा । सात्त्विकी सत्त्वनिर्वृता देवपूजादिविषया, राजसी रजोनिर्वृता यक्षरक्षःपूजादिविषया, तामसी तमोनिर्वृता प्रेतपिशाचादिपूजाविषयैवं त्रिविधा तामुच्यमानां श्रद्धां शृणु ॥ २ ॥**

**भाष्यार्थ—अयं सामान्यविषयः प्रश्नः अप्रविभज्य न प्रतिवचनं अर्हति इति ( श्रीभगवान् उवाच- )**—हा सामान्यविषयच प्रश्न आहे. पण त्याचा अगदी पृथक् विभाग केल्यावांचून प्रतिवचन-उत्तर देण्यास योग्य नाहीं, म्हणून श्रीभगवान् म्हणाले-[ प्रश्नाचा विषय सामान्य असला तरी त्याचें उत्तर त्याच्या विषयाचा विभाग केल्यावांचून देतां येण्यासारखे नाहीं, म्हणून भगवान् विभागपूर्वक त्याचे उत्तर सांगण्यास आरंभ करितात-]—**त्रिविधा-त्रिप्रकारा श्रद्धा भवति**—त्रिविध म्ह० तीन प्रकारची श्रद्धा असते.—**यस्यां निष्ठायां त्वं पृच्छसि**—ज्या निष्ठेविषयीं श्रद्धापूर्वक क्रियेविषयीं तूं प्रश्न करीत आहेस ती त्रिविध निष्ठा आहे.—**देहिनां सा स्वभावजा**—देहवान् प्राण्यांची ती त्रिविध श्रद्धा स्वभावजन्य आहे. ( प्रकृत विषयाच्या उपयोगी असा स्वभावशब्दाचा अर्थ सांगतात- )—**जन्मान्तरकृतः धर्मादिसंस्कारः मरणकाले अभिव्यक्तः स्वभावः उच्यते**—जन्मान्तरी-पूर्वजन्मी झालेला धर्मादिकांचा संस्कार की जो पूर्वमरणसमयीं अभिव्यक्त होतो, त्याला स्वभाव म्हटले जातें.—**ततः जाता स्वभावजा**—त्या स्वभावापासून झालेली जी श्रद्धा ती स्वभावजा होय.—**सात्त्विकी-सत्त्वनिर्वृता-देवपूजादिविषया**—एक सात्त्विकी-सत्त्वगुणामुळे झालेली, देवपूजा इत्यादि कर्मांविषयींची,—**राजसी-रजोनिर्वृता-यक्षरक्षःपूजादिविषया**—दुसरी राजसी-रजोगुणांपासून झालेली, यक्ष-राक्षसांची पूजा वगैरे यांविषयींची,—**तामसी-तमोनिर्वृता-प्रेतपिशाचादिपूजाविषया**—तिसरी तामसी-तमोगुणाच्यायोगाने झालेली-प्रेतपिशाचादिकांविषयींची—**एवं त्रिविधा**—याप्रमाणें प्राण्यांची तीन प्रकारची श्रद्धा आहे.—**तां उच्यमानां श्रद्धां शृणु**—ती पुढें सांगितली जाणारी श्रद्धा तूं ऐक. २.

**सत्त्वानुरूपा सर्वस्य श्रद्धा भवति भारत ।**
**श्रद्धामयोऽयं पुरुषो यो यच्छ्रद्धः स एव सः ॥३॥**

**अन्वयार्थ—हे भारत**—हे अर्जुना!—**सत्त्वानुरूपा**—विशिष्ट संस्कारांनी युक्त अशा अंतःकरणाच्या अनुरूप—**सर्वस्य**—सर्वांची-प्रत्येक मनुष्याची—**श्रद्धा**—आस्तिक्यबुद्धि—**भवति**—असते.—**अयं पुरुषः**—हा संसारी जीव—**श्रद्धामयः**—श्रद्धाप्राय-प्रायः श्रद्धायुक्त असतो. त्यामुळे—**यः**—जो—**यच्छ्रद्धः**—ज्या श्रद्धेनें युक्त असतो—**सः एव**—त्या श्रद्धेच्या अनुरूपच—**सः**—तो जीव असतो. ३.

**सैवं त्रिविधा भवति—सत्त्वानुरूपा विशिष्टसंस्कारोपेतान्तःकरणानुरूपा सर्वस्य प्राणिजातस्य श्रद्धा भवति भारत । यद्येवं ततः किं स्यादित्युच्यते श्रद्धामयः श्रद्धाप्रायोऽयं पुरुषः संसारी जीवः । कथं यो यच्छ्रद्धो या श्रद्धा यस्य जीवस्य स यच्छ्रद्धः स एव तच्छ्रद्धानुरूप एव स जीवः ॥ ३ ॥**

**भाष्यार्थ**—( पूर्वकर्मानुसार मरणसमयीं उद्भवलेली तीन प्रकारची स्वभावसंज्ञक वासना, हेच तीन प्रकारच्या श्रद्धेचें निमित्त वर सांगितलें. आतां तिचेच उपादान कारण सांगतात-)—**सा एवं त्रिविधा भवति**—ती श्रद्धा याप्रमाणे तीन प्रकारची होते, —**भारत सर्वस्य प्राणिजातस्य सत्त्वानुरूपा-विशिष्टसंस्कारोपेत अन्तः-करणानुरूपा श्रद्धा भवति**—हे भरतवंशजा, सर्व प्राणिजाताची-सर्व प्राण्यांची सत्त्वानुरूप-विशिष्टसंस्कारांनी युक्त अशा अन्तःकरणानुरूप श्रद्धा असते. [ विशिष्ट-संस्कारांनी युक्त असे अन्तःकरण हेच श्रद्धेचे उपादान कारण असल्यामुळे त्रिविध संस्कारांच्या अनुसार त्रिविध श्रद्धा होते. अहोपण, सत्त्वादि निष्ठेविषयीं प्रश्न असतांना श्रद्धेचे त्रिविधत्व सांगण्यांत काय अर्थ आहे ? असा प्रश्न-]—**यदि एवं ततः किं स्यात्** —असें श्रद्धेचें त्रिविधत्व जरी असले तरी त्यामुळें प्रश्नाचा निर्णय कसा होणार ?—**इति उच्यते**—असे म्हणाल तर सांगतो—**अयं पुरुषः-संसारी जीवः श्रद्धा-मयः-श्रद्धाप्रायः**—हा पुरुष म्ह० हा संसारी जीव श्रद्धामय-श्रद्धाप्रचुर आहे-पुरुषामध्यें श्रद्धेचेंच आधिक्य असतें.—**कथं**—पुरुष श्रद्धामय कसा ?—'**यः यच्छ्रद्धः**' -**या श्रद्धा यस्य जीवस्य सः यच्छ्रद्धः**—ज्या जीवाची जी श्रद्धा असते तो 'यच्छ्रद्ध'—**सः एव तच्छ्रद्धानुरूपः एव सः-जीवः**—तोच तच्छ्रद्धानुरूपच तो म्ह० जीव असतो-ज्याची जी श्रद्धा असते तसाच तो पुरुष[1] असतो. ३.

---

१ रहस्यकार दुसऱ्या श्लोकांतील 'स्वभावजा' या शब्दाचा अर्थ 'स्वभावतः' असा करितात. तिसऱ्या श्लोकांतील 'सत्त्वानुरूपा' याचा "ज्यांच्या त्यांच्या सत्त्वाप्रमाणे म्ह० प्रकृतिस्वभावाप्रमाणे" असा करितात व टीपेंत म्हणतात-"सत्त्वशब्दाचा अर्थ देहस्वभाव, बुद्धि किंवा अतःकरण असा आहे. काठकोपनिषदांत सत्त्वशब्दाचा हा अर्थ आला असून ( कठ. ६.७ ) वेदान्तसूत्राच्या शांकरभाष्यांतहि 'क्षेत्रक्षेत्रज्ञ' या पदाऐवजीं 'सत्त्व-

**यजन्ते सात्त्विका देवान्यक्षरक्षांसि राजसाः ।**
**प्रेतान्भूतगणांश्चान्ये यजन्ते तामसा जनाः ॥ ४ ॥**

**अन्वयार्थ—सात्त्विकाः**—सत्त्वनिष्ठ पुरुष—**देवान्**—देवांस—**यजन्ते**—पूजतात.—**राजसाः**—राजस पुरुष—**यक्षरक्षांसि**—यक्ष व राक्षस यांस पूजतात.—**अन्ये तामसाः जनाः**—दुसरे तामस जन—**प्रेतान् च भूतगणान्**—प्रेतांना व भूतगणांना पूजतात. ४

**ततश्च कार्येण लिङ्गेन देवादिपूजया सत्त्वादिनिष्ठाऽनुमेयेत्याह—यजन्ते पूजयन्ति सात्त्विकाः सत्त्वनिष्ठा देवान्, यक्षरक्षांसि राजसाः, प्रेतान्भूतगणांश्च सप्तमातृकादींश्चान्ये यजन्ते तामसा जनाः ॥ ४ ॥**

---

क्षेत्रज्ञ' हे पद आले आहे.(१.२.१२)साराश दुसऱ्या श्लोकातील 'स्वभाव' आणि तिसऱ्या श्लोकांतील ' सत्त्व ' हे दोन्ही शब्द या ठिकाणी समानार्थक आहेत. कारण स्वभाव म्ह० प्रकृति व प्रकृतीपासूनच बुद्धि व अन्तःकरण होते हा सिद्धान्त सांख्य व वेदान्त या दोहोसहि मान्य आहे. " पण यात रहस्यकारानी कसा घोटाळा केला आहे तो पहा.अगोदर ते सत्त्व म्ह० प्रकृतिस्वभाव म्हणतात; नतर देहस्वभाव, बुद्धि व अन्तःकरण हा 'सत्त्व' शब्दाचा अर्थ सागतात. त्याविषयी काठकातील 'इन्द्रियेभ्यः पर मनः मनसः सत्त्वं उत्तमं ' या वाक्यात सत्त्वशब्दाचा तसाच अर्थ केला आहे असे म्हणतात. शांकरभाष्याचाहि हवाला देतात आणि स्वभाव व सत्त्व हे दोन्ही शब्द समानार्थक आहेत असे म्हणतात. इतकेच नव्हे तर पुढे स्वभाव म्ह० प्रकृति व प्रकृतीपासूनच पुढें बुद्धि व अन्तःकरण होते,असा सांख्य-वेदान्ताचा सिद्धान्त सागतात. म्हणजे कशाचाच कशाला मेळ नाहीं. प्रकृतिस्वभाव व देहस्वभाव आणि अन्तःकरण व बुद्धि ही एकच कशी होतील ? काठकांत, शारीरकांत,फार काय पण या गीताभाष्यांतहि आचार्यांनी सत्त्वशब्दाचा बुद्धि किंवा अन्तःकरण असा अर्थ केला आहे (गी. भा.पृ.९,१०५३पहा ) योगवासिष्ठादि ग्रथातहि सत्त्वशब्द अन्तःकरण या अर्थी योजिला आहे,पण त्यावरून'स्वभाव' व'सत्त्व'हे शब्द समानार्थक कसे ठरतात! बरें ते जर समानार्थक आहेत तर स्वभाव म्ह०प्रकृति व प्रकृतीपासून अन्तःकरण होतें वगैरे येथें सांगण्याचें काय प्रयोजन आहे ? आम्ही म्हणतो सांख्य व वेदान्त याचा जरी तसा सिद्धान्त असला तरी त्याचा येथें काय सबंध ? यापेक्षां स्वभाव व सत्त्व या शब्दाचा आचार्यांनीं केलेला अर्थ किती सुबोध व सयुक्तिक आहे, याचा विचार आतां वाचकांनीच करावा. "जशी ज्याची बुद्धि तसें त्याला फल आणि ही बुद्धि होणे किंवा न होणे,हे प्रकृतिस्वभावावर अवलंबून असतें " वगैरे दुसराहि पुष्कळ असंबद्ध मजकूर येथे लिहिला आहे, पण त्याकडे दुर्लक्ष करणेच बरे ! " म्हणूनै प्रकृतिस्वभावाप्रमाणे श्रद्धा बदलत्ये,असें सांगितल्यावर" वगैरे म्हणणे निराधारच आहे. कारण दुसऱ्या किंवा तिसऱ्या श्लोकांतहि ' प्रकृतिस्वभावाप्रमाणें श्रद्धा बदलत्ये ' असें सांगितलेकें नाहीं.

**भाष्यार्थ—ततः च कार्येण लिङ्गेन देवादिपूजया सत्त्वादिनिष्ठा अनुमेया इति आह**—आणि अधिकृत पुरुष याप्रमाणें श्रद्धाप्रधान असल्यामुळें कार्य या लिंगावरून-देवादि पूजेच्यायोगाने-देवादिकाची पूजा, ह्याच कार्यावरून पुरुषाची सत्त्वादि निष्ठा अनुमेय आहे. या कार्यावरून त्याच्या निष्ठेचे अनुमान करावें, असें सांगतात—**सात्त्विकाः-सत्त्वनिष्ठाः देवान् यजन्ते-पूजयन्ति**—सात्त्विक लोक-सत्त्वगुणनिष्ठ लोक देवांचे यजन करितात. वस्वादि देवास पूजतात.—**राजसाः यक्षरक्षांसि**—रजोनिष्ठ कुबेरादि यक्ष, नैर्ऋतादि राक्षस, यांची पूजा करितात.—**अन्ये तामसाः जनाः प्रेतान् च भूतगणान्-सप्तमातृकादीन् यजन्ते**—इतर तामस जन प्रेत व भूतगण सप्तमातृकादिक यांचे यजन करितात. ( स्वधर्मापासून च्युत झालेले ब्राह्मणादिक देहपातानंतर वायुदेहाला प्राप्त होतात, ते प्रेत होत, हे देवादिक आपापल्या सात्त्विकादि पूजकास सात्त्विकादि फल देतात. ) ४.

अशास्त्रविहितं घोरं तप्यन्ते ये तपो जनाः ।
दम्भाहंकारसंयुक्ताः कामरागबलान्विताः ॥५॥
कर्शयन्तः शरीरस्थं भूतग्राममचेतसः ।
मां चैवान्तःशरीरस्थं तान्विद्ध्यासुरनिश्चयान् ॥६॥

**अन्वयार्थ—ये**—जे—**दंभाहंकारसंयुक्ताः**—दंभ व अहंकार यांनी संयुक्त असलेले—**कामरागबलान्विताः**—काम व राग-आसक्ति याच्या बलाने युक्त असलेले—**अचेतसः**—अविवेकी—**शरीरस्थं**—शरीरातील—**भूतग्रामं**—इंद्रियसमुदायास—**च**—आणि—**अन्तःशरीरस्थं मां एव**—शरीरात असलेल्या मलाच—**कर्शयन्तः**—कृश करणारे—**जनाः**—लोक—**अशास्त्रविहितं**—शास्त्राने ज्याचें विधान केलेले नाही असे—**घोरं**—प्राण्याना पीडा देणारे—**तपः**—तप—**तप्यन्ते**—करितात—**तान् आसुरनिश्चयान्**—त्यांना आसुर निश्चयाचे—**विद्धि**—जाण. ५, ६

**एवं कार्यतो निर्णीताः सत्त्वादिनिष्ठाः शास्त्रविध्युत्सर्गे तत्र कश्चिदेव सहस्रेषु देवपूजादितत्परः सत्त्वनिष्ठो भवति बाहुल्येन तु रजोनिष्ठास्तमोनिष्ठाश्चैव प्राणिनो भवन्ति, कथम्—अशास्त्रविहितं न शास्त्रविहितमशास्त्रविहितं घोरं पीडाकरं प्राणिनामात्मनश्च तपस्तप्यन्ते निर्वर्तयन्ति ये तपो जनास्ते च दम्भाहंकारसंयुक्ता दम्भश्चाहंकारश्च दम्भाहंकारौ ताभ्यां संयुक्ता दम्भाहंकारसंयुक्ताः कामरागबलान्विताः कामश्च रागश्च कामरागौ तत्कृतं बलं कामरागबलं तेनान्विताः कामरागबलैर्वाऽन्विताः ॥ ५ ॥**

---

१या श्लोकावरील टीपेत रहस्यकारांनी पुनः 'शास्त्रावर श्रद्धा असणाऱ्या मनुष्याचे ...' व 'शास्त्रावर श्रद्धा नसणाऱ्या कामपरायण व दांभिक लोकांचा वर्ग कोणता,' वगैरे म्हटलें आहे. पण येथील श्रद्धेचा संबंध शास्त्राशीं नाहीं हें आम्हीं पहिल्याच टीपेंत ( पृ. १०८३ ) सांगितलें आहे.

**भाष्यार्थ—एवं शास्त्रविध्युत्सर्गे कार्यतो निर्णीताः सत्त्वादिनिष्ठाः—** याप्रमाणे शास्त्रविधीचा उत्सर्ग केला असतां सत्त्वादिनिष्ठ जन कार्यावरून जाणले जातात. यांच्या सत्त्वादिनिष्ठेचे ज्ञान त्यांच्या पूजादि प्रकारांवरून होते.—**तत्र सहस्रेषु कश्चित् एव देवपूजादितत्परः सत्त्वनिष्ठः भवति**—पण त्यांतील हजारो लोकांपैकीं कोणी एखादाच देवादिकाच्या पूजेमध्यें तत्पर म्ह० सत्त्वनिष्ठ असतो—**तु बाहुल्येन रजोनिष्ठाः च तमोनिष्ठाः एव प्राणिनः भवन्ति**—पण बाहुल्यानें रजोनिष्ठ व तमोनिष्ठच प्राणी असतात. [ रजोनिष्ठ व तमोनिष्ठ जनाचेंच जगांत आधिक्य असते.]—**कथं**—ते कसे ?—**अशास्त्रविहितं-न शास्त्रविहितं अशास्त्रविहितं**—अशास्त्रविहित म्ह० शास्त्रानें विहित नसलेले ते अशास्त्रविहित—**घोरं-प्राणिनां आत्मनः च पीडाकरं**—घोर म्ह० प्राण्यांना व स्वतःला पीडा करणारें—**तपः तप्यन्ते**—तप करितात म्ह०—**ये जनाः तपः निर्वर्तयन्ति**—जे जन असले अशास्त्रविहित व घोर तप करितात—**ते च दम्भाहंकारसंयुक्ताः-दम्भः च अहंकारः च दम्भाहंकारौ ताभ्यां संयुक्ताः दम्भाहंकारसंयुक्ताः**—आणि ते दंभाहंकारसंयुक्त असलेले,-दंभ व अहंकार-मिळून दंभाहंकार, त्या दंभाहंकारानीं संयुक्त म्ह० दंभाहंकारसंयुक्त—**काम-रागबलान्विताः-कामः च रागः च कामरागौ तत्कृतं बलं कामरागबलं तेन अन्विताः**—काम म्ह० काम्यविषय व राग-विषयभोगाचा अभिलाष मिळून काम-राग, त्या काम-रागाच्या निमित्तानें जें बल ते काम-रागबल त्या-काम-रागबलानें युक्त—**वा काम-राग-बलैः युक्ताः**—किंवा काम, राग व तत्प्रयुक्त बल यानीं युक्त [ या विशेषणानीं विशिष्ट असलेले लोक आसुरनिश्चयी आहेत, असें जाण, असा पुढील श्लोकाशीं संबंध. ] ५

**कर्शयन्त इति । कर्शयन्तः कृशी कुर्वन्तः शरीरस्थं भूतग्रामं करणसमुदायमचेतसोऽविवेकिनो मां चैव तत्कर्मबुद्धिसाक्षिभूतमन्तःशरीरस्थं कर्शयन्तो मदनुशासनाकरणमेव मत्कर्शनं तान्विद्ध्यासुरनिश्चयानासुरो निश्चयो येषां त आसुरनिश्चयास्तान्परिहरणार्थं विद्धीत्युपदेशः ॥ ६ ॥**

**भाष्यार्थ—' कर्शयन्तः० ' इति**—वरील श्लोकांत प्राधान्यानें रजोनिष्ठांचे वर्णन करून आतां 'कर्शयन्तः०' या श्लोकानें तमोनिष्ठांचे प्राधान्यानें वर्णन करितात.—**शरीरस्थं भूतग्रामं-करणसमुदायं कर्शयन्तः-कृशीकुर्वन्तः**—शरीरांतील भूतसमूहास-इन्द्रियसमुदायास कृश करणारे—**अचेतसः-अविवेकिनः**—अविवेकी—**मां च एव-तत्कर्मबुद्धिसाक्षिभूतं अन्तःशरीरस्थं कर्शयन्तः**—आणि मलाहि -त्यांच्या कर्माचा व बुद्धीचा म्ह० ज्ञानाचा साक्षिभूत अशा अन्तःशरीरस्थ-शरीरांत-बुद्धींत राहणाऱ्या मला कृश करणारे (पण सर्वसाक्षी ईश्वराला प्राणी कृश कसे करितात? उत्तर-)—**मदनुशासनाकरणं एव मत्कर्शनं**—माझ्या श्रुति-स्मृतिरूप अनुशासनाचें अनुष्ठान न करणे, हेंच माझें कर्शन आहे. (अ. १६ श्लो. १८ पृ. १०७२ पहा)—**तान् आसुरनिश्चयान् विद्धि-आसुरः निश्चयः येषां ते आसुरनिश्चयाः**

**तान् परिहरणार्थं विद्धि इति उपदेशः**—याप्रमाणें शरीरांतील इन्द्रियसमुदायाला व कर्मज्ञानसाक्षिभूत अशा अन्तःशरीरस्थ मला कृश करणाऱ्या त्यांना तूं आसुर निश्चयाचे समज. ज्यांचा आसुर निश्चय असतो ते आसुरनिश्चय होत. त्यांना तूं जाण-असले लोक आसुरनिश्चयी असतात असे त्यांचा व त्याच्या निश्चयाचा परिहार करण्यासाठीं तूं जाण, असा हा उपदेश आहे. ६.

**आहारस्त्वपि सर्वस्य त्रिविधो भवति प्रियः ।**
**यज्ञस्तपस्तथा दानं तेषां भेदमिमं शृणु ॥ ७ ॥**

**अन्वयार्थ—तु**—आणि तसाच—**सर्वस्य**—सर्वांचा—**आहारः अपि**—आहारहि—**त्रिविधः**—तीन प्रकारचा—**प्रियः**—प्रिय—**भवति**—होतो—**यज्ञः**—यज्ञ,—**तपः**—तपश्चर्या—**तथा**—त्याचप्रमाणें—**दानं**—दान, त्रिविध असतें.—**तेषां**—त्यांचा—**इमं भेदं**—हा भेद—**शृणु**—ऐक. ७.

आहाराणां च रस्यस्निग्धादिवर्गत्रयरूपेण भिन्नानां यथाक्रमं सात्त्विकराजसतामसपुरुषप्रियत्वदर्शनमिह क्रियते रस्यस्निग्धादिष्वाहारविशेषेष्वात्मनः प्रीत्यतिरेकेण लिङ्गेन सात्त्विकत्वं राजसत्वं तामसत्वं च बुद्ध्वा रजस्तमोलिङ्गानामाहाराणां परिवर्जनार्थं सत्त्वलिङ्गानां चोपादानार्थं तथा यज्ञादीनामपि सत्त्वादिगुणभेदेन त्रिविधत्वप्रतिपादनमिह राजसतामसान्बुद्ध्वा कथं नु नाम परित्यजेत्सात्त्विकानेवानुतिष्ठेदित्येवमर्थम्—आहारस्त्वपि सर्वस्य भोक्तुस्त्रिविधो भवति प्रिय इष्टस्तथा यज्ञस्तथा तपस्तथा दानं तेषामाहारादीनां भेदमिमं वक्ष्यमाणं शृणु ॥ ७ ॥

**भाष्यार्थ—च रस्य-स्निग्धादिवर्गत्रयरूपेण भिन्नानां आहाराणां यथाक्रमं सात्त्विक-राजस-तामसपुरुषप्रियत्वदर्शनं इह क्रियते**—व रस्य-स्निग्ध इत्यादि तीन वर्ग या रूपानें भिन्न असलेल्या-त्रिविध झालेल्या आहारांचे अनुक्रमानें सात्त्विक, राजस, तामस पुरुषप्रियत्व-म्ह० ते त्रिविध आहार सात्त्विकादि तीन प्रकारच्या पुरुषांस प्रिय असतात, असे येथें प्रदर्शित केले जाते. (पण रस्यादिवर्ग सात्त्विक पुरुषाला, कट्वादिवर्ग राजस पुरुषाला व यातयामादि वर्ग तामस पुरुषाला प्रिय असतो, हें येथें सांगण्याचा उपयोग काय ? उत्तर-)—**रस्यस्निग्धादिषु आहारविशेषेषु आत्मनः प्रीति-अतिरेकेण लिङ्गेन सात्त्विकत्वं राजसत्वं तामसत्वं च बुद्ध्वा**—रस्य-स्निग्धादि विशिष्ट आहारांमध्यें आपली अतिशय प्रीति असणे या लिंगावरूनच आपलें सात्त्विकत्व, राजसत्व व तामसत्व जाणून—**रजस्तमोलिङ्गानां आहाराणां परिवर्जनार्थं च सत्त्वलिङ्गानां उपादानार्थं**—राजस व तामस लिंगांनीं युक्त असलेल्या आहारांचें परिवर्जन-परित्याग करून सात्त्विक चिह्नांनीं युक्त असलेल्या आहारांचें ग्रहण करावें यांसाठीं हें सांगितलें जात आहे.—**तथा सत्त्वादिगुणभेदेन यज्ञादीनां अपि त्रिविधत्वप्रतिपादनं इह राजसतामसान्**

**बुद्ध्वा**—त्याचप्रमाणें सत्त्वादिगुणांच्या भेदांमुळे यज्ञादिकांच्या त्रिविधत्वाचें जें प्रतिपादन येथ केलें जात आहे, तें राजस व तामस यज्ञादिकांना जाणून—**कथं नु नाम परित्यजेत् सात्त्विकान् एव अनुतिष्ठेत् इति एवं अर्थे**—त्याचा त्याग कसा बरे करील व सात्त्विक यज्ञादिकांचेच अनुष्ठान करील, यासाठीं भगवान् म्हणतात—**सर्वस्य भोक्तुः आहारः तु अपि त्रिविधः-प्रियः इष्टः भवति**—सर्व भोक्त्याला आहारहि तीन प्रकारचा प्रिय होतो.—**तथा यज्ञः तथा तपः तथा दानं**—त्याचप्रमाणे यज्ञ, तसेंच तप व तसेंच दान त्रिविध प्रिय होते.—**तेषां आहारादीनां इमं वक्ष्यमाणं भेदं शृणु**—त्या आहारादिकांचा हा पुढें सांगितला जाणारा त्रिविध भेद ऐक. ७.

आयुःसत्त्वबलारोग्यसुखप्रीतिविवर्धनाः ।
रस्याः स्निग्धाः स्थिरा हृद्या आहाराः सात्त्विकप्रियाः॥

**अन्वयार्थ—आयुःसत्त्वबलारोग्यसुखप्रीतिविवर्धनाः**—आयुष्य, मानस बल, शारीर बल, आरोग्य, सुख व प्रीति यांना वाढविणारे—**रस्याः**—रसयुक्त, —**स्निग्धाः**—स्नेहयुक्त—**स्थिराः**—देहांत चिरकाल राहणारे—**हृद्याः**—हृदयाला प्रिय वाटणारे असे—**आहाराः**—आहार—**सात्त्विकप्रियाः**—सात्त्विक लोकांना प्रिय असतात. ८.

आयुरिति । आयुश्च सत्त्वं च बलं चाऽऽरोग्यं च सुखं च प्रीतिश्च तासां विवर्धना आयुःसत्त्वबलारोग्यसुखप्रीतिविवर्धनास्ते च रस्या रसोपेताः स्निग्धा स्नेहवन्तः स्थिराश्चिरकालस्थायिनो देहे, हृद्या हृदयप्रिया आहाराः सात्त्विकप्रियाः सात्त्विकस्येष्टाः ॥८॥

**भाष्यार्थ—'आयुः०' इति**—'आयुः०' इत्यादि श्लोकानें सात्त्विकांना प्रिय वाटणाऱ्या आहारांचें वर्णन करितात—**आयुः च सत्त्वं च बलं च आरोग्यं च सुखं च प्रीतिः च तासां विवर्धनाः-आयुःसत्त्वबलारोग्यसुखप्रीतिविवर्धनाः**—आयुः-उत्तम प्रकारें जीवन, सत्त्व-चित्तस्थैर्य किंवा वीर्य, बल-शरीरेंद्रियसामर्थ्य, आरोग्य -नीरोगता, सुख-अंतःकरणाचा आल्हाद, व प्रीति-दुसऱ्याला सपन्न पाहून मनाला होणारा हर्ष, यांची वृद्धि करणारे म्हणून आयुःसत्त्वादिविवर्धन,—**ते च रस्याः-रसोपेताः**—तेच रस्य म्ह० रसयुक्त-सरस—**स्निग्धाः-स्नेहवन्तः**—स्नेहयुक्त—**स्थिराः-देहे चिरकालस्थायिनः**—स्थिर म्ह० देहांत चिरकाल राहणारे-शरीरावर चिरकाल उपकार करणारे—**हृद्याः-हृदयप्रियाः**—हृदयाला प्रिय वाटणारे असे—**आहाराः सात्त्विकप्रियाः-सात्त्विकस्य इष्टाः**—आहार सात्त्विकप्रिय असतात म्ह० सात्त्विक पुरुषाला आवडतात. ८.

कट्वम्ललवणात्युष्णतीक्ष्णरूक्षविदाहिनः ।
आहारा राजसस्येष्टा दुःखशोकामयप्रदाः ॥ ९ ॥

**अन्वयार्थ—कटु-अम्ल-लवण-अत्युष्ण-तीक्ष्ण-रूक्ष-विदाहिनः**—कडू, आंबट, खारट, अति उष्ण, तीक्ष्ण, रूक्ष—नीरस व तोंडाची आग करणारे, असे व—**दुःखशोकामयप्रदाः**—दुःख, शोक आणि रोग देणारे—**आहाराः**—आहार—**राजसस्य**—राजस प्रकृतीच्या मनुष्याला—**इष्टाः**—आवडतात. ९.

**कट्विति । कटुरम्लो लवणोऽत्युष्णोऽतिशब्दः कट्वादिषु सर्वत्र योज्योऽतिकटुरतितीक्ष्ण इत्येवं कट्वम्ललवणात्युष्णतीक्ष्णरूक्षविदाहिन आहारा राजसस्येष्टा दुःखशोकामयप्रदा दुःखं च शोकं चाऽऽमयं च प्रयच्छन्तीति दुःखशोकामयप्रदाः ॥ ९ ॥**

**भाष्यार्थ—' कटु०' इति**—'कटु' इत्यादि श्लोकानें राजस पुरुषाला प्रिय होणारे आहार सांगतात—**कटुः अम्लः लवणः अत्युष्णः**—कडू, आंबट, खारट, अति उष्ण,—**अतिशब्दः कट्वादिषु सर्वत्र योज्यः अतिकटुः अतितीक्ष्णः इति-एवं**—येथील ' अति ' हा शब्द ' कटु ' इत्यादि सर्व शब्दांशी जोडावा, अतिकटु, अति तीक्ष्ण अशाप्रकारे,—**कटु अम्ल-लवण-अत्युष्ण-तीक्ष्ण-रूक्ष-विदाहिनः**—कडू, आंबट, खारट, अति उष्ण, तिखट, रूक्ष—स्नेहशून्य—रसरहित, दाहक—**आहाराः राजसस्य इष्टाः**—असे आहार राजस पुरुषाला प्रिय असतात—**दुःखशोकामय-प्रदाः-दुःखं च शोकं च आमयं च प्रयच्छन्ति इति दुःखशोकामयप्रदाः**—दुःख शोक-आमयप्रद—दुःख—तात्कालिक पीडा, शोक—इष्टवियोगजन्य दुःख, आणि रोग देणारे म्हणून दुःखशोकामयप्रद. [ असे ते राजस आहार असतात. ] ९.

**यातयामं गतरसं पूति पर्युषितं च यत् ।**
**उच्छिष्टमपि चामेध्यं भोजनं तामसप्रियम् ॥ १० ॥**

**अन्वयार्थ—यातयामं**—अर्धे शिजलेले,—**गतरसं**—रसरहित,—**पूति**—दुर्गंधयुक्त,—**पर्युषितं**—शिळे,—**च यत् उच्छिष्टं**—आणि जे उच्छिष्ट—**अपि च**—त्याचप्रमाणे—**अमेध्यं**—यज्ञाला अयोग्य—**भोजनं**—भोजन—अन्न—**तामस-प्रियं**—तें तामस लोकाना प्रिय असते. १०

**यातयाममिति । यातयामं मन्दपक्वं निर्वीर्यस्य गतरसेनोक्तत्वाद्गतरसं रसवियुक्तं पूति दुर्गन्धं पर्युषितं च पक्वं सद्रात्र्यन्तरितं च यदुच्छिष्टमपि च भुक्तशिष्टमप्यमेध्यमयज्ञार्हं भोजनमीदृशं तामसप्रियम् ॥ १० ॥**

**भाष्यार्थ—'यातयामं०' इति**—तामस जनांना प्रिय असलेले आहार 'यातयामं०' या श्लोकानें सांगतात—**यातयामं मन्दपक्वं**—अर्धें शिजलेलें म्ह० अर्धें कच्चे ( अहो-पण, निर्वीर्य अन्नाला यातयाम म्हणतात, अर्ध्या शिजलेल्या अन्नाला यातयाम म्हणत नाहीत, असें कोणी म्हणेल म्हणून आचार्य सांगतात–)—**निर्वीर्यस्य गतरसेन उक्तत्वात्**—निर्वीर्य अन्नाचा गतरस या शब्दानें उल्लेख केला असल्यामुळे येथे यातयाम म्ह० अर्धें कच्चे अन्नच घ्यावें—**गतरसं-रसवियुक्तं**—गतरस म्ह० रसरहित,

ज्यांतील स्वाभाविक रस निघून गेला आहे असें,—**पूति-दुर्गंधं**—आंबलेलें, दुर्गन्धयुक्त —**पर्युषितं च-पक्कं सत् रात्र्यन्तारेतं च**—आणि पर्युषित म्ह० शिळे-शिजविल्यानंतर एक रात्र निघून गेलेले म्ह० आदल्या दिवशी शिजविलेलें—**यत् उच्छिष्टं अपि च-भुक्तशिष्टं अपि**—आणि जे उच्छिष्ट, म्ह० दुसऱ्याने खाऊन उरलेल असेंहि—**अमेध्यं-अयज्ञार्हं**—अमेध्य म्ह० यज्ञाला अयोग्य-अपवित्र—**ईदृशं भोजनं तामसप्रियं**—अशा प्रकारचे अन्न तामस लोकांना प्रिय असते. १०.

## अफलाकाङ्क्षिभिर्यज्ञो विधिदृष्टो य इज्यते ।
## यष्टव्यमेवेति मनः समाधाय स सात्त्विकः ॥११॥

**अन्वयार्थ—अफलाकांक्षिभिः**—फलाची आकांक्षा न करणाऱ्या लोकांकडून—**यः विधिदृष्टः यज्ञः**—जो शास्त्राच्या विधीने प्राप्त झालेला यज्ञ—**यष्टव्यं एव इति**—मला अवश्य यज्ञ करावयास पाहिजे असें—**मनः समाधाय**—मनाचे समाधान करून—**इज्यते**—केला जातो—**सः सात्त्विकः**—तो सात्त्विक यज्ञ आहे. ११

**अथेदानीं यज्ञस्त्रिविध उच्यते— अफलाकाङ्क्षिभिरफलार्थिभिर्यज्ञो विधिदृष्टः शास्त्रचोदनादृष्टो यो यज्ञ इज्यते निर्वर्त्यते यष्टव्यमेवेति यज्ञस्वरूपनिर्वर्तनमेव कार्यमिति मनः समाधाय नानेन पुरुषार्थो मम कर्तव्य इत्येवं निश्चित्य स सात्त्विको यज्ञ उच्यते ॥**

**भाष्यार्थ**—( राजस व तामस आहारांचा त्याग करून सात्त्विक आहाराचे ग्रहण करण्यासाठी तीन प्रकारचा आहार सांगितला. तसाच आतां तीन प्रकारचा यज्ञ सांगतात-)—**अथ इदानीं त्रिविधः यज्ञः उच्यते**—आतां या श्लोकांत तीन प्रकारचा यज्ञ सांगितला जातो.—**अफलाकाङ्क्षिभिः-अफलार्थिभिः विधिदृष्टः यज्ञः-शास्त्रचोदनादृष्टः यः यज्ञः इज्यते-निर्वर्त्यते**—अफलाकांक्षी-फलाची इच्छा न करणाऱ्या पुरुषांकडून विधिदृष्ट यज्ञ-शास्त्रविधीने विहित असलेला जो यज्ञ संपादन केला जातो ( तो कसा ? )—**यष्टव्यं एव इति-यज्ञस्वरूपनिर्वर्तनं एव कार्यं इति मनः समाधाय**—केवल यज्ञच केला पाहिजे, यज्ञाचे नुसते स्वरूपच संपादन केले पाहिजे असें मनाचे समाधान करून—**अनेन मम पुरुषार्थः न कर्तव्यः इति एवं निश्चित्य**—या यज्ञाच्या योगाने मला कोणताच पुरुषार्थ संपादन करावयाचा नाहीं असा निश्चय करून जो यज्ञ केला जातो—**सः सात्त्विकः यज्ञः उच्यते**—तो सात्त्विक यज्ञ म्हटला जातो. [ फलाच्या इच्छेवांचूनच केवल यज्ञाचें स्वरूप निष्पन्न व्हावें अशा बुद्धीने यथाशास्त्र केलेला जो यज्ञ तो सात्त्विक यज्ञ होय. ] ११.

## अभिसंधाय तु फलं दंभार्थमपि चैव यत् ।
## इज्यते भरतश्रेष्ठ तं यज्ञं विद्धि राजसम् ॥१२॥

**अन्वयार्थ—हे भरतश्रेष्ठ**—हे भरतकुलश्रेष्ठा !—**तु**—पण—**फलं अभिसंधाय**—फलाची इच्छा ठेवून—**च दंभार्थं अपि एव**—व दंभासाठीहि केवल—**यत्**—जें—**इज्यते**—यजन केलें जाते,—**तं यज्ञं**—त्या यज्ञाला—**राजसं**—राजसयज्ञ—**विद्धि**—जाण. १२.

**अभिसंधायेति । अभिसंधायोद्दिश्य फलं दम्भार्थमपि चैव यदिज्यते भरतश्रेष्ठ तं यज्ञं विद्धि राजसम् ॥ १२ ॥**

**भाष्यार्थ—' अभिसंधाय० ' इति**—त्यागासाठीं ' अभिसंधाय ' या श्लोकानें राजस यज्ञाचे लक्षण सांगतात.—**फलं अभिसंधाय-उद्दिश्य च दंभार्थं अपि एव यत् इज्यते**—फलाच्या उद्देशानें-इच्छेनें व दंभासाठींहि म्ह० लोकांनीं आपणास धार्मिक म्हणावें, या हेतूनें जो यज्ञ केला जातो—**भरतश्रेष्ठ**—हे भरतकुलश्रेष्ठा !—**तं यज्ञं राजसं विद्धि**—त्या यज्ञाला तूं राजस जाण. [ स्वर्गादिकांच्या उद्देशानें व आपलें धार्मिकत्व प्रकट करण्यासाठीं जो यज्ञ केला जातो तो राजस व त्यामुळें त्याज्य आहे, असें समज. ] १२.

**विधिहीनमसृष्टान्नं मंत्रहीनमदक्षिणं ।**
**श्रद्धाविरहितं यज्ञं तामसं परिचक्षते ॥१३॥**

**अन्वयार्थ—विधिहीनं**—शास्त्रोक्त विधीवांचून—**असृष्टान्नं**—ज्यांत अन्नदान केलेलें नाहीं,—**मंत्रहीनं**—मंत्ररहित—**अदक्षिणं**—दक्षिणारहित—**श्रद्धाविरहितं** श्रद्धाशून्य—**यज्ञं**—यज्ञाला—**तामसं**—तामस यज्ञ—**परिचक्षते**—सांगतात. १३

**विधिहीनमिति । विधिहीनं यथाचोदितविपरीतम्, असृष्टान्नं ब्राह्मणेभ्यो न सृष्टं न दत्तमन्नं यस्मिन्यज्ञे सोऽसृष्टान्नस्तमसृष्टान्नम्, मन्त्रहीनं मन्त्रतः स्वरतो वर्णतश्च वियुक्तं मन्त्रहीनम्, अदक्षिणमुक्तदक्षिणारहितं श्रद्धाविरहितं यज्ञं तामसं परिचक्षते तमोनिर्वृत्तं कथयन्ति ॥ १३ ॥**

**भाष्यार्थ—' विधिहीनं० ' इति**—'विधिहीन' या श्लोकानें त्यागासाठींच तामस यज्ञ सांगतात—**विधिहीनं-यथाचोदितविपरीतं**—विधिहीन म्ह० शास्त्रविधीच्या उलट—**असृष्टान्नं-यस्मिन् यज्ञे ब्राह्मणेभ्यः अन्नं न सृष्टं-न दत्तं सः असृष्टान्नः तं असृष्टान्नं**—असृष्टान्न म्ह० ज्या यज्ञांत ब्राह्मणांना अन्न दिलें जात नाहीं तो असृष्टान्न, त्या असृष्टान्नाला—**मन्त्रहीनं-मन्त्रतः स्वरतः च वर्णतः वियुक्तं मन्त्रहीनं**—मंत्रहीन म्ह० मंत्र, स्वर व वर्ण यांनीं रहित तो मंत्रहीन, अशा त्या मंत्रहीन यज्ञाला—**अदक्षिणं-उक्तदक्षिणारहितं**—अदक्षिण म्ह० विहित दक्षिणेनें रहित—**श्रद्धाविरहितं यज्ञं**—आणि श्रद्धारहित यज्ञाला—**तामसं परिचक्षते-तमोनिर्वृत्तं कथयन्ति**—तामस म्हणतात-तमोगुणामुळें झालेला असें सांगतात. [ विधिहीन, अन्नसंतर्पणरहित, मंत्रहीन, दक्षिणाहीन व श्रद्धारहित यज्ञाला तामस यज्ञ म्हणतात. ] १३.

**देवद्विजगुरुप्राज्ञपूजनं शौचमार्जवम् ।**
**ब्रह्मचर्यमहिंसा च शारीरं तप उच्यते ॥१४॥**

**अन्वयार्थ—देवद्विजगुरुप्राज्ञपूजनं**—देव, ब्राह्मण, गुरु व प्राज्ञ–विद्वान् यांचें पूजन,—**शौचं**—स्नानादि शौच,—**आर्जवं**—सरळ वर्तन—**ब्रह्मचर्यं**—स्त्रीशरीरांशीं संसर्ग न करणें,—**च अहिंसा**—आणि प्राण्यांची हिंसा न करणे,त्याला ताडन न करणे, हें—**शारीरं तपः**—शारीर–शरीरानें होणारे तप—**उच्यते**—म्हटलें जातें. १४

**अथेदानीं तपस्त्रिविधमुच्यते—देवाश्च द्विजाश्च गुरवश्च प्राज्ञाश्च देवद्विजगुरुप्राज्ञास्तेषां पूजनं देवद्विजगुरुप्राज्ञपूजनं शौचमार्जवमृजुत्वं ब्रह्मचर्यमहिंसा च शरीरनिर्वर्त्यं शारीरं शरीरप्रधानैः सर्वैरेव कार्यकरणैः कर्त्रादिभिः साध्यं शारीरं तप उच्यते । पञ्चैते तस्य हेतव इति हि वक्ष्यति ॥ १४ ॥**

**भाष्यार्थ**—( याप्रमाणे राजस व तामस यज्ञांचा त्याग करून सात्त्विक यज्ञाचेंच अनुष्ठान करण्यासाठीं तीन प्रकारचे यज्ञ सांगितले. आता सात्त्विकादि भावाचें निरूपण करण्यासाठीं सर्व तपांचें स्वरूप सांगतात–)—**अथ इदानीं त्रिविधं तपः उच्यते**—आता या श्लोकानें तीन प्रकारचे तप सांगितलें जातें.—**देव-द्विज-गुरु-प्राज्ञाः देवाः च द्विजाः च गुरवः च प्राज्ञाः च तेषां पूजनं देवद्विजगुरुप्राज्ञपूजनं**—ब्रह्मादि देव, द्विज–ब्राह्मण, पित्रादि गुरु व प्राज्ञ–विद्वान् पंडित, त्याचे प्रणाम-

---

१ याविषयीं रहस्यकार म्हणतात–"तप म्ह० अरण्यात जाऊन पातंजल योगानें शरीर कष्टविणे असा संकुचित अर्थ या ठिकाणीं विवक्षित नसून" वगैरे, पण तो अर्थ येथें विवक्षित आहे असें म्हणतो कोण ? शिवाय तप म्ह० 'अरण्यात जाऊन पातंजल योगानें शरीर कष्टविणे' म्हणजे काय ? पातंजल योगसूत्रात जे तप सांगितलें आहे तें रहस्यकार म्हणतात तशा स्वरूपाचें नाहीं. उलट 'तपःस्वाध्यायेश्वरप्रणिधानानि क्रियायोगः' पा. सू. २. १. या सूत्राच्या भाष्यात व्यास म्हणतात–"तच्च चित्तप्रसादनं अबाधमानं अनेन आसेव्यं" वाचस्पतिमिश्र याचेंच स्पष्टीकरण–'तत् च उपादीयमानं अपि तपः तावन्मात्रं एव चरणीयं न यावता धातुवैषम्यं आपद्यते' राजाधिराज भोजदेवविरचित पातंजल योगसूत्रवृत्तींत–'तपः शास्त्रान्तरोपदिष्टं कृच्छ्रचान्द्रायणादि' असें म्हटलें आहे. या सर्वांचा भावार्थ असा–मनु-याज्ञवल्क्यादि धर्मशास्त्रोक्त कृच्छ्रचांद्रायणादि तप, पण तेंहि शरीरांतील रस-रक्तादि धातूंचें वैषम्य न होईल इतकेंच करणें. स्वाध्याय म्ह० प्रणवादि जप किंवा मोक्षशास्त्राध्ययन व ईश्वरप्रणिधान–सर्वकर्म परमगुरु जो ईश्वर त्याला अर्पण करणें किंवा कर्मफलसंन्यास हा क्रियायोग म्ह० कर्मयोग होय. यावरून रहस्यकाराचें म्हणणें किती निराधार आहे, तें आता वाचकांनींच ठरवावें. पूर्वीं सहाव्या अध्यायांतहि रहस्यकारानीं योगाविषयीं असेंच अनुदार उद्गार काढले आहेत. (गी. भा. पृ. ५९७, ६०९. पहा.) पण त्यातल्यात्यात गंमत ही आहे की त्यांना कापिल सांख्यदर्शन मात्र गीतेंत जेथे तेथें दिसतें ! मग योगानेंच तेवढें रहस्यकाराचें काय घोडें मारलें आहे कोण जाणे. बाकी योगाशीं व संन्यासाशीं त्यांचा दीर्घ द्वेष आहे खरा !!

शुश्रूषादि पूजन, हेंच देवद्विजगुरुप्राज्ञपूजन—**शौचं**—पूर्वोक्त द्विविध शुचिर्भूतपणा-पवित्रपणा—**आर्जवं-ऋजुत्वं**—अन्तःकरणाचा सरळपणा—**ब्रह्मचर्यं**—ब्रह्मचर्य-व्रतस्थ अवस्था, इन्द्रियनिग्रह—**च अहिंसा**—व हिंसा न करणें, प्राण्यांना पीडा न देणें-या सर्वांना—**शरीरनिर्वर्त्यं-शारीरं-शरीरप्रधानैः सर्वैः एव कार्यक-रणैः कर्त्रादिभिः साध्यं शारीरं तपः उच्यते**—शरीराच्या योगानें होणारें तें शारीर, शरीर ज्यामध्यें मुख्य आहे अशा देहेंद्रियांनी कर्ता, करण इत्यादिकाकडून साध्य होणारें जे तप त्याला शारीर तप म्हटलें जातें. [ कोणतेंहि तप केवळ शरीरानें होणें शक्य नाहीं. म्हणून भाष्यांत शरीरप्रधान-सर्वच शरीरेंद्रियांनी असें म्हटलें आहे. त्याच-प्रमाणें कर्ता, करण व त्यांचे व्यापार यांवांचून कोणतीच क्रिया होत नाहीं, म्हणून 'क-र्त्रादिभिः' असें भाष्यांत म्हटलें आहे. पण तप कर्ता, करण इत्यादिकांनी साध्य होत असेल तर त्याला 'शारीर तप' कसें म्हणतां येईल ? आणि त्याला जर शारीर तप म्हटलें तर तें कर्त्रादिसाध्य कसें, अशी आशंका घेऊन आचार्य म्हणतात-]—' **पञ्चैते तस्य हेतवः ' इति हि वक्ष्यति**—मनुष्य शरीर, वाक्, मन यानीं जें जे आरंभितो त्या प्रत्येकाला अधिष्ठान, कर्ता इत्यादि पांच हेतु अवश्य लागतात, असें पुढें ( अठराव्या अध्यायांत श्लो. १५. ) भगवान् सांगतील. १४.

## अनुद्वेगकरं वाक्यं सत्यं प्रियहितं च यत् ।
## स्वाध्यायाभ्यसनं चैव वाङ्मयं तप उच्यते ॥१५॥

**अन्वयार्थ—यत्**—जें—**अनुद्वेगकरं**—प्राण्याच्या मनांत दुःख उत्पन्न न कर-णारें,—**सत्यं**—खरें,—**च प्रियहितं**—व प्रिय आणि हितकर—**वाक्यं**—वाक्य—**च**—व—**स्वाध्यायाभ्यसनं एव**—यथाविधि वेदशास्त्राध्ययन—**वाङ्मयं तपः**—हें वाङ्मय तप—**उच्यते**—सांगितलें जातें. १५

अनुद्वेगेति । अनुद्वेगकरं प्राणिनामदुःखकरं वाक्यं सत्यं प्रियहितं च यत्प्रियहिते दृष्टादृष्टार्थे । अनुद्वेगकरत्वादिभिर्धर्मैर्वाक्यं विशेष्यते । विशेषणधर्मसमुच्चयार्थश्चशब्दः । परप्रत्यायनार्थं प्रयुक्तस्य वाक्यस्य सत्यप्रियहितानुद्वेगकरत्वानामन्यतमेन द्वाभ्यां त्रि-भिर्वा हीनता स्याद्यदि न तद्वाङ्मयं तपः । तथा सत्यवाक्यस्येतरेषामन्यतमेन द्वाभ्यां त्रिभिर्वा हीनतायां न वाङ्मयतपस्त्वम् । तथा प्रियवाक्यस्यापीतरेषामन्यतमेन द्वाभ्यां त्रिभिर्वा हीनस्य न वाङ्मयतपस्त्वम् । तथा हितवाक्यस्यापीतरेषामन्यतमेन द्वाभ्यां त्रिभिर्वा वियुक्तस्य न वाङ्मयतपस्त्वम् । किं पुनस्तत्तपो यत्सत्यं वाक्यमनुद्वेगकरं प्रिय-हितं च यत्तत्परमं तपो वाङ्मयम् । यथा शान्तो भव वत्स स्वाध्यायं योगं चानुतिष्ठ तथा ते श्रेयो भविष्यति । स्वाध्यायाभ्यसनं चैव यथाविधि वाङ्मयं तप उच्यते ॥

**भाष्यार्थ—'अनुद्वेग०' इति**—'अनुद्वेग०'या श्लोकानें वाङ्मय तप सांगतात—**अ-नुद्वेगकरं-प्राणिनां अदुःखकरं वाक्यं**—अनुद्वेगकर,प्राण्यांना अदुःखकर-दुःखकर न

होणारें असें वाक्य—**सत्यं प्रियहितं च यत्**—सत्य व जें प्रिय-हित (सत्य म्ह० जसें ठाऊक असेल तसेंच सांगणें, प्रिय म्ह० कानाला सुखकर वाटणारें व हित म्ह० परीणामीं हितावह किंवा-)—**प्रियहिते दृष्टादृष्टार्थे**—प्रिय व हित हे दोन्ही शब्द दृष्ट व अदृष्ट या दोन्ही अर्थी घ्यावे म्ह० ऐहिक व पारलौकिक प्रिय व हितवचन.—**अनुद्वेगकरत्वादिभिः धर्मैः वाक्यं विशेष्यते**— अनुद्वेगकर, सत्य, प्रिय व हित या धर्मांनीं वाक्य विशेषित केलें जातें. अर्थात् अनुद्वेगकरत्वादि विशेषणांनी विशिष्ट असें वाक्य, —**विशेषणधर्मसमुच्चयार्थः चशब्दः**—विशेषणांचा परस्पर एक समुच्चय करण्यासाठीं 'च यत्' हा 'च' शब्द आहे. (पण वाक्याला अशीं हीं चार विशेषणें कां लाविलीं आहेत व त्यांचा परस्पर समुच्चय करण्यांत तरी काय अर्थ आहे? उत्तर-)—**परप्रत्यायनार्थं प्रयुक्तस्य वाक्यस्य सत्य-प्रिय-हित-अनुद्वेगकरत्वानां अन्यतमेन द्वाभ्यां त्रिभिः वा हीनता स्यात् यदि, न तत् वाङ्मयं तपः**—दुसऱ्याला एखाद्या विषयाचा बोध करून देण्यासाठी योजलेले वाक्य सत्य, प्रिय, हित व अनुद्वेगकरत्व यांतील कोणत्या तरी एका गुणानें, दोन गुणांनीं किंवा तीन गुणांनीं जर हीन असेल तर ते वाङ्मय तप नव्हे.—**तथा सत्यवाक्यस्य इतरेषां अन्यतमेन द्वाभ्यां त्रिभिः वा हीनतायां न वाङ्मयतपस्त्वं**—त्याचप्रमाणें सत्यवाक्य बाकीच्या विशेषणांतील कोणत्या तरी एका, दोन किंवा तीन विशेषणांनी हीन असेल तर त्याला वाङ्मयतपस्त्व नाहीं.—**तथा प्रियवाक्यस्य अपि इतरेषां अन्यतमेन द्वाभ्यां त्रिभिः वा हीनस्य न वाङ्मयतपस्त्वं**—तसेंच प्रिय वाक्यहि इतर विशेषणातील एक, दोन किंवा तीन विशेषणांनीं हीन असल्यास त्याला वाङ्मयतपस्त्व नाहीं.—**तथा हितवाक्यस्य अपि इतरेषां अन्यतमेन द्वाभ्यां त्रिभिः वा वियुक्तस्य न वाङ्मयतपस्त्वं**—त्याच न्यायाने हित वाक्यहि बाकीच्या विशेषणांतील एक, दोन किंवा तीनहि विशेषणांनीं रहित असेल तर त्यालाहि वाङ्मयतपस्त्व नाहीं—**किं पुनः तत् तपः**—तर मग तें तप कोणतें?—**यत् सत्यं वाक्यं अनुद्वेगकरं प्रियहितं च यत् तत् परमं वाङ्मयं तपः**—जें सत्यवाक्य, अनुद्वेगकर, प्रिय व जे हित तें परम वाङ्मय तप होय.—**यथा वत्स शान्तः भव स्वाध्यायं योगं च अनुतिष्ठ तथा ते श्रेयः भविष्यति**—जसें बाळा, शांत हो. स्वाध्याय व योग-अनुष्ठानादि कर. म्हणजे तुझें कल्याण होईल. —**स्वाध्यायाभ्यसनं च एव यथाविधि**—आणि प्राङ्मुखत्व पवित्रपाणित्व इत्यादि शास्त्रोक्त विधींचें उल्लंघन न करितां स्वाध्यायाचें आवर्तन करणें, हें—**वाङ्मयं तपः उच्यते**—वाङ्मय तप म्हटलें जातें. [कारण, स्वाध्यायांत वाणीची अधिक प्रवृत्ति होत असते. म्हणून हें वाङ्मय-वाक्प्रधान तप होय.] १५.

**मनःप्रसादः सौम्यत्वं मौनमात्मविनिग्रहः ।**

**भावसंशुद्धिरित्येतत्तपो मानसमुच्यते ॥१६॥**

**अन्वयार्थ—मनःप्रसादः**—मनाची अत्यंत शांति, प्रसन्नता,—**सौम्यत्वं**—सौम्यता,—**मौनं**—न बोलण्याविषयीं मनाचा संयम,—**आत्मविनिग्रहः**—सामान्यतः सर्व बाजूंनीं मनाचा निरोध करणें,—**भावसंशुद्धिः**—मनाचा निष्कपटपणा—**इति एतत् तपः**—हे अशा प्रकारचें तप—**मानसं**—मानस तप—**उच्यते**—म्हटलें जातें. १६.

**मन इति । मनःप्रसादो मनसः प्रशान्तिः स्वच्छतापादनं मनसः प्रसादः । सौम्यत्वं यत्सौमनस्यमाहुर्मुखादिप्रसादकार्याऽन्तःकरणस्य वृत्तिः, मौनं वाक्संयमोऽपि मनःसंयमपूर्वको भवतीति कार्येण कारणमुच्यते मनःसंयमो मौनमिति । आत्मविनिग्रहो मनोनिरोधः सर्वतः सामान्यरूप आत्मविनिग्रहो वाग्विषयस्यैव मनसः संयमो मौनमिति विशेषः । भावसंशुद्धिः परैर्व्यवहारकालेऽमायावित्वं भावसंशुद्धिरित्येतत्तपो मानसमुच्यते**

**भाष्यार्थ—'मनः०' इति**—'मनः०' या श्लोकानें मानस तप सांगतात—**मनःप्रसादः-मनसः प्रशान्तिः-स्वच्छतापादनं मनसः प्रसादः**—मनःप्रसाद म्ह० मनाची शांति मनामध्यें स्वच्छता-अनाकुलता-निश्चितपणा रागादिदोषराहित्य हा गुण संपादन करणें हा मनाचा प्रसाद होय.—**सौम्यत्वं-यत् सौमनस्यं आहुः-मुखादिप्रसादकार्या अन्तःकरणस्य वृत्तिः**—सौम्यत्व म्ह० ज्याला सौमनस्य म्हणतात. सर्वांचें हितचिंतन-कोणाचेंहि अहितचिंतन न करणें, मुखादिकांची प्रसन्नता हें जिचें कार्य आहे अशी अन्तःकरणाची वृत्ति—**मौनं-वाक्संयमः अपि मनःसंयमपूर्वकः भवति इति कार्येण कारणं उच्यते-मनःसंयमः मौनं इति**—मौन म्ह० वाक्संयमहि मनःसंयमपूर्वक होतो. मनःसंयम केल्यानेंच वाक्संयम होतो. म्हणून येथें कार्यानें कारणाचा निर्देश केला जातो. अर्थात् मनःसंयम हेंच मौन, असें म्हटलें जातें. किंवा मुनाचा भाव मनन, तेंच मौन.—**आत्मविनिग्रहः-मनोनिरोधः**—आत्मविनिग्रह म्ह० मनोनिरोध-आत्म्याचा-मनाचा निरोध (तर मग मौन व आत्मविनिग्रह यांच्या अर्थांत फरक काय? उत्तर-)—**सर्वतः सामान्यरूपः आत्मविनिग्रहः**—सर्वतः सामान्यरूप मनोनिग्रह हा आत्मविनिग्रह—**वाग्विषयस्य एव मनसः संयमः मौनं इति विशेषः**—व वाक्-संबंधी मनाचा संयम हें मौन, असा या शब्दाच्या अर्थांत फरक आहे. [ आत्मविनिग्रह म्ह० सामान्यतः सर्व विषयापासून मनाचा निग्रह व मौन म्ह० वाक्-विषयक मनाचाच निग्रह. ]—**भावसंशुद्धिः-परैः व्यवहारकाले अमायावित्वं भावसंशुद्धिः**—भावसंशुद्धि म्ह० हृदयाची अविकलता-रागादिमलराहित्य दुसऱ्यांशीं व्यवहार करितांना निष्कपटपणा, हीच भावसंशुद्धि—**इति एतत् तपः मानसं उच्यते**—अशा या तपाला मानस म्ह० मनःप्राधान्यानें होणारें तप असें म्हणतात. १६.

**श्रद्धया परया तप्तं तपस्तत्त्रिविधं नरैः ।**
**अफलाकाङ्क्षिभिर्युक्तैः सात्त्विकं परिचक्षते ॥१७॥**

**अन्वयार्थ—अफलाकांक्षिभिः**—फलाची आकांक्षा न करणाऱ्या—**युक्तैः**—समाहितचित्त—**नरैः**—पुरुषांकडून—**परया श्रद्धया**—अतिशय श्रद्धेनें—**तप्तं**—केललें—**तत् त्रिविधं तपः**—जे तीन प्रकारचें तप त्याला—**सात्त्विकं**—सात्त्विक—**परिचक्षते**—म्हणतात. १७

**यथोक्तं कायिकं वाचिकं मानसं च तपस्तप्तं नरैः सत्त्वादिभेदेन कथं त्रिविधं भवतीत्युच्यते—श्रद्धयाऽऽस्तिक्यबुद्ध्या परया प्रकृष्टया तप्तमनुष्ठितं तपस्तत्प्रकृत त्रिविधं त्रिप्रकारमधिष्ठानं नरैरनुष्ठातृभिरफलाकाङ्क्षिभिः फलाकाङ्क्षारहितैर्युक्तैः समाहितैर्यदीदृशं तपस्तत्सात्त्विकं सत्त्वनिर्वृत्तं परिचक्षते कथयन्ति शिष्टाः ॥ १७ ॥**

**भाष्यार्थ—यथोक्तं कायिकं वाचिकं मानसं च तपः नरैः तप्तं सत्त्वादिभेदेन त्रिविधं कथं भवति इति उच्यते**—वर तीन श्लोकांत सांगितलेले शारीर, वाङ्मय व मानस असे मनुष्यांनी केलेले तप सत्त्वादि भेदाने त्रिविध कसें होतें तें ( या पुढील तीन श्लोकांनी ) सांगितले जातें.—**परया-प्रकृष्टया श्रद्धया-आस्तिक्यबुद्ध्या तप्तं अनुष्ठितं**—परम श्रद्धेने-अतिशय आस्तिक्यबुद्धीनें तपलेले म्ह० अनुष्ठिलेलें—**तत् प्रकृतं त्रिविधं-त्रिप्रकारं अधिष्ठानं तपः**—ते प्रकृत त्रिविध-तीन प्रकारचें-शरीर वाक् व मन यांनी होणारें तप—**अफलाकाङ्क्षिभिः फलाकांक्षारहितैः युक्तैः-समाहितैः नरैः अनुष्ठातृभिः**—अफलाकांक्षी-फलाकांक्षारहित-फलेच्छाशून्य, युक्त-समाहित म्ह० सिद्धि व असिद्धि यांविषयीं निर्विकार अशा नरांकडून-अनुष्ठान करणारांकडून अनुष्ठिलेले [ अशा लोकांनीं केलेलें ]—**यत् ईदृशं तपः तत् सात्त्विकं-सत्त्वनिर्वृत्तं परिचक्षते-शिष्टाः कथयन्ति**—जे अशा प्रकारचे तप त्याला सात्त्विक-सत्त्वगुणामुळे झालेलें तप असें सांगतात. शिष्ट त्याला सात्त्विक तप म्हणतात. १७

सत्कारमानपूजार्थं तपो दम्भेन चैव यत् ।
क्रियते तदिह प्रोक्तं राजसं चलमध्रुवम् ॥१८॥

**अन्वयार्थ—यत् तपः**—जे तप—**सत्कारमानपूजार्थं**—सत्कार मान व पूजा यांसाठीं—**च**—आणि—**दंभेन एव**—दंभानेंच—**क्रियते**—केले जातें—**तत्**—तें—**इह**—येथे—**राजसं**—राजस—**चलं**—चंचल व—**अध्रुवं**—अनित्य—**प्रोक्तं**—म्हटले जातें. १८

**सत्कारेति । सत्कारमानपूजार्थं सत्कारः साधुकारः साधुरयं तपस्वी ब्राह्मण इत्येवमर्थं मानो माननं प्रत्युत्थानाभिवादनादिस्तदर्थं पूजा पादप्रक्षालनार्चनाशयितृत्वादिस्तदर्थं च तपः सत्कारमानपूजार्थं दम्भेन चैव यत्क्रियते तपस्तदिह प्रोक्तं कथितं राजसं चलं कादाचित्कफलत्वेनाध्रुवम् ॥ १८ ॥**

**भाष्यार्थ—' सत्कार० ' इति**—' सत्कार० ' या श्लोकाने राजस तपाचा निर्देश करितात—**सत्कारमानपूजार्थं-सत्कारः-साधुकारः अयं साधुः त-**

**पस्वी ब्राह्मणः इति एवं अर्थे**—सत्कार, मान, पूजा यांसाठीं, सत्कार म्ह० साधुकार, हा साधु, तपस्वी, ब्राह्मण आहे, असें लोकांनीं म्हणावें म्हणून,—**मानः-माननं-प्रत्युत्थानाभिवादनादिः तदर्थं**—मान म्ह० मानन, उठून उभें रहाणें, अभिवंदन करणें, त्यासाठीं,—**च पूजा-पादप्रक्षालन-अर्चन अशयितृत्वादिः-तदर्थं**—व पूजा म्ह० पादप्रक्षालन करणें, पूजन करणें, भोजन घालणें वगैरे त्यासाठीं—**तपः सत्कार-मान-पूजार्थं**—जें तप तें सत्कारमानपूजार्थ होय—**च दम्भेन एव यत् तपः क्रियते**—आणि दंभानेंच जें तप केलें जातें, दंभानें म्ह० नास्तिकपणानें, केवळ आपले धार्मिकत्व प्रकट करण्यासाठीं जें तप आचरिलें जातें—**तत् इह राजसं चलं कादाचित्कफलत्वेन अध्रुवं प्रोक्तं-कथितं**—ते याच लोकीं फल देणारें असल्यामुळें राजस, चल व त्याचें फल अनियत असल्यामुळें अध्रुव म्हटलें आहे. [ अशा राजस तपाला त्याज्य मानावें. ] १८.

**मूढग्राहेणाऽऽत्मनो यत्पीडया क्रियते तपः ।**
**परस्योत्सादनार्थं वा तत्तामसमुदाहृतम् ॥१९॥**

**अन्वयार्थ—यत् तपः**—जें तप—**मूढग्राहेण**—अविवेकयुक्त निश्चयानें—**आत्मनः**—आत्म्याच्या—**पीडया**—पीडेनें—**वा**—अथवा—**परस्य**—दुसऱ्याच्या—**उत्सादनार्थं**—विनाशासाठीं—**क्रियते**—केले जातें—**तत्**—ते—**तामसं**—तामस तप म्हणून—**उदाहृतं**—म्हटलेलें आहे. १९

**मूढेति । मूढग्राहेणाविवेकनिश्चयेनाऽऽत्मनः पीडया क्रियते यत्तपः परस्योत्सादनार्थं विनाशार्थं वा तत्तामसं तप उदाहृतम् ॥ १९ ॥**

**भाष्यार्थ—' मूढ इति० '** ' मूढ० ' या श्लोकांत तामस तपाचा संग्रह करितात.—**मूढग्राहेण-अविवेकनिश्चयेन आत्मनः पीडया वा परस्य उत्सादनार्थं-विनाशार्थं यत् तपः क्रियते तत् तपः तामसं उदाहृतं**—मूढ म्ह० अत्यंत अविवेकी, त्याचा ग्राह म्ह० आग्रह, अर्थात् अविवेकी निश्चयानें-विवेकशून्य निश्चयानें, स्वतःच्या देहादिकांना पीडा देऊन किंवा दुसऱ्याच्या उत्सादनार्थ-विनाशासाठीं जें तप केलें जातें, त्याला तामस तप म्हटलें आहे. १९.

**दातव्यमिति यद्दानं दीयतेऽनुपकारिणे ।**
**देशे काले च पात्रे च तद्दानं सात्त्विकं स्मृतम् ॥**

**अन्वयार्थ—यत् दानं**—जें दान—**दातव्यं इति**—मला अवश्य द्यावयास पाहिजे, अशा भावनेनें—**अनुपकारिणे**—उपकार न करणाऱ्या-प्रत्युपकार करण्यास असमर्थ असलेल्या पुरुषाला—**देशे काले च पात्रे च**—विहित देश, काल व पात्र यांमध्यें—**दीयते**—दिलें जातें—**तत् दानं**—ते दान—**सात्त्विकं**—सात्त्विक—**स्मृत**—म्हटलेलें आहे.२०

इदानीं दानभेद उच्यते— दातव्यमित्येवं मनः कृत्वा यद्दानं दीयतेऽनुपकारिणे प्रत्युपकारासमर्थाय समर्थायापि निरपेक्षं दीयते देशे पुण्ये कुरुक्षेत्रादौ काले संक्रान्त्यादौ पात्रे च षडङ्गविद्वेदपारग इत्यादौ तद्दानं सात्त्विकं स्मृतम् ॥ २० ॥

**भाष्यार्थ—इदानीं दानभेदः उच्यते**—आतां क्रमप्राप्त दानाचा त्रिविध भेद सांगितला जातो—**दातव्यं इति एवं मनः कृत्वा**—मला हें दान द्यावयाचें आहे, त्याच्या फलाची वगैरे कांहीं इच्छा करावयाची नाहीं अशी भावना करून—**यत् दानं अनुपकारिणे-प्रत्युपकार-असमर्थाय दीयते**—जें दान अनुपकारी म्ह० उलट उपकार करावयास असमर्थ असलेल्या मनुष्याला दिलें जातें—**समर्थाय अपि निरपेक्षं देशे-पुण्ये कुरुक्षेत्रादौ काले-संक्रान्त्यादौ च पात्रे च षडंगविद्-वेदपारगे इत्यादौ दीयते**—समर्थाला म्ह० प्रत्युपकार करण्यास समर्थ असलेल्यालाहि, निरपेक्ष-प्रत्युपकाराची अपेक्षा न करतां, कुरुक्षत्रादि पवित्र प्रदेशीं, संक्रांत्यादि पर्वकालीं व षडंगवेत्ता षट्शास्त्रज्ञ, वेदपारंगत इत्यादिकांस दिलें जातें—**तत् दानं सात्त्विकं स्मृतं**—तें दान सात्त्विक असें म्हटलें आहे. २०

यत्तु प्रत्युपकारार्थं फलमुद्दिश्य वा पुनः ।
दीयते च परिक्लिष्टं तद्दानं राजसं स्मृतम् ॥ २१ ॥

**अन्वयार्थ—तु**—पण—**यत्**—जे दान—**प्रत्युपकारार्थं**—प्रत्युपकारासाठीं—**वा पुनः**—किंवा—**फलं उद्दिश्य**—फलाचा उद्देश धरून—**च परिक्लिष्टं**—व अतिशय क्लेशानें—**दीयते**—दिलें जाते—**तत्**—ते—**राजसं दानं**—राजस दान—**स्मृतं**—म्हटलेले आहे. २१.

यत्त्विति । यत्तु दानं प्रत्युपकारार्थं काले त्वयं मां प्रत्युपकरिष्यतीत्येवमर्थं फलं वाऽस्य दानस्य मे भविष्यत्यदृष्टमिति तदुद्दिश्य पुनर्दीयते च परिक्लिष्टं खेदसंयुक्तं तद्राजसं स्मृतम् ॥ २१ ॥

**भाष्यार्थ—' यत् तु० ' इति**—' यत् तु० ' या श्लोकानें राजस दान सांगतात—**तु यत् दानं प्रत्युपकारार्थं-काले तु अयं मां प्रति-उपकरिष्यति इति एवं अर्थं**—पण जे दान प्रत्युपकारासाठीं म्ह० प्रसंगीं हा माझ्यावर प्रत्युपकार करील, यासाठीं—**वा अस्य दानस्य मे अदृष्टं फलं भविष्यति इति**—किंवा या दानाचें मला अदृष्ट फल प्राप्त होईल म्हणून—**तत् उद्दिश्य च पुनः परिक्लिष्टं-खेदसंयुक्तं दीयते**—त्या फलाच्या उद्देशाने व तसेंच परिक्लेशानें म्ह० खेदयुक्त होऊन दिले जाते—**तत् राजसं स्मृतं**—तें राजस दान म्हटलें आहे. २१.

अदेशकाले यद्दानमपात्रेभ्यश्च दीयते ।
असत्कृतमवज्ञातं तत्तामसमुदाहृतम् ॥ २२ ॥

**अन्वयार्थ—यत् दानं**—जें दान—**अदेशकाले**—अयोग्य देश व अविहित काल यांत—**च**—व—**अपात्रेभ्यः**—अपात्रांना—**असत्कृतं**—असत्कारानें व—**अवज्ञातं**—अवज्ञेने—**दीयते**—दिलें जाते—**तत्**—ते—**तामसं**—तामस दान—**उदाहृतं**—म्हटलेले आहे. २२.

अदेशेति । अदेशकालेऽपुण्ये देशे म्लेच्छाशुच्यादिसंकीर्णेऽकाले पुण्यहेतुत्वेनाप्रख्याते संक्रान्त्यादिविशेषरहितेऽपात्रेभ्यश्च मूर्खतस्करादिभ्यो देशादिसंपत्तौ चासत्कृतं प्रियवचनपादप्रक्षालनपूजादिरहितमवज्ञातं पात्रपरिभवयुक्तं यद्दानं तत्तामसमुदाहृतम् ॥२२॥

**भाष्यार्थ—' अदेश० ' इति**—' अदेश० ' या श्लोकाने तामस दान सांगतात—**अदेशकाले-अपुण्ये देशे-म्लेच्छ-अशुच्यादिसंकीर्णे-अकाले पुण्यहेतुत्वेन अप्रख्याते-संक्रान्त्यादिविशेषरहिते**—अदेशकाली म्ह० म्लेच्छ, अशुची इत्यादिकांनी संकीर्ण झालल्या अपुण्य प्रदेशी अमंगल मनुष्ये व पदार्थ यांचा ज्याच्याशी संसर्ग झाला आहे अशा अपवित्र प्रदेशी, तसेच अकाली म्ह० पुण्यहेतुत्वानें प्रख्यात नसलेल्या, संक्रान्त्यादि विशेषरहित अशा कालीं—**च अपात्रेभ्यः-मूर्खतस्करादिभ्यः**—आणि सत्पात्र नसलेल्या मूर्ख, चोर इत्यादिकांना—**च देशादिसंपत्तौ असत्कृतं-प्रियवचन-पादप्रक्षालन-पूजादिरहितं**—आणि देशादिसंपत्ति जरी असली म्ह० योग्य देश, काल व पात्र जरी असले तरी सत्कारानें म्ह० प्रिय भाषण, पादप्रक्षालन, पूजा इत्यादि न करितां—**अवज्ञातं-पात्रपरिभवयुक्तं**—अवज्ञेनें म्ह० पात्राच्या तिरस्कारानें युक्त-सत्पात्राचा तिरस्कार करून—**यत् दानं दीयते तत् तामसं उदाहृतं**—जे दान दिलें जाते तें तामस असें म्हटलें आहे.२२.

ॐतत्सदिति निर्देशो ब्रह्मणस्त्रिविधः स्मृतः ।
ब्राह्मणास्तेन वेदाश्च यज्ञाश्च विहिताः पुरा ॥२३॥

**अन्वयार्थ—ॐ तत्सत्**—ॐ तत् सत्—**इति**—असा—**ब्रह्मणः**—ब्रह्माचा—**त्रिविधः**—तीन प्रकारचा—**निर्देशः**—निर्देश—**स्मृतः**—सांगितलेला आहे.—**तेन**—त्या निर्देशानें—**पुरा**—पूर्वी—**ब्राह्मणाः**—ब्राह्मण,—**च वेदाः**—व वेद—**च**—आणि—**यज्ञाः**—यज्ञ—**विहिताः**—निर्माण केलेले आहेत. २३

यज्ञदानतपःप्रभृतीनां साद्गुण्यकरणायायमुपदेश उच्यते—ओं तत्सदित्येष निर्देशो निर्दिश्यतेऽनेनेति निर्देशस्त्रिविधो नामनिर्देशो ब्रह्मणः स्मृतश्चिन्तितो वेदान्तेषु ब्रह्मविद्भिः । ब्राह्मणास्तेन निर्देशेन त्रिविधेन वेदाश्च यज्ञाश्च विहिता निर्मिताः पुरा पूर्वमिति निर्देशस्तुत्यर्थमुच्यते ॥ २३ ॥

**भाष्यार्थ—यज्ञदानतपःप्रभृतीनां साद्गुण्यकरणार्थ अयं उपदेशः उच्यते**—यज्ञ, दान, तप इत्यादि विहित कर्मांचें साद्गुण्यसंपादन करण्यासाठीं म्ह० त्यांत प्रमादादि कारणानें घडलेल्या वैगुण्याचा परिहार करून त्याला सद्गुणसंपन्न करण्यासाठीं

हा उपदेश केला जातो.—' **ओं तत्सत्** ' **इति एषः निर्देशः**—ओं, तत्, व सत् असा हा निर्देश,—**निर्दिश्यते अनेन इति निर्देशः**—ज्याच्या योगानें निर्देश केला जातो तो निर्देश—**ब्रह्मणः त्रिविधः नामनिर्देशः वेदान्तेषु ब्रह्मविद्भिः स्मृतः-चिंतितः**—ब्रह्माचा तीन प्रकारचा नामनिर्देश वेदान्तांमध्ये-उपनिषदामध्यें ब्रह्मवेत्त्यांनीं सांगितलेला म्ह० कल्पिलेला आहे. ' ओं इति ब्रह्म ' (तै. भाष्यार्थ,१.८, पृ. ४१.) या श्रुतींत ब्रह्माचा ' ओं ' असा निर्देश आहे. ' तत्त्वमसि ' या श्रुतींत ( छां. भाष्यार्थ, ६.८, पृ. ४७५. ) ब्रह्माचा 'तत्' या नावाचा निर्देश आहे. ' सदेव सोम्य ' या श्रुतींत ( छां. भाष्यार्थ, ६ २, पृ. ४१५.) 'सत्' या नांवाचा निर्देश आहे. यज्ञांत कांहीं वैगुण्य झालें आहे, असा संशय आल्यास या तीन नांवांतील कोणत्याहि नांवाचा उच्चार केल्यास त्याचा परिहार होतो. (आतां या त्रिविध नांवाचीच स्तुति करतात. )—**तेन त्रिविधेन निर्देशेन ब्राह्मणाः च वेदाः च यज्ञाः पुरा-पूर्वं विहिताः-निर्मिताः**—त्या त्रिविध नामनिर्देशानें ब्राह्मण,वेद व यज्ञ याना पूर्वी-सृष्टीच्या आरंभीं ब्रह्मदेवानें-प्रजापतीनें विहित म्ह० निर्माण केलेले आहे.—**इति निर्देशस्तुत्यर्थं उच्यते**—असें त्या निर्देशाच्या स्तुतीसाठीं सांगितलें जातें. २३.

---

१ रहस्यकार या श्लोकाच्या अवतरणात म्हणतात—" यावर अशी शका येते की,... कोणतेहि कर्म घेतले तरी ते दोषमय व दुःखकारक असल्यामुळे ही सर्व कर्मे सोडल्याखेरीज ब्रह्मप्राप्ति होणें शक्य नाही आणि हे जर खरे तर अमुक कर्म सात्विक व अमुक राजस हा भेद करण्यात तरी काय हंशील ? गीतेचें या आक्षेपास असे उत्तर आहे की, सात्विक, राजस, तामस हे कर्माचे भेद परब्रह्माला सोडून आहेत असे नाही." (हे गीतेचें उत्तर आहे कीं रहस्यकाराच्या पदरचे ? गीता परब्रह्माला निर्गुण म्हणून जर म्हणत आहे, तर सात्विकादि भेद त्याला सोडून नाहीत, असे कसे म्हणेल ? ) " ब्रह्म म्ह० काय हे ज्या संकल्पांत सांगितलेले आहे त्यांतच सात्विक कर्मे व सत्कर्मे यांचा समावेश होतो. त्यामुळे ही कर्मे अध्यात्म दृष्टयाहि त्याज्य नव्हेत"( पण संकल्प कोणता ? 'ॐतत्सत्' हा? पण तो तर ब्रह्माचा त्रिविध नामनिर्देश आहे. उपनिषदात ब्रह्माचा या तीन नांवांनीं उल्लेख केला आहे, तो कोठें कोठें केला आहे तें आम्ही वर भाष्यात दाखविलेच आहे. मध्वाचार्यादिकहि असेंच म्हणतात. तेव्हा त्यात सात्विक कर्मे व सत्कर्मे याचा समावेश कसा होणार ? हा निर्देश सात्विक कर्मामध्येहि घडलेल्या वैगुण्याचे निरसन करण्यासाठीं आहे.म्ह० साद्गुण्यसंपादनार्थ या त्रिविध निर्देशाचा उच्चार करावा असें येथें सांगावयाचें आहे.अर्थात् हें सर्व कर्माधिकारी साधकासाठी आहे, ज्ञाननिष्ठेच्या विरक्त ज्ञानी अधिकाऱ्यासाठी नाहीं. ही दृष्टि रहस्यकारांनी सर्वथा सोडल्यामुळेंच त्यांना असा असंबद्ध मजकूर वारंवार लिहिण्याचा प्रसंग आला आहे, त्यामुळें तिकडे दुर्लक्ष करणे हाच उत्तम मार्ग होय. ) या श्लोकाच्या अर्थात रहस्यकार "याच निर्देशाने पूर्वी ब्राह्मण, वेद व यज्ञ निर्माण केलेले आहेत" असें म्हणतात. पण टीपेत " सर्व सृष्टीच्या आरंभी ब्रह्मदेवरूपी पहिला ब्राह्मण, वेद आणि यज्ञ हे उत्पन्न झालेले आहेत, असें पूर्वीच ( गी. ३.१० ) सांगितलें आहे," असे म्हणतात. पण गी. ३.१० यांत असें सांगितलें नाहीं. ( गी. भा. पृ. २८२ पहा ) मुळांत ' ब्राह्मणाः ' असें बहुवचनी पद असतांना त्याचा 'ब्रह्मदेवरूपी ब्राह्मण' असा अर्थ करणें सर्वथा अयोग्य होय.

**तस्मादोमित्युदाहृत्य यज्ञदानतपःक्रियाः ।**
**प्रवर्तन्ते विधानोक्ताः सततं ब्रह्मवादिनाम् ॥ २४ ॥**

**अन्वयार्थ—तस्मात्**—म्हणून—**ओं**—ओं—**इति उदाहृत्य**—असें उच्चारून—**ब्रह्मवादिनां**—वेदवादी ब्राह्मणांच्या—**विधानोक्ताः**—वेद शास्त्रानें सांगितलेल्या—**यज्ञदानतपःक्रियाः**—यज्ञ, दान व तप या क्रिया—**सततं**—सतत—**प्रवर्तन्ते** प्रवृत्त होतात. २४.

**तस्मादोमित्युदाहृत्योच्चार्य यज्ञदानतपःक्रियाः यज्ञादिस्वरूपाः क्रियाः प्रवर्तन्ते विधानोक्ताः शास्त्रचोदिताः सततं सर्वदा ब्रह्मवादिनां ब्रह्मवदनशीलानाम् ॥ २४ ॥**

**भाष्यार्थ—तस्मात् 'ओं' इति उदाहृत्य-उच्चार्य**—ज्याअर्थी 'ओं' हा निर्देश ब्राह्मणादिकाचें कारण आहे, आणि तो ब्रह्माचा निर्देश आहे त्याअर्थी-ओं असा उच्चार करून-ओं असें म्हणून—**ब्रह्मवादिनां-ब्रह्मवदनशीलानां विधानोक्ताः-शास्त्रचोदिताः यज्ञ-दान-तपः-क्रियाः-यज्ञादिस्वरूपाः क्रियाः सततं-सर्वदा प्रवर्तन्ते**—ब्रह्मवाद्यांच्या म्ह० वेदाध्ययन करणे हे ज्यांचे शीलच आहे अशा द्विजांच्या शास्त्रविधानोक्त, यज्ञ, दान व तप या क्रिया म्ह० यज्ञादिरूप कर्मे सर्वदा प्रवृत्त होतात. [ वैदिक द्विज ' ओं ' असा उच्चार करून आपल्या यज्ञादि क्रिया आरंभितात. ] २४.

**तदित्यनभिसंधाय फलं यज्ञतपःक्रियाः ।**
**दानक्रियाश्च विविधाः क्रियन्ते मोक्षकाङ्क्षिभिः ॥२५॥**

**अन्वयार्थ—मोक्षकांक्षिभिः**—मोक्षाची इच्छा करणाऱ्या लोकांकडून—**तत् इति**—'तत्' या ब्रह्माच्या नावाचा उच्चार करून,—**फलं अनभिसंधाय**—फलाची इच्छा न करून,—**विविधाः**—नाना प्रकारचीं—**यज्ञतपःक्रियाः**—यज्ञकर्मे-तपश्चर्या—**च दानक्रियाः**—व दानक्रिया—**क्रियन्ते**—केल्या जातात. २५.

**तदिति । तदित्यनभिसंधाय तदिति ब्रह्माभिधानमुच्चार्यानभिसंधाय च कर्मणः फलं यज्ञतपःक्रिया यज्ञक्रियाश्च तपःक्रियाश्च यज्ञतपःक्रिया दानक्रियाश्च विविधाः क्षेत्रहिरण्यप्रदानादिलक्षणाः क्रियन्ते निर्वर्त्यन्ते मोक्षकाङ्क्षिभिर्मोक्षार्थिभिर्मुमुक्षुभिः ॥२५॥**

**भाष्यार्थ—' तत्० ' इति**—या श्लोकानें 'तत्०' या निर्देशाचा विनियोग सांगतात—**'तदित्यनभिसंधाय'-तत् इति ब्रह्माभिधानं उच्चार्य च कर्मणः फलं अनभिसंधाय**—'तत्' हें ब्रह्माचें नांव उच्चारून व कर्माच्या फलाची इच्छा न करून-**यज्ञतपःक्रियाः-यज्ञक्रियाः च तपःक्रियाः च यज्ञतपःक्रियाः**—यज्ञतपःक्रिया म्ह० यज्ञक्रिया, व तपःक्रिया—**च विविधाः क्षेत्रहिरण्यप्रदानादिलक्षणाः दानक्रियाः**—आणि नानाप्रकारच्या भूमि, सुवर्णादिप्रदान इत्यादिरूप दानक्रिया—**मोक्षकांक्षिभिः-मोक्षार्थिभिः-मुमुक्षुभिः क्रियन्ते-निर्वर्त्यन्ते**—मोक्षाची आकांक्षा करणाऱ्या

मोक्षेच्छु-मुमुक्षूंकडून केल्या जातात. [ मुमुक्षु ' तत् ' या ब्रह्माच्या नांवाचा उच्चार करून व फलाची इच्छा न ठेवतां यज्ञ, दान व तप हीं कर्मे करितात. ] २५.

**सद्भावे साधुभावे च सदित्येतत्प्रयुज्यते ।**
**प्रशस्ते कर्मणि तथा सच्छब्दः पार्थ युज्यते ॥२६॥**

**अन्वयार्थ—सद्भावे**—अस्तित्व या अर्थी—**च साधुभावे**—व सद्वृत्तत्व या अर्थी—**सत् इति एतत्**—सत् असें हे पद—**प्रत्युज्यते**—योजिले जातें—**तथा**—त्याचप्रमाणे—**पार्थ**—हे पार्था!—**प्रशस्ते कर्मणि**—विवाहादि प्रशस्त कर्मामध्यें—**सच्छब्दः**—सत् हा शब्द—**युज्यते**—योजला जातो. २६.

**ओंतच्छब्दयोर्विनियोग उक्तोऽथेदानीं सच्छब्दस्य विनियोगः कथ्यते— सद्भावेऽसतः सद्भावे यथाविद्यमानस्य पुत्रस्य जन्मनि तथा साधुभावेऽसद्वृत्तस्यासाधोः सद्वृत्तता साधुभावस्तस्मिन्साधुभावे च सादित्येतदभिधानं ब्रह्मणः प्रयुज्यते तत्रोच्यतेऽभिधीयते प्रशस्ते कर्मणि विवाहादौ च तथा सच्छब्दः पार्थ युज्यते प्रयुज्यत इत्येतत्॥**

**भाष्यार्थ—ओं·तत्·शब्दयोः विनियोगः उक्तः**—'ओं' व 'तत्' या शब्दांचा विनियोग सांगितला.—**अथ इदानीं सत्·शब्दस्य विनियोगः कथ्यते**—आतां या श्लोकांत 'सत्' शब्दाचा विनियोग कथन केला जातो—**सद्भावे-असतः-सद्भावे यथा अविद्यमानस्य पुत्रस्य जन्मनि**—सद्भाव या अर्थी म्ह० विद्यमान नसलेल्या वस्तूचे अस्तित्व या अर्थी, जसें-अविद्यमान म्ह० न जन्मलेल्या पुत्राचा जन्म या अर्थी—**तथा साधुभावे च-असद्वृत्तस्य असाधोः सद्वृत्तता साधुभावः तस्मिन् साधुभावे**—आणि त्याचप्रमाणें साधुभाव या अर्थी, दुराचरण करणाऱ्या असाधूचें जे सद्वर्तन तो साधुभाव, त्या साधुभाव या अर्थी—**सत् इति एतत् ब्रह्मणः अभिधानं प्रयुज्यते तत्र उच्यते-अभिधीयते**—'सत्' असें हे ब्रह्माचें नांव योजिले जाते,त्याअर्थी त्याला 'सत्' असे म्हटलें जातें.—**तथा पार्थ विवाहादौ प्रशस्ते च कर्मणि सत्·शब्दः युज्यते-प्रयुज्यते इति एतत्**—त्याचप्रमाणें हे अर्जुना! विवाहादि कर्मामध्ये 'सत्' हा शब्द योजिला जातो, प्रशस्त कर्मामध्यें सत् शब्दाचा प्रयोग केला जातो, असा याचा भावार्थ. २६.

**यज्ञे तपसि दाने च स्थितिः सदिति चोच्यते ।**
**कर्म चैव तदर्थीयं सदित्येवाभिधीयते ॥ २७ ॥**

---

१ या श्लोकात गीतेला कोणतीं कर्मे विवक्षित आहेत ते सांगितले आहे व ती फलाची आशा सोडून कोण करितात, त्याचाहि स्पष्ट उल्लेख आहे. मोक्षकांक्षी म्ह० मुमुक्षुच फलेच्छा सोडून कर्मे करितात, हें म्हणणें गीतेचा यथार्थ अर्थ कळावा, अशी इच्छा करणारांनीं लक्षांत ठेविलें पाहिजे. साधकच निष्काम कर्मांचे अधिकारी आहेत, ज्ञानी नव्हेत, हें यावरून उघड होतें. ( गी. भा. पृ. १८५ पहा. )

**अन्वयार्थ—च**—आणि—**यज्ञे तपसि च दाने**—यज्ञ, तप व दान या कर्मांत—**स्थितिः**—तत्परतेने राहणें, याला—**सत् इति उच्यते**—सत् असें म्हणतात—**च**—आणि—**तदर्थीयं**—त्या यज्ञादिकांसाठीं जें—**कर्म**—कर्म तें—**सत्**—सत्कर्म—**इति एव**—असेंच—**अभिधीयते**—म्हटलें जातें. २७

**यज्ञे यज्ञकर्मणि या स्थितिस्तपसि च या स्थितिर्दाने च या स्थितिः सा च सदित्युच्यते विद्वद्भिः, कर्म चैव तदर्थीयमथ वा यस्याभिधानत्रयं प्रकृतं तदर्थीयं यज्ञदानतपोर्थीयमीश्वरार्थीयमित्येतत् । सदित्येवाभिधीयते । तदेतद्यज्ञतपआदिकर्मासात्त्विकं विगुणमपि श्रद्धापूर्वकं ब्रह्मणोऽभिधानत्रयप्रयोगेण सगुणं सात्त्विकं संपादितं भवति ॥**

**भाष्यार्थ—यज्ञे-यज्ञकर्मणि या स्थितिः तपसि च या स्थितिः दाने च या स्थितिः**—यज्ञांत म्ह० यज्ञकर्मांत जी स्थिति-निष्ठा आणि तपामध्ये जी स्थिति व दानामध्ये जी स्थिति—**सा च विद्वद्भिः सत् इति उच्यते**—तीच विद्वानांकडून-पंडितांकडून 'सत्' अशी म्हटली जाते.—**च कर्म एव तदर्थीयं**—आणि जें यज्ञ, तप आणि दान यांसाठीं केलेलें कर्म—**अथ वा यस्य अभिधानत्रयं प्रकृतं तदर्थीयं**—किंवा ज्याचें नामत्रय प्रकृत आहे त्यासाठीं केलेलें कर्म—**यज्ञ-दान-तपोर्थीयं-ईश्वरार्थीय इति एतत्**—यज्ञ, दान, व तप यांसाठीं केलेलें कर्म किंवा ईश्वरार्थ केलेलें कर्म, असा याचा भावार्थ—**सत् इति एव अभिधीयते**—त्या कर्माला 'सत्' असेंच म्हटलें जातें—( सारांश )—**तत् एतत् यज्ञ-तपआदिकर्म असात्त्विकं विगुणं अपि-श्रद्धापूर्वकं ब्रह्मणः अभिधान-त्रयप्रयोगेण सगुणं सात्त्विकं संपादितं भवति**—तें हे यज्ञ, तप इत्यादि कर्म असात्त्विक व गुणरहित जरी असलें, तरी श्रद्धापूर्वक ब्रह्माच्या या तीन नांवांचा उच्चार केल्यानें सगुण व सात्त्विक बनतें. २७

## अश्रद्धया हुतं दत्तं तपस्तप्तं कृतं च यत् ।
## असदित्युच्यते पार्थ न च तत्प्रेत्य नो इह ॥ २८ ॥

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे श्रद्धात्रयविभागयोगो नाम सप्तदशोऽध्यायः ॥ १७ ॥**

---

१ 'यज्ञे तपसि दाने च स्थितिः' याचा अर्थ रहस्यकार 'यज्ञादिकांतील स्थिति म्ह० स्थिर भावना' असा करितात. पण तो बरोबर नाहीं. येथें स्थिति म्ह० निष्ठा, तत्परता, यज्ञादिकांत गढून जाणें हा त्याचा वास्तविक अर्थ आहे. याचें श्लोकावरील टीपेंत "यज्ञादिकासाठीं जे कर्म करावयाचे त्यालाच मीमांसकांनीं यज्ञार्थ कर्म असें सामान्य नाम दिलें आहे" इत्यादि म्हणतात, पण तें बरोबर नाहीं. हें आम्हीं पूर्वींच ( पृ. २८० ) दाखविलें

**अन्वयार्थ—यत्**—जें—**अश्रद्धया**—अश्रद्धेने—**हुतं**—हवन केलेलें,—**दत्तं** दान दिलेलें—**तपः तप्तं**—तप केलेले—**च कृतं**—व केलेलें कर्म—**तत्**—त्याला—**असत् इति**—असत् असें—**उच्यते**—म्हटले जाते.—**पार्थ**—हे पार्थ—**तत्**—तें—**न प्रेत्य**—मरणानंतर फलाच्या उपयोगीं नाहीं—**च**—व—**नो इह**—येथेंहि उपयोगी नाहीं. २८

**तत्र च सर्वत्र श्रद्धाप्रधानतया सर्वं संपाद्यते यस्मात्तस्मात्— अश्रद्धया हुतं हवनं कृतं दत्तं च ब्राह्मणेभ्योऽश्रद्धया, तपस्तप्तमनुष्ठितमश्रद्धया,तथाऽश्रद्धयैव कृतं यत्स्तुति-नमस्कारादि तत्सर्वमसदित्युच्यते मत्प्राप्तिसाधनमार्गबाह्यत्वात्पार्थ । न च तद्बह्वाया-समपि प्रेत्य फलाय नो अपीहार्थं साधुभिर्निन्दितत्वादिति ॥ २८ ॥**

इति श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यगोविंदभगवत्पूज्यपादशिष्यश्रीमच्छंकरभगवतः कृतौ

श्रीभगवद्गीताभाष्ये श्रद्धात्रयविभागयोगो नाम सप्तदशोऽध्यायः ॥ १७ ॥

**भाष्यार्थ—यस्मात् तत्र च सर्वत्र श्रद्धाप्रधानतया सर्वं संपाद्यते तस्मात्**—आणि ज्या अर्थी त्या सर्व यज्ञादिकर्मांमध्ये श्रद्धेचें प्राधान्य असल्यानेंच ते सर्व यज्ञादि सगुणसंपन्न होते त्याअर्थी—**अश्रद्धया हुतं-हवनं कृतं**—अश्रद्धेनें हवन केलेले—**च अश्रद्धया ब्राह्मणेभ्यः दत्तं**—आणि अश्रद्धेने ब्राह्मणांना दान दिलेले—**अश्रद्धया तपः तप्तं-अनुष्ठित**—अश्रद्धेने तप केलेले-तपाचे अनुष्ठान केलेलें—**तथा अश्रद्धया एव यत् स्तुति-नमस्कारादि कृतं**—त्याचप्रमाणें अश्रद्धेनेंच जे स्तुति नमस्कार इत्यादि कर्म केलेले—**तत् सर्वं पार्थ असत् इति उच्यते**—तें सर्व हे पार्था ! असत् असे म्हटले जातें—**मत्प्राप्तिसाधनमार्गबाह्य-त्वात्**—माझ्या प्राप्तीचा जो साधनभूत मार्ग त्यातून हे बाह्य असल्यामुळें-त्या मार्गाला सोडून असल्यामुळे त्याला असत् असे म्हणतात—**च तत् बह्वायासं अपि प्रेत्य फलाय न**—अश्रद्धेनें केलेलें कर्म पुष्कळ आयासांनी जरी केलेले असले तरी परलोकीं फल देण्यास समर्थ होत नाहीं—**इहार्थे अपि नो**—ऐहिक फलाच्याहि उपयोगी नसतें—**साधुभिः निंदितत्वात् इति**—साधूंकडून ते निंदित झाल्यामुळें म्ह० साधुलोक श्रद्धारहित कर्मांची निंदा करीत असल्यामुळे तें ऐहिक व पारलौकिक फलाच्या उपयोगी नसतें. [ या अध्यायात-शास्त्राला न जाणणाऱ्या श्रद्धावानांचे

---

आहे. तसेच " तत् म्ह० ते पलीकडचें " हा अर्थ चिन्त्य आहे. कारण ' तत् ' हा शब्द परोक्षवाची, अप्रत्यक्ष विषयाचा बोधक आहे. 'व्यवहित' या शब्दाचा 'पलीकडचा' असा अर्थ होऊ शकेल.

१ या श्लोकाच्या शेवटीं टीपेंत रहस्यकार म्हणतात—" ब्रह्मस्वरूपाचा बोधक जो सर्वमान्य संकल्प त्यांतच निष्काम बुद्धीनें, किंवा केवल कर्तव्य म्हणून, केलेल्या सात्त्विक कर्मांचा आणि शास्त्राप्रमाणें सद्बुद्धीने केलेल्या प्रशस्त कर्मांचा किंवा सत्कर्मांचा समावेश होतो." ( पण हें म्हणणें अगदीच अयुक्त आहे. संकल्पांत कर्मांचा समावेश कसा होणार ?

त्यांच्या त्यांच्या श्रद्धेप्रमाणें सात्त्विकादि तीन प्रकार होतात. राजस व तामस आहारादि टाकून सात्त्विक आहारादिकांचें सेवन केल्यानें केवल सत्त्वनिष्ठ झालेल्या आणि त्या सात्त्विक यज्ञादिकांतील वैगुण्य ब्रह्माच्या त्रिविध नामनिर्देशानें घालविणाऱ्या साधकांची चित्तशुद्धि होते, नंतर श्रवणादि साधनांनीं ज्यांना तत्त्व साक्षात्कार झाला आहे, अशा त्यांचा मोक्ष उपपन्न होतो–असें सांगितले आहे. ] २८

इति भगवान् श्रीकृष्णांनी गायलेल्या उपनिषदांतील–रहस्यविद्येतील ब्रह्मविद्येपैकीं योग–उपाय-शास्त्रांतील श्रद्धात्रयविभागयोगनावाचा सतरावा अध्याय विष्णुशर्मकृत सान्वयार्थ-सटीप-भाष्य-भाष्यार्थासह समाप्त झाला.

---

अर्थात् " ब्रह्मनिर्देशांतच ज्या कर्माचा समावेश होतो " इत्यादि त्यांचें म्हणणे मुळीच विचारार्ह नाही. पुढे ते म्हणतात.) " जे कर्म ब्रह्मदेवाबरोबरच उत्पन्न झालें (गी. ३-१०) व जें कोणालाहि सुटले नाहीं, ते सोडून द्या असे म्हणणे योग्य नव्हे, हे यावरून सिद्ध होते. " पण गी. अ. ३ श्लोक १० यात ' प्रजापति यज्ञासह म्ह० कर्मासह प्रजा उत्पन्न करून त्यांस म्हणाला' असे म्हटले आहे.ब्रह्मदेवाबरोबर कर्म उत्पन्न झाले असे म्हटलेलें नाही. ज्ञाननिष्ठाला कर्म सुटते, नाही कसे ? जर सुटले नसते तर भगवानांनी ज्ञाननिष्ठा सांगितलीच नसती.चवथ्या अध्यायात 'ब्रह्मार्पण' इत्यादि वचनाने ज्ञानयज्ञ सांगून त्यालाच श्रेष्ठ म्हटलें नसते. पाचव्या अध्यायात सन्यासाला निःश्रेयसकर म्हटले नसतें.' नवद्वारे पुरे देही नैव कुर्वन्न कारयन्' असें म्हणून पुढे १८ व्या अध्यायातहि 'नैष्कर्म्यसिद्धिं परमां सन्यासेन अधिगच्छति ' व ' निष्ठा ज्ञानस्य या परा ' ' सर्वधर्मान् परित्यज्य ' असे म्हटलें नसते. पुनः ते म्हणतात—"–' ॐतत्सत् ' या ब्रह्मनिर्देशाचा वरील कर्मयोगपर अर्थ याच अध्यायात कर्मविभागाला जोडून सांगण्याचा हेतुहि तोच आहे. कारण नुसत्या ब्रह्मस्वरूपाचे वर्णन मागे तेराव्या अध्यायात व त्या पूर्वीहि आलेले आहे ..' सच्चिदानन्द ' हा ब्रह्मनिर्देश प्रचारांत आहे. पण तो न घेतां ' ॐतत्सत् ' हा ब्रह्मनिर्देशच ज्याअर्थी येथे घेतला आहे, त्याअर्थी ' सच्चिदानन्द ' हा ब्रह्मनिर्देश, सामान्य ब्रह्मनिदेश या रूपाने प्रायः गीतेनंतर प्रचारांत आला असावा, " इत्यादि, यावरून आधुनिक सुशिक्षिताच्या कल्पनेच्या भराऱ्या कशा चालतात ते उघड होते. 'ॐतत्सत्' या निर्देशाचा कर्म ब्रह्मार्पण करण्याकडे विनियोग केला आहे, तेव्हा त्याचा कर्मयोगपर अर्थ केला आहे, हें म्हणणे मोठेसे सयुक्तिक नाही. ' सच्चिदानन्द ' हा ब्रह्मस्मरणासाठी निर्देश आहे व ' ॐतत्सत् ' हा कर्म ब्रह्मसमर्पण करण्यासाठी आहे व ते दोन्ही हल्ली प्रचारात आहेत. सध्यावंदनादि नित्यनैमित्तिक करणारांना ही गोष्ट चांगली अवगत आहे. कारण प्रत्येक कर्माच्या शेवटी ' ॐतत्सत् ब्रह्मार्पणमस्तु ' असें आपण नेहमी म्हणतो व ब्रह्मस्मरण करावयाचें तें ' सच्चिदानन्द ' असें करितों. अर्थात् वरील कल्पना केवल कल्पनाच आहे. त्यांत सत्यांश नाहीं.

# अध्याय अठरावा.

मोक्षसंन्यासयोग.

**अर्जुन उवाच**—अर्जुन म्हणाला—

**संन्यासस्य महाबाहो तत्त्वमिच्छामि वेदितुम् ।**
**त्यागस्य च हृषीकेश पृथक्केशिनिषूदन ॥ १ ॥**

**अन्वयार्थ—हे महाबाहो**—हे महापराक्रमी कृष्णा !—**संन्यासस्य**—संन्यास या शब्दाच्या अर्थाचे—**तत्त्वं**—तत्त्व—**वेदितुं**— जाणण्यास—**इच्छामि**—मी इच्छितों—**च**—आणि—**हे हृषीकेश केशिनिषूदन**—हे इंद्रियांच्या ईशा, हे केशिदैत्याला मारणाऱ्या कृष्णा ! —**त्यागस्य (तत्त्वं)**—त्याग या शब्दाच्या अर्थाचें तत्त्व —**पृथक्**—अगदीं निराळे—**(वेदितुं इच्छामि)**—मी जाणण्यास इच्छितों. १.

**सर्वस्यैव गीताशास्त्रस्यार्थोऽस्मिन्नध्याय उपसंहृत्य सर्वश्च वेदार्थो वक्तव्य इत्येवमर्थोऽयमध्याय आरभ्यते । सर्वेषु ह्यतीतेष्वध्यायेषूक्तोऽर्थोऽस्मिन्नध्यायेऽवगम्यते । अर्जुनस्तु संन्यासत्यागशब्दार्थयोरेव विशेषं बुभुत्सुरुवाच-संन्यासस्य संन्यासशब्दार्थस्येत्येतद्धे महाबाहो तत्त्वं तस्य भावस्तत्त्वं याथात्म्यमित्येतदिच्छामि वेदितुं ज्ञातुं त्यागस्य च त्यागशब्दार्थस्येत्येतद्धृषीकेश पृथगितरेतरविभागतः । केषिनिषूदन केशिनामाहयच्छ्माऽसुरस्तं निषूदितवान्भगवान्वासुदेवस्तेन तन्नाम्ना संबोध्यतेऽर्जुनेन ॥१॥**

**भाष्यार्थ—सर्वस्य एव गीताशास्त्रस्य अर्थः अस्मिन् अध्याये उपसंहृत्य** ( वक्तव्यः )—सर्वच गीताशास्त्राचा अर्थ या अध्यायांत संक्षेपतः संग्रहित करून सांगावा—**च सर्वः वेदार्थः वक्तव्यः इति एवं अर्थः अयं अध्यायः आरभ्यते** —आणि सर्व वेदार्थ संक्षेपतः सांगावा म्हणून हा अध्याय आरंभिला जातो. [ या पूर्वीच्या अध्यायांमध्ये विस्तारानें व इतस्ततः सांगितलेला अर्थ अनायासानें कळावा म्हणून संक्षेपतः त्याचा उपसंहार करून सागावा, यासाठीं या अध्यायाचा आरंभ आहे, त्याचप्रमाणें सर्व उपनिषदामध्यें इतस्ततः सविस्तर सांगितलेला अर्थहि सहज कळावा म्हणून या अध्यायांत संक्षेपाने सांगितला आहे. कारण उपनिषदे व गीता यांचा विषय एकच आहे. यास्तव केवल गीतार्थाचाच नव्हे, तर सर्व वेदान्ताच्या अर्थाचाहि या अध्यायांत उपसंहार केला आहे, असें समजावें. ]—**हि सर्वेषु अतीतेषु अध्यायेषु उक्तः अर्थः अस्मिन् अध्याये अवगम्यते**—कारण पूर्वी होऊन गेलेल्या सर्व अध्यायांमध्यें सांगितलेला शास्त्रार्थ या अध्यायांत ज्ञात होतो. ( अहोपण, या अध्यायांत सर्व वेदार्थाचा जर उपसंहार करावयाचा आहे, तर ‘ त्यागेन एके ’ व ‘ संन्यासयोगात्’

या उपनिषद्वचनांत सांगितलेला त्याग व संन्यास यांविषयींच येथें प्रश्न व प्रतिवचन कां आहे ? कारण त्याग व संन्यास हा सर्व वेदार्थ नसून त्याचा एकदेश आहे. )— **तु अर्जुनः संन्यासत्यागशब्दार्थयोः एव विशेषं बुभुत्सुः उवाच**—पण अर्जुन संन्यास व त्याग या शब्दांच्याच अर्थांतील फरक जाणण्याच्या इच्छेनें म्हणाला— **संन्यासस्य-संन्यासशब्दार्थस्य इति एतत्**—संन्यासाचें म्ह० संन्यासशब्दाच्या अर्थाचें, असा भावार्थ—**हे महाबाहो**—हे आजानुबाहो कृष्णा—**तत्त्वं-तस्य भावः तत्त्वं याथात्म्यं इति एतत्**—तत्त्व म्ह० त्याचा जो भाव तें तत्त्व, म्ह० याथात्म्य-यथार्थस्वरूप असा याचा भावार्थ—**वेदितुं-ज्ञातुं इच्छामि**—जाणण्यास मी इच्छितों. ( हे कृष्णा, संन्यासशब्दाच्या अर्थाचें यथार्थ स्वरूप जाणण्याची मी इच्छा करितों. )—**त्यागस्य च-त्यागशब्दार्थस्य इति एतत्**—आणि त्यागाचें-त्यागशब्दाच्या अर्थाचें असा भावार्थ—**हृषीकेश पृथक्-इतरेतरविभागतः**—हे हृषीकेशा म्ह० हे इंद्रियांच्या ईश्वरा, वेगळें वेगळें-एकमेकांपासून विभक्तपणें त्यागाचें तत्त्वहि जाणूं इच्छितों—**केशिनिषूदन-केशिनामा हयच्छद्मा असुरः तं भगवान् निषूदितवान्**—केशिनिषूदन म्ह० केशिनांवाचा अश्वाच्या शरीराचें मिष केलेला एक असुर होता, त्याला भगवान् वासुदेवाने मारलें—**तेन अर्जुनेन तन्नाम्ना संबोध्यते**—त्यामुळें भगवान् अर्जुनाकडून त्या नांवानें संबोधिले जात आहेत. [ अर्जुन ज्याअर्थी त्याग व संन्यास यांचें तत्त्व पृथक् जाणण्याची इच्छा करीत आहे, त्याअर्थी त्याचा अपृथक् म्ह० एकरूप अर्थहि आहे. ] १.

---

१ अठरावा अध्याय हा सर्व गीताशास्त्राचा उपसंहार असल्यामुळे रहस्यकारांनी ‘ आतांपर्यंत काय काय सांगितले याचें सिंहावलोकन ’ केले आहे व ‘ जास्त माहितीसाठीं चवदाव्या प्रकरणाचा ’ हवाला दिला आहे. आम्ही त्याचेंहि सविशेष परीक्षण करितों. “ स्वधर्माप्रमाणे प्राप्त झालेलें युद्ध सोडून देऊन भीक मागण्यास तयार झालेल्या अर्जुनास आपले कर्तव्य करावयास प्रवृत्त करण्यासाठीं गीता उपदेशिली आहे, हे पहिल्या अध्यायावरून स्पष्ट आहे. ” ( पहिल्या अध्यायावरून हें स्पष्ट होत नाहीं. पहिल्या अध्यायांत अर्जुनाला शोक व मोह झाल्याचे स्पष्ट वर्णन आहे व शोकमोहानें व्याकुल होऊन त्याने वैराग्यानें युद्धरूप स्वधर्माचा त्याग केला. बाणासह गांडीव धनुष्य टाकून तो रथांत जाऊन बसला. ‘न कांक्षे विजयं०’ गी.भा.पृ २२ व ‘अहो बत महत्पापं कर्तुं व्यवसिताः’ पृ. २६ इत्यादि वाक्यांनीं अर्जुनाने आपलें वैराग्य व्यक्त केले आहे व ‘ येषामर्थे कांक्षितं नो०’ इत्यादि श्लोकांनीं त्यानें आपला ‘ हे माझे ’ हा मोह व्यक्त केला आहे. ‘ कृपया परयाविष्टः ’ येथून अध्यायसमाप्तीपर्यंत पुढील सर्व श्लोकांनीं त्यानें आपला विषाद-शोक प्रकट केला आहे. त्यावरून आपलें कर्तव्य करावयास प्रवृत्त करण्यासाठीं गीता उपदेशिली, हे ठरत नाहीं. ) “ गुरुहत्यादि दोषयुक्त कर्म केल्यानें आत्म्याचें कल्याण होणार नाहीं, अशी अर्जुनाची शंका होती. म्हणून आत्मज्ञानी पुरुषांनीं स्वीकारलेले दोन प्रकारचे आयुष्यक्रमणाचे मार्ग दुसऱ्या अध्यायाच्या आरंभीच सांगितले. एक सांख्य ( संन्यास ) व दुसरा कर्मयोग ( योग ) ” हा संबंध किती सदोष आहे, याचा विचार वाचकांनी

अवश्य करावा. कारण हा वादाचा पहिला व मुख्य मुद्दा आहे. 'गुरुहत्येने आत्म्याचें कल्याण होणार नाहीं, अशी अर्जुनाची शंका,' व 'म्हणून आत्मज्ञानी पुरुषांनीं स्वीकारलेले दोन प्रकारचे आयुष्यक्रमणाचे मार्ग आरंभीच सांगितले' यांचा कार्यकारणभाव कसा लावावयाचा ? वस्तुतः अर्जुनाची तशी शंकाच नव्हती. (अ. २ श्लो. ४-५ पृ. ३०.) बरें, त्याची तशी शंका होती म्हणून जरी मानलें तरी आत्मज्ञानी पुरुषांनी स्वीकारलेले आयुष्य-क्रमणाचे दोन मार्ग गीतेच्या आरंभीच सांगण्याचें काय कारण ? अर्जुनाच्या शंकेचा व आत्मज्ञानी पुरुषाच्या आयुष्यक्रमणाचा काय संबंध ? 'मी आत्मज्ञानी आहें, तेव्हां आतां मी आपलें पुढील-ज्ञानोत्तर आयुष्य कसें आक्रमूं ?' असा जर अर्जुनाचा प्रश्न असता तर रहस्यकारांचें हें म्हणणे उपपन्न झालें असते. पण बिचारा अर्जुन तर 'माझे स्वजन मरतात' म्हणून विषण्ण-खिन्न-दुःखी झाला आहे. 'मी धर्मसमूढचित्त झालो आहें,' असें आपल्या तोंडाने सांगत आहे व 'मी तुझा शिष्य आहे,' 'माझें निश्चित श्रेय मला सांग' अशी प्रार्थना करीत आहे. 'निश्चित श्रेय' या शब्दावरून मोक्षसाधनच तो विचारीत आहे, हे उघड होतें व भगवनांनी आत्मज्ञानाच्या उपदेशाला जो आरंभ केला आहे त्यावरूनहि तसाच निश्चय होतो. (गी. भा. पृ. ३२) शिवाय दुसऱ्या अध्यायाच्या आरंभी जे सांख्य सांगितले आहे तो संन्यासमार्ग नव्हे, तो ज्ञानी पुरुषाचा ज्ञानोत्तर आयुष्यक्रमणाचा मार्ग नव्हे, तर केवल आत्मानात्मविवेक आहे. त्यांत आत्मा अज, नित्य, अकर्ता, अभोक्ता, निर्विकार वगैरे आहे, असे आत्मस्वरूप श्रुतीच्या आधारानें (गी.भा.पृ. ४५) सांगून अनात्मा त्याच्या अगदी उलट म्ह० विकार पावणारा, विनाशी वगैरे आहे, हे सांगितले आहे, अर्थात 'सांख्ये बुद्धि' (२.३९) म्ह० सांख्यमार्ग-संन्यासमार्ग अशी जी रहस्यकारानी आपली समजूत करून घेतली आहे ती चुकीची आहे. दुसऱ्या अध्यायाच्या ११-३० श्लोकात परमार्थ आत्मवस्तुविवेक सांगितला आहे व तेच सांख्य होय. (गी. भा.पृ.१४४ पहा) त्याचप्रमाणें 'योगे बुद्धिः' म्ह० योग, कर्मयोगमार्ग नव्हे, तर त्या आत्मविवेकाची योग्यता प्राप्त करून देणाऱ्या उपायाचें ज्ञान असा त्याचा अर्थ आहे. (गी. भा. पृ. १४५-१४८ पहा) पुनः रहस्यकार म्हणतात-" आणि हे दोन्ही मार्ग जरी मोक्षप्रद असले तरी त्यातलें त्यात कर्म-योगच अधिक-श्रेयस्कर असा अखेर सिद्धान्त केला. (गी.५-२)" पण हे म्हणणेंहि अयोग्य आहे. हे दोन्ही मार्ग जर आत्मज्ञानी पुरुषाच्या ज्ञानोत्तर आयुष्यक्रमणाचे आहेत, तर त्यांना पुनः मोक्षप्रद म्हणण्यात काय स्वारस्य राहिले ? आत्मज्ञान झाल्यावरहि पुनः मोक्षप्रदमार्गाची अपेक्षा असतेच की काय ? जर असेल तर त्या दुर्बल ज्ञानाला घेऊन काय करावयाचें आहे ? आत्मज्ञानोत्तर मोक्षप्रद दोन मार्गाची अपेक्षा असते, असेंच जर भगवानांचें म्हणणें असेल तर ते श्रुतिविरुद्ध असल्यामुळे सर्वथा अग्राह्यच ठरेल. वैदिक धर्म व वेदान्तशास्त्र केवल तर्कप्रधान नाही. त्यांत कल्पना कांहीं कामाच्या नाहीत. साक्षात् वेदवाक्य प्रमाण पाहिजे व तोच अर्थ स्वानुभवसंवादी पाहिजे. स्वानुभवाशी विसंवादी असतां कामा नये. रहस्यकारांची ज्ञानोत्तर आयुष्यक्रमणाच्या दोन मार्गाची कल्पना केवल श्रुतीच्याच नव्हे तर भगवद्वचनांच्याहि विरुद्ध आहे. ज्ञानानेच मोक्ष, असे 'ज्ञाने-नैव तु कैवल्य' 'ज्ञानं लब्ध्वा परां शांतिं अचिरेण' इत्यादि श्रुतिस्मृतिवचने सांगतात व ज्ञानानंतर मोक्षासाठीं कोणत्याहि मार्गाची अपेक्षा असल्याचे कोठेंहि सांगितलेलें नाहीं.

अर्थात् रहस्यकारांची ही कल्पना निराधार आहे. पांचव्या अध्यायाच्या २ ऱ्या श्लोकांत 'अखेर सिद्धान्त' केल्याचें जें रहस्यकार सांगतात तें खरें नव्हे. याविषयीं भाष्यांत व टीपेंतहि पूर्वी बराच विचार होऊन गेला आहे. ( गी. भा. पृ. ४६९ ते ४९० पहा ) " कर्मयोगांत बुद्धि श्रेष्ठ समजतात " ( हे म्हणणे निराधार आहे. ) " बुद्धि सम व स्थिर असली म्ह० कर्माची बाधा लागत नाही. " ती कां बरें? आणि स्थिर व सम याचा अर्थ काय ? स्थिर व सम म्ह० एकाग्र कीं समाहित ? कीं २.४८ सांगितल्याप्रमाणें सिद्धि व असिद्धि यांना सम मानणें, ही समबुद्धि ? पण वस्तुतः यांतील एकाहि समत्वाने कर्माचा लेप न लागणें शक्य नाही. कर्माचा लेप न लागण्यास काय केले पाहिजे तें अ. ३ श्लो. २७-३० पृ. ३२३ ३२९ अ. ५ श्लो. १० पृ. ५०१ इत्यादि ठिकाणीं सांगितले आहे. 'मी कर्ता' अशा भावनेने केलेले कर्म बंध उत्पन्न करते व कर्तृत्वाभिमान सोडून केलेले कर्म बंध करीत नाही, हा अगदी सरळ न्याय आहे व तोच न्याय चवथ्या अध्यायात 'न मां कर्माणि लिंपन्ति' ( श्लो. १४ पृ. ३८३ ) यावरील भाष्यांत स्पष्ट सांगितला आहे. चवथ्या अध्यायाच्या १५-२३ श्लोकात ( गी. भा. पृ. ३८५ ते ४२६ ) तरी हेच सविस्तर सांगितले आहे. त्यावरील भाष्य, भाष्यार्थ व टीपा पहा म्ह० आचार्यांचे म्हणणें किती प्रमाणबद्ध आहे व रहस्यकाराचें किती प्रमाणशून्य, केवळ काल्पनिक आहे तें सूर्यजयद्रथ न्यायानें कळेल. " कर्म कोणाला सुटले नाही व कोणी सोडू नये " या रहस्यकारांच्या म्हणण्यांतहि तत्त्वार्थ मुळींच नाहीं. कर्म कोणते सुटत नाही? स्वाभाविक; शास्त्रीय कर्मे सुटत नाहीं, असे नाही. ते जर सुटत नसते तर याच अध्यायात पुढे राजस व तामस त्याग जो सांगितला आहे तो सांगण्याचे कारणच नव्हते. तसेच कर्म जर सुटणे शक्यच नाहीं. तर 'सोडूं नये' या म्हणण्यात तरी काय अर्थ आहे ? " फक्त फलाशा सोडली म्हणजे झाले " म्ह० काय झाले ? नुस्ती फलाशा सोडल्याने काय होईल ? तेवढ्याने मोक्ष मिळेल कीं काय ? नाही. मोक्षासाठी ज्ञानच पाहिजे. अर्थात् अग्निहोत्रादि नित्य-नैमित्तिक कर्माच्या फलाचाहि त्याग केल्यास त्याचे स्वर्गादि फल मिळणार नाही, चित्त-शुद्धि होईल, यापेक्षा अधिक काही होणार नाही. " स्वतःकरिता नको असलीं तरी लोकसंग्रहार्थ कम करणे जरूर आहे." कर्मे कोणती ? खाणे, पिणे वगैरे ही का लोकसंग्रहार्थ करावयाची? त्या कर्मांनी लोकसंग्रह कसा होणार? 'शास्त्रीय वर्णाश्रमविहित कर्मे' म्हणाल तर संन्यासानेंहि लोकसंग्रह होईल. कारण संन्यासहि वर्णाश्रमविहित आहे. अर्थात् कोणत्याहि वर्णाचा व आश्रमाचा मनुष्य स्वविहित धर्माचरणानें लोकसंग्रह करूं शकेल. पण 'लोकसंग्रह' याचा अर्थ काय ? तो कोणी करावा ? ( गी. भा. पृ. ३०९ ते ३१२ पहा ) " बुद्धि चांगली असली म्ह० ज्ञानाचा व कर्माचा विरोध येत नाही " हा नुस्ता भ्रम आहे. ज्ञानाधिकार व कर्माधिकार यांमध्ये प्रकाश व अंधकार यांच्या इतका विरोध आहे. गी. भा. पृ. ४७, १०५, २२१-२२५, २४७ पहा. " पूर्वीची वहिवाट पाहता जनकादि याचप्रमाणे वागले, ' इत्यादि युक्तिवाद तिसऱ्यापासून पांचव्या अध्यायापर्यंत आहे. " जनक व श्रीकृष्ण किंवा योगवासिष्ठांतील दाशरथिराम हीं कर्माधिकारी क्षत्रिय पुरुषाचीं उदाहरणें आहेत, व तीं फक्त लोकसंग्रहाच्या बुद्धीनें आहेत. लोकसंग्रहाचे अधिकारी फक्त श्रेष्ठ ज्ञानी आहेत. (गी.भा.पृ.३०९ टीप

पद्य.) शिवाय अ.३श्लो.२० यात जनकादिक कर्मानेच संसिद्धीला प्राप्त झाले,असे ह्मटले आहे. त्यावरूनच 'कर्म' हें संसिद्धीचें साधन ठरते. 'स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः' १८.४५,'एवं ज्ञात्वा कृतं कर्म पूर्वैरपि मुमुक्षुभिः' ४.१५ पृ. ३८५, 'क्रियन्ते मोक्षकांक्षिभिः' (१७.२५ पृ. ११०४.) या वचनावरून कर्मे ज्ञानोत्तर करावीं, असे न ठरता ज्ञानापूर्वी ज्ञाननिष्ठायोग्यता प्राप्त होण्यासाठी करावी, असेंच ठरते. म्ह० कर्मे ज्ञानाची बहिरंग साधनें ठरतात. शिवाय तिसऱ्या अध्यायातील जनक व श्रीकृष्ण यांचे उदाहरण प्रासंगिक असून त्याचा संबध त्याच अध्यायांतील पुढील प्रतिपादनाशीहि जर नाही तर तो पाचव्या अध्यायापर्यंत कोठून असणार? तिसऱ्या अध्यायात अर्जुनाला ईश्वरार्पणबुद्धीने नित्य कर्मच करावयास सांगून 'ते कर्म ह्माच स्वधर्म व तोच सदोष असला तरी निर्दोष परधर्माहून श्रेष्ठ' असे सांगितले. शेवटी सर्व अनर्थाचें कारण काम असल्यामुळे त्याचा त्याग सांगितला. चवथ्या अध्यायात गीतेचा संप्रदाय वगैरे प्रासंगिक विषय सांगितल्यावर —ज्ञानकर्मसंन्यासाचे निरूपण १८–४१ श्लोकात केले आहे. ज्ञानाने–विवेकबुद्धीने खरा कर्मसंन्यास सांगितला आहे. सर्वश्रेयःसाधनांना 'यज्ञ' म्हणून व द्रव्यमय यज्ञाहून ज्ञानयज्ञ श्रेष्ठ आहे, असे सांगून ज्ञानलक्षणसंन्यासाचीच स्तुति केली आहे. शेवटी आत्म्याच्या परोक्ष ज्ञानाने सर्व संशय घालवून आत्म्याचे अपरोक्ष ज्ञान होण्यासाठी त्याचें साधन कर्मयोग आचरण्यास सांगितले आहे. या चवथ्या अध्यायात रहस्यकार म्हणतात तसा युक्तिवाद कांही नाही. उलट आत्मज्ञानासाठी स्वधर्मानुष्ठानच कर असा स्पष्ट उपदेश आहे. पांचव्या अध्यायातहि प्रथम अर्जुनाच्या प्रश्नाचे उत्तर अर्जुन किंवा त्याच्याच अवस्थेतील दुसरा साधक यासाठी 'कर्मयोगो विशिष्यते' असे जरी दिलें आहे तरी पुढे सर्व अध्यायभर मुख्य किंवा गौण संन्यासाचेच वर्णन आहे. जो अर्जुनासारखा कर्माधिकारी असेल त्याने चित्तशुद्धीसाठी ईश्वरार्पणबुद्धीने 'मी कर्ता' हा संग टाकून शास्त्रीय नित्य-नैमित्तिक कर्म करावे व जो ज्ञानाधिकारी असेल त्याने नित्यनैमित्तिकादि सर्व कर्मे टाकून फक्त शारीर कर्म–निर्वाहापुरते कर्म 'निराशीः यतचित्तात्मा' होऊन करावे,असें सांगितले आहे. अर्थात् यातील पहिला प्रकार हा गौण संन्यास व दुसरा प्रकार हा मुख्य संन्यास होय. गीतेच्या प्रत्येक अध्यायात हे दोन्ही संन्यास सांगितले आहेत. आचार्यांनी याच दृष्टीनें सर्व गीता लाविली व त्यामुळे त्यांचे भाष्य ग्राह्य झाले, आणि रहस्यकारांना गीतेत कर्मयोगच दिसला व त्यामुळे त्यांचे रहस्य अग्राह्य ठरलें आहे. पाचव्या अध्यायातील ६ व ११ हे दोन श्लोक कर्मयोग ज्ञानयोगाचे साधन आहे, हे स्पष्ट सांगत असतांना योगाला म्ह० कर्मयोगाला ज्ञानोत्तर स्वतंत्र मोक्षमार्ग म्हणणे सर्वथा अयोग्य आहे. पाचव्या अध्यायाचे १३ ते २६ श्लोक मुख्य संन्यासपर नाहीत, असे म्हणणे हे धाष्टर्य आहे. यावरून रहस्यकाराचे वरील ३ ते ५ अध्यायाविषयींचें म्हणणे किती अग्राह्य आहे ते कोणाच्याहि लक्षात येईल.

रहस्यकार पुढे म्हणतात—"कर्मयोगसिद्ध्यर्थ लागणारी बुद्धीची समता कशी प्राप्त करावी आणि हा कर्मयोग चालवीत असता त्यानेच अखेर मोक्ष कसा मिळतो, हा या पुढला विषय होय. ही समता प्राप्त होण्यास इंद्रियनिग्रह करून एकच परमेश्वर सर्वांभूतीं भरला आहे, हें पुरे जाणलें पाहिजे, दुसरा मार्ग नाही." पण कर्मयोगसिद्ध्यर्थ समत्वबुद्धि

कशाला हवी ? व कर्मयोग सिद्ध होणें म्हणजे तरी काय ? कर्मयोग म्ह० नित्यनैमित्तिक कर्मानुष्ठान, व तेंहि अगोदर फलत्याग करून व नंतर कर्मे ईश्वरार्पण करून आचरावे, एवढेंच गीतेचें म्हणणें आहे. असें कर्माचरण करितां करितां निरहंकार बुद्धि बाणूं लागते व ती पूर्णपणें बाणली की ती कर्माधिकाऱ्याचाहि संन्यासच होय. येथेच कर्मयोगाची हद्द संपली. त्यानंतर आत्मसाक्षात्काराचें मुख्य साधन जे ध्यान त्याच्या अभ्यासाला आरंभ होतो. (गी. भा. पृ. ५४९–५५५ पहा.) अर्थात् 'कर्मयोगसिद्धि' या शब्दाचा कांहीं विशेष अर्थच संभवत नाहीं. स्थितप्रज्ञता ही कर्मयोगाची सिद्धि नव्हे. ती ध्यानयोगानें सिद्ध होणारी ज्ञाननिष्ठा आहे. तसेंच 'कर्मयोगाला लागणारी बुद्धीची समता' ती कोणती ? तिचे स्वरूप तरी काय ? सिद्धि व असिद्धि याना तुल्य मानणे ही समता कीं, सर्वत्र समब्रह्मदृष्टि ठेवणें ही समता, की चित्ताला आत्म्यामध्ये स्थिर करणें ही समता ? यांतील पहिली समता कर्मयोगाच्या वेळी संभवते व तिचेंच भगवानानीं (गी.भा.अ.२श्लो. ४८ पृ. १७५–१७७ पहा) विधान केलें आहे. सर्वत्र ब्रह्मदृष्टि झाल्यावर कर्मयोग संभवत नाहीं. कारण 'मी व माझे' हीच त्याची सामग्री आहे. चित्त आत्म्यामध्ये स्थिर झाल्यावरहि कर्मयोग संभवत नाहीं. कारण चित्ताच्या अस्थिर–असमाहित अवस्थेंतच कर्मानुष्ठान–शरीराची हालचाल संभवते. अर्थात् कर्मयोगाच्या सिद्धीसाठीं लागणारी समता मनाच्या अल्पशिक्षणानेंहि संभवते. त्यासाठीं इंद्रियनिग्रहाची गरज नाहीं.ध्यानालाच इंद्रियनिग्रहादिकांची गरज असून त्यानेच'सर्वभूतात्मभूतात्मा'(गी.भा.पृ.४९८)होता येतें.रहस्यकार ह्मणतात, ते खऱ्या ज्ञानाचे स्वरूपच नव्हे.'एकच परमेश्वर सर्वांभूतीं भरला आहे' असें नुस्तें जाणणें हा आत्मसाक्षात्कार नव्हे. माझा आत्मा म्ह०मीच सर्व भूतांचा आत्मा आहें, मीच परमात्मा, ब्रह्म असें साक्षात् जाणल्यावर कोण कोणासाठीं कोणतें कर्म करणार ! अर्थात् कर्मयोगाला अवश्य लागणारी समता निराळी व ध्यानानें प्राप्त होणारें साक्षात्काररूप साम्य निराळें. सहाव्या अध्यायांतील साम्य सतत ध्यानाभ्यासानें प्राप्त होणारें असून तें चित्तस्थैर्यरूप असल्यामुळे कर्मानुष्ठानोपयोगी नाहीं. तर आत्मज्ञानोपयोगी–आत्मसाक्षात्कारोपयोगी आहे. "सहाव्या अध्यायांत इंद्रियनिग्रहाचें वर्णन करून" हें म्हणणें अगदींच विपरीत आहे. वाचकांनीं सबंध अध्याय वाचून पहावा, म्हणजे त्याना चित्तनिरोधरूप योगाभ्यासाचेंच विधान त्यांत आहे, इंद्रियनिग्रहाचें नाहीं हें सहज कळून येईल. "सातव्या अध्यायापासून सतराव्या अध्यायापर्यंत कर्मयोग आचरीत असतांनाच परमेश्वराचें ज्ञान कसें होतें व तें ज्ञान कोणतें हें सांगितलें आहे" हे रहस्यकाराचें म्हणणें बरोबर नाहीं. कारण सातव्या अध्यायाच्या आरंभींच "योगाभ्यास–मन:समाधान करीत असतांनाच तूं मला कसा जाणशील तें ऐक" असें म्हटलें आहे. 'कर्मयोग आचरीत असतांच' असें म्हटलेलें नाहीं. (गी. भा. पृ. ६१५ पहा.) ७ ते १२ अध्यायांत सोपाधिक-निरुपाधिक ईश्वराची उपासना सांगितली आहे. सातव्या अध्यायात कर्माचें नावहि नाहीं. ईश्वराचें स्वरूप सांगून त्याच्या भक्तीचेंच वर्णन आहे. सातव्या अध्यायांत प्रथम ईश्वराचें स्वरूप सांगितले आहे. त्यावरून सात्त्विक भक्तांना त्याचें ज्ञान होतें, व पुढें भक्तीनें विज्ञान–अनुभवज्ञान होतें, असें त्यांत सांगितलें आहे. म्हणून ज्ञान-विज्ञान हा सातव्या अध्यायाचाच विषय आहे. सतराव्यापर्यंत त्याची व्याप्ति नाहीं. प्रत्येक अध्यायांत ईश्वरा-

चेंच ज्ञान निरनिराळ्या प्रकारें सांगितलें आहे व त्याला निरनिराळें नांवहि दिले आहे. पण तेवढ्यावरून सातव्या अध्यायाचाच विषय सतराव्या अध्यायापर्यंत लांबविला आहे, असें म्हणता येत नाही. ज्ञान कोणतें तें फक्त तेराव्या अध्यायांत सांगितलें आहे. (अ. १३ श्लोक २ पृ. ८६५ पहा) ते ७-१७ अध्यायांत सांगितलें नाहीं, " पैकीं सातव्यांत व आठव्यांत क्षराक्षराचें किंवा व्यक्ताव्यक्ताचें ज्ञानविज्ञान सांगून "... वगैरे म्हणणें अयोग्य आहे. सातव्या अध्यायांत 'क्षर' व 'अक्षर' हे शब्दच नाहींत. आठव्यांत 'अक्षर' शब्द ब्रह्म या अर्थी आहे व 'क्षर' हा शब्द अधिभूत या अर्थी आहे. अर्थात् क्षर म्ह० व्यक्त व अक्षर म्ह० अव्यक्त हें म्हणणें बरोबर नाहीं. याविषयीं आम्हीं पूर्वी ( पृ. ९८७, ) बराच विचार केला असल्यामुळे येथें अधिक विस्तार नको. " ९-१२ अध्यायांत व्यक्ताचीच उपासना करणें प्रत्यक्षावगम्य अतएव सर्वांस सुलभ हा अर्थ वर्णिला आहे," हें म्हणणेंहि चिंत्य असल्याचे आम्हीं वर सांगितले आहे. ( पृ. ६८३,९८४ पहा.) " क्षराक्षरविचारांत ज्याला अव्यक्त म्हणतात तोच मनुष्याच्या शरीरातील आत्मा होय, असा क्षेत्रक्षेत्रज्ञविचार तेराव्या अध्यायात सागितला " हे म्हणणे निराधार आहे क्षराक्षर-विचारांत अव्यक्त कोणाला कोण म्हणते ? क्षराक्षरविचार हा विषयच गीतेला संमत नाहीं. चवदा ते सतरा अध्यायाचा विषय रहस्यकार समजतात तो नाही. (पृ. ९८७पहा) "ठिक-ठिकाणीं तूं कर्म कर असाच अर्जुनास उपदेश असून परमेश्वराची भक्ति करून शुद्धान्तः-करणानें 'परमेश्वरार्पणपूर्वक स्वधर्माप्रमाणे केवल कर्तव्य म्हणून आमरणान्त सर्व कर्में करीत राहणे' हा कर्मयोगपर आयुष्यक्रमणाचा मार्गच सर्वांत उत्तम, असा सिद्धान्त केला आहे" सात ते सतरा अध्यायांत 'कर्म कर' असा उपदेश असण्याचे कारणच नाहीं, 'तूं मच्चित्त हो' इत्यादि उपदेश आहे. अ. ८. श्लो. ७ यांत 'सर्वदा माझे स्मरण कर व युद्ध कर' असें एक वचन आहे. पण त्यांतहि स्मरण प्रधान आहे, युद्ध नव्हे. (गी.भा.पृ.६५२) ९ व्या अध्या-यांत 'यत्करोषि यदश्नासि' २७ असे एक कर्माभासरूप वचन आहे. पण त्यांतहि 'तूं जे जें करशील,खाशील वगैरे तें सर्व मदर्पण कर' असें म्हटले आहे.अर्थात् जे जे म्ह० सर्व शुभ व अशुभ वगैरे, त्यामुळे ते वचन कर्मयोगपर नाही. (गी.भा.पृ. ७१४,१५ पहा) दहाव्या अध्यायांत तसें कर्माभासरूपवचन एकसुद्धां नाही. अकराव्या अध्यायांत 'जित्वा शत्रून्' श्लो. ३३ व 'मत्कर्मकृत् मत्परमः' श्लो. ५५ ही दोन कर्माभास वचने आहेत. पण त्यांतहि 'कर्म कर' असा विधि नाही. ( पृ. ८१६-१८ ) १२ व्या अध्यायात 'सर्वाणि कर्माणि मयि सन्यस्य' असें वचन आहे. त्यांतहि 'कर्में ईश्वरार्पण करून अनन्ययोगानें ध्यान करणाऱ्या उपासकांचा मी उद्धार करतों' असें म्हटलें आहे. 'मत्कर्मपरमः भव' यांत मात्र ईश्वरार्थ कर्म करण्यांत तत्पर होण्याचा विधि आहे. पण तो किंवा त्या पुढील कर्मफलत्यागाचा विधि हे दोन्ही उपासक होण्याचें सामर्थ्य नसल्यास गौण पक्ष म्हणून सांगितले आहेत. यावरून कर्मयोग हा आरंभीचा-मंदाधिकाऱ्यासाठी उपाय आहे,हे उघड होतें [पृ.८३७-३८ पहा ) यावरून अ.७-१२ हें मध्यमषट्क ईश्वराचे स्वरूप सांगून त्याच्या उपासनेचें विधान करीत आहे हें उघड होते; अर्थात् हे प्रकरण कर्मपर नाही. म्हणूनच अद्वैती टीकाकार याला 'उपासनाकांड व तत्पदप्रधानप्रकरण'.म्हणून जें म्हणतात ते अगदीं बरोबर आहे. तेराव्या अध्यायाच्या २४ व्या श्लोकांत कर्मयोग हें तिसऱ्या प्रतीचें ज्ञानसाधन सांगितले आहे,

(पृ.९६६-६७) या ह्म० तेराव्या अध्यायापासून क्षेत्रज्ञ व ईश्वर म्ह०पहिल्या षडाध्यायीचा विषय ज्ञानकर्माधिकारी त्वपदार्थ केवळ क्षेत्रज्ञ व दुसऱ्या षडाध्यायीचा विषय जीवाला उपास्य असलेला ईश्वर, याचें ऐक्य सांगण्यास सुरुवात केली आहे. अर्थात् ही षडाध्यायी ज्ञानप्रधान आहे. रहस्यकारांनीं या व्यवस्थेचा पहिल्या प्रकरणांत (गी. र. पृ. १५) जरी उपहास केला असला तरी गीतेची विषयव्यवस्था तशी आहे, हें विचारांती कोणाच्याहि ध्यानात येईल. असो तेराव्या अध्यायांत 'कर्म कर' असे विधान नाही. चवदाव्या व पंधराव्या अध्यायातहि कर्माचे नावसुद्धां नाही. सोळाव्यांत—आसुरसंपत्तीचें मूळ शास्त्रविधीला सोडून वर्तन करणे हे आहे, असे सांगून 'म्हणून तू शास्त्रविधान जाणून कर्म करण्यास योग्य आहेस' असे म्हटले आहे, अर्थात् विधिनिषेधशास्त्रच मनुष्याच्या कार्याकार्याचा निर्णय करते व स्वाभाविक आसुरभाव निवृत्त होण्यासाठीं शास्त्रविधि समजून घेऊन त्याप्रमाणे कर्माधिकारी पुरुषाने कर्म करणेच उचित आहे, हे येथे सुचविलें आहे. पण तेवढ्यावरूनहि ठिकठिकाणी 'कर्मच कर' असाच उपदेश आहे, असे ठरत नाहीं. सतराव्या अध्यायांत शास्त्रविधि माहीत नसला तरी कुलपरंपरेप्रमाणे जे पूजनादि करितात त्यांच्या श्रद्धेला कोणते नाव द्यावे याचा विचार करून मनुष्याने आसुरी प्रकृति सोडून दैवी प्रकृतीचे व्हावें, यासाठीं सात्त्विक पूजा, सात्त्विक आहार, सात्त्विक यज्ञ, सात्त्विक तप व सात्त्विक दान सांगितले आहे. मनुष्याने राजस व तामस पूजा आहारादिक टाकावे, म्हणून त्याचीहि परिगणना केली आहे.शेवटीं विहित कर्म सर्वदोषपरिहारपूर्वक सात्त्विकच व्हावे म्हणून ब्रह्माच्या त्रिविध नामनिर्देशाचा विधि आहे. अर्थात् त्या निर्देशाचा उच्चार करून मुमुक्षूंनी कर्म ब्रह्मार्पण करावे, असा त्याचा आशय आहे. गीतेला कर्म कोणते विवक्षित आहे व ते कोणीं करावें त्याचा या अध्यायात पुनः स्पष्ट उलगडा केला आहे. यज्ञ, दान व तप हीं कर्में गीतेला कर्मशब्दाने विवक्षित आहेत व मुमुक्षुच तीं करितात. हे गीतेचे म्हणणें श्रुतीला मुळींच सोडून नाहीं. (बृह. भा. अ. ४ ब्रा. ४ पृ. ३३७ पहा.) अर्थात् रहस्यकारांनीं जे 'परमेश्वरार्पणपूर्वक स्वधर्माप्रमाणें' वगैरे शब्दावडंबर माजवून 'कर्मयोगपर आयुष्यक्रमणाचा मार्गच सर्वांत उत्तम' वगैरे म्हटले आहे, ते निराधार होय. तसेंच "ज्ञानमूलक व भक्तिप्रधान कर्मयोगाचे याप्रमाणे सांगोपांग विवेचन झाल्यावर त्याच धर्माचा अठराव्या अध्यायांत उपसंहार करून अर्जुनाला स्वेच्छेनें युद्ध करावयास प्रवृत्त केले" हें म्हणणेहि निराधार आहे. ज्ञानमूलक कर्मयोग शक्य नाहीं, आत्मज्ञान होताच कर्मानुष्ठानाची सामग्री संपते. भक्तिप्रधान कर्मयोग ही सुद्धां कल्पना आहे. जसा ज्ञानी तसाच सतत आत्मचिंतन करणारा भक्तहि कर्मत्यागच करणार, हे उघड आहे. अर्थात् कर्मफलत्याग ही निवृत्तिमार्गांतील पहिली पायरी, तें ईश्वरार्पण करणे ही दुसरी, सतत आत्मचिंतन—भगवद्भजन करणे ही तिसरी व स्वरूपीं स्थित होणे ही चवथी—ज्ञाननिष्ठा होय. ही शास्त्रविहित व अनुभवसिद्ध परंपरा सोडून मनसोक्त गीतार्थ सांगू लागल्यास तो केव्हांहि ग्राह्य होणें शक्य नाहीं. 'कर्मयोगाचें याप्रमाणें सांगोपांग विवेचन झाल्यावर' हे म्हणणे निराधार आहे. 'कर्मयोगाचें सांगोपांग विवेचन' गीतेंत नाहीं. गीतेंत कर्तव्याकर्तव्यशास्त्रावरून सिद्ध झालेल्या वैदिक कर्मयोगाचा फक्त अनुवाद आहे. गीतेंत कर्मयोगाचें सांगोपांग विवेचन आहे असें जे म्हणत असतील त्यांस आम्ही उघड विचारतो कीं तें कोठें आहे! त्याचें प्रत्यक्ष स्थल दाखवा. नाहीपेक्षां

आपलें म्हणणें परत घ्या. उगीच अनभिज्ञांपुढें गप्पा मारण्यांत काय अर्थ आहे ? 'अर्जुनाला स्वेच्छेने युद्ध करावयास प्रवृत्त केले ' होय; अर्जुन प्रत्यक्ष कर्मत्यागाचा अधिकारी नसतांना तामस त्याग करावयास प्रवृत्त झाला होता,स्वधर्म सोडण्यास तयार झाला होता, त्यामुळे त्याचे अकल्याण झाले असतें, श्रेय तर बाजूलाच राहिलें ! उलट नरकाची प्राप्ति झाली असती, यास्तव त्याच्या त्या तामसत्यागाचे निवारण करून त्याला सात्त्विक त्याग करावयास लाविले. पण सात्त्विक त्याग म्ह० ज्ञानोत्तर कर्मयोग हे म्हणणे सर्वथा निराधार आहे. सात्त्विक त्याग हाहि गौण संन्यासच आहे. त्यामुळे " तूं चतुर्थाश्रम धारण करून संन्यासी हो, असे अर्जुनाला सांगितले नाहीं " हे म्हणणे अप्रासंगिक होय. तसें सांगणे शास्त्राप्रमाणेच प्राप्त नाहीं. शास्त्र अनधिकाऱ्याला संन्यासाचा उपदेश करीत नाहीं. आचार्यादिकहि तसे म्हणत नाहीत " या मार्गाने वागणारा मनुष्य नित्यसन्यासी असतो " होय ना ? हें अगदी खरे ना ? मग सर्व कर्मसंन्यासपूर्वक ज्ञाननिष्ठेनेच मोक्ष मिळतो, या आचार्यांच्या म्हणण्यात दोष कोठे राहिला ? मोक्षाला सन्यास अवश्य पाहिजे; मग तो मुख्य असो, की गौण असो. कामत्याग, एषणात्याग केल्यावांचून मोक्ष शक्य नाही व खरा कामत्याग ज्ञानावांचून होणे शक्य नाहा. यास्तव रहस्यकारांनी आचार्यांचा किंबहुना वेदान्तशास्त्राचा सिद्धान्त बरोबर समजून न घेता किंवा त्याचा पूर्ण विचार न करिता नुस्त्या कल्पनेवर 'कर्मयोग' शास्त्राची जी डळमळित इमारत बांधली आहे ती विचाररूपी वाऱ्यापुढें टिकणे शक्य नाहीं. अर्थात् "चतुर्थाश्रमरूपी संन्यास घेऊन सर्व कर्मांचा केव्हा तरी खरोखरच त्याग करण्याचें तत्त्व या कर्मयोगमार्गांत आहे की नाहीं नसल्यास 'सन्यास' व 'त्याग' या दोन शब्दांचे अर्थ काय, असा अर्जुनाचा आता प्रश्न आहे. " असें जे अवतरण रहस्यकार देतात तें असबद्ध आहे. कारण कर्मयोगमार्ग जर मुळी स्वतत्र मार्गच नाहीं, तर त्या मार्गांत कर्मसन्यासाचा प्रसग कोठचा? स्वतंत्र कर्मयोगमार्ग ही कल्पनाच मुळी जर निराधार आहे, तर त्याच्या नांवावर उपस्थित केलेले प्रश्न साधार कसे ठरणार ? असो;

रहस्यकार या श्लोकावरील टीपेत म्हणतात—" भगवान् कर्मे सोडण्यास कोठेच सांगत नसून ..." ( हे म्हणणे खोटे आहे. कारण दुसऱ्या व चवथ्या अध्यायात ज्ञानलक्षण कर्मत्याग सांगितला आहे.तो जर सांगितला नसता तर तिसऱ्या व पांचव्या अध्यायातील ज्ञान व सन्यास याविषयींचा प्रश्नच उपपन्न झाला नसता. " चवथ्या, पाचव्या किंवा सहाव्या अध्यायांत ( ४ ४१, ५-१३, ६-१; ) अगर इतरत्र संन्यासाचे म्हणून जे वर्णन आहे, तेथें फक्त फलाशेचा त्याग करून ( गी. १२-११ ) सर्व कर्मांचा परमेश्वराचे ठायीं संन्यास म्ह० अर्पण करा असें त्यांनी सांगितले आहे." हें म्हणणे भ्रामक आहे. ४-४१ मध्यें 'योगसन्यास्तकर्माण ' असा शब्द आहे. त्यावरून फलत्याग हा संन्यास ठरत नाहीं. ( पृ.४६४) ५-१३ श्लोकांत तर साक्षात् कर्मत्यागच सांगितला आहे.( पृ. ५०४-५१३ ) ६.१ यांत मात्र 'कर्मफलाचा आश्रय न करितां जो कार्य कर्म करतो तो संन्यासी व योगी, असें म्हणून कर्मफलत्यागाची स्तुति केली आहे. ( पृ.५४३ ) १२-११ श्लोकांत कर्मफलत्यागाची स्तुति आहे.[पृ. ८३४] १२-६ [पृ.८२८] व ३-३०[पृ.३२८] यांत कर्मे ईश्वरार्पण करावयास सांगितलीं आहेत, हें खरें; पण फलत्याग, ईश्वरार्पण कर्में करण व 'मी कर्ता ' हा संग टाकून कर्मे करणें, हे तीन उत्तरोत्तर अधिक योग्यतेचे गौण संन्यास आहेत.गीतेंत ते तिन्ही सांगितले आहेत व मुख्य

**श्रीभगवान् उवाच**—श्रीकृष्ण म्हणाले—

**काम्यानां कर्मणां न्यासं संन्यासं कवयो विदुः ।**
**सर्वकर्मफलत्यागं प्राहुस्त्यागं विचक्षणाः ॥२॥**

**अन्वयार्थ—कवयः**—कांहीं विद्वान्—**काम्यानां कर्मणां**—काम्य कर्मांच्या—**न्यासं**—त्यागाला—**संन्यासं**—संन्यास—**विदुः**—समजतात—**विचक्षणाः** कांहीं पंडित—**सर्वकर्मफलत्यागं**—सर्व कर्मांच्या फलाच्या त्यागाला—**त्यागं**—त्याग—**प्राहुः**—म्हणतात. २.

**तत्र तत्र निर्दिष्टौ संन्यासत्यागशब्दौ न निर्लुण्ठितार्थौ पूर्वेष्वध्यायेष्वतोऽर्जुनाय पृष्टवते तन्निर्णयाय-काम्यानामश्वमेधादीनां कर्मणां न्यासं परित्यागं संन्यासं संन्यासशब्दार्थमनुष्टेयत्वेन प्राप्तस्यानुष्ठानं कवयः पण्डिताः केचिद्विदुर्विजानन्ति । नित्यनैमित्तिकानामनुष्टीयमानानां सर्वकर्मणामात्मसंबन्धितया प्राप्तस्य फलस्य परित्यागः सर्वकर्मफलत्यागस्तं प्राहुः कथयन्ति त्यागं त्यागशब्दार्थं विचक्षणाः पण्डिताः । यदि काम्यकर्मपरित्यागः फलपरित्यागो वाऽर्थो वक्तव्यः सर्वथाऽपि त्यागमात्रं संन्यासत्यागशब्दयोरेकोऽर्थो न घटपटशब्दाविव जात्यन्तरभूतार्थौ ॥**

**भाष्यार्थ—पूर्वेषु अध्यायेषु तत्र तत्र निर्दिष्टौ संन्यासत्यागशब्दौ निर्लुण्ठितार्थौ न**—पूर्वीच्या अध्यायांमध्यें ठिकठिकाणीं ज्यांचा निर्देश केला आहे अशा संन्यास व त्याग या शब्दांचा अर्थ अगदीं स्पष्ट रीतीनें कोठेंच सांगितलेला नाहीं—**अतः पृष्टवते अर्जुनाय तन्निर्णयाय** (श्रीभगवान् उवाच)—म्हणून त्या शब्दांचा पृथक् अर्थ जाणण्याच्या इच्छेनें प्रश्न करणाऱ्या अर्जुनाला त्याचा निर्णय कर-

---

कर्मसंन्यासहि सांगितला आहे. २.५५ पृ. १९४; २.६९ पृ. २२०; अ. ३.३ पृ. २५५; ३.१७, १८ पृ. २९६; ४.१८ पृ. ३९१; ४.२१-२२ पृ. ४१६; ४-२४ पृ. ४२७; ५.१३ पृ. ५०४; ६.३ पृ. ५४९ इत्यादि श्लोक पहा. शिवाय गीतेत मुख्य सन्यास सांगितलाच नाहीं, असें म्हटल्यास अर्जुनाचा पांचव्या अध्यायातील प्रश्न अनुपपन्न होतो; व वैशंपायनानें पुढें " यतीनां चापि धर्मः हरिगीतासु कथितः ' असें जे म्हटले आहे तें खोटें ठरतें. अर्थात् 'गीतेत सन्यासाचें म्हणून जें वर्णन आहे, तें फक्त फलत्यागाचें आहे,' हें म्हणणें खोटें आहे. त्यामुळें " उपनिषदांत पहावें तर 'त्यागेन अमृतत्वं आनशुः [ सार्थ नारा. द्वि. आ. पृ. ३५] 'संन्यासयोगात् यतयः शुद्धसत्त्वाः ' [ मु. भा. ३.२-६ पृ. ११३ ] ' प्रव्रजन्ति ' 'व्युत्थाय भिक्षाचर्यं चरन्ति '[बृ. भा. ४.४.२२ पृ. ३३९, ३५१] कर्मत्यागपर संन्यासवचनें आढळतात. अर्थात् भगवान् 'त्याग' व 'संन्यास' हे शब्द स्मार्त चतुर्थाश्रमाला लावीत नसून " वगैरे रहस्यकाराचें म्हणणें केवल काल्पनिक आहे. अधिकारपरत्वें चतुर्थाश्रमाचाहि गीतेंत उपदेश आहे व गौण संन्यासाचाहि गीतेंत उपदेश आहे. अधिकारविभागाची ही कल्पना बरोबर न आल्यामुळें असा घोटाळा झाला आहे. स्मार्त चतुर्थाश्रम ही कल्पनाच चुकीची आहे. स्मार्त व भागवत हे भेद आचार्यांच्या वेळचे नव्हेत त्यानंतरचे आहेत.

त्यासाठीं भगवान् म्हणाले—**काम्यानां-अश्वमेधादीनां कर्मणां न्यासं-परित्यागं संन्यासं-संन्यासशब्दार्थं अनुष्ठेयत्वेन प्राप्तस्य अननुष्ठानं कवयः—केचित् पंडिताः विदुः-विजानन्ति**—काम्य अश्वमेधादि कर्मांचा न्यास-परित्याग म्ह० संन्यास, संन्यास या शब्दाचा अर्थ म्ह० अनुष्ठान करण्यास योग्य अशा रूपानें प्राप्त झालेल्या कर्मांचें अनुष्ठान न करणें, असें कवी-कांहीं पंडित समजतात. [ स्वर्गादि फलाच्या उद्देशानें विहित असलेल्या अश्वमेधादि कर्मांचा परित्याग करणें म्ह० त्याचें अनुष्ठान न करणें, यालाच कित्येक संन्यास असें म्हणतात.]—**विचक्षणाः-पंडिताः अनुष्ठीयमानानां नित्यनैमित्तिकानां सर्वकर्मणां आत्मसंबन्धितया प्राप्तस्य फलस्य परित्यागः सर्वकर्मफलत्यागः तं त्यागं-त्यागशब्दार्थं प्राहुः-कथयन्ति**—दुसरे विद्वान् पंडित अनुष्ठान केल्या जाणाऱ्या नित्य-नैमित्तिक सर्व कर्मांच्या स्वसंबंधित्वानें प्राप्त झालेल्या फलाचा जो परित्याग, हाच सर्वकर्मफलपरित्याग, त्याला त्याग म्ह० त्यागशब्दाचा अर्थ असें सांगतात. [ नित्य-नैमित्तिक कर्मांचें कर्त्याला प्राप्त होणारें जें फल त्याचा त्यानें त्याग करणें, हाच त्यागशब्दाचा अर्थ आहे, असें कित्येक म्हणतात. तर मग त्याग आणि संन्यास या शब्दांच्या अर्थांमध्ये पुष्कळच फरक आहे; पण त्यामुळे त्याच्या लोकप्रसिद्ध अर्थाशीं विरोध येतो, असें कोणी म्हणेल म्हणून आचार्य त्यांच्या अर्थांत अवांतर भेद जरी असला तरी आत्यंतिक भेद नाहीं, असे सांगतात- ]—**यदि काम्यकर्मपरित्यागः वा फलःपरित्यागः अर्थः वक्तव्यः**—जरी काम्यकर्मांचा परित्याग किंवा फलांचा परित्याग हा अर्थ सांगावयाचा असला—**सर्वथा अपि त्यागमात्रं संन्यासत्यागशब्दयोः एकः अर्थः**—तरी म्ह० या दोन अर्थांतील कोणताहि जरी अर्थ घेतला तरी, केवळ त्याग हा संन्यास व त्याग या दोन शब्दांचा एकच अर्थ आहे—**घटपटशब्दौ इव जात्यन्तरभूतार्थौ न**—घट व पट या शब्दाच्या अर्थाप्रमाणें त्याग व संन्यास यांचा निराळ्या जातीचा अर्थ नाहीं. [ घट व पट, यांतील घटाचा अर्थ एका जातीचा व पटाचा त्याहून भिन्न जातीचा, तसा त्याग व संन्यास यांचा अर्थ नाहीं. ]

**ननु नित्यनैमित्तिकानां कर्मणां फलमेव नास्तीत्याहुः कथमुच्यते तेषां फलत्याग इति । यथा वन्ध्यायाः पुत्रत्यागः । नैष दोषः । नित्यानामपि कर्मणां भगवता फलवत्त्वस्येष्टत्वात् । वक्ष्यति हि भगवाननिष्टमिष्टमिति न तु संन्यासिनामिति च । संन्यासिनामेव हि केवलं कर्मफलासंबन्धं दर्शयन्नसंन्यासिनां नित्यकर्मफलप्राप्तिं 'भवत्यत्यागिनां प्रेत्य' इति दर्शयति ॥२॥**

**भाष्यार्थ**—( यावर आक्षेप- )—**ननु नित्यनैमित्तिकानां कर्मणां फलं एव नास्ति इति आहुः**—अहोपण, नित्य व नैमित्तिक कर्मांचें फलच नाहीं असें सांगतात.—**तेषां फलत्यागः इति कथं उच्यते**—तेव्हां त्यांच्या फलाचा त्याग असें कसें सांगितलें जात आहे.—**यथा वन्ध्यायाः पुत्रत्यागः**—ज्याप्रमाणें वंध्येचा पुत्रत्याग ( संभवत नाहीं, त्याप्रमाणें नित्य कर्मांचा फलत्याग संभवत नाहीं. या आक्षे-

पाचें समाधान-)—**एषः दोषः न**—हा दोष येत नाहीं—**भगवता नित्यानां अपि कर्मणां फलवत्त्वस्य इष्टत्वात्**—कारण भगवानांनी नित्य कर्मांचें फलवत्त्व मानलेलें आहे. [ म्ह० नित्य कर्मांचेंहि फल असतें, असें भगवानाचें मत आहे-]—**हि भगवान् 'अनिष्टं इष्टं०' इति वक्ष्यति**—कारण भगवान् अनिष्ट, इष्ट व मिश्र असें कर्मांचें त्रिविध फल पुढें बाराव्या श्लोकांत सांगणार आहेत—**च न तु संन्यासिनां इति**—पण संन्याश्यांना मात्र तसें त्रिविध कर्मफल प्राप्त होत नाहीं, असेंहि तेथेंच सांगतील.—**संन्यासिनां एव हि केवलं कर्मफलासंबंधं दर्शयन्**—केवल संन्याश्यांचाच कर्मफलाशीं कांहीं संबंध नाहीं असें दाखविणारे भगवान्—**'भवति अत्यागिनां प्रेत्य' इति असंन्यासिनां नित्यकर्मफलप्राप्तिं दर्शयति**—'त्याग न करणाऱ्यांना मरणोत्तर त्रिविध कर्मफल प्राप्त होतें' या वचनानें असंन्याश्यांना नित्य कर्मांच्या फलाची प्राप्ति होते, असें दाखवितात. २

---

१ या श्लोकावरील टीपेत रहस्यकार म्हणतात—" कर्मयोगमार्गांत संन्यास व त्याग कशाला म्हणावयाचें ते या श्लोकात स्पष्ट सांगितलें आहे. " ( या व याच्या पुढील श्लोकांत संन्यासाचे चार प्रकार सांगितले आहेत. त्यांतील दुसरा प्रकार भगवानांना इष्ट असून तोच 'सात्त्विक त्याग' म्हणून अर्जुनाला सांगणार आहेत.हे सर्व विकल्प कर्माधिकारी गृहस्थाच्या गौण त्यागाविषयीं आहेत. या गौण विकल्पांनी ज्ञाननिष्ठा व तिची इतिकर्तव्यता-सर्वकर्मसंन्यास यांचा बाध होत नाहीं. तथापि-) " पण संन्यासमार्गी टीकाकारास हे मत ग्राह्य नसल्यामुळें त्यांनी या श्लोकाची बरीच ओढाताण केली आहे " ( ती कशी काय ? ) " श्लोकांत प्रथमच काम्य शब्द आहे. म्हणून मीमांसकाचे नित्य, नैमित्तिक, काम्य व निषिद्ध इ० कर्मांचे भेद या ठिकाणी विवक्षित असून पैकीं काम्य तेवढी कर्मे सोडावीं असा भगवंतांचा उपदेश आहे, असें त्यांचें म्हणणे आहे. " ( कर्मांचे नित्यादि प्रकार मीमांसकांच्या पदरचे नसून ते वैदिक आहेत. यास्तव वैदिक संप्रदायीं गीतेंतील 'काम्य कर्मे' हा शब्द 'स्वर्गादि फलोद्देशानें सांगितलेली कर्मे' या अर्थींच घेतला पाहिजे. त्याचा दुसरा कांहीं अवैदिक व काल्पनिक अर्थ करितांच येत नाहीं. मध्वाचार्य—" फलानिच्छया अकरणेन वा काम्यकर्मणा न्यासः संन्यासः, फलत्यागः एव त्यागः " म्ह० फलाची इच्छा न करितां किंवा तीं मुळींच न करिता जो काम्यकर्मत्याग तो संन्यास व नुस्ता फलाचा त्याग हा त्याग असें म्हणतात. रामानुजाचार्य म्हणतात—'अथ अनयोः एक एव स्वरूपं तच्च ईदृशं इति निर्णेतु वादिविप्रतिपत्तिं दर्शयन्-काम्यानां कर्मणां न्यासं स्वरूपत्याग संन्यासं विदुः' म्ह० आता त्याग व संन्यास यांचें एकच स्वरूप आहे व ते अशा प्रकारचें आहे, असा निर्णय करण्यासाठीं वाद्यांचा मतभेद दाखविणारे भगवान् म्हणतात—काम्यकर्मांचा न्यास म्ह० स्वरूपत्याग, त्याला संन्यास म्हणतात व 'नित्यानां नैमित्तिकानां काम्यानां च सर्वेषां कर्मणां फलत्यागः एव मोक्षशास्त्रेषु त्यागशब्दार्थः' म्ह० नित्य, नैमित्तिक व काम्य अशा सर्व कर्मांचा फलत्याग हाच मोक्षशास्त्रांत त्याग सांगितला आहे. नीलकंठ, मधुसूदनसरस्वती, शंकरानंद, वल्लभसंप्रदायी अ. त. टीकाकार, श्रीधर फार काय पण ज्ञानेश्वरमहाराजहि असेंच याचें व्याख्यान करितात. विस्तारभयास्तव त्यांचीं त्यांचीं मूळ वचनें देत नाहीं. सर्व टीकाकारांची याविषयीं एकवाक्यता असल्यामुळें एकट्या रहस्यकारांचेंच म्हणणे

ग्राह्य मानतां येत नाहीत. शिवाय 'काम्य कर्मे' कोणती तें वैदिक परिभाषेप्रमाणे ठरलें आहे. वैदिकोत्तम व्यासांनी योजलेला तो शब्द आहे. तेव्हां त्याचा अर्थ रहस्यकारांच्या कल्पनेप्रमाणे कसा संभवेल ? तो वैदिककर्मकांडाच्या परिभाषेप्रमाणेंच घेतला पाहिजे. अर्थात् रहस्यकारांनी संन्यासमार्गी टीकाकारावर केलेला ओढातार्णाचा आरोप निराधार आहे. ) "परंतु संन्यासमार्गातील लोकांस नित्य आणि नैमित्तिक कर्मेंहि नको असतात." ( हे म्हणणे किती असत्य व त्यामुळेच धाडसाचे आहे, तें वाचकांनी वरील भाष्यार्थ पाहूनच ठरवावें. कोणीहि वैदिकसंप्रदायी टीकाकार पापक्षय व चित्तशुद्धि यासाठींच विहित असलेलीं नित्यनैमित्तिक कर्मे नकोत, असे म्हणत नाहीं व म्हणणार नाहीं. गीतेवरील वाटेल ती अद्वैती टीका पहा. ) "म्हणून नित्य-नैमित्तिक कर्मांचा समावेश काम्यकर्मातच येथे केलेला आहे, असे त्यास प्रतिपादन करावे लागले आहे." ( हेहि म्हणणे साफ खोटे आहे. भाष्य वाचकापुढें आहेच. दोन व तीन या श्लोकात गौण त्याग किंवा सन्यास याचे चार विकल्प सांगितले आहेत, असे त्यांचें म्हणणे आहे. तेव्हां दुसऱ्यांची मतें सांगताना ते असे म्हणतील कशाला ? हे भगवानाचे मत किंवा सिद्धान्त आहे, असें जर त्यांना सांगावयाचे असते तर त्यांनी त्यात कांहीं न्यूनाधिक प्रतिपादन केलेंहि असते. पण येथे तसा कांहींच प्रकार नाहीं. शिवाय गीतेवरील कोणतीहि टीका जरी घेतली, तरी तीत रहस्यकार म्हणतात तसें कोणीच म्हटलेले आढळत नाहीं. कदाचित् "नित्यानां अपि कर्मणां भगवता फलवत्त्वस्य इष्टत्वात्" असें जे आचार्यांनी वर भाष्यात म्हटलेआहे, त्यावरून रहस्यकारांना तसा भ्रम झाला असेल, पण तो सन्यासमार्गी टीकाकाराचा दोष नव्हे. ) "इतके झाले तरी या श्लोकाच्या दुसऱ्या अर्धात फलाशा सोडावी, कर्मे सोडू नयेत असे जे म्हटले आहे ( पुढे ६ वा श्लोक पहा. ) त्याची सगति लागत नसल्यामुळे अखेर कर्मयोगमार्गाची भगवतांनी ही पोकळ स्तुति केली आहे, भगवतांचा खरा अभिप्राय कर्मे सोडावीं असाच आहे, असा आपल्या पदरचाच शेरा मारून या टीकाकारांनी आपले समाधान करून घेतले आहे." ( पण कर्माधिकाऱ्याने कर्मे सोडावींत, असें आचार्य किंवा वेदान्तशास्त्रहि म्हणत नाहीं. येथे रहस्यकार म्हणतात तसा अर्थ कोणी केलेला नाहीं. कदाचित् बाराव्या अध्यायातील बाराव्या श्लोकातील कर्मफलत्यागाला उद्देशून त्यांचे हे म्हणणे असेल. पण तेथे व इतरत्र (पृ. ११२७) कर्मफलत्यागाची स्तुति करण्याचे कारणहि सांगितले आहे. स्तुति पोकळ नसते. ती विहित कर्मादिकांची प्रशंसा करून त्याविषयीं रुचि उत्पन्न करणारी असते, वगैरे आम्ही पूर्वी सांगितलेच आहे. [गी. भा. पृ. ४८६, ८३९ पहा.] पण येथे त्याचा कांहीं संबंध नाहीं. येथे सर्व कर्मफलत्यागाला त्याग म्हणतात, असे एकदेशी मत सांगावयाचें आहे, व तें अद्वैती टीकाकारांनी रहस्यकारापेक्षाहि अधिक सुबोधपणे सांगितले आहे. विस्तारभयास्तव उतारे देत नाहीं. जिज्ञासूंनी शंकरानन्द-मधुसूदनादिकांच्या टीका पहाव्या.) पुढे रहस्यकार म्हणतात— "सन्यासादिसांप्रदायिक दृष्टीने या श्लोकाचा अर्थ नीट लागत नाहीं, हे उघड होते." ( स्वर्ग-पशु-पुत्र इत्यादि कामनाप्रयुक्त फलांना उद्देशून विहित असलेल्या अश्वमेध, इष्टि, पशु, सोम, इत्यादि काम्य कर्मांचा न्यास हा संन्यास व 'अहरहः संध्यां उपासीत यावज्जीव अग्निहोत्रं जुहुयात्' इत्यादि वचनांवरून प्राप्त झालेल्या नित्य-नैमित्तिक कर्मांचे अनुष्ठान करून फक्त फलाचा त्याग करणें हा त्याग होय, असें

विद्वान् म्हणतात, हा या श्लोकाचा 'नीट' अर्थ नव्हे, असे वाटणें, हें दुर्दैवच म्हटलें पाहिजे ! बरें, सर्व टीकाकार चुकले, तुम्ही तरी याचा ' नीट अर्थ ' कसा काय लावतां तो पाहूं बरें ? ) " याचा खरा अर्थ कर्मयोगपर म्ह० फलाशा सोडून आमरणान्त सर्व कर्मे करण्याचे जे तत्त्व पूर्वी गीतेंत अनेक वेळां सांगितलें आहे, त्याच्याच अनुरोधानें लाविला पाहिजे व तो सरळ लागतोहि. " (म्ह० मरेपर्यंत प्रत्येक मनुष्यानें कर्मेच करीत राहिले पाहिजे, असा आग्रह येथें आहे, असे त्यांचें म्हणणें आहे. पण गीतेचा तसाच ठाम सिद्धान्त असणें शक्य नाहीं. कर्मयोग ज्ञाननिष्ठेचे साधन आहे. वास्तव ज्ञाननिष्ठेची योग्यता प्राप्त होतांच कर्मयोग संपतो. यावज्जीवादि श्रुतिवचने व तदनुसार गीतेची वगैरे वचने कर्मयोगाधिकाऱ्यासाठी आहेत. याविषयीं पूर्वी पुष्कळ लिहिले आहे. म्हणून येथे विस्तार नको. पण रहस्यकार याचा सरळ अर्थ कसा काय लावितात ते पाहूं या–) "कर्मयोगमार्गांत सर्व कर्मांचे 'काम्य' म्ह० फलाशा धरून केलेलीं आणि निष्काम म्ह० फलाशा सोडून केलेलीं असे दोनच वर्ग करीत असतात. " ( पण या तुमच्या कर्मयोगमार्गाला आधार काय ? हीं नुसती तुमची निराधार कल्पनाच दिसते. कारण या तुमच्या वर्गीकरणाला मूळ श्रुति-स्मृतींचा आधार नाहीं, असे कोणी म्हणेल म्हणून रहस्यकार ह्मणतात–) " मनुस्मृतींत त्यास अनुक्रमें ' प्रवृत्त ' कर्म व ' निवृत्त ' कर्म अशीं नावें दिलेलीं आहेत. मनु. १२.८८–८९." मनुस्मृतीतील वचनांचा उल्लेख आम्ही पूर्वी [ पृ. १७६ ] केला आहे. त्यात ' वैदिक कर्म दोन प्रकारचे आहे. एक प्रवृत्त व दुसरें निवृत्त. जे इहलोकच्या किंवा परलोकच्या फलाचे साधन म्हणून सांगितलेले कर्म, तेंच काम्य असून त्यालाच प्रवृत्त कर्म ह्मणतात. कारण तें संसारप्रवृत्तीचे निमित्त होते व जे दृष्टादृष्टफलकामनारहित असलेलें ब्रह्मज्ञानाभ्यासपूर्वक कर्म तें निवृत्त होय. कारण ते संसारनिवृत्तीचे निमित्त होतें, असे म्हटले आहे. त्यावरून वेदोक्त काम्य कर्म हे प्रवृत्त–संसाराला कारण होणारे व नित्यनैमित्तिकादि चित्तशोधक कर्म हें निवृत्त–मोक्षाला कारण होणारे, एवढेच ठरते. नित्य, नैमित्तिक, काम्य, निषिद्ध हे श्रौतस्मार्त कर्मांचे भेद त्यावरून बाधत होत नाहीत. अर्थात् " कर्मे नित्य असोत, नैमित्तिक असोत, काम्य असोत, कायिक, वाचिक, मानसिक, सात्त्विक, राजस तामस वगैरे कोणत्याहि प्रकारचीं असलीं तरी तीं ' काम्य ' आणि ' निष्काम ' या दोन वर्गांपैकीं कोणत्या तरी एका वर्गात आलींच पाहिजेत" वगैरे जे म्हणणें आहे, तें पुनरुक्तप्रायच नव्हे का ? कारण हें म्हणणें प्रमाणसिद्ध असल्यामुळे वेदान्ती टीकाकारानाहि मान्यच आहे. तसेंच " कर्मयोगी सर्व प्रकारचीं काम्य कर्मे अजीबात सोडतो " हें म्हणणेहि फारसें अनिष्ट नाहीं. फारसें म्हणण्याचे कारण ' कर्मयोगी ' या शब्दाऐवजी कर्माधिकारी मुमुक्षु असें म्हणणें अधिक सयुक्तिक झालें असतें, काम्य कर्म संसारप्रवृत्तीचे बीज होत असल्यामुळें मुमुक्षु त्याचा त्याग करितो व निष्काम कर्मे परपरेने संसारनिवृत्तीला–मोक्षाला कारण होत असल्यामुळें तीं आचरितो, याबद्दल वाद नाहीं व ' सर्व प्रकारचीं काम्य कर्मे ' याचा अर्थ श्रौत-स्मार्त काम्य कर्मे असाच घेतला पाहिजे, आणि श्रौतस्मार्त सर्व काम्य कर्मे सोडल्यावर जी राहतात तीं नित्य नैमित्तिकच राहतात, हेंहि विसरता कामा नये. अर्थात् रहस्यकारांनीं " कर्मयोगमार्गांतहि काम्य कर्मांचा संन्यास करावा लागतो, निष्काम कर्मांतहि फलाशेचा सर्वस्वीं त्याग करावा लागतो (६.२) " वगैरे 'लटपट' करून अखेर " ब्रह्म-

चारी, गृहस्थ, वानप्रस्थ अशा क्रमाने शेवटीं प्रत्येकाने सर्व कर्मत्यागरूप संन्यास अगर चतुर्थाश्रम घेतल्यावांचून मोक्षप्राप्तिच होत नाही, हें स्मार्त मत येथे प्रतिपाद्य नाही '' वगैरे जें म्हटलें आहे ते शास्त्रपरिभाषेला सोडून अतएव अग्राह्य होय. कारण रहस्यकार म्हणतात त्याप्रमाणे सर्व वैदिक कर्मांचे सकाम व निष्काम, असे दोन भाग करून त्यांतील सकाम कर्में टाकल्यावर निष्काम कर्मांत आणखी फलाशा राहिली कोठची ? या श्लोकांत भगवान् सिद्धान्त सांगत आहेत, अशी असत् कल्पना केल्यामुळें हा घोटाळा त्यांना करावा लागला. भगवान् इतर मताचा अगोदर उपन्यास करीत आहेत, असें इतर सर्व टीकाकारांप्रमाणे त्यांनीहि मानलं असते, तर असा असमर्थनीय घोटाळा झाला नसता. चार आश्रमांचें तत्त्व जर गीतेला मान्य नसेल तर तिला तरी प्रमाण कोण मानणार ? अगोदर वर्ण व आश्रम हे स्मार्त नव्हेत. कारण रहस्यकारांनी ज्या प्रवृत्त व निवृत्त कर्मासाठीं मनूचा [ अ. १२ श्लो. ८९–९० ] उल्लेख केला, त्याच्याच पुढें 'यथोक्तान्यपि कर्माणि परिहाय द्विजोत्तमः । आत्मज्ञाने शमे च स्यात् वेदाभ्यासे च यत्नवान् ॥ ' ९२ ' या वेदबाह्याः स्मृतयो याश्च काश्च कुदृष्टयः । सर्वास्ताः निष्फलाः प्रेत्य तमोनिष्ठाः हि ताः स्मृताः ' ॥ ९५ ॥ चातुर्वर्ण्यं त्रयो लोकाश्चत्वारश्चाश्रमाः पृथक् । भूतं भव्यं भविष्यं च सर्वं वेदात्प्रसिद्ध्यति ॥ ' ९७ इत्यादि वाक्यें आहेत. त्यांचा भावार्थ—हीं वेदोक्त अग्निहोत्रादि कर्मेंहि सोडून—त्याचा परित्याग—संन्यास करून द्विजोत्तमानें ब्रह्माचे ध्यान, इद्रियजय, प्रणवजप, उपनिषदाचा अभ्यास, याविषयीं यत्न करावा. ९२. ज्या वेदबाह्य स्मृति व तशाच ज्या कुदृष्टि—असत्तर्कमूलक वेदविरुद्ध मतें, ती सर्व परलोका निष्फल होतात. कारण ती नरक हे फल देणारी, म्हणून मन्वादिकांनीं सांगितलेली आहेत. ९५. चातुर्वर्ण्य, तीन लोक, चार आश्रम, भूत, वर्तमान, भविष्य इत्यादि सर्व वेदावरूनच सिद्ध होते. ९७. अर्थात् वर्णाश्रम वेदोक्त आहेत. त्यांना स्मार्त म्हणणे हा अन्याय आहे. अर्थात् गीता, श्रीकृष्ण किंवा व्यास वेदोक्त संन्यास-आश्रमाचा निषेध करतील ही कल्पनाच खोटी आहे. ( पृ. ५४० ते ५४५ पहा. ] रहस्यकाराची ही कुदृष्टि असल्यामुळे 'प्रेत्य निष्फल' आहे. गीतार्थाची खरी ओढाताण रहस्यकारानीं केली आहे व खरा आग्रह त्यांनी धरला आहे. गीतार्थावर सारवण त्यांनी घातलें आहे. गीतेचा अगदी यथार्थ व निर्दोष अर्थ एकट्या आचार्यांनीच केला आहे. असो, शेवटी ते म्हणतात—" संन्याशाचा भगवा वेष घेऊन कर्मयोगी सर्व कर्मांचा त्याग करीत नसला, तरी तो सन्यासाचे खरे तत्त्व पाळीत असल्यामुळे कर्मयोगाचा स्मृतिग्रंथाशीं विरोध नाहीं, असे यावरून सिद्ध होतें." पण नुसत्या भगव्या वेषाला आचार्य तरी मुख्य संन्यास कोठें म्हणतात ! तेहि संन्यासाच्या खऱ्या तत्त्वालाच खरा सन्यास म्हणतात. पण ते तत्त्व म्ह० केवल निष्काम कर्मानुष्ठान नव्हे, तर 'तत्त्वज्ञाच्या कर्तृत्वाभिमानाचा पूर्णपणे त्याग ' हेच ते तत्त्व आहे. खरा सर्वकर्मसंन्यासी तोच होय. [ याच अध्यायाच्या अकराव्या श्लोकावरील भाष्याची शेवटची ओळ पहा. ] हें सन्यासाचें खरें तत्त्व पाळणारा नियत कर्में करीत असला तरी कर्मयोगी नव्हे, तो परमार्थ संन्यासीच आहे आणि अशा संन्यासावांचून सद्योमुक्ति मिळणें शक्य नाहीं, हें आचार्यांचें म्हणणे कोणालाहि खोडून काढतां येणें शक्य नाहीं.

**त्याज्यं दोषवदित्येके कर्म प्राहुर्मनीषिणः ।**
**यज्ञदानतपःकर्म न त्याज्यमिति चापरे ॥ ३ ॥**

**अन्वयार्थ—एके मनीषिणः**—कांहीं विद्वान्—**दोषवत् कर्म**—दोषांनीं युक्त असलेलें कर्म—**त्याज्यं**—टाकावें—**इति प्राहुः**—असें म्हणतात.—**च अपरे**—आणि दुसरे कांहीं पंडित—**यज्ञदानतपःकर्म**—यज्ञ, दान व तप एतद्रूप कर्म—**न त्याज्यं**—त्याज्य नाहीं,—**इति (आहुः)**—असे म्हणतात. ३.

**त्याज्यं दोषेति । त्याज्यं त्यक्तव्यं दोषवद्दोषोऽस्यास्तीति दोषवत् । किं तत्कर्म बन्धहेतुत्वात्सर्वमेव । अथवा दोषो यथा रागादिस्त्यज्यते तथा त्याज्यमित्येके प्राहुर्मनीषिणः पण्डिताः सांख्यादिदृष्टिमाश्रिता अधिकृतानां कर्मिणामपीति । तत्रैव यज्ञदानतपःकर्म न त्याज्यमिति चापरे । कर्मिण एवाधिकृतानपेक्ष्यैते विकल्पा न तु ज्ञाननिष्ठान्व्युत्थायिनः संन्यासिनोऽपेक्ष्य । ज्ञानयोगेन सांख्यानां निष्ठा मया पुरा प्रोक्तेति कर्माधिकारादपोध्दृता ये न तान्प्रति चिन्ता ॥**

**भाष्यार्थ—'त्याज्यं दोष०' इति**—'त्याज्यं०' या श्लोकानें काम्य कर्मांचा त्याग करून नित्यनैमित्तिक कर्मे फलाभिलाष सोडून करावीं, हा पूर्वोक्त, पक्ष प्रतिपक्षाचें निरसन करून दृढ करण्यासाठीं वाद्यांचा आणखी मतभेद सांगतात—**त्याज्यं-त्यक्तव्यं**—त्याज्य म्ह० त्याग करण्यास योग्य आहे,—**दोषवत्-दोषः अस्य अस्ति इति दोषवत्**—दोष ज्याला आहे ते दोषवत्—**किं तत्**—ते काय?—**सर्वं एव कर्म**—सर्वच कर्म.—( पण सर्वच कर्म दोषवत् कसें? )—**बंधहेतुत्वात्**—ते बंधाला कारण होत असल्यामुळे दोषवत् आहे—**अथवा दोषः रागादिः यथा त्यज्यते तथा त्याज्यं**—किंवा रागादि दोष जसा सोडला जातो, त्याप्रमाणें कर्म सोडावे—**इति एके सांख्यादिदृष्टिं आश्रिताः मनीषिणः-पण्डिताः प्राहुः**—असें सांख्यादिकांच्या दृष्टीचा-मताचा आश्रय केलेले मनीषी-पंडित सांगतात. [ अहोपण, कर्मांचा ज्याना अधिकार नाहीं,अशा लोकांनीच कर्मांचा त्याग करणें उचित आहे,कर्माधिकाऱ्यांना नाहीं,कारण त्यांना कर्मत्याग केल्यास प्रत्यवाय लागतो,असें कोणी म्हणेल म्हणून सांख्यांच्याच म्हणण्याचा अनुवाद-]—**अधिकृतानां कर्मिणां अपि इति**—कर्माधिकारी पुरुषानें सुद्धां दोषाप्रमाणे कर्मत्याग करावा असे ते म्हणतात.-[ कारण कर्माधिकारी पुरुषानेंहि कर्मे जरी टाकलीं तरी त्यांत कांहीं प्रत्यवाय नाहीं. उलट हिंसादियुक्त कर्म केल्यासच फार मोठा प्रत्यवाय-दोष लागतो, असें सांख्यांचे म्हणणे आहे. आतां मीमांसकांचा पक्ष सांगतात-]—**तत्र एव यज्ञदानतपःकर्म न त्याज्यं इति च अपरे**—त्या कर्माधिकारी पुरुषांविषयींच यज्ञ, दान, तप व नित्य-नैमित्तिक कर्मे यांचा त्याग करूं नये असें आणखी कित्येक म्हणतात. ( दोन व तीन या श्लोकांत कर्मी अकर्मी, अधिकृत, अनधिकृत या सर्वांना उद्देशून हे विकल्प सांगितले आहेत, असें कोणी म्हणेल, म्हणून आचार्य सांगतात-)—**कर्मिणः एव अधिकृतान् अपेक्ष्य**

**एते विकल्पाः**—कर्माधिकारी-कर्मठ पुरुषांनाच उद्देशून हे विकल्प आहेत—**तु ज्ञाननिष्ठान् व्युत्थायिनः संन्यासिनः अपेक्ष्य न**—आणि पुत्रादि एषणात्रयाविषयीं विरक्त होऊन संन्यास करणाऱ्या संन्यासी ज्ञाननिष्ठांना उद्देशून-त्यांच्या अपेक्षेनें हे विकल्प नाहींत—'**ज्ञानयोगेन सांख्यानां निष्ठा मया पुरा प्रोक्ता' इति कर्माधिकारात् अपोद्धृताः ये तान् प्रति चिन्ता न**—ज्ञानयोगानें सांख्यांची निष्ठा पूर्वीं सांगितली ( ३. ३) असे म्हणून कर्माधिकारापासून ज्यांना अगदीं पृथक् केले त्यांच्यासाठी हा विचार नाही. [ तर कर्माधिकारी पुरुषांविषयींच हा येथील विचार आहे. ]

**ननु कर्मयोगेन योगिनामित्यधिकृताः पूर्वं विभक्तनिष्ठा अपीह सर्वशास्त्रोपसंहारप्रकरणे यथा विचार्यन्ते तथा सांख्या अपि ज्ञाननिष्ठा विचार्यन्तामिति । न। तेषां मोहदुःखनिमित्तत्यागानुपपत्तेः। न कायक्लेशनिमित्तानि दुःखानि सांख्या आत्मनि पश्यन्तीच्छादीनां क्षेत्रधर्मत्वेनैव दर्शितत्वात् । अतस्ते न कायक्लेशदुःखभयात्कर्म परित्यजन्ति । नापि ते कर्माण्यात्मनि पश्यन्ति । येन नियतं कर्म मोहात्परित्यजेयुः । गुणानां कर्म नैव किंचित्करोमीति हि ते संन्यस्यन्ति । सर्वकर्माणि मनसा संन्यस्येत्यादिभिर्हि तत्त्वविदः संन्यासप्रकार उक्तः। तस्माद्येऽन्येऽधिकृताः कर्मण्यनात्मविदो येषां च मोहात्त्यागः संभवति कायक्लेशभयाच्च त एव तामसास्त्यागिनो राजसाश्चेति निन्द्यन्ते कर्मिणामनात्मज्ञानां कर्मफलत्यागस्तुत्यर्थम् ॥**

**भाष्यार्थ**—( अहोपण, पूर्वीं कर्माधिकारी पुरुषांची ज्ञाननिष्ठेहून अगदीं निराळी निष्ठा जरी सांगितली असली तरी त्यांचा या उपसंहार प्रकरणांत पुनः विचार करणें जसें उचित आहे, त्याचप्रमाणे ज्ञाननिष्ठांचाहि येथे विचार करणें उचितच आहे. त्यांत विरुद्ध कांहीच नाही, अशी शंका-)—**ननु 'कर्मयोगेन योगिनां' इति अधिकृताः पूर्वं विभक्तनिष्ठाः अपि इह सर्वशास्त्रोपसंहारप्रकरणे यथा विचार्यन्ते**—अहोपण, 'कर्मयोगाने योग्यांची' असे म्हणून कर्माधिकाऱ्यांसाठीं पूर्वीं अगदी स्वतंत्र-निराळी निष्ठा जरी सांगितली आहे तरी या सर्वशास्त्रोपसंहारप्रकरणांत त्यांचा जसा विचार केला जात आहे—**तथा सांख्याः अपि ज्ञाननिष्ठाः विचार्यन्तां इति**—त्याप्रमाणे ज्ञाननिष्ठ सांख्यांचाहि येथे विचार केला जावो, असे म्हणाल तर—[ तिसऱ्या अध्यायांत कर्माधिकारी पुरुषांची कर्मनिष्ठा अगदीं पृथक् सांगितलेली असतांनाहि या उपसंहार प्रकरणांत त्या कर्माधिकाऱ्यांचा पुनः जसा विचार केला जात आहे. त्याचप्रमाणें तेथेच सांगितलेल्या ज्ञाननिष्ठांचाहि या प्रकरणांत विचार व्हावा, हें उचित आहे, अशी आशंका घेऊन आचार्य म्हणतात-]—**न। तेषां मोहदुःखनिमित्तत्यागानुपपत्तेः**—परमार्थ ज्ञानामध्यें तत्पर झालेल्या ज्ञाननिष्ठांचा येथे विचार करावयाचा नाहीं. कारण मोह व दुःख यांच्या निमित्ताने होणारा जो त्याग त्याचा ज्ञाननिष्ठांमध्यें संभव नाहीं, ज्ञाननिष्ठांचा मोहदुःखनिमित्तक त्याग संभवत नाहीं. ( कारण-)—**सांख्याः कायक्लेशनिमित्तानि दुःखानि आत्मनि न पश्यन्ति**—

सांख्य-परमार्थज्ञाननिष्ठ शरीराच्या क्लेशामुळें होणारीं दुःखें आत्म्यामध्यें पहात नाहींत.—**इच्छादीनां क्षेत्रधर्मत्वेन एव दर्शितत्वात्**—कारण इच्छादिक हे क्षेत्राचे धर्म आहेत, असेच वर प्रदर्शित केलें आहे. ( अ. १३ श्लो. ६ पृ. ९०९)—**अतः ते कायक्लेशदुःखभयात् कर्म न परित्यजन्ति**—त्यामुळे ते सांख्य-ज्ञानीशरीर-क्लेशाच्या व दुःखाच्या भीतीनें कर्माचा परित्याग करीत नाहीत.—**ते कर्माणि अपि आत्मनि न पश्यन्ति**—ते-सांख्य कर्मेंहि आत्म्यामध्ये पहात नाहीत—**येन नियतं कर्म मोहात् परित्यजेयुः**—की ज्या कारणानें नियत कर्माचा मोहाने परित्याग करतील !—'**गुणानां कर्म**' '**नैव किंचित् करोमि**' **इति हि ते संन्यस्यन्ति**—कर्म शरीरेंद्रियरूप गुणांचें आहे. ( ३ २८ पृ. ३२४ ) 'मी आत्मा कांहीं करीत नाहीं, ' ( ५.८ पृ. ४९९ ) असे समजूनच ते कर्मसंन्यास करितात.—'**सर्वकर्माणि मनसा संन्यस्य**' ( ५-१३ पृ ५०४ ) **इत्यादिभिः हि तत्त्वविदः संन्यासप्रकारः उक्तः**—' सर्व कर्माचा मनाने संन्यास करून ' इत्यादि वाक्यांनी तत्त्ववेत्त्यांच्या संन्यासाचा प्रकार सांगितला आहे.—**तस्मात् ये अन्ये कर्मणि अधिकृताः अनात्मविदः**—यास्तव जे ज्ञाननिष्ठांहून निराळे असलेले, कर्मामध्येच अधिकृत असलेले अनात्मज्ञ-आत्म्याला न जाणणारे—**च मोहात् च कायक्लेशभयात् येषां त्यागः संभवति**—व मोहामुळे व शरीरक्लेशाच्या भीतीमुळे ज्यांचा त्याग संभवतो—**ते एव तामसाः च राजसाः त्यागिनः इति**—तेच तामस व राजस त्यागी आहेत, असे म्हणून—**अनात्मज्ञानां कर्मिणां कर्मफलत्यागस्तुत्यर्थं निन्द्यन्ते**—आत्म्याला साक्षात् न जाणणाऱ्या कर्मठांच्या कर्मफलत्यागाची स्तुति करण्यासाठी त्यांची निंदा केली जाते. [ ज्ञाननिष्ठ पुरुष इच्छा-द्वेषादि हे सर्व क्षेत्रधर्म समजतात व कर्मे आत्म्याची आहेत असेहि समजत नाहीत. त्यामुळें त्यांचा मोह-दुःख इत्यादि निमित्ताने कर्मत्याग संभवत नाही. ते कर्म शरीरेंद्रियांची आहेत, आत्म्याची नव्हेत, असे समजून त्यांचा त्याग करितात. यास्तव ज्या अनात्मज्ञ कर्मठांचा मोहाने व शरीरक्लेशाच्या भीतीने त्याग संभवतो त्यांची येथे राजस व तामस म्हणून निंदा केली आहे. पण त्या निंदेचाहि हेतु अज्ञ कर्मठांच्या कर्मफलत्यागाची स्तुति करावी, हा आहे. कारण अज्ञांना चित्तशुद्धीसाठी कर्मफलत्याग विहित आहे. ]

**सर्वारम्भपरित्यागी मौनी संतुष्टो येन केनचिदनिकेतः स्थिरमतिरिति गुणातीतलक्षणे च परमार्थसंन्यासिनो विशेषितत्वात् । वक्ष्यति च ज्ञानस्य या परा निष्ठेति । तस्माज्ज्ञाननिष्ठाः संन्यासिनो नेह विवक्षिताः । कर्मफलत्याग एव सात्त्विकत्वेन गुणेन तामसत्वाद्यपेक्षया संन्यास उच्यते न मुख्यः सर्वकर्मसंन्यासः ॥**

**भाष्यार्थ**—( शिवाय परमार्थ संन्याश्यांची गीतेंत प्रशंसाच केलेली असल्यामुळे ते निंदेचा विषयच होऊं शकत नाहींत, असे सांगतात-)—**सर्वारंभपरित्यागी** ( १२. १६ पृ. ८५० )'**मौनी संतुष्टः येनकेनचित् अनिकेतः स्थिरमतिः**' ( १२·१९,

८५२ ) **इति**—सर्व आरंभांचा-कर्मांचा परित्याग करणारा, मौनी, जें कांहीं प्राप्त होईल त्यानें संतुष्ट होणारा, ज्याचें एक नियत-निवासस्थान नाहीं, ज्याची परमार्थविषयक बुद्धि स्थिर असते, असें भगवद्भक्ताच्या लक्षणांत—**च गुणातीतलक्षणे परमार्थसंन्यासिनः विशेषितत्वात्**– व गुणातीताच्या लक्षणांत परमार्थ संन्याशाचें विशिष्टत्व सांगितलें आहे.त्याचप्रमाणें या उपसंहार प्रकरणात 'सिद्धि प्राप्तो यथा'(श्लो.५०)या श्लोकात —'**निष्ठा ज्ञानस्य या परा' इति च वक्ष्यति**—जी ज्ञानाची परा निष्ठा आहे, असें म्हणून पुढें ज्ञाननिष्ठा सांगणार आहेत.—**तस्मात् ज्ञाननिष्ठाः संन्यासिनः इह न विवक्षिताः**—तस्मात् ज्ञाननिष्ठ संन्यासी येथे विवक्षित नाहीत. तर—**कर्मफलत्यागः एव सात्त्विकत्वेन गुणेन तामसत्वादि-अपेक्षया संन्यासः उच्यते** —कर्मफलत्यागच सात्त्विकत्व या गुणानें तामसत्वादिकाच्या अपेक्षेने संन्यास म्हटला जातो. [ म्ह० येथें कर्मफलत्यागालाच सात्त्विक त्याग या गुणामुळें संन्यास म्हटलें आहे. अर्थात् हा गौण संन्यास होय. त्याला तामस व राजस त्यागाच्या अपेक्षेनें संन्यास म्हटले आहे. ]—**न मुख्यः सर्वकर्मसंन्यासः**—सात्त्विक त्याग हा खरा-मुख्य संन्यास नव्हे.

**सर्वकर्मसंन्यासासंभवे च न हि देहभृतेति हेतुवचनान्मुख्य एवेति चेत्। न, हेतुवचनस्य स्तुत्यर्थत्वात्। यथा त्यागाच्छान्तिरनन्तरमिति कर्मफलत्यागस्तुतिरेव यथोक्तानेकपक्षानुष्ठानाशक्तिमन्तमर्जुनमज्ञं प्रति विधानात्तथेदमपि न हि देहभृता शक्यमिति कर्मफलत्यागस्तुत्यर्थं वचनम्। न सर्वकर्माणि मनसा संन्यस्य नैव कुर्वन्न कारयन्नास्त इत्यस्य पक्षस्यापवादः केनचिद्दर्शयितुं शक्यः। तस्मात्कर्मण्यधिकृतान्प्रत्येवैष संन्यासत्यागविकल्पः। ये तु परमार्थदर्शिनः सांख्यास्तेषां ज्ञाननिष्ठायामेव सर्वकर्मसंन्यासलक्षणायामधिकारो नान्यत्रेति न ते विकल्पार्हाः। तथोपपादितमस्माभिर्वेदाविनाशिनमित्यस्मिन्प्रदेशे तृतीयादौ च ॥ ३ ॥**

**भाष्यार्थ**—( अहोपण, संन्यासशब्दानें कर्मफलसंन्यास हा मुख्य संन्यासच घेणें उचित आहे. कारण मुख्य व गौण अर्थातील मुख्य अर्थच समजणें उचित असते, अशी आशंका-)—**च सर्वकर्मसंन्यासासंभवे 'न हि देहभृता०' इति हेतुवचनात् मुख्यः एव इति चेत्**—आणि सर्व कर्मांचा संन्यास अशक्य आहे, सर्वकर्मसंन्यासाचा असंभव आहे, याविषयीं 'न देहभृता शक्यं०' हें हेतुबोधक वचन प्रमाण असल्यामुळें येथील संन्यास मुख्यच आहे गौण नव्हे म्हणून म्हणाल तर—**न, हेतुवचनस्य स्तुत्यर्थत्वात्**—तें बरोबर नाही. कारण 'न हि देहभृता०' हें हेतुवचन कर्मफलत्यागाच्या स्तुतीसाठी आहे. ( याविषयी दृष्टान्त-)—'**यथा त्यागात् शान्तिः अनन्तरं**' ( अ. १२ श्लो. १२ पृ. ८३५ )—**इति कर्मफलत्यागस्तुतिः एव**— ज्याप्रमाणें 'कर्मफलत्यागानंतर लागलीच शाति' या पूर्वोक्त वचनानें कर्मफलत्यागाची स्तुतिच केलेली आहे, कारण—**यथोक्त-अनेकपक्ष-अनुष्ठान-अशक्तिमन्तं अज्ञं अर्जुनं प्रति विधानात्**—वर सांगितलेल्या अनेक पक्षांचें अनुष्ठान करण्याचें सामर्थ्य नसलेल्या अनात्मज्ञ अर्जुनाला उद्देशून त्या कर्मफलत्यागाचें विधान केलें आहे.

[ पण दृष्टान्तांत तरी स्तुति काय म्हणून घ्यावयाची ? उत्तर—कारण ज्ञानावांचून नुस्त्या कर्मफलत्यागानेंच मुक्ति मिळणे शक्य नाहीं, शिवाय ' अद्वेष्टा०' इत्यादि पुढच्याच श्लोकापासून ज्ञानसाधनांचें जें विधान केलें आहे तेंहि नुस्त्या कर्मफलत्यागानेंच मोक्ष मिळतो, असें म्हटल्यास अनुपपन्न होतें. यास्तव त्या कर्मफलत्यागाला स्तुतिच म्हणणें उचित आहे. ]—**तथा इदं अपि ' न हि देहभृता शक्यं०' इति कर्मफलत्यागस्तुत्यर्थं वचनं**—तसेच ' न हि देहभृता०' हेंहि कर्मफलत्यागाच्या स्तुतीसाठीं वचन आहे. कारण—**' सर्वकर्माणि मनसा संन्यस्य ' ' नैव कुर्वन् न कारयन् आस्ते '**—' सर्व कर्मांचा मनाने त्याग करून ' ' स्वतः कांहीं न करितांच व दुसऱ्याकडून न करवितांच शरीररूपी नगरांत राहतो '—**इति अस्य पक्षस्य अपवादः केनचित् दर्शयितुं न शक्यः**—अशा या पक्षाचा अपवाद कोणालाहि दाखवितां येणें शक्य नाही.—**तस्मात् कर्माणि अधिकृतान् प्रति एव एषः संन्यासत्यागविकल्पः**—म्हणून कर्मामध्यें अधिकृत असलेल्या कर्मठासाठींच हा संन्यास व त्याग यांचा विकल्प आहे.—**तु ये परमार्थदर्शिनः सांख्याः तेषां सर्वकर्मसंन्यासलक्षणायां ज्ञाननिष्ठायां एव अधिकारः**—पण जे परमार्थदर्शी सांख्य त्यांचा सर्वकर्मसंन्यासरूप ज्ञाननिष्ठेतच अधिकार आहे—**न अन्यत्र**—कर्मामध्यें त्यांचा अधिकार नाहीं.—**इति ते विकल्पार्हाः न**—त्यामुळें ते अशा विकल्पांना पात्रच नाहीत. त्यांच्याविषयीं असा विकल्पच करितां येत नाहीं, आणि—**तथा ' वेदाविनाशिनं ' इति अस्मिन् प्रदेशे च तृतीयादौ अस्माभिः उपपादितं**—तसेंच ' वेदाविनाशिनं०' ( अ. २ श्लो. २१ पृ. १०० ) व तृतीय अध्यायादिकांमध्यें आम्हीं उपपादन केले आहे. ३.

## निश्चयं शृणु मे तत्र त्यागे भरतसत्तम ।
## त्यागो हि पुरुषव्याघ्र त्रिविधः संप्रकीर्तितः ॥४॥

**अन्वयार्थ—हे भरतसत्तम**—हे भरतश्रेष्ठा अर्जुना !—**तत्र त्यागे**—त्या त्यागाविषयीं—**मे निश्चयं**—माझा निश्चय—**शृणु**—ऐक.—**हे पुरुषव्याघ्र**—हे पुरुषश्रेष्ठा अर्जुना !—**त्यागः**—त्याग—**त्रिविधः**—तीन प्रकारचा—**संप्रकीर्तितः हि**—सांगितलेला आहे. ४.

**तत्रैतेषु विकल्पभेदेषु—निश्चयं शृण्ववधारय मे मम वचनात्तत्र त्यागे त्यागसंन्यासविकल्पे यथादर्शिते भरतसत्तम भरतानां साधुतम । त्यागो हि त्यागसंन्यासशब्दवाच्यो हि योऽर्थः स एक एवेत्यभिप्रेत्याऽऽह त्यागो हीति । पुरुषव्याघ्र त्रिविधस्त्रिप्रकारस्तामसादिप्रकारैः संप्रकीर्तितः शास्त्रेषु सम्यक्कथितः । यस्मात्तामसादिभेदेन त्यागसंन्यासशब्दवाच्योऽर्थोऽधिकृतस्य कर्मिणोऽनात्मज्ञस्य त्रिविधः संभवति न परमार्थदर्शिन इत्ययमर्थो दुर्ज्ञानस्तस्मादत्र तत्त्वं नान्यो वक्तुं समर्थः । तस्मान्निश्चयं परमार्थशास्त्रार्थविषयमध्यवसायमैश्वरं शृणु ॥ ४ ॥**

**भाष्यार्थ—तत्र एतेषु विकल्पभेदेषु**—गौणसंन्यासाविषयीं असे हे विकल्पाचे प्रकार रूढ असतांना—**भरतसत्तम-भरतानां साधुतम मे-मम वचनात् तत्र यथादर्शिते त्यागे-त्यागसंन्यासविकल्पे निश्चयं शृणु अवधारय**—हे भरतकुलोत्तमा! माझ्या वचनावरून-माझ्या सांगण्यावरून तूं वर दाखविलेल्या प्रकारच्या त्यागाविषयीं-त्याग व संन्यास यांच्या विकल्पाविषयी निश्चय ऐक. त्याविषयींचा निश्चय माझ्या वचनावरून तूं कर. (तोच आपला निश्चय दाखविण्यासाठीं भगवान् प्रथम त्यागांतील अवान्तर भेद सागतात-)—**त्यागः हि-त्यागसंन्यासशब्दवाच्यः हि यः अर्थः सः एकः एव इति अभिप्रेत्य 'त्यागः हि' इति आह**—कारण त्याग म्ह० त्याग व संन्यास या शब्दांनी वाच्य असा जो अर्थ तो एकच आहे, असा आशय मनांत ठेवून-अशा अभिप्रायानें भगवान् 'त्यागः हि' इत्यादि सांगतात—**पुरुषव्याघ्र त्रिविधः-तामसादिप्रकारैः त्रिप्रकारः सप्रकीर्तितः शास्त्रेषु (सम्यक् कथितः**—हे पुरुषश्रेष्ठा! त्याग त्रिविध तामसादिप्रकारांनीं तीन प्रकारचा सांगितलेला आहे. शास्त्रांमध्ये उत्तम प्रकारें सागितलेला आहे.—**यस्मात् अनात्मज्ञस्य अधिकृतस्य कर्मिणः त्यागसंन्यासशब्दवाच्यः अर्थः तामसादिभेदेन त्रिविधः संभवति**—ज्याअर्थी अनात्मज्ञ कर्माधिकाऱ्याचा संन्यास व त्याग या शब्दांनी वाच्य असलेला अर्थ तामसादिभेदानें तीन प्रकारचा संभवतो—**न परमार्थदर्शिनः इति अयं अर्थः दुर्ज्ञानः**—व परमार्थदर्शी पुरुषाच्या त्यागाचा असा त्रिविध भेद संभवत नाहीं, म्हणून हा अर्थ अतिशय दुर्ज्ञान आहे, त्याचें ज्ञान होणें फार कठिण आहे—**तस्मात् अत्र तत्त्वं वक्तुं अन्यः न समर्थः**—त्याअर्थी या त्यागाविषयींचे तत्त्व सागण्यास माझ्यावाचून दुसरा कोणी समर्थ नाहीं.—**तस्मात् ऐश्वरं निश्चयं-परमार्थशास्त्रार्थविषयं अध्यवसायं शृणु**—म्हणून तूं मज ईश्वराचा निश्चय-परमार्थशास्त्रार्थाविषयीं म्ह० खऱ्या शास्त्रार्थाविषयीं निर्णय ऐक. ४.

**यज्ञदानतपःकर्म न त्याज्यं कार्यमेव तत्।**
**यज्ञो दानं तपश्चैव पावनानि मनीषिणाम् ॥५॥**

**अन्वयार्थ—यज्ञदानतपःकर्म**—यज्ञ, दान व तप हें कर्म—**न त्याज्यं**—टाकूं नये,—**तत्**—तर ते—**कार्यं एव**—अवश्य करावेंच.—**यज्ञः दानं च तपः एव**—यज्ञ, दान व तप—**मनीषिणां पावनानि**—विद्वानांना पावन करणारीं आहेत. ५

**कः पुनरसौ निश्चय इत्यत आह—यज्ञो दानं तप इत्येतत्त्रिविधं कर्म न त्याज्यं न त्यक्तव्यं कार्यं करणीयमेव तत्। कस्माद्यज्ञो दानं तपश्चैव पावनानि विशुद्धिकारणानि मनीषिणां-फलानभिसंधीनामित्येतत् ॥ ५ ॥**

**भाष्यार्थ—पुनः असौ निश्चयः कः**—पण तो निश्चय कोणता?—**इति अतः आह**—तें भगवान् सांगतात—**यज्ञः दानं तपः इति एतत् त्रिविधं कर्म न त्याज्यं-न त्यक्तव्यं**—यज्ञ, दान व तप असें हें त्रिविध-तीन प्रकारचें कर्म टाकूं

नये, या त्रिविध कर्मांचा त्याग करूं नये.—**तत् कार्यं-करणीयं एव**—तें कर्म अवश्य केलेंच पाहिजे.—**कस्मात्**—कोणत्या कारणानें बरें तें अवश्य केलेंच पाहिजे ?—**मनीषिणां-फलानभिसंधीनां इति एतत्**—विद्वानांना म्ह० फलाची इच्छा न करणारांना, असा याचा भावार्थ—**यज्ञः दानं च तपः एव पावनानि-विशुद्धिकारणानि**—यज्ञ, दान आणि तप हींच कर्में पावन करणारीं-विशुद्धीचीं कारणें आहेत-[ फलाची इच्छा न करता यज्ञ, दान व तप हीं कर्में करणारांची चित्तशुद्धि होते. ] ५.

एतान्यपि तु कर्माणि संगं त्यक्त्वा फलानि च ।
कर्तव्यानीति मे पार्थ निश्चितं मतमुत्तमम् ॥६॥

**अन्वयार्थ**—**तु**—पण—**हे पार्थ**—हे अर्जुना !—**एतानि कर्माणि अपि**—हीं कर्में सुद्धां—**संगं च फलानि त्यक्त्वा**—कर्तृत्वाभिमान व फलें टाकून—**कर्तव्यानि**—करावीं—**इति**—असें—**मे**—माझें—**निश्चितं उत्तमं मतं**—निश्चित उत्तम मत आहे. ६.

एतान्यपीति । एतान्यपि तु कर्माणि यज्ञदानतपांसि पावनान्युक्तानि सङ्गमासक्तिं तेषु त्यक्त्वा, फलानि च तेषां त्यक्त्वा परित्यज्य कर्तव्यानीत्यनुष्ठेयानीति मे मम निश्चितं मतमुत्तमम् । निश्चयं शृणु मे तत्रेति प्रतिज्ञाय पावनत्वं च हेतुमुक्त्वैतान्यपि कर्माणि कर्तव्यानीत्येतन्निश्चितं मतमुत्तममिति प्रतिज्ञातार्थोपसंहार एव नापूर्वार्थं वचनमेतान्यपीति प्रकृतसंनिकृष्टार्थतोपपत्तेः । सासङ्गस्य फलार्थिनो बन्धहेतव एतान्यपि कर्माणि मुमुक्षोः कर्तव्यानीत्यपिशब्दस्यार्थो न त्वन्यानि कर्माण्यपेक्ष्यैतान्यपीत्युच्यते ॥

**भाष्यार्थ**—**'एतान्यपि०' इति**—'एतान्यपि०' या श्लोकानें भगवान् आपल्या निश्चयाचा उपसंहार करितात.—**एतानि अपि तु कर्माणि-यज्ञ-दान-तपांसि पावनानि उक्तानि**—पण हीं कर्मेंहि म्ह० यज्ञ, दान व तप-ज्यांना पूर्व श्लोकांत पावन करणारीं म्हणून म्हटलें तीं यज्ञादिक कर्में—**संगं-तेषु आसक्तिं त्यक्त्वा**—संगाला म्ह० त्या कर्मांविषयींच्या आसक्तीला सोडून—**च तेषां फलानि त्यक्त्वा-परित्यज्य**—आणि त्यांचीं फलें टाकून म्ह० फलांचा परित्याग करून—**कर्तव्यानि इति-अनुष्ठेयानि इति मे-मम निश्चितं उत्तमं मतं**—यज्ञादि कर्में करावीं-त्यांचें अनुष्ठान करावें, असें माझें निश्चित उत्तम मत आहे. ( याप्रमाणें श्लोकाचा अक्षरार्थ सांगून तात्पर्यार्थ सांगतात-)—**' निश्चयं शृणु मे तत्र ' इति प्रतिज्ञाय**—' त्याविषयीं माझा निश्चय ऐक ' अशी प्रतिज्ञा करून—**पावनत्वं च हेतुं उक्त्वा**—आणि ' पावनत्व ' हा हेतु सांगून—**एतानि अपि कर्माणि कर्तव्यानि इति एतत् निश्चितं उत्तमं मतं इति प्रतिज्ञातार्थोपसंहारः एव**—हीं कर्में सुद्धां संग व फल सोडून करावीं, असें हें निश्चित उत्तम मत आहे, हा

वरील प्रतिज्ञात अर्थाचाच उपसंहार आहे.—**' एतान्यपि० ' इति वचनं अपूर्वार्थं न**—' एतानि अपि० ' हें वचन पूर्वी प्रकृत नसलेला अपूर्व अर्थ सांगण्यासाठीं नाहीं. —**प्रकृतसंनिकृष्टार्थतोपपत्तेः**—कारण ' एतानि ' या शब्दाला प्रकृत संनिकृष्ट-अर्थत्व असणेंच युक्त आहे. [ एतानि म्ह० हीं, या शब्दाचा प्रकृत व जवळ असलेला विषय-हाच अर्थ उपपन्न होतो. यास्तव ' एतानि ' या शब्दानें पूर्वप्रकृत व नुक्तीच वर सांगितलेलीं यज्ञ दान-तप हीं नित्य कर्मेंच घेणें उचित आहे. आतां ' अपि ' या शब्दाचा विवक्षित अर्थ दाखवितात-]—**सासंगस्य फलार्थिनः बन्धहेतवः अपि एतानि कर्माणि मुमुक्षोः कर्तव्यानि इति अपिशब्दस्य अर्थः**—आसक्तीनें युक्त असलेल्या फलार्थी पुरुषाच्या बन्धाला कारण होणारींहि हीं कर्में मुमुक्षूनें अवश्य आचरावीं, असा अपिशब्दाचा अर्थ आहे. [ यज्ञादि कर्में कर्तृत्वाभिमान व फलेच्छा यांनीं युक्त असलेल्या पुरुषाच्या बंधाला जरी कारण होत असलीं तरी मुमुक्षूनें त्यांचें अवश्य आचरण करावें, असें ' अपि ' या शब्दानें सुचविलें आहे. ]—**तु अन्यानि कर्माणि अपेक्ष्य ' एतानि अपि ' इति न उच्यते**—पण अन्य कर्मांच्या अपेक्षेनें ' हीं कर्में सुद्धां करावीं ' असें येथें सांगितलें जात नाहीं. [ म्ह० दुसरीं कर्में करावीं व त्यांच्याबरोबर हीं कर्में सुद्धां करावीं, अशा आशयानें येथें 'एतान्यपि ' हीं कर्में सुद्धां करावीं, असें म्हटलेलें नाहीं. अर्थात् ' एतानि ' म्ह० पूर्वप्रकृत यज्ञ दान-तपः-कर्में व ' अपि ' म्ह० तीं जरी कर्तृत्वाभिमान व फलाभिलाष यांनीं युक्त असलेल्या पुरुषाला बद्ध करणारी असलीं तरी, असा या शब्दांचा अर्थ आहे. ]

**अन्ये वर्णयन्ति नित्यानां कर्मणां फलाभावात्सङ्गं त्यक्त्वा फलानि चेति नोपपद्यते । एतान्यपीति यानि काम्यानि कर्माणि नित्येभ्योऽन्यान्येतान्यपि कर्तव्यानि किमुत यज्ञदानतपांसि नित्यानीति । तदसत्, नित्यानामपि कर्मणां फलवत्त्वस्योपपादितत्वात् । यज्ञो दानं तपश्चैव पावनानीत्यादिवचनेन नित्यान्यपि कर्माणि बन्धहेतुत्वाशङ्कया जिहासोर्मुमुक्षोः कुतः काम्येषु प्रसङ्गः 'दूरेण ह्यवरं कर्म ' इति च निन्दितत्वात् । 'यज्ञार्थात्कर्मणोऽन्यत्र ' इति च काम्यकर्मणां बन्धहेतुत्वस्य निश्चितत्वात् । 'त्रैगुण्यविषया वेदाः ' ' त्रैविद्या मां सोमपाः ' 'क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति ' इति च । दूरव्यवहितत्वाच्च न काम्येष्वेतान्यपीति व्यपदेशः ॥ ६ ॥**

**भाष्यार्थ**—( ' एतान्यपि० ' हे वाक्य नित्यकर्मविषयक नाहीं, या मताचा उपन्यास करितात-)—**अन्ये वर्णयन्ति**—दुसरे व्याख्यानकार याचें असें वर्णन करितात—**नित्यानां कर्मणां फलाभावात् संगं त्यक्त्वा फलानि च इति न उपपद्यते**—नित्यकर्मांच्या फलाचाच अभाव असल्यामुळें म्ह० नित्यकर्मांचें फलच नसल्यामुळें ' संग व फळें सोडून ' हें भगवानांचें म्हणणें उपपन्न होत नाहीं. यास्तव **' एतानि अपि० ' इति० यानि नित्येभ्यः अन्यानि काम्यानि कर्माणि एतानि अपि कर्तव्यानि**—' एतानि अपि० ' या वचनानें जीं नित्यकर्मांहून पृथक् असलेलीं काम्यकर्में तींहि करावीं —**यज्ञ-दान-तपांसि नित्यानि इति किमुत**—मग

यज्ञ,दान व तप हीं नित्य कर्मे करावींच हें काय सांगावयास पाहिजे ? [नित्यकर्मांचें फलच नसल्यामुळें तीं संग व फल यांचा त्याग करून करावी, हें म्हणणेंच उत्पन्न होत नाहीं, म्हणून ' एतान्यपि ' या शब्दांनी नित्य कर्माहून अगदीं पृथक् असलेलीं जीं काम्य कर्मे तींहि करावीं, असें ठरतें आणि काम्य कर्मेंहि करावयास पाहिजेत असें जर भगवान् सांगत आहेत तर नित्य कर्मे अवश्य केलींच पाहिजेत, हे काय सांगावें ? असा याचा भावार्थ कित्येक वर्णितात. पण नित्य कर्मांचें फलच नाहीं, असें जे वाद्याचें म्हणणें आहे तेंच अनुपपन्न आहे, असें आचार्य सांगतात-]—**तत् असत्**—हें म्हणणें बाधित होणारें आहे, बरोबर नाहीं.—**नित्यानां अपि कर्मणां फलवत्त्वस्य उपपादितत्वात्**—नित्य कर्मांचेंहि फलवत्त्व· नित्य कर्मांचेहि फल आहे, तीं निष्फल नाहींत, असें आम्ही पूर्वी उपपादन केलें आहे. ( गी. भा. पृ. ८८ )—**'यज्ञो दानं तपश्चैव पावनानि ' इत्यादिवचनेन नित्यानि अपि कर्माणि बन्धहेतुत्वाशंकया जिहासोः मुमुक्षोः कुतः काम्येषु प्रसंगः**—' यज्ञ, दान व तप हीं पावन करणारीं आहेत. ' या वचनानें सांगितलेलीं नित्य कर्मेंहि बंधाला कारण होणारीं आहेत, या भीतीनें सोडण्याची इच्छा करणाऱ्या मुमुक्षूचा काम्य कर्मामध्यें प्रसंगच कोठचा ? [ नित्य कर्मेंहि पुण्याच्या योगानें बद्ध करणारीं आहेत, असें समजून त्यांचाहि त्याग करणाऱ्या मुमुक्षूला काम्य कर्मांची प्राप्तिच नाहीं. पावन करणारीं नित्य कर्मेंहि सोडणारा काम्य कर्मांत प्रवृत्त होईल, हें संभवत नाहीं. शिवाय ]—**' दूरेण ह्यवरं कर्म० ' इति च निन्दितत्वात्**—' कर्म अत्यंत निकृष्ट आहे ' या वचनानें भगवानांनीं काम्य कर्मांची निन्दा केलेली आहे. [ त्यामुळें मुमुक्षूला तीं अनुष्ठेयच नाहींत. तसेच काम्य कर्मे मुमुक्षूला अपेक्षित असलेला जो मोक्ष त्याच्या विरुद्ध आहेत. त्यामुळेंहि त्याला तीं अनुष्ठेय नाहींत, असें सांगतात-]—**' यज्ञार्थात्कर्मणोऽन्यत्र ' इति च काम्यकर्मणां बन्धहेतुत्वस्य निश्चितत्वात्**—' यज्ञार्थात् कर्मणः ' या वचनानें काम्य कर्मांचें बंधहेतुत्व निश्चित झालेलें आहे. [ ईश्वरार्थ केलेल्या कर्माहून इतर कर्मे बंधाला कारण होतात ही गोष्ट ' यज्ञार्थात्० ' (अ. ३.९ पृ. २७९) या वचनानें भगवानांनीं निश्चित केली आहे. **'त्रैगुण्यविषया वेदाः'**-संसार हा वेदांचा विषय आहे. (२.४५ पृ.१६४)—**' त्रैविद्या मां सोमपाः०'**—सोमपान करणारे वैदिक माझें यजन करून स्वर्गगतीची इच्छा करितात. ( अ. ९ श्लो. २० पृ. ७०५ )—**'क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति' इति च**—आणि पुण्य क्षीण झालें असतां मर्त्यलोकांत प्रवेश करितात, असें सांगितलें आहे. त्यावरूनहि काम्य कर्मांचें बंधकत्व सिद्ध होतें.—**च दूरव्यवहितत्वात् न काम्येषु 'एतानि अपि' इति व्यपदेशः**—आणि पूर्व श्लोकांत यज्ञादि कर्मे प्रकृत असल्यामुळें व '०एतत् ' या समीपवाची-समीप या अर्थाच्या शब्दानें त्यांचाच परामर्श केलेला असल्यामुळें व ' काम्यानां कर्मणां ' (श्लो. २ पृ. ११८) येथील दूरच्या काम्य कर्मांचा ' एतत् ' त्या शब्दानें परा-

मर्श होऊं शकत नसल्यामुळे ' एतानि अपि ' या शब्दांनीं काम्य कर्मांचा निर्देश केला आहे, असें मानतां येत नाही. ६

---

१ रहस्यकार या श्लोकांना असे अवतरण देतात—" आतां संन्यासमार्ग व मीमांसक यांच्यामधील कर्माबद्दलच्या वादाचा उपन्यास करून कर्मयोगशास्त्राचा त्या बाबतींतील अखेर निर्णय सांगतात " तिसऱ्या श्लोकार्तील पहिला पक्ष हा संन्यासमार्गाचा पक्ष आहे, असे रहस्यकार समजतात व त्या श्लोकार्धाचा अर्थ असा करितात—" कर्म दोषयुक्त म्हणून त्याचा सर्वस्वी त्याग करावा, असें कित्येक पंडित म्हणतात. " पण हा अर्थ मुळाला धरून नाहीं. मूळ शब्द " त्याज्य दोषवत् इत्येके कर्म प्राहुः मनीषिणः " असे आहेत. ' एके मनीषिणः दोषवत् कर्म त्याज्यं इति प्राहुः ' कांहीं विद्वान् दोषयुक्त कर्मांचा त्याग करावा, असे सांगतात. किंवा ' एके मनीषिणः कर्म दोषवत् त्याज्य इति प्राहुः ' कांही विद्वान् कापिल सांख्य कर्मे दोषाप्रमाणे टाकावी असे सांगतात, हा त्याचा सरळ अर्थ आहे. पण रहस्यकार ' कर्म दोषवत् अतः तत् सर्वथा त्याज्य ' असा ओढाताणीने अन्वय लावून अर्थ करितात. आचार्य 'हा पक्ष कापिल सांख्याचा आहे' असे म्हणतात व रहस्यकार तो वेदान्त्यांचा म्हणतात. आचार्य भगवद्गीता हे वेदान्ताचे प्रकरण आहे असे मानतात; गीतेंतील सर्व वर्णन उपनिषदांना अनुसरून असल्यामुळे व ब्रह्मसूत्रातहि तिचा 'स्मृति' म्हणून उल्लेख केलेला असल्यामुळे तसे मानणे सर्वथा युक्तहि आहे.पण रहस्यकार त्याला स्वतंत्र प्रकरण मानतात. ( गी. र. पृ. १२ वगैरे ) व वेदान्त्यांच्या म्ह० संन्यासमार्गीयांच्या कांही सिद्धान्तांचेहि खंडन करून भगवानांनी आपलें भागवत मत म्ह० कर्मयोगशास्त्र यांत प्रतिपादिले आहे, असे समजतात. पण त्याला आधार कांही नाहीं.ही त्यांची नुसती कल्पना आहे. वेदान्त्याचें अद्वैत तेवढे गीतेला मान्य आहे, संन्यास मान्य नाहीं. प्रकृति-पुरुष-विवेक वगैरे सर्व कापिल सांख्याचे सिद्धान्त तिला संमत आहेत,असेहि त्यांचे म्हणणे आहे. संन्यासमार्गाचा पूर्वपक्ष कल्पून त्याचे निरसन केल्याचे यांत त्यांनी ठिकठिकाणी दाखविलें आहे,पण सांख्यांचे तसे खंडन केल्याचे कोठेहि दाखविले नाही. यावरूनच रहस्याला किती मान द्यावयाचा ते तज्ज्ञ वाचकांना कळेल. असो,

रहस्यकारांनी या श्लोकाच्या पूर्वार्धाचा अर्थ असा ओढाताणीने करून तो संन्यासमार्गीयांचा पक्ष म्हणून दाखविण्याचा जरी यत्न केला आहे तरी तो सपशेल चुकला आहे.कारण अद्वैती वेदान्ती ' कर्म दोषयुक्त म्हणून त्याचा सर्वस्वी त्याग करावा ' असे म्हणत नाहीत. त्यांचा असा पक्षच नाहीं. त्यांचा तसा पक्ष जर असता तर आचार्यांनी 'त्वं कर्म एव कुरु । न तूष्णीं आसनं संन्यासः अपि न कर्तव्यः ।' तू कर्मच कर. मुकाट्याने बसणे,हेहि करू नये व संन्यासहि करूं नये' (गी. भा. पृ. ३८५ ) असे म्हटले नसते. 'सहजं कर्म सदोष अपि न त्यजेत्—सहजस्य कर्मणः स्वधर्माख्यस्य परित्यागेन परधर्मानुष्ठाने अपि दोषात् नैव मुच्यते भयावहश्च परधर्मः...तस्मात् न त्यजेत् ' असें ( श्लोक १८.४८ )स्पष्ट म्हटले नसतें. अर्थात् रहस्यकारांनी संन्यासमार्गीयांवर लादलेला हा मिथ्या आरोप आहे,याविषयी आतां कोणाचीहि खात्री झाल्यावांचून रहाणार नाही. "कर्मांचा दोष म्ह० बंधकत्व कर्मांत नाही. फलाशेत आहे" हे म्हणणे रहस्यकारांचें किंवा त्यांच्या कर्मयोगाचें नसून वेदान्तशास्त्राचें आहे (गी.भा.

पृ.५७,२७९,३८३ वगैरे पहा, पण रहस्यकार त्यांच्याच म्हणण्याचा त्यांच्याच विरुद्ध कसा उपयोग करून घेतात तो पहा. हे तरी एक मोठें कौशलच आहे. ! " सर्व कर्में दोषयुक्त अतएव त्याज्य होत, हें संन्यासमार्गांतलें मत गीतेस संमत नाही. (गी. १८.४८-४९.) " हे म्हणणें खोटें आहे, हे आम्ही आतांच वर दाखविलें आहे. गीतेचें मत निराळें व वेदान्तशास्त्राचें निराळें हा निव्वळ भ्रम आहे. " गीता फक्त काम्य कर्मोचा सन्यास करावयास सांगत आहे" हेहि म्हणणे खोटें आहे.कारण गीता सर्वकर्मसंन्यासहि सांगते. (गी.भा. पृ.१००-११५,५०४ पहा) "पण धर्मशास्त्रांत प्रतिपादिलेलीं सर्व कर्में काम्यच असल्यामुळें" ( हाहि भ्रम आहे. कर्में वेद व स्मृति ह्या दोन्ही प्रमाणग्रंथांत सांगितलीं आहेत व तीं सर्वच काम्य नाहीत. तीं नित्य, नैमित्तिक, काम्य व निषिद्ध अशी चार प्रकारचीं आहेत. अर्थात् ) "त्यांचाहि संन्यास करावा, असें आतां प्राप्त होते, पण तसे केले तर यज्ञचक्र बुडून सृष्टि उध्वस्त होण्याचा प्रसग येतो तेव्हां करावे काय ? " ( रहस्यकारांची ही भीति फुकट आहे. कारण यज्ञचक्र बुडाले तरी सृष्टि उध्वस्त होत नाही, हें आता अनुभवानेंच सिद्ध झाले आहे. हल्ली रहस्यकारांचे यज्ञचक्र आहे कोठें ? ते पार बुडून गेले आहे, तथापि ' सृष्टि उध्वस्त ' झाली नाही ? म्हणजे ३.१६ या श्लोकांचा अर्थ ते समजतात-तसा नाहीं. [ गी. भा. पृ. २९३-९५ ] शिवाय सृष्टीची काळजी रहस्यकारांना किंवा आमच्यासारख्या जीवांना कशाला हवी? ती सृष्टिकर्त्याला आहे. पण रहस्यकार म्हणतात-) " गीता या प्रश्नाचें उत्तर असे देते की, यज्ञ-दानादि कर्में स्वर्गादि फलप्राप्त्यर्थ करा म्हणून शास्त्रांत जरी सांगितले असले तरी यज्ञ, दान व तप करणें इ. माझे कर्तव्य होय, अशा निष्काम बुद्धीने लोकसंग्रहार्थ हींच कर्में कारितां येत नाहीत असे नाही. म्हणून लोकसंग्रहार्थ स्वधर्माप्रमाणे दुसरीं निष्काम कर्में जशीं करावयाचीं तशीं यज्ञदानादि कर्मेंसुद्धा फलाशा व आसक्ति सोडून केलीं पाहिजेत. कारण तीं नेहमीच ' पावन ' म्ह० चित्तशुद्धिकारक किंवा परोपकारबुद्धि वाढविणारीं आहेत. " ( नित्य व नैमित्तिक कर्में स्वर्गादिफलप्राप्त्यर्थ सागितलेलीं नाहीत. त्याचा विनियोग पापक्षयाकडे केला आहे. त्यांच्या योगाने लोकसंग्रह होणें शक्य नाही. लोकसग्रहशब्दाचा सृष्टीचे धारण-पोषण हा अर्थ बरोबर नाहीं. सृष्टीचे धारण-पोषण करण्याचा जीवाचा अधिकार नाही. तो बिचारा ' अवश-' कर्मपरतंत्र असल्यामुळें स्वतःचें धारण-पोषण करण्यासहि जर समर्थ नाही तर सृष्टीचे धारण-पोषण कसें करणार ! ती नुस्ती रहस्यकारांची कल्पना आहे. अर्थात् ' दुसरी कर्में जशीं करावयाची०' वगैरे त्याचें म्हणणें निरर्थक आहे. पावन म्ह० चित्तशुद्धिकारक हें म्हणणें बरोबर आहे. पण पावन म्ह० परोपकारबुद्धि वाढविणारी हा अर्थ ओढाताणीचा आहे. त्याला शास्त्रांत कांहीं प्रमाण नाही. ' एतान्यपि ' याचा अर्थ " इतर निष्काम कर्मांप्रमाणें हीं यज्ञ-दानादि कर्मेंसुद्धां " असा करितात. पण इतर निष्काम कर्में तीं कोणतीं ? लौकिक कर्में निष्काम संभवतच नाहीत. स्वतःसाठी नसली तरी दुसऱ्यासाठीं तरी लौकिक कर्में असतात. पण दुसऱ्यासाठीं हा सुद्धां काम आहे व अखेर त्याचेंहि फल-कीर्ति वगैरेच्या रूपानें अप्रत्यक्षपणें कर्त्यालाच प्राप्त होतें. अर्थात् ' इतर निष्काम कर्में' हा नुस्ता शब्द आहे. त्याला विशिष्ट अर्थ नाहीं. पुढें रहस्यकार म्हणतात —)"अशा रीतीनें फलाशा सोडून, किंवा भक्तिमार्गदृष्ट्या परमेश्वरार्पणबुद्धीनें हीं कर्में केलीं म्हणजे सृष्टीचें रहाटगाडगें

चालू राहून कर्त्यांच्या मनांतली फलाशा सुटलेली असल्यामुळें हीं कर्मे मोक्षप्राप्तीच्याहि आड न येतां सर्व गोष्टींचा नीट मेळ बसतो. " ( फलाशा सोडणें हा स्वतंत्रच पक्ष असून परमेश्वरार्पणबुद्धीनें कर्मे करणें हा भक्तिमार्ग आहे, वगैरे कल्पना निर्मूल आहेत. ते सर्व क्रमानें अहंकारत्यागाचे उत्तरोत्तर अधिक योग्यतेचे उपाय आहेत. नुस्ती फलाशा सोडणें, ही कर्मनिवृत्तीची पहिली पायरी आहे. सर्व कर्मे ईश्वरार्पण करणें ही त्याच्या पुढची पायरी आहे. कर्तृत्वाभिमानत्याग ही त्याच्या पुढची व ' गुणा गुणेषु वर्तन्ते ' ( पृ. ३२४ ) किंवा ' इन्द्रियाणीन्द्रियार्थेषु वर्तन्ते ' ( पृ. ४९९ ) ही तत्त्ववेत्त्याची अखेरची पायरी आहे. हे सर्व परमात्म्याच्या साक्षात्काराचे उपाय आहेत. त्यामुळें 'ते मोक्षाच्या आड न येतां ' वगैरे म्हणणेंहि फुकट आहे. 'मोक्षाचें साधन मोक्षाच्या आड येत नाहीं, ' या म्हणण्यात काही अर्थच नाहीं. तसेच " फलाशा सोडून किंवा परमेश्वरार्पणबुद्धीनें कर्मे केल्याने सृष्टीचे रहाटगाडगें चालू " कसे राहणार ? साधकानें फलाशा सोडून किंवा ईश्वरार्पणबुद्धीने कर्मे का करावयाचीं ? आपली चित्तशुद्धि व्हावी, ईश्वराचा प्रसाद व्हावा म्हणून, आणि चित्तशुद्धि किंवा ईश्वराचा प्रसाद याची तरी अपेक्षा कां करावयाची, तर आत्मज्ञान होऊन संसारचक्रांतून—भवसागरातून मुक्त व्हावें ह्मणून; स्वतः संसारातून मुक्त होण्याची इच्छा करणारा इतराचा संसार कायम रहावा, असा यत्न किंवा इच्छा तरी कसा करील? आणि ज्ञानी होण्याच्यापूर्वी साधक-अवस्थेतहि जर तो जगाचें रहाटगाडगें चालू रहावे म्हणून निष्काम व ईश्वरार्पणबुद्धीनें कर्मे करीत नाहीं तर ज्ञानोत्तर म्ह० हें सर्व जगत् मिथ्या आहे, असें निश्चित कळल्यावर ते चालू रहावे, म्हणून तीच कर्मे कशीं करणार ? श्रेष्ठ कर्माधिकारी ज्ञानी लोकसंग्रह करतो हे खरें; पण तो लोकसंग्रह म्ह० जगाचें धारण-पोषण नव्हे. तर कर्माधिकाऱ्यानीं कर्मानुष्ठान सोडून उन्मार्गी होऊ नये, म्हणून श्रेष्ठानें स्वतः स्वाधिकाराप्रमाणे शास्त्रीय कर्मे करीत राहणे, त्यांच्या उन्मार्गाचें निवारण करणे, हा त्याचा अर्थ आहे. ( पृ. ३०९ ) " कर्मासंबधानें कर्मयोगशास्त्राचा हाच अखेरचा निश्चित सिद्धान्त आहे (२. ४५ टीप पहा)" या म्हणण्यांत आता काहीच स्वारस्य उरलें नाहीं, हे वाचकांच्या ध्यानात येईल. कारण कर्मयोगशास्त्र म्हणून जर मुळी स्वतंत्र शास्त्रच नाही तर त्याचा ' अखेरचा निश्चित सिद्धान्त ' हे अर्थरहित शब्द आहेत, हे कोणीहि कबूल करील. २.४५ वरील टीपेचे परीक्षण आम्हीहि त्याच श्लोकावरील टीपेत केले आहे, तेंहि पहा ( गी. भा. पृ. १६५-१६८ ). " मीमांसकाचा कर्ममार्ग व गीतेंतील कर्मयोग या मधला भेद गीतारहस्यात ( पृ. २८९-९२ व ३४२-४४ ) अधिक स्पष्ट करून दाखविला आहे " वगैरे, पण विस्तारभयास्तव आम्ही त्याचे सविस्तर परीक्षण करीत नाहीं. थोडक्यांत निरीक्षण करितो. श्रौतस्मार्त सर्व कर्मे व दान, ध्यान, जप इत्यादि सर्व, हे यज्ञ होत, हें खरें; त्याविषयी वेद, स्मृति व गीता यांत आधार आहे. पण " प्रत्येकाच्या अधिकाराप्रमाणें हे यज्ञ म्ह० शास्त्रोक्त कर्मे किंवा धंदे किंवा कर्तव्यव्यवहार " या रहस्यकारांच्या म्हणण्याला मात्र काहीं आधार नाहीं. केवळ धर्मासाठीं विहित असलेलीं शास्त्रोक्त कर्मे कोठे ? व पोट जाळण्यासाठीं प्रसंगीं ब्राह्मणानें म्लेच्छाची सेवा पत्करणें किंवा शिंप्याचा, सुताराचा, फार काय पण चर्मकाराचाहि धंदा किंवा कर्तव्यव्यवहार पत्करणें कोठें ? व असले धंदे त्यानें केले किंवा न केले तरी

समाजाचे त्यांत नफा-नुकसान काय होणार? शास्त्रोक्त कर्मं व्यक्तीकरितां असून त्याचें फलहि फक्त त्यालाच मिळते. एकाच्या सदाचरणाचे फल दुसऱ्याला मिळणे, हा अन्याय आहे. अर्थात् शास्त्रोक्त कर्माचा धंदा किंवा व्यवहार, असा अगदी अयोग्य अर्थ करून 'या व्यापकार्थी यज्ञाची लोकसंग्रहार्थ नेहमीच आवश्यकता असते' हे म्हणणें सर्वथा अनुपपन्न होय. इतकेंच नव्हे तर शास्त्रीय कर्माच्या अर्थाला इतके हीन स्वरूप देणे हे महत्पाप आहे. पुढे रहस्यकार "सांसारिक कर्मं धर्मशास्त्राप्रमाणे यथासांग म्ह० नीतीने" वगैरे पुष्कळसे निरर्थक असंबद्ध शब्दजाल पसरून शेवटी असा सारांश सांगतात—"सारांश संसार यज्ञमय किंवा कर्ममय असला तरी तो करणाराचे दोन वर्ग होतात. एक शास्त्रोक्तरीत्या पण फलाशा ठेवून संसार करणारे ( कर्मठ लोक ) आणि दुसरे निष्काम बुद्धीने केवल कर्तव्य म्हणून संसार करणारे (ज्ञानी लोक.)" ( रहस्यकाराना गीतार्थ बरोबर न कळण्याचे कारण हीच मिथ्याबुद्धि होय. येथील संसार म्ह० प्रपंच-सृष्टि असा जर अर्थ असेल तर सर्व संसार कर्ममय म्ह० प्रवृत्तिपर आहे, असे म्हणता येईल. पण त्याला यज्ञमय म्हणतां येणार नाही. कारण त्यातील प्रत्येक जीव जी प्रवृत्ति करीत असतो ती शरीर व शरीरसंबंधी याच्या स्वास्थ्यासाठी करीत असतो. पण 'यज्ञ' हा शब्द अशा स्वाभाविक प्रवृत्तीला उद्देशून केव्हाच योजीत नाहीत, आणि संसार म्ह० प्रत्येक व्यक्तीचा संसार म्ह० प्रपंच म्हणून म्हटले तर मनुष्यच त्याचा अधिकारी ठरतो. कारण मनुष्येतर प्राणी प्रपंच करीत नाहीत. ते नुसते स्वसंरक्षण व स्वास्थ्य याची काळजी वाहतात. पण सर्वच प्रापंचिक मनुष्ये कर्मठ म्ह० शास्त्रोक्तरीत्या कर्म करणारी नाहीत. वास्तव कर्मठ व ज्ञानी म्ह० श्रुतिस्मृत्युक्त कर्माचे व ज्ञानाचे अधिकारीच होत. तथापि त्याचाहि रहस्यकार म्हणतात तसा विभाग होऊ शकत नाही; तर जे स्वर्गादि फलाच्या इच्छेने श्रौत-स्मार्त कर्मे करणारे ते कर्मठ, हे म्हणणे ठीक आहे पण जे निष्काम बुद्धीनें कर्मे करणारे ते ज्ञानी नव्हेत. जिज्ञासु साधकच निष्कामबुद्धीनें चित्तशुद्ध्यर्थ शास्त्रोक्त कर्मे करितात. ज्ञानी पुरुषाच्या ठिकाणी कामाचाच असंभव असल्यामुळें तो निष्काम कर्मे करितो हे म्हणणेच खोटें आहे. तसेंच, 'ज्ञानी' व 'संसार करणार' हे म्हणणेच 'माझी माता वंध्या' याप्रमाणे व्याघातदोषग्रस्त आहे.'पुढे ते म्हणतात—)—"निव्वळ कर्मठास स्वर्गप्राप्तीसारखे अनित्य फल, आणि ज्ञानानें किंवा निष्काम बुद्धीनें कर्मे करणाऱ्या ज्ञानी पुरुषांस मोक्षाचे नित्य फळ मिळतें, असा गीतेचा सिद्धान्त आहे" ( यावरूनच गीतेचे व त्याबरोबरच वेदान्तशास्त्राचें रहस्य रहस्यकारांस किती कळलें आहे, याची शंका येते. अगोदर ज्ञानानें कर्मे करणें म्हणजे काय? ज्ञानाने म्ह० निष्कामबुद्धीने असे आपण समजूं! पण निष्कामबुद्धीनेंहि कर्म करणाराची साहंकारबुद्धि—देहाभिमान सुटत नाही. तो सुटल्यावांचून आत्मज्ञान अशक्य आहे. तेव्हा नुसती निष्कामबुद्धीने कर्म केल्याने 'मोक्षाचे नित्य फल' कसें मिळणार? 'मोक्षाचे नित्य फल' हा शब्द प्रयोगच आमच्या कानास त्रास देतो. तथापि तो सहन करून त्याच्या अर्थाकडे जरी पाहिले तरी कर्माने मिळणारे फल नित्य आहे, या म्हणण्यास कोणत्याच प्रमाणाचा पाठिंबा नाही. 'निष्काम कर्माचे फल' या म्हणण्यावरहि वरचाच 'वदतोव्याघात' दोष येतो. ज्ञानी पुरुषाला गति नाही, हा वेदान्तसिद्धान्त आहे. गीतेंतहि जीवन्मुक्ताच्या स्थितप्रज्ञ, गुणातीत वगैरे अवस्था ही सद्योमुक्तीच

आहे. अर्थात् आठव्या अध्यायांतील दोन गति ब्राह्मी स्थितीला प्राप्त झालेल्या जीवन्मुक्तासाठीं नाहींत. त्या कर्मठ व उपासक यांसाठीं आहेत. या विषयाचा रहस्यकारांनीं बराच विचार कर्मविपाक व आत्मस्वातंत्र्य या प्रकरणांत केला आहे. पण आम्हांला त्याचें परीक्षण करण्यास येथें सवड नाहीं. आम्हीं त्याचा विचार अन्यत्र करू. तूर्त गी. भा. पृ. ६७१–७६ पहा.) "मोक्षासाठीं कर्में सोडण्यास गीता कोठेच सांगत नाहीं." (असें म्हणणें हें भयंकर धाडस आहे. कारण ज्ञाननिष्ठा व सर्वकर्मसन्यास गीतेंत सांगितला आहे.) "त्यागशब्दानें गीतेंत कर्मत्याग न समजतां फलत्याग विवक्षित आहे." होय. पण तो कर्माधिकाऱ्यासाठीं 'गौण संन्यास' या रूपानें सांगितला आहे.१८ व्या अध्यायांतच पुढें 'निष्ठा ज्ञानस्य या परा' 'नैष्कर्म्यसिद्धिं परमां संन्यासेनाधिगच्छति' 'विविक्तसेवी लघ्वाशी यतवाक्कायमानसः। ध्यानयोगपरो नित्यं वैराग्यं समुपाश्रितः॥ अहंकारं बलं दर्पं कामं क्रोधं परिग्रहं। विमुच्य निर्ममः शान्तः ब्रह्मभूयाय कल्पते॥' इत्यादि वचनें आहेत, त्यावरून ही गोष्ट सिद्ध होते. रहस्यकारांनीं ज्याचा वर हवाला दिला आहे त्या ३४२ ते ४४ पृष्ठांवर अशीं वाक्यें आहेत.) "गृहस्थाश्रमांत राहूनच मोक्ष प्राप्त होतो असें वेदाचें स्पष्ट विधान असल्याचें जैमिनि म्हणत आहे. त्याचें हें म्हणणे काही निराधार नाहीं." (आणि 'चातुर्मास्य याग करणाऱ्यास अक्षय्य फल मिळतें' हे म्हणणें तरी निराधार कोठें आहे? सत्यनारायणाच्या पूजेनेंहि मोक्ष मिळतो. सेतुबंध रामेश्वराच्या दर्शनानेंहि मुक्ति मिळते. गयेंत विष्णुपदीं पिंड दिल्यानेंहि पितर मुक्त होतात. या सर्वांना आधार आहेत. मग मोक्षासाठीं रहस्यकाराचें गीतेंतील निष्काम कर्मच कशाला हवें? मुख्य वाक्य कोणतें व गौण वाक्य कोणतें, विधि कोणता व अर्थवाद कोणता? मुख्य फल कोणतें व अवान्तर फल कोणतें, याचा निर्णय करणे रहस्यकार समजतात तितकें जर सोपें असते तर दोन मीमांसा व इतर शास्त्रे यांच्या एवढ्या विस्ताराची गरजच नव्हती.) "परमेश्वराचे ज्ञान तत्पूर्वीं (म्ह० उपनिषदांच्या पूर्वीं) झालेले नव्हते, असे नाहीं" (जर झाले असेल तर ते कोणत्या प्रमाणानें? कर्मकांडानें? पण ते तर शक्य नाहीं. कर्मकांडात परमेश्वराचें अस्तित्वच संशयित आहे. म्हणूनच पूर्वमीमांसकास निरीश्वरवादी समजतात. ज्ञानाचें प्रमाण जर पूर्वीं असतें तर उपनिषदे अस्तित्वात आलींच नसतीं. रहस्यकार म्हणतात–) "उपनिषदें संहिता व ब्राह्मणे यानंतरचीं आहेत" (उघडच आहे. कर्मकांड, उपासना व ज्ञान असा क्रम असल्यामुळे आणि कर्मकांड उपासनेचे साधन व उपासना ज्ञानाचे साधन असा त्यांचा अगागी भाव असल्यामुळें व ज्ञानाने कृतकृत्यता प्राप्त होत असल्यामुळे ज्ञानकांडात्मक उपनिषदें शेवटीं असणें योग्यच आहे. पण तेवढ्यावरून 'कर्मकांडाने परमेश्वराचें ज्ञान होत असे व मोक्ष मिळत असे,' अशी कल्पना करणें अगदींच अप्रयोजक आहे. वेद, स्मृति व त्यांतीलच एक गीता यांचा परस्पर संबंध डोळ्यापुढें न ठेवल्यामुळें रहस्यकारांनीं "ज्ञानकांड व कर्मकांड यांची तडजोड घालण्याची गीतेची शैली स्मृतिकारांपेक्षां अधिक सरस आहे" इत्यादि भलतेंच कांहीं तरी लिहिले आहे. त्यांना मोक्षाचें व अद्वैतसिद्धान्ताचें यथार्थ स्वरूपच न कळल्यामुळें "व्यक्तिरूप आत्म्याचें कल्याण यत्किंचितहि कमी न करितां त्याला जोडून सृष्टींतील समष्टिरूप आत्म्याचें कल्याणहि गीतामार्गानें साधले जातें." वगैरे कांहीं तरी अपसिद्धान्त लिहून ठेवले आहेत. आत्मैक्यज्ञान हें जर गीतेचें प्रतिपाद्य

**नियतस्य तु संन्यासः कर्मणो नोपपद्यते ।**
**मोहात्तस्य परित्यागस्तामसः परिकीर्तितः ॥७॥**

**अन्वयार्थ—तु**—परंतु—**नियतस्य कर्मणः**—नित्य कर्मांचा—**संन्यासः**—परित्याग—**न उपपद्यते**—उपपन्न होत नाहीं.—**तस्य**—नित्य कर्मांचा—**मोहात्**—अज्ञानामुळें—**परित्यागः**—केलेला त्याग—**तामसः परिकीर्तितः**—तामस सांगितलेला आहे. ७.

**तस्मादज्ञस्याधिकृतस्य मुमुक्षोः— नियतस्य तु नित्यस्य संन्यासः परित्यागः कर्मणो नोपपद्यतेऽज्ञस्य पावनत्वस्येष्टत्वात् । मोहादज्ञानात्तस्य नियतस्य परित्यागः नियतं चावश्यं कर्तव्यं त्यज्यते चेति विप्रतिषिद्धमतो मोहनिमित्तः परित्यागस्तामसः परिकीर्तितो मोहश्च तम इति ॥ ७ ॥**

**भाष्यार्थ—तस्मात् अज्ञस्य अधिकृतस्य मुमुक्षोः**—नित्य कर्मे अवश्य केलीं पाहिजेत, असें याप्रमाणें सिद्ध झाल्यामुळें अज्ञ कर्माधिकारी मुमुक्षूच्या—**नियतस्य तु-नित्यस्य कर्मणः संन्यासः-परित्यागः न उपपद्यते**—नियत म्ह० नित्य कर्मांचा संन्यास-परित्याग उपपन्न होत नाहीं.—**अज्ञस्य पावनत्वस्य इष्टत्वात्**—कारण अज्ञ पुरुषाला नित्य कर्मे पावन करितात, नित्य कर्माला पावनत्व आहे, हें भगवानांना इष्ट आहे. ( अहोपण, पुष्कळ लोक नियत कर्मांचाहि त्याग करीत

---

आहे, तर व्यष्टि आत्मा व समष्टि आत्मा हा भेद गीता करील कशी ? आणि आत्मा जर निर्गुण, निर्विकार, एक आहे तर तो कल्याणरूप आहेच. मग त्याचें आणखी कल्याण काय साधावयाचे आहे ? ' बिभेत्यल्पश्रुतात् ' या बरोबरच ' अन्यथाश्रुतात् वेदः ' असेंहि म्हणण्याचा प्रसंग रहस्यकारांनी आणला आहे.) "ज्ञान व निष्काम कर्मे यामध्ये विरोध नाहीं." ( हें म्हणणे भ्रामक आहे. निष्काम कर्मांनाहि कर्तृत्वबुद्धीची आवश्यकता आहे व ज्ञानानें तीच निवृत्त होते अर्थात् जेथें ' मी कर्ता' ही कर्तृत्वबुद्धि आहे तेथें कर्मे निष्काम जरी असलीं तरी आत्मज्ञान नाहीं व जेथें अद्वैत आत्मबोध आहे तेथे कर्तृत्वबुद्धि नाही व तिच्या अभावीं निष्काम कर्मांचाहि संभव नाहीं. तात्पर्य नित्य-नैमित्तिक कर्मे चित्तशोधक असल्यामुळें ज्ञाननिष्ठायोग्यता प्राप्त होण्यासाठींच त्यांचें अनुष्ठान उपनिषदांत व गीतेंत विहित आहे. या बाबतींत गीता व उपनिषदें यांचा विरोध संभवत नाहीं. ज्ञानोत्तर कर्मे करणें किंवा ती सोडणें, हा शास्त्रविधीचा विषय नसून ज्या त्या ज्ञानी पुरुषाच्या प्रारब्धकर्माशीं त्याचा संबंध आहे. भगवान्, गीता किंवा व्यास यांतील कोणीहि ज्ञात्यावर ' कर्मे केलीच पाहिजेत' असा जुलूम करण्यास समर्थ नाहीं; आणि ही चर्चाहि श्रुतिस्मृतिविहित कर्मांची आहे. लौकिक धंद्याची वगैरे नव्हे, हें येथें मुद्दाम लक्षांत ठेवलें पाहिजे. कारण येथें यज्ञ, दान व तप या कर्मांचा स्पष्ट उल्लेख आहे. तीं सर्व शास्त्रविहित आहेत, व त्यांना ' पावनानि-पावन करणारी ' असेंहि म्हटलें आहे. वास्तव या श्लोकांची आचार्यांनी लाविलेली संगति व केलेला अर्थच सर्वथा निर्दोष व शास्त्रशुद्ध आणि वैदिक संप्रदायाला धरून आहे.)

असलेले दिसतात, असें कोणी म्हणेल म्हणून भगवान् सांगतात-)—**मोहात्-अज्ञानात् तस्य-नियतस्य परित्यागः**—मोहामुळें-अज्ञानामुळें-म्ह० नित्य कर्म पावन करणारे आहे, हें ज्ञान नसणें, या कारणानें त्या नियत कर्माचा परित्याग, हा तामस त्याग म्हटलेला आहे, असा पुढें संबंध. ( अज्ञाचा नित्यकर्मत्याग मोहामुळेंच होतो, याचें उपपादन-)—**नियतं च अवश्यं कर्तव्यं त्यज्यते च इति विप्रतिषिद्धं**—नियत म्ह० अवश्य कर्तव्य व तेंच टाकले जातें, त्याचा त्याग केला जातो, हें अत्यंत विरुद्ध आहे.—**अतः मोहनिमित्तः परित्यागः तामसः परिकीर्तितः**—यास्तव मोहनिमित्त-मोह-अज्ञान या कारणाने होणारा जो परित्याग तो तामस त्याग म्हटलेला आहे.—**मोहः च तमः इति**—कारण मोह म्ह० तमच आहे. यास्तव नित्यकर्मत्याग हा तामस त्याग होय. ७

दुःखमित्येव यत्कर्म कायक्लेशभयात्त्यजेत् ।
स कृत्वा राजसं त्यागं नैव त्यागफलं लभेत् ॥८॥

**अन्वयार्थ—यत् कर्म**—जें कर्म—**दुःखं**—दुःख आहे,—**इति एव**—असें समजूनच—**कायक्लेशभयात्**—शरीराच्या क्लेशांच्या भयानें—**त्यजेत्**—टाकलें जातें—**सः**—तो असा—**राजसं त्यागं कृत्वा**—राजस त्याग करून—**त्यागफलं**—त्यागाच्या फलास—**न एव लभेत्**—प्राप्त होत नाहींच. ८.

**किंच— दुःखमित्येव यत्कर्म कायक्लेशभयाच्छरीरदुःखभयात्त्यजेत्परित्यजेत्स कृत्वा राजसं रजोनिर्वृत्तं त्यागं नैव त्यागफलं ज्ञानपूर्वकस्य सर्वकर्मत्यागस्य फलं मोक्षाख्यं न लभेन्नैव लभते ॥ ८ ॥**

**भाष्यार्थ—किंच**—अज्ञाचा नित्यकर्मत्याग याहि कारणानें संभवत नाहीं, असें 'दुःखं०' या श्लोकानें सांगतात—**दुःखं इति एव यत् कर्म कायक्लेशभयात्-शरीरदुःखभयात् त्यजेत्-परित्यजेत्**—नित्य कर्म करणे, हें दुःख आहे अशा समजुतीनें जे कर्म शरीराला क्लेश होतील या भीतीने-शरीराच्या दुःखाला भिऊन टाकतो-परित्याग करितो—**सः राजसं-रजोनिर्वृत्तं त्यागं कृत्वा**—तो राजस म्ह० रजोगुणामुळें होणारा त्याग करून—**त्यागफलं-ज्ञानपूर्वकस्य सर्वकर्मत्यागस्य फलं-मोक्षाख्यं न लभेत्-नैव लभते**—त्यागाच्या फलास-ज्ञानपूर्वक केलेल्या सर्वकर्मत्यागाच्या 'मोक्ष' या नांवाच्या फलाला प्राप्त होत नाहींच. [ शरीरेंद्रियांना क्लेश होतात म्हणून नित्य कर्म दुःखद आहे, असें मानून त्याचा जो त्याग करितो, तो राजस त्याग असल्यामुळें ज्ञानपूर्वक केलेला जो सर्वकर्मत्याग, त्याचें मोक्ष हे फल त्याला प्राप्त होत नाहीं. तर त्या राजस त्यागाला अनुरूप असें 'नरक' हेंच फल त्याला मिळतें. ] ८

कार्यमित्येव यत्कर्म नियतं क्रियतेऽर्जुन ।
सङ्गं त्यक्त्वा फलं चैव स त्यागः सात्त्विको मतः॥९॥

**अन्वयार्थ—अर्जुन**—हे अर्जुना!—**यत् नियतं कर्म**—जें नित्य कर्म—**कार्यं इति एव**—हें मला अवश्य करावयास पाहिजे असें समजूनच—**संगं च फलं त्यक्त्वा एव**—आसक्ति व फल सोडूनच—**क्रियते**—केलें जातें—**सः त्यागः**—तो त्याग—**सात्त्विकः मतः**—सात्त्विक मानलेला आहे. ९.

**कः पुनः सात्त्विकस्त्यागः-कार्यं कर्तव्यमित्येव यत्कर्म नियतं नित्यं क्रियते निर्वर्त्यते हेऽर्जुन सङ्गं त्यक्त्वा फलं चैव । नित्यानां कर्मणां फलवत्त्वे भगवद्वचनं प्रमाणमवोचाम । अथवा यद्यपि फलं न श्रूयते नित्यस्य कर्मणस्तथाऽपि नित्यं कर्म कृतमात्मसंस्कारं प्रत्यवायपरिहारं वा फलं करोत्यात्मन इति कल्पयत्येवाज्ञस्तत्र तामपि कल्पनां निवारयति फलं त्यक्त्वेत्यनेनातः साधूक्तं सङ्गं त्यक्त्वा फलं चेति । स त्यागो नित्यकर्मसु सङ्गफलपरित्यागः सात्त्विकः सत्त्वनिर्वृत्तो मतोऽभिमतः ॥**

**भाष्यार्थ—पुनः सात्त्विकः त्यागः कः**—तर मग सात्त्विक त्याग कोणता?—**हे अर्जुन कार्यं-कर्तव्यं इति-एव यत् नियतं-नित्यं कर्म क्रियते-निर्वर्त्यते**—हे अर्जुना! हें मला अवश्य कर्तव्य आहे, असेंच समजून जे नियत म्ह० नित्य कर्म केले जातें, (तें कसें? उत्तर-)—**सङ्गं च फलं एव त्यक्त्वा**—संग-कर्माच्या स्वरूपाविषयींची आसक्ति व फल हीं दोन्ही टाकून, (अहोपण, नित्य कर्मांचें फलच नाहीं! उत्तर-)—**नित्यानां कर्मणां फलवत्त्वे भगवद्वचनं प्रमाणं अवोचाम**—नित्य कर्मांना फलवत्त्व आहे, नित्य कर्मांचें फल आहे,याविषयीं आम्हीं भगवानांचें वचन प्रमाण दिलें आहे. (पृ. ४०५,११३० पहा. 'फलं त्यक्त्वा' याचें दुसऱ्या तऱ्हेनें तात्पर्य सांगतात-)—**अथवा यद्यपि नित्यस्य कर्मणः फलं न श्रूयते**—किंवा जरी नित्य कर्माचें फल प्रत्यक्ष शब्दांनीं सांगितलेले नाहीं—**तथापि नित्यं कर्म कृतं आत्मसंस्कारं-आत्मनः प्रत्यवायपरिहारं वा फलं करोति इति अज्ञः कल्पयति एव**—तरी नित्य कर्म केलें असतां तें आत्मसंस्कार हें फल किंवा कर्त्याच्या प्रत्यवायाचा परिहार हें फल, करतेंच असे अज्ञ समजतो,—**तत्र तां अपि कल्पनां 'फलं त्यक्त्वा' इति-अनेन निवारयति**—यास्तव नित्य कर्माविषयींच्या त्या कल्पनेचेंहि 'फलं त्यक्त्वा' या वचनानें भगवान् निवारण करीत आहेत. [ यथाशास्त्र केलेलें कर्म व्यर्थ होणें शक्य नाहीं. कारण तें व्यर्थ झाल्यास शास्त्रविधीलाच व्यर्थत्व येणार! यास्तव त्याचें प्रत्यक्ष शास्त्रोक्त फल जरी नसलें तरी यथाविधि नित्य कर्मानुष्ठान करणारा आत्मसंस्कार हेंच त्याचें फल मानतो. कारण आत्मा असंस्कार्य आहे, हें त्याला ठाऊक नसतें. त्याचप्रमाणें नित्यकर्मांचें अनुष्ठान न केल्यास प्रत्यवायप्राप्ति होते, असें सांगितलें आहे. त्यामुळें नित्य कर्मानुष्ठान करणाऱ्या कर्त्याच्या प्रत्यवायाचा परिहार होतो, असें तो-अज्ञ मानतो. अशा प्रकारच्या नित्यकर्मफलाचा त्याग करून,असें भगवान् 'फलं त्यक्त्वा' या वचनानें सांगत आहेत. ]—**अतः सङ्गं त्यक्त्वा फलं च इति साधु उक्तं**—याप्रमाणें नित्यकर्मांच्या फलाचा त्याग संभवत असल्यामुळें 'संग व फल सोडून' असें जें म्हटलें आहे तें अगदीं योग्यच म्हटलें आहे.—**सः त्यागः-नित्य-**

**कर्मसु सङ्गफलपरित्यागः सात्त्विकः-सत्त्वनिर्वृतः मतः-अभिमतः**—तो त्याग म्ह० नित्यकर्मांतील संग व फल यांचा परित्याग सात्त्विक-सत्त्वगुणकृत मानलेला आहे, तो सात्त्विक त्याग म्हणून भगवानाला अभिमत आहे.

**ननु कर्मपरित्यागस्त्रिविधः संन्यास इति च प्रकृतस्तत्र तामसो राजसश्चोक्तस्त्यागः कथमिह सङ्गफलत्यागस्तृतीयत्वेनोच्यते यथा त्रयो ब्राह्मणा आगतास्तत्र षडङ्गविदौ द्वौ क्षत्रियस्तृतीय इति तद्वत्। नैष दोषस्त्यागसामान्येन स्तुत्यर्थत्वात्। अस्ति हि कर्मसंन्यासस्य फलाभिसंधित्यागस्य च त्यागत्वसामान्यं तत्र राजसतामसत्वेन कर्मत्यागनिन्दया कर्मफलाभिसंधित्यागः सात्त्विकत्वेन स्तूयते 'स त्यागः सात्त्विको मतः' इति ॥ ९ ॥**

**भाष्यार्थ**—( यावर आक्षेप-)—**ननु कर्मपरित्यागः त्रिविधः संन्यासः इति च प्रकृतः**—अहोपण, कर्मपरित्याग व संन्यास तीन प्रकारचा, असा वर आरंभ केला आहे. [ म्ह० त्याग व संन्यास या शब्दांनी कर्म व त्याचे फल यांचा त्याग प्रकृत आहे. त्यांतील त्याग त्रिविध आहे अशी 'त्यागो हि०' या वचनाने प्रतिज्ञा केली—**तत्र तामसः राजसः च त्यागः उक्तः**—नंतर प्रतिज्ञेच्या अनुसार त्यांतील राजस व तामस हे दोन प्रकार सांगितले-राजस व तामस त्याग सांगितला—**इह संगफलत्यागः तृतीयत्वेन कथं उच्यते**—आणि आतां येथे प्रतिज्ञेच्या उलट संग-फलपरित्याग हाच तिसरा त्याग म्हणून कसा सांगितला जात आहे? ( उपक्रमाच्या उलट उपसंहार करणें अनुचित आहे, याविषयी दृष्टान्त-)—**यथा त्रयः ब्राह्मणाः आगताः तत्र षडंगविदौ द्वौ क्षत्रियः तृतीयः इति तद्वत्**—ज्याप्रमाणें तीन ब्राह्मण आले आहेत, त्यांतील षडंगवेत्ते दोन व क्षत्रिय तिसरा, असें म्हणावे, त्याप्रमाणे त्रिविध त्याग सांगतों असें म्हणून राजस व तामस हे खरे त्याग सांगून तिसरा संगफलत्याग हाच त्याग म्हणून सांगणे विरुद्ध आहे. ( आचार्य या विरोधाचें समाधान करितात-)—**एषः दोषः न**—भगवानांच्या प्रतिपादनावर हा दोष येत नाहीं.—**त्यागसामान्येन स्तुत्यर्थत्वात्**—कर्मत्याग व फलत्याग या दोन्ही त्यागांमध्ये त्यागत्व हें सामान्य-समान धर्म-त्यागत्व ही जाति असल्यामुळें-त्यागत्व या सादृश्यामुळें कर्मत्यागाच्या निंदेनें फलत्यागाची स्तुति करण्यासाठीं हें वचन आहे. ( त्यामुळें त्यांत कांहीच विरोध येत नाहीं. हीच गोष्ट आचार्य अधिक विशद करितात-)—**कर्मसंन्यासस्य च फलाभिसंधित्यागस्य त्यागत्वसामान्यं अस्ति हि**—कर्मांचा संन्यास व फलाच्या इच्छेचा त्याग, यांना त्यागत्व हें सामान्य-सादृश्य आहे. ( याप्रमाणें सामान्य असल्यामुळें वरील निर्देश स्तुतीसाठींच आहे, या म्हणण्याचें समर्थन-)—**तत्र राजसतामसत्वेन कर्मत्यागनिन्दया, कर्मफलाभिसंधित्यागः 'स त्यागः सात्त्विको मतः' इति सात्त्विकत्वेन स्तूयते**—याप्रमाणें त्यागत्वसामान्य असल्यामुळें राजस व तामस या रूपानें कर्मत्यागाची निंदा करून कर्मफलाच्या इच्छेचा

त्याग ' स त्यागः सात्त्विको मतः' या वचनानें सात्त्विकत्याग म्हणून स्तुति केला जातो --कर्मफलेच्छात्यागाला सात्त्विक त्याग म्हणून त्याची येथें स्तुति केली आहे. ९.

**यस्त्वधिकृतः सङ्गं त्यक्त्वा फलाभिसंधिं च नित्यं कर्म करोति तस्य फलरागादिनाऽकलुषीक्रियमाणमन्तःकरणं नित्यैश्च कर्मभिः संस्क्रियमाणं विशुध्यति। विशुद्धं प्रसन्नमात्मालोचनक्षमं भवति। तस्यैव नित्यकर्मानुष्ठानेन विशुद्धान्तःकरणस्याऽऽत्मज्ञानाभिमुखस्य क्रमेण यथा तन्निष्ठा स्यात्तद्वक्तव्यमित्याह—**

---

१ रहस्यकार ७ व ९ या श्लोकांतील 'नियत' शब्दाचा अर्थ ' स्वधर्मप्रमाणे ' नेमलेलें असा करून ७-९ श्लोकांवरील टीपेंत म्हणतात— " नियत म्ह० नित्य असा अर्थ कित्येक करितात. ' नियतं कुरु कर्म त्वं' ३.८. येथें त्या शब्दाचा जो अर्थ आहे तोच येथेंहि घेतला पाहिजे. मीमांसकांची पारिभाषा येथें विवक्षित नाही." (ती कां?) "नियतशब्दाऐवजी ३.१९ कार्य हा शब्द आला असून येथें ९ व्या श्लोकांत 'कार्य' व 'नियत' हे शब्द एकत्र आले आहेत. स्वधर्माप्रमाणे प्राप्त झालेले कोणतेंहि कर्म न सोडता तेच कर्म कर्तव्य म्हणून करणें (३.१९.) याला सात्त्विक त्याग म्हणतात." वगैरे, 'नियत 'शब्दाचा नित्य असा अर्थ सर्व अद्वैती भाष्य-टीकाकार करितात.फारकाय पण रामानुजाचार्यहि नियत म्ह०नित्यनैमित्तिक असा अर्थ करितात. तिसऱ्या अध्यायांतील 'नियत'शब्दाचा अर्थहि सर्व टीकाकार 'नित्य' असाच करितात. रहस्यकार ' नियत म्ह० स्वधर्माप्रमाणे नेमलेले ' असे म्हणतात. पण स्वधर्माप्रमाणे नेमलेलें याचा तरी अर्थ काय ? नित्य कर्माची व्याख्या आचार्यादि सर्व ' जें ज्याला अत्यत विहित असतें, पण त्याचे फल कांही सागितलेलें नसतें ' तें नित्य कर्म होय. अर्थात् संध्यावंदन-अग्निहोत्रादिक. पण रहस्यकारांना तें कर्म नको आहे, जगाच्या उलाढाली पाहिजे आहेत. म्हणून ही सर्व लटपट आहे. तथापि ' स्वधर्माप्रमाणें ' हें विशेषण आहेच. पण 'स्वधर्माप्रमाणें नेमलेले ' याचा अर्थ मध्वाचार्य म्हणतात, त्याप्रमाणें 'वर्णाश्रमोचित कर्म ' हाच असेल तर नित्य कर्माहून त्यांत फरक काय उरला ? कांहीच नाहीं. अ. ३ श्लो. १९ यांत 'कार्य ' हा शब्द कर्तव्य-अवश्यकर्तव्य-नित्य अशा परंपरेनें नित्य या अर्थीच योजला आहे. ( गी.भा.पृ.३०१ पहा.) येथें ९ व्या श्लोकांत 'कार्य' व 'नियत'हे शब्द आहेत,हे खरें; तथापि त्यांतील 'कार्य' हा शब्द कर्तव्य-अवश्यकर्तव्य-या अर्थीच आहे. त्यामुळें जें नित्य कर्म ' हे मला अवश्य केलेच पाहिजे ' या भावनेनें केलें जातें तोच सात्त्विक त्याग होय ' असा या सर्व वाक्याचा अर्थ होतो. सतराव्या अध्यायांत 'यष्टव्यं एव इति मनः समाधाय' (श्लो.११पृ.१०९३) 'दातव्यमिति यद्दानं दीयते' (श्लो.२० पृ.११०० ) हें जसें म्हटलें आहे, तसेंच व त्याच उद्देशानें येथें 'कार्यं इत्येव' हें म्हटले आहे. या तिन्ही ठिकाणीं ' फलाची इच्छा न ठेवतां तें तें कार्य करणें ' हा अर्थ विवाक्षित आहे व असें जें सात्त्विक यज्ञ-दानादि तें चित्तशुद्धीसाठींच विहित असल्यामुळें त्याला 'गौण त्याग' म्हणणेंच उचित होय. तो मुख्य संन्यास होणें केव्हांहि शक्य नाहीं. तसेंच, त्याला ज्ञानोत्तर त्याग असेंहि म्हणतां येत नाहीं. कारण तामस-राजस वगैरे यज्ञादिकांचा त्याग करून सात्त्विक यज्ञादिकांचा स्वीकार करावयास जो सांगितला आहे तो पुढे गुणातीत होण्यासाठीं म्ह० खरा सर्वकर्मत्याग सिद्ध होण्यासाठीं आहे, हें रहस्य न कळल्यामुळेंच रहस्यकारांना गीतार्थाची अन्यथा प्रतिपत्ति झाली आहे.

**भाष्यार्थ**—( याप्रमाणें पूर्वोत्तर विरोधाचा परिहार करून पुढील श्लोकाचें तात्पर्य-) **—यः तु अधिकृतः संगं च फलाभिसंधिं त्यक्त्वा नित्यं कर्म करोति—** पण जो अधिकारी-कर्मठ संग व फलेच्छा टाकून नित्य कर्माचें आचरण करितो— **तस्य फलरागादिना अकलुषीक्रियमाणं च नित्यैः कर्मभिः संस्क्रियमाणं अन्तःकरणं विशुध्यति**—त्याचें फलेच्छा व कर्मासक्ति-कर्माच्या स्वरूपाविषयींची आसक्ति-तें असेंच झालें पाहिजे व असें होतां कामा नये, इत्यादि अभिनिवेश यांच्या योगानें कलुषित न केलें जाणारें व नित्यकर्माच्या योगानें संस्कार केलें जाणारें अन्तःकरण विशेषप्रकारें शुद्ध होतें, ( बरें, अन्तःकरण विशुद्ध झाल्यावर काय होतें? उत्तर-) **—विशुद्धं प्रसन्नं आत्मालोचनक्षमं भवति**—रागादिमलरहित व संस्कारयुक्त म्ह० प्रसन्न झालेलें अन्तःकरण आत्म्याचें आलोचन-विचार-नित्यानित्यविवेक करण्यास समर्थ होतें.**—नित्यकर्मानुष्ठानेन विशुद्धान्तःकरणस्य आत्मज्ञानाभिमुखस्य तस्य एव क्रमेण यथा तन्निष्ठा स्यात् तत् वक्तव्यं इति आह**—आणि याप्रमाणें नित्यकर्माच्या अनुष्ठानानें ज्याचें अन्तःकरण अत्यंत शुद्ध झालें आहे व जो आत्मज्ञानाभिमुख झाला आहे त्यालाच श्रवणादिकांच्या द्वारा आत्मज्ञाननिष्ठा कशी प्राप्त होते तें सागावें, म्हणून भगवान् ' न द्वेष्टि० ' इत्यादि सांगतात—

**न द्वेष्ट्यकुशलं कर्म कुशले नानुषज्जते ।**
**त्यागी सत्त्वसमाविष्टो मेधावी छिन्नसंशयः ॥ १० ॥**

**अन्वयार्थ—अकुशलं कर्म**—संसाराला कारण होणाऱ्या काम्यादि कर्माचा— **न द्वेष्टि**—द्वेष करीत नाहीं.**—कुशले न अनुषज्जते**—चित्तशुद्धीच्या द्वारा मोक्षाला कारण होणाऱ्या नित्यकर्मामध्यें आसक्त होत नाहीं तर तो**—त्यागी**—संग व फल यांचा त्याग करून नित्यकर्माचें अनुष्ठान करितो.**—सत्त्वसमाविष्टः**—आत्मानात्मविवेकाला कारण होणाऱ्या सत्त्वानें संयुक्त होतो.**—मेधावी**—तो आत्मज्ञानरूप प्रज्ञेनें संयुक्त होतो.**—छिन्नसंशयः (भवति)**—त्यामुळेंच त्याचे सर्व संशय तुटलेले असतात.१०.

**न द्वेष्ट्यकुशलमशोभनं काम्यं कर्म शरीरारम्भद्वारेण संसारकारणं किमनेनेत्येवं कुशले शोभने नित्ये कर्मणि सत्त्वशुद्धिज्ञानोत्पत्तितन्निष्ठाहेतुत्वेन मोक्षकारणमिदमित्येवं नानुषज्जते तत्रापि प्रयोजनमपश्यन्ननुषङ्गं प्रीतिं न करोतीत्येतत् । कः पुनरसौ त्यागी पूर्वोक्तेन सङ्गफलपरित्यागेन तद्वांस्त्यागी यः कर्मणि सङ्गं त्यक्त्वा तत्फलं च नित्यकर्मानुष्ठायी स त्यागी ॥**

---

१ आचार्यांचें हें तात्पर्यवर्णन केवल शास्त्रानुसारच नव्हे तर स्वानुभवसिद्धहि असल्यामुळें किती मनोहर आहे, हें सहृदय व सात्त्विक कर्माचरण करणाऱ्या मुमुक्षूनाच कळणें शक्य आहे. इतर अनुष्ठानशून्य शुष्क तर्कपटूंना कळणें शक्य नाहीं. राग-द्वेषानें केवळ लौकिक व्यवहारांत आसक्त झालेल्या विद्वन्मन्यांना तर तें केव्हांच ग्राह्य वाटणार नाहीं.

**भाष्यार्थ—अकुशलं कर्म न द्वेष्टि**—अकुशल कर्मांचा द्वेष करीत नाहीं. (अ-कुशल म्ह० )—**अशोभनं काम्यं कर्म**—अकुशल म्ह० अशोभन काम्य कर्म—**शरीरारम्भद्वारेण संसारकारणं किं अनेन इति-एवं (न द्वेष्टि)**—हें काम्य कर्म शरीराचा-पुनर्जन्माचा आरंभ करून-त्याचें कारण होऊन संसाराला कारण होणारें आहे. तेव्हां अशा या कर्माचें अनुष्ठान करून काय करावयाचें आहे ? असें म्हणून अकुशल म्ह० काम्यकर्माचा द्वेष करीत नाहीं.—**कुशले-शोभने नित्ये कर्मणि सत्त्वशुद्धि-ज्ञानोत्पत्ति-तन्निष्ठाहेतुत्वेन मोक्षकारणं इदं इति-एवं न अनुषज्जते**—कुशल म्ह० शोभन-शुभ-हितकर; नित्यकर्मांमध्यें चित्तशुद्धि, ज्ञानाची उत्पत्ति व ज्ञाननिष्ठा याच्या हेतुत्वाने म्ह० यांचे कारण-निमित्त होऊन त्यांच्या द्वारा मोक्षाचें कारण होणारे हे कर्म आहे अशा भावनेने ( त्यांत ) आसक्त होत नाहीं. म्ह० —**तत्र अपि प्रयोजनं अपश्यन् अनुषङ्गं-प्रीतिं न करोति इति-एतत्**—त्या नित्य कर्मांतहि कांहीं प्रयोजन-फल न पाहणारा तो अनुषंग-प्रीति करीत नाहीं, असा याचा भावार्थ. ( पण दोन्ही प्रकारच्या कर्मांवर प्रीति व द्वेष करीत नाहीं म्हणून सामान्यतः ज्याचा उल्लेख केला तो कोण ? ते प्रश्नपूर्वक सांगतात-)—**पुनः असौ कः**—पण हा असला पुरुष कोण आहे ? तर—**त्यागी-पूर्वोक्तेन संगफलपरित्यागेन तद्वान् त्यागी**—त्यागी म्ह० पूर्वोक्त कर्मासक्ति व कर्मफल त्यांच्या परित्यागानें त्यागवान् झालेला तो त्यागी ( त्याचेंच अधिक विवरण- )—**यः कर्मणि संगं तत्फलं च त्यक्त्वा नित्यकर्मानुष्ठायी सः त्यागी**—जो कर्मामध्यें संग व त्याचें फल यांना टाकून-त्यांचा त्याग करून नित्यकर्माचे अनुष्ठान करणारा तो त्यागी. [ काम्य व निषिद्ध कर्म बन्धाला कारण होतें म्हणून त्याचा द्वेष करीत नाहीं व नित्यनैमित्तिक कर्म मोक्षाला कारण होते, म्हणून त्याच्यावर आसक्त होत नाहीं, असा याचा भावार्थ. ]

**कदा पुनरसावकुशलं कर्म न द्वेष्टि कुशले च नानुषज्जत इत्युच्यते सत्त्वसमाविष्टो यदा सत्त्वेनाऽऽत्मानात्मविवेकविज्ञानहेतुना समाविष्टः संव्याप्तः संयुक्त इत्येतत् । अत एव च मेधावी मेधयाऽऽत्मज्ञानलक्षणया प्रज्ञया संयुक्तस्तद्वान्मेधावी मेधावित्वादेव च्छिन्नसंशयच्छिन्नोऽविद्याकृतः संशयो यस्याऽऽत्मस्वरूपावस्थानमेव परं निःश्रेयससाधनं नान्यत्किंचिदित्येवं निश्चयेन च्छिन्नसंशयो योऽधिकृतः पुरुषः पूर्वोक्तेन प्रकारेण कर्मयोगानुष्ठानेन क्रमेण संस्कृतात्मा सञ्जन्मादिविक्रियारहितत्वेन निष्क्रियमात्मानमात्मत्वेन संबुद्धः स सर्वकर्माणि मनसा संन्यस्य नैव कुर्वन्न कारयन्नासीनो नैष्कर्म्यलक्षणां ज्ञाननिष्ठामश्नुत इत्येतत्पूर्वोक्तस्य कर्मयोगस्य प्रयोजनमनेन श्लोकेनोक्तम् ॥ १० ॥**

**भाष्यार्थ—कदा पुनः असौ अकुशलं कर्म न द्वेष्टि च कुशले न अनुषज्जते इति उच्यते**—केव्हां बरें हा अशुभ कर्मांचा द्वेष करीत नाहीं व कुशल कर्मांमध्यें आसक्त होत नाहीं, म्हणून कोणी विचारील तर त्याचें उत्तर सांगितलें जातें.

**—सत्त्वसमाविष्टः-यदा सत्त्वेन आत्मानात्मविवेकविज्ञानहेतुना समाविष्टः-संव्याप्तः-संयुक्तः इति-एतत्**—( फलेच्छा सोडून नित्य-नैमित्तिककर्मानुष्ठान केल्यानें ज्याचें पाप क्षीण झालें आहे त्याचें चित्त वस्तूचें यथार्थ ग्रहण करण्यास समर्थ होतें. त्याचे स्वरूपज्ञानाविषयींचे संस्कार जागृत होतात. हाच सत्त्वसमावेश होय. ) जेव्हां पुरुष अशा सत्त्वानें म्ह० आत्मा व अनात्मा यांच्या विवेकविज्ञानाला कारण होणाऱ्या सत्त्वानें समाविष्ट म्ह० संव्याप्त-संयुक्त होतो, असा याचा भावार्थ.—**अतः एव च, मेधावी-मेधया-आत्मज्ञानलक्षणया प्रज्ञया संयुक्तः-तद्वान्-मेधावी**—आणि त्यामुळेंच मेधावी-मेधेनें-आत्मज्ञानरूप प्रज्ञेनें संयुक्त-मेधावान्-मेधावी—**मेधावित्वात् एव छिन्नसंशयः**—आणि मेधावित्वामुळेंच-मेधावीपणामुळेंच छिन्नसंशय—**छिन्नः अविद्याकृतः संशयः यस्य**—ज्याचा अविद्याकृत संशय तुटला आहे—**आत्मस्वरूपावस्थानं एव परं निःश्रेयससाधनं अन्यत् किंचित् न इति-एवं निश्चयेन छिन्नसंशयः**—आत्मस्वरूपावस्थान हेंच सर्वोत्तम मोक्षसाधन आहे, दुसरे कांहीं नाहीं, अशा प्रकारच्या निश्चयानें ज्याचे सर्व संशय तुटले आहेत असा तो होतो. ( या सर्व श्लोकाचा अर्थ थोडक्यात सांगतात- )—**यः अधिकृतः पुरुषः पूर्वोक्तेन प्रकारेण कर्मयोगानुष्ठानेन संस्कृतात्मा सन्**—जो अधिकारी पुरुष पूर्वोक्त प्रकारानें म्ह० कर्मासक्ति व कर्मफलेच्छा यांस सोडून कर्मयोगाच्या म्ह० कर्मरूप योगाच्या अनुष्ठानानें सुसंस्कृतचित्त झालेला—**क्रमेण जन्मादिविक्रियारहितत्वेन निष्क्रियं आत्मानं आत्मत्वेन संबुद्धः सः**—श्रवणादि अनुष्ठानाच्या द्वारा जन्मादिविक्रियारहित असल्यामुळें निष्क्रिय, अशा आत्म्यालाच आत्मत्वानें ' हाच मी ' असें साक्षात् ज्यानें जाणलें तो—'**सर्वकर्माणि मनसा संन्यस्य**'—सर्व कर्मांचा मनानें त्याग करून ( अ. ५ श्लो. १३ पृ. ५०४)—'**नैव कुर्वन् न कारयन् आसीनः**'—स्वतः कांहींच न करणारा व न करविणारा, असा शरीरांत राहून—**नैष्कर्म्यलक्षणां ज्ञाननिष्ठां अश्नुते**—नैष्कर्म्यरूप ज्ञाननिष्ठेचा अनुभव घेतो.—**इति एतत् पूर्वोक्तस्य कर्मयोगस्य प्रयोजनं अनेन श्लोकेन उक्तं**—असें हे पूर्वोक्त कर्मयोगाचें प्रयोजन या श्लोकानें सांगितलें आहे. १०.

**यः पुनरधिकृतः सन्देहात्माभिमानित्वेन देहभृदज्ञोऽबाधितात्मकर्तृत्वविज्ञानतयाऽहं कर्तेतिनिश्चितबुद्धिस्तस्याशेषकर्मपरित्यागस्याशक्यत्वात्कर्मफलत्यागेन चोदितकर्मानुष्ठान एवाधिकारो न तत्याग इत्येतमर्थं दर्शयितुमाह—**

---

१ पण रहस्यकार या श्लोकाला " खरा त्यागी किंवा संन्यासी कोण हे सांगतात " असें अवतरण देऊन " एखादें कर्म अकुशल म्ह० अकल्याणकर असले तर द्वेष करीत नाही व दुसरें कल्याणकारक किंवा फायद्याचें आहे म्हणून त्यांत अनुषक्त होत नाही तो सत्त्वशील, बुद्धिमान् व संशयविरहित त्यागी म्ह० संन्यासी म्हणावयाचा " असा करितात. तो मुळाला कितपत धरून व सुबोध आहे, त्याचा विचार वाचकांनीं करावा.

**भाष्यार्थ**—( आत्मज्ञानी पुरुषाच्या सर्वकर्मसंन्यासाची संभावना सांगून आत्मज्ञान-शून्य पुरुषाच्या सर्वकर्मत्यागाचा असंभव दाखविण्यासाठीं पुढील श्लोक आहे, या आशयानें आचार्य अवतरण देतात–)—**यः पुनः अधिकृतः सन् देहात्माभिमानित्वेन देहभृत् अज्ञः**—पण जो अधिकृत असून 'देहच मी' असा अभिमान असणें, या कारणाने देहभृत्-अज्ञ—**अबाधित-आत्मकर्तृत्वविज्ञानतया ' अहं कर्ता' इति-निश्चितबुद्धिः**—ज्याचें आत्म्याविषयींचें कर्तृत्वविज्ञान–मी कर्ता हा अनुभव अबाधित आहे, त्याचा बाध झालेला नाहीं तो अज्ञ अबाधित-आत्मकर्तृत्वविज्ञान होय.त्याचा जो भाव– ( पणा ) ती अबाधित-आत्मकर्तृत्वविज्ञानता, त्या आत्मकर्तृत्वानुभवत्वामुळें ' मी कर्ता ' अशी ज्याची निश्चितबुद्धि आहे—**तस्य अशेषकर्मपरित्यागस्य अशक्यत्वात्**—त्याच्या सर्वकर्मपरित्यागाला अशक्यत्व असल्यामुळे ह्म० त्याच्या सर्वकर्मत्यागाचा असंभव असल्यामुळें—**कर्मफलत्यागेन चोदितकर्मानुष्ठाने एव अधिकारः**—त्याचा कर्मफलत्यागाच्या योगानें विहित कर्मानुष्ठानांतच अधिकार आहे.—**तत्त्यागे न**—त्या विहित कर्मांच्या त्यागामध्ये त्याचा अधिकार नाहीं.—**इति एतं अर्थं दर्शयितुं आह**—असा हा अर्थ दाखविण्यासाठीं भगवान् ' न हि० ' या श्लोकाने ह्मणतात. [ देहच मी अशी ज्याची भावना असते तो मीच कर्ता असें निश्चयानें जाणतो. अशा अज्ञ देहात्मवादी मनुष्याचा सर्वकर्मत्याग सर्वथा अशक्य आहे. त्याचा कर्मफलत्यागाने विहित कर्मानुष्ठानांतच अधिकार आहे, त्यांचा त्याग करण्याचा त्याला अधिकार नाहीं, हे या पुढील श्लोकांत सांगितलें आहे. ]

न हि देहभृता शक्यं त्यक्तुं कर्माण्यशेषतः ।
यस्तु कर्मफलत्यागी स त्यागीत्यभिधीयते ॥११॥

**अन्वयार्थ**—**देहभृता**—देहच आत्मा असा अभिमान धरणाऱ्या पुरुषाकडून—**कर्माणि**—कर्में—**अशेषतः**—निःशेष—**त्यक्तुं**—टाकलीं जाणे—**न हि शक्यं**—शक्य नाहीं.—**तु**—पण—**यः कर्मफलत्यागी**—जो कर्मफलाचा त्याग करणारा—**सः त्यागी**—तो त्यागी—**इति अभिधीयते**—असें म्हटले जातें. ११.

**न हि यस्माद्देहभृता देहं बिभर्तीति देहभृद्देहात्माभिमानवान्देहभृदुच्यते न हि विवेकी स हि वेदाविनाशिनमित्यादिना कर्तृत्वाधिकारान्निवर्तितोऽतस्तेन देहभृताऽज्ञेन न शक्यं त्यक्तुं संन्यसितुं कर्माण्यशेषतो निःशेषेण । तस्माद्यस्त्वज्ञोऽधिकृतो नित्यानि कर्माणि कुर्वन्कर्मफलत्यागी कर्मफलाभिसंधिमात्रसंन्यासी स त्यागीत्यभिधीयते कर्म्यपि सन्निति स्तुत्यभिप्रायेण । तस्मात्परमार्थदर्शिनैवादेहभृता देहात्मभावरहितेनाशेषकर्मसंन्यासः शक्यते कर्तुम् ॥ ११ ॥**

**भाष्यार्थ**—**हि-यस्मात् देहभृता-देहं बिभर्ति इति देहभृत्-देहात्माभिमानवान देहभृत उच्यते**—ज्याअर्थीं देहभृताकडून, देहाला-धारण करितें

**म्हणून देहभृत्**, ' देहच मी ' असा ज्याला अभिमान असतो तो ' देहभृत् ' म्हटला जातो.—**विवेकी न हि**—विवेकी देहभृत् म्हटला जात नाहीं.—**हि सः ' वेदाविनाशिनं० ' इत्यादिना कर्तृत्वाधिकारात् निवर्तितः**—कारण तो विवेकी ' वेदाविनाशिनं० ' ( अ. २ श्लो. २१ पृ. १०० ) इत्यादि श्लोकानें कर्तृत्वाधिकारापासून निवृत्त केलेला आहे. [ कर्तृत्वाधिकार व तत्पूर्वक कर्मानुष्ठान यांपासून निवृत्त केला आहे ]—**अतः**—यास्तव म्ह० ज्ञानवान् देहधारण जरी करीत असला तरी त्याला ' देहच मी ' असा अभिमान नसल्यामुळे—**तेन देहभृता अज्ञेन कर्माणि अशेषतः-निःशेषेण त्यक्तुं-संन्यसितुं न शक्यं**—त्या देहभृत्-देहाभिमानी अज्ञाकडून कर्मे अशेषतः-निःशेष टाकलीं जाणें-त्यांचा सर्वप्रकारें संन्यास करणें शक्य नाहीं, ( ज्या अर्थी असें आहे, अज्ञाचा सर्वकर्मत्याग संभवत नाहीं )—**तस्मात् यः तु अज्ञः-अधिकृतः नित्यानि कर्माणि कुर्वन्**—त्या अर्थी जो कोणी अज्ञ कर्माधिकारी नित्य कर्मे करीत होत्साता—**कर्मफलत्यागी-कर्मफलाभिसंधिमात्रसंन्यासी-सः त्यागी इति अभिधीयते**—कर्मफलाचा त्याग करणारा-केवळ कर्मफलाविषयींची इच्छा सोडणारा तो त्यागी असें म्हटला जातो. ( अहोपण, कर्मानुष्ठान करणाराला त्यागी म्हणणे अयोग्य आहे ! उत्तर-)—**कर्मी अपि सन् इति स्तुत्यभिप्रायेण**—तो वस्तुतः कर्मानुष्ठान करणारा जरी असला तरी फलत्याग या गुणामुळें त्या फलत्यागाची स्तुति करण्याच्या आशयाने त्याला भगवान् त्यागी म्हणतात. ( तर मग सर्वकर्मत्याग कोण करूं शकतो ? उत्तर-)—**तस्मात् परमार्थदर्शिना एव अदेहभृता देहात्मभावरहितेन अशेषकर्मसंन्यासः कर्तुं शक्यते**—तस्मात् परमार्थदर्शी-विवेकवैराग्यादिमान् व अदेहभृत् म्ह० देहच आत्मा या भावानें रहित-देहाभिमानशून्य अशा ज्ञानी पुरुषाकडूनच सर्वकर्मसंन्यास घडणे शक्य आहे. त्यालाच सर्वकर्मसन्यास करितां येतो. ११

## अनिष्टमिष्टं मिश्रं च त्रिविधं कर्मणः फलम् ।
## भवत्यत्यागिनां प्रेत्य न तु संन्यासिनां क्वचित् ॥१२॥

**अन्वयार्थ—अनिष्टं**—पश्वादि योनि प्राप्त होणें हें अनिष्ट,—**इष्टं**—देवादि योनि प्राप्त होणें हें इष्ट—**च**—व—**मिश्रं**—मनुष्यादि योनिप्राप्ति हें मिश्र असें—**कर्मणः**—कर्मांचें—**त्रिविधं फलं**—तीन प्रकारचे फल—**अत्यागिनां**—त्याग न

---

१ रहस्यकार या श्लोकाचा अर्थ असा करितात—"ज्याला म्हणून देह आहे त्याला कर्माचा निःशेष त्याग करणे शक्य नाही. म्हणून ज्यानें कर्मे न सोडतां फक्त कर्मफलांचा त्याग केला त्यालाच खरा त्यागी म्ह० संन्यासी म्हटलें आहे." पण कर्मफलत्याग हा गौण संन्यास आहे व तो देहाभिमानी पुरुषासाठीच आहे, हे आम्हीं वारंवार सांगितलें आहे व वर आचार्य-भाष्यांत याचें स्पष्टीकरण झालेंच आहे.

करणारांना—**प्रेत्य**—मेल्यावर—**भवति**—प्राप्त होतें.—**तु**—पण—**संन्यासिनां**—संन्याश्यांना—**क्वचित्**—केव्हांहि तें—**न**—मिळत नाहीं. १२.

**किं पुनस्तत्प्रयोजनं यत्सर्वकर्मपरित्यागात्स्यादित्युच्यते—अनिष्टं नरकतिर्यगादिलक्षणमिष्टं देवादिलक्षणं मिश्रमिष्टानिष्टसंयुक्तं मनुष्यलक्षणं चैवं त्रिविधं त्रिप्रकारं कर्मणो धर्माधर्मलक्षणस्य फलं बाह्यानेककारकव्यापारनिष्पन्नं सदविद्याकृतमिन्द्रजालमायोपमं महामोहकरं प्रत्यगात्मोपसर्पीव फल्गुतया लयमदर्शनं गच्छतीति फलमिति फलनिर्वचनं तदेतदेवंलक्षणं फलं भवत्यत्यागिनामज्ञानां कर्मिणामपरमार्थसंन्यासिनां प्रेत्य शरीरपातादूर्ध्वम् । न तु परमार्थसंन्यासिनां परमहंसपरिव्राजकानां केवलज्ञाननिष्ठानां क्वचित् । न हि केवलसम्यग्दर्शननिष्ठा अविद्यादिसंसारबीजं नोन्मूलयन्ति कदाचिदित्यर्थः**

**भाष्यार्थ**—( अज्ञ कर्माधिकाऱ्याचा सर्वकर्मसंन्यास जरी संभवत नसला तरी फलाच्या अभावीं त्यानें तीं कर्में कां करावीं ? अशी शंका- )—**यत् सर्वकर्मपरित्यागात् स्यात् तत् प्रयोजनं किं पुनः**—जें सर्वकर्मपरित्यागामुळें प्राप्त होतें, तें प्रयोजन-फल काय बरें आहे ?—**इति उच्यते**—असें विचारशील तर सांगतों—( गौणसंन्यासाचें फल विचारतोस कीं मुख्य संन्यासाचें ? अशा विकल्पपूर्वक उत्तर- )—**अनिष्टं-नरक-तिर्यगादिलक्षणं**—अनिष्ट म्हणजे नरक-तिर्यग्योनि इत्यादि रूप—**इष्टं-देवादिलक्षणं**—इष्ट-देवादियोनिप्राप्तिरूप—**च मिश्रं-इष्टानिष्टसंयुक्तं मनुष्यलक्षणं**—व मिश्र म्ह० इष्टानिष्टसंयुक्त मनुष्ययोनिप्राप्तिरूप—**एवं त्रिविधं-त्रिप्रकारं कर्मणः-धर्माधर्मलक्षणस्य फलं**—अशा रीतीनें त्रिविध-तीन प्रकारचें धर्माधर्मरूप कर्माचें फल मिळतें. ( फलशब्दाची व्युत्पत्ति सांगतात- )—**बाह्य-अनेक-कारकव्यापारनिष्पन्नं सत् अविद्याकृतं इन्द्रजाल-मायोपमं महामोहकरं**—बाह्य अनेक कारकांच्या-इंद्रियांच्या व्यापारामुळें निष्पन्न होणारें, अविद्याकृत, गारुड्याच्या मायेचीच ज्याला उपमा आहे असें महामोह पाडणारें—दिसायला फार रमणीय,—**प्रत्यगात्मोपसर्पि इव**—अविद्येपासून उत्पन्न झालेलें, त्यामुळेंच अविद्याश्रित असलेलें, तथापि भ्रमानें जणुं काय आत्म्याच्या आश्रयानेंच आहे, आत्म्याचेंच आहे असें भासणारें—**फल्गुतया लयं-अदर्शनं गच्छति इति फलं इति फलनिर्वचनं**—अतिशय क्षुद्र असल्यामुळें लयाला-अदर्शनाला प्राप्त होतें म्हणून फल, असें फलाचें निर्वचन-व्युत्पत्ति आहे.—**तत् एतत् एवंलक्षणं फलं**—तें हें अशा स्वरूपाचें त्रिविध फल—**अत्यागिनां अज्ञानां कर्मिणां अपरमार्थसंन्यासिनां प्रेत्य-शरीरपातात् ऊर्ध्वं भवति**—जे अत्यागी अज्ञ कर्मी-अमुख्यसंन्यासी त्यांना येथून गेल्यावर-शरीरपातानंतर-मरणोत्तर मिळतें.—**तु परमार्थसंन्यासिनां परमहंसपरिव्राजकानां केवलज्ञाननिष्ठानां क्वचित् न**—पण जे परमार्थसंन्यासी परमहंसपरिव्राजक केवल ज्ञाननिष्ठ त्यांना तसें त्रिविध फल केव्हांहि व कोठेंहि मिळत नाहीं. [ अर्थात् अमुख्य संन्यासी केवल कर्मफलत्याग जरी करीत असले तरी तेवढ्यानेंच त्यांना मोक्ष प्राप्त होणें शक्य नसल्यामुळें त्यांच्या

कर्मानुसार त्यांना पूर्वोक्त त्रिविध फल अवश्य प्राप्त होतें. पण परमार्थ संन्याश्यांना मात्र तसें फल केव्हांहि मिळत नाहीं. अहोपण, मग असला निष्फळ परमार्थ संन्यास करणार कोण ? अशी आशंका घेऊन म्हणतात- ]—**केवलसम्यग्दर्शननिष्ठाः अविद्यादिसंसारबीजं न उन्मूलयन्ति इति कदाचित् न हि इत्यर्थः**—केवल सम्यग्दर्शननिष्ठ—आत्मज्ञाननिष्ठ अविद्यादि संसारबीजाचें उन्मूलन करीत नाहींत असें केव्हांहि होत नाही, असा याचा भावार्थ. [ अर्थात् परमार्थसंन्यास मोक्षामध्यें पर्यवसान पावत असल्यामुळे तो व्यर्थ नाहीं. परमफलोपयोगी आहे. ] १२

**अतः परमार्थदर्शिन एवाशेषकर्मसंन्यासित्वं संभवत्यविद्याध्यारोपितत्वादात्मनि क्रियाकारकफलानां न त्वज्ञस्याधिष्ठानादीनि क्रियाकर्तॄणि कारकाण्यात्मत्वेन पश्यतोऽशेषकर्मसंन्यासः संभवति । तदेतदुत्तरैः श्लोकैर्दर्शयति—**

**भाष्यार्थ—अतः परमार्थदर्शिनः एव अशेषकर्मसंन्यासित्वं संभवति**—यास्तव परमार्थदर्शी पुरुषाचेंच सर्वकर्मसंन्यासित्व संभवते.—**आत्मनि क्रियाकारक-फलानां अविद्याध्यारोपितत्वात्**—कारण आत्म्यामध्ये क्रिया, कारक व फल अविद्येमुळें अध्यारोपित आहेत. [ अज्ञानामुळे त्यांचा आत्म्यावर आरोप केला जातो. त्यामुळें आत्मा सर्व क्रिया कारक-फलशून्य सच्चिद्घनस्वरूप आहे असें जाणणाऱ्या ज्ञानी पुरुषाचाच सर्वकर्मसंन्यास संभवतो. ]—**तु अधिष्ठानादीनि क्रियाकर्तॄणि कारकाणि आत्मत्वेन पश्यतः अज्ञस्य अशेषकर्मसंन्यासः न संभवति**—पण अधिष्ठानादिक क्रिया करणारीं कारकेंच आत्मा—मी असे पाहणाऱ्या-‘ शरीरादिकच मी ’ असे समजणाऱ्या अज्ञाचा सर्वकर्मसंन्यास संभवतच नाही.—**तत् एतद् उत्तरैः श्लोकैः दर्शयति**—तेंच हे पुढील चार श्लोकांनीं भगवान् दाखवितात-

**पञ्चेमानि महाबाहो कारणानि निबोध मे ।**
**सांख्ये कृतान्ते प्रोक्तानि सिद्धये सर्वकर्मणाम् ॥१३**

**अन्वयार्थ—महाबाहो**—हे महापराक्रमी अर्जुना !—**सर्वकर्मणां सिद्धये**—सर्व कर्मांच्या सिद्धीसाठीं—**सांख्ये कृतांते**—कर्मांची ज्यांत परिसमाप्ति होते त्या वेदान्तांत—**प्रोक्तानि**—सांगितलेलीं—**इमानि पंच कारणानि**—हीं पांच कारणें—**मे निबोध**—तूं माझ्यापासून समजून घे. १३

**पञ्चेमानि वक्ष्यमाणानि हे महाबाहो, कारणानि निर्वर्तकानि निबोध मे ममेति उत्तरत्र चेतःसमाधानार्थं वस्तुवैषम्यप्रदर्शनार्थं च तानि कारणानि ज्ञातव्यतया स्तौति ।**

---

१ रहस्यकार यांतील अनिष्ट,इष्ट इत्यादि शब्दांच्या अर्थाचें स्पष्टीकरण करण्याच्या भानगडींत पडत नाहींत. या श्लोकावरील टीपेंत “सर्वकर्मांचा संन्यास केव्हांच गीतेस इष्ट नाही. फलाशेचा त्याग करणारा पुरुषच गीतेप्रमाणे खरा किंवा नित्यसंन्यासी होय ” इत्यादि जें म्हटलें आहे त्याचें भ्रामकत्व आम्ही पुष्कळदा विशद केलेंच आहे.

**सांख्ये ज्ञातव्याः पदार्थाः संख्यायन्ते यस्मिञ्शास्त्रे तत्सांख्यं वेदान्तः । कृतान्त इति तस्यैव विशेषणं कृतमिति कर्मोच्यते तस्यान्तः कृतस्य परिसमाप्तिर्यत्र स कृतान्तः कर्मान्त इत्येतत् । 'यावानर्थ उदपाने' 'सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते' इत्यात्मज्ञाने संजाते सर्वकर्मणां निवृत्तिं दर्शयति । अतस्तस्मिन्नात्मज्ञानार्थे सांख्ये कृतान्ते वेदान्ते प्रोक्तानि कथितानि सिद्धये निष्पत्त्यर्थं सर्वकर्मणाम् ॥ १३ ॥**

**भाष्यार्थ—हे महाबाहो, इमानि वक्ष्यमाणानि पंच कारणानि-निर्वर्तकानि मे-मम निबोध**—हे आजानुबाहो ! हीं पुढें सांगितलीं जाणारी पांच कारणें-क्रिया करणारी साधनें माझ्या तोंडून ऐक—**इति उत्तरत्र चेतःसमाधानार्थं वस्तुवैषम्यप्रदर्शनार्थं च**—असे पुढील 'अधिष्ठानं॰' इत्यादि उपदेशामध्यें चित्ताचें समाधान ठेवण्यासाठीं-तिकडे लक्ष देण्यासाठीं व त्या अधिष्ठानादि वस्तूंचे ज्ञान अतिशय कठिण आहे, हें प्रदर्शित करण्यासाठीं भगवान् म्हणतात. [ चित्तसमाधानावांचून त्यांचें ज्ञान होणें शक्य नाहीं, म्हणून लक्ष्य लावून ऐक, असे भगवान् सुचवितात. ]—**तानि च कारणानि ज्ञातव्यतया स्तौति**—आतां त्याच कारणांची ज्ञातव्यत्वानें-अवश्य जाणण्यास योग्य अशा रूपानें भगवान् स्तुति करितात—**सांख्ये-ज्ञातव्याः पदार्थाः यस्मिन् शास्त्रे संख्यायन्ते तत् सांख्यं वेदान्तः**—सांख्यामध्ये-ज्ञातव्य पदार्थ ज्या शास्त्रांत गणले जातात-सांगितले जातात ते सांख्य म्ह॰ वेदान्तशास्त्र त्यांत—**कृतान्ते इति तस्य एव विशेषणं**—'कृतान्ते' हें त्या सांख्यशास्त्राचेंच विशेषण आहे.—**कृतं इति कर्म उच्यते**—'कृतं' या शब्दानें कर्म सांगितले जातें.—**तस्य अन्तः-कृतस्य परिसमाप्तिः यत्र सः कृतान्तः-कर्मान्तः इति एतत्**—त्याचा अन्त म्ह॰ कृताची-कर्माची परिसमाप्ति ज्यांत होते तो कृतान्त-कर्मान्त असा याचा भावार्थ.—**'यावानर्थ उदपाने'**—कूपादि अल्प जलाशयांत जेवढा कार्यभाग होतो तो सर्व समुद्रांत अन्तर्भूत होतो,त्याच न्यायानें कर्मार्थ-सर्व वेदाचें फल ब्राह्मणाच्या ज्ञानांत अन्तर्भूत होतें. ( अ. २ श्लो. ४६ पृ. १६८ ) व—**'सर्वं कर्म अखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते'**—हे पार्था ! सर्व कर्म प्रतिबंधावांचून ज्ञानांत अन्तर्भूत होतें. ( अ. ४ श्लो. ३३, पृ. ४४९ )—**इति आत्मज्ञाने संजाते सर्वकर्मणां निवृत्तिं दर्शयति**—या वचनांनी स्वतः भगवान्च आत्मसाक्षात्कार झाला असतां सर्वकर्मांची निवृत्ति दाखवितात—**अतः तस्मिन् आत्मज्ञानार्थे सांख्ये कृतान्ते वेदान्ते सर्वकर्मणां सिद्धये-निष्पत्त्यर्थं प्रोक्तानि-कथितानि**—यास्तव त्या आत्मज्ञानासाठीं असलेल्या कर्मान्त सांख्य-वेदान्त-शास्त्रांत सर्व कर्मांच्या सिद्धीसाठीं-कर्मनिष्पत्तीसाठीं ( पांच कारणें ) सांगितलीं आहेत. १३.

---

१ रहस्यकार या श्लोकांतील 'सांख्ये कृतान्ते' याचा अर्थ "सांख्यांच्या सिद्धान्तांत" असा करितात, व टीपेंत त्याचे समर्थनहि करितात. यास्तव आपल्यालाहि त्याचा विचार केला पाहिजे.—" सांख्य म्ह॰ वेदान्तशास्त्र असा कित्येक टीकाकार अर्थ करितात" (होय करितात. कित्येक असें मोघम कशाला ? शंकराचार्य, नीलकंठ, मधुसूदनसरस्वती, शंक-

रानन्द, भाष्योत्कर्षदीपिकाकार, श्रीधर,वगैरे अद्वैती तर वेदान्तशास्त्र असा अर्थ करितातच, पण मध्वाचार्य "सांख्ये कृतान्ते–ज्ञानसिद्धान्ते" असे म्हणतात. रामानुजाचार्य– "संख्या बुद्धिः–सांख्ये कृतान्ते यथावस्थिततत्त्वविषयया वैदिक्या बुद्ध्या अनुसंहिते निर्णये" असें म्हणतात. वल्लभसंप्रदायी टीकाकारहि–कृतान्त म्ह० वेदान्तच म्हणतात. फार काय पण ज्ञानोबारायहि "वेदरायाचिया राजभवनीं, सांख्यवेदान्ताच्या भवनीं" असे म्हणतात. मध्वभाष्याचे टीकाकार तर 'कापिलतन्त्रस्य निंदितत्वात्' असें म्हणून येथें सांख्यशब्दानें कापिलदर्शन न घेण्याचें कारण सांगतात. अर्थात् एकटे रहस्यकारच सांख्यदर्शनाचे पक्षपाती ठरतात. तथापि ते आपल्या अर्थाचे असे समर्थन करितात–"चवदावा श्लोक नारायणीय धर्मांत अक्षरशः आला असून तेथे तत्पूर्वी प्रकृति व पुरुष या कापिल सांख्यातील तत्त्वाचा उल्लेख असल्यामुळे सांख्यशब्दाने प्रकृतस्थळीं कापिल सांख्यशास्त्रच अभिप्रेत आहे, असें आमचें मत आहे." पण ते अत्यन्त लटपटित आहे. किंबहुना रह॰ काराचे हे समर्थन बादरायणसंबंधाचे एक उत्कृष्ट उदाहरण आहे. 'अधिष्ठानं तथा कर्ता' हा श्लोक नारायणीय उपाख्यानात आहे.त्याच्यापूर्वी 'कारणं पुरुषो ह्येषां प्रधानं चापि कारणम्। स्वभावश्चैव कर्माणि दैवं येषां च कारणम् ॥८५॥' असा श्लोक आहे. यांत पुरुष, प्रधान–प्रकृति, स्वभाव,कर्म व दैव हीं पांच कारणें सांगितलीं आहेत. यांच पांच कारणांचा गीतेंत 'अधिष्ठानं०' इत्यादि श्लोकानें निर्देश केला आहे, हें सांगण्यासाठीं गीतेंतील प्रस्तुत श्लोकाचा तेथें अनुवाद केला आहे व पुढें 'या सर्वांची निष्ठा सर्वत्र हरि आहे,' असें म्हटलें आहे. प्रस्तुत प्रकरण जरी पाहिले तरी 'एष वेदनिधिः श्रीमान् एष वै तपसो निधिः। एष योगश्च सांख्यं च ब्रह्म चाग्र्य हविर्विभुः ॥ ७८ ॥ नारायणपरा वेदा यज्ञा नारायणात्मकाः। तपो नारायणपरं नारायणपरा गतिः ॥ ७९ ॥ नारायणपरं सत्यं ऋतं नारायणात्मकम्। नारायणपरो धर्मः पुनरावृत्तिदुर्लभः ॥ ८० ॥ प्रवृत्तिलक्षणश्चैव धर्मो नारायणात्मकः। नारायणात्मको गन्धो भूमौ श्रेष्ठतमः स्मृतः ॥८१॥... .. नारायणपरा कीर्तिः श्रीश्च लक्ष्मीश्च देवताः। नारायणपरं सांख्यं योगो नारायणात्मकः ॥ ८५ ॥' असें आहे. यांत सर्व नारायणस्वरूप आहे असें सांगत आहेत. तेव्हां 'अधिष्ठानं तथा कर्ता०' वगैरे जी प्रत्येक क्रियेचीं पांच कारणें सांगितलीं आहेत, तीं सांख्यदर्शनांतील आहेत, असें म्हणण्यास येथें काय आधार आहे? तत्पूर्वी 'प्रकृति व पुरुष या कापिलसांख्यशास्त्रांतील तत्त्वांचा उल्लेख आहे' असें रहस्यकार म्हणतात.असेल;पण त्यावरून हीं कारणें कापिल सांख्यशास्त्रोक्तच आहेत,हें कसें ठरतें? प्रत्यक्ष त्या दर्शनांत त्याविषयीं कांहीं आधार नाहीं. शिवाय प्रधान–प्रकृति व पुरुष हे शब्द–हीं तत्त्वें सांख्यदर्शनांतीलच आहेत, व उपनिषदांतील नाहींत असें थोडेंच आहे? उपनिषदांत पुरुष, प्रकृति, प्रधान, महत्, अव्यक्त इत्यादि शब्द आहेत. याविषयीं आम्ही मागें बरेंच लिहिलें आहे, म्हणून येथें अधिक विस्तार करीत नाहीं. (पृ. १२५–२६,९४४) 'नारायणपरं सांख्यं योगो नारायणात्मकः' असे शब्द वर ८५ व्या श्लोकांत आहेत. त्यांतील सांख्य व योग हे वैदिक शब्द आहेत. किंवा कापिल दर्शन याच अर्थी सांख्य आहे म्हणून म्हटलें तर योगहि पातंजल दर्शन याअर्थी घेतला पाहिजे. मिळून त्यापासून रहस्यकारांना इष्ट असें कांहीच निष्पन्न होत नाहीं. वरील उताऱ्यांतील ७९ श्लोकाचा उत्तरार्ध व ऐंशींचा पूर्वार्ध यांचा उल्लेख करून रहस्यकारांनीं, मूर्वी (गी. र. पृ. १०) असा अर्थ

**अधिष्ठानं तथा कर्ता करणं च पृथग्विधम् ।**
**विविधाश्च पृथक् चेष्टा दैवं चैवात्र पंचमम् ॥१४॥**

**अन्वयार्थ—अधिष्ठानं**—शरीर,—**तथा कर्ता**—तसाच कर्ता-मी असें म्हणणारा,—**च पृथग्विधं करणं**—आणि नाना प्रकारचें श्रोत्रादिक इंद्रियजात,—**च विविधाः पृथक् चेष्टाः**—आणि नाना-पृथक् पृथक् प्राणादिकांच्या चेष्टा—**च**—आणि—**अत्र**—या चार कारणांत—**दैवं एव पंचमं**—इंद्रियांवर अनुग्रह करणारें आदित्यादि दैवत हें पांचवें. १४

कानि तानीत्युच्यते—**अधिष्ठानमिच्छाद्वेषसुखदुःखज्ञानादीनामभिव्यक्तेराश्रयोऽधिष्ठानं शरीरं तथा कर्तोपाधिलक्षणो भोक्ता करणं च श्रोत्रादिकं शब्दाद्युपलब्धये पृथग्विधं नानाप्रकारं द्वादशसंख्यं विविधाश्च पृथक्चेष्टा वायवीयाः प्राणापानाद्या दैवं चैव दैवमेव चात्रैतेषु चतुर्षु पञ्चमं पञ्चानां पूरणमादित्यादि चक्षुराद्यनुग्राहकम् ॥ १४ ॥**

**भाष्यार्थ—कानि तानि इति उच्यते**—तीं अधिष्ठानादि कारणें कोणतीं तीं सांगितलीं जातात.—**अधिष्ठानं-इच्छा-द्वेष-सुख-दुःख-ज्ञानादीनां अभिव्यक्तेः आश्रयः-अधिष्ठानं शरीरं**—अधिष्ठान म्ह० इच्छा, द्वेष, सुख, दुःख, ज्ञान इत्यादिकांच्या अभिव्यक्तीचा आश्रय, तेंच अधिष्ठान म्ह० शरीर—**तथा कर्ता-उपाधिलक्षणः भोक्ता**—तसाच कर्ता म्ह० उपाधिलक्षण भोक्ता [ बुद्ध्यादि हीच उपाधि, तेंच ज्याचे लक्षण म्ह० स्वभाव आहे तो उपाधिलक्षण भोक्ता होय. ह्मणजे बुद्ध्यादिकांप्रमाणें बनणारा-त्यांचे धर्म आपल्या ठिकाणी पाहणारा, सोपाधिक-बुद्धिप्रधान ]—**च करणं-श्रोत्रादिकं शब्दादि-उपलब्धये पृथग्विधं नानाप्रकारं द्वादशसंख्यं**—व करण ह्मणजे श्रोत्रादिक, शब्दादिकांच्या ज्ञानासाठीं पृथक् म्हणजे नानाप्रकारचें-पांच ज्ञानेंद्रियें, पांच कर्मेंद्रियें आणि मन व बुद्धि असे बारा प्रकारचें करण—**च विविधाः पृथक् चेष्टाः वायवीयाः प्राणापानाद्याः**—व नानाप्रकारच्या

---

दिला आहे—" हा नारायणीयधर्म पुनर्जन्म टाळणारा म्ह० पूर्णमोक्षप्रद असून तो प्रवृत्तिपरहि आहे असें त्याचें दुहेरी लक्षण देऊन"...वगैरे. पण हा अर्थ बरोबर नाहीं, हें आतां कोणाच्याहि ध्यानांत येईल. त्याचा खरा अर्थ-पुनरावृत्तिदुर्लभ म्ह० पुनर्जन्म ज्यामुळें दुर्लभ होतो असा निवृत्तिधर्म नारायणपर—नारायणात्मक आहे व प्रवृत्तिलक्षण धर्महि नारायणात्मक आहे असा आहे. मागचीं पुढचीं वचनें पाहिलीं म्हणजे हाच अर्थ बरोबर आहे, हें अल्पसंस्कृतज्ञांच्याहि ध्यानात येईल. अशा विपरीत अर्थानेंच रहस्यकार आचार्यांचा अबाधित सिद्धान्त खोडून काढून आपला प्रमाणशून्य कर्मयोग कितीसा सिद्ध करू शकतील तें दिसतेंच आहे ! तथापि सामान्य जनतेच्या अद्वैत सिद्धान्ताविषयींच्या व विशेषतः गीताभाष्याविषयींच्या अज्ञानाचा फायदा घेऊन त्यांनीं तात्कालिक जय संपादन केला आहे, एवढें मात्र खरें ! आतां तो किती दिवस टिकेल व निष्काम तज्ज्ञांच्या आदरास कितपत पात्र होईल, हा प्रश्न अगदीं वेगळा आहे.

पृथक् पृथक् चेष्टा ह्मणजे वायूच्या श्वास, उच्छ्वास इत्यादि निरनिराळ्या क्रिया—**दैवं च एव -दैवं एव च अत्र एतेषु चतुर्षु पंचमं-पंचानां पूरणं**—आणि दैव-दैव हेंच या चार कारणांतील पाचवें म्ह० पांच ही संख्या पूर्ण करणारें कारण होय. [ तें दैव कोणतें ? उत्तर-]—**चक्षुरादि-अनुग्राहकं आदित्यादि**—चक्षुरादि इंद्रियांवर अनुग्रह करणारें आदित्यादि हें पाचवें कारण होय. १४.

**शरीरवाङ्मनोभिर्यत्कर्म प्रारभते नरः ।**
**न्याय्यं वा विपरीतं वा पञ्चैते तस्य हेतवः ॥१५॥**

**अन्वयार्थ—नरः**—पुरुष—**शरीर-वाक-मनोभिः**—शरीर, वाणी व मन यांनी—**यत्**—जे—**न्याय्यं वा विपरीतं वा कर्म**—शास्त्रीय धर्मकार्य किंवा त्याच्या उलट अधर्म कार्य—**प्रारभते**—आरंभितो—**तस्य**—त्याचे—**एते पंच**—हे पांच—**हेतवः**—हेतु आहेत. १५

**शरीरेति । शरीरवाङ्मनोभिर्यत्कर्म त्रिभिरेतैः प्रारभते निर्वर्तयति नरो न्याय्यं वा धर्म्यं शास्त्रीयं, विपरीतं वाऽशास्त्रीयमधर्म्यम् । यच्चापि निमिषितचेष्टादिजीवनहेतु-**

---

१ या श्लोकाचा अर्थ रामानुजादि इतर भाष्यकार व सर्व टीकाकार असाच करितात. फार काय पण आमचे ज्ञानोबारायहि– " तरी देह हे मी म्हणे । पहिले एथ ॥ ३१५ ॥ ययातें अधिष्ठान ऐसे । म्हणिजे -..तिये भोगावया पुरुखा । आन ठावोचि नाही देखा । म्हणोनि अधिष्ठानभाखा । बोलिजे देह ॥ ३१८ ॥ किंबहुना अवस्थात्रया । हे अधिष्ठान धनंजया । म्हणोनि देहा यया । हेंचि नाम ॥ ३२० ॥ आणि कर्ता हे दुजे । कर्माचें कारण जाणिजे । प्रतिबिंब म्हणिजे । चैतन्याचे जे ॥ ३२१ ॥...तेवी बुद्धीचे एक जाणणें । श्रोत्रादिभेदें येणे । बाहेरी इंद्रियपणें । फाके जे का ॥ ३३० ॥ ते पृथग्विध करण । कर्माचे इया कारण । तिसरे गा जाण । नृपनंदना ॥" .इत्यादि अगदी आचार्यांच्या भाष्याप्रमाणेच व्याख्यान करितात. पण रहस्यकाराचा मार्गच निराळा ! ते म्हणतात—" अधिष्ठान ( जागा ), तसाच कर्ता, निरनिराळ्या प्रकारचे कारण ( करण ? ) म्ह० साधन किंवा हत्यार, अनेक प्रकारच्या कर्त्यांच्या पृथक पृथक चेष्टा म्ह० व्यापार आणि त्याबरोबरच पाचवे दैव होय. " हा अर्थ कितपत उपपन्न व सुबोध आहे ते आता वाचकांनीच ठरवावे. रहस्यकारांनीं टीपेंत " कर्माचे फल घडण्यास मनुष्य हा एकटाच कारण नाहीं. " इत्यादि कांहीं तरी असंबद्ध मजकूर पुष्कळ लिहिला आहे. पण त्याकडे दुर्लक्ष करणेंच आता भाग आहे. त्यांचे सर्व प्रतिपादन मुळाला सोडून केवल कल्पनामय असते. येथेच पहा.–'कोणत्याहि न्याय्य किंवा विपरीत कर्माचे हे पाच हेतु–कारणे आहेत ' असें भगवान् सांगत आहेत, पण रहस्यकार म्हणतात—" कर्माचें फल घडण्यास मनुष्य हा एकटाच कारण नाही. " मुळाशीं याचा कांहीं संबंध आहे ? कांहीं नाहीं. तरी सुद्धा आचार्यादिकाना सांप्रदायिक म्हणून दोष देण्यास तयारच ! आणि पुढे असल्या असंबद्ध वाक्याचेच सविस्तर सोदाहरण उपपादन केलें आहे ! तेव्हां अशा असंबद्ध पाल्हाळाचें काय परीक्षण करावयाचे आहे ?

स्तदपि पूर्वकृतधर्माधर्मयोरेव कार्यमिति न्याय्यविपरीतयोरेव ग्रहणेन गृहीतम् । पञ्चैते यथोक्तास्तस्य सर्वस्यैव कर्मणो हेतवः कारणानि । नन्वधिष्ठानादीनि सर्वकर्मणां कारणानि, कथमुच्यते शरीरवाङ्मनोभिः कर्म प्रारभत इति । नैष दोषः, विधिप्रतिषेधलक्षणं सर्वं कर्म शरीरादित्रयप्रधानं तदङ्गतया दर्शनश्रवणादि च जीवनलक्षणं त्रिधैव राशीकृतमुच्यते शरीरादिभिरारभत इति फलकालेऽपि तत्प्रधानैर्भुज्यत इति पञ्चानामेव हेतुत्वं न विरुध्यते ॥ १५ ॥

**भाष्यार्थ—'शरीर०' इति**—या श्लोकानें अधिष्ठानादिक पांच कारणें सर्व कर्मसिद्ध्यर्थ आहेत हे दाखवितात.—**नरः शरीर-वाङ्-मनोभिः एतैः त्रिभिः यत् कर्म प्रारभते-निर्वर्तयति**—पुरुष शरीर, वाणी व मन या तीन साधनांनीं जें कर्म आरंभितो म्ह० करतो ( तें कर्म कसें ? )—**न्याय्यं वा धर्म्यं-शास्त्रीयं विपरीतं वा अशास्त्रीयं-अधर्म्यं**—न्याय्य म्ह० धर्म्य-शास्त्रीय किंवा विपरीत -अशास्त्रीय-अधर्म्य ( धर्माला अनुसरून असलेलें-विहित ते धर्म्य,आणि त्याच्या उलट म्हणजे निषिद्ध तें अधर्म्य. अहोपण, जीवनासाठीं अवश्य असलेले निमिषोन्मेषादि दुसरेंहि साधारण कर्म आहे, मग येथें दोनच प्रकारचें कर्म का सांगितले आहे ? उत्तर-)—**यत् च अपि निमिषितचेष्टादि जीवनहेतुः तत् अपि पूर्वकृतधर्माधर्मयोः एव कार्यं**—आणि जें निमिषित-चेष्टादि-डोळ्याची उघड-झांक वगैरे जीवनाला कारण होणारें व दुसरींहि पहाणे वगैरे स्वाभाविक कर्मे, तें पूर्वी केलेल्या धर्माधर्मांचेंच कार्य आहे.—**इति न्याय्यविपरीतयोः ग्रहणेन एव गृहीतं**—म्हणून न्याय्य व विपरीत या शब्दांच्या ग्रहणानेंच त्या सर्व स्वाभाविक कर्मांचे ग्रहण केले आहे—**एते यथोक्ताः पंच तस्य सर्वस्य एव कर्मणः हेतवः-कारणानि**—हे वर सांगितलेले पांच त्या सर्वच कर्मांचे हेतु म्ह०कारणें आहेत. (यावर आक्षेप-)—**ननु अधिष्ठानादीनि सर्वकर्मणां कारणानि**—अहोपण, अधिष्ठानादिक हीं सर्व कर्मांचीं कारणें आहेत, मग—**'शरीरवाङ्मनोभिः कर्म प्रारभते' इति कथं उच्यते**—'शरीर, वाक् व मन यांनी कर्म आरंभितो' हे पुनः कसें म्हटलें आहे?—**एषः दोषः न**—हा दोष येत नाही. [ म्हणजे अधिष्ठानादि पांच प्रत्येक कर्मांचीं कारणें आहेत, अशी प्रतिज्ञा करून पुनः तीच शारीरादि त्रिविध कर्मांचीं कारणें आहेत, असें म्हणणें अयुक्त नव्हे,]—**विधिप्रतिषेधलक्षणं सर्वं कर्म शरीरादित्रयप्रधानं**—विधि-प्रतिषेधरूप सर्व कर्म शरीरादि-त्रयप्रधान म्ह० शरीरादि तीन साधनांनीच होणारें असतें—**दर्शन-श्रवणादि च जीवनलक्षणं तदंगतया त्रिधैव राशीकृतं शरीरादिभिः आरभते इति उच्यते**—आणि पहाणे, ऐकणें इत्यादि जीवनरूप स्वाभाविक कर्म देहादिकांच्या चक्षुरादि-अंगत्वानें होतें, त्यामुळें त्याचाहि शरीरादि-प्रधान कर्मांमध्येंच अंतर्भाव होतो. म्हणून त्याचे तीनच भाग करून 'शरीरादिकांनीं आरंभ करतो' असें म्हटलें जातें. [ चक्षुरादिक हीं देहाचींच अंगें आहेत, त्यामुळें त्यांच्या योगानें जें होणारें कर्म तेंहि शारीरादि कर्मांहून निराळें आहे, असें म्हणतां

येत नाहीं. म्हणून कायिक, वाचिक व मानसिक असे कर्मांचे तीनच भेद करून त्यांचा या श्लोकांत उल्लेख केला आहे. अहोपण, या त्रिविध कर्मांमध्ये सर्व कर्मांचा अंतर्भाव जरी होत असला तरी अधिष्ठानादिक पांच कारणांनाच त्यांचें हेतुत्व कसें? कारण फलोपभोगाच्या वेळीं दुसऱ्या कारणांची अपेक्षा संभवते, अशी आशंका घेऊन आचार्य सांगतात-]—**फलकाले अपि तत्प्रधानैः भुज्यते इति पंचानां एव हेतुत्वं न विरुध्यते**—फलकालींहि शरीरादिप्रधान कारणाच्या द्वाराच फलाचा अनुभव घेतला जातो, त्यामुळे अधिष्ठानादि पांचांचेंच कारणत्व विरुद्ध नाहीं. [ जन्मकाली व भोगकालीं असलेल्या सर्व कारणांचा त्यांतच अंतर्भाव होत असल्यामुळें तसें म्हणण्यांत कांहींच दोष नाहीं. ] १५

## तत्रैवं सति कर्तारमात्मानं केवलं तु यः ।
## पश्यत्यकृतबुद्धित्वान्न स पश्यति दुर्मतिः ॥१६॥

**अन्वयार्थ—तु**—परंतु—**तत्र एवं सति**—प्रत्येक कर्माची अशी पांच कारणें असतांना—**यः**—जो मनुष्य—**अकृतबुद्धित्वात्**—शास्त्रीय उपदेशादिकांनीं बुद्धि संस्कृत झालेली नसल्यामुळे—**केवलं आत्मानं**—एकट्या आत्म्यालाच—**कर्तारं**—कर्ता—**पश्यति**—पाहतो—**सः दुर्मतिः**—तो दुर्बुद्धि पुरुष—**न पश्यति**—बरोबर पहात नाहीं. त्याला आत्म्याचे यथार्थ ज्ञान नसते. १६

**तत्रेति । तत्रेति प्रकृतेन संबध्यते, एवं सति, एवं यथोक्तैः पञ्चभिर्हेतुभिर्निर्वर्त्ये सति कर्मणि । तत्रैवं सतीति दुर्मतित्वस्य हेतुत्वेन संबध्यते । तत्र तेष्वात्मानमनन्यत्वेनाविद्यया परिकल्प्य तैः क्रियमाणस्य कर्मणोऽहमेव कर्तेति कर्तारमात्मानं केवलं शुद्धं तु यः पश्यत्यविद्वान्कस्माद्वेदान्ताचार्योपदेशन्यायैरकृतबुद्धित्वादसंस्कृतबुद्धित्वाद्योऽपि देहादिव्यतिरिक्तात्मवाद्यन्यमात्मानमेव केवलं कर्तारं पश्यत्यसावप्यकृतबुद्धिरेवातोऽकृतबुद्धित्वान्न स पश्यत्यात्मनस्तत्त्वं कर्मणो वेत्यर्थोऽतो दुर्मतिः कुत्सिता विपरीता दुष्टाऽजस्रं जननमरणप्रतिपत्तिहेतुभूता मतिरस्येति दुर्मतिः स पश्यन्नपि न पश्यति, यथा तैमिरिकोऽनेकं चन्द्रं,यथा वाऽभ्रेषु धावत्सु चन्द्रं धावन्तं यथा वा वाहन उपविष्टोऽन्येषु धावत्स्वात्मानं धावन्तम् ॥ १६ ॥**

**भाष्यार्थ—‘ तत्र ’ इति**—या श्लोकाने अधिष्ठानादिकांना क्रियाकर्तृत्व आहे, असें सांगून अज्ञ त्यामध्यें आत्मदृष्टि ठेवतो या गोष्टीचा अनुवाद करतात—**तत्र इति प्रकृतेन संबध्यते**—तत्र हें पद प्रकृत कर्माशीं संबद्ध होते,—‘ **एवं सति** ’—**एवं कर्मणि यथोक्तैः ‘पंचभिः हेतुभिः निर्वर्त्ये सति**—याप्रमाणें कर्म वर सांगितलेल्या पांच हेतूंनीं घडत असतां-[ म्हणजे अधिष्ठानादि पांच हेतूंनीं कोणतेंहि कर्म घडत असतांना]—**तत्र एवं सति इति दुर्मतित्वस्य हेतुत्वेन संबध्यते**—‘ तत्र एवं सति ’ हें दुर्मतित्वाच्या हेतुत्वानें संबद्ध होतें. [ वर सांगितल्याप्रमाणें अधि-

ष्ठानादिकांना कर्तृत्व असतां मनुष्य ज्या अर्थी तें आत्म्यामध्यें भ्रमानें पहातो, त्याअर्थी आत्म्यामध्यें कर्तृत्व पहाणारा तो दुर्मति होय, असा संबंध लागतो. आतां 'कर्तारं' याचें व्याख्यान करितात-]—**तत्र-तेषु अविद्यया आत्मानं अनन्यत्वेन परिकल्प्य**—त्या अधिष्ठानादिकांमध्यें अविद्येमुळें आत्म्याला तादात्म्यानें कल्पून म्ह० अधिष्ठानादिक व आत्मा यांचें ऐक्य मानून—**तैः क्रियमाणस्य कर्मणः अहं एव कर्ता इति**—ज्यांच्यामध्यें आत्मभाव आरोपिलेला आहे अशा त्या अधिष्ठानादिकांकडून केल्या जाणाऱ्या कर्मांचा मीच कर्ता आहे असे—**केवलं शुद्धं आत्मानं तु यः अविद्वान् कर्तारं पश्यति**—केवळ-शुद्ध सर्व विकारशून्य आत्म्यालाच जो अविद्वान् कर्ता पहातो-म्ह० अकर्त्या आत्म्यालाच कर्ता मानतो,—**कस्मात्**—तो असे कां बरें मानतो ? ( उत्तर- )—**वेदान्त-आचार्य-उपदेशन्यायैः अकृतबुद्धित्वात्-असंस्कृतबुद्धित्वात्**—वेदान्त व आचार्य यांचा उपदेश म्ह० शास्त्रपूर्वक आचार्योपदेश व तदनुसारी न्याय, यांनीं अकृतबुद्धि असल्यामुळें म्ह० त्यांच्या योगानें बुद्धीला संस्कार झालेला नसल्यामुळे ( असें पहातो असा संबंध. अहोपण, ज्याची बुद्धि शास्त्राने संस्कृत झालेली आहे असा द्वैती, ' आत्मा शरीरादिकांहून भिन्न आहे' असे जाणत असूनहि त्याला कर्ता समजतो, तेव्हां अशा मनुष्याला काय म्हणावयाचें ? उत्तर-)—**यः अपि देहादिव्यतिरिक्त-आत्मवादी अन्यं आत्मानं एव केवलं कर्तारं पश्यति असौ अपि अकृतबुद्धिः एव**—आणि जो आत्मा देहादिकांहून भिन्न आहे असें मानणारा, त्या भिन्न असलेल्या केवळ आत्म्यालाच कर्ता समजतो तोहि असंस्कृतबुद्धिच होय. म्ह० त्याच्याहि बुद्धीला शास्त्राचार्योपदेश व न्याय यांच्या योगाने संस्कार झालेला नाहीं, असेंच म्हटलें पाहिजे—**अतः अकृतबुद्धित्वात् सः आत्मनः कर्मणः वा तत्त्वं न पश्यति इत्यर्थः**—यास्तव असंस्कृतबुद्धित्वामुळे तो आत्म्याचें किंवा कर्माचें तत्त्व जाणत नाहीं, असा याचा भावार्थ. [ निर्विकारत्व हे आत्म्याचे तत्त्व म्ह० यथार्थ स्वरूप आहे आणि अविद्याकृत अधिष्ठानादिकांकडून निष्पन्न होणें व आत्म्याशी त्याचा कांहीं एक संबंध नसणे, हें कर्माचें तत्त्व आहे. ]—**अतः दुर्मतिः-कुत्सिता विपरीता दुष्टा-अजस्र जनन-मरण-प्रतिपत्तिहेतुभूता मतिः अस्य इति दुर्मतिः**—आत्मा व कर्म यांचें तत्त्व जाणत नसल्यामुळे दुर्मति, कुत्सित म्ह० विपरीत दुष्ट अर्थात् सतत जन्ममरणांच्या प्राप्तीला कारण होणारी अशी याची मति असते म्हणून दुर्मति—**सः पश्यन् अपि न पश्यति**—तो पहात असूनहि पहात नाहीं. ( 'मी कर्ता' असें आत्म्याला जाणणाऱ्या अविद्वान् पुरुषालाहि आत्म्याचें यथार्थ ज्ञान नसतें याविषयीं दृष्टान्त- )—**यथा तैमिरिकः अनेकं चन्द्रं**—ज्याप्रमाणें तैमिरिक म्ह० ज्याच्या डोळ्याला तिमिर रोग झाला आहे, असा मनुष्य अनेक चंद्र पहात असतांनाहि तत्त्वतः त्याला पहात नाहीं [ त्याप्रमाणें अविद्वान् आत्म्याला कर्ता या रूपानें पहात असूनहि तत्त्वतः त्याला पहात नाहीं. अज्ञानानें अधिष्ठानादिकांशी एकरूप झालेल्या आत्म्यामध्यें अधिष्ठानादिकांच्या क्रियांचा आरोप कसा होतो त्याविषयीं दृष्टान्त-]—**वा यथा अभ्रेषु**

**धावत्सु चंद्रं धावंतं**—किंवा ज्याप्रमाणें ढग धावत असतांना चंद्र धावत आहे असें पहाणारा—**यथा वा वाहने उपविष्टः अन्येषु धावत्सु आत्मानं धावन्तं**—किंवा पालखी, मेणा इत्यादि वाहनात बसलेला मनुष्य त्याचे वाहक-भोयी धांवत असतांना 'मीच धांवत आहें' असा अविवेकामुळें अभिमान धरतो, [ त्याचप्रमाणें अधिष्ठानादिक-शरीरेंद्रियादिक क्रिया करीत असतांना त्यांतील आत्माच क्रिया करणारा आहे, असें जो समजतो तो दुर्मति होय. असा याचा भावार्थ. ] १६

---

१ रहस्यकार याचा अर्थ असा करितात—" या प्रकारची खरी स्थिति असतां बुद्धि संस्कृत नसल्यामुळे मी एकटाच कर्ता आहें, असें ज्याला वाटतें त्या दुर्मतीला कांहींच कळत नाहीं." वगैरे, पण तो बरोबर नाही. कोणत्याहि कर्माचीं अधिष्ठानादि पांच कारणें आहेत, त्यांच्या योगानें कोणतेही कर्म होते. पण असे असतांना केवल आत्म्यालाच जो कर्ता समजतो तो कांहींच जाणत नाहीं, असा या श्लोकाचा खरा अर्थ आहे. त्यांत निरुपाधिक आत्मा अकर्ता आहे व तो शरीरादिक उपाधींनीं युक्त झाला म्हणजेच भ्रमानें कर्ता बनतो, अर्थात् त्याचें कर्तृत्व मिथ्या आहे, असें येथें सागावयाचे आहे. याविषयीं 'आत्मेंद्रियमनोयुक्तं भोक्तेत्याहुर्मनीषिणः [ काठ. भा. १.३.४. पृ. ७४ ] अशी श्रुतिहि प्रमाण आहे आणि आत्म्याचें कर्तृत्व स्वाभाविक नसल्यामुळेच पुढील श्लोकांत "ज्याला 'मी कर्ता' असा अहंभाव नाहीं व ज्याची बुद्धि लिप्त होत नाही तो या सर्व लोकांस मारूनहि बद्ध होत नाहीं" असें म्हटलें आहे. 'मी कर्ता' असा अहंभाव व 'मी हे केलें' हा बुद्धिलेप या मिथ्या अभिमानामुळेच जीव संसारात पडतो व त्याच्या अभावीं तो मुक्त होतो. मिथ्या अभिमानाचा त्याग हाच खरा सन्यास, फलाशात्याग वगैरे हे सर्व गौण सन्यास होत. ते सर्व या मुख्य सन्यासाचे उपाय होत. फार काय पण आश्रमसंन्यासहि या सन्यासापुढे गौण ठरतो. ( पृ. ४७८-८० ) पण केवल तार्किक रहस्यकाराना ही वैदिकदृष्टिच प्राप्त झालेली नसल्यामुळें त्यानीं गीतेचा वाटेल तसा अर्थ केला आहे. त्यांचें उपपादन तरी किती सयुक्तिक असते त्याचा एक मासला पहा—ते ८३४ पृष्ठावर म्हणतात—" मनुष्य आपण जे काही केले असे समजतो तें केवल त्याच्या प्रयत्नाचें फल नसून त्याचा प्रयत्न आणि जगातील इतर व्यापार किंवा चेष्टा या सर्वांच्या साह्यानें ते कार्य घडून आलेले असतं, असा चौदाव्या श्लोकाचा अर्थ आहे. उदाहरणार्थ-शेती केवल मनुष्याच्याच प्रयत्नावर अवलंबून नसून जमीन, बीं, पाऊस, खत, बैल इत्यादिकाचे गुणधर्म किंवा व्यापार यांची शेतीं सफल होण्यास अवश्य मदत लागते." वगैरे. १४ व १५ या श्लोकात 'शरीर, शरीराभिमानी, इंद्रियें, प्राणादिकांचे व्यापार व आदित्यादि देवतांचा अनुग्रह ही पांच कारणें असून मनुष्य शरीर, वाणी व मन यानीं जे जें शास्त्रीय-विहित, अशास्त्रीय-निषिद्ध किंवा स्वाभाविक कर्म आरंभितो त्या सर्वांची हीं पांच कारणे आहेत,' असें सांगितले आहे. पण तिकडे लक्ष न देता अधिष्ठानादिकांचा भलताच अर्थ करून त्याचे उपपादन वर दाखविल्याप्रमाणे करितात. पण आम्ही त्यांस उलट असें विचारतों की, मनुष्याचें कर्म हे त्याच्याच प्रयत्नाचें फल कसें नव्हे ? न्यायशास्त्राकडे जर तुम्हीं पाहिले असतें तर तुम्हांलाच तुमच्या विचारांतील चूक कळून आली असती. तुमच्याच उदाहरणाप्रमाणे पाहिल्यास जमीन, बीं, पाऊस, खत, बैल

वगैरे इतर सर्व सामग्री असूनहि त्या सर्वांचा उपयोग करणारा—त्या सर्वांचें साह्य घेऊन क्रिया करणारा मनुष्य जर नसेल तर त्या सर्वांचाहि कांहींच उपयोग होणार नाहीं, म्हणून मनुष्यच मुख्य कर्ता व इतर सर्व त्याची सहकारी कारणें, असें न्यायानेंच ठरतें. त्यामुळेंच कारणांचे साधारण व असाधारण असे भेद केले जातात. पण मूळ श्लोकाकडे पाहतां प्रस्तुत विवेचन निरुपयोगीच ठरतें. येथें शरीर, मन व वाणी यांनीं होणाऱ्या प्रत्येक कर्माची अधिष्ठानादिक ही पांच साधारण कारणें आहेत, एवढेंच सांगावयाचें आहे. या पांच कारणांवांचून मनुष्याचा—प्राण्याचा कोणताच प्रयत्न होत नाहीं, हें सांगून केवळ आत्मा अकर्ता आहे हें येथें सांगावयाचें आहे. सतराव्या श्लोकांतील ' हत्वाऽपि स इमान् लोकान् न हन्ति ' यासंबंधानेंहि त्यांनी अशीच अप्रस्तुत चर्चा केली आहे. ते म्हणतात— " तथापि ज्याची फलाशा सुटली त्याने वाटेल तें कुकर्म करावें असाहि सतराव्या श्लोकाचा अर्थ समजावयाचा नाही. सामान्य मनुष्यें जें कांही करितात तें स्वार्थाच्या लोभानें करीत असल्यामुळें त्यांच्या हातून गैरवर्तन होत असते. पण ज्याचा स्वार्थ, लोभ किंवा फलाशा पूर्ण लयास जाऊन सर्व भूते ज्याला सारखीच झाली त्याच्या हातून कोणाचेंच अनहित होणें शक्य नाही. कारण दोष बुद्धींत असतो कर्मांत नाहीं. म्हणून ज्याची बुद्धि शुद्ध व पवित्र असे प्रथम कायम ठरले त्याने केलेली एखादी गोष्ट लौकिकदृष्ट्या दिसण्यांत जरी विपरीत दिसली तरी त्यांतील बीज शुद्धच असलें पाहिजे असें न्यायतःच प्राप्त होते व त्याबद्दल शुद्ध बुद्धीच्या मनुष्यास मग जबाबदार धरितां येत नाहीं. असें १७ व्या श्लोकाचें तात्पर्य आहे. स्थितप्रज्ञाच्या म्हणजे शुद्ध बुद्धीच्या पुरुषाच्या निष्पापत्वाबद्दलचे हें तत्त्व उपनिषदांतूनहि वर्णिलेले आहे. ( कौषी. ३,१ व पंचदशी. १४.१६ व १७ पहा ) " अगोदर 'ज्याची फलाशा सुटली' असे सतराव्या श्लोकांत म्हटलेलें नाहीं, त्यामुळे 'त्यानें वाटेल ते कुकर्म करावे' असें येथे प्राप्तच नाहीं. वास्तव रहस्यकारांनी याविषयीं केलेली वरील सर्व चर्चा फुकट आहे. या श्लोकाचा खरा तात्त्विक अर्थ आचार्यांच्या भाष्यावरूनच कळतो. ' ज्याचा स्वार्थ, लोभ किंवा फलाशा पूर्ण लयास जाऊन सर्वभूतें ज्याला सारखींच झाली त्याच्या हातून कोणतेच अनहित होणे शक्य नाही. ' ही नुसती कल्पना आहे. जीव कर्मपरवश आहे, हे लक्षात न ठेवल्याचा हा परिणाम आहे. ज्ञानी जीवन्मुक्तहि तीव्र प्रारब्धाचें अतिक्रमण करूं शकत नाहीं, हा वेदान्तसिद्धान्त आहे. 'सदृशं चेष्टते स्वस्याः प्रकृतेः ज्ञानवानपि' ( पृ. ३३२ ) असें खुद्द भगवान् सांगतात. तेव्हां ज्ञानी पुरुषाच्या हातूनहि तीव्र प्रारब्धवशात कुकर्मच होणार नाहीं, अशी हमी देणे अयोग्य आहे. जसें येथें—या १७ व्या श्लोकांत तसेंच कौषीतकी उपनिषद्, पंचदशी इत्यादि स्थलींहि हेंच सांगितलें आहे. अर्थात् आत्मज्ञानी पुरुषाच्या हातून कर्तृत्वाभिमान व बुद्धिलेप यांच्या अभावीं प्रारब्धवशात् लौकिक पाप जरी घडलें तरी त्यानें तो बद्ध होत नाहीं, हा या वाक्याचा अर्थ आहे. पण हें तत्त्व न कळल्यामुळें रहस्यकार—"ज्याची बुद्धि शुद्ध व पवित्र असें प्रथम कायम ठरलें ( तें कसें काय ठरणार ? ) त्यानें केलेली एखादी गोष्ट लौकिकदृष्ट्या' जरी विपरीत दिसली तरी त्यांतील बीज शुद्धच असलें पाहिजे " असें कांही तरी सांगत सुटले आहेत. हे असलें अनुपपन्न गीतारहस्य कोणाला पटत असेल तें असो. अगोदर बुद्धि शुद्ध व पवित्र असणें, हेंच आत्मज्ञान नव्हे. ती तशी आहे हें लौकिक प्रमाणांनीं

यस्य नाहंकृतो भावो बुद्धिर्यस्य न लिप्यते ।
हत्वापि स इमाँल्लोकान्न हन्ति न निबध्यते ॥१७॥

**अन्वयार्थ—यस्य**—ज्याला—**अहंकृतः भावः**—मी कर्ता आहें, असा भाव-अशी भावना-प्रत्यय—**न**—नसतो व—**यस्य**—ज्याची—**बुद्धिः**—मति-अन्तःकरण—**न लिप्यते**—मी हें केलें, याच्यायोगानें मी नरकास जाईन, अशा अनुतापानें लिप्त होत नाहीं—**सः**—तो—**इमान् लोकान्**—या लोकांना-या सर्व प्राण्यांना—**हत्वा अपि**—मारूनहि—**न हन्ति**—मारीत नाहीं व—**न निबध्यते**—त्या कर्मांच्या फलानें बद्ध होत नाहीं. १७.

**कः पुनः सुमतिर्यः सम्यक्पश्यतीत्युच्यते—यस्य शास्त्राचार्योपदेशन्यायसंस्कृतात्मनो न भवत्यहंकृतोऽहं कर्तेत्येवंलक्षणो भावो भावना प्रत्यय एत एव पञ्चाधिष्ठानादयोऽविद्ययाऽऽत्मनि कल्पिताः सर्वकर्मणां कर्तारो नाहमहं तु तद्व्यापाराणां साक्षिभूतोऽप्राणो ह्यमनाः शुभ्रोऽक्षरात्परतः परः केवलोऽविक्रिय इत्येवं पश्यतीत्येतत् । बुद्धिरन्तःकरणं यस्याऽऽत्मन उपाधिभूता न लिप्यते नानुशयिनी भवतीदमहमकार्षं तेनाहं नरकं गमिष्यामीत्येवं यस्य बुद्धिर्न लिप्यते स सुमतिः स पश्यति । हत्वाऽपि स इमाँल्लोकान्सर्वान्प्राणिन इत्यर्थः । न हन्ति हननक्रियां न करोति न निबध्यते नापि तत्कार्येणाधर्मफलेन संबध्यते ॥**

**भाष्यार्थ—पुनः सुमतिः कः यः सम्यक् पश्यति इति उच्यते**—आत्म्याला कर्ता मानणारा विपरीतदृष्टि पुरुष जर दुर्मति तर मग सुमति कोण ? जो सम्यक् म्ह० यथार्थ जाणतो तो सुमति, असें सांगितलें जातें.—**शास्त्राचार्योपदेशन्यायसंस्कृतात्मनः यस्य अहंकृतः-' अहं कर्ता ' इति-एवंलक्षणः भावः-भावना-प्रत्ययः न भवति**—शास्त्र, शास्त्रानुसार आचार्योपदेश व तदनुसार न्याय यांनीं ज्याच्या अन्तःकरणाला संस्कार झालेला नाहीं, अशा ज्याला ' अहंकृत ' म्ह० ' मी कर्ता ' या अशा स्वरूपाचा भाव म्ह० भावना प्रत्यय नसतो, तर—**एते एव पंच अधिष्ठानादयः**—हेच पांच अधिष्ठानादिक (ते कसे ? उत्तर-)—**अविद्यया आत्मनि कल्पिताः**—अविद्येनें-आत्म्याचें यथार्थ ज्ञान नसल्यामुळें आत्म्यामध्यें क-

---

कायम ठरणेंहि कठिण आहे आणि जरी तसें ठरलें तरी त्यानें केलेल्या विपरीत-लोकविरुद्ध कर्माचें बीज शुद्धच असलें पाहिजे व ' त्याबद्दल शुद्ध बुद्धीच्या मनुष्यास मग जबाबदार धरितां येत नाहीं ' असें म्हणणें म्हणजे आपल्या विवेकबुद्धीला नाहींशी करणेंच आहे. अंधश्रद्धेची ती पराकाष्ठा आहे. शुद्ध बुद्धि पुरुष तर राहोच, पण खऱ्या आत्मसाक्षात्कारवान् पुरुषानेंहि जरी लोकविरुद्ध कार्य केलें तरी त्याची लौकिकांत निंदा झाल्यावांचून रहात नाहीं. त्याची ती कृति खरोखरच जर अहंभावशून्य असेल तर त्याच्या मोक्षाला बाध येणार नाहीं, एवढाच या श्लोकाचा भावार्थ आहे.

लिपलेले अधिष्ठानादिक—**सर्वकर्मणां कर्तारः अहं न**—सर्व कर्मांचे कर्ते आहेत, मी नव्हें.—**अहं तु तद्व्यापाराणां साक्षिभूतः**—पण मी तर त्याच्या व्यापारांचा साक्षिभूत आहें.—" **अप्राणो ह्यमनाः शुभ्रो अक्षरात् परतः परः** "—प्राणरहित-क्रियाशक्तिशून्य, मनोरहित–ज्ञानशक्तिशून्य, शुद्ध, सर्वाहून श्रेष्ठ असलेलें जें अक्षर त्याहून पर–अक्षरात्मा ( मुं. भा.२.१–२ पृ. ५१ )—**केवलः अविक्रियः इति एवं पश्यति इति एतत्**—केवल निरुपाधिक अविक्रिय–जन्मादिशून्य आहें, असें पाहतो, असा भावार्थ.—**यस्य बुद्धिः-अन्तःकरणं आत्मनः उपाधिभूता न लिप्यते अनुशायिनी न भवति**—ज्याची बुद्धि म्ह० अन्तःकरण–आत्म्याची उपाधिभूत बुद्धि लिप्त होत नाहीं, क्लेशशालिनी–पश्चात्तापयुक्त होत नाहीं म्हणजे—**अहं इदं अकार्षं तेन अहं नरकं गमिष्यामि इति-एवं यस्य बुद्धिः न लिप्यते** मीं हें केले, त्यामुळें नरकाला जाईन, अशा रीतीनें ज्याची बुद्धि लिप्त होत नाहीं, पश्चात्ताप पावत नाहीं—**सः सुमतिः सः पश्यति**—तो सुमति, तो पाहतो,—**सः इमान् लोकान्-सर्वान् प्राणिनः इत्यर्थः हत्वा अपि**—तो या लोकांस म्ह० सर्व प्राण्यांना, असा याचा भावार्थ, मारून सुद्धां—**न हन्ति-हननक्रियां न करोति**—मारीत नाही, ' हनन ' ही क्रिया करीत नाहीं,—**न निबध्यते-तत्कार्येण अधर्मफलेन अपि न संबध्यते**—व बद्ध होत नाहीं, त्या हननक्रियेच्या कार्याशीं –अधर्मफलाशीं हिंसा या अधर्माच्या फलाशी संबद्ध होत नाहीं.

**ननु हत्वाऽपि न हन्तीति विप्रतिषिद्धमुच्यते यद्यपि स्तुतिः । नैष दोषः । लौकिकपारमार्थिकदृष्ट्यपेक्षया तदुपपत्तेः । देहाद्यात्मबुद्ध्या हन्ताऽहमिति लौकिकीं दृष्टिमाश्रित्य हत्वाऽपीत्याह यथादर्शितां पारमार्थिकीं दृष्टिमाश्रित्य न हन्ति न निबध्यत इति तदुभयमुपपद्यत एव ॥**

**भाष्यार्थ**—( यावर आक्षेप- )—**ननु यद्यपि स्तुतिः** ( तथापि ) **हत्वा अपि न हन्ति इति विप्रतिषिद्धं उच्यते**—अहोपण, ही जरी ज्ञानाची स्तुति असली तरी ' मारूनहि मारीत नाहीं ' हे म्हणणें विरुद्ध आहे. [ म्ह० जरी स्तुति करावयाची असली तरी विरुद्ध अर्थ सांगून ती करणें युक्त नव्हे, आचार्य या विरोधाचा परिहार करितात- ]—**एषः दोषः न**—हा विरोधरूपी दोष येत नाहीं.—**लौकिक-पारमार्थिकदृष्टि-अपेक्षया तदुपपत्तेः**—लौकिकदृष्टि व पारमार्थिकदृष्टि या दोन दृष्टींच्या अपेक्षेनें तशा निर्देशाची उपपत्ति लागते.–त्या दोन दृष्टींनी तसा दोन प्रकारचा निर्देश संभवतो. ( लौकिक दृष्टीचा आश्रय करून ' हत्वाऽपि ' हा निर्देश आहे, असें सांगतात- )—**देहादि-आत्मबुद्ध्या 'हन्ताहं' इति लौकिकीं दृष्टिं आश्रित्य ' हत्वाऽपि ' इति आह**—देहादिकच आत्मा या बुद्धीनें ' मी मारणारा ' या लौकिकदृष्टीचा आश्रय करून ' हत्वा अपि-' मारूनहि, असें म्हणतात व—**यथादर्शितां पारमार्थिकीं दृष्टिं आश्रित्य ' न हन्ति न निबध्यते ' इति**—वर प्रदर्शित केलेल्या प्रकारच्या दृष्टीचा आश्रय करून ' मारीत नाहीं व अत्यंत बद्धहि होत नाहीं '

असें भगवान् म्हणत आहेत. ( मी कर्ता नव्हे, तर कर्ता व त्याचा व्यापार यांचा साक्षी आहें. क्रियाशक्ति व ज्ञानशक्ति यांनीं युक्त अशा दोन उपाधींनी रहित, शुद्ध, अद्वितीय, अविक्रिय आहें, ही पूर्वोक्त पारमार्थिक दृष्टि होय. )—**तत् उभयं उपपद्यते एव** —याप्रमाणें ' हत्वापि ' व ' न हन्ति ' हें दोन्ही दोन दृष्टींच्या आश्रयानें उपपन्न होतें, त्यांत अनुपपन्न कांहीं नाहीं.

**नन्वधिष्ठानादिभिः संभूय करोत्येवाऽऽत्मा कर्तारमात्मानं केवलं त्विति केवलशब्दप्रयोगात् । नैष दोषः । आत्मनोऽविक्रियस्वभावत्वेऽधिष्ठानादिभिः संहतत्वानुपपत्तेः । विक्रियावतो ह्यन्यैः संहननं संभवति संहत्य वा कर्तृत्वं स्यान्न त्वविक्रियस्याऽऽत्मनः केनचित्संहननमस्तीति न संभूय कर्तृत्वमुपपद्यते । अतः केवलत्वमात्मनः स्वाभाविकमिति केवलशब्दोऽनुवादमात्रम् ॥**

**भाष्यार्थ**—( केवलशब्दावरून येणारा आणखी आक्षेप- )—**ननु अधिष्ठानादिभिः संभूय आत्मा करोति एव**—अहोपण, अधिष्ठानादिकांशीं मिळून म्ह० अधिष्ठानादिकांनीं विशिष्ट असा आत्मा कर्म करतोच.—' **कर्तारं आत्मानं केवलं तु** ' **इति केवलशब्दप्रयोगात्**—कारण ' केवल आत्म्याला कर्ता जो समजतो तो दुर्मति ' असा वरील वाक्यांत केवलशब्दाचा प्रयोग केलेला आहे. [ त्यामुळे केवल–एकाकी आत्मा कर्ता जरी नसला तरी शरीरादिकांनीं विशिष्ट आत्मा कर्ता आहे, असें ठरतें. या आक्षेपाचे समाधान- ]—**एषः दोषः न**—हा दोष येत नाहीं —**आत्मनः अविक्रियस्वभावत्वे अधिष्ठानादिभिः संहतत्वानुपपत्तेः**—कारण आत्म्याला अविक्रियस्वभावत्व असल्यामुळें–अविक्रियत्व हा आत्म्याचा स्वभाव असल्यामुळें त्याने अधिष्ठानादिकांशीं संघात पावणे अनुपपन्न आहे.—**हि विक्रियावतः अन्यैः संहननं संभवति**—कारण विक्रियावानाचाच इतर पदार्थांशीं संघात होऊं शकतो—**संहत्य वा कर्तृत्वं स्यात्**—आणि विक्रियावानाचाच इतरांशी संघात होऊन त्याला कर्तृत्व प्राप्त होते.—**तु अविक्रियस्य आत्मनः केनचित् संहननं न अस्ति**—पण अविक्रिय आत्म्याचा कोणाशीहि संघात होऊं शकत नाही.—**इति संभूय कर्तृत्वं न उपपद्यते**—त्यामुळें अधिष्ठानाशीं मिळून–संघात पावून–तद्विशिष्ट होऊन आत्म्याचें कर्तृत्व उपपन्न होत नाही. ( मग आत्म्याला ' केवल ' हे विशेषण का लाविलें आहे ? उत्तर- )—**अतः आत्मनः केवलत्वं स्वाभाविकं इति केवलशब्दः अनुवादमात्रं**—यास्तव आत्म्याचे केवलत्व स्वाभाविक आहे, त्यामुळे येथील केवलशब्द हा केवल अनुवाद आहे. [ आत्म्याचे कैवल्य स्वभावसिद्धच आहे. ते विशेषणांनीं नवीन संपादन करावयाचें नाही. त्यामुळे या श्लोकांत त्याचा नुस्ता अनुवाद केला आहे. ]

**अविक्रियत्वं चाऽऽत्मनः श्रुतिस्मृतिन्यायप्रसिद्धम् । ' अविकार्योऽयमुच्यते ' ' गुणैरेव कर्माणि क्रियन्ते ' ' शरीरस्थोऽपि न करोति ' इत्याद्यसकृदुपपादितं गीतास्वेव तावत् । श्रुतिषु च " ध्यायतीव लेलायतीव " इत्येवमाद्यासु । न्यायतश्च निरवयव-**

मपरतन्त्रमविक्रियमात्मतत्त्वमिति राजमार्गः । विक्रियावत्त्वाभ्युपगमेऽप्यात्मनः स्वकीयैव विक्रिया स्वस्य भवितुमर्हति। नाधिष्ठानादीनां कर्माण्यात्मकर्तृकाणि स्युः । न हि परस्य कर्म परेणाकृतमागन्तुमर्हति । यत्त्वविद्यया गमितं न तत्तस्य । यथा रजतत्वं न शुक्तिकाया यथा वा तलमलवत्त्वं बालैर्गमितमविद्यया नाऽऽकाशस्य तथाऽधिष्ठानादिविक्रियाऽपि तेषामेवेति नाऽऽत्मनः । तस्माद्युक्तमुक्तमहंकृतत्वबुद्धिलेपाभावाद्विद्वान्न हन्ति न निबध्यत इति ॥

**भाष्यार्थ**—(पण आत्म्याच्या अविक्रियत्वाला प्रमाण काय? उत्तर-)—**च आत्मनः अविक्रियत्वं श्रुति-स्मृति-न्यायप्रसिद्धं**—आणि आत्म्याचें अविक्रियत्व श्रुति-स्मृति-न्यायप्रसिद्ध आहे.—'**अविकार्योऽयं उच्यते**'—'हा अविकार्य म्हटला जातो' (२.४५)—'**गुणैः एव कर्माणि क्रियन्ते**' (३.२७) गुणांकडूनच कर्मे केलीं जातात.—'**शरीरस्थः अपि न करोति**' (१३.३१) शरीरांत स्थित असला तरी करीत नाही,—**इत्यादि गीतासु एव तावत् असकृत् उपपादितं**—इत्यादि गीतेंतच अगोदर अनेकदा उपपादन केलें आहे.—'**ध्यायतीव लेलायतीव**' **इति-एवं-आद्यासु श्रुतिषु च**—तसेच, जणुं काय आत्मा ध्यान करितो, जणुंकाय हालचाल करितो, इत्यादि या अशा अनेक श्रुतींतहि आत्म्याचें अविक्रियत्व सांगितले आहे. ('निष्कलं निष्क्रियं शान्तं०' इत्यादि दुसऱ्याहि अनेक श्रुति येथें घ्याव्या)—**न्यायतः च**—न्यायतःहि आत्म्याचें अविक्रियत्व प्रदर्शित केले आहे. (तो न्यायच दाखवितात-) —**निरवयवं अपरतन्त्रं अविक्रियं आत्मतत्त्वं इति राजमार्गः**—आत्मा स्वतः विकार पावत नाही. कारण तो आकाशाप्रमाणें निरवयव आहे. तो परतःहि विकार पावत नाहीं. कारण तो परतंत्र नाही. जो स्वतः कोणाचेंहि कार्य नसलेला व असंग असलेला आत्मा तो परतंत्र असणे शक्य नाहीं. तसेंच तें आत्मतत्त्व अविक्रिय आहे, हा न्यायाचा राजमार्ग आहे. शिवाय—**आत्मनः विक्रियावत्त्वाभ्युपगमे अपि स्वकीया एव विक्रिया स्वस्य भवितुं अर्हति**—आत्म्याला विक्रियावत्त्व आहे, तो विकार पावतो, असें जरी मानले तरी त्याची स्वनिष्ठ विक्रिया-म्ह० स्वरूपांतील विक्रिया त्याला स्वतःलाच होईल आपली विक्रिया आपल्यालाच होणे योग्य आहे. अर्थात् आत्म्यामध्यें स्वनिष्ठ विक्रिया होते, असे जरी मानलें तरी—**अधिष्ठानादीनां कर्माणि आत्मकर्तृकाणि न स्युः**—अधिष्ठानादिकांची कर्मे आत्मकर्तृक होऊं शकत नाहींत. म्ह० अधिष्ठानादिकांच्या कर्मांचा कर्ता आत्मा आहे, असें कधीं होणार नाहीं.—**परस्य कर्म परेण अकृतं आगन्तुं न हि अर्हति**—अधिष्ठानादिकांचें कर्म दुसऱ्यानें म्ह० आत्म्याने न केलेलें तें आत्म्याकडे वस्तुतः येऊं शकत नाहीं. —**तु यत् अविद्यया गमितं तत् तस्य न**—पण जें अविद्येनें आत्म्यावर आरोपिलेलें वगैरे कर्म तें त्याचें होऊं शकत नाहीं,—**यथा रजतत्वं शुक्तिकायाः न**—जसें आरोपित रजतत्व हें शिंपीचें केव्हांहि होऊं शकत नाहीं.—**यथा वा बालैः अविद्यया गमितं तलमलवत्त्वं आकाशस्य न**—किंवा ज्याप्रमाणें अज्ञ लोकांनीं

अविद्येनें आरोपिलेलें तलमलवत्त्व वस्तुतः आकाशाचें होऊं शकत नाहीं—**तथा अधिष्ठानादि·विक्रिया अपि तेषां एव इति न आत्मनः**—त्याप्रमाणें अधिष्ठानादिकांची विक्रियाहि अधिष्ठानादिकांचीच आहे, त्यामुळें ती आत्म्याची नव्हे.—**तस्मात् अहंकृतत्व·बुद्धिलेपाभावात् ' विद्वान् न हन्ति न निबध्यते ' इति युक्तं उक्तं**—यास्तव मी कर्ता ही भावना व पश्चात्तापरूप बुद्धिलेप यांचा अभाव असल्यामुळे विद्वान्–आत्मसाक्षात्कारवान् कोणाला मारीत नाहीं व बद्ध होत नाहीं, हे अगदीं योग्यच सांगितलें आहे.

**नायं हन्ति न हन्यत इति प्रतिज्ञाय न जायत इत्यादिहेतुवचनेनाविक्रियत्वमात्मन उक्त्वा वेदाविनाशिनमिति विदुषः कर्माधिकारनिवृत्तिं शास्त्रादौ संक्षेपत उक्त्वा मध्ये प्रसारितां च तत्र तत्र प्रसङ्गं कृत्वेहोपसंहरति शास्त्रार्थपिण्डीकरणाय विद्वान्न हन्ति न निबध्यत इति । एवं च सति देहभृत्त्वाभिमानानुपपत्तावविद्याकृताशेषकर्मसंन्यासोपपत्तेः संन्यासिनामनिष्टादि त्रिविधं कर्मणः फलं न भवतीत्युपपन्नं तद्विपर्ययाच्चेतरेषां भवतीत्येतच्चापरिहार्यमित्येष गीताशास्त्रस्यार्थ उपसंहृतः । स एष सर्ववेदार्थसारो निपुणमतिभिः पण्डितैर्विचार्य प्रतिपत्तव्य इति तत्र तत्र प्रकरणविभागेन दर्शितोऽस्माभिः शास्त्रन्यायानुसारेण ॥ १७ ॥**

**भाष्यार्थ**—( पूर्वीच सांगितलेलें आत्म्याचे अविक्रियत्व येथें पुनः कां सांगितलें जात आहे, तें सांगतात–)—**' नायं हन्ति न हन्यते ' इति प्रतिज्ञाय**—' हा मारीत नाहीं व मारला जात नाहीं, ' ( अ. २ श्लो. २० पृ. ९५ ) अशी प्रतिज्ञा करून—**' न जायते० ' इत्यादिहेतुवचनेन आत्मनः अविक्रियत्वं उक्त्वा**–व ' न जायते० ' ( अ. २ श्लो. २० पृ. ९५ ) इत्यादि हेतुबोधक वचनानें आत्म्याचें अविक्रियत्व सांगून—**' वेदाविनाशिनं० ' इति विदुषः कर्माधिकारनिवृत्तिं शास्त्रादौ संक्षेपतः उक्त्वा**—' वेदाविनाशिनं० ' ( अ. २ श्लो. २१ पृ. १०० ) या वचनानें विद्वानाच्या कर्माधिकाराची निवृत्ति शास्त्राच्या आरंभीच संक्षेपतः सांगून—**च मध्ये तत्र तत्र प्रसंगं कृत्वा प्रसारितां**—व मध्ये ठिकठिकाणीं पुनः पुनः प्रसंग आणून विस्तार केलेल्या कर्माधिकार निवृत्तीचा—**इह शास्त्रार्थपिण्डीकरणाय 'विद्वान् न हन्ति न निबध्यते' इति उपसंहरति**—येथें शास्त्रार्थाचा एकत्र संग्रह करण्यासाठीं विद्वान् ' मारीत नाहीं व बद्ध होत नाहीं ' असा भगवान् उपसंहार करितात. [ शास्त्राच्या आरंभीं ज्या कर्मनिवृत्तीची प्रतिज्ञा केली तीच हेतुपूर्वक संक्षेपतः सांगून, मध्यें ठिकठिकाणीं प्रसंग आणून तिचाच प्रसार करून, शास्त्रार्थाचा एकत्र संग्रह करण्यासाठीं येथें भगवान् उपसंहार करीत आहेत. ]—**एवं च सति**—आणि याप्रमाणें विद्वानाला कर्माधिकार नाहीं असें सिद्ध झालें असतां—**देहभृत्त्वाभिमानानुपपत्तौ**—' देहच मी ' या अभिमानाची अनुपपत्ति होते, देहाभिमानाचा अभाव झाला असतां—**अविद्याकृत·अशेषकर्मसंन्यासोपपत्तेः**—अविद्येमुळे-आत्म्याच्या अज्ञानामुळेंच होणाऱ्या सर्वकर्मांच्या संन्यासाची सिद्धि होते,त्यामुळे—**संन्यासिनां कर्मणः**

**इष्टादि त्रिविधं फलं न भवति इति उपपन्नं**—संन्याश्यांना कर्मांचें इष्ट, अनिष्ट व मिश्र असें त्रिविध फल प्राप्त होत नाहीं, असें जे वर ( पृ. ११४८ ) म्हटलें आहे तें सर्वथा योग्यच होय.—**तद्विपर्ययात् च इतरेषां भवति इति एतत् च अपरिहार्यं**—व त्याच्या विपर्ययामुळें म्ह० अज्ञाच्या ठिकाणीं देहाभिमानादि असल्यामुळें इतरांना म्ह० असंन्याश्यांना तें त्रिविध फल प्राप्त होतें, हें वर सांगितलेलें तत्त्व अपरिहार्य आहे.—**इति एषः गीताशास्त्रस्य अर्थः उपसंहृतः**—याप्रमाणें या गीताशास्त्राच्या अर्थाचा येथे उपसंहार केला आहे. [ म्ह० कर्म शरीरादिकांकडून होतें, तें आत्म्याचें नव्हे, अविद्वानालाच कर्माचा अधिकार आहे, कारण देहाभिमान असल्यामुळें त्याच्या त्यागाचा असंभव आहे. पण विद्वानाच्या ठिकाणीं देहाभिमान नसल्यामुळे त्याच्या कर्माधिकाराची निवृत्ति होते, ह्या गीताशास्त्राच्या संक्षिप्त अर्थाचा येथें उपसंहार केला आहे आणि हा गीतार्थ म्ह० वेदार्थच असल्यामुळें तोच सर्वथा ग्राह्य आहे असें आचार्य सांगतात-]—**सः एषः सर्ववेदार्थसारः निपुणमतिभिः पण्डितैः विचार्य प्रतिपत्तव्यः**—तो हा सर्व वेदार्थाचा सारभूत अंश कुशाग्रबुद्धि पंडितांनीं त्याचा चांगला विचार करून स्वीकार करावा.—**इति तत्र तत्र प्रकरणविभागेन शास्त्रन्यायानुसारेण अस्माभिः दर्शितः**—म्हणून ठिकठिकाणीं प्रकरणाचा विभाग करून शास्त्र व न्याय यांच्या अनुसार आम्ही प्रदर्शित केला आहे. [ विवेकी पंडितांनीं या वेदार्थसारभूत अंशाचा विचार करून स्वीकार करावा म्हणून आम्ही शास्त्र व न्याय यांना अनुसरून ठिकठिकाणी प्रकरणविभागपूर्वक तो अर्थ उत्तम प्रकारें विशद केला आहे. ] १७

**ज्ञानं ज्ञेयं परिज्ञाता त्रिविधा कर्मचोदना ।**
**करणं कर्म कर्तेति त्रिविधः कर्मसंग्रहः ॥ १८ ॥**

**अन्वयार्थ—ज्ञानं**—ज्यानें सर्व विषयांचें ज्ञान होतें तें ज्ञान—**ज्ञेयं**—सर्व प्रकारचें ज्ञेय-विषय—**परिज्ञाता**—त्यांना जाणणारा भोक्ता—**त्रिविधा कर्मचोदना**—अशी ही तीन प्रकारची कर्मचोदना आहे. कर्मांत प्रवृत्त करणारी सामग्री आहे.—**करणं**—बाह्य व आंतर इंद्रियें,—**कर्म**—कर्त्याला अत्यंत इष्ट असलेलें कर्म,—**कर्ता**—करणांकडून व्यापार करविणारा,—**इति**—असा—**त्रिविधः**—तीन प्रकारचा—**कर्मसंग्रहः**—कर्मसंग्रह आहे. १८.

**अथेदानीं कर्मणां प्रवर्तकमुच्यते—ज्ञानं ज्ञायतेऽनेनेति सर्वविषयमविशेषेणोच्यते । तथा ज्ञेयं ज्ञातव्यं तदपि सामान्येनैव सर्वमुच्यते । तथा परिज्ञातोपाधिलक्षणोऽविद्याकल्पितो भोक्ता, इत्येतत्त्रयं एषाविशेषेण सर्वकर्मणां प्रवर्तिका त्रिविधा त्रिप्रकारा कर्मचोदना । ज्ञानादीनां हि त्रयाणां संनिपाते हानोपादानादिप्रयोजनः सर्वकर्मारम्भः स्यात्ततः पञ्चभिरधिष्ठानादिभिरारब्धं वाङ्मनःकायाश्रयभेदेन त्रिधा राशीभूतं त्रिषु**

करणादिषु संगृह्यत इत्येतदुच्यते । करणं क्रियतेऽनेनेति बाह्यं श्रोत्रादि, अन्तःस्थं बुद्ध्यादि कर्मेप्सिततमं कर्तुः क्रियया व्याप्यमानं, कर्ता करणानां व्यापारयितोपाधिलक्षण इति त्रिविधस्त्रिप्रकारः कर्मसंग्रहः संगृह्यतेऽस्मिन्निति संग्रहः कर्मणः संग्रहः कर्मसंग्रहः । कर्मैषु हि त्रिषु समवैति तेनायं त्रिविधः कर्मसंग्रहः ॥ १८ ॥

**भाष्यार्थ—अथ इदानीं कर्मणां प्रवर्तकं उच्यते**—याप्रमाणे शास्त्रार्थाचा उपसंहार केल्यानंतर आतां कर्माचें प्रवर्तक सांगितलें जातें [ म्ह० ज्या कर्मामध्यें विद्वानांचा अधिकार नाहीं व अविद्वानांचा अधिकार आहे, त्या कर्मांचे प्रवर्तक-निमित्त सांगितलें जाते. ]—**ज्ञानं-ज्ञायते अनेन इति सर्वविषयं अविशेषेण उच्यते**—ज्ञान म्ह० ज्याच्या योगानें जाणले जातें तें ज्ञान. सर्व विषयांविषयींचें ज्ञान येथें सामान्यतः सांगितलें जातें. अर्थात् सर्व प्रकारचे ज्ञान हा येथील ज्ञानशब्दाचा अर्थ आहे.—**तथा ज्ञेयं ज्ञातव्यं**—तसेच ज्ञेय म्ह० जाणण्यास योग्य असलेलें—**तत् अपि सामान्येन एव सर्वं उच्यते**—ते ज्ञेयहि सामान्यतःच सर्व सांगितलें जातें. [ म्ह० जितके म्हणून ज्ञेय पदार्थ आहेत ते सर्व, असा याचा भावार्थ. ]—**तथा परिज्ञाता-उपाधिलक्षणः अविद्याकल्पितः भोक्ता**—तसाच परिज्ञाता म्ह० उपाधि हें ज्याचें लक्षण आहे म्ह० उपाधिप्रधान-उपहित अविद्याकल्पित अर्थात् मिथ्या भोक्ता—**इति एतत् त्रयं**—( सर्व कर्मणां प्रवर्तकं )-असें हे त्रय म्ह० ज्ञान, ज्ञेय, परिज्ञाता सर्व कर्मांचें प्रवर्तक आहे.—**एषा सर्वकर्मणां अविशेषेण प्रवर्तिका त्रिविधा-त्रिप्रकारा कर्मचोदना**—ही सर्व कर्मांची सामान्यतः प्रवर्तिका-त्रिविध तीन प्रकारची कर्मचोदना आहे. [ चोदना म्ह० क्रियेचें प्रवर्तक वचन, या शाबर भाष्यानुसार आचार्यांनी चोदनाशब्दाचा हा अर्थ सांगितला आहे. अर्थात् ज्ञान, ज्ञेय व ज्ञाता असें हे तीन प्रकारचें कर्मप्रवर्तक आहे. ज्ञानादिकांनाच कर्मप्रवर्तकत्व आहे ही गोष्ट अनुभवानेंच सिद्ध करितात-]—**ज्ञानादीनां त्रयाणां संनिपाते हि हानोपादानादि-प्रयोजनः सर्वकर्मारंभः स्यात्**—ज्ञानादि तीन कारणांचा समवाय झाला असता म्ह० तीं एकत्र जमलीं असतां हान व उपादान म्ह० त्याग, स्वीकार व उपेक्षा हेंच ज्यांचें फल आहे अशा सर्व कर्मांचा आरंभ होतो, हें प्रसिद्ध आहे.—**ततः अधिष्ठानादिभिः पंचभिः आरब्धं वाङ्मनःकायाश्रयभेदेन त्रिधा राशीभूतं त्रिषु करणादिषु संगृह्यते**—याप्रमाणे ज्ञानादिकांना कर्मांचें प्रवर्तकत्व असल्यामुळें अधिष्ठानादि पूर्वोक्त पांच हेतूंनीं आरंभिलेलें शरीर, मन व वाणी या तीन आश्रयभेदांनीं तीन प्रकारें विभक्त झालेलें कर्म, करणादि तीन कारकांमध्यें संग्रहित केलें जातें,—**इति एतत् उच्यते**—असें हें यापुढील श्लोकार्धानें सांगितलें जातें—**करणं-क्रियते अनेन इति श्रोत्रादि बाह्यं बुद्ध्यादि अन्तःस्थं**—करण म्ह० ज्याच्या योगाने कर्म केलें जातें तें, श्रोत्रादि बाह्य व बुद्ध्यादि अंतःस्थ—**कर्म-कर्तुः ईप्सिततमं क्रियया व्याप्यमानं**—कर्म म्ह० कर्त्याला प्राप्त करून घेण्यास अत्यंत इष्ट असलेलें वस्तुजात, क्रियेनें संपादन केलें जाणारें—

व्यापलें जाणारें—**कर्ता-करणानां व्यापारयिता उपाधिलक्षणः**—कर्ता म्ह० इंद्रियांचा प्रवर्तक त्यांच्याकडून व्यापार करविणारा, उपाधिरूप,—**इति त्रिविधः-त्रिप्रकारः कर्मसंग्रहः**—याप्रमाणें तीन प्रकारचा कर्मसंग्रह आहे.—**संगृह्यते-अस्मिन् इति संग्रहः-कर्मणः संग्रहः कर्मसंग्रहः**—यांत संग्रह केला जातो म्हणून संग्रह, कर्मांचा जो संग्रह, तो कर्मसंग्रह—**एषु हि त्रिषु कर्म समवैति**—कारण या करणादि तीन कारकांमध्येंच कर्म नित्य संबद्ध असतें. [ कर्म कारकाच्या आश्रयानें असतें हें प्रसिद्ध आहे. ]—**तेन अयं त्रिविधः कर्मसंग्रहः**—त्यामुळें कर्म, करण व कर्ता असा तीन प्रकारचा कर्मसंग्रह आहे. १८

---

१ या श्लोकांतील ‘ कर्मचोदना ’ व ‘ कर्मसंग्रह ’ या शब्दांचा अर्थ करतांना तर रहस्यकारांनीं फारच गंमत केली आहे ! ते म्हणतात-“ हे शब्द पारिभाषिक आहेत. ” ( बरें मग ? ) “ कोणतेंहि कर्म इंद्रियांनी घडण्यापूर्वीं त्याचा मनानें निश्चय करावा लागतो ” ( निश्चय करणें हे मनाचे काम आहे की, निश्चयात्मिका बुद्धीचें ? ) “ म्हणून या मानसिक विचारास कर्मचोदना म्ह० कर्म करण्याची प्रथम प्रेरणा असें म्हणतात. ” ( मानसिक विचार हीच जर कर्मचोदना तर तिला ‘ ज्ञान, ज्ञेय व ज्ञाता ’ अशी त्रिविध कां म्हटलें ? याचें उत्तर ते असें देतात–) “ व ती साहजिकरीत्या ज्ञान, ज्ञेय व ज्ञाता याप्रमाणें तीन प्रकारची असते ” ( पण मानसिक विचार असा तीन प्रकारचा कसा असूं शकेल ? याचें उत्तर ते उदाहरणानें देतात–) “ प्रत्यक्ष मडकें करण्यापूर्वीं मला अमुक करावयाचें ( ज्ञेय ), व तें अमक्या रीतीनें होईल ( ज्ञान ), असें कुंभार ( ज्ञाता ), आपल्या मनानें ठरवीत असतो ही कर्मचोदना झाली ” ( पण जें करावयाचें तें कार्य होय, ज्ञेय नव्हे, अमक्या रीतीनें होईल, असें ठाऊक असणें याला ज्ञान म्हणतां येईल, पण कुंभाराला ‘ ज्ञाता ’ म्हणतां येणार नाहीं. कुंभार घटाचा कर्ताच आहे, ज्ञाता कोणीहि होईल. पण मडकें करावयाचें असतां त्याचा कर्ता दुसरा कोणी होणे शक्य नाहीं. तसेंच ते पुढें म्हणतात–) “ तो कुंभार ( कर्ता ) माती, चाक वगैरे साधनें ( करण ) मिळवून प्रत्यक्ष मडकें ( कर्म ) तयार करितो. हा कर्मसंग्रह झाला ” ( हें म्हणणें कांहीसें ठीक आहे. पण त्यावरूनहि श्लोकाचें स्वारस्य कांहींच लक्षांत येत नाहीं. वस्तुतः भगवानांना येथें कर्मामध्यें जिच्यामुळें प्रवृत्ति होते ती त्रिपुटी व कर्मांचा जिच्यामध्यें संग्रह होतो ती त्रिपुटी अशा दोन त्रिपुटी सांगावयाच्या आहेत. ज्ञाता (जीव), ज्ञान (ज्ञानाचें करण) व ज्ञेय (विषय) ही त्रिपुटी प्रत्येक कर्माची प्रवर्तक असून कर्ता ( जीव ) करण (कर्मांचें साधन) व कर्म ( कर्त्याला इष्ट असलेली वस्तु ) ही त्रिपुटी कर्मसंग्रह आहे. म्ह० कर्ता, कर्म व करण यांत सर्व कर्मांचा संग्रह होतो. कोणतेंहि कर्म या त्रिपुटीला सोडून, हिच्यावांचून होऊंच शकत नाही. ज्ञानी पुरुषाच्या ठिकाणीं या त्रिपुट्या नसतात. त्यामुळें त्याच्या कर्मांचा असंभव होतो, हें सुचवून १७ व्या श्लोकांतील अर्थालाच येथें अप्रत्यक्षपणें पुष्टि दिली आहे. ‘ मी ज्ञाता ’ व ‘ मी कर्ता ’ इत्यादि ‘ अहंकृत ’ भावच ज्याला नसतो त्याच्या हातून महापातक जरी घडलें तरी तो त्याच्यायोगानें बद्ध होत नाहीं. परलोकीं त्याला त्याचें फळ भोगावें लागत नाहीं. कारण अधिष्ठानादिकांशीं आत्म्याचा जसा संबंध नाहीं तसाच या त्रिपुटीशींहि आत्म्याचा संबंध नाहीं. पण केवल तार्किकांना हें गूढ उकलणें शक्य नाहीं. ) म्हणूनच रहस्यकारांनां “ कर्मचोदना हा शब्द मान-

सिक किंवा अन्तःकरणांतील क्रियेचा बोधक असून कर्मसंग्रह या शब्दानें त्याच मानसिक क्रियेच्या तोडीच्या बाह्य क्रिया दाखविल्या जातात " इत्यादि कांहीं तरी असंबद्ध मजकूर लिहून पुढील २०-२२ श्लोकांस असें अवतरण दिलें आहे—" कोणत्याहि कर्माचा पूर्ण विचार करावयाचा म्ह० 'चोदना' व 'संग्रह' ही दोन्ही पाहिलीं पाहिजेत " (तीं कां बरें ? त्यांचा उपयोग काय ? ती उगीच-कांहीं कारणावांचून पाहावयाचीं ? वस्तुतः येथें कर्माची सामग्रीच कर्मचोदना व कर्मसंग्रह या शब्दांनीं सांगितली आहे. छान्दोग्यांत " यो वै भूमा तत्सुखं । नाल्पे सुखं अस्ति भूमैव सुखं " असें अगोदर म्हणून " यत्र नान्यत्पश्यति नान्यच्छृणोति नान्यद्विजानाति स भूमा अथ यत्रान्यत्पश्यति अन्यच्छृणोति अन्याद्विजानाति तदल्पं यो वै भूमा तदमृतं यदल्पं तन्मर्त्यं " असें त्याचेंच स्पष्टीकरण केलें आहे. याचा अर्थ-" जो भूमा—निरतिशय महत्तत्त्व तेंच सुख. अल्पांत सुख नसतें. भूमा हेंच सुख आहे." " ज्या भूमतत्त्वामध्यें अन्य द्रष्टा अन्य करणानें अन्य द्रष्टव्य पहात नाहीं, दुसरें श्रोतव्य ऐकत नाहीं, दुसरें विज्ञातव्य जाणत नाहीं तो भूमा, पण ज्या अविद्यावस्थेंत अन्य द्रष्टा अन्य साधनानें अन्य द्रष्टव्य पाहतो, अन्य श्रोतव्य ऐकतो, दुसरें ज्ञेय जाणतो ते अल्प. जो भूमा तेंच अमृत व जे अल्प तें मर्त्य. [छां. भा. अ. ७ खं. २३-२४ पृ. ५६१-६२] यात त्रिपुटीचाच स्पष्ट उल्लेख असून तिच्या अभावीं आत्मस्वरूपावस्थानच सांगितलें आहे. पंचदशी प्र. ११ श्लो. १७ पहा. अर्थात् सर्व व्यवहार त्रिपुटी अवस्थेत होतो. ज्ञान-ज्ञेय-ज्ञाता-कर्म-करण-कर्ता ही त्याची सामग्री आहे, तिच्या अभावीं कर्म संभवत नाहीं. कारण आत्मा 'स्वतः अकर्ता' म्हणून त्याचा येथें उल्लेख केला आहे. ) असो; पुढें ते म्हणतात— " पैकीं ज्ञान, ज्ञेय, ज्ञाता (क्षेत्रज्ञ) याचीं अध्यात्मदृष्ट्या लक्षणे पूर्वी १३ व्या अध्यायांत (१३-१८) सांगितलीं आहेत." (हें म्हणणें खोटें आहे. कारण तेथील ज्ञान म्ह० अमानित्वादि ज्ञानसाधनें आहेत; [पृ. ९१४] ज्ञेय म्ह० परब्रह्म आहे व ज्ञात्याचा तेथें उल्लेखच नाहीं आणि येथील ज्ञान म्ह० ज्ञानेंद्रियादिक, ज्ञेय म्ह० बाह्य विषय व ज्ञाता म्ह० उपाधिलक्षण भोक्ता आहे. अर्थात् तेराव्या अध्यायातील ज्ञान, ज्ञेय व येथील ज्ञान-ज्ञेयादिक एक नव्हेत. पण रहस्यकार पुनः म्हणतात-) " तथापि क्रियारूपी ज्ञानाचें लक्षण थोडें निराळें असल्यामुळें या त्रयींपैकीं ज्ञान व दुसऱ्या त्रयींतील कर्म व कर्ता यांच्या व्याख्या आता सांगतात-" ( क्रियारूपी ज्ञान हा प्रयोग विचित्र आहे. ज्ञान ही क्रिया कशी ? कदाचित् तीहि मानस क्रियाच आहे, म्हणून म्हणावें तर पुढील २० श्लोकांत 'येन एकं भाव ईक्षते तत् सात्त्विक ज्ञान' अशी त्याची करणव्युत्पत्ति दिली आहे. शिवाय 'ज्ञान वस्तुतंत्र असतें, कर्तृतन्त्र नसतें,' वगैरे ज्ञानाच्या मानसक्रियात्वाविषयीं मोठा वाद आहे. पण विस्तारभयास्तव आम्ही तो येथें देत नाहीं. रहस्यकार म्हणतात-' ज्ञान, कर्म व कर्ता त्यांच्या व्याख्या सांगतात. ' पण पुढें त्याच्या व्याख्या सांगितल्या नसून सात्त्विकादि त्रिविध भेद सांगितला आहे. असो; 'ज्ञाता व ज्ञेय यांचीं लक्षणे तेराव्या अध्यायांत सांगितलीं आहेत म्हणून तीं येथें पुनः सांगितलीं नाहींत,' असें जरी मानलें तरी दुसऱ्या त्रयींतील 'करण' कां सोडलें ? याला कांहीं उत्तर आहे का ? कांहीं नाहीं. पण वेदान्तशास्त्रदृष्ट्या त्याला उत्तर आहे. तें कोणतें ? आत्म्याचा क्रिया, कारक व फल यांच्याशीं कांहीं संबंध नाहीं, हे येथें सांगावयाचें आहे;

**ज्ञानं कर्म च कर्ता च त्रिधैव गुणभेदतः ।**
**प्रोच्यते गुणसंख्याने यथावच्छृणु तान्यपि ॥ १९ ॥**

**अन्वयार्थ—गुणसंख्याने**—गुणांची गणना ज्यांत केली आहे त्या कपिलाच्या सांख्यशास्त्रांत—**ज्ञानं**—ज्ञान—**कर्म**—क्रिया—**च**—व—**कर्ता च**—क्रियांचा कर्ता—**गुणभेदतः**—सत्त्वादि गुणांच्या भेदानें—**त्रिधा एव**—तीन प्रकारचाच—**प्रोच्यते**—सांगितला जातो.—**तानि अपि**—तीं ज्ञानादिकही—**यथावत्**—यथाशास्त्र—**शृणु**—ऐक. १९

**अथेदानीं क्रियाकारकफलानां सर्वेषां गुणात्मकत्वात्सत्त्वरजस्तमोगुणभेदतस्त्रिविधो भेदो वक्तव्य इत्यारभ्यते—ज्ञानं कर्म च कर्म क्रिया, न कारकं पारिभाषिकमीप्सिततमं कर्म, कर्ता च निर्वर्तकः क्रियाणां त्रिधैवावधारणं गुणव्यतिरिक्तजात्यन्तराभावप्रदर्शनार्थं गुणभेदतः सत्त्वादिभेदेनेत्यर्थः । प्रोच्यते कथ्यते गुणसंख्याने कापिले शास्त्रे गुणभोक्तृविषये प्रमाणमेव परमार्थब्रह्मैकत्वविषये यद्यपि विरुध्यते । ते हि कापिला गुणगौणव्यापारनिरूपणेऽभियुक्ता इति तच्छास्त्रमपि वक्ष्यमाणार्थस्तुत्यर्थत्वेनोपादीयत इति न विरोधः । यथावद्यथान्यायं यथाशास्त्रं शृणु तान्यपि ज्ञानादीनि तद्भेदजातानि गुणभेदकृतानि शृणु वक्ष्यमाणेऽर्थे मनःसमाधिं कुर्वित्यर्थः ॥ १९ ॥**

**भाष्यार्थ—अथ इदानीं**—ज्ञानादिकांचा प्रस्ताव करून आतां त्या ज्ञानादिकांचे अवांतर भेद जाणण्याची अपेक्षा झाली असतां—**सर्वेषां क्रिया-कारक-फलानां गुणात्मकत्वात्**—सर्व क्रिया, कारक व फल यांना गुणात्मकत्व असल्यामुळें—**सत्त्व-रजस्तमोगुणभेदतः त्रिविधः भेदः वक्तव्यः इति आरभ्यते**—सत्त्व, रज व तम या तीन गुणांमुळें क्रियादिकांचाहि त्रिविध भेद सांगावा म्हणून आरंभ केला जातो.—**ज्ञानं कर्म च**—ज्ञान व कर्म—**कर्म क्रिया न कारकं पारिभाषिकं ईप्सिततमं कर्म**—येथें कर्म म्ह० क्रिया, व्याकरणाच्या परिभाषेप्रमाणे कर्त्याला ईप्सिततम म्ह० प्राप्त करून घेण्यास अत्यंत इष्ट असलेला वस्तु, ‘ कर्म ’ या नांवाचें कारक, येथें विवक्षित नाहीं. [ म्ह० येथील कर्मशब्दाने व्याकरणातील कारक घ्यावयाचें नाही.]—**कर्ता च क्रियाणां निर्वर्तकः**—आणि कर्ता-क्रियांचा संपादक म्ह० कर्मे करणारा—**त्रिधा एव (इति) अवधारणं गुणव्यतिरिक्तजात्यन्तराभावप्रदर्शनार्थं**—‘ तीन प्रकारचेंच ’ हे अवधारण-हा प्रकाराचा निश्चय गुणांहून भिन्नजाति नाहीं, हें दाखविण्यासाठीं आहे.—**गुणभेदतः-सत्त्वादिभेदेन इत्यर्थः**—गुणभेदतः म्ह० सत्त्वादि गुणांच्या भेदानें असा भावार्थ—**प्रोच्यते-कथ्यते**—सांगितला जातो.

---

**व** क्रिया-कारक-फलांतील क्रिया, कर्ता व ज्ञान हींच, तीन मुख्य आहेत, म्हणून त्यांचेंच त्रैविध्य येथें सांगत आहेत. कर्त्यामध्यें ज्ञात्याचा अन्तर्भाव होतो, ज्ञानामध्यें करणाचा अन्तर्भाव होतो, व कर्मामध्यें ज्ञेयाचा अन्तर्भाव होतो. )

[ ज्ञान, कर्म व कर्ता यांतील प्रत्येक सत्त्वादि तीन गुणांमुळें तीनच प्रकारचें सांगितलेले आहे. कोठें ? उत्तर-]—**गुणसंख्याने कापिले शास्त्रे**—गुणसंख्यानांत म्ह० कापिलशास्त्रांत—**तत् अपि गुणसंख्यानं शास्त्रं गुणभोक्तृविषये प्रमाणं एव**—तें गुणसंख्यान शास्त्रहि गुण व भोक्ता यांविषयीं प्रमाणच आहे.—**यद्यपि परमार्थब्रह्मैकत्वविषये विरुध्यते**—जरी तें कापिलशास्त्र परमार्थब्रह्मैकत्वविषयामध्यें विरुद्ध आहे, तरी गुण, भोक्ते इत्यादि विषयांत प्रमाणच आहे. [ एखाद्या विशिष्ट विषयामध्यें विरोध जरी असला तरी प्रकृत अर्थी त्याचे प्रामाण्य विरुद्ध नाहीं.]—**ते हि कापिलाः गुणगौणव्यापारनिरूपणे अभियुक्ताः**—कारण ते कापिल सांख्यदर्शनकारहि गुण, गुणांचे व्यापार, भोग वगैरे, यांचें निरूपण करण्यांत मोठे निपुण आहेत—**इति तत् शास्त्रं अपि वक्ष्यमाणार्थस्तुत्यर्थत्वेन उपादीयते इति न विरोधः**—त्यामुळें त्यांचें शास्त्रहि पुढें सागितलेल्या अर्थाच्या स्तुतीसाठीं ग्रहण केलें जातें. [ ज्ञानादि प्रत्येकाचे तीन तीन भेद आहेत, हा वक्ष्यमाण अर्थ आहे, तो दुसऱ्या शास्त्रांतहि तसाच सांगितलेला आहे, अशी त्याची प्रसिद्धि सांगून स्तुति करण्यासाठी त्या मताचें येथे ग्रहण केलें आहे. ] त्यामुळें विवक्षित अर्थाच्या स्तुतीसाठीं इतर शास्त्रांचें ग्रहण करणें यांत कांहीं विरोध नाहीं. यास्तव—**यथावत्-यथान्यायं यथाशास्त्रं शृणु**—यथान्याय-यथाशास्त्र ऐक. (काय ? उत्तर-)—**तानि अपि-ज्ञानादीनि गुणभेदकृतानि तद्भेदजातानि**—तींहि ज्ञानादिक-सत्त्वादि तीन गुणांमुळे झालेले त्यांचे सर्व भेद—**शृणु-वक्ष्यमाणे अर्थे मनःसमाधिं कुरु इत्यर्थः**—ऐक म्ह० पुढें सांगितल्या जाणाऱ्या अर्थामध्यें मनःसमाधान कर.-माझ्या भाषणाकडे लक्ष दे, असा याचा भावार्थ. १९.

**सर्वभूतेषु येनैकं भावमव्ययमीक्षते ।**
**अविभक्तं विभक्तेषु तज्ज्ञानं विद्धि सात्त्विकम् ॥२०॥**

**अन्वयार्थ**—**येन**—ज्या ज्ञानाने—**विभक्तेषु सर्वभूतेषु**—अगदीं भिन्न भिन्न असलेल्या सर्वभूतांमध्यें—**एकं अविभक्तं अव्ययं भावं**—एक अभिन्न अव्यय भाव आत्मवस्तु—**ईक्षते**—पाहतो—**तत् ज्ञानं**—तें ज्ञान—**सात्विकं**—सात्त्विक आहे, असें—**विद्धि**—जाण. २०

**ज्ञानस्य तु तावत्त्रिविधत्वमुच्यते—सर्वभूतेष्वव्यक्तादिस्थावरान्तेषु भूतेषु येन ज्ञानेनैकं भावं वस्तु भावशब्दो वस्तुवाच्येकमात्मवस्त्वित्यर्थः । अव्ययं न व्येति**

१ ' गुणसंख्यान ' म्ह० कापिल सांख्यदर्शन, असे रहस्यकारहि म्हणतात. गीतेंत ' सांख्य ' हा शब्द ' ज्ञान ' या अर्थी आहे. सांख्यदर्शन या अर्थी योजलेला नाहीं. ' गुणसंख्यान ' हा शब्द सांख्यदर्शन या अर्थी योजला आहे, हे यावरून सिद्ध होतें. तसेंच सांख्यांचा स्पष्ट उल्लेख करून फक्त येथेंच त्यांच्या मताचा ज्याअर्थी अनुवाद केला आहे त्याअर्थी यापूर्वी प्रकृति, पुरुष, अव्यक्त इत्यादि जे शब्द आले आहेत ते मूळ सांख्यदर्शनांतील नव्हेत, वेदान्तशास्त्रांतील-उपनिषदांतील आहेत हेंहि उघड होतें.

**स्वात्मना धर्मैर्वा कूटस्थनित्यमित्यर्थः । ईक्षते येन ज्ञानेन पश्यति तं च भावमविभक्तं प्रतिदेहं विभक्तेषु देहभेदेषु न विभक्तं तदात्मवस्तु व्योमवन्निरन्तरमित्यर्थः । तज्ज्ञानमद्वैतात्मदर्शनं सात्त्विकं सम्यग्दर्शनं विद्धीति । यानि द्वैतदर्शनान्यसम्यग्भूतानि राजसानि तामसानि चेति न साक्षात्संसारोच्छित्तये भवन्ति ॥ २० ॥**

**भाष्यार्थ—ज्ञानस्य तु तावत् त्रिविधत्वं उच्यते**—आतां अगोदर तीन श्लोकांनीं ज्ञानाचें त्रिविधत्व सांगितलें जातें—**सर्वभूतेषु-अव्यक्तादि-स्थावरान्तेषु भूतेषु**—सर्व भूतांमध्यें ह्म० अव्यक्तापासून स्थावरापर्यंत शरीरेंद्रियरूप सर्वभूतांमध्यें—**येन-ज्ञानेन एकं भावं-वस्तु**—ज्या ज्ञानानें एक भाव-वस्तु—**भावशब्दः वस्तुवाची एकं आत्मवस्तु इत्यर्थः**—येथील 'भाव' शब्द 'वस्तु' या अर्थी आहे-एक आत्मवस्तु असा याचा भावार्थ—**अव्ययं-स्वात्मना धर्मैः वा न व्येति कूटस्थनित्यं इत्यर्थः**—अव्यय ह्म० स्वरूपानें किंवा धर्मांच्या योगानें क्षय पावत नाहीं ह्म० कूटस्थ नित्य असा याचा भावार्थ—**ईक्षते-येन ज्ञानेन पश्यति**—पहातो -ज्या ज्ञानानें एक अव्यय आत्मवस्तु पहातो, ( असा याचा संबंध. )—**तं च भावं प्रतिदेहं अविभक्तं**—आणि त्या भावाला-आत्मवस्तूला प्रत्येक देहांत अविभक्त—**विभक्तेषु देहभेदेषु तत् आत्मवस्तु न विभक्तं**—भिन्न भिन्न असलेल्या असंख्य देहांमध्यें ती आत्मवस्तु अविभक्त आहे, म्हणजे—**व्योमवत् निरंतरं इत्यर्थः**—आकाशाप्रमाणें निरंतर-अखंड, असा याचा भावार्थ.—**तत् ज्ञानं-अद्वैतात्मदर्शनं सात्त्विकं सम्यग्दर्शनं विद्धि इति**—तें ज्ञान ह्म० अद्वैत आत्मदर्शन सात्त्विक सम्यग्दर्शन आहे असें जाण—**यानि द्वैतदर्शनानि असम्यग्भूतानि राजसानि तामसानि च**—जीं द्वैतदर्शनें-अयथार्थ ज्ञानें तीं राजस व तामस ज्ञानें होत.—**इति साक्षात् संसारोच्छित्तये न भवन्ति**—त्यांमुळें तीं साक्षात् संसारनिवृत्तीला समर्थ होत नाहींत. २०

पृथक्त्वेन तु यज्ज्ञानं नानाभावान्पृथग्विधान् ।
वेत्ति सर्वेषु भूतेषु तज्ज्ञानं विद्धि राजसम् ॥२१॥

**अन्वयार्थ—तु**—परंतु—**यत् ज्ञानं**—जें ज्ञान—**सर्वेषु भूतेषु**—सर्व प्राण्यांमध्यें—**पृथक्त्वेन**—प्रत्येक शरीरांत भिन्न भिन्न रूपानें—**नानाभावान् पृथग्विधान्**—भिन्न भिन्न लक्षणाचे निरनिराळे पदार्थ—**वेत्ति**—जाणतें—**तत् ज्ञानं**—तें ज्ञान—**राजसं**—राजस आहे, असें—**विद्धि**—जाण. २१

पृथक्त्वेनेति । पृथक्त्वेन तु भेदेन प्रतिशरीरमन्यत्वेन यज्ज्ञानं नानाभावान्भिन्नानात्मनः पृथग्विधान्पृथक्प्रकारान्भिन्नलक्षणानित्यर्थः । वेत्ति विजानाति यज्ज्ञानं सर्वेषु भूतेषु ज्ञानस्य कर्तृत्वासंभवाद्येन ज्ञानेन वेत्तीत्यर्थः । तज्ज्ञानं विद्धि राजसं रजोनिर्वृत्तम् ॥ २१ ॥

**भाष्यार्थ—' पृथक्त्वेन० ' इति**—या श्लोकानें राजस ज्ञान सांगतात—**तु यत् ज्ञानं पृथक्त्वेन-भेदेन प्रतिशरीरं अन्यत्वेन**—पण जे ज्ञान पृथक्त्वानें-भेदानें-प्रत्येक शरीरामध्ये अन्यत्वानें—**नानाभावान्-भिन्नान् आत्मनः**—नानाभावास ह्म० भिन्न आत्म्यांस—**पृथग्विधान्-पृथक्प्रकारान् भिन्नलक्षणान् इत्यर्थः**—पृथक् प्रकारचे-निरनिराळया लक्षणांचे, असा याचा भावार्थ.—**यत् ज्ञानं सर्वेषु भूतेषु वेत्ति-विजानाति**—जें ज्ञान सर्व भूतांमध्यें भिन्न भिन्न आत्म्यांना जाणतें-समजतें, पण—**ज्ञानस्य कर्तृत्वासंभवात् येन ज्ञानेन वेत्ति इत्यर्थः**—ज्ञानाला कर्तृत्व संभवत नसल्यामुळें पुरुष ज्या ज्ञानानें जाणतो असा याचा भावार्थ—**तत् ज्ञानं राजसं-रजोनिर्वृतं विद्धि**—त्या ज्ञानाला राजस-रजोगुणापासून उत्पन्न झालेलें, असें जाण. २१

## यत्तु कृत्स्नवदेकस्मिन्कार्ये सक्तमहैतुकम् ।
## अतत्त्वार्थवदल्पं च तत्तामसमुदाहृतम् ॥२२॥

**अन्वयार्थ—तु**—पण—**यत् ( ज्ञानं )**—जे ज्ञान—**एकस्मिन् कार्ये**—एका कार्यांत म्ह० शरीरांत किंवा बाहेर प्रतिमादिकांत—**कृत्स्नवत्**—परिपूर्ण असल्याप्रमाणें—**सक्तं**—जीव किंवा ईश्वर हा एवढाच यापेक्षा अधिक नाहीं अशा अभिनिवेशाने युक्त असलेले,—**अहैतुकं**—युक्तिशून्य—**अतत्त्वार्थवत् च**—तत्त्वार्थरहित व त्यामुळेच—**अल्पं**—अगदी अल्प असते—**तत् तामसं**—ते तामस ज्ञान ह्मणून—**उदाहृतं**—ह्मटलेलें आहे. २२.

**यत्त्विति । यत्तु ज्ञानं कृत्स्नवत्समस्तवत्सर्वविषयमिवैकस्मिन्कार्ये देहे बहिर्वा प्रतिमादौ सक्तमेतावानेवाऽऽत्मेश्वरो वा नातः परमस्तीति यथा नग्नक्षपणकादीनां शरीरानुवर्ती देहपरिमाणो जीव ईश्वरो वा पाषाणदार्वादिमात्र इत्येवमेकस्मिन्कार्ये सक्तमहैतुकं हेतुवर्जितं निर्युक्तिकमतत्त्वार्थवद्यथाभूतोऽर्थस्तत्त्वार्थः सोऽस्य ज्ञेयभूतोऽस्तीति तत्त्वार्थवन्न तत्त्वार्थवदतत्त्वार्थवदहेतुकत्वादेवाल्पं चाल्पविषयत्वादल्पफलत्वाद्वा तत्तामसमुदाहृतम् । तामसानां हि प्राणिनामविवेकिनामीदृशं ज्ञानं दृश्यते ॥ २२ ॥**

**भाष्यार्थ—' यत् तु० ' इति**—या श्लोकाने तामस ज्ञान सांगतात.—**तु यत् ज्ञानं एकस्मिन् कार्ये-देहे बहिः वा प्रतिमादौ कृत्स्नवत्-समस्तवत् सर्वविषयं इव**—पण जें ज्ञान एका कार्यामध्यें म्ह० देहामध्यें किंवा बाहेर प्रतिमेमध्यें समस्तवत् सर्वज्ञानाप्रमाणें-एकामध्यें समस्ताप्रमाणे-जणुं काय सर्वच वस्तूंविषयींचें—**सक्तं-एतावान् एव आत्मा ईश्वरः वा न अतः परं अस्ति इति**—असे सक्त म्ह० आत्मा किंवा ईश्वर काय तो एवढाच याच्या पलीकडे नाहीं, अशा प्रकारचें एका कार्यामध्ये आसक्त असलेलें समस्तविषयक ज्ञान ( एकाच कार्यांतील आसक्तत्व दृष्टान्तानें स्पष्ट करितात-)—**यथा नग्नक्षपणकादीनां शरीरानुवर्ती देहपरिमाणः**

**जीवः वा पाषाणदार्वादिमात्रः ईश्वरः**—ज्याप्रमाणें दिगंबर जैनादिकांचा शरीरानुवर्ती-देहपरिणाम जीव म्ह० शरीराप्रमाणेंच बनणारा किंवा वागणारा व शरीराचें जें प्रमाण त्याच प्रमाणाचा जीव किंवा केवल पाषाण काष्ठ हेच ज्याचे स्वरूप आहे असा ईश्वर—**इति एवं एकस्मिन् कार्ये सक्तं**—याप्रकारें एकाच कार्यामध्यें (देह किंवा बाह्य प्रतिमा इत्यादिकांत) सक्त-आसक्त असलेले—**अहैतुकं-हेतुवर्जितं निर्युक्तिकं**—अहेतुक म्ह० हेतुरहित, युक्तिशून्य—**अतत्त्वार्थवत्-यथाभूतः अर्थः तत्त्वार्थः सः अस्य ज्ञेयभूतः अस्ति इति तत्त्वार्थवत्**—अतत्त्वार्थवत्-यथाभूत म्ह० खरा असलेला जो अर्थ तो तत्त्वार्थ, तसा तत्त्वार्थ ज्या ज्ञानाचा ज्ञेय म्ह० विषय आहे ते ज्ञान तत्त्वार्थवत् होय—**न तत्त्वार्थवत् अतत्त्वार्थवत्**—असें तत्त्वार्थवत् जे नाही ते अतत्त्वार्थवत्—**अहेतुकत्वात् एव अल्पं च**—आणि युक्तिशून्य असल्यामुळें जें ज्ञान अल्प म्ह० आभासरूप आहे—**वा अल्पविषयत्वात् (वा) अल्पफलत्वात्**—किंवा त्याचा विषय अल्प असल्यामुळें किंवा फल अल्प असल्यामुळे जें ज्ञान अल्प आहे-म्ह० जे स्वरूपतः, विषयतः व फलतःहि अल्प आहे—**तत् तामसं उदाहृतं**—तें ज्ञान तामस म्हटलें आहे.—**हि तामसानां प्राणिनां अविवेकिनां ईदृशं ज्ञानं दृश्यते**—जे तामस-अविवेकी प्राणी असतात त्यांचें हे अशा प्रकारचें ज्ञान दिसतें. २२.

---

*१. २०–२२या श्लोकांवरील टीपेत रहस्यकार असें स्पष्टीकरण करितात—"निरनिराळ्या ज्ञानाची हीं लक्षणे व्यापक आहेत. आपली बायका-मुले हाच कायतो सर्व संसार हे ज्ञान तामस होय. यापेक्षां जरा वर चढले म्ह० दृष्टि अधिक व्यापक होऊन आपल्या गावांतला किंवा देशांतला मनुष्य आपला वाटूं लागतो; तथापि निरनिराळ्या गांवांतील अगर देशांतील लोक निरनिराळे ही बुद्धि अद्याप कायम असते, हे ज्ञान राजस होय. पण याहिपेक्षां वर चढून सर्वभूतीं एक आत्मा हे ओळखिले म्ह० हें ज्ञान पूर्ण व सात्त्विक झाले." वगैरे, पण हा भावार्थ व्यवहारदृष्ट्या कितीहि जरी ग्राह्य असला तरी तो मूळाला धरून नाही, हें कोणीहि कबूल करील. येथे बायका-मुले, गाव व देश यांतील लोक एवढाच अर्थ समजणें हा व्यापक अर्थ नसून संकुचित अर्थ आहे. कारण २० व्या श्लोकाप्रमाणें २१ व्या श्लोकांतहि म्ह० राजस ज्ञानाचें लक्षण सांगतानाहि 'सर्वेषु भूतेषु' हे शब्द आहेत. सर्व भूतें म्ह० नुसता गाव किंवा देश नव्हे. तसेंच तामस लक्षणांत 'एकस्मिन् कार्ये कृत्स्नवत्' असे शब्द आहेत. त्यांचाहि बायका-मुलें हा अर्थ संभवत नाही. असे दोष तर गीतारहस्यांत पदोपदी आढळतात. त्यांतले बरेचसे आम्ही यापूर्वी दाखविले आहेत. म्हणून आतां आणखी अधिक कोळसा उगाळीत बसत नाही. येथवर आम्ही जें परीक्षण केलं आहे त्यावरून रहस्यकारांनी केलेला गीतार्थ प्रायः सदोष आहे, याविषयीं वाचकांची खात्री होईल. म्हणून आतां या पुढें दोन-चार मुख्य मुद्यांचाच तेवढा विचार करून या अध्यायावरील टीपाहि संपवितों.

## नियतं संगरहितमरागद्वेषतः कृतम् ।
## अफलप्रेप्सुना कर्म यत्तत्सात्त्विकमुच्यते ॥२३॥

**अन्वयार्थ—यत्**—जें—**अफलप्रेप्सुना**—फलाच्या प्राप्तीची इच्छा न करणाऱ्या कर्त्याकडून—**अरागद्वेषतः कृतं**—राग-द्वेषावांचून केलेलें—**नियतं संगरहितं कर्म**—नित्य आसक्तिरहित कर्म—**तत् सात्त्विकं उच्यते**—त्याला सात्त्विक कर्म म्हटलें जातें. २३

**अथ कर्मणस्त्रैविध्यमुच्यते--नियतं नित्यं सङ्गरहितमासक्तिवर्जितमरागद्वेषतः कृतं रागप्रयुक्तेन द्वेषप्रयुक्तेन च कृतं रागद्वेषतः कृतं तद्विपरीतं कृतमरागद्वेषतः कृतमफलप्रेप्सुना फलं प्रेप्सतीति फलप्रेप्सुः फलतृष्णस्तद्विपरीतेनाफलप्रेप्सुना कर्त्रा कृतं कर्म यत्तत्सात्त्विकमुच्यते ॥ २३ ॥**

**भाष्यार्थ—अथ कर्मणः त्रैविध्यं उच्यते**—आतां कर्माचें त्रिविधत्व सांगितलें जातें.—**नियतं-नित्यं**—नियत म्ह०नित्य,—**संगरहितं-आसक्तिवर्जितं**—संगरहित-आसक्तिशून्य—**अरागद्वेषतः कृतं**—रागद्वेषानें न केलेलें—**रागप्रयुक्तेन द्वेषप्रयुक्तेन च कृतं रागद्वेषतः कृतं तद्विपरीतं कृतं अरागद्वेषतः कृतं**—रागाने प्रेरित होऊन व द्वेषानें प्रेरित होऊन केलेलें जें कर्म तें रागद्वेषकृत होय व त्याच्या उलट म्ह० रागद्वेषावांचून केलेले जें कर्म तें अरागद्वेषानें केलेलें कर्म होय.—**अफलप्रेप्सुना-फलं प्रेप्सति इति फलप्रेप्सुः-फलतृष्णः**—अफलप्रेप्सु-फलाची इच्छा न करणाऱ्या-फल मिळण्याची जो इच्छा करितो तो फलप्रेप्सु म्हणजे फलेच्छु **तत्-विपरीतेन अफलप्रेप्सुना कर्त्रा**—त्याच्या उलट असलेल्या म्हणजे फल मिळण्याची इच्छा न करणाऱ्या कर्त्याकडून—**यत् कृतं कर्म तत् सात्त्विकं उच्यते**—जें केलेलें कर्म तें सात्त्विक म्हटलें जातें. २३.

## यत्तु कामेप्सुना कर्म साहंकारेण वा पुनः ।
## क्रियते बहुलायासं तद्राजसमुदाहृतम् ॥२४॥

**अन्वयार्थ—तु**—पण—**यत्**—जें—**कर्म**—कर्म—**कामेप्सुना**—फलप्राप्तीची इच्छा करणाराकडून—**वा पुनः**—किंवा—**साहंकारेण**—अहंकाराने युक्त झालेल्या पुरुषाकडून—**बहुलायासं**—पुष्कळ आयासानें—**क्रियते**—केले जातें—**तत्**—तें—**राजसं उदाहृतं**—राजस कर्म म्हटलेले आहे. २४.

**यत्त्विति । यत्तु कामेप्सुना फलप्रेप्सुनेत्यर्थः । कर्म साहंकारेण वा साहंकारेणेति न तत्त्वज्ञानापेक्षया किं तर्हि लौकिकश्रोत्रियनिरहंकारापेक्षया । यो हि परमार्थनिरहंकार आत्मवित्र तस्य कामेप्सुत्वबहुलायासकर्तृत्वप्राप्तिरस्ति । सात्त्विकस्यापि कर्मणोऽनात्मवित्साहंकारः कर्ता किमुत राजसतामसयोः । लोकेऽनात्मविदपि श्रोत्रियो निरहंकार**

उच्यते निरहंकारोऽयं ब्राह्मण इति। तस्मात्तदपेक्षयैव साहंकारेण वेत्युक्तम्। पुनः-शब्दः पादपूरणार्थः। क्रियते बहुलायासं कर्त्रा महताऽऽयासेन निर्वर्त्यते तत्कर्म राजसमुदाहृतम् ॥ २४ ॥

**भाष्यार्थ—'यत् तु०' इति**—'यत् तु०' या श्लोकानें राजस कर्म सांगतात—**तु कामेप्सुना-फलप्रेप्सुना इत्यर्थः**—पण कामेप्सुपुरुषाकडून म्ह० फल प्राप्त व्हावें अशी इच्छा करणाऱ्या पुरुषाकडून, असा याचा भावार्थ—**यत् कर्म**—जें कर्म (केलें जातें असा पुढें संबंध)—**वा साहंकारेण**—किंवा साहंकारानें—**साहंकारेण इति तत्त्वज्ञान-अपेक्षया न**—येथें साहंकारानें असें जें म्हटलें आहे, तें तत्त्वज्ञानाच्या अपेक्षेनें नाहीं—**किं तर्हि**—तर, मग काय—**लौकिकश्रोत्रियनिरहंकार अपेक्षया**—लौकिक श्रोत्रियाच्या अहंकाररहित कर्माच्या अपेक्षेनें [निरहंकार तत्त्वज्ञानी पुरुषानें केलेल्या कर्माच्या अपेक्षेनें साहंकार अज्ञ पुरुषानें केलेलें जे कर्म, तें येथें कर्म-शब्दानें विवक्षित नाहीं. तर जो लौकिकांत असलेला, निष्पाप, वेदाध्यायी ब्राह्मण, त्याचें जें अहंकाररहित कर्म त्याच्या अपेक्षेनें येथे 'साहंकारेण कृतं कर्म' असे म्हटलें आहे, यावर कोणी म्हणेल कीं, असें कां? तर सांगतात-]—**यः हि परमार्थनिरहंकारः आत्मवित् तस्य कामेप्सुत्वबहुलायासकर्तृत्वप्राप्तिः न अस्ति**—जो खरा खरा-वास्तविक निरहंकार आत्मवेत्ता, त्याला फलप्राप्तीची इच्छा व पुष्कळ आयासानें कर्माचें कर्तृत्व यांची प्राप्ति नसते—**सात्त्विकस्य अपि कर्मणः अनात्मवित् कर्ता साहंकारः**—सात्त्विक कर्माचाहि कर्ता जर अनात्मज्ञ व साहंकार असतो—**किं उत राजस-तामसयोः**—तर मग राजस आणि तामस कर्मांचा कर्ता साहंकार असतो हें काय सांगावें?—**लोके अनात्मविद् अपि श्रोत्रियः निरहंकारः उच्यते निरहंकारः अयं ब्राह्मणः इति**—व्यवहारामध्यें आत्म्याला न जाणणाराहि वेदाध्यायी निरहंकार म्हटला जातो-हा ब्राह्मण निरहंकार आहे असें म्हणतात,—**तस्मात्-तद् अपेक्षया एव 'साहंकारेण वा' इति उक्तं**—म्हणून त्या निरहंकार श्रोत्रियाच्या अपेक्षेनेच 'साहंकारेण वा' असे म्हटलें आहे—**पुनः-शब्दः पादपूरणार्थः**—पूर्वार्धाच्या शेवटीं असलेला 'पुनः-'शब्द दुसऱ्या चरणाची पूर्ति करण्यासाठीं आहे—**कर्त्रा बहुलायासं-महता आयासेन क्रियते -निर्वर्त्यते**—त्या कर्त्याकडून मोठ्या आयासानें (जें कर्म) केले जातें—**तत् कर्म राजसं उदाहृतं**—तें कर्म राजस म्हटलें आहे. २४

## अनुबन्धं क्षयं हिंसामनपेक्ष्य च पौरुषम्।
## मोहादारभ्यते कर्म यत्तत्तामसमुच्यते ॥ २५ ॥

**अन्वयार्थ—यत् कर्म**—जें कर्म—**अनुबंधं**—मागून होणारा परिणाम—**क्षयं**—शक्तीचा व धनाचा क्षय,—**हिंसां**—प्राण्यांची पीडा—**च पौरुषं**—आणि आपलें

सामर्थ्य यांस—**अनपेक्ष्य**—न पाहून—**मोहात्**—मोहानें—**आरभ्यते**—आरंभिलें जातें—**तत् तामसं उच्यते**—त्याला तामस कर्म म्हटलें जातें. २५

**अनुबन्धमिति । अनुबन्धं पश्चाद्भावि यद्वस्तु सोऽनुबन्ध उच्यते तं चानुबन्धं, क्षयं यस्मिन्कर्मणि क्रियमाणे शक्तिक्षयोऽर्थक्षयो वा स्यात्तं क्षयं, हिंसां प्राणिपीडामनपेक्ष्य च पौरुषं पुरुषकारं शक्नोमीदं कर्म समापयितुमित्येवमात्मसामर्थ्यम्, इत्येतान्यनुबन्धादीन्यनपेक्ष्य पौरुषान्तानि मोहादविवेकत आरभ्यते कर्म यत्तत्तामसं तमोनिर्वृत्तमुच्यते ॥ २५ ॥**

**भाष्यार्थ**—' **अनुबंधं०** ' इति—या श्लोकानें तामस कर्म सांगतात—**अनुबंधं-पश्चात् भावि यत् वस्तु सः अनुबंधः उच्यते**—अनुबंध ह्म० मागून होणारी जी वस्तु-( परिणाम ) तिला अनुबंध ह्मटले जाते—**तं च अनुबन्धं**—त्या अनुबंधाला—**क्षयं-यस्मिन् कर्माणि क्रियमाणे शक्तिक्षयः अर्थक्षयः वा स्यात् तं क्षयं**—क्षयाला-जें कर्म करूं लागले असता शक्तिक्षय किंवा धनक्षय होतो त्या क्षयाला—**हिंसां-प्राणिपीडां अनपेक्ष्य**—हिंसा ह्म० प्राणिपीडा तिला, अर्थात् अनुबंध, क्षय व हिंसा यांची अपेक्षा न करतां—**च पौरुषं-पुरुषकारं शक्नोमि इदं कर्म समापयितुं इति एवं आत्मसामर्थ्य**—पौरुष-पुरुषकार-प्रयत्न, ' मी हे कर्म संपवूं शकतो ' अशा प्रकारचे आत्मसामर्थ्य—**इति एतानि अनुबंधादीनि पौरुषान्तानि अनपेक्ष्य**—अशा या अनुबंधापासून पौरुषापर्यंत चार गोष्टींचा विचार केला असतां—**मोहात्-अविवेकतः यत् कर्म आरभ्यते**—मोहानें-अविवेकाने जे कर्म आरंभिलें जाते—**तत् तामसं-तमोनिर्वृतं उच्यते**—त्याला तामस-तमामुळे झालेले असे म्हटले जाते. २५

## मुक्तसंगोऽनहंवादी धृत्युत्साहसमन्वितः ।
## सिद्ध्यसिद्ध्योर्निर्विकारः कर्ता सात्त्विक उच्यते २६

**अन्वयार्थ**—**मुक्तसंगः**—ज्यानें संग सोडला आहे,—**अनहंवादी**—' मी मी ' असें म्हणण्याचें ज्याचें शील नाहीं,—**धृत्युत्साहसमन्वितः**—धृति व उत्साह यांनीं जो युक्त आहे,—**सिद्ध्यसिद्ध्योः निर्विकारः**—सिद्धि व असिद्धि यांतील कांहीं झालें तरी चित्तांत निर्विकार असणारा—**कर्ता**—कर्ता—**सात्त्विकः**—सात्त्विक—**उच्यते**—ह्मटला जातो. २६

**मुक्तेति । मुक्तसङ्गो मुक्तः परित्यक्तः सङ्गो येन स मुक्तसङ्गोऽनहंवादी नाहंवदनशीलो धृत्युत्साहसमन्वितो धृतिर्धारणमुत्साह उद्यमस्ताभ्यां समन्वितः संयुक्तो धृत्युत्साहसमन्वितः, सिद्ध्यसिद्ध्योः क्रियमणस्य कर्मणः फलसिद्धावसिद्धौ च सिद्ध्यसिद्ध्योर्निर्विकारः केवलं शास्त्रप्रमाणयुक्तो न फलरागादिना यः स निर्विकार उच्यते । एवंभूतः कर्ता यः स सात्त्विक उच्यते ॥ २६ ॥**

**भाष्यार्थ—'मुक्त०' इति—**'मुक्त०' या श्लोकानें सात्त्विक कर्ता सांगतात— **मुक्तसंगः-मुक्तः-परित्यक्तः सङ्गः येन सः मुक्तसंगः**—मुक्तसंग ह्म० ज्यानें संगाचा ह्म० फलासक्तीचा परित्याग केला आहे तो मुक्तसंग—**अनहंवादी-न अहं-वदनशीलः**—अनहंवादी ह्म० 'मी' असें ह्मणण्याचें ज्याचें शील नाहीं तो— **धृत्युत्साहसमन्वितः-धृतिः धारणं उत्साहः उद्यमः ताभ्यां समन्वितः संयुक्तः धृत्युत्साहसमन्वितः**—धृति आणि उत्साह यांनीं युक्त, धृति ह्म० धारण, धैर्य, आणि उत्साह ह्म० उद्यम, त्यानीं युक्त तो धृत्युत्साहसमन्वित—**सिद्ध्य-सिद्ध्योः-क्रियमाणस्य कर्मणः फलसिद्धौ असिद्धौ च**—सिद्धि व असिद्धि यांमध्यें ह्म० क्रियमाण कर्माची फलसिद्धि होणें किंवा न होणें या दोन्हींमध्यें—**सि-द्ध्यसिद्ध्योः निर्विकारः**—सिद्धि व असिद्धि यांविषयीं निर्विकार—**केवलं शास्त्र-प्रमाणप्रयुक्तः न फलरागादिना यः**—केवल शास्त्रप्रमाणानेंच प्रेरित झालेला, फलासक्ति, कर्मासक्ति यांनीं अयुक्त असा जो—**सः निर्विकारः उच्यते**—तो निर्वि-कार म्हटला[१] जातो.—**यः एवंभूतः कर्ता सः सात्त्विकः उच्यते**—जो अशा प्रकारचा कर्ता तो सात्त्विक म्हटला जातो. २६

## रागी कर्मफलप्रेप्सुर्लुब्धो हिंसात्मकोऽशुचिः ।
## हर्षशोकान्वितः कर्ता राजसः परिकीर्तितः ॥ २७ ॥

**अन्वयार्थ—रागी**—ज्याला राग-विषयासक्ति आहे असा रागी,—**कर्मफलप्रे-प्सुः**—कर्मफलाची इच्छा करणारा,—**लुब्धः**—परद्रव्याचा लोभ धरणारा—**हिंसा-त्मकः**—दुसऱ्याला पीडा देण्याचें ज्याचें शील आहे असा,—**अशुचिः**—बाह्य व अन्तःशुद्धि न ठेवणारा,—**हर्षशोकान्वितः**—हर्ष व शोक यांनीं युक्त—**कर्ता**— असा कर्ता—**राजसः परिकीर्तितः**—राजस कर्ता सांगितलेला आहे. २७.

**रागीति । रागी रागोऽस्यास्तीति रागी, कर्मफलप्रेप्सुः कर्मफलार्थी, लुब्धः परद्रव्येषु संजाततृष्णस्तीर्थादौ च स्वद्रव्यापरित्यागी, हिंसात्मकः परपीडास्वभावोऽशुचिर्बा-ह्यान्तःशौचवर्जितो हर्षशोकान्वित इष्टप्राप्तौ हर्षोऽनिष्टप्राप्ताविष्टवियोगे च शोक-स्ताभ्यां हर्षशोकाभ्यामन्वितः संयुक्तस्तस्यैव च कर्मणः संपत्तिविपत्त्योर्हर्षशोकौ स्यातां ताभ्यां संयुक्तो यः कर्ता स राजसः परिकीर्तितः ॥ २७ ॥**

---

१ अ. २ श्लो. ४८ येथें योगस्थ होऊन कर्म कर आणि सिद्धि व असिद्धि यांविषयीं सम असणें हाच योग, असें म्हटलें आहे आणि येथे सिद्धि व असिद्धि या प्रसंगीं निर्विकार असणें हें सात्त्विक कर्त्याचें लक्षण सांगितलें आहे. यावरूनच कर्मानुष्ठानाला-कर्मयोगाला अवश्य असलेलें समत्व म्ह० ध्यानानें प्राप्त होणारें चित्तस्थैर्य किंवा ज्ञानानें प्राप्त होणारें सर्वत्र समदर्शन नव्हे, हें उघड होतें. कारण सात्त्विक कर्माचरणहि मी कर्ता या भावने-वांचून होऊं शकत नाहीं. [ २४ श्लोकावरील भाष्य पृ. ११७४ व पृ. १११४ पहा. ]

**भाष्यार्थ—'रागी०' इति**—या श्लोकानें राजस कर्ता सांगतात—**रागी-रागः अस्य अस्ति इति रागी**—रागी-राग म्ह० कर्मासक्ति ज्याला असते तो रागी—**कर्मफलप्रेप्सुः-कर्मफलार्थी**—कर्मफलाची इच्छा करणारा-कर्माचें फल मिळावें असें इच्छिणारा—**लुब्धः-परद्रव्येषु संजाततृष्णः च तीर्थादौ स्वद्रव्य-अपरित्यागी**—लुब्ध म्ह० परद्रव्याविषयीं ज्याला तृष्णा उत्पन्न झाली आहे व सत्पात्रादिकांमध्यें आपल्या द्रव्याचा जो परित्याग करीत नाहीं—**हिंसात्मकः-परपीडास्वभावः**—हिंसात्मक म्ह० दुसऱ्याला पीडा देण्याचा ज्याचा स्वभावच आहे असा—**अशुचिः बाह्यान्तःशौचवर्जितः**—अशुचि म्ह० बाह्य व अंतःशुद्धीनें रहित (अ. १६ श्लो. १० पृ. १०६६)—**हर्षशोकान्वितः-इष्टप्राप्तौ हर्षः अनिष्टप्राप्तौ इष्टवियोगे च शोकः ताभ्यां-हर्षशोकाभ्यां अन्वितः-संयुक्तः**—हर्षशोकानीं युक्त-इष्टप्राप्ति झाली असतां हर्ष, व अनिष्टप्राप्ति व इष्टवस्तूचा वियोग झाला असतां शोक त्या हर्षशोकांनीं युक्त—**तस्य एव च कर्मणः संपत्ति-विपत्त्योः हर्षशोकौ स्यातां**—त्याच कर्माची सिद्धि झाली असतां किंवा त्याचा नाश झाला असतां हर्ष व शोक होतात. त्या हर्षशोकांनीं संयुक्त—**यः कर्ता सः राजसः परिकीर्तितः**—असा जो कर्ता तो राजस म्हटला आहे. २७.

**अयुक्तः प्राकृतः स्तब्धः शठो नैष्कृतिकोऽलसः ।**
**विषादी दीर्घसूत्री च कर्ता तामस उच्यते ॥ २८ ॥**

**अन्वयार्थ—अयुक्तः**—ज्याचें चित्त समाहित नसते—**प्राकृतः**—जो अत्यंत असंस्कृत-मूर्खासारखा असतो,—**स्तब्धः**—कोणापुढेंहि नम्र न होणारा असतो,—**शठः**—मोठा मायावी,—**नैष्कृतिकः**—दुसऱ्याच्या वृत्तीचा छेद करणारा,—**अलसः**—आळशी,—**विषादी**—नेहमीं खेद करणारा,—**च दीर्घसूत्री**—व चेंगट—**कर्ता**—कर्ता असतो, त्याला—**तामसः**—तामस कर्ता—**उच्यते**—म्हटलें जातें. २७

**अयुक्त इति । अयुक्तोऽसमाहितः प्राकृतोऽत्यन्तासंस्कृतबुद्धिर्बालसमः, स्तब्धो दण्डवन्न नमति कस्मैचित्, शठो मायावी शक्तिगूहनकारी, नैष्कृतिकः परवृत्तिच्छेदनपरोऽलसोऽप्रवृत्तिशीलः कर्तव्येष्वपि, विषादी सर्वदाऽवसन्नस्वभावो दीर्घसूत्री च कर्तव्यानां दीर्घप्रसारणो यदद्य श्वो वा कर्तव्यं तन्मासेनापि न करोति, यश्चैवंभूतः कर्ता स तामस उच्यते ॥ २८ ॥**

**भाष्यार्थ—'अयुक्त०' इति**—या श्लोकानें तामस कर्ता सांगतात—**अयुक्तः-असमाहितः**—अयुक्त-असमाहित, ज्याचें चित्त समाहित नाहीं—**प्राकृतः-अत्यंत-असंस्कृतबुद्धिः-बालसमः**—प्राकृत-ज्याच्या बुद्धीला मुळींच संस्कार झालेले नाहींत असा एखाद्या बालकासारखा-मूर्खासारखा—**स्तब्धः-दण्डवत् कस्मैचित् न नमति**—स्तब्ध म्ह० दण्डाप्रमाणें कोणापुढेंहि नम्र न होणारा [जो कोणालाहि नमस्कार करीत नाहीं]—**शठः-मायावी शक्तिगूहनकारी**—शठ म्ह० लबाड,

कपटी, आपलें सामर्थ्य गुप्त ठेवणारा—**नैष्कृतिकः-परवृत्तिच्छेदनपरः**—नैष्कृतिक म्ह० दुसऱ्याच्या वृत्तीचा उच्छेद करण्यांत तत्पर असलेला—**अलसः-कर्तव्येषु अपि अप्रवृत्तिशीलः**—आळशी, आपल्या कर्तव्यामध्येंहि प्रवृत्त होण्याचें ज्याचें शील नाहीं,—**विषादी-सर्वदा अवसन्नस्वभावः**—विषादी-खिन्न, नेहमीं निरुत्साह असण्याचेंच ज्याचे शील आहे—**च दीर्घसूत्री-कर्तव्यानां दीर्घप्रसारणः यत् अद्य वा श्वः कर्तव्यं तत् मासेन अपि न करोति**—आणि दीर्घसूत्री म्ह० कर्तव्यांचा मोठा पसारा करणारा, आज किंवा उद्यां-एक-दोन दिवसांत जें करावयाचें ते महिन्यानेहि करीत नाहीं.—**च यः एवंभूतः कर्ता सः तामसः उच्यते**—जो अशा प्रकारचा कर्ता तो तामस म्हटला जातो. २८.

## बुद्धेर्भेदं धृतेश्चैव गुणतः त्रिविधं शृणु ।
## प्रोच्यमानमशेषेण पृथक्त्वेन धनंजय ॥२९॥

**अन्वयार्थ—धनंजय**—हे पार्था !—**बुद्धेः**—बुद्धीच्या—**च एव**—आणि—**धृतेः**—धृतीच्या—**गुणतः**—गुणांमुळे होणाऱ्या—**त्रिविधं भेदं**—तीन प्रकारच्या भेदाला—**अशेषेण**—कांहीं बाकी न ठेवितां—**प्रोच्यमानं**—माझ्याकडून सांगितल्या जाणाऱ्या भेदाला—**पृथक्त्वेन**—विवेकतः तूं—**शृणु**—ऐक. २९

**बुद्धेर्भेदमिति । बुद्धेर्भेदं धृतेश्चैव भेदं गुणतः सत्त्वादिगुणतस्त्रिविधं शृण्विति सूत्रोपन्यासः । प्रोच्यमानं कथ्यमानमशेषेण निरवशेषतो यथावत्पृथक्त्वेन विवेकतो धनंजय । दिग्विजये मानुषं दैवं च प्रभूतं धनमजयत्तेनासौ धनंजयोऽर्जुनः ॥ २९ ॥**

**भाष्यार्थ—'बुद्धेर्भेदं०' इति**—या श्लोकाने बुद्धि व धृति यांचे भेद सांगण्याची प्रतिज्ञा करितात—**बुद्धेः भेदं च धृतेः एव भेदं सत्त्वादिगुणतः त्रिविधं शृणु इति सूत्रोपन्यासः**—बुद्धीचा भेद आणि धृतीचा भेद सत्त्वादि गुणांमुळे तीन प्रकारचा तूं ऐक, असा सूत्राचा उपन्यास केला आहे.—**अशेषेण-निरवशेषतः यथावत् पृथक्त्वेन-विवेकतः प्रोच्यमानं-कथ्यमानं**—अशेषतः-कांहीं बाकी न ठेवतां पूर्णपणें, विवेकपूर्वक सांगितला जाणारा हा त्रिविध भेद तूं ऐक—**धनंजय-दिग्विजये मानुषं दैवं च प्रभूतं धनं अजयत् तेन असौ अर्जुनः धनंजयः**—हे धनंजय ! दिग्विजयामध्यें मनुष्यांचें व देवांचें पुष्कळ धन त्यानें जिंकलें, त्यामुळें अर्जुन धनंजय होय. २९.

## प्रवृत्तिं च निवृत्तिं च कार्याकार्ये भयाभये ।
## बन्धं मोक्षं च या वेत्ति बुद्धिः सा पार्थ सात्त्विकी॥३०॥

**अन्वयार्थ—पार्थ**—हे अर्जुना !—**या बुद्धिः**—जी बुद्धि—**प्रवृत्तिं**—कर्ममार्गाला—**च**—व—**निवृत्तिं**—मोक्षमार्गाला—**कार्याकार्ये**—विहित कर्तव्य व निषिद्ध अकर्तव्य यांना,—**भयाभये**—भयाचें कारण व अभयाचें कारण यांस—**बंध व**

**मोक्षं**—बंध व मोक्ष यांना—**वेत्ति**—जाणते—**सा**—ती—**सात्त्विकी बुद्धिः**—सात्त्विकी बुद्धि होय. ३०

**प्रवृत्तिं चेति । प्रवृत्तिं च प्रवृत्तिः प्रवर्तनं बन्धहेतुः कर्ममार्गः, निवृत्तिं च निवृत्तिर्मोक्षहेतुः संन्यासमार्गः, बन्धमोक्षसमानवाक्यत्वात्प्रवृत्तिनिवृत्ती कर्मसंन्यासमार्गाविस्यवगम्यते । कार्याकार्ये विहितप्रतिषिद्धे कर्तव्याकर्तव्ये करणाकरणे इत्येतत्, कस्य देशकालाद्यपेक्षया दृष्टादृष्टार्थानां कर्मणाम् । भयाभये बिभेत्यस्मादिति भयं तद्विपरीतमभयं भयं चाभयं च भयाभये दृष्टादृष्टविषययोर्भयाभययोः कारणे इत्यर्थः । बन्धं सहेतुकं मोक्षं च सहेतुकं या वेत्ति विजानाति बुद्धिः सा पार्थ सात्त्विकी । तत्र ज्ञानं बुद्धेर्वृत्तिर्बुद्धिस्तु वृत्तिमती । धृतिरपि वृत्तिविशेष एव बुद्धेः ॥ ३० ॥**

**भाष्यार्थ—'प्रवृत्तिं च०' इति**—या श्लोकाने सात्त्विकी बुद्धि सांगतात—**प्रवृत्तिं च प्रवृत्तिः-प्रवर्तनं बन्धहेतुः कर्ममार्गः**—प्रवृत्तीला-प्रवृत्ति म्ह० प्रवर्तन, बंधाला कारण होणारा कर्ममार्ग—**निवृत्तिं च निवृत्तिः-मोक्षहेतुः संन्यासमार्गः**—आणि निवृत्तीला म्ह० मोक्षाला कारण होणारा संन्यासमार्ग [ पण प्रवृत्ति म्ह० सर्व आचरण व निवृत्ति म्ह० आचरण न करणे असा येथें अर्थ कां करूं नये ? उत्तर-]—**बन्धमोक्षसमानवाक्यत्वात् प्रवृत्तिनिवृत्ती कर्मसंन्याससमार्गौ इति अवगम्यते**—ज्या वाक्यांत बंध व मोक्ष सांगितले आहेत, त्याच वाक्यांत प्रवृत्ति व निवृत्ति सांगितली असल्यामुळे आणि कर्ममार्गाला बंधहेतुत्व व संन्यासमार्गाला मोक्षहेतुत्व असल्यामुळें प्रवृत्ति व निवृत्ति या शब्दांनीं तेच येथें घेतले पाहिजेत, असे ज्ञात होते.—**कार्याकार्ये-विहितप्रतिषिद्धे-कर्तव्याकर्तव्ये-करणाकरणे इति एतत्**—कार्य-अकार्य म्ह० विहित व निषिद्ध, कर्तव्य व अकर्तव्य करणे व न करणे असा याचा भावार्थ—**कस्य देशकालादि-अपेक्षया दृष्टादृष्टार्थानां कर्मणां**—कशाचें करणे व न करणें, देशकालादिकांच्या अपेक्षेनें दृष्ट व अदृष्ट फल देणाऱ्या कर्मांचें अनुष्ठान करण किंवा न करणें—**भयाभये-बिभेति अस्मात् इति भयं तद् विपरीतं अभयं**—भय व अभय यांत, ज्याची भीति वाटते ते भय, व त्याच्या विपरीत असलेले ते अभय—**भयं च अभयं च भयाभये दृष्टादृष्टविषययोः भयाभययोः कारणे इत्यर्थः**—भय व अभय मिळून भयाभय, ज्यांचा विषय दृष्ट म्ह० प्रत्यक्ष व अदृश्य म्ह० परोक्ष आहे, अशा भयाभयांची जी कारणें तीं असा याचा अर्थ.—[ अनिष्टसाधन हेंच भय व इष्टसाधन हेच अभय. ]—**बन्धं सहेतुकं मोक्षं च सहेतुकं**—बंध सहेतुक व मोक्षहि सहेतुक म्ह० कारणासह बंध व मोक्ष यांस—**या बुद्धिः वेत्ति-विजानाति**—जी बुद्धि जाणते—**पार्थ सा**

---

१ पण रहस्यकार "प्रवृत्ति म्ह० एखादी गोष्ट करूं लागणे, आणि निवृत्ति म्ह० एखादी गोष्ट करूं न लागणे," असा अर्थ करितात. पण एखादी गोष्ट करूं लागणे, किंवा करूं न लागणें हें सात्त्विकबुद्धीचें लक्षण कसें, याचा कांही विचार आहे का ?

सात्त्विकी—हे अर्जुना ! ती सात्त्विकी होय-[ पण एकदा ज्ञानाचें त्रिविधत्व सांगितलें असतांना पुनः येथें बुद्धीचें त्रिविधत्व कां सांगितलें आहे? कारण ज्ञान व बुद्धि एकच आहे ! या आक्षेपाचें समाधान-]—तत्र ज्ञानं बुद्धेः वृत्तिः—वर सांगितलेलें ज्ञान ही बुद्धीची वृत्ति आहे—तु बुद्धिः वृत्तिमती—पण येथील बुद्धि ही वृत्ति नसून वृत्तीचा आश्रय म्ह० अंतःकरण आहे.—धृतिः अपि बुद्धेः वृत्तिविशेषः एव—आणि धृतीसुद्धा अंतःकरणाची एक प्रकारची-ज्ञानाहून निराळी अशी वृत्तिच आहे. ३०

## यया धर्ममधर्मं च कार्यं चाकार्यमेव च ।
## अयथावत्प्रजानाति बुद्धिः सा पार्थ राजसी ॥३१॥

अन्वयार्थ—पार्थ—हे अर्जुना !—यया—ज्या बुद्धीच्या योगानें—धर्मं च अधर्मं च—धर्म व अधर्म यांस—कार्यं च अकार्यं एव—कर्तव्य व अकर्तव्य यांस—अयथावत्—सर्व प्रकारे निर्णयरूपाने नव्हे तर अनिर्णयरूपानें मनुष्य—प्रजानाति—जाणतो—सा राजसी बुद्धिः—ती राजसी बुद्धि होय. ३१

ययेति । यया धर्मं शास्त्रचोदितमधर्मं च तत्प्रतिषिद्धं कार्यं चाकार्यमेव च पूर्वोक्ते एव कार्याकार्ये अयथावन्न यथावत्सर्वतो निर्णयेन न प्रजानाति बुद्धिः सा पार्थ राजसी ॥

भाष्यार्थ—'यया०' इति—या श्लोकानें राजसी बुद्धि सांगतात—यया धर्मं शास्त्रचोदितं—ज्या बुद्धीच्या योगाने पुरुष शास्त्रविहित धर्माला—च अधर्मं तत्-प्रतिषिद्धं—व अधर्म म्ह० शास्त्रनिषिद्ध आचरणाला—च कार्यं च अकार्यं एव पूर्वोक्ते एव कार्याकार्ये—आणि कार्य व अकार्य म्ह० वरच्या श्लोकांत सांगितलेलेंच कार्य व अकार्य याला—अयथावत्-न यथावत् सर्वतः निर्णयेन न—अयथावत् म्ह० पूर्णपणें नव्हें-सर्व प्रकारच्या निर्णयानें नव्हे, अशाप्रकारें—प्रजानाति—जाणतो—पार्थ सा बुद्धिः राजसी—हे अर्जुना ! ती बुद्धि राजसी जाण. [ पुरुष ज्या बुद्धीच्या योगानें धर्म, अधर्म, कार्य, अकार्य, यांना निर्णयानें जाणत नाही म्ह० हाच धर्म व हा अधर्म, हेंच कार्य व हें अकार्य, असे निश्चित जाणत नाही, ती बुद्धि राजसी होय. ] ३१

## अधर्मं धर्ममिति या मन्यते तमसावृता ।
## सर्वार्थान्विपरीतांश्च बुद्धिः सा पार्थ तामसी ॥३२॥

अन्वयार्थ—या तमसा आवृता बुद्धिः—जी अविवेकानें वेष्टित झालेली बुद्धि—अधर्मं धर्मं इति—अधर्माला धर्म असें—च सर्वार्थान् विपरीतान्—व सर्व ज्ञेय पदार्थांना विपरीत—मन्यते—समजते—सा तामसी बुद्धिः—ती तामसी बुद्धि होय. ३२

**अधर्ममिति । अधर्मं प्रतिषिद्धं धर्मं विहितमिति या मन्यते जानाति तमसाऽऽवृता सती सर्वार्थान्सर्वानेव ज्ञेयपदार्थान्विपरीतांश्च विपरीतानेव विजानाति बुद्धिः सा पार्थ तामसी ॥ ३२ ॥**

**भाष्यार्थ**—' **अधर्म०** ' **इति**—या श्लोकानें तामसी बुद्धि सांगतात—**अधर्मं -प्रतिषिद्धं धर्मं-विहितं इति या तमसा आवृता सती मन्यते-जानाति**— अधर्माला-निषिद्धाला धर्म-विहित असें जी बुद्धि तमानें म्ह० अज्ञानानें आच्छादित होत्साती समजते-जाणते—**च सर्वार्थान्-सर्वान् एव ज्ञेयपदार्थान् विपरीतान् एव विजानाति**—आणि कार्य, अकार्य इत्यादि सर्वच ज्ञेय पदार्थांना विपरीत-अगदीं उलट जाणते—**पार्थ सा तामसी बुद्धिः**—हे पार्थ ! ती तामसी बुद्धि होय. ३२

## धृत्या यया धारयते मनःप्राणेन्द्रियक्रियाः ।
## योगेनाव्यभिचारिण्या धृतिः सा पार्थ सात्त्विकी ३३

**अन्वयार्थ—योगेन**—समाधियोगानें—**अव्यभिचारिण्या**—अव्यभिचारिणी अशा—**यया धृत्या**—ज्या धृतीच्या योगानें—**मनःप्राणेंद्रियक्रियाः**—मन, प्राण व इंद्रियें यांच्या क्रिया मनुष्य—**धारयते**—धारण करितो—**पार्थ**—हे अर्जुना !—**सा सात्त्विकी धृतिः**—ती सात्त्विकी धृति होय. ३३

**धृत्येति । धृत्या ययाऽव्यभिचारिण्येति व्यवहितेन संबन्धः, धारयते किं मनःप्राणेन्द्रियक्रिया मनश्च प्राणाश्चेन्द्रियाणि च मनःप्राणेन्द्रियाणि तेषां क्रियाश्चेष्टास्ता उच्छास्त्रमार्गप्रवृत्तेर्धारयति । धृत्या हि धार्यमाणा उच्छास्त्रविषया न भवन्ति । योगेन समाधिनाऽव्यभिचारिण्या नित्यसमाध्यनुगतयेत्यर्थः । एतदुक्तं भवत्यव्यभिचारिण्या धृत्या मनः-प्राणेन्द्रियक्रिया धारयमाणो योगेन धारयतीति । यैवंलक्षणा धृतिः सा पार्थ सात्त्विकी ॥ ३३ ॥**

**भाष्यार्थ**—' **धृत्या०** ' **इति**—या श्लोकानें सात्त्विकी धृति सांगतात—**यया धृत्या अव्यभिचारिण्या इति व्यवहितेन संबंधः**—ज्या धृतीनें याचा ' अव्यभिचारिण्या ' या पुढल्या शब्दांशी संबंध—**धारयते**—धारण करितो—**किं**— काय धारण करतो !—**मनःप्राणेन्द्रियक्रियाः-मनः च प्राणाः च इन्द्रियाणि च मनःप्राणेन्द्रियाणि तेषां क्रियाः-चेष्टाः**—मनःप्राणेन्द्रियक्रिया-मन, प्राण, व इंद्रियें तीं मनःप्राण इंद्रियें-त्यांच्या क्रिया म्ह० चेष्टा—**ताः उच्छास्त्रमार्गप्रवृत्तेः धारयति**—त्या मनःप्राणेंद्रियक्रियांना अशास्त्रिय मार्गानें होणाऱ्या प्रवृत्तीपासून धारण करतो—**धृत्या हि धार्यमाणाः उच्छास्त्रविषयाः न भवन्ति**—धृतीकडून धारण केले जाणारे लोकच शास्त्ररहित आचरणादिकांचे विषय होत नाहीत, हें प्रसिद्ध आहे. [ धृति म्ह० एक प्रकारचा यत्न, अशा धृतीकडून धारण केले जाणारे लोक शास्त्राचें

उल्लंघन करीत नाहींत. त्यांचें सर्व वर्तन शास्त्रानुसारच असतें. आतां त्या धृतीलाच एक विशेषण देतात. ]—**योगेन समाधिना अव्यभिचारिण्या–नित्यसमाधि–अनुगतया इत्यर्थः**—योगानें म्ह० समाधीने अव्यभिचारिणी–नित्य समाधीनें अनुगत-व्याप्त असा याचा भावार्थ [ म्ह० धृति नियमानें समाधीनें अनुगत असते– ]—**अव्यभिचारिण्या धृत्या मनःप्राणेन्द्रियक्रियाः धारयमाणः योगेन धारयति इति एतत् उक्तं भवति**—अव्यभिचारिणी धृतीकडून मन, प्राण व इंद्रियें यांच्या क्रिया धारण करणारा पुरुष त्या योगानेंच धारण करतो, असें याचे तात्पर्य आहे.—**पार्थ या एवंलक्षणा धृतिः सा सात्त्विकी**—हे अर्जुना ! जी अशा प्रकारची धृति ती सात्त्विकी होय. [ वरील सर्व क्रिया ब्रह्मामध्यें जें चित्ताचें ऐकाग्र्य त्याला क्षणभरहि न विसंबणारी अशी जी धृति, तिच्याकडूनच धारण केल्या जातात. त्यावांचून त्यांचें नियमानें धारण होणें शक्य नाहीं. ] ३३.

---

१ रहस्यकार ' अव्यभिचारी ' म्ह० इकडे-तिकडे न ढळणाऱ्या, ' योगेन ' म्ह० कर्मफलत्यागरूप योगानें, व ' धारयते– ' चालविले जातात असा अर्थ करितात व टोपेंत त्याचें असे उपपादन करितात—"धृति म्ह० धैर्य,पण शारीरिक धैर्य या ठिकाणी विवक्षित नसून मनाचा दृढनिश्चय असा या शब्दाचा या प्रकरणांत अर्थ आहे." ( पण इतर प्रकरणांत धैर्य म्ह० शारीरिक धैर्य असा अर्थ विवक्षित असतो, हें आम्ही आज रहस्यकारांच्या तोंडून नवीनच ऐकत आहो. धैर्य हा अन्तःकरणाचा धर्म आहे, असें आम्ही आजवर समजत होतो. इतकेंच नव्हे तर भगवानांनीहि क्षेत्राचे निरूपण करितांना इच्छादिकांप्रमाणें धृति हा अन्तःकरण धर्म आहे, असेच सांगितलेलें दिसतें. (१३.६ पृ. ९०९) 'धृति म्ह० मनाचा दृढ निश्चय' हा अर्थहि आम्हांला अपरिचित आहे,) "बुद्धीनें निर्णय केला तरी तो कायम टिकला पाहिजे. त्याला बळकटपणा आणणे हा मनाचा धर्म आहे." ( पण आम्हांला 'निश्चयात्मक बुद्धि व संकल्पविकल्पात्मक मन' एवढेंच ठाऊक आहे. ) " व्यभिचारी म्ह० इकडे तिकडे न धांवणाऱ्या धैर्यानें " ( धैर्य इकडे-तिकडे धांवतें हाहि अपूर्व शोधच आहे. त्यापेक्षा अढळ, अचल, दृढ धैर्यानें असे म्हटले असते तर ? पण तसें म्हणायाचें म्हणजे ' योगेन ' याचा त्याच्याशी संबध लावावा लागतो. कारण धैर्य अढळ कसें होईल ? तर ' योगाने–चित्तैकाग्र्याने अढळ झालेल्या धृतीनें ' असें म्हणावे लागते. पण तसें म्हटल्यास आचार्यांच्या छापेतून सुटल्याचे सिद्ध होत नाहीं. शिवाय ' योग- ' शब्दाचा ' कर्मयोग ' हा अर्थ करण्याची संधि वायां जाते. म्हणून योगेन म्ह० कर्मफलत्यागरूप योगानें, व ' धारयते ' याचा चालविले जातात, असा अर्थ केला आहे. पण तो चुकला आहे. कारण ' धारयते ' हें कर्मणि क्रियापद नाहीं. कर्तरि आहे. त्यामुळें ' धृत्या ' ही कर्तरि तृतीया नाहीं, करणे आहे. 'पुरुष ज्या अढळ धृतीनें मन, प्राण व इंद्रियें यांच्या क्रियांचें उन्मार्ग प्रवृत्तीपासून धारण करितो,' असाच त्याचा अर्थ संभवतो आणि ती धृति अढळ कशी राहते तर योगानें–चित्तस्थैर्यानें अढळ होते, हाच संबंध निर्दोष आहे. रहस्यकारांनीं आपल्या अर्थाचें उपपादन करण्याची जरी बरीचशी खटपट केली आहे तरी ती फुकट आहे. त्यांत उपपत्ति कांहीं नाहीं.)

**यया तु धर्मकामार्थान्धृत्या धारयतेऽर्जुन।**
**प्रसङ्गेन फलाकाङ्क्षी धृतिः सा पार्थ राजसी ॥३४॥**

**अन्वयार्थ—तु**—परंतु—**अर्जुन**—हे अर्जुना! पुरुष—**यया धृत्या**—ज्या धैर्यानें—**धर्मकामार्थान्**—धर्म, काम व अर्थ या तीन पुरुषार्थांना—**धारयते**—धारण करतो व—**प्रसंगेन**— त्यांतील प्रत्येकाच्या धारणेच्या वेळी—**फलाकांक्षी**—फलाची आकांक्षा करतो—**पार्थ**—हे पार्थ,—**सा**—ती—**राजसी धृतिः**—राजसी धृति होय. ३४.

**यथेति। यया तु धर्मकामार्थान्धर्मश्च कामश्चार्थश्च धर्मकामार्थास्तान्धर्मकामार्थान्धृत्या यया धारयते मनसि नित्यकर्तव्यरूपानवधारयते हेऽर्जुन प्रसङ्गेन यस्य यस्य धर्मादेर्धारणप्रसङ्गस्तेन तेन प्रसङ्गेन फलाकाङ्क्षी च भवति यः पुरुषस्तस्य धृतिर्या सा पार्थ राजसी ॥ ३४ ॥**

**भाष्यार्थ—'यया०' इति**—या श्लोकानें राजसी धृति सांगतात.—**तु यया धर्मकामार्थान्-धर्मः च कामः च अर्थः च धर्मकामार्थाः तान् धर्मकामार्थान्**—पण ज्या धृतीने धर्मकामार्थ-धर्म, काम, व अर्थ, ते धर्मकामार्थ, त्या धर्मकामार्थांना—**यया धृत्या धारयते**—ज्या धृतीकडून धारण करतो—**मनसि नित्यकर्तव्यरूपान् अवधारयते**—मनामध्ये ते नित्य कर्तव्यरूप आहेत असा निश्चय करतो म्ह० हे आपल्याला अवश्य केलेच पाहिजे अशी ज्याची दृढभावना असते—**हे अर्जुन च यः पुरुषः प्रसंगेन यस्य यस्य धर्मादेः धारणप्रसंगः तेन तेन प्रसंगेन फलाकांक्षी भवति**—हे अर्जुना, जो पुरुष प्रसंगानें म्ह० ज्या ज्या धर्मादिकाच्या धारणाचा प्रसंग असतो, त्या त्या प्रसंगाने फलाची आकाक्षा करणारा असतो—**तस्य या धृतिः पार्थ सा राजसी**—त्याची जी धृति ती हे पार्था, राजसी होय. ३४.

**यया स्वप्नं भयं शोकं विषादं मदमेव च।**
**न विमुंचति दुर्मेधा धृतिः सा तामसी मता ॥३५॥**

**अन्वयार्थ—यया**—ज्या धृतीच्या योगाने—**दुर्मेधाः**—दुर्बुद्धि पुरुष—**स्वप्नं**—निद्रेला,—**भयं**—भयाला—**शोकं**—शोकाला—**विषादं**—खेदाला—**च मदं एव**—आणि मदाला—**न विमुंचति**—सोडीत नाही—**सा धृतिः**—ती धृति—**तामसी मता**—तामसी मानलेली आहे. ३५

**यथेति। यया स्वप्नं निद्रां भयं त्रासं शोकं विषादमवसादं विषण्णतां मदं विषयसेवामात्मनो बहु मन्यमानो मत्त इव मदमेव च मनसि नित्यमेव कर्तव्यरूपतया कुर्वन्न विमुञ्चति धारयत्येव दुर्मेधाः कुत्सितमेधाः पुरुषो यस्तस्य धृतिर्या सा तामसी मता ॥ ३५ ॥**

**भाष्यार्थ—'यया०' इति**—या श्लोकानें तामसी धृति सांगतात—**यया स्वप्नं-निद्रां भयं-त्रासं शोकं-विषादं-अवसादं-विषण्णतां**—ज्या धृतीनें स्वप्न म्ह० निद्रा, भय-त्रास, शोक-प्रियवियोगामुळे झालेला संताप, विषाद-अवसाद-निरुत्साह,—**मदं-विषयसेवां आत्मनः बहु मन्यमानः**—मद म्ह० आपल्या विषयसेवनालाच मोठा पुरुषार्थ समजणारा—**मत्तः इव मदं एव च मनसि नित्यं एव कर्तव्य-रूपतया कुर्वन्**—एखाद्या मत्त पुरुषाप्रमाणें मदालाच-विषयसेवनालाच मनामध्यें हेंच आपलें कर्तव्य आहे असें समजणारा—**यः दुर्मेधाः-कुत्सितमेधाः पुरुषः न विमुञ्चति धारयति एव**—जो दुर्बुद्धि म्ह० ज्याची बुद्धि अत्यंत निद्य-कुत्सित आहे असा पुरुष या स्वप्नादिकांना सोडीत नाहीं, तर धारणच करतो—**तस्य या धृतिः सा तामसी मता**—त्याची जी धृति, ती तामसी मानलेली आहे. ३५.

सुखं त्विदानीं त्रिविधं शृणु मे भरतर्षभ ।
अभ्यासाद्रमते यत्र दुःखान्तं च निगच्छति ॥३६॥
यत्तदग्रे विषमिव परिणामेऽमृतोपमम् ।
तत्सुखं सात्त्विकं प्रोक्तमात्मबुद्धिप्रसादजम् ॥३७॥

**अन्वयार्थ—भरतर्षभ**—हे भरतश्रेष्ठा,—**तु इदानीं**—पण हे आता—**त्रिविधं सुखं**—तीन प्रकारचे सुख—**मे शृणु**—मी सांगतो ते ऐक.—**यत्र**—ज्या सुखानुभवांत—**अभ्यासात्**—अभ्यासामुळे परिचयामुळे—**रमते च**—प्राणी रममाण होतो व—**दुःखान्तं**—दुःखाच्या शांतीला—**निगच्छति**—निश्चयाने प्राप्त होतो—**यत्**—जें—**तत्**—सुख—**अग्रे**—आरंभी—**विषं इव**—विषासारखें क्लेशकर पण—**परिणामे**—परिणामीं—**अमृतोपमम्**—अमृतासारखें—**तत् आत्मबुद्धिप्रसादजं सुखं**—ते आत्मविषयक बुद्धीच्या प्रसादापासून झालेलें सुख—**सात्त्विकं प्रोक्तं**—सात्त्विक म्हटलेलें आहे ३६-३७.

गुणभेदेन क्रियाणां कारकाणां च त्रिधा भेद उक्तोऽथेदानीं फलस्य च सुखस्य त्रिधा भेद उच्यते—सुखं त्विदानीं त्रिविधं शृणु समाधानं कुर्वित्येतन्मे मम भरतर्षभ । अभ्यासात्परिचयादावृत्ते रमते रतिं प्रतिपद्यते यत्र यस्मिन्सुखानुभवे दुःखान्तं च दुःखावसानं दुःखोपशमं च निगच्छति निश्चयेन प्राप्नोति ॥ ३६ ॥

**भाष्यार्थ**—( गतार्थांचा अनुवाद करून पुढील श्लोकाचें तात्पर्य सांगतात-)—**गुणभेदेन क्रियाणां कारकाणां च त्रिधा भेदः उक्तः**—गुणभेदानें क्रिया व कारकें यांचा तीन प्रकारचा भेद सांगितला.—**अथ इदानीं फलस्य च सुखस्य त्रिधा भेदः उच्यते**—आतां फलाचा म्ह० सुखाचा त्रिविध भेद सांगितला जातो.—**भरतर्षभ तु इदानीं त्रिविधं सुखं मे-मम शृणु-समाधानं कुरु इति एतत्—हे** भरतश्रेष्ठा ! आतां तीन प्रकारचें सुख माझ्याकडून ऐक-तें ऐकण्यासाठीं

आपल्या मनाचें समाधान ठेव. माझ्या बोलण्याकडे लक्ष ठेव, असा याचा भावार्थ.—**यत्र-यस्मिन् सुखानुभवे अभ्यासात्-परिचयात् आवृत्तेः रमते-रतिं प्रतिपद्यते**—ज्या सुखानुभवामध्यें अभ्यासामुळें-परिचयामुळें वारंवार आवृत्ति केल्यानें रमतो-रतीला प्राप्त होतो, रममाण होतो—**च दुःखान्तं-दुःखावसानं-दुःखोपशमं च निगच्छति-निश्चयेन प्राप्नोति**—आणि दुःखान्ताला-दुःखावसानाला दुःखाच्या उपशमाला जातो-निश्चयानें प्राप्त होतो. [ तें त्रिविध सुख माझ्या तोंडानें एकाग्र चित्तानें तूं ऐक. ] ३६.

**यदिति । यत्तत्सुखमग्रे पूर्वं प्रथमसंनिपाते ज्ञानवैराग्यध्यानसमाध्यारम्भेऽत्यन्तायासपूर्वकत्वाद्विषमिव दुःखात्मकं भवति, परिणामे ज्ञानवैराग्यादिपरिपाकजं सुखममृतोपमं तत्सुखं सात्त्विकं प्रोक्तं विद्वद्भिरात्मनो बुद्धिरात्मबुद्धिरात्मबुद्धेः प्रसादो नैर्मल्यं सलिलवत्स्वच्छता ततो जातमात्मबुद्धिप्रसादजमात्मविषया वाऽऽत्मावलम्बना वा बुद्धिरात्मबुद्धिस्तत्प्रसादप्रकर्षाद्वा जातमित्येतत्तस्मात्सात्त्विकं तत् ॥ ३७ ॥**

**भाष्यार्थ**—' **यत्०** ' **इति**—या श्लोकानें सात्त्विक सुख ग्राह्य आहे असें दाखवितात—**यत् तत् सुखं अग्रे पूर्वं-प्रथमसंनिपाते ज्ञान-वैराग्य-ध्यान-समाधि-आरंभे अत्यन्त-आयासपूर्वकत्वात् विषं इव-दुःखात्मकं भवति**—तें जें सुख आरंभीं-पूर्वीं-प्रथमारंभीं-ज्ञान-वैराग्य-ध्यान-समाधि यांच्या आरंभाच्या वेळीं अत्यंत आयासपूर्वकच संपादन करावें लागत असल्यामुळे विषाप्रमाणे दुःखात्मकच असतें—**परिणामे-ज्ञान-वैराग्यादिपरिपाकजं अमृतोपमं सुखं**—आणि परिणामीं ज्ञान-वैराग्यादिकांच्या परिपाकावस्थेत परिपक्वतेमुळेच झालेलें सुख अमृतोपम असतें—**तत् सुखं विद्वद्भिः सात्त्विकं प्रोक्तं**—ते सुख विद्वानांकडून सात्त्विक म्हटले जातें.—**आत्मनः बुद्धिः-आत्मबुद्धिः आत्मबुद्धेः प्रसादः नैर्मल्यं सलिलवत् स्वच्छता ततः जातं आत्मबुद्धिप्रसादजं**—आपली जी बुद्धि ती आत्मबुद्धि, आत्मबुद्धीचा जो प्रसाद म्ह० निर्मलता जलाप्रमाणे स्वच्छता (तो आत्मबुद्धिप्रसाद ) त्यापासून झालेलें तें आत्मबुद्धिप्रसादज सुख होय.—**आत्मविषया वा आत्मा-अवलंबना वा बुद्धिः आत्मबुद्धिः**—आत्माविषयक किंवा आत्मा हेंच जिचें आलंबन आहे अशी बुद्धि हीच आत्मबुद्धि—**तत्प्रसादप्रकर्षात् वा जातं इति एतत्**—किंवा तिच्या प्रसादाच्या आधिक्यामुळे झालेलें सुख असा याचा भावार्थ—**तस्मात् तत् सात्त्विकं**—म्हणून म्ह० अन्तःकरणाच्या निर्मलतेमुळे किंवा सम्यग्ज्ञानाच्या आधिक्यामुळें उत्पन्न झाल्या कारणानें तें सात्त्विक सुख होय. ३७.

**विषयेन्द्रियसंयोगाद्यत्तदग्रेऽमृतोपमम् ।**
**परिणामे विषमिव तत्सुखं राजसं स्मृतम् ॥३८॥**

**अन्वयार्थ**—**यत्**—जें—**विषयेंद्रियसंयोगात्**—विषय व इंद्रियें यांच्या संयोगामुळे उत्पन्न होतें—**अग्रे**—आरंभीं—**अमृतोपमं**—अमृतासारखें व—**परिणामे**

—परिणामीं—**विषं इव**—विषासारखें—**तत् सुखं**—तें सुख—**राजसं स्मृतं**—
—राजस म्हटलें आहे. ३८

**विषयेति । विषयेन्द्रियसंयोगाद्यत्तत्सुखं जायतेऽग्रे प्रथमक्षणेऽमृतोपममममृतसमं परिणामे विषमिव बलवीर्यरूपप्रज्ञामेधाधनोत्साहहानिहेतुत्वादधर्मतज्जनितनरकादिहेतुत्वाच्च परिणामे तदुपभोगविपरिणामान्ते विषमिव तत्सुखं राजसं स्मृतम् ॥ ३८ ॥**

**भाष्यार्थ—' विषय० ' इति**—या श्लोकानें राजस सुख त्याज्य म्हणून सांगतात—**विषयेन्द्रियसंयोगात् यत् तत् सुखं जायते**—विषय व इन्द्रियें यांच्या संयोगापासून जें सुख होतें—**अग्रे-प्रथमक्षणे अमृतोपमं-अमृतसमं**—अगोदर म्ह० पहिल्याक्षणीं अमृतोपम म्ह० अमृतासारखें—**परिणामे विषं इव**—आणि परिणामीं विषासारखें—**बल-वीर्य-रूप-प्रज्ञा-मेधा-धन-उत्साह-हानिहेतुत्वात्** —बल-शरीरसामर्थ्य, पराक्रमामुळे प्राप्त झालेले यश, रूप-शरीरसौन्दर्य, प्रज्ञा-ग्रहणशक्ति, मेधा-धारणशक्ति, धन-गायी, सुवर्ण वगैरे संपत्ति, उत्साह यांच्या हानीला कारण होत असल्यामुळे—**च अधर्म तज्जनितनरकादिहेतुत्वात्**—आणि अधर्म व त्यापासून प्राप्त झालेला नरकादिक याना कारण होत असल्यामुळे—**परिणामे तदुपभोग-विपरिणामान्ते विषं इव**—परिणामीं-त्यांच्या उपभोगाचा विपरिणाम झाला असतां शेवटीं विषासारखें—**तत् सुखं राजसं स्मृतं**—तें सुख राजस म्हटलेलें आहे. ३८.

**यदग्रे चानुबन्धे च सुखं मोहनमात्मनः ।**
**निद्रालस्यप्रमादोत्थं तत्तामसमुदाहृतम् ॥ ३९ ॥**

**अन्वयार्थ—यत् सुखं**—जें सुख—**अग्रे च अनुबंधे च**—आरंभीं व अंतीं—**आत्मनः मोहनं**—आत्म्याला मोह पाडणारे व—**निद्रा-आलस्य-प्रमाद-उत्थं**—झोंप-आळस-बेसावधपणा यांपासून उत्पन्न झालेलें—**तत् तामसं उदाहृतं**—तें तामस सुख म्हटलेले आहे. ३९

**यदग्रे चेति । यदग्रे चानुबन्धे चावसानोत्तरकाले सुखं मोहनं मोहकरमात्मनो निद्रालस्यप्रमादोत्थं निद्रा चाऽऽलस्यं च प्रमादश्चेत्येतेभ्यः समुत्तिष्ठतीति निद्रालस्यप्रमादोत्थं तत्तामसमुदाहृतम् ॥ ३९ ॥**

**भाष्यार्थ—' यदग्रे च० ' इति**—या श्लोकानें तामस सुख त्यागासाठींच सांगतात—**अग्रे च अनुबंधे च-अवसान-उत्तरकाले यत् सुखं आत्मनः मोहनं -मोहकरं**—आरंभीं व शेवटीं म्ह० समाप्तीच्या उत्तरकालीं-त्या सुखाचा उपभोग घेऊन झाल्यानंतर जें सुख आत्म्याला मोह पाडणारें, जीवाला मोहित करणारे—**निद्रालस्य-प्रमादोत्थं-निद्रा च आलस्यं च प्रमादः च इति एतेभ्यः समुत्तिष्ठति इति निद्रालस्यप्रमादोत्थं**—निद्रालस्यप्रमादोत्थ-निद्रा, आळस व प्रमाद

यापासून उत्पन्न होतें म्हणून निद्रालस्यप्रमादोत्थ—**तत् तामसं उदाहृतं**—तें तामस म्हटलें आहे. ३९.

**न तदस्ति पृथिव्यां वा दिवि देवेषु वा पुनः ।**
**सत्त्वं प्रकृतिजैर्मुक्तं यदेभिः स्यात्त्रिभिर्गुणैः ॥४०॥**

**अन्वयार्थ—यत्**—जे—**एभिः त्रिभिः प्रकृतिजैः गुणैः**—या तीन प्रकृतिजन्य गुणांनीं—**मुक्तं**—सोडलेले—**स्यात्**—असेल असें—**तत् सत्त्वं**—तें सत्त्व-असा प्राणी—**पृथिव्यां वा दिवि देवेषु वा पुनः**—पृथ्वींत किंवा पुनः स्वर्गीतील देवांत—**न अस्ति**—नाहीं. ४०

**अथेदानीं प्रकरणोपसंहारार्थः श्लोक आरभ्यते—न तदस्ति तन्नास्ति पृथिव्यां वा मनुष्यादि सत्त्वं प्राणिजातमन्यद्वाऽप्राणिजातं दिवि देवेषु वा पुनः सत्त्वं प्रकृतिजैः प्रकृतितो जातैरेभिस्त्रिभिर्गुणैः सत्त्वादिभिर्मुक्तं परित्यक्तं यत्स्याद्भवेन्न तदस्तीति पूर्वेण संबन्धः ४०**

**भाष्यार्थ**—( क्रिया-कारक-फलरूप संसाराला प्रत्येकी सात्त्विकादि भेदानें त्रिविधत्व सांगून संसारामध्ये अंतर्भूत होणारें एखादें तरी काहीं या गुणत्रयानें रहित असेल अशी कोणी शंका घेईल म्हणून सांगतात-)—**अथ इदानीं प्रकरणोपसंहारार्थः श्लोकः आरभ्यते**—आतां अगोदर प्रकरणाच्या उपसंहारार्थ श्लोक आरंभिला जातो—**न तत् अस्ति-तत् न अस्ति**—तें नाहीं ( तें काय ? उत्तर-) **पृथिव्यां वा मनुष्यादि सत्त्वं प्राणिजातं अन्यत् वा अप्राणिजातं**—पृथ्वीमध्यें मनुष्यादि सत्त्व-प्राणिजात किंवा दुसरें अप्राणिजात म्ह० लोकप्रसिद्धीप्रमाणें स्थावर-अर्थात् चराचर सत्त्व नाहीं—**दिवि देवेषु वा पुनः**—किंवा स्वर्गात देवांमध्यें-हि सत्त्व नाहीं—**यत् प्रकृतिजैः-प्रकृतितः जातैः एभिः त्रिभिः सत्त्वादिभिः गुणैः मुक्तं-परित्यक्तं स्यात्-भवेत्**—कीं जें प्रकृतीपासून झालेल्या या तीन सत्त्वादि गुणांनीं मुक्त म्ह० सोडलेलें, त्या गुणांनीं रहित असें असेल—**तत् न अस्ति इति पूर्वेण संबंधः**—तें नाहीं, असा पूर्वीच्या ‘न तदस्ति०’ याच्याशीं संबंध. [ आब्रह्मस्तंबपर्यंत भूतांतील एकहि प्राणी गुणरहित नाहीं. ] ४०.

---

१ या श्लोकावरील टीपेंत रहस्यकार म्हणतात—“या सात्त्विकप्रकारांमध्येंहि जी श्रेष्ठ स्थिति तिलाच गीतेंत त्रिगुणातीतावस्था हें नाव दिले आहे. त्रिगुणातीत किंवा निर्गुण हा गीतेप्रमाणे एक स्वतंत्र म्ह० चवथा भेद नाहीं.” पण हें म्हणणे अयोग्य आहे. कारण गीतेंतच ‘गुणेभ्यश्च परं वेत्ति’ म्ह० व जो आत्म्याला गुणांहून अगदीं विलक्षण समजतो असे म्हणून ( १००६ ) ‘गुणानेतानतीत्य त्रीन् देही देहसमुद्भवान्’ असें म्हटलें आहे. अर्जुनानेंहि ‘कथं त्रीन्गुणानतिवर्तते’ असा प्रश्न केला असून ( १००७ ) भगवानांनी ‘गुणैर्यो न विचाल्यते’ असें उत्तर दिलें आहे. तेव्हां ‘निर्गुण हा स्वतंत्र चवथा भेद नाहीं’ असें म्हणणें हें धाडस आहे. ते आपल्या या अशास्त्रीय म्हणण्याला मनूचा आधारहि दाखवितात. “मनुस्मृतींतहि सात्त्विक गतीचेच पुनः उत्तम, मध्यम, कनिष्ठ असे तीन भेद करून उत्तम

**सर्वः संसारः क्रियाकारफललक्षणः सत्त्वरजस्तमोगुणात्मकोऽविद्यापरिकल्पितः समूलोऽनर्थ उक्तो वृक्षरूपकल्पनया चोर्ध्वमूलमित्यादिना, तं चासङ्गशस्त्रेण दृढेन छित्त्वा ततः पदं तत्परिमार्गितव्यमिति चोक्तं, तत्र च सर्वस्य त्रिगुणात्मकत्वात्संसारकारणनिवृत्त्यनुपपत्तौ प्राप्तायां यथा तन्निवृत्तिः स्यात्तथा वक्तव्यं, सर्वश्च गीताशास्त्रार्थ उपसंहर्तव्य एतावानेव च सर्वो वेदस्मृत्यर्थः पुरुषार्थमिच्छद्भिरनुष्ठेय इत्येवमर्थं च ब्राह्मणक्षत्रियविशामित्यादिरारभ्यते—**

**भाष्यार्थ**—( उपसंहार केलेल्या प्रकरणार्थाचा अनुवाद- )—**सर्वः संसारः क्रिया-कारक-फललक्षणः सत्त्वरजस्तमोगुणात्मकः अविद्यापरिकल्पितः समूलः अनर्थः उक्तः**—सर्व संसार क्रिया-कारक-फलरूप म्ह० अनेकरूप आहे. सत्त्व, रज व तमोगुणात्मक ह्म० निर्गुण आत्म्याहून अगदीं विलक्षण आहे. अविद्याकल्पित ह्म० असत्य वस्तु सत्य असल्याप्रमाणे भासत असल्यामुळें तो समूल–अविद्येसह अन-

---

सात्त्विक म्ह० मोक्षप्रद व मध्यम सात्त्विक म्ह० स्वर्गप्रद असें म्हटलें आहे. ( मनु. १२· ४८–५० व ८९ ९१ पहा)" पण रहस्यकारांचे आधारहि कसे लटपटित असतात, ते पहा. वानप्रस्थ, संन्यासी, पुष्पकादि विमानचारी गण, नक्षत्रे व दैत्य हीं अधम सात्त्विक गति–फल आहे ४८, यागशील. ऋषी, देव, वेद, ज्योति वगैरे ही मध्यम सात्त्विक गति ४९ व चतुर्मुख, मरीच्यादिक प्रजापति, मूर्तिमंत धर्म, महत्तत्त्व, अव्यक्त ही उत्तम सात्त्विक गति आहे ५०, असे सांगितल्यावर पुढे लागलेच मनु काय सांगतात ते पहा–" एष सर्वः समुद्दिष्टः त्रिप्रकारस्य कर्मणः । त्रिविधः त्रिविधः कृत्स्नः संसारः सार्वभौतिकः " असा उपसंहार केला आहे कायिक, वाचिक, मानसिक अशा त्रिविध कर्मांचा हा सर्व भूतांचा सात्त्विकादि त्रिविध सर्वसंसार पूर्णपणे सांगितला " यावरून ही सर्व संसारगतिच आहे. त्रिगुणातीतावस्था नव्हे, हे स्पष्ट होतें. आचार्यांनीहि आपल्या भाष्यांत ही गोष्ट वारवार सांगितली आहे. [ बृह. भा. अ. १.१ पृ. ११ पहा छां. भा. पृ. २ वगैरे ] तात्पर्य श्रुति. स्मृति, पुराणें व आचार्य यांची जशी एकवाक्यता होते तशी रहस्यकारांची होत नाहीं. किंबहुना इतर मताचीहि होत नाहीं, ही गोष्ट विशेषकरून लक्षात ठेवण्यासारखी आहे. रहस्यकार वराल उताऱ्यांत ' उत्तम सात्त्विक म्ह० मोक्षप्रद व मध्यम सात्त्विक म्ह० स्वर्गप्रद ' असे म्हणून त्यास मनु. अ. १२ श्लो.८९·९१ चा आधार दाखवितात. पण तोहि तसाच लटपटित आहे. यातील ८९ व ९० या श्लोकाचा उल्लेख वर दोनदा आला आहे. ( पृ. १७६, ११२२ पहा. ) यात प्रवृत्त कर्म कोणतें व निवृत्त कोणतें तें सांगितले आहे. देवांचें साम्य हें प्रवृत्त म्ह० काम्य कर्मांचें फल आहे, व पंचभूतांचें अतिक्रमण–मोक्ष हें निवृत्त कर्मांचें फल आहे, असे ह्मटलें आहे. त्यात उत्तम सात्त्विक व मध्यम सात्त्विक असे म्हटलेलें नाहीं. काम्य कर्मे सात्त्विक आहे, असें ह्मणतां येत नाहीं. शिवाय निवृत्त कर्मांचेंहि मोक्ष हें साक्षात् फल नव्हे, हें पुढील ९१ व ९२ श्लोकांवरून सिद्ध होतें. त्यांत सर्वभूतांमध्यें समदर्शन व संन्यासपूर्वक आत्मज्ञान व शम यांत निमग्न होण्यास सांगितलें आहे. त्यावरूनहि निवृत्त कर्म चित्तशुद्धीच्या द्वारा मोक्षप्रद ठरतें, साक्षात् नव्हे.

थेरूप-व्यर्थ आहे, असें सांगितलें. [अर्थात् अनेकरूप आत्म्याहून विलक्षण व अविद्याकल्पित असल्यामुळें अविद्येसह अर्थरहित-मिथ्या आहे. असा असल्यामुळेंच त्याज्य आहे. पण केवल या अठराव्या अध्यायांतच तसें सांगितलें आहे, असें नाहीं तर-]—**वृक्षरूपकल्पनया च ' ऊर्ध्वमूलं० ' इत्यादिना**—पंधराव्या अध्यायांतहि ' ऊर्ध्वमूलं० ' इत्यादि श्लोकानें वृक्षरूपाच्या कल्पनेनें संसार सांगितला.—**च तं ' असङ्गशस्त्रेण दृढेन छित्वा ततः पदं तत्परिमार्गितव्यं ' इति च उक्तं**—आणि त्या वृक्षाला ' दृढ असंगशस्त्रानें तोडून त्यानंतर त्या पदाला जाणावें ' असेंहि त्या संसाराच्या नाशाचें साधन सांगितलें. ( याप्रमाणें गतार्थाचा अनुवाद करून पुढील संदर्भाचे तात्पर्य सांगतात-)—**तत्र च सर्वस्य त्रिगुणात्मकत्वात् संसारकारणनिवृत्त्यनुपपत्तौ प्राप्तायां**—अशा या अनर्थकर संसाराची निवृत्ति करावी, अशी इच्छा जरी झाली तरी तो सर्व संसार त्रिगुणात्मक असल्यामुळें संसाराच्या कारणाची निवृत्ति होणें अशक्य आहे, अशी अनुपपत्ति प्राप्त झाली असतां [ म्ह० सत्त्वादि तीन गुण हे संसाराचें कारण आहे, पण ते गुण प्रकृत्यात्मक असल्यामुळें त्यांची निवृत्ति होणें शक्य नाहीं, कारण प्रकृति नित्य आहे, अशी आशंका आली असतां-]—**यथा तन्निवृत्तिः स्यात् तथा वक्तव्यं**—ज्याप्रकारें त्या संसाराची निवृत्ति होईल तो प्रकार सांगावा [ म्ह० स्वधर्मानुष्ठानानें तत्त्वज्ञानाची उत्पत्ति होऊन अज्ञानात्मक गुणांची निवृत्ति ज्याप्रकारें होईल तो प्रकार म्ह० सर्व स्वधर्म सांगावा, म्हणून या पुढील ग्रंथ आहे, असा भावार्थ, तसेंच ]—**सर्वः च गीताशास्त्रार्थः उपसंहर्तव्यः**—आणि सर्व गीताशास्त्रार्थाचा उपसंहार करावा—**च एतावान् एव सर्वः वेदस्मृत्यर्थः पुरुषार्थं इच्छद्भिः अनुष्ठेयः इति एवं अर्थं च ब्राह्मणक्षत्रियविशां इत्यादिः आरभ्यते**—आणि वेद व स्मृति यांचा जो कांहीं अर्थ आहे तो सर्व हा एवढाच असून पुरुषार्थाची इच्छा करणारांनी त्याचें अनुष्ठान करावें, यासाठीं ' ब्राह्मणक्षत्रियविशां० ' इत्यादि पुढील भाग आरंभिला जातो.—

**ब्राह्मणक्षत्रियविशां शूद्राणां च परंतप ।**
**कर्माणि प्रविभक्तानि स्वभावप्रभवैर्गुणैः ॥ ४१ ॥**

**अन्वयार्थ—परंतप**—हे अर्जुना!—**ब्राह्मण-क्षत्रिय-विशां**—ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य यांचीं—**च शूद्राणां**—व शूद्रांचीं—**कर्माणि**—कर्मे—**स्वभावप्रभवैः गुणैः**—मायेपासून उत्पन्न झालेल्या सत्त्वादि गुणांनीं—**प्रविभक्तानि**—अत्यंत विभागलेलीं आहेत. ४१

**ब्राह्मणाश्च क्षत्रियाश्च विशश्च ब्राह्मणक्षत्रियविशस्तेषां ब्राह्मणक्षत्रियविशां शूद्राणां च शूद्राणामसमासकरणमेकजातित्वे सति वेदेऽनधिकारात्, हे परंतप कर्माणि प्रविभक्तानीतरेतरविभागेन व्यवस्थापितानि, केन स्वभावप्रभवैर्गुणैः स्वभाव ईश्वरस्य**

**प्रकृतिस्त्रिगुणात्मिका माया सा प्रभवो येषां गुणानां ते स्वभावप्रभवास्तैः । शमादीनि कर्माणि प्रविभक्तानि ब्राह्मणादीनाम् ॥**

**भाष्यार्थ**—(आतां चार वर्णांचा अनुष्ठेय धर्म अगदीं पृथक् आहे, असें सुचविण्यासाठीं अगोदर म्हणतात–)—**ब्राह्मणाः च क्षत्रियाः च विशः च-ब्राह्मणक्षत्रियविशः तेषां ब्राह्मण-क्षत्रिय-विशां**—ब्राह्मण व क्षत्रिय व वैश्य ते ब्राह्मण-क्षत्रिय-वैश्य. त्या ब्राह्मण-क्षत्रिय-वैश्यांचीं,(तिघांनाहि उपनयनसंस्कार व वेदाधिकार समान असल्यामुळें समास केला आहे. )—**च शूद्राणां**—आणि शूद्रांचीं—**शूद्राणां असमासकरणं एकजातित्वे सति वेदे अनधिकारात्**—शूद्र या शब्दाचा ब्राह्मणादिशब्दांशीं समास न करण्याचें कारण शूद्राला एकजातित्व असून म्ह० उपनयन नसून वेदामध्यें अधिकार नाहीं, हें होय.—**हे परंतप, कर्माणि प्रविभक्तानि इतरेतरविभागेन व्यवस्थापितानि**—हे शत्रुतापना ! कर्में अगदीं विभक्त केलेलीं आहेत. परस्परविभागानें व्यवस्थित केलेलीं आहेत. ब्राह्मणादिकांचीं व शूद्रांचीं कर्में अगदीं असंकीर्णपणें–पृथक् प्रस्थापिलेलीं आहेत.—**केन**—कर्मांची अगदीं पृथक् व्यवस्था कोणीं केली आहे ?—**स्वभावप्रभवैः गुणैः**—स्वभावप्रभव गुणांनीं—**स्वभावः-ईश्वरस्य प्रकृतिः-त्रिगुणात्मिका माया**—स्वभाव म्ह० ईश्वराची प्रकृति त्रिगुणात्मिका माया—**सा प्रभवः येषां गुणानां ते स्वभावप्रभवाः तैः**—ती माया ज्या गुणांचा प्रभव म्ह० उत्पत्तिस्थान आहे ते स्वभावप्रभव गुण. त्या गुणांनीं—**ब्राह्मणादीनां शमादीनि कर्माणि प्रविभक्तानि**—ब्राह्मणादिकांचीं शमादिक कर्में अगदीं विभागलेलीं आहेत.

**अथवा ब्राह्मणस्वभावस्य सत्त्वगुणः प्रभवः कारणं, तथा क्षत्रियस्वभावस्य सत्त्वोपसर्जनं रजः प्रभवः, वैश्यस्वभावस्य तमउपसर्जनं रजः प्रभवः शूद्रस्वभावस्य रजउपसर्जनं तमः प्रभवः प्रशान्त्यैश्वर्येहामूढतास्वभावदर्शनाच्चतुर्णाम् । अथवा जन्मांतरकृतसंस्कारः प्राणिनां वर्तमानजन्मनि स्वकार्याभिमुखत्वेनाभिव्यक्तः स्वभावः स प्रभवो येषां गुणानां ते स्वभावप्रभवा गुणाः । गुणप्रादुर्भावस्य निष्कारणत्वानुपपत्तेः स्वभावः कारणमिति कारणविशेषोपादानम् । एवं स्वभावप्रभवैः प्रकृतिप्रभवैः सत्त्वरजस्तमोभिर्गुणैः स्वकार्यानुरूपेण शमादीनि कर्माणि प्रविभक्तानि ॥**

**भाष्यार्थ**—( ' स्वभावप्रभवैर्गुणैः ' याचा दुसरा अर्थ–)—**अथवा ब्राह्मणस्वभावस्य सत्त्वगुणः प्रभवः-कारणं**—किंवा ब्राह्मणस्वभावाचा सत्त्वगुण प्रभव–कारण आहे.—**तथा क्षत्रियस्वभावस्य सत्त्वोपसर्जनं रजः प्रभवः**—त्याचप्रमाणें क्षत्रियस्वभावाचें सत्त्वोपसर्जन रज कारण आहे. म्ह० सत्त्वगुण ज्यांत अमुख्य आहे असें रज क्षत्रियस्वभावाचें कारण आहे—**वैश्यस्वभावस्य तमउपसर्जनं रजः प्रभवः**—वैश्यस्वभावाचा तमउपसर्जन म्ह० तमोगुण ज्यांत गौण आहे असें रज प्रभव आहे.—**शूद्रस्वभावस्य रजउपसर्जनं तमः प्रभवः**—शूद्रस्वभावाचें रजउपसर्जन–रज ज्यांत गौणवृत्तीनें आहे असें तम, हें कारण आहे. कारण—**चतुर्णां 'प्रशान्ति-ऐश्वर्य-ईहा-मूढतास्वभावदर्शनात्**—त्या ब्राह्मणादि चारी

वर्णांचीं अत्यंत शांति, ऐश्वर्य, चेष्टा-व्यवहार व मूढता हीं त्या त्या गुणांचीं कार्यें दिसतात. त्यांवरून अशी व्यवस्था करणे अनुपपन्न नाहीं. ( आतां स्वभावशब्दाचा दुसरा अर्थ सांगतात-)—**अथवा प्राणिनां जन्मान्तरकृतसंस्कारः वर्तमानजन्मनि स्वकार्याभिमुखत्वेन अभिव्यक्तः स्वभावः**—किंवा प्राण्यांचा जन्मांतरीं संपादन केलेला संस्कार वर्तमान जन्मी-या जन्मी आपल्या कार्याभिमुख होऊन अभिव्यक्त झालेला हाच स्वभाव होय. [ म्ह० प्राण्यांचा पूर्वजन्मांतील जो संस्कार-वासना या जन्मीं आपल्या कार्यरूपानें-कार्योन्मुख होऊन अभिव्यक्त होतो तो स्वभाव होय.] —**सः प्रभवः येषां गुणानां ते स्वभावप्रभवाः गुणाः**—तो स्वभाव ज्यांच्या गुणांचा प्रभव म्ह० कारण आहे ते स्वभावप्रभव गुण होत. ( अहोपण, गुणांची अभिव्यक्ति वासनाधीन असते, असे कां म्हणतां ? उत्तर-)—**गुणप्रादुर्भावस्य निष्कारणत्वानुपपत्तेः**—या जन्मीं गुणांचा जो प्रादुर्भाव होतो तो निष्कारण-कारणावांचूनच होतो, असें म्हणणे उपपन्न होत नाहीं. (अहोपण, गुणप्रादुर्भाव निष्कारण होत नाहीं. कारण ' प्रकृतिजैः गुणैः ' या शब्दांनीं प्रकृति हे गुणांचे कारण सांगितलें आहे, अशी कोणी शंका घेईल म्हणून म्हणतात-)—**स्वभावः कारणं इति कारणविशेषोपादानं**—स्वभाव कारण आहे, असे म्हणून स्वभावशब्दानें विशेषकारणाचें ग्रहण केलें आहे. [ ' वासना हे गुणांच्या अभिव्यक्तीचे निमित्त कारण विवक्षित आहे व प्रकृति उपादान कारण आहे.' असो; आता या उक्त अर्थाचा उपसंहार करितात-]—**एवं स्वभावप्रभवैः-प्रकृतिप्रभवैः सत्त्वरजस्तमोभिः गुणैः स्वकार्यानुरूपेण शमादीनि कर्माणि प्रविभक्तानि**—याप्रमाणे स्वभावापासून झालेल्या-प्रकृतिप्रभव सत्त्व, रज व तम या गुणांनीं आपापल्या कार्याच्या अनुसार शमादिक कर्मांचा अगदीं पृथक् विभाग केला आहे.

**ननु शास्त्रप्रविभक्तानि शास्त्रेण विहितानि ब्राह्मणादीनां शमादीनि कर्माणि कथमुच्यते सत्त्वादिगुणप्रविभक्तानीति । नैष दोषः शास्त्रेणापि ब्राह्मणादीनां सत्त्वादिगुणविशेषापेक्षयैव शमादीनि कर्माणि प्रविभक्तानि न गुणानपेक्षयैवेति शास्त्रप्रविभक्तान्यपि कर्माणि गुणप्रविभक्तानीत्युच्यन्ते ॥ ४१ ॥**

**भाष्यार्थ**—( यावर आक्षेप-)—**ननु शास्त्रप्रविभक्तानि-शास्त्रेण विहितानि ब्राह्मणादीनां शमादीनि कर्माणि**—अहोपण, शास्त्रानें ज्यांचा विभाग केला आहे, शास्त्रानें ज्यांचें विधान केलें आहे, अशीं ब्राह्मणादिकांचीं शमादि कर्में आहेत, असें असतांना—**सत्त्वादिगुणप्रविभक्तानि इति कथं उच्यते**—सत्त्वादि गुणांनी अत्यंत विभक्त केलेलीं असें कसें म्हटलें जात आहे ?—**एषः दोषः न**—हा कांहीं दोष नाहीं.—**शास्त्रेण अपि ब्राह्मणादीनां शमादीनि कर्माणि सत्त्वादिगुणविशेषापेक्षया एव प्रविभक्तानि**—कारण शास्त्रानेंहि ब्राह्मणादिकांचीं शमादिक कर्में सत्त्वादि विशेष गुणांच्या अपेक्षेनेंच अगदीं पृथक् विभागलीं आहेत.—**गुणानपेक्षया एव न**—गुणांची मुळींच अपेक्षा न करितां-स्वतंत्रपणेंच कांहीं शा-

स्त्रानें त्यांचा विभाग केलेला नाहीं. ( सत्त्वादि गुणांच्या अनुरोधानेंच तो विभाग आहे.) **—इति शास्त्रप्रविभक्तानि अपि कर्माणि गुणप्रविभक्तानि उच्यन्ते**—त्यामुळें शास्त्रानें ज्यांचा विभाग केला आहे अशींहि कर्में गुणप्रविभक्त म्हणून म्हटलीं जातात. ४१

**शमो दमस्तपः शौचं क्षान्तिरार्जवमेव च ।**
**ज्ञानं विज्ञानमास्तिक्यं ब्रह्मकर्म स्वभावजं ॥४२॥**

**अन्वयार्थ—शमः**—अन्तःकरणाची शांति,**—दमः**—बाह्य इंद्रियांचा निग्रह, **—तपः**—( सतराव्या अध्यायांत सांगितलेलें ) त्रिविध तप,**—शौचं**—अन्तःशुद्धि व बहिःशुद्धि,**—क्षांतिः**—क्षमा**—आर्जवं एव च**—सरळपणा,**—ज्ञानं**—आत्मादि पदार्थांचें ज्ञान,**—विज्ञानं**—शास्त्रार्थाचा अनुभव**—आस्तिक्यं**—श्रद्धाळुपणा हे **—ब्रह्मकर्म स्वभावजं**—ब्राह्मणजातीचें स्वभावजन्य कर्म आहे. ४२

**कानि पुनस्तानि कर्माणीत्युच्यन्ते—शमो दमश्च यथाव्याख्यातार्थौ, तपो यथोक्तं शारीरादि, शौचं व्याख्यातं, क्षान्तिः क्षमा, आर्जवमृजुतैव च, ज्ञानं विज्ञानम्, आस्तिक्यमस्तिभावः श्रद्धानताऽऽगमार्थेषु, ब्रह्मकर्म ब्राह्मणजातेः कर्म ब्रह्मकर्म स्वभावजम् । यदुक्तं स्वभावप्रभवैर्गुणैः प्रविभक्तानीति तदेवोक्तं स्वभावजमिति ॥ ४२ ॥**

**भाष्यार्थ—पुनः कानि तानि कर्माणि इति उच्यन्ते**—आतां तीं कर्में कोणतीं तीं सांगितलीं जातात.**—शमः च दमः-यथाव्याख्यातार्थौ**—शम व दम, वर जसें व्याख्यान केले आहे त्याच अर्थाचे शम व दम येथे घ्यावे. अंतःकरणाचा उपशम हाच शम, व बाह्य इंद्रियांची उपरति हा दम ( पृ. १०५३ )**—तपः-यथोक्तं शारीरादि**—तप-वर सांगितल्याप्रमाणे शारीरादि त्रिविध तप ( पृ. १०९५ )**—शौचं व्याख्यातं**—शुचिर्भूतपणा, पूर्वी सांगितलेली दोन प्रकारची शुद्धि, ( पृ. १०५७) **—क्षान्तिः-क्षमा**—क्षमा ( पृ. १०५७ )**—आर्जवं-ऋजुता एव च**—अन्तःकरणाचा सरळपणा हेंच आर्जव ( पृ. १०५५ )**—ज्ञानं विज्ञानं**—ज्ञान म्ह० शास्त्रीय पदार्थांचें ज्ञान व विज्ञान-शास्त्रार्थ स्वानुभवारूढ करणें-त्याचा अनुभव घेणे ( पृ. ६१५) **आस्तिक्यं-अस्तिभावः आस्तिक्यं आगमार्थेषु श्रद्धानता**—आस्तिक्य म्ह० अस्तिभाव, आगमार्थाविषयीं श्रद्धाळुपणा**—ब्रह्मकर्म-ब्राह्मणजातेः कर्म ब्रह्मकर्म स्वभावजं**—हें ब्रह्मकर्म म्ह० ब्राह्मणजातीचें कर्म, हें स्वभावजन्य ब्रह्मकर्म आहे.**—स्वभावप्रभवैः गुणैः प्रविभक्तानि इति यत् उक्तं तत् एव स्वभावजं इति उक्तं**—वर स्वभावापासून उत्पन्न झालेल्या गुणांनीं ब्राह्मणादिकांचीं कर्में विभागलीं आहेत, असें जे म्हटले होतें, तेंच येथें ' स्वभावजं ' या शब्दानें सांगितलें आहे. ४२.

**शौर्यं तेजो धृतिर्दाक्ष्यं युद्धे चाप्यपलायनम् ।**
**दानमीश्वरभावश्च क्षत्रकर्म स्वभावजम् ॥ ४३ ॥**

**अन्वयार्थ—शौर्यं**—शूरपणा,—**तेजः**—प्रगल्भपणा,—**धृतिः**—धैर्य—**दाक्ष्यं**—दक्षता—**च युद्धे अपि अपलायनं**—व युद्धांतूनहि न पळणें,—**दानं**—औदार्य,—**च ईश्वरभावः**—व प्रभुत्व—**स्वभावजं क्षत्रकर्म**—हें स्वभावजन्य क्षत्रियजातीचें कर्म आहे. ४३

**शौर्यमिति । शौर्यं शूरस्य भावः । तेजः प्रागल्भ्यम् । धृतिर्धारणं सर्वावस्थास्वनवसादो भवति यया धृत्योत्तम्भितस्य । दाक्ष्यं दक्षस्य भावः सहसा प्रत्युत्पन्नेषु कार्येष्वव्यामोहेन प्रवृत्तिः । युद्धे चाप्यपलायनमपराङ्मुखीभावः शत्रुभ्यः । दानं देयेषु मुक्तहस्तता । ईश्वरभावश्चेश्वरस्य भावः प्रभुशक्तिप्रकटीकरणमीशितव्यान्प्रति । क्षत्रकर्म क्षत्रियजातेर्विहितं कर्म क्षत्रकर्म स्वभावजम् ॥ ४३ ॥**

**भाष्यार्थ—'शौर्यं०' इति**—या श्लोकानें क्षत्रिय कर्मे सांगतात—**शौर्यं-शूरस्य भावः**—शौर्य म्ह० शूरपणा-आपल्यापेक्षां अधिक बलवान् असलेल्यावरहि प्रहार करण्याची प्रवृत्ति—**तेजः-प्रागल्भ्यं**—तेज म्ह० प्रगल्भता-दुसऱ्याकडून पराभूत न होणें—**धृतिः-धारणं**—धृति म्ह० धारण, मोठ्या आपत्तीमध्येंहि देह-इंद्रियादिकांना धारण करणारी चित्तवृत्ति—**यया धृत्या उत्तम्भितस्य सर्वावस्थासु अनवसादः भवति**—ज्या धृतीकडून धारण केल्या गेलेल्या पुरुषाचा सर्व अवस्थांमध्ये नाश होत नाहीं-त्याचें धैर्य खचत नाहीं.—**दाक्ष्यं-दक्षस्य भावः सहसा प्रत्युत्पन्नेषु कार्येषु अव्यामोहेन प्रवृत्तिः**—दाक्ष्य-दक्षता, एकाएकी अनेक कार्यें उपस्थित झालीं असतां व्यामोह न पावतां-न गांगरतां त्यांत प्रवृत्ति होणें—**युद्धे च अपि अपलायनं-शत्रुभ्यः अपराङ्मुखीभावः**—आणि युद्धांतूनहि पलायन न करणें, शत्रूपासून पराङ्मुख न होणें—**दानं-देयेषु मुक्तहस्तता**—दान-देय पदार्थामध्यें मुक्तहस्तत्व, धनादि कोणताहि पदार्थ सढळ हाताने देणें—**च ईश्वरभावः-ईश्वरस्य भावः ईशितव्यान्प्रति प्रभुशक्तिप्रकटीकरणं**—आणि ईश्वरभाव म्ह० ईश्वराचा भाव, ज्यांचें नियमन करावयाचें त्याच्यापुढें आपली प्रभुशक्ति प्रकट करणें-त्यांना आपल्या सामर्थ्याची कल्पना आणून देणें—**क्षत्रकर्म-क्षत्रियजातेः विहितं कर्म**—क्षत्रकर्म-क्षत्रिय जातीला विहित असलेलें कर्म—**क्षत्रकर्म स्वभावजं**—हें स्वभावजन्य क्षत्रियकर्म आहे. ४३.

## कृषिगौरक्ष्यवाणिज्यं वैश्यकर्म स्वभावजं ।
## परिचर्यात्मकं कर्म शूद्रस्यापि स्वभावजम् ॥४४॥

**अन्वयार्थ—कृषिगौरक्ष्यवाणिज्यं**—शेत नांगरणें, पशूंचें पालन करणें व देवघेव वगैरे व्यापार करणें, हे—**स्वभावजं वैश्यकर्म**—स्वभावप्राप्त वैश्याचें कर्म आहे.—**परिचर्यात्मकं कर्म**—शुश्रूषा-सेवारूप कर्म—**शूद्रस्य अपि**—शूद्राचेंहि—**स्वभावजं**—स्वाभाविक आहे. ४४

कृषीति । कृषिगौरक्ष्यवाणिज्यं कृषिश्च गौरक्ष्यं च वाणिज्यं च कृषिगौरक्ष्यवाणिज्यं कृषिर्भूमेर्विलेखनं गौरक्ष्यं गा रक्षतीति गोरक्षस्तद्भावो गौरक्ष्यं पाशुपाल्यं वाणिज्यं वणिक्कर्म क्रयविक्रयादिलक्षणं वैश्यजातेः कर्म वैश्यकर्म स्वभावजम् । परिचर्यात्मकं वैश्यकर्म शुश्रूषास्वभावं कर्म शूद्रस्यापि स्वभावजम् ॥ ४४ ॥

**भाष्यार्थ**—'**कृषि-**' **इति**—या श्लोकानें वैश्य व शूद्र यांचें कर्म सांगतात—**कृषि-गौरक्ष्य-वाणिज्यं-कृषिः च गौरक्ष्यं च वाणिज्यं च कृषि गौरक्ष्य-वाणिज्यं**—कृषि, गौरक्ष्य, व वाणिज्य ते कृषि-गौरक्ष्य-वाणिज्य—**कृषिः भूमेः विलेखनं**—कृषि म्ह० भूमीला नांगरणे—**गौरक्ष्यं-गाः रक्षति इति गोरक्षः तद्भावः गौरक्ष्यं-पाशुपाल्यं**—गौरक्ष्य-गायीचें रक्षण करतो म्ह० गोरक्ष, त्याचा भाव म्ह० गोरक्षपणा तेच गौरक्ष्य-पशुपालन—**वाणिज्यं-वणिक्कर्म क्रयविक्रयादिलक्षणं**—वाणिज्य-क्रयविक्रयादिरूप वाण्याचें कर्म हें सर्व—**वैश्यकर्म-वैश्यजातेः कर्म वैश्यकर्म स्वभावजं**—वैश्यकर्म-वैश्य जातीचे कर्म, स्वभावजन्य वैश्यकर्म आहे—**परिचर्यात्मकं-शुश्रूषास्वभावं कर्म शूद्रस्य अपि स्वभावजं**—परिचर्यात्मक म्ह० शुश्रूषास्वरूपाचें कर्म शूद्राचेंहि स्वभावजन्य आहे. [ शूद्राचें परिचर्यात्मक कर्महि स्वभावजन्य आहे. ] ४४.

**स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः ।**
**स्वकर्मनिरतः सिद्धिं यथा विंदति तच्छृणु ॥४५॥**

**अन्वयार्थ**—**स्वे स्वे कर्मणि**—वर सांगितलेल्या आपापल्या कर्मामध्ये—**अभिरतः नरः**—अत्यंत निमग्न असलेला पुरुष—**संसिद्धिं**—शरीरेंद्रियांची शुद्धि होऊन ज्ञानाची योग्यता प्राप्त होणें या उत्तम सिद्धीला—**लभते**—प्राप्त होतो. आतां —**स्वकर्मनिरतः**—आपल्या कर्मात अत्यंत रत असलेला पुरुष—**यथा**—ज्या प्रकारें—**सिद्धिं**—सिद्धीला—**विंदति**—प्राप्त होतो—**तत् शृणु**—तें ऐक. ४५

एतेषां जातिविहितानां कर्मणां सम्यगनुष्ठितानां स्वर्गप्राप्तिः फलं स्वभावतो वर्णा आश्रमाश्च स्वकर्मनिष्ठाः प्रेत्य कर्मफलमनुभूय ततः शेषेण विशिष्टदेशजातिकुलधर्मायुःश्रुतवृत्तवित्तसुखमेधसो जन्म प्रतिपद्यन्त इत्यादिस्मृतिभ्यः पुराणे च वर्णिनामाश्रमिणां च लोकफलभेदविशेषस्मरणात् । कारणान्तरात्त्विदं वक्ष्यमाणं फलम्— स्वे स्वे यथोक्तलक्षणभेदे कर्मण्यभिरतस्तत्परः संसिद्धिं स्वकर्मानुष्ठानादशुद्धिक्षये सति कायेन्द्रियाणां ज्ञाननिष्ठायोग्यतालक्षणां लभते प्राप्नोति नरोऽधिकृतः पुरुषः । किं स्वकर्मानुष्ठानत एव साक्षात्संसिद्धिः । न, कथं तर्हि स्वकर्मनिरतः सिद्धिं यथा येन प्रकारेण विन्दति तच्छृणु ॥ ४५ ॥

**भाष्यार्थ**—( येथवर ब्राह्मणादि वर्णांचीं जीं शमादि कर्में सांगितलीं त्यांच्या अभ्युदय या फलाचा प्रथम निर्देश करतात— )—**एतेषां जातिविहितानां कर्मणां**

**सम्यगनुष्ठितानां स्वभावतः स्वर्गप्राप्तिः फलं**—या ब्राह्मणादि वर्णांना विहित असलेल्या व यथाशास्त्र अनुष्ठिलेल्या कर्मांचे स्वभावतःच स्वर्गप्राप्ति हें फल आहे. [ स्वभावतः म्ह० तीं कर्मे विहित असून मोक्षाची अपेक्षा न करतां अनुष्ठान केल्या-मुळे असा भावार्थ. याविषयी प्रमाण सांगतात- ]—**स्वकर्मनिष्ठाः वर्णाः आश्रमाः च प्रेत्य कर्मफलं अनुभूय**—स्वकर्मांमध्ये तत्पर असलेले वर्ण व आश्रम, मेल्या-वर कर्मफलाचा अनुभव घेऊन—**ततः शेषेण विशिष्टदेश जाति कुल-धर्म-आयुः-श्रुत-वृत्त वित्त सुख मेधसः जन्म प्रतिपद्यन्ते इत्यादि स्मृतिभ्यः**—कर्मफल भोगून अवशिष्ट राहिलेल्या कर्मानें विशिष्ट देश, विशिष्ट जाति, विशिष्ट कुल, विशिष्ट धर्म, विशिष्ट आयुष्य, विशिष्ट विद्या, विशिष्ट वर्तन, विशिष्ट धन, विशिष्ट सुख, विशिष्ट मेधा-धारणाशक्ति-यांनी युक्त होऊन जन्म घेतात इत्यादि[1] स्मृतीवरून ही गोष्ट सिद्ध होते. (याहि कारणानें विहित कर्मांचे स्वर्ग हें फळ मिळणें युक्तच आहे, असें सांगतात-)—**च पुराणे-वर्णिनां आश्रमिणां च लोकफलभेदविशेषस्मर-णात्**—आणि पुराणामध्ये वर्णी व आश्रमी यांना भिन्न भिन्न लोक व फळें यांची प्राप्ति होते, असें म्हणून त्यांचे लोक व फल यांच्या भेदाचे प्रकार सांगितले आहेत.[2] ( पण या पूर्वोक्त कर्मांचे मोक्षाच्या अपेक्षेने जर अनुष्ठान केले तर परंपरेनें तीं मोक्ष फलालाच कारण होतात, असें सांगतात-)—**तु कारणान्तरात् इदं वक्ष्यमाणं फलं**—पण दुसऱ्या कारणानें म्ह० मोक्षाच्या अपेक्षेनें अनुष्ठान केल्यास त्यांचें हें पुढें सांगितलेलें फल आहे.—**स्वे स्वे यथोक्तलक्षणभेदे कर्मणि अभिरतः-तत्परः-नरः-अधिकृतः पुरुषः**—आपापल्या वर सांगितलेल्या लक्षणाच्या भिन्न भिन्न कर्मांमध्ये अभिरत म्ह० तत्पर असलेला मनुष्य-अधिकृत पुरुष—**संसिद्धिं-स्वकर्मानुष्ठानात् अशुद्धिक्षये सति कायेन्द्रियाणां ज्ञाननिष्ठायोग्यतालक्षणां लभते प्राप्नोति**—संसिद्धीला म्ह० स्वकर्मानुष्ठानामुळे अशुद्धीचा क्षय झाला असतां शरीरेंद्रियांची ज्ञाननिष्ठायोग्यता, याच स्वरूपाच्या सिद्धीला प्राप्त होतो. [ अर्थात्

---

१ या आदिशब्दानें 'तद्यथाम्रे फलार्थे निमिते छायागन्धावनूत्पद्यत एवं धर्म चर्यमाणम-र्था अनूत्पद्यन्ते न धर्महानिर्भवति ' ही स्मृति घ्यावी. म्हणजे फलासाठीं आम्रवृक्ष लाविला असतां त्यापासून छाया, सुगंध इत्यादि फळ जसें त्या बरोबरच उत्पन्न होतें त्या-प्रमाणें धर्माचरण करणाला विविध अर्थ त्याबरोबर प्राप्त होतात व त्यामुळे धर्महानि होत नाहीं, असा याचा भावार्थ.

२ "यस्तु सम्यक्करोत्येवं गृहस्थः परमं विधिं । तद्वर्णबन्धमुक्तोऽसौ लोकानाप्नोत्यनुत्त-मान् ॥ यस्त्वेतां नियतश्चर्यां वानप्रस्थश्चरेन्मुनिः । स दहत्यग्निवद्दोषाञ्जयेल्लोकांश्च शाश्व-तान् ॥ मोक्षाश्रमो यश्चरते यथोक्तं शुचिः सुसंकल्पितबुद्धियुक्तः । अनिन्धनज्योतिरिव प्रशान्तं स ब्रह्मलोकं श्रयते द्विजातिः ॥" या पुराणवचनांत स्वधर्मानुष्ठान करणाऱ्या गृहस्थाला सर्वोत्तम लोक मिळतात, वानप्रस्थाला शाश्वतलोक प्राप्त होतात व यतीला ब्रह्मलोक प्राप्त होतो, असें वर्णन आहे.

मोक्षाचे उपाय; अशीं जीं शमादि सात्त्विक कर्में त्यांचा ब्राह्मणांनाच अधिकार असल्या- मुळें त्यांनाच तेवढा मोक्ष मिळेल, क्षत्रियादिकांना शमादिकांचा अधिकारच नसल्यामुळें मोक्ष मिळणार नाहीं, ही शंका व्यर्थ आहे. आपापल्या विहित कर्मांत तत्पर असलेल्या कोणत्याहि वर्णाच्या मनुष्याची चित्तशुद्धि होऊन तिच्या द्वारा ज्ञाननिष्ठायोग्यता प्राप्त होते, आणि ज्याला त्या योग्यतेमुळें ज्ञान झालें आहे, त्याला मोक्ष प्राप्त होतो. अर्थात् ज्ञानी अब्राह्मणालाही मोक्ष मिळतो, असा भावार्थ. येथील संसिद्धिशब्दाचा मोक्ष असा अर्थ घेऊन केवल स्वधर्मनिष्ठ झाल्यानेंच जर त्याचा लाभ होत असेल तर त्यासाठीं संन्यासादिकांचें विधान व्यर्थ आहे, असें मानून वादी शंका घेतो-]—**किं स्वकर्मा- नुष्ठानतः एव साक्षात् संसिद्धिः**—काय, केवल स्वकर्मानुष्ठान केल्यानेंच साक्षात् मोक्षरूप संसिद्धि मिळते ?—**न**—नाहीं, नुसत्या स्वकर्मानुष्ठानानेंच साक्षात् मोक्ष किंवा ज्ञाननिष्ठायोग्यता प्राप्त होत नाही.—**किं तर्हि**—तर मग स्वकर्मनिष्ठाला संसिद्धि कशी व कोणती मिळते ? ( याचें उत्तर श्लोकाच्या उत्तरार्धाने देतात-)—**स्वकर्म- निरतः यथा-येन प्रकारेण सिद्धिं विन्दति तत् शृणु**—स्वकर्मांमध्यें निरत- तत्पर असलेला मनुष्य कोणत्या प्रकारानें सिद्धीला प्राप्त होतो ते ऐक-तो प्रकार तूं एकाग्र चित्तानें ऐकून त्याविषयीं निश्चय कर. ४५

**यतः प्रवृत्तिर्भूतानां येन सर्वमिदं ततम् ।**
**स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विन्दति मानवः ॥४६॥**

**अन्वयार्थ—यतः**—ज्याच्यापासून—**भूतानां**—भूतांची-प्राण्यांची—**प्रवृत्तिः**—उत्पत्ति किंवा चेष्टा होते—**येन**—ज्यानें—**इदं सर्वं**—हें सर्व—**ततं**—व्यापलें आहे—**तं**—त्याला—**स्वकर्मणा**—आपल्या कर्मानें—**अभ्यर्च्य**—पुजून—**मानवः**—मनुष्य—**सिद्धिं**—सिद्धीला—**विंदति**—प्राप्त होतो. ४६

**यत इति । यतो यस्मात्प्रवृत्तिरुत्पत्तिश्चेष्टा वा यस्मादन्तर्यामिण ईश्वराद्भूतानां प्राणिनां स्याद्येनेश्वरेण सर्वमिदं जगत्ततं व्याप्तं स्वकर्मणा पूर्वोक्तेन प्रतिवर्णं तमीश्वरम- भ्यर्च्य पूजयित्वाऽऽराध्य केवलं ज्ञाननिष्ठायोग्यतालक्षणां सिद्धिं विन्दति मानवो मनुष्यः ॥ ४६ ॥**

**भाष्यार्थ—' यतः० ' इति**—या श्लोकानें तोच प्रकार स्पष्ट सांगतात—**यतः- यस्मात् प्रवृत्तिः-उत्पत्तिः-चेष्टा वा**—ज्याच्यापासून प्रवृत्ति म्ह० उत्पत्ति किंवा चेष्टा ('यतः म्ह० यस्मात्' असे जें सांगितलें आहे तेंच अधिक व्यक्त करितात-)—**यस्मात्**

---

१ 'संसिद्धिं लभते नरः' याचा अर्थ रहस्यकार 'त्याला त्यानेंच परमसिद्धि प्राप्त होतेय,' असा करितात. पण तो बरोबर नाहीं. येथील ही संसिद्धि म्ह० चित्तशुद्धि व तिच्या द्वारा ज्ञाननिष्ठायोग्यता प्राप्ति आहे. कारण मोक्ष कर्मानें प्राप्त होणे शक्य नाहीं. (पृ. ५९.पहा ) वास्तव येथील सिद्धि ही कर्माची सिद्धि आहे.

**अन्तर्यामिणः ईश्वरात् भूतानां प्राणिनां स्यात्**—ज्या अंतर्यामी · ईश्वरापासून भूतांची-प्राण्यांची ( प्रवृत्ति ) होते—**येन-ईश्वरेण इदं सर्वं जगत् ततं-व्याप्तं**-ज्या ईश्वरानें हें सर्व जगत् व्यापले आहे. ( मृत्तिकेकडून जसे घटादि विकार व्यापले जावेत त्याप्रमाणे. कारण, कार्याला कारणाहून भिन्न स्वरूप नसतें )—**तं ईश्वरं प्रति-वर्णं पूर्वोक्तेन स्वकर्मणा अभ्यर्च्य-पूजयित्वा-आराध्य**—त्या ईश्वराला प्रत्येक वर्णासाठीं वर सांगितलेल्या स्वधर्मानें पुजून-त्याची पूजा-आराधना करून—**मानवः-मनुष्यः केवलं ज्ञाननिष्ठायोग्यतालक्षणां सिद्धिं विन्दति**—मानव-मनुष्य केवल ज्ञाननिष्ठायोग्यतारूप सिद्धीलो प्राप्त होतो. [ ब्राह्मणादिकांना केवल पूर्वोक्त स्वधर्मानिष्ठेनें साक्षात् मोक्ष मिळणे शक्य नाहीं. कारण मोक्ष केवळ ज्ञानानेंच प्राप्त होणारा आहे. यास्तव स्वधर्मनिष्ठ झालेल्या ब्राह्मणादिकांची चित्तशुद्धि होते, कर्म-फलांची आकांक्षा न करणाऱ्या त्यांना ईश्वरप्रसादानें विवेक-वैराग्यादिक साधनसंपत्ति प्राप्त होते. अशा ज्ञाननिष्ठेला योग्य झालेल्या संन्याश्यांना ज्ञानप्राप्तीनेंच मुक्ति मिळते, या अभिप्रायाने भाष्यांत ' केवलं ' हा शब्द घातला आहे. ] ४६

## श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् ।
## स्वभावनियतं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम् ॥४७॥

**अन्वयार्थ—स्वनुष्ठितात् परधर्मात्**—उत्तम प्रकारें अनुष्ठिलेल्या परधर्मा-हून—**विगुणः स्वधर्मः**—गुणहीन स्वधर्म—**श्रेयान्**—अधिक श्रेयस्कर आहे. —**स्वभावनियतं कर्म कुर्वन्**—स्वभावानें नियत केलेले कर्म करणारा—**किल्बिषं**—पापाला—**न आप्नोति**—प्राप्त होत नाहीं. ४७

**यत एवमतः— श्रेयान्प्रशस्यतरः स्वो धर्मः स्वधर्मो विगुणोऽपीत्यपिशब्दो द्रष्टव्यः । परधर्मात्स्वनुष्ठितात्स्वभावनियतं स्वभावेन नियतं, यदुक्तं स्वभावजमिति तदेवोक्तं**

---

१ रहस्यकार ' सिद्धि विन्दति ' याचा ' मनुष्याला त्यानेच ( ईश्वराची स्वकर्मांनीं केवल वाणीनें- किंवा पुष्पांनीं नव्हे. पूजा केल्यानेंच ) सिद्धि प्राप्त होत असते ' असा अगदी सरळ अर्थ करितात. पण ती सिद्धि कोणती ते सांगत नाहींत. पुढें टीपेंत म्हणतात—"चातुर्वर्ण्याप्रमाणे प्राप्त झालेलीं कर्मे निष्काम बुद्धीनें किंवा परमेश्वरार्पण बुद्धीनें केलीं म्हणजे तें विराट्-स्वरूपी परमेश्वराचें एकप्रकारचें यजन-पूजन होतें व त्यामुळे सिद्धि मिळते असें सांगितलें " कर्में निष्काम बुद्धीनें करणे, व परमेश्वरार्पण बुद्धीनें करणें यांत रहस्यकार फरक कांहींच मानीत नाहींत, असें दिसतें. पण ते बरोबर नाहीं. कारण कर्में निष्काम बुद्धीनें करणें निराळे व ईश्वरार्पण करणे निराळें (अ. १२. श्लो. ९–१२. पृ. ८३३–३५ पहा.) तसेंच परमेश्वर व विराट्स्वरूपी परमेश्वर यांना ते एक मानतात, असें दिसतें; पण तेंहि बरोबर नाहीं. कारण परमात्मा निराळा व, विराट् पुरुष निराळा. परमात्मा निरुपाधिक व विराडात्मा सोपाधिक आहे. पण हा सूक्ष्मभेद रहस्यकारांच्या लक्षांत आला नाहीं, असें दिसतें. या टीपेंतहि 'सिद्धि'शब्दाचें कांहींच स्पष्टीकरण केलेलें नाहीं.

स्वभावनियतमिति, यथा विषजातस्येव कृमेर्विषं न दोषकरं तथा स्वभावनियतं कर्म कुर्वन्नाऽऽप्नोति किल्बिषं पापम् ॥ ४७ ॥

**भाष्यार्थ—यतः एवं अतः**—ज्याअर्थी स्वधर्मानुष्ठानाचें चित्तशुद्ध्यादिकांच्या द्वारा मोक्षामध्यें पर्यवसान होत असतें त्याअर्थी स्वधर्मानुष्ठान आवश्यक आहे, असें आतां सांगतात—**स्वः धर्मः स्वधर्मः श्रेयान् प्रशस्यतरः**—स्वः-स्वतःचा जो धर्म तो स्वधर्म अधिक प्रशंसनीय आहे—**विगुणः अपि इति अपिशब्दः द्रष्टव्यः**—विगुण असाहि स्वधर्म, येथे 'विगुण'शब्दाच्या पुढें 'अपि'शब्द आहे, असें समजावें. ( विगुण असलेलाहि स्वधर्म कोणापेक्षा अधिक प्रशंसनीय ?-)—**स्वनुष्ठितात् परधर्मात्**—उत्तम रीतीनें आचरिलेल्या परधर्माहून ( अहोपण, युद्धादिरूप स्वधर्म करणाराला हिंसेचें पाप लागतें, तेव्हां स्वधर्म अधिक चांगला कसा ? उत्तर-) —**स्वभावनियतं-स्वभावेन नियतं**—स्वभावाने नियत केलेलें—**स्वभावजं इति यत् उक्तं तत् एव स्वभावनियतं इति उक्तं**—वर स्वभावज म्ह० स्वकीय वर्णाश्रमाला उद्देशून विहित म्हणून जे सांगितले तेच येथे स्वभावनियत म्हणून म्हटलें आहे ( युद्धरूप विहित कर्म करणारालाहि पाप लागत नाही, याविषयीं दृष्टान्त-)—**यथा विषजातस्य इव कृमेः विषं न दोषकरं तथा स्वभावनियतं कर्म कुर्वन् किल्बिषं-पापं न आप्नोति**—ज्याप्रमाणें विषापासून उत्पन्न झालेल्या कृमीला विष दोषकर नसते-बाधत नाही, त्याप्रमाणे स्वभावानें नियत केलेले कर्म करणारा किल्बिषाला म्ह० पापाला प्राप्त होत नाहीं-त्याला पाप लागत नाही. ४७

## सहजं कर्म कौन्तेय सदोषमपि न त्यजेत् ।
## सर्वारंभा हि दोषेण धूमेनाग्निरिवावृताः॥४८॥

**अन्वयार्थ—कौन्तेय**—हे कुंतीपुत्रा अर्जुना !—**सहजं कर्म**—जन्मतांच प्राप्त झालेलें कर्म—**सदोषं अपि**—सदोष जरी असलें, तरी—**न त्यजेत्**—टाकूं नये. —**हि**—कारण—**सर्वारंभाः**—सर्व कर्मे—**धूमेन अग्निः इव**—धुराने जसा अग्नि, तशीं—**दोषेण**—दोषाने—**आवृताः**—अच्छादित झालेली असतात. ४८.

स्वभावनियतं कर्म कुर्वाणो विषजात इव कृमिः किल्बिषं नाऽऽप्नोतीत्युक्तम् । परधर्मश्च भयावह इति । अनात्मज्ञश्च न हि कश्चित्क्षणमप्यकर्मकृत्तिष्ठतीति, अतः—सहजं सह जन्मनैवोत्पन्नं सहजं किं तत्कर्म कौन्तेय सदोषमपि त्रिगुणत्वान्न त्यजेत्सर्वारम्भा आरभ्यन्त इत्यारम्भाः सर्वकर्माणीत्येतत्प्रकरणात् । ये केचिदारम्भाः स्वधर्माः परधर्माश्च ते सर्वे हि यस्मात्त्रिगुणात्मकत्वमत्र हेतुस्त्रिगुणात्मकत्वाद्दोषेण धूमेन सहजेनाग्निरिवाऽऽवृताः । सहजस्य कर्मणः स्वधर्माख्यस्य परित्यागेन परधर्मानुष्ठानेऽपि दोषान्नैव मुच्यते, भयावहश्च परधर्मः । न च शक्यतेऽशेषतस्त्यक्तुमज्ञेन कर्म यतस्तस्मान्न त्यजेदित्यर्थः ॥

**भाष्यार्थ—स्वभावनियतं कर्म कुर्वाणः विषजातः कृमिः इव किल्बिषं न आप्नोति इति उक्तं**—स्वभावानें नियत केलेले कर्म करणारा पुरुष विषामध्यें उत्पन्न झालेल्या कृमीप्रमाणे पापाला प्राप्त होत नाही, हें सांगितलें. विषापासूनच झालेला कृमि विषानें मरत नाहीं, त्याप्रमाणें स्वभावनियत सदोष कर्म करणारासहि पाप लागत नाहीं.—**च परधर्मः भयावहः इति**—व मागें (अ. ३ श्लो. ३५ पृ. ३३६) परधर्म भयावह आहे असेंहि सांगितलें. त्यामुळें सर्वथा निर्दोष असलेलें भिक्षाटनच सर्वांनीं करावें असें म्हणतां येत नाहीं.—**च अनात्मज्ञः कश्चित् क्षणं अपि अकर्मकृत् न हि तिष्ठति इति**—आणि कोणीहि अनात्मज्ञ-आत्म्याला न जाणणारा एक क्षणभर सुद्धां कर्म न करितां राहू शकत नाहीं, हेंहि पूर्वी ( अ. ३ श्लो. ५पृ.२७०) सांगितलें. [ त्यामुळें पापाच्या प्राप्तीची शंकाच राहूं नये म्हणून सर्वांनीं कर्मत्यागच करावा, असेंहि म्हणतां येत नाहीं. कारण ज्ञानाच्या अभावीं कोणालाहि क्षणभरसुद्धां कर्म सोडून राहतां येत नाहीं. गुणातीत ज्ञानी मात्र अकर्मकृत् राहूं शकतो.]—**अतः**—याप्रमाणें आता आणखी प्रकारच राहिलेला नसल्यामुळें—**सहजं-सह जन्मना एव उत्पन्नं सहजं**—सहज म्ह० जन्मानेच उत्पन्न झालेले, जन्माबरोबर झालेलें तें सहज —**किं तत्**—तें काय?—**कर्म**—कर्म-स्वभावानें नियत केलेलें कर्म—**कौन्तेय**—हे कुंतिपुत्रा !—**त्रिगुणत्वात् सदोषं अपि न त्यजेत**—विहित असल्यामुळेंच निर्दोष आहे म्हणून त्रिगुणत्वामुळें हिंसात्मक-सदोष असलेलेंहि तें टाकूं नये. [सत्त्वादि तीन गुणामुळेच ज्याचा आरंभ झाला आहे असें हिंसादि दोषांनीं युक्त असलेलें कर्म विहित असल्यामुळें अत्याज्य होय, असा याचा भावार्थ. कर्माच्या दोषवत्त्वाचें स्पष्टीकरण-]—**सर्वारम्भाः-आरभ्यन्ते इति आरम्भाः-सर्वकर्माणि इति एतत्**—सर्व आरंभ-आरंभ केला जातो म्हणून आरंभ-सर्व कर्में असा याचा भावार्थ. ( पण येथें 'आरंभ' या शब्दाचा 'कर्म' असा अर्थ का करावयाचा? उत्तर-)—**प्रकरणात्**—कारण येथें कर्माचें प्रकरण चाललें आहे. ( त्यामुळें 'आरंभ-'शब्दाचा 'ज्यांचा आरंभ केला जातो तीं कर्में' असा कर्मव्युत्पत्तीनें स्व-परकर्म असा अर्थ करावा लागतो. असो; 'दोषेण' इत्यादि शब्दाचें व्याख्यान-)—**ये केचित् स्वधर्माः परधर्माः च आरंभाः ते सर्वे हि यस्मात्**—जे कांही स्वधर्मरूप व परधर्मरूप आरंभ ते सर्वच ज्या अर्थी ( दोषानें आवृत आहेत, असा पुढें संबंध )—**त्रिगुणात्मकत्वं अत्र हेतुः-त्रिगुणात्मकत्वात्**—त्रिगुणात्मकत्व हा त्यांच्या दोषावृतत्वाविषयीं हेतु-कारण आहे. यास्तव त्या सर्व आरंभांना ज्याअर्थी त्रिगुणात्मकत्व आहे त्याअर्थी ते सर्व आरंभ-कर्में—**दोषेण आवृताः**—दोषानें आच्छादित झालेलीं आहेत. ( याविषयीं दृष्टान्त-)—**सहजेन धूमेन अग्निः इव**—सहज-अग्नीबरोबरच उत्पन्न झालेल्या धूमानें अग्नि जसा आच्छादित-व्याप्त असतो त्याप्रमाणें सर्व कर्में दोषांनीं युक्त असतात.—**स्वधर्माख्यस्य सहजस्य कर्मणः परित्यागेन परधर्मानुष्ठाने अपि दोषात् न एव मुच्यते**—'स्वधर्म'नांवाच्या सहज

कर्माचा परित्याग करून परधर्माचें अनुष्ठान जरी केलें तरी दोषापासून सर्वथा सुटका होतच नाहीं.—**च परधर्मः भयावहः**—शिवाय परधर्म भयावह आहे.—**च यतः अज्ञेन अशेषतः कर्म त्यक्तुं न शक्यते तस्मात् न त्यजेत् इत्यर्थः**—आणि ज्याअर्थी अज्ञाला सर्वकर्मत्याग करितां येणें शक्य नसतें त्याअर्थी सहज कर्म सदोष जरी असलें तरी त्याचा त्याग करूं नये, असा याचा भावार्थ.

**किमशेषतस्त्यक्तुमशक्यं कर्मेति न त्यजेत् किं वा सहजस्य कर्मणस्त्यागे दोषो भवतीति । किंचातो यदि तावदशेषतस्त्यक्तुमशक्यमिति न त्याज्यं सहजं कर्मैवं तर्ह्यशेषतस्त्यागे गुण एव स्यादिति सिद्धं भवति । सत्यमेवमशेषतस्त्याग एव नोपपद्यत इति चेत्, किं नित्यप्रचलितात्मकः पुरुषो यथा सांख्यानां गुणाः किंवा क्रियैव कारकं यथा बौद्धानां पञ्च स्कन्धाः क्षणप्रध्वंसिनः, उभयथाऽपि कर्मणोऽशेषतस्त्यागो न भवति ॥**

**भाष्यार्थ**—( सहज कर्म सदोष असले तरी त्याचा त्याग करूं नये, याविषयीं विचार आरंभितात- )—**किं कर्म अशेषतः त्यक्तुं अशक्यं इति न त्यजेत् किंवा सहजस्य कर्मणः त्यागे दोषः भवति इति**—काय, कर्म 'न हि कश्चित्०' या न्यायानें पूर्णपणें टाकता येणे शक्य नाहीं, म्हणून टाकूं नये की सहज कर्माचा त्याग केल्यास ' नित्यत्यागे प्रत्यवायः ' या न्यायानें दोष लागतो म्हणून त्याचा त्याग करूं नये ?—**किं च अतः**—पण संदिग्ध व सप्रयोजन असते त्याचाच विचार करणे युक्त होय. यास्तव या संदिग्ध प्रश्नाचा विचार केल्यास त्याचे फल काय ? त्यापासून निष्पन्न काय होणार ?—**यदि तावत् अशेषतः त्यक्तुं अशक्यं इति सहजं कर्म न त्याज्यं**—आतां जर पूर्णपणें कर्माचा त्याग करणें अशक्य आहे म्हणून सहज कर्म सोडूं नये म्हणून म्हणाल—**तर्हि अशेषतः त्यागे गुणः एव स्यात् इति सिद्धं भवति**—तर अशेषतः--पूर्णपणे कर्माचा त्याग करण्यांत गुणच-मोठा पुरुषार्थच आहे, असें सिद्ध होतें. [ कारण अशक्य असलेलें एखादें कृत्य करून दाखविणें, यांत व्यवहारांत मोठा गुणच-पुरुषार्थच समजला जातो. ]—**सत्यं एवं अशेषतः त्यागः एव न उपपद्यते इति चेत्**—असें खरें; पण पूर्णपणे कर्मत्यागच संभवत नाहीं, असें म्हणाल तर ( या आक्षेपाचेच अधिक विवरण- )—**किं पुरुषः नित्यप्रचलितात्मकः**—काय, पुरुष नित्य प्रचलित स्वरूप आहे,—**यथा सांख्यानां गुणाः**—जसे सांख्यांचे सत्त्वादि गुण, ( त्याप्रमाणे आत्मा नित्य प्रचलित स्वभावाचा म्ह० सतत विकार पावणारा आहे, म्हणून त्याला कर्म अशेषतः टाकतां येत नाहीं, )—**किंवा क्रिया एव कारकं**—कीं क्रिया हेंच कारक.—**यथा बौद्धानां क्षणविध्वंसिनः पञ्च स्कन्धाः**—जसे बौद्धांचे क्षणभंगुर पांच स्कंध ? [ रूपस्कंध, विज्ञानस्कंध, वेदनास्कंध, संज्ञास्कंध व संस्कारस्कंध या क्षणांत भंग पावणाऱ्या बौद्धांच्या पांच स्कंधांप्रमाणें क्रियाकारकभेद नसल्यामुळें कारक जो आत्मा त्यालाच क्रियात्व आहे, असें म्हटलें तरी सर्वकर्मत्याग संभवत नाहीं, सारांश- ]—**उभयथा अपि कर्मणः अशेषतः त्यागः न भवति**—सांख्यांच्या सत्त्वादि गुणांप्रमाणें आत्मा नित्य प्रचलित स्वभाव

आहे असें मानलें किंवा बौद्धांच्या स्कंधांप्रमाणें कारक आत्मा हीच क्रिया आहे असें मानले तरी–या दोन्ही प्रकारें कर्माचा अशेषतः त्याग संभवत नाहीं.

अथ तृतीयोऽपि पक्षो यदा करोति तदा सक्रियं वस्तु यदा न करोति तदा निष्क्रियं वस्तु तदेव । तत्रैवं सति शक्यं कर्माशेषतस्त्यक्तुम् । अयं त्वस्मिंस्तृतीये पक्षे विशेषो न नित्यप्रचलितं वस्तु नापि क्रियैव कारकं किं तर्हि व्यवस्थिते द्रव्येऽविद्यमाना क्रियोत्पद्यते विद्यमाना च विनश्यति । शुद्धं द्रव्यं शक्तिमदवतिष्ठत इत्येवमाहुः काणादास्तदेव च कारकमित्यस्मिन्पक्षे को दोष इति ॥

**भाष्यार्थ**—( आतां वैशेषिकाचा पक्ष– )—**अथ तृतीयः अपि पक्षः**—आतां आणखी एक तिसराहि पक्ष आहे.—**यदा करोति तदा सक्रियं वस्तु यदा न करोति तदा तत् एव निष्क्रियं वस्तु**—आत्मा जेव्हा करतो तेव्हां सक्रिय वस्तु व जेव्हा तो करीत नाही तेव्हा तीच निष्क्रिय वस्तु—**तत्र एवं सति कर्म अशेषतः त्यक्तुं शक्यं**—याप्रमाणे आत्मा सक्रिय व निष्क्रिय अशा दोन्ही स्वभावाचा आहे, असे मानले असतां कर्माचा अशेषतः त्याग करता येणे शक्य आहे.—**तु अस्मिन् तृतीये पक्षे अयं विशेष**·—पण या तिसऱ्या पक्षामध्ये हा विशेष आहे.—**नित्यप्रचलितं वस्तु न क्रिया एव कारकं अपि न**—आत्मा हा नित्यप्रचलित-सविकार वस्तु नाही व क्रिया हेच कारक, असाहि प्रकार नाहीं;—**किं तर्हि व्यवस्थिते द्रव्ये अविद्यमाना क्रिया उत्पद्यते च विद्यमाना विनश्यति**—तर मग काय ? स्वरूपाने नित्य स्थित असलेल्या द्रव्यांत नसलेली क्रिया उत्पन्न होते व असलेली क्रिया नाश पावते. ( अहोपण, क्रिया उत्पन्न होऊन नाश पावणारी आहे, असे जर म्हटले तर क्रियेचा आश्रय असें जें द्रव्य त्याला नित्यत्व कसे ? अशी आशंका घेऊन सांगतात– )—**शुद्धं द्रव्यं शक्तिमत् अवतिष्ठते इति·एवं काणादाः आहुः**—शुद्ध द्रव्य क्रियाशक्तियुक्त असतें, असे काणाद म्हणतात. [ अहोपण, द्रव्य क्रियाशक्तीने जरी युक्त असले तरी त्याला क्रियायुक्तत्व जर नाहीं म्ह० क्रिया हा जर त्याचा धर्म नसेल तर त्याला कारक कसे म्हणता येईल ? कारण क्रिया करणारें जें कारण त्यालाच कारक म्हणत असतात, अशी आशंका घेऊन वैशेषिकाचेंच उत्तर सांगतात– ]—**तत् एव च कारकं**—आणि तें द्रव्यच कारक म्ह० क्रियाकर्तृ आहे. ( म्ह० जें क्रियाशक्तीनें युक्त असलेले तेंच कारक होय. क्रियेचें अधिकरण–क्रियेचा आश्रय हें कारक नव्हे. कारण क्रियाधिकरणाला कारक म्हटल्यास–क्रियाधिकरणामुळें क्रिया व क्रियेमुळें क्रियाधिकरणत्व, असा परस्पराश्रय दोष येतो. याप्रमाणें या वैशेषिकपक्षीं कांहीच दोष नसल्यामुळें हा पक्ष सर्वांनाच ग्राह्य आहे, अशा आशयानें या तिसऱ्या पक्षाचा उपसंहार करितात– )—**इति अस्मिन् पक्षे कः दोषः इति**—याप्रमाणें या पक्षीं काय दोष आहे ? कांहींच नाहीं.म्हणून त्याचाच स्वीकार करावा.

अयमेव तु दोषो यतस्त्वभागवतं मतमिदम् । कथं ज्ञायते, यत आह भगवान्नासतो विद्यते भाव इत्यादि । काणादानां ह्यसतो भावः सतश्चाभाव इतीदं मतम् । अभागवतत्वेऽपि न्यायवच्चेत्को दोष इति चेत् । उच्यते, दोषवत्त्विदं सर्वप्रमाणविरोधात् । कथं, यदि तावद्‌द्व्यणुकादि द्रव्यं प्रागुत्पत्तेरत्यन्तमेवासदुत्पन्नं च स्थितं कंचित्कालं पुनरत्यन्तमेवासत्त्वमापद्यते । तथा च सत्यसदेव सज्जायतेऽभावो भावो भवति भावश्चाभाव इति ॥

**भाष्यार्थ—अयं एव तु दोषः यतः तु इदं अभागवतं मतं**—हाच तर यांत मोठा दोष आहे, की, हें अभागवत मत आहे. [ भगवानांचें असे मत नसणें, त्यांच्या मताविरुद्ध हें मत असणें, हाच त्यातील मोठा दोष आहे. ]—**कथं ज्ञायते**—पण भगवानांचें हें मत नव्हे, हें कसें कळतें? ( उत्तर-)—**यतः भगवान् 'नासतो विद्यते भावः०' इत्यादि आह**—कारण भगवान् 'असत्'चा भाव संभवत नाहीं, ( अ. २ श्लो. १६ पृ. ७५ ) इत्यादि सांगतात.—**असतः भावः च सतः अभावः इति इदं काणादानां मतं हि**—असत्-चा भाव व सत्-चा अभाव होतो असें हें काणादांचें मत आहे, हें प्रसिद्ध आहे—**अभागवतत्वे अपि न्यायवत् चेत् कः दोषः इति चेत्**—अहोपण, हें मत भगवानांचे जरी नसलें तरी न्याययुक्त-न्याय्य असल्यास त्यांत काय दोष आहे, असें म्हणाल तर—**उच्यते**—त्याचें उत्तर सांगतों.—**इदं तु दोषवत् सर्वप्रमाणविरोधात्**—पण हे वैशेषिकांचे मत सदोष आहे. कारण तें सर्व प्रमाणांच्या विरुद्ध आहे.—**कथं**—तें कसे सदोष आहे?—**यदि तावत् द्व्यणुकादि द्रव्यं उत्पत्तेः प्राक् अत्यन्तं एव असत्**—जर अगोदर द्व्यणुकादिद्रव्य उत्पत्तीच्या पूर्वी अत्यंतच असत् आहे—**च उत्पन्नं कंचित् कालं स्थितं पुनः अत्यन्तं एव असत्त्वं आपद्यते**—आणि उत्पन्न झालेले तें द्व्यणुकादिकार्य कांहीं काल अस्तित्वांत राहून पुनः अत्यंतच असत्त्वाला-अत्यंत अशाच अभावाला प्राप्त होतें—**तथा च सति असत् एव सत् जायते-अभावः भावः भवति भावः च अभावः इति**—तर मग तसें झाले असता असत्‌च सत् होतें म्ह० अभाव भाव होतो व भाव अभाव होतो, असें सिद्ध होतें.

तत्राभावो जायमानः प्रागुत्पत्तेः शशविषाणकल्पः समवाय्यसमवायिनिमित्ताख्यं कारणमपेक्ष्य जायत इति । न चैवमभाव उत्पद्यते कारणं वाऽपेक्षत इति शक्यं वक्तुमसतां शशविषाणादीनामदर्शनात् । भावात्मकाश्चेद्‌घटादय उत्पद्यमानाः किंचिदभिव्यक्तिमात्रकारणमपेक्ष्योत्पद्यन्त इति शक्यं प्रतिपत्तुम् । किंचासतश्च सद्भावे सतश्चासद्भावे न कश्चित्प्रमाणप्रमेयव्यवहारे विश्वासः कस्यचित्स्यात् । सत्सदेवासदसदेवेतिनिश्चयानुपपत्तेः ॥

**भाष्यार्थ**—( यासंबंधानेंच वैशेषिकांचा दुसरा सिद्धान्त-)—**तत्र अभावः जायमानः उत्पत्तेः प्राक् शशविषाणकल्पः**—वैशेषिक मतीं उत्पन्न होणारा अभाव

उत्पत्तीच्या पूर्वी सशाच्या शिंगासारखा सर्वथा असत् असतो—**समवायि-असमवायि-निमित्ताख्यं कारणं अपेक्ष्य जायते इति**—व समवायि, असमवायि व निमित्त या नांवाच्या तीन प्रकारच्या कारणांच्या अपेक्षेनें-त्यांच्या साह्यानें उत्पन्न होतो, असें त्यांचें दुसरें मत आहे. ( आचार्य या मतावर दोष देतात-)—**च एवं अभावः उत्पद्यते वा कारणं अपेक्षते इति वक्तुं न युक्तं**—पण वैशेषिकांच्या परिभाषेप्रमाणे अभाव उत्पन्न होतो किंवा तो कारणाची अपेक्षा करितो, असें म्हणणें शक्य नाहीं.—**असतां शशविषाणादीनां अदर्शनात्**—कारण व्यवहारांत असत् असलेल्या सशाच्या शिंगादिकांची उत्पत्ति झालेली कोठें दिसत नाहीं व त्यांना कारणाची अपेक्षा असते, असेंहि दिसत नाहीं. ( यावर वैशेषिक वेदान्त्यांस म्हणतो-मग तुमच्या मतीं तरी कारणांची अपेक्षा करणाऱ्या घटादिकांची उत्पत्ति कशी होते ? कारण भाव पदार्थांची उत्पत्ति होणें किंवा त्यांना कारणाची अपेक्षा असणे, हीं दोन्ही संभवत नाहींत. आचार्य या शंकेचे उत्तर देतात-)—**भावात्मका घटादयः उत्पद्यमानाः चेत् किंचित् अभिव्यक्तिमात्रकारणं अपेक्ष्य उत्पद्यन्ते इति प्रतिपत्तुं शक्यं**—भावरूप घटादि पदार्थ उत्पन्न होतात, म्हणून म्हणाल तर ते केवल अभिव्यक्तीला कारण होणाऱ्या कोणत्या तरी निमित्ताची अपेक्षा करून उत्पन्न होतात, असें समजणें शक्य आहे. [ आमच्या पक्षीं घटादि पदार्थ उत्पत्तीच्या पूर्वींहि कारणरूपानें विद्यमान असतात. त्या वेळीं त्यांचे नाम व रूप व्यक्त नसतें. पण कारण सामग्रीच्या अपेक्षेनें त्यांची पृथक् पृथक् अभिव्यक्ति होते. अर्थात् पूर्वी अव्यक्त असलेले भावच पुढे नामरूपांच्या द्वारा व्यक्त होतात, त्यामुळें त्यांत कांहींच दोष नाहीं. वैशेषिकांच्या असत्कारणवादावर आणखी दोष देतात-]—**किंच असतः सद्भावे च सतः असद्भावे कस्यचित् क्वचित् प्रमाणप्रमेयव्यवहारे विश्वासः न स्यात्**—शिवाय असत्-ला सद्भाव प्राप्त झाला व सत्-ला असत्-भाव प्राप्त झाला म्ह० अभावाचा भाव व भावाचा अभाव जर होऊं लागला तर कोणाचा केव्हांच या प्रमाणप्रमेयव्यवहारावर विश्वास बसणार नाहीं. कारण—**सद् सद् एव असद् असद् एव इति निश्चयानुपपत्तेः**—जे सद् ते त्रिकाली सत् च व जें असत् ते असत्-च, असा निश्चय करितां येत नाहीं. त्यामुळें वैशेषिकांच्या प्रमाणप्रमेयव्यवहारावर कोणाचा विश्वास बसणार नाहीं.

**किंचोत्पद्यत इति द्व्यणुकादेर्द्रव्यस्य स्वकारणसत्तासंबन्धमाहुः। प्रागुत्पत्तेश्चासत्पश्चात्स्वकारणव्यापारमपेक्ष्य स्वकारणैः परमाणुभिः सत्तया च समवायलक्षणेन संबन्धेन संबध्यते संबद्धं सत्कारणसमवेतं सद्भवति। तत्र वक्तव्यं कथमसतः सत्कारणं भवेत्संबन्धो वा केनचित्। न हि वन्ध्यापुत्रस्य सता संबन्धो वा कारणं वा केनचित्प्रमाणतः कल्पयितुं शक्यम् ॥**

**भाष्यार्थ**—( याहि कारणानें वैशेषिकांचा असत्कार्यवाद युक्तिसिद्ध नाहीं, असें सांगतात-)—**किंच उत्पद्यते इति द्व्यणुकादेः द्रव्यस्य स्वकारणसत्तासंबन्धं**

**आहुः**—शिवाय 'उत्पन्न होतें' म्हणजे द्व्यणुकादि द्रव्याचा आपल्या कारणाच्या सत्तेशीं संबंध होतो, असें ते सांगतात. (याचेंच अधिक स्पष्टीकरण-)—**च प्राग्-उत्पत्तेः असत्**—व कार्य उत्पत्तीच्या पूर्वी असत् असतें.—**पश्चात् स्वकारण-व्यापारं अपेक्ष्य**—मागून आपल्या कारणाच्या व्यापाराच्या अपेक्षेनें—**स्वकारणैः परमाणुभिः च सत्तया समवायलक्षणेन संबन्धेन संबध्यते**—आपलीं कारणें असे जे परमाणु त्यांच्याशीं व सत्तेशीं समवायलक्षणसंबंधानें संबद्ध होतें—**संबद्धं सत् कारणसमवेतं सत् भवति**—आणि याप्रमाणें कारणाशीं समवाय-संबद्ध होत्सातें कारणसमवेत कार्य सत् होतें. म्ह० कारणाशीं संबंध झाला असतां कार्याचा सत्तासंबंध होतो. (कार्य उत्पत्तीच्या पूर्वी असत् असतें. नंतर आपल्या कार-णाच्या व्यापारानें आपल्या कारणाशीं व सत्तेशीं समवायसंबंधानें संबद्ध होतें, व कार्य स्वतः सत्तायुक्त होतें. याप्रमाणें वैशेषिकांच्या मताचा अनुवाद करून आचार्य त्यावर दोष देतात-)—**तत्र वक्तव्यं**—पण असें म्हणणाऱ्या वैशेषिकांनीं आम्हांला हें सांगावें, या प्रश्नाचें उत्तर द्यावें—**असतः सत् कारणं कथं भवेत्**—असत्-चें सत् कारण कसें होईल?—**वा असतः केनचित् संबधः (कथं भवेत्)**—किंवा असत्चा कोणाशींहि संबंध कसा होणार?—**वंध्यापुत्रस्य केनचित् सता संबंधः वा कारणं वा प्रमाणतः कल्पयितुं न हि शक्यं**—वंध्यापुत्राचा कोणत्याच सत्-पदार्थाशीं संबध होणें किंवा त्याचें कारण कोणालाहि प्रमाणतः कल्पितां येणें शक्य नाहीं.

**ननु नैव वैशेषिकैरभावस्य संबन्धः कल्प्यते द्व्यणुकादीनां हि द्रव्याणां स्वकारणेन समवायलक्षणः संबन्धः सतामेवोच्यत इति । न संबन्धात्प्राक्सत्त्वानभ्युपगमात् । नहि वैशेषिकैः कुलालदण्डचक्रादिव्यापारात्प्राग्घटादीनामस्तित्वमिष्यते न च मृद एव घटाद्याकारप्राप्तिमिच्छन्ति । ततश्चासत एव संबन्धः पारिशेष्यादिष्टो भवति ॥**

**भाष्यार्थ**—(यावर वैशेषिकांच्या बाजूनें मध्यस्थाचा आक्षेप-)—**ननु वैशेषिकैः अभावस्य संबन्धः न एव कल्प्यते**—अहोपण, वैशेषिकांकडून अभावाचा संबंध केव्हांच कल्पिला जात नाहीं.—**हि सतां एव द्व्यणुकादीनां द्रव्यानां स्वकारणेन समवायलक्षणः संबन्धः उच्यते इति**—तर भावरूपच असलेल्या द्व्यणुकादि द्रव्यांचा आपल्या कारणाशीं समवायलक्षण संबंध त्याच्याकडून सांगितला जातो: असें म्हणाल तर—**न संबन्धात् प्राक् सत्त्वानभ्युपगमात्**—तें बरोबर नाहीं. कारण कार्याचा कारणाशीं संबंध होण्यापूर्वी कार्याचें सत्त्व-अस्तित्व-भावरूपत्व मान-लेलें नाहीं. (याचेंच स्पष्टीकरण-)—**वैशेषिकैः कुलालदंडचक्रादिव्यापारात् प्राक् घटादीनां अस्तित्वं न हि इष्यते**—वैशेषिक कुंभार, दंड, चक्र इत्यादि-कांच्या व्यापारापूर्वी घटादिकांचें अस्तित्व मानीत नाहींत, हें तज्ज्ञांना माहीतच आहे. —**मृदः एव घटाद्याकारप्राप्तिं न च इच्छन्ति**—मृत्तिकादि भावरूप कारणा-लाच घटादि कार्याच्या आकाराची प्राप्ति होते, मातीच घटाकार बनून कार्याचा व्यव-हार करिते, असें ते मानीत नाहींत, हेंहि प्रसिद्ध आहे. (याप्रमाणें कार्याचें कारणसंबंधा-

पूर्वी अस्तित्व नसल्यामुळे परिशेषन्यायानें काय सिद्ध होतें तें सांगतात-)—**ततः च असतः एव संबन्धः पारिशेष्यात् इष्टः भवति**—त्यामुळें परिशेषन्यायानें म्ह० कारणसंबंधापूर्वी कार्याचे अस्तित्व मानीत नसल्यामुळें व मृत्तिका घटरूप होते, हेंहि त्यांना मान्य नसल्यामुळें शेवटीं असत्-चाच-अभावाचाच संबंध त्यांना इष्ट आहे, असें ठरतें, [ पण तो पक्ष अनुपपन्न कसा आहे तें आम्हीं वर दाखविलेंच आहे. ]

**नन्वसतोऽपि समवायलक्षणः संबन्धो न विरुद्धः। न वन्ध्यापुत्रादीनामदर्शनात्। घटादेरेव प्रागभावस्य स्वकारणसंबन्धो भवति न वन्ध्यापुत्रादेरभावस्य तुल्यत्वेऽपीति विशेषोऽभावस्य वक्तव्यः। एकस्याभावो द्वयोरभावः सर्वस्याभावः प्रागभावः प्रध्वंसाभाव इतरेतराभावोऽत्यन्ताभाव इति लक्षणतो न केनचिद्विशेषो दर्शयितुं शक्यः। असति च विशेषे घटस्य प्रागभाव एव कुलालादिभिर्घटभावमापद्यते संबध्यते च भावेन कपालाख्येन स्वकारणेन सर्वव्यवहारयोग्यश्च भवति न तु घटस्यैव प्रध्वंसाभावोऽभावत्वे सत्यपीति प्रध्वंसाद्यभावानां न क्वचिद्व्यवहारयोग्यत्वं प्रागभावस्यैव व्यणुकादिद्रव्याख्यस्योत्पत्त्यादिव्यवहारार्हत्वमित्येतदसमञ्जसमभावत्वाविशेषादत्यन्तप्रध्वंसाभावयोरिव॥**

**भाष्यार्थ**—( यावर पुनः शंका-)—**ननु असतः अपि समवायलक्षणः संबन्धः न विरुद्धः**—अहोपण, असत्चा-अभावाचाहि समवायरूप संबंध विरुद्ध नाहीं. [ सत् व असत् या दोन संबंधी पदार्थाचा संयोग जरी न संभवला तरी त्यांचा समवाय संभवेल कारण समवाय नित्य आहे. त्यामुळे त्याचा एक-संयोग-संबंध जरी न संभवला तरी त्याच्या स्थितीची आवश्यकता आहे, या शंकेचे निरसन-)—**न। वंध्यापुत्रादीनां अदर्शनात्**—नाहीं, सत् व असत् यांचा समवायसंबंधहि संभवत नाहीं. कारण वंध्यापुत्रादि असत् पदार्थाचा तसा संबंध दिसत नाहीं. ( अहोपण, घटादिकांचा जो प्रागभाव तो अत्यन्ताभाव नव्हे. त्यामुळे घटप्रागभाव वंध्यापुत्रादि अत्यन्त असत् पदार्थाहून निराळ्या प्रकारचा आहे. त्यामुळें त्या घटप्रागभावाचा स्वकारणाशीं संबंध संभवतो, अशी आशंका घेऊन तिचें समाधान-)—**घटादेः एव प्रागभावस्य स्वकारणसंबंधः भवति**—घटादिकांच्याच प्रागभावाचा आपल्या कारणाशीं संबंध होतो:—**न। वन्ध्यापुत्रादेः अभावस्य इति अभावस्य तुल्यत्वे अपि विशेषः वक्तव्यः**—नाहीं, तसा संबंध होऊं शकत नाहीं, कारण वन्ध्यापुत्रादिक व अभाव या दोहोंमध्येहि अभावत्व हा स्वभाव एकसारखाच असतांना त्यांतील एका अभावाचाच कारणाशीं संबंध होतो व इतरांचा होत नाहीं, याचें विशेष कारण सांगणें भाग आहे. पण तसें विशेष कारण कांहींच नसल्यामुळें प्रागभावाचाहि कारणसंबंध संभवत नाहीं. ( अहोपण, घटादि प्रागभाव सप्रतियोगी[१] असतो. म्ह० घट

---

१ ज्याचा अभाव तो प्रतियोगी, किंवा ज्याचा भेद तो त्याचा प्रतियोगी, जसें—घटाच्या अभावाचा घट हा प्रतियोगी आहे. पटाच्या अभावाचा पट हा प्रतियोगी. पट व घट या भिन्न पदार्थांचा परस्पर भेद असल्यामुळें पट घटाचा प्रतियोगी व घट पटाचा प्रतियोगी.

ह्याच त्याचा प्रतियोगी असतो; पण वन्ध्यापुत्रादि अत्यन्त अभावाचा तसा प्रतियोगी संभवत नाहीं, असा त्या दोन अभावांत विशेष आहे, अशी आशंका घेऊन तिचें समाधान-)—**एकस्य अभावः द्वयोः अभावः सर्वस्य अभावः प्रागभावः प्रध्वंसाभावः इतरेतराभावः अत्यन्ताभावः इति लक्षणतः विशेषः न केनचित् दर्शयितुं शक्यः**—एकाचा अभाव, दोघांचा अभाव, सर्वांचा अभाव, कार्याचा प्राक् अभाव, प्रध्वंसाभाव, अन्योन्याभाव, अत्यन्त अभाव, असा लक्षणतः विशेष कोणालाहि दाखवितां येणार नाहीं. [म्ह० व्यवहारासाठीं अभावाच्या प्रकारांची ही अशी कल्पना जरी केली तरी त्यांच्या लक्षणांत स्वरूपतः कांहींच भेद नाहीं.]—**च विशेषे असति घटस्य प्रागभावः एव कुलालादिभिः घटभावं आपद्यते**—आणि अभावाच्या स्वरूपांत कांहीच विशेष नसतांना त्यांतील फक्त घटाचा प्रागभावच कुंभारादिकांकडून घटभावास प्राप्त केला जातो,—**च भावेन कपालाख्येन स्वकारणेन संबध्यते**—व भावरूप कपाल[1] या नांवाच्या आपल्या कारणांशीं संबद्ध होतो—**च सर्वव्यवहारयोग्यः भवति**—आणि सर्व व्यवहारास योग्य होतो—**तु घटस्य एव प्रध्वंसाभावः अभावत्वे सति अपि न इति**—पण घटाचाच प्रध्वंसाभाव त्याला घटाचें अभावत्व असूनहि तो पुनः घटत्वास प्राप्त होत नाहीं. आपल्या कारणाशीं संबद्ध होत नाहीं, आणि उत्पत्त्यादि व्यवहारासहि योग्य होत नाहीं. पण प्रागभाव व प्रध्वंसाभाव यांत वस्तुतः कांहीं फरक नसल्यामुळें त्यांच्यामध्ये असा भेद असावा हें अयोग्य आहे. तसेच—**प्रध्वंसादि-अभावानां क्वचित् व्यवहारयोग्यत्वं न**—प्रध्वंसाभाव, अन्योन्याभाव व अत्यन्ताभाव यांना कोणत्याहि प्रदेशीं किंवा कोणत्याहि कालीं जन्मादिव्यवहारयोग्यत्व नाहीं. ते केव्हांच हा आतां उत्पन्न झाला, हा अमुक कार्याच्या उपयोगी आहे, इत्यादि व्यवहारास योग्य नसतात,—**प्रागभावस्य एव द्व्यणुकादिद्रव्याख्यस्य उत्पत्त्यादिव्यवहारार्हत्वं**—पण नुसत्या द्व्यणुकादिद्रव्यसंज्ञक प्रागभावाला मात्र उत्पत्त्यादिव्यवहारयोग्यत्व आहे,—**इति एतत् असमंजसं**—असें हें म्हणणे अगदी असमंजसपणाचें आहे.—**अत्यन्त-प्रध्वंसाभावयोः इव अभावत्वाविशेषात्**—कारण अत्यन्ताभाव व प्रध्वंसाभाव यांच्याप्रमाणें प्रागभावालाहि एकसारखेंच अभावत्व आहे. अर्थात् प्रागभावहि अभावच असल्यामुळें उत्पत्त्यादि व्यवहारास योग्य नाहीं.

**ननु नैवास्माभिः प्रागभावस्य भावापत्तिरुच्यते । भावस्यैव हि तर्हि भावापत्तिर्यथा घटस्य घटापत्तिः पटस्य वा पटापत्तिः । एतदप्यभावस्य भावापत्तिवदेव प्रमाणविरुद्धम् । सांख्यस्यापि यः परिणामपक्षः सोऽप्यपूर्वधर्मोत्पत्तिविनाशाङ्गीकरणाद्वैशेषिकपक्षान्न विशिष्यते । अभिव्यक्तितिरोभावाङ्गीकरणेऽप्यभिव्यक्तितिरोभावयोर्विद्यमानत्वाविद्यमानत्वनिरूपणे पूर्ववदेव प्रमाणविरोधः । एतेन कारणस्यैव संस्थानमुत्प-**

---

१ घट करण्यापूर्वीं त्याचा खालचा व वरचा असे जें दोन भाग तयार केले जातात, त्यांना कपाल म्हणतात.

**त्यादीत्येतदपि प्रत्युक्तम् । पारिशेष्यात्सदेकमेव वस्त्वविद्ययोत्पत्तिविनाशादिधर्मैर्नटवद्नेकधा विकल्प्यत इतीदं भागवतं मतमुक्तं नासतो विद्यते भाव इत्यस्मिञ्श्लोके । सत्प्रत्ययस्याव्यभिचाराद्व्यभिचाराच्चेतरेषामिति ॥**

**भाष्यार्थ**—( यावर आक्षेप-)—**ननु अस्माभिः प्रागभावस्य भावापत्तिः न एव उच्यते**—अहोपण, आम्हांकडून प्रागभावाला घटभावाची प्राप्ति होते, म्ह० घटाचा प्राक्-अभावच घट बनतो, असें म्हटलेंच जात नाहीं. आम्ही मुळीं तसें म्हणतच नाहीं. ( यावर आचार्य दोष देतात-)—**तर्हि भावस्य एव भावापत्तिः यथा घटस्य घटापत्तिः पटस्य वा पटापत्तिः**—अभावाला भावत्वप्राप्ति होते असें जर मानीत नसाल तर मग भावालाच भावापत्ति होते, असे म्हणावें लागेल! जसें-घटालाच घटापत्ति, पटालाच पटापत्ति—**एतद् अपि अभावस्य भावापत्तिवत् एव प्रमाणविरुद्धं**—पण हे म्हणणें सुद्धां अभावाला भावापत्ति होते, याप्रमाणेंच प्रमाणाच्या विरुद्ध आहे. ( आरंभवादावरील हा दोषच परिणामवादावर कसा येतो, तें दाखवितात-)—**सांख्यस्य अपि यः परिणामपक्षः सः अपि अपूर्वधर्मोत्पत्ति-विनाशाङ्गीकरणात् वैशेषिकपक्षात् न विशिष्यते**—आतां सांख्यांचाहि जो परिणामपक्ष आहे तोहि अपूर्व धर्माची-परिणामाची उत्पत्ति व विनाश यांचा अंगीकार करीत असल्यामुळें वैशेषिकांच्या पक्षाहून निराळा मुळींच नाहीं. [ पूर्वी नसलेला परिणाम उत्पन्न होतो व असलेला नाश पावतो, असे त्यांचें मत आहे. त्यामुळें जें असत् तें त्रिकालीं असत्च व जे सत् ते सत्च, अशी व्यवस्था त्या पक्षांत करितां येत नसल्यामुळें तो सांख्यपक्षहि वैशेषिकपक्षापेक्षा अधिक समंजस आहे, असें म्हणतां येत नाहीं. 'अहोपण, कार्य कारणरूपानें पूर्वीहि सत्च असतें. पण तें अव्यक्त असतें आणि कारकव्यापारानें व्यक्त होतें. त्यामुळें व्यक्ति व अव्यक्ति यांनाच जन्म व नाश, असे सांख्य म्हणतात. त्यामुळे वैशेषिकाच्या मताहूच सांख्यमतात विशेष आहे,' असे सांख्यांच्या वतीनें मध्यस्थ म्हणेल म्हणून आचार्य म्हणतात-कारणरूपानें अव्यक्त असलेल्या कार्याचीच अभिव्यक्ति व तिरोभाव-म्ह० कार्य व्यक्त होणे व अव्यक्त होणें, यांचा अंगीकार केल्यामुळें वैशेषिकपक्षाहून सांख्यपक्ष विशिष्ट आहे, असें म्हणतां येत नाहीं. वैशेषिकपक्षाहून सांख्य पक्षांत कांहीं अधिक समंजसपणा आहे, असे म्हणतां येत नाहीं.]—**अभिव्यक्ति-तिरोभावाङ्गीकरणे अपि**—पूर्वी कारणरूपानें विद्यमान असलेल्या कार्याचीच अभिव्यक्ति होते व अभिव्यक्त असलेल्या कार्याचाच कारणरूपानें तिरोभाव-लय होतो, असें जरी मानलें तरी—**अभिव्यक्ति-तिरोभावयोः विद्यमानत्व-अविद्यमानत्वनिरूपणे पूर्ववत् एव प्रमाणविरोधः**—अभिव्यक्ति व तिरोभाव यांना सत्त्व, आहे कीं असत्त्व आहे, असें निरूपण करूं लागलें असतां पूर्वीप्रमाणेंच प्रमाणविरोध हा दोष येतो. [ कारकव्यापारापूर्वी अनभिव्यक्तीप्रमाणेंच अभिव्यक्तीलाहि सत्त्व असतें कीं असत्त्व ? त्यापूर्वीहि अभिव्यक्ति विद्यमान असते असें म्हटल्यास मग कारकव्यापाराची काय गरज ? कारण जिच्यासाठीं कारकव्यापाराची

अपेक्षा ती अभिव्यक्ति पूर्वींच विद्यमान आहे. अर्थात् त्याविषयींच्या प्रमाणाशीं विरोध येतो. बरें ती अभिव्यक्ति पूर्वी विद्यमान नव्हती म्हणून म्हणावें तर वैशेषिकांच्या पक्षावर येणाराच दोष सांख्यपक्षावर येतो.कारण अविद्यमान–असत् असलेली अभिव्यक्ति होणार कशी ? तसेंच कारकव्यापारानंतर व्यक्तीप्रमाणें अव्यक्तिहि जर सत् असेल तर तोच पूर्वोक्त दोष येतो व त्याला असत् म्हणावें तर सत् असत् होते, असें मानलेलें नसल्यामुळें तेंहि संभवत नाहीं. शिवाय जे सत् ते सत्च व असत् तें असत्च असा निश्चय होत नसल्यामुळें प्रमाणप्रमेयव्यवहारावर कधींच कोणाचा विश्वास बसणार नाहीं. त्यामुळें वैशेषिकपक्षाप्रमाणें सांख्यपक्षहि अग्राह्य आहे. आतां राहिलेल्या बौद्ध पक्षाचेंहि याच न्यायानें निरसन–]—**एतेन कारणस्य एव संस्थानं उत्पत्त्यादि इति एतत् अपि प्रत्युक्तं**— या कथनानें 'कारणालाच कार्यरूप प्राप्त होणे,कारणानेंच कार्याकार बनणे हीच उत्पत्ति व त्यानेंच कार्याचा आकार टाकून आपल्या मूळ रूपाला प्राप्त होणे, हाच नाश, या मताचेंहि निरसन झाले. [ कारण पूर्वरूप स्थित असतांना किंवा ते नष्ट झालें असतां एकाला दुसऱ्या रूपाची प्राप्ति होणे अयोग्य आहे. कारण प्राप्त झालेले स्वाभाविक रूप कोणत्याच अवस्थेंत टाकता येणें शक्य नाहीं. याप्रमाणे आरंभवाद व परिणामादिवाद यांमध्यें उत्पत्त्यादि व्यवहाराची अनुपपत्ति असल्यामुळें शेवटीं परिशेषन्यायानें काय सिद्ध होतें, ते सांगतात– ]—**पारिशेष्यात् सत् एकं एव वस्तु अविद्यया उत्पत्ति-विनाशादि-धर्मैः नटवत् अनेकधा विकल्प्यते इति इदं भागवतं मतं 'नासतो विद्यते भावः०' इति अस्मिन् श्लोके उक्तं**—वैशेषिकादिकाचे सर्व वाद अनुपपन्न ठरल्यावर शेवटीं विवर्तवादच उरत असल्यामुळें–सत् एकच वस्तु अविद्येनें उत्पत्ति-विनाशादि धर्मांनी नटाप्रमाणे अनेक प्रकारें कल्पिली जाते, असें हें भगवानांचें मत 'नासतो विद्यते भावः०' ( २·१६ पृ. ७५ ) या श्लोकांत सांगितलें आहे.—**सत्प्रत्ययस्य अव्यभिचारात् च इतरेषां व्यभिचारात् इति**— कारण सत्प्रत्ययाचा व्यभिचार होत नाहीं व इतर विकारांच्या प्रत्ययांचा व्यभिचार होतो. म्हणून सत् एकच वस्तु आहे. ( गी. भा. पृ. ७८ पहा. )

**कथं तर्हि आत्मनोऽविक्रियत्वेऽशेषतः कर्मणस्त्यागो नोपपद्यत इति । यदि वस्तुभूता गुणा यदि वाऽविद्याकल्पितास्तद्धर्मः कर्म तदाऽऽत्मन्यविद्याध्यारोपितमेवेत्यविद्वान्न हि कश्चित्क्षणमप्यशेषतस्त्यक्तुं शक्नोतीत्युक्तम् । विद्वांस्तु पुनर्विद्ययाऽविद्यायां निवृत्तायां शक्नोत्येवाशेषतः कर्म परित्यक्तुमविद्याध्यारोपितस्य शेषानुपपत्तेः । नहि तैमिरिकदृष्ट्याऽध्यारोपितस्य द्विचन्द्रादेस्तिमिरापगमे शेषोऽवतिष्ठते । एवं च सतीदं वचनमुपपन्नं सर्वकर्माणि मनसेत्यादि । 'स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः' 'स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विन्दति मानवः' इति च ॥ ४८ ॥**

**भाष्यार्थ—आत्मनः अविक्रियत्वे तर्हि अशेषतः कर्मणः त्यागः न उपपद्यते इति कथं**—आत्मा अविक्रिय आहे, असें जर भगवानांचें मत आहे, तर मग स्वकर्मांचा त्याग उपपन्न होत नाहीं, हें कसें म्हटलें आहे ? (आत्मा जर अविक्रिय

असेल तर सहजकर्मांचाहि त्याग करितां येईल ! यावर आचार्य विकल्पपूर्वक उत्तर देतात-)—**यदि वस्तुभूताः गुणाः यदि वा अविद्याकल्पिताः**—शरीरेंद्रियरूप गुण खरे आहेत, किंवा खोटे आहेत ? ते कल्पित किंवा अकल्पित कसेहि जरी असले तरी—**कर्म तद्धर्मः**—कर्म त्यांचा धर्म आहे, म्ह० शरीरेंद्रियें खरीं आहेत व कर्म हा त्यांचा धर्म आहे किंवा तीं अविद्याकल्पित-मिथ्या आहेत, व कर्म हा त्यांचा धर्म आहे !—**तदा आत्मनि अविद्याध्यारोपितं एव इति अविद्वान्**—यांतील कोणताहि पक्ष जरी घेतला तरी तें कर्म आत्म्यामध्यें अविद्येनें आरोपित आहे-शरीरेंद्रियांचें कर्म आत्म्यावर आरोपिलेलें आहे-तें माझें आहे, असें अज्ञानाने कल्पिलेलें आहे, असें न जाणणारा-शरीराच्या कर्मांचा आत्म्यावर वृथा आरोप केला जातो हें ज्याला माहीत नाहीं तो—'**न हि कश्चित् क्षणं अपि**' **अशेषतः त्यक्तुं शक्नोति इति उक्तं**—निःशेष-सर्व कर्मांचा त्याग करूं शकत नाहीं, असें 'न हि कश्चित्० ' अ. ३.५ या श्लोकानें सांगितलें आहे.—**तु पुनः विद्वान् विद्यया अविद्यायां निवृत्तायां अशेषतः कर्म परित्यक्तुं शक्नोति एव**—पण तोच विद्वान् विद्येनें अविद्या निवृत्त झाली असता अशेषतः कर्मत्याग करण्यास समर्थ होतोच तो सर्व कर्मत्याग करूं शकतो. कारण—**अविद्याध्यारोपितस्य शेषानुपपत्तेः**—विद्येनें अविद्येची निवृत्ति झाल्यावर अविद्येनेंच कल्पिलेल्या कर्मादिकांचा अवशेष राहणे उचित नाहीं.—**तैमिरिकदृष्ट्या अध्यारोपितस्य द्विचन्द्रादेः तिमिरापगमे शेषः न हि अवतिष्ठते**—तिमिररोगाने विकृत झालेल्या दृष्टीनें-भ्रमानें कल्पिलेल्या दोन चंद्रादिकांचा तिमिर दोष गेला असतां अवशेष रहात नाहींच.—**एवं च सति**—आणि विद्वानाचा सर्वकर्मत्याग संभवतो, अशी वस्तुस्थिति असल्यामुळेच—'**सर्वकर्माणि मनसा**'—( अ. ५ श्लो. १३ पृ. ५०४ )—**इत्यादि इदं वचनं उपपन्नं**— सर्व कर्मांचा मनानें त्याग करून० ' इत्यादि हें वचन उपपन्न होतें. ( तसेंच, अविद्वानाच्या सर्वकर्मत्यागाचा असंभव असल्यामुळेंच येथें-)—'**स्वे स्वे कर्मणि अभिरतः संसिद्धिं लभते नरः**'—आपापल्या कर्मामध्यें सर्वप्रकारें रत असलेला पुरुष सिद्धीला प्राप्त होतो व—'**स्वकर्मणा तं अभ्यर्च्य सिद्धिं विंदति मानवः**' **इति च**—त्याचप्रमाणें स्वकर्मानें ईश्वराची पूजा करून मनुष्याला सिद्धि प्राप्त होते, असें जें सांगितलें आहे, तेंहि उपपन्न होतें ४८

**असक्तबुद्धिः सर्वत्र जितात्मा विगतस्पृहः ।**
**नैष्कर्म्यसिद्धिं परमां संन्यासेनाधिगच्छति ॥४९॥**

**अन्वयार्थ—सर्वत्र**—पुत्र, स्त्री इत्यादि सर्वांमध्यें—**असक्तबुद्धिः**—ज्याचें अन्तःकरण आसक्त झालेलें नसतें,—**जितात्मा**—ज्यानें आपल्या अन्तःकरणाला जिंकलें आहे,—**विगतस्पृहः**—ज्याचा देह, जीवित, भोग यांविषयींचीहि स्पृहा नाहींशी झालेली आहे असा आत्मज्ञ—**संन्यासेन**—यथार्थदर्शनरूप संन्यासानें किंवा ज्ञानपूर्वक

सर्व कर्मसंन्यासानें—**परमां नैष्कर्म्यसिद्धिं**—सर्वोत्कृष्ट निष्क्रिय आत्मस्वरूपावस्थान-रूप सिद्धीला—**अधिगच्छति**—प्राप्त होतो ४९.

**या च कर्मजा सिद्धिरुक्ता ज्ञाननिष्ठायोग्यतालक्षणा तस्याः फलभूता नैष्कर्म्यसिद्धि-र्ज्ञाननिष्ठालक्षणा वक्तव्येति श्लोक आरभ्यते—असक्तबुद्धिरसक्ता सङ्गरहिता बुद्धि-रन्तःकरणं यस्य सोऽसक्तबुद्धिः सर्वत्र पुत्रदारादिष्वासक्तिनिमित्तेषु जितात्मा जितो वशीकृत आत्माऽन्तःकरणं यस्य स जितात्मा विगतस्पृहः विगता स्पृहा तृष्णा देहजी-वितभोगेषु यस्मात्स विगतस्पृहः। य एवंभूत आत्मज्ञः स नैष्कर्म्यसिद्धिं निर्गतानि कर्माणि यस्मान्निष्क्रियब्रह्मात्मसंबोधात्स निष्कर्मा तस्य भावो नैष्कर्म्यं नैष्कर्म्यं च तत्सिद्धिश्च सा नैष्कर्म्यसिद्धिर्नैष्कर्म्यस्य वा सिद्धिर्निष्क्रियात्मस्वरूपावस्थानलक्षणस्य सिद्धिर्निष्पत्तिस्तां नैष्कर्म्यसिद्धिं परमां प्रकृष्टां कर्मजसिद्धिविलक्षणां सद्योमुक्त्यवस्था-नरूपां संन्यासेन सम्यग्दर्शनेन तत्पूर्वकेण वा सर्वकर्मसंन्यासेनाधिगच्छति प्राप्नोति। तथा चोक्तं " सर्वकर्माणि मनसा संन्यस्य नैव कुर्वन्न कारयन्नास्ते " इति ॥ ४९ ॥**

**भाष्यार्थ**—( विद्वानाला सर्वकर्मत्याग जरी करितां आला तरी अविद्वानाला तो करितां येत नाहीं, असें सांगितले, आतां गतार्थाचा अनुवाद करून पुढील श्लोकाचें तात्पर्य सांगतात- )—**या च कर्मजा ज्ञाननिष्ठायोग्यतालक्षणा सिद्धिः उक्ता तस्याः फलभूता ज्ञाननिष्ठालक्षणा नैष्कर्म्यसिद्धिः वक्तव्या इति श्लोकः आरभ्यते**—आणि जी कर्मापासून होणारी ज्ञाननिष्ठायोग्यतारूप सिद्धि सांगितली तिची फलभूत ज्ञाननिष्ठारूप नैष्कर्म्यसिद्धि सांगावी, म्हणून हा पुढील श्लोक आरंभिला जातो—**असक्तबुद्धिः-असक्ता सङ्गरहिता बुद्धिः-अन्तःकरणं यस्य सः असक्तबुद्धिः**—असक्तबुद्धि ह्म० ज्याची बुद्धि-अन्तःकरण असक्त-संगरहित असते तो असक्तबुद्धि ( कोठें ? उत्तर- )—**सर्वत्र-पुत्रदारादिषु आसक्तिनिमित्तेषु**—सर्व ठिकाणीं ह्म० पुत्र-स्त्री इत्यादि आसक्तीच्या निमित्तांमध्ये असक्तबुद्धि, ( 'अहोपण, पुत्रादिविषयांमध्यें चित्ताची आसक्ति जरी नसली तरी ते स्वाधीन नसणें शक्य आहे ' अशी शंका घेऊन सांगतात- )—**जितात्मा-जितः-वशीकृतः आत्मा-अन्तः-करणं यस्य सः जितात्मा**—जितात्मा म्ह० जिंकलेला म्ह० वश केलेला आहे आत्मा म्ह० अन्तःकरण ज्याचें तो जितात्मा—**विगतस्पृहः-विगता स्पृहा-तृष्णा देहजीवितभोगेषु यस्मात् सः विगतस्पृहः**—विगतस्पृह, ज्याच्यापासून देह, जीवित, भोग इत्यादिकविषयींची स्पृहा-तृष्णा पार निघून गेली आहे तो विगत-स्पृह-निःस्पृह होय.—**यः एवंभूतः आत्मज्ञः सः नैष्कर्म्यसिद्धिं-निर्गतानि कर्माणि यस्मात् निष्क्रियब्रह्मात्मसंबोधात् सः निष्कर्मा**—जो अशा प्रकारचा सर्वत्र असक्तबुद्धि, जितात्मा व विगतस्पृह आत्मज्ञ तो नैष्कर्म्यसिद्धीला ( प्राप्त होतो, असा संबंध. ) निष्क्रिय ब्रह्मच आत्मा आहे, असा साक्षात्कार झाल्यामुळें ज्याच्यापासून कर्में निघून गेलीं आहेत तो निष्कर्मा होय.—**तस्य भावः नैष्कर्म्यं**—

त्याचा जो भाव ( पणा ) तें नैष्कर्म्य-निष्कर्मत्व ( निष्कर्मपणा )—**नैष्कर्म्यं च तत् सिद्धिः च सा नैष्कर्म्यसिद्धिः**—जें नैष्कर्म्य तीच सिद्धि, अशा नैष्कर्म्यसिद्धीला—**वा नैष्कर्म्यस्य सिद्धिः-निष्क्रिय-आत्मस्वरूपावस्थानलक्षणस्य सिद्धिः-निष्पत्तिः तां नैष्कर्म्यसिद्धिं**—किंवा नैष्कर्म्याची जी सिद्धि म्ह० निष्क्रिय आत्मस्वरूपावस्थानलक्षण निष्कर्मावस्थेची सिद्धि-निष्पत्ति, त्या नैष्कर्म्यसिद्धीला ( त्या सिद्धीचेंच विशेषण- )—**परमां-प्रकृष्टां-कर्मजासिद्धिविलक्षणां सद्योमुक्ति अवस्थास्वरूपां**—परम म्ह० उत्कृष्ट-कर्मानें मिळणाऱ्या सिद्धीहून विलक्षण सद्योमुक्ति-जीवन्मुक्ति अवस्थारूप-जीवन्मुक्त होऊन राहणें या स्वरूपाच्या नैष्कर्म्यसिद्धीला—**संन्यासेन-सम्यग्दर्शनेन वा तत्पूर्वकेण सर्वकर्मसंन्यासेन अधिगच्छति-प्राप्नोति**—संन्यासानें-म्ह० तत्त्वज्ञानानें किंवा तत्त्वज्ञानपूर्वक सर्वकर्मसंन्यासानें संपादन करितो. संन्यासानें नैष्कर्म्यसिद्धीला प्राप्त होतो.—**तथा च " सर्वकर्माणि मनसा संन्यस्य नैव कुर्वन् न कारयन् आस्ते " इति उक्तं**—आणि तसेंच ' सर्व कर्मांचा मनानें त्याग करून कांहीं न करणारा व कांहीं न करविणारा असा शरीरनगरांत राहतो ' असें म्हटलें आहे. ४९

---

१ हा श्लोक फारच महत्त्वाचा आहे. पण रहस्यकारांनीं त्याची ओढाताण करून त्याचा भलताच अर्थ केला आहे. ते म्हणतात—"-'असक्तबुद्धिः सर्वत्र ' म्हणून कोठेंहि आसक्ति न ठेवतां ' जितात्मा ' मन ताब्यांत आणून ' विगतस्पृहः-' निष्काम बुद्धीनें वागलें म्हणजे ' संन्यासेन ' कर्मफलाच्या संन्यासानें ' परमां नैष्कर्म्यसिद्धिं अधिगच्छति ' परम नैष्कर्म्यसिद्धि प्राप्त होते. " हा अर्थ मुळाला धरून नाहीं, हे कोणीहि संस्कृतज्ञ कबूल करील. पण आपण तिकडे दुर्लक्ष करूं पुढें टीपेंत ते म्हणतात—" नैष्कर्म्यसिद्धि मिळण्यास कर्में सोडण्याची जरूर नाहीं. " [गी. ३ ४]..." नैष्कर्म्य म्ह० काय व खरी नैष्कर्म्यसिद्धि कशाला म्हणावें याची फोड आम्ही गी. ३.४ वरील टीपेंत केली आहे, ती पहा." ( पण त्या टीपेचा विचार आम्हींहि तेथेंच सविस्तर केला आहे. [ पृ. २६२ ते २७० ] तो पहा. रहस्यकारांनीं त्या श्लोकाचा जो अर्थ केला आहे तो चुकला आहे. असो; ) " संन्यासमार्गांतील लोकांची दृष्टि केवळ मोक्षावर असते " ( अगदीं खरं आहे; सर्व वैदिकधर्मच मोक्षासाठीं आहे. ) " आणि भगवंताची मोक्ष व लोकसंग्रह या दोहोंवरहि सारखीच असते " ( हें मात्र खोटें आहे. भगवंतांनींहि गीतेचा उपदेश मोक्षासाठींच केला आहे. त्यांनीं श्रेष्ठ कर्माधिकारी ज्ञानी पुरुषाला लोकसंग्रहेच्छा असल्यास असक्त राहून स्वधर्मरूप कर्म करण्याची जी अनुज्ञा दिली आहे तीहि लोकांनीं उन्मार्गी न होतां स्वधर्मानुष्ठानानें अखेर मुक्त व्हावें यासाठीं आहे व त्याविषयीं अद्वैतवेदान्त शास्त्र मुळींच प्रतिकूल नाहीं. बाकी रहस्यकार लोकसंग्रहशब्दाचा जो अर्थ समजतात तो मात्र वेदान्तशास्त्राला संमत नाहीं व भगवानांनाहि संमत असणें शक्य नाहीं. ) " लोकसंग्रहार्थ म्ह० समाजाचें धारणपोषण होण्यास ज्ञानविज्ञानयुक्त पुरुष किंवा रणांगणांत तरवार गाजविणारा शूर क्षत्रिय यांच्याप्रमाणेच शेतकरी, वाणी, उदमी, सुतार, लोहार, कुंभार किंबहुना मांसविक्रय करणारा व्याध यांचीहि जरूर आहे आणि कर्में सोडल्याखेरीज मोक्ष मिळत नाहीं, असें म्हटलं म्हणजे या सर्व लोकांस

आपापले धंदे सोडून संन्यासी व्हावयास पाहिजे. कर्मसंन्यास मार्गांतील लोक याची फारशी परवा करीत नाहींत. पण गीतेची दृष्टि तशी संकुचित नाही. यासाठीं गीता असें सांगते कीं आपल्या अधिकाराप्रमाणे प्राप्त झालेला धंदा सोडून दुसऱ्याचा धंदा चांगला म्हणून तो करूं लागणे योग्य नव्हे " या एकाच उताऱ्यावरून रहस्यकारांनी गीतेच्या अर्थाचा अनर्थ कसा केला आहे, ते तज्ज्ञ वाचकांच्या लक्षांत येईल. गीता वस्तुत: मोक्षसाधनांचा उपदेश करणारी असतांना तिला एखाद्या क्षुद्र लौकिक शास्त्राचें स्वरूप देऊन तिचा दुरुपयोग केला आहे. येथें ' श्रेयान् स्वधर्मः ' ' स्वधर्मे निधनं श्रेयः ' ' स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः ' या वाक्याचा भगवानांना किंवा व्यासांना इष्ट असलेला अर्थ न घेतां स्वतःला अभिप्रेत असलेला अर्थ त्यांवर लादला आहे. धर्मशब्दाचा धंदा हा अर्थ अगदीं अनुचित होय. शेतकरी, वाणी, उदमी, सुतार किंबहुना मास विकणारा यांचे धंदे हा स्वधर्म व त्या स्वधर्मानें मोक्ष मिळणार ! कोण हा अनर्थ ! ! पण हें सांगावयास गीता किंवा भगवान् हवेत कशाला ? जे लोक गीतेला मानीत नाहींत त्या असंख्य लोकांनीं आपले हे धंदे सोडले आहेत कीं काय ? जर सोडले नाहींत तर 'समाजाचें धारणपोषण होण्यास त्यांची जरूर आहे,' हे सांगण्यास गीता कां प्रवृत्त होईल ? शिवाय जे हे धंदे सोडीत नाहांत, ते सर्व मुक्त होणार की काय ? रहस्यकार ! आपल हे तत्त्वज्ञान चुकलें आहे बरें ! ! गीतेंत स्वधर्म हा शब्द अशा लौकिक अर्थी वापरलेला नाही. धंदा पोट भरण्यासाठीं असतो, व धर्म उत्कर्षासाठीं, चित्तशुद्धीसाठी व पापक्षयासाठी असतो. शेतकरी धान्यासाठी शेतकी करितो, वाणी पैशासाठी दुकान घालून क्रयविक्रय सुरू करितो. सुतार, लोहार, खाटिक वगैरे सर्व पोटाकरितां धंदे आरंभितात. ते निष्काम होणेंहि शक्य नाहीं व त्यानें ईश्वराचे अर्चन पूजनहि संभवत नाही. जे कर्म कांहीं अलौकिक फलाच्या उद्देशानें विहित असते किंवा ज्याचे काहीं अलौकिक फल संभवतें तेंच 'निष्काम म्ह० त्या फलाची इच्छा न ठेवितां करा,' असें विधान करितां येत व त्याच्या योगानेच ईश्वराचें पूजन संभवतें. संसार हें ज्यांचें फल मिळावयाचे आहे, ती सर्व पारलौकिक धर्मसदृश सकाम, साभिमान कर्में सोडल्यावाचून मोक्ष मिळणें शक्य नाही. ही त्रिकालाबाधित गोष्ट आहे. मोक्ष सुलभ नाही. तो स्वतः पतकरलेल्या धंद्यानें मिळत नाही. हजारों-लक्षावधि-कोट्यवधि लोकांतील एखादाच मोक्षाची इच्छा करितो. बाकीचे सर्व रहस्यकारांचा लोकसंग्रह करणारेच असतात ( गी. भा. पृ. ६१६ ) व त्याचें विधान करावयास गीता किंवा भगवान् नकोत.व्यवहारापासून निवृत्त होण्याचा उपदेश करावयास मात्र भगवान्, व्यास, आचार्य यांसारखे श्रेष्ठ ज्ञानी पाहिजेत, व उपनिषदे, गीता यांसारखीं श्रेष्ठ शास्त्रे पाहिजेत. प्रवृत्ति प्राणिसाधारण आहे, तिला शास्त्रविधानाची गरज नाहीं. त्यासाठींच संन्यासमार्गी सर्वांना ' मोक्षासाठीं धंदे सोडा ' असें सांगतात, अशी जरी क्षणभर कल्पना केली तरी त्यांच कोणी ऐकणार नाहीं. वस्तुतः वेदान्तशास्त्र अविरक्ताला संन्यास सांगतच नाहीं. पण रहस्यकार या तत्त्वार्थाकडे पाहतात कशाला ? गीतेंत सिद्धीसाठीं ज्या कर्मांचें विधान केलं आहे ती स्वधर्मरूप पारलौकिक कर्में आहेत मोक्षाला कारण होणारीं कर्में लौकिक असणें शक्य नाही. अर्थात् " जें कर्म एकदा आपलें म्हणून पतकरिलें तें कितीहि अप्रिय व कठिण असलें तरी आसक्ति सोडून केलेंच पाहिजे. " हें रहस्यकारांचें म्हणणं गीतेला

सिद्धिं प्राप्तो यथा ब्रह्म तथाऽऽप्नोति निबोध मे ।
समासेनैव कौन्तेय निष्ठा ज्ञानस्य या परा ॥ ५० ॥

**अन्वयार्थ—हे कौन्तेय**—हे कुंतीपुत्रा!—**सिद्धिं प्राप्तः**—ज्ञाननिष्ठेची योग्यता प्राप्त होणें, एतद्रूप सिद्धीला प्राप्त झालेला पुरुष—**यथा**—ज्या प्रकारें—**ब्रह्म**—ब्रह्माला—**प्राप्नोति**—प्राप्त होतो—**तथा**—तो प्रकार—**मे**—माझ्या तोंडून—**समासेन एव**—संक्षेपतःच—**निबोध**—निश्चयानें जाण.—**या**—की, जी—**ज्ञानस्य**—ज्ञानाची—**परा निष्ठा**—पराकाष्ठा आहे. ५०.

**पूर्वोक्तेन स्वकर्मानुष्ठानेनेश्वराभ्यर्चनरूपेण जनितां प्रागुक्तलक्षणां सिद्धिं प्राप्तस्योत्पन्नात्मविवेकज्ञानस्य केवलात्मज्ञाननिष्ठारूपा नैष्कर्म्यलक्षणा सिद्धिर्येन क्रमेण भवति तद्वक्तव्यमित्याह— सिद्धिं प्राप्तः स्वकर्मणेश्वरं समभ्यर्च्य तत्प्रसादजां कायेन्द्रियाणां ज्ञाननिष्ठायोग्यतालक्षणां सिद्धिं प्राप्तः सिद्धिं प्राप्त इति तदनुवाद उत्तरार्थः । किं तदुत्तरं यदर्थोनुवाद इत्युच्यते । यथा येन प्रकारेण ज्ञाननिष्ठारूपेण ब्रह्म परमात्मानमाप्नोति तथा तं प्रकारं ज्ञाननिष्ठाप्राप्तिक्रमं मे मम वचनान्निबोध त्वं निश्चयेनावधारयेत्येतत् । किं विस्तरेण नेत्याह समासेनैव संक्षेपेणैव हे कौन्तेय ॥**

---

धरून नाही. गीता पतकरलेल्या कर्माला मोक्षसाधन म्हणत नाही व ते मोक्षसाधन होणें शक्यहि नाहीं. तसेच "ज्याचे मन शांत असून ज्यानें सर्वभूतान्तर्गत ऐक्य ओळखिलें तो धर्मानें अगर जातीनें व्यापारी असो वा खाटिक असो, निष्कामबुद्धीने हे धंदे करणारा सदर पुरुष स्नानसंध्याशील ब्राह्मणाइतका किंवा शूर क्षत्रिया इतकाच थोर व मोक्षाला अधिकारी आहे" हे म्हणणे अप्रस्तुत आहे. कारण केवल 'मन शांत असणें व ऐक्य ओळखणे' एवढ्यानेच मोक्ष मिळणे शक्य नाहीं. आत्मसाक्षात्कार होऊन स्वरूपी स्थित–स्थितप्रज्ञ ·गुणातीत झाले पाहिजे. तोच मोक्ष होय. स्नानसंध्याशील ब्राह्मणहि जीवन्मुक्त नव्हे व शूर क्षत्रियहि जीवन्मुक्त नव्हे. किंवा स्नानसंध्या व शौर्य हे साक्षात् मोक्षसाधनहि नव्हे. ज्ञानच मोक्षसाधन आहे व शास्त्रोक्त स्वधर्मरूप कर्मच ज्ञानाची योग्यता प्राप्त करून देतें. अर्थात् "कर्मे सोडल्यानें जी सिद्धि मिळावयाची तीच निष्कामबुद्धीनें आपापले धंदे करणारांस मिळते असे ४९ व्या श्लोकांत स्पष्ट म्हटले आहे" हे म्हणणे निराधार आहे. ४९ व्या श्लोकात तसें म्हटलेले नाही. शिवाय कर्मे सोडल्याने कोणतीच सिद्धि मिळत नाहीं. ज्ञानानें–आत्मसाक्षात्काराने मोक्ष मिळतो. कर्मांनीं नाही. आपापले धंदे निष्कामबुद्धीने होणें शक्य नाही. मग पारमार्थिक सिद्धीचें नांव कशाला? धंद्याची सिद्धि म्ह० त्यांत बरकत होणें हीच आहे. "भागवत धर्मांतील जें काय रहस्य तें हेंच होय." पण भागवत धर्मांत जीं कर्में ईश्वरार्पणबुद्धीनें करावयास सांगितलीं आहेत तीं यज्ञ-दानतपोरूप नित्य कर्में होत; खाटीक, चांभार वगैरेंचा धंदा नव्हे. यासाठीं महाराष्ट्र संतमंडळाचा रहस्यकार शेवटीं हवाला देतात, पण तोहि अस्थानी आहे. कारण महाराष्ट्रांतील साधुसंत निवृत्त होते, प्रवृत्त नव्हते. धंदा पोटासाठी असतो. त्याचा मोक्षाशीं कांहीं संबंध नाही.

**भाष्यार्थ—पूर्वोक्तेन ईश्वराभ्यर्चनरूपेण स्वकर्मानुष्ठानेन जनितां प्राक्-उक्तलक्षणां सिद्धिं प्राप्तस्य उत्पन्न-आत्मविवेकस्य**—पूर्वी सांगितलेल्या क्रमानें ईश्वरार्चनरूप स्वकर्मानुष्ठानानें उत्पन्न झालेली-मिळविलेली जी पूर्वोक्त लक्षणाची सिद्धि तिला प्राप्त झालेल्या म्ह० ज्याला आत्मविवेक उत्पन्न झाला आहे अशा पुरुषाची **—केवल-आत्मज्ञाननिष्ठारूपा नैष्कर्म्यलक्षणा सिद्धिः येन क्रमेण भवति तत् वक्तव्यं इति आह**—केवल आत्मज्ञाननिष्ठारूप नैष्कर्म्यलक्षण सिद्धि ज्या क्रमानें होते ते सांगावें म्हणून भगवान् म्हणतात—**सिद्धिं प्राप्तः स्वकर्मणा ईश्वरं समभ्यर्च्य**—सिद्धीला प्राप्त झालेला म्ह० स्वकर्माने ईश्वराचें अभ्यर्चन-पूजन करून—**तत्प्रसादजां कायेन्द्रियाणां ज्ञाननिष्ठायोग्यतालक्षणां सिद्धिं प्राप्तः**—त्याच्या प्रसादाने प्राप्त झालेल्या शरीरेंद्रियांच्या ज्ञाननिष्ठायोग्यतारूप सिद्धीला प्राप्त झालेला;—**'सिद्धिं प्राप्तः' इति तदनुवादः उत्तरार्थः**—'सिद्धिं प्राप्तः' असा जो त्याचा अनुवाद केला आहे तो पुढील विषयासाठीं आहे.—**किं तत् उत्तरं यदर्थः अनुवादः इति उच्यते**—तें उत्तर-पुढील विषय काय आहे कीं, ज्याच्यासाठीं हा अनुवाद आहे, म्हणून विचाराल तर सांगितलें जातें-सिद्धीला प्राप्त झालेला—**यथा-येन प्रकारेण-ज्ञाननिष्ठारूपेण ब्रह्म-परमात्मानं आप्नोति**—जसा-ज्या प्रकारें ज्या ज्ञाननिष्ठारूप प्रकारानें ब्रह्माला-परमात्म्याला प्राप्त होतो—**तथा-तं प्रकारं-ज्ञाननिष्ठाप्राप्तिक्रमं मे-मम वचनात् निबोध-त्वं निश्चयेन अवधारय इति एतत्**—तसे-त्या प्रकाराला-ज्ञाननिष्ठाप्राप्तीच्या क्रमाला माझ्या वचनावरून तूं जाण-तूं निश्चयानें तो क्रम समजून घे, असा याचा भावार्थ.—**किं विस्तरेण**—तो क्रम विस्तारानें सांगणार की काय ? ( कारण विस्ताराने सांगितल्यास दुर्बोध होईल उत्तर-)—**न इति आह**—नाहीं, विस्ताराने सांगत नाहीं. तर—**हे कौन्तेय, समासेन एव-संक्षेपेण एव**—हे कुन्तीपुत्रा, समासानेंच-संक्षेपानेंच सांगतो.

यथा ब्रह्म प्राप्नोति तथा निबोधेति अनेन या प्रतिज्ञाता ब्रह्मप्राप्तिस्तामिदंतया दर्शयितुमाह निष्ठा ज्ञानस्य या परेति । निष्ठा पर्यवसानं परिसमाप्तिरित्येतत् । कस्य ब्रह्मज्ञानस्य या परा परिसमाप्तिः । कीदृशी सा यादृशमात्मज्ञानम् । कीदृक्तत् यादृश आत्मा । कीदृशोऽसौ, यादृशो भगवतोक्त उपनिषद्वाक्यैश्च न्यायतश्च ॥

**भाष्यार्थ**—( चतुर्थपादाची पूर्वपादाशीं संगति लागत नाहीं अशी आशंका घेऊन सांगतात-)—**'यथा ब्रह्म प्राप्नोति तथा निबोध' इति अनेन या प्रतिज्ञाता ब्रह्मप्राप्तिः**—'ज्या प्रकारें ब्रह्माला प्राप्त होतो तो प्रकार ऐक' या वाक्यानें जी ब्रह्मप्राप्ति प्रतिज्ञात आहे म्ह० ज्या ब्रह्मप्राप्तीची प्रतिज्ञा केली आहे—**तां इदंतया दर्शयितुं. 'निष्ठा ज्ञानस्य या परा' इति आह**—त्या ब्रह्मप्राप्तीलाच 'ही ती' या रीतीनें प्रत्यक्ष दाखविण्यासाठीं 'जी ज्ञानाची परानिष्ठा' असें भगवान् सांगत आहेत.—**निष्ठा-पर्यवसानं-परिसमाप्तिः इति एतत्**—निष्ठा म्ह० पर्यवसान

परिसमाप्ति, असा भावार्थ—**कस्य, ब्रह्मज्ञानस्य या परा परिसमाप्तिः**—कोणाची परिसमाप्ति ? ( उत्तर– ) ब्रह्मज्ञानाची जी परा परिसमाप्ति तीच प्रकृत ज्ञानाची निष्ठा आहे. ( पण ब्रह्मज्ञानाची परा निष्ठा प्रसिद्ध नाहीं. त्यामुळें ती साधनानुष्ठानाधीन म्ह० साधनानुष्ठानानें साध्य होणारी असेल अशा आशयानें प्रश्न– )—**कीदृशी सा**—पण ती ब्रह्मज्ञाननिष्ठा कशाप्रकारची आहे ? ( प्रसिद्ध आत्मज्ञानाच्या अनुरोधानें ब्रह्मज्ञाननिष्ठा अनायासानें कळण्यासारखी आहे, अशा आशयानें उत्तर– )—**यादृशं आत्मज्ञानं**—जशा प्रकारचें आत्मज्ञान तशाच प्रकारचे ब्रह्मज्ञान आहे. ( पण आत्मज्ञान तरी कोठें सिद्ध झालें आहे ? अशा आशयानें पुनः प्रश्न– )—**कीदृक् तत्**—तें आत्मज्ञान कशाप्रकारचें आहे ? ( ' अर्थे नैव विशेषो हि ' ज्ञान व त्याचा विषय यांत फरक कांहींच नाहीं, या न्यायानें उत्तर– )—**यादृशः आत्मा**—जशा प्रकारचा आत्मा तशाच प्रकारचें तें आत्मज्ञान आहे. ( पण आत्म्याविषयींहि निश्चय कांहींच नाहीं, त्याविषयीं अनेकांचीं अनेक मतें आहेत. म्हणून आत्म्याविषयीं पुनः प्रश्न– )—**असौ कीदृशः**—पण तो आत्मा कशा प्रकारचा आहे ? ( याचें उत्तर– )—**यादृशः भगवता उक्तः उपनिषद्वाक्यैः च न्यायतः च**—जशा प्रकारचा भगवानांनीं सांगितला आहे, उपनिषद्वाक्यांनीं उपदेशिला आहे, व न्यायानें सिद्ध झालेला आहे, तसा.

ननु विषयाकारं ज्ञानं न विषयो नाप्याकारवानात्मेष्यते क्वचित् । ननु ' आदित्यवर्णं भारूपः स्वयंज्योतिः ' इत्याकारवत्त्वमात्मनः श्रूयते, न तमोरूपत्वप्रतिषेधार्थत्वात्तेषां वाक्यानाम् । द्रव्यगुणाद्याकारप्रतिषेध आत्मनस्तमोरूपत्वे प्राप्ते तत्प्रतिषेधार्थान्यादित्यवर्णमित्यादिवाक्यानि, अरूपमिति च विशेषतो रूपप्रतिषेधात् । अविषयत्वाच्च " न संदृशे तिष्ठति रूपमस्य न चक्षुषा पश्यति कश्चनैनम् " " अशब्दमस्पर्शम् " इत्याद्यैः । तस्मादात्माकारं ज्ञानमित्यनुपपन्नम् । कथं तर्ह्यात्मनो ज्ञानम् । सर्वं हि यद्विषयं ज्ञानं तत्तदाकारं भवति निराकारश्चाऽऽत्मेत्युक्तम् । ज्ञानात्मनोश्चोभयोर्निराकारत्वे कथं तद्भावनानिष्ठेति ॥

भाष्यार्थ—( यावर आक्षेप– )—**ननु विषयाकारं ज्ञानं न विषयः नापि आकारवान् आत्मा क्वचित् इष्यते**—अहोपण, विषयाकार ज्ञान असतें, आणि आत्मा विषय आहे असेंहि कधीं कोणी मानीत नाहींत व आकारवान् आहे, असेंहि कधीं कोणी म्हणत नाहींत. ( यावर सिद्धान्ती प्रतिशंका घेतात– )—**ननु 'आदित्यवर्णं भारूपः स्वयंज्योतिः' इति आत्मनः आकारवत्त्वं श्रूयते**—अहोपण, ' आदित्यवर्ण, प्रकाशरूप, स्वयंप्रकाश ' इत्यादि वचनांत आत्म्याचें आकारवत्त्व श्रुत आहे. म्ह० आत्म्याला आकार-स्वरूप आहे हें श्रुतिसिद्ध आहे. ( पूर्ववादी याचें समाधान करितो– )—**न । तेषां वाक्यानां तमोरूपत्वप्रतिषेधार्थत्वात्**—असें नाहीं. कारण त्या वाक्यांना तमोरूपत्वप्रतिषेधार्थत्व आहे. म्ह० तीं वाक्यें आत्म्याच्या तमोरूपत्वाचा निषेध करणारीं आहेत. ( म्ह० त्यांचें तात्पर्य श्रुत अर्थी नाहीं. या समाधानाचेंच वादी अधिक स्पष्टीकरण करितो– )—**द्रव्य-गुणादि-आकारप्रतिषेधे आत्मनः तमो-**

**रूपत्वे प्राप्ते तत्प्रतिषेधार्थानि 'आदित्यवर्णं' इत्यादिवाक्यानि**— द्रव्य, गुण इत्यादि आकारांचा प्रतिषेध केला असतां आत्म्याला तमोरूपत्व प्राप्त होतें, त्याचा प्रतिषेध करण्यासाठीं 'आदित्यवर्णं' श्वेता. ३.८ इत्यादि वाक्यें आहेत. ( आत्म्याचा आकार सांगण्यासाठीं तीं वाक्यें नाहींत. याहि कारणानें आत्म्याला आकारवत्त्व नाहीं, असें सांगतात–)—**'अरूपं' इति च विशेषतः रूपप्रतिषेधात्**— 'अरूपं०' ( का. भा. ३.१५ पृ. ९० ) इत्यादि श्रुतीनें विशेषेंकरून रूपाचा प्रतिषेध केला आहे. ( आतां आत्मा विषय नाहीं, असें जे वर आक्षेपात म्हटले आहे त्याचें उपपादन–)—**अविषयत्वात् च**—आणि आत्मा अविषय असल्यामुळेंहि आत्मज्ञान संभवत नाहीं, ( आत्मा इंद्रियांचा विषय होत नाहीं, याविषयी श्रुति–)—**'न संदृशे तिष्ठति रूपमस्य न चक्षुषा पश्यति कश्चन एनं'** —( श्वेता. ४.२० ) **'अशब्दमस्पर्शं' इत्याद्यैः**—( का. भा. ३.१५ पृ. ९० )–परमात्म्याचें रूप इंद्रियांच्या सन्मुख स्थित होत नाहीं. त्याला चक्षुरिंद्रियानें कोणी पहात नाहीं. ' अशब्द, अस्पर्श, अरूप, ' इत्यादि श्रुतिवाक्यांनीं आत्मा निर्विषय आहे, असें सांगितलें आहे.—**तस्मात् आत्माकारं ज्ञानं इति अनुपपन्नं**—यास्तव आत्माकार ज्ञान होते हें म्हणणें अनुपपन्न आहे. ( यावर एकदेशी वेदान्ती शंका घेतो–)—**तर्हि आत्मनः ज्ञानं कथं**—तर मग [ म्ह० ज्ञानाला आत्माकारत्व जर मुळीं संभवतच नाहीं तर ] आत्म्याचें ज्ञान कसें होणार?—**हि सर्वं यद्विषयं ज्ञानं तत्तदाकारं भवति**—कारण सर्वच ज्ञान ज्या विषयाचें असते त्या त्या विषयाच्या आकाराचें होतें, हें प्रसिद्ध आहे. —**च आत्मा निराकारः इति उक्तं**—व आत्मा निराकार आणि निर्विषय आहे, असें म्हटलें आहे. ( त्यामुळे आत्म्याला विषयत्वहि नाहीं. बरें, आत्म्याप्रमाणें त्याच्या ज्ञानालाहि निराकारत्व असेल म्हणून म्हणावें तर–)—**च ज्ञानात्मनोः उभयोः निराकारत्वे तद्भावनानिष्ठा कथं इति**—आणि ज्ञान व आत्मा या दोहोंनाहि निराकारत्व मानल्यास म्ह० तीं दोन्ही निराकार आहेत, असें म्हटल्यास आत्मज्ञानाची भावनानिष्ठा कशी होणार? [ आत्मज्ञानाचें पुनः पुनः अनुसंधान करणें ही भावना, तिची निष्ठा म्ह० समाप्ति–आत्मसाक्षात्काराची दृढता. आत्मा व ज्ञान या दोहोंनाहि निराकार मानल्यास त्यांतील कांहींच संभवत नाहीं, असा भावार्थ. ]

**. न । अत्यन्तनिर्मलत्वस्वच्छत्वसूक्ष्मत्वोपपत्तेरात्मनो बुद्धेश्चाऽऽत्मसमनैर्मल्याद्युपपत्तेरात्मचैतन्याकाराभासत्वोपपत्तिः । बुद्ध्याभासं मनस्तदाभासानीन्द्रियाणीन्द्रियाभासश्च देहोऽतो लौकिकैर्देहमात्र एवाऽऽत्मदृष्टिः क्रियते । देहचैतन्यवादिनश्च लोकायतिकाश्चैतन्यविशिष्टः कायः पुरुष इत्याहुः, तथाऽन्य इन्द्रियचैतन्यवादिनः । अन्ये मनश्चैतन्यवादिनः । अन्ये बुद्धिचैतन्यवादिनः । ततोऽप्यन्तरमव्यक्तमव्याकृताख्यमविद्यावस्थमात्मत्वेन प्रतिपन्नाः केचित् सर्वत्र हि बुद्ध्यादिदेहान्ते आत्मचैतन्याभासताऽऽत्मभ्रान्तिकारणमित्यत आत्मविषयं ज्ञानं न विधातव्यं किं तर्हि नामरूपाद्यनात्माध्यारोपण-**

**निवृत्तिरेव कार्या नाऽऽत्मचैतन्यविज्ञानमविद्याध्यारोपितसर्वपदार्थाकारैरेव विशिष्टतया गृह्यमाणत्वात् ॥**

**भाष्यार्थ**—( सिद्धान्ती याचें समाधान करितात- )—**न**—हा आक्षेप बरोबर नाहीं.—**आत्मनः अत्यन्तनिर्मलत्व-स्वच्छत्व सूक्ष्मत्व उपपत्तेः**—आत्म्याचें अत्यंत निर्मलत्व, स्वच्छत्व, सूक्ष्मत्व उपपन्न होत असल्यामुळे—**च बुद्धेः आत्मसमनैर्मल्यादि-उपपत्तेः**—व आत्म्याच्या निर्मलत्वादिकांसारखेंच बुद्धीचें निर्मलत्वादिक उपपन्न होत असल्यामुळें—**आत्मचैतन्याकार-आभासत्वोपपत्तिः**—बुद्धींतील आत्मचैतन्याकार आभासत्वाची उपपत्ति लागते-बुद्धीत आत्मचैतन्याचा आभास संभवतो. [ बुद्धि आत्म्यासारखीच निर्मल वगैरे असल्यामुळें ती आत्मचैतन्याच्या आभासानें व्याप्त म्ह० ज्ञानपरिणामाने युक्त होते. ]—**बुद्ध्याभासं मनः तदाभासानि इन्द्रियाणि इन्द्रियाभासः च देहः**—साभासबुद्धीने व्यापलेले मन असतें. साभास मनाने व्याप्त इंद्रियें असतात व साभास इंद्रियांनीं व्याप्त स्थूल देह असतो. ( याविषयीं लौकिक भ्रांतीचेच प्रमाण देतात- )—**अतः लौकिकैः देहमात्रे एव आत्मदृष्टिः क्रियते**—म्हणूनच सामान्य प्राकृत लोकांकडून केवल देहामध्येंच आत्मदृष्टि केली जाते. म्हणजे ' केवल देहच मी-आत्मा ' असे म्हटलें जातें.—**च देहचैतन्यवादिनः लोकायतिकाः चैतन्यविशिष्टः कायः पुरुषः इति आहुः**—आणि ' देहच चैतन्य-आत्मा ' असे म्हणणारे चार्वाकादि लोकायतिक चैतन्यविशिष्ट शरीरच पुरुष आहे, असें म्हणतात. [ म्ह० देहच आत्मा असें मानणारे लोक जगांत आहेत. ]—**तथा अन्ये इंद्रियचैतन्यवादिनः**—तसेच दुसरे इंद्रियचैतन्यवादी आहेत.—**अन्ये मनश्चैतन्यवादिनः**—आणखी कित्येक मनच आत्मा असे म्हणणारे आहेत. **अन्ये बुद्धिचैतन्यवादिनः**—दुसरे पुष्कळसे लोक बुद्धि हाच आत्मा असें म्हणणारे आहेत.—**ततः अपि अन्तर्-अव्यक्तं अव्याकृताख्यं अविद्यावस्थं आत्मत्वेन प्रतिपन्नाः केचित्**—त्या बुद्धीच्याहि आंत-पलीकडे असलेल्या अव्यक्त-अव्याकृतसंज्ञक अविद्यावस्थ आभासरूप अन्तर्यामिला आत्मत्वानें पहाणारे-सुषुप्त्यवस्थ आभासयुक्त अन्यर्यामिला आत्मा मानणारे कांहीं-कारणोपासक आहेत. (पण देहापासून बुद्धीपर्यंत कार्यामध्यें लौकिक परीक्षकांनाहि आत्मभ्रांति होण्याचें साधारण कारण सांगतात- )—**बुद्ध्यादि-देहान्ते सर्वत्र हि आत्मचैतन्याभासता आत्मभ्रान्ति-कारणं**—याप्रमाणें बुद्धीपासून देहापर्यंत सर्व कार्यामध्यें आत्मचैतन्याभासाची व्याप्ति असणें हेंच त्यांतील प्रत्येक आत्मा आहे, अशी भ्रांति होण्याचें कारण आहे. [ अर्थात् आत्मज्ञान याप्रमाणें लौकिकपरीक्षकांना माहित असल्यामुळें-तें प्रसिद्ध असल्यामुळें तें विधीचा विषय होत नाहीं असें सांगतात- ]—**इति-अतः आत्मविषयं ज्ञानं न विधातव्यं**—यास्तव म्ह० आत्मज्ञान लौकिकपरीक्षकांनाहि संमत असल्यामुळें, सिद्धच असलेल्या त्या आत्मविषयक ज्ञानाचें-आत्मज्ञानाचें विधान करावयास नको.—**किं तर्हि नामरूपादि-अनात्माध्यारोपणनिवृत्तिः एव कार्या**—तर मग काय?

नाम-रूपादि अनात्म्यांचा आत्म्यावर जो अध्यारोप केला आहे त्याची फक्त निवृत्तिच तेवढी करणें उचित आहे—**न आत्मचैतन्यविज्ञानं**—आत्मचैतन्यविज्ञान विधेय नाहीं, त्याचें विधान होऊं शकत नाहीं. कारण—**अविद्याध्यारोपितसर्वपदार्थाकारैः एव विशिष्टतया गृह्यमाणत्वात्**—अविद्येनें अध्यारोपित जे सर्व पदार्थ त्यांच्या आकारांनी विशिष्ट, अशा स्वरूपानेच त्याचें ग्रहण केलें जातें. त्यामुळें तें आत्मविज्ञान विधेय नाहीं

**अत एव हि विज्ञानवादिनो बौद्धा विज्ञानव्यतिरेकेण वस्त्वेव नास्तीति प्रतिपन्नाः प्रमाणान्तरनिरपेक्षतां च स्वसंविदितत्वाभ्युपगमेन । तस्मादविद्याध्यारोपणनिराकरणमात्रं ब्रह्मणि कर्तव्यं न तु ब्रह्मज्ञाने यत्नोऽत्यन्तप्रसिद्धत्वात् । अविद्याकल्पितनामरूपविशेषाकारापहृतबुद्धित्वादत्यन्तप्रसिद्धं सुविज्ञेयमासन्नतरमात्मभूतमप्यप्रसिद्धं दुर्विज्ञेयमतिदूरमन्यदिव च प्रतिभात्यविवेकिनाम् । बाह्याकारनिवृत्तबुद्धीनां तु लब्धगुर्वात्मप्रसादानां नातःपरं सुखं सुप्रसिद्धं सुविज्ञेयं स्वासन्नमस्ति । तथा चोक्तं ' प्रत्यक्षावगमं धर्म्यम् ' इत्यादि ॥**

**भाष्यार्थ**—( उपलब्ध होणारे जे देह, इन्द्रियें, मन, बुद्धि व अव्यक्त त्यांसह चैतन्याचा अनुभव येतो, त्यावांचून त्यांचा अनुभव येत नाहीं, कारण तीं सर्व जड आहेत, याविषयीं विज्ञानवादी बौद्धांच्या भ्रांतीचें प्रमाण देतात-)—**अतः एव हि विज्ञानवादिनः बौद्धाः विज्ञानव्यतिरेकेण वस्तु-एव नास्ति इति प्रतिपन्नाः**—म्हणूनच विज्ञानवादी बौद्ध विज्ञानावांचून वस्तूच नाहीं, असें समजले. ( सर्व ज्ञेय ज्ञानानें व्याप्त झालेलें असेंच ज्ञात होतें. त्यामुळे त्यांना ज्ञानातिरिक्त वस्तूच संमत नाहीं. कारण स्वप्नांत पाहिलेली वस्तु ज्ञानाहून भिन्न नसते, अशा रीतीनें त्यांना भ्रम होत असतो. पण ज्ञानहि ज्ञेय असल्यामुळे त्याला जाणणारें दुसरें कांहीं तरी पाहिजे, असें कोणी म्हणेल म्हणून-)—**च स्वसंविदितत्वाभ्युपगमेन प्रमाणान्तरनिरपेक्षतां**—आणि तसेंच ज्ञान स्वतःलाच जाणतें-तें स्वसंवेद्य आहे असें मानून त्याला दुसऱ्या प्रमाणाची अपेक्षा नाहीं, असे ते समजले आहेत. ( याप्रमाणें सर्व वाद्यांच्या मतानेंच ब्रह्मात्म्यामध्यें ज्ञान सिद्ध असल्यामुळे त्याला विधेयत्व नाहीं. तें विधीचा विषय होत नाहीं, असें ठरलें असतां फलित सांगतात-)—**तस्मात् ब्रह्मणि अविद्याध्यारोपणनिराकरणमात्रं कर्तव्यं**—म्हणून ब्रह्मामध्यें अविद्येमुळें अनात्मधर्मांचा जो आरोप केलेला आहे त्याचें निराकरणमात्र करावें.—**तु ब्रह्मज्ञाने यत्नः न (कर्तव्यः) अत्यन्तप्रसिद्धत्वात्**—पण ब्रह्मज्ञानाविषयीं भावना या नांवाचा यत्न करावयास नको. कारण ब्रह्म अत्यन्त प्रसिद्ध आहे. (अहोपण, ब्रह्म व त्याचें ज्ञान जर अत्यन्त प्रसिद्ध आहे तर लौकिक जनांची त्याविषयीं भलतीच कल्पना कां होते ? उत्तर-)—**अविद्याकल्पितनामरूप-विशेषाकार-अपहृतबुद्धित्वात्**—अविद्येनें कल्पिलेलें जें नाम, रूप, विशेष व आकार त्यांनीं बुद्धीचा अपहार केल्यामुळें-त्या कल्पित नामरूपांत बुद्धि आसक्त झाल्यामुळें—**अत्यन्तप्रसिद्धं सुविज्ञेयं आसन्नतरं आत्मभूतं**

**अपि अविवेकिनां अप्रसिद्धं दुर्विज्ञेयं अतिदूरं अन्यत् इव च प्रतिभाति** —अत्यन्त प्रसिद्ध, अनायासानें साक्षात् कळण्यासारखें, अगदीं समीप असलेलें व आत्मभूत असेंहि तें ब्रह्म अविवेक्यांना अप्रसिद्ध, दुर्विज्ञेय, अतिदूर व स्वतःहून पृथक् असल्यासारखें भासतें.—**बाह्याकारानिवृत्तबुद्धीनां तु लब्धगुर्वात्मप्रसादानां अतःपरं सुखं सुप्रसिद्धं सुविज्ञेयं स्वासन्नं न अस्ति**—पण ज्यांची बुद्धि बाह्य आकारांपासून निवृत्त झाली आहे, ज्यांना शुश्रूषादि उपायांनीं संतुष्ट झालेल्या आचार्यांचा व स्वतःच्या बुद्धीचा प्रसाद प्राप्त झाला आहे, त्यांना या ब्रह्माच्या पलीकडे सुखस्वरूप, सुप्रसिद्ध, सुविज्ञेय व अत्यन्त समीप अशी दुसरी वस्तुच नाहीं. [गुरुप्रसाद म्ह० वर सांगितल्याप्रमाणें संतुष्टचित्त झालेल्या आचार्यांचा 'याला आतां तत्त्वसाक्षात्कार होऊं दे' असा अनुग्रह व आत्मप्रसाद म्ह० ज्याला तत्त्वमस्यादिपदांचें ज्ञान व वाक्यार्थज्ञान झालें आहे त्यानें श्रौतयुक्तींचें अनुसंधान केल्यामुळें आत्म्याच्या स्वरूपाविषयींचा निश्चय होऊन एकाग्र बुद्धीनें विषयांपासून विमुख होऊन आत्मोन्मुख होणें; असे हे दोन प्रसाद ज्याला प्राप्त झाले आहेत त्याला ब्रह्म अत्यन्त प्रसिद्ध आहे, अत्यन्त सुखरूप आहे, अत्यन्त सुविज्ञेय आहे व आत्मरूपच असल्यामुळें अत्यन्त समीप आहे, याविषयीं मुळींच संशय रहात नाहीं. आत्मज्ञान आत्म्याच्या द्वारा अतिशय प्रसिद्ध आहे, याविषयींच प्रमाण-]—**तथा च प्रत्यक्षावगमं धर्म्यं इति उक्तं**—आणि 'प्रत्यक्षावगमं धर्म्यं' साक्षात् अनुभवास योग्य व धर्माला सोडून नसलेलें, असें हें ज्ञान आहे, या वाक्यानें (अ. ९.२. पृ. ६८३) मागें तसें सांगितलें आहे.

**केचित्तु पण्डितंमन्या निराकारत्वादात्मवस्तु नोपैति बुद्धिरतो दुःसाध्या सम्यग्ज्ञाननिष्ठेत्याहुः। सत्यमेवं गुरुसंप्रदायरहितानामश्रुतवेदान्तानामत्यन्तबहिर्विषयासक्तबुद्धीनां सम्यक्प्रमाणेष्वकृतश्रमाणां, तद्विपरीतानां तु लौकिकग्राह्यग्राहकद्वैतवस्तुनि सद्बुद्धिर्नितरां दुःसंपाद्याऽऽत्मचैतन्यव्यतिरेकेण वस्त्वन्तरस्यानुपलब्धेः। यथा चैतदेवमेव नान्यथेत्यवोचाम। उक्तं च भगवता—'यस्यां जाग्रति भूतानि सा निशा पश्यतो मुनेः' इति। तस्माद्बाह्याकारभेदबुद्धिनिवृत्तिरेवाऽऽत्मस्वरूपालम्बने कारणम्॥**

**भाष्यार्थ**—(यावर ज्ञाननिष्ठा दुःसाध्य आहे, असा आक्षेप-)—**तु केचित् पंडितंमन्याः**—पण कित्येक पंडितंमन्य—**निराकारत्वात् बुद्धिः आत्मवस्तु न उपैति**—आत्मा निराकार असल्यामुळें बुद्धि आत्मवस्तूला प्राप्त होत नाहीं—**अतः सम्यग्ज्ञाननिष्ठा दुःसाध्या इति आहुः**—त्यामुळें तत्त्वज्ञाननिष्ठा दुःसाध्य आहे, असें म्हणतात. —**सत्यं एवं**—हें त्यांचें म्हणणें खरें आहे. (पण ते कोणाविषयीं? बहिर्मुखांविषयीं, अन्तर्मुखांविषयीं नव्हे, असें सांगतात-)—**गुरुसंप्रदायरहितानां अश्रुतवेदान्तानां अत्यन्तबहिर्विषयासक्तबुद्धीनां सम्यक्प्रमाणेषु अकृतश्रमाणां** —ज्यांना गुरुसंप्रदाय नाहीं, त्यामुळें ज्यांनीं वेदान्ताचें श्रवण केलेलें नाहीं, त्यामुळें ज्यांची बुद्धि बाह्य विषयांमध्यें अत्यंत आसक्त आहे व त्यामुळेंच ज्यांनीं यथार्थप्रमाणांविषयीं परिश्रम केलेले नाहींत त्यांना ज्ञाननिष्ठा दुःसाध्य आहे, हें अगदीं खरें;—

**तु तद्विपरीतानां लौकिकग्राह्यग्राहकद्वैतवस्तुनि सद्बुद्धिः नितरां दुःसंपाद्या**—पण त्यांच्या विपरीत असलेले जे लोक म्ह० ज्यांना गुरुसंप्रदाय आहे, ज्यांनीं वेदान्तश्रवण केलें आहे, ज्यांची बुद्धि बाह्य विषयासक्त नाहीं, व ज्यांनीं सम्यक्प्रमाणाविषयीं परिश्रम केले आहेत म्ह० जे अद्वैतनिष्ठ झाले आहेत त्यांची लौकिक ग्राह्यग्राहकरूप-विषयेंद्रियरूप द्वैत वस्तूमध्ये सद्बुद्धि होणें-म्ह० हें ग्राह्यग्राहकरूप द्वैत सत्य आहे, अशी बुद्धि होणे फारच कठिण आहे. त्यांची तशी भावना होणें शक्य नाहीं. कारण—**आत्मचैतन्यव्यतिरेकेण वस्त्वन्तरस्य अनुपलब्धेः**—आत्मचैतन्यावांचून त्यांना दुसरी वस्तु मुळीं उपलब्धच होत नाहीं.—**यथा च एतत् एवं एव अन्यथा न इति अवोचाम**—आणि ज्याप्रकारें हें असेच आहे याहून विपरीत नाहीं, म्ह० अद्वैत हीच एक नित्य वस्तु असून द्वैत अविद्याकल्पित आहे, ते तात्त्विक केव्हांहि नव्हे, आणि हीच गोष्ट अगदीं निर्विवाद आहे, त्याप्रकारें आम्हीं या पूर्वींहि ठिकठिकाणीं उपपादन केलें आहे. ( अन्तर्निष्ठ अद्वैतदर्शी पुरुषांची द्वैतामध्यें सद्बुद्धि नसते याविषयीं भगवानांची संमति दाखवितात- )—'**यस्यां जाग्रति भूतानि सा निशा पश्यतो मुनेः' इति भगवता उक्तं च**—'ज्या द्वैतावस्थेंत सर्व भूतें जागतात ती ज्ञानी पुरुषाची रात्र आहे' असें भगवानांनींहि सांगितलेंच आहे. ( अ. २ श्लो. ६९ पृ. २२०. )—**तस्मात् बाह्याकारभेदबुद्धिनिवृत्तिः एव आत्मस्वरूपालम्बने कारणं**—तस्मात् बाह्याकारभेदबुद्धीची निवृत्ति हेंच आत्मस्वरूपाच्या आलंबनाचें कारण आहे. भेदबुद्धि टाकल्यानेंच आत्मज्ञाननिष्ठ होतां येते.

**न ह्यात्मा नाम कस्यचित्कदाचिदप्रसिद्धः प्राप्यो हेय उपादेयो वा । अप्रसिद्धे हि तस्मिन्नात्मनि अस्वार्थाः सर्वाः प्रवृत्तयः प्रसज्येरन् । न च देहाद्यचेतनार्थत्वं शक्यं कल्पयितुम् । न च सुखार्थं सुखं दुःखार्थं वा दुःखमात्मावगत्यवसानार्थत्वाच्च सर्वव्यवहारस्य । तस्माद्यथा स्वदेहस्य परिच्छेदाय न प्रमाणान्तरापेक्षा ततोऽप्यात्मनोऽन्तरतमत्वात्तदवगतिं प्रति न प्रमाणान्तरापेक्षेत्यात्मज्ञाननिष्ठा विवेकिनां सुप्रसिद्धेति सिद्धम् ॥**

**भाष्यार्थ**—( अहोपण, आत्मा जर कोणत्याहि प्रकारें सम्यग्ज्ञान या क्रियेनें साध्य होत असेल तर हेय किंवा उपादेय यांतील कोणत्या तरी कोटींत त्याचा संनिवेश होऊन क्रियासाध्य असल्यामुळें स्वर्गाप्रमाणेच असिद्ध ठरेल, अशी आशंका घेऊन सांगतात- ) —**आत्मा नाम कस्यचित् कदाचित् अप्रसिद्धः प्राप्यः हेयः उपादेयः वा न हि**—आत्मा हा कोणालाच केव्हांच अप्रसिद्ध प्राप्य-प्राप्त करून घेण्यास योग्य, त्याज्य, किंवा ग्राह्य नाहीं. [ कारण तो आत्माच असल्यामुळे कोणालाच अप्रसिद्ध असणें शक्य नाहीं. त्यामुळेंच तो नित्य प्राप्त आहे. म्हणूनच अनात्मपदार्थांतील जें अनिष्ट-दुःखसाधन असेल तें हेय-त्याज्य व इष्ट-सुखसाधन असेल ते उपादेय-ग्राह्य असतें. तसा हा हेय किंवा उपादेय नाहीं. त्यामुळें तो क्रियासाध्य नाहीं. ]—**तस्मिन् आत्मनि अप्रसिद्धे हि सर्वाः प्रवृत्तयः अस्वार्थाः प्रसज्येरन्**—तो आत्मा जर

अप्रसिद्ध असेल तर सर्व प्रवृत्ति अस्वार्थ आहेत–स्वार्थरहित आहेत, असें म्हणावें लागेल. [ क्रियेवांचून आत्मा जर अप्रसिद्धच असेल–त्याची जर सिद्धीच होत नसेल तर अभ्युदय व निःश्रेयस यांसाठीं केल्या जाणाऱ्या सर्व प्रवृत्ति निराधार ठरतील. कारण क्रियेनें सिद्ध होणाऱ्या असिद्ध आत्म्यासाठीं त्या आहेत, असें म्हणतां येणार नाहीं. अर्थात् त्या सर्व निःस्वार्थ आहेत, त्यांचा आधार कोणी नाहीं, असें होईल. पण तें सर्व प्रमाणांच्या विरुद्ध आहे. बरें त्या देहादिकांतील कोणासाठीं तरी आहेत, म्हणून म्हणावें तर तेंहि उपपन्न होत नाहीं, असें सांगतात -]—**देहादि-अचेतनार्थत्वं कल्पयितुं न च शक्यं**— देहादि अचेतनासाठीं त्या सर्व प्रवृत्ति आहेत, अशी कल्पना करितां येत नाहीं. कारण देह, इंद्रियें, मन, बुद्धि, व अव्यक्त हीं सर्व अचेतन आहेत. तेव्हां त्यांना घटादिकांप्रमाणेंच मी अमुक क्रियेनें अमुक दुःखाचा परिहार करून अमुक सुखाची प्राप्ति करून घेईन अशा प्रकारचें अर्थित्व संभवत नाहीं.—**न च सुखार्थं सुखं दुःखार्थं वा दुःखं**—प्रत्येक प्रवृत्ति फलावसायिनी–फलामध्यें पर्यवसान पावणारी असल्यामुळें त्या फलाची इच्छा करणारा कोणी अवश्य पाहिजे. त्यामुळें सुखासाठींच सुख किंवा दुःखासाठींच दुःख असें म्हणतां येत नाहीं.—**सर्वव्यवहारस्य आत्मावगत्यवसानार्थत्वात् च**—कारण सर्व व्यवहाराला आत्मज्ञानावसानार्थत्व आहे. कोणताही व्यवहार आत्मज्ञानामध्यें पर्यवसान पावतो. आत्मा जर अप्रसिद्ध–सर्वथा असिद्ध असता तर यज्ञादि व्यवहार कोणी केला नसता. ( अहोपण, आत्मा प्रसिद्ध जरी असला तरी तो प्रमाणाच्या द्वाराच प्रसिद्ध होतो. कारण प्रत्येक गोष्ट प्रमाणानेंच सिद्ध होत असते, असा न्याय आहे, असें कोणी म्हणेल म्हणून सांगतात-)—**तस्मात् यथा स्वदेहस्य परिच्छेदाय प्रमाणान्तरापेक्षा न**—वास्तव ज्याप्रमाणें स्वदेहाच्या निश्चयासाठीं दुसऱ्या प्रमाणाची अपेक्षा नसते त्याप्रमाणें—**ततः अपि आत्मनः अन्तरतमत्वात् तदवगतिं प्रति न प्रमाणान्तरापेक्षा**—आत्मा त्या देहाहूनहि अतिशय आंत असल्यामुळें–त्याला अन्तरतमत्व असल्यामुळें त्याच्या ज्ञानासाठीं दुसऱ्या प्रमाणाची अपेक्षा नाहीं.—**इति विवेकिनां आत्मज्ञाननिष्ठा सुप्रसिद्धा इति सिद्धं**— त्यामुळें आत्मानात्मविवेक्यांची आत्मज्ञाननिष्ठा अत्यंत प्रसिद्ध आहे, हें सिद्ध झालें. [ प्रमाणप्रमेयादि सर्व व्यवहार आत्मज्ञान होईपर्यंतच संभवतो, हे प्रसिद्ध आहे. अर्थात् प्रमाणप्रमेयांची प्रवृत्ति त्या पूर्वीच होणें शक्य असल्यामुळें आत्मा त्या प्रवृत्तीपूर्वींच प्रसिद्ध आहे, असें मानणें भाग आहे. याप्रमाणें आत्म्याचा साक्षात्कार स्वाभाविक असल्यामुळें आरोपाच्या निवृत्तीनें विवेक्यांची ज्ञाननिष्ठा अत्यंत प्रसिद्ध आहे. ]

**येषामपि निराकारं ज्ञानमप्रत्यक्षं तेषामपि ज्ञानवशैव ज्ञेयावगतिरिति ज्ञानमत्यन्तं प्रसिद्धं सुखादिवदेवेत्यभ्युपगन्तव्यम् । जिज्ञासानुपपत्तेश्च अप्रसिद्धं चेज्ज्ञानं ज्ञेयवज्जिज्ञास्येत । यथा ज्ञेयं घटादिलक्षणं ज्ञानेन ज्ञाता व्याप्तुमिच्छति तथा ज्ञानमपि ज्ञानान्तरेण ज्ञाता व्याप्तुमिच्छेत् । न चैतदस्ति । अतोऽत्यन्तप्रसिद्धं ज्ञानं ज्ञाता-**

ऽप्यत एव प्रसिद्ध इति । तस्माज्ज्ञाने यत्नो न कर्तव्यः किं त्वनात्मबुद्धिनिवृत्तावेव तस्माज्ज्ञाननिष्ठा सुसंपाद्या ॥ ५० ॥

**भाष्यार्थ**—( 'अहोपण, आम्ही ज्ञान निराकार आहे, असें अनुमान करितों' असें जे कित्येक म्हणणारे आहेत त्यांचें निराकरण करितात-)—**येषां अपि ज्ञानं निराकारं अप्रत्यक्षं तेषां अपि ज्ञेयावगतिः ज्ञानवशा एव**—ज्यांच्या मतीं ज्ञान निराकार व अप्रत्यक्ष आहे त्यांचीहि ज्ञेय-विषयाची अवगति-ज्ञेयाचा अनुभव ज्ञानाधीनच असतो—**इति ज्ञानं सुखादिवत् एव अत्यन्तं प्रसिद्धं इति अभ्युपगन्तव्यं**—म्हणून ज्ञान सुखादिकांप्रमाणें नित्य अनुभवगम्य आहे, अत्यन्त प्रसिद्ध आहे, असें समजावें. [ त्यामुळें त्याला अनुमेय-अनुमानानेंच जाणण्यास योग्य, असें म्हणतां येत नाहीं. विषयाचा अनुभव येतो म्हणून ज्ञान आहे, असें अनुमान केल्यास त्यावर ज्ञानामुळें विषयानुभव व विषयानुभवामुळें ज्ञान असा अन्योन्याश्रय दोष येतो. ज्ञान प्रसिद्ध आहे, असें याहि कारणानें म्हणतां येते-]—**जिज्ञासानुपपत्तेः च**—जिज्ञासेची अनुपपत्ति असल्यामुळेंहि ज्ञान प्रसिद्ध आहे. [ कारण ते जर पूर्वींच सिद्ध नसतें तर त्याविषयीं जिज्ञासा-जाणण्याची इच्छा झाली असती,पण ज्ञानाची इच्छा प्रसिद्ध नाहीं. कारण जें अगोदर सिद्ध असतें त्याविषयीं जिज्ञासा होणें योग्य नाहीं, हेंच आतां भाष्यकार अधिक स्पष्ट करितात-]—**अप्रसिद्धं चेत् ज्ञानं ज्ञेयवत् जिज्ञास्येत**—ज्ञान जर अप्रसिद्ध असतें तर इतर ज्ञेय-विषयांप्रमाणें त्याला जाणण्याची इच्छा केली गेली असती.—**यथा ज्ञाता घटादिलक्षणं ज्ञेयं ज्ञानेन व्याप्तुं इच्छति तथा ज्ञानं अपि ज्ञाता ज्ञानान्तरेण व्याप्तुं इच्छेत्**—ज्याप्रमाणे ज्ञाता घटादिरूप ज्ञेयाला जाणण्याची इच्छा करितो त्याप्रमाणे ज्ञात्यानें ज्ञानालाहि दुसऱ्या ज्ञानानें जाणण्याची इच्छा केली असती—**न च एतत् अस्ति**—पण ज्ञान दुसऱ्या ज्ञानाचें ज्ञेय होतें, असें कोठेंच दिसत नाहीं. ( शिवाय तसें मानल्यास अनवस्था दोष येतो. याप्रमाणें ज्ञानाला जाणण्याची इच्छाच अनुपपन्न झाली असतां काय निष्पन्न होतें, तें सांगतात-)—**अतः अत्यन्तप्रसिद्धं ज्ञानं**—तस्मात् ज्ञान अत्यंत प्रसिद्ध आहे.—**अतः एव ज्ञाता अपि प्रसिद्धः इति**—त्यामुळेच ज्ञाता आत्माहि प्रसिद्धच आहे. कारण ज्ञात्यावांचून केवल ज्ञानाची सिद्धिच होणें शक्य नाहीं. ( याप्रमाणे ज्ञान सर्वथा सिद्धच असल्यामुळें त्याविषयीं भावना या नांवाचा विधि नाहीं, असें सांगतात-)—**तस्मात् ज्ञाने यत्नः न कर्तव्यः**—म्हणून ज्ञानाविषयीं यत्न करावयास नको.—**किंतु अनात्मबुद्धिनिवृत्तौ एव**—तर अनात्मबुद्धि निवृत्त करण्यासाठींच भावना करावयास पाहिजे.—**तस्मात् ज्ञाननिष्ठा सुसंपाद्या**—म्हणून ज्ञाननिष्ठा अनायासानें संपादन करितां येण्यासारखी आहे. ५०

**बुद्ध्या विशुद्धया युक्तो धृत्यात्मानं नियम्य च ।**
**शब्दादीन्विषयांस्त्यक्त्वा रागद्वेषौ व्युदस्य च ॥५१**

विविक्तसेवी लघ्वाशी यतवाक्कायमानसः ।
ध्यानयोगपरो नित्यं वैराग्यं समुपाश्रितः ॥ ५२ ॥
अहंकारं बलं दर्पं कामं क्रोधं परिग्रहम् ।
विमुच्य निर्ममः शान्तो ब्रह्मभूयाय कल्पते ॥ ५३

**अन्वयार्थ—विशुद्धया बुद्ध्या युक्तः**—अत्यन्त शुद्ध-निष्कपट बुद्धीनें युक्त होऊन—**च धृत्या आत्मानं नियम्य**—आणि धैर्यानें शरीरेंद्रियसंघाताचें नियमन करून-त्याला आपल्या वश करून—**शब्दादीन् विषयान् त्यक्त्वा**—शब्द-स्पर्शादि विषयांचा त्याग करून—**रागद्वेषौ व्युदस्य च**—आणि राग व द्वेष यांचा परित्याग करून,—**विविक्तसेवी**—वन-पर्वत-गुहा इत्यादि एकांतस्थानाचे सेवन करण्याचें ज्यांचें शील आहे, असा—**लघ्वाशी**—हितकर, परिमित व हलके-पवित्र अन्न खाण्याचें ज्याचें शील आहे, असा—**यतवाक्कायमानसः**—वाक्, शरीर, व मन यांचें ज्यानें नियमन केलें आहे, असा—**नित्यं ध्यानयोगपरः**—सतत ध्यान व योग यात तत्पर झालेला—**वैराग्यं समुपाश्रितः**—ऐहिक व पारलौकिक विषयांविषयीं विरक्त झालेला-वैराग्याचा आश्रय केलेला,—**अहंकारं**—देहादिकांच्या ठिकाणीं असलेला जो अहंभाव, त्याला,—**बलं**—काम, रागादि युक्त सामर्थ्याला—**दर्पं**—मदाला—**कामं**—इच्छेला,—**क्रोधं**—द्वेषाला——**परिग्रहं**—व शरीरधारण किंवा धर्माचरण यांनाहि अवश्य असलेल्या परिग्रहाला—**विमुच्य**—टाकून—**निर्ममः**—ममत्व-माझेपणा सोडून ममत्वरहित झालेला,—**शांतः**—त्यामुळे अतिशय शांत असा यति—**ब्रह्मभूयाय**—ब्रह्म बनण्यास—**कल्पते**—समर्थ होतो. ५१-५३.

**सेयं ज्ञानस्य परा निष्ठोच्यते कथं कार्येति—बुद्ध्याऽध्यवसायात्मिकया विशुद्धया मायारहितया युक्तः संपन्नो धृत्या धैर्येणाऽऽत्मानं कार्यकरणसंघातं नियम्य च नियमनं कृत्वा वशीकृत्य शब्दादीञ्शब्द आदिर्येषां ते शब्दादयस्तान्विषयांस्त्यक्त्वा । सामर्थ्याच्छरीरस्थितिमात्रान्केवलान्मुक्त्वा ततोऽधिकान्सुखार्थांस्त्यक्त्वेत्यर्थः । शरीरस्थित्यर्थत्वेन प्राप्तेषु च रागद्वेषौ व्युदस्य च परित्यज्य ॥ ५१ ॥**

**भाष्यार्थ—सा इयं ज्ञानस्य परा निष्ठा कथं कार्या इति उच्यते**—ती ही ब्रह्मज्ञानाची परा निष्ठा कशी संपादन करावी तें सांगितलें जातें—[ आरोपित अनात्म धर्मांची निवृत्ति करून ब्रह्मामध्यें ज्ञानसंतानरूपाने पर्यवसान पावणें हीच ती ज्ञानाची परा निष्ठा होय. ती सुसंपाद्य आहे, असेंहि वर सांगितलें. पण ती कोणत्या उपायानें संपादन करावी ? उत्तर-]—**बुद्ध्या-अध्यवसायात्मिकया विशुद्धया-मायारहितया युक्तः-संपन्नः**—ब्रह्मच आत्मा अशा निश्चयाच्या अत्यंत शुद्ध म्ह०

मायारहित–संशयविपर्ययशून्य बुद्धीनें युक्त म्ह० संपन्न—**च धृत्या–धैर्येण आत्मानं–कार्यकरणसंघातं नियम्य–नियमनं कृत्वा–वशीकृत्य**—व धृतीनें–धैर्यानें आत्म्याला म्ह० शरीरेंद्रियसंघाताला नियमित करून–शरीरेंद्रियसमुदायाचें नियमन करून–त्याला वश करून–स्वाधीन ठेवून—**शब्दादीन्–शब्दः आदिः येषां ते शब्दादयः तान् विषयान् त्यक्त्वा**—शब्दादिकांस–शब्द ज्यांचा आदि–आरंभ आहे ते शब्दादिक त्या शब्दादिविषयांस टाकून ( ' अहोपण शब्दादि सर्वच विषयांचा त्याग केल्यावर देहस्थितिहि अशक्य होईल ' असें कोणी म्हणेल म्हणून म्हणतात–)—**सामर्थ्यात् शरीरस्थितिमात्रान् केवलान् मुक्त्वा ततः अधिकान् सुखार्थान् त्यक्त्वा इत्यर्थः**—सर्वच विषयांचा त्याग केल्यास शरीरस्थितीची अनुपपत्ति होऊन ज्ञाननिष्ठाच असिद्ध होणें, या सामर्थ्यावरूनच केवल शरीरस्थितीलाच मात्र कारण होणाऱ्या विषयांना सोडून, त्यांहून अधिक सुखासाठीं जे विषय त्या सर्वांचा त्याग करून असा भावार्थ. ( पण शरीरस्थितीसाठीं ज्यांची अनुज्ञा दिली आहे अशा विषयांमध्येंहि रागादिकांचा संभव आहे. पण तो रागादिदोष ज्ञानप्रतिबंधक असल्यामुळें त्याचें निरसन करितात–)—**शरीरस्थित्यर्थत्वेन प्राप्तेषु च रागद्वेषौ व्युदस्य परित्यज्य**—शरीराच्या स्थितीसाठीं म्हणून प्राप्त झालेल्या विषयांतील राग व द्वेष यांचा परित्याग करून ' विविक्तसेवी व्हावें ' असा पुढें संबंध. ५१.

ततः—विविक्तसेव्यरण्यनदीपुलिनगिरिगुहादीन्विविक्तान्देशान्सेवितुं शीलमस्येति विविक्तसेवी । लघ्वाशी लघ्वशनशीलः । विविक्तसेवालघ्वशनयोर्निद्रादिदोषनिवर्तकत्वेन चित्तप्रसादहेतुत्वाद्ग्रहणम् । यतवाक्कायमानसो वाक्च कायश्च मानसं च यतानि संयतानि यस्य ज्ञाननिष्ठस्य स ज्ञाननिष्ठो यतिर्यतवाक्कायमानसः स्यात् । एवमुपरतसर्वकरणः सन्ध्यानयोगपरो ध्यानमात्मस्वरूपचिन्तनं योग आत्मविषय एवैकाग्रीकरणं तौ ध्यानयोगौ परत्वेन कर्तव्यौ यस्य स ध्यानयोगपरः । नित्यग्रहणं मन्त्रजपाद्यन्यकर्तव्याभावप्रदर्शनार्थम् । वैराग्यं विरागभावो दृष्टादृष्टेषु विषयेषु वैतृष्ण्यं समुपाश्रितः सम्यगुपाश्रितो नित्यमेवेत्यर्थः ॥ ५२ ॥

**भाष्यार्थ—ततः**—त्यानंतर—म्ह० देहस्थितीला अवश्य अशा विषयांना सोडून व तसल्या अवश्य विषयांविषयींचेहि राग-द्वेष टाकून नंतर—**विविक्तसेवी–अरण्य-नदीपुलिन-गिरिगुहादीन् विविक्तान् देशान् सेवितुं शीलं अस्य इति विविक्तसेवी**—विविक्तसेवी म्ह० ( चित्ताचें ऐकाग्र्य व प्रसाद यांसाठीं ) अरण्य, नदीचें तीर, पर्वतगुहा इत्यादि एकान्त व पवित्र प्रदेशांचें सेवन करण्याचें ज्याचें शीलच –स्वभावच आहे तो विविक्तसेवी,—**लघ्वाशी–लघु-अशनशीलः**—लघु म्हणजे परिमित, हितकर व पवित्र अन्नच खाणारा–निद्रादि दोषांच्या निवृत्तीसाठीं तसलें अन्न भक्षण करण्याचें ज्याचें शील आहे, तो लघ्वाशी—**विविक्तसेवा-लघु-अशनयोः निद्रादिदोषनिवर्तकत्वेन चित्तप्रसादहेतुत्वात् ग्रहणं**—विविक्तसेवा व लघु अशन हीं निद्रादिदोषांचें निवर्तन करणारीं या रूपानें चित्तप्रसादाला कारण होत, अस-

त्यामुळें त्यांचें येथें ग्रहण केलें आहे. ( निद्रादि येथील आदिशब्दानें आळस, अनवधान -दुर्लक्ष्य इत्यादि बुद्धीला विक्षेप करणारे दोष विवक्षित आहेत. पुढील ध्यान-योगांच्या उपायत्वानें आणखी विशेषण देतात-)—**यतवाक्कायमानसः-वाक् च कायः च मानसं च यतानि-संयतानि यस्य ज्ञाननिष्ठस्य सः ज्ञाननिष्ठः यतिः यतवाक्कायमानसः स्यात्**—यतवाक्कायमानस-वाक् व शरीर व मानस हीं ज्या ज्ञाननिष्ठाचीं नियमित-अगदीं निरुद्ध केलेलीं आहेत तो ज्ञाननिष्ठ यति यतवाक्कायमानस होय. त्यानें यतवाक्कायमानस व्हावें. ( रागादिकांचा निग्रह अत्यंत आवश्यक आहे, हें द्योतित करण्यासाठीं येथें भाष्यांत 'स्यात्' हें विध्यर्थी रूप योजलें आहे. आतां ज्यानें वागादि इंद्रियसमूहाचें नियमन केले आहे त्याचें अनायासानें कर्तव्य सांगतात-)—**एवं उपरतसर्वकरणः सन्**—याप्रमाणे ज्याचीं सर्व इंद्रियें उपरत झालीं आहेत असा होऊन—**ध्यानयोगपरः ध्यानं-आत्मस्वरूपचिन्तनं योगः-आत्मविषये एव एकाग्रीकरणं तौ ध्यानयोगौ परत्वेन कर्तव्यौ यस्य सः ध्यानयोगपरः**—ध्यानयोगपर-ध्यान म्ह० आत्मस्वरूपाचे चिंतन व योग म्ह० आत्मा या विषयांतच त्याला एकाग्र करणें, ते ध्यानयोग परत्वानें-श्रेष्ठ साधन या रूपाने ज्याला कर्तव्य असतात तो ध्यानयोगपर होय.—**नित्यं**—नित्य-सतत-ध्यान व योग यांत गढून गेलेला-तत्पर झालेला,—**नित्यग्रहणं मन्त्रजपादि-अन्यकर्तव्याभावप्रदर्शनार्थं**—येथें 'नित्य' या शब्दाचें ग्रहण मंत्र, जप, प्रदक्षिणा, प्रणाम,इत्यादि ध्यानयोगाला प्रतिबंध करणाऱ्या अन्य कर्तव्याचा अभाव प्रदर्शित करण्यासाठीं केलें आहे. ( ध्यानयोगाच्याच उपायत्वानें वैराग्याचा उपदेश-)—**वैराग्यं-विरागभावः-दृष्टादृष्टेषु विषयेषु वैतृष्ण्यं समुपाश्रितः-सम्यक्-नित्यं एव इत्यर्थः उपाश्रितः**—वैराग्य म्ह० विरागत्व-आसक्तिराहित्य,दृष्ट व अदृष्ट विषयामध्यें वैतृष्ण्य-त्यांविषयीं तृष्णा नसणें अशा वैराग्याला समुपाश्रित-सम्यक् म्ह० नित्यच-सदोदितच असा भावार्थ, वैराग्याचा सतत ज्यानें आश्रय केला आहे, असें होऊन नित्य ध्यानयोगपर व्हावे.

**किंच—अहंकारमहंकरणमहंकारो देहेन्द्रियादिषु तं बलं सामर्थ्यं कामरागादियुक्तं नेतरच्छरीरादिसामर्थ्यं स्वाभाविकत्वेन त्यागस्याशक्यत्वात् । दर्पो नाम हर्षानन्तरभावी धर्मातिक्रमहेतुः ' हृष्टो दृप्यति दृप्तो धर्ममतिक्रामति ' इति स्मरणात्तं च । काममिच्छां क्रोधं द्वेषं परिग्रहमिन्द्रियमनोगतदोषपरित्यागेऽपि शरीरधारणप्रसङ्गेन धर्मानुष्ठाननिमित्तेन वा बाह्यः परिग्रहः प्राप्तस्तं च विमुच्य परित्यज्य परमहंसपरिव्राजको भूत्वा देहजीवनमात्रेऽपि निर्गतममभावो निर्ममोऽत एव शान्त उपरतः । यः संहृतायासो यतिर्ज्ञाननिष्ठो ब्रह्मभूयाय ब्रह्मभवनाय कल्पते समर्थो भवति ॥५३॥**

**भाष्यार्थ—किं च**—' अहंकारं० ' या श्लोकानें ज्ञाननिष्ठ यतीच्या आणखी एका विशेषणाचा पूर्वोक्त विशेषणांशीं समुच्चय करितात.—**अहंकारं-देहेन्द्रियादिषु अहंकरणं-अहंकारः तं**—अहंकाराला देह-इंद्रियें इत्यादिकांमध्यें ' अहं ' अशी भावना ठेवणें, हाच येथील अहंकार होय, त्या अहंकाराला—**बलं-कामरागादियुक्तं सा-**

**मर्थ्य**—बलाला म्ह० कामरागादियुक्त सामर्थ्याला, ( पण सामान्य बल येथें कां घेऊं नये ? उत्तर–)—**इतरत् शरीरादिसामर्थ्यं न स्वाभाविकत्वेन त्यागस्य अशक्यत्वात्**—इतर–शरीरादिकांचें सामर्थ्य येथें विवक्षित नाहीं. कारण त्याला स्वाभाविकत्व असल्यामुळें त्याचा त्याग करतां येणें अशक्य आहे. ( म्हणून येथील बल म्ह० कामरागादियुक्त सामर्थ्यच होय. )—**दर्पः नाम हर्षानन्तरभावी धर्मातिक्रमहेतुः**—दर्प म्ह० हर्षानन्तर होणारा व धर्माच्या अतिक्रमाला कारण होणारा एक मानस विचार. ( याविषयीं प्रमाण–)—' **हृष्टः दृप्यति दृप्तः धर्मं अतिक्रामति** ' **इति स्मरणात् तं च**—हृष्ट झालेला दृप्त–दर्पयुक्त होतो व दृप्त धर्माचें अतिक्रमण करितो, असें स्मृतिवचन आहे, अशा त्या दर्पाला,—**कामं-इच्छां क्रोधं-द्वेषं परिग्रहं**—कामाला म्ह० इच्छेला, क्रोधाला–द्वेषाला व परिग्रहाला ( ' विमुच्य ' असा पुढें संबंध )—**इन्द्रिय-मनोगतदोषपरित्यागे अपि शरीरधारणप्रसंगेन वा धर्मानुष्ठाननिमित्तेन बाह्यः परिग्रहः प्राप्तः**—इंद्रियगत व मनोगत दोषांचा जरी परित्याग केला तरी शरीरधारणाच्या प्रसंगानें किंवा धर्मानुष्ठानाच्या निमित्तानें बाह्य परिग्रह प्राप्त होतो,—**तं च विमुच्य-परित्यज्य**—त्या बाह्य परिग्रहाचा परित्याग करून—**परमहंसपरिव्राजकः भूत्वा**—परमहंस परिव्राजक होऊन—**देहजीवनमात्रे अपि निर्गतममभावः-निर्ममः**—देहजीवनासाठीं अवश्य असलेल्या वस्तूविषयींहि ज्याचा ' ममत्व ' हा भाव–' हे माझें ' ही वृत्ति राहिलेली नाहीं तो निर्मम होय.—**अतः एव शान्तः-उपरतः**—म्हणूनच अहंकार व ममत्व याच्या अभावीं शान्त म्ह० उपरत झालेला असा—**यः संहृतायासः यतिः ज्ञाननिष्ठः**—जो निरायास–सर्व आयास टाकून सुखी झालेला यति ज्ञाननिष्ठ तो—**ब्रह्मभूयाय-ब्रह्मभवनाय कल्पते-समर्थो भवति**—ब्रह्मभूय होण्यास ब्रह्मभवनास–ब्रह्मभावास समर्थ होतो–ब्रह्मरूप होण्यास योग्य बनतो. ( ५२ व्या श्लोकांतील वैराग्यशब्दानें कामत्याग जरी सांगितलेला असला तरी कामाचें सामर्थ्य फारच मोठें असल्यामुळें पुनः प्रत्यक्ष शब्दानें कामत्याग सांगितलेला आहे. ) ५३.

**ब्रह्मभूतः प्रसन्नात्मा न शोचति न कांक्षति ।**
**समः सर्वेषु भूतेषु मद्भक्तिं लभते पराम् ॥ ५४ ॥**

**अन्वयार्थ—ब्रह्मभूतः**—वर सांगितल्याप्रमाणें ब्रह्मभूत झालेला—**प्रसन्नात्मा**—त्यामुळें आत्मानंदाला प्राप्त झालेला पुरुष—**न शोचति न कांक्षति**—शोक करीत नाहीं व आकांक्षा करीत नाहीं.—**सर्वेषु भूतेषु समः**—सर्व भूतामध्यें सम असतो—**परां मद्भक्तिं**—माझ्या श्रेष्ठ ज्ञानरूप भक्तीला—**लभते**—प्राप्त होतो. ५४

**अनेन क्रमेण—ब्रह्मभूतो ब्रह्मप्राप्तः प्रसन्नात्मा लब्धाध्यात्मप्रसादो न शोचति किंचिदर्थवैकल्यमात्मनो वैगुण्यं चोद्दिश्य न शोचति न संतप्यते न काङ्क्षति । ब्रह्मभूतस्यायं स्वभावोऽनूद्यते न शोचति न काङ्क्षतीति । न ह्यप्राप्तविषयाकाङ्क्षा ब्रह्म-**

**विद उपपद्यते । न हृष्यतीति वा पाठः । समः सर्वेषु भूतेष्वात्मौपम्येन सर्वेषु भूतेषु सुखं दुःखं वा सममेव पश्यतीत्यर्थो नाऽऽत्मसमदर्शनमिह तस्य वक्ष्यमाणत्वाद्भक्त्या मामभिजानातीति । एवंभूतो ज्ञाननिष्ठो मद्भक्तिं मयि परमेश्वरे भक्तिं भजनं परामुत्तमां ज्ञानलक्षणां चतुर्थीं लभते चतुर्विधा भजन्ते मामित्युक्तम् ॥ ५४ ॥**

**भाष्यार्थ—अनेन क्रमेण**—' बुद्धया विशुद्धया० ' इत्यादि या उक्त क्रमानें—**ब्रह्मभूतः-ब्रह्मप्राप्तः**—ब्रह्मभूत म्ह० ब्रह्माला प्राप्त झालेला-ब्रह्माला पोचलेला-जिवंत असतांनाच सर्व अनर्थ निवृत्त होऊन ' निरतिशयानन्द ब्रह्मच मी ' असा अनुभव घेणारा—**प्रसन्नात्मा-लब्ध-अध्यात्मप्रसादः**—प्रसन्नचित्त-अध्यात्म म्ह० प्रत्यगात्मा त्यांतील प्रसाद म्ह० सर्वअनर्थनिवृत्तीनें परमानंदाचा आविर्भाव, तो ज्या जीवन्मुक्ताला प्राप्त झाला आहे तो प्रसन्नात्मा होय.—**न शोचति-किंचित् अर्थ-वैकल्यं च आत्मनः वैगुण्यं उद्दिश्य न शोचति न संतप्यते**—शोक करीत नाही. कोणत्याहि पदार्थाच्या हानीला किंवा स्वतःच्या वैगुण्याला उद्देशून-शोक करीत नाही, संतप्त होत नाही. ( बाह्य विषयांतील एखादा पदार्थ नाहीसा झाला किंवा स्वतः-च्याच शरीरेंद्रियांत कांही वैगुण्य झाले तर त्यासाठीं शोक करीत नाही. )—**न काङ्क्षति**—व कशाची आकांक्षाहि करीत नाही. ( याचें तात्पर्य-)—' **न शोचति न कांक्षति ' इति ब्रह्मभूतस्य अयं स्वभावः अनूद्यते**—' शोक करीत नाही व आकांक्षा करीत नाही ' असा हा ब्रह्मभूताचा स्वभाव सांगितला जातो. त्यांच्या पूर्व-सिद्ध स्वभावाचा हा अनुवाद आहे.—**हि ब्रह्मविदः अप्राप्तविषय-आकांक्षा न उपपद्यते**—कारण ब्रह्मवेत्त्याला अप्राप्त विषयाविषयींची आकांक्षा उपपन्न होत नाही. [ कारण त्याला अप्राप्त विषयच नाही त्याचप्रमाणे त्याला परिहार्य असेंहि कांही नसल्या-मुळे परिहार्याचा परिहार करितां आला नाही, म्हणून शोकहि होत नाही. ]—' **न हृष्यति ' इति वा पाठः**—किंवा ' न हृष्यति ' म्ह० रमणीय वस्तु प्राप्त झाल्यानें आनंदिताहि होत नाही, असा येथे पाठ आहे.—**समः सर्वेषु भूतेषु-आत्मौप-म्येन सर्वेषु भूतेषु सुखं दुःखं वा समं एव पश्यति इत्यर्थः**—' सर्व भूतां-मध्यें सम '-आपल्या उपमेनें सर्व भूतांमध्यें सुख व दुःख समच पाहतो, असा याचा भावार्थ.—**इह आत्मसमदर्शनं न**—' समः सर्वेषु भूतेषु ' येथे सर्व भूतांमध्यें सम-निर्विशेष आत्मदर्शन विवक्षित नाही.—**तस्य ' भक्त्या मां अभिजानाति ' इति वक्ष्यमाणत्वात्**—कारण ते निर्विशेष आत्मदर्शन ' भक्त्या मां अभिजानाति ' या पुढील श्लोकांत सांगावयाचे आहे, म्हणून येथें सुखदुःखांचं समदर्शनच घ्यावें.—**एवंभूतः ज्ञाननिष्ठः मद्भक्तिं-मयि परमेश्वरे भक्तिं-भजनं परां-उत्तमां चतुर्थीं ज्ञानलक्षणां लभते**—अशाप्रकारचा उक्त विशेषणविशिष्ट जीवन्मुक्त ज्ञाननिष्ठ माझ्या भक्तीला-मज परमेश्वराविषयींची जी भक्ति-भजन परा-उत्तम चवथी-ज्ञान-लक्षण भक्ति तिला प्राप्त होतो. [ म्ह० त्याची ज्ञाननिष्ठा सुप्रतिष्ठित होते. श्रवण मनन-निदिध्यासन करणाऱ्या शमादियुक्त पुरुषाचें वारंवार केलेल्या श्रवणादिकांच्या योगानें

'ब्रह्मच आत्मा' अशा स्वरूपाचें मोक्ष हें फल देणारें अपरोक्ष ज्ञान सिद्ध होतें. आर्तादिकांच्या तीन भक्तींच्या अपेक्षेनें ज्ञानलक्षणा भक्ति चवथी होय. याविषयीं सातव्या अध्यायांतील वचनाचें प्रमाण-]—'**चतुर्विधा भजन्ते मां' इति उक्तं**—'चार प्रकारचे जन मला भजतात' असें वर सांगितलेंच आहे. ( पृ.६२९ पहा ). ५४

**भक्त्या मामभिजानाति यावान्यश्चास्मि तत्त्वतः ।**
**ततो मां तत्त्वतो ज्ञात्वा विशते तदनन्तरम् ॥ ५५**

**अन्वयार्थ—अहं**—मी—**यावान् अस्मि**—जेवढा आहें—**च**—आणि—**यः अस्मि**—जो आहे, तें—**तत्त्वतः**—यथार्थपणें—**भक्त्या**—भक्तीनें—**मां**—मला—**अभिजानाति**—जाणतो—**ततः**—त्यानंतर—**मां**—मला—**तत्त्वतः**—यथार्थपणें—**ज्ञात्वा**—जाणून—**तदनंतरं**—त्यानंतर—**विशते**—प्रवेश करतो. ५५

**ततो ज्ञानलक्षणया भक्त्या मामभिजानाति यावानहमुपाधिकृतविस्तरभेदो यश्चाहं विध्वस्तसर्वोपाधिभेद उत्तमपुरुष आकाशकल्पस्तं मामद्वैतं चैतन्यमात्रैकरसमजमजरममरमभयमनिधनं तत्त्वतोऽभिजानाति । ततो मामेवं तत्त्वतो ज्ञात्वा विशते तदनन्तरं मामेव । नात्र ज्ञानानन्तरप्रवेशक्रिये भिन्ने विवक्षिते ज्ञात्वा विशते तदनन्तरमिति, किं तर्हि फलान्तराभावज्ञानमात्रमेव, क्षेत्रज्ञं चापि मां विद्धीत्युक्तत्वात् ॥**

**भाष्यार्थ**—( समाधिसाध्य परमभक्तिरूप ज्ञानानें कोणतें अपूर्व फल प्राप्त होतें ? उत्तर-)—**ततः ज्ञानलक्षणया भक्त्या मां अभिजानाति**—त्यानंतर त्या ज्ञानलक्षण समाधिजन्य भक्तीनें मला आत्मत्वानें जाणतो. ( त्याच भक्तिपराधीन ज्ञानाचें विवरण-)—**यावान् अहं-उपाधिकृतविस्तरभेदः**—मी जेवढा आहें, म्ह० माझ्या उपाधिकृत भेदाचा विस्तार जेवढा आहे, माझ्या औपाधिक स्वरूपाचा व्याप जेवढा आहे,—**च यः अहं विध्वस्तसर्वोपाधिभेदः आकाशकल्पः उत्तमपुरुषः**—आणि जो मी आहें-सर्व उपाधिभेदांनीं रहित-निरुपाधिक, असा जो मी आकाशासारखा अपरिच्छिन्न व असंग उत्तम पुरुष आहें.—**तं मां अद्वैतं चैतन्यमात्रैकरसं अजं अजरं अमरं अभयं अनिधनं तत्त्वतः अभिजानाति**—त्या मला-अद्वैत चैतन्यमात्र एकरसरूप अज, अजर, अमर, अभय, अनिधन म्ह० सर्व विकाररहित अशा मला तत्त्वतः-साक्षात् जाणतो. ( याप्रमाणें तत्त्वज्ञानाचा अनुवाद करून त्याचें फल विदेह कैवल्य सांगतात-)—**ततः मां एवं तत्त्वतः ज्ञात्वा तदनन्तरं मां एव विशते**—त्यानंतर मला अशाप्रकारें तत्त्वतः जाणून त्यानंतर लागलीच माझ्यामध्येंच प्रवेश करितो. ( पण तत्त्वज्ञान व त्याच्या मागून होणारी प्रवेशक्रिया हीं दोन भिन्न आहेत असें प्राप्त होतें, म्हणून आचार्य म्हणतात-)—**अत्र 'ज्ञात्वा विशते तदनन्तरं' इति ज्ञानानन्तरप्रवेशक्रिये भिन्ने न विवक्षिते**—येथें 'जाणून नंतर प्रवेश करितो' असें म्हटलेलें असल्यामुळें ज्ञान व त्या-

नंतर प्रवेशक्रिया अशी ही दोन भिन्न विवक्षित नाहीत.—**किं तर्हि**—तर मग काय ?—**फलान्तराभावज्ञानमात्रं एव**—प्रवेशावांचून ज्ञानाचें दुसरे कांहीं फल नाहीं, एवढेंच काय ते येथें विवक्षित आहे. ( अहोपण, ब्रह्मप्राप्ति हेच दुसरें फल आहे ? याचें उत्तर-)—**' क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि ' इत्युक्तत्वात्**—' क्षेत्रज्ञ मी आहें, असेंहि तूं जाण ' असे सांगितलेलें असल्यामुळे ब्रह्म व आत्मा यांचा भेद नाहीं. त्यामुळें ज्ञानाहून दुसरी निराळी प्राप्ति नाहीं.

**ननु विरुद्धमिदमुक्तं ज्ञानस्य या परा निष्ठा तया मामभिजानातीति, कथं विरुद्धमिति चेदुच्यते, यदैव यस्मिन्विषये ज्ञानमुत्पद्यते ज्ञातुस्तदैव तं विषयमभिजानाति ज्ञातेति न ज्ञाननिष्ठां ज्ञानावृत्तिलक्षणामपेक्षत इति । ततश्च ज्ञानेन नाभिजानाति ज्ञानावृत्त्या तु ज्ञाननिष्ठयाऽभिजानातीति ॥**

**भाष्यार्थ**—( ज्ञाननिष्ठा याच श्रेष्ठ भक्तीनें मला प्राप्त होतो, असें सांगितले. त्यावर आक्षेप-)—**ननु ज्ञानस्य या परा निष्ठा तया मां अभिजानाति इति इदं विरुद्धं उक्तं**—अहोपण, ज्ञानाची जी परा निष्ठा त्या निष्ठेने मला जाणतो असें हें विरुद्ध सांगितलें आहे—**कथं विरुद्धं इति चेत् उच्यते**—विरुद्ध कसें म्हणून विचाराल तर सांगतों—**यदा एव यस्मिन् विषये ज्ञातुः ज्ञानं उत्पद्यते**—ज्यावेळीं ज्या विषयाविषयीं ज्ञात्याचे ज्ञान उत्पन्न होते—**तदा एव ज्ञाता तं विषयं अभिजानाति**—तेव्हांच ज्ञाता त्या विषयाला साक्षात् जाणतो.—**इति ज्ञानावृत्तिलक्षणां ज्ञाननिष्ठां न अपेक्षते इति**—त्यामुळे ज्ञानाची आवृत्ति करणें, हेंच जिचे स्वरूप आहे अशा ज्ञाननिष्ठेची अपेक्षा नाहीं.—**ततः च ज्ञानेन न अभिजानाति तु ज्ञानावृत्त्या ज्ञाननिष्ठया अभिजानाति इति विरुद्धं**—त्यामुळें ज्ञानानें जाणत नाहीं, तर ज्ञानाची पुनः पुनः आवृत्ति करणे या ज्ञाननिष्ठेनें जाणतो हें म्हणणें विरुद्ध आहे. [ ज्ञान उत्पन्न होतांच त्याचा विषय अभिव्यक्त होतो, त्यासाठीं ज्ञानावृत्तिरूप ज्ञाननिष्ठेचीच कांहीं गरज नसते, असें असतांना तुम्ही ' ज्ञानानें ब्रह्माला जाणत नाही, ज्ञानाच्या आवृत्तीने-ज्ञाननिष्ठेनें जाणतो,' असें विरुद्ध कसें सांगतां ? ]

**नैष दोषो ज्ञानस्य स्वात्मोत्पत्तिपरिपाकहेतुयुक्तस्य प्रतिपक्षविहीनस्य यदात्मानुभवनिश्चयावसानत्वं तस्य निष्ठाशब्दाभिलापः शास्त्राचार्योपदेशेन ज्ञानोत्पत्तिपरिपाकहेतुं सहकारिकारणं बुद्धिविशुद्ध्यादममानित्वादि चापेक्ष्य जनितस्य क्षेत्रज्ञपरमात्मैकत्वज्ञानस्य कर्त्रादिकारकभेदबुद्धिनिबन्धनसर्वकर्मसंन्याससहितस्य स्वात्मानुभवनिश्चयरूपेण यदवस्थानं सा परा ज्ञाननिष्ठेत्युच्यते । सेयं ज्ञाननिष्ठाऽऽर्तादिभक्तित्रयापेक्षया परा चतुर्थी भक्तिरित्युक्ता । तया परया भक्त्या भगवन्तं तत्त्वतोऽभिजानाति । यदनन्तरमेवेश्वरक्षेत्रज्ञभेदबुद्धिरशेषतो निवर्तते । अतो ज्ञाननिष्ठालक्षणया भक्त्या मामभिजानातीति वचनं न विरुध्यते ॥**

**भाष्यार्थ—एषः दोषः न**—आमच्या सिद्धान्तावर तुम्ही म्हणतां तसा दोष येत नाहीं—**स्वात्मोत्पत्तिपरिपाकहेतुयुक्तस्य प्रतिपक्षविहीनस्य ज्ञानस्य यत् आत्मानुभवनिश्चयावसानत्वं तस्य निष्ठाशब्दाभिलापात्**—ज्ञानाची उत्पत्ति व त्याचा परिपाक यांच्या कारणानें युक्त असलेल्या व विरोधी-प्रतिपक्ष-शून्य अशा ज्ञानाचें जें आत्मानुभवाने होणाऱ्या निश्चयामध्ये पर्यवसान त्याचाच निष्ठा-शब्दानें उल्लेख केला आहे. त्यामुळें तुम्हीं म्हणतां तसा विरोध येत नाहीं. ( याचेंच अधिक स्पष्टीकरण-)—**शास्त्राचार्योपदेशेन**—शास्त्र व आचार्य यांच्या उपदेशानें ( कारण ' आचार्यवान् पुरुषो वेद ' ज्याला आचार्यांने उपदेश केला आहे, तोच आत्म्याला जाणतो अशी श्रुति आहे. त्यामुळें शास्त्र व शास्त्रानुसार आचार्योपदेश यांच्यायोगानें) —**ज्ञानोत्पत्तिपरिपाकहेतुं सहकारिकारणं बुद्धिविशुद्ध्यादि अमानित्वादि च अपेक्ष्य**—ज्ञानाची उत्पत्ति व तिचा परिपाक-संशयादि प्रतिबंधांचा नाश, त्यांचें हेतुभूत व उपदेशाचेंच सहकारिकारण अशी जी बुद्धीची विशुद्धि वगैरे व अमानित्वादि त्याच्या अपेक्षेनें—**जनितस्य क्षेत्रज्ञपरमात्मैकत्वज्ञानस्य कर्त्रादिकारकभेदबुद्धिनिबन्धनसर्वकर्मसंन्याससहितस्य स्वात्मानुभवनिश्चयरूपेण यत् अवस्थानं सा परा ज्ञाननिष्ठा इति उच्यते**—त्याच उपदेशापासून झालेलें जे क्षेत्रज्ञ व परमात्मा यांचे ऐक्य ज्ञान ( व तेंहि ज्ञान कसें ? तर-) मी कर्ता, हे माझे कर्म, या साधनानें मी ते करीन व त्याचें मला अमुक फल मिळेल इत्यादि कारकभेदबुद्धीनेच होणारी जीं सर्व कर्में त्यांच्या संन्यासासह असलेलें जें ऐक्यज्ञान त्याचे स्वात्मानुभवनिश्चयरूपाने म्ह० सर्व कल्पनारहित अशा स्वरूपांतच फलरूपानें जें राहणें ती ज्ञानाची परा निष्ठा असें प्रामाणिकांकडून म्हटले जाते. [ शास्त्र व आचार्य यांच्या उपदेशाने ज्ञान होते, पण त्याला दुसऱ्या सहकारिकारणाची अपेक्षा असते. चित्ताची शुद्धि, अमानित्वादिक हे त्यांच्या उत्पत्तीचें व परिपाकाचे सहकारी कारण आहे. ज्ञानाचा परिपाक म्ह० दृढत्व-संशयादि सर्व प्रतिबंधराहित्य. आचार्यांच्या शास्त्रानुसार उपदेशाने चित्तशुद्ध्यादि सहकारी कारणाच्या अपेक्षेने क्षेत्रज्ञ व ईश्वर यांचे ऐक्यज्ञान होते. कर्ता, कर्म, करण इत्यादि कारकभेदबुद्धीनेच होणाऱ्या सर्व कर्मांच्या संन्यासासह असलेल्या त्या ज्ञानाचे स्वात्मानुभवनिश्चयरूपाने जें अवस्थान तीच ज्ञाननिष्ठा होय. अशा ऐक्यज्ञानानें सर्व कल्पनाशून्य आत्मस्वरूपीं स्थिर होणे हेच ज्ञानाचे फल आहे. अर्थात् भगवानांनी चवथ्या अध्यायांत ' ज्ञानखड्गानें संशय तोडून ज्ञानोत्पत्तीला कारण होणाऱ्या कर्मांचे अनुष्ठान कर ' पृ. ४६६ असे जें सांगितले आहे त्यांत कांही दोष नाहीं. कारण ज्ञाननिष्ठेची योग्यता येण्यासाठीं कर्मानुष्ठान अवश्य पाहिजे. असो; ही ज्ञाननिष्ठाच चवथी भक्ति कशी ? उत्तर-]—**सा इयं ज्ञाननिष्ठा आर्तादिभक्तित्रयापेक्षया परा चतुर्थी भक्तिः इति उक्ता**—तीही ज्ञाननिष्ठा आर्तादि तीन प्रकारच्या भक्तीच्या अपेक्षेनें ' परा-चवथी भक्ति ' म्हणून म्हटली आहे.—**तया परया भक्त्या भगवन्तं तत्त्वतः अभिजानाति**—त्या परा भक्तीच्या योगानें भगवा-

नास तत्त्वतः साक्षात् जाणतो.—**यदनन्तरं एव ईश्वर-क्षेत्रज्ञभेदबुद्धिः अशेषतः निवर्तते**—ज्या ज्ञानानंतर लागलीच ईश्वर निराळा व क्षेत्रज्ञ निराळा ही भेदबुद्धि निःशेष निवृत्त होते.—**अतः**—ज्ञाननिष्ठारूप भगवद्भक्ति तत्त्वज्ञानाहून निराळी नसल्यामुळें आणि अज्ञाननिवृत्ति हें फल तेवढ्यानेंच सिद्ध होत असल्यामुळें व ते फलहि तद्रूपच–ज्ञाननिष्ठारूपच असल्यामुळें आणि त्यांचा म्ह० फल व ज्ञाननिष्ठा यांचा भिन्नत्वानें जो निर्देश केला आहे तो औपचारिक–गौण असल्यामुळें—**ज्ञाननिष्ठालक्षणया भक्त्या मां अभिजानाति इति वचनं न विरुध्यते**—ज्ञाननिष्ठालक्षणभक्तीने मला जाणतो, असें जें वचन आहे तें विरुद्ध नाहीं.

**अत्र च सर्वं निवृत्तिविधायि शास्त्रं वेदान्तेतिहासपुराणस्मृतिलक्षणमर्थवद्भवति, " विदित्वा व्युत्थायाथ भिक्षाचर्यं चरन्ति । तस्मान्न्यासमेषां तपसामतिरिक्तमाहुर्न्यास एवात्यरेचयत् " इति " संन्यासः कर्मणां न्यासो वेदानिमं च लोकममुं च परित्यज्य त्यज धर्ममधर्मं च " इत्यादि । इह च दर्शितानि वाक्यानि न च तेषां वाक्यानामानर्थक्यं युक्तम् । न चार्थवादत्वं स्वप्रकरणस्थत्वात्प्रत्यगात्माविक्रियस्वरूपनिष्ठत्वाच्च मोक्षस्य । न हि पूर्वसमुद्रं जिगमिषोः प्रातिलोम्येन प्रत्यक्समुद्रं जिगमिषुणा समानमार्गत्वं संभवति । प्रत्यगात्मविषयप्रत्ययसंतानकरणाभिनिवेशश्च ज्ञाननिष्ठा । सा च प्रत्यक्समुद्रगमनवत्कर्मणा सहभावित्वेन विरुध्यते । पर्वतसर्षपयोरिवान्तरवान्विरोधः प्रमाणविदां निश्चितः । तस्मात्सर्वकर्मसंन्यासेनैव ज्ञाननिष्ठा कार्येति सिद्धम् ॥**

**भाष्यार्थ**—( सर्वकर्मसंन्याससहित उपदेशजन्य स्वरूपावस्थानरूप ज्ञान परमपुरुषार्थोपयोगी आहे, याविषयीं प्रमाण सांगतात– )—**अत्र च सर्वं निवृत्तिविधायि वेदान्त-इतिहास-पुराण-स्मृतिलक्षणं शास्त्रं अर्थवत् भवति**—याविषयीं निवृत्तीचें विधान करणारें सर्व वेदान्त, इतिहास, पुराण, स्मृतिरूप शास्त्र उपयोगी आहे. ( सर्व निवृत्तिशास्त्राचा मोक्षाला उपयोग आहे. त्या शास्त्राचाच उल्लेख– )—"**विदित्वा-व्युत्थाय अथ भिक्षाचर्यं चरन्ति**"—त्याच या आत्म्याला जाणून ब्राह्मण पुत्रैषणा, वित्तैषणा व लोकैषणा यांपासून व्युत्थान करून नंतर भिक्षाचरण करितात. ( बृ. भा. ३. ५. १. भाष्यार्थ पृ. १३५ )—"**तस्मात् न्यासं एषां तपसां अतिरिक्तं आहुः**"—ज्या अर्थी संन्यास हें पुरुषार्थाचें अन्तरंग साधन आहे त्याअर्थी तो संन्यास या सत्यादि सर्व तपांमध्यें उत्तम साधन आहे, असें विद्वान् सांगतात( सार्थ नारायणो. अ. ७९ पृ. ८२)—"**न्यास एवात्यरेचयत्**"—एका संन्यासानेच त्या सर्वांचें उल्लंघन केलें आहे. सा. नारा. अ. ७८ पृ. ७६—**इति**—अशीं याविषयीं श्रुतिवचनें आहेत. —'**संन्यासः कर्मणां न्यासः**'—संन्यास म्ह० कर्मांचा त्याग—'**वेदान् इमं च लोकं अमुं च परित्यज्य**'—वेदांना, म्ह० वेदोक्त कर्मांना, या लोकाला व परलोकाला सोडून—'**त्यज धर्मं अधर्मं च**'—धर्माला सोड व अधर्माला सोड.—**इत्यादि**—अशा प्रकारचीं वचनें महाभारतांतील शांतिपर्वादिकांत आहेत.—**इह च वाक्यानि**

**दर्शितानि**—येथेंहि 'सर्वकर्माणि मनसा संन्यस्य' इत्यादि वाक्यें प्रदर्शित केलीं आहेत. ( अहोपण, त्या वाक्यांचें तात्पर्य स्वरूपतः कर्मत्यागामध्यें नाहीं, अशी आशंका घेऊन सांगतात-)—**तेषां वाक्यानां आनर्थक्यं न च युक्तं**—त्या वाक्यांचें व्यर्थत्व ह्म० तीं सर्व वाक्ये स्वार्थीं प्रमाण नाहींत, त्यांचा अर्थ निराळाच आहे, असें म्हणणें युक्त नव्हे.—**न च अर्थवादत्वं स्वप्रकरणस्थत्वात्**—तीं अर्थवाद वाक्यें आहेत, असेंहि म्हणतां येत नाही. कारण तीं वाक्ये आपल्या प्रकरणामध्यें स्थित आहेत. [ तीं वाक्यें निवृत्तिशास्त्रांतील आहेत, प्रवृत्तिशास्त्रांतील नव्हेत. तीं प्रवृत्तिशास्त्रांतील जर असतीं तर प्रकरणविरोध येतो म्हणून त्यांना अर्थवाद मानतां आलें असतें. पण स्वप्रकरणांतच-संन्यासप्रकरणांतीलच तीं असल्यामुळें त्यांना तसें मानतां येत नाही. मोक्षोपयोगी ज्ञाननिष्ठेची अपेक्षा करणाऱ्या मुमुक्षूंचा अधिकार संन्यासातच आहे. कर्मनिष्ठेमध्यें नाही, याविषयी आणखीं एक कारण-] —**च मोक्षस्य प्रत्यगात्म-अविक्रयस्वरूपनिष्ठत्वात्**—आणि मोक्षाला प्रत्यगात्म-अविक्रियस्वरूपनिष्ठत्व आहे [ ह्म० मोक्ष प्रत्यगात्माच्या अविक्रिय स्वरूपनिष्ठ आहे. प्रत्यगात्म्याच्या अविक्रिय स्वरूपांत निश्चयानें स्थित होणे, हाच मोक्ष आहे. त्यामुळें ज्ञाननिष्ठेची अपेक्षा करणाऱ्या मुमुक्षूचा कर्मसंन्यासांतच अधिकार आहे. कर्मनिष्ठा ज्ञाननिष्ठेच्या विरुद्ध आहे, याविषयीं दृष्टान्त-]—**पूर्वसमुद्रं जिगमिषोः प्रातिलोम्येन प्रत्यक्समुद्रं जिगमिषुणा समानमार्गत्वं न हि संभवति**—पूर्वसमुद्राकडे जाण्याची इच्छा करणाराचें त्याच्या अगदीं उलट-पश्चिम समुद्राला जाण्याची इच्छा करणाराशीं समानमार्गत्व संभवत नाहीं. [ अगदीं विरुद्ध दिशेला जाणाऱ्या त्या दोघांचा एकच मार्ग संभवत नाहीं. आचार्यांनीं दिलेला हा दृष्टान्त अगदीं समर्पक आहे. बुभुक्षु व मुमुक्षु यांचे मार्ग इतकेच भिन्न व परस्परविरुद्ध आहेत. आतां ज्ञाननिष्ठेच्या स्वरूपाचा अनुवाद करून कर्मनिष्ठेशीं तिचें साहचर्य किती विरुद्ध आहे, तें सांगतात-] —**प्रत्यगात्मविषयप्रत्ययसंतानकरणाभिनिवेशः च ज्ञाननिष्ठा**—प्रत्यगात्म्याचा जो प्रत्यय-साक्षात्कार त्याला अविच्छिन्न-सतत टिकविण्याचा जो अभिनिवेश -आग्रह तीच ज्ञाननिष्ठा होय.—**सा च प्रत्यक्समुद्रगमनवत् कर्मणा सहभावित्वेन विरुध्यते**—ती पश्चिमसमुद्राकडे गमन करण्याप्रमाणें असलेल्या कर्माशीं सहभावित्वानें विरुद्ध आहे. [ ज्ञाननिष्ठेचा कर्मनिष्ठेशीं सहभाव-साहचर्य संभवत नाहीं. ज्ञान व कर्म यांच्यामध्यें विरोधबुद्धि कशी होते, अशी आशंका घेऊन कर्मे ज्ञानानें निवृत्त होतात ही गोष्ट श्रुति-स्मृतिप्रसिद्ध आहे, असें सांगतात-]—**पर्वतसर्षपयोः इव अन्तरवान् विरोधः प्रमाणविदां निश्चितः**—पर्वत व रायी-मोहरी यांच्या इतका अन्तरवान् कर्म व ज्ञान यांतील विरोध, प्रमाणवेत्त्यांना निश्चित झालेला आहे. ( कर्म व ज्ञान यांत मोहरी व पर्वत यांच्या इतकें अन्तर आहे. एका धर्मीमध्यें त्यांचें सांकर्यानें राहणें शक्य नाहीं, हे प्रमाणज्ञांना निश्चयानें ज्ञात झालेलें आहे. याप्रमाणें ज्ञान व कर्म यांचा असमुच्चय सिद्ध झाला असतां फलित सांगतात-)—**तस्मात् सर्व-**

**कर्मसंन्यासेन एव ज्ञाननिष्ठा कार्या इति सिद्धं—म्हणून सर्वकर्मसंन्यासानेंच ज्ञाननिष्ठा करावी, असें सिद्ध झालें. ५५.**

---

१ आचार्यांनी ४९ ते ५५ श्लोकांवर सविस्तर व सोपपत्तिक भाष्य लिहिलें आहे. तें वाचकांनी लक्षपूर्वक वाचावें. म्हणजे हा ज्ञानयोगाचा उपसंहार आहे, हें कोणाच्याहि सहज ध्यानांत येईल. ४९ व्या श्लोकांत 'सर्वत्र असक्तचित्त, जितात्मा व निष्काम पुरुष परम नैष्कर्म्यसिद्धीला सन्यासाने प्राप्त होतो' असें सांगितले व 'स्वकर्मानें ईश्वराचेन करून सिद्धीला–ज्ञाननिष्ठायोग्यतारूप सिद्धीला प्राप्त झालेल्या पुरुषाला ही ज्ञाननिष्ठारूप नैष्कर्म्यसिद्धि कशी–कोणत्या क्रमाने प्राप्त होते,' ते सांगण्यासाठी ५०ते ५५ श्लोक आहेत. स्वकर्माने परमात्मपूजा केली असता मिळणारी सिद्धि म्ह० मोक्ष नव्हे, हे 'सिद्धिं प्राप्तो यथा ब्रह्म प्राप्नोति' या शब्दावरूनच स्पष्ट होतें व ब्रह्मप्राप्ति हीच परा ज्ञाननिष्ठा आहे, हे 'निष्ठा ज्ञानस्य या परा' यांवरून सिद्ध होते. नैष्कर्म्य म्ह० कर्माभाव-अवस्था; ती ज्ञाननिष्ठारूप होय. यास्तव ही स्थिति कर्मयोगाच्या पलीकडची आहे. तथापि रहस्यकार ५०–५६ श्लोकावरील टीपेत—"वरील सिद्धावस्थेचें वर्णन कर्मयोग्याचें आहे, कर्मसन्यास करणाऱ्या पुरुषाचे नव्हे, हे लक्षात ठेवले पाहिजे" असे बजावितात. पण ५० ते ५५ श्लोकाचा अर्थ पाहिल्यास त्यात कर्मांचें नावहि नाही. उलट त्यातील सर्व धर्म कर्मयोगाला प्रतिबंध करणारेच आहेत. 'यतवाक्कायमानसः, नित्य ध्यानयोगपरः, वैराग्य समुपाश्रितः, अहंकार... परिग्रह विमुच्य' इत्यादि धर्म विशेषेकरून कर्मविरोधी आहेत. 'परा भक्ति लभते' या वचनाने सातव्या अध्यायात सांगितलेल्या चार भक्तांतील ज्ञानी भक्ताची ज्ञानरूपभक्तिच विवक्षित आहे. अर्थात् त्यासंबधानें रहस्यकारांनी जी ओढाताण केली आहे ती उपेक्षेलाच पात्र होय. "कर्मयोग्याला प्राप्त होणारी ही अखेरची स्थिति आणि कर्मसन्याससमार्गानें प्राप्त होणारी अखेरची स्थिति केवल मानसिकदृष्ट्या एकच असल्यामुळे हीं वर्णनें आमच्याच मार्गांतील आहेत, असे म्हणण्यास सन्यासमार्गातील टीकाकारास सवड झाली आहे. पण हा अर्थ खरा नव्हे," वगैरे जे रहस्यकाराचे म्हणणे आहे, त्याला आम्हीहि पूर्वीच उत्तर दिलेले असल्यामुळे पुनः विस्तार करीत नाही. पण एवढेच सांगतों की कर्मयोगानेच का होईना पण ब्रह्मभाव जर प्राप्त होत असेल तर तो सुद्धा निष्क्रिय-आत्मरूपच असला पाहिजे. मानसिक स्थिति वर वर्णन केल्याप्रमाणे झाल्यावर जगाच्या उलाढाली होणे शक्य नाही. निष्क्रियत्व हेंच आत्मरूप व सक्रियत्व हेंच अनात्मरूप होय. आत्मरूप होणें हाच जर खरा मोक्ष असेल, व गीतेत तोच सांगितला आहे, तर मुमुक्षूला निष्क्रियच बनलें पाहिजे. जेथे सक्रियत्व तेथें मोक्ष नाही. स्वरूपावस्थान नाही. जेथें चलन तेथें अचलत्व शक्य नाही. आत्मा अचल आहे (२.२४) यास्तव फलत्यागादिरूप संन्यास हा मुख्यसंन्यास नव्हे. 'एका कर्मयोगानेच मोक्षासुद्धा सर्व सिद्धि प्राप्त होतात' हा भयंकर अपसिद्धान्त आहे. गीतेंतहि तसें सांगितलेले नाही. उलट 'तावान् सर्वेषु वेदेषु ब्राह्मणस्य विजानतः' (२.४६) 'सर्व कर्म ज्ञाने परिसमाप्यते' (४.३३) असेंच सांगितलें आहे.

सर्वकर्माण्यपि सदा कुर्वाणो मद्व्यपाश्रयः ।
मत्प्रसादादवाप्नोति शाश्वतं पदमव्ययम् ॥ ५६ ॥

**अन्वयार्थ—मद्व्यपाश्रयः**—माझ्या ठिकाणीं ज्यानें आपली सर्व वृत्ति अर्पिली आहे, ज्यानें केवल माझाच आश्रय केला आहे, असा ज्ञानी,—**सर्वकर्माणि**—सर्व विहित-निषिद्ध कर्में,—**सदा कुर्वाणः अपि**—नेहमी करीत असला तरी—**मत्प्रसादात्**—माझ्या प्रसादामुळे—**शाश्वतं अव्ययं पदं**—नित्य अक्षय पदाला,—**अवाप्नोति**—प्राप्त होतो. ५६

**स्वकर्मणा भगवतोऽभ्यर्चनभक्तियोगस्य सिद्धिप्राप्तिः फलं ज्ञाननिष्ठायोग्यता । यन्निमित्ता ज्ञाननिष्ठा मोक्षफलावसाना स भगवद्भक्तियोगोऽधुना स्तूयते शास्त्रार्थोपसंहारप्रकरणे शास्त्रार्थनिश्चयदार्ढ्याय—सर्वकर्माणि प्रतिषिद्धान्यपि सदा कुर्वाणोऽनुतिष्ठन्मद्व्यपाश्रयोऽहं वासुदेव ईश्वरो व्यपाश्रयो यस्य स मद्व्यपाश्रयो मय्यर्पितसर्वात्मभाव इत्यर्थः । सोऽपि मत्प्रसादान्ममेश्वरस्य प्रसादादवाप्नोति शाश्वतं नित्यं वैष्णवं पदमव्ययम् ॥ ५६ ॥**

**भाष्यार्थ**—( तर मग ज्ञाननिष्ठेनेंच मोक्ष संभवत असल्यामुळें कर्मानुष्ठानाची सिद्धि होत नाहीं, अशी आशंका घेऊन सांगतात-)—**स्वकर्मणा भगवतः अभ्यर्चनभक्तियोगस्य सिद्धिप्राप्तिः-फलं ज्ञाननिष्ठायोग्यता**—स्वकर्मानें भगवानाचें अभ्यर्चन करणे या भक्तियोगाची सिद्धिप्राप्ति-फल ज्ञाननिष्ठायोग्यता आहे. [ज्ञाननिष्ठेची योग्यता प्राप्त होण्यासाठीं भगवदर्चनरूप स्वकर्म-अनुष्ठान करावे, असा याचा भावार्थ. पण ज्ञाननिष्ठायोग्यतेचा तरी काय उपयोग ? अशी आशंका घेऊन सांगतात-]—**यन्निमित्ता मोक्षफलावसाना ज्ञाननिष्ठा**—ज्या ज्ञाननिष्ठायोग्यतेच्या निमित्तानें मोक्ष या फलामध्यें पर्यवसान पावणारी ज्ञाननिष्ठा सिद्ध होते. [ अर्थात् ज्ञाननिष्ठासिद्धीसाठीं ज्ञाननिष्ठायोग्यता पाहिजे ] यास्तव—**सः भगवद्भक्तियोगः अधुना शास्त्रार्थोपसंहारप्रकरणे शास्त्रार्थनिश्चयदार्ढ्याय स्तूयते**—तो ज्ञाननिष्ठायोग्यता देणारा भगवद्भक्तियोग आतां शास्त्रार्थाच्या उपसंहारप्रकरणांत शास्त्रार्थाचा निश्चय दृढ करण्यासाठीं स्तुति केला जातो म्ह० त्या भगवद्भक्तियोगाची आतां स्तुति करितात. [ ठिकठिकाणीं सांगितलेल्याच कर्मानुष्ठानाचा येथे प्रकरणवशात् उपसंहार केला जातो. तो शास्त्रार्थनिश्चयाची दृढता व्यक्त करतो. जरी एखाद्या कर्मानुष्ठान करणाऱ्या पुरुषाचें चित्तशुद्धीच्या द्वारा कैवल्य सिद्ध होतें तरी पापबाहुल्यामुळें कर्मानुष्ठान करणाऱ्याहि पुष्कळांचें कैवल्य चित्तशुद्धीच्या अभावीं सिद्ध होत नाहीं, अशी आशंका घेऊन भगवान् सांगतात-]—**सर्वकर्माणि-प्रतिषिद्धानि अपि-सदा कुर्वाणः-अनुतिष्ठन्**—सर्व कर्में ( हा श्लोक ईश्वराराधनाच्या स्तुतिपर असल्यामुळें ) सर्व-प्रतिषिद्ध कर्मेंहि सदा करणारा-प्रतिषिद्ध कर्मांचेंहि नित्यनैमित्तिकांप्रमाणें सतत अनुष्ठान करणारा —**मद्व्यपाश्रयः-अहं वासुदेवः ईश्वरः व्यपाश्रयः यस्य सः मद्व्यपाश्रयः**

**मयि-अर्पित-सर्वात्मभावः इत्यर्थः**—मद्व्यपाश्रय-मी वासुदेव-ईश्वर ज्याचा व्यपाश्रय आहे, तो मद्व्यपाश्रय होय म्ह० माझ्या ठिकाणी ज्यानें सर्वात्मभाव अर्पिला आहे, असा याचा भावार्थ.—**सः अपि मत्प्रसादात्-मम ईश्वरस्य प्रसादात् शाश्वतं-नित्यं अव्ययं वैष्णवं पदं अवाप्नोति**—तोहि माझ्या प्रसादामुळे-मज ईश्वराच्या अनुग्रहामुळे शाश्वत-नित्य अव्यय वैष्णवपदाला प्राप्त होतो. ५६.

**चेतसा सर्वकर्माणि मयि संन्यस्य मत्परः ।**
**बुद्धियोगमुपाश्रित्य मच्चित्तः सततं भव ॥ ५७ ॥**

**अन्वयार्थ—सर्वकर्माणि**—सर्व कर्मे—**चेतसा**—विवेकबुद्धीने—**मयि**—मज ईश्वराच्या ठिकाणी—**संन्यस्य**—अर्पण करून,—**मत्परः**—मी ज्याला श्रेष्ठ आहें असा होऊन—**बुद्धियोगं**—बुद्धियोगाचा—**उपाश्रित्य**—आश्रय करून—**मच्चित्तः**—माझ्या ठिकाणीं ज्याचे चित्त आहे असा—**सततं**—नेहमी—**भव**—तूं हो. ५७

**यस्मादेवं तस्मात्—चेतसा विवेकबुद्ध्या सर्वकर्माणि दृष्टादृष्टार्थानि मयीश्वरे संन्यस्य यत्करोषि यदश्नासीत्युक्तन्यायेन मत्परोऽहं वासुदेवः परो यस्य तव स त्वं मत्परः सन्बुद्धियोगं मयि समाहितबुद्धित्वं बुद्धियोगस्तं बुद्धियोगमुपाश्रित्याऽऽश्रयोऽनन्यशरणत्वं मच्चित्तो मय्येव चित्तं यस्य तव स त्वं मच्चित्तः सततं सर्वदा भव ॥५७॥**

**भाष्यार्थ—यस्मात् एवं तस्मात्**—ज्याअर्थी परमेश्वराच्या प्रसादाचें असे माहात्म्य आहे त्याअर्थी त्याच्या अनुग्रहासाठी तूं यत्न करावास असे सांगतात—**चेतसा-विवेकबुद्ध्या**—मनाने म्ह० विवेकबुद्धीने—**दृष्टादृष्टार्थानि सर्वकर्माणि**—दृष्ट फल देणारे व अदृष्ट फल देणारी सर्व कर्मे—**मयि ईश्वरे 'यत् करोषि यत् अश्नासि' इति उक्तन्यायेन संन्यस्य**—मज ईश्वराचे ठिकाणी 'यत् करोषि यत् अश्नासि' (९.२७. पृ ७१४.) या पूर्वी सांगितलेल्या न्यायाने समर्पण करून—**मत्परः-अहं वासुदेवः परः यस्य तव स त्वं मत्परः सन्**—मत्पर-मी वासुदेव ज्या तुला पर म्ह० श्रेष्ठ आहे, तो तूं मत्पर होऊन—**बुद्धियोगं-मयि समाहितबुद्धित्वं बुद्धियोगः तं बुद्धियोगं उपाश्रित्य**—बुद्धियोगाला-माझ्या

१ हा श्लोक मोक्षफलामध्यें पर्यवसान पावणाऱ्या ज्ञाननिष्ठेचें साधन जो भक्तियोग त्याच्या स्तुतिपर आहे, असे आचार्य म्हणतात. अर्थात् आचार्य त्याचा अन्तर्भाव वरील ज्ञाननिष्ठेच्या क्रमांत करीत नाहींत. रहस्यकार त्यांतच त्याचा अन्तर्भाव करितात. पण 'सर्वकर्माणि अपि सदा कुर्वाणः' येथील 'अपि'शब्दावरूनच हा भिन्न विषय ठरतो. श्लोकाचा खरा अर्थ भाष्यावरूनच समजून घ्यावा.

ठिकाणीं समाहितबुद्धित्व हाच बुद्धियोग त्या बुद्धियोगाचा आश्रय करून—**आश्रयः -अनन्यशरणत्वं**—आश्रय करणे म्ह० अनन्य शरण होणे, बुद्धियोगाला अनन्य शरण होऊन—**मच्चित्तः-मयि एव चित्तं यस्य तव सः त्वं मच्चित्तः सततं सर्वदा भव**—मच्चित्त-माझ्या ठिकाणीच ज्या तुझे चित्त आहे तो तूं मच्चित्त सतत -सर्वदा हो. ५७.

**मच्चित्तः सर्वदुर्गाणि मत्प्रसादात्तरिष्यसि ।**
**अथ चेत्त्वमहंकारान्न श्रोष्यसि विनङ्क्ष्यसि ॥५८॥**

**अन्वयार्थ—मच्चित्तः**—माझ्याच ठिकाणीं ज्याने चित्त लावले आहे असा तूं—**मत्प्रसादात्**—माझ्या कृपेमुळे—**सर्वदुर्गाणि**—संसाराला कारण होणाऱ्या अज्ञानादि सर्व निमित्तांना—**तरिष्यसि**—तरशील, त्यांचे उल्लंन करून जाशील.—**अथ चेत्**—पण जर,—**त्वं**—तूं—**अहंकारात्**—अभिमानामुळें—**न श्रोष्यसि**—माझें ऐकणार नाहींस तर—**विनंक्ष्यसि**—विनाश पावशील. ५८

**मच्चित्तः सर्वदुर्गाणि सर्वाणि दुस्तराणि संसारहेतुजातानि मत्प्रसादात्तरिष्यस्यतिक्रमिष्यसि । अथ चेद्यदि त्वं मदुक्तमहंकारात्पण्डितोऽहमिति न श्रोष्यसि न ग्रहीष्यसि ततस्त्वं विनङ्क्ष्यसि विनाशं गमिष्यसि ॥ ५८ ॥**

**भाष्यार्थ**—( मच्चित्त झाल्यानें काय होते, तें सांगतात-)—**मच्चित्तः सर्वदुर्गाणि-सर्वाणि दुस्तराणि संसारहेतुजातानि मत्प्रसादात् तरिष्यसि-अतिक्रमिष्यसि**—मच्चित्त झालेला तूं सर्व दुर्गाना-सर्व दुस्तर संसारकारणांना-संसाराच्या सर्व निमित्ताना माझ्या अनुग्रहाने तरशील, सर्व संसारकारणांचें उल्लंघन करून जाशील.—**अथ चेत् यदि त्वं पंडितः अहं इति अहंकारात् मदुक्तं न श्रोष्यसि-न ग्रहीष्यसि**—पण असें असूनहि जर तूं ' मी पंडित आहें ' अशा

---

१ रहस्यंकार 'बुद्धियोग म्हणजे फलाशेच्या ठिकाणीं बुद्धि न ठेवता कर्मे करण्याची युक्ति किंवा समत्वबुद्धि' असा अर्थ करितात, व तो २.४९ श्लोकांतील अर्थाप्रमाणेच आहे, असेंहि म्हणतात, व ' कर्मापेक्षा बुद्धि श्रेष्ठ ' या तत्त्वाचा हा उपसंहार म्हणतात. कर्मसन्यास म्ह० काय हेंहि यांतच " मनानें ( म्ह० कर्मत्यागानें नव्हे तर केवल बुद्धीनें ) मला सर्व कर्मे अर्पण करून " या शब्दांनी सांगितलें आहे, असे म्हणतात. पण तें बरोबर नाही. कारण त्यावर पुनरुक्त दोष येतो. 'मनानें-बुद्धीने कर्मे ईश्वरार्पण करणें' व 'फलाशेच्या ठिकाणीं बुद्धि न ठेवणे' यांत अर्थतः फरक कांहीच नाही. वस्तुतः येथें ' सतत मच्चित्त हो ' हें विधान आहे. तो कसा ? तर " सर्व कर्मे विवेकबुद्धीनें मला अर्पण करून व माझ्या ठिकाणीं बुद्धि ठेवून मच्चित्त हो ' असें येथें सांगितलें आहे. केवल मनानें कर्मत्याग कसा करावयाचा ? मनानें कर्मत्याग केल्यावर बाह्यक्रिया होणें शक्य नाहीं, हे पूर्वी सांगितलेंच आहे. ( पृ. ११३ पहा. )

अभिमानानें मीं सांगितलेलें हें न ऐकशील-त्याचा स्वीकार न करशील,—**ततः त्वं विनङ्क्ष्यसि-विनाशं गमिष्यसि**—तर तूं विनष्ट होशील-विनाश पावशील. ५८

**यदहंकारमाश्रित्य न योत्स्य इति मन्यसे ।**
**मिथ्यैष व्यवसायस्ते प्रकृतिस्त्वां नियोक्ष्यति ॥५९॥**

**अन्वयार्थ—अहंकारं आश्रित्य**—अहंकाराचा आश्रय करून—**न योत्स्ये**—मी लढणार नाहीं—**इति यत्**—असे जे—**मन्यसे**—तूं समजतोस, तूं ह्मणत आहेस—**एषः**—हा—**ते**—तुझा—**मिथ्या व्यवसायः**—खोटा निश्चय आहे—**प्रकृतिः**—तुझा क्षत्रियस्वभाव—**त्वाम्**—तुला—**नियोक्ष्यति**—युद्ध करावयास लावील.५९

**इदं च त्वया न मन्तव्यं स्वतन्त्रोऽहं किमर्थं परोक्तं करिष्यामीति—यच्चैतत्त्वमहंकारमाश्रित्य न योत्स्य इति न युद्धं करिष्यामीति मन्यसे चिन्तयसि निश्चयं करोषि मिथ्यैष व्यवसायो निश्चयस्ते तव यस्मात्प्रकृतिः क्षत्रस्वभावस्त्वां नियोक्ष्यति ॥५९॥**

**भाष्यार्थ—अहं स्वतन्त्रः किमर्थं परोक्तं करिष्यामि इति इदं च त्वया न मन्तव्यं**—मी स्वतंत्र आहें, दुसऱ्याने सांगितलेले काय म्हणून करूं, असेहि तूं समजूं नयेस. हेंहि तूं मनांत आणूं नकोस.—**यत् च एतत् त्वं अहंकारं आश्रित्य न योत्स्ये इति-न युद्धं करिष्यामि इति मन्यसे-चिन्तयसि-निश्चयं करोषि**—आणि जे तूं अहंकाराचा आश्रय करून-अभिमान धरून लढणार नाहीं, ' मी युद्ध करणार नाहीं ' असे समजत आहेस-चिंतन करीत आहेत-निश्चय करीत आहेस—**एषः ते-तव व्यवसायः-निश्चयः मिथ्या**—हा तुझा निश्चय-आग्रह मिथ्या आहे—**यस्मात् प्रकृतिः-क्षत्रस्वभावः त्वां नियोक्ष्यति**—कारण तुझी प्रकृति-तुझा क्षत्रियस्वभाव तुला युद्धामध्ये नियुक्त करील, तुला युद्ध करावयास लावील. ५९.

**स्वभावजेन कौन्तेय निबद्धः स्वेन कर्मणा ।**
**कर्तुं नेच्छसि यन्मोहात्करिष्यस्यवशोऽपि तत् ॥ ६०**

**अन्वयार्थ—कौन्तेय**—हे अर्जुना !—**स्वभावजेन स्वेन कर्मणा**—स्वभावजन्य अशा आपल्या. कर्माने-स्वकर्तव्याने—**निबद्धः**—अत्यंत बद्ध झालेला तूं—**मोहात्**—अविवेकामुळे,—**यत् कर्तुं न इच्छसि**—जे करण्याची इच्छा करीत नाहींस,—**तत्**—तें युद्ध—**अवशः अपि**—स्वभाववश होऊनहि—**करिष्यसि**—करशील. ६०

**यस्माच्च—स्वभावजेन शौर्यादिना यथोक्तेन कौन्तेय निबद्धो निश्चयेन बद्धः स्वेनाऽऽत्मीयेन कर्मणा कर्तुं नेच्छसि यत्कर्म मोहादविवेकतः करिष्यस्यवशोऽपि परवश एव तत्कर्म ॥ ६० ॥**

**भाष्यार्थ—यस्मात् च**—आणि ज्या अर्थी—**कौन्तेय स्वभावजेन-यथोक्तेन शौर्यादिना निबद्धः-स्वेन-आत्मीयेन कर्मणा निश्चयेन बद्धः**—अर्जुना स्वभावापासून झालेल्या-पूर्वोक्त शौर्यादि कर्मांनें निबद्ध झालेला-आपल्या स्वधर्मरूप कर्मांने निश्चयाने बद्ध झालेला तूं—**यत् कर्म मोहात्-अविवेकतः कर्तुं न इच्छसि**—जे कर्म मोहामुळे-अविवेकाने करण्याची इच्छा करीत नाहींस—**तत् कर्म अवशः अपि परवशः एव करिष्यसि**—तें कर्म तूं अवश होऊनहि-प्रकृतीच्या अधीन होऊनच करशील. ६०

**ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति ।**
**भ्रामयन्सर्वभूतानि यन्त्रारूढानि मायया ॥ ६१ ॥**

**अन्वयार्थ—अर्जुन**—हे अर्जुना!—**ईश्वरः**—परमात्मा—**सर्वभूतानां**—सर्वभूतांच्या,—**हृद्देशे**—हृदयप्रदेशी,—**यंत्रारूढानि सर्वभूतानि**—जणुकाय यंत्रावर बसलेल्या मनुष्यांप्रमाणें सर्व भूतांना—**मायया**—मायेनें—**भ्रामयन्**—भ्रमण करवीत—**तिष्ठति**—राहतो. ६१.

यस्मात्—ईश्वर ईशनशीलो नारायणः सर्वभूतानां सर्वप्राणिनां हृद्देशे हृदयदेशेऽर्जुन शुक्लान्तरात्मस्वभावो विशुद्धान्तःकरण इति, 'अहश्च कृष्णमहरर्जुनं च' इति दर्शनात् । तिष्ठति स्थितिं लभते । स कथं तिष्ठतीत्याह भ्रामयन्भ्रमणं कारयन्सर्वभूतानि यन्त्रारूढानि यन्त्राण्यारूढान्यधिष्ठितानीवेतीवशब्दोऽत्र द्रष्टव्यः । यथा दारुकृतपुरुषादीनि यन्त्रारूढानि मायया छद्मना भ्रामयंस्तिष्ठतीति संबन्धः ॥ ६१ ॥

**भाष्यार्थ**—( याहि कारणानें तूं युद्ध करावेंस, असे भगवान् सांगतात-)—**यस्मात्**—ज्याअर्थी—**ईश्वरः-ईशनशीलः नारायणः**—ईश्वर-ईशन-नियमन करण्याचे ज्याचे शीलच आहे असा नारायण—**सर्वभूतानां-सर्वप्राणिनां हृद्देशे-हृदयदेशे**—सर्व भूतांच्या-सर्व प्राण्यांच्या हृद्देशांत-हृदयप्रदेशांत—**अर्जुन-शुक्लान्तरात्मस्वभावः-विशुद्धान्तःकरणः इति**—हे अर्जुन, ज्याचा अन्तरात्मस्वभाव शुक्ल आहे म्ह० ज्याचें अन्तःकरण शुद्ध आहे, म्हणून अर्जुन-( अर्जुनशब्दाच्या या अर्थाविषयीं श्रुतीचें प्रमाण दाखवितात-)—'**अहश्च कृष्णं अहरर्जुनं च**-' **इति दर्शनात्**—कांहीं दिवस कृष्ण-अस्वच्छ-कलुषित दिसतो व कांही अर्जुन-अतिस्वच्छ-शुद्धस्वभावाचा दिसतो, याप्रमाणें श्रुतींत शुक्लशब्दाचा पर्याय म्हणून अर्जुनशब्दाचा प्रयोग केलेला दिसतो.—**तिष्ठति-स्थितिं लभते**—( ईश्वर सर्व प्राण्यांच्या हृदयांत ) राहतो-स्थितीला प्राप्त होतो.—**स कथं तिष्ठति इति आह**—तो कसा राहतो, असें अर्जुन विचारील म्हणून भगवान् सांगतात—**भ्रामयन्-भ्रमणं कारयन् सर्वभूतानि यन्त्रारूढानि-यन्त्राणि आरूढानि अधिष्ठितानि इव इति इवशब्दः अत्र द्रष्टव्यः**—सर्व भूतांकडून भ्रमण करवीत ( सर्व भूतें कशीं ?)-यन्त्रारूढ झालेलीं, जणुं काय यंत्रावर आरूढ-अधिष्ठित झालेलीं जीं सर्व भूतें त्यांच्या-

करून भ्रमण करवीत ' यंत्रारूढानि इव ' असा येथें ' इव ' शब्द—जणुं काय हा शब्द आहे, असें समजावें. ( त्याचेंच स्पष्टीकरण-)—**यथा दारुकृतपुरुषादीनि यन्त्रारूढानि मायया-छद्मना भ्रामयन् तिष्ठति इति संबन्धः**—ज्याप्रमाणें लौकिक मायावी-कळसूत्री बाहुल्याचा खेळ करणारा काष्ठमय बाहुल्या वगैरे यंत्रांना मायेनें-कांहीं गुप्त योजनेने फिरवांत-त्याच्याकडून खेळ-भ्रमण करवीत राहतो त्याप्रमाणें ईश्वरहि जणुं काय यंत्रारूढ झालेल्या या सर्व भूतांना मायेनें भ्रमण करवीत त्यांच्या हृदयांत राहतो, असा संबंध. ६१

**तमेव शरणं गच्छ सर्वभावेन भारत ।**
**तत्प्रसादात्परां शान्तिं स्थानं प्राप्स्यसि शाश्वतम् ॥६२**

**अन्वयार्थ—भारत**—हे अर्जुना !—**तं एव**—त्याच ईश्वराला—**सर्वभावेन**—सर्व प्रकारें—**शरणं गच्छ**—शरण जा—**तत्प्रसादात्**—त्याच्या प्रसादामुळें—**परां शान्तिं**—सर्वोत्कृष्ट शांतिला—**च**—आणि—**शाश्वतं स्थानं**—नित्य स्थानाला—**प्राप्स्यसि**—प्राप्त होशील. ६२

तमेवेश्वरं शरणमाश्रयं संसारार्तिहरणार्थं गच्छाऽऽश्रय सर्वभावेन सर्वात्मना हे भारत ततस्तत्प्रसादादीश्वरानुग्रहात्परां प्रकृष्टां शान्तिं परामुपरतिं स्थानं च मम विष्णोः परमं पदमवाप्स्यसि शाश्वतं नित्यम् ॥ ६२ ॥

**भाष्यार्थ—हे भारत तं एव ईश्वरं शरणं-आश्रयं संसारार्तिहरणार्थं सर्वभावेन-सर्वात्मना गच्छ**—हे अर्जुना, त्याच ईश्वराला संसारपीडा हरण करण्यासाठीं सर्व भावानें म्ह० शरीर, वाणी व मन याच्यायोगाने शरण जा, म्ह० त्याचाच आश्रय कर—**ततः तत्प्रसादात्-ईश्वरानुग्रहात् परां-प्रकृष्टां शांतिं-परां उपरतिं च स्थानं-मम विष्णोः परमं पदं शाश्वतं-नित्यं अवाप्स्यसि**—त्यामुळें-त्याच्या प्रसादानें-तत्त्वज्ञानोत्पत्तीपर्यंत ईश्वराच्या अनुग्रहानें परा-श्रेष्ठ शांतीला म्ह० सर्वोत्तम उपरतीला व स्थानाला-मज विष्णूच्या परम शाश्वत-नित्य पदाला प्राप्त होशील. [ ज्यांत मुक्त पुरुष राहतात ते स्थान, त्या स्थानाला तूं प्राप्त होशील.]६२

**इति ते ज्ञानमाख्यातं गुह्याद्गुह्यतरं मया ।**
**विमृश्यैतदशेषेण यथेच्छसि तथा कुरु ॥ ६३ ॥**

**अन्वयार्थ—इति**—याप्रमाणें—**मया**—मीं—**ते**—तुला—**गुह्यात् गुह्यतरं ज्ञानं**—गुह्याहून अति गुह्य ज्ञान—**आख्यातं**—सांगितलें—**एतत्**—याचा पूर्णपणें—**विमृश्य**—विचार करून मग—**यथा इच्छसि**—जसें तुला वाटेल—**तथा कुरु**—तसें कर. ६३

**इत्येतत्ते तुभ्यं ज्ञानमाख्यातं कथितं गुह्याद्गोप्याद्गुह्यतरमतिशयेन गुह्यं रहस्यमित्यर्थः। मया सर्वज्ञेनेश्वरेण विमृश्य विमर्शनमालोचनं कृत्वैतद्यथोक्तं शास्त्रमशेषेण समस्तं यथोक्तं चार्थजातं यथेच्छसि तथा कुरु ॥ ६३ ॥**

**भाष्यार्थ**—(शास्त्राचा उपसंहार करण्याची इच्छा करणारे भगवान् म्हणतात-) **—इति एतत् ते तुभ्यं ज्ञानं आख्यातं-कथितं गुह्यात्-गोप्यात् गुह्यतरं-अतिशयेन गुह्यं-रहस्यं इत्यर्थः**—हे अशाप्रकारचें ज्ञान तुला सांगितलें. (तें ज्ञान कसें? उत्तर-) गुह्य-अतिशय गोप्य-गुप्त ठेवण्यास योग्य-त्याहून गुह्यतर-अतिशय गुह्य-रहस्य, असा याचा भावार्थ. ('ज्ञायते अनेन इति ज्ञानम्' अशा व्युत्पत्तीनें येथें ज्ञान म्ह० गीताशास्त्र)**—मया सर्वज्ञेन ईश्वरेण**—मीं-सर्वज्ञ ईश्वरानें (हें अतिशय गुह्य गीताशास्त्र तुला सांगितले)**—एतत् यथोक्तं शास्त्रं च यथोक्तं अर्थजातं अशेषेण-समस्तं विमृश्य-विमर्शनं-आलोचनं कृत्वा**—या पूर्वोक्त शास्त्राचा व पूर्वोक्त सर्व विषयांचा पूर्णपणे विचार-आलोचन करून**—यथा इच्छसि तथा कुरु**—जशी तुझी इच्छा असेल तसें कर, म्ह० ज्ञान किंवा कर्म यांतील जें तुला इष्ट वाटेल त्याचे अनुष्ठान कर[1]. ६३.

---

१ रहस्यकार ५९-६३ श्लोकावरील टीपेत म्हणतात-"या श्लोकात कर्मपारतंत्र्याचें गूढतत्त्व सांगितलें आहे. .. आत्मा स्वत. जरी स्वतन्त्र आहे तरी जगाच्या म्ह० प्रकृतीच्या व्यवहाराकडे नजर दिली असता असें आढळून येतें की, कर्माचें जें रहाटगाडगे अनादिकालापासून चालत आहे त्यावर आत्म्याची काही सत्ता नाही." ... पण हें सर्व म्हणणें अज्ञ जीवाला लागू आहे. नित्यशुद्ध-बुद्ध-मुक्तस्वभाव आत्म्याला लागू नाही. यावरूनच अर्जुन ज्ञाननिष्ठ होण्यास अधिकारी नव्हता, हे उघड होतें. गुणातीताला 'प्रकृतिस्त्वां नियोक्ष्यति' असें म्हणता येणे शक्य नाही. कारण ज्याला प्रकृति नियुक्त करते तो गुणातीत किंवा स्थितप्रज्ञच नव्हे. अर्थात हा उपदेश अनात्मज्ञ-भेददृष्टि साधक पुरुषासाठींच आहे, हें निर्विवाद सिद्ध होतें. ६३ व्या श्लोकांतील 'यथेच्छसि तथा कुरु' या वाक्याचा फार गूढ अर्थ आहे, असें म्हणून "हें ज्ञान तू समजून घेतलेंस म्हणजे तूं स्वयंप्रकाश होशील व नंतर तू स्वेच्छेनें जें करशील तेंच धर्म्य व प्रमाण होईल, आणि अशा प्रकारची स्थितप्रज्ञाची अवस्था तुला प्राप्त झाल्यावर तुझ्या इच्छेला आळा घालण्याची जरूर राहणार नाही, असा यातील खरा भावार्थ आहे." असें रहस्यकार सांगतात. पण तो भावार्थ रहस्यकाराच्या मनचा आहे. मूळ श्लोकातून तो निघत नाहीं. "बुद्धि साम्यावस्थेस पोंचली म्ह० वाईट इच्छाच शिल्लक रहात नसल्यामुळें अशा ज्ञानी पुरुषाचें इच्छास्वातंत्र्य त्यास किंवा जगास कधींच अपायकारक होऊं शकत नाहीं" असेंहि त्या भावार्थाच्या उपपादनार्थ सामान्यतः सांगितलें आहे. पण प्रकृतिपरवश-कर्मपरतंत्र असलेल्या पुरुषाची इच्छा अशी असणें शक्य नाहीं. ज्ञानी पुरुषहि तीव्र प्रारब्धाचें उल्लंघन करूं शकत नाही, वगैरे आम्हीं वर सांगितलेंच आहे. (पृ. ११५८) गुणातीत किंवा स्थितप्रज्ञ तीव्र प्रारब्धानें जरी उल्लंघन करीत नसला तरी अनात्मज्ञाप्रमाणें कर्मपरवश, प्रकृतिपरतंत्र होत नाहीं. कारण त्यांचा परिणाम ज्यावर घडणार ते शरीरेन्द्रियादि माझ्याहून अगदी पृथक् आहे, असें तो जाणतो व त्यामुळे व्याकुळ होत नाहीं. पूर्ण स्वातंत्र्याचा-स्वाराज्याचा अनुभव घेतो.

सर्वगुह्यतमं भूयः शृणु मे परमं वचः ।
इष्टोऽसि मे दृढमिति ततो वक्ष्यामि ते हितम् ॥ ६४

**अन्वयार्थ—भूयः**—पुनरपि—**मे**—माझें—**सर्वगुह्यतमं**—सर्व गुह्यांतील अतिशय गुह्य—**परमं वचः**—परम वचन—**शृणु**—ऐक—**मे**—मला तूं—**दृढं इष्टः**—अत्यंत प्रिय—**असि**—आहेस—**इति ततः**—म्हणून, त्या कारणानें—**ते हितं**—तुझें हित—**वक्ष्यामि**—मी सांगतों. ६४

**भूयोऽपि मयोच्यमानं शृणु— सर्वगुह्यतमं सर्वगुह्येभ्योऽत्यन्तरहस्यमुक्तमप्यसकृद्भूयः पुनः शृणु मे मम परमं प्रकृष्टं वचो वाक्यम् । न भयान्नाप्यर्थकारणाद्वा वक्ष्यामि किं तर्हीष्टः प्रियोऽसि मे मम दृढमव्यभिचारेणेति कृत्वा ततस्तेन कारणेन वक्ष्यामि कथयिष्यामि ते हितं परं ज्ञानप्राप्तिसाधनम् । तद्धि सर्वहितानां हिततमम् ॥ ६४ ॥**

**भाष्यार्थ—भूयः अपि मया उच्यमानं शृणु**—गीताशास्त्राचें पूर्वापर विचारानें तात्पर्य ठरविण्यास जर तूं असमर्थ असशील तर पुनरपि मी सांगत असलेलें हे तूं ऐक—**सर्वगुह्यतमं-सर्वगुह्येभ्यः अत्यंतरहस्यं असकृत् उक्तं अपि भूयः-पुनः मे-मम परमं-प्रकृष्टं वचः-वाक्यं शृणु**—सर्वगुह्यतम-सर्व गुह्यांहून अत्यंत रहस्य, वारंवार जरी सांगितलें आहे तरी पुनः माझें हें उत्कृष्ट वाक्य ऐक.—**न भयात् वा न अपि अर्थकारणात् वक्ष्यामि**—मी भयानें किंवा कांहीं-धनादिकांच्या इच्छेनें हें पुनः पुनः सांगत नाहीं—**किं तर्हि**—तर मग पुनः पुनः तेंच तें कां सांगत आहेस?—**मे-मम दृढं-अव्यभिचारेण इष्टः-प्रियः असि**—तूं मला दृढ-निश्चयानें इष्ट-प्रिय आहेस—**इति कृत्वा**—म्हणून पुनः पुनः सांगतों—**ततः-तेन कारणेन ते हितं-परं ज्ञानप्राप्तिसाधनं वक्ष्यामि-कथयिष्यामि**—त्या कारणानें मी तुला हित म्ह० श्रेष्ठ ज्ञानप्राप्तीचें साधन सांगेन—**तत् हि सर्वहितानां हिततमं**—कारण तें ज्ञानप्राप्तीचे साधन सर्व हितांमध्यें अतिशय हित आहे. ६४.

मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ।
मामेवैष्यसि सत्यं ते प्रतिजाने प्रियोऽसि मे ॥६५॥

**अन्वयार्थ—मन्मनाः भव**—तूं माझ्याच मध्ये ज्याचें मन आहे असा हो—**मद्भक्तः भव**—माझाच भक्त हो—**मद्याजी भव**—माझेंच यजन-पूजन करणारा हो—**मां नमस्कुरु**—मलाच नमस्कार कर—**ते सत्यं प्रतिजाने**—मी तुला सत्य प्रतिज्ञा करून सांगतों—**मां एव एष्यसि**—तूं मलाच येऊन पोंचशील—**मे प्रियः असि**—कारण तूं मला प्रिय आहेस ६५.

**किं तदित्याह— मन्मना भव मच्चित्तो भव मद्भक्तो भव मद्भजनो भव मद्याजी मद्यजनशीलो भव मां नमस्कुरु नमस्कारमपि ममैव कुरु । तत्रैवं वर्तमानो वासुदेव**

एव सर्वसमर्पितसाध्यसाधनप्रयोजनो मामेवैष्यस्यागमिष्यसि । सत्यं ते तव प्रतिजाने सत्यां प्रतिज्ञां करोम्येतस्मिन्वस्तुनीत्यर्थः । यतः प्रियोऽसि मे । एवं भगवतः सत्यप्रतिज्ञत्वं बुद्ध्वा भगवद्भक्तेरवश्यंभाविमोक्षफलमवधार्य भगवच्छरणैकपरायणो भवेदिति वाक्यार्थः ॥ ६५ ॥

भाष्यार्थ—**किं तत् इति आह**—तें अत्यंत गुह्य काय आहे, ते सांगतात—**मन्मनाः भव मच्चितः भव मद्भक्तः भव-मद्भजनः भव**—माझ्या ठिकाणींच ज्याचें मन आहे असा हो, माझ्या ठिकाणीच ज्याचे चित्त आहे असा हो, माझा भक्त हो.म्ह० माझेंच भजन करणारा हो.—**मद्याजी-मद्यजनशीलः भव**—माझेंच यजन करणारा हो–माझेंच पूजन करण्याचें ज्याचे शील आहे असा हो—**मां नमस्कुरु-नमस्कारं अपि मम एव कुरु**—नमस्कार सुद्धां मलाच कर ( उत्तरार्धाचें व्याख्यान-) —**तत्र एवं वर्तमानः वासुदेवे एव सर्वसमर्पितसाध्यसाधनप्रयोजनः मां एव एष्यसि-आगमिष्यसि**—या व्यवहारभूमींत अशा रीतीनें वागणारा तूं–वासुदेवामध्येंच ज्यानें सर्व साध्य-साधन-प्रयोजनभाव समर्पिला आहे, असा तूं, मलाच प्राप्त होशील. [ ज्याने आपली सर्व वृत्ति माझ्या ठिकाणी अर्पिली आहे, असा तूं मलाच येऊन पोंचशील. ]—**सत्यं ते प्रतिजाने**—मी तुला सत्य प्रतिज्ञा करून सांगतों—**एतस्मिन् वस्तुनि सत्यां प्रतिज्ञां करोमि इत्यर्थः**—याविषयीं मी सत्य प्रतिज्ञा करतो असा याचा भावार्थ—**यतः मे प्रियः असि**—कारण तूं मला प्रिय आहेस. म्हणून मी अशी प्रतिज्ञा करतो—**एवं भगवतः सत्यप्रतिज्ञत्वं बुद्ध्वा**—याप्रमाणे भगवानांचें सत्यप्रतिज्ञत्व जाणून म्ह० भगवानांची प्रतिज्ञा सत्य आहे, ती केव्हाहि असत्य होणार नाहीं, असा निश्चय करून—**भगवद्भक्तेः अवश्यंभाविमोक्षफलं अवधार्य**—भगवद्भक्तीचें मोक्ष हें फल अवश्य प्राप्त होणारें आहे असा निश्चय करून—**भगवत्-शरणैकपरायणः भवेत् इति वाक्यार्थः**—भगच्छरण होणे हीच एक ज्याची परम गति आहे, हेंच एक ज्याचें श्रेष्ठ साधन आहे, असे व्हावें, असा या वाक्यांचा भावार्थ. ६५.

**सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज ।**
**अहं त्वा सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः ॥ ६६**

अन्वयार्थ—**सर्वधर्मान्**—सर्व धर्म व अधर्म या दोहोंचाहि—**परित्यज्य**—परित्याग करून—**मां एकं**—केवल मलाच—**शरणं व्रज**—शरण ये—**अहं**—

१ या श्लोकात सर्व गुह्यातले गुह्य भगवानानी सांगितलें व तें नवव्या किंवा अकराव्या अध्यायाच्या शेवटी जसें सांगितलें आहे तशाच प्रकारचें आहे. त्यांत मोक्षाचें मुख्य साधन अशी जी भगवत्परायणता तिचाच उपदेश केला आहे. तिलाच आचार्यांनीं कर्मयोगनिष्ठेचें परमरहस्य म्हटलें आहे. ज्ञाननिष्ठा ही त्यापुढील पायरी आहे व तीच पुढील श्लोकांत सांगितली आहे.

मी—**त्वा**—तुला—**सर्वपापेभ्यः**—सर्व पापांपासून—**मोक्षयिष्यामि**—सोडवीन—**मा शुचः**—शोक करूं नकोस ६६.

**कर्मयोगनिष्ठायाः परमरहस्यमीश्वरशरणतामुपसंहृत्याथेदानीं कर्मयोगनिष्ठाफलं सम्यग्दर्शनं सर्ववेदान्तविहितं वक्तव्यमित्याह—सर्वधर्मान्सर्वे च ते धर्माश्च सर्वधर्मास्तान्। धर्मशब्देनात्राधर्मोऽपि गृह्यते नैष्कर्म्यस्य विवक्षितत्वात् "नाविरतो दुश्चरितात्" "त्यज धर्ममधर्मं च" इत्यादिश्रुतिस्मृतिभ्यः। सर्वधर्मान्परित्यज्य संन्यस्य सर्वकर्माणीत्येतत्। मामेकं सर्वात्मानं समं सर्वभूतस्थमीश्वरमच्युतं गर्भजन्मजरामरणविवर्जितमहमेवेत्येवमेकं शरणं व्रज न मत्तोऽन्यदस्तीत्यवधारयेत्यर्थः। अहं त्वा त्वामेवंनिश्चितबुद्धिं सर्वपापेभ्यः सर्वधर्माधर्मबन्धनरूपेभ्यो मोक्षयिष्यामि स्वात्मभावप्रकाशीकरणेन। उक्तं च—'नाशयाम्यात्मभावस्थो ज्ञानदीपेन भास्वता' इति। अतो मा शुचः शोकं मा कार्षीरित्यर्थः॥**

**भाष्यार्थ—कर्मयोगनिष्ठायाः परमरहस्यं ईश्वरशरणतां उपसंहृत्य—** कर्मयोगनिष्ठेचें परम रहस्य जी ईश्वरशरणता-ईश्वरपरायणता तिचा उपसंहार करून **—अथ इदानीं कर्मयोगनिष्ठाफलं सम्यग्दर्शनं सर्ववेदान्तविहितं वक्तव्यं इति आह**—आतां यापुढें कर्मयोगनिष्ठेचे सर्ववेदान्तविहित सम्यग्दर्शन हें फल सांगावें, म्हणून भगवान् म्हणतात—**सर्वधर्मान्-सर्वे च ते धर्माः च सर्वधर्माः तान्**—सर्वधर्मांना-सर्व असे जे धर्म ते सर्व धर्म त्या सर्व धर्मांना—**धर्मशब्देन अत्र अधर्मः अपि गृह्यते नैष्कर्म्यस्य विवक्षितत्वात्**—धर्मशब्दानें येथें अधर्माचेंहि ग्रहण केलें जातें. कारण येथें नैष्कर्म्य विवक्षित आहे. (ज्ञाननिष्ठ मुमुक्षूने धर्माधर्माचा त्याग करावा, याविषयीं श्रुति-स्मृतिप्रमाण-)—"**नाविरतो दुश्चरितात्**-"—शारीर पापापासून निवृत्त न झालेला (का. भाष्यार्थ २.२४. पृ. ६७)—'**त्यज धर्मं अधर्मं च**'—धर्माचा त्याग कर व अधर्माचा त्याग कर (म. भा. शां. ३२९.४०) —**इत्यादि श्रुति-स्मृतिभ्यः**—इत्यादि श्रुति-स्मृतींवरून मुमुक्षूनें धर्माधर्मत्याग करावा असें ठरतें.—**सर्वधर्मान् परित्यज्य-सर्वकर्माणि संन्यस्य इत्यर्थः**—सर्वधर्मांचा परित्याग करून-सर्वकर्मांचा संन्यास करून, असा याचा भावार्थ—**मां एकं -सर्वात्मानं समं सर्वभूतस्थं ईश्वरं अच्युतं गर्भ-जन्म-जरा-मरणविवर्जितं अहं एव इति एवं एकं शरणं व्रज**—मलाच एकाला-सर्वात्मा, सम, सर्वभूतस्थ, ईश्वर, अच्युत, गर्भ-जन्म-जरा-मरणरहित-अशा मला 'मीच एक' अशा प्रकारें मज एकाला शरण जा (याचें तात्पर्य-)—**मत्तः अन्यत् न अस्ति इति अवधारय इत्यर्थः**—माझ्याहून दुसरें कांहीं नाहीं, असा तूं निश्चय कर, असा याचा भावार्थ—**अहं त्वा-त्वां एवं निश्चितबुद्धिं**—मी तुला-अशा प्रकारें 'एक मी आहें' अशी ज्याची बुद्धि निश्चित झाली आहे त्या तुला—**सर्वपापेभ्यः-सर्वधर्माधर्मबन्धनरूपेभ्यः स्वात्मभावप्रकाशीकरणेन मोक्षयिष्यामि**—सर्व पापांपासून-सर्व धर्म व अधर्म यांच्या बंधनरूप पापांपासून आपलें निरुपाधिक स्वरूप प्रकाशित करून मुक्त

करीन ( अर्जुन क्षत्रिय असल्यामुळें त्याचा संन्यासद्वारा ज्ञाननिष्ठेंत मुख्य अधिकार नाहीं.तथापि त्याला पुढें करून त्याच्या द्वारा अधिकाऱ्यांना ज्ञाननिष्ठेचा हा उपदेश केलेला असल्यामुळें त्यांत कांहीं विरोध नाही. याविषयीं गीतेचेंच प्रमाण-)—**'नाशयाम्यात्मभावस्थो ज्ञानदीपेन भास्वता'** ( अ. १०.११ पृ. ७४१ ) **इति उक्तं च**—मी त्यांच्यावर दया करण्यासाठीं त्यांच्या अन्तःकरणांत स्थित होऊन देदीप्यमान ज्ञानदीपानें अज्ञानजन्य अविवेकास घालवितों, असें म्हटलेच आहे.—**अतः**—मी ईश्वर तुझ्या बंधाचें निरसन करून तुझें रक्षण करणारा असल्यामुळे—**मा शुचः-शोकं मा कार्षीः इत्यर्थः**—शोक करूं नको, असा भावार्थ.

## उपसंहार-भाष्य.

**आस्मिन्हि गीताशास्त्रे परं निःश्रेयससाधनं निश्चितं किं ज्ञानं किं कर्म वाऽऽहोस्विदुभयमिति । कुतः संदेहः 'यज्ज्ञात्वाऽमृतमश्नुते' 'ततो मां तत्त्वतो ज्ञात्वा विशते तदनन्तरम्' इत्यादीनि वाक्यानि केवलाज्ज्ञानान्निःश्रेयसप्राप्तिं दर्शयन्ति । 'कर्मण्येवाधिकारस्ते' 'कुरु कर्मैव' इत्येवमादीनि कर्मणामवश्यकर्तव्यतां दर्शयन्ति । एवं ज्ञानकर्मणोः कर्तव्यतोपदेशात्समुच्चितयोरपि निःश्रेयसहेतुत्वं स्यादिति भवेत्संशयः । किं पुनरत्र मीमांसाफलम् । नन्वेतदेवैषामन्यतमस्य परमनिःश्रेयससाधनत्वावधारणम् । अतो विस्तीर्णतरं मीमांस्यमेतत् ॥**

**भाष्यार्थ**—( पूर्वापरपर्यालोचनानें गीताशास्त्राचे व्याख्यान करून व उपसहार करून त्याच्या तात्पर्यार्थाचा निर्धार जरी केला आहे तरी विचारद्वारा त्याचा निश्चय करण्यासाठीं विचार आरंभितात-)—**अस्मिन् हि गीताशास्त्रे परं निःश्रेयससाधनं निश्चितं किं ज्ञानं किं कर्म वा आहोस्वित् उभयं इति**—या सुप्रसिद्ध गीताशास्त्रांत परम निःश्रेयससाधन कोणते निश्चित केलें आहे ? ज्ञान किंवा कर्म, कीं ज्ञान व कर्म हीं दोन्ही समुच्चयानें ? असा संशय येतो.—**कुतः संदेहः**—अहोपण, कांहीं कारणावांचून असा संदेह कां येतो ? ( निरनिराळे अर्थ द्योतन करणारीं अनेक वाक्यें आढळत असल्यामुळे संशय येतो, असें सांगतात-)—**' यज्ज्ञात्वामृतमश्नुते ' ' ततो मां तत्त्वतो ज्ञात्वा विशते तदनन्तरं ' इत्यादीनि वाक्यानि केवलात् ज्ञानात् निःश्रेयसप्राप्तिं दर्शयन्ति**—' यज्ज्ञात्वा० ' ( अ. १३.१२.

---

१ रहस्यकार 'हा श्लोक भक्तिपर आहे,' असे म्हणतात व आचार्य वगैरे ' धर्माबरोबर अधर्माना सोड' असें जे म्हणतात त्याला ' अन्यत्रधर्मात् अन्यत्राधर्मात्० ' हे काठकवचन आधार आहे, असें म्हणतात. पण वस्तुस्थिति तशी नाही. वरील भाष्य पहा. त्यांत आचार्यांनीं आधार दाखविला आहे. भक्तिपर उपसंहार वरच्या श्लोकांत झाला; यास्तव येथे ' मां एकं शरणं व्रज ' हा आत्मनिष्ठ होण्याचाच उपदेश आहे. " मला एकट्याला भज " हा अर्थ बरोबर नाहीं. ' शरणं व्रज ' म्ह० आश्रय कर, मन्निष्ठ हो, ऐक्यज्ञानानें माझ्या स्वरूपास प्राप्त हो, असा येथे उपदेश आहे. ' अशोच्यान्० ' हा उपक्रम व ' मा शुचः ' हा उपसंहार, यावरून शोकनिवृत्ति हाच या गीताशास्त्राच्या उपदेशाचा उद्देश स्पष्ट दिसतो.

पृ. ९२३ ) ' ततो मां० ' (१८.५५. पृ.१२२८) इत्यादि वाक्यें केवल ज्ञानानेच मोक्ष-प्राप्ति होते, असें दाखवितात.—' **कर्मण्येवाधिकारस्ते०** ' (अ. २.४७.पृ. १७१) **' कुरु कर्मैव० '** ( अ. ४.१५. पृ. ३८५ ) **इत्येवमादीनि कर्मणां अवश्यकर्तव्यतां दर्शयन्ति**—' कर्मण्येवाधिकारः ' ' कुरु कर्मैव ' इत्यादि वाक्ये कर्माची अवश्यकर्तव्यता दाखवितात. ( त्यामुळे कर्मानेहि मोक्ष मिळतो, असें वाटतें )—**एवं ज्ञानकर्मणोः कर्तव्यतोपदेशात् समुच्चितयोः अपि निःश्रेयसहेतुत्वं स्यात् इति संशयः भवेत्**—त्याचप्रमाणें ज्ञान व कर्म यांच्या कर्तव्यतेचा उपदेश केलेला असल्यामुळे समुच्चित म्ह० तीं दोन्हीं मिळून-त्या दोहोंनाहि मोक्षहेतुत्व आहे, असा संशय येतो. ( पण जे संदिग्ध व सफल असेल त्याचाच विचार करणे उचित असल्यामुळे वरील प्रश्न संदिग्ध जरी असला तरी त्याच्या निर्णयापासून कांहीं फल जर नसेल तर त्याचा विचार करावयास नको, अशा आशयानें आक्षेप-)—**किं पुनरत्र मीमांसाफलं**—पण या मीमांसेचें फल काय ? ( उत्तर-)—**ननु एतत् एव एषां अन्यतमस्य परमनिःश्रेयससाधनत्वावधारणं**—अहो, ज्ञान, कर्म व ज्ञानकर्मसमुच्चय यांतील अमुकच एकाला परम निःश्रेयससाधनत्व आहे,असा निश्चय होणें, हेच याचे फल आहे.—**अतः विस्तीर्णतरं मीमांस्यं एतत्**—म्हणून म्हणजे विचाराला कारण होणारा संदेह व प्रयोजन या दोहोंचेंहि अस्तित्व असल्यामुळे अधिक विस्तारानें हे मीमांसा करण्याजोगे आहे, याचा सविस्तर विचार करणे योग्यच आहे.

**आत्मज्ञानस्य तु केवलस्य निःश्रेयसहेतुत्वं भेदप्रत्ययनिवर्तकत्वेन कैवल्यफलावसानत्वात् । क्रियाकारकफलभेदबुद्धिरविद्ययाऽऽत्मनि नित्यप्रवृत्ता मम कर्माहं कर्ताऽमुष्मै फलायेदं कर्म करिष्यामीतीयमविद्याऽनादिकालप्रवृत्ता । अस्या अविद्याया निवर्तकमयमहमस्मि केवलोऽकर्ताऽक्रियोऽफलो न मत्तोऽन्योऽस्ति कश्चिदित्येवंरूपमात्मविषयं ज्ञानमुत्पद्यमानं कर्मप्रवृत्तिहेतुभूताया भेदबुद्धेर्निवर्तकत्वात् । तुशब्दः पक्षद्वयव्यावृत्त्यर्थो न केवलेभ्यः कर्मभ्यो न च ज्ञानकर्मभ्यां समुच्चिताभ्यां निःश्रेयसप्राप्तिरिति पक्षद्वयं निवर्तयति । अकार्यत्वाच्च निःश्रेयसस्य कर्मसाधनत्वानुपपत्तिः । न हि नित्यं वस्तु कर्मणा ज्ञानेन वा क्रियते ॥**

**भाष्यार्थ**—( याप्रमाणें प्रस्तुत विषय विचारणीय आहे, असें सांगून आतां अगोदर सिद्धान्ताचा थोडक्यांत उल्लेख करितात-)—**आत्मज्ञानस्य तु केवलस्य निःश्रेयसहेतुत्वं**—केवल आत्मज्ञानालाच मोक्षसाधनत्व आहे. कारण—**भेदप्रत्ययनिवर्तकत्वेन कैवल्यफलावसानत्वात्**—आत्मज्ञानाला भेदप्रत्ययनिवर्तकत्व असून कैवल्यफलावसानत्व आहे.-कैवल्यफलामध्यें त्याचें पर्यवसान होत असतें. ( या संक्षिप्त वाक्याचेंच विवरण-)—**क्रिया-कारक-फलभेदबुद्धिः अविद्यया आत्मनि नित्यप्रवृत्ता**—क्रिया, कारक, फल यांविषयींची भेदबुद्धि अविद्येनें आत्म्यामध्यें नित्य प्रवृत्त झाली आहे.—**मम कर्म अहं कर्ता अमुष्मै फलाय इदं कर्म करिष्यामि इति इयं अविद्या अनादिकालप्रवृत्ता**—माझें कर्म, मी कर्ता, अमुक

फलासाठीं हें कर्म मी करीन, अशा प्रकारची ही अविद्या अनादिकालापासून प्रवृत्त झाली आहे. [ अविद्येचा आश्रय आत्मा आहे. त्यामुळे ती अनादि आहे. क्रियाकारकफल-भेदरूप अविद्या त्या मूल अविद्येपासून उद्भवली आहे. ही कार्यरूप अविद्याच अनर्थ-रूप आहे. ही अनादि अविद्येचें कार्य असल्यामुळें प्रवाहरूपानें अनादि आहे, हें सु-चविण्यासाठींच भाष्यांत 'अनादिकालप्रवृत्ता' असें तिला विशेषण दिले आहे. त्यांतील कारण-अविद्येची निवृत्ति करणाऱ्या आत्मज्ञानाचा उपन्यास करितात-]—**अस्याः अविद्यायाः निवर्तकं 'अयं अहं अस्मि' केवलः अकर्ता अक्रियः अफलः न मत्तः अन्यः कश्चित् अस्ति इति-एवंरूपं आत्मविषयं ज्ञानं उत्प-द्यमानं**—या अविद्येचे निवर्तक-निवृत्ति करणारें हा मी आहें, केवल, अकर्ता, अक्रिय, व अफल आहें. माझ्याहून निराळा दुसरा कोणी जीव किंवा ईश्वर नाहीं, हें अशा स्वरूपाचें उत्पन्न होणारें आत्मविषयक-आत्म्याविषयींचे ज्ञान आहे. [ हें अशा प्रकारचें ज्ञान पूर्वोक्त कारणाविद्येचें निवर्तक आहे. ते उत्पन्न होतांना अविद्येची निवृत्ति करीतच उत्पन्न होते. सूर्य उदय पावत असतांना हळू हळू अंधकाराचा क्षय करीतच जसा उदय पावतो त्याप्रमाणें हें आत्मज्ञान अविद्येचा क्षय करीतच उत्पन्न होतें. अर्थात् 'हे ज्ञान उत्पन्न झाल्यावर अविद्येची निवृत्ति करूं शकणार नाही, कारण तें अविरोधानें उत्पन्न झाले आहे व उत्पन्न होण्यापूर्वीहि तें त्याची निवृत्ति करूं शकणार नाहीं, कारण ज्याला स्वतःच स्वरूप प्राप्त झालेलें नसतें तें कोणतेंच कार्य करूं शकत नाही,' अशी कुशंका काढून आत्मज्ञान अविद्येची निवृत्ति करूं शकत नाही, असे म्हणतां येत नाही. असो; पण हें ज्ञान कारणाविद्येची निवृत्ति करतें, असें कशावरून? उत्तर-]—**कर्म-प्रवृत्तिहेतुभूतायाः भेदबुद्धेः निवर्तकत्वात्**—कर्मप्रवृत्तीला कारण होणारी जी भेदबुद्धि तिचें निवर्तकत्व ज्ञानाला आहे म्ह० या ज्ञानानें कार्याविद्येची निवृत्ति होते, असें स्पष्ट अनुभवास येते. त्यावरून तें कारणाविद्येचीहि निवृत्ति करते, हे सिद्ध होतें. ( वर भाष्यांत 'आत्मज्ञानस्य तु' येथें 'तु' असा जो शब्द आहे, त्याचा आशय व्यक्त करितात-)—**'तु'शब्दः पक्षद्वयव्यावृत्त्यर्थः**—'तु' हा शब्द पक्षद्वयाची -दोन पक्षांची व्यावृत्ति करण्यासाठीं आहे. (हेच स्पष्ट करितात-)—**न केवलेभ्यः कर्मभ्यः न च ज्ञानकर्मभ्यां समुच्चिताभ्यां निःश्रेयसप्राप्तिः इति पक्षद्वयं निवर्तयति**—केवल कर्मांपासून मोक्षप्राप्ति होत नाही व समुच्चित ज्ञान व कर्म यांपा-सून निःश्रेयसप्राप्ति होत नाहीं, याप्रमाणें तो 'तु'शब्द दोन्ही पक्षाची निवृत्ति करतो. म्ह० असें सुचवितो. ( याहि कारणानें मुक्ति कर्मांनीं साध्य होणारी नाहीं, असें सांग-तात-)—**निःश्रेयसस्य अकार्यत्वात् च कर्मसाधनत्वानुपपत्तिः**—मोक्षाला अकार्यत्व असल्यामुळें-मोक्ष हें कार्य-उत्पन्न होणारा पदार्थ नसल्यामुळें त्याच्या कर्म-साधनत्वाची अनुपपत्ति आहे. [ म्ह० तो कर्म या साधनानें साध्य होतो, असे म्हणतां येत नाहीं. कोणतेंहि कार्यच कृतीनें उत्पन्न करितां येतें. मोक्ष नित्यसिद्ध आहे. त्यामुळें कर्म हें त्याचें साधन नव्हे. कर्माचें फल केव्हांहि नित्य असणें शक्य नाही. 'एष नित्यो

महिमा ब्राह्मणस्य न कर्मणा वर्धते नो कनीयान्' ब्रह्मज्ञाचा मोक्ष हा नित्य महिमा आहे, तो कर्मानें वाढत नाहीं व कमी होत नाहीं, अशी श्रुति असल्यामुळें मोक्ष नित्य आहे. त्याला कार्यत्व नाहीं. त्यामुळें त्याला साधनाची अपेक्षा नाहीं, अशा आशयानें सांगतात-]—**नित्यं वस्तु कर्मणा ज्ञानेन वा न हि क्रियते**—नित्य वस्तु कर्मानें किंवा ज्ञानानें नवीन उत्पन्न केली जात नाहीं.

**केवलं ज्ञानमप्यनर्थकं तर्हि । नाविद्यानिवर्तकत्वे सति दृष्टकैवल्यफलावसानत्वात् । अविद्यातमोनिवर्तकस्य ज्ञानस्य दृष्टं कैवल्यफलावसानत्वम् । रज्ज्वादिविषये सर्पाद्यज्ञानतमोनिवर्तकप्रदीपप्रकाशफलवत् । विनिवृत्तसर्पविकल्परज्जुकैवल्यावसानं हि प्रकाशफलं तथा ज्ञानम् । दृष्टार्थानां च च्छिदिक्रियाग्निमन्थनादीनां व्यापृतकर्त्रादिकारकाणां द्वैधीभावाग्निदर्शनादिफलादन्यफले कर्मान्तरे व्यापारानुपपत्तिर्यथा तथा ज्ञाननिष्ठाक्रियायां दृष्टार्थायां व्यापृतस्य ज्ञात्रादिकारकस्याऽऽत्मकैवल्यफलादन्यफले कर्मान्तरे प्रवृत्तिरनुपपन्नेति न ज्ञाननिष्ठा कर्मसहितोपपद्यते । भुज्यग्निहोत्रादिक्रियावत्स्यादिति चेत् । न, कैवल्यफले ज्ञाने क्रियाफलार्थित्वानुपपत्तेः ॥**

**भाष्यार्थ**—(अहोपण, ज्ञानानेहि मोक्ष जर केला जात नसेल तर केवल ज्ञानहि मुक्तीच्या उपयोगी नाहीं, असे ठरतें. मग ज्ञानाला मोक्षाचें साधनत्व कसे? अशी शंका-)—**तर्हि केवलं ज्ञानं अपि अनर्थकं**—तर मग केवल ज्ञान सुद्धां निरुपयोगीच आहे? (उत्तर-)—**न । अविद्यानिवर्तकत्वे सति दृष्टकैवल्यफलावसानत्वात्**—केवल ज्ञान व्यर्थ नाहीं, कारण त्याला अविद्यानिवर्तकत्व आहे. म्ह० तें अविद्येची निवृत्ति करणारें आहे. शिवाय त्याचें कैवल्य हें फल दृष्ट म्ह० साक्षात् अनुभवास येणारें आहे, व अशा साक्षात् कैवल्य फलांत त्याचें पर्यवसान होत असतें. (आतां याचाच विचार करितात-)—**अविद्यातमोनिवर्तकस्य ज्ञानस्य कैवल्यफलावसानत्वं दृष्टं**—अविद्यारूप तमाची निवृत्ति करणाऱ्या ज्ञानाला कैवल्यफलावसानत्व आहे. म्ह० कैवल्य या फलांत पर्यवसान पावणे, हा त्याचा भाव-धर्म-स्वभावच आहे. (याविषयीं दृष्टान्त-)—**रज्ज्वादिविषये सर्पादि-अज्ञानतमोनिवर्तकप्रदीपप्रकाशफलवत्**—रज्ज्वादि विषयांतील सर्पादिविषयक अज्ञानतमाची निवृत्ति करणाऱ्या प्रदीपाच्या प्रकाशफलाप्रमाणें-रज्जूच्या ठिकाणीं सर्पादि भासणें हेंच अज्ञानतम, त्याला दीपप्रकाश निवृत्त करतो हें प्रसिद्ध आहे. त्याचप्रमाणें ज्ञान अज्ञानतमाचें निवर्तक आहे. (दृष्टान्तांत तमोनिवर्तक प्रकाशाचें कोणत्या फलांत पर्यवसान होतें? उत्तर-)—**विनिवृत्तसर्पविकल्परज्जुकैवल्यावसानं हि प्रकाशफलं**—जिच्यावरील सर्पविकल्प विशेषतः निवृत्त केला आहे अशा रज्जूचें कैवल्यामध्यें पर्यवसान होणें, विकल्प निवृत्त झाल्यावर केवल निर्विकल्प रज्जूनें स्वरूपानें स्थित होणें, हेंच प्रकाशाचें फल आहे.—**तथा ज्ञानं**—तसेंच ज्ञान आत्मकैवल्यावसान आहे. [प्रदीपप्रकाशाचें सर्पभ्रमनिवृत्तीच्या द्वारा केवल रज्जुस्वरूपांतच जसें पर्यवसान होतें त्याप्रमाणें आत्मज्ञानाचेंहि आत्म्याविषयींची जी अविद्या तिच्या निवृत्तीच्या द्वारा आ-

रम्याच्या कैवल्यामध्यें पर्यवसान होतें. 'अहोपण, ज्ञाननिष्ठेला कारण होणारे जे ज्ञात्रादिक —ज्ञाता, ज्ञान वगैरे त्याची दुसऱ्या कर्मातहि प्रवृत्ति संभवते. यास्तव कर्मासहितच ज्ञान-निष्ठा कैवल्यामध्यें पर्यवसान पावते, असे म्हटले पाहिजे,' अशी आशंका घेऊन समाधान-]—**यथा दृष्टार्थानां च छिदिक्रिया-अग्निमन्थनादीनां व्यापृतकर्त्रादिकारकाणां द्वैधीभाव-अग्निदर्शनादिफलात् अन्यफले कर्मान्तरे व्यापारानुपपत्तिः**—ज्याप्रमाणें ज्यांचें फल दृष्ट-प्रत्यक्ष आहे, अशा तोडणें; अग्नीसाठी अरणीचे मंथन करणें, इत्यादि क्रिया करण्यांत गढून गेलेल्या कर्ता, करण इत्यादि कारकांचा काष्ठाचे दोन भाग करणे, अग्नि उत्पन्न झालेला दिसणे, इत्यादि फलाहून ज्याचें भिन्न फल आहे अशा दुसऱ्या कर्मात व्यापार संभवत नाहीं,—**तथा ज्ञाननिष्ठाक्रियायां दृष्टार्थायां व्यापृतस्य ज्ञात्रादिकारकस्य आत्मकैवल्यफलात् अन्यफले कर्मान्तरे प्रवृत्तिः अनुपपन्ना**—त्याप्रमाणे जिचे फल दृष्ट म्ह० प्रत्यक्ष आहे अशा ज्ञाननिष्ठा क्रियेमध्ये गढून गेलेल्या ज्ञाता, ज्ञान इत्यादि कारकांची आत्मकैवल्य या फलाहून ज्याचे फल भिन्न आहे अशा दुसऱ्या कर्मात प्रवृत्ति होणें शक्य नाहीं.—**इति ज्ञाननिष्ठा कर्मसहिता न उपपद्यते**—म्हणून ज्ञाननिष्ठा कर्मासह असणे शक्य नाहीं. ( वादी ज्ञाननिष्ठा कर्मासह असूं शकेल, असें दृष्टान्ताने दाखवितो- )—**भुजि-अग्निहोत्रादिक्रियावत् स्यात्**—लौकिक भोजनक्रिया व वैदिक अग्निहोत्रादि क्रिया याचें जसे एकाच वेळीं अनुष्ठान होऊं शकतें त्याप्रमाणे अग्निहोत्रादिक व ज्ञाननिष्ठा यांचाहि एकाच वेळीं संभव आहे. अग्निहोत्री जसा जेऊं शकतो त्याप्रमाणें तो ज्ञाननिष्ठहि होऊं शकेल !—**इति चेत् न**—म्हणून म्हणाल तर तें बरोबर नाहीं.—**कैवल्यफले ज्ञाने क्रियाफलार्थित्वानुपपत्तेः**—कारण कैवल्य हे ज्याचे फल आहे असें ज्ञान झाल्यावर क्रियाफलाचें अर्थित्व संभवत नाहीं. कर्मफल मिळावे, अशी इच्छाच संभवत नाहीं. [ भोजनाचें तृप्ति हें फल मिळाल्यावरहि स्वर्गादिफल किंवा त्याचे अग्निहोत्रादि साधन, यांविषयी इच्छा होणें शक्य आहे. त्यामुळे भोजन व अग्निहोत्रादि याचा समुच्चय संभवतो. पण मुक्ति हे साक्षात् फल देणारी ज्ञाननिष्ठा प्राप्त झाल्यावर स्वर्गादिक किंवा त्याचें साधन कर्म याविषयींची इच्छाच संभवत नाही. त्यामुळें ज्ञाननिष्ठा व कर्म यांचें साहित्य-समुच्चय शक्य नाहीं. म्हणूनच भगवानानीं ज्ञान व कर्म या दोन पृथक् निष्ठा सांगितल्या आहेत. ]

**कैवल्यफले हि ज्ञाने प्राप्ते सर्वतःसंप्लुतोदके फले कूपतडागादिक्रियाफलार्थित्वाभाववत्फलान्तरे तत्साधनभूतायां वा क्रियायामर्थित्वानुपपत्तिः । न हि राज्यप्राप्तिफले कर्मणि व्यापृतस्य क्षेत्रप्राप्तिफले व्यापारोपपत्तिस्तद्विषयं चार्थित्वम् । तस्मान्न कर्मणोऽस्ति निःश्रेयससाधनत्वम् । न च ज्ञानकर्मणोः समुच्चितयोः । नापि ज्ञानस्य कैवल्यफलस्य कर्मसाहाय्यापेक्षाऽविद्यानिवर्तकत्वेन विरोधात् । नहि तमस्तमसो निवर्तकमतः केवलमेव ज्ञानं निःश्रेयससाधनमिति ॥**

**भाष्यार्थ**—( वरील संक्षिप्त सूत्रवाक्याचाच विस्तार करितात-)—**कैवल्यफले हि ज्ञाने प्राप्ते फलान्तरे तत्साधनभूतायां वा क्रियायां अर्थित्वानुपपत्तिः**—कैवल्य-आत्म्याचा निरुपाधिक भाव हें ज्याचें फल आहे असे आत्मज्ञान-साक्षात्कार झाला असता दुसऱ्या फलाविषयीं किंवा त्याच्या साधनभूत कर्माविषयीं अर्थित्व संभवत नाहीं. [ ज्ञानी पुरुष इतर फलांची व त्यांच्या साधनांची आकांक्षा धरीत नाहीं, यम्रविषयीं दृष्टान्त-]—**सर्वतःसंप्लुतोदकस्थानीये फले कूपतडागादिक्रियाफलार्थित्वाभाववत्**—ज्यांत सर्व बाजूंनीं पाणी तुडुंब भरलें आहे अशा समुद्राचें स्नानादि फल प्राप्त झालें असतां कूप, तडाग इत्यादिकांना निर्माण करणें या क्रियेमध्यें व त्यांतील स्नानादि क्रियेमध्यें कोणाचेहि अर्थित्व संभवत नाहीं, ( सिंधु-भागीरथीसारखी नदी मिळाल्यावर विहीर खणावी, किंवा तळें बांधावें व त्यांत आपण स्नान-पानादि करावें, अशी इच्छा कोणी कधीं करीत नाहीं, हे प्रसिद्ध आहे, तसेंच प्रकृत ज्ञानाविषयीं जाणावे. निरतिशय फल देणारें ज्ञान प्राप्त झालें असता सातिशय-मर्यादित-परिच्छिन्न फल देणाऱ्या कर्मांची इच्छा होत नाहीं, याविषयीं दृष्टान्त-)—**राज्यप्राप्तिफले कर्मणि व्यापृतस्य क्षेत्रप्राप्तिफले व्यापारोपपत्तिः च तद्विषयं अर्थित्वं न हि**—राज्याची प्राप्ति हें ज्याचें फल आहे अशा कर्मामध्यें गढून गेलेल्या-त्यासाठीं प्रयत्न करणाऱ्या पुरुषाचा एक शेत मिळणें हें ज्याचें फल आहे अशा कर्माविषयीं प्रयत्न संभवत नाहीं किंवा त्याला त्याचें अर्थित्व-आकांक्षाहि संभवत नाहीं, हे प्रसिद्ध आहे.—**तस्मात् कर्मणः निःश्रेयससाधनत्वं न अस्ति**—तस्मात् कर्माला मोक्षसाधनत्व नाहीं.(ज्ञान व कर्म यांचे सह अनुष्ठान संभवत नाहीं, म्हणून जे वर म्हटलें होते त्याचा उपसंहार-)—**च समुच्चितयोः ज्ञानकर्मणोः न**—आणि समुच्चित ज्ञान व कर्म यांनाहि मोक्षाचें साधनत्व नाहीं. [ कारण, प्रकाश व अंधकार यांप्रमाणें परस्पर विरुद्ध असलेल्या ज्ञान-कर्मांना एका फलाचें साधनत्व संभवत नाहीं. ' अहोपण, ज्ञानच मोक्षाला साधून देत असतांना आपल्याला साहाय्य करणारें या नात्यानें कर्मांची अपेक्षा करतें, कारण करणाला-साधनाला उपकरणांची-उपसाधनांची अपेक्षा असते ' या आक्षेपाचें समाधान-]—**कैवल्यफलस्य ज्ञानस्य कर्मसाहाय्यापेक्षा अपि न**—कैवल्य हें ज्याचें फल आहे अशा ज्ञानाला कर्माच्या साह्याची अपेक्षाहि नसते [ ज्ञान आपल्या उत्पत्तीसाठीं यज्ञादि कर्मांची अपेक्षा जरी करीत असलें तरी उत्पन्न झालेले ज्ञान फलासाठीं त्याची अपेक्षा करीत नाहीं.

---

१ ज्ञानकर्मसमुच्चयाचें हें खंडन वाचकांना मनन करण्यासारखें आहे. यावरून आचार्यांचा पक्ष किती युक्तियुक्त आहे तें कोणाच्याहि लक्षांत येईल. रहस्यकारांनीं हा वाद बरोबर समजून न घेतां उगीच त्यावर दोष देण्याचा यत्न केला आहे. पण त्यावरून ज्ञानकर्मसमुच्चय सिद्ध होत नाहींच. शिवाय आचार्य ज्या कर्मांचा ज्या ज्ञानाशीं समुच्चय संभवत नाहीं असें म्हणतात तें कर्म व ज्ञान रहस्यकारांना मुळींच इष्ट नाहीं. वाचकांनीं हें सर्व उपसंहार-भाष्य लक्षपूर्वक वाचावें, अशी आम्ही शिफारस करतों.

कारण ज्ञानोत्पत्ति झाली कीं मुक्ति तात्काल व अवश्य मिळते. त्यामुळें ती केवल ज्ञानाधीनच आहे. कर्माधीन नाहीं. आतां ज्ञान उपकरण–इतिकर्तव्यता या नात्यानें कर्मांची अपेक्षा करतें, अशी जी वाद्याची कल्पना आहे त्याविषयीं म्हणतात–]—**अविद्यानिवर्तकत्वेन विरोधात्**—ज्ञानाला अविद्यानिवर्तकत्व आहे आणि अविद्या व तिचें कार्य क्रिया कारक-फलभेदबुद्धि यांच्या योगानेंच कर्म होतें. त्यामुळे त्यांचा अद्वैत ज्ञानाशीं विरोध आहे. म्हणून कर्म ज्ञानाचें उपकरणच होऊं शकत नाहीं. अर्थात् ज्ञान फलासाठीं कर्मांची अपेक्षा करीत नाहीं. ( अहोपण, कर्महि जर ज्ञानाप्रमाणेंच अज्ञाननिवर्तक असेल तर त्यांचा विरोध कसा ? उत्तर–)—**तमः तमसः निवर्तकं न हि**—तम तमाचें निवर्तक होऊं शकत नाहीं, हे प्रसिद्ध आहे.—**अतः**—म्हणून म्ह० केवल कर्मांचा किंवा ज्ञानसमुच्चित कर्मांचा मोक्षाशीं साक्षात् संबंध नसल्यामुळे—**केवलं एव ज्ञानं निःश्रेयससाधनं इति**—केवल ज्ञानच मोक्षाचें साधन आहे, ही गोष्ट सिद्ध झाली.

**न। नित्याकरणे प्रत्यवायप्राप्तेः कैवल्यस्य च नित्यत्वात्। यत्तावत्केवलज्ञानात्कैवल्यप्राप्तिरित्येतदसत्। यतो नित्यानां कर्मणां श्रुत्युक्तानामकरणे प्रत्यवायो नरकादिप्राप्तिलक्षणः स्यात्। नन्वेवं तर्हि कर्मभ्यो मोक्षो नास्तीत्यनिर्मोक्ष एव। नैष दोषो नित्यत्वान्मोक्षस्य। नित्यानां कर्मणामनुष्ठानात्प्रत्यवायस्याप्राप्तिः। प्रतिषिद्धस्य चाकरणादनिष्टशरीरानुपपत्तिः। काम्यानां च वर्जनादिष्टशरीरानुपपत्तिः। वर्तमानशरीरारम्भकस्य च कर्मणः फलोपभोगक्षये पतितेऽस्मिञ्शरीरे देहान्तरोत्पत्तौ च कारणाभावादात्मनो रागादीनां चाकरणात्स्वरूपावस्थानमेव कैवल्यमित्ययत्नसिद्धं कैवल्यमिति॥**

**भाष्यार्थ**—( केवल ज्ञान मुक्तीचे साधन आहे, असें जें सांगितलें त्याचा निषेध करणारा वादी शंका घेतो–)—**न**—हा सिद्धान्त बरोबर नाहीं. कारण—**नित्याकरणे प्रत्यवायप्राप्तेः**—नित्य कर्मांचें अनुष्ठान न केल्यास प्रत्यवायाची प्राप्ति होत असते—**च कैवल्यस्य नित्यत्वात्**—आणि कैवल्याला नित्यत्व आहे. ( या संग्रहवाक्यांतील पहिल्या ' न ' या निषेधार्थी निपाताचें स्पष्टीकरण–)—**यत् तावत् केवलज्ञानात् कैवल्यप्राप्तिः इति एतत् असत्** –आता अगोदर केवल ज्ञानानेंच कैवल्याची प्राप्ति होते, असें जें म्हटलें आहे तें असत्–बाधित होणारे आहे. ( त्याविषयीं संग्रहवाक्यांत ' नित्याकरणे प्रत्यवायप्राप्तेः ' असा जो हेतु सांगितला होता त्याचें उपपादन–)—**यतः श्रुत्युक्तानां नित्यानां कर्मणां अकरणे नरकादिप्राप्तिलक्षणः प्रत्यवायः स्यात्**—कारण वेदोक्त नित्य कर्मांचें अनुष्ठान न केल्यास नरकादिप्राप्तिरूप फल देणारा प्रत्यवाय प्राप्त होईल. ( यास्तव ज्ञानवानाला नित्यानुष्ठान अवश्य आहे. त्यामुळें केवल ज्ञानच कर्मांचें निमित्त आहे, असें म्हणतां येत नाहीं. आतां वरील संग्रहवाक्यांत ' कैवल्यस्य च नित्यत्वात् ' असें जें म्हटलें आहे तें कशाची व्याप्ति करण्याकरितां आहे तें सांगतात–)—**ननु एवं तर्हि कर्मभ्यः मोक्षः नास्ति इति अनिर्मो-**

**क्षः एव**—अहोपण, असें जर आहे तर म्ह० श्रौत नित्यनैमित्तिक कर्म न केल्यास प्रत्यवायप्राप्ति होते, ह्मणून त्यांचें अनुष्ठान अवश्य केलें पाहिजे, असे जर ह्मटलें तर ज्ञानाशी समुच्चित किंवा असमुच्चित अशा कोणत्याच कर्मांपासून मोक्ष मिळणे शक्य नाहीं, असें वर सांगितलेलें असल्यामुळे व केवल ज्ञान हे त्याचे साधनच नसल्यामुळें जिला कांहीं साधनच राहिलेले नाहीं अशी मुक्ति सिद्ध होणार नाही, असा भावार्थ. ( पण ' कैवल्यस्य च नित्यत्वात् ' इत्यादिकांचे स्पष्टीकरण करणारा वादीच अनिर्मोक्ष प्रसंगाचा निषेध करितो-)—**एषः दोषः न मोक्षस्य नित्यत्वात्**—पण मोक्षाला नित्यत्व असल्यामुळे हा अनिर्मोक्षप्रसंगरूप दोष येत नाही ( मुक्ति नित्य असल्यामुळें ती यत्नावांचूनच सिद्ध होते. त्यामुळे अनिर्मोक्षप्रसंग येत नाहीं, याचेच स्पष्टीकरण ) —**नित्यानां कर्मणां अनुष्ठानात् प्रत्यवायस्य अप्राप्तिः**—नित्य कर्मांच्या अनुष्ठानामुळे प्रत्यवायाची प्राप्ति होत नाही—**प्रतिषिद्धस्य च अकरणात् अनिष्टशरीरानुपपत्तिः**—आणि प्रतिषिद्ध कर्माचे आचरण न केल्याने अनिष्टशरीराचीहि उत्पत्ति होत नाही—**काम्यानां च वर्जनात् इष्टशरीरानुपपत्तिः**—व काम्य कर्मांना वर्ज केल्यामुळे इष्ट शरीराची अनुपपत्ति होते—**वर्तमानशरीरारम्भकस्य च कर्मणः फलोपभोगक्षये अस्मिन् शरीरे पतिते**—आणि वर्तमानशरीराच्या आरंभक कर्माचा म्ह० प्रारब्ध कर्माचा फलोपभोगाने क्षय होऊन हे शरीर पडले असतां —**च देहान्तरोत्पत्तौ कारणाभावात्**—आणि दुसरा देह उत्पन्न होण्याचें कांहीं कारणच उरलेलें नसल्यामुळे [ म्ह० नित्यकर्मानुष्ठान केल्यामुळे नरक देणारा प्रत्यवाय लागत नाही, काम्य कर्म सोडल्याने देवादि इष्ट देहाची प्राप्ति होत नाही व निषिद्ध कर्में सोडल्याने पश्वादि अनिष्ट देहाची प्राप्ति होत नाही, याप्रमाणें दुसऱ्या जन्माचें कारणच नसल्यामुळे पुनर्जन्म संभवत नाही. अहोपण रागादि दोषांमुळे दुसरें कर्म होईल व त्यामुळे देहान्तरप्राप्ति होईल, असे कोणी म्हणेल ह्मणून सांगतात-]—**रागादीनां च अकरणात्** रागादि दोष न केल्याने-रागादिकांचा त्याग केल्याने—**आत्मनः स्वरूपावस्थानं एव कैवल्यं इति**—व आत्म्याचे स्वरूपीं अवस्थान हेंच कैवल्य, असें असल्यामुळें—**अयत्नसिद्धं कैवल्यं इति**—कैवल्य अयत्नसिद्ध आहे. तें यत्नावांचून सिद्ध होणारें आहे, त्याच्यासाठी कांहीं यत्न करावयास नको.

**अतिक्रान्तानेकजन्मान्तरकृतस्य स्वर्गनरकादिप्राप्तिफलस्यानारब्धकार्यस्योपभोगानुपपत्तेः क्षयाभाव इति चेत् । न, नित्यकर्मानुष्ठानायासदुःखोपभोगस्य तत्फलोपभोगत्वोपपत्तेः । प्रायश्चित्तवद्वा पूर्वोपात्तदुरितक्षयार्थत्वान्नित्यकर्मणाम् । आरब्धानां चोपभोगेनैव कर्मणां क्षीणत्वादपूर्वाणां च कर्मणामनारम्भेऽयत्नसिद्धं कैवल्यमिति ॥**

**भाष्यार्थ**—( यावर मध्यस्थाचा आक्षेप-)—**अतिक्रान्त अनेकजन्मान्तरकृतस्य स्वर्गनरकादिप्राप्तिफलस्य अनारब्धकार्यस्य उपभोगानुपपत्तेः क्षयाभावः इति चेत्**—अहोपण, या जन्मापूर्वीच्या अनेक जन्मान्तरीं केलेल्या स्वर्गनरकादिप्राप्ति हें फल देणाऱ्या पण ज्याच्या कार्याला आरंभ झालेला नाहीं, अशा म्ह०

संचित कर्मांच्या फलाचा उपभोग या जन्मीं होणें अशक्य असल्यामुळें त्याचा क्षय होत नाही, अनेक जन्मान्तरकृत इष्टानिष्ट संचित कर्में हेंच दुसऱ्या जन्माचें कारण अवशिष्ट असते त्यामुळें, या एकाच जन्मीं काम्य-निषिद्ध कर्मांचा त्याग करून नित्य कर्मांचे अनुष्ठान केल्यानें अनायासानें मोक्ष मिळेल ही आशा व्यर्थ आहे, म्हणून म्हणाल तर ( वादी त्याचें समाधान सांगतो- )—**न । नित्यकर्मानुष्ठानायासदुःखोपभोगस्य ' तत्फलोपभोगत्वोपपत्तेः**—तें बरोबर नाहीं. कारण नित्यकर्मांचें अनुष्ठान करीत असतांना होणारे जे आयास तेंच दुःख, तसलें दुःख होणें हाच त्या संचितकर्मांच्या फलाचा उपभोग होय, असें म्हणणें उपपन्न होत असल्यामुळें त्यासाठीं दुसरा जन्म घेण्याचे कारण नाहीं. [ अहोपण, नित्यादि कर्मानुष्ठानाचे वेळीं होणारें जे दुःख हेंच पूर्वसंचिताचें फल आहे असे जरी म्हटलें तरी दुःख हें पापाचें फल असल्यामुळे, नित्य-कर्मानुष्ठानानें पूर्वसंचित पापाची निवृत्ति होते असें जरी मानलें तरी त्यामुळेंच पुण्याची निवृत्ति होणें शक्य नाहीं. कारण नित्य कर्म व दुरित यांचा जसा विरोध आहे, तसा नित्य कर्म व पुण्य यांचा विरोध नाहीं. त्यामुळें संचित पुण्यासाठीं तरी दुसरा जन्म घ्यावा लागेल, अशी आशंका घेऊन वादी दुसरा पक्ष सांगतो- ]—**प्रायश्चित्तवत् वा नित्यकर्मणां पूर्वोपात्तदुरितक्षयार्थत्वात्**—किंवा प्रायश्चित्ताप्रमाणें नित्यकर्में पूर्वी संचित केलेल्या पापाचा क्षय करण्यासाठीं आहेत. त्यामुळे ती दुसऱ्या जन्माला कारण होत नाहीत. ( तथापि आरब्धकर्मामुळेंच दुसरा जन्म घ्यावा लागेल! कारण अनेक जन्म देणारेंहि प्रारब्ध असतें! याचें उत्तर- )—**आरब्धानां च कर्मणां उपभोगेन एव क्षीणत्वात्**—आणि प्रारब्धकर्मांचा तर उपभोगानेंच क्षय झालेला असतो ( अहोपण पूर्वार्जितकर्मांचा असा जरी क्षय झाला तरी कांहीं अपूर्व म्ह० या जन्मीं केलेली कर्मेंच दुसऱ्या जन्माचा आरंभ करतील, अशी आशंका घेऊन सांगतात- )—**अपूर्वाणां च कर्मणां अनारम्भे कैवल्यं अयत्नसिद्धं इति**—आणि अपूर्व कर्मांचा आरंभच न होऊं दिल्यास-त्यांचा अनारंभ झाल्यास कैवल्य अनायासानें-आपोआपच सिद्ध होईल.

**न, "तमेव विदित्वाऽतिमृत्युमेति नान्यः पन्था विद्यतेऽयनाय" इति विद्याया अन्यः पन्था मोक्षाय न विद्यत इति श्रुतेश्चर्मवदाकाशवेष्टनासंभववदविदुषो मोक्षासंभवश्रुतेर्ज्ञानात्कैवल्यमाप्नोतीति च पुराणस्मृतेरनारब्धफलानां पुण्यानां कर्मणां क्षयानुपपत्तेश्च यथापूर्वोपात्तानां दुरितानामनारब्धफलानां संभवस्तथा पुण्यानामप्यनारब्धफलानां स्यात्संभवः । तेषां च देहान्तरमकृत्वा क्षयानुपपत्तौ मोक्षानुपपत्तिः । धर्माधर्महेतूनां च रागद्वेषमोहानामन्यत्राऽऽत्मज्ञानादुच्छेदानुपपत्तेर्धर्माधर्मोच्छेदानुपपत्तिः । नित्यानां च कर्मणां पुण्यलोकफलश्रुतेर्वर्णा आश्रमाश्च स्वकर्मनिष्ठा इत्यादिस्मृतेश्च कर्मक्षयानुपपत्तिः ॥**

**भाष्यार्थ**—( ज्ञानावांचून कर्मानेंच मोक्ष मिळतो, या पक्षाचें श्रुतीच्या आधारानें निरसन करितात- )—**न**—हें म्हणणें बरोबर नाहीं.—**' तमेव विदित्वा अतिमृ-**

**त्युं एति नान्यः पन्था विद्यतेऽयनाय-' इति विद्यायाः अन्यः पन्थाः मोक्षाय न विद्यते इति श्रुतेः**—' त्या आत्म्यालाच जाणून मृत्यूचें उल्लंघन करितो, मोक्षाला ज्ञानावांचून दुसरा मार्ग नाहीं, ' अशा अर्थाच्या श्वेताश्वतरश्रुतींत ( ३.८ ) ज्ञानावांचून मोक्षाचें दुसरें साधन नाहीं, असें सांगितलें आहे.-त्याचप्रमाणे **—चर्मवत् आकाशवेष्टनासंभववत् अविदुषः मोक्षासंभवश्रुतेः**—चामड्याला जसें गुंडाळतां येतें त्याप्रमाणें आकाशाला गुंडाळतां येणें अशक्य आहे. आकाशाला गुंडाळणें जसे अशक्य, आकाशवेष्टनाचा जसा असंभव तसाच अविद्वानाच्या मोक्षाचा असंभव सांगणारी श्वेताश्वर श्रुति आहे [' यदा चर्मवत् आकाशं वेष्टयिष्यन्ति मानवाः । तदा देवं अविज्ञाय दुःखस्यान्तो भविष्यति ॥' श्वेता. अ ६.२० म्ह० जेव्हां मानव चामड्याप्रमाणें आकाशाला गुंडाळतील तेव्हां देवाला जाणल्यावांचून त्यांच्या दुःखाचा अन्त होईल, अशी ती मूळ श्रुति आहे. ]—**ज्ञानात् कैवल्यं आप्नोति इति च पुराणस्मृतेः**—ज्ञानानें कैवल्यप्राप्ति होते, अशी पुराणस्मृतिहि आहे.—**च अनारब्धफलानां पुण्यानां कर्मणां क्षयानुपपत्तेः**—शिवाय तुम्ही वर सांगितलेला न्याय, त्याला अनुकूल असें प्रमाण नसल्यामुळें, आभासरूप आहे. त्यामुळें ज्यांच्या फलाचा आरंभ झालेला नाहीं अशा पुण्यकर्मांचा भोगावांचून क्षय होणें अशक्य –अनुपपन्न असल्यामुळे ज्ञानावांचून मोक्ष मिळणें शक्य नाहीं. ( संचित पुण्यकर्मांचा संभवच नाहीं, म्हणून म्हणाल तर सांगतो-)—**यथा पूर्वोपात्तानां अनारब्धफलानां दुरितानां संभवः तथा अनारब्धफलानां पुण्यानां अपि संभवः स्यात्**—ज्याप्रमाणें पूर्वजन्मीं संपादन केलेल्या व ज्यांच्या फलाचा आरंभ झालेला नाहीं अशा संचित पापकर्मांचा संभव आहे असें म्हणतां व त्याच्या क्षयासाठीं नित्यकर्मानुष्ठान सांगतां, तसा ज्यांच्या फलाचा आरंभ झालेला नाहीं अशा संचित पुण्यांचाहि संभव आहे—**च तेषां देहान्तरं अकृत्वा क्षयानुपपत्तौ मोक्षानुपपत्तिः**—व त्या संचित पुण्यकर्मांचा दुसऱ्या देहाचा आरंभ केल्यावांचून क्षय होणें अशक्य झालें असतां मोक्षाची अनुपपत्ति होते. ( याहि कारणानें कर्मक्षयाची अनुपपत्ति झाल्यामुळें मोक्षाची अनुपपत्ति होते,असें सांगतात-)—**धर्माधर्महेतूनां च राग-द्वेष-मोहानां अन्यत्र आत्मज्ञानात् उच्छेदानुपपत्तेः धर्माधर्मोच्छेदानुपपत्तिः**—आणि धर्म व अधर्म यांना कारण होणाऱ्या राग-द्वेष-मोहांचा आत्मज्ञानावांचून उच्छेद –क्षय होणें शक्य नसल्यामुळें राग-द्वेषादिकांमुळेंच उद्भवणाऱ्या धर्माधर्मांचा उच्छेद होऊं शकत नाहीं. ( त्यामुळेंहि ज्ञानावांचून मुक्तीचा असंभव आहे. आतां ' कर्मणा पितृलोकः '.या श्रुतीचा आश्रय करून कर्मांचा क्षय न होण्याचें आणखी एक कारण सांगतात-)—**च नित्यानां कर्मणां पुण्यलोकफलश्रुतेः**—आणि नित्यकर्मांचें पुण्यलोकप्राप्ति हें फल सांगणारी श्रुति असल्यामुळे कर्मांनें मोक्ष मिळणें शक्य नाहीं.— **' वर्णाः च आश्रमाः स्वकर्मनिष्ठाः' इत्यादिस्मृतेः च कर्मक्षयानुपपत्तिः**—' स्वकर्मनिष्ठ वर्ण व आश्रम मरणोत्तर पुण्यलोकीं जातात व तेथें कर्मफलाचा अनु-

भव घेऊन अवशिष्ट कर्मामुळे विशिष्ट जन्म घेतात असें ( पृ.११९५) स्मृतिवचन असल्यामुळें कर्मक्षयाचा असंभव आहे. ( ज्ञानावांचून कर्मक्षय नाहीं व कर्मक्षयावांचून मोक्ष नाहीं, असा याचा भावार्थ. ).

**ये त्वाहुर्नित्यानि कर्माणि दुःखरूपत्वात्पूर्वकृतदुरितकर्मणां फलमेव न तु तेषां स्वरूपव्यतिरेकेणान्यत्फलमस्त्यश्रुतत्वाज्जीवनादिनिमित्ते च विधानादिति । न, अप्रवृत्तानां फलदानासंभवाद्दुःखफलविशेषानुपपत्तिश्च स्यात् । यदुक्तं पूर्वजन्मकृतदुरितानां कर्मणां फलं नित्यकर्मानुष्ठानायासदुःखं भुज्यत इति तदसत् । न हि मरणकाले फलदानायानङ्कुरीभूतस्य कर्मणः फलमन्यकर्मारब्धे जन्मन्युपभुज्यत इत्युपपत्तिः । अन्यथा स्वर्गफलोपभोगायाग्निहोत्रादिकर्मारब्धे जन्मनि नरककर्मफलोपभोगानुपपत्तिर्न स्यात् । तस्य दुरितदुःखविशेषफलत्वानुपपत्तेश्च, अनेकेषु हि दुरितेषु संभवत्सु भिन्नदुःखसाधनफलेषु नित्यकर्मानुष्ठानायासदुःखमात्रफलेषु कल्प्यमानेषु द्वंद्वरोगादिबाधानिमित्तं न हि शक्यते कल्पयितुं नित्यकर्मानुष्ठानायासदुःखमेव पूर्वकृतदुरितफलं न शिरसा पाषाणवहनादिदुःखमिति ॥**

**भाष्यार्थ**—( आतां पूर्ववाद्याच्या शंकेचा अनुवाद करून समाधान करितात-)—**तु ये आहुः**—पण जे कित्येक म्हणतात की—**नित्यानि कर्माणि दुःखरूपत्वात् पूर्वकृतदुरितकर्मणां फलं एव**—नित्यकर्मे दुःखरूप असल्यामुळे पूर्वी केलेल्या पापकर्माचे ते फलच आहे.—**नु तेषां स्वरूपव्यतिरेकेण अन्यत् फल न अस्ति**—व स्वरूपावांचून त्यांचें दुसरें कांही फलच नाही, कारण—**अश्रुतत्वात्**—जेथें त्यांचा विधि आहे तेथें फल सांगितलेले नाही. ( पण त्यांचें जर कांहीं फलच नसेल तर वेद त्यांचे विधानहि करणार नाहीं, म्हणून म्हणावे तर-)—**जीवनादिनिमित्ते च विधानात् इति**—जीवनादिनिमित्तानेच त्यांचे विधान केलेले आहे. [ त्यामुळे कामना हें निमित्त नसल्यामुळें त्यांचे विधानच संभवत नाही, असे म्हणतां येत नाही. कारण जीवन हेच त्यांचें निमित्त आहे. याप्रमाणे आक्षेपाचा अनुवाद करून आचार्य त्याचें समाधान सांगतात-]—**न । अप्रवृत्तानां फलदानासंभवात् दुःखफलविशेषानुपपत्तिः च स्यात्**—असें नाही. जी कर्मे फल देण्यास प्रवृत्त झालेलीं नाहीत-जी फलोन्मुख झालेलीं नाहीत त्यांच्या फलदानाचा असंभव आहे. त्यामुळें दुःखफलविशेषाची अनुपपत्ति होते. ( या संग्रहवाक्यांतील 'न' या निषेधार्थी शब्दाचें विवरण-)—**पूर्वजन्मकृतदुरितानां कर्मणां फलं नित्यकर्मानुष्ठानायासदुःखं भुज्यते इति यत् उक्तं तत् असत्**.—पूर्वजन्मी केलेल्या पाप कर्माचें फल या जन्मीं नित्य कर्मानुष्ठानाच्या आयासाचे दुःख या रूपानें भोगलें जातें, असें जें वर म्हटले आहे ते खोटें आहे. ( संग्रहवाक्यांतील 'अप्रवृत्तानां॰' इत्यादि हेतूचें स्पष्टीकरण-)—**हि मरणकाले फलदानाय अनङ्कुरीभूतस्य कर्मणः फलं अन्यकर्मारब्धे जन्मनि उपभुज्यते इति न उपपत्तिः**—कारण मरणसमयीं फल

देण्यासाठीं अंकुरीभूत न झालेल्या–फलोन्मुख न झालेल्या कर्माचें फल दुसऱ्याच कर्मानें आरंभिलेल्या जन्मामध्यें भोगलें जातें, याविषयीं कांहीं उपपत्ति नाहीं. [ज्या कर्मानें या देहाचा आरंभ झाला असेल त्याच कर्माचे फल या जन्मीं भोगणें उचित आहे. जें पाप पूर्व जन्मांतील मरणाचे वेळीं फलोन्मुखच झालेले नाहीं, त्याचें फल नित्य कर्मानुष्ठानाचे आयास या रूपानें मिळणें शक्य नाही.]—**अन्यथा स्वर्गफलोपभोगाय अग्निहोत्रादिकर्मारब्धे जन्मनि नरककर्मफलोपभोगानुपपत्तिः न स्यात्**—नाही तर स्वर्ग या फलाचा उपभोग घेण्यासाठीं अग्निहोत्रादि कर्मानीं ज्याचा आरंभ केला आहे अशा जन्मांत नरक या कर्मफलाच्या उपभोगाची अनुपपत्ति होणार नाहीं. म्ह० स्वर्गांतहि नरकभोग घडूं शकेल! (संग्रहवाक्यांत 'दुःखफलविशेषानुपपत्तिश्च स्यात्' असें जे म्हटलें आहे त्याचे विवरण-)—**च तस्य दुरितदुःखविशेषफलत्वानुपपत्तेः**—शिवाय त्या नित्यकर्मानुष्ठानायासदुःखाला पापाचे दुःखविशेषफलत्व आहे, असे म्हणतां येत नाहीं. या विशेष पापाचे हें विशिष्ट फल, असे म्हणतां येत नाहीं. कारण—**अनेकेषु हि भिन्नदुःखसाधनफलेषु दुरितेषु संभवत्सु**—भिन्न भिन्न प्रकारचें दुःख देणे हेंच ज्यांचें फल आहे अशी अनेक पापे संभवत असताना—**नित्यकर्मानुष्ठानायासदुःखमात्रफलेषु कल्प्यमानेषु द्वंद्वरोगादिबाधानिमित्तं कल्पयितुं न हि शक्यते**—नित्य कर्माचे अनुष्ठान करितांना होणारे जे आयास व त्यामुळे होणारे दुःख तेवढेच काय-ते त्या सर्व पापाचें फल आहे अशी कल्पना केल्यास राग-द्वेषादि द्वंद्वामुळें होणारी पीडा व रोगादिकाची पीडा यांचें काहींच निमित्त कल्पिता येणार नाहीं. कारण—**नित्यकर्मानुष्ठानायासदुःखं एव पूर्वकृतदुरितफलं शिरसा पाषाणवहनादिदुःखं न इति**—नित्यकर्मानुष्ठानायासदुःख हेंच पूर्वकृत पापाचे फल आहे, मस्तकानें पाषाण वाहणें वगैरे निमित्तानें होणारें दुःख हें पूर्वकृत पापाचे फल नव्हे, असे म्हणावें लागणार! [संचित पाप कर्में अनंत संभवतात. तीं सर्व एकाच प्रकारचे दुःख देणारी नसून अनेक प्रकारची दुःखे देणारी असणार, हे निर्विवाद आहे. पण त्या सर्वांचें नित्यकर्मानुष्ठानायासरूप दुःख हे एकच फल आहे असे म्हणणे अयोग्य आहे. कारण हेतु अनेक प्रकारचा असताना त्याचे फल एक प्रकारचेंच संभवत नाहीं. शिवाय पूर्व पापाचें तेवढेच फल मानल्यास राग-द्वेषादियुक्त दुःख व रोगादिकामुळे होणारे दुःख याचें निमित्त पाप नव्हे असें म्हणावें लागेल. शिवाय नित्यकर्मानुष्ठानायास दुःख हेंच पापाचें फल व इतर काबाडकष्ट वगैरे करावयास लागणें, हें पापाचे फल नव्हे, हें म्हणणें अगदीं युक्तिशून्य आहे. तस्मात् नित्यकर्मानुष्ठानायास दुःख हेंच पूर्व संचित पापाचें फल आहे, ही कल्पना अगदीं अग्राह्य आहे.]

**अप्रकृतं चेदमुच्यते नित्यकर्मानुष्ठायासदुःखं पूर्वकृतदुरितकर्मफलमिति। कथम्, अप्रसूतफलस्य पूर्वकृतदुरितस्य क्षयो नोपपद्यत इति प्रकृतं तत्र प्रसूतफलस्य कर्मणः फलं नित्यकर्मानुष्ठानायासदुःखमाह भवानाप्रसूतफलस्येति। अथ सर्वमेव पूर्वकृतं**

**दुरितं प्रसूतफलमेवेति मन्यते भवांस्ततो नित्यकर्मानुष्ठानायासदुःखमेव फलमिति विशेषणमयुक्तं नित्यकर्मविध्यानर्थक्यप्रसङ्गश्चोपभोगेनैव प्रसूतफलस्य दुरितकर्मणः क्षयोपपत्तेः ।** किंच श्रुतस्य नित्यस्य दुःखं **कर्मणश्चेत्फलं** नित्यकर्मानुष्ठानायासादेव तद् **दृश्यते** व्यायामादिवत्तदन्यस्येतिकल्पनानुपपत्तिः । जीवनादिनिमित्ते च विधानान्नि- **त्यानां कर्मणाम् ॥**

भाष्यार्थ—( शिवाय हें म्हणणें अप्रस्तुत आहे, असें सांगतात-)—**नित्यकर्मानुष्ठानायासदुःखं पूर्वकृतदुरितकर्मफलं इति इदं अप्रकृतं च उच्यते**— नित्यकर्मांचें अनुष्ठान करीत असतांना होणारे जे आयास, हेंच दुःख पूर्वकृत पापकर्माचें फल आहे, असें जें वर म्हटले आहे तें अप्रकृत आहे.—**कथं**—तें कसें?—**अप्रसूतफलस्य पूर्वकृतदुरितस्य क्षयः न उपपद्यते इति प्रकृतं**—ज्याचें फल मिळालेलें नाहीं, अशा पूर्वकृत दुरिताचा क्षय उपपन्न होत नाहीं, हा प्रकृत विषय आहे.— **तत्र भवान् प्रसूतफलस्य कर्मणः फलं नित्यकर्मानुष्ठानायासदुःखं आह न अप्रसूतफलस्य इति**—पण त्यासंबंधीं तूं ज्याच्या फलाला आरंभ झाला आहे अशा कर्माचें फल नित्यकर्मानुष्ठानासदुःख आहे, असें सागत आहेस,ज्याच्या फलाला आरंभ झालेला नाहीं, त्याचें तें फल आहे, असें कांहीं सांगत नाहीस. म्हणून हे सांगणें प्रकृत विषयाला सोडून आहे.—**अथ सर्वं एव पूर्वकृतं दुरितं प्रसूतफलं एव इति मन्यते भवान्**—बरें, सर्वच पूर्वजन्मकृत दुरित फलोन्मुख झालेलेंच आहे, असें तूं मानीत असशील—**ततः नित्यकर्मानुष्ठानायासदुःखं एव फलं इति विशेषणं अयुक्तं**—तर नित्यकर्मानुष्ठानायासदुःख हेंच त्याचे फल आहे, असे विशेषण अयुक्त होतें.—**च नित्यकर्मविध्यानर्थक्यप्रसङ्गः**—व नित्यकर्माच्या विधीला आनर्थक्य आहे, तो विधि व्यर्थ आहे, असें म्हणण्याचा प्रसंग येतो. कारण—**प्रसूतफलस्य दुरितकर्मणः उपभोगेन एव क्षयोपपत्तेः**—ज्याच्या फलाला आरंभ झाला आहे, जें फलोन्मुख झाले आहे, अशा पापकर्माचा उपभोगानेच क्षय होणें सर्वथा युक्त होय. ( त्यामुळें त्यासाठीं नित्यकर्मांचा विधि नको. )—**किंच श्रुतस्य नित्यस्य कर्मणः दुःखं चेत् फलं तत् व्यायामादिवत् नित्यकर्मानुष्ठानायासात् एव दृश्यते**—शिवाय विहित नित्यकर्मांचें दुःख हेंच जर फल असेल तर तें व्यायामादिकांप्रमाणें नित्यकर्मानुष्ठानाच्या आयासामुळेंच अनुभवास येईल!—**तत् अन्यस्य इति कल्पनानुपपत्तिः**—त्यामुळें तें दुःख दुसऱ्या दुरिताचें फल आहे, ही कल्पना करणें अयोग्य आहे.[व्यायामादि केल्यास जें दुःख होतें तें दुसऱ्या कोणत्या तरी पापाचें फल आहे असें म्हणतां येत नाहीं. कारण तें त्याचेंच फल आहे, हें प्रसिद्ध-सिद्ध आहे.तसेंच वेदोक्त नित्यकर्मांचें अनुष्ठान करितांना जे आयास होतात त्यांपासून होणारें दुःख हें त्यांचेंच फल मानलें पाहिजे. कारण त्यामुळेंच तें होतें. म्हणून तें पूर्व दुरिताचें फल आहे, या म्हणण्यांत कांहीं उपपत्ति नाहीं.शिवाय दुःख हेंच जर नित्यकर्मांचें फल असेल तर त्याचें अनुष्ठान करण्यापेक्षां तें न करणेंच चांगलें, अशी आशंका घेऊन सांगतात-]—**च**

**नित्यानां कर्मणां जीवनादिनिमित्ते विधानात्**—आणि नित्यकर्मांचें जीवनादि निमित्तानें विधान केलें आहे. म्ह० जिवंत राहणें हेंच त्यांच्या अनुष्ठानाचें निमित्त आहे. त्यामुळें जिवंत असेपर्यंत त्याचें अनुष्ठान केलेंच पाहिजे.

**प्रायश्चित्तवत्पूर्वकृतदुरितफलत्वानुपपत्तिः । यस्मिन्पापकर्मनिमित्ते यद्विहितं प्रायश्चित्तं न तु तस्य पापस्य तत्फलम् । अथ तस्यैव पापस्य निमित्तस्य प्रायश्चित्तदुःखं फलं जीवनादिनिमित्तमपि नित्यकर्मानुष्ठानायासदुःखं जीवनादिनिमित्तस्यैव तत्फलं प्रसज्येत नित्यप्रायश्चित्तयोर्नैमित्तिकत्वाविशेषात् ॥**

**भाष्यार्थ**—( नित्य कर्मांना पूर्वकृत पापाचें फलत्व नाही, याविषयीं आणखी हेतु-)—**प्रायश्चित्तवत् पूर्वकृतदुरितफलत्वानुपपत्तिः**—प्रायश्चित्त कर्माप्रमाणें नित्य कर्मांना पूर्वकृतदुरिताचें फल म्हणणें अनुपपन्न आहे.—**यस्मिन् पापकर्मनिमित्ते यद्विहितं प्रायश्चित्तं तत् तु तस्य पापस्य फलं न**—ज्या पापकर्मांच्या निमित्तानें जें प्रायश्चित्त विहित असतें तें त्या पापाचे फल नव्हेच. ( त्या निमित्तभूत पापाचें तें फल नव्हे हें खरें; पण प्रायश्चित्ताचें अनुष्ठान करितांना होणारें जें दुःख तें त्या पापाचें फल आहे, अशी शंका-)—**अथ तस्य एव पापस्य निमित्तस्य प्रायश्चित्तदुःखं फलं**—पण त्याच पाप या निमित्ताचें प्रायश्चित्तदुःख हें फल आहे, म्हणून म्हणावे तर—**जीवनादिनिमित्तं अपि नित्यकर्मानुष्ठानायासदुःखं जीवनादिनिमित्तस्य एव तत् फलं प्रसज्येत**—जीवनादि निमित्तानें होणारें नित्यकर्मानुष्ठानायासरूप दुःखहि जीवनादिनिमित्ताचेच तें फल आहे, असें म्हणण्याचा प्रसंग येईल. कारण—**नित्य-प्रायश्चित्तयोः नैमित्तिकत्वाविशेषात्**—नित्य व प्रायश्चित्त या दोहोंनाहि नैमित्तिकत्व एकसारखेंच आहे. [ पाप या निमित्तानें प्रायश्चित्तदुःख होतें व जीवन या निमित्तानें नित्यकर्मानुष्ठानदुःख होतें. मिळून दोन्ही नैमित्तिकच ! ]

**किंचान्यन्नित्यस्य काम्यस्य चाग्निहोत्रादेरनुष्ठानायासदुःखस्य तुल्यत्वान्नित्यानुष्ठानायासदुःखमेव पूर्वकृतदुरितस्य फलं न तु काम्यानुष्ठानायासदुःखमिति विशेषो नास्तीति तदपि पूर्वकृतदुरितफलं प्रसज्येत । तथा च सति नित्यानां फलाश्रवणात्तद्विधीनान्यथानुपपत्तेश्च नित्यानुष्ठानायासदुःखं पूर्वकृतदुरितफलमित्यर्थापत्तिकल्पनाऽनुपपन्ना । एवं विधानान्यथानुपपत्तेरनुष्ठानायासदुःखव्यतिरिक्तफलत्वानुमानाच्च नित्यानाम् ॥**

**भाष्यार्थ**—( नित्यकर्मानुष्ठानायासदुःख हें पूर्वोपात्त दुरिताचें फल नव्हे याविषयीं आणखी हेतु-)—**किं च अन्यत्**—शिवाय आणखीं असें की,—**नित्यस्य काम्यस्य च अग्निहोत्रादेः अनुष्ठानायासदुःखस्य तुल्यत्वात्**—नित्य व काम्य अग्निहोत्रादिकांच्या अनुष्ठानाचें आयासदुःख एकसारखेंच-समान असल्यामुळें—**नित्यानुष्ठानायासदुःखं एव पूर्वकृतदुरितस्य फलं न तु काम्यानुष्ठानायासदुःखं इति विशेषः नास्ति**—नित्यानुष्ठानायासदुःखच पूर्वकृत पापाचें फल

आहे, पण काम्यानुष्ठानायासदुःख पूर्वपापाचें फल नाहीं, असा विशेष-फरक करितां नाहीं—**इति तत् अपि पूर्वकृतदुरितफलं प्रसज्येत**—त्यामुळें तेंहि-काम्यानुष्ठान-दुःखहि पूर्वकृत पापाचें फल आहे, असें मानण्याचा प्रसंग येईल.—**तथा च सति नित्यानां फलाश्रवणात् तद्विधानान्यथानुपपत्तेः च**—पण काम्यानुष्ठानहि दुरितफलच आहे, ही गोष्ट कबूल केल्यास नित्य कर्मांचें कांहीं फलच श्रुत नसल्यामुळें व त्याच्या विधानाची दुसऱ्या प्रकारें उपपत्ति लागत नसल्यामुळें—**नित्यानुष्ठानायासदुःखं पूर्वकृतदुरितफलं इति अर्थापत्तिकल्पना अनुपपन्ना**—नित्यानुष्ठानायासदुःख हें पूर्वकृत पापाचें फल आहे, ही अर्थापत्तिकल्पना अयोग्य आहे. [ म्ह० नित्य कर्में विहित तर आहेत, पण त्याचें फल कांहीं सांगितलेलें नाहीं. फलावांचून विधि संभवत नाहीं, म्हणून नित्यकर्में पापक्षयार्थ आहेत, अशी अर्थापत्ति प्रमाणानें कल्पना करावी लागते. पण ती अयोग्य आहे. कारण काम्यानुष्ठानानेंहि दुरिताची निवृत्ति होण्याचा संभव आहे. शिवाय नित्यकर्में अनुष्ठानायासदुःखाहून निराळें फल देणारीं आहेत. कारण तीं विहित आहेत. काम्यकर्मांप्रमाणें, असें अनुमान संभवत असल्यामुळें तीं केवल दुरितक्षयार्थ नाहींत, असें सांगतात -]—**एवं नित्यानां विधानान्यथानुपपत्तेः अनुष्ठानायासदुःखव्यतिरिक्तफलत्वानुमानात् च**—काम्यकर्मांप्रमाणेंच नित्य कर्मांचेंहि फलावांचून उगीच विधान उपपन्न होत नसल्यामुळें त्यांचें अनुष्ठानायासदुःखाहून निराळें फल आहे, असें अनुमान होतें. ( त्यामुळें अनुष्ठानायासदुःख हेंच पूर्व पापाचें फल आहे, असें म्हणतां येत नाहीं. )

**विरोधाच्च । विरुद्धं चेदमुच्यते नित्यकर्मण्यनुष्ठीयमानेऽन्यस्य कर्मणः फलं भुज्यत इत्यभ्युपगम्यमाने स एवोपभोगो नित्यस्य कर्मणः फलमिति नित्यस्य कर्मणः फलाभाव इति च विरुद्धमुच्यते । किंच काम्याग्निहोत्रादावनुष्ठीयमाने नित्यमप्यग्निहोत्रादि तन्त्रेणैवानुष्ठितं भवतीति तदायासदुःखेनैव काम्याग्निहोत्रादिफलमुपक्षीणं स्यात्तत्तन्त्रत्वात् । अथ काम्याग्निहोत्रादिफलमन्यदेव स्वर्गादि तदनुष्ठानायासदुःखमपि भिन्नं प्रसज्येत । न च तदस्ति दृष्टविरोधात् । न हि काम्यानुष्ठानायासदुःखात्केवलनित्यानुष्ठानायासदुःखं भिद्यते ॥**

**भाष्यार्थ—विरोधात् च**—शिवाय नित्यानुष्ठानामुळें पापफलाचा भोग घडतो हें म्हणणें स्वतःच्याच म्हणण्याविरुद्ध आहे. ( तें कसें ? तेंच स्पष्ट करून सांगतात-) —**विरुद्धं च इदं उच्यते**—हें विरुद्ध सांगितलें जात आहे.—**नित्यकर्मणि अनुष्ठीयमाने अन्यस्य कर्मणः फलं भुज्यते इति अभ्युपगम्यमाने**—नित्यकर्मांचें अनुष्ठान करीत असतांना अन्य कर्मांचें फल भोगलें जातें, असें जर मानलें तर—**सः एव उपभोगः नित्यस्य कर्मणः फलं इति नित्यस्य कर्मणः फलाभावः इति च विरुद्धं उच्यते**—तोच उपभोग नित्यकर्मांतें फल आहे ( कारण जें ज्याच्या अनन्तर होतें, तें त्याचें कार्य, असा नियम आहे ) व नित्यकर्मांच्या फलाचा अभाव आहे, असें हें विरुद्ध सांगितलें जात आहे.—**किंच काम्याग्निहोत्रादौ अ-**

**नुष्ठीयमाने नित्यं अपि अग्निहोत्रादि तन्त्रेण एव अनुष्ठितं भवति**—शिवाय अग्निहोत्रादिकांचें अनुष्ठान केलें जात असतां नित्य अग्निहोत्रादिकहि तंत्रानेंच अनुष्ठान केलें जातें. [संकल्पानें काम्य व नित्य अग्निहोत्राचें तंत्रानें अनुष्ठान करितां येतें.] —**इति तदायासदुःखेन एव काम्याग्निहोत्रादिफलं उपक्षीणं स्यात् तत्तन्त्रत्वात्**—त्यामुळें त्याच्या आयासदुःखानेंच काम्य अग्निहोत्रादिकांचें फल उपक्षीण होतें. कारण तें काम्यकर्म नित्य कर्माच्या तन्त्रानें होत असतें.—**अथ काम्य-अग्निहोत्रादिफलं स्वर्गादि अन्यत् एव**—बरें नित्य व काम्य यांचें अनुष्ठान एकाच वेळीं जरी होत असलें तरी काम्य अग्निहोत्रादिकांचें स्वर्गादि फल नित्यानुष्ठानदुःखाहून निराळेंच आहे, म्हणून म्हणाल तर—**तदनुष्ठानायासदुःखं अपि भिन्नं प्रसज्येत**—काम्यानुष्ठानाचें फल नित्यानुष्ठानायासदुःखाहून भिन्न आहे असें जर म्हटले तर काम्यानुष्ठानायासदुःख व नित्यानुष्ठानायासदुःख हीं परस्पर भिन्न आहेत, असें म्हणण्याचा प्रसंग येईल—**न च तत् अस्ति**—पण काम्यानुष्ठानदुःख भिन्न नाहीं. कारण—**दृष्टविरोधात्**—तसें मानल्यास प्रत्यक्ष अनुभवाशीं विरोध येतो. ( तो विरोधच स्पष्ट करितात-)—**काम्यानुष्ठानायासदुःखात् केवलनित्यानुष्ठानायासदुःखं न हि भिद्यते**—काम्यानुष्ठानायासदुःखाहून केवल नित्यानुष्ठानायासदुःख निराळें नसतें, हें प्रसिद्ध आहे. [ अर्थात् भिन्न फल मानल्यास दृष्टविरोध हा दोष येतो. ]

**किंचान्यदविहितमप्रतिषिद्धं च कर्म तत्कालफलं न तु शास्त्रचोदितं प्रतिषिद्धं वा तत्कालफलम् । भवेद्यदि तदा स्वर्गादिष्वप्यदृष्टफलशासने चोद्यमो न स्यात् । अग्निहोत्रादीनामेव कर्मस्वरूपाविशेषेऽनुष्ठानायासदुःखमात्रेणोपक्षयः काम्यानां च स्वर्गादिमहाफलत्वमङ्गेतिकर्तव्यताद्याधिक्ये त्वसति फलकामित्वमात्रेणेति न शक्यं कल्पयितुम् । तस्मान्न नित्यानां कर्मणामदृष्टफलाभावः कदाचिदप्युपपद्यते । अतश्चाविद्यापूर्वकस्य कर्मणो विद्यैव शुभस्याशुभस्य वा क्षयकारणमशेषतो न नित्यकर्मानुष्ठानम् ॥**

**भाष्यार्थ**—( आत्मज्ञानाप्रमाणे अग्निहोत्रादिकांचा मोक्षाशीं साक्षात् संबंध नाहीं, याविषयीं आणखीहि कारण आहे, असें सांगतात-)—**किं च अन्यत्**—शिवाय दुसरें असें कीं,—**अविहितं अप्रतिषिद्धं च कर्म तत्कालफलं**—जें विहित नसलेलें व प्रतिषिद्धहि नसलेलें कर्म तें तत्काल फल देणारें असतें.—**तु शास्त्रचोदितं प्रतिषिद्धं वा कर्म तत्कालफलं न**—पण शास्त्रविहित किंवा निषिद्ध कर्म तत्काल फल देणारें नसतें. [ भोजन, मर्दन इत्यादि जें व्यावहारिक स्वाभाविक कर्म तें शास्त्रविहित व निषिद्धहि नाहीं. त्याचें फल लागलेंच मिळतें, हें प्रसिद्ध आहे. पण शास्त्रीय विहित किंवा निषिद्ध कर्म, तसें लागलेंच फल देणारें नसतें. ज्याचें फल लागलेंच साक्षात् मिळावयाचें असतें, तें कर्म शास्त्रविहित नसतें. आत्मज्ञान दृष्टफल देणारें आहे. त्यामुळें अदृष्ट फल देणारें कर्म त्याचें सहकारी होत नाहीं. तसेंच तें स्वतःहि दृष्टफल मोक्षामध्यें प्रवृत्ति करूं शकत नाहीं, असा भावार्थ. ]

**—भवेत् यदि तदा स्वर्गादिषु अपि अदृष्टफलशासने च उद्यमः न स्यात्**—शास्त्रीय अग्निहोत्रादि कर्मांचें फलहि जर लागलेंच मिळणारें असतें तर स्वर्गादिकांमध्येंहि व अदृष्ट फलाच्या अनुशासनांत शास्त्राची प्रवृत्ति झाली नसती. [ म्ह० शास्त्रीय कर्मांचें फल जर दृष्ट असतें तर स्वर्गादिकांमध्येंहि प्रवृत्ति झाली नसती व अदृष्ट फल सांगण्यास शास्त्रहि प्रवृत्त झालें नसतें. शिवाय नित्य अग्निहोत्रादिकांचें फल अदृष्ट नाही व काम्य अग्निहोत्रादिकांचें फल मात्र अदृष्ट आहे, म्हणून म्हणाल तर कांहीं कारणावांचून असा विभाग होऊं शकत नाहीं, असें सांगतात- ]**—अग्नि-होत्रादीनां एव कर्मस्वरूपाविशेषे अनुष्ठानायासदुःखमात्रेण उपक्षयः—** अग्निहोत्रादि कर्मांचाच कर्मस्वरूपामध्यें जरी कांहीं विशेष नसला तरी अनुष्ठानाच्या आयासामुळे होणारें जें दुःख त्याच्या योगानेंच-तेवढ्यानेच क्षय होतो,**—तु काम्यानां च अंग-इतिकर्तव्यतादि-आधिक्ये असति फलकामित्वमात्रेण स्वर्गादि-महाफलत्वं इति कल्पयितुं न शक्यं**—पण तेंच काम्य कर्मांना अंग इतिकर्त-व्यता इत्यादिकाचें आधिक्य जरी नसलें तरी नुस्ती फलाची कामना असणे एवढ्याच कारणानें स्वर्गादिमहाफलत्व आहे-त्यांचें स्वर्ग हें महाफल आहे, अशी कल्पना करतां येणें शक्य नाही. [ नित्य अग्निहोत्रादि कर्में व काम्य अग्निहोत्रादि कर्में यांच्या कर्म-स्वरूपामध्यें जरी कांहीं फरक नसला तरी त्यांतील नित्य कर्मांचा केवल अनुष्ठाना-यासदुःखानें क्षय होतो, त्यांचें त्याहून निराळें कांहीं फल नाही, पण त्याच काम्य अग्नि-होत्रादि कर्मांमध्यें अंगादि कोणत्याच दृष्टीनें आधिक्य नसतांनाहि अधिकाऱ्यामध्यें केवल फलकामना असणें एवढ्याच कारणानें त्यांचें स्वर्गादि महाफल मिळतें, असा विभाग करणें सर्वथा अयोग्य आहे. तसा विभाग करण्यास कांहीं प्रमाण नाही. ]**—तस्मात् नित्यानां कर्मणां अदृष्टफलाभावः कदाचित् अपि न उपपद्यते** —म्हणून नित्य कर्मांच्या अदृष्ट फलाचा अभाव आहे, असें केव्हांहि म्हणतां येणें शक्य नाहीं.**—अतः च**—काम्य कर्मांप्रमाणें नित्य कर्मांचेंहि पितृलोकादि अदृष्ट फल आहे, असें प्रमाणतः सिद्ध झाल्यामुळें**—अविद्यापूर्वकस्य शुभस्य अशुभस्य वा कर्मणः अशेषतः क्षयकारणं विद्या एव नित्यकर्मानुष्ठानं न**—अवि-द्यापूर्वकच घडणारें जें शुभ किंवा अशुभ कर्म त्याच्या अशेषतः-निःशेष क्षयाचें कारण-त्याचा निःशेष नाश करणारी विद्याच आहे, नित्यकर्मानुष्ठान हें त्याच्या अशेषतः क्षयाचें कारण नव्हे.

**अविद्याकामबीजं हि सर्वमेव कर्म । तथाचोपपादितम् । अविद्वद्विषयं कर्म विद्वद्विषया च सर्वकर्मसंन्यासपूर्विका ज्ञाननिष्ठा । उभौ तौ न विजानीतः, वेदाविनाशिनं नित्यम्, ज्ञानयोगेन सांख्यानां कर्मयोगेन योगिनाम्, अज्ञानां कर्मसङ्गिनां, तत्त्ववित्तु गुणा गुणेषु वर्तन्त इति मत्वा न सज्जते, सर्वकर्माणि मनसा संन्यस्याऽऽस्ते, नैव किंचि-त्करोमीति युक्तो मन्येत तत्त्ववित्, अर्थादज्ञः करोमीति । आरुरुक्षोः कर्म कारणमारू-ढस्य योगस्थस्य शम एव कारणम् । उदाराख्योऽप्यज्ञा ज्ञानी त्वात्मैव मे मतम् ।**

**अज्ञाः कर्मिणो गतागतं कामकामा लभन्ते । अनन्याश्चिन्तयन्तो मां नित्ययुक्ता यथोक्तमात्मानमाकाशकल्पम कल्मषमुपासते । ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयान्ति ते । अर्थान्न कार्मिणोऽज्ञा उपयान्ति ॥**

**भाष्यार्थ**—( अहोपण, सर्व कर्म अविद्यापूर्वकच आहे, हे अद्यापि सिद्ध झालेलें नाहीं, असें कोणी ह्मणेल म्हणून आचार्य सांगतात-)—**सर्व एव हि कर्म अविद्याकामबीजं**—सर्वच कर्म अविद्या व काम या कारणानें होणारें आहे. म्ह० अविद्या व काम हें सर्व कर्माचें बीज आहे.—**तथा च उपपादितं**—आणि आम्हीं तसें उपपादनहि केले आहे.—**अविद्वद्विषयं कर्म च विद्वद्विषया सर्वकर्मसंन्यासपूर्विका ज्ञाननिष्ठा**—अविद्वानाचा विषय कर्म आहे व विद्वानाचा विषय सर्वकर्मसंन्यासपूर्वक ज्ञाननिष्ठा आहे. ( अधिकारिभेदाने भगवानांनीं दोन निष्ठा सांगितल्या आहेत, इत्यादि गतार्थाचा अनुवाद करितात-)—" **उभौ तौ न विजानीतः** "—ते दोघेहि आत्मस्वरूपाला जाणत नाहींत, ( पृ. ९४ )—" **वेदाविनाशिनं नित्यं**"—जो आत्म्याला अविनाशी व नित्य जाणतो, ( पृ. १०० )—" **ज्ञानयोगेन सांख्यानां कर्मयोगेन योगिनां** "—ज्ञानयोगानें सांख्यांची व कर्मयोगानें अज्ञ गृहस्थांची ( पृ. २५५ )—" **अज्ञानां कर्मसङ्गिनां** "—कर्मामध्यें आसक्त असलेल्या अज्ञांचा बुद्धिभेद करूं नये ( ३२० )—" **तत्त्ववित्तु गुणा गुणेषु वर्तन्त इति मत्वा न सज्जते** "—पण तत्त्ववेत्ता इंद्रियरूप गुण विषयरूप गुणांमध्ये प्रवृत्त होतात, असे मानून त्यांत आसक्त होत नाही ( ३२४ )—" **सर्वकर्माणि मनसा संन्यास्यास्ते** "—सर्व कर्माचा मनानें-विवेकबुद्धीनें त्याग करून राहतो. (७०४)—" **नैव किंचित्करोमीति युक्तो मन्येत तत्त्ववित्** "—तत्त्ववेत्त्यानें सर्व इंद्रियें कर्मै करीत असतांनाहि मी कांहींच करीत नाहीं, असें चिंतन करावें ( पृ. ४९९ )—. **अर्थात् अज्ञः करोमि इति**—अर्थात् अज्ञ 'मी करतों' असे चिंतन करितो. ( अज्ञाच्या चित्तशुद्धीसाठीं कर्म व ज्याचें चित्त शुद्ध झालें आहे त्याचा कर्मसंन्यास ज्ञानप्राप्तीचें साधन आहे, याविषयीं वाक्य-)—"**आरुरुक्षोः कर्म कारणं आरूढस्य योगस्थस्य शम एव कारणं** "—योगारूढ होऊं इच्छिणाराला कर्म हें साधन आहे व त्याच आरूढ झालेल्या योगस्थाला शम-कर्माचा त्याग हेंच साधन आहे. पृ. ५४९ ( या विभागाला सातव्या अध्यायांतील वाक्यहि अनुकूल आहे, असें सांगतात-)—**त्रयः अपि अज्ञाः उदाराः ज्ञानी तु मे आत्मा एव मतं**—तिघेहि अज्ञ भक्त उत्कृष्ट आहेत. तथापि ज्ञानी माझा आत्माच असें माझें मत आहे ६३१. ( कर्म अविद्वद्विषय आहे याविषयीं नवव्या अध्यायांतील वचन-)—**अज्ञाः कर्मिणः गतागतं कामकामाः लभन्ते**—अज्ञ विषयेच्छु कर्मी जा ये या अवस्थेला-जन्म मरणपरंपरेला प्राप्त होतात.७०६(विद्वानांच्या संन्यासपूर्वक ज्ञाननिष्ठेविषयीं त्याच अध्यायांतील वाक्य-)—"**अनन्याश्चिन्तयन्तो मां नित्ययुक्ताः" यथोक्तं आत्मानं आकाशकल्पं अकल्मषं उपासते**—अनन्यमनानें नित्ययुक्त होऊन माझें चिंतन करणारे वर

सांगितलेल्या प्रकारच्या आकाशासारख्या निष्पाप आत्म्याची उपासना करितात पृ.७०६ ( त्याचविषयीं दहाव्या अध्यायांतील वचन- )—" **ददामि बुद्धियोगं तं येन मां उपयान्ति ते**"—मी त्यांना तो बुद्धियोग देतों कीं ज्याच्यायोगानें ते मला प्राप्त होतात. पृ. ७१९ ( विद्वानांनाच भगवत्प्राप्ति होते असा निर्देश केल्यामुळें इतरांना त्याची प्राप्ति होत नाही, हें अर्थात् सूचित होतें, असें सांगतात- )—**अर्थात् न कर्मिणः अज्ञाः उपयान्ति**—अर्थात् अज्ञ कर्मी मला प्राप्त होत नाहींत.

**भगवत्कर्मकारिणो ये युक्ततमा अपि कर्मिणोऽज्ञास्त उत्तरोत्तरहीनफलत्यागावसान-साधनाः। अनिर्देश्याक्षरोपासकास्त्वद्वेष्टा सर्वभूतानामित्याद्याध्यायपरिसमाप्त्युक्तसाधनाः क्षेत्राध्यायाद्यध्यायत्रयोक्तज्ञानसाधनाश्च । अधिष्ठानादिपञ्चहेतुकसर्वकर्मसंन्यासिनामा-त्मैकत्वाकर्तृत्वज्ञानवतां परस्यां ज्ञाननिष्ठायां वर्तमानानां भगवत्तत्त्वविदामनिष्टादिक-र्मफलत्रयं परमहंसपरिव्राजकानामेव लब्धभगवत्स्वरूपात्मैकत्वशरणानां न भवति भवत्येवान्येषामज्ञानां कर्मिणामसंन्यासिनामित्येष गीताशास्त्रोक्तस्य कर्तव्याकर्तव्यार्थस्य विभागः ॥**

**भाष्यार्थ**—( अहोपण भगवत्कर्म करणारांना युक्ततमत्व असल्यामुळें कर्मीहि भगवंताला प्राप्त होतात, अशी आशंका घेऊन सांगतात - )—**ये भगवत्कर्मकारिणः ते युक्ततमाः अपि कर्मिणः अज्ञाः उत्तरोत्तरहीनफलत्यागावसानाः**—११ व्या अध्यायाच्या शेवटीं सांगितल्याप्रमाणें ' मत्कर्मकृत् ' इत्यादि न्यायानें भगवत्कर्म करणारे ते जरी युक्ततम असले तरी कर्मी–अज्ञ असतात, ते एकदम भगवानाला पोचूं शकत नाहींत. ( त्यांचें अज्ञत्व कशावरून ठरवावयाचें ? उत्तर– ) चित्तसमाधानापासून फलत्यागापर्यंत उत्तरोत्तर हीन साधनांचें ग्रहण केल्यामुळें अभ्यास करण्यास असमर्थ असलेल्यासाठींच भगवत्कर्मकारित्व सांगितलें आहे. अर्थात् भगवत्कर्म करणारे अज्ञ होत. ( आतां ' ये तु अक्षरं ' इत्यादि वाक्याच्या आधारानें संन्यासपूर्वक ज्ञाननिष्ठा हा विद्वानाचा विषय आहे, असा निर्धार करितात– )—**अनिर्देश्य-अक्षरोपासकाः तु ' अद्वेष्टा सर्वभूतानां ' इत्यादि आ-अध्यायपरिसमाप्ति उक्तसाधनाः**—पण अनिर्देश्य अक्षरोपासक कीं जे ' अद्वेष्टा सर्वभूतानां ' ( पृ. ८४६ ) येथून बारावा अध्याय संपेपर्यंत सांगितलेलीं साधनें आचरणारे असतात, ते संन्यासपूर्वक ज्ञाननिष्ठेचे अधिकारी आहेत. [ त्याचप्रमाणें तेराव्या अध्यायांत जीं ' अमानित्वादि ' ( ७–११ ) साधनें सांगितलीं आहेत, चवदाव्यांत जीं गुणातीताचीं लक्षणें सांगितलीं आहेत, पंधराव्यांत जीं ' असंग-निर्मानमोहादि ' साधनें सांगितलीं आहेत त्या सर्व साधनांनीं अक्षरोपासक युक्त असतात. त्यामुळेंहि ते ज्ञाननिष्ठेंतच अधिकृत आहेत असें सांगतात– ]—**क्षेत्राध्यायादि-अध्यायत्रयोक्तज्ञानसाधनाः च**—व ते अक्षरोपासक क्षेत्राध्यायादि तीन अध्यायांत सांगितलेल्या ज्ञानसाधनांनीं युक्त असतात. ( याप्रमाणें दोन प्रकारच्या निष्ठेची अधिकारिभेदानें व्यवस्था लावून ज्ञाननिष्ठांना अनिष्ट, इष्ट व मिश्र असें त्रिविध कर्मफल मिळत नाहीं, तर मुक्तिच मिळते आणि कर्म-

निष्ठांना त्रिविध कर्मफलच मिळतें, मुक्ति मिळत नाहीं, अशा अत्यंत इष्ट असलेल्या शास्त्रार्थविभागाचा उपसंहार करितात-)—**अधिष्ठानादिपञ्चहेतुकसर्वकर्मसंन्यासिनां आत्मैकत्व-अकर्तृत्वज्ञानवतां**—अधिष्ठानादि (पृ. ११५२) पांच हेतूंनीं घडणाऱ्या सर्वकर्मांच्या संन्याश्यांना, आत्म्याचें एकत्व, अकर्तृत्व इत्यादि ज्ञानानें युक्त असलेल्यांना—**परस्यां ज्ञाननिष्ठायां वर्तमानानां भगवत्तत्त्वविदां**—श्रेष्ठ ज्ञाननिष्ठेमध्यें राहणाऱ्या भगवत्तत्त्ववेत्त्यांना—**परमहंसपरिव्राजकानां एव लब्धभगवत्स्वरूप-आत्मैकत्वशरणानां**—परमहंसपरिव्राजकांनाच-ज्यांना भगवत्स्वरूप आत्म्याचें एकत्वज्ञान साक्षात् झालें असून जे त्या एकत्व ज्ञानाचाच आश्रय करून राहिले आहेत त्यांना—**अनिष्टादिकर्मफलत्रयं न भवति**—या सर्व विशेषणांनीं विशिष्ट असलेल्या ज्ञाननिष्ठांना पूर्वोक्त अनिष्टादि त्रिविध कर्मफल प्राप्त होत नाहीं.—**अन्येषां अज्ञानां कर्मिणां-असंन्यासिनां भवति एव**—पण इतर अज्ञ कर्मी असंन्याश्यांना अनिष्ट, इष्ट व मिश्र असे त्रिविध कर्मफल मिळतें,—**इति एषः गीताशास्त्रोक्तस्य कर्तव्याकर्तव्यार्थस्य विभागः**—असा हा गीताशास्त्रोक्त कर्तव्य व अकर्तव्य या दोन विषयांचा विभाग आहे.

**अविद्यापूर्वकत्वं सर्वस्य कर्मणोऽसिद्धमिति चेत्। न, ब्रह्महत्यादिवत्। यद्यपि शास्त्रावगतं नित्यं कर्म तथाऽप्यविद्यावत एव भवति। यथा प्रतिषेधशास्त्रावगतमपि ब्रह्महत्यादिलक्षणं कर्मानर्थकारणमविद्याकामादिदोषवतो भवत्यन्यथा प्रवृत्त्यनुपपत्तेस्तथा नित्यनैमित्तिककाम्यान्यपीति। व्यतिरिक्तात्मन्यज्ञाते प्रवृत्तिर्नित्यादिकर्मस्वनुपपन्नेति चेत्। न, चलनात्मकस्य कर्मणोऽनात्मकर्तृकस्याहं करोमीतिप्रवृत्तिदर्शनात्॥**

**भाष्यार्थ**—(सर्वकर्मांचें बीज अविद्या व काम आहे असें जें वर म्हटलें आहे तें बरोबर नाहीं. कारण शास्त्रविहित कर्माला अविद्यापूर्वक म्हणणें अयोग्य आहे, असा आक्षेप-)—**सर्वस्य कर्मणः अविद्यापूर्वकत्वं असिद्धं इति चेत्**—सर्वकर्माला अविद्यापूर्वकत्व आहे, हें म्हणणें असिद्ध आहे, म्हणून म्हणाल तर—**न। ब्रह्महत्यादिवत्**—तें बरोबर नाहीं. ब्रह्महत्यादिकांप्रमाणें. (या दृष्टान्ताचें स्पष्टीकरण-)—**यद्यपि नित्यं कर्म शास्त्रावगतं तथापि अविद्यावतः एव भवति**—जरी नित्य कर्म शास्त्रानें अवगत होणारें-शास्त्रद्वाराच ज्ञात होणारें असलें तरी तें अविद्यावानाचेंच आहे.—**यथा प्रतिषेधशास्त्रावगतं अपि ब्रह्महत्यादिलक्षणं अनर्थकारणं कर्म अविद्याकामादिदोषवतः भवति**—जसें प्रतिषेध शास्त्रावरून अवगत-ज्ञात होणारें ब्रह्महत्यादिरूप अनर्थाला कारण होणारें कर्म अविद्या-कामादि दोषांनीं युक्त असलेल्या पुरुषाचेंच असतें. (अविद्याकामादिदोषवानाकडून ब्रह्महत्यादि अनर्थावह कर्म घडते याविषयीं हेतु-कारण-)—**अन्यथा प्रवृत्ति-अनुपपत्तेः**—अविद्याकामावांचून त्या कर्मांत प्रवृत्ति होण्याचा संभव नसतो,—**तथा नित्य-नैमित्तिक-काम्यानि अपि इति**—त्याचप्रमाणें नित्य-नैमित्तिक-काम्य कर्मेंहि अविद्या-कामवानाकडूनच होतात. (या म्हणण्यावर आक्षेप-)—**व्यतिरिक्तात्मनि अविज्ञाते नित्यादिकर्मसु प्रवृत्तिः**

**अनुपपन्ना इति चेत्**—आत्मा देहादिकांहून भिन्न आहे, असें ज्ञान असल्यावांचून—हें ज्ञात नसल्यास नित्यादि पारलौकिक कर्मामध्यें प्रवृत्तिच होऊं शकत नाहीं, म्हणून म्हणाल तर—**न**—तें बरोबर नाहीं. कारण आत्मा देहादिकांहून भिन्न आहे, असें ज्ञान जरी असलें तरी पारमार्थिक आत्मज्ञानाचा अभाव असल्यामुळें मिथ्याज्ञानानेंच नित्यादिकर्मामध्यें प्रवृत्ति होते.त्यामुळें त्या कर्मांचें अविद्यापूर्वकत्व अप्रतिहत आहे,असा भावार्थ.(तेंच स्पष्ट करितात–)—**चलनात्मकस्य कर्मणः अनात्मकर्तृकस्य 'अहं करोमि ' इति प्रवृत्तिदर्शनात्**—चलनरूप कर्म आत्मकर्तृक नाहीं, कारण आत्मा निष्क्रिय आहे. त्यामुळें त्या चलनात्मक कर्माला अनात्मकर्तृकत्वच आहे. देहेंद्रियसंघात सक्रिय असल्यामुळें त्याचेंच कर्म आहे. तथापि त्या देहेंद्रियसंघातावर 'मी' असा मिथ्या अभिमान धरून प्राण्याची कर्मामध्यें प्रवृत्ति होते, असें स्पष्ट दिसतें. त्यामुळें त्या नित्यादिकर्माला अविद्यापूर्वकत्वच आहे.

**देहादिसंघातेऽहंप्रत्ययो गौणो न मिथ्येति चेत् । न, तत्कार्येष्वपि गौणत्वोपपत्तेः । आत्मीये देहादिसंघातेऽहंप्रत्ययो गौणो यथाऽऽत्मीये पुत्र आत्मा वै पुत्रनामासीति, लोके चापि मम प्राण एवायं गौरिति तद्वत् । नैवायं मिथ्याप्रत्ययो मिथ्याप्रत्ययस्तु स्थाणुपुरुषयोरगृह्यमाणविशेषयोः । न गौणप्रत्ययस्य मुख्यकार्यार्थत्वमधिकरणस्तुत्यर्थत्वाल्लुप्तोपमाशब्देन । यथा सिंहो देवदत्तोऽग्निर्माणवक इति सिंह इवाग्निरिव क्रौर्यपैङ्गल्यादिसामान्यवत्त्वाद्देवदत्तमाणवकाधिकरणस्तुत्यर्थमेव न तु सिंहकार्यमग्निकार्यं वा गौणशब्दप्रत्ययनिमित्तं किंचित्साध्यते मिथ्याप्रत्ययकार्यं त्वनर्थमनुभवति ॥**

**भाष्यार्थ**—( देहादिसंघातावरील 'अहं' हा अभिमान मिथ्या आहे, असें जें म्हटलें त्यावर आक्षेप–)—**देहादिसंघाते ' अहं-'प्रत्ययः गौणः न मिथ्या इति चेत्**—देहादिसंघातावरील 'अहं' मी–हा प्रत्यय गौण आहे मिथ्या नव्हे, असे म्हणाल तर—**न । तत्कार्येषु अपि गौणत्वोपपत्तेः**—तें बरोबर नाहीं. कारण 'अहं' बुद्धीला गौण म्हटल्यास तत्पूर्वक होणाऱ्या कर्मालाहि गौणत्व आहे, असें म्हणावें लागेल. ( आणि कर्महि गौण झालें म्हणजे आत्म्याला अनर्थांची प्राप्तिच नसल्यामुळें त्याच्या निवृत्तीसाठीं साधनांचा शोध करणें व्यर्थ होईल, असा याचा भावार्थ. आतां याचाच अधिक विस्तार–)—**आत्मीये देहादिसंघाते 'अहं'प्रत्ययः गौणः यथा आत्मीये पुत्रे ' आत्मा वै पुत्रनामासि ' इति**—आत्मसंबंधी देहादि-संघातावरील –आपल्या शरीरेंद्रियांवरील 'मी' हा प्रत्यय गौण आहे. जसा आत्मीय–आपल्या पुत्रावरील ' पुत्र हा आत्माच आहे ' या श्रुतिवचनांत सांगितल्याप्रमाणें आत्मप्रत्यय–'मी' हा प्रत्यय गौण असतो,—**लोके च अपि अयं गौः मम प्राणः एव इति**—व्यवहारांतहि हा बैल माझा प्राणच आहे, अशी भेदबुद्धिपूर्वक गौणबुद्धि प्रसिद्ध आहे,—**तद्वत्**—तशीच म्ह० लोक व वेद यांच्या अनुरोधानें आपल्या संघातावरहि 'अहं' ही बुद्धि गौण आहे. ( अहोपण, मिथ्या बुद्धिहि भेदबुद्धिपूर्वक संभवते. त्यामुळें आपल्या संघातावरील 'अहं' बुद्धि मिथ्याच कां नव्हे ? अशी मध्यस्थाची शंका घेऊन वादीच

म्हणतो-)—**अयं मिथ्याप्रत्ययः न एव**—हा मिथ्या प्रत्यय नव्हेच.—**मिथ्याप्रत्ययः तु अगृह्यमाणविशेषयोः स्थाणुपुरुषयोः**—मिथ्याप्रत्यय तर ज्यांच्या विशेषस्वरूपाचें ग्रहण केलें जात नाहीं, ज्यांचें विशिष्टस्वरूप कळत नाहीं, असा स्थाणु व पुरुष, यांचाच संभवतो. [ म्ह० अधिष्ठान व आरोप्य याचा विवेक न झाल्यामुळें मिथ्याप्रत्यय होतो. याप्रमाणें देहादिकांच्या ठिकाणीं होणारी जी ‘ अहं ’बुद्धि तिला गौणत्व आहे या आक्षेपाचें विवरण केल्यावर ‘ तर मग तिच्या कार्यालाहि गौणत्व येईल ’ असें जें वर आक्षेपाचा परिहार करितांना म्हटलें होतें, त्याचें विवरण-]—**गौणप्रत्ययस्य मुख्यकार्यार्थत्वं न**—गौणप्रत्ययाला मुख्यकार्यार्थत्व नसतें. म्हणजे गौणप्रत्ययाचा मुख्यप्रत्ययाचें कार्य करण्याकडे उपयोग होत नाहीं.—**लुप्तोपमाशब्देन अधिकरणस्तुत्यर्थत्वात्**—कारण लुप्त झालेल्या उपमाशब्दानें अधिकरणाची स्तुति करण्यासाठीं गौण प्रयोग योजलेला असतो.—**यथा देवदत्तः सिंहः माणवकः अग्निः इति सिंहः इव अग्निः इव क्रौर्य-पैंगल्यादिसामान्यवत्त्वात् देवदत्त-माणवकाधिकरणस्तुत्यर्थं एव**—जसें-देवदत्त सिंह आहे,हा ब्रह्मचारी बटु अग्नि आहे, म्ह० हा जणुं काय सिंहाप्रमाणें जणुंकाय अग्नीप्रमाणें आहे,असें क्रूरपणा व पिंगटवर्ण इत्यादि साधर्म्य असल्यामुळे देवदत्त व माणवक-बटु या अधिकरणाची स्तुति करण्यासाठींच म्हटलें जातें.—**तु गौणशब्दप्रत्ययनिमित्तं किंचित् सिंहकार्यं अग्निकार्यं वा न साध्यते**—पण गौणशब्द व प्रत्यय यांच्या निमित्तानें कोणतेंहि सिंहकार्य किंवा अग्निकार्य साधलें जात नाहीं. [देवदत्त सिंह आहे, असें म्हणून त्यानें हत्तीचें गंडस्थल फोडावें,किंवा बटूला अग्नि म्हटल्यानें त्यानें घर जाळावें अशी अपेक्षा कधींच कोणी करीत नाहीं.पण मिथ्याबुद्धीचें अनर्थ हें कार्य आत्मा अनुभवितो, त्यामुळें देहादिकांतील ‘ अहं ’ ही बुद्धि गौण नव्हे, असें सांगतात-]—**तु मिथ्याप्रत्ययकार्यं अनर्थं अनुभवति**—पण आत्मा देहच मी या मिथ्याप्रत्ययाचें कार्य अनर्थ अनुभवितो. ( त्यामुळें ‘ देहच मी ’ हा मिथ्याप्रत्यय होय. )

**गौणप्रत्ययविषयं च जानाति नैष सिंहो देवदत्तः स्यान्नायमग्निर्माणवक इति । तथा गौणेन देहादिसंघातेनाऽऽत्मना कृतं कर्म न मुख्येनाहंप्रत्ययविषयेणाऽऽत्मना कृतं स्यात् । न हि गौणसिंहाग्निभ्यां कृतं कर्म मुख्यसिंहाग्निभ्यां कृतं स्यात् । न च क्रौर्येण पैङ्गल्येन वा मुख्यसिंहाग्न्योः कार्यं किंचित्क्रियते स्तुत्यर्थत्वेनोपक्षीणत्वात् स्तूयमानौ च जानीतो नाहं सिंहो नाहमग्निरिति न सिंहस्य कर्म ममाग्नेश्चेति तथा न संघातस्य कर्म मम मुख्यस्याऽऽत्मन इति प्रत्ययो युक्ततरः स्यान्न पुनरहं कर्ता मम कर्मेति ॥**

**भाष्यार्थ**—( देहबुद्धि मिथ्या याविषयीं आणखी एक कारण-)—**च गौणप्रत्ययविषयं एषः देवदत्तः सिंहः न स्यात् अयं माणवकः अग्निः न इति जानाति**—गौणबुद्धीचा विषय असा जो देवदत्त किंवा बटु त्याला ‘ हा देवदत्त सिंह नव्हे, हा बटु अग्नि नव्हे, ’ असें दुसरा जाणतो, ( पण तसा अविद्वान् आत्म्याहून देह

जरी वस्तुतः भिन्न असला तरी त्याचें अनात्मत्व अनुभवीत नाहीं, त्यामुळें देहात्मबुद्धि गौण नव्हे. देहाला 'मी' असें म्हणणें व तसा अनुभव घेणें यांना गौण मानल्यास आणखी कोणता दोष येतो तें सांगतात-)—**तथा गौणेन देहादिसंघातेन आत्मना कृतं कर्म मुख्येन अहंप्रत्ययविषयेण कृतं न स्यात्**—त्याचप्रमाणें गौण देहादिसंघातरूप आत्म्यानें केलेले कर्म मुख्य-'अहंप्रत्यया'चा 'विषय अशा आत्म्यानें केलें आहे, असे होणार नाहीं (पण कर्तृत्व आत्म्यामध्यें प्रतीत होतें, 'मी कर्ता' असें प्रसिद्ध आहे. हीच गोष्ट उदाहरणानें स्पष्ट करितात-)—**गौणसिंहाग्निभ्यां कृतं कर्म मुख्यसिंहाग्निभ्यां कृतं न हि स्यात्**—गौण सिंह व अग्नि यांनी केलेलें कर्म मुख्य-खरा सिंह व अग्नि यांनीं केलेलें, असे कधींच होत नाही, हे प्रसिद्ध आहे. —**मुख्यसिंहाग्न्योः क्रौर्येण पैङ्गल्येन वा किंचित् कार्यं न च क्रियते स्तुत्यर्थत्वेन उपक्षीणत्वात्**—मुख्य सिंह व अग्नि याच्या क्रौर्यानें किंवा पिंगलतेनें देवदत्त व बटु यांच्याकडून कोणतेंहि काय केलें जात नाहीं. कारण त्यांची स्तुति करणें याच प्रयोजनानें त्यांचा क्षय झालेला असतो, (त्याचप्रमाणें देहगत जडत्वानेंहि मुख्य आत्म्याचें कांहीं कार्य केलें आहे, असें होत नाहीं देहात्मबुद्धीला गौणत्व नाहीं, याविषयीं आणखी हेतु-)—**स्तूयमानौ च अहं सिंहः न अहं अग्निः न इति जानीतः**—स्तुति केली जाणारे देवदत्त व बटु 'मी सिंह नव्हे, मी अग्नि नव्हे,' असें जाणतात—**सिंहस्य कर्म मम न च अग्नेः**—तसेंच सिंहाचें कर्म हें माझें कर्म नव्हे व अग्नीचे कर्म हें माझे नव्हे असें ते जाणतात—**तथा संघातस्य कर्म मम मुख्यस्य आत्मनः न इति प्रत्ययः युक्ततरः स्यात्**—याचप्रमाणें देहात्मबुद्धि जर गौण असती तर शरीरेंद्रियसंघाताचें जे कर्म तें मज मुख्य आत्म्याचें नव्हे, असा प्रत्यय येणेंच अत्यंत युक्त होतें.—**पुनः अहं कर्ता मम कर्म इति न**—पण त्याच्या उलट 'मी कर्ता' व 'माझें कर्म' असा प्रत्यय येणें मुळींच युक्त नव्हे.

**यच्चाऽऽहुरात्मीयैः स्मृतीच्छाप्रयत्नैः कर्महेतुभिरात्मा करोतीति। न, तेषां मिथ्याप्रत्ययपूर्वकत्वात्। मिथ्याप्रत्ययनिमित्तेष्टानिष्टानुभूतक्रियाफलजनितसंस्कारपूर्वका हि स्मृतीच्छाप्रयत्नादयः। यथाऽस्मिञ्जन्मनि देहादिसंघाताभिमानरागद्वेषादिकृतौ धर्माधर्मौ तत्फलानुभवश्च तथाऽतीतेऽतीततरेऽपि जन्मनीत्यनादिरविद्याकृतः संसारोऽतीतोऽनागतश्चानुमेयः। ततश्च सर्वकर्मसंन्यासाज्ज्ञाननिष्ठायामात्यन्तिकः संसारोपरम इति सिद्धम्॥**

**भाष्यार्थ**—(शरीराला मी म्हणणें हा प्रत्यय मिथ्याच जरी असला तरी आत्म्याचें कर्तृत्व त्या मिथ्या प्रत्ययामुळें नाहीं, तर त्याचें ज्ञान, इच्छा व प्रयत्न यांच्या योगानें त्याचें कर्तृत्व खरें आहे, मिथ्या नव्हे, या मताचा अनुवाद करितात-)—**यत् च आहुः कर्महेतुभिः आत्मीयैः स्मृतीच्छाप्रयत्नैः आत्मा करोति इति**—आतां कित्येक जें म्हणतात कीं, कर्माचे हेतु-कर्माचीं निमित्तें अशा, आत्म्याच्या स्मृति, इच्छा, व प्रयत्न यांच्या योगानें आत्मा करतो, (असें म्हणतात)—**न**—तें बरोबर

नाहीं.—**तेषां मिथ्याप्रत्ययपूर्वकत्वात्**—कारण आत्म्याचें ज्ञानादिकांमुळेंहि अस- लेलें कर्तृत्व मिथ्याप्रत्ययपूर्वकच आहे. कारण ज्ञानादिक हे मिथ्याबुद्धीचेच कार्य आहे. ज्ञानादिकहि मिथ्याप्रत्ययपूर्वकच आहेत. (याचेंच स्पष्टीकरण-)—**हि स्मृति इच्छा- प्रयत्नादयः मिथ्याप्रत्ययनिमित्तेष्टानिष्टानुभूतक्रियाफलजनितसंस्कारपू- र्वकाः**—कारण स्मृति, इच्छा, प्रयत्न इत्यादि भाव मिथ्या ज्ञानाला निमित्त करून- मिथ्या प्रत्ययाच्या निमित्तानें कोणाला इष्ट व कोणाला अनिष्ट कल्पून, त्या कल्पनेच्या द्वारा तसाच अनुभव घेतलेल्या त्यांतील इष्ट पदार्थाला ग्रहण करण्याची इच्छा व अनिष्ट पदार्थाचा त्याग करण्याची इच्छा, यांच्या योगानें तदनकूल क्रिया करून, तिचें इष्ट किंवा अनिष्ट फल भोगून, त्या फलभागाच्या संस्काराने ( स्मृत्यादिक ) होतात. इष्टानिष्टफलोपभोगापासून त्याविषयींच्या स्मृति, इच्छा, प्रयत्न वगैरे होतात. अर्थात् मिथ्याप्रत्यय हेंच त्यांचें मूळ आहे. त्यामुळे आत्म्याचे कर्तृत्व मिथ्या आहे, खरें नव्हे.—**यथा अस्मिन् जन्मनि देहादिसंघाताभिमानरागद्वेषादिकृतौ ध- र्माधर्मौ तत्फलानुभवः च**—ज्याप्रमाणे या वर्तमान जन्मीं देहादि संघातच मी असा अभिमान, राग, द्वेष इत्यादिकांमुळे धर्म व अधर्म होतात व त्यांच्या फलाचा अनु- भव येतो—**तथा अतीते अतीततरे अपि जन्मनि**—त्याचप्रमाणें मागच्या व त्याच्या मागच्याहि जन्मांमध्यें तो येतो म्ह० गत अनेक जन्मींहि तो देहाभिमान- राग-द्वेष, त्यामुळे धर्माधर्म व त्यांचें फल या क्रमानेच येतो,—**इति अनादि-अवि- द्याकृतः संसारः अतीतः अनागतः च अनुमेयः**—याच न्यायानें म्ह० या जन्मांतील अनुभवानुसार अनादि अविद्याकृत भूतकालीन व भविष्यत्कालीन संसार अनु- मेय-अनुमान करण्यास योग्य आहे. वर्तमानकालच्या अनुभवावरून मागील व पुढील अनादि अविद्याकृत संसाराची कल्पना येते—**ततः च सर्वकर्मसंन्यासात् ज्ञान- निष्ठायां आत्यन्तिकः संसारोपरमः इति सिद्धं**—आणि त्यामुळे सर्वकर्म- संन्यास करून ज्ञाननिष्ठेत स्थित झाल्यानें कारणासह संसाराचा उपरम होतो, असें सिद्ध झालें.

अविद्यात्मकत्वाच्च देहाभिमानस्य तन्निवृत्तौ देहानुपपत्तेः संसारानुपपत्तिः। देहादि- संघात आत्माभिमानोऽविद्यात्मकः। न हि लोके गवादिभ्योऽन्योऽहं मत्तश्चान्ये गवा- दय इति जानंस्तेष्वहमिति प्रत्ययं मन्यते कश्चित्। अजानंस्तु स्थाणौ पुरुषविज्ञानवद- विवेकतो देहादिसंघाते कुर्यादहमिति प्रत्ययं न विवेकतो जानन्। यस्त्वात्मा वै पुत्र नामासीति पुत्रेऽहंप्रत्ययः स तु जन्यजनकसंबन्धनिमित्तो गौणः। गौणेन चाऽऽत्मना भोजनादिवत्परमार्थकार्यं न शक्यते कर्तुं गौणसिंहाग्निभ्यां मुख्यसिंहाग्निकार्यवत्॥

**भाष्यार्थ**—( संसार अविद्यात्मक असल्यामुळें विद्येनें त्याचा बाध होतो, याविषयीं आणखी कारण-)—**च देहाभिमानस्य अविद्यात्मकत्वात् तन्निवृत्तौ देहा- नुपपत्तेः संसारानुपपत्तिः**—आणि देहाभिमानाला अविद्यात्मकत्व असल्यामुळें- देहच मी ही भावना आत्मस्वरूपाच्या अज्ञानामुळें भ्रमानें उत्पन्न झालेली असल्यामुळें

तो देहाभिमान निवृत्त झाल्यावर देहाची अनुपपत्ति-असंभव झाला असतां संसाराची अनुपपत्ति-असंभव होतो, ( अहोपण, संसार धर्माधर्मामुळे संभवतो, तो अविद्याकृत नाहीं, अशी शंका घेऊन म्हणतात-)—**देहादिसंघाते आत्माभिमानः अविद्यात्मकः**—देहादि संघातावरील ' हाच मी ' असा हा आत्माभिमान अविद्यात्मक-भ्रामक आहे. ( मी धर्मादिकांचा कर्ता हा अभिमानहि मिथ्या आहे. त्यामुळें संसाराचें प्रधान-मूळ कारण अविद्याच.)—**लोके अहं गवादिभ्यः अन्यः च गवादयः मत्तः अन्ये इति जानन् कश्चित् तेषु अहं इति प्रत्ययं न हि मन्यते**—व्यवहारांत मी गाय, बैल, घोडा, घर इत्यादि माझ्या पदार्थाहून अगदीं भिन्न आहे व ते गाय, घोडा वगैरे पदार्थहि माझ्याहून अगदीं पृथक् आहेत, असे जाणणारा कोणीहि त्यांच्या ठिकाणीं मी असा अभिमान ठेवीत नाहीं, त्यांना मी असे समजत नाहीं, हे प्रसिद्ध आहे.—**अजानन् तु स्थाणौ पुरुषविज्ञानवत् अविवेकतः देहादिसंघाते अहं इति प्रत्ययं कुर्यात् न विवेकतः जानन्**—पण तसे न जाणणारा मात्र, पुढील खांबाला भ्रमानें जसे मनुष्य मानावें त्याप्रमाणें, अविवेकामुळे देहादिसंघातावर-शरीरेंद्रियसमूहावर ' मी ' असा अभिमान धरील, त्याला ' हाच मी ' असें वाटेल, पण विवेकतः जाणणारा-म्ह० देह निराळा व आत्मा निराळा असे जाणणारा तसा मिथ्या अभिमान कधीं धरणार नाहीं —**तु यः 'आत्मा वै पुत्र नामासि' इति पुत्रे अहं-प्रत्ययः**—आतां-' हे पुत्र तूं माझा आत्मा आहेस ' असा पुत्रावर जो आत्माभिमान असतो,'पुत्रच मी' असा जो अहंप्रत्यय श्रुतीनें सांगितलेला आहे—**सः तु जन्यजनक-संबंधनिमित्तः गौणः**—तो तर जन्य व जनक या संबंधाच्या निमित्तानें झालेला असल्यामुळें गौण आहे—**गौणेन च आत्मना भोजनादिवत् परमार्थकार्यं कर्तुं न शक्यते**—व गौण आत्म्याकडून भोजनादिकांप्रमाणे मुख्य-खरें कार्य घडणें शक्य नसतें.—**गौणसिंहाग्निभ्यां मुख्यसिंहाग्निकार्यवत्**—गौण सिंह व अग्नि यांच्याकडून मुख्य सिंह व अग्नि यांचें कार्य घडणे जसे शक्य नसते त्याप्रमाणे. [ पुत्रानें भोजन केल्यानें पित्याचें पोट भरत नाहीं, हें प्रसिद्ध आहे. त्यामुळें देहादिकांना जर गौण-आत्मत्व असेल तर त्यांचें कर्तृत्वादि कार्य मुख्य आत्म्याचें वास्तविक आहे, असें म्हणतां येणार नाहीं. देवदत्ताला सिंह म्हटल्यानें तो सिंहाचें कार्य करूं लागत नाहीं, किंवा त्यानें केलेलें कार्य हें मुख्य सिंहाचे कार्य आहे असेंहि म्हणतां येत नाहीं. ]

**अदृष्टविषयचोदनाप्रामाण्यादात्मकर्तव्यं गौणैर्देहेन्द्रियात्मभिः क्रियत इति चेत् । न, अविद्याकृतात्मकत्वात्तेषाम् । न गौणा आत्मानो देहेन्द्रियादयः । कथं तर्हि. मिथ्याप्रत्ययेनैवासङ्गस्याऽऽत्मनः संगत्यात्मत्वमापाद्यते तद्भावे भावात्तदभावे चाभावात् । अविवेकिनां ह्यज्ञानकाले बालानां दृश्यते दीर्घोऽहं गौरोऽहमिति देहादिसंघातेऽहंप्रत्ययो न तु विवेकिनामन्योऽहं देहादिसंघातादिति जानवतां तत्काले देहादिसंघातेऽहंप्रत्ययो भवति । तस्मान्मिथ्याप्रत्ययाभावेऽभावात्तत्कृत एव न गौणः ॥**

**भाष्यार्थ**—( याविषयीं आक्षेप- )—**अदृष्टविषयचोदनाप्रामाण्यात् आत्मकर्तव्यं गौणैः देहेन्द्रियादिभिः क्रियते इति चेत्**—स्वर्गादि अदृष्ट विषयांविषयीं स्वर्गकामादि वेदवाक्याला प्रामाण्य असल्यामुळे त्यावरून आत्मा देहादिकांहून भिन्न आहे, असें ज्ञान होतें. पण केवल आत्म्याला कर्तृत्व नाहीं. त्यामुळें वेदानें सांगितलेलें त्याचें कर्तव्य कर्म गौणच असलेल्या देहेंद्रियादि आत्म्याकडून केले जातें, म्हणून म्हणाल तर—**न तेषां अविद्याकृतात्मकत्वात्**—ते बरोबर नाहीं. कारण त्या देहेंद्रियादिकांना अविद्याकृत आत्मत्व आहे. म्ह० त्याना गौण आत्मत्व नाहीं मिथ्यात्मत्व आहे., ( याचेच उपपादन- )—**देहेंद्रियादयः गौणाः आत्मानः न**—देह, इंद्रियें इत्यादिक हे गौण आत्मे नव्हेत.—**कथं तर्हि**—तर मग देहादिकच मी अशी प्रतीति कशी येते ?—**मिथ्याप्रत्ययेन एव असंगस्य आत्मनः संगत्यात्मत्वं आपाद्यते**—मिथ्याप्रत्ययानेंच असंग आत्म्याच्या संगतीनें आत्मत्व संपादन केलें जातें. ( असंग आत्म्याचीहि देहादिकांमध्ये मिथ्या प्रत्ययाने संग उत्पन्न करून देहच आत्मा अशी भ्रामक समजूत होते )—**तद्भावे भावात् तदभावे च अभावात्**—कारण जेव्हां तसा भ्रामक संग असतो तेव्हां देहादिकांना आत्मत्व असते व त्या संगाचा जेव्हां अभाव असतो तेव्हां त्याचाहि अभाव होतो.(झोपेत देहादिकांवर आसक्ति नसते त्यामुळें त्यांना आत्मत्वहि नसते. याविषयीं शास्त्रीय संस्कारशून्यांच्या अनुभवाचें प्रमाण देतात- ) —**अविवेकिनां हि बालानां अज्ञानकाले दीर्घः अहं गौरः अहं इति देहादिसंघाते अहंप्रत्ययः दृश्यते**—अविवेकी बालांचाच-प्राकृत जनांचाच अविद्यासमयीं-अज्ञानकालीं मी उंच आहे, गोरा आहे अशा प्रकारचा देहादिसंघातावर 'मी' असा प्रत्यय-मी असा अभिमान दिसतो—**तु विवेकिनां अहं देहादिसंघातात् अन्यः इति ज्ञानवतां तत्काले देहादिसंघाते अहं प्रत्ययः न भवति**—पण विवेक्यांचा-मी देहादिसंघाताहून अगदी निराळा आहें असें ज्यांना ज्ञान आहे त्यांचा त्या ज्ञानसमयीं देहादिसंघातावर 'मी' असा अभिमान नसतो. ( याप्रमाणे अन्वय व्यतिरेकन्याय व अज्ञांचा अनुभव यांवरून सिद्ध झालेल्या अर्थाचा उपसंहार करितात- )—**तस्मात् मिथ्याप्रत्ययाभावे अभावात् तत्कृतः एव न गौणः**—यास्तव मिथ्याभिमानाचा जेव्हां अभाव असतो तेव्हां कर्तृत्वादिकांचा अभाव असल्यामुळें मिथ्याभिमानामुळेच देहादिकांच्या ठिकाणीं कर्तृत्वादि-अभिमान आहे, तो गौण नव्हे. ( देह मी हा अभिमान मिथ्या आहे, गौण नव्हे. )

**पृथग्गृह्यमाणविशेषसामान्ययोर्हि सिंहदेवदत्तयोरग्निमाणवकयोर्वा गौणः प्रत्ययः शब्दप्रयोगो वा स्यान्नागृह्यमाणसामान्यविशेषयोः। यत्तूक्तं श्रुतिप्रामाण्यादिति । न, तत्प्रामाण्यस्यादृष्टविषयत्वात् प्रत्यक्षादिप्रमाणानुपलब्धे हि विषयेऽग्निहोत्रादिसाध्यसाधनसंबन्धे श्रुतेः प्रामाण्यं न प्रत्यक्षादिविषयेऽदृष्टदर्शनार्थत्वात्प्रामाण्यस्य । तस्मान्न दृष्टमिथ्याज्ञाननिमित्तस्याहंप्रत्ययस्य देहादिसंघाते गौणत्वं कल्पयितुं शक्यम् । न हि श्रुतिशतमपि शीतोऽग्निरप्रकाशो वेति ब्रुवत्प्रामाण्यमुपैति । यदि ब्रूयाच्छीतोऽग्निरप्रकाशो**

**येति तथाऽप्यर्थान्तरं श्रुतेर्विवक्षितं कल्प्यं प्रामाण्यान्यथानुपपत्तेर्न तु प्रमाणान्तरविरुद्धं स्ववचनविरुद्धं वा ॥**

**भाष्यार्थ**—( 'देहच मी' हा शब्द व प्रत्यय गौण नव्हेत, याविषयीं आणखी एक-कारण- )—**पृथक्-गृह्यमाणविशेषसामान्ययोः हि सिंहदेवदत्तयोः वा अग्निमाणवकयोः गौणः प्रत्ययः शब्दप्रयोगः वा स्यात्**—ज्यांच्यामधील विशेष व सामान्य यांचें अगदीं पृथक् ग्रहण केलें जातें अशाच सिंह व देवदत्त किंवा अग्नि व ब्रह्मचारी बटु यांच्या विषयीं गौण प्रत्यय किंवा शब्दप्रयोग होऊं शकतो—**अगृह्यमाणसामान्यविशेषयोः न**—ज्यांच्यांतील सामान्य व विशेष यांचें ग्रहण केलें जात नाहीं, त्यांचें ज्ञान होत नाहीं, त्यांचा गौण प्रत्यय येत नाहीं किंवा त्यांच्याविषयीं गौण शब्दप्रयोगहि संभवत नाहीं. ( सिंह पशु आहे व देवदत्त मनुष्य आहे, हा विशेष व क्रूरता हा त्या दोघांतील सामान्य धर्म यांचें ज्ञान असल्यामुळेंच देवदत्त सिंह आहे, असें म्हणतां येतें, त्यावांचून तसा प्रत्ययहि येणार नाहीं व तसा शब्दप्रयोगहि होणार नाहीं.- )—' **श्रुतिप्रामाण्यात्** ' **इति यत् उक्तं**—आतां अदृष्टविषयश्रुतीला प्रामाण्य असल्यामुळें कर्ता-आत्मा देहादिकांहून भिन्न आहे, असा निश्चय होतो, त्यामुळें त्याचा देहादिकांवरील अभिमान गौण आहे, मिथ्या नव्हे, असें जें वर म्हटलें आहे—**( तत् ) न**—तें बरोबर नाहीं.—**तत्प्रामाण्यस्य अदृष्टविषयत्वात्**—कारण श्रुतीच्या प्रामाण्याचा विषय अदृष्ट-अज्ञात असतो. [ दुसऱ्या कोणत्याहि म्ह० प्रत्यक्ष व अनुमान यांतील एकाहि प्रमाणानें ज्ञात न होणारा जो विषय त्याविषयीं श्रुतीला मुख्य प्रामाण्य आहे. पण आत्मा देहादिकांहून भिन्न आहे, हें लौकिक प्रमाणानें सिद्ध आहे. त्यामुळें श्रुतीच्या आधारानें देहाभिमान गौण ठरवूं पाहणें अयोग्य आहे. हीच गोष्ट आचार्य विशद करितात-]—**प्रत्यक्षादिप्रमाणानुपलब्धे हि विषये अग्निहोत्रादिसाध्यसाधनसंबन्धे श्रुतेः प्रामाण्यं**—प्रत्यक्षादि इतर प्रमाणांनीं उपलब्ध न होणाऱ्या विषयामध्येंच म्ह० अग्निहोत्रादि साध्य साधनसंबंधाविषयीं श्रुतीला प्रामाण्य आहे.—**न प्रत्यक्षादिविषये**—प्रत्यक्षादि प्रमाणांनीं ज्ञात होणाऱ्या विषयाविषयीं श्रुतीला प्रामाण्य नाहीं.—**प्रामाण्यस्य अदृष्टदर्शनार्थत्वात्**—कारण प्रामाण्याला अदृष्टदर्शनार्थत्व आहे. अदृष्ट-अज्ञात असलेला विषय ज्ञात करून देणें, हे प्रमाणाचें काम आहे. [ स्वर्ग साध्य आहे व अग्निहोत्रादि त्याचें साधन आहे, इत्यादि साध्यसाधनसंबंध प्रत्यक्षादि प्रमाणांनीं ज्ञात होण्यासारखा नाहीं. म्हणून त्या अर्थीं श्रुति प्रमाण आहे. पण ' माझा देह ' इत्यादि अनुभवावरूनच आत्मा देहाहून भिन्न आहे, हें सिद्ध होत असल्यामुळें त्याविषयीं श्रुतीला प्रामाण्य नाहीं, ती त्याविषयीं उदासीनच आहे, इतकें सिद्ध झालें असतां त्याचा फलितार्थ सांगतात-]—**तस्मात् दृष्टमिथ्याज्ञाननिमित्तस्य अहंप्रत्ययस्य देहादिसंघाते गौणत्वं कल्पयितुं न शक्यं**—यास्तव मिथ्याज्ञान हें ज्याचें प्रत्यक्ष निमित्त आहे अशा देहादिसंघातावरील अहंप्रत्ययाचें श्रुतीच्या आधारानें गौणत्व कल्पिणें शक्य नाहीं. ( देहच मी हा प्रत्यय मिथ्याज्ञाना-

मुळें येतो, हें जर प्रत्यक्षसिद्ध आहे तर श्रुतीवरून त्याला गौण मानणें अयोग्य आहे. शास्त्रविधीचा विषय अगदीं निराळा असल्यामुळें आत्मा देहाहून भिन्न आहे, असें सांगणें, हा तिचा विषय नव्हे, असें सांगितलें. पण आतां तो तिचा विषय आहे, असें जरी मानलें तरी प्रत्यक्षाशीं विरोध येत असल्यामुळें त्याचें समर्थन करितां येत नाहीं, असें सांगतात-)—**अग्निः शीतः अप्रकाशः वा इति ब्रुवत् श्रुतिशतं अपि प्रामाण्यं न हि उपैति**—अग्नि थंड किंवा प्रकाशरहित आहे, असें सांगणाऱ्या शंभर श्रुतींनाहि प्रामाण्य प्राप्त होत नाहीं, त्यांना प्रमाण मानतां येत नाहीं. ( अहोपण, श्रुति अपौरुषेय व त्यामुळेंच सर्वदोषरहित आहे. यास्तव अन्य प्रमाणांशीं विरोध जरी आला तरी तिचें प्रामाण्य नाकबूल करितां येत नाहीं, असें कोणी म्हणेल म्हणून आचार्य सांगतात-)—**यदि ब्रूयात् शीतः अग्निः अप्रकाशः वा इति तथापि श्रुतेः विवक्षितं अर्थान्तरं कल्प्यं**—आणि जर ती अग्नि शीत किंवा अप्रकाश आहे, असें सांगेल तर त्या श्रुतीचा विवक्षित अर्थ दुसराच कल्पिला पाहिजे.-तिच्या अविरुद्ध अशा दुसऱ्याच अर्थाची कल्पना केली पाहिजे.—**तु प्रमाणान्तरविरुद्धं स्ववचनविरुद्धं वा न**—पण दुसऱ्या प्रमाणाच्या विरुद्ध किंवा आपल्याच-तिच्याच दुसऱ्या वचनाच्या विरुद्ध अशा अर्थाची कल्पना करणें, केव्हांहि युक्त नव्हे.

**कर्मणो मिथ्याप्रत्ययवत्कर्तृकत्वात्कर्तुरभावे श्रुतेरप्रामाण्यमिति चेत् । न, ब्रह्मविद्यायामर्थवत्त्वोपपत्तेः । कर्मविधिश्रुतिवद्ब्रह्मविद्याविधिश्रुतेरप्रामाण्यप्रसङ्ग इति चेत् । न, बाधकप्रत्ययानुपपत्तेः । यथा ब्रह्मविद्याविधिश्रुत्याऽऽत्मन्यवगते देहादिसंघातेऽहंप्रत्ययो बाध्यते तथाऽऽत्मन्येवाऽऽत्मावगतिर्न कदाचित्केनचित्कथंचिदपि बाधितुं शक्या फलाव्यतिरेकावगतेर्यथाऽग्निरुष्णः प्रकाशश्चेति । न च कर्मविधिश्रुतेरप्रामाण्यं, पूर्वपूर्वप्रवृत्तिनिरोधेनोत्तरोत्तरापूर्वप्रवृत्तिजननस्य प्रत्यगात्माभिमुख्यप्रवृत्त्युत्पादनार्थत्वात् । मिथ्यात्वेऽप्युपायस्योपेयसत्यतया सत्यत्वमेव स्याद्यथाऽर्थवादानां विधिशेषाणाम् । लोकेऽपि बालोन्मत्तादीनां पयआदौ पाययितव्ये चूडावर्धनादिवचनम् । प्रकारान्तरस्थानां च साक्षादेव प्रामाण्यसिद्धिः प्रागात्मज्ञानाद्देहाभिमाननिमित्तप्रत्यक्षादिप्रामाण्यवत् ॥**

**भाष्यार्थ**—( यावर आक्षेप-)—**कर्मणः मिथ्याप्रत्ययवत्कर्तृकत्वात् कर्तुः अभावे श्रुतेः अप्रामाण्यं इति चेत्**—कर्माला मिथ्याप्रत्ययवत्कर्तृकत्व आहे. म्ह० कर्माचा कर्ता ' मी देह ' या मिथ्याप्रत्ययानें युक्तच असतो.-तशा मिथ्याप्रत्ययवान् कर्त्याकडूनच कर्म होते, असें तुमचें म्हणणें आहे. पण आत्मज्ञान होऊन त्या मिथ्याप्रत्ययाचा अभाव झाला असतां कर्त्याचाहि अभाव होतो, कर्त्याच्या अभावीं अनुष्ठानाचा असंभव होतो. त्यामुळें कर्मकांडश्रुतीला अप्रामाण्य येते. पण कर्मकांड अप्रमाण ठरल्यास अध्ययनविधीशीं विरोध येतो, म्हणून म्हणाल तर—**न । ब्रह्मविद्यायां अर्थवत्त्वोपपत्तेः**—तें बरोबर नाहीं. कारण कर्मकांडश्रुतीला ज्ञान होईपर्यंत तात्त्विक प्रामाण्य जरी नसलें तरी व्यावहारिक प्रामाण्य संभवतें आणि ब्रह्मकांडश्रुतीला ती ब्रह्मविद्येला उत्पन्न करणारी असल्यामुळें तात्त्विक प्रामाण्य उपपन्न होतें. त्यामुळें अध्य-

यनविधीशीं विरोध येत नाहीं. ( पण कर्मकांडश्रुतीला जर तात्त्विक प्रामाण्य नाहीं तर तें ब्रह्म-ज्ञानकांडश्रुतीला तरी कोठून असणार ? अशी शंका घेऊन तिचें समाधान करितात-)—**कर्मविधिश्रुतिवत् ब्रह्मविद्याविधिश्रुतेः अप्रामाण्यप्रसंगः इति चेत्** —पण मग कर्मकांडश्रुतीप्रमाणें ब्रह्मविद्येचे विधान करणाऱ्या श्रुतीच्याहि अप्रामाण्याचा प्रसंग येईल, म्हणून म्हणाल तर—**न । बाधकप्रत्ययानुपपत्तेः**—तें बरोबर नाहीं. कारण उत्पन्न झालेल्या ब्रह्मविद्येचा बाधकप्रत्यय संभवत नाहीं-तिचा बाध करील असा प्रबल प्रतिबंध उपपन्न होत नाहीं. ( हेंच दृष्टान्ताने विशद करितात-)—**यथा ब्रह्मविद्याविधिश्रुत्या आत्मनि अवगते देहादिसंघाते अहंप्रत्ययः बाध्यते** —ज्याप्रमाणें ब्रह्मविद्याविधिश्रुतीनें-तिच्यायोगाने आत्म्याचा साक्षात् अनुभव आला असतां देहादिसंघातावरील ' मी ' हा प्रत्यय बाधित होतो—**तथा आत्मनि एव आत्मावगतिः कदाचित् केनचित् कथंचित् अपि न बाधितुं शक्या**— त्याप्रमाणें म्ह० देहादिसंघातावरील आत्मप्रतीतीप्रमाणें आत्म्यामध्यें ' हा मी आत्मा ' अशी झालेली निश्चित प्रतीति-असा आत्मबोध केव्हांहि कोणाकडूनहि कोणत्याहि प्रकारें बाधित होणें शक्य नाहीं.—**फलाव्यतिरेकागवतेः**—कारण ती आत्मावगति-आत्मज्ञान लौकिकज्ञानाप्रमाणें फलाहून अव्यतिरिक्त असतें. अज्ञाननिवृत्ति हें येथील फल आहे. त्याहून तें ज्ञान निराळें नसतें, ते ज्ञान सफल असतें.—**यथा अग्निः उष्णः प्रकाशः च**—जसा अग्नि उष्ण आहे व प्रकाश आहे, हें ज्ञान फलरूपच-सफलच असतें त्याचप्रमाणें;—**न च कर्मविधिश्रुतेः अप्रामाण्यं**—कर्मविधिश्रुतीला अप्रामाण्यहि नाहीं.—**पूर्वपूर्वप्रवृत्तिनिरोधेन उत्तरोत्तर-अपूर्वप्रवृत्तिजननस्य प्रत्यगात्माभिमुख्यप्रवृत्त्युत्पादनार्थत्वात्**—कर्मकांडश्रुति अनादिकालापासून प्रवृत्त झालेल्या पूर्व पूर्व स्वाभाविक प्रवृत्तीला प्रतिबंध करून उत्तरोत्तर यागादि अलौकिक प्रवृत्ति उत्पन्न करिते व चित्तशुद्धीच्याद्वारा प्रत्यगात्मोन्मुख प्रवृत्ति उत्पन्न करिते. अर्थात् पूर्वपूर्व स्वाभाविक प्रवृत्तीचा निरोध करून उत्तरोत्तर अधिक योग्यतेची शास्त्रीय प्रवृत्ति करून चित्तशुद्धीच्या द्वारा प्रत्यगात्म्याविषयींची जिज्ञासा उत्पन्न करण्यासाठीं कर्मकांडश्रुति असल्यामुळें तिला परंपरेनें आत्मज्ञानार्थत्व आहे. त्यामुळें साक्षात् जरी नसलें तरी तिला परंपरेनें तात्त्विक प्रामाण्य आहे. ( अहोपण, श्रुतीला मिथ्यात्व असल्यामुळें धूमाभासाप्रमाणें तिला अप्रामाण्य आहे, म्हणून म्हणाल तर सांगतों-)—**उपायस्य मिथ्यात्वे अपि उपेयसत्यतया सत्यत्वं एव स्यात्**—उपायाला मिथ्यात्व जरी असलें तरी उपेयाच्या सत्यत्वामुळें त्याला सत्यत्व आहे. ( स्वरूपानें असत्यत्व असलें तरी सत्य उपेयाच्या द्वारा उपायाला प्रामाण्य असतें, याविषयीं दृष्टान्त-)—**यथा विधिशेषाणां अर्थवादानां**—जसें-विधीचे शेष जे अर्थवाद त्यांना स्वतंत्र प्रामाण्य जरी नसलें तरी विधीचे शेष या रूपानें प्रामाण्य आहे.—**लोके अपि बालोन्मत्तादीनां पयआदौ पाययितव्ये चूडावर्धनादिवचनं**—व्यवहारांतहि लहान मुलें, उन्मत्त-वेडे इत्यादिकांना दूध वगैरे पाजावयाचें असतां ' हें दूध पी म्ह० तुझी शेंडी लांब

होईल ' इत्यादि वचन योजलें जातें. ( अहोपण, कर्मकांडश्रुतींना अशा रीतीनें परंपरेनें प्रामाण्य जरी असलें तरी त्यांच्या साक्षात्प्रामाण्याची उपेक्षाच होते! अ ी आ का घेऊन म्हणतात–)—**प्रकारान्तरस्थानां च साक्षात् एव प्रामाण्यसिद्धिः**—आत्मज्ञानाचा उदय होण्यापूर्वीची जी अवस्था त्या अवस्थेत स्थित असलेल्या ज्या कर्मकांडश्रुति त्यांना अज्ञातसंबंधबोधकत्वानें साक्षात्च प्रामाण्य इष्ट आहे. ( ज्ञानापूर्वी कर्मश्रुतींना व्यावहारिक प्रामाण्य असतें याविषयीं दृष्टान्त–)—**प्राग् आत्मज्ञानात् देहाभिमाननिमित्तप्रत्यक्षादि प्रामाण्यवत्**—आत्मज्ञान होण्यापूर्वी देहाभिमानाच्या निमित्तानें प्रत्यक्षादिकांना जसें प्रामाण्य असतें त्याप्रमाणेंच त्यापूर्वी कर्मश्रुतींना प्रामाण्य असतें.

**यत्तु मन्यसे स्वयमव्याप्रियमाणोऽप्यात्मा संनिधिमात्रेण करोति तदेव च मुख्यं कर्तृत्वमात्मनः । यथा राजा युध्यमानेषु योधेषु यध्यत इति प्रसिद्धं स्वयमयुध्यमानोऽपि संनिधानादेव जितः पराजितश्चेति च तथा सेनापतिर्वाचैव करोति क्रियाफलसंबन्धश्च राज्ञः सेनापतेश्च दृष्टः, यथा च ऋत्विक्कर्म यजमानस्य, तथा देहादीनां कर्माऽऽत्मकृतं स्यात्तत्फलस्याऽऽत्मगामित्वात् । यथा च भ्रामकस्य लोहभ्रामयितृत्वादव्यापृतस्यैव मुख्यमेव कर्तृत्वं तथा चाऽऽत्मन इति ॥**

**भाष्यार्थ**—( याप्रमाणें प्रतीतिमात्र कर्तृत्वाला मिथ्यात्व जरी असलें तरी श्रुतिप्रामाण्याला बाध येत नाहीं, हे सांगितलें. आतां दुसऱ्याच प्रकारें कर्तृत्व खरें आहे, अशी शंका उत्थापित करितात–)—**तु स्वयं अव्याप्रियमाणः अपि आत्मा संनिधिमात्रेण करोति तत् एव च आत्मनः मुख्यं कर्तृत्वं इति यत् मन्यसे**—आतां स्वतः कांहीं व्यापार–हालचाल न करणारा असा जरी आत्मा असला तरी केवळ सांनिध्यानें तो करितो व तेच आत्म्याचे मुख्य कर्तृत्व आहे, असे जे तूं समजतोस, (स्वतः व्यापार न करिताच नुस्त्या सांनिध्याने मुख्य कर्तृत्व कसें, याविषयीं दृष्टान्त– )—**यथा राजा स्वयं अयुध्यमानः अपि युध्यमानेषु योधेषु संनिधानात् एव युध्यते इति प्रसिद्धं**—ज्याप्रमाणें राजा स्वतः युद्ध करीत नसला तरी योद्धे युद्ध करीत असतांना केवल संनिध राहिल्यानेंच युद्ध करितो, असें म्हणतात, हें प्रसिद्ध आहे,—**जितः पराजितः च इति**—त्याचप्रमाणें योद्धयाचा जय-पराभव झाला असता राजाच जित–पराजित झाला असें म्हणतात—**तथा सेनापतिः वाचा एव करोति**—तसाच सेनापति स्वतः शरीरानें जरी युद्ध करीत नसला तरी वाणीनेंच योद्धयाना आज्ञा करितो—**च क्रियाफलसंबंधः राज्ञः च सेनापतेः दृष्टः**—आणि क्रियेच्या फलाचा संबंध राजा व सेनापति यांच्याशी झालेला दिसतो ( नुस्त्या सांनिध्यानेंहि मुख्य कर्तृत्व येतें याविषयीं वैदिक दृष्टान्त–)—**यथा च ऋत्विक्कर्म यजमानस्य**—किंवा, ज्याप्रमाणें ऋत्विजांचें कर्म हें यजमानाचें कर्म होतें,—**तथा देहादीनां कर्म आत्मकृतं स्यात्**—त्याप्रमाणें देहादिकांचें कर्म आत्मकृत–आत्म्याचें होतें,—**तत्फलस्य आ-**

**त्मगामित्वात्**—कारण त्याचें फल आत्मगामी-आत्म्याला प्राप्त होणारें असतें. ( स्वतः व्यापार न करितां केवल सांनिध्यानें दुसऱ्याच्या व्यापाराचें निमित्त झाल्यानेंहि मुख्य कर्तृत्व कसें प्राप्त होतें, त्याविषयीं दृष्टान्त-)—**यथा च भ्रामकस्य अव्यापृतस्य एव लोहभ्रामयितृत्वात् मुख्यं एव कर्तृत्वं**—आणि ज्याप्रमाणें भ्रामक-भ्रमण करविणारा लोहचुंबक स्वतः व्यापारशून्यच जरी असला तरी लोखंडाला भ्रमण करावयास लावीत असल्यामुळें त्याला मुख्यच कर्तृत्व असतें—**तथा च आत्मनः**—तसेंच आत्म्याचें कर्तृत्व मुख्य आहे,—**इति**—असें जें तूं म्हणतोस तें बरोबर नाहीं, असा पुढें संबंध.

तदसत्, अकुर्वतः कारकत्वप्रसङ्गात् । कारकमनेकप्रकारमिति चेत् । न, राजप्रभृतीनां मुख्यस्यापि कर्तृत्वस्य दर्शनात् । राजा तावत्स्वव्यापारेणापि युध्यते योधानां योधयितृत्वेन धनदानेन च मुख्यमेव कर्तृत्वं तथा जयपराजयफलोपभोगे । तथा यजमानस्यापि प्रधानत्यागेन दक्षिणादानेन च मुख्यमेव कर्तृत्वम् । तस्मादव्यापृतस्य कर्तृत्वोपचारो यः स गौण इत्यवगम्यते । यदि मुख्यं कर्तृत्वं स्वव्यापारलक्षणं नोपलभ्यते राजयजमानप्रभृतीनां तदा संनिधिमात्रेणापि कर्तृत्वं मुख्यं परिकल्प्येत यथा भ्रामकस्य लोहभ्रामणेन न तथा राजयजमानादीनां स्वव्यापारो नोपलभ्यते । तस्मात्संनिधिमात्रेणापि कर्तृत्वं गौणमेव । तथा च सति तत्फलसंबन्धोऽपि गौण एव स्यात् । न गौणेन मुख्यं कार्यं निर्वर्त्यते ॥

**भाष्यार्थ—तत् असत्**—क्रिया करणारें जें कारण तेंच कारक, या सिद्धान्ताशीं विरोध येत असल्यामुळें हें म्हणणें बरोबर नाहीं.—**अकुर्वतः कारकत्वप्रसंगात्**—कारण तसें मानल्यास क्रिया न करणाराला कारकत्व आहे, असें म्हणण्याचा प्रसंग येतो.—**कारकं अनेकप्रकारं इति चेत्**—पण कारक अनेक प्रकारचें असतें म्हणून म्हणाल तर—**न राजप्रभृतीनां मुख्यस्य अपि कर्तृत्वस्य दर्शनात्**—तें बरोबर नाहीं. कारण राजा, सेनापति इत्यादिकांचें मुख्य कर्तृत्वहि दिसतें. ( अर्थात् स्वव्यापारावांचून कोणीहि कारक होऊं शकत नाहीं. राजादिकांचें मुख्य कर्तृत्व कसें दिसतें तें सांगतात-)—**राजा तावत् स्वव्यापारेण अपि युध्यते**—राजा तर स्वतःच्या व्यापारानेंहि युद्ध करितो—**च योधानां योधयितृत्वेन च धनदानेन मुख्यं एव कर्तृत्वं**—व योद्ध्यांकडून युद्ध करवून व धन देऊनहि युद्ध करितो त्यामुळें त्याला मुख्यच कर्तृत्व आहे—**तथा जय-पराजयफलोपभोगे**—त्याचप्रमाणें जय, पराजय इत्यादि फलोपभोगामध्येंहि त्याला मुख्य कर्तृत्वच आहे. ( आतां ऋत्विक्कर्म यजमानाचें होतें, असें जें म्हटलें आहे त्याविषयीं सांगतात-)—**तथा यजमानस्य अपि प्रधानत्यागेन दक्षिणादानेन च मुख्यं एव कर्तृत्वं**—त्याचप्रमाणें यजमानाचेंहि प्रधानत्यागानें-मुख्य आहुति दिल्यानें व दक्षिणादानानें मुख्यच कर्तृत्व आहे. ( याचप्रमाणें स्वव्यापारामुळेंच मुख्य कर्तृत्व सिद्ध होत असल्यामुळें फलित सांगतात-)—**तस्मात् अव्यापृ-**

**तस्य यः कर्तृत्वोपचारः सः गौणः इति अवगम्यते**—वास्तव कांहीं व्यापार करीत नसलेल्यालाहि जो कर्तृत्वोपचार होतो [ म्ह० व्यापार-हालचाल-कर्म न करणारा-लाहि कर्ता असें जें म्हटलें जातें ] तो कर्तृत्वोपचार गौण होय, असें सिद्ध होतें.—**यदि राज-यजमानप्रभृतीनां स्वव्यापारलक्षणं मुख्यं कर्तृत्वं न उपलभ्यते**—जर राजा, यजमान इत्यादिकांचें स्वव्यापाररूप-स्वतः कर्म करणें, या स्वरूपाचें मुख्य कर्तृत्व उपलब्ध झालें नसतें, ते स्वतः कर्म करितात, असें जर मुळीं कधीं दिसलेंच नसतें—**तदा सांनिधिमात्रेण अपि मुख्यं कर्तृत्वं परिकल्प्येत**—तर नुसत्या सांनिध्यानें-समीप असणें एवढ्या कारणानेंहि त्यांचें मुख्य कर्तृत्व कल्पितां आलें असतें.—**यथा भ्रामकस्य लोहभ्रामणेन**—जसें लोकचुंबकाचें केवल सांनिध्यानें लोखंडाला भ्रमण करावयास लावणें, या कारणानें मुख्य कर्तृत्व मानलें जातें; पण—**तथा राज-यजमानादीनां स्वव्यापारः न उपलभ्यते इति न**—तसा राजा, यजमानु इत्यादिकांचा स्वव्यापार उपलब्ध होत नाहीं असें नाहीं.—**तस्मात् सांनिधिमात्रेण अपि कर्तृत्वं गौणं एव**—म्हणून नुसत्या सांनिध्यानेंहि जें त्याचें कर्तृत्व तें गौणच आहे.—**तथा च सति तत्फलसंबन्धः अपि गौण एव स्यात्**—आणि कर्तृत्व गौण आहे, असें सिद्ध झालें असतां त्याच्या फलाचा संबंधहि गौणच ठरतो. ( राजाचें कर्तृत्व गौण म्हटल्यास त्याचें जय पराजयादि फलहि गौण आहे, असेंच म्हणावें लागेल ! पण मग-)—**गौणेन मुख्यं कार्यं न निर्वर्त्यते**—गौण कर्त्याकडून मुख्य कार्य केलें जात नाहीं.

**तस्मादसदेवैतद्गीयते देहादीनां व्यापारेणाव्यापृत आत्मा कर्ता भोक्ता च स्यादिति । भ्रान्तिनिमित्तं तु सर्वमुपपद्यते । यथा स्वप्ने मायायां चैवम् । न च देहाद्यात्मप्रत्ययभ्रान्तिसंतानविच्छेदेषु सुषुप्तसमाध्यादिषु कर्तृत्वभोक्तृत्वाद्यनर्थ उपलभ्यते । तस्माद्भ्रान्तिप्रत्ययनिमित्त एवायं संसारभ्रमो न तु परमार्थ इति सम्यग्दर्शनादत्यन्तमेवोपरम इति सिद्धम् ॥ ६६ ॥**

**भाष्यार्थ**—( एकाच्या व्यापारानें दुसऱ्याला मुख्य कर्तृत्व नाहीं, असें सिद्ध झालें असतां आतां निष्पन्न झालेल्या अर्थाचा उपसंहार करितात-)—**तस्मात् देहादीनां व्यापारेण अव्यापृतः आत्मा कर्ता भोक्ता च स्यात् इति एतत् असत् एव गीयते**—म्हणून देहादिकांच्या व्यापारानें स्वतः कांहीं व्यापार न करणारा आत्मा कर्ता व भोक्ता होईल, असें हे मिथ्याच सांगितलें जातें. [ तें म्हणणें प्रमाणसिद्ध नव्हे. तर मग तुम्ही आत्म्याच्या कर्तृत्वादिकांचा स्वीकार कसा केला आहे ? ‘ कर्ता शास्त्रार्थवत्त्वात् ’ अ. २ पा. ३ सूत्र ३३ म्ह० शास्त्राला सार्थक्य येण्यासाठीं आत्माच कर्ता आहे, बुद्धि नाहीं. या न्यायानें तुमच्या मतींहि आत्माच कर्ता ठरतो, म्हणून कोणी म्हणेल तर आचार्य सांगतात-]—**भ्रान्तिनिमित्तं तु सर्वं उपपद्यते**—पण भ्रान्ति या निमित्तानें आत्म्याचें कर्तृत्वादि सर्व संभवतें.—**यथा स्वप्ने मायायां च एवं**—जसें स्वप्नांत किंवा मायावस्थेंत सर्व संभवतें त्याप्रमाणें. ( आत्म्यांतील कर्तृत्वादिक सर्व

मिथ्याज्ञानकृतं आहे, याविषयीं व्यतिरेक दाखवितात-)—**देहादि आत्मप्रत्यय-भ्रान्तिसंतानविच्छेदेषु सुषुप्तिसमाध्यादिषु कर्तृत्व भोक्तृत्वादि अनर्थः न च उपलभ्यते**—देहादिकच आत्मा असा प्रत्यय-असा अभिमान याच भ्रांतीच्या परंपरेचा ज्यांत विच्छेद होतो त्या समाधि सुषुप्ति-मूर्छा इत्यादि अवस्थांमध्ये कर्तृत्व-भोक्तृत्व इत्यादि अनर्थ उपलब्ध होत नाहीं.—**तस्मात् अयं संसारभ्रमः भ्रांतिप्रत्ययनिमित्तः एव**—तस्मात् हा संसारभ्रम भ्रांतिप्रत्यय-भ्रामक देहाभिमान या निमित्तानेंच होतो.—**तु परमार्थः न**—तो परमार्थ नव्हे-संसार सत्य-वास्तविक नव्हे. ( याप्रमाणें संसारभ्रम अविद्याकृत आहे, हें सिद्ध झालें असतां आतां ज्यासाठीं या मीमांसेला आरंभ केला होता त्याचा उपसंहार करितात-)—**इति सम्यग्दर्शनात् अत्यन्तं एव उपरमः इति सिद्धं**—त्यामुळें तत्त्वज्ञानानें त्याचा अत्यंतच उपरम-बाध होतो ही गोष्ट सिद्ध झाली. ६६.

**इदं ते नातपस्काय नाभक्ताय कदाचन ।**
**न चाशुश्रूषवे वाच्यं न च मां योऽभ्यसूयति ॥ ६७**

**अन्वयार्थ—इदं**—हे ज्ञान—**ते**—तूं—**अतपस्काय**—तपश्चर्या न करणाराला —**न वाच्यं**—सांगूं नयेस—**अभक्ताय**—तसेच जो माझा भक्त नसेल त्याला—**कदाचन**—केव्हांहि—**न(वाच्यं)**—सांगूं नयेस आणि—**अशुश्रूषवे**—जो गुरु,ईश्वर यांची शुश्रूषा करणारा नसेल, त्याला सांगूं नयेस—**च**—आणि—**यः**—जो—**मां**—माझी—**अभ्यसूयति**—असूया करतो, त्याला—**न च (वाच्यं)**—सांगूं नयेस. ६७

**सर्वं गीताशास्त्रार्थमुपसंहृत्यास्मिन्नध्याये विशेषतश्चान्त इह शास्त्रार्थदार्ढ्याय संक्षेपत उपसंहारं कृत्वाऽथेदानीं शास्त्रसंप्रदायविधिमाह—इदं शास्त्रं ते तव हिताय मयोक्तं संसारविच्छित्तयेऽतपस्काय तपोरहिताय न वाच्यमिति व्यवहितेन संबध्यते । तपस्विनेऽप्यभक्ताय गुरुदेवभक्तिरहिताय कदाचन कस्यांचिदप्यवस्थायां न वाच्यम् । भक्तस्तपस्व्यपि सन्नशुश्रूषुर्यो भवति तस्मा अपि न वाच्यम् । न च यो मां वासुदेवं प्राकृतं मनुष्यं मत्वाऽभ्यसूयत्यात्मप्रशंसादिदोषाध्यारोपणेन ममेश्वरत्वमजानन्न सहतेऽसावप्ययोग्यस्तस्मा अपि न वाच्यम् ॥**

**भाष्यार्थ**—( याप्रमाणें शास्त्राचा तात्पर्यार्थ विचारद्वारा निश्चित करून आचार्य पुढील श्लोकाला अवतरण देतात-)—**अस्मिन् अध्याये सर्वं गीताशास्त्रार्थं उपसंहृत्य विशेषतः अन्ते च इह शास्त्रार्थदार्ढ्याय संक्षेपतः उपसंहारं कृत्वा**—या अठराव्या अध्यायांत सर्व गीताशास्त्रार्थाचा उपसंहार करून आणि विशेषतः शेवटीं ' सर्वधर्मान् परित्यज्य० ' या श्लोकांत शास्त्रार्थाला दृढत्व आणण्यासाठीं संक्षेपानें उपसंहार करून—**अथ इदानीं शास्त्रसंप्रदायविधिं आह**—आतां यापुढें या शास्त्राचा संप्रदायविधि सांगतात.—**इदं शास्त्रं ते-तव हिताय-संसार-**

**विच्छित्तये मया उक्तं**—हें शास्त्र तुझ्या हितासाठीं-संसाराचा विच्छेद होण्यासाठीं मीं सांगितलें. ते तूं—**अतपस्काय-तपोरहिताय न वाच्यं इति व्यवहितेन संबध्यते**—अतपस्क म्ह० तपोरहित असलल्या कोणालाहि सांगूं नयेस असा 'अतपस्काय' याचा पुढील-दूरच्या 'वाच्यं' या शब्दाशीं संबंध लागतो.—**तपस्विने अपि अभक्ताय-गुरुदेवभक्तिरहिताय कदाचन-कस्यांचित् अपि अवस्थायां न वाच्यं**—तपस्वी असलेल्याहि अभक्ताला म्ह० गुरु-देवभक्ति यांनीं रहित असलेल्याला केव्हांहि-कोणत्याहि अवस्थेंत सांगूं नये.—**भक्तः तपस्वी अपि सन् यः अशुश्रूषुः भवति तस्मै अपि न वाच्यं**—भक्त व तपस्वीहि असून जो गुरुशुश्रूषा न करणारा असतो त्यालाहि सांगूं नये.—**च मां वासुदेवं प्राकृतं मनुष्यं मत्वा यः अभ्यसूयति**—व मज वासुदेवाला प्राकृत मनुष्य समजून जो माझी अत्यन्त असूया करितो म्ह०—**आत्मप्रशंसादिदोषाध्यारोपणेन मम ईश्वरत्वं अजानन् न सहते**—मी आत्मप्रशंसा वगैरे करितों अशा दोषांचा मजवर आरोप करून माझें ईश्वरत्व न जाणणारा माझ्या ईश्वरत्वाला सहन करीत नाहीं—**असौ अपि अयोग्यः तस्मै अपि न वाच्यं**—तोहि अयोग्य आहे. त्यालाहि हें शास्त्र सांगूं नये.

भगवति भक्ताय तपस्विने शुश्रूषवेऽनसूयवे च वाच्यं शास्त्रमिति सामर्थ्याद्गम्यते तत्र मेधाविने तपस्विने वेत्यनयोर्विकल्पदर्शनात् । शुश्रूषाभक्तियुक्ताय तपस्विने तद्युक्ताय मेधाविने वा वाच्यम् । शुश्रूषाभक्तिवियुक्ताय न तपस्विने नापि मेधाविने वाच्यम् । भगवत्यसूयायुक्ताय समस्तगुणवतेऽपि न वाच्यम् । गुरुशुश्रूषाभक्तिमते च वाच्यमित्येष शास्त्रसंप्रदायविधिः ॥ ६७ ॥

**भाष्यार्थ—भगवति भक्ताय तपस्विने शुश्रूषवे अनसूयवे च शास्त्रं वाच्यं इति सामर्थ्यात् गम्यते**—( अर्थात्-) भगवानांच्या ठिकाणीं परम भक्ति-निःसीम प्रेम ठेवणारा, तपस्वी, शुश्रूषु व असूया न करणारा अशा अधिकाऱ्याला हें शास्त्र सांगावे, असें वरील 'अभक्ताला सांगूं नये, तमक्याला सांगूं नये,' अशा निषेध-सामर्थ्यावरूनच सिद्ध होतें. ( आतां या अर्थसिद्ध अर्थात दुसऱ्या स्मृतीला अनुसरून मेधावित्वाचाहि अन्तर्भाव करितात-)—**तत्र मेधाविने तपस्विने वा इति अनयोः विकल्पदर्शनात्**—त्या पूर्वोक्त विशेषणांत 'धारणाशक्तिमान् पुरुषाला किंवा तपस्व्याला' अशा या दोन विशेषणांचा विकल्प सांगितलेला असल्यामुळे—**शुश्रूषाभक्तियुक्ताय तपस्विने तद्युक्ताय मेधाविने वा वाच्यं**—शुश्रूषा व भक्ति यांनीं युक्त असलेल्या तपस्व्याला किंवा शुश्रूषाभक्तियुक्त मेधावी-धारणाशक्तिमान् साधकाला सांगावें.—**शुश्रूषाभक्तिवियुक्ताय तपस्विने न मेधाविने अपि न वाच्यं**—शुश्रूषा-भक्तिरहित तपस्व्याला हें सांगूं नये व शुश्रूषाभक्तिरहित मेधावीलाहि सांगूं नये.—**भगवति असूयायुक्ताय समस्तगुणवते अपि न वाच्यं**—भगवानाविषयीं असूयायुक्त असलेला पुरुष इतर सर्व गुणांनीं संपन्न जरी असला तरी त्याला हें शास्त्र

सांगूं नये.—**गुरुशुश्रूषा भक्तिमते च वाच्यं**—पण गुरुशुश्रूषा व भक्ति यांनीं युक्त असलेला पुरुष कदाचित् उत्तम तपस्वी व मेधावी जरी नसला तरी त्याला हें सांगावें. —**इति एषः शास्त्रसंप्रदायविधिः**—असा हा शास्त्रसंप्रदायविधि आहे. ६७.

**य इदं परमं गुह्यं मद्भक्तेष्वभिधास्यति ।**
**भक्तिं मयि परां कृत्वा मामेवैष्यत्यसंशयः ॥ ६८ ॥**

**अन्वयार्थ**—**यः**—जो—**इदं परमं गुह्यं**—हें परम गुह्य ज्ञान,—**मद्भक्तेषु**—माझ्या भक्तांच्या ठिकाणीं—**अभिधास्यति**—सांगेल तो,—**मयि**—माझ्या ठिकाणीं,—**परां भक्तिं कृत्वा**—ज्ञानरूप श्रेष्ठ भक्ति करून,—**मां एव**—मलाच,—**एष्यति**—प्राप्त होईल,—**असंशयः**—याविषयीं मुळींच संशय ठेवूं नको. ६८.

संप्रदायस्य कर्तुः फलमिदानीमाह— य इमं यथोक्तं परमं निःश्रेयसार्थं केशवार्जुनयोः संवादरूपं ग्रन्थं गुह्यं गोप्यं मद्भक्तेषु मयि भक्तिमत्स्वभिधास्यति वक्ष्यति ग्रन्थतोऽर्थतश्च स्थापयिष्यतीत्यर्थः । यथा त्वयि मया । भक्तेः पुनर्ग्रहणात्तद्भक्तिमात्रेण केवलेन शास्त्रसंप्रदाने पात्रं भवतीति गम्यते । कथमभिधास्यतीत्युच्यते भक्तिं मयि परां कृत्वा भगवतः परमगुरोः शुश्रूषा मया क्रियत इत्येवं कृत्वेत्यर्थः । तस्येदं फलं मामेवैष्यति मुच्यत एवात्र संशयो न कर्तव्यः ॥ ६८ ॥

**भाष्यार्थ**—**इदानीं संप्रदायस्य कर्तुः फलं आह**—आतां शास्त्रसंप्रदायाची प्रवृत्ति होण्यासाठीं संप्रदायकर्त्याला फल सांगतात—**यः इमं यथोक्तं परमं-निःश्रेयसार्थं केशवार्जुनयोः संवादरूपं ग्रंथं गुह्यं-गोप्यं**—जो कोणी अध्यापक या वर सांगितलेल्या प्रकारच्या परम म्ह० निःश्रेयस-मोक्ष हें ज्याचें फल आहे अशा निरतिशय पुरुषार्थाच्या साधनाला; या केशव व अर्जुन यांच्या संवादरूप गुह्य म्ह० यांत रहस्यार्थ सांगितल्यामुळें गुप्त ठेवण्यास योग्य अशा ग्रंथाला—**मद्भक्तेषु-मयि भक्तिमत्सु अभिधास्यति-वक्ष्यति**—मद्भक्तांमध्यें-माझ्यावर भक्ति-परम प्रीति ठेवणारांमध्यें सांगेल-कथन करील—**ग्रन्थतः च अर्थतः स्थापयिष्यति इत्यर्थः**—ग्रंथरूपानें व त्याच्या अर्थद्वारा प्रस्थापित करील, असा याचा भावार्थ. ( त्याला हें पुढील फल मिळेल. ग्रंथ स्थापनाविषयीं दृष्टान्त-)—**यथा त्वयि मया**—ज्याप्रमाणें तुझ्या ठिकाणीं मीं याची प्रस्थापना केली आहे त्याप्रमाणें माझ्या भक्तांच्या मनांत हा ग्रंथ अर्थाच्याद्वारा दृढ ठसवील—**भक्तेः पुनः ग्रहणात् तद्भक्तिमात्रेण केवलेन शास्त्रसंप्रदाने पात्रं भवति इति गम्यते**—'मद्भक्तेषु' असें म्हणून शब्दाचें पुनः ग्रहण केल्यामुळें केवल भगवद्भक्ति याच एका गुणानें या शास्त्राचें दान करण्याविषयीं-शास्त्रदानाचें पात्र होतें, असें सिद्ध होतें.—**कथं अभिधास्यति इति उच्यते**—कसें अभिधान-कथन करील तें सांगितलें जातें—**मयि परां भक्तिं कृत्वा**—माझ्या ठिकाणीं परम भक्ति करून—**मया परमगुरोः भगवतः शुश्रूषा क्रियते**

इति-एवं कृत्वा इत्यर्थः—मजकडून ही परमगुरु जो भगवान् त्याची शुश्रूषाच केली जात आहे, अशी भावना करून असा याचा भावार्थ, अशा परम भक्तीनें माझ्या भक्तांना हें शास्त्र जो शिकवितो—तस्य इदं फलं—त्याला हें फल प्राप्त होतें.—मां एव एष्यति-मुच्यते एव—मलाच प्राप्त होतो, मुक्तच होतो.—अत्र संशयः न कर्तव्यः—याविषयीं संशय मुळींच करूं नये. ६८

न च तस्मान्मनुष्येषु कश्चिन्मे प्रियकृत्तमः ।
भविता न च मे तस्मादन्यः प्रियतरो भुवि ॥ ६९

**अन्वयार्थ**—मनुष्येषु—मनुष्यांमध्यें—कश्चित्—कोणी—मे—मला—तस्मात्—त्या शास्त्रसंप्रदाय चालविणाऱ्या मनुष्याहून,—प्रियकृत्तमः—अधिक प्रिय करणारा,—न (अस्ति)—नाहीं.—च—आणि—भुवि—या भूलोकीं,—तस्मात् अन्यः—त्याहून दुसरा कोणी,—मे—मला—प्रियतरः—अधिक प्रिय,—न भविता—होणाराहि नाहीं. ६९.

किंच— न च तस्माच्छास्त्रसंप्रदायकृतो मनुष्येषु मनुष्याणां मध्ये कश्चिन्मे मम प्रियकृत्तमोऽतिशयेन प्रियकृत्ततोऽन्यः प्रियकृत्तमो नास्त्येवेत्यर्थो वर्तमानेषु । न च भविता भविष्यत्यपि काले तस्माद्द्वितीयोऽन्यः प्रियतरो भुवि लोकेऽस्मिन् ॥ ६९ ॥

**भाष्यार्थ**—( अहोपण सर्व मुक्तिसाधनांमध्यें ध्यान श्रेष्ठ असल्यामुळें ध्याननिष्ठ झालेला जो मुमुक्षु त्याची विद्यासंप्रदायामध्यें प्रवृत्ति होणार नाहीं, अशी आशंका घेऊन भगवान् म्हणतात-)—किं च मनुष्येषु-मनुष्याणां मध्ये कश्चित् मे-मम तस्मात् शास्त्रसंप्रदायकृतः प्रियकृत्तमः-अतिशयेन प्रियकृत् न च—आणि त्या शास्त्रसंप्रदायकर्त्याहून मनुष्यांतील कोणीहि मला अधिक प्रिय करणारा-माझें अतिशय प्रिय करणारा नाहीं. ( म्हणून मुमुक्षूनें वर सांगितलेल्या विशेषणांनीं विशिष्ट अशा अधिकाऱ्याला विद्यासंप्रदान करावें. )—वर्तमानेषु ततः अन्यः प्रियकृत्तमः नास्ति एव इत्यर्थः—म्ह० हल्लीं-वर्तमानसमयीं विद्यमान असलेल्या मनुष्यांत त्याहून दुसरा अधिक प्रियकर कोणी नाहींच, असा भावार्थ. ( भूतकालीन मनुष्यांतील कोणी मला अधिक प्रियकर नव्हता).—न च भविता-भविष्यति अपि काले भुवि-अस्मिन् लोके तस्मात् अन्यः-द्वितीयः प्रियतरः न —तसाच पुढें होणाराहि नाहीं. भविष्यत्कालींहि, या भूलोकीं त्या विद्यासंप्रदायकर्त्याहून मला दुसरा कोणी अधिक प्रिय होणार नाहीं. [ अर्थात् ध्याननिष्ठ जरी श्रेष्ठ असला तरी आपला संप्रदाय प्रवृत्त करणारा त्याहूनहि अत्यंत श्रेष्ठ असल्यामुळें ध्याननिष्ठानेंहि विद्यासंप्रदान करणें सर्वथा उचित होय, असा भावार्थ ] ६९

अध्येष्यते च य इमं धर्म्यं संवादमावयोः ।
ज्ञानयज्ञेन तेनाहमिष्टः स्यामिति मे मतिः ॥ ७० ॥

**अन्वयार्थ—च यः**—आणि जो,—**आवयोः इमं धर्म्यं संवादं**—आह्मां दोघांच्या या धर्मरूप संवादाला,—**अध्येष्यते**—पठन करील म्हणजे त्याचें अध्ययन करील,—**तेन**—त्याच्याकडून,—**ज्ञानयज्ञेन**—ज्ञानयज्ञानें,—**अहं इष्टः**—मी पूजिलेला असा,—**स्याम्**—होईन.—**इति मे मतिः**—असा माझा निश्चय आहे. ७०.

**योऽपि—** अध्येष्यते च पठिष्यति य इमं धर्म्यं धर्मादनपेतं संवादरूपं ग्रन्थमावयोस्तेनेदं कृतं स्यात् । ज्ञानयज्ञेन विधिजपोपांशुमानसानां यज्ञानां ज्ञानयज्ञो मानसत्वाद्विशिष्टतम इत्यतस्तेन ज्ञानयज्ञेन गीताशास्त्रस्याध्ययनं स्तूयते । फलविधिरेव वा देवतादिविषयज्ञानयज्ञफलतुल्यमस्य फलं भवतीति । तेनाध्ययनेनाहमिष्टः पूजितः स्यां भवेयमिति मे मम मतिर्निश्चयः ॥ ७० ॥

**भाष्यार्थ**—( संप्रदायकर्त्याचें 'स वक्ता विष्णुरित्युक्तः' या न्यायानें श्रेष्ठत्व सांगून आतां याचें अध्ययन करणाराला विशिष्ट फल सांगतात-)—**यः अपि**—आणि कोणी भक्तिमान्—**यः इमं धर्म्यं-धर्मात् अनपेतं आवयोः संवादरूपं ग्रंथं अध्येष्यते च पठिष्यति**—जो कोणी या धर्म्य म्ह० धर्माला सोडून नसलेल्या आम्हां उभयतांच्या संवादरूप ग्रंथाला-ग्रंथाचें अध्ययन करील-त्याचा पाठ करील—**तेन इदं कृतं स्यात्**—त्यानें हें केले आहे, असे होईल. ( हें म्हणजे काय ? उत्तर-)—**ज्ञानयज्ञेन-विधि-जप-उपांशु-मानसानां यज्ञानां ज्ञानयज्ञः मानसत्वात् विशिष्टतमः**—ज्ञानयज्ञाने-विधियज्ञ,जपयज्ञ,उपांशुयज्ञ व मानस यज्ञ या चार प्रकारच्या यज्ञांतील ज्ञानयज्ञ मानसत्वामुळें-तो मानस यज्ञ असल्यामुळें अतिशय श्रेष्ठ आहे. (' श्रेयान् द्रव्यमयात् यज्ञात् ज्ञानयज्ञः' पृ. ४४९ असें सांगितलेंच आहे.)—**इति-अतः तेन ज्ञानयज्ञेन गीताशास्त्रस्य अध्ययनं स्तूयते**—त्यामुळें त्या ज्ञानयज्ञानें गीताशास्त्राचें अध्ययन स्तुति केलें जातें. ' ज्ञानयज्ञ ' असे म्हणून त्या अध्ययनाची स्तुति केली जाते.—**वा फलविधिः एव**—किंवा हा फलविधिच आहे, ( तो कसा तेंच सांगतात-)—**देवतादिविषयज्ञानयज्ञफलतुल्यं अस्य फलं भवति इति**—देवतादिविषयक ज्ञानयज्ञाचें जें फल त्याच्यासारखें-तत्तुल्य फल याचें मिळतें. ज्ञानयज्ञाचें कैवल्य हें फल आहे. गीताशास्त्राचें अध्ययन करणाराला तत्तुल्य फल मिळतें व तें देवतादिकांचें आत्मत्व हें आहे, असा भावार्थ, अहोपण नुसत्या अध्ययनाचें सर्वात्मत्व हें फल कसें मिळेल. ? कारण श्रुति ' तस्मात् तत्सर्वमभवत् ' असें सांगते. याचें उत्तर-)—**तेन अध्ययनेन अहं इष्टः-पूजितः स्यां-भवेयं इति मे-मम मतिः-निश्चयः**—त्या अध्ययनानें मी इष्ट म्ह० पूजित आहें. त्या अध्ययनानें मी पूजा केला जातों अशी माझी मति-असा माझा निश्चय आहे. ( त्या अध्ययन करणारानें ज्ञानयज्ञतुल्य अध्ययनानें भगवानांची पूजा केल्यामुळें भगवत्प्रसादानें त्याला ज्ञान होतें व तो ज्ञानानें मुक्त होतो. ) ७०

**श्रद्धावाननसूयश्च शृणुयादपि यो नरः ।**
**सो पि मुक्तः शुभाँल्लोकान्प्राप्नुयात्पुण्यकर्मणाम् ॥**

**अन्वयार्थ—यः**—जो—**श्रद्धावान्**—श्रद्धालु—**अनसूयः**—असूया न करणारा—**नरः**—मनुष्य, ( हा आमचा संवाद )—**शृणुयात् अपि**—नुसता ऐकेलहि—**सः अपि**—तोहि—**मुक्तः**—पापापासून मुक्त होऊन,—**पुण्यकर्मणां**—पुण्यवानांच्या,—**शुभान् लोकान्**—शुभलोकांना—**प्राप्नुयात्**—प्राप्त होईल. ७१.

**अथ श्रोतुरिदं फलम्— श्रद्धावाञ्श्रद्दधानोऽनसूयश्चासूयावर्जितः सन्निमं ग्रन्थं शृणुयादपि यो नरोऽपिशब्दात्किमुतार्थज्ञानवान्सोऽपि पापान्मुक्तः शुभान्प्रशस्तांल्लोकान्प्राप्नुयात्पुण्यकर्मणामग्निहोत्रादिकर्मवताम् ॥ ७१ ॥**

**भाष्यार्थ—अथ श्रोतुः इदं फलं**—आतां श्रोत्याचें हें फल सांगितलें जातें.—**श्रद्धावान्-श्रद्दधानः च अनसूयः-असूयावर्जितः सन् यः नरः इमं ग्रन्थं शृणुयात् अपि**—श्रद्धावान्-मोठा श्रद्धालु व असूयाशून्य-गुणांमध्यें दोषारोप न करणारा असा होत्साता जो नर या शास्त्राचें नुस्तें श्रवणहि करील—**अपिशब्दात् किमुत अर्थज्ञानवान्**—'शृणुयात् अपि' या अपिशब्दावरून मग ज्याला या शास्त्राचें अर्थज्ञान आहे तो पापापासून मुक्त होईल हे काय सांगावें ? असा अर्थ निष्पन्न होतो;—**सः अपि पापात् मुक्तः पुण्यकर्मणां-अग्निहोत्रादिकर्मवतां शुभान् प्रशस्तान् लोकान् प्राप्नुयात्**—तोहि पापापासून मुक्त होऊन-पुण्य कर्मे करणाऱ्या लोकांच्या-अग्निहोत्रादि कर्मवानांच्या शुभ म्ह० अत्यंत प्रशस्त-प्रशंसनीय लोकांस प्राप्त होईल. ७१

**कच्चिदेतच्छ्रुतं पार्थ त्वयैकाग्रेण चेतसा ।**

**कच्चिदज्ञानसंमोहः प्रनष्टस्ते धनंजय ॥ ७२ ॥**

**अन्वयार्थ—पार्थ**—हे अर्जुना !—**त्वया**—तूं—**एतत्**—हें मीं सांगितलेलें,—**एकाग्रेण चेतसा**—एकाग्र चित्तानें—**श्रुतं कच्चित्**—ऐकलेंस का ?—**धनंजय**—हे धनंजया !—**ते**—तुझा,—**अज्ञानसंमोहः**—अज्ञानामुळे झालेला अविवेक—**प्रनष्टः कच्चित्**—सर्वथा नाहींसा झाला का ? ७२.

**शिष्यस्य शास्त्रार्थग्रहणाग्रहणविवेकबुभुत्सया पृच्छति । तदग्रहणे ज्ञाते पुनर्ग्राहयिष्याम्युपायान्तरेणापीति प्रष्टुरभिप्रायः । यत्नान्तरमास्थाय शिष्यः कृतार्थः कर्तव्य इत्याचार्यधर्मः प्रदर्शितो भवति— कच्चित्किमेतन्मयोक्तं श्रुतं श्रवणेनावधारितं पार्थ किं त्वयैकाग्रेण चेतसा चित्तेन किं वा प्रमादितम् । कच्चिदज्ञानसंमोहोऽज्ञाननिमित्तः संमोहो विचित्तभावोऽविवेकता स्वाभाविकः किं प्रनष्टः । यदर्थोऽयं शास्त्रश्रवणायासस्तव मम चोपदेष्टृत्वायासः प्रवृत्तस्ते तव धनंजय ॥ ७२ ॥**

**भाष्यार्थ**—( शिष्याच्या मनांत अज्ञान, संशय, विपर्यास जोंवर आहेत तोंवर आचार्यांनीं त्यास उपदेश करावा, हें सुचविण्यासाठीं भगवान् अर्जुनास प्रश्न करीत आहेत-)—**शिष्यस्य शास्त्रार्थग्रहणाग्रहणविवेकबुभुत्सया पृच्छति**—

शिष्याला शास्त्रार्थाचें ग्रहण करितां आलें कीं नाहीं, त्यानें शास्त्रार्थग्रहण केलें कीं अजून शास्त्रार्थग्रहण केलें नाहीं, याचा विवेक करण्यासाठीं हें जाणण्याच्या इच्छेनें भगवान् प्रश्न करितात—**तद्ग्रहणे ज्ञाते पुनः उपायान्तरेण आपि ग्राहयिष्यामि इति प्रष्टुः अभिप्रायः**—त्याचे अग्रहण ज्ञात झालें, म्ह० त्यानें शास्त्रार्थाचें ग्रहण केलेलें नाहीं, असें दिसलें तर पुनः दुसऱ्या उपायानेंहि मी त्याच्याकडून शास्त्रार्थाचें ग्रहण करवीन, असा प्रश्न कर्त्याचा-भगवानांचा अभिप्राय-आशय आहे.—**यत्नान्तरं आस्थाय शिष्यः कृतार्थः कर्तव्यः इति आचार्यधर्मः प्रदर्शितः भवति**—एका उपायाने शिष्य कृतार्थ न झाल्यास दुसऱ्या प्रकारें यत्न आरंभून-दुसऱ्या यत्नाचा आश्रय करून शिष्याला कृतार्थ करावें, असा हा आचार्याचा धर्म या प्रश्नाने प्रदर्शित होतो.—**पार्थ कच्चित्-किं**—वा अर्जुना, काय सांग बरें!—**मया उक्तं एतत् त्वया एकाग्रेण चेतसा-चित्तेन श्रुतं-श्रवणेन अवधारितं किं**—मीं सांगितलेलें हें सर्व तूं एकाग्र चित्तानें-सावधान मनाने ऐकलेंस का? माझा उपदेश ऐकून तूं त्याचा अर्थ बरोबर समजलास का?—**किं वा प्रमादितं**—कीं माझ्या उपदेशाकडे दुर्लक्ष केलेंस!—**अज्ञानसंमोहः-अज्ञाननिमित्तः स्वाभाविकः संमोहः-विचित्तभावः अविवेकता प्रनष्टः कच्चित्-किं**—अज्ञानसंमोह-अज्ञान या निमित्तानें झालेला स्वाभाविक संमोह-विचित्तभाव-अविवेकत्व सर्वथा नष्ट झाला का?-तुझा मोह-अविवेक गेला का?—**यदर्थः अयं तव शास्त्रश्रवणायासः मम च उपदेष्टृत्वायासः प्रवृत्तः**—ज्या मोहाचा नाश होण्यासाठीं हा तुझा शास्त्रश्रवण करण्याचा सर्व आयास व माझा उपदेश करण्याचा आयास प्रवृत्त झाला-ज्या मोहासाठीं तूं शास्त्रश्रवण करावयास व मी त्याचा उपदेश करावयास प्रवृत्त झालों तो—**ते-तव**—( मोहः प्रनष्टः कच्चित् )—**हे धनंजय**—हे धनंजया ( तो ) तुझा मोह प्रनष्ट झाला काय? असा संबंध. ७२

**अर्जुन उवाच**—अर्जुन म्हणाला—

**नष्टो मोहः स्मृतिर्लब्धा त्वत्प्रसादान्मयाच्युत ।**
**स्थितोऽस्मि गतसंदेहः करिष्ये वचनं तव ॥ ७३ ॥**

**अन्वयार्थ—अच्युत**—हे श्रीकृष्णा!—**मोहः नष्टः**—माझा मोह पार नाहींसा झाला.—**त्वत्प्रसादात्**—तुझ्या कृपेमुळें,—**मया**—मीं—**स्मृतिः**—आत्मतत्त्वाविषयींची आठवण—**लब्धा**—मिळविली.—**गतसंदेहः स्थितः अस्मि**—मी सर्व संदेहांनीं रहित होऊन आतां राहिलों आहें.—**तव वचनं करिष्ये**—तुझें म्हणणें मी मानीन म्ह० तुझ्या म्हणण्याप्रमाणें मी वागेन. ७३.

**नष्टो मोहोऽज्ञानजः समस्तसंसारानर्थहेतुः सागर इव दुस्तरः । स्मृतिश्चाऽऽत्मतत्त्वविषया लब्धा । यस्या लाभात्सर्वग्रन्थीनां विप्रमोक्षः । त्वत्प्रसादात्तव प्रसादान्मया त्वत्प्रसादमाश्रितेनाच्युत । अनेन मोहनाशप्रश्नप्रतिवचनेन सर्वशास्त्रार्थज्ञानफलमेतत्-**

**यदेवेति निश्चितं दर्शितं भवति यदुताज्ञानसंमोहनाश आत्मस्मृतिलाभश्चेति । तथा च श्रुतावनात्मविच्छोचामीत्युपन्यस्याऽऽत्मज्ञाने सर्वग्रन्थिविप्रमोक्ष उक्तः । भिद्यते हृदयग्रन्थिस्तत्र को मोहः कः शोक एकत्वमनुपश्यत इति च मन्त्रवर्णः । अथेदानीं त्वच्छासने स्थितोऽस्मि गतसंदेहो मुक्तसंशयः करिष्ये वचनं तवाहं त्वत्प्रसादात्कृतार्थो न मम कर्तव्यमस्तीत्यभिप्रायः ॥ ७३ ॥**

**भाष्यार्थ**—( याप्रमाणे भगवानांनीं ज्याला मोठ्या प्रेमानें आत्मज्ञानाचा उपदेश केला आहे व त्यामुळें ज्याचें अज्ञान, संशय व विपर्याय नष्ट झाले आहेत, असा अर्जुन भगवदनुग्रह झाल्याचें सांगून भगवानांना संतुष्ट करीत होत्साता म्हणतो–)—**मोहः -अज्ञानजः समस्तसंसारानर्थहेतुः सागरः इव दुस्तरः नष्टः**—मोह-अज्ञानापासून उद्भवलेला संसारांतील सर्व अनर्थांचा हेतु व सागरासारखा दुस्तर, असा अविवेक नष्ट झाला.—**स्मृतिः च आत्मतत्त्वविषया लब्धा**—आणि आत्मतत्त्वाविषयींची स्मृति मला प्राप्त झाली.—**यस्याः लाभात् सर्वग्रन्थीनां विप्रमोक्षः**—ज्या स्मृतीच्या लाभामुळे सर्व कामादि ग्रंथींचा सर्वथा नाश होतो ( ती आत्मतत्त्वाविषयींची स्मृति मला झाली. मोह नष्ट होऊन आत्मस्मृति होण्याचें असाधारण कारण–)—**त्वत्प्रसादात्-तवप्रसादात्-हे अच्युत,त्वत्प्रसादं आश्रितेन मया**—तुझ्या प्रसादामुळें–तुझ्या अनुग्रहानें हे अच्युता, तुझ्या प्रसादाचा आश्रय केलेल्या मीं आत्मस्मृति मिळविली. ( या प्रश्न-प्रतिवचनांवरून कोणता अर्थ निष्पन्न होतो, तें सांगतात–) —**अनेन मोहनाशप्रश्नप्रतिवचनेन**—या मोहाच्या नाशाविषयींचा हा प्रश्न व प्रतिवचन यांच्या योगानें–या मोहनाशविषयक प्रश्नप्रतिवचनानें—**सर्वशास्त्रार्थज्ञानफलं एतावत् एव इति निश्चितं दर्शितं भवति**—सर्वशास्त्रार्थज्ञानाचे फल हें एवढेंच आहे,असे निश्चित दाखविले आहे असे होते.(एवढेंच म्ह० किती ? उत्तर–)—**यत् उत अज्ञानसंमोहनाशः आत्मस्मृतिलाभः च इति**—कीं जें, अज्ञानजन्य संमोहाचा अज्ञानासह नाश व आत्मस्मृतीचा लाभ हे (सर्व शास्त्रार्थज्ञानाचें फल आहे. वर आत्मस्मृति झाली असतां सर्व हृदयग्रन्थींचा सर्वथा अभाव होतो, असे जें म्हटलें आहे त्याविषयीं प्रमाण–)—**तथा च श्रुतौ**—तसेंच छान्दोग्यश्रुतीमध्यें—**अनात्मविद् शोचामि इति उपन्यस्य**—मी आत्म्याला न जाणणारा (नारद) शोक करीत आहें, असा उपक्रम करून—**आत्मज्ञाने सर्वग्रंथिविप्रमोक्षः उक्तः**—आत्मज्ञान झालें असतां सर्व ग्रंथींचा सर्वथा मोक्ष सांगितला आहे. ( छां. भा. अ. ७.१.३ पृ. ५१७ अ. ७.२६.२ पृ. ५७२) —'**भिद्यते हृदयग्रंथिः**'—हृदयग्रंथि तुटते ( मुं भा. २.२.८ पृ. ७९ )—'**तत्र को मोहः कः शोक एकत्वं अनुपश्यतः**—तेव्हां त्या एकत्व पाहणाऱ्या विद्वानाला मोह कशाचा व शोक कशाचा ? ( ईश. भा. ७ पृ. २२ )—**इति च मन्त्रवर्णः** —असा मंत्रवर्ण आहे. ( भगवानांच्या अनुग्रहाने अज्ञानकृत मोह नष्ट होऊन आत्मज्ञान झाले असतां आतां मी केवळ तुझ्या आज्ञेची प्रतीक्षा करीत आहें, अशा आशयाच्या उत्तरार्धांचें व्याख्यान–)—**अथ इदानीं त्वच्छासने स्थितः अस्मि**—

आतां यावेळीं मी तुझ्या आज्ञेमध्यें स्थित आहें—**गतसंदेहः-मुक्तसंशयः**—मी आतां गतसंदेह-संदेहरहित-संशयापासून मुक्त झालों आहें—**अहं तव वचनं करिष्ये**—मी तुझें वचन करीन. (तुझें वचन करीन याचें तात्पर्य-)—**त्वत्प्रसादात् कृतार्थः मम कर्तव्यं न अस्ति इति अभिप्रायः**—तुझ्या प्रसादानें मी कृतार्थ झालों आहें. माझें कर्तव्य कांहीं उरलेले नाहीं, असा याचा आशय. ७३.

**संजय उवाच**—संजय म्हणाला—

**इत्यहं वासुदेवस्य पार्थस्य च महात्मनः ।**
**संवादमिममश्रौषमद्भुतं रोमहर्षणम् ॥७४॥**

**अन्वयार्थ—इति**—याप्रमाणें—**अहं**—मी—**वासुदेवस्य**—वासुदेवाच्या—**च** आणि—**महात्मनः पार्थस्य**—महात्म्या अर्जुनाच्या—**इमं अद्भुतं रोमहर्षणं संवादं**—या आश्चर्यकारक अंगावर रोमांच उभे करणाऱ्या संवादाला—**अश्रौषम्**—ऐकलें. ७४.

**परिसमाप्तः शास्त्रार्थोऽथेदानीं कथासंबन्धप्रदर्शनार्थम्—इत्येवमहं वासुदेवस्य पार्थस्य च महात्मनः संवादमिमं यथोक्तमश्रौषं श्रुतवानस्मि अद्भुतमत्यन्तविस्मयकरं रोमहर्षणं रोमाञ्चकरम् ॥ ७४ ॥**

**भाष्यार्थ—शास्त्रार्थः परिसमाप्तः**—शास्त्रार्थ सर्वतः समाप्त झाला.—**अथ इदानीं कथासंबन्धप्रदर्शनार्थं** (संजय उवाच-) आतां यापुढे कथेचा संबंध प्रद-

---

१रहस्यकार म्हणतात"गीताधर्मांतहि संसार सोडण्यास सांगितलें आहे अशी ज्यांची सांप्रदायिक समजूत आहे त्यांनी ७३व्या श्लोकाची बरीच निराधार ओढाताण केली आहे. " ओढाताण केली आहे की काय, तें भाष्यावरूनच ठरवावें. आम्हीं म्हणतो कीं रहस्यकारांनीच ओढाताण केली आहे."–'धर्मसमूढचेताः'म्ह० धर्म-कर्तव्य माझ्या मनाला कळत नाहीसें झालें" हें म्हणणें खोटें आहे. तथापि त्याचें उत्तर अर्जुनानें 'नष्टो मोहः' या शब्दांनी दिलें आहे. तेव्हां 'स्मृतिः लब्धा' ही स्मृति कशाची ? रहस्यकार म्हणतात-" त्याच कर्तव्य धर्माची आतां त्याला स्मृति झाली" (म्हणजे तो कर्तव्यधर्म विसरला होता की काय? मोह म्ह० विस्मरण नव्हे. तर मोह म्ह० अविवेक. अर्थात् स्मृतीचा विषय सांगणें भाग आहे व तोच आचार्यांनीं उपनिषदांच्या आधारें सांगितला आहे.पुनः ते म्हणतात-)"अर्जुनाला युद्धास प्रवृत्त करण्यासाठीं गीता उपदेशिली असून जागोजाग "म्हणून तूं युद्ध कर" (गी. २. १८, २. ३७, ३. ३०, ८. ७, ११. ३४) असें सांगितलें असल्यामुळें "तुमच्या म्हणण्याप्रमाणें करितों" याचा अर्थ युद्ध करितों असाच होतो. " (हें म्हणणें अयोग्य आहे. गीता युद्धासाठीं सांगितलेली नाहीं. स्वधर्मानुष्ठानपूर्वक चित्तशुद्धीच्या द्वारा ज्ञान संपादन करून मुक्ति मिळविण्यासाठीं उपदेशिली आहे. यास्तव 'करिष्ये वचनं तव' याचा अर्थ 'युद्ध करितों' असा होऊं शकत नाहीं.या श्लोकांत अर्जुनानें आपली कृतकृत्यता व्यक्त केली आहे. कृतकृत्य झाल्यावर कर्तव्य उरत नाहीं. म्हणून आचार्य करितात तोच अर्थ सयुक्तिक होय.)

शित करण्यासाठीं संजय म्हणाला—**इति एवं वासुदेवस्य च महात्मनः पार्थस्य इमं यथोक्तं अद्भुतं-अत्यंतविस्मयकरं रोमहर्षणं-रोमांचकरं संवादं अहं अश्रौषं-श्रुतवान् अस्मि**—हें अशाप्रकारें वासुदेव व महात्मा-अक्षुद्रबुद्धि -सर्व अधिकारिगुणांनीं संपन्न असा अर्जुन, या दोघांच्या या वर सांगितलेल्या प्रकारच्या अद्भुत-अत्यंत विस्मयकर व रोमहर्षण-अंगावर रोमांच उभे करणाऱ्या संवादास मीं ऐकलें-त्या दोघांच्या या संवादास मीं श्रवण केलें. ७४.

**व्यासप्रसादाच्छ्रुतवानेतं गुह्यमहं परम् ।**

**योगं योगेश्वरात्कृष्णात्साक्षात्कथयतः स्वयम् ॥ ७५**

**अन्वयार्थ—अहं**—मी—**एतं परं गुह्यं योगं**—या अत्यंत गुह्य योगाला—**व्यासप्रसादात्**—भगवान् व्यासांच्या कृपेनें—**कथयतः योगेश्वरात् कृष्णात्**—तो सांगत असलेल्या योगेश्वर कृष्णाच्या तोंडून—**स्वयं साक्षात्**—स्वतः आपल्या कानांनीं—**श्रुतवान्**—ऐकिलें. ७५.

**तं चेमम्— व्यासप्रसादात्ततो दिव्यचक्षुर्लाभाच्छ्रुतवानेतं संवादं गुह्यमहं परं योगं योगार्थत्वात्संवादमिमं योगमेव वा योगेश्वरात्कृष्णात्साक्षात्कथयतः स्वयं न परम्परातः॥**

**भाष्यार्थ**—( हा सर्वोत्तम संवाद तूं कसा ऐकलास ? असें कोणी म्हणेल म्हणून संजय सांगतो- )—**तं च इमं**—त्या या संवादाला ( मीं व्यासांच्या अनुग्रहानें ऐकलें असा पुढें संबंध )—**व्यासप्रसादात्-ततः दिव्यचक्षुर्लाभात्**—व्यासांच्या प्रसादानें म्ह० त्यांच्यापासून दिव्यदृष्टीचा लाभ झाल्यामुळें—**एतं गुह्यं संवादं-परं योगं अहं श्रुतवान्**—या गुह्य संवादाला-परम योगाला मीं ऐकलें ( परम पुरुषार्थोपयोगी असल्यामुळें या योगाला ' परम ' हें विशेषण दिलें आहे. गुह्य म्ह० अत्यंत रहस्य. योग म्ह० ज्ञान किंवा कर्म, त्यासाठीं हा संवाद असल्यामुळें यालाहि ' योग ' असें म्हटलें आहे. किंवा चित्तवृत्तिनिरोधरूप योगाचें अंगत्व या संवादाला असल्यामुळें त्याला ' योग ' असें म्हटलें आहे, असें आचार्य सांगतात- )—**योगार्थत्वात् इमं संवादं, योगं एव वा**—योगासाठीं हा संवाद असल्यामुळें याला योग असें म्हटलें आहे. किंवा चित्तनिरोधरूपयोगाचें अंग असल्यामुळें हा योग अशा त्या योगाला—**योगेश्वरात् कृष्णात् स्वयं कथयतः साक्षात् ( श्रुतवान् ) न परंपरातः**—योग्यांचा ईश्वर जो कृष्ण तो स्वतः आपल्या परमेश्वरसंबंधी स्वरूपानें सांगत असतांना मीं प्रत्यक्ष आपल्या कानांनी ऐकलें-परंपरेनें-कर्णोपकर्णी नव्हे. ( भगवान् आपल्या नित्य ज्ञानैश्वर्यादिसंपन्नरूपानें सांगत असतांना त्यांच्या तोंडून मीं हा योग श्रवण केला ) ७५.

**राजन्संस्मृत्य संस्मृत्य संवादमिममद्भुतम् ।**

**केशवार्जुनयोः पुण्यं हृष्यामि च मुहुर्मुहुः ॥ ७६ ॥**

**अन्वयार्थ—राजन्**—हे राजा धृतराष्ट्रा—**केशवार्जुनयोः**—कृष्ण व अर्जुन यांच्या—**इमं अद्भुतं पुण्यं संवादं**—या अद्भुत व पुण्यप्रद संवादाला,—**संस्मृत्य संस्मृत्य च**—पुनः पुनः आठवून—**मुहुः मुहुः**—मी पुनः पुनः—**हृष्यामि** आनंदित होतों. ७६.

**हे राजन्धृतराष्ट्र संस्मृत्य संस्मृत्य संवादमिममद्भुतं केशवार्जुनयोः पुण्यं श्रवणादपि पापहरं श्रुत्वा हृष्यामि च मुहुर्मुहुः प्रतिक्षणम् ॥ ७६ ॥**

**भाष्यार्थ—हे राजन् धृतराष्ट्र**—हे महाराजा धृतराष्ट्रा—**केशवार्जुनयोः पुण्यं-श्रवणाद्-अपि पापहरं इमं अद्भुतं संवादं श्रुत्वा संस्मृत्य संस्मृत्य मुहुर्मुहुः-प्रतिक्षणं हृष्यामि**—केशव व अर्जुन यांच्या या पुण्य-श्रवणानेहि पाप हरण करणाऱ्या अद्भुत संवादाला ऐकून व पुनः पुनः त्याचें स्मरण करून वारंवार-प्रतिक्षणीं मी हृष्ट-संतुष्ट होत आहें. ७६.

**तच्च संस्मृत्य संस्मृत्य रूपमत्यद्भुतं हरेः ।**
**विस्मयो मे महान् राजन् हृष्यामि च पुनः पुनः**

**अन्वयार्थ—च**—आणि—**हे राजन्**—हे धृतराष्ट्रा !—**तत् हरेः अत्यद्भुतं रूपं**—तें हरीचें अतिशय अद्भुत रूप—**संस्मृत्य संस्मृत्य**—पुनः पुनः आठवून—**मे महान् विस्मयः**—मला मोठा विस्मय वाटतो.—**च पुनः पुनः हृष्यामि**—आणि वारंवार मी हृष्ट होतों. ७७.

**तच्च संस्मृत्य संस्मृत्य रूपमत्यद्भुतं हरेर्विश्वरूपं विस्मयो मे महान्हे राजन्हृष्यामि च पुनः पुनः ॥**

**भाष्यार्थ**—( आतां भगवानांनीं अर्जुनाला ध्यानासाठीं जें आपले सगुण विश्वरूप दाखविलें त्याची संजय स्तुति करतो-)—**तत् च हरेः अद्भुतं विश्वरूपं रूपं संस्मृत्य संस्मृत्य हे राजन् मे महान् विस्मयः च पुनः पुनः हृष्यामि**—आणि तें हरीचें अत्यद्भुत विश्वरूप स्वरूप पुनः पुनः आठवून हे राजा, मला मोठा विस्मय वाटतो व मी पुनः पुनः आनंदित होतों. ७७

**यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः ।**
**तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवा नीतिर्मतिर्मम ॥ ७८ ॥**

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे मोक्षसंन्यासयोगो नाम अष्टादशोऽध्यायः ॥ १८ ॥**

**अन्वयार्थ—यत्र**—ज्या पक्षामध्यें—**योगेश्वरः कृष्णः**—योगेश्वर कृष्ण आहे —**च**—व—**यत्र**—ज्या पक्षामध्यें—**धनुर्धरः पार्थः**—धनुर्धर पार्थ आहे—**तत्र**—तेथें-त्या पक्षामध्ये—**श्रीः**—संपत्ति—**विजयः**—विजय—**भूतिः**—ऐश्वर्य—**च**—आणि—**ध्रुवा नीतिः**—नित्य न्याय आहेत—**इति मम मतिः**—अशी माझी दृढ भावना आहे. ७८.

**किं बहुना— यत्र यस्मिन्पक्षे योगेश्वरः सर्वयोगानामीश्वरस्तत्प्रभवत्वात्सर्वयोगबीजश्च कृष्णो यत्र पार्थो यस्मिन्पक्षे धनुर्धरो गाण्डीवधन्वा तत्र श्रीस्तस्मिन्पाण्डवानां पक्षे विजयस्तत्रैव भूतिः श्रियो विशेषो विस्तारो भूतिर्ध्रुवाऽव्यभिचारिणी नीतिर्नय इत्येवं मतिर्ममेति ॥ ७८ ॥**

इति श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यगोविंदभगवत्पूज्यपादशिष्यश्रीमच्छंकरभगवतः कृतौ श्रीभगवद्गीताभाष्ये मोक्षसंन्यासयोगो नाम अष्टादशोऽध्यायः ॥ १८ ॥

**भाष्यार्थ**—( नर-नारायणरूप कृष्ण व अर्जुन यांच्या संवादाला प्रामाण्य आहे हें सुचविण्यासाठी त्यांचा परम उत्कर्ष संजय सुचवितो-)—**किंबहुना यत्र-यस्मिन् पक्षे योगेश्वरः-सर्वयोगानां ईश्वरः**—फार काय सांगू, पण ज्या पक्षामध्यें योगेश्वर–सर्वयोग्यांचा ईश्वर ( भगवान् सर्वयोग्यांचा ईश्वर कसा तें आचार्य सांगतात-) —**तत् प्रभत्वात् च सर्वयोगबीजः**—योगांच्या उत्पत्तीचें कारण असल्यामुळें योगेश्वर व ज्ञान आणि कर्म हाच सर्वयोग, शास्त्रीय ज्ञान-वैराग्यादि हें त्याचें बीज, तें भगवानाच्या अधीन असतें, त्यामुळें ज्याच्यावर भगवदनुग्रह झालेला नाहीं, त्याला तें प्राप्त होत नाहीं. अर्थात् योग व त्याचें फल हीं दोन्हीं भगवदनुग्रहाधीन असल्यामुळें भगवानाला योगेश्वरत्व आहे.—**कृष्णः**—असा योगेश्वर कृष्ण ज्या पक्षामध्यें आहे—**यत्र-यस्मिन् पक्षे धनुर्धरः-गाण्डीवधन्वा पार्थः**—व ज्या पक्षामध्यें धनुर्धर–गाण्डीव धनुष्य धारण करणारा–गाण्डीव हेच ज्याचें धनुष्य आहे असा पार्थ—**तत्र श्रीः**—त्या पक्षांत लक्ष्मी,—**तस्मिन् पाण्डवानां पक्षे विजयः**— त्या पांडवांच्या पक्षामध्येंच विजय म्ह० परम उत्कर्ष—**तत्र एव भूतिः**—त्याच पक्षामध्यें भूति—**श्रियः विशेषः विस्तारः भूतिः**—श्रीचा विशेष विस्तार हीच भूति होय.—**ध्रुवा-अव्यभिचारिणी नीतिः-नयः**—व ध्रुव–कधींहि व्यभिचार न पावणारी–नित्य नीति–न्याय राहतो.—**इति एवं मम मतिः**—ही अशा प्रकारची माझी मति–माझा निश्चय आहे. [ या वाक्यानें संजयाने धृतराष्ट्राची विजयाशा पार घालवून पांडवांना निश्चयाने जय मिळणार असे सुचविलें. ]—**इति**—उपाय-उपेय-भावानें सांगितलेल्या द्विविध निष्ठेची स्थापना केलेली असल्यामुळें कर्मनिष्ठा परंपरेनें म्ह० चित्तशुद्धीच्या द्वारा ज्ञाननिष्ठेला कारण होते, आणि ज्ञाननिष्ठा साक्षात् मोक्षाला कारण होते, या शास्त्रार्थाचा उपसंहार करण्यासाठीं भाष्यांत शेवटीं ' इति ' हा शब्द योजिला आहे. ७८.

इति भगवान् श्रीकृष्णांनी गायलेल्या उपनिषदांतील–रहस्यविद्येतील ब्रह्मविद्येपैकीं योग–उपाय-शास्त्रांतील मोक्षसंन्यासयोगनांवाचा अठरावा अध्याय विष्णुशर्मकृत सान्वयार्थ-सटीप-भाष्य-भाष्यार्थासह समाप्त झाला.

**इति ज्ञानाख्यं तृतीयषट्कम् ।**

**श्रीकृष्णार्पणमस्तु.**